# भारतामृत

संपादक

विद्याविनोद

भाग-2

सदाशिव पेठ, पूना सिटी

# अनुक्रमणिका.

## ६ भीष्मपर्व.



पर्व.



## ८ कर्णपर्व.

## ९ शल्यपर्व.



## शल्यपर्वांतर्गत गदापर्व.



## १० सौप्तिकपर्व.



## सौप्तिकपर्वांतर्गत ऐषीकपर्व.



## ११ स्त्रीपर्व.



## १२ शांतिपर्व.

### राजधर्म.

र्थ
नाही होत न-
र्णि आपल्याशीं एक-
मीला जो तुडवितो तो ध-
टाकतो. विपत्तीमध्यें सांपड-
र्ण सामर्थ्य असून कालाच्या प्रे-
णीला जाऊन आपल्या कुलाच्या व
शाला तूं कारणीभूत होत आहेस. रा-
पानें हा अनर्थच तुझ्यापुढें वाढून
आला आहे. तुझा धर्मलोप फार होऊं लागला आहे.
मुलांना न्यायाची वाट दाखीव. ज्यानें पाप पदरीं प-
डतें असें राज्य तुला काय करावयाचें आहे ? नांव,

त्यांना शत्रू
त्साहयुक्त भाषण
कोमेजत नाहींत ते हा
वारा अनुकूल वहात असतो; तसेंच ढग व पक्षी अ-
नुकूल दिशेनें जात असतात. इंद्रधनुष्ययुक्त मेघ
अनुकूल असाच वर्षाव करीत असतात. हीं जयाचीं
लक्षणें असून नाश होऊं घातलेल्यांना यांच्या उलट
लक्षणें होत असतात. सैन्यांत एकानें घाबरून पळ
काढला कीं सेना प्रचंड असली तरी तो तिला घा-
बरवून सोडतो व सेना अशी घाबरली म्हणजे ति-
च्यांतील मोठमोठे शूर योद्धेही घाबरतात. याप्रमाणें
एकदां मोठ्या सैन्याची दाणादाण उडाली म्हणजे

---

## १२ शांत

### राजधर्म.

करणार' असें सांगत आहेत. कैलास, मंदार व हिमाचल यांवर हजारों मोठमोठे शब्द निघत असून त्यांचीं शिखरें धडाधड खालीं कोसळत आहेत. भूकंपानें फुगून चार समुद्रांपैकीं प्रत्येक आपआपल्या मर्यादा सोडीत आहेत. गांवांत व नगरांत झाडें व ग्रामवृक्ष विजेचा प्रहार होऊन अथवा झंजावातांनीं मोडून पडत आहेत. ब्राह्मणांनीं हवि दिलेल्या अग्नीवर निळा, लाल, पिंवळा असे रंग दिसत आहेत, त्याच्या ज्वाळा डावीकडे पसरत आहेत, व त्यापासून वाईट गंध निघत असून भयंकर शब्दही निघत आहेत. स्पर्श, गंध, व रस यांचें स्वरूप बदललें आहे. निशाणें वरचेवर हालत असून त्यांमधून धूर निघत आहे. नौबती व संबळा यांतून विस्तव बाहेर पडत आहे. खोडसाळ हत्तींना कांपरें सुटलें असून ते गडबडून मलमूत्र टाकीत आहेत. त्याचप्रमाणें सर्व घोडे दीन झाले आहेत व हत्ती पाण्याकडे धांव घेत आहेत. हें सर्व लक्षांत घेऊन या समयीं ज्यानें सर्व जगाचा फडशा पडणार नाहीं अशा तऱ्हेनें तुला उचित वाटेल त्याप्रमाणें तूं वाग.' हें वडिलांचें भाषण ऐकून धृतराष्ट्र ह्मणाला, 'सर्व जनांचा क्षय होणार, हा पूर्वनियमानियमच मला वाटतो. परंतु राजे जर युद्धांत क्षात्रधर्मानें एकमेकांना मारून देह ठेवितील तर त्यांना येथें कीर्ति व वीरलोकीं मोठें सुख मिळणार आहे.' हें ऐकून क्षणभर ध्यानस्थ होऊन व्यास ह्मणाले, 'राजा, वास्तविक कालच जगाचा क्षय करतो व तोच तें निर्माण करतो. येथें शाश्वत असें कांहींच नाहीं. परंतु जातिवध गौण आहे; तेव्हां मला न आवडणारी ही गोष्ट करूं नकोस. वेदांत वध पूज्य मानला नसून त्यापासून कधींही हित होत नसतें. आपल्या शरीराप्रमाणें आपल्याशीं एकजीव झालेल्या कुलधर्माला जो तुडवितो तो धर्मही त्याला तुडवून टाकतो. विपत्तीमध्यें सांपडलेल्या मनुष्याप्रमाणें सामर्थ्य असून कालाच्या प्रेरणेनें आडमार्गाला जाऊन आपल्या कुलाच्या व राजांच्या नाशाला तूं कारणीभूत होत आहेस. राज्यतृष्णारूपानें हा अनर्थच तुझ्यापुढें वाढून आला आहे. तुझा धर्मलोप फार होऊं लागला आहे. मुलांना न्यायाची वाट दाखीव. ज्यानें पाप पदरीं पडतें असें राज्य तुला काय करावयाचें आहे ? नांव, धर्म व कीर्ति यांचें संरक्षण करशील तर तुला स्वर्ग मिळेल. पांडवांना राज्य देऊन कौरवांना त्यांच्याशीं सख्य करूं दे.' असें व्यास बोलत असतां धृतराष्ट्र मध्येंच ह्मणाला; 'आपल्याला जसें कळतें तसेंच मलाही कळतें. स्थिति व विनाश हे पूर्णपणें मला कळून चुकले आहेत. परंतु स्वार्थाची गोष्ट आली म्हणजे लोकांना भुरळ पडत असते व मीही कांहीं जगाबाहेरचा नाहीं. आपलें सामर्थ्य अतुल आहे. आपल्याला मी हात जोडतों. आपण सूज्ञ आहां. आपणच आह्मांला वाट दाखविली पाहिजे. माझे मुलगे माझ्या ताब्यांत नाहींत; अन्याय करावा असें माझें मन कांहीं मला सांगत नाहीं. भारतांची धर्माकडे प्रवृत्ति वळवून त्यांचें नांव व कीर्ति संभाळणार आपणच असून कौरव पांडवांचे पूज्य वडील आपण आहां. असो. आतां जयप्राप्तीचीं लक्षणें कोणतीं तीं ऐकण्याची माझी इच्छा आहे.' व्यास ह्मणाले; अग्नीच्या ठिकाणीं धूर बिलकूल दिसून न येतां त्याचें तेज स्वच्छ असतें; त्याच्या ज्वाळा थेट वर जाऊन उजव्या बाजूला पसरतात. व त्यांत दिलेल्या आहुतींचा पुण्यगंध बाहेर पडतो. शंख व मृदंग हे गंभीर असा मोठा नाद देतात. सूर्यचंद्रांचीं किरणें निर्मल असतात. बसलेले किंवा उडणारे कावळे अनुकूल शब्द करितात. तसेंच गिधाडें, राजहंस, करकुंचे सुतार हे अनुकूल शब्द करीत उजवीकडे फिरक्या घालीत असतात. अलंकार, चिलखतें, ध्वज, श्रुतिमनोहर घोड्यांचें खेंकाळणें इत्यादिकांनीं चक्क करून सोडणाऱ्या ज्यांच्या सैन्यावर दृष्टि ठरत नाहीं त्यांना शत्रूंवर जय मिळत असतो. जेथें योध्यांचें उत्साहयुक्त भाषण व जोम दिसून येतो व ज्यांच्या माळा कोमेजत नाहींत ते हा रणसागर तरून जातात. वारा अनुकूल वहात असतो; तसेंच ढग व पक्षी अनुकूल दिशेनें जात असतात. इंद्रधनुष्ययुक्त मेघ अनुकूल असाच वर्षाव करीत असतात. हीं जयाचीं लक्षणें असून नाश होऊं घातलेल्यांना यांच्या उलट लक्षणें होत असतात. सैन्यांत एकानें घाबरून पळ काढला कीं सेना प्रचंड असली तरी तो तिला घाबरवून सोडतो व सेना अशी घाबरली म्हणजे तिच्यांतील मोठमोठे शूर योद्धेही घाबरतात. याप्रमाणें एकदां मोठ्या सैन्याची दाणादाण उडाली ह्मणजे

पाण्याच्या मोठ्या ओघाप्रमाणें किंवा भ्यालेल्या पशूच्या कळपाप्रमाणें तिला आवरतां येणें कठिण व भीतीनें दाणादाण उडालेली पाहून मोठी भीति उत्पन्न होते. सैन्याचा एकदां मोड झाला ह्मणजे सैन्य दशदिशांना पळूं लागतें; मग मोठ्या शूरांनाही त्याला थांबवितां येत नाहीं. म्हणून मोठ्या चतुरंग सेनेची चांगली व्यवस्था ठेवून व स्वतः नेहमीं दक्ष राहून उपायांनीं प्रथम यत्न करावा. सामादि उपायांनीं जय मिळविणें सर्वांत श्रेष्ठ मानलें असून फुटीनें तो मिळविणें मध्यम समजलें आहे आणि युद्धानें जय मिळविणें हें तर सर्वांत कमी समजलें आहे. दोघांच्या युद्धांत अनेक दोष आहेत; त्यांत पहिला नाश हा होय. एकमेकांना न ओळखणारे, आनंदवृत्तीचे, बायकापोरांचा ओढा नसलेले, दृढनिश्चयी, असे पन्नास शूर असले तरी ते मोठ्या सैन्याचा चुराडा उडवूं शकतात. कधीं माघार न घेणारे असे पांच, सहा, किंवा सात लोकसुद्धां जय मिळवितात. मोठ्या सैन्याचा फडशा पाडण्याला आपण एकटेच समर्थ आहों हें जाणून गरुडाची कांहीं मोठ्या सैन्यावर मोठीशी मदार नाहीं. तेव्हां पुष्कळ सैन्य असल्यानें जय मिळतोच असें खात्रीनें सांगतां येत नाहीं. जय हा अनिश्चित असून याठिकाणीं दैवावरच मोठी भिस्त आहे; जय ज्यांना मिळतो तेच कृतकृत्य होतात.' असें ह्मणून व्यास निघून गेले व पुढें घडलेली संपूर्ण युद्धाची हकीकत संजयानें दिव्यचक्षूंच्या योगानें जशीं घडली तशी धृतराष्ट्राला सांगितली.

---

## २ जंबुद्वीपाची माहिती. [६.४–११.]

व्यास गेल्यावर क्षणभर विचार करून धृतराष्ट्रानें संजयाला विचारिलें. 'संजया, या ठिकाणीं जन्मलेले शूर राजे जिवाची सुद्धां पर्वा न करतां ह्या पृथ्वीसाठीं, तिच्यावरील वैभवासाठीं, लहान मोठ्या शस्त्रांनीं एकमेकांना मारण्याला उठले आहेत; व कोणी कोणाला हार न जातां यमपुरीला भर घालीत आहेत. तर या भूमीच्या ठिकाणींच असे कांहीं विलक्षण गुण आहेतसें मला वाटतें. तेव्हां तिच्यासंबंधानें मला सविस्तर माहिती दे.' संजय म्हणाला, ह्या जगांत सर्व भूतमात्रांचे स्थावर आणि जंगम असे मुख्य दोन भाग आहेत. जंगमांचे अंडज, स्वेदज, आणि जरा व आयुष्य यांनीं युक्त असे तीन भेद आहेत; त्यांमध्यें जरा व आयुष्य असणारे श्रेष्ठ असून त्यांमध्यें मानव व पशु श्रेष्ठ आहेत. यांमध्यें नानारूप धारण करणारे चौदा भेद वेदांत सांगितले त्यांवर यज्ञ अवलंबून आहेत. यांपैकीं गांवांत रहाणाऱ्या प्राण्यांमध्यें गाई, बकरीं, शेळ्या, मनुष्य, घोडे, खेंचरें, व गाढव या सात प्राण्यांमध्यें मनुष्य श्रेष्ठ असून सिंह, वाघ, डुकरें, रेडे, हत्ती, अस्वल व माकडें या सात अरण्यांत रहाणाऱ्यांमध्यें सिंह श्रेष्ठ आहे. सर्व भूतमात्र एकमेकांवर उपजीविका करितात. उद्भिजांना स्थावर अशी संज्ञा असून त्यांचे झाडें, झुडपीं, लता, वेली व केवळ बाहेरील साल असून खांद्या नसणारीं गवताच्या जातीचीं असे पांच भेद आहेत. याप्रमाणें स्थावरजंगमाचे एकंदर एकोणीस भेद असून पंचमहाभूतें सर्वांना सामान्य आहेत. याचचोविसांना उद्देशून लोकमान्य गायत्री प्रचारांतआली आहे. व जो ह्या सर्व गुणांनीं संपन्न अशा पवित्र गायत्रीचें खरें स्वरूप ओळखतो तो ह्या लोकांत कधीं नाश पावत नाहीं. ह्या सर्व चराचराची उत्पत्ति व नाश भूमीपासून असून भूमीच सर्व भूतांना आधारभूत व सनातन आहे. ज्याची ही भूमि त्याचेंच सर्व स्थावरजंगम ह्मणून हिच्यावर इतका लोभ धरून राजे एकमेकांना मारतात.

भूमि, उदक, वायु, अग्नि व आकाश हीं पंचमहाभूतें ह्या जगांतील सर्व वस्तूंच्या ठिकाणीं दृश्यमान असल्यानें विद्वानांना सर्व वस्तु सारख्याच भासतात. शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध हे ह्या पांचांचे गुण आहेत. भूमीच्या ठिकाणीं हे पांचही गुण आहेत. गंधव्यतिरिक्त चार गुण पाण्यांत असून शब्द, स्पर्श, रूप हे तीन तेजाचे ठिकाणीं आहेत, वायूमध्यें शब्द व स्पर्श हे दोन गुण आहेत. आकाशाच्या ठिकाणीं नुसता शब्द गुण आहे. पंचमहाभूतांवर अवलंबून असणाऱ्या सर्व भूतमात्रांत पंचमहाभूतांतील हे पांच गुण आहेत. जेव्हां हे मर्यादा सोडून एकमेकांत घुसटत नाहींत तेव्हां जिकडे तिकडे साम्य असतें. परंतु जेव्हां साम्यस्वरूप जाऊन विषमता येते तेव्हां देहधारी होऊन भोकऱ्यांच्या ठि-

काणीं हे वासना उत्पन्न करतात. भूम्यादि क्रमानें त्यांचा नाश होतो व आकाशादि क्रमानें ते जन्माला येतात. हीं सर्व अपरिमेय असून त्यांचें मुख्य स्वरूप ब्रह्म आहे. ह्या जगांत सर्व भूतमात्र या पंचमहाभूतांपासून झाले आहेत; या भूतमात्रांचें प्रमाण मानव केवळ अनुमानानें सांगत असतात; परंतु ज्या गोष्टी आपल्या कल्पनेच्याबाहेर आहेत त्या कल्पनेनें ठरविण्यांत अर्थ नाहीं. प्रकृतीच्याही जें पलीकडे आहे तें अचिंत्याचें लक्षण समजावें.

आतां मी सुदर्शन द्वीपाची माहिती देतों. हें चक्राच्या आकाराचें वाटोळें आहे. हें नद्या व दुसऱ्या जलाशयांनीं व्याप्त असून मेघासारख्या पर्वतांनीं, नाना आकारांच्या नगरांनीं, तसेंच रम्य प्रदेशांनीं भरलें आहे. त्याचप्रमाणें हें फलपुष्पसंपन्न झाडांनीं व धनधान्यांनीं समृद्ध आहे, हें चोहों बाजूंनीं लवण समुद्रानें वेढलें आहे. ज्याप्रमाणें आपली प्रतिमा आरशांत दिसतें त्याप्रमाणें (चंद्राधिष्ठित मनामध्यें) चंद्रमंडळामध्यें हें सुदर्शनद्वीप दिसतें. याच्या एका भागीं संसाररूपी पिंपळ दिसतो व दुसरीकडे शीघ्रगती ससा दिसतो. सर्व बाजूंनीं सर्व प्रकारच्या औषधिसमुदायांनीं हा वेष्टिला आहे. याशिवाय सर्व पाणी आहे. याहून शेष राहिलेलेंही याच कार्याचें अवशेष सूक्ष्मरूप जीव असून त्याहून वेगळा हा शब्दब्रह्म आहे याची माहिती विस्तारानें सांगतों ऐक. पूर्व पश्चिम समुद्राला जाऊन भिडलेले पूर्व पश्चिम पसरलेले भूमीचे भाग पाडणारे-हिमवत, हेमकूट, पर्वतश्रेष्ठ निषध, वैडूर्यांनीं भरलेला नल, व चंद्रासारखा सर्व धातूंनीं चित्रविचित्रित व अनेक शिखरांनीं संपन्न असा श्वेत हे सहा मुख्यपर्वत आहेत, यांवर सिद्ध चारण रहात असतात. यांच्यामधील देश हजारों योजनें असून त्या त्या ठिकाणीं पुण्यकारक प्रदेश आहेत. त्यांनाच वर्ष ह्मणतात व त्यांत जिकडे तिकडे नाना जातींचे लोक रहातात. आपण राहतों हें भारतवर्ष असून याच्या पलीकडे हेमवत व त्याच्या पलीकडे हरिवर्ष आहे. नीलाच्या दक्षिणेला व निषधाच्या उत्तरेला पूर्वपश्चिम पसरलेला माल्यवत पर्वत आहे व त्याच्या पलीकडे गंधमादन पर्वत आहे. ह्या दोहोंच्यामध्यें वर्तुलाकृति सोन्याचा पर्वत मेरू आहे. सकाळच्या सूर्यासारखा तो कांतिमान असून विस्तवाच्या देदीप्यमान गोळ्याप्रमाणें त्याच्यामधून धूर वगैरे कांहीं निघत नाहीं. तो चौऱ्यायशी हजार योजनें उंच असून तितकाच खोल पृथ्वींत मेला आहे. त्याच्या आजूबाजूला भद्राश्व, केतुमाल, जंबुद्वीप व पुण्यवान लोकांना आश्रयभूत उत्तर कुरु हे चार द्वीप आहेत. सूर्य याच्याभोंवतीं फिरत असतो. त्याचप्रमाणें सर्व नक्षत्रांसह चंद्र व वायु याला प्रदक्षिणा घालीत असतात. हा पर्वत दिव्य पुष्पफलांनीं संपन्न असून सोन्यानीं शृंगारलेल्या घरांनीं भरला आहे. या पर्वतावर सर्व देव, गंधर्व, असुर व राक्षस, अप्सरांना घेऊन क्रीडा करीत असतात. या ठिकाणीं ब्रह्मदेव, रुद्र, देवेंद्र एकत्र जमून नानाप्रकारचे यज्ञ करून विविध दक्षिणा देत असतात. त्याचप्रमाणें तुंबुरु, नारद, विश्वावसु, हाहा, हूहू या ठिकाणीं एकत्र जुळून नानाप्रकारच्या स्तुतींनीं देवेंद्राची स्तुति करीत असतात. तसेच महात्मे सप्तर्षी व प्रजापति कश्यप नेहमीं पर्वापर्वाला येथें जातात. येथेंच दैत्यगुरु शुक्राचार्य आपल्या दैत्यवर्गासह आनंदांत दिवस घालवितात. हीं रत्नें व हे रत्नांचे पर्वत त्यापासूनच आहेत. त्याचा चवथा हिस्सा कायतो कुबेराला भोगण्याला मिळतो व याचा सोळावा हिस्सा तो मनुष्यांना देतो. याच्या उत्तर भागाला दिव्य व रम्य कर्णिकार वनें आहेत. त्या ठिकाणीं प्रत्यक्ष भूतभावन पशुपति स्वर्गणामध्यें पायापर्यंत लोंबणारी कर्णिकाराची माळ घालून उद्यमान सूर्यासारख्या तीन डोळ्यांनीं जिकडे तिकडे प्रकाश पाडीत उमेसह क्रीडा करीत असतात. कडकडीत तप करणारे सिद्धच त्याकडे पाहूं शकतात. दुराचारी लोकांना त्याकडे पहातां येणें शक्य नाहीं. त्याच पर्वताच्या शिखरापासून चोहोंकडे पसरलेली पवित्र गंगा मेघगर्जनेप्रमाणें मोठा शब्द करीत मोठ्या वेगानें चंद्रसरोवरामध्यें येऊन पडते. तें सागरासारखें सरोवर तिच्यामुळें निर्माण झालें आहे ह्मटलें तरी चालेल. मेरूच्या पश्चिम बाजूला तेथेंच जंबूखंडांत केतुमाल म्हणून मोठा लोकवस्तीचा प्रदेश असून तेथें आयुर्मर्यादा दहा हजार वर्षें आहे. तेथें पुरुषांचा वर्ण सोन्यासारखा आहे. व बायका अप्सरेसारख्या असून रोग, शोक इत्यादि त्यांना मुळीं माहीत नाहीं, व ते नेहमीं मोठ्या उल्हासवृत्तीमध्यें

असतात. गंधमादनाच्या शिखरावर गुह्यकांचा स्वामी कुबेर राक्षसांसह अप्सरांना घेऊन क्रीडा करीत असतो. गंधमादनाच्या पृष्ठभागावर आयुर्मर्यादा अकरा हजार वर्षें आहे. या ठिकाणीं लोक तेजस्वी, बलशाली व आनंदी आहेत. नीलपर्वताच्या वरच्या बाजूला श्वेतद्वीप आहे व श्वेताच्या वरतीं हैरण्यक आहे; त्याच्या वरतीं नाना जनपदांनीं भरलेलें ऐरावत द्वीप आहे. अगदीं दक्षिणेला व अगदीं उत्तरेला असणारीं दोन वर्षें भरत व ऐरावत धनुष्याच्या आकाराचीं आहेत. श्वेत, हिरण्यक, इला, हरी, व हैमवत हीं पांच मध्यें असून त्यांमध्यें इला मधलें आहे. या साती वर्षांमध्यें उत्तर उत्तरेचीं वर्षे त्याच्याहून खालखालच्या वर्षाहून, आयुर्मर्यादा, आकार, आरोग्य, धर्म, काम व अर्थ यांमध्यें अधिकाधिक श्रेष्ठ आहेत. या वर्षांमध्यें निरनिराळे प्राणिमात्र एकत्र राहतात. याचप्रमाणें ही पृथ्वी पर्वतांनीं व्यापिली आहे. हेमकूटालाच कैलास अशी संज्ञा असून त्यावर कुबेर गुह्यकांसह आनंदांत रहात असतो. कैलासाच्या उत्तरेला उत्तम रत्नमय सुवर्णशिखरांनीं संपन्न मोठा मैनक पर्वत आहे. याच पर्वतावर मोठें दिव्य, पांढरें शुभ्र, सोन्याचें वाळवंट असलेलें रम्य बिंदुसरोवर आहे; त्यावर राजा भगीरथ गंगेला पाहून बरींच वर्षें राहिला. येथें अनेक रत्नांचे यज्ञस्तंभ असून सोन्याचे ग्रामवृक्ष आहेत. याच ठिकाणीं यज्ञ करून मोठ्या यशस्वी इंद्रानें सिद्धि मिळविली. भूतगणांनीं परिवेष्टित सनातन व जाज्वल्य भूतपति विश्वस्रष्ट्याची येथें सर्व लोक उपासना करतात. नर, नारायण, मनु, व पांचवे शंकर येथें असतात. याच ठिकाणीं ब्रह्मलोकापासून निघून प्रथम प्रकट झालेली मंदाकिनी, गंगा व भोगावती अशा तीन प्रवाहांनीं वाहणारी दिव्यगंगा पुढें वस्वौकसारा, नलिनी, पावनी, सरस्वती, जंबूनदी, सीता, गंगा व सिंधु अशा सात प्रवाहांनीं वाहूं लागते. सरस्वती मधून मधून दृश्य मधून मधून अदृश्य अशी वाहते. ह्या स्वर्गीच्या सात नद्या तिन्ही लोकांत प्रसिद्ध आहेत.

हिमवतावर राक्षस रहात असून हेमकूटावर गुह्यक राहतात. निषधावर सर्प व नाग रहात असून गोकर्ण हें तपोवन आहे. सर्व देवासुरांचें श्वेतपर्वत वसतिस्थान आहे. निषधावर गंधर्व व नीलावर ब्रह्मर्षी राहतात. शृंगवान हें देवांचें हिंडण्याफिरण्याचें ठिकाण आहे. याप्रमाणें हीं सात वर्षें असून या सर्वांमध्यें चराचर भूतमात्रांचा समावेश आहे व ते सर्व दैवी व मानुषी वैभवांनीं संपन्न आहेत, त्यांची गणना होणें अशक्य आहे. कल्याणेच्छूंना श्रद्धेनेंच तीं मिळतात. या प्रमाणें या शशाकृति भागाच्या अगदीं दक्षिणोत्तर असणारीं दोन वर्षें तर मीं सांगितलींच. नागद्वीप व काश्यपद्वीप हे दोन त्यांचे कर्णभूत आहेत. ताम्रवर्ण शीलांनीं युक्त श्रीमान असा मलयपर्वत हा शशसंज्ञित जंबूद्वीपाचा दुसरा भाग आहे.

नीलाच्या दक्षिणेला व मेरूच्या उत्तर भागाला सिद्धांनीं आश्रय केलेला पुण्यकारक उत्तर कुरु आहे. या ठिकाणीं नेहमीं फलपुष्पें असणारीं मधुर फलांचीं झाडें आहेत. त्या ठिकाणीं फुलांना उत्तम वास व फळांना चांगली गोडी रहाते. त्या ठिकाणीं कांहीं झाडें तर वाटेल तीं फळें देणारीं असतात, व कांहीं दुधाचीं झाडें आहेत ज्यांमधून षड्रसयुक्त अमृततुल्य दूध गळत असतें. तीं झाडें वस्त्रेंही देतात व त्यांच्या फळापासून अलंकार मिळतात. बारीक सोन्याच्या वालुकांनीं भरलेली ही सर्व भूमि सोन्याची आहे. सर्व ऋतु फार सुखावह असून चिखल म्हणून येथें माहीत नाहीं. पुण्यकारक, सुखावह, मनाला आल्हाद देणारीं सरोवरें येथें आहेत. देवलोकापासून भ्रष्ट झालेले सर्व लोक तेथें जन्माला येतात. सर्व शुद्ध कुलांत जन्माला येत असून मोठे रूपवान असतात. त्या ठिकाणीं स्त्रिया व पुरुष जोडप्यानें उत्पन्न होत असून स्त्रिया तर प्रति अप्सरा असतात. वर सांगितलेल्या दूध देणाऱ्या झाडाचें अमृततुल्य दूध हे पितात. हीं जोडपीं योग्य काळीं उपजून सारखीं वाढतात. त्यांचें रूप व गुण व वेष सर्व सारखेच असतात. चक्रवाकांच्या जोडप्याप्रमाणें हीं अगदीं सारखीं असतात. येथील सर्व लोक रोगराईवांचून असून उल्हासवृत्तींत असतात. दहा हजार दहा वर्षें ते जगतात. ते कधीं एकमेकांना सोडीत नाहीं. भारुंड नामक तीक्ष्ण चोंचीचे मोठे बलवान पक्षी येथें आहेत ते हे मेले असतां यांना उचलून दऱ्यांमध्यें नेऊन टाकतात. ही उत्तर कुरूची थोडक्यांत हकीकत आहे.

आतां मेरूच्या पूर्वभागाची हकीकत जशी आहे

तशी देतों. त्याचा मुख्य प्रांत भद्राश्व असून त्यांत भद्रसाल नांवाचें वन आहे, व या वनांत कालाम्र नांवाचा मोठा शुभ व नित्य फलपुष्पांनीं संपन्न असा वृक्ष आहे. हा एक योजन उंच आहे. सिद्ध व चारण याचा आश्रय घेतात. येथील लोक शुभ्रवर्ण असून मोठे तेजस्वी व बलशाली आहेत. तशाच स्त्रिया कुमुदवर्णाच्या असून सुंदर व देखण्या आहेत. या चंद्राप्रमाणें कांतिमान असून त्यांचीं तोंडें पूर्णचंद्रासारखीं आहेत. तशींच त्यांचीं गात्रें चंद्रासारखीं शीतल असून त्या नृत्यगायनांत मोठ्या हुशार आहेत. या ठिकाणीं आयुर्मर्यादा दहा हजार वर्षें आहे; ते कालाम्राचा रस पीत असतात व यांचें यौवन नेहमीं कायम असतें.

नीलाच्या दक्षिणेला व निषधाच्या उत्तरेला सुदर्शन नांवाचा एक मोठा पुण्यकारक जुनाट जंबुवृक्ष आहे. तो सर्व काम पुरविणारा आहे. सिद्धचारण त्याच्या आश्रयानें असतात. व सनातन जंबुद्वीपाला त्याच्याचवरून नांव पडलें आहे. एक हजार एकशें योजनें याची उंची असून हा आकाशाला जाऊन भिडला आहे. पिकलीं असतां उकलणाऱ्या यांच्या फळांचा घेर दोन हजार पांचशें अंगुळें असतो, व तीं खालीं पडतांना मोठा शब्द करतात, व रुप्याप्रमाणें पांढरे शुभ्र रस भूमीवर गाळतात. त्या जंबूच्या रसाची नदी बनून ती मेरूला घेर घालून उत्तर कुरूमध्यें उतरते. तेथें तो रस पिणारांच्या मनाला शांति राहून त्यांना कधीं तहान लागत नाहीं व जरेचाही उपद्रव होत नाहीं. देवांचे अलंकार ज्यानें करितात असें जांबूनद नामक सोनें तेथें आहे. तें इंद्रगोपासारखें चकचकीत असतें. येथें उगवत्या सुर्याप्रमाणें तेजस्वी लोक उत्पन्न होतात. त्याचप्रमाणें माल्यवताच्या शिखरावर संवर्तक नांवाचा कालाग्नि नेहमीं दिसत असतो. याच्या शिखरावरून जसजसें पूर्वेकडे जावें तसतशा पुष्कळ लहान लहान टेंकड्या आहेत. हा पर्वत अकरा हजार योजनें आहे. रुप्याप्रमाणें शुभ्र वर्णाचे लोक येथें उत्पन्न होतात. ते सर्व ब्रह्मलोकापासून भ्रष्ट झालेले आहेत, व सर्व एकमेकांशीं चांगल्या रीतीनें वागतात. ऊर्ध्वरेत होऊन ते कडकडीत तप करितात. भूतांच्या रक्षणासाठीं सूर्यामध्यें प्रवेश करितात. सासष्ठ हजार वर्षें अरुणाच्या पुढून सूर्याच्या भोंवताळून ते चालले असतात व पुढें सूर्याच्या उष्णतेनें तप्त होऊन ते चंद्रमंडळामध्यें शिरतात.

श्वेताच्या दक्षिणेला व निषधाच्या उत्तरेला रमणक ह्मणून वर्ष आहे. तेथें शुद्ध कुलांनीं संपन्न, देखणे असे लोक उत्पन्न होतात. एकमेकांचा ते द्वेष करीत नाहींत, अकरा हजार पांचशें वर्षें ते जगून मोठ्या आनंदांत दिवस घालवितात. नीलाच्या दक्षिणेला व निषधाच्या उत्तरेला हिरण्मय वर्ष असून त्या ठिकाणीं हैरण्वती नदी आहे. तेथेंच हा पक्षिराज गरुड रहात असतो. तेथें यक्षांचे अनुयायी रहात असून ते सर्व देखणे, श्रीमान, बलशाली व उल्हासवृत्तीचे आहेत. तेथील लोकही अकरा हजार पांचशें वर्षें जगतात. त्या ठिकाणीं एक मणिमय, एक सुवर्णमय व एक रत्नमय अशीं तीनच शिखरें आहेत, व त्यांना उत्तम वाड्यांनीं शोभा आली आहे. तेथें स्वयंप्रकाश शांडिली देवी रहात असते. ह्या शृंगवताच्या उत्तरेला समुद्रापर्यंत ऐरावत वर्ष आहे. हें वर्ष पूर्वींच्यापेक्षां श्रेष्ठ आहे. सूर्य येथें कधीं प्रकाशत नाहीं व माणसांना वृद्धापकाळही येत नाहीं. नक्षत्रांसह चंद्रच येथें प्रकाश देणारा आहे. येथील लोकांची कांति, वर्ण व डोळे हीं सर्व कमलासारखीं असतात. त्यांना कधीं घाम सुटत नाहीं. त्यांच्या अंगाचा वास मोठा मनोहर असतो. ते कांहीं खात नाहींत व जितेंद्रिय आहेत. ते सर्व स्वर्गांतून पडलेले असून निरिच्छ आहेत. त्यांची आयुर्मर्यादा तेरा हजार वर्षें आहे. क्षीरसमुद्राच्या उत्तरेला अमेयशक्ति विष्णु जांबूनदसोन्याच्या दैदीप्यमान रथामध्यें रहात असतात. त्या रथाला आठ चाकें असून त्याला भुतें जोडलीं आहेत व मनाप्रमाणें त्याची शीघ्र गति आहे.

आतां ज्या भारतवर्षासंबंधानें नाना देशचे राजे एकमेकांचा हेवा करून एकमेकांच्या छातीवर बसतात तें हें भारतवर्ष, देवेंद्राला, वैवस्वत मनूला, पृथूला, इक्ष्वाकूला, ययातीला, अंबरीषाला, मांधात्याला, नहुषाला, मुचुकुंदाला, उशीनरपुत्र शिबीला, ऋषभाला, ऐलाला, नृगाला, कुशिकाला, गांधीला, सोमकाला, दिलीपाला, व दुसऱ्या बलिष्ठ क्षत्रियांना प्रिय झालें आहे. महेंद्र, मलय, सह्य, शुक्तिमान, ऋक्षवान, विंध्य, व परियात्र हे सात दे-

शाचे विभाग पाडणारे कुलपर्वत आहेत. याशिवाय हजारों माहीत नसलेले दऱ्या व शिखरें यांनीं युक्त उंच पर्वत आहेत. व पुष्कळ लहान लहान डोंगर असून तेथें रानटी लोक रहातात. आर्य, म्लेंच्छ व यांच्या मिश्रणानें झालेल्या अनेक जाती, गंगा, सिंधु, सरस्वती, गोदावरी, नर्मदा, बाहुदा, शरद्रु, चंद्रभागा, यमुना, दृषद्वती, विपाशा, विपापा, स्थूलवालुका, वेत्रवती, इरावती वितस्ता, ऊन पाण्याची देविका, वेदस्मृता, वेदवती, स्वर्गीय इक्षुला, कृमि, चित्रवाहा, चित्रसेना, गोमती, धूतपापा, महानदीवंदना, कौशिकी, स्वर्गीयकुल्या, निचिता, लोहितारणी, रहस्या, शतकुंभा, शरयू, चर्मण्वती, वेत्रवती, हस्तिसोमा, दिश, शरावती, ऊन पाण्याची वेणा, भीमरथी, कावेरी, चुलुका वाणी, शतबला, नीवारा, अहिता, सुप्रयोगा, पवित्रा, कुंडली, राजनी, पुरमालिनी, पूर्वाभिरामा, वीरा, भीमा, ओघवती, पाशाशिनी, पापहरा, महेंद्रा, पाटलावती, करीषिणी, असिक्नी, महानदी, कुशवीरा, मकरी, प्रवरा, मेना, हेमा, घृतवती, पुरावती, अनुष्णा, शैब्या, कापी, सदानीरा, अधृष्या, कुशधारा, सदाक्रांता, शिवा, वीरवती, वस्त्रा, सुवस्त्रा, गौरी, कंपना, हिरण्वती, वरा, वीरकरा, महानदी, पंचमी, रथचित्रा, ज्योतिरथा, विश्वामित्रा, कपिंजला, उपेंद्रा, बहुला, कुवीरा, अंबुवाहिनी, विनदी, पिंजला, वेणा, तुंगवेणा, विदिशा, कृष्णवेणा, ताम्रा, कपिला, खलु, सुवामा, वेदाश्वा, हरिश्रावा, शीघ्रा, पिच्छिला, भारद्वाजी, कौशिकी, शोणा, बाहुदा, चंद्रमा, दुर्गा, चित्रशिला, ब्रह्मवेध्या, बृहद्वती, यवक्षा, अथरोही, जांबूनदी, सुनसा, तमसा, दासी, वसामन्या वराणसी, नीला, धृतिवती, महानदी पर्णशा, मानवी, वृषभा, ब्रह्ममेध्या, बृहत्ध्वनी, सदा शुद्ध कृष्णा, मंदगा, मंदवाहिनी, ब्राह्मणी, महागौरी, दुर्गा, चित्रोपला, चित्ररथा, मंजुला, वाहिनी, मंदाकिनी, वैतरणी, महानदी, कोषा, शुक्तिमती, अनंगा, वृषसाह्वया, लोहित्या, करतोया, वृषका, कुमारी, ऋषिकुल्या, मारिषा, सरस्वती, मंदाकिनी, सुपुण्या, सर्वा, गंगा, ह्या नद्या सर्व विश्वाच्या माता असून सर्वच महाफल देणाऱ्या आहेत. याशिवाय पुष्कळ लहानसान नद्या आहेत.

आतां यांतील देश सांगतों. कुरु पंचाल, शाल्व, माद्रेय, जांगल, शूरसेन, कलिंग, पुलिंद, बोध, माला, मत्स्य, कुशल्य, सौशल्य, कुंति, कांतिकोसल, चेदि, मत्स्य. करुष, भोज, सिंधु, पुलिंद, श्रेष्ठ दशार्ण, मेकल, उत्कल, पंचाल, कोसल नैकपृष्ठ, धुरंधर, गोध, मद्रकलिंग, काशि, परकाशि, जठर, कुकुर, दशार्ण, कुंति, अवंति, अपरकुंति, गोमंत, दंडक, संड, विदर्भ, रूपवाहिक, पांडुराष्ट्र, गोपाराष्ट्र, करीति, अधिराज्य, कुशादि, मल्लराष्ट्र, केवल, अयवाह, वारवाह, चक्र, चक्राति, शक, विदेह, मगध, स्वक्ष, मलज, विजय, अंग, वंग, कलिंग, यकृल्लोम, मल्ल, सुदेष्ण, प्रल्हाद, माहिक, शशिक, बाल्हिक, वाटधान, आभीर, कालतोयक, अपरांत, परांत, पंचाल, चर्ममंडल, अटवीशिखर, मेरुभूत, उपावृत्त, अनुपावृत्त, स्वराष्ट्र, केकय, कुंदापरांत, मायेह, कक्ष, सामुद्रनिष्कुट, अंध, पुष्कळ पर्वतावरील व पर्वताच्या पायथ्याचे प्रांत, अंगमलज, मगध, मानवर्जक समंतर, प्रावृषेय, भार्गव, पुण्ड्र, भर्ग, किरात, सुदृष्ट, यामुन, शक, निषाद, निषद, आनर्त, नैर्ऋत, दुर्गाल, प्रतिमत्स्य, कुंतल, कोसल, तीरग्रह, शूरसेन, ईजिक, कन्यकागुण, तिलभार, मसीर, मधुमंत, सुकंदक, काश्मीर, सिंधुसौवीर, गांधार, दर्शक, अभीसार, उलूत, शैवल, बाल्हिक, दर्वीचव, नव, दर्व, वातज, अयरथ, उरग, बहुवाद्य, सुदामन्, सुमल्लिक, बध्र, करीषककुलिंद, उपत्यक, वनायु, दशापार्श्व, रोमन, कुशबिंदु, कच्छ, गोपालकक्ष, जांगल, कुरुवर्णक, किरात, बर्बर, सिद्ध, वैदेह, ताम्रलिप्तक, औंड्र, म्लेंच्छ, सैसिरिध्र, पार्वतीय, तसेच दक्षिणेकडचे द्रविड, केरल, प्राच्य, भूषिक, वनवासिक, कर्णाटक, माहिषक, विकल्प, मूषक, झिल्लिक, कुंतल, सौहृद, नभृकानन, कौकुट्टक, चोल, कोंकण, मालव, नर, समंग, करक, कुकुर, अंगार, मारिष, ध्वजिनि, उत्सव, संकेत, त्रिगर्त, शाल्वसेनि, व्यूक, कोकबल, प्रोष्ट, समवेगवश, विंध्यचुलिक, पुलिंद, वल्कल, मालव, बल्लव, अपरवल्लव, कुलिंद कालद, कुंडल, करट, मूषक, तनवाल, घटसृंजय, अंठिद, वाशिवाट, तनय, सुनय, ऋषिक, विदर्भ, काक, तंगण, परतंगण, उत्तर, अपरम्लेंच्छ, क्रूर, यवन, चीन, कांबोज, दारुण, व दुसरे म्लेंच्छ देश, सकृद्ग्रह, कुलथ, हूण, पारसिक, रमण, चीन, दशमालिक, तसेच दुसरे पुष्कळ

क्षत्रियांनीं, वैश्यांनीं, शूद्रांनीं वसलेले प्रदेश, शूद्र, भीर, दरद, काश्मीर, पशु, खाशीर, अंतचार, पल्हव, गिरिगव्हर, आत्रेय, भरद्वाज, स्तनपोषिक, प्रोषक, कलिंग वगैरे किराताचे प्रदेश, तोमर, हन्यमान, करभंजक, वगैरे देश त्या त्या जातींनीं वसलेले आहेत. हे मीं थोडक्यांत देश सांगितले. ह्या भूमीची योग्य व्यवस्था राखली असतां ही कामधेनु धर्मार्थकामांचें महाफल त्या त्या मानानें देणारी आहे. ह्मणूनच हिची हांव सुटून राजे हिच्या पायीं रणांत प्राण देण्याला तयार होतात. देवांची किंवा मनुष्यांची आश्रयभूत ही भूमीच असल्यानें ती मिळविण्यासाठीं कुत्र्यांची ज्याप्रमाणें मांसाच्या तुकड्यावर झडप पडते त्याप्रमाणें हिच्यावर राजांची झडप पडते. हिचा उपभोग घेऊं इच्छिणाऱ्या कोणाच राजाला समाधानी होत नाहीं. ह्मणून ती हातीं येण्यासाठीं कौरवपांडवांची सामदामादिकांनीं खटपट चालली आहे. हिची योग्य मरामत ठेवली तर ही भूमि आई बाप, भाऊ सर्व कांहीं हीच आहे.

या भारतवर्षांत कृत, त्रेता, द्वापर, व कलि असे चार युगपर्वत आहेत. कृतयुगांत आयुर्मर्यादा चार हजार वर्षे असून, त्रेतायुगांत तीन व द्वापरांत दोन हजार वर्षे आहे; व या कलियुगांत त्याची मर्यादाच नसून गर्भांत तसेंच उपजल्यावरोबर देखील लोक मरतात. मोठे बलवान, सत्ववान, शहाणे, संपत्तिमान, देखणे असे हजारों लोक कृतयुगांत जन्माला येतात. तपोधन मुनी, उत्साहसंपन्न, महात्मे, धार्मिक, सत्यवादी, देखणे, धिप्पाड, वीर्यशाली, धनुर्धर, युद्धांत कुशल, शूर असे क्षत्रिय त्रेतायुगांत जन्माला येऊन ते सर्वच चक्रवर्ती असतात. मोठे उत्साहसंपन्न, वीर्यशाली व परस्परांवर जय मिळवूं इच्छिणारे असे सर्व वर्णांचे लोक द्वापरांत जन्माला येतात. अल्प पराक्रमी, रागीट, लोभी, खोटे असे लोक कलियुगांत जन्माला येऊन इर्ष्या, मीपणा राग, कपट, असूया, विषयासक्ति, लोभ हे गुण त्यांमध्यें दिसून येतात. हैमवत या वर्षापेक्षां श्रेष्ठ असून त्याहून श्रेष्ठ हरिवर्ष आहे.

हें जग अनेक द्वीपांनीं भरलें आहे. त्यांपैकीं मुख्य सात द्वीपें; व चंद्र, सूर्य व राहु यांची थोडक्यांत माहिती सांगतों. जंबूपर्वताचा विस्तार पूर्ण अठरा हजार सहाशें योजनें आहे. मोठ्या खाऱ्या समुद्राचा विस्तार याच्या दुपटीनें आहे. हा समुद्र अनेक प्रदेशांनीं, व्याप्त, हिरे, पोंवळीं यांनीं चित्रविचित्रित, अनेकविध धातूंनीं विचित्रित अशा पर्वतांनीं शोभायमान असा आहे. या ठिकाणीं सिद्धचारणांचा वास असून हा वर्तुलाकृति आहे.

शाकद्वीप जंबुद्वीपाच्या दुप्पट असून त्याच्या लगतचा समुद्र त्याच्या दुपटीनें आहे. क्षीरसमुद्रानें हा वेढला आहे. तेथें पुण्यकारक प्रदेश असून त्यांत लोक मरत नाहींत. तेथील लोक क्षमा व तेज यांनीं युक्त असल्यानें दुष्काळाचें तेथें नांव कशाला पाहिजे? त्याचप्रमाणें हिऱ्यांनीं भरलेले व रत्नांच्या ज्यांत खाणी आहेत असे सात पर्वत, तशाच नद्या तेथें आहेत. पहिला मेरु, त्यावर देव, ऋषि, गंधर्व रहात असतात. दुसरा पूर्वेकडे पसरलेला मलय पर्वत आहे. तेथूनच मेघ निघून चोहोंकडे पसरतात. त्याच्यापुढें जलधार नांवाचा मोठा पर्वत आहे. तेथूनच इंद्र उत्तम प्रकारचें पाणी शोषून घेत असतो, आणि त्यामुळेंच पावसाळ्यांत पाऊस पडतो. तेथें उंच असा रेवतक पर्वत आहे. त्याच्यावर आकाशांत ब्रह्मदेवानें रेवती नक्षत्राची कायमची स्थापना करून ठेविली आहे. उत्तरेला जलपूर्ण मेघाप्रमाणें कांतिमान, उंच व श्रीमान मोठा काळा पर्वत आहे. त्यापासून प्रजेला काळेपणा आला आहे. आतां सर्वच द्वीपांत काळे, गोरे, भेसळ असे लोक आहेत, पण काळी प्रजा प्रथम येथून निघाल्यामुळें त्याला काळा हें नांव मिळालें आहे. त्याच्यानंतर मोठा पर्वत दुर्गशैल आहे, व पुढें केसर पर्वत असून सुगंध केशरांनीं युक्त असा वारा तेथून सुटतो. यांत सात वर्षे आहेत. महामेरूच्या वर्षाला महाकाश ह्मणतात. जलदाच्याला कुमुदोत्तर ह्मणतात. जलधाराला सुकुमार, रैवताला कौमार, श्यामाच्याला मणिकांचन, केसराच्याला मोदाकी, आणि शेवटचा महायुमान्. या द्वीपामध्यें शाक नांवाचा मोठा वृक्ष आहे. त्याची उंची व घेर जंबू वृक्षा एवढींच आहेत. तेथील लोक त्याची पूजा करितात. तेथें पुण्यकारक निरनिराळे प्रदेश आहेत. तेथील लोक शंकराची पूजा करितात. तेथें सिद्ध, चारण, देवता जात असतात. लोक दीर्घायुषी असून जरामरण त्यांना

नाहीं. प्रत्यक्ष गंगा, सुकुमारी, कुमारी, शीताशी, वेणिका, महानदी, मणिजला, चक्षुर्वर्धनिका ह्यांसारख्या शेंकडों श्रेष्ठ व पापनाशक नद्या तेथें आहेत. मंग, मशक, मानस, मदंग असे चार पवित्र प्रांत आहेत. मंगामध्यें आपल्या कर्मामध्यें गढलेले ब्राह्मण फार आहेत. मशकामध्यें धार्मिक व सर्व इच्छा पूर्ण करणारे क्षत्रिय राजे आहेत. मानसामध्यें धर्मानें उपजीविका करून राहणारे, सर्व इच्छा परिपूर्ण झालेले, शूर व धर्मार्थ जाणणारे वैश्य आहेत. मंदगेमध्यें नित्य धर्मानें राहणारे शूद्र आहेत. **तेथें कोणी राजा नसून शिक्षा नाहीं व शिक्षेस पात्र असा प्राणीही नाहीं.** ते सर्व धर्मज्ञ असून आपापल्या धर्मानें राहून एकमेकांचें रक्षण करितात.

आतां उत्तरेकडील द्वीपासंबंधानें माहिती सांगतों ऐक. त्या ठिकाणीं एक तुपाचा, एक दह्याचा, एक मद्याचा व एक पाण्याचा असे समुद्र आहेत. तेथील वरवरचे द्वीप खालच्या खालच्याहून दुपटीनें मोठे आहेत. मधल्या द्वीपामध्यें गौर ह्मणून मनशिळा धातूचा पर्वत आहे. पश्चिमेकडच्या द्वीपामध्यें नारायणाचा आवडता कृष्ण नांवाचा पर्वत आहे. कुशद्वीपामध्यें दर्भांचीं बेटें व शाल्मली द्वीपामध्यें शाल्मली यांची पूजा होते. क्रौंच द्वीपामध्येंही सर्व रत्नांचें आगर महाक्रौंच म्हणून पर्वत आहे. त्याची चारी वर्णांच्या लोकांकडून पूजा होते. गोमंत नांवाचा सर्व धातूंनीं संपन्न मोठा पर्वत आहे. त्या ठिकाणीं धीमान कमलनयन नारायण मुक्त झालेल्या लोकांसह रहात असतो. कुशद्वीपामध्यें पोंवळ्यांनीं भरलेला त्याच नांवाचा दुसरा एक पर्वत आहे. तो सोन्याचा असून कोणाला तेथें जातां येत नाहीं. कुमुद नांवाचा तिसरा देदीप्यमान पर्वत आहे. चवथा पुष्पवान नांवाचा, पांचवा कुशेशय व सहावा हरिगिरी असे सहा मोठे पर्वत तेथें आहेत. त्यांपैकीं पहिल्याला औद्भिद खंड ह्मणतात, दुसरा वेणुमंडल, तिसरा सुरथाकार, चवथा कंबल, पांचवा धृतिमत्, साहवा प्रभाकर व सातवा कापिल असे सात खंड आहेत. या ठिकाणीं देव व गंधर्व मोठ्या आनंदांत विहार करीत राहतात. त्यांपैकीं कोणी मरत नाहीं. सर्व लोक गोरे असून सुकुमार आहेत, क्रौंचाच्यापुढें वामनक, त्याच्या पुढें अंधकार, त्याच्या पुढें मैनाक, त्याच्या पुढें गोविंद, त्याच्या पलीकडे निबिड असे पर्वत आहेत. यांच्या मधील प्रदेश अनुक्रमें दुपटी दुपटीनें वाढत गेले आहेत. क्रौंचाला लागून असणाऱ्या प्रदेशाला कुशल ह्मणतात; वामनीच्या जवळच्याला मनोनुग ह्मणतात. याच्या पलीकडच्याला उष्ण ह्मणतात. त्याच्या पलीकडचा प्रवारक, त्याच्या पलीकडचा अंधकारक त्याच्या पलीकडे मुनिदेश व त्याच्या पलीकडे दुंदुभिस्वन देश आहेत. येथें सिद्ध चारण भरले आहेत व प्रजा बहुतेक गोरी आहे. ह्या सर्वांमध्यें देवगंधर्व असतात. पुष्कर द्वीपामध्यें पुष्कर नांवाचा माणकें व रत्नें यांनीं भरलेला पर्वत आहे. तेथें स्वतः ब्रह्मदेव नेहमीं रहात असतात. **जंबुद्वीपांतून नानाप्रकारचीं रत्नें या द्वीपामध्यें लोकांच्या उपयोगासाठीं येतात.** या द्वीपामधून **ब्रह्मचर्य, खरेपणा व आत्मनिग्रह यांच्या योगानें लोकांच्या आरोग्याचें व आयुष्याचें प्रमाण दुपटीदुपटीनें वाढलेलें आहे.** ह्या द्वीपामधील जे प्रांत सांगितले ते सर्व मिळून एकच देश मानला आहे; कारण ह्या सर्व ठिकाणीं एकच धर्म चालतो. स्वतः ब्रह्मदेव दंड उगारून तयार असून सदा ह्या द्वीपाचें रक्षण करीत आहेत. येथील लोक आपसूक तयार होऊन पुढें आलेलें अन्न खाऊन राहतात. त्याच्या पलीकडे सम नांवाची वस्ति आहे. याला चार कोपरे असून तेहतीस मंडळें आहेत. सर्वांना पूज्य असे चार दिग्गज त्या ठिकाणीं आहेत. त्यांपैकीं वामन, ऐरावत व सुप्रतीक हे असून या सुप्रतीकाच्या गंडस्थळांतून मद वहात असतो. त्यांचें आकारमान कोणाला अद्याप कळलें नाहीं. यांच्या उच्छ्वासांतून सोडलेला वारा ह्या पृथ्वीवर येऊन त्याच्यायोगानें प्रजा जिवंत राहतात.

याप्रमाणें ही द्वीपांची माहिती आहे. आतां स्वर्भानु हा ग्रह गोळ्याच्या आकाराचा असून याचा व्यास बारा हजार योजनें आहे, तसाच याचा परिघ बेचाळीस हजार आहे. असें विद्वान व पौराणिक ह्मणतात. चंद्राचा व्यास अकरा हजार योजनें असून त्याचा परिघ तेहतीस हजार आहे. सूर्याचा व्यास दहा व परिघ पसतीस हजार आठशें आहे. राहु याहून मोठा असल्यानें चंद्रसूर्यांना झांकून टाकीत असतो. ह्याप्रमाणें ही सर्व जगाची माहिती आहे.

## ३ भारतीय युद्धाची सुरवात.
## (६. १६-२२).

पुढें रात्र सरल्यावर ' भिडा, भिडा, ' ह्मणून ओरडणाऱ्या राजांच्या शब्दांनीं त्याचप्रमाणें शंख, दुंदुभि यांच्या शब्दांनीं, हर हर ओरडणाऱ्यांनीं, घोड्यांच्या खेंकाळण्यांनीं, रथचक्रांच्या घरघर आवाजांनीं, हत्तींच्या गरजण्यांनीं व योद्ध्यांच्या गर्जना, धांवाधांव, छड्डू ठोकणें, व आरोळ्या यांनीं एकच गडबड उडून राहिली. सूर्योदयाच्या वेळीं कौरव पांडवांचें सैन्य जय्यत तयार होऊन राहिलें. कोणाची मात्रा चालूं न देणारीं त्यांचीं शस्त्रास्त्रें व कवचें त्याचप्रमाणें सशस्त्र होऊन तयार झालेल्या त्यांच्या अफाट सेना सूर्यकिरणामध्यें झळकूं लागल्या. त्याठिकाणीं सोन्यांनीं शृंगारलेले हत्ती व रथ विजेसह असणाऱ्या मेघाप्रमाणें झळकत होते. रथदळें तर अनेक नगरांप्रमाणेंच दिसत होतीं. धनुष्य, सैफ, कट्यार, तरवार, गदा, शक्ति, गुरगुंज, इत्यादि लखलखीत हत्यारांनिशीं सज्ज होऊन सैन्यामध्यें योद्धे आपापल्या जागीं उभे राहिले. हजारों हत्ती, पायदळ, रथ, स्वार, जाळ्याप्रमाणें पसरून राहिले. दोन्ही बाजूंला नाना प्रकारचे लखलखीत ध्वज फडकाविले होते. चिलखत वगैरे चढवून तयार झालेले वीर युद्धाला आतुर झाल्यासारखे दिसत होते. हत्यारें उगारून वैलासारखे लांब वटारून पाहण्यानें चित्रविचित्रित दिसणारे नरवीर हस्तत्राण व भाते बांधून आपापल्या तुकड्यांच्या पुढें उभे राहिले. सौबल देशाचा शकुनि, अवंतीचा शल्य, कैकेय देशचे जयद्रथ, विंद व अनुविंद, कंबोज देशाचा सुदक्षिण, कलिंग देशाचा श्रुतायुध, राजा जयत्सेन, कोशल देशाचा बृहद्बल व सात्वतांचा कृतवर्मा हे दहा परिघाप्रमाणें बाहू असणारे अनेक यज्ञ करून त्यांमध्यें पुष्कळ दाक्षिणा दिलेले शूर नरव्याघ्र अक्षौहिणीचे नायक होते. हे व दुसरे पुष्कळ दुर्योधनाचे अंकित नीतिमान महारथी राजे व राजपुत्र चिलखत वगैरे चढवून आपापल्या तुकडीमध्यें तयार उभे होते. ह्या सर्वांनीं कृष्णाजिनें बांधलीं होतीं व सर्वच बलवान असून युद्धप्रसंगामुळें उत्साहयुक्त व आनंदभरित असे दुर्योधनासाठीं ब्रह्मलोकाची दीक्षा घेऊन दहाअक्षौहिणी संभाळून राहिले. कौरवांची जी थोरली टोळी अकरावी अक्षौहिणी ती सर्व सैन्याच्या पुढें असून तिचे पुढारी शंतनुपुत्र भीष्म होते. पांढरा फेटा, पांढरी छत्री, पांढरें चिलखत यांनीं मंडित पांढरे शुभ्र व कधीं न डगमगणारे असे भीष्म उदय पावलेल्या चंद्राप्रमाणें दिसत होते. सोन्याच्या ताडाचें चिन्ह असलेला, ध्वज ज्यांवर फडकत आहे अशा रुप्याच्या रथांत बसलेले भीष्म पांढऱ्या ढगांमध्यें झांकलेल्या ऊष्णरश्मि सूर्यासारखे कौरवपांडवांना दिसत होते. धृष्टद्युम्नाच्यामागें असलेल्या सर्व सृंजय वीरांना आ पसरून येणाऱ्या मोठ्या सिंहाला पाहून ज्याप्रमाणें सामान्य श्वापदांना कांपरें भरावें त्याप्रमाणें त्यांना पाहून कांपरें भरलें. याप्रमाणें लक्ष्मीनें झळकणाऱ्या महावीरांच्या हाताखालीं असलेली कौरवांची अकरा अक्षौहिणी सेना तशीच पांडवांची सात अक्षौहिणी सेना मोठमोठ्या मगरी व सुसरी यांनीं भरलेल्या व युगांतकालीं एकमेकांशीं भिडलेल्या दोन सागरांप्रमाणें दिसत होत्या. तशाप्रकारचें अफाट सैन्य कधीं कोणाच्या पाहण्यांतच आलें नसेल. त्याठिकाणीं सर्व मोठमोठे वीर जमले होते. मघे संबंधाचा जो पितृलोक त्या ठिकाणीं त्या दिवशीं चंद्र होता. आकाशामध्यें सात मुख्य ग्रह लखलखीत प्रकाशत होते. उदयकालीं सूर्य दुभंगल्याप्रमाणें दिसत असून तो आकाशांत लाल ज्वाळा बाहेर टाकीत आहेसा दिसला. लाल दिसणाऱ्या दिशांचे ठिकाणीं मांस व रक्त यांवर राहणारीं कोल्हीं व कावळे आपल्याला आतां मेलेल्यांचीं शरीरें खाण्याला मिळणार ह्मणून ओरडत होतीं. सकाळीं उठून पितामह भीष्म व द्रोणाचार्य एकाग्रतेनें ' पांडवांना जय मिळो ' असें ह्मणून मग करार केल्याप्रमाणें कौरवांचे बाजूनें युद्धाला तयार झाले. सर्व धर्म पूर्ण ओळखणारे देवव्रत भीष्माचार्य राजांना आपल्यापाशीं आणवून ह्मणाले, ' हे क्षत्रीय वीरांनो, स्वर्गाला जाण्याला हें भलें मोठें द्वार तुमच्यासाठीं खुलें केलें आहे. यामधून इंद्रलोकाला व ब्रह्मलोकाला खुशाल जा. तुमच्या पूर्वजांनीं व त्यांच्याही मागच्यांनीं हा तुमच्यासाठीं कायमचा मार्ग करून ठेविला आहे. लढाईमध्यें न कचरतां आपलें नांव राखा. नाभाग, ययाति, मांधा-

ता, नहुष, नृग, अशाच प्रकारच्या कृत्यांनीं यशस्वी होऊन श्रेष्ठपदाला गेले. रोगराईनें घरांमध्यें मरणें हा क्षत्रियासंबंधानें अधर्म समजला आहे. शस्त्रानें मरणें हा त्यांचा पूर्वापार धर्म आहे.' याप्रमाणें भीष्म उत्तेजनपर बोलल्यावर सैन्याचे अधिपती सुवक रथांमधून झळकत आपापल्या तुकड्यांकडे गेले. फक्त वैकर्तन कर्ण, त्याचे अमात्य व आप्त यांनीं मात्र भीष्मांमुळें शस्त्र हातीं घेतलें नाहीं. कर्णा खेरीज सर्व कौरव व तत्पक्षीय राजे सिंहनादानें सर्व दिशा दणाणून सोडून शत्रूवर चालून गेले. पांढऱ्या शुभ्र छत्र्या, पताका, ध्वज, हत्ती, घोडे व पायदळ यांनीं त्या सैन्यांना फारच शोभा आली होती. नौबती, मृदंग, नगारे यांच्या शब्दांनीं व रथांच्या घरघरण्यांनीं पृथ्वी दणाणून राहिली होती. कौरवपक्षाकडील मोठ्या धनुर्धारी राजांनीं भीष्मांच्या आज्ञेप्रमाणें आपापल्या जागा घेतल्या. ज्यावर ध्वज फडकत आहे अशा हत्तीवर बसून सर्व राजांना बरोबर घेऊन गोवासन देशाचा शैब्य चालला होता. ज्याच्या ध्वजावर सिंहाच्या शेपटीचें चिन्ह होतें असा वाटेल त्या प्रसंगाला डोकें देण्याला समर्थ पद्मवर्ण अश्वत्थामा सर्व तुकड्यांच्या पुढें चालला होता. श्रुतायुध, चित्रसेन, पुष्पमित्र, विविंशति, शल्य, भूरिश्रवा व महारथ विकर्ण हे सात मोठे धनुर्धारी वीर उत्तम चिलखतें चढवून अश्वत्थाम्याच्या मागें पण भीष्मांच्या पुढें रथांतून चालले होते. यांचेही रथांला शोभा देणारे उंच असे सोन्याचे ध्वज झळकत होते. आचार्यश्रेष्ठ द्रोणांच्या ध्वजावर सोन्याची वेदी, कमंडलु व धनुष्य काढलें होतें. शेकडों हजारों तुकड्यांना आपल्या मागून घेऊन चाललेल्या दुर्योधनाच्या मोठ्या ध्वजावर हिरेजडित हत्तीचें चिन्ह होतें. पौरव, कलिंगराज कंबोजाधिपति सुदक्षिण, क्षेमधन्वा व शल्य यांचे रथ त्याच्यापुढें होते. ज्यावर बैलाचें चिन्ह असलेला ध्वज फडकत होता अशा उत्तम रथांत बसून मागध सैन्याच्यापुढें कृप चालले होते. शरदृतूंतील मेघाप्रमाणें शोभणारे तें अफाट सैन्य कर्णपुत्र वृषसेन व बुद्धिशाली कृप यांच्या देखरेखीखालीं होतें. डुकराचें चिन्ह असलेल्या दिव्य ध्वजानें शोभणारा मोठा यशस्वी जयद्रथ आपल्या पथकाच्या पुढें होता. एक लाख रथ, ऐशीं हजार हत्ती व साठ हजार पायदळ एवढें सैन्य त्याच्या ताब्यांत होतें. त्यामध्यें असंख्य रथ, हत्ती, घोडे होते. साठ हजार रथ व दहा हजार हत्ती बरोबर घेऊन केतुमानासह सर्व कलिंगाचा स्वामी चालला. तोफा ( यंत्रें ) गुरगुंज, भाते, पताका यांनीं शृंगारलेले त्याचे धिप्पाड हत्ती पर्वतासारखे दिसत होते. अग्नीसारखा देदीप्यमान उत्तम ध्वज, पांढरी शुभ्र छत्री, कंठभूषण, चवरी यांनीं कलिंगाधिपति फारच खुलून दिसत होता. चित्रविचित्रित अशा उत्तम अंकुशानें युक्त मोठ्या हत्तीवर बसलेला केतुमानही मेघावर बसलेल्या सूर्याप्रमाणें रणभूमीवर झळकत होता. आपल्या तेजानें झळकणारा भगदत्त चांगल्या हत्तीवर बसून इंद्रासारखा चालला होता. भगदत्ताच्या तोंडीचे केतुमानाला धरून असणारे अवंतीचे विंद व अनुविंदही रथांतून चालले होते. द्रोण, भीष्म, अश्वत्थामा, बाल्हीक व कृप यांनीं व्यवस्था लावून दिलेल्या रथमय त्या कौरव व्यूहाचें हत्तीं हेंच धड असून राजांचीं डोकीं हें त्याचें शीर व घोडे हीं पिसें होतीं. असा तो सर्व बाजूंनीं तोंड असलेला उग्र व्यूह हंसत शत्रूसैन्यावर उडी घेतो आहेसें दिसत होतें.

ते वेळीं एकाएकीं युद्धासाठीं चालून जाणाऱ्या त्या योद्ध्यांच्या हृदयांमध्यें कांपरें भरविणारा शब्द उठला. शंख व नौबती यांच्या शब्दांनीं हत्तींच्या गरजण्यांनीं व रथांच्या घरघर आवाजांनीं पृथ्वी फाटून चालली आहेसें दिसलें. घोड्यांच्या खेंकाळण्यांनीं व योद्ध्यांच्या गर्जनांनीं एका क्षणामध्यें आकाश व भूमि भरून राहिली. दोन्ही दळें एकमेकांशीं भिडतांना चळचळ कांपत होतीं. ज्यांच्यावर ध्वज फडकताहेत असे उत्तम उत्तम ऋषभाक्ष महाधनुर्धारी कौरववीर नानाप्रकारचीं हत्यारें व धनुष्यें हातांत घेऊन हस्तत्राण बांधून सैन्याच्या अघाडीला चालले होते. दुःशासन, दुर्विषह, दुर्मुख, दुःसह, विविंशति, चित्रसेन व महारथ विकर्ण हे धृतराष्ट्राचे मुलगे त्याचप्रमाणें इमानाला जागणारा पुरुमित्र, जय भूरिश्रवा व शल ही मंडळी भीष्मांची पाठराखी होती. वीस हजार रथ यांच्या मागून चालले होते. तसेच अभिषाह, शूरसेन, शिबि, वसाति, शाल्व, मत्स्य, आंबष्ठ, त्रैगर्त, केकय,

सौवीर, कैतव्र देशाचे तसेच पूर्व, पश्चिम, दक्षिण व उत्तर या दिशांकडील बारा प्रांतांतले जिवावर उदार होऊन लढण्याला तयार झालेले शूर वीर मोठें रथदळ बरोबर घेऊन भीष्मांचें रक्षण करीत होते. ज्या ठिकाणीं मगधाधिपति होता तेथें त्याच्या मागून तें रथदळ व दहा हजार वेगवान हत्तीदळ चालले होतें. रथाचीं चाकें त्याचप्रमाणें हत्ती राखणारे शिपाई त्या सैन्यामध्यें सहा कोटी होते. नखांनीं व भाल्यांनीं युद्ध करणारे हजारो शिपाई हातांत धनुष्य, ढाल, तरवार घेऊन पुढें चालले होते. ही अकरा अक्षौहिणी कौरवसेना यमुनेपासून वेगळ्या केलेल्या गंगेप्रमाणें दिसत होती.

याप्रमाणें कौरव सैन्याची व्यवस्था पाहून ज्याला मानुष, दैव, गांधर्व, आसुर इत्यादि व्यूहांची पूर्ण माहिती होती तो धर्मराज त्यांच्या अनुरूप आपल्या सैन्याची उलट व्यवस्था लावण्याच्या उद्देशानें अर्जुनाला ह्मणाला, ‘ बाळा अर्जुना, महर्षी बृहस्पतींच्या वचनावरून ज्यांचें सैन्य थोडें आहे त्यांनीं जुळून राहून युद्ध करावें असें आहे. ज्यांचें पुष्कळ सैन्य आहे त्यांनीं आपलें वाटेल तसें पसरून ठेवावें. थोड्या सैन्यानिशीं पुष्कळांबरोबर लढतांना त्या थोड्या सैन्याची व्यवस्था **सुईच्या टोकाप्रमाणें संकुचित लावावी**. आपल्या शत्रूपेक्षां आपलें सैन्य फारच थोडें आहे. तेव्हां वरील वचन ध्यानांत ठेवून आपल्या सैन्याची व्यवस्था लाव. ’ हें धर्मराजाचें भाषण ऐकून अर्जुन म्हणाला, ‘ महाराज, ही पहा मी इंद्रानें ठरविल्याप्रमाणें शत्रूला दुर्जय अशी वज्र नांवाची आपल्या सैन्याची व्यूहरचना करतों. वावटळीप्रमाणें शत्रूला त्राहि त्राहि करून सोडणारा, प्रहार करणारांमध्यें श्रेष्ठ भीमसेन शत्रु सैन्याच्या तेजांचा चुराडा उडवीत आपल्या सैन्याच्या अघाडीला युद्ध करील. सर्व युद्धाच्या खुब्या ठाऊक असलेला हा पुढारी पुढें युद्ध करूं लागला असतां सिंहाला पाहून पळ काढणाऱ्या क्षुद्र मृगाप्रमाणें दुर्योधन प्रभृति सर्व कौरवांची गाळण उडून जाऊन ते मागें पाय घेतील. ह्या तटाचा आपणा सर्वांना निर्भयपणें आश्रय करतां येईल. अचाट कर्म करणारा हा नरश्रेष्ठ खवळला असतां त्याकडे पाहूं शकेल असा पुरुषच लोकांत सांपडणें कठीण.’

याप्रमाणें सैन्याची व्यवस्था करून अर्जुन शत्रूवर निघाला. कौरव सैन्याला चालून येतांना पाहून ती पांडवांची मोठी सेना पूर्ण, अचळ व संथ वहाणाऱ्या गंगेप्रमाणें दिसत होती. भीमसेन, वीर्यशाली धृष्टद्युम्न, नकुल, सहदेव, धृष्टकेतु, हे हिचे पुढारी होते. आपल्या भावांनिशीं, मुलांनिशीं एक अक्षौहिणी सैन्य बरोबर घेऊन विराट त्यांची पाठ राखण्याला यांच्या मागें होता. महातेजस्वी नकुलसहदेव भीमसेनाचे चक्ररक्षक होते. विजेसारखे चपळ द्रौपदीचे मुलगे व अभिमन्यु हेही भीमसेनाच्या मागें त्याची पाठ राखीत होते. रथ्यांमध्यें श्रेष्ठ शूर सेनानायक प्रभद्रकांनिशीं धृष्टद्युम्न त्यांचा सांभाळ करीत होता. भीष्मांना मारण्याला तयार होऊन शिखंडी त्यांच्या मागून चालला असून अर्जुन त्याची पाठ राखीत होता. महाबलशाली युयुधान अर्जुनाच्या मागें होता; व वीर्यशाली केकेयबंधु धृष्टकेतु व चेकितान यांनिशीं पांचाल राजपुत्र युधामन्यु व उत्तमौजा अर्जुनाचे चक्ररक्षक होते. राजा युधिष्ठिर चालत्या पर्वतासारख्या पुष्कळ मस्त हत्तींनिशीं मधल्या तुकडीबरोबर होता. उदार पांचाल देशचा पराक्रमी यज्ञसेन राजा पांडवांच्या बाजूनें आपल्या अक्षौहिणी सैन्यासह विराटाच्या मागून चालला होता. त्यांच्या रथावरून सोन्याचें शृंगारलेले चंद्रसूर्यप्रमाणें झळकणारे नानाप्रकारचीं चिन्हें असलेले मोठमोठे ध्वज होते. आपले भाऊ व मुलगे यांनिशीं धृष्टद्युम्न युधिष्ठिराचें संरक्षण करीत होता. दोन्ही बाजूंच्या असंख्य ध्वजांना मागें सारून एकटा मारुति अर्जुनाच्या रथावर फडकत होता. हातांमध्यें तरवारी, शक्ति, कट्यारी घेऊन असंख्य पायदळ भीमसेनाचें रक्षण करण्यासाठीं पुढें चाललें होतें. गंडस्थळांतून मद बाहेर पडत असल्यानें जे वर्षाव करणाऱ्या मेघाप्रमाणें दिसत असून चोहोंकडे कमलासारखा सुवास पसरीत होते, झूल घातली असल्यामुळें झळकणारे व पर्वतासारखे धिप्पाड, बलवान व अमूल्य दहा हजार हत्ती मागून चालले होते. धैर्यशाली व बुद्धिशाली भीमसेन परिघासारखी मोठी गदा हातामध्यें मध्यें घेऊन त्या अफाट सैन्याला आपल्या मागून घेऊन चालला होता. सूर्याप्रमाणें शत्रुसैन्याला जणूं तापविणाऱ्या त्या वीराकडे जवळून कोणा यो-

ध्याच्यानें पाहवत सुद्धां नव्हतें. ह्या वज्र नांवाच्या व्यूहरचनेला सर्व बाजूंनीं तोंड असून त्याला भीति ह्मणून बिलकूल नव्हती. धनुष्यें हींच या घोर व्यूहरचनेमधील विजा होत्या, व त्यावर देखरेख अर्जुनाची होती. याप्रमाणें कौरव व्यूह रचनेला तोडीदाखल ही व्यूहरचना केली असून पांडव तिचें संरक्षण करीत असल्यानें मनुष्यलोकामध्यें ती कोणाला फोडतां येण्यासारखी नव्हती.

याप्रमाणें पहाटेच्या प्रहरीं दोन्ही सैन्यें सूर्योदयाची वाट पहात सज्ज उभीं असतांना वारा वाहूं लागून त्यामधून पावसाचे तुषार पडूं लागले व आकाशामध्यें ढग वगैरे कांहीं नसतां गडगडाट होऊं लागला. रुक्षवारा चोहों बाजूंनी वाहूं लागून तोआपल्याबरोबर पृथ्वीवरील खडे उडवून नेत होता. मोठी धूळ उठून अंधकारानें सर्व जग भरून गेलें. पूर्वेकडे मोठा उल्कापात होऊन उदय पावणाऱ्या सूर्यावर उल्का आदळून त्याचे तुकडे झाले. त्याबरोबर मोठा शब्द झाला. याप्रमाणें दोन्ही सैन्यें आपल्या तयारीमध्यें असतां सूर्य निःस्तेज असा उगवला व मोठा शब्द निघून धरणीकंप झाला. भूमि दुभंगली. मण्या लटकाविल्या असून उत्तम सोन्याच्या माळांनीं झांकून काढलेल्या पताकांनीं युक्त उंच उंच ध्वज वाऱ्याच्या सोसाट्यानें फडफडूं लागल्यामुळें ताडाच्या वनाप्रमाणें भासूं लागले. कौरवसेना व पांडवसेना एकमेकांवर भिडत असतां—त्या दोन्ही दळांचें फार उग्रस्वरूप दिसत होतें; कौरव सैन्याचें तोंड पश्चिमेकडे असून पांडवांच्या सैन्याचें पूर्वेकडे होतें. कौरवांचें सैन्य दानवेंद्राच्या सेनेप्रमाणें दिसत असून पांडवांचें देवेंद्राच्या सेनेप्रमाणें दिसत होतें. वारा पांडवांच्या बाजूनें कौरवांकडे वहात होता. कौरव सैन्यांत श्वापदें ओरडत होतीं. पांडव सैन्यांतील हत्तींच्या गंडस्थळांतून वाहणाऱ्या मदाचा दर्प कौरव सैन्यांतील हत्तींना सहन होत नव्हता. ज्याच्या गंडस्थलांतून मदवारी वहात आहे अशा सोन्याची झूल घातलेल्या कमलवर्ण हत्तीवर बसून दुर्योधन आपल्या सैन्यामधून चालला होता. स्तुतिपाठक व भाट त्याची स्तुति गात होते. सोन्याची सांखळीची चंद्रासारखी पांढरी शुभ्र छत्री त्याच्या डोक्यावर धरली होती. गांधार देशचे मावळे लोक त्याच्या भोंवतालीं ठेवून शकुनि त्याच्याबरोबर चालला होता. पांढरा फेटा बांधून पांढरें धनुष्य व तरवार घेऊन वृद्ध भीष्म सर्व सैन्याच्या पुढें होते. त्यांवर पांढरी छत्री धरली होती. त्यांचा ध्वज पांढरा असून घोडेही पांढऱ्या पर्वताप्रमाणें पांढरेच होते. या भीष्मांच्याच तुकडीमध्यें सर्व धृतराष्ट्राचे मुलगे, बाल्हीकापैकीं एका भागाचा शल, आंबष्ठ, सिंधुदेशचे क्षत्रिय, सौवीर, व पांच नद्यांमधील शूर वीर हे होते. बहुतेक सर्व राजांचे गुरु अजिंक्य द्रोणाचार्य तांबडे घोडे जुंपलेल्या सोन्याच्या रथांत बसून सर्व सैन्याच्या मागून त्याचें संरक्षण करीत चालले होते. वार्धक्षत्रि, भूरिश्रवा, पुरुमित्र, जय, शाल्वयोद्धे, मत्स्ययोद्धे व हत्तीदळांनीं लढणारे केकय भाऊ हे सर्व त्या सैन्याच्यामध्यें होते. अनेक प्रकारच्या युद्ध कलेमध्यें निपुण धीराचे महाधनुर्धारी रूप, शक, किरात, यवन, पल्हव यांनिशीं उत्तरेच्या बाजूनें चालले होते. वृष्णि, भोज, सुराष्ट्र देशांच्या महारथ्यांनीं संभाळलेलें कृतवर्म्याच्या हाताखालचें शस्त्रास्त्रनिपुण हत्यारबंद मोठें सैन्य दक्षिणेच्या बाजूनें चाललें होतें. मरण्यासाठीं किंवा अर्जुनावर जय मिळविण्यासाठीं निर्माण केलेले अस्त्रनिपुण संसप्तकांचे दहा हजार रथी तसेच शूर त्रिगर्त अर्जुनाकडे चालले होते. कौरवसैन्यामध्यें पूर्ण एक लक्ष हत्तीदळ असून प्रत्येक हत्तीच्या मागें शंभर शंभर रथी, प्रत्येक रथ्याच्या मागें शंभर शंभर स्वार, प्रत्येक स्वारामागें दहा दहा तिरंदाज व प्रत्येक तिरंदाजाच्या मागें शंभर शंभर ढालतरवारीचे शिपाई, याप्रमाणें भीष्मांनीं सैन्याची व्यवस्था ठेविली होती. रोजच्या रोज ते दैव, मानुष गांधर्व अशी निरनिराळ्या प्रकारची व्यूहरचना करीत होते. तथापि कृष्णार्जुनांनीं संभाळल्यामुळें पांडवसेना कोणाची मात्रा चालून न देण्यासारखी होती.

याप्रमाणें कौरवांची प्रचंड सेना सज्ज पाहून युधिष्ठिराला चिंता उत्पन्न झाली; व भीष्मांनीं रचलेला तो अभेद्य व्यूह पाहतांच तोंड उतरून जाऊन तो अर्जुनाला ह्मणाला, ' हे महाबाहो, ज्यांच्या बाजूनें युद्ध करणारे पितामह भीष्म त्या कौरवांपुढें युद्धांत आपला काय टिकाव लागणार ? महातेजस्वी भीष्मांनीं सशास्त्र तयार केलेला हा व्यूह अभेद्य आहे. या प्रचंड व्यूहामधून आपण कसे पार पडून निघ-

णार ? याप्रमाणें खिन्न झालेल्या धर्मराजाला शत्रूचा नायनाट उडविणारा अर्जुन ह्मणाला, 'बहुगुणांनीं संपन्न असून संख्येनें पुष्कळ लोक असले तरी त्यांवर थोड्या लोकांना बुद्धीनें कसा जय येतो तें सांगतों ऐका. तें कारण नारदांना तसेंच भीष्मद्रोणांना माहीत आहे; पूर्वी देवासुरांच्या युद्धांत इंद्रादि देवांना भीष्म ह्मणाले कीं, सत्य, दया, धर्म व यत्न यांनीं जसा जय येतो तसा तो बल व वीर्य यांनीं येत नाहीं. न्याय, अन्याय व लोभ ओळखून अहंकार टाकून नेटानें लढा. ज्या बाजूला न्याय त्याच बाजूला जय येणार. ह्मणून, महाराज, रणामध्यें खात्रीनें आपल्याला जय येणार. नारदही असेंच ह्मणाले आहेत कीं, जेथें कृष्ण तेथें जय. जय हा कृष्णाच्या अंगभूत आहे. तो त्याच्या मागून येतो. भक्तवशता हा त्याचा दुसरा गुण आहे. त्याचें तेज अपरिमेय असून शत्रुमंडळामध्यें तो निर्धास्त असतो. हा सनातन पुरुष आहे. हा जेथें तेथेंच जय असणार. ज्याच्या बाणाला कोठेंही प्रतिबंध नाहीं, अशा ह्या हरीनें पूर्वी देवासुरांच्या युद्धांत जय कोणाला येणार ह्मणून विचारलें असतां कृष्णाच्या मागें राहून आह्मी जिंकणार असें जे ह्मणाले त्यांनाच जय आला; व त्याच्याच प्रसादानें इंद्रादि देवांना त्रैलोक्य मिळालें. तो विश्वभुक् त्रिदिवेश्वर ज्या आपल्या जयाची इच्छा करीत आहे त्या आपल्याला चिंतेचें कांहीं कारण दिसत नाहीं.'

नंतर चांगल्या युद्धानें श्रेष्ठ स्वर्ग मिळविण्याच्या इच्छेनें कुरुश्रेष्ठ पांडवांनीं जशी हवी तशी आपल्या सैन्याची उलट व्यूहरचना केली. शिखंडीची तुकडी मध्यें असून त्यावर देखरेख अर्जुनाची होती. धृष्टद्युम्न सर्व सैन्याच्या पुढें फिरत असून भीमसेन त्याला संभाळीत होता. दक्षिणेच्या बाजूच्या तुकडीचा सांभाळ इंद्रतुल्य धनुर्धारी श्रीमान सात्वतश्रेष्ठ युयुधान करीत होता. ज्याच्या घोड्यांचें सामान सोन्यानें मढविलें होतें व ज्यावर ध्वज फडकत होता अशा सोन्यारत्नांनीं शोभणाऱ्या महेंद्राच्या रथा सारख्या रथामध्यें बसून हत्तींच्या समुदायामधून युधिष्ठिर चालला होता. त्याच्या डोक्यावर धरलेली हस्तिदंती मुठीची पांढरी शुभ्र छत्री फारच शोभा देत होती. त्याच्या उजव्या बाजूनें मोठमोठे ऋषी त्याची स्तुति करीत चालले होते. पुष्कळ पुरोहित, ब्रह्मर्षि व सिद्ध शत्रूचा नाश होईल असें ह्मणत जप, मंत्र, तंत्र करून स्वस्त्ययन ह्मणत याच्या भोंवताळून चालले होते. कुरुश्रेष्ठ युधिष्ठिर वस्त्रें, गाई, फळें, पुष्पें, सोन्याचीं नाणीं ब्राह्मणांना वांटीत चालला होता. ज्याला शेंकडों घांटा लाविल्या होत्या असा उत्तम सोन्यानें मढवून काढलेला अग्नीप्रमाणें झळकणारा अर्जुनाचा रथ हजार सूर्यांप्रमाणें कांतिमान दिसत होता. त्याला पांढरे घोडे जुंपले होते व त्याचीं चाकें फार सुबक होतीं. त्या रथाचे घोडे श्रीकृष्णानें चालविले होते व त्याच्या ध्वजावर मारुति बसला होता. अशा रथामध्यें ज्याच्या तोडीचा धनुर्धर मागें झाला नाहीं व पुढें होणार नाहीं असा अर्जुन गांडीव व बाण हातांमध्यें घेऊन बसला असतां कौरवसेनेला उलथून टाकितो आहे कीं काय असें त्याचें फारच उग्र स्वरूप दिसत होतें. ज्याला कोणत्याही हत्याराची गरज नसून जो युद्धामध्यें केवळ आपल्या भुजांनीं हत्ती, घोडे यांचा चुराडा उडविण्याला समर्थ होता असा वृकोदर न कुलसहदेवांसह महाशूर रथ्यांचें रक्षण करीत होता.

---

## ४ युद्धाचे वेळीं अर्जुनानें केलेली देवीची प्रार्थना. [ ६. २३–२४ ]

ते वेळीं भरतश्रेष्ठ अर्जुनाला श्रीकृष्ण ह्मणाले, 'जे हे आपल्या सैन्यामध्यें उभे राहून आपल्या तेजानें ताप देत आपल्याकडे सिंहाप्रमाणें पहात आहेत, या कुरुवंशाच्या केतुभूत भीष्मांनीं तीनशें अश्वमेध केले आहेत. यांना मारल्यावरच कौरवांच्याबरोबर युद्धाची तूं आशा धर. परंतु अगोदर शुचिर्भूत होऊन रणभूमीकडे तोंड करून उभा रहा व शत्रूचा पराभव होण्यासाठीं हात जोडून दुर्गेचें स्तोत्र ह्मण.'

नंतर अर्जुन ह्मणाला, 'हे सिद्धांना उत्तमपदाला नेऊन पोहोंचविणारे मंदरवासिनी आर्ये, तुला मी नमस्कार करतों. हे कुमारि, हे पिंगटवर्णाचे कपालपत्नी, हे भक्तकल्याणि महाकालि, मी तुझ्यापुढें लीन आहें. हे वरवर्णिनि चंडि, तूंच लोकांना संकटांतून तारणारी आहेस. हे विक्राळ स्वरूप धारण करणारे महाभागे कात्यायनि, तूंच प्रत्यक्ष जयस्वरूपी

असून जय देणारी आहेस. नाना आभरणांनीं विभूषित असा तुझा मोराच्या पिसांचा ध्वज असून भयंकर भाला व ढालतरवार तुझ्या हातांमध्यें आहे. श्रीकृष्णाची तूं धाकटी बहीण असून तुझा जन्मही नंदकुळांतच झाला आहे. पीतांबरधारि देवि, तुला रेड्याचें रक्त आवडतें. तूं सर्वव्यापी असून प्रत्यक्ष वेद व श्रुति तूंच आहेस. तसेंच तुला भूतज्ञान आहे. जंबुद्वीपाच्या राजधानीच्या ग्रामवृक्षांच्या ठिकाणीं तसेंच देवालयांतून तुझें वास्तव्य आहे. सर्व विद्यांमध्यें श्रेष्ठ विद्या तूंच असून प्राणिमात्रांची महानिद्रा तूंच आहेस. स्कंदाची तूं माता आहेस. स्वाहा, स्वधा, कला, काष्ठा, सरस्वती, तशीच वेदमाता व वेदांत सर्व तूंच आहेस. हे महादेवि, शुद्ध मनानें मीं याप्रमाणें तुझी स्तुति केली आहे. तुझ्या प्रसादानें रणामध्यें मला नेहमीं जय मिळो. अरण्यांतील भयाच्या ठिकाणीं, बिकट जागीं व तुझ्या भक्तांच्या घरीं तुझा नेहमीं वास असून पातालामध्यें तूं दानवांना युद्धामध्यें जिंकलेस. जंभिनी, मोहिनी, माया, न्ही, श्री, संध्याकाळ, दिवस, सावित्री, जननी, तुष्टि, पुष्टि, धृति, दीप्ति, चंद्रसूर्यांना तेज देणारी तूंच आहेस. वैभवशाल्यांचें वैभव तूंच आहेस. सिद्धचारण आत्मानात्मविवेकरूप समाधीमध्यें तुझ्यांकडे दृष्टि लावतात.' हें ऐकून अर्जुनाची भक्ति ओळखून सर्व मानव प्राण्यांवर कृपा करणारी देवी अंतरिक्षामध्यें प्रकट होऊन श्रीकृष्णासमक्ष ह्मणाली, ' हे पांडवा, थोड्याच वेळांत तूं शत्रूंना जिंकशील. कोणाची मात्रा न चालूं देणारा असा तूं प्रत्यक्ष नर असून नारायण तुला साहाय्य आहे. शत्रूंना—प्रत्यक्ष इंद्राला सुद्धां रणांत तुला जिंकवणार नाहीं. ' असें ह्मणून ती वरददेवी लगेच गुप्त झाली.

याप्रमाणें व्यूहरचना करून तयार झालेलीं तीं दळें एकमेकांशीं भिडत असतां एकच गोंधळ उडून राहिला. बाजे, शंख, नौबती इत्यादिकांचे आवाज रणशूरांच्या गर्जनेशीं मिळून जाऊन मोठा गजगज उडाला होता. व या दोन दळांचा संगम मोठा अलौकिक दिसत होता.

---

## ९ अर्जुन विषाद व श्रीकृष्णाचा उपदेश—गीता. (६. २५–४१)

पवित्र अशा कुरुक्षेत्रामध्यें याप्रमाणें कौरवपांडव युद्धाला आतुर होऊन भिडले असतां पांडवांचें जय्यत सैन्य पाहून दुर्योधन द्रोणाचार्यांकडे येऊन ह्मणाला, आचार्य आपला बुद्धिशाली शिष्य धृष्टद्युम्न यानें व्यवस्था लावलेली ही पांडवांची अफाट सेना पहा. हिच्यामध्यें मोठमोठीं धनुष्यें हातांमध्यें घेऊन निघालेले, युद्धामध्यें भीमार्जुनांच्या तोडीचे शूर, युयुधान, विराट, महारथी द्रुपद, धृष्टकेतु, चेकितान वीर्यशाली काशिराज, पुरुजित्, कुंतिभोज, नरपुंगव शैब्य, पराक्रमी युधामन्यु, वीर्यशाली उत्तमौजा, तसेच अभिमन्यु व द्रौपदीचे मुलगे अशी अशी महारथी मंडळी दिसताहेत. आतां आमच्यामध्यें जे ठळक ठळक आहेत त्यांची माहिती लक्षांत येण्यासाठीं देतों. आपण, भीष्म, कर्ण, कृप, समितिंजय, अश्वत्थामा, विकर्ण, सौमदत्ति, त्याचप्रमाणें दुसरे पुष्कळ नाना शास्त्रांनीं प्रहार करण्याला समर्थ असे युद्धविशारद शूर मजसाठीं प्राण देण्याला तयार आहेत. तरी पण आमच्या सैन्याचें आधिपत्य भीष्मांकडे असल्यानें तें पांडवांच्या सैन्याशीं टक्कर देण्याला अपुरें आहे. उलटपक्षीं त्यांचें सैन्य भीमांच्या संरक्षणाखालीं असल्यानें आह्मांला भारी आहे. ह्मणून तुह्मी सर्व आपापल्या तुकडीमध्यें आपापल्या जागीं राहून भीष्मांचें तेवढें मोठ्या हुषारीनें रक्षण करा.'

या नंतर प्रतापशाली कुरुवृद्ध भीष्माचार्यांनीं दुर्योधनाला संतोष होण्यासाठीं मोठ्यानें आपला शंख फुंकून सिंहनाद केला. त्याबरोबर हजारों शंख, नौबती, नगारे, पडघम, शिंगें यांचा गजर सुरू होऊन सर्व भूमि दुमदुमून राहिली. तेव्हां पांढरे घोडे जुंपलेल्या आपल्या भव्य रथामध्यें बसलेल्या श्रीकृष्णानें आपला पांचजन्य व अर्जुनानें धनंजय असे आपले दिव्य शंख फुंकले. अचाट कर्म करणाऱ्या भीमसेनानें आपला पौंड्र महाशंख फुंकला, व कुंतिपुत्र राजा युधिष्ठिरानें आपला अनंतविजय शंख फुंकला. नकुलसहदेवांनीं सुघोष व मणिपुष्पक फुंकले. मोठा धनुर्धारी काश्य, महारथ शिखंडी, धृष्टद्युम्न, विराट, कधीं पराभव ह्मणून ठाऊक नस-

लेला सात्यकि, द्रुपद, द्रौपदीचे मुलगे, महाबाहु अभिमन्यु, या सर्वांनीं आपापले शंख फुंकले. त्या गजरानें आकाश व पृथ्वी दणाणून जाऊन कौरवांचीं हृदयें फाटून गेलीं. कौरवांना सज्ज होऊन उभे राहिलेले पाहून शस्त्रप्रहार सुरू झाला असतां धनुष्य उचलून अर्जुन त्या प्रेरक परमात्म्याला ह्मणाला, 'हे अच्युता, दोन्ही सैन्यांच्या मध्यभागीं माझा रथ उभा कर; ह्मणजे युद्धासाठीं तयार होऊन राहिलेल्यांकडे मी नजर फेंकीन, आणि या रणसमारंभामध्यें मला कोणाशीं युद्ध करावें लागेल हें ठरवीन. युद्धामध्यें दुर्बुद्धि दुर्योधनाची बाजू घेऊन त्याच्या मनाप्रमाणें वागण्यासाठीं जे येथें जुळले आहेत त्या ह्या लढवय्यांवर मला एकदां दृष्टि फेंकूं दे.' याप्रमाणें अर्जुन बोलला असतां श्रीकृष्ण दोन्ही सैन्यांच्यामध्यें भीष्मद्रोणप्रमुख सर्व राजांच्या पुढें आपला श्रेष्ठ रथ उभा करून, 'हे पार्था, ह्या जुळलेल्या कौरवांवर नजर फेंक,' असें ह्मणाला. तेव्हां त्या ठिकाणीं दोन्ही सैन्यांमध्यें वडील, चुलते, आजे, गुरू, मामे, भाऊ, पुतणे, नातु, स्नेही, सासरे, जिव्हाळ्याचे लोक, तयार होऊन उभे असलेले त्याच्या दृष्टीस पडले. त्या सर्वांना याप्रमाणें तयार होऊन उभे असलेले पाहून अंतःकरण कळवळल्यानें खचून जाऊन अर्जुन ह्मणाला, 'हे कृष्णा, ह्या स्वजनांना युद्धाला तयार होऊन उभे राहिलेले पाहून माझीं गात्रें गळून गेलीं आहेत; तोंड सुकून गेलें आहे; कांपरें भरून अंगावर कांटा उभा राहिला आहे; गांडीव हातामधून गळून पडत आहे; आणि अंग जळत आहे. युद्धामध्यें स्वजनांना मारून कांहीं कल्याण होईलसें दिसत नाहीं. हे कृष्णा, मला विजय नको, राज्य नको किंवा तें सुख नको. आह्मांला तें राज्य घेऊन काय करावयाचें आहे, सुखोपभोगांशीं काय करावयाचें किंवा या प्राणाशीं तरी काय काम आहे? ज्यांसाठीं आह्मी राज्याची, भोगांची आणि सुखांची इच्छा केली ते हे गुरू, वडील, मुलगे, आजे, मामे, सासरे, नातू, मेहुणे, संबंधी, प्राणाची व धनाची आशा सोडून युद्धाला तयार होऊन उभे राहिले आहेत. कृष्णा, मला कोणीं मारिलें तरी पृथ्वीसाठीं तर कशाला, पण प्रत्यक्ष त्रैलोक्याच्या राज्यासाठीं सुद्धां यांना मारण्याची माझी इच्छा नाहीं. ह्या धार्तराष्ट्रांना मारून आह्मांला काय बरें सुख होणार? या आततायींना मारून आह्मी पापालाच धनी होणार? ह्मणून आमचे बांधव जे हे धार्तराष्ट्र यांना आह्मीं मारूं नये; कारण स्वजनांना मारून आह्मांला सुख कसें बरें व्हावें? लोभामुळें बुद्धि गेल्यानें यांना जरी कुलक्षय केल्यापासून जडणारा दोष व मित्रद्रोहाचें पातक दिसत नाहीं, तरी कुलक्षय केल्यानें लागणारें पाप दिसत असून या पापापासून दूर रहायाचें आह्मांस समजूं नये का? कुलक्षय झाला असतां त्याबरोबर पूर्वापार चालत आलेले कुलधर्म नष्ट होतात; व धर्म नाहींसा झाल्यानें सर्व बाकी राहिलेल्या कुळावर अधर्माचा पगडा बसतो. याप्रमाणें अधर्माचा पगडा बसल्यावर कुलस्त्रिया गैर चालीच्या निघूं लागतात. आणि त्या बिघडल्या ह्मणजे वर्णावर्णाची भेसळ होते. आणि हा वर्णसंकर कुलाचा नाश करणाऱ्यांच्या व बाकी राहिलेल्या कुळाच्या नाशाला कारण होतो. ह्यांच्या पितरांना पिंड व उदक न मिळून ते नरकांत पडतात. कुळाचा नाश करणाऱ्यांच्या ह्या वर्णसंकरकारक दोषांमुळें परंपरागत जातीच्या तशाच कुळाच्या धर्माचा फडशा पडतो, व कुळधर्म बुडाले ह्मणजे मनुष्यांचें खात्रीनें नरकामध्यें ठाणें पडतें असें आमच्या ऐकण्यांत आहे. तेव्हां राज्यसुखाच्या लोभानें स्वजनांना मारण्याला तयार होऊन आह्मी हें महत्पाप करण्याला सिद्ध झालों ही केवढी तरी वाईट गोष्ट आहे! हातामध्यें शस्त्र न घेतां स्वस्थ असतांना जरी हातांत शस्त्र घेऊन येऊन धृतराष्ट्रपुत्रांनीं रणामध्यें मला मारलें तरी तें सुद्धां यापेक्षां मला कल्याणकारक वाटतें.' असें ह्मणून शोकाकुल होऊन हातांतील धनुष्यबाण टाकून देऊन अर्जुन रथामध्यें जागच्याजागीं बसला.

याप्रमाणें अर्जुनाला ममतेनें कळवळलेला डोळे पाण्यांनीं भरून धीर खचलेला पाहून मधुसूदन त्याला ह्मणाला, 'बा अर्जुना, हलक्यांना उचित, स्वर्गाच्या आड येणारें व मर्दाला कालिमा आणणारें हें मोहपटल अशा आणीबाणीच्या प्रसंगीं तुझ्यावर कसें येऊन पडलें? असा षंढपणा पदरीं घेऊं नकोस. हें

तुला शोभत नाहीं. हे शत्रुतापना, हा कमीपणा आणणारा दुबळेपणा टाकून देऊन तयार हो.' अर्जुन ह्मणाला, 'पण हे कृष्णा, ज्यांची आह्मीं पूजा केली पाहिजे त्या भीष्मांशीं, त्या द्रोणांशीं युद्ध करून मी त्यांवर बाण कसे सोडूं? अशा तेजस्वी गुरूंना न मारतां ह्या लोकीं भिक्षा मागून राहण्याची पाळी आली तरी बेहेत्तर. कारण धर्मार्थादि चतुर्विध पुरुषार्थसंबंधानें तत्पर अशा गुरूंना मारून येथेंच रक्तानें भरलेल्या भोगांचा उपभोग घ्यावा लागणार, मग परलोकींच्या भोगांची किंवा मोक्षाची गोष्ट राहिली बाजूला. आतां भिक्षा मागणें चांगलें कां युद्ध करणें चांगलें हें आधीं बरोबर कळत नाहीं. शिवाय आह्मी त्यांना जिंकूं कां ते आह्मांला जिंकतील हें सांगतां येणें कठीण व आह्मी जिंकूं असें जरी घेऊन चाललें तरी ज्यांना मारून आह्मांला जिवंत राहवेंसें वाटत नाहीं तेच हे धार्तराष्ट्र आमच्यापुढें युद्धाला तयार होऊन उभे राहिले आहेत. या मोहरूपी दोषानें माझ्या मनावर पगडा बसविला असल्यामुळें धर्माधर्म मला कळेनासा झाला आहे ह्मणून मी तुला विचारतों. खात्रीनें जें कल्याणप्रद असेल तें तूं मला सांग. मी तुझा शिष्य आहें. ह्या मला शरण आलेल्याला बरावाईट मार्ग असेल तो दाखीव. भूमीवर निर्वैर असें वैभवकारक राज्य किंवा देवाचें आधिपत्य मिळालें तरी त्यानें हा इंद्रियांना शोषून टाकणारा शोक नाहींसा होईल असें मला मुळींच दिसत नाहीं.' असें श्रीकृष्णाला ह्मणून शत्रूला ताप देणारा अर्जुन मी युद्ध करणार नाहीं ह्मणून स्वस्थ बसला. याप्रमाणें दोन्ही सैन्यांच्यामध्यें उत्साहहीन होऊन बसलेल्या त्या अर्जुनाला श्रीकृष्ण हंसत हंसतच ह्मणाला, 'तूं मोठमोठ्या शहाणपणाच्या गोष्टी तर सांगतोस आणि ज्यासंबंधानें शोक करण्याचें कारण नाहीं अशा संबंधानें शोक करीत बसतोस. शहाणे लोक मेलेल्यासाठीं किंवा जित्यासाठीं कधीं शोक करीत नाहींत. मी, तूं, हे सारे लोक पूर्वीं कधीं नव्हतों असें नाहीं किंवा पुढें होणार नाहीं असेंही नाहीं. देहधाऱ्याला ह्या देहामध्यें ज्याप्रमाणें कौमार, यौवन, जरा इत्यादि अवस्था अनुभवाव्या लागतात त्याचप्रमाणें त्याला एक देह टाकून दुसरा देह घ्यावा लागतो, ह्मणून शहाण्याला कांहीं याविषयीं वाटत नाहीं. थंडी, ऊन्ह, सुख, दुःख इत्यादि इंद्रियांना होणारे क्षणिक विकार त्यांना होतात,जातात. भारता, ते सोसले पाहिजेत. हे नरश्रेष्ठा, सुखदुःखें सारखीं मानणाऱ्या ज्या शहाण्या पुरुषाला हे पीडा देत नाहींत तो मोक्षाला लायख होतो. जें मुळांतच नाहीं त्याला अस्तित्व नाहीं व जें आहे त्याला नसतेपणा नाहीं. तत्त्ववेत्यांनीं दोघांचाही याप्रमाणें पूर्ण छडा लावला आहे. ज्यानें हें सर्व जग भरलें आहे त्याला कधीं नाश नाहीं व त्या अविनाश्याचा नाश कोणाच्या हातून होणेंही नाहीं. शाश्वत, अविनाशी, अनिर्वर्णनीय जो आत्मा त्याचे हे उपाधिभूत देह नाशवंत समजले आहेत. ह्मणून तुला युद्ध करण्याला कांहीं हरकत नाहीं. जो हा मारतो असें समजतो किंवा जो हा मरतो असें समजतो त्या दोघांनाही कांहीं कळत नाहीं. हा कोणाला मारीत नाहीं किंवा स्वतः मरत नाहीं. हा कधीं जन्मत नाहीं किंवा मरत नाहीं. एकदां असून फिरून नाहींसा होणारा हा नव्हे. ह्या जन्मरहित शाश्वत, पुराणपुरुषाचा, देहाचा नाश झाला असतांही त्याबरोबर नाश होत नाहीं. ह्याला जन्म व खंड नसून अविनाशी असा हा कायमचा आहे हें जो जाणतो तो पुरुष कसा कोणाला मारवील किंवा मारील? ज्याप्रमाणें जुनीं वस्त्रें टाकून मनुष्य दुसरीं नवीं घेतो त्याप्रमाणें आत्मा जुनीं शरीरें टाकून देऊन नव्यांमध्यें शिरतो. शस्त्रें याला तोडूं शकत नाहींत; विस्तव याला जाळूं शकत नाहीं. पाण्यानें हा भिजत नाहीं किंवा वाऱ्याला याला शोषून घेतां येत नाहीं. याला तोडणें शक्य नाहीं, याला जाळणें शक्य नाहीं किंवा शोषून घेणें शक्य नाहीं, हा कायमचा, सर्वव्यापी, स्थिर, अचल असा सनातन पुरुष आहे. तसाच हा अव्यक्त, अतर्क्य व निर्विकार आहे. तेव्हां हा अशा प्रकारचा आहे हें ओळखून या संबंधानें तूं वाईट वाटून घेऊं नयेस. आतां हा नेहमीं उत्पन्न होणारा किंवा नेहमीं मरणारा आहे असें जर तुला वाटत असेल तरी पण यासंबंधानें शोक करण्याचें कारण नाहीं. कारण जो जन्मला त्याला मरण व मेला त्याला जन्म ठेवलाच आहे. तेव्हां या अपरिहार्य गोष्टीसंबंधानें शोक कां करावा? या भूतलावरील सर्व भूतमात्र मूळचे अव्यक्त

असून मध्येंच निजलेल्याला स्वप्नाप्रमाणें मायेच्या योगानें व्यक्त दिसूं लागून शेवटीं नाश झाल्यावर फिरून अव्यक्तच होतात. मग या गोष्टीसंबंधानें दुःखाला कारण कोठें उरतें ? कोणी याकडे आश्चर्यानें पाहतो, कोणीं यासंबंधानें आश्चर्यानें बोलतो आणि कोणी या संबंधाच्या गोष्टी आश्चर्यानें ऐकतो; पण ऐकून देखील याची ओळख कोणाला पटत नाहीं. हे अर्जुना, सर्वांच्या देहांमध्यें असणारा हा आत्मा नेहमीं अवध्य आहे. ह्मणून कोणाही प्राणिमात्रासंबंधानें शोक करण्याचें कारण नाहीं. आतां स्वधर्माकडे लक्ष देशील तरी असें कचरणें तुला शोभत नाहीं. धर्म्य अशा युद्धाखेरीज क्षत्रियाला कल्याणप्रद असें दुसरें कांहींच नाहीं. आपोआप पुढें आलेलें स्वर्गाचें केवळ खुलें दार असें युद्ध ज्या क्षत्रियांच्या नशिबीं येतें ते धन्य समजले पाहिजेत. आतां हें धर्माला अनुसरून असणारें युद्ध जर तूं करणार नाहींस तर स्वधर्माला आणि कीर्तीला मुकून पाप तुझ्या माथीं बसेल. आणि सर्व लोक तुझी अपकीर्ति सांगत बसतील. आणि **संभाविताला अपकीर्ति मरणापेक्षां वाईट आहे.** मोठमोठे महारथी तूं रणांतून भिऊन पळालास असें समजतील. आणि ज्यांना तूं आजपर्यंत मोठा वाटत होतास त्यांना तूं आतां तुच्छ वाटूं लागशील. तुझ्या वाईटावर असलेले तुझ्यासंबंधानें भलतें सलतें बोलूं लागतील; तुझ्या सामर्थ्याची निंदा करूं लागतील. मग याहून दुःखद तें काय असणार ? मेलास तर स्वर्ग मिळेल; जय मिळविशील तर पृथ्वीचा उपभोग घेशील. ह्मणून युद्ध करण्याचा निश्चय करून ऊठ. सुखदुःख, नफानुकसान, जयापजय सारखींच समजून युद्धाला तयार हो ह्मणजे तुला पाप मुळींच लागणार नाहीं. हें तुला मीं **सांख्य शास्त्रांतील** तत्त्व सांगितलें; आतां **योगशास्त्रांतील** तत्त्व सांगतों ऐक; जें तत्त्व तुला कळल्यानें कर्मपाशापासून तूं सुटशील. या योगशास्त्रावरून आरंभलेलें निष्काम कर्म फुकट जात नाहीं व याला मध्यें विघ्नही येत नाहीं. या धर्माप्रमाणें केलेलें थोडें सत्कृत्य देखील जन्ममरणादिक महाभयापासून सोडविण्याला पुरें होतें. या योगमार्गामध्यें निश्चयात्मक एक ठाम बुद्धि झाली पाहिजे, अनिश्चयात्मक बुद्धीनें मोक्षप्राप्तीची खटपट चालविणाऱ्यांचे अनंत विचार बनून त्याला अनेक फांटे फुटत असतात. वेदाच्या अगदीं वरवर दिसणाऱ्या शब्दार्थामध्येंच गढून जाऊन त्यावांचून दुसरें कांहीं नाहीं असें ह्मणणारे सकाम बुद्धीनें स्वर्गाच्या पाठीस लागलेले मूर्ख लोक भोग व ऐश्वर्य यांच्या प्राप्तीसाठीं फिरून जन्म, फिरून कर्म, असें फळ देणाऱ्या अनेक निरनिराळ्या पुष्कळ क्रिया ज्यांत सांगितल्या आहेत, अशा वाक्यांची विशेष स्तुति करतात. परंतु अशा प्रकारच्या वेदवाक्यांनीं भोग व ऐश्वर्य यांमध्यें गढून त्यानें वेडे बनलेल्या ह्या मूर्खांची समाधीच्या वेळीं निश्चयात्मक ठाम बुद्धि असूं शकत नाहीं. तेच वेद सत्त्व, रज, तम, या तीन गुणांनीं भरलेल्या संसारांत पाडण्याला कारणीभूत होतात. ह्मणून हे अर्जुना, या त्रैगुण्यात्मक संसारापासून सूट. सुखदुःख या जोडीची पर्वा न करतां नेहमीं सत्त्व गुण धरून न मिळालेलें मिळविण्याकडे व मिळविलेलें राखण्याकडे लक्ष न देतां आत्म्याला ओळखून रहा. ज्याप्रमाणें लहानसान झऱ्याचा किंवा जिकडे तिकडे जलमय होऊन राहिलेल्या मोठ्या जलाशयाचा एखाद्या मनुष्याला आपली तहान भागविण्याला सारखाच उपयोग होतो त्याचप्रमाणें शहाणा ब्रह्मज्ञानी सर्व वेदांचा ब्रह्मज्ञानापुरताच उपयोग करून घेतो. **कर्म करण्यापुरताच तेवढा तुला अधिकार आहे. त्यांच्या फलावर बिलकुल नाहीं. केलेल्या कर्माच्या फलाची आशा मनामध्यें धरूं नकोस. बरें फळ नाहीं ह्मणून कांहीं न करतां स्वस्थही बसूं नकोस. पूर्ण ईश्वरनिष्ठ होऊन निर्लोभपणानें काम साधलें तरी वाहवा न साधलें तरी वाहवा अशा बुद्धीनें कर्तव्य करीत रहा. यशापयशासंबंधानें सारखेंच असणें यालाच ईश्वरनिष्ठा ह्मणतात.** कारण अर्जुना, **आसक्तबुद्धीनें केलेलें कर्म फारच वाईट.** ह्मणून कर्मप्रवर्तक त्या समबुद्धीला शरण जा. **फळाचा हेतु धरून कर्म करणारे क्षुद्र आहेत.** ह्या लोकीं ही समबुद्धि आलेला मनुष्य पुण्य आणि पाप ह्यां दोन्हींना रजा देतो. ह्मणून या समत्वाकडे लक्ष लाव. कर्म करीत असतां त्यामध्यें यशापयशासंबंधानें बेपर्वा राहून केवळ कर्तव्य ह्मणून तें करीत

राहणें हाच शहाणपणा. कारण समबुद्धि झालेले शहाणे लोक कर्मापासून मिळणाऱ्या फळाला फांटा देऊन जन्ममरणाच्या फेऱ्यांतून सुटून अनपाय अशा श्रेष्ठ मोक्षपदाला जातात. जेव्हां तुझी बुद्धि मोहाचा पडदा बाजूला सारून त्याच्या पलीकडे जाईल, तेव्हां ऐकलेल्याच्या व ऐकावयाच्यासंबंधानें तुला वीट येईल. जे वेळीं निरनिराळ्या वेदवाक्यांनीं गोंधळून गेलेली तुझी बुद्धि स्थिर होऊन समाधीमध्यें न डगमगतां ठाम राहील तेव्हां योगप्राप्ति झाली असें समज.' अर्जुन ह्मणाला, 'समाधीनें ज्याची बुद्धि ठाम झाली आहे त्याची खूण काय? बुद्धि परमात्म्याच्या ठिकाणीं ठाम झालेला मनुष्य काय बोलतो? त्याचें आसन कशा प्रकारचें असतें? व त्याचा व्यवहार कसा असतो?' श्रीकृष्ण ह्मणाला, 'ज्या वेळीं मनुष्य मनामध्यें आलेल्या सर्व वासना सोडून देऊन आपल्या ठिकाणींच आत्मस्वरूपांत तुष्ट असतो तेव्हां त्याची बुद्धि परमात्म्याच्या ठिकाणीं ठाम झाली ह्मणतात. दुःखाच्या वेळीं न कचरणारा, सुखासंबंधानें बेपर्वा असणारा त्याचप्रमाणें लोभ, भय, राग हे मनोविकार ज्याच्या मनांतून गेले आहेत त्याला स्थितधी मुनि ह्मणतात. बऱ्यावाईट गोष्टी कालानुसार घडावयाच्या त्या घडल्यानें ज्याला बरें किंवा वाईट वाटत नाहीं तेव्हां त्याची बुद्धि परमात्म्याकडे ठाम झाली ह्मणावयाची. ज्याप्रमाणें कांसव चोहोंकडून आपले अवयव आखडून घेतें त्याप्रमाणें इंद्रियविषयांपासून जेव्हां हा इंद्रियांना आवरून घेतो तेव्हांच त्याची बुद्धि ठाम होते. विषयांकडे पहावयाचें नाहीं असा निश्चय केलेल्या मनुष्यापासून विषय दूर पळतात; व यावरील प्रेम उडाल्यावर वासना देखील हा परब्रह्ममय झालेला पाहून यापासून दूर होते. नुसतें मनच ताब्यांत ठेवावयाची खटपट करणाऱ्या शहाण्या पुरुषाचीं देखील अस्वस्थ करून सोडणारीं इंद्रियें मनाला जोरानें आपल्याकडे खेंचतात. ह्मणून प्रथम त्या सर्वांवर दाब ठेवून मनुष्यानें एकाग्रतेनें मजकडेसच लक्ष देऊन असावें. कारण इंद्रियें ज्याच्या स्वाधीन झालीं त्याचीच बुद्धि ठाम झाली ह्मणावयाची. विषयांसंबंधानेंच विचार करीत राहिल्यानें मनुष्याची त्यांवर आसक्ति जडते. आसक्तीपासून वासना उत्पन्न होते व वासना पूर्ण न झाल्यानें राग येतो. रागापासून भुरळ पडून त्याच्या योगानें बुद्धि चळते. त्याच्या योगानें बुद्धीचा ऱ्हास होऊन बुद्धि गेल्यानें मनुष्य नाश पावतो. आपलें चित्त ज्यानें आपल्या स्वाधीन करून घेतलें आहे असा मनुष्य प्रीति किंवा द्वेष यांपासून अलग अशा आपल्या ताब्यांत असलेल्या इंद्रियांच्या योगानें विषयांचा उपभोग घेत असला तरी त्याच्या मनाला स्वस्थता असते व याप्रमाणें मन प्रसन्न असल्यानें याचीं सर्व दुःखें नाहींशीं होतात. व प्रसन्न अशा या मनुष्याची बुद्धि पुढें लवकरच स्थिर होते. ज्याचें मन स्थिर नाहीं त्याला परमात्मज्ञान नाहीं, त्याला भक्तीचा विचार नाहीं; भक्तिनसल्यानें शांति नाहीं. शांति नसल्यावर सुख कोठून असणार? जें मन वाटेल तिकडे चरणाऱ्या इंद्रियांच्या मागून जातें तें वारा ज्याप्रमाणें पाण्यामध्यें नाव गडप करतो त्याप्रमाणें मनुष्याची बुद्धि नाहींशी करतें. ह्मणून चोहोंबाजूंनीं ज्याचीं इंद्रियें इंद्रिय विषयांपासून आवरलीं असतात त्याचीच बुद्धि ठाम झाली. जें ब्रह्मज्ञान सर्व भूतमात्रांस पूर्ण अंधकारमय रात्रशी वाटतें तें मनोनिग्रही मनुष्यास लख्ख प्रकाशमय भासतें आणि ज्या ह्या मायामय संसाराचे ठिकाणीं सर्व प्राणिमात्र जागरूक असतात तो त्या विवेकी यतीला रात्रीप्रमाणें शून्य वाटतो. ज्याप्रमाणें अनेक नद्या, नेहमीं भरलेला असून आपली मर्यादा कधीं उल्लंघन न करणाऱ्या समुद्रामध्यें गडप होऊन जातात त्याचप्रमाणें सर्व वासना ज्याच्यामध्यें लय पावतात त्यालाच शांति मिळते. वासनांवर आसक्ति ठेवून त्यांच्या मागें लागलेल्याला ती मिळत नाहीं. जो मनुष्य सर्व प्रकारच्या वासना सोडून देऊन निस्पृह असा होऊन ममत्व व अहंकार टाकून ह्या जगामध्यें वावरतो त्याला शांति मिळते. ही आतांपर्यंत सांगितलेली ब्रह्ममय करणारी स्थिति होय. ही प्राप्त झाल्यानें मनुष्य मोह पावत नाहीं. मरणकालीं देखील अशी स्थिति झाली तर कायमचें ब्रह्मसुख मिळतें.'

(३.) अर्जुन म्हणाला, 'हे जनार्दना, कर्मापेक्षां ज्ञानच जर तूं श्रेष्ठ समजतोस तर मला हें घोर कर्म कां करावयाला लावतोस? घोटाळ्यांत पाडणाऱ्या भाषणानें तूं माझ्या बुद्धीला भ्रम पाडीत

आहेस. तर एक काय तें ठाम ठरवून ज्याच्या योगानें माझें खरें हित होईल तेंच मला सांग.'

यावर भगवान श्रीकृष्ण ह्मणाला, 'हे निष्पापा, पूर्वी सृष्टीच्या आरंभींच मीं इहलोकीं वेदान्ती लोकांस ज्ञानमार्गानें व योग्यांस कर्ममार्गानें परमात्मप्राप्ति सांगितली आहे. कर्म मुळींच हातीं न घेतां मनुष्याच्या अंगीं कर्मशून्यता येणें नाहीं; आणि केवळ कर्म सोडून दिल्यानेंच फलसिद्धि होत नाहीं. कारण क्षणभरसुद्धां कोणी कर्म केल्यावांचून रहात नाहीं. हा जीव पराधीन असल्यामुळें स्वाभाविक गुणांच्या योगानें कर्में हीं करीतच असतो. कर्मेंद्रियांचा निग्रह करून जो मूर्ख मनानें इंद्रियविषयांचें चिंतन करीत रहातो त्याला ढोंगी ह्मणतात. परंतु जो इंद्रियांवर मनाचा दाब ठेवून फलावर आसक्ति न ठेवतां कर्मेंद्रियांनीं कर्में करीत रहातो तोच श्रेष्ठ समजावा. तूं कर्म करच. कारण कर्म न करण्यापेक्षां कर्म करणें श्रेयस्कर आहे. कर्म न करशील तर तुझी शरीरयात्रा सुद्धां चालणार नाहीं. यज्ञावांचून निराळ्या हेतूनें कर्म केलें असतां त्या कर्मानें ह्या जगांत मनुष्य बांधला जाऊन संसाराच्या फेऱ्यांत सांपडतो. ह्मणून फलाच्या इच्छेपासून दूर राहून परमात्मप्राप्तीसाठीं कर्म कर. पूर्वी सृष्टि उत्पन्न करते वेळीं परमात्मप्राप्त्यर्थ कर्म किंवा यज्ञ याला अधिकारी प्रजा उत्पन्न करून ब्रह्मदेव ह्मणाले कीं, या यज्ञाच्या साहाय्यानें प्रजा उत्पन्न करा. हा यज्ञ इष्ट फल देणारी कामधेनु होवो. या यज्ञानें तुह्मी देवांना संतुष्ट करा ह्मणजे वृष्ट्यादिकांनीं ते तुह्मांला सुखी करतील व याप्रमाणें परस्परांना संतोषवीत राहिल्यानें तुमचें विशेष कल्याण होईल. कारण या यज्ञानें संतुष्ट केल्यानें देव तुह्मांला हवे ते भोग देतील. त्यांनीं दिलेल्या भोगांचा त्यांना कांहीं मोबदला न देतां जो उपभोग घेतो तो चोरच समजला पाहिजे. यज्ञामध्यें देवांना हविर्भाग देऊन राहिलेलें जे सेवन करतात ते सर्व पापांपासून मुक्त होतात. जे पापी केवळ आपल्या पोटासाठीं अन्न शिजवितात ते पापी लोक तें अन्न न खातां प्रत्यक्ष पापच खात असतात. सर्व भूतमात्रांची उत्पत्ति अन्नापासून आहे, अन्नाची उत्पत्ति पावसापासून आहे, यज्ञामुळें पाऊस पडतो व ह्या यज्ञाची उत्पत्ति कर्मांपासून आहे. हें कर्म वेदापासून उत्पन्न झालें आहे. हा वेद त्या अविनाशी ब्रह्मापासून उत्पन्न झाला आहे. ह्मणून सर्व ठिकाणीं भरलेलें ब्रह्म नेहमीं यज्ञामध्यें साक्षित्वानें कायम आहे. याप्रमाणें चाललेलें चक्र जो चालू ठेवीत नाहीं तो इंद्रियांच्याच विषयोपभोगादि उपयोगासाठीं जन्म घेतलेला पापी मनुष्य फुकट जिवंत आहे असें समजलें पाहिजे. जो मनुष्य आत्म्यामध्येंच गढून त्याच्या लाभानेंच समाधान पावून त्यावरच संतुष्ट असतो त्याला करावयाचें ह्मणून कांहींच उरलें नसतें. कोणतेंही कर्म करण्यांत अथवा न करण्यांत त्याचा नफा तोटा कांहींच नसतो. आणि भूतमात्रांच्या साहाय्यानें आपला कांहीं नफा करून घेण्यासारखें कोणत्याही भूतमात्रांवर अवलंबून असें त्याचें कांहींच नसतें. ह्मणून नेहमीं कोणत्याही गोष्टीवर आसक्ति न ठेवतां कर्म करीत रहावें. कारण निरपेक्षतेनें कर्म करीत राहिल्यानें श्रेष्ठ पुरुषाची प्राप्ति होते. कारण जनकादिकांनीं कर्मांनीं सिद्धि मिळविली आहे. शिवाय तूं ज्ञानी झाला असलास तरी लोकांनीं आडमार्गाला जाऊं नये एवढ्यासाठीं तरी तुला आपलें कर्तव्य करीत राहिलें पाहिजे. **वरिष्ठ लोक ज्याज्याप्रमाणें वागतात त्याचप्रमाणें सामान्य लोक वागत असतात. ते जो कित्ता घालून देतात तोच इतर लोक गिरवीत असतात.** ह्या तिन्ही लोकांमध्यें मला कांहीं करावयाचें ह्मणून उरलें नाहीं. कांहीं मिळालें नाहीं असें नाहीं; किंवा कांहीं मिळवावयाचेंही नाहीं; तरी मी कर्म करीतच राहिलों आहे. कारण जर मीं हुशारीनें कर्म करीत राहणार नाहीं तर अर्जुना, लोक माझ्या वाटेनेंच जाऊं लागतील. मी जर कर्म करणार नाहीं तर ह्या सर्व प्रजा माझ्यासारख्याच वागूं लागल्यानें त्यांकडून कर्म न होतां त्या नाश पावतील; आणि सर्व गोलंकार करण्याला व ही प्रजा नाहींशी करण्याला मी कारणीभूत होणार आहें. वेडे लोक कर्मामध्यें गढून ज्याप्रमाणें कर्म करीत असतात त्याचप्रमाणें लोकांना सरळ वाट दाखविण्यासाठीं शहाण्यानें त्यांत गढून न राहतां कर्म करीत रहावें. कर्मामध्यें गढलेल्या अज्ञान्यां-

च्या बुद्धीला भेद पाडून त्यांची कर्मावरील श्रद्धा उडवूं नये. शहाण्यानें निष्कामबुद्धीनें कर्मामध्यें गढलें राहून सर्व कर्में त्यांकडून करवून घ्यावीं. प्रकृतीच्या सत्त्वरजादि स्वाभाविक गुणांनीं सर्व क्रिया होत असतात. अहंकारानें ज्याची बुद्धि चळली आहे तो मात्र मी करणारा असें मानीत असतो. इंद्रियें व त्यांचीं कर्में यांच्या निरनिराळ्या भेदांचें खरें स्वरूप ओळखणारा इंद्रियें आपापल्या विषयांमध्यें संचार करीत असतात, तेथें आत्म्याचा कांहीं संबंध नाहीं हें जाणून त्यामध्यें गढून रहात नाहीं. परंतु जे प्रकृतीच्या सत्त्वरजादि गुणांनीं मूढ बनून इंद्रिय व तद्विषयक कर्में यांमध्यें गढले असतात त्या पूर्ण ज्ञान न झालेल्या मंदबुद्धी लोकांना पूर्णज्ञान झालेल्यानें चळवूं नये. ह्मणून परमात्म्याकडे लक्ष लावून सर्व कर्मांचा हवाला मजवर देऊन वासना व ममत्व यांना फाटा देऊन मन स्वस्थ करून तूं युद्ध कर. जे लोक नेहमीं विश्वासानें व चिकित्सा न करतां ह्या माझ्या सांगण्याप्रमाणें वागतात ते सर्व कर्मपाशापासून सुटतात.; परंतु जे याची चिकित्सा करीत राहून या माझ्या ह्मणण्याप्रमाणें वागत नाहींत ते सर्व सावध असले तरी बुद्धि जाऊन नाश पावावयाचे हें तूं खास समज. ज्ञानी असला तरी मनुष्य आपापल्या प्रकृतीप्रमाणें वागत असतो. सर्व भूतमात्र आपापल्या प्रकृतीच्या वळणावर जात असतात. याठिकाणीं एखादी गोष्ट करावयाची नाहीं ह्मणून त्याचा काय उपयोग होणार ? इंद्रियासाठीं इंद्रियांचे, लोभ, द्वेष, इत्यादि विषय उत्पन्न झाले आहेत. यांच्या तावडींत मात्र जाऊं नये. कारण ते ह्याच्या आड येणारे आहेत. दुसऱ्याचा धर्म उत्तम रीतीनें पाळण्यापेक्षां आपला कसा बसा पाळला तरी तो कल्याणप्रद आहे. आपल्या धर्मानें वागत असतां मरण आलेलें पतकरलें. दुसऱ्याचा धर्म स्वीकारल्यानें परिणाम भयंकर होतो.'

यावर अर्जुन ह्मणाला, 'बरें, आतां मनुष्य मनांतून नसतां बलात्कारानें नेऊन लावल्याप्रमाणें पापाचरण कोणाच्या प्रेरणेवरून करीत असतो ?' भगवान् श्रीकृष्ण ह्मणाला, 'रजोगुणापासून उत्पन्न होणारा मोठा खादाड, मोठा पापी असा हा, ह्याला काम ह्मण अथवा क्रोध ह्मण मनुष्याला तें करावयाला लावीत असतो. ह्या संसारामध्यें ह्याला तूं आपला वैरी समज. ज्याप्रमाणें धुरानें अग्नि, मळानें आरसा किंवा पडद्यानें गर्भ झांकला जातो त्याप्रमाणें ह्या मनोविकारानें हें ज्ञान झांकून टाकलें आहे. ज्ञानी लोकांच्या नेहमीं अतृप्त व असंतुष्ट अशा या कामरूपी वैऱ्यानें हें ज्ञान झांकून टाकलें आहे बरें ! इंद्रियें, मन व बुद्धि हें याचें ठाणें आहे. यांच्या योगानें हा ज्ञानावर दडपण घालून जीवाला मोह पाडीत असतो. म्हणून तूं प्रथम सर्व इंद्रियांना ताब्यांत घेऊन ज्ञान व अनुभव यांचा फडशा पाडणाऱ्या ह्या दुष्ट शत्रूला जिंक. ज्ञान करून देण्याला साधनें जीं इंद्रियें तीं जडविषयांपेक्षां श्रेष्ठ आहेत. परंतु या इंद्रियांना प्रवर्तक असें मन असल्यानें तें त्याहून श्रेष्ठ आहे. व या मनामध्यें येणाऱ्या विषयांसंबंधानें निश्चय ठरविणारी जी बुद्धि ती त्या मनाहून श्रेष्ठ आहे. व या सर्वांचा साक्षिभूत जो आत्मा तो बुद्धीहूनही श्रेष्ठ आहे. याप्रमाणें बुद्धीहून हा श्रेष्ठ आहे हें जाणून बुद्धीच्यायोगानें मन आवरून, ताब्यांत येण्यास कठिण अशा ह्या कामरूपी शत्रूला जिंक.

(४) हा कायमचा योग मीं पूर्वीं सृष्टीच्या आरंभाला सूर्याला सांगितला; त्यानें आपला पुत्र जो मनु याला सांगितला व त्या मनूनें हा इक्ष्वाकूला सांगितला. याप्रमाणें परंपरेनें ऐकून हा राजर्षींना कळला. तो योग पुढें पुष्कळ कालानें ह्या जगांतून नाहींसा झाला. तोच हा जुनाट योग आज मीं तूं माझा भक्त आहेस, तूं माझा मित्र आहेस ह्मणून तुला फिरून सांगितला आहे. हें अति उत्तम रहस्य आहे.' यावर अर्जुन ह्मणाला, 'सूर्याचा जन्म अगोदर असून तुझा नंदकुळांत मागून जन्म झाला आहे. ह्मणून हा योग तूंच प्रथम सांगितलास हें कसें मीं ओळखावें ?' श्रीकृष्णानें उत्तर दिलें, 'हे अर्जुना, माझे त्याचप्रमाणें तुझे अनेक जन्म झाले आहेत. त्या सर्वांचें ज्ञान मला आहे, पण हे शत्रुतापना, तें तुला नाहीं. मी जन्मरहित आहें, अविनाशी आहें, सर्व भूतमात्रांचा नियामक आहें तरी आपल्या त्रिगुणात्मक मायेला ताब्यांत घेऊन तिच्या साहाय्यानें मी जन्म घेतों. कारण जे-

व्हां जेव्हां धर्म नाहींसा होत जातो व अधर्म जोरावतो तेव्हां तेव्हां मी स्वतःला उत्पन्न करतों. **धर्माची बिघडलेली घडी बसविण्यासाठीं, साधूंना राखण्यासाठीं व दुष्टांचा फडशा पाडण्यासाटीं मी प्रत्येक युगीं जन्म घेत असतों.**

याप्रमाणें माझें अलौकिक जन्म व कर्म जो वास्तविक रीतीनें ओळखतो, त्याला देह टाकल्यावर पुनर्जन्म न येतां तो माझ्या सारूप्यतेला येतो. लोभ, भय, राग नाहींसें झाल्यानें माझा आश्रय करून मदाकार झालेले पुष्कळ जीव ज्ञानरूपी तपानें शुद्ध होऊन माझ्या सारूप्यतेला मिळाले आहेत. सर्वत्र मीच भरून असल्यानें जे जे माझ्याकडे ज्या ज्या **भावानें येतात त्यांच्या त्यांच्याशीं प्रतिबिंबत्वानें माझें तसेंच वागणें असतें. सर्वस्वी प्राणिमात्र माझ्याच वाटेनें जातात.** ह्या लोकीं लोक कर्मांची फलप्राप्ति व्हावी ह्मणूनच देवतांचें आराधन करीत असतात. कारण ह्या मृत्युलोकीं कर्मांची फलप्राप्ति लवकर होत असते. त्यांच्या त्यांच्या सत्वादि गुणानुसार व तपादि कर्मानुसार ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र असे चार वर्ण मींच मायेच्या आश्रयानें उत्पन्न केले आहेत ह्मणून त्यांचा वास्तविक कर्ता मीच आहें, तरी ते मायेच्या साहाय्यानें केले असल्यानें मी अविनाशी असा कांहीं न करणाराच आहें. कर्मांचा मजवर परिणाम होत नसून कर्मफलावरही मला आशा नाहीं असें जो मला ओळखतो तो कर्मांशीं बांधला जात नाहीं. पूर्वीं होऊन गेलेले मोक्षेच्छु हें ओळखूनच कर्म करीत आले. ह्मणून पूर्वीं होऊन गेलेल्यांनीं त्यांच्या पूर्वीच्यांचा कित्ता वळवून ज्याप्रमाणें कर्म केलें तसेंच तूंही कर्म कर. निष्कर्म होऊं नकोस. कर्म ह्मणजे काय, अकर्म ह्मणजे काय, यासंबंधानें मोठमोठ्या शहाणे ह्मणविणारांचा सुद्धां गोंधळ उडून राहिला आहे. तेव्हां तें कर्म काय आहे हें तुला सांगतों. तें तुला चांगलें समजलें ह्मणजे अकल्याणकारक अशा संसाराच्या फेऱ्यांतून तूं सुटशील. कर्माचें तसेंच दुष्कर्माचें त्याचप्रमाणें निष्कर्माचें तत्त्व पूर्ण जाणलें पाहिजे. कारण **कर्माचें रहस्य फार गूढ आहे.** आपण या संसारचक्रामध्यें पडलों असल्यानें त्याबरोबरच कर्में स्वाभाविक रीतीनें आपल्या हातून घडत आहेत. त्याचप्रमाणें आपण स्वस्थ बसलों तरी याच स्वभावानें कर्में आपल्या हातून घडतच असतात व तीं घडवून आणण्यामध्यें किंवा न घडवून आणण्यामध्यें आपलें कांहीं अंग नाहीं हें ज्याला पूर्णपणें कळलें तोच शहाणा, तोंच योगामध्यें गढलेला व तोच ब्रह्मस्वरूप होऊन सर्व कर्मांचा संपादक होतो. ज्याच्या सर्व क्रिया, वासना व तन्मूलक कल्पनारहित निरपेक्ष असतात, त्या ज्ञानरूपी अग्नीनें सर्व कर्मफलें भस्म करून टाकलेल्या मनुष्यालाच विद्वान शहाणा ह्मणतात. कर्मफलाची आशा सोडून देऊन कशावर अवलंबून न राहतां संतुष्ट राहून जो कर्म करीत असतो तो कर्म करीत असूनही कांहींच करीत नाहीं असेंच समजलें पाहिजे. सर्व आशा दूर करून व मन व देह आपल्या ताब्यांत ठेवून सर्व आत्मीय वस्तूंशीं संबंध तोडून जो केवळ शरीरसंबंधी स्वाभाविक कर्में करीत राहतो त्याला कांहीं पाप लागत नाहीं. जें कांहीं सहजगत्या मिळेल त्यावर संतुष्ट राहणारा, सुखदुःखादि द्वंद्वांच्या पलीकडे गेलेला, ज्याच्या ठिकाणीं मत्सरभाव उरला नाहीं व एखादी गोष्ट साधली किंवा फसली तरी ज्याला त्यासंबंधानें पर्वा वाटत नाहीं; तो कर्म करीत राहिला तरी त्यानें बांधला जात नाहीं. विषयांवरील आसक्ति नाहींशी होऊन जो मुक्त झाला आहे व ज्याचें मन खऱ्या ज्ञानाच्या ठिकाणीं दृढ झालें आहे तो यज्ञासाठीं व परोपकारासाठीं निष्कामबुद्धीनें कर्म करतो, तें त्याचें कर्म फलशून्य होऊन त्याला बाधक होत नाहीं. ब्रह्मरूपी अग्नीमध्यें ब्रह्मस्वरूपी आहुती ब्रह्म ब्रह्मालाच देत आहे, याप्रमाणें कर्ता, कर्म, कारण व क्रिया हीं सर्वच ज्याला ब्रह्मरूपी दिसतात, त्या ब्रह्मकर्मांतच निमग्न असणाऱ्याला ब्रह्मप्राप्ति होते. कोणी योगी देवतादिकांना उद्देशून यज्ञ करितात; कोणी ब्रह्मयज्ञानें ब्रह्मस्वरूपी अग्नीमध्यें ब्रह्मरूप द्रव्याचीच आहुति देतात. कोणी कान डोळे इत्यादि इंद्रियांचा संयमरूपी अग्नीमध्यें होम देतात. कोणी शब्द, स्पर्श, रूप, इत्यादि विषयांचा इंद्रियस्वरूपी अग्नीमध्यें होम देतात. कोणी सर्व इंद्रियांचे व्यापार त्याचप्रमाणें जीवनशक्तीचे व्यापार ज्ञानानें चेतविलेल्या मनःसंयमरूपी अग्नींत होम

देऊन निर्विकल्पक समाधीमध्यें लीन होतात. कोणी पैशाच्या साधनानें यज्ञ करतात; कोणी तपानें करतात; तसेच कोणी चित्ताचें लय करून करतात; व कोणी वेदाध्ययनानें व कोणी ज्ञानानें यज्ञ करतात. या प्रमाणें हे सर्वच मनोनिग्रहपूर्वक कडकडीत व्रत पाळून यज्ञ करणारे आहेत. कोणी प्राण व अपान यांची गति अटकावून प्राणायामामध्यें गढून प्राणाची अपानामध्यें व अपानाची प्राणामध्यें आहुति देतात. कोणी आहार बेताचा ठेवून प्राणवायूचा प्राणवायूमध्येंच होम करतात. ह्या सर्वांनाच यज्ञाची चांगली ओळख पटली असून हें सर्व यज्ञांनीं पाप नाहींसें करून यज्ञ करून अवशिष्ट राहिलेल्या अमृताचें सेवन करून सनातन ब्रह्माला जाऊन मिळतात. वर सांगितल्यांपैकीं एकही यज्ञ न करणाराला हा मृत्युलोकसुद्धां मिळत नाहीं; मग दुसऱ्या एखाद्या लोकाची वार्ता कशाला? याप्रमाणें अनेक प्रकारचे यज्ञ वेदरूपी ब्रह्माच्या तोंडानें सांगितले आहेत. त्या सर्वांची उत्पत्ति कर्मापासूनच आहे हें तूं लक्षांत ठेव. हें कळलें ह्मणजे तूं मुक्त होशील. पैशानें केलेल्या यज्ञापेक्षां ज्ञानाच्या साहाय्यानें केलेला यज्ञ चांगला. कारण सर्व कर्मांचा शेवट ज्ञानामध्येंच होतो. तें ज्ञान ज्यांना खरें तत्त्व उमगलें आहे, असे जे ज्ञानी त्यांना नमस्कार करून त्यांची सेवा करशील व त्यांना योग्य शंका विचारशील तर ते तुला सांगतील. तें कळल्यावर याप्रमाणें तुला पुन्हां मोह पडणार नाहीं. त्याच्या योगानें माझ्याप्रमाणेंच आपल्या ठिकाणीं सर्व भूतमात्रांना तूं पाहूं लागशील. सर्व प्राण्यांमध्यें तूं फार वाईट पापी असलास तरी ज्ञानरूपी नौकेनें सर्व पाप तरून तूं पार होशील. ज्याप्रमाणें पेटलेला अग्नि सर्व लांकडें जाळून भस्म करतो त्याप्रमाणें ज्ञानरूपी अग्नि सर्व कर्मांचा फडशा उडवितो. कारण ज्ञानासारखें पवित्र ह्या लोकीं दुसरें कांहींच नाहीं. तें ज्ञान निष्काम कर्म करीत राहून आत्मनिष्ठेनें योग्यतेला पोहोंचलेल्या मनुष्याला बऱ्याच दिवसांच्या खटपटीनें आपोआप आपल्या ठिकाणींच मिळतें. इंद्रियनिग्रह करून गुरूच्या ठिकाणीं दक्ष असणाऱ्या भाविकालाच ज्ञान मिळतें; व ज्ञान झाल्यावर लवकरच मोक्षरूपी श्रेष्ठ शांति मिळते. अज्ञानी, अभाविक व संशयखोर असा मनुष्य सफई नाश पावतो. संशयखोर इहपराला मुकून सुखालाही मुकतो. आत्मनिष्ठेच्या योगानें सकामकर्में सोडून देऊन ज्ञानाच्या योगानें संशय ज्यानें नाहींसा केला आहे असा आत्मज्ञान झालेला मनुष्य कर्मांनीं बांधला जात नाहीं. ह्मणून ज्ञानरूपी तरवारीनें अज्ञानापासून उत्पन्न झालेला तुझ्या हृदयामध्यें असलेला हा संशय छाटून काढून हे अर्जुना, युद्धाला तयार होऊन आपलें कर्तव्य बजाव. ऊठ.'

(५) यावर अर्जुन ह्मणाला, 'हे कृष्णा, कर्म सोडणें व कर्मामध्यें गढणें दोन्हीं तूं चांगलीं ह्मणतोस. तेव्हां ह्या दोहोंपैकीं जें एक कल्याणप्रद असेल तें नीट विचार करून मला सांग.' श्रीकृष्ण म्हणाला, 'कर्म सोडून देणें व कर्म करणें दोन्ही कल्याणप्रद आहेत; परंतु त्यांमध्यें कर्म सोडून दिल्यापेक्षां त्यामध्यें गढणेंच विशेष चांगलें आहे. जो द्वेष करीत नाहीं किंवा आशा करीत नाहीं त्यानें सदा कर्म टाकलेंच आहे असें समजावयाचें. कारण हे महाबाहो, सुखदुःखरूपी द्वंद्वापासून जो मुक्त झाला आहे तो सहजच संसारपाशांतून सुटतो. **ज्ञानमार्ग व कर्ममार्ग निराळे आहेत असा केवळ मूढांचा समज आहे.** यांपैकीं कोणता तरी एक मार्ग नीट धरला असतां दोन्हींचें फळ मिळतें. **ज्ञान्यांना जें स्थान मिळतें तें योग्यांनाही मिळतें.** सांख्य आणि योग एकच आहे असें जे समजतात तेच खरे ज्ञानी. निष्काम कर्म झाल्यावांचून संन्यास होणें कठीण आहे. निष्काम कर्मामध्यें गढलेल्या ज्ञान्याला मात्र तावडतोब ब्रह्मप्राप्ति होते. सर्व भूतमात्रांच्या ठिकाणीं असणारा परमात्मा व आपण एकच आहों अशी ज्याची बुद्धि झाली आहे असा मनुष्य देह व इंद्रियें ताब्यांत ठेवून कर्ममार्गानें कर्म करीत असला तरी त्याचा शिंतोडा त्याला लागत नाहीं. पहात असतां, ऐकत असतां, स्पर्श करीत असतां, वास घेत असतां, खात असतां, जात असतां, झोंप घेत असतां श्वासोच्छ्वास करीत असतां, बोलत असतां, टाकीत असतां, घेत असतां; डोळे उघडीत असतां किंवा मिटत असतां इंद्रियें आपापल्या विषयांसंबंधानें कर्में करीत असून त्यांचें कर्तव्य आपल्याकडे मुळीं

नाहीं असें पूर्ण ध्यानांत ठेवून तत्त्वज्ञान झालेल्या निष्काम कर्म करणाऱ्या योग्यानें मी कांहींच करीत नाहीं असें मानावें. सर्व कर्मे ब्रह्माला अर्पण करून आसक्ति न ठेवितां जो कर्म करतो त्याला कमळावरील पाण्याच्या थेंबाप्रमाणें पाप मुळीं लागत नाहीं, कर्ममार्गाला लागलेले योगी आसक्ति सोडून देऊन अंतःकरणाच्या शुद्धीसाठीं नुसत्या शरीरानें, मनानें, बुद्धीनें, तसेंच इंद्रियांनीं निष्काम कर्मे करीत असतात. ज्याची आत्म्याच्या ठिकाणीं स्थिरबुद्धि झाली आहे तो कर्मफलाला धनी न होतां निष्ठेनें मिळणारी मोक्षरूपी शांति मिळवितो. अशी ज्याची बुद्धि स्थिर झाली नाहीं तो कांहीं विशिष्ट इच्छेनें कर्म करूं लागून फलावर आसक्त राहिल्यानें संसारपाशामध्यें जखडला जातो. मनानें सर्व कर्मे सोडून देऊन आत्मनिग्रही पुरुष कांहीं न करतां किंवा कांहीं न करवितां ज्याला नऊ द्वारें आहेत अशा या देहरूपी नगरामध्यें सुखानें असतो. सामान्य लोकांचा कर्तृत्वाचा अभिमान, कर्म, किंवा त्याचा कर्मफलाशीं संबंध ह्यांपैकीं कोणतीच गोष्ट कर्तृत्वशून्य परमात्मा उत्पन्न करीत नाहीं; परंतु प्रकृतीच्या हातून या गोष्टी घडत असतात. आणि कोणाचें पाप तसेंच पुण्यही तो कधीं घेत नाहीं. अज्ञानानें ज्ञान झांकून गेल्यामुळें प्राणी या जगांत असे वेडे बनतात. परंतु जेव्हां आत्मज्ञानानें हें त्यांचें अज्ञान दूर होतें तेव्हां तें श्रेष्ठ ज्ञान त्यांमध्यें सूर्याप्रमाणें प्रकाशमान होतें. त्या परमात्म्याच्या ठिकाणीं बुद्धि गढून जे तदाकार झाले आहेत तसेंच त्यावर दृढनिष्ठा बसून जे तल्लीन झाले आहेत असे ज्ञानानें पाप धुवून काढलेले पुरुष जन्ममरणाच्या फेऱ्यामध्यें पडत नाहींत. उत्तम विद्येच्या योगानें विनयशील झालेल्या ब्राह्मणाचे ठिकाणीं, गाईच्या ठिकाणीं, हत्तीच्या ठिकाणीं, कुत्र्याच्या ठिकाणीं तसेंच चांडाळाच्या ठिकाणीं विद्वान लोक सारख्या दृष्टीनें पहातात. याप्रमाणें भेदाभेद बुद्धि जाऊन ज्यांची समदृष्टि झाली आहे, त्यांनीं ह्या लोकींच जन्ममरणाला जिंकलें ह्मणावयाचें. कारण ब्रह्म हें शुद्ध व भेदशून्य आहे. तेव्हां ते ब्रह्मामध्येंच लीन होतात. बुद्धि स्थिर होऊन मोह जाऊन ब्रह्माशीं मिळून गेलेल्या ब्रह्मवेत्त्यानें कोणतीही मनाप्रमाणें गोष्ट घडली असतां, त्यांत आनंद मानून घेऊं नये किंवा एखादी मना विरुद्ध गोष्ट घडली असतां त्या योगानें कष्टी होऊं नये. शब्दादि बाह्य विषयांमध्यें ज्याचें अंतःकरण गढलें नाहीं त्या ब्रह्माशीं तादात्म्य झालेल्या पुरुषाला आत्मस्वरूपाचे ठिकाणीं जें सुख मिळतें त्या सुखाचा तो अक्षय उपभोग घेतो. कारण विषयांचा इंद्रियांशीं संबंध जडून मिळणारीं सुखें केवळ दुःखालाच कारणीभूत असून त्यांना आरंभ व शेवट आहेत. ह्मणून ज्ञानी त्यांच्या ठिकाणीं रममाण होत नाहीं. शरीर टाकण्याच्या पूर्वीं ह्याच लोकीं ज्याला कामक्रोधांचे तडाके सहन करण्याचें सामर्थ्य येतें तोच पुरुष आत्मनिष्ठ, तोच सुखी. आत्मस्वरूपाच्या ठिकाणीं आनंदी राहून आत्मस्वरूपच ज्याला विश्रांतिस्थान होतें व ज्याला आत्मस्वरूपाकडूनच प्रकाश मिळतो त्या ब्रह्ममय झालेल्या योग्याला अखंड ब्रह्मसुख मिळतें. संशयाची गांठ तोडून आत्मनिग्रह करून सर्व भूतमात्रांच्या हितामध्यें गर्क झालेल्या धूतपाप साधूंनाच अखंड ब्रह्मसुखाचा लाभ मिळतो. कामक्रोधांना दूर करून मनोनिग्रहानें ब्रह्मरूप ज्यांनीं ओळखिलें आहे त्या यतींच्या भोंवतीं अखंड ब्रह्मसुख कायमचें असतें. शब्दादि बाह्य विषयांना आपल्याजवळ न येऊं देतां बाहेरच ठेवून, दोन्ही भिंवयांमध्यें नाकाच्या टोंकावर दृष्टि लावून, व नाकपुड्यांमधून वहाणारे प्राण व अपान वायू प्राणायाम विधीनें सारखे करून जो ध्यानस्थ मुनि इंद्रियें, मन व बुद्धि यांना आपल्या स्वाधीन ठेवतो व इच्छा, भय आणि राग हे सोडून मोक्षामध्यें गढला असतो तो सदां मुक्तच आहे. यज्ञ व तप यांचा भोक्ता, सर्व लोकांचा स्वामी व सर्व भूतमात्रांच्या जिव्हाळ्याचा असा मी आहें हें ओळखल्यानें मनुष्याला मोक्षरूपी शांति मिळते.'

(६) 'कर्मफलावर आशा न ठेवतां जो कर्तव्यकर्म करीत रहातो तोच संन्यासी, तोच योगी समजावा. ज्यानें अग्निकार्य किंवा कर्तव्यकर्मे सोडून दिलीं आहेत तो कांहीं संन्यासी किंवा योगी नव्हे. ज्याला संन्यास ह्मणतात तोच योग समज; कारण संकल्प सोडल्यावांचून कोणीही योगी होऊं शकत

नाहीं. योगाला चढूं इच्छिणाऱ्या मुनीला कर्मच साधन सांगितलें आहे. तोच एकवार योगाला चढला ह्मणजे सर्व कर्मांपासून निवृत्ति हें मग साधन सांगितलें आहे. ज्यावेळीं इंद्रियविषयांच्या ठिकाणीं व ते मिळविण्याला साधनीभूत कर्मांच्या ठिकाणीं न गढतां मनुष्य सर्व संकल्प सोडून देतो तेव्हां योग त्याला साधला ह्मणावयाचें. आपणच आपला उद्धार करावा. आपल्याला खालीं अधोगतीला नेऊन पोहोंचवूं नये. आपणच आपले हितकारी बंधू किंवा अहितकारी शत्रू होत असतों. ज्यानें स्वतःला स्वतःच्या ताब्यांत ठेविलें आहे तो स्वतःच स्वतःचा बंधु होतो; परंतु ज्यानें आपल्याला आपल्या ताब्यांत ठेविलें नाहीं तो आपण होऊन आपला शत्रु होतो. आत्मसंयमन करून ज्याचें अंतःकरण अगदीं शांत झालें आहे त्याला थंडी, उन्ह, सुख, दुःख, मान, अपमान या सर्व अवस्थांमध्यें परमात्म्याचा साक्षात्कार असतो. वेदांतशास्त्रानें मिळालेलें ज्ञान व साक्षात्कारानें उत्पन्न झालेलें अनुभवजन्य ज्ञान यांनींच समाधान पावून निर्विकार चित्त होऊन इंद्रियनिग्रही बनलेल्या पुरुषाला आत्मनिष्ठ समजावें. असा योगी ढेंकूळ, दगड, व सोनें सारखें लेखूं लागतो. जिव्हाळ्याचे, मित्र, शत्रू, तटस्थ, मध्यस्थ, नावडते, बंधू त्याचप्रमाणें भले लोक तसेंच दुष्ट या सर्वांच्या ठिकाणीं सारखी बुद्धि असणाराच श्रेष्ठ समजला आहे. योग्यानें मन व जड देह आपल्या स्वाधीन ठेवून फार गवाळ जवळ न बाळगतां एकांतामध्यें एकटें राहून नेहमीं आपलें मन ब्रह्मचिंतनाकडे एकाग्रतेनें लावावें. शुद्ध अशा प्रदेशीं फार उंच नाहीं, फार सखल नाहीं असें प्रथम दर्भासन त्यावर मृगाजिन व त्यावर मऊ वस्त्र असें आपलें स्थिर आसन तयार करून त्याठिकाणीं मन एकाग्र करून मन व इंद्रियांचे व्यापार बंद करून आसनावर बसून आत्मशुद्धीसाठीं ध्यान लावावें. आसनावर अचल होऊन शरीर, मान व डोकें न हालतां सरळ ठेवून दिशांकडे दृष्टि न देतां आपल्या नाकाच्या शेंड्यावर ती लावावी; अंतःकरण अगदीं शांत ठेवावें; मनामध्यें भीति बिलकूल ठेवूं नये; ब्रह्मचारी व्रत असावें; व मनोनिग्रहानें माझ्या ठिकाणीं लक्ष ठेवून माझ्यांतच तल्लीन होऊन एकाग्र व्हावें. याप्रमाणें मनोनिग्रह करून सदा आत्मचिंतनामध्यें गढलेल्या योग्याला मजपाशीं असणारी मोक्षसुखरूप श्रेष्ठ शांति मिळते. फार खाणाराला तसेंच मुळींच कांहीं न खाणाराला त्याचप्रमाणें फार झोंपाळू किंवा फार जागणारा याला योग साधावयाचा नाहीं. ज्याचे आहारविहार बातावेताचे आहेत, सर्व कर्मांचे वेळीं ज्याचे व्यापार नियमित आहेत, तसेंच जो बेतानें झोंप घेऊन जागाही बेतानेंच असतो अशाला दुःख समूळ नाहींसें करणारा योग साधतो. ज्या वेळीं उत्तम तऱ्हेनें ताब्यांत ठेवलेलें मन आत्मस्वरूपामध्यें स्थिर होऊन मनुष्य वासनांपासून अलग होतो तेव्हांच तो आत्मनिष्ठ झाला असें समजावें. ज्याप्रमाणें निवाऱ्यामध्यें असलेला दिवा हालत नाहीं. त्याप्रमाणें मनोनिग्रहानें एकाग्रता मिळविणाऱ्या योग्याचे योगाभ्यासानें स्थिर झालेलें मन विषयांपासून फिरतें व या स्थितींत स्वतःला आत्मस्वरूपाचा अनुभव मिळूं लागून आत्मस्वरूपामध्येंच पुरुष संतुष्ट असतो. ज्या स्थितीमध्यें केवळ बुद्धीला घेण्यासारखें इंद्रियविषयापलीकडचें जें अतिश्रेष्ठ सुख तें हा अनुभवूं लागतो व ज्यामध्यें स्थिर होऊन तो सत्यज्ञानापासून ढळत नाहीं, जो लाभ एकदां साधला म्हणजे याहून दुसरा कोणताही लाभ मनुष्य अधिक समजत नाहीं, व ज्यामध्यें एकवार गढला म्हणजे मोठमोठ्या दुःखालाही तो डगत नाहीं व ज्याठिकाणीं दुःखप्राप्तीचा वियोग अशा याला योग या विपरीत लक्षणानें ओळखावें. मनाला कंटाळा येऊं न देतां हा योग दृढनिश्चयानें लावावा. संकल्पापासून उत्पन्न होणाऱ्या सर्व वासना निःशेष बाजूला ठेवून सर्व इंद्रियांना चोहों बाजूंनीं मनानेंच आवरून निश्चयात्मक बुद्धीनें हळू हळू विषयापासून माघार घ्यावी, व मनाला आपल्या ठिकाणीं ठाम करून मनांत दुसरें कांहीं आणूं नये. हें चंचळ आणि अस्थिर मन जिकडे जिकडे भटकूं लागेल तिकडून तिकडून याला मागें ओढून नंतर त्याला आपल्या ताब्यांत आणून ठेवावें. कारण यानें रजोगुण दबला जाऊन मन अगदीं शांत होतें; मग या ब्रह्मस्वरूपी निष्पाप यो-

ग्याकडे श्रेष्ठ असें ब्रह्मसुख धांव घेतें. ह्याप्रमाणें सदा आत्मस्वरूपाचे ठिकाणीं गढलेला निष्पाप योगी अनायासानें ब्रह्मसंबंधी श्रेष्ठ सुखाचा उपभोग घेतो. योगाभ्यासानें एकाग्र झालेला सर्वांच्या ठिकाणीं समदृष्टीनें पहाणारा सर्व भूतमात्रांच्या ठिकाणीं आपल्याला व आपल्या ठिकाणीं सर्व भूतमात्रांना पाहूं लागतो. जो सर्व ठिकाणीं मला व माझ्या ठिकाणीं सर्वांना पाहूं लागतो त्याला मी किंवा मला तो कधीं मुकत नाहीं. सर्व एकच ब्रह्ममय आहे असा निश्चय होऊन सर्व भूतांचे ठिकाणीं असणाऱ्या मला जो भजतो तो योगी सर्व प्रकारें कर्म करीत वावरत असला तरी माझ्या ठिकाणींच लीन असतो. आपल्याला सुख हवेंसें वाटतें, दुःखापासून त्रास होतो. यावरून आपल्याप्रमाणेंच सुखदुःखाच्या बाबतींत जो दुसऱ्यासंबंधानें विचार करतो तोच श्रेष्ठ योगी समजला पाहिजे.' अर्जुन म्हणाला, 'ज्याची किल्ली समबुद्धि आहे असा जो हा योग तूं सांगितलास तो मनाच्या चंचळतेमुळें कायम होणें कठिण आहेसें मला वाटतें. कारण हे कृष्णा, **मन फार चंचळ, इंद्रियांना वाटेल तिकडे नेणारें असून वाऱ्याप्रमाणेंच याला आवरतां येणें फार कठिण काम आहे असें मला वाटतें.**' श्रीकृष्ण म्हणाला, 'हे महाबाहो, मन चंचळ असून आवरतां येणें कठिण आहे हें जें तूं म्हणतोस तें अगदीं खरें आहे; परंतु अभ्यासानें तसेंच वैराग्यानें त्याला आवरतां येतें. ज्यानें मन आवरलें नाहीं त्याला योग साधणें कठिण असा माझा समज आहे. परंतु त्याला आवरण्याची ज्याची खटपट चालली आहे त्याला तो उपायानें साधणें शक्य आहे.' अर्जुन म्हणाला, 'श्रद्धावान् परंतु मनोनिग्रहाची खटपट न केल्यामुळें योगापासून ढळलेला अशा मनुष्याला योगाची सिद्धि मिळत नाहीं तेव्हां तो कोणत्या गतीला जातो? विसकळलेल्या ढगाप्रमाणें ब्रह्ममार्गाला लागला असतां वाटेंत गोंधळून वाट सुटलेला असा हा इहपर या दोहोंना मुकून नाश पावतो काय? हा जो मला संशय आला आहे तो तूंच दूर केला पाहिजेस. तुझ्यावांचून हा संशय दूर करणारा मला कोणी मिळणार नाहीं.' श्रीकृष्ण म्हणाला, 'बा अर्जुना, त्या प्रयत्नाचा येथें किंवा परलोकीं पूर्ण नाश कधींच होत नाहीं. कारण लाडक्या, **कोणीही चांगलें काम करणारा दुर्गतीला कधीं जात नाहीं.** योगापासून ढळलेला मनुष्य पुण्यवानांना मिळणारे लोक मिळवून तेथें पुष्कळ दिवस राहून पुढें शुद्धशील अशा भाग्यवानांच्या घरीं जन्म घेतो, किंवा बुद्धिशाली अशा योग्यांच्याच कुळांत त्याला जन्म येतो. कारण ह्या लोकीं अशा प्रकारचा जन्म मिळणें फार दुर्लभ आहे आणि तेथें त्याला पूर्वजन्मींच्या बुद्धीची जोड मिळते आणि फिरून तो योगाची सिद्धि मिळविण्यासाठीं खटपट करूं लागतो. आणि त्याच पूर्वजन्मींच्या अभ्यासानें तो त्याकडे आपल्याआपण ओढला जातो. आणि योग केवळ जाणून घेण्याच्याच इच्छेनें तो वेदाच्या पलीकडे जाऊन सत्यब्रह्माकडे वळतो. आणि याप्रमाणें प्रयत्न चालू असतां पापशुद्धि होऊन अनेक जन्मांच्या थोडथोड्या प्रयत्नानें त्याला सिद्धि मिळते आणि तो श्रेष्ठ अशा गतीला जाऊन मिळतो. अशा प्रकारचा योगी तपस्व्यांहून श्रेष्ठ आहे; ज्ञान्यांहून श्रेष्ठ आहे; तसाच कर्मठांहून अधिक आहे. ह्मणून हे अर्जुना, तूं अशा प्रकारचा योगी हो. सर्व योग्यांमध्यें जो श्रद्धालु माझ्याकडे लक्ष ठेवून मला भजतो तोच सर्वांमध्यें श्रेष्ठ योगी मी समजतों.'

(७) 'माझ्या ठिकाणीं मन ठेवून योगसाधन करून माझें सर्वस्वी अवलंबन केल्यानें तुला खात्रीनें माझें ज्ञान ज्या रीतीनें होईल तो प्रकार सांगतों ऐक. हें अनुभवासह संपूर्ण ज्ञान तुला मी अशेष सांगतों. हें जाणून घेतल्यावर जाणण्याचें म्हणून ह्या जगांत दुसरें कांहींच उरत नाहीं. हजारों लोकांमध्यें कोणी तरी एखादाच सिद्धीकरितां झटत असतो; व ह्या झटणाऱ्या सिद्धांपैकीं सुद्धां मला पूर्णपणें ओळखणारा असा फारच विरळा. पृथ्वी, पाणी, अग्नि, वायु, आकाश, मन, बुद्धि व अहंकार अशा ह्या आठ निराळ्या प्रकारांनीं माझी मायाशक्ति प्रकटली आहे. ह्या आठ प्रकारानें मिळून बनलेली ही जड प्रकृति कनिष्ठ दर्जाची असून चैतन्यमय माझी दुसरी एक श्रेष्ठ प्रकृति आहे हेंही लक्षांत ठेव. तिच्यावरच हें सर्व जग अवलंबून आहे. सर्व भूतमात्र या दोन प्रकृती पासून

उत्पन्न झाले आहेत हें लक्षांत ठेव. सर्व जगाची उत्पत्ति व संहार करणारा मी आहें. माझ्या वांचून ह्या जगांत दुसरें कांहींच नाहीं. सुतांत गोंवलेल्या मण्यांप्रमाणें हें सर्व जग माझ्यामध्यें गोंवलें आहे. पाण्यामध्यें रस म्हणून जें कांहीं आहे तें मीच आहें. चंद्रसूर्यांचें तेज मीच आहें. सर्व वेदांमधला ॐकार मीच आहें. त्याचप्रमाणें आकाशाचा जो शब्दगुण व लोकांमधलें पौरुषेय मीच आहें. पृथ्वीमधला पुण्यकारक गंधगुण मीच आहें. अग्नीचें तेज मीच आहें. सर्व भूतमात्रांची जीवनशक्ति व तपस्व्यांमधलें तप मीच आहें. सर्व भूतमात्रांचें पुरातन बीज मीच आहें. त्याचप्रमाणें बुद्धिमानांमध्यें असणारी बुद्धि व तेजस्वी लोकांमध्यें असणारें तेज मीच आहें. बलवानांमधील वासना व प्रीति यांनीं शून्य असें सत्व व बल मीच आहें. त्याप्रमाणें भूतमात्रांमधील धर्माला सोडून नसणारी वासना मीच आहें. जे जे म्हणून कांहीं सात्विक, राजस तसेच तामस भाव आहेत ते सर्व माझ्यापासूनच उत्पन्न झाले आहेत. परंतु अग्नीपासून धूर उत्पन्न होतो खरा, पण त्या धुरामध्यें जसा अग्नि नसतो तसा मी मात्र त्यामध्यें नसतों. ते मात्र माझ्यामध्यें असतात. अर्थात् ते माझ्यापासून उत्पन्न होतात हें तूं लक्षांत ठेव. या त्रिगुणात्मक पदार्थांनीं सर्व जगावर भुरळ पडल्यामुळें हे याहून पलीकडचा श्रेष्ठ व अव्यय अशा मला ओळखीत नाहींत. कारण ही माझी त्रिगुणात्मक दैवी माया दुर्लंघ्य आहे. मला जे शरण येतात तेच हिला तरून जातात. पापकर्मांमध्यें गढलेले मूर्ख नराधम मायेनें त्यांची बुद्धि गेल्यामुळें आसुरी वृत्ति धारण करून मला शरण येत नाहींत. दुःखपीडित, माझें तत्त्व जाणून घेऊं इच्छिणारे, पैसा पाहिजे असलेले व ज्ञानी असे चार प्रकारचे धन्य लोक मला भजतात. ह्यांपैकीं सदा एकाग्रतेनें माझ्याच ठिकाणीं भक्ति ठेवून असणारा ज्ञानी सर्वांमध्यें श्रेष्ठ आहे. कारण त्याला माझीच फार आवड असते आणि म्हणून मलाही तोच आवडतो. हे सर्वच भक्त थोर आहेत. पण ज्ञान्याला मी आपला आत्माच समजतों. कारण परब्रह्मरूपीं जो मी त्या अत्युत्तम गतीला मिळण्याला एकाग्रतेनें त्याची खटपट चाललेली असते. पुष्कळ जन्मांच्या शेवटीं सर्व वासुदेवमय आहे असें ओळखून तो मला येऊन मिळतो. अशा प्रकारचा महात्मा फारच दुर्मिळ. निरनिराळ्या वासनांनीं बुद्धि गेल्यानें आपापल्या प्रारब्ध स्वभावांनीं जखडून जाऊन निरनिराळे नियम धरून लोक निरनिराळ्या देवतांकडे धांव घेतात. जो जो सकाम भक्त ज्या ज्या देवतेच्या स्वरूपाची श्रद्धेनें पूजा करण्याचें मनांत आणतो त्याची त्याची त्या त्या देवतेच्या ठिकाणीं ती ती दृढश्रद्धा सर्वांतर्यामी मीच उत्पन्न करितों. आणि तो त्या श्रद्धेनें युक्त होऊन त्या देवतेचें आराधन करीत असतो. आणि नंतर त्या त्याच्या इच्छा पूर्ण होतात. कारण माझ्याकडूनच त्या वासनांची तशी व्यवस्था लागत असते. परंतु त्या मंदबुद्धि लोकांचें तें फळ मात्र नश्वर असतें. देवतांचें आराधन करणारे त्या त्या देवतांकडे त्या त्या कर्मांचें नश्वर फळ भोगण्याला जातात. व निष्काम माझी आराधना करणारे त्यांच्या निष्काम कर्मांचें शाश्वत फळ भोगण्याला मजकडे येतात. मी अगोचर आहें तरी मूढ लोक माझें अविनाशी अत्युत्कृष्ट श्रेष्ठ स्वरूप न ओळखतां मला सस्वरूप समजतात. योगमायेचें माझ्यावर झांकण पडलें असल्यामुळें मी सर्वांना स्पष्ट दिसत नाहीं. म्हणून हे मूर्ख संसारी लोक मला जन्म व मरण नाहीं हें जाणत नाहींत. भूत, वर्तमान व भविष्य अशा सर्व काळच्या यच्चावत् भूतमात्रांना मी ओळखतों पण मला मात्र कोणी ओळखत नाहीं. इच्छा व द्वेष यामुळें उत्पन्न होणाऱ्या सुखदुःखजन्य मोहानें सर्व भूतमात्र जन्मकाळीं अज्ञानाच्या तावडींत जातात. परंतु ज्या पुण्यकर्म करणाऱ्या लोकांचें पाप नाहींसें झालें आहे ते ह्या सुखदुःखासंबंधी मोहाच्या कचाट्यांतून सुटून निश्चयात्मक व्रत पाळून मला भजतात. माझा आश्रय करून जे जरामरणांतून सुटण्यासाठीं यत्न करतात त्यांना ब्रह्मज्ञान, अध्यात्मज्ञान, तसेंच कर्मज्ञान पूर्ण झालें म्हणावयाचें. साकार, चिन्मय व साक्षिभूत ( अधिभूत, अधिदैव व अधियज्ञ ) असा मी आहें हें जे जाणतात त्या समाधिष्ट पुरुषांना अंतकाळींही माझी ओळख राहते.'

( ८ ) अर्जुन म्हणाला, ब्रह्म तें काय, अध्यात्म

काय, कर्म कशाला म्हणावयाचें, अधिभूत म्हणजे काय, अधिदैवाचें काय लक्षण, ह्या देहामध्यें अधियज्ञ कोण व तो कसा असतो, तसेंच आत्मनिग्रही लोकांना अंतकाळीं तूं कसा ओळखूं येतोस, हें मला सांग.' श्रीकृष्ण म्हणाला, 'ज्याला कधीं नाश नाहीं तें सर्वश्रेष्ठ ब्रम्ह. पदार्थांना अस्तित्व देऊन नियमन करणारें जीव नामक तत्त्वच अध्यात्म होय. भूतमात्रांचे आस्तित्व कायम राहून त्यांचे व्यवहार चालण्यासाठीं स्वार्थ त्यागानें त्यांच्या कल्याणाठीं जे यज्ञयागादिक घडतात तीं कर्में होत. सर्व नाशवंत वस्तुजात अधिभूत होय. चिच्छक्ति हेंच अधिदैवत. मनुजश्रेष्ठा अर्जुना, ह्या देहामध्यें असणारा जो मी तोच अधियज्ञ. मरणकाळीं याप्रमाणें माझी आठवण ठेवून जो देह ठेवतो तो माझ्या सारूप्याला जाऊन मिळतो यांत बिलकुल संशय नाहीं. अथवा जें जें देवतास्वरूप मनांत ठेवून मनुष्य शेवटीं देह ठेवतो तेंच ध्यान नेहमीं त्याच्या डोळ्यांपुढें असल्यानें त्या त्या स्वरूपाला तो जाऊन मिळतो. कारण ज्या विषयावर अगर देवतेवर दृढ भक्ति जडली असते त्याचाच रात्रंदिवस निदिध्यास राहिल्यानें मरणकाळीं त्याचीच आठवण राहून देहत्यागानंतर तसें फळ मिळतें. म्हणून सदां सर्वकाळ माझी आठवण ठेवून युद्ध कर. याप्रमाणें मन व बुद्धि माझ्याकडे लागलीं म्हणजे तूं खात्रीनें माझ्या सारूप्याला मिळशील. मन दुसरीकडे कोठें न जाऊं देतां अभ्यासयोगानें एकाग्र करून सदैव ध्यान करीत राहिल्यानें मनुष्य दिव्य अशा श्रेष्ठ पुरुषाला जाऊन मिळतो. मरणकाळीं भक्तियुक्त होऊन निश्चळ मनानें तसेंच योगाच्या सामर्थ्यानें दोन्ही भिंवयांमध्यें प्राणवायु बरोबर रीतीनें ठेवून सर्वज्ञ, चिरंतन, सर्व जगताचा नियंता, सूक्ष्माहून सूक्ष्म, सर्वांचा उत्पादक, अचिंत्यरूप, सूर्यासारखा तेजस्वी व अंधाराच्या पलीकडचा अशा परमात्म्याचें जो ध्यान ठेवतो तो त्या श्रेष्ठ दिव्य पुरुषाला जाऊन मिळतो. वेदज्ञ ज्याला अविनाशी म्हणतात, निरिच्छ झालेले यती ज्यामध्यें शिरतात, व ज्याची इच्छा बाळगून लोक ब्रह्मचर्य पाळतात, तें पद मी तुला थोडक्यांत सांगतों.

बाह्य विषयाचें ज्ञान करून देणारीं सर्व इंद्रियें आवरून मनाला हृदयामध्येंच कोंडून ठेवून आपलें प्राण डोक्यामध्यें ठेवून योगसमाधि लावून बसलेला जो मनुष्य ॐ या एकाक्षरी ब्रह्माचा विचार करीत माझी आठवण ठेवून देह ठेवतो त्याला उत्तम गति मिळते. एकाग्रतेनें जो अष्टौप्रहर माझें स्मरण ठेवतो त्या नेहमीं समाधिस्थ असणाऱ्या योग्याला माझी प्राप्ति सहज होते. उत्तम सिद्धि मिळवून ते माहात्मे एकवार मला येऊन मिळाले ह्मणजे फिरून अनित्य व दुःखमूल जो जन्म त्याच्या फेऱ्यामध्यें ते पडत नाहींत. ब्रह्मलोकापर्यंत सर्व लोक फिरून फिरून जन्ममरणाच्या फेऱ्यामध्यें पाडणारे आहेत. परंतु एकदां मजकडे आल्यावर मात्र पुनर्जन्माचें नांव उरत नाहीं. कारण दिवस व रात्र हा भेद कळणाऱ्या त्या अतींद्रिय झालेल्या मन्वादिकांचीं चार युगें हजार वेळ झालीं असतां ब्रह्मदेवाचा एक दिवस होतो. तसेंच फिरून चार युगें हजार वेळ गेलीं ह्मणजे त्याची एक रात्र होते. असें त्यासंबंधी कालमान समजलें आहे. त्याचा दिवस सुरू झाला असतां सर्व व्यक्त चराचर अव्यक्त प्रकृतीपासून उत्पन्न होतात व त्याची रात्र पडूं लागली ह्मणजे ते सर्व त्याच अव्यक्त नांवाच्या प्रकृतीमध्यें गडप होतात. तोच हा सर्व चराचरसमूह रात्र पडूं लागली असतां फिरून फिरून कर्माच्या आधीन होऊन निरुपायानें त्यामध्यें गडप होतो व दिवस सुरू झाला असतां फिरून उत्पन्न होतो. परंतु या अव्यक्त प्रकृतीहून निराळी दुसरी जी एक सनातन अव्यक्त वस्तु ( परब्रह्म ) आहे तिचा सर्व भूतमात्रांचा नाश झाला असतांही नाश होत नाहीं. ह्या अव्यक्तालाच अविनाशी म्हणतात. त्यालाच श्रेष्ठ गति ह्मणतात. ज्या पदाला गेलें असतां प्राणी फिरून या संसाराच्या फेऱ्यांत पडत नाहींत तेंच माझें श्रेष्ठ स्थान होय. ज्याच्या पोटांत सर्व चराचर भूतमात्र आहेत व ज्यानें हें सर्व विश्व भरलें आहे ( ज्यानें हें सर्व जाळें पसरलें आहे ) तो अक्षरसंज्ञक श्रेष्ठ पुरुष एकनिष्ठ भक्तीनेंच मिळणें शक्य आहे. कर्ममार्गानें जाणारे योगी ज्या काळीं देह ठेवून गेल्यानें संसाराच्या फेऱ्यांतून सुटतात किंवा त्यामध्यें पडतात तो काळ आतां सांगतों. अग्नि, प्रकाश, दिवस, शुक्लपक्ष, उत्तरायणाचे सहा महिने ह्या वेळीं देह ठेवून जा-

णारे ब्रह्मवेत्ते क्रमानें चित्तशुद्धि होऊन ब्रह्मपदाला मिळतात. धूर, रात्र, कृष्णपक्ष, दक्षिणायनामधले सहा महिने ह्यावेळीं देह ठेवून हा योगी चंद्रलोकाला जाऊन मग फिरून जन्माला येतो. ह्या जगाच्या कायमच्या शुक्ल व कृष्ण गती समजण्यांत आल्या आहेत. एकीच्या योगानें संसाराचा फेरा चुकतो व दुसरीच्यानें फिरून फिरून तो फेरा पडतो. याप्रमाणें एक मोक्षाला व दुसरा संसाराला कारण असे हे दोन मार्ग आहेत हें लक्षांत ठेवून कर्ममार्गानें जाणारा योगी भांबावत नाहीं. म्हणून सर्वकाळ योगामध्यें गढलें रहावें. हें तत्त्व जाणल्यानें वेदाध्ययनामध्यें, यज्ञ करण्यामध्यें, तप करण्यामध्यें, तसेंच दान करण्यामध्यें जें पुण्यफल सांगितलें आहे तें सर्व मार्गे सारून योगी आद्य असें जें श्रेष्ठपद त्याला जातो.'

(९) 'हें पुढील अगदीं गूढ व सानुभव असें ज्ञान निर्मत्सर अशा तुला सांगतों. हें तुझ्या मनांत उतरलें म्हणजे तूं संसारपाशांतून सुटशील. सर्व विद्यांचा मुकुटमणी, सर्व गूढांमध्यें गूढ, प्रत्यक्ष अनुभवास येणारें, धर्माला धरून असणारें, करण्याला सुकर असून शाश्वत फल देणारें असें हें पवित्र व उत्तम ज्ञान आहे. हे शत्रूला ताप देणाऱ्या अर्जुना, ह्या धर्मावर श्रद्धा न ठेवणारे पुरुष माझ्यापर्यंत मजल न येतां जन्ममरणाच्या फेऱ्यांत वारंवार पडतात. माझ्या अव्यक्त मूर्तीनें हें सर्व जग भरलें आहे.व्यावहारिक दृष्टच्या जगताचा आभास ब्रह्मावर होतो. या न्यायानें आकाशामध्यें असणाऱ्या भांड्यांप्रमाणें सर्व भूतमात्र माझ्या ठिकाणीं आहेत. पण ज्याप्रमाणें भांडीं फुटलीं तरी आकाशाचा त्यांशीं संबंध नसून तें नाहींसें होत नाहीं, त्याप्रमाणें मी त्यांपासून वेगळा आहें; पण पारमार्थिक दृष्टीनें दोरीमध्यें जसा सर्प नसतो तसें भूतमात्रही माझ्या ठिकाणीं नाहींतच म्हटलें पाहिजे. माझें ईश्वरी योगसामर्थ्य कसें आहे पहा. मी निःसंग असून भूतमात्रांचा आश्रय आहें, पण त्यांमध्यें मात्र मी नाहीं. तसाच माझा आत्मा भूतमात्रांचें अस्तित्व ठेवणारा आहे, पण सच्चिदानंद स्वरूपी मी त्यांमध्यें नाहीं. ज्याप्रमाणें सदैव निर्मर्याद आकाशामध्यें वायु सर्वत्र पसरला असतो, पण आकाश त्यापासून अलग असतें, त्याप्रमाणें सर्व भूतमात्र माझ्या ठिकाणीं आहेत हें लक्षांत ठेव. कल्पाच्या अखेरीस सर्व भूतमात्र माझ्या प्रकृतीमध्यें गडप होतात व कल्पारंभाला फिरून मी त्यांना उत्पन्न करितों. संकल्प निर्मित माझ्या प्रकृतीकरवीं प्रकृतीच्या अगदीं तावडींत गेल्यानें पराधीन अशा अखिल भूतमात्रांना सत्तामात्रेंकरून मी फिरून फिरून उत्पन्न करीत असतों. पण उदासीनासारखा राहून त्या कर्मांमध्यें मीं आसक्ति न ठेवल्यानें तीं कर्मे मला बाधक होत नाहींत. माझ्या सत्तेखालीं ही प्रकृति चराचर विश्व उत्पन्न करते; आणि ह्याच कारणानें हें जग संसारचक्रामध्यें फिरत राहिलें आहे. सर्व भूतमात्रांवर स्वामित्व करणारें माझें श्रेष्ठ स्वरूप न ओळखतां मनुष्यदेह धारण केल्याबद्दल मला मूर्खलोक तुच्छ समजतात. ज्याचें ज्ञान फुकट आहे असे हे नष्टबुद्धीचे लोक वायफळ आशा धरून वायफळ कर्म करीत राहून मोह पाडणारा राक्षसी व असुरी स्वभाव धरतात. परंतु जे महात्मे असतात ते दैवी स्वभाव धरून एकाग्र मनानें सर्व भूतमात्रांचा मूळ उत्पादक व अविनाशी असा मी आहें हें ओळखून मला भजतात. नेहमीं माझें कीर्तन करीत राहून निश्चयानें झटून व भक्तीनें नमस्कार करून नेहमीं आत्मनिष्ठ राहून माझी उपासना करितात. कोणी अभेदबुद्धीनें, कोणी अनेक प्रकारानें मी विश्वव्यापी असल्यामुळें भेदबुद्धीनें माझें ज्ञानयज्ञाच्या योगानें यजन करतात. श्रौतयज्ञ मी, स्मार्तयज्ञ मी, स्वधारूपी पितरांना दिलेलें अन्न मी, मनुष्यांचें औषधरूपी अन्न मीच, देवतांना व पितरांना हवी देतांना म्हटला जाणारा मंत्र मीच, हवि देण्याचें तूप मीच, अग्नि मीच व आहुति मीच. ह्या जगाचा बाप, आई, पालक, आजा सर्व मीच आहें. जाणून घेण्यासारखा पवित्र प्रणव ॐकार मीच आहें. तसेंच ऋक्, साम व यजु हे वेद मीच आहें. त्याचप्रमाणें ह्याची गति, भरण करणारा, स्वामी, साक्षी, आधार, आसरा, सुहृद, उत्पत्तिस्थान, लयस्थान, वसतिस्थान, भांडार, व कधीं नाहींसें न होणारें बीज मीच आहें. आदित्यादि रूपानें मीच ऊन्ह पाडतों, व पर्जन्य वर ओढून घेतों व खालीं सोडतों. देवांचें अमृतत्व तसेंच मनुष्यांचें मर्त्यत्व मीच आहें. प्रसंगीं विद्यमान व प्रसंगीं अविद्यमान अशा कार्यकारणमालिकेचें नित्य व अखंड

कारण मीच आहें. जे तीन वेद पढलेले सोमपानानें पाप धुवून काढून यज्ञ करून स्वर्ग मागतात, त्यांना पवित्र असा इंद्र लोक मिळून स्वर्गामध्यें देवांना मिळणाऱ्या उत्तम भोगाचा ते उपभोग घेतात; व विशाळ अशा त्या स्वर्ग लोकाचा उपभोग घेऊन संचित पुण्य नाहींसें झालें ह्मणजे फिरून मृत्युलोकाला येतात. याप्रमाणें सकाम बुद्धीनें तिन्ही वेदांतील विधींना अनुसरणारे जन्ममरणाच्या चक्रांत सांपडतात. एक निष्ठेनें माझें ध्यान ठेवून जे माझी उपासना करतात त्या **नेहमीं माझे ठिकाणीं गढलेल्या लोकांचें योगक्षेम मी वहात असतों.** जे मजवांचून इतर देवांचे भक्त त्या त्या देवांचें श्रद्धापूर्वक यजन करितात ते देखील सरळ रस्ता सोडून माझीच आराधना करीत असतात. कारण सर्व यज्ञांचा उपभोग घेणारा व स्वामी मीच आहें. परंतु ते मला ओळखावें तसें ओळखत नाहींत म्हणून पतन पावतात. देवतांची नियमादिकांनीं भक्ति करणारे देवलोकाला जातात, पितरांची भक्ति करणारे पितृलोकाला जातात, भूतांची आराधना करणारे भूतत्वाला जातात व माझी आराधना करणारे मजकडे येतात. निर्मळ पत्र, पुष्प, फल, पाणी यांपैकीं जें कांहीं मला जो भक्तीनें व निर्मळ अंतःकरणानें देतो तें भक्तिपूर्वक दिलेलें मी आनंदानें घेतों. जें तूं करशील, जें तूं खाशील पिशील, जें तूं हवन करशील, जें देशील, जें तप करशील, तें सर्व अर्जुना, मला अर्पण करून टाक, म्हणजे बरें वाईट फळ देणारे जे कर्मपाश त्यांमधून तूं सुटशील. याप्रमाणें वासना व अभिमान टाकून मला अर्पण म्हणून तूं कर्म करीत राहिलास तर जीवन्मुक्त होऊन तूं मला येऊन मिळशील. **मी सर्वांच्या ठिकाणीं सारखा आहें. मला कोणी द्वेष्य किंवा प्रिय नाहीं.** तरी पण जे मला भक्तिपूर्वक भजतात ते माझ्या ठिकाणीं व मी त्यांच्या ठिकाणीं एकस्वरूपानें असतों. जो एकनिष्ठेनें मला भजतो तो अतिदुराचारी असला तरी तो साधुच समजला पाहिजे. कारण तो सरळ वाटेला लागला असतो. कारण अर्जुना, माझा आश्रा केल्यानें स्त्रिया, वैश्य, शुद्र अशा प्रकारचे जे कोणी पापयोनीमध्यें जन्मले असतील ते सुद्धां श्रेष्ठ गतीला जातात. मग जे शुद्ध योनीमध्यें जन्मलेले ब्राह्मण तसेच राजर्षी असतील त्यांची गोष्ट कशाला, म्हणून ह्या अशाश्वत व कष्टमय मृत्यु लोकामध्यें तूं आला असल्यानें मला भज. माझ्याकडे लक्ष ठेवून माझी भक्ति ठेव. माझी यजनादिकांनीं आराधना कर व मला शरण ये. मजकडे लक्ष लावून याप्रमाणें माझे ठिकाणीं लीन झाल्यानें शेवटीं माझ्याकडेसच खात्रीनें येशील.

( १० ) श्रीकृष्ण भगवान् पुढें बोलला, 'हे महाबाहो अर्जुना, फिरून माझें कल्याणप्रद भाषण ऐक. तुला माझें बोलणें पटून त्यानें तुला संतोष होतो ह्मणून मी तुला तुझें हित व्हावें ह्मणून तें सांगत आहें.' **माझ्या उत्पत्तीचें गूढ देवांना तसेंच महर्षींना सुद्धां समजलें नाहीं.** देवांचें तसेंच ऋषींचें मूळ कारण सर्व प्रकारें मीच आहें. मला जन्म नसून सर्वांचें मूळ कारण व सर्वांवर सत्ता चालविणारा असा मी आहें हें जो जाणतो तोच मर्त्य भ्रम दूर होऊन सर्व पापांपासून मुक्त होतो. बुद्धि, ज्ञान, निर्मोहता, क्षमा, सत्य, दम, शम, सुख, दुःख, जन्म, मृत्यु, भीति, निर्भयता, अहिंसा, सारखेपणा, संतोष, तप, दान, यश, अपयश या भूतमात्रांच्या जीवाच्या निरनिराळ्या अवस्था माझ्यापासूनच उत्पन्न होतात. भृग्वादि सात ऋषि व चार सावर्ण मनु माझे अंशभूत माझ्या मनापासून अयोनिज असे उत्पन्न झाले असून त्यांच्यापासून ही सर्व प्रजा उत्पन्न झाली आहे. ज्याला हा विस्तार व ही घटना बरोबर कळली, त्याचीच खात्रीनें स्थिर अशी समदृष्टि असणारी समाधि लागते. मी सर्वांचा उत्पादक आहें. माझ्यापासून सर्व उत्पन्न झालें आहे असें समजून शहाणे लोक भक्तिपूर्वक मला भजतात. माझ्याकडे लक्ष लावून माझ्यावर जीव लावून असणारे एकमेकांना ज्ञानोपदेश करीत व माझें नाम संकीर्तन करीत संतोषामध्यें मजेंत असतात. त्या नेहमीं एकनिष्ठ राहून प्रेमपूर्वक भजणाऱ्या माझ्या भक्तांना मी अशी बुद्धि देतों कीं, त्याच्या योगानें ते मजकडे येतात. अशांवरच दया करण्यासाठीं मी आपल्या खऱ्या स्वरूपानें देदीप्यमान अशा ज्ञानरूपी दिव्यानें त्यांचा अज्ञानापासून उत्पन्न होणारा अंध-

कार नाहींसा करतों.' यावर अर्जुन म्हणाला, 'पवित्र व उत्तम असें श्रेष्ठ ब्रह्म व श्रेष्ठ तेज तूंच आहेस. शाश्वत असा दिव्य पुरुष, सर्व देवांमध्यें पहिला, जन्मरहित असा स्वामी तूंच आहेस असें सर्व ऋषी, देवर्षि नारद, असित, देवल, व्यास हे सर्व म्हणतात व तूं स्वतःही असेंच म्हणतोस. हें सर्व मी खरें समजतों. कारण हे भगवन्, तुझें स्वरूप देवांना किंवा दानवांना कोणालाच उमगलें नाहीं. हे पुरुषश्रेष्ठा, हे भूतभावना, हे भूतेशा, हे देवदेवा, हे जगत्पते, तूंच आपण आपल्याला ओळखतो आहेस. म्हणून ज्या आपल्या विभूतींनीं तूं हे सर्व लोक भरून राहिला आहेस त्या तुझ्या विभूती समग्र रूपा करून मला सांग. हे योगिन्, नेहमीं तुझें ध्यान ठेवून मीं तुला कसें ओळखावें व कोणकोणत्या स्वरूपामध्यें तुझें ध्यान करावें? तुझें षड्गुणैश्वर्यत्व व विभूती फिरून विस्तारानें मला सांग. हें अमृत पिऊन मला समाधानी होत नाहीं.' श्रीकृष्ण म्हणाला, 'हे कुरुश्रेष्ठा, ठीक आहे. मी तुला आपल्या ठळक ठळक दिव्य विभूती सांगतों. कारण माझा एकंदर विस्तार अनंत आहे. हे जितेंद्रिय अर्जुना, सर्व भूतमात्रांच्या हृदयामध्यें राहिलेला आत्मा मी आहें. त्याचप्रमाणें त्यांचा उत्पादक, संरक्षक, व अंतक मीच आहें. उदाहरणार्थ; बाराआदित्यामधला मी विष्णु आहें; सर्व प्रकाशमान वस्तूंपैकीं मी सूर्य आहें; सर्व वायूंमधला मी मरीचि आहें; नक्षत्रांमधला मी चंद्र आहें; वेदांमधला मी सामवेद आहे; देवांमधला इंद्र आहें; इंद्रियामधलें मन आहें; भूतमात्रांमधली मी चेतनाशक्ति आहें; रुद्रांमधला शंकर आहें; यक्ष व राक्षसयांमधला कुबेर आहें; अष्टवसूंमधला अग्नि आहें; पर्वतांमधला मेरु आहें; राजपुरोहितांमधला मुख्य बृहस्पति मी आहें; सेनापतींमधला कार्तिकस्वामी मी आहें; जलाशयांमधला समुद्र मी आहे; महर्षींपैकीं मी भृगु आहें; शब्दसमुच्चयामध्यें एकाक्षरीं ॐकारवर्ण मी आहें; सर्व यज्ञांमधील जपयज्ञ मी आहें; सर्व स्थावरांमध्यें हिमाचल मी आहें; सर्व वृक्षांमधला पिंपळ मी आहें; देवर्षींमधला नारद मी आहे; गंधर्वांमधला चित्ररथ मी आहें; सिद्धांमधला कपिल मुनि मी आहें; घोड्यांमध्यें अमृत मंथनाच्या वेळीं निघालेला उच्चैःश्रवा, हत्तीमध्यें ऐरावत व मनुष्यांमध्यें राजा मीच आहें हें लक्षांत ठेव. तसाच आयुधांमध्यें वज्र, दुभत्या गाईंमध्यें कामधेनु मीच आहें; उत्पत्तिकर्ता मदन मीच आहें; सर्पांमधला वासुकि मीच आहें; नागांमधला अनंत नाग मी आहें; जलचरांमधला वरुण मी आहें; पितरांमधला अर्यमा मी आहें; सर्व शासकांमधला यम मी आहें; दैत्यांमधला प्रल्हाद मी आहें; गणना करणाऱ्यांपैकीं काल मी आहें; श्वापदांमधला सिंह मी आहें; पक्ष्यांमधला गरुड मी आहें. शुद्ध करणारांमध्यें वारा मी आहें; शस्त्रधाऱ्यांमध्यें श्रीराम मी आहें; मत्स्यादि जलचरांमध्यें मगर मी आहें; वाहणाऱ्यामध्यें गंगा मी आहें; सृष्टवस्तूंचा आदि, मध्य व अंत मीच आहें; सर्वविद्यांपैकीं परमात्मविद्या मी आहें; वादविवादांमधील सत्यनिर्णयात्मक वाद मी आहें; अक्षरांपैकीं अकार मी आहें; समासांमधला द्वंद्व समास मी आहें; कधीं क्षय नसणारा काल मी आहें; सर्वत्र मुख व दृष्टि असणारा कर्मफल देणारा मीच आहें; सर्वनाशक मृत्यु मीच आहें; पुढें होणाऱ्यांचा उत्पादक मी आहें; स्त्रियांची कीर्ति, शोभा, वाणी, स्मरणशक्ति, बुद्धि, धैर्य, क्षमा हीं सारीं मीच आहें; स्तोत्रांमधलें बृहत्सामस्तोत्र, छंदांमधील गायत्री मीच आहें; मासांमध्यें मार्गशीर्ष मास मी आहें; ऋतूंमधील वसंत ऋतु मी आहें; फांसे वगैरे खेळून द्यूतानें दुसऱ्याचा छळ करणाची द्यूतक्रिया मीच आहें; तेजस्वी लोकांचें तेज मी आहें; विजयी लोकांचा जय मी आहें; हातपाय हालविणारांचा व्यवसाय मीच आहें; सत्वशील पुरुषांमधलें सत्व मीच आहें; सर्व भूतमात्रांचें जें कांहीं बीज आहे तें मीच आहें; सर्व चराचरांमध्यें अशी एकही वस्तु नाहीं कीं जी माझ्याशिवाय आहे. माझ्या दिव्य विभूतींचा अंत नाहीं. परंतु हा माझ्या विभूतीचा विस्तार मी तुला ठळक रीतीनें सांगितला. जी जी म्हणून जगामध्यें विभूतीनें शोभिवंत, व गुणविशेषानें खुलून दिसणारी वस्तु आहे, ती ती माझ्या अंशापासूनच उत्पन्न झाली आहे असें तूं समज. किंवा अर्जुना हा सर्व पाल्हाळ कळून घेऊन तरी तुला काय करावयाचें आहे? हें सगळें विश्व मी आपल्या एका अंशानें आवरून राहिलों आहें.'

(११) अर्जुन म्हणाला, 'माझ्यावर कृपा करण्यासाठीं आत्मस्वरूप विवेचनात्मक जी ही अत्युत्कृष्ट गुह्य गोष्ट तूं मला सांगितलीस तिच्या योगानें माझा मोह दूर झाला आहे. कारण, हे कमलनयना भूतमात्रांची उत्पत्ति व लय त्याच प्रमाणें तुझा शाश्वत महिमा मीं तुझ्या तोंडून विस्तारानें ऐकला आहे. हे परमेश्वरा, तूं आपलें ज्या प्रकारचें वर्णन दिलेंस तशा प्रकारचें हें तुझें सर्वसत्ताक स्वरूप मला पहावेंसें वाटतें. हे पुरुषोत्तमा, अष्टासिद्धिसंपन्न असें तें तुझें स्वरूप मला पाहतां येणें शक्य असेल तर तें अविनाशी स्वरूप मला दाखीव.' श्रीकृष्ण म्हणाला, 'अर्जुना, तर मग आतां माझीं शेंकडों तशींच हजारों नानाप्रकारचीं, नानारंगाचीं व नानाआकारांचीं अलौकिक स्वरूपें पहा. अनेक आदित्य, वसु, रुद्र, अश्विनीकुमार, वायु त्याचप्रमाणें आजपर्यंत न पाहिलेलीं अशीं आश्चर्यें पहा. ह्या माझ्या देहामध्यें आज सर्व स्थावरजंगम तसेंच दुसरें जें कांहीं पाहण्याचें तुझ्या मनामध्यें असेल तें सर्व एकवटलेलें पहा. परंतु ह्या तुझ्या मूळच्या चर्मचक्षूंनें तुला हें दिसणार नाहीं. म्हणून अलौकिक ज्ञानचक्षु मी तुला देतों. त्यानें माझें अघटित घटनासामर्थ्य पाहून घे.' असें बोलून नंतर अलौकिक सामर्थ्यवान् प्रभु श्रीकृष्णानें आपलें अनेक तोंडें व डोळे असलेलें, अनेक उत्तम आभरणांनीं विभूषित, अनेक अलौकिक आयुधें हातांमध्यें घेतलेलें, अत्युत्कृष्ट माळा व वस्त्र धारण केलेलें, सुवासिक गंध व उटी लावलेलें, चोहोंबाजूला तोंडें असलेलें, सर्वस्वी थक्क करून सोडणारें, मर्यादारहित, विलक्षण दिसणारें, अत्युत्कृष्ट ईश्वरी स्वरूप अर्जुनाला दाखविलें. जर आकाशामध्यें हजार सूर्यांचा प्रकाश एकदम पडला असता तर ती प्रभा त्या महात्म्याच्या प्रभेच्या बरोबरीला लागली असती. तेवेळीं त्या ठिकाणीं त्या देवेश भगवानाच्या शरीरामध्यें सर्व जग अनेक प्रकारें भिन्न भिन्न असें एकवटलेलें अर्जुनानें पाहिलें. तेव्हां विस्मयचकित होऊन अर्जुनाच्या अंगावर हर्षरोमांच उभे राहिले. त्या भगवानापुढें मस्तक लववून हात जोडून तो ह्मणाला, 'हे देवा, तुझ्या शरीरामध्यें सर्व देव तसेच अनेक प्रकारचे नानाजातीचे स्थावरजंगम पदार्थ, सर्वांचा स्वामी कमलासन ब्रह्मदेव, सर्व ऋषि व अलौकिक नाग मला दिसत आहेत. ज्यांना अनेक हात, पोटें, तोंडें व डोळे आहेत अशीं तुझीं लाखों रूपें मला जिकडे तिकडे दिसत आहेत. हे विश्वरूप विश्वेश्वरा, तुझा शेवट, तुझें मध्य किंवा तुझें मूळ कांहींच मला दिसत नाहीं. किरीट घालून गदा व चक्र हातांमध्यें घेतलेला तूं चोहोंकडे तेज फांकलेला तेजाचा गोळाच मला दिसत आहेस. अवर्ण्य अशा चोहोंबाजूंनीं पेट घेतलेल्या अग्नि व सूर्य यांसारख्या तुझ्या ह्या रूपावर माझे डोळे ठरत नाहींत, ओळख पटवून घेण्याला लायक असा तूं अविनाशी परब्रह्म आहेस. ह्या विश्वाचा मुख्य आधार तूं आहेस. तुला ऱ्हास म्हणून ठाऊक नाहीं. कधींही त्यांत फरक न होणारा जो कायमचा धर्म तो राखणारा तूं आहेस. तूं पुराणपुरुष आहेस असें मला वाटतें. ज्याला मूळ, मध्य किंवा शेवट नाहीं, ज्याला हजारों हात आहेत, चंद्र आणि सूर्य हेच ज्याचे डोळे आहेत व पेट घेतलेला अग्नि हा ज्याचें तोंड आहे असा अपार वीर्यशाली तूं ह्या विश्वाला भाजून काढीत आहेससें मला दिसत आहे. कारण हें सर्व अंतरिक्ष तशाच सर्व दिशा तूं एकट्यानें भरून सोडल्या आहेस. हे महात्मन्, हें तुझें अलौकिक विक्राळ स्वरूप पाहून तिन्ही लोक घाबरले आहेत. कारण ही देवमंडळी तुझ्यामध्यें पटापट शिरत आहे; कोणी घाबरून जाऊन हात जोडून तुझी प्रार्थना करीत आहेत; त्याचप्रमाणें हे ऋषी व सिद्ध स्वागतपूर्वक बहुविध तुझी स्तुति करीत आहेत. हे अकरा रुद्र, बारा आदित्य आठ वसु, साध्यगण, विश्वेदेव, अश्विनीकुमार, मरुद्गण, श्राद्धामध्यें दिलेलें ऊन्हून अन्न सेवन करणारे पितर, गंधर्व, यक्ष, असुर व सिद्धगण, हे सर्व विस्मयचकित होऊन तुझ्याकडे पहात आहेत. हे सर्व शक्तिमान श्रीकृष्णा, शेंकडों तोंडें डोळे, हात, पाय, मांड्या, पाय, पोटें असून पुष्कळ दाढा असल्यामुळें विक्राळ दिसणारें तुझें हें अचाट विश्वरूप पाहून सर्व लोक तसेंच मी घाबरून गेलों आहों. कारण तोंड पसरून आपले लाल डोळे वटारून अकाशाला जाऊन भिडलेल्या अशा अनेक वर्णधारी देदीप्यमान तुला पाहून माझें

अंतःकरण घाबरून गेलें आहे. माझा धीर सुटला आहे व मला चैन पडत नाहींसें झालें आहे. मोठमोठ्या दाढांमुळें विकाळ दिसणारीं प्रलयकाळच्या अग्नीसारखीं हीं तुझीं तोंडें पाहिल्यावरोबर मला दिशाभूल पडली आहे. जिवाला सुख वाटेनासें झालें आहे. तर, हे जगाच्या आधारभूत देवेशा, मजवर कृपा कर. हें पहा अनेक राजमंडळांसह हे धृतराष्ट्राचे मुलगे त्याचप्रमाणें भीष्म, द्रोण, हा सूतपुत्र कर्ण, तसेच आमच्या बाजूचे ठळक ठळक योद्धे मोठ्या वेगानें तुझ्या मोठमोठ्या दाढांमुळें विकाळ व भयप्रद अशा तोंडांमध्यें शिरत आहेत! यांपैकीं कांहींच्या डोक्यांचें पीठ पडून तें तुझ्या दांतांमध्यें चिकटलेलें दिसत आहे. ज्याप्रमाणें नदीचे सहस्रावधि प्रवाह समुद्राकडेसच धांव घेत असतात त्याप्रमाणें मृत्युलोकचे योद्धे चोहोंकडून पेट घेतलेल्या तुझ्या तोंडामध्यें पटापट शिरत आहेत. ज्याप्रमाणें पेटलेल्या आगीमध्यें पतंग मरण्यासाठीं धांवून उडी घेतात त्याचप्रमाणें हे सर्व लोक आपल्या नाशासाठीं तुझ्या तोंडांत धडपडत शिरत आहेत. तूं आपल्या ह्या पेट घेतलेल्या तोंडांनीं चोहोंकडून सर्व लोकांना गिळीत गिळीत जिभल्या चाटीत आहेस. हे विष्णो, तुझीं प्रखर किरणें आपल्या तेजांनीं हें सर्व विश्व व्यापून त्याला भाजून काढीत आहेत. असा उग्र स्वरूपी तूं कोण आहेस मला सांग. हे देवांमध्यें श्रेष्ठ प्रभो, मी तुला नमस्कार करतों; माझ्यावर कृपा कर. सर्वांचें मूळ कारण असा जो तूं त्या तुझी बरोबर ओळख व्हावी असें मला वाटतें. कारण तुझ्या ह्या सर्व खटपटीचें धोरण मला चांगलें कळलें नाहीं.'

भगवान् म्हणाला, 'लोकांचा संहार करणारा मी काळ हा असा वाढून ह्या ठिकाणीं लोकांचा फडशा उडविण्याला निघालों आहें. ह्या रणामध्यें प्रत्येक दळामध्यें तयार होऊन जे हे सर्व योद्धे उभे ठाकले आहेत ते तूं कांहीं हातपाय हालविले नाहींस तरी नाहींसे होणार आहेत. म्हणून तूं ऊठ. यश मिळीव. शत्रूंना जिंकून झगझगीत राज्याचा उपभोग घे. मींच या सर्वांना पूर्वींच मारून टाकलें आहे. आतां तूं केवळ निमित्ताला कारण हो. पूर्वींच मीं मारून टाकलेल्या ह्या भीष्मांना, द्रोणांना, जयद्रथाला तसेंच कर्णाला व दुसऱ्या शूर योद्ध्यांना मार. कचरूं नकोस. लढ. रणामध्यें तूं आपल्या प्रतिस्पर्ध्यांना खास जिंकशील.' हें केशवाचें भाषण ऐकून अर्जुन हात जोडून कांपत कांपत त्याला नमस्कार करून फिरून भीत भीत गद्गदित वाणीनें म्हणाला, 'हे हृषीकेशा, तुझें माहात्म्य गातांना जगाला जें आनंदाचें भरतें येऊन प्रेमाचा पान्हा फुटतो तें ठीकच आहे. तसेंच तें ऐकून राक्षस गर्भगळित होऊन दशदिशेला पळ काढतात व सिद्ध तुला नमस्कार करतात हें सर्व रास्तच आहे. हे महात्मन्, ब्रह्मदेवांचासुद्धां मूळ उत्पादक जो तूं त्या तुला मोठ्याला हे कां नमस्कार करणार नाहींत? हे जगताच्या आधारभूत अनंता देवेशा, तूं, आहे, नाहीं असें ज्ञान करून देणाऱ्या सदसद्रूपी विनाशी मायेच्या पलीकडचा अविनाशी आहेस. तूंच मूळ देव आहेस; तूं पुराणपुरुष आहेस. ह्या विश्वाचा तूं उत्तम आधार आहेस. सर्व समजून घेण्यालायक वस्तू जाणणारा व त्या वस्तूहि तूंच आहेस. श्रेष्ठ असें स्थान तूंच आहेस. हे अनेकस्वरूपी देवा, हें सर्व विश्व तुझ्या योगानेंच भरलें आहे. वायु, यम, वरुण, चंद्र, प्रजापति, प्रपितामह हे सर्व तूंच आहेस. तुला माझे शेंकडों हजारों नमस्कार असोत. पुढून, मागून सर्व बाजूंनीं हे सर्वा, तुला माझा नमस्कार असो. तुझें सामर्थ्य व पराक्रम अपार असून तूं सर्व भरून राहिला आहेस म्हणून तुला सर्व हें नांव आहे. तुझा हा महिमा न ओळखतां चुकून म्हण किंवा स्नेहामुळें म्हण हे कृष्णा, हे यादवा, हे मित्रा, म्हणून जें मी आजपर्यंत वरचेवर हट्टानें बोललों असेन अथवा तुझ्या मागें किंवा तुझ्या समोर मजेंत फिरतांना, आंथरुणावर पडलों असतां, बसलों असतांना किंवा जेवतेवेळीं थट्टा करून हांसें पिकविण्यासाठीं मीं जो तुझा अपमान केला असेल त्या सर्वांबद्दल मी अतर्क्य अशा तुझी क्षमा मागतों. तूं ह्या चराचर विश्वाचा बाप आहेस व पूज्य असा थोर गुरु आहेस. हे अतुलप्रभावशाली देवा, तिन्ही लोकांमध्यें तुझ्यासारखा कोणी नाहीं, मग तुझ्याहून श्रेष्ठ असा कोठून मिळणार? म्हणून नमस्कार करून अंग तुझ्यापुढें लववून स्तुत्य असा जो तूं सर्वस्वामी त्या तुझी मी क्षमा

मागतों. तुझ्यावर प्रेम करणाऱ्यावर तूं प्रेम करणारा असल्यानें हे देवा बाप ज्याप्रमाणें मुलाचे, मित्र ज्याप्रमाणें मित्राचे किंवा नवरा ज्याप्रमाणें बायकोचे अपराध पोटांत घालतो त्याप्रमाणें देवा तूं माझे अपराध पोटांत घाल. हें तुझें अपूर्व रूप पाहून मी हर्षभरित झालों आहें खरा पण भयानें माझें मन जाग्यावरून उडालें आहे. ह्मणून हे जगताच्या आधारभूत देवेशा, मला तेंच तुझें पूर्वींचें रूप दाखीव. किरीट घालून हातामध्यें गदा व चक्र घेतलेला असा पूर्वीसारखा तुला पाहण्याची मला इच्छा आहे ह्मणून हे सहस्रभुज धारण करणाऱ्या विराटमूर्ते, चतुर्भुजयुक्त असें तेंच रूप तूं फिरून धारण कर' भगवान् ह्मणाला, 'हे अर्जुना, मी आपल्या अघटित सामर्थ्यानें तुझ्यावर प्रसन्न होऊन हें सर्वोत्तम, तेजोमय, सर्वव्यापी, अनंत व मूळचें रूप तुला दाखविलें आहे. हें माझें रूप तुझ्यावांचून दुसऱ्या कोणीं पूर्वीं पाहिलें नाहीं. वेद व यज्ञमंत्र यांच्या अध्ययनांनीं, दानांनीं, पुण्यकारक अशा क्रियांनीं किंवा उग्र तपांनीं तुझ्यावांचून दुसऱ्या कोणाला ह्या मृत्युलोकीं माझें हें स्वरूप दृष्टीस पडणें शक्य नाहीं. माझें हें अशा प्रकारचें रूप पाहून गांगरून मनाची चलबिचल उडूं देऊं नकोस. भीति सोडून प्रसन्न मनानें तेंच माझें पूर्वींचें रूप हें पहा. ह्याप्रमाणें बोलून वासुदेवानें अर्जुनाला आपलें पूर्वींचें लौकिकरूप दाखविलें; व याप्रमाणें सौम्य स्वरूप फिरून धरून घाबरलेल्या अर्जुनाला त्यानें धीर दिला. तेव्हां अर्जुन ह्मणाला, 'हे जनार्दना, हें तुझें सौम्य असें मानवरूप पाहून आतां माझें मन जाग्यावर येऊन पूर्व स्थिति मला आली आहे.' श्रीकृष्ण ह्मणाला, जें हें माझें रूप तूं पाहिलें आहेस तें दुसऱ्या कोणालाही दिसणें फार कठीण आहे. देव देखील नेहमीं हें रूप पाहण्याची आशा करून आहेत. तूं जसें मला पाहिलें आहेस अशा प्रकारें मी चारी वेदांचें अध्ययन केल्यानें, तपानें, दानानें, यज्ञानें कोणाच्या दृष्टीस पडणें शक्य नाहीं. परंतु एकनिष्ठ भक्तीनें मात्र अशा प्रकारें माझें खरें स्वरूप ओळखून व पाहून माझ्याशीं सारूप्य होऊन जाणें शक्य आहे. **कशावर आसक्ति न ठेवतां सर्व भूतमात्रांशीं वैरभाव सोडून जो माझ्या ठिकाणीं तल्लीन होऊन माझ्यावर भक्ति ठेवून मजसाठीं कर्में करीत राहतो तो मला येऊन मिळतो.'**

(१२) अर्जुन ह्मणाला, 'वर सांगितल्या प्रकारानें जे भक्त नेहमीं एकाग्र राहून तुझ्या सगुण मूर्तीची उपासना करतात व जे अविनाशी अशा तुझ्या अव्यक्ताची उपासना करतात त्या दोन वर्गांच्या लोकांपैकीं कोणत्या वर्गाला योग उत्तम समजला ह्मणावयाचें?' भगवान् ह्मणाला, 'माझ्या ठिकाणीं मन ठेवून सदा एकनिष्ठ होऊन मोठ्या श्रद्धाळूपणानें जे माझी उपासना करतात तेच श्रेष्ठ प्रकारचे आत्मनिष्ठ मला विशेष पसंत आहेत. परंतु जे दाखवून देतां येत नाहीं, निर्गुण सर्वगामी, अतर्क्य, सर्वत्र साक्षित्वानें भरून असणारें, अचळ, नित्य व अविनाशी अशा माझ्या परब्रह्म स्वरूपाची सर्व इंद्रियें स्वाधीन ठेवून उपासना करतात तेही सर्व भूतमात्रांच्या हितामध्यें गढले असल्यानें मजकडेसच येतात. परंतु याप्रमाणें अव्यक्ताच्या ठिकाणीं चित्त देऊन राहिलेल्या लोकांना अधिक क्लेश सोसावे लागतात. कारण देहाभिमान असणाऱ्यांना निर्गुणोपासनेनें अव्यक्त गति मिळणें मोठें साहासाचें आहे. परंतु जे सर्व कर्में मला आर्पण करून माझ्या ठिकाणीं तल्लीन असतात व अगदीं एकनिष्ठ भावानें माझें ध्यान ठेवून माझी उपासना करतात त्यांनीं माझ्या ठिकाणींच लक्ष लाविलें असल्यामुळें ह्या मृत्यूनें युक्त अशा संसारसागरापासून झटकन् मी त्यांना बाहेर काढतों. ह्मणून माझ्या ठिकाणींच मन ठेव; बुद्धि माझ्या ठिकाणीं लाव ह्मणजे हा देह ठेवल्यावर माझ्या ठिकाणींच तुझा कायमचा वास होईल यांत संशय नाहीं. आतां माझ्या ठिकाणीं जर तुझें मन दृढ रहात नसेल तर मग अभ्यासाच्या योगानें मला मिळवून घेण्याची इच्छा धर. आणि हा अभ्यास ठेवणेंही जर तुझ्यानें होत नसेल तर **माझ्यासाठीं ह्मणून निष्कामबुद्धीनें कर्में करण्यांत गढला रहा.** माझ्यासाठीं ह्मणून कर्में करीत राहिलास तरी तुला सिद्धि मिळेल. आतां माझ्या ठिकाणीं एकनिष्ठ राहून एवढें सुद्धां जर तुझ्यानें करवत नसेल तर मग **आत्मनिग्रहानें जें कांहीं करशील त्याच्या फलावर तरी आस्था ठेवूं नकोस.** कारण आत्मविचार केवळ ऐकत राहण्यापेक्षां त्याचें परोक्ष ज्ञान चांगलें; केवळ परोक्ष

ज्ञानापेक्षां ध्यान चांगलें. ब्रह्मचिंतनापेक्षां निष्काम-बुद्धीनें कर्में करीत राहणें चांगलें. याप्रमाणें कर्मफल बाजूला झुगारून दिल्यावर शांति काय जवळच आहे. कोणाही भूतमात्राचा द्वेष न करतां सर्वांशीं मित्रत्वानें राहून सर्वांवर कींव करणारा, ममता व अहंकार दूर करून सुखदुःखें सारखींच समजणारा, क्षमाशील, संतुष्ट, दृढनिश्चयानें आत्मनिग्रह करून नेहमीं योगामध्यें गढलेला असा जो भक्त आपलें मन व बुद्धि माझ्या ठिकाणीं लावून असतो तो मला आवडतो. ज्यापासून लोकांना भय वाटत नाहीं किंवा ज्याला लोकांचें भय वाटत नाहीं, आनंद, राग, भय व काळजी यांपासून जो सुटला आहे तो मला आवडतो. निस्पृह, शुद्धशील, प्रसंगावधानी, तटस्थ वृत्तीचा, दुःख ह्मणून ज्याला ठाऊक नाहीं, कोणत्याही सकाम कामाकडे ढुंकून न पाहणारा असा जो माझा भक्त तो मला आवडतो. ज्याला कशाही संबंधानें आनंद होत नाहीं किंवा भेद न उरल्यानें कोणासंबंधानें द्वेष वाटत नाहीं अगर शोक होत नाहीं, ज्याला कशाची इच्छा नसते व ज्यानें बरीं किंवा वाईट सर्वच कर्में सकामबुद्धीनें करण्याची सोडून दिलीं आहेत, तो श्रद्धाळू भक्त मला आवडतो. जो शत्रु व मित्र, मान व अपमान, थंडी व ऊन्ह, सुख व दुःख यांची सारखीच काळजी करतो, ज्याची कशावर आसक्ति नाहीं, निंदा व स्तुति ज्याला सारख्याच वाटतात, मौन धरून जो जें कांहीं मिळेल त्यावर संतुष्ट असतो, ज्याला घरदार कांहीं ठाऊक नाहीं अशा दृढ बुद्धीचा भक्तिमान् मनुष्य मला आवडतो. आतां जे माझे भक्त माझ्या ठिकाणीं तल्लीन होऊन श्रद्धाळुपणानें हें धर्मरूपी अमृत सेवन करतात ते मला फारच प्रिय होत.'

(१३) भगवान् फिरून म्हणाला, 'हे अर्जुना ह्या शरीराला क्षेत्र हें नांव आहे व ह्याचें ज्याला ज्ञान आहे तोच जीवात्मा क्षेत्रज्ञ होय असें तज्ज्ञ समजतात. सर्व शरीरांमध्यें जीवात्मा मीच आहें असें समज. शरीर आणि जीवात्मा यासंबंधानें जें खरें ज्ञान तेंच मला संमत आहे. हें क्षेत्र म्हणजे काय, तें कशा प्रकारचें आहे, त्याचे विकार काय काय आहेत, त्यापासून कार्य काय उत्पन्न होतें; तसेंच जो हा क्षेत्रज्ञ सांगितला तो कोण, त्याचें सामर्थ्य काय आहे वगैरे थोडक्यांत सांगतों ऐक. अनेक मोठमोठ्या ऋषींनीं नाना प्रकारच्या वैदिक वृत्तांनीं व ठाम ठरवून ठेवलेल्या सयुक्तिक ब्रह्मज्ञानात्मक सूत्रांनीं निरनिराळ्या प्रकारें याचें वर्णन केलें आहे. पृथ्वी, आप, तेज, वायु व आकाश ह्या पंचमहाभूतांचीं पांच सूक्ष्म रूपें, यांना भासमान करणारा अहंकार, निश्चित ज्ञान करून देणारी बुद्धि, व या सर्वांना मूळभूत माया, त्याचप्रमाणें डोळे, कान इत्यादि पांच ज्ञानेंद्रियें व हातपाय इत्यादि पांच कर्मेंद्रियें, मन, आणि शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध हे इंद्रियांना उमगणारे पांच विषय मिळून क्षेत्र होतें व इच्छा, द्वेष, सुख, दुःख, देहेंद्रियात्मक शरीर, आभासिक चैतन्य व सहनशक्ति हे त्याचे विकार, ह्या दोघांनाही मिळून थोडक्यांत सविकार क्षेत्र ह्मणतात. निरभिमान, निर्दंभ, अहिंसा, सहनशीलता, सरळपणा, गुरूची उपासना, शुद्धता, स्थिरता, आत्मनिग्रह, इंद्रियविषयांसंबंधानें वैराग्य, अहंकारशून्यता, जन्म, मृत्यु, वार्धक्य, रोगराई, दुःख यांमधले दोष जाणणें, औदासीन्य, बायका, मुलें, घरदार यांसंबंधानें निष्प्रेमभाव, बरा वाईट कोणताही प्रसंग गुदरला असतां नेहमीं सारखी मनोवृत्ति ठेवणें, एकनिष्ठतेनें मजवर शुद्ध भक्ति ठेवणें, एकांत वास करणें, लोकांमध्यें राहणें न आवडणें, नेहमीं आत्मज्ञानामध्यें गढलें राहणें, ऐक्य साक्षात्काराचा प्रत्यक्ष अनुभव घेणें, ह्या सर्वांना ज्ञान ही संज्ञा आहे—अर्थात ज्ञानप्राप्तीला हीं साधनें आहेत. याहून निराळें तें अज्ञान समजावें. आतां ज्ञेय कशाला म्हणावें तें सांगतों. जें जाणल्यानें मनुष्य अमर होतो. अनादिमायेपासून वेगळें कार्यकारण संबंधाच्या पलीकडचें तें ज्ञेय परब्रह्म; जें आहे किंवा नाहीं असें त्यासंबंधानें कांहींच म्हणतां येत नाहीं. आभासिक दृष्ट्या सर्वच बाजूंनीं याला हात, पाय, डोळे, डोकीं, तोंडें व कान असून ह्या लोकांमध्यें हा सर्व भरून राहिला आहे. पांच कर्मेंद्रियें, पांच ज्ञानेंद्रियें, मन व बुद्धि या सर्वांच्या गुणांनीं भासमान होणारें परंतु ह्या सर्व इंद्रियांवांचून असणारें, सर्वांपासून वेगळें पण सर्व भरून राहिलेलें, सत्वरजादि गुणांपासून अलग पण त्यांना जाणणारें भूतमात्रांच्या आंत बाहेर भरून असणारें, अचल

असून चल, फार सूक्ष्म असल्यानें जड बुद्धीस न कळण्याजोगें, फार दूर असून अगदीं जवळ असणारें असें तें ब्रह्म आहे. तसेंच हें वेगळें मुळीं नसून जलामध्यें दिसणाऱ्या अनेक चंद्रांप्रमाणें सर्व भूतामात्रांच्या ठिकाणीं निरनिराळें आहेसें दिसतें. सर्व भूतमात्रांचा तें आधार असून सर्वांना गिळून टाकणारें व उत्पन्न करणारें तेंच आहे. सर्व प्रकाशमान वस्तूंमध्यें तें श्रेष्ठ आहे व अंधकाराच्या व्यतिरिक्त आहे. निरभिमान वगैरे वर सांगितलेलें ज्ञान अनादिमायेपासून वेगळें इत्यादिकांनीं सांगितलेलें ज्ञेय व ज्ञानफल तद्रूपच असून तें प्रत्येकाच्या हृदयामध्यें कायम आहे. याप्रमाणें क्षेत्र, ज्ञान व ज्ञेय थोडक्यांत सांगितलें. ह्याचें पक्कें ज्ञान करून घेऊन माझा भक्त माझ्याशीं स्वरूपतेला येऊन मिळतो. प्रकृति ( चेतनाशून्य जड द्रव्य ) व पुरुष ( चेतना उत्पन्न करणारी शक्ति ) हे दोन्ही जन्मरहित आहेत व जडसूक्ष्मादि विकार व रूपरसादि गुण हे प्रकृतीपासून उत्पन्न झाले आहेत हें ध्यानांत ठेव. शरीर व इंद्रियें यांना मूळ कारण प्रकृति व सुखदुःखादिक भोगण्याला पुरुष कारण समजतात. कारण हा पुरुष हा प्रकृतीमध्यें राहून प्रकृतीपासून उद्भवणाऱ्या गुणांचा उपभोग घेतो; आणि चांगल्या किंवा वाईट योनीमध्यें याचा जन्म होण्याला गुणाशीं याचा संबंध हेंच कारण होतें. आत्म्याच्या अगदीं जवळ राहून सर्व पहात रहाणारा आपण कांहींएक करीत नसतां इंद्रियादिकांच्या व्यापारास संमति देणारा, यांचा पोषक, सुखदुःखादि गुणांचा उपभोग घेणारा, सर्व शास्ता जो श्रेष्ठ पुरुष ह्या देहामध्यें आहे त्याला परमात्माही ह्मणतात. तो ह्याप्रमाणें पुरुषाला व तिच्या गुणांसह प्रकृतीला ओळखतो. तो वाटेल तसा ह्या जगांत वावरत असला तरी त्याला पुनर्जन्म नाहीं. कोणी ध्यानाच्या साहाय्यानें शुद्ध मानस होऊन आपल्या ठिकाणीं आत्मस्वरूपाला पाहूं लागतात; कोणी सांख्य योगानें पाहूं लागतात व कोणी कर्म योगानें पाहूं लागतात. परंतु हे प्रकार न जाणणारे दुसरे दुसऱ्यांच्या तोंडून ऐकून त्याप्रमाणें श्रद्धापूर्वक उपासना ठेवतात. याप्रमाणें श्रुतिवाक्यावर विश्वास ठेवून श्रद्धेनें त्याप्रमाणें वागणारे देखील मृत्यूंतून खात्रीनें पार पडतात. जी जी ह्मणून चराचर वस्तु उत्पन्न होते ती ती क्षेत्र आणि क्षेत्रज्ञ यांच्या संबंधापासून उत्पन्न होते हें लक्षांत ठेव. परमेश्वर सर्व भूतमात्रांच्या ठिकाणीं सारखेपणानें राहणारा आहे व ह्या भूतमात्रांचा नाश झाला असतांही त्याचा नाश होत नाहीं हें ज्याला कळतें तोच सत्य उमगला असें समजावें. कारण सर्व ठिकाणीं सारखेपणानें भरून राहिलेल्या ईश्वराला समदृष्टीनें पाहणारा या जड देहानें आत्म्याला कधीं मारीत नाहीं; आणि अशा रीतीनें सारूप्यतेला मिळतो. आकाशामध्यें ढगाची हालचाल होत असते, पण आकाशाचें जसें त्यांत कांहीं अंग नसतें त्याप्रमाणें प्रकृतीकडून सर्व कर्में सर्व तऱ्हेनें घडत असतात व आत्मा कांहीं करीत नाहीं असें ज्याला कळलें त्यालाच खरें कळलें ह्मणावयाचें. ज्यावेळीं मनुष्य या भूतमात्रांचीं निराळीं स्वरूपें एकाच आत्म्यापासून निघून विस्तार पावलीं आहेत असें पाहूं लागतो तेव्हां तो ब्रह्मस्वरूपी बनतो. अनादिपणानें व निर्गुणपणानें हा आत्मा अविनाशी आहे व हा शरीरामध्यें आहे तरी तो कांहीं करीत नाहीं व देहाशीं संबंध ठेवीत नाहीं. ज्याप्रमाणें आकाश सर्व ठिकाणीं भरून राहिलें आहे तरी तें कशाला चिकटून रहात नाहीं त्याप्रमाणें देहामध्यें आत्मा सर्व ठिकाणीं भरून आहे तरी त्यापासून वेगळा आहे. ज्याप्रमाणें एकटा सूर्य हें सर्व जग प्रकाशमान करतो त्याप्रमाणें हा शरीरामध्यें असणारा आत्मा सर्व शरीर प्रकाशमान करतो. जे ह्याप्रमाणें ज्ञानचक्षूनें क्षेत्र, क्षेत्रज्ञ व भूतमात्रांच्या ठिकाणीं पसरलेल्या मायेपासून स्वतः निराळे आहों हें ओळखतात ते ब्रह्मपदाला जातात.

( १४ ) फिरून सर्व ज्ञानांमध्यें श्रेष्ठ असें जें ज्ञान त्यासंबंधानें माहिती तुला सांगतों. जें कळून सर्व मुनी ह्या संसारबंधांतून सुटून उत्तम अशा मोक्षरूपी सिद्धीला जाऊन मिळाले. ह्या ज्ञानाच्या आश्रयानें माझ्या सारूप्यतेला येऊन मिळालेले जीव सृष्टीच्या उत्पत्तीच्या वेळीं देखील उत्पन्न होत नाहींत व सर्व प्रलय होण्याचे वेळीं देखील त्यांना कांहीं पीडा होत नाहीं. ( त्रिगुणात्मक मायाख्य ) मोठें ब्रह्म हें माझें गर्भाशय असून त्याठिकाणीं मी आपला गर्भ ठेवतों; व त्यापासून सर्व भूतमात्रांची उत्पत्ति होते. सर्व योनीमध्यें ज्या निर-

निराळ्या मूर्ती उत्पन्न होतात त्या सर्वांचें एक मोठें उत्पत्तिस्थान ब्रह्म आहे व त्यामध्यें बीज ठेवणारा जनक मी आहें. सत्व, रज आणि तम हे प्रकृतीपासून उत्पन्न झालेले गुण असून ते ह्या अविनाशी पुरुषाला ह्या देहामध्यें जखडून टाकतात. त्यांपैकीं सत्व हा निर्मळ शुद्ध दुःखमोहादिकांपासून मुक्त असल्यानें प्रकाशमान व निर्बाध असून तो मनुष्याला सुख व ज्ञान यांच्याशीं जखडून टाकतो. रजामध्यें रंजक ( वासना उत्पन्न करण्याचा ) गुण असल्यानें तो वासना व मिळाल्या वस्तूवर प्रेम उत्पन्न करतो, आणि तो देह्यांना कर्मांशीं जखडून टाकतो. तम हा गुण अज्ञानापासून उत्पन्न होऊन सर्व प्राण्यांना मोह पाडणारा आहे. प्रमाद, आळस व झोंप यांच्याशीं तो प्राण्यांना जखडून टाकतो. याप्रमाणें सत्व सुख देतो, रज कर्माला प्रवृत्त करतो, व तम ज्ञानाला दडपून ठेवून मनुष्याकडून प्रमाद घडवितो. रज व तम यांना चेपून सत्व आपला जोर चालवितो. रज व सत्त्व यांना चेपून तम आपला अंमल चालवितो व तम व सत्व यांना दडपून रज वरपगडा मिळवितो. ह्या देहामध्यें सर्व इंद्रियांच्या ठिकाणीं प्रकाश पडून जेव्हां खऱ्या ज्ञानाचा उजेड पडतो तेव्हां सत्वाचा पगडा बसला असें समजावें. रजोगुण वाढला असतां लोभ, कर्माकडे प्रवृत्ति, कर्म करण्याला आरंभ, तीं कधीं पुरेशीं न वाटणें, दुसऱ्याला बुचाडण्याची हाव हे गुण उत्पन्न होतात. तमोगुण वाढला असतां अज्ञान, कर्माचा कंटाळा, चुका व मोह त्यांचा प्रादुर्भाव होतो. जेव्हां सत्वगुण वाढून प्राणी नाश पावतो तेव्हां ज्ञान्यांना मिळणारे उत्तम लोक त्याला मिळतात. रजोगुणाचा जोर झाला असतां मेल्यानंतर कर्मामध्यें गढलेल्या मनुष्ययोनीमध्यें त्याला जन्म येतो व तमोगुणाचें प्राबल्य असतां मेला तर अज्ञान अशा हलक्या योनीमध्यें तो जन्म घेतो. चांगल्या कर्माचें स्वच्छ असें सात्विक फळ मिळते; रजोगुणाचें फळ दुःख आहे व तमोगुणाचे अज्ञान हें फळ आहे. सत्वापासून ज्ञान उत्पन्न होतें, रजापासून लोभ व तमापासून प्रमाद, मोह व अज्ञान यांची उत्पत्ति आहे. सत्वगुणी लोक वर स्वर्गाला जाऊन देव होतात, रजोगुणी ह्या मृत्यु लोकामध्यें मनुष्य होऊन राहतात व तमोगुणी खालीं नीच योनीला जातात. कर्मांचा कर्ता या गुणांहून वेगळा नसून हे गुणच कर्मांचे प्रवर्तक आहेत व या गुणांच्या पलीकडचा मी आहें हें जो ओळखतो तो माझ्या सारूप्यतेला मिळतो. देहाबरोबर निर्माण होणाऱ्या ह्या तीन गुणांना मागें सारून प्राणी जन्म, मरण, म्हातारपण, दुःख यांतून सुटून अमरत्वाचा उपभोग घेतो. ' अर्जुन ह्मणाला, ' प्रभो, कोणत्या चिन्हांनीं प्राणी ह्या तीन गुणांच्या पलीकडे पोहोंचला आहे असें समजावें ? त्याचा आचार कसा असतो, व तो ह्या तीन गुणांना कसें मागें सारतो ? भगवान् ह्मणाले, 'प्रकाश ( ज्ञान ) प्रवृत्ति व मोह हे सत्वरजतमांचे धर्म आहेत असें समजून त्या त्या अवस्थेमध्यें त्यांच्या कार्याला सुरवात झालीं असतां ज्याला वाईट वाटत नाहीं किंवा तीं बंद पडलीं असतां त्यांच्या प्रवृत्तीसंबंधानें उत्कंठा उत्पन्न होत नाहीं, उदासीनासारखा राहून ह्या गुणांच्या योगानें जो चळत नाहीं, हे गुण आपापलीं कामें बजावीत आहेत असें समजून जो स्वस्थ राहून बिलकूल गांगरून जात नाहीं, दुःखाच्या व सुखाच्या वेळीं जो सारखा स्वस्थ असतो, ढेंकूळ, धोंडा व सोनें ज्याला सारखें वाटत असतें, इष्टानिष्टासंबंधानें सारखाच बेगुमान राहून जो धैर्य कधीं चळूं देत नाहीं व कोणी आपली निंदा केली किंवा स्तुति केली तरी त्याची सारखीच पर्वा करितो, मान व अपमान या दोन्हींची ज्याला सारखीच खातर असते, मित्र व शत्रु ज्याला सारखेच वाटतात आणि कोणतेंच काम जो सकाम बुद्धीनें हातीं घेत नाहीं त्यानें ह्या गुणांना मागें सारिलें आहे असें समजावें. जो निष्कपट अशा भक्तिभावानें मला भजतो तो ह्या गुणांना मागें सारून ब्रह्मस्वरूप होण्याला पात्र होतो. ब्रह्माचा, विकारशून्य मोक्षाचा अचळ अशा स्पष्ट धर्माचा व अद्वितीय अशा श्रेष्ठ सुखाचा आधार मीच आहें.

( १५ ) वर ब्रह्माच्या ठिकाणीं ज्यांनें मूळ धरलें आहे व ज्याच्या खांद्या खालीं लांबवर पसरल्या आहेत, अशा ह्या प्रपंचरूपी क्षणिक अश्वत्थवृक्षाला कोणी शाश्वत समजतात. वेदवाक्येंच याला समाधानरूपी छाया देणारी पालवी आहे. तेव्हां ह्या वृक्षाचें खरें स्वरूप जो जाणतो त्यालाच वेदाचा खरा अर्थ

उमगला ह्मणावयाचें. याच्या सत्त्वरजादि गुणरूपी रसवाहिन्यांमुळें फोंफावलेल्या विषयरूपी पालव्यांनीं भरलेल्या अशा खांद्या वर खालीं चोहोंकडे पसरल्या आहेत; व ह्याच्या ह्या मृत्युलोकीं कर्मांच्या आधारानें फुटणाऱ्या पारंब्या खालीं सतत सर्वत्र पसरत आहेत. हा असा जरी आहे तरी याचें स्वरूप, याचा शेवट, याचें मूळ किंवा याचा आधार ह्या मृत्युलोकांतील मनुष्याच्या लक्षांत येत नाहींत. याप्रमाणें घट्ट मूळ धरलेल्या या अश्वत्थवृक्षाला धनपुत्रादिकांवरील वैराग्यबुद्धिरूपी शस्त्रानें समूळ कापून काढून नंतर ज्या ठिकाणीं गेलें असतां फिरून संसारांत परत पडण्याची भीति नाहीं व ज्यापासून ह्या फार जुनाट संसारवृक्षाचा पसार झाला त्याच मूळ पुरुषाला मी शरण आहें अशा भावानें, श्रेष्ठ पदाच्या शोधाला लागावें. मान व मोह बाजूला सारून, नश्वर विषयावरील प्रेमरूपी दोषाला जिंकून वासनेपासून परत फिरून अध्यात्मचिंतनानें सुखदुःख नांवाच्या जोडीपासून अलग होऊन ज्ञानी झालेले लोक त्या शाश्वतपदाला जाऊन मिळतात. जें स्थान स्वयंप्रकाश असून सूर्य, चंद्र किंवा अग्नि यांपासून त्याला तेज मिळण्याची अपेक्षा नाहीं व ज्या ठिकाणीं गेलें असतां मनुष्य परत येत नाहीं, तें माझें अत्युत्कृष्ट ठिकाण होय. जीवलोकामध्यें जीवरूपानें दिसणारा सनातन जीवात्मा माझाच अंश आहे; व तो आपापल्या स्थानीं असलेल्या मन वगैरे सहा इंद्रियांशीं मिळून व्यापार करीत रहातो. जेव्हां हा जीवात्मा शरीर धरतो किंवा टाकतो तेव्हां वारा जसा गंधमय वस्तूपासून गंध आपल्याबरोबर घेऊन जातो, त्याप्रमाणें हा ह्यांना आपल्याबरोबर घेऊन या शरीरांतून त्या शरीरांत जात असतो. कान, डोळे, त्वचा, जीभ, नाक व मन यांचा आश्रय करून हा शब्दादि विषयांचा प्रेमानें उपभोग घेत असतो. हा देह सोडून जावो, देहामध्यें असो, शब्दादि विषयांचा उपभोग घेत राहो किंवा सुखदुःखादि गुणांशीं चिकटलेला असो, अज्ञानी लोकांना याचें खरें स्वरूप कळत नाहीं, ज्ञानचक्षु याला ओळखतात. प्रयत्न केल्यानें योग्यांना मात्र हा सदा आपल्याचमध्यें आहे हें कळतें. पण ज्यांची चित्तशुद्धि झाली नाहीं ते कितीही झटपटले तरी त्यांना हें उमगत नाहीं. सर्व जगताला प्रकाशमान करणारे सूर्यामध्यें जें तेज आहे तसेंच जें चंद्रामध्यें किंवा अग्नीमध्यें आहे तें माझेंच तेज हें तूं लक्षांत ठेव. मी पृथ्वीमध्यें शिरून आपल्या सामर्थ्यानें भूतमात्रांना आधार देतों; व जलमय सोम होऊन सर्व ओषधी, वाढवितों. मी जठराग्नि होऊन प्राण्यांच्या देहामध्यें राहतों, व अपान वायूशीं मिळून चार प्रकारचें अन्न पचवितों. मीच सर्वांच्या हृदयांमध्यें पूर्णपणें भरून राहिलों आहे. आठवण, ज्ञान व विसर ह्या सर्व गोष्टी माझ्यापासूनच त्यांच्या त्यांच्या कर्मानुसार घडत असतात. सर्व वेदांच्या साहाय्यानें ज्ञान करून घेण्यासारखी वस्तु मीच आहें; तसा वेदांत प्रवर्तक व वेदाचें खरें मर्म ओळखणारा मी आहें. ह्या विश्वामध्यें क्षर म्हणजे नाशवंत व अक्षर अविनाशी असे दोन पुरुष आहेत. सर्व भूतमात्रात्मक जडाला क्षर ही संज्ञा आहे व याला उत्पन्न करणारी व सर्व संसारामध्यें भरून राहिलेली जी चैतन्यशक्ति तिला अक्षर संज्ञा आहे. यांहून वेगळा असा जो श्रेष्ठ पुरुष त्याला परमात्मा ह्मणतात; हा अविनाशी सर्वशास्ता त्रैलोक्यामध्यें भरून राहून त्याला पोसतो. ज्या अर्थी असा हा मी क्षराच्या पलीकडे आहें व अक्षराहून ही उत्तम आहे त्या अर्थी लोकांमध्यें व वेदामध्यें मी पुरुषोत्तम म्हणून जाणवलेला आहे. अज्ञानाचा पडदा दूर होऊन जो मी पुरुषोत्तम अशा प्रकारचा आहें हें ओळखतो त्याला सर्व कळूं लागून सर्व ठिकाणीं मीच आहे अशा भावानें तो मला भजतो. हें सर्वांमध्यें गूढ असें शास्त्र मीं सांगितलें आहे. हें उमगून मनुष्य बुद्धिमान् होऊन कृतकृत्य होतो.

(१६) धैर्य, शुद्धांतःकरण, ज्ञानधारणेची खटपट, दान, इंद्रियनिग्रह, यज्ञ, अध्ययन, तप सरळपणा, अहिंसा खरेपणा, अक्रोध, दानशीलता, शांति, चुगलखोरपणाचा अभाव, प्राणिमात्रांवर दया, विषयांनीं न डगमगणें, कोमलपणा, लज्जा, संथपणा, तेज, क्षमा, प्रसंगावधान, शुचिर्भूतता, कोणाचा द्रोह न करणें, फार ताठा न धरणें, हे गुण सत्कुलोत्पन्न पुरुषाची दैवी संपत्ती होय. पोकळ डौल, ताठा, अभिमान, राग, निष्ठुरता, मूर्खपणा हे गुण आसुरी संपदा भोगण्यासाठीं

जन्मलेल्याच्या ठिकाणीं असतात. दैवीसंपदा संसार-पाशांतून सोडविण्याला कारणीभूत होते. व आसुरी त्याच्याशीं जखडण्याला कारणीभूत होते. उगीच हुरहूर बाळगूं नकोस. दैवी संपदेसाठींच तूं जन्मला आहेस. ह्यालोकीं भूतमात्रांची दैवी व आसुरी अशी दोन प्रकारची उत्पत्ति आहे. दैवी उत्पत्तीसंबंधानें विस्तारानें तुला सांगितलें. आतां आसुरीसंबंधानें सांगतों ऐक. आसुरजन्म पावलेल्यांना कोणती गोष्ट करावी कोणती न करावी हें कळत नाहीं व शुचिर्भूतता, आचार व खरेपणा हे त्यांच्यामध्यें नसतात. आसुर लोक हें जग खोटें, धर्माधर्मानें अनियंत्रित असें असून याला कोणी शास्ता नाहीं; केवळ मदनच कारणीभूत होऊन स्त्रीपुरुषांच्या मैथुनानें हें जग उत्पन्न झालें आहे असें ह्मणतात. अशी नजर ठेवून आत्मघाती कोत्या बुद्धीचे हे क्रूरकर्मी लोक जगाचे शत्रू बनून त्याच्या नाशाला सरसावतात, पोकळ डौल, ताठा, माज यांनीं भरून जाऊन घाणेरडेपणानें राहून, कधीं तृप्त न होणाऱ्या वासना धरून व मूर्खपणानें दुष्ट विचार मनांत ठेवून कामाला प्रवृत्त होतात. आमरणान्त अपार चिंता बाळगून एवढेंच काय तें जगामध्यें येऊन करावयाचें असा मनाचा ठाम निश्चय ठरून विषयोपभोगामध्यें गढलेले शेंकडों आशापाशांनीं जखडले जाऊन कामक्रोधांच्या तावडींत गेलेले हे लोक वासनांची तृप्ति करून घेण्याकरितां अन्यायानें पैसा सांठविण्याची हाव धरतात. हें आज मला मिळालें, उद्यां हा माझा मनोरथ शेवटास जाईल, हा पैसा मजजवळ आहे, हाही पण उद्यां मिळेल, हा शत्रू मीं मारला, दुसऱ्यांनाही मारीन, मीच सर्वांचा स्वामी आहें, सर्व भोग मला आहेत, मी कृतकृत्य आहें, मी बलवान आहें, मी सुखी आहें, मी धनाढ्य आहें, थोर कुळामध्यें माझाच जन्म आहे, माझ्यासारखा दुसरा कोण आहे, मी यज्ञ करीन, मी दान करीन, मी मजा करीन, याप्रमाणें अज्ञानानें वेडे होऊन नाना विचारांनीं डोकें फिरून जाऊन मोहजालामध्यें हे गुरफटले जातात व वासनांची तृप्ति करून घेण्यामध्यें गर्क राहून अमंगळ नरकामध्यें पडतात. आपणच आपल्याला मोठे समजून घेऊन ताठेलपणानें पैशाचा गर्व व माज यांनीं भरल्यामुळें केवळ दांभिकपणानें शास्त्राला सोडून नांवाचे यज्ञ ते करतात. अहंकार, बल, गर्व, वासना व राग यांच्या आधीन होऊन त्यांच्या व इतरांच्या देहांमध्यें राहणारा जो मी त्या माझा द्वेष करून भलत्यांचा ते हेवा करतात. त्या माझ्या द्वेष करणाऱ्या क्रूर अशा पापी नराधमांना मी ह्या संसारांत आसुर योनीमध्येंच नेहमीं जन्माला घालतों. या मूर्खांना याप्रमाणें जन्मोजन्मीं आसुर योनि मिळून माझें वारेंसुद्धां न मिळतां ते खालीं खालीं नीच योनीलाच जात राहतात. वासना, राग व लोभ अशा तीन प्रकारचें आपला नाश करणारें हें नरकाचें द्वार आहे. ह्मणून हीं तिकल सोडावी. नरकाच्या ह्या तीन दारांपासून दूर राहणारा मनुष्य आपलें कल्याण साधतो. आणि मग श्रेष्ठ अशा ब्रह्मपदाला जाऊन मिळतो. जो शास्त्रमार्ग सोडून देऊन मन मानेल तसें वागतो त्याला यश मिळत नाहीं, सुख मिळत नाहीं किंवा उत्तम गति मिळत नाहीं. ह्मणून काय करावें. काय न करावें हें ठरविण्याला शास्त्राचाच आधार तूं घेतला पाहिजेस. शास्त्रामध्यें तुझ्यासारख्या क्षत्रियाला सांगितलेलें कर्म ओळखून तें करणेंच तुला रास्त आहे.

(१७) अर्जुन ह्मणाला, ‘ परंतु कृष्णा, जे शास्त्रांत सांगितलेला विधि सोडून पण श्रद्धापूर्वक यजन करतात त्यांची निष्ठा कशा प्रकारची समजावयाची? तिला सात्विक ह्मणावी कां राजस कां तामस, ? श्रीकृष्ण ह्मणाला, ‘मनुष्याची श्रद्धा स्वाभाविक सात्विक, राजस व तामस अशा तीन प्रकारची असते, ती सांगतों ऐक. ज्या ज्या मनुष्याच्या अंतःकरणावर जसा जसा ( मागून ) संस्कार घडला असेल त्याप्रमाणें त्याची त्याची श्रद्धा राहते. मात्र सर्व प्राणिमात्र श्रद्धेनें युक्त असतो. ज्याची जशी श्रद्धा असेल तशा प्रकारचा तो मनुष्य असतो. सात्विक श्रद्धा असणारे देवाची पूजा करतात. राजस श्रद्धेचे लोक यक्ष व राक्षस यांची पूजा करतात; व जे तामस वृत्तीचे लोक आहेत ते प्रेतें व भुतें याची पूजा करतात. जे अविवेकी लोक दांभिकपणा व अहंकार यांनीं भरून जाऊन वासना, विषयासक्ति व सामर्थ्य यांच्या जोरावर शरीरांतील इंद्रियसमुदायांना आणि ह्मणूनच मला पीडा

देऊन शास्त्रमार्गाला सोडून भलत्या वाटेनें घोर तप करतात ते आसुरी निश्चयाचे लोक समज. सर्वांच्या आवडीच्या आहारामध्येंही तीन प्रकार असतात. त्याचप्रमाणें यज्ञ, तप व दान हेंही निरनिराळ्या तीन प्रकारचे असतात. त्यांमधला भेद सांगतों ऐक. आयुष्य, वीर्य, बळ, आरोग्य, सुख व प्रीति वाढविणारे मधुर, चमचमित, पोषक व मनाला तोषविणारे असे आहार सात्विक वृत्तीच्या लोकांना आवडतात. कडू, आंबट, खारट, उन्हून, तिखट, तीव्र, रुक्ष अशा दुःख, रोग व शोक उत्पन्न करणाऱ्या आहाराची राजस वृत्तीच्या लोकांना आवड असते. थंड, बेचव वासट, शिळें, उष्टें, अमंगळ अशा प्रकारचें खाणें तामस वृत्तीच्या लोकांना आवडतें. स्थिर मनानें व ह्मणूनच फळाची इच्छा न करणाऱ्याकडून जो सशास्त्र यज्ञ होतो त्याला सात्विक यज्ञ ह्मणावें. फळ डोळ्यापुढें ठेऊन किंवा ढोंगासाठीं जो यज्ञ होतो तो राजस समजावा. ज्यामध्यें अन्न किंवा दक्षिणा दिली जात नाहीं, अशा प्रकारचा अशास्त्र, मंत्रहीन व श्रद्धेवांचून केलेला यज्ञ तामस ह्मणतात. देव, ब्राह्मण, गुरु व विद्वान यांचा सत्कार करणें, शुचिर्भूतता व सरळपणा ठेवणें, ब्रह्मचर्य पाळणें, कोणाला पीडा न देणें ह्यांना शारीरतप ह्मणतात. न लागणारें असें खरें, गोड व हितकर भाषण करणें व वेदाचा अभ्यास सुरू ठेवणें याला वाचिक तप ह्मणतात. मनाची प्रसन्नता, सौम्यपणा, मौन, आत्मनिग्रह, अंतःकरणशुद्धि याला मानसिक तप ह्मणतात. लोकांनीं मोठ्या श्रद्धेनें केलेलें वरील तप तीन प्रकारचें असतें. फळाची इच्छा न धरतां लोक जें एकनिष्ठेनें तप करतात त्याला सात्विक तप ह्मणतात आपल्याला मानमान्यता मिळावी, आपला बहुमान व्हावा, आपली पूजा व्हावी ह्मणून ढोंगानें जें तप करण्यांत येतें त्या अशाश्वत व अनिश्चित फल देणाऱ्या तपाला राजस तप ह्मणतात. भलत्याच ग्रहानें आपल्याला पीडा करून घेण्यासाठीं किंवा दुसऱ्याचा समूळ उच्छेद करण्यासाठीं जें तप करण्यांत येतें त्याला तामस तप ह्मणतात. केवळ यावयाचें ह्मणून आपल्यावर कांहीं उपकार न करणाऱ्या सत्पात्राच्या ठिकाणीं देशकाल पाहून जें दान दिलें जातें त्याला सात्विक दान ह्मणतात. परंतु उपकाराची फेड करण्याकरितां ह्मणून किंवा कोणत्यातरी उद्देशानें मोठ्या कष्टानें जें दान देण्यांत येतें त्याला राजस दान ह्मणतात. देशकाल न पाहतां व सत्कार न करतां धिक्कारपूर्वक जें दान कुपात्रीं दिलें जातें त्याला तामस दान ह्मणतात. ॐ, तत्, सत्, अशा तीन प्रकारें ब्रह्माचा निर्देश स्मृतीमध्यें केला आहे. त्याच तीन प्रकारें निर्दिष्ट ब्रह्मानें पूर्वीं सृष्टीच्या आरंभीं ब्राह्मण, वेद व यज्ञ निर्माण केले. ह्मणून जे ब्रह्मवेत्ते आहेत त्यांच्या यज्ञ, दान, तप इत्यादि सशास्त्र क्रिया नेहेमीं ॐ असें प्रथम ह्मणून सुरू असतात. सर्व तेंच ब्रह्म आहे अशा दृष्टीनें फळाकडे दृष्टि न देतां तत् शब्दाचा उच्चार करून मोक्षेच्छु लोकांच्या यज्ञ, तप, दान, इत्यादि क्रिया सुरू होतात. अस्तित्व व चांगलेपणा यांकडे सत् शब्दाचा उपयोग होत असतो. तसाच त्याचा प्रशस्त चांगल्या कर्माच्या वेळीं उपयोग करितात. यज्ञ, तप व दान त्यांमध्यें ठामपणा याला सत् शब्द लावतात. ह्मणून त्या संबंधाचें जें कर्म त्यालाही सत्च ह्मणतात. अश्रद्धेनें केलेला यज्ञ, दिलेलें दान व आचरलेलें तप यांना असत् ह्मणतात. त्यापासून इहलोकीं किंवा परलोकीं कोठेंच फायदा होत नाहीं.

(१८) अर्जुन ह्मणाला, ' हे हृषीकेशा, संन्यास ह्मणजे काय व त्याग ह्मणजे काय याचा खरा अर्थ समजून घेण्याची माझी इच्छा आहे. ' भगवान् ह्मणाला, ' पुत्रकामेष्ट्यादि निश्चित फळ देणारीं काम्य कर्में सोडून देणें याला विद्वान संन्यास ह्मणतात. कोणत्याच कर्माच्या फलाची आशा सोडून देणें याला शहाणे त्याग ह्मणतात. कांहीं ह्मणतात कीं, कर्म ह्मणून जेवढें तेवढें सोडून द्यावें. कांहीं ह्मणतात यज्ञ, दान, तप हीं कर्में सोडूं नयेत. तेव्हां अशा वादग्रस्त त्यागाच्या प्रश्नासंबंधानें माझें ठाम मत काय आहे तें ऐक. कारण हे नरश्रेष्ठा, त्याग हा तीन प्रकारचा सांगितला आहे. यज्ञ, दान, व तप ह्या तीन प्रकारचें कर्म सोडतां कामा नये. तें अवश्य केलें पाहिजे. कारण यज्ञ, दान व तप हीं फळाची आशा न करणाऱ्या बुद्धिमानाला पावन करणारीं आहेत. परंतु हीं सुद्धां त्यांवर आसक्ति किंवा फळांची इच्छा न ठेवतां केलीं पाहिजे-

त असें माझें त्यांसंबंधानें ठरलेलें उत्तम मत आहे; अवश्य करावयाचीं ही कर्में सोडणें योग्य नाहीं; आणि अज्ञानानें तीं सोडणें याला तामस त्याग ह्मणतात. शरीराला क्लेश होतील ह्या भीतीनें कष्टद समजून जें कर्म सोडण्यांत येतें तो राजस त्याग करून त्यागाचें फळ कधीं मिळत नाहीं. जें अवश्य कर्म केलेंच पाहिजे असें समजून त्यावर आसक्ति किंवा फळाची अपेक्षा न ठेवतां करण्यांत येतें तो सात्विक त्याग समजतात. ज्याचा संशय दूर झाला आहे असा आत्मानात्मविवेकी बुद्धिमान् त्यागी नावडत्या कर्माचा तिरस्कार करीत नाहीं किंवा आवडत्याला लगटून रहात नाहीं. कारण ज्याला ह्मणून देह आहे अशाला कर्म अगदीं सोडतां येणें शक्य नाहीं. परंतु जो कर्मफलाची आशा ठेवीत नाहीं त्यालाच त्यागी ह्मणतात. कर्मत्याग न करणारांना देह ठेवल्यावर वाईट, चांगलें व मिश्र अशीं कर्मांचीं तीन प्रकारचीं फळें भोगावीं लागतात. परंतु ज्यांनीं कर्म संन्यास केला आहे त्यांना हीं कधीं भोगावीं लागत नाहींत. सर्व कर्मांचा ज्ञानामध्यें ज्यांत शेवट झाला आहे अशा सांख्य वेदांतशास्त्रांत सर्व कर्मांच्या फलनिष्पत्तीला हीं पुढील पांच कारणें सांगितलीं आहेत, तीं ऐक (देहरूपी) आधार, (चित्प्रतिबिंबरूपी) कर्ता, (निरनिराळीं इंद्रियरूपी) साधनें, (प्राणापानादिकांचे) निरनिराळे व्यापार आणि पांचवें दैव. शरीर, तोंड, मन यांनीं मनुष्य जें जें ह्मणून बरें किंवा वाईट काम आरंभतो त्याला हे पांच हेतु (प्रवर्तक कारणें) असतात. तेव्हां अशी वास्तविक गोष्ट असतां कोत्या बुद्धीमुळें जो आपणच एकटे कर्ते आहों असें समजतो त्या मूढाला बरोबर उमगलें नाहीं ह्मटलें पाहिजे. ज्यामधून मीपणा निघून गेला आहे व ज्याच्या बुद्धीवर लेप बसला नाहीं तो ह्या लोकांना मारून देखील मारणारा होत नाहीं किंवा त्याचा दोष त्याला लागत नाहीं. एखाद्या वस्तूचें ज्ञान, ती वस्तु व ती जाणणारा अशा तीन गोष्टी कोणतेंही कर्म करावयाला कारण होतात; व कर्माचें साधन, घडावयाची गोष्ट व ती करणारा या तिहींमध्यें कर्माचा समावेश होतो. ज्ञान, कर्म आणि कर्ता या तिहींचेही सत्त्वरजादि गुणांच्या भेदानें गुणागुणांच्या विचाराचे वेळीं तीन प्रकार समजण्यांत येतात तेही क्रमानें सांगतों ऐक. ज्या ज्ञानाच्या योगानें निरनिराळ्या सर्व भूतमात्रांच्या ठिकाणीं एकाच नित्य व अभेद भावानें नजर पोहोंचते त्या ज्ञानाला सात्त्विक ज्ञान समजावें. सर्व भूतमात्रांच्या ठिकाणीं नानाप्रकारचे निरनिराळे भाव निरनिराळ्या दृष्टीनें ज्या ज्ञानानें होतें तें राजस ज्ञान समजावें. जें क्षुद्रज्ञान भलत्या समजुतीनें सर्व कांहीं एका जड देहावरच अवलंबून आहे असें निष्कारण समजतें त्याला तामस ज्ञान ह्मणतात. प्रेमभाव किंवा द्वेषभाव सोडून त्यावर आसक्ति न ठेवतां व फलाची आशा न बाळगतां जें कर्म होतें त्याला सात्त्विक कर्म ह्मणतात. परंतु जें कांहीं कर्म इच्छा धरून किंवा मीपणाच्या ताठ्यानें फार कष्ट सोसून करण्यांत येतें त्याला राजस ज्ञान ह्मणतात. परिणाम, नुकसान, परपीडा आणि शक्ति यांकडे नजर न देतां जें कर्म मूर्खपणानें हातीं घेण्यांत येतें त्याला तामस ज्ञान ह्मणतात. वस्तूवरील प्रेम, तसाच मीपणा सोडून व यश किंवा अपयश यांची चाड न धरणारा, धैर्य व उत्साह यांनीं युक्त जो कार्य करणारा असतो त्याला सात्त्विक कर्ता ह्मणावें. प्रेमबद्ध, कर्मफलाची इच्छा बाळगणारा, लोभी, दुसऱ्याला पीडा करण्याच्या स्वभावाचा, अमंगळ, आनंद किंवा राग ज्याला येतो अशा कर्त्याला राजस कर्ता ह्मणतात. बेसावध, अडाणी, ताठेर, लुचा दुसऱ्याच्या पोटावर पाय आणणारा, आळशी, रडवा, चेंगट अशा प्रकारचा कर्ता तामस कर्ता होय. सत्त्वादि गुणांच्या भेदानें बुद्धीचे तसेच धैर्याचे तीन प्रकार होतात; ते मी निरनिराळें सविस्तर सांगतों ऐक. कोणतें काम हातीं घ्यावें, कोणतें घेऊं नये, कोणतें करावें, कोणतें न करावें, भय कशापासून आहे, अभय कशापासून आहे, कशानें संसारामध्यें जखडला जातो, कशानें संसारांतून सुटतो, हें जिला कळतें तिला सात्त्विक बुद्धि ह्मणावें. धर्म काय, अधर्म काय, काय करावें, काय न करावें हें जिला स्पष्ट कळत नाहीं तिला राजस बुद्धि ह्मणावें. अज्ञानाचें पांघरूण पडल्यानें जिला अधर्म धर्मसा वाटतो व सर्व गोष्टी विपरीत दिसतात ती तामस बुद्धि होय. ज्या एकाच धैर्यानें मन, प्राण व इंद्रियें यांच्या क्रिया

नियमित होतात तें सात्विक धैर्य होय. परंतु ज्याच्या योगानें धर्म, काम व अर्थ ह्यासंबंधी नित्य कर्तव्यें सुरळीत चालतात, पण त्या त्या प्रसंगानुरूप फळावर इच्छा राहते तें राजस धैर्य समजावें. ज्याच्या योगानें मूर्ख मनुष्याची झोंप, भीति शोक, खिन्नता, माज सुटत नाहींत तें धैर्य तामस समजलें आहे. आतां सुखाचे तीन प्रकार सांगतों ऐक. पुष्कळ परिचयानें जेथें मन रमतें व दुःखाचा शेवट लागतो, जें आरंभीं विषतुल्य वाटून परिणामीं अमृताप्रमाणें भासतें, तें बुद्धीला प्रसन्न करणारें सुख सात्विक समजावें. भोग्य विषय व इंद्रियें यांच्या संयोगानें जें सुख होतें व जें आरंभीं अमृतासारखें असून परिणामीं विषतुल्य असतें त्याला राजस सुख ह्मणतात. जें आरंभाला व परिणामीं आपल्याला मोह पाडणारें असतें असें झोंप, आळस, व गाफिलपणा यांपासून होणारें सुख तामस समजतात. ह्या तीन स्वाभाविक गुणांपासून सुटलेला असा प्राणी पृथ्वीवर किंवा स्वर्गी देवामध्येंसुद्धां मिळणें नाहीं. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र यांचीं कर्मै त्यांच्या त्यांच्या स्वाभाविक गुणांप्रमाणें निरनिराळीं ठरवून टाकलीं आहेत. शम, दम, तप, शुचिर्भूतता, क्षमा, सरळपणा, शब्दज्ञान ( ज्ञान ), अनुभव (विज्ञान ), अस्तिकपणा, ह्यांचा ब्राह्मणांच्या स्वाभाविक कर्मामध्यें समावेश होतो. मर्दुमकी, तेज, धैर्य, दक्षता, युद्धामध्यें पळ न काढणें, दान, ईश्वर आहे अशी समजूत, ह्यांचा क्षत्रियांच्या स्वाभाविक कर्मामध्यें समावेश होतो. शेती गुरें संभाळणें, उदीम ह्यांची वैश्यांच्या स्वाभाविक कर्मामध्यें गणना होते; व सेवा करणें हें शूद्रांचें स्वाभाविक काम आहे. आपापल्या कर्मामध्यें गढून राहिल्यानें मनुष्याला यश येतें. आपापल्या कामांमध्यें गढलेल्यांस यश कसें येतें सांगतों ऐक. ज्यापासून सर्व भूतमात्रांची प्रवृत्ति सुरू झाली आहे व ज्यानें हें सर्व जग भरलें आहे, आपापल्या कर्मानें त्याला पूजिलें असतां मनुष्याला यश मिळतें. दुसऱ्याचा धर्म उत्तम तऱ्हेनें आचरल्यापेक्षां आपला धर्म सरासरी आचरला तरी तो बरा. स्वभावतः ठरलेलें कर्म करीत राहिल्यानें मनुष्याला पाप लागत नाहीं. आपापल्या वर्णाचें कर्म गौण असलें तरी सोडूं नये. कारण धुरानें ज्याप्रमाणें विस्तव झांकला असतो त्याप्रमाणें सर्व कर्मामध्यें दोष हा असावयाचाच. आत्मनिग्रहानें कशावर आसक्ति न ठेवतां निःस्पृह राहून कर्मसंन्यास केल्यानें कांहीं न केल्यानें मिळणारी उत्तम सिद्धि मनुष्याला मिळते. जो शुद्ध बुद्धि ठेवून व धिरानें आत्मनिग्रह करून विषयांच्या वाटेला जात नाहीं, प्रीति व द्वेष बाजूला ठेवून व एकांतवास धरून बेताचा आहार ठेवतो, तोंड, शरीर व मन स्वाधीन ठेवून नेहमीं वैराग्य धरून ध्यानामध्यें गढून असतो व अहंकार, बळ, ताठा, वासना, राग, सभोंवारचा पसारा व ममता सोडून समाधानवृत्ति धरतो, तो ब्रह्मस्वरूपी होण्याला पात्र होतो. व एकवार ब्रह्मस्वरूप होऊन प्रसन्नांतःकरण झाला ह्मणजे त्याला शोक किंवा आशा कांहींच उरत नाहीं. व सर्व भूतमात्रांना सारखे लेखूं लागून माझ्या संबंधी श्रेष्ठ भक्ति त्याच्या ठिकाणीं उत्पन्न होते व या भक्तीच्या योगानें मी कोण आहें व माझें वास्तविक स्वरूप काय आहे हें तो चांगलें ओळखूं लागतो व याप्रमाणें माझें खरें स्वरूप ओळखून मागून तो माझ्याशीं मिळून जातो. मनुष्य माझा आश्रय करून नेहमीं वाटेल तीं कर्मै करीत राहिला तरी माझ्या रूपेनें त्याला शाश्वत व अविनाशी असें पद मिळतें. सर्व कर्मै मनःपूर्वक मला अर्पून माझेंच काय तें ध्यान ठेवून एकाग्रबुद्धीनें मजकडे नेहमीं चित्त ठेव. माझ्याकडे चित्त ठेविल्यानें माझ्या प्रसादानें तूं सर्व संकटांतून पार पडशील. आतां अहंपणामुळें तूं जर माझें ऐकणार नाहींस तर नाश पावशील. अहंकारामुळें मी युद्ध करणार नाहीं असें जें तुला वाटत आहे तीं तुझी खटपट व्यर्थ आहे. तुझी प्रकृति तें तुला करावयाला लावील. अर्जुना, तूं आपल्या स्वाभाविक कर्मानें बांधला गेला आहेस. मोहामुळें जें करण्याचें तुझ्या मनांत नाहीं तें तूं निरुपायानें झकत करशील. अर्जुना, चाकावर चढलेल्या सर्व प्राणिमात्रांना मायेनें गरगरां फिरवीत ईश्वर सर्वांच्या हृदयामध्यें राहिला आहे. त्यालाच अनन्यभावानें शरण जा. त्याच्या प्रसादानें उत्तम समाधानी मिळून चिरस्थायी स्थान मिळेल. याप्रमाणें अतिगूढ असें ज्ञान मी तुला सांगितलें आहे. यावर चांगला विचार करून जसें वाटेल त-

सें वाग; फिरून सर्वांमध्यें गुह्य अशी गोष्ट तुला सांगतोंऐक. तूं माझा फार आवडता आहेस ह्मणून तुझ्या हिताची गोष्ट सांगतों. **माझ्याकडे लक्ष ठेवून माझ्यावर भक्ति ठेव, माझी पूजा करून मला नमस्कार कर; ह्मणजे खात्रीनें तूं मला येऊन मिळशील**, हें तुला मी खात्रीपूर्वक सांगतों. तूं माझा फार लाडका आहेस. सर्व बऱ्यावाईट गोष्टी सोडून **देऊन एकट्या मला शरण ये. मी सर्व पापांपासून तुला सोडवीन. उगीच हुरहूर बाळगूं नकोस.**

---

### ६ आशीर्वादग्रहण. ( ६.४१–४३ )

नंतर अर्जुनाला बाण व गांडीव घेऊन फिरून तयार झालेला पाहून जवळच्या महारथ्यांनीं फिरून मोठी आनंदाची आरोळी दिली. पांडव, सोमक व त्यांच्या अनुयायी वीरांनीं हर्षभरित होऊन शंख फुंकले. ते वेळीं, नोवती, पेश्य, ककच शिंगें यांचा एकदम मोठा घोष झाला. देव, गंधर्व, पितर, सिद्ध, चारण व ऋषी इंद्राला पुढें करून तें घनघोर रणकंदन पाहण्याला आतुर होऊन त्याठिकाणीं आले. त्यावेळीं सागरासारख्या तुफान झालेल्या त्या दोन सैन्यांची अगदीं चळवळ उडून गेली असतां महावीर युधिष्ठिर आपलें चिलखत व श्रेष्ठ आयुध खालीं काढून ठेवून रथांतून एकदम खालीं उतरला, व मुकाट्यानें हात जोडून शत्रुसैन्यांत भीष्मांकडे चालला. त्याला तसा निघालेला पाहून अर्जुनही झटकन् रथांतून खालीं उतरून आपल्या भावांसह श्रीकृष्णाला बरोबर घेऊन त्याकडे निघाला; व ठळक ठळक राजेही हा काय करीत आहे तें पाहण्याकरितां त्यांच्या मागून गेले. अर्जुनप्रभृति भावांनीं त्याला विचारलें, 'महाराज, आपण हें काय मांडलें आहे ? आह्मा सर्वांना सोडून शत्रुसैन्याकडे पायीं एकटेच कोणीकडे चालला ? आपण आमचे वडील भाऊ असल्यानें आपलें हें कृत्य पाहून भीतीनें आमचें हृदय व्यग्र झालें आहे.' याप्रमाणें भाऊ हाक मारून विचारीत असतां कांहीं उत्तर न देतां युधिष्ठिर मुकाट्यानें तसाच पुढें चालला. थोर बुद्धिशाली श्रीकृष्ण हांसत हांसत त्यांना ह्मणाला, 'मीं याचा अभिप्राय ओळखला. भीष्म, द्रोण, शल्य व दुसरीं माणसें यांचें अनुमोदन घेऊन युद्ध करावें ह्मणून हा त्यांकडे जात आहे. कारण जुन्या इतिहासामधून असें ऐकण्यांत आहे कीं, वडिलांना न विचारतां जो युद्ध करतो त्याला वडिलांचा शाप बसतो. परंतु जो त्यांचें यथाशास्त्र अनुमत घेऊन थोरांबरोबर युद्ध करतो त्याला युद्धांत खात्रीनें जय येतो.'

इकडे श्रीकृष्ण याप्रमाणें बोलत असतां कौरवसैन्यामध्यें हाहाकार उडून राहिला. पांडवसैन्य अगदीं स्तब्ध होतें. युधिष्ठिराला दुरून पाहून कौरवांचे सैनिक आपसांत बोलूं लागले कीं, हा राजा युधिष्ठिर आपल्या भावांना घेऊन उघडपणें आश्रय मागण्यासाठीं भीष्मांना शरण येत आहे ! अर्जुन, भीम, नकुल, सहदेव यांसारखे पाठीराखे असतांना हा कसा कचरला न कळे ! याचा जन्म खात्रीनें जगविख्यात क्षत्रियकुळामध्यें झाला नाहीं ! असें ह्मणून त्यांनीं कौरवांची स्तुति करून आपल्या आंगवस्त्रांचे पदर उडविले; व श्रीकृष्ण व दुसरे पांडव यांसह त्यांनीं युधिष्ठिराची निंदा केली. इकडे युधिष्ठिर आपल्या भावांसह बाण, शक्ति इत्यादिक आयुधांनीं भरून राहिलेली कौरव सेना ओलांडून थेट भीष्मांकडे गेला, व त्यांचे पाय घट्ट धरून त्यांना तो ह्मणाला, 'तात, आपण कोणाला हार जाणारे नव्हे. आपल्याबरोबर आह्मी युद्ध करूं इच्छितों, तेव्हां त्याला आपली परवानगी असावी व आपला आशीर्वाद असावा.' भीष्म ह्मणाले, 'जर या प्रसंगीं तूं मला विचारण्याला आला नसतास तर तुझा पराभव होवो ह्मणून मीं तुला शाप दिला असता. वत्सा, आतां मी संतुष्ट झालों आहें. युद्ध कर आणि जय मिळीव. माझ्यापासून काय पाहिजे असेल तें माग. माझ्या वरानें तुझा पराभव होणार नाहीं. **मनुष्य हा पैशाचा गुलाम आहे. पैसा कोणाचा गुलाम नाहीं**, ही जी ह्मण आहे ती खरी आहे. पैशानें मी कौरवांना बांधलों गेलों आहे, ह्मणून मी तुला सांगतों कीं, **तुझ्या बाजूनें युद्ध करण्यावांचून वाटेल तें मागून घे.**' यावर युधिष्ठिर ह्मणाला, '**तात, नेहमीं माझें हित मनांत धरून मला सल्ला देत जा, मग आपण कौरवांच्या बाजूनें खुशाल युद्ध करा.**' भीष्म ह्मणाले, आतां

मी तुझें साहाय्य काय करूं. तुझ्या शत्रूच्या बाजूनें युद्ध करणार हें तर ठरलेंच. तेव्हां तुझ्या मनांत जें काय असेल तें सांग. ' युधिष्ठिर ह्मणाला, ' आपला तर कोणाच्या हातून पराभव होणें शक्य नाहीं. तेव्हां आपल्याला मी कसा जिंकणार ? जर आमचें कल्याण आपल्या मनांत असेल तर या बाबतींत जो हिताचा सल्ला असेल तो द्या. ' भीष्म ह्मणाले, ' मला रणांत कोणी जिंकण्याला समर्थ नाहीं आणि माझ्या मरणाची वेळही अजून आली नाहीं. तेव्हां आतां जा. फिरून गांठ घे. ' नंतर हे भीष्मांचे शब्द मस्तकावर घेऊन त्यांना फिरून नमस्कार करून तो द्रोणाचार्यांच्या रथाकडे गेला; व त्या अजिंक्य आचार्यांना अभिवादन व प्रदक्षिणा करून आपल्या हितासाठीं असें बोलला कीं, भगवन्, दोष न घेतां युद्ध करावें यासाठीं ती आपली परवानगी मागतो. आपल्या परवानगीवांचून शत्रूचा पराभव माझ्या हातून कसा होणार? ' द्रोण म्हणाले, ' जर तूं मजकडे आला नसतास तर तुझा पूर्ण पराभव होवो, ह्मणून मीं तुला शाप दिला असता. तूं हा माझा सत्कार केल्यानें मी संतुष्ट झालों आहें. माझी तुला परवानगी आहे;युद्ध करून जय मिळीव.मनुष्य हा पैशाचा गुलाम आहे. पैसा कोणाचा गुलाम नाहीं. पैशानें कौरवांना बांधला गेलों आहें. मी कौरवांच्या बाजूनें युद्ध करीन पण तुला जय येण्याबद्दल मी प्रार्थना करीन. ' युधिष्ठिर ह्मणाला ' गुरो ' माझ्या जयाकडे लक्ष देऊन माझ्या हिताचा सल्ला मला देत जा. मग आपण खुशाल कौरवांच्या वतीनें लढा. द्रोण ह्मणाले, ' राजा, ज्या तुझा सल्लागार श्रीकृष्ण परमात्मा आहे त्या तुला जय खात्रीनें येणार. माझी तुला परवानगी आहे. रणामध्यें तूं शत्रूचा फडशा पाडशील. धर्म तिकडे कृष्ण व कृष्ण तिकडे जय हें ठरलेलें आहे. जा, युद्ध कर. आणखी काय विचारावयाचें आहे बोल. युधिष्ठिर ह्मणाला, ' आपला कोणाच्या हातून पाडाव व्हावयाचा नाहीं, तेव्हां युद्धांत आपल्याला मी कसा जिंकणार एवढें मला सांगा. ' द्रोण ह्मणाले, ' जोंपर्यंत रणामध्यें मी युद्ध करीत राहीन तोंपर्यंत तुला जय कधीं येणार नाहीं. बेसावधपणांत शस्त्र खालीं ठेवून मरण्याच्या उद्देशानें ध्यानस्थ बसलेल्या वेळेखेरीज रणामध्यें शस्त्र हातांत घेऊन खवळून युद्ध करीत असतां मला जिंकणारा कोणी योद्धा दिसत नाहीं. आणि ज्याच्या शब्दावर विश्वास ठेवतां येईल अशा पुरुषापासून मोठी वाईट गोष्ट ऐकूनच मी शस्त्र खालीं ठेवीन हेंही पण खास सांगून ठेवतों. ' याप्रमाणें त्यांचें भाषण ऐकून त्याचा निरोप घेऊन युधिष्ठिर कृपाचार्यांकडे गेला; व त्यांना अभिवादन व प्रदक्षिणा करून तो मोठा हुशार धर्मराज त्या अजिंक्य कृपांना ह्मणाला, ' आपली आज्ञा घेऊन निर्दोष होऊन आपल्या आज्ञेनें युद्ध करून सर्व शत्रूंना मी जिंकूं इच्छितों. ' कृप ह्मणाले, ' धर्मा, मी तर अवध्य आहें. युद्ध कर आणि जय मिळीव. तुझ्या येण्यानें मी मोठा संतुष्ट झालों आहे. नेहमीं उठल्या बरोबर तुला जय यावा ह्मणून प्रार्थना करीत जाईन हें तुला खास सांगून ठेवतों. ' हें ऐकून त्यांचा निरोप घेऊन युधिष्ठिर शल्याकडे गेला, व त्याला नमस्कार, व प्रदक्षिणा करून त्या अजेयाचा त्यानें आशीर्वाद घेतला व त्यास त्याच्या पूर्वींच्या वचनाची आठवण दिली; व तेवढेंच आपल्यासाठीं काम करण्याला सांगून त्याचा निरोप घेऊन तो आपल्या भावांनिशीं त्या अफाट सैन्यामधून निघून चालता झाला. इकडे श्रीकृष्ण त्या रणामध्यें पांडवांसाठीं कर्णाकडे जाऊन ह्मणाला, 'कर्णा भीष्मांशीं वांकडें पडल्यामुळें तूं युद्ध करणार नाहींस ह्मणून मीं ऐकलें आहे. तेव्हां जर तूं दोघांना सारखेच समजत आहेस तर भीष्म मरेतोंपर्यंत आमच्या बाजूला ये. भीष्म मेल्यावर फिरून तूं कौरवांच्या बाजूनें आमच्याशीं लढ. ' कर्ण ह्मणाला, ' कृष्णा, दुर्योधनाचें वांकडें माझ्या हातून कधींही होणार नाहीं. दुर्योधनाचें हित माझ्या मनामध्यें सदा वसत असून त्यासाठीं मीं आपल्या प्राणावर पाणी सोडलें आहे असें तूं समज. ' हें त्याचें भाषण ऐकून युधिष्ठिर प्रभृति पांडवांनिशीं कृष्ण परत आला. नंतर सैन्याच्या मध्यें उभा राहून जो कोणी आमच्या बाजूला आमच्या साहाय्याला येईल त्याला मी आपल्याकडे घेईन असें युधिष्ठिर मोठ्यानें ओरडून ह्मणाला. ते वेळीं युयुत्सु मोठ्या संतोषानें त्याला ह्मणाला कीं, महाराजा, मला जर तूं पतकरत असशील तर मी तुझ्या बाजूनें

कौरवांशीं युद्ध करीन. तेव्हां युधिष्ठिर ह्मणाला, 'चल ये. आपण सर्व मिळून आपल्या मूर्ख भावांशीं युद्ध करूं' धृतराष्ट्राचा वंश व पिंड तूं चालवावेस असें दिसतें. आह्मांलाही तूं हवा आहेस तेव्हां तूं आमचेकडे ये. दुर्बुद्धि तापट दुर्योधन कांहीं जिवंत रहात नाहीं. तेव्हां युयुत्सु कौरवांना सोडून नौबतीच्या गजरामध्यें पांडवांच्या सैन्याला येऊन मिळाला. नंतर आपलें सोन्यासारखें लखलखीत चिलखत फिरून अंगावर चढवून युद्धिष्ठिर तयार झाला. ते सर्व फिरून आपापल्या रथांवर चढले, व सैन्याची पूर्वीप्रमाणें व्यवस्था लावून युद्धाला तयार होऊन उभे राहिले. शेंकडों नौबती, नगारे यांचा गजर सुरूं झाला; व सर्वांनीं सिंहनाद केले. याप्रमाणें पांडवांना फिरून रथांवर पाहून धृष्टद्युम्नादिकांना आनंदी आनंद झाला. मान्यांना मान देणाऱ्या त्या पांडवांचा मोठेपणा पाहून राजांनीं त्यांचा फार बहुमान केला. त्या महात्म्यांचा जिव्हाळा कृपा, प्रसंगोपात वर्तन, ज्ञातीवरील थोर दया या संबंधानें राजाचे जिकडे तिकडे मनाला व हृदयाला आल्हाद देणारे शाबास! शाबास! असे धन्यवाद ऐकूं येऊं लागले. त्या ठिकाणीं जमलेले म्लेंच्छ, आर्य वगैरे सरसकट सर्वांनीं तें पांडवांचें वर्तन पाहून व ऐकून सद्गदित अंतःकरणानें अश्रू ढाळले. मोठमोठ्या नौबतींच्या व दुधासारख्या पांढऱ्या शुभ्र शंखांच्या नादांनीं सर्व रणभूमि दुमदुमून राहिली.

---

### ७ पहिला दिवस—गर्दी. [६.४४–४६]

दुःशासन आपल्या भावांसह सर्व सैन्य घेऊन भीष्मांना पुढें करून पांडवसैन्यावर चालून गेला. इकडे पांडवही भीष्मांशीं सामना देण्याच्या इच्छेनें मोठ्या उत्साहानें भीमाला पुढें करून कौरवांवर चालून निघाले. त्या घोर रणामध्यें तीं दोन्ही कौरवपांडवांचीं प्रचंड दळें एकमेकांशीं भिडत असतां जणूं काय वाऱ्यानें हलवून सोडल्याप्रमाणें शंखमृदंगाच्या शब्दांनीं अरण्यें हालून राहिलीं. एकच गर्दी झाली. राजाचे हत्ती, घोडे, रथ यांनीं खेचून गेलेल्या त्या अभद्र मुहूर्तावर जमलेल्या सैन्यांचा शब्द वाऱ्यानें खळबळून सोडलेल्या समुद्राच्या आवाजाप्रमाणें घों असा निघत होता. याप्रमाणें भयंकर शब्द उठला असतां महाबाहु भीमानें बैलासारखी डरकाळी फोडली. हिनें रणामध्यें उठणाऱ्या बाकी सर्व शब्दांना मागें सारलें. विजेच्या कडाडण्यासारखा तो शब्द ऐकून सर्व सैन्य गर्भगळित झालें व सैन्यांतील सर्व जनावरें मलमूत्र टाकूं लागलीं. उग्र स्वरूप धरून मोठ्या मेघाप्रमाणें गर्जत कौरवांचा चळकांप करून सोडणारा तो त्यांवर चालून आला. तो याप्रमाणें चालून येत असतां विजेनें युक्त असणाऱ्या मेघासारखे दुर्योधन प्रभृति कौरवबंधु, तसेच दुसरे राजपुत्र यांनीं आपलीं प्रचंड धनुष्यें ओढून नुकतीच कात टाकलेल्या सापासारखे नाराचादी बाण टाकून ढगांनीं ज्याप्रमाणें सूर्याला झांकून टाकावें त्याप्रमाणें त्याला झांकून थोपविलें. तेव्हां द्रौपदीचे मुलगे, महारथ अभिमन्यु, नकुल, सहदेव, धृष्टद्युम्न हे वेगवान वज्रांनीं ज्याप्रमाणें पर्वत शिखरें फोडून काढावीं त्याप्रमाणें तीक्ष्ण बाणांनीं कौरवांना जर्जर करीत त्यांवर चालून आले. ज्यामध्यें भयंकर टणत्कार व हस्तत्राणाचा फडफड शब्द चालला होता अशा ह्या पहिल्या चकमकीमध्यें दोन्ही बाजूंपैकीं कोणीही माघार घेतली नाहीं. अचूक नेम मारणाऱ्या द्रोणशिष्यांच्या हातून विलक्षण चलाखीनें बाण चटचट सुटत असतां धनुष्याचा धूं आवाज कांहीं थांबत नव्हता, व आकाशामधून फिरणाऱ्या लखलखीत ग्रहाप्रमाणें बाण चोहोंकडे फिरत होते. बाकीचे सर्व राजे प्रेक्षकांप्रमाणें हा भयंकर चमत्कार टक लावून पहात होते. ते वेळीं हातांमध्यें धनुष्यबाण घेतलेले सर्व राजे दुर्योधनाच्या आज्ञेनें आपापल्या पथकांनिशीं पांडवसैन्यावर तुटून पडले. त्याचप्रमाणें युधिष्ठिराच्या आज्ञेनें पांडवांकडील सैन्य कौरवांवर तुटून पडलें. याप्रमाणें दोन्ही सैन्यें एकमेकांशीं भिडत असतां सैन्यांच्या गर्दीनें उठलेल्या धुळीनें सूर्य झांकून गेला व नेटानें लढणारे, घायाळ होऊन मागें जाणारे व फिरून युद्धाला तयार होऊन येणारे यांमध्यें आपला कोण व शत्रूकडील कोण हें कांहींच उमगून येत नव्हतें. त्या घनघोर रणामध्यें भीष्म सर्व सैन्याच्यावर झळकत होते, तें महाघोर युद्ध त्या दिवशीं दुपार उलटण्याच्या पूर्वीं सुरूं झालें. हस्तत्राणाचा फडफडाट, शंखाचे शब्द, गरजणाऱ्या

वीरांचे सिंहनाद, हस्तत्राणावर आपटणाऱ्या प्रत्यंचेचा चटचट शब्द, पायदळांच्या पाउलांचा आवाज, घोड्यांचें खेंकाळणें, आकड्या व अंकुश यांचे रपके, निरनिराळ्या हत्यारांपासून निघणारे शब्द, घंटांचा नाद, एकमेकांवर तुटून पडणाऱ्या हत्तींची गर्जना, या सर्वांचा मिळून उठलेला अंगावर कांटा उभा करणारा शब्द व रथांचें घडाडणें मेघगर्जनेप्रमाणें ऐकूं येत होतें. तेवेळीं सर्व कौरव मन निष्ठुर करून जिवाची पर्वा न धरतां निशाणें उभारून पांडवांवर तुटून पडले. ते वेळीं शंतनुपुत्र भीष्म कालदंडासारखें उग्र धनुष्य घेऊन अर्जुनावर चालून गेले. अर्जुनानें लोकविख्यात गांडीव हातांत घेऊन त्या रणामध्यें भीष्मांवर चाल केली. इकडे मोठा धनुर्धारी सात्यकि कृतवर्म्यावर चालून गेला. त्या दोघांचें अंगावर कांटा आणणारें युद्ध झालें. ते दोघे आपापला बचाव करून परस्परांना बाणांनीं घायाळ करून सोडीत होते. त्या महाबलशाली वीरांचीं अंगें बाणांनीं भरून निघालीं असल्यानें तीं फुलून निघालेल्या चित्रविचित्र पळसाच्या झाडांप्रमाणें दिसत होतीं. अभिमन्यु महाधनुर्धारी बृहद्बलाशीं युद्ध करीत होता. त्या झटापटींत कौसलराज बृहद्बलानें अभिमन्यूचा ध्वज व सारथी यांना पाडलें. याप्रमाणें आपल्या सारथ्याला पाडल्यामुळें अभिमन्यु खवळून जाऊन नऊ बाण मारून त्यानें बृहद्बलाला घायाळ केलें. दोन भल्ल बाणांनीं त्याचा ध्वज, एकानें चक्ररक्षक व एकानें सारथी खालीं पाडले. याप्रमाणें एकमेकांना ते बाणांनीं घायाळ करीत राहिले. मानी अशा पांडवांशीं वैर बांधलेल्या महारथी दुर्योधनाबरोबर भीमसेन युद्ध करीत असून त्या रणांगणामध्यें ते दोन मोठे बलाढ्य कुरुपुंगव परस्परांना बाणांनीं झांकून टाकीत होते. नानायुद्धकलेमध्यें प्रवीण अशा त्या धन्यवीरांना पाहून सर्व प्राणिमात्र थक्क झाले. दुःशासन नकुलावर चालून जाऊन अनेक मर्मभेदी बाण त्यानें त्यावर सोडले. नकुलानें हांसत हांसत त्याचा ध्वज उडवून देऊन धनुष्य मोडून टाकलें. दुर्धर्षानें बाणांनीं नकुलाचे घोडे कापून काढून निशाण खालीं पाडलें. दुर्मुख बलशाली सहदेवावर चालून गेला. कोणाला हार न जाणारे ते दोन महावीर तोडीला तोड देण्याच्या हावेनें उग्र अशा बाणांनीं परस्पराला त्राहि त्राहि करून सोडीत होते. स्वतः युधिष्ठिर शल्यावर चालून गेला. शल्यानें त्याच्या धनुष्याचे दोन तुकडे केले तेव्हां तें मोडलेलें धनुष्य टाकून देऊन दुसरें एक बळकट व वेगवान धनुष्य घेऊन त्यानें त्वेषानें बारीक टोंकाच्या बाणांचा शल्यावर वर्षाव केला. धृष्टद्युम्न द्रोणांवर चालून गेला. त्यांनीं खवळून दुसऱ्याचा प्राण घेणाऱ्या त्याच्या दणकट धनुष्याचे तीन तुकडे केले; व कालदंडासारखा एक मोठा तीक्ष्ण बाण सोडला. तो नेमका त्याच्या शरीरांत जाऊन रुतला. तेव्हां धृष्टद्युम्नानें दुसरें धनुष्य घेऊन चवदा बाणांनीं द्रोणांना जखमी केलें. याप्रमाणें त्या दोन खवळलेल्या योद्ध्यांमध्यें घोर संग्राम चालला होता. त्या रणामध्यें शंख सोमदत्तीवर व रभस रभसावर चालून गेले; व या दोन मान्यांमधील चकमक फारच निकराची झाली. ज्याच्या धैर्याचा कधीं अंत कळावयाचा नाहीं अशा नारसिंह स्वरूपी चेदीराज धृष्टकेतूनें बाल्हीकावर चाल केली. ते दोघे खवळलेले वीर मंगळ व बुध यांप्रमाणें एकमेकांवर तुटून पडत होते. अलंबुष राक्षसावर अचाट कृत्य करणारा घटोत्कच तुटून पडला. शिखंडी अश्वत्थाम्यांवर चालून गेला. शिखंडीला आलेला पाहून अश्वत्थाम्यांनीं तीक्ष्ण नाराचबाणांनीं त्याला पुष्कळ जखमा करून घाबरवून सोडलें. शिखंडीनेंही चांगल्या पाजळलेल्या तीक्ष्ण बाणांनीं अश्वत्थाम्यांना जर्जर केलें. सेनानी विराट भगदत्तावर चालून जाऊन मेघानें ज्याप्रमाणें वृष्टीनें पर्वत झांकून काढावा त्याप्रमाणें त्याला बाणांनीं झांकून काढलें. भगदत्तानेंही मेघानें जसें सूर्याला झांकून काढावें तसें त्याला झांकून काढलें. कैकेयराज बृहद्रथावर रूप चालून गेले. त्या दोन तापट रथ्यांनीं एकमेकांचे घोडे व धनुष्य कापून काढल्यावर एकमेकांशीं तलवारीनें लढण्याला ते तयार होऊन उभे राहिले. त्यांचें तें युद्ध फारच भयंकर झालें. द्रुपद हा सैंधवराज जरासंधावर चालून गेला. त्यांच्यामध्यें शुक्र व मंगळ यांप्रमाणें फार भयंकर चकमक उडाली. विकर्णसुत सोमावर चालून जाऊन त्यांमध्यें युद्ध जुंपलें. सुशर्म्यावर पांडवांच्या बाजूचा पराक्रमी चेकितान चवताळून चालून गेला. मोठ्या सिंहानें ज्याप्रमाणें हत्तीवर चालून जावें त्याप्रमाणें

पराक्रमी शकुनीनें विक्रम माजविणाऱ्या प्रतिविंध्यावर चाल केली. कांबोजांचा महारथ सुदक्षिण यावर श्रुतकर्मा चालून गेला. त्या मैनाकाप्रमाणें अढळ सुदक्षिणानें सहदेवपुत्र श्रुतकर्म्याला बाणांनीं जखमी केलें. श्रुतकर्म्यानेंही त्याला फाडूनच टाकतो आहे कीं काय अशा रीतीनें बाणाचा वर्षाव केला. मोठ्या सावध अशा इरावानानें खवळून तशाच रीतीनें सावध असणाऱ्या श्रुतायूवर चाल केली. अर्जुनपुत्र इरावानानें प्रतिपक्ष्याचे घोडे मारून मोठ्यानें गर्जना केली. ती गर्जना सर्व सैन्यामध्यें भरून राहिली. श्रुतायूनेंही खवळून गदेच्या शेवटानें अर्जुनपुत्राचे घोडे मारले. विंध्य आणि अनुविंध्य यांनीं महारथ वीर कुंतिभोजाचे मुलगे व सैन्य यावर स्वारी केली. त्याचा तो घोर पराक्रम तर पाहण्यासारखाच होता. त्या अफाट सैन्याबरोबर त्या दोघांचें मोठ्या नेटानें युद्ध झालें. पांच कैकय भाऊ आपल्या सैन्यानिशीं पांच गांधार राजपुत्र व त्यांची सेना यांशीं भिडले. धृतराष्ट्रपुत्र वीरबाहु विराटपुत्र उत्तराबरोबर लढूं लागला. चेदिराज त्वेषानें उलूकावर चालून गेला. याप्रमाणें त्या रणगर्दीमध्यें हजारों हत्ती, रथ, घोडे व पायदळ यांच्या जोड्या एकमेकांशीं भिडल्या. क्षणभर मात्र त्या रणाकडे पाहून गम्मत वाटली. परंतु लवकरच एकच गर्दी होऊन कोणाला कांहीं ओळखूं येईना. हत्तीदळ हत्तीदळावर, रथी रथ्यांवर, स्वार स्वारांवर, शिपाई शिपायांवर तुटून पडत होते. याप्रमाणें योद्धे परस्परांशीं भिडले असतां मोठ्या हातघाईचें व भयंकर युद्ध सुरू झालें. तेव्हां हत्ती, घोडे, रथी व पायदळ यांची मर्यादा सुटून एकच गर्दी उडून राहिली.

शेंकडों हजारों वीर आपापल्या जागा सोडून वाटेल तसें युद्ध करीत होते. मुलगा बापाला ओळखीना. बाप आपल्या पोटच्या पोराला ओळखीना. भाऊ भावाला, मामा भाच्याला, भाचा मामाला, मित्र मित्राला, कोणी कोणाला न ओळखतां पिसाळल्यासारखें पांडव कौरवांशीं लढत होते. कांहीं आपल्या रथांनिशीं रथदळावर तुटून पडून जुवांनीं जूं, इसाडांनीं इसाड, दांड्यांनीं दांड्या मोडून पाडीत होते. कांहीं टोळीनें टोळीवर तुटून पडत होते. कांहीं रथ रथांवर आपटून त्यांची गतिच बंद पडत होती. ज्यांचीं गंडस्थळें फुटलीं आहेत असे धिप्पाड हत्ती हत्तींवर आदळून खवळून जाऊन आपल्या दातांनीं एकमेकांना अनेक प्रकारें फाडून काढीत होते; हातांमध्यें गदा, मुसळ, गोफण, गुरगुंज, लोखंडाच्या कांबी, लखलखीत व धारेच्या तलवारी घेऊन एकमेकांना मारण्याचे उद्देशानें योद्धे चवताळून एकमेकांवर धांवतांना दिसत होते. एकमेकांवर घाव करणाऱ्या वीरांच्या रक्तानें भरलेल्या तलवारी चमकत होत्या. वीरांनीं शत्रूंच्या मर्मस्थळावर तोलून फेंकलेल्या तलवारींचा शब्द फारच मोठा निघत होता. गदा व मुसळ यांनीं घायाळ झालेल्या, तलवारींनीं छाटून निघालेल्या, हत्तींच्या दातांनीं फोडून काढलेल्या, तसेंच हत्तींनीं चिरडून टाकलेल्या लोकांचा एकमेकांना हाका मारीत असतां प्रेतांप्रमाणें हृदयद्रावक शब्द फारच भयंकर निघत होता. चमर हरिणाच्या शेंपटीचे तुरे ज्यांना लावले होते अशा हंसासारख्या वेगवान घोड्यांवर बसून स्वार एकमेकांवर तुटून पडत होते. सोन्यांनीं सुशोभित अशा त्यांनीं सोडलेल्या लखलखीत विटा मोठमोठ्या सापाप्रमाणें जोरानें जाऊन पडत होत्या. कांहीं स्वार आपल्या वेगवान घोड्यांवरूनच मोठमोठ्या रथांवरून उड्या घेऊन रथ्यांना कापून काढीत होते. त्याचप्रमाणें बाणांच्या माऱ्यामध्यें आलेल्या अनेक स्वारांना रथी धारेच्या भल्ल बाणांनीं मारून पाडीत होते. सोन्यानें शृंगारलेले नव्या मेघांसारखे कांहीं मस्त हत्ती घोड्यांना खालीं पाडून पायांनींच तुडवून काढीत होते. कांहीं हत्ती आपल्या दातांनीं घोड्यांना त्यांच्या स्वारांनिशीं वर उचलून फेकून देऊन पुष्कळ रथांचा त्यावरील निशाणांसकट चुराडा उडवीत फिरत होते. स्वार व हत्तींवरील योद्धे यांनीं सोडलेले तुळतुळीत व तीक्ष्ण बाण हत्तींच्या गंडस्थळांवर अंगावर व पाठीवर सापासारखे जाऊन पडत होते. वीरांच्या हातून सुटलेल्या मोठमोठ्या उल्केसारख्या लखलखीत शक्त्या लोखंडाचीं चिलखतें फोडून शत्रूंच्या व त्यांच्या घोड्यांच्या चिंध्या उडवून जिकडे तिकडे खालीं पडत होत्या. त्या रणांमध्यें योद्धे, चित्ते व वाघ यांच्या आतड्याच्या म्यानामधून बाहेर काढलेल्या लखलखीत तलवारीनें शत्रूंना छाटून काढीत होते छाटून निघालेल्या पक्षाचे अवशिष्ट

वीर खवळून चालून येत असतां त्यांकडे बोट दा-खवून कांहीं आपल्या तलवारी, ढाला, फरशी घेऊ-न त्यावर तुटून पडत होते. कांहीं हत्ती माहुताच्या चुचकारण्यावरून आपल्या सोंडांनीं योद्ध्यांसकट रथांना फरफर ओढीत चोहोंकडे फिरत होते. कोणी शंकूंनीं फाडले जाऊन, कोणी फरशींनीं छिन्नभिन्न होऊन कोणी हत्तीखालीं चिरडून, कोणी घोड्यांनीं घायाळ होऊन, कोणी रथाच्या चाकाखालीं सांपडून दुःखानें आपल्या आप्तबांधवांना हाका मारीत होते. कोणी मुलांना, कोणी बापांना, कोणी भावांना, बांधवांना, कोणी मामांना, कोणी भाचांना आणि कोणी शत्रूंना देखील हाका मारून एकच कल्होळ उडवून देत होते. पुष्कळांचीं आंतडीं बाहेर पडू-न, कांहींच्या मांड्या मोडून, कांहींचे हात तुटून, कां-हींच्या बरगड्या छाटून निघून, तान्हेनें पीडित होऊन कसें तरी जगावें म्हणून त्यांची धडपड चालली होती. कांहीं दुबळे तान्हेने व्याकुळ होऊन जमिनीवर पडून पाणी मागत होते. रक्ताच्या पाटामध्यें बुडून जाऊन घाबरलेले ते सर्व स्वतःला व तेथें जु-ळलेल्या कौरवांना दोष देत होते; परंतु कांहीं एकमेकांशीं हाडवैर बांधलेल्या शूर क्षत्रियांनीं शस्त्र-ही खालीं ठेवलें नाहीं, किंवा डोळ्यांतून पाणी देखील काढलें नाहीं. मोठ्या आनंदानें ते एकमेकांना टा-कून बोलत होते. व रागानें दांत ओंठ चावून व भिवया चढवून एकमेकांकडे पहात होते. कांहीं मो-ठे शक्तिमान व हिमतीचे होते तरी बाणांनीं अगदीं भरून गेल्यामुळें जखमांनीं घायाळ होऊन बेशुद्ध होऊन पडले होते. निवडक निवडक वीरांचा असा भयंकर संहार चालला असतां सैन्यामध्यें एकच हा-हाकार उडून राहिला होता. याप्रमाणें कौरव पांडवां-चें युद्ध चाललें असतां प्राण नाशाला कांहीं म-र्यादाच उरली नाहीं. पांडवांचें सैन्य भीष्मांकडे आले तेव्हां चळचळ कांपू लागलें. मेरूनें ज्या-प्रमाणें चंद्राला शोभा यावी त्याप्रमाणें मोठ्या र-थामध्यें बसलेल्या भीष्मांना ज्यावर पांच तारे कां-ढले होते अशा उभारलेल्या ताडाच्या ध्वजानें शोभा आली होती.

---

## ७ विराटपुत्र उत्तराचा वध. (६.४७–४९)

याप्रमाणें त्या भयंकर दिवसाचा पूर्वभाग सरत येऊन ठळक ठळक योद्ध्यांची भयंकर कत्तल चा-लली असतां दुर्मुख, कृतवर्मा, कृप, शल्य व विविं-शति दुर्योधनानें सांगितल्यावरून भीष्मांकडे जाऊन त्यांचें संरक्षण करीत होते. या पांच अतिरथ्यांच्या संरक्षणाखालीं महारथ भीष्म पांडवांच्या सैन्यामधू-न शिरून त्याला अगदीं खळवळून सोडीत होते. चेदि, काशि, करुष, पांचाल या सर्वांच्या सैन्यांम-धून जिकडे तिकडे भीष्मांचें ताडाचें निशाण फडकतांना दिसत होतें. ते आपल्या वेगवान व अणीदार भल्ल बाणांनीं शत्रूंचीं मुंडकीं, रथ, जूं व निशाणें सर्व कापून काढीत होते. भीष्मांच्या रथाच्या वाटेंत सांपडलेल्या हत्तींना मर्म-स्थळीं ठोक बसल्यानें मोठ्यानें ते चीं चीं करीत होते. पिंगट रंगाचे पाणीदार घोडे ज्याला जोडले होते अशा रथामध्यें बसून अभिमन्यु खवळून भीष्मांवर व त्यांचें संरक्षण करणाऱ्या पांच रथ्यांवर चालून गेला. त्याच्या रथावर सोन्यानें चित्रविचित्रित केले-ला पांगाऱ्याचा ध्वज फडकत होता. भीष्मांचें ता-डाचें निशाण बाणानें पाडून तो भीष्म व त्यांचे सं-रक्षक यांजबरोबर युद्ध करीत होता. एका बाणानें कृतवर्म्याला व पांचांनीं शल्याला जखमी करून नऊ बारीक टोंकाच्या बाणांनीं त्यानें भीष्मांनासुद्धां मऊ पाडलें. एका चिलखत वगैरे सर्वांना फोडून आंत शि-रणाऱ्या अणीदार भल्ल बाणानें त्यानें दुर्मुखाच्या सा-रथ्याचें शीर धडापासून वेगळें केलें, व एकानें त्याचें सोन्यानें शृंगारलेलें धनुष्य कापून काढलें. त्याचप्रमाणें रणभूमीवर जणूं नाचच चालविल्या त्यानें कृपाचा-र्यांचेंही सर्व सामान मोडून टाकलें. त्याची ती च-लाखी पाहून देवांना सुद्धां आनंद झाला. व त्या-ची नेमका नेम मारण्याची हातोटी पाहून भीष्मादि रथ्यांना तो अर्जुनच वाटूं लाग-ला. ज्यापासून चटचट बाण सुटत होते असें तें त्याचें गांडीवाप्रमाणें टणत्कार करणारें धनु-ष्य कोलतीसारखें जिकडे तिकडे गरगर फिरत होतें. यमस्वरूप भीष्म त्यावर चालून गेले व नऊ मोठ्या वेगवान बाणांनीं त्याला जखमी करून त्यांनीं वीर्य-शाली अर्जुनपुत्राचा ध्वज तीन भल्ल बाणांनीं मोडून

टाकला, व तिहींनीं सारथी ठार केला. त्याचप्रमाणें कृतवर्मा, कृप, शल्य या सर्वांनीं त्यावर बाण सोडले. तरी तो मैनाक पर्वतासारखा मुळींच कचरला नाहीं. या पांच महारथ्यांनीं तो अगदीं वेढून गेला होता, तरी त्या सर्वांवर त्यानें बाणांचा वर्षाव चालविला होता. याप्रमाणें हजारों वीरांना बाणांनीं झांकून काढून भीष्मांवर बाण सोडीत तो मोठ्यानें गर्जत होता, ते वेळीं त्याच्या मनगटाचा विलक्षण जोर दिसून आला. याप्रमाणें कटून पराक्रम गाजवीत भीष्मांना तो बेजार करून सोडीत असतां भीष्मही त्यावर बाण सोडीत होते व तो त्या सर्वांना कापून काढीत होता; व नऊ बाणांनीं त्यानें भीष्मांचें निशाण मोडून पाडलें, ते वेळीं लोक मोठ्यानें ओरडलें. याप्रमाणें तें निशाण पाडलेलें पाहून भीमानें त्याला उत्साह आणण्यासाठीं मोठ्यानें गर्जना केली. तेवेळीं त्या भयंकर रणामध्यें अनेक मोठमोठीं दिव्य अस्त्रें प्रकट करून कधीं न खचणाऱ्या भीष्मांनीं हजारों बाणांनीं अभिमन्यूला झांकून काढलें. तेवेळीं विराट व त्याचा मुलगा धृष्टद्युम्न, भीम, पांच कैकेय बंधु, व सात्यकि असे मोठे धनुर्धारी महारथी अभिमन्यूची पाठ राखण्यासाठीं धांवून आले. याप्रमाणें ते मोठ्या वेगानें आपल्यावर येऊन पडत असतां भीष्मांनीं तीन बाणांनीं धृष्टद्युम्नाला व नवांनीं सात्यकीला बेजार करून अगदीं कानापर्यंत ओढून सोडलेल्या एका तीक्ष्ण क्षुर बाणांनीं सिंहाचें चिन्ह असलेलें भीमाचें निशाण त्याच्या रथापासून खालीं पाडलें. तेव्हां भीमानेंही बाण सोडून भीष्मकृपादिकांना जखमी केलें. विराटपुत्र उत्तरही सोंडेचें वेटाळें करून वर उचललेल्या आपल्या हत्तीवरून शल्यावर चालून गेला. मोठ्या वेगानें आपल्यावर येऊन पडणाऱ्या त्या हत्तीच्या अलौकिक वेगाला शल्यानें बाण सोडून आळा घातला. त्यानें खवळून जाऊन त्या हत्तीनें शल्याच्या रथाच्या जुवावर पाय देऊन त्याचे चार पुष्ट व नीट वाहून नेणारे घोडे मारून टाकले. तेव्हां ज्याचे घोडे मरून पडले आहेत अशा त्या रथांतच बसून शल्यानें उत्तराचा प्राण घेणारी मोठ्या सापासारखी लोखंडी शक्ति त्यावर सोडली. तिनें चिलखत फुटून जाऊन घेरी येऊन हातामधून अंकुश व गुरगुंज गळून पडून तो खालीं जमिनीवर पडला. तेव्हां हातामध्यें तलवार घेऊन आपल्या श्रेष्ठ रथांतून खालीं उडी घेऊन शल्यानें त्या भल्या हत्तीची मोठी सोंड छाटून काढिली. याप्रमाणें सोंड तुटून हजारों बाण मर्मस्थळीं लागल्यानें तो हत्ती मोठ्यानें किंकाळून खालीं पडून मेला. याप्रमाणें अचाट कृत्य करून शल्य लखलखीत अशा कृतवर्म्याच्या रथावर एकदम चढला. याप्रमाणें आपल्या उत्तर भावाला मारून शल्याला कृतवर्म्याच्या रथांत बसलेला पाहून तूप ओतल्यानें ज्याप्रमाणें अग्नीनें पेट घ्यावा त्याप्रमाणें शंख संतापानें अगदीं खवळून गेला. इंद्रधनुष्यासारखें आपलें मोठें धनुष्य ओढून शल्याला मारण्याच्या इरायानें बाणांचा वर्षाव करीत तो त्यावर धांवून गेला. मोठा रथसमुदाय सर्व बाजूंनीं त्याला राखीत होता. मस्त हत्तीप्रमाणें ज्याचा पराक्रम अशा त्या वीराला शल्यावर तुटून पडतांना पाहून मृत्यूच्या दाढेंत सांपडलेल्या शल्याला वांचविण्यासाठीं कौसल देशचा बृहद्बल, मगधाचा जयत्सेन, शल्याचा मानी मुलगा रुक्मरथ, अवंतीचे विंद व अनुविंद, कंबोजाचा सुदक्षिण, व बृहत्क्षत्राचा दायाद सिंधु देशचा जयद्रथ या सात रथ्यांनीं त्याला चोहोंकडून घेरलें. नाना धातूंनीं चित्रविचित्रित ह्या महात्म्यांचीं ताणलेलीं धनुष्यें विजेप्रमाणें चमकत होतीं. उन्हाळ्याच्या शेवटीं वाऱ्यानें उठलेल्या ढगांनीं ज्याप्रमाणें पर्वतावर पाण्याचा पाऊस पाडावा त्याप्रमाणें यांनीं शंखाच्या डोक्यावर बाणाचा वर्षाव केला. तेव्हां खवळून गेलेल्या त्या महाधनुर्धारी सेनापति शंखानें लखलखीत अशा सात बाणांनीं त्यांचीं धनुष्यें कापून काढून मोठ्यानें गर्जना केली. तेव्हां महाबाहु भीष्म मेघाप्रमाणें गर्जून आपलें ताडासारखें धनुष्य घेऊन शंखावर चालून गेले. त्यांना येतांना पाहून वावटळानें लटपटणाऱ्या नावेप्रमाणें पांडवसेनेची धांदल उडाली. तेव्हां भीष्मांपासून याचें संरक्षण झालें पाहिजे असें मनांत आणून अर्जुन शंखाच्या पुढें येऊन उभा राहिला. आणि नंतर युद्ध सुरू झालें. त्या रणांत युद्ध करीत असलेल्या योद्ध्यांचा एकच हाहाकार उडून राहिला. एक तेज दुसऱ्या तेजामध्यें मिळून गेल्याप्रमाणें लोक त्या वेळीं थक्क होऊन गेले. इकडे शल्यांनीं हाताम-

ध्यें गदा घेऊन रथांतून खालीं उतरून शंखाचे चारी घोडे मारून टाकले. तेव्हां हातांतील तलवारीनिशीं त्या रथांतून खालीं उडी घेऊन पळून जेव्हां तो अर्जुनाच्या रथामध्यें जाऊन बसला तेव्हांच त्याच्या जिवांत जीव आला. तेवेळीं भीष्मांच्या रथामधून जे बाण सुटत होते त्यांनीं आकाश व भूमि भरून राहिली. अनेक पांचाल, मत्स्य, केकय व प्रभद्रक वीरांना भीष्मांनीं आपल्या बाणांनीं पाडलें. त्या रणामध्यें अर्जुनाला सोडून पांडवसेनेमध्यें असणाऱ्या द्रुपदावर भीष्म चालून गेले, व त्या प्रिय संबंध्याला त्यांनीं बाणांनीं झांकून काढलें. हिंवाळा सरल्यावर ज्याप्रमाणें आगीनें अरण्यें जळून निघतात त्याप्रमाणें द्रुपदाचें सैन्य बाणांनीं भाजून निघालेलें दिसत होतें. विनधुराच्या झळझळीत निखाऱ्यांप्रमाणें देदीप्यमान भीष्मांवर भर दुपारच्या वेळीं रखरखीत प्रकाशणाऱ्या सूर्याप्रमाणें पांडववीरांचे डोळे ठरेनात. थंडीनें कुडकुडलेल्या गुरांप्रमाणें भयानें गांगरून जाऊन ते इकडे तिकडे पाहूं लागले असतां त्यांच्या कचाट्यांतून सोडविणारा त्यांना कोणी वाली दिसेना. सैन्य चिरडून मरून पडलें असतां व उत्साहशून्य होऊन पळ काढीत असतां पांडवसैन्यामध्यें मोठा हाहाकार उडून राहिला. याप्रमाणें सैन्याचा मोड होऊन फडशा पडत असतां सूर्य अस्ताला गेल्यानें कोठें कांहीं दिसेनासें झालें व लढाई बंद करण्याविषयीं भीष्मांनीं मोठ्यानें इशारत दिलेली ऐकून पांडवांनीं आपलीं सैन्यें आवरून घेतलीं.

---

## ८दुसरा दिवस-क्रौंचारुणव्यूह.(६.५०-५२)

याप्रमाणें पहिल्या दिवसाच्या अखेरीस उभय पक्षांनीं आपापलीं सैन्यें परत घेतल्यावर भीष्मांना याप्रमाणें रणामध्यें खवळून जाऊन अचाट पराक्रम करतांना पाहून दुर्योधन हर्षभरित झाला; व धर्मराज आपला पराभव होणार असें वाटून मोठा कष्टी होऊन आपले भाऊ व दुसरे राजे यांसह श्रीकृष्णाकडे येऊन ह्मणाला, ' कृष्णा, घोर पराक्रमी भीष्मांकडे पहा तरी ! उन्हाळ्यामध्यें वणवा ज्याप्रमाणें सर्व अरण्य जाळून फडशा पाडतो त्याप्रमाणें ते माझें सैन्य बाणांनीं भाजून काढीत आहेत. तूप ओतलेल्या अग्नीप्रमाणें आमचें सर्व सैन्य चाटून घेत असतां या महात्म्यांकडे आमच्यानें नुसतें पाहवणार तरी कसें ? कारण याच्या बाणांचा मार वघून व ह्या महाबलशाली धनुर्धरांना पाहूनच आमच्या सैन्यानें पार पळ काढला आहे. खवळलेल्या यमाला, इंद्राला, पाश घेऊन तयार असलेल्या वरुणाला किंवा गदाधारी कुबेराला एकवेळ जिंकतां येईल, पण या महातेजस्वी भीष्मांना जिंकतां येणें शक्य नाहीं ! अशी वास्तविक स्थिति असल्यामुळें नाव नसल्यानें अपार व अगाध भीष्मरूपी डोहामध्यें मी बुडत चाललों आहें. माझ्या कोत्या बुद्धीमुळें मला याला कांहीं उपाय सुचत नसल्यानें भीष्मांचीच गांठ घेऊन मी आपला वनाला जातों. तेथें जाऊन काळ काढणें मला बरें वाटतें! या भीष्मरूपी मृत्यूच्या दाढेंत राजांना देण्याला माझें मन घेत नाहीं. मोठमोठीं अस्त्रें यांना माहीत असल्यानें माझ्या सैन्याचा हे नायनाट उडवितील. ज्याप्रमाणें आपल्या नाशासाठींच पतंग पेटलेल्या आगीकडे धांव घेतात तीच गति यांवर तुटून पडणाऱ्या माझ्या सैन्याची होत आहे ! राज्याच्या आशेनें पराक्रम गाजविण्याच्या या खटपटींत उलट माझा नाश झाला आहे. माझे वीर भाऊ बाण लागून घायाळ झाले आहेत. बंधुप्रेमानें माझ्यासाठीं ते राज्याला व तसेंच सुखाला मुकले आहेत. आज जीव बचणें शक्य दिसत नसल्यामुळें कसाबसा जीव वांचला ह्मणजे पुरे असें मला वाटत आहे. राहिलेलें आयुष्य खर्ची घालून मी कडक तप करीत राहतों. अर्जुनाला तर रणामध्यें मी तटस्थच पाहतों. महाबाहु एकटा भीम आपली सर्व शक्ति खर्चून केवळ मनगटाच्या जोरावर क्षात्र धर्माला स्मरून युद्ध करीत आहे. वीरांचा फडशा पाडणाऱ्या आपल्या गदेनें मोठ्या उत्साहानें तो रथ, घोडे, शिपाई व हत्ती यांचा समाचार घेत अचाट काम करीत आहे. परंतु अशा सरळरीतीनें हा शेंकडों वर्षें युद्ध करीत राहिला तरी शत्रुसैन्याचा फडशा याच्या हातून होणार नाहीं. तुझा लाडका अर्जुन कायतो एकटा सर्व अस्त्रें जाणतो. परंतु तो आज आह्मीं महात्म्या भीष्मद्रोणांकडून भाजून निघत आहों तरी आमच्याकडे दुर्लक्ष करीत आहे! भीष्मद्रोणांकडून फिरफिरून प्रयोग होत असले-

त्या दिव्यास्त्रांनीं सर्व क्षत्रिय जळून खाक होत आहेत. या राजांच्या साहाय्यानें हे खवळलेले भीष्म आमचा खात्रीनें पूर्ण फडशा पाडतील असाच यांचा विलक्षण पराक्रम आहे. तेव्हां वणव्यास जसा पाऊस तसा यांना शांत करणारा कोण आहे याचा विचार तूंच पहा. तुझ्याच प्रसादानें शत्रूंना मारून आपलें राज्य मिळवून पांडव सुखांत राहणार आहेत.' असें ह्मणून शोकानें मन खचून काय करावें हें न सुचतां बुद्धिशाली धर्मराज बराच वेळ स्वस्थ विचारामध्यें गढून राहिला. दुःखानें वेडा होऊन त्याला असा कष्टी झालेला पाहून सर्व पांडवांना आनंदवीत श्रीकृष्ण ह्मणाला, 'हे भरतश्रेष्ठा, शोक करूं नकोस. ज्या तुला सर्व लोकांमध्यें नावाजलेले धनुर्धर असे शूर भाऊ आहेत, ज्या तुझें हित करण्याला मी व तसाच हा मोठा यशस्वी सात्यकि तयार आहों त्या तूं असा शोक करावास हें कांहीं ठीक नाहीं. हे विराट, द्रुपद, धृष्टद्युम्न व दुसरे राजे तुझ्या ठिकाणीं भक्तिमान असून आपल्या सैन्यांनिशीं तुझ्या प्रसादाला आपसरून आहेत. तुझ्या हिताचीच इच्छा धरून असणारा हा धृष्टद्युम्न तुझें वाटेल तें प्रिय करण्याला तयार असून यानें तुझें सेनापत्य पतकरलें आहे. हा शिखंडी तर प्रत्यक्ष भीष्मांना काळच आहे!' हें श्रीकृष्णाचें भाषण ऐकून त्या मंडळीमध्यें श्रीकृष्णासमक्षच धर्मराज महारथ धृष्टद्युम्नाला ह्मणाला, 'बा धृष्टद्युम्ना, मी ह्मणतों तें ऐक. मात्र तें माझें भाषण व्यर्थ करूं नकोस. श्रीकृष्णानें पसंत केलेला तूं माझा सेनापति आहेस. पूर्वीं देवांचे ज्याप्रमाणें कार्तिकस्वामी सेनापती होते तसा तूं पांडवांचा आहेस. तेव्हां हे नरशार्दूला पराक्रम गाजवून तूं कौरवांना जिंक. मी, भीम, श्रीकृष्ण, नकुलसहदेव व द्रौपदीचे मुलगे, तसेच दुसरे ठळक ठळक राजे आह्मी तुझ्या मागून येण्याला तयार आहों.' हें ऐकून सर्वांना आनंदवीत धृष्टद्युम्न ह्मणाला, 'भगवान शंकरांनीं मूळ द्रोणांना मारण्यासाठीं मला उत्पन्न केलें आहे. तेव्हां भीष्म, द्रोण, कृप, शल्य तसाच जयद्रथ या सर्व गर्वानें फुगलेल्या वीरांना आज मी रणामध्यें तोंड देतों.' शत्रूंचा फडशा पाडणाऱ्या राजेंद्र धृष्टद्युम्नाचें हें दमाचें भाषण ऐकून धर्मराज त्याला ह्मणाला, 'जो देवासुरांच्या युद्धाचे वेळीं बृहस्पतींनीं इंद्राला सांगितला होता तो सर्व शत्रूंचा फडशा पाडणारा क्रौंचारुण नांवाचा व्यूह रच. कधीं कोणाच्या पाहण्यांत न आलेली ती व्यूहरचना आज कौरवांच्या दृष्टीस पडूं दे.' याप्रमाणें त्या नृपश्रेष्ठ धर्मराजाचें भाषण ऐकून धृष्टद्युम्नानें सकाळच्या प्रहरीं अर्जुनाला सर्व सैन्याच्या पुढें केलें. आपल्या मोठ्या सैन्यानिशीं द्रुपद त्या व्यूहाचा शिरोभाग झाला; कुंतिभोज व चैद्य हे दोन राजे डोळे झाले; दशार्णक, प्रभद्र, दाशेरक, अनूपक व किरात हे मान बनले; युधिष्ठिर पटच्चर, पौंड्र, पौरवक व निषाद या लोकांसह पाठीचा भाग बनला; भीम व धृष्टद्युम्न हे दोन पंख झाले; द्रौपदीचे मुलगे, अभिमन्यु, महारथ सात्यकि हे व पिशाच, दारद, पुंड्र, कुंडीविष, मारुत, धेनुक, तंगण, परतंगण, बाल्हिक, तित्तिर, चोल, पांड्य उजव्या पंखाकडे होते; अग्निवेश, हुंड, मालव, दानभारी, शबर, उद्धस, वत्स, हे व नकुलाचे मुलगे यांसह नकुलसहदेव डाव्या पंखाकडे होते. पंखाकडे दहा हजार रथी होते, डोक्याकडे दशलक्ष, पाठीकडे दहा कोटि वीस हजार, व मानेकडे दहा लक्ष सत्तर हजार रथी होते. पंखाच्या मूळाला, पंखांमधून व पंखांच्या शेवटीं हत्ती गराडा देऊन चालले होते. ते हाल करचालणाऱ्या पर्वतांसारखे दिसत होते. तीस हजार रथी, कैकेय, काशिराज व शैब्य यांनिशीं विराट कटिपश्चाद्भाग राखीत होता. याप्रमाणें हा मोठा व्यूह रचून चिलखत वगैरे चढवून युद्धाला तयार होऊन पांडव सूर्योदयाची वाट पहात राहिले. त्यांचीं सूर्यासारखीं पांढरीं शुभ्र छत्रें हत्तींवरून व रथांवरून झळकत होतीं.

अतुल तेजस्वी अर्जुनाला त्या घोर व अभेद्य क्रौंच व्यूहाचें रक्षण करतांना पाहून दुर्योधन, द्रोण, कृप, शल्य, सोमदत्ति व आपले भाऊ यांच्याकडे जाऊन त्यांना आनंदवीत प्रसंगोचित म्हणाला, 'तुम्ही सर्वच महारथी युद्धामध्यें कुशल असून नाना शस्त्रांनीं प्रहार करण्याला समर्थ असल्यानें एकेकटे पांडवांना रणामध्यें मारण्याला समर्थ आहां; मग तुह्मी सर्व एकत्र जमल्यावर काय विचारावयाचें? असें जरी आपलें सैन्य आहे तरी त्यांचें संरक्षण करणारे भीष्म असल्यानें तें पांडवसैन्याशीं

तोंड देण्याला अपुरें आहे. परंतु हें पांडवांचें सैन्य त्यांचें रक्षण करण्याला भीम असल्यानें पुरें आहे. तेव्हां संस्थान, शूरसेन, वेत्रिक, कुकुर, आरोचक, त्रिगर्त, मद्रक व यवन ह्या लोकांना शत्रुंजय, दुःशासन, वीर विकर्ण, चित्रसेन, ह्यांनिशीं नंदोपनंदकांना व पारिभद्रकांना घेऊन आपापल्या सैन्यांनिशीं भीष्मांचें तेवढें नीट संरक्षण करूं देत.' नंतर भीष्म, द्रोण व धृतराष्ट्राचे मुलगे ह्यांनीं उलट पांडवांच्या तोंडीला तोंड देणारा असा मोठा व्यूह रचला. आणि अफाट सैन्यामधून त्याला आपल्याबरोबर घेऊन भीष्म इंद्राप्रमाणें चालले. महाधनुर्धारी प्रतापशाली द्रोण, कुंतल, दशार्ण, मागध, विदर्भ, मेकल, कर्णप्रावरण इत्यादि लोकांनिशीं सर्व सैन्य घेऊन रणाला शोभा देणाऱ्या भीष्मांच्या मागून चालले होते. गांधार, सिंधुसौवीर, शिबि व वसाति ह्या लोकांसह शकुनि द्रोणाचें संरक्षण करीत होता. त्यामागून राजा दुर्योधन आपल्या सर्व भावांनिशीं अश्वातक, विकर्ण, आंबष्ठ, कोसल, दरद, शक, व क्षुद्रमालव या लोकांना घेऊन शकुनीच्या सैन्याचें रक्षण करीत चालला होता. भूरिश्रवा, शल, भगदत्त, अवंतीचे विंदानुविंद डावी बाजू संभाळीत होते. सौमदत्ति, सुशर्मा, कांबोजाचा सुदक्षिण, श्रुतायु आणि अच्युतायु हे उजवी बाजू राखीत होते. अश्वत्थामा, कृप, सात्वतांचा कृतवर्मा हे मोठ्या सेनेनिशीं पिछाडीला व्यवस्थेनें राहिले होते. वसुमान, केतुदान, काश्याचा मुलगा अभिभू वगैरे नाना देशांचे राजे सर्वांची पिछाडी सांभाळीत होते. तेवेळीं युद्धासाठीं हर्षभरित झालेल्या कौरवपांडवांनीं आनंदानें आपापले शंख फुंकून सिंहनाद केले. त्याबरोबर शंख, नौबती इत्यादिकांचा एकच मोठा गजर होऊन राहिला. याप्रमाणें हे कौरव पांडव एकमेकांना ताप देत फिरून एकमेकांशीं भिडले.

याप्रमाणें दोन्ही पक्षांकडील सैन्यांची समसमान व्यूहरचना झाल्यावर दुर्योधनानें चिलखत चढवून तयार असलेल्या आपल्या सैनिकांना युद्ध सुरूं करण्यास इशारत दिली. तेव्हां मन अगदीं कठोर करून जिवाची पर्वा न करितां ते सर्व आपले बावटे फडकावीत पांडवांवर चालून गेले; व रथ, हत्ती, यांची एकच गर्दी उडून जाऊन कौरवपांडवांचें अंगावर कांटा उभा करण्यासारखें निकराचें युद्ध सुरूं झालें. रथ्यांनीं सोडलेले बारीक टोकांचे सोनेरी पिसाचे लखलखीत बाण हत्तींवर व घोड्यांवर जाऊन पडत होते. याप्रमाणें रण सुरू झालें असतां अचाट पराक्रमी कवचधारी, कोणाची डाळ शिजूं न देणारे वृद्ध भीष्म धनुष्य सज्ज करून अभिमन्यु, भीमसेन, धृष्टद्युम्न वगैरे पांडवांकडील ठळक ठळक वीरांवर बाणांचा वर्षाव करीत सुटले. त्या वीरांची गांठ पडल्याबरोबर तो व्यूह फुटला. सर्व सैन्यांची एकच गर्दी उडून राहिली. स्वार रथी व यांचे उत्तम उत्तम घोडे मरून पडले; व पांडवांकडील रथदळाची पळापळ उडाली. नरव्याघ्र अर्जुन मात्र भीष्मांना याप्रमाणें खवळलेले पाहून श्रीकृष्णाला म्हणाला, 'पितामहांकडे रथ घेऊन चल. कृष्णा, दुर्योधनाच्या हितामध्यें दक्ष असलेले हे खवळून जाऊन आमच्या सैन्याचा फडशा पाडणार यांत संशय नाहीं. ज्यांच्या हातामधलें धनुष्य कधीं ढळावयाचें नाहीं अशा ह्या भीष्मांचे पाठिराखे असलेली द्रोणाचार्य, कृपाचार्य वगैरे मंडळी पांचाल सैन्याचा सप्पा उडवितील. तेव्हां ह्या सैन्याच्यासाठीं आज मला पितामहांना मारलें पाहिजे.' तेव्हां श्रीकृष्ण त्याला ह्मणाला, 'धनंजया, तयार रहा, हा पहा तुला मी पितामहांच्या रथाजवळ नेऊन भिडवितों.' असें ह्मणून श्रीकृष्णानें तो जगविख्यात रथ भीष्मांच्या रथाजवळ नेऊन भिडविला. ज्यावर पुष्कळ निशाणें फडकत असून त्या उभारलेल्या निशाणांवर उग्र व मोठा शब्द करणारा वानर होता, ज्याला बगळ्याच्या रंगाचे घोडे जोडले होते व ज्याचा घडघडाट मेघगर्जनेप्रमाणें होत होता, अशा त्या मोठ्या दैदीप्यमान रथांत बसून शूर कौरवसेनेचा चुराडा उडवीत आपल्या सुहृदांचा आनंद वाढवीत तो एकदम भीष्मांजवळ येऊन थडकला. त्याला येऊन भिडतांना पाहून सैंधव व पूर्वेकडील सौवीर व केकय यांना बरोबर घेऊन भीष्मही एकदम त्याला तोंड देण्याला सरसावले. कारण भीष्म, द्रोण किंवा कर्ण यांवांचून अर्जुनाच्या पुढें जाण्याची छाती कोणाची होती? ते वेळीं महारथी भीष्मांनीं सत्याहत्तर नाराच बा-

णांनीं, द्रोणांनीं पंचवीस व कृपांनीं पन्नास बाणांनीं अर्जुनाला झांकून काढलें, व इतर वीरांनींही त्यावर बाणांचा वर्षाव केला. याप्रमाणें चोहोंकडून सर्वांचे तीक्ष्ण बाण लागत होते तरी पर्वताप्रमाणें तो मुळीं डगला नाहीं; उलट तो त्या सर्व कौरववीरांवर अनेक बाण सोडीतच होता. सात्यकि, विराट, धृष्टद्युम्न, द्रौपदीचे मुलगे व अभिमन्यु अर्जुनाच्या भोंवतीं होते. नंतर धृष्टद्युम्न सोमकांसह भीष्मांचें प्रिय करण्यामध्यें गढलेल्या महाधनुर्धरी द्रोणांवर चालून गेला. भीष्मांनीं ऐशीं तीक्ष्ण बाण सोडून अर्जुनाला घायाळ केलें असतां सर्व कौरवांनीं मिळून आनंदानें मोठी आरोळी दिली; तेव्हां प्रतापशाली अर्जुन कौरव रथ्यांच्यामध्यें घुसून मोठमोठ्या रथ्यांवर आपल्या धनुष्यानें नेम धरीत कौरवसैन्यामध्यें क्रीडा करीत राहिला. तेव्हां त्या रणामध्यें अर्जुनानें आपल्या सैन्याला बेजार केलेलें पाहून दुर्योधन भीष्मांकडे येऊन ह्मणाला, 'तात, हा कृष्णासह बलशाली अर्जुन मोठ्या नेटानें लढत असून माझ्या सर्व सैन्याचें आपण व द्रोण जिवंत असून मूळ खणून काढीत आहे. आपल्यामुळें कर्णानें शस्त्र खालीं ठेवून माझ्या हितामध्यें तो नेहमीं दक्ष असूनही आज तो अर्जुनाबरोबर युद्ध करीत नाहीं. तेव्हां अर्जुन मरेल अशी कांहीं तरी खटपट करा.' हें दुर्योधनाचें भाषण ऐकून देवव्रत भीष्म क्षात्र धर्माला धिःकार असो असें ह्मणून अर्जुनावर चालून गेले. ज्या दोघांच्याही रथांचे घोडे पांढरे होते असे हे दोघे वीर एकमेकांशीं भिडले असतां राजांनीं मोठ्यानें सिंहनाद करून आपापले शंख फुंकले. अश्वत्थामा, दुर्योधन व विकर्ण भीष्मांच्या भोंवतीं युद्धाला तयार होऊन राहिले. त्याचप्रमाणें सर्व पांडव अर्जुनाच्या भोंवतीं तयार होऊन उभे होते, व दोघांची चकमक सुरू झाली ते वेळीं अर्जुनानें चांगल्या नेमानें सोडलेल्या हजारों बाणांनीं भीष्मांना चोहोंकडून कोंडून टाकलें. भीष्मांनींही अनेक बाण सोडून त्यांचा प्रतिकार केला. युद्धानें फुरफुरलेले हे दोघे उत्साहवान वीर तोडीला तोड देऊन सारखें युद्ध करीत होते. भीष्मांच्या धनुष्यापासून सुटलेल्या बाणांचा एकेकड्यानें अर्जुनाच्या बाणांनीं मोडून तुकडे होत होते, त्याचप्रमाणें अर्जुनानें सोडलेले बाण भीष्मबाणांनीं मोडून जमिनीवर येत होते. एकमेकांच्या रथाचे घोडे, इसाड व चाकें यांवर बाण मारीत ते क्रीडा करीत राहिले. तेव्हां भीष्म खवळून जाऊन त्यांनीं श्रीकृष्णाच्या छातीवर तीन बाण मारले. त्यांनीं जखम झाली असतां भगवान फुललेल्या पळसाप्रमाणें शोभत होता. याप्रमाणें श्रीकृष्णाला बाण लागलेले पाहून अर्जुनानें संतापानें तीक्ष्ण बाणांनीं भीष्मांच्या सारथ्याला जखमी केलें. ते दोघे एकमेकाला मारण्याला अगदीं झटापट खात होते तरी त्यांचा एकमेकांवर कांहीं नेम चालेना. सारथ्याच्या हुशारीमुळें व चलाखीच्या योगानें तें नानाविध मंडळें करून एकमेकांवर तुटून पडून व मागें हटून परस्परांवर घाव कसे द्यावे हें ठरवीत होते; व याप्रमाणें संधीची वाट पहात उभे असतांना ते वरचेवर सिंहनाद करून शंख फुंकित होते, आणि तसेंच धनुष्याचा टणत्कार करीत होते. त्यांच्या त्या शंखांच्या शब्दांनीं व रथांच्या घरघरण्यानें भूमि दणाणून फाटून कांपूं लागली. तो पराक्रम पाहून सर्व लोक अगदीं थक्क होऊन गेले. त्या दोघांमध्यें कमीअधिकपणा मुळींच दिसून येत नव्हता. मधून मधून दोघे अगदीं बाणांनीं झांकून गेलेले दिसत व फिरून एकदम दिसूं लागत. तेवेळीं त्या दोघांचा पराक्रम पाहून देव, गंधर्व, चारण व ऋषी आपसांत ह्मणूं लागले कीं, ह्या दोन खवळलेल्या वीरांना युद्धामध्यें कोणा देवादिकांनासुद्धां जिंकतां येणें शक्य नाहीं. हें अलौकिक युद्ध अगदीं थक्क करून सोडणारें आहे. रथाचे घोडे शाबूद राहून धनुष्यासह त्यांत बसून रणामध्यें बाणाचा वर्षाव करीत असतां भीष्मांचा पराभव बुद्धिशाली अर्जुनाच्या हातून कधींही होणें शक्य नाहीं. तसेंच देवांनासुद्धां दुर्धर्ष अर्जुनाचाही पराभव भीष्मांच्या हातून होणें नाहीं. जगाच्या शेवटपर्यंत हें युद्ध असेंच सारखें चालत राहणार! खवळले असतां सर्व चराचराचा नाश करण्यास समर्थ अशा भीष्मांच्या हातून पांडवांचा पराभव न व्हावा यावरून पराक्रमापेक्षां दैवच बलवत्तर समजलें पाहिजे.

---

## ९ भानुमानाचा वध. (६.५३–५५)

इकडे द्रोणांनीं तीक्ष्ण बाणांनीं धृष्टद्युम्नाला घायाळ केला; व धृष्टद्युम्नानेंही नव्वद तीक्ष्ण बाण मारून द्रोणांना घायाळ केलें. तेव्हां अगाध सामर्थ्यवान द्रोणांनीं फिरून त्या संतापलेल्या धृष्टद्युम्नाला बाणांनीं झांकून काढलें, व त्याचा प्राण घेण्याच्या इरायानें एक प्रतिकालदंडस्वरूपी घोर बाण हातांत घेतला. प्रत्यक्ष मृत्यूसारखा तो बाण येत असतां त्याला कापून काढून त्यानें द्रोणांवर बाणांचा वर्षाव चालविला. शिवाय त्या पराक्रमी वीरानें द्रोणांना मारण्यासाठीं सोन्यानें व वैडूर्य मण्यांनीं शृंगारलेली मोठी वेगवान शक्ति त्यांवर सोडली. द्रोणांनीं सहज हांसत हांसत तिचे तीन तुकडे उडवून दिले. शक्तीची याप्रमाणें वाट लागलेली पाहून प्रतापी धृष्टद्युम्नानें फिरून बाणांचा मारा सुरू केला असतां महायशस्वी द्रोणांनीं त्यांना अटकावून धृष्टद्युम्नाचें धनुष्य मधोमध कापून काढलें. नंतर पर्वतासारखी कणखर गदा त्या बलशाली धृष्टद्युम्नानें द्रोणांवर फेंकली. द्रोणांनीं मोठा पराक्रम करून मोठ्या चलाखीनें ती सोन्यानें शृंगारलेली गदा परतवून त्यावर फिरून बाणांचा वर्षाव सुरू केला; एका भल्ल बाणानें त्याच्या सारथ्याला रथाखालीं आणलें; आणि चार तीक्ष्ण बाणांनीं त्याच्या चार घोड्यांना खालीं पाडून मोठ्यानें सिंहनाद केला. याप्रमाणें सारथि मरून विरथ होऊन धनुष्यही मोडून गेल्यानें धृष्टद्युम्न शंभर चंद्र ज्यांवर काढले होते अशी एक मोठी लखलकीत ढाल व तलवार घेऊन द्रोणांना ठार करण्याच्या इरायानें मांसाच्या लालुचीनें सिंहानें ज्याप्रमाणें एखाद्या मस्त हत्तीवर चालून जावें त्याप्रमाणें मोठ्या वेगानें द्रोणांवर तो चालून गेला. द्रोणाचार्यांनीं बाणांच्या वर्षावानें त्याला थोपविल्यामुळें आपल्या ढालीनें तो त्या बाणांच्या माऱ्याला मात्र प्रतिबंध करीत होता. इतक्यांत त्याला साहाय्य करणारा बलशाली भीम एकदम त्याठिकाणीं चालून आला, व त्यानें द्रोणांवर तीक्ष्ण बाण सोडून धृष्टद्युम्नाला आपल्या रथावर घेतलें. तेवेळीं कलिंग देशचा राजा भानुमान याला आपल्या मोठ्या सैन्यानिशीं द्रोणांच्या साहाय्याला जाण्यासाठीं दुर्योधनानें आज्ञा केली. त्यावरून तो भीमावर एकदम चालून गेला.

इकडे द्रोणही धृष्टद्युम्नाला सोडून विराट व द्रुपद यांना अडविण्याला त्यांकडे गेले; व धृष्टद्युम्न धर्मराजाकडे निघून आला. नंतर भानुमान व भीम यांमध्यें अंगावर कांटा उभा करण्यासारखें, सर्व जगाचा क्षय उडविणारें निकराचें युद्ध झालें.

भानुमान दुर्योधनाच्या आज्ञेनें आपल्या मोठ्या सैन्यानिशीं भीमावर चालून आला. भीमसेनेंही चेदिदेशाच्या लोकांसह त्या कलिंगसेनेवर तुटून पडला. इकडे श्रुतायु मोठ्या त्वेषानें भीमावर चालून आला. हजारों रथी, दहा हजार हत्तीदळ व निषादांसह केतुमान यांनिशीं कलिंगराजानें भीमसेनाला चोहोंकडून वेढून घेतलें. ते वेळीं भीमसेनाच्या मागून असणारे चेदि, मत्स्य, करूष हे निषादावर धांवून गेले. नंतर मोठें भयंकर हातघाईचें युद्ध सुरू झालें. गरजणाऱ्या समुद्राप्रमाणें त्या सैन्यांमधून शब्द निघत होता. एकमेकांचा फडशा पाडीत असणाऱ्या वीरांनीं सर्व पृथ्वी रक्तमांसांनीं भरून टाकली. मारण्याला उत्सुक झालेल्या वीरांना आपपर ओळखूं येत नसल्यानें कोणाला हार न जाणारे असे ते लढवय्ये आपल्या बाजूच्या लोकांनाच आपण मारीत होते, आणि कलिंग व निषाद यांची व चेदींच्या लहान मोठ्या तुकड्यांची एकच गर्दी उडून गेली. चेदींनीं आपल्या शक्त्यनुसार पराक्रम गाजविल्यावर ते भीमसेनाला सोडून परतले असतां सर्व कलिंगांबरोबर एकटा भीमसेन आपल्या मनगटाच्या जोरावर टक्कर देत होता. कलिंगराज भानुमान व त्याचा महारथ मुलगा शक्रदेव यांनीं भीमावर पुष्कळ बाण मारले. भीमसेन एकटा आपल्या मनगटाच्या जोरावर आपलें श्रेष्ठ धनुष्य फिरवीत कलिंगांशीं युद्ध करीत असतां शक्रदेवानें बाणांनीं भीमसेनाचे घोडे मारून टाकले, व भीम विरथ झाला असतां त्यावर तुटून पडून तीक्ष्ण बाणांनीं त्याला झांकून काढलें. भीमसेनानें आपली कठिण पोलादी गदा शक्रदेवावर सोडली. त्यानें तो मरून आपल्या सारथ्यासह रथांतून खालीं जमिनीवर पडला. आपला मुलगा मेलेला पाहून भानुमानानें आपल्या हजारों रथ्यांनीं सर्व दिशा अटकाविल्या. तेव्हां भीमानें भयंकर कृत्य करण्याच्या हेतूनें पाणिदार तलवार व अप्रतिम अर्धचंद्र व तारे

यांनीं मढविलेली सोन्याची ढाल हातीं घेतली. इकडे भानुमानानेंही संतापानें धनुष्याची प्रत्यंचा ओढून तिला एक सापाच्या विषाप्रमाणें तीक्ष्ण बाण लावून तो त्यानें भीमावर सोडला. त्या वेगानें येऊन पडणाऱ्या तीक्ष्ण बाणाचे भीमसेनानें आपल्या मोठ्या तलवारीनें दोन तुकडे केले. नंतर कलिंगराजानें खवळून जाऊन साणेवर घासलेले चवदा तोमर भीमावर सोडले. त्यांनाही आपल्या अप्रतिम तलवारीनें त्यानें आपल्याजवळ येऊं न देतां वरचेवरच मोडून टाकलें; आणि नंतर तो भानुमानावर तुटून पडला. तेव्हां भानुमानानें बाणांनीं त्याला झांकून काढून मोठ्यानें गर्जना केली ती भीमाला सहन न होतां तोही मोठ्यानें गरजला. त्यानें कलिंगराजाची सेना अगदीं गडबडून गेली. याप्रमाणें मोठ्यानें गर्जून तलवारीनिशीं त्याच्या हत्तीच्या दांतांना धरून चढून तो त्याच्या पाठीवर गेला. भानुमानानें त्यावर एक शक्ति सोडली. तिचे दोन तुकडे करून त्यानें आपल्या तलवारीनें भानुमानालाही छाटून टाकलें. नंतर त्यानें आपली ती मोठी वजनदार तलवार त्या हत्तीच्या मानेवर मारली. तेव्हां मान छाटली जाऊन तो नदीच्या वेगानें फोडून निघालेल्या पर्वताप्रमाणें मोठ्यानें चीं चीं करीत खालीं पडला. तेव्हां त्या हत्तीवरून एकदम खालीं उडी घेऊन अगदीं न गडबडतां हातांत तलवार घेऊन तो खालीं दंड थोपटून उभा राहिला, व हत्तींना मारून पाडून अनेक ठिकाणीं वाट काढीत व जिकडे तिकडे स्वार, हत्तीदळ, रथी व पायदळ यांचा फडशा पाडीत रक्तानें भरलेला असा तो फिरत असतां तो श्रेष्ठ नरवीर गरगर फिरणाऱ्या अग्निचक्राप्रमाणें दिसत होता. कांहीं हत्तींचे दांत,कांहींच्या सोंडेचे शेवट छाटले गेल्यामुळें व कांहींचीं गंडस्थळें फोडून काढल्यामुळें व त्यांवरील योद्धे नाहींसे झाल्यामुळें ते हत्ती आपल्या स्वतःच्याच सैन्याचा फडशा पाडीत जमिनीवर मोठ्यानें चीं चीं करीत पडत होते; व हे पडत असतां त्यांच्याबरोबरच मोडलेले तोमर, माहुतांचीं मुंडकीं,चित्रविचित्रित झूल, सोन्यासारखे लखलखित कंबरबंद हत्तींच्या मानेवरचे पट्टे, शक्ती, निशाणें, मुद्गल, बंदुका तोफा वगैरे, निरनिराळ्या प्रकारचीं धनुष्यें, पांढरेशुभ्र जंबिये, बरच्या, अंकुश, निरनिराळ्या प्रकारच्या घांटा, सोन्याच्या मुठी व माहुत हीं सर्वच खालीं येतांना दिसत होतीं. याप्रमाणें मोठमोठ्या हत्तींचा चेंदा उडवून त्यानें दुसऱ्या दळांचा ज़ुराडा उडविण्यास सुरवात केली व चांगल्या चांगल्या स्वारांना घोड्यांवरून खालीं आणलें. त्या भयंकर चकमकीमध्यें त्यानें घोड्यांचे लगाम, काढण्या, तंग, खोगीर, विटा, चांगल्या चांगल्या कव्यारी, चिलखतें, चित्रविचित्रित ढाली व सरंजाम जिकडे तिकडे जमिनीवर पसरून टाकलीं होतीं. कांहीं रथांवर उडी घेऊन त्यांतील रथ्यांना खेंचून त्यांना त्यांच्या निशाणांसकट तो छाटून टाकीत होता, कांहींना पायानें चेंगरून टाकीत होता, कांहींना ख़ालीं खेंचून चिरडीत होता, कांहींना तलवारीनें छाटीत होता, कांहींना आपल्या गरजण्यानें गर्भगळित करून सोडीत होता, कांहींना तर तो आपल्या मांड्यांच्या तडाख्यानें खालीं पाडीत होता, व कांहीं याला पाहून भयानेंच प्राण सोडीत होते. याप्रमाणें ती अफाट चलाख कलिंगसेना भीष्मांभोंवतीं जमून भीमावर चालून जात होती. तिच्या आघाडीला श्रुतायूला पाहून भीमसेन त्यावर चालून गेला. श्रुतायूनें त्याच्या छातीवर बाणांचा मारा केला. ते बाण लागून बरचीनें टोंचलेल्या हत्तीप्रमाणें अस्वस्थ होऊन पेटविलेल्या अग्नीप्रमाणें भीम संतापून गेला. नंतर भीमाचा सारथी अशोक यानें सोन्यानें मढविलेला रथ आणून त्यावर भीमाला घेतलें; व संतापानें धनुष्य ओढून त्या अलौलिक धनुष्यापासून सोडलेल्या नऊ तीक्ष्ण बाणांनीं त्यानें श्रुतायूला ठार करून दोन क्षुर बाणांनीं त्याच्या सत्वदेव व सत्य या दोन चक्ररक्षकांनाही यमाच्या घरची वाट दाखविली. नंतर त्या धीट वीरानें तीन नाराच बाणांनीं केतुमानाचीही तीच वाट लाविली. तेव्हां कलिंगसैन्य सज्ज होऊन पुष्कळ सैन्यानिशीं त्यानें भीमाला गराडून शक्ति, गदा, तलवार, तोमर, कव्यार, परशु यांचा त्यांनीं त्यावर भडिमार सुरू केला. त्या भडिमाराचा प्रतिकार करून आपली गदा घेऊन जोरानें त्यांवर हल्ला करून भीमानें दोन हजार सातशें वीरांना यमसदनास पाठविलें. याप्रमाणें तो कलिंग सैन्याचा फिरून फिरून फडशा पाडीत असतां, त्या महारथ्याला पाहून

वरील माहुत मरून पडलेले असे हत्ती बाणांनीं घायाळ होऊन वाऱ्यानें विस्कळलेल्या ढगांप्रमाणें आपल्याच सैन्यामधून लोकांना तुडवीत पळत सुटले. तेव्हां हातांत तलवार घेतलेल्या बलशाली भीमानें आपला मोठा शब्द देणारा शंख फुंकला. त्यानें सर्व कलिंगसैन्याच्या मनाला चळकांप उत्पन्न करून त्यांना अगदीं गांगरवून सोडलें. इकडे धृष्टद्युम्नानें समाकुल झालेल्या आपल्या सेनेला नेटानें युद्ध करण्याला इशारत दिली; व निवडक लोकांनिशीं धृष्टद्युम्नानें भीमसेनाची पिछाडी संभाळली; कारण ह्याला भीम व सात्यकि यांशिवाय प्राणाहून प्रिय असा दुसरा कोणीच नव्हता. ह्या दोघांनीं सात्यकीला दुरून पाहून मोठ्या जोरानें युद्ध चालविलें; व सात्यकीही मोठ्या वेगानें त्यांच्या मागें जाऊन उभा राहिला, आणि उग्र रूप धरून हातांत धनुष्य घेऊन घोर कर्म करीत तो कलिंगाचा समाचार घेऊं लागला. भीमसेनाला असा पाहून 'भीमरूपानें हा काळच कलिंगाबरोबर लढत आहे,' असें कौरवपक्षीय बोलूं लागले. तेव्हां रणामध्यें तो गोंगाट ऐकून सैन्य व्यवस्थितपणें आपल्याबरोबर घेऊन भीष्म एकदम त्या ठिकाणीं आले. सात्यकि, भीमसेन व धृष्टद्युम्न भीष्मांच्या त्या सुवर्णमंडित रथावर तुटून गेले; व भीष्मांना एकदम रणामध्यें घेरून त्यांनीं त्यांवर बाणवर्षाव केला. भीष्मांनीं उलट बाण त्यांवर मारले. सत्यकीनेंही भीमाचें साहाय्य करण्याकरितां भीष्मांच्या सारथ्याला एकदम मारून टाकलें. सारथी मरून घोडे उधळले असतां त्यांनीं भीष्मांना रणांगणामधून एकीकडे नेलें. याप्रमाणें त्यांना बाजूला नेलें असतां पेट घेतलेला वणवा ज्याप्रमाणें रान जाळीत सुटतो त्याप्रमाणें भीम कलिंग सैन्याचा फडशा पाडून आपल्या सैन्यामध्यें उभा राहिला असतां त्याच्यापुढें जाण्याला कांहीं कोणा कौरववीरांची छाती होईना. मत्स्य व पांचाल वीरांची वाहवा घेऊन धृष्टद्युम्नाला आलिंगन दिल्यावर तो सात्यकीकडे आला. सात्यकीनेंही कलिंगांचा असा एकट्यानें फडशा पाडल्याबद्दल त्याला शाबासकी देऊन रथाखालीं उडी घेऊन त्यानें त्याला घट्ट आलिंगन दिलें. नंतर फिरून आपल्या रथांत बसून त्यानें कौरवसैन्याचा फडशा पाडण्याचें काम सुरू केलें.

याप्रमाणें रथदळ, घोडेदळ व पायदळ यांचा मोठा संहार होऊन त्या दिवसाचा पूर्वभाग सरत आला असतां धृष्टद्युम्न अश्वत्थामा, शल्य व कृप या तीन महारथ्यांशीं भिडला, व त्यानें प्रथम दर्शनीं अश्वत्थाम्यांचे घोडे मारून टाकले. तेव्हां अश्वत्थाम्यांनीं एकदम शल्याच्या रथावर चढून धृष्टद्युम्नावर बाणांचा भडिमार सुरू केला. धृष्टद्युम्नाला अश्वत्थाम्यांशीं भिडलेला पाहून अभिमन्यु झटकन् तीक्ष्ण बाणांचा वर्षाव करीत त्या ठिकाणीं धांवून आला, व त्यानें शल्य, कृप व अश्वत्थामा यांवर बाणांचा मारा सुरू केला. शल्य प्रभृतींनीं उलट त्यांवर बाण सोडलें. इतक्यांत अभिमन्यूला याप्रमाणें भिडलेला पाहून दुर्योधनाचा मुलगा लक्ष्मण त्या ठिकाणीं आला. लक्ष्मण व अभिमन्यु यांचें निकराचें युद्ध सुरू झालें असतां मोठ्या चलाख अभिमन्यूनें लक्ष्मणाला बाणांनीं झांकून काढलें; तेव्हां लक्ष्मणानेंही बाणानें अभिमन्यूच्या धनुष्याचें मुठीनें धरण्याच्या ठिकाणीं आपल्या बाणानें दोन तुकडे केले. तेव्हां सैन्यामध्यें एकच मोठा कल्होळ उडाला, अभिमन्यूनें तें मोडकें धनुष्य टाकून देऊन दुसरें चित्रविचित्रित अधिक वेगवान धनुष्य हातांत घेतलें. ह्याप्रमाणें तोडीला तोड देत ते लढत असतां लक्ष्मणाला अभिमन्यूनें बेजार केलेला पाहून दुर्योधन त्या ठिकाणीं आपल्या रथदळानिशीं जाऊन त्यानें अभिमन्यूला घेरलें. इकडे अर्जुनही आपला मुलगा याप्रमाणें भिडलेला पाहून आपल्या मुलाचें संरक्षण करण्यासाठीं तिकडे धांवला. इकडे भीष्म, द्रोण प्रभृति मंडळीही रथदळ, हत्तीदळ बरोबर घेऊन अर्जुनावर चालून गेले. हत्ती, घोडे, पायदळ यांपासून एकदम उठलेली धूळ सूर्यमंडळाला जाऊन भिडल्यामुळें फारच दाट दिसत होती. हजारों हत्ती व शेंकडों घोडे अर्जुनाच्या बाणांच्या माऱ्यांत आले असतां पुढें कांहीं त्यांच्यानें चाल होईना. सर्व प्राणिमात्र मोठ्यानें ओरडूं लागले. दिशा धुंद होऊन कौरवांच्या अन्यायाचा भयंकर ठसा त्या ठिकाणीं दिसून येत होता. अर्जुनाच्या बाणांचा भडिमार चालला असतां आकाश, दिशा, भूमि किंवा सूर्य कांहीं ओळखूं येत नव्हतें, कांहीं रथी रथांसकट, कांहीं रथांला मुकून हत्यारांनिशीं, कांहीं स्वार

घोडे टाकून, कांहीं हत्तीवरचे हत्तींला टाकून अर्जुनाच्या भयानें जिकडेतिकडे धांवूं लागले. अर्जुनाच्या बाणांनीं रथ, घोडे यांपासून कांहीं खालीं आलेले, कांहीं येत असलेले दिसत होते. गदा, तलवार, विटा, भाते, बाण, धनुष्य, अंकुश, निशाणें वगैरे घेऊन तयार असलेल्या वीरांना उग्र रूप धरलेला अर्जुन तीक्ष्ण बानांनीं कापून काढीत होता. लखलखीत सोटे, मुद्गल, विटा, कट्यारी, गोफणी, तलवारी, परशु, तीक्ष्ण तोमर, फुटून पडलेलीं सोन्याचीं चिलखतें, निशाणें, ढाली, पिसें, सोन्याच्या मुठीचीं छत्रें, आकडे, अंकुश, चाबूक यांच्या त्या रणभूमीवर जिकडे तिकडे राशी पडलेल्या दिसत होत्या. अर्जुनाला तोंड देण्याला समर्थ असा एकही पुरुष तेथें दिसत नव्हता. जो जो म्हणून त्याच्या पुढें येत होता त्याला त्याला तो यमलोकाला पाठवीत होता. ते पळत असतां कृष्णार्जुनांनीं आपापले श्रेष्ठ शंख फुंकले. याप्रमाणें आपल्या सैन्याची दाणादाण झालेली पाहून भीष्म हांसत हांसत द्रोणांना म्हणाले, ' कृष्णासह या बलशाली अर्जुनानें जशी वाट लावावी तशीच आमच्या सैन्याची वाट लागली आहे. कालस्वरूपी याला रणांत जिंकतां येणें कांहीं शक्य नाहीं. तसेंच ह्या विस्कळलेल्या सैन्यालाही आतां परतविण्याचें काम मोठें कठीण आहे. एकानें पळ काढलेला पाहून दुसरा याप्रमाणें हे पळत सुटले आहेत. हा सूर्यही सर्व लोकांच्या डोळ्यांला जणूं झांपड टाकीत मावळत चालला आहे. तेव्हां आतां युद्ध बंद करावें हेंच बरें. दमून घाबरून गेलेले आपले योद्धे आतां कांहीं केल्यानें युद्धाला तयार होणार नाहींत, असें म्हणून संध्याकाळ झाली असल्यामुळें भीष्मांनीं सैन्य आवरून लढाई बंद केली.

---

## ९ तिसरा दिवस—श्रीकृष्णप्रतिज्ञेचा भंग. (६.५६–५९)

रात्र सरून उजाडल्यावर पितामह भीष्मांनीं दुर्योधनाला जय मिळवून देण्यासाठीं सैन्याला तयार राहण्याला आज्ञा देऊन गरुडव्यूह रचला. त्या गरुडव्यूहाच्या तोंडांत आपण स्वतः राहिले. डोळ्याच्या ठिकाणीं द्रोण व कृतवर्मा ह्यांना ठेवलें. यशस्वी अश्वत्थामा व कृप, त्रैगर्त, कैकेय व वाटधान यांनिशीं डोक्याच्या ठिकाणीं होते. मद्रक, सिंधु, सौवीर, पंचनद यांनिशीं भूरिश्रवा, शल्य, भगदत्त व जयद्रथ मानेच्या ठिकाणीं होते. आपल्या भावांसह व अनुयायांसह दुर्योधन पाठीवर होता. अवंतीचे विंदानुविंद, शकांसह कंबोजाधिपति, व शूरसेन हे लोक शेपटीला होते. मागध, कलिंग व दासेरण हे उजव्या पंखाला होते. कारूष, विकुंज, मुंड, कुंडीवृष हे बृहद्बलासह डाव्या पक्षाला होते. याप्रमाणें कौरव सैन्याची रचना झालेली पाहून अर्जुन व धृष्टद्युम्न यांनीं त्याच्या तोडीला उलट मोठी दारुण अर्धचंद्राकार व्यूहाची रचना केली. त्याच्या उजव्या कोराला नानाशस्त्रांनीं संपन्न अशा नानादेशच्या राजांनिशीं भीमसेन झळकत होता. त्याच्या मागूनच विराट, द्रुपद हे होते. त्यांच्या मागें नील, नीलाच्या मागें चेदि, काशि, करूष व पौरव यांसह धृष्टकेतु होता. पांचाल व प्रभद्रक यांसह धृष्टद्युम्न त्या अफाट सैन्याच्यामध्यें युद्धाला तयार होऊन उभा होता; व धर्मराजही त्याच ठिकाणीं आपल्या हत्तीदळासह होता. त्याच्या मागें सात्यकि, सात्यकीच्या मागें द्रौपदीचे पांच मुलगे, त्यांमागें अभिमन्यु व अभिमन्यूच्या मागें इरावान होते. त्याच्या मागें घटोत्कच व महारथ केकय योद्धे होते. त्यांच्या मागें डाव्या कोराला ज्याचें रक्षण करणारा भगवान श्रीकृष्ण होता असा जगाचें संरक्षण करणारा नरश्रेष्ठ अर्जुन होता. नंतर रथदळ व हत्तीदळ एकमेकांना भिडून युद्धाला सुरवात झाली. भयंकर काटाकाटी सुरू झाली असतां नौबतीच्या शब्दांत मिळून गेलेला एकच मोठा शब्द रणांतून निघाला. त्यावेळीं अतिरथी अर्जुनानें युगांतकालीन काळाप्रमाणें बाणांनीं रथदळाचा फडशा पाडण्यास सुरवात केली असतां धार्तराष्ट्रही अगदीं कटून त्याच्याशीं लढत होते. झगझगीत यशाची हाव धरून मरणावांचून परतावयाचें नाहीं अशा दृढनिश्चयानें पांडवसैन्याशीं भिडून त्याला ते ठिकठिकाणीं फोडीत होते. व्यूह फुटून पळणाऱ्या व परतणाऱ्या कौरव पांडवसैन्यांमध्यें कांहींच ओळखूं येत नव्हते. पृथ्वीवरून उठलेल्या धुळीनें सूर्याला झांकून काढलें. लोकांना दिशा उप-

दिशा कांहींच ओळखूं येत नव्हत्या. केवळअनुमानानें, खुणेंनीं, नांव किंवा गोत्र ऐकून लोक एकमेकांना मारीत होते. ठिकठिकाणीं युद्ध नेटानें सुरू होतें तरी द्रोणांनीं संभाळलेला तो कौरवांचा व्यूह कांहीं केल्यानें फुटेना. त्याचप्रमाणें अर्जुनानें रचलेला व भीमानें संभाळलेला पांडवांचा व्यूहही कांहीं केल्यानें फुटेना. दोन्ही सैन्यांतील लोक आपापल्या जागेपासून पुढें येऊन रथदळ व हत्तीदळ यांच्यांशीं भिडून युद्ध करीत होते. स्वार स्वारांना आपल्या लखलखीत कव्यारींनीं व विटांनीं मारून पाडीत होते. व रथी रथ्याला गांठून त्या वीर रणप्रसंगामध्यें आपल्या सोन्याच्या बाणांनीं मारून पाडीत होता. हत्तीवरचे योद्धे हत्तीवरच्या योद्धयांना मारून पाडीत होते. हत्तींच्या दांतांच्या टोकांनीं कांहींचीं पोटें फाडून निघाल्यामुळें ते रक्त ओकीत धापा टाकीत पडले होते. पायदळांतील लोक मोठ्या त्वेषानें व उत्साहानें गोफणींनीं व परशूंनीं पायदळांतील लोकांना मारून टाकीत होते. रथी गजयोध्याला, गजयोद्धा रथ्याला, स्वार रथ्याला व रथी स्वाराला, शिपाई रथ्याला, रथी शिपायाला याप्रमाणें त्या दोन्ही सैन्यांमध्यें वाटेल तो वाटेल त्याचा समाचार घेत सुटला होता. मोडून पाडलेले बाहुटे, धनुष्यें, तोमर, विटा, गदा, सोटे, कंपन, शक्ति, चित्रविचित्रित चिलखतें, कणप, अंकुश, लखलखीत तलवारी, सुवर्ण, टोकाचे बाण, झूल, गालिचे, मौल्यवान कांबळी फुलांच्या माळा यांनीं भूमि चित्रविचित्रित दिसत होती. मरून पडलेल्या मनुष्यांच्या, घोड्यांच्या व हत्तींच्या धडांनीं भरून गेल्यामुळें रक्तामांसांचा चिखल होऊन राहिलेल्या जमिनीवर जाण्याला रिघाव नव्हता. उडणारी धूळ रणभूमींतील रक्तानें दबून जात होती, व दिशा सर्व स्वच्छ झाल्या होत्या. जगताचा फडशा होत चालल्याची खूण दाखविणारीं असंख्य धडें रणांमधून उठत होतीं. याप्रमाणें भयंकर युद्ध चाललें असतां रथी जिकडे तिकडे धांवतांना दिसत होते. तेवेळीं भीष्म, द्रोण प्रभृति कोणाला युद्धांत हार न जाणारे सिंहतुल्य पराक्रमी वीर वरचेवर पांडवांच्या सैन्याच्या फळ्या फोडीत होते. इकडे भीमसेन, घटोत्कच प्रभृतिमंडळीही कौरवसैन्याची दाणादाण उडवून सोडीत होती. याप्रमाणें परस्परांना मारून रक्तानें माखून निघालेले वीर आकाशांतील ठळक ठळक ग्रहांप्रमाणें शोभत होते. तेवेळीं अर्जुनाला त्या रणामध्यें पाहून कौरववीर खवळून जाऊन त्यांनीं त्याला चोहोंकडून वेढून घेऊन हजारों बाण त्यावर सोडून त्याला अटकाविलें. लखलखीत व तीक्ष्ण शक्ति, गदा, वगैरे नानाप्रकारचीं शस्त्रें त्यांनीं त्याजवर सोडलीं. टोलधाडीप्रमाणें लागलेल्या त्या शस्त्रांच्या रांगेला अर्जुनानें चोहोंबाजूंनीं आपल्या बाणांनीं अटकाव केलेला पाहून देवगंधर्वादिकांच्या तोंडून शाबास, शाबास म्हणून धन्यवाद निघाले. सात्यकि व अभिमन्यु मोठ्या सैन्यानिशीं सौबल व गांधार वीरांवर चालून गेले. तेव्हां सौबलांनीं संतापानें नानाप्रकारच्या शस्त्रांनीं सात्यकीच्या रथाचे तिळाएवढे तुकडे उडवून दिले. तेवेळीं सात्यकि तो रथ सोडून एकदम अभिमन्यूच्या रथावर चढला; व याप्रमाणें एका रथामध्यें बसून त्या दोघांनीं सौबलसैन्याची वाताहत उडवून दिली. इकडे भीष्मद्रोणांनीं कंकपक्ष्याचीं पिसें लावलेल्या तीक्ष्ण बाणांनीं मोठ्या हुशारीनें धर्मराजाच्या तुकडीचा नाश चालविला. तेवेळीं धर्मराज व नकुलसहदेव सर्व सैन्य जमवून घेऊन द्रोणांवर चालून गेले, व त्या दोघांमध्यें तुंबळ युद्ध जुंपलें. इकडे भीम व घटोत्कच अचाट कृत्य करीत असतां दुर्योधनानें येऊन त्यांना प्रतिबंध केला. त्या ठिकाणीं घटोत्कचाचा पराक्रम तर विलक्षण दिसून येत होता. भीमसेनानें संतापानें त्या तापट दुर्योधनाच्या हृदयामध्यें एक पृषत्क बाण मारला. त्यानें विव्हळ होऊन दुर्योधन आपल्या रथामध्यें मटकन् बसला व त्याला भोंड आली. त्याला याप्रमाणें बेशुद्ध झालेला पाहून त्याच्या सारथ्यानें त्याला रणांतून एकीकडे नेलें, व त्याचें सैन्य विस्कळून त्याची दाणादाण उडाली. अशा प्रकारें तें पळत सुटलें असतां तीक्ष्ण बाणांचा भडिमार करीत भीम त्याच्या मागून चालला. इकडे धर्मराज भीष्मद्रोणांच्या देखत तीक्ष्ण बाणांनीं त्यांच्या सैन्याचा फडशा पाडीत होता. कौरव सैन्याची याप्रमाणें दाणादाण उडाली असतां भीष्मद्रोणांच्यानेंही त्याला थोपवितां येईना. याप्रमाणें हजारों रथ्यांची पळापळ उडाली असतां एकाच रथामध्यें बसलेले अभिमन्यु

व सात्यकि सौबलें सैन्याचा चोहोंकडून फडशा उडवीत होते. तेव्हां दुर्योधनानें मोठ्या मिनतवारीनें त्यांना परतविलें. तेव्हां दुसरेही आपल्याला इतरांपेक्षां कमीपणा येऊं नये ह्मणून लाजेनें जागच्या जागीं थबकले. याप्रमाणें ते परतले असतां दुर्योधन लगेच भीष्माकडे जाऊन ह्मणाला, 'पितामह, आपण त्याचप्रमाणें सर्व अस्त्रांमध्यें प्रवीण आचार्य, त्यांचे मुलगे अश्वत्थामे व महाधनुर्धारी कृप जिवंत असतां सैन्यानें याप्रमाणें पळ काढावा हें आपल्याला साजेसें नाहीं. आपण किंवा द्रोण प्रभृतींच्या पुढें पांडवांचा पदार्थ काय ? खचित त्यांच्यावर कृपा करण्याचा आपला विचार आहे ह्मणूनच सैन्याचा असा फडशा पडत असतां आपण त्यांची गय करतां. आपल्याला जर पांडवांशीं युद्ध करावयाचें नव्हतें तर तसें आपण मला युद्ध सुरू होण्याचे पूर्वींच सांगावयाचें होतें, ह्मणजे मीं तेव्हांच कर्णाशीं याचा विचार केला असता. आतां जर मला सोडावयाचा आपला विचार नसेल तर आपल्या शौर्याला साजेलसें युद्ध करा.' हें दुर्योधनाचें भाषण ऐकून हांसून रागानें डोळे लाल करून भीष्म त्याला ह्मणाले, 'दुर्योधना, खरा व तुझ्या हिताचा सल्ला मीं तुला पुष्कळ वेळां दिला. प्रत्यक्ष इंद्रासह देव आले तरी त्यांना पांडवांना जिंकतां येणार नाहीं. आतां माझ्या ह्मातान्याच्या हातून जेवढें कांहीं होणें शक्य आहे तेवढें आज मी करतों. आज मी एकटा पांडवांना त्यांच्या सैन्यासकट थोपवितों पहात रहा.' याप्रमाणें त्यांचें भाषण ऐकून कौरवांकडे शंखादि वाद्यांचा गजर सुरू झाला व तो ऐकून पांडवांकडेही शंख, नौबती वगैरे वाद्यें वाजूं लागलीं. दुपार उलटून सूर्य पश्चिमेकडे कलला असतां व पांडव जय मिळाल्यानें हर्षभरित होऊन राहिले असतां सर्व धर्माधर्माचा बारीक भेद जाणणारे पितामह मोठें सैन्य पाठीवर घेऊन वेगवान घोड्यांनिशीं पांडवांच्या सैन्यावर चालून आले. आणि दोन्ही पक्षांचे अंगावर कांटा उभा करण्यासारखें तुंबळ युद्ध सुरू झालें. दुभंगणाऱ्या पर्वताप्रमाणें धनुष्यांच्या हातावर चढविलेल्या कातड्यावर निघणाऱ्या फडफड शब्दानें सर्व रणभूमि भरून राहिली. 'थांब, हा उभा आहे, यावर बाण मार, मागें फीर, उभा रहा, हा उभा आहे, दे घाव,' असे शब्द जिकडे तिकडे ऐकूं येत होते. पर्वतावरून पडलेल्या धोंड्याप्रमाणें सोन्याचीं चिलखतें, किरीट, बाहुटे खालीं पडून त्यांचे शब्द होत होते. कापून टाकलेलीं शेंकडों हजारों मुंडकीं व हात जमिनीवर गडबडा लोळत होतीं. कांहीं नरवीर तर मुंडकीं उडून गेलीं असतांही हातांमध्यें धनुष्य व हत्यारें तशींच सज्ज धरून उभे असलेले दिसत होते. मोठमोठ्या हत्तींचीं धडें हेच जिच्यांतील भयंकर खडक आहेत अशी उत्तम उत्तम हत्ती, घोडे व नरवीर यांपासून निघून परलोकसमुद्राला जाऊन मिळणारी, रक्तमांसांनीं राड झालेली व गिधाडें व कोल्हीं यांना आनंद देणारी मोठ्या जोरानें वाहणारी रक्ताची नदी तेथून निघाली. मारून पाडलेल्या योद्ध्यांच्या योगानें त्याठिकाणीं रथ्यांना वाट मुळींच सांपडत नव्हती. कांहींना बाण लागून त्यांच्या योगानें त्यांचीं आंतडीं बाहेर पडत होतीं तरी न कचरतां मोठ्या ताठ्यानें ते शत्रूवर चालून जात होते. रणामध्यें घायाळ होऊन पडलेले कांहीं 'तात, भाऊ, सखे, बंधो, मित्रा, मामा, मला सोडून जाऊं नकोस,' ह्मणून ओरडत होते. 'चल, ये, असा भ्यालास कां, कोठें जाणार, हा पहा रणामध्यें दंड थोपटून उभा आहे, घाबरूं नकोस,' असें कांहीं ओरडत होते. अशा ह्या रणामध्यें नेहमीं धनुष्य ओढून तयार असलेले भीष्म विषारी सापांप्रमाणें लखलखीत बाण सर्व दिशांला एकसारखे सोडीत नेम धरून धरून पांडवांच्या रथ्यांना मारीत होते. जणूं काय नाचताहेत याप्रमाणें रथांमधून आलातचक्राप्रमाणें ते आपलें हस्तलाघव दाखवीत फिरत होते. याप्रमाणें मोठ्या चपलतेनें फिरत असतां ते एकटे पांडवांकडच्या लोकांना हजारोंप्रमाणें सर्व दिशांमध्यें दिसत होते. यांवर कांहीं पांडवांकडच्या लोकांची नजर ठरत नव्हती. मात्र त्यांचे बाण पांडव सैन्याचा फडशा पाडतांना दिसत होते. प्रतिपक्ष्यांचें सैन्य मोठें असल्यानें त्यांच्या हत्तींवर व घोड्यांवर मारलेल्या बाणांपैकीं ह्या चलाखीनें युद्ध करणाऱ्या भीष्मांचा एकही बाण फुकट जात नव्हता. वज्रानें ज्याप्रमाणें पर्वत फोडून काढावा त्याप्रमाणें एकाच चांगल्या अणीदार बाणानें ते हत्तीचें चिलखत फोडून काढीत होते, चिलखत चढवून हत्तीवर दोघे तिघे एकवटून बसले

असले तरी ते नाराच बाण नेमका सोडून त्यांना ठार करीत होते. जो जो ह्मणून त्यांच्या पुढें येई तो क्षणमात्रांत दिसेनासा होई. याप्रमाणें धर्मराजाच्या मोठ्या सैन्याचा त्यांनीं फडशा चालविला असतां त्याची अगदीं फुटाफूट होऊन गेली. प्रत्यक्ष श्रीकृष्ण, अर्जुन व शिखंडी हे किती झटपटले तरी त्यांना त्या सैन्याला परतविनां येईना. हत्ती, घोडे व लोक या सर्वांना बाण लागून निशाणें व रथांचे दांडे मोडून पडल्यानें पांडवसैन्यामध्यें हाहाकार उडून जाऊन तें अगदीं वेडें बनलें. बाप मुलाला व मुलगा बापाला मारीत दैवाच्या फेऱ्यांत सांपडलेले मित्र मित्रांना युद्धाला बोलावीत होते. पांडवांकडील कांहीं सैनिक तर चिलखतें काढून टाकून केस मोकळे सोडून दीन होऊन धांवतांना दिसत होते. याप्रमाणें सैन्याची धांवपळ उडालेली पाहून भगवान् श्रीकृष्ण रथ आवरून अर्जुनाला ह्मणाला, ' अर्जुना, आजपर्यंत ज्यासंबंधानें तूं उतावीळ झाला होतास ती वेळ ही येऊन ठेपली आहे. पूर्वी राजे एकत्र जमले असतां त्यांच्यासमक्ष तूं जें बोलला होतास कीं, मी भीष्म, द्रोण प्रमुख धृतराष्ट्राचे वीर मजबरोबर युद्धाला रणांत तयार होऊन उभे राहतील त्या सर्वांना त्यांच्या अनुयायांसह ठार करीन; तें आपलें बोलणें आतां खरें कर. अर्जुना, तुझ्या सैन्याची कशी दाणादाण उडून गेली आहे पहा. आ पसरून उभा असलेल्या अंतकाप्रमाणें भीष्मांना पाहून तें पळत सुटलें आहे. ' हें ऐकून अर्जुन ह्मणाला, ' कौरवसैन्यामध्यें शिरून भीष्मांकडे घोडे हाण. कोणाला हार न जाणाऱ्या वृद्ध पितामहांना आज मी मारतों. ' हें ऐकून श्रीकृष्णानें रथाचे रुप्यासारखे पांढरे शुभ्र घोडे सूर्याप्रमाणें झळकणारा भीष्मांचा रथ ज्या ठिकाणीं होता तिकडे हाकले. याप्रमाणें अर्जुनाला भीष्मांकडे वळलेला पाहून युधिष्ठिराचें तें अफाट सैन्य पुन्हां परतलें. तेव्हां भीष्मांनीं सिंहासारखी गर्जना करून अर्जुनाचा रथ बाणांनीं झांकून टाकला; व एका क्षणांत तो रथ, त्याचे घोडे किंवा सारथि कोणीच दिसेनासे झाले. याप्रमाणें घोडे भीष्मांच्या बाणांनीं भरून निघाले होते तरी हिंमतवान श्रीकृष्णानें न डगतां धैर्यानें ते पुढें हाकले. अर्जुनानें मेघाप्रमाणें नाद देणारें आपलें दिव्य धनुष्य घेऊन तीन बाणांनीं भीष्मांचें धनुष्य मोडून पाडलें. तेव्हां भीष्मांनीं तें मोडलेलें धनुष्य टाकून देऊन एका निमिषांत दुसरें धनुष्य घेऊन तें सज्ज करून त्याचा टणत्कार केला. अर्जुनानें तेंही त्यांचें धनुष्य मोडून टाकलें. तेव्हां त्याचें तें हस्तलाघव पाहून ' शाबास अर्जुना, हें अचाट कृत्य तूंच करावेंस. बाळा, मी फार खुष झालों आहें. चालूं दे माझ्याबरोबर युद्ध, ' अशी अर्जुनाची वाहवा करून दुसरें एक मोठें धनुष्य घेऊन त्यांनीं अर्जुनाच्या रथावर बाण सोडले. घोडे हाकण्यामध्यें श्रीकृष्णानें विलक्षण सामर्थ्य दाखविलें. भराभर मंडळाकार घोडे फिरवीत राहून त्यानें भीष्मांचे सर्व बाण निष्फळ करून सोडले. भीष्मांच्या बाणांनीं सर्व अंग भरून निघालेले ते दोन नरवीर शिंगांनीं ओरखडल्या निघालेल्या दोन खवळलेल्या खोंडांप्रमाणें शोभत होते. भीष्मांनीं अगदीं खवळून जाऊन हजारों बाण सोडून कृष्णार्जुनांच्या दिशा बंद करून टाकल्या, व वरचेवर मोठ्यानें हांसून बाण सोडीत त्यांनीं अर्जुनाला कांपावयाला लावून श्रीकृष्णाला तोंडांत बोटें घालावयाला लाविलें. तो भीष्मांचा पराक्रम, तो अर्जुनाचा पुळपुळीतपणा, तो भीष्मांनीं मध्यान्हकाळच्या सूर्याप्रमाणें दोन्ही सैन्यांमध्यें उभें राहून चालविलेला पांडवांच्या ठळक ठळक सैनिकांचा फडशा, हें सर्व पाहून श्रीकृष्णाला वाटलें कीं, आतां युधिष्ठिराचें सैन्य कांहीं बाकी रहात नाहीं. कारण हे भीष्म एक दिवसामध्यें सर्व देवदानवांचा फडशा पाडण्याला समर्थ आहेत. मग या पांडवांच्या सैन्याचें ते काय चालूं देणार? तेव्हां पांडवांसाठीं सज्ज होऊन आज मला भीष्मांना मारलें पाहिजे; पांडवांच्या डोक्यावरचें हें मोठें ओझें कमी केलें पाहिजे; कारण हा अर्जुन रणांत मरूं घातला आहे तरी भीष्मासंबंधाच्या त्याच्या पूज्यबुद्धीमुळें त्याला आपलें कर्तव्य कळेनासें झालें आहे. याप्रमाणें श्रीकृष्ण विचार करीत असतां भीष्मांनीं बाणांच्या वर्षावांनीं सर्व दिशा, आकाश व पृथ्वी झांकून काढली व रश्मिमान सूर्य सुद्धां दिसेनासा झाला. वारा जोरानें वाहूं लागून दिशा धुकट व क्षुब्ध दिसूं लागल्या. द्रोण, विकर्ण, जयद्रथप्रभृति भीष्मांच्या आज्ञेंत वागणारी मंडळी सैन्यानिशीं एकदम अर्जुनावर चालून गेली. याप्र-

माणें कृष्णार्जुनांना त्यांनीं आपल्या चतुरंग सैन्या-निशीं गराडलेलें पाहून त्या सैन्यावर एकदम चा-लून येऊन वृत्राला मारणाऱ्या इंद्राला ज्याप्रमाणें विष्णूंनीं साहाय्य केलें, त्याप्रमाणें सात्यकीनें अर्जु-नाला मदत केली. भीष्मांनीं सर्व योद्ध्यांना जर्जर केल्यामुळें हत्ती, घोडे, रथ व पायदळ यांची दाणादाण उडून त्यांना पळतांना पाहून ते म्हणाले, 'हे क्षत्रि-यांनो, तुह्मी पळतां कोठें? हा कांहीं पूर्वींच्या भल्या लोकांनीं सांगितलेला धर्म नव्हे. आपलें ब्रीद सोडूं नका. आपला वीरांचा धर्म पाळा.' याप्रमाणें एकं-दर स्थिति होऊन ठळक ठळक राजे सुद्धां पळतां-ना व सर्व कौरव आपल्यावर चालून येतांना पाहून सात्यकीची वाहवा करून श्रीकृष्ण त्याला ह्मणाला, 'जे पळताहेत त्यांना पळूं देत एवढेंच नव्हे तर जे उभे आहेत त्यांनासुद्धां वाटेल तर जाऊं देत. भीष्मांना तसेंच द्रोणांना आज मी रथांतून खालीं आणतों. मी खवळलों असतां कौरवांकडचा कोणी-ही रथी माझ्या तावडींतून सुटणार नाहीं. म्हणून आज हातामध्यें हें चाक घेऊन मी महाव्रत भी-ष्मांना ठार करतों. भीष्मद्रोणांना व सर्व कौरवपक्षी-यांना मारून पांडवांना संतोष देतों, व अजातश-त्रु धर्मराजाला आज राज्य मिळवून देऊन सुखी होतों.' असें ह्मणून वसुदेवपुत्र भगवान श्रीकृष्णानें वज्रासारखा ज्याचा प्रभाव व ज्याच्या कड्याला कांटे होते असें सूर्याप्रमाणें लखलखीत सुनाभ नांवाचें आपलें चक्र हातानें उचलून घोडे सोडून रथाखालीं उडी घेतली व तो महात्मा आपल्या पा-यांनीं भूमि दणाणून सोडीत मदानें डोळे फिरून जाऊन मोठ्या ताठ्यानें पुढें उभा असलेल्या मस्त हत्तीला मारण्याच्या इराद्यानें धांवून जाणाऱ्या सिंहा-प्रमाणें भीष्मांकडे झपाट्यानें चालला असतां हवेमध्यें उडणाऱ्या पिवळ्या पितांबराच्या योगानें ज्यामध्यें वीज लकाकत आहे अशा मेघाप्रमाणें चमकत हो-ता; व याचा हात हेंच ज्याचें देठ असें त्याचें सुद-र्शनचक्ररूपी कमल सकाळच्या सूर्याप्रमाणें कां-तिमान अशा भगवान नारायणाच्या नाभिकमला-पासून निघालेल्या अगदीं पहिल्या कमलाप्रमाणें शोभत होतें. याप्रमाणें रागानें चक्र घेऊन मोठ्यानें गरजतांना त्याला पाहून कौरवांचा फडशा पडणार असें वाटून सर्व लोकांनीं मोठ्यानें दुःखाचे उद्गार काढले. याप्रमाणें त्या भगवानाला हातामध्यें चक्र घेऊन येतांना पाहून भीष्म आपल्या गांडिवासारख्या मोठ्या धनुष्याचा टणत्कार करून न गांगरतां व न भितां त्या अतुल पराक्रमी भगवानाला ह्मणाले, 'हे जगाच्या आधारभूत देवेशा चल, ये. हे चक्र-पाणे, तुला नमस्कार असो. सर्वांना आश्रय देणा-ऱ्या परमेश्वरा, मला एकदम रथाखालीं आण. आ-ज तूं मला मारल्यानें माझें इहपरलोकीं कल्याणच होणार आहे. हे अंधक व वृष्णि यांच्या नाथा, तूं आज मजकडे आल्यानें माझा तिन्ही लोकांमध्यें बहुमान होणार आहे.' तेव्हां अर्जुनानें लगबगीनें रथाखालीं उडी घेऊन आपल्या भक्कम अशा लांब हातांनीं यदुश्रेष्ठ भगवानाचा हात धरला. तो आ-दिदेव श्रीकृष्ण याप्रमाणें त्याला धरलें असतां रागा-नें खवळून वावटळानें ज्याप्रमाणें एखाद्या मोठ्या झाडाला आपल्या बरोबर ओढून न्यावें त्याप्रमाणें त्याला आपल्या बरोबर फरपटत ओढून घेऊन चा-लला. परंतु अर्जुनानें जोरानें पाय रेलून झपाट्यानें भीष्मांकडे निघालेल्या भगवानाला मोठ्या मिनत-वारीनें दहाव्या पावलाला जोरानें खेचून धरलें. नंतर त्याला नमस्कार करून अर्जुन त्याला सप्रेम ह्मणाला, 'कृष्णा, राग आवर. पांडवांना गति तूंच आहेस. प्रतिज्ञा केलेलें काम मी शेवटास नेल्यावां-चून ठेवणार नाहीं हें मी तुला मुलांची व भावांची शपथ घेऊन सांगतों. तुझ्या आज्ञेनें मी खात्रीनें सर्व कौरवांचा शेवट लावीन.' याप्रमाणें ती त्याची प्रति-ज्ञा व शपथ मोठ्या संतुष्ट मनानें ऐकून कौरवश्रेष्ठ अर्जुनाचें प्रिय करण्यामध्यें दक्ष असा भगवान हा-तांतील चक्रानिशीं फिरून रथावर चढला, आणि फिरून हातामध्यें लगाम धरून त्यानें आप-ला पांचजन्य शंख घेऊन त्याच्या शब्दानें सर्व दि-शा दणाणून सोडल्या. तेव्हां कौरववीरांमध्यें ए-कच हाहाकार उडून गेला. आणि सर्व कौरवसै-न्यामध्यें एकदम मृदंग, ढोल, नफेरी, नौबती यांचे शब्द, रथांच्या चाकांचा घरघर आवाज व भयंकर सिंहनाद सुरू झाले. मेघाच्या गडाडण्यासारख्या गांडिवाच्या शब्दानें सर्व आकाश व दिशा भरून निघाल्या. अर्जुनाच्या धनुष्यापासून सुटलेल्या लखल-

खीत व दैदीप्यमान बाणांचा सुळसुळाट जिकडे तिकडे झाला होता. तेवेळीं दुर्योधन बाण उगारून भीष्म व भूरिश्रवा यांसह वाळलेल्या गवताचें रान जाळून फडशा पाडणाऱ्या धूमकेतूप्रमाणें त्यावर चालून गेला. तेव्हां भूरिश्रव्यानें भल्ल बाण, दुर्योधनानें उग्र तोमर, शल्यानें गदा व भीष्मांनीं शक्ति याप्रमाणें निरनिराळ्यांनीं निरनिराळीं शस्त्रें अर्जुनावर सोडलीं, परंतु अर्जुनानें त्या सर्वांना आपल्या बाणांनीं कापून काढलें, आणि अलौकिक सामर्थ्याचें तें चित्रविचित्रित गांडिव धनुष्य दोन्ही हातांनीं जोरानें ओढून सशास्त्र रीतीनें माहेंद्र अस्त्राचें अभिमंत्रण करून त्यानें तें आकाशामध्यें प्रगट केलें. त्या महाधनुर्धारी महात्म्यानें त्या उत्तम अस्त्राच्या योगानें अग्नीप्रमाणें लखलखीत बाणसमूहांनीं सर्व कौरवसैन्याचें निवारण केलें. आपल्या अणीदार बाणांनीं सर्व दिशा व उपदिशा भरून काढून अर्जुनानें आपल्या गांडिवाच्या शब्दानें त्यांचीं मनें अगदीं व्यग्र करून सोडली. तो गांडिवाचा शब्द ऐकून विराट प्रभृति हिंमतवान मंडळी तिकडे वळली. जिकडे जिकडे कौरवसैन्यामध्यें गांडिवाचा शब्द कानीं पडे तिकडे तिकडे कौरवसैन्य दबून जाऊन त्या शब्दाकडे पुढें सरसावण्याची कोणाला छाती होत नसे. तो भयंकर भडिमार चालला असतां चांगले चांगले योद्धे रथ, घोडे, सारथी यांसकट मरून पडत होते. तसेंच त्या घनघोर संग्रामामध्यें सोन्याचे झूल चढवून वर मोठमोठे बाहुटे उभारलेले हत्ती नाराचबाणांच्या माऱ्यानें घायाळ होऊन झूली सकट शरीराचा चेंदामेंदा उडून धडाधड प्राण सोडून खालीं पडत होते. तसेंच जलमय व मनुष्यांच्या चरबीनें फेसाळ अशी मोठी घोर नदी त्या रणामध्यें निर्माण झाली. जिचा प्रवाह मोठा आहे अशी ती नदी मेलेल्या हत्तीघोड्यांच्या शरीररूपी खडकानें अडखळत खळखळ वहात होती. नरवीरांच्या मज्जेपासून बाहेर पडलेल्या मांसानें ती राड होऊन गेली होती. असंख्य राक्षसमंडळी हींच तिच्या कांठीं झाडें होतीं. डोक्यांच्या कवट्यांवरील केस हे तिच्यावर तरंगणारें शेवाळें होतें. अनेक धडांच्या राशीरूपी वाळवंटांनीं तिचे हजारों प्रवाह झाले होते. मोडून पडलेल्या अनेक कवचरूपी लाटांनीं ती खळबळून गेली होती. मनुष्य, घोडे, हत्ती यांच्या हाडांचे तुकडे हीच तिच्यामधील वाळू होती. कुत्रे, कंक, अस्वल, गिधाडें, कावळे, मांसाहारी राक्षस, तरस यांनीं जिचा कांठ भरून निघाला आहे अशी ती भयंकर नदी मोठ्या वैतरणीसारखी लोकांना दिसूं पडली. याप्रमाणें अर्जुनानें कौरवसैन्यांतील ठळक ठळक योध्यांचा फडशा पाडल्यावर चेदि, पांचाल प्रभृति वीरांनीं मोठी जयाची आरोळी दिली. तिच्यायोगानें सर्व कौरव योद्धे गांगरून गेले. तसेंच कृष्णार्जुनांनीं हर्षयुक्त मोठी आरोळी दिली. इतक्यांत तें घोर ऐंद्रास्त्र आकाशामध्यें पसरून शस्त्रांनीं वीरांच्या अंगाला पुष्कळ जखमा झाल्या; त्याचप्रमाणें सूर्यनारायण आपलीं किरणें आखडून घेऊन लाल गोळ्यासारखा रक्तवर्ण झाल्यामुळें संध्याकाळ होऊन तांबूडें पडून रात्र पडत चालली. यामुळें भीष्म प्रभृति कौरव तळाकडे परतले. इकडे अर्जुनही शत्रूंना जिंकून, कीर्ति व यश मिळवून त्या दिवसाचें काम शेवटास नेऊन रात्र पडल्यामुळें आपल्या पक्षाकडील वीरांसह गोटाकडे निघाला. इकडे कौरवांकडील सैनिक त्याच्या त्या अचाट कृत्याची स्तुति करीत हजारों मशाली व झळझळीत जळणारे दिवे यांनीं लखलखीत केलेल्या आपापल्या गोटांकडे गेले.

---

## १० चवथा दिवस–सायंतनीचा वध. ( ६. ६०–६४ )

रात्र सरून उजाडल्यावर भीष्म अगदीं खवळून सर्व सैन्यानिशीं फिरून शत्रूवर चालून निघाले. त्यांची सेना अर्जुनावर चालून जात असतां तिचा वेग मोठ्या नदीप्रमाणें जोराचा होता. त्यामधील सैन्याची व्यवस्था व्याल नांवाच्या व्यूहामध्यें लाविली होती व तिच्या तुकड्यांमधून हत्ती, घोडे, पायदळ यांची रेलचेल होती. अशी ती मोठ्या मेघासारखी सेना पाहून नरश्रेष्ठ अर्जुन रथांत बसून आपल्या सैन्याच्या आघाडीला शत्रुसैन्याचा फडशा पाडण्यासाठीं त्यावर चालून निघाला. ते दिवशीं सकाळच्या वेळीं कौरवश्रेष्ठ धर्मराजानें ज्या प्रकारची व्यूहरचना केली होती तशा प्रकारची रचना कधीं झालेली कोणाच्या पाहण्यांत किंवा ऐकण्यांतही

आली नसेल. रणवाद्यांचा गजर व शस्त्रास्त्रांचा ध्वनि यानें आकाश भरून गेलें. आकाशाला जमिनीवरून उठलेल्या धुळीचा छत बसून तें अगदीं झांकून गेलें. अशा स्थितींत दोन्ही बाजूंचे वीर एकमेकांशीं भिडून रथी, सारथी, घोडे, रथ व बाहुटे यांनिशीं रथ्यांचा फडशा उडवीत होते; हत्ती हत्तीला, शिपाई शिपायाला मारून पाडीत होते. असंख्य सोन्याच्या तारांनीं विभूषित सूर्याप्रमाणें लखलखीत चिलखतें परशू, विटा, तलवारी यांनीं तुकडे तुकडे होऊन खालीं पडत होतीं. कांहीं रथ्यांचे हात हत्तींच्या सुळांनीं मोडून जाऊन ते आपल्या सारथ्यांसह खालीं येत होते तर कांहीं मोठे रथी हत्तीवरच्या योद्ध्यांनाही आपल्या बाणांनीं मारून पाडीत होते. याप्रमाणें चतुरंग सैन्याचा मोठा संहार चालला असतां मोठमोठ्या महारथांच्या घोळक्यासह भीष्म मोठ्या वेगवान रथामध्यें बसून मोठमोठ्या अस्त्रांचा प्रभाव ज्यांचे ठिकाणीं आहे अशा बाणांनीं इंद्र धनुष्याप्रमाणें झळकणाऱ्या अर्जुनावर द्रोण प्रभृति मंडळीसह धांवून गेले. इकडे भीष्मही अर्जुनावर चालून गेले. त्यांनीं सोडलेल्या मोठमोठ्या अस्त्रसमूहांचा अचाट पराक्रमी अर्जुनानें विपाठ बाणांनीं फन्ना उडवून त्या धनुर्धरांमध्यें श्रेष्ठ भीष्मांवर भल्ल बाणांचा वर्षाव केला. तसेंच सूर्यानें अंधाराचा फडशा पाडावा त्याप्रमाणें भीष्मांनीं आपल्या मोठमोठ्या अस्त्रांनीं ते सर्व छाटून काढले.

इकडे याप्रमाणें यांचें युद्ध चाललें असतां अश्वत्थामा, भूरिश्रवा, शल्य, चित्रसेन व सांयमिनि शलपुत्र यांनीं अभिमन्यूला घेरलें. पांच हत्तींशीं भिडलेल्या सिंहाच्या बच्चाप्रमाणें ह्या पांच महातेजांशीं भिडलेला तो एकटा दिसत होता. दूरचा नेम मारण्यामध्यें, शौर्यामध्यें, पराक्रमामध्यें, अस्त्रज्ञानामध्यें, व हस्तलाघवामध्यें त्याच्या तोडीचा कोणी दिसत नव्हता. आपल्या मुलाला याप्रमाणें भिडून पराक्रम गाजवितांना पाहून अर्जुनानें सिंहनाद केला. तो शत्रूंशीं भिडून युद्ध करीत असतां मोठ्या चलाखीनें फिरणारें त्याचें मोठें धनुष्य सूर्याप्रमाणें चमकत होतें. एका बाणानें अश्वत्थाम्यांना व पांचांनीं शल्याला जखमी करून आठ बाणांनीं त्यानें सांयमिनीचा ध्वज खालीं पाडला व सोमदत्तीनें सोडलेली सोन्याच्या दांडीची मोठ्या सापासारखी घोर शक्ति तीक्ष्ण बाणांनीं मागें हटविली. त्याचप्रमाणें शल्य सोडीत असलेल्या मोठ्या वेगवान बाणांचा प्रतिकार करून त्यानें त्याचे चार घोडे मारले. त्याच्या ह्या पराक्रमानें घाबरून गेलेल्या शल्य प्रभृति पांच वीरांचा त्याच्या पुढें टिकाव लागेना. तेव्हां दुर्योधनाच्या सांगण्यावरून त्रिगर्त, मद्र प्रभृति शत्रूला हार न जाणाऱ्या पंचवीस हजार शूर मंडळींनीं अर्जुन व अभिमन्यु यांना गराडा दिला. ह्याप्रमाणें ह्या दोन महारथी पितापुत्रांना घेरलेलें पाहून सेनापती धृष्टद्युम्न पुष्कळ चतुरंग दळ घेऊन त्वेषानें त्या कौरवसैन्यावर चालून आला. पांचाल कुलाचें नांव गाजविणाऱ्या त्या वीरानें अर्जुनावर चालून येणाऱ्या कृपांच्या खांद्याच्या सांध्यावर तीन बाण मारले. नंतर दहा बाणांनीं दहा मद्रकांना मारून त्यानें कृतवर्म्याचा पृष्ठरक्षक एका भल्ल बाणानें मारून टाकला. नंतर महात्म्या पौरवाचा वारस जो दमन त्याला लखलखीत टोंकाच्या एका नाराच बाणानें ठार केलें. तेव्हां सांयमिनीच्या मुलानें धृष्टद्युम्नावर तीस बाण सोडून दहा बाणांनीं त्याच्या सारथ्याला जखमी केलें. याप्रमाणें त्याचे बाण लागले असतां जिभेनें ओठ चाटून धृष्टद्युम्नानें फार तीक्ष्ण अशा भल्ल बाणानें त्याचें धनुष्य मोडून टाकलें, व त्यावर पंचवीस बाण सोडून त्याचे घोडे व दोन पृष्ठरक्षक मारून टाकले. ह्या सांयमिनीच्या मुलानें धृष्टद्युम्नाच्या मुलाला रथामध्यें पाहून हातामध्यें एक उत्तम पोलादी तलवार घेऊन पायानेंच तो त्यावर चालून गेला. त्याला काळाप्रमाणें आपल्याकडे जोरानें धांवून येतांना पाहून धृष्टद्युम्नाच्या मुलानें त्याच्यावर गदा फेंकली. त्यानें तो मरून खालीं पडला व त्याच्या हातांतील तलवार व चिलखत हींही मोडून खालीं पडलीं. कौरव सैन्यामध्यें त्याच्या मरणानें हाहाकार उडून राहिला. तेव्हां सांयमिनि आपल्या मुलाला मारलेलें पाहून धृष्टद्युम्नावर जोरानें चालून गेला, व मस्त हत्तीला ज्याप्रमाणें अंकुशानें टोचावें त्याप्रमाणें त्यानें तीन बाण मारले त्याचप्रमाणें रणभूमीला शोभा आणणाऱ्या शल्यानें संतापून त्याच्या छातीवर प्रहार केला तेव्हां निकराचें युद्ध सुरू झालें.

शल्यानें धृष्टद्युम्नाला नऊ बाण सोडून पीडिलें

असतां धृष्टद्युम्नानानें लोहमय बाणांनीं त्याचें निवारण केलें. क्षणभर दोघांमध्यें कांहीं कमजास्तपणा न दिसतां सारखें युद्ध चाललें होतें. पण इतक्यांत एका पिवळ्या तीक्ष्ण भल्ल बाणानें शल्यानें धृष्टद्युम्नाचें धनुष्य कापून काढून बाणांच्या वर्षावानें त्याला झांकून काढलें. याप्रमाणें शल्यानें धृष्टद्युम्नाला पीडा दिली असतां अभिमन्यु त्यावर धांवून गेला, आणि त्यानें आर्तायनीवर बाण मारले. तेव्हां त्याला आळा घालण्यासाठीं दुर्योधन प्रभृति दहा कौरवमंडळी शल्याभोंवतीं जमून त्याचें रक्षण करूं लागली. तेव्हां भीम, नकुल सहदेव, पांच द्रौपदीचे मुलगे, अभिमन्यु व धृष्टद्युम्न हे दहा वीर नानाप्रकारचीं शस्त्रें सोडून परस्परांना मारण्याला आतुर होत्साते मोठ्या उत्साहानें त्यावर चालून गेले. ते वेळीं भीमसेनानें दुर्योधनाला पाहून भांडणाचा एकदांचा शेवट लावण्याच्या इरायानें आपली गदा हातामध्यें घेतली. शिखरयुक्त अशा कैलास पर्वताप्रमाणें त्याला हातांत गदा घेऊन तयार झालेला पाहून सर्व धृतराष्ट्राचे मुलगे भयानें पळूं लागले. दुर्योधन मात्र दहा हजार हत्तीदळानिशीं मगध राजाला पुढें करून भीमावर चालून निघाला. त्या हत्तीदळाला आपल्यावर चालून येतांना पाहून भीमसेनानें हातांत गदा घेऊन सिंहाप्रमाणें मोठ्यानें गर्जून रथांतून खालीं उडी घेतली. व आ पसरलेल्या काळाप्रमाणें तो त्यावर चालून गेला. तो आपल्या गदेनें हत्तींना मारीत फिरत असतां मन व अंतःकरण यांना कांपरें भरविणाऱ्या त्याच्या गरजण्यानें हत्ती एकत्र जुळून गडबडूं लागले. इकडे नकुल प्रभृति भीमाची पाठ राखणारी मंडळी हत्तींवर बाणांचा वर्षाव करीत तीक्ष्ण व पिवळ्या रंगाच्या क्षुरप्र, भल्ल व अंजलिक बाणांनीं त्यांवरील योद्ध्यांचीं मुंडकीं उडवून पाडीत होती. तीं मुंडकीं तुटून पडत असतां जणूं धोंड्यांचाच वर्षाव होत आहेसें दिसत होतें. इकडे मगध देशच्या राजानें आपला ऐरावतासारखा हत्ती अभिमन्यूच्या रथावर सोडला. त्याला आपल्यावर येतांना पाहून अभिमन्यूनें एका बाणानें त्याला मारून पाडला, व हत्ती मारल्यावर एका रुपेरी भल्ल बाणानें त्यानें मगध राजाचेंही मुंडकें उडवून दिलें. इकडे भीमसेनही त्या हत्तीदळाचा चुराडा उडवीत होता. वज्रानें पर्वतांप्रमाणें एका प्रहारासरशीं तो हत्तींना कोणाचे सुळे तर कोणाचीं गंडस्थळें, कोणाचीं हाडें तर कोणाच्या पाठी व कोणाचीं माकडहाडें मोडून मारून पाडीत होता. कांहीं चीं चीं करीत रणांतून पळत होते. कांहीं खचून खालीं पडत होते. कांहीं मलमूत्र टाकीत होते. कांहींच्या तोंडांतून फेंस निघत होता. कांहीं रक्त ओकत होते. कांहींचीं गंडस्थळें फुटलीं होतीं. कांहीं विव्हळ होऊन पर्वताप्रमाणें धाडकन् जमिनीवर पडत होते. रक्त, चरबी, मज्जा यांनीं लेपाडला जाऊन हातांत दंड घेतलेल्या अंतकाप्रमाणें भीम रणांतून फिरत होता. हत्तींच्या रक्तानें भरलेली गदा हातांत घेऊन चारी दिशेला हा युद्ध करीत फिरत असतां नर्तन करणाऱ्या शंकरासारखा भासत होता. याप्रमाणें गदेनें व बाणांनीं चोहोंकडून मारले जाणारे हत्ती आपल्याच सैन्याला तुडवीत पळत सुटले.

याप्रमाणें गजदळाचा फडशा पडलेला पाहून दुर्योधनानें भीमाला मारा ह्मणून आपल्या सैन्याला आज्ञा केली. त्याबरोबर सर्व दळें भयंकर गर्जना करीत भीमावर धांवून गेलीं. अपार महासागराप्रमाणें कोणालाही खवळवितां येण्याला अशक्य अशा त्या सेनेला वेलेप्रमाणें भीमानें थोपवून अमानुष कर्म करून दाखविलें. तो आपली लोहमय जड गदा घेऊन रथदळ, घोडेदळ तुडवीत चालला. कांहीं रथसमूहांना मनगटाच्या तर कांहींना मांड्यांच्या जोरानें ओढून नेत हत्तीनें ज्याप्रमाणें शरवनाचा फडशा पाडावा त्याप्रमाणें तो कौरवसैन्याचा फडशा उडवीत चालला. जिकडे तिकडे मरून पडलेले मनुष्य, हत्ती, घोडे यांच्या योगानें तें रणांगण मृत्यूच्या दरबाराप्रमाणेंच दिसत होतें. आ पसरलेल्या काळाप्रमाणें त्या अतुल पराक्रमी भीमाला हातांत मोठी गदा घेऊन याप्रमाणें अचाट कर्म करतांना पाहून भीष्म सूर्यासारख्या झळझळीत रथांत बसून बाणांच्या वर्षावानें त्याला झांकून काढीत एकदम त्या ठिकाणीं धांवून आले. त्यांना त्याप्रमाणें येतांना पाहून भीमही त्यांवर चालून गेला. त्याचक्षणीं शिनींमध्यें श्रेष्ठ सात्यकिही कौरवसैन्याला कांपवीत आपल्या भक्कम धनुष्यानें त्यांचा फडशा पाडीत भीष्मांवर चालून आला.

ते वेळीं सोमदत्तपुत्र भूरिश्रव्याखेरीज दुसरा कोणी-ही वीर तेथें गडबडला नाहीं असा दिसत नव्हता. तो मात्र आपल्या बाजूच्या रथ्यांची पीछेहाट होत चाललेली पाहून सात्यकीशीं दोन हात करण्याच्या इरायानें त्यावर चालून गेला; व अगदीं खवळून जाऊन त्यानें सात्यकीवर नऊ बाण सोडले. तेव्हां सात्यकीनेंही अणीदार बाण सोडून त्याचें निवारण केलें. ते वेळीं दुर्योधन आपल्या भावांनिशीं भूरिश्रव्याच्या भोंवतीं जमून मोठ्या हुशारीनें त्याचें रक्षण करीत होता. इकडे महातेजस्वी पांडवही त्या खवळलेल्या सात्यकीच्या भोंवतीं जमून त्याचें संरक्षण करीत होते. भीमसेनानें गदा उगारून हजारों रथ्यांनिशीं धृतराष्ट्राच्या मुलांना गराडलें असतां नंदक, दुर्योधनप्रभृति कौरवांनीं त्यावर बाणांचा भडिमार सुरू केला. तेव्हां महाबलशाली भीमानें दुर्योधनाला पुढें पाहून फार दिवसपर्यंत चिंतिलेला सुयोग आला आहे असें वाटून त्याला मारून टाकण्यासाठीं आपल्या सारथ्याला ज्या ठिकाणीं रथांच्या धावांच्या योगानें उठलेली धूळ अशोक झाडांच्या योगानें आकाशाला जाऊन भिडत होती त्या दुर्योधन असलेल्या ठिकाणीं आपला रथ नेण्यास सांगितलें. आणि त्यानें नंदकाच्या छातीवर तीन बाण मारले. दुर्योधनानेंही त्यावर सहा बाण सोडून तीन तीक्ष्ण बाणांनीं विशोकाला जखम केली, व तीक्ष्ण असे भल्ल बाण सोडून त्याचें धनुष्य त्यानें मोडून टाकलें. आपल्या सारथ्याला दुर्योधनानें जर्जर करून सोडलेलें पाहून भीमाला तें सहन न होऊन त्यानें खवळून एक दिव्य धनुष्य घेतलें; व दुर्योधनाचा प्राण घेण्यासाठीं त्याला एक पीस लावलेला क्षुरप्र बाण सोडून त्यानें त्याचें धनुष्य मोडून टाकलें. तेव्हां दुर्योधनानेंही रागानें दुसरें धनुष्य घेतलें व त्याला काळासारखा घोर बाण जोडून तो भीमाच्या छातीवर मारला. तो खोल जाऊन लागल्यामुळें त्यानें भीम रथामध्यें मट्कन् खालीं बसला व त्याला मूर्च्छा आली. त्याला याप्रमाणें पीडलेला पाहून अभिमन्युप्रभृति पांडवपक्षाकडील महाधनुर्धरांनीं दुर्योधनाच्या डोक्यावर प्रखर शस्त्रांचा वर्षाव केला. इतक्यांत भीमसेनही सावध होऊन त्यानें दुर्योधनावर बाणांचा मारा केला व पंचवीस बाण सोडून शल्याला रणांतून परतविलें. तेवेळीं सेनापति प्रभृति चौदा धृतराष्ट्राचे मुलगे डोळे लाल करून बाणांचा वर्षाव करीत भीमावर चालून येऊन एकदम त्या सर्वांनीं त्यावर मारा चालविला. त्यांवर जोरानें धांवून त्यांपैकीं बहुतेकांना भीमसेनानें यमसदनाची वाट दाखविली, तेव्हां बाकीच्यांनीं त्याच्या भयानें गर्भगळित होऊन चोहोंकडे पळ काढला. तेवेळीं भीष्मांनीं सर्व कौरवसैन्याला एकदम भीमावर चालून जाण्यास सांगितल्यावरून ते सर्व त्यावर तुटून पडले. आपल्या मदोन्मत्त हत्तीवर बसून भीमसेनावर तुटून पडतांपडतांच भगदत्तानें त्याला बाणांनीं झांकून काढलें, अभिमन्यु प्रभृति वीरांनीं त्यावर बाणांचा वर्षाव करीत त्याला चोहोंकडून घेरून घेतलें आणि त्याच्या हत्तीला त्यांनीं बाणांच्या वर्षावानें फोडून काढलें. तेवेळीं भगदत्तानें भीमसेनाच्या छातीवर बारीक टोंकाचा बाण मारल्यामुळें भीमाला मूर्च्छा येऊन त्यानें बाहुटयाच्या कांठीला धरलें. त्याबरोबर प्रतापशाली भगदत्तानें मोठ्यानें गर्जना केली. तेवेळीं भीमाची ती स्थिति झालेली पाहून घटोत्कच त्याच ठिकाणीं गुप्त झाला व भित्यांची भीति वाढविणारी भयंकर माया निर्माण करून एका अर्ध्या निमिषामध्यें भयंकर रूप घेऊन आपल्या मायेनेंच स्वतः निर्माण केलेल्या ऐरावण हत्तीवर बसलेला फिरून नजरेस पडला. अंजन, वामन व महातेजस्वी महापद्म ह्या तीन मोठ्या हत्तींवर राक्षस बसलेले दिसत होते. घटोत्कचानें भगदत्ताला त्याच्या हत्तीसकट ठार करण्याच्या इरायानें आपल्या हत्तीला चुचकारिलें, त्या बलशाली राक्षसांनीं चुचकारिल्यावरून चार चार दांतांचे दुसरे हत्तीही चारी दिशांनीं भगदत्ताच्या हत्तीवर जाऊन पडले व त्यांनीं आपल्या दांतांनीं त्याला अगदीं जेरीस आणिलें. ह्याप्रमाणें ह्या हत्तींनीं जर्जर करून बाण लागून पीडल्यामुळें त्या भगदत्ताच्या हत्तीनें विजेच्या कडकडण्याप्रमाणें मोठ्यानें किंकाळी फोडली. ती त्याची मोठी किंकाळी ऐकून भीष्म, द्रोण व दुर्योधन यांना ह्मणाले, 'ह्या महाधनुर्धारी भगदत्त घटोत्कचाबरोबर युद्ध करीत असून पेंचांत आलेला दिसतो. पांडवांच्या मोठ्या आनंदाच्या गर्जना ऐकूं येत आहेत. हत्तीही फार घाब-

रून किंकाळी फोडीत आहेसें दिसतें. भगदत्त आपल्या बाजूचा कट्टा अभिमानी असून कुलीन व शूर असा सेनापति आहे, तेव्हां त्याचें आपण रक्षण केलें पाहिजे.' हें ऐकून सर्व कौरवमहावीर भीष्मद्रोणांना पुढें करून भगदत्ताला बचावण्यासाठीं मोठ्या त्वरेनें तो होता तिकडे गेले. त्यांना येतांना पाहून पांडवांसह पांचाल युधिष्ठिराला पुढें करून त्यांच्या मागून गेले. त्या सैन्यांना येतांना पाहून विजेच्या कडाडण्याप्रमाणें घटोत्कचानें मोठ्यानें गर्जना केली. त्याची ती गर्जना व हत्तींची चाललेली झुंज पाहून भीष्म द्रोणांनां ह्मणाले, 'ह्या दुष्ट राक्षसाबरोबर आतां मला युद्ध करावेंसें वाटत नाहीं. तो मोठा बलवान् व वीर्यशाली असून त्याला हल्लीं साहाय्यही मिळालें आहे. प्रत्यक्ष इंद्रालाही तो युद्धामध्यें अजिंक्य आहे. तो मोठा अचुक नेम मारणारा असून नेमका घाव देणारा आहे. आमचीं वाहनें तर थकून गेलीं आहेत. पांडवपांचालांनीं आह्मांला फार घायाळही करून सोडलें आहे. तेव्हां ह्या विजयी पांडवांशीं आतां युद्ध चालविणें मला प्रशस्त दिसत नाहीं. तेव्हां आज युद्ध बंद करण्याचा गजर देऊन उद्यां फिरून शत्रूशीं युद्ध चालवावें.' हें भीष्मवाक्य ऐकून घटोत्कचाच्या भीतीनें घाबरून गेलेले कौरव मोठ्या युक्तीनें सैन्य परतवून पांडवांकडून पराभव झाल्यानें लाजून आपापल्या शिबिरांकडे निघाले. ते परत आल्यावर विजयी पांडवांनीं सिंहनाद करून शंख फुंकले. व सर्व अंगाला बाणांच्या जखमा लागल्या होत्या तरी मोठ्या उल्हासयुक्त मनानें भीमसेनघटोत्कचांना पुढें करून ते मोठ्या आनंदानें एकमेकांची वाहवा करीत अनेक प्रकारें गर्जत मोठ्या वाद्यांच्या गजरांत पृथ्वीला कांपवीत व कौरवांचीं हृदयें पिळून घेत संध्याकाळच्या वेळीं थेट आपापल्या शिबिरांकडे चालले. इकडे दुर्योधन मात्र आपले भाऊ मारले गेल्यामुळें डोळे पाण्यांनीं भरून येऊन चिन्तातुर मनानें आपल्या शिबिराची सर्व व्यवस्था यथास्थित लावल्यावर शोकाकुल असा विचार करीत पडला.

---

## ११ श्रीकृष्णस्वरूप. (६. ६५–६८)

देवांना देखील दुःसाध्य असें कृत्य पांडवांच्या हातून घडलेलें पाहून दैवयोगानें विदुरांच्या ह्मणण्याप्रमाणें सर्व जुळत चालल्यानें काळीज चर्र होऊन पांडवांपाशीं अशी वियातरी कोणती आहे किंवा असा त्यांना वर तरी कोणाचा आहे कीं त्याच्या योगानें भीष्मांसारख्या महामहायोद्ध्यांशीं टक्कर देऊनही आकाशांतील ताऱ्याप्रमाणें त्यांचा नाश ह्मणून बिलकूल होत नाहीं असें वाटून कौरवांवर खात्रीनें संकट ओढवलें असून त्यांत त्यांचा फडशा पडणार व त्यांच्या संकटामध्यें त्यांना हात देणारा असा एखादा वीर सांपडणें कठिण असें कोणालाही वाटणें साहजिक होतें. परंतु पांडवांनीं कांहीं मंत्र अगर माया केली नसून त्यांच्यापाशीं असा बागुलबोवाही कांहीं नव्हता. केवळ आपल्या शक्तीच्या जोरावरच ते रणामध्यें न्यायानें लढत होते. ते सर्व कृत्यें मोठी कीर्ति मिळविण्याकडे नजर ठेवून धर्मानें आरंभीत व धर्माची जोड आपल्या बाजूला ठेवून युद्ध करीत होते. **धर्म तिकडे जय हें ठरलेंच आहे.** आणि ह्मणूनच ते कधीं मारले जात नव्हते व जयश्री नेहमीं त्यांना माळ घालीत होती. आतां इकडे कौरवांकडे पाहिलें असतां ते दुरात्मे व सदा निष्ठुर व निंद्य कर्म करणारे असल्यानें त्यांचा युद्धामध्यें पराभव होत होता. त्यांनीं पांडवांचें पुष्कळ वांकडें केलें होतें त्या सर्व त्यांच्या अपराधांकडे लक्ष न देतां पांडव नेहमीं त्यांच्याशीं गोडीनेंच वागत आले होते. परंतु कौरव त्यांना तुच्छ मानीत. याप्रमाणें नेहमीं त्यांच्या विरुद्ध करीत आलेल्या पापकर्माचें हें घोर फळ येऊन ठेपलें होतें. आणि ह्मणूनच विदुरप्रभृति थोरांचें हिताचें पथ्यकर भाषणसुद्धां मरणोन्मुखाला औषधाप्रमाणें त्यांना रुचेनासें झालें होतें.

आपल्या महारथी भावांना रणामध्यें पांडवांनीं मारल्यामुळें शोकाकुल होऊन रात्रीच्या वेळीं दुर्योधन महाबुद्धिशाली भीष्मांकडे येऊन विनयपूर्वक त्यांना ह्मणाला, 'आपण, आचार्य, भूरिश्रव भगदत्त प्रभृति मोठमोठे कुलीन व आमच्यासाठीं प्राणावर उदार होऊन लढणारे महारथी तिन्ही लोकांना सुद्धां पुरून उरण्यासारखे आहेत असें मला वा-

ढतें. असें असून पांडवांच्या पुढें तुमचें कांहीं चालत नाहीं तेव्हां मला मोठा संशय येत आहे. तर पांडव कोणाच्या आश्रयानें क्षणोक्षणीं आमचा पराभव करीत आहेत तें आपण मला सांगा.' हें ऐकून भीष्म ह्मणाले, 'दुर्योधना मी बोलतों तें ऐक. पांडवांशीं सख्य करण्यांतच तुझें तसेंच सर्व जगाचें कल्याण आहेसें मला वाटतें. त्यांच्याशीं मिळून सुखी होऊन तूं सर्व शत्रूंना ताप देत व बांधवांना आनंदवीत ह्या पृथ्वीचा उपभोग घे. पूर्वीं मी पुष्कळ ओरडलों तरी तूं माझें ऐकलें नाहींस. त्यांना जें तूं तुच्छ करतोस त्याचें हें फळ येऊन ठेपलें. सत्कृत्य करणारे पांडव न मरण्याचें कारण विचारतोस तर ऐक. सर्व जगतामध्यें असा कोणी नाहीं, झाला नाहीं किंवा होणार नाहीं कीं जो शार्ङ्गधारी कृष्णाचा पाठिंबा असलेल्या पांडवांना जिंकील. पूर्वीं शुद्धांतःकरणाच्या मुनींच्या तोंडून यांच्या संबंधानें जें कांहीं मीं ऐकलें आहे तें सांगतों ऐक. पूर्वी सर्व देव व ऋषी मिळून गंधमादन पर्वतावर जाऊन भक्तिपूर्वक ब्रह्मदेवांजवळ उभे राहिले असतां एक झळझळीत असें उत्कृष्ट विमान आकाशामध्यें ब्रह्मदेवांच्या दृष्टीस पडलें. ध्यानानें तें ओळखून ब्रह्मदेवांनीं मोठ्या आनंदभरित अंतःकरणानें पुराणपुरुष परमेश्वराला नमस्कार केला. ब्रह्मदेवाला उठून उभे पाहून सर्व ऋषी व देवही हात जोडून तो अद्भुत चमत्कार पहात उभे राहिले. ब्रह्मवेत्त्यांमध्यें श्रेष्ठ ब्रह्मदेव विधिपूर्वक त्याची पूजा करून ह्मणाले, 'हे देवा तूं विश्वावसु, विश्वमूर्ति, सकल विश्वाचा शास्ता व त्याचा आधारभूत, सर्व विश्वाची ढवळाढवळ करणारा, वशी व विश्वेश्वर आहेस. योगरूप देहधारी तुला मी शरण आहें. सर्व लोकांच्या हितामध्यें तूं दक्ष आहेस. तूं योग्यांमध्यें श्रेष्ठ असून योगाच्या आधींचा व मागचा तूंच आहेस. सर्व भूत, वर्तमान, भविष्य काळीं असणारा सर्व लोकांचा स्वामी व मुळांचाही मूळ असा तूं आहेस. असंख्य गुणांचा आधार तूंच आहेस. तुझे केश पिंगट असून तूं पीतवस्त्र नेसला आहेस. सर्व दिशांचा तूं स्वामी आहेस. विश्व हेंच तुझें राहण्याचें ठिकाण आहे. तुला अंत किंवा नाश नाहीं. तूं व्यक्त असून अव्यक्त आहेस. तूंच कायतो स्वतःला ओळखतोस. तूं फार खोल असून सर्व इच्छा परिपूर्ण करणारा आहेस. ब्रह्म ह्मणून तूं जाणवला आहेस. तूं कृतकार्य असून मोठा बुद्धिमान् आहेस. धर्मज्ञ असून विजय देणारा आहेस. तुझा आत्मा गुह्य असून सर्व योगाचा तूं आत्मा आहेस. जें ह्मणून कांहीं स्पष्टपणें अस्तित्वांत आलें आहे त्या सर्वांचा तूं उत्पादक आहेस. तुला उत्पन्न करणारा कोणी नसून सर्वांचा नाश करण्यामध्यें तूं तत्पर आहेस. तूं सर्व संकल्पांचें मूळ असून ब्रह्मसंबंधीं सर्वांचा तूं चाहता आहेस. अमृत उत्पन्न करणारा तूंच आहेस. नेहमीं मुक्त असा तूं प्रजापतीचा स्वामी आहेस. पृथ्वी तुझे पाय असून दिशा बाहू व आकाश डोकें आहे. तुझी मूर्ति मी आहें. देव तुझें शरीर आहे. सूर्य चंद्र तुझे डोळे आहेत. तप व कर्म आणि धर्म यांपासून उत्पन्न झालेले सत्य तुझें बल आहे. अग्नि तुझें तेज आहे. वायु श्वास आहे. जल घाम आहे. अश्विनीकुमार तुझे कान असून सरस्वती जीभ आहे. वेद हे तुझें ज्ञान असून हें जग तुझ्यावर अवलंबून आहे. तुझी गणना, परिमाण, तेज, पराक्रम, बल किंवा उत्पत्ति कांहींच आह्मांला कळत नाहीं. सर्वश्रेष्ठ असा जो तूं त्या तुला विनयपूर्वक तुझ्या भक्तीमध्यें गढून आह्मी नेहमीं पूजतों. तुझ्याच प्रसादानें ऋषी, देव, गंधर्व, यक्ष, राक्षस इत्यादि नानाविध प्राणिमात्रांनीं पूर्ण अशी ही सृष्टि मीं निर्माण केली आहे. हे दुःखाचें समूळ नाश करणाऱ्या कृष्णा, तूंच सर्व भूतमात्रांची गति व मार्गदर्शक असून जगताचा गुरु आहेस. देव नेहमीं तुझ्याच प्रसादानें सुखी आहेत व ही पृथ्वी निर्भय आहे. ह्मणून हे यदुकुलश्रेष्ठा, कुलोद्धारका, दैत्यांना मारून धर्म संस्थापना करून जगाचें अस्तित्व कायम राखण्यासाठीं मी सांगतों त्याप्रमाणें कर. तूं स्वतः संकर्षणाला आपल्या स्वरूपानें उत्पन्न करून मग प्रद्युम्नाला उत्पन्न केलेंस. प्रद्युम्नापासून अविनाशी अनिरुद्धाला उत्पन्न केलेंस. त्या अनिरुद्धापासून माझी ब्रम्ह्याची उत्पत्ति झाली आहे. तेव्हां मी वासुदेवमय असून तुझ्यापासूनच माझी उत्पत्ति आहे. निरनिराळ्या रूपानें अंशमात्रानें तूं मनुष्ययोनीमध्यें जन्म घेऊन सर्व लोकांना सुखी

करण्यासाठीं असुरांना मारून पुण्य व यश संपादून फिरून योगरूप घेतोस. सर्वांचे इच्छित मनोरथ पूर्ण करणाऱ्या तुझा आश्रय करून तुझ्या ठिकाणींच सर्व भूतमात्र राहिले आहेत. लढाईमध्यें मारले गेलेले दैत्य, दानव, व राक्षस महाबलशाली व घोररूप धरून मनुष्य योनीमध्यें जन्मले आहेत. त्यांना मारण्यासाठीं तूंही नरासह मनुष्यरूपानें पृथ्वीवर जन्म घेऊन रहा.' तेव्हां ते हे अतुल तेजस्वी पुराणपुरुष नरनारायण ह्या पृथ्वीवर उत्पन्न झाले असल्यानें देवांनीं जरी आपली शिकस्त केली तरी त्यांच्या हातून सुद्धां यांचा पराभव होणें शक्य नाहीं. वेदपारगमुनींनीं व मीं तुला अनेक वेळां वासुदेवाशीं व पांडवांशीं युद्ध करूं नकोस ह्मणून सांगितलें पण तें मूर्खपणानें तूं ऐकलें नाहींस. तमोगुणानें युक्त असा तूं राक्षस आहेस असा माझा तर्क आहे. कारण ह्या नरनारायण वासुदेव व अर्जुन यांचा तुझ्याशिवाय दुसरा कोण द्वेष करील? ह्मणून मी तुला सांगतों कीं, तिन्ही लोकांना धारण करणारा चराचरांचा गुरु सर्वांचा प्रकृतिभूत हा प्रत्यक्ष जयस्वरूपी असल्यानें हा ज्या बाजूला असणार तेथेंच धर्म राहणार व धर्म तेथें जय हेंही ठरल्यासारखेंच आहे. याच्या महात्माचें व योगसामर्थ्याचें पांडवांना पाठबळ असल्यानें जय खात्रीनें त्यांनाच येणार. पांडवांना नेहमीं कल्याणप्रद बुद्धि व रणामध्यें बळ तोच देतो; व नेहमीं भयापासून त्यांना राखतो. आपापल्या वर्णांच्या गुणांनीं संपन्न असे ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र नेहमीं आपापल्या कर्मामध्यें गढून राहून ह्याच वासुदेवाची पूजा करतात. हा सर्वश्रेष्ठ असून सर्व दैवतांमध्यें मुख्य दैवत आहे. आप, वायु व तेज तीन निर्माण करून नंतर पृथ्वी निर्माण केल्यावर पाण्यावर शयन करून सर्व तेजोमय अशा ह्या परमात्म्यानें त्या ठिकाणीं योगनिद्रा केली. त्यानें तोंडापासून अग्नि, प्राणापासून वायु व मनापासून सरस्वती व वेद निर्माण केले. यानें प्रथम लोक निर्माण करून देव व ऋषी उत्पन्न केले. भूत, वर्तमान, भविष्य निर्माण केल्यावर जग उत्पन्न करून प्रथम सर्व भूतमात्रांमध्यें वडील संकर्षण ह्यानें उत्पन्न केला. त्यापासून देवदेव नारायण उत्पन्न झाला; त्याच्या नाभीपासून कमलाची उत्पत्ति होऊन त्यापासून ब्रह्मदेवांची उत्पत्ति झाली; व त्या ब्रह्मदेवांपासून ही प्रजा झाली. विश्वरूपी अनंत शेष ह्या परमात्म्यानें उत्पन्न केला. तो ह्या सर्व भूतमात्रांसह ही पर्वताढ्य पृथ्वी धारण करतो. ह्या अतुल सामर्थ्यवान परमात्म्याला ब्राह्मण ज्ञानानें जाणतात. ह्याच्या कानाच्या मळापासून मधु नांवाचा असुर उत्पन्न झाला. अघोर कर्म करणारा तो असुर घोर बुद्धि धरून ब्रह्मदेवाचा नाश करण्याला निघाला असतां त्याला यानें मारलें. तेव्हांपासून याला सर्व मधुसूदन म्हणूं लागले. वराह, नारसिंह, वामन वगैरे रूप घेणारा हाच असून हा सर्व जगाचा मातापिता आहे. यानें तोंडापासून ब्राह्मण, बाहूंपासून क्षत्रिय, मांड्यांपासून वैश्य व पायांपासून शूद्र उत्पन्न केले आहेत. ब्रह्मभूत असा जो हा योगाचा गड्डा आहे. त्याची अमावास्येला व पौर्णिमेला आराधना करून मनुष्याला केशवस्वरूपी परब्रह्माची प्राप्ति होते. यालाच मुनिश्रेष्ठ तेज समजतात. ज्यावर हा प्रसन्न होईल त्यानें सर्व अविनाशी लोक मिळविले समजलें पाहिजे. जो याला संकटसमयीं शरण जाईल त्याचें कल्याण होऊन तो सुखी होईल. यालाच जे अनन्य भावानें शरण जातात ते संकटसमयीं डगमगत नाहींत. जनार्दन त्यांचें नेहमीं संरक्षण करीत असतो. त्याला पूर्ण ओळखून युधिष्ठिर त्याला अनन्य भावानें शरण आहे. सर्व यज्ञांमध्यें श्रेष्ठ यज्ञ हा असून सर्व तपांमध्यें मुख्य तप हा आहे. तसाच देवांचा आदिदेव हाच आहे. पूर्वीं प्रजा उत्पन्न करण्याच्या वेळचा दक्षप्रजापति हाच होय. अंगिराऋषींनीं सर्व लोकांचा ह्याला उत्पादक ह्मटलें आहे; त्याचप्रमाणें असितदेवलांनीं अव्यक्त तें सर्व याच्या शरीरापासून उत्पन्न झालें असून व्यक्त जें कांहीं तें याच्या मनामध्यें आहे असें ह्मटलें आहे. यानें आपल्या मस्तकानें स्वर्ग व्यापले असून बाहूंनीं पृथ्वी व्यापली आहे. तिन्ही लोक ज्याच्या उदरांत भरून आहेत असा हा सनातन परमात्मा आहे. तपानें शुद्ध झालेल्यांना अशा प्रकारचा हा जाणवतो. आत्मसाक्षात्कारानें तृप्त असणाऱ्या ऋषींना सर्वांमध्यें श्रेष्ठ असा हाच आहे. लढाईमध्यें पाय मागें न घेणाऱ्या थोर व धर्म हेंच मुख्य समजणाऱ्या राजर्षींना आधार हाच आहे.

दुष्टांच्या संहारासाठींच हे नरनारायण मनुष्यांमध्यें अवतरले असल्यानें हे वीर अवध्य असून युद्धामध्यें यांचा पराभव होणें नाहीं. यशस्वी पांडवांवर कृष्णाचें पूर्ण प्रेम आहे म्हणून त्यांचाही युद्धामध्यें नाश होणार नाहीं. ह्मणून सांगतों कीं पांडवांबरोबर सख्य करून आपल्या भावांशीं मिळून या पृथ्वीचा उपभोग घे. या नरनारायणांना तुच्छ करशील तर तूं कांहीं बाकी राहणार नाहींस. ' असें सांगून दुर्योधनाला रजा देऊन भीष्म निजले. दुर्योधनही त्यांना नमस्कार करून चांदण्यानें फटफटीत असलेल्या रात्रीच्या वेळीं आपल्या शिबिराकडे जाऊन बिछान्यावर पडला.

## १२ पांचवा दिवस. ( ६.६९–७४ )

रात्र सरून सूर्योदय झाल्यावर फिरून दोन्ही दळें आपापल्या सैन्याची व्यवस्था लावून मोठ्या उल्हासानें युद्धाला भिडलीं. सैन्याची मकराकारानें व्यूहरचना करून भीष्म त्याचें चोहोंबाजूंनीं संरक्षण करीत होते. रथ, पायदळ, हत्ती व स्वार आपापल्या ठिकाणीं सज्ज राहून भीष्मांच्या मागून चालले होते. याप्रमाणें कौरवांना तयार पाहून यशस्वी पांडवांनीं आपल्या सैन्याची बहिरिससाण्याच्या आकाराची अभेद्य व्यूहरचना केली. त्याच्या तोंडाला बलशाली भीमसेन झळकत होता. दोन डोळ्यांच्या ठिकाणीं शिखंडी व धृष्टद्युम्न होते. सत्यपराक्रमी वीर सात्यकि त्याच्या डोक्याला होता. अर्जुन आपलें गांडीव हलवीत त्याच्या मानेला होता. महात्मा द्रुपद आपल्या अक्षौहिणी सैन्यानिशीं डाव्या बाजूला होता. एक अक्षौहिणीचा स्वामी केकेय उजव्या बाजूला होता. द्रौपदीचे मुलगे व वीर्यशाली अभिमन्यु पाठीवर होते. श्रीमान युधिष्ठिर नकुलसहदेवांसह मागें होता. त्या मकरव्यूहाच्या तोंडांत शिरून भीष्मांजवळ जाऊन भीमानें त्यांना बाणांनीं झांकून काढलें. ते वेळीं भीष्मांनीं ह्या घोर रणप्रसंगामध्यें मोठमोठीं शस्त्रें सोडून पांडवांच्या त्या व्यवस्थित सैन्याला घाबरवून सोडलें. सैन्य याप्रमाणें घाबरलेलें पाहून अर्जुनानें त्या रणाच्या तोंडीं एकदम येऊन भीष्मांवर हजारों बाण मारले. तेव्हां पूर्वी आपल या सैन्याची त्याचप्रमाणें भावांची उडालेल्या कत्तलेची आठवण असल्यानें दुर्योधन द्रोणांना ह्मणाला, ' आचार्य, आपण माझ्या हितामध्यें सदा दक्ष राहिलें पाहिजे. कारण आह्मी आपण व भीष्म यांवरच अवलंबून देवांना देखील जिंकण्याची आशा धरून आहों. मग वीर्य व पराक्रम यांनीं कमी अशा पांडवांची कथा काय ? तेव्हां पांडव मरतील अशी कांहीं तजवीज आपण करा. ' हें दुर्योधनाचें भाषण ऐकून द्रोणांनीं सात्यकीच्या समक्ष पांडवसैन्यावर मारा केला. सात्यकीनें त्यांचें निवारण केलें व दोघांचें चळकांप उत्पन्न करणारें भयंकर युद्ध जुंपलें. हांसत हांसतच द्रोणांनीं तीक्ष्ण बाण सात्यकीवर सोडले. तेव्हां आचार्यांपासून सात्यकीचें संरक्षण करण्यासाठीं भीमानें त्यांवर बाण सोडले. तेवेळीं द्रोण, भीष्म व शल्य यांनीं भीमाला बाणांनीं झांकून काढलें. तें पाहून अभिमन्यु व द्रौपदीचे मुलगे यांनीं त्या सर्व शस्त्र घेऊन उठलेल्या योद्ध्यांवर त्वेषानें तीक्ष्ण बाण सोडले. याप्रमाणें पांडवांवर तुटून पडलेल्या भीष्मद्रोणांवर त्या घोर रणसंग्रामामध्यें शिखंडी मेघाच्या गडाडण्याप्रमाणें शब्द करणारें आपलें धनुष्य घेऊन चालून गेला, व आपल्या बाणजालानें सूर्याला झांकून काढीत तो त्यांवर बाणांचा वर्षाव करूं लागला. त्याकडे आल्यावर त्याचा स्त्रीपणा स्मरून भीष्मांनीं त्याच्याशीं युद्ध करण्याचें सोडून दिलें. तेव्हां दुर्योधनाच्या सांगण्यावरून त्यांचें रक्षण करण्यासाठीं द्रोण त्यावर धांवून गेले. प्रलयकालच्या पेटलेल्या अग्नीसारख्या त्या द्रोणांशीं प्रसंग आला असतां, घाबरून शिखंडीनें त्यांना टाळलें. इकडे जय मिळविण्याच्या निश्चयानें पांडव भीष्मांवर चालून जात होते व इकडे दुर्योधन मोठ्या यशाचा वांटा आपल्याकडे यावा ह्मणून आपल्या सैन्यानिशीं त्यांचें रक्षण करीत होता. जय व मोठी कीर्ति संपादन करण्याला हपापलेल्या त्या दोन्ही पक्षांचा देवदानवांप्रमाणें घनघोर संग्राम चालला होता. इकडे भीमसेनाच्या भयापासून कौरवांचें रक्षण करण्यासाठीं भीष्मांनीं अगदीं निकराचें युद्ध चालविलें होतें. त्या दिवसाच्या पूर्वाण्हामध्यें राजांचें घनघोर युद्ध चालून त्यांत ठळक ठळक वीरांचा फडशा चालला होता. त्या भयंकर गर्दीमधून उठणारा शब्द आकाशाला जा-

ऊन भिडत होता. डरकळ्या फोडणाऱ्या पोळाप्रमाणें जयासाठीं युद्ध करणारे ते वीर एकमेकांवर गर्जत होते. तीक्ष्ण बाणांनीं छाटून निघणाऱ्या मुंडक्यांमुळें आकाशामध्यें दगडांचा वर्षाव चालल्याप्रमाणें दिसत होतें. कुंडलें, फेंटे, सुवर्णभूषणें यांनीं झळकणारीं शिरें हत्ती, घोडे व मनुष्यें यांचे बाणांनीं छाटून निघालेले हातपाय वगैरे अवयव यांनीं हं हं म्हणतां सर्व पृथ्वी झांकून निघाली. दाट धूळ हेंच ढग यांमधून शस्त्ररूपी विजेची चमक होऊन मेघांच्या गडाडण्याप्रमाणें आयुधांचा शब्द निघत होता. कौरवपांडवांमध्यें भयंकर व घातुक प्रहार चालले असतां रक्ताचे पाट वाहूं लागले. बाणांचा वर्षाव चालला होता. बाणांच्या वर्षावानें पीडलेले हत्ती चीं चीं करून किंकाळ्या फोडीत होते. धैर्यशाली व अतुल पराक्रमी खवळलेल्या वीरांच्या धनुष्यांच्या प्रत्यंचेचे पंजावर आदळून उठणाऱ्या फडफड आवाजानें कशाचाही उमग पडेनासा झाला होता. त्या रक्ताच्या पुरामध्यें जिकडे तिकडे धडें उडत होतीं, व राजे शत्रूंना मारण्याला तयार होऊन धांवत होते. लोखंडी कांबीप्रमाणें लांब लांब बाहू असलेले ते अतुलपराक्रमी शूर वीर बाण, शक्ति, गदा, तलवार यांनीं एकमेकांना मारून पाडीत होते. बाणांनीं घायाळ झालेले असे निरंकुश हत्ती व वरचे स्वार मेलेले घोडे दश दिशांला धांवत होते. बाण लागून घायाळ झालेले दोन्ही बाजूंचे कांहीं वीर उचल खाऊन फिरून धडपडत खालीं पडत होते. त्या भीष्मभीमांच्या गर्दीमध्यें बाहू, शिरें, धनुष्यें, गदा, परिघ, हात, मांड्या, पाय, भूषणें यांचे त्या ठिकाणीं जागजागीं ढीग पडले होते. कोणी आयुधांनीं तर कोणी बाहूंनीं, कोणी गुडघ्यांनीं, कोणी हातांनीं, कोणी मुठींनीं ते वीर एकमेकांस मारून पाडीत होते. मरून पडलेल्या, पडणाऱ्या व धडपडत असलेल्या लोकांनीं जिकडे तिकडे त्या रणभूमीला उग्रस्वरूप आलें होतें. विरथ झालेले रथी हातामध्यें उत्तम तलवार घेऊन एकमेकांना मारण्यासाठीं धांवत होते. तेव्हां दुर्योधन कलिंगांना घेऊन भीष्मांना पुढें करून पांडवांवर तुटून पडला असतां पांडवही भीमाच्या भोंवतीं जुळून भीष्मांवर धांवून गेले व दोघांचें युद्ध सुरू झालें. आपल्या भावांना भीष्मांशीं भिडलेलें पाहून अर्जुन हत्यार उगारून त्यांवर धांवून गेला. पांचजन्याचा शब्द, गांडीवाचा टणत्कार व त्याचा तो ध्वज पाहून कौरवांची गाळण उडाली. त्यांच्या ध्वजावर सिंहाच्या शेंपटीचें चिन्ह असून आकाशांत तो पेट घेतलेल्या पर्वताप्रमाणें दिसत होता. झाडांचा त्याला बिलकूल प्रतिबंध न होतां तो उगवलेल्या धूमकेतूसारखा दिसत होता. तो निरनिराळ्या रंगांचा असून त्यावर वानर होता. त्याचप्रमाणें सोन्यानें मढविलेल्या पाठी त्याचें तें गांडीव मेघमंडळामधील विजेप्रमाणें चमकत होतें व गडाडण्याप्रमाणें वारंवार त्याची गर्जना ऐकूं येत होती. कौरवसैन्याचा फडशा पाडीत असतां त्याच्या पंजांचा फडफड शब्दही फार भयंकर रीतीनें कानांवर पडत होता. मोठ्या वाऱ्यामध्यें विजेच्या लखलखाटासह गडगडणाऱ्या मेघाप्रमाणें तो चोहोंबाजूंनीं सर्व दिशांला बाणांच्या वर्षावांनीं पूर आणून सोडीत होता. हा भीष्मांवर धांवून जात असतां त्याच्या अस्त्रांच्या योगानें वेडे बनलेल्या कौरवांना पूर्व किंवा पश्चिम कोणचीच दिशा उमगेनाशी झाली. वाहनें थकून घोडे मेल्यामुळें भ्रमिष्ट होऊन एकमेकांशीं जुळून सर्व कौरवयोद्धे भीष्मांचाच आसरा घेत होते. भीष्मच काय ते त्यांना संकटामध्यें आधार झाले होते. तेव्हां शीघ्रगामी मोठमोठे कंबोजाचे घोडे, हजारों गोप, गोपायन, मद्र, सौवीर, त्रिगर्त या सैन्यांनिशीं जयद्रथाला बरोबर घेऊन कलिंगाधिपति दुःशासनाला पुढें करून निघाला. तेव्हां दुर्योधनाच्या सांगण्यावरून चौदा हजार निवडक स्वार जयद्रथाच्या रक्षणासाठीं त्याच्या भोंवतालून चालले होते. ह्या सर्वांनीं रथ, घोडे यांच्या निरनिराळ्या तुकड्या करून अर्जुनावर मारा सुरू केला. त्या चतुरंग सैन्यापासून मोठ्या ढगाप्रमाणें उठलेल्या धुळीनें रणभूमीला एक प्रकारचें उग्रस्वरूप आलें होतें. भीष्म एका अफाट तुकडीनिशीं अर्जुनाशीं भिडले, अवंत्याधिपति काशिराजाशीं भिडला, जयद्रथ भीमसेनाशीं भिडला, युधिष्ठिर शल्याशीं भिडला. विकर्ण सहदेवाशीं भिडला व चित्रसेन शिखंडीशीं भिडला. मत्स्यवीर दुर्योधन व शकुनीवर चालून गेले. द्रुपद, चेकितान, सात्यकी, हे द्रोण व अश्वत्थामे यांच्याशीं भिडले. कृप व कृत-

वर्मा धृष्टद्युम्नावर चालून गेले. याप्रमाणें धांवपळ उडालेले हत्ती, घोडे, वगैरे सैन्यें जिकडे तिकडे एकमेकांशीं भिडलीं असतां आकाशामध्यें ढग वगैरे नसून विजा चमकूं लागल्या. सर्व दिशा धुळीनें भरून गेल्या. उल्कापात होऊं लागून मोठमोठे शब्द होऊं लागले. भयंकर वावटळ उठून धुळीचा वर्षाव सुरू झाला. सूर्य दिसेनासा झाला. धुळीनें पडून अस्त्रसमुदायांनीं बेजार झालेले लोक संज्ञाहीन झाले. ताऱ्याप्रमाणें लखलखीत अशा शस्त्रांनीं आकाश प्रकाशमान झालें होतें. वर सोन्याचें काम केलेल्या बैलाच्या कातड्याच्या चित्रविचित्र ढाली त्याचप्रमाणें सूर्यासारख्या लखलखीत तलवारीनें छाटून निघालेलीं धडें व शिरें यांचा चोहोंकडे सडा पडला होता. पुष्कळ महारथी रथाचें चाक, आस व गर्भ मोडून जाऊन ध्वज मोडून खालीं पडून घोडे मारले जाऊन खालीं येत होते. कोठें कोठें रथी मारले गेल्यानें शस्त्रांच्या जखमा लागलेले रथांचे घोडे रथ ओढतां ओढतां खालीं पडत होते, कांहीं तसेच जखमा लागलेले सामानानिशीं रथाला आपल्याबरोबर ओढून घेऊन चालले होते. पुष्कळ हत्ती नाराच बाण लागून गतप्राण होऊन अंकुश माहुत यांनिशीं खालीं पडल्यानें ती रणभूमि झांकून गेली होती. याप्रमाणें ती रणभूमि स्वार, पायदळ, रथी यांनीं भरून गेली असतां भीष्मांवर व द्रोणप्रभृति इतर मंडळीवर अर्जुन चालून गेला. जयद्रथ, दुर्योधन वगैरे मंडळीवर भीम तुटून पडला. सहदेव हा शकुनि व त्याचा मुलगा उलूक यांवर चालून गेला. युधिष्ठिर हत्तीदळावर चालून गेला. नकुल त्रिगर्तांच्या सैन्याशीं भिडला. सात्यकि, चेकितान व अभिमन्यु शाल्व व केकय सैन्यावर तुटून पडले. धृष्टकेतु व घटोत्कच कौरवांच्या रथदळाशीं भिडले. कधीं हिंमत न खचणारा धृष्टद्युम्न घोरकर्म करणाऱ्या द्रोणाशीं भिडला. याप्रमाणें शत्रूशीं भिडून पांडवांनीं सूर्य भर दुपारच्या वेळीं आकाशांत तापत असतां मारा सुरू केला व दोन्ही बाजूंला कचल सुरू झाली. त्या ठिकाणीं कौरव सृंजयांचा भयंकरच प्रहार चाललेला दिसून येत होता. चोहोंबाजूंला सोडलेल्या बाणांच्या योगानें आकाश, सूर्य, दिशा किंवा उपदिशा कशाचाच उमग पडत नव्हता. लखलखीत टोंकांच्या शक्ति, फेंकली जाणारीं तोमरें, लखलखीत तलवारी यांची नीलकमळाप्रमाणें कांति फांकली होती. निरनिराळ्या प्रकारचीं चिलखतें व भूषणें यांच्या तेजानें आकाश व दिशा लखलखल्या होत्या. या संधीस भीष्म व बलशाली भीम यांची मोठी झटापट झाली. इतक्यांत सात्यकीनें झटपट येऊन प्रखर बाण कानापर्यंत ओढून भीष्मावर सोडले. तेवेळीं भीष्मांनीं सात्यकीच्या सारथ्याला रथाखालीं आणिलें; तेव्हां सारथी मेल्यानें रथाचे घोडे मनोजवानें रणांतून सैरावैरा धांवूं लागले. तेवेळीं सैन्यामध्यें हाहाकार उडून राहिला. पळा, धरा, घोडे आवरा, धांवा असा एकच कल्होळ युधामन्यूच्या रथाजवळ उडून राहिला. विराटानें तीन बाण भीष्मांवर सोडून आणखी तीन बाणांनीं त्यांचे घोडे घायाळ केले. तेव्हां महाधनुर्धारी भीष्मांनीं उलट त्यावर दहा बाण सोडले. ज्यांच्या हातून धनुष्य कधीं ढळावयाचें नाहीं अशा भयंकर धनुर्धारी अश्वत्थाम्यांनीं अर्जुनाच्या छातीवर बाण सोडले. अर्जुनानें त्यांचें धनुष्य मोडून त्यांवर तीक्ष्ण बाणांचा मारा केला. अश्वत्थाम्यांनीं त्वेषानें दुसरें धनुष्य घेऊन अर्जुनावर त्याचप्रमाणें कृष्णावर बाणांचा मारा सुरू केला. त्या शत्रुकर्शन अर्जुनानें डाव्या हातानें धनुष्य घट्ट धरून प्राण घेणारे तीक्ष्ण व भयंकर असे बाण अश्वत्थाम्यांवर सोडले. त्यांनीं त्या रणामध्यें त्या द्रोणपुत्रांचें कवच फोडून त्यांचें रक्त प्राशन केलें. हे महायोद्धे, द्रोणांचे प्रियपुत्र, आपले सहाध्यायी व विशेषेंकरून ब्राह्मण या भावनेनें शत्रुतापन अर्जुनानें त्यांवर कृपा केली, आणि त्यांना सोडून तो कौरवांना मारीत सुटला. इकडे दुर्योधनानें भीमावर बाणांचा मारा चालविला होता. भीमसेनही संतापून त्यानें तीक्ष्ण व वेगवान बाण दुर्योधनाच्या विशाल छातीवर मारले. त्यांनीं झांकून गेलेला सोन्याच्या गोपामधला दुर्योधनाचा रत्नमणि ग्रहांनीं झांकलेल्या सूर्याप्रमाणें झळकत होता. इकडे चित्रसेन, पुरुमित्र, सत्यव्रत वगैरे मंडळीवर बाण सोडीत जणूं काय नर्तन करीत रणामधून फिरत असतां अभिमन्यूनें कौरवांना त्रासवून सोडलें. चित्रसेनाचें धनुष्य मोडून त्याचें कवच फोडून त्याच्या उरावर त्यानें बाण मारले. तेव्हां सर्व

कौरव खवळून जाऊन एकवटून त्यावर बाण सोडूं लागले, तथापि तो वीर सर्वांना मारून पाडीत होता. शुष्क अरण्याचा जाळून फडशा पाडणाऱ्या वणव्याप्रमाणें तो सर्व सैन्याला भाजून काढीत असतां त्याचें तें कृत्य पाहून सर्व कौरवांनीं त्याला वेढलें. तें त्याचें एकंदर कृत्य पाहून दुर्योधनपुत्र लक्ष्मण एकदम त्यावर तुटून गेला. अभिमन्यु त्यावर धांवून जाऊन त्यानें बाणांनीं त्याचे चार घोडे मारून पाडले. तेव्हां लक्ष्मणानें खवळून जाऊन त्यावर एक शक्ति फेंकली. अभिमन्यूनें त्या येऊन पडणाऱ्या घोरशक्तीचेही दोन तुकडे केले. तेव्हां कृपांनीं लक्ष्मणाला आपल्या रथामध्यें रणभूमींतून मार्गे नेलें. इतक्यांत युद्धाची खुमखुम कधीं न जिरणाऱ्या सात्यकीनें वाटेल तेवढा भार सहन करणारें आपलें धनुष्य ओढून आशीविषासारखे जालीम बाण सोडण्यास सुरवात केली. याप्रमाणें भयंकर कृत्य करून आपल्या धनुष्यानिशीं त्यानें भूरिश्रव्याला गांठलें. कुरुकुलाची कीर्ति वाढविणारा भूरिश्रवाही युयुधानानें आपल्या सैन्याचा फडशा पाडलेला पाहून त्वेषानें त्यावर धांवून गेला, व इंद्रधनुष्याच्या तोडीचें आपलें प्रचंड धनुष्य ओढून चलाखी दाखवीत वज्रासारखे हजारों बाण त्यानें त्यावर सोडले. सात्यकीच्या अनुयायांना हे घातुक बाण असह्य होऊन सात्यकीला रणामध्यें एकटा सोडून ते जिकडे तिकडे पळाले. त्या भूरिश्रव्याला पाहून चित्रविचित्रित कवचें, आयुधें व ध्वज असलेले युयुधानाचे दहा महारथी मुलगे खवळून जाऊन ज्याच्या ध्वजावर यूपाचें चिन्ह होतें त्या भूरिश्रव्यावर सारखा बाणांचा वर्षाव करीत ते त्यावर धांवून गेले, व पावसाळ्यांत अनेक मेघांनीं ज्याप्रमाणें मेरु पर्वतावर वर्षाव चालवावा त्याप्रमाणें त्या सर्वांनीं त्या एकट्यावर बाणांचा वर्षाव चालविला. परंतु त्यांनीं सोडलेले ते कालदंडासारखे भयंकर बाण आपल्याकडे न येऊं देतां मध्येंच तो तोडून पाडीत होता. त्या एकट्याला वेढून बाणांच्या वर्षावानें त्याला मारण्याची त्यांची खटपट चालली असतां भूरिश्रव्यानें रागानें त्यांचीं धनुष्यें मोडून त्यांचीं मुंडकींही उडवून टाकलीं. तेव्हां वज्रानें मोडून पाडलेल्या झाडांप्रमाणें ते जमिनीवर मरून पडले. याप्रमाणें मुलांना मारलेलें पाहून सात्यकी गर्जत भूरिश्रव्यावर तुटून पडला. तेव्हां भीमसेनानें लगबगीनें सात्यकीजवळ येऊन त्याला आपल्या रथावर घेतलें, व दुर्योधनानेंही भूरिश्रव्याला आपल्या रथांत घेतलें. इकडे पांडवांनीं भीष्मांशीं निकरानें युद्ध चालविलेंच होतें. याप्रमाणें सूर्य आरक्त होत चाललेल्या वेळीं अर्जुनाला मारण्यासाठीं दुर्योधनानें पाठविलेल्या पंचवीस हजार महारथ्यांचा विस्तवावर पडणाऱ्या टोळाप्रमाणें अर्जुनानें फडशा पाडला. इतक्यांत सूर्य अस्ताला जाऊन सर्व सैन्याला कांहींच उमग पडेनासें झाल्यानें भीष्मांनीं युद्ध बंद केलें, व कौरव पांडवांनीं आपापल्या शिबिरांकडे जाऊन विश्रांति घेतली.

---

## १३ सहावा दिवस. ( ६.७५-७९ )

याप्रमाणें विसावा घेऊन रात्र सरल्यावर वाद्यांच्या गजरामध्यें दोन्ही दळें फिरून युद्धाला तयार झालीं. तेव्हां युधिष्ठिरानें धृष्टद्युम्नाला मकरव्यूह रचण्यास सांगितलें. द्रुपद व अर्जुन त्याच्या डोक्याला राहिले. त्याच्या डोळ्यांच्या ठिकाणीं नकुलसहदेव, चोंचीला भीम, अभिमन्यु, द्रौपदीचे मुलगे घटोत्कच, सात्यकि व धर्मराज मानेच्या ठिकाणीं, पाठीला सेनापति विराट व मोठ्या सेनेनिशीं धृष्टद्युम्न, त्याच्या डाव्या बाजूला पांच केकय भाऊ, व उजव्या बाजूला नरव्याघ्र धृष्टकेतु व वीर्यशाली चेकितान याप्रमाणें त्या व्यूहाच्या रक्षणाला उभे होते. पायाच्या ठिकाणीं महाराज कुंतिभोज व शतानीक मोठ्या सैन्यानिशीं होते. तसेंच सोमकांनिशीं शिखंडी व इरावान हे शेपटीला होते. याप्रमाणें प्रचंड व्यूहरचना करून पांडव सकाळच्या वेळीं चिलखतें चढवून युद्धाला तयार होऊन निघाले असतां भीष्मांनीं आपल्या सैन्याची क्रौंचासारखी रचना केली. त्याच्या चोंचीच्या ठिकाणीं महाधनुर्धारी द्रोण झळकत होते. अश्वत्थामा व कृप डोळ्यांच्या ठिकाणीं होते. कांबोज व बाल्हिक यांसह सर्व धनुर्धाऱ्यांमध्यें श्रेष्ठ कृतवर्मा डोक्याला होता. पुष्कळ राजांनिशीं दुर्योधन व शूरसेन मानेला होते. मद्र, सौवीर व केकय या लोकांनिशीं मोठ्या सेनेसह प्राग्ज्योतिष पोटावर होता.

प्रस्थलाचा राजा सुशर्मा आपल्या सेनेनिशीं चिलखत चढवून डाव्या बाजूला उभा होता. तुषार, यवन, शक व चूचुप ह्या जाती त्या व्यूहाच्या उजव्या बाजूला होत्या. श्रुतायु, शतायु व सोमदत्ति हे परस्परांचें रक्षण करीत त्याच्या पिछाडीला होते. याप्रमाणें उभय पक्षाची तयारी होऊन युद्धाला सुरवात झाली. रथी गजयोद्ध्यांवर, गजयोद्धे रथ्यांवर, स्वार रथ्यांवर, रथी स्वारांवर, स्वार स्वारांवर, रथी पायदळावर, स्वार पायदळावर याप्रमाणें वाटेल ते वाटेल त्यावर तुटून पडत होते. भीमसेन प्रभृति महारथ्यांनीं संभाळलेली पांडवसेना त्याचप्रमाणें भीष्म, कृप, द्रोण, प्रभृतींनीं संभाळलेली कौरवसेना ग्रहनक्षत्रांनीं पूर्ण अशा आकाशाप्रमाणें दिसत होती. पराक्रमी भीम द्रोणांना पाहून भरधाव घोडे सोडून त्यांच्या सैन्यावर चालून गेला. तेव्हां द्रोणांनीं त्याच्या मर्मस्थळांवर नेम धरून लोहमय बाण त्यावर सोडले. पण भीमानें त्यांच्या सारथ्याला यमसदनाची वाट दाखविली. तेव्हां स्वतःच घोडे आवरून प्रतापशाली द्रोणांनीं अग्नीनें ज्याप्रमाणें कापसाच्या राशीचा फन्ना उडवावा त्याप्रमाणें पांडवसैन्याचा फडशा पाडण्यास सुरवात केली. याप्रमाणें भीष्मद्रोणांच्या हातून मरूं लागलेले सृंजय व केकय पळ काढूं लागले. त्याचप्रमाणें भीमार्जुनांनीं घायाळ करून सोडलेली कौरवसेना एखाद्या यौवनमत्त सुंदरीप्रमाणें जागच्या जागीं स्तब्ध राहिली. याप्रमाणें नरवीरांचा फडशा पाडल्यानें दोन्ही व्यूह फुटून दोन्ही दळांची एकच गर्दी झाली. तो एक आश्चर्यजनक देखावा दिसत होता, एकमेकांच्या अस्त्रांचा प्रतिकार करीत दोन्ही दळें युद्ध करीत होतीं.

याप्रमाणें कौरवसैन्य नानाप्रकारचें असून नाना गुणांनीं संपन्न होतें. कोणाला फोडतां येणार नाहीं अशी आतांपर्यंत त्याची अनेक वेळां निरनिराळ्या प्रकारानें रचना झाली होती. त्याची अगदीं उल्हासवृत्ति असून कौरवांच्या कल्याणाकडे सदा त्याचें पूर्ण लक्ष होतें. तें आज्ञाधारक असून व्यसन म्हणून त्याला ठाऊक नव्हतें. त्याच्या पराक्रमाची पूर्वी कसोटी लागली होती. त्यांतील वीर उतार वयाचे किंवा अगदीं पोरही नसून फार काटकोळे किंवा अगदीं स्थूलही नव्हते. ते फार चपळ बनलेले व मजबूत बांध्याचे होते. त्यांतील योद्धे कसलेले असून रोगराई त्यांना बिलकुल ठाऊक नव्हती. सर्वांनीं चिलखतें चढविलीं असून सर्व हत्यारबंद होते. पुष्कळ हत्यारांचा त्यांजवळ संग्रह होता. तलवारीचें युद्ध, द्वंद्वयुद्ध, गदायुद्ध, भिंदिपाल, शक्ति, मुसल, विटा, कट्यारी, खंजिरी, सोट, असूड, बाण, कंपन, धनुष्य कणप, गोफणी इत्यादिकांच्या युद्धांत तसेंच निरनिराळ्या मुष्टियुद्धामध्यें ते पटाईत होते. सर्व विद्या त्यांना अवगत असून व्यायामाचा सराव असे. ते सर्व प्रकारच्या शस्त्रविद्येमध्यें निष्णात होते. हत्तीवर बसण्यांत व त्यावरून उतरण्यांत, पुढें मागें होण्यांत, नेमका घाव देण्यांत, कुच करण्यांत व माघार घेण्यांत, ते कुशल होते. हत्तीवर, घोड्यावर व रथांत बसण्यांत ते उत्तम ठरले होते. योग्य पारखीनें भरती करून तनखा वगैरे देऊन ते पदरीं ठेवले होते. उगीच मिळाले तसें, उपकारामुळें किंवा आप्तसंबंधानें किंवा मित्रसंबंधानें हलक्या कुळांतून घेतलेले असे ते नव्हते. ते सर्व थोर घराण्यांतले असून त्यांच्या आप्तसंबंध्यांना कौरवांनीं संतुष्ट करून त्यांवर फार उपकार केले होते. ते यशस्वी व बुद्धिमान होते. त्यांमध्यें आप्त लोकच फार भरले असून त्या सर्वांनीं अनेक युद्धप्रसंग पाहिले होते. ते जगविख्यात असून भीष्म, द्रोण, कृप, अश्वत्थामा, भूरिश्रव प्रभृति लोकमान्य उत्तम उत्तम वीरांनीं तें संभाळलें होतें. चोहोंकडून येऊन मिळणाऱ्या नद्यांनीं तुडुंबलेल्या महासागराप्रमाणें चारी दिशेनें येऊन मिळालेल्या लोकांनीं तें अगदीं भरगच्च होतें. नाना योद्धे हेच ज्याच्यामधील पाणी, हत्ती, घोडे ह्याच ज्यामधील भयंकर लाटा, गोफणी, तलवारी, गदा, शक्ति, प्रास यांनीं व्याप्त असून ध्वज, भूषणें, वगैरे रत्नांनीं शृंगारलेला धांवणाऱ्या अश्वरूपी वावटळानें खळबळून सोडलेला अशा पैलपार जाण्याला कठीण गरजणाऱ्या सागराप्रमाणें तें दिसत होतें. अशा प्रकारच्या सैन्याचा सुद्धां जेव्हां फडशा पडत होता तेव्हां दैवच प्रधान समजलें पाहिजे. आजपर्यंत अशा प्रकारचा प्रयत्न मनुष्यांच्या कधीं दृष्टीस पडला नव्हता. अनेक शस्त्रांचें वैभव

ज्यांजवळ होतें त्या कौरवांना पांडवांना जिंकतां न यावें व त्यांचाच युद्धामध्यें असा फडशा पडावा हें दैवाचेंच वैचित्र्य नव्हें तर काय ? अथवा ज्यांना पूर्वी सर्व कळून चुकलें होतें अशा विदुरांचें हिताचें व पथ्यकर भाषण मंदबुद्धि दुर्योधनानें ऐकलें नाहीं त्याचेंच हें प्रायश्चित्त नसावें कशावरून ? अथवा या सर्वच गोष्टी नियमानियमाप्रमाणें घडत असतात असें मानलें पाहिजे. कौरवांच्याच दोषानें द्यूत सुरू झालें. युद्ध तरी त्यांच्याचमुळें निघालें. तेव्हां त्या पापाचें ते हें फळ भोगीत होते. **आपण केलेल्या कर्मांचेंच फळ मनुष्याला इहलोकीं ह्मणा किंवा परलोकीं भोगावें लागतें.**

भीमानें भीष्मांनीं संभाळलेल्या त्या अफाट कौरवसैन्यामध्यें शिरून दुर्योधनाच्या भावांना गांठलें. सैन्यामध्यें शिरलेला पाहून त्याला जिवंत पकडावयाचा अशा निश्चयानें कौरवांनीं त्याला गराडा दिला. त्या सैन्याच्या मध्यें येऊन पोहोंचला तरी भीति ह्मणून त्याला शिवली नाहीं. धृतराष्ट्राच्या मुलाची पर्वा न करतां त्यानें त्यांचे हजारों ठळक ठळक गजयोद्धे, स्वार, रथी यांचा फडशा पाडला, व त्यांची खटपट ओळखून सगळ्यांनाच ठार करण्याचें मनांत आणिलें. आणि ह्मणून रथ सोडून तो हातांत गदा घेऊन कौरवसैन्याचा लोट चिरडीत सुटला. याप्रमाणें तो सैन्यामध्यें शिरला असतां धृष्टद्युम्नही द्रोणांना सोडून अफाट कौरवसैन्याचें निवारण करीत एकदम भीमसेनाच्या शून्य रथाजवळ येऊन पोहोंचला. त्याठिकाणीं भीमसारथि विशोकाला एकटा पाहून त्याच्या मनाला चरका बसून तो निःसंज्ञ झाला. पाण्यानें डोळे भरून गेल्यानें घसा दाटून येऊन त्यानें माझ्या प्राणापेक्षां मला प्रिय असा भीम कोठें आहे, ह्मणून कष्टी होऊन विशोकाला विचारिलें. तेव्हां विशोक हात जोडून त्याला ह्मणाला, ‘ मला येथें ठेवून क्षणभर तूं येथें वाट पहात रहा, तोंपर्यंत मला मारण्याला निघालेल्या यांचा समाचार घेऊन मी येतों, असें मला सांगून महाराज या अफाट कौरवसैन्यरूपी महासागरांत शिरले.’ हें विशोकाचें भाषण ऐकून धृष्टद्युम्न ह्मणाला, ‘मी रणांत असून भीम एकटाच शत्रुसैन्यामध्यें शिरला हें ऐकून पांडव काय ह्मणतील. माझ्या साहाय्यकारी व प्रिय भीमाला एकटा सोडून परतणें मला श्रेयस्कर होणार नाहीं. ह्मणून भीम जिकडे गेला आहे तिकडे मी जाणार. आतां मी शत्रूचा कसा फडशा पाडतों पहा !’ असें ह्मणून गदेनें मारून टाकलेल्या हत्तींच्या वाटांनीं तो बहादर शत्रुसैन्यामधून चालला. सर्व झाडांचा फडशा पाडणाऱ्या वावटळाप्रमाणें शत्रुसैन्याला भाजून काढतांना भीम त्याच्या दृष्टीस पडला. त्याच्या हातून मरून पाडणारें रथी, स्वार, शिपाई गजयोद्धे मोठ्यानें किंकाळी फोडीत होते; व कौरवसैन्यामध्यें अगदीं हाहाकार उडून राहिला होता. तेवेळीं सर्व अस्त्रविद्येमध्यें प्रवीण कौरववीर फिरून न डगतां त्यांच्या भोंवतीं जमून त्यावर शरवर्षाव करूं लागले. याप्रमाणें त्या वीराला घायाळ होऊन हातांत गदा घेऊन त्या सैन्यामधून अंतकाळच्या कालाप्रमाणें पायीं फिरतांना पाहून धृष्टद्युम्नानें त्याजवळ जाऊन त्याला धीर दिला व झटपट त्याच्या अंगांतून बाण उपसून काढून त्यानें त्याला आपल्या रथावर घेऊन घट्ट आलिंगन दिलें. इकडे त्या भयंकर गर्दीमध्यें दुर्योधनही आपल्या भावांकडे येऊन त्यांना ह्मणाला, ‘ हा दुरात्मा धृष्टद्युम्न भीमाला येऊन मिळाला आहे. मोठ्या सैन्यानिशीं आपण त्यावर चालून जाऊं या. नाहींतर तो आपल्या सैन्यावर हल्ला करील. ’ हें भावाचें भाषण ऐकून मोठ्या त्वेषानें युगान्तकाळच्या भयंकर धूमकेतूप्रमाणें ते सर्व हत्यारें उगारून धृष्टद्युम्नाला मारण्यासाठीं प्रत्यंचेच्या टणत्कारानें व रथाच्या घरघर आवाजानें चळकांप उत्पन्न करीत त्यावर चालून गेले, व त्यांनीं बाणांनीं त्याला झांकून काढलें. धृष्टद्युम्नानें त्वेषाला चढून त्यांना मारण्यासाठीं प्रमोहनास्त्र योजलें; त्यानें बुद्धि व सामर्थ्य जाऊन ते निःसंज्ञ झाले. तेच वेळीं द्रोणांनीं द्रुपदाला गांठून त्यावर तीन भयंकर बाण सोडले. ते बरेच लागल्यामुळें पूर्व वैर मनांत आणून द्रुपदानें पाय मागें घेतला. याप्रमाणें द्रुपदाला जिंकून द्रोणांनीं मोठ्यानें शंख फुंकला असतां त्याच्या शब्दानें सर्व सोमक घाबरून गेले. इतक्यांत द्रोणांना धृष्टद्युम्नानें धृतराष्ट्राच्या मुलांना प्रमोहनास्त्रानें निःसंज्ञ केल्याची बातमी कळून ते एकदम तेथून ज्या ठिकाणीं धृष्टद्युम्न व भीम याप्रमाणें खुशाल चरत चालले होते त्या ठिकाणीं आले व कौरवांना बेशुद्ध पाहून

प्रज्ञास्त्रानें त्यांनीं प्रमोहनास्त्राचा नाश केला. याप्रमाणें ते सावध झाले असतां भीमधृष्टद्युम्न फिरून त्यांशीं युद्ध करण्यासाठीं त्यांवर चालून गेले. तेव्हां युधिष्ठिरानें अभिमन्यु प्रभृति बारा वीरांना त्यांकडे जाऊन त्यांची बातमी घेऊन येण्यास सांगितलें असतां मोठ्या शौर्यानें लढणारे ते अभिमानी वीर बरें आहे ह्मणून सूर्य मध्यान्हाला आला असतां तिकडे निघाले. त्यांनीं आपल्या सैन्याची पाचराच्या आकाराची रचना करून धृतराष्ट्राचें रथदळ फोडून कौरवसैन्यांत प्रवेश केला. भीमसेनाच्या भयानें गर्भगळित होऊन धृष्टद्युम्नामुळें वेडे बनलेल्या कौरव सैन्याच्यानें त्यांना थोपवेना. ते कुलीन महाधनुर्धारी भीमधृष्टद्युम्नांचा शोध करीत धांवत निघाले. त्यांना पाहून भीमधृष्टद्युम्न हर्षभरित झाले. इतक्यांत आपले गुरु द्रोण यांना जोरानें आपल्याकडे येतांना पाहून धृष्टद्युम्न भीमाला केकयाच्या रथांत बसवून आपण सर्वास्त्रांमध्यें प्रवीण अशा द्रोणांवर रागानें चालून गेला. तो याप्रमाणें तुटून पडत असतां द्रोणांनीं त्याचें धनुष्य मोडून टाकलें, व धन्याच्या अन्नाची आठवण धरून दुर्योधनाच्या हितासाठीं हजारों बाण त्यावर सोडले. धृष्टद्युम्न दुसरें धनुष्य घेऊन द्रोणांवर बाण सोडूं लागला. त्यांनीं तेंही मोडून टाकून शिवाय त्याचे घोडेही मारून पाडले. आणि त्याच्या सारथ्यालाही यमसदनाला पाठविलें. तेव्हां धृष्टद्युम्न झटकन् त्यांतून खालीं उडी घेऊन अभिमन्यूच्या रथामध्यें चढला. तेव्हां पांडवांच्या चतुरंग सैन्याचा चळकांप उडून त्याची दाणादाण झाली असतां त्याला थोपविण्याचें कोणाच्या हातून होईना. खवळलेल्या समुद्राप्रमाणें तें सैन्य अगदीं हालून राहिलें होतें; व कौरवसैन्यामध्यें जिकडे तिकडे आनंदी आनंद होऊन शाबास शाबास ह्मणून शब्द कानीं पडूं लागले. इतक्यामध्यें दुर्योधन सावध होऊन आपल्या भावांनिशीं जमून तो भीमाशीं युद्ध करूं लागला. त्यांनीं एकमेकांवर बाणांचा मारा चालविला. दुर्योधनाचे भाऊ प्राणांची पर्वा न बाळगतां त्याला पकडण्याविषयीं पूर्वीं केलेल्या मसलतीची आठवण होऊन ठाम विचारानें त्याला धरण्याला निघाले. त्यांना आपल्यावर तुटून पडतांना पाहून फार खवळून भीमानें कौरवांवर लखलखीत बाण सोडले. इतक्यांत अभिमन्यु प्रभृति युधिष्ठिरानें पाठविलेल्या बारा वीरांनीं आपलीं सैन्यें चोहोंकडे उभीं करून कौरवांवर चाल केली. सुवर्णमुकुट घालून वैभवानें प्रति सूर्य व तेजानें प्रति अग्नि अशा त्या महाधनुर्धाऱ्यांना रथांत बसून येतांना पाहून कौरव भीमाला सोडून निघाले. ते जिवंत सुटले हें कांहीं भीमाला सहन झालें नाहीं. म्हणून तो फिरून त्यांना पीडा देत त्यांच्या मागून निघाला. याप्रमाणें अभिमन्यूला भीमधृष्टद्युम्नांशीं मिलाफ झालेला पाहून कौरवसैन्यांतील दुर्योधनप्रभृति महारथी धनुष्य घेऊन भरधांव घोडे सोडून त्यांवर चालून गेले व दुपार उलटल्यावर दोघांचें घनघोर रण माजले. अभिमन्यूनें विकर्णाचे घोडे मारून पाडले. याप्रमाणें रथाचे घोडे मेल्यानें विकर्ण चित्रसेनाच्या रथावर चढला. तेव्हां अभिमन्यूनें त्या दोघांना बाणांनीं झांकून काढलें. त्या दोघांनींही लोहमय बाण त्यावर सोडले; पण तो मेरूसारखा न डगमगतां उभा होता. दुःशासन पांच केकय भावांना लढवीत होता व द्रुपदसैन्य दुर्योधनाला तीक्ष्ण बाणांनीं सामना देत होतें. भीष्मांनींही पांडवसैन्याला अगदीं कालवून सोडलें होतें. इतक्यांत दक्षिण बाजूच्या फळीकडे अर्जुन शत्रूचा फडशा पाडीत असतां त्याच्या गांडीवाचा टणत्कार ऐकूं येत होता. रणभूमीला फार भयंकर व विचित्र स्वरूप आलें होतें.

याप्रमाणें दोन्ही दळें निकरानें लढत असतां सूर्य तांबडा होत चालला अशा समयीं युद्धाला उतावळा झालेला दुर्योधन भीमाला मारण्याच्या इरायानें त्यावर धांवून गेला. त्या हाडवैरी दुर्योधनाला आपल्याकडे येतांना पाहून भीम संतापून जाऊन त्याला ह्मणाला, 'अनेक वर्षें वाट पहात राहिलेली वेळ आज येऊन ठेपली आहे. रणांतून पळ काढणार नाहींस तर आज मी तुला जिवंत ठेवीत नाहीं. आज तुला मारून कुंतीचे तसेच द्रौपदीचे क्लेश व वनवास हे सर्व दूर करतों. मागें ज्या तूं मत्सरानें भरून जाऊन पांडवांना तुच्छ केलें आहेस त्या पापाबद्दल हें संकट तुझ्यावर ओढवलें आहे समज. कर्णाच्या व शकुनीच्या सल्ल्यानें नाचून पूर्वीं पांडवांची पर्वा न बाळगतां तूं जें स्वच्छंद

वागला आहेस, कृष्ण तुझ्यापुढें तोंड पसरण्याला आला असतां मूर्खपणानें त्याला सुद्धां ज्या तूं तुच्छ केलेंच; व उलूकाबरोबर ताऱ्यानें जो तूं निरोप पाठविलास त्या सर्वांबद्दल आज तुला तुझ्या अनुयायांसह व बांधवांसह मारून प्रायश्चित्त देतों. असें ह्मणून आपलें घोर धनुष्य ओढून व तें फिराफिरून फिरवून पेटलेल्या अग्नीच्या ज्वाळेप्रमाणें लागणाऱ्या बाणांनीं भीमानें दुर्योधनाचें धनुष्य व सारथी, घोडे छत्र व लखलखीत ध्वज तोडून काढिले. नाना रत्नांनीं विभूषित असा तो झळकणारा ध्वज ढगांमधून पडणाऱ्या विजेप्रमाणें खालीं आला. नंतर त्या वीरानें हांसत हांसतच अंकुशानें एखाद्या मोठ्या हत्तीला डवचावें त्याप्रमाणें दहा बाणांनीं दुर्योधनाला घायाळ केलें. तेव्हां जयद्रथ कसलेल्या लोकांनिशीं दुर्योधनाकडे जाऊन त्या निश्चेष्ट झालेल्या दुर्योधनाला त्यानें आपल्या रथावर उचलून घेतलें.

नंतर जयद्रथानें हजारों रथांनीं भीमाला गराडा देऊन त्याचा मार्ग अडविला. इकडे धृष्टकेतु, अभिमन्यु प्रभृति मंडळी कौरवांशीं झुंजतच होती. वज्रासारख्या कठिण बाणांचा कौरववीर अभिमन्यूवर मारा करीत असतां तो अस्त्रनिपुण बहादर न डगमगतां सर्वांना कांपवून सोडीत होता. विकर्णाच्या रथावर चौदा घोर भल्ल बाण सोडून त्यानें त्याच्या रथाचे ध्वज, सारथी व घोडे खालीं आणिले. पुढें त्यानें बारीक टोंकाचे बाण विकर्णावर सोडले असतां ते त्याच्या शरीरांतून पार जमिनीवर जाऊन पडले. याप्रमाणें त्याला घायाळ केलेला पाहून, त्याचे दुसरे भाऊ अभिमन्यु प्रभृति वीरांवर तुटून पडून मोठ्या आवेशानें त्यांनीं बाणांचा मारा सुरू केला. दुर्मुखानें श्रुतकर्म्याचे घोडे मारून सारथ्याला खालीं आणिलें असतांही रथांतून न ढळतां पेट घेतलेल्या उल्केसारखी भयंकर शक्ति त्यानें रागानें त्यावर फेंकली. ती दुर्मुखाचें चिलखत फोडून आपल्या तेजानें डोळे दिपवीत भूमींत शिरली. त्याला विरथ झालेला पाहून सुतसोमानें त्याला आपल्या रथांत घेतलें. इकडे श्रुतकीर्ति धृतराष्ट्रपुत्र जयत्सेनावर चालून आला असतां, जयत्सेनानें सहज एक बाण सोडून त्याचें धनुष्य मोडून टाकिलें. याप्रमाणें आपल्या भावाचें धनुष्य मोडलेलें पाहून तेजस्वी शतानिक मोठ्यानें गर्जत त्या ठिकाणीं येऊन थडकला. आणि आपलें भक्कम धनुष्य ओढून एखाद्या मस्त हत्तीप्रमाणें मोठ्यानें गर्जना करून कवच वगैरे फोडून आंत शिरणारा एक बाण त्यानें जयत्सेनाच्या हृदयांत मारला. याप्रमाणें चकमक चालली असतां, दुष्कर्ण आपल्या भावाजवळ येऊन मोठ्या त्वेषानें त्यानें शतानिकाचें धनुष्य कापून काढिलें. तेव्हां दुसरें मजबूत धनुष्य घेऊन, थांब थांब ह्मणून दुष्कर्णाला ओरडून सांगून, लखलखीत सापासारख्या तीक्ष्ण बाणांनीं त्याचे घोडे वगैरे मारून टाकून, एक मजबूत बाण त्याच्या हृदयांत मारून, वज्रानें मोडून पडलेल्या झाडाप्रमाणें त्यानें त्याला खालीं आणिलें. याप्रमाणें दुष्कर्णाला घायाळ झालेला पाहून पांच कौरववीरांनीं शतानिकाला ठार करण्याच्या इरायानें चोहोंकडून वेढून त्यावर बाणांचा मारा सुरू केला. रथाला रथ व हत्तीला हत्ती भिडून घनघोर रण सुरू होऊन कचल सुरू झाली. एकमेकांचा समाचार घेत असलेल्या त्या दोन्हींकडील वीरांचें सूर्यास्ताचे वेळीं चाललेलें तें यमपुरीला भर टाकणारें युद्ध फारच भयंकर दिसत होतें. इतक्यांत भीष्म पुष्कळ पांचालसैन्याला यमसदनाला पाठवून पांडवसैन्याची फाकाफाक करून संध्याकाळ झाल्यानें युद्ध बंद करून आपल्या शिबिराकडे गेले. इकडे धर्मराजही धृष्टद्युम्न व भीम यांना पाहून आनंदानें त्यांचें मस्तक हुंगून आपल्या शिबिराकडे गेला.

---

## १४ सातवा दिवस. ( ६.८०-८६ )

दोन्ही बाजूंचे वीर दुसरे दिवशीं फिरून युद्धाच्या तयारीनें रणभूमीवर सज्ज होऊन राहिले. तेव्हां अंगांतून वाहणाऱ्या रक्तानें भरून निघालेला असा दुर्योधन चिंतेनें ग्रासला जाऊन भीष्मांना ह्मणाला, ‘ आपण उग्र व भयानक अशा सैन्याची अनेक प्रकारें अनेकवार नीट रचना केली. परंतु पांडवांच्या शूर महारथ्यांनीं ती सर्व फोडून सैन्याचा फडशा पाडला आहे; व सर्व नांवाजलेल्या वीरांना बेसावध करून वज्रासारख्या मकरव्यूहामध्यें सुद्धां शिरून कालदंडासारख्या घोर बाणांनीं भीमानें मला जर्जर करून सोडलें. त्याला खवळलेला पाहून भ-

यानें अगदीं घाबरून आज माझ्या मनाला चैन नाहीं. आपल्याच रूपेनें पांडवांना मारून जय मिळवावा असा माझा हेतु आहे.' याप्रमाणें त्याचें भाषण ऐकून तो रागावला आहेसें पाहून शस्त्रधाऱ्यांमध्यें श्रेष्ठ भीष्म कांहीं वाईट न वाटतां हांसतच त्याला ह्मणाले, 'वाटेल तें करून तुला विजय व सुख देण्याचें माझ्या मनांत आहे. मी कुचराई बिलकूल करीत नाहीं. परंतु पांडवांना जे रणांत साहाय्य करीत आहेत ते यशस्वी, महारथी, शूर व सर्व अस्त्रांमध्यें निष्णात असून श्रम ह्मणून त्यांच्या गांवीं नाहीं, व ते रणांत क्रोधरूपी विष सोडीत असतात. तुझ्याशीं हाडवैर बांधून वीर्यानें फुगलेल्या ह्यांचा पराभव कधींही होणें शक्य नाहीं. प्राणाची पर्वा न करतां मी रणामध्यें तुझ्यासाठीं कटून यत्न करीन.' हें ऐकून मोठा खूष होऊन दुर्योधनानें सर्व राजांना आपल्या सर्व सैन्यांनिशीं बाहेर पडण्यास सांगितलें. त्यावरून नानाशस्त्रांनीं संपन्न चतुरंगदळ मोठ्या हर्षानें बाहेर पडून झळकत युद्धाला सज्ज होऊन निघालें असतां पिंगट वर्णाच्या धुळीनें सूर्यकिरणांना अगदीं झांकून टाकिलें. ज्यामध्यें अति उग्र हत्ती व नानाप्रकारचे सैनिक होते असें तें कौरवसैन्य युगांतकालीन मेघमंडळाप्रमाणें दिसत होतें. यावेळीं दुर्योधनाला फिरून चिंतेमध्यें मग्न झालेला पाहून त्याला संतोषविण्यासाठीं भीष्म ह्मणाले, 'मीं व द्रोण वगैरे महारथी यांनीं तुझ्यासाठीं प्राणाची पर्वा सोडिली आहे. आपल्यापाशीं हजारों उत्तम रथी आहेत. त्याचप्रमाणें चांगल्या चांगल्या ठिकाणचे घोडे असून त्यावरचे स्वार कसलेले आहेत. मस्त हत्ती आपल्यापाशीं पुष्कळ आहेत. त्याचप्रमाणें नानादेशचे उत्तम प्रहार करणारे शिपाई तुझ्यासाठीं युद्धाला तयार होऊन उभे आहेत. हे सर्व देवांनाही अजिंक्य आहेत असें मला वाटतें. तथापि देवांना देखील पांडव रणामध्यें अजिंक्य आहेत. ते महेंद्रासारखे पराक्रमी असून त्यांना श्रीकृष्ण साहाय्य आहे. आतां तुझ्या इच्छेप्रमाणें मी आपली शिकस्त करीन. पांडवांना तरी रणांत मी जिंकीन. किंवा ते मला जिंकतील.' असें सांगून त्याच्या मनांतील चिंता दूर करणारें मोठें गुणावह औषध त्यांनीं दुर्योधनाला दिल्यामुळें त्याच्या हृदयांतील शल्य दूर झालें. नंतर स्वच्छ उजाडल्यावर नानाव्यूहरचनेमध्यें प्रवीण अशा वीर्यशाली भीष्मांनीं नानाशस्त्रांनीं व्याप्त व ठळक ठळक योद्धे, हत्ती व ऋष्टी, तोमर घेतलेले स्वार यांनीं पूर्ण असा मंडलव्यूह रचला. प्रत्येक हत्तीपाशीं सात सात रथ, प्रत्येक रथाजवळ सात सात स्वार, प्रत्येक स्वाराजवळ दहा तिरंदाज व प्रत्येक धनुर्धाऱ्याभोंवतीं दहा ढाली घेऊन लढणारे याप्रमाणें त्यांनीं महा महारथ्यांनीं सैन्याची रचना लावून ते स्वतः त्याचा सांभाळ करीत होते. दहा हजार हत्ती, स्वार, व रथदळ यांसह धृतराष्ट्रपुत्र सज्ज होऊन भीष्मांना राखीत होते. व वीरांचे रणशब्द, रथांचा घरघर आवाज व वाद्यांचा गजर यांचा एकच नाद उठून राहिला. याप्रमाणें भीष्मांनीं रचलेला तो पश्चिमाभिमुख दुर्भेद्य व्यूह पाहून युधिष्ठिरानें स्वतः आपल्या सैन्याचा वज्रव्यूह रचला. याप्रमाणें सैन्याची रचना होऊन रथी, स्वार वगैरे आपापल्या जागीं उभे राहिल्यावर त्यांनीं सिंहनाद केला. व्यूह फोडण्याच्या इरायानें युद्धाला आतुर होऊन दोन्ही दळांतील वीर आपापल्या सैन्यांनिशीं निघाले. द्रोण विराटावर चालून गेले. अश्वत्थामा शिखंडीवर चालून गेले. दुर्योधन स्वतः धृष्टद्युम्नावर चालून गेला. नकुलसहदेव शल्यावर चालून गेले. विंदानुविंद इरावानावर चालून गेले. पुष्कळ राजे एकवटून अर्जुनाशीं भिडले भीमसेनानें हार्दिक्याला सामना दिला. चित्रसेन, विकर्ण व दुर्मर्षण यांच्याशीं अभिमन्यु युद्ध करीत होता. महाधनुर्धारी प्राग्ज्योतिषाचा राजा एखाद्या मस्त हत्तीनें ज्याप्रमाणें दुसऱ्यावर चालून जावें त्याप्रमाणें घटोत्कचावर चालून गेला. भूरिश्रवा तयार होऊन धृष्टकेतूशीं, आलंबुष सात्यकीशीं, युधिष्ठिर श्रुतायुषाशीं व चेकितान कृपांशीं युद्ध करूं लागले. बाकीचे सर्व भीष्मांवरच चालून गेले. अनेक आयुधें घेऊन पुष्कळ राजांनीं अर्जुनाला वेढलें असतां अर्जुनानें संतापून धनुष्याची प्रत्यंचा ओढून त्या राजमंडळावर बाणांचा वर्षाव सुरू केला. त्यांनींही त्याला बाणांनीं झांकून काढलें. तेव्हां अर्जुनानें संतापून जाऊन इंद्रास्त्रानें त्यांचें निवारण केलें. त्याच्या बाणांच्या तावडींतून सुटलेला असा तेथें एकही दिसेना. त्याप्रमाणें कापाकापी चालली असतां कौरववीरांनीं

भीष्मांकडे धांव घेतली. अगाध डोहांत बुडणाऱ्या त्या वीरांना भीष्म तरण्याला नौका झाले. कौरव-सैन्याची फुटाफूट होऊन वाऱ्यानें हलवून सोडलेल्या महासागराप्रमाणें त्याची अगदीं खळबळ उडून राहिली होती. याप्रमाणें सैन्याची खळबळ उडून भीष्म अर्जुनावर चालून आले असतां दुर्योधनानें अर्जुनाचा तो पराक्रम पाहून गडबडीनें सुशर्माप्रभृति राजांकडे येऊन, 'भीष्म आपल्या जिवाची पर्वा न धरतां अर्जुनाबरोबर युद्ध करण्यासाठीं गेले आहेत, तेव्हां त्यांची तुह्मी सर्व मोठ्या हुशारीनें पाठ राखा,' ह्मणून सांगितलें. त्याबरोबर सर्व राजेलोकांचें सैन्य भीष्मांबरोबर चाललें व बलशाली भीष्मांनीं एकदम अर्जुनावर चाल करून त्याला गांठलें. त्यांच्या चोहींभोंवतीं त्रिगर्त मंडळी होती.

इकडे द्रोणांनीं विराटाचा ध्वज तोडून पाडून धनुष्य मोडून टाकलें. तेव्हां विराटानें तें मोडकें धनुष्य टाकून लगेंच दुसरें एक मजबूत धनुष्य घेतलें व लखलखीत अशा विषारी सापासारखे बाण सोडून द्रोणांचे घोडे, ध्वज व सारथि या सर्वांचा फडशा पाडला; व द्रोणांनींही खवळून जाऊन त्याचे घोडे व सारथि मारून पाडले. तेव्हां त्या रथांतून खालीं उडी घेऊन तो एकदम आपल्या मुलाच्या रथावर चढला. व दोघां बापलेकांनीं द्रोणांना बाणांनीं झांकून काढलें. तेव्हां द्रोणांनीं एक आशीविषासारखा बाण शंखावर सोडला. तो त्याच्या पोटांतून पार निघून जाऊन रक्तानें भिजून खालीं भूमीवर जाऊन पडला. लगेच धनुष्य व बाण हातांतून गळून जाऊन शंख आपल्या बापाजवळ रथामध्यें पडला. आपला मुलगा मेलेला पाहून आ पसरलेल्या काळाप्रमाणें द्रोणांना पाहून रण सोडून विराटानें पळ काढला. नंतर द्रोणांनीं पांडवसैन्याची पूर्ण वाताहत लाविली. इकडे शिखंडीनें अश्वत्थाम्यांशीं भिडून त्यांच्या भिवयांच्यामध्यें तीन तीक्ष्ण नाराच बाण सोडले. ते वेळीं अश्वत्थाम्यांनीं एका निमिषामध्यें त्याचा ध्वज, सारथि, घोडे व आयुधें तोडून पाडलीं. त्यानें खवळून जाऊन शिखंडी हातांत ढाल व लखलखीत तलवार घेऊन रथाखालीं उतरला व ससाण्याप्रमाणें शत्रूला ताप देत सुटला, व तो तलवारीची फेर करीत सुटला असतां अश्वत्थाम्यांना त्यावर नेम मारण्यास संधि मिळेना अश्वत्थाम्यांनीं सोडलेले हजारों बाण तो आपल्या धारेच्या तलवारीनें छाटून काढीत होता. तेव्हां आश्वत्थाम्यांनीं जिच्यावर शंभर चंद्र काढले होते अशी त्याची लखलखीत ढाल व तलवार कापून काढून पुष्कळ तीक्ष्ण बाणांनीं त्याला जर्जर करून सोडलें. शिखंडीनें झळझळीत सापासारखी ती मोडकी तलवार फिरवून त्यावर सोडली. अश्वत्थाम्यांनीं मोठ्या हातचलाखीनें त्या मोडक्या तलवारीचेही तुकडे केले; व पुष्कळ तीक्ष्ण बाणांनीं शिखंडीला घायाळ केलें. याप्रमाणें त्यांनीं जर्जर होऊन तो एकदम सात्यकीच्या रथावर चढला. इकडे हा सात्यकि अलंबुष राक्षसाशीं मोठ्या निकरानें लढत होता. राक्षसी मायेनें अनेक बाणांनीं त्या राक्षसानें त्याला झांकून काढलें असतां अर्जुनापासून संपादिलेलें ऐंद्र अस्त्र सोडून त्यानें त्या राक्षसाच्या सर्व मायेचा फडशा उडविला, व पावसाळ्यांत मेघानें ज्याप्रमाणें जलधारांनीं पर्वताला झांकून काढावें त्याप्रमाणें त्यानें त्या राक्षसाला बाणांनीं झांकून काढलें. तेव्हां तो राक्षस भिऊन जाऊन सात्यकीला सोडून रणांतून पळून गेला. या प्रमाणें इंद्रालाही अजिंक्य अशा त्या राक्षसेंद्राला जिंकून सत्यकीनें मोठ्यानें सिंहनाद केला.

इकडे ह्याचवेळीं धृष्टद्युम्नानें दुर्योधनावर तीक्ष्ण बाण सोडून त्याला त्यांनीं झांकून काढलें. त्यानें न गडबडतां दुर्योधनानें धृष्टद्युम्नावर उलट बाण सोडले. तेव्हां धृष्टद्युम्नानें खवळून जाऊन त्याचें धनुष्य मोडून टाकलें, घोडे मारून पाडले, व त्यालाही बाणांनीं जर्जर केलें. या प्रमाणें रथाचे घोडे मेल्यामुळें तलवारीनिशीं रथाखालीं उडी घेऊन पायानेंच तो धृष्टद्युम्नावर चालून गेला. तेव्हां त्यावर पूर्ण भक्ति असलेल्या शकुनीनें येऊन त्याला एकदम आपल्या रथावर घेतलें. इकडे मोठ्या ढगानें सूर्याला झांकून काढावें त्याप्रमाणें कृतवर्मा भीमाला व भीम कृतवर्म्याला बाणांनीं झांकून काढीत असतां भीमानें कृतवर्म्याचे चार घोडे, सारथि व शृंगारलेला ध्वज यांची वाताहत लावून त्याचें सर्व शरीर जखमांनीं भरून टाकलें. तेव्हां दुर्योधनादेखत तो धृतराष्ट्राचा मेहुणा जो वृषक त्याच्या रथावर चढला.

कौरवपक्षाचे लोक आपल्या शक्त्यनुरूप उत्साहानें अगदीं कटून लढत होते, तरी गंगेचें गोड पाणी ज्याप्रमाणें समुद्राला मिळून त्याच्या सहवासानें खारें व्हावें त्याप्रमाणें पांडववीरांशीं संबंध येऊन त्यांचा पराक्रम व्यर्थ होत होता. यथाशक्ति खटपट करून ते अचाट कर्म करीत होते व पुण्यवानांना मिळणाऱ्या लोकांची इच्छा धरून जिवाची सुद्धां पर्वा न करितां लढत होते; तरी धृतराष्ट्र व दुर्योधन यांच्या अपराधामुळें व यमलोकाला भर टाकण्यासारखा पृथ्वीचा भयंकर प्रळयकाळ आला असल्यामुळें त्यांच्या पराक्रमाचा कांहींच उपयोग होत नव्हता. इकडे अवंतीचे विंदानुविंद इरावानावर तुटून पडून त्याच्याशीं निकरानें लढत होते. इरावानानें त्यांचा सारथी मारून पाडल्यानें रथाचे घोडे उधळून रथाची चोहोंकडे धांवपळ उडाली. इकडे घटोत्कच भगदत्ताशीं भिडला होता. भगदत्तानें पांडवसैन्याची दाणादाण उडविली असतां घटोत्कचानें ढगानें ज्याप्रमाणें मेरू पर्वताला झांकून काढावें त्याप्रमाणें बाणांनीं त्याला झांकून काढलें. त्यानें भगदत्तावर मोठी वेगवान् शक्ति सोडिली. तिचेही भगदत्तानें तीन तुकडे केलेले पाहून घटोत्कचानें भयानें माघार घेतली. इकडे शल्य आपले भाचे जे नकुलसहदेव त्यांच्यांशीं भिडला होता. सहदेवानें त्याला बाणांनीं झांकून काढिलें. तें आपले भाच्यांचें अलौकिक कर्म पाहून शल्याला मोठा आनंद झाला. कारण त्याच्या आईच्या संबंधानें त्याचें त्यांवर प्रेम होतें. हांसत हांसतच त्यानें नकुलाचे घोडे वगैरे मारून टाकले. तेव्हां नकुल एकदम आपल्या भावाच्या रथावर चढला व त्या दोघांनीं मिळून आपलीं मजबूत धनुष्यें ओढून शल्याच्या रथाला बाणांनीं झांकून काढलें. तरी तो तिळमात्र डगला नाहीं. तेव्हां सहदेवानें रागावून गरुडासारखा वेगवान् बाण त्याच्यावर सोडला. तो शल्याच्या आंगांतून निघून जाऊन खालीं पडला. त्यानें घायाळ होऊन तो रथांत मटकन् बसला व त्याच्या डोळ्यांपुढें अंधेरी आली. याप्रमाणें त्याला घेरी आलेली पाहून, त्याचा सारथी त्याला परत घेऊन निघाला. शल्यासारख्या वीराचा रथ परतलेला पाहून सर्व कौरव खचून गेले.

इकडे सूर्य डोक्यावर आला असतां युधिष्ठिरानें श्रुतायूला पाहून घोडे त्यावर सोडून बाणाचा वर्षाव चालविला. तेव्हां त्याचें निवारण करून श्रुतायूनें सात बाण युधिष्ठिरावर सोडले. ते त्याचें चिलखत फोडून जणूं त्याचे प्राणच धुंडाळित आहेत अशा रीतीनें त्याचें रक्त पिऊं लागले. तेव्हां युधिष्ठिरानेंही खवळून डुकराच्या कानासारख्या फाळीचा बाण त्याच्या हृदयावर मारला. व दुसऱ्या एका भल्ल बाणानें त्याचा ध्वज मोडून पाडला. याप्रमाणें युगाचे शेवटीं जाळून टाकणाऱ्या अग्नीप्रमाणें त्याला खवळलेला पाहून देव, राक्षस व गंधर्व यांची सुद्धां गडबड उडून जाऊन सर्व जग अस्वस्थ झालें. कौरव सैन्यांना जिवाची आशा मुळीं उरली नाहीं. त्यानें श्रुतायूचें तें प्रचंड धनुष्य मुठीजवळ तोडून टाकून एक नाराच बाण त्याच्या छातीवर मारला. व त्याचे घोडे वगैरे मारून टाकल्यानें श्रुतायूनें रणांतून पळ काढला. तेवेळीं कौरवसैन्य परत फिरलें असतां आ पसरलेल्या काळाप्रमाणें तो त्यांचा फडशा उडवीत चालला. इकडे चेकितान व कृप हे एकमेकांशीं भिडून एकमेकांशीं निकरानें लढत होते. ते दोघे बलशाली तलवारीचा एकमेकांवर घाव करीत होते. श्रमानें व तलवारीच्या घावांनीं मूर्छित होऊन ते खालीं पडले असतां स्नेहामुळें शिशुपालाच्या मुलाचा मुलगा करकर्ष यानें धांवत येऊन चेकितानाला आपल्या रथावर घेतलें. व तसेंच शकुनीनेंही कृपांना आपल्या रथावर घेतलें. इकडे भूरिश्रवा व धृष्टकेतु एकमेकांशीं भिडले असतां भूरिश्रव्यानें धृष्टकेतूच्या रथाची वाताहत लावल्यामुळें तो शतानिकाच्या रथावर चढला.

चित्रसेन, विकर्ण व दुर्मर्षण हे तिघे अभिमन्यूवर चालून गेले असतां कफ, वात, पित्त यां तिघांशीं शरीराचा ज्याप्रमाणें झगडा चालावा त्याप्रमाणें त्यांचें तुंबळ युद्ध जुंपलें. अभिमन्यूनें त्या तिघां धृतराष्ट्रपुत्रांना रथांखालीं आणिलें. परंतु भीमाच्या प्रतिज्ञेची आठवण होऊन, त्यांना त्यानें ठार मात्र केलें नाहीं. तेव्हां देवांना देखील हार न जाणाऱ्या भीष्मांना चतुरंग सेनेनिशीं त्यांना हात देण्यासाठीं एकट्या अभिमन्यूवर चालून जातांना पाहून, अर्जुनानें श्रीकृष्णाला आपला रथ तिकडे ने-

ण्यास सांगितलें. तेव्हां तो अर्जुनाचा रथ तिकडे वळलेला पाहून कौरवसैन्यांत एकच हाहाकार उडाला. भीष्मांनीं राखलेल्या तुकडीकडे जाऊन आपला पूर्व वैरी जो सुशर्मा त्याला अर्जुनानें गांठलें. सुशर्म्यानें पुढून मागून व सर्व बाजूंनीं त्याला वेढून बाणांनीं त्याला झांकून काढिलें. तेव्हां घनघोर युद्ध सुरू होऊन रक्ताचा पूर वाहूं लागला. पाय दिलेल्या सापाप्रमाणें फुसफुसत एकेका बाणानें अर्जुनानें कौरववीरांचीं धनुष्यें कापून काढिलीं व बाणांचा त्यांचेवर मारा चालविला. तेव्हां त्यांचे बाण लागून आंग फुटून रक्तानें भरून जाऊन कौरववीर हात, पाय, डोकें वगैरे तुटून मरून पटापट खालीं पडूं लागले. याप्रमाणें त्यांचा फडशा चालला असतां त्रिगर्तांचा राजा त्याची पाठ राखणाऱ्या बत्तीस वीरांसह अर्जुनावर तुटून पडला. व अर्जुनाला घेरून आपल्या भयंकर धनुष्याचा टणत्कार करीत त्यावर त्यांनीं बाणांचा वर्षाव चालविला. त्यानें खवळून अर्जुनानें त्या सर्वांना मारून टाकलें, व तो भीष्मांवर चालून गेला. इकडे युधिष्ठिरही आपला वांटा जो शल्य याला सोडून भीमप्रभृति मंडळीसह भीष्मांवरच चालून गेला. याप्रमाणें पांची पांडवांचा मारा चालला असतांही भीष्म मुळीं डगले नाहींत. इतक्यांत अचाट पराक्रमी जयद्रथानें त्या पांची महारथ्यांचीं धनुष्यें कापून काढिलीं, व दुर्योधनानेंही मोठ्या त्वेषानें अग्नीसारखे बाण त्यांवर सोडले. इकडे रूप, शल्य, शल यांनींही बाणांनीं पांडवांना जर्जर करून टाकिलें होतें. इकडे भीष्मांनीं शिखंडीचें धनुष्य तोडलेलें पाहून युधिष्ठिराला राग येऊन तो शिखंडीला ह्मणाला, 'सूर्याप्रमाणें लखलखीत बाणांचा लोट सोडून मी भीष्मांला मारीन अशी प्रतिज्ञा करून ती शेवटाला कां नेत नाहींस. भीष्मांना कां मारीत नाहींस ? प्रतिज्ञा खरी करून आपला धर्म, कुल व यश राख. उग्र पराक्रमी भीष्म माझ्या सर्व सैन्याला मोठे प्रखर बाण सोडून काळाप्रमाणें भाजून काढीत आहेत. धनुष्य मोडून जाऊन हार खाऊन पाय मागें घेऊन बांधवांना व भावांना सोडून कोठें चाललास? अतुल पराक्रमी भीष्मांना पाहून तूं खरोखर घाबरला आहेस. तुझ्या तोंडावर सुद्धां प्रफुल्लता दिसत नाहीं. तुला न कळत नरवर अर्जुन या घोर रणप्रसंगामध्यें भीष्मांशीं भिडला असतां तूं असा भीष्मांसंबंधानें कां घाबरला आहेस ?" हें धर्मराजाचें निष्ठुर टोचणीचें बोलणें ऐकून हा आपला धिःकार आहे असें समजून तो एकदम भीष्मांना मारण्याकरितां लगबगीनें निघाला. त्याला शल्यानें घोर अस्त्रानें वाटेंतच थोपविलें. त्या अस्त्रानें न डगमगतां शिखंडीनें त्याच्या उलट उग्र असें वारुणास्त्र काढलें आणि त्यानें शल्याचें अस्त्र कापून काढलें. भीष्मांनीं युधिष्ठिराचा ध्वज व धनुष्य मोडून टाकलें असतां धनुष्यबाण टाकून युधिष्ठिर भयभीत झाला. इकडे भीष्म गदा घेऊन जयद्रथावर चालून गेला. याप्रमाणें गदा हातांत घेऊन भीमसेनाला येतांना पाहून, यमदंडासारखे भयंकर बाण जयद्रथानें त्यावर सोडिले, त्यांची पर्वा न करितां भीमानें जयद्रथाचे पारवे घोडे मारून टाकले. तें पाहून चित्रसेन वेगानें हत्यार उगारून भीमसेनाला मारण्याकरतां त्यावर चालून आला. भीमसेन गदेनें त्याला हटवीत त्याकडे वळला. तेव्हां त्या गदेचा मारा चुकविण्यासाठीं सर्वांना मूर्छित करून टाकणाऱ्या त्या घनघोर प्रसंगापासून निसटून कौरवसेनेनें पळ काढला.

याप्रमाणें ह्या तुंबळ गर्दीमध्यें भीष्म एकदम युधिष्ठिरावर चालून गेले असतां सर्व सृंजय चळचळ कांपूं लागले व त्यांना युधिष्ठिर काळाच्या जबड्यांत सांपडलासें वाटूं लागलें. दोघेही एकमेकांवर बाण सोडून एकमेकांना झांकून काढीत असतां, आकाशामध्यें ते बाण पक्ष्यांच्या घोळक्याप्रमाणें दिसत होते. एका निमिषार्धांत बाणसमूहांनीं भीष्मांनीं युधिष्ठिराला अगदीं झांकून काढिलें. तेव्हां युधिष्ठिरानें भीष्मांला मारण्यासाठीं पुष्कळ राजांना आज्ञा केली असतां रथ्यांचा मोठा वेढा भीष्मांभोंवतीं पडला. तरी ते आपल्या धनुष्यानें क्रीडा करीतच त्या महारथ्यांना मारून पाडीत होते. सैन्य अव्यवस्थित होऊन एकच गर्दी उसळली असतां एक एक योद्धा एकेका योध्याला बोलावून त्याच्याशीं युद्धाला भिडत होता. शिखंडी भीष्मांशीं भिडून थांब थांब ह्मणून त्यांच्यावर तुटून पडला. त्याचा स्त्रीपणा लक्षांत आणून त्याच्याकडे दुर्लक्ष करून भीष्म सृंजयावर चालून गेले. धृष्टद्युम्न व सात्यकी

शक्ति, तोमर यांचा वर्षाव करून कौरवसैन्याला त्राहि त्राहि करून ठार करीत होते. तरी उदार बुद्धि ठेवून कौरव रण सोडीत नव्हते; व उत्साहानुरूप तेही पांडवसेनेला मारून पाडीत होते. धृष्टद्युम्न कौरवसैन्याला मारून पाडीत असतां त्यांमध्यें एकच कल्होळ उडला. त्यांचा तो आरडा ऐकून विंदानुविंद लगबगीनें धृष्टद्युम्नावर चालून आले व त्यांनीं त्याला बाणांनीं झांकून काढिलें. महाबलशाली धृष्टद्युम्नानें झटकन् आपल्या रथांतून खालीं उडी घेऊन तो एकदम सात्यकीच्या रथावर चढला. त्या वेळीं राजा युधिष्ठिर मोठी सेना घेऊन विंदानुविंदांबर चालून गेला. तेव्हां दुर्योधनही आपल्या सेनेनिशीं विंदानुविंदांच्या भोंवतीं जमून राहिला.

याप्रमाणें युद्धामध्यें अचाट काम चाललें असतां, सूर्य अस्ताला जाऊन कांहीं दिसेनासें झालें. रक्ताच्याच लाटांनीं भरलेली भयंकर नदी वाहूं लागली. व त्या संध्यासमयीं एका क्षणांत ती नदी कोल्ह्यांनीं गजबजून गेली. अमंगल कोल्ह्यांच्या भयंकर कोल्हेकुईंनीं त्या रणभूमीला भयंकर स्वरूप आलें होतें. राक्षस, पिशाच त्याचप्रमाणें दुसरे मांसभक्षक हजारों प्राणी त्या ठिकाणीं जिकडे तिकडे दिसूं लागले. अर्जुन सुशर्मादिकांना त्यांच्या अनुयायांसह जिंकून त्या सैन्यांमधून आपल्या शिबिराकडे गेला.

पुढें सर्व कौरवपांडववीर आपापल्या तुकडीनिशीं आपापल्या शिबिराला जाऊन एकमेकांची वाहवा करूं लागले. मग यथाक्रमानें तळाच्या रक्षणाला पाहारा ठेवून अंगांतून बाण उपसून काढून निरनिराळ्या पाण्यांत ते न्हाले. व ब्राह्मणांनीं स्वस्त्ययनें केल्यावर भाटांचे स्तुतिपाठ व गाण्याबजावण्याचे सुस्वर नाद यांमध्यें त्या यशस्व्यांनीं आनंदांत रात्र घालविली. एका क्षणामध्यें ती सर्व रणभूमी स्वर्गाप्रमाणें भासूं लागली. त्या महारथ्यांपैकीं कोणाच्याही तोंडून युद्धाची वार्ताही निघत नव्हती.

## १५ आठवा दिवस—इरावानाचा वध.
### ( ६–८७–९० )

याप्रमाणें रात्र घालवून हुशार झाल्यावर कौरवपांडव फिरून युद्धाला निघाले. भीष्मांनीं पांडवांविरुद्ध भयंकर व्यूह रचला. मालव, दक्षिणेकडचे व अवंतीचे लोक बरोबर घेऊन भीष्म सर्व सैन्याचे पुढें होते. कुलिंद, पारद, क्षुद्रक व मालव यांनिशीं द्रोण त्यांच्या मागोमागच चालले होते. द्रोणांच्या मागून मगध, कलिंग व पिशाच्च या लोकांनिशीं भगदत्त चालला होता. त्याच्या मागून कोसलदेशाचा बृहद्बल, मेकल व त्रैपुर यांसह चालला होता. त्याच्या मागून प्रस्थलाचा राजा पुष्कळ कांबोज व हजारों यवन बरोबर घेऊन चालला होता. त्रैगर्ताच्या मागून वाटेल तसे तुटून पडणारे अश्वत्थामे सिंहनादानें पृथ्वी दणाणून सोडीत चालले होते. याप्रमाणें ही सागरासारखी मोठी सेना व्यवस्थित रीतीनें चालली असतां, त्यामध्यें पताका, पांढरीं छत्रें, निरनिराळीं मौल्यवान् बाहूभूषणें व धनुष्यें झळकत होतीं. तेव्हां धृष्टद्युम्नानें शत्रूंच्या व्युहाचा पार फडशा उडवून देणारा असा फार भयंकर शृंगारक नांवाचा व्यूह रचला. त्याच्या शिंगाकडे एक हजार रथी व त्यांत स्वार व पायदळ यांनिशीं भीम व सात्यकी होते. त्यांच्या मागें कृष्णसारथी नरश्रेष्ठ अर्जुन होता. त्याच्या मध्याला युधिष्ठिर व नकुलसहदेव होते. त्याचप्रमाणें युद्धशास्त्रामध्यें निपुण अशा महामहाधनुर्धरांनीं तो व्यूह भरून काढला होता. याप्रमाणें पांडव हा प्रचंड व्यूह रचून, युद्धाला तयार होऊन उभे राहिले. ढोलगी व शंख यांच्या शब्दांनीं त्याचप्रमाणें वीरांच्या आरडाओरड्यानें सर्व दिशा दणाणून गेल्या. नंतर दोन्ही दळांतील वीर परस्परांकडे डोळे रोखून धरून एकमेकांला युद्धाला हाक मारूं लागले. तेव्हां एकमेकांला मारण्याला सुरवात होऊन भयंकर युद्ध सुरू झालें. आ पसरलेल्या गर्भगळित करून सोडणाऱ्या मोठमोठ्या सापांप्रमाणें तीक्ष्ण नाराच बाण, व ढगांतून चमकणाऱ्या विजांप्रमाणें तेलानें घांसलेल्या लखलखित शक्ति व सोन्यानें मढविलेल्या गदा रणामध्यें जिकडे तिकडे एकदम येऊन पडत होत्या. स्वच्छ आकाशाप्रमाणें लखलखित तलवारी व बैलाच्या कातड्याच्या चित्रविचित्रित ढाली त्या रणभूमीवर शोभत होत्या. त्या रणामध्यें ते एकमेकांशीं भिडत असतां रथी लोक आपला

रथ शत्रूंवर नेऊन त्याच्या जुवाला जूं भिडवून लढत होते. कांहीं हत्तीवरून युद्ध करीत असतां सुळ्याला सुळे घासले गेल्यामुळें धुरांनीं युक्त असा अग्नि जिकडे तिकडे बाहेर पडत होता. पायदळ, रथ, स्वार, हत्ती हे एकमेकांशीं भिडून, एकच गर्दी होऊन गेली होती. त्या रणांगणामध्यें भीष्म खवळून जाऊन जिकडे तिकडे झळकत असतां तापणाऱ्या सूर्यप्रमाणें त्यावर पांडवांची दृष्टि ठरेना. तेव्हां युधिष्ठिराच्या सांगण्यावरून सर्व पांडवसैन्य एकदम त्यांवर तुटून पडून त्यांना बेजार करीत होते. तरी युद्धाची मोठी हौस असणारे भीष्म, सोमक, सृंजय व पांचाल सैन्यांतील मोठमोठ्या धनुर्धरांना आपल्या बाणांनीं मारून पाडीत होते. त्या पांडव सैन्यांत भीमाशिवाय भीष्मांशीं तोंड देणारा ते वेळीं कोणी दिसेना. त्यानें मात्र त्यांना गांठून त्यांवर प्रहार चालविले. भीमानें भीष्मांच्या सारथ्याला मारल्यानें त्यांचा रथ उधळला. भीमानें दुर्योधनाचा भाऊ जो सुदाम त्याचें मुंडकें एक तीक्ष्ण क्षुरप्र बाणानें उडवून खालीं पाडलें. याप्रमाणें आपल्या भावाला मारलेला पाहून आदित्यकेतु प्रभृति त्याचे सात भाऊ भीमावर चालून आले, त्यांचीही मागें त्यांनीं दिलेल्या क्लेशाची आठवण ठेवून भीमानें तीच वाट लाविली. यावेळीं मोठे शहाणे विदूर यांनीं पूर्वीं जो हिताचा व प्रेमकर सल्ला दिला होता, त्याची कौरवांला आठवण झाली व हा कौरवाला काळ उपजला असून खात्रीनें सर्वांला मारणार असें त्यांना वाटूं लागलें. इकडे दुर्योधन आपले भाऊ मेल्यामुळें फार कष्टी होऊन भीष्मांजवळ जाऊन ह्मणाला, 'माझे शूर भाऊ भीमानें मारून टाकले आहेत, व दुसरेही पुष्कळ कौरववीर आपली शिकस्त करीत असतां त्याच्या हातून मरूनच पडत आहेत. आपण तर तिऱ्हाईतपणा धरून आमचेकडे लक्ष देत नाहीं; तेव्हां हा मीं आडमार्गच घेतला असें समजलें पाहिजे. काय हें माझें दैव खडतर आहे पहा ? ' हें निष्ठुरतेचें भाषण ऐकून डोळ्यांत पाणी येऊन भीष्म ह्मणाले, 'मीं द्रोण, विदूर व यशस्वी गांधारी यांनीं तुला पूर्वीं सांगितलें आहे. ते वेळीं मीं आणखीही असें सांगितलें आहे कीं, या युद्धाच्या भानगडींत मला व द्रोणांना तूं मुळींच घेऊं नकोस. धृतराष्ट्राच्या ज्या ह्मणून मुलाला भीम रणामध्यें पाहील त्याला त्याला तो खात्रीनें मारून काढील. ह्मणून आतां तूं निर्धारानें स्थिर होऊन स्वर्ग डोळ्यांपुढें ठेवून पांडवांशीं युद्ध कर. देवांना देखील पांडव अजिंक्य आहेत. '

दुपारचे वेळीं फिरून घनघोर संग्राम सुरू झाला. धृष्टद्युम्न, सात्यकि, शिखंडीप्रभृति महारथी मंडळी आपल्या तुकड्यांनिशीं व अभिमन्यु, अर्जुन-द्रौपदीचे मुलगे वगैरे वीर दुर्योधनानें पाठविलेल्या राजांवर चालून गेले. अभिमन्यु, घटोत्कच व भीम यांच्या हाताखालीं पांडवसेना तीन तुकड्या करून कौरवांवर चालून गेली. द्रोण, सोमक व सृंजय त्यांजवर तुटून पडून त्यांना यमसदनाला पाठवीत होते. तेव्हां सृंजयाच्या सैन्यामध्यें एकच हाहाकार उडून राहिला. द्रोणांनीं मारलेले पुष्कळ क्षत्रिय व्याधिग्रस्त लोकांप्रमाणें रणामध्यें लोळतांना दिसत होते. रडणाऱ्या आरडणाऱ्या व कण्हणाऱ्या लोकांचा शब्द जिकडे तिकडे ऐकूं येत होता. तसेंच प्रतिकालासारख्या बलशाली भीमानें इकडे कौरवांची भयंकर कत्तल चालविली होती. याचप्रमाणें इकडे भीष्मप्रभृति मंडळींनींही पांडवांची भयंकर कत्तल चालविली होती.

इकडे शकुनि व हार्दिक्य पांडवसैन्यावर चालून गेले. ते वेळीं कांबोज, नदीज आरट्ट, महीज, वनायुंज, तिचिरिज वगैरे लोकांसह व डोंगराळ ठिकाणचे, वाऱ्यासारखे वेगवान् व सोन्याच्या अलंकारांनीं शृंगारलेले व चांगल्या रीतीनें शिकविलेले अशा घोड्यांनिशीं अर्जुनपुत्र इरावान त्या सैन्यावर चालून गेला. हा इरावान, त्याला नागराजाच्या सुनेपासून झाला होता. हिच्या पूर्वीच्या नवऱ्याला गरुडानें मारल्यामुळें, ही दीन खिन्न झाली असतां, हिला मूल नसल्यामुळें हिचा सासरा जो ऐरावत यानें हिला हीच आपण होऊन तयार झाल्यामुळें अर्जुनाला दिली. याप्रमाणें दुसऱ्याच्या बायकोच्या ठिकाणीं अर्जुनाला हा झाला होता. त्याला आईनें नागलोकामध्यें वाढवून सांभाळलें. त्याच्या चुलत्यानें अर्जुनावरील त्याच्या द्वेषामुळें अर्जुन इंद्रलोकीं आहे असें ऐकून तो एकदम तिकडे गेला, आणि शांतपणें त्याला अभिवादन करून विनयानें

हात जोडून, मी तुझा मुलगा आहें ह्मणून त्यानें त्याला कळविलें; तेव्हां अर्जुनालाही पूर्वी घडलेल्या त्या सर्व गोष्टीची आठवण झाली, व आपल्या तोंडीच्या त्या मुलाला आलिंगन दिलें असतां अर्जुनाच्या मनांत प्रेम फुटलें. ते वेळीं प्रेमानें त्यानें त्याला युद्धकाळीं आपल्याला साहाय्य करण्याला सांगितलें होतें, व यानेंही हो ह्मटलें असल्यावरून सुंदर सुंदर रंगाचे व मोठे वेगवान् असे पुष्कळ घोडे घेऊन तो या प्रसंगीं आला होता. उभय दळ एकमेकांशीं भिडून गर्दी उडाली असतां दोन्ही बाजूंचे बरेच घोडे जिकडे तिकडे गारद होऊन पडले. बाण सरून घोडे मरून थकून गेलेले वीर एकमेकांवर प्रहार करून मरून पडत होते. या वेळीं शकुनीचे सहा भाऊ चांगल्या वयांत आलेल्या कसलेल्या व जोरदार घोड्यांवर बसून रणांत बाहेर पडले. शकुनि व त्याच्या तुकडींतील लोक त्यांचें संरक्षण करीत होते. ही तुकडी स्वर्ग मिळविण्याच्या इच्छेनें मोठ्या आवेशानें इरावानाच्या सैन्यांत शिरली असतां इरावानाचे लोक त्यांना मारीत सुटले. शकुनीच्या भावांनीं इरावानाला घेरलें; आणि भिडा ह्मणून एकामेकांला सांगत एकच गर्दी उडवून देऊन तीक्ष्ण बीटांचा मारा करीत, ते त्यावर धांवून गेले. चोहोंकडून बिटांचा मार बसून रक्तबंबाळ झाला होता तरी धैर्य चळूं न देतां आपल्या शरीरांत रुतलेल्या बिटाच काढून त्या तो शत्रूवर फेंकीत होता. त्याला पूर्ण घेरून पकडण्याची खटपट चालली असतां तो आपल्या तलवारीनें डाव्या उजव्या हातांनीं त्या जवळ आलेल्यांचे अवयव छाटून काढीत होता; याप्रमाणें आयुधें गळून हातपाय तुटून ते सर्व मरून खालीं पडले. मात्र त्या सहा भावांपैकीं वृषभ त्याच्या अंगाला पुष्कळ जखमा लागल्या होत्या तरी त्या भयंकर कत्तलींतून जिवंत सुटला. त्या सर्वांना पडलेले पाहून बकाला मारल्यामुळें भीमाशीं पूर्वींच वैर जुळलेल्या मायावी आर्ष्यशृंगी नांवाच्या राक्षसाजवळ जाऊन दुर्योधन त्याला ह्मणाला, 'हे वीरा, हा पहा अर्जुनाचा मायावी मुलगा माझ्या सैन्याचा फडशा पाडून माझें नुकसान करीत आहे. तुलाही वाटेल तेथें जातां येत असून मायास्त्रांमध्यें तूं निपुण आहेस, तसेंच अर्जुनाशीं तुझें वैर आहे, ह्मणून तूं याला मार.' बरें ह्मणून तो विक्राळ राक्षस सिंहनाद करून युद्धामध्यें कुशल व बिटांनीं युद्ध करणारे असे मरून राहिलेले दोन हजार उत्तम स्वार घेऊन इरावानाला मारण्यासाठीं त्याच्यावर चालून गेला. त्यानें ज्यांवर शूल व पट्टे घेतलेले राक्षस बसले आहेत असे दोन हजार घोडे मायेनें निर्माण केले. इरावानानें त्यांना हं हं ह्मणतां यमलोकाची वाट दाखविली. याप्रमाणें त्या सैन्याचा फडशा पाडल्यावर युद्धाची खुमखुमी असलेले ते दोन वीर एकमेकांवर धांवून गेले. तो राक्षस जवळ आला असतां त्याचें दैदीप्यमान धनुष्य व भाता हीं इरावानानें एकदम तोडून टाकलीं. याप्रमाणें आपलें धनुष्य तुटलें असतां आपल्या मायेनें इरावानाला मोह पाडण्यासाठीं तो राक्षस एकदम आकाशामध्यें गेला, तेव्हां इरावानही आकाशांत उडून व मायेनें त्या राक्षसाला मोह पाडून बाणांनीं त्याचीं गात्रें कापून काढीत होता. परंतु मायेमुळें त्याचे अवयव फिरून फिरून उत्पन्न होत होते; तरी बलशाली इरावान आपल्या परशूनें ते फिरून फिरून कापून काढीत असे. याप्रमाणें घाव बसत असतां तो राक्षस मोठ्यानें किंकाळी फोडीत होता, व परशूनें जखमा होऊन त्याच्या आंगांतून पुष्कळ रक्त वाहूं लागलें. तेव्हां तो बलवान् राक्षस याप्रमाणें आपल्या तेजस्वी शत्रूला पाहून खवळला व त्यानेंही जोर केला व भयंकर असें मोठें रूप घेऊन त्याला धरण्याला निघाला. इतक्यांत इरावानाचा कोणी आईकडचा नाग पुष्कळ नागांनिशीं त्याच्या साहाय्याला आला; व फड्याच्या नागाप्रमाणें मोठें रूप घेऊन त्या राक्षसाला त्यानें नागांनीं झांकून काढिलें. तेव्हां राक्षसानें जरा विचार करून गरुडाचें रूप घेऊन त्या सर्व नागांला खाऊन टाकिलें. या वेळीं इरावानाला जरा गडबडलेला पाहून त्यानें तलवारीचा घाव देऊन मुकुटासकट त्याचें डोकें खालीं छाटून पाडिलें. तो वीर मेल्यानें कौरवपक्षीय निश्चिंत झाले व दोन्ही दळांमध्यें एकच गर्दी उडून हत्ती, घोडे, रथ यांची काटाकाट सुरू झाली. त्या भयंकर रणप्रसंगांमध्यें दोन्ही दळें चढाओढीनें आंगांत संचार झाल्याप्रमाणें खवळून युद्ध करीत होतीं.

---

## १६ घटोत्कचाचें युद्ध. (६.९१-९६)

इरावानाला मारलेला पाहून घटोत्कच मोठ्यानें गरजला. त्याच्या योगानें सर्व पृथ्वी दणाणून जाऊन दरदर हालूं लागली. विजेच्या कडाडण्याप्रमाणें मोठ्यानें गर्जून, विक्राळ स्वरूप घेऊन लखलखीत शूळ उगारून काळाप्रमाणें तो कौरवसैन्यावर धांवून गेला. त्याला येतांना पाहून भीतीनें कौरवसैन्यानें जवळ जवळ तोंड फिरविलें असतां दुर्योधन आपलें मोठें धनुष्य घेऊन त्यावर चालून गेला. वंगराज दहा हजार पर्वतासारखे हत्ती घेऊन त्याच्या मागून गेला. ते वेळीं आंगावर कांटा उभा राहण्याजोगें तुंबळ युद्ध जुंपलें. मेघमंडळाप्रमाणें ते हत्तीदळ पाहून घटोत्कचाचे राक्षस मोठ्यानें गर्जत शस्त्रें घेऊन त्यावर धांवले. बाण, शक्ति, ऋष्टि, भिंदिपाल, शूल, मुद्गर, परशु, पर्वत व वृक्ष इत्यादिकांनीं त्यांनीं त्या गजदळावर मारा चालविला. कोणाचे गंडस्थळ तर कोणाचे अवयव फुटून रक्त वाहूं लागलें. हजारों हत्ती त्या रणभूमीवर मरून पडले. याप्रमाणें गजदळ कमी होऊं लागलेलें पाहून खवळून जिवाची पर्वा न धरतां दुर्योधन त्या राक्षसांवर तुटून पडला; आणि त्यांवर तीक्ष्ण बाण सोडून त्यानें ठळक ठळक राक्षसांना मारिलें. तें त्याचें अचाट कृत्य पाहून घटोत्कच आपलें इंद्रधनुष्यासारखें मोठें धनुष्य घेऊन दुर्योधनावर धांवला, आणि रागानें डोळे लाल करून त्याला ह्मणाला, ' ज्यांना त्वां क्रूरानें कपटद्यूतांत जिंकून इतके दिवस वनवास भोगावयाला लावलेंस त्या पित्यांच्या व आईच्या ऋणांतून आज मी मुक्त होतों. त्या द्रौपदीला रजस्वला असतांना एका लुगड्यानिशीं सभेमध्यें आणून हे दुर्बुद्धे, तूं फार क्लेश दिलेस, त्याचप्रमाणें ती आश्रमामध्यें असतां तुझ्या मनाप्रमाणें वागणाऱ्या त्या जयद्रथानें माझ्या पित्यांना तुच्छ करून तिला स्पर्श केला,' या व अशा दुसऱ्या अपमानांचा आज तूं रण सोडून न जाशील तर मी शेवट लावतों. ' असें बोलून आपलें मोठें धनुष्य ओढून दांत ओंठ चावीत जिभळी चाटीत त्यानें बाणांच्या वर्षावानें दुर्योधनाला झांकून काढिलें. पण दुर्योधनानें दैत्यांना सुद्धां सहन करण्याला कठिण असा तो वर्षाव सहन केला आणि त्वेषानें नागाप्रमाणें फुसफुसत तीक्ष्ण असे नाराच बाण त्या राक्षसावर सोडले. तेव्हां त्याच्या आंगांतून रक्त वाहूं लागलें. घटोत्कचानें दुर्योधनाला ठार करण्याचा विचार मनांत आणून पर्वताला सुद्धां फोडून काढणारी मोठी शक्ति त्यानें उचलून हातांत घेतली. उल्केसारखी ती लखलखीत शक्ति त्यानें उचललेली पाहून, वंगराजानें आपला पर्वतासारखा धिप्पाड हत्ती त्यावर सोडून तो दुर्योधनाच्या रथापुढें येऊन उभा राहिला. याप्रमाणें वंगराजाला आड आलेला पाहून रागानें डोळे लाल करून घटोत्कचानें ती उचललेली शक्ति त्या हत्तीवर सोडली. ती लागून रक्ताचा लोट निघून तो खालीं पडून मेला व त्याबरोबर वंगराजाही खालीं आला. सैन्याची दाणादाण उडाली. तथापि क्षात्रधर्माला स्मरून दुर्योधनानें आपली जागा सोडली नाहीं. प्रलयकालीन अग्नीप्रमाणें तीक्ष्ण बाण त्यानें त्या घोर राक्षसावर सोडला. बाणाच्या तडाक्यांतून घटोत्कच मोठ्या शिताफीनें सुटला; व मोठ्यानें गर्जून प्रलयकालीन मेघाप्रमाणें त्यानें कौरवसैन्याला त्रासवून सोडिलें. तेव्हां भीष्म द्रोणांकडे येऊन ह्मणाले, ' ह्या ऐकूं येणाऱ्या शब्दावरून खात्रीनें घटोत्कच दुर्योधनाशीं भिडला आहे. रणामध्यें कोणालाही याचा पराभव करतां येणें शक्य नाहीं. तेव्हां तुह्मी जाऊन दुर्योधनाला सांभाळा. आह्मां सर्वांना मिळून प्रथम हेंच केलें पाहिजे; हें ऐकून द्रोणप्रभृति महारथी हजारों रथी बरोबर घेऊन, त्या घेरून घेतलेल्या दुर्योधनाचें रक्षण करण्याकरितां गेले. तें विक्राळ सैन्य पाहून घटोत्कच बिलकूल घाबरला नाहीं. त्यानें आवेशानें आपलें मोठें धनुष्य ओढून अर्धचंद्र बाणानें आचार्यांचें धनुष्य मोडून टाकिलें; आणि दुसऱ्या एका भल्ल बाणानें सोमदत्ताचा ध्वज उडवून देऊन जयशब्द केला. याप्रमाणें इतर महारथ्यांचाही थोड्याबहुत प्रमाणानें समाचार घेऊन त्यानें सर्वांना मागें हटविलें. नंतर तो दुर्योधनावर चालून गेला. तेव्हां त्याला वेगानें दुर्योधनावर येऊन पडतांना पाहून युद्धाची खुमखुमी असणारे कांहीं कौरववीर ताडासारखीं मोठीं धनुष्यें ओढून सिंहाच्या घोळक्याप्रमाणें एकवटून त्या एकट्यावर तुटून पडले; व त्यांनीं त्यावर बाणांचा मारा चाल-

विला. त्यानें बराच घायाळ होऊन तो एकदम आकाशांत उडाला आणि शरत्कालच्या मेघांप्रमाणें मोठ्यानें गरजला, तो त्याचा शब्द ऐकून युधिष्ठिर भीमाला ह्मणाला, 'या शब्दावरून खात्रीनें घटोत्कच कौरवमहारथ्यांशीं भिडला असून ते त्याला भारी झाले आहेत. तसेंच इकडे पितामह खवळून पांचाळांचा फडशा पाडूं लागल्यामुळें त्यांच्या संरक्षणासाठीं अर्जुन शत्रूंशीं लढत आहे. याप्रमाणें हे दोन प्रसंग लक्षांत आणून जाऊन पेचांत सांपडलेल्या त्या घटोत्कचाला सोडीव. ही भावाची आज्ञा ऐकून आपल्या सिंहनादानें सर्व राजांना त्रासवून सोडीत तो मोठ्या वेगानें त्याकडे गेला. सत्यधृति, सौचित्ति, अभिमन्यु प्रभृति मंडळीही मोठें रथदळ बरोबर घेऊन घटोत्कचाच्या भोंवतीं जमून त्याचें रक्षण करूं लागले. यांच्या सिंहनादानें रथांच्या घरघर आवाजानें, खुरांच्या टपटप् शब्दांनीं पृथ्वी दणाणून गेली. तेव्हां दोन्हीं दळें एकत्र भिडून भित्र्यांना कांपरें भरविण्यासारखें भयंकर युद्ध सुरू झालें. हत्ती घोड्यांवर, शिपाई रथदळावर याप्रमाणें सर्व सैन्य एकमेकांशीं भिडलें. त्या चतुरंग सेनेच्या गर्दीमुळें, पायांपासून व चाकांपासून धुरकट व तांबूस अशी मोठी धूळ उठून त्यानें सर्व रणभूमि भरून गेली. आपले व शत्रूकडचे लोक मुळींच ओळखूं येईनात. सरसकट काटाकाट सुरू झाली. हत्ती, घोडे व लोक ह्यांच्या रक्तांनीं व आंतड्यांनीं भरलेली नदी वाहूं लागून केशरूपी शेवाळ्यानें व गवतांनीं ती भरून गेली होती. तुटलेल्या मुंडक्यांचा दगडांच्या वर्षावाप्रमाणें पटपट शब्द ऐकूं येत होता. स्वारांचे घोडे व हत्ती यांची एकच खेंचाखेंच होऊन प्रहारांनीं त्यांचीं शरीरें छिन्नविछिन्न होऊन रक्तबंबाळ झालीं होतीं. याप्रमाणें अंगावर कांटा उभा राहण्यासारखें युद्ध चाललें असतां कौरवांचे अफाट सैन्य थोडें माघार घेऊं लागलें व तें पाहून दुर्योधन त्वेषानें भीमावर चालून गेला आणि त्यानें त्याला बाणाच्या वर्षावानीं झांकून काढिलें व पिसें लावलेला एक तीक्ष्ण अर्धचंद्र बाण सोडून भीमाचें धनुष्य काटून काढिलें. व ही संधि साधून पर्वताला सुद्धां फोडून काढणारा एक तीक्ष्ण बाण त्यानें भीमाच्या छातीवर सोडला. तो आंत जाऊन भिडल्यानें भीमसेन फार घायाळ झाला व ओष्ठप्रांत चाटीत तो आपल्या ध्वजाला टेंकला. याप्रमाणें त्याला खचलेला पाहून जाळून फडशा पाडणाऱ्या अग्नीप्रमाणें घटोत्कच रागानें अगदीं पेटला. अभिमन्युप्रभृति पांडवांकडील महारथीही संतापून दुर्योधनावर धांवून गेले. तेव्हां द्रोणांनीं व्यसनार्णवांत बुडत असलेल्या दुर्योधनाचें संरक्षण करण्याकरितां कौरवमहारथ्यांना एकदम तिकडे जाण्यास सांगितलें. तेव्हां कृप, भूरिश्रवा, शल्यप्रभृति महाधनुर्धारी कौरव दुर्योधनाभोंवतीं गोळा झाले. इकडे त्यांना याप्रमाणें पाठविल्यावर महाबाहू द्रोणांनीं आपलें मोठें धनुष्य ओढून एकदम भीमाला बाणांनीं झांकून काढिलें. तेव्हां भीमानेंही दहा बाण त्याच्या उजव्या बरगडींत मारून त्यांना घायाळ केलें. त्यांनीं विव्हळ होऊन वयोवृद्ध द्रोणाचार्य बेशुद्ध होऊन रथांत बसले. याप्रमाणें गुरूंची दशा उडालेली पाहून स्वतः दुर्योधन व अश्वत्थामे संतापून भीमावर चालून आले. तेव्हां झटपट आपली गदा घेऊन व रथांतून खालीं उडी घेऊन भीम त्यांवर धांवला. तेव्हां त्याला मारण्याच्या हेतूनें द्रोणप्रभृति कौरव महारथ्यांनीं नानाप्रकारचीं शस्त्रें त्याच्या छातीवर सोडलीं. तेव्हां भीमसेनाचा प्रिय सखा अनूपांचा राजा नील संतापून अश्वत्थाम्यांवर चालून गेला व त्यानें त्यांवर बाण सोडला. त्याच्या योगानें रक्तबंबाळ झाल्यामुळें त्याला मारण्याचा विचार मनांत करून अश्वत्थाम्यांनीं उत्तम पाणी दिलेले लखलखीत बाण सोडून त्याचे घोडे व ध्वज कापून काढून त्याच्या छातीला जखम केली, त्यानें घायाळ होऊन नील खचून रथांत बसला. तें पाहून अश्वत्थाम्यांवर घटोत्कच आपल्या राक्षसमंडळीनिशीं धांवून गेला. घटोत्कचाचे राक्षस अश्वत्थाम्यांच्या बाणांनीं जेरीला येऊन मागें फिरतांना पाहून घटोत्कच संतापला, व भयंकर माया प्रगट करून त्या मायावीनें अश्वत्थाम्याला मोह पाडला. त्या मायेनें सर्व कौरवसैन्य मागें हटलें. व त्यांची कत्तल उडाल्यानें रक्तबंबाळ होऊन रणामध्यें ते गडबडा लोळूं लागले. बहुतेक कौरवांची दाणादाण उडून, बरेच राजे मरून पडले. हजारों घोडे व स्वार काटून निघाले. तेव्हां कौरवसैन्य शिबिराकडे वळलें

पाहून लढा, पळूं नका, घटोत्कचानें निर्माण केलेली ही माया आहे, असें भीष्म ओरडून सांगत होते तरी त्या मायेनें मोह पडून तें सैन्य तेथें ठरलें नाहीं. याप्रमाणें सूर्यास्ताचे वेळीं घटोत्कचानें कौरवसैन्याची दाणादाण उडवून दिली. या मोठ्या दंग्यामध्यें दुर्योधन भीष्मांकडे येऊन विनयपूर्वक त्यांना अभिवादन केल्यावर मोठा सुस्कारा टाकून घटोत्कचाचा जय व आपला पराजय झाल्याची सर्व हकीकत त्यांच्या कानावर घालून, दुर्योधन त्यांना ह्मणाला; 'शत्रूंनीं ज्याप्रमाणें कृष्णाचा आश्रय केला आहे, त्याप्रमाणें आपला आश्रय करून आह्मीं पांडवांशीं हें भयंकर युद्ध सुरू केलें. मी व माझ्या ताब्यांत असलेलें अकरा अक्षौहिणी सैन्य आपल्या हुकुमांत आहे. त्या मला घटोत्कचाच्या आश्रयानें भीम प्रभृति मंडळींनीं जिंकलें, ही गोष्ट वाळलेल्या झाडांतील अग्नीप्रमाणें मला जाळून काढीत आहे. ह्मणून आपल्या कृपेनें या राक्षसाला स्वतः मारण्याचें माझें मनांत आहे.' तेव्हां भीष्म ह्मणाले, 'बा, दुर्योधना, कसाही प्रसंग आला तरी तुझें स्वतःचें रक्षण झालें पाहिजे. युधिष्ठिर, अर्जुन किंवा दुसरा कोणी पांडव यांच्याशीं तूं युद्ध कर. राजधर्म लक्षांत घेतां, राजानें राजाशीं युद्ध करावें. मी, द्रोण, दुःशासन प्रभृति तुझे भाऊ तुला फार चुटपूट वाटत असेल तर त्या राक्षसाशीं युद्ध करतों. नाहींतर ह्या इंद्रासारख्या पराक्रमी भगदत्ताला त्याच्याशीं युद्ध करण्याला जाऊं दे.' असें ह्मणून, त्यांनीं भगदत्ताला त्याची फार शिफारस करून जाऊन कोणाला हार न जाणाऱ्या त्या घटोत्कचाला एकदम प्रतिबंध करण्यास सांगितलें. ती भीष्मांची आज्ञा ऐकून भगदत्त एकदम सिंहनाद करून शत्रूंवर गेला. त्याला धांवून येतांना पाहून भीमसेन, अभिमन्यु व घटोत्कच प्रभृति मंडळी त्याकडे वळली. दोघांमध्यें भयंकर युद्ध जुंपून यमपुरीला भर पडूं लागली. याप्रमाणें गर्दी उडाली असतां भगदत्त साठ ठिकाणांहून मद वाहणाऱ्या आपल्या मस्त हत्तीवर बसून भीमावर चालून गेला. त्यानें भीमाला बाणांनीं झांकून काढिलें असतां, भीमानें भगदत्ताच्या मागें पुढें त्याचें रक्षण करणारे शेंकडों वीर बाणांनीं मारून काढले. नंतर प्रतापशाली भगदत्तानें आपल्या हत्तीला त्यावर सोडलें. तो हत्ती मोठ्या वेगानें भीमावर तुटून गेला, तेव्हां भीम प्रभृति पांडवांनींही त्यावर हल्ला करून त्या एकट्या हत्तीला चोहोंकडून घेरून घेतलें आणि चोहोंकडून दिव्यास्त्रांचा त्याच्यावर मारा केला. तेव्हां दशार्णांचा राजा मोठ्या हत्तीवर बसून भगदत्ताच्या हत्तीवर चालून गेला. परंतु समुद्राला थोपविणाऱ्या वेलेप्रमाणें भगदत्ताच्या त्या सुप्रतीक नांवाच्या हत्तीनें त्याला अडविलें. तेव्हां पांडवसैन्यांनीं सुद्धां, शाबास, शाबास, ह्मणून त्याची वाहवा केली. भगदत्तानें आवेशानें त्या हत्तीवर तोमर सोडलें ते बिळांत शिरणाऱ्या नागांप्रमाणें सोन्याचें झूल फोडून त्याच्या आंगांत शिरले. त्यानें घायाळ होऊन मोठ्यानें ची, ची, करीत वाऱ्यानें फडशा पडणाऱ्या झाडांप्रमाणें आपल्या सैन्यालाच तुडवीत पळत सुटला. याप्रमाणें त्या हत्तीला पळत सुटलेला पाहून भीम वगैरे मंडळी सिंहनाद करून भगदत्तावर चालून गेली. तो भयंकर शब्द ऐकून भगदत्तानें आपला हत्ती त्यांवर सोडला. अंकुशानें त्याला डवचल्याबरोबर प्रळयकाळच्या अग्नीप्रमाणें त्यानें उग्र स्वरूप धरलें. व चोहोंकडे पळत सुटून रथ, हत्ती, घोडे, पायदळ हजारोंच्या हजारों चिरडीत सुटला. याप्रमाणें त्या हत्तीनें खळबळून सोडलेलें पांडवसैन्य विस्तवावर ठेवलेल्या कातड्याप्रमाणें आखडत चाललें. याप्रमाणें आपल्या सैन्याची भगदत्तानें दाणादाण उडविलेली पाहून तोंड व डोळे लाल करून विक्राळ स्वरूप धरून घटोत्कच भगदत्तावर तुटून गेला. व त्या हत्तीला ठार करण्याच्या हेतूनें पर्वताला फोडून काढणारा एक लखलखीत शूल घेऊन तो त्यानें त्यावर जोरानें फेंकला. भगदत्तानें एका अर्धचंद्र बाणानें त्याला मध्येंच काटून काढलें. तेव्हां इंद्रानें सोडलेल्या आकाशांतील मोठ्या इंद्रधनुष्यासारख्या त्या शूलाचे दोन तुकडे होऊन ते आकाशांत उडाले. नंतर भगदत्तानें सोन्याच्या मुठीची अग्निशिखेसारखी एक मोठी शक्ति घेऊन थांब, थांब, ह्मणून ती राक्षसावर सोडली. आकाशांतील इंद्रधनुष्याप्रमाणें तिला येऊन पडतांना पाहून घटोत्कचानें वर उडून तिला पकडली; व मोठ्यानें गर्जून तिला मांड्यामध्यें धरून मोडून टाकिली. तें अचाट कर्म पाहून मोठ्या आरोळीनें पांड-

वांनीं पृथ्वी दणाणून सोडली. आनंदभरित झालेल्या पांडवांचा तो महानाद भगदत्ताला सहन न होऊन, तीक्ष्ण नाराच बाण सोडून सर्व पांडववीरांचा त्यानें यथास्थित समाचार घेतला; व भीमसेनाचे घोडे मारून ध्वज उडवून देऊन त्याच्या सारथ्याला घायाळ केला. तेव्हां भीम विरथ होऊन हातांत गदा घेऊन त्यानें रथाखालीं उडी घेतली. इतक्यांत कृष्ण सारथी अर्जुन आजूबाजूला शत्रूचा फडशा पाडीत त्या ठिकाणीं येऊन दाखल झाला. व तेथें पांचाल, पांडव व कैकेय यांचें तुमुल युद्ध झालें.

इकडे भीमानें इरावानाच्या मरणाची हकीकत कृष्णार्जुनांच्या कानांवर घातली. तेव्हां मुलाच्या मरणाची बातमी ऐकून, फार दुःखी होऊन, अर्जुन श्रीकृष्णाला ह्मणाला, ' मोठ्या बुद्धिमान् विदुरांना हा कौरवपांडवांचा समूळ नाश पूर्वीच कळून चुकला होता; आणि म्हणूनच त्यांनीं धृतराष्ट्राला नको नको ह्मणून सांगितलें. त्या दुर्योधनाच्या व शकुनीच्या दोषामुळें व त्या कर्णाच्या वाईट सल्यामुळें हा क्षत्रियांचा संहार चालला आहे. धर्मराजांनीं त्या दुर्योधनाला अर्धराज्य नाहीं तर निदान पांच गांवें तरी दे ह्मणून मागितलें. तें फार चांगलें केलें असें मला वाटतें. परंतु त्या मूर्खाच्यानें तेवढें सुद्धां देववलें नाहीं. या क्षत्रियधर्माला धिक्कार असो. युद्ध चालविलेंच पाहिजे, ह्मणून कौरव सैन्याकडे लौकर घोडे हाक. ' श्रीकृष्णानें तात्काळ वायुवेगानें घोडे हाकले. त्या वेळीं पौर्णिमेच्या व अमावास्येच्या वेळीं वाऱ्यानें उसळून सोडलेल्या समुद्राप्रमाणें कौरवसेनेमध्यें खळबळ उडून राहिली. मध्यान्ह उलटल्यावर पुन्हां युद्ध जुंपलें. तेव्हां धृतराष्ट्राचे मुलगे द्रोणांभोंवतीं जमून, भीमसेनावर चालून गेले. भीष्म, कृप व भगदत्त वगैरे मंडळी अर्जुनावर चालून गेली. हार्दिक्य व बाल्हिक सात्यकीवर चालून गेले. राजा अंबष्टकानें अभिमन्यूला गांठलें व बाकीचे बाकीच्यांशीं भिडले. धृतराष्ट्राच्या मुलाला पाहून भीम तूप ओतलेल्या अग्नीप्रमाणें जळूं लागला. त्यांनीं त्याजवर बाणांचा वर्षाव केला असतां, वाघाप्रमाणें ताठ्यानें ओष्ठप्रांत चाटीत त्यानें व्यूढोरस्क, कुंडली वगैरे बऱ्याच धृतराष्ट्राच्या मुलांना मारून पाडिलें. बाकीच्या धृतराष्ट्रपुत्रांना भीमसेन काळासारखा दिसूं लागला. व ते पळत सुटले. जनावरांमध्यें शिरलेल्या लांडग्याप्रमाणें भीमसेनानें कौरवांची पळवापळव उडवून दिली. इकडे भीष्मप्रभृति मंडळींनीं अर्जुनाशीं युद्ध चालविलें असतां त्यांच्या अस्त्रांचें निवारण करून त्यांतील ठळक ठळक योध्यांना हा मृत्युलोकाकडे पाठवीत होता. अभिमन्यूनें जगविख्यात अंबष्ठाचें कांहीं चालूं न देतां त्याला विरथ केला; त्यानें झटकन रथांतून उडी घेऊन अभिमन्यूवर तलवार फेंकली, व आपण हार्दिक्याच्या रथावर चढला. सर्व युद्धकला माहीत असलेल्या अभिमन्यूनें मोठ्या चलाखीनें तिचा घाव चुकविला.

याप्रमाणें घोर युद्ध चाललें असतां नरवीर, हत्ती घोडे वगैरे प्राण्यांच्या छिन्नभिन्न अवयवांनीं, व त्यांच्या मोडलेल्या भूषणांनीं व शस्त्रांनीं रणभूमीस भयानक परंतु चित्रविचित्र व एक प्रकारचें रमणीय स्वरूप आलें होतें. याप्रमाणें दोन्ही दळांचा चेंदा उडून, तीं अगदीं थकलीं असतां रात्र पडून कांहीं दिसेनासें झाल्यामुळें लढाई बंद करून सर्व लोक आपापल्या शिबिरांकडे गेले.

## १७ नववा दिवस—भीष्मदुर्योधन संवाद.
## ( ६. ९७–१०६ )

रात्रीं दुर्योधन, शकुनि, दुःशासन व कर्ण एकत्र जमून पांडवांना त्यांच्या अनुयायांसह कसें जिंकावें याचा विचार करूं लागले. दुर्योधन कर्णाशीं विचार करून शकुनीला ह्मणाला ' भीष्म, द्रोण, कृप, शल्य व सोमदत्ती हे पांडवांना हात लावीत नाहींत याचें कारण कांहीं मला कळत नाहीं. याप्रमाणें ते निर्धास्तपणें माझ्या सेनेची खच्ची करीत आहेत; व सैन्य कमी होत जाऊन शस्त्रांचीहि तूट पडत चालली आहे. पांडवांना रणामध्यें मी कसा जिंकीन याची मला शंका पडली आहे. ' हें ऐकून कर्ण ह्मणाला ' भरतश्रेष्ठा, वाईट वाटून घेऊं नकोस. मी सर्व तुझ्या मनाप्रमाणें करून टाकतों. ह्या महारणामधून शस्त्र खालीं ठेवून भीष्मांना आपलें आंग काढून घेऊं दे; ह्मणजे त्यांच्या देखत मी ह्या जमलेल्या सर्व पांडवसोमकांचा फडशा पाडतों. भीष्म

पांडवावर नेहमीं दया करतात. शिवाय ह्या महारथ्यांना जिंकण्याचें त्यांचे अंगीं सामर्थ्यच नाहीं; व ते अभिमानी असून नेहमीं त्यांना] युद्धाची आवड असल्यानें पांडवांना ते एकदम कसें जिंकून टाकणार ? तेव्हां तूं लवकर त्यांच्या शिबिराकडे जा. त्यांच्याकडूनच हत्यार खालीं ठेवीव ह्मणजे मी पुढील सर्व काम उरकून टाकतों. ' हें कर्णाचें भाषण ऐकून दुर्योधन आपल्या दुःशासन वगैरे मंडळींना बरोबर घेऊन भीष्मांकडे निघाला. तो भीष्मांकडे निघाला असतां इंद्रामागून असणाऱ्या देवांप्रमाणें त्याचे भाऊ व महाधनुर्धारी राजे, कोणी घोड्यांवर तर कोणी हत्तींवर तर कोणी रथांतून हातांत हत्यारें घेऊन त्याचे रक्षणासाठीं त्याच्या भोंवताली चालले होते. आपल्या उजव्या हातानें मोठ्या अदबीनें सर्व शस्त्रशिक्षासंपन्न अशा राजे लोकांचे नमस्कार घेत व स्तुतिपाठकांची स्तुति ऐकत अत्तराच्या दिव्यांच्या रोषणाईतून तो चालला असतां स्वच्छ प्रकाशणाऱ्या ग्रहांनीं युक्त चंद्राप्रमाणें तो झळकत होता. भर्जरी फेटे चढविलेले भालदार मोठ्या अदबीनें लोकांना बाजूला करीत होते. भीष्मांच्या शिबिराला आल्यावर घोड्यावरून उतरून भीष्मांजवळ जाऊन, त्यांना अभिवादन केल्यावर उत्तम अस्तर घातलेल्या मौल्यवान सुवर्णासनावर बसून, डोळ्यांस पाणी आणून गद्गद वाणीनें तो त्यांना ह्मणाला, ' तात, आपला आश्रय करून आह्मी देवांना सुद्धां जिंकण्याची उमेद धरतों. मग पांडवांची कांहीं विशेष गोष्ट नाहीं. तेव्हां आतां माझ्यावर कृपा करून आपण तेवढ्या पांडवांना मारा ह्मणजे बाकीच्यांचा मी समाचार घेतों. दयेमुळें किंवा माझ्यासंबंधी द्वेषभावामुळें किंवा माझ्या कमनशिबामुळें आपण पांडवांना राखीत असाल तर त्या कर्णाला परवानगी द्या ह्मणजे तो पांडवांचा समाचार घेईल. '

याप्रमाणें वाक्शल्यानें दुर्योधनानें त्यांना टोंचलें असतां फार वाईट वाटून दुःखानें व रागानें उचंबळून बराच वेळ विचार केल्यावर डोळे वटारून मऊ पणानेंच ते दुर्योधनाला ह्मणाले, " दुर्योधना, तुझ्या मनाप्रमाणें करण्यासाठीं यथाशक्ति झटत असून व या प्राणाची रणामध्यें आहुति द्यावयाला तयार झालों असतां अशा वाक्शल्यानें तूं मला कां टोंचतोस ? अर्जुनानें इंद्राला सुद्धां जिंकून खांडव वनांत अग्नीला तृप्त केलें. तुला गंधर्वांनीं बलात्कारानें पकडून नेलें असतां तुझे भाऊ व कर्ण यांनीं पळ काढला; पण तुला त्यांपासून अर्जुनानें सोडविलें. विराट नगरामध्यें त्या एकट्या बाहादरानें आह्मां सर्वांना त्याचप्रमाणें मीच काय तो पुरुष असें वाटणाऱ्या त्या कर्णाला जिंकून आमचे कपडे काढून घेऊन उत्तराला दिले. त्याचप्रमाणें इंद्राला देखील अजिंक्य अशा निवातकवचांना यानें जिंकिलें. हीं उदाहरणें त्याच्या पराक्रमाची ओळख पटवून देण्याला पुरीं आहेत. सर्व सृष्टीला राखून, त्याचा संहार करणारा अनंतशक्ति परमात्मा ज्याचा पाठीराखा आहे, त्या पराक्रमी अर्जुनाला रणांत जिंकणें कोणाच्याही हातून होणें नाहीं. नारद प्रभृति मोठमोठ्या ऋषींनीं तुझी पुष्कळ कानउघाडणी केली आहे; परंतु मूर्खपणानें काय बोलावें काय न बोलावें हें कांहीं आतां तुला कळत नाहीं. आतां माझ्या संबंधानें ह्मणशील तर एका शिखंडी खेरीज करून बाकी सर्व पांचाल व सोमकांना मी मारीन तरी किंवा त्यांच्या हातून मरून स्वर्गाला तरी जाईन. शिखंडी मात्र पूर्वी स्त्री असून पुढें वरदानानें पुरुष झाला असल्यानें हा प्राण गेला तरी त्याला मी मारणार नाहीं. तेव्हां आतां तूं खुशाल जाऊन नीज. जोंपर्यंत ही पृथ्वी कायम आहे तोंपर्यंत ज्याचें नांव लोक घेत राहतील असा घोर रणप्रसंग मी करतों. ' हें ऐकून त्यांना अभिवादन करून दुर्योधन आपल्या शिबिराकडे परत आला; व मंडळींना रजा दिल्यावर ती रात्र शिबिरामध्यें काढून उजेडल्यावर उठून आज भीष्म खवळून जाऊन सोमकांना मारणार, तेव्हां सैन्याची जय्यत तयारी ठेवा ह्मणून त्यानें राजांना आज्ञा दिली.

दुर्योधनाचें रात्रीचें रडगाणें ऐकून पारतंत्र्य फार वाईट आहे असें वाटून भीष्मांना फार दुःख झालें. व अर्जुनाशीं भिडण्याच्या हेतूनें त्यांनीं बराच वेळ विचार केला. दुर्योधनानें दुःशासनाला सैन्याची जय्यत तयारी ठेवून शल्य, शकुनि, द्रोणप्रभृति मंडळींना मोठ्या हुशारीनें भीष्मांची पाठ राखण्यास सांगितलें. हें ऐकून ते सर्व रथदळ बरोबर घेऊन

भीष्मांच्या भोंवतीं जमून भूमि व आकाश दणाणून सोडीत व पांडवसैन्याला खळवळून सोडीत निघाले. याप्रमाणें ते निघाले असतां दुर्योधन फिरून आपल्या भावांना म्हणाला, “ अर्जुनाच्या रथाच्या डाव्या चाकाचें रक्षण युधामन्यु करीत असून उजव्या चाकाचें रक्षण उत्तमौजा करीत आहे; व असा हा अर्जुन शिखंडीचें रक्षण करीत आहे. तेव्हां आह्मांला चुकवून हा भीष्मांला न मारील अशी व्यवस्था ठेवा.’ याप्रमाणें भीष्मांना मोठ्या रथदळामध्यें चालून येतांना पाहून, अर्जुनानें धृष्टद्युम्नाला, शिखंडीला पुढें ठेवण्यास सांगितलें व आपण, त्याचें संरक्षण करतों असें ह्मणाला.

नंतर भीष्मांनीं आपल्या सैन्याची सर्वतोभद्र नांवाची मोठी व्यूहरचना केली. कृप, कृतवर्मा, शल्यप्रभृति वीर व धृतराष्ट्राचे मुलगे भीष्मांसह या सैन्याच्या आघाडीला व्यूहाच्या तोंडाला होते; द्रोण, भूरिश्रवा, शल्य, व भगदत्त सज्ज होऊन उजव्या बाजूला होते; अश्वत्थामा, सोमदत्त, व विंदानुविंद मोठ्या सैन्यानिशीं डावी बाजू राखीत होते. दुर्योधन त्रिगर्तांसह पांडवांशीं झुंजण्याला मध्यभागीं तयार होऊन उभा होता; अलंबुष व श्रुतायु सज्ज होऊन सर्व सैन्याच्या पिछाडीला होते. इकडे युधिष्ठिर, भीम, नकुल, सहदेव पांडवसैन्याच्या आघाडीला सज्ज होऊन उभे राहिले. धृष्टद्युम्न, चेकितानप्रभृति मंडळी त्यांच्यामागून सज्ज होऊन व्यवस्थेनें उभी होती. कौरव भीष्मांला पुढें करून त्यांवर चालून गेले, ते वेळीं गंभीर रणशब्द व अनेक वाद्यांचा गजर यांमध्यें दोन्ही दळें एकमेकांशीं भिडून एकच गर्दी उसळून गेली. पक्षी भयंकर शब्द करीत उडूं लागले. सूर्य चांगला उगवला होता तरी निस्तेज झाला; मोठें भयसूचक वावटळ सुटलें. भयंकर शब्द करणारीं क्रूर कोल्हीं मोठी कत्तल उडणार असें सांगत कुयी कुयी करूं लागली. दिशांनीं पेट घेऊन धूळ, रक्त व हाडें यांचा वर्षाव सुरू झाला. शोकाकुल झालेल्या हत्ती घोडे इत्यादिकांच्या डोळ्यांतून टपटप पाणी गळूं लागून ते मलमूत्र टाकूं लागले. मोठमोठ्या उल्का सूर्यमंडळावर आदळून खालीं भूमीवर पडून मोठें भय सुचवीत होत्या. शंख, नौबती इत्यादिकांच्या शब्दांनीं वावटळानें हालवून सोडलेल्या अरण्याप्रमाणें दोन्ही दळें हालवून सोडलीं होतीं व वादळानें खळवळून सोडलेल्या समुद्राप्रमाणें दोन्ही दळांत खळवळ उडून राहिली होती.

इकडे महारथी अभिमन्यु पिंगट घोडे जुंपलेल्या उत्तम रथांत बसून शरवर्षाव करीत दुर्योधनाच्या त्या अफाट सैन्यावर धांवून गेला. कालदंडासारखे शत्रूचा फडशा पाडणारे त्याचे बाण शूर शूर क्षत्रियांना यमसदनाला नेऊन पोंहोंचवीत होते. याप्रमाणें अचाट कर्म करीत असतां अभिमन्यु कौरवसेनेला असह्य झाला. शत्रूंवर प्रहार करीत असतां हा महाधनुर्धारी हातांत वज्र घेतलेल्या प्रत्यक्ष इंद्राप्रमाणें दिसत होता. सोन्याच्या पाठीचें याचें धनुष्य विजेप्रमाणें जिकडे तिकडे चमकतांना दिसत होतें. त्यानें सोडलेले तीक्ष्ण अशा पिंवळ्या बाणांचा फुललेल्या झाडांच्या वनामधून फिरणाऱ्या भुंग्यांच्या मालिकेप्रमाणें जिकडे तिकडे संचार होत होता. त्याचप्रमाणें सोन्याच्या रथांत बसून मोठ्या चलाखीनें व ऐटीनें कृप, द्रोण, अश्वत्थामा, बृहद्बल व जयद्रथ यांना मोह पाडीत तो मोठ्या जलदीनें इकडून तिकडे फिरत होता. त्याचें धनुष्य सदोदित मंडळाकारच असून सूर्यमंडळासारखें तें कौरवसैन्याला जाळून टाकीत होतें. याप्रमाणें त्या वेगशाली वीराला झळकतांना पाहून त्याच्या त्या अचाट कृत्यामुळें ह्या जगामध्यें दोन अर्जुन अवतरले आहेत असें सर्व क्षत्रियांना वाटूं लागलें. त्यानें जर्जर करून सोडलेली अफाट भारती सेना मदानें धुंद झालेल्या एकाद्या तरुणीप्रमाणें जागच्या जागींच गुंगून पडत होती. याप्रमाणें त्यानें दाणादाण उडवून दिलेल्या सेनेनें आर्तरव केला. तो भयंकर शब्द ऐकून दुर्योधन आर्ष्यशृंगीला ह्मणाला, ‘ हा प्रति अर्जुनासारखा अभिमन्यु आपल्या सैन्याची दाणादाण उडवून देत आहे; याला सर्व विद्येमध्यें निष्णात अशा तुझ्यावांचून दुसरें रामबाण औषध कांहीं मला दिसत नाहीं. तूं जाऊन लौकर याला मार, तोंपर्यंत भीष्म द्रोणाच्या मदतीनें आह्मी अर्जुनाला मारतों.’ ही दुर्योधनाची आज्ञा ऐकून त्या प्रतापशाली राक्षसानें पावसाळ्यांतील मेघाप्रमाणें मोठ्यानें गर्जना केली. त्यानें पांडवांच्या से-

नेचा चळकांप उडाला. कित्येक तर त्यानें गर्भगळित होऊन आपले आवडते प्राण सोडून खालींच पडले.

इकडे अभिमन्यु हर्षभरित होऊन हातांत धनुष्यबाण घेऊन नाचतच रथामधून त्यावर चालून गेला. राक्षसानें त्याला गांठल्याबरोबर तो त्याच्या सैन्याचा फडशा पाडीत चालला. याप्रमाणें तो राक्षस आपला पराक्रम दाखवीत असतां, पांडवांच्या सेनेनें भयानें पळ काढिला. कमलवनाला तुडवून काढणाऱ्या हत्तीप्रमाणें त्या सैन्याला चिरडून टाकल्यावर तो राक्षस बलशाली पांच द्रुपद भावांवर चालून गेला. पांच द्रुपदवीर सूर्यावर चालून जाणाऱ्या पंचग्रहांप्रमाणें त्या राक्षसावर चालून गेले. बाणांनीं बेजार केल्यामुळें तो क्षणभर अगदीं बेशुद्ध झाला. परंतु लगेच शुद्धीवर येऊन संतापानें दुप्पट चेवून, त्यांचें धनुष्य, बाण ध्वज सर्व मोडून टाकून, त्यानें त्यांचे घोडे व सारथी यांना ठार केलें व त्यांना विरथ करून हजारों बाण त्यांवर सोडून त्यांना मारण्याकरितां तो त्यांच्यावर धांवून गेला. याप्रमाणें त्यानें त्यांना बेजार केलेला पाहून, अभिमन्यु त्या राक्षसावर धांवून गेला. दोघांचें तुंबळ युद्ध जुंपलें. काळ व अग्नि यांप्रमाणें रागानें डोळे लाल करून हे दोन वीर एकमेकांशीं भिडले असतां त्याचा परिणाम फारच भयंकर झाला. त्या राक्षसानें मोठ्या चलाखीनें हजारों बाण सोडून अभिमन्यूला त्रास दिला असतां अभिमन्यूनें सोडलेले बाण त्याचें शरीर फोडून मर्मस्थळीं जाऊन भिडले. तेव्हां त्या राक्षसानें यमदंडासारखे तीक्ष्ण बाण अभिमन्यूवर सोडले, ते त्याच्या शरीरांतून निघून जाऊन खालीं पडले. ते वेळीं त्या राक्षसानें शत्रूला हाय हाय करून सोडणारी मोठी माया निर्माण केली. तेव्हां अभिमन्यूचें सैन्य तमांमध्यें गडप्प होऊन त्याला अभिमन्यु किंवा आपपर कोणीच दिसेना. तो घोर मायेचा अंधार पाहून अभिमन्यूनें भयंकर सूर्यास्त्र निर्माण केलें त्याचे योगानें जिकडे तिकडे लख्ख उजेड पडला. पुढें त्या राक्षसानें अशा प्रकारच्या पुष्कळ माया निर्माण केल्या असतां, अस्त्रनिपुण अभिमन्यूनें त्या सर्वांचें निवारण केलें. याप्रमाणें आपल्या मायेचा मोड होऊन बाणांचा आपल्यावर भडिमार होतांना पाहून, तो राक्षस आपला रथ तेथेंच टाकून भिऊन पळाला. नंतर एखादा मस्त हत्ती ज्याप्रमाणें कमलवनाचा फडशा पाडीत सुटतो त्याप्रमाणें अभिमन्यु कौरवसैन्याचा चेंदा उडवूं लागला. याप्रमाणें अभिमन्यूनें आपल्या सैन्याची दाणादाण उडवून दिलेली पाहून भीष्मांनीं त्याचें निवारण केलें. व सर्व कौरवमहारथ्यांनीं त्या एकट्या वीरावर बाणांचा भडिमार चालविला.इतक्यांत अर्जुन खवळून जाऊन आपल्या मुलाला साहाय्य देण्यासाठीं कौरवसैन्याचा फडशा पाडीत भीष्मांवर चालून आला. तेव्हां भीष्मही सूर्यावर चालून जाणाऱ्या राहूप्रमाणें अर्जुनावर तुटून गेले.इकडे द्रोणांनींही अर्जुनावर बाण सोडले असतां सात्यकीनें त्यांच्याशीं भिडून पांडवांचें हित करण्यासाठीं तीक्ष्ण बाणांनीं त्यांना बेजार केलें. ते वेळीं कृपाचार्यांनीं कंकपत्रांनीं युक्त असे बाण त्यावर सोडले. तेव्हां सात्यकीनें कृपाचार्यांवर एक प्राणघातक बाण सोडला. तो त्यावर येऊन पडत असतां तापट अश्वत्थाम्यांनीं संतापानें त्याचे दोन तुकडे केले. तेव्हां सात्यकी कृपांना सोडून अश्वत्थाम्यांवर चालून गेला. तेव्हां अश्वत्थाम्यांनीं त्याचें धनुष्य मोडून बाणानें त्याला बेजार केलें. तेव्हां सात्यकीनें दुसरें धनुष्य घेऊन अश्वत्थाम्यांच्या बाहूंवर व छातीवर अनेक बाण सोडले. त्याचे योगानें घेरी येऊन अश्वत्थामे ध्वजाच्या काठीला धरून क्षणभर रथांत स्वस्थ बसले. परंतु लवकरच सावध होऊन त्यांनीं एक नाराच बाण सात्यकीवर सोडला तो सात्यकीच्या शरीरांतून निघून पृथ्वींत शिरला. नंतर दुसऱ्या एका भल्ल बाणानें सात्यकीचा ध्वज मोडून अश्वत्थाम्यांनीं मोठा सिंहनाद केला.सात्यकीनें उलट बाणांचा वर्षाव करून त्यांना जर्जर करून सोडलें. ते वेळीं आपल्या मुलाचा बचाव करण्यासाठीं द्रोण सात्यकीवर चालून गेले. तेव्हां सात्यकीनें अश्वत्थाम्यांना सोडून द्रोणांवर तीक्ष्ण बाणांचा मारा चालविला. यानंतर शत्रुतापन अर्जुनही खवळून द्रोणांवर चालून गेला. आणि याप्रमाणें आकाशामध्यें एकमेकांशीं जुळणाऱ्या बुधशुक्रांप्रमाणें हे दोन वीर द्रोण व अर्जुन त्या महायुद्धांत एकमेकांशीं भिडले. क्षात्रधर्म जाणून या प्रसंगीं उभयतांनीं आपला

गुरुशिष्य संबंध यत्किंचितही ओळखला नाहीं. प्रथम अर्जुनानें सोडलेल्या तीन बाणांची द्रोणांनीं पर्वा केली नाहीं. परंतु फिरून जेव्हां त्यानें त्यांना बाणांनीं झांकून टाकलें तेव्हां ते रागानें जंगलांत पेट घेतलेल्या अग्नीप्रमाणें अगदीं खवळून गेले. व त्यांनीं हं हं ह्मणतां अर्जुनाला बाणांनीं झांकून काढलें. तेव्हां दुर्योधनानें सुशर्म्याला द्रोणांच्या रथाच्या पाठीमागें त्यांचें रक्षण करण्यासाठीं राहण्यास सांगितलें. तेव्हां सुशर्म्यानेंही लोखंडाच्या टोंकाच्या बाणांनीं अर्जुनाला झांकून काढलें. ते बाण चोहोंकडून अर्जुनाच्या आंगांत शिरत होते. अर्जुन युगांतकालीन कालाप्रमाणें सुशर्मा व त्याचा मुलगा यांना बाणांनीं हाणून काढीत असतां मरण्याच्याच दृढ निश्चयानें ते त्यावरच तुटून पडत होते. तेव्हां तेवेळीं अर्जुनानें वायवास्त्र सोडलें असतां आकाशामध्यें सोसाट्याचा वारा उत्पन्न होऊन तो अनेक झाडें उमळून पाडून सैन्याचा फडशा उडवूं लागला. त्यावर द्रोणांनीं घोर पर्वतास्त्र सोडलें. त्यानें वारा बंद पडून दाही दिशा प्रसन्न झाल्या. पुढें अर्जुनानें त्रिगर्तांच्या रथसमूहांचें कांहीं चालूं न देतां त्यांना निरुत्साह करून परतविलें. तेव्हां दुर्योधन, कृप अश्वत्थामा प्रभृति मंडळींनीं मोठ्या रथदळांनिशीं अर्जुनाची वाट बंद केली, व भगदत्त व श्रुतायु यांनीं हत्तीदळांनिशीं भीमाला थोपविलें व भूरिश्रवा, शकुनि प्रभृति मंडळींनीं लखलखीत बाण सोडून नकुलसहदेवांना थोपविलें. इकडे भीष्म युधिष्ठिरावर चालून जाऊन त्यांनीं त्याला चोहोंकडून घेरलें. आपल्यावर गजदळ येऊन पडतांना पाहून ओष्ठप्रांत चाटीत एखाद्या सिंहाप्रमाणें हातांत गदा घेऊन भीमानें रथांतून खालीं उडी घेतली. ढगाला ज्याप्रमाणें वाऱ्यानें विस्कळून सोडावें त्याप्रमाणें त्या हत्तीदळाची त्यानें आपल्या गदेनें दाणादाण उडवून दिली. रक्त, मांस व मज्जा ह्यांनीं न्हालेला भीम रक्तानें भरलेली गदा हातांत घेऊन उभा असतां केवळ रुद्राप्रमाणें दिसत होता. त्याच्या तावडींतून सुटलेले हत्ती आपल्या सैन्याचाच फडशा पाडीत दशदिशेला सैरावैरा पळूं लागले.

दुपारच्या वेळेला सोमकांबरोबर भीष्मांच्या घोर युद्धाला सुरवात झाली. ते वेळीं भीष्मांनीं गुरें ज्याप्रमाणें कापलेल्या काडाच्या ढिगांचा फडशा पाडतात याप्रमाणें पांडवसैन्याचा फडशा चालविला. धृष्टद्युम्न, शिखंडी, विराट, द्रुपद प्रभृति मंडळींनीं त्यांवर बाणांचा मारा चालविला असतां त्यांनीं उलट बाण सोडून त्या सर्वांना घायाळ केलें. मात्र नीतीपासून कधीं न ढळणाऱ्या त्या महात्म्यांनीं शिखंडीला मनामध्यें स्त्री समजून त्यावर बाण सोडले नाहींत. इतक्यांत द्रौपदीचे पांच मुलगे, पांच केकय भाऊ व सात्यकी यांनिशीं भीम यांच्या मदतीसाठीं भीष्मांवर चालून आला. इकडे कौरवही भीष्मांच्या मदतीसाठीं पांडव सेनेवर चालून गेले. शिपाई, स्वार, रथी व गजदळ यांमध्यें यमपुरीला भर घालणारें तुंबळ युद्ध जुंपलें. दंडांत सोन्याचीं बाहुभूषणें, कानांत कुंडलें, व डोक्यांवर फेटे चढविलेले देवपुत्रासारखे शूर राजे विरथी होऊन सामान्य जनांप्रमाणें पळतांना दिसत होते. वरील योद्धे मरून पडल्यानें हत्ती आपल्या सैन्यालाच तुडवीत ची ची करीत पळत होते. त्याचप्रमाणें दोन्ही दळांतील गजयोधी हत्ती मरून पडल्यामुळें दशदिशांना धांवत सुटले होते. त्याचप्रमाणें घोडे मरून पडलेले स्वार हातांत तलवारी घेऊन कोणी पळत होते व कोणी शत्रूंला पळवीत होते. याप्रमाणें भयंकर युद्ध सुरू असतां रक्ताची नदी वाहूं लागून, त्याच्या प्रवाहाला हाडांनीं अडथळा येत होता. केस हेच त्यांतलें शेवाळ असून मोडक्या रथाच्या योगानें त्यामध्यें भोंवरे पडले होते. घोडे हेच त्यांतील मासे असून मुंडक्यांच्या खडकांनीं ती भरली होती. हत्ती हे त्यांतील जलचर प्राणी होते. चिलखतें व फेटे हाच तिच्यावरचा फेंस होता. तलवारी त्यांतील कासव असून धनुष्य हाच तिचा जोराचा प्रवाह होता. बाहुटे, निशाणें ह्याच झाडांनीं ती भरली होती. मनुष्यरूपी तिचा कडा ती वरचेवर पाडून वाहून नेतें होती. मांसाहारी प्राणी, ह्याच हंसांनीं ती भरली होती. यमलोकाला भर पाडणारी ही वाहूं लागलेली नदी शूर क्षत्रिय, हत्ती, घोडे व रथ ह्याच तरांनीं निर्भयपणें तरून जात होते. मेलेल्या लोकांना यमपुरीला घेऊन जाणाऱ्या वैतरणी नदीप्रमाणें भीतीनें गांगरून गेलेल्या ती भित्र्यांना यमपुरीकडे नेत होती, ती भयंकर कत्तल पाहून, 'दुर्योधनाच्या अप-

राधानें क्षत्रिय मरत आहेत. गुणवान अशा पांडवांच्या लोभानें धृतराष्ट्र कसा द्वेष करतो,' ह्मणून क्षत्रिय कौरवांच्या नांवानें खडे फोडतांना व पांडवांची स्तुति करतांना ऐकूं येत होतें. सर्व योद्धयांच्या तोंडचे ते शब्द ऐकून सर्व लोकांचा गुन्हेगार दुर्योधन, भीष्म, द्रोण, कृप व शल्य यांना ह्मणाला, 'ताठा सोडून लढा, उगीच दिरंगाई कां करतां ?' तें ऐकून फांशामुळें उद्भवलेलें युद्ध फिरून सुरू होऊन भयंकर कत्तल सुरू झाली. दोघेही कौरवपांडव आपल्या जिवाची पर्वा न करतां लढत होते. व दैवगतीनें व धृतराष्ट्राच्या अन्यायानें ज्ञातीचा भयंकर फडशा झाला.

अर्जुनानें सुशर्म्याच्या अनुयायांना मारण्याचा सपाटा चालविला असतां रथ, घोडे, हत्ती वगैरे वाहनें सोडून देऊन सैनिक भीतीनें दशदिशांला पळूं लागले. सुशर्मा व दुसरे लोक त्यांना थोपवीत होते तरी ते थांबेनात. या समयीं सुशर्म्याला वांचविण्यासाठीं दुर्योधन भीष्मांना पुढें करून पूर्ण तयारीनें अर्जुनावर चालून आला. तेव्हां अर्जुनाचें सामर्थ्य माहीत होतें तरी मोठ्यानें गर्जत उत्साहपूर्वक पांडवसैन्य अगदीं तयार होऊन भीष्मांवर चालून आलें. तेव्हां भीष्मांनीं त्या सर्व पांडवसेनेला बाणांनीं झांकून काढलें. याप्रमाणें सूर्य डोक्यावर आला असतां, सर्व कौरवपांडवांनीं एकमेकांशीं भिडून युद्ध चालविलें. सात्यकीनें कृतवर्म्यावर व द्रुपदानें द्रोणांवर बाणांचा मारा चालविला. भीम प्रपितामह बाल्हीकाला बाणांनीं घायाळ करून वनामध्यें गरजणाऱ्या सिंहाप्रमाणें मोठ्यानें गर्जत उभा राहिला. अर्जुन व चित्रसेन एकमेकांवर बाण सोडीत एकमेकांशीं भिडले असतां हे दोन महावीर महाघोर बुध व शनीप्रमाणें दिसत होते. इतक्यांत अभिमन्यूनें चित्रसेनाचे चार घोडे व सारथि मारून टाकल्यामुळें चित्रसेन आपल्या रथांतून खालीं उडी घेऊन एकदम विकर्णाच्या रथावर चढला. द्रुपदाला द्रोणांनीं बाणांनीं बेजार केलें असतां पूर्वीच्या वैराची आठवण ठेवून त्यानें एकदम माघार घेतली. त्याचप्रमाणें भीमानें बाल्हीकाचे घोडे व सारथि मारून टाकले. तेव्हां तो लक्ष्मणाच्या रथावर चढून बसला. सात्यकीनें कृतवर्म्याला बाणांनीं बेजार केल्यावर भीष्मांवर बाण सोडून आपलें मोठें धनुष्य फिरवीत रथामध्यें तो नाचत उभा राहिला. त्यावर भीष्मांनीं नागकन्येसारखी मोठ्या जोरानें जाऊन पडणारी लोखंडी शक्ति सोडली. मागें हटविण्याला कठिण अशी ती काळासारखी शक्ति आपल्यावर येऊन पडत असतां सात्यकीनें मोठ्या चलाखीनें ती चुकविली. तेव्हां मोठ्या उल्केसारखी दैदीप्यमान ती शक्ति त्याला न लागतां खालीं पडली. तेव्हां सात्यकीनेंही आपली सोन्याप्रमाणें लखलखीत शक्ति जोरानें भीष्मांचे रथावर सोडली. काळरात्रीप्रमाणें येऊन पडणाऱ्या त्या शक्तीचे भीष्मांनीं दोन तुकडे केले; व खालीं भूमीवर पडून तिचे तुकडे तुकडे झाले. याप्रमाणें सात्यकीची शक्ति कापून काढून संतापानें भीष्मांनीं त्यावर बाणांचा मारा चालविला असतां पांडवांनीं चतुरंग दळानिशीं सात्यकीचें संरक्षण करण्यासाठीं भीष्मांना घेरलें. उन्हाळ्यानंतर सूर्याला घेरून टाकणाऱ्या मेघाप्रमाणें पांडवांनीं भीष्मांना घेरून घेतलेलें पाहून दुर्योधन दुःशासनाला ह्मणाला, 'ह्या शत्रूचा फडशा पाडणाऱ्या भीष्मांना पांडवांनीं चोहोंकडून घेरून घेतलें आहे. तेव्हां या वेळीं यांचें संरक्षण करणेंच मी मुख्य काम समजतों. कारण हेच कायते आमचें रक्षण करणारे आहेत. तेव्हां सर्व सैन्यानिशीं यांच्या भोंवतीं जमून रणामध्यें अचाट कृत्य करणाऱ्या या वीरांचें तूं रक्षण कर.' हें ऐकून दुःशासन मोठ्या सैन्यानिशीं भीष्मांभोंवतीं जमून तयार राहिला. नंतर शकुनीनें उत्तम पोषाख केलेल्या रगदार व अभिमानी, हातांत लखलखीत विटा, ऋष्टि, तोमर घेतलेल्या एक लाख स्वारांनिशीं व शिकवून युद्धांत पटाईत केलेल्या चांगल्या शिपायांनिशीं नकुल, सहदेव व धर्मराज यांना घेरून थोपविलें. इकडे दुर्योधनानें दहा हजार शूर स्वार पांडवांना थोपविण्यासाठीं पाठविले. येऊन पडणाऱ्या हंसांच्या टोळीनें ज्याप्रमाणें एखादें मोठें सरोवर खळबळून सोडावें त्याप्रमाणें त्या जोरानें तुटून पडणाऱ्या घोड्यांनीं पांडवसेनेमध्यें खळबळ उडवून दिली. तेव्हां धर्मराज व नकुलसहदेव यांनीं पावसाळ्यामध्यें भरून जाऊन पौर्णिमेच्या दिवशीं मर्यादा सोडून वाहूं लागणाऱ्या समुद्राला थोपविणाऱ्या वेलेप्रमाणें त्याला जोरानें आडविलें. ते वेळीं पांडवांच्या रथ्यांनीं

तीक्ष्ण बाण सोडून स्वारांचीं मुंडकीं कापून काढून त्यांना खालीं आणिलें. ऋषि लागून स्वारांचीं मुंडकीं फळांप्रमाणें पटापट गळून पडत होतीं. सिंहापुढें आलेल्या पशूंची ज्याप्रमाणें प्राणरक्षणासाठीं धांवपळ उडते त्याप्रमाणें घोड्यांची एकच धांवपळ उडून गेली होती. याप्रमाणें पांडवांनीं त्या महारणामध्यें शत्रूला जिंकून शंख फुंकले असतां दुर्योधन आपल्या सैन्याचा पराभव झालेला पाहून दीनवाणीनें शल्याला ह्मणाला, हा युधिष्ठिर नकुलसहदेवांसह सेनेची दाणादाण उडवून देत आहे पहा. आपलें सामर्थ्य व पराक्रम जगविख्यात आहे, तेव्हां आपण यांना थोपवा.' तें दुर्योधनाचें भाषण ऐकून प्रतापशाली शल्य आपल्या रथदळांनिशीं पांडवांवर तुटून पडून त्यानें युधिष्ठिराला थोपविलें व त्यावर बाणांचा मारा चालविला. तेव्हां मृत्युमुखांत सांपडल्याप्रमाणें युधिष्ठिराला शल्याच्या रथांच्या मारांत सांपडलेला पाहून भीम त्याकडे गेला. आणि सूर्य कलला असतां फिरून भयंकर युद्ध सुरू झालें. ते वेळीं भीष्मद्रोणांनीं सर्व पांडवसेनानायकांवर बाणांचा भडिमार चालविला. इकडे सात्यकी व भीम हेही थेट जाऊन लागणारे तीक्ष्ण बाण त्या महारथ्यांवर सोडीत होते. सौवीर, कितव, पूर्वेकडील, पश्चिमेकडील, उत्तरेकडील, मालव, अभिषाह, शूरसेन, शिवी व वसाती वीर तीक्ष्ण बाणांनीं जर्जर झाले होते तरी भीष्मांना न सोडतां अनेक प्रकारचीं आयुधें हातांत घेऊन पांडवांवर तुटून पडत होते. त्याचप्रमाणें पांडवांनीं मोठ्या रथदळांनिशीं भीष्मांना घेरून घेतलें होतें. तथापि मोठ्या दाट अरण्यांत टाकलेल्या अग्नीप्रमाणें ते शत्रूला भाजून काढीत होते. त्यांचा रथ हेंच अग्निगृह असून धनुष्य ह्याच त्याच्या ज्वाळा होत्या; त्याचप्रमाणें तलवार, शक्ति व गदा हेच त्याला सर्पण असून बाण ह्याच त्याच्या ठिणग्या होत्या. अशा प्रकारचा भीष्मरूपी अग्नि क्षत्रिय वीरांना जाळून काढीत होता. चेदी काशी व करूष या देशचे चौदा हजार प्रसिद्ध व कुलवान् महारथी जिवाची पर्वा न करतां आ पसरलेल्या काळासारख्या भीष्मांवर चालून जाऊन परलोकाच्या तयारीला लागले होते. वरील योद्धे मरून गेलेले असे हजारों हत्ती व घोडे मरून पडलेले दिसत होते. भीष्मबाणांनीं जर्जर झालेले वीर पळूं लागले असतां कोणाच्यानें त्यांना थोपवेना; व त्यांची धांवपळ उडाली असतां कोणी दोघे सुद्धां एकत्र जमून पळतांना दिसत नव्हते. पांडवसैन्यांत एकच हाहाकार उडाला, व तें सैरावैरा पळूं लागलें. ती स्थिति पाहून, रथ आवरून श्रीकृष्ण अर्जुनाला म्हणाला, 'अर्जुना, ज्याची तूं आजपर्यंत इच्छा धरून बसला होतास ती वेळ आली आहे; मोहानें तूं वेडा झाला नसशील तर यांवर हात चालीव. पूर्वीं विराटनगरामध्यें राजांसमक्ष भीष्मद्रोण प्रभृति जे जे म्हणून रणामध्यें माझे पुढें उभे राहतील त्या सर्व धृतराष्ट्राच्या सैन्याला मी मारून काढीन असें जें तूं ह्मणाला होतास तें आपलें भाषण खरें कर व क्षत्रधर्म स्मरून न डगतां युद्ध कर.' असें श्रीकृष्ण बोलला असतां, तोंड खालीं करून वांकड्या दृष्टीनें श्रीकृष्णाकडे पाहून मोठ्या कष्टानें तो त्याला म्हणाला, 'ज्यांना मारूं नये अशांना मारून राज्य मिळवून नरकाची शिदोरी बांधून घेणें किंवा वनवासाचीं दुःखें सोसणें यांपैकीं काय करणें कल्याणप्रद आहे मला कळत नाहीं. असो, भीष्मांवर रथ चालीव, तुझ्या म्हणण्याप्रमाणें करतों.' ह्यावर सूर्याप्रमाणें ज्यांवर नजर ठरत नव्हती असे भीष्म ज्या ठिकाणीं होते तेथें श्रीकृष्णानें घोडे हांकले; व याप्रमाणें अर्जुनाला भीष्मांवर चालून निघालेला पाहून पांडवसैन्य परत वळलें. ते वेळीं भीष्मांनीं सिंहाप्रमाणें मोठ्यानें गर्जून अर्जुनाच्या रथावर बाणांचा वर्षाव केला. तरी कृष्णानें न घाबरतां धैर्यानें भीष्मांच्या बाणांनीं घायाळ झालेले ते घोडे तसेंच पुढें हांकले. ते वेळीं मेघाप्रमाणें शब्द देणारें दिव्य धनुष्य घेऊन बाणांच्या योगानें अर्जुनानें भीष्मांचें धनुष्य मोडून टाकलें. तेव्हां एका निमिषांत दुसरें धनुष्य घेऊन तें भीष्मांनीं सज्ज केलें असतां तेंही अर्जुनानें तसेंच मोडून टाकलें. ती त्याची विलक्षण चलाखी पाहून शाबास, शाबास म्हणून भीष्मांनीं सुद्धां त्याची वाहवा केली. व दुसरें एक धनुष्य घेऊन त्यांनीं अर्जुनाच्या रथावर बाणांचा मारा चालविला. घोडे हांकण्यामध्यें मोठी कसोशी करून मंडलाकार रथ हांकीत राहून श्रीकृष्णानें त्यांचे ते सर्व बाण फुकट घालविले. अर्जुनाचें मऊ युद्ध, ते-

जस्वी भीष्मांचा बाणवर्षाव, व वीरांचा संहार पाहून श्रीकृष्णाला तें सहन झालें नाहीं. घोड्यांचा लगाम टाकून योगी श्रीकृष्ण त्या महारथांतून खालीं उडी घेऊन, ठोसा देण्याच्या हेतूनें हातांत चाबूक घेऊनच सिंहाप्रमाणें गर्जत व पायानें पृथ्वी हदारून सोडीत रागानें डोळे लाल करून भीष्मांवर धांवून गेला. याप्रमाणें त्याला भीष्मांजवळ येऊन त्यांवर तुटून पडतांना पाहून 'भीष्म मेले,' 'भीष्म मेले' असा शब्द जिकडे तिकडे ऐकूं येऊं लागला. त्याला आपल्यावर तुटून येतांना पाहून अगदीं न घाबरतां आपलें मोठें धनुष्य ओढून ते शांतपणें त्याला म्हणाले, 'हे पुंडरीकाक्षा, ये, ये, मला या महारणामध्यें पाड. युद्धांत तूं मला मारल्यानें लोकांमध्यें माझें सर्व प्रकारें उत्तम कल्याणच होणार आहे. त्रैलोक्यामध्यें मला आज मोठा मान मिळाला आहे. यथेष्ट माझ्यावर प्रहार कर. हा मी तुझा दास उभा आहें.' इतक्यांत अर्जुन त्याच्यामागून धांवून गेला; व त्यानें त्याच्या हाताला धरलें असतां त्याला ओढीत घेऊनच श्रीकृष्ण जोरानें पुढें चालला. अर्जुनानें मोठा जोर करून कसेंबसें त्याचे पाय धरून दहाव्या पावलाला त्याला थांबविलें. आणि रागानें डोळे लाल करून सापाप्रमाणें फुसफुसणाऱ्या त्याला अगदीं काकुळत येऊन मोठ्या प्रेमळ शब्दानें अर्जुन ह्मणाला, 'कृष्णा परत फीर. मी युद्ध करणार नाहीं म्हणून तूं जें पूर्वीं म्हणाला आहेस तें खोटें करणें तुला उचित नाहीं. लोक तुला असत्यवादी ह्मणतील. हा माझा भाग. मी या भीष्मांना मारीन, हें तुला मी शपथपूर्वक सांगतों. आज कोणाला हार न जाणाऱ्या यांना मारून शत्रूंचा शेवट लावतों.' हे शब्द ऐकून रागारागानेंच कांहीं न बोलतां श्रीकृष्ण फिरून रथावर चढला. भीष्मांनीं फिरून बाणांचा मारा चालवून हिंवाळ्यानंतर ज्याप्रमाणें सूर्य आपल्या किरणांनीं सर्व प्राणिमात्रांचें सत्व ओढून घेतो त्याप्रमाणें भीष्म योध्यांचे प्राण घेऊं लागले.

याप्रमाणें पांडवसैन्याचा त्यांनीं अगदीं मोड करून टाकला असतां, मरून निरुत्साह होऊन, निसंज्ञ होऊन पळ काढणाऱ्या पांडवसेनेचे डोळे आपल्या तेजानें प्रखर अशा मध्यान्हींच्या सूर्याप्रमाणें भीष्मांवर ठरेनात. याप्रमाणें त्यांची धांवपळ उडाली असतां चिखलांत रुतलेल्या गुराप्रमाणें अथवा पायाखालीं तुडविल्या जाणाऱ्या दुबळ्या मुंग्यांप्रमाणें त्यांना कोणी हात देणारा मिळेना. याप्रमाणें त्यांनीं पांडवसैन्याचा फडशा चालविला असतां सूर्य अस्ताला गेला, घोर संध्याकाळ पडली व रणांत कांहींच दिसेनासें झालें. भीष्म मारून काढीत असतां हत्यारें टाकून देऊन, भयानें विव्हळ झालेलें सर्व पांडवसैन्य मागें वळून पळ काढूं लागलें. तेव्हां हें पाहून युधिष्ठिरानें लढाई बंद केली. नंतर त्या लढाईमध्यें घायाळ झालेले सर्व सैनिक आपापल्या शिबिराकडे गेले.

## १८ भीष्मांचा युधिष्ठिराला सल्ला.
### ( ६. १०७ )

रणामधील भीष्मांचें त्या दिवशींचें अचाट कृत्य पाहून पांडवांना चैन पडेना. तेव्हां पांडव, वृष्णि व सृंजय या प्रसंगीं काय केलें असतां कल्याण होणार आहे म्हणून विचार करण्यासाठीं एकत्र जमले. तेव्हां धर्मराज बराच वेळ विचार करून श्रीकृष्णाकडे पहात म्हणाला, 'कृष्णा, पहा, अचाट पराक्रमी भीष्म कमलवनाला तुडवून टाकणाऱ्या हत्तीप्रमाणें माझ्या सैन्याचा चेंदा उडवीत आहेत. या महात्म्यांवर आमची नुस्ती नजर सुद्धां ठरत नाहीं. पेट घेतलेल्या अग्नीप्रमाणें किंवा भयंकर विषारी तक्षक नागाप्रमाणें ते सर्व माझें सैन्य चाटून घेत आहेत. रणामध्यें सज्ज झालेल्या यमाला, किंवा खवळलेल्या इंद्राला,, वरुणाला किंवा कुबेराला सुद्धां जिंकणें सोपें आहे; परंतु या खवळलेल्या भीष्मांना रणांत जिंकणें सोपें नाहीं. ह्मणून अशी स्थिति असतां माझ्या कोत्या बुद्धीमुळें रणांत भीष्मांसारख्याशीं तोंड द्यावयाचें असल्यानें मी शोक सागरांत बुडालों आहे. तेव्हां यांच्याशीं तोंड देण्यापेक्षां वनाला जावें हेंच मला बरें दिसतें. मला हें युद्ध नको. माझे भाऊसुद्धां बाणांनीं अगदीं जर्जर झाले आहेत. माझ्यासाठीं बंधुप्रेमानें राज्याला मुकून, मजबरोबर वनाला येऊन त्यांनीं क्लेश सोसले. इतकें सर्व असून हें जीवित मला अधिक वाटत आहे, पण तें सुद्धां आतां राहणें कठीण

झालें आहे. आतां जी आयुष्याची बाकी राहिली असेल त्यानें धर्माचरण करावेंसें मला वाटतें. माझ्यावर व माझ्या भावांवर जर तुझी दया असेल तर धर्माला व्यत्यय न येतां माझें हित कशांत आहे तें तूं मला सांग.' याप्रमाणें हें धर्मराजाचें काकुळतीचें लांबलचक भाषण ऐकून, श्रीकृष्ण त्याचें समाधान करून ह्मणाला, 'धर्मराजा, असा खिन्न होऊं नकोस. तुझे सर्व भाऊ मोठे शूर व अजिंक्य आहेत. त्यांना किंवा वाटेल तर मला भीष्मांशीं युद्ध करण्याला सांग. तूं सांगितलें असतां मी काय करणार नाहीं? जरी अर्जुनाच्या मनांत नसेल तरी भीष्मांला सामन्याला बोलवून मी त्यांना मारतों. भीष्म मेल्यावर जय येईल असें तुला वाटत असेल तर आज मीएकटा त्यांना मारतों. जो पांडवांचा शत्रु तो माझाच शत्रु असें मी समजतों. जे तुझे आहेत ते माझे आहेत व माझे आहेत ते तुझेच आहेत. तुझा भाऊ माझा मित्र, संबंधी व शिष्य आहे. अर्जुनासाठीं मी आपल्या आंगाचें मांस तोडून देईन हाही माझ्यासाठीं आपला प्राण देईल असा आमच्या दोघांमधला करारच आहे. तेव्हां तूं मला सांग ह्मणजे मी लढण्याला तयार आहें. पूर्वीं उपप्लव्यामध्यें सर्व लोकांपुढें मी भीष्मांना मारीन अशी अर्जुनानें प्रतिज्ञा केली ती त्याची प्रतिज्ञा खरी झाली पाहिजे. आतां तो मला परवानगी देईल तर मी खात्रीनें हें काम शेवटास नेईन. अथवा ही जोखीम रणामध्यें पार्थाच्या शिरावर आहे. तो भीष्मांना रणांत मारील. हा तयार होऊन उभा राहिला असतां अशक्य गोष्टीसुद्धां घडवून आणील; देवदानवांनासुद्धां नाहींसे करील; मग ह्या भीष्मांची बिशाद काय! ह्या महावीर्यशाली भीष्मांची बुद्धि चळून क्षुद्रांवर हे आपला पराक्रम गाजवीत आहेत व यांना आपलें कर्तव्य कळेनासें झालें आहे.'

युधिष्ठिर ह्मणाला, 'माधवा, तूं ह्मणतोस तें बरोबर आहे. हें सर्व मिळूनसुद्धां तुझ्या तोडीला लागणार नाहींत. माझ्या पक्षाला तूं येऊन मिळाला आहेस तेव्हां माझे सर्व मनोरथ खात्रीनें पूर्ण होणार आहेत. सर्व देवांसह इंद्राला देखील आह्मी जिंकूं, मग ह्या भीष्मांची गोष्ट कशाला? परंतु आपल्या कामासाठीं तुला मी खोटा करूं इच्छित नाहीं. तूं बोलल्याप्रमाणें न लढतांच मला होईल तें साहाय्य कर. दुर्योधनाकरितां मी लढेन, परंतु तुला सल्ला देईन असा भीष्मांनीं मजबरोबर करार केला आहे. तेव्हां मला सल्ला देऊन राज्य देणारे तेच आहेत. करितां त्यांच्या मरणाचा उपाय त्यांना विचारण्यासाठीं आपण सर्व मिळून त्यांकडेच जाऊं; ह्मणजे खात्रीनें ते आमच्या हिताचें खरें काय तें सांगतील. ते सांगतील त्याप्रमाणें मी करीन. त्या वृद्ध आवडत्या ताताच्या तातांना मी मारूं इच्छितों तेव्हां क्षत्रधर्माला धिःकार असो.' हा विचार कृष्णालाही पसंत पडून सर्व पांडव चिलखतें व हत्यारें काढून ठेवून भीष्मांच्या शिबिराकडे गेले. व आंत शिरून पायांवर डोकें ठेवून ते त्यांना शरण गेले. तेव्हां त्या सर्वांचें सप्रेम स्वागत करून, 'तुमच्या मनाजोगें मी काय करूं,' ह्मणून त्यांनीं विचारलें व 'तुह्मी सांगाल तें काम कितीही कठिण असलें तरी तें मी मनापासून करीन,' असें ह्मणाले. तेव्हां धर्मराज प्रेमळ व दीनवाणीनें ह्मणाला, 'तात आपल्याला सर्व कांहीं कळत आहे. मला जय कसा मिळणार? मला राज्य कसें मिळणार? आणि प्रजेची ही कत्तल बंद कशी पडणार? हें आह्मांला सांगा. आपण कशानें मरणार हें आपलें आपणच आह्मांला सांगा. रणांत आपल्यापुढें आमचा टिकाव कसा लागणार? रणामध्यें मंडळाकार धनुष्य घेऊन आपण फिरत असतां आपण शत्रूला एवढीसुद्धां संधी देत नाहीं. आपण बाण केव्हां काढतां, केव्हां जोडतां, केव्हां ओढतां हें कांहींच आह्मांला कळत नाहीं. रणांत भयंकर कत्तल उडवून देऊन माझ्या मोठ्या सैन्याचा आपण फडशा उडवून दिला आहे. तेव्हां आपल्याला जिंकून माझ्या सैन्याचें ज्यानें कुशल होईल असा उपाय सांगा.'

त्यावर भीष्म ह्मणाले, 'मी जिवंत असे तोंपर्यंत तुला खात्रीनें जय मिळणार नाहीं. मला जिंकल्यावर तुला जय मिळेल. ह्मणून रणांत तुला जय पाहिजे असेल तर माझ्यावर लौकर प्रहार चालीव. मी तुह्मांला परवानगी देतों, माझ्यावर खुशाल प्रहार करा. तुह्मीं याप्रमाणें मला बरोबर ओळखलें एवढेंच पुरे आहे. मी मेल्यावर सर्व मेल्यासारखें होणार आहे. जोंपर्यंत हातांत शस्त्र घेऊन रणामध्यें मी स-

ज्ञ आहें, तोंपर्यंत मला जिंकण्याची कोणाची छाती नाहीं. तेव्हां शस्त्र ठेवीन त्या वेळीं महारथ्यांनीं मला मारावें. ज्यानें हत्यार खालीं ठेवलें आहे, जो पडला आहे, ज्याचें कवच किंवा ध्वज पडलें आहे, जो पळतो आहे, जो भ्याला आहे, जो विकलेंद्रिय आहे, ज्याला एकुलता एक मुलगा आहे, जो नांवाजलेला नाहीं, जी स्त्री आहे, किंवा ज्याला स्त्रीचें नांव आहे इतक्यांबरोबर मला युद्ध आवडत नाहीं. अमंगळ ध्वज पुढें पाहिल्यावर मी युद्ध करणार नाहीं असा मीं पूर्वींच संकल्प करून ठेवला आहे. हा जो, लढाईला आतुर असणारा, नेहमीं फत्ते मिळविणारा शूर, महारथी शिखंडी हा पूर्वीं स्त्री असून पुढें पुरुष झाला आहे हें सर्व तुह्मांलाही ठाऊक आहेच. त्याचा तो अमंगळ ध्वज पुढें पाहून हातांत बाण घेऊन मारण्याला माझें मन कधींही घेणार नाहीं. रणामध्यें महाभाग श्रीकृष्ण किंवा धनंजय यांवांचून दुसरा कोणी मला मारण्याला समर्थ नाहीं ह्मणून अर्जुनाला कवच वगैरे चढवून व शिखंडीला पुढें करून माझ्यावर मारा करा. ह्मणजे मी पडल्यावर तुह्मी सर्व कौरवांना मारण्याला समर्थ होऊन तुह्मांला खात्रीनें जय मिळेल. याप्रमाणें भीष्मांचा विचार घेऊन, त्यांना अभिवादन करून, पांडव आपल्या शिबिराला गेले. याप्रमाणें बोलून भीष्मांनीं परलोकाची दीक्षा घेतली असतां अर्जुन दुःखसंतप्त होऊन, लाज वाटून ह्मणाला, ‘ बुद्धिमान् व शहाण्या कौरवांमध्यें थोर अशा गुरुंशीं मीं कसें युद्ध करावें ? कृष्णा, लहानपणीं खेळतांना धुळीच्या आंगांनीं त्यांच्या मांडीवर बसून त्यांचें आंग मीं मळविलें आहे. त्या आजोबांना मीं बाबा असें ह्मटलें असतां ‘ मी तुझा बाबा नव्हे, तुझ्या बाबांचा बाबा आहे, ’ असें जे मला ह्मणत त्यांना मीं कसें मारावें ? माझ्या सैन्याचा त्यांना खुशाल फडशा पाडूं दे. मला जय मिळो किंवा मी मरो. मी कांहीं त्यांच्यांशीं युद्ध करणार नाहीं. कृष्णा, तुझा काय विचार ! ’ श्रीकृष्ण ह्मणाला, ‘ अर्जुना, पूर्वीं मी भीष्मांना मारीन अशी प्रतिज्ञा करून, क्षत्रधर्माला जागत असून, आज त्यांना मारीत नाहीं ह्मणतोस हें कसें ? युद्धांत यांना मारल्यावांचून तुला जय कधीं येणार नाहीं. दैवानें पूर्वी ठरवून ठेवलेला नियमानियम असा आहे, व तें तसेंच झालें पाहिजे. आ पसरून तयार असलेल्या काळासारख्या या भीष्मांना तुझ्यावांचून दुसरा कोणी मग तो प्रत्यक्ष इंद्र असला तरी जिंकण्याला समर्थ नाहीं. ह्मणून माझें सांगणें ऐकून स्वस्थपणें तूं भीष्मांना मार. पूर्वीं बृहस्पतींनीं इंद्राला सांगितलें आहे कीं, ‘ आपल्यावर हत्यार उपसून आपल्याला मारण्याच्या हेतूनें येणारा वडील, वृद्ध व गुणवान् असला तरी त्याला मारावें. ’ मनांत कांहीं किंतू न धरतां युद्ध करावें; प्रजेचें रक्षण करावें; व यज्ञ करावा हा क्षत्रियांचा पूर्वापार धर्म आहे. शिखंडी हा भीष्मांच्या मरणाला कारण होणार आहे. कारण याला पाहिल्या बरोबर ते मागें फिरतात. तेव्हां शिखंडीला त्यांचे पुढें करून आपण त्यांना खालीं आणावें व इतर सर्व वीरांचें बाणांनीं निवारण करावें. याप्रमाणें विचार ठरवून ते आपापल्या जागीं निजले.

---

## १९ दहावा दिवस—संकुल युद्ध.

### ( ६. १०८—१११ )

पुढें सूर्योदय झाल्यावर शत्रुनाशक उत्तम व्यूह रचून ढोलकीं, मृदंग, नगारे यांच्या गजरामध्यें पांढरे शुभ्र शंख फुंकीत शिखंडीला पुढें करून पांडव बाहेर पडले. ’ शिखंडी सर्व सैन्याच्या आघाडीला असून भीमसेन व अर्जुन त्याच्या रथाच्या चाकांचें रक्षण करीत होते. त्याच्या मागें द्रौपदीचे मुलगे व अभिमन्यु असून चेकितान व सात्यकी त्यांचें रक्षण करीत होते. धृष्टद्युम्न पांचालांसह बरोबर चालला होता. युधिष्ठिर व नकुलसहदेव सिंहनाद करीत त्यांचे मागून चालले असून त्यांच्या मागून विराट, द्रुपद, पांच कैकेय बंधू व धृष्टकेतु पांडव सैन्याची पिछाडी राखीत होते. याप्रमाणें सैन्याची रचना करून जिवाची पर्वा न धरतां ते कौरवांवर चालून निघाले. त्याचप्रमाणें महारथ भीष्मांना पुढें करून कौरवांनीं पांडवांवर चाल केली. कोणाला हार न जाणाऱ्या या भीष्मांचें धृतराष्ट्राचे मुलगे रक्षण करीत होते. त्याचप्रमाणें द्रोण, अश्वत्थामे, भगदत्त, कृप वगैरे मंडळी कौरवसैन्याची पिछाडी राखीत होते. भीष्मांनीं

आपल्या सैन्याची पैशाच्य व्यूहरचना केली; व दोन्ही दळांचें यमपुरीला भर घालणारें भयंकर युद्ध सुरू झालें. अर्जुन प्रभृति पांडव शिखंडीला पुढें करून भीष्मांवर चालून गेले असतां भीमानें पुष्कळ कौरवसेनेवर बाण सोडून त्यांना रक्ताचें स्नान घालून परलोकाला पाठविलें. नकुलसहदेव व सात्यकि यांनीं तर कौरवसैन्याला अगदीं जर्जर करून सोडलें होतें. याप्रमाणें पांडववीरांनीं खळबळ उडवून देऊन कौरवसैन्याची चोहोंकडे दाणादाण उडाली असतां तो सैन्याचा नाश भीष्मांना सहन झाला नाहीं. जिवाची पर्वा देखील न धरतां त्यांनीं पांडवसैन्यावर तीक्ष्ण अशा नाराच, वत्सदंत व अंजिलिक बाणांचा मारा चालवून पांडवांच्या सैन्याला जागच्या जागीं थोपविलें; व असंख्य हत्ती व घोडे यांचा फडशा पाडला. अनेक रथ्यांना त्यांच्या रथांवरून, स्वारांना घोड्यांवरून, गजयोद्ध्यांना हत्तींवरून खालीं आणून पुष्कळ शिपायांचा त्यांनीं चुराडा उडविला. उग्र स्वरूप धारण करून ते रणामधून चोहोंकडे फिरत असतां त्यांचें धनुष्य नेहमीं वांकलेलें दिसत होतें. त्यांचें तें अचाट कृत्य पाहून कौरवांना आश्चर्य वाटून त्यांनीं त्यांची वाहवा केली. याप्रमाणें त्यांना लढतांना पाहून पांडवांचा धीर सुटला. आ पसरलेल्या काळाप्रमाणें त्यांना थोपविण्याचें कोणाचे हातून होईना. जंगलाला जाळून काढणाऱ्या वणव्याप्रमाणें ते तीक्ष्ण बाणांनीं शिखंडीचें रथदळ जाळून काढीत होते. कालानें सोडलेल्या मृत्यूप्रमाणें तीन विषारी बाण शिखंडीनें त्यांच्या छातीवर मारले. ते त्यांच्या छातींत खोल जाऊन भिडले होते तरी शिखंडीला पाहून त्याच्याशीं युद्ध करण्याचें मनांत नसल्यानें ते हासत हासत ह्मणाले, 'तुला वाटेल तसें तूं खुशाल मारा चालीव; मी तुझ्याशीं युद्ध करणार नाहीं. ज्याप्रमाणें तुला ब्रह्मदेवानें उत्पन्न केलें आहे तसा तुला मी स्त्रीच समजतों.' हें त्यांचें भाषण ऐकून शिखंडी खवळून जाऊन ओठ चावीत ह्मणाला, 'क्षत्रियांचा अंत करणारे आपण आहांत हें मी जाणतों. त्याचप्रमाणें परशुरामाशीं झालेलें आपलें युद्ध व आपला दिव्य प्रभाव या सर्व गोष्टी माझ्या कानांवर आल्या आहेत. आपला प्रभाव ठाऊक असून सुद्धां पांडवांचें व स्वतःचें प्रिय करण्यासाठीं मी आपल्याशीं युद्ध करून, आपल्याला मारणार हें मी शपथपूर्वक सांगतों. हें माझें भाषण ऐकून आपल्याला वाटेल तसें करा. माझ्यावर आपण नेम धरा किंवा न धरा. आपण कांहीं आज माझ्या हातून जिवंत सुटत नाहीं. हें जग आतां शेवटचें पाहून घ्या.' असें म्हणून वाक्शरानें घायाळ झालेल्या भीष्मांवर त्यानें पांच आणीदार बाण सोडले. तेव्हां शिखंडीला भीष्मांचा काळ समजून अर्जुनानें त्याला त्यांवर सोडलें. आणि ह्मणाला, 'शत्रूची दाणादाण करीत मी तुझ्यामागून येतों. तूं खुशाल भीष्मांवर त्वेषानें चालून जा. तुला त्यांचे हातून बिलकूल पीडा होणार नाहीं. त्यांना न मारतां आज जर तूं रणांतून परतशील तर जगांत तुझी व माझी थट्टा होणार आहे. तेव्हां आपली थट्टा होणार नाहीं असा यत्न करून भीष्मांना मार. बाकी सगळ्यांना मी थोपवून धरतों.'

इकडे लढत असतां भीष्मांच्या धनुष्याला किंवा रथाला यत्किंचित् अपाय न होतां तीक्ष्ण बाणांनीं त्यांनीं शत्रूंचा फडशा चालविला होता. प्रतिज्ञा केल्याप्रमाणें युद्धांत पांडवसैन्याचा ते फडशा पाडीत असतां त्यांना आळा घालण्याचें काम कोणाचे हातून होईना. इतक्यांत अर्जुन सिंहाप्रमाणें गर्जत व वरचेवर धनुष्याचा टणत्कार करीत, रथदळाला त्रासवून त्या ठिकाणीं आला. त्याच्या त्या शब्दानें धाबरलेलें कौरवसैन्य सिंहाच्या शब्दानें घाबरलेल्या पशूंप्रमाणें भिऊन पळालें. तें पाहून दुर्योधनानें घाबरून आपल्या सैन्यास धीर देऊन युद्धास परतविण्याविषयीं भीष्मांची प्रार्थना केली. तेव्हां दुर्योधनाचें समाधान करीत भीष्म ह्मणाले, 'दुर्योधना, स्वस्थमनानें ऐक. पूर्वीं मी तुझ्याशीं प्रतिज्ञा केली आहे कीं, दररोज दहा हजार क्षत्रियवीरांना मारून मी रणांतून परतेन. त्याप्रमाणें आजपर्यंत मीं केलें आहे. आज देखील मी अचाट कृत्य करून दाखवीन. आज मी एक मरून तरी पडेन किंवा पांडवांना मारीन. आज मी सैन्याच्या आघाडीला मरून पडतों व स्वामिपिंडाच्या ऋणांतून मोकळा होतों.' असें ह्मणून क्षत्रियांवर बाणांचा भडिमार चालवीत ते पांडवसैन्यावर तुटून पडले; व त्यांनीं

दहाव्या दिवशीं आपली पूर्ण शक्ति दाखवून एक लाख लोक मारले. पांचालसेनेमधील महारथ्यांचें तेज त्यांनीं सूर्य ज्याप्रमाणें आपल्या किरणांनीं जल शोषून घेतो त्याप्रमाणें हरण केलें. दहा हजार हत्ती व दहा हजार घोडे व दोन लाख पायदळ कापून काढून स्वच्छ जळणाऱ्या अग्नीप्रमाणें ते रणामध्यें झळकत असतां उत्तरायणामध्यें प्रकाशणाऱ्या सूर्याप्रमाणें त्यांच्यावर पांडवांचे डोळे ठरत नव्हते. सर्व पांडव व सृंजय वीरांबरोबर ते एकटे युद्ध करीत होत.

याप्रमाणें भीष्मांचा पराक्रम पाहून अर्जुन, ' न भितां भीष्मांवर चालून जा, मी यांना मारून पाडतों ' असें शिखंडीला ह्मणाला. तेव्हां शिखंडी भीष्मांवर चालून गेला व सर्व पांडववीर मागोमाग भीष्मांवरच तुटून पडले. याप्रमाणें त्यांना एकट्या भीष्मांवर तुटून पडतांना पाहून कौरवांकडचे वीर भीष्मांचें रक्षण करण्याकरितां तिकडे चालून जाऊन निरनिराळ्या वीरांनीं निरनिराळ्या वीरांना अटकाविलें. भीष्मांना गांठण्यासाठीं शिखंडीला पुढें करून अर्जुन त्वेषानें त्यांजवर चालून जांत असतां दुःशासनानें त्याला थोपविलें. इकडे धृष्टद्युम्न, ' हा अर्जुन भीष्मांवर चालून जात आहे, तेव्हां त्वेषानें एकट्या भीष्मांवरच हल्ला करा. भिऊं नका. भीष्मांचा तुमच्यावर हल्ला होणार नाहीं. अर्जुनाशीं युद्ध करण्याला प्रत्यक्ष इंद्रसुद्धां समर्थ नाहीं. मग दुबळ्या व ह्मातार्‍या भीष्मांचें काय चालणार, ' ह्मणून आपल्या सैन्याला ओरडून सांगत होता. हे सेनापतीचे शब्द ऐकून पांडवांकडचे महारथी मोठ्या उत्साहानें भीष्मांवर चालून निघाले. प्रलयकालीन महापुराच्या लाटेप्रमाणें चालून येणाऱ्या त्या ओघाला निर्भयपणानें दुःशासन आपल्या सैन्यानिशीं थोपवीत होता. तेवेळीं दुःशासनानें कृष्णार्जुनांवर बाणांचा मारा केला. तेव्हां पौर्णिमेचे दिवशीं पूर्णचंद्राला ग्रासून टाकणाऱ्या राहूप्रमाणें अर्जुनानें दुःशासनाला ग्रासून त्याचा बाण व रथ मोडून टाकला. तेव्हां दुःशासनानें दुसरें धनुष्य घेऊन भीष्मांपुढें उभे राहून पंचवीस बाण अर्जुनावर सोडले. तेव्हां अर्जुनानें खवळून जाऊन सोन्याचीं पिसें लावलेले तीक्ष्ण बाण त्यावर सोडले. सरोवरामध्यें घुसणाऱ्या हंसाप्रमाणें ते दुःशासनाच्या आंगांत जाऊन रुतले. याप्रमाणें अर्जुनानें त्याला जर्जर करून सोडलें असतां दुःशासन भीष्मांच्या रथांत जाऊन बसला. समुद्रांत बुडूं लागलेल्या ह्या दुःशासनास भीष्म बेट मिळालें.

इकडे सात्यकि सज्ज होऊन भीष्मांवर चालून येत असतां आर्ष्यशृंगी राक्षसानें बाणांनीं त्याला जेरीला आणून त्याला थोपविण्याचा प्रयत्न चालविला. तथापि सात्यकि गर्जत हांसत उभा आहेसें पाहून प्राग्ज्योतिषांचा राजा भगदत्त यानें त्यावर बाणांचा मारा चालविला. भगदत्तानें त्याचें धनुष्य मोडून टाकलें. लगेच दुसरें धनुष्य घेऊन सात्यकि तयार झालेला पाहून भगदत्तानें त्वेषानें एक भयंकर शक्ति त्यावर सोडली. तिचे सात्यकीनें दोन तुकडे करून टाकले. तेव्हां दुर्योधनानें ' याला रणांतून जिवंत सोडूं नका, हा मेला कीं, पांडवांचें सैन्य मेलें समजा, ' ह्मणून आपल्या भावांना सांगितलें. तें त्याचें भाषण ऐकून मोठमोठे महारथी सात्यकीवर भिडले. इकडे कांबोजाचा राजा सुदक्षिण अभिमन्यूशीं भिडून त्याला थोपवीत होता. इकडे वृद्ध विराट व द्रुपद खवळून जाऊन कौरवसैन्याला प्रतिबंध करून भीष्मांवर चालून जात असतां अश्वत्थाम्यांनीं त्याला तोंड दिलें. तेव्हां त्या दोघांचें तुंबळ युद्ध जुंपलें. एखादा मस्त हत्ती ज्याप्रमाणें दुसऱ्या मस्त हत्तीवर चालून जावा त्याप्रमाणें रूप सहदेवावर चालून जाऊन भीष्मांना बचावण्यासाठीं ते त्याच्याशीं निकरानें युद्ध करीत होते. इकडे विकर्ण नकुलाशीं भिडला असतां गोठ्यांतील दोन पोळांप्रमाणें ते एकमेकांला मारीत होते. भीष्मांवर चालून येणाऱ्या घटोत्कचाला दुर्मुख व धृष्टद्युम्नाला हार्दिक्य थोपवीत होते; व भीष्मांकरितां दोघांचें निकराचें युद्ध जुंपलें. त्याचप्रमाणें भीष्मांकडे धांवून येणाऱ्या भीमावर थांब, थांब ह्मणून भूरिश्रवा चालून गेला. भीष्मांना मारण्यासाठीं भीम भूरिश्रव्यावर व भीष्मांना जय यावा म्हणून भूरिश्रवा भीमावर मारा करून मोठ्या हुशारीनें लढत होते. इकडे धर्मराज मोठ्या सैन्यानिशीं भीष्मांवर चालून येत असतां द्रोणांनीं त्याला थोपविलें. द्रोणांच्या रथाचा घडघडाट ऐकून प्रभद्रकांचा चळकांप उडाला. द्रोणां-

नीं ती पांडवसेना थोपविली असतां तिचें एक पाऊल देखील पुढें पडेना. त्याचप्रमाणें चित्रसेन चेकितानाला थोपवीत होता. इकडे दुःशासन अर्जुनाला थोपविण्यासाठीं आपली पराकाष्ठा करीत असतां त्याला न जुमानतां दुःशासनाला परतवून तो कौरवसेनेला तुडवून काढीत होता. याप्रमाणें जिकडे तिकडे महारथ्यांकडून कापून निघणाऱ्या कौरवसेनेमध्यें खळबळ उडून राहिली होती.

## २० भीष्मपतन. ( ६.११२—११९ )

याप्रमाणें मस्त हत्तीला सुद्धां थोपविणारे आपले प्रचंड धनुष्य फिरवीत धनुर्धरी वीर अर्जुन कौरवसैन्याची दाणादाण उडवीत पांडवसैन्यामधून फिरत असतां जिकडे तिकडे अपशकुन होत असलेले पाहून द्रोण आपल्या प्रतापशाली आश्वत्थाम्यांना ह्मणाले, ‘ वत्सा, आजचा दिवस असा आहे कीं, आज भीष्मांना मारण्यासाठीं महाबलशाली अर्जुन आपली पराकाष्ठा करणार. भात्यांतून बाण आपोआप बाहेर पडत आहेत; धनुष्य स्फुरण पावत आहे; प्रयत्नावांचून अस्त्रप्रयोग आपोआप होत आहे; व मनाला एक प्रकारचा क्रूरपणा वाटत आहे. पशुपक्ष्यांचा चोहोंकडे सारखा घोर शब्द चालला आहे. गिधाडें खालीं कौरवसैन्यामध्यें घुसत आहेत. सूर्य निस्तेज झाला आहे. दिशा लाल भडक झाल्या आहेत. भूमि खचून दरदरून कंपायमान होत आहे. कंक, गिधाडें व बगळे वरचेवर ओरडत आहेत. अमंगळ कोल्हीं ओरडून मोठें भय सुचवीत आहेत. सूर्यमंडळामधून मोठी उल्का पडली आहे. सूर्यभोंवतीं धडाच्या आकृतीचे ढग दिसत आहेत. त्याचप्रमाणें चंद्रसूर्यांना भयंकर खळें पडलें आहे. दुर्योधनाच्या देवळामधील देव थरथर कांपत आहेत, हांसत आहेत, नाचत आहेत व रडत आहेत. याचप्रमाणें सूर्यभोंवतीं ग्रह डावीकडून दुःशकुनसूचक प्रदक्षिणा करीत आहेत. भगवान चंद्र खालीं डोक्यानें उगवत आहे. कौरवसैन्यांत राजांच्या आंगांवर चिलखतें असतांही ते निस्तेज दिसत आहेत. दोन्ही सैन्यांमधून पांचजन्याचा शब्द व गांडिवाचा टणत्कार जिकडे तिकडे ऐकूं येत आहे. भीष्मार्जुन एकमेकांशीं भिडणार हा विचार येऊन माझ्या आंगावर कांटा उभा रहात आहे; व माझें मन उद्विग्न झालें आहे. त्या कपटपटु पापी शिखंडीला पुढें करून अर्जुन भीष्मांबरोबर युद्ध करण्याला गेला आहे. या शिखंडीचा ध्वज अमंगळ समजून भीष्म त्यावर प्रहार करणार नाहींत. हा विचार मनांत येऊन माझा मेंदु गढुळ झाला आहे. त्या युधिष्ठिराचा राग, भीष्मार्जुनांचा समागम व माझ्या अस्त्रांची ही तयारी हे सर्व प्रजेचें अकल्याण खात्रीनें सुचवीत आहेत. अर्जुन बुद्धिमान, बलशाली, शूर, अस्त्रनिपुण, चलाख, दूरचा नेम मारणारा, वेळप्रसंग ओळखणारा, व इंद्रादि देवांना देखील अजिंक्य असून युद्धांत श्रम ह्मणून मुळीं त्याला ठाऊक नाहीं. त्याला भैरवास्त्र मिळालें असून तो रणांत नेहमीं विजयी असतो. तेव्हां आजच्या ह्या प्रसंगांत भयंकर कत्तल उडणार आहे. झटपट जा व स्वर्ग डोळ्यांपुढें ठेवून कीर्ति मिळविण्यासाठीं त्याचा मार्ग अटकाव. दुसऱ्यावर पोट भरणाऱ्यांना जीव जतन करण्याची ही वेळ नव्हे. रथ, हत्ती व घोडे हेच ज्यामधील भोंवरे आहेत अशी दुस्तर, भयंकर रणनदी पार्थ आपल्या एकठ्या रथानिशीं तरून जात आहे. ब्राह्मण्यता, मनोनिग्रह, दान व आजपर्यंत आचरलेलें मोठें तप याचें फळ या युधिष्ठिराला मात्र मिळालेलें दिसतें. कारण याला अर्जुन, भीम, नकुलसहदेव यांसारखे भाऊ मिळाले असून श्रीकृष्णासारखा साहाय्यकर्ता मिळाला आहे. तपानें ज्यानें शरीर सुकविलें आहे अशा ह्या धर्मराजाच्या दुःखानें उत्पन्न झालेला राग हाच ह्या दुर्बुद्धि धृतराष्ट्राच्या सेनेला जाळून काढीत आहे. सैन्यामधून हाहाकार उडून गेला आहे. तूं धृष्टद्युम्नावर चालून जा, मी युधिष्ठिरावर चालून जातों, चोहोंकडून अतिरथ्यांनीं रक्षण केलेलें असल्यामुळें समुद्राच्या पोटाप्रमाणें या व्यूहाच्या आंत शिरकाव होणें कठीण आहे. आपलें प्रचंड धनुष्य हातांत घेऊन उत्तम अस्त्राचा प्रयोग चालवून धृष्टद्युम्न व भीमसेन यांच्यांशीं भीड. आपला लाडका मुलगा चिरकाल जगावा असें कोणाला वाटणार नाहीं? परंतु क्षात्र धर्म मनांत आणून मी तुला हें सांगत आहें. ’

इकडे भगदत्त, कृप, शल्य, कृतवर्मा, विंद, अनुविंद, जयद्रथ, चित्रसेन, विकर्ण व दुर्मर्षण हे

दहा कौरव योद्धे भीमाशीं भिडून सर्वांनीं मिळून त्यावर बाणांचा मारा चालविला असतां कोणाचें धनुष्य तर कोणाचा रथ मोडून टाकून, कोणाचे घोडे, कोणाचे सारथी मारून भीम त्या सर्वांची वाताहत लावीत होता. तेव्हां शल्य वगैरे कौरववीरांनीं आणीदार बाण भीमाच्या मर्मस्थळावर सोडले. शिवाय कोणी त्यावर शक्ति, कोणी तोमर, कोणी पट्टीश, कोणी शतघ्नी सोडीत असतां त्या सर्वांचे तो तिळाच्या काड्याप्रमाणें मोडून तुकडे करीत होता. याप्रमाणें रणबहादर भीमाला एकटा कौरवांशीं भिडलेला पाहून अर्जुन त्या घनघोर चाललेल्या रणाच्या ठिकाणीं बाणांनीं शत्रूचा फडशा पाडीत आला. जे कौरवयोद्धे भीमांशीं भिडून लढत होते त्यांवर अर्जुन बाण सोडूं लागला असतां दुर्योधनानें सुशर्म्याला आपल्या मोठ्या सैन्यांनिशीं जाऊन त्या दोघांचा समाचार घेण्यास सांगितलें. तेव्हां सुशर्म्यानें हजारों रथदळ बरोबर घेऊन जाऊन त्या दोघांना चोहोंकडून घेरलें. परंतु ते दोघे अनेक कौरवयोद्ध्यांचे धनुष्यबाण मोडून काढून शेंकडों हजारों लोकांचीं मुंडकीं छाटून काढीत होते. जिकडे तिकडे मारून पाडलेले रथी व स्वार गडबडा लोळतांना दिसत होते. कापून काढलेले हत्ती, शिपाई, घोडे व मोडून पाडलेले रथ यांनीं भूमि अगदीं भरून निघाली होती. छिन्नभिन्न झालेलीं छत्रें, मोडून पाडलेले ध्वज, गळून पडलेले अंकुश व झूल, पायांखालीं चुरून गेलेलीं बाहुभूषणें, हार, हरणाचीं कातडीं, फेटे, ऋष्टि, चवऱ्या, पंखे, राजांचे चंदनचर्चित हात, मांड्या यांनीं सर्व भूमि झांकून गेली होती. याप्रमाणें या दोघां भीमार्जुनांनीं भयंकर पराक्रम करून कौरवसैन्याचा फडशा उडवून दिला होता. इतक्यांत दुर्योधनाचे सांगण्यावरून द्रोण व मगधांचा राजा जयत्सेन ज्या ठिकाणीं भीमार्जुन याप्रमाणें कौरवसेनेचा फडशा पाडीत होते तेथें आले. जयत्सेनानें भीमावर बाणांचा मारा सुरू केला असतां भीमानें त्याच्या सारथ्यालाच रथांतून खालीं आणलें. तेव्हां घोडे उधळून पळूं लागल्यामुळें सर्व सैन्य पहात असतांना जयत्सेनानें पाय मागें घेतला; इकडे संधी पाहून द्रोण भीमावर बाण सोडूं लागले असतां त्यानें त्या गुरूंवर उलट पासष्ठ भल्ल बाण सोडले. अर्जुनानें लोहमय बाण सुशर्म्यावर सोडून त्याच्या सैन्याची वाताहत केली. तेव्हां भीष्म व कोसलचा बृहद्बल भीमार्जुनांवर चालून आले. तेव्हां आ पसरून जवळ येणाऱ्या काळासारख्या त्या भीष्मांवर सर्व पांडव व धृष्टद्युम्न शिखंडीला पुढें करून एकदम चालून गेले. शिखंडी अगदीं निर्भयपणें मोठ्या उत्साहानें त्यांवर चालून गेला. इकडे कौरवसैन्यही भीष्मांना पुढें करून शिखंडीप्रमुख त्या पांडवांशीं भिडले. तेव्हां भीष्मांचें व पांडवांचें कौरवांना चळकांप उत्पन्न करण्यासारखें भयंकर युद्ध सुरू झालें. जय अथवा मोड यासाठीं लागलेल्या ह्या द्यूतामध्यें कौरवांच्या जयासाठीं भीष्म पणाला लागले होते. वीरांनो, भीष्मांवर चालून जा, भिऊं नका, म्हणून धृष्टद्युम्न आपल्या सैन्याला उत्तेजन देत होता. तें सेनापतीचें हुरूप आणणारें भाषण ऐकून, पांडवसेना जिवाची पर्वा न धरतां भीष्मांवर तुटून पडली. भीष्मांनींही येऊन पडणाऱ्या त्या सेनेला तोंड दिलें. एकसारखी भयंकर कत्तल सुरू होऊन लाखों वीरांचा फडशा पडत होता. याप्रमाणें दहा दिवस पांडवसेनेला भाजून काढल्यावर त्या धर्मात्म्या भीष्मांना जिवाचा कंटाळा आला. म्हणून रणामध्यें आपण मरावें अशा हेतूनें जवळच असलेल्या युधिष्ठिराला ते म्हणाले, ' बा युधिष्ठिरा, सर्व शास्त्रें तुला अवगत आहेत. न्यायाचें व स्वर्गफल देणारें माझें भाषण ऐक. ह्या देहाचा मला कंटाळा आला आहे. रणामध्यें पुष्कळ प्राण्यांना मारतां मारतां माझे दिवस गेले आहेत. म्हणून माझ्या मनाप्रमाणें जर तुला करावयाचें असेल तर अर्जुन, तसेंच पांचाल व सृंजय यांना पुढें करून मला मारण्याचा यत्न कर. ' हा त्यांचा विचार कळल्यावर युधिष्ठिर आपल्या सैन्याला म्हणाला, 'भीष्मांवर चालून जाऊन त्यांच्याशीं लढून त्यांना जिंका. शत्रूंचा मोड करून टाकणारा हा अर्जुन तुमचें रक्षण करणारा आहे. तसाच हा धृष्टद्युम्न तुमचा सेनापति असून, भीमसेन खात्रीनें तुमची पाठ राखील. तेव्हां भीष्मांची भीति बिलकूल बाळगूं नका. शिखंडीला पुढें करून आज भीष्मांना खात्रीनें आपण जिंकूं. '

याप्रमाणें विचार ठरवून ब्रह्मलोकाला जाण्यास तयार होऊन सर्व पांडवसेना त्वेषानें भीष्मांवर चालून

गेली; आणि त्यांनीं भीष्मांना पाडण्याला कसून मेहनत केली. ते वेळीं दुर्योधनाच्या सांगण्यावरून नाना देशचे राजे, द्रोण, अश्वत्थामे, दुःशासन प्रभृतींच्या बरोबर राहून रणाच्या मध्यभागीं लढत असलेल्या भीष्मांचें रक्षण करीत होते. याप्रमाणें दोन्ही दळें एकमेकांवर तुटून जाऊन भयंकर पराक्रम गाजवीत असतां पृथ्वी दरदर हालत होती; व सर्व वातावरण भयंकर रणशब्दानें भरून राहिलें होतें. सर्व राजांच्या बाहुभूषणांचें व किरीटांचें लखलखीत तेज नाहींसें होऊन तीं निस्तेज दिसूं लागलीं होतीं. धुळीचे ढग उत्पन्न होऊन शस्त्ररूपी विजांनीं ते युक्त होते. व धनुष्याच्या भयंकर टणत्काराची गर्जना त्यांमधून ऐकूं येत होती. असंख्य पाश, शक्ति, ऋष्टि, बाण यांनीं आकाश भरून गेलें असून सूर्याचा प्रकाश अगदीं बंद पडला होता. रथी घोड्यांना, हत्ती हत्तींना, शिपाई शिपायांना मारून काढीत होते. मांसाच्या तुकड्यांवर ज्याप्रमाणें ससाण्यांची धाड पडावी त्याप्रमाणें भीष्मांसाठीं कौरव पांडवांमध्यें तुंबळ युद्ध जुंपलें होतें.

इकडे अभिमन्यु मोठे सेनेनिशीं दुर्योधनाशीं भिडला असतां काळाच्या बहिणीसारखी भयंकर शक्ति त्यानें त्यावर सोडली. त्या येऊन पडणाऱ्या शक्तीचे दुर्योधनानें क्षुरप्र बाणानें दोन तुकडे केले. तेव्हां अभिमन्यूनें खवळून जाऊन दुर्योधनाच्या छातीवर बाणांचा मारा चालविला. ब्राह्मणवीर अश्वत्थाम्यांनीं चवताळून येणाऱ्या सात्यकीच्या छातीवर एक नाराच बाण सोडला असतां, सात्यकीनेंही कंकाचीं पिसें लावलेले नऊ बाण त्यांच्या मर्मस्थानीं सोडले. इकडे पौरवानें धृष्टकेतूला बाणांनीं झांकून काढून त्याला जागजागीं जखमी केलें; व त्याचें धनुष्य कापून काढून तो मोठ्यानें गरजला. धृष्टकेतूनेंही चटकन् दुसरें धनुष्य घेऊन त्यावर बाणांचा मारा चालविला. व एकमेकांचीं धनुष्यें मोडून घोडे मारून एकमेकांना विरथ केल्यावर हे दोन तापट वीर एकमेकांशीं असियुद्ध करण्याला तयार होऊन भिडले. दोघांच्या हातांत बैलांच्या कातड्याच्या वर शंभर चंद्र काढलेल्या ढाली होत्या. याप्रमाणें लखलखीत तलवारी हातांत घेऊन एका सिंहिणीसाठीं एकमेकांवर तुटून पडणाऱ्या दोन सिंहांप्रमाणें पुढें मागें सरून नाना प्रकारचीं मंडळें करून ते एकमेकांवर हल्ला करीत होते. पौरवानें आपल्या तलवारीनें धृष्टकेतूच्या कपाळावर घाव दिला असतां त्यानेंही आपली उत्तम धारेची तलवार त्याच्या खांद्यावर मारली. याप्रमाणें एकमेकांच्या घावांनीं ते घायाळ होऊन पडले असतां धृतराष्ट्रपुत्र जयत्सेनानें पौरवाला व सहदेवानें धृष्टकेतूला आपल्या रथांत बसवून एकीकडे नेलें. इकडे चित्रसेन सुशर्म्याशीं व अभिमन्यु बृहद्बलाशीं भिडून त्यांनीं तुंबळ युद्ध चालविलें होतें. इकडे भीमसेन गजदळाशीं युद्ध करीत असतां पर्वतासारखे धिप्पाड व काजळाच्या ढिगांप्रमाणें काळे कुळकुळीत हत्ती जमिनीवर पडून चोहोंकडे पसरलेल्या पर्वतांप्रमाणें दिसत होते. इकडे युधिष्ठिर मोठ्या सेनेनिशीं शल्यांशीं युद्ध करीत होता. इकडे विराट व जयद्रथ एकमेकांशीं भिडून त्यांनीं निकराचें युद्ध चालविलेंच होतें. इकडे द्रोण धृष्टद्युम्नाशीं भिडून त्यांनीं घोर युद्ध चालविलें होतें. इकडे अर्जुन आपल्या तीक्ष्ण बाणांनीं भीष्मांना भंडावून सोडीत त्यांवर धांवून जात असतां तीन ठिकाणांहून मद वाहणाऱ्या मस्त हत्तीवर बसून प्रतापशाली भगदत्त त्याच्याशीं युद्धाला तयार होऊन आला; व त्यानें बाणांचा वर्षाव करून अर्जुनाला थोपविण्याचा प्रयत्न केला. परंतु त्या शुभ्र हत्तीला तीक्ष्ण बाणांनीं जर्जर करून शिखंडीला घेऊन तो भीष्मांवर चालून गेला; व भगदत्त द्रुपदाच्या रथाकडे वळला. याप्रमाणें अर्जुन शिखंडीला पुढें करून भीष्मांवर चालून गेला असतां त्या दोघांचें तुंबळ युद्ध जुंपलें. शिखंडी भीष्मांशीं भिडला असतां त्यानें एकदम त्यांना बाणांनीं भरून काढलें. रथरूपी कोठ्यामध्यें ठेवलेल्या अग्नीला तलवारी, शक्ति व गदा या सर्पणांनीं चेतवून, धनुष्यरूपी ज्वाळा उत्पन्न करून बाणरूपी त्याच्या ठिणग्यांनीं तो क्षत्रियांना जाळून काढीत होता. भीष्महीं उत्तम उत्तम अस्त्रें सोडून अर्जुनाच्या मागून असणाऱ्या सोमकांना जाळून काढीत पांडवसेनेला थोपवीत होते. रथ, हत्ती, घोडे यांवर त्यांनीं मनुष्य उरूं दिला नाहीं. विजेच्या कडाडण्याप्रमाणें त्यांच्या धनुष्यांचा टणत्कार ऐकून सर्व सैनिकांमध्यें चळकांप उठत असे. निर्मनुष्य करून

टाकलेले उत्तम उत्तम घोडे जुंपलेले रथ रणांतून वाऱ्याप्रमाणें भरधांव सुटलेले दिसत होते. चेदी, काशी व करूष या देशांच्या जिवावर उदार झालेल्या व शत्रूंस पाठ न दाखविणाऱ्या चौदा हजार कुलवान महासारथ्यांनीं भीष्मांशीं भिडून आपल्या हत्तीघोड्यांनिशीं यमलोकाची वाट धरली. कृष्णसारथी अर्जुन व अतुल पराक्रमी शिखंडी यांशिवाय भीष्मांपुढें जाण्याला कोणी धजत नसे. इतक्यांत शिखंडीनें भीष्मांना गांठून त्यांच्या छातीवर दहा बाण सोडले असतां, रागानें डोळे लाल करून कटाक्षानें जाळून काढीत आहेत कीं काय अशा रीतीनें त्यांनीं त्याकडे पाहिलें. परंतु त्याचा स्त्रीपणा मनांत आणून त्यावर त्यांनीं बाण सोडले नाहींत. परंतु शिखंडी हें उमगला नाहीं. इकडे अर्जुन शिखंडीला ह्मणाला, ‘ एकदम तुटून पडून भीष्मांना मार, उगीच विचार करीत बसण्यांत काय अर्थ आहे ? या आमच्या सर्व सैन्यांमध्यें भीष्माशीं तोंड देणारा मला तुझ्यावांचून कोणी दिसत नाहीं. ’ तें ऐकून नानाप्रकारचे बाण सोडून शिखंडीनें भीष्मांना झांकून काढलें, परंतु तिकडे लक्ष न देतां अर्जुनाला थोपवून भीष्म पांडवसैन्याचा फडशा पाडीत होते. त्या प्रसंगीं दुःशासन भीष्मांना सांभाळून फिरून अर्जुनाशीं युद्ध करून विलक्षणच शौर्य दाखवीत होता. या रुद्रस्वरूपी वीराला पांडवांच्यानें थोपवेना. यानें रथ्यांना विरथी करून, स्वार व हत्तीवरचे योद्धे या सर्वांना मारून खालीं आणलें. त्याचप्रमाणें बाणांनीं घायाळ झालेले कित्येक हत्ती दश दिशांला पळूं लागले. त्यांच्यापुढें जाण्याची अर्जुनावांचून कोणाची छाती होईना. अर्जुन त्याचा मोड करून भीष्मांवर चालून गेला असतां फिरून फिरून भीष्मांच्या आधारानें तो बेफामपणानें लढत होता. शिखंडीनें भीष्मांवर अनेक तीक्ष्ण बाण सोडले. त्यांचा त्यांवर कांहीं परिणाम न होतां हांसत हांसतच उन्हानें पीडिलेला ज्याप्रमाणें पाण्याच्या धारा आपल्यावर घेत असतो, त्याप्रमाणें ते ते शिखंडीचे बाण आपल्या आंगावर घेत होते. याप्रमाणें भीष्म लढत असतां दुर्योधन आपल्या सैन्याला ह्मणाला, ‘अर्जुनावर चोहोंकडून तुटून पडा. तुमचें सर्वांचें रक्षण करण्याला त्याचप्रमाणें तुमचें कल्याण पहाण्याला व तुमच्या कवचांची काळजी घेण्याला भीष्म खबरदार आहेत. सामन्यांत प्रत्यक्ष देवांना देखील ते पुरे आहेत. मग मानव पांडवांची बिशाद काय ? ह्मणून भिऊन पळूं नका. मी स्वतः आज तयार होऊन तुमच्याबरोबर या अर्जुनाशीं युद्ध करतों. ’ हें त्याचें भाषण ऐकून नाना देशचे मोठमोठे महारथी वीर अग्नीवर झडप घेणाऱ्या पतंगाप्रमाणें एकदम टोळधाडीप्रमाणें अर्जुनावर तुटून पडले. या सर्वांचा दिव्य अस्त्रें विचारपूर्वक सोडून अर्जुनानें समाचार घेतला. हजारों बाण तो सोडीत असतां आकाशामध्यें पेट घेतलेल्या अग्नीप्रमाणें त्याचें गांडीव धनुष्य दिसत होतें. त्याच्या बाणांनीं ध्वजबीज मोडून पडून विव्हळ झालेल्या कौरववीरांची अर्जुनाशीं भिडण्याला छाती होईना. रथी, घोडे, हत्ती, स्वार वगैरे सर्व त्याचे बाण लागून मरून खालीं पडले. व अर्जुनानें सोडलेल्या बाणांमुळें पळापळ उडालेल्या सैन्यानें भूमि भरून गेली होती. याप्रमाणें त्या सैन्याला पळवून लावल्यावर अर्जुन दुःशासनावर बाणांचा भडिमार करूं लागला. ते थेट दुःशासनाच्या अंगांतून निघून जाऊन शिरणाऱ्या सापांप्रमाणें भूमीमध्यें शिरत होते. दुःशासनाचे घोडे व सारथी मारून पाडल्यावर विंशति, कृप, विकर्ण, शल्य या सर्वांस त्यानें विरथी करून टाकलें. याप्रमाणें अर्जुनानें मोड केला असतां या सर्वांची रणामध्यें पळापळ उडाली. याप्रमाणें सकाळचे प्रहरीं या सर्वांचा मोड करून व दुसऱ्या पुष्कळ राजांना बाणांनीं जर्जर करून परतवून अर्जुन रणामध्यें स्वच्छ किरणांनीं झळकणाऱ्या सूर्याप्रमाणें झळकत उभा होता. कौरवपांडवांच्या सैन्यांमधून रक्ताची नदी वाहूं लागली. व हत्ती, घोडे, शिपाई, स्वार या सर्वांचीं मुंडकीं मधल्यामध्यें उडून चोहोंकडे पसरून पडत होतीं. गजयोधी व रथी जिकडे तिकडे मरून पडले होते. चाक, जूं व ध्वज मोडून पडलेले रथ्यांचा त्या रणांत सडा पडला होता. कुत्रीं, कावळे, गिधाडें, कोल्हीं व दुसरीं श्वापदें खाद्य मिळाल्यानें आनंदानें ओरडत होतीं. चोहों बाजूंला मोठी वावटळ उसळली असून त्या ठिकाणीं राक्षस व मांसाहारी प्राणी मोठ्यानें ओरडतांना दिसत होते. गदा, शक्ति व धनुष्य हातांत असलेले हजारों रणवीर रणामध्यें जिकडे तिकडे पड-

लेले दिसत होते. तेव्हां भीष्म दिव्यास्त्र उगारून अर्जुनावर चालून गेले असतां शिखंडी त्यांच्यापुढें आला. तेव्हां अग्नीसारखें भयंकर अस्त्र त्यांनीं आवरून घेतलें.

नंतर दोन्ही बाजूंचे योद्धे लढाईतून पाय परत घ्यावयाचा नाहीं असा निश्चय करून ब्रह्मलोकाच्या तयारीनें सैन्याची जय्यत तयारी करून एकमेकांशीं भिडले. रथी रथ्यांशीं, स्वार स्वारांशीं; गजयोद्धे गजयोद्ध्यांशीं, शिपाई शिपायांशीं भिडून अगदीं वेड्याप्रमाणें खवळून जाऊन ते लढत असतां दोन्ही दळांची एकच गर्दी उडाली; व कांहीं भेदाभेद न राहतां एकच कत्तल सुरू झाली. शल्य कृपप्रभृति कौरववीर आपल्या लखलखीत रथांमध्यें बसून पांडवसेनेवर चालून गेले असतां वाऱ्यानें हालवून सोडलेल्या पाण्यांतलि नावेप्रमाणें पांडवसेनेची गडबड उडून गेली. सेनापती धृष्टद्युम्नानें निर्भयपणें भीष्मांवर चालून जाण्यास हुकूम केल्यावरून सर्व सोमक व सृंजय भीष्मांवर तुटून पडले; व त्यांनीं त्यांवर बाणांचा मारा चालविला. तेव्हां भीष्मही अगदीं खवळून जाऊन त्यांच्याशीं लढूं लागले. पूर्वीं परशुरामांनीं त्या कीर्तिमानांना शत्रूंचा पार फडशा पाडणारी जी अस्त्रविद्या शिकविली होती ती दाखवून त्यांनीं दहा हजार वीर मारून काढले. त्याचप्रमाणें असंख्य घोडे व हत्ती मारून त्यांनीं सात महारथी मारले. पांच हजार रथी, चौदा हजार शिपाई मारून याप्रमाणें सैन्याचा बराच फडशा पाडल्यावर विराटाचा आवडता भाऊ जो शतानिक याला त्यांनीं ठार केलें. याप्रमाणें हजारों राजांचा फडशा पाडीत असतां उद्विग्न होऊन ते अर्जुनाला हाक मारीत होते. जे कोणी अर्जुनाच्या साहाय्याला येऊन भीष्मांवर चालून जात होते त्यां सर्वांना ते यमपुरीला पाठवीत होते. त्यांची अचाट कृति व अपार तेज पाहून, संतुष्ट होऊन श्रीकृष्ण अर्जुनाला ह्मणाला, ‘ हे भीष्म दोन्ही सैन्यांच्यामध्यें उभे आहेत. यांना आपली पराकाष्ठा करून मारशील तरच जय मिळणार आहे. ’ अर्जुनानें लागलीच भीष्मांना बाणांनीं झांकून काढून द्रुपद, विराट, भीमसेन, सात्यकि, अभिमन्यु वगैरे जी मंडळी भीष्मांच्या बाणांनीं जर्जर होऊन संकटांत बुडत चालली होती त्यांना वर काढलें. ते वेळीं शिखंडीलाही अर्जुनाचा याप्रमाणें पाठिंबा मिळाल्यानें तो भीष्मांवर तुटून पडला. ते वेळीं रणकर्माची पूर्ण माहिती असणाऱ्या अर्जुनानेंही भीष्मांच्या अनुयायांना मारून फिरून त्यांवर भिडून, चाल केली. सात्यकिप्रभृति धनुष्याची बळकट मंडळीही रणांतून पाय मागें न घेतां हत्यारें उपसून भीष्मांवरच चालून निघाली. याप्रमाणें या सर्वांनीं केलेला बाणांचा मारा एकदम न घाबरतां उडवून देऊन, भीष्म पांडवसैन्यामध्यें फिरत बाणवर्षाव करीत जणूं क्रीडा करीत होते. मात्र शिखंडीवर त्यांनीं एक देखील बाण सोडला नाहीं. त्यांनीं द्रुपदसैन्यांतील सात महारथी एकदम मारून काढले. तेव्हां एकदम जिकडेतिकडे एकच हाहाकार उडून राहिला. मत्स्य, पांचाल, व चेदी या सर्व देशचे वीर त्या एकट्यावर धांवून जाऊन ते सर्व मिळून भयंकर तोफा, परीघ, परशु, मुद्गल, मुसल, विटा, गोफणी, बाण, शक्ति, तोमर, कंपन, वत्सदंत, भुशुंडी इत्यादिकांचा त्या एकट्या भीष्मांवर मारा करूं लागले. त्यानें त्यांचें कवच फुटून ते अगदीं पीडिले गेले होते तरी मर्मावर येऊन बसणाऱ्या घावांची पर्वाही त्यांनीं केली नाहीं. उलट ते प्रलयकाळच्या अग्नीप्रमाणें भडकलेल्या त्या रणामधून इकडून तिकडे फिरतांना दिसत होते; व पांचालराज धृष्टकेतूला न जुमानतां पांडवसैन्यामध्यें घुसून अर्जुन, भीम, सात्यकि, द्रुपद, विराट, धृष्टद्युम्न यांवर कवचांचा चुराडा उडवून टाकणाऱ्या भयंकर बाणांचा मारा करीत होते. त्यांनींही त्यांचें निवारण करून भीष्मांवर पुष्कळ बाणांचा मारा चालविला. शिखंडीनें सोडलेल्या मोठमोठ्या बाणांनीं सुद्धां भीष्मांना कांहीं अपाय होत नाहींसें पाहून अर्जुनानें खवळून जाऊन शिखंडीच्या मागून बाण सोडून त्यांचें धनुष्य कापून काढलें. ही गोष्ट द्रोणप्रभृति कौरवमहारथ्यांना सहन न होऊन दिव्यास्त्र सोडीत अगदीं खवळून जाऊन ते अर्जुनावर तुटून पडले. मारा, हाणा, पकडा, जखमी करा, कापून काढा, म्हणून त्यांच्या तोंडांतून निघणारे उद्गार अर्जुनाच्या रथाजवळ ऐकूं येत असतां सात्यकि, भीमसेन, धृष्टद्युम्न, विराट, द्रुपद, घटोत्कच, अभिमन्यु हे सात पांडववीर रागानें खवळून जाऊन त्यांवर धांवून गेले. तेवेळीं त्या दो-

घामध्यें आंगावर शहारे उत्पन्न करण्याजोगें तुंबळ युद्ध जुंपलें. शिखंडीनें अर्जुनाच्या आश्रयानें भीष्मांवर दहा बाण सोडून दहांनीं त्यांचा सारथी मारून पाडला, व एकानें त्यांचा ध्वज मोडून पाडला. पुढें भीष्मांनीं दुसरें मोठें बळकट धनुष्य घेतलें असतां तेंही अर्जुनानें तीक्ष्ण बाणानें मोडून टाकलें. याप्रमाणें ते जसजसें नवीन धनुष्य हातीं घेत, तसतसें अर्जुन तें मोडून पाडी. याप्रमाणें धनुष्य मोडून कांहीं चालेनासें झालेलें पाहून रागानें दांत ओंठ चावीत भीष्मांनीं आवेशानें पर्वताला सुद्धां फोडून काढणारी शक्ति उचलून घेऊन ती अर्जुनावर सोडली. जळणाऱ्या विजेप्रमाणें तिला येतांना पाहून अर्जुनानें पांच तीक्ष्ण भल्लबाण सोडून तिचे पांच तुकडे करून ढगांतून मोडून खालीं पडणाऱ्या विजेप्रमाणें तिला खालीं पाडलें. तें पाहून भीष्मांनीं मनांत विचार केला, 'हा बलशाली श्रीकृष्ण या पांडवांचा पाठीराखा नसता तर या सर्व पांडवांना मी एका धनुष्यानें मारण्याला समर्थ आहें. परंतु श्रीकृष्णसाहाय्यानें पांडव अवध्य आहेत व माझ्या पुढें असणारा शिखंडी स्त्री आहे, या दोन कारणांनीं मी आतां पांडवांशीं युद्ध करीत नाहीं. कालीशीं तातांचें लग्न लागलें तेवेळीं त्यांनीं संतुष्ट होऊन, 'तुझ्या मनांत येईल त्या वेळेला तूं मरशील व रणामध्यें तुला मरण येणार नाहीं,' असा मला वर दिला. तेव्हां माझ्या मरणाची वेळ आली असें मला वाटतें.' याप्रमाणें अतुल पराक्रमी भीष्मांचा हा विचार जाणून ऋषी व अष्टवसू आकाशांतून त्यांना ह्मणाले, 'बा भीष्मा, तूं जें मनांत आणलें आहेस तें आह्मांला प्रिय आहे. त्याप्रमाणें करून युद्धांतून तूं आतां आपलें आंग काढ.' असें ते ह्मणताहेत तोंच मंगलकारक, अनुकूल व तुषारांनीं युक्त असा सुगंध वारा सुटला. आकाशांत दुंदुभी मोठ्यानें वाजूं लागून भीष्मांवर पुष्पवृष्टि झाली. भीष्मांवांचून व संजयावांचून तें संभाषण दुसरे कोणालाही ऐकूं आलें नाहीं. सर्व लोकांना प्रिय असे भीष्म रथांतून खालीं पडणार या विचारानें देवांच्या मनांची चळवळ उडून गेली. याप्रमाणें देवांचे शब्द ऐकून भीष्म यापुढें अर्जुनावर चालून गेले नाहींत. शिखंडीनें तीक्ष्ण बाणांनीं त्यांचें सर्व चिलखत फोडून काढून त्यांच्या छातीवर नऊ बाण मारले. तरी धरणीकंपाच्या वेळीं सुद्धां न डगणाऱ्या पर्वताप्रमाणें ते स्वस्थ होते. नंतर अर्जुनानें हांसत हांसतच गांडीव ओढून कांहीं क्षुद्रक बाण त्यांच्या सर्व मर्मस्थळांवर सोडले. याप्रमाणें अर्जुनानें त्यांना बाणांनीं भरून काढलें असतां भीष्म दुःशासनाला ह्मणाले, 'हा पांडवांमधला महारथी त्वेषानें हजारों बाण सोडीत माझ्यावरच चालून येत आहे. हा इंद्राला सुद्धां अजिंक्य आहे. मला यानें वज्र व वीज ह्यांसारख्या तीक्ष्ण बाणांनीं घायाळ केलें आहे. माझें चिलखत फोडून मुसलाप्रमाणें जाऊन टोंचून माझीं मर्मस्थळें कापून काढणारे हे बाण शिखंडीचे खास नव्हेत. माझ्या प्राणाला यमदूताप्रमाणें कासावीस करून हे त्याला नेत आहेत. उग्रविषानें युक्त अशा चावा घेणाऱ्या मोठमोठ्या सापांसारखे माझ्या मर्मस्थळीं घुसणारे हे बाण खात्रीनें शिखंडीचे नसून अर्जुनाचे आहेत. हे बाण माघमासीं पशूंना सिवसिव भरविणाऱ्या थंडीप्रमाणें माझ्या गात्रांना शिवशिवून सोडीत आहेत. अर्जुनाखेरीज बाकी सर्व राजे एकवटले तरी मला पीडा देण्याचें सामर्थ्य त्यांचे आंगीं नाहीं. असें ह्मणून पांडवांना जाळून टाकण्याच्या हेतूनें फिरून एक शक्ति त्यांनीं अर्जुनावर सोडली असतां तिचेही अर्जुनानें तीन तुकडे करून टाकले. पुढें हातांत ढाल तलवार घेऊन जय किंवा मरण या दोहोंपैकीं एक मिळविण्याच्या निश्चयानें भीष्मांनीं रथांतून खालीं उडी घेतली असतां अर्जुनानें त्या ढालीचे शेंकडों तुकडे उडवून दिले. या दहाव्या दिवसाच्या तुंबळ युद्धानें रणभूमीला उग्र स्वरूप येऊन ती रक्तानें भरून निघाली होती. याप्रमाणें त्या दिवशीं दाहाहजार योद्ध्यांना ठार करून सर्व मर्मस्थळांवर मार घेत भीष्म त्या रणभूमीवर उभे होते. तसाच धनुर्धारी अर्जुन सैन्याच्या आघाडीला उभा राहून सर्व कौरवसैन्याला बाणांनीं घायाळ करून पळवून लावीत होता. सौवीर, कितव वगैरे देशचे कांहीं धैर्यशाली वीर मात्र अर्जुनाच्या बाणांनीं घायाळ झाले होते तरी भीष्मांना न सोडतां सर्व कौरवांना परतवून एकट्या अर्जुनावर बाणांचा मारा करीत होते. पाडा, धरा, लढा. काटा असा एकच शब्द भीष्मां-

च्या रथाजवळ उठून राहिला होता. या रणामध्यें हजार वीरांना मारून काढून ज्यावर बाण लागला नव्हता अशी भीष्मांच्या आंगावर दोन अंगुळें सुद्धां जागा नव्हती. याप्रमाणें अर्जुनाच्या बाणांनीं सर्व आंग छिन्नभिन्न होऊन सूर्य थोडा बाकी उरला असतां पूर्वेकडे तोंड करून भीष्म रथांतून खालीं आले. ते खालीं येतांना आकाशांत देवांमध्यें व खालीं राजांमध्यें एकच हाहाकार उठून राहिला व त्याबरोबर सर्व कौरवांचीं हृदयें खचून गेलीं. व ते पडतांना पृथ्वी दरदरून गेली. उपटून काढलेल्या इंद्रधनुष्याप्रमाणें सर्व धनुर्धाऱ्यांचे अग्रणी हे खालीं आले असतां बाणांनीं अगदीं भरून निघाले असल्यामुळें त्यांचें आंग जमिनीला लागलें नाहीं. याप्रमाणें खालीं येऊन शरशय्येवर ते पडल्याबरोबर दिव्य भावाचा त्यांच्या शरीरामध्यें संचार झाला. पाऊस पडला, व पृथ्वी कांपू लागली. पडतांना सूर्याला दक्षिणायनामध्यें पाहून प्राणोत्क्रमणाला तो काल योग्य नाहीं असें जाणून त्यांनीं संज्ञा जाऊं दिली नाहीं. आकाशामध्यें, 'सर्व शस्त्रधाऱ्यांमध्यें श्रेष्ठ प्रत्यक्ष काल निर्माण करणाऱ्या महात्म्या भीष्मांनीं दक्षिणायन असतां कसा देह ठेविला,' म्हणून जिकडे तिकडे आकाशवाणी ऐकून, 'मी जिवंत आहें,' असें भीष्म म्हणाले; आणि पृथ्वीवर पडले तरी उत्तरायणाची वाट पहात ते प्राण धरून राहिले. हा त्यांचा विचार जाणून गंगेनें महर्षींना हंसाच्या रूपानें त्यांकडे पाठविलें. तेव्हां मानसवासी हे हंस कौरवांचे पितामह भीष्म ज्या ठिकाणीं शरशय्येवर निजले होते त्या ठिकाणीं आले व त्यांना भेटून प्रदक्षिणा करून ते दक्षिणेकडे निघाले असतां भीष्म त्यांना म्हणाले, ' दक्षिणायनामध्यें सूर्य असतांना प्राण सोडणार नाहीं हा माझा निश्चय आहे. सूर्य उत्तरायणामध्यें आल्यावर मी आपल्या मूळच्या ठिकाणाला जाणार हें मी तुम्हांला खास सांगतों. पित्याच्या वरानें प्राण सोडणें ही गोष्ट माझ्या हातांत असल्यामुळें मी तोंपर्यंत प्राण ठेवीन. ' असें त्यांना म्हणून ते शरशय्येवर पडले.

याप्रमाणें कौरवश्रेष्ठ महातेजस्वी भीष्म पडल्यावर पांडव व संजय यांनीं सिंहनाद केला. कौरव अगदीं वेडे बनून जागच्या जागीं खिळले. कृप, दुर्योधन प्रभृति मंडळी मोठ्यानें सुस्कारा टाकून रडूं लागली. दुःखामुळें बराच वेळपर्यंत त्यांचीं इंद्रियें बधिर होऊन गेलीं. ते विचारांत अगदीं गढून जाऊन, युद्धाचा विचारच त्यांच्या मनांतून निघून गेला. अगदीं धरून ठेवल्याप्रमाणें पांडवांवर चालून जाण्याला त्यांचे पायच घेईनात. भीष्मांसारखे अवध्य वीर मरून पडल्यानें दुर्योधन मेला असें सर्वांना वाटूं लागलें. ठळक ठळक वीर मरून बाकी सर्व जखमांनीं घायाळ झाले असल्यामुळें काय करावें हेंच त्यांना सुचेना. पांडवांना जय मिळाल्यानें मोठ्या आनंदानें त्यांनीं आपले शंख फुंकले. भीमानें मोठ्यानें दंड थोपटून गर्जना केली. सर्व वीरांनीं आपापलीं हत्यारें खालीं ठेवून कोणी विचारांत मग्न झाले, कोणी रडूं लागले, कोणी पळूं लागले, कोणी वेडे बनून गेले, कोणी क्षात्रधर्माला धिःकार असो म्हणूं लागले व कोणी भीष्मांची वाहवा करूं लागले. ऋषि व पितर यांनीं भीष्मांची स्तुति केली. महोपानिषदांमध्यें सांगितलेली योगसमाधि घेऊन वेळेची वाट पहात बुद्धिमान् भीष्म जप करीत राहिले.

---

## २१ कर्णदुर्योधनांना भीष्मांचा शेवटचा उपदेश. ( ६. १२०—१२२ )

याप्रमाणें संध्याकाळचे वेळीं कौरवांना उदास करून पांचालांना आनंदवीत जमिनीला न शिवतां भीष्म शरशय्येवर पडले असतां कौरवांचा सीमावृक्ष उमळून पडल्यानें दोन्ही सैन्यांमधील क्षत्रियांच्या मनांमध्यें भीति शिरली. जिकडे तिकडे हाहाकार उठून एकच गोंधळ झाला. आकाश काळ्याकुट्ट अंधारानें भरून जाऊन सूर्याचें तेज नाहींसें झालें. पृथ्वीमधून भयंकर शब्द निघूं लागला. 'हेच खरे ब्रह्मवेत्ते आहेत; हेच ब्रह्मवेत्त्यांमध्यें श्रेष्ठ आहेत; पूर्वी पित्याला कामार्त पाहून हे स्वतः ऊर्ध्वरेत बनले, ' याप्रमाणें शरशय्येवर पडलेल्या भीष्मांसंबंधानें ऋषी, सिद्ध व चारण उद्गार काढूं लागले.

इकडे भीष्म पडल्यावर दुर्योधनानें भीष्माच्या संरक्षणासाठीं ज्याला त्यांच्या जवळ ठेविलें होतें, तो दुःशासन आपल्या सैन्यानिशीं द्रोणाकडे मोठ्या

लगबगीनें आला. तेव्हां आतुरतेनें सर्व कौरव त्याच्या भोंवतीं जमले. त्यानें भीष्मांची पतनवार्ता द्रोणांना सांगितली असतां ती वाईट बातमी ऐकून द्रोण बेशुद्ध झाले. पुढें कांहीं वेळानें शुद्धीवर आल्यावर लढाई बंद करून त्यांनीं आपलें सैन्य परतविलें. तें पाहून पांडवांनींही दूतांना वेगवान घोड्यांवरून सैन्यांमधून पाठवून आपल्या सैन्याला लढाई बंद करण्याविषयीं हुकूम सोडला. सर्व सैन्य परतल्यावर ते सर्व चिलखतें उतरून ठेवून भीष्मांभोंवतीं जमले. हजारों राजेही युद्ध बंद करून ब्रह्मदेवाभोंवतीं जमणाऱ्या देवांप्रमाणें त्यांच्याजवळ येऊन उभे राहिले. सर्व कौरवपांडव त्यांना अभिवादन करून त्यांचे जवळ उभे राहिले असतां त्यांचें स्वागत करून, 'तुमच्या दर्शनानें संतुष्ट झालों आहें,' असें ह्मणून, 'माझें डोकें लोंबत आहे, मला कांहीं उशी द्या' असें ते ह्मणाले. तेव्हां राजांनीं लहान लहान मऊ उशा आणल्या; तें पाहून भीष्म हांसून त्यांना ह्मणाले, 'वीरशय्येला ह्या उशा काय कामाच्या?' नंतर सर्व लोकांमध्यें असामान्य असा जो महारथी अर्जुन त्याकडे पाहून ते ह्मणाले, 'धनंजया, माझें डोकें लोंबत आहे, या वीरशय्येला योग्य अशी तुला योग्य वाटेल ती उशी मला दे. सर्व धनुर्धाऱ्यांमध्यें श्रेष्ठ असा तूंच ती मला देण्याला समर्थ आहेस. क्षात्रधर्म तुला अवगत असून, तुला बुद्धि व सामर्थ्य आहे.' अर्जुनानेंही बरें ह्मणून त्यांचा उद्देश ओळखून आपलें गांडीव घेऊन त्याला तीक्ष्ण बाण जोडून त्या भरतश्रेष्ठ भीष्मांची आज्ञा घेऊन तीन बाणांनीं त्यांच्या डोक्याला टेका दिला. याप्रमाणें आपला उद्देश अर्जुनानें ओळखला असें पाहून भीष्मांना संतोष झाला व त्या दिलेल्या उशीबद्दल त्याची वाहवा करून ते ह्मणाले, 'अर्जुना, या शयनाला योग्य अशी उशी तूं मला दिली आहेस. यापेक्षां निराळ्या रीतीनें जर तूं वागला असतास तर रागानें मीं तुला शाप दिला असता. हे महाबाहो, धर्मानें चालणाऱ्या क्षत्रियानें रणामध्यें अशा शरशय्येवर निजलें पाहिजे.' असें त्याला ह्मणून तेथील सर्व राजांना ते ह्मणाले, 'अर्जुनानें मला कशी उशी दिली पहा. सूर्य उत्तरायणामध्यें जाईपर्यंत मी या शय्येवर निजणार. तेव्हां उत्तरायण आल्यावर मोठ्या तेजस्वी अशा सात घोडे जोडलेल्या रथांत बसून एखादा मित्र ज्याप्रमाणें मित्राला रजा देतो त्याप्रमाणें या प्राणाला मी रजा देईन. या मीं पडलेल्या ठिकाणाच्या भोंवतीं खंदक खणा. आतां मी येथें सूर्याची उपासना करीत राहतों. राजांनो, आतां वैर सोडून लढाई बंद करा.' इतक्यांत बाण उपटून काढण्यामध्यें पटाईत असे वैद्य आपल्या सर्व हत्यारांनिशीं तेथें आले. त्यांना पाहून भीष्म दुर्योधनाला ह्मणाले, 'यांना बहुमानानें द्रव्य देऊन जाण्याला सांग. मी अशा रीतीनें पडलों असतांना मला आतां वैद्यांची काय गरज आहे? क्षात्रधर्मामध्यें नांवाजलेली उत्तम गति मला मिळालेली आहे. याप्रमाणें मी शरशय्येवर पडलों असतां बाण उपटून काढणें हा कांहीं क्षात्रधर्म नव्हे. याच बाणांनिशीं मला जाळलें पाहिजे.' हें त्यांचें भाषण ऐकून दुर्योधनानें त्या वैद्यांना ज्यांचे त्यांचे योग्यतेप्रमाणें सन्मान करून पाठवून दिलें. याप्रमाणें त्यांची ती चोख धर्मनिष्ठा पाहून चोहोंकडून जमलेल्या राजांना मोठें आश्चर्य वाटलें. नंतर सर्व पांडवकौरवांनीं त्यांजवळ जाऊन त्यांना अभिवादन करून तीन प्रदक्षिणा केल्या. आणि चोहों बाजूंनीं त्यांच्या रक्षणाला लोक ठेवून संध्याकाळच्या वेळीं रक्तानें भरलेले असे ते अगदीं चिंतातुर होऊन विश्रांतीसाठीं आपापल्या शिबिरांकडे गेले. पांडव आपल्या शिबिरांत गेल्यावर भीष्मांच्या मरणानें डोक्यावरचा एक बोजा उतरल्यामुळें स्वस्थ झालेल्या पांडवांकडे येऊन श्रीकृष्ण युधिष्ठिराला ह्मणाला, 'भीष्मांना पाडून तुला जय मिळाला हें ठीक झालें. हे सर्वशास्त्रांमध्यें प्रवीण भीष्म मनुष्यांना एवढेंच नव्हे तर देवांना सुद्धां अवध्य होते. परंतु केवळ दृष्टीनें जाळून काढणाऱ्या तुझ्याशीं प्रसंग आल्यामुळें तुझ्या त्या भयंकर डोळ्यांनींच ते जळून गेले आहेत.' यावर धर्मराज त्याला ह्मणाला. 'हा विजय तुझ्या प्रसादामुळें मिळाला असून, हा त्यांचा पराजयही तुझ्या रागामुळेंच झाला आहे. भक्तांना अभय देणारा तूंच आह्मांला आधार आहेस. ज्यांच्या हितामध्यें नेहमीं दक्ष राहून रणामध्यें ज्यांचें रक्षण करण्याला तूं हजर आहेस त्यांना जय मिळावा हें कांहीं आश्चर्य नाहीं.'

रात्र सरून उजेडल्यावर पांडवकौरव वीरशय्येवर पडलेल्या भीष्मांकडे येऊन त्यांना अभिवादन करून त्यांच्याजवळ उभे राहिले. हजारों मुली त्या ठिकाणीं येऊन, चंदनाची बुकणी, लाह्या, फुलें त्यांजवर उधळीत होत्या. सूर्याचें दर्शन घेण्याला जमणाऱ्या प्राणिमात्रांप्रमाणें स्त्रिया, ह्मातारे, मुलें, प्रेक्षक व सामान्य लोक त्या ठिकाणीं जमले होते. हजारों नौबती वाजत होत्या, त्याचप्रमाणें नट, नर्तक कारागीर मंडळी भीष्मांकडे आली होती, या जमावामुळें आकाशांतील सूर्यमंडळाप्रमाणें त्या भरतभूमीला शोभा आली होती. भीष्मांना बाणांचा फार त्रास होत असून ते सापाप्रमाणें निःश्वास टाकीत होते. त्या जमलेल्या राजांकडे पाहून ते पाणी असें ह्मणाले; तेव्हां जवळच्या राजांनीं उंची उंची खाण्याचे पदार्थ व गार पाण्यानें भरलेले घडे त्यांच्यापुढें आणून ठेविले, ते पाहून भीष्म ह्मणाले, 'मानुषविषय यापुढें आतां मला निरुपयोगी आहेत. मनुष्यांमधून निघून चंद्रसूर्यांच्या उत्तरायणामध्यें जाण्याची वाट पहात मी शरशय्येवर पडलों आहें.' अशा शब्दांनीं त्यांना टोंचून शेवटीं, 'अर्जुनाला मला भेटवा,' असें ते ह्मणाले. त्याबरोबर 'काय आज्ञा आहे' ह्मणून तो त्यांच्यापुढें येऊन उभा राहिला. तेव्हां भीष्म ह्मणाले, 'बा अर्जुना, तुझ्या बाणांनीं भरून निघालेलें हें शरीर जळत आहे, मर्मस्थळांना फार वेदना होत आहेत, तोंड कोरडें पडत आहे; तेव्हां वेदनेनें पीडलेल्या मला पाणी दे. जशा प्रकारचें पाहिजे तशा प्रकारचें पाणी देण्याला तूं समर्थ आहेस.' बरें ह्मणून अर्जुन रथावर चढला व गांडीवाला प्रत्यंचा चढवून त्यानें त्याचा मोठा टणत्कार केला. त्यानें सर्व प्राणिमात्र घाबरून गेले. नंतर भीष्मांना प्रदक्षिणा केल्यावर त्या धनुष्याला बाण लावून अभिमंत्रण करून त्याला पर्जन्यास्त्र जोडून भीष्मांच्या जवळच दक्षिणेच्या बाजूला त्यानें पृथ्वीला भोंक पाडलें. त्यापासून गार, अमृततुल्य, उत्तम सुवासिक अशी शुद्ध व स्वच्छ पाण्याची धार वर निघाली. त्या शीतल जलधारेनें अर्जुनानें भीष्मांना गार केलेलें पाहून सर्व राजे थक्क झाले व थंडीनें कुडकुडणाऱ्या गुरांप्रमाणें कौरव अगदीं कुडकुडूं लागले, राजे आश्चर्यानें आपल्या अंगवस्त्राचीं शेवटें उडवूं लागले. भीष्म याप्रमाणें तृप्त होऊन सर्व राजांसमक्ष त्याची वाहवा करीत त्याला ह्मणाले, 'हे महाबाहो, तुझ्यासंबंधानें ही कांहीं आश्चर्याची गोष्ट नाहीं; तूं आदिऋषि असून श्रीकृष्णाच्या साहाय्यानें महत्कृत्य करशील असें नारदांनीं पूर्वींच मला सांगितलें आहे. देवेंद्राच्या हातून सुद्धां जें घडणें शक्य नाहीं, अशा सर्व क्षत्रियांच्या नाशाला तूं कारण आहेस. धनुर्धाऱ्यामध्यें तूंच काय तो धनुर्धर असून सर्व पृथ्वींतील लोकांमध्यें तूं श्रेष्ठ आहेस. विदुर, द्रोण व बलराम, श्रीकृष्ण या सर्वांनीं केलेला उपदेश बुद्धि चळून मूर्ख बनल्यामुळें दुर्योधनाला पटला नाहीं. तेव्हां तो याप्रमाणें धर्माला झुगारून देणारा भीमाच्या बलाखालीं चिरडून जाऊन लवकरच मरून पडेल.' हें त्यांचें भाषण ऐकून दुर्योधनाचें तोंड अगदीं उतरून गेलें. तेव्हां त्याकडे पाहून भीष्म ह्मणाले, 'दुर्योधना, दुःख बाजूला ठेवून मी ह्मणतों तें ऐक. बुद्धिशाली अर्जुनानें अमृततुल्य गार पाण्याची धार उत्पन्न करून जें कृत्य केलें तें तूं पाहिलेंसच. असें करणारा ह्या जगांत कोणी सांपडणार नाहीं. आग्नेय, वारुण, वायव्य वैष्णव, ऐंद्र, पाशुपत, ब्राह्म वगैरे सर्व अस्त्रांची माहिती सर्व जगामध्यें एकट्या अर्जुनाला किंवा त्या श्रीकृष्णाला आहे. पांडवांना युद्धामध्यें जिंकतां येणार नाहीं. ज्याचीं हीं अशीं अमानुष्य कृत्यें आहेत त्या रणाला शोभा देणाऱ्या ह्या बलशाली वीराशीं अगदीं वेळ न लावतां संधि करून टाक. जोंपर्यंत श्रीकृष्ण स्वाधीन आहे, जोंपर्यंत तुझ्या सैन्याचा फडशा उडाला नाहीं, जोंपर्यंत तुझे अवशिष्ट भाऊ व राजे जिवंत आहेत, जोंपर्यंत युधिष्ठिरानें आपल्या लाल डोळ्यानें तुझ्या सैन्याला जाळून टाकलें नाहीं तोंपर्यंत तूं पांडवांशीं संधि कर. या पांडववीरांशीं तुझें सख्य असावें असें मला वाटतें. पांडवांबरोबर संधि करून युद्ध बंद पाड. हें माझें भाषण तुला पटूं दे. हेंच तुला व तुझ्या कुलाला हितकारक आहे. अर्जुनानें आतांपर्यंत केलेलें काम पुरें आहे. या भीष्मांबरोबरच शेवट होऊन तुमचें सख्य जुळूं दे व बाकी राहिलेले खुशाल राहूं देत. माझ्यावर कृपा कर. पांडवांना अर्धें राज्य देऊन धर्मराजाला इंद्रप्रस्थामध्यें राहूं दे. मित्रांचा द्रोह करून नीच राजांच्या

मालिकेला जाऊन दुर्लौकिक पदरीं घेऊं नकोस. बाप, मुलगे, मामे, भाचे या सर्वांना प्रेमानें एकमेकांना भेटूं दे. मूर्खपणानें बुद्धीला भ्रंश होऊन हें माझें समयोचित भाषण तूं जर न ऐकशील तर तुला पुढें ताप होईल. मी हें अगदीं खरें बोलत आहें; तेव्हां याचा येथेंच शेवट कर.' जिव्हाळ्यामुळें ह्याप्रमाणें कळकळीचा उपदेश देऊन भीष्म गप्प झाले. परंतु मरूं घातलेल्या औषधाप्रमाणें हें धर्मार्थाला धरून असलेलें भीष्मांचें भाषण त्याला रुचलें नाहीं.

पुढें सर्व राजे आपापल्या शिबिरांकडे निघून गेल्यावर ही भीष्म पडल्याची बातमी ऐकून किंचित् मनाची चलबिचल उडून जाऊन कर्ण शरवनामध्यें जन्मलेल्या कार्तिकेयाप्रमाणें शरशय्येवर पडलेल्या भीष्मांना भेटावयाला लगबगीनें आला. व त्यांना डोळे मिटून पडलेले पाहून, गळा दाटून येऊन 'भीष्म! भीष्म!' ह्मणून उद्गार काढून, 'नेहमीं आपल्या डोळ्यांत सलणारा, आपल्याला नेहमीं वैऱ्याप्रमाणें दिसणारा हा मी कर्ण आलों आहें,' असें ह्मणाला. तें ऐकून वळ्यांनीं ज्यांचे डोळे झांकून गेले होते असें भीष्म हळू हळू डोळे उघडून रक्षकांना बाजूला करवून तेथें कोणी नाहींसें झाल्यावर बापानें ज्याप्रमाणें मुलाला कवटाळावें त्याप्रमाणें एका हातानें त्याला कवटाळून स्नेहपूर्वक ह्मणाले, 'कर्णा ये, तूं नेहमीं माझ्या उलट जाऊन माझ्याशीं चढाओढ धरतोस; तूं मजजवळ आला नसतास तर तुझें खात्रीनें कल्याण झालें नसतें. तूं कुंतीचा मुलगा असून राधेचा नव्हेस. सूर्य तुझा बाप आहे हें नारदांकडून व व्यासांकडून मला कळलें आहे. मला तुझा द्वेष मुळींच नाहीं. तूं उगीच पांडवांना टाकून बोलत होतास, ह्मणून तुझा हिरमोड करण्यासाठीं मी तुला निष्ठुर बोलत असे. कांहीं संस्कार न घडतां तुझा जन्म झाला असल्यामुळें व हलक्या लोकांशीं संबंध जुळल्यामुळें तुझी बुद्धि अशी झाली असून गुणवानांचा सुद्धां ती द्वेष करूं लागली आहे. ह्मणून मी तुला सभेमध्यें पुष्कळ लागून बोललों. रणामध्यें शत्रूला सहन करण्याला कठीण असें तुझें वीर्य, ब्राह्मणांवरची तुझी भक्ति, शौर्य, त्याचप्रमाणें दानाकडे तुझें पूर्ण लक्ष हें सर्व मी जाणतों. तुझ्या सारखा पुरुष मनुष्यांमध्यें कोणी सांपडणार नाहीं. परंतु कुळामध्यें फूट पडण्याच्या भीतीनें मी तुला नेहमीं निष्ठुर बोलत असें. धनुर्विद्येंत, शरसंधानामध्यें, चलाखीमध्यें, अस्त्रसामर्थ्यामध्यें तूं त्या अर्जुनाच्या व श्रीकृष्णाच्या तोडीचा आहेस. कर्णा, मुलीसाठीं काशीपुराला जाऊन तूं एकट्यानें सर्व राजांना चिरडून टाकिलेंस. त्याचप्रमाणें कोणाला हार न जाणारा बलशाली जरासंध सुद्धां रणांत तुझ्या बरोबरीला लागला नाहीं. आपल्या तेजाच्या व बलाच्या जोरावर नेहमीं तूं धर्मानें युद्ध करीत असून देवगुण तुझ्यामध्यें आहेत. मनुष्याला तूं भारी आहेस. तुझ्या संबंधीं जो माझा राग होता तो आज नाहींसा झाला आहे. **मनुष्यप्रयत्नानें दैव बदलतां येणें शक्य नाहीं.** परंतु माझें जर तुला ऐकावयाचें असेल तर तूं आपल्या पांडव भावांशीं जाऊन मीळ. माझ्याबरोबरच या वैराचा शेवट लागूं दे. पृथ्वीवरील सर्व राजे आज खुशाल राहूं देत.

यावर कर्ण ह्मणाला, 'आपण ह्मणतां तें सर्व मला ठाऊक आहे. कुंतीनें मला सोडून सूतानें वाढविलें. दुर्योधनाच्या ऐश्वर्याचा उपभोग घेऊन ताता, आतां माझ्या हातून नांवाला बट्टा आणवत नाहीं. ज्याप्रमाणें तो श्रीकृष्ण त्या पांडवांना घट्ट धरून आहे, त्याप्रमाणें मी पैसा, शरीर, मुलगा, बायको, यश सर्व दुर्योधनासाठीं सोडून दिलें आहे. क्षत्रियांना हांथरुणावर पडून मरण येऊं नये. दुर्योधनाची बाजू घेऊन मीं नेहमीं पांडवांना खवळविलें आहे. ही अवश्य घडून येणारी गोष्ट उलटविणें शक्य नाहीं. **पुरुषप्रयत्नानें दैव कोणाला फिरवितां येणार?** पृथ्वीचा पूर्ण फडशा पाडणारीं झालेलीं दुश्चिन्हें आपण सभेमध्यें सांगितलेलींच आहेत. मी पांडवांना ओळखतों, तसाच त्या श्रीकृष्णाला पूर्ण ओळखतों. ते सर्वांना अजिंक्य आहेत ह्मणूनच त्यांना जिंकण्याचा मीं निश्चय केला आहे. हें भयंकर पेटलेलें वैर सोडून देतां येणें शक्य नाहीं. आपल्या धर्माला जागून उत्साहानें मी अर्जुनाशीं युद्ध करणार. तेव्हां माझा असा युद्धाचा निश्चय ठरला असल्यानें आपण मला परवानगी द्या. आपल्या परवानगीनें युद्ध करावें असें माझ्या मनांत आहे. अविचारानें किंवा वेडेपणामुळें जें कांहीं मी आपणाला टाकून

बोललों किंवा आपल्या उलट गेलों त्या सर्वांची आपण क्षमा करावी. ' यावर भीष्म ह्मणाले, 'कर्णा, हें भयंकर वैर जर सोडतां येणें शक्य नसेल तर मी तुला आज्ञा देतों. राग, चुरस कांहीं न धरतां भल्यांचा कित्ता डोळ्यांपुढें ठेवून, तुझ्या शक्त्यनुरूप व उत्साहानुरूप मीपणा सोडून देऊन स्वर्गाची इच्छा धरून खुशाल युद्ध कर. आणि अर्जुनाच्या हातून तुला पाहिजेत ते लोक क्षात्रधर्मानें जिंकून मिळीव. धर्मयुद्धाखेरीज क्षत्रियाला कांहीं कल्याणकारक नाहीं. समेट करण्यासाठीं मीं पुष्कळ दिवस बरीच खटपट केली, परंतु तें कांहीं घडून आलें नाहीं. असो. '

याप्रमाणें भीष्म बोलल्यावर त्यांना अभिवादन करून भीष्मांची समजूत घालून कर्ण रथांत बसून दुर्योधनाकडे गेला.

# ७ द्रोणपर्व.

## २२ द्रोणाचार्यांना सैनापत्याभिषेक.

(७. ४—११)

याप्रमाणें कर्ण रथांत बसून युद्धाला सिद्ध होऊन आल्यानंतर त्याला पाहून दुर्योधन आनंदानें ह्मणाला, ' आजपर्यंत माझी सर्व सेना तूं नव्हतास त्यामुळें अगदीं अनाथ झाली होती. आतां ती तूं आल्यामुळें सनाथ झाली असें मला वाटतें. हे पुरुषश्रेष्ठा, आतां पुढें आह्मीं काय करावें, कसें वागावें, ह्मणजे आमचें हित होईल तें सांग. ' हें ऐकून कर्ण ह्मणाला, ' हे राजा तूंच सगळ्यांत शहाणा आहेस. तुझ्यासारख्या राजाधिराजाला जशी एखादी गोष्ट चांगलीशी समजेल तशी कांहीं इतराला समजणार नाहीं, तूं जें सांगशील तें आह्मी ऐकण्याला तयार आहों. तूं कांहीं अयोग्य सांगणार नाहींस अशी माझी खात्री आहे. ' हें ऐकून दुर्योधन ह्मणाला, 'वय, पराक्रम, ज्ञान वगैरे सर्व गुणांनीं भीष्म श्रेष्ठ होते, त्यांनीं आजपर्यंत शत्रूचे पुष्कळ लोक कापून काढले. त्यांनीं आजपर्यंतचे दहा दिवस उत्तम रीतीनें पार पाडले. ते तर आतां शरपंजरीं पडले आहेत. तेव्हां हे कर्णा, आतां त्यांच्या मागून सेनापति कोणाला बरें नेमावा ? कोणी तरी चांगला नेता असल्यावांचून सेनेच्यानें टिकाव धरवत नाहीं. सारथ्यावांचून जसा रथ किंवा नावाड्यावांचून जशी नाव व्यर्थ तशीच नायकावांचून सेनाही व्यर्थ आहे. ह्मणून आमच्यामध्यें जी ठळक ठळक मंडळी आहेत त्यांतून एखादा चांगलासा योद्धा, भीष्मांच्यामागें सेनापतीच्या जागेला योग्य असा हुडकून काढ. तूं ज्याचें नांव घेशील त्यालाच आह्मी सेनापति करतों. ' ह्यावर कर्ण ह्मणाला, ' आमच्या जवळील ही सर्वच मंडळी सेनापतीच्या जागेला योग्य आहेत. हे सर्वजण कुलवान आहेत, पराक्रमी आहेत, शहाणे आहेत व बुद्धिमान आहेत. ह्यांपैकीं एकही योद्धा रणांगणांतून शत्रूला पाठ दाखवून पळ काढणार नाहीं अशी माझी खात्री आहे. परंतु एकाच वेळीं सर्वांना सेनापति करणें शक्य नाहीं. ह्मणून त्यांतल्या त्यांत जो विशेष गुणवान असेल त्यालाच सेनापति करावा. हे गुरु द्रोणाचार्य सर्वांहून वडील आहेत, तेव्हां यांनाच सेनाधिपत्य द्यावें हें मला बरें दिसतें. दैत्यगुरु शुक्राचार्य व देवगुरु बृहस्पति यांच्या तोडीचे हे गुरु द्रोणाचार्य असतांना सेनापतीच्या जागेवर दुसऱ्या कोणाचा हक्क पोहोंचणार आहे ? हे सर्व सेनापतींमध्यें श्रेष्ठ आहेत, सर्व योद्ध्यांचे गुरु आहेत व बुद्धिमानांमध्यें वरिष्ठ आहेत. ह्मणून हे दुर्योधना, यांनाच तूं सेनापति कर. ' हें कर्णाचें भाषण ऐकून दुर्योधन द्रोणाचार्यांना ह्म-

णाला, ' आपण वर्णानें, कुलानें, ज्ञानानें, वयानें, बुद्धीनें, वीर्यानें, दक्षतेनें, धैर्यानें, नीतीनें, तपश्चर्येनें व शौर्यानें सर्वांपेक्षां श्रेष्ठ आहां. आपल्यासारखा सेनानायक सर्व राजांमध्यें कोणी नाहीं. ह्मणून आपण सेनाधिपत्य स्वीकारून आह्मां सर्वांचें रक्षण करा. इंद्रानें जसें सर्व देवांचें सेनाधिपत्य स्वीकारून दैत्यांचा फडशा पाडला त्याप्रमाणें आपणही ह्या दहा अक्षौहिणी सेनेचे नायक होऊन पांडवसेनेचा फडशा पाडा. आपण सेनाधिपति झाला ह्मणजे अर्जुनाची आमच्यापुढें उभे राहण्याची मुळींच छाती होणार नाहीं. मग युधिष्ठिराचा सर्व भावांसह आह्मी सहजच फडशा पाडूं. ' असें दुर्योधनानें ह्मटल्याबरोबर सर्व राजांनीं मोठ्यानें सिंहनाद करून त्यांचा जयजयकार केला. नंतर द्रोणाचार्य दुर्योधनाला ह्मणाले, ' मीं वेद, त्याच्या साही अंगांसह ह्मटला आहे; सर्व शस्त्रविद्या मला माहीत आहे; तुह्मीं माझ्या ठिकाणीं जे जे गुण आहेत ह्मणून आतां सांगितलें तें सर्व खरें आहे. पांडवांच्या सेनेला खेळवीत खेळवीत मी सर्व सोमकांचा नाश करून टाकीन. ' हें ऐकून दुर्योधनानें सर्व राजांना घेऊन द्रोणाचार्यांना सेनापतीचा अभिषेक केला. तेव्हां कौरवसेनेंत चोहोंकडे जयजयकार झाला. ब्राह्मण स्वस्तिवाचन ह्मणूं लागले; सूत, मागध वगैरे बंदीजन त्यांची कीर्ति गाऊं लागले. व कलावंतिणी नाचूं लागल्या. याप्रमाणें द्रोणाचार्यांना अभिषेक झाल्यावर, ' आतां काय! पांडवांना आह्मी सहज जिंकूं, ' असें ह्मणत सर्व कौरव फुशारकी मारूं लागले. नंतर द्रोणाचार्य सर्व योद्ध्यांना घेऊन त्यांची नीट रीतीनें व्यवस्था लावून युद्धाकरितां निघाले. त्या वेळीं सिंधुपति जयद्रथ, कलिंगाधिपति विकर्ण व दुर्योधन हे आपल्या सेनानायकाच्या उजव्या बाजूला उभे राहिले. शकुनि विटा खेळण्यामध्यें हुषार अशा आपल्या गांधारकांना व घोडेस्वारांना बरोबर घेऊन कृपाचार्य, कृतवर्मा, चित्रसेन व दुःशासन यांचेबरोबर डाव्या बाजूला उभा राहिला. त्याचप्रमाणें कर्णही आपल्या सर्व योद्ध्यांना घेऊन त्यांच्याबरोबरच पांडवांशीं लढण्याकरितां निघाला. ह्या सूर्यासारख्या तेजस्वी कर्णाला पाहून सर्व कौरवसेनेला अतिशय आनंद झाला. ह्या आनंदाच्या भरांत ते भीष्मांच्या मरणानें झालेलें सर्व दुःख विसरून गेले; ' आतां ह्या कर्णाला पाहून पांडव युद्धाला उभे सुद्धां राहणार नाहींत; कर्ण इंद्रासह सर्व देवांना जिंकून टाकील; मग ह्या यःकश्चित् पांडवांची काय कथा? भीष्मांनीं आजपर्यंत यांची कीव केली. परंतु कर्ण आतां त्या सर्वांचा फडशा पाडून टाकील, ' अशा रीतीनें बडबडत व कर्णाची स्तुति करीत सर्व कौरववीर मोठ्या आनंदानें युद्धाला चालले होते.

## २३ द्रोण व अर्जुन यांच्या प्रतिज्ञा.
## ( ७. १२–१४ )

अशा रीतीनें सर्व सैन्य युद्धाला सिद्ध झालें असतां द्रोणाचार्य मध्येंच दुर्योधनाला ह्मणाले, ' राजा, कुरुश्रेष्ठ भीष्मांच्या नंतर तूं मला सेनापति केलेंस त्याबद्दल तुला कांहीं तरी चांगलीशी देणगी दिली पाहिजे. तर आतां जें तुझ्या मनांत असेल तें माग. तूं मागशील तें देण्याला मी तयार आहें. ' हें ऐकून दुर्योधन, कर्ण व दुःशासन यांच्या समक्ष द्रोणाचार्यांना ह्मणाला कीं, ' जर आपल्या मनांत मला वर द्यावा असें असेल, तर युधिष्ठिराला मजपुढें जिवंत धरून आणा. ' ह्यावर आचार्य ह्मणाले, ' खरोखर धर्म फार धन्य आहे. कारण तूं सुद्धां त्याच्या वधाची इच्छा करीत नाहींस त्याला अजातशत्रु असें जें ह्मणतात तें अगदीं खरें आहे. असें नसतें तर तूं त्याला जिवंत धरून आणण्याविषयीं सांगण्याच्या ऐवजीं ठार करा असेंच मला सांगितलें असतेस. कां तुझ्या मनांत असें आहे कीं, त्याला जिवंत राखून आपल्या कुळाचें रक्षण करावें व सर्व पांडवांना जिंकून त्यांचें राज्य त्यांच्या हवालीं करावें आणि त्यांच्याशीं स्नेह भावांनीं वागावें? ' असें द्रोणाचार्यांनीं विचारल्याबरोबर दुर्योधनाचें खरें इंगित बाहेर पडलें. देवगुरु बृहस्पतींनाही आपल्या मनांत असलेलें लपवून ठेवतां येत नाहीं. मग दुर्योधनासारख्याची गोष्ट तर विचारावयासच नको. खरें आहे तें बाहेर यावयाचेंच. या नियमाला अनुसरूनच राजा द्रोणाचार्यांचें वरील भाषण ऐकून आनंदाच्या भरांत ह्मणाला, ' अहो, आचार्य, युधिष्ठिराला ठार करून मला जय कधींही मिळावयाचा

नाहीं. त्याला मारला असतां बाकीचे पांडव खात्रीनें आह्मां सर्वांचा फडशा पाडतील. त्या सर्वांना जिंकणें तर इंद्राच्यानेंही होणार नाहीं. त्यांच्यांतला एक जरी शिल्लक राहिला तरी तो सर्व कौरवांना कापून काढल्याशिवाय राहणार नाहीं. ह्याकरितां त्या सत्यप्रतिज्ञ धर्माला धरून आणून द्यूतानें जिंकावा व पुनः अरण्याला पाठवावा ह्मणजे बंधुनिष्ठ असे बाकीचे पांडव आपोआपच त्याचेबरोबर वनाला जातील. असें झालें ह्मणजे मात्र मला पुष्कळ वेळपर्यंत राज्यसुख घ्यावयाला सांपडेल. ह्मणूनच धर्मराजाला ठार न करतां त्याला जिवंत धरून आणावा अशी माझी इच्छा आहे. ' हें दुर्योधनाचें भाषण ऐकून व त्याची कुटिल बुद्धि लक्षांत आणून, त्या बुद्धिमान् द्रोणाचार्यांनीं विचार करून त्याला सांगितलें कीं, ' जर युधिष्ठिराचें अर्जुन रक्षण करणार नाहीं तर मात्र मी त्याला खास धरून आणीन; तो जवळ असेल तर माझ्यानेंच केवळ नव्हे, तर इंद्राच्यानें सुद्धां ही गोष्ट होणें नाहीं. अर्जुन हा माझा शिष्य आहे खरा; परंतु तो मारीन किंवा मरेन या निश्चयानें युद्धाला तयार झाला आहे. शिवाय त्यानें इंद्रापासून व शंकरापासून आणखी अस्त्रविद्या संपादन केली आहे. ह्मणून त्याच्याशीं युद्ध माझ्यानें होत नाहीं. आणि याकरितां तो जेणेंकरून युद्धाचे वेळीं धर्माजवळ न राहतां बाहेर कोठें तरी राहील असें कर. तो गेला ह्मणजे मग धर्मराजाला धरून आणलाच, असें समज. अर्जुनावांचून एकटा युधिष्ठिर एक क्षणभर जरी माझ्यापुढें उभा राहील तरी सुद्धां तेवढ्या वेळेंत मी त्याला निःसंशय धरून आणून तुझ्यापुढें उभा करीन. परंतु अर्जुन जवळ असेल तर मात्र ही गोष्ट माझ्यानें होणार नाहीं. ' हें द्रोणाचार्यांचें बोलणें ऐकून मूर्ख कौरवांना फार आनंद झाला; व जणूं काय युधिष्ठिराला आतां धरून आणलाच असें उगीच आपापसांत ते बडबड करूं लागले. परंतु दुर्योधनाच्या मनांत द्रोणाविषयीं संशय होता. त्यांचा पांडवांकडे कल आहे असें त्याला वाटत होतें. ह्मणून त्यानें द्रोणाचार्य हें आपलें बोलणें कदाचित् परतवतील या भीतीनें ही त्यांची प्रतिज्ञा सर्व सैनिकांला ऐकूं जाईल अशा रीतीनें मोठ्यानें त्यांच्या देखत सर्वांना सांगितली. ही आचार्यांची प्रतिज्ञा ऐकून सर्व कौरवसेनेला आनंद झाला. व जिकडे तिकडे वीरांचा सिंहनाद आणि वाद्यांचा गजर ह्यांचा एकच गोंघळ उडून राहिला.

पुढें लगेंच युधिष्ठिराला ही बातमी त्याच्या हितचिंतकाकडून कळली. ती त्याच्या कानीं पडल्याबरोबर आपल्या सर्व भावांना व सैनिकांना जमवून त्या सर्वांच्या देखत तो अर्जुनाला ह्मणाला, ' हे पुरुषश्रेष्ठा, आज द्रोणाचार्यांनीं काय प्रतिज्ञा केली ही तूं ऐकलीसना ? ' द्रोणाचार्यांनीं जी प्रतिज्ञा केली ती आमच्यासाठीं थोडी सवड राखूनच केली आहे. ह्मणून हे महाबाहो, नेहमीं माझ्याजवळ राहून जेणेंकरून मी दुर्योधनाच्या हातांत सांपडणार नाहीं असें कर. ' हें ऐकून अर्जुन ह्मणाला, ' ज्याप्रमाणें आचार्यांचा वध मला केव्हांही प्रशस्त होणार नाहीं त्याप्रमाणें आपल्याला सोडून जाणेंही प्रशस्त नाहीं. जरी प्रत्यक्ष इंद्र किंवा विष्णुही सर्व देवांना घेऊन त्यांच्या साह्याला आले तरी सुद्धां युद्धांतून आपल्याला घेऊन जाणें त्यांच्यानें होणार नाहीं. महाराज, मी जिवंत आहें तोंपर्यंत सर्व धनुर्धरांमध्यें श्रेष्ठ अशा द्रोणाचार्यांपासूनही आपणांला भीति बाळगण्याचें कांहीं कारण नाहीं. शिवाय मी आपणाला असें सांगतों कीं, आजपर्यंत माझा कोठेंही पराभव झाला नाहीं व एकदां एखादी गोष्ट करतों ह्मणून सांगितल्यावर ती केली नाहीं असें कधीं झाल्याचेंही मला आठवत नाहीं. ' हें अर्जुनाचें बोलणें ऐकून, शंखनाद, भेरी व मृदंग इत्यादि रणवाद्यांचा भेसुर आवाज, शूरांनीं केलेला धनुष्याचा टणत्कार व त्यांची सिंहासारखी गंभीर गर्जना ह्यांची पांडवसेनेमध्यें एकच गर्दी उडून राहिली. व तलवारबहादरांना युद्धासाठीं अधिक स्फुरण देणारा असा हा गंभीर रणवाद्यांचा गजर ऐकून कौरवांकडे डंका, नौबती वगैरे वाद्यें वाजूं लागलीं. नंतर दोन्ही दळें एकमेकांला भिडून त्यांचा घनघोर संग्राम सुरू झाला.

## २४ अभिमन्यूचा पराक्रम. (७.१४–१९)

ह्या वेळीं पांडवांकडील सेनाधिपत्य अर्जुनानें

स्वीकारलें होतें व कौरवांकडील सैनापत्य द्रोणाचार्यांकडे होतें. दोघेही आपापलीं सैन्यें नीट व्यवस्थेनें लावून एकमेकांवर तुटून पडले. परंतु दोघेही शूर व वाकबगार सेनापति असल्यानें पहिल्या प्रथम कोणाचेंच कांहीं चालेना. परंतु पुढें द्रोणाचार्य धृष्टद्युम्नाच्या सैन्यावर एकदम घुसून गेले; व जो जो म्हणून आपल्या बाणाच्या टप्यांत येईल त्या प्रत्येकाला आपल्या तीक्ष्ण बाणानें यमलोकाचा रस्ता दाखवीत विजेप्रमाणें ते सर्व पांडवसेनेंत चमकूं लागले. वणवा पेटला ह्मणजे जसें वनच्या वन जळून खाक होतें त्याप्रमाणेंच द्रोणाचार्यांच्या अग्नीसारख्या तिखट बाणांनीं सर्व पांचाळसेना पटापट मरून पडूं लागली. रथी, घोडेस्वार, हत्ती, घोडे व पायदळ हीं सर्व कौरवसेनापतीच्या असह्य माऱ्यांनीं हात, पाय व डोकें वगैरे तुटून गेल्यामुळें जागच्याजागींच कण्हत पडलीं होतीं. अशा रीतीनें ह्या वृद्ध परंतु पराक्रमी अशा कौरवसेनापतीनें पांडवसेनेची भयंकर कत्तल उडविल्यामुळें त्या रणांगणांतून शूरांना स्वर्गप्राप्ति करून देणारी अशी एक प्रचंड रणनदी वाहूं लागली. त्या रणनदींत रक्त हें पाणी, रथ हेच मोठमोठे भोंवरे, मरून पडलेले हत्ती व घोडे हे लहान लहान खडक, चिलखतें ह्या लहानशा तरी, मांस हा चिखल, मेद, मज्जा व हाडें ह्यांचा चुराडा हीच वाळू, किरीटांचे तुकडे हे पाण्यावरील फेंस, विटा, भाला वगैरे हत्यारें हे मोठमोठे मासे, योद्ध्यांचें धड हे प्रवाहांत वहात जाणारे लांकडाचे ओंडके, शूरांचीं तुटून पडलेलीं डोकीं हीं कमलें, तलवारी हे लहान लहान चकाकणारे मासे, व रथांचीं मोडून पडलेलीं चाकें ह्याच सुसरी होत्या. ह्या नदीच्या भोंवतीं बगळे, गिधाडें व कोल्हीं वगैरे हिंस्र प्राणी रक्तमांसाच्या आशेनें घिरट्या घालीत होते. अशा रीतीनें ही भयंकर रणनदी आपल्या सेनेंतून वहात चाललेली आहे हें पाहून युधिष्ठिर वगैरे मंडळी रागानें द्रोणाचार्यांवर धांवून गेली. त्यामुळें उभयपक्षांकडे कांहीं वेळ बरींच द्वंद्वयुद्धें माजून राहिलीं. सहदेवानें आपल्या तीक्ष्ण बाणांनीं शकुनीचा बावटा तोडून पाडला आणि त्याचे घोडे व सारथी ह्यांचाही फडशा पाडला. तेव्हां शकुनीनें आपली गदा घेऊन रथाखालीं उडी टाकून झंदकन मोठ्या चलाखीनें सहदेवाचा सारथी ठार केला. मग सहदेवही गदा घेऊनच रथाखालीं उतरला. नंतर या दोघांचें गदायुद्ध जुंपलें. त्याचप्रमाणें द्रोणाचार्यांनीं धृष्टद्युम्नाला, शल्यानें नकुलाला, धृष्टकेतूनें कृपाचार्यांना, द्रुपदराजानें भगदत्ताला व शिखंडीनें सोमदत्तीला अशा रीतीनें प्रत्येकानें आपल्या शत्रूकडील एकेकाला गांठलें. त्यामुळें सर्व रणभूमीवर द्वंद्वयुद्धाची एकच गर्दी उडून राहिली. इतक्यांत पौरव मोठ्या वेगानें बाणांचा वर्षाव करीत अभिमन्यूवर धांवून आला. परंतु हा येत आहे इतक्यांतच अभिमन्यूनें चलाखीनें अगदीं प्रखरसे बाण सोडून त्याचे घोडे, सारथी, धनुष्य, बावटा व छत्र ह्या सर्वांचा चुराडा उडविला. इतक्यांत हार्दिक्यानें एक बाण सोडून अभिमन्यूचें धनुष्य मोडून टाकलें. लगेच अभिमन्यूनें तें मोडकें धनुष्य टाकून देऊन चांगली पाणीदार अशी तलवार व चित्रविचित्रित रंगाची एक सुंदरशी ढाल हातीं घेऊन रथावरून खालीं उडी ठोकली. नंतर झपाट्यानें पवित्रे चाळीत, मधून मधून उडी मारीत व अर्धचंद्राकृति वर्तुळें घेत, तो पौरवाच्या रथापाशीं जाऊन भिडला; व तेथून पौरवाच्या रथावर उडी घेऊन त्याच्या सारथ्याला एका लाथेसरशीं खालीं पाडला व तलवारीच्या वारानें बावटा छाटून टाकून अभिमन्यूनें पौरवाला शेंडीला धरून खालीं पालथा पाडला. याप्रमाणें पौरवाला अभिमन्यूच्या कचाट्यांत सांपडलेला पाहून त्याला सोडविण्याकरितां जयद्रथ ढाल तलवार घेऊन वेगानें अभिमन्यूवर धांवला. जयद्रथ आपणावर चाल करून येत आहे हें पाहून अभिमन्यूनें पौरवाला सोडून देऊन आपल्या बापाच्या पुरातन शत्रूचा समाचार घेण्याकरितां पौरवाच्या रथावरून खालीं उडी टाकली. तेव्हां शत्रुपक्षाकडील योद्ध्यांनीं याच्यावर विटा, भाला, बर्ची, पट्टा व तलवार वगैरे हत्यारें मारण्याचा सपाटा चालवला. परंतु या रणशूर पठ्ठ्यानें खूप चलाखीनें त्या सर्वांची आपल्या ढालीनें पत करीत व पुढें येईल त्याला आपल्या तलवारीचें पाणी दाखवीत, आणि सिंहनाद करीत झपाट्यानें जयद्रथावर चाल केली. नंतर हे दोघे नरसिंह एकमेकांला भिडले; व त्यांचें तुंबळ युद्ध चालूं झालें. एकदम तुटून पडणें, बेधडक शत्रूवर

वार करणें, आलेला शत्रूचा वार मोठ्या शिताफीनें चुकविणें, प्रसंग पाहून मागें पुढें पवित्रे चाळणें, नागमोडी पवित्रे चालून व हुलकावणी दाखवून शत्रूला फसाविणें व संधि साधून शत्रूच्या नरडीचा घोंट घेण्याकरितां एकदम उडी मारणें वगैरे तलवारीचे डावपेंच दोघांनाही चांगले अवगत होते. त्यांमध्यें कोणीच कोणाला हार जाईना. एखादे वेळीं सिंह व वाघ चवताळून एकमेकांवर आपले पंजे जोरानें मारतात व दंतप्रहार करतात त्याप्रमाणें हे तलवारबहाद्दर एकमेकांवर खूप जोरानें तलवारीचें वार करीत होते. तेव्हां जयद्रथाची तलवार अभिमन्यूच्या ढालेवरील सोनेरी गोळ्यावर जोरानें आपटल्यामुळें मोडून दुखंड झाली. इतक्यांत अभिमन्यु आपल्या रथावर चढून पुनः सर्वांशीं टक्कर घ्यायला तयार झाला; हें पाहून जलदीनें कौरवांकडील सर्व राजांनीं त्याला गराडा दिला. तेव्हां या बलशाली अर्जुनपुत्रानें आपल्या हातांतील ढाल तलवार टाकून देऊन व सिंधुपति जयद्रथाची पाठ सोडून सर्व सैन्याचा समाचार घेण्याकरितां आपलें धनुष्य सज्ज करून सूर्याप्रमाणें आपल्या बाणरूपी तीक्ष्ण किरणांनीं सर्वांना त्राही त्राही करून सोडलें. इतक्यांत शल्यानें सोन्याचा मुलामा दिलेली अशी एक तीक्ष्ण धारेची बर्ची त्याच्या अंगावर फेंकली; पण ह्या रणसिंहानें ती वरच्यावरच झेलून आपल्या तलवारीनें तिचे दोन तुकडे केले. नंतर आभिमन्यूनें दुसरी एक तीक्ष्ण बरचीच घेऊन शल्यावर जोरानें फेंकली. तिनें जाऊन सारथ्याचा चुराडा करून शल्याला रथाच्या खालीं आणला. ही ह्या अभिमन्यूची शिताफी पाहून विराट, द्रुपद, युधिष्ठिर, सात्यकि व धृष्टद्युम्न इत्यादिकांनीं शाबास, शाबास अशी मोठ्यानें गर्जना केली. त्यामुळें पांडवसेनेमध्यें जिकडे तिकडे अभिमन्यूचा जयजयकार होऊं लागला. परंतु हें कौरवांना सहन न होऊन त्यांनीं त्याच्यावर चोहोंकडून बाणांचा मारा चालविला. इतक्यांत शल्यानें, अभिमन्यूनें आपला सारथी मारला हें पाहून रागानें हातांत गदा घेऊन रथाखालीं उडी ठोकली व पायींच मोठ्या वेगानें अभिमन्यूवर चाल केली. हें पाहून अभिमन्यूनेंही आपली प्रचंड गदा हातांत घेऊन भीम नको नको ह्मणत असतांही शल्याला चल चल ह्मणत रथाखालीं उडी टाकली. परंतु भीमानें बळेंच अभिमन्यूला मागें सारून आपली गदा हातांत घेऊन शल्यावर चाल केली.

---

## २५ पहिल्या दिवसाचा शेवट.
## ( ७. १६–१७ )

अभिमन्यूला मागें सारून भीमच आपल्यावर चाल करून येत आहे हें पाहून शल्यही ऐटीनें वाघाप्रमाणें पवित्रे चाळीत वेगानें भीमावर तुटून पडला. तेव्हां भेरी, नगारा, डंका वगैरे शूरांना प्रोत्साहजनक अशा रणवाद्यांचा गजर सर्व रणभूमीवर दुमदुमून राहिला; व दोन्ही पक्षांकडून शाबास, शाबास अशी आरोळी ऐकूं येऊं लागली. भीमाच्या तोडीचा शल्यावांचून दुसरा कोणीही वीर कौरवपक्षाकडे नव्हता, व भीमावांचून शल्याच्या तोडीचा दुसरा कोणीही योद्धा पांडवांकडे नव्हता. बुद्धि, बल, पराक्रम व युद्धचातुर्य ह्यांमध्यें दोघेही सारखेच होते. नंतर हे दोघेही योद्धे अर्धचंद्राकृति मंडलें घेत, आपापली गदा जोरानें गरगर फिरवीत मत्त हत्तीप्रमाणें मोठ्यानें गर्जना करीत चवताळून एकमेकांवर धांवले. भीम जेव्हां जेव्हां आपली गदा गरगर फिरवी तेव्हां तेव्हां त्या गदेंतून सर्व कौरवसेनेच्या कानठळ्या बसतील इतक्या मोठ्यानें घुम् घुम् असा अवाज निघत असे. पुढें हे जेव्हां एकमेकांवर गदा सोडूं लागले व आपल्यावर सुटलेल्या शत्रूच्या गदेची आपल्या गदेनेंच पत करीत मागें पुढें होऊं लागले, तेव्हां त्यांच्या गदेंतून विस्तवाच्या ठिणग्या पडूं लागल्या. एकमेकांच्या गदाप्रहारांनीं सर्व अंग रक्तबंबाळ झाल्यामुळें दोघेही वीर फुललेल्या पळसाप्रमाणें लाल बुंद दिसत होते. शेवटीं दोघांनींही एकदम एकमेकांला खूप जोरानें गदेचा तडाखा दिला. हा तडाखा चांगल्या मर्मस्थळीं बसल्यामुळें दोघेही एकम मूर्छित होऊन पडले. परंतु भीम लगेच सावध होऊन आपली गदा सांवरून धरून पुनः युद्धाला सिद्ध होऊन उभा राहिला. इकडे शल्य अजून तसाच कणहत पडला होता. इतक्यांत कृतवर्मा तेथें आला व शल्याची ही शोचनीय स्थिति

पाहून त्यानें शल्याला आपल्या रथांत घेऊन जलदीनें रणांगणांतून पळ काढला. शल्यासारख्या वीराची अशी दुर्दशा झालेली पाहून कौरवसेनेची कंबरच खचली, व ती जिकडे वाट फुटेल तिकडे धांवूं लागली. हें पाहून पांडवांनीं आनंदानें सिंहगर्जना केली. व जोरानें शंख फुंकून आपल्या सेनेचा उत्साह वाढविण्याकरितां रणवाद्यांचा गजर केला. नंतर सर्व पांडवांनीं मिळून पळत सुटलेल्या कौरवसेनेवर दुप्पट जोरानें मारा केला व तिचा फडशा पाडण्याला प्रारंभ केला; पण इतक्यांत वृषसेनानें पुढें होऊन ह्या सर्व सेनेला थोपवून धरून पांडवांवर बाणांचा मारा चालविला. हा वृषसेनाचा मारा असह्य होऊन पांडवसेनेची अगदीं पांचावर धारण बसली. एकट्या वृषसेनानें आपल्या विजयाचें पारडें फिरविण्याचा बेत आणला हें पाहून रागानें नकुलाचा मुलगा शतानिक हा जोरानें आपल्या तीक्ष्ण बाणांचा वर्षाव करूं लागला; पण इतक्यांत कर्णाच्या मुलानें त्याचें धनुष्यच तोडून टाकलें. आपल्या भावाचें धनुष्य तुटलें हें पाहून शतानिकाच्या भावांनीं कर्णाच्या मुलावर लगट केली. ते जाऊन कर्णाच्या मुलाला भिडतात न भिडतात इतक्यांत अश्वत्थामा वगैरे महारथ्यांनीं त्यांच्यावर हल्ला केला व बाणांचा मारा चालविला. हें पाहून पांडववीरांनीं आपल्या मुलांच्या संरक्षणाकरितां धांव घेतली. नंतर दोन्ही पक्षांचें बरेंच तुंबळ युद्ध झालें व शेवटीं कौरवसेनेला हार खावी लागली. पण इतक्यांत द्रोणाचार्यांनीं येऊन 'शूरहो, पळूं नका. भिण्याचें कांहीं कारण नाहीं. हा मी आलोंच,' असें ह्मणून पांडवांवर बाणांचा मारा करीत करीत युधिष्ठिराचें धनुष्य तोडून त्यावर लगट केली; परंतु युधिष्ठिराचा चक्ररक्षक जो कुमार ह्यानें त्यांना मध्येंच अडवून धरलें. कुमाराचें हें साहस पाहून सर्वांनीं शाबास शाबास अशी आरोळी ठोकली; तेव्हां कुमाराला जास्तच उत्साह चढला त्या उत्साहाचे भरांत त्यानें द्रोणाचार्यांचे छातींत एक तीक्ष्ण बाण मारून मोठ्यानें सिंहनाद केला. हें त्या कुमाराचें अचाट कृत्य पाहून द्रोणाचार्यांना फार चीड आली. त्यामुळें त्यांनीं त्याला तेथल्या तेथेंच ठेंचून शिखंडी, सात्यकि, नकुल व युगंधर वगैरे योद्ध्यांचा समाचार घेत घेत युधिष्ठिरावर लगट केली. तेव्हां कौरवसेना, 'आतां मात्र युधिष्ठिर आपल्या सेनापतीच्या तडाक्यांत सांपडला आजच युद्धाचा शेवट होईल. आह्मांला खात्रीनें जय मिळणार,' अशा रीतीनें फुशारकी मारूं लागली. व द्रोणाचार्य युधिष्ठिरावर आणि पांडवसेनेवर झपाट्यानें बाणांचा मारा करूं लागले. तो मारा असह्य होऊन पांडवसेना थोडीशी कचरली व त्यामुळें कौरवसेनेला व द्रोणाचार्यांना अधिक जोर येऊं लागला; पण इतक्यांत अर्जुन आपल्या गांडीवाचा टणत्कार करीत व सपाट्यांत येईल त्याला स्वर्ग दाखवीत झपाट्यानें युधिष्ठिराच्या मदतीला धांवून आला. त्यामुळें तें सर्व पारडें फिरलें. अर्जुनानें चहूंकडे बाणांचा मारा करून सर्व दिशा बाणमय करून सोडल्या. त्यामुळें कौरवसेना अगदीं भांबावून गेली. इतक्यांत सूर्यही अस्ताला गेला; त्यामुळें त्या रणभूमीवर आपला व परका हें ओळखेना; तेव्हां द्रोणाचार्य व दुर्योधन ह्यांनीं त्या दिवसाचें युद्ध संपवून आपल्या शिबिराकडे मोर्चा फिरविला. नंतर सर्व पांडवही आनंदानें आपल्या शिबिराकडे वळले.

## २६. दुसऱ्या दिवसाचें युद्ध.

(७.१८–३२)

शिबिराजवळ पोहोंचल्यावर द्रोणाचार्य व दुर्योधन यांची गांठ पडली, तेवेळीं द्रोणाचार्य केलेल्या प्रतिज्ञेची पूर्तता न झाल्यानें किंचित् सलज्ज होऊन दुर्योधनाला ह्मणाले, 'मीं तुला पूर्वींच सांगितलें होतें कीं, अर्जुन जर जवळ असेल तर कांहीं युधिष्ठिराला पकडणें शक्य नाहीं. माझ्याबद्दल तूं आपल्या मनांत मुळींच शंका आणूं नकोस. खरोखरच अर्जुन लढत असतांना त्याच्याजवळून धर्माला पकडून आणणें फार कठीण आहे, तें इंद्रादि देवांना सुद्धां होणार नाहीं; ह्मणून जेणेंकरून अर्जुनाला युद्धाचे वेळीं धर्माजवळ रहातां येणार नाहीं असा कांहीं तरी उपाय योजिला पाहिजे. कोणी तरी त्याच्यावर खम ठोकून त्याला दुसरीकडे युद्धाकरितां बोलावून न्यावा. युद्धाला बोलाविलें असतां तो नाहीं ह्मणावयाचा नाहीं व शत्रूला जिंकल्याशिवाय रणभूमींतून परतही यावयाचा नाहीं. अशा रीतीनें अर्जुन कोठें तरी दुसरीकडे गेला ह्मणजे मग

मी धृष्टद्युम्नाच्या देखत धर्माला हां हां ह्मणतां पकडून आणतों. अर्जुनावांचून एकटा युधिष्ठिर जर मजपुढें युद्धाला उभा राहील व भिऊन रणांगणांतून पळ काढणार नाहीं तर त्याला मी क्षण न लागतां पकडून तुझ्या स्वाधीन करतों.' हें द्रोणाचार्यांचें बोलणें ऐकून त्रिगर्ताधिपति व त्याचे भाऊ हे ह्मणाले, 'आह्मीं अर्जुनाचे कांहीं अपराध केले नसतांही त्यानें आह्मांला विनाकारण पुष्कळ त्रास दिला आहे. तो आमच्या अंतःकरणांत रात्रंदिवस डांचत आहे. त्यामुळें आह्मांला झोंप सुद्धां येत नाहीं. आज सहज प्रसंग आला आहे, तर त्याला आह्मी, तुमचा व आमचा दोघांचाही फायदा होईल अशा रीतीनें येथून लांब बोलावून नेऊन युद्ध करून ठार करून सोडतों. आज अर्जुन तरी ठार होईल किंवा त्रिगर्त तरी स्वर्गाला जातील, कांहीं तरी एक खास होईल, हें आह्मी तुह्मांला प्रतिज्ञापूर्वक सांगतों.' अशा रीतीनें शपथ घेऊन सत्यरथ, सत्यवर्मा, सत्यव्रत, सत्येषु व सत्यकर्मा ह्या पांच भावांनीं दहा लक्ष रथी बरोबर घेऊन तेथून आपला मोर्चा फिरविला. ते वेळीं माळवा व तुंडिकेर येथील तीस लक्ष रथी त्यांना येऊन मिळाले; त्याचप्रमाणें प्रस्थला नगरीचा राजा सुशर्मा हाही त्रिगर्तांची घोर प्रतिज्ञा ऐकून त्यांना मदत करण्याकरितां आपले दहा लाख रथी घेऊन त्यांना येऊन मिळाला. नंतर सर्वांनीं निरनिराळा अग्नि पेटवून दर्भाचीं वस्त्रें अंगावर वेंऊन व ब्राह्मणांची यथाशास्त्र पूजा करून: उत्तम लोकांची प्राप्ति होण्याकरितां त्या रणवत अशा पेटलेल्या अग्नीपुढें उभे राहून निश्चयानें सर्व सैन्याच्या देखत प्रतिज्ञा केल्या कीं, 'अधर्मानें वागणारे, ब्रह्महत्या करणारे, दारू पिणारे, गुरुपत्नीशीं रत होणारे, ब्राह्मणांचें द्रव्य हरण करणारे, शरण आलेल्याचा त्याग करणारे, गोहत्या करणारे, ऋतुकालीं आपल्या बायकोशीं रत न होणारे, श्राद्धाचे दिवशीं स्त्रीसंभोग करणारे, किंवा आपल्या आईबापांचा त्याग करणारे ह्यांना ज्या नरकलोकाची प्राप्ति होते त्याच लोकाची प्राप्ति जर आह्मी अर्जुनाला न मारतां युद्धांतून पळ काढूं तर आह्मांलाही होवो व शत्रुसैन्याला मारतां मारतां जर आमचे प्राण जातील तर मात्र आह्मांला स्वर्गप्राप्ति होवो.' अशी खडतर प्रतिज्ञा करून सर्व त्रिगर्त व त्यांचे साथीदार हे अर्जुनाला युद्धाकरितां पाचारण करीत दक्षिण दिशेकडे निघून गेले.

इकडे, आपणाला युद्धाला बोलावणें आलें आहे हें पाहून अर्जुन राजा युधिष्ठिराला ह्मणाला, 'हे संशप्तक मला युद्धाला बोलावितात. तर तिकडे जाऊन त्या सर्वांचा फडशा पाडण्याविषयीं मला आज्ञा द्या. शत्रूनें आपणाला युद्धाला पाचारावें व आपण भ्याडासारखें स्वस्थ बसावें हें मला तर मुळींच सहन होत नाहीं. अहो पुरुषश्रेष्ठ, मी आपल्याला प्रतिज्ञापूर्वक सांगतों कीं, मी आज सर्व संशप्तकांना ठार करतों.' हें ऐकून युधिष्ठिर ह्मणाला, 'बा अर्जुना, द्रोणाचार्यांच्या मनांत काय आहे हें तुला माहितच आहे. तर जेणेंकरून त्यांचा बेत सिद्धीस जाणार नाहीं अशी कांहीं तरी व्यवस्था कर. द्रोणाचार्य हे बलवान, शूर, शस्त्रास्त्रविद्येंत पारंगत व दमदार असे आहेत. अशांनीं मला पकडून नेण्याची प्रतिज्ञा केली आहे.' ह्यावर अर्जून ह्मणाला, 'अहो राजेश्वर, हा सत्यजित आज आपलें रक्षण करील. सत्यजित जवळ असतांना आचार्यांचा बेत मुळींच सिद्धीस जावयाचा नाहीं. आणि यदाकदाचित् सत्यजित मेलाच तर मग तुह्मीं कितीजण असला तरी तुमचें आचार्यांच्या पुढें कांहीं चालावयाचें नाहीं. मग युद्धांतून पळ काढण्यावांचून दुसरा उपायच नाहीं.'

नंतर धर्मराजानें अर्जुनाला प्रेमपूर्वक आलिंगन देऊन व आशीर्वाद देऊन युद्धाला जाण्याविषयीं निरोप दिला. त्याबरोबर भुकेलेला सिंह जसा सावज पाहिल्याबरोबर त्याजवर झडप घालण्याकरितां वेगानें धांवतो त्याप्रमाणें अर्जुनही संशप्तकांचा फडशा पाडण्याकरितां वेगानें त्यांच्यावर चालून गेला.

इकडे संशप्तक गेले ते एक सोईवारशी जागा पाहून त्या ठिकाणीं आपलें सर्व रथदळ नीट व्यवस्थेनें लावून अर्जुनाची वाट पहात उभे राहिले. अर्जुन आलेला पाहून त्यांना फार आनंद झाला. त्यामुळें त्यांनीं मोठ्यानें गर्जना केली. त्या गर्जनेनें दाही दिशा भरून गेल्या. परंतु त्या रणभूमिवर सैनिकांचा खूप जमाव असल्यामुळें त्याचा प्रतिध्वनि मात्र झाला नाहीं. ह्या संशप्तकांना पाहून अर्जुन किंचित् गर्वानें श्रीकृष्णाला ह्मणाला, 'कृष्णा

पाहिलेंस कां, हे कसे मरावयाला तयार झाले आहेत ते? बेटे आतां रडावयाचें सोडून हांसतात काय ह्मणून! किंवा त्यांना आनंदच होणें योग्य आहे. पापी लोकांना स्वर्गसुख कधींच मिळावयाचें नाहीं. तें आतां त्यांना सहज मिळणार आहे? तेव्हां त्यांना आनंद कां नाहीं होणार?' असें ह्मणून अर्जुनानें आपला देवदत्त नांवाचा शंख जोरानें फुंकला. ह्या गंभीर आवाजासरशीच सर्व सेना घाबरून तटस्थ उभी राहिली. घोडे तर डोळे पसरून, कान व डोकीवरील केस ताठ उभे करून व पाय आखडून उभे राहिले, व भयानें मुतूं लागले. पुढें कांहीं वेळ गेल्यावर सर्व सैनिक सावध झाले. नंतर ते सर्वजण आपापल्या जागीं व्यवस्थेशीर उभे राहून अर्जुनावर बाणांचा मारा करूं लागले. अर्जुनानें त्या बाणांना आपल्यापर्यंत येऊंसुद्धां दिलें नाहीं. त्यांचे त्यानें वाटेंतल्या वाटेंतच आपल्या बाणांनीं तुकडे तुकडे करून सोडले. हें पाहून रागानें त्यांनीं खूप जोरानें बाण सोडून कृष्णार्जुनांना त्या बाणांनीं अगदीं झांकून टाकलें. ते वेळीं अर्जुन डोकीवर सोन्याचीं पिसें बसविलेले बाण रुतल्यामुळें प्रातःकाळच्या सूर्याप्रमाणें विशेषच तेजस्वी दिसूं लागला. नंतर अर्जुनानें एक रुंद फळाचा बाण सोडून सुबाहूचें धनुष्य तोडून टाकलें. हें पाहून सुशर्मा, सुरथ, सुधर्मा, सुधनु व सुबाहु ह्या सर्वांनीं अर्जुनावर बाण सोडण्याचा सपाटा चालविला. नंतर अर्जुनानें रुंद पात्याचे बाण सोडून ह्यांचे सर्व बाण वाटेंतल्या वाटेंतच तोडून टाकून सर्वांचे बावटे उतरले. आणि लगेच सुधन्व्याचे घोडे, धनुष्य व शिरस्त्राण ह्यांचा फडशा पाडून त्याचें डोकेंही वरच्यावरच उडविलें. याप्रमाणें हा बलशाली सुधन्वा ठार झाल्यानंतर त्याचें सैन्य भयानें चहूंकडे पळूं लागलें. असें झालें तरी अर्जुनाची बाणवृष्टि तशीच झपाट्यानें चालली होती. आपलें सैन्य भयानें पळूं लागलें हें पाहून त्रिगर्ताधिपति रागानें सर्व रथ्यांना ह्मणाला कीं, 'शूरहो, पळूं नका, पळूं नका. तुमच्यासारख्या शूरांनीं भिऊन जाऊन समरांगणांतून पळ काढावा हें कांहीं बरोबर नाहीं; सर्वांच्या देखत अग्नि पेटवून अर्जुनाला ठार केल्याशिवाय युद्धांतून परतणार नाहीं अशी प्रतिज्ञा करून आतां पळत सुटलां ह्याला ह्मणावें तरी काय? दुर्योधनानें विचारलें तर ह्या काळ्या तोंडानें काय सांगाल? असें भ्याडासारखें वागून उगीच सर्व लोकांत आपलें हांसें करून घेऊं नका. चला, परता. आपण सर्वजण मिळून अर्जुनावर तुटून पडूं.' असे हे आपल्या राजाचे उत्तेजनपर शब्द ऐकल्याबरोबर संशप्तकांचें सर्व सैन्य रणवाद्यांचा गजर करीत व शंख वाजवीत मोठ्या नेटानें पुनः अर्जुनावर तुटून पडलें. त्यामुळें अर्जुनाचें व ह्यांचें पुनः तुंबळ युद्ध चालू झालें.

याप्रमाणें तिकडे अर्जुन संशप्तकांशीं युद्धांत गुंतला असतां, कौरवांनीं आतां अर्जुन नाहीं तेव्हां युधिष्ठिराला पकडण्याला कांहीं उशीर लागणार नाहीं असा विचार करून आनंदानें युद्धाची तयारी केली. कौरवसेनापतीनें सुपर्ण नांवाचा व्यूह रचला. त्या सुपर्ण व्यूहाच्या तोंडावर द्रोणाचार्य स्वतः राहिले. दुर्योधन आपल्या सर्व भावांसह डोक्याचे ठिकाणीं उभा राहिला. कृतवर्मा, कृपाचार्य हे दोघे डोळ्यांचे ठिकाणीं उभे राहिले. भूतशर्मा, क्षेमशर्मा, वीर्यशाली कर्कांक्ष, पूर्वदेशचे राजे लोक, सिंह व कलिंग देशचे राजे, तसेच कांबोज देशचे राजे, आणि शक व यवन लोक हे मानेच्या ठिकाणीं उभे राहिले. भूरिश्रवा, शल्य, सोमदत्त, बाल्हीक हे रथ, घोडे, पायदळ वगैरे एक अक्षौहिणी सैन्य बरोबर घेऊन त्या व्यूहाच्या उजव्या बाजूला उभे राहिले. विंदानुविंद व सुदक्षिण हे अश्वत्थाम्यांला पुढें करून डाव्या बाजूला उभे राहिले. पिछाडीला कलिंग, मगध, मद्र वगैरे देशचे लोक व शकुनीचे लोक हे होते. शेंपटीकडे कर्ण आपल्या सर्व मुलांना घेऊन मोठ्या सेनेसह उभा होता. जयद्रथ, भीमरथ, भूमिंजय व नैषध हे राजे आपापल्या पथकानिशीं त्या गरुडव्यूहाच्या छातीचें रक्षण करीत होते. अशा रीतीनें नानाप्रकारचे शूर राजे लोक जवळ असल्यानें देवसभेंतील इंद्राप्रमाणें व डोकीवर पांढरें शुभ्र छत्र असल्यामुळें कृत्तिकायुक्त असलेल्या पूर्णचंद्राप्रमाणें द्रोणाचार्य शोभत होते.

अशा रीतीची ही कौरवांकडील जय्यत तयारी पाहून युधिष्ठिर पार्षताला ह्मणला. 'हे महाबाहो जेणेंकरून मी ह्या ब्राह्मणयोद्ध्याच्या तडाक्यांत

सापडणार नाहीं अशी कांहीं तरी व्यवस्था कर.' हें ऐकून धृष्टद्युम्न ह्मणाला, 'आपण कांहीं त्याची काळजी करूं नका. मी कौरवसेनापतीला त्याच्या सर्व सैन्यासह थोपवून धरून पुढें न येईल अशी व्यवस्था करतों. अहो कुरुश्रेष्ठ, मी जिवंत आहें तोंपर्यंत तरी आपणाला काळजी करण्याची गरज नाहीं. कारण त्याच्यानें कांहीं मला जिंकवणार नाहीं.' असें ह्मणून धृष्टद्युम्न स्वतः द्रोणाचार्यांवर चालून गेला. धृष्टद्युम्न स्वतःच पहिल्यानें आपल्यावर चालून आलेला पाहून द्रोणाचार्यांना थोडें वाईट वाटलें. परंतु इतक्यांत आचार्यांचें प्रिय करणारा असा दुर्मुख नांवाचा धृतराष्ट्रपुत्र धृष्टद्युम्नावर चालून गेला. तेव्हां या दोघांचें घनघोर युद्ध झालें. हे दोघे वीर एकमेकांशीं निकरानें लढत असतांना द्रोणांनीं पांडवसैन्याचा फडशा चालविला. युद्धाची एकच गर्दी उसळून राहिली. एका क्षणांत दाट पसरलेले मेघ झंझावातानें जसे नाहींसे होतात त्याप्रमाणें पांडवसैन्याची अगदीं त्रेधा उडून गेली. शूर पुरुषांच्या जोराच्या चालण्यानें, बाणांच्या सपाट्यानें, रथांच्या धांवण्यानें व हत्तींच्या पळण्यानें धूळ उडून सर्व मैदान अंधारमय होऊन गेलें, त्यामुळें आपला व परका ओळखेना. एकमेकांच्या शब्दांवरून अनुमानानेंच लढणें भाग पडलें. युद्धाचे आरंभीं पायदळ पायदळावरच तुटून पडलें. रथी रथ्यांनाच जाऊन भिडले. हत्तीवरून लढणारे हत्तीदळावरच तुटून पडले व स्वारांनीं स्वारांशींच टक्कर देण्यास सुरवात केली. परंतु ह्या गर्दीमध्यें ती सर्व घडी बिघडून समोर येईल त्याच्यावर हत्यारांचे घाव बसूं लागले. हत्तींवर बाणांचा मारा बसल्यानें ते चीं चीं, करीत चोहोंकडे सैरावैरा धांवूं लागले. तेव्हां त्यांच्या माहुतांनीं अंकुशाच्या माऱ्यांनीं त्यांना पुनः युद्धाला उभे केले. कित्येक हत्ती माहूत युद्धांत कामास आल्यामुळें व चोहोंकडून बाणांचा मारा होत असल्यानें जिवाच्या भीतीनें मध्येंच पळत सुटले. तेव्हां त्यांच्या त्यांच्यांतच टकरा होऊन पुष्कळ हत्ती त्या टकरांमुळें रणभूमीवर मरून पडले. याचप्रमाणें रिसाल्यांतील घोड्यांचीही त्रेधा उडाली. कित्येक इमानी घोडे आपल्या व धन्याच्या जिवाचें रक्षण करण्याकरितां त्या युद्धाच्या गर्दींतून बाहेर पडण्यासाठीं धडपडत होते. या गर्दींत बापानें मुलाला व मुलानें बापाला या रीतीनें जो पुढें येईल त्याला यमलोकचा रस्ता दाखवीत शूर योद्धे त्या रणभूमींतून विजेसारखे इकडून तिकडून चमकत होते. अशा रीतीनें चोहोंकडे एकसारखी कत्तल झाल्यानें युद्धाच्या आरंभीं उठलेली धूळ नाहींशी झाली एवढेंच नव्हे, सर्व रणमैदान रक्तमांसानें भरून गेलें; तें इतकें कीं, त्यांत लढणाऱ्या योद्ध्यांचीं सबंध पावलें बुडत असत. अशा रीतीनें भयंकर कत्तल करीत करीत द्रोणाचार्यांनीं युधिष्ठिराला गांठलें. द्रोण जवळ आले हें पाहून सत्यजित त्यांचेवर धांवला. नंतर त्यानें तीक्ष्ण असे बाण सोडून कौरवसेनापतीचे ध्वज व सारथी यांचा फडशा पाडला. हें पाहून द्रोणांनीं रागानें रुंद पात्याचा बाण सोडून त्याच्या धनुष्याची कांब तोडून टाकली. तेव्हां या शूरानें लगेंच दुसरें धनुष्य घेऊन द्रोणांवर जास्तच जोरानें मारा चालविला. इतक्यांत वृकही त्याच्या मदतीला धांवला. अशा रीतीनें ह्या दोघां पांचालांनीं महारथी द्रोणांना जेरीस आणलें. हें पाहून पांडवांनीं आनंदानें गर्जना केली. ह्या गर्जनेनें वृकाला जास्त जोर आला. त्यामुळें त्यानें द्रोणाचार्यांच्या छातीवर एकसारखे साठ बाण सोडले. हें पाहून सेनापति द्रोणांनीं रागानें डोळे वटारून आधीं सत्यजित, वृक या दोघांचीं धनुष्यें तोडून टाकलीं आणि नंतर घोडे व सारथी यांच्यासह वृकाला यमलोकांची वाट दाखविली. इतक्यांत सत्यजितानें दुसरें धनुष्य घेऊन द्रोणाचार्य व त्यांचे घोडे व सारथी यांच्यावर बाणांचा मारा चालविला. अशा रीतीनें सत्यजित थोड्याशा जयानें फुगून जाऊन आपल्याशीं टक्कर देण्याला अद्यापि उभा आहे हें पाहून द्रोणाचार्यांनीं रागानें एक अर्धचंद्राकृति बाण सोडून त्यानें त्याचें डोकें वरच्यावरच चेंडूप्रमाणें उडविलें. अशा रीतीनें शूर पंचालांची वाट लागलेली पाहून युधिष्ठिरानें द्रोणांपासून हळू हळू मागें पाय घेण्याची सुरवात केली. इतक्यांत पांचाल कैकेय व मत्स्य वगैरे राजे युधिष्ठिराच्या मदतीला धांवले. तेव्हां मत्स्यराजाचा धाकटा भाऊ शतानिक यानें नुकतेच सहाणेवर पाजळलेले असे सहा तीक्ष्ण बाण घेऊन सारथी, घोडे व स्वतः आचार्य यांच्यावर सोडले. ते त्यांच्या थोडेसे

मर्मी लागल्यामुळें खवळून जाऊन एका बाणांतच कौरवसेनापतींनीं त्याचें शिरकमळ भूमंडलाला पोंचविलें. असें हें आचार्यांचें घोर कृत्य पाहून शिखंडी, सात्यकि, धृष्टद्युम्न व युधिष्ठिर हे खूप जोरानें बाणांचा वर्षाव करीत कौरवसेनापतींवर तुटून पडले. तेव्हां कौरवपांडवांचें बरेंच तुंबळ युद्ध झालें. ह्या गर्दीत कौरवसेनापतींनीं दृढसेन, क्षेम व क्षत्रदेव यांना ठार करून सात्यकि व युधामन्यु यांचा समाचार घेत युधिष्ठिराला गांठलें. आचार्य जवळ आले, हें पाहतांक्षणींच युधिष्ठिरानें घोडे मागें फिरवून पळ काढला; व पांचालानें द्रोणावर चाल केली. पण द्रोणाचार्यांनीं तेथल्या तेथेंच त्याला स्वर्ग दाखविला. हा पांचालपुत्र ठार झाल्याबरोबर पांडवसैन्यांत ‘ ठोका द्रोणांला ठोका, ’ असा एकच मोठा ध्वनि उठला. पण इकडे लक्ष न देऊन द्रोणाचार्यांनीं सात्यकि, शिखंडी व धृष्टद्युम्न वगैरेंवर सारखा बाणांचा सपाटा चालविला होता. अशा रीतीनें द्रोणाचार्यांनीं पांडवसेनेची कत्तल केलेली पाहून कौरवांना फार आनंद झाला. व त्यांनीं मोठ्यानें सिंहनाद केला. हें पाहून हांसत हांसत दुर्योधन कर्णाला ह्मणाला, ‘ हे राधेया, आचार्यांच्या बाणांनीं पांचालांची कशी त्रेधा उडाली आहे पहा. मला वाटतें आतां ते फिरून युद्धाचें नांव देखील काढणार नाहींत. ह्या महाक्रोधी भीमाला माझ्या सैनिकांनीं जर्जर केलेला पाहून कर्णा, मला फार आनंद होत आहे. आतां ह्या दुष्टाला द्रोणाच्या तडाक्यांतून जगून राज्य करण्याची आशाच करावयाला नको. ’ यावर कर्ण ह्मणाला, ‘ हा जिवंत असेतोंपर्यंत कौरवांचा जय निमूटपणें पाहील असें कधींहि होणार नाहीं. सर्व पांडव शूर, बलवान व अस्त्रविद्येंत पारंगत असे आहेत. कपटानें द्यूत खेळून त्यांना वनवासाला धाडलें हें त्यांच्या अंतःकरणांत सारखें बोंचत आहे. त्यामुळें ते जीव जाईतोंपर्यंत युद्धांतून माघार म्हणून घ्यावयाचे नाहींत. हा पहा भीम परतला आहे. आतां तो आमच्यांतील चांगल्या चांगल्या योद्ध्यांचा समाचार घेईल. सात्यकि वगैरे शूर योद्धेही त्याच्या पाठोपाठ त्याला मदत करण्याला आले आहेत. हे सर्वजण मारीन किंवा मरेन अशा निश्चयानें परतले आहेत. तेव्हां अशा साहसी व शूर लोकांबरोबर टक्कर देणें एकट्या द्रोणाचार्यांच्यानें होणार नाहीं. ह्मणून आपणही त्यांच्या मदतीला जाऊं या. ’ असें म्हणून ते दोघेही आपल्या सर्व लोकांनिशीं द्रोणाचार्यांकडे त्यांना मदत करण्याकरितां धांवून आले. तेथें आल्यावर दुर्योधन आपल्या लोकांना ह्मणाला कीं, ‘ तुमच्या अंगांत जेवढी शक्ति, उत्साह, वीर्य व कसब असेल तेवढें खर्च करून पांडवांना मागें हटवा. ’

हें ऐकल्याबरोबर दोन्ही पक्षांकडील योद्धे एकमेकांवर वेगानें तुटून पडले. त्यामुळें त्या रणभूमीवर कांहीं वेळ जिकडे तिकडे द्वंद्वयुद्धेंच माजून राहिलीं. दुर्मर्षणानें भीमाला गांठलें. कृतवर्मा सात्यकीवर चालून गेला. जयद्रथ क्षत्रवर्म्यावर तुटून पडला. सुबाहु युयुत्सूवर घसरला व शल्यानें युधिष्ठिराला थोपवून धरलें. हीं व अशाच प्रकारचीं दुसरीं आणखी शेंकडों द्वंद्वयुद्धें त्या समरांगणावर चाललीं होतीं. ह्यांतील योद्धे एकमेकांच्या नरडीचा घोट घेण्याविषयीं फारच निकरानें लढत होते. आपल्या अंगांत जें कांहीं युद्धकौशल्य आहे तें सर्व दाखविण्याची योग्य वेळ काय ती हीच असें वाटून सर्व कसबांचा त्या ठिकाणीं उपयोग करीत होते, व जें युद्ध करावयाचें तें धर्मानें करावयाचें असा निश्चय होता; या सर्व कारणांमुळें तीं द्वंद्वें फारच भयंकर पण रमणीय व सत्वशील अशीं दिसत होतीं.

अशा रीतीनें कांहीं वेळ द्वंद्वयुद्धें चाललीं होतीं इतक्यांत दुर्योधन स्वतः गजयोधी बरोबर घेऊन भीमावर धांवला. स्वतः दुर्योधन आपल्यावर चालून आला हें पाहून ह्या बलशाली व शूर अशा भीमाला जास्तच स्फुरण चढलें. त्यासरशीं ह्यानें आपल्या तीक्ष्ण बाणांनीं पुष्कळ मदोन्मत्त हत्तींचा समाचार घेतला. सोसाट्याचा वारा सुटला ह्मणजे ढग जसे दाही दिशांला पसरून एका क्षणांत नाहींसे होतात, त्याप्रमाणें ह्या भीमाच्या असह्य माऱ्यानें ते सर्व हत्ती घाबरून जाऊन चीं चीं करीत सैरावैरा पळूं लागले. आपल्या हत्तींची ही अशी त्रेधा उडालेली पाहून दुर्योधनानें भीमावर बाणांचा वर्षाव सुरू केला. पण भीमानें ह्या बाणांचा मधल्या मधेंच फडशा उडवून दुर्योधनाचें धनुष्य तोडून टाकलें

व हत्तीलाही यमलोक दाखविला.

दुर्योधनाची अशी फजिती उडालेली पाहून अंग नावाचा म्लेंच्छाधिपति हत्तीवर स्वार होऊन दुर्योधनाला मदत करण्याकरितां जलदीनें धांवत आला. पण हा येत आहे इतक्यांत भीमानें त्याच्या हत्तीच्या गंडस्थळावर रोंख धरून नेमानें बाण मारला. त्यासरशीं त्याचें गंडस्थळ फुटून तो गतप्राण होऊन खालीं पडला. इतक्यांत भीमानें खूप चलाखीनें एक रुंद पातीचा बाण सोडून हत्तीवरून खालीं येणाऱ्या अंगराजाचें डोकें वरच्यावर उडविलें.

हा पडल्यामुळें तर त्या गजयोद्ध्यांची पांचांवरच धारण बसली. ते भयानें चहूंकडे पळूं लागले. त्यामुळें ह्या हत्तीच्या पायांखालीं चिरडूनच कौरवांकडील बरेंच पायदळ ठार झालें. याप्रमाणें कौरवसैन्याची चहूंकडून धांदल चालली होती. पण इतक्यांत भगदत्त आपला प्रसिद्ध हत्ती घेऊन भीमाच्या समाचाराला आला. ज्या हत्तीच्या साहाय्यानें इंद्रानें दानवांचा फडशा उडविला होता त्याच हत्तीच्या कुळांतला हा हत्ती होता. हा हत्ती डोळे वटारून रागानें भीमावर धांवून आला. नंतर एकदम आपले पुढील दोन्ही पाय जुळवून त्यानें त्या खालीं जुंपलेल्या घोड्यांसह भीमाचा रथ सोंडेनें ओढून घेतला व तो पायांखालीं तुडवून त्याचा चुराडा करून टाकला. ह्या हत्तीनें अशा रीतीनें रथावर झडप घातल्याबरोबर भीमानें रथाखालीं उडी ठोकून त्या हत्तीच्याच अंगाखालीं दडी मारली. भीमाला अंजलिका वेधाची चांगली माहिती होती. त्यामुळें भिवून पळून न जातां त्यानें त्या हत्तीच्या अंगाखालीं वसून त्याला आपल्या हातांनीं चापट्या देत गरगर फिरविण्याला प्रारंभ केला. ह्या हत्तीला दहा हजार हत्तींचें बळ होतें तरी तो ह्या वेळीं कुंभाराच्या चाकाप्रमाणें गरगर फिरत होता. अशा रीतीनें कांहींवेळ त्याला फिरवून भीम झटदिशीं त्या सुप्रतीकाच्या पुढें उभा राहिला. त्यासरशीं त्यानें भीमाला आपल्या सोंडेनें धरून खालीं पाडला व दोन्ही गुडघे त्याच्या आंगावर रोवून गळ्याला सोंडेचा विळखा दिला. तेव्हां भीमानें खूप जोरानें त्याची सोंड मुरगाळली. त्यामुळें त्याचा तो विळखा थोडासा सैल पडला. त्यासरशीं झटका देऊन भीम त्याच्या कचाट्यांतून निसटला व पुन्हा त्याच्या अंगाखालीं शिरला. नंतर संधि पाहून तेथून पार झाला. पण इतक्यांत 'ह्या सुप्रतीकानें आपल्या सोंडेनें मान मुरगाळून भीमाला ठार केला, भीमाला ठार केला, अशी सर्व सैन्यांत एकच आरोळी उठली. त्यामुळें घाबरून जाऊन युधिष्ठिर व पांडव सर्व सैन्यानिशीं वेगानें भीम जेथें उभा होता तेथें आले. नंतर भीम तेथें जवळच उभा असलेला त्यांच्या दृष्टीस पडला. तेव्हां सर्वांनीं मिळून भगदत्तावर व त्याच्या सैन्यावर बाणांचा मारा चालविला. पण भगदत्तानें आपल्या ह्या दिव्य हत्तीच्या साहाय्यानें त्यांची मुळींच मात्रा चालूं दिली नाहीं.

पुढें दशार्ण देशचा राजा आपला हत्ती घेऊन नागमोडीच्या चालीनें ह्याच्यावर तुटून पडला. तेव्हां कांहीं वेळ ह्या दोन्ही गजयोद्ध्यांचें युद्ध फारच बघण्याजोगें झालें. नंतर शेवटीं भगदत्ताच्या सुप्रतीकानें दशार्णाधिदतीच्या हत्तीच्या बरगडींत जोरानें दंतप्रहार करून त्याला ठार केला. इतक्यांत भाला मारून भगदत्तानें ह्या दशार्णाधिपतीलाही स्वर्ग दाखविला. नंतर भगदत्तानें आपला हत्ती युयुधानाच्या रथावर सोडला. पण युयुधानानें तो येत आहे असें पाहूनच रथाखालीं उडी घेऊन सात्यकीच्या रथाकडे पळ काढला. हें पाहून भगदत्तानें पुनः भीमावर चाल केली. तेव्हां त्याच्या हत्तीनें सोंडेंत पाणी घेऊन तें जोरानें भीमाच्या घोड्यावर सोडलें. त्यासरशीं ते घोडे बुजून जाऊन त्या रथासह समरांगणावर चहूंकडे सैरावैरा धांवूं लागले. तेव्हां रुचिपर्व्यानें भगदत्तावर बाणांचा मारा सुरू केला. पण भगदत्तानें एक रुंद फळाचा सरळसा बाण घेऊन त्यानें रुचिपर्व्याचें शीर धडापासून वेगळें केलें. हें पाहून पांडवांकडील योद्ध्यांनीं मोठ्यानें आरोळी ठोकून ह्या सुप्रतीकावर जोरानें बाणांचा मारा सुरू केला. पण इतक्यांत टांच मारून व अंकुश टोंचून भगदत्तानें आपल्या हत्तीला जास्तीच चेतविला. त्यामुळें तो कान ताठ करून, डोळे वटारून व सोंड लांब करून, रथ्यांचा चुराडा करीत पांडव सेनेंत धांवत सुटला. त्यामुळें पांडवसेनेंत एकच हाहाकार उडाला.

इकडे अशा तऱ्हेची धांदल चाललेली पाहून व

योद्ध्यांच्या पळण्यानें चहूंकडे धूळ उठलेली पाहून अर्जुन श्रीकृष्णाला ह्मणाला, 'भगदत्तानें आपल्या हत्तीच्या साहाय्यानें आमच्या लोकांची बहुतेक फजिती उडवून दिली असली पाहिजे. असें नसतें तर ही इतकी धूळ उठली नसती व इतका गोंधळ झाला नसता. भगदत्त हा साधारणपणें इंद्रा इतका गजयुद्धामध्यें पटाईत आहे. या पृथ्वीतलावर त्याच्या तोडीचा कोणी तरी असेल असें निदान मला तरी वाटत नाहीं. शिवाय त्याचा हत्तीही कितीही शस्त्रप्रहार झाले तरी त्यांना न जुमानणारा व युद्धामध्यें न दमणारा असा आहे. त्यामुळें हा एकटाच सर्व पांडवसैन्याचा आज फडशा पाडील. आह्मां दोघांवांचून त्याचा समाचार घेण्याजोगा समर्थ आमच्यामध्यें कोणी नाहीं. ह्मणून हे कृष्णा, चल, घोडे हाक. आपण जाऊन त्याचा फडशा पाडूं.' हें ऐकून कृष्णानें आपल्या घोड्यांचा रोंख वळवून युधिष्ठिराकडे रथ चालविला. पण इतक्यांत चवदा हजार संशप्तक त्यांच्या रथामागून धांवून आले. व 'आमच्याशीं युद्ध करून मग तिकडे जा,' असें ह्मणूं लागले. हें पाहून अर्जुन थोडासा बुचकळ्यांत पडल्या सारखा झाला. त्याला आधीं युधिष्ठिराच्या मदतीला जावें किंवा आधीं ह्या त्रिगर्तांचा फडशा पाडावा हें सुचेना. नंतर त्यानें श्रीकृष्णाच्या सल्लयानें आधीं पुढें आलेल्या शत्रूंची रग जिरवून मग युधिष्ठिराच्या मदतीला जावें असें ठरविलें. व पुनः मागें परतून त्यांचा समाचार घेण्याला सुरवात केली. तेव्हां अर्जुनाच्या असह्य माऱ्यानें त्या संशप्तकांची अगदीं दाणादाण उडून गेली. कित्येकांचे हात मोडले, कित्येकांचे पाय मोडले, कित्येकांचीं डोकीं तुटून पडलीं, कित्येकांचीं आयुधें तुटून पडलीं, व कित्येकांच्या रथांचा चुराडा उडाला. अशा रीतीनें त्या संशप्तकांची कत्तल करून अर्जुन आपल्या गांडीवाचा टणत्कार करीत जलदीनें युधिष्ठिराला येऊन मिळाला.

नंतर सर्वांनीं मिळून कौरवसैन्याचा फडशा उडविण्याला आरंभ केला. त्या वेळीं, विस्तवाचा स्पर्श जसा मनुष्याला सहन होत नाहीं त्याप्रमाणें ह्या अर्जुनादि पांडवांचा मारा असह्य होऊन कौरव सैन्य रणांगणांतून पराङ्मुख होऊं लागलें. इतक्यांत भगदत्तानें आपल्या सुप्रतीकासह अर्जुनावर चाल करून बाणांचा मारा सुरू केला. परंतु अर्जुनानें त्यांचे मधल्यामधेंच तुकडे करून पाडले. हें पाहून भगदत्तानें आपला हत्ती त्याच्यावर सोडला. इतक्यांत श्रीकृष्णानें मोठ्या शिताफीनें घोडे हाकून त्या हत्तीला उजवा वळसा देऊन आपला रथ त्याच्या मागें घेतला. ह्या वेळीं अर्जुन भगदत्ताच्या पाठीमागें असल्यानें त्याला भगदत्त व त्याचा हत्ती ह्या दोघांना एकदम ठार करतां आलें असतें. परंतु पाठीमागून वार करणें हा धर्म नव्हे, हें लक्षांत आणून या शूर पुरुषानें त्याच्यावर हात उगारला नाहीं. परंतु भगदत्ताला आपल्याला पाहून हे मागें फिरले असें वाटून जरा जास्त स्फुरण आलें; व त्या भरांत त्यानें कृष्णार्जुनांना आपल्या बाणांनीं अगदीं झांकून टाकलें. त्यामुळें, कृष्णार्जुन बहुतेक आतां ठारच होणार, ते कांहीं आतां भगदत्ताच्या तडाक्यांतून वांचणार नाहींत असें लोकांना वाटूं लागलें. पण इतक्यांत अर्जुनानें त्याचें धनुष्यच तोडून टाकलें. तेव्हां भगदत्तानें त्याच्यावर चवदा वेळ भाले फेंकले, परंतु या सर्वांचीही त्यानें तीच वाट लाविली; शिवाय सुप्रतीकाच्या आंगावरील चिलखतही तोडून खालीं पाडलें. नंतर रागानें खवळून जाऊन भगदत्तानें श्रीकृष्णावर सोन्याच्या दांड्याची व पोलादी परज असलेली अशी तीक्ष्ण धारेची एक बर्ची फेंकली. परंतु अर्जुनानें हिचेही दोन तुकडे केले. व त्याचें छत्र आणि ध्वज यांचाही फडशा उडवला. इतक्यांतच भगदत्तानें दुसरें धनुष्य घेऊन त्यांच्यावर बाणांचा मारा करण्याला सुरवात केली. पण अर्जुनानें ह्याही वेळेला त्याचें धनुष्य व भाता यांचा फडशा पाडला; शिवाय जलदीनें आणखी साठ सत्तर बाण सोडून त्याचें सर्व शरीर बाणमय करून सोडलें. हें पाहून भगदत्तानें अगदीं शेवटचा उपाय ह्मणून आपल्या अंकुशावर वैष्णवी अस्त्राचें अभिमंत्रण करून तें अर्जुनावर सोडलें. सर्व जगाची राखरांगोळी करणारें असें हें अस्त्र अर्जुनावर सुटलेलें पाहून श्रीकृष्णानें आपली छाती पुढें केली व त्यावर तें अस्त्र घेतलें. श्रीकृष्णाच्या छातीवर येऊन आपटल्याबरोबर त्या अस्त्राला वैजयंती माळेचें रूप आलें. त्यामुळें श्रीकृष्ण अधिकच शोभूं लागला. पण हें श्रीकृष्णाचें कृत्य पाहून अर्जुनाला फार

वाईट वाटलें ह्मणून तो ह्मणाला कीं, 'हे कृष्णा, मी युद्ध न करतां फक्त घोडेच हांकीन,' अशी तुझी प्रतिज्ञा आहे. मग तूं ह्या वेळीं आपल्या प्रतिज्ञेचा भंग काय ह्मणून केलास ? मी त्या अस्त्राचें निवारण करण्याला असमर्थ असतों, किंवा एखाद्या अडचणींत सांपडून भांबावून गेलों असतों तर तूं असें करावयाचें होतेंस. परंतु मी धनुष्यबाण घेऊन युद्ध करीत असतांना मजपुढें सर्व देव, दानव व मनुष्यें जरी आलीं तरी त्या सर्वांना मी एकटाच बस्स आहें हें तुला माहीत आहे.' हें ऐकून श्रीकृष्ण त्याला ह्मणाला, 'पूर्वीं घडलेली हकीकत मी तुला सांगतों ती ऐक. मीं प्रथमतः आपल्या चार मूर्ती प्रकट केल्या. त्यांपैकीं एक मूर्ति नेहमीं पृथ्वीतलावर राहून तपश्चर्या करीत असते, दुसरी लोक जीं बरीं वाईट कर्में करतात त्यांवर नेहमीं नजर ठेवते, तिसरी ह्या भूतलावर जन्म घेऊन मनुष्याप्रमाणें कर्में करीत रहाते व चवथी एकसारखी हजार हजार वर्षें झोंप घेत असते. ती जेव्हां हजार वर्षांच्या एका झोंपेंतून उठते तेव्हां त्या वेळीं जे वर देण्याला योग्य असतील त्यांना वर देते. एकदां ती माझी हजार वर्षांची झोंप पुरी होऊन मी जागा झालों असतांना पृथ्वीनें येऊन माझी प्रार्थना केली कीं, 'माझा मुलगा नरक हा वैष्णवास्त्रानें युक्त व्हावा व तो सर्व देवदानवांना अजिंक्य असा असावा, असा हे प्रभो, आपण मला वर द्यावा.' ही तिची प्रार्थना ऐकून मीं आपलें वैष्णवास्त्र दिलें व ह्या अस्त्राच्या योगानें तुझा मुलगा अजिंक्य होईल असें तिला सांगितलें. तेव्हां बरें ह्मणून ती निघून गेली; व तेव्हांपासून नरक हा सर्वांना अजिंक्य झाला. आणि त्या नरकापासूनच ह्या भगदत्तानें हें अस्त्र संपादन केलें आहे. ह्मणून हें अस्त्र सुटलें असतांना इंद्र व रुद्र वगैरे देवही त्याच्यापासून वांचणार नाहींत असा ह्या अस्त्राचा प्रभाव आहे. ह्मणून मीं तुझ्याकरितां ह्या अस्त्राचें निवारण केलें. आतां हा निरस्त्र झाला आहे तेव्हां तुला कांहीं आतां त्याच्यापासून भीति उरली नाहीं. आतां तूं ह्याला खुशाल चोप.' हें ऐकून अर्जुनानें एक तीक्ष्ण बाण सुप्रतीकाच्या गंडस्थळावर सोडला. तो नेमका त्याच्या गंडस्थळांतून पार झाला. त्यासरशीं तो हत्ती झीट येऊन मटकन खालीं बसला. हत्ती बसला तो कायमचाच बसला ! एक मोठ्यानें किंकाळी फोडून त्यानें स्वर्गाची वाट धरली. नंतर श्रीकृष्णानें अर्जुनाला सांगितलें कीं, 'हा ह्मातारा भगदत्त डोळ्यांला त्रास होऊं नये ह्मणून आपल्या डोळ्यांवर नेहमीं एक प्रकारचें विरविरीत फडकें बांधीत असतो. तें तूं तोडून टाक.' हें ऐकून अर्जुनानें त्याप्रमाणें केलें. त्यासरशीं त्याचे डोळे मिटले व त्याला कांहींच दिसेना. इतक्यांत अर्जुनानें अर्धचंद्राकृति फाळ बसविलेला असा एक तीक्ष्ण बाण भगदत्तावर सोडला. तेव्हां तो बाण त्या प्राग्ज्योतिषाधिपतीचा प्राण घेऊन त्याच्या छातींतून पार निघून गेला.

हें पाहून वृषक व अचल नांवाचे दोघे गांधार अर्जुनावर तुटून पडले. त्यांपैकीं एक मागें झाला व दुसरा अर्जुनाच्या पुढें झाला. याप्रमाणें मागें व पुढें उभे राहून दोन्हींकडून त्यांनीं अर्जुनावर मारा करण्याला सुरवात केली. तेव्हां अर्जुनानें वृषकाचे घोडे, सारथी, धनुष्य, छत्र, रथ व ध्वज ह्या सर्वांचे तिळाएवढे तुकडे करून सोडले. व पांचशें गांधार योद्धे कापून काढले. इतक्यांत वृषक दुसरें धनुष्य घेऊन आपल्या भावाच्या रथावर चढला. नंतर हे दोघेही भाऊ एकमेकांला चिकटून उभे राहून पुनः अर्जुनावर सपाट्यानें बाण सोडूं लागले. हें पाहून अर्जुनानें दोघेही एकमेकांला चिकटून उभे आहेत हें लक्षांत आणून एकाच बाणांत दोघांचेंही काम व्हावें अशा बेतानें एक अचूक बाण सोडला; त्यासरशीं हे दोघेही भाऊ गतप्राण होऊन धाडदिशीं जमिनीवर पडले.

आपले भाऊ ठार झाले हें पाहून शकुनि कृष्णार्जुनांवर तुटून पडला. तेव्हां त्याच्या सैन्यांतून, सोटे, लठ, दगड, तोफा, बर्च्या, गदा, गुर्दे, फरशा, तलवारी, शूल, रेलें, पट्टे, मुसल, चक्र व बाण वगैरे हत्यारें जोरानें पांडवांवर सुटूं लागलीं. त्यामुळें पांडवसैन्यांतील लोक पटापट मरून पडूं लागले. तेव्हां रक्तमांसाच्या आशेनें वाघ, कोल्हीं, गिधाडें, घारी वगैरे हिंस्र प्राणी पांडवसैन्यामध्यें गोळा होऊं लागले. नंतर शकुनीनें आपल्या मायेनें निरनिराळीं अस्त्रें सोडण्याला आरंभ केला. प्रथमतः त्यानें जें अस्त्र सोडलें त्या योगें जिकडे तिकडे अंधारच अं-

धार झाला. हें पाहून अर्जुनानें ज्योतिशास्त्र सोडलें त्यामुळें सर्व दिशा स्वच्छ होऊन उजेड पडला. तेव्हां शकुनीनें जलास्त्र सोडलें. त्या जलास्त्राच्या योगानें सर्व सैन्यांत पाण्याचा वर्षाव होऊं लागला. पण अर्जुनानें आदित्यास्त्र सोडून तें पाणी शोषून टाकलें. अशा रीतीनें त्यानें सोडलेल्या प्रत्येक अस्त्राचें त्याच्या विरुद्ध दुसरें अस्त्र सोडून, निवारण करून अर्जुनानें त्याच्यावर बाणांचा मारा सुरू केला. तो असह्य होऊन शकुनीनें तेथून पळच काढला.

नंतर पांडव व कौरव सैन्यांतील लोक एकमेकांवर आवेशानें तुटून पडले. त्यामुळें त्यांचें बरेंच घनघोर युद्ध झालें. पांडवांकडे, मारा द्रोणांना मारा, असा शब्द उठला व कौरवसैन्यांत, 'द्रोणाचार्यांचें रक्षण करा, वीरहो द्रोणाचार्यांचें रक्षण करा,' असा ध्वनि उठला. त्यामुळें दोन्ही पक्षांकडील योद्धे आपापला उद्देश साधण्यासाठीं खूप निकरानें लढत होते. ह्या वेळीं पांडवांकडील नील नांवाच्या योध्यानें फारच कमाल करून सोडली. त्यानें आपल्या हस्त लाघवानें एका क्षणांत शेंकडों कौरवांना यमसदनीं धाडलें. त्यानें केलेली ही कौरवसैन्याची कत्तल पाहून अश्वत्थामे त्याचा समाचार घेण्याकरितां पुढें सरसावून आले. त्या उभयतांचें घोर युद्ध होऊन शेवटीं अश्वत्थाम्यांनीं एक तीक्ष्ण बाण सोडून ह्याचें शीर धडापासून वेगळें केलें. नील पडलेला पाहून पांडवांना जास्तच चेव आला. त्यामुळें तें पुढें येईल त्याची कत्तल करीत सुटले. अशा रीतीनें चहूंकडून सर्व पांडववीरांनीं कौरवांची कत्तल चालविल्यामुळें ते भयानें 'हे कर्णा, हे कर्णा,' असें मोठ्यानें दीनस्वर काढून ओरडूं लागले. त्यांचा दीनस्वर ऐकून कर्ण भिऊं नका, भिऊं नका,' असें ह्मणत व त्यांना धीर देत धांवत आला. तो आल्याबरोबर अर्जुनानें त्याच्या देखत त्याचे विपाटादि तिघे भाऊ ठार केले. कर्णाच्या देखत त्याचे भाऊ पांडवांनीं मारले हें पाहून कौरवसेनेची पांचांवरच धारण बसली. इतक्यांत भीमानें रथाखालीं उडी ठोकून आपल्या तलवारीनें कर्णाचे बरेच लोक कापून काढले, व नंतर पुनः आपल्या रथावर चढून धनुष्यबाण हातीं घेऊन, कर्ण, कर्णाचा सारथि व घोडे या सर्वांचा समाचार घेतला. इकडे धृष्टद्युम्नानें चंद्रवर्मा व बृहत्क्षत्र ह्यांना स्वर्गाची वाट दाखविली; व सात्यकि कर्णावर धांवून आला. अशा रीतीनें कर्ण पांडवांच्या कचाट्यांत सांपडलेला पाहून दुर्योधन, द्रोणाचार्य व जयद्रथ हे आपापले लोक घेऊन कर्णाच्या मदतीला धांवले. तेव्हां धृष्टद्युम्न, भीम, अभिमन्यु व नकुलसहदेव हे सात्यकीच्या मदतीला कंबर बांधून उभे राहिले. नंतर दोन्ही दळें एकमेकांवर घसरलीं. व त्यांचें तें युद्ध बऱ्याच हातघाईवर आलें होतें. इतक्यांत संध्याकाळ झाल्यामुळें कांहींच दिसेनासें झालें. ह्मणून उभयपक्षांकडील योद्ध्यांनीं युद्ध करावयाचें रहित करून आपापल्या शिबिराकडे मोर्चा फिरविला.

---

## २७ तिसरा दिवस—अभिमन्यूचा पराक्रम
### (७.३३–७१)

याप्रमाणें संध्याकाळ झाल्यामुळें युद्ध बंद करून अर्जुनाच्या शौर्याचें वर्णन करीत करीत सर्व योद्धे आपापल्या शिबिरांकडे गेले. नंतर पहाटेच्या वेळेला शत्रूला थोडासा जय मिळाल्यानें ज्याला फार वाईट वाटलें होतें असा अभिमानी दुर्योधन सर्वांच्या देखत विनयपूर्वक द्रोणाचार्यांना ह्मणाला, 'अहो आचार्य, खरोखर आह्मांला मारावें असें आपल्या मनांत आहे. कारण युधिष्ठिर आज आपल्या अगदीं जवळ आला, असूनही त्याला आपण धरलें नाहीं. आपल्या मनांत धरावयाचें असतें तर सर्व तेत्तीस कोटी देवांनीं त्याच्या रक्षणाकरितां जरी कंबर बांधली असती तरी आपण त्याला सोडलें नसतेंत. प्रथम वर देऊन नंतर आह्मांला फशीं पाडलेंत. हें कांहीं बरें नव्हे. श्रेष्ठ लोक शरणागताचा आशाभंग कधीं करीत नाहींत.' हें ऐकून थोडासा विषाद वाटून द्रोणाचार्य ह्मणाले. 'मी तुझ्या हिताकरितां प्रयत्न करीत असतां तूं माझ्याविषयीं अशी भलती कल्पना करतोस हें कांहीं तुला शोभत नाहीं. सर्व देव, दानव, राक्षस, गंधर्व, यक्ष व पाताळांतील सर्प जरी आले तरी त्यांच्यानेंही अर्जुनानें रक्षिलेल्या धर्माला पकडणें होणार नाहीं. ज्या ठिकाणीं प्रत्यक्ष विश्वकर्ता गोविंद आहे व जेथें स्वतः अर्जुन सेनापति आहे तेथें शंकराशिवाय युद्धाला

उभें राहण्याची तरी कोणाची छाती होणार आहे? बापा, आतां मी तुला एक सांगतों. आज कोणातरी एका चांगल्या महारथ्याला मी मारीन. हें माझें बोलणें केव्हांही खोटें होणार नाहीं. आज अशा प्रकारचा व्यूह रचतों कीं, तो देवांना देखील फोडतां येणार नाहीं. पण राजा, अर्जुनाला कांहीं तरी उपायानें लांब पाठीव. युद्धशास्त्रामध्यें त्याला असाध्य व माहीत नाहीं असें कांहींच नाहीं. कांहीं माझ्याकडून तर कांहीं दुसऱ्याकडून अशा रीतीनें सर्व माहिती त्यानें मिळविली आहे.' असें द्रोणाचार्यांनीं ह्मटल्याबरोबर बाकी राहिलेले संशप्तक पुनः उठले, व ते अर्जुनाला युद्धाकरितां पाचारून पुनः दक्षिणदिशेला घेऊन गेले. तिकडे अर्जुन व संशप्तक यांचें बरेंच तुंबळ युद्ध झालें.

इकडे आचार्यांनीं चक्रव्यूहाची रचना केली व त्यांत देवेंद्रासारख्या शूर राजांची त्यांच्या त्यांच्या पथकासह चांगल्या माऱ्याच्या ठिकाणीं योजना केली. व्यूहाच्या तोंडावर सूर्यवंशांतील राजे लोकांची योजना केली. ते सर्व योद्धे तांबडीं वस्त्रें परिधान करून तांबडीं भूषणें घालून तांबड्या पताका घेऊन मरेन किंवा मारीन या निश्चयानें व प्राण जाईपर्यंत एकमेकांना मदत करावयाची अशा प्रतिज्ञेनें युद्धाला उभे होते. हे योद्धे दहा हजार होते. यांवर लक्ष्मण सेनापति होता. राजा दुर्योधन, कर्ण, दुःशासन व कृपाचार्य वगैरे महारथी बरोबर घेऊन त्या व्यूहाच्या मध्यभागीं उभा होता. सर्व सैन्याचे पुढें सूर्यासारखे तेजस्वी असे द्रोणाचार्य उभे होते. त्यांच्याजवळच जयद्रथ, बाकीचे कौरव, शकुनि, शल्य, भूरिश्रवा व अश्वत्थामा वगैरे वडी वडी मंडळी आपापलीं पथकें बरोबर घेऊन त्या व्यूहाचें रक्षण करण्याकरितां तयारीनें उभी होती.

अशी ही कौरवपक्षाची कडेकोट तयारी पाहून पांडवांनीं भीमाला पुढें करून एकदम कौरवांवर चाल केली. परंतु द्रोणाचार्यांनीं बाणांचा मारा करून त्यांना पुढें येऊं दिलें नाहीं. पांडवांच्या एकवटून आलेल्या ह्या सर्व सैन्यभाराला एकट्या द्रोणाचार्यांनीं आपल्या बाहुबलानें थोपवून धरलें. हें पाहून सर्वांना मोठें आश्चर्य वाटलें. परंतु आपल्या सैन्याचें द्रोणाचार्यांच्या माऱ्यापुढें कांहीं चालत नाहीं हें पाहून युधिष्ठिराला मोठी काळजी पडली. नंतर तो अभिमन्यूला ह्मणाला, 'बाळा अर्जुन येऊन जेणेंकरून आह्मांला दोष देणार नाहीं असें कर. चक्रव्यूहाचा भेद कसा करावा हें आह्मांला मुळींच माहीत नाहीं. तूं, अर्जुन, श्रीकृष्ण किंवा प्रद्युम्न यांपैकींच कोणी तरी हा व्यूह फोडून पार जाईल. ह्या चौघांशिवाय चक्रव्यूहाचा भेद करणारा असा एखादा कोणी तरी पांचवा योद्धा असेल असें मला वाटत नाहीं. बाबा अभिमन्यो, तुझे चुलते, मामे व सर्व सैन्य तुझी प्रार्थना करीत आहे. तर ह्यांची ही प्रार्थना सफल करणें तुझ्याकडे आहे. म्हणून हे महाबाहो, लौकर शस्त्रास्त्रें घेऊन द्रोणाचार्यांवर चाल करून जाऊन त्यांच्या सैन्याचा फडशा पाड.' ह्यावर अभिमन्यु ह्मणाला, 'वडिलांच्या आशीर्वादानें मी हा व्यूह सहज फोडून टाकीन. मला माझ्या वडिलांनीं युद्धविद्या उत्तम तऱ्हेनें शिकवली आहे. परंतु मला व्यूहांतून परत येतां येत नाहीं,' हें ऐकून युधिष्ठिर ह्मणाला, 'हे युद्धविशारदा, महाबाहो, तूं प्रथमतः द्रोणांवर चाल करून व्यूहांतून वाट पाड. मग आह्मी सर्वजण तुझ्या पाठोपाठ येतों. अर्जुनाप्रमाणें आह्मी सर्वजण तुझें रक्षण करीत तुझ्या मागोमाग येतों.' लगेच भीम ह्मणाला 'मी तुझ्या पाठोपाठ येतों व धृष्टद्युम्न, सात्यकि, पंचाल वगैरे मोठमोठे योद्धेही तुझ्या मदतीला येतील. तूं नुसती वाट पाडलीस कीं पुरे. लगेच आह्मी सर्वजण तेथील लोकांची कत्तल करीत तुझ्या मागोमाग उभे रहातों.' हें ऐकून अभिमन्यु ह्मणाला, 'द्रोणाचार्यांचें सैन्य जय्यत तयारीनें उभें आहे. अशांवर चालून जाणें ह्मणजे पतंगानें पेटलेल्या अग्नीवर झडप घालण्याप्रमाणेंच आहे. असें जरी आहे तरी, आमच्या कुलाची कीर्ति कायम रहावी ह्मणून व मामांना आणि तातांना आनंद व्हावा ह्मणून मी न डगमगतां आचार्यांचा व्यूह फोडून आंत शिरतों. आज माझ्यासारख्या लहान पोरानें शत्रूसैन्याची उडविलेली कत्तल सर्वांच्या नजरेस पडेल. माझ्या तडाक्यांतून माझ्यापुढें येणारा असा जर कोणी जिवंत सुटेल तर मी अर्जुनाचा किंवा सुभद्रा मातेचा बच्चाच नव्हे.' नंतर अभिमन्यूनें सारथि सुमित्र याला 'आचार्यांच्या सैन्यावर लौकर घोडे हाक,'

अशी आज्ञा केली. हें ऐकून सुमित्र ह्मणाला, 'आयुष्मन्, पांडवांनीं आपणांवर जरा जास्त बोजा टाकला आहे. थोडा वेळ विचार करा, आणि मग युद्धाला चला. द्रोणाचार्य हे अनुभवी शूर व युद्धविद्याविशारद असे आहेत.' हें आपल्या सारथ्याचें भाषण ऐकून अभिमन्यु हांसत हांसत ह्मणाला, 'हे सारथे, हे द्रोण म्हणजे कोण? किंवा सर्व क्षत्रिय मंडळ म्हणजे तरी काय आहे? सर्व देवांना घेऊन ऐरावतावर स्वार होऊन प्रत्यक्ष इंद्र जरी आला किंवा सर्व भूतगणांला घेऊन महाप्रतापी रुद्र जरी आला तरी त्याच्याशींही मी टक्कर देईन. माझ्या क्षात्र तेजाबद्दल तूं आपल्या मनांत शंका आणूं नकोस. शत्रूचें सैन्य माझ्या पासंगालासुद्धां लागणार नाहीं. महाप्रतापी असा माझा पिता किंवा सर्व विश्वाला जिंकणारा असा माझा मामा जरी मजपुढें युद्धाला उभा राहिला तरी सुद्धां मला भीति ह्मणून कसली ती वाटणार नाहीं.' हें ऐकून 'बरें' असें ह्मणून सुमित्रानें घोडे हांकले. ते तीन वर्षांचे असे तरणेबांड घोडे थोडीशी इशारत मिळाल्याबरोबर शत्रूंच्या माऱ्याला न जुमानतां वाऱ्यासारखे जलदीनें पळत शत्रूवर जाऊन भिडले. बाकीचे पांडवही याच्या पाठोपाठ निघाले. पांडव अशा रीतीनें अभिमन्यूला पुढें करून पुनः चालून आले हें पाहून सर्व कौरवसैन्य त्यांच्यावर जास्त त्वेषानें तुटून पडलें. हा वीराचा बच्चाही सिंहाच्या छाव्याप्रमाणें आपल्या बाणरूपी नखांनीं त्यांचीं मर्मस्थळें फोडीत व्यूह फोडून आंत घुसण्याच्या खटपटीला लागला. तेव्हां कांहीं वेळ व्यूहाच्या तोंडाजवळ दोन्ही पक्षांचें बरेंच तुंबळ युद्ध झालें. पण शेवटीं पुढें येऊन अडथळा करणाऱ्या सर्व योद्ध्यांना मागें हटवून अभिमन्यु वाट पाडून आंत घुसला. अभिमन्यूनें चक्रव्यूहाचा भेद केला हें पाहून चहूंकडील शूर शूर राजे थांब, थांब. पुढें कोठें चाललास? हा मी तुझा समाचार घ्यावयाला आलों,' असें ह्मणत त्याच्यासभोंवतीं गोळा झाले. पण ह्या वीर पठ्ठयानें त्यांना न जुमानतां बाणांचा मारा करीत तसाच पुढचा मार्ग धरला. कौरवांकडील लोक मात्र त्याच्यावर पतंगाप्रमाणें झडप घालीत व शेवटीं प्राणाला मुकत. ऋत्विज ज्याप्रमाणें वेदीवर दर्भ पसरतात त्याप्रमाणें या रणबहाद्दरानें सर्व समरांगण शत्रूंच्या छिन्नविच्छिन्न झालेल्या शरीरांनीं भरून सोडलें. दांतओंठ चावत रागानें त्याच्यावर तुटून पडलेल्या लोकांचीं मुंडकीं यानें वरच्यावरच उडविल्यामुळें तीं तशींच धूळ खात खालीं पडलीं होतीं. हजारों लोकांची कत्तल उडाल्यामुळें नानाप्रकारचीं किरिटें, कुंडलें, बाहुभूषणें लोखंडाच्या कांबीसारखे बळकट असे शूर योद्ध्यांचे हात, हत्तींच्या पायासारख्या विशाल मांड्या, नानाप्रकारचीं शस्त्रास्त्रें व हत्ती घोडे वगैरे जनावरें यांचीं हाडें यांनीं सर्व रणभूमि अगदीं गच्च भरून गेली होती. मर्मस्थळीं वार लागल्यामुळें शूर शिपाई घायाळ होऊन जिकडे तिकडे विवळत पडले होते. त्यांचा दीनस्वर ऐकून कौरवांना पुष्कळ चेव आला. पण अभिमन्यूच्या माऱ्यापुढें त्यांचा कांहींच इलाज चालेना. शेवटीं अगदीं हताश होऊन पळण्याशिवाय दुसरा मार्ग नाहीं असा विचार करून विवळत पडलेल्यांची काळजी न करतां घोड्यांना टांच देऊन तेथून त्यांनीं पळ काढण्याला आरंभ केला.

अशा रीतीनें एकट्या अभिमन्यूनें आपल्या सर्व सैन्याची त्रेधा उडविली हें पाहून दुर्योधनाला फार त्वेष चढला. व त्या त्वेषांत तो अभिमन्यूवर चालून गेला. हें पाहून द्रोणाचार्यांनीं, 'राजाचें रक्षण करा, राजाचें रक्षण करा, नाहीं तर अभिमन्यू आह्मां सर्वांच्या देखत त्याचा फडशा पाडील,' अशी मोठ्यानें आरोळी ठोकली. हें ऐकून मोठमोठे वीर दुर्योधनाचें रक्षण करण्याकरितां त्याकडे धांवले. अश्वत्थामा, कृपाचार्य, कृतवर्मा शल्य व भूरिश्रवा वगैरे बडी बडी मंडळी एकट्या अभिमन्यु बाळावर तुटून पडली. परंतु अग्नीवर गवताचा बोजा कितीही पडला तरी त्याबद्दल अग्नीला जसें कांहीं वाटत नाहीं त्याप्रमाणें अभिमन्यूला त्यांची कांहीं फिकीर वाटली नाहीं. आपल्या बाणांच्या माऱ्यानें या सर्वांना मागें हटवून त्यानें मोठ्यानें सिंहगर्जना केली. इतक्यात अश्मकेश्वर 'थांब, थांब' ह्मणत अभिमन्यूवर तुटून पडला. व त्यानें अभिमन्यूवर दहा बाण सोडले. तेव्हां अभिमन्यूनें परत दहाच बाणांत त्याचे घोडे, सारथी, ध्वज, बाहू, धनुष्य व डोकें हीं सर्व तोडून खालीं पाडलीं. तेव्हां कर्ण, कृ-

पाचार्य, द्रोणाचार्य वगैरे मंडळी पुनः अभिमन्यूवर जास्त जोरानें मारा करूं लागली. तेव्हां या सर्वांचा मारा सहन करून अभिमन्यूनें कर्णाच्या चिलखताचे तिळाएवढे तुकडे करून पाडल व सुषेण व कुंभभेदी यांचा समाचार घेतला. व शल्यावरही जोरानें मारा केला, तो मारा असह्य होऊन शल्य मूर्च्छा येऊन रथावर मटदिशीं बसला. आपल्या पित्याची ही दशा झालेली पाहून शल्याचा धाकटा भाऊ अभिमन्यूवर तुटून पडला; पण पहिल्याच सलामीसरशी अभिमन्यूनें त्याला स्वर्ग दाखविला. ह्याचें हस्तलाघव पाहून दोन्ही पक्षांतील लोक, 'शाबास, शाबास' असें मोठ्यानें ओरडले व द्रोणाचार्य त्याचें शौर्य पाहून आनंदानें कृपाचार्यांना ह्मणाले, 'हा अर्जुनाचा बच्चा त्याच्याच तोडीचा आहे. याचें शौर्य पाहून याच्या वडिलाला, युधिष्ठिरादि चुलत्यांना, बाकीच्या आप्तांना किंबहुना शत्रूंना देखील विस्मय वाटल्यावांचून राहणार नाहीं. याच्या तोडीचा एकही धनुर्धर ह्या सैन्यभारांत असेल असें मला वाटत नाहीं. हा मनांत आणील तर सर्व सैन्याचा एका क्षणांत धुव्वा उडवील.' हें द्रोणाचार्यांचें प्रेमाचें भाषण ऐकून दुर्योधनाला फार राग येऊन तो कर्ण, दुःशासन व बाल्हीक वगैरे राजांना ह्मणाला, 'सर्व राजांचे ह्या ब्रह्मश्रेष्ठ द्रोणाचार्यांनीं सेनाधिपत्य स्वीकारलें आहे. असें असूनही ते ह्या मूर्ख पोराला मारावयाचें मनांत आणीत नाहींत. यांच्यापुढें प्रत्यक्ष काळाच्यानें सुद्धां उभें राहवणार नाहीं, मग त्या यःकश्चित पोराची काय कथा? अर्जुन आपला शिष्य आहे व हा त्याचा मुलगा आहे असें समजून आचार्य याची गय करतात. पण हें मूर्ख पोर एवढ्यानेंच चढून जाऊन लौकरच त्यांना देखील मारून टाकील.' असें दुर्योधनानें ह्मणाल्याबरोबर सर्व राजे द्रोणाचार्यांच्या देखत अभिमन्यूला ठार करण्याकरितां धनुष्याची दोरी ओढूं लागले. इतक्यांत दुःशासन दुर्योधनाला ह्मणाला, 'मी एकटा जाऊन याला ठार करतों. पांडव पांचाल यांच्या देखत मी याला राहूप्रमाणें ग्रासून टाकीन. हा माझ्या कचाट्यांत सांपडलेला पाहून कृष्णार्जुन कांहीं जिवंत राहणार नाहींत. व बाकीचे पांडवही विन्मुख होऊन रणांगणांतून पळ काढतील. अर्थांत याला एकट्याला मारला ह्मणजे तुमचे सर्व शत्रू आपोआप नाहींसे होतील याकरितां आशीर्वादपूर्वक मला परवानगी द्या; मी तुमच्या सर्व शत्रूंना ठार करतों.' असें ह्मणून दुःशासन वेगानें बाण सोडीत अभिमन्यूवर धांवून गेला. त्याला पाहून हांसत हांसतच अभिमन्यू ह्मणाला, 'हा दुष्ट अधर्मी मजपुढें रणांगणांत आला हें फार बरें झालें. हे नीचा, भर सभेंत युधिष्ठिर काकांची जी विटंबना केलीस व भीमांना जे अपशब्द बोललास व माता द्रौपदीची जी विटंबना केलीस त्या सर्वांचें आतां प्रायश्चित्त भोग. आतां कांहीं तू माझ्या तडाक्यांतून जिवंत सुटत नाहींस. पाठ दाखवून पळ काढशील तरच जिवंत सुटशील.' असें ह्मणून त्यानें त्याच्यावर तक्ष्ण बाण सोडले. ते त्याच्या छातींत व बगलेंत जोरानें घुसले, त्यामुळें विव्हळ होऊन तो रथांत घायाळ होऊन मूर्छित पडला. दुःशासनाची अशी दशा झालेली पाहून त्याच्या सारथ्यानें वेगानें घोडे हाकून रणांगणांतून पळ काढला, दुःशासनासारखा वीर रणांगणांतून घायाळ होऊन पळून गेला हें पाहून दुर्योधन कर्णाला ह्मणाला, 'हे वीरश्रेष्ठा, एका क्षणांत अभिमन्यूनें दुःशासनाची कशी अवस्था केली ती पहा. हा सूर्याप्रमाणें आपल्या प्रखर बाणांनीं आमच्या सैन्याला तापवीत आहे. शिवाय सर्व पांडव सिंहाप्रमाणें गर्जना करीत याला मदत करण्याकरितां याच्या पाठोपाठ धांवून येत आहेत.' हें ऐकून कर्ण बाणांचा मारा करीत अभिमन्यूवर धांवून गेला. पण ह्या अभिमन्यूनें त्याचा तो सर्व मारा सहन करून त्याचे घोडे, सारथी, ध्वज व धनुष्य ह्या सर्वांचे आपल्या बाणांनीं तुकडे तुकडे करून सोडले. कर्णाची अशी फजिती उडाली ह्मणून त्याचा धाकटा भाऊ त्याचें उसनें फेडण्याकरितां ऐटीनें अभिमन्यूवर चालून आला. पण तो येतांक्षणींच अभिमन्यूनें त्याचें मुंडकें उडविलें. हें पाहून कर्ण भयानें व लाजेनें तेथून पळून गेला. कर्णानें पळ काढला हें पाहून तर कौरवसैन्याची पांचांवर धारण बसली. तें चहूंकडे सैरावैरा पळूं लागलें. इतक्यांत जयद्रथ त्या सर्वांना थोपवून धरून आपल्या धनुष्याचा टणत्कार करीत पुढें सरसावला.

यानें पूर्वी द्रौपदीला उपटून नेण्याचा बेत केला होता. ते वेळीं भीमानें याची फजिती उडविली होती. त्यामुळें वाईट वाटून या मानी पुरुषानें श्रीशंकराची कडक तपश्चर्या करून त्यापासून 'अर्जुन नसेल तेव्हां तुला बाकीच्या पांडवांना जिंकतां येईल,' असा वर मिळविला होता.

त्या वरप्रभावानें व अर्जुन जवळ नसल्यानें ह्या वेळीं याला अधिक जोर आला होता. यानें आल्याबरोबर सात्यकि, भीमसेन व धृष्टद्युम्न वगैरे सर्व योद्ध्यांना आपल्या बाणांनीं झांकून सोडलें. पण इतक्यांत राजा युधिष्ठिरानें याचें धनुष्य तोडून टाकलें. तेव्हां दुसरें धनुष्य घेऊन जयद्रथानें धर्मराजावर दहा बाण व बाकीच्यांवर तीन तीन बाण सोडले. हें सहन न होऊन भीमानें तीनच बाणांत त्याचें धनुष्य, छत्र व ध्वज हीं तोडून पाडलीं. जयद्रथानेंही लगेच दुसरें धनुष्य घेऊन भीमाचे घोडे मारले व धनुष्यही तोडून टाकलें. हें पाहून भीमानें तेथूनच सात्यकीच्या रथावर उडी टाकली! नंतर पांचाल, केकयादि पांडववीर अभिमन्यूनें पाडलेल्या वाटेनें व्यूह भेदून आंत जाऊं लागले.

परंतु जयद्रथानें एकट्यानेंच त्या सर्वांना अडवून धरलें. इतक्यांत अभिमन्यूनें वृषसेनाचा सारथी मारला व धनुष्यही तोडून टाकलें. सारथी मेल्याबरोबर घोड्यांना कोणी आवरता नाहींसा झाला. त्यामुळें ते वृषसेनाला घेऊन सर्व रणांगणांतून उगीच सैरावैरा धांवूं लागले. तेव्हां सर्व कौरववीर एकदम अभिमन्यूवर तुटून पडले. त्याबरोबर अभिमन्यूच्या सारथ्यानें मोठ्या शिताफीनें त्या सर्वांची नजर चुकवून त्यांच्या मधूनच आपला रथ बाजूला काढला. पण तेथें वसातीय धनुष्य सज्ज करून उभा होता. अभिमन्यूनें त्याच्या छातींत एक तीक्ष्ण बाण सोडला. तो बाण छातींत शिरून त्याचें काळीज भेदून पार निघून गेला. वसातीयासारखा वीर एका क्षणांत ठार झाला हें पाहून पुनः सर्वांची गाळण उडाली. तेव्हां शल्याचा मुलगा मद्राधिपति रुक्मरथ सर्वांना धीर देत पुढें सरकला. अभिमन्यूनें ह्याचे हात व धनुष्य तोडून टाकून शेवटीं मुंडकें छाटलें. शल्याचा मुलगा रुक्मरथ हा ठार झाला हें समजल्याबरोबर सर्व राजे पुनः चवताळून याच्यावर आले. त्या सर्वांनीं मिळून आपल्या बाणांखालीं याला अगदीं झांकून सोडला. हें पाहून दुर्योधनाला फार आनंद झाला. व आतां अभिमन्यू लौकरच स्वर्गाची वाट धरील असें त्याला वाटलें. पण त्याचें हें मनोराज्य फार वेळ टिकलें नाहीं. कारण अभिमन्यूनें गंधर्वास्त्र सोडलें, त्यामुळें सर्व रणभूमीवर जिकडे तिकडे अभिमन्यूच उभे आहेत असें सर्व कौरवांना दिसूं लागलें. हें पाहून कौरवांनीं मागें पाय काढण्याला सुरवात केली. हें गंधर्वास्त्र अर्जुनानें तपश्चर्या करून गंधर्वापासून मिळविलें होतें व पुढें तें अभिमन्यूला शिकविलें होतें. आपल्या सर्व सैन्याची गाळण उडाली व आपल्या समोर जिकडे तिकडे अभिमन्यूच्या मूर्ती बाणांचा मारा करीत उभ्या आहेत हें पाहून दुर्योधनानें तर तेथून पळच काढला. दुर्योधन पळाला तेव्हां त्याच्या मागोमाग कर्णादि वीरही पळाले. हें पाहून दुर्योधनाचा मुलगा लक्ष्मण अभिमन्यूवर तुटून पडला. तेव्हां दुर्योधनही आपल्या मुलाच्या रक्षणाकरितां पुनः परतला. तेव्हां त्याचे सरदारही पुनः अभिमन्यूवर चालून आले. लक्ष्मण व दुर्योधनादि वीर त्याच्यावर सारखा बाणांचा मारा करूं लागले. त्यामुळें साप जसा काठीच्या तडाक्यानें चवताळून उलट अंगावर धांवतो त्याप्रमाणें चवताळून रागानें अभिमन्यू लक्ष्मणाला म्हणाला, 'नीट हुषारीनें रहा व ह्या जगांतील जर कांहीं तुला बघावयाचें असेल तर तें बघून घे. कारण मी आतां तुला तुझ्या बापादेखत व सर्व पाठीराख्यांदेखत यमराजाकडे पाठवितों.' असें म्हणून अभिमन्यूनें एक रुंद पात्याची चांगली पाणीदार अशी तलवार म्यानांतून उपसली व ती लक्ष्मणावर फेंकली. चिडलेली नागीण जशी बिळांतून वेगानें बाहेर पडते त्याप्रमाणें ही तलवार त्याच्यापासून जी जोरानें गेली तों तिनें लक्ष्मणाचें डोकें किरीटकुंडलांसह वरच्यावरच उडाविलें. लक्ष्मणासारखा राजबिंडा ठार झाला हें पाहून सर्व लोक हाय हाय म्हणून शोक करूं लागले. दुर्योधन तर पुत्रशोकानें चवताळून 'मारा, ह्याला मारा,' असें मोठ्यानें ओरडूं लागला.

हें ऐकून, कर्ण, द्रोण, अश्वत्थामा वगैरे सर्व वीर मोठ्या नेटानें अभिमन्यूवर तुटून पडले. अभिमन्यूनेंही ह्या सर्वांचा चांगला समाचार घेतला, व वृंदारक, कोसलाधिपति बृहद्बल, कर्णाचे सहा स-

चिवं व मागध राजाचा मुलगा ह्या सर्वांना यमसदनीं पाठविलें.

नंतर दुःशासनाचा मुलगा दौःशासनि हा पुढें झाला. त्याला पाहून अभिमन्यु ह्मणाला, ' तुझा बाप भ्याडासारखा रणांगणांतून पळून गेला. तूं तरी धैर्यानें पुढें आलास, एवढ्यानें बरें झालें. पण तूं जिवंत सुटशील असें मात्र समजूं नकोस. ' असें ह्मणून नुक्ताच धार लावलेला असा एक तीक्ष्ण बाण अभिमन्यूनें दौःशासनीवर सोडला. पण अश्वत्थाम्यांनीं ह्याचे मध्येंच तीन तुकडे केले. लगेच अभिमन्यूनें त्याचा ध्वज खालीं पाडला व शल्यावर तीन बाण सोडले, नंतर शत्रुंजय, चंद्रकेतु, मेघवेग, सूर्यवर्चस व सूर्यभास यांना मारून त्यानें शकुनीचा समाचार घेतला.

अभिमन्यूनें कौरवसैन्यांत अशा रीतीनें प्रळय उडविलेला पाहून शकुनीनें, ' आह्मी सर्व मिळून याला मारणार, पण त्याच्या आधीं हाच आह्मां सर्वांना मारून टाकील, ' असे दुर्योधनापाशीं उद्गार काढले. ही शकुनीची दीनवाणी ऐकून व आपल्या अंगावर लागलेल्या बाणांच्या जखमांकडे पाहून कर्ण द्रोणाचार्यांना ह्मणाला, ' अहो द्विजश्रेष्ठ, हा आतां आह्मां सर्वांचा फडशा पाडील; कधींही सोडणार नाहीं. तर ह्यानें आह्मां सर्वांना यमलोकीं पाठविलें नाहीं तोंपर्यंतच हा कशानें मरेल, तें सांगा. ' हें ऐकून महाप्रतापी द्रोणाचार्य सर्वांना ह्मणाले, ' हा सिंहाचा छावा सर्वांची कत्तल करीत रणांगणांतून विजेप्रमाणें सारखा चमकत आहे. पण त्याची नजर चुकवून मारतां येईल अशी एक तिळाएवढी तरी जागा त्याच्या शरीरावर असेल असें तुम्हांला वाटतें काय? तो तुह्मां सर्वांचा समाचार घेत आहे. पण त्याचें आपल्या स्वतःच्या शरीरावर चहूंकडे एकसारखें लक्ष आहे. हा चहूंकडे इतक्या जलदीनें फिरत आहे कीं लोकांना ह्याच्या धनुष्याच्या कांबीशिवाय कांहींच दिसत नाहीं. हा आपल्या धनुष्याला बाण जोडतो केव्हां व तो सोडतो केव्हां हेंच मुळीं समजत नाहीं; असें ह्याचें हस्तलाघव आहे. माझ्या अंगावर चहूंकडे बाण मारून जरी ह्यानें मला घायाळ केलें आहे तरी ह्याचें हें युद्धचापल्य पाहून मला फार आनंद होत आहे. हा अगदीं अर्जुनाच्या तोडीचा योद्धा आहे. '

हे इकडे अशा रीतीनें अभिमन्यूच्या वधाबद्दल विचार करीत होते तरी तो पूर्वीप्रमाणेंच निर्भयपणें सपाट्यानें बाण सोडीत होता. त्यांतील कांहीं बाण कर्णाच्या बऱ्याच मर्मस्थळीं बसले. त्यामुळें तो जास्तच घायाळ झाला. त्याला द्रोणाचार्य ह्मणाले, ' अभिमन्यूचें हें कवच अभेद्य आहे. शिवाय हाही मोठा पराक्रमी आहे. याच्या बापाला कवच नीट व्यवस्थेनें कसें घालावें तें मीं शिकाविलें आहे. आणि हा त्याच्याचपासून शिकला आहे. ह्याच्या धनुष्याची दोरी, धनुष्य, बाणांचा भाता, घोडे व सारथी ह्या सर्वांचे तुकडे करून ह्याला रणांगणांतून विमुख केला पाहिजे; व मग याच्या पाठीवर वार केला पाहिजे. असें झालें तरच हा मरेल नाहीं तर हा पट्ठा धनुष्य हातीं घेऊन जोंपर्यंत युद्धाला तोंड देऊन उभा आहे तोंपर्यंत सर्व देवदानवांनीं मिळून जरी ह्याला जिंकण्याचा बेत केला तरी सुद्धां हा कांहीं त्यांना हार जावयाचा नाहीं. हे राधेया, तुला होत असेल तर आधीं ह्याला विरथ करून ह्याचें धनुष्य तोडून टाक. '

हें आचार्यांचें भाषण ऐकून कर्णानें अभिमन्यूचें धनुष्य तोडलें. कृतवर्म्यानें घोडे मारले. कृपाचार्यांनीं सारथी ठार केला. आणि बाकीच्या सर्वांनीं मिळून या विरथ झालेल्या एकव्या लहान बाळावर बाणांचा वर्षाव केला. परंतु या छाव्यानें आपल्या क्षात्र धर्माला स्मरून पाठ न दाखवितां हातांत ढाल तलवार घेऊन सिंहाप्रमाणें रथावरून खालीं उडी ठोकली. तो आपली तलवार चमकावीत खालीं उतरल्याबरोबर त्याची नजर चोहोंकडे सारखी फिरत असल्यामुळें त्याला गराडा देऊन उभे राहिलेल्या प्रत्येक वीराला आतां ह्या रणसिंहाची झडप आपल्यावरच येऊन पडते कीं काय असें वाटून जो तो आपापल्या ठिकाणींच स्तब्ध होऊन उभा राहिला. इतक्यांत द्रोणाचार्यांनीं एक रुंद फाळाचा बाण सोडून मुठीपासून याची तलवार वेगळी केली. कर्णानें ढालीचे तुकडे तुकडे केले. त्यावर जवळ पडलेलें एक रथाचें चाकच घेऊन हा रणपटु रागानें डोळे लाल करून द्रोणाचार्यांवर धांवला

त्यावेळीं हा अभिमन्यु दानवांचा चुराडा उडविणाऱ्या चक्रधर वासुदेवाप्रमाणें त्या रणांगणांत अतिशयच शोभत होता. त्याचे ते रक्तानें भरलेले कपडे, रागानें लाल झालेले डोळे व ती क्रूर मुद्रा पाहून आणि त्याची सिंहासारखी भयंकर गर्जना ऐकून सभोंवारच्या वीरांची अगदीं गाळण उडून गेली. त्यांच्यानें त्याच्याकडे पाहवेना देखील! तरी सर्वांनीं बळेंच धैर्य आणून त्याच्या चक्रावर सारखा बाणांचा मारा सुरू केला. इतक्या महारथ्यांच्या माऱ्यापुढें रथाचें चक्र तें किती वेळ टिकणार ? तें लगेच तुकडे तुकडे होऊन खालीं पडलें. तरी न डगमगतां या रणबहादुरानें हातीं गदा घेऊन अश्वत्थाम्यावर चाल केली. अग्नीप्रमाणें तेजस्वी अशी ही गदा घेऊन अभिमन्यु आपल्यावर धांवून येत आहे हें पाहून अश्वत्थाम्यांनीं तेथून पळच काढला! तेव्हां अभिमन्यूनें जवळच असलेले कालिकेय वगैरे सत्याहत्तर गांधार वीर, दहा रथी, सात केकय, दहा हत्ती, दौःशासनीचा रथ व घोडे या सर्वांचा चुराडा उडविला. तेव्हां दौःशासनि रागानें आपली गदा हातीं घेऊन सौभद्रावर धांवला. तेव्हां हे दोघेही बंधु त्र्यंबक व अंधक यांच्याप्रमाणें एकमेकांच्या नरडीचा घोट घेण्याकरितां आवेशानें एकमेकांवर गदेचा प्रहार करूं लागले. अशा रीतीनें कांहीं वेळ गदायुद्ध केल्यावर शेवटीं दोघांनींही एकमेकांवर जोरानें गदेचा तडाखा दिला. तो दोघांच्या वर्मी लागला. त्यामुळें दोघेही मूर्छित होऊन खालीं पडले, नंतर दौःशासनि थोडा आधीं सावध होऊन आपली गदा सावरून उभा राहिला. लगेच अभिमन्यु सावध होऊन उठूं लागला. पण तो उठतो आहे इतक्यांत दौःशासनीनें आपली गदा त्याच्या डोक्यांत घातली. इतक्या वेळ झालेल्या श्रमानें व या मर्मी बसलेल्या तडाक्यानें पुनः निचेष्ट होऊन अभिमन्यु खालीं पडला.

याप्रमाणें पुष्कळांनीं मिळून ह्या लहान बाळाला एकटा गांठून मारलें. हा पडल्याबरोबर कौरववीरांनीं आनंदानें शिंग फुंकून सिंहगर्जना केली. चंद्राप्रमाणें आल्हादकारक मुख, डोक्यावरील ती झुलपी, आंगावर लागलेले ते सर्व वार वगैरे पाहून पांडवांकडील प्रत्येक योद्धा ढळढळा रडूं लागला. एवढेंच नव्हे तर अंतरिक्षांत भूतगणांनीं सुद्धां दुःखानें आक्रोश केला. द्रोणकर्णांसारख्या सहा महारथ्यांनीं मिळून एकव्या लहान बालकाला गांठून मारलें हा मोठा अधर्म झाला, अशी आकाशवाणी झाली. अभिमन्यु पडल्याबरोबर पांडवांचें सर्व सैन्य भयानें पळूं लागलें. त्यांना पाहून व सौभद्राचें दुःख एकीकडे ठेवून धर्मराज त्यांना ह्मणाला, ‘ वीरहो, ह्या शूर वीरानें युद्धांत पाठ न दाखवितां सर्वांची रग जिरवून धारातीर्थी देह ठेविला आहे तेव्हां हा खास स्वर्गालाच गेला आहे. आतां तुह्मी असें भिऊं नका. थोडा धीर धरा, ह्मणजे आह्मी सर्वजण ह्या शत्रूंचा फडशा पाडूं. ’ धर्मराजानें मोठ्या धैर्यानें उच्चारलेले हे शब्द ऐकून पांडववीरांनीं झालेल्या अन्यायाचा सूड घेण्याकरितां कशींबशीं नेटानें शस्त्रें उगारून कौरवांवर चाल केली. कौरव तर यांच्याशीं टक्कर देण्याला तयारच होते. अशा रीतीनें पुनः ह्या दोन्ही पक्षांचें युद्ध जुंपलें. पण तें फार वेळ टिकलें नाहीं. कारण ह्या सर्व अधर्माला पाहून सूर्यही कंटाळून अस्ताचलीं निघून गेला. हें पाहून दोन्ही पक्षांकडील वीरांनीं आपापलीं शस्त्रें सावरून शिबिरांकडे मोर्चा वळविला.

दोन्ही दळें संध्याकाळ झाल्यामुळें युद्ध आटोपून आपापल्या शिबिराकडे गेलीं तेव्हां त्या रणांगणांत रक्तमांसाचा कर्दम माजून राहिला होता. एकव्या अभिमन्यूनें दहा हजार योद्धे एक महारथी व लक्षावधि हत्ती घोडे मारून त्यांच्या छिन्नविछिन्न शरीरांनीं सर्व रणांगण भूषविलें होतें ! त्या मोडलेल्या रथांच्या तुकड्यांनीं, वीरांच्या हातून गळून पडलेल्या हत्यारांनीं, व धारातीर्थी देह ठेवलेल्या शूरांच्या अस्ताव्यस्त पडलेल्या शरीरांनीं सर्व समरांगण फारच भयाण दिसत होतें. कोल्हीं, कुत्रीं, कावळे, बगळे, लांडगे, राक्षस व पिशाच वगैरे हिंस्र प्राणी आनंदानें ओरडत व मरून पडलेल्या योद्ध्यांचीं शरीरें फाडून रक्त, मांस व मज्जा हीं खाऊन मिटक्या मारीत मोठ्या मजेनें नाचत सर्व समरभूमीवर हिंडत होतीं. लाखों प्राणी मरून पडल्यामुळें त्यांच्या शरीरांतून वहाणाऱ्या रक्ताची तर एक भयंकर नदीच झाली होती.

अशा रीतीनें शत्रूंची भयंकर कत्तल करून व

द्रोणकर्णासारख्या अतिरथ्यांना त्राही त्राही करून क्षत्रियधर्माला अगदीं योग्य अशा रीतीनें या शूर अभिमन्यूनें शत्रूंशीं टक्कर देत धारातीर्थी आपला देह ठेविला होता. याची ही सर्व कृति लक्षांत आणून राजा युधिष्ठिर फारच शोक करूं लागला. तो ह्मणाला, 'द्रोणांसारख्या महावीरांना 'हे माय धरणी ठाव' करून सोडणारा अभिमन्यु यःकश्चित दौःशासनीकडून मारला जावाना! आतां मी आपलें हें तोंड सुभद्रेला कसें दाखवूं? कृष्णाला तरी आतां काय सांगूं? अर्जुन मला काय ह्मणेल? लोभांत गुंतून गेल्यामुळें पुढें ओढवणाऱ्या संकटाकडे माझें लक्ष गेलें नाहीं. गोड गोड खावयाला देऊन, उत्तम उत्तम वस्त्रें देऊन व मूल्यवान दागिने घालून ज्याचें आह्मीं लालनपालन करावें त्या बाळाला म्यां मूर्खानें युद्धांत पाठविला! जाणून बुजून तें लहान बाळच. मग तें ह्या दुःखमय युद्धांतून सुखरूपपणें पार कसचें पडणार? त्याच्या पाठोपाठच आमचाही देह पडला असता तर बरें झालें असतें! हा लहान असून, निर्लोभी, बुद्धिमान, विनयशील, क्षमावान, बलवान, धीर व पराक्रमी असा होता. मोठमोठे ज्ञाते पंडितसुद्धां याच्या सदाचरणाची वाहवा करतात. ज्यानें निवातकवच व कालकेय ह्यांना ठार केलें; तसेंच हिरण्यपुरांत राहणाऱ्या इंद्राच्या शत्रूला तर ज्यानें एका निमिषार्धांत यमसदनीं पाठविलें; तो अर्जुन आतां ह्या अभिमन्यूच्या वधानें चवताळून जाऊन सर्व कौरवांची राखरांगोळी करून सोडील. बाळ अभिमन्यु रणांत कामास आला हें पाहून तर मला हें राज्य नको, ऐश्वर्य नको, स्वर्ग नको, कांहींच नको असें झालें आहे.'

धर्मराज अशा रीतीनें शोक करीत होता इतक्यांत व्यासमुनि तेथें आले. त्यांना पाहून उठून धर्मराजानें अर्घ्यपाद्यादिकेंकरून त्यांची यथोचित पूजा केली. नंतर झालेली सर्व हकीकत सांगून धर्मराज पुनः शोक करूं लागला. तेव्हां व्यासांनीं त्याचा शोक दूर करण्याकरितां उपदेश करून मृत्यूची हकीकत सांगितली. ते ह्मणाले-'अकम्पन नामक राजाचा मुलगा हरि हा शत्रूंशीं झुंजतांना मेला; तेव्हां त्या अकंपनाचें सांत्वन करण्याकरितां नारदांनीं त्याला ही मृत्यूची हकीकत सांगितली. ती येणेंप्रमाणें.—

पूर्वी प्रजापतीनें सर्व प्रजा निर्माण केल्या. पुढें त्यांच्या ठिकाणींच आपोआप वृद्धि पावण्याची शक्ति ठेवल्यामुळें त्या उत्तरोत्तर झपाट्यानें वाढूं लागल्या. तेव्हां त्यांचा भार सहन न होऊन पृथ्वी दीन होऊन प्रजापति ब्रह्मचाला शरण आली. तेव्हां प्रजापतींनीं तिचा तो भार कमी कसा करावा ह्याबद्दल पुष्कळ विचार केला. परंतु त्यांना कांहींच उपाय सुचेना. त्यामुळें ते खूप संतापले. तेव्हां त्यांच्या रागापासून अग्नि उत्पन्न झाला; व तो सर्व चराचर सृष्टि जाळीत सुटला. तेव्हां रुद्राला त्या जळणाऱ्या सृष्टीची दया येऊन त्यानें प्रजापतींची राग आवरण्याबद्दल विनवणी केली. रुद्राच्या विनंतीवरून त्यानें आपला राग आवरला खरा; पण त्याच्या त्या पूर्वीच्या अग्नीपासूनच एक अति सुंदर अशी देवी उत्पन्न झाली. तिचेंच मृत्यु असें नांव ठेवून प्रजापतींनीं तिला सर्व प्राणिमात्रांचा संहार करण्याविषयीं सांगितलें. परंतु ती पापभीरु असल्यामुळें प्रजापतींची ती क्रूर आज्ञा ऐकून तिला रडें कोसळलें. ती रडूं लागली तेव्हां तिच्या डोळ्यांतून अश्रु पडूं लागले ते प्रजापतींनीं आपल्या ओंजळींत धरले. पुढें तिनें सर्व प्राणीमात्रांची दया येऊन त्यांच्या कल्याणाकरितां पुष्कळ वर्षें घोर तपश्चर्या केली. तिची ती सात्विक वृत्ति, कडकडीत आचरण, व उग्र तप हीं पाहून ब्रह्मदेव संतुष्ट झाले. व तिला विचारूं लागले कीं, तूं इतकी घोर तपश्चर्या कां करतेस? तेव्हां ती ह्मणाली,'सर्व प्राणीमात्रांना त्यांचे त्यांचे प्राण व आप्तजन हे अत्यंत प्रिय आहेत, तेव्हां त्यांचे प्राण घेणें हा अधर्म होईल.' हें ऐकून प्रजापती ह्मणाले, 'माझ्या आज्ञेनें तुला अधर्म लागणार नाहीं. शिवाय यमादि देव तुझ्या मदतीला येतील. व मीं पूर्वी धरलेले तुझ्या डोळ्यांतील अश्रुबिंदू हे स्वतः नानाप्रकारचे रोग होऊन प्राणीमात्रांचे प्राण हरण करतील. तेव्हां आतां तुला माझ्या आज्ञेनें प्राणीमात्रांचा संहार करण्याला कांहीं हरकत नाहीं.'

हें ऐकून मृत्यु देवता ह्मणाली, 'आपली आज्ञा मला शिरसा वंद्य आहे. पण मी सांगतें एवढें मात्र झालें पाहिजे. लोभ, राग, मत्सर, द्वेष, मोह व निर्लज्जता ह्या सर्वांनीं प्राणीमात्रांच्या शरीरांत शिरून त्यांचा फडशा पाडला पाहिजे.' हें ऐकून 'बरें

आहे ' ह्मणून प्रजापतींनीं तिला तसें होईल ह्मणून वर दिला.

याप्रमाणें मृत्यु हा ईश्वरनिर्मितच आहे. हा कोणालाही सुटला नाहीं. तेव्हां त्याबद्दल शोक करूं नको. शिवाय हे राजा तुझा मुलगा धारातीर्थी मेला आहे. तेव्हां तो स्वर्गालाच गेला आहे. तर त्याबद्दल शोक करण्याचें मुळींच कारण नाहीं.

ह्यावर पुनः धर्मराज ह्मणाला, ' गुरु महाराज आपल्या ह्या उपदेशामृतानें माझें बरेंच सांत्वन झालें आहे. तरी पण मला आणखी पूर्वीच्या पुण्यशाली राजांच्या कथा ऐकाव्याशा वाटतात. तर त्या आपण कृपा करून सांगा.

हें ऐकून व्यासांनीं गोष्टी सांगण्याला सुरवात केली. ते ह्मणाले, ' पूर्वी शैब्य नांवाचा राजा होता. व त्याला सृंजय नांवाचा मुलगा होता. पर्वत व नारद या नांवाचे दोन ऋषिपुत्र या सृंजयाचे मित्र होते. हे दोघेही एकदां सहज सृंजयाकडे आले. एकदां हे तिघेही मित्र सहज बोलत बसले असतांना सृंजयाची मुलगी कांहीं कारणानें आपल्या बापाकडे आली. ती फार देखणी होती. नारदानें तिच्याबद्दल राजापाशीं मागणी केली. राजानें ती कबूल केली; परंतु पर्वताला तें खपलें नाहीं. कारण त्याचेंही मन तिच्यावर जडलें होतें. ह्मणून तो नारदाला ह्मणाला माझें पूर्वीच हिच्यावर मन बसलें आहे. त्यामुळें हिला मीं मनानें वरली आहे. हें न जाणतां तूं तिच्याबद्दल मागणी केलीस हा अधर्म झाला. आणि ह्या अधर्मासाठीं तूं स्वर्गास न जातां पृथ्वीवरच भटकत रहाशील. '

हें ऐकून नारद ह्मणाले, ' वधूवरांची इच्छा असून त्या दोघांचेंही त्याबद्दल बोलणें झालें असलें पाहिजे. शिवाय ह्याला वधूच्या पालकाची सम्मति मिळून त्या दोघांचाही यथाप्रकार पाणिग्रहणविधि झाला पाहिजे. मगच त्या दोघांचा योग्यसंबंध झाला असें होतें. सप्तपदी झाल्याशिवाय विवाहच पूर्ण होत नाहीं. तुझें तर इच्यावर फक्त मनच जडलें होतें. बाकीच्या विवाहविधींपैकीं कांहींच झालें नाहीं. मग तुझा तिच्यावर हक्क कोठून येणार? आणि तुझा कांहींच हक्क नसतांना तूं मला विनाकारण शाप दिलास. ह्मणून तुलाहि माझ्याशिवाय स्वर्गति मिळावयाची नाहीं.

पुढें राजा सृंजय हा पुत्रप्राप्तीकरितां तशीच सर्व ब्राह्मणांची एकनिष्ठपणें सेवा करीत राहिला. त्याला त्याच्या मागण्यावरून नारदांनीं, तुला यशस्वी कीर्तिमान, तेजस्वी, पराक्रमी व सर्व शुभ गुणांनीं युक्त असा मुलगा होईल. व शिवाय त्याचे मल, मूत्र, घाम व श्लेष्मादि विकारांनीं शरीराच्या बाहेर पडणारीं द्रव्यें हीं सर्व सोन्याचीं होतील ' असा वर दिला. त्याप्रमाणें त्याला मुलगाही झाला. राजानें त्या मुलाचें नांव सुवर्णष्ठीवी असें ठेविलें. त्या मुलाच्या अंगांतून मलमूत्रादि जीं जीं द्रव्यें बाहेर येत तीं सर्व सोन्याचीं असल्यामुळें राजाची संपत्ति फारच वाढली. तेव्हां त्यानें घर, द्वार, शयनें, भांडीं, यज्ञपात्रें वगैरे सर्व कांहीं सोन्याचींच करून सोडलीं. पुढें चोरांना ही हकीकत कळली. तेव्हां त्यांच्या तोंडाला पाणी सुटून त्यांनीं त्या मुलाला उपटून नेऊन ठार केला. पण त्या वेळीं त्यांना द्रव्यप्राप्ति मुळींच झाली नाहीं. त्या मुलाचा प्राण गेला त्याच्याबरोबरच सुवर्ण उत्पन्न होण्याचेंही बंद झालें. त्यांनीं केलेला बेत फसला ह्मणून ते चोर एकमेकांवरच रागावूं लागले. शेवटीं त्या रागाच्या सपाट्यांत त्या चोरांनीं एकमेकांला ठार केलें. याप्रमाणें या चोरांचा व त्या सुवर्णष्ठीवीचा अंत झाला.

इकडे राजा सृंजय हा आपल्या मुलाच्या मरणाबद्दल फार शोक करूं लागला. तेव्हां मुनिश्रेष्ठ नारदांनीं त्याचें सांत्वन करण्याकरितां ह्मणून त्याला पूर्वीच्या मोठमोठ्या राजांच्या पुष्कळ गोष्टी सांगितल्या. ते ह्मणाले,

' आविक्षित नांवाच्या राजाला मरुत्त नांवाचा मुलगा होता. ह्या मरुत्ताच्या भक्तीला संतुष्ट होऊन शंकरांनीं त्याला पुष्कळ धन दिलें. त्या धनाचा त्यानें यज्ञाकडे उपयोग केला. त्याच्या यज्ञांत सर्व विधि अगदीं योग्य प्रकारें होत ह्मणून इंद्रादि सर्व देव त्याच्या प्रत्येक यज्ञाचे वेळीं आपापला हविर्भाग घेण्याविषयीं स्वतः येत. दक्षिणा व भोजनांतील सर्व पदार्थ यथेच्छ मिळाल्यामुळें सर्व ब्राह्मणमंडळीही त्याच्यावर संतुष्ट असत. अशाप्रकारें अगदीं उत्तम तऱ्हेनें सर्व यज्ञ पार पडून मरुत्त राजा

शेवटीं स्वर्गाला गेला. अशा तऱ्हेचा लक्षावधि यज्ञ करणारा मरुत्त सुद्धां जर इहलोक सोडून गेला, तर मग ज्यानें एकही यज्ञ केला नाहीं असा तुझा सुवर्णष्ठीव मेला म्हणून तुला दुःख काय म्हणून व्हावें? मरण हें सर्वांना लागलेंच आहे. त्याचप्रमाणें राजा सुहोत्रानें अत्यंत धर्मानें राज्य केलें; हजार अश्वमेध, शंभर राजसूय व आणखी कित्येक व्रतें केलीं. फार काय, त्याच्या राज्यांत सोन्याचा पाऊस पडत असे. पण इतकें करणाऱ्या ह्या सुहोत्रालाही शेवटीं मरण हें आलेंच. त्याचप्रमाणें दाशरथि राम, परशुराम, अंबरीष व भरत वगैरे मोठमोठे पुण्यवान राजे मृत्युपंथाला गेले. हें सर्व लक्षांत आणून हे राजा, तूं आपला शोक आवर.' हें ऐकून राजा सृंजय ह्मणाला, 'हे मुनिश्रेष्ठा तुह्मीं सांगितलेल्या ह्या पुण्यपुरुषांच्या कथांनीं मी आपलें सर्व दुःख विसरून गेलों. हें राजाचें भाषण ऐकून नारदांना फार आनंद झाला. ह्मणून त्यांनीं त्याला त्याचा मेलेला मुलगा पुनः जिवंत करून दिला. पुढें ह्या पितापुत्रांनीं यज्ञयागादि बरींच पुण्यकर्मे करून स्वर्गप्राप्ति करून घेतली.

तेव्हां हे धर्मा, तुझा अभिमन्यु तर स्वर्गालाच गेला आहे. कारण तो शत्रूशीं लढतां लढतां धारातीर्थी मरण पावला आहे. जिवंत मनुष्याबद्दल कदाचित् शोक केल्यास चालेल. पण स्वर्गाला गेलेल्याबद्दल मुळींच शोक करूं नये. **मेलेल्या माणसांबद्दल जसजसा शोक करावा तसतसा तो अधिकाधिक दुःखालाच कारण होतो.** ह्मणून हे सुजाणा, शोक सोडून दे व धैर्य धरून पुनः शत्रूशीं युद्ध कर." अशा रीतीनें धर्माचें पुष्कळ तऱ्हेनें सांत्वन करून व्यासमुनि अंतर्धान पावले.

---

## २८ अर्जुनाची प्रतिज्ञा. (७.७२-८१)

इकडे संध्याकाळपर्यंत सर्व संशप्तकांना मारून विजयानें अर्जुन आपल्या शिबिराकडे परतला; पण त्याचें मन अगदीं उदास झालें होतें. ह्मणून तो श्रीकृष्णाला ह्मणाला, 'हे यदुश्रेष्ठा, मला आज जय प्राप्त झाला असूनही, माझें मन अगदीं उदास आहे, दुःखानें गळा दाटून आल्यासारखा झाला आहे, कंबर खचून गेली आहे, व जिकडे तिकडे अशुभ चिन्हें होऊं लागलीं आहेत, हें काय आहे? आज माझे सर्व भाऊ खुशाल आहेत ना? हें ऐकून श्रीकृष्णानें सांगितलें—'तुझे सर्व भाऊ, आप्त व स्नेही ह्या सर्वांचें कुशल आहे. उगीच मनाला वाईट वाटून घेऊं नको.' असें श्रीकृष्णानें सांगितल्यावर अर्जुनाला थोडेंसें बरें वाटलें. नंतर ते दोघेही वीर त्या दिवशीं रणांत घडलेल्या गोष्टींविषयीं बोलत बोलत आपल्या शिबिराकडे आले. पण तेथें येऊन पाहतात तों त्यांना सर्वच चमत्कारिक दिसलें. जयसूचक रणवाद्यें वाजावयाचीं तीं वाजत नव्हतीं. बाहुटे फडकत असावयाचे ते खालीं पडले होते. बंदीजनांचा स्तुतिपाठ ऐकूं येत नव्हता. सैन्यांतील शिपाई आज यांना पाहिल्याबरोबर मुजरे न करतां दुःखानें खालीं मान घालून बाजूबाजूला होत होते. ही सर्व विचित्र स्थिति पाहून अर्जुनाचें धाबें गडाडलें. पण तसाच धीर धरून तो थोडासा पुढें आला. तेव्हां त्याला त्याचे सर्व भाऊ व स्नेही दुःखाकुल होऊन खालीं माना घालून बसले आहेत असें दिसलें. अर्जुन युद्धांतून आल्याबरोबर बाळ अभिमन्यु दररोज आनंदानें नाचत सामोरा यावयाचा पण तोही आज आला नाहीं. हें पाहून तर त्याची छातीच फुटली. तो आपल्या भावांना ह्मणाला, 'कां, आज तुह्मी असें खालीं माना घालून कां बसला? कां बोलाना कां? बाळ अभिमन्यु कोठें दिसत नाहीं? द्रोणांनीं आज चक्रव्यूहाची रचना केली होती असें मीं ऐकिलें आहे.. त्या चक्रव्यूहाचा भेद आपल्यापैकीं माझ्या सौभद्रावांचून कोणालाही करतां यावयाचा नाहीं. मीं त्याला व्यूहांत शिरल्यानंतर पुनः परत कसें यावें हें अद्याप शिकविलें नाहीं; तेव्हां तुह्मां कोणीं त्याला व्यूह फोडावयाला पाठविलें नाहीं-ना? कां तुह्मीं त्याला व्यूह भेदावयाला पाठविला व तो शत्रूंची कत्तल करीत व्यूहांत शिरल्यावर कोणीं दुष्टानें त्याला मारलें? काय,' झालें तरी काय? सांगा लौकर. अहो, तें स्मितभाषी, वडिलांच्या आज्ञेंत नेहमीं तत्पर, शूर, विनयशील, सर्वांगसुंदर, सर्वांना प्रिय असें माझें लाडकें बाळ कोठें दिसत नाहीं? तें माझ्या दृष्टीस पडणार नाहीं. तर माझ्यानें कांहीं प्राण धरवणार नाहीं. अहो वयानें लहान असून ज्याची महारथ्यांत गणना होत होती व जो माझ्या दीडपटीनें शूर होता

तो माझा अभिमन्यू कोठें आहे? अहो, त्याचा तो कोकिळासारखा सुस्वर आवाज आज मुळींच ऐकूं येत नाहीं! व त्याचें तें हास्यवदनही कोठें दिसत नाहीं. त्यामुळें माझ्या जिवाला मुळींच चैन नाहीं. तुह्मी कोणीं कांहींच बोलत नाहीं. तेव्हां हा वीर खरोखर धारातीर्थींच पडला असला पाहिजे. ज्या वीराला पाहून सर्व शत्रू थरथरां कांपत असत त्याच अभिमन्यूच्या सभोंवार आज कोल्हीं कुत्रीं निर्भयपणें हिंडताहेत ना? जें बाळ नेहमीं मऊ बिछान्यावर निजावयाचें तें आज रणांगणांत धूळ खात पडलें असेल! हायरे! बाळा! शत्रूंच्या कचाट्यांत सांपडला असतांना तुला माझी आठवण झाली असेल? पण नसेल! तुला शूराला दुसऱ्याच्या साहाय्याची काय अपेक्षा? तुला धारातीर्थीं पडलेला पाहून अर्जुन हें माझें हृदय फाटत नाहीं. तेव्हां हें आहे तरी कशाचें? वज्राचें तर नसेल ना? आतां सुभद्रा मला काय ह्मणेल? द्रौपदीला काय सांगूं. ही दुःखाची वार्ता ऐकून शोकानें आक्रोश करणाऱ्या त्या तुझ्या प्रिय पत्नीकडे माझ्यानें पाहवणार सुद्धां नाहीं! कौरवांनीं केलेला सिंहनाद तर मीं मघांशींच ऐकला. हे अधर्म्यांनों, उगीच कशाला गर्जतां? पांडवांचें बल काय आहे तें आतां तुह्मांला दिसेल. केशवार्जुनांचें अप्रिय करून तुह्मी कोठें जाणार? तुमच्या पापाचरणाचें फळ तुह्मांला लौकरच मिळेल. कृष्णा, तूं तेव्हांच हें मला कां नाहीं सांगितलेंस. मीं त्याच क्षणीं सर्व कौरवांचा फडशा पाडला असता.'

अशा रीतीनें पुत्रवियोगानें शोकाकुल झालेल्या अर्जुनाला श्रीकृष्ण ह्मणाला, 'नको, असा शोक करूं नकोस. सर्वांची हीच वाट आहे. त्यांतून क्षत्रियांच्या-शौर्यानें शत्रूंशीं झुंजणारांच्या-तर हें नशीबींच लागलेलें आहे. शिवाय युद्धांत पाठ न दाखवितां धारातीर्थीं देह ठेवणें हें क्षत्रियांना भूषणास्पदच आहे. अभिमन्यूला तर क्षत्रियकुलाला शोभेल असेंच मरण आलेलें आहे. तो निःसंशय स्वर्गालाच गेला आहे. ह्मणून हे पुरुषश्रेष्ठा, तूं त्याबद्दल शोक करूं नकोस. हे तुझे भाऊ, हे स्नेही, पहा कसे दीन होऊन बसले आहेत ते. तुला असा शोक करतांना पाहून तर त्यांना अधिकच दुःख होत आहे. तूं शहाणा आहेस. तुला सर्व कळतेंच आहे. तेव्हां हे अर्जुना, तूं स्वतःचा शोक आवरून ह्या तुझ्या आर्तांचें सांत्वन कर.'

याप्रमाणें श्रीकृष्णानें सांत्वन केल्यावर अर्जुन पुनः आपल्या भावांना ह्मणाला, 'अभिमन्यूला कोणीं मारलें व कसें मारलें हें सर्व मला सांगा. तो शूर, हातांत शस्त्रें घेऊन युद्धाला सिद्ध होऊन उभा राहिला असतांना प्रत्यक्ष इंद्र जरी आला असतां तरीं सुद्धां न डगमगणारा होता. मग तो ह्या यःकश्चित कौरवांकडून कसा मारला गेला? शिवाय तुह्मी सर्व जणही हातांत धनुष्यें घेऊन तेथेंच उभे होता. मग तुमच्या देखत तुह्मां सर्वांना न जुमानतां त्यांनीं माझ्या बाळाला कसें मारलें? तुमच्याच आंगांत पराक्रम नाहीं! माझ्या अभिमन्यूचें रक्षण करण्याइतकें तुमच्या आंगांत सामर्थ्य नाहीं असें मला पूर्वींच कळलें असतें तर मींच त्याचें रक्षण केलें असतें. उगीच तुह्मांला तरी दोष देण्यांत काय अर्थ आहे? तुमच्यासारख्या नेभळ्यांच्या स्वाधीन मीं आपला मुलगा केला, हा माझाच मूर्खपणा आहे! तुह्मीं आपल्या आंगावर हीं जीं चिलखतें घातलीं आहेत व हीं जीं शस्त्रें तुह्मीं आपल्या हातांत घेतलीं आहेत हीं सर्व केवळ शोभेसाठीं व लोकांना दाखविण्यासाठीं आहेत! ह्याचा खरोखर कांहीं उपयोग नाहीं. तुमच्या हातून माझ्या एका मुलाचें सुद्धां रक्षण करवलें नाहीं!' असें ह्मणून अर्जुन रागानें मुसमुसत व दुःखानें डोळ्यांतून अश्रु गाळीत कांहीं वेळ स्तब्ध राहिला. त्या वेळीं त्याच्याकडे नुस्तें पहाणेंही कोणाच्यानें होईना.

नंतर राजा युधिष्ठिर त्याला ह्मणाला, 'हे वीरश्रेष्ठा, तूं संशप्तकांना मारण्याकरितां गेल्यानंतर द्रोणाचार्यांनीं आपल्या सैन्याची चक्रव्यूहाच्या अकारानें उत्तम तऱ्हेची रचना करून मला धरण्याचा बेत केला. तेव्हां आह्मीं आमची पराकाष्ठा करून पाहिली; पण आमचें द्रोणाचार्यांच्या असह्य माऱ्यापुढें कांहींच चालेना. हें पाहून आम्हीं अभिमन्यूला आचार्यांच्या व्यूहाचा भेद करून आंत शिरण्याला सांगितलें. त्याप्रमाणें तो वीरपुरुष शौर्यानें शत्रूंची कत्तल करीत आंत शिरला त्याच्या पाठोपाठच आम्हीही त्याला मदत करण्याकरितां शत्रूंना

कापीत कापीत आंत शिरलों. पण लगेच जयद्रथानें येऊन आम्हां सर्वांना अडविलें. त्याला रुद्राचा वर मिळाला होता म्हणून त्याच्यापुढें आमचें कांहीं चालेना. इकडे अभिमन्यु पुढें एकटाच आलेला पाहून द्रोण, कर्ण, कृप, अश्वत्थामा, कोसलाधिपति व कृतवर्मा ह्या सहा जणांनीं मिळून त्याला विरथ केला. नंतर दौःशासनीनें याच्या डोकींत गदा घातली. झालें! आमचें शोककारण संपलें! नंतर अभिमन्यु हें दुःखमय जग टाकून स्वर्गाला गेला! त्यानें व्यूहांत शिरल्यापासून आठ हजार रथी, नऊशें गजयोधी दोन हजार राजपुत्र व बृहद्बल राजा इतक्यांना यमसदनीं पाठविलें; शिवाय त्यानें किरकोळ वीर किती मारले याचा तर पत्ताच नाहीं.'

असें धर्मराज बोलतो आहे इतक्यांत अर्जुन मूर्च्छा येऊन खालीं पडला. तेव्हां सर्वांनीं त्याला धरला. त्यावेळीं सर्वजण दुःखित अंतःकरणानें म्लानवदन करून एकमेकांकडे पहात तटस्थ उभे राहिले. नंतर कांहीं वेळानें अर्जुन शुद्धीवर येऊन रागानें मुसमुसत व हात चोळीत आणि दुःखानें डोळ्यांतून अश्रु ढाळीत सर्वांना प्रतिज्ञापूर्वक म्हणाला, 'मी तुम्हांला सत्य सत्य सांगतों कीं, माझ्या अभिमन्यूच्या वधाला कारणीभूत झालेल्या जयद्रथाला मी उद्यां ठार करणार. त्यानें आपला जीव वांचविण्याकरितां कौरवांचा पक्ष सोडून आपल्या राजधानीकडे परत जावें तरी एक किंवा श्रीकृष्ण, राजा युधिष्ठिर व मी ह्यांपैकीं कोणाला तरी एकाला त्यानें शरण यावें तरी एक. ह्यांपैकीं जर कोणतीच गोष्ट त्यानें केली नाहीं तर त्या बालहत्या करणाराला उद्यां यमलोक पहावा लागेल. त्याचें रक्षण करण्याकरितां जे म्हणून मजपुढें युद्धाला उभे राहतील, मग ते द्रोणाचार्य असोत किंवा कृपाचार्य असोत त्या सर्वांना मीं आपल्या बाणांनीं झांकून टाकीन. हे शूरहो, जर मी उद्यां त्या पाप्याला मारणार नाहीं तर मला स्वर्गप्राप्तीच होणार नाहीं. एवढेंच नव्हे पण मातृहत्या करणारे, पितृहत्या करणारे, गुरुपत्नीशीं रत होणारे, विश्वासघात करणारे व दारू पिणारे इत्यादिकांना ज्या रौरव नरकाची प्राप्ति होते त्याच दुस्तर नरकाची प्राप्ति मी बोलल्याप्रमाणें जयद्रथाला न मारीन तर मलाही होईल. आणखीही मी तुम्हांला सांगतों कीं, एवढी रात्र उलटल्यावर उद्यां संध्याकाळच्या आंत मी त्याला मारीन. आणि जर कां मी त्याला मारण्याच्यापूर्वी सूर्यास्त झाला तर तेथल्या तेथेंच अग्नि पेटवून त्यामध्यें मी आपली स्वतःची आहुति देईन. देव, दानव, मनुष्यें, पक्षी पातालांतील सर्प, राक्षस, सर्व ऋषी, किंबहुना हें सर्व चराचर विश्व,ह्या सर्वांनीं एकवटून जरी माझ्या शत्रूचें रक्षण करण्याचा प्रयत्न केला तरी सुद्धां त्या सर्वांना एकीकडे करून मी आपल्या वैऱ्याचा फडशा पाडीन. आतां तो स्वर्गलोकीं जावो, किंवा पातालांत दडून बसो, कोठेंही गेला तरी त्याचें मी आपल्या बाणानें डोकें उडवीनच.

अशा रीतीनें पुत्रशोकानें खवळून जाऊन अर्जुनानें घोर प्रतिज्ञा करून आपलें गांडीव धनुष्य जोरानें खालीं आपटलें व मोठ्यानें आपला देवदत्त वाजविला. लगेच श्रीकृष्णानेंही आपला पांचजन्य फुंकला व बाकीच्या योद्ध्यांनीं भयंकर सिंहनाद केला. ह्या आवाजानें सर्व पृथ्वी गर्जून गेली.

इतक्यांत हेरांनीं येऊन जयद्रथाला ही बातमी दिली, व पांडवांकडील गर्जनाही त्याला ऐकूं आली. ही बातमी कानीं पडण्याबरोबर त्याचे हातपायच गळले! कसाबसा तो अंथरुणावरून उठला, व आतां काय करावें ह्याबद्दल विचार करूं लागला, पण त्याला काय करावें हेंच सुचेना. नंतर तो तसाच सर्व राजे मिळून कांहीं मसलत करीत बसले होते तिकडे गेला, व तेथें जाऊन मोठ्यानें रडूं लागला. अर्जुनाची प्रतिज्ञा ऐकून त्याच्या अंगांत धडकीच बसली होती. त्यामुळें कांपत कांपत तो तेथील राजांना म्हणाला, 'पांडूच्या कुंतीला इंद्राकडून झालेला हा दुष्ट अर्जुन मला उद्यां ठार करणार आहे, तेव्हां मी आपला निघून जातों. नाहीं तर हे क्षत्रियश्रेष्ठांनो, तुम्ही मला अभय देऊन माझें रक्षण करा. द्रोणाचार्य, कृपाचार्य, दुर्योधन व कर्ण वगैरे वीरपुरुष प्रत्यक्ष काळालाही मागें हटविणारे असे आहेत. मग ह्या एका फाल्गुनाची ती कथा काय? अहो, पांडवांनीं आनंदानें केलेली गर्जना ऐकून माझ्या अंगांत कांपरें भरलें आहे व मरणोन्मुख झालेल्या मनुष्याप्रमाणें माझीं सर्व गात्रें निर्बल होत चाललीं आहेत. पांडवांची ती प्रतिज्ञा खोटी करणें देवांनासुद्धां अशक्य आहे. मग तुमच्या हा-

तून तें कसें होणार ? ह्मणून हे वीर हो, मला आतां निरोप द्या. देव तुमचें कल्याण करो. मी आपला कोठें तरी जाऊन दडून बसतों. पांडवांच्या नजरेस पडणार नाहीं अशी माझ्याकडून होईल तेवढी मी खबरदारी घेतों. मग पुढें काय होणार असेल तें होईल.' अशा रीतीनें भयानें व्याकुळ होऊन दुःख करणाऱ्या जयद्रथाला कार्यसाधु दुर्योधन ह्मणाला, 'हे वीरश्रेष्ठा, घाबरूं नकोस. ह्या सर्व क्षत्रियवीरांच्यामध्यें उभा राहणाऱ्याला नुस्तें युद्धाला पाचारण करण्याची कोणाची छाती होणार आहे?' मी, कर्ण, द्रोणाचार्य, अश्वत्थामा, शल्य व भूरिश्रवा वगैरे आह्मी सर्व मंडळी आपापलीं पथकें घेऊन तुझ्या रक्षणाकरितां तुझ्या पाठोपाठ हजर असतों. तूं त्याबद्दल मुळींच काळजी करूं नकोस. आणि हे वीरा, तूंही स्वतः चांगलाच शूर आहेस. मग ह्या पांडवांची ती तुला एवढी भीति काय ह्मणून वाटावी? भीति अगदीं सोडून दे. माझें हें अकरा अक्षौहिणी सैन्य आज तुझ्याकरितां लढत राहील.'

अशा रीतीनें समजूत घालून व धीर देऊन दुर्योधनानें त्याला द्रोणाचार्यांकडे नेलें. तेथें गेल्यावर आचार्यांच्या पायां पडून जयद्रथ विनयपूर्वक त्यांना ह्मणाला, 'अहो भगवन्, अर्जुनाला माझ्यापेक्षां विशेष चांगलें काय येतें ? नेम चांगला मारतां येतो कां तो खूप पल्यावरूनही चांगला धरतां येतो, कां त्याची हातचलाखी चांगली आहे, त्याला माझ्यापेक्षां चांगलें काय येतें तें सांगा. मला त्याच्यांत व माझ्यांत काय फरक आहे तें पहावयाचें आहे.' हें ऐकून आचार्य ह्मणाले--'शिक्षणासंबंधानें ह्मणशील तर दोघांचेंही शिक्षण सारखेंच आहे. फक्त त्यानें तुझ्यापेक्षां थोडा अभ्यास जास्त केला आहे. शिवाय त्याच्यावर आजपर्यंत संकटेंही बरींच आलीं आहेत त्यामुळें तो थोडासा तुझ्यापेक्षां अधिक धीट आहे. एवढेंच काय तें. तूं अर्जुनाला मुळींच भिऊं नकोस, मी तुझें रक्षण करतों. मीं ज्याला आपल्या पाठीशीं घेतलें आहे त्याला मारणें देवादिकांनासुद्धां अशक्य आहे. मी आज अशा प्रकारचा व्यूह रचतों कीं, त्यांतून अर्जुनाला मुळींच पार होतां येणार नाहीं. ह्मणून हे महाबाहो, भीति सोडून दे, धीर धर व आपल्या क्षात्र धर्माला स्मरून नेटानें युद्धाला उभा राहून वडिलांची कीर्ति संभाळ. तूं वेदांचें अध्ययन करून यथाशास्त्र यज्ञयागादि कर्मे केलीं आहेस; तेव्हां तुला कांहीं आतां यमाची भीति नाहीं. धीर धरून युद्धाला उभा रहाशील तर दुर्लभ अशा स्वर्गाची तुला सहज प्राप्ति होईल. कौरव काय, पांडव काय, मी काय, माझा मुलगा काय, किंवा कोण काय, सर्वजण कालपाशानें जखडले आहेत. प्रत्येकजण आपापल्या कर्माप्रमाणें परलोकांची वाट धरणारच आहे. मोठमोठ्या घोर तपश्चर्या करून तपस्वी लोक ज्या लोकाला जातात त्या लोकची प्राप्ति शूर क्षत्रियाला, त्यानें नुस्तें आपल्या धर्माचें यथाशास्त्र पालन केलें कीं होते.' याप्रमाणें आचार्यांनीं जयद्रथाला धीर देऊन सांगितल्यावर त्याला थोडें बरें वाटलें. नंतर त्यानें अर्जुनाबरोबर धैर्यानें लढावयाचेंच असा निश्चय केला. हें पाहून सर्व कौरवांनीं आनंदानें जयघोष केला.

इकडे अर्जुनानें केलेली ही दुर्धर प्रतिज्ञा पाहून व कौरवांकडील जयघोष ऐकून श्रीकृष्ण अर्जुनाला ह्मणाला, 'तूं आपल्या भावांना न विचारतां व माझाही सल्ला न घेतां 'उद्यां जयद्रथाला मारीन' अशी एकदम प्रतिज्ञा केलीस, हें मोठें साहस केलेंस. मीं कौरवांकडे आपले हेर पाठविले होते. त्यांनीं आतांच येऊन सांगितलें कीं, 'तूं जयद्रथाच्या वधाबद्दल जेव्हां प्रतिज्ञा केलीस तेव्हां आपल्याकडील सर्व योद्ध्यांनीं सिंहनाद केला व रणवाद्येंही वाजविलीं ह्या सर्वांचा गंभीर ध्वनि तिकडे कौरवांच्या गोटांत ऐकावयाला गेला. त्यासरशीं ते गडबडून उठले व आपल्या सैन्याची व्यवस्था लावूं लागले. कारण अभिमन्यूच्या वधानें रागावून जाऊन धनंजय आतांच आपल्यावर चाल करून येत आहे असें त्यांना वाटलें. अशा रीतीनें सर्व सैन्याची व्यवस्था लावीत व आनंदानें जयघोष करीत सर्व राजे आपापल्या पथकांनिशीं युद्धाच्या तयारीनें उभे होते इतक्यांत तूं जयद्रथाच्या वधाबद्दल प्रतिज्ञा केलीस हें त्यांच्या कानावर गेलें. त्याबरोबर सर्वांचें धाबें गडबडलें. इतक्यांत जयद्रथही ती बातमी कळल्यामुळें घाबरून दुर्योधनाकडे धांवत जाऊन ह्मणाला, 'तोडीला तोड देऊन अर्जुनाबरोबर धैर्यानें युद्ध करणारा असा कोणी धनुर्धर तुमच्याम-

ध्यें असेलसें मला वाटत नाहीं. श्रीकृष्ण ज्याच्या साहाय्याला आहे व जो स्वतः शूर आहे असा अर्जुन आपल्या गांडीवाचा टणत्कार करीत युद्धाला सज्ज होऊन आला असतां त्याच्या पुढें नुस्तें उभें रहाण्याची तरी कोणाची छाती होईल काय ? मला वाटतें प्रत्यक्ष इंद्राच्यानें सुद्धां त्याच्यापुढें उभें राहवणार नाहीं. पूर्वीं हिमालय पर्वतावर ह्या अर्जुनानें सर्व सृष्टीचा संहार करणाऱ्या अशा प्रत्यक्ष महादेवाबरोबर सुद्धां पायींच टक्कर दिली असें माझ्या ऐकण्यांत आहे. त्याचप्रमाणें त्यानें एकट्यानेंच इंद्राच्या आज्ञेवरून हिरण्यपुरांत राहणाऱ्या हजारों दैत्यांचा खुराडा उडविला. ह्मणून हे नृपश्रेष्ठा, मला घरीं जाण्याची परवानगी दे तरी एक; किंवा द्रोणाचार्य व अश्वत्थामा ह्यांच्या साहाय्यानें माझें रक्षण करतों ह्मणून वचन दे तरी एक.' हें ऐकून सुयोधनानें त्याला बरोबर घेऊन द्रोणाचार्यांकडे जाऊन त्यांची प्रार्थना केली. त्याबरोबर त्यांनीं युद्धाची तयारी केली. कर्ण, भूरिश्रवा, अश्वत्थामा, प्रतापी वृषसेन, कृपाचार्य, व स्वतः जयद्रथ अशा सहा पराक्रमी महारथ्यांकडे त्यांनीं आपल्या सैन्याचा पुढाकार दिला आहे. शिवाय आचार्यांनीं शकट व पद्मक नांवाच्या व्यूहांची रचना केली; व त्या पद्मव्यूहाच्या अगदीं मध्यभागीं जयद्रथाला ठेवावयाचा असा बेत केला आहे. हे पार्था, धनुर्विद्या, शौर्य, बल व धैर्य ह्यांमध्यें ह्या सहा रथ्यांपैकीं प्रत्येकजण तुला भारी आहे. मग हे सहाही योद्धे एकेठिकाणीं झाल्यावर तर ह्यांच्या शक्तीसंबंधानें विचारावयासच नको. आणि ह्या सर्वांना जिंकल्याशिवाय तर जयद्रथ हातीं लागावयाचा नाहीं. ह्मणून आतां आपण बुद्धिमान व विचारी असे आपले मंत्री आणि स्नेही ह्यांचा सल्ला घेऊं आणि मग काय करणें तें ठरवूं.'

ह्यावर अर्जुन ह्मणाला, 'कृष्णा, कौरवांच्या ह्या सहा रथ्यांना तूं बलवान असें समजतोस, पण हे सर्व माझ्या पासंगालाही लागणार नाहींत, अशी माझी खात्री आहे. ह्यांचें प्रत्येक अस्त्र मीं आपल्या अस्त्रानें तोडलेलें उद्यां तुझ्या दृष्टीस पडेल. द्रोणाचार्यांच्या देखत सर्वांची कत्तल करून मी आपल्या बाणानें जयद्रथाचें डोकें उडवीन. देव, दानव, पितर, मनुष्यें किंबहुना सर्व चराचर विश्व जरी त्याच्या साहाय्याला आलें तरी सुद्धां जयद्रथाचें डोकें अर्जुनाच्या बाणानें उडालेलें उद्यां तुझ्या दृष्टीस पडल्यावांचून राहणार नाहीं. ह्या पाप्याचे साहाय्यकारी जे द्रोणाचार्य त्यांच्यावरच आधीं मी हल्ला करतों. सुयोधनाची सर्व मदार काय ती ह्यांच्यावरच आहे. ह्मणून आधीं ह्यांच्याच सैन्याचा फडशा पाडतों, आणि मग जयद्रथाचा समाचार घेतों. यम, कुबेर, वरुण, इंद्र व रुद्र ह्यांच्यापासून मीं जें जें अस्त्र मिळविलें आहे त्या सर्वांचा प्रभाव उद्यां माझ्या शत्रूंना दिसून येईल.! उद्यां रणांगणांत जिकडे तिकडे शत्रूंचीं मुंडकींच मुंडकीं पडलीं आहेत असें तूं पहाशील. शत्रूंच्या रक्तमांसांनीं सर्व हिंस्र प्राण्यांना तृप्त करीन, माझ्या मित्रांना आनंदवीन आणि जयद्रथाचें डोकें उडवीन. जयद्रथानें आजपर्यंत माझे पुष्कळ अपराध केले आहेत तेव्हां त्या सर्वांचें उट्टें काढून उद्यां मी त्याच्या आतांना ढळढळां रडावयाला लावीन. दूध तूप खाऊन पुष्ट झालेल्या शेंकडों राजांना मीं आपल्या गांडीवाच्या साहाय्यानें यमलोकीं पाठवीन. मी उद्यां कौरवांची इतकी भयंकर कत्तल उडवीन कीं जेणेंकरून माझ्याशिवाय ह्या पृथ्वीवर दुसरा कोणीच धनुर्धर नाहीं अशी सुयोधनाची पक्की खात्री होईल. ह्या गांडीवासारखें दिव्य धनुष्य व तुझ्यासारखा सारथी असल्यावर मला या जगांत आजिंक्य तें काय आहे ? आजपर्यंत तुझ्या कृपेनें मीं काय मिळविलें नाहीं ह्मणून तूं आतां मला अशी भीति घालतोस? ज्याप्रमाणें समुद्रांतील पाणी कधीं आटावयाचें नाहीं किंवा चंद्रावरील डाग कधीं नाहींसा व्हावयाचा नाहीं त्याचप्रमाणें माझीही प्रतिज्ञा कधीं खोटी व्हावयाची नाहीं. माझी शक्ति, पराक्रम किंवा अस्त्रविद्या याबद्दल तूं आपल्या मनांत मुळींच संशय आणूं नकोस. मी उद्यां पराभव तर पावणार नाहींच, पण कौरवांना जिंकून जयद्रथाला ठार करीन हें खास समज. ज्याप्रमाणें ब्राह्मण हे नेहमीं खरेंच बोलावयाचे, किंवा साधू हे नेहमीं नीतिवानच असावयाचे अगर यज्ञ करणाऱ्यांना ज्याप्रमाणें लक्ष्मी ही खात्रीनें मिळावयाचीच, त्याचप्रमाणें नारायणालाही प्रत्येक कामांत यश खात्रीनें मिळावयाचेंच.' असें सांगून अर्जुनानें दुसरे दिवशीं उजेडावयाच्या

सुमारास रथ तयार ठेवण्याविषयीं श्रीकृष्णाची प्रार्थना केली.

त्या रात्रीं दोघांनाही झोंप आली नाहीं. ते दोघेही रागानें सारखे मुसमुसत होते. कृष्णार्जुनांना रागावलेले पाहून देवादिकांना सुद्धां भीति पडली. वारा मोठ्या सोसाट्यानें वाहूं लागला. धडाच्या आकृतीच्या ढगांचें सूर्याभोंवतीं खळें पडलें. पृथ्वीवर आकाशांतून दगडांचा वर्षाव होऊं लागला. सर्व पृथ्वी डळमळूं लागली. समुद्र खवळून गेला; त्यामुळें नद्यांचे प्रवाह उलट वाहूं लागले. घोडे, हत्ती वगैरे जनावरें आपापसांतच भांडूं लागून भयानें मुतूं लागलीं व रडूं लागलीं. अशा प्रकारचीं हीं दुश्चिन्हें पाहून व अर्जुनाची प्रतिज्ञा ऐकून सर्व कौरवांचीं मनें फार उद्विग्न झालीं.

नंतर अर्जुनानें श्रीकृष्णाला आपल्या घरीं जाऊन सुभद्रा व तिची सून उत्तरा ह्या दोघींची समजूत करण्याविषयीं विनाविलें. हें ऐकून श्रीकृष्ण अर्जुनाच्या घरीं जाऊन पुत्रशोकानें विव्हळ झालेल्या आपल्या बहिणीला ह्मणाला, 'हे वार्ष्णेयि, मुलाबद्दल शोक करूं नकोस. सर्व प्राणिमात्रांना मरण हें लागलेंच आहे. क्षत्रिय कुलांत उत्पन्न झालेल्या तुझ्या मुलाला वीरांना शोभेल असेंच मरण आलें आहे. पुष्कळ शत्रूंची कत्तल करून युद्धामध्यें लढतां लढतां तुझ्या वीरपुत्रानें धारातीर्थीं देह ठेविला. तूं वीरमाता, वीरपत्नी, वीरकन्या, व वीरभागिनी आहेस ह्मणून तूं आपल्या या सद्गतीला गेलेल्या शूर मुलाबद्दल शोक करूं नकोस. हा पापी जयद्रथ आपल्या अपराधाचें फळ लवकरच भोगील. एवढी रात्र उलटली ह्मणजे अर्जुन त्याला तो कोठेंही असला तरी मारील. ह्मणून हे भद्रे, तूं आपल्या स्वतःचा शोक आवर व तुझ्या सुनेचें सांत्वन कर.'

हें श्रीकृष्णाचें भाषण ऐकून सुभद्रा दुःखानें विलाप करूं लागली, 'हाय रे बाळा, ह्या मंदभागिनीच्या पोटीं येऊन ह्या अभागिणीला अकालींच तूं टाकून गेलासना? तुझें तें कमलासारखें सुंदर मुख रणांगणांतील धुळीनें भरलें असेल. तूं आजपर्यंत मऊ बिछान्यावर निजणारा असें असून आज वीरशय्येवर तुला सुखानें कशी झोंप लागली? ज्याची शुश्रूषा करण्याला पूर्वीं सुंदर स्त्रिया असत त्याच तुझ्या सभोंवतीं आज कोल्हीं विरळ्या वालताहेतना? पांडव, पांचाल व वृष्णिवीर यांसारखे मोठमोठे पराक्रमी योद्धे तुझें रक्षण करण्याला तयार असतांना अनाथासारखा तूं आज शत्रूंच्या हातून कसा मेलास? तुला मुकल्यामुळें मी आतां लवकरच यमलोकची वाट धरीन. बाळा, तुझें तें सुंदर मुख पुन्हां माझ्या दृष्टीस कसें पडेल? पांडवांच्या तसेंच त्या सर्व वृष्णि व पांचाल वीरांच्या पराक्रमाला धिःकार असो. कारण हे सर्वजण तुझ्या पाठोपाठ असून यांच्या हातून एकट्या माझ्या बाळाचें रक्षण करवलें नाहीं. माझ्या बाळामुळें हें सर्व जग मला शून्य भासतें आहे. बाळा ये, ये, लवकर ये, हें माझें स्तन भरून तडतडत आहेत. तर लवकर येऊन माझ्या मांडीवर बैस व स्तनपान कर. तुझ्या त्या सर्व लीला मला आतां स्वप्नवत् झाल्या आहेत. मनुष्यप्राण्याचा जन्मच पाण्यांतील बुडबुड्याप्रमाणें क्षणभंगुर आहे. ह्या तुझ्या तरुण बायकोचें मी आतां कसें सांत्वन करूं? ऐन उमेदींतच तूं आपला अवतार आटोपलास. ब्रह्मचारी, दानशील, शूर, पवित्र, गुरुसेवेमध्यें तत्पर व यथाशास्त्र हजारों यज्ञ करणारे अशा पुण्य पुरुषांना ज्या उत्तम लोकाची प्राप्ति होते तोच उत्तम लोक तुलाही मिळो.' अशा रीतीनें पुत्रशोकानें विव्हळ होऊन दीन स्वरानें सुभद्रा विलाप करीत असतांना उत्तरा व द्रौपदी ह्या दोघीही तेथें आल्या. त्यांनींही पुष्कळ शोक केला. व शेवटीं दुःख सहन न झाल्यामुळें मूर्छा येऊन खालीं पडल्या. हें पाहून श्रीकृष्णालाही फार वाईट वाटलें. तरी थोडासा धीर धरून त्यानें पाणी वगैरे शिंपडून ह्यांना सावध केलें. नंतर तो म्हणाला, 'हे सुभद्रे, शोक करूं नकोस, पांचालि, उत्तरेचें समाधान कर. क्षत्रियश्रेष्ठ अभिमन्यु उत्तम गतीला गेला आहे. आमच्या कुलांतील सर्व वीरपुरुषही त्याच गतीला जावोत. ह्या वीरानें आज ज्या तऱ्हेचें कृत्य केलें त्याच तऱ्हेचें, शूराला साजेलसें कृत्य आज आम्ही करतों.' याप्रमाणें बहीण सुभद्रा, द्रौपदी व उत्तरा या सर्वांची समजूत करून श्रीकृष्ण अर्जुन व बाकीचे राजे यांना भेटून आपल्या निजावयाच्या ठिकाणीं गेला. नंतर बाकीचे पांडववीरही

आपापल्या ठिकाणीं निजावयास गेले.

पुढें कांहीं वेळानें श्रीकृष्णानें अर्जुनाकडे येऊन तेथें डोळ्यांला पाणी लावून दर्भाची उत्तम शय्या तयार केली. व त्याच्यावर नानाप्रकारच्या फुलांच्या माळा व गन्ध वगैरे पूजासाहित्य ठेवून त्याच्या सभोंवार सर्व प्रकारचीं आयुधें ठेविलीं. नंतर अर्जुनानेंही आपल्या डोळ्यांला पाणी लाविलें. इतक्यांत परिचारकानें अर्जुनापुढें बली आणून ठेविला. नंतर अर्जुनानें आनंदानें गंधमाल्यादिकेंकरून श्रीकृष्णाची पूजा केली व तो बलीही त्याला समर्पण केला.

नंतर श्रीकृष्ण हांसत हांसत अर्जुनाला ह्मणाला, 'पार्था तुझें कल्याण असो. तूं या शय्येवर नीज, मी आपल्या शिबिराकडे जातों,' असें ह्मणून श्रीकृष्ण शस्त्रधारी अशा शूर द्वारपालांना तेथें ठेवून दारुकासहवर्तमान आपल्या शिबिराकडे गेला. तेथें गेल्यावर तो आपल्या अंथरुणावर पडला, परंतु त्यांला झोंप आली नाहीं. अर्जुनावर कोणत्याही प्रकारचें संकट न येतां त्याची प्रतिज्ञा निर्विघ्नपणें कशी पार पडेल, याबद्दल त्याला काळजी पडली होती. त्याचप्रमाणें पांडवांकडील सर्व वीरही अर्जुनाची ही घोर प्रतिज्ञा कशी पार पडेल याबद्दल विचार करीत होते. अर्जुनाच्या यशाबद्दल इच्छा करण्यांतच त्यांची रात्र निघून गेली.

इकडे श्रीकृष्णही, अर्जुनाच्या प्रतिज्ञेचा ध्यास लागल्यामुळें रात्रींच एकदम जागा होऊन दारुकाला ह्मणाला, 'दारुका, पुत्रशोकानें विव्हळ होऊन अर्जुनानें 'उद्यांच जयद्रथाला मारीन' अशी खडतर प्रतिज्ञा केली आहे. व ही प्रतिज्ञा दुर्योधनाला कळल्यामुळें तो ती खोटी करण्याच्या खटपटीला लागला आहे. द्रोणाचार्य व अश्वत्थामा हे दोघे वीर सर्व सेनेसह त्याचें रक्षण करण्याला तयार झाले आहेत. तिन्ही लोकांतील वीरांचा अग्रणी जो इंद्र त्यालासुद्धां या द्रोणाचा पराभव करणें अशक्य आहे. असें जरी आहे तरी उद्यां सूर्यास्ताचे आंत अर्जुन जयद्रथाला मारून आपली प्रतिज्ञा खरी करील असें मी करतों. बायको, मित्र किंवा बांधव यांपैकीं मला अर्जुनापेक्षां अधिक प्रिय असा कोणीच नाहीं. ह्मणून मी उद्यां कर्ण व दुर्योधन ह्यांना जिंकून अर्जुनाची प्रतिज्ञा शेवटास नेणार. अर्जुनाकरितां मी उद्यां शेंकडों राजांची कत्तल करीन. अर्जुनाचा जो द्वेष करतो तो माझाही द्वेषी आहे व अर्जुनावर जो प्रेम करतो तो माझाही स्नेहीच आहे असें मी समजतों; किंबहुना अर्जुन माझें अर्धें आंगच आहे; ह्मणून हे दारुका, उद्यां सकाळीं उजाडल्याबरोबर माझा रथ तयार करून आण. त्यांत गदा, कौमोदकी नांवाची दिव्य शक्ति, चक्र, धनुष्य, उत्तम उत्तम बाण व बाकीचीं आयुधें हीं ठेवून त्यांच्याजवळच माझी बसण्याचीही उत्तम व्यवस्था कर. बलाहक, मेघपुष्प, शैब्य व सुग्रीव हे चार घोडे जोडून छत्रचामरादिकांनीं माझा रथ उत्तम शोभिवंत कर; तसेंच हे दारुका, तूंही कवच वगैरे घालून तयार ऐस. उद्यां अर्जुनाची प्रतिज्ञा शेवटास नेऊन त्याचें सर्व दुःख नाहींसें करीन. एवढेंच नव्हे पण हे दारुका, मी तुला आणखी ही सांगतों कीं, माझा प्रिय भक्त अर्जुन ज्या ज्या कामांत हात घालील, त्या त्या कामांत त्याला यशच येणार, हें तूं खास समज.'

हें ऐकून दारुक ह्मणाला, आपणच जर त्याचें सारथ्य पतकरलें आहे, तर त्याला अपजय कसा येणार? नेहमीं तो प्रत्येक कामांत यशस्वीच होणार? बरें, आतां आपण सांगितल्याप्रमाणें मी सर्व व्यवस्था करतों.' इकडे अशा रीतीनें श्रीकृष्ण व दारुक यांचें भाषण चाललें असतां तिकडे अर्जुनाला एक स्वप्न पडलें.

## २९ अर्जुनाचें स्वप्न (७. ८०–८२)

वर सांगितल्याप्रमाणें अर्जुन श्रीकृष्णाच्या आज्ञेनें दर्भशय्येवर निजला असतां त्याला एक स्वप्न पडलें, तें असें:—

तो शोकानें संतप्त होऊन आपल्या प्रतिज्ञेविषयींच विचार करीत बसला होता. इतक्यांत श्रीकृष्णाची स्वारी तेथें आली. त्यासरशीं उठून अर्जुनानें त्याला आसन दिलें. अर्जुन हा स्वप्नांतही श्रीकृष्णाला उठून आसन वगैरे देऊन त्याचा यथोचित सत्कार करीत असे. नंतर श्रीकृष्णानें जयद्रथाच्या वधाबद्दल अर्जुनाचा अगदीं निश्चय झाला आहे हें पाहून त्याला सांगितलें कीं, 'हे अर्जुना,

तूं विषाद वाटून घेऊं नकोस. कारण काल हा दुर्जय आहे. कालच सर्व मनुष्यांना बरी वाईट स्थिति आणतो. हे नरश्रेष्ठा, तुला हा एवढा विषाद कशाबद्दल झाला आहे तें सांग. हे शहाण्या मनुष्या उगीच शोक करणें बरोबर नाहीं. कारण हा शोक कार्यांची हानि करतो. जें करावयाचें असेल तें लगेच करून टाकावें. व्यर्थ शोक करीत बसल्यास नाना प्रकारचीं संकटें येऊन मनुष्य लवकरच नाश पावतो. ह्मणून शोक करणें बरोबर नाहीं. ' हें श्रीकृष्णाचें भाषण ऐकून शूर व शहाणा असा अर्जुन त्याला ह्मणाला, ' हे केशवा, माझ्या मुलाची हत्या करणाऱ्या त्या दुष्ट जयद्रथाला उद्यांच मारण्याबद्दल मीं प्रतिज्ञा केली आहे. परंतु कौरवांनीं जयद्रथाला पाठीशीं घेऊन अकरा अक्षौहिणी सैन्यापैकीं आजपर्यंत मेलेलें तेवढें वजा जाऊन बाकी राहिलेल्या सर्व सैन्यानिशीं त्याचें रक्षण करण्याचें पत्करलें आहे. तेव्हां इतकी मंडळी त्याच्या रक्षणाला असतांना तो दुरात्मा माझ्या दृष्टीस तरी कसा पडेल? तो दृष्टीस पडला नाहीं ह्मणजे माझी प्रतिज्ञा खोटी होईल व प्रतिज्ञा खोटी झाली ह्मणजे माझ्यासारख्यांनीं जगणें हें महत्पाप आहे. सूर्य तर फार जलद अस्ताला जातो. ह्मणून मला फार भीति वाटते.' अर्जुनाच्या शोकाचें कारण ऐकून डोळ्यांला पाणी लावून पूर्वेकडे तोंड करून कमलाक्ष श्रीकृष्ण अर्जुनाचें हित व्हावें ह्मणून त्यालां ह्मणाला, ' बा अर्जुना, दिव्य असें जें पाशुपतास्त्र कीं ज्याच्यायोगानें महादेवांनीं सर्व दैत्यांचा चुराडा उडविला तें जर तुला माहीत असेल तरच तुझ्यानें उद्यां जयद्रथाला ठार करणें होईल. आणि तें जर तुला माहीत नसेल तर तूं त्या वृषभध्वजाची प्रार्थना कर. म्हणजे तो महेश्वर प्रसन्न होऊन तुला तें अस्त्र देईल. ' हें श्रीकृष्णाचें भाषण ऐकून डोळ्यांला पाणी लावून अर्जुनानें एकाग्र अंतःकरणानें श्रीशंकराचें ध्यान केलें. त्या वेळीं त्याला असें वाटलें कीं, आतां पहाटेची वेळ झाली असून श्रीकृष्ण व आपण असे दोघेही हिमाचलाच्या पायथ्याकडे आलों आहों. त्या ठिकाणीं नानाप्रकारचे सिद्ध, महानदी गंगा, मंदारादि नानाप्रकारचे वृक्ष व अथर्वण ऋषीचा पुण्याश्रम हीं त्याच्या दृष्टीस पडलीं. तो पर्वत सूर्यासारखा तेजस्वी असून त्यावर श्रीशंकराची स्वारी बसली आहे. व त्याच्यासभोंवतीं शेंकडों भूतगण गायन, वादन, नर्तन इत्यादि लीलेनें भक्तिपूर्वक त्याला आळवीत आहेत असें त्याच्या दृष्टीस पडलें. सर्व चराचर सृष्टीच्या निर्माण कर्त्या अशा त्या परमेश्वराला पाहून अर्जुन व श्रीकृष्ण या दोघांनींही अनन्य भावानें साष्टांग प्रणाम केला. नर नारायण हे दोघेही वीर आपल्याकडे आले आहेत हें पाहून सुप्रसन्न अंतःकरणानें हांसत हांसत महादेव त्यांना म्हणाले, ' वीरश्रेष्ठांनो उठा, तुम्हांला काय पाहिजे आहे तें त्वरित सांगा. तुम्हांला जें पाहिजे असेल तें मी देतों. ' हें ऐकून ते दोघेही आनंदानें उठले. व भक्तिपुरस्सर त्याची स्तुति करूं लागले. ' सर्व वेद पारगा, सर्व सृष्टीचें कल्याण किंवा अकल्याण करणें हें तुझ्याच हातीं आहे. तुला हजार तोंडें, हजार बाहु, हजार नेत्र व हजार पाय आहेत. तुझी लीला अगाध आहे. तूं भक्तांवर नेहमीं दया करतोस. हे पिनाकपाणे आह्मी तुला शरण आलों आहों. आमच्यावर कृपा कर. ' असें दोघांनीं ह्मटल्यावर अर्जुनानें आपल्याला पाशुपतास्त्र पाहिजे आहे, म्हणून विनंति केली. तेव्हां शंकरांनीं त्यांना सांगितलें कीं, ' हे नरश्रेष्ठांनो तुमची इच्छा मीं जाणली. तुम्हीं ज्याकरितां येथें आलां आहां तें मी तुम्हांला देतों. हे शत्रुंजयांनो येथें जवळच एक अमृताचें सरोवर आहे. त्यांत मीं पूर्वीं ज्याच्या साहाय्यानें सर्व दैत्यांचा फडशा पाडला असें तें माझें दिव्य धनुष्य व बाण हीं मीं टाकलीं आहेत. तर तेथें जाऊन तुह्मीं तें घेऊन या. ' हें ऐकून बरें आहे ह्मणून ते दोघेही वीर त्या सरोवराकडे गेले. पण तेथें जाऊन पहात आहेत तों त्यांना त्यांत एक मोठा नाग आहे असें दिसलें. तसेच ते जाऊन उभे राहिले. इतक्यांत दुसरा एक हजार फडांचा नाग वर डोकें काढून आला. त्याचा अग्नीच्या ज्वालेसारखा प्रखर श्वासोच्छ्वास चालला होता. हें पाहून ते दोघेही डोळ्याला पाणी लावून हात जोडून पार्वतीपति वृषभध्वजाची प्रार्थना करीत करीत त्या नागाजवळ गेले. त्याबरोबर श्रीशंकराच्या महात्म्यानें त्या दोन्ही नागांनीं आपलें सर्परूप टाकून देऊन धनुष्य व बाण यांचीं रूपें घेतलीं,

तेव्हां तें दिव्य धनुष्य हातीं घेऊन कृष्णार्जुन महादेवाकडे आले. नंतर शंकराच्या बरगड्यांतून एक दिव्य ब्रह्मचारी बाहेर पडला. त्याचे डोळे पिंगटवर्णाचे असून कंठ निळा होता. त्या ब्रह्मचाऱ्यानें पवित्र्यांत उभें राहून धनुष्याला प्रत्यंचा चढवून, त्याच सरोवरावर एक बाण सोडला. पवित्र्यांत उभा राहून मंत्र ह्मणत असतांना त्याचा तो पवित्रा, धनुष्य धरण्याची शैली हीं पाहून अर्जुनानें ती मंत्रक्रियाही ध्यानांत ठेविली. व शंकराला पूर्वीं अरण्यामध्यें त्यांनीं दिलेल्या वराची आठवण करून दिली. तेव्हां त्याची ती इच्छा पाहून शंकरांनीं पुनः त्याला पाशुपतास्त्र दिलें. तेव्हां त्याला फार आनंद झाला. नंतर ह्या दोघांनींही त्याला नमस्कार करून आनंदानें आपल्या शिबिराची वाट धरली.

---

## ३० तिसऱ्या दिवसाची तयारी.
### ( ७.८२–९४ )

अशा रीतीनें पांडवांकडील लोकांची सर्व रात्र गडबडींतच निघून गेली. इकडे उजेडल्यावर गवई लोक कौरवकुळांचीं वर्णनपर पदें गाऊं लागले, नर्तक नाचूं लागले, भाट स्तुतिपाठ ह्मणूं लागले व वाजंत्री चौघडा वाजवूं लागले. पांडवांच्या तळावर हा सर्व आवाज दुमदुमत राहिल्यामुळें युधिष्ठिर लौकर जागा झाला; नंतर प्रातर्विधि आटोपून न्हाणीघरांत गेला. तेथें सुगंधी द्रव्यें मिसळलेल्या अशा उत्तम सुवासिक पाण्यानें स्नान करून स्वच्छ धुतलेलीं वस्त्रें नेसून, व अंगाला चंदन लावून, जप व होम वगैरे आपलीं प्रातःकर्में करण्याकरितां पूर्वेकडे तोंड करून युधिष्ठिर आसनावर बसला. नंतर त्यानें आपलीं होमहवनादि कृत्यें आटोपून, निग्रही, वेदपारग व आचारशील अशा हजारों ब्राह्मणांना चांगल्या दुभत्या व काळ्या कपिला अशा सवत्स गाई व सुवर्ण वगैरे दान देऊन सभागृहांत प्रवेश केला. त्या ठिकाणीं नानाप्रकारचे अलंकार व उत्तम उत्तम रेशमी वस्त्रें परिधान करून रत्नखचित अशा दिव्य सिंहासनावर राजा धर्म विराजमान झाला. तेव्हां भालदार ललकारूं लागले, चवरीवाले चवऱ्या वारूं लागले, सूत त्याची स्तुति गाऊं लागले; व सेवक राम राम करूं लागले. इतक्यांत चहूंकडे घोड्यांच्या टापांचा टप् टप् आवाज, रथांचा धडधडाट, हत्तीवरील घांटांचा घणघणाट, शंखांचा भों भों असा आवाज व योद्ध्यांच्या जोरानें पडलेल्या पावलांचा दणदणाट हीं ऐकूं येऊं लागलीं. नंतर लगेच चोपदारानें येऊन धर्माला लवून मुजरा करून श्रीकृष्णाची स्वारी आली आहे म्हणून सांगितलें. हें ऐकून धर्मराज त्याला सामोरा गेला व त्या हृषीकेशाला सभागृहांत आणून अर्घ्यपाद्यादिकेंकरून उच्चासनावर बसवून आपण खालीं बसला. नंतर दोघांचेही कुशल प्रश्न झाले. इतक्यांत भीम, धृष्टद्युम्न, शिखंडी, सात्यकि व केकय वगैरे वीर मंडळी सभागृहांत येऊन आपापल्या जागेवर बसली. युयुधान मात्र श्रीकृष्णाच्याच आसनावर बसला होता. अशा रीतीनें सर्व दरबार भरल्यानंतर धर्मराज विनयपूर्वक श्रीकृष्णाला ह्मणाला, 'सर्व देव जसे इंद्रावर अवलंबून आहेत त्याप्रमाणें आह्मी सर्वजण तुझ्यावर अवलंबून आहों. कृष्णा, आतां आमच्यावर कृपादृष्टीनें पहा व आह्मांला जय मिळवून दे. शत्रूंनीं आह्मांला राज्यांतून हांकलून देऊन आजपर्यंत आमचे कसे हाल केले तें सर्व तुला माहीतच आहे. हे भक्तवत्सला, आमचें सुख, दुःख किंबहुना सर्व जीवितही तुझ्यावरच अवलंबून आहे. ह्मणून हे मधुसूदना, अर्जुनाची प्रतिज्ञा शेवटास नेऊन आमच्यावरील संकट टळेल असें कर. ह्या दुःखार्णवांतून पार पडण्याला आज तूं आमची नाव हो. युद्धामध्यें सारथी जें काम करतो तें मोठमोठ्या रथ्यांकडूनही होत नाहीं. हे जनार्दना, तूं आपल्या यादवांचें जसें सर्व संकटांपासून रक्षण करतोस त्याप्रमाणें आमचेंही रक्षण कर. हे देवाधिदेवा, पुरुषोत्तमा, कृष्णा, आह्मी तुला शरण आलों आहों, आमचें रक्षण करून तूं आपलें भक्तवत्सल हें नांव खरें करून दाखीव.' हें ऐकून श्रीकृष्ण ह्मणाला, 'तिन्ही लोकांत पार्थाच्या तोडीचा एकही धनुर्धर नाहीं; तो पराक्रमी, अस्त्रविद्यासंपन्न, बलवान्, युद्धप्रवीण, तरुण व तेजस्वी असा आहे. तो वीरशाली नृसिंह तुझ्या शत्रूंचा पाडाव करील व मीही त्याला कौरवांची कत्तल करण्याला मदत करीन. आज अर्जुन आपल्या बाणानें त्या पापकर्म्या जय-

द्रथाचे तुकडे तुकडे करून त्याच्या शरीरानें गिधाडें, घुबडें, कोल्हीं व कुत्रीं वगैरे हिंस्र प्राण्यांना मेजवानी देईल. इंद्रादि देव जरी त्याच्या मदतीला आले तरी सुद्धां आज त्याचें यमदर्शन चुकावयाचें नाहीं. हे राजा, आज धनंजय त्या बलशाली जयद्रथाला मारूनच तुझ्या दर्शनाला येईल; कांहीं काळजी करूं नकोस. '

श्रीकृष्ण व धर्म ह्यांचें अशा रीतीनें भाषण चाललें असतां धनंजय तेथें आला व श्रीकृष्ण आणि धर्मराज यांना नमस्कार करून आपल्या जाग्यावर बसला. नंतर त्याला हातांशीं धरून उठवून व त्याचें डोकें हुंगून राजा धर्मानें त्याला आलिंगन देऊन सांगितलें कीं, ' हे अर्जुना, तुझें तोंड व श्रीकृष्णाचें तोंड हीं दोन्हीं फार उल्हासित दिसताहेत. तेव्हां तुला आज खात्रीनें जय मिळणार. ' नंतर अर्जुनानें, 'राजा, देव तुझें कल्याण करो. श्रीकृष्णाच्या कृपेनें काल रात्रीं मला एक चमत्कारिक स्वप्न पडलें,' असें ह्मणून झालेली सर्व हकीकत सांगितली. तें ऐकून सर्वांनीं सद्गदित अंतःकरणानें श्रीशंकराला नमस्कार करून वः वः फार चांगलें झालें असा मोठ्यानें शब्द केला. नंतर धर्माच्या आज्ञेनें सर्वजण आपापलीं शस्त्रास्त्रें घेऊन जय्यत तयारीनें युद्धाकरितां बाहेर पडले. कृष्णार्जुन व सात्यकि हेही धर्माला नमस्कार करून व त्याचा निरोप घेऊन निघाले. नंतर श्रीकृष्णानें मेघासारख्या घडघड आवाजाचा, बालसूर्याप्रमाणें कांतिमान, ज्याच्या ध्वजस्थानीं मारुति बसला आहे व जो सर्व शस्त्रास्त्रांनीं युक्त होता, असा दिव्य रथ आपलीं प्रातःकर्मे आटोपून युद्धाकारितां तयार झालेल्या अर्जुनापुढें आणून उभा केला. त्याला पाहून सुवर्णाचें कवच घातलेला व हातांत धनुष्यबाण घेतलेला असा किरीटी वयोवृद्ध, आचारशील, जितेंद्रिय व तपोनिष्ठ अशा ब्राह्मणांचे आशीर्वाद घेत घेत त्या रथाला प्रदक्षिणा करून त्यावर चढला. तो रथ सोन्याचा असून मोठमोठ्या मांत्रिकांनीं आधींच त्याला अभिमंत्रित केला होता. अर्जुनाच्या मागोमाग सात्यकि व श्रीकृष्ण हेही त्या रथावर चढले. नंतर श्रीकृष्णानें घोड्याचे दोर हातीं घेतले. त्या वेळीं अंधःकाराचा नाश करण्याकरितां बुध व शुक्र या तेजस्वी ताऱ्यांसह चंद्र आकाशमार्गांतून जातांना ज्याप्रमाणें झळकतो त्याप्रमाणें अर्जुनही या दोघांच्या योगानें झळकत होता. हे निघाले तेव्हां सूतमागधादि बंदीजन मंजुळ स्वरानें आशीर्वादपर गाणें गाऊं लागले. व सुस्वर वाद्यें वाजूं लागलीं. सुवासिक वायु त्यांच्या मागून वाहूं लागला. त्याचप्रमाणें अर्जुनाला शुभशकुन होऊं लागले. तेव्हां अर्जुन सात्यकीला ह्मणाला, ' मी जयद्रथाला ठार करतोंच. पण ह्या जयद्रथाला ठार करणें हें जसें मला महत्त्वाचें वाटत आहे त्याचप्रमाणें धर्मराजाचें रक्षण करणेंही माझें कर्तव्य कर्मच आहे. ह्मणून हे महाबाहो, तूं जाऊन राजाचें रक्षण कर. तूं वासुदेवासारखा पराक्रमी आहेस. माझ्यासंबंधीं काळजी करूं नकोस. जेथें श्रीकृष्ण आहे व जेथें मी आहें तेथें मुळींच वांकडें व्हावयाचें नाहीं. ' यावर 'बरें, ' ह्मणून सात्यकि धर्मराजाकडे गेला.

इकडे द्रोणाचार्यही उजाडल्यावर युद्धाच्या तयारीला लागले. त्यामुळें कौरवसैन्यामध्यें कांहीं वेळ बरीच गडबड उडून राहिली. जिकडे तिकडे शूरांच्या गर्जना ऐकूं येऊं लागल्या. कित्येक जोरानें आपल्या धनुष्याचा टणत्कार करूं लागले; कित्येक म्यानांतून आपली तलवार उपसून तिच्याकडे आनंदानें पाहूं लागले; कित्येक शूर पुरुष युद्धाविषयीं उतावळे होऊन उगीच इकडून तिकडे पवित्रे चाळीत व हातवारे करीत हिंडूं लागले; कित्येकजण आपली गदा जोरानें हालवून तिच्यावर लोंबत सोडलेल्या घांटांचा घणघण आवाज करूं लागले व कित्येक रणनवरे तर जडावाचे वगैरे मूल्यवान अलंकार घालून व उत्तम उत्तम रेशमी वस्त्रें परिधान करून ऐटीनें आपलीं शस्त्रें पडताळीत, ' अर्जुन कोठें आहे, श्रीकृष्ण कोणीकडे गेला व भीम अद्याप कां येत नाहीं,' असें एकमेकांना विचारूं लागले. आणि अशा गर्दीतच कौरवसेनापति द्रोणाचार्य हे आपल्या सैन्याची नीट व्यवस्था लावण्याकरितां आपल्या रथांत बसून मोठ्यानें शंख फुंकीत जलदीनें समरांगणांतून हिंडत हिंडत जयद्रथाकडे येऊन ह्मणाले, 'तूं, वृषसेन, सोमदत्ति, कर्ण, अश्वत्थामा, शल्य व कृपाचार्य या सहा वीरांना बरोबर घेऊन एक लक्ष घोडे, साठ हजार रथ, चौदा हजार हत्ती व एकवीस हजार पायदळ

इतक्या सैन्यासह बारा कोस मागें रहा; ह्मणजे पांडवांची कांहीं तुजवर मात्रा चालणार नाहीं.' हें ऐकून त्याला थोडेंसें बरें वाटलें. नंतर तो वर सांगितल्याप्रमाणें गांधारांचे घोडेस्वार, रथी व आपले स्वतःचे सिंधुनदीच्या कांठचे दहा हजार घोडे घेऊन कर्णादि सहा रथ्यांसह तेथून निघून गेला. जयद्रथ तिकडे गेल्यानंतर दुर्मर्षण, दुःशासन व विकर्ण यांच्यासह दीड हजार गजयोधी बरोबर घेऊन सैन्याच्या अगदीं अघाडीला उभा राहिला. या सर्व सैन्याची रचना द्रोणाचार्यांनीं चक्रशकटव्यूहानें केली होती. हा व्यूह बारा कोस लांब होता व याची पिछाडी पांच कोस रुंदीची होती. या चक्रशकटाच्या मागल्या भागांतच सूचीपद्म नांवाचा व्यूह रचला होता व त्या सूचिपद्मांतच पुनः गूढ नांवाचा व्यूह रचला होता. सूचीपद्म नांवांच्या व्यूहाच्या तोंडावर कृतवर्म्याला उभें केलें होतें व त्याच्यापुढें कांबोज, जलसंध, दुर्योधन आणि कर्ण हे वीर ओळीनें आपापल्या सैन्यानिशीं उभे होते; त्याचप्रमाणें शकटव्यूहाच्या तोंडाकडेही हजारों शूर लढवय्ये त्या व्यूहाचें रक्षण करण्याकरितां आपापलीं आवडतीं शस्त्रास्त्रें घेऊन उभे होते व सर्वांच्या पुढें द्रोणाचार्य स्वतः उभे होते. अशा रीतीनें व्यूहाचा कडेकोट बंदोबस्त करून जयद्रथाला सूचीपद्माच्या मध्यभागीं निवडक सैन्यानिशीं ठेवला होता. द्रोणाचार्यांची ही व्यवस्था पाहून दुर्योधनाला फार आनंद झाला.

कौरवांप्रमाणें पांडवांच्या सैन्याचीही नकुलाचा मुलगा शतानीक आणि धृष्टद्युम्न यांनीं उत्तम तऱ्हेनें व्यवस्था लाविली होती. नंतर हजार हत्ती, हजार रथ, तीन हजार घोडे व दहा हजार पायदळ इतकें सैन्य बरोबर घेऊन, 'आज अर्जुनाला मी थोपवून धरतों. हे वीरहो, तुह्मां सर्वांच्या देखत मी अर्जुनाशीं टक्कर देतों,' असें ह्मणत ऐटीनें दुर्मर्षण पांडवसैन्यावर चालून गेला.

इकडे अर्जुनही आपल्या सैन्याच्या अग्रभागीं उभा राहून मोठ्यानें आपला देवदत्त फुंकूं लागला; त्याबरोबर कृष्णानेंही आपला पांचजन्य वाजविला, आणि या धांदलींत मारुतीनेंहीं वरून भुभुःकार केला. तेव्हां विजेच्या कडकडाटानें जसे सामान्य लोक घाबरून जातात त्याप्रमाणें शत्रुसैन्य घाबरून गेलें. नंतर कौरव व अर्जुन हे एकमेकांवर बाणांचा मारा करूं लागले; तेव्हां अर्जुन शत्रूंचे बाण तोडून आपल्या बाणांनीं त्यांचीं डोकीं भराभर तोडून खालीं पाडूं लागला. आपल्या सैन्याची अर्जुनानें अशी त्रेधा उडविली हें पाहून दुःशासन आंगांत चिलखत, डोकीवर शिरस्त्राण वगैरे घालून आपलें हस्तिसैन्य बरोबर घेऊन अर्जुनावर वेगानें तुटून पडला. त्या वेळीं हत्तीवरील घांटांच्या घणघण आवाजानें, शंखांच्या नादानें, धनुष्यांच्या टणत्कारानें, वीरांच्या आरोळ्यांनीं व हत्तींच्या गरजण्यानें सर्व पृथ्वी दुमदुमून गेली. इतक्यांत अर्जुनानें बाण मारण्याचा सपाटा चालविला. त्यासरशीं कित्येकांचीं डोकीं उडालीं, कित्येकांचे हात तुटले, कित्येकांचे पाय तुटले, कित्येक वेळां तर एका बाणानेंच दोन दोन तीन तीन वीर घायाळ होऊन पडूं लागले. हत्ती तर अर्जुनाच्या ह्या तीक्ष्ण बाणांनीं गंडस्थळें फुटून जाऊं लागल्यामुळें तोंडानें रक्त ओकत व चीं चीं करीत पटापट खालीं पडूं लागले. ह्या वेळीं हजारों वीरांची कत्तल झाल्यामुळें वीरांचे छिन्नविछिन्न झालेले देह, हत्तींचीं फुटलेलीं गंडस्थळें, धनुष्यबाण, तलवार वगैरे शस्त्रें व ध्वजपताकादि राजचिन्हें ह्या सर्वांचा रणभूमीवर एकच कर्दम माजून राहिल्यामुळें ती फारच भयाण दिसूं लागली.

अशा रीतीनें आपलें बहुतेक सैन्य मारलें गेल्यामुळें घाबरून जाऊन दुःशासन द्रोणाकडे पळत सुटला. . दुःशासन घाबरून पळून गेल्यानंतर अर्जुन द्रोणाचार्यांवर चालून गेला. पण त्यांची गांठ पडल्याबरोबर तो श्रीकृष्णाचे सांगण्यावरून हात जोडून आचार्यांची प्रार्थना करूं लागला. तो ह्मणाला, 'भो ब्रह्मन्, मला आशीर्वाद देऊन माझें कल्याण चिंतन करा. आपण मला वडलांप्रमाणें आहां. आपण धर्मराजाप्रमाणें श्रेष्ठ असून श्रीकृष्णाप्रमाणें पूज्य आहां. ताता, अश्वत्थाम्यांप्रमाणेंच ह्याही बालकाचें आपण रक्षण करा. आपला प्रसाद घेऊन मग जयद्रथाला मारावें अशी माझी इच्छा आहे. तर हे प्रभो, आशीर्वाद देऊन माझ्या प्रतिज्ञेचें रक्षण करा.' हें अर्जुनाचें भाषण ऐकून आचार्य, 'हे धनंजया मला जिंकल्याशिवाय जयद्रथाला जिंकतां येणार नाहीं.'

असें ह्मणून लगेच हांसत हांसतच कृष्णार्जुनांवर बाण सोडूं लागले. तेव्हां अर्जुनानें आपल्या क्षात्रधर्माला अनुसरून आचार्यांचे आलेले बाण मधल्यामधेंच तोडून उलट त्यांच्यावर बरेच बाण सोडले. नंतर अर्जुन पुनः आपल्या बाणांनीं आचार्यांचें धनुष्य तोडावें अशा विचारानें धनुष्याची दोरी आकर्ण ओढून जोरानें बाण सोडण्याच्या बेतांत होता. इतक्यांत आचार्यांनीं त्याच्याच धनुष्याची दोरी तोडली. व त्याला त्याच्या सारथ्याला व घोड्यांना आपल्या बाणांनीं अगदीं झांकून टाकलें. एवढ्या अवधींत अर्जुनानें दुसरें धनुष्य तयार करून आचार्यांचा व त्यांच्या सेनेचा बराच समाचार घेतला. हें पाहून आचार्यांनीं त्याच्यावर ब्रह्मास्त्र सोडलें. परंतु या वीरानें आपल्या गुरूवर उलट ब्रह्मास्त्राचा प्रयोग न करितां आल्या अस्त्राचाच आपल्या बाणानें नाश केला.

द्रोणार्जुनांचें अशा रीतीनें चाललेलें हें तुमुल युद्ध पाहून व पुढें आपणाला अद्याप बरेंच काम करावयाचें आहे हें लक्षांत आणून वासुदेव धनंजयाला ह्मणाला, ‘ हे पार्था, उगीच येथें वेळ घालवूं नकोस. आपणाला अजून बरेंच काम करावयाचें आहे. ह्या द्रोणाचार्यांना सोडून आपण तसेच पुढें जाऊं या.’ हें ऐकून, ‘बरें तुझी इच्छा,’ असें ह्मणून अर्जुन आचार्यांना प्रदक्षिणा करून बाकीच्या सैन्यावर बाणांचा मारा करीत तसाच पुढें चालूं लागला. हें पाहून द्रोण त्याला ह्मणाले, ‘ पांडवा, आतां कोठें चाललास ? पुढें आलेल्या शत्रूला न जिंकतां तूं कधींही परतत नाहींस, असें असून मला न जिंकतां तूं तसाच पुढें कां चाललास ? ’ हें ऐकून अर्जुन ह्मणाला, ‘आपण माझे शत्रू नाहीं. आपण गुरु, व मी आपला शिष्य, आपल्या मुलासारखा आहें; शिवाय आपणांला युद्धांत जिंकील असा एकही वीर ह्या पृथ्वीतलावर नाहीं. ’ असें ह्मणत ह्मणत जयद्रथाला मारण्याकरितां अर्जुन झपाट्यानें कौरवसैन्यांत शिरला. त्याच्या बरोबरच त्याचे चक्ररक्षक युधामन्यु व उत्तमौजस हेही आंत शिरले. कृतवर्मा, कांबोज व कर्ण वगैरे योद्धे पुनः आचार्यांनाच पुढें करून अर्जुनाला थोपवून धरूं लागले. ह्या वेळीं द्रोणांनीं वासुदेव व अर्जुन या दोघांना खांद्यावर व छातीवर बाण मारून बरेंच घायाळ केलें; तेव्हां अर्जुनानें आपल्या बाणांनीं त्यांचें निवारण करून व कृतवर्म्याच्या सैन्याचा भडशा पाडीत पाडीत सुदक्षिण व कृतवर्मा ह्या दोघांवर चाल करून कृतवर्म्याचें धनुष्य तोडून टाकलें व त्याच्यावर खूप बाणांचा वर्षाव केला. नंतर कृतवर्मा आपल्या बाणांखालीं दडपून गेला आहे असें पाहून अर्जुन त्याला सोडून तसाच पुढें कांबोज सेनेवर चालून गेला; तेव्हां त्याचे चक्ररक्षकही त्याचेबरोबरच निघाले; पण कृतवर्म्यानें ह्यांना मध्येंच अडवून धरिलें. तेव्हां युधामन्यूनें त्याचा ध्वज तोडला व उत्तमौजानें त्याचें धनुष्य तोडलें. अशा रीतीनें कृतवर्मा व पांचाल ह्यांची झटापट चालली असतां पार्थ तसाच झपाट्यानें पुढें गेला. तेव्हां त्याला पाहून रागानें आपल्या धनुष्याची प्रत्यंचा उडवीत श्रुतायुध अर्जुनावर चाल करून आला. अर्जुनानें त्याचें धनुष्य व बाणांचा भाता हीं दोन्ही तोडून टाकलीं; तसेंच त्याचे घोडे व सारथी यांना यमलोकाला पाठविलें. हें पाहून श्रुतायुध आपली अमोघ गदा घेऊन रथावरून खालीं उडी ठोकून कृष्णार्जुनावर चालून आला.

श्रुतायुध हा जलाधिपति वरुण याच्यापासून पर्णाशा नांवाच्या नदीला झालेला मुलगा होय. एकदां याच्या आईनें, ‘ माझा मुलगा नेहमीं अवध्य असावा, ’ अशी वरुणाची प्रार्थना केली. तेव्हां वरुण ह्मणाला, ‘ मी याला एक दिव्य अस्त्र देतों. याच्या योगानें याला कोणी मारूं शकणार नाहीं. आतां, मृत्युलोकांत जन्मलेल्या प्रत्येक प्राण्याला केव्हांना केव्हां तरी मेलें हें पाहिजेच; तरी पण हा तुझा मुलगा ह्या अस्त्राच्या प्रभावानें सर्वांना अजिंक्य होईल.’ असें ह्मणून वरुणानें उत्तम अभिमंत्रण केलेली अशी एक गदा श्रुतायुधाला दिली व तो ती गदा देतांना पुनः श्रुतायुधाला ह्मणाला कीं, ‘ही गदा तुझ्यावर शस्त्र धरणाऱ्यावरच सोड. दुसऱ्या कोणावर सोडूं नकोस. युद्धांत असूनही जो लढत नसेल किंवा ज्यानें तुझ्यावर शस्त्र उगारलें नाहीं अशावर तूं ही गदा सोडूं नकोस. जर सोडशील तर ती उलट तुझ्याच टाळक्यांत पडेल. ’ श्रुतायुधानें, त्याचा अंतकाल जवळ आल्यामुळें, ती गदा श्रीकृष्णावर सोडली; त्यामुळें ती उलट त्याच्यावरच पडली, व तो मरण पावला.

तेव्हां शत्रुसैन्यांत मोठा हाहाकार उडाला.

हें पाहून कांबोज राजाचा मुलगा सुदक्षिण हा अर्जुनावर चालून आला. अर्जुनानें त्याचें धनुष्य व ध्वज हीं तोडून पाडलीं; व आणखी बाण सोडून त्याला घायाळ केलें. पण त्याला न जुमानतां त्यानें दुसरें धनुष्य सज्ज करून अर्जुनाच्या मर्मस्थळीं नेमके तीन बाण सोडून मोठ्यानें सिंहगर्जना केली. नंतर पुनः या सुदक्षिणानें, घांटा वगैरे लावलेली अशी सर्वपारसवी नांवाची एक तेजस्वी शक्ति अर्जुनावर सोडली. ती त्याच्या हातून सुटल्यावरोबर जळतच आकाशांत जाऊन अर्जुनावरून जमिनीवर हापटली. त्या वेळीं तिचे तुकडे तुकडे झाले; पण अर्जुनही मूर्छा येऊन मटकन रथांत बसला. नंतर कांहीं वेळानें शुद्धीवर येऊन अर्जुनानें आपल्या तीक्ष्ण बाणांनीं सुदक्षिणाच्या रथाचे तुकडे तुकडे करून त्याच्याही छातीवर एक तीक्ष्ण बाण सोडला. तो बाण त्याचे प्राण घेऊन त्याच्या छातींतून पार गेला. त्या सरशी सुदक्षिण वाळलेल्या पांगाऱ्याप्रमाणें धाडदिशीं खालीं पडला.

सुदक्षिण पडल्यावरोबर श्रुतायु व अच्युतायु नांवाचे दोघे वीर चवताळून अर्जुनावर तुटून पडले. नंतर एकजण डावीकडे व एकजण उजवीकडे अशा रीतीनें उभे राहून दोघांनीं दोन बाजूंनीं पार्थावर बाणांचा मारा करण्याला सुरवात केली. अर्जुनानेंही तितक्याच झपाट्यानें त्या दोघांवरही बाण सोडले. अर्जुनाचे बाण जरा मर्मी लागल्यामुळें श्रुतायूनें त्याच्यावर भाला सोडला; तो जोरानें लागल्यामुळें पार्थ झीट येऊन खालीं पडला. इतक्यांत अच्युतायूनें त्याच्यावर आपलें शूल फेंकलें. त्यामुळें जखमेवर मिठाचें पाणी शिंपडल्याप्रमाणें झालें. व पार्थ तर अधिक मूर्छा येऊन आपल्या बाहुट्याच्या काठीला धरून बराच वेळ खालीं मान घालून बसला. त्यामुळें सर्व कौरवांना अर्जुन ठार झालासें वाटून फार आनंद झाला. ह्मणून कौरवसैन्यांत जिकडे तिकडे सिंहगर्जना ऐकूं येऊं लागल्या. तेव्हां श्रीकृष्णानें बेतानें अर्जुनाला सावध केलें. पण हा सावध होऊन आपलीं शस्त्रें सावरी तोंपर्यंत श्रुतायु व अच्युतायु ह्या दोघांनीं मिळून कृष्णार्जुनांना आपल्या बाणांनीं अगदीं घायाळ करून सोडलें. त्या दोघांनीं मिळून इतके बाण सोडले कीं, रथ, घोडे, ध्वज व स्वतः कृष्णार्जुन यांजवर जिकडे तिकडे बाणचबाण होऊन गेले होते. नंतर अर्जुनानें सावध होऊन शक्रास्त्रानें ह्या दोघांचींही शिरकमलें वरच्यावरच उडवून देऊन त्यांच्या सेनेचा फडशा पाडीत तशीच पुढें चाल केली.

पण इतक्यांत श्रुतायूचा मुलगा नियतायु अच्युतायूचा मुलगा दीर्घायु हे दोघे वीर आपल्या बापांबद्दल सूड घेण्यासाठीं अर्जुनावर तुटून पडले. पण त्यांना पुढें आल्यावरोबरच अर्जुनानें यमाचा दरबार दाखविला.

हें पाहून अंग, द्रविड व म्लेंच्छ वगैरे देशचे लोक आपापलीं सैन्यें घेऊन अर्जुनावर धांवले. पण अर्जुनानें ह्या सर्वांचा आपल्या बाणांनीं फडशा पाडला. त्यांच्या छिन्नविच्छिन्न झालेल्या शरीरांनीं सर्व रणभूमी भरून गेली. अर्जुनाच्या बाणांचा मारा सहन न होऊन सैन्यांतील हत्ती रक्त ओकूं लागले. ह्या कत्तलींत अर्जुनानें एकंदर साठ हजार घोडे व दहा हजार लढवय्ये ठार केले.

अर्जुन अशा रीतीनें कौरवसैन्याचा धुराडा उडवीत असतां अंबष्ठ राजा त्याला अडवून धरण्याकरितां पुढें आला. तो आल्यावरोबर अर्जुनानें त्याचे घोडे मारले व धनुष्यही तोडून टाकलें. लगेच अंबष्ठानें गदा घेऊन अर्जुनाच्या रथावर चाल केली व ती गदा जोरानें श्रीकृष्णावर सोडली. त्या सरशी अर्जुनानें त्याचे दोन्ही हात व डोकें हीं वरच्यावरच आपल्या बाणांनीं उडवलीं. त्यावरोबर अंबष्ठाचें धड जमिनीवर आदळलें.

या संधीस दुर्योधन जलदीनें एकटाच आपल्या रथावर बसून आचार्यांकडे येऊन ह्मणाला, 'धनंजय तर अघाडीच्या लोकांचा फडशा पाडून व्यूहांत शिरून आंतील लोकांची एकसारखी कत्तल करीत सुटला आहे. आतां त्या अर्जुनाला अडवून धरण्याबद्दल पुढें काय करावें ह्याबद्दल आपण चांगला विचार करा. आतां हा सव्यसाची जेणेंकरून जयद्रथाला मारणार नाहीं असें कांहीं तरी करा. अहो पुरुषश्रेष्ठा, आपल्यावांचून ह्या संकटांतून सोडविणारा असा आह्मांला दुसरा कोणीही वाली नाहीं. कोपानिलानें प्रदीप्त झालेला हा धनंजयरूपी प्रलयाग्नि माझ्या सेनेला गवताप्रमाणें जाळून टा-

कीत आहे. अघाडीच्या लोकांचा फडशा पाडून धनंजय व्यूहांतील लोकांची कत्तल करीत आपणांवर झपाट्यानें चालून येत आहे. हें पाहून जयद्रथाचें रक्षण करण्याकरितां त्याच्या जवळ मोठ्या शौर्यानें कंबर बांधून उभे राहिलेल्या वीरांना आतां आपल्या हातून जयद्रथाचें रक्षण कसें होणार ह्याबद्दल मोठी काळजी पडली आहे. त्या सर्वांची अशी खातरी होती कीं, अर्जुन निदान द्रोणांच्या तडाख्यांतून तरी जिवंतपणें पार पडणार नाहीं. पण हा अर्जुन तुमच्या देखतच माझ्या सैन्याची कत्तल करीत पुढें चालला आहे. ह्यावरून अहो महाभाग, आपण पांडवांच्या पक्षाचे आहां असें मला वाटतें. अहो ब्रह्मन्, मीं आजपर्यंत आपला योगक्षेम माझ्या हातून होईल तितक्या चांगल्या रीतीनें चालविला; व आपणांला खुष ठेवण्याकरितां मीं माझ्यानें होईल तेवढी खटपट केली. असें असून आपण तें कांहींच लक्षांत घेत नाहीं. आह्मी तुमचे नित्यभक्त असून तुह्मी आह्मांकडे मुळींच पहात नाहीं. एवढेंच नव्हे तर आपण आमचे शत्रू जे पांडव त्यांचें हित करण्याकरितां नेहमीं झटत असतां. तुह्मी आमचें अन्न खाऊन उलट आमचेंच अकल्याण करूं पहातां. मधांत बुडवलेल्या वस्ताऱ्याप्रमाणें आपण वरून गोड आहां हें मला पूर्वीं कळलें नव्हतें. आपण जर ' पांडवांना थोपवून धरतों' ह्मणून मला वचन दिलें नसतें तर मींही जयद्रथाला तो आपल्या घराकडे जावयाला निघाला असतां विनाकारण ठेवून घेतलें नसतें. तुमच्या सांगण्यावर विश्वास ठेवून मीं मूर्खानें जयद्रथाला येथें केवळ मारण्याकरितांच ठेवून घेतलें ! प्रत्यक्ष यमाच्या दाढेंत सांपडलेला मनुष्य ही एखादवेळ वांचेल, परंतु अर्जुनाच्या कचाट्यांत सांपडलेला जयद्रथ जिवंत सुटणार नाहीं. ह्मणून अहो महाभाग, जेणेंकरून आज जयद्रथाचा प्राण वांचेल असें कांहीं तरी करा. मी दुःखावेशानें आपणांपाशीं कमीजास्त बडबडलों आहें, ह्याबद्दल आपण कोप करूं नका. अहो आचार्य, कसें तरी करून जयद्रथाचें रक्षण करा.'

ह्यावर द्रोणाचार्य ह्मणाले, ' तुझ्या बोलण्यानें मी मुळींच रागावावयाचा नाहीं. तूं मला माझ्या अश्वत्थाम्यासारखा आहेस. हे राजा, मी आतां तुला खरें आहे तें सांगतों. धनंजयाचा सारथी श्रीकृष्ण आहे व त्याचे घोडेही फार चपळ आहेत. त्यामुळें त्याला एवढीशी वाट सांपडली तरी पुरें होतें. तेवढ्याच वाटेंतून तो पुढें जातो. तो चालला असतांना मीं आपल्या बाणांनीं त्याचा एक कोसपर्यंत पाठलाग केला हें तुला ह्या खालीं पडलेल्या बाणांवरून दिसत नाहीं काय ? ह्मातारपणामुळें मला आतां त्याच्या इतकी चलाखी करवत नाहीं. शिवाय बाकीचे पांडव आपल्या सैन्यांनिशीं व्यूहाच्या तोंडाला येऊन भिडले आहेत व ' सर्व धनुर्धरांच्या देखत युधिष्ठिराला जिवंत धरीन ' अशी मीं सर्व क्षत्रियांमध्यें उभा राहून प्रतिज्ञा केली आहे. अर्जुन पुढें व्यूहांत गेल्यामुळें धर्मराजच आपल्या सैन्याचा पुढाकार घेऊन मजवर चालून आला आहे. ह्मणून मी आतां ही व्यूहाच्या अघाडीची बाजू सोडून फाल्गुनाबरोबर युद्ध करण्याकरितां मागें जात नाहीं. तूंच आपल्या सैन्यानिशीं जाऊन धनंजयाबरोबर युद्ध कर. राजा, तूं स्वतः शूर वीर असून युद्धविद्याविशारद असा आहेस. ह्मणून तूंच पार्थाकडे जा.' हें ऐकून दुर्योधन ह्मणाला, 'अहो आचार्य, तुह्मांला देखील मागें सारून जो झपाट्यानें पुढें गेला त्या धनंजयाला अडविणें माझ्यानें कसें होईल ? एखादे वेळेस सुरपति इंद्राला जिंकणें शक्य आहे पण ह्या अर्जुनाशीं युद्ध करणें फार कठिण आहे. ज्यानें तुह्मांलाही जुमानलें नाहीं, ज्यानें कृतवर्म्याचा पराभव केला व ज्यानें श्रुतायुध, सुदक्षिण वगैरे पराक्रमी राजांना ठार मारून शेंकडों म्लेच्छांची कत्तल केली, अशा अग्नीप्रमाणें तेजस्वी अर्जुनाशीं माझ्यानें कसें युद्ध करवेल ? पण आपणाला माझ्यानें त्यांच्याशीं टक्कर देववेल असें वाटत आहे. कसेंही असलें तरी मी तुमचा बंदा सेवक आहें. माझें यश रक्षण करणें आपणाकडे आहे.' ह्यावर पुनः आचार्य ह्मणाले, ' हे कुरुश्रेष्ठा, तूं म्हणतोस तें अगदीं बरोबर आहे. अर्जुनाबरोबर युद्ध करणें खरोखरच फार कठिण आहे. तरी पण मी तुझ्यानें त्याचा तो असह्य मारा सहन करवेल असें करतों. श्रीकृष्णाच्या देखत अर्जुनाला तूं अडवून धरलेंस असें पाहून सर्व धनुर्धरांना आज अतिशय आश्चर्य वाटेल. राजा, तु-

ह्या अंगांत मी हें सोन्याचें कवच घालतों. याच्या योगानें तुझ्यावर शस्त्रास्त्रांची कांहींच मात्रा चालणार नाहीं. हें कवच तुझ्या अंगांत असेतोंपर्यंत अर्जुन, श्रीकृष्ण, किंबहुना सर्व देवांचें तुझ्याबर कांहीं चालावयाचें नाहीं. ह्मणून तूं हें कवच घालून अर्जुनावर चालून जा. ह्याच्या योगानें तूं अर्जुनाला सहज खेळवशील.' असें ह्मणून त्या ब्रह्मवेत्त्या द्रोणाचार्यांनीं डोळ्याला पाणी लावून मंत्र ह्मणत दुर्योधनाच्या अंगांत चिलखत चढविलें, व त्याला आशीर्वाद दिला. ते ह्मणाले, 'ब्रह्मादि देवगण तुझें कल्याण करोत. ययाति, नहुष, धुंधुमार व भगीरथ वगैरे राजर्षी तुझें रक्षण करोत. सर्व प्राणीमात्रांपासून तुझें कल्याण होवो. स्वाहा, स्वधा, शची, लक्ष्मी आणि अरुंधती ह्या देवता तुझें भलें करोत व वसिष्ठकश्यपादि मुनिगण तुजसाठीं स्वस्तिवादन ह्मणोत. हे गांधारे, पूर्वी वृत्रासुरानें सर्व देवगणांना जिंकून त्राहि त्राहि करून सोडलें. त्यामुळें ते सर्व देव घाबरून ब्रह्मदेवाला शरण गेले. त्यांना ब्रह्मा म्हणाला, 'तुम्हां सर्वांचें मीं रक्षण करावें हें योग्य आहे खरें. परंतु वृत्रासुर त्वष्ट्र्याच्या अमोघ तेजानें उत्पन्न झाल्यानें फार दुःसह झाला आहे. त्वष्ट्र्यानें हजारों वर्षे तपश्चर्या करून शंकराच्या प्रसादानें ह्या वृत्रासुराला निर्माण केलें आहे. म्हणून शंकराच्या कृपेशिवाय त्याला जिंकणें शक्य नाहीं.' हें ऐकून सर्व देव पुनः महादेवाकडे गेले; व वृत्रासुराची हकीकत त्यांनीं त्याला कळविली. ही, सर्व देवांची दीनवाणी ऐकून महादेवांनीं इंद्राला एक कवच देऊन तें घालण्याबद्दल एक मंत्र व विधीहि सांगितला. नंतर श्रीमहादेवांच्या आज्ञेप्रमाणें इंद्रानें तो मंत्र ह्मणून विधिपूर्वक तें कवच अंगांत चढवून सर्व देवांसह वृत्रासुराला मारलें. पुढें तो मंत्र व तें चिलखत इंद्रानें अंगिरसाला दिलें. नंतर अंगिरसानें आपला मुलगा जो बृहस्पति त्याला तें कवच समंत्र दिलें; व पुढें तें कवच बृहस्पतींनीं अग्निवेश्याला व अग्निवेश्यानें मला दिलें. व तेंच कवच आज मीं तुझ्या अंगांत घातलें आहे. ह्या कवचावर महादेवांनीं सांगितलेला मंत्र घातला आहे. शिवाय ब्रह्मदेवांचाही मंत्र घातला आहे.' असें सांगून आचार्यांनीं त्याला युद्धांत पाठविलें. तेव्हां तो एक हजार रथी, एक हजार हत्ती व दहा हजार घोडे, एवढें सैन्य घेऊन रणवाद्यांचा गजर करीत ऐटीनें अर्जुनावर चालून गेला.

---

## ३१ सात्यकि व द्रोणाचार्य यांचें युद्ध.

( ७. ९५-९९ )

इकडे दुर्योधन अर्जुनावर चालून गेल्यावर बाकीचे पांडववीर आपापल्या सैन्यासह द्रोणाचार्यांवर तुटून पडले. तेव्हां व्यूहाच्या तोंडाशीं कौरवपांडवांचें घनघोर युद्ध झालें. तो संग्राम पाहण्याकरितां सूर्य आकाशाच्या अगदीं मध्यभागीं आला. धृष्टद्युम्नादि पांडववीर आपल्या सैन्याची नीट व्यवस्था लावून कौरवसैन्यावर खूप झपाट्यानें बाणांचा मारा करीत होते. कौरवही द्रोणाचार्यांना पुढें करून पांडवांवर बाण सोडीत होते. पावसाळ्यांतील झंझावातानें समुद्र जसा खवळून जातो त्याप्रमाणेंच आचार्यांच्या बाणांनीं सर्व पांडवसेना खवळून गेली होती. परंतु पर्वतापुढें पाण्याच्या प्रवाहाचें जसें कांहीं चालत नाहीं, त्याप्रमाणेंच पांडवांचेंही आचार्यांपुढें कांहीं चालेना. हें पाहून धृष्टद्युम्न आचार्यांवर चाल करून आला. द्रोणाचार्यांनीं ज्या ज्या रथ्यांवर म्हणून बाण सोडले, त्या प्रत्येक रथ्याला धृष्टद्युम्नानें आपल्या बाणांनीं द्रोणाचार्यांचे बाण तोडून टाकून आचार्यांच्या कचाट्यांतून मुक्त केलें. धृष्टद्युम्नाचा मारा सहन न झाल्यानें कौरवांचें सैन्य आश्रयासाठीं तीन वाटांनीं पळूं लागलें. एका तुकडीनें कृतवर्म्याचा आश्रय केला. दुसरीनें जलसंधाचा आश्रय केला व तिसरीनें द्रोणाचार्यांचा आश्रय केला. ह्या पळत सुटलेल्या सैन्याची द्रोणाचार्य जसजशी व्यवस्था लावीत होते तसतशी धृष्टद्युम्न त्यांची वाताहात करीत असे. अशा रीतीनें द्रोणाचार्यांसारख्या वीरांनाही थक्क करून कौरवसैन्याचा फडशा पाडीत धृष्टद्युम्न चालला असतां आचार्यांनीं दहा बाण सोडून त्याची तलवार, ढाल, घोडे, ध्वज, व छत्र या सर्वांचा फडशा पाडला व दुसरा एक बाण धनुष्याची दोरी आकर्ण ओढून त्याचा जीव घेण्याकरितां जोरानें सोडला. इतक्यांत सात्यकीनें चौदा बाण सोडून आचार्यांच्या बाणाला धृष्टद्युम्नापर्यंत

येऊं न देतां मध्येंच त्याचे तुकडे तुकडे करून पाडले. याप्रमाणें सिंहाच्या तडाक्यांत सांपडलेल्या हरिणाप्रमाणें आचार्यांच्या कचाट्यांत सांपडलेल्या धृष्टद्युम्नाला सात्यकीनें मुक्त केलें. हें पाहून धनुष्याची कमान हेंच ज्यांचें आ पसरलेलें तोंड आहे, तीक्ष्ण धारेचे बाण हेच ज्यांचे दांत आहेत असे क्रोधरूपी विषानें भरलेले द्रोणाचार्य डोळे लाल करून मोठ्यानें फुसकारे टाकीत सात्यकीवर धांवले. हें पाहून शूर सात्यकि आपल्या सारथ्याला ह्मणाला, ' कौरवांच्या सर्व आशेचें स्थान ह्मणजे हे शूर द्रोणाचार्य होत. तर चल यांचीच खबर घेऊं, लवकर घोडे हाक. हें ऐकल्याबरोबर सारथ्यानें त्याचा रथ आचार्यांच्या रथाशीं नेऊन भिडविला. तेव्हां ते दोघेही वीर एकमेकांला आपलें युद्धचातुर्य दाखविण्याकरितां मोठ्या शिताफीनें बाणांचा वर्षाव करूं लागले. उन्हाळ्याचे शेवटीं जोरानें पाऊस पडून जसें जिकडे तिकडे जलमय होऊन जातें त्याप्रमाणें ह्यांच्या बाणवर्षावानें सर्व रणांगण बाणमय होऊन गेलें. सर्व आकाशही बाणानें भरून गेल्यामुळें समरभूमीवर सूर्याचा प्रकाश मुळींच येईनासा झाला व वारा वाहीनासा झाला. ह्या वीरांच्या धनुष्याचा टणत्कार ऐकून विजेच्या कडकडाटाप्रमाणें त्या रणभूमीवरील शूरांच्या कानटाळ्या बसूं लागल्या. दोघांनीं एकमेकांचे ध्वज व छत्र पाडलें. दोघांचें शरीर रक्तबंबाळ झालें होतें. प्रत्येकजण एकमेकांचा जीव घेण्याकरितां सापासारखा विषारी बाण सोडीत होता व भयंकर सिंहनाद करीत होता. यांचें हें युद्ध पहात दोन्ही पक्षाकडील योद्धे शत्रूकडील लोक अगदीं आपल्या पुढें आले असतांही त्यांच्यावर हात न उगारतां तटस्थ उभे होते. हत्ती, घोडे, पायदळ वगैरे चतुरंग सैन्य शत्रूच्या माराची फिकीर न करतां यांचेंच युद्ध पहात स्वस्थ उभे होते. एवढेंच नव्हे, तर सिद्ध, चारण विद्याधर व गंधर्व वगैरे देवगणही ह्यांचें हें युद्ध पाहण्याकरितां विमानांत बसून त्या ठिकाणीं आले होते. दोघांच्या सारथ्यांनीं ह्या वीरांप्रमाणेंच आपलें कौशल्य प्रगट केलें. अशा रीतीनें तुमुल युद्ध चाललें असतांना सात्यकीनें आचार्यांचें धनुष्य वारंवार तोडण्याचा सपाटा चालविला. आचार्यांनीं धनुष्य घेण्याचा अवकाश कीं सात्यकीनें तें तोडलेंच. याप्रमाणें सात्यकीनें आचार्यांचीं शंभर धनुष्यें तोडून पाडलीं. सात्यकीचें हें हस्तलाघव पाहून द्रोणाचार्यसुद्धां आनंदानें डोलूं लागले. ' याच्यावर आतां अस्त्रप्रयोगच केला पाहिजे. ' असा विचार करून द्रोणाचार्यांनीं आपल्या बाणांवर अस्त्रप्रयोग करून ते सात्यकीवर सोडले. त्यानेंही त्याच्याच तोडीचें असें दुसरें अस्त्र सोडून आचार्यांचें अस्त्र निष्फळ केलें. लगेच आचार्यांनीं दुसऱ्या अस्त्राचा प्रयोग केला. त्याचीही सात्यकीनें तीच वाट लाविली. याप्रमाणें ह्याही वेळेला आचार्य जें जें ह्मणून अस्त्र सोडीत त्या प्रत्येक अस्त्राची सात्यकि तोड करीत असे. ह्याचें हें असाधारण कृत्य पाहून रणांगणावरील सर्व योद्धे त्याची वाहवा करूं लागले. आपला प्रत्येक प्रयत्न व्यर्थ होतो हें पाहून द्रोणाचार्यांना फार राग आला. ह्मणून त्यांनीं आपल्या प्रतिपक्ष्याला ठार करण्याकरितां आग्नेयास्त्र सोडलें. लगेच सात्यकीनें वारुणास्त्र सोडलें. हें पाहून सर्व समरांगणावर एकच हाहाकार उडाला. हीं दोन्ही अस्त्रें एकमेकांला भिडून नाहींशीं होईपर्यंत आकाशगामी प्राणी आकाशांतून हिंडेनासे झाले, एवढेंच नव्हे तर सूर्यही त्या भयंकर अस्त्रांनीं विषुववृत्ताच्या खालीं उतरला. इतक्यांत भीम, युधिष्ठिर, नकुल, सहदेव व धृष्टद्युम्नादि पांडववीर सात्यकीच्या मदतीला धांवून आले. व दुःशासनादि कौरववीर द्रोणाचार्यांच्या मदतीला धांवून आले. त्यामुळें यांचें हें द्वंद्वयुद्ध थांबून दोन्ही पक्षांकडील लोकांचें तुमुल युद्ध चालूं झालें.

---

## ३२ विंदानुविंदांचा वध. ( ७. १०० )

अशा रीतीनें इकडे सूर्य अस्ताचलाच्या बाजूला वळला असतां व दोन्ही सैन्यें एकमेकांवर तुटून पडलीं असतां अर्जुन व वासुदेव हे दोघे जयद्रथाला गांठण्याकरितां झपाट्यानें चालले होते. अर्जुन आपल्या तीक्ष्ण बाणांनीं शत्रुसैन्यांतून रथापुरतीच वाट काढीत असे व तेवढ्याच अकुंचित वाटेनें जनार्दन त्याचा रथ मोठ्या शिताफीनें हाकीत असे. अर्जुनाचा रथ इतक्या जलदीनें चालला होता कीं, रथांत बसून त्यानें एक कोसावरील

शत्रूवर नेम धरून सोडलेला बाण, तो रथ त्या शत्रूच्या पुढें एक कोसभर गेल्यानंतर लागत असे. अर्जुनाचे घोडे लठ्ठ व फार वेगवान होते व त्यांना कृष्णासारखा नेता मिळाल्यामुळें त्यांनीं आपल्या वेगानें सर्व जगाला थक्क करून सोडलें. याप्रमाणें वेगानें घोडे हाकीत श्रीकृष्ण कौरवसेनासमूहाच्या अगदीं मध्यभागीं येऊन ठेपला. पण ह्या वेळीं त्याचे घोडे श्रमानें व तान्हेनें फार थकून गेले होते. त्यांच्या आंगांवर चोहोंकडे वार लागले होते. यामुळें ते तो रथ कसा तरी ओढून नेत होते. इतक्यांत अवंतीचे राजपुत्र विंदानुविंद हे दोघे अर्जुनाचे घोडे दमले आहेत हें पाहून आपल्या सैन्यानिशीं मोठ्या ऐटीनें या पांडववीरावर चालून आले. त्यांनीं आल्याबरोबर अर्जुन, श्रीकृष्ण आणि त्याचे घोडे ह्या सर्वांना आपल्या बाणांनीं घायाळ केलें. हें पाहून अर्जुनानें त्यांच्यावर मोठ्या रागानें नऊ दहा बाण सोडले. पण यांनीं त्या बाणांचे मध्येंच तुकडे करून अर्जुनाला आपल्या बाणांनीं झांकून टाकला, व मोठी सिंहगर्जना केली. ह्यामुळें पांडवाला फार राग आला. लगेच त्यानें त्यांचीं धनुष्यें तोडलीं, सारथी मारले, चक्ररक्षक ठार केले, घोड्यांचा फन्ना उडविला व विंदाचें डोकें उडविलें. त्यावर अनुविंदानें सारथीहीन रथावरून उडी टाकून हातांत गदा घेऊन धनंजयावर चाल केली. व श्रीकृष्णाच्या कपाळावर जोरानें प्रहार केला. हें पाहून अर्जुनानें त्याचें डोकें, दोन हात व दोन पाय हीं सर्व छाटून टाकलीं. दोघेही राजपुत्र मेलेले पाहून त्यांच्या सैनिकांनीं पांडवांवर चाल केली. पण त्या सर्वांचा एकट्या अर्जुनानें फडशा पाडला. पण अर्जुन, अर्जुनाचे घोडे आणि सारथी श्रीकृष्ण, हे सर्व अगदीं दमून गेले आहेत व जयद्रथ अद्याप फार लांब आहे हें पाहून कौरवसैनिक मोठ्या उत्साहानें एकट्या अर्जुनावर तुटून पडले. त्यांना पाहून अर्जुन श्रीकृष्णाला ह्मणाला, ‘कृष्णा, घोडे शत्रूंच्या बाणांनीं घायाळ झाले असून श्रमानें अगदीं थकून गेले आहेत. व जयद्रथ तर अजून फार लांब आहे. करितां हे माधवा, घोडे सोड, व त्यांच्या अंगांतील बाण उपसून काढून त्यांना थोडासा विसावा दे. ’ श्रीकृष्णालाही गोष्ट पसंत पडली. नंतर पुनः अर्जुन ह्मणाला, ‘मी ह्या सर्व सेनेला थोपवून धरतों; व काय करावयाचें असेल तें तूं कर. ’ असें ह्मणून अर्जुनानें आपलें गांडीव हातांत घेऊन रथावरून खालीं उडी ठोकली. त्यासरशीं ‘ धनंजयाला मारण्याची हीच वेळ आहे, ’ असें समजून सर्व क्षत्रियवीर त्याच्यावर बाणांचा मारा करीत व अस्त्रें सोडीत एकदम तुटून पडले. त्या वेळीं अर्जुनाचा खरा पराक्रम सर्वांच्या दृष्टीस पडला. कारण एकट्या अर्जुनानें पायींच, आपल्यावर चालून आलेल्या सर्व रथदळांशीं टक्कर देऊन, त्यांच्या अस्त्रांचें आपल्या अस्त्रांनीं निवारण करून व आपल्या बाणांनीं त्यांच्या बाणांचा फडशा उडवून त्या सर्वांना अगदीं जर्जर करून सोडलें ! बाण हेच ज्यांतील लाटा, रथ हे भोंवरे, हत्ती ह्या सुसरी, पायदळांतील शिपाई हे मासे, छत्र चामरें हीं फेंस व शंखनाद आणि रणवाद्यांचा गजर हीच ज्याची गर्जना अशा कौरवांच्या सैन्यरूपी समुद्राला एकट्या पार्थानें आपल्या बाणांनीं अडवून धरलें. एकटा लोभ ज्याप्रमाणें मनुष्यांच्या अंगांतील सर्व सुगुणांचें मातेरें करतो त्याप्रमाणें एकट्या अर्जुनानें पायीं सर्व कौरवसेनेला निस्तेज करून सोडलें. हें पाहून श्रीकृष्ण अर्जुनाला ह्मणाला, ‘ अर्जुना, घोडे फार तान्हेजले आहेत. त्यांना येथें प्यावयला पाणी नाहीं. ’ हें श्रीकृष्णाचें वाक्य ऐकल्याबरोबर अर्जुनानें पृथ्वींत एक बाण सोडला. त्याबरोबर तेथें स्वच्छ पाण्याचें असें सुंदर सरोवर निर्माण झालें. मुनींच्या स्नानाला व हंस, चक्रवाकादि पक्ष्यांच्या वासाला योग्य असें तें सरोवर असल्यामुळें नारदमुनि सुद्धां त्याच्या दर्शनाकरितां आले. ह्या सरोवराच्या पाठोपाठच अर्जुनानें बाणांचे वांसे, बाणांचें आढें व बाणांचेच खांब ज्याला उभे केले आहेत असें एक रमणीय मंदिर घोड्यांना पाणी पिऊन सावलीमध्यें सुखानें कांहीं वेळ राहण्याकरितां ह्मणून तयार केलें. हें मंदिर पाहून श्रीकृष्णानें सुद्धां त्याला शाबासकी दिली.

नंतर श्रीकृष्णानें रथावरून खालीं उडी ठोकून, थकलेल्या व बाणांनीं घायाळ झालेल्या अशा घोड्यांनाही सोडलें. शत्रूकडील लोकांचे बाण यांच्यावर एकसारखे येतच होते. पण पृथ्वीवरील न-

या जशा समुद्राकडे गेल्यावरोबर तेथल्या तेथेंच गडप होतात त्याप्रमाणें कौरवांचे बाण अर्जुनाजवळ त्याच्या अस्त्रप्रभावानें गडप होत असत. कृष्णार्जुनांना ह्या शत्रूंच्या, बाणांची, शस्त्रांची व अस्त्रांची कांहींच बाधा झाली नाहीं. श्रीकृष्णानें ते घोडे सोडून सर्व शत्रूंच्या देखत, त्यांचे बाण उपसून काढून अंग चोळलें, व त्यांना स्वच्छ धुवून पाणी पाजून त्या बाणमय मंदिरांत कांहीं वेळ विसांवा दिला. लागलीच श्रीकृष्णानें रथाला पुनः घोडे जोडून व उभयतां त्यावर बसून तो हाकला देखील ! पाणी प्याल्यामुळें व विसांवा घेतल्यामुळें घोड्यांना ताजा दम आला; त्यामुळें ते आतां पहिल्यापेक्षां खूप जलदीनें चालले होते. हें पाहून तर कौरवांचें धावेंच गडबडलें. ‘ अहो धिःकार असो आह्मांला ! आह्मां सर्वांच्या देखत आह्मांला , लहान मुलाप्रमाणें तुच्छ करून हे कृष्णार्जुन पुनः निघाले देखील ! वीरहो धांवा, कृष्णार्जुनांना मारण्याकरितां लौकर धांव ध्या. नाहीं तर आतां हे जयद्रथाकडे चालले पहा ! ’ असें ओरडून सर्व कौरवांनीं एकच गोंधळ करून दिला. सिंहाच्या सभोंवार हरिणादि श्वापदांनीं किती जरी नेटानें गराडा दिला तरी त्यांच्यानें सिंहाचें काय वांकडें व्हावयाचें आहे ? अर्जुन त्या सर्वांना आपल्या बाणांनीं जर्जर करून जयद्रथाला गांठण्याकरितां तसाच झपाट्यानें पुढें चालला. कृष्णार्जुन व्यूहाच्या तोंडाशीं असतांना ह्यांना द्रोणाचार्य व कृतवर्मा यांच्या सैन्यांतूनच पार होतां येणार नाहीं, असें दुर्योधनादि कौरवांना वाटत होतें. व जयद्रथालाही आचार्य व कृतवर्मा यांचा फार भरंवसा वाटत होता. पण आतां ह्यांना जयद्रथाच्या अगदीं जवळ जवळ आलेले पाहून सर्वांचाच धीर सुटला. जयद्रथाच्या जगण्याची आशा कोणालाच वाटेनाशी झाली. कृष्णार्जुनांना तर आपण जयद्रथाच्या जवळ जवळ येत चाललों हें पाहून पक्ष्याला आमिष सांपडल्याप्रमाणें फार आनंद झाला होता.

---

## ३३ दुर्योधन व अर्जुन यांचें युद्ध.
### ( ७. १०१—१०७ )

अशा रीतीनें सर्व कौरवसेनेला पादाक्रांत करून कृष्णार्जुन जयद्रथाला मारण्याकरितां झपाट्यानें पुढें चालले आहेत हें पाहून जयद्रथाच्या रक्षणाकरितां दुर्योधन वेगानें धांवत आला. द्रोणाचार्यांनीं त्याच्या आंगावर दिव्य कवच घातल्यामुळें त्याला ह्या वेळीं अधिक उमेद आली होती. तो धनंजयापुढें येऊन उभा राहिल्यावरोबर कौरवसैन्यांत जिकडे तिकडे रणवाद्यें वाजूं लागलीं, सिंहगर्जना व शंखनाद हीं ऐकूं येऊं लागलीं. त्याचप्रमाणें जयद्रथाचे रक्षक जे कर्णादि वीर त्यांनाही फार आनंद झाला आहे. हें पाहून श्रीकृष्ण अर्जुनाला ह्मणाला, ‘ हे धनंजया,हा पहा दुर्योधन आपणांवर चालून आला आहे. हा शूर असून ह्याला नेम चांगला धरतां येतो; हा अस्त्रसंपन्न आहे, व याला सर्व प्रकारच्या युद्धकला चांगल्या अवगत आहेत. ह्याला सर्व लोक महारथी असें समजतात. हा नेहमीं तुह्मां सर्व भावांचा अतिशय द्वेष करतो. ह्मणून हे निष्पाप्या, ह्या वेळीं ह्याच्याशीं निकरानें युद्ध करणें हेंच मला बरें दिसतें. जय किंवा अपजय मिळविण्याची संधि काय ती हीच आहे. पार्था, आजपर्यंत सांठलेला तुझ्या मनांतला राग शमविण्याची आतां वेळ आली आहे. पांडवांच्या सर्व अनर्थांला कारण असा हा दुर्योधन आतां तुझ्या बाणाच्या टप्पांत आला आहे; तर आतां सोडूं नकोस. गुरूपासून मिळविलेल्या विद्येचें आता सार्थक करून घे. राज्यलोभी अशा या दुर्योधनाशीं प्रत्यक्षपणें दोन हात होण्याचा प्रसंग येणें फार कठीण आहे. असें असून तो आज सहजगत्या तुझ्या तडाक्यांत आला आहे. तर आतां सोडूं नकोस. हे धनंजया, जेणेंकरून दुर्योधनाला ह्या मृत्यु लोकाला राम राम ठोकण्याचीच पाळी येईल असें कर. ऐश्वर्यमदानें चढलेल्या अशा ह्याला आजपर्यंत दुःख ह्मणून कसलें तें माहीत नाहीं. व तुझा पराक्रमही अजून ह्याला कळला नाहीं; देव, दानव व मनुष्य ह्यांपैकीं कोणीही तुझ्याबरोबर युद्ध करावयाला धजत नाहीं ! मग ह्या एकट्या दुर्योधनाची ती काय कथा ! इंद्रानें जसें वृत्रासुराला मारलें तसेंच तूंही आज ह्याला ठार कर. कपटानें द्यूत खेळून धर्मराजाला फसविलेला तो हाच. तुह्मां निष्पाप अशा पांडवांना आजपर्यंत विनाकारण त्रास दिलेला हाच. ह्मणून हे महाबाहो, वाटेल

तसा अनाचार करणाऱ्या ह्या अनार्याला आधीं कांहीं विचार न करितां ठोक. कपटानें राज्य हरण केलें, तुह्मां सर्वांना वनवासाला धाडलें, साध्वी द्रौपदीची भर सभेंत विटंबना केली, हें सर्व आधीं लक्षांत आण, आणि मग ह्याच्या नरडीचा घोंट घेणारा असा एक तीक्ष्ण बाण सोड. आजच्या तुझ्या कार्याला अडथळा करण्याकरितां ह्मणून हा तुझ्याशीं युद्ध करण्याला आला आहे. त्यामुळें आपोआपच, तुझ्या दैवयोगानें तुझ्या सर्व इच्छा पूर्ण होण्याची संधि आली आहे. ह्मणून ही संधि न दवडतां ह्या पाप्याला ठार करून सर्व भांडणाचें मूळच उपटून टाक. ह्याला मारलेंस ह्मणजे मग बाकीच्या सेनेचा फडशा पाडण्याला तुला मुळींच उशीर लागणार नाहीं, तें काम मग हां हां ह्मणतां होईल.' हें ऐकून अर्जुन श्रीकृष्णाला ह्मणाला, 'हें तर माझें काम आहे. दुर्योधनाला मारणें हें माझें अवश्य कर्तव्य आहे. कृष्णा, आतां दुसरीकडे कोठेंही न जातां आधीं त्याच्याकडेच जाऊं या. तर चल हाक, तिकडेच घोडे हाक. ह्यानें आजपर्यंत आमच्या राज्याचा निष्कंटकपणें उपभोग घेतला आहे, ह्मणून ह्याचें आतां डोकें उडवून त्या सर्वांचें उट्टें काढतों. अशा रीतीनें बोलत बोलत कृष्णार्जुनांनीं आपला रथ दुर्योधनाच्या रथाजवळ नेऊन भिडविला. कृष्णार्जुनांना जवळ आलेले पाहून अगदीं न डगमगतां दुर्योधन नेटानें युद्धाला उभा राहिला. व अर्जुनाला ह्मणाला, 'पार्था, आजपर्यंत तूं जें कांहीं गुरूजवळ शिकला असशील तें सर्व आतां मजजवळ दाखीव. कृष्णाच्या व तुझ्या अंगांत कितपत पाणी आहे तें आह्मांला पहावयाचें आहे. आमच्यामागें आपण मोठमोठ्या पराक्रमाचीं कृत्यें केलीं आहेत असें हे लोक नेहमीं ह्मणत असतात. तर आतां आपली काय करामत असेल ती प्रत्यक्षच दाखीव.' असें ह्मणून दुर्योधनानें अर्जुनाच्या अंगावर तीन व त्याच्या चार घोड्यांवर चार बाण सोडले; आणि श्रीकृष्णावरही आठ बाण सोडून त्याच्या हातांतला चाबूक तोडून खालीं पाडला. अर्जुनानेंही उलट त्याच्यावर दहावीस बाण सोडले; पण ते दुर्योधनाच्या अंगावरील दिव्य चिलखताचा स्पर्श झाल्याबरोबर निर्वीर्य होऊन खालीं गळून पडले. ह्या बाणांचा कांहींच उपयोग झाला नाहीं हें पाहून पुनः त्याच्यावर चवदा बाण सोडले; पण त्यांचीही तीच स्थिति झाली. अर्जुनाचे सर्व बाण निष्फळ होतात हें पाहून श्रीकृष्ण त्याला म्हणाला, 'तुझा एकही बाण लागू होत नाहीं हें पाहून मला दगडांना पाय फुटल्याप्रमाणें अचंबा वाटत आहे. तुझ्या गांडीवाचा ताण पहिल्यासारखाच आहेना? तुझ्या दंडाची व मुठीची ताकद कायम आहेना? कां तुम्हां दोघांची ही आतां शेवटचीच भेट? वज्रासारखे बळकट व शत्रूची छाती फोडून पार जाणारे असे हे तुझे तीक्ष्ण बाण निर्जीव होऊन आज खालीं पडतात! तेव्हां अर्जुना ह्याच्यापेक्षां तुझी फजिती ती कसली व्हावयाची? हें ऐकून अर्जुन म्हणाला, 'कृष्णा, हें अभेद्य कवच द्रोणाचार्यांनीं याच्या अंगांत घातलें आहे, सर्व त्रैलोक्यही ह्या कवचाखालीं गडप होईल असा ह्या कवचाचा प्रभाव आहे. ही कवचविद्या फक्त एका द्रोणाचार्यांनाच माहीत आहे. आणि त्याच सत्पुरुषापासून मीं ती संपादन केली आहे. इंद्राच्या वज्राचाही ह्याच्यावर कांहीं प्रभाव चालावयाचा नाहीं! मग माझ्या ह्या बाणांची ती काय कथा? कृष्णा, तुला सर्व विश्वांतील भूत, भविष्य व वर्तमान ह्या तिन्ही कालांचें ज्ञान असून अगदीं माहीत नसल्याप्रमाणें प्रश्न करून मला आणखी बुचकळ्यांत पाडतोस काय? परंतु हे जनार्दना, ह्याच्या अंगावर हें कवच असतांनाही मीं ह्याला माझ्या बाणांनीं घायाळ करून पळावयाला लावतों. प्रत्यक्ष ब्रह्मदेव जरी त्या कवचांत येऊन बसले तरीसुद्धां त्यांच्यानें आत। माझ्या बाणापासून ह्याचें रक्षण करणें होणार नाहीं.' असें ह्मणून अर्जुनानें आपल्या बाणांवर मानवास्त्राचें अभिमंत्रण करून ते बाण गांडीवाच्या दोरीला लावून जोरानें दुर्योधनावर सोडले. पण ते बाण त्याच्या धनुष्यापासून सुटतात न सुटतात इतक्यांत अश्वत्थाम्यानें त्याच अस्त्रानें त्या सर्वांचे तुकडे तुकडे करून खालीं पाडले. इतक्यांत दुर्योधनानें कृष्णार्जुनावर जलदीनें बाण सोडून त्यांना आपल्या बाणाखालीं अगदीं झांकून टाकलें.' त्यामुळें पार्थाला अतिशय राग येऊन त्यानें दुर्योधनावर बाण रोंखले, परंतु त्याचें सर्व शरीर त्या दिव्य कवचानें झांकलेलें असल्यामुळें त्यानें बाणांनीं प्रथ-

मतः त्याचे घोडे, चक्ररक्षक, साराथि आणि रथ ह्या सर्वांचा चुराडा उडविला. अशा रीतीनें विरथ झाल्यामुळें दुर्योधन जमिनीवरच उभा राहिला. त्याबरोबर त्याच्या दोन्ही तळहातांवर पार्थानें अतिशय तीक्ष्ण असे बाण सोडले, ते दुर्योधनाच्या हातांत रुतून बसल्यामुळें त्याला फार वेदना होऊं लागल्या. त्या सहन न झाल्यामुळें दुर्योधनानें तेथून पळच काढला.'

आपल्या राजाची ही अशी कष्टदशा पाहून सर्व कौरववीर रागानें एकदम अर्जुनावर तुटून पडले व त्या सर्वांनीं मिळून अर्जुनावर बाणांचा वर्षाव केला. भूरिश्रवा, शल, कर्ण, वृषसेन, कृप, शल्य व अश्वत्थामा असे सात महारथी जयद्रथाच्या रक्षणाकरितां त्याच्या आसपास उभे होते. शत्रूचें सैन्य पुनः आपल्यावर जोमानें चालून येत आहे असें पाहून अर्जुनानें आपला देवदत्त व कृष्णानें आपला पांचजन्य वाजविला. यांच्या आवाजानें सर्व आकाशपाताळ अगदीं दणाणून गेलें. हा आवाज सहन न होऊन कर्णादि वीरांनीं एकदम त्यांच्यावर हल्ला केला. अश्वत्थाम्यानें प्रथमतः श्रीकृष्ण व अर्जुन ह्या दोघांवरही बाण सोडले. तेव्हां अर्जुनानें रागानें कर्ण व वृषसेन यांचा समाचार घेऊन शल्याचें धनुष्य तोडून पाडलें. लगेच शल्यानें दुसरें धनुष्य घेऊन अर्जुनावर बाणांचा मारा चालविला. कर्णादि बाकीच्या वीरांपैकीं कोणी श्रीकृष्णाचा चाबूक तोडला तर कोणी घोड्यांवर बाण मारले. कोणी अर्जुनावर सोडले तर कोणी श्रीकृष्णावर नेम धरला, अशा रीतीनें सर्वजण मिळून त्रास देऊं लागले. पण एकटा अर्जुन या सर्वांनाही आपल्या बाणांनीं जर्जर करीत होता.

इकडे अर्जुन गेल्यानंतर सर्व पांडवांना द्रोणाचार्यांनीं थोपवून धरलें होतें. त्यामुळें त्यांचें व्यूहाचें तोंडाशींच कौरवांबरोबर बरेंच तुमुल युद्ध चाललें चाललें होतें. तिसऱ्या प्रहरच्या सुमारास केकयाकडील महारथी बृहत्क्षत्र हा द्रोणाचार्यांवर चालून गेला. पण क्षेमधूर्तीनें याला मध्येंच थोपवून धरलें. तेव्हां राजा युधिष्ठिर आचार्यांवर चालून गेला. तेव्हां द्रोणाचार्यांनीं त्याला त्याचे घोडे सारथी यांसह बराच घायाळ केला. व पुनः त्याच्यावर तीक्ष्ण बाणांचा मारा चालविला. परंतु युधिष्ठिरानें थोडीशी चलाखी करून आचार्यांचे सर्व बाण खालीं पाडले. हें पाहून आचार्यांनीं रागानें त्याचें धनुष्य तोडून पायापासून डोक्यापर्यंत त्यचें सर्व शरीर बाणांनीं भरून सोडलें. पण युधिष्ठिरानें दुसरें बळकट धनुष्य हातीं घेऊन आचार्यांचे सर्व बाण तोडून टाकले. लगेच पुनः धर्मानें पर्वताला भेदून टाकण्याइतकी बळकट सोन्याचा दांडा असलेली व भयंकर आवाजाच्या आठ घांटा लावलेली अशी एक दिव्य शक्ति त्याच्यावर सोडली. ही शक्ति जी धर्मापासून सुटली ती लगेच जळत जळत आकाशांतून आचार्यांकडे गेली. तिला पाहून आचार्यांनीं ब्रह्मास्त्र सोडलें. तें ब्रह्मास्त्र ह्या शक्तीचा फडशा पाडून धर्मराजावर चालून आलें. हें पाहून धर्मानेंही ब्रह्मास्त्रच सोडलें. अशा रीतीनें आचार्यांच्या ब्रह्मास्त्राचें ब्रह्मास्त्रानेंच निवारण करून धर्मानें द्रोणाचार्यांच्या पायांवर प्रखरसे पांच चार बाण सोडले व त्यांचें धनुष्यही तोडून टाकलें. नंतर आचार्यांनीं धर्मावर गदा फेंकली. हें पाहून धर्मानेंही उलट गदाच फेंकली. त्या दोन्ही गदांची आकाशांत जोरानें टक्कर झाल्यामुळें रणभूमीवर कांहीं वेळ सारख्या विस्तवाच्या ठिणग्या पडत होत्या. नंतर त्या त्वेषाच्या भरांत द्रोणांनीं धर्माचे घोडे मारले, धनुष्य तोडलें व ध्वज खालीं पाडला. धर्मराज विरथ होऊन निःशस्त्र असा खालीं उभा आहे हें पाहून द्रोणाचार्यांनीं जरा जलदीनें त्याच्यावर लगट केली. द्रोणाचार्य जवळ आल्याबरोबर 'राजा मेला, द्रोणांकडून राजा ठार झाला' अशी सर्व पांडवसैन्यांत एकच आरोळी झाली. इतक्यांत धर्मराजानें सहदेवाच्या रथावर उडी ठोकून तेथून पळ काढला.

इकडे बृहत्क्षत्र व क्षेमधूर्ति यांचें तसेंच तडाक्यानें युद्ध चाललें होतें. क्षेमधूर्तीनें बृहत्क्षत्राचें धनुष्य तोडून त्याच्या छातीवर नेमके बाण मारून त्याला बरेंच घायाळ केलें होतें. यामुळें चिडून जाऊन बृहत्क्षत्रानें दुसरें धनुष्य घेऊन सपाट्यासरशीं त्याचे घोडे आणि सारथी यांना इहलोकांतून मुक्त करून एक रुंद फळाचा बाण नेमका त्याच्या गळ्यावर सोडला. त्यासरशीं त्याचें शिर धडापासून वेगळें होऊन पटदिशीं खालीं हापटलें! त्याचें तें तेजस्वी

मुखकमल पाहून लोकांना आकाशांतून एखादा ताराच गळून पडला कीं काय असें वाटलें !

याच वेळीं धृष्टकेतु आचार्यांवर चालून जाऊं लागला. पण त्याला वीरधन्व्यानें अडवून धरलें. तेव्हां ह्या दोघांचें युद्ध फारच भयंकर झालें. वीरधन्व्यानें सामनेवाल्याचें धनुष्य तोडतांच धृष्टकेतूनें एक तेजस्वी शक्ति त्यावर सोडली. ती तशीच वेगानें जाऊन वीरधन्व्याच्या छातीवर बसल्यामुळें त्याची छाती फुटून तिच्या चिंधड्या उडाल्या. वीरधन्व्याचा शेवट लागतो न लागतो इतक्यांत दुर्मुख व सहदेव ह्या दोघां भावांची लढाई जुंपली. दुर्मुखानें सहदेवावर एकदम पन्नास साठ बाण सोडून त्याला बराच घायाळ केला; व मोठी गर्जना केली. हें पाहून सहदेवानें त्याचा ध्वज तोडून खालीं पाडला, घोडे मारले, सारथ्याला ठार केलें व शेवटीं त्याचें धनुष्य तोडून त्यालाही घायाळ केलें. तेव्हां त्यानें जवळच असलेला, त्रिगर्त देशचा राजपुत्र निरमित्र याच्या रथांत उडी ठोकली. आपल्या शत्रूनें निरमित्राचा आश्रय केला हें पाहून सहदेवानें निरामित्राचें डोकें उडविलें. हें पाहून सर्व त्रिगर्तसैन्यांत बराच हाहाकार उडाला.

त्याचप्रमाणें नकुलानें विकर्णाला थोड्याच वेळांत जेर केला. व सात्यकीनें मागधाधिपति व्याघ्रदत्ताला गांठून त्याचा व त्याच्या सैन्याचाही फडशा उडविला. हें पाहून द्रोणाचार्यांना फार राग आला. ह्मणून ते डोळे वगैरे वटारून मोठ्या त्वेषानें त्याच्यावर चालून गेले.

इकडे द्रौपदीच्या मुलांवर सौमदत्तीनें बाणांचा मारा करून त्यांना अतिशय विव्हळ केलें; सौमदत्तीनें एकदम प्रत्येकाच्या छातींत एक एक बाण घुसेल अशा खुबीनें पांच बाण सोडले. ते त्यांना सहन न होऊन पांचहीजणांनीं मिळून एकदम सौमदत्तीवर हल्ला केला.अर्जुनाच्या मुलानें त्याच्या घोड्याला यमाचा दरबार दाखविला, भीमाच्या मुलानें धनुष्य तोडलें. युधिष्ठिराच्या मुलानें बावटा पाडला, नकुळाचा मुलगा शतानीक यानें सारथ्याला मारला आणि शेवटीं सहदेवाच्या मुलानें सौमदत्तीचें डोकें उडविलें. प्रातःकाळच्या सूर्याप्रमाणें तेजस्वी असें तें शिरकमल खालीं पडलेलें पाहून सर्व कौरवांचा धीर सुटला. इतक्यांत अलंबुष हा सर्वांना धीर देत भीमसेनावर चालून आला. तेव्हां त्यांचें इंद्रजित व लक्ष्मण यांच्याप्रमाणें फारच प्रेक्षणीय युद्ध झालें.

---

## ३४ भीम व अलंबुष यांचें युद्ध.

(७-१०८-११०)

भीम व अलंबुष या नरराक्षसांचें युद्ध जुंपलेलें पाहून सर्वांना मोठें आश्चर्य वाटलें. अलंबुषाला हांसत हांसतच भीमानें तीक्ष्ण बाण मारून त्याला व त्याच्या सेनेला फार घायाळ केलें. ह्यामुळें चिडून जाऊन अलंबुषानें भीमाच्या सातशें रथ्यांचा चुराडा उडवून त्यालाही फार घायाळ केला. त्यामुळें भीमाला लगेच मूर्च्छा आली. नंतर कांहीं वेळानें शुद्धीवर येऊन भीमानें आकर्ण धनुष्य ओढून जलदीनें तीक्ष्ण बाण सोडून त्याला पायापासून डोक्यापर्यंत सर्व शरिरभर जखमांनीं भरून काढला. बाणांनीं अतिशय विव्हळ होऊन ह्याच भीमानें आपला भाऊ बक मारला हें लक्षांत आल्यानें त्याला भीमाविषयीं फार चीड आली. तो एकदम गुप्त झाला; व गुप्तरूपानेंच त्यानें भीमावर बाणांचा वर्षाव केला. भीमानें आपल्या बाणांनीं सर्व आकाश व्यापून टाकिलें. इकडे हा राक्षस मध्येंच विराटस्वरूप घेऊन वाटेल तसा बडबडे व लगेच अगदीं लहान स्वरूप घेऊन जमिनींत नाहींसा होई. व ही अशी क्रिया चालली असतांनाच आकाशांतून सारखी बाणांची वृष्टि होत होती, शूल येऊन आदळत होते, गोफणीचे दगड सुटत होते, तलवारीचे घाव लागत होते. व वज्राचे तडाके बसत होते. अशा रीतीनें या मायावी राक्षसानें आकाशांतून गुप्तरूपानें शस्त्रादिकांचा मारा करून भीमाचें बहुतेक सैन्य ठार केलें. ह्याच्या ह्या माऱ्यानें, हत्ती चीची करून प्राण सोडूं लागले, घोडे मरूं लागले व रथी गतप्राण होऊन आपल्या रथांतून पटपट पडूं लागले. रणभूमींतून रक्ताची नदी वाहूं लागली. पांडवांना मोठें भय प्राप्त झालें. इकडे कौरवसैन्यांत आनंदानें रणवाद्यांचा गजर चालूं झाला. भीमाला शत्रूंच्या रणवाद्यांनीं जास्तच त्वेष चढला. नंतर रा-

गानें डोळे लाल करून त्यानें राक्षससैन्यावर त्वष्टास्त्र सोडलें. त्या अस्त्रानें त्याच्या मायेचा नाश करून त्याला व त्याच्या सैन्याला अगदीं जेर करून सोडलें ! त्या अस्त्राच्या माऱ्याला भिऊन तो मायावी राक्षस आश्रयाकरितां ह्मणून द्रोणाचार्यांकडे पळत सुटला. अलंबुष थोडासा लांब जातो न जातो इतक्यांतच त्याला घटोत्कचानें गांठलें. त्यावेळीं या राक्षसांचें युद्ध फारच भयंकर झालें. अलंबुष घटोत्कचाचा प्राण घेण्याकरितां जी जी ह्मणून माया उत्पन्न करी त्या प्रत्येकीला घटोत्कच आपल्या मायेनें हाणून पाडी. पहिल्या सलामीलाच अलंबुषानें घटोत्कचाला मर्मस्थळीं एक जोराचा तडाखा दिला. हें पाहून सर्व पांडवांनीं खूप जलदाईनें अलंबुषाच्या भोंवतीं गराडा दिला. पण चहूंकडून वणवा पेटला असतांही त्यांतून बळेंच मुसंडी मारून एखादा हत्ती जसा बाहेर पडावा, त्याप्रमाणें हा अलंबुष पांडववीरांच्या गराड्यांतून एकदम बाहेर पडला. बाहेर पडल्याबरोबर पांडवांनीं त्याच्यावर लगट करून बाणांचा मारा चालविला. परंतु त्यानें ह्या सर्व बाणांचें आपल्या मायेनें निवारण केलें व उलट त्या सर्वांवर बाणांचा वर्षाव करून घटोत्कचाला अतिशय घायाळ केला. त्यानें चिडून जाऊन घटोत्कचानें एकदम आपल्या रथांतून अलंबुषाच्या रथावर गरुडपक्षी ज्याप्रमाणें सापावर झडप घालतो त्याप्रमाणें टाणदिशीं उडी ठोकून त्याला झट्दिशीं तेथून उचलून घेतला व नंतर गरगर फिरवून दाणदिशीं जमिनीवर हापटला. त्यावरोबर त्याचें हाडन् हाड चूर होऊन गेलें. याप्रमाणें घटोत्कचानें अलंबुषाचा चुराडा उडवून तो मोठ्यानें सिंहनाद करूं लागला. ही सिंहगर्जना ऐकून व अलंबुषासारख्या पराक्रमी आणि मायावी राक्षसाचा चुराडा उडालेला पाहून सर्व कौरवसैन्यांत एकच हाहाकार उडाला. पण इतक्यांत द्रोणाचार्यांनीं सात्यकीवर चाल करून त्याला अगदीं जर्जर करून सोडलें. तेव्हां धर्मराजाच्या आज्ञेवरून पांचाल, केकय, व भीमादि पांडव हे सर्वजण आपापल्या सैन्यांनिशीं द्रोणाचार्यांवर चालून गेले. लगेच त्यांच्या मागोमाग धर्मराजही आपल्या सेनेनिशीं निघाला. आचार्यांनीं ह्या सर्व पाहुण्यांचा आपल्या बाणांनीं यथोचित सत्कार केला. भर दोनप्रहरच्या वेळीं चिखलांत रुतून पडलेल्या हत्तीप्रमाणें सर्व पांडवांची ह्या वेळीं फार त्रेधा उडाली. द्रोणाचार्यांनीं एकंदर पांचालांपैकीं पंचवीस महारथी, शंभर केकय वीर आणि बरेंच पांडवसैन्य कांपून काढलें.

---

### ३५ सात्यकीची कुमक. (७.११०–१३४)

अशा रीतीनें द्रोणाचार्य इकडे पांडवांची कचल करीत असतांना एकाएकीं पांचजन्याचा भेसुर आवाज व कौरवांची आनंददर्शक आरोळी हीं एकवटूनच ह्या धर्मादिकांच्या कानांवर येऊं लागलीं, व अर्जुनाच्या गांडीवाचा आवाज तर मुळींच ऐकूं येईना. हें पाहून युधिष्ठिराच्या पोटांत धस्स झालें.अर्जुनाबद्दल त्याच्या मनांत भलभलत्या कल्पना येऊं लागल्या ! त्यामुळें दुःखित होऊन रडत रडत धर्मराज सात्यकीला ह्मणाला, ‘ मित्रांना आपल्या मित्रांबद्दल कांहीं कर्तव्य असेल तर तें फक्त संकटकालींच आहे. श्रीकृष्ण ज्याप्रमाणें आह्मां पांडवांच्या सुखाविषयीं नित्य झटत असतो त्याप्रमाणें तूही नेहमीं आमच्याच कल्याणाची खटपट करतोस. शिवाय पराक्रमानेंही तूं श्रीकृष्णाच्या तोडीचा आहेस. ह्मणून अशा संकटकालीं, हे पुरुषश्रेष्ठा, तूं आपल्या गुरूला व आपल्या भावाच्या जिवलग मित्राला साहाय्य करावेंस हें तुला योग्य आहे. मित्रकार्यासाठीं जो आपला प्राण खर्ची घालतो त्याला, ब्राह्मणाला पृथ्वीदान दिल्याचें फळ मिळतें. ह्मणून हे सात्यके, अशा संकटकालीं अर्जुनाचें रक्षण करणें तुझ्यावांचून दुसऱ्या कोणाच्यानेंही होणार नाहीं. तूं त्याचा शिष्य असून जिवलग स्नेही आहेस. आह्मीं द्वैत वनांत असतांना अर्जुनानें तुझ्या मागें मजजवळ सर्व थोर थोर लोकांच्या देखत तुझ्या शौर्य, धैर्य, खरेपणा वगैरे गुणांची प्रशंसा केली होती. तर तूं त्याची आतां निराशा करूं नकोस. तर हे महाबाहो, आतां तूं तुझ्या त्या भक्तीला, प्रेमाला शिष्यत्वाला, स्नेहाला, कुलीनपणाला व शौर्याला साजेलसेंच कर. सुयोधन तर मघाशींच द्रोणाकडून तें दिव्य चिलखत चढवून घेऊन अर्जुनावर चालून गेला आहे. शिवाय कौरवांचे सर्व महारथीही त्याच्या पाठोपाठ ति-

कडेच गेले आहेत. व आतां अर्जुनाच्या विरुद्ध त्यांच्या मोठमोठ्या आरोळ्या ऐकूं येत आहेत; ह्मणून हे मान्यपुरुषा शैनेया, तूं जरा जलदी करून त्याच्याकडे धांव मार. इकडे मी व भीमसेन असे दोघेजण सर्व सैन्यानिशीं द्रोणाचार्यांना थोपवून धरतों. त्यांना तुझ्याकडे मोर्चा वळवूं देत नाहीं. शैनेया, पहा, पर्वकाळीं समुद्राला जशी भरती येते त्याप्रमाणें ह्या कौरवसैन्याला कशी भरती येत आहे ती. जिकडे तिकडे हत्तींचा चीत्कार, घोड्यांचें खिंकाळणें, वीरांच्या गर्जना व रणवाद्यांचा गंभीर आवाज हींच ऐकूं येत आहेत. मागून द्रोणाचार्यांचा मारा व पुढून जयद्रथाच्या सैन्याचा मारा; असा दोन्हींकडून मारा चालला असतांना प्रत्यक्ष इंद्राच्यानेंसुद्धां दम धरवणार नाहीं; मग एकटा अर्जुन तो काय करणार ? तोच जर मारला गेला तर माझ्यासारख्यांनीं जगण्यांत तरी काय अर्थ आहे ? किंवा माझ्यानें जगणें तरी कसें होईल ? तुझ्यासारखे रणबहाद्दर जिवंत असतांना माझ्यावर हें संकट कोसळलें आहे ! शूर, अस्त्रविद्यासंपन्न, तरुण, सांवळ्या वर्णाचा व सर्वांगसुंदर असा माझा अर्जुन सूर्योदयाबरोबर एकठाच ह्या अफाट सेनासागरांत शिरला आहे. आतां दोनप्रहर उलटून गेली तरी अजूनही त्याच्याकडील कांहींच बातमी नाहीं. वार्ष्णेया, तो अद्याप जिवंत आहे किंवा नाहीं ह्याचाच मला वानवा आहे. मला श्रीकृष्णाबद्दल मुळींच काळजी वाटत नाहीं. तो सर्व जगाचा रक्षणकर्ता आहे. तिन्ही लोक जरी एकदम त्याच्यावर चालून आले तरी त्या सर्वांचा एका क्षणांत फडशा पाडण्याइतकें सामर्थ्य त्याच्या अंगीं आहे. मग ह्या यःकश्चित् धार्तराष्ट्रांची ती काय कथा ? ' सात्यकीला अशक्य असें जगांत कांहींच नाहीं. तो भीष्मद्रोणादिकांपेक्षांही अधिक पराक्रमी आहे. ' असें सर्व लोक नेहमीं ह्मणत असतात. ह्मणून हे महाबाहो, हे धर्मात्मन् माझ्या बोलण्याला मान देऊन तूं ह्या दुष्ट दुर्योधनाच्या सैन्यांत शीर; व सर्व महारथ्यांशीं झुंजून आपला खरा पराक्रम काय आहे तो दाखीव.'

प्रसंगाला साजेलसें धर्माचें मधुर भाषण ऐकून सात्यकि त्याला ह्मणाला, 'अहो अच्युत, धनंजयाच्या रक्षणासाठीं ह्मणून आपण जें कांहीं मला सांगितलें तें अगदीं योग्य आहे. धनंजयाकरितां मी आपले प्राण सुद्धां खर्चीं घालीन. आपली आज्ञा होईल तर सर्व त्रैलोक्यावर मी चालून जाईन, मग ह्या असल्या निर्जीव सैन्याची ती काय कथा ? दुर्योधनाच्या सैन्याचा फडशा पाडून मी आज विजयी होतों, हें मी आपल्याला खात्रीनें सांगतों. जयद्रथाला ठार करून अर्जुन व मी असे दोघेहीजण सुखरूपपणें येऊन आपल्याला भेटूं. परंतु हे राजन्, अर्जुनानीं भर रणांगणांत वासुदेवाच्या देखत मला असें निक्षून सांगितलें आहे कीं, 'मी जयद्रथाला मारून येईपर्यंत तूं धर्मराजांचें मोठ्या काळजी पूर्वक रक्षण कर. तूं व महारथी प्रद्युम्न ह्या दोघांवर राजा धर्माला सोंपवून इकडची कांहीं काळजी न करतां मी जयद्रथावर चालून जातों. द्रोणाचार्य हे सर्व कौरवांमध्यें शूर आहेत हें तुला माहीतच आहे. त्यांनीं धर्मराजाला धरण्याविषयीं प्रतिज्ञा केली आहे, व यांना धरणें ह्मणजे आचार्यांना कांहींच अवघड नाहीं. हें काम ते सहज करतील. आणि जर कां धर्मराज द्रोणाचार्यांच्या हातांत सांपडले तर मग जयद्रथाला मारणें माझ्यानें होणार नाहीं. हे सत्यवादी धर्म एकदां द्रोणाचार्यांच्या हातांत सांपडले ह्मणजे हें सर्व सोडून देऊन पुनः आह्मांला वनवासच पत्करावा लागेल. व आजपर्यंत एवढा खटाटोप करून मिळविलेला जय अगदीं व्यर्थ होईल. ह्मणून हे महाबाहो, तूं माझ्याकरितां, ह्या मिळविलेल्या जयाकरितां व कीर्तीकरितां, राजाचें रक्षण कर. '

याप्रमाणें सव्यसाचीनें द्रोणाचार्यांच्या भीतीनें आपल्याला माझ्या स्वाधीन केलें आहे. शिवाय रणामध्यें द्रोणाचार्यांशीं तोंड देणारा प्रद्युम्नाशिवाय मला दुसरा कोणी दिसत नाहीं. व मीही त्यांना तोंड देऊं शकेन असा अर्जुन महाराजांचा समज आहे. तेव्हां याकडे तसेंच त्या गुरूच्या सांगण्याकडे दुर्लक्ष करून आपल्याला माझ्यानें सोडवत नाहीं. अभेद्य कवचामुळें व हस्तलाघवामुळें द्रोणाचार्यांनीं आपल्याला गांठलें असतां हातीं आलेल्या पक्ष्याबरोबर मुलांनीं ज्याप्रमाणें मौज करावी त्याप्रमाणें आपली ते दशा उडवतील. अर्जुनासंबंधानें आपल्याला भिण्याचें कारण नाहीं. त्यांच्याशीं तोंड देणारे जे हे सौवीरक, सैंधव प्रभृति ते त्यांच्या पासं-

गालाही लागणार नाहींत. सर्व सुर, असुर, राक्षस, किन्नर इत्यादिकांसह ही सर्व स्थावरजंगम पृथ्वी जरी त्यांच्या विरुद्ध उठली तरी त्यांची बरोबरी करण्याला पुरी नाहीं. ज्या ठिकाणीं ते दोघे कृष्णार्जुन वीर आहेत, त्या ठिकाणी कोणत्याही रुत्यांत संकट येण्याची गोष्ट काढावयाला नको. आपणाला धरण्याला द्रोणाचार्य फार उत्सुक आहेत व आपली प्रतिज्ञा खरी करण्याला ते आज झटणार, तेव्हां आपल्याला कोणाच्या स्वाधीन न करतां कोठेंही जाण्याला माझें मन घेत नाहीं. तेव्हां याचा विचार करून आपल्याला जें मला सांगणें असेल तें सांगा.' यावर युधिष्ठिर ह्मणाला, ' हे महाबाहो, तूं ह्मणतोस तें अगदीं खरें आहे. परंतु अर्जुनासंबंधानें माझें मन मला कांहीं बरोबर सांगत नाहीं. मी आपलें रक्षण कसें बसें करून घेईन. माझ्या सांगण्यावरून तूं त्याच्या साहाय्याला जा. हा भीम, धृष्टद्युम्न, शिखंडी वगैरे सर्व मंडळी एक जुटीनें माझें रक्षण करतील. समुद्राला थोपविणाऱ्या वेलेप्रमाणें खवळलेला धृष्टद्युम्न द्रोणाचार्यांना थोपविण्याला समर्थ आहे. कवच, धनुष्यबाण व तलवार या सर्वांनिशीं त्यांनांच मारण्यासाठीं तो अग्नीमधून उत्पन्न झाला आहे. तेव्हां तूं खुशाल जा. माझ्यासंबंधानें काळजी बिलकूल करूं नकोस. याप्रमाणें युधिष्ठिराचें भाषण ऐकून राजाला सोडलें असतां अर्जुन काय ह्मणेल किंवा अर्जुनाकडे न गेल्यानें लोकापवाद काय येईल याचा पुष्कळ विचार करून सात्यकि धर्मराजाला ह्मणाला, ' आपलें रक्षण होईल असें जर आपल्याला वाटत असेल तर मी अर्जुन महाराजांकडे जातों. आपली आज्ञा मस्तकावर घेऊन द्रोणाचार्यांचें हें दुर्भेद्य सैन्य फोडून पाण्यांत घुसणाऱ्या झष माशाप्रमाणें मी कौरवसैन्यांत शिरतो व पांडवाच्या भीतिनें अश्वत्थामा, कर्ण, कृपप्रभृति मंडळींच्या रक्षणाखालीं ज्या ठिकाणीं जयद्रथ आपलें सैन्य घेऊन आहे त्या ठिकाणीं जातों. ज्या ठिकाणीं अर्जुन महाराज जयद्रथाला मारण्याला तयार होऊन उभे आहेत, तें ठिकाण येथून तीन योजनें असावें असें मला वाटतें. तरी मी क्षणांत तिकडे जाऊन धैर्यानें जयद्रथ मरेपर्यंत अर्जुन महाराज बरोबर असतों. या ठिकाणीं अंजनक जातीच्या हत्तीदळाची तुकडी असून त्यावर युद्धाची मोठी आवड असणारे व उत्तम प्रहार करणारे म्लेंछ बसले आहेत. त्याचप्रमाणें हें रथदळ यांत सर्व अस्त्रांमध्यें निपुण असे हजारों योद्धे असून ते रथावरून त्याचप्रमाणें हत्तीवरून लढण्यांत पटाईत, मुष्टियुद्धामध्यें, त्याचप्रमाणें गदायुद्धामध्येंही पटाईत आहेत. तसेंच ते ढालतलवार घेऊन भिडून एकमेकांवर प्रहार करण्यामध्येंसुद्धां हुषार आहेत. त्यांच्यावर कर्ण नायक आहेत, या सर्वांना चिरडून मी अर्जुन महाराजांना जाऊन मिळेन. त्याचप्रमाणें हे येथें दिसणारे सातशें शृंगारलेले हत्ती, त्यावर अभिकुलोत्पन्न किरातवीर बसले आहेत; ते पूर्वी आपल्या आहेत असून आज आपल्या विरुद्ध उठून आपल्याशीं लढत आहेत. हे व अशाच प्रकारच्या दुसऱ्या योद्ध्यांची एक अक्षौहिणी सैना माझ्याशीं तोंड घावयाला तयार आहे. या सर्वांचा समाचार घेऊन मी अर्जुन महाराजांना जाऊन मिळेन.'

नंतर बाणांनीं भरलेले भाते, नानाप्रकारचीं आयुधें व सर्व जरूरीची सामुग्री ह्यांचा त्याच्या रथांत चांगला पुरवठा करून घोड्यांना चांगल्या रीतीनें सामान घालून तयार करून सेवकांनीं खूप माज आणणारी दारू पाजली. नंतर निघण्याच्या पूर्वी स्नान करून शुद्ध होऊन, मंगलविधि उरकून, व ब्राह्मणांचा आशीर्वाद घेऊन कैलातकमधु प्राशनानें डोळे लाल झालेला सात्यकि रथारूढ होऊन निघाला. निघतेवेळीं त्यानें युधिष्ठिराचे पाय धरले व युधिष्ठिरानें त्याचें मस्तक हुंगलें. भीमसेनही युधिष्ठिराच्या सांगण्यावरून सात्यकीच्या मागून निघाला. भीमाला आपल्या मागून येतांना पाहून सात्यकि त्याला ह्मणाला, ' आपण राजांचें रक्षण करा. तो मुख्य बोजा आपल्यावर आहे. कालानें पक्क झालेलें हें शत्रुसैन्य फोडून मी आंत शिरतों. कोणत्याही प्रसंगीं राजाचें रक्षण करणें हेंच श्रेयस्कर आहे. आपण माझें सामर्थ्य ओळखतां व मीही आपलें सामर्थ्य ओळखतों. ह्मणून माझें ऐकावयाचें असेल तर आपण परत फिरा.' भीमानें ती गोष्ट कबूल केली. त्यावर सात्यकि ह्मणाला, 'जाच तर. मला जय खात्रीनें येणार. कारण, आज माझ्या गुणावर खुष होऊन, आपण माझ्या सांगण्याप्रमाणें वागण्याला तयार

झालां. मला जे चांगले शकुन होताहेत त्यावरून त्या पापी जयद्रथाला महात्म्या अर्जुनांनीं मारल्यावर येऊन धर्मराजांना मी आलिंगन देईन असें मला वाटतें. ' याप्रमाणें बोलून भीमाला निरोप दिल्यावर तो कौरवसैन्यांत शिरूं लागला असतां त्या सैन्याचा चळकांप उडून तें अगदीं वेडें बनलें. इकडे युधिष्ठिर द्रोणांना गांठण्याच्या इरायानें आपल्या सैन्यानिशीं त्यांच्या मागून गेला. तेव्हां युद्धाची खुमखुमी असलेला धृष्टद्युम्न व राजा वसुधान पांडवांच्या सैन्याला ' चला झटपट प्रहार करा. शत्रूवर तुटून पडा, सात्यकीला अडथळा न येतांना खुशाल निघून जाऊंदे, कारण यांला जिंकण्यासाठीं पुष्कळ महारथी झटणार आहेत, ' असें ह्मणून मोठ्या आवेशानें कौरवांवर तुटून पडले. कौरवही त्यांच्यावर चालून गेले. ते वेळीं सात्यकीच्या रथाजवळ एकच मोठा शब्द उठून राहिला. सात्यकीनें कौरवसैन्याला झांकून काढल्यामुळें हजारों तुकड्यांनीं फुटून तें पळालें. नंतर सात्यकीनें सैन्याच्या अघाडीला असलेले सात मोठे धनुर्धारी व दुसरे पुष्कळ राजे यांचा चुराडा उडवून दिला. प्रसंगीं एका बाणानें शंभरांचा तर प्रसंगीं शंभर बाणांनीं एकाचा याप्रमाणें तो हत्ती, घोडे, गजयोधी, स्वार, रथी, या सर्वांची वाट लावीत होता. याप्रमाणें कौरवसैन्याचा फडशा पाडून सात्यकि, अर्जुन ज्या मार्गानें गेला, त्याच मार्गानें जाण्याच्या इरायानें निघाला असतां द्रोणांनीं त्याला आड विलें. दोघांनीं एकमेकांवर बाणांचा वर्षाव करून एकमेकांचे घोडे व सारथी घायाळ केले व रथ झांकून काढले नंतर द्रोण सात्यकीला ह्मणाले, ' मी युद्धाला बोलावीत असतां एखाद्या भित्र्याप्रमाणें तुझा गुरु युद्ध सोडून मला उजवी घालून निघून गेला. त्याच्याप्रमाणें रण सोडून न जातां तूं आज माझ्याशीं युद्ध करशील तर जिवंत सुटणार नाहींस. सात्यकि ह्मणाला, ' धर्मराजांच्या आज्ञेनें मी अर्जुन महाराजांच्या साहाय्याला चाललों आहें. तेव्हां आपण खुशाल असा. मला आपल्याशीं युद्ध करण्याला वेळ नाहीं. गुरूंनीं घेतलेला मार्गच शिष्य घेत असतात. तेव्हां ते गेले तसाच मी चाललों. ' असें ह्मणून त्यांना सोडून तो निघाला. तेव्हां द्रोणांनीं मोठ्या आवेशानें असंख्य बाण सोडून त्याचा पाठलाग केला. तथापि सात्यकि आपले तीक्ष्ण बाण कर्णाच्या सैन्यावर सोडीत तसाच सैन्यामध्यें शिरला. तेव्हां त्याला तोंड देणारे अवंतिराज, बाल्हीक, कर्ण वगैरेंचें एकमेकांच्या आश्रयानें राहिलेलें सर्व सैन्य पळून गेलें. तें पाहून कृतवर्मा सात्यकीला आडविण्यासाठीं पुढें सरसावला. तेव्हां त्या दोघांचें मोठ्या निकराचें युद्ध झालें. विषारी सापाप्रमाणें प्रखर वत्सदंत बाण कृतवर्म्यांनीं सात्यकीच्या छातीवर सोडला. तो छातींतून पार त्याच्या शरीरामध्यें शिरून रक्तानें भरून भूमींत शिरला; व त्यानें सात्यकीचें धनुष्य मोडून टाकलें. तेव्हां सात्यकीनें आपली मोठी शक्ति कृतवर्म्याच्या उजव्या बाहूवर सोडली व एका क्षणामध्यें दुसरें धनुष्य सज्ज करून घेऊन त्यानें हजारों बाण कृतवर्म्यावर सोडून शरवर्षावानें त्याला झांकून काढलें. व रुंद फाळ्याच्या बाणानें त्याच्या सारथ्याचें शीर धडापासून वेगळें केलें. या प्रसंगीं कृतवर्मे स्वतः आपले घोडे आंवरण्याला तयार झाले; व हातांत धनुष्य घेऊन त्यांनीं आपला रथ सात्यकीवर सोडला. इकडे या अवधींत सात्यकि त्यांना मागें टाकून पुढें निघून गेला होता. पुढें सात्यकि कांबोजांच्या तुकडीकडे आला. त्या ठिकाणीं पुष्कळ शूर महारथी आपल्या सैन्याची योग्य व्यवस्था लावून व त्याचें रक्षण करणें कृतवर्म्यावर सोंपवून सात्यकीशीं युद्ध करण्यासाठीं मोठ्या झपाट्यानें आले. इकडे भीमसेनाच्या हाताखालच्या पांचाल सैन्याची कृतवर्म्याशीं गांठ पडली असतां, त्यांचा उत्साह एकदम नाहींसा झाला. तरी ते मोठ्या निकरानें लढले. परंतु एकट्या कृतवर्म्यांनीं सर्व पांडवांना थोपवून धरलें. त्यावेळेस कृतवर्म्यांचें शौर्य फार अलौकिक दिसून आलें. भीम, नकुल, सहदेव, धृष्टद्युम्न, शिखंडी हे सर्व एकदम त्यावर बाण सोडीत असतां कृतवर्म्यानें त्या सर्वांचा वेगवेगळा समाचार घेतला. भीमाचें धनुष्य व ध्वज सुद्धां त्यांनीं मोडून टाकलीं. व मोठ्या त्वेषानें अनेक बाण त्याच्या छातींत सोडले. प्रमाणें या कृतवर्म्याच्या अस्सल बाणांनीं जेरीला येऊन धरणीकंप झाला असतां ज्याप्रमाणें पर्वत चळावा त्याप्रमाणें भीमसेन आपल्या रथामध्यें

थोडासा चळला. तें पाहून धर्मराज प्रभृति मंडळी बाण सोडून कृतवर्म्याला त्रास देऊं लागले. त्यांच्या भोंवतीं रथांचा वेढा देऊन भीमाचें रक्षण व्हावें म्हणून त्यांनीं त्यावर बाणांचा मारा चालविला. पुढें शुद्धीवर येऊन बलशाली भीमानें सोन्याच्या मुठीची एक लोहमय शक्ति घेऊन ती कृतवर्म्याच्या रथावर सोडली. कात टाकलेल्या सापाप्रमाणें ती तेजस्वी शक्ति युगांतकालीन अग्नीप्रमाणें पेट घेऊन कृतवर्म्यावर येऊन पडत असतां त्यानें दोन बाणांनीं तिचे दोन तुकडे करून ती खालीं पाडली. तेव्हां आकाशांतून पडलेल्या उल्केप्रमाणें तिचा चोहोंकडे उजेड पडला. याप्रमाणें आपल्या शक्तीची वाट लावलेली पाहून भीम खवळला. व त्यानें दुसरें एक धनुष्य घेऊन कृतवर्म्यावर बाणांचा मारा चालविला. बाणांनीं त्याच्या सर्वांगाला जखमा लागून त्यांतून रक्त वाहूं लागल्यामुळें तांबड्या फुललेल्या अशोकाप्रमाणें तो शोभत होता. पुढें कृतवर्म्यानें धृष्टद्युम्न, शिखंडी प्रभृति मोठमोठ्या वीरांचाही यथेच्छ समाचार घेतला. सर्व पांडवांसह चेदी, पांचाल, सृंजय, केकय या महावीरांना त्यानें जिंकलें. याप्रमाणें त्या सर्वांची कत्तल होऊन निघत असतां धैर्य न राहून व त्याच्या शरवृष्टीनें जेरीला येऊन पांडवसेनेनें रणांतून तोंड फिरविलें.

## २६ जलसंध व सुदर्शन यांचा वध.
## ( ७. ११५—११९ )

याप्रमाणें पांडवसेना लज्जेनें तोंड खालीं घालून पळूं लागली असतां व कौरवसैन्याला मोठा हर्ष झाला असतां या प्रसंगीं आधार मिळेल काय म्हणून चिंताक्रांत झालेल्या पांडवसेनेला हात देण्यासाठीं एकदम सात्यकि कृतवर्म्यावर मागें वळला. त्याच्या आज्ञेवरून सारथ्यानें एका निमिषांत रथ कृतवर्म्यावर नेऊन भिडवला. तेव्हां कृतवर्म्यानें त्यावरही बाणांचा वर्षाव चालविला असतां त्या सात्यकीनें आपल्या बाणांनीं त्याचे घोडे, पृष्ठरक्षक व सारथी यांना मारून त्याचें धनुष्य मोडून टाकलें. व याप्रमाणें त्याला विरथ करून त्याच्या सैन्याला जर्जर करून सोडलें. नंतर तो आपल्या सारथ्याला म्हणाला, 'द्रोणाच्या डाव्या बाजूला मेघाप्रमाणें काळेंभोर जें हत्तीदळ तुला दिसत आहे तिकडे रथ वळीव. त्या तुकडीचा नायक रुक्मरथ आहे. त्या तुकडीमध्यें पुष्कळ हत्ती आहेत. त्या तुकडींत सर्व राजपुत्र आसून सर्व नांवाजलेले योद्धे आहेत. त्रिगर्त देशांतील ते उत्तम रथी आहेत. ते माझ्याबरोबर युद्ध करण्यास वाट पहात आहेत. तेव्हां घोडे तिकडे वळवून माझा रथ तिकडे घेऊन चल.' याप्रमाणें तो बोलला असतां सारथ्यानें रथ तिकडे नेला. सात्यकीला आपल्याकडे येतांना पाहून त्या गजयोद्ध्यांनीं त्याला चोहोंकडून घेरून त्यावर बाणांचा वर्षाव चालविला. पर्वताच्या पृष्ठभागीं धो धो पाऊस पाडणाऱ्या मोठ्या ढगांप्रमाणें सात्यकीनेंही त्यांवर बाणांचा वर्षाव केला. वज्राप्रमाणें याच्या बाणांनीं फडशा चालला असतां ते हत्ती सुळे मोडून, रक्तबंबाळ होऊन व गंडस्थळें फुटून, कान, तोंड व सोंड छाटलीं जाऊन व वर बसलेले योद्धे मरून रणांतून धांवत सुटले. त्यांपैकीं पुष्कळ वत्सदंत, अंजलिक, क्षुरप्र वगैरे जातींच्या बाणांनीं रक्तबंबाळ होऊन मलमूत्र टाकीत व चीं चीं करीत पळत सुटले. कांहीं इकडे तिकडे धांवूं लागले. कांहीं ठेंचाळून पडले; कांहीं उदासीन झाले. याप्रमाणें त्यांची वाट लागली असतां बलशाली जलासंधानें आपला हत्ती सात्यकीच्या रथावर सोडला. अंगामध्यें सोन्याचें चिलखत सोन्याचें अंगद व कुंडलें त्याच्या कानांत असून त्यानें रक्तचंदन अंगाला फासलें होतें व सुवर्णमाला डोक्याला गुंडाळली असून त्याच्या छातीवर पदक व गळ्यांत हार होता. हातांत तलवार होती. अशा प्रकारचा तो आपलें धनुष्य सावरीत हत्तीवरून सात्यकीवर तुटून पडत असतां ज्यामधून वीज लखलखत आहे अशा ढगाप्रमाणें दिसत होता. सात्यकीनें आपल्यावर त्वेषानें तुटून पडणाऱ्या त्या हत्तीला थोपविलें. सात्यकीच्या बाणांनीं आपला हत्ती थोपलेला पाहून जलासंध खवळला. त्या दोघांमध्यें निकराचें युद्ध जुंपलें. सात्यकि आपलें धनुष्य ओढीत असतां मध्येंच जलासंधानें तें तोडून टाकलें व हांसत हांसत त्यानें त्यावर तीक्ष्ण बाण सोडले. सात्यकीनें दुसरें धनुष्य घेऊन, थांब थांब म्हणून जलासंधाची छाती बाणांनीं भरून काढली, व एका क्षुरप्र बाणानें जलासंधाचें धनुष्य मुठीपाशींच मोडून

टाकलें. व आणखी कांहीं बाण सोडून जलासंधाला घायाळ केलें. पुढें जलासंधानें सात्यकीवर तोमर सोडला, तो सात्यकीच्या डाव्या हातामधून शिरून भूमीमध्यें शिरला; नंतर तलवार घेऊन त्यानें सात्यकीवर फेंकली. ती तलवार सात्यकीचें धनुष्य तोडून खालीं पडली. पुढें सात्यकीनें दुसरें एक मजबूत धनुष्य घेऊन तें ओढून एका बाणानें जलासंधाला जखमी करून दुसऱ्या दोन बाणांनीं त्याचे बाहू छाटून काढले. आणखी एका बाणानें सात्यकीनें त्याचें मुंडकें उडावलें. याप्रमाणें जलासंधाला मारल्यावर सात्यकीनें हत्तीच्या पाठीवरची अंबारी खालीं पाडली. ती लोंबती अंबारीच आपल्या पाठीवर घेऊन ची ची करीत तो हत्ती पळत सुटला. तेव्हां कौरवसेनेमध्यें हाहाकार उडून राहिला. व कौरवसैन्य पाठ दाखवून पळूं लागलें. इतक्यांत द्रोण एकदम त्या ठिकाणीं येऊन पोहोंचले. तेव्हां गर्वानें फुगलेल्या सात्यकीवर तुटून पडण्यास कौरवांना धीर आला. व पुढें द्रोण व युयुधान ह्यांच्यामध्यें भयंकर युद्ध सुरू झालें.

बाणांचा वर्षाव करीत या सर्व योद्ध्यांनीं सात्यकीशीं लगट केली. व त्याला बाणांनीं झांकून काढलें. सात्यकीनेंही उलट बाण सोडून त्या सर्वांचा यथेच्छ समाचार घेतला. नंतर सात्यकि दुर्योधनावर चालून गेला व त्यावर त्यानें बाण सोडले. व दोघांचें मोठें युद्ध जुंपलें. बाण सोडून त्या दोघांनीं एकमेकांला झांकून काढलें. दुर्योधनानें सात्यकीवर एकदम शंभर बाण सोडले. सात्यकीही खवळून जाऊन त्यानें दुर्योधनाला पुष्कळ जेरीला आणलें; दुर्योधनाचें धनुष्य व ध्वज मोडून त्याचे घोडे व सारथी मारून पाडले; व दुर्योधनालाही पुष्कळ बाणांनीं घायाळ केलें. याप्रमाणें सात्यकीच्या बाणानें जेरीला येऊन दुर्योधनानें पळ काढला व तो चित्रसेनाच्या रथांत जाऊन बसला. तें पाहून जिकडे तिकडे हाहाकार उडून राहिला. तो शब्द ऐकून कृतवर्मा सात्यकीवर तुटून पडला. सात्यकीनेंही आपला रथ त्यावर सोडून तो कृतवर्म्यावर चालून गेला व त्यांची बरीच चकमक उडाली. पुढें धनंजयाला जाऊन मिळण्याला आतुर झाला असल्यामुळें कृतवर्म्याला कांहीं तीक्ष्ण बाणांनीं रथांत घायाळ करून पाडून सात्यकि पुढें निघाला. तलवार परजीत तो कृतवर्म्याच्या चतुरंग सैन्याच्या तुकडीमधून चालला असतां हजारों क्षत्रियांच्या रक्तानें माखून निघालेली पृथ्वी दरदर हालत होती.

याप्रमाणें कौरवसैन्याला निरनिराळ्या ठिकाणीं सात्यकि जेरीला आणीत असतां द्रोणाचार्यांनीं त्यावर चालून येऊन बाणांचा वर्षाव केला. त्या दोघांमधलें युद्ध फारच निकराचें व प्रेक्षणीय झालें. सात्यकीला अस्त्रज्ञान पूर्ण असल्यानें त्यानें द्रोणाचार्यांचे सर्व बाण कापून काढले. सात्यकीनें द्रोणांवर व त्यांच्या ध्वजावर बाण सोडून त्यांच्या देखत त्यांच्या सारथ्याला बाणांनीं जर्जर केलें. द्रोणांनींही सात्यकीच्या सारथ्यावर व ध्वजावर बाण सोडून त्याचा ध्वज मोडून पाडला. व एका बाणानिशीं त्याचें धनुष्य मोडलें. त्याबरोबर सात्यकीनें खवळून जाऊन तें धनुष्य ठेवून मोठी गदा हातांत घेतली व ती त्यानें द्रोणांवर फेंकली ती येऊन पडत असतां द्रोणांनीं तिला पुष्कळ बाण सोडून आपल्याकडे येऊं दिली नाहीं. शिवाय त्यांनीं एक भयंकर शक्ति हातांत घेऊन ती सात्यकीवर सोडली. परंतु ती सात्यकीला बिलकुल न लागतां त्याच्या रथांतून घुसून मोठा शब्द करीत पृथ्वीमध्यें शिरली. नंतर सात्यकीनें बाणानें द्रोणांचा हात घायाळ केला. द्रोणांनींही सात्यकीचें धनुष्य मोडून त्याच्या सारथ्याला जखमी केलें. त्यामुळें तो बेशुद्ध होऊन रथांत पडला. तेव्हां सारथ्याचेंही काम करून हातांत लगाम धरून द्रोणांशीं सात्यकीनें युद्ध चालविलें. नंतर युयुधानानें द्रोणांच्या सारथ्याला एका बाणानिशीं मारून पाडून त्यांच्या घोड्यांना पळवून लावलें. तेव्हां द्रोणाचार्यांचा रथ आकाशामध्यें प्रकाशणाऱ्या सूर्याप्रमाणें त्या रणांतून गिरक्या घालूं लागला. तेव्हां सर्व राजे द्रोणांच्या घोड्यांना धरा, धरा, ह्मणून सात्यकीला सोडून द्रोणांकडे गेले. याप्रमाणें सर्व रथी सात्यकीला सोडून द्रोणांकडे गेलेले पाहून कौरवसैन्य उदास झालें. व फिरून त्याची फुटाफूट झाली. इकडे द्रोण फिरून सावध होऊन व्यूहाच्या तोंडाशीं जाऊन उभे राहिले. पांडव व पांचाल यांनीं आपल्या मागें व्यूह फोडलेला पाहून

द्रोण सात्यकीच्या मागें न जातां पांडव पांचालांना थोपवून तो मोडलेला व्यूह रक्षण करण्याच्या नादीं लागले.

याप्रमाणें द्रोण, कृतवर्मा वगैरे मंडळींना जिंकल्यावर सात्यकि मांसावर झडप घालणाऱ्या बहिरीससाण्याप्रमाणें शत्रुसैन्यावर बाणांचा वर्षाव करीत कौरवसैन्यामधून घुसून पुढें चालला. इतक्यांत नाना प्रकारच्या युद्धकलेमध्यें निपुण अशा सुदर्शन राजाला तें सहन न होऊन त्यानें नेटानें त्याला थोपविण्याचा प्रयत्न केला. त्या दोघांमध्यें फार घोर युद्ध होऊन त्याची दोन्ही पक्षांच्या योद्ध्यांनीं मोठी प्रशंसा केली. बराच वेळ त्या दोघांमध्यें निकराचें युद्ध होऊन शेवटीं सुदर्शन पडला. याप्रमाणें त्याला मारून, विजयानें झळकत, कौरवसैन्याला थक्क करून सोडीत, अर्जुन ज्या वाटेनें कौरवसैन्याचें बाणांनीं निवारण करीत गेला होता त्याच वाटेनें अग्नीप्रमाणें दृष्टीपुढें येणाऱ्या शत्रूंना जाळून काढीत तो पुढें चालला. पुढें निघाल्यावर तो सारथ्याला फिरून ह्मणाला, 'सारथे, रथ, घोडे व हत्ती यांनीं भरून निघालेला बाणरूपी लाटा ज्यावर उसळत आहेत व ज्याच्यामध्यें तलवार, बाण व गदा, मोठमोठे जलचर प्राणी आहेत, शूरांच्या आयुधांपासून निघणारा शब्द हा ज्यामधील उसळणारा घो घो शब्द आहे, असा भयंकर व जवळ जाण्याला कठिण व जलासंधाचें सैन्य हेंच ज्याच्या किनाऱ्यावरील मांसभक्षक राक्षस आहेत असा द्रोणसैन्यरूपी महासागर आपण तरून पार पडलों. आतां ओढ्याप्रमाणें राहिलेल्या थोड्याशा सैन्यामधून जाणें फार कठिण नाहीं. तेव्हां आतां निर्भयपणें घोडे हाक. आपण आतां अर्जुन महाराजांच्या जवळ जवळ आलों असावे असें मला वाटतें. अर्जुन महाराज जिनें गेले ती वाट पहा. हत्ती घोडे, रथी व पायदळ यांचे ढिगारे पडून उंच नीच झाली आहे. हें त्यांनीं दाणादाण करून सोडलेलें कौरवसैन्य पळत सुटलें आहे. ही तांबूस धूळ आकाशाला जाऊन भिडत आहे. हा गांडीवाचा टणत्कार ऐकूं येत आहे. मला होणाऱ्या शकुनावरून सूर्यास्ताच्या पूर्वीं अर्जुन महाराज जयद्रथाला खास मारणार. घोड्यांना फार श्रम होऊं न देतां ज्या ठिकाणीं तो दुर्योधन त्याचप्रमाणें कांबोज, यवन, शक, किरात, दर्द, बर्बर, ताम्रलिप्तक मुंड व दुसरें नाना म्लेंच्छ जातीचें सैन्य आहे तिकडे रथ घेऊन चल. त्यांचा मला युद्ध देण्याचा इरादा दिसतो. ह्या सर्वांचा फडशा पाडून हा भयंकर कोट मीं फोडलाच समज. माझें बळ, माझें वीर्य, व माझी गुरूच्या ठिकाणीं कृतज्ञताबुद्धि आज कौरवांना कळून येईल.' याप्रमाणें तो बोलला असतां सारथ्यानें आपले रथाचे सुशिक्षित घोडे मोठ्या वेगानें हांकले. हे घोडे मोठ्या वेगानें भरधांव सुटून त्यांनीं सात्यकीला एका क्षणमध्यें यवनाच्या तुकडीकडे आणून पोहोंचविलें. सात्यकि येऊन भिडला असतां पुष्कळ चलाख वीरांनीं त्याला बाणांनीं झांकून काढलें. परंतु सात्यकीनें चलाखीनें एकसारखे बाण सोडीत एकेका वेळेला पांच पांच, सहा सहा, सात सात, आठ आठ यवनांना तो मारून काढी. त्याचप्रमाणें त्यानें हजारों कांबोज, शक, शबर, किरात, बर्बर वगैरे म्लेंछांना मारून रक्तमांसाचा चिखल करून जमिनीवरून जातां येईनासें करून सोडलें. शिरस्त्राण, व केस नसून लांब दाढी असलेल्या पेंढाऱ्यांच्या मुंडक्यांनीं पिसें खुडलेल्या पक्ष्याप्रमाणें रणभूमी झांकून निघून, रक्तानें भरून निघालेल्या धडांच्या योगानें तिला फार शोभा येऊन तांबूस ढगांनीं भरलेल्या आकाशाप्रमाणें ती दिसत होती. याप्रमाणें त्या सर्वांचा फडशा पाडला असतां बाकी राहिलेल्या थोड्या सैन्यानें भीतीनें पळ काढला. याप्रमाणें कांबोजाच्या त्या अजिंक्य सैन्याला व यवनांच्या सैन्याला पळवून सोडून पुरुषसिंह सात्यकि पुढें चालला. अर्जुनाच्या कुमकेसाठीं याप्रमाणें अचाट पराक्रम गाजवीत तो चालला असतां सर्व चारण व गंधर्व यांनीं त्याची वाहवा केली.

---

## ३७ वीरकेतूचा वध. (७. १२०-१२४)

याप्रमाणें यवन व कांबोज यांचा फडशा पाडून सात्यकि थेट कौरवसैन्यामधून अर्जुनाकडे चालला. द्रोणांचें सैन्य, तरून जाण्याला कठिण असें भोज सैन्य, जलासंधाचें सैन्य, कांबोजाचें सैन्य व कृत-

वर्मारूपी मगरांनीं भरलेलें कौरवसैन्य तरून पार पडलेल्या व मद गळत आपल्या कळपामध्यें उभा असलेल्या हत्तीसारख्या सात्यकीला मारण्याच्या इरायानें कौरववीरांनीं मोठ्या त्वेषानें घेरलें. दुर्योधन, दुःशासन, शकुनि वगैरे शूर शस्त्रधारी वीर मोठ्या सैन्यासह आवेशानें मारा, भिडा, थांबा, पहा पहा, ह्मणत त्याजवळ येऊन भिडले. तेव्हां दोघांचें तुंबळ युद्ध जुंपलें. दुर्योधनप्रभृति सर्व वीरांनीं एकदम त्याच्यावर बाण सोडले असतां अगदीं न भितां मोठ्या अभिमानानें हांसत सात्यकीनें त्या सर्वांवर तीन तीन बाण सोडून त्यांना जखमी केलें. तो त्या रणामध्यें बहिरीससाण्याप्रमाणें चलाखीनें फिरत होता. शकुनीचें धनुष्य व तलवार कापून काढून त्यानें तीन बाण दुर्योधनाच्या छातीवर मारले. नंतर त्यानें त्याच्या सारथ्याला झटपट मारून खालीं पाडलें. त्याबरोबर रथाचे घोडे उधळून जाऊन त्यांनीं दुर्योधनाला रणांतून एकीकडे नेलें. याप्रमाणें राजाच्या रथाची वाट लागलेली पाहून शेंकडों लोकांनीं पळ काढला.

इतक्यांत दुर्योधनाच्या आज्ञेनें निकराची लढाई देण्याच्या इरायानें संशप्तक रणाकडे परतले. तीन हजार स्वार, शक, कांबोज, बाल्हीक, यवन, पारद, कुलिंद, तंगण, अंबष्ठ, पैशाच, बर्बर, डोंगरी वगैरे जातीचे लोक हातांत धोंडे घेऊन विस्तवामध्यें उडी घेणाऱ्या टोळांप्रमाणें सात्यकीवर धांवून आले. हजारों रथी, महारथी व गजयोधी व स्वार सात्यकीवर बाणांचा वर्षाव करूं लागले. 'याला मारा' ह्मणून असंख्य शिपाई त्याच्यावर तुटून पडत होते. परंतु एकटा वीर सात्यकि त्या सर्वांबरोबर अगदीं न गडबडतां युद्ध करीत होता. मोडून पडलेले रथ, हत्यारें, आस, दांडे, ध्वज, मरून पडलेले हत्ती, घोडे व फुटून तुटून खालीं पडलेलीं चिलखतें ढाली, माळा, अलंकार, वस्त्रें व अनुकर्ष यांनीं भूमी भरून निघाली. अंजन, वामन, सुप्रतीक, महापद्मक, ऐरावत वगैरे जातीचे पर्वतप्राय उंच जातीचे हत्ती क्षणामध्यें मरून पडले. वनायु, डोंगरी, कांबोज देशचे व बाल्हीक देशचे उत्तमोत्तम घोडेही सात्यकीनें मारून काढले. याप्रमाणें त्यांचा फडशा उडत असतां दुःशासन पेंढार सैन्याला ह्मणाला, 'परता, तुह्मांला युद्धधर्म कळत नाहीं. पळून काय फायदा होणार आहे.' नंतर धोंडे फेंकून युद्ध करणाऱ्या मावळे वीरांना तो ह्मणाला, 'तुह्मी धोंडे मारून युद्ध करण्यांत पटाईत आहांत. सात्यकीला धोंड्यांनीं युद्ध करतां येत नाहीं. तेव्हां त्या युद्धाला हापापलेल्या सात्यकीला धोंड्यांनीं ठार करा.' हें भाषण ऐकून ते सर्व मावळे सात्यकीवर चालून जाऊन हत्तीच्या गंडस्थळासारखे मोठेमोठे धोंडे व गोफणी हातांत घेऊन त्याला मारण्याच्या इरायानें सात्यकीच्या पुढें जाऊन उभे राहिले. सात्यकीनें बाण सोडून ती धोंड्यांची वृष्टि कापून काढली. काजव्याप्रमाणें लखलखणाऱ्या तुकडे उडालेल्या त्या धोंड्यांनीं सैन्याचा फडशा उडूं लागल्यामुळें जिकडे तिकडे हाहाकार उडून राहिला. शेंकडों वीरांचे हात त्यांच्या हातांमधील धोंड्यांनिशीं कापून निघून ते जमिनीवर मरून पडत होते. हातांत तलवारी, शूल वगैरे घेऊन पुष्कळ दारद, तंग, खस, लंपाक, कुलिंद यांनीं आपापलीं आयुधें सात्यकीवर फेंकलीं परंतु सात्यकीला सर्व हत्यारांचें ज्ञान पूर्ण असल्यानें त्यानें आपल्या बाणांनीं सर्व हत्यारांचा फडशा पाडला. त्यामुळें चतुरंग सैन्याची पळापळ झाली. सात्यकीवर चालून आलेल्या गजदळापैकीं बाकी राहिलेल्या हत्तींचीं गंडस्थळें फुटून रक्तबंबाळ झाल्यामुळें त्यांनीं सात्यकीच्या रथापासून पळ काढला. ते वेळीं सात्यकीनें पळवून सोडलेल्या सैन्यामधून पर्वकालीं खवळलेल्या समुद्राप्रमाणें मोठा शब्द निघत होता. तो ऐकून द्रोण आपल्या सारथ्याला ह्मणाले, 'हा सात्वत महारथी सात्यकि खवळून जाऊन सैन्याला काळाप्रमाणें रणामध्यें फाडून काढीत फिरत आहे. हा जेथें भयंकर शब्द निघत आहे त्या ठिकाणीं रथ घेऊन चल.' सारथी म्हणाला, 'खरोखरच कौरवसैन्य फुटून पळूं लागलें आहे. इकडे हे शूर पांचाल व पांडव एकवटून आपल्याला मारण्यासाठीं आपल्यावर चालून येत आहेत. सात्यकि बराच लांब गेला आहे. तेव्हां आतां येथें राहावयाचें किंवा त्याकडे जावयाचें हें आपणच ठरवा.' याप्रमाणें सारथी बोलत असतां कौरवसैन्य सात्यकीला सोडून द्रोणांच्या रथाभोंवतीं गोळा झालें.

तेव्हां दुःशासनाचा रथ जवळ आलेला पाहून द्रोण त्याला म्हणाले, ‘ दुःशासना, ह्या सर्व रथांची पळापळ कां उडाली आहे. राजा खुशाल आहेना. जयद्रथ जिवंत आहेना. तूं राजाचा मुलगा, राजाचा भाऊ असून तुला यौवराज्य मिळालें आहे तेव्हां आतां असा पळतोस काय? आपण होऊन पांडव व पांचाल यांच्याशीं युद्ध आरंभून आज एकट्या सात्यकीला एवढा कां भ्यालास? त्या भिकार द्यूतामध्यें हातांत फांसे घेतांना हे पुढें भयंकर विषारी बाण होणार हें त्यावेळीं तुला कळलें नाहीं. पूर्वी पांडवांना टाकून बोलून द्रौपदीला क्लेश देण्याला मुख्यतः तूं कारण झाला आहेस. तो तुझा मान, तो तुझा ताठा, तें तुझें बीज, तें तुझें गरजणें, तें सर्व कोठें गेलें? विषारी सापाप्रमाणें पांडवांना चेतवून आतां तूं पळणार कोठें? ही कौरवसेना, हें राज्य व ज्याचा तूं कर्कश भाऊ पळपुटा बनला आहेस तो दुर्योधन या सर्वांची आतां कींव केली पाहिजे. एकट्या सात्यकीशीं युद्ध करतांना जर तुला आज असा पळ काढण्याचा प्रसंग आला तर त्या गांडीवधारी अर्जुनाला, भीमाला, नकुलसहदेवांना, किंवा युधिष्ठिराला पाहशील तेव्हां तुझी काय दशा उडेल. आतां एकदम जाऊन गांधारीच्या पोटांत शिरून लपून बस. कारण ह्या पृथ्वीवर तूं कोठेंही पळालास तरी तुझी जगण्याची आशा नाहीं. जर तूं पळण्याचा विचार केला असशील तर तूं गोडीगुलाबीनेंच धर्मराजाला पृथ्वीचें राज्य देऊन टाक. जोंपर्यंत अर्जुनाचे सापासारखे बाण तुझ्या शरीरांत घुसले नाहींत, व जोंपर्यंत पांडवांनीं तुह्मां शंभर भावांना रणामध्यें मारून टाकले नाहींत, जोंपर्यंत युधिष्ठिर व कृष्ण खवळले नाहींत, जोंपर्यंत भीमानें या अफाट सैन्यांत शिरून तुझ्या भावाला बगलेंत मारलें नाहीं, तोंपर्यंत पांडवांशीं स्नेह कर. तुझेंही रक्त भीम पिणार आहे असें मीं ऐकलें आहे, तें कांहीं खोटें होणार नाहीं. मूढा, तुला त्या भीमाचा पराक्रम ठाऊक नव्हता काय? ह्मणून रणांतून पाय मागें घेऊन पळ काढणाऱ्या त्वां त्याच्याशीं वैर आरंभिलेंस? तेव्हां आतां असाच या रथानिशीं सात्यकीकडे परत जा. तुझ्यावांचून या सैन्याची कशी पळापळ उडाली आहे पहा. आपल्यासाठीं तरी सात्यकीशीं युद्ध दे.’ हें बोलणें ऐकलें न ऐकलेंसें करून कांहीं उत्तर न देतां रणांतून कधीं पाय मागें न घेणारें मोठें म्लेंच्छ सैन्य बरोबर घेऊन तो सात्यकीवर तुटून पडला. इकडे द्रोणही वेगानें पांचाल व पांडव यांवर चालून गेले. आपलें नांव सांगून त्यांनीं पांडव, पांचाल व वत्स सैन्याची मोठी कत्तल केली. त्याप्रमाणें अनेक सैन्यांना ते जिंकीत असतां पांचालपुत्र तेजस्वी वीरकेतु त्यांवर चालून आला. त्या दोघांची भयंकर चकमक उडून त्यांमध्यें वीरकेतु मरून वाऱ्यानें उपळून पर्वतावरून खालीं येणाऱ्या चांफ्याच्या झाडाप्रमाणें खालीं आला. त्याला मरून पडलेला पाहून चित्रकेतु, सुधन्वा, चित्रवर्मा व चित्ररथ भावाच्या मरणानें दुःखी होऊन युद्ध करण्याच्या इरायानें द्रोणावर धांवून गेले व पांचाल सैन्यानिशीं त्यांनीं त्यांना घेरलें. व उन्हाळ्यानंतरच्या मेघांप्रमाणें बाणांच्या वर्षावानें त्यांना झांकून काढलें. याप्रमाणें त्यांचे बाण लागत असतां द्रोणांनीं अगदीं खवळून जाऊन त्यांना नाहींसेंच करण्याकरितां कीं काय त्यांवर शरांचें अगदीं जाळें पसरून सोडलें. प्रथम त्यांचे सारथी व घोडे मारून काढून पुढें झाडावरून फुलें तोडावींत त्याप्रमाणें त्यांचीं मुंडकीं कापून त्यांनीं खालीं पाडलीं. याप्रमाणें त्यांना मारून ते आपलें धनुष्य फिरवीत राहिले; पांचाल मेलेले पाहून धृष्टद्युम्नाच्या डोळ्यांतून पाणी आलें व संतापानें खवळून तो द्रोणाच्या रथावर चालून गेला. तेव्हां या दोघांमध्यें युद्ध फार जोराचें झालें. दोघेही युद्धकलेमध्यें प्रवीण असल्यानें नानाप्रकारचीं मंडलें व यमकें करीत एकमेकांला बाणांनीं मारून काढीत असतां इतर वीरांना ते अगदीं थक्क करून सोडीत होते. द्रोण धृष्टद्युम्नाशीं भिडले आहेत तेव्हां खात्रीनें ते आपल्या हातीं येणार असें पांचाल ओरडत होते. इकडे द्रोणांनीं एकदम धृष्टद्युम्नाच्या सारथ्याचें डोकें एखाद्या पिकल्या फळाप्रमाणें अचानक उडवून दिलें. तेव्हां धृष्टद्युम्नाचे घोडे उधळले. पांचाल व सृंजय यांची दाणादाण उडवून देऊन द्रोण आपल्या सैन्यामध्यें येऊन उभे राहिले.

इकडे द्रोणांनीं चिडविल्यावरून दुःशासन सात्यकीवर चालून गेला, तेव्हां सात्यकीनें बाणांचा वर्षाव करून दुःशासनादिकांना बेजार केलें. दुःशा-

सनाच्या वीरांनीं पळ काढला. तरी दुःशासन न डगतां उभा राहून सात्यकीवर बाण सोडून मोठ्यानें गर्जत होता. तेव्हां दुर्योधनानें त्रिगर्तांना सात्यकीवर जाण्यास सांगितलें. तेव्हां पुष्कळ रथांनिशीं सात्यकीवर चालून जाऊन त्यांनीं त्याला घेरलें. सात्यकीनें त्यांचीही कत्तल उडवून दिली. तेव्हां फिरून दुःशासनाचें व त्याचें निकराचें युद्ध जुंपलें. त्यामध्यें सात्यकीनें दुःशासनाचे घोडे, पार्श्वरक्षक सारथी वगैरे सर्व मारले. परंतु भीमाच्या प्रतिज्ञेप्रमाणें तो भीमाचा वांटा असल्यामुळें त्याला न मारतां सोडून दिलें. दुःशासनाचें धनुष्य व रथ मोडून घोडे व सारथी नाहींसे झाल्यामुळें त्रिगर्ताधिपतीनें त्याला आपल्या रथावर घेतलें. इकडे सात्यकी हळू हळू अर्जुनाकडे निघाला.

## ३८ बृहत्क्षत्र, धृष्टकेतु व क्षत्रधर्मा यांचा वध ( ७. १२५ )

दिवस कलल्यावर रण फार भयंकर माजलें. द्रोण सोमकांशीं भिडले असतां पावसाप्रमाणें सैन्यांमधून शब्द निघत होता. पांच केकय भावांमधील वडील बृहत्क्षत्र त्यांवर चालून आला व त्यानें आचार्यांना फार जर्जर केलें. त्यावर द्रोणांनींही तीव्र बाण सोडले. ते सर्व त्यानें मोठ्या शिताफीनें कापून काढले. तेव्हां त्यावर वरचढ करण्याच्या इच्छेनें द्रोणांनीं ब्रह्मास्त्र सोडलें. त्याचा बृहत्क्षत्रानें ब्रह्मास्त्रानेंच नाश केला. शेवटीं द्रोणांनीं पुष्कळ बाणांनीं त्याला अगदीं व्याकूळ करून त्याचे घोडे, सारथी वगैरे मारून काढून एक बाण नेमका त्याच्या छातीवर मारला. त्यानें छाती फुटून तो मरून खालीं पडला. याप्रमाणें बृहत्क्षत्र मरून पडल्यावर चेदिराज धृष्टकेतु आगींत उडी घेणाऱ्या पतंगाप्रमाणें मरण्यासाठीं द्रोणांवर धांवून गेला व निजलेल्या वाघाला डवचावें त्याप्रमाणें त्यानें द्रोणांवर बाण सोडून त्यांना डवचलें. तेव्हां द्रोणांनीं त्याचें धनुष्य तोडून टाकलें. घोडे मारून पाडून सारथ्याचें डोकें उडवून दिलें. तेव्हां धृष्टकेतूनें रथांतून खालीं उडी घेऊन एखाद्या खवळलेल्या नागिणीसारखी उग्र गदा त्यांवर फेंकली. तिचे द्रोणांनीं तुकडे तुकडे करून टाकले असतां ती मोठा शब्द करीत खालीं पडली. तेव्हां धृष्टकेतूनें तोमर व लखलखित शक्ति द्रोणांवर सोडली, त्यांचीही द्रोणांनीं तीच वाट लाविली. पुढें धृष्टकेतूची वाट लावण्याच्या इरादानें द्रोणांनीं एक तीक्ष्ण विशिख बाण त्याच्यावर सोडला. तो त्याचें कवच फोडून पोटांतून निघून पद्मवनांत शिरणाऱ्या हंसाप्रमाणें पृथ्वीमध्यें शिरला. याप्रमाणें तो मेला असतां त्याचा अस्त्रनिपुण मुलगा मोठ्या त्वेषानें तो बाणांचा भार आपल्या डोक्यावर घेऊन युद्धाला उठला. त्याचीही द्रोणांनीं सहज तीच वाट लाविली. तेव्हां जरासंधाचा मुलगा स्वतः द्रोणावर चालून आला. व त्यानें बाणांचा वर्षाव करून द्रोणांना झांकून काढलें. त्याची ती चलाखी पाहून द्रोणांनीं हजारों बाण सोडून हजारों वीर पहात असतां त्याला मारून टाकला. जो जो ह्मणून द्रोणांच्या समोर येत असे त्याला त्याला वेळ आली असतां सर्व प्राणिमात्रांना गट्ट करणाऱ्या काळाप्रमाणें ते गिळून टाकीत होते.

याप्रमाणें द्रोणाचार्यांच्या बाणांनीं घाबरून गेलेल्या पांचाल महारथ्यांना आपले पाय सुसरीनें धरल्याप्रमाणें वाटूं लागलें. तरी सर्व चेदि, सृंजय काशि, व कोसलवीर द्रोणाचार्यांवर मोठ्या उत्साहानें त्यांना मारण्यासाठीं ‘ द्रोण मेले, द्रोण मेले ह्मणून ओरडत चालून जात होते. या सर्व वीरांना द्रोणांनीं यथाक्रम यमाकडे पाठविलें. या वेळीं क्षत्रधर्मा युद्धाला तयार होऊन उभा राहिला व अगदीं खवळून जाऊन अर्धचंद्र बाणानें त्यानें द्रोणांचें धनुष्य कापून काढलें. तेव्हां क्षत्रियांतक द्रोण अगदीं खवळून व लखलखित व जास्ती वेगवान असें दुसरें धनुष्य घेऊन त्यांनीं क्षत्रधर्म्याला मारून खालीं पाडलें. याप्रमाणें धृष्टद्युम्नाचा मुलगा मेल्यानें सैन्यामध्यें थरकांप उडाला. पुढें चेकितान द्रोणांवर चालून आला. त्याच्या उजव्या बाहूमध्यें सोळा बाण सोडून दुसऱ्या बाणांनी त्याचा ध्वज मोडून काढून द्रोणांनीं त्याचा सारथी मारून पाडला. तेव्हां चेकितानाचे घोडे सारथी मेल्यामुळें उधळून रथाला घेऊन पळाले. याप्रमाणें यांची दशा उडालेली पाहून सर्व पांडव व पांचाल घाबरले. पंच्यायशीं वर्षांचे ह्मातारे कानापर्यंत ज्यांचे केस पिकले आहेत

अशा द्रोणांना याप्रमाणें पराक्रम गाजवीत एखाद्या सोळा वर्षांच्या तरण्या बांडाप्रमाणें रणामध्यें झळकतांना पाहून द्रुपद ह्मणाला, 'हा ब्राह्मण क्षत्रियांना भुकेलेल्या वाघाप्रमाणें खाऊन टाकीत आहे. बाकी दुर्योधनाला खरोखर फार वाईट गति मिळणार. कारण, त्याच्या लोभामुळेंच पुष्कळ ठळक ठळक क्षत्रिय रणामध्यें मरून रक्तांत लोळत कोल्ह्याकुत्र्यांना खाद्य होऊन पडले आहेत. असें ह्मणून अक्षौहिणी सैन्यानिशीं पार्थांना पुढें करून तो द्रोणांवर चालून गेला.

## ३९ भीम व कर्ण यांची चकमक.
## ( ७. १२६–४१ )

याप्रमाणें पांडवांचें सैन्य हालवून निघालें असतां सोमक, पांचाल व पांडव तेथून दूर बाजूला गेले. प्रलयकाळाप्रमाणें जगाचा व विशेषतः पांडुपांचाळांचा क्षय चालला असून द्रोण पराक्रम गाजवून वरचेवर गर्जत असतां युधिष्ठिराला पुढें कांहीं आधार दिसेना. आतां पुढें कसें होणार ह्मणून तो अर्जुनासाठीं चोहोंकडे पाहतो तों त्याला अर्जुनही दिसेना किंवा सात्यकीही दिसेना. गांडीवाचा शब्दही ऐकूं येईना. त्यामुळें त्याच्या मनाला चैन नाहींसें झालें व सात्यकि व अर्जुन यांनां कुमक पाठविण्याचा तो विचार करूं लागला. नंतर भीमाजवळ जाऊन तो मोठ्या दुःखानें त्याला म्हणाला, 'त्या अर्जुनाचा किंवा सात्यकीचा ध्वज मला दिसत नाहीं. श्रीकृष्णानें वाजविलेल्या पांचजन्याचा शब्द ऐकूं येत आहे. तेव्हां यावरून असें वाटतें कीं, अर्जुन मरून पडल्यामुळें श्रीकृष्ण स्वतः युद्ध करीत आहे. ज्याच्या सामर्थ्यावर अवलंबून पांडव जिवंत आहेत व संकटसमयीं ज्याकडे आह्मी धांव मारतों तो आज जयद्रथाला शोधीत कौरवसैन्यांत शिरला आहे; परंतु तो अद्याप परत आला नाहीं. तसेंच सात्यकीचीही कांहीं वार्ता समजत नाहीं. यामुळें त्या उभयतांसंबंधानें माझ्या मनांत मोठी चिंता व धास्ती उत्पन्न झाली आहे. तेव्हां माझी आज्ञा पाळणें तुला आपलें कर्तव्य वाटत असेल तर तूं या दोघांच्या शोधाला जा. अर्जुनाच्या मागून एकदा जाण्यांत सात्यकीनें जें धैर्य दाखविलें तें सामान्य मनुष्याच्या हातून दाखविलें जाणार नाहीं. तेव्हां या दोघांची गांठ घेऊन मला खूण दे.

भीमसेन ह्मणाला, 'ब्रह्मदेव, शंकर, इंद्र, वरुण हे आजपर्यंत ज्या रथांत बसत आले त्यांत बसून कृष्णार्जुन गेले आहेत. तेव्हां त्यांना कांहीं भीति नाहीं. परंतु आपली आज्ञा मला शिरसा मान्य आहे. ह्मणून हा मी चाललों. त्यांना भेटून मी आपल्याला खूण देईन.' असें बोलून युधिष्ठिराला धृष्टद्युम्नाच्या स्वाधीन करून तो त्याला ह्मणाला, 'हे महाबाहो, हर प्रयत्नानें महाराजांना पकडण्याला द्रोण कसे टपले आहेत हें तुला माहीतच आहे. महाराजांचें रक्षण करणें जितकें आवश्यक आहे तितकें जयद्रथाला मारण्यास जाणें मला अवश्य नाहीं. असें अर्जुन ह्मणून गेला आहे. परंतु महाराजांची आज्ञा ही मला मोडतां येत नाहीं. म्हणून तो मरूं घातलेला जयद्रथ जिकडे आहे तेथें मी जातों. तूं मात्र महाराजांच्या आज्ञेंत राहून त्यांचें नीट रक्षण कर. हेंच या युद्धामध्यें आपलें पाहिलें कर्तव्य आहे.' धृष्टद्युम्नानें त्याचें ह्मणणें मान्य केल्यावर वडील भावाला त्याच्या स्वाधीन करून, धर्माला नमस्कारपूर्वक आलिंगन दिल्यावर कैरातकमधु पिऊन मदानें डोळे लाल झालेला भीम दुप्पट आवेशानें अर्जुन गेलेल्या वाटेनें निघाला. ब्राह्मणांनीं स्वस्तिवाचन केलें. तो निघाला असतां अनेक जयसूचक चिन्हें होऊं लागलीं. अंगांत कुंडलें, अंगद, पंजा व सोन्यानें मढविलेलें पोलादी चिलखत घालून भीम निघाला असतां फिरून पांचजन्याचा शब्द ऐकूं आला. तो त्रैलोक्याला घाबरून सोडणारा शब्द ऐकून धर्मराजानें भीमाला जाण्याची गडबड केली. याप्रमाणें त्याचा आग्रह पाहून भीमसेन भावाचें प्रिय करण्यासाठीं सिंहनाद करीत व धनुष्याचा टणत्कार करीत आपला शंख फुंकून निघाला. कौरवसैन्यांत शिरल्यावर धनुष्याची प्रत्यंचा जोरानें ओढून बाण सोडून शत्रुसैन्याच्या तोंडाला त्यानें अगदीं हलवून सोडलें. सोमक व पांचाल त्याच्या मागून होते. दुश्शल, चित्रसेन, विकर्ण, विंदानुविंद प्रभृति कौरव मंडळी त्याला थोपविण्यासाठीं त्यावर चालून गेली. त्यांनीं आपल्याला घेरलेलें पाहून क्षुद्र पशूंवर चालून जा-

णाऱ्या सिंहाप्रमाणें तो त्यांवर तुटून पडला. कौरववीरांनीं मोठमोठीं दिव्य अस्त्रें प्रगट करून भीमाला बाणांनीं अगदीं झांकून काढलें. परंतु वेगानें त्यांच्यामधून पार पडून भीम तडख द्रोणाचार्यांच्या तुकडीवर चालून गेला. व पुढें असलेल्या गजदळाला बाणांच्या वर्षावानें त्यानें झांकून काढलें. व त्याला दशदिशांला चीं चीं करीत पळवून लावलें. द्रोणाचार्यांनीं त्याच्या कपाळावर एक बाण मारला. नंतर उभयतांचीं अधिकोत्तर भाषणें होऊन शेवटीं कालदंडासारखी आपली गदा त्यानें द्रोणाचार्यांच्या रथावर फेंकली. त्यानें द्रोणाचार्यांचा रथ, सारथी, ध्वज या सर्वांचा फडशा पडला. परंतु इतक्यांत द्रोणाचार्यांनीं मात्र रथाखालीं उडी घेतली. इकडे धृतराष्ट्राच्या मुलांनीं भीमाला गराडा दिला व द्रोणाचार्य दुसऱ्या रथांत बसून व्यूहाच्या तोंडाशीं जाऊन युद्धाला तयार होऊन उभे राहिले. पुढें वृंदारक, अत्रय, रौद्रकर्मा या धृतराष्ट्राच्या मुलांना भीमानें ठार केलें. इतर कौरवांनीं बाणांचा त्यावर भडिमार केला. परंतु त्यानें विंदानुविंद व सुवर्मा यांनाही वरच्याप्रमाणेंच बाणांनीं मारून यमसदनाला पाठविलें. धृतराष्ट्रपुत्र सुदर्शन यावर त्यानें बाण सोडला असतां तो लागून तोही मरण पावला. याप्रमाणें त्या रथदळाला त्यानें एका क्षणांत दशदिशांला उडवून लाविलें. याप्रमाणें ठळक ठळक वीरांना मारून, रथदळाला घाबरवून सोडून, व रथ्यांना मागें टाकून तो द्रोणाचार्यांच्या तुकडीकडे गेला. त्याला थोपविण्यासाठीं आचार्यांनीं त्यावर बाणांचा वर्षाव केला, परंतु तो शरवर्षाव गट्ट करीत कौरवांमध्यें घुसला. तेव्हां कौरवांच्या सांगण्यावरून मोठमोठे धनुर्धारी जोरानें त्यावर तुटून पडून त्यांनीं त्याला वेढलें. तेव्हां शत्रूच्या बाजूचा फडशा पाडणारी आपली गदा उगारून ती त्यानें त्यावर सोडली व त्याच्या योगानें पुष्कळ योद्ध्यांचा त्यानें चुराडा उडविला. तेजानें जळणाऱ्या त्या भयंकर गदेनें कौरवांना अगदीं घाबरवून सोडलें. तेव्हां तिला येऊन पडतांना पाहून भयंकर शब्द करीत कौरवांनीं पळ काढला.

याप्रमाणें नासधूस करीत त्याला पुढें चाललेला पाहून द्रोणांनीं त्यावर चाल केली. तेव्हां दोघांमध्यें निकराचें युद्ध झालें. ते वेळीं द्रोणांच्या धनुष्यापासून सुटलेल्या बाणांनीं हजारों पांडववीरांचा फडशा पडला. तेव्हां द्रोणांच्या रथाकडे जाऊन भीमानें तो दांड्याला धरून आपटून दिला. याप्रमाणें भीमानें एका निमिषांत सहज रथ उडवून देऊन तो आपल्या रथांत येऊन बसला; व लागलींच सारथ्यानें एकदम रथ जोरानें पुढें हाकला. व नदीचा जोराचा प्रवाह ज्याप्रमाणें झाडें उमळून पाडीत पुढें जातो त्याप्रमाणें क्षत्रियांना चिरडीत तो पुढें चालला. कृतवर्म्याच्या ताब्यांतल्या भोजसैन्याच्या तुकडीकडे आल्यावर त्याचाही चेंदा उडवून देऊन तो सैन्याचे अंगावर कांटा उभा करीत पुढें चालला. नंतर दरद व युद्धकुशल म्लेंच्छ सैन्याच्या तुकडीकडे तो आला. आणि त्या ठिकाणीं सात्यकीला युद्ध करतांना पाहून अर्जुनाची गांठ घेण्याकरितां तो मोठ्या निकरानें लढत पुढें चालला. तेव्हां जयद्रथाला मारण्यासाठीं कटून मेहनत करीत असलेला अर्जुनही त्याला दिसला. तेव्हां पावसाळ्यांतील मेघाप्रमाणें तो मोठ्यानें गरजला. तें त्याचें गरजणें ऐकून कृष्णार्जुनांनींही त्याला मिळण्यासाठीं मोठ्यानें आरोळी दिली. व सात्यकीनेंही त्याचप्रमाणें मोठ्यानें आरोळी दिली. याप्रमाणें याची आरोळी ऐकून युधिष्ठिराचा शोक नाहींसा होऊन तो स्वस्थ झाला. तो मनांत ह्मणाला, 'हे महाबाहो भीमा, माझ्या सांगण्याप्रमाणें तूं खूण दिलीस. ज्यानें रणांत इंद्राला जिंकून अग्नीला तृप्त केलें, ज्याच्या मनगटाच्या जोरावर आह्मी जिवंत आहोंत, देवांना देखील दुर्जय अशा निवातकवचांना ज्यानें एका धनुष्यानें जिंकलें; उत्तर गोग्रहणाच्या वेळीं सर्व कौरवांचा ज्यानें एकट्यानें समाचार घेतला, चौदा हजार कालकेय ज्यानें मारले, दुर्योधनासाठीं ज्यानें चित्ररथ गंधर्वाला जिंकलें, तो कृष्णसारथी माझा लाडका अर्जुन जिवंत आहे, हें माझें मोठें भाग्यच मी समजतों. जयद्रथाला मारण्याची प्रतिज्ञा पुरी करून सूर्यास्ताचे पूर्वीं श्रीकृष्णाबरोबर त्याला मी पाहीन काय? दुर्योधनाच्या कल्याणामधें दक्ष असणारा जयद्रथ आज अर्जुनाच्या हातून मरून त्याच्या शत्रूंना आनंद देईल काय, जयद्रथाला अर्जुनानें मारलेलें ऐकून मूढ दुर्योधन आमच्याशीं सख्य करील काय? आज इतक्या योद्ध्यांचा फडशा पडलेला पाहून,

त्याला पश्चात्ताप होईल काय ? एका भीमाबरोबर आमच्या ह्या वैऱ्याचा शेवट लागेल काय ? ' याप्रमाणें नानाप्रकारचे विचार त्याच्या मनांत आले.

इकडे भीमसेनाची ती गर्जना ऐकून कर्ण त्यावर चालून गेला. भीमानेंही आपल्यापुढें कर्णाला पाहून त्याच्यावर त्वेषानें पाणी दिलेले बाण सोडले. कर्णानेंही त्या सर्वांना तसेंच परतविलें. त्यांच्यामध्यें बऱ्याच निकराचें युद्ध होऊन त्यामध्यें दोघांनीं युद्धकौशल्य बरेंच दाखविलें. भीमानें तर मोठी हातचलाखी दाखवून मुठीपाशींच कर्णाचें धनुष्य कापून काढलें. व कर्णानेंही दुसरें धनुष्य घेऊन भीमावर बाणांचा मारा चालविला. शेवटीं भीमानें त्याच्या धनुष्याची दोरी तोडून सारथ्याला रथांतून खालीं आणला व रथाचे घोडे मारून टाकले. तेव्हां, कर्ण झटकन् रथांतून उडी घेऊन वृषसेनाच्या रथांत जाऊन बसला. याप्रमाणें कर्णाला जिंकून भीमानें मेघगर्जनेप्रमाणें शब्द केला असतां सर्व पांडवसैन्याला आनंद होऊन जिकडे तिकडे शंखनाद उठला.

याप्रमाणें सैन्याची दाणादाण उडवून देऊन अर्जुन, सात्यकि व भीम जयद्रथाकडे जाऊन पोहोंचल्यावर मनांत पुष्कळ विचार आणून दुर्योधन एकट्या रथानिशीं झपाट्यानें द्रोणांकडे आला. व रागानें डोळे लाल होऊन घाबरून म्हणाला, ' अर्जुन, भीमसेन व सात्यकि आमच्या मोठ्या सैन्याचा पराभव करून अगदीं अडथळा न येतां जाऊन त्या ठिकाणीं लढत आहेत. अर्जुन आपल्याला न जुमानतां गेला तो गेलाच. परंतु सात्यकि व भीम हेही आपल्याला मागें टाकून पुढें सरसावून गेले आहेत. ज्या अर्थीं हे तिघे आपल्यासारख्या नरवीरांना मागें सारून पुढें निघून गेले आहेत त्या अर्थीं माझ्या-या मंद भाग्याचा-या युद्धांत खात्रीनें नाश होणार. झाली गोष्ट कांहीं परत येत नाहीं. परंतु पुढचा विचार सांगा. आतां जयद्रथासंबंधानें जें करावयाचें तें नीट विचार करून वेळ न दवडतां करा. ' द्रोण म्हणाले, ' मीं पुष्कळ विचार केला आहे. आतां काय करावयाचें सांगतों ऐक. हे तिघे पुढें गेले आहेत, यांची जितकी भीति तितकीच मागें असणाऱ्या पांडवसैन्याची भीति आहे. परंतु जिथें कृष्णार्जुन आहेत तिकडची भीति विशेष आहे. आतां खवळलेल्या अर्जुनापासून भिऊन गेलेल्या जयद्रथाचें रक्षण आधीं झालें पाहिजे. ' शकुनीच्या डोक्यांतून निघालेल्या द्यूताची आज ही वेळ आली. त्या सभेमध्यें जय किंवा पराजय कांहींच झाला नाहीं. आजच पण लावून बसलेल्या आपणामध्यें जय किंवा अपजय कोणाला येणार पाहिलें पाहिजे. या ठिकाणीं हे सांप्रत युद्धाला जमलेले वीर द्यूत खेळणारे असून हे बाण हेच फासे समज व हा जयद्रथ ह्या द्यूतामधील पणाला लावलेली वस्तु आहे. शत्रूशीं मोठें द्यूत या संबंधानें चाललें आहे. तेव्हां आतां सर्वांनीं जिवाची पर्वा न करतां योग्य रीतीनें याचें रक्षण केलें पाहिजे. ज्या ठिकाणीं ते मोठमोठे धनुर्धारी कंबरा बांधून जयद्रथाचें रक्षण करीत आहेत तेथें तूं लवकर जा. व त्यांना कुमक दे. मी या ठिकाणीं मागून येणाऱ्या पांचालपांडवांना थोपवून तुह्मांला पुढें कुमक पाठवीत जाईन. हें ऐकून दुर्योधन एकदम त्यांच्या सांगण्यावरून अचाट कर्म करण्याच्या इरायानें पुढें निघून गेला. इकडे पूर्वी कृतवर्म्यानें थोपविल्यामुळें मागें राहिलेले अर्जुनाचे चक्ररक्षक युधामन्यु व उत्तमोजा अर्जुनाला मिळण्याकरितां पिछाडी फोडून कौरवसैन्यामधून येत असतां दुर्योधनाच्या पुढें आले, तेव्हां या दोन भावांबरोबर त्याचें युद्ध झालें त्यांत दुर्योधनाचे घोडे व सारथी मेल्यामुळें खालीं उतरून त्यानें एक गदा त्यांच्यावर फेंकली. त्यामुळें त्यांच्या रथाचा फडशा पडला. त्यांनीं मात्र एकदम रथाखालीं उडी घेतली. इकडे दुर्योधनही सारथी व रथ नाहींसे झाल्यामुळें शल्याच्या रथावर चढून बसला. युधामन्यु व उत्तमोजा हेही दुसऱ्या रथांत बसून अर्जुनाकडे निघून गेले.

याप्रमाणें आंगावर शहारे उत्पन्न करण्यासारखें युद्ध चाललें असतां मस्त हत्ती ज्याप्रमाणें मस्त हत्तीवर चालून जावा त्याप्रमाणें कर्ण फिरून भीमावर चालून आला. परंतु भीमसेनाच्या मनांत याला युद्ध न देतां कृष्णार्जुनांकडे जाण्याचा विचार होता. परंतु त्यावर बाणांचा वर्षाव करून त्याला अधिक्षेपपूर्वक आव्हान केलें असतां रथ फिरवून तो कर्णाबरोबर युद्ध देण्याला तयार होऊन त्यावर बा-

ण वर्षाव करूं लागला. इकडे कर्णानें आपल्या बाणांनीं भीमाचा रथ, ध्वज, सारें झांकून काढून त्याचें मजबूत कवच उडवून दिलें. त्यानें भीमाला त्वेष चढून त्यानें त्यावर तीक्ष्ण बाण सोडले. ते कूंकरणाऱ्या पक्षाप्रमाणें कर्णाच्या शरीराच्या प्रत्येक भागावर पडत होते. पुढें भीमानें आणखी बाण सोडून कर्णाचे घोडे व सारथी मारून धनुष्य मोडून टाकलें. व त्याच्या छातीवरही एक बाण मारून त्याला घायाळ केलें.

नंतर कर्ण दुसऱ्या रथांत बसून समुद्राप्रमाणें खवळून भीमावर चालून आला. भीमही द्यूताच्या वेळचे, वनामध्यें झालेले व विराट नगरामध्यें भोगावे लागलेले क्लेश, त्याचप्रमाणें दुर्योधनाचीं अघोर कृत्यें, दुःशासनानें द्रौपदीवस्त्रहरणाचे वेळीं सोडलेले वाग्बाण, व कर्णाचीं दुर्भाषणें आठवून आपलें प्रचंड धनुष्य काढून तो त्वेषानें कर्णावर चालून गेला. उभयतांचें शरभाप्रमाणें भयंकर युद्ध जुंपलें. त्या दोघांना रागानें डोळे लाल करून खवळलेले पाहून कौरवपक्षीय महारथी कांपूं लागले. ती रणभूमी यमाच्या राजधानीप्रमाणें भयंकर दिसूं लागली. या दोन वीरांनीं सोडलेले गृध्रपंख लावलेले बाण शरदृतूमध्यें आकाशांत फिरणाऱ्या मत्त सारसांच्या पंक्तीप्रमाणें शोभत होते. क्षणार्धांत ती रणभूमी मेलेले हत्तीघोडे व लोक ह्यांनीं भरून निघाली. कांहीं वेळानें भीमानें कर्णाच्या सारथ्याला खालीं आणलें व त्याचें धनुष्य मोडून टाकलें. तेव्हां भीमाला मारण्यासाठीं एक मोठी शक्ति घेऊन ती त्यावर सोडून कर्णानें मोठा शब्द केला. त्या शक्तीचे भीमानें वरचेवर तुकडे उडवून दिले; व फिरून कर्णाचें धनुष्य मुठीपाशीं कापून काढून त्याचे घोडे व सारथी मारून पाडले. त्यामुळें कर्णाला मोठी चिंता पडून पुढें काय करावें हें सूचेना. याप्रमाणें कर्णाला पेंचांत सांपडलेला पाहून रागानें थरथर कांपत दुर्योधन दुर्जयाला ह्मणाला, 'भीम कर्णाला गिळून टाकण्याचे आधीं तिकडे जाऊन त्या हिजड्याला मारून कर्णाला मदत दे.' ही भावाची आज्ञा ऐकून दुर्जय जाऊन भीमावर भिडला. त्याला भीमानें मर्मस्थलावर बाण मारून यमसदनाची वाट दाखविली. याप्रमाणें कर्णाला विरथ करून त्यानें अनेक बाण, शतघ्नी व भाले यांनीं कर्णाला भरून काढलें. इतकें झालें तरी कर्णानें रण सोडून माघार घेतली नाहीं. याप्रमाणें कर्ण विरथ असूनही शत्रूला न डगतां त्याच्याशीं युद्ध करतांना पाहून दुर्योधनानें दुर्मुखाला त्याला रथ नेऊन देण्यास सांगितलें. त्यावरून दुर्मुखानें कर्णाकडे रथ नेऊन, भीमालाही बाण सोडून थोपविण्याचा प्रयत्न केला. तेव्हां भीमानें कर्णाचें निवारण करून आपला रथ दुर्मुखावर नेला; व नऊच बाणांनीं त्यानें त्याला यमसदनाला पाठविलें. कर्णाला दुर्मुखाच्या मरणानें वाईट वाटून तो त्याच रथांत जाऊन बसला. त्या दुर्मुखाच्या मरणानें दुःख होऊन दीर्घोच्छ्वास टाकीत कर्णाला काय करावें हें सुचेना. ही संधी पाहून भीमानें कर्णावर बाण सोडून त्याचें कवच फोडून काढलें; व त्याच्या सारथ्याला जखमी केलें. याप्रमाणें भीमाच्या बाणांनीं विव्हळ होऊन घोडे भरधांव सोडून कर्ण रण सोडून निघून गेला. भीम पेट घेतलेल्या अग्नीप्रमाणें झळकत धनुष्याचा टणत्कार करीत त्या ठिकाणीं उभा होता.

जी आजपर्यंत दुर्योधनाला कर्णच एकटा कायतो बलवान अशी घमेंड होती ती आज दांत पडलेल्या सापाप्रमाणें त्याची स्थिति झालेली पाहून अगदीं जिरली. कर्ण, दुःशासन व मी आह्मी तिघे पांडवांना जिंकण्याला पुरे आहों असें त्याला वाटत होतें. त्याला कृष्णाचें ह्मणणें न ऐकल्याबद्दल वाईट वाटूं लागलें. आपल्या भावांना भीम पटापट मारून काढतो आहेसा पाहून त्याला मोठेंच वाईट वाटलें. कर्णाचा भीमानें पराभव केलेला पाहून दुर्मर्षण, दुःसह, दुर्मद व दुर्धर या चार दुर्योधनाच्या भावांना हें सहन न होऊन ते भीमावर तुटून पडले. तेव्हां कर्णही पुनः परतून भीमाशीं लढूं लागला. त्यानें आपल्या प्रचंड धनुष्यापासून बाण सोडून धृतराष्ट्राच्या मुलांना त्यांचे घोडे व सारथी यांसह मारून वावटळानें उमळून पाडलेल्या झाडाप्रमाणें खालीं पाडलें. धृतराष्ट्राच्या मुलांना रणामध्यें मरून पडलेले पाहून संतापून जाऊन कर्ण जिवावर उदार झाला. व भीमानें आपल्या समक्ष त्यांना मारल्यानें आपणच त्या संबंधानें जबाबदार आ-

होंत असें त्याला वाटून तो भीमाशीं त्वेषानें युद्ध करूं लागला. परंतु त्याला न जुमानतां भीमानें त्याचें धनुष्य मोडून टाकलें, व घोडे व सारथी मारून टाकले. तेव्हां कर्ण रथाखालीं उतरून त्यानें भीमावर गदा फेंकली. तिला न जुमानतां भीमानें कर्णावर हजारों बाणांचा वर्षाव केला. याप्रमाणें फिरून भीमाच्या बाणांनीं बेजार होऊन कर्ण त्याला पाठ दाखवून निघाला असतां दुर्योधनानें चित्र, विचित्र, चित्राक्ष, चारुचित्र, शरासन, चित्रायुध व चित्रवर्मा या आपल्या भावांना त्याच्या मदतीला जाण्यास सांगितलें. त्यावरून भीमावर ते चालून गेले असतां एकेका बाणानेंच त्या सर्वांना त्यानें यमसदनाला पाठविलें. तें पाहून डोळ्यांत पाणी येऊन त्याला विदुरांच्या शब्दाची आठवण झाली. कर्णाला हा भीमसेनाचा पराक्रम सहन न होऊन सापाप्रमाणें फुसफुसत फिरून त्यावर चालून येऊन सूर्यकिरणांप्रमाणें तो त्यावर बाणांचा वर्षाव करूं लागला. याप्रमाणें कर्णाचा मोठा जोर असतांही भीम अगदीं डगला नाहीं. तोही या सर्व बाणांचा प्रतिकार करून कर्णाला बाणांनीं झांकून काढीतच होता. तो भीमाचा पराक्रम पाहून कौरवसुद्धां त्याची वाहवा करीत होते. तें पाहून दुर्योधनानें फिरून शत्रुंजय, शत्रुसह, चित्र, चित्रायुध, दृढ, चित्रसेन व विकर्ण या आपल्या सात भावांना त्यावर पाठविलें. त्यांचीही भीमानें पूर्वींच्याप्रमाणेंच वाट लाविली. त्या सर्वांना मारल्यावर विकर्णाला मारल्याबद्दल मात्र भीमाला फार वाईट वाटून तो त्याला उद्देशून ह्मणाला, 'मी सर्व कौरवांना मारीन अशी प्रतिज्ञा केली असल्यामुळेंच मला तुला मारावें लागलें; नाहीं तर तुझें आमच्या कल्याणाकडे लक्ष असल्यानें तुला मारण्याचें कारण नव्हतें. शिवाय, तूं क्षत्रधर्मानें रणांत युद्धासाठीं आला होतास, तेव्हां क्षत्रधर्म मीं तुला सांगावयास नको. याप्रमाणें कर्णाच्या देखत या सातांना मारून त्यानें मोठ्यानें गर्जना केली. ती ऐकून युधिष्ठिराला त्याला जय आला असें खात्रीनें वाटून त्यानें नौबदी वगैरे वाजविण्यास सांगितलें. मोठ्या आनंदानें तो द्रोणांवर चालून गेला. आपले एकतीस भाऊ मेलेले पाहून विदुरांच्या हितोपदेशाची दुर्योधनाला आठवण झाली; व काय करावें हें त्याला सुचेना. व सभेमध्यें पांडवांचे हाल करून द्रौपदीच्या केलेल्या धिंडवड्याचें हें फळ होय. व भीमसेन तेरा वर्षेपर्यंत झांकून ठेवलेल्या आपल्या रागाची आग पाखडून कौरवांचा फडशा करीत आहे असें त्याला वाटलें.

भीम व कर्ण पाण्यानें ओथंबलेल्या ढगाप्रमाणें बाणांचा एकमेकांवर वर्षाव करीत होते. ते वेळीं समुद्र जसा खवळून जावा त्याप्रमाणें सैन्यामध्यें अगदीं खळबळ उडून राहिली होती. भीमाच्या बाणांच्या तडाक्यांत सांपडून पुष्कळ कौरववीरांचा फडशा पडला होता; बाकी उरलेल्यांनीं पळ काढला होता. त्या रणामध्यें शूरांना आनंद देणारा व भित्र्यांना गर्भगळित करणारा असा रक्ताचा पूर वाहूं लागला. व तो पूर घोडे, ध्वज, रथाचे तुकडे छिन्नभिन्न अवयव वगैरेंनीं भरून निघाला होता. या दोन वीरांचें अद्भुत अतर्क्य व अमानुष पराक्रम पाहून सिद्धचारणांना देखील आश्चर्य वाटलें.

नंतर कर्णानें भीमावर सारखा बाणांचा मारा सुरू केला. पण पावसाची कितीही जरी मुसळधार चालली तरी पर्वत ज्याप्रमाणें त्याला भीत नाहीं किंवा आपल्या जागेपासून तीळभरही मागें पुढें होत नाहीं त्याप्रमाणें भीमही कर्णाच्या बाणवर्षावाला मुळींच डगमगला नाहीं. एवढेंच नव्हे, पण त्या सर्व बाणांचा फडशा पाडून त्यानें त्याच्या कानावर एक तीक्ष्णसा बाण सोडला. त्यानें अचूक जाऊन कर्णाच्या एका कानांतील नक्षत्राप्रमाणें चकाकणारें असें कुंडल खालीं पाडलें. नंतर भीमानें पुनः कर्णाच्या कपाळावर नेमके सात आठ बाण सोडले. त्यामुळें तो मूर्छित होऊन क्षणभर आपल्या रथांत बसून राहिला. नंतर सावध होऊन कर्ण मोठ्या रागानें भीमावर चालून गेला. अशा रीतीनें युद्ध अगदीं निकरानें चाललें असतां मध्येंच भीमानें कर्णाचें धनुष्य तोडलें. नंतर कर्णानें एकामागून एक आठरा धनुष्यें हातीं घेतलीं; त्या सर्वांचा भीमानें फडशा पाडला. हें पाहून कर्णानें पुनः धनुष्य घेऊन दाही दिशांला बाणांचा मारा करून सर्व रणांगण आपल्या बाणांनीं झांकून टाकलें. त्याबरोबर भीमानें ते सर्व बाण आपल्या बाणांनीं तोडून टाकून कर्णाचे घोडे मारले आणि त्यालाही घायाळ के-

ला. शेवटीं भीमानें त्याच्यावर रथशक्ति सोडली. पण कर्णानें आपल्या तीक्ष्ण बाणांनीं तिचे शेंकडों तुकडे करून सोडले. तेव्हां भीम मारीन किंवा मरेन अशा ईर्षेनें हातांत ढालतलवार घेऊन कर्णावर धांवून आला. पण तो येत आहे इतक्यांत कर्णानें त्याच्या ढालीचे तुकडे तुकडे करून टाकले. हें पाहून भीमानें रागानें नुस्ती तलवारच त्याच्या अंगावर फेंकली. तिची त्यानें आपल्या धनुष्यावर पत केली त्यामुळें तो वांचला. पण धनुष्य मात्र तुटून गेलें. लगेच दुसरें धनुष्य घेऊन भीमावर बाणांचा मारा सुरू केला. भीम निःशस्त्र होता तरी तसाच नेटानें कर्णाच्या रथावर चालून आला. परंतु कर्ण डोळे झांकून पडलेला पाहून तो मध्येंच थबकला.

अशी ही भीमाची धर्मबुद्धि पाहून कौरवांनीं सुद्धां त्याची वाखाणणी केली. इतक्यांत कर्णानें आपल्या धनुष्याला बाण जोडून भीमावर नेम धरला हें पाहून भीमानें जवळच मरून पडलेल्या हत्तींच्या ढिगाऱ्यांतून एक हत्ती उचलून बाणांचा मारा चुकविण्याकरितां आपल्यापुढें केला. कर्णानें त्याच्या अगदीं चिंधड्या उडविल्या. भीमानें लागलीच ते हत्तीचे तुकडेच त्याच्या अंगावर जोरानें फेंकले; व रथाचीं मोडकीं चाकें, मेलेलीं घोडीं, जें जें काय हाताला सापडलें तें तेंच त्याच्या अंगावर फेंकण्याला सुरवात केली. कर्णानेंही भीमाकडून जें जें येईल त्या प्रत्येक वस्तूचा तुकडे करून टाकण्याचा सपाटा चालविला. अशा रीतीनें कांहीं वेळ दोघांची झटापट झाल्यावर भीम जोरानें मूठ वळून त्याला बुकी मारून ठार करण्याकरितां त्याच्या अंगावर धांवून गेला, पण इतक्यांत अर्जुनाच्या प्रतिज्ञेची आठवण झाल्यामुळें कर्ण अगदीं तडाक्यांतच सांपडला असतांही त्याला तसाच सोडून तो मागें परतला; व कर्णानें कुंतीला दिलेलें वचन आठवून भीम निःशस्त्र होता, तरी त्याला ठार केलें नाहीं. ह्या दोघाही वीर पुरुषांची ही धर्मबुद्धि पाहून देवादिकांनीं सुद्धां यांना शाबासकी दिली. अशा रीतीनें कांहीं वेळ युद्ध झाल्यावर कर्णाचे बाण थोडेसे मर्मीं लागल्यामुळें भीमानें रागावून कर्णाचे हातांतील धनुष्य एका हातानें दाबून मोडलें व दुसऱ्या हातानें कर्णाच्या टाळकीवर जरा जोरानें एक थप्पड दिली. त्यासरशी चिडून जाऊन कर्ण भीमाला ह्मणाला, ‘ हे षंढा, अधाशा, तूं माझ्यापुढें उगीच युद्धाला कशाकरितां उभा राहिला आहेस ? जेथें खाण्यापिण्याची चंगळ असेल तेथें तुझ्यासारख्यांनीं जावें ! युद्धांत कांहीं आपल्यासारख्यांचा उपयोग नाहीं! कंद, मूळ फळें खात मुनीच्या वेषानें रानोरान भटकत हिंडणें हेंच तुझ्यासारख्याला बरें आहे. युद्ध करणें ह्मणजे हाताखालच्या आचारी पाणक्यांना बडवित सुटणें नव्हे. ह्मणून हे कुंतीच्या पोरा, तुला मी पुनःपुनः सांगतों कीं, तूं हें युद्ध करणें सोडून देऊन कोठें तरी अरण्यांत निघून जा; नाहींतर कृष्णार्जुनांकडे जा, ह्मणजे ते तरी तुझें रक्षण करतील. तेंही होत नसेल तर आपला मुकाट्यानें घराकडे निघून जा. ’ हें ऐकून भीम ह्मणाला, ‘ हे दुष्टा, तुझी तर मीं बरेच वेळां रग जिरविली आहे. आतां उगीचकशाला बडबड करतोस ? चल कुलहीना माझ्याबरोबर कुस्ती खेळावयाला चल. ह्मणजे जसा त्या कीचकाला माररला तसा तुलाही येथल्या येथेंच ठार करतों. ’ हें भीमाचें भाषण ऐकून मात्र कर्ण थोडासा चपापल्यासारखा होऊन स्वस्थ उभा राहिला. इतक्यांत अर्जुनानें त्याच्यावर दोन चार तीक्ष्ण बाण सोडले. ते चांगले मर्मींच बसले. धनुष्य तर भीमानें पूर्वींच मोडून टाकलें होतें, व त्यांतच पुनः अर्जुनाचा मारा सुरू झाला. हें पाहून कर्णानें आपला मोर्चाच तेथून दुसरीकडे वळविला. कर्ण गेलासें पाहून इकडे भीमही सात्यकीच्या रथावर चढून अर्जुनाकडे जावयास निघाला.

---

## ४० अलंबुषाचा वध. (७—१४०-४१)

सात्यकि तर पूर्वीपासूनच कौरवसैन्याचा सारखा फडशा पाडीत होता. त्यांत आतां तर त्याला भीमाची मदत मिळाली. त्यामुळें तर कौरवसेनेचा आतां फारच संहार होऊं लागला. हें पाहून शूर व साहसी योद्धा अलंबुष हा कर्णाला थोपवून धरण्याकरितां पुढें सरसावला. तेव्हां ह्या दोघां रणशूरांचें युद्ध इतक्या अद्भुत रीतीनें झालें कीं, दोन्ही पक्षांकडील योद्धे आपलें संग्रामकार्य टाकून देऊन कांहीं वेळ यांचेंच युद्ध पहात स्व-

रथ उभे राहिले. अलंबुषानें प्रथमतः सात्यकीवर दहा बाण इतक्या जोरानें सोडले कीं, ते सात्यकीच्या अंगावरील जाड चिलखत फोडून आंत शिरले. हे बाण शिरले न शिरले इतक्यांत दुसरे आणखी चार बाण सोडून त्यानें सात्यकीचे चारी घोडे ठार केले. हें पाहून सात्यकीनेंही त्याचे घोडे मारले व सारथ्याचें डोकें उडविलें. सारथ्याचें डोकें खालीं पडतें न पडतें इतक्यांत सात्यकीच्या दुसऱ्या एका बाणानें स्वतः अलंबुषाच्याच नरडीचा घोंट घेतला.

अलंबुष पडल्यावरोबर सात्यकीनें आपला मोर्चा अर्जुनाच्या रथाकडे वळविला. पण दुःशासनादि कौरवांना तें सहन न होऊन त्यांनीं सात्यकीला मध्येंच अडवून धरिलें. सात्यकीनेंही त्यांचा चांगला समाचार घेतला. इकडे दुःशासन अडचणींत सांपडला आहे हें पाहून त्याला सोडविण्याकरितां त्रिगर्तांनीं सात्यकीवर लगट केली, पण ह्या एकट्याच बहादरानें इतक्या सर्वांचीही रग जिराविली. विस्तवाची कोलीत गरगर फिरविली ह्मणजे ज्याप्रमाणें विस्तवाचें एकच कडें दिसूं लागतें, त्याप्रमाणें हा सात्यकि त्या रणभूमीवर विजेसारखा इकडून तिकडे सारखा चमकत असल्यामुळें सर्व रणभूमीवर जिकडे तिकडे सात्यकीच्याच मूर्ति दिसूं लागल्या. अशा रीतीनें सात्यकीनें सर्व रणभूमीवर एकच गोंधळ उडवून दिला. इतक्यांत कलिंगाधिपति आपल्या सैन्यासह मोठ्या वेगानें सात्यकीवर चाल करून आला. पण त्याचीही पूर्वींच्याप्रमाणेंच वाताहत झाली. त्यामुळें सर्व कौरववीरांचें धावें दणाणून गेलें. सात्यकीला पाहून इकडे श्रीकृष्णार्जुनांचीं फुशारकीचीं व राजाधर्मासंबंधानें चिंतापर भाषणें चाललीं होतीं; इतक्यांत सात्यकि मोठ्या आनंदानें अर्जुनाकडे चालला असतां भूरिश्रवा येऊन सात्यकीवर तुटून पडला.

---

## ४१. भूरिश्रव्याचा वध. (७.१४२–४३)

अशा रीतीनें भूरिश्रवा व सात्यकि यांची समरांगणीं गांठ पडल्याबरोबर भूरिश्रवा सात्यकीला ह्मणूं लागला, 'आज तुझी माझ्याशीं गांठ पडली हें फार चांगलें झालें. तूं आतां ह्या समरभूमींतून पळून जाशील तरच जिवंत सुटशील. नाहींतर तुला कांहीं आतां जगण्याची आशा करावयाला नको. हे सात्यके, मी आज तुला, वीरशिरोमण्याला ठार करून राजा दुर्योधनाला संतुष्ट करीन. तुला मीं ठार केलें ह्मणजे कृष्णार्जुन निरुत्साह होऊन युद्धांतूनच पळून जातील; शिवाय तूं आजपर्यंत ज्यांना ज्यांना ह्मणून मारलें आहेस त्या सर्वांच्या बायकांनाही आनंद होईल. सिंहाच्या तडाक्यांत सांपडलेल्या क्षुद्र मृगाप्रमाणें तुलाही आतां माझ्या तडाक्यांतून जिवंत सुटण्याची आशा करावयाला नको.' हें ऐकून सात्यकि ह्मणाला, 'उगीच बडबड कशाला करतोस. तुला काय करावयाचें तें हातानें करून दाखीव. केवळ तुझ्या बडबडण्यावर मी भिऊन जाईन असें मात्र तूं समजूं नकोस. शरदृतूंतील मेघाच्या गडगडाटाप्रमाणें तुझें हें बाष्कळ बोलणें ऐकून मला हांसूं मात्र येतें. तूं जर माझ्या सामन्याची पुष्कळ दिवस वाट पहात होतास तर मग आतां उशीर कां ? होऊं देत दोन हात ! माझे बाहू स्फुरण पावूं लागले आहेत. तुझी गर्दन उडविल्याशिवाय कांहीं मी आतां येथून हालत नाहीं.'

अशा रीतीनें दोघांचीं भाषणें झाल्यावर एकदम युद्धाला सुरवात झाली. एकाच हत्तिणीच्या मागें लागलेले उन्मत्त हत्ती आपापसांत ज्याप्रमाणें निकरानें लढतात त्याप्रमाणें हेही दोघे वीर एकमेकांशीं फारच निकरानें लढूं लागले. प्रथमतः कांहीं वेळ ह्यानें त्याच्यावर बाण सोडावेत ते त्यानें तोडून टाकावेत; पुनः त्यानें सोडावेत ते ह्यानें तोडावेत, असा क्रम चालला होता. पण शेवटीं दोघांच्याही हातांतील धनुष्यें तुटलीं व दोघांचेही घोडे मारले गेले. त्यामुळें अर्थात् हातघाईशीं प्रसंग आला. तेव्हां दोघेही हातांत नागव्या तलवारी व ढाला घेऊन मोठ्या वेगानें एकमेकांवर तुटून पडले. व्यवस्थेशीर रीतीनें मागें पुढें पवित्रे चालणें, मध्येंच उडी मारून शत्रूवर वार करणें, अर्धवर्तुळाकृति मंडळें घेणें, शत्रूला फसविण्याकरितां एकदम बळसा घेऊन पुनः मागें फिरून एकाएकीं वार करणें व मध्येंच हुलकावणी दाखविणें वगैरे प्रकारच्या युद्धकलेमध्यें दोघेही सारखेच निपुण असल्यामुळें हें तलवारीचें युद्ध बराच वेळ चाललें होतें तरी त्याचा कांहींच निकाल ला-

गेना. जेव्हां दोघांच्याही ढाली तुटल्या तेव्हां मात्र ही तलवारीची खणाखणी बंद झाली. पण लगेच दोघांची कुस्ती जुंपली. दोघांचीही छाती रुंद असून चांगली भरलेली होती. दंड पिळदार होते, मांड्या तयार होत्या; शिवाय दोघांनाही कुस्तींतील पेंच चांगले माहीत होते. दस्ती ओढणें, कसोटा देणें, टकरा देणें, पट काढणें, ढुंगणी देणें, उखाड देऊन खालीं पाडणें व कंबरखोडा घालणें वगैरे कुस्तींतले सर्व प्रकार चालले होते. पण दोघांनाही त्या त्या पेंचाच्या तोडी चांगल्या माहीत होत्या त्यामुळें कांहीं वेळ कोणाचेंच कांहीं चालेना. पण सात्यकि आधींच दमलेला होता, व त्यांतच हे भूरिश्रव्यासारख्या ताज्यादमाच्या रणशूर योद्ध्या बरोबर बराच वेळ चाललेलें युद्ध, त्यामुळें तर तो अगदींच टेंकीस आला. अशा स्थितींत भूरिश्रव्यानें उखड देऊन सात्यकीला खालीं आपटला. व लांबडा करून स्वारी घातली. सात्यकीनें ती स्वारी सोडविली. पण लगेच भूरिश्रव्यानें पुनः त्याला खालीं पाडून त्याच्या छातीवर पाय दिला व एका हातानें त्याची शेंडी धरून गर्दन उडविण्याकरितां ह्मणून तलवार उगारली, त्यासरशीं सात्यकीनें त्याला वार करतां येऊं नये ह्मणून कुंभाराच्या चाकाप्रमाणें आपलें शरीर गरगर फिरवण्याला आरंभ केला. अशी सात्यकीची त्रेधा उडालेली पाहून श्रीकृष्ण अर्जुनाला ह्मणाला, 'हे महाबाहो ' तुझ्यादेखत तुझ्या शिष्याची भूरिश्रव्यानें अशी त्रेधा उडवावी हें तुझ्या पराक्रमाला शोभत नाहीं. ' हें ऐकून अर्जुनाला मनामध्यें तर भूरिश्रव्याच्या पराक्रमाबद्दल फार आनंद झाला होता. परंतु तो श्रीकृष्णाला ह्मणाला, ' केशवा, माझें सारें लक्ष जयद्रथाकडे गुंतल्यामुळें हें मला दिसलें नाहीं. आतां पहा मी माझ्या शिष्याकरितां काय करतों तें ! असें ह्मणून त्यानें झटदिशीं एक रुंद पात्याचा बाण सोडला. ज्याप्रमाणें आकाशांतून वीज पडावी त्याप्रमाणें हा बाण चकृकन् भूरिश्रव्याच्या काखेंतून पार झाला. त्यासरशीं त्याचा हात वरील बाहुभूषणें व तलवार यांच्यासह एकदम तुटून खालीं पडला.

अशा रीतीनें सात्यकीला ठार करण्याबद्दलचा आपला सर्व बेत अर्जुनानें निरर्थक केला हें पाहून भूरिश्रव्यानें सात्यकीला तसाच सोडून देऊन अर्जुनाची पुष्कळ निंदा केली. तो ह्मणाला, ' माझें सर्व लक्ष सात्यकीकडे गुंतलें असतांना एकाएकीं तूं माझा हात तोडलास हें फार वाईट केलेंस. तूं भूरिश्रव्याला कसा मारलास असें जर धर्मराजानें विचारलें तर तूं त्याला काय सांगशील ? ही असली कपटविद्या तुला कोणीं शिकविली ? इंद्रानें, कां द्रोणानें, कां प्रत्यक्ष महादेवांनींच ? तूं तर सगळ्यांपेक्षां चांगला धर्मज्ञ आहेस. असें असून असलें नीच कर्म तुझ्या हातून कसें झालें ? उन्मत्त झालेला, भ्यालेला, विरथ झालेला, दीन होऊन शरण आलेला, व संकटांत सांपडलेला अशांवर शस्त्रप्रहार करणें हें योग्य नाहीं. असें शास्त्रमत आहे. सज्जनांच्या हातून पापकर्म कधींही होत नाहीं. पण मनुष्य ज्यांच्या ज्यांच्या सहवासाला असतो त्यांच्या त्यांच्याप्रमाणें त्याचीही वृत्ति बदलते. त्याचप्रमाणें तुझीही बदललीच आहे यांत संशय नाहीं. कारण त्याशिवाय कुरुवंशासारख्या राजकुलांत उत्पन्न झालेल्या पुरुषाच्या हातून क्षात्रधर्माचें उल्लंघन होणें शक्य नाहीं. दुसऱ्याबरोबर लढणाऱ्या शत्रूवर एकाएकीं बाण सोडणें हें कृष्णाच्या स्नेह्यावांचून दुसऱ्या कोणाच्यानें व्हावयाचेंच नाहीं ! स्वभावतःच निंद्य कर्म करणारे अशा वृष्णिकुलोत्पन्न लोकांचें बोलणें तूं काय ह्मणून ऐकतोस ? ' हें भूरिश्रव्याचें बोलणें ऐकून अर्जुन रागानें ह्मणाला, ' मनुष्य ह्मातारा झाला ह्मणजे त्याच्याबरोबर त्याची बुद्धिही ह्मातारी होते. अरे, श्रीकृष्ण ह्मणजे कोण व मी पांडव कसा आहें हें तुला माहीत असूनही उगीच कां निंदा करतोस. क्षत्रिय समरांगणावर युद्धाला येतात तेव्हां एकटेच येत नाहींत; आपले बाप, भाऊ, मित्र, व आप्त या सर्वांना मदतीला घेऊन येतात. मग माझा प्रत्यक्ष शिष्य व सुखसंबंधी असा हा सात्यकि माझ्याकरतां प्राणावर उदार होऊन लढत असतांना त्याला मीं मरूं द्यावा हें बरें होईल का ? स्वतः प्राणावर बेतली असली तरी तें एकीकडे ठेवावें, पण आपल्याकरतां जो लढत असेल त्याचें आधीं रक्षण करावें; अशी राजनीतिच आहे. मग मीं आपल्या सात्यकीचें रक्षण केलें ह्यांत काय वावगें झालें ? शिवाय कोट्यावधी हत्ती, रथ, घोडे व पायदळ हें मागें पुढें उभें असून सारखा शस्त्रप्रहार

करीत असतांना मी एकट्या सात्यकीशींच युद्ध करीन असें ह्मणून कसें चालेल ? स्वतः सात्यकी आतांपर्यंतच्या युद्धानें अगदीं दमलेला, त्याच्या अंगावर चहूंकडे वार लागलेले, शिवाय त्याचा सारथि व घोडेही दमलेलेच, अशा अडचणीच्या स्थितींत त्याला गांठून आपण विजयी व्हावें असें तुझ्या मनांत होतें, पण तें तुला साधून कोण देणार ? तूं आधीं स्वतःलाच दोष दे. कारण तुझें स्वतःचें संरक्षण सुद्धां तुझ्यानें करवलें नाहीं. मग तूं दुसऱ्याचें काय करणार ? '

हें अर्जुनाचें भाषण ऐकून भूरिश्रव्यानें शरासन आंथरलें; व त्याच्यावर मांडी घालून प्रायोपवेशनाच्या निश्चयानें सूर्याकडे दृष्टि लावून प्राणायाम करण्याला आरंभ केला. हें पाहून सर्वजण त्याची स्तुति व कृष्णार्जुनाची निंदा करूं लागले. आपली हे विनाकारण निंदा करतात हें अर्जुनाला मात्र सहन झालें नाहीं. तो ह्मणाला, 'जो कोणी मत्पक्षीय माझ्या बाणाच्या टप्यांत असेल त्याला कोणाच्यानेंही मारणें होणार नाहीं हें तुह्मां सर्वांना माहीत आहेच. हातांत शस्त्र घेऊन तूं सात्यकीला मारूं लागलास तेव्हां मीं तुझा हात तोडला ह्यांत अधर्म तो काय केला ? अरे, ज्याच्या हातांत शस्त्र नाहीं, अंगांत चिलखत नाहीं, बसावयाला रथ नाहीं, शिवाय अगदीं एकाकी अशा लहान अर्भकाचा, माझ्या अभिमन्यूचा तुह्मीं सर्वांनीं मिळून वध केलात हा मात्र धर्म झाला नाहींरे ? ' हें अर्जुनाचें बोलणें ऐकून भूरिश्रव्यानें जमिनीवर डोकें टेकून त्याच्या बोलण्याला मान दिला व आपला तुटका हात त्याच्याकडे फेंकून देऊन आपण अगदीं मूकवृत्ति धारण केली. ' हें पाहून अर्जुन ह्मणाला, ' हे महाबाहो, धर्म भीम, नकुल, सहदेव ह्यांच्यावर ज्याप्रमाणें माझी प्रीति आहे त्याप्रमाणेंच तुझ्यावरही आहे. हे शूरा, आतां तूं आनंदानें स्वर्गाला जा. ' वासुदेव ह्मणाला, ' ब्रह्मादिकांनाही अत्यंत दुर्मिळ अशा माझ्या वैकुंठलोकीं तूं जा. '

अशा रीतीनें कृष्णार्जुन त्याला आशीर्वाद देत आहेत इतक्यांत सात्यकीनें कृष्णार्जुनादि सर्वजण नको नको ह्मणत असतांही भूरिश्रव्याचें डोकें उडविलें, त्याबरोबर सर्व सैनिक सात्यकीची निंदा करूं लागले. पण देवादिकांनीं येऊन सांगितलें कीं, 'तुह्मी उगीच रागावूं नका. त्यांत सात्यकीचा कांहीं दोष नाहीं. शूरानें समरांगणीं आलेल्या मनुष्याला मारलेंच पाहिजे. त्या वेळीं कोणत्याही तऱ्हेचा विचार करतां उपयोगी नाहीं. शिवाय विधात्यानें पूर्वींच सात्यकीच्या हातून याचा मृत्यु होईल असें ठरविलें होतें. ' ह्यावर पुनः सात्यकि ह्मणाला, ' जगामध्यें आपली धार्मिकबुद्धि प्रगट करण्याकरितां ह्मणून मारूं नको, मारूं नको असें जें तुह्मी ह्मणतां त्या तुमची धार्मिकबुद्धि अभिमन्यूच्या वेळीं कोठें गेली होती ? शिवाय मीं पूर्वींच एकदां प्रतिज्ञा केली होती कीं, मी जिवंत असतांना जो कोणी मला लाथ मारील तो मुनि असला तरी त्याला मी ठार करीन. **शिवाय वाल्मिकींनींही एके ठिकाणीं सांगितलें आहे कीं, मनुष्यानें आपल्या शत्रूला नेहमीं त्रास देत असलें पाहिजे.** ' हें सात्यकीचें भाषण ऐकून सर्वजण स्वस्थ बसले; परंतु मुनिवृत्तींत असलेल्या भूरिश्रव्याचा सात्यकीनें वध केला हें कांहीं कोणाला पसंत पडलें नाहीं !

पूर्वीं देवकीचा स्वयंवर समारंभ चालला असतां शिनी राजानें त्या समारंभाकरितां जमलेल्या सर्व राजांना जिंकून वसुदेवाला अर्पण करण्याकरितां ह्मणून देवकीला आपल्या रथांत बसविली. हें सोमदत्ताला सहन न होऊन त्यानें शिनी राजाशीं युद्ध मांडलें. त्यांत शिनी राजानें सोमदत्ताला खालीं पाडून त्याच्या छातीवर पाय देऊन, हातांत शेंडी धरली. पण पुनः त्याला तसाच जिवंत सोडून दिला. हा अपमान सहन न होऊन सोमदत्तानें याचा सूड घेण्याकरितां महादेवाची तपश्चर्या अत्यंत उग्रपणें करण्याला सुरवात केली. पुढें ह्या उग्र तपश्चर्येनें संतुष्ट होऊन महादेवांनीं वर दिला कीं, शिनीच्या मुलाला छातीवर पाय देऊन जेर करील इतका शूर मुलगा तुझ्या पोटीं जन्मास येईल. ' हें ऐकून सोमदत्ताला फार आनंद झाला. पुढें कांहीं काल गेल्यावर महादेवाच्या वराप्रमाणें भूरिश्रवा त्याच्या पोटीं आला. व त्यानें वराप्रमाणें सात्यकीच्या छातिवर पाय दिला. नाहीं तर वृष्णिकुलांतल्या शूर पुरुषांना जिंकणें देवादिकांना सुद्धां शक्य नाहीं.

———

## ४२ जयद्रथाचा वध. ( ७. १४५–१५२ )

अशा रीतीनें भूरिश्रव्याचा वध झाल्यावर अर्जुन श्रीकृष्णाला ह्मणाला, ‘ कृष्णा, घोडे जलद हांक. जयद्रथ जोंपर्यंत भिऊन आपल्या देशाकडे पळून गेला नाहीं तोंपर्यंतच मला त्याचेकडे जाऊं दे. देवा, माझी प्रतिज्ञा लौकर सफल कर. कारण हा पहा सूर्य अस्ताचलाच्या जवळ जवळ जात चालला आहे. ’ हें ऐकून कृष्णानें जोरानें रथ हांकला. तेव्हां अर्जुन जयद्रथाला मारण्याकरितां झपाट्यानें पुढें चालला हें पाहून दुर्योधन, कर्ण, वृषसेन, शल्य अश्वत्थामा व कृपाचार्य वगैरे वडे वडे वीर त्याला अडवून धरण्याकरितां मोठ्या नेटानें पुढें सरसावले. इतक्यांत दुर्योधन कर्णाला ह्मणाला, ‘ कर्णा आतां तुझ्या पराक्रमाची वेळ आली आहे. जेणेंकरून अर्जुनाच्या हातून जयद्रथ मरणार नाहीं असें कर. दिवस अगदीं थोडा उरला आहे. संध्याकाळपर्यंत नेट धरलास ह्मणजे खात्रीनें आमचाच जय होईल. कारण सूर्यास्तापर्यंत जयद्रथाचें रक्षण झालें ह्मणजे अर्जुन आपली प्रतिज्ञा सिद्धीस गेली नाहीं ह्मणून अग्निकाष्ठें भक्षण करील. ह्या पांचांपैकीं एकदां अर्जुन नाहींसा झाला ह्मणजे बाकीचे चौघे कांहीं फार वेळ जगत नाहींत. आणि सर्व पांडव नाहींसे झाले ह्मणजे सर्व पृथ्वी आपलीच आहे. ह्या अर्जुनानें मागचा पुढचा विचार न पहातां उगीचच एवढी घोर प्रतिज्ञा केली. मला वाटतें ह्यानें असली घोर प्रतिज्ञा केवळ आपल्या नाशाकरितांच केली आहे. कर्णा तूं, महापराक्रमी शल्य, रणशूर अश्वत्थामा, बलशाली दुःशासन, व प्रतापी कृपाचार्य यांचेसारखे मोठमोठे वीर जयद्रथाचें रक्षण करीत असतांना अर्जुन त्याला संध्याकाळच्या आंत मारील असें कसें होईल ? ह्मणून हे कर्णा, अश्वत्थामा, शल्य इत्यादि शूरांना बरोबर घेऊन थोडासा नेटानें युद्ध कर. ’ हें ऐकून कर्ण ह्मणाला, ‘ राजा, भीमाबरोबर झालेल्या संग्रामांत मी पुष्कळ जखमी झालों आहें, त्यामुळें मला उभा राहण्याची सुद्धां शक्ति नाहीं. परंतु युद्ध केल्याशिवाय सुटकाच नाहीं ह्मणून कसा तरी उभा आहे. माझे हातपाय अगदींच गळून गेले आहेत. तथापि जयद्रथ अर्जुनाच्या हातांत सांपडूं नये व हे राजा, तुला जय मिळावा एवढ्याकरितां मी माझ्यानें होईल तेवढी खटपट करतों. मग जय मिळणें हें दैवाधीन आहे. ’

कर्ण व दुर्योधन यांचें अशा रीतीनें भाषण चाललें आहे इतक्यांत अर्जुन येऊन त्यांच्याशीं भिडलाच. तेव्हां त्याला अडविण्याकरितां पुष्कळ लोक पुढें सरसावले. परंतु अर्जुनाच्या माऱ्यापुढें त्यांचा मुळींच टिकाव लागेना. अर्जुन पुढें येईल त्या सर्वांची कत्तल करीत करीत अगदीं जयद्रथाच्या जवळ जवळ जाऊं लागला. तें पाहून बरेच लोक अगदीं निराश होऊन रणांतून पळून जाऊं लागले. इतक्यांत अर्जुनानें कर्ण, शल्य, कृपाचार्य, व अश्वत्थामा वगैरे महान महान वीरांचा समाचार घेऊन प्रत्यक्ष जयद्रथावर साठ बाण सोडून त्यालाही बराच घायाळ केला. जयद्रथानें अर्जुनानें पुढें येऊं नये ह्मणून कृष्णार्जुनांवर बरेच बाण सोडले. परंतु अर्जुनानें त्या सर्वांचा मधल्यामध्येंच फडशा पाडला. व त्याचा सारथीही ठार केला. पण सूर्य अगदीं अस्ताचलाजवळ जात चालला असें पाहून श्रीकृष्ण अर्जुनाला ह्मणाला, ‘ ह्या कर्णादि सहा महावीरांच्यामध्यें तुझा शत्रु जयद्रथ आपल्या जिवाच्या भीतीनें लपून बसला आहे. तेव्हां यांना जिंकल्याशिवाय त्याला मारतां यावयाचें नाहीं. याकरितां मी आतां आपल्या योगमायेनें सूर्याला झांकून टाकतों. तेणेंकरून जयद्रथाला सूर्यास्त झाला असें वाटेल. मग अर्थात् तो दुष्ट अत्यानंदानें तुझा मरणसमारंभ पहाण्याकरितां आपल्या आश्रयस्थानाच्या बाहेर येईल. मग तूं अगदीं हयगय न करतां व सूर्यास्त झाला आतां कसा मारूं याबद्दलची शंका मनांत न आणतां, त्याला ‘मार’ असें ह्मणून श्रीकृष्णानें लगेच योगमाया उत्पन्न करून सूर्याला झांकून सोडला. त्याबरोबर सर्व कौरवसैन्याला अतिशय हर्ष झाला, व जयद्रथासुद्धां सर्वजण मोठ्या आनंदानें पश्चिम दिशेकडे व अर्जुनाकडे पाहूं लागले. हें पाहून पुनः श्रीकृष्ण अर्जुनाला ह्मणाला, ‘ अर्जुना, हा पहा जयद्रथ तुझी भीति सोडून सूर्याकडे कसा निर्भयपणें पहात आहे तो. ह्याला मारण्याचा योग्य काल हाच आहे. तर हे महाबाहो, आतां ह्याचें डोकें तोडून तूं आपल्या प्रतिज्ञेचें साफल्य कर. ’ असें श्रीकृष्णानें सांगितल्याबरोबर अर्जुनानें कृपाचार्य, कर्ण,

शल्य, दुर्योधन, वृषसेन व जयद्रथाचें संरक्षण करण्याकरितां उभे असलेले वीर या सर्वांवर सारखा बाणांचा मारा करीत करीत जयद्रथाशीं लगट केली. अर्जुनाच्या बाणांचा वणवा चहूंकडून पेटलेला पाहून व अर्जुन अगदीं जवळ आलेला पाहून सर्व कौरववीरांचें धाबें दणाणलें. त्यांनीं अर्जुनाला पुढें न येऊं देण्यावद्दल आपल्या हातून होईल तेवढा प्रयत्न केला. परंतु त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. उलट अर्जुनाचा मारा जास्तच दुःसह होऊं लागला. त्या वेळीं त्या समरांगणावर ज्याला अर्जुनाचा बाण लागला नाहीं असा एकही कौरववीर नव्हता. हत्ती, घोडे, पायदळ, व रथदळ यांपैकीं प्रत्येक योद्धा अर्जुनाच्या बाणानें घायाळ झाला होता. घायाळ झाल्यामुळें डोळयांला चक्कर आली होती, युद्धाच्या गर्दीमुळें चहूंकडे धूळ उडाली होती, व त्यांत आणखी सूर्यास्त झालेला त्यामुळें योद्ध्यांना आपला व परका हेंच मुळीं ओळखेना. अर्जुनाचा भयंकर मारा अगदीं दुःसह झाल्यानें कांहीं वीर युद्ध सोडून पळून जाऊं लागले. परंतु वर सांगितल्या कारणांनीं दृष्टीला अंधत्व आल्यामुळें, व भीतीनें पाय लटपटल्यामुळें ते तेथल्या तेथेंच अडखळून पडूं लागले. पुढें कांहीं वेळानें ह्या भयंकर कत्तलीनें त्या रणभूमींतून रक्ताचा पाट वाहूं लागला. तेव्हां युद्धाच्या गर्दीमुळें उठलेली धूळ मात्र दबली गेली. मांसाचा चिखल तर इतका भयंकर झाला होता कीं, त्यामध्यें मधल्या कण्यापर्यंत रथाचीं चाकें बुडत होतीं. कौरवांचे हत्ती अर्जुनाच्या माऱ्यानें चीं चीं करीत त्यांच्याच सैन्यांतून सैरावैरा पळूं लागले. त्यामुळें त्यांच्या पायाखालीं चिरडूनच कौरवांकडील पुष्कळ योद्धे ठार झाले. त्याचप्रमाणें घोडेही वरचा स्वार पडल्यामुळें मोकळे होऊन पुढें येई त्याजवर दुगाण्या झाडीत इकडून तिकडे धांवूं लागले. अशा रीतीनें एकाकडून आपल्याच सैन्यांतील हत्तीघोड्यांचा त्रास व दुसरीकडून अर्जुनाचा असह्य मारा अशा दुहेरी माऱ्यानें कौरवसैन्याची फारच त्रेधा उडून गेली. अर्जुनाचा हात इतका जलद चालला होता कीं, तो एकसारखे बाणच सोडतो आहे असें दिसत होतें. ह्मणजे तो आपल्या भात्यांतून बाण केव्हां काढी व तो जोडी केव्हां हें मुळींच ओळखून येत नसे. याप्रमाणें सर्व सैनिकांची त्रेधा उडवून अर्जुनानें कर्ण व वृषसेन यांचें धनुष्य तोडलें, शल्याचा सारथी मारला, आणि कृपाचार्य व अश्वत्थामा ह्या दोघां मामेभाचांचाही बराच समाचार घेतला. नंतर त्यानें जयद्रथाकरितां अग्नीसारखा तेजस्वी व वज्रासारखा बळकट असा एक बाण आपल्या भात्यांतून काढला व तो आपल्या गांडीवाला जोडून त्यावर वज्रास्त्राचें अभिमंत्रण केलें. त्याबरोबर अंतरिक्षामध्यें देवादिकांची एकच गडबड उडून राहिली. इतक्यांत श्रीकृष्ण अर्जुनाला ह्मणाला, ‘ धनंजया, ह्या दुरात्म्या सैंधवाचें डोकें लौकर उडीव. कारण हा सूर्य अस्ताचलाला चालला. शिवाय जयद्रथाच्या वधासंबंधानें मी तुला आणखी एक गोष्ट सांगतों ती ऐक. जयद्रथाचा बाप जो वृद्धक्षत्र त्याला बरेच दिवस पुत्रसंतति नव्हती. पुढें अगदीं ह्मातारपणीं त्याला हा मुलगा झाला. हा जन्मास आला त्यावेळीं आकाशवाणी झाली कीं, हा तुझा मुलगा अत्यंत शूर होईल. सर्व क्षत्रियवीर ह्याला बहुमान देतील. परंतु ह्याचा शत्रु ह्याचा शिरच्छेद करील. हें ऐकून वृद्धक्षत्रानें रागानें सर्व राजे लोकांचे देखत असा शाप दिला कीं, माझ्या मुलाचें डोकें उडवून जो कोणी जमिनीवर पाडील त्याचेंच डोकें हजारों तुकडे होऊन जमिनीवर आदळेल. ’ अशा रीतीनें शाप देऊन योग्य कालीं आपल्या मुलाला गादीवर बसवून तो आपण स्वतः तपश्चर्येकरितां निघून गेला. तो हल्लीं ह्या समंतपंचकाच्या बाहेरच तपश्चर्या करीत बसला आहे. ह्मणून हे महाबाहो अर्जुना, ह्या जयद्रथाचें डोकें उडवून त्याच्या बापाच्या मांडीवर पाड. आणि जर कां तूं ह्याचें डोकें जमिनीवर पाडशील तर तुझ्याच डोक्याचे हजारों तुकडे होतील. हल्लीं तो राजा तपश्चर्येंत मग्न आहे. ह्मणून जेणेंकरून त्याला न कळत त्याच्या मुलाचें डोकें त्याच्या मांडीवर पडेल असें कर. हें इंद्रात्मजा अर्जुना, तुला अशक्य असें कांहींच नाहीं. ह्मणून दिव्यास्त्राचें अभिमंत्रण करून हें कार्य शेवटास ने. ’ हें ऐकून बरें आहे ह्मणून रागानें दांत ओंठ चावीत अर्जुनानें आकर्ण धनू ओढलें व तो पूर्वींच अभिमंत्रित केलेला तेजस्वी बाण जोरानें सोडला. हा बाण अर्जु-

नाच्या गांडीवापासून सुटला तो जयद्रथाचा शिरच्छेद करून आकाशांत उडून गेला. इतक्यांत अर्जुनानें आपल्या अस्त्रप्रभावानें शरमंडल तयार केलें. त्या शरमंडलानें जयद्रथाचें डोकें वाहून नेऊन त्याचा बाप सायंसंध्या करीत बसला होता त्याच्या मांडीवर त्याला न कळत ठेवलें. पुढें राजा वृद्धक्षत्र आपला जप संपवून उपस्थान करण्याकरितां उभा राहिला तोंच तें डोकें त्याच्या मांडीवरून जमिनीवर पडलें. त्या सरशीं त्या राजाचें डोकें शतधा चूर्ण झालें.

तिकडे असा प्रकार होतो आहे इतक्यांत इकडे श्रीकृष्णानें आपली माया काढून घेतली. त्यामुळें पुनः सूर्यप्रकाश पडूं लागला. तेव्हां सर्व कौरवांना समजलें कीं श्रीकृष्णानें आपल्या योगमायेनें हा अंधार पाडला होता. खरोखर कांहीं सूर्यास्त झाला नव्हता.

अशा रीतीनें जयद्रथाला ठार केल्यानंतर पांडवांकडील कृष्णार्जुनादि योद्धे आनंदानें आपापला शंख वाजवूं लागले. हा नाद राजा धर्माच्या कानावर पडल्यावरोबर त्याला वाटलें कीं, आपला खात्रीनें जय झाला. त्यामुळें त्याच्याकडील लोकही आनंदानें सिंहगर्जना करूं लागले. सर्व कौरववीर पहात असतां अर्जुनानें जयद्रथाचें डोकें उडविलें हें कृपाचार्य व अश्वत्थामा यांना सहन झालें नाहीं. त्यामुळें त्या दोघांनीं एकदम अर्जुनावर लगट केली. यांच्याकडचे बाण खूप जोरानें येत, पण अर्जुन त्या सर्वांचाही फडशा पाडी. आणि अर्जुन जे बाण सोडी ते मात्र फारच हळू सोडी. कारण त्याच्या मनांत गुरु कृपाचार्य व आचार्यपुत्र अश्वत्थामा यांनीं आपल्या हातून मरावें असें नव्हतें. अशा रीतीनें अर्जुन जरी भिऊन भिऊन बाण सोडीत होता तरी त्यांतला एक बाण कृपाचार्यांच्या बराच मर्मी बसला. त्यासरशीं ते मूर्च्छा येऊन मटदिशीं खालीं बसले. कृपाचार्यांची अशी स्थिति झालेली पाहून त्यांच्या सारथ्याला आपले यजमान ठार झालेसेंच वाटलें. त्यामुळें त्यानें झटदिशीं रथ फिरवून त्यांना रणांगणांतून बाजूला काढलें. कृपाचार्य गेलेसें पाहून आश्वत्थाम्यानेंही आपला रोंख फिरवला.

कृपाचार्यांना आपल्या बाणानें मूर्च्छा आली हें पाहून अर्जुनाला फार वाईट वाटलें; अगदीं म्लान वदन करून व डोळ्यांला पाणी आणून तो श्रीकृष्णाला ह्मणाला, 'कृष्णा, ज्ञानी विदुरानें पूर्वींच ह्मणजे ज्या वेळीं हा दुर्योधन जन्माला आला त्याच वेळीं राजा धृतराष्ट्रला सांगितलें कीं, हा कुलघातकी होईल, ह्याच्यापासून सर्वांना पीडा होईल. सबब आतांच ह्याला परलोकीं पाठवावा. केशवा, आज त्या ज्ञानी पुरुषाचें बोलणें प्रत्ययास येत आहे. हें पहा, कृपाचार्यांना आज त्याच्याच करतां मूर्छित होऊन पडावें लागलें आहे. धिक्कार असो ह्या क्षात्र धर्माला आणि ह्या पौरुषाला. द्रोणाचार्यांचा स्नेही, ब्राह्मण आणि माझा गुरु अशा कृपाचार्यांचा द्रोह करणारा माझ्यासारखा अधम पातकी दुसरा कोणी तरी असेल काय? गुरूपासून विद्या घेऊन त्याबद्दल त्यांची एक निष्ठपणें सेवा करून व शेवटीं गुरुदक्षिणा देऊन जे त्यांना संतुष्ट करितात ते स्वर्गामी होतात. परंतु जे कोणी माझ्यासारखे नीच पुरुष गुरूपासून विद्या घेऊन उलट त्यालाच मारतात त्यांना नरकाशिवाय अन्य गतीच नाहीं. कृष्णा, मी आतां ह्या आपल्या दुष्कृतीनें नरकाचा अधिकारी झालों.'

याप्रमाणें अर्जुन श्रीकृष्णापुढें विलाप करीत आहे इतक्यांत कर्ण अर्जुनावर धांवून आला. तें पाहून सात्यकि व पांचाल हे त्याला आडवे गेले. तेव्हां सात्यकि व कर्ण यांचें युद्ध जुंपलें. ह्या वेळीं सात्यकि कृष्णाच्या दिव्य रथांत बसला होता. व दारुक त्याचें सारथ्य करीत होता. शिवाय युधामन्यु व उत्तमौजा असे दोघेजण त्याचे चक्ररक्षक होते. कर्ण व सात्यकि ह्यांचें हें युद्ध इतकें भयंकर रीतीनें चाललें होतें कीं तो युद्धचमत्कार पाहण्याकरितां दोन्हीकडचीं दळें आपापलें युद्धकार्य सोडून तटस्थ उभीं राहिलीं होतीं. जयद्रथाचा व भूरिश्रव्याचा वध झाल्यामुळें कर्णाला अतिशय चीड आली होती. त्यामुळें तो सापाप्रमाणें फुस्कारे टाकीत वरचेवर सात्यकीवर मोठ्या वेगानें धांवून येई. परंतु सात्यकि त्याला आपल्या बाणांच्या माऱ्यानें तसाच थोपवून धरी. अशा रीतीनें बराच वेळ झटपट चालली होती. पण शेवटीं सात्यकीनें कर्णावर इतक्या जोरानें बाणांचा मारा केला कीं, त्यामुळें त्याचें सर्व अंग रक्तबंबाळ झालें. ध्वज मोडला, सारथी ठार झाला, घोडे मारले गेले व रथाचेही तुकडे तुकडे

झाले. व ही दुर्दशा दुर्योधन, शल्य, अश्वत्थामा यांच्या देखत झाली. त्यामुळें त्यांना फार राग आला. त्यामुळें ते सर्वजण एकदम सात्यकीवर तुटून पडले. परंतु एकट्या सात्यकीनें त्या सर्वांचा समाचार घेतला. कर्ण तर अगदीं त्याच्या कचाट्यांत सांपडला होता, पण अर्जुनाची प्रतिज्ञा सफल करण्याकरितां त्यानें कर्णाचा वध केला नाहीं.

इतक्यांत भीमानें येऊन अर्जुनाला सांगितलें कीं, माझा जेव्हां रथ मोडला तेव्हां ह्या कर्णानें मला पुष्कळ अपशब्दांचा मारा केला त्याचवेळीं मीं ह्याला सांगितलें आहे कीं, मला असें जो कोणी ह्मणेल त्याला स्वर्गलोकाची वाट धरावी लागेल. तर हे अर्जुना तूं माझें बोलणें लक्षांत ठेवून जेणेंकरून तें सत्य होईल असें कर.'

हें भीमाचें बोलणें ऐकून अर्जुन कर्णाला ह्मणाला, 'जो योद्धा युद्धाला उभा राहिला त्याला जय किंवा अपजय ह्या दोहोंतून कांहीं तरी एक खात्रीनें येणार. इंद्राचा सुद्धां पुष्कळ वेळां पराजय झाला आहे. मग आह्मां मनुष्यांची काय कथा! सात्यकीनें तर आतां तुला ठारच केला असता, परंतु माझी प्रतिज्ञा सफल व्हावी ह्मणून त्यानें तुला जिवदान दिलें आहे. असें असून तुझ्या बाणानें उगीच कोठें भीमाचा रथ मोडला तर तूं त्याला बरेंच अपशब्द बोललास. शूर पुरुष शत्रूला जिंकल्यानंतर त्याची निंदा करीत नाहींत किंवा कोणच्याही तऱ्हेनें त्याला दुखवीत नाहींत. भीमानें तुला पुष्कळवेळां विरथी केलें. परंतु तो तुला कांहींच बोलला नाहीं. असें असून, हे सूतपुत्रा तूं मात्र त्याला अबद्ध बोललास. तर आतां ह्याचें व माझ्या मागें माझा बाळ अभिमन्यु मारलास त्याचें फळ भोग. मी तुझ्या देखत तुझा मुलगा वृषसेन याला मारीन. नंतर तुला मारीन. जे कोणी क्षत्रिय ह्या माझ्या प्रतिज्ञेला आड येतील त्या सर्वांनाही यमसदनीं पाठवीन.' अर्जुनाची ही भयंकर प्रतिज्ञा ऐकून कौरवसैन्यांत एकच गोंधळ उडून राहिला. इतक्यांत सूर्य अस्ताला गेल्यामुळें कृष्णानें आपला रथ वळविला. व अर्जुनाची प्रतिज्ञा शेवटास गेली ह्मणून आनंदानें त्याला कडकडून भेटला. नंतर पुनः श्रीकृष्ण त्याला ह्मणाला, 'हे अर्जुना, तूं एकदां आपली भयंकर प्रतिज्ञा शेवटास नेलीस. राजा वृद्धक्षत्र हा आपल्या मुलासह तुझ्या हातून ठार झाला. कौरवांच्या ह्या अगाध सेनासमुद्रांतून पार होण्याला देवांनासुद्धां अशक्य होतें. पण अशा त्या अफाट कौरवसेनेचा त्वां एकट्यानेंच फडशा पाडला. आतां ह्याचप्रमाणें कर्ण व त्याचा मुलगा वृषसेन ह्यांनाही ठार करून विजयी हो ह्मणजे झालें.' हें ऐकून अर्जुन श्रीकृष्णाला ह्मणाला, 'केशवा, तूं ज्यांचा साह्यकर्ता आहेस त्यांच्या प्रतिज्ञा शेवटास गेल्या ह्यांत कांहीं आश्चर्य नाहीं. प्रभो हा जो विजय मिळाला हा तुझाच प्रभाव आहे. व आतां तुझ्याच कृपेनें युधिष्ठिराला संपूर्ण पृथ्वीचें राज्य मिळेल. हे मधुसूदना आमचा पालनकर्ता तूंच आहेस.'

अशा रीतीनें कृष्णार्जुनांचा संवाद झाल्यानंतर श्रीकृष्णानें रथ हाकला, व वाटेनें जातां जातां सर्व रणभूमी दाखविली. तो ह्मणाला, 'अर्जुना, हे पहा जयाचे इच्छेनें आलेले हे शेंकडों राजे आज गतप्राण होऊन कसे जमिनीवर लोळत पडले आहेत ते! कित्येक तर हातपाय तुटल्यामुळें विव्हळ होऊन दुःखानें ओरडत, अस्ताव्यस्त रीतीनें पडले आहेत. योद्ध्यांचीं नानाप्रकारचीं शस्त्रें, चिलखतें, किरीटें, दागिने, पताका, मोडके रथ व मरून पडलेलीं वाहनें, ह्या सर्वांनीं ही रणभूमी अगदीं भरून गेली आहे. हत्ती घोडे, व मनुष्यें हीं मरून पडल्यामुळें गिधाडें, लांडगे व कोल्हीं वगैरे हिंस्रपशूंची चंगळ उडून राहिली आहे.' याप्रमाणें रणभूमी पहात पहात व आनंदानें शंखनाद करीत ही विजयी कृष्णार्जुनांची जोडी राजा धर्माकडे येऊन पोहोंचली.

त्यांना पाहिल्याबरोबर राजा धर्मानें मोठ्या लगबगीनें रथाखालीं उडी टाकून कृष्णार्जुनांना आलिंगन दिलें. नंतर राजा ह्मणाला, 'कृष्णा, तुझ्या कृपेनें अर्जुनाची प्रतिज्ञा सफल झाली. देवा, तुझा आश्रय असल्यावर आह्मांला काय कमी आहे? तुझ्याच कृपेनें इंद्राला इंद्रपद मिळालें. फार काय ही सर्व सृष्टि तुझ्याच लीलामात्रेंकरून निर्माण झाली आहे, तिचें पोषणही तुझ्याच कृपेनें होत आहे, व अंतीं तिचा लयही तुझ्याच ठिकाणीं व्हावयाचा आहे. अशा अनादिनाथाला जे शरण आले व ज्यांचा तूं स्वीकार केलास त्यांना संकटें ह्मणजे

कःपदार्थ ? ' असें ह्मणून अर्जुनाच्या पाठीवरून हात फिरवून पुनः एकदां त्यानें त्याला आलिंगन दिलें.

इतक्यांत सात्यकि, भीम, पांचाल हे राजाला नमस्कार करून त्याच्या जवळ हात जोडून उभे राहिले. ह्या सर्वांना आलिंगन देऊन धर्मराज ह्मणाला, ' द्रोण, कृतवर्मा, शल्य इत्यादिकांच्या कचाट्यांतून तुह्मी सुखरूपपणें पार पडला ही मोठ्या आनंदाची गोष्ट आहे. तुह्मां समरप्रिय शूरांना पाहून मला फार आनंद होतो. ' असें ह्मणून राजा धर्मानें त्यांना पुनः आलिंगन दिलें. ह्यावेळीं सर्वांच्या डोळ्यांतून प्रेमाश्रू वहात होते.

अशा रीतीनें इकडे पांडवसैन्यामध्यें आनंद चाललला असतांना कौरवांकडील लोक दुःखाकुल होऊन स्वस्थ बसले होते. दुर्योधनाला तर कांहींच सुचेना. आपणाला मदत करण्याकरितां ह्मणून जे जे राजे आले ते सर्व धारातीर्थी पतन पावले हें पाहून त्याला फार वाईट वाटलें. त्याच्या डोळ्यांतून सारखे दुःखाश्रू वहात होते. द्रोणाचार्य, कर्ण, शल्य, कृपाचार्य व अश्वत्थामा यांसारख्या मोठमोठ्या अजिंक्य वीरांचा पराभव करून त्यांच्या देखत अर्जुनानें जयद्रथाला मारलें हें पाहून तर त्याला असें वाटूं लागलें कीं, या सर्व पृथ्वीतलावर अर्जुनासारखा योद्धाच नाहीं. ज्या कर्णादिकांच्या जोरावर मीं हा एवढा संग्राम मांडला त्याच कर्णादिकांची ह्याच अर्जुनापुढें कांहीं मात्रा चालत नाहीं. तेव्हां आतां काय करावें ?' अशा रीतीनें विचार करीत व दुःखानें अश्रू ढाळीत राजा दुर्योधन द्रोणाचार्यांकडे जाऊन त्यांना ह्मणाला, ' आचार्य पाहिलेंत कां, मला मदत करून राज्य मिळवून यावें ह्मणून आलेल्या राजे लोकांचीच ह्या धारातीर्थीं कशी आहुति पडली आहे ती ! ह्या सर्व राजे लोकांच्या मरणाला मीच कारणीभूत झालों आहें. तेव्हां असल्या ह्या मित्रद्रोहाच्या पातकांतून मीं आतां मुक्त कसा होईन ? हजारों अश्वमेध केले तरी माझी ह्या भयंकर पातकांतून सुटका होणें नाहीं. अहो आचार्य, मी आतां तुह्मांला शपथपूर्वक सांगतों कीं, ह्या पांडवांची त्यांच्या मुलांबाळांसह कत्तल तरी करीन एक किंवा मी तरी माझे जयद्रथादि स्नेही जिकडे गेले तिकडे जाईन. मी ज्यांच्यावर अवलंबून आहें तेच पांडवांच्या हिताची इच्छा करितात. अर्जुन तुमचा शिष्य असल्याकारणानें तुह्मी त्याची उपेक्षा करतां. त्यामुळें माझे सर्व स्नेही ह्या संग्रामांत बळी पडले. मित्र ह्मणून एकावर विश्वासून कामगिरी यावी आणि तोच जर कां शत्रुपक्षाकडे वळला तर मग ती कामगिरी शेवटास कशी जाईल ? कांहींही असो, माझे स्नेही गेले. आतां मला तरी जगून काय करावयाचें आहे ? जिकडे ते तिकडेच मीही जातों. अहो, पांडवगुरो मला आतां आज्ञा द्या. '

हें ऐकून किंचित् विचार केल्यासारखें करून द्रोणाचार्य दुर्योधनाला ह्मणाले, ' राजा, तूं मला विनाकारण टोंचून कां बोलतोस ? अर्जुन हा अजिंक्य आहे असें मीं तुला पुष्कळ वेळां सांगितलें आहे. अर्जुनाचा पाठिंबा मिळाल्याबरोबर भीष्मासारख्या प्रतापी योद्ध्याला यःकश्चित् शिखंडीनें सुद्धां मारलें ! आतां ह्याच्यावरूनच तूं पहा कीं अर्जुनाचें सामर्थ्य किती आहे तें. हे राजा, शकुनीच्या नादाला लागून कपटद्यूतानें पांडवांना वनवास भोगावयाला लावलास. साध्वी द्रौपदीचा विनाकारण भरसभेंत छळ केलास. त्याच वेळीं तुला विदुरांनीं पुष्कळ उपदेश केला. पण त्याकडे तूं मुळींच लक्ष दिलें नाहींस. सज्जनांच्या व सन्मित्रांच्या उपदेशाचा जो अव्हेर करून आपलाच हेका करतो त्याचा नाश फारच लौकर होतो. कर्ण, कृपाचार्य, शल्य, अश्वत्थामा व तूं स्वतः त्या जयद्रथाचें रक्षण करीत असतां अर्जुनानें तुह्मां सर्वांचे देखत जयद्रथाचें डोकें उडविलें. असें असतांना त्याबद्दल विनाकारण मला एकट्यालाच कां दोष देतोस? असो. आतां हें पहा सृंजय व पांडव यांचें सैन्य जयानें उन्मत्त होऊन आमच्यावर चालून येत आहे. यांचा संहार केल्याशिवाय मी आतां आपल्या अंगावरचें चिलखत उतरवत नाहीं. तूंही जा. व आपल्या सर्व सैन्यांसह होईल तेवढी खटपट करून यांना मागें हटीव. तसेंच माझ्या अश्वत्थाम्याला सांग कीं, ' सोमकांना जिवंत सोडूं नको. व वडिलांनीं तुला जें जें सांगितलें आहे तें सर्व नीट लक्षांत ठेव. दम, सत्य व आर्जव यांचें साधन करून धर्मार्थादि पुरुषार्थांचें संपादन कर व ब्राह्मणांना नेहमीं संतोषवीत जा. ' राजा एवढा माझा निरोप अश्वत्थाम्याला कळीव.

बरें आतां तूं जा.मी ह्या पांडवसैन्यावर चालून जातों.'

ह्याप्रमाणें द्रोण व दुर्योधन यांचें भाषण झाल्यावर दुर्योधन पुनः लढाईला तोंड देण्याच्या निश्चयानें कर्णाकडे गेला व तेथें जाऊन कर्णाला ह्मणाला, 'कर्णा हे पहा माझ्याकरितां किती राजे धारातीर्थी पडले आहेत ते. ह्या एवढ्या राजमंडळाचा एकट्या अर्जुनानें संहार केला. देवादिकांना सुद्धां अभेद्य अशा ह्या द्रोणाचार्यांचा व्यूह ते स्वतः त्याचें रक्षण करीत असतांना अर्जुनानें फोडला. तेव्हां याला, काय ह्मणावें ? आचार्यांनींच याला वाट दिली. दुसरें काय ? असें नसतें तर अर्जुनाचा व्यूहामध्यें प्रवेश मुळींच झाला नसता. पूर्वींच जयद्रथ जातों ह्मणत होता, त्याच वेळीं त्याला पाठविलें असतें तर बरें झालें असतें. द्रोणाचार्यांनीं त्याच्या संरक्षणाबद्दल अभिवचन दिलें ह्मणून मीं त्याला ठेवून घेतलें. नाहीं तर मीं त्याला कधींच ठेवून घेतलें नसतें. जयद्रथाला त्याचें संरक्षण करण्याबद्दल वचन देऊन आचार्यांनीं अर्जुनाला वाट दिली !'

हें ऐकून कर्ण ह्मणाला, 'आचार्यांना उगीच दोष देऊं नको. ते आपल्या शक्तीप्रमाणें अंतःकरणपूर्वक लढतात. अर्जुन स्वतः शूर असून तरुण आहे. त्याशिवाय प्रत्यक्ष श्रीकृष्ण त्याचा सारथी आहे. आचार्य अगदीं ह्मातारे झाले आहेत, त्यामुळें त्यांना याच्याबरोबर झुंजवत नाहीं. हा झटदिशीं हुलकावणी देऊन पार निघून जातो. शिवाय पांडवांचें दैवच अनुकूल आहे. पहा आह्मीं त्यांना विष दिलें, पाण्यांत बुडविलें, लाक्षागृहांत असतांना जाळण्याचा प्रयत्न केला, पण ह्या सर्वांचा कांहींच उपयोग झाला नाहीं !'

अशा रीतीनें कर्ण व दुर्योधन यांचें भाषण चाललें आहे इतक्यांत पांडवांचें सैन्य त्यांच्यावर चालून आलें.

---

## ४३ घटोत्कचवध. ( ७. १५३–१८४ )

दुर्योधन जयद्रथाच्या वधानें आधींच आपल्या जिवाला कंटाळला होता. आणि त्यांतच हें पंचालसैन्य त्याच्यावर चालून आलें. त्यामुळें त्याला फारच चीड आली. म्हणून तो तसाच जिवावर उदार होऊन त्यांच्यावर तुटून पडला. व जोरानें बाणांचा मारा करूं लागला. हा मारा पांडवसेनेला फारच दुःसह झाला. त्यामुळें ती पळ काढण्याच्या बेताला आली. इतक्यांत भीम, शिखंडी, धृष्टद्युम्न व विराट वगैरे योद्धे आपल्या सैन्याच्या मदतीला आले. परंतु राजा दुर्योधनानें थोड्याच वेळांत ह्यांचीही त्यांच्या सेनेप्रमाणेंच स्थिति केली ! हें पाहून राजा युधिष्ठिर दुर्योधनाचा समाचार घेण्याकरितां मोठ्या आवेशानें त्याच्यावर धांवून आला. परंतु दुर्योधनानें हा येतो आहे इतक्यांतच ह्याचा ध्वज तोडून पाडला, सारथ्याच्या कपाळावर बाण मारला, घोडे घायाळ केले, व शेवटीं हातांतलें धनुष्यही तोडून टाकलें. राजा धर्मानें लगेच दुसरें धनुष्य घेतलें व 'हा पहा आतां मेलास' असें म्हणून आकर्ण धनुष्य ओढून एक तीक्ष्ण बाण सोडला. तो दुर्योधनाच्या मर्मी लागल्यामुळें तो मूर्छित होऊन रथांत पडला. त्यासरशीं पांचालवीरांनीं 'दुर्योधन ठार झाला, दुर्योधन ठार झाला' अशी मोठ्यानें आरोळी ठोकली. त्याबरोबर द्रोणाचार्य लगबगीनें तेथें धांवून आले.

द्रोणाचार्यांनीं आल्याबरोबर धृष्टद्युम्नाच्या मुलींना यमलोकीं पाठविलें. हें पाहून शिबी राजा ह्याबद्दल सूड घेण्याकरितां द्रोणाचार्यांवर धांवून आला. त्यानें आल्याबरोबर आधीं आचार्यांचा सारथी मारला. त्यामुळें आचार्यांनीं रागावून त्याचे घोडे, व सारथी ह्यांना ठार करून त्याचें डोकें उडविलें.

इकडे कलिंगाधिपतीचा मुलगा आपल्या बापाच्या वधाचा सूड घेण्याकरितां भीमावर चालून आला. तेव्हां भीमानें वाघाप्रमाणें एकदम आपल्या रथावरून त्याच्या रथावर उडी मारून त्याला बुक्की मारून ठार केला. त्याबरोबर ध्रुव व जयरात हे दोघेजण त्याच्यावर चाल करून आले. पण त्यांचीही त्यांच्या मित्राप्रमाणें एका मुठींतच भीमानें खात्री केली. आपले दोघे भाऊ ठार झाले हें पाहून दुर्मद भीमाला ठार करण्याकरितां आपल्या धनुष्याचा टणत्कार करीत वेगानें धांवत आला. हा येतो आहे तोंच भीमानें ह्याचे घोडे व सारथी ह्यांना यमलोक दाखविला. आपला रथ निरुपयोगी झाला ह्मणून दुर्मद आपला भाऊ दुर्मर्षण याच्या

रथावर चढला. हें पाहून भीमानें त्यांच्या रथावर जोरानें एक लाथ मारली. त्यासरशी तो रथ खालीं पडला. त्याबरोबर हेही खालीं पडले. तेव्हां लगेच ह्या दोघां भावांना त्यानें ठेंचून ठेंचून मारलें. असें हें भीमाचें अमानुष कृत्य पाहून सर्व कौरव अगदीं घाबरून गेले. प्रलयकालचा रुद्रच भीमरूपानें येथें अवतरला आहे कीं काय असें त्यांना वाटूं लागलें व ते भिऊन पळ काढण्याच्या बेतांत होते. इतक्यांत सोमदत्त व अश्वत्थामा हे दोघे वीर त्यांच्या मदतीला आले. सोमदत्ताचा मुलगा भूरिश्रवा याला सात्यकीनें मारला होता. ह्मणून सात्यकीला ठार करण्याची प्रतिज्ञा करून सोमदत्त सात्यकीवर चालून गेला. थोडावेळ त्या दोघांची झटापट झाली नाहीं तोंच सात्यकीनें त्याला मूर्छित केला.

इकडे अश्वत्थामा व घटोत्कच ह्यांची लढाई जुंपली. ह्या दोघांनींही प्रथमतः एकमेकांवर बराच शस्त्रवर्षाव केला. परंतु त्याचा कांहीं फारसा उपयोग होत नाहींसें पाहून घटोत्कचानें आपल्या मायेनें पर्वतरूप धारण केलें. तें पाहून अश्वत्थाम्यानें वज्रास्त्रानें त्याचा फडशा पाडला. नंतर लगेच घटोत्कचानें जलदाचें रूप धारण करून अश्वत्थाम्यावर दगडांचा वर्षाव करण्याला प्रारंभ केला. ह्यावर अश्वत्थाम्यानें वाय्वास्त्र सोडलें व त्याचा फडशा पाडला. अशा रीतीनें बराच वेळ ह्या मानवराक्षसांचें अस्त्रयुद्ध चाललें होतें. इतक्यांत घटोत्कचाचा मुलगा आपल्या राक्षससेनेसह बापाच्या मदतीला आला. पण अश्वत्थाम्यानें ह्याला ह्याच्या सेनेसह धारातीर्थी शयन करावयाला लावलें. इतक्यांत बाल्हीक भीमावर चालून आला. ह्याला पाहून भीमानें ह्याच्यावर आपली वज्रासारखी बळकट गदा फेंकली. त्यासरशीं बाल्हीकाचा, त्याचा रथ, घोडे व सारथी यांसह अगदीं चुराडा झाला. हें पाहून नागदत्त दृढबाहू वगैरे दहा कौरव भीमाला ठार करण्याकरतां त्याच्यावर शर वर्षाव करूं लागले. परंतु भीमानें ह्या दाही जणांना एका क्षणांत स्वर्ग लोक दाखविला. इकडे युधिष्ठिरानें मालव, अंबष्ठ, व मद्रक वगैरे सैनिकांशीं युद्ध करून त्यांना यमलोकीं पाठविण्याचा अगदीं सपाटा चालविला होता. हें पाहून राजा दुर्योधनानें द्रोणाचार्यांना त्याच्यावर चालून जावयास सांगितलें. त्याबरोबर द्रोणाचार्यांनीं येऊन धर्मराजावर वाय्वास्त्र सोडलें. युधिष्ठिरानेंही वाय्वास्त्र सोडूनच त्याचें शमन केलें. हें पाहून आचार्यांनीं ब्रह्मास्त्र सोडलें. युधिष्ठिरानें त्याचेंही ब्रह्मास्त्रानेंच शमन केलें. हें पाहून आचार्यांनीं आपला मोर्चा द्रुपदाच्या सैन्याकडे वळविला. त्याबरोबर भीम व अर्जुन आपल्या सैन्यासह द्रुपदाच्या मदतीला धांवून आले. अर्जुन आचार्यांच्या उजव्या बाजूला झाला, व भीम डाव्या बाजूला झाला. अशा रीतीनें दोघांनीं दोहींकडून मारा चालविला. इतक्यांत सात्यकीही, केकय, पांचाल व मत्स्य वगैरे राजांसहवर्तमान त्या रणभूमीवर येऊन दाखल झाला. याप्रमाणें चोहींकडून मारा चालल्यामुळें कौरवसेनेच्यानें मुळींच दम धरवेना. द्रोणाचार्य मधून मधून बराच धीर देत होते तरी सुद्धां ते भयानें समरांगणांतून मागें पाय काढूं लागले.

हें पाहून दुर्योधन कर्णाला ह्मणाला, 'हे मित्रवत्सला, मित्रत्व दाखविण्याची खरी वेळ ही आहे. हे पांडववीर सापाप्रमाणें फुसफुसत आमच्यावर चालून येत आहेत. तर हे कर्णा, आतां यांच्यापासून आमच्या सैन्याचें रक्षण कर.' हें ऐकून कर्ण ह्मणाला, 'आतां प्रत्यक्ष इंद्र जरी अर्जुनाच्या साहाय्याला आला तरी त्याला सुद्धां जिंकून अर्जुनाला ठार करीन. मी तुला प्रतिज्ञापूर्वक सांगतों कीं, अर्जुन व पांचालवीर ह्यांना यमलोकीं पाठवून तुला सर्व पृथ्वीचें राज्य देतों. सर्व पांडवांमध्यें अर्जुनच कायतो विशेष पराक्रमी आहे. त्यालाच मी ह्या अमोघ अशा वासवी शक्तीनें स्वर्गद्वार दाखवितों. अशा रीतीनें अर्जुन नाहींसा झाला ह्मणजे त्याचे बाकीचे भाऊ सहजच तुझ्या ताब्यांत येतील, नाहीं तर पुनः वनवासाला जातील.'

अशा रीतीनें कर्ण दुर्योधनापुढें बढाई मारीत असतां कृपाचार्य मध्येंच हंसत हंसत ह्मणाले—'फार उत्तम, कर्णा फार उत्तम. केवळ बोलण्यानेंच कार्य होत असेल तर आज राजा दुर्योधन तुझ्या योगानें सनाथ झाला. हे सूतपुत्रा, पांडवांचा व तुझा बराच वेळ सामना झालेला आहे. गंधर्वांनीं जेव्हां दुर्योधनाचा पराभव करून त्याला पकडून नेलें त्या

वेळीं आपणच त्याचें रक्षण करीत होता! शिवाय विराट नगरामध्यें असतांना अर्जुनानें तुझा तुझ्या भावांसह पराभव केला होता. कर्णा, एकट्या अर्जुनाचा पराभव करणें सुद्धां फार कठिण आहे. मग सर्व पांडव व त्यांचा साहाय्यकारी श्रीकृष्ण यांचा पराभव करीन ह्मणून उगीच कशाला बडबडतोस? कर्णा, तुला काय करावयाचें तें न बोलतां कर; आणि न बोलतां करणें हेंच खऱ्या पुरुषाचें लक्षण आहे. शरदृतूंतील गडगडणाऱ्या मेघापासून कांहीं फलप्राप्ति होत नाहीं हें अजून राजाला समजलें नाहीं! हे सूतपुत्रा, जोंपर्यंत अर्जुनाला पाहिलें नाहींस तोंपर्यंतच ही तुझी बडबड! एकदां कां त्याची समरांगणावर गांठ पडली ह्मणजे तुझी ही सर्व बडबड जागच्या जागींच राहील.'

हें ऐकून कर्ण ह्मणाला, 'तूं जातीनें ब्राह्मण असून ह्मातारपणामुळें अशक्त झाला आहेस. शिवाय तुझा पांडवाकडे ओढा जास्त आहे. ह्यामुळें तूं माझा अशा रीतीनें अवमान करतोस. अरे ब्राह्मणा, पुनः जर माझ्यापुढें असें बोलशील तर ह्या तलवारीनें तुझी जीभच छाटून टाकीन.'

कर्णानें अशा रीतीनें कृपाचार्यांना निष्ठुरपणें बोललेलें ऐकून अश्वत्थामा रागानें लाल होऊन हातांत नंगी समशेर घेऊन कर्णावर धांवून आला. अश्वत्थामा ह्मणाला, 'हे नराधमा, अर्जुनाच्या खऱ्या गुणांचें वर्णन करीत असतांना तूं माझ्या मामांची उगीच निर्भर्त्सना करतोस अं? अर्जुनानें जेव्हां तुझ्या देखत जयद्रथाचें डोकें उडविलें तेव्हां तुझा पराक्रम कोठें दडला होता? हे दुष्टा, नराधमा, कर्णा, उभा रहा, मीच आतां तुझें डोकें उडवितों.' असें ह्मणून अश्वत्थामा तलवार उपसून धांवलाच. त्याबरोबर दुर्योधन व कृपाचार्य यांनीं त्याला आडवून धरलें. हें पाहून पुनः कर्ण ह्मणाला, 'सोडा, सोडा, या नीचाला माझा पराक्रम काय आहे तो पाहूं दे.' तरी कृपाचार्यांनीं सोडलें नाहीं हें पाहून अश्वत्थामा ह्मणाला, 'आह्मीं या वेळीं तुझी क्षमा केली आहे. अर्जुनच तुझ्या गर्वाचा परिहार करील.' ह्यावर पुनः दुर्योधन ह्मणाला, 'हे ब्रह्मश्रेष्ठा, शांत हो. कर्णावर रागावूं नकोस. त्याला क्षमा कर. तूं, कृपाचार्य, द्रोणाचार्य, कर्ण व शल्य यांच्यावरच माझा सर्व भार आहे. हे पहा पांडवांचा आमच्याकडेच मोर्चा वळला.'

असें हे बोलताहेत तोंच, 'कर्ण कोठें आहे, धरा, त्याला ठार करा, आतां त्याला जिवंत सोडूं नका,' असें ह्मणत पांडवसैन्य त्यांच्यावर धांवून आलें. हें पाहून कर्णही त्यांच्यावर तुटून पडला. कर्णानें बाणांचा वर्षाव करून सर्व पांडवसेनेला थोपवून धरलें व अर्जुनावर तीन बाण सोडले. त्यामुळें रागावून अर्जुनानें नेमका ह्याच्या हातावरच बाण सोडला. त्यासरशीं कळ येऊन कर्णाच्या हातांतलें धनुष्य पडलें. परंतु लगेच डोळ्याचें पातें लवतें न लवतें इतक्यांत कर्णानें तें धनुष्य उचलून घेऊन पुनः अर्जुनावर सपाट्यानें बाणांचा मारा सुरू केला. हें पाहून अर्जुनानें त्याचें धनुष्य तोडलें, सारथ्याचें डोकें उडविलें, व घोडे ठार केले. अशा रीतीनें ना घोडा, ना सारथी, ना धनुष्य असा होऊन कर्ण गडबडीनें आश्रयाकरितां कृपाचार्यांच्या रथावर चढला. कर्णाची अशी त्रेधा झालेली पाहून सर्व कौरवसेना भयानें पळूं लागली. पण दुर्योधनानें त्यांना धीर दिला व स्वतःच पांडवांवर चालून जाऊं लागला. हें पाहून कृपाचार्य अश्वत्थाम्याला ह्मणाले, 'हा रागीट राजा आतां रागानें पार्थावर चाल करीत आहे. पण पतंग ज्याप्रमाणें दिव्यावर उडी घालून स्वतःला जाळून घेतो त्याप्रमाणें अर्जुनावर चाल करून हा आपलाच नाश करून घेईल. ह्मणून हे अश्वत्थामन्, त्याची व अर्जुनाची गांठ पडली नाहीं तोंपर्यंतच त्याला आवर. आह्मी सर्व जिवन्त असतांना आमच्या देखत राजानें एकटेंच शत्रूवर चालून जावें व तेथें आपल्या प्राणाची आहुति द्यावी हें बरोबर नाहीं. ह्मणून हे द्रौणे, जा. त्याला थोपवून धर.' असें मामांनीं सांगितल्याबरोबर अश्वत्थामा दुर्योधनाकडे जाऊन ह्मणाला, राजा, मी जिवंत असतांना मला सोडून त्वां एकट्यानेंच युद्धावर जावें हें बरोबर नाहीं. अर्जुनाबद्दल तूं मुळींच काळजी करूं नको. मी त्याचा समाचार घेतों.' हें ऐकून राजा दुर्योधन ह्मणाला, 'आचार्य पांडवांचें आपल्या मुलांप्रमाणें रक्षण करतात. तसेंच हे द्विजोत्तमा, तूंही त्यांची उपेक्षाच करतोस. माझ्या कमनशीबानें असो अथवा धर्मावर तुझी भक्ति असल्यानें

असो, अगर द्रौपदीचें प्रिय करण्याकरितां ह्मणून असो, तुझ्या हातून त्यांची उपेक्षा होते हें खास. ज्या माझ्याकरितां हे सर्व बांधव आज दुःखार्णवांत पडले आहेत त्या मला धिक्कार असो. गौतमीपुत्रावांचून दुसरा कोण बरें अंगीं सामर्थ्य असून शत्रूंची उपेक्षा करील. हे अश्वत्थामन्, आतां कृपा करून ह्या पांचालांचा नाश करा. तुह्मी पांचालांचा नाश केला म्हणजे मग आह्मी केकय वगैरे राजांचा समाचार घेतों. पांचालांचें मरण तुझ्याच हातीं आहे. तेव्हां तें तुलाच केलें पाहिजे. ह्मणून हे महाबाहो, चल लौकर चल, अर्जुनाच्या माऱ्यानें आमची सेना फार घायाळ होत चालली आहे. आतां उपेक्षा करण्याची मुळींच वेळ नाहीं.'

हें ऐकून अश्वत्थामा ह्मणाला, 'हे महाबाहो, तूं ह्मणतोस तें खरें आहे; मला व तातांना पांडव हे फार प्रिय आहेत. त्याप्रमाणें त्यांनाही आह्मी प्रिय आहों. परंतु ही प्रियता युद्धांत मुळींच नाहीं. आह्मी आपल्या जिवाची पर्वा न करितां आमच्यानें होईल तसें युद्ध करतों. मी, कर्ण, कृप व कृतवर्मा हे चौघेजण सर्व पांडवांची एका क्षणांत राखरांगोळी करून टाकूं. व पांडवही आमच्या सर्व कौरवसेनेचा एका क्षणार्धांत निकाल करून टाकतील. अशा रीतीनें दोन्ही पक्ष सबल असल्याकारणानें कोणाचेंच कांहीं चालत नाहीं. असें असून हे राजा, तूं कुत्सितबुद्धीचा असल्याकारणानें आमच्याविषयीं विनाकारण वाईट कल्पना करतोस. मी तर आतां जिवावर उदार होऊन पांडवांवर चालून जातों व जे जे ह्मणून माझ्या बाणांच्या टप्प्यांत येतील त्या सर्वांचा फडशा पाडतो.'

असें ह्मणून जों गेला तों पांडवसेनेंतच शिरला; तेव्हां धृष्टद्युम्नानें त्याच्यावर बाणांचा मारा चालविला. अश्वत्थाम्यानेंही न डगमगतां तसाच झपाट्यानें मारा चालविला. तेव्हां दोघांच्या बाणजालांनीं दश दिशा व्यापून गेल्या. अशा रीतीनें थोडा वेळ दोघांची झटपट झाली नाहीं इतक्यांत अश्वत्थाम्यानें धृष्टद्युम्नाचे, घोडे, सारथी, धनुष्य, व चक्ररक्षक या सर्वांचा फडशा पाडला व अशा रीतीनें धृष्टद्युम्न विरथी झाल्याबरोबर शंभर रथी व तीन महारथी यांना हां हां ह्मणतां सर्वांच्या देखत यमसदनीं पाठविलें! शिवाय त्यानें पांचाल सैन्य किती मारलें याचा तर पत्ताच नाहीं.

अशा रीतीनें अश्वत्थाम्यानें आपल्या सैन्याची फारच त्रेधा उडविली आहेसें पाहून भीमार्जुन आपल्या सैन्यासह धृष्टद्युम्नाच्या मदतीला धांवले. इकडे दुर्योधनही द्रोणाचार्यांच्या साहाय्यानें पांडवांवर चालून आला. याप्रमाणें दोन्हीकडील सैन्य एके ठिकाणीं भिडून त्यांची बराच वेळ हातघाई झाली. आधींच रात्रीची वेळ, त्यांत ही युद्धाची गर्दी, ह्यामुळें त्या समरांगणावर कांहींच दिसेना. तेव्हां दुर्योधनानें मशाली पेटविण्याचा हुकूम केला. युधिष्ठिरानेंही आपल्या लोकांना मशाली पेटवावयाला सांगितलें. याप्रमाणें दोन्ही पक्षांकडील शिपायांनीं मशाली पेटविल्यामुळें दाही दिशा प्रकाशमय दिसूं लागल्या.

अशा रीतीनें दोन्ही दळांना आपापले शत्रू स्वच्छ दिसूं लागल्यावर पुनः युद्ध जुंपलें. तेव्हां कृतवर्म्यानें युधिष्ठिराला गांठलें, द्रोणाचार्यांनीं सात्यकीवर मारा चालविला, सहदेवाला कर्णानें अडविलें, भीमसेन दुर्योधनाशीं भिडला, शकुनीनें नकुलावर चाल केली, शिखंडी कृपाचार्यांवर धांवून गेला, दुःशासन प्रतिविंध्यावर तुटून पडला, व अश्वत्थाम्यानें घटोत्कचाला थोपवून धरलें. त्याचप्रमाणें हत्ती हत्तींशीं, घोडे घोड्यांशीं रथी रथ्यांशीं व पायदळ पायदळांशीं भिडून राहिलें. याप्रमाणें कांहीं वेळ व्यवस्थेशीर युद्ध चाललें होतें. पण लौकरच ही घडी विसकटून युद्धाची एकच गर्दी उडून गेली.

पुढें ह्या गर्दींतच कर्ण व धृष्टद्युम्न यांचें युद्ध फार निकरावर आलें. त्या दोघांनींही एकमेकाला आपल्या बाणांनीं अगदीं रक्तबंबाळ करून सोडलें. इतक्यांत कर्णानें धृष्टद्युम्नाचा सारथी मारला, घोडे ठार केले व धनुष्यही तोडून टाकलें. तरीही न डगमगतां धृष्टद्युम्नानें जवळ पडलेलें रथाचें चाक घेऊन त्यानें कर्णाचे चारही घोडे चेंचून ठार केले; व लगेच सहदेवाच्या रथांत उडी ठोकली. धृष्टद्युम्नाची अशी स्थिति झालेली पाहून सर्व पांचाल व सोमक त्याच्या मदतीला धांवले. कर्णानेंही आपल्या रथाला दुसरे घोडे जुंपून पांचालांवर मारा करण्याला सुरवात केली. कर्णाचा मारा फारच दुःसह

झाल्याकारणानें पांचालवीर समरांगणांतून पळून जाऊं लागले. ह्या वेळीं ह्यांची इतकी धांदल उडाली कीं, घोड्यांच्या टकरा होऊन स्वार खालीं पडूं लागले, रथांच्या टकरा होऊन रथ मोडूं लागले व आंतील रथी आपल्या प्राणाला मुकूं लागले. कित्येक योद्धे तर देहभान विसरून कर्णाच्याच अंगावर धांवून गेले; त्यामुळें आयतेच त्याच्या बाणांच्या टप्यांत सांपडून तेथल्या तेथेंच मरून पडले.

आपल्या सैन्याची अशी फजिती झालेली पाहून अर्जुन श्रीकृष्णाला कर्णाकडे आपला रथ नेण्याविषयीं आग्रह करूं लागला. तेव्हां श्रीकृष्ण अर्जुनाला ह्मणाला, 'ह्यानें मुद्दाम तुझ्याकरितां वासवी शक्ति राखून ठेविली आहे. ह्मणून ह्या वेळीं तूं त्याच्यावर चालून जाणें बरोबर होणार नाहीं. घटोत्कचाला लावून दे. तो बलवान् आहे, अस्त्रसंपन्न आहे. शिवाय त्याच्याजवळ राक्षसी माया आहे. यामुळें तो कर्णाला सहज जिंकून टाकील.' हें ऐकून अर्जुनानें घटोत्कचाचें स्मरण केलें, त्याबरोबर अंगांत चिलखत चढविलेला व सशस्त्र असा तो मायावी राक्षस अर्जुनापुढें हजर झाला, व कृष्णार्जुनांना नमस्कार करून, हात जोडून पुढें उभा राहिला. हें पाहून त्याला श्रीकृष्ण ह्मणाला, 'कर्णानें पांचालांना फार त्रास दिला आहे. त्याची खोडकी जिरविणारा तुझ्यावांचून दुसरा कोणी नाहीं. ह्मणून हे हैडिंबे, तूं कर्णाचा पराभव करून पांचालांचें रक्षण कर. मनुष्यमात्र मुलांची जी इच्छा करतात ती एवढ्याचकरितां कीं त्यांनीं आपलें आपत्कालीं रक्षण करावें. त्याप्रमाणें हे घटोत्कचा, तूं ह्या वेळीं आपलें पुत्राचें कर्तव्य बजाव. तूं स्वतः शूर आहेस. त्यांतून राक्षसांना रात्रीं जास्त बल येतें. ह्मणून हे भीमपुत्रा, तूं आतांच जाऊन कर्णाचा वध कर व पांडवांचें रक्षण कर.'

हें बोलणें मोठ्या उत्साहानें मान्य करून घटोत्कच कर्णावर चालून गेला. पण जटासुराचा मुलगा अलंबुष यानें मध्येंच घटोत्कचाला अडवून धरलें. तेव्हां घटोत्कचानें त्याचे घोडे व सारथी मारून त्याला विरथ केलें. अलंबुषानें घटोत्कचाला एक बुक्की मारली. घटोत्कचानें तसाच त्याला खालीं पाडून आवळून धरला. पण अलंबुष झट्दिशीं बाहेर निघाला व मेघ होऊन घटोत्कचावर वर्षाव करूं लागला. तेव्हां घटोत्कचानें अग्निरूप धारण केलें, लगेच अलंबुषानें सर्परूप धारण केलें, त्यावर पुनः घटोत्कचानें गरुडरूप धारण केलें. अशा रीतीनें दोघांचेंही बराच वेळ मायायुद्ध चाललें होतें. शेवटीं घटोत्कचानें अलंबुषाला उचलून घेऊन श्येनपक्ष्यासारखी एकदम वर उडी मारून त्याला खालीं आदळलें. व लगेच तलवारीनें त्याचें डोकें उडविलें. नंतर पुनः तेंच डोकें घेऊन घटोत्कच दुर्योधनाकडे गेला. आणि तें डोकें त्याच्या रथांत ठेवून त्याला ह्मणाला कीं, 'रिकाम्या हातानें राजाकडे अगर बायकांकडे जाऊंनये असें शास्त्र आहे ह्मणून हा तुला नजराणा आणला आहे. आतां असेंच कर्णाचेंही डोकें उडवितों व तुला नजर करतों.'

असें ह्मणून ज्याचे डोळे लाल आहेत, तोंड तांबडें आहे, पोट खोल गेलें आहे, केंस ताठ आहेत, कान रुंद आहेत, हनुवटी लांब आहे, तोंडाचा जबडा कानापर्यंत फांकलेला आहे, सुळे लांब असून पुढें आलेले आहेत, ओंठ लांब असून खालीं लोंबत आहेत, नाक स्थूल आहे, अंगाचा वर्ण निळा आहे, शरीर पर्वतप्राय मोठें आहे, बेंबी खोल आहे, कपाळ भव्य आहे, डोक्यावर रत्नखचित किरीट आहे, कानांत प्रातःकाळच्या सूर्याप्रमाणें तेजस्वी कुंडलें आहेत, अंगांत काशाचें चिलखत आहे, शिवाय वर अस्वलाचें कातडें आहे, रथ चारशें हात लांबीचा आठ चाकांचा व शंभर घोड्यांचा आहे व ज्याचा सारथीही भव्य शरीराचा राक्षस आहे, असा घटोत्कच एकदम कर्णावर चालून गेला. तेव्हां कर्णानेंही त्याच्याशीं निकरानें युद्ध केलें. बाणांनीं व शक्त्यांनीं एकमेकांचें शरीर अगदीं घायाळ होऊन गेलें होतें. मध्यरात्रीचा समय असल्या कारणानें घटोत्कचाबरोबरचे राक्षस आपल्या मायेनें आकाशांतून कर्णसैन्यावर दगड, मुसळ, गुर्दे, तलवारी व गदा ह्यांचा वर्षाव करीत होते. कर्णानें ह्या सर्व मायेचा फडशा पाडून घटोत्कचाचा व त्याच्या सेनेचा चांगलाच समाचार घेतला. आपल्या मायेचा प्रभाव चालत नाहींसें पाहून घटोत्कचानें ज्याला हजार कणे बसविले आहेत असें एक मोठें चाक घेऊन कर्णावर फेंकलें. पण अभाग्याच्या म-

नोराज्याप्रमाणें त्याचाही कर्णाच्या बाणांनीं मधल्या मध्येंच चुराडा उडला. त्यानें लगेच पुनः गदा फेंकली. तिचीही पण तीच स्थिति झाली. हें पाहून घटोत्कचानें पुनः आपली माया पसरली. तो क्षणांत पर्वतासारखा मोठा होई व क्षणांत अगदीं सूक्ष्म होऊन जमिनींत शिरे, लगेच हजार डोकीं व हजार पोटांच्या मनुष्याचें रूप घेई व लगेच जलरूप घेऊन सर्व सैन्यांतून वहावयाला लागे. अशा रीतीनें नानाप्रकारचीं भयंकर रूपें घेऊन सर्व कौरवसेनेला त्यानें अगदीं भिवडावून सोडलें. नंतर गुप्तरूपानें एकदम कर्णाजवळ जाऊन उभा राहिला व 'सूतपुत्रा, थांब, आतां कांहीं तूं माझ्या तडाख्यांतून जिवंत सुटत नाहींस' असें ह्मणाला. आणि लगेच त्यानें मोठ्यानें टाळी वाजवून व दांतओंठ खाऊन महाघोर अशी शक्ति कर्णावर सोडली. कर्णानें आपल्या हातांतलें धनुष्य खालीं ठेवून ती शक्ति झेलली आणि नंतर ती तशीच पुनः घटोत्कचावर फेंकली. घटोत्कचानें ती पुनः आपल्यावरच आलीशी पाहून रथाखालीं उडी ठोकली. त्याबरोबर रथ, घोडे व सारथी ह्या सर्वांचा चुराडा झाला. हें पाहून घटोत्कच लगेच गुप्त झाला व त्याच्या सैन्यानें कर्णावर लगट केली. इतक्यांत बकासुराचा भाऊ अलायुध याला ह्या रात्रीं युद्धाची वार्ता समजली. पूर्वी भीमानें त्याचे भाऊ मारून हिडिंबेशीं संबंध केला होता. त्या कृत्याचा सूड घेण्याकरितां दुर्योधनाच्या संमतीनें तो या संधीस घटोत्कचावर तुटून पडला. घटोत्कचही कर्णाला सोडून त्यावर धांवला. दोघेही मायावी असल्यामुळें त्यांचें युद्ध फार भयंकर चाललें होतें. इतक्यांत भीम आपल्या मुलाच्या मदतीला आला. त्याबरोबर अलायुधानें भीमावरच चाल केली. पूर्वीच्या वैरामुळें दोघेही एकमेकांशीं अतिशय निकरानें लढत होते.. त्यांचें प्रथम बाणयुद्ध, नंतर गदायुद्ध व शेवटीं मुष्टियुद्धही झालें. पण त्या सर्वांत भीमालाच हार खावी लागली ! तेव्हां श्रीकृष्णानें घटोत्कचास प्रथम अलायुधाचाच समाचार घेण्यास सांगितलें. त्याप्रमाणें घटोत्कचानें अलायुधावर बाणांचा वर्षाव करण्याला सुरवात केली. त्यासरशीं अलायुधानें भीमाला सोडून घटोत्कचावर लगट केली. व त्याच्या डोक्यांत जोरानें परीघ हाणला. तो अगदीं मर्मस्थळावर व बऱ्याच जोरानें बसल्यामुळें घटोत्कचाला मूर्च्छा आली. पण तो लौकरच शुद्धीवर आला. नंतर त्यानें अलायुधावर गदा सोडली ती त्यानें आपल्या गदेनेंच झाडून पाडली व आपल्या मायेनें घटोत्कचावर रक्त, मांस, दगड व मुसल वगैरे फेंकण्याला व झाडें उपटून मारण्याला प्रारंभ केला. घटोत्कचानेंही तेंच सुरू केलें. त्यामुळें दोघेही रक्तबंबाळ होऊन अगदीं दमून गेले. शेवटीं दोघांची कुस्ती जुंपली. त्यांत घटोत्कचानें अलायुधाला शेंडी ओढून खालीं पाडलें व तलवारीनें त्याचें शीर कापून दुर्योधनापुढें नेऊन ठेविलें.

अशा रीतीनें घटोत्कचानें अलायुधाचा वध करून त्या विजयाच्या भरांत वर आकाशांत उडी मारिली व तेथूनच दगड, बाण, गुर्दे, मुसळ, उखळ, तलवारी, रथाचीं चाकें व गदा यांचा वर्षाव करण्याला सुरवात केली. यामुळें कित्येक दगडाखालीं चिरडून मेले, कित्येक बाणांनीं घायाळ झाले, कित्येकांचे तलवारीनें हात, पाय व डोकीं तुटलीं, कित्येकांचे रथ मोडून पडले, घोडे ठार झाले व हत्ती निचेष्ट झाले. अशा रीतीनें एकच गोंधळ उडून गेला. ह्याच्या ह्या असह्य माऱ्यानें एकंदर एक अक्षौहिणी सैन्य मेलें. हें पाहून कौरवांच्या तोंडचें पाणी पळालें. तेव्हां कर्णानें आपल्या लोकांच्या रक्षणाकरितां पुष्कळ प्रयत्न केला. त्यानें दाही दिशांला झपाट्यानें बाणांचा वर्षाव केला. त्या राक्षसाची मायाशक्ति नष्ट करण्याकरितां पुष्कळ अस्त्रप्रयोग केला. परंतु ह्या सर्वांचा कांहींच उपयोग झाला नाहीं. उलट अधिकाधिकच त्रास होऊं लागला. हें पाहून सर्व कौरवांनीं त्याची विनंति केली कीं, 'हे महाबाहो, आतां आमची उपेक्षा करूं नकोस. तूं जर उपेक्षा करशील तर आजच्या रात्रींच सर्व कौरवसैन्य नाहींसें होईल. तुझ्या वांचून आह्मांला दुसरा त्राता नाहीं. आतां तूं अर्जुनाकरितां राखून ठवेलली ती अमोघ वासवी शक्ति सोड. त्यावांचून हा राक्षस मरावयाचा नाहीं. व आज ह्यांतून जगलों तर उद्यां पांडवांचा समाचार घेतां येईल. तर आतां विलंब न करितां तुझी वासवी शक्ति सोड.' असें हे ह्मणत आहेत इतक्यांत आकाशांतून एक मोठी शिळा येऊन कर्णाच्या रथावर पडली. त्यासरशीं सर्व रथाचा, घोडे व सारथी यांच्यासह अ-

गर्दी चुराडा झाला. कर्णानें त्यांतून झटदिशीं बाहेर उडी मारली ह्मणून तो तेवढा वांचला. अशा रीतीनें घटोत्कचानें त्रास दिलेला पाहून कर्णानें मुद्दाम अर्जुनाकरितां ह्मणून पुष्कळ वर्षें राखून ठेवलेली आपली वासवी शक्ति घटोत्कचावर सोडली. ती शक्ति सुटलेली पाहिल्याबरोबर घटोत्कचानें पर्वतरूप धारण केलें. पण त्या शक्तीनें त्या पर्वताला फोडून त्या भयंकर राक्षसाच्या काळजाचा ठाव घेतला. त्यासरशीं त्यांचें तें अक्राळविक्राळ शरीर धाडकन् खालीं पडलें. तें शरीर इतकें भयंकर होतें कीं, त्याच्याखालीं सांपडूनच हजारों हत्ती, हजारों घोडे, हजारों रथ, हजारों योद्धे, यांचा चुराडा झाला. तरी पण घटोत्कच ठार झाला हें पाहून सर्व कौरवांना अतिशय आनंद झाला, त्यांच्या सैन्यांत जिकडे तिकडे कर्णाची स्तुति, रणवाद्यांचा गजर व योद्ध्यांची आनंददर्शक सिंहगर्जना हें ऐकूं येऊं लागलें.

कौरवांच्या सैन्यांत असा आनंद चालला असतांना पांडवांकडील सर्व वीर दुःखाकुल होऊन घटोत्कचाबद्दल शोक करूं लागले. परंतु श्रीकृष्णाला फार हर्ष झाला. त्यानें आनंदानें टाळी पिटली, सिंहगर्जना केली, आणि पुनः पुनः अर्जुनाला आलिंगन देऊन पांचजन्य फुंकला. अशी ही श्रीकृष्णाची विपरीत कृति पाहून अर्जुन त्याला ह्मणाला, 'कृष्णा, हें काय तूं आरंभलें आहेस ? आह्मी सर्वजण घटोत्कच मेला ह्मणून शोकाकुल झालों आहों व तूं आनंदानें टाळ्या पिटीत आहेस. तर हे कृष्णा, तुला हर्ष कां झाला तें सांग. ' हें ऐकून श्रीकृष्ण ह्मणाला, धनंजया, सांगतों तें ऐक. घटोत्कच मेला खरा, पण त्याच्या योगानें आज कर्णाजवळची वासवी शक्ति नष्ट झाली. कर्णाचें तें दिव्य कवच, तीं तेजःपुंज कुंडलें व ही अमोघ शक्ति जोंपर्यंत त्याच्या जवळ होतीं तोंपर्यंत प्रत्यक्ष इंद्र, वरुण, कुबेर किंवा कृतांत जरी आला असता तरी सुद्धां त्याला हा कर्ण अजिंक्य होता. म्हणून इंद्रानें तुझ्याकरितां ब्राह्मणाचें रूप घेऊन तीं कवचकुंडलें कर्णापासून मागून घेतलीं. परंतु त्या वासवी शक्तीमुळें हा आजपर्यंत तसाच अजिंक्य राहिला होता. ती शक्ति आज घटोत्कचानें नाहींशी केली ह्मणून मला आनंद झाला आहे. ही वासवी शक्ति ह्यानें मुद्दाम तुझ्याचकरितां राखून ठेवली होती. त्या शक्तीपुढें तुझ्या गांडीवाचा फार कशाला माझ्या सुदर्शनाचाही कांहीं एक उपयोग झाला नसता. आतां कर्णाच्या हातांत जोंपर्यंत शस्त्र आहे व जोंपर्यंत हा युद्ध करीत आहे तोंपर्यंत त्याचा पराभव कोणाच्यानेंच होणार नाहीं. करितां तूं आपल्या पूर्वीच्या प्रतिज्ञेचें स्मरण करून हा जेव्हां जमिनींत घुसलेल्या आपल्या रथाचें चाक काढण्याच्या खटपटीला लागेल त्याच वेळेस ह्याचा शिरच्छेद कर. हिडिंब, बकासुर, अलायुध व घटोत्कच वगैरे राक्षस हे यज्ञविध्वंसक व ब्रह्महत्या करणारे होते. ह्यांना जर मारविलें नसतें तर जगांत अधर्म मातला असता. ब्रह्मचर्य, सत्य, दम, शौच, धर्म, लज्जा, धैर्य व क्षमा हीं जेथें आहेत तेथेंच माझी प्रीति आहे हें मी तुला अगदीं सत्य सत्य सांगतों. '

इकडे राजा धर्म अत्यंत शोकाकुल होऊन आपल्या रथामध्यें पडला. हें पाहून श्रीकृष्णानें त्याचें सांत्वन केलें. तेव्हां राजा धर्म डोळे पुशीत पुशीत श्रीकृष्णाला ह्मणाला, ' कृष्णा आह्मी वनवासांत असतांना हा घटोत्कच अगदीं लहान होता तरी त्यानें आह्मांला पुष्कळ मदत केली. गंधमादन यात्रेमध्यें तर यानें द्रौपदीला आपल्या खांद्यावरून वाहिली. हा अत्यंत शूर असून याची आमच्यावर फार प्रीति होती. व हाही मला सहदेवाइतकाच आवडत होता. हे जनार्दना, आह्मी सर्वजण जवळ असतांना आमच्या देखत याचा वध कसा झाला ? अभिमन्यूच्या वेळेला एक अर्जुन जवळ नव्हता, पण आतां तो सुद्धां होताना? अर्जुनानें आधीं जयद्रथाला उगीच मारला. आधीं द्रोणाचार्य व कर्ण यांनाच मारावयाला पाहिजे होतें. कारण त्यांच्यावरच सुयोधनाची सारी मदार आहे. आणि त्यांना मारलें असतें ह्मणजे ह्या जयद्रथाला मारण्याला कांहीं उशीर नव्हता. कांहींही असो, मला आधीं कर्णाचा वध केला पाहिजे. मीच आतां कर्णावर चालून जातों व भीम द्रोणाचार्यांचा समाचार घेईल. ' असें ह्मणून शंखनाद करीत व धनुष्याचा टणत्कार करीत धर्मराज त्या आवेशांतच तडख निघाला. हें पाहून श्रीकृष्णानें धर्माच्या मागोमाग त्याला मदत करण्याकरितां आपलाही रथ हांकला. त्याबरोबर भीम, सात्यकि, धृ-

घ्टद्युम्न व नकुलसहदेव हेही त्याच्या मागोमाग गेले.

इतक्यांत तेथें व्यास प्रगट झाले. त्यांनीं धर्माला सांगितलें कीं, ‘ उगीच शोक करूं नकोस. झालें तें योग्यच झालें. कर्णाच्या वासवीशक्तीमध्यें एकच वीर मारण्याची शक्ति होती, ती त्यानें अर्जुनाकरितां राखून ठेवली होती. ह्मणून श्रीकृष्णानें तुझ्या कल्याणाकरितां कर्णावर घटोत्कचाला पाठवून त्या शक्तीचा नाश करविला. ती शक्ति कायम असती तर अर्जुन जिवंत राहिला नसता. ह्मणून तूं आपला शोक आवर; व आपल्या बांधवांसहवर्तमान शत्रूंशीं धैर्यानें व नीतीनें युद्ध कर. आजपासून पांचव्या दिवशीं तूं पूर्ण विजयी होशील व संपूर्ण पृथ्वी तुझ्या ताब्यांत येईल. राजा, नेहमीं धर्माचें पालन करीत जा. कारण जिकडे धर्म तिकडेच जय हें तूं खास समज. ’ इतकें सांगून व्यास अंतर्धान पावले.

व्यासांचें हें भाषण ऐकून धर्मराजाचें मन थोडें शांत झालें. पण भीम व द्रोणाचार्य ह्यांचें युद्ध बरेंच निकरानें चाललें होतें. हें पाहून राजा धर्म धृष्टद्युम्नाला ह्मणाला, तुला अग्नीनें जन्मतःच धनुष्य, कवच व तलवार हीं दिलीं आहेत. शिवाय तुझी उत्पत्तिही द्रोणाचार्यांच्या वधाकरितांच आहे. ह्मणून तुला कांहीं भीति नाहीं. आतां तूं लौकर जा व भीमाला मदत कर. सात्यकि, नकुलसहदेव वगैरेही तुझ्या मदतीला येतील. ’ हें ऐकून धृष्टद्युम्न द्रोणाचार्यांवर धांवला. तसेंच सात्यकि, नकुल, सहदेव व पांचाल, सृंजय, केकय वगैरे वीरही त्याच्या पाठोपाठच गेले. त्यामुळें तें युद्ध फारच भयंकर झालें. पण इतका वेळ युद्ध करून श्रमल्यामुळें व मध्यरात्र उलटून गेल्यामुळें सर्व योद्धे झोंपेनें अगदीं घेरले होते. स्वार आपल्या घोड्यावरच झोंप घेऊं लागले, रथी आपल्या रथांत पडले, हत्तीस्वारांनीं आपल्या हत्तीच्या गंडस्थळावरच माना टेंकल्या व पायदळांतील योद्धे खालीं जमिनीवरच पडूं लागले. अशा रीतीनें बरेच योद्धे युद्ध टाकून झोंपेच्या आधीन झाले. पण जे कित्येक सावध होते त्यांनीं ही बरी संधी आहे असें पाहून जोरानें मारा चालविला. त्यामुळें दोन्ही पक्षांकडील बरेच लोक पटापट मरून पडूं लागले. हें पाहून अर्जुनानें सर्वांना मोठ्यानें ओरडून सांगितलें कीं, ‘ हे वीर हो, तुह्मी व तुमचीं वाहनें हीं फार दमलीं आहेत व आतां रात्रही फार झाली आहे. सबब आतां येथेंच घटकाभर विश्रांति घ्या. चंद्रोदय झाल्यावर पुनः युद्धाला सुरवात करूं. ’ हें अर्जुनाचें भाषण ऐकून दोन्ही पक्षांकडील योद्ध्यांना फार आनंद झाला. ते अर्जुनाची स्तुति करूं लागले. व ज्याला जेथें जागा सांपडली तेथेंच ते पडले. पर्वतावर पसरलेल्या मोठमोठ्या दगडांमधूनच जसे सापाचे फुस्कारे निघावेत त्याप्रमाणें ह्या समरांगणामध्यें सैनिकांचीं शरीरें पसरल्यामुळें व श्वासोच्छ्वासामुळें ह्या वेळीं एक प्रकारची शोभा व एक प्रकारची भीति ह्यांचें एकीकरण झालें होतें. अशा रीतीनें दोन्हींकडील योद्धे झोंपीं गेल्यानंतर कांहीं वेळानें चंद्रोदय झाला. त्यासरशीं हा सेनासमुद्र खडबडून जागा झाला.

---

## ४४ द्रोणाचार्यांचा वध. (७.१८५–१९२)

इतक्यांत दुर्योधन द्रोणाचार्यांकडे जाऊन त्यांना म्हणाला, ‘ युद्धाचे वेळीं आपले शत्रू दमले आहेत म्हणून त्यांची उपेक्षा करतां उपयोगी नाहीं. आमचे शत्रू श्रमानें तेजहीन झाले असतांही तुह्मी त्यांची उपेक्षा करतां. त्यामुळें ते पुनः ताजेतवाने होऊन आमच्याशीं दुप्पट जोरानें लढतात. अहो आचार्य, तुमच्यासारखा शस्त्रास्त्रसंपन्न असा वीर देवलोकांतही कोणी नाहीं. असें असून तुमच्यानें ह्या यःकश्चित् पांडवांचा नाश करणें होत नाहीं. हें माझेंच मंदभाग्य म्हणावयाचें, दुसरें काय ? ’ हें ऐकून द्रोणाचार्यांना फारच राग आला. त्यामुळें ते त्याला ह्मणाले, ‘दुर्योधना, मी ह्मातारा असूनही माझ्या शक्तीप्रमाणें युद्ध करीत आहें. आतां ज्यांना अस्त्रविद्या येत नाहीं अशांवर मीं अस्त्रप्रयोग करावा असें तुझ्या मनांत आहे. त्याप्रमाणें मी आज करतों. मग तें शुभ असो अगर अशुभ असो. आज मी सर्व पांचालांचा नाश करून मगच कवच काढतों, हें तूं खास समज. पण अर्जुन दमला आहे ह्मणून त्याच्याशीं युद्ध करून त्यालाच ठार करावें असें जें तुझें मत हें मात्र होणार नाहीं. त्याचें सामर्थ्य तुला प्रत्यक्षच माहीत आहे. देव, गंधर्व, यक्ष व राक्षस यांपैकीं कोणीही त्याच्याशीं युद्ध करण्याला धजत

नाहीं. मग देवादिकांनाही अजिंक्य अशा ह्या अर्जुनाला मनुष्याच्यानें कसें जिंकवेल ?' आचार्यांनीं केलेली ही अर्जुनाची स्तुति दुर्योधनाला मुळींच सहन झाली नाहीं. तो रागानें त्यांना ह्मणाला, 'मी, दुःशासन, कर्ण व शकुनि मामा मिळून अर्जुनाचा वध करतों. व तुह्मी बाकीचें सैन्य बरोबर घेऊन दुसऱ्या पांडवांशीं युद्ध करा.' ह्यावर द्रोणाचार्य हांसत हांसत ह्मणाले, 'तसेंच कर. जा, यशस्वी हो. अर्जुनाशीं युद्ध करून त्याला जिंकणारा असा या पृथ्वीतलावर कोण क्षत्रियाचा बच्चा आहे ? फार कशाला, त्याच्या बरोबर युद्धाला सुरवात करून जिवंतपणें घरीं जाणारा असा तरी कोण मायेचा पूत या दुनयेंत आहे ? तूं आपल्या पापबुद्धीनें सर्वांबद्दल विनाकारण वाईट कल्पना करून घेतली आहेस. पण तें कांहींका असेना, तूं आपला जा व त्याला जिंकून ये. हा तुझा जुगारी शकुनिमामा, पांडवांना कपटद्यूतानें फसविणारा, अर्जुनावर खुशाल चालून जाऊंदे. मी, माझा भाऊ दुःशासन व कर्ण असे तिघेजण मिळून अर्जुनाला ठार करतों, असें तूं भर सभेंत पुष्कळ वेळां बोलला आहेस. आतां ती तुझी प्रतिज्ञा खरी कर ह्मणजे झालें. हा तुझा शत्रु अर्जुन तुझ्यापुढेंच उभा आहे. तर तूं आपल्या क्षात्रधर्माला अनुसरून त्याच्याशीं युद्ध कर. आजपर्यंत राजैश्वर्याचा उपभोग घेतला आहेस, दानधर्म केला आहेस, अध्ययन केलें आहेस, सारांश ह्या जगांत येऊन जें जें करावयाचें तें सर्व त्वां केलें आहेस. तेव्हां आतां तुला मरण आलें ह्मणून कांहीं वाईट नाहीं. तर जा आपल्या शत्रूशीं धैर्यानें युद्ध कर.' असें ह्मणून द्रोणाचार्य आपल्या सैन्यानिशीं निघून गेले.

इतक्या अवसराला अरुणोदय झाला. हें पाहून सर्व योद्धे सूर्यासन्मुख हात जोडून राहिले व प्रार्थना करूं लागले. व ती प्रार्थना आटोपल्यावर कौरवांनीं आपल्या सैन्याच्या दोन तुकड्या केल्या. एकीचे सेनापति द्रोणाचार्य झाले व दुसरीवर स्वतः दुर्योधन सेनापति झाला. हें पाहून श्रीकृष्णानें अर्जुनाला सांगितलें कीं, 'द्रोणाचार्यांना उजवीकडे घेऊन दुर्योधनादिकांना डावीकडे घाल.' इतक्यांत भीम ह्मणाला, 'तूं या दुर्योधनादिकांनाच उजवीकडे घेऊन त्यांचा पराभव कर व कीर्ति मिळवून आपल्या क्षात्रकुलाचें सार्थक कर.' हें ऐकून अर्जुनानें द्रोणाचार्यांना सोडून दुर्योधनादि मंडळीवरच चाल केली व सर्वांना आपल्या बाणांनीं घायाळ करून सोडलें. आधींच पहाटेची वेळ व त्यांतून अर्जुनाच्या व दुर्योधनादि कौरवांच्या बाणवर्षावांनीं व योद्ध्यांच्या गडबडीनें सर्व समरांगणावर धूळ उठली. त्यामुळें आपला व परका हें सुद्धां ओळखेना. तिकडे म्हणजे समरभूमीच्या उत्तर दिशेला द्रोणाचार्य आपल्या तीक्ष्ण बाणांनीं पांचाल वीरांना दे माय धरणी ठाव करून सोडीत होते. आचार्यांची तप्ताग्निप्रमाणें उज्ज्वल असलेली ती कांति पाहूनच कित्येकांचें धाबें गडबडलें. त्यांच्या त्या असह्य माऱ्यापुढें कोणाच्यानें टिकाव धरवेना.

हें पाहून विराट, द्रुपद व द्रुपदाचे तिघे नातू द्रोणाचार्यांचा समाचार घेण्याकरितां त्यांच्यावर तुटून पडले. पैकीं द्रुपदाच्या नातवांना तर आचार्यांनीं पहिल्या सलामीसरसा एकेका बाणांतच स्वर्ग दाखविला. तें पाहून द्रुपद व विराट यांनीं कौरवसेनापतींवर बऱ्याच निकराचा हल्ला केला. हें पाहून आचार्यांनीं त्या दोघांचींही धनुष्यें तोडून टाकलीं. तरीही न डगमगतां द्रुपद राजानें आचार्यांवर दहा तोमर व विराट राजानें एक तीक्ष्ण धारेची बर्ची फेंकली. आचार्यांनीं यांचे तोमर व बर्ची ह्यांचा आपल्या रुंद फळाच्या बाणांनीं चुराडा केला व दोन भाले फेंकून दोन्ही राजांना यमलोकीं पाठविलें.

राजा द्रुपद, त्याचे तीन नातू व विराट राजा यांचा वध झालेला पाहून धृष्टद्युम्न फारच चवताळला व त्यानें आपल्या सर्व सैनिकांना शपथ घातली कीं, 'आज ज्याच्या हातून द्रोणाचार्य जिवंत सुटतील किंवा द्रोणाचार्यांकडून जो आज पराभव पावेल, त्याचें ब्राह्मणसेवेनें, क्षात्रधर्माचरणानें, व यज्ञयागादिकानें मिळवलेलें आजपर्यंतचें पुण्य नाहींसें होईल.' अशी शपथ घालून पांचालवीर धृष्टद्युम्न हा आपल्या सर्व सैन्यानिशीं वेगानें आचार्यांवर तुटून पडला. त्यासरशीं दुर्योधनादि कौरववीरही अर्जुनाला सोडून आचार्यांच्या रक्षणाला धांवले. धृष्टद्युम्नानें ह्या सर्व कौरवांवर बराच निकराचा हल्ला केला. परंतु ह्या सर्वांनीं जोरानें बाणां-

चा वर्षाव करून तो निष्फळ केला. अशा रीतीनें धृष्टद्युम्नाचें कांहींच चालेना. हें पाहून भीमसेन रागानें स्वतः पुढें होऊन भयंकर गर्जना करीत व चोहोंकडे बाणाचा वर्षाव करीत कौरवसेनेंत घुसला. मागोमाग धृष्टद्युम्नही आपल्या सेनेसह कौरवांवर पुनः तुटून पडला. त्यामुळें कौरवपांडवांचें युद्ध फारच निकरानें चाललें. दोन्ही पक्षांकडील योद्धे एकमेकांच्या सैन्यांत शिरून निकरानें लढत असल्यानें कौरव कोणते व पांडव कोणते हें सुद्धां कांहीं वेळ ओळखूं येईना. त्यामुळें बरेच पांडववीर पांडवांकडूनच कापले गेले. शिवाय आदल्यादिवशीं रात्रभर युद्ध करून दमल्यामुळें व पुनः सकाळींच युद्धाला सुरवात झाल्यामुळें बरेच योद्धे भुकेनें व तहानेनें व्याकुळ होऊन पटापट खालीं पडूं लागले. शंखाचा भयंकर नाद, रणवाद्यांचा गजर, हत्तींची गर्जना, घोड्यांचें खिंकाळणें, धनुष्याचा टणत्कार, वीरांच्या आरोळ्या, रथांचा गडगडाट, घायाळ झालेल्या लोकांच्या किंकाळ्या व तलवारींचा खणखणाट, ह्या सर्वांचा आवाज एकवटल्यामुळें सर्व आकाश दणाणून गेलें होतें. तसेंच हा आवाज ऐकून योद्ध्यांच्या मनांत धैर्य, भीति, राग, शोक, तिरस्कार व आवेश ह्या सर्वांचा प्रादुर्भाव एक समयावच्छेदेंकरूनच होत असे. दोन्ही पक्षांकडील योद्धे मागला पुढला विचार न करितां अगदीं जिवावर उदार होऊन लढत असल्यामुळें त्या समरांगणांत बऱ्याच लोकांचे बळी पडले. घोडे व हत्ती यांच्या रक्तांतून उगम पावून व योद्ध्यांच्या रक्तरूपी ओढ्यांना बरोबर घेऊन, शस्त्ररूपी मत्स्यांनीं व मांसरूपी कर्दमांनीं युक्त अशी रणनदी वीरपुरुषांना परलोकाला घेऊन जाण्याकरितां त्या समरभूमींतून धों धों करीत सपाट्यानें वाहूं लागली. शत्रूंच्या बाणांनीं मरून पडलेले हत्ती, उंट, व घोडे वगैरे वहानें, वीरांचीं हस्तपादादिक अवयवें, मोडून पडलेले रथ, नानाप्रकारचीं शस्त्रास्त्रें व किरीट, कुंडलें, कडीं, पट्टे वगैरे भूषणें ह्या सर्वांची त्या रणभूमीवर एकच गर्दी माजून राहिल्यामुळें योद्ध्यांना व त्यांच्या वाहनांना इकडून तिकडे जाण्याला वाट सुद्धां मिळेना.

अशा रीतीनें दोन्हींकडचे सैनिक एकमेकांचा संहार करीत असतांना द्रोणार्जुनांचें युद्ध जुंपलें होतें. द्रोणाचार्यांनीं अर्जुनाला मारण्याकरितां पुष्कळ प्रयत्न केला, परंतु तो सर्व व्यर्थ गेला. तेव्हां द्रोणांनीं बाकीचा सर्व प्रयत्न सोडून देऊन त्याच्यावर अस्त्रप्रयोग करण्याला सुरवात केली. त्यांनीं वायवास्त्र सोडलें तर ह्यानें पर्वतास्त्र सोडावें, त्यांनीं पर्वतास्त्र सोडलें तर ह्यानें वज्रास्त्र सोडावें, त्यांनीं वज्रास्त्र सोडलें तर ह्यानें इंद्रास्त्र सोडावें, त्यांनीं सर्पास्त्र सोडलें तर ह्यानें गरुडास्त्र सोडावें व त्यांनीं जलास्त्र सोडलें तर ह्यानें अग्न्यस्त्र सोडावें. अशा रीतीनें द्रोणांनीं ह्याच्यावर जें जें अस्त्र सोडलें त्या त्या अस्त्राचा अर्जुनानें आपल्या अस्त्रविद्येच्या प्रभावानें अगदीं फडशा पाडून टाकला. अशा रीतीची आपल्या सच्छिष्याची बुद्धि व शौर्य पाहून द्रोणाचार्यांना फार संतोष झाला व हा आपल्याहीपेक्षां अधिक आहे अशी त्यांची खात्री झाली. ह्यांचें हें अद्भुत युद्ध पहाण्याकरितां आकाशामध्यें देव, गंधर्व, किन्नर, विद्याधर, यक्ष, सिद्ध व मोठमोठे ऋषिजन ह्यांची गर्दी झाली. इतक्यांत द्रोणाचार्यांनीं रागानें अर्जुनावर ब्रह्मास्त्राचा प्रयोग केला. त्याबरोबर सर्व पृथ्वी डळमळूं लागली, वारा तुफान वाहूं लागला, व समुद्र खवळून गेला. हें पाहून सर्व प्राणीमात्र घाबरून गेले. पण इतक्यांत अर्जुनानें उलट ब्रह्मास्त्राचाच प्रयोग करून आचार्यांच्या अस्त्राचें सांत्वन केलें.

नंतर आचार्यांनीं अर्जुनाला सोडून पांचालांवर चाल केली. त्याबरोबर तेही त्यांच्यावर चालून आले. त्यांच्या बाणांच्या तडाख्यानें पांचालवीर पटापट मरून पडूं लागले. दावानलाप्रमाणें हा आमचें सर्वच सेनावन जाळून टाकतो आहे कीं काय असें पांडवांना वाटूं लागलें. अशा रीतीनें सर्व सेना घाबरून गेलेली पाहून श्रीकृष्ण अर्जुनाला ह्मणाला, 'इंद्रादि देवांच्यानें सुद्धां ह्यांना जिंकवणार नाहीं. हे ज्या वेळेस शस्त्र खालीं ठेवतील त्याच वेळेस ह्यांना जिंकतां येईल, म्हणून हे पांडवहो, जेणेंकरून आपल्या सैन्याचा नाश होणार नाहीं अशी कांहीं तरी युक्ति काढा. मग त्यांत थोडासा धर्म सुटला तरी हरकत नाहीं. अश्वत्थामा मेल्यावर मात्र हे युद्ध करणार नाहींत असें मला वाटतें. ह्मणून

कोणीतरी जाऊन त्यांना अश्वत्थामा मेला असें सांगा.' हें श्रीकृष्णाचें बोलणें अर्जुनाला मुळींच आवडलें नाहीं. बाकीच्या पांडवांना मात्र तें आवडलें. ह्याला धर्मराजाची संमति मिळाली, पण पूर्ण संमति मिळाली नाहीं. पांडवांच्या सैन्यांत इंद्रवर्मा नांवाच्या मालवाधिपतीचा अश्वत्थामा नांवाचा एक हत्ती होता. त्याला भीमानें आपल्या गदेनें मारून टाकला. नंतर तोच द्रोणाजवळ जाऊन 'अश्वत्थामा ठार झाला, अश्वत्थामा ठार झाला' असें मोठ्यानें ओरडला. त्याबरोबर आचार्यांचे हातपाय गळाले. पण इतक्यांत त्यांना आपल्या मुलाच्या शौर्याची आठवण झाली. त्यामुळें त्यांना आपल्या मुलाच्या मरणाबद्दल शंका वाटली व थोडासा धीरही आला. त्याबरोबर त्यांनीं पुनः दुप्पट वेगानें धृष्टद्युम्नावर हल्ला केला. तेव्हां एकदम वीस हजार पांचालवीरांनीं त्यांच्यावर बाणांचा मारा करून त्यांना अगदीं झांकून टाकलें. ह्या सर्व बाणांचा फडशा पाडून आचार्यांनीं रागानें त्यांच्या नाशाकरितां ब्रह्मास्त्राचा प्रयोग केला व पुनः बाणांचा वर्षाव करण्याला सुरवात केली. त्याबरोबर कोणाचे हात, कोणाचे पाय, कोणाचें डोकें व कोणाचें सबंध धड तुटून पडूं लागलें. हत्ती व मनुष्य ह्यांचा सारखा नाश होऊं लागल्यामुळें सर्व रणांगणांतून रक्तमांसाचा चिखल होऊन राहिला. ह्या कत्तलीमध्यें एकंदर वीस हजार पांचालरथी, मत्स्यांकडील पांचशें रथी, सृंजयांकडील सहा हजार रथी, दहा हजार हत्ती व दहा हजार घोडीं इतकें सैन्य द्रोणाचार्यांच्या बाणांना बळी पडलें. त्याचप्रमाणें वसुदानाचें शिरही ह्याच कत्तलींत उडालें. द्रोणांनीं चालविलेली ही भयंकर कत्तल पाहून विश्वामित्र, जमदग्नि, भारद्वाज, गौतम व वसिष्ठ वगैरे सर्व ऋषींनीं अग्नीसह येऊन आचार्यांना सांगितलें कीं, 'तूं अधर्मानें युद्ध करीत आहेस. तेव्हां तुझा अंतकाळ जवळ आला आहे. आतां हातांतलें शस्त्र खालीं ठेवून आमच्याकडे पहा. व पुनः असलें क्रूरकर्म करूं नकोस. सर्व वेद व वेदांगें यांचें ज्याला ज्ञान आहे, व जो नेहमीं सत्यधर्मानें वागत आहे अशा सत्वशील ब्राह्मणाला असलें कृत्य शोभत नाहीं. ज्यांना अस्त्रविद्या येत नाहीं अशा मनुष्यांवर तूं अस्त्रप्रयोग केला आहेस. ह्मणून हे द्रोणा, आतां शस्त्र खालीं ठेवून हा अधर्म बंद कर.' हें ऋषींचें भाषण ऐकून व भीमाच्या शब्दाची आठवण होऊन द्रोणाचार्यांना फार वाईट वाटलें. नंतर त्यांनीं अश्वत्थाम्याच्या मरणाबद्दल खरें खोटें समजून घेण्याकरितां युधिष्ठिराला प्रश्न केला. तिन्ही लोकांच्या स्वामित्वाकरितां सुद्धां युधिष्ठिर खोटें बोलणार नाहीं अशी आचार्यांची खात्री होती.

आतां जर युधिष्ठिर खरें सांगेल तर हा ब्राह्मण आतांच्या आतां निष्पांडवी पृथ्वी करील. कधींही सोडणार नाहीं. हें लक्षांत आणून श्रीकृष्ण धर्मराजाला ह्मणाला, 'मी तुला खात्रीनें सांगतों कीं, हा द्रोण जर दोनप्रहरपर्यंत अशाच आवेशानें लढेल तर तुम्हां सर्वांचा नाश करून टाकील. म्हणून ह्यावेळीं खोटें बोलून आमचे प्राण वांचीव. अगदीं जिवाशीं येऊन बेतल्यावर खोटें बोललें असतां दोष नाहीं.' अशा रीतीनें श्रीकृष्ण धर्माला सांगत असतांना भीम मध्येंच म्हणाला, 'द्रोणाचार्यांच्या वधाची युक्ति श्रीकृष्णानें सांगितल्यावर मी मालवाधिपतीच्या अश्वत्थामा नांवाच्या हत्तीला मारून द्रोणाचार्यांच्या जवळ अश्वत्थामा मेला, अश्वत्थामा मेला, असें मोठ्यानें ओरडलों. तरी द्रोणाचार्यांनीं तिकडे लक्षच दिलें नाहीं. त्यांना माझें बोलणें खरेंच वाटलें नाहीं. म्हणून महाराज, आतां श्रीकृष्णाच्या सांगण्याला मान देऊन आपण आचार्यांना अश्वत्थामा मेला असें सांगा. आपण असें सांगितल्यावर ते युद्ध करणार नाहींत. कारण खरें बोलण्याबद्दल आपली तिन्ही लोकांत ख्याती आहे.' हें भीमाचें व श्रीकृष्णाचें भाषण ऐकून राजा धर्मानें भीत भीत होय अश्वत्थामा हत्ती–हत्ती हा शब्द फारच हळूं उच्चारून–मेला असें सांगितलें. त्यबरोबर धर्मराजाचा रथ जो हा वेळपर्यंत पृथ्वीपासून चार बोटें वर अंतराळीं रहात असे, तो ह्या खोटें बोलण्यापासून इतरांप्रमाणें जमिनीलाच चिकटून राहूं लागला.

इकडे युधिष्ठिराच्या तोंडचे हे शब्द ऐकिल्याबरोबर द्रोणाचार्यांचे हातपाय गळले. ते पुत्रशोकानें स्वतःच्या जीविताबद्दल सुद्धां निराश झाले. 'आपण पांडवांचे फार अपराधी आहों. पुत्रवधाची वार्ता समजल्यावरही आपण ऋषींचें बोलणें ऐकलें नाहीं हें फार वाईट केलें.' असें त्यांना वाटूं लाग-

लें. याप्रमाणें पुत्रशोकानें त्यांचें मन उद्विग्न झाल्यामुळें धृष्टद्युम्न त्यांच्या पुढेंच उभा होता तरी ही त्यांच्यानें त्याच्याशीं युद्ध करवेना.

हें पाहून, द्रुपदराजानें यज्ञ करून मुद्दाम द्रोणाचार्यांच्या वधाकरितां अग्नीपासून मिळविलेला धृष्टद्युम्न, ज्याची दोरी बळकट असून त्यांतून मेघगर्जनेप्रमाणें गंभीर आवाज निघत होता, ज्याची कमान विजेप्रमाणें तेजस्वी होती व ज्याचे बाण वज्रासारखे बळकट होते, असें धनुष्य सज्ज करून द्रोणाचार्यांच्या वधाकरितां त्यांच्यावर चालून आला. तेव्हां सर्व सैनिकांना व स्वतः भारद्वाजांनाही आपला अंतकाळ जवळ आला आहे असें वाटूं लागलें. तरी तसेंच नेटानें आचार्य धृष्टद्युम्नाचें निवारण करण्याकरितां उठले. पण त्यांच्या मंत्रांना अस्त्र सिद्ध होईनात व ज्या भात्यानें सबंध चार दिवस व एक रात्र बाण पुरविले तोच भाता आतां एक प्रहरभर दिवस आला नाहीं तोंच अगदीं रिकामा पडला. आधींच पुत्रशोकानें हातपाय गळालेले, त्यांतच हा शस्त्रादिकांचा अभाव व ऋषींचीं शस्त्रें खालीं ठेवण्याबद्दल आज्ञा, हें सर्व पाहून आचार्यांची छातीच दडपली. शस्त्रें टाकून देऊन स्वस्थ बसावें असेंच त्यांना वाटूं लागलें. नंतर कांहीं वेळानें त्यांची मति बदलली. त्यांनीं आंगिरस नांवाचें धनुष्य हातीं घेऊन धृष्टद्युम्नावर जोरानें मारा चालविला व थोड्याच वेळांत त्याचें धनुष्य तोडून सारथ्याचें डोकें उडविलें. धृष्टद्युम्नानें दुसरें धनुष्य घेऊन नेमकें आचार्यांच्या छातीवरच बाण सोडले. तेव्हां रागाच्या सपाट्यांतच त्यांनीं एकामागून एक अशीं धृष्टद्युम्नाचीं सर्व धनुष्यें तोडून टाकलीं. फक्त त्याच्यापाशीं गदा आणि तलवार मात्र शिल्लक राहिली. तेव्हां धृष्टद्युम्नानें जवळ जाऊन गदेचा प्रहार करावा अशा उद्देशानें आपला रथ पुढें हांकला. त्यामुळें आचार्यांच्या रथाचे घोडे व धृष्टद्युम्नाचे रथाचे घोडे हे एकमेकांत मिसळून गेले. त्याबरोबर बराच गोंधळ उडाला. तेव्हां धृष्टद्युम्नानें गदा उचलून तिला जोर येण्याकरितां गरगर फिरविण्याला आरंभ केला. पण तो ती फेंकणार इतक्यांत आचार्यांनीं तिचे दोन तुकडे केले. लगेच धृष्टद्युम्नानें तलवार घेऊन आपल्या रथाच्या जुवावरून भारद्वाजांच्या रथांत उडी ठोकली. त्याबरोबर ह्याला परत आपल्या रथांत जातां येऊं नये ह्मणून आचार्यांनीं मोठ्या शिताफीनें ह्याचेच तेवढे घोडे मारले. नंतर दोघांचेंही तलवारीनें युद्ध चालूं झालें. मागें पुढें पवित्रे चाळणें, वळसा घेऊन शत्रूला गांठणें, संधि साधेल त्याप्रमाणें आपल्या शत्रूचा डोळा चुकवून त्यावर वार करणें किंवा तलवार खुपसणें, शत्रूला मध्येंच हूल दाखविणें, वार करण्याला जोर येण्याकरितां व शत्रूचा वार चुकविण्याकरितां मानेंभोंवतीं आपली तलवार जोरानें फिरविणें, आपल्या अंगाभोंवतीं आपली तलवार फिरवून शत्रूच्या वाराची युक्तीनें पत करणें, ह्या व अशाच प्रकारच्या दुसऱ्या पेंचांत दोघेही चांगले निष्णात असल्यामुळें समरांगणांतील योद्ध्यांना तलवारीच्या युद्धांत कसब ह्मणून जें आहे तें सर्व पूर्ण रीतीनें पहावयाला सांपडलें. अशा रीतीनें कांहीं वेळ ही तलवारीची खणाखणी झाल्यावर आचार्यांनीं एकदम वैतस्तिक नांवाच्या बाणांचा वर्षाव करून आपल्या प्रतिपक्षाची ढाल व तलवार हीं दोन्ही तोडून टाकलीं, आणि तसलाच एक तीक्ष्ण बाण घेऊन धृष्टद्युम्नावर नेम धरला. हा बाण सुटला असता तर धृष्टद्युम्न ठारच झाला असता. पण सात्यकीनें चलाखी करून तो बाण मध्येंच तोडून टाकला. अशा रीतीनें कृपाचार्य व कर्ण ह्यांच्या देखत, द्रोणांच्या कचाट्यांत सांपडलेल्या धृष्टद्युम्नाला, सात्यकीनें मोठ्या शिताफीनें सोडविलेला पाहून कृष्णार्जुनांना व सर्व पांडवांना अतिशय हर्ष झाला. त्यामुळें ते 'शाबास, सात्यके शाबास,' असें मोठ्यानें ओरडले.

पण कौरवांना हें सहन न होऊन, दुर्योधन, कृपाचार्य व कर्ण वगैरे मंडळी एकदम सात्यकीवर तुटून पडली. हें पाहून युधिष्ठिर, भीम, नकुल, सहदेव वगैरे मंडळी ही सात्यकीच्या मदतीला धांवली. त्यामुळें प्रळयकाळच्या रुद्राच्या संहाराप्रमाणें त्या रणभूमीवर योद्धे, हत्ती, घोडे वगैरेंचा संहार होऊं लागला. अशा रीतीनें चहूंकडे भयंकर कचल चालली असतां युधिष्ठिराच्या आज्ञेवरून सर्व सृंजय वीर द्रोणाचार्यांवर तुटून पडले. त्यासरशीं आचार्यही मरणाच्या निश्चयानें पांडवसैन्यांत घुसले. त्याबरोबर पृथ्वी डळमळूं लागली, वादळ सुटलें; व उ-

ल्कापात झाला. त्याचप्रमाणें आचार्यांच्या शस्त्रांतून ठिणग्या पडूं लागल्या, रथांतून भयंकर आवाज निघूं लागले, घोड्यांच्या डोळ्यांतून पाणी येऊं लागलें, द्रोणांचा डावा डोळा व डावा बाहु स्फुरण पावूं लागला, मन उदास भासूं लागलें व हातपाय लटपटूं लागले. तरी त्यांनीं तसाच धीर धरून युद्धाला प्रारंभ केला. व सपाट्यासरशीं वीस हजार योद्धे व एक लक्ष हत्ती, यांची कत्तल केली.

इकडे भीमानें शस्त्रहीन व रथहीन झालेल्या धृष्टद्युम्नाला आपल्या रथांत घेऊन त्याला सांगितलें कीं, तुझ्यावांचून आचार्यांशीं युद्ध करण्याला कोणी धजत नाहीं. ह्मणून जलदी करून त्यांना तेवढें स्वर्गीं पाठीव. सर्व भार तुजवरच आहे. ' हें ऐकून धृष्टद्युम्न वेगानें आचार्यांवर तुटून पडला. त्यानें कौरव, बाल्हीक व शिबी वगैरे जे जे वीर आचार्यांच्या रक्षणाला उभे होते त्या सर्वांना जर्जर करून प्रत्यक्ष आचार्यांवरही जोराचा मारा केला. सूर्य ज्याप्रमाणें आपल्या प्रखर किरणांचा प्रभाव चहूंकडे सारखा पाडतो त्याप्रमाणें हा आपल्या हस्तलाघवानें सर्वांवर सारखा बाणांचा मारा करीत होता. पण इतक्यांत आचार्यांनीं याच्या सर्व बाणांचा फडशा पाडून, यालाही घायाळ केलें. त्यामुळें धृष्टद्युम्नाला बऱ्याच वेदना होऊं लागल्या. हें पाहून भीम रागानें आचार्यांकडे गेला व त्यांच्या रथाला घट्ट धरून त्यांना ह्मणाला, ' आपल्या वर्णाश्रमधर्माचा त्याग करणाऱ्या तुमच्यासारख्या ब्राह्मणांनीं जर युद्ध केलें नाहीं तर या जगांतील सर्व क्षात्र तेज नाहींसें होतें असें मुळींच नाहीं. सर्व धर्मांमध्यें अहिंसा ही अति उच्च गणली आहे. त्या अहिंसेचें मुख्य बीज ह्मणजे ब्राह्मण होत. त्यांतून आपण तर ज्ञाते ब्राह्मण आहां, असें असून आपण एखाद्या क्रूर व मतिमंद चांडाळाप्रमाणें पुत्र, दारा व धन यांच्याकरितां कोट्यावधि लोकांचे गळे कापीत आहां. जे आपण आपल्या मुलाच्या एका जिवाकरितां स्वधर्मानें वागणाऱ्या अशा ह्या शेंकडों शूर क्षत्रियांचा संहार करीत अहां त्या आपल्या मनाला ह्या असल्या घोर कर्माबद्दल थोडीसुद्धां वाईट तरी कसें वाटत नाहीं ? बरें, ज्यामुळें आपण सुखानें कालक्रमणा करीत आहां व ज्याच्याकरितां हातीं हें शस्त्र घेतलें आहे तो तुमचा मुलगा तर गतप्राण होऊन अनाथाप्रमाणें जमिनीवर लोळत पडला आहे. राजा धर्मानें तुह्मांला सांगितलें असून तुमचा त्याच्या शब्दावर विश्वास बसत नाहीं. धर्मराजाच्या बोलण्याचा अविश्वास धरणें हें बरें नव्हे. ' असें भीमानें सांगितल्याबरोबर आचार्यांनीं धनुष्य खालीं फेंकून देऊन कर्ण, कृपाचार्य व दुर्योधन यांना हाक मारून सांगितलें कीं, ' धीर धरा व शौर्यानें लढा. हेंच मी तुह्मांला पुनः पुनः सांगतों. ईश्वर तुमचें कल्याण करो व तुह्मांला जय मिळो. मी आतां शस्त्र खालीं ठेवितों. ' असें ह्मणून द्रोणाचार्यांनीं अश्वत्थाम्याबद्दल शोक करीत करीत शस्त्र खालीं ठेविलें; व एकाग्र मन करून ताठ बसून, हनुवटी उराला लावून ॐकारस्वरूपी परमात्म्याचें ध्यान करून ज्योतीला ज्योती मिळवून दिली. त्या वेळचें आचार्यांचें तेज प्रतिसूर्याप्रमाणें प्रखर होतें. ह्यांचा जीवात्मा तेजोमय होऊन परब्रह्माशीं लीन होतांना श्रीकृष्ण, संजय, अश्वत्थामा, अर्जुन, व धर्मराज ह्या पांचजणांनाच दिसला; बाकी कोणालाही दिसला नाहीं. पण त्यांना शस्त्रहीन पाहून मात्र सर्व सैन्यांत एकच कोलाहाल झाला.

इतक्यांत धृष्टद्युम्नानें विजेसारखी चकाकणारी अशी तीक्ष्ण धारेची तलवार घेऊन आचार्यांच्या रथावर उडी ठोकली; व सर्वजण ' नको, नको ' ह्मणत असतां व प्रत्यक्ष अर्जुनही ' नको, नको ' ह्मणून ओरडत असतांना, पंचाऐशीं वर्षांचे वृद्ध पण सोळा वर्षांच्या तरुणाप्रमाणें शूर व चलाख अशा आचार्यांचें टक्कल पडलेलें पांढऱ्या केसांचें डोकें, झट्दिशीं धडापासून वेगळें केलें; आणि मोठ्यानें सिंहगर्जना केली. त्याबरोबर भीमानें त्याला आलिंगन दिलें व दोघेही त्या रणभूमीवर आनंदानें नाचूं लागले. त्याप्रमाणें सर्व पांडवांनींही जयघोष करून आनंदानें रणवाद्यें वाजविलीं. व भीमानें दंड ठोकून त्या आवाजानें सर्व समरांगण दणाणून टाकलें.

## ४५ अश्वत्थाम्याचें नारायणास्त्र.

( ७. १९३—२०२ )

याप्रमाणें आचार्यांच्या मरणानें पांडवसेनेंत आ-

नंद झाला खरा, पण कौरवसेनेंत फारच हाहाकार उडाला. सर्वांच्या डोळ्यांतून एकदम दुःखाश्रूंचे लोट चालले. त्यांचे हातपाय लटपटले; एक पाऊल ठेवण्या इतकी सुद्धां शक्ति व उत्साह हीं राहिलीं नाहींत. सर्व वीर मोठ्यानें गळा काढून रडूं लागले. दोन दिवस अन्नपाणी न मिळाल्यामुळें आधींच ते तहानेनें व भुकेनें व्याकूळ झाले होते, त्यांतून सर्वांगावर वार, शिवाय हा दुःखांचा डोंगर कोसळलेला, त्यामुळें त्यांची फारच त्रेधा उडून गेली. सूर्य जसा आकाशांतून खालीं पडावा किंवा समुद्र आटून कोरडा ठणठणीत व्हावा त्याप्रमाणें कधीं न होणारी गोष्ट आज झाल्यामुळें दुर्योधनासारख्या धैर्यशाली पुरुषाचीही छाती फाटून गेली; व तो भयानें रणांगणांतून पळूं लागला. त्यावरोबर शल्य, कृपाचार्य शकुनि व दुःशासन वगैरे शूर वीरही आपापल्या सैन्यानिशीं पळूं लागले. आचार्यांच्या मरणानें सर्व कौरववीर इतके भांबावून गेले कीं, तें आपल्या हातांतलीं शस्त्रें व कवच हीं फेंकून देऊन पळूं लागले. रथी तर रथ टाकून देऊन नुसत्या घोड्यांवरूनच पळूं लागले. मागें राहिलेले लोक पुढें चाचलेल्यांना मागून शत्रूंचा हल्ला आल्यास एकमेकांला मदत होईल या आशयानें ' थांबा, थांबा, ' ह्मणून मोठ्यानें आरोळ्या देत होते; पण पुढें गेलेले लोक पळूं तेवढी भुई थोडी असें मानून त्यांच्या आरोळ्यांना हांक न देतां भीतीनें तसेंच पुढें पळत होते. मामा भाच्यांची, मुलगा आपल्या बापाची किंवा बाप आपल्या मुलाची व भाऊ भावाची काळजी न करितां ज्याचा तो जीव बचावण्याकरितां वाट फुटेल तिकडे पळत होता.

अशा रीतीनें सर्व लोक भयानें पळत होते तरी इकडे अश्वत्थामा शिखंडी वगैरे योद्ध्यांशीं तसाच निकरानें लढत होता. त्याच्यावर चालून आलेल्या पांडवसेनेचा फडशा पाडून तो मागें वळून पाहूं लागला तों आपले सर्व लोक पळताहेत असें त्याला दिसून आलें. तेव्हां तो दुर्योधनाकडे जाऊन ह्मणाला, ' भ्याल्यासारखी ही सेना पळत कां सुटली आहे ? आणि तूं तिला आवरीत कां नाहींस ? पण तुझाही धीर खचल्यासारखाच दिसतो. व कर्ण वगैरे मंडळीचीही धांदलच उडालेली दिसते. आजपर्यंत इतकीं युद्धें झालीं पण अशा रीतीनें लोक कधींच पळत नव्हते ! सर्व खुशाल आहेत ना ? कां एखादा रणसिंह नाहींसा झाला ? ' अश्वत्थाम्याला पाहून राजा दुर्योधनाचा कंठ दाटून आला. डोळे पाण्यानें भरून आले. त्याच्यानें कांहींच बोलवेना. ह्मणून त्यानें मोठ्या कष्टानें, जवळच उभे असलेल्या कृपाचार्यांना अश्वत्थाम्याला सर्व हकीकत सांगण्याबद्दल विनंती केली. त्यावरून कृपाचार्यांनीं मोठ्या दुःखानें झालेली सर्व हकीकत सांगितली.

त्याबरोबर अश्वत्थामा लाथ लागलेल्या सापाप्रमाणें फुसफुसूं लागला. करकर दांत खाऊं लागला. हात चोळूं लागला व पाय हापटूं लागला. शिवाय पितृवियोगानें त्याच्या डोळ्यांतून अश्रुधारा चालल्या. तसेंच डोळे पुशीत पुशीत तो रागानें दुर्योधनाला ह्मणाला, 'या नीचांनीं माझ्या तातांना कोणच्या रीतीनें मारलें हें सर्व कळलें. त्याचप्रमाणें ह्या धर्माचा टेंभा मिरविणाऱ्या धर्माचें पापकृत्य समजलें. युद्धांत आलेल्यांना जय किंवा अपजय त्यांपैकीं कांहीं तरी एक येणारच. त्यांतून मरण येणें हें फार चांगलें. धर्मानें युद्ध करीत करीत मेलेल्यांना सद्गतीच मिळते. त्याप्रमाणें माझे वडीलही सद्गतीला गेले आहेत. ते लढाईंत मेले याबद्दल मला मुळींच वाईट वाटत नाहीं. सर्व राजे लोकांच्या देखत शत्रूनें त्यांची शेंडी धरून मान कापली हें ऐकून मात्र माझें काळीज तुटतें. जशीं जे कर्मं करतात तशीं ते फळें भोगतात. त्याचप्रमाणें ह्या दुरात्म्या धृष्टद्युम्नानें हें महत् अघोर कर्म केलें आहे. आतां त्याला त्याचें फळही तसेंच मिळेल. तसेंच ह्या धर्मानेंही असत्य बोलून आपल्या आचार्यांना फसविलें; व त्यांच्याकडून शस्त्र ठेवावयाला लावलें. ह्या त्याच्या पातकाबद्दल त्याला लौकरच परलोकचा रस्ता सुधारावा लागेल. हे कुरुश्रेष्ठा, मी आतां तुला शपथपूर्वक सांगतों कीं, ह्या धृष्टद्युम्नाला ठार केल्याशिवाय जिवंत रहाणें हें माझ्यानें कधींच होणार नाहीं. मी जिवंत असतांना शत्रूनें माझ्या तातांची, माझ्या आचार्यांची, शेंडी धरली तेव्हां धिक्कार असो ह्या माझ्या पुत्रत्वाला, ह्या माझ्या शिष्यत्वाला व ह्या माझ्या क्षात्रविद्येला ! मी जेणेंकरून आतां माझ्या स्वर्गस्थ वडिलांच्या ऋणां-

तून मुक्त होईन असेंच कर्म करीन. शहाण्यानें आपली स्तुति कधींही करूं नये; परंतु हा अपमान मला सहन होत नाहीं ह्मणून मी आपला पराक्रम वारंवार सांगत आहें. ह्या लोकांमध्यें मजवांचून व अर्जुनावांचून अस्त्रविद्यासंपन्न असा कोणीच नाहीं. पण आज मी ज्या अस्त्राचा प्रयोग करणार आहें तें अस्त्र कोणालाच माहीत नाहीं; अर्जुनाला नाहीं, भीमाला नाहीं, सात्यकीला नाहीं, फार काय पण प्रत्यक्ष श्रीकृष्णाला सुद्धां माहीत नाहीं. भगवान नारायणानें प्रसन्न होऊन माझ्या वडिलांना तें अस्त्र दिलें, व त्यांच्यापासून मला प्राप्त झालें. हें अस्त्र इतकें दिव्य आहे कीं, हें अस्त्र देतांनाच भगवान नारायणानें, ‘ ह्या अस्त्रप्रभावानें तूं समरांगणांत अत्यंत तेजःपुंज दिसशील. अगदीं अवध्य अशा योद्ध्यांनाही हें अस्त्र ठार करील. कोणालाही ह्याची तोड कळणार नाहीं. हें अस्त्र विफळ कधींही व्हावयाचें नाहीं. शिवाय ह्याच्यावर कोणत्याही अस्त्राचा प्रभाव चालणार नाहीं. ह्मणून तूं सहसा ह्याचा प्रयोग करूं नकोस. ’ असें माझ्या वडिलांना सांगितलें. ह्मणून तुला सत्य सत्य सांगतों कीं, मी ह्या अस्त्रप्रभावानें सर्व पांडवांचा पराभव करून त्यांच्या देखत ह्या धृष्टद्युम्नाला, ब्रह्मघातकी, मित्रघातकी व गुरुद्रोही अशा ह्या अधमाधमाला, आज यमलोकीं पाठवितों.’

असें अश्वत्थाम्यानें सांगितल्याबरोबर सर्वांना धीर आला. दुर्योधनादिकांनीं आनंदानें सिंहगर्जना केली; व रणवाद्यें वाजूं लागलीं. त्याबरोबर पळत सुटलेल्या लोकांना थोडासा धीर आला व ते परतूं लागले. रथांचा घडघडाट, योद्ध्यांच्या आरोळ्या, रणवाद्यांचा गजर, घोड्यांच्या टापांचा टप्टप् असा अवाज, हत्तींच्या घांटांचा घणघणाट, दुर्योधनादिकांच्या गंभीर गर्जना व शंखनाद ह्यांनीं सर्व पृथ्वी दणाणून गेली.

तेव्हां धर्मराज अर्जुनाला म्हणाला, ‘ आचार्यांच्या मरणानें घाबरून जे लोक आपला जीव वांचविण्यासाठीं वाट फुटेल तिकडे सैरावैरा पळत होते, तेच लोक आतां आनंदानें जयघोष करूं लागले आहेत; त्यांच्यांत रणवाद्यांचा गजर चालला आहे, घोडे खिंकाळूं लागले आहेत व योद्धे मोठ्यानें सिंहनाद करीत आहेत. तेव्हां त्यांना कोणी तरी धीर देऊन परतविलें आहे खास. अर्जुना, कोणत्या महारथ्यानें ह्यांना धीर देऊन आमच्यावर उलट चालून येण्याची तयारी केली आहे हें तुला माहीत असेल तर सांग. ह्यांच्या ह्या गंभीर गर्जना ऐकून हे आतां तिन्ही लोकांचा फडशा पाडतील असें वाटतें. ’ हें ऐकून अर्जुन म्हणाला, ‘जो जन्माला आल्याबरोबर द्रोणाचार्यांनीं आनंदानें आपल्या सर्वस्वाचें दान केलें, तो अश्वत्थामा आपल्या पित्याच्या अपमानामुळें व वधामुळें क्रुद्ध होऊन आमच्यावर चाल करून येत आहे. महाराज, आपण अगदीं खरें बोलणारे आहां अशा भरंवशानें आचार्य आपल्याकडे आले असतांना आपण राज्यलोभानें केवळ सत्याचा भास दाखवून त्यांना फसविलें, ह्याबद्दल तिन्ही लोकांत आपली अपकीर्ति दुमदुमून राहील. पुत्रशोकानें विव्हल होऊन शस्त्र खालीं ठेवून बसलेल्या आचार्यांचा धृष्टद्युम्नाकडून वध करविलात, आतां त्याचें रक्षणही आपणच करा. आमच्या कोणाच्या हातून त्याचें रक्षण होणार नाहीं. हा अर्जुन माझ्याकरितां आपलें राज्य, बायका, पोरें व भाऊ वगैरे सर्वस्वाचा त्याग करील अशी ज्या आचार्यांची पक्की खात्री होती त्या आचार्यांचा त्या माझ्या शस्त्रहीन अशा प्रिय गुरूंचा, वध चालला असतांना मी त्याची उपेक्षा केली तेव्हां आतां मला नरकावांचून दुसरी गति ती काय मिळणार आहे ? अशा स्थितींत जगण्यापेक्षां मरावें हेंच बरें ! ’ हें ऐकून भीमाला फारच राग आला. तो अर्जुनाला चीड येईल अशा रीतीनें ह्मणाला कीं,‘आपल्या बाहुबलानें अधर्माचा उच्छेद करून दुःखीजनांचें रक्षण करणाऱ्या शूर क्षत्रियकुलामध्यें जन्म घेऊन, कंद, मूळ, फळें ह्यांवर निर्वाह करणाऱ्या मुनिवेषधारी ब्राह्मणाप्रमाणें मऊ, मऊ भाषण करतोस हें तुला शोभत नाहीं. अंगांत इंद्राप्रमाणें पराक्रम असूनही ज्यांच्यामुळें तेरा वर्षें वनवास भोगावा लागला व नानाप्रकारचे हाल सोसावे लागले त्या कौरवांबद्दल अद्याप तुझ्या अंतःकरणांत क्षमाच वसत आहे, तेव्हां तुझी धन्य आहे ! अधर्मानें आमचें राज्य हरण केलें, साध्वी द्रौपदीचा भरसभेंत छळ केला, आम्हांला वल्कलें नेसावयाला लाविलीं, ह्या सर्व गोष्टी मीं सहन केल्या. असें अ-

सून केवळ खोटें बोललों ह्मणून-कोट्यावधि लोकांचे प्राण वांचविण्याकरितां खोटें बोललों ह्मणून-तूं आमची निंदा करतोस अं? तुझ्याच सांगण्यावरून आम्ही युद्धाला आलों व आमची शिकस्त करून युद्ध करतों. तेव्हां तूं आमच्या कर्तबगारीबद्दल आमची पाठ थोपटावीस व आम्हांला शाबासकी द्यावीस, तें सोडून उलट आमच्याच दुःखावर डाग देतोस व माझ्या हातून तुमचें संरक्षण होणार नाहीं असें सांगतोस? जो तुझ्या पासंगालाही लागणार नाहीं अशा अश्वत्थाम्याची श्रीकृष्णाच्या देखत स्तुति करीत आहेस व आपल्या स्वतःच्या दोषांचें आविष्करण करीत आहेस ह्याबद्दल तुला लाज तरी कशी वाटत नाहीं? हे महाबाहो धनंजया, एका गदेच्या तडाक्यासरशीं इंद्रादि देवगणांनाही पळवून लावणारा असा माझ्यासारखा महाबलाढ्य तुझा भाऊ असतांना त्या अश्वत्थाम्याची भीति बाळगणें हें तुला बरोबर नाहीं. नाहींतर हे अर्जुना, तूं आपल्या सर्व भावांना घेऊन स्वस्थ रहा. मी एकटाच आपली गदा घेऊन अश्वत्थाम्याशीं टक्कर देतों व त्याचा पराभव करतों.' नंतर धृष्टद्युम्न अर्जुनाला ह्मणाला, 'हे बीभत्सो, यज्ञ करणें व करविणें, दान देणें व घेणें, वेदाध्ययन करणें व करविणें अशीं ब्राह्मणांचीं सहा कर्में आहेत. ह्यापैकीं कोणतें बरें कर्म आचार्यांनीं केलें, ह्मणून त्यांना ब्राह्मण ह्मणावयाचें? ज्यांनीं आपल्या श्रेष्ठधर्माचा त्याग करून क्षात्रधर्माचा स्वीकार केला व त्यांतही अमानुष कर्में केलीं, अशा ब्राह्मणाधमाला मीं ठार केलें, ह्यांत अयोग्य तें काय झालें? अश्वत्थाम्यानें आपल्या बापाच्या वधाबद्दल रागानें ह्याच्याहीपेक्षां गंभीर गर्जना केली किंवा आणखी एवढ्या कौरवांचें आमच्या बाणांना बळी दिलें ह्मणून माझें काय नुकसान होणार आहे? माझा जन्मच जर आचार्यांच्या वधाकरितां झालेला आहे तर मग माझ्या हातून अधर्म झाला असें कसें ह्मणतोस? युद्धामध्यें ज्याला धर्म किंवा अधर्म ह्याचा मुळींच विधिनिषेध नाहीं त्याला ब्राह्मण किंवा क्षत्रिय तरी कसें ह्मणावें? ज्यांना अस्त्रज्ञान मुळींच नाहीं अशा कोट्यावधि लोकांचा संहार ज्यानें ब्रह्मास्त्र सोडून केला अशा अधर्म्याला मारूं नये तर काय करावें? तुझ्यासारख्या धर्मज्ञानें ह्याबद्दल माझी स्तुति करावी तें सोडून तूं उलट माझी निंदा करतोस! ज्यानें माझ्या देखत माझ्या मुलांना व भावांना ठार मारलें, त्याचें डोकें कापूनही माझ्या मनाचें समाधान झालें नाहीं. जयद्रथाप्रमाणें त्याचेंही डोकें भिल्लांच्या प्रदेशांत मीं टाकलें नाहीं ह्याबद्दलच मला फार वाईट वाटतें. क्षत्रियानें आपल्या शत्रूला न मारणें हाच अधर्म आहे व मारणें हा धर्म आहे. तूं पितामह भीष्माचार्य यांना मारलेंस हा धर्मच झाला व मी आपल्या शत्रूला मारलें हा मात्र अधर्म झाला! असो. अर्जुना, दुसऱ्या कशाकरितां नाहीं पण द्रौपदी व तिचीं मुलें ह्यांच्याकरितां मी तुला या तुझ्या फाजील बोलण्याबद्दल क्षमा करतों. आचार्यांचें व आमचें वैर हें वंशपरंपरेचें आहे, आणि हें सर्वांना माहीत आहे; पण तुम्हां पांडवांना मात्र माहीत नाहीं. धर्मराज खोटा नाहीं किंवा मीही अधर्मी नाहीं. शिष्यद्रोही अशा पाप्याचा वध झाला. आतां तूं धैर्यानें युद्ध कर. तुझा जयच होईल.' द्रुपदपुत्राचें हें भाषण ऐकून सर्व राजे गप्प बसले. अर्जुनाच्या डोळ्यांतून अश्रुधारा वाहूं लागल्या. तो 'धिःकार धिःकार' असें ह्मणून धृष्टद्युम्नाकडे करड्या नजरेनें पाहूं लागला. धर्म, भीम व नकुलसहदेव हेही लज्जित होऊन खालीं पाहूं लागले. पण सात्यकीला हें सहन न होऊन तो म्हणाला कीं, 'अशा तऱ्हेचें अभद्र भाषण करणाऱ्या ह्या नराधमाला मारील असा कोणी येथें नाहीं काय? असलें अघोर कर्म केल्याबद्दल सज्जन लोक तुझी निंदा करीत असतांना तूंच त्यांना उलट बोलतोस तेव्हां तुला लाज नाहीं कां वाटत? नीचा, गुरुघातक्या, ह्या तुझ्या पापकृत्याबद्दल तुझी जीभ तरी कशी झडत नाहीं? किंवा मस्तकाच्या चिंधड्या कां होत नाहींत? आपण अपराध करून पुनः गुरूचीच निंदा करतोस? तुला आतांच्या आतां ठारच केला पाहिजे. आपल्या स्वतःच्या सद्गुरूची शेंडी धरून मान कापणारा तुझ्यासारखा नराधम ह्या जगतीतलावर कोणीच नसेल. तुझ्यासारखा कुलांगार पोटीं आल्यामुळें तुझ्या सात पिढ्यांतील पूर्वज तुझ्या ह्या पातकामुळें त्यांची सर्व पुण्याई नष्ट होऊन आज नरकांत लोळत पडले आहेत. भीष्माचार्यां-

च्या वधाबद्दल तूं अर्जुनांना बोललास, परंतु त्यांत त्यांचा दोष मुळींच नाहीं. पितामहांनीं स्वतःच आपला वध कोणत्या रीतीनें व्हावयाचा हें ठरविलें होतें. शिवाय त्यांना मारलें ते तुझ्या भावानेंच. पांचालपुत्राशिवाय असलें पापकर्म करणारा कोणी मिळावयाचा नाहीं. त्यालाही तुझ्या बापानें त्या महात्म्यांच्या वधाकरितांच निर्माण केलें !! पांचालांची जातच मित्रद्रोही, गुरुघातकी, व अधर्मी अशी आहे. नीचा, तुझ्या ब्रह्मघातक्याच्या दर्शनानें होणाऱ्या पातकाच्या प्रायश्चित्तासाठीं सर्व लोक तुझें दर्शन होण्याबरोबर सूर्यदर्शन घेतात. निर्लज्जा, पांचालका, माझ्या गुरूंच्याही गुरूंची निंदा करितोस, पुन्हा जर असलीं नीच उत्तरें मजपुढें देशील तर ह्याच गदेनें मी तुझें डोकें ठेचीन. कधीं सोडणार नाहीं.' अशा रीतीनें सात्यकीनें केलेली निर्भर्त्सना ऐकून धृष्टद्युम्न फारच रागावला; पण तो हांसत हांसतच सात्यकीला ह्मणाला, ' सात्यके, तुझ्या तोंडांतून मीं बराच वेळ निंदा ऐकली. पण तुला पुनः क्षमा करतों. दुष्ट असे अनार्य लोक नेहमीं सत्पुरुषांची निंदाच करीत असतात. **क्षमा करणें हें चांगलें आहे खरें, पण दुर्जनांला क्षमा करून उपयोगी नाहीं. क्षमावान मनुष्य आपणाला भ्याला असें तो समजतो.** तूं स्वतःच अगदीं नखशिखांत दोषमय असून उलट माझीच निंदा करतोस. अर्जुनानें ज्याचे दोन्ही हात तोडले आहेत असा भूरिश्रवा प्रायोपवेशन करून ध्यानस्थ बसला असतां तूं त्याचें डोकें उडविलेंस. आतां ह्याच्यापेक्षां अधिक पाप तें कसलें आहे? माझ्या अस्त्रप्रहारानें मूर्च्छा आली ह्मणून द्रोणांनीं शस्त्र खालीं ठेविलें. ही संधि गांठून मीं त्यांचा शिरच्छेद केला. क्रूरा, ह्यांत माझ्या हातून अधर्म तो कोणता झाला? पुनः जर असें कमीजास्त बोलशील तर तुला कृतांताचा आश्रय करावा लागेल. बरें तें असो. पण मूर्खा, केवळ धर्मानेंच वागून सर्व गोष्टी होत नसतात. कौरवांनीं सुद्धां पुष्कळ अधर्म केला आहे. अन्यायानें द्यूत खेळून राजा धर्माला फसविला. विनाकारण साध्वी द्रौपदीचा भर सभेंत छळ केला. पांडवांच्या सर्वस्वाचा अपहार करून त्यांना त्यांच्या धर्मपत्नीसह वनवासाला धाडलें. शल्यालाही फसवूनच आपल्याकडे घेतला. अगदीं साहाय्यहीन, शस्त्रहीन अशा बाळ अभिमन्यूचा वध ह्याच कर्णद्रोणादि सहाजणांनीं मिळून केला. त्याचप्रमाणें अर्जुनानें भीष्माचार्यांना अधर्मानेंच मारलें. शिवाय तूं एवढा धर्मवेत्ता ह्मणवितोस पण तूंही भूरिश्रव्याला अधर्मानेंच मारलेंस. ह्याप्रमाणें दुर्योधनादि कौरवांनीं व पांडवांसारख्या धर्मज्ञांनींही जयाच्या आशेनें पुष्कळ अधर्म केला आहे. धर्म काय व अधर्म काय हें कळणें फार कठिण आहे. ह्मणून तूं त्याच्या भानगडींत पडूं नकोस व व्यर्थ आपल्या प्राणालाही मुकूं नकोस. मुकाट्यानें कौरवांबरोबर युद्ध कर. ' हें ऐकून सात्यकीचे डोळे लाल झाले. तो रागानें थर थर कांपूं लागला व सापासारखा फुसफुसूं लागला. ' तुला आतां कमीजास्त बोलत नाहीं. पण ठारच करतों ' असें ह्मणून सात्यकीनें हातांतलें धनुष्य ठेविलें व गदा घेऊन धृष्टद्युम्नावर एकदम वाघाप्रमाणें उडी मारली. हे दोघेही काळपुरुष एकमेकांला भिडणार इतक्यांत श्रीकृष्णानें खूण केल्यावरून भीमानें झट्दिशीं आपल्या रथांतून उडी टाकली व सात्यकीला ओढून धरलें. इतक्यांत सहदेवानें अति मधुर शब्दांनीं त्यांचें समाधान केलें. परंतु त्यांचा राग आवरेना, व ते एकमेकांवर धांवून जाण्याचा यत्न करीत आहेत हें पाहून श्रीकृष्ण, धर्मराज व अर्जुन ह्यांनीं येऊन त्या दोघांचीही समजूत केली.

ह्यांचा हा अशा रीतीनें आपसांत तंटा चालला असतांना इकडे अश्वत्थाम्यानें डोळ्यांना पाणी लावून शुचिर्भूत होऊन नारायणास्त्राचा पांडवांवर प्रयोग केला. त्याबरोबर बाण, भाले, बर्च्या, शूल, गुर्दे, मुसळ, फरश्या, व तलवारी वगैरे हत्यारें पांडवांवर येऊन पडूं लागलीं. पांडवांनीं आपली होती नव्हती तेवढी शक्ति खर्च केली; पण त्याचा कांहींच उपयोग झाला नाहीं. ते जसजसें नेटानें युद्ध करीत तसे तसे त्यांचे अधिकाधिकच लोक गारद होऊं लागले. हें पाहून राजा धर्म अगदीं बाबरून गेला. तो ह्मणाला, 'धृष्टद्युम्ना, तूं आपल्या सर्व पांचालांसह येथून लौकर निघून जा. सात्यके, तूंही आपले लोक घेऊन येथून पळ काढ. श्रीकृष्ण आपल्या स्वतःच्या रक्षणापुरता समर्थ आहे. तो दुसऱ्यांना युक्त्या सांगतो. मग त्याचें स्वतःचें रक्षण करणें त्याला काय

अवघड आहे ? मी तुह्मां सर्वांना सांगतों कीं आतां तुह्मी युद्धाच्या नादीं लागूं नका. मीही आपल्या सर्व भावांसहवर्तमान चितेमध्यें प्रवेश करतों. भीष्मद्रोणांसारख्यांच्या पराक्रमसागरांतून तरून, आतां अश्वत्थाम्याच्या एवढ्याशा डबक्यांतच सर्व गणगोतांसह बुडून मरण्याची पाळी आली आहे. युद्धामध्यें मीं आचार्यांसारख्या पुण्यपुरुषांचा वध केला! युद्धांविषयीं अजाण असा माझा बाळ अभिमन्यु शस्त्रहीन होऊन जेव्हां एकटाच शत्रूंच्या कचाट्यांत सांपडला तेव्हां मीं त्याचें रक्षण केलें नाहीं, साध्वी द्रौपदीचा जेव्हां ह्या दुष्टांनीं छळ केला तेव्हांही मीं त्यांची उपेक्षाच केली. माझ्या सुखाकरितां मीं आजपर्यंत हजारों पांचालांचे धारातीर्थीं व्यर्थ बळी पाडले. आतां उगीच राहून तरी काय उपयोग ? आजपर्यंत माझ्याकरितां जे जे मेले त्या सर्वांकरितां मी आज माझ्या सर्व भावांसह चितेंत उडी घेतों. ’ असें धर्मराज ह्मणत आहे तोंच श्रीकृष्ण सर्वांना मोठ्यानें ह्मणाला कीं, ‘ आधीं हातांतलीं शस्त्रें टाका व खालीं उतरा. तुह्मी जसे जसे लढाल तसा तसा तुमचा संहारच होत जाईल. ह्या अस्त्राचा असा नियम आहे कीं, जो ह्याच्या प्रतिकाराबद्दल प्रयत्न करील त्यालाच हें अस्त्र ठार करील.व जो कोणी शस्त्रें टाकून देऊन जमिनीवर उभा राहील त्याला हें अस्त्र शिवणार सुद्धां नाहीं. ह्मणून तुह्मी आपापले रथ, हत्ती, व घोडे वगैरे सर्व सोडून देऊन खालीं जमिनीवर उभे रहा व शस्त्रें टाकून द्या. ह्याच्या प्रतिकाराची कल्पना सुद्धां मनांत आणूं नका. त्याच्याशीं युद्ध करण्याचें तुह्मीं नुसतें आपल्या मनांत जरी आणलें तरी सुद्धां तें तुमचा फडशा पाडील; मग तुह्मी पाताळांत कां दडून रहांना !’ असें श्रीकृष्णानें सांगितल्याबरोबर सर्वजण पटापट हत्यारें खालीं टाकूं लागले.हें पाहून भीमसेनानें आपली व आपल्या गदेची प्रशंसा करून सैनिकांना शस्त्रें ठेवूं नका ह्मणून सांगितलें; व अर्जुनालाही गांडीव खालीं न ठेवण्याविषयीं आग्रह केला. परंतु अर्जुन ह्मणाला, नारायणास्त्र, गाय व ब्राह्मण ह्यांच्याशीं जेव्हां प्रसंग येईल तेव्हां मला माझें गांडीव खालीं ठेवलेंच पाहिजे. ’

अर्जुन असें ह्मणतो आहे इतक्यांत भीमानें अश्वत्थाम्यावर चाल केली व त्याला आपल्या बाणांनीं झांकून टाकला. तेव्हां अश्वत्थाम्यानें हांसून त्याचा थोडासा धिःकार केला; व मंत्रानें अधिक प्रखर व तेजस्वी झालेल्या बाणांचा वर्षाव केला. परंतु हा जसा जसा जास्त शौर्यानें लढूं लागला तसा तसा ह्याला त्या अस्त्राचा प्रभाव जास्तच भोंवूं लागला. शिवाय बाकीचे सर्व योद्धे आपापलीं शस्त्रें टाकून घोडे, हत्ती, व रथ वगैरे वहानेंही सोडून स्वस्थ खालीं जमिनीवर उभे राहिले होते. त्यामुळें त्यांना कोणत्याही प्रकारचा त्रास न होता अश्वत्थाम्याच्या अस्त्रप्रभावानें जे बाण सुटत ते सर्व ह्याच्यावरच येऊन धडकत. त्यामुळें सर्व पांडववीर अगदीं घाबरून गेले. पण भीम मुळींच डगमगला नाहीं. तो तसाच नेटानें युद्ध करीत होता.। ह्या नारायणास्त्राचें तेज जसें जसें अधिक होऊं लागलें तसा तसा अश्वत्थाम्याला अधिकाधिक आनंद होऊं लागला. हें पाहून कृष्णार्जुनांनीं वारुणास्त्राचा प्रयोग केला. त्यामुळें त्या दोन्ही अस्त्रांची टक्कर चालली. इतक्यांत कृष्णार्जुन भीमाच्या रथाकडे गेले. व त्याच्या हातांतलीं शस्त्रें काढून घेऊन त्यालाही खालीं ओढला. त्याबरोबर तें नारायणास्त्र शांत झालें. दिशा उज्ज्वल झाल्या; वारा शांतपणें वाहूं लागला; हत्ती, घोडे वगैरे मुक्या जनावरांनाही आनंद झाला.

अशा रीतीनें नारायणास्त्राचें निवारण झाल्यावर सर्व पांडववीर पुनः आपापलीं शस्त्रें सांवरून कौरवांवर चालून गेले. हें पाहून दुर्योधनानें अश्वत्थाम्याला त्यांच्यावर नारायणास्त्राचा प्रयोग आणखी एकदां करण्याविषयीं विनंति केली. तेव्हां अश्वत्थामा दुःखानें एक सुस्कारा टाकून त्याला ह्मणाला, ‘ ह्या अस्त्राचा प्रयोग दुसऱ्यांदा केला कीं हें अस्त्र प्रयोग करणाराचाच घात करतें. हें अस्त्र केव्हांही विफळ जावयाचें नाहीं. पण श्रीकृष्णानें ह्याला विफळ केलें. किंवा ह्या अस्त्रानें आपलें काम केलेंच ह्मणावयाचें; शत्रू ठार झाले नाहींत, तथापि समरांगणांत भर युद्धाच्या गर्दींत ह्यांनीं आपलीं शस्त्रें खालीं ठेविलीं. तेव्हां ह्यांचा पराभव व्हावयाचा तो काय राहिला. हेंच त्यांना मरणापेक्षां अधिक आहे. नंतर अश्वत्थामा रागानें चवताळून आपल्या बापाच्या

वधाचा सूड घेण्याकरितां धृष्टद्युम्नावर तुटून पडला. त्यानें धृष्टद्युम्नाचे घोडे, सारथी, रथ व धनुष्य ह्या सर्वांचा फडशा उडविला, त्याला स्वतःला बराच घायाळ केला व त्याच्या सेनेला जेर करून पळावयाला लावलें. हें पाहून सात्यकी धृष्टद्युम्नाच्या मदतीला धांवला. त्यानें आल्याबरोबर अश्वत्थाम्याचा सारथी मारला, घोडे ठार केले, रथ मोडला, धनुष्याचे तुकडे केले व ह्याच्या छातीवरच नेमके तीस बाण सोडले. त्यामुळें अश्वत्थाम्याला झीट आली व त्याला आतां पुढें काय करावें हेंच सुचेना. आपल्या गुरुपुत्राची अशी फजिती झालेली पाहून दुर्योधनाला फार वाईट वाटलें. तो कर्ण, कृपाचार्य व वृषसेन ह्यांना घेऊन सात्यकीच्या समाचाराला आला. त्या सर्वांनीं मिळून सात्यकीवर चोहोंकडून बाणांचा मारा सुरू केला. पण सात्यकीनें ह्यांनाही तेव्हांच जेरीस आणलें. इतक्यांत अश्वत्थामा सावध होऊन दुसऱ्या रथांत बसून आला. पण त्याला ह्याही खेपेला पूर्वीप्रमाणें फजीत पावूनच परतावें लागलें. सात्यकीनें वृषसेनाचे तीन हजार रथी यमलोकीं पाठविले, कृपाचार्यांचे पंधराहजार हत्ती ठार केले, व शकुनीचे पन्नास हजार घोडे कापून काढले. इतक्यांत अश्वत्थामा पुनः सात्यकीवर चालून आलाच. सात्यकीनें पुनः त्याला बराच जखमी केला. तेव्हां अश्वत्थाम्यानें एक अत्यंत तीक्ष्ण धारेचा बाण सात्यकीवर सोडला. तो त्याचें कवच फोडून आंत अगदीं मर्मी घुसला, व लगेच सात्यकीच्या शरीरांतून जोरानें रक्त वाहूं लागलें. त्यामुळें तो झीट येऊन रथांतच पडला. आपल्या मालकाची अशी भयंकर स्थिति पाहून त्याच्या सारथ्यानें तेथून रथच बाजूला काढला. लगेच अश्वत्थाम्यानें दुसरा एक विषारी बाण धृष्टद्युम्नाच्या कपाळावर मारला. हाही तसाच जोरानें आंत घुसला. त्यामुळें धृष्टद्युम्नही मूर्छित होऊन आपल्या ध्वजाच्या काठीशीं डोकें टेंकून बसला. हें पाहून अर्जुन, भीम, वृद्धक्षत्र चेदीचा युवराज व मालवाधिपति सुदर्शन हे आपले धनुष्यबाण सज्ज करून वेगानें अश्वत्थाम्यावर धांवून आले. ह्या सर्वांनीं गुरुपुत्र अश्वत्थाम्यावर सारखा मारा चालविला अश्वत्थाम्यानें प्रथमतः ह्यांच्या बाणांचें निवारण केलें. व प्रत्येकांवर नेमके पांच पांच बाण सोडले. नंतर त्यानें मालवाधिपति सुदर्शन ह्याचे दोन बाणांनीं हात व एका बाणानें डोकें उडविलें. सुदर्शनाचें हें डोकें खालीं पडतें न पडतें इतक्यांतच अश्वत्थाम्यानें एक रथशक्ति सोडून वृद्धक्षत्राच्या रथाचा चुराडा केला. नंतर सुदर्शनाप्रमाणें ह्याचेही हात व डोकें हीं तोडून पाडलीं; आणि लगेच चेदींचा युवराज ह्यालाही ह्यांच्याबरोबरच स्वर्गाला पाठविलें.

अशा रीतीनें सुदर्शन, वृद्धक्षत्र व युवराज हे तिघेही आपल्या देखत मृत्युमुखीं पडले हें भीमाला सहन झालें नाहीं. तो तसाच त्वेषानें अश्वत्थाम्यावर तुटून पडला. उभयतांचें बाणयुद्ध चाललें असतां भीमानें त्याच्या बरगड्यांत एक रुंद फळाचा बाण मारला. तो बराच आंत शिरला; त्यामुळें अश्वत्थामा विव्हळ होऊन आपलीं शस्त्रास्त्रें खालीं टाकून देऊन रथामध्यें स्वस्थ बसला. नंतर भीमानें बाकीच्या कौरवांवर बाणांचा वर्षाव करून त्यांना अगदीं टेकीस आणलें. इतक्यांत अश्वत्थामा सावध होऊन पुनः भीमावर चालून आला. त्यामुळें पुनः या दोघांचें युद्ध जुंपलें. अश्वत्थाम्यानें मध्येंच भीमाच्या सारथ्याच्या कपाळावर एक बाण मारला. त्याबरोबर तो तेथेंच मूर्छित होऊन पडला. त्यामुळें घोडे बेफाम होऊन समरांगणांतून सैरावैरा धांवूं लागले. त्यामुळें सैनिकही भयानें युद्ध सोडून पळूं लागले. त्याबरोबर पांडवांच्या सैन्यांत चहूंकडे अगदीं धांदल उडून गेली. हें पाहून व राजा धर्माचीं मर्मभेदक वाक्यें ऐकून अर्जुनाला फार चीड आली. ह्मणून तो त्या रागाच्या आवेशांतच अश्वत्थाम्याला ह्मणाला, 'तुझ्या अंगांत जितकी शक्ति, जितकें ज्ञान, जितका पराक्रम असेल व मनांत कौरवांबद्दलची प्रीति व आमच्याबद्दलचा द्वेष जेवढा म्हणून असेल तेवढा सर्व मला दाखीव. तुला जें काय करणें असेल तें यावेळीं माझ्यावर कर. मी आतां तुझ्या सर्व गर्वाचा परिहार करतों.' या मर्मभेदक शब्दांनीं अश्वत्थामा फारच चिडला. नंतर अश्वत्थाम्यानें डोळ्यांला पाणी लावून मंत्रोच्चार केला व अग्नेयास्त्राचें आवाहन केलें. त्याबरोबर आकाशांतून तीक्ष्ण बाणांचा वर्षाव व उल्कापात होऊं लागला, सूर्याचा प्रकाश नाहींसा झाला. सर्व स-

मरांगणांत अगदीं काळोख होऊन गेला. वाऱ्याची शीतळाई नष्ट होऊन तो ऊन झाला. कावळे चहूंकडून काव काव असा कर्कश शब्द करूं लागले. मेघमंडळांतून रक्ताचे थेंब पडूं लागले.गाई,म्हशी,बैल वगैरे पशू मोठ्यानें डरकाळ्या फोडूं लागले. शांतपणानें समाधि लावून बसलेल्या योग्यांच्यासुद्धां अंतःकरणांत चलबिचल होऊं लागली. स्वर्ग, मृत्यु व पाताळ या तिन्ही लोकांना अतिशय ताप होऊं लागला. या अस्त्रतेजानें संतप्त होऊन पृथ्वींतले साप सुद्धां फुस्कारे टाकीत आपल्या बिळांतून बाहेर येऊं लागले. समुद्र खवळल्यामुळें आंतल्या प्राण्यांनासुद्धां त्रास होऊं लागला. पूर्वेकडून पश्चिमेकडून, दक्षिणेकडून, उत्तरेकडून, वरून, खालून, अशारीतीनें चहूंकडून पांडवसैन्यावर बाणांचा मारा होऊं लागला. हे बाण सर्वांना जाळीत सुटले. त्यामुळें, हत्ती, घोडे, रथ व पायदळ या सर्वांचा भुग्गा उडून गेला. चहूंकडे वणवा पेटला ह्मणजे घाबरून जाऊन आपला जीव वांचविण्याकरितां जंगलांतील हत्ती ज्याप्रमाणें हिकडून तिकडे पळत असतात त्याप्रमाणें यावेळींही कित्येक हत्ती अश्वत्थाम्याच्या या प्रखर बाणांचा अग्नीप्रमाणेंच चटका बसल्यामुळें पुढें मागें कोण आहे हें न पहातां चीं चीं करीत चहूंकडे सैरावैरा धांवूं लागले. जिकडे तिकडे मोकळे रथ व मरून पडलेले हत्ती, घोडे व मनुष्यें यांचेच ढिगारे दिसूं लागले. अस्त्रप्रभावानें एकंदर एक अक्षौहिणी सैन्य ठार झालें.

याप्रमाणें पांडवसेनेची दुर्दशा झालेली पाहून कौरवांना फार हर्ष झाला. त्यांनीं आनंदानें शुभसूचक रणवाद्यें वाजवावयाला आरंभ केला. त्यांच्या सैन्यांत चहूंकडे वीरांच्या सिंहगर्जना व शंखनाद हेंच ऐकूं येऊं लागलें.; परंतु हा सर्व प्रकार पाहून अर्जुनाला फार वाईट वाटलें. त्यानें सर्वास्त्राचें निवारण करणाऱ्या ब्रह्मास्त्राचा प्रयोग केला. त्याबरोबर एका क्षणांत सर्व दिशा स्वच्छ झाल्या, वारा शीतळ वाहूं लागला. अश्वत्थाम्याचें अस्त्रतेज मंद झालें. बाणांचा वर्षाव होईनासा झाला. जिकडे तिकडे शांत झालें. परंतु ह्या सर्वांत अद्भुत गोष्ट ही कीं, कमलपत्र जसें पाण्यांत बुडलेलें असूनही कोरडें ठणठणीत असतें त्याप्रमाणें, श्रीकृष्ण, अर्जुन, त्यांचे घोडे, रथ व ध्वज वगैरे सर्व कांहीं, अश्वत्थाम्याच्या अस्त्राचा इतका भयंकर मारा चालला असूनही, अगदीं सुरक्षित होतें. हें पाहून अश्वत्थाम्याला फार वाईट वाटलें; त्यानें एक दुःखाचा सुस्कारा टाकला; नंतर धनुष्य वगैरे टाकून रथांतून उडी ठोकली व रणांगणांतून पळण्याला आरंभ केला. अश्वत्थामा युद्ध सोडून पळत आहेसें पाहून श्रीवेदव्यास प्रकट झाले. त्यांना पाहून त्यानें नम्रपणें नमस्कार केला, व विचारिलें; कीं, 'भगवन्, हें काय झालें व कसें झालें हें मला मुळींच कळत नाहीं. माझें हें अस्त्र विफल कसें झालें ! कां माझ्या हातूनच कांहीं अपराध झाला ? कृष्णार्जुन हे जिवंत आहेत. मनुष्य, यक्ष, गंधर्व, पिशाच, राक्षस व देव यांपैकीं कोणाच्याही अंगीं माझें अस्त्र निवारण्याचें सामर्थ्य नाहीं. असें असून माझ्या ह्या दिव्य अस्त्रानें केवळ एक अक्षौहिणी सैन्य मात्र ठार झालें. व ह्या कृष्णार्जुनांना—या मानवदेहधाऱ्यांना—कांहींही झालें नाहीं ! अहो, भगवन् असें कां झालें तें सांगा.'

हें ऐकून व्यास ह्मणाले, 'शांतपणें लक्ष देऊन ऐक. हा जो नारायण ह्मणून आहे त्यानें पूर्वी केवळ वायुभक्षण करून सासष्ट हजार वर्षें तपश्चर्या केली. त्यावेळीं स्वयंभु, जटाधारी, शूलपाणी, चंद्रमौली असा नंदिकेश्वर या नारायणाला प्रसन्न झाला. व त्यानें वर दिला कीं, 'माझ्या प्रसादानें तूं देव, गंधर्व व मनुष्य या सर्वांमध्यें बलवान; होशील कोणत्याही शस्त्रानें किंवा कोणत्याही अस्त्रानें तुझा पराजय होणार नाहीं. तुझ्या समोर उभें राहण्याला कोणीही धजणार नाहीं, एवढेंच नव्हे पण युद्धामध्यें प्रत्यक्ष मी जरी आलों तरी तुझ्यापुढें माझा प्रकाश मुळींच पडणार नाहीं.'

अशा तऱ्हेचा ह्याला पिनाकपाणी शंकराचा वर मिळाल्याकारणानें हा सर्वांना अजिंक्य आहे. व हा अर्जुनही त्याच्याच तपश्चर्येनें झालेल्या नर नामक महामुनीचा अवतार आहे. ह्यामुळें हाही अजिंक्यच आहे.' व्यासांचें हें उत्तर ऐकून अश्वत्थाम्याच्या मनांत श्रीकृष्णाविषयीं पूज्यबुद्धि उत्पन्न झाली. तो पिनाकपाणी रुद्राला व महामुनि व्यासांना नमस्कार करून आपल्या सेनेंत परत गेला.

एकाएकीं व्यास प्रकट झालेले पाहून अर्जुनाल

फार आनंद झाला. त्यानेंही यांना नमस्कार करून विचारिलें कीं, ' हे मुनिश्रेष्ठ, मी युद्धाला उभा राहिलों ह्मणजे अग्नीप्रमाणें तेजस्वी असा एक दिव्य पुरुष हातांत शूल घेऊन मजपुढेंच शत्रुसैन्याचा संहार करीत चालला आहेसें मला दिसतें तो जिकडून जिकडून जाईल तिकडून तिकडूनच मीही जातों. त्यामुळें पहाणाऱ्यांना वाटतें कीं, माझ्याच प्रभावानें शत्रुसैन्याचा संहार होत आहे. ही दिव्य मूर्ति चालत असतांना हिचे पाय जमिनीला मुळींच लागत नाहींत. तर हे महामुने, अशी ही दिव्य मूर्ति कोणाची तें मला सांगा. '

हें ऐकून व्यास ह्मणाले, ' ज्यानें दक्षयज्ञाचा विध्वंस करून देवांपासून आपला हविर्भाग मिळविला, ज्यानें त्रिपुरासुराचा नाश केला, ज्यानें इंद्राचा सुद्धां गर्व परिहार केला, असा हा रुद्र, प्रतापी व दयाळू आहे. अर्जुना, जयद्रथाच्या वधाचे आधीं तुला श्रीकृष्णानें ज्याचें दर्शन करविलें तोच हा शंकर, तोच पिनाकपाणी रुद्र, तोच संग्रामामध्यें येऊन तुझें साहाय्य करितो. पार्था, तुझें शौर्य, ज्ञान, तुझी विद्या व तुझें जीवित सर्व कांहीं धन्य आहे. ' असें म्हणून व्यास अंतर्धान पावले. नंतर दोन्ही पक्षांकडील वीरांनीं संध्याकाळ झाल्यामुळें त्या दिवशीचें युद्ध आटोपून आपापल्या गोटाकडे कुच केलें.

# ८ कर्णपर्व

## ४६ कर्णाला सैनापत्याचा अभिषेक.

( ८. १—१८ )

याप्रमाणें द्रोणाचार्य पडल्यावर व अश्वत्थाम्याचा मोड झाल्यावर संध्याकाळ झाल्यामुळें सर्व कौरववीर युद्ध बंद करून आपल्या तळाकडे परतले. भीष्माचार्य व द्रोणाचार्य यांच्यासारखे अतिरथी युद्धांत कामीं आल्यामुळें कौरवांचीं तोंडें अगदीं सुकून गेलीं. अपजयानें चित्त उद्विग्न होऊन आतां पुढें काय करावें हेंच त्यांना सुचेना. तळावर गेल्यावर सर्वजण एके ठिकाणीं जमले व याबद्दलच विचार करूं लागले. प्रथमतः दुर्योधन बाकीच्या सर्व राजांना ह्मणाला, ' शूरहो, तुह्मी सर्वजण शहाणे व चतुर अहां. आमच्यावर कसा प्रसंग येऊन गुदरला आहे हेंही तुह्मांला माहीत आहे. तर आतां काय करावें हें लौकर सांगा. ' राजा दुर्योधनाचें हें भाषण ऐकून प्रत्येक वीर राजाला धीर देण्याकरितां आपली अस्तनी वर करून तलवार सांवरूं लागला. याप्रमाणें राजाकरितां धारातीर्थी आपल्या जिवाची आहुति द्यावयाला तयार झालेल्या वीरांना पाहून, व दुर्योधनाच्या अंतःकरणाची उद्विग्नता लक्षांत आणून रणधुरंधर अश्वत्थामा ह्मणाला, ' मोठमोठे स्वामिभक्तवीर, शस्त्रास्त्रांची जय्यत तयारी व धर्मश्रद्धा याच गोष्टी मुख्यत्वेंकरून विजयाला कारण आहेत. आमच्यांतील सर्वच योद्धे स्वामिभक्त, धर्मनिष्ठ व शौर्यानें देवांनाही भारी असे आहेत. मग तुला जयाबद्दल काळजी कां वाटावी? आतां दैवगतीबद्दल म्हणशील तर मनुष्य धर्माचरणानें वागत असला म्हणजे दैवही आपोआप अनुकूल होतें. आमच्या मनांत कर्णाला सेनापति करावा असें आहे; धैर्य, वीर्य, बल व युद्धकौशल्य या सर्वांमध्यें हा आमच्याहून श्रेष्ठ आहे. हा कर्दनकाळ आपलें धनुष्य सज्ज करून रणांगणांत उभा राहिला म्हणजे शत्रूंची याला पाहून गाळण उडते.

दुर्योधनाच्याही मनांत तेंच होतें. कर्णाइतका त्याचा विश्वास कोणावरही नव्हता. काय करील

तर कर्णच करील असें त्याला वाटत होतें. त्यांतच पुनः अश्वत्थाम्याच्या शब्दाची भर पडली. त्यामुळें त्याला फार आनंद झाला. व कर्णाबद्दलची आशा दुणावली. तो आदरपुरःसर कर्णाला म्हणाला, 'कर्णा, तुझ्या शौर्याबद्दल माझी खात्री आहे व मजवर तुझें प्रेम किती आहे हेंही मला माहीत आहे. तूं अत्यंत चतुर अहेस. व तुझ्यावांचून मला अन्य गति नाहीं. भीष्माचार्य व द्रोणाचार्य हे आजपर्यंत माझे सेनापती होते. पण ते आतां युद्धांत कामास आले आहेत. त्यांच्या मागें तूंच माझा सेनापति हो. ते दोघेही शूर होते खरे, पण त्यांचा धनंजयाकडे ओढा होता. आपला आजोबापणा लक्षांत आणून भीष्माचार्यांनीं पांडवांचें रक्षण केलें. त्यांनीं युद्धांत कुचराई केली. शेवटीं तूं आपलें शस्त्र खालीं ठेवलेंस असें पाहून अर्जुनानें शिखंडीला पुढें करून आजोबांची स्वर्गांत पाठवणी केली ! पुढें, ते भीष्मपितामह शरपंजरी पडल्यावर तुझ्याच सांगण्यावरून मीं द्रोणांना सैनापत्य दिलें. त्यांनींही आपले शिष्य म्हणून पांडवांवर शिकस्त केली नाहीं; व धृष्टद्युम्नानें त्यांना लौकरच कंठस्नान घातलें! हे दोघेही जरी मोठे शूर होते तरी त्यांना तुझ्या पराक्रमाबद्दल खात्री होती. आतां त्यांच्या मागें तर तुझ्यासारखा रणधुरंधर योद्धा आमच्यामध्यें कोणीच नाहीं. आह्मांला जय मिळवून द्यावयाला तूंच समर्थ आहेस. पूर्वीं काय किंवा आतां काय? केव्हांही झालें तरी तुझ्यावांचून आह्मांला दुसरा नेताच नाहीं. त्या दोघांना झालें तरी मीं तुझ्याच सांगण्यावरून सेनापती केलें होतें. ह्मणून हे कर्णा, तूं आतां आमचा नायक हो. कार्तिकस्वामीनें ज्याप्रमाणें देवसेनेचें आधिपत्य स्वीकारलें त्याप्रमाणें तूंही ह्या ह्या कौरवसेनेचें आधिपत्य स्वीकार व शत्रूंचा फडशा पाड. सूर्योदय झाल्याबरोबर अंधार ज्याप्रमाणें एकदम नाहींसा होतो त्याप्रमाणें तूं आमचा सेनानायक झालास हें ऐकिल्याबरोबरच पांडवसेना युद्ध सोडून पळूं लागेल. फार काय सांगूं? कर्णा, तुजबरोबर युद्ध करण्याला प्रत्यक्ष अर्जुनही धजत नाहीं !' हें ऐकून कर्ण ह्मणाला, 'राजा, मीं पूर्वींच तुला सांगितलें आहे कीं, 'मी तुझा सेनापति होऊन पांडवांना व श्रीकृष्णाला जिंकतों.' त्याप्रमाणें मी आतां तुझा सेनापति होतों. राजा, धीर धर, असा निराश होऊं नकोस. आतां पांडवांचा पराभव झालाच असें समज.' असें कर्णानें ह्मटल्याबरोबर राजा दुर्योधनाला फार हर्ष झाला. त्यानें लगेच अभिषेकाची तयारी केली. रत्नखचित सुवर्णकलश आणले, पवित्र अशा मृत्तिकेचीं पात्रें आणलीं, हत्तीचे दांत, गव्याचीं व गेंड्याचीं शिंगें, ह्यांना सोन्यानें मढवून अभिषेकाकरितां पुढें मोत्याचे घोंस लाविले. नंतर दुर्योधन व बाकीचे सर्व राजे उठून उभे राहिले. कर्णाला उच्चासनावर बसविला. गंगा, यमुना, व सरस्वती इत्यादि पवित्र नद्यांचें व तीर्थांचें पाणी आणून विद्वान ब्राह्मणांकडून यथाविधी अभिषेक करविला. त्याबरोबर ब्राह्मण स्वस्तिवाचन ह्मणूं लागले, भाट स्तुतिपाठ गाऊं लागले, व राजे लोक त्याचा जयघोष करूं लागले. दुर्योधनाला आतां आपण कृतार्थ झालों असें वाटूं लागलें !

याप्रमाणें सेनापत्यभिषेक झाल्यानंतर कर्णानें तयारीची नौबत वाजविण्याला सांगितलें. नुक्तीच मध्यरात्र उलटली होती व शिपाई लोक दमून अगदीं सुस्त झाले होते; तरीही नौबत वाजूं लागल्याबरोबर जिकडे तिकडे तयार व्हा चला लौकर तयार व्हा अशी एकच आरोळी उठली. ती ऐकून माहुत आपल्या हत्तींना सजवूं लागले, रथी आपले रथ तयार करून जोडूं लागले, स्वार आपले घोडे कसूं लागले, शिपाई आपल्या अंगावर चिलखतें चढवूं लागले व मोठमोठे शूर योद्धे आपल्या पाणिदार तलवारी परजून गंभीर सिंहगर्जना करूं लागले.

इकडे कर्णही, बाणांनीं भरलेले भाते, गदा, जेजाले, गुर्दे, मुसळ, तलवारी, भाले, पट्टे, अंकुश, बर्च्या व धनुष्याच्या लांब लचक कमानी वगैरे प्रकारची युद्धसामुग्री ज्यांत पूर्ण भरली आहे, ज्याला वेगवान घोडे जुंपले आहेत, ज्याच्यावर पांढरा बावटा फडकतो आहे, व जो सोन्यानें मढविलेला आहे, अशा एका बळकट रथांत बसून आपल्या योद्ध्यांना इशारत देण्याकरितां शंखनाद करूं लागला व स्फुरण येण्याकरितां धनुष्याचा टणत्कार करूं लागला. सूर्यासारख्या तेजस्वी अशा कर्णाला ह्या दिव्य रथांत बसलेला पाहून कौरववीरांना धीर आ-

ला, व भीष्मद्रोणांच्या वधामुळें झालेल्या दुःखाचा विसर पडला.

नौबतीच्या आवाजानें कर्णाच्या शंखनादानें थोड्याच वेळांत सर्व राजेलोक आपापल्या पथकांसह कर्णाच्या रथाभोंवतीं जमले. मग लगेच कर्णानें मकरव्यूहाची रचना केली. सैन्याच्या अवाडीला ह्मणजे त्या व्यूहाच्या अगदीं तोंडावर स्वतः कर्ण आपल्या खासगी सेनेनिशीं उभा राहिला. शकुनि व उलूक दोन्ही डोळ्यांच्या ठिकाणीं उभे राहिले; अश्वत्थाम्यानें डोक्याची बाजू संभाळली; मानेवर सर्व कौरवबंधू राहिले; मध्यभाग राजा दुर्योधनानें आपणाकडे घेतला, नारायणाच्या शूर गोपालसेनेला बरोबर घेऊन कृतवर्म्यानें डाव्या पायाकडची बाजू रोंखून धरली; शूर दक्षिणी लढवय्यांना आपल्या हाताखालीं घेऊन कृपाचार्यांनीं उजव्या पायाकडची बाजू पत्करिली; शल्य आपल्या पथकानिशीं मागल्या डाव्या पायावर उभा राहिला; तीनशें हत्ती व हजार रथी ह्यांना बरोबर घेऊन सुषेणानें उजवी बाजू रोंखून धरिली; व अगदीं पिछाडीला ह्मणजे ह्या कूर्मव्यूहाच्या शेंपटीवर चित्र व चित्रसेन ह्या दोघा भावांची नेमणूक झाली. अशा रीतीनें आपल्या सेनेची कूर्मव्यूहामध्यें रचना करून कर्णानें कुचाची नौबत वाजविण्यास सांगितलें.

कौरवांनीं कुचाची नौबत चालविली हें पाहून धर्मराज धनंजयाला ह्मणाला, ‘अर्जुना, कौरवांकडे युद्धाची तयारी झाली. यांनीं किती जरी तयारी केली तरी मी ह्यांना आतां कस्पटाप्रमाणेंच लेखतों. कारण ह्यांच्यांत आतां शूर असा कोणीच उरला नाहीं! एक कर्णच काय तो आतां शिल्लक आहे. त्याला तेवढा मारलास ह्मणजे तूं विजयीच आहेस. ह्याच्या मरणानें बारा वर्षेपर्यंत माझ्या डोळ्यांत सलत असलेला कांटा नाहींसा होईल. ह्मणून हे महाबाहो, बीभत्सो, आतां होईल तितक्या लौकर व्यूहरचना कर.’

हें ऐकून अर्जुनानें आपल्या सेनेची अर्ध चंद्राकार रचना केली; डाव्या बाजूला भीम, उजव्या बाजूला धृष्टद्युम्न, मध्यें राजा धर्म, त्याच्या मागें त्याचें रक्षण करण्याकरितां नकुलसहदेव यांना उभें केलें; व बाकीच्या वीरांनाही त्यांच्या योग्यतेप्रमाणें ज्यास्त मान्याच्या किंवा कमी मान्याच्या जागीं नेमणूक करून स्वतः अर्जुन व्यूहाच्या मध्यभागीं धर्माच्या शेजारीच उभा राहिला. युधामन्यु व उत्तमौजा हेही अर्जुनाचें चक्र रक्षण करण्याकरितां त्याच्याच बाजूला उभे राहिले. नंतर अर्जुनानेंही कुचाची इशारत केली. त्याबरोबर, शंख, भेरी, डंके, लगेडंके, नगारे, झांजा, व नौबती इत्यादि रणवाद्यांचा गजर चालू झाला. व हा गजर ऐकून योद्ध्यांना स्फुरण चढलें. त्यांनींही सिंहगर्जना करण्याला प्रारंभ केला. आपल्या मालकाच्या गर्जना ऐकून घोडे खिंकाळूं लागले व हत्ती गरजूं लागले.

याप्रमाणें गर्जना करीत विजयाच्या लालसेनें व स्वर्गाच्या आशेनें जिवावर उदार झालेले वीर एकमेकांच्या नरडीचा घोंट घेण्याकरितां आतुर होऊन एकदम एकमेकांवर तुटून पडले. पहिल्याप्रथम कांहीं वेळ रथी रथ्यांवर, हत्ती हत्तींवर, स्वार स्वारांवर, व पायदळ पायदळांवर, अशा रीतीनें व्यवस्थेशीर युद्ध चाललें होतें, पण लौकरच ती घडी बिघडली. हत्तींवरील लोक रथ्यांवर घसरले, रथ्यांनीं घोडेस्वारांवर हल्ला केला, व घोडस्वारांनीं पायदळांवर चाल केली, अशा रीतीनें ज्याच्या तडाक्यांत जो सांपडेल, किंवा ज्याच्या निर्बलतेची खात्री असेल त्याला गांठून कंठस्नान घालण्याचा सपाटा सुरू झाला.

अशा प्रकारें युद्धाची गर्दी चालली असतां मध्येंच भीम आपली बाजू सोडून हत्तीवर बसून कौरवसैन्यांत घुसला. हें पाहून क्षेमधूर्तीनें त्याच्यावर लगट केली. दोघेही वीर बलवान होते व दोघेही वीर हत्तीवरच स्वार झाले होते. त्यामुळें हत्ती हत्तींची टक्कर व योद्ध्या योद्ध्यांची लढाई हीं एकदम चालू झाली. दोघांचेही हत्ती उत्तम शिकविलेले असल्यामुळें चक्राकार फेरा घेऊन एकदम शत्रूशीं लगट करण्यांत व तसाच झटदिशीं वळसा घेऊन शत्रूपासून लांब उभे रहाण्यांत चांगलें पटाईत होते. त्यामुळें ह्या दोघांही वीरांना आपल्या प्रतिपक्ष्यावर वार करून त्याचा वार चुकविण्याला चांगली सवड सांपडत असे. प्रथमतः कांहीं वेळ ह्या दोघांनीं एकमेकांवर बाणांचा वर्षाव केला. पण पुढें लौकरच दोघांचीही धनुष्यें तुटून पडलीं. त्यामुळें केवळ भा-

त्याशींच प्रसंग आला. क्षेमधूर्तीनें जो भाला मारला तो इतक्या जोरानें मारला कीं, भीमाच्या अंगांतील पोलादी चिलखत फोडून तो आंत घुसला. त्याबरोबर भीमाच्या अंगांतून रक्त वाहूं लागलें. तरी स्वस्थ न बसतां भीमानें तसाच उलट त्याच्यावरही एक भाला फेंकला. पण क्षेमधूर्तीनें बाणांचा वर्षाव करून त्या भाल्याचे तुकडे करून टाकले. हें पाहून भीमानेंही दुसरें धनुष्य हातीं घेतलें व कुलूताधिपाच्या हत्तीवरच मारा चालविला. हा मारा सहन न होऊन हत्तीनें रणांगणांतून पळ काढला. क्षेमधूर्तीनें त्याला आवरून धरण्याचा पुष्कळ प्रयत्न केला. पण त्याचा कांहींच उपयोग झाला नाहीं. आपला प्रतिपक्षी पळत सुटला हें पाहून भीमाच्या हत्तीनें त्याच्यावर लगट केली. आतां पळून सोय लागणार नाहीं असा विचार करून क्षेमधूर्तीनें आपला हत्ती चट्कन् तेथेंच उभा केला व भीमाच्या हत्तीवर तीक्ष्ण बाणांचा मारा चालविला. त्याबरोबर भीमाचा हत्ती घायाळ होऊन खालीं पडला. पण ह्याच्या आधींच ह्मणजे हत्ती खालीं पडणार असें वाटल्यावरोबर भीमानें खालीं उडी टाकली होती. आपला हत्ती पडला हें पाहून भीमानें क्षेमधूर्तीवर गदा फेंकली. त्यासरशीं क्षेमधूर्ती व त्याचा हत्ती ह्या दोघांचाही एकदम चुराडा झाला.

## ४७ विंदानुविंदांचा वध. (८.१३-१४)

याप्रमाणें क्षेमधूर्ती व भीम यांची टक्कर चालली असतां विंद व अनुविंद या नांवाचे केकयांच्या घराण्यांतील दोघे भाऊ सात्यकीवर चाल करून आले. त्या दोघांनीं मिळून सात्यकीला अगदीं जर्जर करून टाकला; त्याचें धनुष्य तोडलें व त्याला सर्वांगांनीं घायाळ केला. त्यामुळें त्याचा धीर तर खचला नाहींच; पण उलट त्याला अधिक त्वेष मात्र चढला. त्यानें दुसरें धनुष्य सज्ज केलें व अनुविंदाचे नरडीवर नेम धरून अगदीं तीक्ष्ण व रुंद पातें बसविलेला बाण सोडला. त्याबरोबर जें नेहमीं सर्व शरीराच्या वर असावयाचें व ज्याला नेहमीं किरीटकुंडलें वगैरे भूषणांनीं अधिक शोभा आणली जात असे, तें अनुविंदाचें उत्तमांग एकदम आपल्या स्थानापासून च्युत होऊन खालीं पडलें !

याप्रमाणें आपल्या भावाचें मस्तक उडालेलें पाहून विंदाचा क्रोध अनावर झाला. 'थांब थांब' असें ह्मणत तो सात्यकीवर धांवून आला व सात्यकीवर सपाट्यानें बाणांचा मारा करूं लागला. पूर्वीं या दोघां भावांनीं मिळून सात्यकीला बराच घायाळ केला होता; व त्यांतच पुनः ह्या विंदाचा मारा चालूं झाला. त्यामुळें सात्यकीचें सर्वांग रक्तबंबाळ झालें. पण तें यायोगानें फुललेल्या पळसाप्रमाणें विशेषच शोभिवन्त दिसूं लागलें. विंदाप्रमाणें सात्यकीनेंही त्याच्यावर झपाट्यानें बाणांचा मारा चालविला होता. त्यामुळें थोड्याच वेळांत दोघांचेही रथ मोडले, घोडे ठार झाले, सारथ्यांचीं डोकीं उडालीं व धनुष्यें तुटलीं. नंतर बसावयाला रथ नाहीं व हातांत धनुष्य नाहीं असें पाहून दोघांनींही आपल्या तलवारी उपसल्या. ह्या खड्गयुद्धाचे आरंभीं दोघांच्याही हातांत ढाल होती.पण तलवारींच्या तीक्ष्ण माऱ्यानें तिचे लौकरच तुकडे झाले. त्यामुळें पत व वार हीं दोन्ही एका तलवारीवरच करणें भाग पडलें. शत्रूवर आपला हात सफाइदार चालावा व त्याचा आपल्यावर मुळींच चालूं नये अशा बेतानेंच दोघेही आपले पवित्रे चाळीत होते. शत्रूनें वार केला तरी आपणाला सहसा लागूं नये ह्मणून दर खेपेला तलवार आपल्या अंगाभोंवतीं फिरवून घेत असत व वार करतांनाही समोरून न करितां तिरपाच करीत असत. त्यामुळें शत्रूचा वार चुकत असे. अशा रीतीनें फार सावधपणें पण त्वेषानें यांची खणाखणी चालली होती. शेवटीं विंदानें सात्यकीवर एक जोराचा वार केला. पण सात्यकीनें तो तसाच आपल्या तलवारीच्यापाठीवर घेतला.हें पाहून व सात्यकीचा वार आपणावर बसूं नये ह्मणून विंद पवित्रे घेऊन जलदीनें मागें सरकला. सात्यकीनें लगेच अर्धचंद्राकृति फेरा घेऊन त्याला गांठला व थोडासा बाजूला होऊन त्याच्या कंबरेवरून एक तिरपा वार केला. त्याबरोबर विंदाच्या शरीराचे दोन तुकडे झाले.

इतक्यांत इकडे श्रुतकर्म्यानें चित्रसेनाला गांठून ठार केलें. व प्रतिविंध्यानें चित्रावर चाल केली. प्रतिविंध्यानें सपाट्यासरशीं चित्राचे घोडे व सारथी ह्यांना ठार करून धनुष्य तोडून टाकलें. त्या-

बरोबर चित्रानें सोन्याच्या घांटा लावलेली अशी प्रखर शक्ति प्रतिविंध्यावर सोडली. प्रतिविंध्यानें तर सहज लीलेनें तिचे दोन तुकडे केले. हें पाहून चित्रानें आपल्या शत्रूवर एक गदा फेंकली. ती गदा बरीच मोठी होती व अतिशय जोरानें सोडली होती. त्यामुळें प्रतिविंध्याला तिचा प्रतिकार करतां येईना. म्हणून त्यानें झटदिशीं रथांतून उडी टाकली. त्यानें उडी टाकली न टाकली इतक्यांत ती गदा जोरानें रथावर आदळली. त्यासरशीं रथ, घोडे व सारथी ह्या सर्वांचा चुराडा उडाला. इकडे प्रतिविंध्यानें रथांतून उडी टाकल्याबरोबर एक शक्ति सज्ज करून चित्रावर सोडली. चित्रानें ती तशीच प्रतिविंध्यावर उलटविली, व त्याचा उजवा हात कलम केला. उजवा हात तुटला ह्मणून हाय हाय करीत न बसतां प्रतिविंध्यानें तसाच डाव्या हातानें चित्राच्या छातींत भाला मारला; तो त्याचे चिलखत फोडून छातींतून पार गेला. त्याबरोबर चित्रराजा हातपाय पसरून जमिनीवर चित्रासारखा स्वस्थ पडला! प्रतिविंध्याचें हें अचाट सामर्थ्य पाहून कौरवसैन्य आश्चर्यचकित झालें.

प्रतिविंध्य अशा रीतीनें आपला पराक्रम गाजवीत असतांना अश्वत्थामा व भीमसेन यांची लढाई जुंपली. बाण हेच ज्यांच्या दाढा आहेत व धनुष्याच्या कमानी ह्याच ज्यांचीं आ पसरलेलीं तोंडें आहेत असे हे नररूपी व्याघ्र एकमेकांच्या नरडीचा घोट घेण्याकरितां परस्परांकडे डोळे ताठ करून पाहूं लागले. बाणांच्या वर्षावानें दोघे परस्परांना झांकून टाकूं लागले. अशा रीतीनें बाणवर्षाव चालला असतांना अश्वत्थाम्यानें मध्येंच भीमाला उजवी प्रदक्षिणा घातली. भीमाला हें सहन न होऊन त्यानेंही अश्वत्थाम्याला उजवी घातली. नंतर अश्वत्थामा भीमाला विरथी करण्याचा प्रयत्न करूं लागला व भीम अश्वत्थाम्याला विरथी करण्याचा प्रयत्न करूं लागला. पण कोणाचेंच कांहीं साधेनासें पाहून अश्वत्थाम्यानें भीमावर अस्त्रें सोडण्याला सुरवात केली. भीमानें त्याच्या अस्त्रांचें निवारण करण्याचा सपाटा चालविला. अस्त्रप्रयोगानेंही भीम हटत नाहीं असें पाहून अश्वत्थाम्यानें धनुष्य सज्ज करून एक तीक्ष्ण धारेचा बाण त्याला जोडला. हें पाहून भीमानेंही आपलें धनुष्य सजविलें. नंतर दोघांनींही मर्मस्थळें पाहूनच बाण सोडला. दोघांचेही बाण एकदम लागून दोघेही एकदम मूर्छित पडले. तेव्हां त्यांच्या सारथ्यांनीं आपले मालक मूर्छित पडलेले पाहून आपले रथ बाजूला काढले. अश्वत्थामा व भीम यांचें युद्ध चाललें असतांना इकडे अर्जुनानें संशप्तकांच्या सैन्यांत अगदीं कहर उसळून दिला होता. हत्ती, घोडे व योद्धे यांची एकसारखी कत्तल चालविली होती. त्यामुळें त्यांच्या सैन्यांत जिकडे तिकडे हाहाकार चालला होता.

'अश्वत्थामा शुद्धीवर येऊन पहातो तों त्याला अर्जुनाच्या माऱ्यानें संशप्तकांचें सैन्य सैरावैरा पळूं लागलें आहे असें दृष्टीस पडलें. त्याबरोबर 'अर्जुना, चल माझ्याबरोबर युद्ध कर. तुझ्या अंगांत काय जी करामत असेल ती मला दाखीव,' असें ह्मणून अश्वत्थाम्यानें श्रीकृष्ण व अर्जुन ह्या दोघांवरही बाणांचा मारा चालविला. हें पाहून 'आधीं ह्यांचा समाचार घेऊन मग संशप्तकांशीं युद्ध कर,' असें श्रीकृष्णानें सांगितल्यावरून अर्जुनानें अश्वत्थाम्याकडेच मोर्चा वळविला. अर्जुनानें अश्वत्थानें सोडलेल्या बाणांचा फडशा पाडून त्याच्या सारथ्याच्या हातांतली घोड्याची दोरी तोडली व घोड्यांना बाण मारले. त्याबरोबर घोडे बेफाम होऊन रणांगणांतून पळत सुटले.

अश्वत्थाम्याची अशी फजिती झालेली पाहून दंडधार नांवाचा गजयोधी पांडवसेनेवर चालून आला. हा दंडधार बलानें व कसबानें अगदीं भगदत्ताच्या तोडीचा होता. व त्याचा हत्तीही त्याला अनुरूप असाच होता. हा हत्ती मूळचा चांगल्या जातीचा होता. शिवाय त्याला वाकबगार वस्तादाकडून शिकवून तयार केला होता. समरांगणांत शिरल्याबरोबर ह्या हत्तीनें रथाच्या घोड्यांना पुढच्या पायांत दाबून धरून सोंडेनें रथ उलथून टाकावा आणि नंतर घोड्यांना व रथाला पायाखालीं दडपून टाकावें. त्याचप्रमाणें पायदळांतील शिपायांना व घोडेस्वारांनाही पायांखालीं चिरडून टाकण्याचा त्यानें सपाटा चालविला. याप्रमाणें हत्तीनें रथ, घोडे व शिपाई यांचा चेंदा उडविण्याला आरंभ केला व दंडधारानें बाणांच्या माऱ्यानें आसपासच्या योद्ध्यां-

ना दे माय धरणी ठाय करून सोडलें. त्यामुळें पांडवसेना अगदीं घाबरून गेली. हें पाहून अर्जुनानें आधीं दंडधाराचें धनुष्य तोडलें. तेव्हां दंडधारानें हत्तीला टांच देऊन जलदीनें अर्जुनाच्या रथावर लगट केली व श्रीकृष्णावर भाला फेंकला. पण अर्जुनानें त्या भाल्याला श्रीकृष्णापर्यंत येऊंच दिलें नाहीं. त्याचे मधल्यामध्येंच दोन तुकडे केले, व लगेच दोन रुंद फळाचे बाण सोडून दंडधाराचे दोन्ही हात खांद्यापासून वेगळे केले. नंतर पुनः बाणांचा मारा करून हत्तीला चीत केला व त्याचें डोकें उडविलें. लगेच आपल्या भावाचा सूड घेण्याकरितां दंड आपल्या हत्तीवर स्वार होऊन अर्जुनावर चालून आला. पण अर्जुनानें त्याचीही त्याच्या भावाकडे पाठवणी केली.

## ४८ कर्ण व नकुल यांचें युद्ध व पहिल्या दिवसाचा शेवट. (८.१९–३०)

नंतर अश्वत्थामा व पाण्ड्य यांचें युद्ध होऊन त्यांत पाण्ड्य ठार झाला. हें पाहून नकुलानें कौरवसेनेवर सपाट्यानें बाणांचा मारा चालविला. तेव्हां कर्ण त्याचा समाचार घेण्याकरितां धांवून आला. कर्णाला पाहून नकुल ह्मणाला, 'पाप्या, तूं आलास हें बरें झालें; मी तुझ्या गांठीची पुष्कळ दिवस अपेक्षा करीत होतों. ह्या सर्व अनर्थाला तूंच मूळ कारण आहेस. तुझ्याच मुळें कौरवांची नासाडी झाली. तूं ठार झालास ह्मणजे आपोआपच हें भांडण मिटेल. आज मी तुला ठार करतों.'

हें ऐकून कर्ण ह्मणाला, 'तूं पांण्डु कुलांत जन्माला आला आहेस व हातांत शस्त्र घेऊन उभा आहेस. आतां त्याप्रमाणें पराक्रम दाखीव ह्मणजे झालें. आपला पराक्रम दाखीव आणि मग बडबड कर.' असें ह्मणून कर्णानें त्याच्यावर एकदम त्र्याहत्तर बाण सोडले. नकुलानें ह्या सर्वांचा फडशा पाडला, हें पाहून कर्णानें लगेच त्याचें धनुष्य तोडलें व अत्यंत तीक्ष्ण असे तीस बाण त्याच्या अंगावर सोडले. ते त्याचें कवच फोडून आंत घुसले. त्यामुळें त्याच्या अंगांतून सारख्या रक्ताच्या धारा चालल्या. हें पाहून नकुलाला उलट फारच आवेश चढला. त्यानें दुसरें बळकटसें धनुष्य घेऊन कर्णाचें धनुष्य तोडलें व त्याच्यावर एकसारखे तीनशें बाण मारून त्याला अगदीं जर्जर करून सोडला. नकुलाचें हें शौर्य पाहून सर्व लोक आश्चर्यचकित झाले. व नकुलाचे बाण आपल्यावर बसूं नयेत ह्मणून लांब जाऊन उभे राहिले. नकुलासारख्यानें आपली फजिती करावी हें कर्णाला मुळींच सहन झालें नाहीं. त्यानें त्याचे घोडे, सारथी, रथ, धनुष्य व चक्ररक्षक ह्या सर्वांचा फडशा पाडला, व शेवटीं चिलखत फोडून ढाल व तलवार ह्यांचेही तुकडे करून टाकले. धनुष्य नाहीं, तलवार नाहीं, भाला नाहीं, कांहींच नाहींसें पाहून नकुलानें रथाचें चाक घेऊन कर्णावर उगारलें. पण कर्णानें त्याचेही वरच्यावरच तुकडे केले. तेव्हां नकुलानें तेथून पळ काढला! त्याबरोबर त्याचा पाठलाग करून कर्णानें त्याच्या गळ्यांत धनुष्य अडकविलें. नंतर त्याला थांबवून कर्ण ह्मणाला, 'मघाशीं बडबड केलीस ती सारी व्यर्थचना? अजूनही तुला कांहीं बोलावयाचें असेल तर बोल. नकुला इतःपर या बलवान कौरवांशीं युद्ध करूं नकोस. कोणी तरी आपल्याच जोडीचा हलकासा योद्धा गांठून त्याच्याशीं युद्ध कर. जा. आतां घरीं जाऊन स्वस्थ बैस. किंवा कृष्णार्जुनांच्या आश्रयाखालीं जाऊन रहा.' असें ह्मणून कुंतीस दिलेल्या वचनाची आठवण राखून कर्णानें त्याला सोडून दिला. हा अगदीं हातांत सांपडला असतांही कर्णानें ह्याला ठार केलें नाहीं. अशा रीतीनें फजीत पावून नकुल युधिष्ठिराच्या रथाकडे गेला.

इकडे अर्जुनानें संशप्तकांपैकीं सौश्रुति, सत्यसेन, व मित्रसेन वगैरे ठळक ठळक वीरांना ठार करून बाकीच्यांना आपल्या बाणांच्या माऱ्यानें अगदीं जर्जर करून सोडलें. त्यामुळें सर्व संशप्तक घाबरून युद्ध सोडून पळूं लागले. हें पाहून दुर्योधन अर्जुनावर धांवून आला. अर्जुनानें त्याचे घोडे व सारथी यांना ठार करून एक अत्यंत तीक्ष्ण बाण त्याच्यावर सोडला. हा लागला असतां तर दुर्योधन ठारच झाला असता. पण अश्वत्थाम्यानें ह्या बाणाला त्याच्यापर्यंत जाऊं न देतां ह्याचे मध्येंच दोन तुकडे केले. त्याबरोबर अर्जुनानें अश्वत्थामा, कृपाचार्य, कृतवर्मा व दुःशासन या सर्वांचीं पटापट धनुष्यें

तोडून टाकलीं व कर्णावर लगट केली. कर्णानेंही कृष्णार्जुनांवर मारा चालविला. लगेच सात्यकि, उत्तमौजा, शिखंडी, नकुलसहदेव व राजा धर्म या सर्वांनीं येऊन कर्णावर बाणांचा वर्षाव केला. पण ह्या सर्वांनाही एकटा कर्ण पुरून उरला होता. त्यानें ह्या सर्वांचा समाचार घेऊन हत्ती, घोडे, रथ व पायदळ ह्या सर्वांचा फडशा करण्याचाच सपाटा चालविला होता. हें पाहून अर्जुनानें इंद्रास्त्र सोडलें. त्याबरोबर कौरवसैन्यांत एकच हाहाकार उडाला. ज्याप्रमाणें गारा पडाव्यात त्याप्रमाणें आकाशांतून जोरानें बाणांचा मारा होऊं लागला. सर्व कौरववीर भयग्रस्त होऊन पळूं लागले. इतक्यांत सूर्य अस्ताचलाला गेला. त्यामुळें दोन्ही पक्षांकडील लोकांनीं युद्ध बंद करून आपापल्या गोटाकडे मोर्चा फिरविला.

आजच्या दिवशींही कौरवांचा बऱ्याच ठिकाणीं मोड झाला होता. त्यामुळें ते फार हताश झाले होते व आतां पुढें कसें करावें या चिंतेंतच त्यांची सर्व रात्र निघून गेली.

---

## ४९ कर्णयुद्धाचा दुसरा दिवस व शल्य सारथ्य ( ८. ३१–८० )

दुसरे दिवशीं सकाळीं अगदीं पहाटेस कर्ण, राजा दुर्योधनाकडे जाऊन ह्मणूं लागला कीं, ' राजा मी आज अर्जुनाशींच लगट करतों. मी तरी त्याला मारीन किंवा तो तरी मला मारील. आज दोन्हींपैकीं कांहीं तरी एक होईल. त्याशिवाय मी आज युद्धांतून परतणारच नाहीं. दोन्ही पक्षाकडे पुष्कळ वीर शिल्लक असल्यामुळें आजपर्यंत माझी त्याची प्रत्यक्ष गांठच पडली नाहीं. आतां आमच्यापैकीं बहुतेक सैन्य कामास आलें आहे. शिवाय माझ्या जवळचीं शस्त्रास्त्रें नाहींशीं झालीं आहेत. तेव्हां तो आज माझ्यावरच चालून येईल. जरी आला तरी आज माझाच जय होईल. कारण त्याच्याजवळ माझ्याइतकीं पाणीदार शस्त्रें नाहींत. त्याला माझ्याप्रमाणें लांबीच्या पल्लयावर मारा करितां येत नाहीं. शिवाय शौर्यानें, शक्तीनें व पांचपेंचानेंही तो माझ्यापेक्षां कमीच आहे. हें माझें विजय नांवाचें धनुष्य पूर्वी विश्वकर्म्यानें मुद्दाम इंद्राकरितां तयार केलें होतें. ह्याच धनुष्यानें त्यानें सर्व दैत्यांचा फडशा पाडला. ह्याचा नुसता टणत्कार ऐकूनच मोठमोठे दैत्यवीर घाबरून जात असत. पुढें तें धनुष्य इंद्रानें भार्गवाला दिलें व भार्गवानें मला दिलें. असें हें दिव्य धनुष्य मजजवळ असतांना अर्जुनाचें मजपुढें काय चालणार आहे ? अग्नीपुढें ज्याप्रमाणें झाडांच्यानें टिकाव धरवत नाहीं त्याप्रमाणें अर्जुनाच्यानेंही मजपुढें टिकाव धरवणार नाहीं.

आतां ज्याप्रमाणें मीं तुजपुढें माझ्या सामर्थ्याचें व शस्त्रांचें वर्णन केलें त्याप्रमाणेंच मला माझा कमीपणाही तुजपुढें सांगितलाच पाहिजे. अर्जुनाच्या धनुष्याची दोरी फार दिव्य आहे. ती कधींही तुटत नाहीं. त्याच्या बाणांचे भाते अक्षय्य आहेत. तो युगानुयुगें जरी एकसारखें युद्ध करीत राहिला तरी त्याच्या भात्यांतील बाण म्हणून नाहींसे व्हावयाचे नाहींत. तसाच त्याचा रथही फार दिव्य आहे. तो कधींही व कशानेंही मोडावयाचा नाहीं. घोडे तर मनोवेगीच आहेत. केवळ आपल्या भुभुःकारानेंच सर्व सेनेला पळवून लावणारा असा कपिश्रेष्ठ मारुती त्याच्या ध्वजावर आहे. पण त्यासर्वांत विशेष गोष्ट ही कीं, प्रत्यक्ष श्रीकृष्ण त्याचा सारथी आहे.

मद्राधीप शल्य हा सारथ्य करण्यांत श्रीकृष्णासारखाच कुशल आहे. तो जर माझा सारथी होईल तर फार बरें होईल. शिवाय माझ्या मागून चांगले घोडे जुंपलेले रथ तयार असूं देत. व बाणांनीं भरलेल्या गाड्याही माझ्या मागोमाग येऊं देत, ह्मणजे माझ्या या सर्व उणीवा भरून निघतील, आणि तेणेंकरून मी अर्जुनला सहज जिंकीन. तर हे राजा, आतां उगीच वेळ दवडूं नकोस. तूं येवढें माझें काम कर. आणि मग माझा पराक्रम पहा ! '

हें ऐकून राजा दुर्योधनाला फार आनंद झाला. तो कर्णाला ह्मणाला तूं जसें सांगतोस त्याप्रमाणें मी सर्व करितों. बाणांनीं भरलेले छकडे व रथ तुझ्या मागोमाग तयार ठेवितों, व शिवाय आह्मीही सर्वजण आपलीं धनुष्यें घेऊन तुझ्या मदतीकरितां तुझ्याजवळ उभे राहतों, असें ह्मणून राजा दुर्योधन शल्याकडे वळला व अतिशय नम्रपणानें त्याला ह्मणाला कीं, 'हे महाभाग मद्रेश्वर, आतां कर्ण जें बोलला तें

आपण ऐकलेंच, तेव्हां आतां कौरवांच्या कल्याणाकरितां आपण आज कर्णाचें सारथ्य करा. एवढी मी आपल्याला हात जोडून प्रार्थना करितों. आपण सारथी झालांत ह्मणजे कर्ण अर्जुनाला सहज जिंकील; ज्याप्रमाणें श्रीकृष्ण सर्व संकटांतून अर्जुनाचें रक्षण करीत आहे त्याप्रमाणें तुह्मीही आज कर्णाचें रक्षण करा. भीष्म, द्रोण, कृप, कर्ण, भोज, शकुनि सौबल, अश्वत्थामा व स्वतः आपण असे नऊच जण कायते माझे आधारस्तंभ आहां. त्यांपैकीं भीष्म, द्रोण तर पूर्वींच युद्धांत कामास आले आहेत. आणि त्यांच्याबरोबरच आमच्यापैकीं पुष्कळ योद्धे माझ्याकरितां ह्या धारातीर्थीं आपला देह ठेवून स्वर्गीं गेले आहेत. तर आतां जें थोडें सैन्य राहिलें आहे तें तरी पांडवांच्या हातीं सांपडणार नाहीं असें करा. कर्णाला जयाची आशा पुष्कळ आहे, पण त्याला योग्यसा सारथीच नाहीं, ह्मणून तो निराश झाला आहे. तर यावेळीं येवढें काम तुह्मी करा. आजपर्यंत अर्जुनानें आमचे सैन्याचा पुष्कळ फडशा पाडला आहे, पण आतां तुह्मी दोघेजण मिळून त्याचा नाश करा. कर्ण हा रथीलोकांमध्यें श्रेष्ठ आहे व आपण सारथ्यांमध्यें श्रेष्ठ आहां. तुह्मा दोघांचा समागम फारच अपूर्व होणार आहे. तुह्मां दोघांला पाहून देवगण सुद्धां मागें सरकतील; मग यःकश्चित् पांडवांची ती काय कथा ! ' हें दुर्योधनाचें भाषण ऐकून शल्य रागानें फुस्कारे टाकूं लागला. त्याचे डोळे लाल झाले. कपाळाला आंठ्या पडल्या व क्रोधातिरेकानें सर्व शरीर कांपूं लागलें. तो राजा दुर्योधनाला ह्मणाला, ' हे अंधपुत्रा, माझा असा अपमान करतोस काय ? अगदीं निःशंकपणें मला कर्णाचा सारथी हो ह्मणतोस त्यांत तुला कांहींच वाटत नाहीं काय ? तुला माझ्यापेक्षां कर्णाची योग्यता जास्त आहे असें वाटतें. पण मी त्याला कस्पटाप्रमाणें लेखतों. आतांच पाहिजे असेल तर त्याला मजपुढें उभा कर. मी त्याचा फडशा पाडून आल्या वाटेनें परत जातों. किंवा मी एकटाच ह्या पांडवांवर चालून जाऊन त्यांचा नाश करतों. युद्धामध्यें अशा रीतीनें माझा अपमान करणें हें तुला बरें नाहीं. हत्तीच्या सोंडेसारखे पुष्ट व वज्रासारखे बळकट असलेले हे माझे बाहू पहा. त्याचप्रमाणें माझें हें धनुष्य, हे तीक्ष्ण बाण, हा दिव्य रथ व पर्वतासारखी स्थूल अशी ही गदा जिनें ह्या सर्व पृथ्वीचा मी एका क्षणांत चुराडा करून सोडीन, व जिच्या साहाय्यानें सर्व समुद्राला शोषून टाकीन अशी माझी अस्त्रविद्या याकडे थोडेंसें लक्ष दे. राजा, तूं मला काय ह्मणून ह्या हीन कुळांत जन्मलेल्या राधेयाचें सारथ्य करण्यास सांगतोस. ब्रह्मदेवानें आपल्या तोंडापासून ब्राह्मण निर्माण केले आहेत, बाहूपासून क्षत्रिय निर्माण केले आहेत, मांड्यांपासून वैश्य व पायांपासून शूद्र निर्माण केले आहेत असें श्रुति सांगते. त्यापैकीं ब्राह्मण, याजन, अध्यापन व शुद्ध परिग्रह या तीन कर्मांनीं बाकीच्या तीन वर्णांपेक्षां अत्यंत श्रेष्ठ आहेत. पीडितांचें रक्षण करून धर्मस्थापना करावी हें क्षत्रियांचें कर्म असल्यामुळें ते बाकीच्या दोन वर्णांपेक्षां श्रेष्ठ आहेत. कृषि व पशुपालन यायोगेंकरून वैश्य शूद्रांपेक्षां श्रेष्ठ व शूद्रांनीं ह्या तिन्ही वर्णांची यथायोग्य सेवा करावी हेंच त्यांना विहित आहे. त्या शूद्रापैकींच हे सूत ! मग त्यांची सेवा उच्च कुलांत जन्मलेल्या क्षत्रियानें करावी असें कोठें तरी ऐकिलें आहेस काय ? व तें कधीं तरी योग्य होईल काय ? मी मूर्धाभिषिक्त राजा आहें. शिवाय महारथ्यांमध्यें माझी गणना होते. मग मी अशा प्रकारचा बलवान व ऐश्वर्यसंपन्न असून मला या यःकश्चित शूद्रपुत्राची सेवा कर म्हणतोस हें मला मुळींच सहन होत नाहीं.' असें ह्मणून शल्य निघून चालूं लागला. नंतर दुर्योधनानें पुष्कळ आर्जव करून त्याला थांबवून धरला. व त्याला अत्यंत मधुरवाणीनें म्हणाला कीं, ' अहो मद्रेश्वर, आपण जें म्हणतां तें सर्व खरें आहे. कर्ण आपल्यापेक्षां अधिक आहे असें मला मुळींच वाटत नाहीं. आपण नेहमीं ऋत(खरें) बोलणारे आहां ह्मणूनच आपल्याला आर्तायनी असें म्हणतात. व शत्रूंच्या डोळ्यांत आपल्या पराक्रमानें रात्रंदिवस सलत असतां ह्मणूनच आपल्याला शल्य असें ह्मणतात. आपण गुणांनीं व पराक्रमांनीं कर्ण, अर्जुन व श्रीकृष्ण या सर्वांपेक्षां अत्यंत श्रेष्ठ आहां असें मला वाटतें. व सर्व जगही असेंच म्हणतें. कर्ण अस्त्रविद्येंत अर्जुनापेक्षां अधिक निपुण आहे व सारथ्यकलेंत आपण श्रीकृष्णापेक्षां अधिक कुशल आहां. शिवाय रथ्यापेक्षां सारथीच अधिक शूर व कुशल असावा ला-

गतो. त्याप्रमाणें आपण कर्णापेक्षां युद्धविद्येंत अधिक निपुण आहां. ह्मणून आपणच त्याचें सारथ्य करावें. पूर्वी त्रिपुरासुराचे वेळीं रुद्राला आपणापेक्षां अधिक गुणवान सारथी पाहिजे होता. तेव्हां सर्व देवांनीं मिळून ब्रह्मदेवाची प्रार्थना करून त्याला रुद्राचें सारथ्य करावयाला लाविलें, त्याप्रमाणें आह्मी आज आपली प्रार्थना करतों. हें ऐकून शल्यानें राजा दुर्योधनाला आलिंगन दिलें व सांगितलें कीं, हे प्रियदर्शना, तुझ्या म्हणण्याप्रमाणें मी सर्व करतों. पण युद्धप्रसंगीं मला जें योग्य वाटेल, मग तें प्रिय असो वा अप्रिय असो, तें मी बोलत जाईन. त्याबद्दल तूं किंवा कर्णानें रागवतां उपयोगी नाहीं. ' हें ऐकून कर्ण ह्मणाला, ' ज्याप्रमाणें ब्रह्मदेवानें रुद्राचें सारथ्य केलें व श्रीकृष्ण अर्जुनाचें सारथ्य करीत आहे त्याचप्रमाणें आपण माझें सारथ्य करून कौरवांचें कल्याण करा. '

ह्यावर पुनः शल्य ह्मणाला, ' दुसऱ्याची निंदा करणें किंवा आपली आपण स्तुति करणें हें शहाण्या मनुष्याला योग्य नाहीं. तरी पण माझी योग्यता किती आहे हें मी तुला सांगतों. पुढें येणाऱ्या संकटाचा आधींच कायास बांधून तें निवारण्याचा उपाय करणें, न मारतां किंवा विशेष त्रास न देतां घोड्यांना जलदीनें चालविणें, व चहूंकडे सारखें लक्ष पुरविणें या सर्वांमध्यें इंद्रसारथी मातली याच्यानेंही माझी बरोबरी करवणार नाहीं; आज युद्धसमयीं मी तुझे घोडे हांकतों. तूं त्याबद्दल अगदीं निष्काळजी ऐस.'

नंतर कर्णानें आपल्या जैत्र नांवाच्या रथाची विधिपूर्वक पूजा करून त्याला प्रदक्षिणा घातली व सूर्याला नमस्कार करून शल्याला रथावर चढावयाला सांगितलें, त्याबरोबर शल्य रथावर चढला, व त्याचे मागोमाग कर्णही आपलें धनुष्य सज्ज करून रथांत बसला. हें पाहून दुर्योधनाला आपण कृतकृत्य झालों असें वाटलें. तो आनंदानें कर्णाला ह्मणाला, ' भीष्मद्रोणांनींही जें कर्म केलें नाहीं असें अघटित कर्म आज तूं कर. राजा धर्माला जिवंत धर, किंवा धनंजयाला तरी ठार कर. जा; विजयी हो. '

असें दुर्योधनानें सांगितल्याबरोबर व कर्णाचा रथ चालू झाल्याबरोबर सर्व कौरवांना अतिशय हर्ष झाला. तेही आपल्या जिवावर उदार होऊन त्याच्या मागोमाग निघाले, व शुभसूचक रणवाद्यांचा गजर चालू झाला, पण जिकडे तिकडे दुःश्चिन्हें दिसूं लागलीं. पृथ्वी डळमळूं लागली व तींतून एक प्रकारचा भयंकर आवाज निघूं लागला. जिकडे तिकडे उल्कापात होऊं लागले, आकाशांत अभ्र नसतांही वीज कडाडूं लागली, नाना प्रकारचीं श्वापदें व पक्षी हीं सर्व सैन्याला उजवी घालूं लागलीं. कर्णाच्या रथाचे घोडे आरंभालाच ठेंचळून पडूं लागले, सैन्यांतील सर्व घोड्यांच्या व हत्तींच्या डोळ्यांतून पाणी वाहूं लागलें. हीं व अशाच तऱ्हेचीं दुसरीं शेंकडों दुश्चिन्हें होत होतीं तरी कौरवांकडील लोक मुळींच कचरले नाहींत, ते उलट कर्णाचा जयजयकारच करूं लागले,

त्याबरोबर कर्ण थोडासा गर्वानें शल्याला ह्मणाला, ' शस्त्रास्त्रें घेऊन रथामध्यें बसलों ह्मणजे मी इंद्रालाही डरत नाहीं. भीष्मासारखे रणवीर या रणभूमीवर पडले हें पाहून तर माझे बाहू जास्तच स्फुरण पावतात; व माझें मन युद्धाला अतिशय आतुर होतें. शौर्य, वीर्य, बल, धैर्य व युद्धचातुर्य ह्या सर्व गुणांनीं युक्त अशा द्रोणाचार्यांच्यानेंही अर्जुनाचा समाचार घेववला नाहीं. ह्यावरून मला असें वाटतें कीं माझ्यावांचून ह्या यमस्वरूपी अर्जुनावर चालून जाण्याची कोणाची छातीच होत नाहीं, शिवाय, पाणीदार शस्त्रें, दिव्य अस्त्रें, अचाट सामर्थ्य व अमित पराक्रम एवढ्यानेंच कधींही जय मिळत नाहीं अशी माझी आतां पक्की खात्री झाली आहे. दैवगति अनुकूल असल्यावांचून जय मिळणें फार कठिण आहे. असें जरी आहे तरी माझा उत्साह अधिकाधिकच वाढत आहे. तर ज्या ठिकाणीं श्रीकृष्ण, अर्जुन, भीमसेन, सात्यकि व धृष्टद्युम्न वगैरे मंडळी उभी आहे तिकडे मला लौकर न्या. आज युद्धामध्यें पराक्रम करून मी त्या सर्वांना यमलोकीं पाठवीन किंवा स्वतःच त्यांच्याकडून मारला जाऊन द्रोणाचार्यांच्या भेटीला जाईन. इंद्र, वरुण, यम वगैरे देवही जरी आज अर्जुनाच्या मदतीला आले तरी न डरतां मी त्या सर्वांचा पराभव करीन, व अर्जुनाला ठार करीन.'

हें ऐकून शल्यानें त्याचा पुष्कळ उपहास केला. शल्य ह्मणाला, ' पुरे, पुरे, उगीच कशाला बडबड

करतोस? तो पुरुषश्रेष्ठ अर्जुन कोणीकडे व तूं कोणीकडे? ज्या जयानें देव, दानव, यक्ष व राक्षस ह्या सर्वांचा पराजय करून अग्नीला खांडववन दिलें त्याची बरोबरी उगीच कशाला करतोस? शिवाय हेंही तुला माहीतच आहे कीं, गंधर्वांनीं जेव्हां तुझ्या राजाला धरून नेला तेव्हां ह्या अर्जुनानेंच आपल्या पराक्रमानें त्याला सोडवून आणला. गोग्रहणाचे वेळीं भीष्माचार्य, द्रोणाचार्य, अश्वत्थामा वगैरे बडे-बडे योद्धे बरोबर असतांनाही अर्जुनानें तुमचा पराभव केला! मग त्या वेळीं तुझा पराक्रम कोठें गेला होता? आतां आपण येथून पळ काढलात तरच बरें आहे, नाहींतर आज आपली येथें गच्छंतीच होणार आहे हें आपण खास समजा.'

कर्ण ह्मणाला, 'उगीच त्याची तरी कशाला एवढी स्तुति करतां? आतां माझें त्याचें युद्धच होणार आहे. तेव्हां कोणाचा पराक्रम अधिक आहे हें प्रत्यक्षच दिसून येईल.'

'बरें तसेंच कां होईना' ह्मणून शल्यानें रथ हांकला. थोडेंसें पुढें गेल्यावर पांडवांची सेना शस्त्रास्त्रें घेऊन समरांगणावर सज्ज आहे असें दिसून आलें. हें पाहून कर्ण जो कोणी भेटेल त्या प्रत्येकाला अर्जुन कोठें आहे हें दाखविण्याबद्दल बक्षिसें देऊं करूं लागला. तो ह्मणाला, 'जो कोणी माझी व अर्जुनाची गांठ घालून देईल त्याला तो मागेल तितकें धन मी देईन. तें त्याला पसंत न पडेल तर शंभर दुभत्या गाई देईन. तेंही पसंत न पडलें तर शंभर गांवें इनाम देईन. तेंही त्याला पटलें नाहीं तर रत्नालंकारानें मंडित अशा शंभर तरुण सुंदरी देईन. आतां फार काय सांगूं. जो कोणी अर्जुनाची व माझी गांठ घालून देईल त्याला मी माझी बायको, मुलें, व जी जी काय माझी संपत्ती आहे ती सर्व देईन. आणि त्याशिवाय कृष्णार्जुनांना मारून त्यांचीही सारी संपत्ति त्यालाच देईन.

हें ऐकून शल्य ह्मणाला, 'हे सूतपुत्रा, उगीच बक्षिसें देत बसूं नकोस. आतां लौकरच तुझी आणि धनंजयाची गांठ पडेल. तूं आतां देऊं केलेल्या संपत्तींतून शेंकडों यज्ञ होतील. मग ह्या सहज होणाऱ्या कामाकरितां एवढी संपत्ति कशाला खर्च करतोस? शिवाय अर्जुनाशीं युद्ध करण्याची तुझी इच्छा, गळ्यांत धोंडा बांधून समुद्र तरून जाण्याची इच्छा करणें किंवा पर्वताच्या कड्यावरून उडी टाकणें ह्याच्या इतकीच मूर्खपणाची आहे. तुला तुझ्या कल्याणाची इच्छा असेल तर सर्व वीरांना बरोबर घेऊन व्यूहरचना कर आणि नंतर अर्जुनाशीं युद्ध कर. दुर्योधनाच्या हिताकरितां मी तुला ही गोष्ट सांगत आहें. तुला जगावेंसें वाटत असेल तर माझ्या बोलण्यावर विश्वास ठेव.'

कर्ण ह्मणाला, 'माझ्या अंगीं तितका पराक्रम आहे ह्मणूनच मी अर्जुनाशीं युद्ध करण्याला तयार झालों आहें. तुह्मी मात्र शत्रूप्रमाणें ह्या वेळीं मला भिववावयाला लागला आहां. प्रत्यक्ष इंद्र जरी आपलें वज्र घेऊन मला युद्धांतून परतवूं लागला तरी सुद्धां मी युद्धांतून परत जाणार नाहीं.'

शल्य ह्मणाला, 'अर्जुनाच्या बाणांचा जेव्हां मारा होईल तेव्हां तुला माझ्या बोलण्याची आठवण होईल. ज्याप्रमाणें लहान पोर आपल्या आईच्या मांडीवर निजून आकाशांतला चंद्र आणून देण्याबद्दल मूर्खपणानें तिच्यापाशीं हट्ट करतें त्याप्रमाणेंच अर्जुनाला जिंकण्याबद्दलचा तुझा हव्हही मूर्खपणाचाच आहे. चवताळून गर्जना करणाऱ्या सिंहाला एखाद्या हरिणाच्या पाडसानें युद्धाला बोलवावें, किंवा बिळांत असलेल्या कृष्णसर्पाला लहान मुलानें काठीनें डिवचावें त्याप्रमाणेंच तुझी ही कृति चालली आहे.'

कर्ण ह्मणाला, गुणी मनुष्यच गुणवानाच्या गुणाची परीक्षा करतो. निर्गुणी पुरुषाच्या हातून ती होणें नाहीं. आपण अगदीं गुणहीन आहां, मग आपल्याला त्याच्या गुणाची पारख कशी होईल? अर्जुनाचा पराक्रम किती आहे व त्याचें अस्त्रसामर्थ्य कितपत आहे हें मला पक्कें माहीत आहे. त्याचप्रमाणें कृष्णाचा मोठेपणा किती आहे हेंही मी ओळखून आहें. म्हणूनच मी अर्जुनाला युद्धाबद्दल आव्हान करतों. सर्व वृष्णिवीरांमध्यें लक्ष्मी काय ती कृष्णाजवळच आहे व सर्व पांडवांमध्यें विजयी असा अर्जुनच आहे. मग अशा दोघांची एकदम गांठ पडली असतां युद्धांतून परत कोण जाईल? असा लक्ष्मीवान् श्रीकृष्ण व असा विजयी अर्जुन हे दोघेही रथांत बसून केवळ माझ्याच करितां धां

वून येत आहेत. ह्यावरूनच मी किती भाग्यशाली आहें ह्याची परीक्षा करा. अर्जुनाचें गांडीव व श्रीकृष्णाचें चक्र हीं पाहून सामान्य भ्याडांची गाळण उडते; पण माझ्यासारख्या शूराला उलट जास्त हर्षच होतो. तुह्मी माझे मित्र असून शत्रूप्रमाणें मला भिववावयाला पाहतां. तेव्हां आज मी कृष्णार्जुनांना मारून नंतर आपली ही तीच वाट लावतों. मला माझ्यापराक्रमाची इतकी खात्री आहे कीं, हजारों वासुदेव किंवा हजारों अर्जुन जरी एकदम माझ्यावर चालून आले तरी त्या सर्वांना मी एकटा बस्स आहें. आतांउगीच स्वस्थ तरी बसा. मद्रक हे किती नीच लोक आहेत हें मला ठाऊक आहे. एका ब्राह्मणानें राजदरबारीं येऊन असें सांगितलें कीं, मद्रक हे अत्यंत दुष्ट बुद्धीचे असून ते नेहमीं खोटें बोलतात. जगामध्यें दुष्कर्म म्हणून जेवढें असेल तें सर्व मद्राकांच्या ठिकाणीं भरलें आहे. बाप, मुलगा, सासू, सासरा, जांवई, मुली, भाऊ, बहीण व आले गेलेले व घरचीं नोकर माणसें हीं सर्व एके ठिकाणीं बसतात. आणि स्त्रिया त्यांपैकीं वाटेल त्याशीं, मग तो ज्ञात असो वा अज्ञात असो, रत होतात. मद्रकांच्या घरामध्यें सातूच्या पिठांत झांकून मासे खाण्याची पद्धत फार आहे. ते नेहमीं गोमांस खातात व दारू पितात. आणि मग उन्मत्त होऊन वाटेल तसे अबद्ध प्रलाप करतात. मग अशांच्या ठिकाणीं धर्माधर्माचा विचार तो काय असणार? अथर्व वेदामध्यें, 'ज्याप्रमाणें ब्रह्मद्वेष्टा मनुष्य किंवा मद्रकाशीं सहवास करणारा मनुष्य नेहमीं अधोगतीला जातो त्याप्रमाणें आतां मीं घेतलेल्या मद्रकाच्या नांवानें हे विंच्वा, तुझें विष नाहींसें होऊं दे.' असा विंचवाचें विष उतरण्याबद्दलचा मंत्र आहे. व हा मंत्र पुष्कळ ज्ञाते लोक विंचू चावला असतांना नेहमीं म्हणत असतात. शिवाय तुमच्यांतील स्त्रिया मद्य पिऊन उन्मत्त झाल्या म्हणजे अंगावरचीं वस्त्रें वगैरे टाकून देऊन तशाच नाचूं लागतात, तसेंच रतिप्रसंगीं वाटेल त्याच्याशीं रत होतात; मग अशा स्त्रियांच्या पोटीं जन्म घेऊन माझ्या पुढें धर्मवाद करण्याबद्दल तुला लाज वाटावी.

शिवाय शुद्ध क्षत्रियांचा धर्म निराळाच आहे. शत्रूशीं युद्ध करीत करीत धारातीर्थीं जो शूर पुरुष आपला देह ठेवतो तोच क्षत्रियांमध्यें उच्च प्रतीत गणला जातो. व तोच स्वर्गतीला जातो. त्याप्रमाणें मला स्वर्गाला जाण्याची इच्छा असून तशा प्रकारचा योग्य प्रसंग हा मला अनायासेंच मिळाला आहे. दुर्योधन हा माझा परम मित्र आहे. त्याच्याकरितां मी आपले प्राण, माझ्याजवळची संपत्ति, किंबहुना माझें सर्वस्व खर्चण्यास तयार आहें. तुमच्यासारख्या शेंकडों जणांनीं जरी खटपट केली तरी सुद्धां हा क्षत्रियपुत्र युद्धांतून पराङ्मुख होणार नाहीं. मला माझे गुरू भार्गव याणीं समरांगणीं देह ठेवणाऱ्या शूरांच्या पुण्याईबद्दल पुष्कळ सांगितलें आहे. व त्याची मला पक्की आठवण आहे म्हणून मी आतां या युद्धांतून केव्हांही परतणार नाहीं. तूं मात्र आतां जास्त बडबड करूं नकोस. तुझ्या या अभद्र प्रलापाबद्दल तुला आतांच ठार केला असता, पण राजा दुर्योधनाचें कार्य व्हावयाचें आहे म्हणून या वेळीं गय करतों. पुनः जर असें बोलशील तर याच गदेनें तुझें डोकें फोडून टाकीन. आतां उगीच रथ हाक.

शल्य ह्मणाला, 'मी मूर्धाभिषिक्त अशा शुद्ध क्षत्रियांच्या पोटीं जन्मलों आहें. ज्याप्रमाणें एखादा मद्यपी बडबडतो त्याप्रमाणें तूंही बडबडूं लागला आहेस. पण मी आपल्या मित्रत्वाला स्मरून तुझ्या हिताच्या गोष्टी सांगत आहें. त्याबद्दल उलट तूं मला मारावयाला तयार झालास. मी सारथी होऊन तुझ्या मदतीला आलों आहें. तेव्हां तुझें सुख, दुःख, बल, अबल, श्रम, उत्साह, शस्त्रास्त्रांची सामुग्री, घोड्यांचा उत्साह व पक्ष्यांचा शुभसूचक किंवा अशुभसूचक आवाज हीं सर्व मला पाहिलीं पाहिजेत व त्यांत कांहीं कमीजास्त दिसल्यास मला त्याचा प्रतिकारही केला पाहिजे. पण याबद्दल तूं मला शिव्या देतोस! परंतु यांत नवल नाहीं. नीच असेच असतात.

समुद्राच्या कांठीं एक धनवान् वाणी रहात होता. त्याला पुष्कळ मुलगे होते. त्या सर्व मुलांच्या ताटांतून जें उरे तें खाऊन एक कावळा फार पुष्ट झाला होता. कोणी एक वेळीं हंस पक्षी त्या समुद्राच्या कांठीं आनंदानें येऊन बसले होते. त्यावेळीं त्या वाण्याच्या मुलांनीं आपल्या कावळ्याला ह्मटलें, 'तूंच सर्व पक्ष्यांमध्यें श्रेष्ठ आहेस, तुझ्यासारखा तीव्र ग-

तीचा एकही पक्षी नाहीं. ' हें त्या उष्टें खाऊन वाढलेल्या कावळ्याला अगदीं खरें वाटलें व तो ऐटीनें त्या हंसांकडे जाऊन माझ्याबरोबर कोणाला उडावयाचें असेल तर चला असें ह्मणाला. ' हें ऐकून ते हंस ह्मणाले, ' आह्मी मानससरोवरांत रहाणारे हंस आहोंत. दूर उडण्यावद्दल सर्व पक्ष्यांमध्यें आमची ख्याति आहे. मग हे कावळ्या, आह्मां हंसांबरोबर तूं कसा उडशील? ' हें ऐकून कावळा त्यांची निर्भर्त्सना करून ह्मणाला, ' मला एकंदर उडण्याच्या एकशें एक पद्धती माहीत आहेत व त्यांपैकीं प्रत्येक पद्धतीनें चार चारशें कोसपर्यंत मी सहज जातों. हें ऐकून त्यांतील मुख्य हंस ह्मणाला, 'तुला एकशें एक गति माहीत आहेत. परंतु पक्ष्यांची सर्वसाधारण अशी एकच गति मला माहीत आहे. मला दुसऱ्या गति माहीत नाहींत. पण चल, तुला वाटेल त्या पद्धतिनें ऊड. ' हें ऐकून तेथें जमलेले कावळे खदखदा हांसून ह्मणाले कीं, एकाच गतीनें शंभर गतींच्या कावळ्याची बरोबरी कशी होईल? अशी या कावळ्यांनीं त्याची पाठ थोपटल्याबरोबर तो कावळा मोठ्या ऐटीनें वर, खालीं, मागें, पुढें, वांकडा, तिरपा अशा रीतीनें पुष्कळ तऱ्हेनें तिथल्या तिथेंच उडून दाखवूं लागला. हें पाहून तर त्याच्या जातभाईंना फारच आनंद झाला. ते या झाडावरून त्या झाडावर व त्या झाडावरून या झाडावर उड्या मारूं लागले व आपण विजयी झालों असें समजून त्या हंसाची निर्भर्त्सना करण्याकरितां ' काव काव ' असा शब्द करूं लागले. हंसही आपल्या नेहमींच्या चालीप्रमाणें प्रथमतः हळूच उडाला. त्यामुळें तो कावळ्याच्या मागें पडला. त्याबरोबर सर्व कावळे पुनः मोठ्यानें ' काव काव ' असा शब्द करूं लागले. तें ऐकून हंसाला त्वेष चढला व त्यानें पश्चिमेकडच्या बाजूला समुद्राच्या रोंखानें एक जोरानें झपाटा मारला. त्याबरोबर तो अगदीं समुद्रमध्यापर्यंत जाऊन पोहोंचला. कावळाही त्याच्या मागोमाग उडाला. पण त्याला त्या समुद्रामध्यें कोठेंही झाड दिसेना. तें पाहून मी आतां विश्रांति घेण्याकरितां कोठें बसूं अशी त्याला चिंता पडली. व दमून गेल्यामुळें त्याच्यानें जोरानें उडवेना देखील! इकडे हंस तर सारखा पुढें चालला होता. पण थोडासा पुढें गेल्यावर मागें वळून पहातो तों त्याला कावळा दिसेना. आपण एकटेंच पुढें जाणें हें बरें नव्हे असा विचार करून त्याची वाट पहात मध्येंच कांहीं वेळ थांबला, इतक्यांत कावळाही अगदीं दमून गेल्यामुळें धापा टाकीत टाकीत हातापायांत शक्ति नसल्यामुळें पाण्याच्या जवळून जवळून येऊन पोहोंचला. हें पाहून हंस त्याला ह्मणला, ' तूं मघाशीं तुला उडण्याच्या एकशें एक गति माहीत आहेत असें सांगितलेंस त्यांपैकीं आतां ज्या गतिनें तूं येतोस, त्या गतीचें नांव काय? मधून मधून पाण्यामध्यें पंख बुडाविणें, चोंच बुडाविणें व धापा टाकीत उडणें ही उडण्याची पद्धत त्या एकशें एक पद्धतींपैकींच आहे काय? कां त्यांपेक्षां निराळी आहे. कावळ्या, ये लवकर ये, मी तुझी वाट पहात आहें. ' हें ऐकून व पाण्याचा अंत कोठें आहे हें न समजल्यामुळें घाबरून व श्रमानें अगदीं थकून गेल्यामुळें अगदीं मंद अशा दीन वाणीनें कावळा त्या हंसाला ह्मणाला, ' हे हंसराजा, आह्मी किती झालें तरी जातीनें कावळे आहों. कोठें तरी ' काव, काव ' करीत लोकांना त्रास देत या झाडावरून त्या झाडावर उडण्याइतकीच आमची योग्यता. हे हंसश्रेष्ठा, मी आतां तुला अगदीं शरण आलों आहें, आतां मला कसेंही करून या अपार समुद्राच्या पलीकडे ने. ' असें ह्मणून कावळा अंगांत शक्ति नसल्यामुळें धाडदिशी पाण्यांत पडला. अशा रीतीनें मरणोन्मुख होऊन शरण आलेल्या कावळ्याला हंस ह्मणाला, ' तूं एकशें एक पद्धतींनीं सर्व आकाशांतून उडून येणारा प्रचंड कावळा असून ह्या एवढ्याशा लहान फेरीनेंच कसा दमून गेलास?

हें त्याचे बोलणें ऐकून अगदीं दीन मुद्रेनें त्याच्याकडे पाहत कावळा त्या हंसाला ह्मणाला हे हंसपते उच्छिष्ट खाऊन वाढलेला मी कावळा गर्वानें आजपर्यंत आपल्याला गरुडाप्रमाणेंच समजत होतों; आणि त्याच कल्पनेनें आजपर्यंत मीं माझे जातभाई जे दुसरे कावळे त्यांचा व इतर पक्ष्यांचा पुष्कळ अपमान केला आहे. हे हंसा, आतां मी तुला शरण आलों आहें. मला जर आतां सुखरूपपणें माझ्या देशाकडे नेऊन पोहोंचवशील तर मी आतां तेथें गेल्यावर कोणाचाही अपमान कर-

णार नाहीं. मला आतां या अडचणींतून मुक्त कर.

अशा रीतीनें दीनवाणीनें त्याची प्रार्थना करीत व दुःखानें 'काव काव' करीत तो कावळा अंगांत शक्ति नसल्यामुळें अगदीं बुडण्याच्या घाईला आला. हें पाहून त्या हंसाला दया आली. त्यानें त्याला आपल्या पायांनीं उचलून पाठीवर घेतला व जेथून पैज मारून हे दोघेही निघालें होते त्या ठिकाणीं आणून पोंहोंचविला. नंतर तो हंस त्या कावळ्याची समजूत करून आपल्या देशाकडे निघून गेला.

याप्रमाणें हे कर्णा, तूंही ह्या कौरवांच्या उष्ट्यावर वाढला आहेस. ह्मणून सर्व शूरांचा अवमान करीत आहेस. द्रोणाचार्य, कृपाचार्य, भीष्माचार्य, अश्वत्थामा व दुसरे बडेबडे कौरववीर हे सर्व बरोबर असतांना विराटनगरामध्यें तुझ्या हातून त्या एकट्या अर्जुनाचा पराभव करणें झालें नाहीं. त्या वेळीं ज्याप्रमाणें सिंहाच्या गर्जनेला भिऊन कोल्हे रानोमाळ पळत सुटतात त्याप्रमाणें तुह्मी सर्वजण त्याच्या माऱ्याला भिऊन पळत सुटला. अर्जुनानें प्रत्यक्ष आपल्या भावाला मारलेला पाहूनही तूं त्याचा सूड न घेतां तसाच पळत सुटलास. आतां जेव्हां ते कृष्णार्जुन तुझ्या डोळ्यांपुढें येतील तेव्हां मात्र तूं अशी बडबड करणार नाहीं.अर्जुनाच्या तीक्ष्ण बाणांचा मारा बसूं लागला ह्मणजे तुला अर्जुनामध्यें व आपल्यामध्यें काय अंतर आहे हें समजून येईल. त्या नरसिंहाची बरोबरी करूं नकोस.'

कर्ण ह्मणाला, 'शल्या, तूं उगीच बडबडूं नकोस. अर्जुनाच्या अस्त्रविद्येची मला पक्की माहिती आहे. त्याच्या अंगांत पराक्रम किती आहे हेंही मी ओळखून आहें. मी त्या कृष्णार्जुनांशीं युद्ध केल्याशिवाय कधींहि राहणार नाहीं. परंतु ह्या वेळेला त्या ब्राह्मणश्रेष्ठ परशुरामाच्या शापाची आठवण झाली ह्मणजे मात्र थोडासा कचरतों. परंतु मी आज दुसऱ्या अस्त्रांनीं तरी त्याच्याशीं युद्ध करीन. भिऊन युद्धांतून कधीं परत जाणार नाहीं. शिवाय आणखीही एक गोष्ट झाली आहे. कोणे एक वेळीं मीं अरण्यांतून फिरत असतांना सहज चुकून एका ब्राह्मणाच्या गाईच्या वासरावर बाण सोडला. त्याबरोबर तें वासरूं तडफडून तेथेंच प्राणास मुकलें. तें पाहून त्या ब्राह्मणाला फार राग आला व त्यानें मला शाप दिला कीं, युद्धाचे प्रसंगीं ज्यावेळेस तुझा मरणकाल समीप येईल तेव्हां तुझें चाक जमिनींत घुसेल.' तेव्हां मी त्या ब्राह्मणाला शरण गेलों व हजार गाई देऊं लागलों तरीही तो माझ्यावर प्रसन्न होईना तेव्हां मी चवदा हजार कपिला गाई देऊं लागलों तरीही तो प्रसन्न होईना. ह्मणून मी माझें घरदार सर्व संपत्ति देऊं केली, पण ब्राह्मण ह्मणून संतुष्ट होईना व तो ह्मणूं लागला कीं, मी जें बोललों तें कधींही खोटें होणार नाहीं. जा. आतां उगीच माझ्याशीं जास्त भाषण करूं नकोस.' हें ऐकून मी मुकाट्यानें आपल्या घराकडे परतलों. तथापि मी त्या शापालाही भीत नाहीं. शल्या तुला माझ्या अंगांतला पराक्रम माहीत नाहीं, ह्मणूनच तूं अशी बडबड करतो आहेस. हा कर्ण युद्धांतून भिऊन जाण्याकरितां जन्माला आला नाहीं. हा पराक्रम करून यश मिळविण्याकरितांच जन्माला आला आहे. शिवाय शल्या, तूं अत्यंत गुणहीन आहेस, यामुळें तुला मजपुढें बोलण्याचा अधिकार नाहीं. ज्याच्या राज्यांत मद्यपान बुधस्त्रीगमन, बालहत्या, परद्रव्याचा अपहार वगैरे पापकर्मे चालतात त्या राजाला धर्माच्या बाबतींत बोलण्याला कोणताही अधिकार नाहीं. आतां तूं उगीच स्वस्थ रहा. केशवार्जुनाच्या पूर्वीं तुलाच मारण्याचा प्रसंग आणूं नकोस.'

शल्य ह्मणाला, 'हे कर्णा, ज्या अंगदेशाचा तूं अधिपती आहेस त्या **तुझ्या अंगदेशांत आपल्या बायकामुलांचा विक्रय अगदीं राजरोस रीतीनें चालला आहे.** तिकडे आधीं लक्ष दे. प्रत्येक ठिकाणीं चांगलें व वाईट हीं दोन्ही असावयाचींच. पण **मनुष्यप्राणी दुसऱ्याचे दोष काढण्यांत मात्र अत्यंत निपुण असतो. पण स्वतःचे दोष त्याला मुळींच दिसत नाहींत. कळले तरी वळत नाहींत.** प्रत्येक देशामध्यें धार्मिक लोकही असतात व अधर्मिकही असतात. राजे, आपल्या शक्तीप्रमाणें आपल्या देशांतून अधर्म नाहींसा करण्याबद्दल नेहमीं प्रयत्न करीत असतात. एकाद्या विशिष्ट देशामध्यें सर्वकालीं सर्वच लोक पापाचारी असतात असें नाहीं.'

अशा रीतीनें ह्या कर्णशल्यांचें भाषण चालले असतांना राजा दुर्योधनानें येऊन त्या दोघांची समजूत केली व हात जोडून या युद्धाचे प्रसंगीं अशा रीतीनें आपापल्यामध्यें वैमनस्यें आणूं नका अशी त्यांची प्रार्थना केली. तेव्हां कर्णही कांहीं बोलला नाहीं, व शल्यानें निमूटपणें रथ हाकला.

ह्या वेळीं कृपाचार्य, कृतवर्मा हे मागधाना बरोबर घेऊन त्या कौरवसेनेच्या उजव्या बाजूकडे उभे होते. त्याच्या जवळच शकुनि व उलूक हे दोघे आपले बीटेकरी घोडेस्वार घेऊन त्यांच्या मदतीकरितां तयार होते. डाव्या बाजूला संशप्तक वीर आपले बारा हजार रथी घेऊन उभे होते व त्यांच्या जवळ शक, यवन व कांबोज वगैरे वीर युद्धाला तयार होऊन उभे होते. कर्ण सर्वांच्यामध्यें उभा होता. दुःशासन त्याच्या मागें उभा होता व सर्व सेनेच्या मागून दुर्योधन आपल्या सर्व भावांसह आपल्या सैन्याचें रक्षण करण्याकरितां आपली तलवार परजवीत होता. अशा रीतीनें बार्हस्पत्य नांवाच्या महाव्यूहाची रचना करून कर्ण पांडवावर चालून गेला. ही कौरवसेना अशा जय्यत तयारीनें आपल्यावर चाल करून येत आहे हें पाहून राजा युधिष्ठिर धनंजयाला ह्मणाला, 'अर्जुना, कर्णानें व्यूहाची रचना कशी केली आहे हें तुला दिसतेंच आहे. आतां जेणेंकरून त्यांचा प्रभाव आमच्यावर चालणार नाहीं असें कर. माझ्या मतानें तूं स्वतः कर्णावर चालून जावेंस, भीमानें सुयोधनाला गांठावें, नकुलानें वृषसेनावर चाल करावी. सहदेवानें सौबलाशीं भिडावें, शतानीकानें दुःशासनाचा समाचार घ्यावा, व सात्यकीनें कृतवर्म्यावर मारा करावा. आणि मीं स्वतः कृपाचार्याशीं युद्ध करावें.'

हें धर्मराजाचें भाषण ऐकून बरें तसेंच कां होईना असें ह्मणून अर्जुन सर्व सैन्याला धर्मराजाच्या आज्ञेप्रमाणें तयार राहण्यास सांगून आपण स्वतः कौरवसेनेवर तुटून पडला. तेव्हां त्या वीर अर्जुनाला पाहून शल्य कर्णाला ह्मणाला, 'कर्णा, तूं ज्याची वाट पहात होतास तो हा अर्जुन तुझ्या सेनेचा फडशा पाडीत तुजवरच चालून येत आहे. पांडवांकडच्या रथांच्या घडघडाटानें सर्व समरभूमी दणाणून गेली आहे. सूर्याच्या भोंवतीं खळें पडलें असून त्यांतून माणसांचे धड दिसूं लागले आहेत. कावळे, घुबड व घारी ह्या सर्व भयंकर शब्द करूं लागल्या आहेत. पर्वतासारखे धिप्पाड व विजेसारखे चपल असे हे घोडे थरथर कांपूं लागले आहेत. यावरून मला आजचें लक्षण बरोबर दिसत नाहीं. पांडवांकडील रणवाद्यांचा गजर ऐकून आमच्या लोकांचें धाबें दणाणूं लागलें आहे. हा पहा अर्जुन शंखनाद करीत व आपल्या धनुष्याची प्रत्यंचा उडवीत तुझ्या सैन्यावर बाणांचा मारा करूं लागला आहे. ज्याच्या हातांत गांडीव धनुष्य आहे व ज्याचा सारथी श्रीकृष्ण आहे. अशा या अर्जुनाला आज तूं मारलेंस तर तूंच आमचा राजा होशील. पण गवतानें अग्नीचें शांतवन करणें किंवा पाण्यानें वरुणाचा नाश करणें, किंवा पिऊन समुद्र आटवणें यांच्याप्रमाणेंच ही गोष्ट फार दुर्घट आहे. जो कोणी आपल्या हातांनीं पृथ्वीला वर उचलून धरील किंवा देवांना त्यांच्या स्वर्ग लोकापासून खालीं ढकलून देईल तोच वीरपुरुष ह्या अर्जुनाचा पराभव करूं शकेल. दुसऱ्याच्यानें हें होणें नाहीं. असा पराक्रमी अर्जुन आजपर्यंतच्या वैराचें उसनें फेडण्याकरितां आतां तयार होऊन आला आहे. त्याचप्रमाणें हा त्याचा भाऊ बलशाली भीम, हा धर्मशील युधिष्ठिर व हे शूर नकुलसहदेव आपल्या जिवावर उदार होऊन आपल्या भावाबरोबर आपलीं शस्त्रास्त्रें घेऊन येत आहेत.

अशा रीतीनें यांचें भाषण चाललें आहे इतक्यांत दोन्ही सैन्यें एकमेकांशीं भिडलीं. त्याबरोबर अर्जुन रागानें पुढें आलेल्या संशप्तकांवर चालून गेला. संशप्तकही आपल्या जिवाची पर्वा न करितां अर्जुनाशीं निकरानें लढूं लागले. हें पाहून अर्जुनाला जास्तच उत्साह आला. त्यामुळें तो त्यांची एकसारखी कत्तल करीत सुटला. त्यानें पुढून, मागून, उजवीकडून व डावीकडून अशा रीतीनें चहूंकडून त्यांच्यावर बाणांचा मारा चालविला.

त्याचप्रमाणें इकडे कर्ण व पांचाल हेही एकमेकांवर तुटून पडले. अश्वत्थामा, कृपाचार्य, शकुनि वगैरे योद्धे मत्स्य व केकय यांच्याशीं लढूं लागले. दुर्योधनानें आपल्या सर्व भावांच्या साहाय्यानें सात्यकीला थोपवून धरलें. याप्रमाणें दोन्ही दळें एकमेकांशीं भिडल्याबरोबर हजारों शंख वाजूं लाग-

ले. नगारे चालूं झाले. भेरींचा भयंकर आवाज ऐकूं येऊं लागला व त्यांतच दोन्ही पक्षांकडील योद्धे वीरश्रीनें बेफाम होऊन सिंहगर्जना करूं लागले. त्याबरोबरच घोड्यांचें खिंकाळणें व हत्तींचें ओरडणें हीं सुरू झालीं. व सर्व आवाजांच्या मिश्रणानें एक मोठा आवाज होऊन तो त्या रंगभूमींतील भ्याडांना घाबरवून पळवूं लागला. पण धीर पुरुषांना जास्त जास्तच त्वेष चढत चालला. त्यामुळें त्यांचें युद्धही फार भयंकर होत चाललें. रणांगणांत जिकडे तिकडे मुडद्यांची रास पडूं लागली. घोडे, हत्ती व उंट वगैरे जनावरें बाणांच्या व शस्त्रांच्या माऱ्यांनीं घायाळ होऊन तेथल्या तेथेंच उताणीं पडूं लागलीं. मोठमोठे रथी शत्रूंच्या बाणांनीं गतप्राण होऊन त्या कर्दमांतच तोंडें वांसून पडूं लागले. मानससरोवराच्या पृष्ठभागाप्रमाणें ही रणभूमि शिरकमलांनीं व्यापून गेली. घायाळ झालेल्या लोकांच्या दुःखकर आरोळ्या, मारा सहन न झाल्यामुळें होणारा हत्तींचा चीत्कार, घोड्यांचें खेंकाळणें व आवेशांत आलेल्या शत्रूंच्या गर्जना या सर्वांचा एकच गोंधळ उडून गेला. ज्याप्रमाणें या रणभूमीवर युद्धाची गर्दी चालली होती, त्याप्रमाणेंच स्वर्गांतही अप्सरांचें गाणें, वजावणें, नाच इत्यादि थाट चालला होता. त्या विमानांत बसून धारातीर्थीं पडणाऱ्या शूरांना आपल्याबरोबर घेऊन जाण्याकरितां मी पुढें मी पुढें असें ह्मणून गडबडीनें एकमेकींच्या पुढें धांवत होत्या. त्यांनीं या शूरांना स्वर्गाला नेण्याचा एकसारखा सपाटा चालविला होता. हें पाहून तर वीरपुरुषांना जास्तच आवेश व हर्ष चढला. ते मरूं किंवा मारूं या निश्चयानें अगदीं त्वेषानें एकमेकांवर तुटून पडूं लागले. कांहीं वेळ रथी रथ्यांशीं झुंजूं लागले, पायदळांनीं पायदळावर लगट केली, स्वारांनीं स्वारांवर चाल केली, व गजयोधी गजयोद्ध्यांशीं टक्कर देऊं लागले. पण लवकरच सर्वांचा संकर होऊन ज्याला जो सांपडेल त्याला तो मारीत सुटला. कित्येक वीर आपल्या शस्त्रास्त्रांची पुंजी संपल्यामुळें धैर्य खचूं न देतां उलट अधिक त्वेषानें आपल्या शत्रूवर चालून जाऊन आपल्या मुष्टीचा प्रहार करूं लागले; शत्रूंचे केंस धरून त्यांना खालीं पाडूं लागले, व नखांनीं ओचकारूं लागले. अशा रीतीनें युद्धाची गर्दी चालल्यामुळें त्या रंगभूमीवर अतिशय धुरळा उडाला. तो इतका कीं, त्यामुळें आपला व परका हे देखील कांहींवेळ ओळखूं येईना. पण लवकरच रक्तरूपी पाण्यानें भरलेली नदी त्या रणांगणांतून धो धो करीत झपाट्यानें वाहूं लागली. त्यामुळें तो धुरळा झट्दिशीं खालीं बसला. त्या नदीमध्यें मांसाचा चिखल झाला होता. हत्ती, घोडे, मनुष्यें यांची छिन्नविच्छिन्न झालेलीं शरीरें, मोडके तोडके रथ, नानाप्रकारचीं शस्त्रास्त्रें व योद्ध्यांचे अलंकार हीं वाहून जाऊं लागलीं. वीरपुरुष स्वर्गसुख घेण्याकरितां आपल्या शस्त्ररूपी नावांनीं त्या नदींतून पार पडून जाण्याची खटपट करूं लागले. त्यापैकीं जे अर्धे कच्चे होते ते त्या नदीच्या भयंकर प्रवाहांत मध्येंच बुडून गटंगळ्या खाऊं लागले. जिकडे तिकडे योद्ध्यांच्या शरीरांतून रक्ताच्या चिळकांड्या उडत असल्यामुळें सर्व समरभूमी व तींत लढणारे योद्धे अगदीं लालबुंद होऊन गेले होते.

अशा या समरभूमीचा भयंकर देखावा पाहून भित्रे लोक आपला जीव वांचविण्याकरितां त्यांतून पळूं लागले. पण भीमादि वीरांनीं सारखा मारा चालविलाच होता. तें पाहून राजा दुर्योधन आपल्या लोकांना ‘ पळूं नका, पळूं नका ’ असें ह्मणून थोपवून धरण्याचा प्रयत्न करूं लागला. पण ते मुळींच थांबेनात. हें पाहून शकुनि वगैरे वीरांनीं भीमावर लगट केली. कर्णानेंही शल्याला आपला रथ भीमाकडेच नेण्याविषयीं सांगितलें. कर्ण आपल्यावर चाल करून येत आहे हें पाहून भीम सात्यकि, धृष्टद्युम्न वगैरे वीरांना ह्मणाला, ‘ तुह्मी सर्वजण मिळून राजा युधिष्ठिराचें रक्षण करा. ज्यानें माझ्यादेखत दुर्योधनाची खुशामती करण्याकरितां राजाची विटंबना केली त्या कर्णाच्या नरडीचा मी आज घोट घेतों. आतां तो तरी मला मारील किंवा मी तरी त्याला मारीन हें मी तुह्मांस खास सांगतों. असें ह्मणून त्यानें कर्णाकडे आपला मोर्चा फिरविला. तेव्हां शल्य कर्णाला ह्मणाला, ‘ हा महाबाहू भीमसेन आजपर्यंतच्या सांठलेल्या रागाची शांति करण्याकरितां तुजवर धांवून येत आहे. याचें उग्ररूप पाहून प्रलयकालच्या रुद्रस्वरूपाची आठवण होते. अस उग्र-

रूप आजपर्यंत मीं कधीं पाहिलें नव्हतें. अभिमन्यूच्या व घटोत्कचाच्या वधाचे वेळीं यानें अशी उग्र मुद्रा धारण केली नव्हती, ' हें ऐकून राधेय शल्याला ह्मणाला, ' तूं भीमाविषयीं जें बोललास तें सर्व अक्षरशः खरें आहे. हा मानी पुरुष अत्यंत रागावला आहे व आपल्या जिवाविषयीं बेपर्वा झाला आहे. त्याच्या शौर्याबद्दलही माझी खात्री आहे. त्यानें अज्ञातवासांत असतांना द्रौपदीच्या विनंतीवरून केवळ आपल्या बाहुबलानेंच कीचकासारख्या योद्ध्याची गठडी वळविली. तोच भीम आज शस्त्रास्त्र घेऊन युद्धांत आला आहे. तेव्हां आतां हा काय प्रलय उडवील याची कल्पना देखील होत नाहीं. अर्जुनाची माझी गांठ पडावी व त्यानें तरी मला मारावें किंवा मीं तरी त्याला मारावें अशी माझी पुष्कळ दिवसांपासून इच्छा आहे. ती इच्छा आज या भीमाच्या समागमानें पुरी होईल असें मला वाटतें. ह्या भीमसेनाला ठार केला ह्मणजे किंवा विरथी केला ह्मणजे अर्जुन आपोआपच मजवर चालून येईल.' हें ऐकून शल्यानें भीमाकडे जलदीनें रथ हाकला. तें पाहून भीमानें कर्णाच्या सैन्यावर सपाट्यानें बाणांचा मारा चालविला. तेव्हा कर्णाला फारच त्वेष आला. त्यानें भीमाच्या छातीवर बाण मारून त्याला घायाळ केलें व शिवाय त्याचें धनुष्य तोडून टाकलें. भीमानें लागलींच दुसरें धनुष्य घेऊन वज्रासारखा बळकट व काळकूटासारखा जहाल असा एक तीक्ष्ण फाळ जोडलेला सरळ बाण घेऊन धनुष्याला लावला. व आकर्ण धनुष्य ओढून जोरानें कर्णावर सोडला. त्यासरशीं कर्ण मूर्छित होऊन आपल्या रथांत मटकन् खालीं पडला. हें पाहून मद्राधिपानें आपला रथ बाजूला काढला.

राधेयाला विमुख झालेला पाहून दुर्योधनानें आपल्या भावाला जलदीनें भीमावर चाल करण्याला सांगितलें. त्याबरोबर श्रुतवर्मा, दुर्धर, क्राथ, विवित्सु, विकट, नंद, उपनंद, दुष्प्रहर्ष, सुबाहु, वातवेग, सुवर्चस, धनुर्ग्राह, दुर्मद, जलसंध व शल वगैरे कौरववीर पतंगाप्रमाणें भीमाच्या क्रोधाग्नीवर झडप घालण्याकरितां तुटून पडले. त्या सर्वांनीं मिळून भीमावर सारखा बाणांचा मारा चालविला. भीमानें पहिल्याच सपाट्याला विवित्सु, क्राथ, नंदोपनंद यांचीं मुंडकीं उडविलीं. हें पाहून बाकीचे भाऊ भीमाचा सूड घेण्याकरितां अधिक त्वेषानें लढूं लागले. पण भीमानें थोड्याच वेळांत त्यांनाही यमलोक दाखविला. इतक्यांत कर्ण सावध होऊन पुनः भीमावर चालून आला. त्यानें आपल्या हस्तलाघवानें डोळ्याचें पातें लवतें न लवतें, इतक्यांत भीमाचा सारथी मारला, घोडे ठार केले, ध्वज तोडून पाडला, रथ मोडला व शेवटीं धनुष्याचे तुकडे केले. हें पाहून भीमानें गदा घेऊन कर्णाच्या सैन्यांत घुसून एकच गोंधळ उडवून दिला. त्यानें पहिल्या सपाट्याला आपल्या गदेच्या तडाख्यानें सातशें हत्तींचीं गंडस्थळें फोडलीं; नंतर तसाच सौबलाच्या गजसेनेवर चालून जाऊन तिचीही कर्णाच्या सेनेप्रमाणेंच व्यवस्था केली. रथी व पायदळ यांपैकीं कितीजण त्याच्या गदेला बळी पडले याचा पत्ता नव्हता. बरेच लोक घाबरून कोणीकडे पळावें हें न सुचल्यामुळें उलट त्याच्याकडेच पळत सुटले. त्यामुळें ते आयतेच त्याच्या गदेच्या तडाख्यांत सांपडले. अशा रीतीनें भीमानें कत्तल चालविलेली पाहून तीन हजार घोडेस्वार त्याच्यावर धांवून आले. पण आश्चर्य हें कीं, या सर्व घोडेस्वारांचा त्यांच्या घोड्यांनिशीं एकट्या भीमानें आपल्या गदेच्या जोरावर चुराडा उडविला. असा हा भयंकर रणसंग्राम पाहण्याकरितां सूर्यही ह्यावेळीं आकाशाच्या अगदीं मध्यभागीं आला होता. भीमानें आपल्या सैन्याची अशा तऱ्हेनें दुर्दशा चालविली आहे हें पाहून दुर्योधनाला फार वाईट वाटलें. तो येऊन कर्णप्रमुख वीरांना ह्मणाला, 'आज आपल्याकरितां स्वर्गद्वार उघडें आहे. तर तुह्मी क्षत्रियाला शोभेल अशा तऱ्हेचा पराक्रम गाजवा. तुह्मीं पांडवांचा पराभव केला तर या पृथ्वीचें आधिपत्य तुह्मांला मिळेल. तुह्मीच धारातीर्थी पडाल तर तुमच्याकरितां स्वर्गाचें द्वार खुलेंच आहे. ' हें ऐकून सर्व क्षत्रिय वीर आनंदानें गर्जना करूं लागले व पांडवांचा समाचार घेण्याकरितां आपल्या अस्तान्या वर सारून तलवारी परजूं लागले. इतक्यांत अश्वत्थामा पुढें होऊन त्या सर्वांना ह्मणाला, ' धृष्टद्युम्नानें माझ्या तातांना ते निःशस्त्र असतांना

ठार केलें आहे. त्याचा सूड घेण्याकरितां व दुर्योधनाची फत्ते होण्याकरितां त्याला तसाच निष्ठुरतेनें ठार करितों. ही माझी प्रतिज्ञाच समजा. अर्जुन किंवा भीम यांतले कोणीही जरी त्याच्या रक्षणाला आले तरी मी त्यांचाही पराभव करून याचा सूड घेईन, कधींही सोडणार नाहीं. ' असें ह्मणून अश्वत्थाम्यानें धृष्टद्युम्नावर चाल केली. धृष्टद्युम्नानें त्याच्यावर बाणांचा मारा करण्याला सुरवात केली. पण अश्वत्थाम्यानें त्याचे सर्व बाण वरच्यावर तोडून टाकून त्याचें धनुष्य, गदा, घोडे व सारथी या सर्वांचा फडशा पाडला. त्याबरोबर धृष्टद्युम्नानें ढालतलवार घेऊन रथांतून खालीं उडी ठोकली. पण अश्वत्थाम्यानें लवकरच त्या ढालतलवारीचे तुकडे केले आणि गरुड ज्याप्रमाणें वेगानें सापावर झडप घालतो त्याप्रमाणें त्याच्या नरडीचा घोंट घेण्याकरितां हातांत तलवार घेऊन रथांतून एकदम धृष्टद्युम्नावर उडी टाकिली. तें पाहून कृष्णानें अश्वत्थाम्याच्या रोंखानें जलदीनें रथ नेला. अर्जुन अंगावर धांवून येत आहे हें पाहून अश्वत्थाम्यानें चलाखी करून धृष्टद्युम्नाला खालीं ओढला; व त्याची मान कापण्याकरितां वर तलवार उगारली. पण इतक्यांत अर्जुनानें त्याच्यावर तीक्ष्ण बाणांचा मारा करून त्याला अतिशय घायाळ केला त्यामुळें त्याला धृष्टद्युम्नाला तसेंच सोडून देणें भाग पडलें.

नंतर अश्वत्थामा आपल्या रथावर चढून अर्जुनाचा समाचार घेण्याकरितां धांवला. इतक्यांत इकडे सहदेवानें धृष्टद्युम्नाला आपल्या रथांत बसवून रणांगणांतून बाजूला काढला. अश्वत्थाम्यानें अर्जुनाच्या छातीवर बाण मारून त्याला खवळून सोडला. त्या सरशीं अर्जुनानें तीक्ष्ण परज बसविलेली सोन्याच्या दांड्याची वज्रासारखी बळकट अशी बर्ची जोरानें अश्वत्थाम्यावर फेंकली. त्यासरशीं तो विव्हळ होऊन मूर्छित पडला. हें पाहून त्याच्या सारथ्यानें आपला रथ बाजूला काढला. अशा रीतीनें अश्वत्थाम्याचा पराभव झाल्याबरोबर श्रीकृष्णानें आपला रथ पुनः संशप्तकांकडे वळविला. वाटेंत जातां जातां श्रीकृष्ण अर्जुनाला ह्मणाला, ' हे महाबाहो, हे कौरवांचें सैन्य युधिष्ठिरावर बाणांचा मारा करीत आहे. दुर्योधन, अश्वत्थामा, कर्ण यांच्या सपाट्यांतून सुरक्षितपणें पार पडणें हें देवादिकांना सुद्धां अशक्य आहे. ह्या सर्वांच्या कचाट्यांतून सांपडलेला पाहून युधिष्ठिराचा यांतून बचाव होईलसें मला वाटत नाहीं. हा पहा, राजा युधिष्ठिर कर्णाच्या माऱ्याला भिऊन युद्धांतून पराङ्मुख होत आहे. आजपर्यंतच्या उपवासानें व धर्माचरणानें कृश झालेला राजा ब्राह्मणवृत्तीलाच योग्य आहे. याच्या हातून क्षात्रकर्म होणें नाहीं. हा कर्ण पहा आपल्या बाणांनीं तुमच्या सर्व सेनेला कसा पळवीत सुटला आहे तो. परंतु या भीमानें हें सर्वच पारडें फिरविलें. पहा आतां राजा युधिष्ठिर निर्भय झाला. भीमानें आपल्या अस्त्रांच्या प्रभावानें कृपाचार्य कर्ण वगैरे बऱ्याबऱ्या योद्ध्यांनाही जेरीस आणिलें आहे. भीमाच्या बाणांच्या योगेंकरून घायाळ होऊन हे कौरवांचे हत्ती आपला जीव वांचविण्याकरितां बेफाम होऊन पायदळांतील लोकांना तुडवीतच त्यांच्या सैन्याला पळवीत आहेत. हा निषादाधीपती पांडवांवर चालून आला आहे. पण पहा भीमानें याचें मुंडकें उडवून चेंडूप्रमाणें जमिनीवर आदळलें आहे. ह्या भीमानें कौरवांच्या सेनेमध्यें इतका प्रळय मांडला आहे कीं, आतांपर्यंतच ह्यानें एकंदर धार्तराष्ट्रांच्या तीन अक्षौहिणी सेनेचा धुव्वा उडविला. अशा रीतीनें बोलत बोलत कृष्णार्जुनांची जोडी संशप्तकावर येऊन पोहोंचली व तेथें त्यांचें तुंबळ युद्ध जुंपलें.

इकडे भीमानें आपल्या तीक्ष्ण बाणांनीं दुर्योधनाला पळवून लावून गजसेनेमध्यें मुसंडी मारली. त्यानें तेथें जाऊन आपल्या एकेका हातामध्यें एकेक हत्ती धरून त्या दोघांना जोरानें एकमेकांवर आपटून त्यांचीं हाडें चुरडून टाकलीं व लांबच्या हत्तींचीं आपल्या बाणांनीं गंडस्थळें फोडून त्यांना ची ची करीत पळवावयाला लाविलें. अशा रीतीनें भीमानें हत्तींचा फडशा पाडल्यामुळें त्या रणभूमीवर जिकडे तिकडे हत्तींच्या प्रेतांचे पर्वतप्राय ढीग पडले होते. पळण्याच्या श्रमानें कित्येक हत्ती रक्त ओकून मरून पडूं लागले. कित्येक घायाळ होऊन तेथेंच लोळूं लागले. कित्येक तर भीमाच्या गर्जनेनेंच भिऊन हातपाय गळून जागच्या जागीं स्वस्थ उभे राहिले. अशा रीतीनें भीमानें कौरवसेनेची दुर्दशा चालविली असतांना कर्णानें केकयांचा संहार चालविला होता.

केकयांनीं त्याच्यावर बरीच शिकस्त केली. पण त्यांत त्यांना यश आलें नाहीं. कर्णानें त्यांच्यापैकीं पांचशें रथी यमाच्या दरबारीं पाठविले. अशाप्रमाणें कर्णानें त्रास दिल्यामुळें घाबरून पुष्कळ योद्धे आश्रयाकरितां भीमाकडे धांवून येऊं लागले. इतक्यांत कर्णानें नकुलसहदेव यांना आपल्या संरक्षणाला घेऊन उभा राहिलेल्या राजा युधिष्ठिरावर दुर्योधनाची मनकामना पूर्ण करण्याकरितां जोरानें मारा चालविला. हें पाहून नकुल, सहदेव व धर्मराज ह्या तिघांनींही कर्णाचा प्रतिकार करण्याचा आपल्या हातून होईल तितका प्रयत्न केला. पण त्याचा कांहीं उपयोग होईना. कर्णानें युधिष्ठिराचे घोडे, शिरस्त्राण व नकुलाचे घोडे व धनुष्य ह्यांचा फडशा उडविला. तेव्हां धर्म व नकुल यांनीं आपल्या संरक्षणाकरितां सहदेवाच्या रथांत उडी घेतली.

अशा तऱ्हेनें आपल्या भाचांची फजिती झालेली पाहून शल्याला फार वाईट वाटलें. ह्मणून तो त्यांना सोडविण्याकरितां कर्णाला ह्मणाला, 'तूं अर्जुनाशीं लढावयाचें सोडून ज्याचें चिलखत तुटलें आहे, बाणांची पूंजी संपली आहे, घोडे दमून गेले आहेत व स्वतः जो अस्त्रविद्येंतही साधारणच आहे अशा धर्माशीं काय ह्मणून युद्ध करतोस? शिवाय तूं अशा रीतीनें त्या बाकीच्या योद्ध्यांशीं युद्ध करण्यांत वेळ घालवूं लागलास ह्मणजे तुझे घोडे दमतील, स्वतःचे हात थकतील व बाणांचे भाते मोकळे होतील. मग अशा तुटपुंज्या स्थितींत अर्जुनाची गांठ पडली ह्मणजे विनाकारण फजित पावून युद्धांतून परत जावें लागेल. ज्याच्याविषयीं तूं आजपर्यंत टपून बसला आहेस त्या अर्जुनाशीं युद्ध कर. उगीच या बिचाऱ्या युधिष्ठिराला मारण्यानें तुझा काय पुरुषार्थ वाढणार आहे! ह्या अर्जुनानें आपल्या शरवर्षावानें आमच्या सर्व सेनेला दे माय धरणी ठाय करून सोडलें आहे. तो स्वतः शूर असून त्याच्या जवळ त्याचें रक्षण करण्याकरितां सात्यकि व युधामन्यु यांच्यासारखे पराक्रमी योद्धे अगदीं सज्ज होऊन उभे आहेत. त्याशिवाय भीमानें दुर्योधनाला गांठून त्याला बहुतेक ठार करण्याच्याच बेतांत आणिलें आहे. आह्मी सर्वजण जिवंत असतांना आमच्या राजाची अशी दुर्धर स्थिति व्हावी हें बरें नव्हे. त्यांतून तुझ्यासारख्या सेनापतीला तर हें मुळींच शोभत नाहीं. तर लौकर भीमाकडे जाऊन राजाला त्याच्या तडाक्यांतून सोडीव. ह्या गरीब बिचाऱ्या युधिष्ठिराच्या मागें लागूं नकोस.'

हें शल्याचें वाक्य ऐकून कर्णाला भीमाबद्दल फार चेव आला. ह्मणून त्यानें भीमाकडेच आपला रथ नेण्याविषयीं शल्याला सांगितलें. कर्ण गेलेला पाहून नकुल, सहदेव व धर्मराज ह्या तिघांनीं आपल्या शिबिराचा रस्ता सुधारला. तेथें येऊन राजा धर्मानें आपल्या अंगांतील बाण वगैरे उपसून काढले. व अगदीं थकून गेल्यामुळें तो अंथरुणावर स्वस्थ पडला. नंतर नकुलसहदेव त्याची आज्ञा घेऊन भीमाला जाऊन मिळाले.

इकडे अर्जुन व संशप्तक यांचें तुमुल युद्ध चाललें असतांना मध्येंच अश्वत्थाम्यानें अर्जुनावर लगट केली. त्यानें श्रीकृष्ण व अर्जुन यांना आपल्या बाणांनीं झांकून टाकलें; ऐंद्रजाल नांवाचें अस्त्र सोडून अर्जुनाच्या सेनेचा फडशा उडविण्याला प्रारंभ केला. हें पाहून अर्जुनानें इंद्रास्त्रानें अश्वत्थाम्याच्या अस्त्राचें निवारण करून स्वतः अश्वत्थाम्यावरही बरेंच बाण सोडले. तरीही अश्वत्थामा न डगमगतां कृष्णार्जुनांवर मारा करूं लागला. त्यानें या दोघांनाही बरेंच घायाळ केलें. अश्वत्थाम्यानें श्रीकृष्णावर बाण सोडले. त्यामुळें अर्जुनानें त्वेषानें अश्वत्थाम्याचा सारथी मारला; तथापि न घाबरतां अश्वत्थाम्यानें सारथ्याचें व रथ्याचें अशीं दोन्ही कामें स्वतःच करण्याला सुरवात केली. तो एका हातानें घोड्यांच्या दोऱ्या धरून नुसत्या तोंडाच्या इशाऱ्यानें त्यांना वाटेल तिकडे व वाटेल त्या तऱ्हेनें वळवीत असे. व एका हातानेंच धनुष्याला बाण लावून शत्रुसेनेवर सोडीत असे. असाच त्याचा अद्भुत पराक्रम पाहून रणांगणांतील सर्व योद्ध्यांनीं त्याला आनंदानें शाबासकी दिली. अर्जुनालाही त्याचें युद्धकौशल्य पाहून बराच आनंद झाला. नंतर त्यानें झटदिशीं एक दोन रुंद फळाचे बाण सोडून अश्वत्थाम्याच्या घोड्यांच्या दोऱ्या तोडल्या; व नंतर घोड्यांवर झपाट्यानें दहापांच तीक्ष्ण बाण सोडले. त्यासरशीं ते घोडे बेफाम होऊन त्या रणांगणांतून पळत

सुटले. याप्रमाणें अश्वत्थाम्याची फजिती करून अर्जुनानें पुढें तसाच जोरानें कौरवसेनेवर मारा चालविला. त्या वेळीं कौरवसेना भयानें पळूं लागली. हें पाहून दुर्योधन कर्णाला ह्मणाला, 'कर्णा, पांचालांच्या व अर्जुनाच्या माऱ्याला भिऊन आपली सेना पळूं लागली आहे. इकडे थोडेंसें लक्ष दे. नंतर तुला वाटेल तें कर. हजारों शूर योद्धे घायाळ होऊन मदतीकरितां तुझ्या नांवानें मोठ्यानें ओरडत आहेत.' हें ऐकून कर्णानें आपला रथ पांचालांकडे नेण्याला सांगितलें. त्याप्रमाणें त्यानें तो तिकडे नेला. तिकडे गेल्यावर कर्णानें पळत सुटलेल्या सर्व योद्ध्यांना धैर्य देऊन व शपथ घालून मागें परतविलें. व स्वतः भार्गवास्त्राचा प्रयोग केला. त्याबरोबर कोट्यावधी बाणांचा पांचालसेनेवर सारखा वर्षाव होऊं लागला. ते त्या बाणाखालीं अगदीं झांकून गेले. त्या तीक्ष्ण बाणांनीं घायाळ होऊन, पांचालांपैकीं बरेच वीर कामास आले. कित्येक लोक तेथेंच तडफडत हातपाय घासून पडले. कित्येकांनीं भयानें कृष्णार्जुनांच्या नांवानें हाक मारावयाला सुरवात केली. त्यांच्या त्या दीन आरोळ्या ऐकून व भार्गव अस्त्राचा प्रभाव पाहून अर्जुन श्रीकृष्णाला ह्मणाला, 'काळाप्रमाणें घोरकर्म करणाऱ्या या कर्णाकडे पहा. त्याचा सूड उगविण्याचें माझ्या मनांत फार दिवस घोळत आहे. तर तावडतोब चल. जोंपर्यंत मनुष्यप्राणी जिवंत आहे तोंपर्यंतच त्याच्या हातून कांहीं तरी पराक्रम होईल. मेल्यावर काय होणार आहे ? ह्मणून होईल तितकें लवकर आपलें इच्छित कार्य साधून घ्यावें हें बरें.' हें ऐकून श्रीकृष्ण अर्जुनाला ह्मणाला, 'ह्या कर्णानें तुझ्या युधिष्ठिरादि भावांना बरेंच जखमी केलें आहे. तर आधीं त्यांची गांठ घेऊन त्यांचें कुशल वर्तमान पहा; आणि नंतर कर्णावर चालून जा.' असें ह्मणून श्रीकृष्णानें युधिष्ठिराकडे जाण्याकरितां आपला रथ हांकला. येतांना वाटेंत जे लोक लढत होते त्यांना शाबासकी देत व पराङ्मुख झालेल्यांना धैर्य देऊन पुनः युद्धाला लावीत व पडलेल्यांची वास्तपुस्त करीत अर्जुन युधिष्ठिराचा शोध करूं लागला. पण त्याला युधिष्ठिर कोठेंही दिसेना. हें पाहून त्यानें जलदीनें भीमाची गांठ घेतली. व राजा कोठें आहे ह्मणून विचारिलें. तेव्हां भीमानें सांगितलें कीं कर्णाच्या बाणांनीं जखमी होऊन राजानें येथून आपल्या रथाचा मोर्चा वळविला.' हें ऐकून अर्जुन ह्मणाला, 'तर मग तूं असाच जाऊन राजाचें कुशल वृत्त घेऊन ये. तो बहुतेक आपल्या शिबिराकडेच गेला असेल. द्रोणाचार्यांशीं युद्ध करीत असतांना बऱ्याच जखमा झाल्या होत्या. तरीही त्यानें युद्धांतून पाय काढला नव्हता. पण आज ज्याअर्थी तो येथून शिबिराकडे गेला आहे त्याअर्थी कांहीं तरी बराच घोंटाळा असला पाहिजे, तर तूं लवकर जाऊन त्याचा शोध करून ये. मी तोंपर्यंत या कौरवसेनेला येथेंच थोपवून धरतों.' भीम ह्मणाला, 'मी संशप्तकांना बघून घेतों. तूंच राजाकडे जा.' हें ऐकून अर्जुनानें श्रीकृष्णाला शिबिराकडे आपला रथ वळविण्याला सांगितलें. दोघेही जलदीनें रथ हांकीत युधिष्ठिराकडे येऊन पोहोंचले. तेथें गेल्यावर पहातात तों राजा अंथरुणावर निजून आहे असें त्यांच्या दृष्टीस पडलें. तथापि राजा सुखरूप आहे, असें पाहून त्यांना आनंद झाला. त्यांनीं जाऊन त्याला नमस्कार केला. युधिष्ठिरालाही त्यांना पाहून फार आनंद झाला. तो कृष्णार्जुनांना ह्मणाला, 'ये, कृष्णा, ये, धनंजया, ये, तुह्मां दोघांना पाहून मला फार आनंद होतो. कृष्णा, अर्जुना, माझें आज त्या कृतांतरूपी कर्णाशीं फारच घोर युद्ध झालें. धृष्टद्युम्न, सात्यकि, नकुल, सहदेव हे सर्वजण तेथेंच उभे होते; तरी त्या सर्वांदेखत कर्णानें माझे चक्ररक्षक मारले, घोडे ठार केले, व ध्वज मोडून पाडला. ह्या सर्वांचा पराभव करून तो माझ्याजवळ आला व मला वाटेल तसें टोंचून बोलूं लागला. फार काय सांगूं भीमाच्या प्रभावानेंच माझे आज प्राण वांचले. नाहीं तर कर्णानें आज मला स्वर्गच दाखविला असता. आज तेरा वर्षे ज्याच्या भीतीनें मला झोंप आली नाहीं, व निजलों असतां, बसलों असतां, जेवत असतां, दुसऱ्याशीं बोलत असतां, सारांश मी कोणत्याही स्थितींत असलों तरी मला कर्णावांचून दुसरें कांहींच दिसत नाहीं. त्याच्या भीतीनें मी जेथें जेथें ह्मणून पळून जातों तेथें तेथें कर्णच पुढें येऊन उभा आहे असें मला वाटतें. अशी ज्या कर्णाची मला भीति

पडली आहे त्याच कर्णानें आज माझा पूर्ण पराभव करूनही मला पुनः जिवंत सोडला ! याच्यापेक्षां दुसरी फजिती ती कसली व्हावयाची ? अशा रीतीनें फजीत पावून जगण्यांत तरी काय अर्थ आहे ? भीष्माचार्य, कृपाचार्य, व द्रोणाचार्य यांनीं सुद्धां आजपर्यंत माझी इतकी दुर्दशा केली नाहीं; पण आज ह्या सूतपुत्रानें केली ! हे कृष्णा, हे अर्जुना, तुह्मी ज्या अर्थी युद्ध सोडून मध्येंच माझ्याकडे आला आहां त्या अर्थी कर्णाला ठार केल्याबद्दलची आनंदकारक वार्ता सांगण्याकरितांच माझ्याकडे आला असाल असें मला वाटतें. तर इंद्रासारखा चतुर, कालयमासारखा पराक्रमी व भार्गवासारखा अस्त्रवेत्ता असा कर्ण तुमच्या हातून कसा ठार झाला हें मला सविस्तरपणें सांगा. कर्ण हा अर्जुनाचा काळच आहे असें दुर्योधन नेहमीं ह्मणत होता व कर्णही त्याला खुष करण्याकरितां वाटेल तशी बढाई मारीत होता. अशा कर्णाला तुह्मीं आज यमलोकीं पाठविलेंना ? ‘ ह्या निर्बल पांडवांची बायको होऊन कशाला रहातेस ? त्यांना सोडून ह्या वैभवशील कौरवांचा स्वीकार कर, ’ असें ह्मणून ज्यानें भरसभेंत साध्वी द्रौपदीची विटंबना केली व ज्यानें सर्वांच्या देखत ‘ षंढ पांडव ’ असें ह्मणून आमचा अवमान केला त्या दुरात्म्या सूतपुत्राचें डोकें तुह्मी कसें उडविलं तें मला सांगा.’

हें राजा धर्माचें भाषण ऐकून अर्जुन ह्मणाला, ‘मी संशप्तकांशीं लढत असतांना द्रोणपुत्र अश्वत्थामा हा मध्येंच माझ्यावर चालून आला. तें पाहून मी अश्वत्थाम्याकडे आपला मोर्चा वळविला. त्याबरोबर संशप्तकांपैकीं पांचशें रथ्यांनीं माझ्यावर लगट केली. त्यामुळें मी बराच बुचकळ्यांत पडलों; पण शेवटीं ह्या पांचशें रथ्यांना यमराजाच्या दरबारीं पाठवून अश्वत्थाम्याशीं भिडलों. अश्वत्थामा आमच्यावर जोरानें बाणांचा मारा करूं लागला. त्याच्या मागें आठ आठ बैलांच्या आठशें गाड्या बाणांनीं भरून उभ्या होत्या. त्यानें तितक्याही बाणांचा आमच्यावर वर्षाव केला. परंतु मीं आपल्या बाणांनीं त्याच्या बाणांचा फडशा उडवून अश्वत्थाम्यालाही जखमी केला. त्यामुळें तो माझ्यापुढून कर्णाच्या रथाकडे निघून गेला. त्याला पाहून कर्ण त्वेषानें पांचशें रथी घेऊन माझ्यावर चालून आला. मीं त्याच्या पांचशें रथ्यांचे धारातीर्थी बळी पाडले. व आतां कर्णाशींच जाऊन भिडणार, इतक्यांत श्रीकृष्णानें सांगितल्यावरून मी तुझ्या भेटीकरितां निघून आलों. कर्णानें तिकडे फारच धुमाकुळ मांडला आहे. त्याचा मार खाऊन पांचालांच्या तोंडचें पाणी पळालें आहे. सात्यकि, धृष्टद्युम्न, उत्तमोजा, व युधामन्यु वगैरे बडेबडे वीर सुद्धां अगदीं टेंकीस आले आहेत. पुढें जाऊन त्याच्यावर मारा करणें तर लांबच राहिलें, पण त्यांच्यानें कर्णाच्या अस्त्राचें निवारण सुद्धां करवेना ! आतां मीच जाऊन त्याचा समाचार घेतों. कर्ण, दुर्योधनादि वीरांनीं कदाचित् भीमावर लगट केली असेल. ह्मणून मला आतांच गेलें पाहिजे. मला आशीर्वाद द्या. मी आज त्या कर्णाचें डोकें उडवितों. माझी ही प्रतिज्ञा असत्य होईल तर असत्यवाद्यांची कष्टप्रद गति मला मिळूं दे.

कर्णानें पराभव केला असल्यामुळें युधिष्ठिराला फार वाईट वाटलें होतें. पण अर्जुन कर्ण पुढें आला असतांही त्याचा सूड न घेतां तसाचें परत आला हें ऐकून तो रागानें लाल झाला. तो अर्जुनाला ह्मणाला, ‘ कर्ण आपल्या सेनेची दुर्दशा उडवीत आहे हें पाहूनही तूं रणांगणांतून निघून आलास हें योग्य केलें नाहींस. तूं वीरमाता पृथा इच्या पोटीं जन्म व्यर्थ घेतलास ! तुझ्या हातून कर्णाबरोबर युद्ध करणें होत नव्हतें तर ‘ मी कर्णाशीं युद्ध करून त्याला ठार करीन, ’ अशी द्वैतवनामध्यें बढाई तरी मारावयाची नव्हती ! तुझ्या भरंवशावर तर आह्मी युद्धाला सुरवात केली. तुझ्या हातून होत नव्हतें तर पूर्वींच तसें सांगावयाचें होतें; ह्मणजे त्याप्रमाणेंच कांहीं तरी व्यवस्था केली असती. माशाला ज्याप्रमाणें आमिष दाखवून जाळ्यांत धरतात त्याप्रमाणेंच तूंही राज्याची आशा दाखवून आह्मां सर्वांना काळाच्या जबड्यांत आणून सोडलेंस ! तूं जन्माला आलास तेव्हां आकाशवाणी झाली कीं, ‘ हा मुलगा दिग्विजयी होईल. हा खांडववनामध्यें सर्व देवांचा पराभव करील. फार काय, ह्याच्यासारखा धनुर्धर आजपर्यंत झाला नाहीं व पुढेंही होणार नाहीं ! ’ पण आजचा हा आपला भित्रेपणा

पहातांना देव देखील खोटें बोलतात असें वाटतें. ' ह्याच्यानें कर्णाच्या पुढें उभें देखील राहवावयाचें नाहीं ' असें सुयोधनानें पूर्वींच सांगितलें होतें. पण मींच आपल्या मूर्खपणानें याच्यावर विश्वास ठेविला नाहीं ! आतां त्याबद्दल मला वाईट वाटत आहे. पण काय उपयोग ? तुझ्याकडून पूर्वींच तसा नकार आला असता ह्मणजे मीं ह्या केकय, सृंजय वगैरे वीरांना तरी माझ्याकरितां ह्या रणदेवतेला त्यांच्या जिवांचे बळी द्यावयाला लाविलें नसतें. कृष्णा, आतां मला कर्णाच्या स्वाधीन होण्याची पाळी आली ! धिःकार असो या जिण्याला ! माझा बाळ अभिमन्यू असता किंवा पराक्रमी घटोत्कच असता तरी आज मला अशी दुःखद स्थिति आली नसती. अर्जुना, तुझ्या हातून होत नसेल तर श्रीकृष्णाच्या हातांत धनुष्य दे व तूं त्याचें सारथ्य कर किंवा तुझ्यापेक्षां दुसरा जो कोणी शूर असेल त्याच्या हातांत तुझें गांडीव दे; ह्मणजे तरी पुनः आह्मांला राज्यभ्रष्ट होऊन रानोरान हिंडण्याची पाळी येणार नाहीं. राजा पांडूच्या पोटीं जन्म घेऊन आह्मांला अशा रीतीनें गोत्यांत घालण्यापेक्षां तूं जन्मालाच आला नसतास किंवा गर्भांत असतांनाच तुझा नाश झाला असता तरी फार बरें झालें असतें. पाठ दाखवून युद्धांतून पळून येणाऱ्याला हें गांडीव, हा दिव्य रथ व हे वेगवान घोडे घेऊन तरी काय करावयाचें आहे ? अर्जुना, एवढा शूर म्हणवून घेऊन कर्णाला भिऊन पळालासना ? धिक्कार असो त्या तुझ्या शौर्याला आणि त्या गांडीवाला !'

युधिष्ठिरानें असा धिःकार केलेला पाहून अर्जुनानें सपदिशीं आपली तलवार उपसली. त्याबरोबर श्रीकृष्णानें ताडलें. तो अर्जुनाला ह्मणाला, ' धनंजया, आतां तलवार कशाला उपसलीस? तुझ्याबरोबर युद्ध करण्याला तर कोणीं आलेलें दिसत नाहीं. कौरवांना थोपवून धरण्याविषयीं भीमाला सांगून तूं राजाचें कुशल वर्तमान पहाण्याकरितां येथें आलास. राजा तर खुशाल आहे. मग अशा ह्या आनंदाचे प्रसंगीं तलवार काय म्हणून उपसलीस ?' हें ऐकून रागानें मुसमुसत अर्जुन श्रीकृष्णाला म्हणाला, ' आपलें गांडीव दुसऱ्याचे हातांत दे असें जो कोणी मला ह्मणेल त्याचें मी डोकें उडवीन अशी माझी प्रतिज्ञा आहे. त्याप्रमाणें राजानें आतां तुझ्या समक्षच उद्गार काढले. असलें टोंचून बोलणें मला मुळींच सहन होत नाहीं; ह्मणून ह्याला ठार करून मी आपली प्रतिज्ञा खरी करतों. तूं ह्या संपूर्ण जगाचा स्वामी असून तुला सर्व कांहीं समजतें आहे. मीं आतां काय करावें हें तूंच सांग. ' हें ऐकून श्रीकृष्णानेंही त्याचा पुष्कळ धिःकार केला. तो ह्मणाला, ' पार्था, तुला धर्मज्ञान मुळींच नाहीं असें मला वाटतें ! कोणाचीही हिंसा न करणें हाच मोठा धर्म आहे. प्रसंग पडल्यास खोटें बोलावें पण हिंसा करूं नये. शरण आल्याला, भिऊन पळत सुटलेल्या व युद्ध सोडून स्वस्थ बसलेल्या शत्रूला सुद्धां केव्हांही मारूं नये. असें असून तूं आपल्या वडील भावालाच मारावयाला उठलास. यावरून तुला धर्मांतील सूक्ष्म विचार मुळींच कळत नाहींत. आतां धर्माधर्माच्या निर्णयाबद्दल मी तुला एक दोन गोष्टी सांगतों. पूर्वीं बलाक नांवाचा व्याध होता. त्याचे घरीं, ह्यातारे आईबाप, बायकापोरें, व आणखी कांहीं मंडळी इतकें त्याचें कुटुंब होतें. ह्या सर्वांच्या निर्वाहाकरितां तो रोज शिकार करून घरीं आणून देत असे. पण मनापासून त्याला हें असलें काम नको होतें. तो नेहमीं खरें बोलत असे, कोणाचा द्वेष करीत नसे व आपल्या वर्णाश्रम धर्माला कधींही सोडीत नसे. एके वेळीं तो शिकारीकरितां हिंडत असतां त्यानें एक नेत्रहीन पशु बाण सोडून ठार केला. त्याबरोबर आकाशांतून पुष्प वृष्टि होऊं लागली व अप्सरा आनंदानें गात हा व्याध आणि पशु या दोघांनाही नेण्याकरितां विमान घेऊन आल्या. याचें कारण असें कीं, ह्या अंधानें पूर्वीं तपश्चर्या करून वर मिळविला होता. व तो त्या वराचा उपयोग प्राणिमात्रांचा नाश करण्याकडे करीत होता. अशा प्रकारच्या दुष्ट अंधाचा ह्या बलाकानें वध करून सर्व प्राणिमात्रांचें रक्षण केलें, त्यामुळें अर्थांतच हा पुण्यवान होऊन स्वर्गाचा अधिकारी झाला. तसेंच कौशिक नांवाचा कोणी सत्यनिष्ठ ब्राह्मण अरण्यांत तपश्चर्या करीत बसला होता. त्याच्या आश्रमावरून एका ब्राह्मणाचा पाठलाग करीत कांहीं चोर आले. त्यांनीं कौशिकाला पळून गेलेल्या ब्राम्हणाचा पत्ता विचारला. कौशिकाचा खरें बोलण्याचा नियम अ-

सल्यामुळें त्यानें चोरांना ब्राह्मणाचा खरा पत्ता सांगितला. त्यावरून चोरांनीं ब्राह्मणास शोधून काढून त्याला ठार केलें. धर्माधर्माचा विचार न करतां सत्यव्रत आचरण केल्याबद्दल या ब्रह्महत्येचा अधिकारी कौशिक होऊन अक्षय नरकांत कुजत पडला.

यावरून खरा धर्म कशांत आहे हें ओळखणें फार दुर्घट आहे असें तुला कळून आलें असेलच. आतां तुला मी खऱ्या धर्माची मीमांसा सांगतों. प्राणिमात्रांच्या हिताकरितांच धर्माची प्रवृत्ति आहे. अर्थात जेणेंकरून प्राणिमात्रांची हत्या किंवा दुसऱ्या कोणत्याही प्रकारचें अनहित होणार नाहीं तोच धर्म होय. यावरून चोरांशीं आपले प्राण वांचविण्याकरिता त्यांना विश्वास बसेल अशा रीतीनें शपथा देऊन नंतर त्या जरी मोडल्या तरी त्याबद्दल दोष लागणार नाहीं. अशा ठिकाणीं खोटें बोलणें हाच धर्म होय असें धर्मतत्त्ववेत्ते म्हणतात. पातकी मनुष्याला धन दिलें असतां त्याच्या पातकाचा वांटा त्या दात्यालाही भोगावा लागतो. म्हणून पातकी मनुष्य कितीही संकटांत असला तरी त्याला मदत न करणें व त्याला हाल अपेष्टा होऊन मरूं देणें हाच धर्म आहे.

याच्यावरून अर्जुना, युधिष्ठिराला मारणें हें योग्य आहे असें तुला वाटतें काय ? ' अर्जुन ह्मणाला, ' कृष्णा, तूंच आह्मां सर्वांपेक्षां बुद्धिमान आहेस, व धर्मवेत्ताही आहेस. शिवाय आईबापसुद्धां काळजी करणार नाहींत इतकी आमच्या हिताबद्दल तुला काळजी आहे. तुझ्यावांचून आह्मांला दुसरी गतीच नाहीं. ह्मणून हे केशवा, तुझ्या सांगण्यावरून युधिष्ठिराला मारणें हें मला योग्य दिसत नाहीं. पण त्याला न मारतां माझी प्रतिज्ञा रक्षण कशी होईल तें सांग. ' हें ऐकून श्रीकृष्ण ह्मणाला, ' राजा युधिष्ठिर अतिशय दमलेला आहे व कर्णाच्या माऱ्यानें त्याचें अंतःकरण अगदीं वैतागून गेलें आहे, तेव्हां तो तुला इतकें रागावून बोलला. नुसता एका कर्णाला मारला ह्मणजे आपोआप सर्व कौरवांचा पराभव झाल्यासारखाच आहे. अशा बुद्धीनेंच त्यानें तुला कर्णाचा वध करण्यासाठीं असें रागावून सांगितलें. बाकी त्याच्या अंतःकरणामध्यें मुळींच राग नाहीं. आतां तुझी प्रतिज्ञा खरी होण्याकरितां राजा जिवंत असून मेल्यासारखा कशानें होईल हें तुला सांगतों. मानी पुरुषाचा अपमान झाला ह्मणजे त्यांना मरणापेक्षांही पलीकडे होते. तुह्मीं सर्व भावांनीं व या जगांतील ज्ञानवान, वृद्ध आणि शूर अशा पुरुषांनीं आजपर्यंत त्याचा सन्मानच केला आहे. शिवाय वडिलांना ' तूं, अरे, जारे ' असें बोलणें ह्मणजे त्यांना मरणप्रायच आहे. ह्मणून हे अर्जुना तूं आतां धर्मराजाचा शब्दांनीं अपमान करून पुनः त्याच्या पायां पडून क्षमा माग. अर्थात तुझी प्रतिज्ञा रक्षण होऊन राजाचाही जीव वांचेल. '

हें ऐकून अर्जुन राजा धर्माला ह्मणाला, ' राजा तूं मला असे अपशब्द बोलूं नकोस. युद्धांतून पाठ दाखवून पळून येणाऱ्याला बोलण्याचा मुळींच अधिकार नाहीं. जो युद्धामध्यें प्राणाची पर्वा न करितां शत्रूंची एकसारखी कत्तल करीत आहे अशा भीमालाच मला रागें भरण्याचा अधिकार आहे. क्षत्रियामध्यें बाहुबल असतें व ब्राह्मणामध्यें वाग्बळ असतें. पण राजा तूं जातीनें क्षत्रिय असूनही तुझी ऐट काय ती फक्त बोलण्यांतच आहे. मी नेहमीं तुझ्याकरितां आपले प्राण संकटीं घालून एवढे श्रम करीत असतांनाही तूं मला बोलतोस याबद्दल तुला कांहींच वाटूं नये काय ? तुझ्यापासून आह्मांला आजपर्यंत मुळींच सुख मिळालें नाहीं. तूं मात्र आमच्या शौर्यावर बेफिकीर राहून आपल्या मंदिरामध्यें स्त्रियांचें सुख घेत राहिलास. प्रतापी भीष्माचार्यांचा शिखंडीला पुढें करून वधही मींच केला. ह्मणून तूं आजपर्यंत जगलास. जुगार खेळणें हें फार वाईट आहे हें तुला माहीत असूनही व सहदेव नको नको ह्मणत असतांही तूं बळेंच जुगार खेळून आम्हां सर्वांना वनवासी केलेंस. याप्रमाणें तुझ्यापासून आम्हीं तर दुःख भोगलेंच. पण भरतखंडांतील बाकीच्या राजांनाही तुझ्याच प्रतापामुळें आपल्या सर्व ऐश्वर्याला व जीविताला मुकावें लागत आहे.'

असे शब्द तोंडांतून बाहेर पडतात न पडतात तोंच सत्यशील अर्जुन पापभयानें थरथर कांपूं लागला, व पश्चात्तापानें विरक्त होऊन आपलीच मान कापून घेण्याकरितां तलवार सावरूं लागला. तें पाहून श्री-

कृष्ण अर्जुनाला ह्मणाला, 'पार्था, स्वतःची हत्त्या करावयाला तूं तयार झालास हें चांगलें नाहीं. आपल्या वडील भावाचा तलवारीनें प्राण घ्यावयाला तयार झाला होतास त्यापेक्षां केवळ शब्दानें त्याचा अपमान केलास, हें विशेष वाईट झालें काय? आतां तूं शांत हो व राजाचा आशीर्वाद घेऊन आपल्या शत्रूंचा फडशा पाड.'

हें ऐकून अर्जुन धर्माच्या पायांवर डोकें ठेवून हात जोडून क्षमा करण्याविषयीं त्याची प्रार्थना करूं लागला. पण धर्माला त्याचे पूर्वीचे कठोर शब्द ऐकून फार वाईट वाटलें. तो ह्मणाला, 'अर्जुना, माझ्यामुळें तुह्मां सर्वांना दुःख सोसावें लागलें. मी अत्यंत पातकी, आळशी व भित्रा असा आहें ह्मणून तूं आतांच या कुलाधमाचें डोकें उडीव किंवा मी आपला अरण्यांत निघून जातों. तुह्मी सर्वजण सुखानें रहा. मी नसलों ह्मणजे तुह्मांला सुख होईल. शूर भीमसेन हाच राज्याधिकाराला योग्य आहे. माझ्यासारख्या नपुंसकाला राज्यपद उपयोगाचें नाहीं. शिवाय कालकूटाप्रमाणें जहर अशीं हीं तुमचीं बोलणीं मला सोसवत नाहींत. अशा तऱ्हेनें जगण्यापेक्षां मरणेंच बरें.' असें ह्मणून राजा धर्म एकदम अंथरुणापासून उठून बाहेर जाण्याला निघाला. पण श्रीकृष्णानें त्याला आंवरून धरून त्याच्या पायांवर डोकें ठेविलें व नम्रतापूर्वक सांगितलें कीं, राजश्रेष्ठा, 'हें गांडीव दुसऱ्याच्या हातांत दे' असें जो कोणी ह्मणेल त्याला ठार करीन अशी अर्जुनाची प्रतिज्ञा आहे हें तुला माहीत असेलच. त्याप्रमाणें तूं आतां रागाच्या सपाट्यांत, ह्मणालास. तेव्हां आपली प्रतिज्ञा रक्षण करण्याकरितां अशा तऱ्हेनें तुझा अवमान करून तुझा प्राणघात केला. वडिलांचा अवमान करणें हें त्याला ठार करण्यासारखेंच आहे; ह्मणून हे महाराजा, आह्मां दोघांचे अपराध क्षमा कर. आह्मी तुला शरण आलों आहों. तुझ्या आज्ञेनें आह्मी कर्णाला आतां ठार करतों हें मी तुला प्रतिज्ञापूर्वक सांगतों.' हें ऐकून धर्मराजानें श्रीकृष्णाला उठविलें व हात जोडून त्याची विनंति केली कीं, 'कृष्णा तुझ्या कृपेनें आह्मां दोघांचाही प्राण वांचला. नाहीं तर अज्ञानानें मोहित होऊन आज दोघेंही प्राणाला मुकत होतों.'

असें धर्मराज बोलत आहे इतक्यांत अर्जुन पुनः धर्मराजाच्या पायांवर डोकें ठेवून रडूं लागला, व 'अधिकोत्तर बोलल्याबद्दल क्षमा करा.' असें ह्मणून अगदीं नम्रपणें प्रार्थना करूं लागला. तेव्हां धर्मानें उठवून त्याला आलिंगन दिलें. व दोघेही भाऊ मिळून मोठ्यानें रडूं लागले. नंतर कांहीं वेळानें थोडेंसें दुःख कमी झाल्यावर धर्मराज प्रेमानें अर्जुनाचें डोकें हुंगून ह्मणाला, 'कर्णानें सर्व वीरांच्या देखत माझा पराभव केला. त्यामुळें मला आतां जगावेंसें सुद्धां वाटत नाहीं; आज जर तूं त्याला मारणार नाहींस तर मी खरोखरच आपली हत्या करून घेईन.' हें ऐकून अर्जुन ह्मणाला, 'महाराज, पराक्रमी भीमाची, परमप्रिय नकुलसहदेवांची व आपल्या पायांची शपथ घेऊन मी स्वर्गीं न जातां येथेंच आपल्यापुढें अशी प्रतिज्ञा करितों कीं, जर मी आज कर्णाला मारणार नाहीं तर मी स्वर्गीं न जातां ह्या पृथ्वीतलावरच पडून राहीन.' अशी राजापुढें प्रतिज्ञा करून अर्जुन श्रीकृष्णाला ह्मणाला, 'कृष्णा, तुझ्या सल्लयानें मी आज त्या दुरात्म्याला निःसंशय ठार करतों.' हें ऐकून श्रीकृष्ण ह्मणाला, 'हे भरतश्रेष्ठा, त्या पराक्रमी कर्णाला मारण्याला तूं समर्थ आहेस व माझ्याही मनांत तूं कर्णाला मारावेंस असेंच आहे.' नंतर धर्माकडे वळून तो ह्मणाला, 'ह्या अर्जुनाचें सांत्वन करून ह्याला कर्णाला ठार करण्याकरितां युद्धांत जाण्याला परवानगी दे. कर्णाच्या बाणांनीं तूं बराच जखमी झालास असें समजल्यामुळें आह्मी तुझ्या समाचाराला आलों. तूं त्याच्या हातांत न सांपडतां सुखरूपपणें पार पडलास हें आमचें महद्भाग्यच ह्मणावयाचें. आतां ह्या अर्जुनाला 'जय मिळो' ह्मणून आशीर्वाद दे ह्मणजे झालें.' हें ऐकून धर्मराज ह्मणाला, 'पार्था, जें योग्य होतें तेंच तूं बोललास. त्याबद्दल मला मुळींच राग नाहीं. माझ्या बोलण्याबद्दल मात्र तूं राग मानूं नकोस. जा, आतां कर्णाला जिंकून ये.' त्याबरोबर अर्जुनानें पुनः पायां पडून धर्माची परवानगी घेतली. व धर्मानेंही त्याला 'यशस्वी हो' असा आशीर्वाद दिला.

नंतर रथ सज्ज करून कृष्णार्जुन समरभूमीकडे जाण्याला निघाले. तेव्हां सर्व दिशा उजळ झाल्या.

चाषपक्षी उजवी घालूं लागले. व कावळे, गिधाड, बगळे वगैरे हिंस्र पक्षी, मांसाच्या आशेनें रथाच्या पुढें पळूं लागले. अशीं सर्व शुभचिन्हें होत होतीं, तरी कर्णासारख्या पराक्रमी योद्ध्याचा वध माझ्या हातून कसा होईल अशी; अर्जुनाला मोठी काळजी पडली. याप्रमाणें त्याला चिंताग्रस्त पाहून श्रीकृष्ण ह्मणाला, धनंजया, 'तूं आजपर्यंत जो पराक्रम केलास तो तुझ्यावांचून दुसऱ्या कोणत्याही मनुष्यप्राण्याच्यानें होणें शक्य नाहीं. जयद्रथाच्या रक्षणाकरितां द्रोणांनीं एवढा आटोकाट व्यूह रचला, पण त्या व्यूहाचा भेद करून तूं शेवटीं जयद्रथाला मारलेंसच. भीष्मांसारख्या पराक्रमी योद्ध्यांनाही तूंच मारलेंस. आतां अश्वत्थामा, कृतवर्मा, कर्ण, शल्य व कृपाचार्य, असे पांचच महारथी कौरवांकडे शिल्लक आहेत. ह्या पांचजणांना मारून निष्कंटक पृथ्वीचें राज्य राजा धर्माला दे. द्रोणाचार्यांचा मुलगा ह्मणून अश्वत्थाम्याला पाहिजे असल्यास मारूं नकोस. तुला वाटल्यास कृपाचार्यांनाही ब्राह्मण ह्मणून सोडून दे. मामा ह्मणून शल्यावर तलवार उपसूं नकोस. व आईच्या कुळापैकीं ह्मणून कृतवर्म्याच्याही वाटेला जाऊं नकोस, पण ह्या पापमति कर्णाला मात्र आज जिवंत सोडूं नकोस. त्याला मारलें असतां कांहीं दोष नाहीं, असें मी तुला प्रतिज्ञापूर्वक सांगतों. सुयोधनाला तुमच्याबरोबर जुगार खेळावयाला ह्यानेंच लाविलें. तुह्मांला लाक्षागृहांत जाळून टाकण्याचा बेतही ह्यानेंच करविला. फार काय द्रौपदीच्या विटंबनेला सुद्धां हाच कारण आहे. सुयोधनाचा भार कायतो ह्याच्यावरच आहे व हाही 'कृष्णार्जुनांना मी सहज ठार करीन' असें नेहमीं ऐटीनें म्हणत असतो. बाळ अभिमन्यु आचार्यांच्या व्यूहांत शिरून जेव्हां सर्व कौरवांचा फडशा पाडूं लागला तेव्हां ह्याच दुष्टानें कृपाचार्यादि वीरांना प्रोत्साहन देऊन बाळाला एकटा गांठून निःशस्त्र केला व शेवटीं ह्या सर्वांनीं मिळून त्याचा प्राण घेतला! अर्जुना, ह्यांच्या ह्या चांडाळकृतीची आठवण झाली म्हणजे माझ्या सर्व अंगाची लाही उडते. याच्या शौर्याबद्दल म्हणशील तर सौभद्रानें आपल्या बाणांनीं ह्याला अगदीं जेरीस आणून सोडला होता. त्या वेळीं हा मूर्छित होऊन आपल्या जिवाच्या भीतीनें दुसरीकडे निघून सुद्धां गेला. याच्या एकट्याच्या हातून सौभद्राला मारणें कधीं झालें नसतें. सभेमध्यें दीन झालेल्या कृष्णेला ओढून हा कुलाधम 'कृष्णे, पांडव सर्व हतवीर्य झाले, आतां तूं दुसरा पति कर. हे सुभगे, कौरवांच्या दास झालेल्या पांडवांची बायको होऊन कशाला राहतेस? कौरवांनीं त्यांच्या देखत तुझी विटंबना चालविली असतांना तुझे पति म्हणविणाऱ्यांकडून तुझें संरक्षणही करवत नाहीं. महाराजा दुर्योधन हा सार्वभौम आहे. पृथ्वींतील सर्व राजे लोक याच्यापुढें हात जोडून उभे आहेत. ह्मणून तूं ह्या अळू पांडवांचा त्याग कर,' असें ह्मणाला. तर हे महाबाहो धनंजया, आतां तूं आपल्या तीक्ष्ण बाणांनीं पांडवांचें वीर्य काय आहे तें याला दाखीव. यानें आजपर्यंत तुमचे जेवढे अपराध केले आहेत, त्या सर्वांची आठवण कर. आतां त्यांचे उसने फेडून घे. कर्णाचें डोकें उडालेलें सर्व राजे लोकांना पाहूं दे. तूं आज आधीं त्याच्या मुलाला मार ह्मणजे तो सहजच तुझ्यावर चालून येईल. मग तूं आपल्या गांडीवाचा प्रभाव त्याला दाखीव. अर्जुना, हे पांचालवीर पहा! कर्णाचा मारा सहन न झाल्यामुळें कसे पळत सुटले आहेत ते. शतानीक, नकुल, जन्मेजय व सात्यकि हे सर्व वीर कर्णाच्या तडाक्यांत सांपडले आहेत. हे पांचालवीर रणांगणांतून कधींही परतावयाचे नाहींत. यांना काळाची भीति कसली ती नाहीं. या अतिरथी भीष्माचार्यांनीं सर्व पांडवसेनेला अगदीं जेरीस आणून सोडलें होतें. त्या भीष्मांच्या वेळींही यांनीं पाठ दाखविली नव्हती. मग असे महावीर पांचाल आज ह्या कर्णाच्या माऱ्यापुढें निरुपाय होऊन पळूं लागले आहेत हें आश्चर्य नव्हे काय? अर्जुना, आतां या तुझ्या मित्रांना मदत कर. त्यांना कर्णाच्या त्रासांतून सोडीव. तूं आतां कर्णावर चाल केली नाहींस तर हा कर्ण आतां एका क्षणांत ह्या सर्व पांचालांचा फडशा पाडील. हा भीम धैर्यानें तोंड देऊन कर्णाशीं लढत आहे; पण यालाही कर्णानें आपल्या बाणांनीं बराच जखमी केला आहे. या राधेयाला मारणारा पांडवामध्यें तुझ्यावांचून दुसरा कोणीही वीर दिसत नाहीं. तर आतां तूं ह्या कर्णाला मारून आपली प्र-

तिज्ञा शेवटास ने.'

हें श्रीकृष्णाचें भाषण ऐकून अर्जुनाला फार आनंद झाला. त्याला कर्णासारख्या पराक्रमी योद्ध्याचा समाचार माझ्यानें कसा घेववेल अशी जी भीति पडली होती ती नाहींशी झाली. श्रीकृष्णाच्या भाषणानें त्याच्या अंगांत अधिक उत्साह आला. तो आपल्या गांडीवाचा टणत्कार करीत श्रीकृष्णाला ह्मणाला, 'गोविंदा, तुझ्यासारख्या जगत्पालकाचा आधार असल्यावर मला जयाची काळजी करावयाला नकोच. मला खात्रीनें जय मिळणार. सर्वशक्तिमान अशा तुझें साहाय्य असल्यावर तिन्ही लोक जर एकवटून मजपुढें आले तर त्या सर्वांनाही मी एका क्षणांत यमलोकीं पाठवीन. मग या यःकश्चित् कर्णाची ती काय कथा. पांचालांची फजिती झालेली मला दिसतेच आहे. व कर्ण कसा लढतो आहे तेंही मीं पहात आहे. याच्याशीं युद्ध करितांना मी त्यांत असा पराक्रम करीन कीं, जावत्कालपर्यंत या पृथ्वीचें अस्तित्व आहे तावत्कालपर्यंत सर्व प्राणिमात्र माझ्या पराक्रमाचें वर्णन करीत रहातील. मी आज याला जिवंत सोडीत नाहीं. याला ठार करून दुर्योधनाला त्याच्या कर्माचें फळ भोगावयाला लावतों. **गुणवानाचा द्वेष करून निर्गुणाला पुढें केल्यानें काय माठें परिणाम होतात ते आज राजा धृतराष्ट्राला दाखवितों.** ज्याप्रमाणें एखादा पुरुष आपली स्वतःची आंबराई, वेडेपणानें तोडून टाकल्यावर दुसऱ्यांनीं आणलेल्या आंब्याचें फळ पाहून दुःखानें आपल्या मूर्खपणाबद्दल चरफडूं लागतो, त्याचप्रमाणें आज राजा दुर्योधन आपल्या दुष्टपणानें कर्णासारख्या वीराला धारातीर्थीं पडलेला पाहून व आपल्याला राज्याची निराशा झालेली पाहून दुःखानें व्याकूळ होईल. कपटी फाशानें मिळविलेल्या राज्याचें सुख काय आहे तें शकुनीला आज दाखवितों. जो कर्ण आपल्यापेक्षां या जगांत कोणीही पराक्रमी पुरुष नाहीं असें ह्मणतो त्या कर्णाला या माझ्या दिव्य गांडीवाचा प्रभाव दाखवितों. व त्याचें डोकें उडवून या तान्हेलेल्या पृथ्वीला त्याचें रक्त पाजतों.'

असें भाषण करीत कृष्णार्जुन कौरवसैन्यांत शिरले. त्याबरोबर कौरववीरही एकदम त्यांच्यावर तुटून पडले. त्या सर्वांनीं यांच्यावर बाण सोडण्याचा सपाटा चालविला. पण अर्जुन झंजावातानें मेघजाल ज्याप्रमाणें एका क्षणांत नाहींसें होतें त्याप्रमाणेंच आपल्या बाणवातानें त्यांचे शरजाल तोडून टाकूं लागला. अर्जुनाच्या बाणांनीं हजारों योद्धे मृत्युमुखीं पडूं लागले. अर्जुनानें कौरवसैन्यामध्यें सारखा प्रळय मांडल्यामुळें त्याच्या सैन्यांत फारच हाहाकार उडाला. अशा रीतीनें पुढें आलेल्या कौरवांचा फडशा पाडून अर्जुन कर्णाच्या सैन्यावर चालून गेला. अर्जुन आलेला पाहून भीमाला अधिक त्वेष चढला. तो कौरवसेनेला आपल्या गदेनें एकसारखा ठेंचतच चालला. तेव्हां राजा दुर्योधनाच्या आज्ञेवरून सर्व कौरववीर भीमावर तुटून पडले. भीमानें पुढें आलेल्या हत्तींना हातामध्यें धरून गरगर फिरवून आपल्यापासून लांब असलेल्या हत्तींवर व योद्ध्यांवर टाकण्याचा सपाटा चालविला. त्यामुळें दहा हजार हत्ती, चार लक्ष वीर पुरुष, पांच हजार घोडे व शंभर रथी अशा रीतीनें चिरडूनच नाहींसें झाले. हा भीम जिकडे जिकडे ह्मणून जाई तिकडे तिकडे हजारों लोकांची कचल करून त्यांच्या प्रेतांचा ढीग पाडी. भीमाचें हें अद्भुत कर्म पाहून राजा दुर्योधनानें शकुनीला भीमावर चालून जावयाला सांगितलें. त्याबरोबर तो आपल्या सर्व भावांसहवर्तमान भीमावर तुटून पडला. प्रथमतः शकुनीनें भीमावर बरेच तीक्ष्ण बाण सोडले. ते त्याचें कवच फोडून आंत घुसले. त्यामुळें भीमाला बराच राग आला. त्यानें पोलादी परज बसविलेली सोन्याच्या दांड्याची एक तीक्ष्ण बर्ची जोरानें शकुनीवर सोडली. पण शकुनीनें बरीच चलाखी करून ती बर्ची तशीच भीमावर उलटवली. त्याबरोबर भीमाच्या डाव्या हाताला तिचा तडाखा लागून थोडीशी जखम झाली. त्यामुळें भीमाला फारच आवेश चढून त्यानें शकुनीचे घोडे ठार केले, सारथ्याचें डोकें उडविलें व ध्वज मोडून पाडला. त्याबरोबर शकुनीनें खालीं उडी टाकून भीमावर जोरानें बाणांचा मारा चालविला. पण लगेच भीमानें त्याचें धनुष्य तोडून टाकलें व पांच चार बाण नेमके त्याच्या मर्मस्थळावर सोडले. त्यामुळें तो मूर्च्छित होऊन खालीं तडफडत पडला. शकुनीची

अशी दुर्दशा झालेली पाहून दुर्योधनानें त्याला आपल्या रथांत घालून झटदिशीं बाजूला काढला. शकुनि मूर्छित होऊन खालीं पडला व दुर्योधन रणांगणांतून बाजूला गेला हें पाहून सर्व कौरववीरांचें धाबें दणाणलें. ते कर्णाच्या आश्रयाला जाण्याकरितां त्याच्याकडे पळूं लागले. तें पाहून कर्णानें पांडववीरांवर सपाट्यानें बाणांचा मारा चालविला. त्यानें जनमेजयाचे घोडे मारले व सारथी ठार केला. शतानीकाचें धनुष्य तोडलें. धृष्टद्युम्नाचे घोडे मारले व कैकेयपुत्र विशोक याला ठार केलें. तें पाहून कैकेय सेनापती उग्रकवी हा कर्णाचा मुलगा प्रसेन याच्यावर चालून गेला. पण कर्णानें अर्ध चंद्राकृति फाळ बसविलेला एक तीक्ष्ण बाण सोडून ह्यालाही विशोकाच्या भेटीला पाठविलें. इतक्यांत हिकडे सात्यकीनें प्रसेनाला ठार केला. सात्यकीनें आपला मुलगा मारला हें पाहून कर्ण रागानें वेडा होऊन सात्यकीवर धांवून आला. पण शिखंडीनें तो येतो आहे इतक्यांतच त्याचें धनुष्य तोडलें. त्याबरोबर कर्णानें शिखंडीचें धनुष्य व बावटा तोडून धृष्टद्युम्नाच्या मुलाचें डोकें उडविलें. तें पाहून श्रीकृष्णानें लौकर कर्णावर चाल कर, नाहींतरहा आतां सर्व पांचालांना नाहींसे करील,' असें अर्जुनाला सांगितलें. त्याबरोबर तो कर्णाचे सेनेवर बाणांचा वर्षाव करूंलागला. त्याबरोबर भीम आपल्या भावाच्या मागोमाग त्याचें रक्षण करण्याकरितां चालूं लागला. इतक्यांत इकडे कर्णानें सोमकांना गांठून त्यांचा फडशा पाडण्याला सुरवात केली. त्याबरोबर उत्तमौजा, जनमेजय, युधामन्यु व शिखंडी ह्या सर्वांनीं मिळून त्याला थोपवून धरण्याचा प्रयत्न केला. पण त्याच्यापुढें यांचें कांहींच चालेना. उलट कर्णानेंच यांच्यापैकीं कोणाचें धनुष्य तोडलें, कोणाचा सारथी मारला, कोणाचे घोडे ठार केलें, कोणाचा बाहुटा पाडला, तर कोणाचा रथ मोडिला असें करून यांचीच त्रेधा उडविली. इतक्यांत सात्यकि कर्णावर धांवून आला. त्याबरोबर कृपाचार्य, कृतवर्मा, दुर्योधन व स्वतः कर्ण या चौघांनींही त्याच्यावर मारा चालविला. पण ह्या एकट्या रणबहादरानें त्या सर्वांचा समाचार घेतला. त्यानें यांच्यावर बाण सोडीत सोडीत सभोंवारच्या सैन्यापैकीं बरेंच सैन्य यमलोकीं पाठविलें. इतक्यांत दुःशासन भीमावर धांवून आला.

---

## ५० दुःशासन व वृषसेन यांचा वध.

### ( ८.८१--८६ )

तेव्हां, एका हत्तिणीच्या मागें लागलेल्या दोन मदोन्मत्त हत्तींची गांठ पडली ह्मणजे ते ज्याप्रमाणें एकमेकांशीं अति त्वेषानें झुंजतात त्याप्रमाणेंच हे दोघेही वीर आजपर्यंत मनांत सांठून राहिलेल्या वैराचें उट्टें काढण्याकरितां एकमेकांवर आवेशानें तुटून पडले. त्यामुळें त्या दोघांचेंही युद्ध फारच भयंकर झालें. दुःशासनाला पाहिल्याबरोबर भीमानें दोनतीन रुंद फळांचे बाण सोडून त्याचें कपाळ फोडलें व सारथ्याचें डोकें उडविलें. तरी न डगमगतां दुःशासनानें स्वतःच घोडे आवरून धरून भीमावर जोरानें बाणांची वृष्टि केली. त्यांतील बरेच बाण मर्मीं लागल्यामुळें भीम मूर्छित होऊन हात पाय पसरून रथांत पडला; पण तो थोड्याच वेळानें सावध झाला. नंतर भीम आपलें धनुष्य घेऊन पुनः युद्धाला सुरवात करीत आहे इतक्यांतच दुःशासनानें त्याचें धनुष्य तोडलें व सारथ्याला जखमी केला. त्याबरोबर तें तुटकें धनुष्य टाकून देऊन भीमानें विजेसारखी चकाकणारी अशी एक तीक्ष्ण धारेची बर्ची जोरानें दुःशासनावर फेंकली. पण दुःशासनानें जलदीनें व जोरानें दहा बारा रुंद तोंडाचे बाण सोडून तिचे मधल्यामध्येंच तुकडे करून पाडले. दुःशासनानें भीमावर पुनः बराच बाणांचा वर्षाव केला. त्यामुळें भीमाला बरीच चीड आली. तो कालदंडासारखी भयंकर अशी आपली गदा हातांत घेऊन डोळे लाल करून तक्षकाप्रमाणें रागानें फुस्कारे टाकीत दुःशासनाला ह्मणाला, 'तूं इतका वेळ आपलें युद्धकौशल्य दाखविलेंस. आतां मीं माझी गदा घेतली आहे. इचा एवढा तडाखा सहन कर ह्मणजे झालें! मी आज तुझें रक्त पिणार आहें.' असें भीम ह्मणत आहे इतक्यांत दुःशासनानें अतिशय जड अशी एक बर्ची भीमावर फेंकली. भीमानें झटदिशीं आपल्या गदेचा तडाखा देऊन तिचा रोंख दुःशासनाकडेच वळविला. त्याबरोबर ती दुःशासनाचे कपाळावर आदळ-

ली. त्यामुळें कपाळ फुटून त्यांतून भळभळ रक्त वाहूं लागलें, व ही बर्ची परत जाते न जाते इतक्यांतच भीमानें त्याच्या रथावर आपली गदाही फेंकली. मेरुपर्वतासारखी धिप्पाड असलेली ती भीमाची गदा दुःशासनाच्या रथावर पडल्याबरोबर रथ व घोडे ह्या सर्वांचा एका क्षणांत चुराडा झाला! कपाळ फुटून त्यांतून जोरानें रक्त वहात होतें तरी दुःशासनानें त्यांतल्यात्यांत चलाखी करून ती गदा येऊन आपटण्यापूर्वींच खालीं उडी टाकली ह्मणून तो वांचला; नाहीं तर त्याचीही त्यांतच चटणी होत होती! ह्या प्रचंड गदेचा तडाखा चुकवण्याकरितां दुःशासनानें जरी आपल्याकडून होईल तेवढी खबरदारी घेतली तरी ओझरतां कां होईना, पण तडाखा बसावयाचा तो बसलाच! व तेवढ्याच तडाख्यानें त्याच्या अंगांतील पोलादी चिलखत फुटून त्याचे तुकडे तुकडे झाले! कपाळांतून रक्त वहात आहे, अंगांतील चिलखताचे तुकडे झाले, रथाचा चुराडा उडाला व हा यमस्वरूपी भीम पुनः आपली गदा सांवरून पुढें उभा आहेच. हें पाहून दुःशासन थरथर कांपूं लागला! दुःशासनाची अशी फजिती झालेली पाहून पांडववीरांनीं आनंदानें भीमाचा जयजयकार केला. नंतर दुःशासनानें आपली सर्व शक्ति खर्च करून जोरानें भीमावर आपली गदा फेंकली. पण भीमानें तिला आपल्या गदेच्या तडाख्यानें हाणून पाडली; व लगेच आपल्या रथावरून गरुडाप्रमाणें दुःशासनावर टाणदिशीं उडी टाकून मोठ्यानें सिंहगर्जना केली. ही गर्जना ऐकूनच आसपासचे शिपाई मूर्छित पडले! दुःशासनाला पुढें पाहिल्याबरोबर भीमाला त्याच्या सर्व पापकृत्यांची आठवण झाली. त्यामुळें आगींत तेल ओतल्याप्रमाणें झालें. भीमाचा क्रोधाग्नि जास्तच भडकला. कर्ण, कृपाचार्य, अश्वत्थामा, दुर्योधन व कृतवर्मा, ह्या सर्वांना मोठ्यानें हाक मारून 'मी आज दुःशासनाला ठार करणार आहें. तुमची शक्ति असेल तर सर्वजण मिळून याचें रक्षण करा.' असें म्हणून त्यानें राजा दुर्योधनाच्यासमक्ष दुःशासनाला ओढून खालीं पाडलें; नंतर त्याच्या नरडीवर पाय देऊन छाती फोडण्याकरितां तलवार उगारली. त्याबरोबर दुःशासनाची बोबडी वळली. तो लटलट कांपूं लागला. तें पाहून भीम रागानें ह्मणाला कीं, 'राजसूय यज्ञामधील अवभृत स्नानानें पवित्र झालेले, साध्वी याज्ञसेनीचे केश कोणत्या हातानें ओढलेस तें सांग पाहूं. हा भीम आतां त्याचा समाचार घेणार आहे, लौकर सांग.' हें ऐकून दुःशासनाला त्वेष आला. तो आपला हात पुढें करून ह्मणाला, 'हा पहा हत्तीच्या सोंडेप्रमाणें पुष्ट असलेला माझा हात; ह्यानेंच मीं याज्ञसेनीचे केश धरून ओढले.' असें सर्व कौरवपांडवांच्या देखत मग्रूरीचें दुःशासनाचें बोलणें ऐकून भीमाला अतिशय चीड आली. त्यानें दुःशासनाच्या छातीवर पाय देऊन हात बळकट धरला, व 'कोणाची छाती होत असेल तर या. हा भीम आतां याचा हात उपटीत आहे,' असें मोठ्यानें ओरडून त्याच्या हाताला एक जोराचा हिसका दिला. त्यासरशीं दुःशासनाचा हात निखळून बाहेर आला! नंतर भीम खालीं बसला व आपल्या वज्रासारख्या बळकट अशा हाताच्या तडाख्यानें दुःशासनाची छाती फोडून त्यांतील ऊन ऊन रक्त आपल्या ओंजळीनें पिऊन मट मट मिटक्या मारूं लागला. त्याला शत्रूच्या–दुःशासनाच्या–रक्ताइतकी गोडी दुसऱ्या कशांतच वाटेना! तो ह्मणाला, 'आईच्या दुधापेक्षां, मधापेक्षां, अधमोऱ्या दह्यापेक्षां, फार काय स्वर्गांतील अमृतापेक्षांही हें रक्त मला फार गोड लागत आहे! अशी गोडी ह्या पृथ्वींतील दुसऱ्या कोणत्याही पदार्थांत नाहीं!' असें ह्मणून तो दुःशासनाकडे रागानें पहातो आहे तों त्याचा प्राण निघून गेला असें त्याच्या दृष्टीस पडलें. तेव्हां आपल्या शत्रूचा आपणाला आतां आणखी कोणत्याही रीतीनें सूड घेतां येत नाहीं असें पाहून त्याला फार वाईट वाटलें. तो दुःशासनाकडे पाहून ह्मणाला, 'काय करूं, काळानें तुझें रक्षण केलें!' याचे हे शब्द ऐकून व हें राक्षसी कृत्य पाहून कौरववीरांची अगदीं गाळण उडाली. ते भयानें सैरावैरा धांवत सुटले. कित्येक तर तेथेंच मूर्छित पडले! त्यांतल्यात्यांत जे थोडेसे धीट होते ते तेथेंच कांहीं वेळ धैर्यानें उभे राहिले. पण त्यांचेही लौकरच हात पाय लटपटले, व शस्त्रें गळून खालीं पडलीं. व तेथें कित्येक धीट येऊन खालीं पडले. कांहींजण भयानें डोळे झांकून पळत सुटले.

पळतांना वाटेंत ते जेव्हां जेव्हां डोळे उघडीत तेव्हां तेव्हां हा भीम,दुःशासनाच्या छातीवर बसून रक्त पीत आहे असेंच त्यांना दिसत असे. त्यामुळें तर ते फारच घाबरले. याचें अघोरकर्म पाहून 'हा मनुष्य नव्हे, राक्षस आहे किंवा काळपुरुष आहे' असें मोठ्यानें सर्व सैनिक ओरडूं लागले.

इतक्यांत चित्रसेन भीमावर धांवून आला. तें पाहून युधामन्यु त्याला थोपवून धरण्याकरितां पुढें सरला. चित्रसेनानें त्याचा सारथी मारला. सारथी खालीं पडतो आहे इतक्यांतच युधामन्यूनें चित्रसेनाचें डोकें उडविलें. आपला भाऊ मेला आहे हें पाहून कर्ण रागानें पांडव सेनेचा धुव्वा उडवूं लागला.

इकडे भीमानें दुःशासनाचें ताजें रक्त यथेच्छ पिऊन पुनः ओंजळ भरली. नंतर तो सर्व कौरववीरांच्या देखत दुःशासनाकडे व बाकीच्या वीरांकडे पाहून ह्मणाला, 'हे पुरुषाधमा, मी आतां हें तुझें रक्त पितों आहे. आतां तूं पहिल्याप्रमाणेंच 'गायरे गाय' असें ह्मण. पूर्वी आमच्याकडे पाहून आह्मांला 'गायरे गाय' ह्मणून जे कोणी नाचले होते त्या सर्वांना उद्देशून 'गाय' ह्मणून आज आह्मी नाचतों. आह्मांला विष चारलें, लाक्षागृहामध्यें आह्मांला जाळण्याचा प्रयत्न केला, आह्मांला सर्पाकडून चावविलें, कपटद्यूतानें आमचें राज्य घेऊन, आह्मांला वनवास करावयाला लावला, भरसभेंत द्रौपदीचे केस धरून तिला ओढली; शेवटीं आह्मी वीराटाच्या घरामध्यें दीन वेषानें असतांनाही आमचा नाना तऱ्हेनें छळ केला. या सर्व दुःखाला हे दुष्टा, तूंच कारण आहेस.' असें ह्मणून वृकोदर तशीच रक्ताची ओंजळ घेऊन कृष्णार्जुनांकडे गेला व त्यांना ह्मणाला कीं, 'हे वीरश्रेष्ठहो, दुःशासनाबद्दल मीं जी प्रतिज्ञा केली होती ती आज खरी केली. आतां याचप्रमाणें या रणदेवीला दुर्योधनाचा बळी देऊन त्याचें डोकें सर्व कौरवांच्या देखत मीं आपल्या पायानें तुडविलें ह्मणजे मला समाधान होईल असें ह्मणून भीमानें आनंदानें एक भयंकर गर्जना केली. त्याचे त्या वेळचे रक्तानें भरलेले कपडे, तोंडावर, मिशांवर रक्त पिण्यानें आलेली लाली त्याचप्रमाणें रक्तानें भरलेली ओंजळ, हें सर्व भयंकर स्वरूप पाहून पांडवांकडील वीरसुद्धां चकित झाले.

अशा रीतीनें पराक्रमी भीमानें दुःशासनाची छाती फोडून आपली प्रतिज्ञा खरी केलेली पाहून निषंगी, कौंची, पाशी, दंडधार, धनुर्धर, अलोलुप, सह, षंढ, वातवेग, सुवर्चस, असे दहा कौरवबंधु आपल्या भावाच्या वधानें चिडून जाऊन भीमावर बाणांचा मारा करूं लागले. आधींच दुःशासनाच्या वधामुळें भीमाच्या आंगांत वीरश्री चढली होती, त्यांतच पुनः यांची दुरदुर चाललेली पाहून भीमाला फार राग आला. त्यानें प्रत्येकावर एकेक असे एकंदर दहा रुंद फळाचे बाण सोडून तेवढ्यांतच यांना यमद्वार दाखविलें.

दुःशासनाच्या वधाच्या पाठोपाठ ह्या दहा भावांचे धारातीर्थी पडणें व भीमाचें तें उग्र स्वरूप पाहून कर्णाला फार भीति पडली. शल्यानें त्याच्या चेहऱ्यावरून हा घाबरला आहे असें तात्काळ ताडलें. ह्मणून तो त्याला ह्मणाला, 'कर्णा, तुझ्यासारख्याला रणांगणांत घाबरणें हें शोभत नाहीं. हे सर्व कौरवाकडील राजे भीमाचें हें अघोर कर्म पाहून भयानें पळत आहेत. दुर्योधनही आपल्या भावांच्या मरणानें अतिशय दुःखी होऊन वेड्यासारखाच झाला आहे. कृपाचार्यादि महावीर व हे बाकीचे कौरवबंधु राजाची समजूत करून पांडवांशीं टक्कर देण्याचा प्रयत्न करीत आहेत. हे धनंजयादि पांडववीर तर तुझ्यावरच चालून येत आहेत. ह्मणून हे नरव्याघ्रा, आपल्या क्षात्रधर्माला अनुसरून धैर्यानें धनंजयावर चालून जा. राजा दुर्योधनाचा सर्व भार तुजवर आहे. तर त्याला यथाशक्ति हात दे. जय झाला तर तुझी अक्षय कीर्ति होईल, नाहीं तर स्वर्गसुख आहेच. तुला भांबावलेला पाहून हा तुझा मुलगा वृषसेन पांडवांचा समाचार घेत आहे, असें ह्मणून शल्यानें कर्णाचा रथ हांकला.

इकडे वृषसेन दुःशासनाच्या वधाचा सूड घेण्याकरितां कालदंडासारखी भयंकर गदा हातांत घेतलेल्या व प्रळयकालच्या रुद्राप्रमाणें भयंकर स्वरूप धारण केलेल्या भीमावर धांवून आला. पण इतक्यांत मध्येंच नकुलानें त्याला अडविलें. नकुलानें पहिल्या सलामीबरोबर वृषसेनाचा बावटा उतरून खालीं पाडला. तें पाहून वृषसेनानें आपल्या तीक्ष्ण बाणांनीं नकुलाचे चारी घोडे मारले. त्याबरोबर न-

कुलानें ढालतलवार घेऊन रथाखालीं उडी ठोकली. नंतर तो त्या समरांगणावर विजेप्रमाणें इकडून तिकडे चमकूं लागला. त्यानें खालीं उतरल्यापासून एका क्षणाच्या आंत दोन हजार कौरववीरांचें रक्त आपल्या तलवारीला पाजलें. नकुलानें आपल्या सेनेंत असा प्रळय उडविलेला पाहून वृषसेनानें एकसारखे अठरा बाण सोडून त्याला बराच जेरीस आणला. पण न डगमगतां उलट अधिक त्वेषानें वृषसेनाला आपल्या तलवारीचें पाणी दाखविण्याकरितां नकुलानें गरुडाप्रमाणें एकदम उडी मारली. जवळ आल्याबरोबर वृषसेनानें आधीं त्याची ढाल तोडली व पुनः बाणांचा मारा चालविला. पण नकुल ह्या वेळीं आपल्या तलवारीचे हात अशा अद्भुत रीतीनें करीत होता कीं, बाणांची पत व शत्रूंची कत्तल हीं एकाच वेळीं होत असत. इतक्यांत वृषसेनानें आणखी पांच सहा बाण सोडून त्याची तलवार तोडली व त्यालाही बराच घायाळ केला. त्याबरोबर नकुलानें एकदम भीमाच्या रथावर उडी घेतली.

वृषसेनानें नकुलाला फार त्रास दिला हें पाहून धृष्टद्युम्नादि पांचाल वीर, सात्यकि, शतानीकादि द्रौपदीचे मुलगे हे वृषसेनावर धांवून आले. त्याबरोबर कृपाचार्य, अश्वत्थामा, दुर्योधन व शकुनि वगैरे वीरांनीं त्या सर्वांना थोपवून धरलें. तेव्हां कुलिंद पुत्रानें कृपाचार्यांना आपल्या बाणांनीं बरेंच घायाळ केलें व शेवटीं ते मूर्छितही पडले. त्याबरोबर त्यांना स्वर्गीं पाठविण्याकरितां कुलिंदपुत्रानें त्यांच्या छातीवर आपला भाला फेंकला. पण इतक्यांत शकुनीनें तो भाला तोडून कुलिंदपुत्राचें डोकें उडविलें. इकडे कृतवर्म्यानें शतानीकाच्या गजयोद्ध्यांचा फडशा पाडण्याला सुरवात केली होती. तसेंच कुलिंदाच्या धाकट्या मुलानें क्राथावर आपला हत्ती चालविला. त्याबरोबर त्यानें त्या हत्तीचें गंडस्थळ फोडून त्याला चीं चीं करीत पळावयाला लाविलें. आपला हत्ती आवरत नाहींसा पाहून कुलिंदानें त्याच्यावरून खालीं उडी मारली व दुसऱ्या हत्तीवर बसून पुनः क्राथावर चाल केली व क्राथाचे घोडे व सारथी यांना चिरडून टाकलें. नंतर त्यानें जवळच असलेल्या शकुनीवर चाल केली. पण शकुनीनें त्याला आपल्यापर्यंत येऊं न देतां मध्येंच चेंडूप्रमाणें त्याचें डोकें उडविलें. त्याचप्रमाणें नकुलाचा मुलगा शतानीक कुलिंदाच्या हत्तींना ठार करून त्यांच्या प्रेतांचे ढीग घालीत होता. तें पाहून कुलिंदराजपुत्र त्याच्यावर चालून आला. पण याचें शतानीकानें शीर धडापासून वेगळें केलें. त्याबरोबर वृषसेनानें शतानीकावर तीन बाण सोडले. भीम, नकुल यांच्यावर सात बाण सोडून स्वतः श्रीकृष्णावर त्यानें बारा बाण सोडले. त्याची ही चलाखी व धैर्य पाहून सर्व कौरवांनीं त्याला शाबासकी दिली. पण श्रीकृष्णाला बाण मारलेले पाहून अर्जुनाचा क्रोधाग्नि फारच भडकला. तो वृषसेनावर वेगानें चाल करून आला. तें पाहून या शूर वृषसेनाला जास्तच आवेश आला. त्यानें येतां येतांच कृष्ण व अर्जुन या दोघांनाही बरेंच जखमी करून सोडलें. त्याबरोबर अर्जुन डोळे लाल करून व कपाळ चढवून मोठ्यानें कर्ण, दुर्योधन व अश्वत्थामा वगैरे सर्व वीरांना हाक मारून ह्मणाला, ' मी आज तुह्मां सर्वांच्या देखत व विशेषेंकरून कर्णा, तुझ्या देखत या वृषसेनाला ठार करतों. तुह्मीं सर्वांनीं मिळून माझ्या मुलाला एकटा गांठून तो निःशस्त्र असतांना त्याला ठार केलें. पण मी आतां तुमच्या देखत याचें मुंडकें उडवितों. कर्णा, तुझ्या मुलाला मी मारतों. तूं त्याचें रक्षण कर. हे सर्व कौरववीरहो, तुमचें सामर्थ्य असेल तर तुह्मी या वृषसेनाचें रक्षण करा. मी या वृषसेनाला मारून नंतर त्याच्या पाठोपाठ कर्णालाही स्वर्गीं पाठविणार आहें. ' असें ह्मणून अर्जुनानें अत्यंत तीक्ष्ण असे दहा बाण मर्मस्थळांचा रोख धरून वृषसेनावर सोडले. त्याबरोबर त्याचे दोन्ही हात तुटले, धनुष्याचे तुकडे झाले, मुंडकें वर उडालें व धड धाडदिशीं जमिनीवर आदळलें.

अर्जुनानें आपल्या मुलाला मारलें हें पाहून रागानें डोळे लाल करून कर्ण कृष्णार्जुनांवर चालून आला. तें पाहून श्रीकृष्ण अर्जुनाला ह्मणाला, 'अर्जुना, हा पहा कर्ण तुझ्यावर चालून येत आहे, आतां चांगला स्थीर हो. तुझ्या मनांत आजपर्यंत तुंबून राहिलेल्या वैराचें उट्टें काढण्याचा हाच समय आहे. कर्ण तुझ्यावर येत आहे हें पाहून सर्व कौर-

वांना फार आनंद झाला आहे; ते त्याचा जयघोष करीत आहेत; रणवाद्यें वाजवीत आहेत; सिंहनादांची तर त्यांच्यामध्यें गर्दी उडून राहिली आहे. त्याचा बाणांचा मारा सहन न होऊन हे पांचालवीर पळूं लागले आहेत. कर्णाचे बाण फार असह्य असतात. त्याचा मारा देवादिकांना सुद्धां सहन होत नाहीं. त्याला मारण्याचें सामर्थ्य फक्त तुझ्याच अंगीं आहे. रुंडमाळा घातलेल्या अशा त्रिशूलधारी शंकराच्या भयंकर मूर्तीकडे नुसते डोळे उघडून पाहण्याचीही छाती होत नाहीं. मग त्याच्याबरोबर लढण्याची तर गोष्ट बाजूला राहिली. तूं त्याच्याबरोबर युद्ध करून त्याला प्रसन्न करून घेतलें आहेस. तर हे महाबाहो, इंद्रानें ज्याप्रमाणें नमुचीला मारलें त्याप्रमाणें तूंही कर्णाला ठार कर. पार्था, तुला युद्धांत जय मिळो व ईश्वर तुझें कल्याण करो.' हें ऐकून अर्जुन ह्मणाला, 'कृष्णा, जगत्पालक असा तूं सर्वसाक्षी प्रभू ज्या अर्थीं माझ्यावर प्रसन्न आहेस त्याअर्थी खात्रीनें माझा जय होणार. केशवा, चल रथ पुढें हाक. आज कर्णाला मारल्याशिवाय हा अर्जुन युद्धांतून परत येणार नाहीं. आजचा माझा पराक्रम पाहून जोंपर्यंत या पृथ्वीचें अस्तित्व आहे तोंपर्यंत प्राणिमात्र त्याचें वर्णन करतील. कृष्णा, आतां वेळ लावूं नकोस. घोडे जरा जलदीनें हाक.' असें अर्जुनानें ह्मटल्याबरोबर कृष्णानें रथ हांकला.

---

## ५१ कर्णवध. ( ८. ८७–९६ )

अर्जुनाच्या रथाचे घोडे मनोवेगी असल्यामुळें तो रथ एका क्षणांत कर्णापुढें येऊन ठेपला. कर्णही आपल्या मुलाच्या वधानें चिडून जाऊन अर्जुनाचा सूड घेण्याकरितां धैर्यानें पुढें आला. पुत्रशोकानें त्याच्या डोळ्यांतून सारखें पाणी वहात होतें. त्याचे डोळे रागानें व शोकानें अतिशय लाल झाले होते. दोघांच्याही रथांचे घोडे पांढरेच होते. दोघेही वीर अत्यंत तेजस्वी होते. त्यांचे रथही दिव्य होते. त्यामुळें आकाशांतून प्रत्यक्ष सूर्य व चंद्रच या समरांगणीं येऊन उभे राहिले आहेत कीं काय असा भास होत होता. त्यांच्या धनुष्यांचा टणत्कार, आपापल्या सैन्यांना आवेश येण्याकरितां केलेली सिंहगर्जना, व रथांचा घडघडाट या योगें सर्व समरांगण दुमदुमून गेलें. आणि त्यांतच दोन्ही सैन्यांतील वीरांचा आपापल्या नायकांचा केलेला जयजयकार येऊन मिळाला. त्यामुळें एकच गर्दी उसळून राहिली. कौरवांनीं कर्णाला आनंद व्हावा व त्याच्या अंगांत अधिक वीरश्री चढावी म्हणून गंभीर रणवाद्यें वाजविण्याला, शंख फुंकण्याला व मोठ्यानें सिंहनाद करण्याला सुरवात केली. त्याचप्रमाणें पांडवांनींही धनंजयाला आवेश येण्याकरितां शंख, भेरी, नगारे व आपल्या सिंहगर्जना यांनीं दाही दिशा दणाणून सोडल्या. कर्णार्जुन एकमेकांशीं भिडलेले पाहूनच सैन्यांतील कित्येक वीरांना अतिशय आवेश चढला. व ते आपल्या शत्रूवर दंड ठोकून व दांत ओंठ चावून तुटून पडूं लागले. कर्ण व अर्जुन हे दोघेही अत्यंत शूर होते, दोघेही बलवान होते, दोघेही सारखेच अस्त्रसंपन्न होते, दोघांच्या अंगांत चिलखतें होतीं, दोघांचीं शस्त्रास्त्रें सारखींच दिव्य होतीं, दोघेही एकमेकांच्या नरडीचा घोंट घेण्याबद्दल डोळे फाडून रागानें एकमेकांकडे पहात होते. त्यांची ती विशाल छाती, लांब व पुष्ट असे बाहू, तीक्ष्ण शस्त्रें, वेगवान घोडे, कृष्णशल्यांसारखे अद्वितीय सारथी, व सूर्यासारखी कांति हें पाहून देवादिकांना सुद्धां या योद्ध्यांपैकीं कोण विजयी होईल याचा निर्णय करवेना. सर्व कौरव कर्णाचें रक्षण करण्याकरितां त्याच्या सभोंवार आपलीं शस्त्रास्त्रें सांवरून सज्ज होऊन उभे राहिले. त्याचप्रमाणें धृष्टद्युम्नादि पांडववीरही आपलीं धनुष्यें सज्ज करून व समशेरी बाहेर काढून अर्जुनाच्या जवळ उभे होते. या वेळच्या ह्या युद्धरूपी जुगारामध्यें कर्ण व अर्जुन हेच फासे होते. त्यांच्यावरच जयापजयाची मदार अवलंबून होती. ह्मणून दोन्ही पक्षांकडील वीर मोठ्या आतुरतेनें आपल्या पराक्रमशाली सेनानायकांकडे पहात होते. ह्यांचें युद्ध पाहण्याकरितां देव, दानव, गंधर्व, पिशाच, उरग, राक्षस, सिद्ध व चारण हे विमानांत बसून आकाशामध्यें तटस्थ उभे होते. इंद्र आपला मुलगा अर्जुन हा विजयी होवो म्हणून आशीर्वाद देत होता व सूर्य आपला कर्ण विजयी होवो म्हणून आशीर्वाद देत होता. अशा रीतीनें त्यांच्या युद्धाकरितां इंद्र व सूर्य यांचाही वाद चालला

होता. ह्या दोघांही वीरांची गांठ पडल्याबरोबर आतां हें युद्ध फार भयंकर होईल ह्मणून अखिल भूमंडळ भयानें थरथर कांपूं लागलें होतें. देवदानवांमध्यें कर्णार्जुनांच्या विजयाबद्दल दुफळी होऊन देव अर्जुनाच्या पक्षाला झाले होते. व दैत्य, राक्षस पिशाच्च वगैरे मंडळी कर्णाकडे झाली. कर्णार्जुनांची वीरश्री पाहून सर्व देव उत्सुकतेनें प्रजापतीला यांच्यापैकीं 'कोण विजयी होईल' ह्मणून विचारूं लागले. कित्येकजण ' देवा, दोघांची बरोबरी होवो ' अशी स्वयंभू परमात्म्याची प्रार्थना करूं लागले.

इतक्यांत इंद्रानें येऊन प्रजापतीला नमस्कार केला व हात जोडून प्रार्थना केली कीं, ' हे देवाधिदेवा, कृष्णार्जुनांचा जय होईल असें पूर्वींच भगवंतांनीं सांगितलें आहे, तर तेंच आतां खरें होवो. ' तें ऐकून शंकर व ब्रह्मदेव म्हणाले, ' ह्या विजयाचाच जय होईल, धनंजयानें पूर्वीं तुला मदत केली आहे. खांडववन देऊन अग्नीला तृप्त केलें आहे. कर्णानें दैत्याचा पक्ष धरला आहे ह्मणून त्याचा पराभव होईल. अर्जुन हा अत्यंत धर्मनिष्ठ आहे. सर्व पांडव नीतिमान असून त्यांना आजपर्यंत या कौरवांनीं वनवास करवून विनाकारण दुःख भोगावयाला लाविलें. आतां या कौरवांचा जय होईल तर पुनः हे आपल्या पापाचरणांनीं सर्व पृथ्वीवर प्रलय करून सोडतील ह्मणून पांडवांचाच जय होणें इष्ट आहे. कृष्णार्जुन हे साक्षात् नरनारायणच आहेत. सर्व सृष्टीचे चालक आहेत. ह्यांच्यासारखा गुण, वीर्य, बुद्धि व कौशल्य ह्यांनीं युक्त असा देवलोकांमध्यें व मनुष्यलोकांमध्यें दुसरा कोणीही नाहीं. कर्णही अत्यंत शूर आहे. ह्मणून त्याला स्वर्गति प्राप्त होईल.' हें ऐकून इंद्राला अतिशय हर्ष झाला. तो मोठ्यानें सर्व देवादिकांना सांगूं लागला कीं, ' शंकर व ब्रह्मा ह्या देवाधिदेवांच्या सांगण्याप्रमाणें कृष्णार्जुनांचाच जय होणार. तुह्मी आतां निश्चिंत रहा.' असें इंद्रानें सांगितल्याबरोबर सर्व देवगण आनंदानें आपलीं दिव्य वाद्यें वाजवूं लागले व या नरसिंहावर पुष्पवृष्टि करूं लागले. नंतर ह्या अद्वितीय योद्धयांचें युद्ध पाहण्याकरितां कांहीं गलबल न करितां ते अगदीं शांतपणें उभे राहिले. इकडे कृष्ण व शल्य यांनीं आपल्या रथ्यांना इषारा देण्याकरितां व त्वेषाला चढविण्याकरितां मोठ्यानें आपले शंख फुंकले, त्याबरोबर घोडेही मोठ्यानें खेंकाळूं लागले. इतक्यांत अर्जुनाच्या ध्वजावरील उग्ररूपी व महाबलवान असा मारुति एकदम कर्णाच्या ध्वजावर उडून गेला व तेथें जाऊन आपल्या दातांनीं व नखांनीं कर्णाची पताका फाडूं लागला. पण याच्या उडीबरोबर तो बावटा एकदम हलल्यामुळें बावट्याची काढणी एकदम मारुतीच्या गळ्यांत अडकली. त्यामुळें त्याच्या गळ्याला फास बसल्यासारखा होऊन तो तडफडूं लागला. कर्णार्जुनांच्या युद्धाच्या आधींच हे बावटेच एकमेकांशीं लढूं लागलेले पाहून लोकांना फार आश्चर्य वाटलें. पण लवकरच मारुतीनें आपल्या दांतानें ती काढणी तोडून गळ्याचा फास सोडविला व पुनः आपल्या ध्वजावर उडी मारली. शल्य व कृष्ण हे एकमेकांची नजर चुकवून शत्रूचा रथ आपल्या कचाट्यांत आणण्याकरितां एकमेकांकडे अत्यंत रोखून पहात होते. त्याचप्रमाणें कर्णार्जुनही बाण कोठें सोडावा व कसा सोडावा हें पाहण्याकरितां एकमेकांकडे डोळे फाकून त्वेषानें पाहूं लागले. तेव्हां कर्ण शल्याला ह्मणाला, ' हे सारथीश्रेष्ठा मद्राधिपा, जर कदाचित् अर्जुनानें मला ठार केलें तर तूं पुढें काय करशील. ' तें ऐकून शल्य ह्मणाला, ' जर अर्जुनानें तुला मारलें तर मी एकटाच आपला रथ पुढें चालून कृष्ण व अर्जुन या दोघांनाही ठार करीन. ' त्याचप्रमाणें इकडे अर्जुनानें श्रीकृष्णाला प्रश्न केला तेव्हां श्रीकृष्णानें हांसून उत्तर दिलें कीं, ' सूर्य आपल्या मंडळापासून च्युत होऊन खालीं पडेल, महासागर आटून जाईल, अग्नि अगदीं थंड होईल, पण धनंजया, कर्णाच्यानें तुला मारवणार नाहीं. कदाचित् अशी विपरीत गोष्ट झालीच तर मी आपल्या नुसत्या हातांनींच कर्ण व शल्य यांचा चुराडा करीन. ' हें श्रीकृष्णाचें वचन ऐकून अर्जुनाला अतिशय आनंद झाला. तो श्रीकृष्णाला ह्मणाला, ' जनार्दना, कर्ण व शल्य हे दोघेही माझ्यापुढें मुळींच टिकणार नाहींत. मी आतांच रथ व घोडे यांसह त्या दोघांचा फडशा पाडतों. आज कर्णाच्या सर्व बायका वैधव्यदुःखानें रडूं लागतील. साध्वी द्रौपदीला फरारा ओढून नेऊन तिची या नीचानें

जी विटंबना केली, किंवा आह्मांला भर सभेंत हा जें टोंचून बोलला त्याची आठवण झाली ह्मणजे माझ्या तळव्याची आग मस्तकाला जाते. मी आज त्याच्या सर्व पापकृतीचें फळ त्याला भोगावयाला लावतों. हे मधुसूदना, तूं आज कर्णाचा सूड घेतल्याबद्दलची वार्ता आनंदानें अभिमन्यूच्या आईला जाऊन सांगशील. त्याचप्रमाणें तूं आपली आत्या कुंती हिचेही डोळे आनंदाश्रूनें भरून आणशील. त्याचप्रमाणें अपमानदुःखानें रडत असलेल्या कृष्णेच्या डोळ्यांचेंही याला मरून पडलेला पाहून पारणें फिटेल.' असें बोलत बोलतच कर्णार्जुन एमेकांला भिडले व त्यांनीं बाणांच्या वर्षावाला प्रारंभ केला. त्याबरोबर हत्ती, घोडे व मनुष्यें यांना तो मारा सहन न होऊन ते चोहोंकडे पळूं लागले. इतक्यांत दुर्योधन, कृतवर्मा, शकुनि, कृपाचार्य, व अश्वत्थामा असे पांच महारथी कृष्णार्जुनांवर चालून आले. पण अर्जुनानें या सर्वांचीं धनुष्यें तोडलीं, भाते फोडून खालीं पाडले, रथाचे तुकडे केले व घोड्यांनाही ठार केलें. अशा रीतीनें फजिती झाल्यावर त्यांनीं अर्जुनाची वाट सोडली. इकडे अर्जुनानें कर्णावरही दहा बारा बाण सोडून शक, तुषार, यवन, कांबोज वगैरे कौरवांच्या मदतीला आलेले राजे यांनाही आपल्या बाणांच्या माऱ्यानें पिटाळून लावलें. अशा रीतीनें अर्जुनानें सर्व कौरवसेनेची दुर्दशा उडविलेली पाहून आकाशांतून देवगण त्याला शाबासकी देऊं लागले. त्याबरोबर वारा अत्यंत सुगंध व शांत वाहूं लागला. तें पाहून सर्व लोकांना अत्यंत आश्चर्य वाटलें. कौरवपक्षाची इतकी फजिती झाली होती तरी कर्ण व दुर्योधन यांचें धैर्य मुळींच खचलें नव्हतें. ते आपल्या शत्रूशीं लढण्याकरितां तसेंच नेटानें उभे होते. इतक्यांत अश्वत्थामा दुर्योधनाकडे येऊन त्याची विनंति करूं लागला कीं, 'राजा, आतां कृपा करून हें युद्ध पुरें कर. ज्या युद्धामध्यें माझ्या तातांसारखे व भीष्मासारखे पराक्रमी सेनापती नाहींसे झाले त्या युद्धाला धिक्कार असो. मी व माझे मामा कृपाचार्य हे दोघेही अमर आहों ह्मणूनच वांचलों. आतां पांडवांबरोबर तह करून हें वैर मिटवून टाक. व पांडवांसहवर्तमान आनंदानें राज्य कर. मीं सांगितलें असतांना कृष्णार्जुन कधीं नाहीं ह्मणावयाचे नाहींत. ते माझ्या वचनाबाहेर मुळींच जाणार नाहींत. युधिष्ठिर तर जेणेंकरून प्राणीमात्रांचा संहार होणार नाहीं याचीच नेहमीं वाट पहात असतो; आणि भीम व नकुलसहदेव हे नेहमीं त्याच्याच अनुरोधानें चालतात. तूं ह्या अशा सत्वशील पांडवांशीं आतां तह केलास ह्मणजे सर्व प्राणीमात्रांचें कल्याण होईल. तुझ्या मदतीकरतां आलेले हे मोठमोठे राजे सुखरूपपणें आपल्या नगराला परत जाऊं देत. आतां तूं माझें बोलणें न ऐकशील तर शत्रूंच्या बाणांनीं विव्हळ होऊन जेव्हां मृत्युशय्येवर पडशील तेव्हां तुला पश्चात्ताप होईल. ह्या एकट्या धनंजयानें आतांपर्यंत किती कत्तल उडविली हें तूं पाहिलेंच आहेस. ह्मणून मी पुनः तुला सांगतों कीं, त्या पांडवांशीं तूं तह कर. मीही त्यांना हेंच सांगतों. ते माझ्या सांगण्याप्रमाणें तुझ्याच आज्ञेंत वागतील. तुझी माझ्या ठिकाणीं अत्यंत आदरबुद्धि आहे व माझें तुझ्यावर अत्यंत प्रेम आहे; ह्मणून मी तुला ही तुझ्या व सर्व जगाच्या हिताची गोष्ट सांगतों. तुझ्या मनांत असेल तर ह्या कर्णाला मी आतांच थांबवून धरतों. मैत्री ही चार प्रकारची आहे; सहज मैत्री, पराक्रमानें मिळविलेली मैत्री, पैशानें मिळविलेली मैत्री, व सामोपचारानें मिळविलेली मैत्री. पांडव ह्यांपैकीं चारी तऱ्हेनें तुझे मित्रच आहेत. जन्मतःच ते तुझे भाऊ आहेत; आजपर्यंत युद्ध करून तुह्मी दोघांनींही एकमेकांनीं एकमेकांला आपला पराक्रम दाखविला आहे. आतां तूं त्यांना त्यांचें राज्य देऊन तह कर ह्मणजे बाकीच्या दोन्ही गोष्टी साध्य होतील. तूं शांत होऊन पांडवांशीं तह केलास ह्मणजे तुझें तर कल्याण होईलच, परंतु तुझे जगावर अनंत उपकार होतील.' हें हितचिंतक अश्वत्थाम्याचें वचन ऐकून दुर्योधनाला मोठें वाईट वाटलें. तो दुःखानें सुस्कारा टाकून ह्मणाला, 'तूं जें ह्मणालास तें सर्व खरें आहे. पण मी सांगतों तेवढें ऐक. दुःशासनाच्या छातीवर पाय देऊन ह्या राक्षसी भीमानें त्याच्या नरडीचा घोंट घेतला तें अद्यापि माझ्या उरांत जळत आहे. शिवाय कर्ण अत्यंत प्रतापी आहे, त्याच्यापुढें अर्जुनाच्यानें मुळींच टिकाव धरवणार नाहीं, आणि मीं जरी आतां पांडवांशीं सख्य केलें

तरी त्यांच्या अंतःकरणांत मुरून राहिलेलें आमच्या संबंधी वैर कधींही व कशानेंही जावयाचें नाहीं. ह्मणून हे गुरुपुत्रा, तूं कर्णाला थांबवूं नकोस. तो अर्जुनाचा फडशा पाडील.' असें ह्मणून तो दुर्योधन पुनः सर्व सैनिकांना ह्मणाला, 'चला, स्वस्थ उभे काय ह्मणून राहिला? पांडवांवर चालून जाऊन त्यांचा फडशा पाडा.' असें दुर्योधनानें सांगितल्याबरोबर सर्व सैनिक आपापलीं शस्त्रें परजून मोठ्या वीरश्रीनें शत्रूवर चालून गेले. त्याबरोबर अर्जुनही कर्णावर चालून आला. कर्णानें प्रथम अर्जुनावर नेमके दहा बाण सोडले. अर्जुनानेंही आपल्या तीक्ष्ण बाणांनीं त्याच्या बाणांचे वरच्यावर तुकडे करून उलट त्याच्या बरगडींत दहा बाण सोडले. नंतर पुनः अर्जुन थोडेंसें पुढें सरून कर्णावर सारखा बाणांचा वर्षाव करूं लागला. त्याबरोबर कर्णानेंही उलट मारा करून अर्जुनाचे सर्व बाण तोडून टाकण्याचा सपाटा चालविला. हें पाहून अर्जुनानें आग्नेयास्त्र सोडलें. त्यामुळें कौरवाकडील सर्व सैनिकांचीं वस्त्रें जळूं लागलीं. तेव्हां घाबरून ते चहूंकडे पळूं लागले. पण त्यांच्या पळण्यानें ही आग न विझतां अधिकच पेटली. अरण्यांत वणवा पेटला असतां हरिण, कोल्हे इत्यादि पशू दीन वदन करून आपणांला कोणी तरी त्राता भेटेल काय ह्मणून मोठ्यानें ओरडत असतात त्याप्रमाणें कौरववीर सर्वांग जळूं लागल्यामुळें आपली यांतून मुक्तता करण्यासाठीं कर्णाच्या नांवानें मोठ्यानें हाका मारूं लागले. तें ऐकून कर्णानें वारुणास्त्र सोडून अर्जुनाच्या आग्नेयास्त्राचें निवारण केलें. आणि वारुणास्त्रानें आकाशांत जिकडे तिकडे ढग भरून राहिले असल्यामुळें सूर्याचा प्रकाश समरभूमीवर मुळींच येईना. त्यामुळें अंधार गडद होऊन योद्ध्यांना आपला व परका हें मुळींच ओळखूं येईना. हें पाहून अर्जुनानें वायव्यास्त्राचा प्रयोग करून सर्व ढग पळवून लाविले व लगेच वज्रास्त्राचें अभिमंत्रण करून बाण सोडण्याला आरंभ केला. त्याबरोबर ते सर्व बाण वज्रासारखे बळकट झाल्यामुळें कर्णाच्या बाणांनीं न तुटतां तसेंच नीट जाऊन कर्णाच्या शरीरांत, घोड्यावर व सारथ्याच्या अंगांत जोरानें घुसूं लागले. त्यामुळें कर्णाचें सर्व शरीर रक्तबंबाळ झालें. लगेच कर्णानें तेजस्वी भार्गव अस्त्राचा प्रयोग करून अर्जुनाच्या वज्रास्त्राचें निरसन केलें. ह्या भार्गवास्त्राच्या योगानें पांडवांकडील रथ, हत्ती, पायदळ व घोडे हे शेंकडों गणती मरून पडूं लागले. त्याचप्रमाणें सर्व पांचालांकडील वीर कर्णाच्या माऱ्यानें जखमी होऊन त्या वेदना सहन न झाल्यानें तेथेंच मोठ्यानें कण्हत पडले. पांचालांची व पांडवांडील सैन्याची अशा तऱ्हेनें कत्तल चालविलेली पाहून सर्व कौरवांना अतिशय आनंद झाला. 'कर्णाचा जय आज खात्रीनें होणार, तो कृष्णार्जुनांना आतां मारून टाकील,' असें ह्मणून ते मोठ्यानें कर्णाचा जयजयकार करूं लागले. अर्जुनाच्या अस्त्राचें निवारण करून कर्णानें आपल्याकडील सर्व लोकांची फजीती उडविली हें भीमाला मुळींच सहन झालें नाहीं. तो रागानें अर्जुनाला ह्मणाला, 'हे जिष्णो, हा पातकी सूतपुत्र तुझ्या समक्ष तुझ्या अस्त्राचें निवारण करून पांचालांची कत्तल करीत आहे! तूं पूर्वी प्रत्यक्ष शंकरालाही आपल्या पराक्रमानें प्रसन्न केलेंस, असें असून आज तुलाच त्यानें प्रथमतः दहा बाणांनीं घायाळ केलें. तूं सोडलेले सर्व बाण हा तोडून टाकीत आहे, हें पाहून मला फार आश्चर्य वाटतें. हे अर्जुना, साध्वी द्रौपदीचा यानें जो छळ केला त्याची आठवण धर. 'सर्व पांडव अळू आहेत' असे जे भरसभेंत कर्णानें शब्द काढले ते लक्षांत आण, व यांनीं आजपर्यंत आमच्या नाशाविषयीं काय काय कपटप्रयोग केले तिकडे थोडेंसें लक्ष दे. व याच्याशीं थोड्या नेटानें लढून याला ठार कर. हे महाबाहो, याची तूं उपेक्षा काय म्हणून करीत आहेस. हा अधम उपेक्षा करण्याला योग्य नाहीं. अग्नीला खांडववन दिलेंस त्या वेळेचें तुझें शौर्य कोठें गेलें? तुझ्या हातून होत नसेल तर मी आपल्या गदेनें याला चिरडून टाकतों.'

नंतर श्रीकृष्ण अर्जुनाला ह्मणाला, 'धनंजया, तूं जें जें अस्त्र सोडिलेंस त्या प्रत्येक अस्त्राचा कर्णानें फडशा पाडला हें काय आहे? तुला आज भ्रम तर झाला नाहींना? सर्व कौरव आनंदानें कर्णानें तुझ्या अस्त्राचें निवारण केलें ह्मणून त्याचा जयघोष करीत आहेत हें तुला दिसत नाहीं काय?

तूं आजपर्यंत जसें शौर्य गाजविलेंस त्याप्रमाणेंच आतांही गाजीव. किरातरूपी पिनाकपाणी शंकराशीं युद्ध करते वेळीं तूं काय पराक्रम केलास त्याची आठवण करून आतां या दुर्बुद्धिसूतपुत्राला ठार कर; व ही सर्व समुद्रवलयांकित पृथ्वी निष्कंटक करून राजा धर्माला दे व अक्षय कीर्ति मिळीव.' कृष्णाचें व भीमाचें भाषण ऐकून अर्जुनाला फार त्वेष चढला. तो श्रीकृष्णाला ह्मणाला, 'केशवा, मी आतां कर्णाच्या वधाकरितां व सर्व जगाच्या कल्याणाकरितां हें दिव्य ब्रह्मास्त्र सोडतों. त्याला तुझी, ब्रह्मादिकांची व सर्व वेदवित् ब्राह्मणांची अनुमति असूं दे.' असें ह्मणून सव्यसाचीनें श्रीकृष्णाला व ब्रह्मदेवाला नमस्कार करून तें ब्रह्मास्त्र सोडलें. ब्रह्मास्त्र सुटल्याबरोबर कर्णानें त्याचा फडशा पाडला व अर्जुनावर सपाव्यानें बाणांचा वर्षाव केला. तें पाहून भीम पुनः अर्जुनाला ह्मणाला, 'तुला सर्व जगांत मोठा अस्त्रवेत्ता असें लोक ह्मणतात तर आणखी दुसरें कोणतें तरी अस्त्र सोडून याला जेरीस आण.' तें ऐकून अर्जुनानें एका दिव्यास्त्राचा प्रयोग केला. त्याबरोबर आकाशांतून शूल, चक्र, बाण, पट्टे, यांचा कौरवसेनेवर सपाट्यानें वर्षाव होऊं लागला. त्यामुळें कौरवसैन्य अगदीं घाबरून गेलें. कोणाचें डोकें तुटलें, कोणाचा पाय तुटला, कोणाचा हात तुटला, कोणाचा घोडा ठार झाला, कोणाचा हत्ती गाहाळ झाला, व कोणाचा रथ मोडला अशी सर्व कौरवसैन्यांत एकच धांदल उडाली. आपल्या जवळ उभा राहून लढत असलेल्या योद्धयाचें शरीर छिन्न विछिन्न होऊन धाडदिशीं खालीं पडलेले पाहूनच कित्येकांना भयानें मूर्च्छा आली. ह्या गर्दींत सभापती नांवाचा एक राजा ठार झाला. चारशें हत्ती मेले, आठशें रथी ठार झाले, हजारों घोडेस्वार कापले गेले, व पायदळाची किती कत्तल उडाली याची तर गणनाच नव्हती. कर्णाचा रथ, घोडे, सारथी व बाहुटा यांसह अर्जुनाच्या बाणाखालीं अगदीं झांकून गेला. तें पाहून सर्व कौरव भयानें कर्णाला मोठ्यानें ओरडून ह्मणाले 'कर्णा, ह्या अर्जुनाचा लवकर समाचार घे, नाहीं तर हा आह्मां सर्वांना एका क्षणांत ठार करील.' तें ऐकून कर्णानें पांडववीरांवर सपाव्यानें बाणांचा वर्षाव करण्याला सुरवात केली. त्यामुळें पांडवाकडचे बरेच योद्धे कामाला येऊं लागले. याप्रमाणें कर्णार्जुनांचें युद्ध बरेंच निकरानें चाललें आहे, इतक्यांत धर्मराज तें युद्ध पाहण्याकरितां समरांगणावर येऊन थडकला. त्या वेळीं अर्जुनानें कर्णाला फार क्रोध चढला असल्यामुळें त्याच्यावर जोरानें बाण सोडण्याकरितां आपली धनुष्याची दोरी फारच ओढली; त्यामुळें ती ताडकन् तुटली. ही संधि पाहून कर्णानें श्रीकृष्णावर साठ बाण सोडले व अर्जुनावर शंभर बाण सोडले; व सर्व पांडवांवरही वेगानें बाण सोडून पांडवांचा फडशा पाडण्याला सुरवात केली. लगेच अर्जुनानें दुसरें धनुष्य सज्ज करून कर्ण व शल्य यांना अतिशय घायाळ केलें. तें पाहून कर्णानें श्रीकृष्णावर नेमके पंचवीस बाण सोडले. तेव्हां अर्जुनानें त्यांना श्रीकृष्णापर्यंत येऊं न देतां मध्येंच त्यांचे तुकडे केले व पुनः त्याला आपल्या बाणांनीं अतिशय घायाळ करून सोडला. अशा रीतीनें कर्ण बराच जखमी झाला होता तरी त्याचें धैर्य मुळींच खचलें नव्हतें. तो नेटानें तसेंच युद्ध करीत होता. इकडे अर्जुनानें त्याचे चक्ररक्षक, पादरक्षक, पुढें येऊन घोड्यांचें रक्षण करणारे, मागें उभे राहून मागून हल्ला येऊं न देणारे या सर्वांना व आसपास कर्णासाठीं लढत असलेल्या रथ्यांपैकीं दोन हजार रथ्यांना आपल्या तीक्ष्ण बाणांनीं यमलोकीं पाठविलें. त्याबरोबर थोडेबहुत जिवंत राहिलेले कौरव कर्णाला सोडून आपला जीव वांचविण्याकरितां युद्धांतून पळून जाऊं लागले. तथापि कर्ण मुळींच डगमगला नाहीं. त्यानें रामापासून मिळालेल्या आथर्वास्त्राचा प्रयोग करून अर्जुनाच्या अस्त्राचें निवारण केलें. इकडे जे कौरववीर आपल्या जिवाच्या भीतीनें पळून गेले ते फार लांब पळून न जातां अर्जुनाच्या बाणांच्या टप्प्याच्या बाहेर जाऊन कर्णार्जुनांचें अद्भुत युद्ध पहात तेथेंच उभे राहिले. कर्णार्जुनांच्या अस्त्रप्रभावानें होणाऱ्या शरवर्षावानें सर्व समरभूमि बाणांनीं आच्छादून गेली होती. त्याचें हें अशा तऱ्हेचें युद्धकौशल्य पाहून आकाशांत देव आश्चर्यचकित होऊन आनंदानें त्यांचे धन्यवाद गाऊं लागले. दोघेही वीर यु-

झकलेंत सारखेच निपुण असल्यामुळें केव्हां केव्हां कर्ण आपली शिताफी दाखवी व केव्हां केव्हां अर्जुन आपल्या शिताफीनें सर्व प्रेक्षक वीरांना थक्क करून सोडी. रणवाद्यांचा गंभीर ध्वनि, समरांगणांत जखमी होऊन पडलेल्या लोकांचें कण्हणें, व प्रेक्षकांचें मधून मधून 'शाबास, शाबास' असें ओरडणें हीं एकमेकांत मिसळून त्यांचा बराच मोठा आवाज झाला. त्यामुळें सर्व पृथ्वी दणाणून गेली. इतक्यांत हा भयंकर आवाज ऐकून व कर्णार्जुनांचें युद्ध चाललें आहे हें पाहून 'अर्जुनाचा सूड घ्यावयाला हीच वेळ चांगली आहे,' असा विचार करून अश्वसेन नांवाचा साप खांडववनामध्यें अर्जुनानें केलेल्या आपल्या आईच्या वधाबद्दल सूड घेण्याकरितां बाणाचें रूप घेऊन कर्णाच्या भात्यांत शिरला. ह्या वेळीं दोघेही वीर आतांपर्यंत झालेल्या युद्धश्रमानें अगदीं थकून गेले होते; व एकमेकांच्या तीक्ष्ण बाणांनीं अतिशय घायाळ झाले होते. त्यामुळें त्यांच्या सर्व शरीरांतून सारखें रक्त वहात होतें व त्यांचीं तोंडें अगदीं सुकून गेलीं होतीं ! हें पाहून इंद्रानें आपल्या अर्जुनाच्या वस्त्रयानें आपल्या कर्णाच्या तोंडावरून हात फिरविला आणि अप्सरांनीं आपल्या सुवासिक अशा वाळ्याच्या पंख्यावर पाणी शिंपडून त्यांनीं ह्या दोघांही थकलेल्या वीरांवर गार वारा घातला ! ह्या योगें दोघांनाही पुनः युद्ध करण्याला थोडीशी हुषारी आली. नंतर कर्णानें सर्पाकार तोंड असलेला अतिशय तीक्ष्ण व वज्रासारखा बळकट असा बाण घेऊन आपल्या धनुष्याला लावला. व आकर्ण धनुष्य ओढून अर्जुनाचें डोकं उडविण्याकरितां त्याच्या नरडीवर नेम धरला. त्याबरोबर आकाशांतून उल्कापात होऊं लागला. दिशा उदास भासूं लागल्या व जिकडे तिकडे एकच हाहाकार उडून राहिला. तें पाहून इंद्राला अर्जुनाच्या जीवित्वाबद्दल संशय वाटूं लागून त्याचे हातपाय लटपटले. इतक्यांत ब्रह्मदेवांनीं 'घाबरूं नकोस, पार्थाचा अपजय कधींही होणार नाहीं' असें सांगितल्यावरून त्याला थोडा धीर आला. इकडे शल्यानें कर्णाचा तो नेम बरोबर नाहीं असें पाहून कर्णाला सांगितलें कीं, 'कर्णा ह्या बाणाचा अर्जुनाच्या गळ्यावर नेम लागत नाहीं. हा डोक्यावर लागेल. तर नीट पाहून नेम धर.' हें ऐकून कर्ण अतिशय रागावला. तो डोळे लाल करून शल्याला ह्मणाला, 'शल्या, हा कर्ण दोन वेळां कधीं नेम लावीत नसतो व याचा नेमही कधीं चुकत नाहीं. असें ह्मणून कर्णानें 'फाल्गुना, आतां ठार झालास,' असें मोठ्यानें ओरडून धनुष्याची दोरी आकर्ण ओढून जोरानें बाण सोडला. धनुष्यापासून सुटल्याबरोबर तो बाण अर्जुनाच्या रोखानें आकाशांतून विजेसारखा चमकत येऊं लागला. तें पाहून श्रीकृष्णानें झटदिशीं घोड्यांना थोडीशी इशारत देऊन गुडघे टेंकावयाला लाविलें. व आपल्या पायानें दाबून रथाला थोडेंसें जमिनींत दडपलें. ही श्रीकृष्णाची निपुणता पाहून आकाशांतून त्याच्यावर पुष्पवृष्टि झाली. व सर्व देवगणांतून 'शाबास, शाबास' असा मोठ्यानें ध्वनी निघाला. आधींच शल्यानें सांगितल्याप्रमाणें कर्णाचा बाण थोडासा डोक्याच्या रोखानेंच सुटला होता. व त्यांतच श्रीकृष्णानें रथाला खालीं दडपलें. त्यामुळें कर्णाचा नेम अजिबात चुकला. धनुष्यापासून जो बाण सुटला तो नीट किरीटावर थडकला. त्यामुळें अर्जुनाच्या डोकीवरील किरीट मात्र खालीं पडलें. बाणरूप धरलेल्या सापाला अर्जुनाच्या नरडीचा घोंट घ्यावयाला सांपडला नाहीं यामुळें फार वाईट वाटलें. ह्मणून तो पुनः कर्णाच्या भात्यांत शिरण्यासाठीं चालला. पण इतक्यांत कर्णानें त्याला पाहिलें, तेव्हां कर्णानें त्याला तूं कोण आहेस असें विचारिलें. अश्वसेन ह्मणाला, 'मी सर्प आहें. खांडववनामध्यें अर्जुनानें माझ्या आईला मारलें, ह्मणून मी त्याचा सूड घेण्याकरितां आलों आहें. तूं मला आतां अर्जुनावर सोडलेंस पण तुझा नेम चुकला त्यामुळें मला अर्जुनाच्या नरडीचा घोंट घ्यावयाला सांपडला नाहीं. पुनः थोडेंसें लक्ष देऊन चांगला नीट नेम धर आणि मग मला सोड; ह्मणजे मी याचें डोकें तेव्हांच उडवीन. प्रत्यक्ष इंद्र जरी हातीं वज्र घेऊन ह्याच्या संरक्षणाला आला तरीही मी ह्याला यमलोकीं पोहोंचविल्याशिवाय राहणार नाहीं. हें ऐकून कर्ण ह्मणाला, 'हे सर्पश्रेष्ठा, हा कर्ण दुसऱ्याच्या जिवावर विजयी होऊं इच्छित नाहीं. शिवाय हा कर्ण केव्हांही दोनदां नेमही ध-

रीत नसतो. जरी दुसऱ्यांदां नेम धरून शेंकडों अर्जुन मरण्याची संधि सांपडली तरी सुद्धां हा कर्ण पहिला नेम कधींही परतवीत नसतो. मी याला व्यालास्त्राचा प्रयोग करून आतांच ठार करतों. तूं सुखरूपपणें आपल्या घरीं जा.' हें ऐकून त्या अश्वसेनाला फार राग आला. तो स्वतःच अर्जुनाला ठार करण्याकरितां आपलें पूर्वींचें सर्परूप घेऊन अर्जुनाच्या नरडीच्या रोखानें उडाला. हें पाहून श्रीकृष्णानें, 'खांडव वनामध्यें तूं ज्या सर्पिणीला मारलेंस तिचा हा अश्वसेन नांवाचा मुलगा आपल्या आईच्या वधाबद्दल सूड घेण्याकरितां तुझ्यावर चालून येत आहे, तर याला आधीं ठार कर,' असें अर्जुनाला सांगितलें. त्याबरोबर अर्जुनानें सहा बाण सोडून त्या सापाचे सात तुकडे केले. अशा रीतीनें त्या सापाचा फडशा उडविल्यानंतर व कर्णाचा बाण फुकट गेल्यानंतर श्रीकृष्णानें घोड्यांना पुनः उठविलें व रथही वर काढला. ही संधि साधून कर्णानें अर्जुनावर दहा बाण सोडले. उलट अर्जुनानें बारा बाण सोडून त्याचे दहा बाण तोडून काढिले व दोन बाण त्याच्या बरगडींत सोडले. ते दोन बाण त्याचें चिलखत फोडून आंत शिरले. त्यामुळें त्यांतून रक्त येऊं लागलें. लगेच कर्णानें श्रीकृष्णाला दहा बाण सोडून बरेंच घायाळ केलें. हें अर्जुनाला मुळींच सहन झालें नाहीं. त्यानें अतिशय तीक्ष्ण असे नव्वद बाण जोरानें सोडले. तेव्हां उत्तम कारागिराकडून करविलेलें असें बळकट व शोभिवंत चिलखत आणि तेजस्वी कुंडलें हीं तुकडे तुकडे होऊन खालीं पडलीं. नंतर पुनः अशा रीतीनें त्याच्या अंगांतील चिलखत पडल्यानंतर अर्जुनानें बरेच बाण त्याच्या मर्मस्थळावर सोडून त्याला अगदीं रक्तबंबाळ केला. त्यामुळें कर्ण निःशस्त्र होऊन मूर्छित होऊन पडला. त्याबरोबर त्याच्या हातून धनुष्यही गळून खालीं पडलें. आपला शत्रु मूर्छित पडला आहे ह्याच संधींत आपण त्याच्यावर बाण सोडणें हें बरोबर नाहीं असा विचार करून त्याच्यावर मारा न करितां अर्जुन स्वस्थ बसला. हें पाहून श्रीकृष्ण ह्मणाला, 'धनंजया स्वस्थ कां बसलास? शहाणे लोक शत्रूची अडचणीची वेळ आली असतांना त्याच्यावर जास्तच लगट करतात. ह्मणून तूं ह्या वेळीं स्वस्थ न बसतां जलदी करून हा पुनः शुद्धीवर यावयाच्या आंत याला ठार कर,' त्याबरोबर 'बरें आहे' ह्मणून अर्जुनानें कर्णावर सपाट्यानें बाणांचा वर्षाव केला. सर्व अंग रक्तानें लाल झाल्यामुळें व अंगांत चोहोंकडे बाण शिरल्यामुळें अस्ताचे वेळीं उभा असलेल्या आरक्त सूर्याप्रमाणें हा कर्ण अतिशय शोभिवंत दिसत होता. नंतर कर्ण पुनः थोड्याच वेळानें सावध होऊन कृष्ण व अर्जुन या दोघांवरही मारा करूं लागला. नंतर कर्णानें ब्रह्मास्त्राचा प्रयोग केला. लगेच अर्जुनानें ऐंद्रास्त्राचा प्रयोग केला. पण कर्णानें त्याचेंही निवारण केलें. हें पाहून अर्जुनानें पुनः उलट ब्रह्मास्त्राचाच प्रयोग केला. त्याबरोबर कर्णाच्या रथावर झपाट्यानें बाणांचा वर्षाव होऊं लागला. पण इतक्यांत कर्णानें अर्जुनाच्या धनुष्याची दोरी तोडली. लगेच अर्जुनानें दुसरी जोडली. तीही कर्णानें तोडली. यानें तिसरी जोडली. तिचीही त्यानें तीच वाट लाविली, लगेच चवथी, पांचवी, साहावी याप्रमाणें अर्जुनानें शंभर वेळां आपल्या धनुष्यावर दोरी चढविली व कर्णानें तितक्याही वेळां ती तोडून टाकली. आणि हा सर्व प्रकार एका क्षणांत झाला. हें त्या दोघांचें हस्तचापल्य पाहून समरांगणांतील वीरांना व आकाशांतील देवांना फार आश्चर्य वाटलें. इकडे अर्जुनाची अशी फजिती झालेली पाहून श्रीकृष्णानें अर्जुनाला रौद्रास्त्राचा प्रयोग करण्याला सांगितलें. इतक्यांत कर्णाच्या रथाचें चाक जमिनींत घुसलें. त्यामुळें तें तो वर उचलून काढण्याकरितां खालीं उतरला. त्यानें आपलें चाक जमिनींतून उपसून काढण्याकरितां जेव्हां हिसका मारला तेव्हां सर्व पृथ्वी चार बोटें वर उचलली. इतकें कर्णाचें सामर्थ्य असूनही त्याच्या हातून तें चाक वर काढवेना. हें पाहून कर्णाला फार वाईट वाटलें. तो अर्जुनाला म्हणाला, 'अर्जुना, थोडा वेळ दम धर, मी हें चाक वर उचलून काढतों. धनंजया, तुझी शौर्याबद्दल व धर्मनिष्ठतेबद्दल फार ख्याति आहे. कोणी हात जोडून शरण आला किंवा शस्त्र टाकून पळत सुटला किंवा त्याचें चिलखत व शस्त्रास्त्रें नष्ट झालीं तर त्याच्यावर शूर लोक केव्हांही हत्यार उचलीत नाहींत. तूं तर अत्यंत शूर

आहेस. ह्मणून मी हें चाक उचलून काढीतोंपर्यंत माझ्यावर बाण सोडूं नकोस. मी, तूं किंवा श्रीकृष्ण यांपैकीं कोणालाही भीत नाहीं. व तूंही शूर अशा क्षत्रियाचा बच्चा आहेस. तर क्षणभर दम धर आणि मग माझ्याशीं युद्ध कर.' हें ऐकून श्रीकृष्ण त्याला ह्मणाला, 'राधेया, आतां मात्र तुला धर्म आवडतो. **प्रायः दुष्ट लोक संकटांत सांपडले ह्मणजे देवाचीच निंदा करतात. पण आपल्या पापकृत्याला ते मुळींच दोष देत नाहींत.** राधेया, दुःशासन, शकुनि, व सुयोधन यांच्या साहाय्यानें तूं द्रौपदीला फरफर ओढून आणून जेव्हां तिची विटंबना करून तिला नाहीं नाहीं तें बोललास, त्या वेळीं मात्र तुला धर्माची आठवण झाली नाहीं. ठरल्याप्रमाणें तेरा वर्षें वनवास करून नम्रपणें तुमच्याकडे राज्य मागावयाला आले असतांना ह्या पांडवांना तुह्मीं झिडकारून लाविलें; त्या वेळीं आपली धर्मबुद्धि कोठें गेली होती. ह्या भीमसेनाला साप चाववून, विष चारून व पाण्यांत बुडवून ठार करण्याचा प्रयत्न केला त्या वेळीं मात्र आपणाला धर्म आठवला नाहीं. तुह्मीं सहाजणांनीं मिळून एकट्या अभिमन्यूला---लहान बाळाला--- निःशस्त्र असा गांठून ठार केलें. त्या वेळीं आपणाला धर्माची कशी आठवण झाली नाहीं ? त्या वेळीं जर तुह्मांला धर्म नकोसा झाला होता तर आतां तरी कशाला उगीच धर्माबद्दल कंठशोष करितां?' हें ऐकून कर्णानें लाजेनें मान खालीं घालून कांहींच उत्तर दिलें नाहीं. चाक उचलणें सोडून देऊन तसाच रथावर चढला व पुनः धनुष्य हातीं घेऊन युद्ध करूं लागला. त्यानें ब्रह्मास्त्राचा प्रयोग केला. अर्जुनानेंही उलट ब्रह्मास्त्रानेंच त्याचें निवारण करून आग्नेयास्त्र सोडलें. कर्णानें वारुणास्त्र सोडून अर्जुनाच्या अस्त्रप्रभावानें पेटलेल्या अग्नीचें शांतवन केलें. व सर्व दिशा अभ्राच्छादित करून जिकडे तिकडे अंधार करून टाकला. नंतर खालीं उतरून तो पुनः चाक वर काढण्याच्या खटपटीला लागला. अर्जुनानें वायव्यास्त्र सोडून एका क्षणांत ते सर्व ढग विस्कळून लाविले. हें पाहून कर्णानें आपल्या धनुष्यानें अत्यंत तीक्ष्ण असा एक बाण सोडला. त्याचें तेज पाहूनच पांडवांकडील लोक घाबरून गेले. तो बाण सुटल्याबरोबर एकदम अर्जुनाच्या छातीच्या वरच्या बाजूंत घुसला. तो फार जोरानें लागल्यामुळें अर्जुनाला क्षणभर मूर्च्छा आली व हातांतलें गांडीव लटपटलें. ही संधि पाहून कर्ण पुनः खालीं उतरला. कर्णानें बरीच खटपट केली तरी त्याची दैवगति फिरल्यामुळें त्याच्यानें तें चाक वर काढवेना. इतक्यांत अर्जुन सावध झाला. हें पाहून श्रीकृष्ण 'हा वर चढतो आहे इतक्यांत तूं याचें डोकें उडीव,' असें अर्जुनाला ह्मणाला. हें ऐकून अर्जुनानें एक रुंद फळाचा बाण सोडून कर्णाचें ध्वज तोडून खालीं पाडले. त्याबरोबर कौरवांचें यश व सर्व अशा हीं खालीं गळून पडलीं, त्यांना कर्णाचा जय होईल असें मुळींच वाटेना. नंतर अर्जुनानें अतिशय तीक्ष्ण आजपर्यंत कोट्यावधि योद्ध्यांचा प्राण घेऊन आल्यामुळें रक्तानें लाल झालेला, अग्नीप्रमाणें तेजस्वी व वज्राप्रमाणें बळकट असा एक दिव्य बाण घेऊन आपल्या गांडिवाला जोडला. त्याबरोबर सर्व पृथ्वी डळमळूं लागली. तें पाहून सर्व ऋषि लोकांनीं याच्यापासून जगांतील इतर प्राणीमात्रांना अपाय न होवो अशी इच्छा प्रकट केली. इकडे अर्जुनानें तो बाण सोडून आकर्ण धनुष्याची दोरी ओढली व आजपर्यंत मीं जें कांहीं तप आचरिलें असेल किंवा माझ्या वडिलांना व गुरुंना संतुष्ट करून जें कांहीं पुण्य मिळविलें असेल त्या सर्व पुण्याईनें हा माझा बाण सफल होवो.' असें ह्मणून अथर्व वेदांतील दिव्य मंत्रांचा उच्चार करून तो बाण कर्णावर सोडला. त्याबरोबर सूर्य जो पूर्वीं यांचें युद्ध पाहण्याकरितां आकाशाच्या अगदीं मध्यभागीं येऊन उभा राहिला होता तो आतां आपल्या मुलाची धडगत नाहीं असें पाहून, रागानें लाल होऊन अस्ताचलाकडे वळला. व इकडे कर्णाचें डोकें उडून जमिनीवर पडलें. त्याबरोबर त्याच्या शरीरांतून एक प्रकारचें दिव्य तेज निघून सूर्यामध्यें मिळालें. तें पाहून सर्वांना फार आश्चर्य वाटलें. कर्णाचें डोकें धडापासून वेगळें झालें, हें पाहून कृष्णानें आनंदानें आपला पांचजन्य वाजविला, व अर्जुनानें आपला देवदत्त फुंकला. धृष्टद्युम्नादि पांचालवीरांनीं मोठ्यानें सिंहगर्जना केली. पांडवांकडे जयसूचक वाद्यें वाजूं लागलीं. पांडवांकडील कित्येक वीर कर्णाला

रणशय्येवर निजलेला पाहून आनंदानें नाचूं लागले व एकमेकांना आलिंगन देऊं लागले. कर्णाचें शीर जरी धडापासून वेगळें झालें होतें तरी तें अत्यंत तेजस्वी दिसत होतें. संध्याकाळच्या प्रहरीं सूर्य ज्याप्रमाणें आपलें तेज घेऊन अस्ताचळीं निघून जातो त्याप्रमाणें अर्जुनाच्या बाणानें कर्णाचा प्राण हरण करून पुनः आपल्या भात्यांत उडी मारली.

इकडे कर्ण पडल्याबरोबर शल्यानें आपला रथ मागें वळविला. त्याबरोबर सर्व कौरववीरही भयानें पळत सुटले. शल्य दुर्योधनाकडे येऊन ह्मणाला, 'राजा, हत्ती, घोडे, पायदळ व मोठमोठे रथी या सर्वांची कत्तल करून अर्जुनानें शेवटीं प्रतापी कर्णाचाही धारातीर्थीं बळी घेतला. राजा अशा प्रकारचें भयंकर युद्ध कधींही झालें नाहीं. कर्णासारखा प्रतापी योद्धा पडलेला पाहून दैवगतीच विचित्र आहे असें ह्मणावें लागतें. आपल्याकडील इंद्रासारखे पराक्रमी योद्धे लढाईंत कामास आले. सर्व भावांना तुझ्याकरितां प्राण वेंचावे लागले व तुझ्या सर्व स्नेह्यांना तुझ्याबद्दल इहलोकाला मुकावें लागलें! पण आतां याचा शोक करून काय उपयोग! यश हें केव्हांही नेहमीं मिळत नसतें. असें लक्षांत आणून तूं आपल्या मनाचें शांतवन कर.' हें ऐकल्याबरोबर दुर्योधन मूर्च्छित पडला.

इकडे बाकीचे कौरववीर भरसमुद्रांत येऊन नाव फुटल्यामुळें त्यांत बसलेला वाणी ज्याप्रमाणें भांबावून जातो त्याप्रमाणें भांबावून गेले. त्यांना पुढें काय करावें हें सुचेना! ते नुसते समरांगणावर सैरावैरा धांवूं लागले. भयानें त्यांना आपल्यापुढें कोण आहे हें सुद्धां दिसेना! त्यामुळें एकमेकांवर आपटूनच हातपाय मोडून घेऊन कित्येक लोक तेथेंच तडफडत पडले. अर्जुनानें माझ्यावरच बाण रोखला आहे व भीम गदा घेऊन माझ्यावरच चाल करून येत आहे या कल्पनेनेंच हातपाय लटपटून जागच्याजागीं स्वस्थ उभे राहून कित्येक लोक प्राणास मुकले. रथी आपला रथ टाकून देऊन नुसत्या घोड्यावर बसून पळूं लागले; गजयोद्ध्यांनीं आपल्या हत्तींना अंकुशाचा मारा करून जलदीनें पळावयाला लाविलें; स्वारांनीं आपल्या घोड्याला टांच दिली; ते पळतांना मागें पुढें न पाहतां तसेंच झपाट्यानें पळूं लागले. त्यामुळें घोड्यांच्या टापांखालीं व हत्तींच्या पायांखालीं चिरडूनच कित्येक लोक ठार झाले. कित्येक हत्ती वरील माहुत नाहींसे झाल्यामुळें व पांडवांकडील मारा सहन न झाल्यामुळें इकडून तिकडे ची ची करीत सारखे धांवत होते. इतक्यांत दुर्योधन सावध झाला व अशा प्रकारें आपल्या सैन्याची फजिती झालेली पाहून तो आपल्या सारथ्याला ह्मणाला, 'माझा रथ आपल्या सैन्याच्या पिछाडीला ने ह्मणजे मी आपल्या सर्व योद्ध्यांना थोपवून धरतों. मी युद्धाला उभा राहिलों ह्मणजे अर्जुनाच्यानें माझ्यापुढें टिकाव धरवणार नाहीं. आज अर्जुन, श्रीकृष्ण व बलशाली भीमसेन यांना ठार करून मी कर्णाच्या ऋणांतून मुक्त होतों.' हें शूराला शोभण्यासारखें कौरवराजाचें भाषण ऐकून सारथ्यानें हळूच तो रथ नेऊन पिछाडीला उभा केला. त्याबरोबर पंचवीस हजार लोक आपले हत्ती घोडे व रथ वगैरे वाहनें नाहींशीं झालीं होतीं तरी पायानेंच लढण्याला सिद्ध होऊन दुर्योधनाच्या रथासभोंवार लढण्याला गोळा झाले. त्याबरोबर भीम व धृष्टद्युम्न हे आपलें सैन्य घेऊन त्याच्यावर चालून गेले. त्यांची बराच वेळ झटापट झाली. पण आतां कौरवांकडील लोक निराश होऊन निकरानें लढत असल्यामुळें पांडवांना आवरेनात. हें पाहून भीमानें आपली गदा हातांत घेऊन रथाखालीं उडी ठोकली व त्यांचा प्रळयकाळच्या रुद्राप्रमाणें एका क्षणांत चुराडा करून टाकला. सात्यकीनें शकुनीच्या घोड्यावरील विटेकऱ्यावर मारा करून त्यांना जेरीस आणलें. व धनंजयानें कौरवांकडील राहिलेल्या रथ्यांवर चाल करून त्यांचाही फडशा पाडला. अशा रीतीनें पांडवांनीं व पांचालांनीं मिळून पुनः लढण्याला तयार झालेल्या पंचवीस हजार कौरवांना कापून काढलें, त्यामुळें जे कांहीं लोक पुनः परत येणार होते ते तसेच पळत सुटले. पण दुर्योधन मात्र न डगमगतां तसाच नेटानें पांडवांशीं लढत होता. तो पांडवांपैकीं हजारों लोक कापून काढून भीम, अर्जुन, धृष्टद्युम्न सात्यकि या सर्वांना आपल्या तीक्ष्ण बाणांनीं जेरीस आणण्याचा प्रयत्न करीत होता. तरी त्याचे लोक भयानें पळत होते. हें पाहून त्यांना उत्साह आणण्या-

करितां दुर्योधन मोठ्यानें ओरडत ह्मणाला, ‘ मला अशी कोणतीही सुरक्षित जागा दिसत नाहीं कीं, जेथें पांडवांचा मुळींच प्रवेश होणार नाहीं. मग उगीच पळून काय उपयोग? तुह्मी कोठेंही गेलां तरी हे तुमचा पाठलाग करून तुह्मांला कापून काढतील. शत्रूला पाठ दाखवून मरण्यापेक्षां छातीवर वार घेऊन धारातीर्थीं देह ठेवणें हेंच क्षत्रियांना अधिक श्रेयस्कर आहे. शिवाय हे क्षत्रिय वीरहो, शूर असो, भ्याड असो, कसाही जरी असला तरी यम त्याला मारल्याशिवाय रहात नाहीं. मग शत्रूंना मारतां मारतां मरून स्वर्गसुख घेण्याला कां मागें पुढें पहावें? सहज रीतीनें मिळणारें स्वर्गसुख सोडून हजारों वर्षें रौरव नरकांत लोळत राहण्याची इच्छा करण्याइतका मूर्ख तुमच्यामध्यें कोणी तरी असेल असें मला मुळींच वाटत नाहीं. क्षत्रियांना युद्धांतून पाठ दाखवून पळण्याइतकें लाजिरवाणें व आपल्या एकवीशीला नरकांत घालण्याइतकें पाप कृत्य दुसरें कोणतेंही नाहीं. युद्धांत मरणाऱ्या मनुष्याची देवांगना वाट पहात असतात. तर आपण भीष्म द्रोणादिकांचा कित्ता गिरवून शत्रूशीं शौर्यानें लढूं या. व ते गेले तिकडेच आपणही जाऊं या. शिवाय पांडवांकडील सैन्यही फार थोडें उरलें आहे. आणि कृष्णार्जुनही बरेच जखमी झाले आहेत. त्यामुळें त्यांच्यांत आतां फारसा तकवा उरला नाहीं. मी एकटा या सर्वांचा समाचार घेईन. ’ असें दुर्योधन मोठ्यानें ओरडत होता तरी तिकडे लक्ष न देतां कौरववीर तसेच पळत होते. तें पाहून शल्य दुर्योधनाला ह्मणाला, ‘ राजा, पर्वतासारखे धिप्पाड शरीराचे हजारों हत्ती जखमी होऊन लोळत पडले आहेत. त्याचप्रमाणें मोठमोठे वीरही चिलखतें तुटून मर्मस्थळीं बरेच जबर वार लागल्यामुळें दुःखानें कण्हत पडले आहेत. तसेंच कित्येक घोडे श्रमानेंच दमून जाऊन रक्त ओकूनच आपल्या प्राणाला मुकले आहेत. व कित्येक शत्रूंच्या वारांनीं हातपाय तुटून त्या वेदना सहन न झाल्यामुळें तडफडत पडले आहेत. ज्यांचे प्राण एकदम नाहींसे झाले ते सुखानें रणशय्येवर हातपाय पसरून निजले आहेत; पण ज्यांचे प्राण गेले नाहींत ते मात्र या अंगावरून त्या अंगावर होत दुःखानें कण्हत तानेमुळें, जवळून पळत जाणाऱ्या लोकांजवळ पाणी मागत व हातपाय झाडीत जेथल्या तेथेंच हताश होऊन पडले आहेत. ज्या हत्तींचे प्राण गेले नाहींत पण जबर जखमा झाल्या आहेत त्यांनीं तर ओरडून ओरडून सर्व समरांगण दणाणून सोडलें आहे. रथांचा तर इतका चुराडा झाला आहे कीं सर्व समरांगणावर मोडकीं चाकें, बाहुल्यांचे तुकडे, कण्याचीं शकलें, व रथांतील खिळे व जुवांचे तुकडे हेंच पसरले आहेत. तलवारी, पट्टे, गुर्दे, विटा, अंकुश, बर्ची, बाण, धनुष्यें, भाते, चिलखतें हेंही सर्व समरांगणावर अस्ताव्यस्त रीतीनें पसरल्यामुळें चकचकणाऱ्या नक्षत्रांनीं भरलेल्या आकाशाप्रमाणें हें समरांगण एक प्रकारें शोभिवंत दिसत आहे. हे महाराजा, जे राजे लोक नेहमीं पराच्या गादीवर निजणारे, उत्तम उत्तम वस्त्रें व भूषणें घालणारे, व ज्यांची सेवा हजारों दासी मोठ्या अतुरतेनें करीत असत असें हे भाग्यशाली राजे लोक तुझ्याकरितां आपल्या प्राणाला व ह्या सर्व ऐश्वर्याला मुकून या रणांगणांत अनाथाप्रमाणें पडले आहेत. राजा, हें सर्व लक्ष देऊन पहा. व आपल्या सैन्याला परत जावयाला परवानगी दे, आणि तूंही आपल्या शिबिराकडे जा. सूर्यही आतां मावळण्याच्या बेताला आला आहे. ’ हें ऐकून दुर्योधन ‘हे कर्णा’ असें ह्मणून मोठ्यानें शोक करूं लागला. त्याच्या डोळ्यांतून सारख्या अश्रुधारा चालल्या. दुःखातिरेकानें तो वरचेवर अतिशय बेशुद्ध पडे व पुनः शुद्धीवर येऊन असाच मोठ्यानें आक्रोश करूं लागेल. इतक्यांत अश्वत्थाम्यादि वीरही त्याचें समाधान करण्याकरितां तेथें आले; परंतु अर्जुनाचा रथ हे सर्व एके ठिकाणीं जमून पुनः हल्ला करण्याच्या बेतांत आहेत असें वाटल्यावरून त्यांच्यावरच चालून येऊं लागला तें पाहून त्यांची गाळण उडाली. रथाला पाहिल्याबरोबर सर्वजण आपोआपच एकदम उठून वाट फुटेल तिकडे चालूं लागले. कर्णाच्या व अर्जुनाच्या बाणांच्या माऱ्यांनीं, भीमाच्या गदेच्या तडाख्यानें अश्वत्थाम्याच्या अस्त्रप्रभावानें, शकुनीच्या विटांनीं, कृपाचार्यांच्या अंकुशांनीं व दाक्षिणात्यांच्या तलवारींनीं दोन्हीकडील वीरांची कत्तल झाल्यामुळें या रणांगणांतून रक्ताची नदी झपाट्यानें वाहूं

लागली होती त्यांतून तलवारी, पट्टे, बाण वगैरे हत्यारें माशासारखीं तरंगत जात होतीं. हत्तींचीं धडें सुसरीप्रमाणें इकडून तिकडे धडपडत व एकमेकांना टक्कर देत प्रवाहांतून वहात चालली होतीं. मनुष्यांचे तुटलेले हातपाय व धडें किती चालली होतीं यांचा तर पत्ताच नाहीं. कित्येक वेळां मोडक्या रथांचे मध्येंच ढिगारे पडल्यामुळें त्याला अडकून कांहीं वेळ मनुष्यांचे छिन्नविछिन्न झालेले देह, हत्ती घोडे इत्यादिकांचीं प्रेतें व हीं हत्यारें एके ठिकाणीं थबकून रहात. त्यामुळें मध्यें पर्वतासारखा ढीग होई. आपला मुलगा अर्जुनाच्या बाणांनीं जखमी होऊन व आजपर्यंत केलेल्या पराक्रमांनीं थकून जाऊन रणशय्येवर निजला आहे हें पाहून सूर्यही अस्ताचलीं जाऊं लागला. व त्याबरोबर आकाशांतील देवगणही वीर पुरुषांची झालेली कत्तल पाहवेना म्हणून आपापल्या स्थानांला परत गेले. कर्ण जरी गतप्राण होऊन निचेष्ट पडला होता, तरी त्याची कांति मुळींच कमी जाहली नव्हती. तो पहिल्याप्रमाणेंच तेजस्वी दिसत होता. त्यामुळें पांडवांकडील शिपायांना हा अद्याप जिवंत आहे असें वाटून त्याच्या जवळून जाण्याला सुद्धां त्यांना भीति वाटे. गुरु रोहिणीच्या जवळ येऊन सूर्याप्रमाणेंच मोठा प्रखर भासूं लागला. आकाशांतून उल्कापात होऊं लागला. सर्व दिशा उदास भासूं लागल्या व देवलोकांमध्यें व मनुष्यांमध्यें जिकडे तिकडे हाहा शब्द उमटला. पण राक्षस, पिशाच्च, कोल्हीं, कुत्रीं, कावळे, गिधाडें व लांडगे वगैरे हिंस्र प्राणी ह्यांच्या टोळ्यांच्या टोळ्या आनंदानें नाचत बागडत व मोठ्यानें ओरडत रणभूमीकडे येऊं लागल्या. हें सर्व पाहून कौरववीरांनीं दुर्योधनाची पुनः एकदां आतां युद्ध पुरें करून शिबिराकडेच मोर्चा वळविण्याबद्दल विनंति केली. त्याला शल्यानेंही अनुमति दिल्यावरून दुर्योधनानें युद्ध बंद करून सर्वांना आपापल्या पथकानिशीं आपापल्या गोटाकडे जावयाला सांगितलें. त्याबरोबर कृतवर्मा आपल्या रथ्यांना घेऊन आपल्या गोटाकडे गेला. कृपाचार्यांनीं आपल्या गजयोद्ध्यांसह आपल्या शिबिराकडे मोर्चा वळविला. शकुनि, अश्वत्थामा, संशप्तक हेही आपापले लोक घेऊन शिबिराकडे गेले. कौरवांमध्यें सुद्धां कांहींजण अर्जुनाची स्तुति करीत होते व कांहींजण कर्णाची स्तुति करीत होते. पण सर्वचजण भीतीनें आपल्याकडून होईल तितकें लवकर आश्रयाची जागा गांठण्याकरितां तळाकडे जलदीनें पळत होते. कर्ण मेल्याबरोबर राहिलेल्या कौरवांना राज्य, बायका, मुलें व प्रत्यक्ष जीवित यांचीही निराशा झाली.

इकडे श्रीकृष्ण अर्जुनानें कर्णाला मारल्यावर आनंदानें त्याला आलिंगन देऊन ह्मणाला, ‘ ज्याप्रमाणें इंद्रानें वृत्राला मारलें त्याचप्रमाणें तूंही आपल्या गांडीवाच्या प्रभावानें कर्णाला ठार केलेंस. तुझें हें आजचें शौर्य आह्मी सर्वजण मिळून राजा धर्माला सांगतों. तूं कर्णाशीं लढत असतांना राजा तुझें युद्ध पाहण्याकरितां समरांगणांत आला होता. पण शत्रूकडील मारा सहन न झाल्यामुळें तो पुनः परत गेला. तर आतां आपण त्याच्याकडेच जाऊन त्याला झालेली सर्व हकीकत सांगूं या. ’ असें ह्मणून श्रीकृष्णानें रथ वळविला व जातां जातांच सात्यकि, धृष्टद्युम्न, युधामन्यु, वृकोदर व नकुलसहदेव वगैरे वीरांना त्यानें सांगितलें कीं, आह्मी राजाकडे जाऊन त्याला ही आनंदाची बातमी सांगून येईतोंपर्यंत तुह्मी सर्वजण शत्रूकडील लोक परत आल्यास त्यांना कापून काढण्याकरितां येथेंच उभे रहा. त्याबरोबर त्यांनीं होय ह्मटल्यावरून कृष्णार्जुन हे आनंदानें राजा धर्माकडे आले. त्यावेळीं राजा पलंगावर निजलेला होता. ह्या दोघांनीं येऊन आनंदानें त्याला नमस्कार केला. ह्या दोघांचीं तोंडें प्रफुल्लित झालेलीं पाहून राजा धर्माला फार आनंद झाला. कर्णाला यानें ठार केला असेल अशी त्याच्या मनाची पक्की खात्री झाली. त्यामुळें त्याच्या डोळ्यांतून आनंदाश्रु वाहूं लागले. तो या दोघांनाही आनंदानें भेटला. नंतर कृष्णार्जुनांनीं हात जोडून झालेली सर्व हकीकत सांगितली. नंतर कृष्ण जय मिळाल्यामुळें थोडा गर्वाच्या स्वरानें पण हात जोडून पुनः राजा धर्माला ह्मणाला, ‘ राजा, तूं, भीमसेन, अर्जुन व नकुलसहदेव हे सर्वजण या वीरक्षयांतून सुखरूपपणें पार पडलां. ज्या कर्णानें पूर्वी तुमची विटंबना केली त्या कर्णाचें रक्त पृथ्वीला पाजून हा अर्जुन पुनः काय आज्ञा आहे ह्मणून

तुझ्यापुढें हात जोडून उभा आहे. ' हें ऐकून राजा धर्म हांसत हांसत श्रीकृष्णाच्या खांद्यावर हात टाकून त्याला ह्मणाला, ' वासुदेवा, तुझ्यासारखा सारथी व सल्लागार असतांना अर्जुनानें कर्णाला मारला, ह्यांत कांहींच आश्चर्य नाहीं. पूर्वींच नारदांनीं व व्यासांनीं मला सांगितलें आहे कीं, तुह्मी दोघे नरनारायणाचे अवतार आहां, ह्मणून देवा, तुझ्याच कृपेनें आह्मी विजयी झालों. तुझ्याच कृपेनें भीष्म, द्रोण, कर्ण अशा बड्याबड्या वीरांना ठार करून, कृपाचार्य, कृतवर्मा, अश्वत्थामा वगैरे शूर पुरुषांचा आह्मीं पराभव केला. असें ह्मणून धर्मराज आपल्या खासगी पथकाला बरोबर घेऊन कृष्णार्जुनांबरोबर कर्णाला पहाण्याकरितां समरांगणांत आला. व तेथें येऊन कर्णाला त्याच्या मुलासह रणशय्येवर पडलेला पाहून कृष्णार्जुनांची पुनः पुनः स्तुति करूं लागला. तो ह्मणाला, 'गोविंदा, तुझ्या कृपेनें आज मी राजा झालों. कर्णाला ठार झालेला पाहून दुर्योधन तर हें राज्य ऐश्वर्य व युद्ध सोडून देऊन आपोआपच कोठें तरी निघून जाईल. आजपर्यंत तेरा वर्षें दुःखामुळें आह्मीं रात्रीच्यारात्री जागून काढल्या. झालेल्या अपमानामुळें आमची तळमळ ह्मणून केव्हांही कमी झाली नाहीं. पण कृष्णा, तुझ्या कृपेनें आज आह्मी सुखानें झोंप घेऊं. असें यांचें बोलणें चाललें आहे इतक्यांत नकुल, सहदेव, वृकोदर, सात्यकि, धृष्टद्युम्न व शिखंडी वगैरे योद्धेही धर्म व कृष्णार्जुन यांच्याकडे येऊन मिळालेल्या जयाबद्दल व गाजविलेल्या पराक्रमाबद्दल त्यांची स्तुति करूं लागले. नंतर हे सर्वजण मिळून आनंदानें कृष्णार्जुनांचा जयजयकार करीत, मोठ्यानें सिंहगर्जना करीत व जयसूचक रणवाद्यें वाजवीत आपल्या सर्व सैन्यांनिशीं शिबिराकडे परत गेले.

# ९ शल्यपर्व.

## ५१ शल्यसैनापत्य. ( ९. १–७ )

कौरवपांडवांच्या घोर रणकंदनामध्यें कर्ण मेल्यामुळें विजयी अर्जुन आनंदानें सिंहगर्जना करीत होता. तें पाहून, ज्याप्रमाणें एखादा महासागरामध्यें प्रवास करणारा व्यापारी आपली नाव फुटल्यामुळें घाबरून जातो, किंवा सिंहाला पाहून हरीण जसे गर्भगळीत होतात किंवा शिंग मोडल्यामुळें जशी बैलाची अथवा विषारी दांत पाडल्यानें जशी सापाची अवस्था होते, त्याप्रमाणें कौरव भयानें वेडे होऊन पळूं लागले. त्या गडबडींत कित्येकांचे घोडे गेले, कित्येकांचे हत्ती गेले व कित्येकांचे हातपाय तुटले व प्रत्येकाला सर्व पृथ्वी भीमार्जुनमय दिसूं लागली. अशा रीतीनें सैन्यामध्यें सर्व हाहाकार उडाला असतां दुर्योधन कृष्णाला व भीमार्जुनांला मारून कर्णाच्या ऋणांतून मुक्त होण्यासाठीं न डगतां अर्जुनावर चालून आला. तेव्हां रथ, हत्ती किंवा घोडा ह्यांपैकीं कांहींच न उरल्यामुळें पंचवीस हजार वीर पायींच पुन्हां युद्धाला परतले. त्या वेळीं भीमानें व धृष्टद्युम्नानें मोठ्या त्वेषानें त्यांना गराडा देऊन त्यांजवर बाणांचा वर्षाव सुरू केला. कौरवांनींही त्याला बराच वेळ तोंड दिलें. इतक्यांत भीम मोठ्या त्वेषानें रथाखालीं उतरून हातामध्यें आपली आवडती गदा घेऊन कालांतकाप्रमाणें सर्वांचा संहार करीत सुटला. हातामध्यें गदा व तलवार घेऊन ससाण्याप्रमाणें भीम सर्वांना छाटीत सुटला असतां अर्जुन तेथें आला; व त्या दोघांनीं मिळून शकुनीवर चाल केली व त्याचे घोडे मारून पाडले व रथ मोडून टाकला. पुढें भीमार्जुन व सात्यकि यांनीं दुर्योधनाला गांठलें. चेकितान, शिखंडी द्रौपदीपुत्र यांनीं आपल्या सैन्याची बरीच त्रेधा उडविलेली पाहून सुद्धां न

डगमगतां दुर्योधनानें पुढें जाऊन व सैरावैरा पळत सुटलेल्या सैन्याला परतवून त्यांना धीर देण्याकरितां तो ह्मणाला, ‘ तुह्मी कोठेंही पळाला तरी पांडव तुह्मांला सोडीत नाहींत. शिवाय त्यांचें सैन्य आतां थोडें उरलें असून कृष्णार्जुनही घायाळ झाले आहेत. आपण जर थोडा वेळ नेट धरून राहिलों तर आपल्याला खात्रीनें जय मिळेल. शिवाय **युद्धामध्यें पाठ दाखविणाऱ्या क्षत्रियाइतका महापापी कोणीच नाहीं.** सुखानें स्वर्गप्राप्ति करून देणारा धर्मयुद्धासारखा दुसरा मार्गच नाहीं. ’ ह्या शब्दांनीं कौरवसैन्याला धीर येऊन तें फिरून उत्साहानें लढूं लागलें. याही वेळीं कौरवांचा फार फडशा उडालेला पाहून कृपाचार्य दुर्योधनाला ह्मणाले, ‘ युद्धापासून आतां कांहीं फायदा होईलसें मला दिसत नाहीं व ज्यासाठीं युद्ध करावयाचें ते मुलगे, बंधू, मामे, भाचे इत्यादि सर्व संबंधी व भीष्म, द्रोण व कर्ण यांसारखे महारथी हा नश्वर देह टाकून स्वर्गाला गेले आहेत. त्यामुळें आह्मी फार कष्टीही झालों आहों. आमच्यांतील सर्व योद्धे जिवंत असते तरी अर्जुनाला जिंकतां आलें नसतें. महाबाहु अर्जुन श्रीकृष्णसाहाय्यानें देवादिकांनाही अजिंक्य आहे. भीमाच्या गर्जनेनें, पांचजन्याच्या शब्दानें, व गांडीवाच्या टणत्कारानेंच आह्मीं घाबरून जाऊन विजेप्रमाणें चमकणाऱ्या गांडीवानें आमचे डोळे दिपून जात आहेत. वाऱ्यालाही मागें सारणाऱ्या अशा वेगवान् घोड्यांच्या रथामध्यें बसून पावसाळ्यामध्यें मेघ ज्याप्रमाणें आपल्या वर्षावांनीं वणवा विझवून टाकतात त्याप्रमाणें अर्जुनानें बाणवर्षावानें आमच्या सर्व सैन्याची वाट लाविली आहे. ज्याप्रमाणें एखादा मस्त हत्ती सरोवरामध्यें शिरून सर्व पाणी खळबळून सोडतो व भराभर कमळें तोडून टाकतो त्याप्रमाणें अर्जुनानें तुझ्या सैन्यामध्यें शिरून एकच गर्दी उडवून पुष्कळांचीं शिरें धडापासून वेगळीं केलीं आहेत. युद्धाला प्रारंभ होऊन आज सतरा दिवस झाले. एवढ्या अवधींत सारखा आमचाच नाश होत आहे. दुःशासनाची अवस्था काय झाली, कर्णाच्या हातून काय झालें, जयद्रथाचा कितीसा पाड लागला, तुझ्या पराक्रमांचा काय परिणाम झाला हें सर्व तूं पहातच आहेस. व्यूहामध्यें जयद्रथाच्या संरक्षणाला मोठमोठे योद्धे असतांनाही त्या सर्वांच्या देखत तुझ्या सर्व वीरांच्या छातीवर पाय देऊन अर्जुनानें त्याला कसें मारलें याची आठवण तुला अजून बुजाली नसेल. दिव्यास्त्रसंपन्न अर्जुनाला जिंकण्याला समर्थ असा एकही वीर पुरुष आमच्यामध्यें नाहीं. भीमानें आपलीं प्रत्येक प्रतिज्ञा खरी केली आहे व तो आणखीही करील. सत्यप्रतिज्ञ पांडवांना तूं विनाकारण फार छळलें आहेस. त्याचें हें फळ आतां भोगावें लागत आहे. आपल्यासाठीं तूं स्वतःला व पुष्कळ राजांना विनाकारण संकटांत घालून घेतलें आहेस. आतां तरी तूं स्वतःचें रक्षण करून घे. स्वतःचा नाश झाल्यावर सर्व कांहीं असून नसल्यासारखेंच. **ज्याची दिवसेंदिवस चढती कमान असेल त्यानेंच युद्ध करावें व ज्याचा पाय आंत आंत येत असेल त्यानें तह करावा हेंच उचित.** देवगुरू बृहस्पतीचेंही असेंच ह्मणणें आहे. आतां पांडवांपेक्षां आह्मी फारच हीनबल आहों ह्मणून त्यांच्याशीं तह करणें हेंच मला बरें दिसतें. **जो आपलें कल्याण कशांत आहे व अकल्याण कशांत आहे हें पहात नाहीं तो लौकरच राज्यभ्रष्ट होऊन दुःखाचा वांटेकरी होतो.** उगीच मूर्खासारखें युद्ध चालू ठेवून दुःख भोगण्यापेक्षां धर्माला शरण जाऊन आपलें राज्य परत मिळवावेंस हें बरें. दयाशील धर्मराज कृष्णाच्या सांगण्यानें तुला पुनः राज्यावर बसवील. कृष्ण जें सांगेल त्याला अर्जुनादि पांडव खात्रीनें मान्य होतील. आतां पार्थाबरोबर वैर मांडण्यापेक्षां तह करणेंच बरें. हें जें मी तुला सांगतों तें घाबरल्यामुळें प्राण वांचण्याकरतां सांगतों आहें असें मात्र समजूं नकोस. जें खरोखर हिताचें आहे तेंच मी तुला सांगत आहें. पुढें तुला ह्या माझ्या बोलण्याची आठवण होईल. ’ असें ह्मणून कृपाचार्यांनीं दुःखाचा सुस्कारा टाकला.

हें ऐकून दुर्योधन दुःखातिरेकानें क्षणभर गप्प राहून कृपाचार्यांस ह्मणाला, ‘आपण जिवाचीही पर्वा न करितां महारथी पांडवांबरोबर निकरानें लढला हें सर्व लोकांनीं पाहिलें आहे. व सुहृदाप्रमाणें जें जें कांहीं सांगणें योग्य आहे तेंच आपण मला सांगितलें. परंतु मरणोन्मुखाला परिणामीं हितकर असा

काढाही ज्याप्रमाणें कडू वाटतो त्याप्रमाणें हें आपलें हितवचनही मला पटत नाहीं. कारण, ज्याला आह्मी राज्यापासून दूर केलें व खोट्या फाशांनीं द्यूतांत जिंकलें तो अभिमानी धर्मराज पुन्हां कशी बरें आमची कींव करील. नेहमीं पार्थाचें हितचिंतन करणारा कृष्ण ज्यावेळीं आह्मांकडे शिष्टाई करण्याकरितां आला होता त्यावेळीं आह्मीं त्याचें ऐकिलें नाहीं; मग आतां तो आमचें बोलणें काय ह्मणून ऐकेल? द्रौपदीला फरफरां ओढीत आणून भर सभेमध्यें तिचे आह्मीं हाल केले. त्याबद्दल महावीर पार्थ क्षमा कधीं तरी करील काय? आपला भाचा अभिमन्यु याला आह्मीं युद्धामध्यें **अधर्मानें मारल्याचें** पाहून कंसारी कृष्ण कसा बरें स्वस्थ बसेल? पराक्रमशाली भीमाच्या प्रतिज्ञेचा भंग होणें शक्य आहे काय? जे भीमार्जुन हातामध्यें शस्त्रें घेऊन युद्धाला उभे राहिले असतां यमालाही अंतकालाप्रमाणें भासणारे आहेत, अशा त्या वीर पुरुषांना मजसारख्या वैऱ्याबरोबर चालविलेल्या युद्धापासून कोणी तरी परतवूं शकेल काय? आपल्यावर ओढवलेल्या दुर्धर प्रसंगाच्या योगानें संतापून गेलेली द्रौपदी माझा नाश होण्याकरितां घोर तपश्चर्या करीत आहे. ती रोज जमिनीवर निजते. कृष्णभगिनी सुभद्रा आपला मान एका बाजूला सारून यःकश्चित् दासीप्रमाणें तिची सेवा करीत आहे. माझा नाश होईपर्यंत हें व्रत न चुकतां चालविण्याचा त्यांचा निर्धार आहे. अशी सर्व स्थिति असतां तह कसा बरें होईल. शिवाय सर्व पृथ्वीवर आजपर्यंत महाचक्रवर्ती ह्मणवून घेऊन आतां पांडवांपुढें मान वांकविणें माझ्यानें कधींही होणार नाहीं. हा वेळपर्यंत मीं स्वतः पुष्कळ भोग भोगिले व माझ्या आप्त इष्टांनाही ऐश्वर्यवान केलें असें असतां मींच आतां पांडवांवर उपजीविका करावी हें कितीबरें लाजिरवाणें आहे? मी द्वेषबुद्धीनें आपल्या बोलण्याचा तिरस्कार करतों असें मात्र समजूं नका. आपण जें कांहीं सांगितलें तें सर्व मजविषयीं आपल्या मनामध्यें प्रेमबुद्धि आहे ह्मणूनच आपण सांगितलें हें खरें, परंतु ह्या प्रसंगीं तह करणें हें मला रास्त दिसत नाहीं. अहो परंतप आचार्य, **षंढाप्रमाणें भिऊन बसणें योग्य नाहीं. आतां युद्धच केलें पाहिजे.** मीं पुष्कळ यज्ञ करून देवांना संतुष्ट केलें आहे, दक्षिणा देऊन ब्राह्मणांना आनंदविलें आहे, बराच दानधर्म करून याचकवर्गाचें दारिद्र्य दूर केलें आहे. ह्मणून ह्या सर्वांच्या आशीर्वादानें मलाच खात्रीनें यश येणार. मीं परराष्ट्रांना पादाक्रांत करून सार्वभौमत्व मिळविलें, जगांतील सर्व भोग भोगिले. नीतीनें राज्य चालवून प्रजेचा आशीर्वाद घेतला, वडिलांच्या ऋणांतून मुक्त झालों, क्षात्र धर्माचें उल्लंघन कधींही केलें नाहीं, परंतु खरें सुख असें मला कशांतही आढळलें नाहीं. **मनुष्याचें या जगांत जर कांहीं कर्तव्य असेल .तर तें कीर्ति मिळाविणें हें आहे व ती कीर्ति क्षत्रियानें युद्ध करूनच मिळविली पाहिजे. घरीं आंथरुणावर पडून मरणारा क्षत्रिय अधम होय. धारातीर्थी देह ठेवणाऱ्या क्षत्रियाला ब्राह्मणांना शेंकडों यज्ञांच्या योगानेंही दुष्प्राप्य असा अक्षय स्वर्गवास मिळतो.** ह्मणून मी आतां ह्या सर्व ऐहिक सुखांना लाथ मारून शूर पुरुषांना मिळणाऱ्या स्वर्गाचीच वाट धरणार. खरें शूर शत्रूला कधीं पाठ न दाखविणारे, नेहमीं खरे बोलणारे अशाच लोकांना नेहमीं स्वर्गी थारा मिळतो. शत्रूंच्या छातीवर पाय देऊन धैर्यानें युद्ध करीत असतां धारातीर्थी देह ठेवणाऱ्या पुरुषांची स्वर्गांतील अप्सरा उत्कंठेनें वाट पहात असतात; व अशा पुरुषांच्या वाडवडिलांचा स्वर्गामध्यें जयजयकार करतात. ह्मणून मीही आतां तोच मार्ग पतकरणार. माझ्याकरितां पितामह भीष्मांनीं, भाऊ दुःशासनानें सेनापति कर्णानें व शूर जयद्रथानें ह्याच मार्गाचें अवलंबन केलें. त्यांच्या ऋणांतून मुक्त होण्याकरितां राज्याचा अभिलाष न धरतां मलाही तोच मार्ग स्वीकारला पाहिजे. आपल्या आजाच्या, भावांच्या व स्नेह्यांच्या नाशाला कारण होऊन जर मी आतां आपला जीव मात्र वांचवीन तर खरोखर लोक माझी छीः थूः करतील. शिवाय पांडवांच्या पायां पडून राज्य परत मिळविलें तरी भाऊ किंवा मित्र यांपैकीं कोणीही न उरल्यामुळें त्या राज्योपभोगापासून तरी काय सुख मिळणार? ह्मणून मी शत्रूंबरोबर धैर्यानें लढून हें तुच्छ जग सोडून स्वर्गाचीच वाट धरणार!’ हें दुर्योधनाचें भाषण ऐ-

कून सर्व क्षत्रिय आनंदानें शाबास शाबास ह्मणाले, ह्या भाषणानें सर्वांना मागील दुःखाचा विसर पडला, व पुनः लढण्याचें धैर्य आलें. इतक्यांत संध्याकाळ झाल्यामुळें जवळच चार कोसांच्या आंत हिमालयाच्या पायथ्यापाशीं असलेल्या सरस्वती नदीच्या कांठीं जाऊन त्यांनीं तेथें घोड्यांची चाकरी वगैरे केली व आपणही स्नान करून पाणी पिऊन रात्रभर विश्रांति घेतली.

ह्या ठिकाणीं रात्रीं राहिले असतां कौरवांकडील सर्व राजांनीं दुर्योधनाजवळ येऊन एका उत्तम, अनुभवशीर व शूर अशा सेनापतीची निवड करण्याबद्दल त्याची विनंती केली. तेव्हां दुर्योधनानें शूर, अनुभवशीर व सर्व विद्याविशारद अश्वत्थाम्याला सेनापति कोणाला करावें ह्मणून विचारिलें. तेव्हां अश्वत्थामा कुल, रूप, शौर्य, गुण इत्यादिकांनीं संपन्न अशा शल्याची शिफारस करून ह्मणाला, 'हे आपल्या भाचांकडेही न पाहतां आह्मांला येऊन मिळाले आहेत. हे कार्तिकस्वामीप्रमाणें शूर आहेत. कार्तिकस्वामीच्या योगानें देवांनीं जसें दानवांना जिंकिलें त्याप्रमाणें तुलाही ह्यांच्या साह्यानें जय मिळेल.' हे शब्द कानीं पडण्याबरोबर सर्व कौरवपक्षाला दुप्पट उमेद आली; व त्यांनीं शल्याच्या सभोंवार जमून त्याचा जयजयकार केला. दुर्योधनही जमिनीवर उभा राहिला व हात जोडून शल्यास म्हणाला कीं, 'मित्रांना आपल्या मित्रत्वाचा उपयोग करण्याची योग्य वेळ काय ती हीच. तर आपण आमचे सेनापती व्हा. आपण सर्व सैन्याच्या पुढें झालां ह्मणजे सर्व पांडव लटपटून जातील !' ह्यावर शल्य ह्मणाला, 'हे राजा, तुझ्यामनाप्रमाणें मी करतों, फार काय सांगूं, मी तुझ्या करितां आपलें सर्व राज्य, धन व प्राणही वेंचण्यास तयार आहें. दुर्योधना, कृष्णार्जुनांना तूं सर्व रथ्यांमध्यें श्रेष्ठ समजतोस, परंतु ते मजपुढें मुळींच टिकणार नाहींत. मी तुझा सेनापति होऊन अशा प्रकारचा व्यूह रचीन कीं, पांडवांना तो मुळींच फोडतां येणार नाहीं, हें मी तुला खात्रीनें सांगतों.' हें ऐकून दुर्योधनानें मद्रराज शल्याला विधिपूर्वक सेनाधिपत्याचा अभिषेक केला. तेव्हां सर्व सैनिकांनीं आनंदानें सिंहनाद केला; व जिकडे तिकडे आनंदवाद्यें वाजूं लागलीं.

इकडे कौरवसैन्यांतील आनंदाचा गजर ऐकून राजा युधिष्ठिर कृष्णाला ह्मणाला, 'हे माधवा, रणसिंह शल्याला कौरवांनीं सेनापति केलें. हें लक्षांत आणून तुला योग्य वाटेल तें कर. आमचा पुढारी, संरक्षक सर्व काय तो तूंच आहेस. तेव्हां श्रीकृष्ण ह्मणाला, 'मद्राधिपति शल्य हा भीष्मद्रोणादिकांसारखा किंबहुना त्यांच्याहूनही शूर आहे. अर्जुन, शिखंडी, धृष्टद्युम्न किंवा सात्यकि ह्यांच्यापैकीं त्याच्या जोडीला कोणीच उतरणार नाहीं. तो समरभूमीवर उभा राहिला असतां खवळलेल्या काळाप्रमाणें भासेल. सर्व पृथ्वीवर किंबहुना स्वर्गीं देखील शल्याला मारणारा तुझ्यावांचून दुसरा कोणी मला दिसत नाहीं. ज्याप्रमाणें इंद्रानें शंबराला मारलें त्याप्रमाणें तूंही ह्याला मार. हा मेला म्हणजे कौरवसैन्य अगदीं गांगरून जाईल. त्यामध्यें कांहींच सत्व राहणार नाहीं. आणि मग सर्वस्वीं तुझाच जय होईल. हा मामा आहे ह्मणून ह्याची कींव करूं नकोस. पुढें उभा राहणाराला ठार करणें हा क्षत्रियांचा धर्म आहे. भीष्मद्रोणांसारख्यांना जिंकून आतां शल्याकडून जर पराभव पावशील तर महासागरांतून तरून जाऊन गाईच्या पायानें पडलेल्या खड्ड्यामध्यें बुडाल्याप्रमाणें होईल. तुझ्या अंगीं जें क्षात्रतेज असेल, जें तपःसामर्थ्य असेल, जें शौर्य असेल, तें सर्व. या युद्धामध्यें दाखीव व महारथी शल्याला मार.' इतकें बोलून भगवान् श्रीकृष्ण आपल्या शिबिराकडे निघून गेला. युधिष्ठिरही आपल्या भावांसहवर्तमान आपल्या डेऱ्याकडे गेला. कर्णाच्या वधामुळें सर्व पांडवसैन्याला फार आनंद झाला होता त्यामुळें त्यांनीं रात्रभर सुखानें झोंप घेतली.

## ९२ कर्णपुत्रांचा वध. (९.८–१०)

उजाडल्यावर दुर्योधनानें आपल्या सैन्यांतील लोकांना तयार होण्याबद्दल हुकूम केला. त्याबरोबर कांहीं रथ जोडावयाला लागले, कांहीं हत्ती सजवूं लागले, कांहींनीं घोडे तयार केले व राजेलोक आपापल्या पथकानिशीं तयार झाले. रणवाद्यें वाजूं लागलीं. त्यामुळें योद्ध्यांना मोठें स्फुरण चढलें व

मद्रराज शल्य आपला सेनापति आहे हें मनांत आल्यानें तर ते मृत्यूलाही न भितां युद्धाकरितां पुढें सरसावले. त्या वेळीं कृपाचार्य, कृतवर्मा, अश्वत्थामा, शल्य व आणखी बरेच राजे दुर्योधनाकडे आले व सर्व मिळून आपल्यापैकीं कोणीही एकटेच पांडवांशीं लढूं नये व जो कोणी एकटाच पांडवाशीं लढेल किंवा युद्धांतून मागें फिरेल त्याला पांच महापातकें लागतील, प्रत्येकानें एकमेकांचें संरक्षण करावें व सर्वांनीं मिळून लढावें, असें ठरवून शल्याला पुढें करून युद्धाकरितां निघाले. तेव्हां मद्रराज शल्यानें सर्व बाजूंनीं सुरक्षित असा व्यूह रचला व आपण एका काठेवाडी घोडे जोडलेल्या रथामध्यें बसला. त्याच्याबरोबर त्याच्या पथकांतील लोक व कर्णाचे मुलगे होते. त्याच्या डाव्या बाजूला त्रिगर्तांसह कृतवर्मा होता, उजव्या बाजूला कृपाचार्य, शक व यवनलोक घेऊन उभे राहिले, व त्यांच्या पाठीमागें अश्वत्थामा कांबोजांतील लोक घेऊन उभा राहिला. व सर्व सैन्याच्या मध्यभागीं दुर्योधन आपल्या कौरवसैन्यानिशीं उभा राहिला. सुबलपुत्र शकुनीबरोबर मोठा रिसाला घेऊन निघाला व राजा उलूकही बरोबर आपलें सर्व सैन्य घेऊन निघाला. अशा व्यवस्थित थाटानें कौरवांचें सैन्य पांडवांवर चाल करून निघालें.

पांडवही आपल्या सैन्याचे तीन भाग करून त्यांवर धृष्टद्युम्न, शिखंडी व सात्यकि ह्या तिघांना मुख्य नेमून कौरवांवर चालून गेले. राजा युधिष्ठिर आपल्या सैन्यानिशीं शल्यावर चालून गेला. अर्जुनानें, कृतवर्मा व संशप्तक यांच्यावर मोठ्या जोरानें चाल केली. भीमसेन व दुसरे महारथी कृपाचार्याला मारण्याकरितां धांवून गेले. माद्रीपुत्र आपल्या सैन्यानिशीं शकुनि व उलूक ह्यांवर तुटून पडला.

त्या वेळीं कौरवांकडील सैन्य अकरा हजार रथ, दहा हजार सातशें हत्ती, दोन हजार घोडे व तीन कोटी पायदळ इतकें उरलें होतें. तसेंच पांडवांकडे सहा हजार रथ, सहा हजार हत्ती, दहा हजार घोडे व एक कोट पायदळ इतकें उरलें होतें.

पायदळ, हत्ती, घोडे, रथी हे एकदम एकमेकांशीं भिडले असतां हत्ती वर्षाकाळांतील मेघगर्जनेप्रमाणें मोठ्यानें गर्जना करूं लागले. त्यांनीं कित्येक रथ्यांवर हल्ला करून त्यांच्या रथाचा चुराडा करून टाकला. व पायदळांतील कित्येक लोक त्यांच्या हलल्यालाच भिऊन समरांगणावर इकडे तिकडे धांवूं लागले. रथी आपल्या बाणांच्या वर्षावांनीं घोड्यांचा व पायदळाचा फडशा पाडूं लागले. घोडेस्वारांनीं आपल्या तलवारीनें व भाल्यानें पुष्कळ रथ्यांचा फडशा उडविला. घोड्यांचें खेंकाळणें, त्यांच्या टापांचा टपटप आवाज, रथांचा घडघडाट, शिपायांच्या आरोळ्या, हत्तींची गर्जना, रणवाद्यांचा घोष, शंखांचा नाद, ह्या सर्वांच्या योगानें दाही दिशा दणाणून गेल्या. धनुष्यांचा टणत्कार, हत्यारांची चमक, चिलखतांचें तेज ह्यांनीं इंद्रियें बधिर होऊन कांहींच उमगेनासें झालें. जमिनीतर रक्तानें भरलेलीं डोकीं पसरल्यामुळें ती सोन्याच्या कमलांनीं भरून निघाल्याप्रमाणें दिसत होती. चंदनाची उटी लावलेले, अलंकार घातलेले असे रणभूमीवर पडलेले हात, इंद्रमहोत्सवाचे वेळीं उभारलेल्या गुढ्यांप्रमाणें दिसूं लागले. जिकडे तिकडे शूर योद्ध्यांचीं धडें, छत्रें व चामरें पडल्यामुळें सर्व रणांगणावर रंगी बेरंगी फुलेंच पसरल्याप्रमाणें दिसत होतीं. धैर्यानें लढणाऱ्या शूर योद्ध्यांचे देह रक्तानें भरल्यामुळें फुललेल्या पळसासारखे दिसत होते. ज्याप्रमाणें वाऱ्यानें मेघ नाहींसे होतात अथवा वज्रानें पर्वतांचा नाश होतो त्याप्रमाणें शेंकडों हत्तींचा फडशा पडत होता. घोडे व त्यांवरील स्वार यांचे तर तेथें पर्वताएवढे मोठे ढीग पडले होते. ज्यामध्यें रक्त हेंच पाणी, रथ हेच भोंवरे, निशाणें हींच झाडें, हाडांचे चूर हेच खडे, योद्ध्यांचे बाहू ह्याच सुसरी, धनुष्याच्या कमानी ह्याच लाटा, हत्तीचे देह हेच खडक, घोडे हेच दगड, मेदमज्जा हाच चिखल, छत्र हेच हंस, गदा ह्याच तरी, पताका हेच जीमधील सुंदर वृक्ष अशी चिलखतें व शिरस्त्राण ह्यांनीं भरलेली एक परलोकाकडे वाहणारी नदीच त्या समरभूमीवर निर्माण झाली. त्या नदीकडे पाहून शूरांना आनंद होऊन त्यांचे बाहू स्फुरण पावूं लागले. परंतु भ्याडांच्या अंगावर ती शहारे उत्पन्न करीत होती. त्या भयंकर नदींतून शूर पुरुष आपल्या शस्त्रांनीं व वाहनांनीं पार झाले. देवांच्या व राक्षसांच्या युद्धाप्रमाणें त्या युद्धांत भयंकर रीतीनें सर्व सैन्याचा फडशा होत

असतां कित्येकजण आपल्या बांधवांना हांका मारीत भयानें रणभूमीमधून परतूं लागले.

धृष्टद्युम्न व शिखंडी ह्यांनीं धर्मराजाला पुढें करून मद्राधिपति शल्यावर चाल केली. त्या वेळीं शल्याकडील लोक फारच शौर्यानें लढले. परंतु इतक्यांत लढण्यांत पटाईत असे माद्रीचे मुलगे अस्त्रें घेऊन त्यांना मागें हटविण्याकरितां वेगानें चाल करून आले. त्यामुळें कौरवांचें सैन्य भयानें पळूं लागलें. विजयी पांडवांनीं आपल्या बाणांनीं त्यांचा पुष्कळ नाश केला. कौरवांच्या समक्ष त्यांच्या सैन्याचा अशा रीतीनें नाश झाल्यामुळें फार हाहाकार उडाला. कित्येक शूर लोक जयाच्या इच्छेनें पळणाऱ्यांना थोपवूं लागले. परंतु पांडवांच्या मारामुळें घाबरून जाऊन बंधु, मामे, भाचे, मित्र ह्या सर्वांना सोडून जो तो आपले प्राण संरक्षण करण्याकरितां धांवूं लागला. परंतु ज्याप्रमाणें महासागराचें तीर त्याला थोंपवून धरतें, त्याप्रमाणें एकट्या शल्यानें सर्व पांडवसेनेला अडविलें, व तो शल्य श्रेष्ठ धर्मराजापुढें जाऊन उभा राहिला. हें पाहून कौरवांचें सैन्य धैर्यानें परतलें, व रणभूमीवर येऊन युद्धाकरितां व्यवस्थित उभें राहिलें. तेव्हां कौरवपांडवांचें युद्ध फारच भयंकर झालें व तेथें पाण्याप्रमाणें रक्ताचा स्राव झाला.

इकडे नकुलानें कर्णाचा मुलगा चित्रसेन याला गांठलें. तेव्हां, एखाद्या वेळीं दक्षिण व उत्तर ह्या दोन्ही दिशांना ढग येऊन ज्याप्रमाणें दोन्ही दिशांकडून परस्पर विरुद्ध दिशेला जोरानें पावसाचा वर्षाव होतो त्याप्रमाणें दोघेही लढण्यामध्यें पटाईत असल्यामुळें उभयतांनीं एकमेकांवर खूप जोरानें बाणांचा वर्षाव केला. दोघेही सारखेच अस्त्रविद्येंत निपुण होते, दोघेही चांगले रथी होते, व दोघेही परस्परांला मारण्याला संधि पहात होते. चित्रसेनानें एका तीक्ष्ण बाणानें नकुलाच्या धनुष्याची कमान तोडली. तीन बाण त्याच्या कपाळावर सोडले व घोडे, ध्वज आणि सारथी ह्यांचाही त्यानें तीन तीन बाणांनींच फडशा उडविला. नंतर नकुल हातामध्यें ढाल तलवार घेऊन, जसा एखादा सिंह पर्वताच्या शिखरावरून ऐटीनें खालीं येतो त्याप्रमाणें रथावरून खालीं उतरला व चित्रसेनावर चालून गेला. आपला शत्रु आपणावर पायानेंच चाल करून येत आहे असें पाहून चित्रसेनानें त्याजवर पुष्कळ बाण सोडले. परंतु नकुलानें आपल्या ढालीनें त्यांची पत करून तो चित्रसेनाच्या रथावर चढला व सर्वांच्या देखत त्यानें त्याचें शिर धडापासून वेगळें केलें. तेव्हां सुषेण व सत्यसेन यांनीं आपल्या भावाला मारला हें पाहून वाघाप्रमाणें नकुलावर चाल केली व बाणांचा वर्षाव केला. त्यांची बराच वेळ झटापट झाली. शेवटीं नकुलानें सत्यसेनावर रथशक्ति सोडली. तिनें सत्यसेनाच्या छातींत घुसून त्याच्या चिंधड्या उडवून दिल्या. तें पाहून सुषेणानें त्वेषानें नकुलाचे घोडे, रथ, सारथि, व ध्वज ह्या सर्वांचा नाश केला व आनंदाची आरोळी दिली. तेव्हां द्रौपदीचा मुलगा सुतसोम आपल्या बापाच्या संरक्षणाकरितां रथ घेऊन धांवून आला, व नकुल त्याच्या रथावर चढला व दुसरें धनुष्य घेऊन पुन्हां युद्ध करूं लागला. शेवटीं नकुलानें अर्धचंद्राकृति फाळ बसविलेला एक बाण जोरानें सुषेणावर सोडला. त्यामुळें सुषेणाचें डोकें तुटून खालीं पडलें.

## ५२. द्वंद्वयुद्ध. ( ९.११–१५. )

नकुलानें कर्णाच्या सर्व मुलांना ठार केलें हें पाहून कौरवसेना भयानें घाबरून पळूं लागली. परंतु मद्राधिपानें सिंहगर्जना करून धनुष्याचा टणत्कार केला, तेव्हां कौरवांच्या सैन्याला थोडासा धीर आला व तें शल्याबरोबर शत्रूशीं लढण्याला पुन्हां उभें राहिलें. पांडवांकडेही सात्यकि, भीमसेन वगैरे मंडळी धर्मराजाबरोबर उभी होती. इतक्यांत अर्जुन संशप्तकांना मारून धर्मराजाला येऊन मिळाला. तेव्हां पांडवांकडील लोक अधिक त्वेषानें कौरवांवर चालून गेले व त्यांची त्यांनीं बरीच कत्तल केली. आपल्या सैन्याची चिखलांत रुतलेल्या गाईप्रमाणें व्यवस्था झाली आहेसें पाहून शल्याला फार त्वेष चढला व तो पांडवांवर तुटून पडला. त्या वेळीं बरेच अपशकुन झाले. सगळी पृथ्वी एकदम डळमळूं लागली व तिच्यांतून मोठा शब्द निघाला. शुक्र, मंगळ, व बुध हे ग्रह पांडवांच्या मागें व कौरवांच्या पुढें दिसूं लागले. कावळे व घुबड हे यो-

द्धयांच्या डोक्यांवर येऊन बसूं लागले. अशी सर्व स्थिति असतां पांडवही खूप निकरानें लढत होते. शल्यानें युधिष्ठिरादि पांडवांवर बाणांचा पुष्कळ मारा केला. ह्या वेळीं भीमाला फार राग आला व तो दांत ओठ चावून शल्यावर आपली गदा घेऊन चालून गेला

भीमाची गदा यमदंडाप्रमाणें भयंकर दिसत होती. ती सोन्यानें मढविली असल्यामुळें अग्नीप्रमाणें चकाकत होती. लोखंडाची असल्यामुळें वज्रासारखी कणखर होती, व त्यावर चंदन फांसलें होतें, त्यामुळें एखाद्या खवळलेल्या नागिणीप्रमाणें ती उग्र दिसत होती. रक्तमांसानें भरल्यामुळें काळपुरुषाच्या जिभेचें तिला स्वरूप आलें होतें व घणघणीत आवाजाच्या घांटा लावल्यामुळें इंद्राच्या वज्राप्रमाणें तिच्यांतून भयंकर आवाज निघत होता. ह्याच गदेच्या योगानें कैलास पर्वतावर भीमानें कुबेरावर चाल केली होती व ह्याच गदेच्या योगानें त्यानें पुष्कळ यक्षांना ठार केलें होतें. भीम गदा घेऊन निघाला तेव्हां त्याला पुष्कळांनीं अडविलें. परंतु भीम त्या सर्वांच्या छातीवर पाय देऊन तसाच वेगानें गेला व शल्याच्या घोड्याचा त्यानें चुराडा उडविला. त्यासरशीं शल्यानें भीमाच्या छातीवर भाला मारला, परंतु त्यानें तो तसाच परतवून शल्याच्या सारथ्याच्या छातींत खुपसला. त्यामुळें त्याची छाती फुटून तो रक्त ओकूं लागला. हें पाहून शल्य अगदीं चकित झाला व आपणही एक गदा घेऊन रथाखालीं उतरला. भीम गदायुद्धामध्यें फारच कुशळ होता. शल्यही तसाच तयार होता. त्यामुळें त्या दोघांचें युद्ध फारच बघण्यासारखें झालें. ते इतक्या त्वेषानें लढत होते कीं, ज्या वेळीं ते एकमेकांवर आपली गदा सोडीत व आपल्या गदेनेंच त्याची पत करीत, तेव्हां त्यांतून विस्तवाच्या ठिणग्या उडत असत. गदेच्या ठोशांनीं ते वीर अगदीं रक्तबंबाळ झाले; त्यांच्या गदा एकमेकांवर हपटल्यामुळें जो आवाज होई त्यानें दाही दिशा भरून जात. एकमेकांच्या माऱ्यांत आल्यावर ते कांहीं अंशीं वाटोळ्या रेषेंत पवित्रे चाळीत व एकमेकांवर आपली गदा सोडून झट्दिशीं पत करीत असत; शेवटीं अतिशय आवेशानें दोघांनींही परस्परांवर गदा सोडली व तिच्या तडाख्यानें दोघेही मूर्छित होऊन खालीं पडले. त्यामुळें सर्व सैन्यामध्यें एकच हाहाकार उडाला.

इतक्यांत कृपाचार्य तेथें आले व त्यांनीं शल्याला आपल्या रथांत घालून रणांगणांतून बाजूला नेलें. परंतु भीम डोळ्याचें पातें लवतें न लवतें इतक्यांत शुद्धीवर आला व शल्याला पुन्हां युद्धाकरितां पाचारूं लागला. सर्व कौरवसैन्य पांडवांवर एकदम चालून आलें, तेव्हां पांडवही त्यांच्यावर तुटून पडले. त्या गर्दीत दुर्योधनानें चेकितानाच्या छातींत जोरानें भाला भोंसकला, त्यामुळें त्याचें सर्व शरीर रक्तबंबाळ झालें व तो व्याकुळ होऊन रथाखालीं पडला. चेकितान पडला हें पाहून पांडव कौरवांच्या सैन्यावर झपाट्यानें बाणांचा वर्षाव करूं लागले. तेव्हां त्या रणभूमीवर कांहीं वेळ वरींच द्वंद्वें माजून राहिलीं. कृपाचार्य, कृतवर्मा व सुबलपुत्र या तिघांनीं मद्राधिपति शल्य याला पुढें करून धर्मराजावर हल्ला केला. दुर्योधनानें पराक्रमी धृष्टद्युम्नाला गांठलें. तीन हजार रथ बरोबर घेऊन द्रोणाचार्यांचा मुलगा अश्वत्थामा यानें अर्जुनाला रोंखून धरलें. सर्व योद्धे प्राणांचीही पर्वा न करतां खूप निकरानें लढले. रणांगणांमध्यें युद्धाची एकच गर्दी झाल्यानें दाही दिशा धुळीनें अगदीं भरून गेल्या. त्यामुळें आपला व परका हें मुळींच ओळखवेना. पुढें रक्ताचा पाट वाहूं लागल्यावर ती धूळ खालीं बसली व प्रत्येक गोष्ट स्वच्छ दिसूं लागली. प्रत्येक योद्धा जयाच्या इच्छेनें व धारातीर्थी देह ठेविल्यानें स्वर्ग प्राप्ति होते अशी खात्री असल्यानें फारच निकरानें लढला. ह्या गर्दींत शल्य रणभूमीवर परत आला व त्यानें एकट्यानें युधिष्ठिर, भीम, सात्यकि, नकुल, सहदेव यांच्याशीं युद्ध करून मोठा पराक्रम गाजविला.

इकडे द्रोणपुत्र अश्वत्थामा व त्याचा साथीदार त्रिगर्त ह्यांनीं अर्जुनाचें शरीर बाणांनीं अगदीं घायाळ केलें तेव्हां अर्जुनानेंही त्यांच्यावर पावसाप्रमाणें बाणांचा वर्षाव करून त्यांना अगदीं घेरून घेतलें, इतक्याही अर्जुनाच्या माराला न डगमगतां कौरवसैन्यानें अश्वत्थाम्यासह पांडवांबरोबर नेटानें लढून अर्जुनाचा रथ, घोडे, सारथी, सैन्य वगैरे सर्व बाणमय करून सोडलें. तेव्हां अर्जुन आपल्या शत्रुपक्षा-

ची सारखी कत्तल करीत सुटला. आपल्या सैन्याची अर्जुनानें फार नासाडी केली हें पाहून अश्वत्थाम्याला फार राग आला व ते अर्जुनावर तुटून पडला. अश्वत्थाम्यानें पार्थावर चवदा, व श्रीकृष्णावर दहा असे चोवीस बाण सोडले. अर्जुनानें आपल्या गुरुपुत्रावर गांडीवाचा मारा करून त्याचा रथ, घोडे व सारथि ह्या सर्वांना ठार केलें. अश्वत्थामा विरथी झाल्यामुळें त्यानें पार्थावर मुसळ फेंकलें. त्या मुसळाचे अर्जुनानें आपल्या बाणांनीं मध्येंच सात तुकडे केले त्यावर पुनः अश्वत्थाम्यानें गुर्दा फेंकला. यमदंडाप्रमाणें भयंकर असलेल्या त्या गुर्याला पाहून अर्जुनानें त्वरेनें पांच बाण सोडले व त्याला हाणून खालीं पाडलें. व तीन रुंद तोंडाचे बाण अश्वत्थाम्यावर सोडले. त्यामुळें तक्षक जसा काठीचा तडाखा बसल्यामुळें रागानें जीभ चाळवतो त्याप्रमाणें अश्वत्थाम्यानेंही रागानें दांत ओठ चावले व सुरथ नांवाच्या पांचाल योद्ध्यावर एक तीक्ष्ण बाण सोडला. तो बाण त्याच्या छातींतून पार गेला. व त्या सरशीं तो रथावरून धाडदिशीं खालीं पडला. सुरथ आपल्या रथावरून खालीं पडल्याबरोबर अश्वत्थामा त्याच रथावर चढला व संशतकांना बरोबर घेऊन अर्जुनाबरोबर पुन्हां लढूं लागला. ह्या वेळीं हे दोघेही योद्धे जिवावर उदार होऊन फारच निकरानें लढले. व तो युद्धाचा चमत्कार पाहण्याकरितां सूर्य आकाशाच्या अगदीं मध्यभागीं येऊन उभा राहिला.

इकडे पृषताचा मुलगा धृष्टद्युम्न व राजा दुर्योधन यांचें फारच निकरानें युद्ध चाललें होतें. शिखंडीनें प्रभद्रकांना बरोबर घेऊन कृतवर्मा व गौतम यांच्या बरोबर युद्ध चालविलें होतें. सात्यकि, भीम, नकुल, सहदेव इत्यादि पांडवांना शल्यानें आपल्या बाणांनीं अगदीं जर्जर करून सोडले. इतक्यांत धर्मराजाला शल्यानें फार त्रास दिलेला पाहून नकुल आपल्या मामावर धांवून गेला; व त्याच्या छातींत त्यानें तीक्ष्ण व सरळ असे पोलादाचे दहा बाण मारले. शल्यानेंही तसेच त्याच्यावर बरेच बाण सोडले. नंतर राजा युधिष्ठिर, भीमसेन, सात्यकि व सहदेव हे शल्यावर तुटून पडले. व सर्वांनीं मिळून त्याच्यावर बराच मारा केला. तेव्हां शल्यानें नकुलाचें धनुष्य आपल्या बाणानें तोडून टाकलें व सात्यकीचे रथ, घोडे व धनुष्य ह्या सर्वांचा फडशा पाडून सोडला. ह्यामुळें सात्यकीला फार राग आला व तो दुसऱ्या रथावर बसून सेनापति शल्य यावर जाऊन भिडला. तेव्हां त्यांचें युद्ध इंद्र व शंबरासुर ह्यांच्याप्रमाणें फारच भयंकर झालें. कौरवांचें सैन्य पांडवांवर एकदम चालून गेलें. व तें संख्येनें बरेंच मोठें होतें त्यामुळें त्यानें पांडवांना बहुतेक जेरीस आणून सोडलें. कृष्णार्जुनांनीं व भीमानें आपल्या सैनिकांना पुष्कळ नेट दिला. परंतु त्यांच्यानें अगदीं दम धरवेना. हें पाहून अर्जुनाला आवेश चढून त्यानें कृपाचार्य व कृतवर्मा ह्यांच्यावर जोरानें मारा करण्यास सुरवात केली. सहदेवानें शकुनीला गांठलें. नकुल एका बाजूस उभा राहून शल्यावर मारा करूं लागला. द्रौपदीच्या मुलांनीं तर पुष्कळच राजांना रोखून धरलें. शिखंडीनें द्रोणांच्या मुलावर मारा चालविला. भीमानें आपल्या गदेनें राजा दुर्योधनाला थोपवून धरलें. धर्मराज आपल्या सर्व सैन्यानिशीं शल्यावर बसरून पडला. अशा रीतीनें प्रत्येकानें एकेकाला गांठल्यामुळें उभयतांचें सैन्य जागजागीं गुंतून राहिलें. **चंद्राजवळ शनि असतांना जशी शोभा दिसते** तसें शल्य धर्माजवळ असल्यामुळें शोभला. शल्य धर्माला आपल्या तलवारीचें पाणी दाखवून लगेच भीमावर धांवून गेला. शल्याचा मारा सहन न झाल्यामुळें पांडवांचें सैन्य रणांगणांतून पळूं लागलें. तेव्हां धर्माला फार राग आला व तो मारो अथवा मरो असा निश्चय करून शल्यावर तुटून पडला.

---

## ५४ शल्ययुधिष्ठिरांचें युद्ध व शल्याचा वध. (९. १६–१७).

धर्म आपल्या सर्व भावांना व श्रीकृष्णाला हाक मारून ह्मणाला, ‘ भीष्म, द्रोण, कर्ण वगैरे जे जे राजे कौरवांकरितां आमच्याशीं युद्धाला उभे राहिले त्या सर्वांना तुह्मीं आपल्या पराक्रमानें स्वर्गाची वाट दाखविली. आतां शल्य हेच एकटे उरले आहेत व ते माझा वांटा आहेत. तेव्हां मी आज त्यांना मारणार. ह्या वेळीं आपण सर्वांनीं कशी चाल करावी यासंबंधीं माझा विचार ऐका. शूर नकुल व

सहदेव यांनीं माझे चक्ररक्षक होऊन मजकरितां आपल्या मामांशीं मोठ्या निकरानें लढावें. रथयोजकांनीं आज माझ्या रथामध्यें शल्यापेक्षां जास्त शस्त्रास्त्रांची भरपूर जेथल्या तेथें तयारी करून ठेवावी. शिनीच्या नातवानें माझ्या उजवीकडे उभें रहावें व धृष्टद्युम्नानें डावीकडे उभे रहावें. धनंजयानें माझ्या मागें रहावें व भीमानें पुढें रहावें. अशा व्यवस्थेनें आपण शल्यांवर चालून गेलों म्हणजे खात्रीनें आपलाच जय होईल.'

असें धर्मानें सांगितल्यानंतर सर्व राजे आपापल्या नेमलेल्या जागेवर उभे राहिले. तेव्हां पांचाल, मत्स्यादि सर्व पांडवसेनेला अतिशय आनंद झाला. त्यामुळें सर्व रणभूमीवर रणवाद्यांचा गजर व योद्ध्यांचा सिंहनाद ह्यांचा एकच नाद उठून राहिला. व सर्व पांडवसैन्य कौरवांवर एकदम चालून गेलें. कौरवांनींही रणवाद्यांचा गजर केला व पांडवांना बेतानें आपल्या अंगावर घेऊन त्यांच्यावर झपाट्यानें बाणांचा मारा सुरू केला. शल्यानें धर्माला गांठलें,व दुर्योधन, द्रोणाचार्यांनीं शिकविलेल्या विद्येचा प्रभाव दाखवीत,समरभूमीवर सारखा बाणांचा वर्षाव करीत होता. इतक्यांत भीम त्याला जाऊन भिडला. धृष्टद्युम्न, सात्यकि व नकुलसहदेव इत्यादि पांडवांनीं शकुनि वगैरे वीरांवर चाल केली. दुर्योधनानें रुंद फळाच्या बाणानें भीमाचा बावटा खालीं उतरला व त्याच्या धनुष्याचे दोन तुकडे केले. तेव्हां भीमानें त्याच्यावर रथशक्ति सोडली. ती त्याच्या छातींत बसल्यामुळें त्याला झीट आली व तो रथांत मटकन् बसला. पुनः भीमानें जलदीनें त्याचा सारथि मारला. तेव्हां अश्वत्थामा, कृपाचार्य व कृतवर्मा हे दुर्योधनाचें रक्षण करण्याकरितां धांवून आले. कौरवसैन्याची अशा रीतीनें धांदल उडाली असतां अर्जुनानें त्यांच्यावर झपाट्यानें आपल्या गांडीवाचा मारा चालविला. आपल्या वेगवान् घोड्यांना स्वतःच चालवून जलदीनें धर्म शल्यावर तुटून पडला.धर्मानें आपले डोळे वटारले होते व त्याला अतिशय त्वेष चढला असल्यामुळें त्याचें शरीर थरथर कांपत होतें. जे कोणी म्हणून त्याच्या पुढें आले त्या सर्वांना त्यानें कापून काढलें. घोडे, हत्ती, रथी, सारथी ह्या सर्वांना यमाचा दरबार दाखवून तो शल्यावर जाऊन भिडला. नंतर दोघांनींही शंख वाजविला व एकमेकांची निर्भर्त्सना करीत पहिली सलामी ठाकली. दोघेही निकरानें लढले व त्यांनीं एकमेकाला अगदीं रक्तबंबाळ करून सोडलें. ह्या दोघांनीं आपला प्राण पणाला लावून युद्धरूपी जुगार मांडला होता.

धर्म आपल्या शत्रूच्या डाव्या बाजूला उभा राहून त्याच्यावर बाणांचा मारा करीत होता; इतक्यांत शल्यानें त्याजवर एक रुंद पात्याचा बाण सोडला व त्याचें धनुष्य तोडून टाकलें. तेव्हां धर्मानें दुसरें धनुष्य घेऊन शल्याचे घोडे, धनुष्य, सारथी व ध्वज ह्या सर्वांचा फडशा उडविला. त्यामुळें कौरवसेन्याची थोडीशी धांदल उडाली; परंतु द्रोणपुत्र अश्वत्थामा लागलींच धांवून आला व शल्याला आपल्या रथांत बसवून घेऊन समरभूमींतून थोडासा बाजूला झाला. तेव्हां धर्मानें मोठ्यानें सिंहनाद केला; तो ऐकून मद्रराज थोडासा हांसला. व एक धनुष्य घेऊन दुसऱ्या रथावर बसून आपणही मोठ्यानें सिंहनाद करून धर्मावर चालून आला. सपाट्यासरशीं धर्म, भीम, सात्यकि व नकुल सहदेव वगैरेंचा थोडासा समाचार घेऊन पांडवसैन्यांतील बरेच घोडे, रथ, हत्ती, पायदळ, स्वार व रथी हे त्यानें कापून काढले. तेव्हां त्या कालरूप शल्यावर पांचाल, सोमक, भीम, शैनेय व नकुलसहदेव वगैरे योद्ध्यांनीं एक जुटीनें बराच बाणांचा वर्षाव केला. इतक्यांत धर्मानें नेमका शल्याच्या छातींत एक बाण सोडला. तो शल्य सेनापतीच्या मर्मीं लागलेला पाहून कौरवांकडील योद्धे शस्त्रास्त्रांनीं तयार होऊन दुर्योधनाच्या आज्ञेनें त्याच्या सभोंवतीं जमले. इतक्यांत शल्यानें धर्मावर खूप जलदीनें सात बाण सोडिले. लागलींच धर्मानेंही त्याजवर बराच मारा केला. अशा रीतीनें त्या दोघांची बरीच वेळ झटापट झाल्यानंतर भीमानें शल्याचें चिलखत फोडलें. तेव्हां शल्य हातांमध्यें ढालतलवार घेऊन रथावरून उडी ठोकून पांडवांवर वेगानें धांवून आला. त्यानें प्रथम नकुलाच्या रथाचा जूं तोडला, व मग तो धर्मावर झपाट्यानें तुटून पडला. हें पाहून भीमानें त्याच्या ढालीचा फडशा उडवला व तलवारीची मूठ तो-

डून खालीं पाडली. तेव्हां कौरवसैन्य भयानें जिकडे तिकडे सैरावैरा धांवूं लागलें. शल्य भीमादि वीरांचा तडाखा सहन करूनही तसाच वेगानें धर्माकडे वळला.शल्याचा मोर्चा आपल्याकडे वळलेला पाहून धर्महो त्याजवर धांवून गेला. श्रीकृष्णांनीं, ‘ शल्याचा वध तुझ्याच हातून होणार, ’ ह्मणून सांगितलेली गोष्टही त्याला ह्यावेळीं आठवली. ह्यामुळें त्याला शल्याला मारण्यासाठीं दुप्पट आवेश आला. शुद्धवृत्ति धर्मानें रागानें डोळे वटारून जेव्हां शल्याकडे पाहिलें तेव्हांच तो बहुतेक अर्धमेला झाला, धर्मानें लगेच एक तीक्ष्ण शक्ति घेतली. ही शक्ति विश्वकर्म्यानें मुद्दाम शंकराकरितां निर्माण केली होती. आजपर्यंत पांडवांनीं गंध, धूप, दीप, नैवेद्य वगैरे पूजाद्रव्यांनीं तिची उत्तम तऱ्हेनें सेवा केली होती. घुंगुर, रत्नें वगैरेंनीं तिला उत्तम तऱ्हेनें सजविली होती. त्या शक्तीवर धर्मानें घोरमंत्रांचें अभिमंत्रण केलें व शंकरानें ज्याप्रमाणें पूर्वीं ती अंधकावर सोडली होती त्याप्रमाणें त्यानें ती शक्ति जोरानें शल्यावर सोडली. शल्यानेंही पाठ न दाखवितां धैर्यानें छाती पुढें केली; व अग्नि ज्याप्रमाणें यथाशास्त्र हवन केलेल्या तुपाच्या धारेचा आ पसरून स्वीकार करतो त्याप्रमाणें त्यानें पुढें जाऊन तिला अंगावर घेतली. ती शक्ति शल्याच्या छातींतून पार निघून जमिनींत घुसली. त्याचें नाक, डोळे, कान, वगैरे सर्व गात्रें अगदीं छिन्नविच्छिन्न झाल्यामुळें, त्यांतून सारखें रक्त वहात होतें. स्कंदाच्या तडाख्यानें क्रौंच पर्वताची जी अवस्था झाली तशीच ह्या शक्तीच्या योगानें शल्याची झाली. वज्राच्या दणक्यानें पर्वताचें शिखर ज्याप्रमाणें एकदम खालीं कोसळतें त्याप्रमाणें शल्यही रथावरून धाडकन् खालीं पडला. तो खालीं पडतांना तेथील जागा किंचित् वर आल्याप्रमाणें भासलीं. त्यामुळें एखादी स्त्री जसें आपल्या प्रिय पतीला पुढें होऊन प्रेमानें आलिंगन देते त्याप्रमाणें पृथ्वी ही आपला प्रिय भर्ता शल्य ह्याला आलिंगन देण्याकरितांच पुढें आली आहे कीं काय असें पाहणारांना वाटलें. शल्यही आपल्या आवडत्या बायकोला कडकडून भेटला व काळझोंपेच्या आधीन झाला. विधिपूर्वक दिलेल्या हविर्द्रव्यानें अग्नि जसा शांत होतो तसा शल्यही धर्मानें सोडलेल्या शक्तीच्या योगानें अगदीं शांत झाला.

नंतर युधिष्ठिरानें हातामध्यें धनुष्य घेऊन आपल्या शत्रुपक्षाकडील लोकांची एकसारखी कत्तल करण्याला सुरवात केली. धर्माचा मारा सहन न झाल्यानें कौरवांकडील लोक डोळे झांकून एकमेकांवर धडाधड पडूं लागले. अशा रीतीनें एकमेकांवर आदळूनच पुष्कळ लोक मेले. योद्ध्यांच्या शरीरांतून रक्ताच्या धारा चालल्यामुळें ते निःशक्त होऊन त्यांच्या हातांतून शस्त्रें गळून पडत होतीं; व प्राण त्यांच्या देहाला सोडून स्वर्गीं निघून जात होते.

आपल्या भावाचा अशा रीतीनें शेवट झाला हें पाहून शल्याचा धाकटा भाऊ विचित्रकवच हा रागानें धर्मावर धांवून आला. हाही आपल्या भावाप्रमाणेंच शूर होता, व आपल्या भावाबद्दलच्या आपल्या कर्तव्याला जागण्याकरितां शत्रूशीं खूप निकरानें लढत होता. धर्मानें अगदीं जलदीनें सहा बाण सोडून त्याचें धनुष्य व बावटा ह्यांचे तुकडे करून सोडले; नंतर एक तीक्ष्ण व अतिशय तेजस्वी भाला घेऊन त्यानें त्याची गर्दन उडविली. त्यामुळें त्याचें धड रथावरून धाड्दिशीं खालीं आदळलें.

---

## ५५ शाल्व वध. (९. १८--२०)

विचित्रकवच ठार झाल्यानंतर तर कौरवसैन्यांतील लोकांच्या छातीनें अगदीं ठावच सोडला. ते पांडवांना भिऊन रणांतून पाय काढूं लागले. हें पाहून शिनि राजाचा नातू सात्यकि हा त्यांच्यावर फारच झपाट्यानें बाणांचा वर्षाव करूं लागला. इतक्यांत हार्दिक्यानें येऊन त्याला गांठलें. दोघेही सारखेच शूर होते व दोघेही वृष्णिकुलांतलेच होते. त्या दोघांनीं एकमेकांवर इतका मारा केला होता कीं उन्हामध्यें उभा राहिलेल्या मनुष्याचें शरीर जसें सूर्याच्या किरणांनीं अगदीं भरून जातें त्याप्रमाणें त्यांचें शरीर बाणमय झालें होतें. सात्यकीनें हार्दिक्याचा रथ, घोडे, सारथि ह्या सर्वांचा फडशा पाडला. हें पाहून कृपाचार्य तेथें धांवून आले व त्यांनीं त्याला जलदीनें आपल्या रथांत घालून त्या गर्दींतून बाजूला काढलें. तेव्हां आपल्या सैन्याची अशा प्रकारची त्रेधा उडालेली पाहून

दुर्योधन एकटाच पांडवांवर धांवून गेला, व धृष्टद्युम्न, सात्यकि वगैरे पांडवांकडील योद्ध्यांवर त्यानें सपाट्यानें बाणांचा मारा सुरू केला. तेव्हां पांडवांकडील लोकांना त्यांच्यावर चालून जाण्याचा धीर होईना. त्यांना तो काळाप्रमाणें भासूं लागला. इतक्यांत कृतवर्माही दुसऱ्या रथांत बसून दुर्योधनाला मदत करण्याकरितां पुनः रणांगणावर येऊन ठेपला. परंतु युधिष्ठिरानें मोठ्या त्वरेनें त्याच्यावर चार बाण सोडून त्याचे घोडे मारले व सहा बाण सोडून गौतमाचाही थोडासा समाचार घेतला. इकडे शारद्वतांनीं आठ बाण सोडून धर्माचे घोडे मारले. परंतु शल्य मेल्यामुळें कौरवांच्या सैनिकांचा धीर जो सुटला होता तो कांहीं फिरून येईना. शल्याच्या पथकांतील सातशें रथी व योद्धे यांनीं रणांगणांतून पळ काढला. तेव्हां दुर्योधनानें आपल्या लोकांना धीर यावा ह्मणून हत्तीवर चढून सेवकांना आपल्यावर छत्र धरण्याला व चवऱ्या वारण्याला सांगितलें. व तो मद्रांना 'पळूं नका, पळूं नका,' ह्मणून मोठ्यानें ह्मणूं लागला. दुर्योधनाचा हा शब्द ऐकून ते लोक पुन्हां परतले व धर्माला ठार करण्याच्या निश्चयानें पांडवांच्या सैन्यांत घुसून त्यांची त्यांनीं बरीच कत्तल उडविली. नंतर अर्जुन, भीम, नकुल, सहदेव, सात्यकि, द्रौपदीचे पांचही मुलगे, धृष्टद्युम्न शिखंडी, पांचाल व सोमक वगैरे राजेही आले व ते राजा युधिष्ठिराला मध्यें घालून त्याच्या संरक्षणाकरितां आपण सभोंवार उभे राहिले. झंजावातानें झाडें जशीं अगदीं हालून जातात किंवा मकर समुद्रांतील सारें पाणी जसें खळबळून सोडतात, त्याप्रमाणें ह्या सर्वांनीं मिळून कौरवसेनेमध्यें एकच गोंधळ उडवून दिला. प्रवाहाच्या विरुद्ध दिशेनें वारा सुटला ह्मणजे नदीचें पाणी जसें खवळून जातें तसें पांडवांचें सैन्य सारें खवळलें होतें. परंतु अशाही सैन्यावर कौरवांकडील महारथी चालून गेले; व 'धर्म कोठें आहे, त्याचे भाऊ कोठें आहेत, धृष्टद्युम्न, सात्यकि, वगैरे वीरांनीं कोठें दडी मारली,' असें मोठमोठ्यानें ओरडूं लागले. त्या सरशीं द्रौपदीच्या पुत्रांनीं त्यांच्यावर हल्ला करून त्यांची एकसारखी कत्तल करण्याला सुरवात केली. पुष्कळ लोक पतंगाप्रमाणें पांडवांवर पडून नाश पावले. तेव्हां गांधार राजाचा मुलगा शकुनि दुर्योधनाकडे येऊन ह्मणाला, 'आमच्या देखत ह्या सैन्याचा अशा रीतीनें नाश व्हावा काय? प्रत्यक्ष तूं युद्धामध्यें असतांना असें होणें बरें नव्हे. सर्वांनीं मिळून लढावयाचें असें ठरलें असतां शत्रू आमच्या सैन्याची समूळ कत्तल करीत असतांही तूं कसा स्वस्थ आहेस? हें तुझ्यानें पाहवतें तरी कसें?' दुर्योधन ह्मणाला, 'हे माझें न ऐकतां पांडवांवर चालून गेले, त्यामुळें हा परिणाम झाला. झालें तें झालें. आतां विनाकारण बोलून काय उपयोग? आतां तरी हयगय न करतां रथी, घोडेस्वार, हत्तीदळ वगैरे सर्व जण मिळून आपण शूर मद्रजनांचें संरक्षण करण्याला जाऊं व कसल्याही प्रसंगीं एकमेकांचें रक्षण करण्याला झटूं.

ह्याप्रमाणें करावयाचें ठरून राजा दुर्योधन सर्व लोकांनिशीं पांडवांवर तुटून पडला; व त्यानें मोठ्यानें सिंहनाद करून सर्व रणांगण हदरून सोडलें. तेव्हां कौरवांच्या सैन्यांतून जिकडे तिकडे हाणा, मारा, कापा, तोडा, पकडा, हेच शब्द ऐकूं येऊं लागले. पांडवांनींही आपल्या सैन्याची उत्तम तऱ्हेनें व्यवस्था लावून लढाईला तोंड दिलें. लगेच त्यांची हातघाई जुंपली. व पुष्कळ मद्रांनीं स्वर्गाची वाट धरली. पांडवांच्या सैन्यांतून आनंदाची गर्जना ऐकूं येऊं लागली. रणांगणांत आवेशानें योद्ध्यांचीं कबंधें नाचूं लागलीं. आकाशांतून उल्का पडल्या. समरभूमीवर रथी, रथ, हत्ती व घोडे ह्यांचे पर्वतप्राय ढीग पडले. सारथि नाहींसा झाला व घोड्यांचे रथाला जखडलेले दोर मात्र तसेच कायम राहिले. त्यामुळें कित्येक घोडे रथाचे अर्धे व मोडकेतुडकेच भाग घेऊन रणांगणांतून चहूंकडे धांवूं लागले कौरव सेनेचा धीर सुटून ती जिकडे वाट फुटेल तिकडे पळूं लागली. शल्याच्या वधानें धृतराष्ट्रपुत्रांचे हातपाय गळून त्यांनींही समरभूमीला आपली पाठ दाखविली. भीष्म, द्रोण व कर्ण हे नाहींसे झाले तेव्हां कौरवांची जशी स्थिति झाली होती तशीच पुन्हांही शल्याच्या मरणानें झाली. कोणी घोड्यावर तर कोणी हत्तीवर व कोणी रथांत बसून तर कोणी पायांनींच, जसें ज्याला साधेल तसें, आपला जीव मुठींत धरून रणांगणांतून पळून गेले. दे-

न हजार हत्ती माहुतांच्या अंकुशांच्या माऱ्यानें रणांतून पळत होते. सैनिकांची तर फारच त्रेधा उडाली होती. त्यांच्या सर्वांगावर बाण लागले होते. पराभवामुळें अंगांतील उत्साह तर मुळींच नाहींसा झाला होता. कसें तरी धापा टाकीत भीतीनें पावलें उचलीत ते चालले होते. इतक्यांत विजयी पांडव व पांचाल, हे धांवून आले. चोहोंकडून बाणांचा सूं सूं आवाज, शूरांची सिंहासारखी गंभीर गर्जना, योद्ध्यांचा भयंकर शंखनाद हीं ऐकूं येऊं लागलीं. कौरवसेनेची ही फजिती पाहून पांचाल व पांडवांकडील इतर लोक हे आपसांत हर्षानें बोलूं लागले कीं आज राजा युधिष्ठिराच्या शत्रूंचा समूळ नायनाट झाला. आज दुर्योधनाची राज्यश्री नष्ट झाली. आज धृतराष्ट्र आपल्या मुलाची मरणवार्ता ऐकून दुःखानें व्याकुळ होऊन जमिनीवर गडबडा लोळेल. विदुरानें सांगितलेल्या हिताच्या गोष्टीची आज त्याला आठवण होईल व आपल्या मूर्खपणाबद्दल स्वतःलाच दोष देईल. आजपर्यंत पांडवांना राजा धृतराष्ट्रामुळें काय काय संकटें सोसावीं लागलीं तीं सर्व आतां त्याला त्यांचा दास बनल्यावर पुरीं लक्षांत येतील. भगवान कृष्णाची योग्यता किती आहे, अर्जुनाच्या गांडीवाच्या टणत्काराचा प्रभाव काय आहे व भीमाच्या मनगटाची ताकद, त्याच्या अस्त्रांचें सामर्थ्य, हीं सर्व त्याला आतां समजतील. दुर्योधनाला भीमानें ठार केल्यानंतर दुःशासनाच्या नरडीचा घोट घेतला त्यावेळचा पराक्रम व हा तडाखा हे एकदम लक्षांत येतील. देवांनाही अजिंक्य अशा शल्याला निजविणाऱ्या धर्माचा पराक्रम आज त्याला कळूंद्या. सौबलाला व तसेंच दुसऱ्या शेंकडों वीरांना नकुल व सहदेव यांनीं स्वर्गाची वाट दाखविली हें ऐकून त्यांच्या आंगचें पाणी आज त्याला कळेल. अहो, अर्जुन, सात्यकि, भीम, धृष्टद्युम्न, द्रौपदीचे मुलगे, नकुल, सहदेव व राजा युधिष्ठिर ह्यांसारखे एकापेक्षां एक महापराक्रमी वीर ज्यांच्याकडे व भगवान कृष्णासारखा ज्यांचा चालक, शिवाय जे नेहमीं सत्यानें चालणारे अशांचा जय कां नाहीं होणार? अहो, पृथापुत्र युधिष्ठिरावांचून, भीष्म, द्रोण, कर्ण व शल्य ह्यांना व अशाच प्रकारच्या दुसऱ्या पराक्रमी वीरांना जिंकण्याची दुसऱ्या कोणाची छाती होती? '

याप्रमाणें एकमेकांमध्यें बोलत, पळणाऱ्या कौरवांचा त्यांनीं पाठलाग केला व पराक्रमी अर्जुनही त्यांच्याबरोबरच शत्रूंवर धांवून गेला. शकुनि वगैरे वीरही भीमाला पाहून घाबरले. हें पाहून त्यांचा नकुल, सहदेव व सात्यकि ह्यांनीं पाठलाग केला. तेव्हां दुर्योधन आपल्या सारथ्याला ह्मणाला, 'मी पुढें उभा राहिलों असतां माझा पाडाव सहज होतो. ह्मणून सैन्याच्या मागल्या बाजूला माझा रथ ने. शिवाय हें पहा, पांडवांना भिऊन किती तरी सैन्य पळत सुटलें आहे! व त्यामुळें चोहोंकडे धूळच धूळ होऊन राहिली आहे! तेव्हां पिछाडी संभाळून सैन्य थोपविलें पाहिजे. मी मागून नेट देऊन पांडवांना थोपवूं लागलों ह्मणजे माझें सर्व सैन्य धैर्यानें पुन्हां परतेल.' हें ऐकून सारथ्यानें रथ पिछाडीला नेला. तेव्हां हत्ती, घोडे किंवा रथ ह्यांपैकीं एकही वाहन नव्हतें तरी एकवीस हजार लोक आपल्या जिवाची पर्वा न करतां युद्ध करण्यासाठीं परतून तयार झाले. निरनिराळ्या देशांतील लोक जयाच्या इच्छेनें जेव्हां एकमेकांवर तुटून पडूं लागले तेव्हां फारच भयंकर गर्दी उडाली. भीम व धृष्टद्युम्न यांनीं आपल्याबरोबर चतुरंग सैन्य घेऊन पुष्कळांना मागें हटविलें. बाकीच्या पायदळानें मोठ्यानें ओरडत आनंदानें स्वर्गाची वाट धरण्याला भीमावर सारखा मारा चालविला. त्यांनीं त्याच्या रक्षकांचा फडशा पाडला. तेव्हां भीमाला फार राग येऊन आपली गदा हातांत घेऊन त्यानें रथाखालीं उडी टाकली. कालदंड हातांत घेतलेल्या यमाप्रमाणें त्यानें आपल्या गदेनें त्या एकवीस हजारांचा चुराडा केला. व लगेच धृष्टद्युम्नासह फिरून पहिल्या ठिकाणीं आला. झंझावातानें पांगाऱ्याच्या झाडाची स्थिति व्हावी तशी त्या पायदळाची स्थिति झाली होती. त्यांच्या आंगांतून रक्त वहात होतें व तें जमिनीवर पडलें होतें. रणभूमि पताका व मरून पडलेलें सैन्य ह्यांनीं भरून गेल्यामुळें तिला फार उग्र स्वरूप आलें होतें. नंतर युधिष्ठिर व दुसरे महारथी आपल्या सैन्यानिशीं दुर्योधनावर तुटून पडले. पण आश्चर्य हें कीं दुर्योधन एकटा होता तरी त्यानें ह्यांची मात्रा चालूं दिली नाहीं. त्याच्याजवळ थोडेंसेंच सैन्य शिल्लक होतें. व त्यावरही

बराच मारा बसला होता, ह्मणून तेंही पळण्याच्या बेतांत होतें. तेव्हां दुर्योधन त्यांना ह्मणाला, 'तुह्मी पर्वतावर जा किंवा पृथ्वीवर दुसरे कोठेंही जा; पांडव तुह्मांला सोडीत नाहींत. त्यांना येतां येणार नाहीं अशी एखादी जागा असेलसें मला वाटत नाहीं. मग उगीच पळून जाण्यांत काय अर्थ आहे? आपण सर्वजण मिळून जर युद्ध करूं तर खात्रीनें आपला जय होईल. हे वीरांनो ! ह्या पृथ्वीवरील प्रत्येक प्राण्याला घरीं निजून राहिलें तरी सुद्धां मरण हें येणारच. क्षत्रियधर्माला जागून **युद्ध करतां करतां मेल्यानें अक्षय्य स्वर्गसुख मिळतें.** व शत्रूलाच मारलें तर ह्या लोकचें सुख मिळतें. हे कौरवांनो, **युद्धासारखा स्वर्गाला नेऊन पोहोंचविणारा दुसरा सुखाचा मार्गच नाहीं.**' हें दुर्योधनाचें भाषण कौरवांना पटलें व ते पुन्हां पांडवांवर चालून गेले. पांडवांची सेनाही आपल्या ठिकाणीं व्यवस्थेशीरच होती. तिनें कौरवांवर उलट चाल केली. धनंजय आपल्या जगविख्यात गांडीव धनुष्याचा मारा करीत युद्धाच्या गर्दींत शिरला.

कौरवांचें सैन्य परतल्यानंतर म्लेंच्छाधिपति शाल्व हत्तीवर बसून रागानें पांडवांवर धांवून गेला. त्याच्या हत्तीच्या गंडस्थळांतून मद गळत होता. तो पर्वतप्राय मोठा व ऐरावतासारखा जातिवंत असून मुद्दाम गजविद्येंतील दर्दी लोकांकडून युद्धाकरितां तयार करविला होता. तो हत्ती युद्धाच्या वेळीं चोहोंकडे सारखा फिरत असल्यामुळें सोमक, सृंजय वगैरे पांडवांकडील लोकांना रणभूमीवर तो एकटा हजार हत्तींप्रमाणें दिसूं लागला. शाल्वानें आपल्या तीक्ष्ण बाणांचा प्रयोग सुरू केला. त्या वेळीं पांडवसेनेची बरीच धांदल उडाली. ती भयानें चोहोंकडे सैरावैरा पळूं लागली. त्यांपैकीं कित्येक लोक तर एकमेकांवर पडून चिरडूनच मेले. तें पाहून कौरवांकडील योद्ध्यांनीं शाल्वाचा जयजयकार करून मोठ्यानें शंखनाद केला. परंतु पांडवांकडील सेनापति पांचालपुत्र ह्याला हें सहन न होऊन तो जोरानें त्या हत्तीवर चालून गेला; व त्यानें तीक्ष्ण बाण मारून त्याचें गंडस्थळ फोडलें. तेव्हां तो हत्ती कच खाऊन मागें फिरला. शाल्वानें तशाच स्थितींत हत्तीला आपल्या अंकुशानें परतवून धृष्टद्युम्नाच्या रथावर चाल केली. हें पाहून धृष्टद्युम्नानें हातांत गदा घेऊन चट्कन् रथावरून खालीं उडी ठोकली. हत्तीनें घोडे व सारथी ह्यांसह त्या रथाचा चुराडा करून आपल्या सोंडेनें तो वर उचलून धाडदिशीं जमिनीवर हापटला. हें पाहतांच भीम, शिखंडी व सात्यकि ह्यांनीं त्याच्यावर मारा सुरू केला. तरीही तो हत्ती न डगतां रणांगणांतून सारखा हालत होता. त्यामुळें पांडवांच्या सैन्यांत अगदीं हाहाकार उडून गेला. तेव्हां पांचाल व सृंजय ह्यांनीं त्या हत्तीला अडविला. व धृष्टद्युम्नानें आपली बळकट गदा हातीं घेऊन वेगानें चालून जाऊन त्या हत्तीचें गंडस्थळ फोडलें. तेव्हां तो हत्ती मोठ्यानें ओरडला व मट्कन् खालीं बसला. इतक्यांत सात्यकीनें शाल्वाचें डोकें त्याच्या धडापासून वेगळें केलें. त्यासरशीं तोही हत्तीबरोबरच खालीं पडला.

---

## ५६. शकुनीचा वध. (९. २१–२८.)

रणशूर शाल्व मेल्यामुळें कौरवसेनेचे फिरून हातपाय गळले. परंतु कृतवर्म्यानें शत्रुसैन्याला अडवून धरलें. सर्व शरीरावर बाण लागले असतांही एकटा कृतवर्मा शत्रूंशीं नेटानें लढत आहेसें पाहून पळून जाणारें सैन्य परतलें. व 'मेलों तरी बेहेत्तर' असें म्हणून पुन्हां पांडवांबरोबर लढूं लागलें. इतक्यांत सात्यकि येऊन त्यांना मिळाला. त्यानें आल्याबरोबर सातच बाणांत राजा क्षेमधूर्ति ह्याला आधीं स्वर्ग दाखविला. कृतवर्मा व सात्यकि हे दोघेही सात्वत कुळांतलेच होते. सात्यकि आलेला पाहून कृतवर्मा त्याच्यावर तुटून पडला. त्यांनीं एकमेकांवर बाण सोडण्याचा सपाटा चालविला. कृतवर्म्यानें सात्यकीला गांठून चार बाणांनीं त्याचे घोडे मारले; व आणखी एक बाण सोडून त्याचें धनुष्य तोडून दोन तुकडे केले. त्यानंतर शिनिकुलामध्यें श्रेष्ठ व सर्व धनुर्धरांमध्यें वरिष्ठ अशा सात्यकीनें दुसरें धनुष्य घेऊन त्याचा सारथि, घोडे, बावटा ह्या सर्वांचा फडशा पाडला. तेव्हां कृतवर्म्यानें सात्यकीला ठार करण्याकरितां त्याच्यावर शूल फेंकला. सात्यकीनें आपल्या बाणांनींच त्या शूलाचा चुराडा करून त्याला खालीं पाडलें; व दुसरा एक रुंद फळाचा बाण त्याच्या

छातींत मारला. त्या दोघांच्या झटापटींत कृतवर्म्याचे घोडे व सारथि हे मारले गेल्यामुळें तो आपल्या रथावरून खालीं उतरला. हें पाहून दुर्योधन पुढें झाला व त्यानें एकट्यानेंच पांचाल, सोमक वगैरे सर्व पांडवसेनेला तोंड दिलें व न डगमगतां तीक्ष्ण बाण सोडण्याला सुरवात केली. दुर्योधनाचा मारा प्रलयकालच्या रुद्राच्या माऱ्याप्रमाणें दुःसह झाला. नंतर दुर्योधनानें सहदेवाचें धनुष्य तोडलें. लगेच सहदेव तें तुटकें धनुष्य टाकून दुसरें चांगलें बळटसें धनुष्य घेऊन दुर्योधनावर चालून गेला व त्याच्यावर त्यानें दहा बाण सोडले. नंतर नकुलानें नऊ, सात्यकीनें एक, द्रौपदीच्या मुलांनीं सत्तर, धर्मानें पांच, व भीमानें ऐंशी असा सर्वांनीं चोहोंकडून दुर्योधनावर बाणांचा मारा चालविला. तरीही तो मुळींच डगमगला नाहीं. त्या वेळचें त्याचें शौर्य, हस्तलाघव व सहनशीलता हें पाहून सर्वजण थक्क झाले. आपला राजा लढत आहे हें पाहून सर्व कौरवसैन्य, परतून पुन्हां युद्धाला उभें राहिलें. त्यावेळीं कौरवपांडवांचें बरेंच तुमुल युद्ध झालें. शिपाई इतके भांबावून गेले कीं त्यांना दिशा सुद्धां कळेनात. त्याच सपाट्यांत अश्वत्थाम्यानें भीमाला गांठलें. इतक्यांत शकुनीनें राजा धर्माला गांठून चार बाणांनीं त्याचे घोडे मारले. धर्माचा रथ निरुपयोगी झाला आहेसें पाहून सहदेवानें त्याला आपल्या रथांत घेतलें व भयंकर सिंहनाद केला. उलूकानें प्रतापी नकुलाला गांठलें. सात्यकीनें पुन्हां कृतवर्म्याला गांठलें.तेव्हां त्यांचें फारच निकराचें युद्ध झालें.दुर्योधनानें धृष्टद्युम्नाचें धनुष्य तोडून त्याच्यावर पुष्कळ बाण सोडले. धृष्टद्युम्नही दुसरें आयुध घेऊन त्याच्याशीं लढला. मनुष्य व इंद्रियें यांमधील युद्धाप्रमाणें गौतम व द्रौपदीपुत्र ह्यांचेंही युद्ध मोठ्या निकरानें चाललें होतें व इंद्रियें जशीं मूर्ख मनुष्यावर आपला पगडा बसवितात त्याप्रमाणें द्रौपदीच्या मुलांनींही त्या गौतमाला हाणून पाडलें. नंतर मनुष्यांनीं मनुष्यांना, घोड्यांनीं घोड्यांना, हत्तींनीं हत्तींना व रथदळानें रथदळाला असें एकमेकांनीं एकमेकांना गांठलें. त्यामुळें युद्धाची एकच गर्दी उडून राहिली. त्या रणभूमीवर एकापेक्षां एक भयंकर अशीं रणें माजून राहिलीं. रथांचें पळणें, घोडेस्वारांचें धांवणें, हत्तींचे सुस्कारे व योद्ध्यांची धडपड ह्यांनीं व वाऱ्याच्या सोसाट्यांनीं उठलेली धूळ आकाशापर्यंत इतकी दाट पसरली होती कीं, सूर्याचा प्रकाश सुद्धां पृथ्वीवर पोहोंचत नव्हता. परंतु थोड्याच वेळांत ती धूळ युद्धामध्यें पडलेल्यांच्या रक्तानें खालीं बसली. त्यामुळें व दोन प्रहरची वेळ होऊन चिलखतांवर सूर्यकिरणें पडल्यानें सर्व रणांगणावर लक्कन् प्रकाश पडला. दोन्ही पक्षांकडील योद्धे, खूप निकरानें लढले. ह्या चकमकींत धर्मराजानें कृतवर्म्याचे घोडे मारून त्याला पुन्हां विरथी केलें; तेव्हां अश्वत्थाम्यानें त्याला आपल्या रथांत घेऊन बाजूला काढलें, व दुर्योधनानें राजा धर्मावर सातशें रथी पाठविले, ह्या रथ्यांनीं झपाट्यानें जाऊन धर्माला गांठलें व त्याला आपल्या बाणांच्या वर्षावांनीं झांकून सोडलें. परंतु शिखंडीप्रमुख योद्ध्यांना हें सहन न होऊन ते उत्तम घोड्यांचें रथदळ बरोबर घेऊन धर्माच्या संरक्षणाकरितां धांवून आले. पांडवांनीं सातशें कौरव रथ्यांची कत्तल करून बाकीच्यांचीही कत्तल उडविण्याकरितां पांचालांना बरोबर घेऊन त्यांच्यावर चाल केली. त्या वेळीं युद्धाची भयंकर गर्दी उडाली. ह्याच वेळेस दारुण उत्पात होऊं लागले. इतक्यांत शकुनि कौरवांना ह्मणाला, ‘ तुह्मी पुढून ह्यांची कत्तल उडवा, मी मागें जाऊन ह्यांना कापून काढतों. ’ असें ह्मणून तो पांडवांच्या फौजेच्या पिछाडीवर चालून गेला व त्या फौजेमध्यें धुमाकूळ उडवूं लागला. त्याचे दहा हजार घोडेस्वार होते. त्यांच्या हातांत लांब विटा असून ते विटा सोडण्यांत पटाईत होते. युधिष्ठिरानें सैन्याच्या पिछाडीचें रक्षण करण्याकरितां रणशूर सहदेवाला आपल्या जवळील सर्व हत्ती, घोडे व तीन हजार पायदळ देऊन शकुनीवर पाठविलें. त्यानें जाऊन शकुनीच्या तुकडीचा बराच फडशा उडविला. त्यानें शकुनीचें सुमारें चार हजार घोडेस्वार कापून काढले. तेव्हां शकुनि आपल्या राहिलेल्या सहा हजार लोकांनिशीं रणांगणांतून निघून गेला. पांडवांकडेही सहा हजारच घोडेस्वार शिलक होते. शकुनि पुन्हां येणार नाहीं असें वाटून द्रौपदीचे मुलगे हत्तीदळाला बरो-

बर घेऊन धृष्टद्युम्नाला जाऊन मिळाले. व सहदेव एकटा सर्व रणांगणांत धूळ उठली असतांही राजा युधिष्ठिराकडे गेला. हे गेलेसें पाहून शकुनि पुन्हां धृष्टद्युम्नाच्या पथकाच्या मागल्या बाजूवर तुटून पडला. तेव्हां पुन्हां शकुनीचें व पांडवांचें रणकंदन माजलें. ह्या युद्धांत योद्धे आपल्या कुडींत प्राण असेतोंपर्यंत निकरानें लढले. एवढेंच नव्हे तर **धडें सुद्धां एका हातांत कापलेलें शीर त्याच्या शेंडीनें धरून व दुसऱ्या हातानें तलवार उगारून रणमैदानांत आवेशानें नाचूं लागलीं.** व कित्येक लोक तर रक्ताच्या वासानें डोकें फिरून गेल्यामुळें आपला व परका हा भेदाभेद मनांत न ठेवतां पुढें येईल त्याच्यावर आपल्या तलवारीचा वार करूं लागले.यावेळीं शूरांनीं हा माझा भाऊ,हा माझा मुलगा किंवा हा माझा मित्र इत्यादि विचार सोडून देऊन जो कोणी दंड थोपटून पुढें उभा राहिला त्या प्रत्येकाला आपल्या शस्त्राचें पाणी दाखविण्याला कमी केलें नाहीं. अगदीं थोडें सैन्य शिल्लक असतांही शकुनि न परततां धैर्यानें लढत आहे हें पाहून पांडवांनीं त्याला चोहोंकडून वेढून जर्जर करण्याकरितां नानाप्रकारच्या शस्त्रांचा प्रहार करण्याला सुरवात केली. शकुनीच्या लोकांनींही पुष्कळ शिकस्त केली. परंतु त्याचा कांहींएक उपयोग झाला नाहीं. त्याचें बहुतेक सारें सैन्य मेलें. फक्त सातशेंच घोडेस्वार शिल्लक राहिले. तेवढ्याच लोकांनिशीं परतून तो कौरवांच्या मुख्य सेनेमध्यें दुर्योधनाकडे गेला व आपण मोठी कामगिरी बजाविली आहेसें दाखवून रथ्यांना धैर्य येईल अशा रीतीनें दुर्योधनाला ह्मणाला, ‘ हे राजा, तूं युधिष्ठिराच्या सर्व रथ्यांचा फडशा पाड. थोडेंसें जिवावर उदार होऊन निकरानें लढलें म्हणजे त्याचा पराभव होणें कांहीं अशक्य नाहीं. मी तर त्याचे सर्व घोडेस्वार कापून काढले आहेत. एवढ्या रथदळाचा चुराडा उडाला म्हणजे हत्तीदळ व बाकीचें सैन्य ह्यांना आपण बोलबोलतां हाणून पाडूं. ’ हें ऐकून आपणाला जय मिळणार ह्या समजुतीनें हातांत धनुष्यें घेऊन कौरव वेगानें पांडवांवर धांवून गेले. त्यामुळें पुन्हां भयंकर सिंहगर्जना, धनुष्याच्या दोरीचा टणत्कार वगैरे सुरू होऊन उभयपक्षांकडील योद्ध्यांचीं शिरकमलें पटापट खालीं पडूं लागलीं. परंतु कौरवसेना आपणाला येऊन भिडली आहेसें पाहून अर्जुन श्रीकृष्णाला ह्मणाला, ‘ जलदीनें घोडे हांकून मला शत्रुसैन्यामध्यें ने. मला आज त्यांचा आपल्या तीक्ष्ण बाणांनीं समाचार घेऊं दे. युद्धाला प्रारंभ होऊन आज अठराच दिवस झाले. इतक्यांत पहा! यांची काय दशा उडाली आहे! युद्धाला आरंभ होण्याच्या पूर्वी ह्या धार्तराष्ट्राचें समुद्रप्राय सैन्य होतें. परंतु आतां मूठभरच शिल्लक राहिलें आहे. भीष्मांचा वध झाल्याबरोबर जर दुर्योधनानें तह केला असता तर फार चांगलें झालें असतें. भीष्मवधानंतर ह्यांनीं पुन्हां युद्धाला कां सुरवात केली समजत नाहीं. निदान द्रोणाचार्य व कर्ण हे मेल्यानंतर तरी हा स्वकीयांचा नाश बंद करावयाचा होता. परंतु तें सर्व एका बाजूला राहून विकर्ण, शल्य, शाल्व व दुसरे कित्येक अक्षौहिणीपति ह्यांचा फडशा पडला तरी अद्यापि हा मूर्ख लोभामुळें हा कसाईखाना अद्यापि बंद पाडीत नाहीं ह्याला ह्मणावें तरी काय? आपल्यापेक्षां गुणांनीं, बलानें, शौर्यानें फार काय सर्व गोष्टींनींही आपले शत्रू अधिक आहेत असें माहीत असून देखील कल्याणाकल्याणाकडे लक्ष न देतां कोणी तरी शहाणा माणूस लढेल काय? हे कृष्णा, पांडवांबरोबर सख्य करण्याबद्दलचा तुझाहि उपदेश ज्यानें मनावर घेतला नाहीं तो दुसऱ्याच्या सांगण्याला कितपत भीक घालणार? ज्यानें भीष्मद्रोण विदुर ह्यांसारख्या माहात्म्यांनाही बाजूला गुंडाळून ठेवलें, अशाजवळ कोणाची मात्रा चालणार? ज्यानें प्रत्यक्ष आपल्या बापाला व नेहमीं अपल्या मुलांचें हित इच्छिणाऱ्या आईलाही आपल्या दुर्भाषणांनीं दुखविलें त्या मूर्खाला काय ह्मणावें? सर्व कुळाचा अंत करण्याकरितांच हा उत्पन्न झाला आहे, दुसरें काय! आमच्या तोंडांत माती घालण्यासाठीं त्याची ही सर्व खटपट ! ह्या दुरात्म्याची ही नीच कृति पाहून मला त्या थोर विदुराच्या बोलण्याची खात्री पटली. ज्यानें जमदग्निपुत्राचें पथ्यकर व यथार्थ भाषणही तुच्छ केलें त्याचा नाशच झाला पाहिजे. ही स्वारी जन्माला आली तेव्हांच पुष्कळ साधूंनीं भाकीत केलें होतें कीं ह्या कुलांगाराच्या योगानें सर्व क्षत्रिय कुळांचा नायनाट उडेल. त्या सर्वांचें भविष्य अगदीं

खरें ठरलें. कारण पहा कीं ह्याच्याचकरितां कोट्यावधि क्षत्रिय मृत्युमुखीं पडले. व बाकीच्या सर्वांचा आज मी फडशा पाडून त्याच्या तळावर एकही मनुष्य उरूं देत नाहीं. हे कृष्णा, चल, घोडे लौकर हांक, दुर्योधनाच्या देखत त्याच्या सर्व सैन्याची कत्तल करूं व नंतर त्याला स्वर्ग दाखवून धर्मराजांना संतुष्ट करूं.

हें सव्यसाची अर्जुनाचें भाषण ऐकून भगवान् श्रीकृष्ण घोड्यांची दोरी हातांत घेऊन जलदीनें निर्भयपणें कौरवांच्या सेनावनांत शिरला. तें वन नाना प्रकारचीं शस्त्रें व बाण यांनीं फार भयंकर दिसत असून शक्तिरूपी कांटे त्यांत फार पसरले होते. रथ व हत्ती हेच वृक्ष बनले होते. घोडे व पायदळ हे वेलीसारखे चोहोंकडे पसरले होते. आणि त्या अरण्यामध्यें शिरण्याला गदा किंवा भाला ह्यांशिवाय दुसरा मार्गच नव्हता. अशा त्या भयंकर अरण्यांत शिरून अर्जुनानें बाणांचा खूप वर्षाव केला व दावानलाप्रमाणें सर्व सेनावन आपल्या बाणानलानें जाळून फस्त करूं लागला. त्यामुळें भिऊन जाऊन दुर्योधनाच्या देखत त्याची सेना पाठ दाखवून रणांगणांतून पळूं लागली. जे थेडे योद्धे लढण्याकरितां आले त्यांनीं धृष्टद्युम्नाच्या तुकडीवर हल्ला केला. त्यामुळें धृष्टद्युम्न, शिखंडी व शतानीक वगैरे पांडव व हें परतलेलें कौरवसैन्य ह्यांच्यामध्यें पुन्हां युद्ध सुरू झालें. कांहीं वेळ धृष्टद्युम्न व दुर्योधन ह्या दोघांमध्यें बरीच झटापट उडाली. पण शेवटीं धृष्टद्युम्नानें दुर्योधनाचा सारथी व घोडे ह्यांना यमलोकाची वाट दाखविली. तेव्हां आपलें बहुतेक सैन्य नाहींसें झालेलें पाहून दुर्योधन घोड्यावर बसून जवळच शकुनि होता तिकडे गेला. रथदळाचा पाडाव झाला होता ह्मणून तीन हजार हत्तीदळानें पांडवांना वेढा दिला. तेव्हां मेघानें व्यापिलेल्या पांच ग्रहांप्रमाणें ते पांच पांडव रणांगणांत शोभूं लागले.

नंतर अर्जुनानें आपल्या तीक्ष्ण बाणांनीं त्या हत्तीदळाचा फडशा पाडण्याला सुरवात केली. इतक्यांत भीमानें हातांत आपली प्रचंड गदा घेऊन रथावरुन खालीं उडी ठोकली, तेव्हां त्याला पाहून-च कौरवसेना मलमूत्र टाकूं लागली. भीमानें आपल्या गदेच्या तडाख्यानें पुष्कळ हत्तींचीं गंडस्थळें फोडलीं तेव्हां ते हत्ती चीं चीं करून इकडे तिकडे पळूं लागले व कित्येक तेथेंच धडपडून मरून पडले. युधिष्ठिर व नकुलसहदेव ह्यांनींही आपल्या तीक्ष्ण बाणांनीं पुष्कळांना यमलोकची वाट दाखविली. धृष्टद्युम्नानें दुर्योधनाचा पराभव करून त्याला पिटाळून लाविलें; व त्या हत्तीदळाचा नाश करण्याकरितां त्याजवर चाल केली. परंतु दुर्योधन जेव्हां सैन्यामध्यें दिसेना तेव्हां अश्वत्थामा, कृपाचार्य व कृतवर्मा यांस बहुतकरून तो मेला असावा असें वाटून ते त्याचा नीट तपास करूं लागले. तेव्हां कांहींजण ह्मणाले कीं सारथी मेल्यानंतर धृष्टद्युम्नाच्या अजिंक्य व शूर अशा सैन्याची वाट सोडून देऊन तो शकुनीकडे निघून गेला. पांडवांचा मार बसल्यामुळें चिडून गेलेले असे कांहीं सैनिक ह्मणूं लागले कीं, महाराजांशीं तुह्मांला काय करावयाचें आहे ? असतील जिवंत तर पडतील दृष्टीस. तुह्मी सर्व मिळून लढूं लागा. ह्या चालून आलेल्या सर्व सैन्याला कापून काढूं या. नाहीं तर हे पांडव आमच्या सर्व हत्तीदळाला मारून चालते होतील. हें ऐकूनही अश्वत्थामा, कृपाचार्य, कृतवर्मा, हे धृष्टद्युम्नाची फळी फोडून शकुनीकडे निघून गेले. तेव्हां कौरवांकडील लोकांचीं तोंडें अगदीं सुकून गेलीं व ते आपल्या जीविताबद्दल अगदीं निराश झाले. तेव्हां संजय स्वतः जिवाची आशा सोडून त्यांना जाऊन मिळाले व त्यांच्यासह जेथें शारद्वत होता त्या ठिकाणीं जाऊन आपल्या सैन्याची व्यवस्था लावून युद्धाला उभा राहिले. परंतु त्या ठिकाणीं ह्यांना धृष्टद्युम्नानें गांठून खूप मार दिला व त्यांना तेथून पळावयाला लाविलें. तेथून मुठींत जीव धरून ते कसेबसे पळत होते. इतक्यांत सात्यकीनें वाटेंतच त्यांना गांठलें. तेव्हां त्यांचें सात्यकीशीं बराच वेळ युद्ध झालें. परंतु शेवटीं सात्यकीनें त्यांचा पाडाव करून संजयाला जिवंत धरलें व भीमानें आपल्या गदेच्यायोगानें व अर्जुनानें आपल्या बाणांनीं बाकीच्या हत्तीदळाचा फडशा पाडून रणांगणांतून रथांत बसून जाण्याकरितां पैस बाट काढली.

भीम सर्व हत्तीदळाला मारून बाकीच्या सैन्या-चाही फडशा पाडीत आहे व राजा दुर्योधन तर येथें नाहीं असें पाहून जिवंत राहिलेले बाकीचे सारे कौरवबंधू एकवटून भीमावर चालून आले. तेव्हां भीम पुन्हां आपल्या रथावर बसला व त्यांच्यावर बाणांचा वर्षाव करूं लागला. परंतु ह्या माऱ्याला न डगमगतां धृतराष्ट्राच्या मुलांनीं जोरानें त्याच्यावर हल्ला केला. तेव्हां भीमाला राग येऊन त्यानें दुर्मर्षणाचें शीर धडापासून वेगळें केलें. तसेंच श्रुतांत व जयत्सेन ह्यांना अनुक्रमें भाला व बाण ह्यांच्या योगानें ठार केलें. नंतर श्रुतर्व्यानें रागावून भीमावर शंभर बाण सोडले. तेव्हां भीमालाही राग येऊन त्यानें जैत्र, भूरिबल व रपि ह्या तिघांवर सपाटून बाण सोडले. त्यामुळें ते गतप्राण होऊन रथावरून खालीं पडले. लगेच भीमानें दुर्विमोचन, दुष्प्रधर्ष, सुजात व दुर्विषह ह्यांनाही स्वर्गाची वाट दाखविली. एकट्या भीमानें आपल्या बऱ्याच भावांचा फडशा पाडला, हें सहन न होऊन श्रुतर्वा रागानें भीमावर चाल करून आला व त्यानें भीमाचें एका बाणांत धनुष्य तोडलें. भीमानेंही लगेच दुसरें धनुष्य घेऊन त्याच्यावर बाणांचा वर्षाव केला. तेव्हां ह्या दोघांचें युद्ध जंबासुर व इंद्र यांच्या युद्धाप्रमाणें फारच भयंकर झालें. इतक्यांत श्रुतर्व्यानें भीमाच्या छातींत एक बाण मारला. तो त्याला फार लागला. त्यामुळें **पर्वकाळच्या समुद्राप्रमाणें** खवळून त्यानें श्रुतर्व्याचा सारथी व चारी घोडे ह्यांना यमलोक दाखविला. तेव्हां श्रुतर्वा ढाल, तलवार घेऊन युद्धाला सिद्ध झाला; परंतु इतक्यांतच भीमानें एक रुंद फळाचा बाण मारून त्याचें डोकें तोडून खालीं पाडलें त्यामुळें त्याचें धडही धाडदिशीं जमिनीवर आलें. श्रुतर्व्याच्या मरणानें कौरवसेना वेडी बनून भीमावर तुटून पडली. तेव्हां तिला अंगावर घेऊन व तिजवर बाणांचा वर्षाव करून प्रतापी भीमानें पांचशें रथ, सातशें हत्तिदळ, एक लक्ष पायदळ, व आठशें घोडे इतकें सैन्य ठार केलें. कौरवांच्या शंभर भावांपैकीं दुर्योधन व सुदर्श असे दोघेच काय ते आतां शिल्लक राहिले होते. हे दोघे रिसाला बरोबर घेऊन व्यवस्थित रीतीनें युद्धाकरितां उभे होते. तेव्हां दुर्योधन रिसाल्यामध्यें उभा आहे हें पाहून श्रीकृष्ण अर्जुनाला ह्मणाला, 'आतां शत्रूंचा बहुतेक फडशा पडला आहे. संजयाला तर सात्यकीनें धरून नेलें आहे. इकडे दुर्योधनाला बाजूला करून कृपाचार्य, कृतवर्मा व अश्वत्थामा हे तिघे मोठ्या वीरश्रीनें उभे आहेत. श्रीमान धृष्टद्युम्न हा प्रभद्रकांना व दुर्योधनाच्या सैन्याला ठार करून येथें उभा आहे. ऐटीनें डोकीवर छत्र वगैरे धरून व आपली सेना व्यवस्थित रीतीनें लाऊन हा दुर्योधन वरचेवर तुजकडे पहात युद्धाकरितां उभा आहे. तर हे अर्जुना त्याला एकदां मारून कृतार्थ हो.' हें कृष्णाचें बोलणें ऐकून फाल्गुन त्याला ह्मणाला, 'धृतराष्ट्राच्या सगळ्या मुलांना भीमानें ठार केलेंच आहे. हे दोघे राहिले आहेत ह्यांचाही आज फडशा पडेल. कृष्णा, भीष्म, द्रोण, कर्ण, व शल्य इत्यादिकांचा तर फडशा पडलाच आहे. फक्त शकुनीचे पांचशें घोडे, दोनशें रथ, शंभर हत्ती इतकें सैन्य व अश्वत्थामा, कृपाचार्य, उलूक, शकुनि व कृतवर्मा वगैरे योद्धे एवढेच शिल्लक आहेत. ह्यांनाही काळाच्या दाढेंत पडल्याशिवाय परिणाम नाहीं. इतकें सैन्य मेलें तरी दुर्योधन अद्यापि जिवंत आहे ! असो, आज ह्यालाही मारल्यावर राजा युधिष्ठिराला शत्रु उरणार नाहीं. जो कोणी उन्मत्तपणानें मजपुढें युद्धाला उभा राहील त्याचा त्याचा फडशाच पाडतों. आज शकुनीला ठार करून राजा धृतराष्ट्राच्या जागरणाचें मूळ नाहींसें करतों. व शकुनीनें सभेमध्यें कपटानें आह्मांपासून जें काय उपटलें तें सर्व आज परत घेतों. पांडवांनीं आपल्या नवऱ्यांना व मुलांना ठार केलें हें ऐकून हस्तिनापुरांतील स्त्रिया आज ढळढळां आसू ढाळतील. हे माधवा, दुर्योधन जर आज युद्धांतून पळाला नाहीं तर तो आपल्या प्राणाला व राज्यलक्ष्मीला खचित मुकेल. व आज आमच्या सर्व कामाचा निकाल लागेल.'

हें धनंजयाचें भाषण ऐकून श्रीकृष्णानें दुर्योधनाच्या सैन्याकडे रथ हांकला. तेव्हां दुर्योधनाच्या सैन्याशीं टक्कर देण्याला भीमसेन, अर्जुन व सहदेव असे तिघे महारथी तयार होऊन दुर्योधनाला ठार करण्याकरितां त्याच्यावर चालून गेले. शत्रू आपल्यावर चालून आले असें पाहून, सुदर्शनें भीमाला, सुशर्मा व शकुनि यांनीं अर्जुनाला, व दुर्योध-

नानें घोड्यावर बसून सहदेवाला, याप्रमाणें तिघांला निरानिराळें गांठून कौरवांनीं युद्धाला तोंड दिलें. शत्रूंची गांठ पडल्याबरोबर दुर्योधनानें सहदेवाच्या डोक्यावर नेमका भाला मारला. तो त्याला बराच लागल्यामुळें मूर्छित होऊन रथांतच तो मटकन् बसला. त्याचें सर्व अंग रक्तानें भरून गेलें. कांहीं वेळानें शुद्धीवर येऊन, सापाप्रमाणें रागानें उष्ण श्वास टाकीत, दुर्योधनावर तीक्ष्ण बाण सोडून त्याला त्यानें सर्व बाजूंनीं अगदीं व्यापून टाकलें. इकडे अर्जुनानें युद्धामध्यें बराच पराक्रम करून पुष्कळ शूर स्वारांचीं डोकीं वरच्यावरच उडविलीं. व अशा रीतीनें सर्व घोडेस्वारांचा फडशा पाडून त्यानें त्रिगर्ताच्या रथदळावर हल्ला केला. त्रिगर्तांनींही एक जुटीनें कृष्णार्जुनांना आपल्या बाणांनीं चोहोंकडून घेरून सोडलें. परंतु अर्जुनानें त्याला न जुमानतां एक रुंद फळाचा बाण सोडून सत्यकर्मा याच्या रथाचें जूं तोडून टाकलें व लगेच दुसरा एक तसलाच तीक्ष्ण बाण सोडून त्याचें डोकें उडविलें. नंतर सर्वांच्या देखतच एखादा भुकेलेला सिंह ज्याप्रमाणें हरणावर झडप घालून त्याला झपाट्यासरशीं गट्ट करतों त्याप्रमाणें एका क्षणांत सत्येषु याला मारून सुशर्म्यावर तो चालून गेला. अर्जुनानें त्या प्रस्थलाधिपति सुशर्म्याचे आधीं रथ व घोडे ह्यांची कत्तल करून मग त्याच्यावरही एक यमदंडासारखा तीक्ष्ण व सरळ बाण सोडला. तो त्याच्या छातींत लागल्यामुळें सुशर्मा गतप्राण होऊन धाडदिशीं जमिनीवर पडला. त्याच्या मरणानें पांडवसेनेला फार आनंद झाला. नंतर लगेच अर्जुनानें त्याच्या पंचेचाळीस मुलांना आपल्या तीक्ष्ण बाणांनीं स्वर्ग दाखवून बाकी राहिलेल्या कौरवसेनेची कत्तल करण्याकरितां तिच्यावर चाल केली. त्याचप्रमाणें भीमानेंही सुदर्शन नांवाच्या धृतराष्ट्राच्या मुलाला बाणांच्या वर्षावानें झांकून टाकला; व शेवटीं एक रुंद फळाचा तीक्ष्णसा बाण सोडून त्याचें मुंडकें उडविलें. आपला नेता भीमानें ठार केला हें पाहून त्याची सेना रागानें भीमावर धांवून आली. परंतु भीमानें तितक्याही सेनेला सुदर्शनाच्या भेटीला लावून दिलें. सर्व सैन्याचा फडशा पडला हें पाहून बडे बडे रथी भीमावर रागानें तुटून पडले. तेव्हां पांडवांचें व कौरवांचें युद्ध फारच भयंकर झालें. सर्व रणभूमि, घोडे, त्यावरील स्वार, नाना प्रकारचीं शस्त्रास्त्रें व भूषणें ह्यांनीं भरून गेली. आवेशांत मेलेल्या योद्ध्यांचीं धडें नाचत होतीं व सर्व भूमि घार, गिधाड वगैरे हिंस्रक प्राण्यांनीं भरल्यामुळें फारच भेसूर दिसूं लागली. अशा रीतीनें पांडव राहिलेल्या कौरवांची मजेंत कत्तल करीत असल्यामुळें, युद्धाची एकच गर्दी माजून राहिली होती. इतक्यांत शकुनीनें सहदेवाच्या डोकींत भाला मारला. त्यामुळें तो विव्हळ होऊन रथांतच मटकन् बसला. सहदेवाची अशी स्थिति झालेली पाहून भीमानें सर्व कौरवसैन्याची कत्तल करण्याचा सपाटा चालविला, व मध्येंच त्यानें गंभीर सिंहगर्जना केली. त्यामुळें हत्ती, घोडे व शकुनीचे शिपाई घाबरून पळूं लागले. दुर्योधनानें त्यांना परतविलें. इतक्यांत सहदेवही सावध झाला व त्यानें शकुनीचे घोडे व धनुष्य तोडून टाकून त्याचाही थोडासा समाचार घेतला. लगेच शकुनीनें दुसरें धनुष्य घेऊन नकुल व भीम ह्या दोघांवरही बाण सोडले. उलूकही आपल्या बापाला सोडविण्याकरितां भीम व सहदेव ह्यांच्यावर बाण सोडूं लागला. परंतु शेवटीं सहदेवानें उलूकाचा बळी घेतला. मुलाच्या मरण्यानें शकुनीला फार दुःख झालें. त्याच्या डोळ्यांतून अश्रुधारा वाहूं लागल्या. गळा दाटून आला व मोठ्यानें सुस्कारा टाकून विदुराच्या सांगण्याची आठवण झाल्यामुळें तो त्याचा विचार करूं लागला. कांहीं वेळ विचार करून त्यानें सहदेवावर धांवून जाऊन तीक्ष्ण असे तीन बाण सोडले. सहदेवानें ह्या बाणांचे आपल्या बाणानें मधल्यामध्येंच तुकडे करून शकुनीचें धनुष्य पुन्हां तोडलें. शकुनीनें त्याच्यावर तलवार फेंकली; परंतु तिचेही त्या बहादरानें दोन तुकडे केले. तलवारीचीही जेव्हां तीच गति झाली तेव्हां शकुनीनें आपल्या शत्रूवर एक जंगी गदा फेंकली. परंतु तिचा नेम चुकून ती मध्येंच जमिनीवर पडली. गदाही विफल झाली हें पाहून शकुनीनें त्याच्यावर भयंकर शक्ति सोडली. पण तिचेही रणशूर सहदेवानें तीन तुकडे केले. शक्तीचा नाश झाला व शकुनीही घाबरला हें पाहून कौरवांची तर पांचावरच

धारण बसली, ते भयानें वाट फुटेल तिकडे पळूं लागले. शेवटीं सहदेवानें शकुनीला गांठला व त्याला पूर्वीच्या गोष्टीची आठवण करून देण्याकरितां ह्मणाला, ' क्षत्रियधर्माप्रमाणें पुढें उभा राहून युद्ध कर. अरे नीचा! सभेमध्यें फांशांनीं जुगार खेळून आमच्यापासून जें कांहीं उपटलेंस त्याचें हें फळ आज भोग. जे जे ह्मणून आह्मांला हांसले त्या सर्वांचा पार फडशा उडाला आहे. फक्त कुलांगार दुर्योधन आणि त्याचे मामा आपण असे दोघेच काय ते उरलां आहां. काठीच्या तडाक्यानें झाडावरून फळ जसें अलग खालीं पाडतात त्याप्रमाणें तुझें डोकें वरच्यावरच उडवितों पहा. असें बोलून सहदेव रागानें शकुनीवर धांवून गेला, व आकर्ण दोरी ओढून त्याच्यावर त्यानें दहा बाण सोडले. तसेंच चार बाणांत त्याचे घोडे, छत्र, ध्वज व धनुष्य इतक्यांचा फडशा पाडला. तेव्हां शकुनि रागावून सहदेवाला मारण्याकरितां भाला घेऊन आवेशानें हात वर करून त्याच्यावर धांवून आला. परंतु माद्रीसुतानें चलाखीनें रुंद फळाचे तीन तीक्ष्ण बाण सोडून त्याचे हात व भाला ह्यांना मधल्यामध्येंच उडविलें. नंतर लगेच मोठ्यानें डरकाळी फोडून त्यानें दुसरा एक रुंद तोंडाचा बाण घेतला व तो नेमका आपल्या शत्रूच्या मानेवर सोडून त्याचें डोकें छाटून खालीं पाडलें. ह्याप्रमाणें कौरवांच्या दुर्बुद्धीचा गड्डा सहदेवानें अजीबात उपटून काढला. रक्तबंबाळ झालेलें शकुनीचें धड जमिनीवर लोळत पडलेलें पाहून कौरवांकडील योद्धे गर्भगळित होऊन हातांत शस्त्र असूनही दाही दिशा पळूं लागले. त्यांचीं तोंडें अगदीं सुकून गेलीं. युद्धांत शकुनि पडल्यामुळें सर्व पांडव व कृष्ण ह्यांनीं आनंदानें शंखनाद केला. सर्व योद्ध्यांनीं सहदेवाकडे येऊन कपटी, व विश्वासघातकी असा शकुनि व त्याचा मुलगा उलूक ह्या दोघांनाही ठार केल्याबद्दल आनंद दाखवून त्याचा जयजयकार केला.

## ५७ दुर्योधनाचें डोहांत लपून बसणें.
## ( ९. २७ )

युद्धामध्यें आपला राजा मेला हें पाहून शकुनीच्या सैनिकांनीं आपल्या जिवाची पर्वा सोडून पांडवांवर चाल केली. सहदेवाचा प्राण घेण्याकरितां सज्ज होऊन आलेल्या सैन्याचा सहदेव, अर्जुन व भीम ह्यांनीं फडशा पाडला. भीमार्जुनाच्या तडाक्यांनीं घोडे व त्यांवरील स्वार हे मरून पटापट जमिनीवर पडले. दुर्योधन आपल्या सैन्याची ही दुःस्थिति पाहून शिल्लक राहिलेलें रथदळ, रिसाला, हत्तींदळ व पायदळ ह्यांना एकेठिकाणीं जमवून ह्मणाला कीं, 'तुह्मीं सर्वजण मिळून एकदम पांडवांवर तुटून पडा, व त्यांची त्यांच्या स्नेह्यांसह कत्तल करून झटदिशीं रणांगणांतून परतून बाजूला व्हा.' त्या वीरांनीं हें दुर्योधनाचें वाक्य शिरसामान्य करून पांडवांवर चाल केली. भीष्मद्रोणांसारखे सर्व शूर सेनापति नष्ट झाल्यामुळें त्याचें रक्षण करण्याला कोणीही उरला नसल्यानें ह्या सैन्याचा पांडवांनीं एका क्षणांत फडशा उडवून दिला. कौरवांना पांडवांच्या असह्य माऱ्यामुळें त्यांपुढें उभें सुद्धां राहवेना. त्यामुळें ते इकडे तिकडे धांवूं लागले. त्यांच्या पळण्यानें व युद्धाच्या गर्दीनें धूळ उडून कांहींच दिसेनासें झालें. तरीही पांडवांकडील योद्ध्यांनीं त्यांचा पाठलाग करून त्यांचा समूळ नाश करून टाकला.

ह्याप्रमाणें पांडववीरांनीं अकरा अक्षौहिणी सेनेची कत्तल केली. हजारों राजांना स्वर्गलोकीं पाठविलें. एकटा दुर्योधनच कायतो उरला. आपलें सर्व सैन्य नष्ट झालें. हें पाहून दुर्योधनाला सर्व पृथ्वी अगदीं शून्य भासूं लागली. व इकडे पांडव यश आल्यामुळें आनंदाच्या आरोळ्या देत आहेत व धनुष्याची प्रत्यंचा उडवीत आहेत हें पाहून तर त्याला फारच वाईट वाटलें. व कोठें तरी पळून जावें असा विचार त्याच्या मनांत आला.

ह्या वेळीं पांडवांकडे दोन हजार रथ, सातशें हत्ती, पांच हजार घोडे व दहा हजार पायदळ इतकें सैन्य शिल्लक होतें. एवढें सैन्य व्यवस्थित रीतीनें उभें करून धृष्टद्युम्न युद्धाला तयार झाला होता. इकडे दुर्योधनानें आपल्या मेलेल्या घोड्याला टाकून हातांत गदा घेऊन भयानें पूर्वेकडे पळ काढला. पहा. अकरा अक्षौहिणी ज्याचें सैन्य, व जो स्वतः पृथ्वीपति, तो आतां आपले प्राण वांचविण्याकरितां एकटाच पायानें धांवत आहे! काय ही दैवाची वि-

चित्र गति! चार पावलें गेला नाहीं तोंच त्याला विदुराच्या शब्दांची आठवण झाली. सर्व क्षत्रियांचा ह्या युद्धामध्यें फडशा पडणार हें महात्म्या विदुरानें पूर्वींच भाकित केलें होतें. अशा रीतीनें विचार करीत आपल्या सर्व सैन्याचा क्षय झाला हें पाहून दुःखित अंतःकरणानें दुर्योधन डोहांत शिरण्याकरितां चालला. इकडे पांडवांनीं सर्व रथी, महारथी, राजे व महाराजे ह्या सर्वांचा फडशा पाडला. फक्त अश्वत्थामा, कृपाचार्य, कृतवर्मा व दुर्योधन एवढेच वीर कायते जिवंत होते. सात्यकीनें संजयाला पूर्वींच पकडून आणलें होतें. त्याला पाहून धृष्टद्युम्न हांसत हांसत सात्यकीला ह्मणाला, 'ह्याला उगीच पकडून कशाला आणलेंस? झालें तें झालें, आतां ह्याला जिवंत ठेवून तरी काय उपयोग?' हें ऐकून संजयाला मारण्याकरितां सात्यकीनें तलवार उगारली. इतक्यांत व्यासांनीं तेथें येऊन त्याला तसें न करण्याबद्दल सांगितलें. तेव्हां सात्यकीनें हात जोडून संजयाला सोडून दिलें. ह्याप्रमाणें सात्यकीकडून परवानगी मिळाल्यावर संजय आपलें चिलखत व शस्त्रें हीं तेथेंच ठेवून रक्तानें भरलेल्या शरीरानेंच संध्याकाळीं नगराकडे निघाला. तो सुमारें एक कोसभर गेल्यानंतर त्याला गदा हातांत घेतलेला व सर्वांगावर वार लागलेला असा एकटाच दुर्योधन भेटला. दुर्योधनाचे डोळे दुःखानें भरून आल्यामुळें संजय त्याला दिसेना. कांहीं वेळानंतर दुर्योधनानें त्याला पाहिलें. परंतु संजयाला त्याची ती दुःखद स्थिति पाहून कांहींच बोलवेना. नंतर संजयानें त्याला सात्यकीच्या कचाट्यांत सांपडल्यापासून व्यासाच्या कृपेनें सुटका होईतोंपर्यंतची आपली सर्व हकीकत सांगितली. दुर्योधन शुद्धीवर आल्यानंतर क्षणभर विचार केल्यासारखें करून संजयाला आपल्या भावांची व सर्व सैन्याची वगैरे हकीकत विचारूं लागला. संजयानें हें सर्व प्रत्यक्ष पाहिलेंच होतें. ह्मणून त्यानें सर्वांचा नाश झाला व व्यासांच्या सांगण्यावरून तुझ्या लोकांपैकीं फक्त तीनच रथी जिवंत आहेत, असें दुर्योधनाला सांगितलें. हें ऐकून दुर्योधनानें दुःखाचा एक मोठा सुस्कारा टाकला व संजयाकडे पुन्हां पुन्हां पहात त्याला त्याच्या अंगावरून हात फिरवून ह्मणाला कीं, 'तुझ्यावांचून दुसरा कोणीही ह्या युद्धांतून जिवंत पार पडला नाहीं. त्यामुळें मला आतां तुझ्यावांचून कोणी नाहीं. पांडवांचे तर पुष्कळ स्नेही आहेत. आतां तूं ताताना जाऊन सांग कीं, आपला मुलगा दुर्योधन हा डोहामध्यें शिरला आहे. मोठमोठे स्नेही, मुलगे व भाऊ यांचा नाश करून पांडवांनीं राज्य घेतल्यावर सुद्धां प्राणाच्या आशेनें जगणारा माझ्यासारखा मूर्ख कोणी तरी असेल काय? ह्या घोर युद्धांतून जिवंत पार पडून डोहामध्यें लपून बसलों आहें.' इतकें बोलून तो डोहांत शिरला; नंतर आपल्या स्तंभनी विद्येच्या सामर्थ्यानें सर्व पाणी शांत केलें. दुर्योधन डोहांत शिरल्यावर संजय एकटा उभा असतांना त्याला ज्यांच्या सर्वांगाला वार लागले आहेत, व ज्यांचे घोडे दमून गेले आहेत असे कृपाचार्य, अश्वत्थामा व कृतवर्मा हे तिघे रथी तेथें येत असलेले दिसले. संजयाला पाहून त्यांनीं घोडे जलदीनें हांकले व जवळ जाऊन तो जिवंत सुटल्याबद्दल आनंद दाखवून दुर्योधन कोठें आहे ह्मणून विचारलें. नंतर संजयानें त्यांना दुर्योधनाची सर्व हकीकत सांगितली व तो ज्या डोहांत शिरला होता तो डोहही दाखवून दिला. अश्वत्थामा हें ऐकून व तो डोह फार मोठा आहे हें पाहून बराच वेळ दीनवाणें शोक करीत बसला. इतक्यांत पांडव आलेसें पाहून संजयाला कृपाचार्यांच्या रथांत बसवून तिघांही रथ्यांनीं कौरवांच्या गोटाकडे पळ काढला. त्या ठिकाणीं जखमी झालेल्या अशा कांहीं सैन्याच्या तुकड्या होत्या; त्यांनींही धृतराष्ट्रपुत्रांच्या मरणाची वार्ता ऐकून फार शोक केला. नंतर मागें बायकांना संभाळण्याकरितां ह्मणून जे ह्मातारे राहिले होते तें सर्व राजस्त्रियांना घेऊन संध्याकाळीं हस्तिनापुराकडे निघून गेले. धृतराष्ट्राचे सर्व मुलगे धारातीर्थीं पडले हें ऐकून बायकांनीं तर अगदीं आकांत करून सोडला. त्यांनीं केस तोडले, हातपाय हापटले, ऊर बडवून घेऊन कुररीप्रमाणें मोठ्यानें रडून सर्व भूमि दणाणून सोडली. अमात्य व भालदार वगैरे मंडळीही मौल्यवान वस्तु व आपापल्या बायका घेऊन खेंचरांच्या गाड्यांतून नगराकडे निघून गेली. ज्यांना आजपर्यंत ऊन्हसुद्धां माहीत नव्हतें अशा सुकुमार राजपेशीत-

त्या स्त्रिया ज्यांचे त्राते नाहींसे झाल्यामुळें भयानें सर्वांच्या देखत पायानेंच पळूं लागल्या. लहानांपासून थोरांपर्यंत सर्वजण भीमाच्या भयानें गांवाकडे पळूं लागले.

अशी स्थिति झाली असतांना युयुत्सु आतां काय करावें ह्मणून आपल्यापाशींच विचार करूं लागला. अकरा अक्षौहिणी सैन्य ज्याच्या ताब्यांत त्या दुर्योधनाची ही स्थिति! त्याचे सर्व भाऊ ठार झाले. भीष्मद्रोणांसारख्या योद्ध्यांनीं धारातीर्थीं देह ठेवला. राहिलों काय तो एकटा मीच. सर्वजण भिऊन दुःखानें पळूं लागले आहेत. अशा वेळीं धर्मभीमाच्या आज्ञेनें सर्वांना बरोबर घेऊन नगरांत प्रवेश करावा हेंच मला बरें दिसतें. असा विचार करून त्यानें त्यांच्याकडे जाऊन सर्व हकीकत सांगितली. तेव्हां राजा युधिष्ठिरानें संतुष्ट होऊन त्याला आलिंगन देऊन तसें करण्याबद्दल सांगितलें. धर्मराज सर्वांशींच नेहमीं कनवाळू. नंतर युयुत्सु सर्वांना घेऊन नगरांत गेला. तेव्हां सूर्य अस्ताला चालला होता. नगरांत गेल्यावर त्याची व विदुराची गांठ पडली. तेव्हां दोघांचेही डोळे पाण्यानें भरून आले व दुःखानें गळा दाटून आला. नंतर विदुर त्याला ह्मणाले, 'ह्या भयंकर रणकंदनांतून तूं जिवंत सुटलास ही मोठी आनंदाची गोष्ट आहे. बरें, दुर्योधनाशिवाय तूं एकटाच कसा आलास?' असें विदुरांनीं विचारल्यावरून त्यानें शकुनीसकट सर्वांचा नाश झाल्यामुळें राजा दुर्योधन डोहांत गेला व आपण सर्वजण युधिष्ठिराच्या आज्ञेनें नगरांत आलों, येथपर्यंतची सर्व हकीकत त्याला सांगितली. हें ऐकून विदुर त्याला म्हणाले, 'ह्या वेळीं योग्य तेंच तूं केलेंच. अदूरदर्शी, लोभी व दुर्दैवी राजाला तूंच एकटा उरलास. त्या आंधळ्याची काठी आतां तूंच आहेस. आजचा दिवस येथेंच विश्रांति घेऊन उद्यां राजा युधिष्ठिराकडे जा.

# शल्यपर्वांतर्गत गदापर्व.

## ५८. भीम व दुर्योधन यांच्या युद्धाला प्रारंभ. (९. ३०–३३.)

दुर्योधन डोहांत शिरल्यानंतर पांडवांनीं त्याचा पुष्कळ शोध केला, परंतु तो त्यांना मुळींच सांपडला नाहीं. नंतर पांडवांनीं सर्व घोडे दमून गेल्यामुळें विश्रांति घेण्याकरितां सैन्यासह आपल्या गोटाकडे मोर्चा वळविला. पांडव आपल्या तळावर जाऊन स्वस्थ बसले असें पाहून कृपाचार्य, कृतवर्मा व अश्वत्थामा हे तिघे रथी दुर्योधन ज्या डोहांत शिरला होता त्या डोहाजवळ हळूच जाऊन, दुर्योधन आंत असतांनाच त्याला ह्मणाले कीं, 'हे राजा दुर्योधना, ऊठ. आह्मांला बरोबर घेऊन पांडवांबरोबर लढ. त्यांना जिंकून पृथ्वीचे राज्याच्या उपभोग घे. नाहींतर धारातीर्थीं देह ठेवून स्वर्गसुख तरी घे. शत्रूंकडील बहुतेक सैन्य तूं मारलेंच आहेस. आतां जें थोडें उरलें आहे तेंही सर्वांगावर वार लागल्यामुळें अगदीं निःशक्त झालें आहे. आह्मी तुझ्या पाठीवर आहोंत.' ह्यावर दुर्योधन ह्मणाला, 'पांडवकौरवांच्या भयंकर रणकंदनांतून तुह्मी जिवंत सुटला ही मोठ्या आनंदाची गोष्ट आहे. थोडासा विसावा मिळाला ह्मणजे आह्मी खात्रीनें त्यांना जिंकूं: परंतु आतां तुह्मीही दमलेले आहां व मलाही पुष्कळ वार लागले आहेत. शिवाय त्यांचें सैन्य नुकतेंच मिळालेल्या जयानें उमेदींत आहे. त्यामुळें यावेळीं युद्ध करणें मला बरोबर दिसत नाहीं. तुमची शक्ति मोठी आहे व माझ्या ठिकाणीं तुमची भक्ति आहे. ह्यामुळें तुह्मी मला युद्धाला उत्तेजन देतां हें ठीकच आहे. परंतु ही लढण्याची वेळ नव्हे. आजची रात्र विश्रांति घेऊन उद्यां निःसंशय शत्रूशीं

लढूं. ' हें ऐकून अश्वत्थामा ह्मणाला, ' हे वीरश्रेष्ठा, ऊठ तुझें कल्याण होईल. आपणाला आज जय मिळणार. एवढेंच नव्हें तर मी आजपर्यंत मिळविलेल्या जयाची, खरें बोलून व दुःखी लोकांच्या इच्छा पूर्ण करून मिळविलेल्या पुण्याची शपथ घेऊन सांगतों कीं, आज रात्रीच्या रात्रीं सोमकांना मी ठार करणार. जर मीं आज पांचलांना स्वर्ग दाखविला नाहीं तर पुनः अंगावर चिलखत चढविणार नाहीं. हें सत्य सांगतों. म्हणून हे राजा, तूं माझें ऐक.'

हा असें बोलतो आहे इतक्यांत कांहीं पारधी डोकींवर मांसाचीं ओझीं घेतल्यामुळें आलेल्या थकव्यानें तहान लागली होती ह्मणून पाणी पिण्याकरितां सहजगत्या त्या डोहाकडे आले. हे पारधी भीमाला रोज मांस नेऊन देत असत. ह्यांनीं गुप्तरीतीनें दुर्योधन व अश्वत्थामादि वीर ह्यांच्यामध्यें चाललेलें भाषण ऐकून दुर्योधन पाण्यांत दडला आहे हें ताडलें. धनलोभानें त्यांनीं पांडवांकडे जाऊन ही सर्व हकीकत सांगितली. ही बातमी कळल्यामुळें पांडवसेनेमध्यें जिकडे तिकडे ' दुर्योधन सांपडला, दुर्योधन सांपडला, ' असा एकच शब्द उठला. नंतर सर्व पांडववीर श्रीकृष्णाला बरोबर घेऊन वेगानें त्या डोहाकडे निघाले. ह्या वीरांच्या रथांचा घडघडाट, शंखांचा आवाज व धनुष्यांचा टणत्कार हीं ऐकून कृतवर्मादि महारथी दुर्योधनाचा निरोप घेऊन दूर एका वडाच्या झाडाखालीं जाऊन उभे राहिले व पुढें काय होईल ह्याबद्दल विचार करूं लागले.

इकडे युधिष्ठिर आपल्या लोकांनिशीं त्या द्वैपायन नांवाच्या डोहाकडे येऊन श्रीकृष्णाला ह्मणाला, ' वासुदेवा, हें पाहिलेंस कां, दुर्योधन आपल्या स्तंभनी विद्येच्या प्रभावानें सर्व पाणी शांत करून डोहांत कसा दडून बसला आहे तो ? प्रत्यक्ष इंद्र ह्याच्या रक्षणाला आला तरी आतां याचा बचाव होणें कठीण आहे. ' हें ऐकून भगवान् वासुदेव ह्मणाला, ' **शत्रू जर कुटिल असेल तर आपणही त्याच्याशीं कुटिलच झालें पाहिजे.** ह्मणून हे भरतश्रेष्ठा, तूंही आपल्या मायेनेंच ह्याच्या मायेचा नाश कर. इंद्रानें वृत्रासुर वगैरे आजपर्यंत जे दैत्य मारले ते सर्व मायेनेंच मारले व मींही रामावतारीं रावणाला व वामनावतारीं बलीला जें मारलें तेंही जशास तसें ह्या न्यायानेंच मारलें. इंद्राला जें स्वर्गाचें राज्य मिळालें तें झालें तरी त्यानें ' जशास तसें ' हा कित्ता गिरविला ह्मणूनच मिळालें. म्हणून तुला सांगतों कीं, **जशास तसें वागल्याशिवाय ह्या जगांत कांहींच व्हावयाचें नाहीं** ' हें वासुदेवाचें भाषण ऐकून राजा धर्म दुर्योधनाला वरूनच म्हणाला, ' दुर्योधना, तूं हें काय आरंभिलें आहेस? सर्व क्षत्रियकुळांचा व आपल्याही कुळाचा नाश करून आतां आपले प्राण वांचविण्याकरितां पाण्यांत लपून बसला आहेस ! हे राजा सुयोधना, ऊठ. आमच्याशीं युद्ध कर. अरे, तूं एवढा मानी स्वभावाचा असून आतां भिऊन पाण्यांत कसा लपून बसलास ? तुझा तो अभिमान कोठें गेला ? राजा, तूं अस्सल क्षत्रिय आहेस. कौरवकुळांत तुझा जन्म आहे, हें लक्षांत आण. असा भितोस का ? युद्धामध्यें पाठ दाखविणें ह्मणजे नरकाचें साधन करणें आहे. हा क्षत्रियांचा धर्म नव्हे. हे तुझे वडील, आजे, भाऊ, मुलगे, मामे व मित्र ह्या सर्वांना मारवून आतां आपला तेवढा प्राण वांचवावयाला पहातोस अं ! आजपर्यंत ' मी शूर, मी शूर' म्हणून बढाई मारीत होतास ती उगीचच? शूर कधींही शत्रूला भिऊन पळत नाहींत. तर तूं आतां ऊठ. आह्मां सर्वांना ठार करून ह्या सर्व पृथ्वीचें राज्य कर. नाहीं तर आपला स्वतःचा देह धारातीर्थीं ठेवून स्वर्गसुख मिळीव. ' हें ऐकून दुर्योधन पाण्यांतूनच ह्मणाला, ' जिवंत प्राण्याला भीति वाटावी ह्यांत कांहीं आश्चर्य नाहीं. परंतु मीं कांहीं आपल्या प्राणाच्या भीतीनें पळ काढला नाहीं. माझ्या रथाचा चुराडा झाला, सारथी मेला, माझ्याजवळ बाण नाहीं व दुसरें कोणी माझ्या मदतीला नाहीं, ह्मणून थोडासा विसावा घ्यावा ह्या हेतूनें मी पाण्यांत बुडून बसलों आहें. हे युधिष्ठिरा, थोडासा दम खा. तुझ्या सैनिकांनाही थोडासा दम धरण्याला सांग. मी उठून तुम्हां सर्वांचा समाचार घेतों. ज्यांच्याकरितां मी राज्याची इच्छा करीत होतों ते हे माझे सर्व भाऊ युद्धांत कामास आले. जिच्यांतील सर्व क्षत्रिय नाहींसे झाले आहेत अशा ह्या पृथ्वीचा विधवेप्रमाणें उपभोग घेणें मला आव-

डत नाहीं. तरीही पांचाल व पांडव ह्यांना जर्जर करून तुला जिंकण्याचें माझ्या मनांत आहे. युद्धापासून आतां दुसरा कांहीं फायदा नाहीं. राजा, ह्या पृथ्वीचें राज्य तुलाच असो. अंगावर कांतडें पांघरून मी आतां अरण्यांत जाणार? माझे सर्व लोक नाहींसे झाल्यामुळें राज्य करण्याची माझी मुळींच इच्छा नाहीं. ह्या निर्वीर पृथ्वीचें राज्य तूंच कर.'

हें दुर्योधनाचें भाषण ऐकून युधिष्ठिर ह्मणाला 'बाबा, असा वैतागून जाऊं नकोस. हे सुयोधना, तूं जरी ह्या पृथ्वीचें दान करण्याला तयार झालास तरी तुझ्याकडून दान घेऊन राज्य करण्याची माझी मुळींच इच्छा नाहीं. कारण कीं हात पसरून दान घेणें हा कांहीं क्षत्रियाचा धर्म नव्हे. पण तुला जिंकून ह्या पृथ्वीचें राज्य मी करणार. बरें, ह्या पृथ्वीचें दान करण्याला तूं कोण? तूं आतां राजा आहेस काय? आणि तुझ्या मनांत जर यावयाचीच होती तर जेव्हां आह्मी आपल्या कुलाचा नाश होऊं नये ह्मणून तुझ्याकडे गरीबीनें मागण्याकरितां आलों होतों तेव्हां कां नाहीं दिलीस? तेव्हां श्रीकृष्णाच्या सांगण्याचा सुद्धां तूं अवमान केलास. पूर्वी तूं आह्मांला सुईच्या टोंकाएवढीही जमीन देण्याला तयार नव्हतास तो तूं आज सर्व पृथ्वी द्यायला कसा तयार झालास? अरे मूढा, तुला हें कसें समजत नाहीं कीं, सर्व पृथ्वी दिली तरी तूं आपल्या प्राणाला हा मुकणारच. कारण आह्मी दोघेही जिवंत राहिलों तर जय कोणाला मिळाला ह्याचा बरोबर निर्णय होणार नाहीं. व सगळ्या जगाला त्याचा संशय पडेल. तुझा प्राण माझ्या हातांत आहे. मलाच वाटलें तर मी तुला जिवंत सोडीन. पण तुझ्या च्यानें कांहीं आपला प्राण वांचवणार नाहीं. तूं मागें आह्मांला जाळण्याचा प्रयत्न केलास, विष पाजण्याची व आह्मांला पाण्यामध्यें बुडविण्याची खटपट केलीस; आमच्या राज्याचा अपहार केलास; वाटेल तें वाईट वाईट बोललास; शिवाय साध्वी द्रौपदीची भर सभेंत विटंबना केलीस. पाप्या हें सर्व पहातां तुला ठारच केला पाहिजे. तर ऊठ, ऊठ, लढाईला उभा रहा.'

याप्रमाणें पांडवांनीं केलेली निर्भर्त्सना ऐकून दुर्योधनानें एक मोठा सुस्कारा टाकला व युद्धाचा निश्चय करून हातवारे करीत पाण्यांतून ह्मणाला कीं, 'हे पार्थांनो, तुह्मांला रथ आहेत, घोडे आहेत व तुमच्या मदतीला मोठमोठे शूर स्नेही आहेत. मी एकटा, शस्त्रहीन असून वाहन नसल्यानें पायानेंच मला युद्ध करावें लागणार. तेव्हां तुह्मी एकएकटे तरी येऊन माझ्याशीं लढा. पुष्कळांनीं मिळून एकट्याशींच लढणें कांहीं धर्म नव्हे. तशांत विशेषेंकरून ज्याला चिलखत नाहीं, जो शस्त्रहीन व दमलेला असून ज्याच्या सर्व अंगावर वार लागले आहेत त्याच्याशी सर्वांनीं एकदम लढणें तर फारच अन्यायाचें आहे. हे राजा, मी तुला भीत नाहीं, तुझ्या भीमाला भीत नाहीं, अर्जुनाला भीत नाहीं, श्रीकृष्णाला भीत नाहीं, किंवा नकुल, सहदेव, पांचाल व सात्यकि यांनाही भीत नाहीं. मी रागावलों ह्मणजे सर्वांना एकटाच पुरे आहे. मनुष्याच्या कीर्तीला कारण धर्म आहे. मी धर्माचें व आपल्या कीर्तीचें रक्षण करण्याकरितां असें बोलतों. हे पांडवांनो, थोडासा दम धरा. मी आतां उठून सूर्य ज्याप्रमाणें रात्र संपतांक्षणींच आपल्या तेजानें सर्व नक्षत्रांना निस्तेज करून सोडतो त्याप्रमाणें तुह्मां सर्वांचा पराभव करून तुमचीं तोंडें फिक्कीं पाडतों. तुह्मा सर्वांचा फडशा पाडून मी आज भीष्म, द्रोण, कर्ण वगैरे शूर पुरुषांच्या, माझ्या मुलांच्या, शकुनि वगैरे आप्तांच्या व प्रतापी बांधवांच्या ऋणांतून मुक्त होतों. युधिष्ठिर ह्मणाला, 'हे सुयोधना, तूं क्षत्रियधर्म पूर्णपणें जाणतोस. परंतु तुह्मी सर्व अतिरथी, महारथी, धर्मज्ञ यांनीं मिळून एकट्या अभिमन्यूला मारला त्या वेळीं तुमचा धर्म कोठें गेला होता. मनुष्य संकटांत असेल तेव्हां त्याला धर्म आठवतो, परंतु त्याला चढती कमान असतांना स्वर्गाचें द्वार बंद आहे असें वाटत असतें. तुझी आमच्यापैकीं एकएकट्याशीं युद्ध करण्याची इच्छा आहे, तर कांहीं चिंता नाहीं. तुझ्याशीं लढण्याकरितां तुला वाटेल तो वीर देतों; व तूं वाटेल तें हत्यार घेऊन युद्ध कर. आमच्यापैकीं एकाला जरी मारलेंस तरी सर्व राज्य तुझें आहे.' दुर्योधन ह्मणाला, 'माझ्याशीं लढण्याला जर कोणी एकच उठणार असेल तर मी ह्या आपल्या गदेनें युद्ध करतों. माझ्याशीं गदायुद्ध करण्याला तुह्मांपैकीं जो कोणी समर्थ असेल व ज्याला

मी दुर्योधनाला जिंकेन असें वाटत असेल त्यानें माझ्याशीं लढण्याला उठावें. युधिष्ठिरानें तें कबूल केल्यावर दुर्योधन सापाप्रमाणें सुस्कारे टाकीत आपली लोखंडाची मोठी गदा घेऊन एकदम पाण्यांतून बाहेर आला. तेव्हां त्याला पाहून सर्वांना हा दंडधारी यम आहे, किंवा वज्रधारी इंद्र आहे, कीं शूलधारी रुद्र आहे असें वाटूं लागलें. त्याला पाहून युधिष्ठिर ह्मणाला, 'चल हें कवच घे. केस नीट बांध. शिरस्राण घाल व तुला जें जें कांहीं कमी आहे तें सर्व घे. व युद्धाला तयार हो.'

नंतर दुर्योधनानें उत्तम सोनेरी चिलखत अंगांत घातलें. डोक्याला शिरस्राण बांधलें. व हातांत गदा घेऊन तो युधिष्ठिराला ह्मणाला, 'चला कोण येणार तो उठूं या. तूं ये, किंवा अर्जुन येऊं दे, किंवा भीम येऊं दे अथवा नकुल सहदेव येऊं देत. कोण पाहिजे ते या. माझ्याबरोबर गदायुद्धांत कोणीच टिकणार नाहीं.'

अशा रीतीनें दुर्योधन गर्जना करीत असतांना भगवान श्रीकृष्ण रागानें युधिष्ठिराला ह्मणाला, 'अरे आमच्यापैकीं कोणा पाहिजे त्याच्याबरोबर लढ व त्याला ठार करून राज्य घे; असें जें तूं दुर्योधनाला ह्मणालास तें केवढें साहस केलेंस? जर त्यानें तुला, किंवा अर्जुनाला, किंवा नकुलसहदेवांना युद्धाला बोलाविलें असतें तर मग कसें झालें असतें? गदायुद्धांत ह्याच्याबरोबर टिकणारा कोणीच नाहीं.ह्यानें भीमाला मारण्याकरितां गदायुद्धाचा तेरा वर्षे अभ्यास केला आहे. ह्याच्या तोडीला भीमावांचून दुसरा कोणी येईलसें मला तरी वाटत नाहीं. पण त्यानें झालें तरी ह्या विद्येंत ह्मणावा तसा अभ्यास केला नाहीं. भीम बलवान आहे खरा, परंतु दुर्योधन फार कसबी आहे. **शक्तिवानापेक्षां युक्तिवानाचीच योग्यता जास्त आहे.** ह्मणून तूं आपल्या शत्रूचा फायदा करून स्वतःचें मात्र नुकसान करून घेत होतास. सर्व शत्रूंचा नाश करून त्यांच्यापैकीं एकटाच उरला असतां व तोही संकटांत असतां, त्याच्याबरोबर लढण्याला एकाला उठवून आपलें मिळालेलें राज्य गमावण्याला निघाला होतास?तुह्मांपैकीं एकाच्याही हातून दुर्योधनाला न्यायानें जिंकतां येणार नाहीं. एवढेंच नव्हे तर प्रत्यक्ष इंद्र सुद्धां त्याच्याबरोबर गदेनें युद्ध करावयाला टिकणार नाहीं. तो गदायुद्धांत फारच निपुण आहे. ह्मणून भीमाला तरी जय मिळेल किंवा नाहीं ह्याबद्दल मला संशय वाटतो. पण तूं तर 'आमच्यापैकीं कोणाही एकव्याला मारून सर्व राज्य घे,' असें दुर्योधनाला ह्मणालास ह्यावरून पुन्हां तूं पूर्वीप्रमाणेंच जुगार आरंभिलीस असें झालें. ह्यावरून असें वाटतें कीं, ही पंडूची संतती राज्यभोगासाठीं जन्मली नाहीं. कायमचा वनवास करावा व भिक्षा मागून पोट भरावें एवढ्याच करितां हिचा जन्म आहे.' ह्यावर भीम ह्मणाला, 'हे कृष्णा, तूं असें वाईट वाटून घेऊं नकोस. काळजी करण्याचें कांहीं कारण नाहीं. मी आज ह्याला खात्रीनें ठार करतों. माझी गदा त्याच्या दीडपटीनें मोठी आहे. ह्या गदेनें त्याच्याशीं युद्ध करण्याकरितां माझे बाहू फुरफुरूं लागले आहेत. मी आज ह्याला निःसंशय यमलोकाची वाट दाखवितों.' हें ऐकून श्रीकृष्णानें त्याला आनंदानें शाबासकी दिली व ह्मणाला कीं, प्रतापशाली भीमा, तुझ्याच योगानें धर्मराजाचे सर्व शत्रू नाहींसे झाले. तूंच धृतराष्ट्राच्या सर्व मुलांना ठार केलेंस पूर्वेकडील राजे व गांधारपुत्र ह्यांनाही यमलोक तूंच दाखविलास. आतां ह्या दुर्योधनाला मारून सर्व पृथ्वी, ज्याप्रमाणें विष्णूनें दैत्यांचा संहार करून इंद्राला स्वर्गाचें राज्य दिलें, त्याप्रमाणें राजा धर्माला दे. तुझी गांठ पडल्यावर त्या पाप्याचा नाश होईलच. तूं ह्याची मांडी फोडून आपली प्रतिज्ञा खरी कर. पण ह्याच्याशीं मोठ्या सावधगिरीनें लढ. कारण हा बलवान असून गदायुद्धांत फार निपुण आहे.'

नंतर पराक्रमी भीम युधिष्ठिराला ह्मणाला, 'मी आज ह्या पाप्याला ठार करून आपल्या हृदयांत सलणारा कांटा काढून टाकतों व आजपर्यंत माझ्या मनांत जो राग धुमसत आहे तो शान्त करतों. आज हा दुष्ट आपल्या प्राणाला, राज्याला सर्व वैभवाला मुकून आपल्या गळ्यांत कीर्तीची माळ घालील. माझ्या हातून दुर्योधन मेला हें ऐकून आज राजा धृतराष्ट्राला शकुनीच्या नादानें केलेल्या आपल्या सर्व कृष्णकृत्यांची आठवण होईल.' इतकें बोलून हातामध्यें गदा घेऊन तो दुर्योधनापुढें युद्धाला दंड थोपटून उभा राहिला. तेव्हां

तो मानी दुर्योधनही रागानें त्याच्यावर आपली गदा उगारून चालून गेला. युद्धाला उभा राहिल्यावर भीम दुर्योधनाला ह्मणाला, तूं व राजा धृतराष्ट्रानें आमच्यासंबंधीं जीं जीं दुष्कृत्यें केलीं त्या सर्वांची आतां आठवण कर. साध्वी द्रौपदी रजस्वला असतांना तिला भर सभेंत ओढून तिची विटंबना केली व शकुनीच्या सल्यानें राजा धर्माबरोबर जुगार खेळून त्याला त्यांत कपटानें जिंकलें हीं व आणखी दुसरीं जीं जीं ह्मणून पातकें केलींत त्या सर्वांची आतां आठवण कर. आह्मी निरपराधी असतांना आह्मांला विनाकारण छळलेंस त्याचें हें फळ आतां वाढून आले आहे ! तुझ्याकरितांच आह्मां सर्वांचे आजोबा, महाप्रतापी भीष्म शरपंजरी पडले आहेत. अरे कर्ण, द्रोण, पराक्रमी शल्य, तुझे भाऊ व इतर राजे लोक ह्यांनींही तुझ्याचकरितां युद्धामध्यें आपला प्राण दिला. महापातकी कुलाधम असा तूंच काय तो उरला आहेस. ह्या तुलाही आज ठार करून तुझा गर्व व राज्य हरण करतों. आणि तूं पांडवांचे आजपर्यंत जे जे अपराध केलेस त्या सर्वांचा सूड उगवितों.' हें ऐकून दुर्योधन ह्मणाला, 'अरे, चल. उगीच एवढी घमेंड कशाला ? मी आपली गदा घेऊन युद्धासाठीं तुझ्यापुढें उभाच आहें. न्यायानें युद्ध केलें तर इंद्राच्यानें सुद्धां मला जिंकवणार नाहीं. हिंवाळ्यांतील ढगाप्रमाणें वायफळ बडबड करूं नकोस. तुझ्या अंगांत जी काय करामत असेल ती प्रत्यक्ष दाखीव.' असें ह्मणून दोघेही एकमेकांवर तुटून पडले.

---

## ५९बलरामाची तीथयात्रा. (९-३४-३६)

पण इतक्यांत आपल्या शिष्यांचें युद्ध पाहण्याकरितां त्या ठिकाणीं बलराम आले. हें पाहून सर्वांनीं त्यांचा सत्कार केला. बलराम कृष्णादि पांडव व दुर्योधन यांना ह्मणाले, 'मी यात्रेकरितां ह्मणून बाहेर पडलों त्याला आज बेचाळीस दिवस झाले. मी पुष्य नक्षत्रावर निघालों व आज श्रवण नक्षत्रावर येथें आलों. मी येथें मुद्दाम आपल्या शिष्यांचें गदायुद्ध पहाण्याकरितां आलों आहे.'

पूर्वीं बलराम आपण कौरव अगर पांडव ह्यांपैकीं कोणालाही साहाय्य करावयाचें नाहीं अशा निश्चयानें रथ, घोडे, हत्ती वगैरे वाहनें मोठमोठे ऋत्विज व विद्वान ब्राह्मण ह्यांसह सरस्वतीच्या कांठचीं क्षेत्रें व तेथील पवित्र तीर्थें पहात पहात निघाले होते. वाटेंत त्यांनीं पुष्कळ दानधर्म केले. पुष्कळ व्यापाऱ्यांनीं त्यांच्या वाटेनें आपलीं दुकानें लाविलीं होतीं. शिवाय त्यांच्याबरोबर तीर्थयात्रा करण्याकरितां व मौज पहाण्याकरितां पुष्कळ लोक चालले होते. याप्रमाणें थाटानें तीर्थयात्रा करीत असतां प्रथम ते सरस्वतीच्या तीरावरील प्रभासक्षेत्रीं आले. **ह्याच प्रभास तीर्थीं स्नान करून चंद्र पुढें सांगितल्याप्रमाणें शापमुक्त झाला.**

दक्षाला सत्तावीस मुली होत्या. **ह्याच स्त्रिया पुढें नक्षत्ररूपानें प्रगट झाल्या.** या सर्वांचें त्यानें चंद्राशीं लग्न लावून दिलें होतें. त्या सर्वच सुंदर व पतिसेवापरायण होत्या. परंतु त्यांमध्यें रोहिणी ही सर्वांहून अतिशय सुंदर होती. त्यामुळें चंद्राची तिजवरच अधिक प्रीति जडली. व बाकीच्या स्त्रियांकडे न जातां तो हिच्याशींच नेहमीं रममाण होऊं लागला. हें पाहून बाकीच्या स्त्रियांना राग येऊन त्या आपल्या बापाकडे गेल्या व त्याला ह्मणाल्या कीं, 'भगवान सोम आह्मांकडे मुळीं न पहातां नेहमीं रोहिणीकडेच असतो. ह्मणून आह्मी सर्वजणी तुझ्याजवळ राहून मिताहार ठेवून तपश्चर्या करतों. हें ऐकून दक्षप्रजापति चंद्राला ह्मणाला, 'हे सोमा, तूं आपल्या सर्व बायकांना सारखें पहा, ह्मणजे तुला दोष लागणार नाहीं. असें प्रजापतीनें चंद्राला वारंवार सांगितलें असतां त्यानें त्याजकडे बिलकूल लक्ष दिलें नाहीं. त्यामुळें प्रजापतीला राग येऊन त्यानें यक्ष्मा नांवाच्या रोगाला चंद्राचा समाचार घेण्याकरितां त्याकडे पाठविलें. तो जाऊन नक्षत्राधिपति सोम याच्यामध्यें शिरला. त्यामुळें सोमराजा दिवसेंदिवस वाळूं लागला. तेव्हां त्या क्षयांतून मोकळा होण्याकरितां त्यानें पुष्कळ खटपट केली. नानाप्रकारचे यज्ञ केले. परंतु ह्या सर्वांचा कांहीं उपयोग झाला नाहीं. इकडे चंद्राला क्षय झाल्यामुळें सर्व वनस्पति उगवेनाशा झाल्या. ज्या कांहीं उगवत त्या बेचव व निःसत्व अशा निपजूं लागल्या. व वनस्पति निः-

सत्व झाल्यामुळें सर्व प्राणिमात्र अशक्त व कृश होऊं लागले. अशा रीतीनें एका चंद्राला क्षय झाल्यामुळें सर्व जगाचा नाश होण्याची पाळी आली. ही हकीकत देवांना समजली. तेव्हां सर्व देव मिळून दक्षप्रजापतीकडे जाऊन त्याची प्रार्थना करून ह्मणाले, 'हे भगवन् प्रसन्न व्हा. चंद्राला शापापासून मुक्त करा. आपल्या शापानें चंद्रमा, सर्व वनस्पति, व वनस्पतींमुळें सर्व प्रजा क्षीण झाली आहे. प्राण्यांच्या नाशाबरोबर आमचाही नाश होण्याची वेळ आली आहे. आमचा नाश झाल्यावर जगांत काय उरणार आहे? इकडे लक्ष देऊन हे जगद्गुरो, प्रसन्न व्हा व कृपा करा.' हें ऐकून प्रजापति देवांना ह्मणाला, 'माझें वचन कधींही खोटें होणार नाहीं, परंतु आपल्या सर्व बायकांच्या ठिकाणीं सारखें प्रेम ठेवावें व सरस्वतीच्या तीरावरील तीर्थांमध्यें स्नान करावें ह्मणजे हा पुन्हां तेजस्वी होईल. प्रत्येक महिन्याच्या पहिल्या पंधरवड्यांत हा कलेकलेनें क्षय पावेल व दुसऱ्या पंधरवड्यांत पुन्हां एकएका कलेनें वृद्धि पावेल. ह्यानें पश्चिमसमुद्राकडे जेथें सरस्वती समुद्राला मिळते तेथें जाऊन शंकराची आराधना करावी ह्मणजे हा पूर्ववत् तेजस्वी होईल.' हें ऐकून चंद्रानें सरस्वतीच्या कांठीं असणाऱ्या प्रभास नांवाच्या तीर्थीं जाऊन **अमावास्येच्या** दिवशीं स्नान केलें. त्यामुळें तो तेजस्वी होऊन जगताला प्रकाश देऊं लागला; पण त्याचें किरण मात्र थंड झालें. नंतर सर्व देव प्रभासतीर्थीं येऊन चंद्राला बरोबर घेऊन प्रजापतीकडे गेले. तेव्हां प्रजापतीनें सर्वांना निरोप देऊन पुन्हां चंद्राला स्त्रिया व ब्राह्मण यांचा अवमान कधीं करीत जाऊं नकोस ह्मणून सांगितलें. क्षयी झालेला चंद्र स्नान करून पूर्ववत् तेजस्वी झाला ह्मणून त्या तीर्थाला **प्रभास** असें नांव पडलें. ह्या प्रभास तीर्थाची यात्रा करून बलराम **चमसोद्भव** नांवाच्या तीर्थाला गेले व तेथें नानाप्रकारचे दानधर्म करून **उदपान** नांवाच्या तीर्थाकडे गेले. ह्या **उदपान** तीर्थीं वनस्पती वगैरे नेहमीं हिरव्यागार असल्यामुळें सरस्वती नदी जरी अदृश्य आहे तरी ऋषींना ती प्रत्यक्ष वहातच आहे असें वाटतें. ह्याच उदपान तीर्थामध्यें त्रित नांवाचा महामुनि पडला होता, व त्यानें त्या तीर्थांत असतांना सोमयज्ञ करून स्वतः सोमपान केलें होतें.

पूर्वीं एकत, द्वित व त्रित नांवाचे तीन महातपस्वी मुनी होते. ते सूर्याप्रमाणें तेजस्वी असून त्यांना संततीही बरीच होती. तपःसामर्थ्यानें त्यांना सत्यलोकाला जाण्याची योग्यता आली होती. त्यांचें तप, इंद्रियदमन व सदाचार पाहून त्यांचा पिता गौतम यांला फार आनंद होत असे. काहीं काळानें गौतम स्वर्गवासी झाले. त्यामुळें ज्या ज्या राजाकडे त्यांचें यजमानकृत्य होतें ते सर्व राजे गौतमांच्या मुलांना आपले पुरोहित समजून त्यांची पूजा करूं लागले. ह्या सर्व मुलांमध्यें त्रित आपल्या विद्वत्तेनें व सदाचरणानें दिवसेंदिवस पुढें येऊं लागला. शेंवटीं त्याला त्याच्या बापाची योग्यता आली. त्यामुळें सर्व मुनीही त्याला श्रेष्ठ मानून त्याची पूजा करूं लागले. पुढें एकदां एकत व द्वित ह्यांच्या मनांमध्यें यज्ञ करून सोमपान करावेंसें आलें. परंतु जवळ पैसा नव्हता त्यामुळें त्यांना मोठी चिंता पडली. शेवटीं त्यांनीं अशी युक्ति काढिली कीं, आपला भाऊ त्रित ह्याला पुढें करून आपल्या सर्व यजमानांकडून यज्ञ करवावेत. त्यांत मिळालेल्या आपल्या पुरोहितपणाच्या दक्षिणेवर व पशू वगैरे अन्य सामुग्रीवर यज्ञ करावा.

ह्याप्रमाणें त्या तिघांही भावांनीं आपल्या यजमानांना बोलावून त्यांच्याकडून यज्ञ करविले. व त्यांत मिळालेले पशू वगैरे घेऊन पूर्वेच्या रोंखानें निघाले. वाटेनें त्रित आनंदानें सर्वांच्या पुढें चालले होते व बाकीचे दोन भाऊ सर्व पशूंना हांकलीत मागून चालले होते. जातां जातां तो मोठा पशुसमुदाय पाहून त्या दोघा भावांच्या तोंडाला पाणी सुटलें व त्रितांना फसवून हे सर्व आपणच कसें लाटावे ह्याबद्दल ते विचार करूं लागले. 'त्रित यज्ञ चालविण्यांत फार कुशल आहे. तसाच तो वेदविद्येंतही पारंगत आहे. ह्यामुळें त्याला त्याच्या मनांत आलें तर आणखी पाहिजे तितके पशु मिळतील. तर आपण दोघे मिळून त्रिताची नजर चुकवून हीं जनावरें हांकून नेऊं या.' असा विचार करीत ते वाटेनें जात असतां रात्र पडली. इतक्यांत एक लांडगा त्यांच्यावर चवताळून आला. त्रित सर्वांच्या पुढें होते. लांडग्याला पाहून किंचित घाबरले व भयानें मागें सरले तोंच तेथें जवळच

सरस्वतीच्या कांठीं एक मोठाथोरला खड्डा होता त्यामध्यें पडले. तेव्हां आपणाला कोणी तरी काढावें ह्या उद्देशानें ते पुष्कळ ओरडले. परंतु त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. त्यांच्या भावांनीं आपला भाऊ खड्यांत पडला आहे हें जाणून लांडग्याच्या भीतीनें व पशूंच्या लोभानें त्याला तेथेंच सोडून सर्व जनावरांना घेऊन पळ काढला. भाऊ आपणाला सोडून पळून गेले व आपण एखादा पापी जसा नरकांत कुजत पडतो त्याप्रमाणें ह्या मातीनें व निरनिराळ्या प्रकारच्या वेलींनें भरलेल्या खड्ड्यामध्यें पडून राहिलों आहों. आतां आपणाला सोमपान कसें मिळणार. ह्याप्रमाणें त्रित विचार करीत तेथें पडले होते. इतक्यांत वरून लोंबत असलेली एक वेली त्यांच्या नजरेस आली. जरा हात लांब करून ती त्यांनीं ओढून घेतली व तिलाच त्यांनीं सोमवल्ली असें कल्पिलें. नंतर पाणी व अग्नि ह्यांचें मनानेंच ध्यान करून आपण स्वतः होता बनले व आपण पूर्वीं कल्पिलेल्या पाण्यालाच पुन्हां तूप असें कल्पून व लहान लहान खड्यांना साखरेचे खडे कल्पून वेदोक्त मंत्रानें सर्वांना त्यांनीं कल्पिलेल्या द्रव्यांतील ज्याच्या त्याच्या योग्यतेप्रमाणें यथाविधि हविर्भाग दिले व नंतर मोठ्यानें ध्वनि केला. त्यानें सर्व स्वर्गलोक दुमदुमून राहिला. तो ऐकून सर्व देव त्रित ऋषींच्या यज्ञाच्या ठिकाणीं गेले. तेथें त्रित मुनींनीं मंत्र ह्मणून यथाविधि हविर्भाग दिले त्यांनीं देव संतुष्ट होऊन वर मागण्यास सांगितल्यावरून त्रित मुनींनीं त्या खड्ड्यांतून आपल्याला वर काढण्यास सांगून 'ह्या ठिकाणीं येऊन स्नान करणाऱ्यांना सोमयज्ञ करणाऱ्यांना जी गति मिळते ती गति मिळावी असें मागितलें,' त्याबरोबर सरस्वती नदी वेगानें त्या डोहांत वहात येऊन तिनें त्यांना वर काढिलें, वर आल्यावर त्यांनीं सर्व देवांची पूजा केली व देव त्यांना त्यांनीं मागितलेला वर देऊन स्वर्गाला निघून गेले. इकडे त्रितही आनंदानें आपल्या आश्रमाकडे गेले. आश्रमांत येऊन त्यांनीं आपल्या भावांना तुह्मी ज्या अर्थीं पशूंच्या लोभानें मला सोडून पळून आलांत त्या अर्थीं तुह्मी लांब लांब सुळ्यांचे मोठाल्या दाढांचे लांडगे होऊन अरण्यांतून फिरत रहाल. व तुमची संततीही अस्वलें व वानर होऊन भटकत राहील असा शाप दिला. त्यांनीं हे शब्द उच्चारल्याबरोबर ते लांडगे, अस्वलें व वानर होऊन अरण्यांतून भटकूं लागले.

ह्या उदपान तीर्थांत बलरामांनीं स्नान करून पुष्कळ दानधर्म केला. व पुढें विनशन नांवाच्या तीर्थाकडे गेले. या ठिकाणीं शूद्र व भिल्ल लोकांच्या पातकाचरणानें सरस्वतीनें आपला प्रवाह गुप्त केला, ह्मणून ऋषि ह्या तीर्थाला विनशन ह्मणतात. ह्याही तीर्थांत स्नान वगैरे करून बलराम सुभूमिक नांवाच्या तीर्थाकडे गेले. ह्या ठिकाणीं खेळण्याकरितां पुष्कळ रूपवती अप्सरा नेहमीं येत असतात. देव, गंधर्व व पितृगण प्रत्येक महिन्याला ह्या तीर्थाला स्नानाकरितां येतात. ही जागा नानाप्रकारच्या उत्तम उत्तम फळांनीं व फुलांनीं नेहमीं भरलेली असते. ह्मणून येथें अप्सरांना फार आनंद होतो. ह्यासाठीं हिला सुभूमिका असें नांव आहे. बलरामांनीं ह्या सुभूमिक तीर्थामध्यें स्नान करून पुष्कळ दानधर्म केला; व उत्तम प्रकारचें केवळ देवलोकींच ऐकावयाला मिळणारें असें मनोहर व कर्णमधुर गायन व निरनिराळ्या प्रकारचीं वाद्यें ऐकिलीं. नंतर ते गंधर्व तीर्थाला गेले. ह्या ठिकाणीं विश्वावसु आदिकरून सर्व गंधर्व नेहमीं आपलें गायन करीत असतात. ह्या ठिकाणीं बलरामांनीं ब्राह्मणांना शेळ्या, मेंढ्या, गाई, खेंचरें, उंट, सोनें व रुपें देऊन उत्तम प्रकारचें इच्छाभोजन दिलें. नंतर ते गर्गतीर्थाला गेले. ह्या ठिकाणीं पूर्वीं गर्गमुनींनीं **ग्रहांच्या गति, धूमकेतूंचें आगमन, निरनिराळ्या उत्पातांचें कारण व सर्व प्रकारचें कालज्ञान ह्यांचें ज्ञान संपादन करण्याकरितां उग्र तपश्चर्या केली होती.** त्यामुळें ह्या तीर्थाला गर्गतीर्थ असें नांव मिळालें. ह्या ठिकाणीं ऋषी **ज्योतिःशास्त्राचें ज्ञान होण्याकरितां** नेहमीं गर्गमुनींची उपासना करीत असतात. येथेंही यथाविधि सर्व कर्में करून नीलांबरधारी बलराम शंख तीर्थाला गेले. ह्या ठिकाणीं सरस्वतीचें कांठीं शंख नांवाचा मेरुपर्वतासारखा उंच व पांढरशुभ्र असा मोठा वृक्ष आहे. मोठमोठे तपस्वी ऋषी, शक्तिमानपिशाच, हजारों सिद्ध पुरुष, शेंकडों विद्याधर व यक्ष, व पराक्रमी राक्षस हें सर्व येथें हंगामाच्या वेळीं ह्या झाडाचीं फळें खातात

बाकीच्या वेळीं कांहीं न खातां व न पितां राहतात. त्यामुळें हें कोणालाही दिसत नाहींत. अशी ह्या झाडासंबंधीं आख्यायिका आहे. नंतर द्वैतवनाला जाऊन बलराम हे नागधन्वान नांवाच्या तीर्थाला गेले. ह्या ठिकाणीं नानाप्रकारचे सर्प व ऋषी नेहमीं राहतात. तेथेंच पूर्वी सर्व देवांनीं वासुकीला सर्पराज्य देऊन राज्याभिषेक केला. या ठिकाणीं सापाची भीति मुळींच नाहीं. नंतर पूर्वेकडच्या बाजूला जीं हजारों तीर्थे आहेत त्या सर्व तीर्थांमध्यें स्नान करून ब्राह्मणांना दानें देऊन व ज्या ज्या ठिकाणीं जसें माहात्म्य आहे तसें तसें उपवासादि व्रतें करून व तेथें राहणाऱ्या ऋषींना नमस्कार करून जेथून सरस्वती नदी पुन्हां पूर्वेकडे वळली आहे तिकडे बलराम गेले.

पूर्वी नैमिषारण्यामध्यें बारा वर्षेपर्यंत चालणारें असें मोठें सत्र चाललें होतें. त्या सत्राकरितां नैमिषारण्यांत पुष्कळ लांबलांबचे ऋषी आले होते. हें सत्र संपल्यानंतर सर्व ऋषी तीर्थयात्रा करण्याकरितां सरस्वतीचे कांठीं गेले. पुष्कळ ऋषीसमुदाय एकदम आल्यामुळें ह्या सरस्वतीच्या कांठचीं सर्व तीर्थे शहराप्रमाणें अगदीं गजबजून गेलीं. ही सर्व ऋषीमंडळी कुरुक्षेत्राजवळील समंतपंचक नांवाच्या प्रांतापर्यंत पसरली होती. ऋषीसमुदाय बराच मोठा जमल्यानें त्यांना होमहवनादि क्रिया करण्याला पुरेशी स्वतंत्र जागा मिळेना. ह्मणून त्यांनीं आपल्या जानव्यांनीं सर्व क्षेत्र मोजून थोडथोडी जागा वांटून घेतली. अशा रीतीनें जागेच्या संकोचामुळें चिंताग्रस्त झालेल्या मुनींना पाहून सरस्वतीनें त्यांच्या होमहवनादि क्रिया उत्तम रीतीनें पार पाडण्याकरितां आपला ओघ पूर्वेकडे वळविला. तसेंच तिनें ह्या पूर्वेकडील प्रवाहावर पुष्कळ मोठमोठे वृक्षांचें वन निर्माण केलें. तेव्हांपासून ह्या वनांना 'नैमिषीय कुंज' असें ह्मणतात. बलरामांनीं ह्या ठिकाणीं स्नानादि कर्मे करून ब्राह्मणांना इच्छाभोजन घालून त्यांना नाना प्रकारचीं दानें दिलीं. नंतर जेथें उत्तम प्रकारचे पक्षी आहेत, जेथें नाना प्रकारचीं फळझाडें व फुलझाडें आहेत, जेथें महान् महान् तपस्वी ऋषी आहेत, जेथें विद्यार्थ्यांच्या वेदाध्ययनानें सर्व दिशा दुमदुमून गेल्या आहेत, व जेथें नेहमीं सत्पुरुषांची वस्ती आहे व ज्या ठिकाणीं तप करून महामुनि मंकणक यांनीं सिद्धि मिळविली अशा सप्तसारस्वत नांवाच्या तीर्थाकडे बलराम गेले.

---

## ६० सप्तसारस्वत तीर्थ व महामुनि मंकणक यांची हकीकत. (९-३७-३८)

हें सर्व जग सप्तसारस्वतांनीं भरलें आहे. ज्या ज्या ठिकाणीं ह्मणून ऋषिश्रेष्ठांनीं हिच्या प्रवाहाबद्दल हिची प्रार्थना केली त्या त्या ठिकाणीं ह्या महानदीनें आपला प्रवाह प्रकट करून ऋषींची कामना पूर्ण केली. अशा रीतीनें ही सरस्वती सात ठिकाणीं—सुप्रभा, कांचनाक्षी, विशाला, मनोरमा, ओघवती, सुरेणु व विमलोदका अशा सात नांवांनीं प्रसिद्ध आहे. पूर्वी पितामहांनीं यज्ञ चालविला होता; त्याप्रसंगीं पुष्करप्रांतीं सरस्वती सुप्रभा या नांवानें पितामहाकरितां व देव आणि ऋषी ह्या सर्वांना संतुष्ट करण्याकरितां प्रगट झाली. तसेंच नैमिषारण्यांतील ऋषींचीं यज्ञयागादि कर्में सफल करण्याकरितां त्या ठिकाणीं सरस्वतीनें कांचनाक्षी या नांवानें आपला प्रवाह प्रकट केला. तसेंच गयानें आपल्या यज्ञाच्या वेळीं इची प्रार्थना केली ह्मणून विशाला या नांवानें हिनें आपला प्रवाह गयादेशीं प्रकट केला. हिचा उगम हिमालयाच्या पायथ्याशीं झाला आहे. त्याचप्रमाणें राजा उद्दालक कोसल देशाच्या उत्तरेच्या बाजूला एकदां यज्ञ करीत होता. त्या वेळीं तेथें जमलेल्या ऋषींच्या स्नानाकरितां उद्दालकानें सरस्वतीला तिचा प्रवाह प्रकट करण्याबद्दल प्रार्थिलें. तेव्हां सरस्वती मुनिवृंदांना तोषविण्याकरितां उत्तर कोसलप्रांतीं मनोरमा नांवानें प्रकट झाली.

मोठमोठ्या तपस्वी मुनींनीं आपल्या राहण्यानें भूषविलेल्या अशा पुण्यकारक कुरुक्षेत्रामध्यें राजर्षि कुरु यज्ञ करीत असतां महामुनि वसिष्ठांच्या विनंतीवरून सरस्वतीनें कुरुक्षेत्रांतही आपला पुण्यदायक जलप्रवाह प्रकट केला. त्यावेळीं वसिष्ठांनीं हिला ओघवती असें नांव दिलें. गंगाद्वाराचे ठिकाणीं दक्ष यज्ञ करीत असतांना सरस्वती तेथें प्रकट झाली. त्या वेळीं हिला तेथें सुरेणु असें नांव मिळालें. तसेंच

ब्रह्मदेव हिमालयावर यज्ञ करीत होते तेव्हां ही तेथें उत्पन्न झाली. त्या वेळीं हिला विमलोदा असें नांव मिळालें. पुढें ह्या सातही प्रवाहांचा एके ठिकाणीं संगम झाला व त्या तीर्थाला सप्तसारस्वत असें नांव मिळालें. एकदां मंकणकमुनि नदीमध्यें स्नान करीत असतां त्यांना सहज एकाएकी सुंदर पण पुण्यशील अशी एक स्त्री नग्न होऊन स्नान करीत असतांना दिसली. त्या सुंदरीला पाहून ऋषिवर्यांचें नदीमध्यें रेतस्खलन झालें. ऋषींनीं तें रेत आपल्या भांड्यांत धरलें. तेव्हां लगेच त्या रेतबिंदूचें सात भाग झाले व त्या भागांपासून, वायुवेग, वायुबल, वायुहा, वायुमंडल, वायुज्वाल, वायुरेता, व वायुचक्र असे सात वीर्यवान् ऋषी जन्माला आले. व त्यांच्या पासून एकुणपन्नास मरुत उत्पन्न झाले.

एकदां मंकणकमुनींचा हात दर्भानें कापला त्यामुळें त्यांतून रक्त न वाहतां वनस्पतीच्या रसाप्रमाणें एक प्रकारचा रस बाहेर पडूं लागला. हें पाहून मंकणकमुनि आनंदानें नाचूं लागले. त्या वेळीं त्यांच्या तेजानें मोहून जाऊन स्थावरजंगमादि सर्व विश्वही नाचूं लागलें. हें पाहून सर्व ऋषींनीं व ब्रह्मादिदेवांनीं महादेवांची त्या मुनींचें नाचणें बंद करविण्यास प्रार्थना केली. तेव्हां महादेवांनीं त्या ऋषीच्या आनंदाचें कारण जाणून त्याजवळ जाऊन आपल्या आंगठ्यावर खूप जोरानें वार केला. तेव्हां त्यापासून रक्त न गळतां सोन्यासारखें तेजःपुंज भस्म बाहेर आलें. हें पाहून मंकणकांना आपल्या गर्वाबद्दल लाज वाटली व हे महादेव आहेत असें वाटून त्यांनीं त्या ब्राह्मणरूपी महादेवाचे घट्ट पाय धरले व अनेक तऱ्हेनें त्यांची स्तुति करून शेवटीं ह्मणाले, 'हे देवा, जर माझ्या हातून कांहीं अपराध झाला असेल तर त्याची क्षमा करून माझ्या तपश्चर्येचा भंग न होईल असें करा.' ह्या त्यांच्या स्तुतीनें संतुष्ट होऊन महादेव ह्मणाले, 'हे मुने माझ्या कृपेनें आपलें तप कमी न होतां उलट हजारपटीनें वाढेल. मी येथेंच ह्या सप्तसारस्वततीर्थीं राहतों. व जे लोक येथें माझी उपासना करतील त्यांना स्वर्गलोकीं अगर ह्या लोकीं. कोठेंही कांहींच उणें पडणार नाहीं. शिवाय त्यांना सारस्वत लोकाची प्राप्ति होईल.' असें ह्मणून ते तेथें राहिले. बलरामांनीं ह्या पवित्र तीर्थाचे ठिकाणीं एक रात्र राहून तेथें राहणाऱ्या मुनींची व मंकणकांची पूजा करून व उपोषण वगैरे करून यथाशास्त्र सर्व तीर्थविधि आटपून दुसरे दिवशीं सकाळीं ज्या ठिकाणीं स्नान करून कपालमोचन मुनी आपल्या गुडघ्यावरील त्रासदायक डोक्यापासून मुक्त झाले अशा औशनस नांवाच्या पवित्र तीर्थाकडे गेले.



---

## ६१ औशनस तीर्थ व कपालमोचन मुनि यांची हकीकत. (९-३९)

पूर्वी दाशरथी राम दुष्ट राक्षसांचा नाश करून मुनिजनांचें रक्षण करण्याकरितां दंडकारण्यांतून फिरत होता. त्या वेळीं त्यानें एकदां आपल्या बाणानें एका राक्षसाचें डोकें उडविलें. तें डोकें, महोदर नांवाचा कोणी एक तीर्थयात्रा करीत फिरणारा ब्राह्मण सहजीं त्या दंडकारण्यांतूनच चालला होता, त्याच्या मांडीवर जाऊन आपटलें व तेथेंच चिकटून राहिलें. त्यामुळें पुढें त्याच्या मांडींतून सारखा पू वाहूं लागला, व अतिशय वेदना होऊं लागल्या. तेव्हां महोदरानें ऋषींच्या सांगण्यावरून या औशनस तीर्थांत स्नान मात्र केलें, त्याबरोबर त्याच्या मांडीवरून तें डोकें गळून खालीं पाण्यांत पडलें. तें डोकें गळून पडण्याबरोबर त्याला फार आनंद झाला. इकडे पाण्यांत गळून पडलेलें डोकें तेथेंच नाहींसें झालें. तेव्हांपासून या तीर्थाला कपालमोचन असें नांव पडलें. नंतर कपालमोचन पुन्हां त्या तीर्थाला गेला व तेथील पाणी प्याला त्यामुळें त्याला सर्वसिद्धि मिळाली.

ह्या उशनस तीर्थामध्यें स्नान करून व ब्राह्मणांना दानें देऊन बलराम रुषङ्ग ऋषींच्या आश्रमाला गेले. याच ठिकाणीं पूर्वी आर्ष्टिषेण ऋषींनीं उग्र तपश्चर्या केली होती, व याच ठिकाणीं तपश्चर्या केल्यानें विश्वामित्रांना ब्रह्मर्षिपद मिळालें. येथून बलराम रुषङ्गनें जेथें आपला देहत्याग केला त्या ठिकाणीं गेले ह्या तीर्थामध्यें स्नान वगैरे करून ज्या ठिकाणीं आर्ष्टिषेणांनीं तपश्चर्या केली व ज्या ठिकाणीं तपश्चर्या करून विश्वामित्रांनीं आपणाला ब्रह्मर्षि असें ह्मणवून घेतलें अशा पवित्र स्थानाकडे गेले.

---

## ६२ आर्ष्टिषेण व ब्रह्मर्षि विश्वामित्र यांची हकीकत. (९. ४०-४१)

पूर्वी कृतयुगामध्यें आर्ष्टिषेण नांवाचे सदाचारी व सद्गुणी ब्राह्मण होते. पुष्कळ श्रम करूनही त्यांना वेदविद्या मुळींच आली नाहीं. त्यामुळें ते फार कष्टी होऊन येथें उग्र तपश्चर्या करण्याकरितां आले. ह्या तपोबलानें त्यांना सर्व वेदांचें पूर्ण ज्ञान झालें व सर्व सिद्धि प्राप्त झाली. तेव्हां आनंदानें त्यांनीं ह्या तीर्थाला तीन वर दिले. पहिला—आजपासून जो मनुष्य ह्या तीर्थामध्यें स्नान करील त्याला अश्वमेधाचें फल मिळेल, दुसरा—आजपासून ह्या ठिकाणीं सापापासून कोणालाही त्रास पोहोंचणार नाहीं, व तिसरा—ह्या ठिकाणीं तपश्चर्या करणाऱ्याला थोड्याच काळांत उत्तम सिद्धि मिळेल. ह्याप्रमाणें वर देऊन भगवान तपोनिधि आर्ष्टिषेण ऋषि स्वर्गाला निघून गेले. देवापि सिंधुद्वीप यांनींही याच ठिकाणीं तपश्चर्या करून ब्राह्मण्य संपादन केलें. याचप्रमाणें राजर्षि कौशिकांनींही याच ठिकाणीं उग्र तपश्चर्या करून आपणाला ब्रह्मर्षि असें म्हणवून घेतलें. ती हकीकत याप्रमाणें आहे.

पूर्वी गाधि नांवाचा एक महापराक्रमी राजा होऊन गेला. त्याला विश्वामित्र नांवाचा एक शूर मुलगा होता. गाधि हा सत्वशील, न्यायी व धर्मपरायण होता. त्याचा वृद्धापकाल झाला होता, त्यामुळें आपल्या मुलाला यथाविधि राज्याभिषेक करून गाधि स्वर्गाला निघून गेला. इकडे विश्वामित्र राजा झाला. **कितीही दक्ष मनुष्य असला तरी त्याच्यानें सर्व पृथ्वीचें राज्य होणें फार कठिण आहे.** पुढें एकदां राक्षसांनीं आपल्या प्रजेला फार त्रास दिला आहे असें त्याला समजल्यावरून राजा विश्वामित्र आपलें चतुरंग सैन्य तयार करून युद्धाला बाहेर पडला. तो वाटेनें जातां जातां वसिष्ठ ऋषींच्या आश्रमाला येऊन पोहोंचला. या ठिकाणीं त्याच्या सैन्यानें पुष्कळ अत्याचार केला. हें जेव्हां वसिष्ठ ऋषींच्या नजरेस आलें, तेव्हां त्यानीं रागानें या दुराचारी सैन्याचा फडशा पाडण्याकरितां आपल्या कामधेनूला शबरांची उत्पत्ति करण्यास सांगितलें. तेव्हां तिनें मोठे भयंकर पुरुष निर्माण केले. ह्यांनीं त्या सर्व सैन्याची अगदीं कत्तल करून दिली. हें आश्चर्यकारक कृत्य पाहून विश्वामित्रानें तपोबलापुढें राजबलाचें कांहींच चालत नाहीं, तेव्हां तप हेंच श्रेष्ठ आहे असें मनांत आणून त्या ठिकाणीं उग्र तप करण्याला सुरवात केली व नाना प्रकारच्या नियमांनीं व उपवासांनीं आपलें शरीर अगदीं झिजविलें. क्रमाक्रमानें जलाहार, वायुभक्षण व नुसतीं वाळलेलीं पानें खाऊन राहण्यापर्यंत त्यांनीं मजल आणून पोहोंचविली. याप्रमाणें घोर तपश्चर्या केल्यानें ते सूर्यासारखे कांतिमान झाले. तेव्हां सृष्टिकर्त्यानारायणानें त्याला वर मागण्यास सांगितलें. तेव्हां मला ब्राह्मणत्व यावें व सर्वांनीं मला ब्रह्मर्षि कबूल करावें असा त्यांनीं वर मागितला. त्याप्रमाणें तो त्यांना मिळाला. याप्रमाणें आपल्या तपश्चर्येनें ब्राह्मणत्व मिळवून विश्वामित्र पृथ्वीवर कृतकृत्य होऊन आनंदांत फिरूं लागले. या ब्राह्मणत्व देणाऱ्या तीर्थामध्यें स्नानादि सर्व विधि आटोपून बलराम पुढें अवाकीर्ण नांवाच्या तीर्थाला गेले.

पूर्वी नैमिषारण्यांतील ऋषींनीं बारा वर्षेपर्यंत चालणारें असें सत्र सुरू केलें होतें. त्यांतील विश्वजित् नांवाचा यज्ञ संपल्यावर सर्व ऋषींनीं मिळून पांचाल देशच्या राजाकडून यज्ञ चालविणाऱ्या ब्राह्मणांना दक्षिणा देण्याकरितां एकवीस पुष्ट, निरोगी, सुंदर व सशक्त अशा कालवडी मागून घेतल्या. त्या इतर ऋषींना देऊन दाल्भ्य ऋषी आणखी कालवडी मिळविण्याकरितां धृतराष्ट्रराजाकडे गेले. त्या वेळीं त्याच्या येथल्या कांहीं कालवडी एकाएकीं कांहीं कारण नसतां मरून पडल्या होत्या. तेव्हां आपल्याला पाहिजे असल्यास ह्या मेलेल्या कालवडी घेऊन जा असें धृतराष्ट्र ह्मणाला. तें त्यांचें निष्ठुर भाषण ऐकून बकदाल्भ्य ऋषींना फार राग आला. व त्यांनीं ह्याचा सूड उगवण्याचा निश्चय करून त्या मेलेल्या कालवडी ते घेऊन गेले. पुढें अवाकीर्ण तीर्थामध्यें यज्ञाग्नि पेटवून त्यामध्यें ह्या मेलेल्या जनावरांचेंच मांस काढून धृतराष्ट्राच्या राज्याचा नाश व्हावा ह्मणून रोज ते त्याच्या आहुती देत. त्यामुळें धृतराष्ट्राचें राज्य दिवसेंदिवस क्षीण होऊन अगदीं नष्टप्राय झालें. हें पाहून सर्वांनीं ज्योतिष्याला त्याचें कारण विचारलें. तेव्हां त्यानें राजाला सांगितलें कीं

आपण बकदाल्भ्य मुनींना मेलेले पशू दिलेत ते घेऊन त्यांच्याच मांसानें ते आपल्या राष्ट्राचा नाश होण्याकरितां सरस्वतीच्या तीरीं रोज हवन करीत आहेत; त्यामुळें ह्या राष्ट्राची अशी स्थिति झाली आहे. त्या मुनीकडे जाऊन त्याला प्रसन्न करून घ्या ह्मणजे हें संकट नाहींसें होईल. हें ऐकून धृतराष्ट्र सरस्वतीच्या कांठीं त्या मुनींकडे जाऊन व त्यांना साष्टांग नमस्कार करून ह्मणाला, 'भगवन्, मी आपणाला शरण आलों आहें. मी दीन आहें, मतिमंद आहें, माझ्या मूर्ख स्वभावानें लोभामुळें मीं जें केलें त्याची क्षमा करून माझ्यावर कृपा व्हावी. आपल्यावांचून मला आतां दुसरी गति नाहीं.' याप्रमाणें दीनवाणा होऊन त्याला शरण आलेला पाहून मुनींनीं दयार्द्र होऊन त्याच्यावर कृपा केली. व त्याच्या राज्याची संकटापासून मुक्तता होण्यासाठीं फिरून दुसरी आहुति टाकून सर्व राष्ट्रावरील संकट दूर केलें. याच ठिकाणीं पूर्वीं देवगुरु बृहस्पतींनीं राक्षसांच्या नाशाकरितां व देवांच्या संरक्षणाकरितां मांसाच्या आहूती देऊन यज्ञ केला होता व त्यामुळें सर्व राक्षसांचा फडशा पडला. अशा प्रकारच्या ह्या शत्रूंचा नाश करून टाकणाऱ्या पवित्र तीर्थामध्यें स्नान करून उत्तम उत्तम वस्त्रें, हत्ती, घोडे, रथ, व रत्नें वगैरे नानाप्रकारची संपत्ति देऊन ब्राह्मणांना इच्छाभोजन घालून बलराम यायात तीर्थाला गेले.

ह्या तीर्थांत नहुष राजाचा मुलगा ययाति यानें पूर्वीं एकदां यज्ञ केला होता. त्या वेळीं सरस्वतीनें ययातीच्या औदार्यानें व भक्तीनें संतुष्ट होऊन लोणी व दूध उत्पन्न केलें होतें. व पुन्हां दुसऱ्या वेळीं जेव्हां ययातीनें यज्ञ केला तेव्हांही सरस्वतीनें ह्याच्या भक्तीला संतुष्ट होऊन यज्ञांतील ब्राह्मणांच्या सर्व इच्छा तृप्त करून त्यांना उत्तम उत्तम घरें, वस्त्रें व इतर वस्तु देऊन संतुष्ट केलें होतें. व ही सर्व देणगी राजाची आहे असें मानून त्या ब्राह्मणांनीं ययाति राजाला आनंदानें आशीर्वाद दिले. ह्या तीर्थांतील सर्व विधि आटोपून बलराम वशिष्ठापह नांवाच्या तीर्थाला गेले.

## ६३ वशिष्ठापह तीर्थाचें वर्णन. (९.४२-४३)

विश्वामित्रांच्या मनांत महामुनि वशिष्ठांविषयीं व त्यांच्या तपश्चर्येबद्दल मत्सर उत्पन्न झाला होता. त्यामुळें ते वशिष्ठांना नेहमीं पाण्यांत पहात असत. वशिष्ठांचा आश्रम सरस्वतीच्या पूर्वतीरीं स्थाणु नांवाच्या तीर्थावर होता व तेथेंच पलीकडील तीरावर विश्वामित्रांचा होता ह्या ठिकाणीं शंकरानीं पूर्वीं उग्र तपश्चर्या केली होती. व तिची सिद्धि झाल्यानंतर त्यांनीं सरस्वतीची पूजा करून येथें तीर्थाची स्थापना केली. तेव्हां ह्या तीर्थाला स्थाणु तीर्थ असें नांव पडलें. ह्याच ठिकाणीं देवांनीं तारकासुराला मारण्याच्या वेळीं कार्तिकस्वामीला सेनापत्याभिषेक केला होता. येथें असतांना विश्वामित्र व वशिष्ठ यांच्यामधील वैर दिवसेंदिवस अधिकाधिक वाढत चाललें. त्यांतून विश्वामित्र महाकोपी असल्यामुळें वशिष्ठांच्या नाशाविषयीं विचार करूं लागले. परंतु वशिष्ठमुनि सात्विक असल्यामुळें त्यांचें तपस्तेज जोरावर होतें. तें सहन न होऊन विश्वामित्रांनीं विचार केला कीं, ही सरस्वती आपल्या प्रवाहाच्या वेगानें वशिष्ठांला येथपर्यंत वाहून आणील व ते येथें आल्यानंतर मी त्यांना सहजच मारून टाकीन. असा विचार करून त्यांनीं सरस्वतीचें ध्यान केलें. त्याबरोबर त्यांचा राग ओळखून ती कांपत कांपतच त्यांच्यापुढें हात जोडून काय आज्ञा आहे ह्मणून येऊन उभी राहिली. तेव्हां विश्वामित्रांनीं रागानें ताबडतोब वसिष्ठांला येथें घेऊन ये, असें तिला सांगितलें. तेव्हां ती अधिकच घाबरली व वसिष्ठांचा तपःप्रभाव लक्षांत आणून त्यांपुढें येऊन ही सर्व हकीकत तिनें त्यांना सांगितली. वसिष्ठ तिला ह्मणाले. 'हे सरिच्छ्रेष्ठ, मनांत बिलकुल शंका न आणतां तूं मला खुशाल वाहून ने. मात्र लौकर ने; नाहीं तर ते तुला विनाकारण शाप देतील.' याप्रमाणें त्यांना दयार्द्र पाहून वसिष्ठऋषि आपल्या कांठीं जप करीत बसले असून विश्वामित्र होमांत गुंतले असतां हीच योग्य संधि आहे असें जाणून, झपाट्यानें एक जोराचा प्रवाह सोडून तिनें वसिष्ठांना विश्वामित्रांकडे वहावत नेलें. वहात जातांना वसिष्ठांनीं, 'हे देवि सरस्वति, तुझा उगम मानसस-

रोवरापासून असून तुझ्याच पवित्र उदकानें सर्व जग पूत झालें आहे, तूंच आकाशांतील मेघांना पाण्याचा पुरवठा करतेस व तुझ्याच योगानें आह्मांला ध्यानधारणादि करतां येतें, तूंच, पुष्टि द्युति, कीर्ति, बुद्धि व उमा आहेस.' इत्यादि प्रकारें तिची स्तुति केली. त्यांना मारण्याकरितां एखादें हत्यार सांपडतें काय पहावें, ह्मणून विश्वामित्र इकडे तिकडे पाहूं लागले. इतक्यांत आतां ब्रह्महत्या होईल ह्या भीतीनें वसिष्ठमुनींना तिनें झटदिशीं पुनः परत पूर्वेकडे वाहून नेलें. याप्रमाणें गाधिपुत्र विश्वामित्र याला फसवून वसिष्ठांचा प्राण तिनें वांचविला. इकडे सरस्वतीनें आपणाला फसवून वसिष्ठांला परत नेलें हें पाहून रागानें लाल होऊन विश्वामित्रांनीं तिला 'पाण्याच्या रूपानें न वाहतां तूं रक्ताच्या रूपानें वहाशील' असा शाप दिला. तेव्हांपासून सरस्वती त्या ठिकाणीं रक्तरूपानें वाहूं लागली. याप्रमाणें, या तीर्थाला वसिष्ठापह असें नांव पडलें.

पुढें सरस्वतींतून रक्त वाहूं लागलें हें पाहून राक्षसांनीं येऊन तिच्या ठिकाणीं वस्ती केली. एखाद्याला स्वर्गप्राप्ति झाल्यानें जसा आनंद होतो त्याप्रमाणें ह्या राक्षसांना ही रक्ताची नदी सांपडल्यानें आनंद झाला. रोज यथेच्छ रक्त पिऊन, नाचत, बागडत व नानाप्रकारच्या क्रीडा करीत सुखानें ते त्या ठिकाणीं काळ क्रमूं लागले.

पुढें एकदां सर्व ऋषि मिळून तीर्थयात्रा करण्याकरितां निघाले. ते सर्व ठिकाणचीं पवित्र तीर्थें पहात पहात येथें आले. व सरस्वतींतून रक्त वहात आहे, शिवाय राक्षसांनीं तिच्या कांठीं आपलें ठाणें बसविलें आहे, हें पाहून त्या तपोधनांना फार वाईट वाटलें. या दुःखद स्थितीचें कारण विचारल्यावरून सरस्वतीनें त्यांना झालेली सर्व हकीकत सांगितली. ती ऐकून त्यांनीं परस्परांमध्यें विचार करून तिला शापमुक्त करण्याच्या निश्चयानें घोर तपश्चर्या सुरू केली, व उपवास, नाना प्रकारचीं कष्टदायक व्रतें, इंद्रियदमन इत्यादिकांनीं पशुपति शंकराला प्रसन्न करून घेऊन सरस्वतीला तिच्या भयंकर शापापासून सोडविली. तेव्हांपासून ती पूर्वीप्रमाणें स्वच्छ पाण्यानें वाहूं लागली. परंतु रक्ताच्या ऐवजीं स्वच्छ पाणी वाहूं लागल्यानें राक्षसांना अन्न मिळेना. ते उपाशी तडफडूं लागले. अशा रीतीनें भुकेनें व्याकुळ होऊन सर्व राक्षस पुन्हां याच मुनींना शरण आले. व ह्मणूं लागले कीं, महाराज, आह्मी सर्व उपाशी मरत आहों. हे मुनिश्रेष्ठ, आह्मी पापाचारी धर्मभ्रष्ट आहों. आपल्या अवकृपेनें व आमच्या दुष्कृत्यांनीं आह्मी या ब्रह्मराक्षसांच्या योनीला आलों आहों. परस्त्रीच्या ठिकाणीं पापबुद्धि ठेवणारे व ब्राह्मणांचा व आपल्या गुरूंचा द्वेष करणारे अगर आपल्या वडिलांचा अपमान करणारे या सर्वांना हाच जन्म येतो. हे ब्राह्मणश्रेष्ठांनो, आतां आमची ह्यांतून सुटका करावी. आपण तिन्ही लोकांचें रक्षण करण्याला समर्थ आहां.' ही त्यांची प्रार्थना ऐकून ते सर्व ऋषि राक्षसांची या नीच जन्मांतून मुक्तता करण्याकरितां सरस्वतीची प्रार्थना करूं लागले. तेव्हां महर्षींच्या शब्दाला मान देऊन सरस्वतीनें ह्यांच्या मुक्ततेकरितां अरुणा नांवाचा आपलाच एक फांटा उत्पन्न केला. नंतर ह्या अरुणेमध्यें स्नान करून सर्व राक्षस मुक्त होऊन स्वर्गाला गेले. ह्याच अरुणेमध्यें स्नान करून इंद्र, ब्रह्महत्येपासून झालेल्या पातकांतून मुक्त झाला. ती हकीकत अशीः—

इंद्र व नमुचि ह्या दोघांमध्यें एकदां वांकडें आलें. तेव्हां नमुचि इंद्राला भिऊन सूर्यकिरणांत जाऊन शिरला. नंतर इंद्रानें पुन्हां त्याच्याशीं तह करून सांगितलें कीं, 'हे असुरश्रेष्ठा, मी तुला वाळलेल्या पदार्थानें मारणार नाहीं, किंवा ओल्या पदार्थानेंही मारणार नाहीं, रात्रीं मारणार नाहीं व दिवसांही पण मारणार नाहीं. हें तुला मी अगदीं शपथपूर्वक सांगतों.' हें बोलणें त्याला मान्य झाल्यामुळें दोघांचेंही पहिल्याप्रमाणें सख्य झालें. पुढें एकदां दाट धुकें पडलें आहे असें पाहून इंद्रानें पाण्याच्या फेंसानें नमुचीचें डोकें उडविलें. तें डोकें इंद्राच्या मागें लागून त्याला नेहमीं 'अरे पाप्या मित्रघातक्या,' असें ह्मणूं लागलें. यामुळें त्रासून जाऊन इंद्रानें ही सर्व हकीकत ब्रह्मदेवांला कळवून यांतून मुक्त होण्याचा उपाय विचारला. तेव्हां ब्रह्मदेवांनीं सांगितलें कीं, अरुणेच्या तीरीं जा व तेथें यथाशास्त्र यज्ञ करून स्नान कर, ह्मणजे तूं या संकटापासून मुक्त होशील. ही नदी पूर्वीं गुप्त होती. हि-

ला ऋषींनीं प्रकट केलें. सरस्वती व अरुणा ह्यांचा संगम झालेलें ठिकाण फार पवित्र आहे. ' हें ऐकून इंद्रानें त्या संगमावर यथाविधि यज्ञ करून स्नान केलें. त्याबरोबर इंद्रब्रह्महत्येच्या दोषापासून मुक्त झाला व तें नमुचीचें डोकेंही त्या पवित्र जलाच्या स्पर्शानें पावन झालें, याप्रमाणें इंद्र व नमुचि हे दोघेही मुक्त होऊन स्वर्गाला गेले.

ह्या पवित्र तीर्थी स्नान करून व पुष्कळ दानधर्म करून बलराम, ज्या ठिकाणीं पूर्वी प्रत्यक्ष चंद्रानें राजसूय यज्ञ केला होता, व ज्या यज्ञांत अत्रिऋषि होते, ज्या तीर्थाजवळच देवदानवांचें युद्ध होऊन कार्तिकस्वामीनें तारकासुराला त्या युद्धांत ठार केलें. अशा सोमतीर्थाकडे गेले.

## ६४ कार्तिकस्वामींचें चरित्र. (९.४४-५०)

पूर्वी एकदां श्रीमहादेवाचें वीर्य अग्नींत गळून पडलें. त्यापासून उत्पन्न झालेल्या गर्भानें अग्नि दिवसेंदिवस अधिक तेजस्वी दिसूं लागला. परंतु पुढें तो गर्भ त्याच्यानें सहन करवेना ह्मणून त्यानें ब्रह्मदेवाच्या परवानगीनें तो गंगेंत नेऊन टाकला. पण गंगेलाही सूर्यासारखा तेजस्वी असा तो गर्भ धारण करवेना. ह्मणून तिनें तो गर्भ हिमालयावर टाकला. तेव्हांपासून पुढें तो हिमालयावरच पूर्णदशेला आला. नंतर डोंगरावरील गवतावरच उघड्या ठिकाणीं वाढलेलें पण अतिशय तेजस्वी असें तें बालक कृत्तिकांच्या नजरेस पडलें. त्या साहीजणी निपुत्रिक होत्या. ह्मणून त्यांपैकीं प्रत्येकजणी ' हा माझा बालक, हा माझा बालक ' ह्मणून उत्सुकतेनें त्याला घेण्यासाठीं पुढें धांवल्या. तेव्हां त्यांच्या स्तनांतून अपत्य प्रेमानें दूध गळूं लागलें. हें पाहून व ह्या सर्वांनाही आपण हवें आहों हें जाणून त्या बालकानें सहा तोंडांनीं त्या सर्वांचेंही स्तनपान केलें.. हें त्या बालकाचें अचाट कृत्य पाहून दिव्य अशा कृत्तिकांनाही फार आश्चर्य वाटलें. पर्वतावर ज्या ठिकाणीं हें बालक वाढलें तें सर्व स्थान सुवर्णमय झालें. यानें कृत्तिकांचें स्तनपान केलें ह्मणून कार्तिकेय व गंगेमध्यें हा गर्भ होता ह्मणून गांगेय अशीं याला नावें पडलीं. पुढें त्या पर्वतावर उघड्या गवतावरच चंद्रकलेप्रमाणें हा दिवसेंदिवस वाढूं लागला. तेव्हां पुष्कळ मुनि याचें दर्शन घेण्याकरितां व गंधर्व स्तुतिपर गाणें गाण्याकरतां येऊं लागले. सुंदर सुंदर अशा देवकन्याही आनंदानें नाचत व गाणें गात याला पाहण्याकरितां आल्या. महानदी गंगा व पृथ्वी याही सुंदर रूप धरून आपल्या कुमाराकडे आल्या. बृहस्पतींनीं ह्या कुमाराचे जातकर्मादि सर्व संस्कार केले. नंतर वेदही या कुमारापुढें निरनिराळे चार देह धारण करून हात जोडून उभे राहिले. पुढें या कुमारानें पार्वतीसह प्रत्यक्ष शंकरांना पाहिलें. त्यांच्याभोंवतीं विचित्र आकाराचे असे पिशाच्चगण होते. कित्येकांचीं तोंडें वेडीं वांकडीं निरनिराळ्या प्राण्यांच्या तोंडांसारखीं होतीं. कित्येकांचे सर्वच देह विद्रूप होते. कांहीं पर्वतासारखे धिप्पाड होते. कित्येक काडीसारखे कृश होते; व कांहीं क्षीरसमुद्राप्रमाणें पांढरे शुभ्र होते; त्याचप्रमाणें कार्तिकेयाच्या दर्शनाला सप्तमातृगण, साध्य, विश्वेदेव, मरुद्गण, पितृगण, अकरा रुद्र, बारा आदित्य, सिद्ध, दानव, ब्रह्मदेव, विष्णु, इंद्र, व नारदादि देवर्षी व सर्व ब्रह्मर्षिही आले होते. महादेव सर्व परिवारांसह येत आहेत हें पाहून महायोगी गांगेय त्यांना सामोरा गेला. त्याला सामोरा येतांना पाहून महादेव, पार्वती, अग्नि व गंगा या सर्वांच्या मनांत एकदम असें आलें कीं, हा आतां माझ्याकडे येईल. हें त्यांचें मनोगत जाणून प्रभु कार्तिकेयानें योगबलानें एका क्षणांत आपल्या स्वतःच्या स्कंद, शाख, विशाख व नैगमेय अशा चार मूर्ति निर्माण केल्या. त्यांपैकीं स्कंद नांवाची मूर्ति शंकराकडे गेली, विशाख नांवाची पार्वतीकडे गेली, शाख नांवाची अग्नीकडे गेली व नैगयेम गंगेकडे गेली, या चारी मूर्ति अगदीं हुबेहूब होत्या व त्या सर्वांच्याकडे एकदम गेल्या. हें पाहून देवांनाही आश्चर्य वाटलें. राक्षस व दैत्य यांच्यामध्यें तर हाहाकारच उडाला. नंतर शंकर, पार्वती, अग्नि व गंगा यांच्या विनंतीवरून पितामहांनीं या कुमाराला सर्व विश्वाचें सेनापत्य दिलें; व सर्वांना आज्ञा केली कीं, आजपासून तुह्मी सर्वजण याच्या ताब्यांत वागा, नंतर ब्रह्मादि सर्व देव व गंधर्वादि उपदेव हे सर्व कुमाराला अभिषेक करण्यासाठीं त्याला बरोबर घेऊन ज्या ठिकाणीं सरस्वतीचा उगम झाला आहे अशा हिमालयाच्या पायथ्याशीं असलेल्या समंतपं

चक नांवाच्या देशाकडे आले.

या ठिकाणीं अभिषेकाला लागणारें सर्व साहित्य जमवून देवगुरु बृहस्पतींनीं अग्नि प्रदीप्त करून यथाविधि हवन केलें. नंतर हिमालयानें दिलेल्या सुंदर रत्नखचित सिंहासनावर कुमाराला बसवून मंगलवाद्यें वाजवीत मोठ्या थाटानें सुवर्णकलशांत पवित्र सरस्वतीचें पाणी घेऊन, आनंदानें सर्व देवांनीं कुमाराला सेनापत्याभिषेक केला. या पूर्वी अशा थाटाचा अभिषेक फक्त वरुणालाच झाला होता. ह्या समारंभाचे वेळीं ब्रह्मदेवांनीं आनंदानें; नंदिसेन, लोहिताक्ष, घंटाकर्ण व कुमुदमाली या नांवाचे चार परिचारक स्कंदाला दिले. हे मोठे पराक्रमी, योगबलानें युक्त व स्वतःच्या इच्छेप्रमाणें शक्ति व उत्साह धारण करणारे होते. नंतर स्थाणूनींही एक परिचारक स्कंदाला प्रेमपूर्वक दिला व इंद्रादि देवांनीं या वीरशाली सेनापतीला आपली अजिंक्य सेना देऊन मोठ्यानें जयजयकार केला. प्रत्यक्ष कालासारखे भयंकर असे उन्माथ व प्रमाथ या नांवाचे दोन प्रतापी परिचारक यमानें सेनापति स्कंदाला दिले. सूर्यानें सुभ्राज व भास्वर या नांवाचे आपले दोन सेवक याला दिले. सोमानें मणि व सुमणि या नांवाचे आपले दोन चाकर प्रेमपूर्वक दिले. ज्वालाजिव्ह व ज्योति ह्या नांवाचे, शत्रूंवर वाघासारखें तुटून पडून त्यांचा फडशा पाडणारे असे आपले दोन सेवक अग्नीनें आपल्या मुलाला दिले. अंशानें, परिघ, वट, पराक्रमी भीम, रणशूर दहति आणि दहन या नांवाचे पांच योद्धे बुद्धिमान स्कंदाच्या तैनातीला दिले. इंद्रानें उत्क्रोश व पंचक या दोघांना अग्निपुत्राच्या दिमतीला पाठविलें. यांपैकीं पहिला वज्रधारी होता, व दुसरा दण्डधारी होता. विष्णूनें चक्र, विक्रमक व शूरसंक्रम, असे तीन पट्टे, वैद्यशास्त्रामध्यें प्रवीण अशा अश्विनीकुमारांनीं सर्व विद्या ज्यांना अवगत आहेत असे वर्धन व नंदन नांवाचे दोन पुरुष व पार्वतीनें उन्माद, शंकुकर्ण व पुष्पदंत असे तीन वीर कार्तिकेयाच्या सेवेला दिले. त्याचप्रमाणें या मंगलप्रसंगीं सर्व देवांनीं व गंधर्वादि उपदेवांनीं आपापले योद्धे कार्तिकस्वामीच्या स्वाधीन केले. व कित्येक शूर पुरुष आपण स्वतःच या प्रतापी सेनापतीच्या हाताखालीं काम करण्याला व त्याला यथाशक्ति साह्य करण्याला तयार झाले. नंतर वैष्णवी, ब्राह्मी, सौरी इत्यादि शक्त्या इंद्राच्या संमतीनें सेनापति कुमार याच्याकडे आल्या, त्याचप्रमाणें सात मातृगणही कार्तिकेयाच्या सेवेला व असुरांचा नाश करण्याकरितां आपण होऊन तयार झाले. इंद्रानें स्वतःचे पुष्कळ अस्त्र, शक्त्या व घणघण नाद करणारी अशी मोठी घंटा ज्याला लटकावली आहे व प्रातःकालच्या सूर्याप्रमाणें जिचें पांढरें तेज चमकतें आहे अशी शुभ्र पताका शूर सेनापति गुह याला दिली. पशुपति शंकरांनीं, शूर तपोबलयुक्त, नाना प्रकारचीं आयुधें घेतलेली व अजिंक्य अशी धनंजय नांवाची सेना त्याच्या ताब्यांत दिली. विष्णूनें याला आपली वैजयंती माला दिली. ही धारण करणाऱ्याचा उत्साह कधींही व कसल्याही संकटकालीं नाहींसा होत नाहीं. पार्वतीनें सूर्यासारखीं तेजःपुंज अशीं दोन वस्त्रें, गंगेनें नेहमीं अमृत देणारा असा कमंडलू, बृहस्पतींनीं एक दण्ड व ब्रह्मदेवांनीं उत्तमसें कृष्णाजिन, हीं प्रेमपूर्वक षडाननाला दिलीं. शेवटीं जगत्कर्त्या परमेश्वरानें स्कंदाला सर्व युद्धांत जय मिळेल ह्मणून आशीर्वाद दिला.

याप्रमाणें सर्व देवांचें सेनापत्य मिळाल्यामुळें कार्तिकेय पेटलेल्या अग्नीप्रमाणें तेजःपुंज दिसूं लागला. नंतर आपल्या सेनेला व सर्व मातृगणांना बरोबर घेऊन दैत्यांचा नाश करण्याकरितां गुहानें कुच केलें. ह्या वेळच्या ह्याच्या तयारीला पाहून देवांना फार आनंद झाला. भेरी, शंख वगैरे रणवाद्यें, नाना प्रकारचीं शस्त्रें, पताका व घंटा यांच्या योगानें सर्व सेना शरदृतूच्या शुक्लपक्षांतील स्वच्छ आकाशाप्रमाणें शोभूं लागली. कुचाचे आरंभीं सर्व देव, भूतगण व बाकीचे सैनिक यांनीं नगारे, शंख झांजा व दुसरीं अशाच तऱ्हेचीं मोठ्या आवाजाचीं रणवाद्यें वाजवावयाला सुरवात केली. इंद्रादि देव सेनापतीची स्तुति करूं लागले. गंधर्व गाऊं लागले व अप्सरा नाचूं लागल्या. व्यवसाय, जय, धर्मसिद्धि, लक्ष्मी, धैर्य, व स्मृति हे सर्व सैन्याच्यापुढें होते. चालतांना वाटेंत गुहानें एक गंभीर सिंहनाद केला. तो ऐकून व सर्व शस्त्रास्त्रांनीं युक्त अशा गुहाला पाहून सर्व दैत्य भयानें सैरावैरा

चहूंकडे धांवूं लागले. देवांनीं आपलीं शस्त्रास्त्रें सांवरून त्यांच्यावर चाल केली. महासेनानेंही रागावून पुष्कळ शक्ति व अस्त्रें सोडलीं. त्या अस्त्रांपासून व शक्तीपासून प्रलयकालाप्रमाणें उल्कापात झाला. पुढें कांहीं वेळ देवदानवांची झटापट उडाल्यावर शेवटीं कार्तिकस्वामीनें तारकासुराला ठार केलें. या वेळीं या दैत्याच्या संरक्षणाला दहा लक्ष दैत्य व दहा शूर असे दैत्यसरदार आपलीं शस्त्रें सावरून तयार होते. ह्या सर्वांचा गुहानें फडशा पाडला, नंतर, महिष, त्रिपाद व हृदोदर ह्या दैत्याधिपतींना व यांच्या सेवकांना त्यानें गारद केलें. हें आपल्या सेनापतीचें कृत्य पाहून देव आनंदानें नाचूं लागले.

ह्याप्रमाणें कार्तिकेयानें सर्व दैत्यांचा फडशा पाडला. परंतु बाण नांवाचा एक दैत्य कार्तिकस्वामीला भिऊन क्रौंच नांवाच्या पर्वताचा आश्रय करून राहिला होता. तेव्हां अग्निपुत्र षडाननानें आपल्या पित्यांनीं दिलेल्या शक्तीनें त्या क्रौंच पर्वताला फोडून टाकलें. तेव्हां त्या पर्वताचा आश्रय करून असलेल्या पशु, पक्षी, इत्यादि वनचरांची व विद्याधरादि उपदेवतांची फार धांदल उडाली. आपल्या आश्रयस्थानाचा फडशा पडल्यामुळें सर्व दैत्य भराभर बाहेर येऊं लागले. तेव्हां देवांनीं त्यांना मारण्याचा सपाटा चालविला. शेवटीं देवसेनापतीनें आपल्या अजिंक्य अस्त्रानें बाणाचाही फडशा पाडला. तेव्हां सर्व देवांना अतिशय आनंद झाला. जिकडे तिकडे दुंदुभी, शंख व घंटा वाजूं लागल्या. देवस्त्रियांनीं भगवान् गुहावर पुष्पवृष्टि केली. वायू चहूंकडे सुगंध असा वाहूं लागला. महर्षींनींही यांची पूजा केली. याला कित्येक लोक, ब्रह्मयोनि असें ह्मणतात; कित्येक उमापुत्र, कित्येक गंगापुत्र, कित्येक शंकरपुत्र, कित्येक कृत्तिकापुत्र, व कित्येक अग्निपुत्र ह्मणतात. याप्रमाणें या ठिकाणीं सर्व दैत्यांचा फडशा पाडला ह्मणून याला तेजसतीर्थ असें नांव आहे. याच ठिकाणीं सर्व देवांनीं वरुणालाही सर्व जळाचा अधिपति कल्पून अभिषेक केला. या ठिकाणीं स्नान करून व सर्व तीर्थविधि आटोपून बलराम अग्नितीर्थाला गेले. या ठिकाणीं भृगु ऋषींच्या शापामुळें भिऊन शमीच्या झाडामध्यें दडून राहिलेला अग्नि देवांना सांपडला. त्या अग्नितीर्थामध्यें स्नान करून बलराम ब्रह्मयोनि नांवाच्या तीर्थाकडे गेले. या ब्रह्मयोनि तीर्थामध्यें स्नान करून बलराम कौबेर तीर्थाला गेले. या तीर्थीं तप करून कुबेरानें देवांची खजीनदारी मिळविली. येथें येऊन बलराम, कुबेरानें ज्या ठिकाणीं तपश्चर्या केली होती तें वन पाहून स्नानादि सर्व तीर्थविधि आटोपून पुढें बदरपाचन नांवाच्या तीर्थाकडे वळले.

या बदरपाचन तीर्थामध्यें पुष्कळ तपस्वी व सिद्धमुनी राहतात. या ठिकाणीं पूर्वीं भरद्वाजाच्या श्रुतावती नांवाच्या मुलीनें 'देवश्रेष्ठ मला नवरा मिळावा' ह्मणून फार कडक तपश्चर्या केली. तिच्या त्या उग्र व एकनिष्ठ तपश्चर्येनें संतुष्ट होऊन इंद्र वसिष्ठाचें रूप घेऊन तिच्या आश्रमाला आला. तिनें त्यांची मुनींच्या आचाराला योग्य अशी पूजा केली. नंतर वसिष्ठरूपी इंद्र तिला ह्मणाला, 'हे सुव्रते, तूं उग्र तपश्चर्या करीत आहेस हें मला माहीत आहे व तूं ही तपश्चर्या कशाकरितां करीत आहेस हेंही पण मी जाणतों. हे कल्याणि, तुझे सर्व मनोरथ सफल होतील. तपश्चर्येनें सर्व कांहीं मिळतें. देवलोक सुद्धां तपश्चर्येनें मिळतो. सारांश तप हेंच सर्व सुखाचें मूळ आहे. आतां हे सुंदरि, मी सांगतों तेवढें कर, ह्मणजे तुझे मनोरथ पूर्ण होतील.' असें सांगून त्या वसिष्ठरूपी इंद्रानें पांच बोरें तिच्या हातावर ठेवून तीं शिजवावयाला सांगितलीं. नंतर इंद्र तेथून निघून जाऊन जवळच एका तीर्थीं–याच तीर्थाला पुढें इंद्रतीर्थ असें नांव पडलें–तिचीं तीं बोरें शिजूं नयेत अशाबद्दल आपण जप करीत बसला. इकडे श्रुतावतीनें त्या मुनीच्या शब्दाला मान देऊन शुचिर्भूत होऊन तीं बोरें शिजत ठेविलीं. त्या बोरांकरितां तिनें त्या अरण्यांतील सर्व लांकडें आणून जाळलीं. तरी त्या बोरांना थोडादेखील मऊपणा आला नाहीं. संध्याकाळ झाली तरी सुद्धां कांहींच परिणाम होईना. लांकडें नसल्यामुळें खालचा जाळ मात्र विझत चालला. तेव्हां तिनें लांकडें नव्हतीं ह्मणून आपलें स्वतःचें शरीर जाळण्याचा निश्चय करून आपले दोनही पाय चुलींत घातले. ते पाय जसजसे जळत तसतसे ती आंत आंत सारीत असे. पाय जळत चालले परंतु बोरें कांहीं शिजेनात. तरी तिच्या मनाला त्याबद्दल कांहींच बा-

टलें नाहीं. 'हीं बोरें चांगलीं शिजीव, ह्मणजे तुझे मनोरथ पूर्ण होतील' हें त्या ऋषींचें वाक्य तिच्या मनांत साखरे घोळत होतें. शरीर जळत असतांना ती थंड पाण्यांत बसल्याप्रमाणें स्वस्थ बसली होती. ते दोनही पाय अग्नीनें जाळून टाकले, परंतु त्याबद्दल तिला यत्किंचित्‌ही वाईट वाटलें नाहीं. हें तिचें कृत्य पाहून इंद्रानें संतुष्ट होऊन आपलें रूप प्रकट करून सांगितलें कीं, 'हे महाभागे, मी तुझ्या भक्तीनें व सदाचरणानें संतुष्ट झालों आहें. तुझे सर्व मनोरथ पूर्ण होतील. तूं हा देह सोडून निरंतर स्वर्गामध्यें माझ्याजवळ रहाशील. तसेंच हें तीर्थ बदरपाचन नांवानें प्रसिद्ध राहील, व या ठिकाणीं मुनी नेहमीं होमहवनादि पुण्यकर्मे करून रहातील व या तीर्थी स्नानादि विधी करणारे पुरुष निष्पाप होतील.

'हे पुण्यशीले, पूर्वीं एकदां सर्व सप्तर्षि मिळून फळें, कंद, व मुळें आणण्याकरितां हिमालयाला गेले. जातांना त्यांनीं एकट्या अरुंधतीला येथें ठेवलें. ते गेल्यानंतर इकडे लगेच बारा वर्षांचा मोठा दुष्काळ पडला. त्यामुळें अरुंधतीला अन्न मिळेना. ऋषी आपले तिकडेच आश्रम बांधून स्वस्थ राहिले. तेव्हां अरुंधतीनें तपश्चर्या करण्याला आरंभ केला. तिच्या त्या उग्र तपश्चर्येनें संतुष्ट होऊन प्रत्यक्ष महादेव ब्राह्मणाचें रूप घेऊन तिच्याकडे भिक्षा मागण्याकरितां आले. तेव्हां त्या साध्वीनें सांगितलें कीं, 'भगवन्‌ घरांतील अन्नसामुग्री संपली आहे. थोडीं बोरें आहेत. तीं पाहिजे असल्यास घ्या. हें ऐकून त्यांनीं सांगितलें कीं, कांहीं हरकत नाहीं. तींच चांगलीं शिजीव ह्मणजे झालें. ह्यावर त्या साध्वीनें बरें आहे असें ह्मणून अग्नि पेटविला व त्यावर ब्राह्मणाकरितां बोरें शिजत ठेविलीं. तीं बोरें शिजवीत असतां त्यांनीं येऊन तिला उत्तम उत्तम अशा देवादिकांच्या गोष्टी सांगितल्या. याप्रमाणें कांहीं न खातां व न पितां तीं बोरें शिजवीत, ब्राह्मणाच्या तोंडच्या मनोरम गोष्टी ऐकत व तपश्चर्या करीत तिनें तीं अवर्षणाचीं बारा वर्षे आनंदानें एक दिवसाप्रमाणें घालविलीं. नंतर ते ऋषी आले. तेव्हां तिला पूर्वीप्रमाणेंच सेवा करण्यास सांगितलें. नंतर त्यांनीं आपलें खरें स्वरूप प्रगट करून अरुंधतीला सांगितलें कीं, 'हे कल्याणि, आतां तुला पाहिजे असेल तो वर माग.' हें ऐकून त्या महासाध्वीनें उत्तर केलें, 'हे भगवन्‌ जर तुह्मी संतुष्ट झालां असाल तर मला एवढें द्या, 'हें तीर्थ बदरपाचन नांवानें प्रसिद्ध राहूं दे. ह्या ठिकाणीं नेहमीं सिद्ध पुरुषांची वस्ती असूं दे. व ह्या तीर्थी येऊन जो कोणी तीन रात्र उपाशीं राहील त्याला बारा वर्षेपर्यंत उपाशीं राहून मीं जें तप केलें, व त्याचें जें पुण्य मला मिळालें तितकें पुण्य मिळावें' हें ऐकून बरें आहे, असें सांगून शंकर कैलासाला निघून गेले. हें अरुंधतीचें कृत्य पाहून सर्व ऋषींना मोठा विस्मय झाला. याप्रमाणें अरुंधतीनें आपल्या तपाचरणानें येथें सिद्धि मिळविली. पण तूं माझ्याकरितां तप करीत असतांना त्या अरुंधतीच्याही पुढें मजल मारलीस. तूं ज्याप्रमाणें येथें विशेष कडकपणानें तपश्चर्या केलीस त्याप्रमाणें मीही तुला अरुंधतीहून एक विशेष वर देऊन ठेवितों. ह्या ठिकाणीं जो एक रात्र राहून ह्या तीर्थांत स्नान करील त्याला मरणानंतर उत्तम गति मिळेल.' इतकें बोलून इंद्र स्वर्गाला निघून गेला. तो निघून गेल्यानंतर त्या क्षेत्रांत पुष्कळसा पाऊस पडला. इकडे श्रुतावतीही आपला नश्वर देह टाकून स्वर्गी जाऊन इंद्राबरोबर आनंदानें रममाण होऊन राहिली.

येथें स्नान करून व दानधर्म करून बलराम इंद्रतीर्थाला गेले. या ठिकाणीं इंद्रानें शंभर यज्ञ केले होते. ह्मणून तेव्हांपासून इंद्राला शतक्रतु हें नांव मिळालें व ह्या तीर्थाला इंद्रतीर्थ असें नांव मिळालें. ह्या ठिकाणचेही सर्व तीर्थविधि आटोपून बलराम रामतीर्थाला गेले. येथें भार्गवरामांनीं एकवीस वेळ निःक्षत्रिय पृथ्वी केल्यानंतर आपला उपाध्याय जो कश्यपमुनि त्याला बरोबर घेऊन शंभर अश्वमेध व वाजपेय यज्ञ केले होते. यज्ञाचे वेळीं भार्गवांनीं सर्व समुद्रवलयांकित पृथ्वीचें दान केलें होतें व त्यावर पुष्कळ अमूल्य अशी दक्षिणा दिली होती. ह्या रामतीर्थाचे सर्व तीर्थविधि आटोपून व वरुणतीर्थामध्यें स्नान करून हलधर आदित्यतीर्थाला गेले. ह्या तीर्थी यज्ञ करून सूर्यनारायणानें सर्व ज्योतिर्गणामध्यें श्रेष्ठपणा मिळविला आहे. द्वैपायनानींही याच तीर्थामध्यें स्नान करून योगसिद्धि

मिळविली. देवल ऋषीही पूर्वी याच ठिकाणीं गृहस्थाश्रमाचा स्वीकार करून होते. हे ऋषि आपल्या धर्मामध्यें नेहमीं तत्पर राहून शुद्ध रीतीनें वागत असत; कायावाचामनेंकरून कोणावर कधीं न रागावतां सर्वांशीं सारख्या रीतीनें वागत असत, कोणीं निंदा अगर वाईट केलें तरी त्याला कांहींही ह्मणत नसत; सोनें व मातीचें ढेंकूळ याला ते महामुनि सारखेच लेखीत; आलेल्या अतिथींचा सत्कार करून आपल्या देवपूजेंत ते नेहमीं गढले असत. अशा रीतीनें देवल ऋषि ब्रह्मचर्य व्रतामध्यें काल घालवीत असतांना जैगीषव्य नांवाचे कोणी एक महायोगी देवलांच्या आश्रमाकडे आले. त्या जैगिषव्यांनीं येथें राहून योगाभ्यास करून सिद्धि मिळविली. ते महामुनि या योग्यांची नित्य नियमानें पूजा करीत. याप्रमाणें त्या दोघांचीं या आश्रमांत बरींच वर्षें लोटलीं. परंतु तेवढ्या अवधींत ह्या योग्यांनीं त्या मुनीबरोबर अगदींच भाषण केलें नाहीं. हें पाहून असितांना त्यांचा कंटाळा आला. पुढें एके दिवशीं चिंताक्रांत होऊन हातीं कमंडलू घेऊन आकाशमार्गानें देवल समुद्राकडे निघून गेले. परंतु हे असितदेवलमुनि समुद्राकडे जाऊन पोहोंचले नाहींत तोंच त्यांच्या नजरेस जैगीषव्यमुनि आपल्यापूर्वी येऊन स्नान करीत आहेत असें आलें. तेव्हां असितमुनींना फार आश्चर्य वाटलें, नंतर ह्या मुनिवर्यांनीं आपलें स्नानसंध्यादि नित्यकर्म आटोपून आपल्याबरोबरचा कमंडलू भरून घेऊन, हे योगिराज अद्याप पाण्यांत बसले आहेत असें पाहून जलदीनें आपल्या आश्रमाकडे वळले. पण आश्रमांत येऊन पाहतात तों जैगीषव्य पूर्वीप्रमाणें आपल्या आसनावर स्वस्थ बसलेले दृष्टीस पडले. ‘ हे माझ्या आधीं समुद्राकडे केव्हां गेले व पुन्हां परत केव्हां आले हें कांहींच कळत नाहीं. तेव्हां हें काय गौडबंगाल आहे हें पहावें ’ ह्मणून असितमुनि एकदम आकाशांत उडाले. तेव्हां देवलऋषींच्या नज़रेस असें पडलें कीं, सर्व सिद्ध मिळून या जैगीषव्यांची पूजा करीत आहेत. पण पुन्हां कांहीं वेळानें त्यांनीं पाहिलें तों हे योगिराज पितृलोकांत दृष्टीस पडले. इतक्यांत जैगीषव्य पितृलोकाहून यमलोकाला गेले. नंतर हे योगी तेथून सोमलोकाला गेले. पण लगेच जैगीषव्य अग्निहोत्र्यांच्या लोकाला गेले. येथपर्यंत प्रत्येक लोकांत असितमुनि यांच्या मागून चालले होते, याप्रमाणें दर्श व पौर्णिमा या दोन्ही पर्वांचे वेळीं यज्ञ करणाऱ्यांना, पशुयज्ञ करणाऱ्यांना, चातुर्मास यज्ञ नियमानें करणाऱ्यांना, व अग्निष्टोम याजी, वाजपेययाजी, व राजसूययज्ञ करणारे यांना जे लोक मिळतात त्या त्या लोकांतून यांच्या मागून जाऊन शेवटीं पतिव्रतांच्या लोकापर्यंत जैगीषव्य पुढें व देवलमुनि मागें अशा रीतीनें हे दोघे चालले. पण तेथून देवलांना जैगीषव्य कोठें गेले हेंच मुळीं दिसेना. तेव्हां त्या योग्यांना पाहण्याच्या हेतूनें देवलांनीं अंतरिक्षांत भेटलेल्या सिद्धांना महाराज योगीश्रेष्ठ जैगीषव्य कोठें आहेत ह्मणून विचारलें. तेव्हां सिद्धांनीं त्याला सांगितलें कीं, जैगीषव्य ब्रह्मलोकाला गेले आहेत. आपला प्रवेश तेथें होणार नाहीं. तें ऐकून देवलमुनी पुन्हां गेले तसेच एकेक लोक उतरत खालीं आपल्या आश्रमाला परत आले. परंतु आश्रमांत येऊन पहातात तों जैगीषव्य पूर्वीप्रमाणें आपल्या आसनावर बसलेले त्यांच्या दृष्टीस पडले.

तेव्हां हात जोडून विनयपूर्वक तपोनिष्ठ जैगीषव्यांकडे जाऊन ते ह्मणाले, ‘ महामुने, मला मोक्षमार्ग सांगा. हें ऐकून त्या योगिश्रेष्ठांनीं त्या देवलमुनींना उपदेश दिला. व सर्व योगमार्ग सांगितला. परंतु मुनि आपला गृहस्थाश्रम व त्यांतील सर्व कर्में सोडून मोक्षमार्गाचा स्वीकार करीत आहेत हें पाहून सर्व भूतगणांना व पितृगणांना आतां आपली संभावना कोण करील ह्मणून मोठी काळजी पडली. तेव्हां मुनींनीं मोक्षमार्गाचा स्वीकार न करतां गृहस्थाश्रमांतच राहण्याचा निश्चय केला. तेव्हां सर्व वनस्पती, फळें, मुळें व ओषधी ह्या शोक करूं लागल्या कीं हा क्षुद्रबुद्धि देवल पुन्हां आह्मांला तोडणार व आमचा नाश करणार. ह्यानें सर्व प्राणिमात्रांला अभय दिलें परंतु ह्याला हें समजलें नाहीं कीं, ह्यामध्यें आमचे हाल होतात. हें जेव्हां देवलमुनींच्या कानीं आलें तेव्हां त्यांना मोठा विचार पडला. शेवटीं देवलमुनींनीं मोक्षमार्गच उत्तम आहे असें ठरवून मोक्षमार्गाचा स्वीकार केला; व निश्चयानें आणि एकाग्र अंतःकरणानें यो-

गाभ्यास करून सिद्धि मिळविली. तेव्हां बृहस्पती आदिकरून सर्व देव ह्या मुनिद्वयांकडे येऊन त्यांच्या तपःसामर्थ्याबद्दल त्यांची स्तुति करूं लागले.

याप्रमाणें देवल व जैगीषव्य यांची हकीगत आहे. या तीर्थांतील स्नानदानादि विधि आटोपून बलराम सोमतीर्थाला गेले. येथें पूर्वी सोमराजानें राजसूययज्ञ केला होता. याच ठिकाणीं तारकासुराचाही वध झाला होता. ह्या ठिकाणीं स्नान करून ब्राह्मणांना निरनिराळ्या प्रकारचीं दानें देऊन बलदेव सारस्वत तीर्थाला गेले. या ठिकाणीं पूर्वी सारस्वत मुनींनीं जेव्हां बारा वर्षेपर्यंत मुळींच पाऊस पडला नव्हता तेव्हांही विद्यार्थ्यांना वेदपाठ देऊन त्यांच्याकडून अध्ययन करविलें होतें.

---

## ६९ सारस्वत मुनींची हकीकत.

### (९-५१)

पूर्वी दधीचि या नांवाचे महातपस्वी ब्रह्मचर्यव्रतानें रहात होते. त्यांच्या उग्र तपश्चर्येला भिऊन इंद्रानें तिचा भंग करण्याकरितां अलंबुषा नांवाच्या अति सुंदर अप्सरेला त्यांना मोहविण्याकरितां ह्मणून पाठविलें. ऋषी देवतर्पण करीत असतांना तिला पाहून त्यांच्या मनांत विकार उत्पन्न होऊन रेतस्खलन झालें. तें रेत सरस्वतीनें धारण करून गर्भाचें पोषण केलें. नंतर योग्य कालीं ती प्रसूत होऊन तिला उत्तम मुलगा झाला. ह्या मुलाला घेऊन ती ऋषींकडे गेली. तेव्हां ऋषिमंडलामध्यें दधीच बसलेले होते. त्यांना पाहून सरस्वतीनें मुलाच्या जन्माची हकीकत सांगून त्याला दधीच्यापुढें केला. तेव्हां दधीचींनीं त्या मुलाला प्रेमपूर्वक आलिंगन देऊन त्याचें मस्तक हुंगिलें; व 'हे सुभगे ' तुझ्या पाण्यानें तर्पण केलें असतां, विश्वेदेव व पितृगण तृप्त होतील' असा सरस्वतीला आशीर्वाद देऊन ह्मणाले कीं, हा मुलगा ' सारस्वत ' या नांवानें प्रसिद्ध राहील. हा मोठा तपस्वी होईल, व पुढें कोणे एके वेळीं बारा वर्षेपर्यंत पाऊस पडणार नाहीं. त्यावेळीं हाच वेदपारग सर्व ब्राह्मणांना वेद शिकवील.

याच समयाला देवदानवांमध्यें युद्ध सुरूं झाले होतें. या युद्धामध्यें देवांना अपयश येऊं लागलें. ह्मणून इंद्र कोठें तरी चांगलीं हत्यारें मिळविण्यासाठीं तिन्ही लोकांमध्यें हिंडत होता. परंतु ज्यांच्या योगानें राक्षसांचा सहज फडशा पडेल अशीं उत्तम हत्यारेंच त्याला मिळेनात. तेव्हां इंद्र देवांना ह्मणाला, ' हे देवहो, ह्या असुरांना माझ्यानें मारवत नाहीं. दधीच ऋषींचीं हाडें मिळालीं तर मात्र आपणाला ह्या युद्धांत यश देईल. तर तुह्मी त्या मुनिवर्यांकडे जाऊन त्यांची प्रार्थना करा. व हाडें मिळाल्यास पहा. ' हें ऐकून देवांनीं दधीचांकडे येऊन त्यांचीं हाडें मागितलीं. देवांच्या ह्या प्रार्थनेला मान देऊन, त्यांचें हित करण्याकरितां दधीचमुनी देह ठेवून स्वर्गाला गेले. इकडे इंद्रानें त्या हाडांचीं गदा, वज्र, चक्र वगैरे उत्तम उत्तम नानाप्रकारचीं हत्यारें करविलीं. दधीच ऋषींचा देह भृगुऋषींनीं आपल्या तपोबलानें वाढविला होता म्हणून तो पर्वतासारखा मोठा झाला होता. ह्यांच्या तेजाला इंद्र सुद्धां भीत होता. नंतर ह्या दधीच ऋषींच्या हाडांनीं केलेल्या हत्यारांपैकीं वज्र घेऊन व तें ब्रह्ममंत्रानें मंत्रून इंद्रानें अति त्वेषानें दैत्यावर सोडलें. त्या योगें एका सपाट्यांत नव्याण्णव दैत्य एकदम ठार झाले.

पुढें कांहीं कालानंतर बारा वर्षांचा मोठा दुष्काळ पडला. ह्या बारा वर्षांत पाण्याचा एक टिपूसही पडला नाहीं. तेव्हां सर्व ऋषी आपापले पूर्वीचे आश्रम सोडून पोटासाठीं म्हणून बाहेर पडले. त्या वेळेला सारस्वत मुनीही आपला आश्रम सोडून बाहेर कोठें तरी जावें या उद्देशानें निघाले. तों सरस्वतीनें त्यांना सांगितलें कीं, ' बाळा, तूं कांहीं येथून जाऊं नकोस. मी तुझ्या पोटाची व्यवस्था करतें. माझ्या ठिकाणीं मासे राहतात ते मी तुला दररोज देत जाईन. ' हें ऐकून **सारस्वत मुनि माशावर निर्वाह करीत** आपलें होमहवन व वेदाध्ययन करीत तेथेंच राहिले. पुढें दुष्काळ संपल्यानंतर सर्व मुनी जमून पुन्हां वेद ह्मणण्याची खटपट करूं लागले. परंतु बारा वर्षेपर्यंत केवळ पोटाचीच विवंचना करून अध्ययनाकडे दुर्लक्ष्य केल्यानें त्यांपैकीं एकालाही वेद म्हणतां येईना. सर्वच ते विसरले होते ! तेव्हां सर्व ऋषी सारस्वतांकडे जाऊन वेद शिकविण्यासाठीं प्रार्थना करूं लागले. तेव्हां सारस्वतांनीं त्यांना सांगितलें कीं, तुह्मी विधिपूर्वक माझे शिष्य

व्हा; म्हणजे मी तुह्मांस वेदपाठ देईन. हें ऐकून मुनि ह्मणाले कीं, हे ऋषे तूं आमच्यापेक्षां लहान आहेस तेव्हां आम्हीं तुझें शिष्यत्व कसें पतकरावें ? ह्यांवर सारस्वत म्हणाले कीं, ‘ विधिपूर्वक वेदाध्ययन न केल्यास शिकविणारा व शिकणारा दोघेही नाश पावतात. अशा रीतीनें शिकविणारे व शिकणारे हे गुरुशिष्य नव्हेत, तर केवळ एकमेकांचे वैरीच होत. ऋषींनीं वयावर किंवा पिकलेल्या केसावर अथवा पैशावर अगर बंधुगणावर धर्म ठरविला नाहीं. तर जो विद्वान व वेदपारग असेल तोच मोठा आहे. ’ हें त्याचें वचन ऐकून ऋषींनीं यथाप्रकार शिष्यत्व पतकरून त्याच्यापाशीं वेदाध्ययन केलें. ह्याप्रमाणें वेद शिकण्याकरितां साठ हजार ऋषींनीं सारस्वत मुनीचें शिष्यत्व पतकरून आपल्या गुरूंच्या आसनाकरितां प्रत्येकानें एक एक मूठभर दर्भ आणून दिले. येथील तीर्थविधि आटोपून हलधर ज्या ठिकाणीं वृद्धकन्या होती अशा एका महाप्रसिद्ध क्षेत्राकडे गेले.

## ६६ वृद्ध कन्येची हकीकत. ( ९–५२ )

कुणि नांवाचे एक महातपस्वी मुनि होते. त्यांनीं आपल्या इच्छामात्रेंकरूनच एक कन्या निर्माण केली व तिला पाहून अत्यानंदानें मुनिवरांनीं स्वर्गवास स्वीकारला. नंतर ही मुनिकन्या तेथेंच आपल्या पित्याच्या आश्रमामध्यें तपश्चर्या करीत राहिली. बापानें हिचें लग्न करण्याचा विचार मनांत आणला होता. परंतु हिनें मनाजोगा नवरा मिळेना ह्मणून लग्न करणेंच नाकारिलें. व पितृतर्पण आणि देवतर्पण करून तपश्चर्येंतच आपला काल घालवण्याचा निश्चय करून ती उपवासादि व्रतें करीत राहिली. पुढें ह्मातारपणामुळें व तपश्चर्येनें अशक्तता आल्यानें तिला एक पाऊलभरही चालवेना. ह्मणून तिनें ह्या लोकांचा त्याग करून स्वर्गीं जाण्याचा विचार मनीं आणला.

ही वृद्धकन्या आपला देहत्याग करणार आहे असें पाहून नारदमुनींनीं तिला सांगितलें कीं, ‘हे सुव्रते, तूं फार घोर तपश्चर्या केलीस हें खरें; परंतु तुझे लग्नादि संस्कार न झाल्यामुळें तुला उत्तम लोकची प्राप्ति होणार नाहीं असें मीं देवलोकांमध्यें ऐकिलें आहे. ’ हें ऐकून ती ऋषींकडे जाऊन ह्मणाली कीं, ‘ जो ऋषि माझ्याशीं लग्न करील त्याला मी आपलें अर्धें तप देईन. ’ हें ऐकून गालवऋषींचा मुलगा शृंगवान ह्मणाला कीं, ‘ मी तुझ्याशीं एकच रात्र घालवीन. हें तुला कबूल असल्यास मी तुझा स्वीकार करतों. ’ ह्या गालवपुत्राच्या ह्मणण्याला रुकार देऊन तिनें त्याच्याशीं विधिपूर्वक लग्न केलें. व एकरात्र त्याच्याशीं राहिली. त्या रात्रीं ती तरुण व सुंदर देह धरून, उत्तम दागिने घालून व चंदनाची उटी वगैरे लावून त्याच्याशीं रममाण झाली. नंतर सकाळीं उठून ती त्याला ह्मणाली, ‘विप्रश्रेष्ठ, तुझ्याशीं केलेल्या कराराप्रमाणें मी एकरात्र राहिलें. आतां मी जातें. तुझें कल्याण असो. ’ असें म्हणून ती स्वर्गाला निघून जातां जातां ह्मणाली कीं, **ह्या तीर्थामध्यें जो कोणी एक रात्र राहून देवतार्चन करील त्याला अठ्ठावन वर्षें ब्रह्मचर्यानें राहिल्यानें जें पुण्य मिळतें तें मिळेल.** पुढें ती वृद्धकन्या स्वर्गाला गेल्यावर शृंगवानाला तिची आठवण होऊन वियोगजन्य दुःख फार दुःसह होऊं लागलें, म्हणून तोही तिच्या रूपाला मोहून स्वर्गाला गेला. या तीर्थामध्यें असतांना बलरामांना शल्य मेल्याची वातमी लागली. नंतर येथील तीर्थविधि आटोपून बलराम समंतपंचकाला गेले. तेथें गेल्यावर तेथें राहणाऱ्या ऋषिलोकांना त्यांनीं कुरुक्षेत्राचें माहात्म्य विचारल्यावरून त्यांनीं तें सांगितलें.

समंतपंचकाला ब्रह्मदेवांची उत्तरवेदी असें ह्मणतात. तेथें देवांनीं पूर्वीं पुष्कळ यज्ञ केले होते. एकदां राजर्षि कुरु हा हें क्षेत्र नांगरीत होता. त्या वेळीं इंद्रानें येऊन त्याला विचारलें कीं, हे राजा तूं हें काय करतोस व कशाकरितां करतोस ? ह्याला कुरूनें उत्तर दिलें कीं, ह्या ठिकाणीं जे कोणी मरतील ते निष्पाप होऊन स्वर्गाला जातील. हें ऐकून त्याचा उपहास करून इंद्र स्वर्गाला निघून गेला. पुढें कुरूनें आपल्या तपोबलानें सर्व क्षेत्र नांगरलें. हें पाहून इंद्रानें देवांना राजाची सर्व इच्छा सांगितली. तेव्हां देव ह्मणाले, ‘कांहीं तरी वर देऊन ह्याचें काम बंद पाडा. नाहीं तर कांहीं पुण्य न करतां फक्त ह्या क्षेत्रांत मेल्यानें लोकांना स्वर्गप्राप्ति होऊं लागली तर पुष्कळ येथें येतील, व. यज्ञ करू-

न ज्यांनीं स्वर्गप्राप्ति करून घेतली आहे त्या आह्माला येथें जागा उरणार नाहीं. ' हें ऐकून इंद्र राजाकडे जाऊन ह्मणाला कीं, हे राजर्षे, पुरे कर. विनाकारण श्रम करूं नकोस. या ठिकाणीं कांहीं न खातां ईश्वरभजन करीत जे मरतील व जे युद्धामध्यें शत्रूला पाठ न दाखवितां लढत लढत देह ठेवतील ते सर्व स्वर्गाला जातील. ' कुरूनें ती गोष्ट मान्य केल्यावर इंद्र स्वर्गाला निघून गेला.

याप्रमाणें या क्षेत्राला इंद्राचा वर मिळाला आहे. शिवाय या तीर्थासारखें पवित्र तीर्थ या पृथ्वीतलावर दुसरें नाहीं, असें ब्रह्मादि देवगणांचेंही मत आहे. या ठिकाणीं जे तपश्चर्या करतील त्यांना अंतीं ब्रह्मलोक मिळेल. जे ह्या ठिकाणीं दानधर्म करतील त्यांना तात्काळ त्या दानाच्या हजारोंपट फळ मिळेल. येथें जे नेहमीं राहतील त्यांना यमलोकाला जाण्याची गरज पडणार नाहीं. या तीर्थीं जे यज्ञ करतील त्यांना या पृथ्वीच्या क्षयापर्यंत स्वर्गवास घडेल. या तीर्थाबद्दल स्वतः इंद्रानें एक श्लोक केला आहे त्याचा अर्थ असा आहे कीं, ' वाऱ्यानें उडून आलेल्या या क्षेत्रांतील धुळीनेंही पातकी लोक तरून जातात. ' मोठमोठे देव, विद्वान व तपस्वी ब्राह्मण, आणि नृगासारखे पराक्रमी राजे हे सर्व ह्याच ठिकाणीं यज्ञ करून मोक्षाला गेले. **तरंतुक, अरंतुक, रामसरोवरें व मचक्रुक ह्यांच्यामधील जागेला कुरुक्षेत्र असें ह्मणतात. व समंतपंचकाला ब्रह्मवेदी असें ह्मणतात.** ' हें सर्वांना मान्य असें पुण्य क्षेत्र आहे.

पुढें बलराम ज्या आश्रमांत शांडिल्य कन्येनें ब्रह्मचर्य व्रतानें घोर तपश्चर्या करून स्वर्गप्राप्ति करून घेतली तेथें गेले. ह्या आश्रमांतील तीर्थविधि आटोपून बलदेव हिमालयावर चढले. ते थोडेसे चालून गेले नाहींत तोंच त्यांना प्लक्षप्रस्रवण नांवाचें तीर्थ भेटलें. त्या तीर्थामध्यें स्नान करून सरस्वतीचा महिमा वर्णन करीत करीत हलधर कारपवन नांवाच्या तीर्थामध्यें स्नान करून यमुना नदीकडे गेले. व त्या यमुनेमध्यें स्नान करून तिच्या कांठीं राहणाऱ्या ऋषी लोकांबरोबर बोलत बसले. इतक्यांत पीत वल्कलधारी नारदमुनि आपली कच्छवी नांवाची वीणा घेऊन तेथें आले. महापूज्य नारदमुनी तेथें आलेले पाहून बलरामांनीं उठून त्यांची आसनपाद्यादिकेंकरून यथोचित पूजा करून कौरवांकडील सर्व कच्ची हकीकत त्यांना विचारली. तेव्हां नारद ह्मणाले, ' भीष्म द्रोणादि प्रतापी योद्ध्यांनीं दुर्योधनाच्या कल्याणाकरितां युद्ध करीत करीत धारातीर्थीं देह ठेवला. आतां कौरवांकडे शूर असे कायते तिघेच उरले आहेत. ते कोण ह्मणशील तर कृपाचार्य, कृतवर्मा व अश्वत्थामा. हे सुद्धां भयानें कोठेंसे पळूनच गेले आहेत. आपलें सर्व सैन्य ठार झालें, शल्य मेला, व राहत्यांपैकीं हे तिघेही पळून गेले असें पाहून दुर्योधन द्वैपायन नांवाच्या डोहामध्यें पाण्यांत बुडून लपून राहिला. परंतु ह्याला कृष्णादि पांडवांनीं हुडकून काढून दुःसह वाग्बाणांनीं घायाळ करून त्या डोहांतून उठविलें. त्या दुर्योधनाचें आज भीमाबरोबर गदायुद्ध होणार आहे. ' हें ऐकून बलरामानें आपल्या सर्व लोकांना द्वारकेला परत जाण्याकरितां निरोप देऊन व तेथील ऋषींना नमस्कार करून व सरस्वतीची स्तुतिपूर्वक अर्चा करून आपल्या रथांत बसून रणभूमीकडे आपल्या शिष्याचें गदायुद्ध पाहण्यासाठीं निघाले.

बलराम आले असें पाहून धर्मानें उठून त्यांचा यथोचित सत्कार केला. नंतर कांहीं कुशल प्रश्न झाल्यावर बलरामांनीं युधिष्ठिराला सांगितलें कीं, कुरुक्षेत्र हें अति पवित्र स्थळ आहे. त्या ठिकाणीं लढत लढत जे प्राण सोडतात त्यांना खात्रीनें स्वर्गप्राप्ति होते. या समंतपंचकाला ह्मणजे कुरुक्षेत्राच्या उत्तर भागाला ब्रह्मवेदी असें ह्मणतात. तर आपण सर्वजण तिकडेच जाऊं. ' हें ऐकून धर्मराज सर्वांसह समंतपंचकाकडे निघाला. तेव्हां दुर्योधनही आपली मोठी गदा घेऊन पायानेंच त्यांबरोबर निघाला. हत्तीप्रमाणें आपले भक्कम पाय जोरानें टाकीत हा चालला असतां अंतरिक्षांतील सर्व देवांनीं आनंदानें ह्याची मोठ्यानें वाहवा केली. व सर्व शूरांनीं, आपल्या शंखनादानें, सिंहासारख्या गंभीर गर्जनेनें, व रणवाद्यांच्या मोठ्या शब्दांनीं सर्व दिशा दुमदुमून सोडल्या.

नंतर हे सर्व योद्धे पश्चिमेच्या बाजूला सरस्वतीच्या दक्षिण तीरावरील उत्तमशा माळजमिनीवर येऊन पोहोंचले. तेथें गेल्यावर भीम व दुर्योधन हे आपापली गदा घेऊन युद्धाला उभे

राहिले. त्यावेळीं हे दोघे पहाणाऱ्यांना झुंजणाऱ्या मत्त हत्तींप्रमाणें दिसले. हे दोघेही वीर आंगांत सोन्याचीं चिलखतें घातल्यामुळें त्या युद्धभूमीवर चंद्रसूर्याप्रमाणें शोभत होते. दोघांचेही डोळे रागानें लाल झाले होते. व दांतओंठ चावीत व एकमेकांकडे रागानें पहात आपापली गदा सावरून युद्धाला सरसावले. त्यावेळीं हे योद्धे सुंदोपसुंद, व रामरावण यांच्याप्रमाणें उग्र दिसूं लागले. युद्धाचे आरंभीं दुर्योधनानें सर्व पांडवांना आपलें युद्ध लक्षपूर्वक पहाण्यास सांगितलें. या त्यांच्या युद्धाचे आरंभीं चहूंकडून उल्कापात होऊं लागले. पृथ्वी डळमळूं लागली. पर्वकाल नसतांही सूर्याला राहूनें ग्रासलें. वाऱ्यांतून मोठमोठे खडे वाहूं लागले. हे व अशा प्रकारचे दुसरे पुष्कळ अपशकुन झाले. ते पाहून भीम युधिष्ठिराला म्हणाला, 'माझ्या अंतःकरणांत धुमसत असलेल्या रागाची शांतता, अग्नीनें ज्याप्रमाणें,आपली शांतता खांडववन खाऊन केली त्याप्रमाणें आज ह्याला ठार करून मी करितों; व आपल्या हृदयांत सलत असणारा कांटा उपटून काढतों. अजातशत्रो, आज ह्याला मारून कीर्तिरूपी माळ मी आपल्या गळ्यांत घालतों. याचे मी माझ्या ह्या गदेनें तुकडे तुकडे करून सोडतों. आम्ही निजलों असतां आमच्या गळ्यांत यानें साप बांधले; जेवत असतांना विष चारलें; प्रमाणकोटींत असतांना पाण्यांत बुडविलें, लाक्षागृहांत असतांना त्याला आग लावून दिली, सभेमध्यें आमचा उपहास केला व सर्वस्व हरण करून आह्मांला वनवासाला धाडलें, ह्या सर्वांचें आज मी उट्टें काढतों. ह्याच्या आयुष्याची दोरी येथें संपली. आतां ह्याला पुन्हां आपल्या पूज्य मातापितरांचें व प्रिय राणीचें दर्शन होणें नाहीं. हा आज आपल्या सर्व राज्यवैभवाला मुकणार. आपल्या मुलाची मरण वार्ता ऐकून आज त्या धृतराष्ट्राला शकुनीच्या दुष्ट सल्ल्याची आठवण होईल. नंतर भीम पुन्हां रागानें दुर्योधनाला म्हणाला, 'हे दुष्टा, तूं व तुझ्या बापानें आम्हीं वारणावतींत असतांना आमच्यावर जीं जीं संकटें आणिलीं त्या सर्वांची आतां आठवण कर. हे नीचा, द्रौपदी रजस्वला असतांना तिला तुम्हीं भर सभेंत ओढून आणून तिची विटंबना केलीत. द्यूतामध्यें कपटी फांशांच्या योगानें शकुनीकडून राजा धृतराष्ट्राला फसवून आह्मां सर्वांना वनवासाला धाडलेंत. तुझ्याकरितां प्रतापी भीष्म आज शरपंजरीं पडले आहेत. तुझ्याचकरितां द्रोणकर्णादि योद्धे, व सर्व भांडणाचें मूळ असा शकुनिही ठार झाला. तुझे सर्व भाऊही तुझ्याचकरितां रणशय्येवर पडले आहेत व आज तुलाही त्या सर्वांच्या भेटीला जावें लागणार.'

अशा रीतीनें भीम दुर्योधनाला टोंचून बोलत असतांना दुर्योधन धैर्य न सोडतां त्याला ह्मणाला, 'अरे, उगीच बढाई पुरे. युद्धाला तयार हो. एखाद्या यःकश्चित् पुरुषाप्रमाणें हा दुर्योधन नुसत्या बडबडण्याला भिऊन जाणारा नाहीं, हें तूं पक्कें समज. हें अगदीं माझ्या मनाप्रमाणेंच घडून आलें आहे. तुझ्याबरोबर गदायुद्ध करावें असें माझ्या मनांत फार दिवस होतें. आज तो प्रसंग आला ही देवाची कृपाच होय. काय करावयाचें तें कृतीनेंच करून दाखीव ह्मणजे झालें. चल. उगीच वेळ घालवूं नको.' असें ह्मटल्याबरोबर त्या रणभूमीवर असलेल्या सर्व वीरांनीं एकदम 'शाबास, शाबास' अशी गर्जना करून टाळ्यांचा गजर केला. तेव्हां भीम मोठ्या रागानें आपली गदा सावरून त्याच्यावर चालून गेला. त्यावेळीं हत्तींनीं मोठ्यानें गर्जना केली, घोडे खिंकाळले, जवळ असलेल्या योद्ध्यांचीं हत्यारें सरसरूं लागलीं. भीमसेन आपल्यावर चालून आला आहे असें पाहून दुर्योधनही त्याच्यावर तुटून पडला.

---

## ६७ गदायुद्ध. (९. ५७–६१)

अशा रीतीनें मोठ्या त्वेषानें तुटून पडून एकमेकांवर जेव्हां त्यांनीं गदेचे प्रहार केले, तेव्हां त्याचा मोठा शब्द झाला. व त्यानें दाही दिशा भरून गेल्या. इंद्र व प्रल्हाद यांच्याप्रमाणें यांचें हें गदायुद्ध फार निकराचें झालें. ह्या वीरांचें शरीर रक्तानें भरल्यामुळें पळसाप्रमाणें ते शोभत होते. हे योद्धे एकमेकांला इतक्या जोरानें मारीत होते कीं, जेव्हां आपल्यावरील तडाख्याची गदेनेंच पत करीत तेव्हां त्या गदेपासून ठिणग्या उडत; त्यांच्या योगानें सर्व आकाश भरून गेलें होतें. उन्मत्त हत्ती एकाद्या ह-

तिणीकरितां ज्याप्रमाणें आपापसांत भांडतात व एकमेकांवर दंतप्रहार करतात त्याप्रमाणें हे वीर-पुरुष एकमेकांला आपल्या प्रचंड गदेनें झोडीत असत. हे लढवय्ये पवित्रे चाळीत आपल्या गदेनेंच जेव्हां एकमेकांला रोंखून धरीत तेव्हां त्यांच्या ह्या गदेला पाहून प्रेक्षकांना यमदंडाची व इंद्राच्या वज्राची आठवण होऊं लागली. भीमानें आपली प्रचंड गदा जोरानें फिरविली. तेव्हां तींतून घूंऽऽऽ असा मोठा आवाज निघाला. तो ऐकून दुर्योधन सुद्धां थक्क झाला. ते स्वतःचें रक्षण करीत संधि साधून एकामेकांवर गदा सोडीत असत; हूल दाखवून एकदम मागें सरत; एकीकडे मारण्याचें ढोंग करून दुसरीकडेच ठोकीत; आपली गदा उगीच वांकडी तिकडी फिरवून एकमेकांला चकवीत; आपल्यावर गदेचा तडाखा येत आहे असें पाहून एकदम खालची बैठक घेऊन पत करून पुन्हां उठून स्वतःची गदा सोडीत; एकदम पुढें होऊन एकमेकांला मारीत किंवा मागें वळून तडाखे देत. कित्येक वेळां तर ते वीर एकमेकांवर एकदम उडी मारून आपल्या गदेचा प्रहार करीत असत.

अशा प्रकारें आपल्या अंगीं असलेली सर्व बुद्धिमत्ता व युद्धकौशल्य याचा उपयोग करून एकमेकांला हाणून पाडण्याकरितां ते उभयतांही फार निकरानें लढत होते. उजवीकडून अर्धचंद्राकृति वाटोळा फेरा घेऊन दुर्योधन भीमाला मारण्याकरितां झपाट्यानें चालला, परंतु भीमाला हें त्याचें कसब कळून आल्यामुळें त्यानें लगेच स्वतः डावीकडून फिरून दुर्योधनाचा बेत फसविला. तरीहीं न डगमगतां दुर्योधनानें त्यांतल्यात्यांत संधि साधून भीमाच्या बरगडींत एक जोरांचा तडाखा दिला. दुर्योधनाच्या तडाख्यानें चेव येऊन त्याला उलट मारण्याकरितां भीम आपली जंगी गदा झपाट्यानें गरगर फिरवूं लागला. हें पाहून दुर्योधनानेंही आपली गदा तशीच उलट दिशेनें फिरविली. त्या गदेवर गदा आपटून दुर्योधनावरचा तडाखा चुकला. इतक्यांत दुर्योधन वांकडे तिकडे वळसे घेत मोठ्या वेगानें भीमावर धांवून आला. परंतु भीमानें त्याच्या तडाख्याची आपल्या गदेनें पत केली. ह्या वेळीं दोघांच्याही गदा फार जोरानें सुटल्यामुळें त्यांतून चहूंकडे अग्नीच्या ठिणग्या उडाल्या. आपला तडाखा व्यर्थ गेला हें सहन न होऊन दुर्योधनानें पुन्हां डावीकडून गिरकी घेऊन परत भीमाच्या डोक्यावर खूप जोरानें गदा मारली. एवढा जोराचा तडाखा बसला असूनही भीम एक पाऊलभरसुद्धां हालला नाहीं. हें पाहून सर्वांना मोठा अचंबा वाटला.

नंतर भीमानें आपल्या प्रतिपक्ष्यावर जोरानें गदा सोडली. परंतु दुर्योधनानें खूप चलाखीनें त्याचा नेम चुकवून तेथून एक पवित्रा काटला. त्यामुळें भीमाचा नेम चुकून ती गदा तशीच खालीं जमिनीवर आदळली. ती इतक्या जोरानें आदळली कीं, तिच्या योगानें सर्व पृथ्वी हदरून गेली. पुन्हां भीमानें गदा सोडली. परंतु दुर्योधनानें आपल्या चलाखीनें व युद्धकौशल्यानें तिचीही पहिल्यासारखीच वाट लाविली; एवढेंच नव्हे, पण दुर्योधनानें भीमाची गडबड उडालेली पाहून त्या गडबडींत त्याच्या छातीवर एक गदेचा तडाखा दिला. ह्या तडाख्यानें भीम अगदीं वेडावून गेला व त्याला आतां पुढें काय करावें हें सुचेना. ही भीमाची स्थिति पाहून पांडवांचीं तोंडें खरकन् उतरलीं. परंतु इतक्यांत भीमानें रागाच्या आवेशांत दुर्योधनाला खूप जोरानें गदेचा तडाखा दिला. हा तडाखा बऱ्याच जोरानें बसल्यामुळें दुर्योधनाला तो सहन न होऊन तो मटकन् खालीं बसला. दुर्योधनाचे गुडघे खालीं टेंकले हें पाहून सृंजयांनीं आनंदानें टाळ्या पिटल्या व मोठ्यानें जयजयकार केला. परंतु हा अपमान सहन न होऊन दुर्योधन रागानें सापाप्रमाणें सुस्कारे टाकीत व डोळे लाल करून झपाट्यानें उठला. नंतर लगेच दुर्योधनानें आपली गदा गरगर फिरवून तशीच जोरानें भीमाच्या डोक्यावर सोडली. त्यामुळें भीमांच्या डोक्यांतून भळभळ रक्त वाहूं लागलें. तरी भीम मुळींच डगमगला नाहीं व आपल्या जागेपासून एक पाऊलभरही मागें पुढें झाला नाहीं. ह्यावेळीं गंडस्थळांतून मद गळणाऱ्या हत्तीप्रमाणें भीम अधिकच शोभूं लागला. नंतर आपली लोखंडी व वज्रासारखी बळकट अशी गदा घेऊन भीमानें दुर्योधनाला एक जोराचा तडाखा दिला. त्यासरशीं दुर्योधन, आधींच

किड्यांनीं पोंखरून पोकळ केलेलें झाड मोठा सोसाट्याचा वारा सुटला असतां ज्याप्रमाणें खाडकन् मोडून खालीं पडतें त्याप्रमाणें धाडकन् खालीं पडला. हें पाहून पांडवांनीं आनंदाची आरोळी दिली. परंतु दुर्योधन पाण्यांत डुंबून राहिलेल्या हत्तीप्रमाणें झटकन् उठून उभा राहिला. लगेच त्यानें जवळच उभा असलेल्या भीमाला आपल्या गदेच्या तडाख्यानें जमिनीवर पाडून स्वतःच आनंदानें ओरडूं लागला. नंतर भीम आपलें रक्तानें भरलेलें तोंड पुसून व भोंवंड आल्यामुळें मिटलेले डोळे उघडून रागानें मुसमुसत दुर्योधनाकडे पहात पहात उठून पवित्र्यांत उभा राहिला.

अशा रीतीनें इकडे युद्धाची गर्दी चालली असतां, अर्जुनानें श्रीकृष्णाला विचारलें कीं, ‘ हे कृष्णा, ह्या योद्ध्यांमध्यें कोण अधिक आहे असें तुला वाटतें व तुझ्यामतें कोणामध्यें कोणता गुण अधिक आहे ?’ हें ऐकून वासुदेव ह्मणाला, हे दोघेही सारखेच शिकलेले आहेत. पण भीम शक्तीनें अधिक आहे व दुर्योधन कलेनें अधिक आहे. न्यायानें लढेल तर भीमाच्यानें कांहीं दुर्योधनाला जिंकवणार नाहीं. अन्यायानें लढेल तर खात्रीनें भीमाचाच जय होईल. आणि देवांनीं जें दैत्यांना जिंकलें तें कपटानेंच जिंकलें. ह्मणून ह्या वेळीं भीमाला कपटयुद्ध करण्याला कांहीं हरकत नाहीं. शिवाय भीमानें द्यूताच्या वेळीं दुर्योधनाची मांडी फोडून त्याला ठार करीन अशी प्रतिज्ञा केली आहे. भीमानें आतां ती प्रतिज्ञा खरी करून कपटी पुरुषाला कपटानेंच ठार करावें. आतां हा भीम जर आपल्या शक्तीच्या घमेंडीवर न्यायानें याच्याशीं युद्ध करील तर खात्रीनें पुन्हां आमच्यावर संकट ओढवणार. भीष्मद्रोणासारख्या शूरांना मारून कसेंबसें आह्मीं या युद्धकलहांतून पार पडलों. प्रत्यक्ष शुक्राचार्यांनीं एके ठिकाणीं ह्मटलें आहे कीं, ‘एकदां पराभव पावून पळालेलें सैन्य निराशेनें फिरून युद्धाला परतलें, तर त्याच्याशीं लढणें फार कठिण आहे. कारण त्यांचा शत्रूला मारीत मारीत मरण्यापलीकडे कांहीं उद्देश नसतो. जो आपल्या जिवाबद्दल निराश झाला आहे अशाबरोबर युद्ध करणें इंद्राच्यानें सुद्धां होणार नाहीं. ’ हा सुयोधन सर्व सैन्य ठार झाल्यामळें निराश होऊन डोहांत दडून बसला होता व राज्याची आशा सोडून कोठें तरी वनांत जाऊन राहण्याच्या विचारांत होता. मग अशाशीं द्वंद्वयुद्ध करण्याकरितां कोणी तरी शहाणा मनुष्य दंड ठोकून उभा राहील काय ? आतां ह्या सुयोधनाला आह्मीं जिंकलेलें राज्य पुन्हां परत घेण्याला कांहीं तरी उशीर आहे काय ? कारण ह्यानें ह्या गदायुद्धाचा एकसारखा तेरा वर्षें अभ्यास केला आहे. हा पहा भीमाला ठार करण्याकरितां इकडून तिकडे पवित्रे चाळीत कशी खटपट करीत आहे. याला भीम जर आतां अन्यायानें मारणार नाहीं तर हाच खात्रीनें राजा होईल. ’ हें सर्व श्रीकृष्णाचें भाषण ऐकून अर्जुनानें भीमाच्या नजरेस पडेल अशा रीतीनें आपल्या डाव्या मांडीवर थाप मारली. ही खूण मिळाल्याबरोबर भीम नाना प्रकारचीं मंडलें घेऊन व वांकडे तिकडे पवित्रे चाळून आपल्या प्रतिपक्ष्याला भिवडवण्याच्या खटपटीला लागला. हें पाहून गदायुद्धामध्यें निष्णात असलेला दुर्योधनही मागें पुढें पवित्रे चाळून त्याला ठार करण्याची संधि पाहूं लागला. हे दोघेही वीर एकमेकांला ठार करण्याकरितां एकसारखे टपून राहिले होते. ते जेव्हां रागानें एकमेकांवर गदा सोडीत व त्याची गदेनेंच पत करीत तेव्हां खवळलेल्या समुद्राप्रमाणें मोठा भयंकर अवाज निघत असे व विस्तवाच्या ठिणग्या पडत असत. अशा रीतीनें आपल्या जिवाचीही परवा न करितां खूप झपाट्यानें युद्ध केल्यामुळें ते दोघेही दमून गेले.

ह्मणून त्यांनीं मध्यंतरीं कांहीं वेळ विसावा घेऊन पुन्हां युद्धाला सुरवात केली. चिखलामध्यें खेळणारे रेडे ज्याप्रमाणें टकरा देऊन युद्ध करतात त्याप्रमाणें जोरानें आपपल्या गदेच्या प्रहारानें त्यांनीं एकमेकांला अगदीं जर्जर करून सोडलें. सर्वांगावर गदेचे तडाखे बसल्यामुळें दोघांच्याही शरीरांतून सारखें रक्त वहात होतें. अशा रीतीनें युद्ध चाललें असतां मध्येंच भीमानें आपण गैर सावध आहोंसें दाखविलें. तेव्हां दुर्योधन झपाट्यानें त्याला मारण्याकरितां पुढें सरसांवला. हें पाहून भीमानें आपली गदा खूप जोरानें त्याच्यावर सोडली. पण दुर्योधन युद्धकलेंत निष्णात असल्यामुळें लगेच च-

लाखीनें पवित्रे काटून मागें सरला. त्यामुळें भीमाचा नेम चुकून गदा जमिनीवर हापटली. इतक्यांत दुर्योधनानें खूप चलाखी करून भीमाला एक जोराचा तडाखा दिला. त्यामुळें भीमाच्या शरीरांतून रक्त जास्त जोरानें वाहूं लागलें. व त्याला थोडीशी भोंवंड आल्यासारखी झाली, पण ती त्यानें दुर्योधनाला मुळींच कळूं दिली नाहीं. एवढेंच नव्हे, पण भीम मोठ्या ऐटीनें उभा असल्यामुळें त्याचा रोख पुन्हां परत आपल्याला तडाखा देण्याचा आहे असें वाटून दुर्योधन त्याच्यावर गदा सोडण्याच्या ऐवजीं आपल्या जागींच स्वस्थ उभा राहिला. पुढें थोडासा विसावा घेऊन भोंवंड आल्यामुळें मंद झालेली दृष्टि साफ झाल्यावर भीमानें आपली गदा सांवरून दुर्योधनावर सिंहाप्रमाणें झडप घातली. ह्या वेळींही दुर्योधनानें ह्याचा नेम चुकविण्याचे बेतानें वर उडी मारली. परंतु हा त्याचा बेत भीमाला कळून आल्यामुळें त्यानें दुर्योधन वर उडतो आहे इतक्यांतच त्याच्या दोन्ही मांड्यांवर एकदम गदेचा तडाखा देऊन सिंह जसें हत्तीचें गंडस्थळ फोडतो त्याप्रमाणें त्या फोडून काढल्या. त्यासरशीं दुर्योधन धाडदिशीं खालीं आला.

त्या वेळीं चहूंकडून सोसाट्याचा वारा वाहूं लागला. सर्व पृथ्वी एकाएकीं डळमळूं लागली. रक्ताचा पाऊस पडला. यक्ष, राक्षस व पिशाच इत्यादिकांचा आकाशांतून भयाण शब्द ऐकूं येऊं लागला. तसाच पक्षी व श्वापदें यांचाही गलबलाट ऐकूं येऊं लागला. हा सर्व गलबला ऐकून हत्ती चीं चीं करूं लागले, घोडे खिंकाळूं लागले. योद्धे सिंहनाद करूं लागले व सर्व रणभूमीवर रणवाद्यांचा एकच गजर उठून राहिला. देव, गंधर्व, सिद्ध, चारण इत्यादि जे उत्सुकतेनें युद्ध पहाण्याकरितां आले होते ते आपसांत ह्या दोघांच्या युद्धकौशल्याची तारीफ करीत परत गेले.

इकडे पांडवांना दुर्योधन पडल्याचें पाहून फार आनंद झाला. व भीम मोठ्या ऐटीनें आपल्या खालीं पडलेल्या शत्रूला ह्मणाला, 'हे दुष्टा, द्रौपदी रजस्वला असून एका वस्त्रानिशीं असतांना, तिला फरफरां ओढीत आणून भरसभेंत तिची विटंबना करून 'अरेरे ! गाय ! गाय !' असें ह्मणून आमचाही उपहास केलास, त्याचें हें फळ.' असें ह्मणून भीमानें डाव्या पायानें दुर्योधनाच्या डोक्यावर लाथ मारली व रागानें लाल होऊन फिरून दुर्योधनाकडे पाहून तो ह्मणाला, अरे मूढा, पूर्वी, 'गाय ! गाय !' असें म्हणून आह्मांपुढें जे ऐटीनें नाचले त्यांच्यापुढें आज आह्मी 'गाय ! गाय !' असें म्हणून नाचतों. आह्मी आपल्या शत्रूला, ते निजले असतांना त्यांच्या घराला आग लावून, अगर त्यांना फांशानें कपट करून फसवून, कांहीं जिंकीत नाहीं. तर आह्मी आपल्या मनगटाच्या जोरावर त्यांना जिंकतों.' नंतर भीम, धर्म व कृष्ण यांच्याकडे वळून ह्मणाला, 'रजस्वला द्रौपदीला भरसभेंत ओढून आणून तिची ज्यांनीं विटंबना केली त्या सर्वांना आह्मीं तिच्याच तपःसामर्थ्यानें ठार केलें आहे पहा ! पूर्वी 'षंढ, षंढ' म्हणून ज्यांनीं आमची निर्भर्त्सना केली अशा धृतराष्ट्रपुत्रांना त्यांच्या गणगोतांसह आह्मीं ठार केलें आहे. आतां आह्मांला स्वर्ग मिळो अगर नरक मिळो ! कांहीं मिळालें तरी हरकत नाहीं.' असें म्हणून खालीं पडलेली दुर्योधनाची गदा हातीं घेऊन त्याच्या कृष्ण कृत्यांचा पुन्हःपुन्हां उच्चार करून त्याची निर्भर्त्सना करीत भीमानें त्याचें डोकें आपल्या डाव्या पायानें पुन्हां लाथडलें. परंतु हें सोमसृंजयादि पांडववीरांना मुळींच आवडलें नाहीं. राजा धर्म त्याला म्हणाला, 'तूं आज आपली प्रतिज्ञा खरी करून भांडणाचा शेवट लावलास. मग तें न्यायानें असो अगर अन्यायानें असो ! आतां ह्याच्या डोकीवर लाथ कशाला मारतोस. कसें झालें तरी हा राजा आहेत. ह्याचे सर्व बंधु, अमात्य व सैन्य ठार झालें आहे, तेव्हां आपण याची कींवच केली पाहिजे. उपहास करणें योग्य नाहीं.'

अशा रीतीनें भीमाची कानउघाडणी करून, दुःखानें गळा दाटून येऊन धर्मराज दुर्योधनाला म्हणाला, 'बाबारे कांहीं वाईट वाटून घेऊं नकोस. हें सर्व पूर्वकर्मांचें फळ आहे. आह्मांला तुह्मीं पीडा द्यावी व तुह्मांला आह्मीं जिंकावें हें सर्व ब्रह्मदेवानें पूर्वी ठरवून ठेविलें होतें. तूं आपल्या लोभानें, उन्मत्तपणानें व मूर्खपणानें आपणावर हें संकट ओढून घेतलेंस. मित्रांना, भावांना,

वडिलांना, मुलांना, नातवांना व दुसऱ्या कित्येक राजे लोकांना ठार करून तूं आपला असा शेवट करून घेतलास. तुझ्या अपराधामुळें आह्मीं तुझ्या भावांना व सर्व गणगोताला ठार केलें. हें सर्व पहातां दैवच बलवत्तर आहे, असें मला वाटतें. तुला स्वतःबद्दल शोक करण्याचें कांहीं कारण नाहीं. तुझा शेवट फार चांगल्या रीतीनें होत आहे. आमचींच आतां सर्व बाजूंनीं दुःखद स्थिति आहे. आपल्या प्रिय बांधवांशिवाय एकटेंच दीनवाणें रहाणें आमच्या कपाळीं आलें आहे. बांधवांच्या व मुलांच्या विधवा झालेल्या बायकांना त्या शोक करीत असतांना आह्मीं कसें वरें पहावें? तूं मात्र आतां स्वर्गामध्यें स्वस्थपणें रहाशील. हें नरकप्राय दुःख भोगण्याचें आमच्या कपाळीं आलें आहे. धृतराष्ट्राच्या सुना व नातसुना ह्या सर्व आतां आमच्या नांवानें रडतील!' असें म्हणून धर्मानें एक मोठा सुस्कारा टाकला.

इकडे भीमानें दुर्योधनाच्या डोकीवर लाथ मारली हें पाहून बलरामाला फार राग आला. म्हणून ते तिरस्कारयुक्त अशा स्वरानें सर्व राजे लोकांच्यादेखत भीमाला म्हणाले, 'भीमा, तुला धिक्कार असो. गदायुद्धांत बेंबीच्या खालीं मारलेलें आपण आजपर्यंत कोठेंच पाहिलें नाहीं. कारण गदायुद्धांत बेंबीच्या खालीं मारूं नये असा नियमच आहे. ह्या नियमाला झुगारून देऊन तूं वाटेल तसा वागलास! हे कृष्णा, खरोखर ह्या दुर्योधनाचा मुळींच पराभव झाला नाहीं. हा अगदीं माझ्या तोडीचा आहे. येवढेंच नव्हे, तर माझ्यावांचून दुसरा कोणीही याच्या तोडीला उतरणार नाहीं. असें असून ह्याला गदेनें खालीं पाडला, हा केवळ माझाच अपमान आहे! कारण शिष्याच्या दुर्बलतेनें गुरूची किंमत होते.' असें म्हणून बलराम रागानें आपला नांगर उचलून भीमावर धांवले. तेव्हां श्रीकृष्ण पुढें होऊन नम्रपणानें त्यांना आवरून धरून व त्याचें सांत्वन करून म्हणाला, 'आपला उदय होणें, आपल्या मित्रांचा उदय होणें, आपल्या मित्रांच्या मित्रांचा उदय होणें, किंवा आपल्या शत्रूंचा क्षय होणें, शत्रूंच्या मित्रांचा क्षय होणें व त्यांच्या मित्रांच्या मित्रांचा क्षय होणें, हीं सहाही आपल्याच ऊर्जित कालाचीं लक्षणें आहेत. ह्याच्या उलट ह्मणजे आपला व आपल्या मित्रांचा क्षय होऊं लागला आणि आपल्या शत्रूंचा व त्यांच्या मित्रांचा उदय होऊं लागला तर मात्र आपला विनाशकाळ जवळ आला असें समजून प्रत्येकानें त्याच्या प्रतिकारार्थ झटलें पाहिजे. पांडव हे आमचे मित्र आहेत, शिवाय ते सत्वशील असून आपल्या आतेचे मुलगे आहेत. त्यांना त्यांच्या शत्रूंकडून बराच त्रास झाला आहे. आणि मला माहीत आहे कीं, प्रतिज्ञा पालन करणें हा क्षत्रियांचा धर्म आहे. युद्धामध्यें सुयोधनाच्या मांड्या मी आपल्या गदेनें फोडीन अशी पूर्वी भीमानें प्रतिज्ञा केली होती. शिवाय 'तुझ्या मांड्या भीम आपल्या गदेनें फोडील,' असा मैत्रेयांनीं दुर्योधनाला शापही दिला होता. ह्मणून झालें हें कांहीं वावगें झालें नाहीं असें मला वाटतें. आप्तपणानें व स्नेहभावानें पांडवांवर आमचें प्रेम जडलें आहे. तेव्हां त्यांचा उदय होणें ह्मणजे आपला उदय झाल्यासारखाच आहे.' हें वासुदेवाचें भाषण ऐकून हलधर ह्मणाला, '**सज्जनांकडून रक्षिलेल्या धर्माची पायमल्ली दोघांकडून होते. एक लोभी मनुष्यांकडून व दुसरी कामी मनुष्यांकडून.** धर्म, अर्थ व काम ह्यांपैकीं एकाचीही पायमल्ली न करितां हे तिन्ही योग्य रीतीनें जो प्राप्त करून घेतो त्यालाच खरें व शाश्वत सुख मिळतें. हे कृष्णा, तूं कांहीं ह्मटलेंस तरी ह्या युद्धांत भीमसेनानें धर्माला गुंडाळून ठेविलें हें खास. यथान्याय युद्ध करणारा हा दुर्योधन उत्तम गतीला जाईल. ह्यानें युद्धदीक्षा घेऊन रणयज्ञाला प्रारंभ केला, व शेवटीं त्यांत आपली स्वतःचीच आहुती देऊन यशोरूपी अवभृत स्नान करून मुक्ति मिळविली.' असें ह्मणून बलराम रथांत बसून द्वारकेला निघून गेले.

नंतर खिन्नवदन झालेल्या धर्माला पाहून श्रीकृष्ण ह्मणाला, 'धर्मराजा, तूं धर्मज्ञ आहेस. गतप्राण होऊन निचेष्ट पडलेल्या दुर्योधनाचें डोकें भीमानें पायानें लाथडलें हें तुला कसें पटतें? हें ऐकून धर्म ह्मणाला, 'भीमानें रागाच्या सपाट्यांत दुर्योधनाच्या डोक्यावर लाथ मारली हें मला आवडलें नाहीं. परंतु कौरवांनीं आह्मांला बराच त्रास दिला. हें भीमाच्या मनांत फार डांचत आहे. यामुळें त्याच्या

हातून हा अविचार घडला. याला उपाय नाहीं.' हें ऐकून भीम हात जोडून धर्मापुढें नम्रपणानें उभा राहिला. त्याला राजा युधिष्ठिर ह्मणाला, 'श्रीकृष्णाच्या विचारानें तूं दुर्योधनादि वीरांना मारून ही पृथ्वी जिंकलीस व आपल्या मातेच्या ऋणांतून मुक्त झालास ही गोष्ट ठीक झाली.' हें धर्मराजाचें भाषण आटपतें न आटपतें इतक्यांत पांचालादि वीर आनंदानें, शंखनाद व सिंहगर्जना करीत तसेंच भेरी, डंका व तुताऱ्या वगैरे रणवाद्यें वाजवीत मोठ्या थाटानें भीमाजवळ जमून त्याला ह्मणाले, 'गदायुद्धांत प्रवीण अशा दुर्योधनाला आपण ठार केलें हें मोठें सुदैवच समजलें पाहिजे. अशा शूराला मारण्याला आपल्यावांचून दुसरा कोण समर्थ आहे? एखाद्या वनगजाप्रमाणें आपण त्याला खालीं पाडून पायानें ह्याचें डोकें ठेंचलें. तसेंच सिंह जसा रेड्याला मारतो त्याप्रमाणें, दुःशासनाला मारून आपण त्याचें रक्तही प्याला. ज्यांनीं ज्यांनीं धर्माचा अवमान केला त्या सर्वांना आपण आपल्या पराक्रमानें पायाखालीं चिरडून टाकलें. ह्या योगानें आपली कीर्ति जगभर पसरली आहे. आपण दुर्योधनाला मारिलें त्या वेळीं जे आमच्या अंगावर आनंदाचे रोमांच उभे राहिले ते अद्यापि तसेच आहेत.' अशा रीतीनें आनंदानें हे वीर बोलत होते इतक्यांत मधुसूदन श्रीकृष्ण येऊन त्यांना ह्मणाला, 'एकदां मरून पडलेल्या शत्रूला पुनःपुन्हां वाईट वाईट शब्दांनीं खोंचून बोलणें हें बरोबर नाहीं. जेव्हां ह्यानें विदुर, द्रोणादि सुहृदांच्या सांगण्याचा अव्हेर करून शकुनीसारख्या कुटिल नीतीच्या लोकांचें बोलणें ऐकून, पांडवांनीं आपला हिस्सा गरीबीनें मागितला असतांही दिला नाहीं, त्याच वेळीं हा लोभी मेला होता. आतां हा लांकडासारखा निचेष्ट पडला आहे. ह्याला उगीच टोंचण्यांत काय फायदा? चला, आतां आपण येथून जाऊं. हें श्रीकृष्णाचें भाषण ऐकून दुर्योधन आवेशानें मरण समयींच्या दुःसह वेदनेलाही न जुमानतां हात टेंकून उठला व कपाळाला आठ्या घालून रागीट मुद्रेनें कृष्णाकडे पहात पहात त्याला ह्मणाला 'अरे कंसाच्या गुलामा, गदायुद्धांत अन्यायानें माझ्या मांड्या फोडविल्यास ह्याबद्दल तुला लाज नाहीं वाटत? माझी मांडी फोडण्याविषयीं भीमाला आठवण करण्याकरितां सूचना कर असें जें तूं अर्जुनाला सांगितलेंस तें मला मुळींच समजलें नाहीं, अशी का तुझी कल्पना आहे? अगदीं सरळ मार्गानें युद्ध करणाऱ्या अशा हजारों वीरांना कपटानें मारविलेंस ह्या तुला कांहींच लाज वाटत नाहींना? निर्दयच तूं! मी, कर्ण, व भीष्मद्रोण ह्यांच्याशीं तुह्मीं न्यायानें युद्ध करतां तर तुह्मांला खचित यश आलें नसतें. आह्मां सर्व धर्मशीलांना त्वां अनार्यानें कपटानें मारविलें.' हें ऐकून श्रीकृष्ण ह्मणाला, 'आह्मीं कांहीं जरी केलें तरी तें तुझ्या करण्यापेक्षां पुष्कळच कमी आहे. भीमाला विष चारलेंस. सर्व पांडवांना जाळून टाकण्याचा प्रयत्न केलास. द्यूतामध्यें अगदीं गैरमाहीतगार अशा धर्माला शकुनीकडून फसविलेंस. व द्रौपदीचा विनाकारण छळ केलास. ह्या सर्व पातकांचें हें प्रायश्चित्त आहे. या थोर भीष्मद्रोणादिकांनाही तुझ्याच अपराधामुळें त्रास सोसावा लागला.' ह्यावर दुर्योधन ह्मणाला, 'मीं सर्व विद्या संपादन करून यथान्याय सर्व पृथ्वीचें राज्य केलें; व शत्रूंच्या छातीवर पाय देऊन ऐटीनें वागलों. तेव्हां माझ्यासारखा भाग्यशाली दुसरा कोण आहे? धर्मवेत्ते क्षत्रिय ज्याच्याकरितां नेहमीं तयार असतात असा लढाईंतला मृत्यु आज मला मिळाला तेव्हां याहून अधिक भाग्य तें काय पाहिजे? मी मी ह्मणणाऱ्या क्षत्रियांनाही दुर्लभ असे केवळ स्वर्गींचे भोग भोगून, आप्त, मित्र, व चाकर या सर्वांसह मी आतां स्वर्गाला चाललों आहें, तुह्मीं मात्र येथेंच रडत बसलां आहां.' हें दुर्योधनाचें उत्साहभरित असे शब्द ऐकून सर्व सिद्ध, शाबास शाबास, असें मोठ्यानें ह्मणाले; आकाशांतून पुष्पवृष्टि झाली; गंधर्व मंजुळ वाद्यें वाजवूं लागले; व अप्सरा दुर्योधनाच्या कीर्तिपर गाणीं गाऊं लागल्या. असा चोहोंकडून दुर्योधनाचा त्याच्या मरणसमयीं जयजयकार होत चाललेला पाहून पांडवांनीं लाजेनें खालीं माना घातल्या. हें पाहून श्रीकृष्ण पांडवांना ह्मणाला, 'भीष्मादि महारथ्यांना सोज्वल मार्गानें जिंकणें अशक्य होतें. तसेंच हा गदाधारी दुर्योधन सुद्धां काळालाही अजिंक्य होता. ह्मणून मीं नानाप्रकारच्या युक्त्यांनीं ह्या सर्वांचा फडशा पाडला. असें केलें नसतें तर हा जय कसा मिळाला अस-

ता व हें राज्य तरी कसें मिळालें असतें? तुमच्या कल्याणाकरितां मीं ही गोष्ट केली. शिवाय थोरांनीं दाखविलेली वाट घेण्याला कांहीं हरकत नाहीं. देवदानवांच्या युद्धामध्यें देवांनीं ह्याच मार्गाचें अवलंबन केलें होतें. आतां आमचें येथील सर्व काम संपलें व संध्याकाळही झाली आहे. तेव्हां आपण सर्व शिबिराकडे जाऊं या. असें तो ह्मणाल्याबरोबर कोणीं सिंहनाद केला; कोणीं शंखनाद केला; व कित्येकांनीं भेरी, तुताऱ्या वगैरे रणवाद्यें वाजविलीं. व सर्व पांडववीर आनंदानें रथांत बसून शिबिराकडे चालते झाले.

सर्व योद्धे दुर्योधनाच्या शिबिराकडे येऊन पोहोंचल्यावर श्रीकृष्णानें अर्जुनाला आपल्या गांडीवाची चढविलेली दोरी उतरण्यास सांगून रथाखालीं उतरण्यास सांगितलें व आपणही रथाखालीं उतरला. नंतर मारुति वरच्यावरच उडून अदृश्य झाला. श्रीकृष्ण रथाखालीं आल्याबरोबर रथाला एकाएकीं आग लागल्यासारखें होऊन घोडे व सामान यांसह सर्व रथ एका क्षणांत जळून खाक झाला! हें पाहून सर्व पांडव एकदम आश्चर्यचकित झाले. नंतर अर्जुन हात जोडून नम्रपणानें श्रीकृष्णाला 'कृष्णा, हें असें कां झालें,' तें ऐकून वासुदेव ह्मणाला, 'युद्धामध्यें आपल्यावर शत्रूंनीं पुष्कळ अस्त्रें सोडलीं होतीं. त्यांमुळें हा पूर्वींच जळून खाक व्हावयाचा. परंतु मी त्याच्यावर बसलों होतों त्यामुळें हा अजून जशाचा तसा होता. आज तुझें सर्व काम संपलें असें पाहून मी ह्याच्यावरून खालीं उतरलों. त्यासरशीं हा रथ पूर्वीं सोडलेल्या ब्रह्मादि अस्त्रांच्या प्रभावानें जळून गेला' असें सांगून आनंदानें युधिष्ठिराला आलिंगन देऊन पुन्हां श्रीकृष्ण म्हणाला, 'हे कौंतेया, सर्व शत्रूंला ठार करून तूं आपल्या भावांनिशीं या रणयज्ञांतून पार पडलास ही फार चांगली गोष्ट झाली. तूं पूर्वीं मधुपर्क वगैरे आणून माझी पूजा केलीस व त्या वेळीं सांगितलें होतेंस कीं, 'हा अर्जुन तुझा भाऊ व मित्र आहे. तेव्हां सर्व संकटांमध्यें तूं ह्याचें रक्षण कर.' त्या वेळीं मीं तुला होय म्हणून सांगितलें होतें. त्याप्रमाणें मीं ह्या अर्जुनाला अनेक संकटांतून पार पाडून, त्याला त्याच्या भावांसह आज तुझ्या स्वाधीन केला आहे. हें ऐकून युधिष्ठिर म्हणाला, 'द्रोणकर्णादिकांनीं सोडलेल्या ब्रह्मास्त्रापासून ह्याचें रक्षण करणारा तुझ्यावांचून दुसरा कोण समर्थ आहे? केवळ तुझ्याच कृपेनें आह्मांला हा विजय मिळाला. पूर्वीं कृष्णद्वैपायनांनीं मला सांगितलें होतें कीं, ज्या ठिकाणीं धर्म आहे तेथें श्रीकृष्ण आहे व जेथें श्रीकृष्ण आहे तेथें यश ठेवल्यासारखेंच आहे.'

अशा रीतीनें युधिष्ठिर व श्रीकृष्ण यांचें भाषण झाल्यावर सर्व योद्धे दुर्योधनाच्या शिबिरांत शिरून तेथील सर्व मौल्यवान वस्तू घेऊन कांहीं वेळ तेथेंच राहिले. मग श्रीकृष्णानें कांहीं मंगलकार्याकरितां आह्मी आज बाहेरच राहूं या.' असें सांगितल्यावरून सर्व पांडववीर ओघवती नांवाच्या जवळच असलेल्या नदीच्या कांठीं राहिले. तेथें असतांना युधिष्ठिर श्रीकृष्णाला ह्मणाला, 'हे कृष्णा, तूं आह्मांला हा एवढा विजय मिळवून दिलास खरा, परंतु तो सर्व आतां नाहींसा होण्याच्या बेतांत आला आहे. गांधारी घोर तपश्चर्येंत गढली आहे. तिला जर हें मुलगे मेल्याचें वर्तमान कळेल तर ती आह्मांला शापून भस्म करील. तर हे पुरुषोत्तमा, तूं जाऊन तिचें सांत्वन कर. तुझ्यावांचून तिच्यापुढें जाणेंही कोणाच्यानें होणार नाहीं. तूं गेलास म्हणजे सर्व हकीकत नीट रीतीनें सांगून तिचें लवकर सांत्वन करशील.' हें ऐकून श्रीकृष्णानें दारुकाला रथ जोडण्याला सांगून तो सज्ज होऊन आल्यावर त्यांत बसून हास्तिनापुराला निघाला. तेथें गेल्यावर धृतराष्ट्राच्या वाड्यांत जाऊन, धृतराष्ट्र, व्यासमुनी व गांधारी ह्यांच्या पायांवर डोकें ठेवून व धृतराष्ट्राच्या हातांत हात घालून कांहीं वेळ श्रीकृष्णपरमात्मा मोठ्यानें सूर काढून रडूं लागला; नंतर डोळे पुसून धृतराष्ट्राला ह्मणाला, 'वडिलांना ठाऊक नाहीं असें कांहींच नाहीं. आजपर्यंत कोठें काय झालें हें सर्व आपणाला कळलेंच आहे. पांडवांनीं तुह्मांला वाईट वाटूं नये व कुलाचाही क्षय होऊं नये म्हणून कसें वर्तन ठेवलें हें सर्व आपल्या लक्षांत आहेच. कपटी द्यूतांतल्या सर्व अटी कबूल करून एखाद्या दुबळ्याप्रमाणें बारा वर्षेंपर्यंत दुसरा वनवास करून शेवटीं लाजिरवाणे

असे वेष घेऊन एक वर्ष अज्ञातवासही केला. युद्धाचे आरंभीं मीं स्वतः येऊन पांच गांव मागितले. परंतु आपण लोभवश होऊन तेवढेही दिले नाहींत. त्यामुळें आज सर्व क्षत्रियकुल नष्ट झालें आहे. भीष्म, द्रोण व विदुर ह्यांनींही तह करण्याबद्दल पुष्कळ सांगितलें. पण तिकडेही आपण लक्ष दिलें नाहीं. **विनाश काल जवळ आला म्हणजे सर्वांची बुद्धि जाते.** मग आपल्याकडे तरी काय दोष आहे. परंतु पांडवांवर मात्र आतां ह्याचा दोष लादूं नका. त्यांच्याकडे यत्किंचितही दोष नाहीं. धर्माच्या दृष्टीनें न्यायानें किंवा स्नेहदृष्टीनें, कोणीकडून पाहिलें तरी, पांडव निर्दोषी आहेत. हें सर्व आपल्याच कृतीचें फळ आहे असें जाणून आपण पांडवांचा मुळींच द्वेष करूं नये. मी आपल्याला हात जोडून सांगतों कीं, आपण व साध्वी गांधारीनें ह्या पातकांचा बोजा पांडवांवर न लादतां आपणच त्याचे धनी आहोंत असें मानावें; व नेहमीं पांडवांचें कल्याण चिंतीत रहावें. तुमच्यावर स्वाभाविकपणेंच धर्मराजाची भक्ति व प्रेम किती आहे हें तुह्मी जाणतच आहां. आपणाला अपकार करणाऱ्या शत्रूलाच त्यानें ठार केलें असें असूनही त्याला ह्या शत्रुक्षयाबद्दल रात्रंदिवस चैन पडेनासें झालें आहे. एवढेंच नव्हे तर तो आपणां दोघांबद्दल फार शोक करीत आहे. व त्या लाजेनेंच त्याच्यानें तुमच्यापर्यंत येववेना!' याप्रमाणें पुत्रशोकानें व्याकुळ झालेल्या धृतराष्ट्राचें सांत्वन करून श्रीकृष्ण गांधारीकडे वळून ह्मणाला, 'हे कल्याणि, तुझ्यासारखी शहाणी या जगांत कोणी नाहीं. तुला आठवत असेलच कीं, सभेमध्यें तूं माझ्याजवळच बसून दोन्ही पक्षांना हितकारक, धर्मार्थांनीं भरलेला असा तुझ्या मुलांना काय उपदेश केलास व त्याची तुझ्या त्या उन्मत्त मुलांनीं कशी वाट लाविली! तूंच दुर्योधनाला सांगितलें होतेंस कीं, 'हे मूढा माझें ऐक. **जिकडे धर्म तिकडे जय.**' तेंच तुझें वचन आतां खरें झालें आहे. तेव्हां मुळीं शोक करूं नकोस व पांडवांवर रागावूं नकोस. हे महाभागे, तूं रागानें नुसते डोळे वटारलेस तरी तेवढ्यानेंच सर्व पृथ्वी जळून खाक होईल, असें सामर्थ्य तुझ्या अंगीं आहे,' हें श्रीकृष्णाचें भाषण ऐकून गांधारी ह्मणाली, 'हे महाबाहो, तूं जें सांगितलेंस तें सर्व खरें आहे. पुत्र शोकानें माझी बुद्धि चळत चालली होती. पण आतां ती तुझ्या उपदेशानें जाग्यावर आली आहे. वृद्ध व अंध अशा महाराजांचे सर्व मुलगे मेल्यामुळें त्यांना आतां काय ते पांडव व तूंच अहां.' असें ह्मणून पुत्रशोकानें विव्हळ झालेली गांधारी तोंडावर पदर घेऊन मोठ्यानें रडूं लागली. हें पाहून श्रीकृष्णानें तिचें पुष्कळ प्रकारें सांत्वन केलें व अश्वत्थाम्याचा कांहीं तरी वाईट बेत असावासें वाटून गडबडीनें उठून धृतराष्ट्र, गांधारी व व्यासमुनी ह्यांना वंदन करून श्रीकृष्णानें धृतराष्ट्राचा, कांहीं जरूरीच्या कारणावरून मी आतां जातों, ह्मणून निरोप घेतला. नंतर गडबडीनें रथांत बसून तो पांडवांकडे गेला.

---

## ६८ अश्वत्थाम्याला सेनापत्याभिषेक.
## ( ९. ६४—६९ ).

इकडे पांडव गेल्यावर दुर्योधन मांडी मोडून विव्हळ होऊन पडला असतां तोंडावर आलेले केस सांवरून आपल्यापैकीं कोणी दिसतो आहे काय ह्मणून इकडे तिकडे पहात होता. इतक्यांत संजय त्याच्या दृष्टीस पडला. त्याला पाहून दुःखानें व रागानें सापाप्रमाणें सुस्कारे टाकीत त्याला तो ह्मणाला, 'भीष्मद्रोणांसारखे शूरवीर व अकरा अक्षौहिणी सैन्य माझ्या पदरीं असतां आज माझी ही दशा झाली! कालगतीपुढें कोणाचा उपाय चालत नाहीं! आमच्यापैकीं जर कोणी जिवंत असतील तर त्यांना भीमानें दुर्योधनाला अन्यायानें मारलें ह्मणून सांग. मी पडलों असतां भीमानें माझ्या डोकीवर लाथ मारली! हेंच जर त्यानें मी राज्यावर असतांना व माझे सर्व बंधू जिवंत असतांना केलें असतें तर खरें! तसेंच माझ्या दुःखी झालेल्या मातापित्यांना सांग कीं, मी आजपर्यंत सर्व चाकरांचीं मनें संतुष्ट ठेविलीं, यथान्याय सगळ्या पृथ्वीचें राज्य केलें, सर्व शत्रूंच्या डोकींवर पाय देऊन वागलों, यथाशक्ति दानधर्म केला, भावांचा यथायोग्य सत्कार केला, परकीय राजांना ताब्यांत ठेविलें, सर्व विद्यांचें अध्ययन केलें, व सर्व आयुष्य सुस्थितींत घालाविलें. आजपर्यंत मला कोणीं जिंकलें

नाहीं व मी कधीं कोणाच्या अंकितही राहिलों नाहीं! माझी राजलक्ष्मी मी मेल्यावरच दुसऱ्याच्या ताब्यांत जात आहे. एवढेंच नव्हे, तर धर्मशील क्षत्रिय ज्याची मनापासून इच्छा करितात अशा प्रकारचें मला मरण आलें आहे! तेव्हां याहून अधिक भाग्य दुसरें काय पाहिजे? युद्धामध्यें मीं आजपर्यंत शत्रूला पाठ कधीं दाखविली नाहीं. व एखाद्या यःकश्चित् मनुष्याप्रमाणें युद्ध सोडून पळण्याचें माझ्या मनांत कधीं आलें नाहीं. शत्रु मला ठार करील, विष पाजील किंवा दुसरा अपाय करील असा बेसावध मी कधीं राहिलों नाहीं. पण भीमानें मात्र मला अन्यायानें मारलें. बरें असो. आतां मी भीष्मादि वीर जिकडे गेले आहेत तिकडेच जातों. ह्या समंतपंचकामध्यें मरण आल्यानें मला स्वर्गच मिळणार. आतां ही दुःखद वार्ता ऐकून माझ्या भावजया, वहिणी व स्नुषा धाय मोकलून रडूं लागतील; माता गांधारी व राजा धृतराष्ट्र यांची पुत्रशोकानें काय दशा होईल? तसेंच लक्ष्मणमाता, माझी लाडकी तर आतां माझ्या वियोगानें व पुत्रशोकानें प्राण सोडील.'

अशा रीतीनें दुर्योधन शोकाकुल होऊन बडबडत असतां कांहीं लोक डोळ्यांतून अश्रु गाळीत अश्वत्थाम्याकडे धांवून गेले. व त्यांनीं त्याला ही सर्व हकीकत सांगितली. तेव्हां अश्वत्थामा, कृपाचार्य व कृतवर्मा असे तिघे दुर्योधनाकडे धांवून आले. सर्व अंग रक्तानें भरून जाऊन, दुःखानें व्याकुळ होऊन जमिनीवर लोळत पडलेल्या राजा दुर्योधनाला पाहून ते तिघेही वीर मूर्छित होऊन खालीं पडले. कांहीं वेळानें पाण्यानें ज्याचे डोळे भरून आले आहेत असा अश्वत्थामा दुःखानें सुस्कारा टाकीत दुर्योधनाला ह्मणाला, 'तुझ्यासारखा सार्वभौम राजा आज एकटाच जमिनीवर धूळ खात पडला आहे! हें पाहून ह्या मृत्युलोकीं कशाचाच नेम नाहीं हें अगदीं खरें ठरतें. हें ऐकून राजा दुर्योधन ह्मणाला, 'ब्रह्मदेवानें ह्या लोकची वस्ती अशीच करून ठेविली आहे. कालगतीनें प्रत्येक वस्तूचा नाश हा व्हावयाचाच. त्याचप्रमाणें माझाही शेवट होत आहे. ह्यांत आनंदाची गोष्ट हीच की, मीं आजपर्यंत युद्धांत पाठ कधींच दाखविली नाहीं! पण पांडवांनीं मला अन्यायानें मारलें. तुह्मीही आजपर्यंत मला जय मिळावा ह्मणून पुष्कळ झटला. पण दैवगतीच फिरली त्याला तुह्मी तरी काय कराल. असें ह्मणत असतांना दुर्योधनाचे डोळे पाण्यानें भरून आले, व गळा दाटून आला, त्यामुळें त्याला पुढें एक अक्षरही बोलवेना. अशी ही दुर्योधनाची दुःखद स्थिति पाहून अश्वत्थाम्याला वाईट वाटून तोही रडूं लागला. इतक्यांत पांडवांचा अन्याय मनांत आणून तो रागानें दुर्योधनाला ह्मणाला, 'ह्या नीचांनीं माझ्या तातांनाही कपटानेंच मारलें. पण तुझी ही स्थिति पाहून जितकें मला वाईट वाटतें तितकें त्याबद्दल वाटत नाहीं. आतां मी तुला आजपर्यंत केलेल्या पुण्याची व दानधर्माची शपथ घेऊन सांगतों कीं, वासुदेवाच्या देखत आज मी सर्व पांचालांना तुझ्या आज्ञेनें यमलोकाला पाठवितों.' हें आनंददायक असें अश्वत्थाम्याचें भाषण ऐकून दुर्योधनानें कृपाचार्यांना लोटा पाण्यानें भरून आणावयाला सांगितलें. त्याप्रमाणें कृपाचार्यांनीं तो भरून आणल्यावर दुर्योधनानें त्यांना 'जर माझें कल्याण व्हावें असें तुमच्या मनांत असेल तर तुह्मी ह्या वेळीं अश्वत्थाम्याला सैनापत्याभिषेक करा. क्षत्रियधर्मानें वागणाऱ्या ब्राह्मणानें राजाची आज्ञा घेऊन लढावें असें आहे,' असें सांगितलें. तेव्हां कृपाचार्यांनी अश्वत्थाम्याला सैनापत्याभिषेक केला. विधिपूर्वक अभिषेक झाल्यानंतर अश्वत्थामा दुर्योधनाला आलिंगन देऊन मोठ्यानें सिंहनाद करीत तेथून निघून गेला.

# १० सौप्तिकपर्व.

## ६९ घुबडाला गुरु केला ! (१०. १-२)

याप्रमाणें दुर्योधनानें आपल्या अंतकाळीं अश्वत्थाम्याला सेनापति केल्यावर अश्वत्थामा, कृपाचार्य व कृतवर्मा, हे तिघे वीर आपल्या गोटाकडे परतले. अंगावर वार लागल्यामुळें व बरेच श्रम झाल्यामुळें त्यांचीं सर्व गात्रें अगदीं थकून गेलीं होतीं. तरी पांडवांनीं आपल्या गोटावर तळ दिला आहे हें पाहून ते आपला पाठलाग करतील ह्या भीतीनें हे कौरववीर तसेच पळत सुटले. त्यांचे घोडे अगदीं दमून गेले होते व ह्यांनाही पुष्कळ तहान लागली होती. पण या धांदलींत ह्यांचेंही त्यांना भान उरलें नाहीं. अशा रीतीनें पळत पळत ते संध्याकाळचे सुमारास पूर्वेकडील एका मोठ्या किर्र अरण्यांत शिरले. हें अरण्य नानाप्रकारच्या पक्ष्यांनीं व श्वापदांनीं अगदीं गजबजलें होतें. सर्व अरण्यभर झाडें व वेली दाट पसरल्या होत्या. चहूंकडे उत्तम प्रकारचे पाण्याचे झरे वहात होते. तसेंच त्या पाण्यांतून उत्तम प्रकारचीं कमळें उगवलीं होतीं. त्यामुळें सर्व वनाला फारच शोभा आली होती. येथें घोड्यांना पाणी पाजून ते आपणही पाणी प्याले. नंतर येथेंच आपलीं संध्योपासनादि नित्यकर्मे आटोपून हे रणबहादूर रात्र झाल्यामुळें निवाऱ्याकरितां एका भल्या मोठ्या वडाच्या आश्रयाला जाऊन राहिले. त्यावेळीं ग्रह व नक्षत्रें यांच्या योगानें रुपेरी छटा दिलेल्या नीलवस्त्राप्रमाणें, सर्व आकाश फारच रमणीय दिसत होतें. कांहीं प्राणी झोंपेच्या गडबडींत होते. व राक्षसादिकांसारखे कांहीं प्राणी रात्रीला पाहून आनंदानें नाचत मोठ्यानें गर्जना करीत होते. अशा वेळीं हे तिघे वीर कौरवपांडवांच्या ह्या भयंकर रणकंदनासंबंधानेंच विचार करीत या झाडाखालीं बसले होते. दिवसभर झालेल्या दगदगीनें बराच थकवा आला होता ह्मणून थोडीशी निवाऱ्याची जागा सांपडल्याबरोबर कृपाचार्य व कृतवर्मा ह्यांना गाढ झोंप लागली. परंतु रागानें फुणफुणाऱ्या अश्वत्थाम्याला मात्र ह्यावेळीं मुळींच झोंप आली नाहीं. तो सापाप्रमाणें एकसारखे फुस्कारे टाकीत नानाप्रकारच्या प्राण्यांनीं भरलेल्या अशा त्या वनामध्यें इकडे तिकडे पहात जागाच होता. तेव्हां त्या झाडावर पुष्कळ कावळे आपापल्या घरट्यांमध्यें निर्धास्तपणें झोंप घेतांना त्याला दिसले. त्यांच्याकडे कांहीं वेळ पहात असतां डोळे हिरवे, आवाज कर्कश, पंख पिंमट, नाक खूप लांब व नखें तीक्ष्ण असें एक मोठें थोरलें घुबड त्या झाडाच्या फांद्यांमध्यें शिरलें. त्यानें त्या दाट फांद्यांमध्यें शिरून पुष्कळ कावळे मारून कित्येकांचे पंख उपटून, कित्येकांच्या मुंड्या मुरगळून व कित्येकांचे पाय मोडून खालीं टाकले. याप्रमाणें जे जे ह्मणून त्याला दिसले त्या सर्वांचा त्यानें फडशा पाडला. एका क्षणांत ह्या घुबडानें तें सर्व झाड कावळ्यांच्या छिन्नभिन्न झालेल्या शरीरांनीं भरून टाकलें.

हें ह्या घुबडाचें कृत्य पाहून आपणही असेंच करावें असा विचार अश्वत्थाम्याच्या डोक्यांत शिरला. ' ह्या पक्ष्यानें मला उत्तम उपदेश केला असें त्याला वाटलें. शत्रूंचा नाश करण्याला हीच वेळ योग्य आहे. नाहींपेक्षां पांडवांना मारणें माझ्यानें होणार नाहीं. ते बलवान आहेत, त्यांच्याजवळ शस्त्रास्त्रेंही बरींच आहेत. शिवाय युद्धांत जय मिळाल्यानें त्यांना दुप्पट जोर आला आहे. पण ह्यांचा फडशा पाडीन ह्मणून राजा दुर्योधनापाशीं मी तर प्रतिज्ञा करून चुकलों आहे. पतंगानें आगींत उडी घेण्यासारखी ही माझी प्रतिज्ञा आहे. मी जर आतां ह्यांच्याशीं न्यायानें युद्ध करीन तर खात्रीनें माझा नाश होणार. परंतु गनिमी कावा लढविला तर मात्र निःसंशय सर्व शत्रूंचा फडशा पडेल; प्रत्येकानें जेणेंकरून कार्यसिद्धि होईल असाच मार्ग पत्करला पाहिजे. मग तो निंद्य असला तरी हरकत नाहीं. क्षत्रियानें तर अशा मार्गाचें अवश्य अवलंबन केलें पाहिजे ! पांडवांनीं तरी काय केलें ? त्यांनीं पावलों-

पावलीं कुत्सित व अतिशय निंद्य अशाच मार्गांचा स्वीकार केला. न्यायी अशा मोठमोठ्या तत्त्ववेत्त्यांनींही अशीच नीति घालून दिली आहे. शत्रूचें सैन्य दमलेलें असतांना, किंवा तें जेवण्याच्या गडबडींत असतांना, कूच करीत असतांना किंवा गाढ निद्रेंत असतांना, त्यांतील मोठमोठे वीर नाहींसे झाले असतांना किंवा त्यामध्यें दुफळी झाली असतांना, त्याच्यावर हल्ला करून त्याचा फडशा पाडावा.' असा विचार करून व पांडवांना पांचालपुत्रांसह कंठस्नान घालण्याचा निश्चय करून अश्वत्थाम्यानें कृपाचार्य व कृतवर्मा ह्यांना जागे केलें.

## ७० अश्वत्थामा व कृपाचार्य यांची मसलत. (१०. ३—६.)

अश्वत्थाम्यानें जागें केल्यानंतर कृपाचार्य व कृतवर्मा हे दोघेही वीर उठून बसले. पराभव झाल्यामुळें त्यांना एक प्रकारची लाज वाटत होती, म्हणून ते कांहींच बोलले नाहींत. डोळे पाण्यानें भरून येऊन अश्वत्थामा ह्मणाला, 'आह्मी ज्याच्याकरितां पांडांशीं एवढें वैर मांडलें, तो राजा दुर्योधन भीमाकडून कपटानें मारला गेला एवढेंच नव्हे तर क्षुद्र भीमानें राजाचे डोकीवर लाथ मारली! शिवाय दुर्योधन मेला ह्मणून जयाच्या फुशारकीनें, सर्व पांचाल व पांडववीर आनंदानें नाचत, खिदळत, हंसत शंखनाद करीत आहेत व मोठ्यानें सिंहगर्जना करीत आहेत. त्याचप्रमाणें रणवाद्यांच्या गजरांनीं घोड्यांच्या खिंकाळण्यांनीं व हत्तींच्या ओरडण्यांनीं सर्व दिशा दणाणून गेल्या आहेत. आमच्यांतील सर्व रणशूर वीर मारले जाऊन आह्मी तिघेच काय ते जिवंत राहिलों आहों. परंतु युद्ध म्हटलें ह्मणजे असें व्हावयाचेंच! आपल्यावर कोसळलेल्या ह्या संकटांनीं मन गडबडून गेलें नसेल तर आतां काय केलें पाहिजे हें सांगा.' हें ऐकून कृपाचार्य ह्मणाले, 'तुझें सर्व ह्मणणें मीं ऐकून घेतलें. आतां मी तुला सांगतों ऐक. **ह्या जगांतील सर्व गोष्टी दैव व पुरुषप्रयत्न या दोहोंवर अवलंबून आहेत.** ह्यांपैकीं केवळ एकाच्या साहाय्यानें, म्हणजे केवळ नशीबानें किंवा केवळ उद्योगानें कोणतींही कार्यें सिद्धीस जावयाचीं नाहींत. दोहोंचेंही साहाय्य असलें पाहिजे; ह्मणजेच कांहीं तरी काम होतें. आजपर्यंत जगामध्यें ज्या ज्या ह्मणून उलाढाली झाल्या आहेत, मग त्या चांगल्या असोत अगर वाईट असोत, त्या सर्व ह्यांच्याच अनुकूलतेनें किंवा प्रतिकूलतेनें झाल्या आहेत. कधीं कोणीं मशागत केली नाहीं, अशा एखाद्या पर्वतावर जर पाऊस पडला तर त्याचा काय बरें उपयोग होणार आहे? पण तोच जर एखाद्या उत्तम नांगरलेल्या अशा जमिनीवर पडला तर त्यापासून किती बरें फायदा होतो. **उत्तम तऱ्हेनें मशागत केलेल्या जमिनीवर पाऊस पडल्यानें जसें पीकही फार चांगलें येतें त्याचप्रमाणें उद्योगशील पुरुषांस दैवाची अनुकूलता झाल्यास मोठमोठीं कार्यें उठतात.** मनुष्यांनीं कितीही दक्षतेनें उद्योग केले तरी, दैव जर अनुकूल नसेल तर, ते सर्व व्यर्थच होणार; अशा समजुतीनें कित्येक आळशी कांहींच न करितां स्वस्थ बसतात एवढेंच नव्हे, तर उलट उद्योग करणाऱ्यांची थट्टा करतात. परंतु शहाण्यांना हें पसंत नाहीं. **कारण केलेल्या कार्याचें मुळींच फळ आलें नाहीं असें या जगांत कधींच होत नाहीं. परंतु उलट कांहींच न करणारे मात्र वारंवार संकटांत पडलेले दृष्टीस पडतात.** केव्हां केव्हां कांहींच न करणाऱ्यांना आपोआप थोडासा फायदा होतो व उद्योग करणाऱ्यांना कांहींच मिळत नाहीं असें होतें खरें. परंतु अशीं उदाहरणें या जगांत फारच थोडीं आहेत. **बहुतेक उद्योग करणारेच या जगांत सुखानें राहतात व आळशी रडत बसतात असेंच नेहमीं आपल्या नजरेस येतें. उद्योग करणाऱ्याला त्याच्या उद्योगाचें फळ हें मिळतेंच;** परंतु यदाकदाचित् मिळालें नाहीं तर त्याबद्दल तो मात्र दोषास पात्र होत नाहीं. कारण त्यामध्यें त्याचें कर्तव्य तेवढें त्यानें केलें असतें. आणि एखाद्या आळशाला सहजगतीनें जरी कांहीं मिळालें तरी सुद्धां तो पूर्वीप्रमाणेंच जननिंदेला पात्र असतो. कारण फलप्राप्ति झाली तरी त्यांत त्यानें कांहींच पुरुषार्थ केलेला नसतो. परंतु इकडे लक्ष न देतां जो नेहमीं आळसामध्येंच राहतो तो स्वतःच आपल्या अनर्थाला कारण होतो. एकट्या दैवाच्याच जोरावर किंवा एकट्या उद्योगाच्याच जोरावर कोणतेंही कार्य

लें. याप्रमाणें पुत्रशोकानें त्यांचें मन उद्विग्न झाल्यामुळें धृष्टद्युम्न त्यांच्या पुढेंच उभा होता तरी ही त्यांच्यानें त्याच्याशीं युद्ध करवेना.

हें पाहून, द्रुपदराजानें यज्ञ करून मुद्दाम द्रोणाचार्यांच्या वधाकरितां अग्नीपासून मिळविलेला धृष्टद्युम्न, ज्याची दोरी बळकट असून त्यांतून मेघगर्जनेप्रमाणें गंभीर आवाज निघत होता, ज्याची कमान विजेप्रमाणें तेजस्वी होती व ज्याचे बाण वज्रासारखे बळकट होते, असें धनुष्य सज्ज करून द्रोणाचार्यांच्या वधाकरितां त्यांच्यावर चालून आला. तेव्हां सर्व सैनिकांना व स्वतः भारद्वाजांनाही आपला अंतकाळ जवळ आला आहे असें वाटूं लागलें. तरी तसेंच नेटानें आचार्य धृष्टद्युम्नाचें निवारण करण्याकरितां उठले. पण त्यांच्या मंत्रांना अस्त्र सिद्ध होईनात व ज्या भात्यानें सबंध चार दिवस व एक रात्र बाण पुरविले तोच भाता आतां एक प्रहरभर दिवस आला नाहीं तोंच अगदीं रिकामा पडला. आधींच पुत्रशोकानें हातपाय गळालेले, त्यांतच हा शस्त्रादिकांचा अभाव व ऋषींचीं शस्त्रें खालीं ठेवण्याबद्दल आज्ञा, हें सर्व पाहून आचार्यांची छातीच दडपली. शस्त्रें टाकून देऊन स्वस्थ बसावें असेंच त्यांना वाटूं लागलें. नंतर कांहीं वेळानें त्यांची मति बदलली. त्यांनीं आंगिरस नांवाचें धनुष्य हातीं घेऊन धृष्टद्युम्नावर जोरानें मारा चालविला व थोड्याच वेळांत त्याचें धनुष्य तोडून सारथ्याचें डोकें उडविलें. धृष्टद्युम्नानें दुसरें धनुष्य घेऊन नेमकें आचार्यांच्या छातीवरच बाण सोडले. तेव्हां रागाच्या सपाट्यांतच त्यांनीं एकामागून एक अशीं धृष्टद्युम्नाचीं सर्व धनुष्यें तोडून टाकलीं. फक्त त्याच्यापाशीं गदा आणि तलवार मात्र शिल्लक राहिली. तेव्हां धृष्टद्युम्नानें जवळ जाऊन गदेचा प्रहार करावा अशा उद्देशानें आपला रथ पुढें हांकला, त्यामुळें आचार्यांच्या रथाचे घोडे व धृष्टद्युम्नाचे रथाचे घोडे हे एकमेकांत मिसळून गेले. त्याबरोबर बराच गोंधळ उडाला. तेव्हां धृष्टद्युम्नानें गदा उचलून तिला जोर येण्याकरितां गरगर फिरविण्याला आरंभ केला. पण तो ती फेंकणार इतक्यांत आचार्यांनीं तिचे दोन तुकडे केले. लगेच धृष्टद्युम्नानें तलवार घेऊन आपल्या रथाच्या जुवावरून भारद्वाजांच्या रथांत उडी ठोकली. त्याबरोबर ह्याला परत आपल्या रथांत जातां येऊं नये ह्मणून आचार्यांनीं मोठ्या शिताफीनें ह्याचेच तेवढे घोडे मारले. नंतर दोघांचेंही तलवारीनें युद्ध चालूं झालें. मागें पुढें पवित्रे चाळणें, वळसा घेऊन शत्रूला गांठणें, संधि साधेल त्याप्रमाणें आपल्या शत्रूचा डोळा चुकवून त्यावर वार करणें किंवा तलवार खुपसणें, शत्रूला मध्येंच हूल दाखविणें, वार करण्याला जोर येण्याकरितां व शत्रूचा वार चुकविण्याकरितां मानेंभोंवतीं आपली तलवार जोरानें फिरविणें, आपल्या अंगाभोंवतीं आपली तलवार फिरवून शत्रूच्या वाराची युक्तीनें पत करणें, ह्या व अशाच प्रकारच्या दुसऱ्या पेंचांत दोघेही चांगले निष्णात असल्यामुळें समरांगणांतील योद्ध्यांना तलवारीच्या युद्धांत कसब ह्मणून जें आहे तें सर्व पूर्ण रीतीनें पहावयाला सांपडलें. अशा रीतीनें कांहीं वेळ ही तलवारीची खणाखणी झाल्यावर आचार्यांनीं एकदम वैतस्तिक नांवाच्या बाणांचा वर्षाव करून आपल्या प्रतिपक्षाची ढाल व तलवार हीं दोन्ही तोडून टाकलीं, आणि तसलाच एक तीक्ष्ण बाण घेऊन धृष्टद्युम्नावर नेम धरला. हा बाण सुटला असता तर धृष्टद्युम्न ठारच झाला असता. पण सात्यकीनें चलाखी करून तो बाण मध्येंच तोडून टाकला. अशा रीतीनें कृपाचार्य व कर्ण ह्यांच्या देखत, द्रोणांच्या कचाट्यांत सांपडलेल्या धृष्टद्युम्नाला, सात्यकीनें मोठ्या शिताफीनें सोडविलेला पाहून कृष्णार्जुनांना व सर्व पांडवांना अतिशय हर्ष झाला. त्यामुळें ते ‘ शाबास, सात्यके शाबास, ’ असें मोठ्यानें ओरडले.

पण कौरवांना हें सहन न होऊन, दुर्योधन, कृपाचार्य व कर्ण वगैरे मंडळी एकदम सात्यकीवर तुटून पडली. हें पाहून युधिष्ठिर, भीम, नकुल, सहदेव वगैरे मंडळी ही सात्यकीच्या मदतीला धांवली. त्यामुळें प्रळयकाळच्या रुद्राच्या संहाराप्रमाणें त्या रणभूमीवर योद्धे, हत्ती, घोडे वगैरेंचा संहार होऊं लागला. अशा रीतीनें चहूंकडे भयंकर कत्तल चालली असतां युधिष्ठिराच्या आज्ञेवरून सर्व सृंजय वीर द्रोणाचार्यांवर तुटून पडले. त्यासरशीं आचार्यही मरणाच्या निश्चयानें पांडवसैन्यांत घुसले. त्याबरोबर पृथ्वी डळमळूं लागली, वादळ सुटलें; व उ-

ल्कापात झाला. त्याचप्रमाणें आचार्यांच्या शस्त्रांतून ठिणग्या पडूं लागल्या, रथांतून भयंकर आवाज निघूं लागले, घोड्यांच्या डोळ्यांतून पाणी येऊं लागलें, द्रोणांचा डावा डोळा व डावा बाहु स्फुरण पावूं लागला, मन उदास भासूं लागलें व हातपाय लटपटूं लागले. तरी त्यांनीं तसाच धीर धरून युद्धाला प्रारंभ केला. व सपाव्यासरशीं वीस हजार योद्धे व एक लक्ष हत्ती, यांची कत्तल केली.

इकडे भीमानें शस्त्रहीन व रथहीन झालेल्या धृष्टद्युम्नाला आपल्या रथांत घेऊन त्याला सांगितलें कीं, तुझ्यावांचून आचार्यांशीं युद्ध करण्याला कोणी धजत नाहीं. ह्मणून जलदी करून त्यांना तेवढे स्वर्गीं पाठीव. सर्व भार तुजवरच आहे. ' हें ऐकून धृष्टद्युम्न वेगानें आचार्यांवर तुटून पडला. त्यानें कौरव, बाल्हीक व शिबी वगैरे जे जे वीर आचार्यांच्या रक्षणाला उभे होते त्या सर्वांना जर्जर करून प्रत्यक्ष आचार्यांवरही जोराचा मारा केला. सूर्य ज्याप्रमाणें आपल्या प्रखर किरणांचा प्रभाव चहूंकडे सारखा पाडतो त्याप्रमाणें हा आपल्या हस्तलाघवानें सर्वांवर सारखा बाणांचा मारा करीत होता. पण इतक्यांत आचार्यांनीं याच्या सर्व बाणांचा फडशा पाडून, यालाही घायाळ केलें. त्यामुळें धृष्टद्युम्नाला बऱ्याच वेदना होऊं लागल्या. हें पाहून भिम रागानें आचार्यांकडे गेला व त्यांच्या रथाला घट्ट धरून त्यांना ह्मणाला, ' आपल्या वर्णाश्रमधर्माचा त्याग करणाऱ्या तुमच्यासारख्या ब्राह्मणांनीं जर युद्ध केलें नाहीं तर या जगांतील सर्व क्षात्र तेज नाहींसें होतें असें मुळींच नाहीं. सर्व धर्मांमध्यें अहिंसा ही अति उच्च गणली आहे. त्या अहिंसेचें मुख्य बीज ह्मणजे ब्राह्मण होत. त्यांतून आपण तर ज्ञाते ब्राह्मण आहां, असें असून आपण एखाद्या क्रूर व मतिमंद चांडाळाप्रमाणें पुत्र, दारा व धन यांच्याकरितां कोट्यावधि लोकांचे गळे कापीत आहां. जे आपण आपल्या मुलाच्या एका जिवाकरितां स्वधर्मानें वागणाऱ्या अशा ह्या शेंकडों शूर क्षत्रियांचा संहार करीत अहां त्या आपल्या मनाला ह्या असल्या घोर कर्मांबद्दल वाईट तरी कसें वाटत नाहीं ? बरें, ज्यामुळें आपण सुखानें कालक्रमणा करीत आहां व ज्याच्याकरितां हातीं हें शस्त्र घेतलें आहे तो तुमचा मुलगा तर गतप्राण होऊन अनाथाप्रमाणें जमिनीवर लोळत पडला आहे. राजा धर्मानें तुह्मांला सांगितलें असून तुमचा त्याच्या शब्दावर विश्वास बसत नाहीं. धर्मराजाच्या बोलण्याचा अविश्वास धरणें हें बरें नव्हे. ' असें भीमानें सांगितल्याबरोबर आचार्यांनीं धनुष्य खालीं फेंकून देऊन कर्ण, कृपाचार्य व दुर्योधन यांना हाक मारून सांगितलें कीं, ' धीर धरा व शौर्यानें लढा. हेंच मी तुह्मांला पुनः पुनः सांगतों. ईश्वर तुमचें कल्याण करो व तुह्मांला जय मिळो. मी आतां शस्त्र खालीं ठेवितों. ' असें ह्मणून द्रोणाचार्यांनीं अश्वत्थाम्याबद्दल शोक करीत करीत शस्त्र खालीं ठेविलें; व एकाग्र मन करून ताठ बसून, हनुवटी उराला लावून ॐकारस्वरूपी परमात्म्याचें ध्यान करून ज्योतीला ज्योती मिळवून दिली. त्या वेळचें आचार्यांचें तेज प्रतिसूर्याप्रमाणें प्रखर होतें. ह्यांचा जीवात्मा तेजोमय होऊन परब्रह्माशीं लीन होतांना श्रीकृष्ण, संजय, अश्वत्थामा, अर्जुन, व धर्मराज ह्या पांचजणांनाच दिसला; बाकी कोणालाही दिसला नाहीं. पण त्यांना शस्त्रहीन पाहून मात्र सर्व सैन्यांत एकच कोलाहाल झाला.

इतक्यांत धृष्टद्युम्नानें विजेसारखी चकाकणारी अशी तीक्ष्ण धारेची तलवार घेऊन आचार्यांच्या रथावर उडी ठोकली; व सर्वजण ' नको, नको ' ह्मणत असतां व प्रत्यक्ष अर्जुनही ' नको, नको ' ह्मणून ओरडत असतांना, पंचाऐशीं वर्षांचे वृद्ध पण सोळा वर्षांच्या तरुणाप्रमाणें शूर व चलाख अशा आचार्यांचें टक्कल पडलेलें पांढऱ्या केंसांचें डोकें, ह्मद्‌दिशीं धडापासून वेगळें केलें; आणि मोठ्यानें सिंहगर्जना केली. त्याबरोबर भीमानें त्याला आलिंगन दिलें व दोघेही त्या रणभूमीवर आनंदानें नाचूं लागले. त्याप्रमाणें सर्व पांडवांनींही जयघोष करून आनंदानें रणवाद्यें वाजविलीं. व भीमानें दंड ठोकून त्या आवाजानें सर्व समरांगण दणाणून टाकलें.

---

## ४५ अश्वत्थाम्याचें नारायणास्त्र.

( ७. १९३—२०२ )

याप्रमाणें आचार्यांच्या मरणानें पांडवसेनेंत आ-

मारणें माझ्या शोकाला भरती येते. म्हणून केवळ शत्रूंचा सूड घेण्याकडेच माझें मन लागलें आहे. तेव्हां मला आतां झोंप कोठून येणार व सुख तरी कसचें वाटणार? ज्या सैन्याचें कृष्णार्जुनांनीं रक्षण केलेलें आहे अर्थात तें इंद्रालासुद्धां अजिंक्य असणार. असें जरी आहे तरी ह्यांचा सूड घेण्याबद्दलचा माझा निश्चय मुळींच ढळत नाहीं. मला या जगांत असा कोणी दिसत नाहीं कीं, जो मला या माझ्या निश्चयापासून परामुख करील. माझ्या मित्रांचा पराभव झाला हें ऐकून माझ्या शरीराचा अगदीं भडका उडाला आहे. ह्मणून मी शत्रूंची कत्तल करून मगच सुखानें झोंप घेईन. यावर कृपाचार्य ह्मणाले, '**मूर्ख व उच्छृंखल मनुष्याच्या मनांत धर्म व अर्थ ह्या पुरुषार्थांचें ज्ञान मिळविण्याचें किती जरी आलें तरी त्याच्यानें तें होणें शक्य नाहीं; त्याचप्रमाणें शहाणा असूनही जो उच्छृंखल असेल त्यालाही कांहीं यावयाचें नाहीं.** ज्याप्रमाणें रुचकर रसांत बुडविलेल्या पळीला त्या रसाचें कांहींच ज्ञान होत नाहीं त्याचप्रमाणें मूर्ख मनुष्य एखाद्या पंडिताजवळ त्याची सेवा करीत किती दिवस जरी राहिला तरी त्याला कांहींच ज्ञान व्हावयाचें नाहीं. जशाचा तसाच कोरडा रहाणार. परंतु तोच बुद्धिमान व शहाणा मनुष्य एक क्षणभरच जरी पंडिताचा सहवास करील तरी जिभेला जसें रसज्ञान तत्काल होतें त्याप्रमाणें त्याला बरेंच ज्ञान येतें, त्यांतून तो बुद्धिमान मनुष्य दमशील असून गुरूची सेवा जर एकनिष्ठपणें करतो तर तो फार लौकर सर्वज्ञ होतो. जो कोणी दुष्ट, पापी, व उच्छृंखल मनुष्य हितबुद्धींचा धिःक्कार करून पापकर्म करण्याला निघतो, त्याचे स्नेही त्याला ह्या पापाचरणापासून परतविण्याचा यथाशक्ति प्रयत्न करतात. जो ह्या स्नेह्यांचें ऐकून आपलें पापाचरण सोडतो तो ऐश्वर्यवान होतो, व जो न ऐकतां आपलाच हेका चालवितो तो लवकर नाश पावतो. ह्मणून हे बापा, आपल्या हिताकडे लक्ष देऊन स्वतःला आवरून धर व माझें बोलणें ऐक. ह्मणजे तुला पश्चात्ताप होणार नाहीं. **जे निजले आहेत किंवा जे शस्त्रहीन आहेत; मी तुझा आहें, माझें रक्षण कर, असें ह्मणून जे शरण आले आहेत; किंवा ज्यांचीं वाहनें दमून गेलीं आहेत; अशांचा वध करणाऱ्याला लोक निंद्य समजतात.** आतां हे पांचाल सर्व शस्त्रास्त्रें टाकून देऊन व चिलखतें काढून ठेवून निधास्तपणें प्रेतासारखे पडले आहेत. तेव्हां अशांना मारणें ह्मणजे नरकाचेंच साधन करणें आहे. तूं तर सर्व शस्त्रधाऱ्यांमध्यें श्रेष्ठ असून तुझ्यामध्यें पापाचा लवलेशही नाहीं अशी तुझी ख्याति आहे. ह्मणून हे तेजस्वी पुरुषा, उद्यां सुर्योदय झाल्यावर दिवसांउजेडीं तूं आपल्या शत्रूंना ठार कर. असें न करशील तर, पांढऱ्यावर काळा डाग दिल्याप्रमाणें, तूं आजपर्यंत निष्पाप राहून एवढ्यानेंच या जगांत अति निंद्य ठरशील.' ह्यावर अश्वत्थामा ह्मणाला, 'अहो मामा, तुह्मीं सांगतां तें सर्व खरें आहे. परंतु ह्या पांडवांनींच ह्या नियमाला फाटा दिला आहे. सर्व राजांच्या देखत व आपण जवळ असतांना धृष्टद्युम्नानें माझ्या तातांना, त्यांनीं आपलें शस्त्र खालीं ठेविलें असतां ठार केलें! त्याचप्रमाणें कर्ण, भीष्म व दुर्योधन ह्यांनाही ह्या नीचांनीं असेंच कपटानें मारलें. असें असून तुह्मी ह्या पांचालांना व पांडवाना कां दोष देत नाहीं? मांडी मोडून हताश होऊन पडला असतां राजा दुर्योधन फार रडला असें बातमीदाऱ्यांच्या तोंडून ऐकल्यापासून माझें काळीज तिळतिळ तुटत आहे. माझ्या तातांचा वध करणाऱ्यांना आतां रात्रींच ते निजले असतांना कापून काढतों. मग मी एखाद्या किड्याच्या जन्माला जाऊन असह्य यातना भोगीत राहिलों तरी बेहेत्तर. ह्मणून मी आज माझ्या मनांत आलेलें करून टाकणार. त्याशिवाय मला आतां झोंप येणार नाहीं. ह्या निश्चयापासून मला परतविणें कोणाच्याही हातून होणार नाहीं. असें ह्मणून प्रतापी द्रोणपुत्र एकटाच आपला रथ जोडूं लागला. हें पाहून कृपाचार्य व कृतवर्मा हे त्याला 'असें कां करतोस? आह्मी तुझ्याबरोबर दुःख किंवा सुख जें असेल तें भोगण्यास तयार आहों. आमच्याबद्दल तूं आपल्या मनांत कांहीं शंका आणूं नकोस,' असें ह्मणाले. तेव्हां बापाच्या वधानें चिडून गेलेला अश्वत्थामा ह्मणाला, 'माझ्या तातांना, ते निःशस्त्र असतांना, धृष्टद्युम्नानें मारलें. तेव्हां मीही त्याला तसाच तो निःशस्त्र होऊन निजला असतांना कापू-

न काढतो. बकरें कापतात त्याप्रमाणें मीं ह्याला कापून काढल्यावर, ह्या युद्धांत मेलेल्यांना मिळणाऱ्या स्वर्गाला खास मुकले.हे वीर हो लौकर अंगांत चिलखत चढवा व हातांत ढाल तलवार घेऊन तयार होऊन माझ्याबरोबर चला.' असें ह्मणून अश्वत्थामा पांडवांच्या शिबिराकडे तडक चालता झाला. लगेच कृपाचार्य व कृतवर्मा हेही त्याच्या पाठोपाठ तिकडे गेले.

---

## ७१ श्रीमहादेवांचा प्रसाद.

( १०.६-८ )

याप्रमाणें कृपाचार्य व कृतवर्मा ह्यांना आपल्या पाठोपाठ जलदीनें यावयाला सांगून अश्वत्थामा निघाला तो तडख पांडवांच्या गोटावर येऊन थडकला. तेथें आल्याबरोबर दारांतच एक मोठा अक्राळ विक्राळ प्राणी उभा आहे असें त्याच्या दृष्टीस पडलें. त्यानें रक्तानें थबथबलेलें असें वाघाचें कातडें आपल्या अंगावर घेतलें होतें, व सापाचें जानवें करून घातलें होतें; त्याला पुष्कळ हात असून त्या सर्व हातांत नानाप्रकारचीं शस्त्रें होतीं; त्याच्या तोंडांतून साररख्या ज्वाळा निघत होत्या. मगरीसारख्या मोठमोठ्या दाढा असून तोंड आ पसरलेलें होतें. शिवाय विचित्र वर्णाचे असे त्याला हजारों डोळे होते. त्याचें तें शरीर व तो वेष हीं सर्व इतकीं भयंकर होतीं कीं, तीं पाहिल्याबरोबर पर्वतांची सुद्धां छाती फुटून गेलीं असती. त्याचें तोंड, नाक, डोळे व कान ह्या सर्वांतून साररख्या ज्वाळा चालल्या होत्या. पुढें ह्या ज्वाळांतूनच शंख, चक्र, गदा धारण केलेल्या अशा शेंकडों हृषीकेशमूर्ती बाहेर पडल्या. अशा ह्या भयंकर पुरुषाला पाहूनही अगदीं न डगमगतां शूर अश्वत्थाम्यानें त्याच्यावर बाणांचा वर्षाव करण्याला सुरवात केली. परंतु ह्या काळपुरुषानें वडवाग्नि जसा समुद्रांतील सर्व पाणी शोषून घेतो त्याप्रमाणें अश्वत्थाम्यानें सोडलेले सर्व बाण भराभर गिळून टाकले. आपण सोडलेलें सर्व बाण व्यर्थ गेले हें पाहून अश्वत्थाम्यानें त्याच्यावर चांगली लखलखीत अशी रथशक्ति सोडली. ती रथशक्ति जाऊन त्या पुरुषावर हापटली त्याबरोबर तिचे तुकडे तुकडे झाले. नंतर अश्वत्थाम्यानें तीक्ष्ण धारेची अशी एक तलवार आपल्या म्यानांतून उपसून काढून त्या भूतावर फेंकली. परंतु मुंगूस जसें मनुष्यांना बघण्याबरोबर बिळांत शिरतें त्याप्रमाणें ती त्याच्या शरीरांतच गुप्त झाली. हें पाहून अश्वत्थाम्याला फार राग येऊन त्यानें एक भली जंगी गदा त्या उग्र पुरुषावर सोडली. ती सुटली नाहीं तोंच त्यानें ती गिळून टाकली. तेव्हां आपल्या जवळचीं सर्व हत्यारें संपलीं; पण हा अद्यापि वठणीला येत नाहीं हें पाहून रागानें चवताळून जाऊन आतां काय करावें ह्मणून अश्वत्थामा इतडे तिकडे पाहूं लागला, तों त्याच्या दृष्टीस जिकडे तिकडे जनार्दनाच्या मूर्तीच मूर्ती पडूं लागल्या. हा सगळा चमत्कार पाहून त्याला कृपाचार्यांच्या सांगण्याची आठवण झाली व तो ह्मणूं लागला कीं, 'जो आपल्या स्नेह्यांचें अप्रिय परंतु हितकर असें भाषण ऐकत नाहीं तो मजप्रमाणेंच संकटांत पडतो. जो मूर्ख मनुष्य शास्त्रज्ञांचें सांगण्याचा अव्हेर करून अनीतीनें दुसऱ्याचा प्राण घेण्याला पहातो तो धर्माला मुकून नरकीं पडतो. गाय, ब्राह्मण, राजा, स्त्री, मित्र, आई, गुरु, अशक्त, जड, अंध, निजलेला, भ्यालेला व वेडा इत्यादिकांवर शस्त्रप्रहार करूं नये असें आजपर्यंत वडील लोक सांगत आले आहेत. असें असूनही मीं तो शास्त्रमार्ग सोडून अनीतीचा मार्ग पत्करिला; ह्मणून आतां ह्या दुस्तर संकटांत पडलों आहे. एखाद्या कार्याला आरंभ करून मग भयानें तेथून पाय मागें घेण्याची पाळी यावी हें फार वाईट! पुरुषप्रयत्न दैवापेक्षां कांहीं श्रेष्ठ नव्हे. आरंभिलेलें कार्य जर दैवगतीनें सिद्धीस गेलें नाहीं तर तें आरंभणारा मूर्ख व धर्मभ्रष्ट आहे असें सर्व लोक ह्मणतात.माझ्यावर तर हें संकट येऊन गुदरलें आहे.परंतु हा द्रोणाचार्यांचा बच्चा युद्धांतून पाठ दाखवून कधीं मागें परतणार नाहीं.मी पुष्कळ विचार करतों परंतु हें काय आहे हें मला मुळींच उमगत नाहीं. खरोखर हें माझ्या अधर्माचरणाचेंच फळ आहे. मी युद्धांत पाठ दाखवावी हें दैवानेंच माझ्या कपाळीं लिहून ठेवलें आहे कीं काय नकळे, कांहीं झालें तरी दैवानुकूलतेवांचून यश मिळणें नाहीं. ह्मणून मी आतां त्याकरितां महादेवाचा धांवा करतों ह्मणजे तो मला ह्या घोर दंडापासून सोडवील. शुलपाणी शंकर तपश्चर्येनें पराक्रमानें सर्वांपेक्षां श्रेष्ठ आहे ह्मणून

मी आतां त्यालाच शरण जातो. असें ह्मणून अश्वत्थाम्यानें रथावरून खालीं उतरून श्रीशंकराला सांष्टांग नमस्कार घालून, 'हे नीलकंठा, हे उमापते, हे सर्व जगताचें कल्याण करणाऱ्या देवाधिदेवा, मी आपणाला शरण आहे. ह्या दुष्कर संकटांतून मला सोडवा. आपल्यावांचून मला सोडविणारा कोणी नाहीं, ' ह्मणून त्यानें शंकराचा धांवा केला. तेव्हां त्याच्यापुढेंच एक सुवर्णमय वेदी उत्पन्न झाली. मग त्या वेदींतून शंकराची मूर्ति प्रकट झाली. त्या तेजोमय मूर्तीच्या प्रकाशानें सर्व दिशा फाकल्या. त्या मूर्तीबरोबर पर्वतासारखे मोठे घोडे उंट, हत्ती, मांजर, कावळे, घुवड व कांसव इत्यादि पशुपक्ष्यांच्या तोंडासारखीं वेडीं वांकडीं तोंडें असलेले, व मुसळ, गुर्दा, तोफा इत्यादि आयुधें घेतलेले व जटा वाढविलेले असे अकाळ विकाळ स्वरूपाचे मोठमोठें पिशाच होते. ह्यांना कशाचीही भीति वाटत नव्हती. हे अतिशय आनंदी दिसत होते. सर्व प्रकारचें ऐश्वर्य मिळालें असूनही ह्यांना त्याबद्दल मुळींच गर्व नव्हता. एकमेकांचा द्वेष यांना मुळीं ठाऊक नव्हता. ह्यांनीं कायावाचामनेंकरून ईश्वराची एकनिष्ठपणें सेवा केली होती. ह्मणून श्रीशंकरही यांच्यावर तसेंच प्रेम करीत. ब्रह्मद्वेषी मनुष्याचें हे रागानें रक्त पीत. इंद्रियनिग्रहपूर्वक हे नेहमीं ईशसेवेंत तत्पर असत. नाना प्रकारच्या वाद्यांनीं आपल्या कर्कश आवाजांनीं ह्यांनीं दाही दिशा दणाणून सोडल्या. अशा प्रकारच्या पिशाच्चांस पाहूनही काडीभर न डगमगतां अश्वत्थामा शंकराला संतुष्ट करण्याकरितां आत्मयज्ञ करण्याला तयार झाला. त्यानें धनुष्याच्या समिधा केल्या व बाणांचीं पवित्रें केलीं. नंतर ' आप्यायस्व समेतु ते ' इत्यादि सोममंत्र ह्मणून श्री. शंकराला आपला स्वतःचाच बळी देण्याकरितां सिद्ध होऊन त्यानें ईश्वराची प्रार्थना करण्याला सुरवात केली. ' हे देवा, अंगिर कुळांत जन्मलेला हा अश्वत्थामा आपल्या स्वतःची आहुती देत आहे; हिचा तूं स्वीकार कर. हे महादेवा, तुझ्यावर माझी निष्ठा असल्यामुळें मी ह्या संकटकालीं अंतःकरणपूर्वक एकाग्र मनानें तुला माझा स्वतःचाच बळी देत आहें. सर्व प्राणिमात्र तुझ्या ठिकाणीं आहेत व तूं त्यांच्या ठिकाणीं आहेस. सर्व गुणांचें अधिष्ठान असा काय तो तूंच आहेस. हे सर्व प्राणिमात्रांच्या आश्रयदात्या शंकरा, मला शत्रूंना जिंकणें जर अशक्य असेल तर हे विभो, तूंच माझा बळी घे. ' असें ह्मणून अश्वत्थाम्यानें पेटलेल्या अग्नींत आपली स्वतःची आहुती दिली. नंतर वर हात करून निचेष्ठ पडलेल्या अशा अश्वत्थाम्याला पाहून श्रीशंकर हंसून ह्मणाले, 'सत्यतेनें, भक्तीनें, तपश्चर्येनें इंद्रियदमनानें, धैर्यानें व आपल्या वाणीनें ज्याप्रमाणें कृष्णानें माझी आराधना केली त्याप्रमाणें आजपर्यंत कोणीच केली नाहीं. ह्मणून त्याच्यापेक्षां मला कोणीच प्रिय नाहीं. त्याच्या शब्दाला मान देऊन मी माया उत्पन्न करून पांचालांचें रक्षण केलें आहे. असें जरी आहे तरी आतां ह्यांचें आयुष्य संपलें आहे, असें ह्मणून श्रीमहादेवांनीं अश्वत्थाम्याला एक उत्तम तलवार देऊन त्याच्या शरीरांत स्वतःच प्रवेश केला. त्यामुळें अश्वत्थामा पहिल्यापेक्षां फारच तेजस्वी व उत्साही होऊन पांडवांच्या शिबिरांत शिरला. शंकराप्रमाणें सर्व भूतगणही त्याच्या बरोबरच निघाले.

## ७२ अश्वत्थाम्यानें केलेली पांडवीयांची भयंकर कत्तल !! (१०.८–९)

अश्वत्थामा गेला तसा कृपाचार्य व कृतवर्मा हे दोघेही त्याच्या पाठोपाठ जाऊन पांडवांच्या डेऱ्याजवळच उभे राहिले. त्यांना पाहून अश्वत्थामा आनंदानें ह्मणाला, ' जरी सर्व क्षत्रिय एकवटून आपल्यापुढें युद्धाला येऊन उभे राहिले तरी त्या सर्वांना आपण दोघेच बस्स आहां. आतां येथें तर मूठभरच लोक आहेत. शिवाय तेही गाढ निजले आहेत. मग काय ! मी डेऱ्यांत शिरून यांची कत्तल उडवितों. तुह्मी येथें दारांतच उभे रहा व एक चिटपांखरूंही तुमच्या तडाक्यांतून जिवंत सुटणार नाहीं अशी खबरदारी ठेवा. ' असें म्हणून तो तडख आंतच शिरला. ह्या वेळीं सर्व पांडववीर दिवसभर झालेल्या श्रमानें व जयाच्या आनंदानें गाढ निजले होते. अश्वत्थामा प्रथमतः धृष्टद्युम्नाच्या तंबूंत गेला. त्या वेळीं धृष्टद्युम्नाला गाढ झोंप लागली होती. हें पाहून अश्वत्थाम्यानें त्याला एक जोरानें लाथ मारून जागें केलें. धृष्टद्युम्न पुरा जागा होऊन अश्वत्थाम्याला ओळखून त्याच्यावर एक-

दम तुटून पडणार तोंच, तो अर्धवट झोंपेंत असतांनाच, अश्वत्थाम्यानें त्याच्या शेंडीला धरून त्याला खालीं पाडलें; व त्याच्या छातीवर एक पाय देऊन दुसऱ्या पायानें त्याची नरडी दाबली. त्यामुळें त्याचा कांहीं उपाय चालेना. तरी त्यानें अश्वत्थाम्याला आपल्या नखांनीं खूप ओरबडलें. पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. इकडे अश्वत्थाम्यानें बकऱ्याच्या नरडीप्रमाणें त्याची नरडी खूप जोरानें दाबली; त्यासरशी त्यानें मोठ्यानें किंकाळी फोडली. पण पुढें नरडी अतिशय दाबली गेल्यामुळें धृष्टद्युम्नाच्यानें मुळींच बोलवेना. तरी तशाच अस्पष्ट स्वरांतच तो ह्मणाला, ' हे गुरुपुत्रा, मला लौकर मार. वेळ लावूं नकोस. हे पुरुषश्रेष्ठा, तुझ्यामुळें मी स्वर्गाला जाईन. कांहीं हरकत नाहीं. लौकर मार. ' हें ऐकून अश्वत्थामा म्हणाला, ' अरे कुलाधमा, गुरुघातक्यांना उत्तम लोक मिळत नसतात. म्हणून हे मूढा तुझ्यावर ह्या पवित्र हत्याराचा मी वार करीत नाहीं. ' असें म्हणून अश्वत्थाम्यानें त्याच्या मर्मस्थळावर खूप जोरानें लाथा मारल्या. तेव्हां धृष्टद्युम्नाच्या ओरड्यानें आसपासच्या बायका व रक्षक लोक जागे झाले परंतु भयानें त्यांच्या तोंडून एक चकार शब्द निघेना. इकडे अश्वत्थामा याप्रमाणें लाथाबुक्यांनींच त्याला ठार करून मोठ्यानें गर्जना करीत बाहेर चालता झाला. तो गेल्यावर धृष्टद्युम्न मेला हें पाहून त्याच्या बायका व रक्षक यांमध्यें रडण्याचा एकच गोंधळ उडाला. तो गलबला ऐकून पुष्कळ शूर वीर कंबरा बांधून तयार झाले व 'काय, झालें काय,' असें ह्मणत धांवून आले. त्यांना पाहून बायकांना जास्तच हुंदका येऊन रडतच त्यांनीं अश्वत्थाम्याकडे बोट करून घडलेली सर्व हकीकत त्यांना कळविली. ती ऐकून सर्व लोक अश्वत्थाम्यावर तुटून पडले. परंतु अश्वत्थाम्यानें या सर्वांचा आपल्या रुद्रास्त्रानें एका क्षणांत फडशा पाडला. पुढें उत्तमौजा हा जवळच आपल्या अंथरुणावर स्वस्थ निजला आहे हें पाहून त्यालाही अश्वत्थाम्यानें पायानें गळा दाबूनच मारलें. इतक्यांत युधामन्यूनें अश्वत्थाम्याच्या छातीवर आपली गदा सोडली. अश्वत्थाम्यानें लगेच त्याला ओढून खालीं पाडलें व त्याचीही बकऱ्याप्रमाणें पायानें ठेंचूनचवाट लाविली. नंतर तलवारबहाद्दूर अश्वत्थामा हातांत तलवार घेऊन डेऱ्यांत शिरला. तेथें निजलेल्या सर्वांना त्यानें आपल्या तलवारीनें कापून काढून घोडे व हत्ती यांचाही समाचार घेतला. या सर्वांची कत्तल केल्यामुळें त्याचें अंग रक्तानें भरून गेलें होतें. त्यामुळें तो राक्षसांसारखा भयंकर दिसत होता. जे लोक त्या ओरड्यांनीं जागे झाले त्यांनीं याला पाहिल्याबरोबर भीतीनें डोळेच मिटले. परंतु द्रौपदीच्या मुलांनीं ह्या राक्षसानें धृष्टद्युम्नाला ठार केला हें पाहून अश्वत्थाम्यावर रागानें बाणांचा वर्षाव सुरू केला. इतक्यांत प्रभद्रक व शिखंडी हेही या गलबल्यानें जागे होऊन आपलें धनुष्य घेऊन द्रोणपुत्रावर धांवून आले. अश्वत्थाम्यानें ह्यांनीं आपल्यावर बाणांचा वर्षाव चालविला आहे हें पाहून व बापाच्या वधाची आठवण होऊन रागानें त्यांना मारण्याकरितां आपल्या रथावरून खालीं उडी घेतली; व हातांत ढाल तलवार घेऊन युद्धाचे गर्दींत घुसून प्रतिविंध्याचें जानवें उतरलें. हें पाहून सुतसोमानें अश्वत्थाम्यावर विटा सोडला व लगेच तलवार उपसून त्याच्यावर चाल केली. परंतु अश्वत्थाम्यानें खूप चलाखीनें तलवारीसकट सगळा हातच उतरून याचेंही जानवें उतरलें. त्यासरशीं नकुलाचा मुलगा शतानीक यानें अश्वत्थाम्यावर रथचक्र फेंकलें. यालाही न जुमानतां अश्वत्थाम्यानें शतानीकाला खालीं पाडून त्याचें डोकें उडविलें. इतक्यांत श्रुतकर्मा भाला घेऊन अश्वत्थाम्यावर धांवून आला. परंतु अश्वत्थाम्यानें तो आल्याबरोबर त्याच्या तोंडावरच वार केला. त्यासरशीं तो आ पसरून खालीं पडला. हें पाहून श्रुतकीर्तीनें अश्वत्थाम्यावर बाणांचा वर्षाव केला. अश्वत्थाम्यानें हे सर्व बाण आपल्या ढालीवर घेऊन धैर्यानें तशीच पुढें चाल केली व श्रुतकीर्तीचें मुंडकें वरच्यावरच उडविलें. नंतर आपल्या तीक्ष्ण तलवारीनें अश्वत्थाम्यानें बऱ्याच प्रभद्रकांना यमलोकची वाट दाखवून शिखंडीला गांठलें, व त्याचेही दोन तुकडे करून खालीं पाडलें. तेव्हां बरेच लोक घाबरून पळूं लागले. अश्वत्थाम्यानें द्रुपद राजाचे मुलगे व नातू यांना त्या गर्दीतून हुडकून काढून ठार केलें. इकडे इतकी गर्दी चालली होती

तरी अद्यापि कांहीं बहाद्दर झोंपेच्या गुंगींतच होते. कित्येकांना ह्यावेळीं स्वप्न पडत होतें. जिचे डोळे, तोंड, व आभरणें हीं सर्व तांबडीं असून नेसलेलें वस्त्रही तांबडें आहे अशी काली देवी हातांत पाश घेऊन उभी आहे व ती आपल्या पाशांत हत्ती, घोडे, व योद्धे यांना बांधून घेऊन चालली आहे व अश्वत्थमा हजारों वीरांची कत्तल करीत आहे असें त्यांना त्यांच्या स्वप्नांत दिसूं लागलें. अशा प्रकारच्या ह्या भयंकर स्वप्नांनीं घाबरून जाऊन बरळत असणारे वीर अश्वत्थाम्याच्या गर्जनेनें व त्याच्या वारानीं घायाळ झालेल्या योद्ध्यांच्या किंकाळ्यांनीं जागे होऊन पहातात तों त्यांना पडलेलें सर्व स्वप्न प्रत्यक्षच दिसूं लागलें. इकडे अश्वत्थाम्यानें तर पांडव सैन्याची कत्तल करण्याचा सपाटा चालविला होता. त्यानें कित्येकांचे पाय मोडले, कित्येकांचे हात तोडले, कित्येकांच्या बरगडींत वार केला, कित्येकांचें डोकें उडविलें व कित्येकांचें जानवें उतरलें; त्याचप्रमाणें त्यानें हत्ती, घोडे, उंट वगैरे पशूंचेही तुकडे तुकडे करून खालीं पाडले. ह्याप्रमाणें ह्या काळाप्रमाणें क्रूर अश्वत्थाम्यानें हें अमानुष कृत्य करून सर्व रणभूमी योद्ध्यांच्या व पशूंच्या छिन्नविछिन्न झालेल्या देहांनीं अगदीं झांकून काढिली. कित्येक जागे होऊन हा काय प्रकार आहे ह्मणून पाहून आपलीं शस्त्रें सांवरताहेत तोंच ह्या कालरूपीवीराची त्यांवर धाड पडे. अश्वत्थाम्यानें रथावर चढून आपल्या तीक्ष्ण बाणांनीं त्या सर्वांना यमलोकाचा रस्ता दाखविला; व नंतर पुन्हां ढालतलवार हातीं घेऊन रथाखालीं उडी घेतली. त्याच्या भयंकर गर्जनेनेंच घाबरून पुष्कळ शूर योद्धे इकडून तिकडे पळत होते; कित्येक वेदना सहन न होऊन मोठ्यानें किंकाळी फोडीत होते; कित्येक बेशुद्ध होऊन बरळत होते; कित्येकांचीं भयानें वस्त्रें गळून पडलीं, व कांहींची तर इतकी गाळण उडाली होती कीं, ते भयानें मलमूत्रोत्सर्जन करूं लागले होते. अशी इकडे पांडवसेनेची त्रेधा उडाली असतां आपणांला आज यथेच्छ रक्तमांस खावयाला सांपडलें ह्या आनंदाच्या भरांत कांहीं राक्षसांची भयंकर गर्जना चालली होती. त्यासरशीं हत्ती, घोडे वगैरे पशू भयानें आपली दावण तोडून इकडून तिकडे सैरावैरा धांवू लागले. ते धांवू लागल्यामुळें आधींच घायाळ होऊन कण्हत पडलेल्या लोकांचा त्यांच्या पायांखालीं सांपडून अगदीं चुराडा उडाला. शिवाय ह्या जनावरांच्या धांवाधांवीनें बरीच धूळ उठून सर्व दिशा गडद होऊन गेल्या. त्यामुळें बाप, मुलगे व भाऊ ह्यांना सुद्धां एकमेकांची ओळख पटेना. आणि हीं जनावरें इकडून तिकडे बेफाम होऊन पळूं लागल्यामुळें त्यांच्यात्यांच्यांतच टकरा होत व हातपाय मोडून तीं खालीं पडत. ही सर्व गडबड पाहून द्वाररक्षक व आंत निजलेले लोक आपल्या प्रियपुत्रांची व आप्तांची पर्वा न करितां जिकडे वाट फुटेल तिकडे पळत सुटले. परंतु कृपाचार्य व कृतवर्मा हे दारांत उभे होते. त्यांनीं आपल्या तडाक्यांत सांपडलेल्या प्रत्येक शिपायाला कंठस्नान घातलें. पुष्कळांनीं हातांपायां पडून दीन स्वरानें त्यांची करुणा भाकली. परंतु ह्या क्रूरांनीं एकालाही जिवंत सोडलें नाहीं. एवढेंच करून हे थांबले नाहींत. तर त्यांनीं अश्वत्थाम्याला बरें वाटावें ह्मणून पांडवांच्या शिबिराला चोहोंकडून आग लाविली. त्यामुळें तर अश्वत्थाम्याला अधिकच फावलें. तो दृष्टीस पडेल त्याच्यावर आपली तलवार चालवीतच कालाप्रमाणें इकडून तिकडे हिंडत होता. या चकमकींत पुष्कळांचीं डोकीं तुटून पडून नुस्तीं कबंधेंच नाचत होतीं. कित्येक आपल्या मुलांच्या व आप्तांच्या नांवानें हांका मारीत होते. 'कृष्णार्जुनादि पांडव जर ह्या वेळीं जवळ असते तर ह्या नीचांची असें घोर कर्म करण्याची काय प्राज्ञा होती. ते येथें नाहींत ह्मणून ह्या सर्व ह्यांच्या चेष्टा चालल्या आहेत. दयाशील, सत्यवादी व शूर अशा अर्जुनानें, निजलेला, निःशस्त्र, शरण आलेला व भयानें पळणारा यांच्यावर आपलें पवित्र शस्त्र कधींच चालविलें नसतें. राक्षसांनाही निंद्य अशा प्रकारचें घोर कृत्य हे नीच आज करीत आहेत.' अशा रीतीनें कित्येक लोक आपापसांतच बोलत होते. कृपाचार्य व कृतवर्मा ह्यांनीं पेटवून दिलेल्या आगीनें कित्येक जळून मेले व कित्येक ह्या तिघांच्या तलवारीला बळी पडले, अशा रीतीनें पांडवांपैकीं बहुतेक लोक गारद झाले.

अशी ही भयंकर कत्तल चालली असतां राक्षस

व नानाप्रकारच्या पिशाच्चगणांनीं त्या रणभूमीवर येऊन हें मांस चांगलें आहे, हें अगदीं चिवट आहे, हें रक्त गोड आहे, हें खारट आहे,' असें ह्मणत व मटमट मिटक्या मारीत तेथें पडलेलें रक्तमांस खाण्याचा एकच सपाटा चालविला होता. याप्रमाणें उजेडावयाच्या आंत सर्व कत्तल उडून एकही शिलक राहिला नाहीं असें झाल्यानंतर हे तिघेही क्रूर पुरुष एकमेकांला आनंदानें भेटले व परस्परांच्या घोर कृत्यांची आपापसांतच प्रशंसा करीत 'अद्यापि राजा दुर्योधन जिवंत असल्यास त्याला ही सर्व आनंदाची हकीकत सांगावी' असें ह्मणून रथांत बसून दुर्योधन जेथें मांडी मोडून कण्हत पडला होता तिकडे तडक चालते झाले.

---

## ७३ दुर्योधनाचा मृत्यु. (१०. ९-१०)

याप्रमाणें पांडवसेनेची भयंकर कत्तल करून अश्वत्थामा, कृपाचार्य व कृतवर्मा हे तिघेही वीर राजा दुर्योधनाकडे त्याला भेटून झालेली सर्व हकीकत सांगण्याकरितां धांवत आले. पण येऊन पहातात तों त्याच्या तोंडांतून रक्त पडत होतें; तसेंच त्याच्या सभोंवार नानाप्रकारचे हिंस्र पशू रक्तमांसाच्या आशेनें टपून बसले होते. त्याचें सर्व अंग रक्तानें भरलें होतें, व तो बहुतेक मेल्यासारखाच पडला होता. फक्त थोडीशी धुगधुगी मात्र उरली होती. राजा दुर्योधनाची अशी ही शोचनीय स्थिति पाहून ह्या तिघांही कौरववीरांना दुःखाचा उमाळा येऊन ते मोठ्यानें रडूं लागले. नंतर रडंत रडतच या तिघांनीं आपल्या हातांनीं दुर्योधनाच्या तोंडावरचें रक्त पुसलें. नंतर शोकाकुल होऊन दुःखानें सुस्कारे टाकीत कृपाचार्य ह्मणाले, 'दैवाला अवघड असें कांहींच नाहीं. अकरा अक्षौहिणी सैन्य ज्याच्या ताब्यांत होतें, जो सार्वभौम राजा असून सर्व मांडलिक राजे ज्याच्या पायां पडत होते, व ज्यानें सर्व शत्रूंला आपल्या पराक्रमानें धूळ चारली, तोच हा राजा दुर्योधन आज रक्तबंबाळ होऊन एकटाच वीरशय्येवर पडला आहे. काय ही दैवाची विचित्र गति! राज्यावर असतांना ज्याच्याकडे शेंकडों ब्राह्मण दक्षिणेकरितां मोठ्या अभिषलाबुद्धीनें पहात असत, त्याच दुर्योधनाकडे आज हे हिंस्र पशु मांसाच्या लालसेनें टकमक पहात आहेत. तशीच ही ह्याची सोन्याचा मुलामा दिलेली गदा; हिनें आजपर्यंत प्रत्येक युद्धामध्यें याची सेवा केली, व आतां हा स्वर्गाला चालला तरी सुद्धां ती त्याला सोडीत नाहीं. प्रियपत्नीप्रमाणें ती अद्यापि कशी त्याच्या शेजारी पडली आहे!'

अश्वत्थामा ह्मणाला, 'हे राजाधिराजा, तूं बलरामाचा शिष्य असून सर्व धनुर्धरांमध्यें श्रेष्ठ आहेस असें असून त्या क्षुद्र भीमाला तुला मारण्याची संधि सांपडली! तेव्हां ह्या लोकीं कालच बलवत्तर आहे! असें नसतें तर तुझ्यासारख्या दक्ष व गदायुद्धांत प्रवीण अशा रणबहाद्दराला यःकश्चित भीमाच्यानें कसें मारवलें असतें? धर्मानें युद्ध करावयाचें असें म्हणून तुला युद्धाला बोलावून पापी व मंदबुद्धि अशा त्या वृकोदरानें गदायुद्धांत अन्यायानें तुझी मांडी फोडली व डोकीवर लाथ मारली; असें असून कृष्ण व युधिष्ठिर हे दोघेही कांहीं न बोलतां स्वस्थ बसले! धिक्कार असो त्यांना. 'दुर्योधन हा माझा शिष्य आहे व त्याच्याइतका गदायुद्धांत प्रवीण असा दुसरा कोणीही नाहीं,' अशी प्रत्यक्ष बलरामानेंही तुझी स्तुति केली आहे. असो. भीमानें अधर्मानें युद्ध केलें ह्मणून सर्व लोक त्याचीच निंदा करीत आहेत. तूं तर उत्तम स्वर्गतीला चाललास. हे पुरुषश्रेष्ठा, मला तुझ्याबद्दल इतकें वाटत नाहीं. पण धृतराष्ट्र व गांधारी ह्यां वृद्ध दंपत्याबद्दल फारच वाईट वाटत आहे. आतां त्यांना अनाथ व पुत्रशोकानें विव्हळ होऊन दीन मुद्रेनें पृथ्वीच्या पाठीवर भीक मागत हिंडावें लागेल. हे गांधारे, शत्रूंशीं छातीला छाती भिडवून मोठ्या शौर्यानें धर्मयुद्ध करीत असतां धारातीर्थीं तूं आपला देह ठेवलास तेव्हा तूं धन्य आहेस. आम्ही मात्र भाग्यहीन आहों. आम्ही तुझ्याबरोबर बाकीच्या राजांप्रमाणें स्वर्गाची वाट धरिली नाहीं तेव्हां धिक्कार असो ह्या आमच्या जीविताला. तुझ्याच अन्नानें मी वाढलों आहें. व तुझ्याच आश्रयानें कृपाचार्यांनीं व माझ्या वडिलांनीं आपलें कुटुंब पोसलें आहे. आम्हीं आजपर्यंत तुझ्यापासून पुष्कळ पैसाही मिळविला. असें असूनही आम्हीं तुझ्यासारख्या दयाळू राजाबरोबर स्वर्गाची वाट धरली नाहीं तेव्हां आमच्यासारखे

पातकी जगांत दुसरे कोणीच नसतील. तुझ्या सुकृताचें स्मरण करीत, ना स्वर्ग ना इहलोकचें सुख अशा रीतीनें मोठ्या कष्टमय स्थितींत दिवस घालविण्याचें आमच्या कपाळीं आलें आहे. कारण तुझ्यासारखा आमचा पोशिंदा नाहींसा झाल्यानें ह्या लोकीं आह्मांला आतां सुख तें कसलें मिळणार ? सुख नाहीं तर मन तरी शान्त कसें राहील. सारांश दुःख करीत भटकण्याचें आमच्या नशीबीं आलें आहे. हे राजा, आतां तूं स्वर्गी गेलास ह्मणजे माझ्या तातांची भेट घेऊन त्यांना धृष्टद्युम्नाचा सूड घेतल्याची हकीकत कळीव; तसेंच जयद्रथ, भूरिश्रवा, बाल्हीक व सोमदत्ति यांनाही माझा नमस्कार सांग. ' असें ह्मणून अश्वत्थामा मध्येंच कांहीं वेळ थांबला व पुन्हां दुर्योधनाकडे पाहून ह्मणाला कीं, ' हे राजा, तूं अद्यापि जिवंत आहेस तर तुला एक आनंददायक बातमी सांगतों ती ऐक. पांडवांकडील फक्त सातच जिवंत आहेत, पांच पांडव, कृष्ण आणि सात्यकि व आमच्यापैकीं कृपाचार्य, कृतवर्मा व मी असे तिघेजण जिवंत आहों. आम्ही तिघांनीं जाऊन सर्व पांडवसेनेची कत्तल केली. द्रौपदीचे मुलगे व सर्व पांचाल यांचा निजल्या ठिकाणींच फडशा उडविला. धृष्टद्युम्नाला तर बकऱ्याप्रमाणें नरडी दाबूनच मारला! ' हें अश्वत्थाम्याचें भाषण ऐकून दुर्योधनाला एकाएकीं मोठें अवसान आलें व त्या आवेशांतच तो त्याला ह्मणाला, 'तुम्ही तिघांनीं मिळून आज जें कृत्य केलें हें भीष्म, कर्ण किंवा द्रोण ह्यांपैकीं कोणाच्याही हातून झालें नव्हतें.. धृष्टद्युम्न व शिखंडी हे दोघेही ठार झाले हें ऐकून तर मी आतां आपल्याला धन्य मानतों. ईश्वर तुमचें कल्याण करो. आतां आपली स्वर्गांत भेट. ' असें ह्मणून दुर्योधनानें स्वर्गाची वाट धरली.

याप्रमाणें दुर्योधन गतप्राण होऊन पडल्यानंतर हे तिघे कौरववीर त्याच्या त्या मृतशरीराकडे पहात पहात दुःखानें आपल्या रथावर चढले व तेथून निघून गेले. इकडे दुर्योधनाच्या मरणाबरोबरच संजयाला मिळालेली दिव्यदृष्टीही नाहींशी झाली.

# सौप्तिकपर्वांतर्गत ऐषीकपर्व.

## ७४ भीमानें अश्वत्थाम्याच्या डोकीवरील मणी आणल्याची हकीकत.

( १०. १०–१९ )

नंतर दुसऱ्या दिवशीं सकाळीं धृष्टद्युम्नाच्या सारथ्यानें राजा धर्माकडे जाऊन त्याला अश्वत्थाम्यानें रात्रीं येऊन मोठ्या क्रूरपणानें कत्तल केल्याची सर्व हकीकत सांगितली. ती वार्ता ऐकून युधिष्ठिराला फार दुःख झालें. तेव्हां सात्यकि व भीमादि पांडव त्याचें सांत्वन करूं लागले. तेव्हां त्यांना उद्देशून राजा युधिष्ठिर ह्मणाला, ' कालगति फार विचित्र आहे. मोठमोठ्या ज्ञात्यांनाही तिचा अंत लागत नाहीं. भाऊ, मित्र, मुलगे, नातू व वडील माणसें ह्या सर्वांना ठार करून आह्मीं जय मिळविला, परंतु अशा रीतीनें सर्वांची हत्या पदरीं घेऊन ज्यांच्यावर आह्मीं जय मिळविला त्यांनींच शेवटीं आह्मांला जिंकलें. जय मिळवूनही शेवटीं जर आमच्या वांट्याला दुःखच होतें तर त्याला जय असें ह्मणण्यांत तरी काय अर्थ आहे ? बाण हेच ज्याच्या दाढा, तलवारीची पात ही ज्याची जीभ, धनुष्याची कोटी हाच ज्याचा पसरलेला जबडा व धनुष्याचा टणत्कार हीच ज्याची गंभीर गर्जना अशा रागावलेल्या नृसिंहरूपी कर्णाच्या तडाक्यांतून जे वांचले ते आज थोड्याशा चुकीमुळें अश्वत्थाम्याच्या हातून मेले. रथ हेच ज्यांतील डोह, बाणांचा वर्षाव ह्या ज्यांतील लाटा, ऋष्टि व-

गैरे आयुधें हींच ज्यांतील मोठमोठ्या सुसरी आणि संग्रामरूपी चंद्राच्या उदयाबरोबर ज्याला भरती येते अशा द्रोणाच्या पराक्रमार्णवांतून शस्त्ररूपी नावा घेऊन मोठमोठे वीर धैर्यानें पार पडले. पण तेच थोड्याशा चुकीनें एकट्या अश्वत्थाम्याकडून ठार झाले. यावरून **दुर्लक्ष हेंच मनुष्याच्या नाशाचें कारण आहे**. जो मनुष्य नेहमीं गैरसावध असतो, त्याचा सर्व तऱ्हेनें नाश होऊन त्याच्यावर अनर्थ गुदरतात. मनुष्य जर नेहमीं हलगर्जीपणानें वागेल तर त्याचे हातून विद्या, तप, पैसा व सुकीर्ति हीं मिळविणें शक्य नाहीं. इंद्रानें नेहमीं सावध राहून सर्व दैत्यांना ठार मारून इंद्रपद मिळाविलें. पण इंद्रतुल्य हे क्षत्रिय थोड्याशा चुकीनें आज ठार झाले! हें एखाद्या वाण्यानें भयंकर समुद्रांतून पोहून जाऊन एका लहानशा ओहळींत गटंकळ्या खात पडावें त्याप्रमाणें झालें! जे वीर याप्रमाणें मेले आहेत ते स्वर्गालाच गेल्यामुळें त्यांच्याविषयीं मला फारसें वाईट वाटत नाहीं. परंतु भाऊ, वडील व मुलगे हे सर्व ठार झाले हें ऐकून द्रौपदी मूर्छित होऊन खालींच पडेल. आतां हिला ह्या दुःखाचा विसर कसा पडावा! ती आप्ताच्या वधानें झालेल्या दुःखानें रात्रंदिवस झुरत राहील. अशा रीतीनें शोक करीत धर्मराज नकुलाला ह्मणाला, ' जा, लवकर जाऊन त्या अभागी द्रौपदीला तिच्या सर्व माहेरच्या माणसांसह येथें घेऊन ये. ' हें ऐकून नकुल रथांत बसून तडक द्रौपदीकडे चालता झाला. इकडे धर्मराज नकुलाला द्रौपदीकडे पाठवून स्वतः रणभूमीकडे आला; व तेथें मुलगे, नातू व आप्तजन हे सर्व रक्तबंबाळ होऊन निचेष्ट असे रणशय्येवर पडले आहेत हें पाहून त्याचा शोक अनावर झाला. त्याचे स्नेही त्याचें सांत्वन करतात तों द्रौपदी तेथें आली. त्यावेळीं तिचें पद्मासारखें नेहमीं प्रफुल्लित असणारें मुख दुःखानें अगदीं सुकून गेलें होतें. राजा धर्माला पाहिल्याबरोबर दुःखाचा उमाळा येऊन ती एकदम खालीं पडली. वृकोदरानें जाऊन तिला झटदिशीं सांवरली. तेव्हां थोडीशी शुद्धीवर येऊन ती भीमाला ह्मणाली, ' आपल्या सर्व मुलांबाळांना यमलोकाला पाठवून आपण सर्व पृथ्वीचें राज्य मिळविलें फार चांगलें झालें! आतां पृथ्वीचा उपभोग घेतांना आपणांला अभिमन्यु आदिकरून युद्धांत कामास आलेल्या बाळांची आठवणही पण होणार नाहीं. त्या अश्वत्थाम्यानें सर्व वीरांना ते रात्रीं निजले असतांना आंथरुणावरच कापून काढलें, हें ऐकून माझ्या सर्वांगाची लाही होत आहे. त्या पापी अश्वत्थाम्याचे त्याच्या सर्व आप्तांसह जर आपण प्राण घेणार नाहीं तर मी येथें प्रायोपवेशन करून प्राण देईन, हें खास समजा. ' असें ह्मणून ती धर्मराजाच्या अंगावर पडली. हें पाहून राजा युधिष्ठिर तिला ह्मणाला, ' हे कल्याणि, तुझीं सर्व मुलें व भावंडें धर्मयुद्धांत कामास आलीं आहेत. ह्मणून आतां त्यांचेबद्दल तुला वाईट वाटून घेण्याचें कांहीं कारण नाहीं. अश्वत्थामा हा फार दूर अरण्यांत जाऊन राहिला आहे. तेव्हां त्याला गांठणें फार कठिण आहे. हें ऐकून द्रौपदी ह्मणाली, ' अश्वत्थाम्याच्या डोक्यांवर उपजतच एक दिव्य मणि आहे असें मीं ऐकलें आहे. त्याला ठार करून तेवढा मणि आणून तो आपल्या डोक्यावर चढला पाहिजे. असें ह्मणून ती भीमाकडे पाहून त्याला ह्मणाली कीं, 'महाराज, मला ह्या शोकापासून मुक्त करण्याला आपणच समर्थ आहां. आपला क्षात्रधर्म स्मरा व इंद्रानें ज्याप्रमाणें शंबरासुराला मारलें त्याचप्रमाणें आपणही ह्या पापात्म्याला ठार करा. वारणावतींत व हिडिंबासुराचे वेळीं आपण कसा पराक्रम गाजविला हें सर्व जगाला माहीत आहे, त्याचप्रमाणें आह्मी विराटनगरांत असतांना त्या नीच कीचकानें जेव्हां मजवर वांकडी नजर फेंकली तेव्हां त्याचा चुराडा करून मला ज्यांनीं त्याच्या कचाट्यांतून सोडविलें ते बलशाली वीर आपणच. अहो महात्मन्, आपण आजपर्यंत जशीं हीं मोठमोठीं पराक्रमाचीं कामें केलीं त्याप्रमाणेंच ह्या घातकी अश्वत्थाम्याला ठार करून सुखी व्हा. ' हें ऐकून भीमाला अश्वत्थाम्याबद्दल फार राग आला. नंतर त्या रागाच्या सपाट्यांतच तो बळकटसें धनुष्य व बरेच तीक्ष्ण असे बाण घेऊन सोन्याच्या रथांत बसला व नकुलाला सारथि करून अश्वत्थाम्याला ठार करण्याकरितां झपाट्यानें निघून गेला.

भीम, याप्रमाणें झपाट्यानें अश्वत्थाम्याला ठार करण्याकरितां चालला तेव्हां त्याच्या रथाचा घडघडाट, श्रीकृष्ण आपल्या शिबिरांत होता, तेथें त्या-

ला ऐकूं येऊन तो गडबडीनें युधिष्ठिराकडे आला व त्याला ह्मणाला, ' हे पांडवा, हा तुझा भाऊ भीम पुत्रशोकानें व्याकुळ होऊन अश्वत्थाम्याला मारण्याकरितां एकटाच निघून गेला. हा तुला सर्व भावांमध्यें अधिक प्रिय आहे. मग असें असून तूं त्याच्याबरोबर कां नाहीं गेलास? अशा संकट प्रसंगीं त्याला एकट्यालाच कां धाडलेंस ? द्रोणाचार्यांनीं अश्वत्थाम्याला जें ब्रह्मशिर नांवाचें अस्त्र दिलें आहे त्याच्या ठिकाणीं सर्व पृथ्वीला जाळून टाकण्याचें सामर्थ्य आहे. गुरु द्रोणाचार्यांनीं संतुष्ट होऊन जेव्हां अर्जुनाला हें अस्त्र दिलें तेव्हां ह्या मत्सरी अश्वत्थाम्याला तें सहन झालें नाहीं. नंतर आपणाजवळही तें अस्त्र असावें ह्या इच्छेनें त्यानें त्या अस्त्रविद्येसाठीं आपल्या पित्याची प्रार्थना केली. तेव्हां ह्या ज्ञात्यांनीं ह्या दुष्टांची पापबुद्धि लक्षांत आल्यामुळें थोडेंसें दिलगीर होऊन त्याला तें अस्त्र दिलें. व नंतर त्याला सांगितलें कीं, हे बापा, तुझ्यावर कितीही मोठें संकट गुदरलें तरी तूं ह्या अस्त्राचा उपयोग करूं नकोस; त्यांतून मनुष्यावर तर ह्याचा अगदींच उपयोग करूं नकोस.' इतकें सांगून पुन्हां गुरुद्रोणाचार्य त्याला ह्मणाले, 'तूं नीट वागशील असें मला वाटत नाहीं.' हें बापाचें बोलणें ऐकून त्याला फार वाईट वाटलें. नंतर निराश होऊन तो पृथ्वीच्या पाठीवर भटकत राहिला. पुढें तुह्मी सर्वजण जेव्हां वनवासाला गेला तेव्हां तो द्वारकेजवळच समुद्राच्या कांठीं येऊन राहिला. नंतर एके दिवशीं मीं एकटा असतांना हा मजकडे येऊन हांसत हांसतच ह्मणाला, ' हे कृष्णा, माझ्या वडिलांनीं मोठी उग्र तपश्चर्या करून अगस्ति ऋषींपासून ब्रह्मशिर नांवाचें दिव्य अस्त्र संपादन केलें तीच अस्त्रविद्या मी आपल्या वडिलापासून शिकलों. हे यदुश्रेष्ठा, ती अस्त्रविद्या मी तुला सांगतों व त्याबद्दल तूं मला आपलें चक्र दे.' हें ऐकून मीं त्याला सांगितलें कीं, देव, दानव, गंधर्व, मनुष्य, पक्षी, व सर्प, ह्या सर्वांमध्यें माझ्या इतकी शक्ति कोणाचीही नाहीं. असें जरी आहे तरी हें धनुष्य, ही शक्ति, हें चक्र व ही गदा तुझ्यापुढें ठेविली आहे. ह्यांपैकीं तुला वाटेल तें अस्त्र देतों. ह्यांतील तुला जे उचलेल व ज्याचा तुला युद्धामध्यें उपयोग करतां येईल तें तूं घे. मला कांहीं त्याच्या मोबदला तुझें अस्त्र नको. हें ऐकून अश्वत्थामा तीक्ष्ण धारेचें वज्रासारखें बळकट असलेलें लोखंडी चक्र मला पाहिजे असें ह्मणाला तेव्हां मी त्याला तें घे असें सांगितलें. नंतर लगेच उडी मारून तें चक्र डाव्या हातानें उचलून घेण्याचा त्यानें प्रयत्न केला. परंतु तें मुळींच हाललें नाहीं. हें पाहून त्यानें उजवा हात लाविला तरी पण तें हालेना. नंतर त्यानें आपल्या अंगांतली सर्व शक्ति लावून तें वर उचलण्याचा प्रयत्न केला. परंतु तें आपल्या जागेपासून तीळभरही हाललें नाहीं. हें पाहून त्याला फार वाईट वाटलें व हिरमुसलें तोंड करून तो तेथून चालता झाला. तेव्हां मी त्याला हाक मारून ह्मणालों कीं, ज्या अर्जुनानें प्रत्यक्ष शंकरालाही द्वंद्व युद्धांत जिंकून संतुष्ट केलें व ज्याच्यापेक्षां मला अधिक प्रिय असें या जगांत कांहींच नाहीं व ज्याला द्यावयाचें नाहीं अशी एकही वस्तू मजजवळ नाहीं, त्या अर्जुनानेंही माझ्याजवळ अशी गोष्ट काढली नाहीं. ज्यानें बारावर्षें हिमालयावर ब्रह्मचर्यानें राहून माझी उग्र तपश्चर्या केली व ज्यानें माझी धर्मपत्नी जी रुक्मिणी हिच्या ठिकाणीं जन्म घेतला त्या सनत्कुमारासारख्या तेजस्वी अशा माझ्या प्रद्युम्नानेंही ह्या अस्त्रांचा अभिलाष केला नाहीं. त्याचप्रमाणें बलरामांनीं, महादेवांनीं किंवा द्वारकेंतील कोणाही यादवानें आजपर्यंत ह्या माझ्या आयुधांबद्दल मजजवळ मागणी केली नाहीं. असें असून त्या दिव्य अस्त्रांची आज तूं इच्छा धरलीस. बरें हे आचार्यपुत्रा, हें चक्र घेऊन तूं युद्ध तरी कोणाबरोबर करणार ? हें ऐकून अश्वत्थामा ह्मणाला, 'हें अस्त्र घेऊन मी तुझ्याबरोबरच युद्ध करीन. माझा केव्हांही पराभव होऊं नये ह्मणून मीं तुझ्यापाशीं हें अस्त्र मागितलें. हें मीं तुला खरें आहे तें सांगितलें. आतां हें मला मिळालें नाहीं तरी हरकत नाहीं. मी आपला जातों. फक्त तुझा आशिर्वाद असूं दे ह्मणजे झालें. तुझ्या चक्रासारखें चक्र एकही ह्या पृथ्वीतलावर नाहीं.' असें ह्मणून तो दुरात्मा मला नानाप्रकारचीं रत्नें व घोडें वगैरे नजराणा देऊन निघून गेला.'

इतकें बोलून श्रीकृष्ण आपल्या रथांत बसला; व त्यानें धर्मार्जुनांनाही त्याच रथांत आपल्या जवळ बसवून घेतलें. नंतर त्या तिघांनीं मिळून ज-

लदीनें घोडे हांकून भीमाला गांठलें, व त्याला थांबविण्याचा प्रयत्न केला. परंतु तो फारच रागावलेला असल्यामुळें त्यांचा तो प्रयत्न सफळ झाला नाहीं. भीम जो निघाला तो तडख गंगेच्या कांठीं अश्वत्थामा जेथें बसला होता त्या ठिकाणीं येऊन पोहोंचला. तेथें व्यासमुनि ऋषींसहवर्तमान आनंदानें भागीरथीच्या तीरीं ईशचिंतन करीत बसले होते. अश्वत्थामाही त्यांच्या जवळच दर्भासन टाकून बसला होता. त्याला पाहून भीम चवताळून 'थांब थांब,' असें ह्मणत जोरानें त्याच्यावर धांवला. भीम आपल्यावर चाल करून येत आहे व त्याच्या पाठोपाठ श्रीकृष्णाच्या रथांत बसून त्याचे दोघे भाऊही त्याला मदत करण्याला येत आहेत हें पाहून अश्वत्थाम्याला मोठी चिंता पडली. इतक्यांत त्याला त्याच्या बापापासून मिळालेल्या दिव्य अस्त्राची आठवण झाली. लगेच त्यानें सर्व पांडवांचा फडशा पाडण्यासाठीं त्या अस्त्राचें अभिमंत्रण करून तें भीमावर सोडलें. त्यासरशीं त्यानें सोडलेल्या बाणांतून विस्तवाच्या ठिणग्या पडूं लागल्या. व आतां ह्या अस्त्रानें सर्व त्रैलोक्य जळून खाक होतें कीं काय अशी सर्व लोकांना भीति पडली. त्या अस्त्राचा तो प्रभाव पाहून श्रीकृष्ण अर्जुनाला गडबडीनें ह्मणाला, 'अर्जुना, अर्जुना, द्रोणाचार्यांनीं जें तुला अस्त्र दिलें आहे त्याचा उपयोग करण्याची ही वेळ आहे. तूं आपल्या अस्त्रानें याचें निवारण कर. व आपलें व आपल्या भावांचें रक्षण कर.' हें ऐकून अर्जुनानें आपलें धनुष्य हातीं घेऊन रथाखालीं उडी टाकली. नंतर 'प्रथमतः अश्वत्थाम्याचें व त्यानंतर आपलें व आपल्या भावांचें ह्या अस्त्रानें कल्याण होवो,' असें ह्मणून अश्वत्थाम्यानें सोडलेल्या अस्त्राचें निवारण करण्याकरितां अर्जुनानें आपलें दिव्य अस्त्र सोडलें, तेव्हां ह्या दोघांच्या अस्त्रापासून प्रलयाग्नीप्रमाणें भयंकर ज्वाळा उत्पन्न झाल्या. आकाशामध्यें मेघगर्जनेप्रमाणें भयंकर नाद उत्पन्न झाला व त्यानें दाही दिशा भरून गेल्या. पृथ्वीवर उल्कापात होऊं लागला व सर्व पृथ्वी वरील पर्वतांसह एकाएकीं डळमळूं लागली. आतां ह्या अस्त्रांच्या योगानें सर्व ब्रह्मांडाची राखरांगोळी उडते कीं काय अशी सर्वांना भीति पडली. इतक्यांत नारदमुनि तेथें आले. नंतर नारद व व्यास हे दोघेही त्या अस्त्रांपासून प्राणीमात्रांना त्रास होऊं नये ह्मणून आपण त्या अस्त्रांच्यामध्यें उभे राहून, 'आजपर्यंत पुष्कळ अतिरथी महारथी झाले, पण त्यांपैकीं एकानेंही ह्या अस्त्राचा मनुष्यावर प्रयोग केला नाहीं. असें असून तुह्मींच या अस्त्राचा प्रयोग काय म्हणून केलात,' म्हणून विचारलें. तें ऐकून व तपोबलानें युक्त अशा त्या अग्निसारख्या तेजस्वी ऋषींना पाहून नम्रपणानें हात जोडून अर्जुन त्यांना म्हणाला, 'अश्वत्थाम्यांच्या अस्त्राचें निवारण व्हावें एवढ्याचकरितां मीं आपलें अस्त्र सोडलें. आतां जर मी आपलें अस्त्र परत घेईन तर हे आपल्या अस्त्रानें सर्व जगाची राखरांगोळी करितील. आतां जेणेंकरून आमचें व सर्व जगाचें कल्याण होईल अशी तजवीज आपण करावी. आपणाला अशक्य कांहींच नाहीं.' असें म्हणून अर्जुनानें आपलें अस्त्र परत घेतलें. एकदां सोडलेलें अस्त्र पुन्हां परत घेणें फार कठिण आहे. तें देवाधिपति इंद्राच्यानें सुद्धां होणार नाहीं. ज्यानें आजन्म कडकडीत ब्रम्हचर्य पाळलें असेल त्यालाच तें परत घेतां येतें. ज्याचें ब्रम्हचर्य ढळलें आहे अशानें जर तें सोडून परत घेण्याचा प्रयत्न केला तर त्याचें व त्याच्या सर्व सुहृदांचें डोकेंच तुटून खालीं पडेल. अर्जुन नेहमीं खरें बोलणारा, शूर, कडकडीत ब्रह्मचर्य पाळलेला व सदोदीत गुरुसेवेंत तत्पर असा होता, म्हणूनच त्याच्यानें हें अस्त्र परत घेववलें. अश्वत्थाम्याचें अस्त्र सुटलें असून व स्वतःच्या अंगीं सामर्थ्य असून अर्जुनानें पुन्हां अश्वत्थाम्यावर अस्त्रप्रयोग केला नाहीं.

इकडे अश्वत्थाम्यानें ते ऋषी मध्यें उभे आहेत हें पाहिलें. परंतु त्याला तें अस्त्र परत घेतां येईना. तेव्हां तो दीन होऊन व्यासांना ह्मणाला कीं, 'हे महामुने, भीमाच्या भीतीनें, स्वतःचें रक्षण करण्याकरितां मीं हें अस्त्र सोडलें. शिवाय ह्या भीमानें दुर्योधनाला अन्यायानें मारलें त्याचा सूड घ्यावा हाही हेतू मनांत होताच. याकरितां सर्व 'पांडवांचा नाश व्हावा' असें म्हणून अग्नितेजाचें अभिमंत्रण करून मीं हें दिव्य अस्त्र सोडलें. आतां ह्या अस्त्रतेजानें सर्व पांडव जळून खाक होतील. मला तर हें परत घेतां येत नाहीं. हे ब्रह्मन्, रागाच्या सपाट्यांत

मीं हें अस्त्र सोडलें. ही मोठी चूक झाली. ' हें ऐकून व्यास म्हणाले, ' बापा, अर्जुनानें जें अस्त्र सोडलें तें कांहीं तुझ्या नाशाकरितां सोडलें नाहीं. आपल्या अस्त्रानें तुझ्या अस्त्राचें निवारण व्हावें एवढ्याचकरितां त्यानें तुझ्यावर उलट अस्त्रप्रयोग केला. परंतु ज्या ठिकाणीं ब्रह्मास्त्राचा ब्रह्मास्त्रानेंच नाश होतो त्या ठिकाणीं बारा वर्षेंपर्यंत पाऊस पडत नाहीं. हें जेव्हां त्याच्या लक्षांत आलें,तेव्हां त्यानें लगेच आपलें अस्त्र परत घेऊन सर्व राष्ट्रावरचें संकट टाळलें. तुझ्या बापापासून ब्रह्मास्त्रासारखें दिव्य अस्त्र मिळवूनही अर्जुनानें क्षात्रधर्माचें उल्लंघन केलें नाहीं. मग अशा सत्पुरुषाच्या नाशाची तूं कां इच्छा करतोस ? हे महाबाहो, हें अस्त्र परत घे आणि तुझें, पांवडांचें व सर्व राष्ट्राचें रक्षण कर. बापा, आपला राग आवरून धर. पांडवांना खुशाल राहूं देत. कारण ते कांहीं तुला अन्यायानें मारण्याची इच्छा करीत नाहींत. हा तुझ्या डोक्यावरचा मणि पांडवांना दे. ह्मणजे ते तुझा प्राण वांचवतील. ' ह्यावर अश्वत्थामा म्हणाला, ' पांडवांनीं व कौरवांनीं आजपर्यंत जेवढी संपत्ति मिळविली असेल त्या सर्वांपेक्षां माझ्या ह्या मण्याची मातब्बरी जास्त आहे. हा अंगावर असला ह्मणजे तहान, भूक, किंवा कोणत्याही प्रकारचा रोग ह्यापासून मुळींच पीडा होत नाहीं. एवढेंच नव्हे तर देव, दानव, राक्षस, सर्प, किंवा मनुष्य ह्यांपैकींही कोणाची मात्रा चालत नाहीं. असा ह्या मण्याचा प्रभाव आहे. म्हणून मीं हा मणि कधीं कोणाला दिला नसता. तथापि आपण म्हणतां म्हणून मला देणें भाग आहे. तर हा मणि घ्या व हा मी ही आपल्याच पुढें उभा रहातों, परंतु माझें अस्त्र मात्र विफळ व्हावयाचें नाहीं. मला कांहीं तें परत घेतां येत नाहीं. आतां आपण सांगतां आहां ह्मणून पांडवांचा जीव वांचविण्याकरितां मीं तें अस्त्र त्यांच्या बायकांच्या गर्भस्थानीं सोडतों. मुनिश्रेष्ठा मला आपल्या आज्ञेच्या बाहेर जातां येत नाहीं.' हें ऐकून व्यासमुनि ह्मणाले, ' बरें कांहीं हरकत नाहीं. गर्भामध्यें सोड. मात्र दुसरीकडे कोठेंही सोडूं नकोस. हें व्यासांचें बोलणें ऐकून अश्वत्थाम्यानें आपलें अस्त्र पांडवस्त्रियांच्या गर्भांत सोडलें.

अश्वत्थाम्यानें आपलें ब्रह्मशिर नांवाचें अस्त्र पांडव स्त्रियांच्या गर्भांत सोडलें हें पाहून आनंदानें श्रीकृष्ण त्याला ह्मणाला, 'विराटराजाची मुलगी, अर्जुनाची सून, जेव्हां उपप्लव्य नांवाच्या नगराला गेली होती तेव्हां एका व्रतशील ब्राह्मणानें तिला सांगितलें कीं सर्व कुरुकुल ( परिक्षीण ) नष्ट होण्याच्या बेतांत आलें ह्मणजे तुला एक मुलगा होईल. व तो परीक्षित या नांवानें प्रसिद्ध राहील. हें ह्या साधूचें बोलणें खरें होऊन परीक्षिताच्या योगानें पुन्हां वंशवृद्धि होईलना?'हें श्रीकृष्णाचें भाषण ऐकून अश्वत्थामा रागानें म्हणाला, ' हे केशवा, तुझें हें बोलणें पक्षपाताचें आहे. माझें बोलणें कधींही खोटें व्हावयाचें नाहीं. ज्याचें तूं रक्षण करण्याची इच्छा करतोस त्या विराटकन्येच्या गर्भाचाही माझ्या अस्त्रानें नाश होईल. ' ह्यावर श्रीकृष्ण ह्मणाला, 'तुझ्या अस्त्राच्या योगानें नाश होऊनही हा फिरून जिवंत होईल. पण तुला मात्र बालहत्या करणारा, नीच पातकी असें सर्व सज्जन म्हणतील व ह्या पातकाचें फळ म्हणून तुला नानाप्रकारच्या व्याधी जडतील. तुझ्या सर्वांगांतून पू व रक्त वाहूं लागेल. तशीच सर्वांगाला अतिशय दुर्गंधी सुटेल. आणि अशा रीतीनें दुःखामध्यें तूं एकटाच निर्जन प्रदेशांत तीन हजार वर्षें भटकत राहशील. तेथें तुला एकही माणूस भेटणार नाहीं. व एवढ्या अवधींत तुझें कोणाशीं भाषणही होणार नाहीं. परीक्षित वयांत आल्यावर वेदाध्ययन करील व कृपाचार्यांपासून अस्त्रविद्या संपादन करून क्षात्रधर्माप्रमाणें यथान्याय साठ वर्षेंपर्यंत सर्व पृथ्वीचें पालन करील. हें सर्व तुझ्या डोळ्यांदेखत होईल. परीक्षित तुझ्या अस्त्रतेजानें जळून खाक झाला तरी मी त्याला जिवंत करीन. माझें तपोबल किती आहे, व माझ्या बोलण्यांत खरेपणा किती आहे हें तूं पहा ! ' नंतर व्यास ह्मणाले, ' ज्याअर्थी तूं उत्तम ब्राह्मण कुळांत जन्मून क्षात्रधर्माचा स्वीकार करून आमचा अनादर करून हें नीच कृत्य केलेंस त्याअर्थी भगवान श्रीकृष्ण म्हणाला तें सर्व खरें होऊन तुला फार कष्टदशा येईल.' ह्यावर अश्वत्थामा ह्मणाला, ' कृष्णाचें बोलणें खुशाल खरें होऊं दे. मी हा येथें तुमच्या जवळच राहतों. असें ह्मणून अश्वत्थाम्यानें पांडवांना आपला मणि दिला

व आपण तडक अरण्याकडे चालता झाला.

इकडे विजयी पांडव आनंदानें तो मणि घेऊन, श्रीकृष्ण, नारद व व्यास यांच्यासह रथांत बसून द्रौपदीकडे आले. तेथें येऊन पाहतात तों द्रौपदी पुत्रशोकानें विव्हळ होऊन प्रयोपवेशनाच्या निश्चयानें बसली होती. तेव्हां सर्व तिच्या सभोंवतीं जमले. तो दिव्य मणि तिच्या हातीं देऊन भीम तिला ह्मणाला, 'हे भद्रे हा पहा, तुझ्या पुत्रघातक्यापासून मणि आणला आहे. ऊठ, शोक सोड, श्रीकृष्ण शिष्टाई करण्याकरितां निघाला असतां तूं त्याला काय बोलली होतीस त्याची आठवण कर. 'धर्मराज जर तह करतील तर मला पती नाहींत, मुलें नाहींत, भाऊ नाहींत, फार काय हे कृष्णा, तूं देखील नाहींस असें होईल,' अशा प्रकारचे कठोर शब्द तूं उच्चारले होतेस त्यांची आठवण कर. आमच्या साम्राज्याला अडथळा आणणारा दुर्योधन ठार झाला. दुःशासनाच्या नरडीचा घोट घेऊन वैराची सांगता केली. त्याचप्रमाणें तुझ्याकरितां अश्वत्थाम्यांला जिंकून हा मणि आणला. फक्त तो ब्राह्मण होता ह्मणून त्याला जीवदान दिलें.' हें ऐकून द्रौपदी ह्मणाली, गुरुपुत्र अश्वत्थामा हेही मला आचार्यांसारखेच पूज्य आहेत. आतां हा मणि महाराजांनीं आपल्या डोकींत घालावा. ह्या द्रौपदीच्या बोलण्याला मान देऊन व गुरूंचा प्रसाद समजून धर्मराजानें तो मणि आपल्या डोकीवर ठेवला. तो शिखरावर चंद्र असतांना जसा पर्वत शोभतो त्याप्रमाणें तेथें शोभूं लागला. हें पाहून द्रौपदीला आनंद होऊन पुत्रशोक ती एकदम विसरून गेली.

---

## ७५ शंकरांचें माहात्म्य–यज्ञमृग.
## (१०. १७–१८)

पुढें एकदां, ह्या भयंकर कत्तलीसंबंधानें विचार मनांत येऊन युधिष्ठिरानें श्रीकृष्णाला विचारलें कीं, 'त्या यःकश्चित् अश्वत्थाम्यानें माझ्या शूर अशा एक लाख सेनेला एका रात्रींत कसें ठार केलें? ज्याला गुरु द्रोणाचार्यसुद्धां भीत होते अशा त्या धृष्टद्युम्न वीराला ह्यानें कसें मारलें!' हें ऐकून श्रीकृष्ण ह्मणाला, 'अश्वत्थामा महादेवांला शरण गेला ह्मणून त्याच्या हातून हें एवढें थोरलें काम उरकलें. महादेव प्रसन्न होतील तर ते मनुष्याला अमरत्वही देतील; ते प्रसन्न झाले असतांना आपल्या भक्ताला, इंद्रालाही जिंकण्याचें सामर्थ्य देतील. मला त्यांच्या सर्व लीला माहीत आहेत. सर्व जगाला आदि, मध्य व अंत हेच आहेत. ह्यांच्याच प्रभावानें सर्व जग सुरळीतपणें चाललें आहे. अगदीं आरंभीं जेव्हां पितामहाला सृष्टि उत्पन्न करावी असें वाटलें तेव्हां त्यानें ती निर्माण करण्याबद्दल शंकरांना आज्ञा दिली. त्यावर शंकरांनीं बरें आहे ह्मणून सांगितलें. परंतु पुढें त्यांना सृष्टीमध्यें बरेच दोष आढळून आल्यावरून तपश्चर्येनें ते दोष घालवावेत असा विचार करून त्यांनीं खोल पाण्यांत बुडून उग्र तपश्चर्या करण्याला सुरवात केली. याप्रमाणें महादेव तपश्चर्येला गेल्यावर इकडे पितामहानें त्यांची पुष्कळ वेळपर्यंत वाट पाहिली. नंतर हे कांहीं आतां लौकर येत नाहींत असें पाहून त्यानें आपल्या मनःप्रभावानें दुसरा एक सृष्टिकर्ता निर्माण केला. पुढें हा नवा सृष्टिकर्ता, रुद्र अद्यापि पाण्यांत बुडून बसला आहे असें पाहून,' पितामहाला ह्मणाला कीं, 'जर माझ्याहून दुसरा कोणी वडील नसेल तर मी प्रजा निर्माण करीन. हें ऐकून पितामह ह्मणाले कीं, तुझ्याहून कोणीही वडील नाहीं. स्थाणु आहे तो अद्यापि पाण्यांत बुडून बसला आहे. तूं खुशाल प्रजा निर्माण कर.' तेव्हां बरें ह्मणून या ब्रह्मदेवानें दक्षप्रजापति आदिकरून सात मानसपुत्र निर्माण केले व त्यांच्याच साह्यानें पुढें चतुर्विधसृष्टि निर्माण केली. परंतु ह्या सर्व प्रजा ब्रह्मदेवानें निर्माण केल्या नाहींत तोंच भुकेनें व्याकुळ होऊन त्या ब्रह्मदेवालाच खाण्याला धांवल्या. तेव्हां भयानें घाबरून जाऊन ब्रह्मदेव पितामहाकडे पळत सुटला. याच्यामागें ह्या प्रजा लागल्याच होत्या. नंतर ब्रह्मदेव ह्मणाला, 'हे भगवन्' माझें रक्षण करा व ह्यांच्या पोटाची कांहीं तरी व्यवस्था लावा.' हें ऐकून पितापहानें त्यांच्याकरितां वनस्पति वगैरे निर्माण केल्या; आणि त्यांच्यांत जे बलिष्ठ होते त्यांना अशक्त प्राण्यांवर निर्वाह करण्याला सांगितलें. याप्रमाणें सर्वांच्या पोटाची व्यवस्था लागल्यावर सर्वजण आपापल्या ठिकाणीं परत गेले, व प्रजा-

वृद्धि करीत राहिले. याप्रमाणें आपोआप प्रजा वाढत राहिल्यानें पितामहाला फार आनंद झाला. पुढें कांहीं कालानें महादेव पाण्यांतून उठून पाहूं लागले तों सर्व प्रकारच्या प्रजा निर्माण झाल्या आहेत व त्या आपल्याच पराक्रमानें वाढत आहेत असें त्यांच्या दृष्टीस पडलें. तें पाहून त्यांना फार राग आला. ह्मणून त्यांनीं आपलें लिंग जमिनींत खुपसलें. तेव्हां ब्रह्मदेवानें त्यांचें सांतवन करून, 'आपण इतका वेळ पाण्यांत बसून काय केलें व आपलें लिंग जमिनींत काय ह्मणून खुपसतां; म्हणून विचारलें. तें ऐकून महादेव ह्मणाले, 'दुसऱ्यानें येऊन ह्या सर्व प्रजा निर्माण केल्या, तेव्हां माझ्या ह्या लिंगाचा आतां काय उपयोग ? मी आपल्या तपोबलानें ह्या सर्व प्रजांकरितां अन्न निर्माण केलें आहे. आतां ह्या वनस्पतीही, बाकीच्या प्राण्यांप्रमाणें, आपल्याच तेजानें वाढत रहातील.' असें म्हणून महादेव मुंजवत पर्वताच्या पायथ्याशीं तपश्चर्या करण्याकरितां निघून गेले.

पुढें देवयुग संपल्यावर एकदां देवांनीं यथाप्रकारें यज्ञ करावयाचें मनांत आणलें. नंतर त्यांनीं यज्ञाला लागणारें हविर्द्रव्यादि सर्व सामान जमविलें व कोणच्या देवानें यज्ञांतील कोणता भाग घ्यावा हेंही ठरविलें. परंतु त्यांनीं न जाणतां अज्ञानानें त्या यज्ञांत महादेवाचा भाग ठेविला नाहीं. यज्ञामध्यें देवांनीं आपल्याला भाग ठेविला नाहीं हें पाहून त्यांना फार राग आला. लोकयज्ञ, क्रियायज्ञ, गृहयज्ञ व पंचभूतात्मकनृयज्ञ अशा ह्या चार प्रकारच्या यज्ञांनींच सर्व जग निर्माण झालें आहे, ह्मणून महादेवांनीं त्यांना मारण्याकरितां लोकयज्ञ व नृयज्ञ ह्या दोहोंच्या साह्यानें पांच हात लांबीचें असें एक धनुष्य निर्माण केलें. वषट्काराला त्याची दोरी केली व बाकीच्या यज्ञांगांना त्याच धनुष्याचीं भूषणें बनविलीं. नंतर महादेव, सर्व देव मिळून ज्या ठिकाणीं यज्ञ करीत होते त्या ठिकाणीं हें धनुष्य घेऊन आले. महादेवांनीं धनुष्याला दोरी लावून तें ओढल्याबरोबर पृथ्वी डळमळूं लागली, वारा वाहीनासा झाला, अग्नि पेटेना, सर्व नक्षत्रें भयानें आपला मार्ग सोडून वांकडीं तिकडीं हिंडूं लागलीं व सूर्यचंद्र निस्तेज झाले, त्यामुळें जिकडे तिकडे अंधारच अंधार होऊन गेला. सर्व देव भयानें घाबरून गेले व त्यांना पुढें काय करावें हें सुचेना. यज्ञदेवताही निस्तेज झाली. नंतर महादेवांनीं त्या यज्ञाचे छातींत एक तीक्ष्ण बाण मारला. तेव्हां त्या यज्ञदेवतेनें हरिणाचें रूप घेऊन आकाशामार्गानें पळ काढला. लगेच महादेवांनींही त्याचा पाठलाग केला. याप्रमाणें यज्ञदेवता पळून गेल्यावर इकडे सर्व देव बेशुद्ध पडले. पण इतक्यांत महादेवांनीं आपल्या बाणानें सवित्याचे बाहू तोडले, भगाचे डोळे फोडले व पूषाचे दांत पाडले. हें पाहून सर्व देव व यज्ञांगें हींहि पळूं लागलीं. अशा रीतीनें सर्वांची दाणादाण करून शेवटीं महादेवानें आपलें धनुष्य फिरवून पळणाऱ्या देवांनाही अडवून धरलें. तेव्हां सर्व देवांनीं मिळून वाणीची स्तुति केली. नंतर तिनें जाऊन त्याच्या धनुष्याची दोरी तोडली. त्यामुळें धनुष्याची कांब एकदम सरळ झाली. मग सर्व देव यज्ञदेवतेला घेऊन महादेवाला शरण आले. तेव्हां त्यानें प्रसन्न होऊन **आपला राग पाण्यांत फेंकून दिला, तेव्हांपासून तो राग अग्नीच्या रूपानें अद्यापपर्यंत पाण्याचा फडशा उडवीत पाण्यांतच राहिला आहे.** त्याचप्रमाणें महादेव प्रसन्न झाल्याबरोबर सवित्याला बाहू फुटले, भगाला डोळे आले व पूषाचे दांत उगवले. याप्रमाणें जिकडे तिकडे स्थिरस्थावर झाल्यावर देवांनीं सर्वांच्या बरोबर महादेवांचाही एक भाग ठेवला व यथाशास्त्र सर्व यज्ञसमारंभ पार पाडला.

अशा रीतीनें एकटा महादेव रागावल्याबरोबर जिकडे तिकडे एकच घोंटाळा उडून गेला, व पुन्हां तोच शान्त झाल्याबरोबर सर्व क्रिया पहिल्याप्रमाणें सुरळीत चालल्या. असा हा वीर्यशाली महादेव प्रसन्न झाला होता ह्मणून एकट्या अश्वत्थाम्याला एका रात्रींत तुझ्या सर्व शूर सेनेची कत्तल करतां आली. म्हणून हें सर्व कृत्य महादेवाचेंच आहे असें समजून तूं आपला शोक आवर व त्यालाच शरण जा.

# ११ स्त्रीपर्व.

## ७६ धृतराष्ट्राचा पुत्रशोक व त्याचें समाधान. ( १. ११–८ )

फांद्या तोडून काढलेल्या झाडाप्रमाणें शंभर मुलें मेल्यामुळें शोकाकुल धृतराष्ट्र ध्यानामध्यें मग्न होऊन चिंतातुर झाला असतां संजय त्याजवळ जाऊन म्हणाला, ' महाराज शोकापासून कांहीं फायदा नाहीं. अठरा अक्षौहिणी लोक मरून ही पृथ्वी अगदीं जनशून्य झाली आहे. नाना देशचे राजे नाना दिशेहून येऊन आपल्या मुलांबरोबरच मेले आहेत तेव्हां आतां वडील, मुलें, नातू, ज्ञातीचे लोक व सुहृद, या सर्वांची प्रेतक्रिया करवा. ' हें कर्णकटु भाषण ऐकून मुलानातवांच्या मरणांनीं कष्टी झालेला धृतराष्ट्र वाऱ्याचा धक्का बसलेल्या झाडाप्रमाणें धाडकन् खालीं पडला. पुन्हां सावध होऊन तो ह्मणाला, ' मुलगे, मंत्री, जिव्हाळ्याचे लोक या सर्वांना मुकून खरोखर मला दुःखामध्यें दिवस काढावे लागणार. पिसें गळून पडून खंगलेल्या पक्ष्याप्रमाणें बांधवांना मुकून मला आतां जगून तरी काय करावयाचें आहे ? माझें राज्य गेलें; बांधव मेले; मी डोळ्यांनाही मुकलों आहें; आतां निस्तेज अशा सूर्याप्रमाणें माझें कांहीं तेज पडणार नाहीं. जिव्हाळ्याच्या लोकांनीं, परशुरामांनीं, नारदांनीं, व्यासांनीं तसेंच सभेमध्यें श्रीकृष्णानें, ' आतां वैर पुरें कर, मुलाला आवर, ' म्हणून माझ्या हिताचें मला सांगितलें, तें मीं ऐकिलें नाहीं. तसें न केल्यामुळें आतां मला फार ताप होत आहे. दुर्योधन, दुःशासन, कर्ण यांचा नाश, त्याचप्रमाणें द्रोणरूपी सूर्याचें मावळणें, ऐकून माझें हृदय फाटून जात आहे. ज्याचें हें फळ आज मला मिळालें असें कांहीं पाप आजपर्यंत मीं केल्याचें मला आठवत नाहीं. खात्रीनें पूर्वजन्मीं माझ्या हातून कांहीं तरी वाईट कृत्य घडलें असलें पाहिजे, म्हणून ब्रह्मदेवानें मला असें दुःख भोगण्याला जिवंत ठेवलें. दैवगतीनें हें ह्मातारपण व त्या बरोबरच हा सर्व आप्तबांधवांचा नाश माझ्यावर ओढवला आहे. ह्या जगामध्यें माझ्यापेक्षां अधिक दुःखी दुसरा कोण असणार ? ह्मणून आजच मी आतां ब्रह्मलोकाचा दूरचा प्रवास घेणार.' धृतराष्ट्र याप्रमाणें शोकाकुल होऊन बरळत असतां संजय त्याला ह्मणाला, 'महाराज, शोक टाका. वृद्धांच्या तोंडून वेदशास्त्रांतील प्रमाणें आपण ऐकलीं आहां. आपला मुलगा तारुण्याच्या ताव्यामध्यें असतां सुहृदांचें सांगणें आपण ऐकलें नाहीं. खोट्या फळावर नजर ठेवून आपण आपलें खरें हित साधून घेतलें नाहीं. तीक्ष्ण धारेच्या तलवारीप्रमाणें स्वबुद्धीनेंच काम करून स्वतःच्या पायावर धोंडा मारून घेतला. सामान्यतः गैरचालीच्या लोकांच्या ह्मणण्याला आपण मान दिला. दुःशासन, दुरात्मा कर्ण, दुष्ट शकुनि, दुर्बुद्धि चित्रसेन व ज्यानें सर्व जगाला शल्य लावून दिलें आहे तो शल्य हे ज्याचे सल्लागार होते त्या दुर्योधनानें कुरुवृद्ध भीष्मांचें, गांधारीचें, विदुरांचें, द्रोणांचें, कृपांचे, श्रीकृष्णांचें, नारदांचें तसेंच व्यासांचें बोलणें ऐकलें नाहीं. युद्धाला हपापून धर्माला त्यानें मान दिला नाहीं. अल्पबुद्धि, अहंकारी, क्रूर, असहनशील, असंतुष्ट असा तो नेहमीं एक युद्धच घेऊन बसला. आपल्या मुलानें धर्माला झुगारून देऊन सर्व क्षत्रियांच्या नाशाला कारण होऊन शूरांचें यश वाढविलें आहे. आपण बुद्धिवान असून शहाणे आहां. आपण मध्यस्थ होता, पण आपल्या मुलांना कांहीं योग्य सल्ला दिला नाहीं. समर्थ असून आपण कुटुंबभार सारखा तोलून धरला नाहीं. मनुष्यानें आधींच योग्यवर्तन ठेविलें पाहिजे; पुढें वेळ निघून गेल्यावर पश्चात्तापाला कारण उरत नाहीं. मुलाच्या लाडिकपणामुळें आपण त्याचे कोड पुरविण्याला निघालां व आतां पश्चात्ताप पावून बसलां. मध तेवढा दिसून कडा ज्याला दिसत नाहीं त्याला मधाच्या मागें लागून खालीं पडल्यावर मग रडण्याची

पाळी येते. रडल्यानें गेली गोष्ट परत येत नाहीं, रडल्यानें कांहीं फळ मिळत नाहीं, रडत बसल्यानें कोणी वैभवाला चढत नाहीं, किंवा रडत बसल्यानें मोक्षप्राप्ति होत नाहीं. आपणच निखारा तयार करून धोतरामध्यें गुंडाळून घेऊन मग आंग माजूं लागलें ह्मणून शहाणा कांहीं मनस्ताप करीत बसत नाहीं. आपणच आपल्या मुलाकडून दुर्भाषणरूपी वारा घालून लोभरूपी तूप ओतल्यानें ह्या पार्थरूपी अग्नीनें पेट घेतला व त्या पेटलेल्या अग्नीमध्यें आपले मुलगे शलभाप्रमाणें जाऊन पडले. ह्या वैराग्नीनें जाळून टाकलेल्या ह्या मुलांसंबंधानें शोक करण्याचें कारण नाहीं. डोळ्यांतील अश्रूंनीं आपण आपलें तोंड अगदीं मलीन करून घेतलें आहे. हें शास्त्र विरुद्ध असून शहाण्यांना संमतही पण नाहीं. हे अश्रू ठिणग्यांप्रमाणें मेलेल्यांना जाळतात तेव्हां हा शोक टाकून धैर्यानें मन आवरून धरा. '

नंतर अमृततुल्य शब्दांनीं धृतराष्ट्राला आनंदवीत विदुर ह्मणाले,'राजा, ऊठ. मनाला धीर दे. सर्व प्राणिमात्रांची अखेरची वाट हीच आहे. सर्व संचयाचा नाशामध्यें,वैभवाचा ऱ्हासामध्यें एकत्र मिळण्याचा वियोगामध्यें शेवट असून ह्या जीविताचा शेवट मरण्यामध्यें आहे. ज्या अर्थी शूराला त्याचप्रमाणें भित्ऱ्याला यम खेचल्यावांचून सोडीत नाहीं तेव्हां क्षत्रियवीर युद्ध केल्यावांचून कां बरें स्वस्थ बसतील ? न लढतांही मनुष्य मरतो व लढूनही जगतो. आरंभाला कांहीं नसून मध्येंच भूतमात्रांचें अस्तित्व दिसूं लागतें; व अखेरीस मेल्यावर तें पूर्वीप्रमाणें फिरून नाहींसें होतें; मग येथें शोकाला जागा कोठें राहिली ? शोक केल्यानें आपल्याला मरून मरणाराच्या मागून जातां येत नाहीं. हें जर ठरलें आहे तर रडण्यांत काय अर्थ आहे ? ज्याप्रमाणें वारा गवतांच्या शेंड्यांना वांकवितो त्याप्रमाणें सर्व भूतमात्र काळाच्या तावडींत जातात. एकाच वाटेला लागून एकेच ठिकाणीं चाललेल्यांपैकीं अमक्याला काळानें आधीं नेलें म्हणून त्या संबंधानें रडत बसण्यांत काय अर्थ आहे ? शिवाय या रणामध्यें मेलेल्यांसंबंधानें तर शोक करण्याचें मुळींच कारण नाहीं. शास्त्रें जर तुला प्रमाण असतील तर त्यांनीं उत्तम गति मिळविली आहे. त्या सर्वांनीं वेदाध्ययन केलें असून व्रत पाळलें आहे, व ते सर्व रणाला तोंड देऊन मेले आहेत. अगोचरापासून येऊन फिरून ते अगोचराला जाऊन मिळाले आहेत. ते तुझे कोणी नाहींत किंवा तूं त्यांचा कोणी नाहींस, मग हा व्यर्थ शोक कशाला ? मेल्यानें स्वर्ग मिळतो व मारल्यानें नांव होतें. हीं दोन्ही फायदेशीरच असल्यानें रणामध्यें व्यर्थ कांहींच नाहीं. इंद्राचे हे पाहुणे होत असून तो यांच्यासाठीं यांच्या इच्छेप्रमाणें लोक तयार करून ठेवीत असतो. शूरांना रणामध्यें मरून जसा स्वर्ग मिळतो तसा पुष्कळ दक्षिणा देऊन केलेल्या यज्ञांनीं किंवा तपांनीं मिळत नाहीं. शत्रूंनीं आपल्या शत्रूंच्या शरीराग्नीमध्यें वेगवान बाणांच्या आहुत्या दिल्या व या तेजस्व्यांनींही धैर्यानें तें सहन केलें. हाच स्वर्गाचा उत्तम मार्ग आहे. हजारों बायकामुलें व आईबाप यांचा या संसारामध्यें अनुभव आला आहे. ते कोणाचे? आपण कोणाचे ? शोकाला हजारों कारणें व भीतीला शेकडों कारणें रोजच्या रोज मूर्खाला होतात. तीं शहाण्याला होत नाहींत. काळाला कोणी आवडता किंवा कोणी नावडता नसून तो कोणासंबंधानें त्रयस्थ रहात नाहीं. काळ सर्व भूतमात्रांना शिजवून काढतो. काळ सर्वांचा संहार करतो. सर्व प्राणिमात्र गाढ झोंपेंत असतां काळ जागा असतो. **काळाला टाळतां येणें शक्य नाहीं.** तारुण्य, रूप, जीवित द्रव्यसंचय, आरोग्य व आवडत्याचा सबंध यांवर शहाण्यानें फार लोभ ठेवूं नये. जनपदाच्या दुःखासंबंधानें एकट्यानें रडत बसण्यांत अर्थ नाहीं. त्या रडणारावर स्वतः नाहींसें होऊन जाण्याची पाळी येईल पण त्याचें दुःख कांहीं कमी व्हावयाचें नाहीं. दुःखासंबंधानें विचारच न करणें हेंच त्यावर उत्तम औषध आहे. त्यावरच विचार करीत बसल्यानें अप्रिय गोष्ट घडून आल्यानें व प्रिय न घडल्यानें तें दूर न होतां उलट वाढते मात्र. कोत्या बुद्धीचे लोक मानसिक दुःखानें व्यग्र होत असतात. त्यापासून धर्म, अर्थ किंवा सुख कशाचाच लाभ नाहीं. यापासून मनुष्य मुख्याच्या गोष्टीला खात्रीनें मुकून धर्मार्थकामांनाही मुकतो. असंतोषी लोक पैशासंबंधानें निरनिराळी स्थिति आल्यानें गांगरून जातात पण शहाणे कधीं

त्यानें डगत नाहींत. शहाणपणानें मानसिक दुःख दूर करावें व औषधानें शारीरिक दूर करावें. ज्ञानाच्या अंगीं हें सामर्थ्य असल्यानें ज्ञान्यानें मुलाच्या ओंळीला जाऊन बसूं नये. मनुष्यानें पूर्वजन्मीं केलेलें कर्म तो निजला असो, उठला असो किंवा धांवत असो त्याच्याबरोबर असतें. ज्या ज्या स्थितींत ज्या ज्या शरीरानें जें जें बरें वाईट कृत्य मनुष्याचे हातून होत असतें त्या त्या स्थितींत त्या त्या शरीरानें त्याचें त्याचें फळ त्याला अनुभवावें लागतें. चांगल्या कृत्याचें फळ सुख असून वाईटाचें दुःख आहे. ज्ञानाच्या आड येऊन मुळाशीं घाव घालणाऱ्या अशा पुष्कळ अपायकारक गोष्टींमध्यें तुझ्यासारखे मन घालील नाहींत. मानसिक सुखदुःखांना उत्पन्न करणाऱ्या विषयांपासून ह्या मनाला आवरून घेऊन शहाण्यानें शांति मिळवावी. ह्या सर्व मनामध्यें घोळणाऱ्या गोष्टी अशाश्वत असून केळीप्रमाणें ह्या जगांत सार ह्मणून कांहीं एक सांपडावयाचें नाहीं. शहाणे लोक मनुष्यांच्या शरीरांना घरें समजतात. काळानें हीं मोडून जातात. एक सत्त्व मात्र शाश्वत आहे. ज्याप्रमाणें मातीचें भांडें चाकावर चढविलें असतां, घडलें जात असतां, घडल्यावर, मोडतांना, चाकावर ठेवतांना, खालीं उतरतांना, ओलेपणीं, वाळल्यावर, भाजतांना अन्न शिजवून खालीं उतरतांना, उतरल्यावर किंवा उपयोगांत असतां मोडतें, तीच स्थिति मनुष्यांच्या देहाची आहे. मनुष्य गर्भामध्यें, जन्मल्याबरोबर, एका दिवसानें, अर्ध्या महिन्यानें, महिन्यानें, एका वर्षानें, दोन वर्षांनीं, तारुण्यामध्यें, मधल्या वयांत किंवा ह्मातारपणीं केव्हांनाकेव्हां तरी मरतो. सर्व प्राणिमात्र प्राक्तनकर्मानुरूप जन्माला येतात व मरतात; हा जर व्यवहार ठरला आहे तर उगीच संताप कां करून घ्यावा? ज्याप्रमाणें कोणी मजेखातर पाण्यांत शिरला असून मधून मधून बुडतो मधून मधून वर येतो त्याप्रमाणें या संसारसागरामध्यें बुडण्याच्या व वर येण्याच्या संबंधानें मनुष्य आपापल्या कर्माधीन असतो. जे मंदबुद्धि असतात त्यांनाच यापासून दुःख होतें. परंतु जे शहाणे लोक ह्या जगामध्यें भूतमात्रांच्या संबंधाचें खरें इंगित ओळखून खऱ्या हिताचा विचार मनांत ठेवून धैर्यानें असतात ते उत्तम गति मिळवितात.

आतां या संसाररूपी अरण्याची तुला थोडी ओळख करून देतों ऐक. गर्भामध्यें जन्म घेतल्यापासून सर्व प्राणिमात्रांच्या क्रियेला सुरवात झाल्याचें दिसतें. अगदीं आरंभाला हा गर्भामध्यें काळाच्या रूपानें जन्म घेऊन पुढें लगेच वाढीला लागतो व पांचवा महिना सरल्याबरोबर चैतन्याचें बिऱ्हाड तेथें येऊन बसतें. पुढें हा गर्भ सर्व अवयवांनीं युक्त असा बनतो. पुढें रक्तमांसानें बरबटलेला असा हा या घाणींत रहात असतां वायूच्या जोरानें वर पाय खालीं डोकें असा होऊन योनीच्या तोंडाशीं येऊन तो पुष्कळ हाल सोशीत राहतो. योनीच्या संकोचनामुळें पूर्वकर्माचें गांठोडें बरोबर घेऊन कष्टानें तिच्यांतून बाहेर पडल्यावर या संसारामध्यें पडून तो दुसरे क्लेश भोगूं लागतो. कुत्रे ज्याप्रमाणें मांसाच्या तुकड्याच्या मागें लागले असतात, त्याप्रमाणें ग्रह याचे मागें लागतात. आपल्या कर्मांनीं जखडून पुढें चाललेल्या या मनुष्याकडे व्याधी धांव घेत असतात, व विषयांची गोडी ज्यांना लागली आहे अशा इंद्रियपाशांमध्यें गुरफटून गेल्यामुळें नानाप्रकारचीं संकटें त्यावर ओढवतात. फिरून फिरून त्यांनीं घट्ट बांधला जात असतां त्याची समाधानी ह्मणून होत नाहीं, व त्यामुळें बरीं वाईट, वाटेल तशीं कामें हातून होऊं लागून तीं त्याला कळत नाहींत. मात्र जे विचारी आहेत ते यांपासून आपला संभाळ करून घेतात. ह्या इंद्रियपाशांनीं जखडलेल्याचे मात्र डोळे न उघडतां यमलोकाकडे लागतात; व यमदूतांकडून खेचला जाऊन वेळ आल्यावर तो मरून जातो. अरेरे! हें जग अगदीं फसलें जाऊन लोभाच्या तावडींत गेलें आहे! लोभ, राग, भय यांनीं वेडा बनून, आपली ओळख मनुष्याला पटेनाशी झाली आहे. तो आपल्या थोर कुळाच्या किंवा पैशाच्या ताठ्यांत गर्क राहून कोणाला हलक्या कुळांतला, कोणाला भिकारी, कोणाला मूर्ख याप्रमाणें नांवें ठेवून दोष देत असतो; परंतु स्वतःला हा नीट ओळखत नाहीं किंवा आपल्यावर याला पूर्ण ताबा ठेवतां येत नाहीं. ज्या अर्थी शहाणे, मूर्ख, श्रीमान, गरीब, कुलीन, अकुलीन, मानी, अमानी सर्व सारखेच मरून पृथ्वीच्या पाठीवर पडतात त्या अर्थी मूर्ख लोक एकमेकांना कां बरें फसवूं पाहतात?

प्रत्यक्षाप्रत्यक्षरीतीनें ही श्रुति लक्षांत ठेवून ह्या अशाश्वत जगामध्यें जन्मापासून जो धर्म डोळ्यांपुढें ठेवून वागतो, सत्याच्या मागून असतो तो सर्व मार्गांपासून सुटून उत्तम मोक्ष मिळवितो.

या संसारारण्यासंबंधानें मी तुला एक गोष्ट सांगतों. कोणी एक द्विज घोर अरण्यामध्यें रहात असतां मांसभक्षक श्वापदांनीं भरलेल्या अशा एका दुर्गम वनाला आला. सिंह, वाघ, हत्ती, अस्वल यांनीं गजबजून जाऊन ज्याला उग्र स्वरूप आलें होतें असें तें यमाला सुद्धां भिवडविण्यासारखें घोर वन आपल्या भोंवतीं पाहून तो फार घाबरला. भयानें गांगरून जाऊन त्यांच्या तावडींतून सुटण्याची संधि पहात तो पळूं लागला असतां त्याला त्यांच्यापासून दूर जातां येईना किंवा त्यांच्या तावडींतूनही सुटतां येईना. त्या घोर वनाच्या चोहोंबाजूंला जाळें पसरलें असून एक विक्राळ स्त्री तेथें हात पसरून उभी असलेली त्याला दिसली. त्यामध्यें पांच पांच फडांचे मोठमोठे नाग असून पर्वतासारखीं आकाशाला जाऊन भिडलेलीं मोठमोठीं झाडें चोहोंबाजूंला होतीं. त्यामध्यें एक खोल विहीर असून मोठमोठ्या वेलींनीं व गवतांनीं ती आजूबाजूला व तोंडाला भरून राहिली होती. त्या खोल डबक्यामध्यें तो ब्राह्मण पडला असतां मध्यें लोंवणाऱ्या वेलीमध्येंच आडकला. फणस ज्याप्रमाणें देंठाला अडकून लोंबत असतो, त्याप्रमाणें तो त्या ठिकाणीं वर पाय खालीं डोकें असा लोंबत राहिला. त्या ठिकाणींही त्याला दुसरा एक उपद्रव झाला. एक मोठा बलाढ्य नाग त्या खोल विहिरीमध्यें त्यानें पाहिला. त्याच्या तोंडाशीं एक धिप्पाड हत्तीही त्याला दिसला. त्याला सहा तोंडें बारा पाय असून तो काळा पांढरा होता. वेलींनीं व झाडांनीं भरलेल्या त्या विहिरीकडे तो हळू हळू येत होता. त्या विहिरीवरच्या झाडांच्या फांद्यांना पूर्वींच तेथें पोळें करून ठेवलेल्या मधमाशा मधाच्या आशेनें फिरून फिरून घिरट्या घालीत चिकटत होत्या. हे निरनिराळ्या प्रकारचे मध फार लज्जतदार असतात, तरी पोरांनाच त्यांची हाव सुटते. ते वेळीं त्या मधांच्या बहुविध धारा वाहूं लागून, हा लोंबत राहिलेला मनुष्य नेहमीं त्या चाखीत राहिला. त्या प्रसंगामध्यें मध चाखतां चाखतां त्याची तहान कांहीं भागेना. तृप्ति न होतां फिरून फिरून तो त्याची आशा करीत राहिला असतां त्याला जिवाचा कंटाळा येईना. त्या मनुष्याची आशा तेथेंच गुंतली. पांढरे काळे उंदीर त्या झाडाची मुळी कुरतडून काढीत होते. त्या घोर अरण्याच्या सरहद्दीवरील मोठमोठ्या सापांची, त्या स्त्रीची, त्या विहिरीच्या तळाला असणाऱ्या नागाची, तोंडाला असणाऱ्या हत्तीची, उंदरांच्या कुरतुडण्यानें झाड उमळून पडण्याची व मधासाठीं घिरट्या घालणाऱ्या मधमाशांची अशा सहा प्रकारची मोठी भीति त्या ठिकाणीं होती. याप्रमाणें संसार गर्तेमध्यें तो त्या ठिकाणीं पडला होता तरी जीविताचा त्याला वीट आला नाहीं.' धृतराष्ट्र ह्मणाला, 'त्याला तेथें मोठेंच दुःख सोसावें लागत असून त्याचें त्या ठिकाणीं राहणें मोठ्या संकटाचें समजलें पाहिजे. त्यावर लोभ जडून तेथें त्याला सुख; कसें वाटलें, तो मनुष्य ज्या ह्या पेंचांत पडला आहे तो देश कोठें आहे, या महाभयापासून त्याची सुटका कशी होणार हें सर्व कृपा करून मला सांगा; ह्मणजे त्याप्रमाणें मी योग्य तें करीन. त्याच्या कल्याणाविषयीं मला मोठी काळजी वाटत आहे.' त्यावर विदुर ह्मणाले, 'मोक्षज्ञांनीं हें केवळ उदाहरण घेतलें आहे; हें पूर्णपणें उमगल्यानें मनुष्य परलोकीं सुखी होतो. जें दाट अरण्य ह्मणून सांगितलें तोच हा महासंसार. मनुष्याचें मर्यादित आयुष्य हें यांतील दुर्गम वन. अनेक मोठमोठे व्याधी हेच मोठमोठे साप. त्यामध्यें वर्णिली ती स्थूल स्त्री, रूप व वर्ण यांचा फडशा पाडणारी जरा होय. मनुष्याचा देह हीच त्यामधील विहीर होय. त्याच्या तळाशीं असणारा तो मोठा सर्प सर्व नाहींसें करून प्राणिमात्रांचा शेवट लावणारा काळ. त्या विहिरीमध्यें उगवलेल्या ज्या वेलीला हा मनुष्य अडकून आहे ह्मणून सांगितलें ती जीविताशा त्या कुव्याच्या तोंडाशीं त्या झाडाला घिरट्या घालीत असणारा सहा तोंडांचा हत्ती ह्मणजे वर्ष व त्याचीं सहा तोंडें सहा ऋतु व बारा पाय हे बारा महिने. त्या झाडाला कुरतुडणारे उंदीर व साप ह्मणून जे सांगितले ते मनुष्याचें आयुष्य कमी करणारे दिवस व रात्री. विषयवासना ह्याच त्या ठिकाणच्या म-

धमाशा. निरनिराळे विषयोपभोग हेच त्या ठिकाणीं गळत असलेल्या मधाच्या धारा व यांमध्यें मनुष्य बुडत असतो. याप्रमाणें हा संसारचक्राचा फेरा आहे. हें ओळखून शहाणे ह्या संसारचक्राचे पाश तोडून टाकीत असतात. आतां ज्या मार्गानें जाऊन शहाणे मोक्षप्राप्ति करून घेतात, तो संसारमार्ग मी विस्तारानें सांगतों ऐक. ज्याप्रमाणें लांबचा प्रवास करीत असतां मनुष्य मध्यें मध्यें थकून विसावा घेतो, त्याप्रमाणें ह्या संसाराच्या फेऱ्यामध्यें मूर्ख लोकच मधून मधून गर्भवासामध्यें मुक्काम करीत असतात. शहाणे लोक हा मुक्काम करीत नाहींत. ह्मणून या भवचक्राचा हा दूरचा मार्ग समजला असून या बिकट संसाराला वन समजलें आहे. सर्व चराचर या फेऱ्यामध्यें सांपडतात ह्मणून त्यावर मोठा लोभ ठेवूं नये. प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष असे जे मनुष्यांचे शारीरिक व मानसिक व्याधि त्यांना, शहाणे मोठमोठे साप समजतात. या आत्मकर्मरूपी मोठमोठ्या सापांपासून त्रास होऊन अडथळा होत असतां सुद्धां मंदबुद्धि लोकांना त्याची भीति वाटत नाहीं. आतां जरी कदाचित् मनुष्य या व्याधींच्या तडाक्यामधून सुटला तरी पुढें त्याला रूप नाहींसें करून टाकणारी जरा येतेच. नाना प्रकारच्या शब्दस्पर्शरूपरसगंधात्मक विषयांनीं मज्जामांसरूपी मोठ्या चिखलांत तो रुतून राहतो व त्याला तेथें कशाचा आधार मिळत नाहीं. वर्षें, महिने, पंधरवडे, दिवस, रात्र, संध्यासमय हे क्रमानें याचें रूप व आयुष्य कमी करीत असतात. ही सर्व काळाच्या सामुग्री असून मूर्खांना हें कळत नाहीं. हें शरीर रथ असून, जीव यावरचा सारथी आहे; तसेंच इंद्रियें घोडे असून मन लगामाच्या दोऱ्या आहेत. ह्या धांवणाऱ्या घोड्यांच्या वेगाबरोबर जो धांवतो तो चक्राप्रमाणें ह्या संसारचक्रामध्यें फिरत राहतो. जो मनोनिग्रहानें बुद्धीच्या जोरावर यांना आवरतो तो या फेऱ्यांत पडत नाहीं. जे ह्या फिरत असणाऱ्या संसारचक्राबरोबर फिरतांना मोह पावत नाहींत त्यांना हा फेरा चुकतो. परंतु संसाराच्या फेऱ्यामध्यें सांपडलेल्यांच्या हातून असें क्वचितच घडत असतें. ह्मणून यांतून निसटण्यासाठीं शहाण्यान हरप्रयत्न करावा. हयगय अगदीं करूं नये. ती केल्यानें शेंकडों फांयांनीं हा संसारवृक्ष वाढ घेतो. इंद्रियें ताब्यांत ठेवून, राग व लोभ यांना बाजूला सारून, जो नेहमीं संतोषवृत्तीनें व सचोटीनें वागतो त्याला शांति मिळते. ज्यानें लोक इतकें गांगरून जातात त्या भवचक्राला यमाचा रथ म्हटलें आहे, आणि तुझी स्थिति झाली आहे अशीच मूर्खाची होते. ज्याची हाव सरत नाहीं, त्याला राज्यनाश, सुहृदांचा नाश, मुलांचा नाश, अशा प्रकारचीं दुःखें सोसावीं लागतात. शहाण्यानें सर्व दुःखांवर उत्तम गुणकारी औषध जें ब्रह्मज्ञान तें घ्यावें, व मन आवरून धरून दुःखरूपी मोठी व्याधि दूर करावी. जसें मनो निग्रहानें आपलें आपल्याला दुःख कमी करतां येतें तसें तें पराक्रम, पैसा, मित्र किंवा सुहृद यांच्या हातून होत नाहीं. म्हणून शील राखून सर्वांशीं मैत्री ठेवावी. आत्मनिग्रह, त्याग व दक्षता हे तीन ब्रह्मलोकाला पोहोंचविणारे घोडे आहेत. शीलरूपी लगाम हातामध्यें धरून हे घोडे जुंपलेल्या मनरूपी रथामध्यें जो बसतो तो मृत्यूच्या भीतीपासून सुटून ब्रह्मलोकाला जातो. जो सर्व प्राणिमात्राला अभय देतो तो विष्णूच्या श्रेष्ठ पदाला जाऊन मिळतो. हें अभयपद हजार यज्ञ केल्यानें किंवा रोज उपवास केल्यानें मिळणें शक्य नाहीं. सर्वांना आत्मा फार प्रिय असून मरण कोणाला आवडत नाहीं. म्हणून शहाण्यानें सर्वांवर दया करावी. नाना मोहामध्यें सांपडून नाना बुद्धि धरणारे अदूरदर्शी लोक या भवसागरामध्यें फिरत राहतात. जे सूक्ष्मदर्शी आहेत तेच शाश्वतपदाला जातात.'

पुत्रशोकानें काहिल उडालेला धृतराष्ट्र हें विदुरवाक्य ऐकून सुद्धां मूर्छा येऊन खालीं पडला. तेव्हां जवळच्या लोकांनीं गार पाणी शिंपडून अंगावरून हात फिरवून व वारा घालून त्याला सावध केल्यावर ह्या प्रसंगामुळें प्राण देण्याचा त्याचा निश्चय पाहून व्यास ह्मणाले, 'धृतराष्ट्रा, मी सांगतों तें नीट ऐक. सर्व वेद तुझ्या कानावरून गेले असून तूं बुद्धिमान आहेस तुला धर्मार्थ चांगला कळतो. तुला कांहीं कळत नाहीं असें नसून तुला कांहीं सांगितलें पाहिजे असेंही नाहीं. ह्या मृत्युलोकची वस्ती अशाश्वत असून शाश्वत ह्मणून निराळें ठिकाण असतां व या जीविताचा शेवट मरणामध्येंच व्हाव-

याचा असतां उगीच शोक कां करतोस. कालानें तुझ्या मुलाला कारण करून या वैराला प्रत्यक्ष कारण तुला केलें आहे. ह्या कुरूंची अशी कत्तल उडावयाची हा नियमानियमच ठरला असल्यानें जे शूर ते उत्तम गतीला जाऊन मिळाले आहेत त्यासंबंधानें उगीच शोक कां बरें करतोस ? त्या महात्म्या विदुराला सर्व कळत असून सख्य जुळविण्यासंबंधानें त्यानें आपली शिकस्त केली. दैवानें आखून दिलेला मार्ग ओलांडण्याला मनुष्य किती झटपटला तरी समर्थ होत नाहीं. देवतांनीं पूर्वीं जें ठरवून ठेविलें होतें तें मी तुला सांगतों ऐक; ह्मणजे तुझें मन जाग्यावर येईल. पूर्वीं मी इंद्रसभेला गेलों होतों. त्या ठिकाणीं सर्व देव व ऋषि जमले होते. त्या ठिकाणीं कांहीं उद्देश मनांत धरून पृथ्वीही आलेली मला दिसली. देवांजवळ येऊन ‘ तुह्मीं ब्रह्मसभेमध्यें जें माझें काम करण्याचें वचन दिलें होतें तें करा, ’ म्हणून ती त्यांना ह्मणाली असतां भगवान विष्णु हांसत हांसतच ह्मणाले कीं, धृतराष्ट्राचा वडील मुलगा जो दुर्योधन तो तुझें काम उरकील. त्याच्यासाठीं सर्व राजे कुरुक्षेत्रामध्यें एकत्र जमून एकमेकांना मारून कृतकृत्य होतील. ते वेळीं हा तुझा भार कमी होईल. तो हा तुझा मुलगा सर्व लोकांच्या संहारासाठीं कलीच्या अंशानें गांधारीच्या पोटीं जन्माला आला. दैवयोगानें त्याला तशाच प्रकारचे भाऊ, मामा शकुनि व मित्र कर्ण मिळाले. **जसा राजा निपजतो तशीच त्याची प्रजा निपजते.** राजा धार्मिक असला तर अधर्मी सुद्धां धर्मनिष्ठ होतो. स्वामीच्या गुणदोषानुरूप नोकर निपजतात. तुझ्या मुलांचा त्यांच्याच अपराधामुळें नाश झाला आहे, तेव्हां आतां शोकाला कारण मुळींच उरलें नाहीं. युधिष्ठिराच्या राजसूययज्ञाच्या वेळीं सभेमध्यें नारदांनीं पांडवकौरव एकमेकांशीं युद्ध करून परस्परांचा फडशा पाडणार, तेव्हां तुला योग्य वाटेल तसें वाग म्हणून तुझ्या हिताचें तुला पूर्वींच सांगितलें. तें ऐकून पांडवांना वाईट वाटलें व धर्मराजानें भांडण होऊं नये म्हणून बरीच खटपट केली. परंतु दैव बलवत्तर असून ईश्वरी नियमानियम कोणालाही टाळतां येणें शक्य नाहीं. तूं धर्मशील व मोठा बुद्धिमान आहेस. सर्व प्राणिमात्रांच्या बऱ्या वाईट गती तुला कळतात. याप्रमाणें शोकाकुल होऊन तूं वेडा झाला आहेस हें जर युधिष्ठिराला कळेल तर तो प्राण देखील ठेवणार नाहीं. जो नेहमीं पशुपक्ष्यांवर देखील दया करणारा त्याला तुझ्याबद्दल कींव कशी येणार नाहीं ? दैव अनिवार्य असल्यामुळें माझ्या आज्ञेनें पांडवांवर दया करून जीव धरून रहा. असा तूं वागशील तर तुझी मोठी कीर्ति होईल. हा पेट घेतलेला पुत्रशोकरूपी अग्नि विचाररूपी पाण्यानें विझीव. ’ असें ह्मणून व्यास तेथेंच गुप्त झाले.

---

## ७७ भीमाची व धृतराष्ट्राची भेट.
### ( ११. ९–१३ )

पुढें संजयानें मेलेल्यांचे यथाक्रमानें प्रेतसंस्कार करण्यासाठीं कुरुक्षेत्राला चलण्याविषयीं धृतराष्ट्राला सांगितलें असतां तो फिरून मेल्यासारखा धाडकन् खालीं पडला. तेव्हां विदुरांनीं पुन्हां त्याचें समाधान करून पुढील कामाला लागण्याविषयीं त्याला विनंति केली. तेव्हां रथ जोडण्याला हुकूम देऊन धृतराष्ट्रानें गांधारीला कुंतिप्रभृति स्त्रियांस घेऊन येण्यास निरोप पाठविला. तो निरोप गेल्याबरोबर सर्व स्त्रियांना घेऊन गांधारी आली. तेथें आल्याबरोबर त्या स्त्रियांना मोठ्यानें गळा काढून रडतांना पाहून स्वतः फार कष्टी झाले होते तरी विदुरांनीं त्यांची समाधानी केली व डोळे पाण्यांनीं भरलेल्या अशा त्यांना रथामध्यें बसवून त्यांसह ते नगराबाहेर पडले. ते वेळीं सर्व कौरवांच्या वाड्यांमधून एकच कल्होळ उडाला. लहान मुलांपासून थोरांपर्यंत सर्वांनीं एकच आकांत करून सोडला. ज्या बायका पूर्वीं देवांच्या सुद्धां दृष्टी पडल्या नव्हत्या त्या आज त्यांचे नवरे मेल्यामुळें अगदीं सामान्य लोकांच्या सुद्धां नजरेपुढें आल्या. केस विस्कटून अंगावरचे दागिने काढून टाकून अनाथाप्रमाणें एका वस्त्रानिशीं त्या धाडकन् खालीं पडत होत्या. नरांची शिकार झाल्यामुळें पर्वतांच्या गुहांमधून बाहेर पडणाऱ्या ठिपकदार हरिणींप्रमाणें पांढऱ्या शुभ्र अशा हवेल्यांमधून शोकाच्या झटक्यांत बाहेर पडून त्या सैरावैरा धांवत होत्या. एकमेकींचे हात धरून युद्धांत मेलेले त्यांचें मुलगे, भाऊ

बाप यांची आठवण करून त्या रडत होत्या. ज्यांना पूर्वी आपल्या सखींच्या पुढें देखील लाज वाटे त्या आतां आपल्या सासऱ्यांच्यापुढें निर्लज्जपणें एका वस्त्रानिशीं येऊन रडत होत्या. एवढेंसें दुःख झालें तरी पूर्वी ज्या एकमेकींचें समाधान करीत त्या आतां शोकानें विव्हळ होऊन एकमेकींच्या तोंडांकडे पहात उभ्या होत्या. अशा ह्या हजारों रडणाऱ्या स्त्रियांना बरोबर घेऊन राजा रणभूमीकडे चालला. त्या स्त्रियांच्या रडण्यानें सर्व भुवनें व्याकुळ होऊन गेलीं होतीं. सर्व नाशाची वेळ येऊन ठेपली आहे असें सर्वांना वाटूं लागलें. कौरवांच्या क्षयामुळें कष्टी झालेल्या पौरजनासह ते चालले असतां नगराच्या बाहेर एक कोस आले नाहींत तों कृप, अश्वत्थामा व कृतवर्मा हे त्यांना भेटले. राजाला पाहिल्याबरोबर गळा दाटून येऊन सुस्कारे टाकून रडत रडत ते त्याला ह्मणाले, ‘ महाराज, आपला मुलगा रणामध्यें मोठें अचाट कृत्य करून आपल्या बरोबरीच्या लोकांसह इंद्रपुरीला गेला आहे. त्याच्या सैन्यापैकीं बाकी काय ते आम्ही तिघेच राहिलों आहों बाकी सर्वांचा पार फडशा पडला आहे. ’ असें त्याला सांगितल्यावर कृप गांधारीला ह्मणाले, ‘ शत्रूला तोंड देऊन लढत असतां शूरांना साजेलसें अचाट कर्म करून बऱ्याच शत्रूंचा फडशा पाडून त्यांनीं प्राण सोडले आहेत. खात्रीनें शस्त्रांनीं मिळणारे दिव्य लोक मिळवून ते त्या ठिकाणीं देवाप्रमाणें सुखांत राहिले आहेत. त्या शूरांपैकीं कोणी लढतांना मागें फिरले असतां घाव लागून मेले नाहींत. त्यांपैकीं कोणीही हात जोडले नाहींत. याप्रमाणें क्षत्रियांना मिळावयाच्या उत्तम गतीला ते गेले असल्यानें त्या संबंधानें शोक करण्याचें कारण नाहीं. त्यांचे शत्रू तरी मोठ्या वैभवांत आहेत असें नाहीं. भीमानें दुर्योधनाला अधर्मानें मारल्याचें ऐकून पांडव निजलेल्या शिबिरामध्यें रात्रीच्या वेळीं शिरून धृष्टद्युम्नप्रभृति सर्व पांचाल व द्रौपदीचे मुलगे यांची आह्मीं कत्तल उडवून दिली. त्याप्रमाणें त्यांची कत्तल करून आह्मी तिघेच उरल्यामुळें रणामध्यें त्या खवळलेल्या पांडवांपुढें टिकाव लागणार नाहीं, असें जाणून इकडे पळ काढला. ते महाधनुर्धरी शूर पांडव आपल्या मुलांना मारल्याचें ऐकून श्रमिष्ट होऊन त्वेषानें सूड घेण्यासाठीं आतां येतील. तेव्हां आह्मी आतां येतों. उगीच शोकामध्यें मन घालूं नका. ह्या सर्व देवाचा खेळ आहे हें जाणून व क्षात्रधर्म मनांत आणून धीरानें असा. ’ असें सांगून त्यांनीं गंगेकडे आपले घोडे हांकले, व पुढें एकमेकांचा निरोप घेऊन कृप हास्तिनापुराला गेले. कृतवर्मा आपल्या राज्यांत गेला व अश्वत्थामा आपल्या आश्रमाला गेला. याप्रमाणें पांडवांचा अपराध करून भयभीत होऊन एकमेकांकडे पहात ते निघून गेल्यावर पांडवांनीं अश्वत्थाम्याला गांठून त्याचा मोड केला. याप्रमाणें सर्व कौरवसैन्याची वाट लावल्यावर धृतराष्ट्र नगराबाहेर पडल्याची बातमी धर्मराजाला लागली; तेव्हां तो आपल्या सर्व भावांनिशीं श्रीकृष्ण, युयुधान व युयुत्सु यांना बरोबर घेऊन त्याकडे आला. पुत्रशोकानें विव्हळ झालेली द्रौपदीही ज्या द्रुपद स्त्रिया तेथें जमल्या होत्या त्यांसह बरोबर होती. गंगेच्या कांठीं कुररीप्रमाणें शोकाकुल होऊन रडणाऱ्या कौरवस्त्रिया त्याच्या दृष्टीस पडल्या. त्या सर्व, ‘ तुझी ती धर्मज्ञता, तुझा तो दयाळूपणा कोठें गेला, ह्मणून आज वडील, भाऊ, वडिलांचें मुलगे, मित्र, तसेंच द्रोण, भीष्म व जयद्रथ या सर्वांना मारविण्याला तुझें मन घेतलें ? वडील भाऊ, भाऊ, सर्वांना पुरून उरणारा अभिमन्यु व द्रौपदीचे मुलगे या सर्वांना मुकून तुला राज्य घेऊन काय करावयाचें आहे, ’ याप्रमाणें बरें वाईट वाटेल तें बडबडत हात वर करून रडत त्याच्या भोंवताලून चालल्या होत्या. धृतराष्ट्राजवळ येतांच प्रथम युधिष्ठिरानें त्याला अभिवादन केल्यावर बाकीच्या पांडवांनींही त्याला अभिवादन करून आपापलीं नांवें कळविलीं. पुत्रशोकानें विव्हळ झालेल्या धृतराष्ट्रानें आपल्या मुलांच्या मरणाला कारण झालेल्या युधिष्ठिराला कसेंबसें आलिंगन दिल्यावर दुष्ट विचारानें त्यानें भीमाला आलिंगन देण्याची इच्छा दाखविली. त्या शोकरूपी वाऱ्यानें चांगला पेट घेतलेल्या आपल्या कोपरूपी वणव्यानें भीमरूपी वनाचा जाळून फडशा पाडण्याचा त्याचा विचार होता. भीमासंबंधानें हा त्याचा वाईट विचार ओळखून श्रीकृष्णानें हातांनीं भीमाला एकीकडे

ओढून भीमाचा लोखंडी पुतळा धृतराष्ट्राच्या पुढें केला. तो भीम आहेसें वाटून त्याला कडकडून भेटून धृतराष्ट्रानें त्या लोखंडी पुतळ्याचा मोडून चुराडा उडवून दिला. दहा हजार हत्तींचें बळ असणाऱ्या त्या राजानें भीमाच्या त्या लोखंडी पुतळ्याचा याप्रमाणें चुराडा उडविल्यानें त्याची छाती चिरडून जाऊन तोंडावाटें तो रक्त ओकूं लागला व शेंड्याला फुलून निघालेल्या प्राजक्ताच्या झाडाप्रमाणें रक्तानें माखून निघून तो जमिनीवर खालीं पडला. संजयानें त्याला सांवरून धरून त्याचें समाधान केलें. तेव्हां राग जाऊन धृतराष्ट्र 'अरे भीमा', ह्मणून शोकाकुल होऊन रडूं लागला. त्याचा राग जाऊन भीमाच्या मरणानें तो व्याकुळ झाला आहे असें पाहून श्रीकृष्ण त्याला ह्मणाला, 'धृतराष्ट्रा, शोक करूं नकोस. तुझ्या हातून भीमाचा वध झाला नाहीं. त्याच्या लोखंडी पुतळ्याला तूं चिरडलें आहेस. तुला रागाच्या तावडींत गेलेला पाहून मृत्यूच्या दाढेंत सांपडलेल्या भीमाला मी बाजूला केला. कारण बलामध्यें तुझ्या तोडीचा कोणी नसल्यानें काळाच्या तावडींत गेल्याप्रमाणें तुझ्या बाहूंमधून जिवंत सुटण्याचें कोणाला सामर्थ्य नाहीं. ह्मणून तुझ्या मुलानें जो हा लोखंडाचा पुतळा तयार करून ठेवला होता तो मीं तुझ्यापुढें केला. पुत्रशोकानें खवळून गेल्यामुळें तुझ्या मनाला न्यायान्याय कळेनासें झालें आहे ह्मणून तूं भीमाला मारूं इच्छितोस. परंतु हें कांहीं तुला योग्य नाहीं. यानें मारलें नसतें तरी तुझे मुलगे जिवंत राहणें कांहीं शक्य नव्हतें. ह्मणून सख्य करण्याविषयीं आह्मीं जी कांहीं खटपट केली ती सर्व लक्षांत घेऊन शोक करूं नकोस.'

इतक्यांत दासींनीं त्याला धुवून काढल्यावर श्रीकृष्ण फिरून ह्मणाला, 'राजा, तूं विविध वेदशास्त्रें पढला आहेस. पुराणें व सर्व राजधर्म ऐकले आहेस. तूं विद्वान आहेस. मोठा शहाणा आहेस. बलाबलासंबंधानें समर्थ आहेस, असें असतां आपला अपराध न कळतां तूं असा राग कां करतोस? मी, भीष्म वगैरे मंडळींनीं पूर्वीं तुझी कानउघाडणी केली असून व बल व शौर्य यांमध्यें पांडव अधिक आहेत हें कळत असून आह्मी नको नको म्हणत असतां तूं आमचें ऐकिलें नाहींस. कारण ज्या राजाची बुद्धि स्थिर असून त्याचे दोष त्याला कळतात त्याचप्रमाणें ज्याला वेळ, प्रसंग समजतो तोच उत्तम कल्याण पावतो. हिताहितासंबंधानें चांगलें सांगत असतां सुद्धां जो तें ऐकत नाहीं त्याला याप्रमाणें अन्यायाला प्रवृत्त होऊन संकटांत पडून रडण्याची पाळी येते. तेव्हां याप्रमाणें आपले भलतें आचरण लक्षांत घे. आपल्यावर आपला ताबा न रहातां तूं दुर्योधनाच्या ताब्यांत गेलास त्या तुझ्या अपराधामुळें तूं या विपत्तींत पडलास. मग उगीच भीमाला कां मारूं इच्छितोस? ह्मणून आतां राग आवर. आपलें दुष्कृत्य आठव. ज्या नीचानें मत्सरबुद्धीनें द्रौपदीला सभेंत आणली त्याला भीमानें सूड घेण्यासाठीं मारलें. तुझ्या व तुझ्या त्या दुष्ट मुलांच्या हातून घडलेला अत्याचार लक्षांत घे. पांडवांचा बिलकूल अपराध नसतां तूं त्यांना सोडून दिलेंस.'

याप्रमाणें श्रीकृष्ण सर्व खरें बोलला असता धृतराष्ट्र त्याला ह्मणाला, 'तूं ह्मणतोस तें अगदीं खरें आहे. परंतु पुत्रस्नेह फार बलवान असल्यानें त्यानें मला धैर्यापासून चळविलें. तूं सांभाळल्यामुळें बलशाली भीम माझ्या हातांमध्यें सांपडला नाहीं हें चांगलें झालें. आतां राग, संताप, सर्व जाऊन मी स्वस्थ झालों आहें. त्याला भेटण्याची मला इच्छा आहे. सर्व मुलगे मरून गेल्यामुळें त्या पांडवांवर माझें कल्याण व प्रेम अवलंबून आहे.' नंतर रडतच सर्व पांडवांच्या अंगावरून हात फिरवून त्यांना धीर देऊन त्यानें आशीर्वाद दिले.

---

## ७८ गांधारीची व पांडवांची भेट.

(११. १४-१५)

नंतर धृतराष्ट्राची आज्ञा घेऊन कृष्णासह सर्व मंडळी गांधारीकडे गेली. याप्रमाणें शत्रूंची वाट लावून युधिष्ठिर आल्याचें कळून पुत्रशोकानें व्याकुळ झाल्यामुळें तिच्या मनांत त्याला शाप देण्याचें आलें. तिच्या मनांतला तो पापविचार अंतर्ज्ञानानें पूर्वींच ओळखून व्यास त्याचवेळीं तिच्याकडे येऊन ह्मणाले, 'मुली, ही वेळ शाप देण्याची नसून शांति धरण्याची आहे. पांडवांवर राग

करूं नकोस. माझें ऐकून मनांतला विचार आवर. ' मी शत्रूंशीं युद्ध करीत आहें. तेव्हां आई, मला चांगला आशीर्वाद दे. ' असें जय मिळावा म्हणून अठरा दिवस तुझा मुलगा तुझ्याकडे येऊन मागत असतां तूं ' जेथें धर्म तेथें जय ' असें त्याला उत्तर देत होतीस. तुझ्या तोंडून कधीं खोटें निघाल्याचें मला स्मरत नाहीं. आणि दुर्योधन तुला विनवीत असतां हे शब्द तुझ्या तोंडून निघत! आतां त्या तुंबळ युद्धांतून पार पडून पांडवांनीं जय मिळविला तेव्हां त्यांच्या बाजूलाच धर्म आहे यांत संशय नाहीं. आजपर्यंत तूं क्षमाशील असून आजच सहनशीलता कां सोडतेस? ह्या अधर्माला जिंक. तुझ्या ह्मणण्याप्रमाणें धर्म तिकडे जय असणार. तुझा धर्म व तूं बोललेलें लक्षांत घेऊन राग आवर. ' गांधारी ह्मणाली, ' भगवन्, यांचा मीं हेवा करीत नाहीं व यांचा नाश व्हावा असेंही माझ्या मनांत नाहीं. परंतु पुत्रशोकानें माझें मन फार गांगरलें आहे. कुंतीप्रमाणेंच मीं व महाराजांनीं या पांडवांना सांभाळलें पाहिजे. त्या दुर्योधनाच्या व शकुनीच्या अपराधामुळें त्या कर्णदुःशासनांच्या हातून हा कौरवांचा फडशा पडला आहे. यांत पांडवांचा बिलकूल दोष नाहीं. ताठ्यानें युद्धाला उभे राहून ते मेले याचें मला मुळींच वाईट वाटत नाहीं. परंतु श्रीकृष्णाच्या डोळ्यांपुढें भीमानें दुर्योधनाला गदायुद्धाला बोलावून तो निरनिराळे फेरे घेत फिरत असतां तो गदायुद्धांत आपल्याहून जास्त आहेसें पाहून त्यावर बेंबीच्या खालीं प्रहार केला याचाच मला मोठा राग आला आहे. महात्म्या शास्त्रकारांनीं सांगितलेला धर्म आपल्या जिवासाठीं शूर पाळीत नाहींत हें पाहूनच मला मोठें आश्चर्य वाटतें.' हें तिचें भाषण ऐकून भीमसेन भीत भीत तिची समजूत करीत ह्मणाला, ' धर्म असो किंवा अधर्म असो घाबरून गेल्यामुळें आपलें संरक्षण करून घेण्यासाठीं मीं जें कांहीं केलें त्याची तूं क्षमा केली पाहिजेस. तुझा मुलगा धर्मयुद्धानें कोणाच्या हातून हार जाणार नाहीं हें पाहून माझ्या हातून अन्यायाचें आचरण झालें. त्यानें तरी पूर्वीं धर्मराजांना अधर्मानेंच जिंकलें होतें. आमची नेहमीं त्यानें खोडी केली असल्यानें मला आडमार्ग धरावा लागला. सैन्यापैकीं हा एकटाच बाकी राहिला असल्यानें गदायुद्धांत मला मारून फिरून यानें राज्य बळकावूं नये ह्मणून मला तसें करावें लागलें. राजपुत्री पांचाली एका वस्त्रानिशीं रजस्वला असतां तिला तुझा मुलगा काय बोलला हें तुला ठाऊकच आहे. दुर्योधनाला जिंकल्यावांचून पृथ्वीचा उपभोग आह्मांला मिळणें शक्य नव्हतें ह्मणून मीं तसें केलें. त्याचप्रमाणें तुझ्या मुलानें भरसभेमध्यें द्रौपदीला डावी मांडी उघडी करून दाखवून आह्मांला दुखविलें तेच वेळीं आह्मीं त्याला मारलें पाहिजे होतें; परंतु धर्मराजांच्या आज्ञेला मान देऊन आह्मीं तेव्हां निमुटपणें करार पाळण्याला तयार झालों. या तुझ्या मुलानें वैराग्नि फारच पेटविला. आह्मांला वनामध्यें नेहमीं फार गांजलें; ह्मणून आज दुर्योधनाला मारून त्या वैरांतून आम्ही मोकळे झालों आहों; व धर्मराजांना राज्य मिळाल्यानें आमचा राग शमला आहे. ' गांधारी ह्मणाली, ' तूं ह्मणतोस त्याप्रमाणें त्यानें सर्व केलें होतें तरी तूं सुद्धां ज्याची, कौशल्यासंबंधानें इतकी वाहवा करतोस, त्याला अशा प्रकारानें मारणें योग्य नव्हतें! शिवाय वृषसेनानें नकुलाचे घोडे मारून टाकले असतां रणामध्यें दुःशासनाचें रक्त पिऊन तूं जे भल्यांनीं निंद्य मानलेलें नीचाला साजेलसें राक्षसी कृत्य केलेंस तें फार वाईट केलेंस. ' भीम ह्मणाला, ' तिऱ्हाईताचें सुद्धां रक्त पिणें रास्त नाहीं मग स्वजना संबंधाची गोष्ट कशाला पाहिजे? स्वतामध्यें व भावामध्यें कांहीं फरक नाहीं. तें रक्त माझ्या ओठाखालीं कांहीं गेलें नाहीं. तेव्हां त्याबद्दल वाईट वाटून घेऊं नकोस. कर्णाला हें पक्कें माहीत होतें. फक्त माझे हात मात्र रक्तानें बरबटले होते. वृषसेनानें नकुलाचे घोडे मारल्यानें फुरफुरलेल्या माझ्या कौरव भावांना दरारा उत्पन्न करण्यासाठीं, त्याचप्रमाणें द्यूताचे वेळीं द्रौपदीच्या केसाला धरलें असतां रागाच्या झपाट्यांत माझ्या तोंडून जें निघून गेलें होतें तें अद्यापि माझ्या लक्षांत असल्यामुळें ती प्रतिज्ञा खरी न केल्यास क्षात्र धर्मापासून मी कायमचा भ्रष्ट होईन या भीतीनें मला तें करावें लागलें. तेव्हां मला तूं उगीच दोष लावूं नकोस. आह्मीं निरपराधी आहों. पूर्वीं आपल्या

मुलांना न आवरतां आतां उगीच आह्मांला दोष दे-ण्यांत काय अर्थ आहे? त्यावर 'त्यांचा अपराध कोणता कां असेना; परंतु आह्मां आंधळ्यांचे व राज्याला मुकलेल्या निराश्रितांचे शंभर मुलगे मारून तूं आमची एक देखील काठी शिल्लक ठेविली नाहींस! तूं जर त्यांना मारण्यामध्यें सरळ मार्ग धरला असतास तर त्या सर्वांना मारून तूं कायम राहिल्याबद्दल सुद्धां मला वाईट वाटलें नसतें,' असें भीमाला ह्मणून, पुत्रशोकानें संतापून गेलेल्या तिनें 'तो राजा कोठें आहे, ह्मणून युधिष्ठिरासंबंधानें विचारलें. तेव्हां धर्मराज कांपत कांपत हात जोडून तिच्यापुढें उभा राहून मधुर शब्दांनीं तिला ह्मणाला, 'देवि, हा दुष्ट सर्व लोकांच्या नाशाला कारणीभूत व तुझ्या मुलांना मारल्यानें शापाला पात्र झालेला मी तुझ्यापुढें उभा आहें. मला शाप दे. आप्तस्वकीयांना मारून या मूर्खाला आतां जगून कांहीं करावयाचें नाहीं, व राज्याचें किंवा पैशाचेंही कांहीं कारण नाहीं.' याप्रमाणें तो बोलत असतां दीर्घ सुस्कारा टाकून ती कांहीं बोलली नाहीं. पायां पडण्यासाठीं तो वांकला असतां त्या धर्मज्ञेची दृष्टि डोळ्यांवरील पट्टींतून त्याच्या आंगठ्याच्या शेंड्यावर गेली. त्याबरोबर त्याचें सुंदर नख अगदीं कर्पून सडून गेलें. तें पाहून अर्जुन श्रीकृष्णाच्या पाठीमागें गेला. याप्रमाणें ते भिऊन गडबडले असतां तिचा राग शमून आईप्रमाणें तिनें त्या सर्वांचें सांत्वन केलें. नंतर तिच्या आज्ञेनें अशा वीरांना जन्म देणारी जी कुंति तिच्याकडे ते सर्व मिळून गेले. मुलांसंबंधी मानसिक व्यथेनें व्याकुळ झालेल्या कुंतीनें मुलांना पाहिल्याबरोबर तोंड झांकून घेऊन अश्रू ढाळले. याप्रमाणें तिनें व मुलांनीं अश्रू ढाळल्यावर अनेक शस्त्रांनीं त्यांच्या आंगावर झालेल्या जखमा पाहून फिरून फिरून तिनें त्यांच्या आंगावरून हात फिरविले. जवळच मुलगे मेल्यामुळें जमिनीवर द्रौपदीला रडत लोळतांना पाहून कुंतीला फार वाईट वाटलें. द्रौपदी तिला पाहून ह्मणाली, 'अभिमन्यु वगैरे आपले मुलगे कुठें आहेत हो! आपण इतक्या कष्टी झाला असून आपल्याला भेटून इतके दिवस झाले आहेत तरी आज ते आपल्याकडे धांवून येत नाहींत. माझ्या बाळांवांचून मला हें राज्य घेऊन तरी काय करावयाचें आहे.' याप्रमाणें ती शोकाकुल होऊन रडत असतां कुंतीनें तिला उठवून समजाविलें; व तिला घेऊन ते गांधारीकडे गेले. तेव्हां गांधारी ह्मणाली, 'मुली, अशी रडूं नकोस. माझ्याकडे बघ. काळाच्या नियमानियमानेंच हा सर्वांचा नाश ठरला होता. आणि तसा तो घडून आला आहे. विदुरांनीं तेवेळीं सांगितलेलें प्रत्ययाला आलें. सभेंतीचें त्या वेळीं जेव्हां जुळलें नाहीं त्या वेळीं महाबुद्धिमान श्रीकृष्ण जें बोलला ती न टळणारी गोष्ट ती बोलल्याहून विशेष रीतीनें घडून आली आहे. ते सर्व रणांत मेले आहेत, तेव्हां त्यांचे संबंधानें शोक करण्याचें कारण नाहीं. माझी तशीच तुझी दशा उडाली आहे. आतां आपलें समाधान कोण करणार? माझ्या मुलेंच एवढ्या मोठ्या कुळाचा असा फडशा पडला आहे.

---

## ७९ स्त्रियांचा विलाप. (११. १५-२५)

नंतर श्रीकृष्णाला पुढें करून सर्व कौरवस्त्रिया त्या भयंकर रणभूमीकडे गेल्या; व तेथें मरून पडलेले मुलगे, बाप, भाऊ, नवरे यांना कोल्हीं, राक्षस, पिशाच वगैरे खात असतांना पाहून रुद्राचें क्रीडाभुवन बनून राहिलेल्या त्या रणभूमीवर आल्याबरोबर त्या मोठ्यानें किंकाळी फोडीत आपापल्या वाहनांतून खालीं उतरल्या. तो कधीं न पाहिलेला देखावा पाहून त्या अगदीं विव्हळ झाल्या. कोणी ठेचा खात चालल्या होत्या; तर कोणी खालीं जमिनीवर बेशुद्ध होऊन पडत होत्या. दुःखानें व्याकुळ झालेल्या स्त्रियांच्या रडण्यानें ती रणभूमि जिकडे तिकडे दुमदुमून गेली होती. तेव्हां श्रीकृष्णाच्या व व्यासांच्या प्रसादानें मिळालेल्या दिव्य दृष्टीनें ती उग्र रणभूमि पुढें पाहून गांधारी श्रीकृष्णाला ह्मणाली, 'श्रीकृष्णा, नवरे मेल्यामुळें केस विस्कळून कुररीप्रमाणें ह्या माझ्या सुना रडताहेत पहा. ह्या आपापल्या नवऱ्याच्या शवाकडे जाऊन त्याचे गुण आठवून रडत आहेत. कोणी आपल्या मुलाकडे, कोणी भावाकडे, कोणी बापाकडे धांवत आहेत. श्रीकृष्णा, ही रणभूमि पहा. ज्यांचे मुलगे मेले आहेत अशा वीरमातांनीं ही कुठें भरली आहे तर कुठें

वीरपत्न्यांनीं व कोठें मेलेल्या वीरांनीं भरली आहे. कर्ण, भीष्म, अभिमन्यु, द्रोण, द्रुपद, शल्य यांसारख्या अग्नीप्रमाणें तेजस्वी नरवीरांनीं त्याचप्रमाणें सोन्याचीं चिलखतें, बाहुभूषणें, पदकें इत्यादिकांनीं हिला फारच शोभा आली आहे. त्याचप्रमाणें वीरांनीं सोडलेल्या शक्ती, परिघ, तलवारी, बाण, भाले, वगैरेंनींही ही भरून निघाली आहे. त्याचप्रमाणें आनंदभरित झालेल्या मांसाहारी प्राण्यांचा घोळका कोठें प्रेतावर बसला आहे तर कोठें त्यावर घिरट्या घालीत आहे व कोठें पडून आहे. हें सर्व पाहून शोकानें मी अगदीं पोळून निघत आहें. ह्या कुरुपांचालांच्या नाशामध्यें ह्या पंचभूतात्मक जगाचा नाश झाल्यासारखा मला दिसत आहे. रक्तानें भरून निघालेले हजारों गरूड व गिधाडें मरून पडलेल्या वीरांना ओढीत आहेत व त्यांच्या पायांना धरून खात आहेत. जयद्रथ, कर्ण, द्रोण, भीष्म, अभिमन्यु हे मरतील असें कोणाच्या स्वप्नांतही वाटलें होतें काय? हे अवध्य असे वीर मरून गिधाडें, कंक, डोमकावळे, ससाणे, कुत्रे, कोल्हीं यांना आज भक्ष्य झाले आहेत. दुर्योधनाच्या सांगण्याप्रमाणें वागून ईर्षेला पेटलेले हे नरसिंह विझलेल्या निखाऱ्याप्रमाणें पडले आहेत; अंगाला मऊ चंदन वगैरे चोपडून पूर्वी जे बिछान्यावर निजत ते आज या उघड्या जमिनीवर धुळींत पडले आहेत. भाट वेळच्या वेळीं स्तुतिपाठानें ज्यांना आनंदवीत, त्यांच्या कानांवर आज कोल्ह्यांची कोल्हेकुयी पडत आहे. त्यांच्या अंगावरचे अलंकार गिधाडें कोल्हीं वगैरे ओढून काढीत आहेत. युद्धासंबंधानें मोठा अभिमान असणाऱ्या या वीरांच्या हातांत अद्यापि बाण, तलवारी व गदा जशाच्या तशा आहेत. कांहीं वीर जणूं आपल्या प्रियकर बायकांनाच कीं काय अशा रीतीनें गदांना घट्ट कवटाळून रणाकडे तोंड करून पडले आहेत. कांहींच्या अंगांत लखलखीत कवचें व हत्यारें असल्यामुळें ते जिवंत आहेतसें वाटून मांसभक्षक प्राणी त्यांच्याजवळ जाण्याला धजावत नाहींत. हीं हजारों भयंकर कोल्हीं या मेलेल्या यशस्वी वीरांच्या गळ्यांतील हार ओढून नेत आहेत. नुकते गेल्या रात्रीं भाटांनीं औपचारिक स्तुतिपाठानें ज्यांचे गुणानुवाद गाइले त्यांच्याबद्दल आज ह्या मुली शोकाकुल होऊन दीनवाणें रडताहेत! रक्तकमलाप्रमाणें रुचिर अशीं यांचीं तोंडे कशीं सुकून गेलीं आहेत पहा. ह्या बायका रडून रडून आतां दमल्या असून इकडे तिकडे धांवत आहेत पहा. रडण्यानें आणि रागानें सुवर्णासारखीं त्यांचीं मुखकमलें कशीं लाल झालीं आहेत! एकमेकींच्या रडण्यामध्यें मिळून गेल्यामुळें यांच्या रडण्याचा अर्थ कांहींच उमगेनासा झाला आहे. रडून, ओरडून व दीर्घ उच्छ्वास टाकून दुःखानें वेड्या होऊन या प्राण टाकीत आहेत. कित्येक स्त्रिया आपल्या कोमल हातांनीं आपलीं कपाळें बडवून घेत आहेत. कापून निघालेलीं मुंडकीं, हात, दुसरे अवयव एकमेकांमध्यें मिसळून त्यांचा ढीगचढीग तेथें पडला आहे. जवळ जाऊन बिनमुंडक्यांचीं धडें पाहून त्याचप्रमाणें धडांवांचून मुंडकीं पाहून या बायका अगदीं वेड्या बनत आहेत. व धडाला शीर लावून पाहून त्यांत मेळ न दिसल्यानें ‘ हें नव्हे,’ ‘हें नव्हे’ असें म्हणून त्या दुःखी होत आहेत. त्याचप्रमाणें कोणी बाणांनीं भरून निघालेले हात, पाय, मांड्या वगैरे जोडून पाहून त्यांमध्यें मेळ न बसल्यामुळें वरच्यावर मूर्च्छा येऊन पडत आहेत. मृगपक्ष्यांनीं ज्यांचीं डोकीं कुरतडून खाऊन खाऊन टाकलीं आहेत अशा कांहींना पाहून ते आपले नवरे ह्मणून कांहींना ओळखच पटेनासें झालें आहे. मांसरक्ताच्या चिखलानें ही रणभूमि भरून निघाली असल्यामुळें येथें मधून वाटच नसल्यासारखी झाली आहे. अशा स्थितींत यांना पाहण्याचें माझ्या कपाळीं आलें याहून विशेष दुःख तें काय असलें पाहिजे! मीं पूर्वजन्मीं कांहीं तरी पाप केलें असलें पाहिजे, त्यामुळें हा सर्व प्रसंग ओढवला आहे. ”

याप्रमाणें शोक करीत कृष्णाशीं बोलत ती चालली असतां मरून पडलेला दुर्योधन तिच्या दृष्टीस पडला. त्याला पाहून वनामध्यें तोडून पाडलेल्या केळीप्रमाणें ती धाडकन् खालीं पडली. फिरून सावध होऊन त्याला तसा रक्तानें माखून पडलेला पाहून ‘अरे बाळा,’ म्हणून विव्हळ होऊन तिनें आपल्या डोळ्यांतील आंसवांनीं त्याची छाती भिजवून काढली. नंतर ती श्रीकृष्णाला ह्मणाली. ‘कृष्णा, ज्ञातीचा फडशा पाडणारें हें भयंकर युद्ध सुरू झाल्या वेळीं हा माझ्यापुढें येऊन हात जोडून मला ह्मणा-

ला. ' आई ह्या ज्ञातीशीं होणाऱ्या युद्धामध्यें मला जय येईल असा आशीर्वाद दे. ' असें तो ह्मणाला असतां पुढें वाढून ठेवलेलें सर्व संकट जाणून मी ह्मणालें, ' वीरा, जिकडे धर्म तिकडे जय. युद्ध करतांना तूं कचरूं नकोस. शस्त्रानें मरणाऱ्या लोकांना मिळणारे इंद्रतुल्य लोक तुला मिळतील. ' कृष्णा, मी त्याला असें ह्मणालें बरें ! तेव्हां त्याच्याबद्दल आतां मला कांहीं वाटत नाहीं. सर्व अस्त्रांमध्यें प्रवीण व युद्धाची खुमखुमी कधीं न जिरणारा असा हा वीरश्रेष्ठ माझा तापट बाळ या वीरशय्येवर पडला आहे पहा. मूर्धाभिषिक्त झालेल्या राजांच्या पुढें असावयाचा तो आज या धुळीमध्यें धूळ खात पडला आहे तेव्हां कालाचा फेरा विचित्र आहे. खात्रीनें दुर्योधनाला लहानसान गति मिळाली नाहीं; कारण रणाला तोंड देऊन हा वीरांनीं पत्करलेल्या शय्येवर पडला आहे. सुंदर सुंदर स्त्रिया ज्याच्या भोंवतीं जमून पूर्वीं याला रंजवीत होत्या त्या ह्याला आज वीरशय्येवर पडलेल्याला अमंगळ कोल्हीं रमवीत आहेत. पूर्वीं ज्याच्या भोंवतीं राजे हात जोडून असत त्याच्या भोंवतीं आज गिधाडें जमलीं आहेत. उत्तम पंख्यांनीं ज्याला पूर्वीं बायका वारा घालीत त्याला आज पक्षी आपल्या पंखांनीं वारा घालीत आहेत. ज्यानें आकरा अक्षौहिणी सेना रणांत उभी केली तो हा आज आपल्या अनीतीनें मरून पडला आहे. विदुर मामंजी त्याचप्रमाणें वडील यांचें न ऐकतां वडिलांचा अवमान केल्यानें हा आज काळाच्या तोंडीं सांपडला. कोणी शत्रु न उरतां आज तेरा वर्षे पृथ्वी ज्याच्या ताब्यांत होती, तो आज पृथ्वीवर मरून पडला आहे! तसेंच रणामध्यें ह्या बायका मेलेल्या वीरांभोंवतीं जमल्या आहेत हें पाहून तर मला मुलांच्या मरणापेक्षांही जास्ती दुःख होत आहे. दुर्योधनाच्या चांगल्या मांडीवर बसणारी सोन्याच्या वेदीसारखी देदीप्यमान सुश्रोणी लक्ष्मणाची आई केस तोडून शोक करीत आहे पहा. जी पूर्वीं दुर्योधनाच्या बाहूंमध्यें सुखांत असावयाची तिची आज काय दशा उडाली आहे! आपल्या मुलाला त्याच्या मुलासह रणांत मरून पडलेला पाहून माझ्या हृदयाचे फुटून शेंकडों तुकडे कसे होत नाहींत ? ही बिचारी शुद्धशील रक्तानें भरलेल्या आपल्या मुलाला हुंगून दुर्योधनावरून हात फिरवीत आहे. ती मधून मधून नवऱ्याबद्दल, मधून मधून मुलाबद्दल शोक करीत आहे. बिचारी आपले हात कपाळावर हाणून घेऊन आपल्या वीर नवऱ्याच्या छातीला चिकटत आहे. कमलाच्या तंतूप्रमाणें जिचा वर्ण अशी ही बिचारी मुलाच्या व नवऱ्याच्या तोंडांवरून हात फिरवीत आहे. जर शास्त्रें खरीं असतील तर खात्रीनें याला उत्तम लोक मिळाले आहेत.

त्याचप्रमाणें कृष्णा, ज्यांना श्रम म्हणून स्वप्नीं देखील माहीत नाहीं असे हे माझे शंभर मुलगे भीमसेनानें आपल्या गदेनें ठार करून टाकले आहेत पहा. ज्या बिचाऱ्या पायांत भूषणें घालून वाड्यामधून चालणाऱ्या त्या माझ्या सुना आज या स्थितींत सांपडून रक्तानें भरलेल्या जमिनीवरून चालत आहेत; मोठ्या कष्टानें गिधाडें, कोल्हीं, कावळे यांना दूर करून दुःखानें घेरी येऊन वेड्याप्रमाणें भटकत आहेत; व ही भयंकर रणभूमि पाहून दुःखानें विव्हळ होऊन खालीं पडत आहेत. कोणी आपल्या भावांना, कोणी बापांना, कोणी मुलांना मरून पडलेले पाहून त्यांच्या हाताला धरून त्यांवर आपणाला घालून घेत आहेत. रथांच्या पुढील भागांना, हत्ती व घोडे यांच्या अंगांना थकल्यामुळें टेकत आहेत. कोणी आपल्या आप्तांचें धडापासून वेगळें केलेलें सुंदर शीर हातांत घेऊन त्याकडे पहात आहेत.व हा सर्व प्रसंगधर्मराजानें आह्मांवर आणला. तेव्हां आमचें पूर्व पाप फार मोठें असलें पाहिजे. अरेरे ! माझ्या अभिमानी मुलांचा हा गोषा आज सामान्य लोकांच्या दृष्टीस पडत आहे!? त्याचप्रमाणें माझ्या मुलांच्या हजारों चंद्र काढलेल्या ढाली, सूर्यासारखीं झळझळीत निशाणें, सोन्याचीं चिलखतें वगैरे कशीं जमिनीवर विसकळून पडलीं आहेत पहा ! ज्याच्या सर्वांगावरचें रक्त शत्रुघाती भीम प्याला आहे तो त्याच्या गदेनें मरून पडलेला हा दुःशासन पहा. आपल्या भावाच्या व कर्णाच्या मनाप्रमाणें वागण्यासाठीं द्यूतांत जिंकलेल्या द्रौपदीला हा भरसभेत ह्मणाला, ' द्रौपदी, अर्जुन, नकुल, सहदेव या सर्वांसह तूं आमची दासी झाली आहेस.तेव्हां आतां एकदम आमच्या वाड्याकडे चल.' तेव्हां कृष्णा, मी त्या दुर्योधनाला ह्मणालें, 'बाळा, ज्याच्या गळ्यांत मृ-

त्यूचा पाश पडला आहे अशा ह्या शकुनीला सोड. हा तुझा मामा फार खोट्या बुद्धीचा असून कलहप्रिय आहे. याला टाकून पांडवांशीं सख्य कर. मूढा, त्या तापट भीमाला तूं ओळखत नाहींस. कोलतीनें हत्तीला टोंचावें त्याप्रमाणें तूं त्याला वाक्शरानें टोचीत आहेस.' या तापट भीमानें तरी भयंकर अत्याचारच केला. कारण रणांत तो प्रत्यक्ष दुःशासनाचें रक्त प्याला. कृष्णा, शाहण्यांना मान्य असा हा माझा बाळ विकर्ण शरत्कालामध्यें निळ्या ढगांनीं झांकून गेलेल्या चंद्राप्रमाणें हत्तींमध्यें पडला आहे. धनुष्य धरल्यानें त्याच्या हाताला घट्टे पडले आहेत; व गिधाडांना ते तोडण्याला मोठे आयास पडत आहेत. याची बिचारी बायको मांसाला हापापलेल्या या गिधाडांना व कावळ्यांना वरचेवर हांकीत आहे, तरी तिच्यानें ते हांकले जात नाहींत. कर्णी, नालीक,नाराच इत्यादि बाणांनीं या सर्वमान्य वीराचें सर्व अंग फोडून निघालें आहे, तरी याच्या तोंडावरचें तेज कमी झालेलें नाहीं. तसाच प्रतिज्ञा पाळणाऱ्या रणशूर भीमाच्या हातून मरून शत्रुसमुदायांचा फडशा पाडणारा हा दुर्मुख येथें पडला आहे. कृष्णा, त्याचें हें तोंड श्वापदांनीं अर्धें खाऊन टाकलें आहे, तरी सप्तमीच्या चंद्राप्रमाणें तें फारच खुलून दिसत आहे. सर्व धनुर्धाऱ्यांना जो उदाहरणादाखल होता तो हा नाना प्रकारच्या माला व अलंकार घातलेला माझा चित्रसेन येथें मरून पडला आहे पहा: त्याच्या बायका विव्हळ होऊन रडत त्याच्याभोंवतीं जमल्या आहेत. स्त्रियांच्या रडण्याचा आवाज त्याचप्रमाणें मांस खाण्याला जमलेल्या श्वापदांचे शब्द यांचा एकच गोंधळ येथें उडून राहिला आहे. शरानें ज्याचें अंग फोडून काढलें आहे व ज्याच्या भोंवतीं गिधाडें जमलीं आहेत असा हा ह्या रणांत मरून पडलेला विविंशति पहा. भल्यांना उचित अशा वीरशय्येवर हा पडला आहे. याचें अंग बाणांनीं भरून गेलें असल्यामुळें, तसेंच याच्या आंगावर सोन्याची माळ व लखलखित कवच असल्यामुळें हा मेला आहे तरी पेटून राहिलेल्या श्वेतपर्वताप्रमाणें दिसत आहे. तसेंच कृष्णा, बळामध्यें व शौर्यामध्यें जो बापाहून व तुझ्याहून दीडपट होता, ज्यानें एकट्यानें माझ्या मुलाची दुर्भेद्य सेना फोडली तो हा सिंहासारखा अभिमानी अभिमन्यु पहा. हा स्वतः दुसऱ्यांचा काळ होऊन स्वतः काळाच्या तावडींत सांपडला आहे. हा मरून पडला आहे तरी याचें तेज कांहीं कमी झालेलें दिसत नाहीं. ही 'अर्जुनाची सून उत्तरा आपल्या वीर पतीला पाहून शोकाकुल होऊन रडत आहे! व जवळ जाऊन त्याच्या अंगावरून हात फिरवीत आहे! पूर्वी त्याच्या विकसलेल्या मुखकमलाला हुंगून जी सुंदरी मद्याच्या मदानें धुंद होऊन लाजत लाजत त्याला आलिंगन देत असे ती आज याचें कवच उकलून रक्तानें भरलेल्या याच्या शरीराकडे न्याहाळून पहात आहे. त्याच्याकडे पाहतां पाहतां ती तुझ्याकडे पहात आहे, त्यावरून ती असें ह्मणते आहेशी दिसते कीं, ' नेहमीं रंकूहरणाच्या मऊ कातड्यावर पडणाऱ्या आपणांला ही भुई रुतत नाहीं काय ? मीं कांहीं आपला गुन्हा केलेला मला आठवत नाहीं. मग तुह्मी माझ्याशीं कां बोलत नाहीं? पूर्वी आपण मला दुरून पाहिल्याबरोबर माझ्याशीं बोलत असा, त्या आपण आजच कां बोलणें सोडून दिलें आहे? अहो, आर्य, त्या कुंती सासुबाईंना तसेंच सुभद्रासासुबाईंना त्याचप्रमाणें देवासारख्या ह्या वडिलांना व दुःखांत बुडालेल्या मला टाकून कोठें गेला ? ' शिवाय त्याचे रक्तांत भरलेले केस धरून डोकें मांडीवर घेऊन तो जिवंत असल्याप्रमाणें त्याला ती विचारीत आहे कीं, 'आपण श्रीकृष्णाचे भाचे, अर्जुनाचे मुलगे असून रणामध्यें शत्रूंनीं आपल्याला कसें मारिलें ? कर्ण, कृप, जयद्रथ, द्रोण, अश्वत्थामा ह्यांनीं मला अशी विधवा केली, तेव्हां त्या क्रूर कर्म करणाऱ्यांना धिक्कार असो. पांडव व पांचाल पहात असतां, मला दुःखांत लोटण्यासाठीं आपल्यासारख्या तरुणांवर सर्वांनीं मिळून मारा करण्याला त्यांचें मन तरी कसें झालें. महाराज, आपल्याला इतके नाथ असून आपण अनाथाप्रमाणें मेलां अं! रणामध्यें पुष्कळांनीं मिळून आपल्याला मारलेलें पाहून नरवीर अर्जुन महाराज जिवंत तरी कसे राहिले ? ही एवढी थोरली राज्यप्राप्ति व हा शत्रूचा पराभव आपल्यावांचून पांडवांना कांहीं गोड वाटणार नाहीं. आपण शस्त्रानें मरून जे लोक मिळविले आहेत, तेथें मी

मनोनिग्रहानें व धर्मानें वागून लवकरच येतें. त्या ठिकाणीं माझी वाट पहात रहा. मनुष्य वेळ आल्याशिवाय मरत नाहीं. म्हणूनच मी हतभागी आपल्याला रणांत मरून पडलेले पाहून सुद्धां जिवंत आहे. महाराज, गोड अशा हसऱ्या तोंडानें पितृलोकामध्यें मला हाक मारीत होता तसे आतां कोणाला हाक मारणार? खात्रीनें स्वर्गामध्यें अप्सरा आपल्या मनाला वेड लावून सोडतील. त्या पवित्र लोकामध्यें अप्सरांशीं मिळून सुखांत विहार करीत असतां माझे हातून जी कांहीं सेवा झाली आहे तिची आठवण ठेवा. देवानें सहा महिनेच आपला माझा संबंध लिहून ठेवला होता. आज सातव्याच महिन्याला आपण मला नाहींसे झालां आहां!' असें म्हणून शोक करीत असतां त्या विराटस्त्रिया मोठ्या कष्टानें तिला बाजूला ओढीत आहेत. जवळच द्रोणांच्या शस्त्रानें मेलेल्या व रक्तानें भरून पडलेल्या विराटाला पाहून त्यांचा शोक अनावर होत आहे. त्याला तोडीत असलेलीं गिधाडें, कोल्हीं ह्यांना त्या दूर करीत आहेत. तरी त्यांच्यानें ते दूर होत नाहींत. उन्हानें व श्रमानें त्यांचीं तोंडें सुकून निस्तेज झालीं आहेत. त्याचप्रमाणें हा उत्तर, हा सुदक्षिण, हा लक्ष्मण येथें मरून पडले आहेत पहा!

हा येथें पेटलेल्या अग्नीप्रमाणें महारथ कर्ण अर्जुनाच्या हातून मरून पडला आहे. याच्या बायका केस विस्कटून त्याच्या भोंवतीं जमून रडत आहेत. ज्याच्यामुळें काळजीनें उद्विग्न होऊन धर्मराजाला तेरा वर्षे झोंप आली नाहीं, तो हा शत्रूला हार न जाणारा प्रत्यक्ष युगांतकालीन अग्नीसारखा वीर आजपर्यंत माझ्या मुलांना आधार होऊन वाऱ्यानें मोडून पडलेल्या झाडाप्रमाणें आज मरून पडला आहे. ही कर्णाची बायको वृषसेनाची आई दीनवाणें रडत त्याच्याजवळ पडून 'गुरूंचा शाप खरोखर खरा ठरला म्हणून आपलें चाक पृथ्वीनें गिळलें व नंतर अर्जुनानें शरानें मुंडकें उडविलें,' असें जणूं त्याला म्हणते आहेसें दिसतें. अरेरे, वीर्यशाली कर्णाला पाहून ही राधा अगदीं बेशुद्ध होऊन पडली आहे. मांसभक्षक प्राण्यांनीं त्याला अगदीं खाऊन टाकल्यामुळें कृष्णचतुर्दशीच्या चंद्राप्रमाणें तो डोळ्यांना आनंदवीनासा झाला आहे. ती जमीनीवर लोळून फिरून उठून त्याचें तोंड हुंगून फिरफिरून रडत आहे.

तसाच हा पुष्कळ आप्त असून अनाथाप्रमाणें भीमसेनानें मारून पाडलेला थोर अवंतीचा राजा रणांत भयंकर कत्तल उडवून वीरशय्येवर पडला आहे. कोल्हीं, कंक वगैरे मांसभक्षक प्राणी याला आपल्याकडे ओढीत आहेत, काय हा कालाचा फेरा आहे पहा! त्याचप्रमाणें हा महाधनुर्धारी बाल्हिक येथें मरून पडला आहे. त्याचप्रमाणें पुत्रशोकानें काहील उडालेल्या अर्जुनानें आपली प्रतिज्ञा पाळण्यासाठीं महात्म्या द्रोणांनीं रक्षण केलें असतांही आकरा अक्षौहिणी सैन्य फोडून आंत शिरून मारून पाडलेला हा मोठा अभिमानी जयद्रथ पहा. याच्या प्रेमळ बायका याचें प्रेत राखीत आहेत तरी त्यांना भिवडावून कोल्हीं व गिधाडें याला जवळच असलेल्या दाट जंगलाकडे ओढून नेत आहेत. ज्या वेळीं हा द्रौपदीला उपटून घेऊन पळाला तेव्हांच पांडवांच्या हातून हा मरावयाचा, परंतु दुश्शलेकडे दृष्टि देऊन ते वेळीं त्यांनीं याला सोडलें. मग आजच ते दुश्शलेला कसें बरें विसरले? ती माझी बाळ कशी दुःखानें ऊर बडवून घेत पांडवांना दोष देत आहे पहा! अरेरे! बिचारी पोर, भय, शोक सर्व बाजूला ठेवून नवऱ्याचें शीर न मिळाल्यामुळें तें धुंडाळीत इकडून तिकडून धांवत आहे. त्याचप्रमाणें हा येथें शल्य मरून पडला आहे. प्रत्यक्ष नकुलाचा मामा असून या धर्मज्ञ धर्मराजानें याला मारलें. कर्णाचा रथ हांकीत असतां यानें पांडवांना जय मिळावा म्हणून त्याचा हिरमोड केला. ह्याच्या पूर्ण चंद्रासारख्या तोंडावर जखम बिलकूल नसून कावळे त्याला टोंचीत आहेत. त्याचप्रमाणें बाहेर पडलेली याची जीभ कावळे खात आहेत. त्याचप्रमाणें हा पहाडी प्रतापशाली राजा भगदत्त पहा. याच्या डोक्यावर असलेली सोन्याची माळा, श्वापदें याला खाऊन टाकीत आहेत तरी केसांना एक प्रकारची शोभाच देत आहे. शौर्यामध्यें व वीर्यामध्यें ज्यांच्या तोडीचे या जगांत कोणी नाहीं, ते हे भीष्म रणांत भयंकर कृत्य करून रणभूमीवर घायाळ होऊन युगांतकालीं आकाशांतून खालीं येऊन पडलेल्या सूर्याप्रमाणें रणांत पडले आहेत पहा! रणामध्यें शस्त्राच्या

तापानें शत्रूंना तापवून सोडून हे नरसूर्य अस्ताला चालले आहेत. शरशय्येवर पडलेल्या ह्या ऊर्ध्वरेते वीराकडे पहा. कर्णी, नाली, नाराच इत्यादि बाणांची शय्या उठवून देऊन त्यावर हे शरवनांत पडलेल्या स्कंदाप्रमाणें पडले आहेत.

अर्जुनानें तीन बाणांची उत्तम उशी यांना दिली आहे. मर्त्य असून अमराप्रमाणें हे प्राण धरून आहेत. यांनीं स्वतः होऊनच पांडवांनीं विचारिलें असतां आपलें मरण त्यांना सांगितलें; नाहींसा झालेला कुरुवंश ज्यांनीं फिरून वर काढला ते आज कौरवांबरोबरच नाहींसे झाले आहेत. हे धर्मज्ञ आतां स्वर्गाला गेल्यावर धर्माच्या बाबतींत माहिती कोणाला देतील? त्याचप्रमाणें अर्जुन व सात्यकी यांचे गुरु द्रोण हे येथें मरून पडले आहेत. इंद्राप्रमाणें चतुर्विध अस्त्रांची यांना माहिती असून ते अस्त्रविद्येंत परशुरामांच्या तोडीचे होते. ज्यांच्या प्रसादानें अर्जुनानें रणांत असें अचाट कृत्य केलें त्यांना धृष्टद्युम्नानें मारून पाडलें आहे. अस्त्रांनीं यांना हात दिला नाहीं. ज्यांना पुढें करून कौरवांनीं पांडवांना युद्धाला बोलाविलें ते आज शस्त्रांनीं घायाळ होऊन मरून पडले आहेत. शत्रूला जाळून काढीत असतां जे सैन्यामधून अग्नीप्रमाणें फिरत असत ते आज विझलेल्या अग्नीप्रमाणें शांत होऊन पडले आहेत. ह्यांच्या हातांत धनुष्य व पंजा अद्यापि असल्यामुळें ते जिवंत असल्यासारखें दिसत आहेत. चार वेद व सर्व अस्त्रें यांनीं यांना कधीं सोडलें नाहीं. भटांनीं ज्यांचे वंद्य पाय आजपर्यंत धरले, ते त्यांचे हजारों शिष्यांनीं पूजिलेले पाय आज कोल्हीं ओढीत आहेत. ही जटा वाढलेली ब्रह्मचारी कृपी दुःखानें दीनवाणें रडत त्यांचे पुढें उभी राहून प्रेतकार्याची व्यवस्था करीत आहे. द्रोणांना चितेवर ठेवून विधिपूर्वक ती पेटवून सामवेदी साम ह्मणत आहेत. जटाधारी ब्रह्मचाऱ्यांनीं ही चिता धनुष्य, शक्ति, रथाचे आतले तुकडे व नानाविध बाण जमवून रचली आहे. याप्रमाणें चिता पेटवून त्यांचे कांहीं शिष्य रडत आहेत व कांहीं त्यावेळीं ह्मणण्याचे तीन साम ह्मणत आहेत; व याप्रमाणें त्यांना अग्नि देऊन, कृपीला पुढें करून व चितेला डावी घालून द्रोणशिष्य गंगेकडे चालले आहेत.

हा युयुधानानें मारून पाडलेला सोमदत्ताचा मुलगा पहा! पुत्रशोकानें कष्टी झालेला सोमदत्त युयुधानाची निंदा करीत आहेसें दिसतें. 'महाराज, ह्या प्रलयकालीं कौरवांची भयंकर कत्तल उडून भरतांचा फडशा पडलेला आपण पहाण्याला जगलां नाहींत हें बरें झालें. हजारों यज्ञ करून पुष्कळ दक्षिणा दिलेल्या आपल्या वीर मुलाला मरून पडलेला त्याचप्रमाणें समुद्रावर आरडणाऱ्या सारस पक्ष्याप्रमाणें ह्या रणामध्यें सुनांचें भयंकर रडणें ऐकण्याला आपण जगला नाहीं हें बरें झालें! अर्जुनानें बाहु छाटून काढून मारून पाडलेल्या ह्या शलाला त्याचप्रमाणें ह्या भूरिश्रव्याला हे मांसभक्षक पशू खात आहेत हें पहाण्याचें आपल्या नशिबीं आलें नाहीं हें चांगलें झालें!' असें ह्मणत सोमदत्ताची बायको रडत आहे पहा. सात्यकीनें मारलेल्या त्या भूरिश्रव्याच्या भोंवतीं त्याच्या बायका जमून रडताहेत. ही भूरिश्रव्याची बायको नवऱ्याचा हात मांडीवर घेऊन, 'हा मित्रांना अभय देऊन शत्रूंना मारून क्षत्रियांचा फडशा पाडणारा व हजारों गाईंचें दान करणारा हात श्रीकृष्णाच्या समोर अर्जुनानें कापून काढला तेव्हां चार लोकांमध्यें या आपल्या महत्कृत्याबद्दल तो काय फुशारकी मारणार, सात्यकीनें तर यापेक्षां पापतर कृत्य करून आपण प्रायोपवेश केला असतां आपल्यावर प्रहार केला. वगैरे गोष्टी आठवून रडत आहेत. ' त्याचप्रमाणें हा गांधारराज शकुनि आपला भाचा जो सहदेव, त्याच्या हातून मरून येथें पडला आहे! पांडवांच्या तेजानें त्याच्या सर्व मायेला जाळून पार केलें आहे. ज्या कपटपटूनें सभेमध्यें कपटानें युधिष्ठिराला जिंकून विपुल राज्य मिळविलें तो हा प्राणाला मुकून पडला आहे पहा. हा बिचारा, माझ्या मुलांचा फडशा पाडण्यासाठींच कपट शिकला; यानेंच पांडवांशीं माझ्या मुलांचा व आपला नाश करण्यासाठीं हाडवैर पाडलें. शस्त्रानें मरण येऊन ज्याप्रमाणें माझ्या मुलांना लोक मिळाले आहेत तेच लोक ह्या दुर्बुद्धीला मिळाले असल्यामुळें तेथें तरी हा वांकडा मनुष्य माझ्या मुलांचें भावांमध्यें वैर न पाडो. त्याचप्रमाणें हा कांबोजाधिपति येथें धुळीमध्यें मरून पडला असून त्याच्या बायका त्याच्या भोंवतीं

जमून दीनवाणें रडत आहेत. त्याचप्रमाणें हा मगधांचा स्वामी जयत्सेन मरून पडला असून, त्याच्या बायका त्याच्या भोंवतीं जमून शोकाकुल होऊन रडत आहेत.

त्याचप्रमाणें हा कोसलांचा स्वामी बृहद्बल येथें मरून पडला असून याच्या अंगांत रुतलेले अभिमन्यूचे बाण त्याच्या बायका उपटून काढीत असतां त्यांना फिरून फिरून मूर्छा येत आहे. त्याचप्रमाणें हें धृष्टद्युम्नाचे बाळ मरून पडले आहेत. त्याचप्रमाणें द्रोणांनीं मारलेले हे पांच केकय बंधू रणांतून माघार न घेतां मरून पडले आहेत. त्याचप्रमाणें सिंहानें मारून काढलेल्या मोठ्या हत्तीप्रमाणें द्रोणांनीं मारलेला हा द्रुपदराज येथें पडला आहे! या द्रुपदाचें कमळाप्रमाणें पांढरें शुभ्र छत्र शरत्कालीन चंद्राप्रमाणें शोभत आहे. ह्या त्याच्या बायका व स्नुना त्याला जाळून, त्याला उजवी घालून जात आहेत. त्याचप्रमाणें द्रोणांनीं मारलेल्या चेदिपुंगव धृष्टकेतूला त्याच्या बायका घेऊन चालल्या आहेत. तसेंच ज्यानें रणामध्यें आपल्या बापाला मुळीं सोडलें नाहीं, त्या ह्या त्याच्या शूर मुलाचे द्रोणांनीं बाणांनीं तुकडे तुकडे केले आहेत पहा. तसाच माझ्या मुलाचे मागून जाणारा हा बाळ लक्ष्मण दुर्योधनाबरोबर मरून पडला आहे पहा. त्याचप्रमाणें वाऱ्यानें उमलून पाडलेल्या दोन झाडांप्रमाणें हे दोघे विंदानुविंद येथें मरून पडले आहेत! ज्याअर्थी भीष्म, द्रोण, कर्ण, कृप, दुर्योधन, अश्वत्थामा, जयद्रथ, सोमदत्त, विकर्ण व कृतवर्मा अशा देवांना देखील मारणाऱ्या शूर योद्ध्यांच्या हातून तुह्मी सुटून उलट ते मरून पडले आहेत तेव्हां हा कालाचा महिमा विलक्षण आहे. तूं जेव्हां तुझा उद्देश सफल न होतां उपप्लव्याला परत गेलास तेव्हांच माझे मुलगे मेले असें मीं समजलें. तेवेळींच आपल्या मुलाचे लाड पुरवूं नकोस असें भीष्मांनीं व विदुरांनीं मला सांगितलें. त्यांचें भाकीत खोटें होणारें नव्हे ह्मणूनच पुढें लवकरच माझे मुलगे राखेला मिळाले आहेत.' असें ह्मणून पुत्रशोकानें धैर्य सुटून व मूर्च्छा येऊन ती खालीं पडली. पुढें सावध होऊन मन अगदीं स्तब्ध झाल्यावर ती कृष्णाला दोष देऊं लागली. ती ह्मणाली, 'कृष्णा, तुझ्या अंगांत सामर्थ्य असून तुझ्याजवळ नोकरमाणसें व सैन्यही पुष्कळ असतां, पांडवकौरवांचा नाश तूं तिऱ्हाइताप्रमाणें कसा पहात राहिलास ? पतिसेवेनें जें कांहीं तप मीं सांठविलें आहे, त्या दुर्मिळ तपानें मी तुला शाप देतें कीं, 'ज्याअर्थीं कौरवपांडव परस्परांशीं मारीत असतां तूं तें डोळे मिटून पहात राहिलास त्या अर्थीं तुझी ज्ञाती तुझ्या हातून मरेल. आजपासून छत्तिसाव्या वर्षी ज्ञाती, अमात्य, मुलगे सर्व मरून वनामध्यें अनाथाप्रमाणें कोणाला न कळत व कोणी लक्ष न देतां निंद्य रीतीनें तुला मरण येईल, व या भरतस्त्रियांना आतां ज्याप्रमाणें दुःख होत आहे त्याप्रमाणें ज्ञाती व बांधव मरून तुझ्या बायकांनाही दुःख होईल.' हे तिचे भयंकर शब्द ऐकून श्रीकृष्ण किंचित् हासल्यासारखें करून ह्मणाला, 'माझ्या शिवाय या जगामध्यें वृष्णिकुलाचा फडशा पाडणारा कोणी नाहीं हें मी जाणतों. आणि ती गोष्ट कशी शेवटास न्यावी या विचारांत मी असतां हा तुझा शाप त्या गोष्टीला साधनच झाला आहे. वृष्णिकुलाचा कोणाच्याही हातून नाश व्हावयाचा नाहीं. यादव एकमेकांनाच मारून मरून पडतील.' श्रीकृष्ण याप्रमाणें बोलला असतां पांडव गांगरून जाऊन निराश झाले.

---

## ८० श्राद्धक्रिया व स्त्रियांना शाप.
### (११. २६–२७)

नंतर श्रीकृष्ण गांधारीला फिरून ह्मणाला, उगीच शोकामध्यें मन घालूं नकोस. तुझ्याच अपराधानें हे कौरव मेले आहेत. दुसऱ्याची ईर्षा करणारा, मोठा अभिमानी व मोठा दुष्ट अशा दुर्योधनाचें दुष्कृत्य तुला बरें वाटलें; त्याच्या दोषाबद्दल तूं जबाबदार आहेस. असें असून तू मला दोष कां ह्मणून देतेस ? मेलेल्या संबंधानें ह्मणा किंवा नष्ट झालेल्या संबंधानें ह्मणा, गत गोष्टीचा जो शोक करतो तो त्या दुःखानें पहिल्या दुःखाला भर घालून दुहेरी संकट आपल्यावर ओढून घेतो. ब्राह्मणस्त्री तपस्वी मुलगा व्हावा ह्मणून गर्भ धारण करते, गाय मानेवर जूं घेणाऱ्यासाठीं करते, घोडी धांवणाऱ्या आपत्यासाठीं करते, शूद्रस्त्री गुलाम निपजविण्या-

साठीं करते, वैश्यस्त्री गुराख्यांसाठीं करते, त्याप्रमाणें क्षत्रियस्त्री रणांत मरणाऱ्या मुलासाठीं गर्भ धारण करते.' हें कृष्णाचें भाषण ऐकून गांधारी गप्प झाली. धृतराष्ट्रानें अज्ञानाचा पडदा बाजूला सारून धर्मराजाला, 'या रणांत मेले किती? जिवंत किती आहेत? व मेलेल्यांना गति काय मिळाली? हें सांग,' ह्मणून विचारिलें. तेव्हां धर्मराज ह्मणाला, 'एक अब्ज, सहासष्ट कोटी, वीस हजार लोक मेले. ज्यांच्या संबंधानें कांहीं मागमूस नाहीं असे चोवीस हजार एकशें पासष्ट लोक आहेत. या मेल्यांपैकीं ज्यांनीं मोठ्या आनंदानें या घोर रणामध्यें आपली आहुती दिली आहे ते इंद्रलोकाला गेले आहेत. जे आतां मरण टळत नाहीं ह्मणून निरुपायानें मेले आहेत ते गंधर्वांचे सोबती झाले आहेत; जे रणांगणांतून तोंड फिरवून परतले असतां किंवा जीव वांचविण्यासाठीं शत्रूला तोंड पसरीत असतां शत्रूच्या शस्त्रानें मेले आहेत ते गुह्यकांकडे गेले आहेत. जे थोर शत्रूंना कापून काढीत असतांना क्षत्रियांच्या कर्तव्याला जागून लढाईंतून परतणें ही शरमेची गोष्ट समजून हातांत शस्त्रें नसतांना सुद्धां शत्रुवर चालून जाऊन शस्त्रानें मेले आहेत त्यांना ब्रह्मलोक मिळाले आहेत. दुसरे जे कोणी या रणामध्यें कसेबसे मेले आहेत ते उत्तरकुरूला गेले आहेत.' यावर 'हें सर्व ज्ञान तुला कशानें झालें,' ह्मणून धृतराष्ट्रानें विचारलें असतां धर्मराज ह्मणाला, 'आपल्या आज्ञेनें मी पूर्वीं वनांत फिरत असतां देवऋषि लोमशांची व माझी गांठ पडली व त्यांच्या प्रसादानें दिव्य चक्षु मिळून मला हें ज्ञान मिळालें आहे.' नंतर धृतराष्ट्र ह्मणाला, 'येथें जे अनाथ, त्याचप्रमाणें सनाथ मरून पडले आहेत त्यांना अग्नि तूं देणार किंवा कसे? ज्यांना कोणी क्रिया करणार नाहीं किंवा ज्यांचा अग्निहोत्राचा अग्नि नाहीं त्यांच्यासंबंधानें काय करावयाचें? आह्मीं कोणाची उत्तरक्रिया करावी? येथें पुष्कळ करावयाचें असल्यामुळें मी तुला हें विचारतों. ज्यांचीं धडें गिधाडें व पक्षी ओढून नेत आहेत त्यांना त्यांच्या कर्मानेंच उत्तम गति मिळेल किंवा नाहीं?' हें धृतराष्ट्राचें भाषण ऐकून युधिष्ठिरानें, बुद्धिशाली विदुर, युयुत्सु, इंद्रसेन व प्रमुख नोकर यांना सांगितलें कीं, 'तुह्मी जाऊन अनाथाप्रमाणें कोणतेंही धड नष्ट होणार नाहीं अशा रीतीनें सर्वांचे प्रेतसंस्कार यथाविधि करा.' याप्रमाणें धर्मराजाची आज्ञा झाल्यावर त्यांनीं चंदन, अगरू, दारुहळद, तूप, तेल, सुगंधी पदार्थ, रेशमी व दुसरीं मोठमोठीं उंची वस्त्रें व लांकडांचे ढीग आणवून मोडलेल्या रथांचे तुकडे व मोडून पडलेलीं निरनिराळीं हत्यारें यांच्या योगानें मोठ्या श्रमानें चिता रचून दुर्योधन, धृष्टद्युम्न, विराट, कर्णप्रभृति सर्व राजांना चितेवर ठेवून तुपाच्या धारा ओतून अग्नि पेटवून, त्यांना जाळलें. कांहीं थोरांचे पितृमेध सुरू होऊन व त्या ठिकाणीं सामगायन सुरू झालें. सामांच्या ऋचांचा स्वर त्याचप्रमाणें स्त्रियांचें रडणें यामुळें त्या रात्रीं सर्व प्राणिमात्रांना एक प्रकारचें औदासीन्य आलें होतें. अगदीं धूर न होतां पेट घेतलेल्या त्या चिता विस्कलित ढगांनीं आच्छादित आकाशामधील ग्रहाप्रमाणें दिसत होत्या. त्या ठिकाणीं जे नाना देशाहून आलेले अनाथ मरून पडले होते त्या सर्वांचे हजारों ढीग करून लांकडांच्या राशीवर तेल ओतून त्यांना विदुरांनीं जाळून काढलें. कुरुराज, युधिष्ठिर त्या सर्वांची क्रिया करवून धृतराष्ट्राच्या मागून गंगेकडे निघाला.

पवित्र अशा त्या गंगेच्या पाण्याजवळ आल्यावर दागिने, वस्त्रें, वेष्टनें सर्व खालीं काढून ठेवून बाप, भाऊ, नातू, स्वजन, मुलगे, नवरे, थोर थोर लोक व सुहृद् या सर्वांना बायकांनीं फार कष्टी होऊन रडत पाणी दिलें. या वीर स्त्रिया त्या वीरांना पाणी देत असतां गंगा वाढून तिचें पाणी सहज हातीं येण्यासारखें झालें. समुद्राच्या तीराप्रमाणें वीरपत्न्यांनीं भरलेला तो गंगेचा तीर निरानंद व उत्साहशून्य दिसत होता. ते वेळीं शोकाकुल झालेली कुंती रडतच हळूच आपल्या मुलांना ह्मणाली कीं, 'ज्या त्या रथयोद्ध्यांमध्यें श्रेष्ठ महाधनुर्धारी वीराला रणांत अर्जुनानें मारिलें, दुर्योधनाचें सैन्य मागें घेऊन तुह्मा सर्वांशीं युद्ध करीत असतां रणामध्यें जो सूर्याप्रमाणें झळकत होता, ज्याच्यासारखा वीर त्या पृथ्वीवर नाहीं व ज्या वीरानें प्राणाची देखील पर्वा न करतां यशाची चाड धरली

त्या रणांतून पाय मागें न घेणाऱ्या कर्णाला पाणी द्या. त्याला राधेचा मुलगा समजूं नका. सूर्यापासून मला झालेला तो तुमचा वडील भाऊ आहे.' असें सांगून तिनें सर्व पूर्ववृत्तांत त्यांना कळविला. तेव्हां युधिष्ठिराला फार दुःख झालें. 'वस्त्रांत झांकून ठेवलेल्या अग्नीप्रमाणें हें तूं कसें झांकून ठेवलेंस ? तूं हें झांकून ठेवल्यानें आमचा घात झाला. अभिमन्यूच्या, द्रौपदीच्या मुलांच्या किंवा द्रुपद, धृष्टद्युम्न प्रभृति पांचालांच्या मरण्यानें किंवा कुरूंच्या नाशानें जें मला दुःख झालें आहे त्याहून शतपट मला कर्णाच्या मरणानें दुःख होत आहे. अग्नि लागल्याप्रमाणें माझ्या शरीराचा भडका उडाला आहे. हें आधीं कळलें असतें तर आह्मांला कशाचीच उणीव पडली नसती. व कौरवांचा फडशा पाडणारी ही घोर कचलही झाली नसती.' असा पुष्कळ शोक करून रडत रडतच त्यानें त्याला पाणी दिलें. त्या ठिकाणीं ज्या स्त्रिया जमल्या होत्या त्यांमध्यें एकच हाहो उडून राहिला. पुढें युधिष्ठिरानें बंधुप्रेमानें कर्णाच्या बायकांना जवळ घेऊन त्याचा पुढील प्रेतविधि विधिपूर्वक केला. माझे हातून वडील भावाचा असा नाश झाला आहे तेव्हां यापुढें स्त्रियांच्या मनांत गोप्य कांहीं राहणार नाहीं; असा शाप देऊन पाणी देण्याचें काम उरकल्यावर तो आपल्या भावांसह गंगेतून वर आला.

# १२ शांतिपर्व.

## राजधर्म.

### ८१ युधिष्ठिराचा मनस्ताप व कर्णशाप वृत्तांत ( १२. १–५ )

सर्व आप्तांना तीळपाणी दिल्यावर पांडव, विदुर, धृतराष्ट्र सर्व भरतस्त्रियांसह एक महिनाभर अशौच पाळून नगराबाहेर राहिले. या ठिकाणीं व्यास, नारद, देवल, देवस्थान कण्व व दुसरे पुष्कळ विद्वान व आचारसंपन्न ब्राह्मण त्याचप्रमाणें गृहस्थ, स्नातक त्याला भेटण्याकरितां त्याजकडे आले. त्या समयाला उचित असा सत्कार घेऊन पुण्यकारक अशा भागीरथीच्या तीरीं त्याच्या भोंवतीं यथान्यायानें आसनावर बसल्यावर शोकानें व्याकुळ झालेल्या त्या धर्मराजाचें त्यांनीं समाधान केलें.

नंतर व्यासादिकांचा विचार घेऊन नारद त्याला ह्मणाले, 'युधिष्ठिरा, तूं आपल्या बाहुवीर्यानें व श्रीकृष्णाच्या कृपेनें न्यायानें ही संपूर्ण पृथ्वी जिंकून थरकांप उत्पन्न करणाऱ्या या रणप्रसंगांतून पार पडलास हें ठीक झालें. क्षात्रधर्मामध्यें दक्ष राहून शत्रूंचा नाश केल्यानें तुला बरें वाटत आहेना ? हें वैभव मिळवून तुझ्या मनाला शोक होत नाहींना?' युधिष्ठिर ह्मणाला, 'कृष्णाच्या बाहुबलाचा आश्रय करून ब्राह्मणांच्या प्रसादानें व भीमार्जुनांच्या बलानें ही संपूर्ण पृथ्वी जिंकली खरी, परंतु माझ्या मनाला सर्वकाळ फार दुःख होत असून मोठ्या लोभानें ज्ञातीचा क्षय करवून व अभिमन्यूला व द्रौपदीच्या मुलांना मारवून हा जो मला जय मिळाला तो केवळ मला अपजयाप्रमाणेंच वाटत आहे. येथून श्रीकृष्ण परत द्वारकेला गेल्यावर तेथें असणारी माझी सून उत्तरा त्याला काय ह्मणेल ? जिचे मुलगे व आप्तबांधव मेले आहेत अशा त्या आमच्या हितामध्यें दक्ष असणाऱ्या दीन द्रौपदीला पाहून पूर्वीप्रमाणेंच अद्यापिही माझ्या मनाला त्रास

होत आहे. शिवाय कुंतीनें एक गोष्ट गुप्त ठेवून माझ्या मनाला डागणी लावून दिली आहे. ज्याला हजार हत्तींचें बल, ज्याच्या तोडीचा रथी या जगांत सांपडणार नाहीं, ज्याची बुद्धि विशाल व गति सिंहासारखी, जो दयाळु, दानशील व नियमसंपन्न असून मानी धार्तराष्ट्रांना आधारभूत होता, ज्याचा पराक्रम अचाट व जो मोठा तापट असून प्रत्येक रणप्रसंगांत चवताळून शत्रूला तोंड देत असे, व ज्याचें अस्त्रलाघव विलक्षण असून ज्याला नाना प्रकारच्या युद्धकला माहीत होत्या, तो कर्ण सूर्यापासून गुप्त रीतीनें झालेला आपला मुलगा, व त्याला आपण पेटाऱ्यांत घालून गंगेच्या प्रवाहांत सोडून दिला असतां पुढें लोक ह्याला सुतपुत्र मानूं लागले, ही गोष्ट कुंतीनें मला तिळांजळी देण्याचे वेळीं सांगितली! राज्यलोभानें मी त्याचा भाऊ असून त्याच्या मरणाला कारण झालों ही गोष्ट अग्नीनें ज्याप्रमाणें कापसाच्या राशीला जाळून भस्म करावें त्याप्रमाणें माझीं सर्व गात्रें जाळीत आहे. पार्थालाही तो आपला भाऊ आहे ही गोष्ट ठाऊक नव्हती. तूं माझा मुलगा आहेस असें सांगून आमच्याशीं सख्य करविण्याच्या हेतूनें त्याच्याकडे कुंती गेली होती असें आह्मांला आतां कळतें. त्या महात्म्यानें तिच्या ह्मणण्याला रुकार दिला नाहीं, आणि तो तिला मागून असें ह्मणाल्याचें आमच्या ऐकण्यांत आहे कीं, ‘ रणामध्यें दुर्योधनाला सोडणें ही गोष्ट कालत्रयीं माझे हातून घडणार नाहीं. त्यामुळें नीचपणा, दुष्टपणा व कृतघ्नपणा माझ्या पदरीं येईल. तुझ्या ह्मणण्यावरून जर मीं युधिष्ठिराशीं सख्य करीन तर रणांत अर्जुनाला भ्याला असें माझ्यासंबंधानें लोक समजतील. म्हणून मी श्रीकृष्णासह अर्जुनाला युद्धांत जिंकून मग मागून धर्मराजाबरोबर सख्य करीन. ’ त्याला कुंती फिरून चौघांसंबंधानें तरी अभय दे आणि मग तुला वाटेल तर अर्जुनाशीं युद्ध कर असें ह्मणाली असतां थरथर कांपत उभी असलेल्या मातेला तो बुद्धिशाली हात जोडून ह्मणाला, ‘ ते चौघे माझ्या तावडींत आले असतांही त्यांना मी मारणार नाहीं. तुला पांच मुलगे खास राहतील. मग ते कर्ण मरून अर्जुनासकट असोत किंवा अर्जुन मरून कर्णासकट असोत. ’ त्या आमच्या वडील भावाला अर्जुनानें मारिलें. कुंतीनें अथवा त्यानें ही गोष्ट कधीं फोडली नाहीं. म्हणून भावाला मारविणाऱ्याच्या माझ्या हृदयाला तीव्र वेदना होत आहेत. कर्णार्जुनाच्या साहाय्यानें मीं प्रत्यक्ष इंद्राला देखील जिंकलें असतें. धृतराष्ट्राचे दुष्ट मुलगे सभेमध्यें मला टोंचून काढीत असतां त्या वेळीं उत्पन्न होणारा राग कर्णाला पाहून शमत असे. द्यूताचे वेळीं दुर्योधनाला बरें वाटावें म्हणून हा जेव्हां आह्मांला कटु व निष्ठुर बोलत असे, तेव्हां त्यामुळें येणारा राग याच्या पायांकडे पाहून नाहींसा होत असे. कर्णाचे पाय कुंतीच्या पायांसारखे आहेत असें मला वाटे. परंतु ते सारखे असण्याला कारण काय असावें, म्हणून विचार करूं लागलों असतां मला कांहीं कारण मात्र दिसेना. युद्धाचे वेळीं त्याचें चाक पृथ्वीनें कसें गिळलें, त्याला शाप कसा झाला, हेंही मला कळल्यासारखेंच आहे. या बाबतींतील देव गुह्य असें असल्याचें कळतें. शस्त्रानें मरण येऊन पवित्र होऊन क्षत्रिय स्वर्गाला कसें जातील हा विचार पडून देवांनीं वैराग्नि चेतविणारा हा कुमारिकेच्या पोटीं गर्भ निर्माण केला. हा बाल असतांच सूताचा मुलगा झाला. द्रोणाचार्यांपासून हा धनुर्विद्या शिकला. लहानपणींच याचें दुर्योधनाशीं सख्य जुळून दैवाच्या नियमानियमानें व अंगस्वभावामुळें हा आमचा नेहमीं द्वेष करूं लागला. पुढें धनुर्विद्येंत अर्जुनाला आपणाहून वरचढ पाहून द्रोणाचार्यांची एकांतांत गांठ घेऊन ब्रह्मास्त्राचें गूढ व तें परत फिरविण्याची विद्या आपल्याला शिकविण्यास त्यानें त्यांची विनंति केली. तेव्हां अर्जुनावर त्यांचें अधिक प्रेम असल्यामुळें व कर्णाचा दुष्ट स्वभाव त्यांना ठाऊक असल्यामुळें, ‘ योग्य व्रताचरण केलेल्या ब्राह्मणाला किंवा तप केलेल्या क्षत्रियालाच ब्रह्मास्त्र येणें शक्य आहे,’ असें द्रोण त्याला ह्मणाले. हें ऐकून एकदम कर्ण महेंद्रपर्वतावर परशुरामाकडे गेला व त्याचेजवळ मी ब्राह्मण आहें ह्मणून खोटें सांगून त्यापासून सर्व अस्त्रांचें ज्ञान त्यानें संपादन केलें. तेथें एके वेळीं आश्रमाजवळच समुद्रतीरावर हातांत तलवार घेऊन एकटा फिरत असतां अग्निहोत्रामध्यें गढलेल्या कोणाएका ब्राह्मणाची होमाची गाय यानें स-

हज चुकून मारली. तेव्हां रागानें त्याचा धिक्कार करून ह्या तुझ्या कर्माचें फळ तुला मिळेल; ज्याच्याशीं चढाओढ धरून ही तुझी खटपट चालली आहे त्याच्याशीं तुझें युद्ध होत असतां भूमि तुझें चाक गिळील तें तूं वर काढण्यांत गुंतलास ह्मणजे ज्याप्रमाणें मस्तीमध्यें तूं या गाईला मारलेंस त्याप्रमाणें तुझा शत्रु तुझें डोकें उडवील. असा त्या ब्राह्मणानें त्याला शाप दिला. आश्रमाकडे परत आल्यावर त्याच्या बाहुवीर्यानें, त्याच्या भक्तीनें, त्याच्या मनोनिग्राहानें व त्याच्या गुरुशुश्रुषेनें परशुराम फारच संतुष्ट झाले असल्यानें निवर्तनासह संपूर्ण ब्रह्मास्त्र यथाशास्त्र त्यांनीं त्याला सांगितलें. याप्रमाणें तें अस्त्र मिळवून कर्ण त्या आश्रमामध्यें मोठ्या आनंदानें धनुर्विद्येंत परिश्रम करीत राहिला असतां कोणे एके वेळीं परशुराम कर्णासह आपल्या आश्रमाजवळ फिरत असतां उपवासानें थकून गेल्यामुळें विश्वासानें उत्पन्न झालेल्या प्रेमामुळें कर्णाच्या मांडीवर डोकें ठेवून निजले. इतक्यांत श्लेष्मा, चर्बी, मांस व रक्त यावर राहणारा चावून वेदना उत्पन्न करणारा एक भयंकर किडा कर्णाच्या जवळ येऊन त्यानें त्याची मांडी फोडली. गुरु जागे होतील या भीतीनें कर्णाला त्याला हाकलतां किंवा मारतां येईना, ह्मणून त्यानें त्याकडे दुर्लक्ष करून ती असह्य वेदना मोठ्या धैर्यानें सहन केली; व तो अगदीं न हालतां व न डगतां त्याचें डोकें मांडीवर घेऊन बसला. पुढें याच्या त्या रक्ताचा स्पर्श होतांच परशुराम जागे होऊन त्यांनीं सर्व खरी हकीकत कर्णाला विचारली. तेव्हां कर्णानें झालेली हकीकत त्यांना सांगितली. परशुरामांनीं आठ पाय तीक्ष्ण दाढा, सर्व अंगावर रांठ केंस असलेल्या अलर्क नांवाच्या डुकराच्या आकाराच्या त्या किड्याला पाहिल्याबरोबर तो किडा प्राण सोडून त्याच रक्तांत मिळून गेला. नंतर लाल मानेचा काळाकभिन्न असा एक विकाळ राक्षस आकाशामध्यें ढगांवर वसलेला त्यांना दिसला. तेव्हां परशुरामांनीं त्याची हकीकत विचारल्यावरून तो ह्मणाला, ‘ पूर्वी मीं दंश नांवाचा मोठा असुर होतों. कृतयुगामध्यें भृगु व मीं समवयस्क असतां भृगूंची आवडती बायको मीं उपटून नेली; त्या महर्षीच्या शापानें मी मूत्र श्लेष्मा खाऊन राहणारा किडा होऊन खालीं पडलों. त्या शापाची मुक्ति आपल्यापासून होणार होती, ह्मणून आज आपला समागम होऊन त्या निंद्य योनीपासून मुक्त झालों आहें. ’ असें ह्मणून त्यांना नमस्कार करून तो निघून गेल्यावर परशुराम रागानें कर्णाला ह्मणाले, ‘ मूर्खा, ही असह्य वेदना ब्राह्मणाच्या हातून सहन झाली नसती, तुझें धैर्य क्षत्रियासारखें दिसतें. तेव्हां खरें काय आहे तें सांग. ’ तेव्हां शापाला भिऊन काकुळतीला येऊन कर्ण ह्मणाला, ‘ ब्राह्मण व क्षत्रिय यांचेमध्यें सूत कुलांत माझा जन्म आहे. मला लोक राधापुत्र कर्ण ह्मणतात. अस्त्रविद्या मिळविण्याची मला फार आशा सुटल्यामुळें माझ्या हातून अपराध घडला, कृपा करा. वेद व विद्या देणारा गुरु पिता आहे ह्यांत संदेह नाहीं. ह्मणून मी आपल्या जवळ भार्गव ह्मणून आपलें गोत्र सांगितलें. ’ असें ह्मणून हात जोडून कांपत कांपत भूमीवर साष्टांग घालून पडलेल्या कर्णाला परशुराम रागानें पण हासूनच ह्मणाले, ‘ ज्या अर्थी अस्त्राच्या लोभानें तूं माझ्याशीं खोटेपणानें वागला आहेस त्या अर्थी या ब्रह्मास्त्राची आपल्या तोडीच्याशीं युद्ध करतांना तुझा मरण काळ आला असतां तुला आठवण राहणार नाहीं. कारण, हें ब्रह्मास्त्र जो ब्राह्मण नाहीं त्याचे ठिकाणीं कधीं राहणार नाहीं. आतां जा, खोट्याला या ठिकाणीं आश्रय नाहीं. मात्र युद्धामध्यें तुझ्या तोडीचा कोणी क्षत्रिय होणार नाहीं. ’ याप्रमाणें परशराम बोलल्यावर त्यांचा यथायोग्य निरोप घेऊन दुर्योधनाकडे येऊन आपण अस्त्रविद्या संपादन केल्याचें त्यानें त्याला कळविलें. याप्रमाणें परशुरामांपासून अस्त्र मिळवून कर्ण दुर्योधनाबरोबर सुखांत राहिला असतां कलिंग देशांतील चित्रांगद राजाच्या राजपूर नगरामध्यें चारी दिशांकडून शेंकडों राजे स्वयंवरासाठीं जमले होते. ती बातमी दुर्योधनाला कळून तो कर्णासह त्या स्वयंवराच्या महोत्सवासाठीं तेथें गेला. स्वयंवराचे वेळीं सभेमध्यें नवरीमुलगी दुर्योधनाला टाकून पुढें गेली. तें दुर्योधनाला सहन न होऊन इतर राजांची पर्वा न करतां सामर्थ्य व ताठा यांच्या मदांत व भीष्मद्रोणांच्या जोरावर तो तिला रथांत बसवून घेऊन चालला. कर्णही बाहुवेष्टण

व पंजा घालून हातांत तलवार घेऊन रथांतून त्याचे मागून निघाला. ते वेळीं कोणी राजे अंगांत चिलखत चढवूं लागले, कोणी रथ जोडूं लागले आणि त्वेषानें कर्ण दुर्योधनावर तुटून पडून त्यांच्यावर बाणांचा वर्षाव करूं लागले. तेव्हां कोणाचें धनुष्य मोडून तर कोणाचे सारथी मारून कर्णानें चलाखीनें सर्वांना जिंकिलें. तेव्हां ते सर्व हिरमोड होऊन 'त्राही, त्राही' ह्मणत स्वतःच आपले घोडे हाकीत रणांतून परत फिरले. इकडे दुर्योधन कर्णाच्या पाठबळानें त्या मुलीला घेऊन हास्तिनापुराला आला. कर्णानें याप्रमाणें पराक्रम गाजविलेला ऐकून, जरासंधानें द्वंद्वयुद्धासाठीं त्याला बोलाविलें. ते वेळीं जरेनें जोडलेला जरासंधाचा सांधा कर्णानें मोडलेला पाहून वैर सोडून देऊन प्रेमानें जरासंधानें कर्णाला अंगदेशामध्यें मालिनी नगर दिलें. तेथें तो निर्वैर राज्य करून दुर्योधनाच्या अनुमतानें चंपानगरीचेंही पालन करूं लागला. ह्याप्रमाणें शस्त्राच्या प्रतापानें तो पृथ्वीवर पुढें आला असतां आमच्या कल्याणासाठीं इंद्रानें त्याजपाशीं कवच कुंडलें मागितलीं. त्यानेंही देवमायेनें मोह पडून तीं दिव्य अशीं परम पूज्य अंगचीं कवचकुंडलें त्याला दिलीं. याप्रमाणें त्यांना मुकल्यामुळें, ब्राह्मणाच्या व परशुरामाच्या शापांमुळें, कुंतीला त्यानें देऊन चुकलेल्या वरामुळें, इंद्राच्या मायेनें, रथी व अतिरथी यांच्या गणनेच्या वेळीं याला अर्धरथी ह्मणून भीष्मांनीं याचा अवमान केल्यामुळें, शल्यानें याचा तेजोभंग केल्यामुळें व श्रीकृष्ण परमात्म्याच्या नीतीमुळें अर्जुनानें रुद्र, इंद्र, यम, वरुण, कुबेर, द्रोण व कृप यांच्यापासून सर्व दिव्य अस्त्रें मिळवून या सूर्यासारख्या तेजस्वी कर्णाला युद्धांत मारिलें. ही सर्व हकीकत आतां माझ्या कानावर आली आहे.

---

## ८२ युधिष्ठिराचा शोक व स्त्रीशाप.
## (१२. ६—७)

याप्रमाणें युधिष्ठिर शोकानें व्याकुळ होऊन चिंतेंत मग्न झाला असतां त्याची ती दीन व केविलवाणी स्थिति पाहून कुंती कष्टी होऊन मधुर शब्दांनीं प्रसंगाला उचित असें त्याला ह्मणाली, 'बा युधिष्ठिरा, याच्या संबंधानें शोक करूं नकोस. शोक टाकून मी सांगतें तें ऐक. तुझ्यासंबंधीं भावाचें कर्तव्य त्याला समजविण्यासाठीं मी त्याचप्रमाणें प्रत्यक्ष सूर्यनारायण पूर्वीं पुष्कळ खटपट करून चुकलों. कल्याण इच्छिणाऱ्या जिव्हाळ्याच्या मनुष्यानें हितासाठीं जें काय सांगावें तें सूर्यनारायणानें स्वप्नामध्यें त्याचप्रमाणें माझ्या समक्ष त्याला सांगितलें. परंतु ममत्वानें किंवा युक्तीनें त्याला किंवा मला कर्णाची समजी घालून तुझ्याशीं सख्य करून देतां आलें नाहीं. पुढें काळ फिरल्यामुळें वैर उकरून काढण्यांतच त्याला गढलेला पाहून तो तुमच्या उलटच जाणार असें समजून मीं त्याजकडे दुर्लक्ष केलें. तें तिचें भाषण ऐकून डोळे पाण्यांनीं भरून येऊन 'तूं हें गुप्त ठेवल्यामुळें मला हा त्रास होत आहे. करितां **या जगांत बायकांच्या तोंडांत कांहीं गुप्त गोष्ट राहणार नाहीं.'** असा त्यानें तिला शाप दिला. त्या महात्म्याला युद्धांत मेलेल्या बांधवांची व महारथ कर्णाची फिरून फिरून आठवण होऊन दुःख अनावर झालें. शोकानें दीर्घोच्छ्वास टाकीत तो अर्जुनाला ह्मणाला, 'वृष्णी व अंधक यांच्या नगरांत आह्मी भिक्षा मागत राहिलों असतों तर ही ज्ञातिक्षयापासून झालेली दुर्गति आह्मांला आली नसती. आमचे शत्रू कौरवच भाग्यवान् असून त्यांनींच जिंकिलें. आपलाच आपण घात करून आह्मांला धर्माचें फळ काय मिळणार? ह्या क्षत्रियाच्या आचाराला, बलाला, पराक्रमाला व रागाला धिक्कार असो. यांच्याच पायीं हा प्रसंग आमच्यावर ओढवला. अरण्यवाश्यांना सहज अशी क्षमा, इंद्रियनिग्रह, शुद्धता, वैराग्य, निर्मत्सरता, अहिंसा, सत्यभाषण हेच गुण उत्तम. आह्मी आढ्यता व मान यांमुळें राज्याचे आशेला लागून या दशेला येऊन मिळालों. आमचे बांधव मेल्यामुळें, त्रैलोक्याचें राज्य देऊन सुद्धां कोणाच्यानें आह्मांला आनंद देववणार नाहीं.

ज्यांना मारूं नये अशा राजांना पृथ्वीसाठीं मारून, आपल्या बांधवांना मुकून जीवितहेतु कांहीं न उरतां आह्मी प्राण धरून आहों. मांसाच्या तुकड्यासाठीं धडपडणाऱ्या कुत्र्यांप्रमाणें अमंगळ आ-

मिषाची आह्मीं आशा धरली; व त्याच्या दुष्परिणामामुळें तें आह्मांला नकोसेंही झालें आहे. बाप, तपानें, ब्रह्मचर्यानें, सत्यानें व शांतीनें राहून सर्वगुणसंपन्न अशा मुलांची इच्छा करतात त्याचप्रमाणें आयांना उपवास, पूजा, व्रत, उत्सव व मंगलकार्यें यांच्या योगानें गर्भ राहतो. दहा महिने त्याला पोटांत बाळगतात. आणि मुलें सुरक्षित निपजतील काय ? तशीं निपजलीं तरी पुढें जगतील काय ? बलशाली निपजून मानमान्यता मिळवतील काय ? इहपर लोकीं आह्मांला सुख देतील काय ? ह्मणून केविलवाणें आशाळू होऊन राहतात. त्यांची ती खटपट आज केवळ निष्फळ झाली आहे. कारण त्यांचे मुलगे पृथ्वीवर कांहीं भोग न भोगतां व देवांचें व पितरांचें ऋण न फेडतां मरून यमलोकाला गेले आहेत. यांच्या आईबापांचीं त्यांच्याकडून संपत्ति व सुख मिळण्याची आशा विफळ झाली आहे. व आशा, द्वेष इत्यादि विकारांनीं ते वेडे बनले असल्यामुळें, त्यांना कोठें व कशाही प्रकारचें जयफल मिळणें नाहीं.

आह्मीच या सर्व लोकांच्या विनाशाला कारण समजले जातों. परंतु तें सर्व पाप धृतराष्ट्राच्या मुलांच्या माथीं लागणार आहे. नेहमीं कपटबुद्धि धरून आह्मीं कांहीं अपराध केला नसून आमचा द्वेष करणारा दुर्योधन आमच्याशीं खोटेपणानें वागत आला. आमचें वैभव त्याला दुःसह झालें. भीष्म किंवा विदुर यांच्या बोलण्याकडे दुर्लक्ष करून पुत्रप्रेमानें धृतराष्ट्रही अन्यायानें त्याच्या बोलण्यास रुकार देत गेला. त्यामुळें माझ्याप्रमाणेंच राजाही सपशेल बुडाला आहे. पापबुद्धि सुयोधन आपल्या भावांना रक्तानें माखून व ह्या वृद्ध मातापितरांना शोकाग्नीमध्यें टाकून विमल यशाला मुकला आहे. त्या मूढानें आमच्यांशीं वैर बांधल्यामुळेंच ह्या कुळाचा समूळ नाश झाला आहे. ज्यांना मारूं नये अशांना मारून आह्मी लोकांमध्यें आज निंदेला पात्र झालों आहों. कुलाचा अंत करणाऱ्या या दुर्बुद्धी पाप्याला राजा करून आज धृतराष्ट्र रडत बसला आहे. शूरांचा नाश झाला, हातून महत्पापें घडलीं आणि शेवटीं आमिषही गेलें. शत्रूंना मारून राग गेला, पण शोकानें अगदीं मला घेरून टाकलें आहे. अर्जुना, कृतपाप कांहीं चांगलें कर्म केल्यानें, अर्थात तें सांगून टाकल्यानें, पश्चात्तापानें, दानानें, तपानें, सर्वसंग सोडल्यानें, तीर्थाला गेल्यानें आणि श्रुतिस्मृतीवर विचार करीत राहिल्यानें दूर होतें. या सर्वांमध्यें देखील सर्व त्यागानेंच फिरून पाप घडण्याची भीति न उरतां जन्ममरणाचा फेरा चुकतो; व मोक्षाची वाट सांपडून तिकडेच लक्ष लागून ब्रह्मप्राप्ति होते. ह्मणून हे अर्जुना, सुखदुःखादि द्वंद्वें सोडून, ज्ञान मिळवून, मौनव्रत धरून मी तुमच्या सर्वांच्या सल्ल्यानें वनाला जातों. संसारांत पडलेल्यांना पूर्ण धर्म प्राप्त होणें शक्य नाहीं असें श्रुतिवचन आहे, आणि त्याचा मला प्रत्यक्ष अनुभवही आला आहे. ऐहिकसुखाच्या मागें लागून माझ्या हातून जन्ममृत्यूच्या फेऱ्यांत घालणारें पाप घडलें आहे. ह्मणून हा पाश, त्याचप्रमाणें हें राज्य व सुख सोडून, शोक व माया टाकून निःसंग होऊन मी वनाला जातों. निष्कंटक व निर्द्वंद्व झालेली ही पृथ्वी तूं सांभाळ. मला राज्य वगैरे कांहीं नको. ’ असें ह्मणून तो गप्प झाला.

---

## ८३ संन्यास व गृहस्थाश्रम. (१२.८–१३)

हें भाषण आपल्यालाच लागून आहे असें समजून तें सहन न झाल्यामुळें बोलण्यांत मोठा पटाईत असा अर्जुन रागानें ओंठ चावीत पण हांसत हांसतच ह्मणाला, ‘ केवढी तरी ही दुःखाची गोष्ट ! कसला हा प्रसंग ! कसला हा अविचार, कीं एवढें अचाट कृत्य करून मिळविलेलें हें वैभव सोडून देण्याला आपण तयार व्हावें. शत्रूंना मारून स्वधर्मानें ही पृथ्वी मिळविली असतां आपण हें सर्व केवळ मनाच्या कोतेपणामुळें सोडून देण्याला तयार झालां आहां. षंढाला किंवा दीर्घसूत्र्याला राज्य कोठलें ? असें होतें तर रागाच्या तावडींत जाऊन आपण राजांना मारलें तरी कशाला ? जो कोणाच्याही कर्मानें मिळालेले भोग न भोगतां केवळ भिक्षेवर उपजीविका करूं इच्छितो तो सर्व कल्याणाला मुकतो; आणि तो भिकारडा जगतामध्यें नांवालौकिकाला न चढतां पशुपुत्रांनाही आंचवतो. आपण हें झगझगीत राज्य सोडून चाल तर भिक्षापात्र हातांत

घेऊन निंद्य वृत्तीनें जगूं पाहणाऱ्या आपल्याला जन काय ह्मणेल? धर्मार्थादि सर्व व्यवसाय सोडून देऊन एकाद्या सामान्य जनाप्रमाणें भिक्षा मागण्याचे हे डोहाळे आपल्याला कां आठवले आहेत! आपण टाकल्यानें राज्यरूपी या आमिषाची दुष्ट लोक नासाडी उडवतील, त्याचें पाप आपल्याच माथीं बसणार आहे. निर्धन स्थितींत, हांतून पुष्कळ वाईट गोष्टी घडल्यामुळें 'निर्धनतेला धिक्कार असो, ती मुनींनाच योग्य आहे,' असें नहूषांनीं सांगितलें आहे. **ज्याला ह्या जगांत धर्म ह्मणतात तोही पैशापासूनच साधतो.** दरिद्री मनुष्य जरी जवळचा आप्त असला तरी लोक त्याचे दोष काढतात. **दारिद्र्य हें जगांत मोठें पाप आहे.** म्हणून आपण त्याचें उगीच गोडवें गाऊं नका. **पतिताप्रमाणेंच निर्धनाचीही लोक कींव करतात.** म्हणून ह्या दोहोंमध्यें मला कांहीं फरक दिसत नाहीं. पर्वतापासून निघणाऱ्या नद्यांप्रमाणेंच चोहों बाजूंनीं मिळवून वाढविलेल्या पैशानें सर्व क्रिया चालतात. **पैशापासूनच धर्म, काम, व स्वर्ग मिळत असून मनुष्याचा चरितार्थ सुद्धां पैशानेंच चालतो. ज्याचे जवळ पैसा नाहीं अशा मंदबुद्धि मनुष्याच्या सर्व क्रियांना उन्हाळ्यांतील ओढ्याप्रमाणें खंड पडतो. ज्याचे जवळ पैसा आहे त्यालाच मित्र मिळतात, त्यालाच बांधव मिळतात, तोच ह्या जगामध्यें खरा पुरुष आणि तोच पंडित. निर्धनाचे मनांतून एखादी गोष्ट करावयाची असल्यास ती त्याचे हातून पार पडत नाहीं. हत्तींनीं मोठमोठ्या हत्तींप्रमाणें पैशानें पैसा जोडतो.** पैशानेंच कूळ नांवालौकिकाला येतें, पैशानेंच धर्म वाढतो. निर्धनाला हा लोकही साधत नाहीं, परलोकही साधत नाहीं. ज्याचे जवळ पैसा नाहीं, ज्याचे जवळ गाई नाहींत, ज्याचे जवळ नौकर नाहींत, ज्या जवळ अतिथी येत नाहींत तोच खरोखर कृश होय. जो केवळ शरीरानें कृश आहे तो कृश समजावयाचा नाहीं. देवासुरांची स्थिति पहा. ज्ञातींच्या वधावांचून त्यांनीं दुसरें काय केलें आहे? दुसऱ्याचें हरण न करतां राजांनीं स्वधर्माचरण तरी कसें करावें? आणि वेदामध्यें तरी शहाण्यांनीं ह्याच निर्णय केला आहे. **नेहमीं तिन्ही वेद पठन करावें, शहाणें व्हावें आणि वाटेल त्या रीतीनें धन मिळवून मोठ्या प्रयत्नानें यज्ञ करावा. द्रोहबुद्धि धरूनच देवांनीं स्वर्गामध्यें जागा पटकाविली. द्रोहबुद्धि** आजपर्यंत कोणालाच सुटली नाहीं. ब्राह्मणांनीं वेद पढून, पढवून यज्ञ करून, करवून चांगला ह्मणून मिळविलेला सर्व पैसा तरी अपकारावांचून मिळाला असतो असें नाहीं. वेदांत असेंच सांगितलें असून देवही असेच वागत आले. राजे झाले तरी पृथ्वी अशीच जिंकतात व नंतर वडिलाच्या मालमत्तेवर हक्क सांगणाऱ्या मुलांप्रमाणें तिजवर आपला हक्क सांगतात. व अशा प्रकारचा उत्कृष्ट राजधर्म पाळून राजर्षी बनून स्वर्गाला अधिकारी होतात. ज्याप्रमाणें भरलेल्या समुद्रापासून पाणी दश दिशांला फुटतें त्याप्रमाणें राजकुलापासून संपत्ति पृथ्वीवर चोहोंकडे पसरते. ही पृथ्वी पूर्वीं दिलीप राजाची होती; पुढें नृग राजाकडे गेली; नंतर हे नहूषाकडे आली; पुढें अंबरीष व मांधाता हिचे स्वामी झाले; ती ही आज आपलेकडे आली आहे. परंतु पुष्कळ द्रव्य खर्चून सर्व प्रकारच्या दक्षिणा देऊन त्यांनीं केलेला यज्ञही राज्याबरोबरच आपल्या वांट्यास आला आहे. तो यज्ञ आपण करणार नाहीं तर केवळ राज्य मिळविल्याचें मोठें पाप आपल्या माथीं बसणार आहे. ज्या प्रजेचा राजा पुष्कळ दक्षिणा देऊन अश्वमेध यज्ञ करतो, त्याची प्रजा अवभृत स्नानाचे वेळीं त्याच्या संनिध राहून पवित्र होते. हा कल्याणाचा अनादि मार्ग असून तो शाश्वतही आहे. हाच मोठा दाशरथ मार्ग होय. तेव्हां याला सोडून आपण आड मार्गाला लागूं नका.' युधिष्ठिर ह्मणाला, एक क्षणभर जर तूं मन व कान एकाग्र करून माझें ह्मणणें ऐकशील तर तुला माझें ह्मणणें पसंत पडेल. भल्यांनीं घेतलेला मार्ग मी स्वीकारीन, तूं प्रतिपादिलेला मार्ग तुझ्यासाठीं ह्मणून कधींही स्वीकारणार नाहीं. ग्राम्यसुख सोडून देऊन फलमूलांचा आहार करून मी अरण्यामध्यें पशूंबरोबर फिरत राहीन; सकाळ संध्याकाळ स्नान करून, वेळच्यावेळीं अग्नीला आहुती देऊन कातडीं, वल्कलें नेसून व जटा वाढवून, थंडी, वारा, ऊन, भूक, तहान, व श्रम यांना न जुमानतां

सशास्त्र अशा विधीनें तप करून शरीर शोषण करीन. वनांत राहणाऱ्या आनंदी मृग पक्ष्यांचे बारीक मोठे, मनाला व कानाला सुखदायक असे शब्द ऐकत, फुललेल्या झाडांच्या व वेलींच्या मनोरम गंधाचा वास घेत व नानाप्रकारचे रमणीय वनवासी प्राणी पहात, त्याचप्रमाणें वानप्रस्थ व वनवासी गृहस्थ यांचें दर्शन घेत मी तेथें सुखानें राहीन. एकांतांत विचार करीत राहून व पितरांना व देवांना वन्य फळांनीं, स्तोत्रांनीं व पाण्यानें तृप्त करून, आरण्यशास्त्राचे कडक नियम पाळीत देहावसानाची वाट पहात राहीन. किंवा डोकें मुंडून मौनव्रत धरून दररोज एक एक झाडापाशीं भिक्षा मागून हा देह झिजवीत राहीन. धुळीनें अंग भरलेला असा मी ज्या घरांत कोणी रहात नसेल अशा घरांत किंवा झाडाखालीं राहून प्रियाप्रिय किंवा हर्षशोक, निंदा अथवा स्तुति यांची पर्वा न बाळगतां, कांहीं न खातां, मायाशून्य, ममताशून्य, सुखदुःखाच्या द्वंद्वापासून अलग असा होऊन जड, आंधळा व बहिरा याप्रमाणें दुसऱ्या कोणाशीं कांहीं न बोलतां आपल्याच ठिकाणीं रमून जाऊन प्रसन्न असा राहीन. आपल्या धर्मानें राहणारें किंवा केवळ पोटाकडे लक्ष देऊन राहणारे सर्व प्राणी सारखे लेखून चतुर्विध स्थावरजंगमाची मी हिंसा करणार नाहीं. कोणाला मी हांसणार नाहीं व कोणावर मी भिंवया चढविणार नाहीं. नेहमीं प्रसन्नवदन होऊन सर्व इंद्रियें चांगल्या रीतीनें आपल्या ताब्यांत ठेवीन. कोणाला वाट न विचारतां, अमक्या देशाला किंवा अमक्या दिशेला जावयाचें असा विशेष हेतु न धरतां वाट फुटेल तिकडे जाईन व मागें पहाणार नाहीं. सरळ खालीं तोंड करून स्थूल व लिंगदेहाचा अभिमान न धरतां मी चालत राहीन. मनुष्याच्या पूर्वसंस्कारावर भावी स्थिति अवलंबून राहते हें जाणून सुखदुःखादि आड येणाऱ्या द्वंद्वांची पर्वा करणार नाहीं. थोडें किंवा स्वादु अन्न एका घरांत न मिळेल तर दुसऱ्या भिक्षा मागेन व तेथेंही न मिळेल तर तिसऱ्या घरीं मागेन. याप्रमाणें सात घरीं भिक्षा मागून मी आपलें पोट भरीन. ज्या घरांतून धूर निघत नाहीं, ज्या घरीं मुसळ कोंपऱ्याला गेलें आहे, विस्तव विजला आहे, लोक जेवले आहेत, भांडींकुंडीं बाजूला गेलीं आहेत, ज्या घरीं भिक्षेकरी येत नाहींत अशा ठिकाणीं एकावेळीं अथवा अनेक वेळां भिक्षा मागीत मी ह्या पृथ्वीवर भटकत राहीन. भिक्षा मिळाली तरी वाहवा न मिळाली तरी वाहवा अशा रीतीनें, ना मेला ना जिवंत अशा रीतीनें राहीन; जगणें किंवा मरणें या दोहींची मी पर्वा करणार नाहीं. एक मनुष्य माझा एक हात कापील, दुसरा दुसऱ्याला चंदन चोपडील तर ह्या दोघांपैकीं एकाचें अकल्याण व दुसऱ्याचें कल्याण चिंतणार नाहीं. जिवंत माणसाच्या हातून मोठेपणाला चढण्याच्या ज्या कांहीं गोष्टी घडणें शक्य आहे, त्या सर्व सोडून डोळे मिटणें व उघडणें, फक्त प्राणधारणेपुरतें अन्नपाणी घेणें, इत्यादि गोष्टी करीत राहीन. व त्यावरही फार मदार ठेवणार नाहीं. सर्व इंद्रियक्रिया सोडून देईन व हृदयांतलें पाप धुवून काढीन. सर्व संग व सर्व स्नेहपाश तोडून टाकीन व वाऱ्याप्रमाणें कोणाच्या ताब्यांत न रहातां स्वच्छंद राहीन. याप्रमाणें मनोविकारांपासून दूर राहून कायमचें सुख मिळवीन. आशेनें माझ्यापासून न कळत मोठें मोठें पाप करविलें आहे. कांहीं लोक बरीं वाईट कामें करून कार्यकारणानें जडलेल्या स्वजनांला पोसतात. परंतु आयुष्य सरून शरीरांतून प्राण निघून गेल्यावर तें पाप त्या करणाऱ्याच्या माथीं बसतें. **कारण कर्माचें फल नेहमीं कर्त्यालाच लागतें.** आणि याप्रमाणें रथाच्या चाकाप्रमाणें फिरणाऱ्या प्राण्यांशीं प्राणी आपल्या कर्मानें जुळतात म्हणून जो जन्म, मृत्यु, जरा यांनीं भरलेला अपार व संकटप्रचुर असा संसार सोडतो तोच खरा सुखी. कर्मांनीं देवांना स्वर्गापासून, व महर्षींना आपापल्या स्थानांपासून खालीं येतांना पाहून, कारणाचें इंगित ज्याला कळलें असा मनुष्य कोणचाही हेतु मनांत धरील काय? या पृथ्वीवरील नानाप्रकारचीं निरनिराळीं कर्में करून लहानसहान भौतिक उपाधींनीं राजा जखडला जातो. हें ज्ञान मला आतां उशीरानें झालें आहे; परंतु आतां तरी अविनाशी, कायमच्या व शाश्वत अशा पदाच्या मागें मला लागलें पाहिजे, व या प्रकारें फिरत राहून व या निर्भय मार्गाला लागून मी जन्म, मृत्यु, जरा, व्याधि यांनीं पछाडलेल्या या देहाची समाप्ति करणार.’

यावर भीम ह्मणाला, ' वेद पढून पढून बुद्धि मंद्ध झालेल्या वेदपाठकाप्रमाणें आपल्या बुद्धीला खरें रहस्य कळेनासें झालें आहे. राजधर्म सोडून आपला आळसामध्यें काळ घालविण्याचा विचार होता तर धार्तराष्ट्रांना मारून तरी आह्मांला काय फळ मिळालें ? क्षात्रमार्गानें चालणाऱ्या दुसऱ्या कोणाला बांधवांच्या ठिकाणीं, क्षमा, दया, अनुकंपा नसतेच कीं काय ? परंतु हें सर्व स्थावरजंगमात्मक जग बलवानाला अन्नाप्रमाणें भोग्य आहे. ते राज्य घेत असतांना जे कोणी त्याच्या आड येतील त्यांना ठार करावें हा क्षात्रधर्म आहे. आमच्या राज्याला ते आड आल्यामुळें आह्मीं त्यांना मारलें आहे. यांत कांहीं अन्याय झाला नाहीं, तेव्हां ह्या पृथ्वीचा आपण उपभोग घ्या. ज्याप्रमाणें मनुष्यानें विहीर खणून पाणी न पितां केवळ चिखलानें स्वतःला बरबटून घेऊन वर परत यावें किंवा एखाद्या मोठ्या झाडावर चढून मध काढून तो न चाखतां खालीं पडून मरावें किंवा मोठ्या आशेनें दूरवर वाट चालून निराश होऊन परतावें, किंवा शत्रूंना मारून मग आपला घात करून घ्यावा किंवा ज्याप्रमाणें एकाद्या भुकेल्याला अन्न मिळून तें त्यानें तोंडांत घालूं नये, किंवा एखाद्या कामी जनाला कामिनी मिळून तिचा त्यानें उपभोग घेऊं नये, त्याप्रमाणें आपलें हें कृत्य आहे. अथवा आपल्या वचनाप्रमाणें चालतों त्या अर्थी आह्मीच या बाबतींत निंदेला पात्र आहों. कारण आमच्या मनगटांत जोर आहे; आह्मी वियासंपन्न आहों; आह्मी बुद्धिशाली आहों; असें असून आह्मीं आपल्या मतानें बाइलबुद्धीप्रमाणें कां चालावें? ह्मातारपणानें थकल्यावर किंवा शत्रूंनीं दुर्गतीला मिळविल्यावर आपत्काळीं संन्यास सांगितला आहे. हल्लींच्या आपल्या स्थितींत संन्यास अगदीं अनुचित आहे. सूक्ष्मदर्शी लोक हा धर्मव्यतिक्रमच समजतात. ज्या विधात्यानें हा क्षात्रधर्म निर्माण केला आहे त्याची कधीं त्यासंबंधीं निंदा झाली आहे काय ? वैभवहीन, निर्धन व धर्मलंड अशा लोकांनीं खोटें असून खऱ्याप्रमाणें भासणारे, वेदार्थाचें केवळ पोकळ पांडित्य माजविलें आहे. असें धर्माचें अवडंबर माजवून मौनानें स्वतःचें पोट भरणाऱ्याला जिवंत राहण्यापेक्षां धर्मभ्रष्ट होण्याचीच विशेषतः पाळी येणार. पुत्रपौत्र, देवऋषि, अतिथि, पितर यांच्या पोटाची पर्वा न करतां एकट्यानें अरण्यामध्यें सुखांत राहणें हाच स्वर्गाचा मार्ग ह्मणावा तर या हरणांनीं, डुकरांनीं किंवा पक्ष्यांनीं स्वर्ग मिळविल्याचें कोठें ऐकिलें नाहीं. राजाला संन्यासानेंच सिद्धि मिळते असें ह्मणावें तर या पर्वतांना व या झाडांना हं हं ह्मणतां सिद्धि मिळावी; कारण यांनीं नेहमींच संन्यास केला असून यांच्यापासून कोणाला उपद्रव नाहीं व ते स्वोदरभरणाशिवाय इतर सर्व विषयपाशांतून मुक्त असून ब्रह्मचारी आहेत. जर प्राण्याला आपल्या भाग्याचेंच फळ मिळतें, दुसऱ्याच्या प्रयत्नाचा कांहीं उपयोग होत नाहीं, तर कर्माचें कार्य काय? परंतु कर्माशिवाय सिद्धि नाहीं. '

यावर अर्जुनानें पुढील जुनाट इतिहास दृष्टांतादाखल सांगितला. तो ह्मणाला, ' अंगावर केस देखील न आलेले, थोर कुळांत जन्मलेले असे कांहीं मंदबुद्धि ब्राह्मण आपल्या आईबापांना टाकून घरदार सोडणें हा धर्मच आहे असें समजून वनाला गेले. इंद्राला त्यांची कींव येऊन सोन्याच्या पक्ष्याचें रूप घेऊन त्यांना तो ह्मणाला, ' यज्ञावशिष्ट खाणाऱ्यांच्या हातून जें कर्म घडतें तें पुण्यप्रद आहे व त्याचें जीवितही धन्य आहे. अशा धर्मपरायणांचा हेतु सफल होऊन त्यांना श्रेष्ठ गति मिळते. '

आपण यज्ञावशिष्ट खाऊन रहात असल्यामुळें आपलीच हा प्रशंसा करीत आहे असें त्यांना वाटलेलें पाहून तो पक्षी त्यांना ह्मणाला, ' अंग धुळीनें भरून घेऊन पाणी व उच्छिष्ट भक्षणाऱ्या अशा मंद बुद्धीच्या तुमची मी प्रशंसा करीत नाहीं, यज्ञावशिष्ट खाऊन राहणारे दुसरेच आहेत; चार पायांच्या प्राण्यांमध्यें गाय श्रेष्ठ असून धातूंमध्यें सोनें श्रेष्ठ आहे. शब्दामध्यें मंत्र श्रेष्ठ असून मनुष्यांमध्यें ब्राह्मण श्रेष्ठ आहे, ब्राह्मणाचे जातकर्मापासून मेल्यानंतरच्या स्मशानविधीपर्यंत सर्व संस्कार समंत्रक होतात. हीं वैदिक कर्मेंच याला उत्तम स्वर्गाचा मार्ग दाखवितात. जो जो ज्या भावानें आल्यावर भावना ठेवून कर्म करतो त्याला शुक्लपक्ष, उत्तरायणांतील सहा महिने व तीन ऋतु सूर्यलोकाला पोहोंचवितात. कृष्णपक्ष, दक्षिणायणाचे सहा महिने व ती-

न ऋतु चंद्रलोकाला पोहोंचवितात. या दोहोंची पर्वा न करणारा अक्षय्य ब्रह्मपदाला मिळतो. हें सर्व कर्माचेंच फल होय. हा चांगला गृहस्थाश्रम सर्व सिद्धि मिळविण्याचें पुण्यकारक ठिकाण आहे. शाश्वत अशा देवलोकाची, पितृलोकाची किंवा ब्रह्मलोकाची श्रुतिनिर्दिष्ट वाट सोडून भलताच मार्ग स्वीकारणें हा मूर्खपणा आहे. ज्याला ज्याला जें जें कर्म सांगितलें आहे, तें तें करणें हेंच थोर तप होय.

देवकर्म, ब्रह्मकर्म, पितृकर्म व गुरुसेवा एकमेकांच्या आड न येतां करीत राहणें हाच दुस्तर तपाचा मार्ग होय. देव हेंच दुष्कर कर्म करून मोठ्या वैभवाला चढले. म्हणून हा कठिण गृहस्थाश्रमधर्म चालविणें हेंच श्रेष्ठ तप आहे. हा धर्मच सृष्टीच्या उत्पत्तीचें आदिबीज आहे. ब्रह्मचर्यादि व्रताची मध्यम तपांत गणना आहे. अतिथीला, देवांना, पितरांना व स्वजनांना देऊन बाकी राहिलेलें जे खातात तेच यज्ञावशेष खाणारे समजले आहेत. म्हणून जें स्वधर्मानें नियमस्थपणानें खरें बोलत राहतात, तेच लोकांमध्यें पूज्य होतात व निष्किल्बिष व निर्मत्सर होत्सातें स्वर्गाला जाऊन पुष्कळ वर्षें इंद्रलोकीं राहतात.' याप्रमाणें त्या ब्राह्मणांनीं धर्मार्थाला धरून असणारें हें पक्ष्याचें भाषण ऐकून दुसऱ्या कोणच्याही आश्रमांत सिद्धि नाहीं असें वाटून गृहस्थाश्रम पतकरिला. म्हणून आपणही धैर्य धरून निष्कंटक अशा संपूर्ण पृथ्वीचें राज्य करा.'

त्यावर मितभाषी नकुल रागानें तोंड लाल होऊन युधिष्ठिराकडे पाहून ह्मणाला, 'विशाखयूपाच्या ठिकाणीं देवांचीं स्थंडिलें रचलेलीं दिसतात. यावरून देव सुद्धां कर्मफलांवरच आहेत असें ह्मणण्यास हरकत नाहीं. आस्तिक लोकांमध्यें राहून सर्व प्राणिमात्रांना अन्न देणारे जे पितर तेही विधिपूर्वक कर्मच करतात. कर्म सांडणाऱ्यांना वेदशत्रू अतएव पूर्ण नास्तिक समजले पाहिजेत. वेदोक्त कर्माला टाकून ब्राह्मण केवळ देवमार्गानें स्वर्गाला जाऊं शकत नाहींत. वेदांवर पूर्ण विश्वास ठेवणारे सर्व आश्रमांमध्यें हा गृहस्थाश्रम श्रेष्ठ समजतात. न्यायानें मिळविलेली संपत्ति मनोनिग्रहपूर्वक जो मुख्य यज्ञ करून त्यांत खर्च करतो तोच मनुष्य खरा त्यागी. गृहस्थाश्रमांतील सुखाची पर्वा न करतां त्याच्यापुढें जो देह खर्ची घालतो तो तामसत्यागी समजावा. घरदार न करतां भटकत झाडांखालीं पडून राहणारा व अन्न वगैरे न शिजवितां नेहमीं योगाभ्यासांत राहणारा भिक्षुकत्यागी होय. राग, आनंद व विशेषेंकरून कोण काय ह्मणतात याची पर्वा न करतां जो ब्राह्मण अध्ययन करीत राहतो, त्याला त्यागी ह्मणतात. परंतु हा त्याग ब्राह्मणालाच सांगितला आहे. सर्व आश्रमांची तुलना करून शहाण्यांनीं असें ठरविलें आहे कीं, तीन आश्रम एकीकडे व गृहस्थाश्रम एकीकडे. असा हा वासना पूर्ण करून स्वर्ग देणारा सर्वांत श्रेष्ठ आहे. ही गोष्ट लक्षांत घेऊन मोठमोठ्या ऋषींनीं हा स्वीकारला आहे. सर्व लोकांची गति एकच आहे, असें मनांत समजून जो फलाची इच्छा न धरितां ह्या आश्रमांत सांगितल्याप्रमाणें वागतो तोच खरा त्यागी. जो मूर्खाप्रमाणें घर सोडून वनाला जातो, तो त्यागी नव्हे. जेव्हां मनुष्य धर्माचें पांघरूण घेऊन वासनांत मग्न असतो, तेव्हां यमधर्म कालपाशानें याच्या गळ्याला जखडतो. मीपणानें केलेलें कोणचेंही कर्म फलदायक होत नाहीं. मीपणा सोडून केलेलें सर्व कर्म फलदायक होतें. शम, दम, धैर्य, सत्य, शुद्धता, सरळपणा, यज्ञ, धृति व धर्म इत्यादि गुण ऋषींना हितावह सांगितले आहेत. या गृहस्थाश्रमामध्यें देवता, पितर व अतिथि यांसंबंधानें कर्म सांगितलें आहे; कारण हाच धर्मार्थकाम याप्रमाणें तिहेरी फल देणारा आहे. निर्दोष अशा ह्या आश्रमांमध्यें निष्ठेनें राहणाऱ्या त्यागी मनुष्याला कोठेंही कोणत्याही प्रकारचा अडथळा येत नाहीं. निष्पाप अशा ब्रह्मदेवानें तरी नाना प्रकारच्या दक्षिणांनीं युक्त असे मजसाठीं यज्ञ करतील म्हणूनच ह्या प्रजा निर्माण केल्या. वेली, झाडें, ओषधी, पवित्रपशु व हवी हीं यज्ञासाठीं आहेत. गृहस्थाश्रमामध्यें असणाऱ्याला, ह्या यज्ञकर्मांमध्यें अनेक अडचणी येतात म्हणूनच गृहस्थाश्रम कठिण असून दुर्लभ आहे, म्हणून तो मिळाला असून ज्यांजवळ पशु व धनधान्य मुबलक आहे, असे गृहस्थ जर यज्ञ न करतील तर कायमचें पाप त्यांना लागतें. कोणी ऋषि अध्ययनरूपी यज्ञ करतात, कोणी ज्ञानयज्ञ करतात व कोणी मनानेंच दुसरे मोठे यज्ञ क-

रतात. याप्रमाणें मन एकाग्र ठेवून जो द्विज ब्रह्ममय होऊन ह्या मार्गाला लागला असतो, त्याचा देव सुद्धां हेवा करितात. असें असतां आपण हिकडून तिकडून गोळा केलेलीं अनेक प्रकारचीं रत्नें अनेक यज्ञांमध्यें खर्चीं न घालतां नास्तिकांप्रमाणें कांहीं तरी बडबडत आहां. कुटुंबामध्यें असणाऱ्याला राजसूय, अश्वमेध किंवा इतर यज्ञ यांवांचून इतर त्यागच सांगितला नाहीं. तेव्हां हे किंवा जे कांहीं दुसरे यज्ञ ब्राह्मणाला संमत आहेत, असे यज्ञ आपण करा. राजाच्या दुर्लक्षामुळें चोरांनीं प्रजेला सर्वस्वीं लुबाडलें असतां ज्या राजाचा त्यांना आधार मिळत नाहीं तो कली समजला आहे. घोडे, गाई, शृंगारलेले हत्ती, दासी, गांवें, प्रांत, शेतें व घरें वेड्याचारामुळें ब्राह्मणांला न दिल्यानें आह्मीही राजपापाचे वांटेकरी होऊन दुःखच भोगीत राहणार. मोठमोठे यज्ञ न करतां व पितरांना स्वधा न देतां किंवा तिर्थांमध्यें स्नान न करतां जर आपण वनाला जाल, तर वाऱ्यानें विस्कळलेल्या ढगांप्रमाणें दोन्ही लोकांला मुकून मध्येंच अधांतरीं राहून नाश पावाल. मनाला जखडून टाकणारे जे अंतर्बाह्य पाश ते टाकूनच मनुष्य खरा त्यागी होतो. घर सोडून पळ काढण्यानें होत नाहीं. लढाईंत स्वसामर्थ्यानें पराक्रमी शत्रूंना जिंकून पूर्वजांनीं सांगितलेल्या व थोरथोर राजांनीं स्वीकारलेल्या स्वधर्मांमध्यें असणारा कोणता क्षत्रिय याप्रमाणें रडत बसेल? बाहुपराक्रमानें ही पृथ्वी जिंकून ती मंत्रज्ञांना देऊन, अहो महाराज, आपण स्वर्गाला जा. उगीच शोक करूं नका.'

यावर सहदेव ह्मणाला, 'बाह्यविषय टाकून कांहीं फलसिद्धि होत नाहीं. शरीरांतील अहंकारादि टाकल्यानें ती कदाचित् होईल. बाह्यविषय टाकून शरीराच्या आंतील विषयांवर आसक्ति ठेवणाऱ्याच्या पदरीं जो धर्म किंवा जें सुख पडतें त्यांचा आमच्या वैऱ्यांनाच लखलाभ असो. व शारीरिक विषय टाकून पृथ्वीचें राज्य करणाऱ्याच्या पदरीं जो धर्म किंवा जें सुख पडतें, तें आमच्या सुहृदांना मिळो. मृत्यूही दोन अक्षरीच आहे. व शाश्वत ब्रह्मही दोन अक्षरीच आहे. माझें असें समजल्यानें मृत्यु आहे व माझें नव्हे असें समजल्यानें शाश्वत ब्रह्मप्राप्ति आहे. तेव्हां ब्रह्म आणि मृत्यु हे आपल्या ठिकाणींच असून सर्व प्राणिमात्रांच्या ठिकाणीं अदृश्य राहून त्यांना झगडवीत आहेत. ह्या जीवांचा आत्मा जर अविनाशी असेल तर सर्व प्राणीमात्रांच्या शरीरांचा नाश केल्यानें याचा नाश होत नाहीं. आतां याला जर शरीराबरोबर जन्म व शरीराबरोबर नाश आहे असें समजलें तर शरीराच्या नाशाबरोबर याचाही नाश होतो. असें समजल्यानें कर्ममार्गच फुकट होणार. तेव्हां हे दोन्ही विचार सोडून देऊन जो भल्यांनीं आजपर्यंत मार्ग स्वीकारिला आहे तो शहाण्यांनीं स्वीकारावा. या पृथ्वीचा जो यथायोग्य उपभोग घेत नाहीं त्याचें जिणें व्यर्थ आहे. वनामध्यें फलमूलावर राहून विषयांवर ज्याची ममता राहते तो मृत्यूच्याच तोंडांत असतो. प्राण्याच्या अंतरभूत सर्व कांहीं स्वभाव आहे. जे सर्व आत्ममय पाहतात ते मोठ्या भयांतून सुटतात. आपणच वडील, माता, बंधु व गुरूच्या ठिकाणीं असल्यानें दुःखपीडित झाल्यानें मी जें कांहीं बरळलों त्याची क्षमा करा. मी हें जें कांहीं बोललों तें खरें असो वा खोटें असो, आपल्या ठिकाणीं असलेल्या भक्तीमुळें मी हें बोललों आहें.'

---

## ८४ दंडनीति. ( १२. १४–१६ )

याप्रमाणें भावांचें निरनिराळें भाषण ऐकून धर्मराज गप्प बसला. नंतर स्त्रियांमध्यें श्रेष्ठ, कुलीन व धर्म जाणणारी द्रौपदी त्याच्या परवानगीनें उचित व गोड अशा शब्दांनीं त्याकडे पाहून ह्मणाली, 'महाराज, हे आपले भाऊ चातकांप्रमाणें सुकत चालले आहेत. व हे फिरून फिरून आपल्यापुढें रडत आहेत; यांना त्यांच्या मनाप्रमाणें कांहीं योग्य उत्तर देऊन आपण कां सुखवीत नाहीं. आजपर्यंत यांनीं कष्टच सोसले आहेत. पूर्वीं द्वैतवनामध्यें थंडी, वारा व ऊन्ह सोसीत आपल्याबरोबर हे भटकत असतांना, 'आपण दुर्योधनाला मारून सर्व कामना पूर्ण करणाऱ्या संपूर्ण पृथ्वीचा उपभोग घेऊं; मोठ्या थाटांत पुष्कळ दक्षिणा देऊन नानाप्रकारचे यज्ञ केल्यावर ह्या वनवासामुळें झालेल्या दुःखाचा तुह्मांला विसर पडून तुह्मी सुखी व्हाल,' असें स्वतः बोलून आज फिरून असें बोलून आमचीं मनें उ-

द्विग्न कां करतां? षंढाला कधीं पृथ्वीचा उपभोग मिळत नाहीं, कधीं संपत्तीचा उपभोग मिळत नाहीं व चिखलांतील माशाप्रमाणें त्याच्या घरीं मुलें नांदत नाहींत. दंडावांचून क्षत्रिय झळकत नाहीं; दंडावांचून त्याला पृथ्वीचा उपभोग मिळत नाहीं; व शासन न करणाऱ्या राजाच्या प्रजेला सुख मिळत नाहीं. सर्व जगाशीं मैत्री, दान, अध्ययन व तप हा ब्राह्मणाचा धर्म आहे, राजाचा नव्हे. दुष्टाला शासन करून भल्यांचें परिपालन करणें व लढाईंत पाय मागें न घेणें हा राजांचा श्रेष्ठ धर्म आहे. ज्या राजाच्या ठिकाणीं क्षमा व राग, दान व आहार, भय व अभय, दंड व अनुग्रह ह्या जोड्या असतात, त्यालाच खरा धर्म कळला. वेदाध्ययनानें, कोणी दिल्यानें, फसवून, यज्ञानें किंवा तोंड पसरून आपण ही पृथ्वी मिळविली नाहीं. आपल्या वैऱ्यांच्या वीर्यसंपन्न हत्ती, घोडे व रथ यांनीं पूर्ण, तीन अंगांनीं उत्कृष्ट व द्रोण कर्णासारख्या वीरांनीं रक्षिलेलें अशा सैन्याचा आपण फडशा पाडिला आहे. नाना पर्वतांनीं युक्त असा जंबुद्वीप, तसाच मेरूच्या पश्चिम दिशेला असणारा तो क्रौंचद्वीप, त्याच्याच तोडीचा मेरूच्या पूर्वेस असणारा शाकद्वीप व उत्तरेस असणारा भद्राश्व आपण दंडानें जुरडला आहे. त्याचप्रमाणें समुद्रामध्यें शिरून त्यांतील अनेक द्वीपें आपण पादाक्रांत केलीं आहेत. याप्रमाणें अचाट कामें केल्याबद्दल द्विज आपली वाहवा करतात, तरी आपल्या मनाला बरें वाटत नाहीं. हे सर्व शत्रूला जर्जर करून टाकणारे आपले भाऊ देवाच्या तोडीचे आहेत, तेही आपल्यामुळें वेडे बनले आहेत. मूर्खपणानें असे चाळे करणारा वैभवाला कधीं चढत नाहीं. जो अशा खुळ्या वाटेला जातो, त्याला धूप देऊन डोळ्यांत अंजन घालून, नाकांत कांहीं ओढावयाला देऊन किंवा दुसऱ्या कांहीं औषधानें ताळ्यावर आणलें पाहिजे. अथवा मीच सर्व स्त्रियांमध्यें अभागी समजलें पाहिजे. पूर्वी होऊन गेलेल्या मांधाता व अंबरीष या राजांप्रमाणें आपण शोभतां. तेव्हां मनाला वाईट वाटून न घेतां पृथ्वीचें राज्य करून धर्मानें प्रजेचें पालन करा. अनेक यज्ञ करा व शत्रूंला दाबांत ठेवा.'

हें द्रौपदीचें भाषण ऐकून कर्तव्यापासून कधीं न ढळणाऱ्या अशा आपल्या वडील भावाच्या मनाला न दुखवितां अर्जुन फिरून ह्मणाला, 'दंडच सर्व प्रजांना ताळ्यांत ठेवून त्यांचें रक्षण करतो; व तोच सर्व वस्तुमात्र सामसूम असतां जागा असतो. शाहणे लोक दंड हाच धर्म समजतात. धर्म, अर्थ व काम ह्यांचें रक्षण करणारा हाच असून प्रत्यक्ष त्रिवर्ग हाच आहे. धनधान्याचें संरक्षण ह्यानेंच होतें. हा लोकव्यवहार लक्षांत घेऊन, तो हातीं घ्या. कोणी दुष्ट लोक राजदंडाच्या तर कोणी यमदंडाच्या भीतीनें तर कोणी परलोकाच्या व कोणी एकमेकांच्या भीतीनें पाप करीत नाहींत. एवंच पशुप्रमाणें जगामध्यें सर्व कांहीं दंडामुळें यथास्थित चाललें आहे याच्याच भयानें प्राणी एकमेकांना खाऊन टाकीत नाहींत. स्वैरचारी लोकांना ताळ्यावर आणून, दुष्टांना हा दंड करतो, ह्मणूनच ह्याला शाहाणे लोक दंड ह्मणतात. तोंडानें बोलणें हा ब्राह्मणाला दंड असून टोले देणें क्षत्रियाला दंड आहे. दंड करणें हा वैश्याला दंड होय. मात्र शूद्राला दंड नाहीं. मनुष्यांनीं आडवाटेला जाऊं नये व पैशाचें संरक्षण व्हावें ह्मणून दंडसंज्ञक ही मर्यादा करून ठेवली आहे. जेथें काळावेरा करून सोडणारा नेहमीं उगारलेला हा लाल दंडुका फिरतो तेथें दंडुका धरणाऱ्याची योग्य नजर असेल तर प्रजा आडवाटेला जात नाहीं. ब्रह्मचारी ह्मणा, गृहस्थ म्हणा, वानप्रस्थ ह्मणा किंवा भिक्षुक ह्मणा हे सुद्धां दंडाच्या भयानेंच सरळ वाटेनें जातात. भीतीशिवाय कोणी यज्ञ करीत नाहीं, भीतीशिवाय कोणी देत नाहीं किंवा भीतीशिवाय कोणी कराराप्रमाणें वागत नाहीं. दुसऱ्याचें मर्म कापून काढल्याशिवाय, किंवा मासेमाऱ्या प्रमाणें दुष्कर कर्म केल्याशिवाय मोठें वैभव मिळत नाहीं. ठोसा देत नाहीं त्याला ह्या जगांत कीर्ति मिळत नाहीं, द्रव्य मिळत नाहीं, किंवा प्रजा मिळत नाहीं. वृत्राला मारूनच इंद्र महेंद्र झाला. जे ठोसे देणारे देव आहेत त्यांचीच लोक फार पूजा करतात. रुद्र, तसाच कार्तिकेय, तसाच इंद्र, तसाच वरुण, अग्नि, यम, काल, वायु, मृत्यु, कुबेर, सूर्य, वसु, मरुत, साध्य हे ठोसे देणारे असल्यानें यांच्या प्रतापाला भिऊन लोक यांच्यापुढें वांकतात. पण जे सर्व लोकांच्या ठिकाणीं तिऱ्हाईत-

पणानें असून आत्मनिग्रही व शांत आहेत, त्या ब्रह्मदेवाची, धात्याची अथवा पूषाची मुकाट्यानें आपापल्या कर्मांमध्यें रत असलेले कोणीलोक पूजा करीत नाहींत. **हिंसेवांचून असणारा असा या जगामध्यें एकही प्राणी मला दिसत नाहीं.** सर्व प्राणी, बलवान दुर्बलावर, याप्रमाणें रहात असतात. मुंगूस उंदरांना, मांजर मुंगसाला, कुत्रा मांजराला व चित्ता कुत्र्याला खात असून या सर्वांना वेळ आली असतां काळ गट्ट करतो. **हें सर्व स्थावरजंगम जग बलवानाचें आहे.** ही स्थिति दैवानेंच ठरविली असल्यानें शहाणा हें पाहून गोंधळत नाहीं. महाराज, ज्याप्रमाणें आपणांला उत्पन्न केलें आहे, तसें आपण व्हा. राग व आनंद बाजूला ठेवून वनाला गेलेल्या मंदबुद्धि तामसांच्या हातूनही कोणाला मारल्यावांचून प्राणयात्रा चालत नाहीं. पाण्यांत, पृथ्वीवर व फळांमध्यें पुष्कळ प्राणी आहेत. त्यांना मारीत नाहीं असा कोणीही सांपडावचा नाहीं. या ठिकाणीं तरी प्राणयात्रेवांचून दुसरा काय हेतु असतो ? केवळ अनुमानानेंच कळण्याजोगे पुष्कळ सूक्ष्म प्राणी आहेत. ज्यांचा नुसते डोळ्यांचें पातें लवविल्यानें नाश होत असतो राग व मत्सर बाजूला ठेवून वनाला गेलेले मुनि देखील न कळत कुटुंबधर्माकडे वळलेले दिसतात. भूमि नांगरून, वनस्पति व झाडें तोडून व पशुपक्ष्यांना मारून मनुष्य यज्ञ करून स्वर्ग मिळवितात. दंडनीति ठेवल्यानेंच मनुष्याच्या सर्व गोष्टी शेवटाला जातात; जगामध्यें दंड नसेल तर पाण्यांतील माशाप्रमाणें बलवानांनीं दुर्बळाला खाऊन टाकून ह्या प्रजा नाहींशा झाल्या असत्या. योग्य रीतीनें योजिलेला दंडच प्रजेला राखतो. विझूं लागलेला अग्नि फुंकारा घातला असतां दंडाच्या भयानेंच फिरून पेट घेतो. बऱ्यावाइटाची निवड करण्याला जर या लोकामध्यें दंड नसतां, तर सर्व जग अंधकारमय होऊन यांत कांहींच ओळखूं आलें नसतें. जे मर्यादा सोडून नास्तिक व वेदनिंदक बनले असतात, त्यांना सुद्धां दंडुका लावल्यानेंच ते झटकन् वाटेवर येतात. सर्व लोक दंडानेंच ताळ्यावर येत असतात. स्वभावतःच असा मनुष्य सांपडणें कठिण. चारी वर्णांना सुखांत ठेवण्यासाठीं, चांगली नीति राहण्यासाठीं, धर्म व अर्थ यांचें रक्षण होण्यासाठीं ब्रह्मदेवानें हा दंड निर्माण केला आहे. पशुपक्ष्यांना या दंडाची जर भीति नसती तर त्यांनीं पशूंना, मनुष्यांना व यज्ञाच्या हवींना खाऊन टाकलें असतें. वठणीला आणण्याला दंडुका नसता तर ब्रह्मचाऱ्यांनीं अध्ययन केलें नसतें; दुभत्या गाईची धार निघाली नसती व मुलींचीं लग्नें झालीं नसतीं; सर्व जग बुडण्याची पाळी येऊन सर्व मर्यादा सुटल्या असत्या आणि माझेपणाचें नांव राहिलें नसतें; सांवत्सरिक सत्रें निर्भयपणें यथाविधि चालली नसतीं; यथोक्त विधीनें आश्रमधर्म पाळले गेले नसते; उंट, बैल, घोडे, खेंचरें, गाढवें गाड्यांना जुंपलें असतां त्यांनीं योग्य रीतीनें गाड्या वाहिल्या नसत्या, नौकर किंवा मुलें यांनीं आज्ञा पाळली नसती; तरुणी पातिव्रत्य धर्मानें राहिल्या नसत्या; दंडानेंच सर्व प्रजा वाटेवर राहिल्या आहेत. दंडांतच सर्व भीति आहे, दंडावरच मनुष्याचा हा लोक व स्वर्गलोक अवलंबून आहे. शत्रूची मान वर न काढूं देणारा हा दंड ज्या ठिकाणीं मोठ्या दक्षतेनें फिरत आहे, त्या ठिकाणीं कपट, पाप किंवा फसवेगिरी यांचें नांव दिसून येत नाहीं, हा दंडुका नेहमीं उगारलेला नसेल तर कुत्रा हवी खाऊन जाईल किंवा कावळा पुरोडाश घेऊन जाईल. आतां हें राज्य धर्मानें मिळालेलें असो अथवा अधर्मानें मिळालेलें असो याबद्दल शोक न करतां सर्व भोग भोगीत राहून यज्ञ करा. सर्व गोष्टी पैशावरच अवलंबून आहेत, व हा पैसा दंडुक्यावरच अवलंबून आहे. तेव्हां ह्या दंडुक्याची महति केवढी आहे पहा. धर्म नियम तरी या जगांत लोकयात्रा चालावी ह्मणूनच घालून ठेवले आहेत. अहिंसा किंवा धर्मविचारानें घडणारीं हिंसा दोहींची गणना चांगल्यामध्येंच आहे. यापैकीं एक अति उत्कृष्ट व दुसरी अगदीं टाकाऊ असें मुळींच नाहीं. सर्व गोष्टींत दोहींचाही बरेंवाईटपणा दिसून येतो. बैलाचें आंड बडवून शिंग वाढूं नये ह्मणून ती जागा डेंचतात, तेव्हांच ते ओझें वाहतात व वठणीला येऊन गाडीला जुंपतां येतात.

ह्याप्रमाणें अव्यवस्थित व खोट्यानें भरलेल्या जगामध्यें वरील निरनिराळ्या न्यायांनीं युक्त असा पुरातन धर्म आपण आचरा, यज्ञ करा, दक्षिणा द्या, प्रजेचें

रक्षण करा. धर्माचें योग्य रीतीनें पालन करा. शत्रूंला मारतांना, मनांत कींव अगदीं धरूं नका. त्यांत मारणाऱ्याला पाप बिलकूल लागत नाहीं. आपल्यावर अविचारानें तुटून पडणाऱ्या शत्रूवर तुटून पडून त्याला मारण्यांत भ्रूणहत्येचें पातक नाहीं. कारण शत्रूंच्या रागानेंच तो राग उत्पन्न होत असतो. सर्व प्राणिमात्रांच्या ठिकाणीं असणारा आत्मा अवध्य असतां त्याला कोण कसा मारणार? ज्याप्रमाणें पुरुष फिरून फिरून नव्या नव्या घरांत जातो, त्याप्रमाणें हा जीव पूर्व देह टाकून निरनिराळ्या शरीरांत जात असतो. शहाणे लोकांनीं मरणाचें हें खरें इंगित ठरविलें आहे.'

यानंतर तापट भीमसेन धीर करून ह्मणाला, 'महाराज, आपल्याला सर्व धर्म ठाऊक आहेत; आपल्याला ठाऊक नाहीं असें कांहींच नाहीं. आपलें वळण घेण्याला आह्मी नेहमीं झटत आहों, परंतु आह्मांला तें कांहीं साधत नाहीं, परंतु आपल्या ह्या वेडेपणामुळें, सर्व कांहीं घोटाळ्यांत येऊन पडलें आहे, व आह्मी कष्टी व दुबळे झालों आहों. सर्व शास्त्रामध्यें आपण प्रवीण असून वेडेपणामुळें व दैन्यामुळें आपण एखाद्या नीच पुरुषाप्रमाणें झालां आहां? पुढील व सांप्रतची लोकांची सर्व बरीवाईट गति आपल्याला ठाऊक आहेच. आतां राज्य करण्यासंबंधानें मी काय कारण देत आहे तें आपण नीट ऐका. मनुष्याला शारीरिक व मानसिक अशा दोन व्याधी उत्पन्न होतात. त्या दोहींचाही जन्म परस्परावलंबी असतो. जो शारीरिक व मानसिक गतदुःख आठवून रडत बसतो तो याप्रमाणें दुःखानें दुःख मिळवून दोन अनर्थ ओढून घेतो. कफ, वात व पित्त हे तीन शरीराचे धर्म असून, ते सर्व सारख्या प्रमाणांत ज्या वेळीं शरीरामध्यें असतात तेव्हांच ती स्वस्थ स्थिति समजली जाते. त्यांपैकीं एकाची वाढ झाल्यास उपाय करावा लागतो. पित्तानें कफाला पीडा होते, व कफानें ऊष्णतेला पीडा होते. त्याचप्रमाणें सत्व, रज आणि तम हे मनाचे तीन धर्म त्या सर्वांची समावस्था हें स्थितीचें लक्षण असून त्यांपैकीं एकाची वाढ झाली असतांही उपाय करावा लागतो. शोक हर्षाच्या आड येत असून, हर्ष शोकाच्या आड येतो. कोणी सुखांत असतां मागील दुःखाची त्याला आठवण करावीशी वाटते, व दुःखांत असतां सुखाची आठवण करावीशी वाटते. आपल्याला दुःखानें दुःख किंवा सुखानें सुख कधींच झालें नसल्यानें दुःखाची आठवण होऊं नये. आतां ती अशी होत आहे तेव्हां दैवच बलवत्तर समजलें पाहिजे. आतां नेहमीं जिवाला क्लेश करून घेणें हा जर आपला स्वभावच बनला असेल तर ह्या पांडवांच्या देखत द्रौपदीला रजस्वला असतां सभेमध्यें यावें लागलें त्याची किंवा फाटक्या तुकड्यानिशीं नगर सोडून वनाला जावें लागलें, व तेथें किर्र अशा अरण्यांत रहावें लागलें, याची किंवा जटासुरापासून झालेल्या हालाची, चित्रासेनाबरोबर झालेल्या युद्धाची, जयद्रथानें दिलेल्या त्रासाची किंवा राजपुत्री द्रौपदीला अज्ञातवासांत कीचकानें दिलेल्या लाथेची आपणाला कां आठवण होत नाहीं? भीष्मद्रोणांशीं आपलें जें युद्ध झालें त्याहून निराळें आपल्या मनाशीं आणि तेंही एकट्यानें करावयाचें युद्ध उपस्थित झालें आहे. या ठिकाणीं बाणांचा, मित्रांचा किंवा बांधवांचा कांहीं उपयोग नसून, आपल्याला एकट्यालाच त्याशीं झगडलें पाहिजे, त्या झगड्यांत मनाला न जिंकतां जर आपण प्राण सोडले तर दुसरा जन्म घेऊन त्या वेळीं फिरून त्या वासनांशीं आपल्याला झगडावें लागणार. ह्मणून आजच आपल्या कर्मांनीं स्थूल शरीर टाकून अव्यक्त अशा ब्रह्मस्वरूपाला मिळण्याकरितां मनावर जय मिळविण्याला तयार व्हा. ही बुद्धि दृढ करून-प्राणिमात्रांची बरी वाईट गति लक्षांत घेऊन वाडवडील चालत आले तसें चालून नीट रीतीनें राज्य करा. दुर्योधन आपल्या भावांनिशीं मेला हें ठीक झालें. द्रौपदीच्या वेणीच्या ऋणांतून आपण आज मुक्त झालां आहां. आपण पुष्कळ दक्षिणा देऊन यथासांग अश्वमेध करा. आह्मी व श्रीकृष्ण आपले दास आपल्या सेवेला हजर आहों.'

## ८५ कर्म व त्याग. (१२. १७–१९)

यावर युधिष्ठिर ह्मणाला, असंतोष, 'वेडगळपणा, माद, आसक्ति, अस्वस्थता, बल, मोह, अभिमान व चिंता ह्या दुष्ट मनोविकारांनीं घेरल्यामुळें राज्या-

वर तुझा लोभ आहे. निरिच्छ, निर्मुक्त व शांत हो-ऊन सुखी हो. एखाद्या एकछत्री राजाला ही सर्व पृथ्वी मिळाली तरी त्याला पोट एकच असणार, मग याची तुला एवढी महती कां वाटते? एका दिवसानें, महिन्यांनीं, एवढेंच नव्हे तर सबंद आयुष्य घातलें तरी ही वासना पूर्ण करणें दुरापास्त आहे. ज्याप्रमाणें सर्पण घातलें तर अग्नि पेटच घेतो, परंतु सर्पण न घातलें तर तो विझतो, तशी याची स्थिति आहे. ह्मणून थोड्या आहारानेंच पोटाचा अग्नि तूं शमीव. वेडगळ मनुष्य आपल्या पोटासाठीं अनेक पापें करण्याला तयार होतो. या पोटाला जिंक ह्मणजे पृथ्वी जिंकल्याप्रमाणें आहे. व नंतर कल्याण हातीं आल्याप्रमाणें आहे. भौतिक वासना, भोग, ऐश्वर्य यांची तूं प्रौढी सांगतोस खरा, परंतु यांचा उपभोग न घेतां शरीर झिजविणारेच उत्तम पदाला जाऊन मिळतात. राज्य मिळवणें व तें राखणें या दोहोंमध्यें धर्माचा बिकट विचार आहेच. या सर्व पृथ्वीचें राज्य करणाऱ्यापेक्षां दगड व सोनें सारखें लेखणाराच धन्य होय. संकल्प, आशा व ममता सोडून इहपरत्र अविनाशी व शोकविरहित असें स्थान मिळीव. ज्यांना कांहीं आमिष नाहीं ते कधीं शोक करीत नाहींत. सर्व आमिषाची आशा सोडून दिल्यानें, दुःखापासून व या वायफळ बडबडीपासून तूं सुटशील. पितृमार्ग व देवमार्ग असे दोन प्रसिद्ध मार्ग आहेत, त्यांपैकीं यज्ञयागादि करणारे पितृमार्गानें जातात, व मोक्षेच्छु देवमार्गानें जातात. तपानें, ब्रह्मचर्यानें व वेदाध्ययनानें मोठमोठे ऋषि देह ठेवून मृत्यूच्या तावडींतून सुटले आहेत. इच्छा हें या जगांत बंधन आहे व कर्माची उत्पत्ति इच्छेपासूनच आहे. तेव्हां या दोहोंपासून सुटल्यानेंच श्रेष्ठ पद मिळतें. द्वंद्वापासून सुटून मुक्त झालेल्या जनकानें 'माझी संपत्ति अपरमित आहे तरी माझें म्हणून यांत कांहींच नाहीं. सबंद मिथिला जळून गेली तरी माझें कांहींच जळत नाहीं,' असें ह्मटलें आहे. ज्ञानरूपी वाड्यावर चढून अवश्य घडणाऱ्या गोष्टींविषयीं शोक करणारा मनुष्य पर्वतावर चढून खालचा प्रदेश दिसत नाहीं म्हणून रडणाऱ्या माणसाप्रमाणें केवळ अंधळा समजला पाहिजे. सर्व दृश्य वस्तूंचें खरें स्वरूप ओळखणाराच खरा डोळस व बुद्धिमान समजला पाहिजे. ही अज्ञात वस्तूचें पूर्ण ज्ञान व ओळख करून देते ह्मणूनच हिला बुद्धि अशी संज्ञा मिळाली आहे. शुद्ध अंतःकरणाचे ज्ञानी व ब्रह्मस्वरूप झालेले ह्यांचें ह्मणणें ज्याला पूर्णपणें समजलें त्यालाच बहुमान मिळतो. ज्या वेळीं ह्या सर्व निरनिराळ्या वस्तू एका ब्रह्माचे ठिकाणीं असलेल्या दिसूं लागतात, व त्यापासूनच ह्याचा विस्तार आहे हें उमगूं लागतें त्या वेळेलाच त्याला ब्रह्मप्राप्ति होते. अशा प्रकारचे लोकच त्या गतीला जातात; मूर्ख, मंदबुद्धि, अबुद्धि, किंवा तप न आचरणारे लोक ह्यांना ती गति मिळणें शक्य नाहीं. सर्व कांहीं बुद्धीच्या आधीन आहे.'

या वाक्शल्यानें विव्हळ होऊन दुःखशोकांनीं संतापून अर्जुन ह्मणाला, 'पूर्वीं जनक राजा राज्य सोडून भिक्षा मागण्याला सिद्ध झाला तेव्हां त्याची बायको कष्टी होऊन एकांतामध्यें निर्भयपणें पण मुद्देसूद रीतीनें त्याला जें ह्मणाली तें ऐका. ती ह्मणाली, 'धनधान्यानें संपूर्ण असें आपलें राज्य सोडून भिक्षापात्र हातीं घेऊन धानामुष्टीवर राहणें बरें नाहीं. आपण आज हें एवढें थोरलें राज्य सोडून अल्पसंतुष्ट राहूं इच्छितां. परंतु एवढ्यानें आपल्याला अतिथि, देव, ऋषि व पितर यांना पोसतां येणार नाहीं, व आपले हे श्रम फुकट जाणार आहेत. तिन्ही वेदांचें परिशीलन केलेल्या हजारों ब्राह्मणांना आजपर्यंत पोसून आतां आपण त्यांच्यापासून अन्नाची इच्छा धरितां. ही एवढी मोठी संपत्ति टाकून कुत्र्याप्रमाणें तुकड्यासाठीं आपण दुसऱ्याच्या तोंडाकडे पाहणार. आपल्या आईला मुलगा नाहींसा होऊन आपली बायको विधवा होणार. हे क्षत्रिय धर्मकामाच्या फळासाठीं दीनवाणें आपसरून आपल्याजवळ जमले आहेत. आपण आजपर्यंत सर्व भूतमात्रांच्या शांतीला पवित्र पाणपोई व आश्रयाला मोठें झाड होऊन, आज दुसऱ्यावर अवलंबून राहणार. हत्ती हातपाय बांधून स्वस्थ बसला म्हणजे त्याला पुष्कळ मांसाहारी प्राणी व किडे तोडून खातात. तेव्हां आपण स्वस्थ बसल्यावर आपली दशा काय होणार? आपली धानामुष्टीवर तेवढी इच्छा राहिल्यानें सर्वसंगपरित्यागाची

आपली प्रतिज्ञाही पण मोडणार; तेंच जर समदृष्टीनें हें जग लेखून आपण विषयोपभोग घ्याल तर आपली प्रतिज्ञा खरी होईल. महाराज, जर माझ्यावर आपली कृपा असेल तर पृथ्वीचें राज्य करून वाडा, पलंग, वाहनें, वस्त्रें, आभरणें यांचा उपभोग घ्या. वैभवाला मुकलेले, कफल्लक बनलेले, मित्र वगैरे कोणी नसलेले यांनीं संन्याश्याची स्थिति पाहून त्याचें केवळ बाह्य अनुकरण करण्यांत अर्थ काय? जो नेहमीं हात पसरतो, व जो नेहमीं देतो, त्या दोघांमधील भेद लक्षांत घ्या. यांपैकीं चांगला कोण? नेहमीं तोंड पसरणारे व ढोंगी यांना दिलेली दक्षिणा वणव्यामध्यें टाकलेल्या आहुतीप्रमाणें आहे. विस्तवांत टाकलेलें सर्व जळून जाईपर्यंत तो विझत नाहीं, नेहमीं भीक मागणाऱ्यांची स्थिति तशीच आहे. शिवाय देणारा राजाच न उरेल तर मोक्षेच्छु तरी कोठून असणार? अन्नापासूनच प्राण असल्यानें अन्न देणारा तो प्राण देणारा समजला पाहिजे. गृहस्थामधून निघून गृहस्थावरच अवलंबून असणारे हे मनोनिग्रही भिक्षुक भक्ति व वैभव मिळवून असतात. बाह्यविषय टाकल्यानें, वेडगळ चाळे केल्यानें, किंवा तोंड पसरल्यानें भिक्षुक बनत नाहीं. जो खऱ्या भावानें विषय सोडतो, पण सुख सोडीत नाहीं तोच खरा भिक्षुक. कोणत्याही गोष्टीवर आसक्ति न ठेवितां जो संसारांत गढल्याप्रमाणें राहून निःसंग व सर्व पाशांपासून मोकळा असतो, व शत्रु व मित्र यांचे ठिकाणीं सारखा असतो तोच खरा मुक्त. डोकें गुळगुळीत करून घेऊन भगवें नेसून नानाप्रकारच्या पाशांमध्यें गुंतलेले पोकळ वासनांच्या मागें लागून कांहीं मिळविण्यासाठीं भटकत असतात. वेदत्रयी, आपला व्यवसाय व मुलेंबाळें सोडून जे दंड व भगवीं वस्त्रें घेतात ते मूर्ख समजले पाहिजेत. मनावर भगवेपणा न उमटतां डोकें गुळगुळीत करून घेऊन, भगवीं वस्त्रें घेऊन धर्माचा टेंभा मिरविणाऱ्यांचें हें कृत्य केवळ पोटासाठीं आहे. तेव्हां इंद्रियनिग्रह करून, काषायवस्त्रें धारण करून असणाऱ्या साधूंना पोसून आपण उत्तम लोक मिळवा. जो घरांमध्यें अग्नि ठेवून मोठमोठे यज्ञ करतो आणि नित्य दान करतो त्याहून मोठा धर्म काय आहे?'

अर्जुन ह्मणाला, 'याप्रमाणें तत्त्व जाणणाऱ्या जनकालाही मोह पडला. तेव्हां अशा रीतीनें धर्मानें राहून, दान व तप यांकडे लक्ष देऊन, प्रजेचें पालन करून, आपण इष्ट लोक मिळवा. देवता, अतिथि व प्राणिमात्र यांना अन्न दिल्यानें आपल्याला श्रेष्ठ पद मिळेल.'

यावर धर्मराज ह्मणाला, 'कर्म करा, कर्म टाका ह्मणून सांगणारीं, धर्मशास्त्रें व ब्रह्मशास्त्रें दोन्ही मला ठाऊक आहेत. या शास्त्रांमध्यें सर्व घोटाळा असून निरनिराळ्या कारणांनीं तीं उत्पन्न झालीं आहेत. व मंत्रांचा खरा अर्थही मला कळतो. तूं केवळ लढवय्या असून अस्त्रांची तेवढी तुला माहिती आहे. शास्त्रांचा खरा अर्थ कळणें तुला शक्य नाहीं. ज्याला शास्त्रार्थांचा सूक्ष्म भेद कळत असून धर्मनिर्णय कळतो, त्यानें सुद्धां मला असें बोलूं नये. आतां बंधुप्रेमानें न्यायाचें व योग्य असें वाटून तूं जें कांहीं बोललास, तें ऐकून मला आनंद झाला आहे. सर्व युद्धधर्मांमध्यें व व्यवहारांमध्यें तूं हुषार आहेस. त्यांमध्यें तुझ्या तोडीचा त्रैलोक्यांत मिळणार नाहीं. धर्म मोठा सूक्ष्म आहे, तूं अद्यापि वृद्धांची सेवा केली नाहींस; धर्माचे लहान मोठे भेद जाणणाऱ्यांचा निर्णय अर्जुन तुला समजला नाहीं. तप, त्याग व ज्ञान हे तीन मार्ग असून त्यांपैकीं प्रत्येक पहिल्यापेक्षां श्रेष्ठ आहे. आतां पहिल्यापेक्षां कांहीं श्रेष्ठ नाहीं असें जें तुला वाटत आहे, त्यापासून हें श्रेष्ठ नाहीं असें दाखवून तुला माघारें फिरवितों. धार्मिक लोक व ऋषि तपांमध्यें व अध्ययनांमध्यें गढले असतात, व त्यांना सनातन लोक मिळतात. कांहीं आर्य लोक विषयनिग्रहानें अज्ञानतम दूर करून, उत्तम मार्गानें त्यागी लोकांना मिळणाऱ्या लोकाला गेले आहेत. क्रिया करणारे जन्ममरणाच्या फेऱ्यांत सांपडून चंद्रलोकाकडच्या दक्षिण मार्गाला लागले आहेत. मोक्षेच्छूंच्या डोळ्यांपुढें जी वस्तु असते ती सांगतां येत नाहीं. योग हाच त्याच्या प्राप्तीला उत्तम मार्ग आहे. विद्वानांनीं 'यांत सत्य वस्तु असेल काय?' 'त्यांत सत्य वस्तु असेल काय?' ह्मणून विचार करून निश्चय ठरवून ठेविला आहे. सर्व वेदशास्त्रें व वेदांत धुंडाळून, केळ चिरून ज्याप्रमाणें कांहीं सार हातीं येत नाहीं त्याप्रमाणें, खरें

तथ्य कांहीं त्यांना सांपडलें नाहीं. एकान्त सोडल्यामुळें या पंचभौतिक शरीरामध्यें इच्छा द्वेष यांनीं युक्त असणारी वस्तूच आत्मा असें बाह्य लक्षणावरून कांहीं लोक मानतात. हा डोळ्यांला न दिसणारा व तोंडानें सांगतां न येणारा सूक्ष्म आत्मा, कर्माला मूळभूत जी अविद्या, तिला पुढें करून, सर्व भूतमात्रांचे ठिकाणीं फिरत असतो. मनाला या आत्म्याकडे लावून आशेला आवरून धरून कर्ममालिका टाकून, मनुष्यानें स्वतंत्र बनून सुखी व्हावें. हा सूक्ष्म बुद्धीलाच केवळ उमगणारा भल्यांनीं स्वीकारलेला मार्ग असून अनर्थानें भरलेल्या विषयाची अर्जुना, तू कशी प्रशंसा चालविली आहेस ? नेहमीं क्रियेमध्यें, दानांमध्यें व यज्ञांमध्यें गढलेल्या जुन्या शास्त्रज्ञांचें सुद्धां असेंच मत आहे. हें असें नव्हे असें ह्मणणारे कांहीं मूर्ख पंडित आहेत; व पूर्वसंस्कार त्यांच्या मनांत दृढ असल्यानें, या त्यांच्या मतापासून त्यांना फिरवितां येत नाहीं. हे बहुश्रुत बडबडे लोक समाजामधून भलतीं मतें प्रतिपादित फिरतात. अर्जुना, ज्या गोष्टी आह्मांला कळल्या नाहींत त्या कोणाला कळणार ? अशी मोठमोठ्या शहाण्यांची वेदज्ञ व शास्त्रवेत्ते यांची कल्पना असते. परंतु तत्त्व ओळखणारा तपानें किंवा ज्ञानानें ब्रह्मप्राप्ति करून घेऊन, सर्व सोडून सुखी होतो.'

---

## ८६ यज्ञाचें महत्त्व. (१२. २०—२२)

यावर मोठे तपस्वी देवस्थान ऋषि समयाला उचित असें ह्मणाले, 'युधिष्ठिरा, पैशापेक्षां कांहीं जास्ती नाहीं असें जें अर्जुन ह्मणाला, तेंच खरें. ही पृथ्वी न्यायानें मिळवून ती टाकून देणें तुला शोभत नाहीं. कारण वेदांत सांगितलेले चार आश्रम ब्रह्मप्राप्तीसाठींच आहेत. त्या चारींमधून यथाक्रमानें जाणें हेंच इष्ट होय, म्हणून मोठमोठे यज्ञ करून त्यांत पुष्कळ दक्षिणा दे. ऋषींमध्यें कोणी साध्यासाध्य यज्ञ केले आहेत, कोणी ज्ञानयज्ञ केले आहेत. याप्रमाणें तपस्वी सुद्धां कर्मांमध्येंच गढलेले आहेत. मात्र यज्ञादिकांसाठीं गोळा केलेल्या पैशाचें बुद्धिदोषानें अपात्रीं दान झाल्यास त्यामुळें भ्रूणहत्येचें पाप लागतें. कुपात्रसत्पात्राचा विचार करून दान करणें मोठें कठीण काम आहे. ब्रह्मदेवानें यज्ञासाठींच पैसा उत्पन्न करून पुरुषालाही त्याच कामासाठीं उत्पन्न करून राखलें आहे. महातेजस्वी इंद्र, पुष्कळ रत्नें देऊन व नाना प्रकारचे पुष्कळ यज्ञ करूनच सर्व देवांत श्रेष्ठ व त्यांचा स्वामी होऊन स्वर्गामध्यें झळकत आहे. हरणाचें कातडें परिधान केलेले महादेव शंकरही सर्व यज्ञांमध्यें आत्म्याची सुद्धां आहुती देऊन सर्व विश्वाला व्यापून कीर्तीनें झळकत राहिले आहेत. आपल्या वैभवानें ज्यानें इंद्रालाही मागें सारलें त्या अविक्षिताचा मुलगा मरुत्त राजानेंही मोठा यज्ञ केला ते वेळीं त्याचीं सर्व भांडीं सोन्याचीं असून प्रत्यक्ष श्री त्या यज्ञामध्यें हजर होती. पुण्यशाली हरिश्चंद्रानें अनेक यज्ञें करून वैभवानें इंद्राला मागें सारलें आहे. ह्मणून द्रव्याचा उपयोग यज्ञांत करावा. त्यांतूनही संतोष स्वर्गापेक्षां अधिक आहे; संतोष श्रेष्ठ सुख आहे. कासव ज्याप्रमाणें आपलीं सर्व अंगें आपल्यामध्यें आखडून घेतो, त्याप्रमाणें सर्व वासनांचा उपसंहार करून मनुष्य आपल्या आत्मस्वरूपामध्येंच जेव्हां संतुष्ट राहतो तेव्हां तो स्थिरबुद्धि होतो. जेव्हां मनुष्य कोणाला भीत नाहीं, किंवा कोणाला याची भीति उरत नाहीं, व तो कामद्वेषाला जिंकतो, तेव्हांच याला ब्रह्मप्राप्ति होते. मनुष्य ज्या ज्या भावानें जें जें कर्म करतो त्या त्या भावानें त्यांची फलप्राप्ति होऊन मग त्याला स्वानुभवानें ब्रह्म दिसूं लागतें. कोणी सामाची प्रशंसा करतात, कोणी यत्न बरा ह्मणतात, कोणी संन्यास बरा ह्मणतात. कोणी दान बरें ह्मणतात, कोणी प्रतिग्रह बरा ह्मणतात. कोणी सर्व सोडून ध्यान करीत राहतात. कोणी हाण, मार, तोड करून राज्य मिळवून प्रजेचें पालन करावें हें चांगलें ह्मणतात. या सर्वांचा विचार करून शहाण्यांचें असें मत ठरलें आहे कीं, **कोणाही प्राणिमात्रांचा द्रोह न करतां जो धर्म घडेल तो चांगला. अद्रोह, सत्यवचन, संपत्तीचा दुसऱ्याला वांटा देणें, दया, मनोनिग्रह, आपल्या बायकोच्या ठिकाणीं संतति उत्पन्न करणें, कोमलपणा, बुद्धीचा चंचलपणा नसणें हा मुख्य धर्म मनूनें सांगितला आहे.** ह्मणून मोठ्या हुशारीनें हा धर्म तूं चालीव. जो राजा राज्यांत राहून नेहमीं मनोनिग्रहानें बऱ्यावाईटाची पर्वा करीत

नाहीं, शास्त्राचें परिशीलन करीत यज्ञावशेषावर राहून दुष्टांना शासन व सुष्टांवर कृपा करतो; प्रजेला धर्मामध्यें ठेवून स्वतः धर्मानें राहतो; व अखेरीस मुलावर राज्यभार टाकून वनामध्यें वेदोक्त रीतीनें कर्में करीत वनफळें खाऊन राहतो त्याला इहपर लोक सफल होतात.'

नंतर अर्जुन फिरून ह्मणाला, 'फार दुर्लभ असें हें राज्य क्षात्र धर्मानें मिळालें असून शत्रूला मारल्याबद्दल आपल्याला इतकें वाईट कां वाटतें? तप व त्याग हा ब्राह्मणांचा स्वर्गप्राप्तीचा धर्म आहे. परंतु तोसुद्धां क्षात्र धर्मानें वागत असतां त्याला वेळीं युद्धांत शस्त्रानें जर मरण येईल तर तें त्याचें जीवित सफल होतें. कारण क्षत्रियांची उत्पत्ति ब्राह्मणांपासूनच आहे. त्याग, यज्ञ, तप किंवा दुसऱ्यावर पोट भरणें क्षत्रियाला सांगितलें नाहीं. क्षत्रियांचें हृदय वज्राप्रमाणें कठीण असलें पाहिजे. इंद्र हा ब्रह्मपुत्र असून आपल्या कर्मानें क्षत्रिय झाला, आणि त्यानें आपल्या आठशें दहा दुराचारी ज्ञातीच्या लोकांना मारलें; हें त्याचें कर्म पूज्य व प्रशस्यच झालें. त्याच्या योगानें त्याला देवाचें इंद्रत्व आलें. तेव्हां त्याचप्रमाणें आपण संताप टाकून देऊन यज्ञ करा. क्षत्रिय धर्मानें लढून शस्त्रानें पवित्र होऊन जे उत्तम गतीला गेले आहेत त्याबद्दल शोक करण्याचें मुळीं कारण नाहीं. **दैव कांहीं कोणाला फिरवितां येणार नाहीं.**'

---

## ८७ राजदंड (१२. २३-२४)

हें भाषण ऐकून सुद्धां युधिष्ठिराला गप्प बसलेला पाहून व्यास ह्मणाले, 'अर्जुन ह्मणतो तें खरें आहे. शास्त्रदृष्टीनें श्रेष्ठ धर्म गृहस्थाश्रमांतच आहे. गृहस्थाश्रम सोडून तुला अरण्य सांगितलें नाहीं. देव, पितर व नौकरमाणसें यांची उपजीविका गृहस्थांवरच असते. तसेंच पशु, पक्षी व सर्व भूतमात्र गृहस्थांवरच रहात असल्यामुळें गृहस्थाश्रमी मनुष्यच श्रेष्ठ समजला आहे. तो हा दुबळ्यांना आचरण्याला फार कठीण असा श्रेष्ठ आश्रम तूं पाळ. तूं सर्व वेद पढला आहेस व मोठें तप केलें आहेस. तेव्हां हा वडिलोपार्जित राज्यभार गाडी ओढणाऱ्या बैलाप्रमाणें वहा. तप, यज्ञ, विद्या, भिक्षा, इंद्रियनिग्रह, ध्यान, एकांतांत राहणें, संतोष व ज्ञान ह्या गोष्टी स्वाभाविकपणें ब्राह्मणानें कराव्या. आतां क्षत्रियांचीं कर्में तुला ठाऊकच आहेत तीं मी तुला सांगतों ऐक. यज्ञ, विद्या, उद्योग, महत्त्वाकांक्षा दंड उगारून राहणें, उग्रपणा, प्रजेचें परिपालन, वेदांचें परिशीलन, उत्तम रीतीचें तपाचरण, पुष्कळ पैसा मिळवून त्याचा सत्पात्रीं व्यय हीं क्षत्रियांचीं कर्में असून तीं उत्तम रीतीनें केलीं असतां इहपर लोकांचें साधन आहे. यामध्यें सुद्धां दंड तयार ठेवणें सर्वांत श्रेष्ठ समजलें आहे. क्षत्रियांचे ठिकाणीं बल व बलाचे ठिकाणीं दंड हीं अवश्य आहेत. बिळांत पडून राहणाऱ्यांना ज्याप्रमाणें साप गट्ट करून टाकतो, त्याप्रमाणें दुसऱ्याच्या शक्तीला अटकाव न करणाऱ्या राजाला व प्रवास न करणाऱ्या ब्राह्मणाला भूमि गिळून टाकते. राजर्षि सुद्युम्नानेंही दंडधारणेनेंच मोठी सिद्धि मिळविली. शंख व लिखित नांवाचे व्रतशील दोघे भाऊ होते. त्या दोघांचेही फलपुष्पांनीं नेहमीं संपन्न असे दोन आश्रम बाहुदा नदीच्या कांठीं वेगवेगळे होते. कोणे एके वेळीं लिखित शंखाच्या आश्रमाला आले असतां शंख सहज आश्रमांतून कोठें बाहेर गेले होते. तेव्हां लिखित कांहीं चांगलीं पिकलेलीं फळें खालीं पाडून तीं खुशाल खाऊं लागले. इतक्यांत शंख आश्रमाला येऊन रागानें ह्मणाले, 'कोणाला न विचारतां हीं फळें घेतल्यानें तूं ही चोरी केली आहेस, तेव्हां हें तुझें कृत्य तूं राजाला कळीव.' तेव्हां लिखित सुद्युम्नाकडे जाऊन ह्मणाले, 'राजा, कोणी न देतां मीं फळें घेतलीं तेव्हां मी चोर आहे, हें लक्षांत घेऊन तूं आपला धर्म पाळ.' सुद्युम्न ह्मणाला, 'माझें ह्मणणें आपणाला प्रमाण असेल तर राजाला जसा दंड करण्याचा अधिकार आहे तसा माफी देण्याचाही अधिकार आहे. तेव्हां मीं आपणाला माफी दिली आहे. आतां आपली दुसरी कांहीं इच्छा असेल तर मागा ती मी पूर्ण करण्याला तयार आहें;' त्यावर, 'शिक्षेवांचून मला कांहीं नको,' असें ते ह्मणाले. तेव्हां त्या राजानें त्यांचे दोन हात छाटले. याप्रमाणें शिक्षा घेऊन आपल्या भावाकडे जाऊन, त्यांनीं केविलवाणें त्यांना क्षमा करावयास विनंति केली. तेव्हां शंख ह्मणाले, 'हे

धर्मज्ञा, माझा तुझ्यावर राग नाहीं; माझा तूं कांहीं अपराधही केला नाहींस. धर्माचें तुझ्या हातून उल्लंघन झालें, आणि त्याची तुझ्याकडून मीं निष्कृति करविली. आतां बाहुदा नदीवर जाऊन देव, पितर व ऋषी यांना तृप्त कर व पाप मनांत सुद्धां आणूं नकोस.' हें भाषण ऐकून ते बाहुदेमध्यें स्नान करून तर्पण करणार तों त्यांना कमलासारखे दोन हात फुटले. तेव्हां विस्मयचकित होऊन भावाला जाऊन त्यांनीं ते दाखविले. त्यावर मीं आपल्या तपाच्या सामर्थ्यानें हें केलें आहे, असें शंख ह्मणाले, तेव्हां, 'आपले अंगांत एवढें तपाचें सामर्थ्य होतें तर आपण पूर्वींच मला निर्दोष कां केलें नाहीं,' ह्मणून लिखितांनीं विचारिलें. त्यावर शंख ह्मणाले, मला असेंच करणें वाजवी होतें, कारण मी दंडधर नाहीं. शिवाय असें करण्यानें तो राजा व तूं दोघेही आपापल्या पितृगणांसह पवित्र झालां आहां.'

तेव्हां, याप्रमाणें शंखांनीं राजा, सुद्युम्नालाही पवित्र केल्यावरून त्या कर्मानेंच त्याला श्रेष्ठ फळ मिळालें. दंड व प्रजापालन हाच क्षत्रियांचा धर्म आहे. डोकें मुंडणें हा नव्हे. तूं ययातीप्रमाणें या पृथ्वीचें राज्य कर. पुष्कळ दिवस अरण्यामध्यें असतांना बिचाऱ्या भावांचे जे संकल्प होते ते पूर्ण करून तुझ्या त्यांना सुख दे. धर्म, अर्थ व काम यांचा आपल्या भावांसह अनुभव घेऊन मग प्रपंचाच्या बाहेर पड. याचक, पितर व देवता यांच्या ऋणांतून मुक्त झाल्यावर, मग तुला तें करतां येईल. भावांसह सर्वमेध व अश्वमेध केल्यानें मोठी कीर्ति होऊन तुला उत्तम गति मिळेल. मी ह्मणतों असें करशील तर तूं धर्मापासून ढळणार नाहींस. जो राजा षष्ठांश कर घेऊन राष्ट्राचें संरक्षण करीत नाहीं, त्याला त्या पापाचा चौथा हिस्सा लागतो. धर्मशास्त्राच्या उल्लंघनानें राजा धर्मभ्रष्ट होतो व त्याला अनुसरल्यानें निर्भय होतो. कामक्रोधांच्या तावडींत न जातां, शास्त्राचा विचार ठेवून, पित्याप्रमाणें जो सर्वांचे ठिकाणीं सारखी दृष्टि ठेवतो त्याला पाप लागत नाहीं. दैव फिरल्यामुळें राजाच्या हातून जर कर्म शेवटास गेलें नाहीं तर त्याबद्दल तो दोषी होत नाहीं. बलात्कारानें किंवा नीतीनें शत्रूंना आपल्या ताब्यांत आणावें; दुष्टांशीं संधि करूं नये; व याप्रमाणें राज्य चोख ठेवावें. शूर, थोर व विद्वान यांचा सत्कार करावा. धनाढ्य वैश्यांचें परिपालन करावें, व्यवहारामध्यें व न्यायाच्या बाबतींत बहुश्रुत लोक नेमावेत, गुणवान असला तरी एकावरच विश्वास टाकून राहूं नये. रक्षण न करणारा, उच्छृंखल, मानी, ताठेर व असूया करणारा अशा राजाला जुलमी समजावा. जे दैवाचा घाव बसून किंवा चोरांकडून रक्षण न झाल्यामुळें नाश पावतात, त्यांबद्दल सर्व पाप राजाच्या माथीं बसतें. मोठ्या विचारानें चोहोंबाजूंनीं जुळवून आणून न्यायानें पौरुष कृत्य करण्यांत अधर्म होत नाहीं. हातीं घेतलेलीं कामें फिसकटतात किंवा दैवाच्या साहाय्यानें शेवटास जातात. परंतु राजानें यत्न केल्यावर मग त्याला पाप लागत नाहीं. या बाबतींत शत्रूंना मारून युद्धांत स्वतः मेलेल्या राजर्षि हयग्रीवाची गोष्ट लक्षांत ठेवण्याजोगी आहे. शत्रूंना जिंकण्यासाठीं व लोकांचें पालन करण्यासाठीं त्यानें आपली शिकस्त केली. निरभिमान राहून मानवी दंडनीति व दैवी सिद्धि यांनीं सतत यज्ञयागादिक क्रिया करून व चारी वर्णांच्या लोकांना आपापल्या धर्मांत नांदवून शत्रूला जिंकून प्रजापालन केल्यावर युद्धांत देह ठेवून हा स्वर्गलोकामध्यें सुखानें नांदत आहे. याच्या थोर व श्लाघ्य वर्तनाची भले लोक स्तुति करीत आहेत. स्वर्ग व वीरलोक मिळवून या महात्म्यानें मोठी कीर्ति मिळविली आहे.'

---

## ८८ कालमहिमा. (१२. २५–२८)

युधिष्ठिर ह्मणाला. 'हें इहलोकचें राज्य व हे निरनिराळ्या प्रकारचे भोग माझ्या मनाला तोषवीत नाहींत; शोकानें अगदीं मला घेरून टाकलें आहे. वीर्यशाली नवरे व मुलगे ह्यांना मुकलेल्या त्या बायकांचें रडणें ऐकून माझ्या मनाला चैन नाहीं.'

यावर फिरून व्यास ह्मणाले, 'मनुष्याला कर्मानें किंवा यज्ञानें कांहीं मिळत नाहीं; कोणी कोणाला कांहीं देत नाहीं. **ब्रह्मदेव कालचक्रानें सर्व गोष्टी घडवून आणीत असतो. मनुष्यांना वेळ आल्यावांचून विशेष कांहीं मिळणें शक्य नाहीं. केवळ बुद्धीच्या जोरावर किंवा शास्त्र पढल्यानें मूर्खांचे सुद्धां प्रसंगी हेतू साधतात. वेळ आली**

**नसेल तर कला, मंत्र व औषधी यांचा कांहीं उपयोग होत नाहीं. तेच वेळ आली असतां उत्तम फलप्रद होतात.** कालानेंच वारा जोरानें वाहतो, कालानेंच ढग पाण्यानें भरतात, कालानेंच पद्मकमलाप्रमाणें पाणी स्वच्छ होतें, कालानेंच झाडें वनांत पोसतात, कालानेंच काळोख्या व चांदण्या रात्री येतात, व पूर्णबिंब चंद्र उगवतो. वेळ आल्यावांचून झाडांना फळपुष्पें येत नाहींत. वेळ आल्यावांचून नद्यांचा प्रवाह जोरावत नाहीं, वेळ आल्यावांचून पक्षी, साप, हरणें, हत्ती व दुसरे पशू यांना माज येत नाहीं, वेळ आल्यावांचून स्त्रियांना गर्भ रहात नाहीं, वेळ आल्यावांचून हिंवाळा, उन्हाळा, पावसाळा येत नाहींत, वेळ आल्यावांचून मनुष्य जन्मत नाहीं किंवा मरत नाहीं. वेळ आल्यावांचून मूल बोलूं लागत नाहीं, मनुष्याला तारुण्यदशा येत नाहीं किंवा पेरलेलें बीं उगवत नाहीं. वेळ आल्यावांचून सूर्य उगवत नाहीं किंवा मावळत नाहीं, चंद्राची कळा वाढत नाहीं किंवा कमी होत नाहीं व समुद्राला मोठमोठ्या लाटा येत नाहींत. हा कठीण काळाचा फेरा सर्व मर्त्यांच्या मागें लागला आहे. कारण वेळ आली असतांच सर्व राजे मरतात. हे दुसऱ्यांना मारतात तसेंच दुसरे यांना मारतात. हीही पण सर्व व्यवहारिक भाषा झाली. हा कोणाला मारीत नाहीं व यांला कोणी मारीत नाहीं. कोणी हा मारतो असें समजतात व कोणी मारीत नाहीं असें समजतात. परंतु सर्व भूतमात्रांचा जन्म व नाश त्यांच्या त्यांच्या स्वभावानें नियमित केले आहेत. संपत्ति नाहींशी झाली असतां किंवा बायको, मूल, बाप मेले असतां ' केवढा तरी दुःखाचा डोंगर कोसळला, ' ह्मणून त्यावर विचार करीत राहिल्यानें दुःख उगीच वाढतें. तेव्हां असा मूर्खाप्रमाणें रडत कां बसला आहेस? वियोगानें रडत बसलेल्या इतर अज्ञान्यांबरोबर तूं कां असा रडतोस? दुःखांनीं दुःखें व भयांनीं भयें अनुभवतोसें वाटणारा हा आत्मा सुद्धां वास्तविक पाहतां माझा नव्हे; किंवा सर्व जगच माझें आहे; आणि तें जसें माझें आहे तसेंच दुसऱ्याचेंही आहे, असें ज्याला वाटतें तो कधीं घाबरत नाहीं. मूर्खाला शोकाला हजारों कारणें व आनंदाला शेंकडों कारणें होतात. परंतु शहाण्याला तीं होत नाहींत. याप्रमाणें बऱ्या वाईट गोष्टी व सुखदुःखें त्या त्या कालीं प्राणिमात्रांवर फिरून फिरून येतात. जग सारें दुःखानें भरलेलें आहे त्यांत सुख मुळींच नाहीं. त्या दुःखापासूनच सुखाची कल्पना येते. **आशेनें मनुष्याला घेरलें असतां त्यापासून दुःख होतें व तें दुःख नाहींसें झालें ह्मणजे सुख होतें.** सर्वकाळ दुःख किंवा सर्वकाळ सुख कधींच होत नाहीं. कारण सुखाचा शेवट दुःखांत व प्रसंगीं दुःखापासून सुख होत असतें. म्हणून ज्याला शाश्वत सुखाची इच्छा असेल त्यानें या दोन्हींला जिंकावें. सुखाचा शेवट झाला ह्मणजे दुःखाला आरंभ होतो व दुःखाचा शेवट झाला ह्मणजे सुखाला आरंभ होतो. ज्याकरतां शोकसंताप होतो किंवा जिच्या मुळाला कष्ट आहेत अशी गोष्ट, साप चावलेल्या एखाद्या भागाप्रमाणें तोडून टाकावी. सुख असो किंवा दुःख असो, प्रिय असो किंवा अप्रिय असो, जें येऊन पडेल त्याला मुकाट्यानें डोकें द्यावें. बायकापोरांचें यत्किंचितही प्रिय करीत असतां मी कोण, कोणाचा, कशासाठीं, व कसा हें तुला कळून येईल. जे अगदीं मूढ असतात किंवा जे बुद्धीच्या पलीकडे जाऊन ब्रह्ममय झालेले असतात, त्यांनाच सुख मिळतें. मध्यस्थितीच्यांना केवळ क्लेश होतात खरें खोटें ओळखणाऱ्यांनाच धर्माचें किंवा सुखदुःखाचें खरे इंगित कळलें ह्मणावयाचें. निरनिराळ्या दुःखांनीं जो दुःखी होतो त्याला सुखाची पाळी कधींच येणार नाहीं. कारण दुःखाचा शेवट कधीं होत नसून एका मागून एक त्याची परंपरा लागलीच असते. सुखदुःख, वैभव, आपत्ति, लाभ, हानि, जन्म, मरण हीं फेऱ्यानें येत असतात. म्हणून धीराच्या मनुष्यानें त्या त्या वेळीं सुख किंवा दुःख मानून घेऊं नये. रणामध्यें युद्ध करणें ही राजाची दीक्षा असून योग्य रीतीनें दंडनीति पाळणें हेंच त्याचें योगसाधन आहे. व यज्ञामध्यें पैशाचा विनियोग करणें हेंच योग्य दान असून हीं तिन्ही त्याला पावन करणारीं समजलीं आहेत. मोठ्या हुशारीनें व नीतीनें राज्याचें संरक्षण करून अहंकार सोडून अनेक यज्ञ करणारा, सर्व लोकांवर न्यायदृष्टि ठेवणारा, वर्णाश्रमधर्म चालविणारा व वेदशास्त्रसंपन्न असा राजा युद्धामध्यें देह ठेवून स्वर्गामध्यें सुखांत राहतो. '

याप्रमाणें व्यास बोलत असतां पैशाहून अधिक कांहीं नाहीं, ह्या अर्जुनाच्या भाषणाला अनुलक्षून युधिष्ठिर त्याला ह्मणाला, 'अर्जुना, निर्धनाला स्वर्ग, सुख किंवा दुसरा कोणचाही अर्थ साधत नाहीं असें जें तूं ह्मणालास तें अगदीं खोटें आहे. केवळ वेदाध्ययनामध्यें व तपामध्यें गढलेल्या मुनींना सिद्धि मिळून सनातन लोक मिळाल्याचें आपण ऐकतों. सर्व धर्म त्याचप्रमाणें ऋषींचे नियम नेहमीं पाळणाऱ्यांना ब्रह्मज्ञ ह्मणतात. वेदाध्ययनामध्यें त्याचप्रमाणें ज्ञानप्राप्तीमध्यें गढलेले धर्मनिष्ठ समजले जातात; ज्ञानप्राप्तीमध्यें गढलेल्यांचीं सर्व कार्यें शेवटाला जातात, असें तापसांचें मत आहे. हीं वेदोक्त कर्मे, करून दान, वेदाध्ययन, यज्ञ व कठीण असा आत्मनिग्रह यांच्या योगानें सूर्याच्या दक्षिणमार्गानें लोक स्वर्गाला जातात. उत्तरेकडचा जो रस्ता दिसतो, तो नियमाच्या योगानें योग्यांना साध्य असून त्याच्या योगानें प्रकाशमय अशा सनातन लोकाला ते जातात. प्राचीन विद्वान या दुसऱ्या गतीचीच प्रशंसा करतात. संतोष हाच स्वर्गाहून श्रेष्ठ आहे, संतोष हेंच श्रेष्ठ सुख आहे. संतोषाहून अधिक चांगलें कांहीं नाहीं. जो राग व आनंद यांना जिंकतो त्यालाच उत्तम सिद्धि मिळते. ज्याप्रमाणें कासव आपले सर्व अवयव आंत आंखडून घेतो, त्याप्रमाणें जेव्हां मनुष्य सर्व मनोविकार आवरतो व जेव्हां त्याला कोणाची भीति रहात नाहीं व त्याची कोणाला रहात नाहीं, जेव्हां इच्छा, द्वेष सोडून देऊन हा कोणाही प्राणिमात्रांवर पापभाव ठेवीत नाहीं व मान व मोह बाजूला ठेवून जेव्हां हा फार संबंध ठेवीत नाहीं तेव्हां त्या आत्म्याच्या ठिकाणीं रममाण होऊन जाणाऱ्या साधूला मोक्ष मिळतो. कोणाला धर्म तर कोणाला व्रत व कोणाला पैसा हवा असतो. अमक्यासाठीं म्हणून जो पैशाची इच्छा करतो, त्यानें ती इच्छाच न करणें बरें. पैशामध्यें त्याचप्रमाणें त्यामध्यें घडणाऱ्या धर्मामध्यें पुष्कळ दोष आहेत. देण्याकरितां म्हणून मिळविलेला पैसा हातांतून सुटणें मुळीं कठीण काम आहे. जे पैसा मिळवितात त्यांच्या ठिकाणीं सरळपणा रहात नाहीं. जे द्रोह करतात त्यांनाच पैसा मिळतो. पुढेंही त्यासंबंधानें पुष्कळ अनर्थावह गोष्टी घडतात. यासाठीं पश्चात्ताप अगर भीति टाकून थोड्या पैशाच्या आशेनें सुद्धां द्रोह करण्यास प्रवृत्त झालेल्या पुरुषास भ्रूणहत्येसारखें पाप सुद्धां लक्षांत येत नाहींत. चोरांनीं गांठल्यावर ज्याप्रमाणें निरुपायामुळें मनुष्य त्याजपुढें पिशवी सोडतो तशा रीतीनें जो नोकरांविषयीं अनुदार त्याच्या संबंधानें त्यांचें मन शुद्ध नसतें. ज्याचे जवळ पैसाच नाहीं त्याला कोण काय ह्मणणार ? तो सर्वांपासून मुक्त असून सुखी असतो. देवस्व घेतलेल्याप्रमाणें, पैशानें कोणी सुखी होत नाहीं. ब्रह्मदेवानें पैसा व पुरुष यज्ञाकरितां उत्पन्न केले असल्यामुळें, सर्व पैशाचा उपयोग यज्ञाकडे झाला पाहिजे. आपल्या वासनेकडे उपयोग करणें प्रशस्त नव्हे. तेव्हां यज्ञामध्यें पैसा खर्चून टाकणें हाच त्याचा विनियोग असतां तो सांठविण्यांत कांहीं अर्थ नाहीं. व धर्मापासून भ्रष्ट झालेल्यांना जे हा पैसा देतात त्यांनाही शंभर वर्षें मलभक्षण करावें लागतें. बाळ अभिमन्यु, द्रौपदीचे मुलगे, धृष्टद्युम्न, विराट, द्रुपद, वृषसेन, धृष्टकेतु, त्याचप्रमाणें नाना देशाचे दुसरे वीर या युद्धांत मेल्यामुळें राज्याच्या आशेनें आपल्या वंशाचा समूळ उच्छेद करणाऱ्या व ज्ञातीला मारणाऱ्या मला शोक मुळींच सोडीत नाहीं. ज्यांच्या मांडीवर मी लोळलों खेळलों त्या पितामहांना मीं राज्यलोभ्यानें मारविलें ! केवढा त्यांचा पराक्रम ! केवढें त्यांचें तेज ! ज्या वेळीं यांना रक्तबंबाळ होऊन जमिनीवर पडलेले पाहिलें, तेच वेळीं भयंकर मनस्तापानें मला घेरलें. ज्यांनीं लहानपणीं आह्मांला वाढवून आमचें रक्षण केलें त्यांना मीं गुरुघाती पाप्यानें राज्यलोभानें थोड्या दिवसाच्या राज्यासाठीं मारविलें ! त्याचप्रमाणें सकल राजांना पूज्य असे आचार्य—माझ्या शब्दांवर ज्यांचा पूर्ण भरंवसा—रणांत त्यांकडे जाऊन मी पापी त्यांच्या मुलासंबंधानें त्यांजपाशीं खोटें बोललों. आणि सत्याचें कवच टाकून देऊन त्या नांवाचा हत्ती मेला असतां अश्वत्थामा मेला ह्मणून मीं त्यांना सांगितलें. तेव्हां असें भयंकर कर्म करून मी कोणच्या लोकाला जाणार ? रणांतून पाय मागें न घेणारा माझा वडील भाऊ कर्ण याला मीं मारविलें ! तेव्हां माझ्याहून पापी कोण असेल ? पर्वताच्या ठिकाणीं जन्मलेल्या सिं-

हासारख्या बाळ अभिमन्यूला मीं लोभानें द्रोणांनीं संरक्षिलेल्या व्यूहामध्यें शिरावयाला लाविलें, तेव्हांपासून भ्रूणहत्या करणाऱ्या मला अर्जुनाच्या किंवा श्रीकृष्णाच्या तोंडाकडे सुद्धां पाहवत नाहीं. द्रौपदीला पांच पर्वतांला मुकलेल्या पृथ्वीप्रमाणें तिच्या पुत्रांना मुकलेली पाहून मला तिची कींव येते. याप्रमाणें ह्या पृथ्वीच्या नाशाला कारणीभूत अशा मीं मोठमोठे गुन्हे केले असल्यामुळें असा बसूनच हें शरीर वाळवून सोडणार. गुरुहत्या करणाऱ्या मीं प्रायोपवेशन केलें आहे असें समजा. दुसऱ्या जन्मामध्यें तरी असा कुळाचा फडशा पडूं नये म्हणून मी आतां कांहीं खाणार नाहीं किंवा पिणार नाहीं. येथें राहूनच मी या अत्यंत प्रिय प्राणांना सुकविणार. तुमची क्षमा मागून वाटेल तिकडे जाण्याला मी तुह्मांला परवानगी देतों.' यावर त्याला 'असें करूं नको' ह्मणून सांगून व्यास फिरून ह्मणाले, 'धर्मा, याप्रमाणें उगीच फार वेळ शोक करण्यांत कांहीं अर्थ नाहीं. हा सर्व दैवाचा खेळ आहे, हें तुला मी फिरून सांगतों. जन्मलेले प्राणी एकत्र जमले असतां त्यांचा वियोग हा झालाच पाहिजे. पाण्यामध्यें निघणाऱ्या बुडबुड्याप्रमाणें ते निघतात व फुटतात. **जमविलेल्या वस्तूंचा शेवट नाशच होतो; वैभवाचा शेवट वियोगामध्यें होतो व प्राणाचा शेवट मरण्यामध्यें होतो. सुखावह वाटणाऱ्या आळसाचा दुःखांत शेवट होतो व दुःखदायक वाटण्याऱ्या दक्षतेचा परिणाम सुखामध्यें होतो.** वैभव, लक्ष्मी, भीड, समाधान, कीर्ति या गोष्टी दक्ष मनुष्याचे ठिकाणीं असून, आळशाच्या वाऱ्याला सुद्धां त्या उभ्या रहात नाहींत. **कोणी मित्र सुख देऊं शकत नाहीं किंवा कोणी शत्रु दुःख देऊं शकत नाहीं. शहाणपणाच पैसा देतो असें नाहीं व पैसा सुख देतो असेंही नाहीं.** ब्रह्मदेवानें ज्या कर्मासाठीं तुला निर्माण केलें आहे, तें कर्म करशील तरच तुला सिद्धि मिळेल. या बाबतींत तुला वाटेल तसें वागण्याला तूं स्वतंत्र नाहींस. जनक राजानें शोकाकुल होऊन ज्ञातीच्या किंवा पैशाच्या लाभहानीच्या वेळीं कल्याणेच्छूनें कसें वागावें ह्मणून बुद्धिमान अशा अश्मा नांवाच्या ब्राह्मणांना विचारिलें असत. ते ह्मणाले, 'हा मनुष्याचा देह उत्पन्न झाल्यावरोबर सुखदुःखें त्याच्या मागें लागतात. त्यापैकीं कोणतेंही एक येऊन पडलें असतां त्याजबरोबर जें जें ह्मणून येऊन पडतें तें तें एकदम ह्याच्या बुद्धीला पालट पाडतें. वैभवाच्या वेळीं मी मोठा कुलीन आहें, मीं फत्ते मिळविली आहे, मी यःकश्चित् सामान्य मनुष्य नाहीं, अशा ह्या तीन विचारांनीं त्याची बुद्धि घेरली जाते. विषयोपभोगामध्यें गढून जाऊन वडिलोपार्जित द्रव्य उडवून भिकेला लागल्यावर दुसऱ्याचा पैसा अपहार करणें त्याला वरें वाटूं लागतें. अशी बुद्धि झाली ह्मणजे सावजाप्रमाणें याला पकडून राजे लोक मारतात; याप्रमाणें यांची आयुष्याची मर्यादा वीस किंवा तीस वर्षांवर येऊन ठेपते. करितां राजानें सर्व प्राणिमात्रांच्या आचरणावर बारीक नजर ठेवून कष्टी झालेल्या लोकांना मदत करावी. चित्ताला श्रम पडणें किंवा एखादी अरिष्ट गोष्ट घडणें हीं दोनच मानसिक दुःखाला कारणें आहेत. या प्रकारें हीं व दुसरीं विषयोपभोगांपासून होणारीं दुःखें मनुष्यावर येऊन पडतात. जरा आणि मृत्यु हे मनुष्यांना लांडग्याप्रमाणें खाऊन टाकतात. मग तो बलवान असो वा दुर्बळ असो, लहान असो वा थोर असो. सुख किंवा दुःख जें जें ह्मणून प्राणिमात्रावर येऊन पडेल तें तें सारें त्याला निमूटपणें सोसलें पाहिजे. तीं कांहीं टाळतां येणें शक्य नाहीं. मग तीं पूर्व वयांत भोगावीं लागोत, मध्यवयांत लागोत. किंवा उत्तर वयांत लागोत. जरामरणादिक व त्याशिवाय दुसऱ्या इच्छिलेल्या गोष्टी टाळतां येणें शक्य नाहीं. असंगाशीं संग, प्रियवस्तूंचा वियोग, बरें वाईट, सुख दुःख हीं सर्व दैवाधीन असतात. त्याचप्रमाणें जन्म व मरण, लाभ व हानी, हीं सर्व प्राक्तनानुरूप असतात. गंध, वर्ण, रस, स्पर्श हीं स्वभावतः उत्पन्न होतात. बसणें, निजणें, चालणें, उठणें, खाणें, पिणें हीं सर्व कालानेंच ठरवून टाकिलीं आहेत. वैद्य असतात ते सुद्धां रोगग्रस्त असतात बलवान दुबळे असतात, श्रीमान षंढ असतात. तेव्हां हा कालाचा फेरा मोठा विचित्र आहे. उत्तम कुलांत जन्म, सामर्थ्य, आरोग्य, रूप, वैभव व उपभोग या गोष्टी दैवानुरूप मिळतात. गरीबांना नको असून सुद्धां पुष्कळ मुलें असतात व श्रीमानांना मुलींच मूल होत नाहीं. व्याधि, अग्नि, पाणी, शस्त्र, भूक,

विष, ज्वर, मृत्यु, वरून पडणें, इत्यादि संकटें जन्मकाळीं मनुष्याच्या कपाळीं जसजसें लिहून ठेविलें असतात, त्या त्या प्रमाणें येऊन गुदरतात. कोणाला अपराध न करतां शिक्षा भोगावी लागते व कोणी अपराध करून शिक्षेपासून मुक्त असतात. कोणी श्रीमंत तारुण्यांत मरतांना दिसतो, व कोणी भिकारी विपत्तींत व ह्मातारपणांत रखडत शंभर वर्षें जगतो. बहुधा श्रीमानांना या जगीं उपभोग घेण्याची शक्ति नसते व गरीब लोक लांकडें सुद्धां पचवितात. असंतोषामुळें एखादा दुष्ट मनुष्य जें जें इष्ट पाप करतो, त्याला त्याला कालाची प्रेरणा न ओळखल्यामुळें तें मीं केलें असें वाटते. याप्रमाणें मृगया, द्यूत, स्त्रिया, दारू व तंटे या गोष्टीला शहाण्यांनीं नांवें ठेविलीं आहेत तरी मोठमोठे विद्वान सुद्धां त्यांत गढलेले दिसतात. याप्रमाणें सर्व इच्छिलेल्या व न इच्छिलेल्या गोष्टी कालानें मनुष्यावर येऊन गुदरतात. वारा, आकाश, अग्नि, चंद्रसूर्य, दिवस, रात्र, ग्रहनक्षत्रें, नद्या व डोंगर यांना कोण करतो व कोण धरतो ? थंडी, वारा व पाऊस त्या त्या वेळीं येत असतात. हीच गोष्ट मनुष्याच्या सुखदुःखाची आहे. औषधांनीं, मंत्रांनीं, होमांनीं व जपांनीं मृत्यूच्या किंवा जरेच्या सपाट्यांत सांपडलेल्या मनुष्याची सुटका होत नाहीं. ज्याप्रमाणें महासागरामध्यें एक लांकूड दुसऱ्या लांकडाशीं जुळून पुन्हां वेगळें होतें, तीच गोष्ट भूतमात्रांच्या समागमाची आहे. जे लोक, स्त्रिया व गाणेंबजावणें यांच्यामध्यें गर्क असतात, व जे अनाथ दुसऱ्याचें अन्न खाऊन असतात, त्या दोघांशीं काल सारखाच वागत असतो. हजारों आईबाप व शेंकडों बायकामुलें यांचा ह्या संसारामध्यें अनुभव आला आहे. ते कोणाचे व आपण कोणाचे ? बायको, बंधु व जिवाळ्याचे लोक हे सर्व ह्मणजे रस्त्यांत एकत्र जमलेल्या चार लोकांप्रमाणें आहेत. मी कोठें आहे ? कोठें जाणार ? मी कोण ? येथें कां आहे ? कशासाठीं व कोणाबद्दल शोक करतों इत्यादि गोष्टींकडे लक्ष लावावें. प्रियाची संगती शाश्वत नसून हा संसार चक्राप्रमाणें फिरत आहे. कोणाच्या दृष्टीला न पडलेला परलोक शहाण्यांना प्रत्यक्ष दिसत असतो. ज्ञानेच्छूनें शास्त्रांना तुच्छ न करतां त्यांच्यावर विश्वास ठेवावा. पितृकार्य करावें, धर्माप्रमाणें वागावें, विधिपूर्वक यज्ञ करावा. व धर्मार्थकाम विचारपूर्वक आचरावेत. ज्यामध्यें जरामृत्युरूपी मोठमोठे जलचर आहेत अशा खोल कालरूपी महासागरांत हें जग बुडत आहे, तरी कोणी हे जाणत नाहीं. वैद्यक शिकलेले पुष्कळ वैद्य सुद्धां आपल्या कुटुंबाबरोबरच व्याधिपीडित होऊन निरनिराळे काढे व औषधें घेत असतात, तरी मृत्यूला त्यांच्यानें मागें टाकतां येत नाहीं. रसायनशास्त्र येत असून त्याचे उत्तमोत्तम प्रयोग टाऊक असलेले लोकही ह्मातारपणानें खंगतात. त्याचप्रमाणें तप करणारे, वेदाध्ययनांत गढलेले, तसेंच ज्ञानशील लोक सुद्धां जरामृत्यूच्या तडाक्यांतून सुटले नाहींत. मनुष्य एकदां जन्माला आल्यावर गेलेले दिवस, महिने, वर्षें, पंधरवडे किंवा रात्री कांहींच परत येत नाहींत. याप्रमाणें कालाच्या तावडींत सांपडून हा नाशवंत प्राणी सर्व प्राणिमात्रांनीं घेतलेल्या ह्या कायमच्या मोठ्या रस्त्याला लागतो. जिवापासून देह असो, किंवा देहापासून जीव असो परंतु बायकांमुलांशीं किंवा आप्तबांधवांशीं होणारा संबंध हा केवळ वाटेंतलाच असतो. हा संबंध कायमचा कोणाशींच जडत नाहीं. प्रत्यक्ष आपल्या शरीराशीं जडत नाहीं मग इतराची गोष्ट कशाला ? तुझा बाप, तुझा आजा आतां कोठें आहेत ? आज तुला ते दिसत नाहींत किंवा तूं त्यांना दिसत नाहींस. मनुष्याला स्वर्ग किंवा नरकही दिसत नाहींत हें खरें, परंतु शास्त्र हाच शहाण्यांचा डोळा आहे. ह्मणून शास्त्राप्रमाणें वागून, ब्रह्मचर्य पाळल्यावर प्रजोत्पादन करून व यज्ञ करून, पितर, देव व मनुष्य यांचे ऋणांतून मुक्त व्हावें. व याप्रमाणें हृदयांतील चिंता दूर करून स्वर्ग व इहलोक मिळविण्यामध्यें दक्ष असावें. याप्रमाणें बरोबर धर्माचरण करून द्रव्याचा यथायोग्य विनियोग करणाऱ्या राजाचें यश सर्व लोकांमध्यें वाढतें. ' याप्रमाणें अश्म्यांचें भाषण ऐकून सर्व शंका दूर झाल्यावर शोक नाहींसा होऊन जनक आपल्या राजधानीला गेला. त्याचप्रमाणें तूंही क्षात्रधर्मानें मिळविलेल्या ह्या पृथ्वीचा उपभोग घे. माझ्या ह्मणण्याकडे दुर्लक्ष करूं नकोस. '

## ८९ थोर राजांचा वृत्तांत. (१२. २९—)

हें व्यासांचें भाषण ऐकून युधिष्ठिर गप्प झाला. त्याच्या ह्या मनोवृत्तीनें सर्वच संशयांत पडल्यामुळें, अर्जुनानें श्रीकृष्णाला त्याची समजूत घालण्याला विनंति केली. युधिष्ठिराचें लहानपणापासून अर्जुनापेक्षां श्रीकृष्णावर अधिक प्रेम असल्यामुळें, त्याचें म्हणणें तो मोडील असें नव्हतें. श्रीकृष्ण, चंदनचर्चित असा त्याचा हात धरून त्याची समजूत घालूं लागला. तेवेळीं मनोहर डोळ्यांनीं खुलून दिसणारें त्याचें तोंड सूर्योदयाचे वेळीं विकसलेल्या कमलाप्रमाणें दिसत होतें. तो ह्मणाला, ' शरीर शोषण करणारा हा शोक बाजूला ठेव. ह्या रणामध्यें जे मेले आहेत ते आतां फिरून मिळणार नाहींत. रणाला शोभा देणारे ते सर्व वीर शत्रूंना तोंड देऊन मेले आहेत. या महायुद्धांत शस्त्रानें पवित्र होऊन, ते स्वर्गाला गेले आहेत. वेद व वेदांगें यांचें परिशीलन करून क्षात्रधर्मामध्यें सदा दक्ष राहिल्यानें वीरांना उचित अशी गति त्यांना मिळाली आहे. तेव्हां यासंबंधानें शोक करणें तुला शोभत नाहीं. यासंबंधानें पुत्रशोकानें पीडिलेल्या सृंजयाची नारदांनीं समजूत केली तो जुना इतिहास तुला सांगतों त्याकडे लक्ष दे. ह्मणजे तुझें दुःख कमी होईल. नारद ह्मणाले, ' हे सृंजया, दुष्ट ग्रहांचें शमन करणारें व आयुष्य वाढविणारें मागच्या राजांचें सुश्राव्य असें चरित्र ऐक, ह्मणजे तुझा संताप नाहींसा होईल.

आविक्षाताचा मुलगा मरुत याच्या विश्वसृग् महायज्ञामध्यें, इंद्र, वरुण, बृहस्पति देव हजर होते. त्यानें प्रत्यक्ष इंद्रावर सुद्धां वरचढ केली; इंद्रांचें प्रिय करण्याकरितां बृहस्पतींनीं त्याचा यज्ञ करण्याचें नाकारलें असतां त्यांचे धाकटे भाऊ संवर्त यांनीं त्याजकडून यज्ञ करविला. याच्या सत्रामध्यें विश्वेदेव सभासद असून, देव व साध्य अन्न वाढणारे होते. देवांना या यज्ञांत सोम मिळून दक्षिणेची रेलचेल उडून गेली होती. याच्या कारकीर्दींत जमीन नांगरल्यावांचून तिच्यामध्यें विपुल धान्य उत्पन्न होत होतें; व पृथ्वी जिकडे तिकडे चैत्य वृक्षांनीं शोभायमान दिसत होती. असा हा थोर राजा सुद्धां कालाच्या तावडींतून सुटला नाहीं.

तसाच अतिथीचा मुलगा सुहोत्र याच्या कारकीर्दींत इंद्र सर्व वर्षभर सोन्याचा पाऊस पाडीत असे. याच्या वेळीं पृथ्वीच्या वसुमति नांवाचा खरेपणा दिसून येत होता. याच्या प्रदेशांत नद्यांमधून सोनें वहात असे. त्याचप्रमाणें इंद्र, नद्यांमध्यें कासव, खेंकडे, सुसरी, मगर इत्यादि शेंकडों हजारों प्राणीसुद्धां सोन्याचेच उत्पन्न करीत असे. आणि हें सर्व सोनें कुरुजांगलामध्यें यज्ञ करून तेथें त्यानें ब्राह्मणांना दिलें. पण तोसुद्धां काळाच्या तावडींत सांपडला.

तसाच अंग देशाचा राजा बृहद्रथ यानें यज्ञामध्यें हजारों घोडे, सुवर्णभूषित मुली, जातिवंत हत्ती, सुवर्णभूषित बैल व गाई, विष्णुपद पर्वतावर यज्ञ करून, त्यांमध्यें दक्षिणेमध्यें वांटल्या. यानें केलेल्या शंभर यज्ञांमध्यें इंद्र सोमानें व ब्राह्मण दक्षिणेनें मस्त झाले होते. ज्यांमध्यें सोमसंस्था असते, अशा सात महायज्ञांमध्यें, त्यानें जो पैसा ओतला, तसा पैसा ओतणारा कोणी झाला नाहीं व होणार नाहीं. पण हा सुद्धां अखेरीस मेलाच.

त्याचप्रमाणें उशीनराचा मुलगा शिबी यानें ढालीप्रमाणें ही पृथ्वी फिरवून आपल्या रथाच्या मोठ्या घरघर शब्दानें दरदरून सोडली; व ती आपल्या अंकित करून एकछत्री सत्ता केली. जितके म्हणून या जवळ ग्राम्य किंवा वन्य गाई घोडे होते, ते सर्व त्यानें यज्ञामध्यें देऊन टाकले. या राजासारखा राज्याचा गाडा ओढणारा कोणी झाला नाहीं, व होणार नाहीं, असें प्रत्यक्ष ब्रह्मदेवाला वाटत होतें. तो सुद्धां मेलाच.

तसाच दुष्यंतापासून झालेला शकुंतलेचा मुलगा भरत यानें देवांसाठीं यमुनेच्या कांठीं तीनशें, सरस्वतीच्या कांठीं वीस व गंगेच्या कांठीं चौदा घोडे यज्ञाच्या स्तंभाला बांधून हजार अश्वमेध व शंभर राजसूय यज्ञ केले. आकाशाला हात पोहोंचविण्याप्रमाणें याच्यासारखें अचाट कृत्य कोणाही मनुष्याच्या हातून होणें शक्य नाहीं. त्यानें हजारों वेद्या तयार करून हजारों घोडे व अगणित द्रव्य कण्वांना दिलें. हासुद्धां शेवटीं काळाच्या तावडींत सांपडलाच.

त्याचप्रमाणें दाशरथि राम हा आपल्या प्रजेवर पोटच्या पोराप्रमाणें दया करीत होता; याच्या रा-

ज्यांत कोणी विधवा किंवा अनाथ नव्हते; तो नेहमीं सर्वांना बापाप्रमाणें असे. नेहमीं पाऊस वेळचे वेळेवर पडून याचे राज्यांत दुष्काळाचें नांव नव्हतें; पाण्यांत बुडून किंवा भाजून कोणी मरत नव्हते; रोगराई ठाऊक नव्हती. स्त्रीपुरुष हजार वर्षें जगत असून ते निरोगी होते व त्यांचे सर्व हेतू पूर्ण होत; बायकांमध्यें सुद्धां एकमेकींमध्यें भांडण होत नसे; मग पुरुषाची गोष्ट राहिली बाजूला. प्रजा नेहमीं धर्मानें वागून संतुष्ट, निर्भय व स्वस्थ असे. सर्व लोक खरेपणानें वागत असत. झाडांना कोणी उपद्रव न दिल्यामुळें त्यांवर नेहमीं फलपुष्पें रहात. गाई डोणभर दूध देत. तो महातपस्वी चौदा वर्षें वनांत राहून नंतर त्यानें ज्यामध्यें कोणाला प्रतिबंध नव्हता असे स्तुत्य दहा अश्वमेध केले. याप्रमाणें अकरा हजार वर्षें त्यानें अयोध्येमध्यें राज्य केलें. त्याला सुद्धां काळानें सोडलें नाहीं.

तसाच भगीरथ राजा ज्यानें केलेल्या यज्ञांत सोम पिऊन इंद्रानें आपल्या बाहुवीर्यानें हजारों असुरांना जिंकलें. यानें आपल्या यज्ञांमध्यें सुवर्णभूषित दहा लक्ष मुली दक्षिणा दिल्या. त्या सर्व मुली चार चार घोडे जुंपलेल्या रथांत बसविल्या होत्या. प्रत्येक रथामागें जातिवंत व सुवर्णानें शृंगारलेले शंभर शंभर हत्ती होते; व प्रत्येक हत्तीच्या मागें हजार हजार घोडे व प्रत्येक घोड्याच्या मागें हजार हजार गाई व गाईंच्या मागें हजार हजार मेंढ्या होत्या. एकांतामध्यें त्याच्या मांडीवर गंगा बसली असतां तिला त्यापासून उर्वशी झाली तीच त्रिपथगा पुढें त्याची मुलगी झाली. तो भगीरथ सुद्धां मेला.

त्याचप्रमाणें दिलीप राजा. यानें आपल्या महायज्ञामध्यें ही सर्व वसुसंपूर्ण पृथ्वी ब्राह्मणाला दिली. यानें यज्ञ करीत असतां प्रत्येक यज्ञामध्यें, हजार हजार सुवर्णभूषित हत्तीच्या दक्षिणा दिल्या. प्रसंगीं इंद्र व देव त्याचें साहाय्य घेत असत. याच्या लखलखीत सोन्याच्या यज्ञस्तंभावरील कड्यावर सहा हजार देव व गंधर्व नाचत असत; व त्यांमध्यें स्वतः विश्वावसु सप्तसुरांवर बीणा वाजवीत असे. याचे सोन्याची झूल घातलेले हत्ती रस्त्यावरून खुशाल पडत असत. या महात्म्याचें दर्शन घेणाऱ्यांनीं सुद्धां स्वर्ग मिळविला आहे. वेदाध्ययनाच्या, धनुष्याच्या टणत्काराच्या व द्या ह्मणून निघणाऱ्या अशा तीन प्रकारच्या शब्दाला याच्या राज्यांत खळ ह्मणून पडत नसे. तो सुद्धां मेला.

त्याचप्रमाणें युवनाश्वपुत्र मांधात्याची गोष्ट आहे. मंत्रपूत केलेल्या आज्यापासून युवनाश्वाच्या पोटांत हा राहिला व मरुत्तांनीं त्याला त्याच्या पोटांतून बरगडी फाडून काढला. युवनाश्वाच्या मांडीवर त्या मुलाला पाहून देव एकमेकांना विचारूं लागले हा कशावर रहाणार? तेव्हां इंद्रानें हा माझ्यावर रहाणार असें ह्मणून आपलें बोट त्याचे तोंडांत ठेविलें. त्यापासून दुधाची धार निघून तो मुलगा वाढला. ह्मणून त्याला मांधाता म्हणूं लागले. याप्रमाणें इंद्राचें बोट पिऊन तो शंभर दिवसांत वाढला. बारा दिवसांत तो बारा वर्षांच्या मुलासारखा दिसूं लागला. सर्व पृथ्वी एका दिवसांत या महात्म्याच्या ताब्यांत आली. यानें आंगार, मरुत, असित, गय, बृहद्रथ या राजांना जिंकलें; अनेक अश्वमेध व राजसूय यज्ञ करून, यानें दहा योजनें लांब असे सोन्याचे रोहित मासे ब्राह्मणाला दिले. व राहिलेला पैसा इतर लोकांमध्यें वांटला. असा हा मांधाताही शेवटीं मेला.

त्याप्रमाणेंच नहुषपुत्र ययातीही सर्व सागरान्त पृथ्वी जिंकून सोटा फेंकून तो पडेल त्या ठिकाणीं वेदी उभारून मोठमोठे यज्ञ करून वेद्यांनीं पृथ्वी भरून काढीत समुद्रापर्यंत जाऊन पोहोंचला व हजार यज्ञ व शंभर वाजपेय करून तीन सोन्याच्या पर्वतांनीं ब्राह्मणांना तृप्त केलें. त्याचप्रमाणें युद्धामध्यें दैत्यदानवांना मारून सर्व पृथ्वी आपल्या मुलांना वांटून दिली. सरहद्दीवरचे मुलूख यदु, द्रुह्यु प्रभृति मुलांना देऊन, पुरूला राज्याभिषेक केल्यावर हा बायकोसह वनाला गेला. पण तोही कांहीं चिरंजीव झाला नाहीं.

त्याचप्रमाणें नाभागपुत्र पुण्यवान अंबरीष याला त्याच्या प्रजेनीं आपलें रक्षण करण्यास निवडलें. यानें यज्ञामध्यें यज्ञ केलेले असे दहा लाख राजे ब्राह्मणांना सुश्रूषेला दिले. असें कृत्य पूर्वी कोणीं केलें नव्हतें व पुढें कोणी करणार नाहीं. पण तोही कांहीं शाश्वत जगला नाहीं.

त्याचप्रमाणें चित्ररथाचा मुलगा शशिबिंदु याला

लाख बायका असून, दहा लाख मुलें होतीं हें सर्व सुवर्णकवचधारी मुलगे उत्तम धनुर्धारी होते. त्या प्रत्येकांनीं शंभर शंभर मुलींशीं लग्नें केलीं. यानें मोठ्या अश्वमेध यज्ञांमध्यें आपलें सर्व ऐश्वर्य ब्राह्मणांला देऊन टाकिलें. पण तोही शेवटीं मेला.

त्याचप्रमाणें अमूर्त रथाचा मुलगा गय शंभरवर्षें यज्ञावशेष खाऊन राहिला होता. त्याला अग्नि प्रसन्न होऊन, 'वर माग' ह्मणाला असतां 'माझी संपत्ति कधीं कमी होऊं नये, धर्मावरची श्रद्धा वाढावी, सत्यामध्यें गोडी वाढावी,' ह्मणून त्यानें वर मागितला, व अग्नीकडून त्याच्या त्या सर्व इच्छा परिपूर्ण झाल्या. दर्शाला, पूर्णमासेला व चातुर्मास्याला याप्रमाणें फिरून फिरून तो हजार वर्षेंपर्यंत अश्वमेध करीत होता. सोमानें देवांना, पैशानें ब्राह्मणांना, स्वधेनें पितरांना व स्त्रियांना त्यांच्या इच्छा परिपूर्ण करून यानें तृप्त केलें. वीस वाव लांब व दहा वाव रुंद अशी सुवर्णभूमि तयार करून ती त्यानें मोठ्या अश्वमेधयज्ञामध्यें ब्राह्मणांना दक्षिणा दिली. गंगेमध्यें जितकी वाळू आहे तितक्या गाई यानें ब्राह्मणांना दिल्या. पण हाही कांहीं शाश्वत जगला नाहीं.

त्याचप्रमाणें सांकृतीचा मुलगा रंतिदेव यानें इंद्राची योग्य रीतीनें आराधना करून 'अन्नाची विपुलता असावी, पुष्कळ अतिथि यावेत, धर्मावरची श्रद्धा उडूं नये व कधीं तोंड पसरण्याची पाळी येऊं नये असा वर मागून घेतला. ग्राम्य व वन्य पशु आपण होऊन यज्ञासाठीं त्याच्यापुढें येऊन हजर होत. त्यांच्या कातड्यांतून निघणाऱ्या रसापासून एक मोठी नदी निघून तिचें चर्मण्वती असें नांव पडलें. 'तुह्मांला शंभर निष्क देतों, तुह्मांला शंभर निष्क देतों,' ह्मणून हाक मारून सभेमध्यें हा ब्राह्मणांना निष्क देत असे, ते नको नको ह्मणत असतांना त्यांना 'शंभर घ्या, हजार घ्या' ह्मणून तो त्यांच्या पदरीं बांधीत असे. त्याचीं पदार्थ ठेवण्याचीं भांडीं व तबकें, घागरी, पंचपात्री, कढया, थाळ्या, पेले वगैरे सर्व भांडीं सोन्याचीं होतीं. रंतिदेवाच्या घरीं रात्रीं पाहूणे राहिले असतां वीस लक्ष गुरें त्यांच्यासाठीं मारलीं जात असतांना सुद्धां 'आज मागच्याप्रमाणें मांसाची चंगाळी नाहीं, सूपरस (रस्सा) यथेष्ठ झोडा' ह्मणून आचाऱ्यांना कंठशोष करून सांगावें लागत असे. पण तोही काळाच्या तडाक्यांतून सुटला नाहीं.

तसाच अमानुष पराक्रमी पुरुषव्याघ्र इक्ष्वाकु कुलोत्पन्न सगर, हा चालला असतां याच्या मागून निरभ्र अशा आकाशामधून चंद्राभोंवतीं असणाऱ्या ज्योतिर्गणाप्रमाणें साठ हजार मुलें असत. याच्या प्रतापानें सर्व पृथ्वी एकछत्री अमलाखालीं आली होती. यानें हजार अश्वमेध करून देवांना तृप्त केलें. त्याचप्रमाणें ब्राह्मणांच्या निरनिराळ्या पुष्कळ इच्छा परिपूर्ण करून यानें त्यांना पुष्कळ द्रव्य दिलें. यानें सागरान्तिक पृथ्वी रागानें खणविली व याच्याच नांवावरून समुद्राला सागर नांव मिळालें तो सुद्धां शेवटीं मेला.

तसाच वैन्याचा मुलगा पृथु याला सर्व ऋषींनीं मिळून वनामध्यें अभिषेक केला व सर्व लोकांना हा पुढें आणील ह्मणून याला पृथु हें नांव दिलें. क्षतापासून रक्षण करणारा ह्मणून याला क्षत्रिय नांव मिळालें. याला पाहून प्रजा ह्याला अनुरक्त असे, ह्मणून याला राजा ह्मणत. याचे वेळीं पृथ्वीवर नांगरल्यावांचून धान्य उगवत असे व झाडांच्या पानागणित मध असे. गाईंना डोणभर दूध असे. मनुष्यांना रोगराई वगैरे ठाऊक नसून त्यांचे सर्व हेतु परिपूर्ण होऊन निर्भयपणें ते शेतांमधून व घरांमधून खुशाल रहात असत. तो चालूं लागला असतां समुद्र पाणी थिजवीत असे, नद्या वर येत असत व याच्या ध्वजाला कोठें आडकाठी होत नसे. एका मोठ्या अश्वमेधामध्यें त्यानें ब्राह्मणांला दोनशें चाळीस वाव (तीन नल्व) उंचीचे एकवीस सोन्याचे पर्वत दिले. तोही काळाच्या तडाक्यांत सांपडलाच.

याप्रमाणें वरील सर्व राजे चारी पुरुषार्थांमध्यें तुझ्यापेक्षां श्रेष्ठ असून तुझ्या मुलापेक्षां पुण्यवान होते, ते सुद्धां मेले. मग तुझ्या मुलाची काय कथा!' असें सांगून नारदांनीं सृंजयाचा शोक दूर केला.' तेव्हां सृंजयानें 'आपल्या भाषणानें माझा शोक दूर झाला आहे; परंतु मजवर प्रसाद करून जर आपण माझ्या मुलाला उठवून मला त्याचा समागम करू-

न घाल तर मजवर आपली कृपा होईल असें ह्मट- ल्यावरून नारदांनीं त्याच्या सुवर्णष्ठीवी नांवाच्या मुलाला जिवंत करून त्याला हजार वर्षें आयुष्य दिलें.

---

## ९०. सुवर्णष्ठीवीचा वृत्तांत. (१२.३०-३१)

'सुवर्णष्ठीवी सृंजयाला कसा झाला? पर्वतांनीं त्याला कां दिला? हजार वर्षें आयुष्य त्याला कसें मिळालें? तो लहानपणींच कां मेला? कांचनष्ठीवी हें नांव कां मिळालें व या नांवाप्रमाणें त्याची कृति होती किंवा काय,?' म्हणून युधिष्ठिरानें विचारलें असतां श्रीकृष्ण ह्मणाला, 'नारद व पर्वत हे दोघे मामे भाचे लोकश्रेष्ठ ऋषी देवलोक सोडून अन्न व तूप यावर राहून आनंदानें मनुष्यांमध्यें फिरत राहण्यासाठीं पृथ्वीवर आले. हे दोघे तपस्वी मनुष्यभोगांचा उपभोग घेत भूतलावर फिरत असतां त्यांनीं एकमेकांशीं करार केला कीं, आपल्या मनांत जो कांहीं बरा वाईट विचार येईल तो एकमेकांना सांगावा व तसें न केल्यास त्याप्रमाणें न वागणाऱ्याला शाप व्हावा. याला परस्परांची संमति देऊन ते दोन लोकपूजित ऋषी श्वैत्यपुत्र सृंजय याजकडे येऊन, 'तुझ्याच कल्याणासाठीं आह्मी कांहीं काल तुझ्याकडे राहणार आहों, तेव्हां तूं आमच्याशीं अनुकूल रीतीनें वाग,' असें ह्मणाले. बरें म्हणून व त्यांचा यथायोग्य सत्कार करून तो राजा त्यांची शुश्रूषा करूं लागला. कोणे एके वेळीं आपल्या मुलीला त्यांकडे घेऊन येऊन ही माझी रूपवती व शीलसंपन्न सुकुमारी नांवाची मुलगी कमलतंतूप्रमाणें कांतिमान असून हिच्या अवयवांमध्यें दोष ठेवण्याला एवढी सुद्धां जागा नाहीं. ही तुमची शुश्रूषा करील,' असें तो राजा त्यांना ह्मणाला. 'ठीक आहे,' असें ते ह्मणाले. धर्माप्रमाणें वागणारी ती मुलगीही सांगितल्याप्रमाणें सत्कारपूर्वक त्यांची शुश्रूषा करीत राहिली. तिच्या त्या शुश्रुषेनें व अप्रतिम लावण्यानें नारदांचें मन एकदम तिच्यावर गेलें. व मदन त्यांच्या हृदयांत शुक्लपक्षांतील चंद्राप्रमाणें वाढ घेत राहिला. परंतु त्या धर्मज्ञाच्यानें लज्जेमुळें तो तीव्र हृदयताप पर्वतांना सांगवेना. परंतु तपाच्या प्रभावानें व यांच्या चेष्टांनीं पर्वतांनीं तें जाणलें व पूर्वींचा केलेला करार त्यांनीं मोडल्यामुळें ब्रह्मचारी व गुरु असून तूं करार मोडल्यामुळें, या सुकुमारीशीं तुझें लग्न तर लागेलच, परंतु लागल्या दिवसापासून तुझें रूप नाहींसें होऊन हिला व दुसऱ्या लोकांना तूं वानररूपानें दिसूं लागतील,' म्हणून त्यांनीं शाप दिला. तेव्हां 'तपानें, ब्रह्मचर्यानें, सत्यानें व मनोनिग्रहानें युक्त असून तूं नेहमीं धर्माप्रमाणें वागणारा आहेस तरी तुला स्वर्ग मिळणार नाहीं, असा नारदांनीं पर्वताला उलट शाप दिला; व ते वेगळे होऊन पर्वत सर्व पृथ्वीवर हिंडत राहिले व नारदांना सृंजयाची मुलगी मिळाली. परंतु पाणिग्रहणमंत्र झाल्यापासूनच त्या मुलीला नारद शापाप्रमाणें वानररूपानें दिसूं लागले. तरी त्यांचा अवमान न करतां त्यांच्यावर ती प्रेमानेंच राहिली; व मन दुसरें कोठें जाऊं न देतां ती पतिवत्सला त्यांची शुश्रूषा करीत राहिली. पुढें कोणे एके वेळीं पर्वत चिटपांखरूं नसलेल्या वनामधून फिरत असतां त्यांना नारद भेटले. तेव्हां, 'कृपा करून मला स्वर्गाला जाण्याला परवानगी दे,' असें ते त्यांना ह्मणाले. याप्रमाणें केंविलवाणे होऊन हात जोडून पुढें उभे असलेल्या पर्वतांना स्वतः दीन झालेले नारद ह्मणाले, 'प्रथम तूं शाप दिल्यावर मागून मत्सरानें मीही शाप दिला. तूं, माझ्या मुलासारखा असून तुला हें शोभतें काय'? नंतर त्या दोघांनीं एकमेकांना उश्शाप दिला. ते वेळीं, नारदांना देवांसारखे श्रीमान पाहून परपुरुषाच्या शंकेनें ती सुकुमारी लांब पळाली. तेव्हां त्या अनिंदितेला पळतांना पाहून हा तुझा नवराच आहे, मनांत शंका घेऊं नकोस.' असें पर्वत तिला ह्मणाले. याप्रमाणें पर्वतांनीं तिची नाना प्रकारें समजूत घातल्यावर आपले पति शापमुक्त झाल्याचें ऐकून तिला बरें वाटलें. पुढें पर्वत स्वर्गाला निघून गेले, व नारद आपल्या घराला आले. हे दोघे नारद व पर्वत सृंजयाच्या वाड्यांत रहात असतां सृंजय त्यांचा यथायोग्य सत्कार करून त्यांच्या सर्व इच्छा परिपूर्ण करीत होता. अशीं कांहीं वर्षें लोटल्यावर त्याला सोडण्याचे वेळीं त्यानें केलेली शुश्रूषा स्मरून राजाला ते वर देण्याला तयार झाले व तपाची सिद्धि सुद्धां त्याला देण्याला तयार झाले. तेव्हां पर्वतांनीं त्याला जवळ बोलावून, 'सरळ वर्तन ठेवून तूं आमचा जो सत्कार केलास त्यामुळें

आह्मीं संतुष्ट आहों. तेव्हां आमचे आज्ञेनें विचार करून वर माग. मात्र ज्याच्या योगानें देवांना किंवा मनुष्यांना त्रास होईल असा वर मागूं नकोस,' असें ह्मणाले. तेव्हां सृंजय ह्मणाला, 'आपण मजवर संतुष्ट झालां आहां एवढेंच मला पुरें आहे. तथापि आपल्या मनांत वर द्यावयाचा असेल तर मोठा वीर्यवान, व्रतशील, आयुष्मान, दैवशाली व इंद्राच्या तोडीचा असा वीर मुलगा मला द्या.' यावर पर्वत ह्मणाले, 'ही तुझी इच्छा पूर्ण होईल; परंतु इंद्राचा पाडाव करण्यासाठीं ज्या अर्थी हा विचार तुझ्या मनांत आला आहे, त्या अर्थी तो आयुष्मान मात्र होणार नाहीं. तो सुवर्णष्ठीवी म्हणून प्रसिद्ध राहील. परंतु इंद्रासारख्या त्या तेजस्वी कुमाराचें इंद्रापासून मोठ्या काळजीनें संरक्षण कर.' तेव्हां असें नसावें म्हणून सृंजयानें पुष्कळ विनवणी केली; परंतु इंद्राचें हित मनांत ठेवून पर्वतांनीं त्याला कांहींच उलट जबाब दिला नाहीं. तेव्हां त्या दीन झालेल्या राजाला नारद ह्मणाले कीं, 'तूं माझी आठवण कर ह्मणजे तुझा मेलेला मुलगा तुला मी परत देईन.' असें बोलून ते दोघे आपल्या मनाप्रमाणें वाटेल तिकडे निघून गेले व राजाही आपल्या वाड्यांत शिरला. पुढें कांहीं दिवस लोटल्यावर तेजानें झळकणारा, मोठा वीर्यशाली मुलगा राजाला झाला. कांचनष्ठीवी ह्या नांवाप्रमाणेंच त्याची कृति होती. ही विलक्षण गोष्ट लोकांमध्यें प्रसिद्ध झाली. महर्षीपासून त्या वरदानाची हकीकत देवेंद्रालाही कळली. तेव्हां बृहस्पतींच्या सल्लयानें त्यानें आपल्या दिव्य वज्राला वाघाचें रूप घेऊन त्याला मारून येण्यास सांगितलें. तेव्हां तें वज्र योग्य संधीची वाट पहात त्या मुलाच्या मागूनच असे. इकडे सृंजयालाही इंद्रासारखा तेजस्वी मुलगा मिळाल्यानें संतोष होऊन बायकांना घेऊन वनामध्यें तो फिरत राहिला. कोणे एके वेळीं भागीरथीच्या तीरीं निर्जन वनांत दायीबरोबर तो पांच वर्षांचा मुलगा खेळत धांवत असतां एका वाघानें त्यावर उडी घेतली व त्यानें त्या मुलाला चिरडलें. तो मरून पडल्यावर दायीनें मोठ्यानें किंकाळी फोडली. त्या वाघानें राजपुत्राला मारल्यावर तो तेथेंच गुप्त झाला. त्या दाईला शोकाकुल होऊन मोठ्यानें रडतांना ऐकून स्वतः राजा तिकडे धांवत गेला. वाघानें रक्त पिऊन टाकल्यामुळें चंद्राप्रमाणें निस्तेज दिसणाऱ्या मरून पडलेल्या त्या मुलाला पाहून शोकविव्हळ होऊन रक्तानें भरलेल्या त्या मुलाला मांडीवर घेऊन तोही रडूं लागला. तेव्हां त्या मुलाच्या आयाही रडत त्या ठिकाणीं धांवत आल्या. तेवेळीं राजानें नारदांची आठवण केली. तेव्हां नारद त्या ठिकाणीं जाऊन वरील राजांच्या गोष्टी सांगून त्यांनीं त्याचें समाधान केलें व पुढें त्या मुलालाही उठविलें. त्या मुलानें आईबापांला संतोष देऊन बाप स्वर्गाला गेल्यावर अकराशें वर्षें राज्य केलें व मोठमोठे यज्ञ करून देवांना व पितरांना तृप्त केल्यावर कुळ कायम ठेवण्याला मुलें उत्पन्न करून कालधर्माला अनुसरून तो हें जग सोडून गेला. हा सर्व वृत्तांत येथें नारद प्रत्यक्ष आहेत त्यांना माहीत आहेच. तेव्हां तूंही शोक बाजूला ठेवून वडिलोपार्जित राज्याचें जूं आपल्या मानेवर घे. पुण्यकारक असे मोठमोठे यज्ञ केल्यावर तुला इष्ट लोक मिळतील.'

---

## ९१ कार्याकार्य व प्रायश्चित्त.(१२.३२-३६)

यावर युधिष्ठिर कांहीं न बोलतां गप्प बसलेला पाहून व्यास फिरून ह्मणाले, 'बा धर्मा, प्रजापालन हा राजांचा धर्म आहे. नेहमीं धर्माप्रमाणें वागणाऱ्यांना धर्मच प्रमाण असतो. म्हणून धर्माला अनुसरून वडिलोपार्जित राज्य कर. तप हा ब्राह्मणांचा धर्म वेदानें ठरविला असून ब्राह्मणांना तो प्रमाण आहे; आणि त्या धर्माचें पूर्ण रक्षण करणारा क्षत्रिय आहे. जो विषयांमध्यें गढून धर्माज्ञा मोडतो, त्या लोकयात्रेच्या आड येणाऱ्या मनुष्याला धरून वाटेवर आणलें पाहिजे. मूर्खपणानें धर्माची आज्ञा खोटी समजणारा मग तो नोकर असो, मुलगा असो, तपस्वी असो अथवा दुसरा कोणी असो, अशा पाप्याला वाटेल त्या रीतीनें वठणीला आणावें किंवा प्रसंगीं ठार करावें. याहून निराळ्या रीतीनें वागणारा राजा पापाला धनी होतो, बुडणारा धर्म जो राखीत नाहीं तो स्वतः धर्म बुडविणारा समजावा. तेव्हां धर्माला अनुसरून धर्मावर कुऱ्हाड उचललेल्या लोकांना तूं मारलेंस तेव्हां त्या संबंधानें वाईट कां वाटून घेतोस ? दुष्टांना मारणें, भल्यां-

वर कृपा करणें व धर्मानें प्रजेचें रक्षण करणें हें राजाचें कामच आहे.' युधिष्ठिर म्हणाला, 'सर्व धर्म आपल्या डोळ्यांपुढें असल्यामुळें आपण जें कांहीं सांगतां याबद्दल मला बिलकुल शंका नाहीं. परंतु ज्यांना मारूं नये अशा पुष्कळांना मीं मारलें तीं कर्मे मला भाजून. शिजवून काढीत आहेत.' व्यास ह्मणाले, 'धर्मा, कोणत्याही क्रियेचा कर्ता ईश्वर आहे किंवा मनुष्य आहे ? कां सर्व गोष्टी या जगांत दैवानेंच घडून येतात ? कां पूर्वकर्माचें तें फल असतें ? मनुष्य ईश्वराच्या आज्ञेप्रमाणें बरें वाईट काम करतो. तेव्हां त्याचें फळही ईश्वराकडेच जातें. मनुष्यानें वनामध्यें कुऱ्हाडीनें झाड तोडलें असतां तोडणाऱ्याला त्याचें पाप लागतें, कुऱ्हाडीकडे त्याचा कांहीं संबंध जात नाहीं; अथवा ते निर्जीव असल्यानें सजीवकर्त्याकडे त्याचें फळ जातें ह्मणावें तर कुऱ्हाड करणाऱ्याकडे त्याचें पाप गेलें पाहिजे, पण तसेंही कांहीं होत नाहीं. म्हणून दुसऱ्यांनीं केलेल्या कर्माचें फळ आपल्याकडे यावें हें कांहीं संगतीला धरून नाहीं. म्हणून त्याचा सर्व बोजा तूं ईश्वरावर सोपीव. आतां ईश्वर वगैरे कांहीं नसून बऱ्या वाईट कर्माचा कर्ता मनुष्यच जर असेल तर ही गोष्ट तुझ्या हातून चांगलीच झाली आहे. आतां कुऱ्हाड करणाऱ्याला ज्याप्रमाणें त्या होणाऱ्या कर्माचें पाप लागत नाहीं त्याप्रमाणें पूर्वसंचिताप्रमाणें घडणाऱ्या कर्माचें फळ त्या मनुष्याकडे जात नाहीं. कारण दैवाच्या उलट कधीं कोणाच्यानें जातां येणें शक्य नाहीं. आतां एक दैवच कायतें आहे असें जरी घेऊन चाललास तरी वाईट गोष्ट कधीं कोणाच्या हातून झाली नाहीं किंवा होणार नाहीं. लोकांमध्यें पुण्य काय, पाप काय, याचा जर शास्त्ररीतीनें छडा लावणें असेल तर नेहमीं दंड तयार ठेवून असणें हाच राजधर्म ठरला आहे. तथापि लोकांत राहिल्यानें शुभाशुभ कर्मे घडून त्याचीं बरीं वाईट फळें मिळतात असें ह्मटलें तरी त्या त्या पापकर्माचें तें तें फळ देणारें वाईट काम सोडून दे ह्मणजे झालें. तुझ्या धर्माप्रमाणें मग तो गौण असला तरी तुला वागावयाचें असेल तर फटिंग होऊन असें बाहेर पडणें तुला शोभत नाहीं. कर्माबद्दल प्रायश्चित्तें सांगितलीं आहेत तीं तरी शरीर राखून असणाऱ्याचे हातूनच घडणार. शरीर टाकूं पाहणाऱ्याच्या हातून कांहीं होणें नाहीं. ह्मणून तूं जिवंत राहशील तर तुझ्या हातून प्रायश्चित्तें होतील. प्रायश्चित्त न करतां येथून परत्र गेल्यावर तुला तें संतापाला मात्र कारण होईल'

युधिष्ठिर ह्मणाला, 'पुत्र, पौत्र, भाऊ, वडील, सासरे, गुरु इत्यादिकांचा त्याचप्रमाणें अनेक आप्तबांधव, सोयरेधायरे तसेंच नानादेशांहून आलेली नररत्नें, या सर्वांना मीं एकट्यानें राज्याच्या लोभानें मारविलें. ज्या ज्ञातीमध्यें हजारों लोक मेले आहेत, त्यांतील मुलें; नवरे, भाऊ इत्यादिकांना मुकलेल्या थोर स्त्रियांची आज काय अवस्था झाली असेल ? सुकून दीन होऊन त्या रडत भूमीवर पडल्या असतील व बाप, नवरे, मुलगे, भाऊ कोणी दिसेनासे झाल्यामुळें व त्यांवरील त्यांच्या प्रेमामुळें खात्रीनें त्या प्राण सोडतील. धर्म फार सूक्ष्म असल्यामुळें त्या स्त्रीवधाचेंही पाप माझ्याच माथीं लागणार. याप्रमाणें आह्मी सुहृदांना मारून, ज्याला प्रायश्चित्त नाहीं असें पाप केल्यामुळें नरकांमध्यें खालीं डोकें होऊन टांगत राहणार. तेव्हां उग्र तपानें हा देह मी ठेवूं इच्छितों. आश्रमांमध्यें चांगला आश्रम कोणता तो मला सांगा.' हें ऐकून बारीक विचार करून व्यास ह्मणाले, 'हे राजा, क्षत्रधर्माचा विचार मनांत आणून उगीच खेद करूं नकोस. ह्या सर्व क्षत्रियांनीं, सर्व पृथ्वीचें वैभव त्याचप्रमाणें मोठें यश मिळावयाची हाव बाळगून स्वधर्माला जागून कालचक्रांत आपली पाळी दिली आहे. त्यांना तूं मारलें नाहींस, भीमानें मारलें नाहीं, अर्जुनानें मारलें नाहीं किंवा नकुलसहदेवांनीं मारलें नाहीं. कालानेंच वेळ आली तेव्हां त्यांचे प्राण घेतले आहेत. त्या कालाला आईबाप किंवा कोणी नाहीं. सर्व कर्मांना साक्षीभूत अशा ह्या कालानें त्यांना नेलें आहे. हें युद्ध केवळ त्यानें निमित्तमात्र केलें. तोच प्राणिमात्रांच्या हातून प्राणिमात्रांना मारवीत असतो आणि हेंच त्याचें ईश्वरी रूप समज. कालानें कर्मसूत्रानें प्राणिमात्राला आपल्याशीं जखडून घेतलें आहे. व सुखदुःखात्मक फळें हाच देत असतो. ज्याच्या योगानें ते कालाच्या तावडींत गेले, त्या

त्यांच्या आत्मविनाशक कर्मांचा विचार कर; त्याचप्रमाणें नियमशील व व्रतशील अशा तुझ्या कृत्यांचाही विचार कर. मनुष्याच्या जन्ममरणाला कांहीं कारण नसतां तीं स्वाभाविक घडून येतात. तेव्हां हा शोक किंवा आनंद व्यर्थ आहे. आतां तुझ्या मनाला पिळून घेणारी ही जी हुरहुर तुला लागली आहे, तेवढ्यासाठीं प्रायश्चित्त सांगितलें आहे, तें करून टाक ह्मणजे झालें. असुर हे वडील भाऊ व देव धाकटे होते. त्यांचेंही संपत्तीसाठीं मोठें भांडण माजलें. त्यांचें युद्ध बत्तीस हजार वर्षें झालें असें ह्मणतात. त्यामध्यें सर्व पृथ्वी रक्तमय करून दैत्यांना मारून देवांनीं स्वर्ग मिळविला. त्या वेळीं तिन्ही लोकांमध्यें शालावृक नांवानें प्रसिद्ध असलेले अठ्यायशीं हजार वेदांत निष्णात झालेले ब्राह्मण पृथ्वी मिळाल्यानें डोळ्यांवर धूर येऊन दैत्यांचें साहाय्य करण्याला तयार झाले. धर्मावर गदा आणून अधर्म सुरू करण्याला तयार झालेल्या ह्या बलाढ्य दुरात्म्यांना देवांनीं मारलें. **एकाला मारून जर कुळामध्यें भल्याची स्वस्थता होत असेल किंवा एका कुळाला मारून जर राष्ट्रामध्यें स्वस्थता होत असेल तर ते धर्माला बाधक होत नाहीं.** कांहीं धर्म अधर्मासारखे दिसतात व कांहीं अधर्म धर्मासारखे दिसतात. त्यांचा शहाण्यानें बारीक विचार केला पाहिजे. ह्मणून तुला श्रुतीचें चांगलें ज्ञान असल्यामुळें आपली समाधानी करून घे. जो मार्ग पूर्वीं देवांनीं धरला तोच तूं धरला आहेस. तुझ्यासारखे लोक कधीं नरकाला जात नसतात. ह्या तुझ्या भावाचें त्याचप्रमाणें जिव्हाळ्याच्या लोकांचें समाधान कर. कारण जो पापकर्मेंच करीत असतो, व तीं करून सुद्धां लाजबीज ज्याला वाटत नाहीं, तो त्या सर्व पापांचा धनी होत असून, त्याला प्रायश्चित्त नाहीं व त्याचें पापही कधीं कमी होत नाहीं. तुझा जन्म निर्मळ कुळांत झाला आहे. तुझ्या मनांत नसतां दुसऱ्याच्या दोषांमुळें हें तुला करावें लागलें व तें करून त्याबद्दल तुला वाईट वाटत आहे. तर याबद्दल प्रायश्चित्त अश्वमेध महायज्ञ सांगितला आहे, तो कर ह्मणजे पापापासून तूं अगदीं मुक्त होशील. शत्रूंना मारल्यावर शंभर यज्ञ करून पापापासून मुक्त झालेला इंद्र सुखदायक स्वर्ग मिळवून तेथें झळकत आहे. तेव्हां ही पृथ्वी तुझ्या पराक्रमानें तुला मिळाली असून आपल्या पराक्रमानें त्यांना तूं जिंकलें आहेस. तेव्हां आपल्या सुहृदांना बरोबर घेऊन त्यांच्या त्यांच्या राष्ट्रांमधून त्या त्या राजधानीला जाऊन त्यांच्या त्यांच्या मुलांना, नातवांना, भावांना त्या त्या राज्यावर अभिषेक करून गर्भामधल्या मुलांची देखील चांगली काळजी घेऊन सर्व प्रजेला रंजवीत ह्या प्रजेचें पालन कर. **ज्यांना मुलगे नसतील तेथें मुलींना अभिषेक कर.** बायका सुखाच्या आशाळू असून तूं असें केल्यानें त्यांचा शोक नाहींसा होणार आहे. याच प्रमाणें सर्व राष्ट्रांमध्यें स्थिर स्थावर करून अश्वमेध कर. व आपल्या धर्माचें रक्षण कर. हेंच परलोकीं तुला कल्याणकारक होणार आहे.'

यावर, 'कोणतीं कर्में केल्यानें मनुष्य प्रायश्चित्ताला पात्र होतो व तीं प्रायश्चित्तें कोणतीं,' ह्मणून युधिष्ठिरानें विचारलें असतां व्यास ह्मणाले, 'सांगितलेलीं कर्में न केल्यानें किंवा निषिद्ध कर्में आचरल्यानें किंवा खोट्या रीतीनें वागल्यानें मनुष्य प्रायश्चित्ताला पात्र होतो. तसेंच जो सूर्योदयाचे वेळीं त्याचप्रमाणें सूर्यास्ताचे वेळीं निजला असतो असा ब्रह्मचारी, ज्याचीं नखें सडलीं आहेत किंवा दांत काळे पडले आहेत असा मनुष्य, ज्याच्या धाकट्या भावाचें लग्न आधीं झालें आहे किंवा जो आपल्या वडील भावाच्या आधीं लग्न करतो तो, ब्रह्महत्या करणारा, नेहमीं दुसऱ्यासंबंधानें वाईट बोलणारा, थोरल्या बहिणीच्या आधीं धाकट्या बहिणीचें लग्न करणारा, व्रत मोडणारा, ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य यांपैकीं कोणालाही मारणारा, अपात्रीं दान करणारा व पात्राच्या ठिकाणीं दान न करणारा, गांवाचा नाश करणारा, मांस विकणारा, अग्नि सोडून दिलेला, ब्रह्मज्ञान विकणारा, गुरूच्या स्त्रीला मारणारा, निंद्य कुळांत झालेला, यज्ञकर्मावांचून पशु मारणारा, घराला आग लावणारा, फसवेगिरीवर राहणारा, गुरूच्या आड जाणारा, करार मोडणारा ह्या सर्वांचीं कृत्यें पापांत गणलीं आहेत. त्याचप्रमाणें स्वधर्म सोडून देणें, परधर्म घेणें, यज्ञ करण्याला योग्य नाहीं अशाचा यज्ञ करून देणें,

अभक्ष्य भक्षण करणें, शरण आलेल्याला सोडणें, नोकराला न पोसणें, मीठ, गूळ इत्यादिक रसांचा विक्रय करणें, पशुपक्ष्यांना मारणें, शक्ति असून गर्भाधानादिक क्रिया न करणें, नित्यदानें न देणें, दक्षणा न देणें, ब्राह्मणाला टाकून बोलणें, हीं सर्व अकार्यें होत. त्याचप्रमाणें बापाशीं तंडणारा, गुरुपत्नीशीं संबंध ठेवणारा व तिजपासून संतति उत्पन्न करणारा हे सर्व अधर्मिक होत. व हीं कर्में केल्यानें मनुष्य प्रायश्चित्ताला पात्र होतो. आतां कोणकोणत्या प्रसंगीं हीं कर्में केलीं असतां मनुष्याला पाप लागत नाहीं तें सांगतों ऐक. रणामध्यें हातांत शस्त्र घेऊन मारण्यासाठीं येणारा, मग तो वेदपारग असला तरी त्याला मारल्यानें ब्रह्महत्येचें पाप लागत नाहीं. हा वेदांत सांगितलेला धर्म आहे. जीव जाऊं लागला असतां किंवा न कळत किंवा धर्म जाणणाऱ्यांनीं सांगितल्यावरून मद्य सेवन केल्यानें मनुष्य फिरून प्रायश्चित्ताला पात्र होतो. ज्याबद्दल अभक्ष्यासंबंधानें गोष्टी सांगितल्या आहेत, त्या सर्वांची शुद्धि प्रायश्चित्तानें होते. गुरूसाठीं गुरुस्त्रीशीं संबंध ठेवल्यानें मनुष्य दोषी होत नाहीं. उद्दालकांनीं आपल्या शिष्यापासून श्वेतकेतूला उत्पन्न करून घेतलें. मनांत कांहीं हेतु न धरतां केवळ गुरूसाठीं ह्मणून ब्राह्मणाच्या पैशाशिवाय दुसरी चोरी केली असतां त्याबद्दल दोष नाहीं. त्याचा जर यानें स्वतः उपभोग घेतला नाहीं तर त्याचें पाप याला लागत नाहीं. आपला किंवा दुसऱ्याचा प्राण वांचविण्यासाठीं, गुरूसाठीं, बायकांसाठी व लग्नासंबंधानें खोटें बोलावें. स्वप्नामध्यें रेतस्खलन झाल्यानें ब्रह्मचर्य व्रताचा भंग होत नाहीं; पेटलेल्या अग्नीमध्यें तुपाचा होम देणें हेंच त्याला प्रायश्चित्त आहे. वडील भाऊ बाटला असतां किंवा त्यानें संन्यास घेतला असतां धाकट्या भावाला त्याच्या आधीं लग्न करण्याला हरकत नाहीं. प्रसंगीं एखाद्या स्त्रीच्या विनंतीवरून तिच्याशीं संबंध ठेविला असतां तें धर्माच्या आड येत नाहीं. यज्ञाशिवाय इतर वेळीं पशूंना मारूं नये, किंवा मारवूं नये. कारण त्यांच्यावर दया करणें हेंच शास्त्रानें सांगितलें आहे. न कळत अयोग्य ब्राह्मणाला देणें किंवा योग्य ब्राह्मणाला न देणें हें पाप नाहीं. गैर चालीची बायको असेल तर तिला सोडून देण्यांत पाप नाहीं. त्याच्या योगानें तीही शुद्ध होते व नवऱ्याला पाप लागत नाहीं. सोमाचें खरें इंगित कळून तो विकला असतां त्याबद्दल दोष नाहीं. काम करण्याला असमर्थ अशा नोकराला सोडण्यांत दोष नाहीं. गुरांसाठीं वनाला आग लावून देण्यांत दोष नाहीं. आतां प्रायश्चित्तें सविस्तर सांगतों ऐक.

**तपानें, शुचिर्भूत कर्मांनीं व दानांनीं मनुष्य फिरून पाप न करील तर तो पापापासून शुद्ध होतो.** त्याचप्रमाणें भिक्षान्न एकवेळ खाऊन एका हातांत कवटी व दुसऱ्या हातांत रुंडदंड घेऊन ब्रह्मचारी व्रतानें नेहमीं फिरल्यापासून व कोणाची असूया न करतां जमिनीवर निजून सर्व जगभर आपलें पाप सांगत बारा वर्षें फिरलें असतां ब्रह्मघातकी सुद्धां पापापासून मुक्त होतो. अथवा विद्वानांच्या सांगण्यावरून किंवा आपल्या मतानें शस्त्रधारी मनुष्याच्या शस्त्रानें मरावें, अथवा पेटलेल्या अग्नीमध्यें खालीं डोकें करून तीन वेळ फेंकून घ्यावें; अथवा कोणता तरी एक वेद तोंडानें ह्मणत शंभर योजनें जावें; किंवा आपल्या जवळ असेल नसेल तें सर्व किंवा उपजीविकेला पुरेसें द्रव्य किंवा यथास्थित थाटविलेलें घर वेद जाणणाऱ्या ब्राह्मणाला द्यावें; किंवा गोब्राह्मणाचें पालन करावें ह्मणजे मनुष्य ब्रह्महत्येच्या पातकापासून मुक्त होतो. तीन दिवस सकाळीं, तीन दिवस संध्याकाळीं जेवून, तीन दिवस मिळेल त्यावर व तीन दिवस उपवासी राहून याप्रमाणें साहा वर्षें किंवा सात दिवस सकाळीं, सात दिवस संध्याकाळीं जेवून, सात दिवस मिळेल त्यावर व सात दिवस उपवासी राहून याप्रमाणें तीन वर्षें व महिनाभर सकाळीं, महिनाभर संध्याकाळीं जेवून, महिनाभर मिळेल त्यावर व महिनाभर उपवासी राहून याप्रमाणें एक वर्षभर कृच्छ्र भोजन ठेवल्यानें किंवा महिन्याच्या पुढें फार थोडे दिवस उपवास केल्यानें सुद्धां मनुष्य ब्रह्महत्येच्या पापापासून मुक्त होतो. अश्वमेधानें या पापापासून मनुष्य शुद्ध होतो यांत बिलकुल संशय नाहीं. जे अवभृत स्नानानें याप्रमाणें शुद्ध होतात ते सर्व या पापापासून शुद्ध होतात असें श्रुतिवाक्य आहे. जो ब्राह्मणांसाठीं युद्धामध्यें मरतो तो ब्रह्म-

हत्येपासून मुक्त होतो. ब्रह्महत्या करणारा भल्या व गरीब अशा एक लक्ष गाई अथवा पंचवीस हजार दुभत्या कपिला गाई अथवा मरते वेळीं वांसरासह हजार दुभत्या गाई सत्पात्रीं दिल्यानें मुक्त होतो. त्याचप्रमाणें जो शंभर काठेवाडी घोडे नियमशील ब्राह्मणांना देतो किंवा एकाला त्याचें इच्छित मनोरथ देऊन तें सांगत फिरत नाहीं, तो सर्व पापापासून मुक्त होतो. **एकदां सुरा पिऊन जो विस्तवा प्रमाणें लाल केलेली ती फिरून प्रायश्चित्त ह्मणून घेतो तो इहपर शुद्ध होतो.** कड्यावरून किंवा आगींत उडी घेऊन किंवा केदारादि लांबच्या तीर्थयात्रेला जाऊन मनुष्य सर्व पापांपासून मुक्त होतो. बृहस्पतींनीं सांगितलेला यज्ञ केल्यानें सुरापी ब्राह्मणाला पुन्हां सभेंत जाण्याला मोकळीक आहे. एखादा मनुष्य दारू प्याला असतां जर ताठा सोडून गरीबीनें ब्राह्मणाला भूमि दान देईल व पुन्हां दारू पिणार नाहीं तर तो त्या पापापासून मुक्त होऊन शुद्ध होतो. गुरुस्त्रीशीं गमन केलें असतां लाल केलेल्या लोखंडी पत्र्यावर पडावें व आपलें शिश्न कापून घेऊन वर दृष्टि ठेवून वनामध्यें फिरत रहावें. देहत्याग केल्यानें मनुष्य वाईट कर्मापासून मुक्त होतो. बायका एक वर्षभर आहारविहार सोडून राहिल्यानें पापापासून मुक्त होतात. जो मनुष्य महिनाभर पाण्याला सुद्धां न शिवतां महाव्रत पाळतो किंवा आत्मसर्वस्व दुसऱ्याला देऊन टाकतो किंवा गुरूसाठीं युद्धांत मरतो तो सर्व पापांपासून मुक्त होतो. गुरूशीं खोटें वर्तन ठेवणारा किंवा त्याच्या उलट जाणारा हा पुन्हां त्याच्या मनाप्रमाणें वागल्यानें त्या पापापासून मुक्त होतो. ब्रह्मचर्यापासून भ्रष्ट झालेला सहा महिनेपर्यंत गाईचें कातडें नेसून ब्रह्महत्येला सांगितलेलें व्रत पाळील तर तो त्या पापापासून मुक्त होतो. दुसऱ्याची बायको किंवा दुसऱ्याचा पैसा उपटणारा मनुष्य एक वर्षभर व्रतस्थ राहिल्यानें त्या पापापासून मुक्त होतो. मात्र ज्याचा त्यानें पैसा घेतला असेल त्याला हरप्रयत्न करून तेवढा पैसा त्यानें परत करावा. ज्या धाकट्या भावाचें वडील भावाच्या आधीं लग्न झालें असेल तो किंवा वडील भाऊ बारा रात्री आत्मनिग्रहानें व्रतस्थ राहिल्यानें त्या पापापासून मुक्त होतो, मात्र पितरांचा उद्धार करण्यासाठीं त्यानें दुसरी बायको केली पाहिजे. तसेंच त्या पहिल्या बायकोकडे कांहीं दोष लागत नसून तिला त्याचें पाप लागत नाहीं. चतुर्मास्य व्रत पाळून धर्णेपार्णे केल्यानें बायका शुद्ध होतात असें धर्मज्ञांचें मत आहे. स्त्रियांनीं मनांत आणलेल्या पापांचा शहाणे लोक विचार करीत नाहींत. राखेनें स्वच्छ होणाऱ्या भांड्याप्रमाणें रजांमधून त्यांचें पाप निघून जाऊन त्या शुद्ध होतात. शूद्रानें उष्टें केलेलें किंवा गाईनें हुंगलेलें अथवा चूळ टाकल्यानें उष्टें झालेलें, कांसेंचें भांडें माती, पाणी, राख, क्षार, निखारे, तूप, दूध, दहीं, शेण व गोमूत्र या दहा पदार्थांनीं शुद्ध होतें. समग्र चतुष्पाद धर्म ब्राह्मणाला सांगितला आहे. व क्षत्रिय, वैश्य व शूद्र यांना क्रमानें एक एक पाद कमी सांगितला आहे. यांचें पापपुण्याचें कमीअधिक प्रमाणही याच मानानें कमीअधिक समजावें. पशुपक्ष्याला मारून व अनेक सजीव झाडें तोडून जडणारें पाप, तीन दिवस वायु भक्षण करून आपण केलेलें कृत्य सांगत फिरल्यानें नाहींसें होतें. ज्यांच्याशीं संबंध ठेवूं नये, अशाशीं संबंध ठेवला असतां ओल्या वस्त्रानिशीं राखेवर पडून सहा महिने फिरत रहावें; असें रुढीला, शास्त्राला व तर्काला धरून प्रायश्चित्त सांगितलें आहे. मिताहार ठेवून कांहीं न बोलतां व कोणाला पीडा न देतां, रागद्वेषादि सोडून देऊन शुद्ध प्रदेशीं गायत्री जपत राहिल्यानें मनुष्य सर्व पापांपासून मुक्त होतो. दिवसां आकाशाखालीं राहून रात्रीं आकाशाखालींच पडून दिवसां तीनदां व रात्रीं तीनदां कपड्यानिशीं पाण्यांत शिरल्यानें व व्रतस्थ राहून स्त्री, शूद्र व पतित यांच्याशीं न बोलल्यानें द्विज अज्ञानानें केलेल्या सर्व पापांपासून मुक्त होतो. पंचभूतांच्या दृष्टीसमोर केलेल्या बऱ्या वाईट कृत्याचें फळ मेल्यावर मिळतें. ज्या मनुष्याचें जें कर्म अधिक होतें त्याला त्याचें फळ अधिक मिळतें. ह्मणून नेहमीं चांगलीं कृत्यें करीत रहावें. पापकर्मांपासून दूर असावें. नेहमीं दान व तप करावें. ज्या त्या पापाप्रमाणें त्याचें प्रायश्चित्त सांगितलें असतें. मात्र महापातकांना प्रायश्चित्त नाहीं. भक्ष्याभक्ष्य, वाच्यावाच्य हीं सर्व ज्ञात व अज्ञात अशा दोन प्रकारचीं आहेत. जाणून बुजून केलेलीं

पापें मोठीं समजलीं जातात व न कळत केलेलीं पापें लहान समजलीं जाऊन त्यांना प्रायश्चित्त आहे. सांगितल्या विधीनें प्रायश्चित्त घेऊन पाप नाहींसें करतां येतें; परंतु आस्तिक बुद्धि धरून विश्वास ठेवणाऱ्यालाच हा विधि सांगितला आहे. नास्तिक व अश्रद्धाळु, दांभिक व द्वेषी अशा मनुष्यांना हा विधि सांगितला नाहीं. इहपर सुखाची इच्छा धरणाऱ्यानें शिष्टाचार व धर्म पाळून शिष्टाला जवळ करावें. सारांश पैसा व प्राण बचविण्यासाठीं क्षात्र धर्माला जागून तूं यांना मारलें असल्यामुळें तुला त्याचा दोष लागणार नाहीं. अथवा तुझ्या मनाला फारच हुरहुर असेल तर प्रायश्चित्त करून टाकं ह्मणजे झालें. मोठ्या लोकांना न शोभेल अशा रीतीनें शोकाकुल होऊन प्राणत्याग करूं नये.

## ९२ भक्ष्याभक्ष्य व पात्रापात्रविचार.

( १२. ३६ )

यावर ' कोणाचें अन्न खावें, कोणाचें खाऊं नये, कोणतें दान प्रशस्त आहे, सत्पात्र कोणाला ह्मणावें,' असे प्रश्न युधिष्ठिरानें विचारल्यावरून प्रजापति, मनु, व सिद्ध यांचा पुढील संवाद व्यासांनीं त्याला सांगितला. ते ह्मणाले, ' पूर्वीं व्रतशील ऋषींनीं प्रजापति, मनूकडे जाऊन हेच प्रश्न केले असतां त्यांनीं पुढें दिल्याप्रमाणें थोडक्यांत स्पष्टपणें त्यांचें समाधान केलें. तें ह्मणाले, ' सर्वस्वीं निर्दोष अशा ठिकाणीं जप, होम व उपवास करणें, आत्मज्ञान मिळविणें, सुवर्ण भक्षण करणें, रत्नादिकयुक्त अशा पाण्यांत स्नान करणें, देवस्थानाला जाणें, आज्य पिणें, पवित्र नद्यांमधील तपस्वी लोक राहण्याचा प्रदेश, डोंगर इत्यादि गोष्टी पवित्र समजल्या आहेत. शहाण्यानें कधीं गर्विष्ट असूं नये. व गर्व झाला असतां दीर्घायुष्याची इच्छा असेल तर त्रिरात्र ऊन्ह पाण्यावर रहावें. दुसऱ्यानें दिलेलें न घेणें, दान, अध्ययन व तप करणें, कोणाला पीडा न देणें, खरें बोलणें, राग न येऊं देणें व यजन करणें हीं धर्माचीं लक्षणें होत. देशकालाप्रमाणें धर्माला अधर्माचें स्वरूप येत असतें. न विचारतां घेणें, दुसऱ्याला पीडा देणें या गोष्टी प्रसंगोपात न्याय्य ठरतात. हे दोन्ही धर्माधर्म त्याचप्रमाणें लौकिक वैदिक, अप्रवृत्ति व प्रवृत्ति प्रसंगोपात त्यांच्या बऱ्यावाइटाप्रमाणें दोन प्रकारचे असतात. **अप्रवृत्तीचें फळ मोक्ष असून जन्ममृत्यूचा फेरा हें कर्माचें फळ आहे. वाईट कृत्यें,** देव, धर्म, प्राण व उदरपोषण हे चार हेतू डोळ्यांपुढें ठेवून केलीं असतां त्याचें फळ चांगलेंच असतें. पुढें वाईट परिणाम होईल असा संभव असणारी गोष्ट किंवा धडधडीत वाईट परिणाम दिसत आहे अशी गोष्ट मुद्दाम केली असतां त्याला प्रायश्चित्त सांगितलें आहे. राग व मोह यांनीं घेरून जाऊन मनाला संतोषविण्याकरितां किंवा दुखविण्याकरितां ज्या गोष्टी केल्या जातात त्याला रूढी, शास्त्र व तर्क यांना धरून शरीर सुकविणें किंवा पवित्र अन्न किंवा मंत्र हीं प्रायश्चित्तें सांगितलीं आहेत. **राजानें राजदंड खालीं ठेवला तर त्यानें एक रात्र उपवास केल्यावांचून तो शुद्ध होत नाहीं.** व त्याला तशा प्रकारचा सल्ला देणाऱ्या पुरोहिताला तीन रात्र उपवास सांगितला आहे. पुत्रादिकांच्या शोकामुळें आत्महत्या करण्याला तयार झालेला त्यांतून वांचला तर त्यानें तीन रात्र उपवास करावा. **जाती, आश्रम, देश व कुळ यांचे धर्म जे सोडतात त्यांना प्रायश्चित्त नाहीं. धर्माधर्म विचारासंबंधानें संशय आला असतां दहा वेदशास्त्र जाणणारे व तीन धर्म पठण करणारे जे सांगतील तोच धर्म समजावा. बैल, माती, मुंग्या, घाणींत उत्पन्न होणारे किडे, विष खवलीं नसलेले मासे, कासवाशिवाय इतर बेडकासारखे चतुष्पाद प्राणी त्याचप्रमाणें घरकोंबडे, हंस, गरूड, चक्रवाक, बदकें, बगळे, कावळे, पाणकावळे, गिधाडें, ससाणे, घुबडें त्याचप्रमाणें मांसभक्षक व दाढेचे चतुष्पाद प्राणी तसेंच ज्यांना वर खालीं दांत आहेत व चार दाढा आहेत असे सर्व पक्षी, त्याचप्रमाणें मेंढीचें, गाढवीचें, सांडेचें, नुकत्या व्यालेल्या गाईचें, बायकांचें, हरणीचें दूध, तसेंच प्रेताकरितां शिजविलेलें अन्न, बाळंतिणीच्या हातचें अन्न, कोणी शिजविलें आहे हें न समजलेलें अन्न इत्यादि पदार्थ ब्राह्मणानें शिवूं नयेत. राजाचें अन्न तेज हरण करतें व शूद्रान्न ब्रह्मतेज हरण**

करतें. सोनाराचें अन्न त्याचप्रमाणें नवरा व मुलगा नसलेल्या स्त्रीच्या हातचें अन्न, आयुष्य कमी करतें. सावकाराचे हातचें अन्न विष्ठेसमान असून, गणिकेचें अन्न रेतासमान आहे. आपल्या बायकांच्या व्यभिचाराकडे कानाडोळा करणारे त्याचप्रमाणें बायकांच्या तावडींत गेलेले, दीक्षा घेतलेले, कृपण, सोम विकणारा, सुतार, चांभार, शिंदळ, परीट, वैद्य व पहारेकरी, तसेंच पुष्कळ लोक ज्यांच्या नांवानें खडे फोडतात असे लोक, नाटकांत सोंग घेऊन त्यावर पोट भरणाऱ्या स्त्रिया, ज्याचें धाकट्या भावाच्या आधीं लग्न झालें आहे किंवा थोरल्या भावाचें आधीं ज्याचें लग्न झालें आहे असे लोक, त्याचप्रमाणें भाट व जुगारबाज यांचे हातचें अन्न खाऊं नये. तसेंच डावे हातांत आणलेलें, शिळें, दारू मिसळलेलें, उष्टें, खाण्याला नालायख असलेलें, ठेवलेलें, पिठाचे, उसाचे व दुधाचे बनलेले पदार्थ त्याचप्रमाणें दह्यांत कालवलेलें, सातूचें लाहीपीठ फार दिवस ठेवून खाऊं नयेत. खीर, तीळभात, मांस, तळलेले पदार्थ उगीच खाण्याकरितां म्हणून करून खाऊं नयेत. देव, ऋषि, मनुष्य, पितर व गृहदेवता यांचा सत्कार करून मग गृहस्थानें खावें. याप्रमाणें मनुष्यानें आपल्या घरीं आपल्या लाडक्या कुटुंबामध्येंच संन्यास घेतलेल्या भिक्षुकाप्रमाणें राहून श्रेष्ठ धर्म साधून घ्यावा. भीतीमुळें दान देऊं नये, किंवा दुष्कीर्तिवानाला, उपकार करणाऱ्याला, गायननर्तनावर राहणाऱ्याला, खुषमस्कऱ्याला, वेड्याला, उन्मत्ताला, चोराला, निंदकाला, मुक्याला, पंडुरोग्याला, विकलांगाला, खुजाला, दुष्टाला, वाईट कुलांतल्याला, व्रतसंस्कार न झालेल्याला दान देऊं नये. ब्रह्मज्ञान झालेल्या श्रोत्रिय ब्राह्मणावांचून दुसऱ्या कोणाला दान करूं नये. अयोग्य दान किंवा अयोग्य प्रतिग्रह दोन्ही देणाऱ्याला व घेणाऱ्याला अनर्थमूलक होतात.

ज्याप्रमाणें खदिराला किंवा दगडाला धरून समुद्र तरूं इच्छिणारा त्यासकट बुडतो त्याप्रमाणें अपात्रीं दान करणारा व अयोग्य दान घेणारा दोघेही सपशेल बुडतात. ओलीं लांकडें वर टाकल्यानें ज्याप्रमाणें विस्तव पेट घेत नाहीं त्याप्रमाणें तप, वेदाध्ययन आणि आचारहीन दान घेणारा निरुपयोगी आहे. कवटीमध्यें असणारें पाणी किंवा कुत्र्याच्या चामड्याच्या पिशवींतलें दूध ज्याप्रमाणें अपवित्र असतें त्याप्रमाणें आचारहीन मनुष्य वेद पढला असला तरी तें व्यर्थ आहे. मनुष्यानें दयाभूतपणानें मंत्रहीन, आचारहीन, सद्वर्तनहीन, शास्त्रहीन अशा अन्नार्थी गरीबाला किंवा जो दीन, दुःखी व व्याधिग्रस्त आहे अशाला वाटेल तर दान करावें. परंतु तें शास्त्रदृष्ट्या हिताचें आहे किंवा तो धर्म आहे अशी मात्र बुद्धि ठेवूं नये. लांकडाचा हत्ती, चामड्याचा हरीण व वेद न पढलेला ब्राह्मण यांमध्यें नांवाचा तेवढा फरक आहे. ज्याप्रमाणें स्त्रियांना षंढ, गाईला गाय व पंखांवांचून पक्षी कामास येत नाहीं, त्याप्रमाणेंच मंत्रहीन ब्राह्मण फुकट आहेत. तसेंच फोलकटावांचून धान्य, पाण्यावांचून विहीर व बिन विस्तवाचे ठिकाणीं आहुति फुकट आहे त्याचप्रमाणें विद्येवांचून ब्राह्मण फुकट आहे. मूर्ख मनुष्य देव व पितर यांच्या हव्य कव्याला आड येत असल्यामुळें त्यांचा शत्रु आहे; व याला दिलेलें दान निष्फळ असल्यामुळें हा केवळ दुसऱ्याचा पैसा लुबाडणारा होय. त्याला उत्तम लोक मिळत नाहीं.'

---

## ९२ युधिष्ठिराचा हास्तिनापुरामध्यें प्रवेश.

**( १२. ३७–३९ )**

याप्रमाणें व्यासाचें भाषण ऐकून युधिष्ठिर ह्मणाला. 'राजधर्म त्याचप्रमाणें चारी वर्णांचे धर्म मला सविस्तर सांगा. तसेंच आपत्कालीं कशी नीति ठेवावी व न्यायमार्ग डोळ्यांपुढें ठेवून पृथ्वी मला कशी जिंकतां येईल ह्या गोष्टी आपल्या तोंडून मला ऐकावयाच्या आहेत, धर्माचरण व राज्य यांमध्यें नेहमीं विरोध येतो म्हणून माझ्या मनाला नेहमीं विचार पडतो.'

यावर व्यास नारदाकडे पाहून ह्मणाले, 'तुला सर्व धर्म ऐकून घ्यावयाचा असेल तर भीष्माकडे जा. ते धर्माच्या गूढासंबंधानें तुझ्या शंका दूर करतील. त्यांना सर्व गोष्टी कळत असून सर्व धर्म अवगत आहेत. बृहस्पति प्रभृति देवर्षींना अनेक वेळ

मोठ्या श्रमानें प्रसन्न करून ते त्यांजपासून नीति शिकले आहेत. जें मूळ शुक्राचार्य किंवा बृहस्पति यांपासून प्रथित झालें तो सर्व धर्मशास्त्र त्याच्या व्याख्यासह यांना माहीत आहे. हे सर्व वेद व त्यांच्या शाखा भृगुपुत्र च्यवन व वसिष्ठ यांपासून हे शिकले आहेत. पूर्वी ब्रह्मदेवाचे वडील मुलगे जे **सनत्कुमार** त्यांजपासून सर्व अध्यात्मज्ञान हे शिकले आहेत. मार्कंडेयांच्या तोंडून यांनीं सर्व यतिधर्म संपादन करून घेतला आहे. तसेंच परशुराम व इंद्र यांजपासून यांना सर्व अस्त्रें मिळालीं आहेत. मनुष्यांमध्यें यांचा जन्म झाला असूनही यांचें मरण यांच्या इच्छेवर अवलंबून आहे; व यांना अपत्य नाहीं तरी स्वर्गांत यांच्यासाठीं पुण्यलोक राखून ठेविले आहेत. ब्रह्मर्षी यांचे बरोबर नेहमीं राहतात, व अध्यात्मज्ञानासंबंधी यांना कांहीं माहीत नाहीं असें नाहीं. याप्रमाणें धर्माचे सर्व बारीकसारीक भेद यांना कळत असल्यामुळें ते प्राण सोडण्याच्या पूर्वी तूं त्यांजकडे जा, ह्मणजे ते तुला सर्व धर्म सांगतील.' त्यावर श्रीकृष्ण त्याला ह्मणाला, 'व्यास ह्मणतात तसें कर. ब्राह्मण त्याचप्रमाणें हे तुझे वीर्यशाली भाऊ उन्हाळ्याचे शेवटीं ज्याप्रमाणें पावसाची वाट पहावी त्याचप्रमाणें तुझ्याकडे दृष्टि देऊन आहेत. मरून बाकी राहिलेले राजे त्याचप्रमाणें सर्व कुरुजांगलांमधील चारी वर्णांचे लोक येथें जमले आहेत. त्यांचे त्याचप्रमाणें आमच्यासारख्या सुहृदांचें तसेंच द्रौपदीचें व्यासांच्या सांगण्यावरून प्रिय करून जगाचें हित कर. याप्रमाणें श्रीकृष्ण व व्यास यांनीं तसेंच दुसऱ्यांनीं केलेलें समाधान ऐकून मनाचें दुःख व संताप टाकून सर्व लोकांच्या कल्याणासाठीं युधिष्ठिर उठून नगरांत जाण्यासाठीं तयार झाला; व नक्षत्रांच्या स्वामी चंद्राप्रमाणें कौरवश्रेष्ठ धृतराष्ट्राला पुढें करून त्या सर्वांच्या मधून तो नगराकडे निघाला. प्रथमतः त्या कुंतीपुत्रधर्मानें हजारों देवब्राह्मणांची पूजा केली; नंतर कांबळी व कृष्णाजिनें टाकलेल्या एका नव्या पांढऱ्या शुभ्र रथावर तो चढला. त्या रथाला शुभलक्षणसंपन्न पांढरेशुभ्र सोळा बैल जुंपले होते व पवित्र मंत्रांनीं त्याची पूजा केली होती. युधिष्ठिर रथावर चढतांच भाटांचे स्तुति पाठ सुरू झाले. भीमानें हातांत लगाम धरला. लखलखीत पांढरें शुभ्र छत्र अर्जुनानें राजावर धरलें. चंद्रकिरणांप्रमाणें लखलखीत शृंगारलेल्या चवऱ्या व पंखे नकुलसहदेवांनीं धरले. मनोजव असे उत्तम घोडे जुंपलेल्या रथांत बसून युयुत्सु युधिष्ठिराच्या मागून चालला. सात्यकि व श्रीकृष्ण आपल्या रथांत बसून त्यांच्या मागून निघाले. मनुष्यांनीं ओढलेल्या वाहनामधून धृतराष्ट्र व गांधारी धर्मराजाच्या पुढें चालले. कुंती, द्रौपदी व सर्व कौरवस्त्रिया विदुरांच्या मागून लहान मोठ्या वाहनांतून चालल्या होत्या. पुष्कळ रथ, हत्ती, व शिपाई मागून चालले होते. याप्रमाणें युधिष्ठिर हास्तिनापुरांत शिरत असतां ती स्वारी मोठ्या थाटाची दिसत होती. हृष्टपुष्ट व उत्कृष्ट प्रेक्षक जनांची त्या ठिकाणीं खेचाखेच होऊन त्यांचा एकच गलगलाट उडाला होता. धर्मराज नगरांतून चालला असतां पौरजनांनीं नगर व राजमार्ग पांढऱ्या शुभ्र माळा व पताका यांनीं सुशोभित केले होते. राजमार्गांमधून धूप घातला होता. बुक्का वगैरे सुवासिक पदार्थ, नानाप्रकारचीं फुलें, फुलझाडें व माळा यांनीं राजवाडा सुवासिक करून सुशोभित केला होता. वेशीमधून पाण्यानें भरलेले कोरे घडे जिकडे तिकडे ठेवले असून चांगल्या देखण्या मुली ठिकठिकाणीं उभ्या केल्या होत्या. पांढरीं फुलें जिकडे तिकडे पसरलीं होतीं. मार्गावरील रत्नाच्या मोठमोठ्या हवेल्या बायकांनीं भरून निघाल्या असल्यामुळें त्यांच्या वजनाखालीं त्या जणूं वांकल्या होत्या. त्या बायका लाजेमुळें हळूहळू पांडवांची स्तुति करीत होत्या. 'द्रौपदी तूं धन्य आहेस, सप्तऋर्षींच्या जवळ असणाऱ्या गौतमीप्रमाणें तूं या पांच श्रेष्ठ पुरुषांना धरून आहेस. तुझ्या व्रतांचें आणि तुझ्या कर्मांचें तुला फळ मिळालें,' असें ह्मणून त्या द्रौपदीची वहावा करीत होत्या.

त्यांच्या या प्रेमळ व स्तुतिपर आपसांमधील कुजबुजण्यानें सर्व नगर गजबजून गेलें होतें. अशा प्रकारचा राजमार्ग ओलांडून धर्मराज शृंगारून सुशोभित केलेल्या राजवाड्याजवळ आला असतां प्रधान मंडळी, नगरवासी व प्रांतांतील लोक जवळ येऊन कर्णमधुर अशा स्तुतिपर शब्दानें ह्मणाले,

'हे राजा, न्यायानें व सामर्थ्यानें शत्रूंला जिंकून तुझें राज्य तुला मिळालें हें ठीक झालें. शंभर शरत्काल तूं आमचा राजा होऊन इंद्राप्रमाणें प्रजेचें पालन कर. याप्रमाणें राजवाड्यापुढें मंगलविधि उरकून ब्राह्मणांनीं दिलेले आशीर्वाद घेतल्यावर श्रद्धा व विजय यांचीं चिन्हें ज्या ठिकाणीं जिकडे तिकडे दिसत होतीं, अशा इंद्रभुवनासमान त्या राजवाड्यांत शिरल्यावर देवघरांत जाऊन रत्नें, सुवासिक पदार्थ व फुलें यांनीं देवपूजन करून तो श्रीमान धर्मराज बाहेर पडला. तेव्हां प्रसंगोचित अशीं मंगल द्रव्यें हातांत घेऊन उभे असलेले ब्राह्मण त्याच्या दृष्टीस पडले. धौम्य व धृतराष्ट्र यांना बरोबर घेऊन, फुलें, मोदक, रत्नें, गाई, वस्त्रें वाटेल त्याला वाटेल तें देऊन त्या सर्वांचा त्यानें सत्कार केला. ते वेळीं पुण्यघोष निघाला त्यानें सर्व आकाश भरून गेलें. नंतर जयसूचक नगारे व शंख वाजूं लागले. इतक्यांत दुर्योधनाचा मित्र चार्वाक राक्षस हातांत माळ व त्रिदंड घेऊन शेंडी असलेल्या ब्राह्मणभिक्षूचें रूप घेऊन पांडवांचें वाईट व्हावें ह्या हेतूनें तेथें जमलेल्या ब्राह्मणांचा विचार न घेतां विनदिकत धिटाईनें धर्मराजाला ह्मणाला, 'राजा, हे ब्राह्मण ह्मणतात कीं, ज्ञातींचा नाश करणाऱ्या तुझ्यासारख्या वाईट राजाला धिक्कार असो. असा ज्ञातीचा नाश करून आतां तुला काय फायदा मिळणार? गुरूंना मारवून जगण्यापेक्षां मरणें बरें.' हें त्या दुष्ट राक्षसाचें भाषण ऐकून ब्राह्मण अगदीं घाबरून गेले, व त्यांमध्यें चळवळ उडून गेली. तेव्हां युधिष्ठिर त्यांना ह्मणाला, 'कृपा करा, मी आपल्यापुढें नम्र होऊन हात जोडतों. या माझ्या आजपर्यंत कष्टलेल्या भावांसाठीं हा माझा उपद्व्याप असल्यामुळें आपण माझा धिक्कार करूं नका.'

हें ऐकून सर्व ब्राह्मण मोठ्यानें ओरडून ह्मणाले, 'आमचें कांहीं असें ह्मणणें नाहीं. तूं सुखी ऐस.' नंतर त्या महात्म्यांनीं ज्ञानचक्षूंनीं तो भिक्षूचें रूप घेऊन आलेला दुर्योधनाचा मित्र चार्वाक राक्षस आहे असें जाणून संतापानें त्याची निर्भर्त्सना करून हुंकारांनीं त्यांनीं त्या पापी राक्षसाला जाळून टाकलें. तेव्हां विजेनें फांद्यांसकट जळून पडलेल्या झाडाप्रमाणें त्यांच्या तेजानें तो जळून पडला. तेव्हां श्रीकृष्ण युधिष्ठिराला ह्मणाला, 'बा युधिष्ठिरा, ब्राह्मण मला सदां पूज्य आहेत. यांच्या तोंडांत विष असून लौकर प्रसन्न होणारे व भूमीवर फिरणारे हे देव आहेत. परंतु या चार्वाक राक्षसानें पूर्वी बदरी आश्रमामध्यें पुष्कळ वर्षेंपर्यंत तप केलें. फिरून फिरून ब्रह्मदेवांनीं याला वर मागण्यास सांगितलें असतां कोणाही प्राण्यापासून आपल्याला भीति नसावी असा त्यानें वर मागितला. तेव्हां 'तुला सर्व प्राणीमात्रांपासून अभय आहे. मात्र ब्राह्मणांचा अवमान करशील तर त्यापासून तुला भीति आहे,' म्हणून ब्रह्मदेवांनीं त्याला वर दिला. तेव्हां त्या घोरकर्मी राक्षसानें देवांना फार ताप दिला. तेव्हां त्याच्या बलानें पीडित होऊन देवांनीं ब्रह्मदेवांकडे जाऊन त्याला मारण्यासाठीं विनंति केली. तेव्हां 'दुर्योधन म्हणून याचा मित्र आहे त्याच्या स्नेहामुळें हा ब्राह्मणांचा अवमान करील, त्यानें रागावून ज्यांच्या तोंडांत शक्ति आहे असे ब्राह्मण याला जाळतील,' असा याला त्यांचा शाप मिळाला. त्याप्रमाणें ब्रह्मदेवांच्या दंडानेंच हा मेला आहे. तूं क्षत्रधर्मानें आपल्या ज्ञातीला मारलें आहेस. व तेही क्षत्रिय वीर स्वर्गाला गेले आहेत. तेव्हां शोक बाजूला ठेवून त्यांची उत्तरक्रिया कर; प्रजेचें रक्षण करून ब्राह्मणांना मान दे.

---

## ९४ राज्याभिषेक व कामांची वांटणी
## (१२. ४०–४१)

नंतर राजा युधिष्ठिर मनाची हुरहुर व शोक जाऊन मोठ्या आनंदानें सोन्याच्या उत्कृष्ट आसनावर बसला. त्याच्यासमोर लखलखीत अशा सुवर्णासनावर सात्यकि व श्रीकृष्ण बसले. युधिष्ठिराच्या दोन्ही बाजूंला भीमार्जुन उत्तम रत्नजडित आसनावर बसले. सोन्यांनीं मढविलेल्या हस्तिदंती सिंहासनावर कुंती नकुलसहदेवांना घेऊन बसली. दुर्योधनाचा पुरोहित सुधर्मा, विदुर, धौम्य, धृतराष्ट्र, हे सर्व झगझगीत अशा निरनिराळ्या उत्कृष्ट आसनावर बसले. युयुत्सु, संजय, भाग्यशाली गांधारी युधिष्ठिराच्याजवळ बसले. सर्व आसनावर बसल्यावर पांढरीं फुलें, स्वस्तिकें, अक्षता, भूमि, सोनें, रुपें,

रत्नें यांना युधिष्ठिरानें हात लावला. नंतर सर्व प्रधान मंडळी पुरोहिताला पुढें करून माती, सोनें, नाना प्रकारचीं रत्नें सर्व सामानांनीं भरलेलें अभिषेक पात्र, लखलखीत सोन्याचे, तांब्यांचे व मातीचे पाण्यानें भरलेले घडे, फुलें, लाह्या, दर्भ, गाईचें दूध, शमीच्या, पिंपळाच्या व पळसाच्या समिधा, मध, तूप, औदुंबराचे स्रुव, सोन्यानें शृंगारलेला शंख इत्यादि मंगल पदार्थ घेऊन युधिष्ठिराजवळ आले. नंतर श्रीकृष्णाच्या सांगण्यावरून पूर्वोत्तर निमुळत्या जागेवर यथाशास्त्र तयार केलेल्या वेदीवर ज्याचें पादपीठ फार मजबूत होतें अशा वाघाचें कातडें घातलेल्या पांढऱ्या शुभ्र व अग्नीप्रमाणें लखलखीत अशा सर्वतोभद्र आसनावर धर्मराजाला व द्रौपदीला बसवून विधिपूर्वक मंत्र म्हणून ब्राह्मणांनीं अग्नींत होम केला. नंतर श्रीकृष्णानें उठून तो पुजलेला शंख हातांत घेऊन त्या पृथ्वीपति युधिष्ठिरावर अभिषेक केला. नंतर धृतराष्ट्र व सर्व प्रधान मंडळी यांनीं कृष्णाच्या सांगण्यावरून त्याचप्रमाणें अभिषेक केला. ह्याप्रमाणें शंखानें अभिषेक झाल्यावर युधिष्ठिर आपल्या भावांमध्यें फारच झळकूं लागला. नंतर डंका, नगारे, नौबती वाजूं लागल्या. प्रजेनें धर्मराजाला नजराणे दिले. ते सर्व घेऊन पुष्कळ देणग्या देऊन त्यानें त्यांचा सत्कार केला; नंतर वेदाध्ययन करणाऱ्या बुद्धिमान व शीलसंपन्न ब्राह्मणांना हजारों निष्क देऊन त्यांजकडून स्वस्तिवाचन ह्मणविलें. तेव्हां संतुष्ट होऊन, ‘तुझें कल्याण असो; तुझा जयजयकार असो, तुझा विजय झाला ठीक झालें; आपल्या पराक्रमानें तूं स्वधर्म राखलास; ज्यामध्यें सर्व वीरांचा फडशा पडला अशा रणांतून शत्रूला जिंकून आपल्या भावांनिशीं तूं पार पडलास, ठीक झालें. आतां लौकर उत्तर कार्यें करून टाक,’ असें ते ह्मणाले.

याप्रमाणें आपल्या प्रजेचें देशकालोचित भाषण ऐकून युधिष्ठिर ह्मणाला, ‘ज्यापेक्षां ब्राह्मणश्रेष्ठ आज एकत्र जमून याप्रमाणें आमचें खरें ह्मणा अगर खोटें ह्मणा गुणानुवाद गात आहेत, तेव्हां पांडव आज खरोखर धन्य आहेत. तुमच्या ह्या स्तुतिवादानें तुमचा आमच्यावर पूर्ण अनुग्रह आहे असें मला वाटतें. आमचे वडील धृतराष्ट्र महाराज हेच माझे श्रेष्ठ दैवत आहेत. माझें प्रिय करण्याची तुमची इच्छा असेल तर तुह्मी यांच्या मर्जीप्रमाणें यांचे हुकुमांत रहावें. एवढ्या ज्ञातीचा नाश करून मी जो जिवंत राहिलों आहें तो केवळ यांचेसाठीं. मला नेहमीं मोठ्या हुशारीनें यांची सेवा केली पाहिजे. तुमच्यासारख्या सुहृदांची जर मजवर कृपा असेल तर यांच्यांशीं तुह्मी पूर्वीप्रमाणें वागा. सर्व जगताचे त्याचप्रमाणें तुमचे आमचे नाथ हे असून ही सर्व पृथ्वी व हे पांडव त्यांचेच आहेत, हें तुह्मी आपल्या लक्षांत ठेवा.’ याप्रमाणें सांगून त्यांना जाण्याला परवानगी दिल्यावर त्यानें भीमाला युवराज केलें. कोणतीही सल्लामसलत देणें, एकाद्या कामाचा निश्चय ठरविणें व संधियानादि सहा प्रकारच्या राजनीतीचा विचार करणें ह्या गोष्टी बुद्धिमान विदुराकडे सोंपविल्या. तसेंच कोणतेंही काम झालें किंवा न झालें तें पाहणें व जमाबंदीवर नजर ठेवणें यांकडे सर्व गुणांनीं संपन्न वृद्ध संजयाची त्यानें योजना केली. सैन्याची मोजदाद ठेवून त्यांना अन्न व मुशाहिरा देणें व दुसरीं लष्करी कामें पहाणें हीं कामें त्यानें नकुलाला सांगितलीं. परचक्राला अटकावण्याचें व दुष्टांची खोड मोडण्याचें काम अर्जुनाकडे दिलें. ब्राह्मणांचीं देवकार्यें व दुसरीं कार्यें यांजकडे रोज रोज नजर देण्याला धौम्यांना त्यानें सांगितलें. सहदेवाला नेहमीं आपल्याजवळ ठेवून त्यानें सदोदित राजाचें संरक्षण करावें असें ठरलें. जें जें काम करण्याला जे जे योग्य वाटले त्यांची त्या त्या कामावर त्यानें योजना केली. विदुर, संजय, युयुत्सु यांना घटकोघटकीं हुशार राहून वडील धृतराष्ट्र सांगतील तें, त्याप्रमाणें त्यांच्या विचारानें सर्व पौरजनांचीं कामें मोठ्या हुशारीनें करण्यास सांगितलें.

---

### ९५ राज्यव्यवस्था. (१२. ४२-४६)

नंतर युधिष्ठिरानें ज्ञातींपैकीं जे युद्धांत मेले होते त्या सर्वांचीं श्राद्धें करविलीं. युधिष्ठिरानें आपल्या मुलांची उत्तरक्रिया अन्न, गाई व उत्तम उत्तम रत्नें देऊन उत्तम प्रकारें केली. त्यानें द्रौपदीला बरोबर घेऊन द्रोण, कर्ण, धृष्टद्युम्न, अभिमन्यु, घटोत्कच व दुसरे सुहृद त्या सर्वांसाठीं व ज्या कोणा

दुसऱ्या राजांना कोणी गोतावळ्याचें उरलें नव्हतें, अशा सर्वांच्या नांवानें वेगवेगळीं श्राद्धें करून द्रव्य, रत्नें, गाई व वस्त्रें देऊन हजारों ब्राह्मण तृप्त केले. त्याचप्रमाणें धर्मशाळा, पाणपोई, तळीं वगैरे त्यांच्या नांवानें बांधवून त्यांच्या ऋणांतून तो मुक्त झाला व याप्रमाणें लोकांच्या शब्दांतून सुटून तो कृतकृत्य झाला. धर्मानें प्रजेचें रक्षण करून, धृतराष्ट्र, गांधारी, विदुरप्रभृति कौरवांची व थोर नोकरांची त्यानें पूर्वीप्रमाणें मानमान्यता ठेवली. ज्या कांहीं कौरवस्त्रियांचे नवरे व मुलगे मेले होते, त्या सर्वांची मानमान्यता ठेवून मोठ्या ममतेनें त्यांचें तो पालन करीत होता. दीन, आंधळे व कंगाल लोकांना दयाळूपणें घर व अन्नवस्त्र देऊन त्यांवर तो कृपा करीत असे. याप्रमाणें क्रम चालला असतां एकदां तो श्रीकृष्णाजवळ येऊन हात जोडून त्याची स्तुति करून ह्मणाला, 'श्रीकृष्णा, तुझ्याच कृपेनें, नीतीनें, सामर्थ्यानें, बुद्धीनें व पराक्रमानें हें वडिलोपार्जित राज्य मला मिळालें.' तेव्हां श्रीकृष्णानेंही अनुकूल शब्दांनीं त्याला आनंदविलें.

पुढें आपल्या सर्व प्रजाजनांना आपापल्या घरीं जाण्याला परवानगी दिल्यावर आपल्या भावांचें समाधान करून तो त्यांना ह्मणाला, 'तुह्मांला पुष्कळ श्रम होऊन शोक व राग यानें फार त्रास झाला आहे. पंगूप्रमाणें तुह्मी माझ्यासाठीं अरण्यांत फार दिवस दुःखांत काढलेत. शत्रूंनीं नाना प्रकारच्या शस्त्रांनीं तुह्मांला जखमा केल्या आहेत. तेव्हां सुखानें मनाप्रमाणें या जयाचा उपभोग घ्या. विश्रांति घेऊन मन स्वस्थ झाल्यावर उद्यां फिरून आपण एकत्र मिळूं.' असें म्हणून पुष्कळ गच्यांनीं शोभायमान, नाना रत्नांनीं पूर्ण व दासदासींनीं भरलेला दुर्योधनाचा वाडा धृतराष्ट्राच्या विचारानें त्यानें भीमाला राहण्याला दिला. त्याच्याच तोडीचा दुःशासनाचा वाडा युधिष्ठिराच्या आज्ञेनें अर्जुनाला मिळाला. दुःशासनाच्या घराहून कांकणभर अधीक कुबेराच्या वाड्याच्या तोडीचा दुर्मर्षणाचा वाडा आजपर्यंत कष्ट सोसलेल्या नकुलाला राजानें प्रेमानें दिला. त्याहून उत्तम दुर्मुखाचा वाडा त्यानें नेहमीं आपल्या हितामध्यें दक्ष असणाऱ्या सहदेवाला दिला. युयुत्सु, विदुर, संजय, सुधर्मा व धौम्य हे आपापल्या घरीं गेले. श्रीकृष्ण सात्यकि बरोबर अर्जुनाच्या वाड्यांत गेला. त्या ठिकाणीं अनेक उत्तमोत्तम खाद्यें व पेयें सेवून आनंदानें त्यांनीं सुखांत रात्र काढली. याप्रमाणें राज्य मिळाल्यावर धर्मराजानें चारी वर्णांच्या लोकांना आपापल्या धर्मांत यथायोग्य रीतीनें चालविलें. हजार योग्य अशा स्नातक ब्राह्मणांना राजानें प्रत्येकीं हजार निष्क देवविलें. त्याचप्रमाणें आपल्यावर अवलंबून असणारे नोकर, अतिथि, गरीब लोक तसेंच तर्कटी लोक, नास्तिकवादि लोक यांना सुद्धां त्यांच्या इच्छा पूर्ण करून त्यानें तृप्त केलें. धौम्य पुरोहितांना हजारों गाई, पुष्कळ संपत्ति, पुष्कळ सोनें, रुपें व नाना प्रकारचीं वस्त्रें त्यानें दिलीं. कृपाचार्यांशीं त्यानें गुरूचें नातें ठेविलें. विदुरांचा त्याचप्रमाणें युयुत्सु व धृतराष्ट्र यांचा बहुमान केला. नाना प्रकारचीं खाद्यें, अन्नें, पेयें, वस्त्रें शयनें व आसनें देऊन मिळालेल्या संपत्तीचा योग्य विनियोग करून त्या थोर दात्यानें सर्व आश्रितांना तोषविलें. सर्व राज्यकारभार धृतराष्ट्र, गांधारी व विदुर यांच्या कानांवर घालून स्वस्थपणें तो सुखांत होता. याप्रमाणें सर्व नगरवासी लोकांना संतुष्ट करून तो हात जोडून श्रीकृष्णाकडे गेला, ज्यांच्या छातीवर कौस्तुभमणि झळकत आहे अशा पीतांबरधारी शामसुंदर श्रीकृष्णाला सोन्यामाणकांनीं शृंगारलेल्या पलंगावर बसलेला पाहून, त्या नरदेहधारी विष्णूकडे जाऊन, 'अच्युता, तुझी रात्र सुखांत गेली ना? तुझीं इंद्रियें सर्व प्रसन्न आहेतना? तुझी बुद्धि ठिकाणावर आहेना? तुझ्या प्रसादानें धर्मभ्रष्ट न होतां आह्मांला जय व यश मिळालें आहे,' असें तो ह्मणाला व तो कांहीं बोलत नाहींसें पाहून युधिष्टिर फिरून ह्मणाला, 'तूं असा ध्यानामध्यें गढून गेला आहेस हें पाहून मला मोठें आश्चर्य वाटतें. तिन्ही जगांचें कुशल आहेना? जाग्रत्, स्वप्न, सुषुप्ति यांहून चौथा योग्यांनाच सुलभ असा तुरीय ध्यानमार्ग तूं धरून या जगांतून आपलें अंग काढून घेतलें आहेस हें पाहून मला आश्चर्य वाटतें. शरीरांतील पांच प्राणवायु आवरून घेऊन सर्व तुझीं प्रसन्न इंद्रियें तूं मनामध्यें नेऊन ठेविलीं आहेस. त्याचमाणें वाणी

आणि मन यांना तूं बुद्धीच्या ठिकाणीं नेऊन ठेविलें आहेस. आणि शब्दादि गुणांनीं विकार पावणारीं श्रोत्रादि इंद्रियें तूं आत्म्याच्या ठिकाणीं लीन करून टाकलीं आहेस. तुझ्या अंगावरील रोम बिलकुल हलत नाहींत; त्याचप्रमाणें बुद्धि व मन हीं स्थिर झालीं आहेत. लांकडाच्या खांबाप्रमाणें किंवा दगडाप्रमाणें तूं अगदीं निश्चळ झाला आहेस. निवाऱ्यांतला दिवा ज्याप्रमाणें शांत जळतो त्याप्रमाणें तूं अगदीं शांत आहेस. तर ह्यांत कांहीं गूढ नसून मला सांगण्यासारखें असेल तर मी तुला हात जोडतों माझा संशय दूर कर. कर्ता, मोडता तूं असून विनाशी व अविनाशी तूंच आहेस. तुला आदि नाहीं किंवा अंत नाहीं. तूं सर्वश्रेष्ठ मूळ पुरुष आहेस ह्मणून तुला शरण आलेल्या मला या ध्यानाचें कारण सांग.'

नंतर भगवान श्रीकृष्ण मन, बुद्धि व इंद्रियें फिरून जाग्यावर आणून हासत ह्मणाले, 'विजणाऱ्या अग्नीप्रमाणें शरशय्येवर पडलेले मरणासन्न भीष्म माझें ध्यान करीत आहेत. त्या महात्म्यांना सर्व भूत, भविष्य वर्तमान कळत असून धर्मवेत्त्यांमध्यें ते श्रेष्ठ आहेत. केवळ आपल्या कर्मांनीं त्यांनीं स्वर्ग मिळविला आहे. चंद्र मावळला असतां रात्रीची जी दशा उडते ती दशा या पृथ्वीची त्यांच्या मागून होणार. त्यांच्याकडे जाऊन तुझ्या मनांत आहे त्याप्रमाणें चारी विद्या, चारी आश्रम व सर्व राजधर्म विचारून घे. कौरवांचे आग्रणी ते नाहींतसे झाल्यावर त्यांचेबरोबरच सर्व ज्ञान लयाला जाणार आहे.'

हें ऐकून युधिष्ठिर गळा दाटून येऊन ह्मणाला, 'माधवा, भीष्मांच्या प्रभावासंबंधानें तूं ह्मणालास तें अगदीं बरोबर आहे. त्यांचें थोर भाग्य व त्यांचा प्रभाव मीं ब्राह्मणांच्या तोंडून पूर्वींच ऐकला आहे. व तूंही तेंच सांगतोस. तेव्हां तुझी मजवर कृपा असेल तर तुला पुढें करून आपण भीष्मांकडे जाऊं. सूर्यानें अयन बदलल्यावर ते ब्रह्मलोकाला जातील. तेव्हां यांना तुझें दर्शन झालें पाहिजे. क्षर व अक्षर असा ब्रह्मभय आदिदेव तूं असल्यानें तुझें दर्शन हा एक त्यांना मोठा लाभ होणार आहे. हें धर्मराजाचें भाषण ऐकून श्रीकृष्णानें आपला देदीप्यमान रथ मागविला.

## ९६ शरशय्येवर भीष्मांची ईशस्तुति.
## ( १२. ४७ )

दक्षिणायन संपून सूर्य उत्तरायणामध्यें गेल्यावर परब्रह्माचे ठिकाणीं आत्म्याला लीन करावयाच्या उद्देशानें हजारों बाणांनीं भरून निघालेले भीष्म स्वस्थ मनानें ध्यान करीत असतां चोहोंकडे पसरलेल्या किरणांनीं युक्त अशा सूर्याप्रमाणें ते फार तेजःपुंज दिसत होते. व्यास, नारद प्रभृति श्रद्धा, मनोनिग्रह, शम इत्यादि गुणांनीं युक्त महान महान ऋषी त्यांच्या बाजूला बसले होते. ते वेळीं भीष्मांनीं मोठ्या आनंदानें मोठ्यानें सर्वभावानें हात जोडून योगेश्वर श्रीकृष्णाची याप्रमाणें स्तुति केली. ते म्हणाले, 'मी थोडक्यांत पण विस्तारपूर्वक श्रीकृष्णा, तुझी आराधना करतों. त्यानें तूं संतुष्ट हो. तूं शुद्धस्वरूप, सर्वांहून श्रेष्ठ, तत्पदानें जाणवलेला, श्रेष्ठपुरुष आहेस. सर्वभावानें या देहाशीं संबंध तोडून आदि व अंत नसणाऱ्या तुला श्रेष्ठ ब्रह्माला, मी शरण आहें. एका उत्पन्नकर्त्या नारायणावांचून तुला बरोबर कोणी ओळखत नाहीं. त्या नारायणापासूनच सिद्ध, मोठमोठे नाग, देव, देवर्षी यांना अव्यय अशा तुझी थोडी ओळख पटते. देव, दानव, गंधर्व वगैरे कोणी तूं कोण व कोठून झालास हें जाणत नाहींत. हीं विश्वें व भूतमात्र सुतांत ओंवलेल्या मण्याप्रमाणें नित्य अशा तुझ्या ठिकाणीं असून अखेरीस तुझ्यामध्येंच लय पावतात. विश्व हेंच ज्याचें अंगभूत असून विश्वाशीं ज्याची उलाढाल चालली आहे, अशा तुझ्या ठिकाणीं सर्व सदसद् कार्यकारणांच्या दोऱ्या माळेप्रमाणें गोंवल्या आहेत. तुला हजारों डोकीं असून हजारों हात, पाय, डोळे आहेत. हजारों तोंडांनीं तूं झळकत आहेस. तुला नारायण नांव असून विश्वाचा तूं मुख्य आधार आहेस. अगदीं सूक्ष्माहून तूं सूक्ष्म असून सर्वांत मोठ्याहून तूं मोठा व थोराहून थोर आहेस. कर्म प्रकाशक मंत्र, मंत्रार्थ स्पष्ट करणारीं वेदवाक्यें, कर्मादिकांशीं मिळून देवतादिकांचें ज्ञान करून देणारीं वाक्यें, केवलात्मक ज्ञान देणारीं वाक्यें ( उपनिषदें ) व निश्चयात्मक ओळख पटविणारे साम, यांमध्यें तुला सत्यकर्मा ह्मटलें आहे. ब्रह्म, जीव, मन व बुद्धि,

(वासुदेव, संकर्षण, प्रद्युम्न, अनिरुद्ध) या चार स्वरूपांनीं तू भासमान असून बुद्धीनें ज्ञेय आहेस व भक्तांचा तूं स्वामी आहेस. वर निर्दिष्ट केलेल्या चार दिव्य नांवांनीं भक्त तुला भजतात. तूं नेहमीं तपस्वरूपी असून केलेलें तप तुझ्या ठिकाणींच राहतें. तूं सर्व जगाचा आत्मा आहेस. सर्व जगाचें तुला ज्ञान आहे. सर्व तूं आहेस. सर्व तुला कळतें. आणि सर्व जग तुझ्यानेंच भरलें आहे. अरणीपासून ज्याप्रमाणें दैदीप्यमान अग्नि उत्पन्न व्हावा त्याप्रमाणें या विश्वाच्या रक्षणासाठीं, ब्रह्मदेवानें वसुदेवापासून देवकीचे ठिकाणीं तुला उत्पन्न केला आहे. तुझे भक्त सर्व दुसऱ्या वस्तूंपासून मन काढून घेऊन निरिच्छ व पापमुक्त होत्साते आपल्या ठिकाणीं तुला पाहूं लागतात व मोक्षाला पात्र होतात. तुझीं कर्में वायु व इंद्र यांहून अधिक असून तुझें तेज सूर्याहून अधिक आहे. बुद्धि व इंद्रियें यांच्या ज्ञानाच्या तूं पलीकडे आहेस. गेलेल्या कल्पादिकांसंबंधानें तुला पुरुष हें नांव आहे. युगाच्या आरंभकालीं तुला ब्रह्म ह्मणतात व क्षयकालीं संकर्षण ह्मणतात. एक असून अनेक रूपानें भासमान होणाऱ्या व सर्व कामना पूर्ण करणाऱ्या तुझी तुझ्याच ठिकाणीं लक्ष असणारे क्रियावान भक्त पूजा करतात. तूं कोशरूपी असून त्या कोशामध्येंच ह्या सर्व प्रजा राहिल्या आहेत. पाण्यामध्यें डुबणाऱ्या पक्ष्यांप्रमाणें हे प्राणी तुझ्यामध्यें डुबत आहेत. तूं सत्यस्वरूपी एकाक्षर ब्रह्म असून सदसदाच्या पलीकडचा आहेस. तुला आदि, मध्य, अंत कांहीं नसून ऋषी, देव, असुर सर्व शुचिर्भूततेनें दुःख निवारणासाठीं उत्कृष्ट औषध ह्मणून तुझी पूजा करतात. तुला जन्म किंवा मृत्यु कांहीं नाहीं. तूं सनातन न दिसणारा व जाणवणारा असा आहेस. जगाचा कर्ता तूंच असून जगामध्यें असणाऱ्या सर्व वस्तूंचा स्वामी तूं आहेस. जगाचा मुख्य रक्षणकर्ता तूंच आहेस. तुला हिरण्यवर्णाला अदितीनें दैत्यांच्या नाशासाठीं निर्माण केलें. त्या तुला सूर्यस्वरूपी परमेश्वराला मी नमस्कार करतों. शुक्लपक्षीं देवांना व कृष्णपक्षीं पितरांना अमृतानें तृप्त करणाऱ्या सोमस्वरूपी तुला माझा नमस्कार असो. ह्या भयंकर संसाररूपी अंधाराच्या पलीकडे उत्तम तेजानें झळकणाऱ्या तुला ओळखल्यानें मृत्यूचा फेरा चुकतो, त्या ज्ञेयस्वरूपी तुला माझा नमस्कार असो. तुला मोठ्या उक्त यज्ञामध्यें ब्राह्मण मोठ्या ऋचेच्या स्वरूपानें पुजतात व मोठ्या चयन यज्ञामध्यें तुझ्या नांवानें मंत्र ह्मणतात; त्या वेदस्वरूपी तुला माझा नमस्कार असो. ऋग्, यजु व साम हे तुझें राहण्याचें ठिकाण आहे, व धाना, करंभ, परिवाप, पुरोडाश, पय हे तुझे पांच प्राण आहेस, व तूं सप्ततंतु स्वरूपानें राहतोस; अशा तुला यज्ञरूपी परमात्म्याला मी नमस्कार करतों. सतरा मंत्रांनीं तुला अग्नीमध्यें होम देतात; त्या होमस्वरूपी तुला माझा नमस्कार असो. यजु नामक तूं वेदपुरुष असून वैदिक छंद तुझे अवयव आहेत; व ऋक्, साम, यजु हीं तुझीं डोकीं आहेत, व रथंतर तुझा समाधानदर्शक उद्गार आहे. त्या तुला स्तोत्रात्मकाला माझा नमस्कार असो. तूं प्रजापतींच्या हजार वर्षें चाललेल्या सत्रामध्यें सुवर्ण पंखांनीं युक्त हंसपक्षाच्या स्वरूपानें प्रगट झालास; त्या तुला नमस्कार असो. निरनिराळीं पदें हींच ज्याचीं अवयवें आहेत, संधि हेच ज्याचें सांधे आहेत व स्वर व व्यंजनें हींच ज्याचे अलंकार आहेत अशा उत्तम अक्षरयुक्त शब्दस्वरूपी तुला माझा नमस्कार असो. वराहरूप धरून ज्यानें तिन्ही लोकांच्या हितासाठीं पृथ्वीला वर काढली त्या वीर्यस्वरूपी तुला माझा नमस्कार असो. हजारों फणांनीं युक्त अशा नागानें विभूषित पर्यंकावर योगनिद्रा करणाऱ्या निद्रास्वरूपी तुला माझा नमस्कार असो. मोक्षप्राप्तीच्या साधनभूत सत्यानें व धर्मार्थादि साधनांनीं जो तूं भल्यासाठीं हा संसार तरून जाण्याला सेतू बांधतोस त्या सत्यस्वरूपी तुला माझा नमस्कार असो. निरनिराळ्या धर्माचे लोक निरनिराळ्या धर्मफळासाठीं निरनिराळ्या धर्मांनीं तुला पुजतात; अशा धर्मस्वरूपी तुला माझा नमस्कार असो. ज्यापासून काममय असे सर्व देही उत्पन्न होतात व जो तूं सर्व भूतमात्रांना उन्माद आणतोस त्या कामस्वरूपी तुला नमस्कार असो. ज्या व्यक्त अशा देहांमध्यें राहणाऱ्या अव्यक्त तुला परमात्म्याला मोठमोठे ऋषि धुंडाळतात, त्या क्षेत्रस्वरूपी तुला माझा नमस्कार असो. नेहमीं चित्स्वरूपानें तूं हृदयामध्यें राहतोस, तथापि जाग्रत स्वप्न,

सुषुप्ति यां तीन स्थितींमध्यें सोळा गुणांनीं युक्त तूं असल्यामुळें तुझ्यासंबंधानें लोक सत्रा प्रकारानें बोलतात; त्या सांख्यस्वरूपी तुला माझा नमस्कार असो. झोंप टाकून श्वास आवरून इंद्रिय निग्रहानें आत्मस्थितींत राहून एकाग्र रीतीनें ज्या तुला शाश्वत जोतीला योगी लोक पहातात त्या योगस्वरूपी तुला नमस्कार असो. पापपुण्य नाहींसें करून जन्म मृत्यूंचा फेरा चुकवून संन्यासी शांत होऊन तुला मिळतात, अशा मोक्षस्वरूपी तुला नमस्कार असो. जो तूं हजार युगांच्या शेवटीं दैदीप्यमान विभावसूचें स्वरूप घेऊन सर्व भूतमात्रांना गिळून टाकतोस त्या घोरस्वरूपी तुला नमस्कार असो. सर्व भूतमात्रांना गिळून टाकल्यावर सर्व जग जलमय करून बालस्वरूपानें त्यावर निजणाऱ्या मायास्वरूपी तुला नमस्कार असो. ज्याच्या नाभिकमलापासून कमल उत्पन्न होऊन त्या कमलाच्या आधारावर हें सर्व जग राहिलें आहे त्या पद्मस्वरूपी तुला माझा नमस्कार असो. जो तूं आपल्या हजार मस्तकांनीं सर्व विश्व व्यापून राहिला आहेस, ज्या समुद्रासारख्या मोठमोठ्या चार इच्छांना तूं जिंकिलें आहेस, अशा योगनिद्रास्वरूपी तुला नमस्कार असो. तुझ्या केशांमध्यें ढग असून सर्व आंगाचे सांध्याचे ठिकाणीं सर्व नद्या आहेत व पोटांत समुद्र आहेत, अशा तोयस्वरूपी तुला नमस्कार असो. ज्यापासून उत्पत्ति व लय यांसंबंधीं सर्व विकार उत्पन्न होऊन ज्याच्यामध्यें फिरून लय पावतात त्या हेतुस्वरूपी परमात्म्याला नमस्कार असो. जो रात्रीं जागा असून दिवसां सुद्धां कामांत गुंतला असतोस व सर्व बऱ्या वाईट गोष्टी पहात असतोस त्या द्रष्टृस्वरूपी तुला नमस्कार असो. कोणच्याही कामामध्यें तूं अकुंठ असून धर्माच्या ठिकाणीं सदैव तत्पर असणाऱ्या कार्यात्मवैकुंठरूपी तुला नमस्कार असो. धर्माची पायमल्ली करून ज्यांनीं वैभव मिळविलें होतें, त्या क्षत्रियांना एकवीस वेळां रागानें तूं मारलेंस, त्या क्रौर्यस्वरूपी तुला नमस्कार असो. पांच वायूंच्या रूपानें शरीरामध्यें संचार करून भूतमात्रांची तूं हालचाल करवितोस; त्या वायुस्वरूपी तुला माझा नमस्कार असो. युगायुगाच्या ठिकाणीं महिने, ऋतु, सहा महिनें अशा रीतीनें फिरफिरून प्रगट होऊन उत्पत्ति व नाश यांचा तूं कर्ता आहेस; त्या कालस्वरूपी तुला माझा नमस्कार असो. ब्राह्मण तुझें तोंड असून क्षत्रिय बाहू आहेत, वैश्य मांड्या व उदर आहेत व तुझ्या पायांच्या ठिकाणीं शूद्र आहेत, त्या वर्णस्वरूपी तुला माझा नमस्कार असो. ज्याचें तोंड अग्नि असून द्यौ मस्तक आहे, आकाश नाभि आहे, पृथ्वी पाय आहेत, सूर्य डोळा व दिशा कान आहेत त्या लोकस्वरूपी तुला नमस्कार असो. काल, यज्ञ यांहून त्याचप्रमाणें श्रेष्ठांहून श्रेष्ठ अशा ज्या तुला आदि नाहीं परंतु विश्वाचें जो आदिकारण आहेस, त्या विश्वरूपी तुला नमस्कार असो. विषयांमध्यें राहणारे आपल्या रागद्वेषादि विषय गुणांनीं तुला विषयपोषक समजतात ह्या त्या गोप्तृस्वरूपी तुला नमस्कार असो. अन्नपानरूपी सर्पणानें कफवातादि दोष व प्राण पोसून जो तूं सर्व प्राणिमात्रांना जिवंत ठेवतोस त्या प्राणस्वरूपी तुला नमस्कार असो. प्राणधारणेसाठीं जो तूं चतुर्विध अन्न पोटांत शिजवितोस त्या पाकस्वरूपी तुला नमस्कार असो. पिंगट डोळे व पिंगट आयाळ असणाऱ्या तूं केवळ दाढ व नखें ह्याच आयुधानिशीं दानवेंद्राचा अंत करणारें स्वरूप घेतलें होतेंस, त्या दृप्त स्वरूपी तुला नमस्कार असो. ज्याला देव, गंधर्व, दैत्य किंवा दानव यांपैकीं कोणी बरोबर ओळखत नाहीं त्या सूक्ष्म स्वरूपी तुला नमस्कार असो. जो तूं भगवान अनंत स्वरूपानें रसातळीं जाऊन ह्या जगाचें धारण करतोस त्या वीर्यस्वरूपी तुला नमस्कार असो. उत्पन्न केलेलें विश्व राखण्यासाठीं जो तूं स्नेहपाशानें जखडून सर्व भूतमात्रांना मोह पाडतोस त्या मोहस्वरूपी तुला नमस्कार असो. केवळ आत्मज्ञान पंचमहाभूतांमध्यें पहावयास लागून ज्या ज्ञानानें योगी तुला मिळतात त्या ज्ञानस्वरूपी तुला नमस्कार असो. ज्या तुझें शरीर अप्रमेय आहे व बुद्धि व दृष्टि चोहोंकडे आहे व जो तूं अप्रमेय आहेस त्या दिव्यस्वरूपी तुला नमस्कार असो. जटा वाढवून दंड घेऊन मोठ्या पोटानिशीं कमंडलु हाच भाता घेऊन फिरणाऱ्या ब्रह्मस्वरूपी तुला नमस्कार असो. तूं देवांचा स्वामी असून हातांत शूल धारण करतोस, अंगाला भस्म फासलें आहेस; तूं ऊर्ध्वलिंग अ-

सून तुला तीन डोळे आहेत; अशा रुद्र स्वरूपी तुला नमस्कार असो. ज्या तूं आपल्या डोक्यावर अर्धचंद्र धारण केला आहेस, सापाचें जानवें घातलें आहेस, हातांत पिनाकशूल घेतला आहेस, त्या उग्रस्वरूपी तुला नमस्कार असो. सर्व भूतमात्रांच्या हृदयांमध्यें तूं असून त्यांच्या उत्पत्तीला व नाशाला तूं कारण आहेस. तुला राग, द्रोह किंवा मोह कांहीं नसून तूं शांतस्वरूपी आहेस. ज्यापासून सर्व असून सर्व ज्याच्या ठिकाणीं आहे, अशा सर्वस्वरूपी तुला नमस्कार असो. विश्व हेंच तुझा व्यवसाय असून तूं विश्वस्वरूपी व विश्वाचा उत्पादक आहेस. तूं सर्व पंचभूतांच्या पलीकडे असून नित्यमुक्त आहेस. तूं सर्वमय आहेस. ह्मणून तिन्ही लोकांमध्यें तसेंच त्याच्या पलीकडे त्याचप्रमाणें सर्व दिशांला माझा तुला नमस्कार असो. तुझें दिव्य स्वरूप मला दिसण्याचा कालत्रयीं संभव नाहीं; परंतु तुझें सनातन सत्यस्वरूप मात्र मला दिसत आहे. तूं आपल्या मस्तकानें आकाश व्यापून, पृथ्वी तुझ्या पायांनीं व्यापिली आहे व विक्रमानें तीन लोक व्यापून टाकलेला असा तूं सनातन पुरुष आहेस. दिशा तुझ्या बाहू असून सूर्य तुझा डोळा आहे. आणि वीर्य हें शुक्र आहे. अतुल पराक्रमी तूं वायूचे सात मार्ग बंद करून राहिला आहेस. अतसीपुष्पासारख्या पीतांबरधारी श्रीकृष्णाला जे नमस्कार करतात त्यांना भय उरत नाहीं. श्री कृष्णाला केलेल्या एका नमस्काराचें श्रेय दहा अश्वमेधांत अवभृत स्नान केल्यासमान आहे. दहा अश्वमेध करणारा फिरून जन्माला येतो; परंतु कृष्णाला नमस्कार करणारा फिरून जन्माला येत नाहीं. श्री कृष्ण हाच ज्यांचा नियामक असून उठतां निजतां जे कृष्णाचें ध्यान ठेवतात, ते कृष्णस्वरूपी बनून मंत्रानें अग्नींत टाकलेलें तूप ज्याप्रमाणें अग्नींत मिळून जातें, त्याप्रमाणें ते कृष्णाशीं मिळून जातात. नरकाच्या त्रासापासून निर्भय होण्याला तूं रक्षाबंधन असून संसार रूपी खोल पाण्यांतून तरून जाण्याला तूं नाव आहेस. तूं ब्रह्मस्वरूपी असून गोब्राह्मण व जग ह्यांचें हित करणारा आहेस. अशा श्रीकृष्णगोविंदाला माझा नमस्कार असो. प्राणरूपी अरण्याची शिदोरी, संसारदुःख नाहींसें करणारें उत्तम औषध हरी हें अक्षरद्वयच आहे. ज्याप्रमाणें सत्य हें विष्णूनें भरलें आहे, जग विष्णूनें भरलें आहे, व सर्व कांहीं विष्णूनें भरलें आहे, त्याप्रमाणें मी विष्णुमय होऊन जाऊन माझें पाप नाहींसें होवो. उत्तम गति मिळण्याची इच्छा धरून मी तुला शरण आलों आहे, तेव्हां ज्यानें माझें कल्याण होईल असा कांहीं तरी तूं विचार कर. तूं अयोनि असून विद्या व तप यांचा मूळ आहेस, वाग्यज्ञानें याप्रमाणें मीं तुझी अर्चना केली आहे. त्यानें तूं संतुष्ट हो. नारायण हेंच श्रेष्ठ ब्रह्म असून नारायण श्रेष्ठ तप आहे. नारायण हाच श्रेष्ठ देव असून सर्व नारायणमय आहे.' याप्रमाणें बोलून भीष्मांनीं त्याजकडेसच लक्ष देऊन 'तुला नमस्कार असो' असें बोलून श्रीकृष्णाला नमस्कार केला. आपल्या योग सामर्थ्यानें भीष्मांची भक्ति ओळखून त्रैलोक्य पाहण्याचें दिव्यज्ञान श्रीकृष्णानें त्यांना दिलें. त्यांची ती स्तुति बंद झाल्यावर ब्रह्मवेत्त्या ब्राह्मणांनीं घसा दाटून येऊन त्यांची फिरून फिरून प्रशंसा केली. त्यांची ती भक्ति जाणून श्रीकृष्ण आनंदभरित होऊन एकदम उठून पांडवांसह रथांत बसून त्यांचेकडे निघाला. तो निघाला असतां वाटेंत ब्राह्मणांचे स्तुतिपर शब्द त्याच्या कानीं पडत होते. हात जोडून व मस्तक नमवून वाटेंत उभे असलेल्या लोकांचें आनंदानें अभिनंदन करीत श्रीकृष्ण भीष्मांकडे निघाला.

---

## ९७ परशुरामांची कथा. (१२. ४८–४९)

श्रीकृष्ण पांडव वगैरे मंडळीसह ज्या ठिकाणीं महात्म्या क्षत्रियांनीं आपला देह ठेविला होता त्या केस, मगज, हाडें, मुंडकीं, कवट्या त्याचप्रमाणें पर्वतप्राय हत्ती, घोडे यांच्या हाडांचे ज्या ठिकाणीं ढीग पडले होते, व ज्याला खाऊन पिऊन मजा केलेल्या काळाच्या पीठाप्रमाणें शोभा आली होती, अशा हजारों भूतांनीं व राक्षसांनीं गजबजलेल्या कुरुक्षेत्राला येऊन पोहोंचला. नंतर युधिष्ठिर, कृपाचार्य वगैरे मंडळीसह ते पहात पहात चालले असतां परशुरामांनीं निर्माण केलेलीं पांच तळीं युधिष्ठिराला दुरून दाखवून श्रीकृष्ण त्याला ह्मणाला, 'त्या ठिकाणीं क्षत्रियांच्या रक्तांनीं परशुरामानें पि-

तरांना तृप्त केलें. एकवीस वेळां पृथ्वी निःक्षत्रिय करून येथें त्यांनीं आपल्या कामाचा शेवट केला.’ हें ऐकून युधिष्ठिर ह्मणाला, ‘परशुरामांनीं एकवीस वेळ पृथ्वी निःक्षत्रिय केली, असें तूं ह्मणतोस त्यासंबंधानें मला संशय वाटत आहे. त्यानें क्षत्रबीजच जाळून टाकल्यावर त्याची फिरून उत्पत्ति कशी झाली? त्यांनीं कशासाठीं या कुरुक्षेत्रीं क्षत्रियांचा फडशा पाडला हें सर्व तूं मला सांग. सर्व ज्ञानांची उत्पत्ति तुझ्यापासूनच असल्यामुळें हे गरुडध्वजा, ही माझी शंका दूर कर.’

हें ऐकून श्रीकृष्ण ह्मणाला, ‘जन्हूचा मुलगा अज ह्मणून होता. त्याचा मुलगा बलाकाश्व असून त्या बलाकाश्वाला कुशिक ह्मणून एक धर्मज्ञ मुलगा होता. त्या इंद्रतुल्य वीर्यशाली कुशिकानें तिन्ही लोकांचा स्वामी होणारा अजिंक्य मुलगा मिळावा ह्मणून उग्र तप केलें. त्याचें तें उग्र तप पाहून पुत्रोत्पादन करण्यामध्यें त्याचें सामर्थ्य ओळखून इंद्रानें स्वतः त्याच्या पोटीं जन्म घेतला. या गाधि नांवानें प्रसिद्ध असलेल्या कुशिकाच्या मुलाला सत्यवती नांवाची एक मुलगी झाली. ती त्यानें भृगुपुत्र ऋचीकाला दिली. तिच्या शुद्ध शीलानें संतुष्ट होऊन तिला त्याचप्रमाणें गाधीला मुलगा व्हावा ह्मणून त्यांनीं चरू तयार केले व बायकोला बोलवून ह्मणाले, ‘हा तूं खा व हा दुसरा तुझ्या आईला खाऊं दे. तिला मोठा तेजस्वी कोणाही क्षत्रियाला हार न जाणारा व सर्व क्षत्रियांचा फडशा पाडणारा मुलगा होईल. तुलाही मोठा शहाणा, शमपर व तपोनिष्ठ असा मुलगा होईल.’ असें तिला सांगून तपाकडेसच लक्ष असणारे ते ऋचीक अरण्याला गेले. या अवधींत गाधि आपल्या बायकोसह तीर्थयात्रेला निघाला असतां ऋचीकांच्या आश्रमाला आला. तेव्हां ते दोन चरू घेऊन नवऱ्याच्या भाषणानें मनाची धांदल उडून जाऊन, मोठ्या आनंदानें ती गोष्ट तिनें आपल्या आईला सांगितली. आईनें चुकून आपला चरू तिला खावयाला दिला. व तिचा आपण खाल्ला. पुढें क्षत्रियांचा अंत करणारा असा उग्रस्वरूपी गर्भ सत्यवतीला राहून त्यानें ती फार तेजस्वी दिसूं लागली. याप्रमाणें देवस्त्रीसारख्या सुंदर आपल्या बायकोला पाहून ऋचीक ह्मणाले, ‘चरूची आदलाबदल केल्यामुळें तुझ्या आईनें तुला फशी पाडलें आहे. तुला तापट व क्रूरकर्म करणारा असा मुलगा होईल व तुझा भाऊ ब्रह्मस्वरूपी तपोनिष्ठ असा होईल. कारण तुझ्यासाठीं तयार केलेल्या चरूमध्यें विश्वरूपी ब्रह्म ठेविलें होतें; व सर्व क्षत्रवीर्य तुझ्या आईच्या चरूमध्यें ठेविलें होतें. परंतु आतां चरूची आदलाबदल झाल्यानें गोष्ट उलट होणार. हें पतीचें भाषण ऐकून महाभागा सत्यवती त्यांच्या पायांवर डोकें ठेवून, कांपत कांपत ह्मणाली, ‘ब्राह्मणाला कलंकभूत असा मुलगा मला होईल असें आपण बोलूं नका.’ त्यावर ऋचीक ह्मणाले,‘तुझ्याप्रमाणेंच माझे मनांत ही गोष्ट नव्हती.परंतु चरूची आदलाबदल झाल्यामुळें अशी गोष्ट झाली आहे.’सत्यवती ह्मणाली.‘मनांत येईल तर लोक निर्माण करण्याला आपण समर्थ आहां तेव्हां मला शमपर व चांगला असा मुलगा द्या.’ हें ऐकून ऋचीक ह्मणाले, ‘मी यापूर्वीं थट्टेंत देखील खोटें बोललों नाहीं; मग अग्नि सिद्ध करून समंत्रक चरू सिद्ध करण्यासंबंधानें तें खोटें कसें होणार? हा नियमानियमच असा होता. हें मला आपल्या तपानें कळलें आहे, तुझ्या पित्याचें कुळ ब्राह्मणमय होईल.’ यावर सत्यवती ह्मणाली, ‘असेंच जर व्हावयाचें असेल तर मला शमपर असा मुलगा होऊं दे व तसा नातु होऊं दे.’ तेव्हां ऋचीक ह्मणाले,‘मुलामध्यें व नातवामध्यें मी कांहीं अंतर समजत नाहीं. तेव्हां तुझ्या ह्मणण्याप्रमाणें होईल.’ यावरून सत्यवतीला तपोनिष्ठ, शांत,व्रतशील असे जमदग्नि झाले; व गाधीला सर्व ब्रह्मगुणांनीं युक्त ब्रह्मतुल्य विश्वामित्र झाले. ह्या जमदग्नींना सर्व विद्येमध्यें पारंगत, धनुर्विद्येमध्यें निष्णात, क्षत्रियांचा अंत करणारे, पेटलेल्या अग्नीप्रमाणें तेजस्वी असे उग्र परशुराम झाले. गंधमादन पर्वतावर शंकरांना प्रसन्न करून त्यांपासून सर्व अस्त्रें व मोठा तेजस्वी परशु त्यांनीं मागून घेतला. त्या अकुंठ धारेच्या अग्नीप्रमाणें दैदीप्यमान कुऱ्हाडीमुळें सर्व लोकांमध्यें त्यांच्या तोडीचा कोणी राहिला नाहीं. याच सुमारास कृतवीर्याचा बलशाली अर्जुन नांवाचा तेजस्वी हैहयांचा राजा होता. दत्तात्रेयांच्या प्रसादानें त्याला हजार बाहू होते व तो महातेज-

स्वी चक्रवर्ती होता. अश्वमेध यज्ञामध्यें सप्तद्वीप व त्यावरील पर्वत यांसह सर्व पृथ्वी आपल्या बाहूंच्या व अस्त्रांच्या बलानें जिंकून ती त्यानें ब्राह्मणांना दिली. भुकेल्या अग्नीनें भिक्षा मागितल्यावरून या विक्रमशाली राजानें त्याला भिक्षा दिली. तेव्हां गांवें, नगरें, राष्ट्रें, वाड्या, पर्वत वनस्पति हीं सर्व त्या अर्जुनाच्या सामर्थ्यानें अग्नीनें जाळून फडशा केलीं. एवढेंच नव्हे तर वाऱ्यानें पेट घेतलेल्या ह्या अग्नीनें या अर्जुनाच्या साहाय्यानें आंत कोणी बसलेला असा वसिष्ठांचा रम्य आश्रम देखील जाळून टाकला. तेव्हां वसिष्ठांनीं रागानें, 'परशुराम रणांत तुझे हात कापून काढतील,' म्हणून याला शाप दिला. महातेजस्वी व बलशाली असा हा अर्जुन शमपर असून ब्राह्मणभक्त, शरणागताला आधार देणारा, दानशील व शूर असल्यानें या शापाकडे त्यानें लक्ष दिलें नाहीं. या शापामुळें त्याचे बलशाली मुलगे त्याच्या मरण्याला अप्रत्यक्ष रीतीनें कारण झाले. त्याच्या गर्विष्ठ व दुष्ट मुलांनीं जमदग्नींच्या गाईचें वासरूं कार्तवीर्याला न कळत उपटून आणलें. त्यासाठीं परशुरामांचें व कार्तवीर्याचें मोठें युद्ध होऊन त्यांत त्यांनीं रागानें अर्जुनाचे हात कापून काढले व त्याच्या मुलांच्या अंतःपुरामध्यें फिरत असणाऱ्या वासराला ते आपल्या आश्रमाकडे घेऊन आले. तेव्हां अर्जुनाच्या सर्व मुलांनीं मिळून, परशुराम समिधा व दर्भ आणण्यासाठीं बाहेर गेले असतां जमदग्नींना न कळत त्यांच्या आश्रमामध्यें जाऊन त्यांचें शीर धडापासून वेगळें केलें. तेव्हां बापाला मारल्यामुळें परशुराम खवळून जाऊन '**पृथ्वी निःक्षत्रिय करणार**' अशी प्रतिज्ञा करून त्यांनीं शस्त्र हातीं घेतलें व त्या वीर्यशाली भृगुश्रेष्ठांनीं पराक्रम गाजवून कार्तवीर्याचे हजारों मुलगे व नातू कापून काढून सगळी पृथ्वी रक्ताच्या चिखलानें भरून काढली. याप्रमाणें पृथ्वी निःक्षत्रिय केल्यावर मनाला फार वाईट वाटून ते वनाला निघून गेले. पुढें विश्वामित्रांचा नातु, रैभ्याचा मुलगा महातपस्वी परावसु ययाति स्वर्गांतून खालीं पडत असतां चाललेल्या यज्ञामध्यें जमलेल्या भल्या लोकांपुढें परशुरामांचा धिक्कार करून ह्मणाला कीं, 'अहो परशुराम, प्रतर्दन प्रभृति मंडळी ही काय क्षत्रिय नव्हेत काय ? आपली प्रतिज्ञा पुरी न करतां उगीच आपण लोकांमध्यें आपली फुशारकी मिरविता ? क्षत्रियांच्या भीतीनें आपण पर्वताचा आश्रय धरून राहिला आहां.' याप्रमाणें परावसूचें भाषण ऐकून परशुरामांनीं फिरून शस्त्र हातांत धरलें व हजारों क्षत्रिय वेलविस्तार वाढून आतां वीर्यशाली झाले होते, त्या सर्वांना कापून काढलें. पुढें गर्भामध्यें असणाऱ्या मुलांनीं पृथ्वी पुन्हां भरून निघाली; तेव्हां जसजसा गर्भ राहील तसतसा तो गर्भच ते कापून काढूं लागले. ते वेळीं कांहीं क्षत्रिय बायकांनीं मोठ्या हुशारीनें आपल्या मुलांचा यांच्यापासून बचाव केला. ह्याप्रमाणें एकवीस वेळ पृथ्वी निःक्षत्रिय करून अश्वमेधाच्या शेवटीं ती त्यांनीं कश्यपांना दक्षिणा दिली. क्षत्रियांची बाकी रहावी ह्या हेतूनें हातांत असलेल्या प्रतिग्रहसूचक सृग् धरलेलेंच बोट दाखवून ते परशुरामांना ह्मणाले, 'राम, आपण दक्षिण समुद्राच्या तीराला जा. माझ्या राज्यांत आपण आतां मुळीं राहूं नका. नंतर परशुरामांसाठीं समुद्रानें आपल्या दुसऱ्या तीरावर एक शूर्पारक देश निर्माण केला. कश्यपांनीं याप्रमाणें पृथ्वीचा प्रतिग्रह घेऊन ती ब्राह्मणांच्या हवालीं करून ते वनाला निघून गेले. तेव्हां शूद्र व वैश्य स्वच्छंदानें वागूं लागून ते ब्राह्मणक्षत्रियांच्या स्त्रियांशीं संबंध ठेवूं लागले. लोकांमध्यें राजा नाहींसा झाल्यामुळें बलवान दुर्बलाला पीडा देऊं लागले. पैशावर कोणाचें स्वामित्व उरलें नाहीं. पुढें कांहीं दिवसांनीं पृथ्वीला याप्रमाणें दुष्टांची पीडा झाल्यामुळें या आदलाबदलीला कंटाळून, धर्मरक्षक क्षत्रिय यथायोग्य रीतीनें रक्षण करण्याला नाहींसे झाल्यामुळें ती रसातलामध्यें शिरूं लागली. याप्रमाणें भीतीनें तिला रसातलाकडे चाललेली पाहून महात्म्या कश्यपांनीं तिला आपल्या उरूनें ( मांडीनें ) धरून ठेविली; ह्मणून तिला उर्वी असें नांव मिळालें. तेव्हां पृथ्वीनें आपल्या रक्षणासाठीं त्यांच्यापाशीं राजा मागितला. ती ह्मणाली, 'स्त्रियांमध्यें मीं पुष्कळ क्षत्रिय झांकून ठेविले आहेत. ते हैहय कुलामध्यें झालेले क्षत्रिय मला सांभाळूं देत. ऋक्षवत् पर्वतावर अस्वलामध्यें वाढविलेला पौरवपुत्र विदूरथ आहे, त्याचप्रमाणें पराशरांनीं दयाभूतपणानें सौदास्याच्या

मुलाचें रक्षण केलें आहे. तो शूद्राप्रमाणें सर्व कर्में करीत आहे. म्हणून त्याला सर्वकर्मा नांव आहे. तसाच शिबीचा तेजस्वी असा मुलगा वनांत गाईबरोबर वाढविला असल्यामुळें त्याला गोपति हें नांव आहे. तसाच प्रतर्दनाचा मुलगा गोठ्यांत वासराबरोबर वाढला असल्यामुळें त्याला वत्स हें नांव आहे. तसाच दधिवाहनाचा नातु व दिवीरथाचा मुलगा याला गौतमांनीं गंगेच्या तीरीं संभाळून ठेविला आहे. तसाच बृद्धरथ नांवाच्या महातेजस्वी क्षत्रियाला गृध्रकूटावर अस्वलांनीं राखलें आहे. त्याचप्रमाणें इंद्रतुल्य वीर्यशाली मरुत्ताच्या कुळांत झालेल्या क्षत्रियवीरांना समुद्रानें राखलें आहे. हे क्षत्रियकुमार निरनिराळ्या ठिकाणीं रहात असून, कारागीर, सोनार इत्यादिकांमध्यें ते राहतात. हे जर माझें रक्षण करतील तर मी फिरून निश्चळ राहीन; ह्यांच्या वाडवडिलांना रामांनीं माझ्यासाठीं मारलें आहे. तेव्हां त्यासंबंधानें मला कांहीं विचार केला पाहिजे. भलत्यांनीं माझें रक्षण करावें अशी माझी इच्छा नाहीं, तर असणाऱ्या क्षत्रियांनींच माझें रक्षण केलें तर मी राहणार; तेव्हां ती तजवीज लौकर करा.' तेव्हां कश्यपांनीं तिनें सांगितलेल्या क्षत्रियांना आणवून त्यांना राज्याभिषेक केला व त्यांच्या मुलानातवांचा वंश कायम झाला. अशी ही पूर्वीची गोष्ट आहे.'

---

## ९८ भीष्म श्रीकृष्ण भेट. (१२. ५०–५२)

याप्रमाणें गोष्टी बोलत बोलत कृष्णयुधिष्ठिर भीष्म शरशय्येवर पडले होते त्या ठिकाणीं आले. आपल्या किरणांनीं झांकून गेलेल्या संध्याकाळच्या सूर्याप्रमाणें भीष्म झळकत होते; व पुष्कळ मुनी त्यांचेजवळ बसले होते. त्या पवित्र प्रदेशीं ओघवती नदीच्या तीरीं त्यांना दुरूनच पाहिल्याबरोबर पांडव, श्रीकृष्ण, कृप वगैरे मंडळी आपल्या वाहनांतून उतरली व चंचळ मन आवरून घेऊन सर्व इंद्रियें एके ठिकाणीं करून ते त्या महामुनींजवळ आले. व्यासप्रभृति ऋषिश्रेष्ठांना अभिवादन करून ते भीष्मांकडे आले, व त्यांची भेट घेऊन त्यांच्याभोंवतीं बसले. त्यावेळीं विजणाऱ्या अग्नीप्रमाणें थंड होत असलेल्या भीष्मांना पाहून मनाला थोडेंसें वाईट वाटून श्रीकृष्ण भीष्मांना ह्मणाला, 'अहो भीष्म, आपलीं सर्व इंद्रियें पूर्वीप्रमाणें प्रसन्न असून आपली बुद्धि कायम आहेना? बाणांच्या माऱ्यानें झालेल्या वेदनेनें आपलें शरीर पीडलें नाहींना? कारण मानसिक दुःखापेक्षां शारीरिक दुःख फार कठीण आहे. पित्याच्या वरदानानें आपण इच्छामरणी आहांत. ही गोष्ट माझ्या सुद्धां नशिबीं नाहीं. एवढासा कांटा सुद्धां या देहाला पीडा देतो. मग आपल्या शरीराला तर इतके बाण लागले आहेत! त्याचें दुःख काय विचारावयाचें आहे. प्राणिमात्रांच्या उत्पत्तिनाशासंबंधानें आपल्याला मी कांहीं सांगावयाला नको. देवांना देखील उपदेश करण्याला आपण समर्थ आहां. ज्ञानानें वृद्ध असलेल्या आपणाला सर्व भूत, भविष्य व वर्तमान, त्याचप्रमाणें प्राणिमात्रांचा संहार आणि धर्माचें फल हें सर्व पूर्ण कळत आहे. कारण आपण मूर्तिमान धर्म आहां. या वैभवसंपन्न राज्यामध्यें हजारों बायका रहात असून सर्व इंद्रियें शाबूद व शरीर पुष्ट असतां आपण ऊर्ध्वरेत राहिला. तपानें मृत्यूला झुगारून देऊन शरशय्येवर पडणारा सत्यधर्मशील महावीर्यशाली, शूर व केवळ धर्माकडे लक्ष देणारा आपल्याखेरीज या तिन्ही लोकांमध्यें कोणी झाल्याचें आह्मी ऐकिलें नाहीं. सत्य, तप, दान, यज्ञ, धनुर्विद्या, वेद, नीति, व प्रजारक्षण यांत दक्ष राहून, दया, शुचिर्भूतता, व सर्व भूतांच्या हितामध्यें दक्षता ठेवणारा आपल्यासारखा कोणीही झाल्याचें आह्मीं ऐकिलें नाहीं. सर्व देव, गंधर्व, असुर, यक्ष, राक्षस यांना आपण एका रथानिशीं जिंकण्याला समर्थ आहां यांत शंका नाहीं. ब्राह्मण नेहमीं आपल्याला गुणांनीं नववा वसु ह्मणतात, परतु गुणांनीं आपण त्या सर्वांना मागें टाकिलें आहे. मनुष्यामध्यें तर आपल्यासारखा कोणी पाहिला नाहीं व ऐकिलाही नाहीं. आपल्या तपानें आपण चराचर लोक निर्माण करण्याला समर्थ आहां. आपण आपल्या उत्तम गुणांनीं उत्तम ब्रह्मलोक मिळविले यांत नवल काय? तेव्हां आपण ज्ञातीच्या संहारानें काहिल उडालेल्या धर्मराजाचा शोक दूर करा. चारी वर्णांचे व चारी आश्रमांचे व चारी विद्यांमध्यें व चारी वर्दांमध्यें सांगितलेले धर्म आप-

णास ठाऊक आहेत. त्याचप्रमाणें सांख्य व योगशास्त्रामध्यें सांगितलेले सनातन धर्म आपण जाणता. चारी वर्णांनीं काय करावें काय न करावें इत्यादि धर्म व त्याचा स्पष्ट अर्थ, त्याचप्रमाणें या चारी वर्णांपासून झालेल्या भेसळ वर्णांचा धर्म, देश, जाती, व कुल यांचा वेदांत सांगितलेला व शिष्टांनीं सांगितलेला धर्म आपल्याला ठाऊक आहेत. इतिहासपुराणांचीही आपणाला पूर्ण माहिती आहे. ह्या जगांत ज्या कांहीं गोष्टी संशयात्मक आहेत त्या संबंधानें संशय दूर करणारा या जगांत आपल्यावांचून कोणी नाहीं. तेव्हां या युधिष्ठिराच्या मनामध्यें उत्पन्न झालेला शोक दूर करा. ज्यांची बुद्धि अगदीं विशाळ आहे, असें आपल्यासारखे लोक बुचकळ्यांत पडलेल्या लोकांचें समाधान करण्यासाठींच निर्माण झाले असतात.'

हें श्रीकृष्णाचें भाषण ऐकून भीष्म किंचित् तोंड वर करून ह्मणाले, ' सर्व लोकांची उत्पत्ति व नाश तुझ्यापासूनच असून कर्ता संहर्ता तूंच आहेस. सर्व उत्पन्न झालेल्या वस्तूंचा शेवट तुझ्यामध्यें असून तू पंचमहाभूतांच्या पलीकडे आहेस. इष्ट गति मिळवूं इच्छिणारा मी तुला शरण आहें. तुला वरें वाटेल तशी माझी गति लाव.' यावर श्रीकृष्ण ह्मणाला; ' माझ्या ठिकाणीं तुमची पूर्ण भक्ति असल्यानें मीं आपल्याला माझें स्वरूप दाखविलें आहे. जो माझा भक्त नाहीं, किंवा जो वांकड्या रस्त्यानें जाणारा भक्त आहे, किंवा ज्याचें मन शांत झालें नाहीं. त्याला मी आपलें आत्मस्वरूप कधीं दाखवीत नाहीं. नेहमीं धर्मानें वागून आपण माझी भक्ति केली आहे व शुचिर्भूततेनें मनोनिग्रह, तप, सत्य व दान यांमध्यें रत राहिला ह्मणून आपण मला पाहण्याला समर्थ झाला आहां. ज्यापासून मनुष्य फिरून कधीं परत येत नाहीं असे लोक आपण मिळविले आहेत. या जगामध्यें आपले आतां छपन्न दिवस उरले आहेत; पुढें आपल्या शुभकर्मांचें आपणाला फल मिळून हा देह ठेवून आपण जाणार. हे देव, वसु विमानांत वसून सूर्य उत्तरायणांत जाईपर्यंत आपली वाट पहात वसले आहेत. कालानुरोधानें सूर्य उत्तरायणांत गेला ह्मणजे जेथून विद्वान परत येत नाहींत, अशा लोकाला आपण जाणार व आपण गेल्यावर हें जग सर्व ज्ञानाला मुकणार. तेव्हां धर्म करून घेण्यासाठीं हे सर्व तुमच्या जवळ आले आहेत. तेव्हां धर्म, अर्थ आणि समाधि यांसंबंधाचें तत्त्व ज्ञातिशोकानें मोह पावलेल्या ह्या धर्मराजाला सांगून त्याचा शोक दूर करा.'

हें ऐकून भीष्म हात जोडून ह्मणाले, ' कृष्णा, तुझ्यापुढें मी काय बोलणार ? वाणीला विषयभूत असें सर्व तुझ्या ठिकाणीं दिसून येतें. या लोकामध्यें जें कांहीं करावयाचें असतें किंवा होतें तें सर्व तुझ्यापासून निघतें. स्वर्गामध्यें इंद्रासमक्ष धर्मार्थ काममोक्षासंबंधानें बोलण्याला जो समर्थ असेल तोच तुझ्या पुढें बोलण्याला समर्थ होईल. बाण लागल्यानें माझें मन पीडलें आहे; गात्रें शिवशिवताहेत, बुद्धि प्रसन्न नाहीं व कांहीं बोलण्याला मला शक्ति नाहीं. अशक्ततेनें माझें तोंड बसल्यासारखें झालें आहे; तेव्हां माझ्या हातून कसें बोलवणार? तेव्हां कृपा कर. माझे हातून कांहीं बोलवत नाहीं. बृहस्पति सुद्धां बोलण्यांत तुझ्यापुढें फिके पडणार. मला पुढें आकाश, दिशा किंवा पृथ्वी कांहींच दिसत नाहीं; केवळ तुझ्या सामर्थ्यानें मी जीव धरून आहें. म्हणून तूंच या धर्मराजाला त्याच्या हिताचें असेल तें सांग. सर्व ज्ञानाचा तूं ठेवा आहेस. सर्व लोकांचा कर्ता तूं पुढें असतां गुरूपुढें शिष्याप्रमाणें म्यां काय बोलावें ? '

यावर श्रीकृष्ण ह्मणाला, ' कौरवांच्या धुरीणाला साजेलसें हें आपलें भाषण आहे. आतां बाण लागून पीडिलेल्या शरीरासंबंधानें आपण जें बोलला त्यासाठीं वर देतों ऐका. आपल्याला थकवा वाटणार नाहीं, मूर्च्छा येणार नाहीं, दाह होणार नाहीं व पीडा होणार नाहीं. तहान किंवा भूक यांपासून सुद्धां आपणाला त्रास होणार नाहीं. सर्व ज्ञानाचा आपल्या मनावर उजेड पडेल. बुद्धि कोठेंही कुंठित होणार नाहीं. ढगांपासून मोकळा झालेल्या चंद्राप्रमाणें रजतमांपासून मोकळें होऊन आपलें मन नेहमीं जागें राहील ! ज्या ज्या विषयाचा ह्मणून आपण विचार मनांत आणाल तो तो उत्तम रीतीनें आपले लक्षांत येईल. दिव्य दृष्टीनें हा चतुर्विधभूत समुदाय आपल्याला स्पष्ट दिसूं लागेल. ज्ञानचक्षूनें पाण्यांत असलेल्या माशाप्रमाणें ह्या सर्व

उत्पन्न केलेल्या वस्तू आठवण केल्यावरोबर आपल्या डोळ्यांपुढें येतील.' असें श्रीकृष्ण ह्मणतो तोंच आकाशांतून सर्व ऋतूंमध्यें असणाऱ्या फुलांचा वर्षाव झाला वाद्यें वाजूं लागलीं व अप्सरा गाऊं लागल्या. अनिष्ट व वाईट असें तेथें कांहींच दिसेना. सुखकर सुगंधिक असा चांगला वारा वाहूं लागला. सर्व दिशा शांत होऊन पशुपक्षी तेथें शांत शब्द करूं लागले. इतक्यांत सहस्रांशु सूर्य पश्चिमेकडे कललेला दिसल्यामुळें तेथें जमलेल्या महर्षींनीं उद्यां फिरून जमूं म्हणून भीष्मांचा व श्रीकृष्णाचा निरोप घेऊन ते निघून गेले. पुढें श्रीकृष्ण व पांडव हेही भीष्मांना प्रदक्षिणा करून रथांत चढले. ते हास्तिनापुराकडे निघाले असतां भगवान निशाकर चंद्र, ज्यांमधून सूर्यानें रस आकर्षण करून घेतला होता अशा औषधींना आपल्या रसानें सजीव करीत व त्यांना आनंदवीत समोरच आकाशांत उगवला. पुढें नगरांत शिरल्यावर ते सर्व आपापल्या वाड्यांमध्यें शिरले.

---

## ९९ राजनीतीचीं सामान्य तत्वें.

### ( १२. ५३–५८ )

रात्रीं सुखांत झोंप घेऊन अर्धा प्रहर रात्र बाकी उरली असतां, श्रीकृष्ण जागा झाला; व सर्व इंद्रियांचा लय लावून त्यानें सनातन ब्रह्माचें ध्यान केलें. पुढें स्तुतिपाठ व पुराणें यांची पूर्ण माहिती असलेल्या सुशिक्षित व मधुर कंठाच्या भाटांनीं याची स्तुति केली. कोणी हातानें टाळ्या वाजवून याचे स्तोत्र गात होते; कोणी मृदंग, कोणी वीणा, कोणी शंख, कोणी नौबत, कोणी अलगूज वाजवीत भजन चालविलें होतें. त्यांच्या योगानें श्रीकृष्ण राहिलेल्या वाड्यामध्यें जिकडे तिकडे आनंदीआनंदच दिसत होता. त्याचप्रमाणें युधिष्ठिराच्या वाड्यांतही मंगल अशा गीतवाद्यांचा स्वर निघत होता. पुढें श्रीकृष्णानें उठून स्नान करून हात जोडून गुह्य जप केल्यावर अग्नि सिद्ध करून त्यांत त्यानें आहुती दिल्या. पुढें चारी वेद येणाऱ्या हजारों ब्राह्मणांना प्रत्येकाला हजार हजार गाई देऊन त्यांचेकडून स्वस्तिवाचन ह्मणविल्यावर अनेक मंगल वस्तूंना स्पर्श करून स्वच्छ आरशामध्यें तोंड पाहिल्यावर राजवाड्यांत जाऊन धर्मराज भीष्मांकडे जाण्याला तयार आहे किंवा नाहीं हें पाहून येण्यास त्यानें सात्यकीला सांगितलें. श्रीकृष्णाच्या सांगण्यावरून सात्यकि लागलींच युधिष्ठिराकडे जाऊन ह्मणाला, 'श्रीकृष्ण रथ जोडून भीष्मांकडे जाण्याला तयार होऊन वाट पहात आहे.' तें ऐकून युधिष्ठिरानेंही अर्जुनाला आपला रथ तयार करविण्यास सांगून तो ह्मणाला, 'सैन्याला वगैरे न घेतां आपण एकटेच जाऊं. कारण तातांना त्रास देतां उपयोगी नाहीं. ह्मणून पुढें असणाऱ्या भालदार वगैरे मंडळींना सुद्धां येऊं नका ह्मणून सांग. आजपासून पितामह श्रेष्ठ गुह्य सांगणार आहेत, तेव्हां त्या ठिकाणीं सामान्य लोक जमूं देऊं नका.' हें युधिष्ठिराचें भाषण ऐकून त्यानें रथ जोडल्याची वर्दी दिली व सर्व रथांत बसून पंचमहाभूतांसारखे ते पांचपांडव कृष्णाच्या वाड्याकडे निघाले. त्यांना आलेले पाहिल्याबरोबर श्रीकृष्ण व सात्यकि आपल्या रथांत बसले व नमस्कार चमत्कार होऊन, 'रात्र सुखांत गेलीना,' म्हणून कुशल प्रश्न विचारून झाल्यावर ते मोठ्या झपाट्यानें कुरुक्षेत्रीं भीष्मांकडे गेले. भीष्म ऋषिमंडळामध्यें बसले होते; त्या ठिकाणीं रथांतून उतरून उजवा हात उचलून त्यांनीं ऋषींचा सत्कार केला. पुढें भीतीनें अगदीं घाबरून जाऊन युधिष्ठिर हळू हळू भीष्मांकडे गेला. तेव्हां नारद तेथें जमलेल्या सर्वांना, 'सूर्याप्रमाणें हें भीष्म आतां लवकरच अस्ताला जाणार. त्यांना लवकर प्रश्न करा. चारी वर्णांचे नानाप्रकारचे धर्म यांना माहीत आहेत,' असें म्हणाले तरी भीष्मांना प्रश्न करण्याची कोणाला छाती होईना. ते एकमेकांकडे पाहूं लागले. तेव्हां युधिष्ठिर श्रीकृष्णाला ह्मणाला. 'तुझ्यावांचून यांना प्रश्न करण्याचा धीर कोणाला होत नाहीं तेव्हां तूंच याना प्रथम प्रश्न विचार.' हें ऐकून श्रीकृष्ण भीष्मांकडे जाऊन ह्मणाला, 'आपली रात्र सुखांत उजाडलीना? बुद्धि प्रसन्न आहेना?' सर्व ज्ञानांचा मनामध्यें उजेड पडला आहेना? हृदय खचलें नसून मन व्याकुळ नाहींना?' भीष्म ह्मणाले, 'दाह, मूर्च्छा, श्रम, थकवा, ग्लानि, वेदना सर्व तुझ्या प्रसादानें

नाहींशीं झालीं आहेत. हातांत असलेल्या फळांप्रमाणें सर्व भूत, भविष्य, वर्तमान मला स्पष्ट दिसत आहेत. वेद व वेदान्त यांमध्यें सांगितलेले सर्व धर्म तुझ्या वरदानानें स्पष्ट कळूं लागले आहेत. व शिष्टांनीं सांगितलेले देश, जाती, कुल यांचे धर्म माझ्या हृदयांत जागृत आहेत. सर्व राजधर्म माझ्यापुढें आहेत; जें जेथें बोलावयाचें तेंच तेथें बोलेन; तुझ्या प्रसादानें माझी बुद्धि व माझें मन प्रसन्न आहेत. तुझ्या ध्यानाच्या जोरानें मी तरण्याप्रमाणें झालों आहें. तुझ्या प्रसादानें हिताच्या गोष्टी सांगण्याला मी समर्थ झालों आहें. आतां तूं स्वतः या गोष्टी कां सांगत नाहींस तुझ्या मनांत काय आहे तें सांगशील तर बरें होईल.' यावर श्रीकृष्ण ह्मणाला.

'यशाला व कल्याणाला मी मूळ आहें. सर्व सदसदात्मक वस्तू माझ्यापासूनच निघाल्या आहेत. परंतु तुमचें मोठें यश वाढविण्यासाठीं ही विशाळ बुद्धि मीं आपल्याला दिली आहे. जोंपर्यंत ही पृथ्वी कायम आहे तोंपर्यंत आपली कीर्ति लोकांमध्यें अक्षय राहील. या युधिष्ठिराच्या प्रश्नाला उत्तर ह्मणून आपण बोलाल तें तें श्रुतिवाक्याप्रमाणें होऊन या पृथ्वीवर राहील. जो ह्या आपल्या सांगण्याप्रमाणें ह्या जगांत वागेल त्याला परलोकीं सर्व पुण्याचें फळ मिळेल. ह्मणून आपलें यश वाढावें यासाठींच आपल्याला मीं ही दिव्य बुद्धि दिली आहे. जोंपर्यंत मनुष्याचें नांव या जगामध्यें ऐकूं येतें तोंपर्यंत त्याची कीर्ति खात्रीनें कायम राहते. लढाईंत मरून बाकी राहिलेले राजे धर्म विचारण्यासाठीं आपल्याकडे आले आहेत. आपण वयानें वृद्ध असून वेद पढले आहां व आचारशील आहां; सर्व राजधर्म व दुसरे धर्म आपल्याला अवगत आहेत. जन्मापासून पाप ह्मणून आपले हातून मुळींच घडलें नाहीं. तेव्हां धर्म ऐकण्यासाठीं आलेल्या यांना बाप मुलाला उपदेश करतो त्याप्रमाणें उत्तम उपदेश सांगा. शाहण्यानें विचारलें असतां दुसऱ्याला सांगावें. न सांगितलें असतां मोठा दोष आहे.'

यावर भीष्म ह्मणाले. 'ठीक आहे. मी यांना सर्व धर्म सांगतों. तुझ्या प्रसादानें वाणी व मन खंबीर झालीं आहेत. कोणच्याही उद्देशानें, चुकून किंवा भीतीनें किंवा दुसऱ्याचें वांकडें करण्यासाठीं ज्याच्या हातून पाप ह्मणून कधीं घडावयाचें नाहीं व वेदाचें रहस्य ज्याला पूर्ण कळलें आहे त्या या युधिष्ठिराला मला प्रश्न करूं दे, ह्मणजे मी सर्व मोठ्या प्रेमानें त्याला सांगतों.'

यावर, 'मान्य व आपल्यावर भक्तीनें असणारे गुरु, संबंधी व बांधव यांना बाणांनीं मारून सर्व लोकांचा फडशा पाडल्यामुळें अभिशापाच्या भयानें तो आपल्यापुढें येत नाहीं,' असें श्रीकृष्ण ह्मणाला असतां भीष्म ह्मणाले, 'दान, अध्ययन व तप हे जसे ब्राह्मणांचे धर्म आहेत तसें रणामध्यें देह ठेवणें क्षत्रियांचा धर्म आहे. आड वाटेल गेलेल्या वडिलांना अजांना, भावांना, गुरूंना संबंध्यांना व आप्तांना युद्धांत मारणें हा धर्मच आहे. नियम मोडणारे, लोभी–मग ते गुरू असले तरी–क्षत्रियानें त्यांना मारावें. जो युद्धामध्यें सर्व पृथ्वी रक्तरूपी पाण्यानें, केशरूपी गवतांनीं, गजरूपी पर्वतांनीं व ध्वजरूपी झाडांनीं भरून काढतो, त्याच क्षत्रियाला धर्माचें खरें तत्त्व कळलें ह्मणावयाचें. जो ह्मणून आपणाला क्षत्रिय ह्मणवून घेतो त्यानें बोलाविलें असतां दंड थोपटून पुढें उभें राहिलें पाहिजे. युद्ध हें धर्माला धरून असून इहपर सुखाला कारणीभूत आहे, असें मनूचें म्हणणें आहे.' हें भीष्मांचें बोलणें संपतांच नम्रपणें त्यांच्यापुढें उभा राहून युधिष्ठिरानें त्यांचे घट्ट पाय धरले. भीष्मांना आनंद होऊन त्यांनीं त्याचें मस्तक हुंगलें व त्याला बसावयाला सांगून निःशंकपणें प्रश्न विचारण्यास सांगितलें. तेव्हां युधिष्ठिर ह्मणाला, 'धर्मवेत्त्यांनीं राजधर्माला सर्वांत श्रेष्ठ धर्म ह्मटला आहे व मलाहि हा मोठा बोजा वाटत आहे. तेव्हां या धर्मासंबंधानें मला माहिती सांगा. हा राजधर्म सर्व जगाला मोठा आधार असून धर्मार्थकाम, एवढेंच नव्हे मोक्षधर्मसुद्धां, या राजधर्मावरच अवलंबून आहे. घोड्याला जसा लगाम किंवा हत्तीला जसा अंकुश तसा हा राजधर्म लोकांना आवरण्याला साधन मानला आहे. यांत जर गडबड उडेल तर लोकमर्यादा मोडून जिकडे तिकडे गोंधळ उडून जाईल. सूर्य जसा उगवून अमंगळ अंधार दूर करतो त्याप्रमाणें जगांतील सर्व संकटें हा राजधर्म दूर करतो. ह्मणून प्रथम त्यासंबंधानें मला माहिती सांगा.' यावर भीष्मांनीं धर्म

श्रीकृष्ण व ब्राह्मण यांना नमस्कार करून राजधर्माला सुरवात केली. ते ह्मणाले.

'प्रजेला रंजविण्याच्या हेतूनें राजानें प्रथम देवब्राह्मणांशीं योग्य वर्तन ठेवावें. धर्माच्या ऋणांतून मुक्त होऊन तो लोकांमध्यें मान्यता पावतो. त्यानें नेहमीं व्यवसायशील असावें. उद्योगाशिवाय केवळ दैवानें काम साधत नाहीं. कोणच्याही सिद्धीला या दोहोंची जरी जरूरी आहे तरी उद्योग हा श्रेष्ठ आहे. दैवाचा एकदां निकाल लागला ह्मणजे तें सुटतें. हातीं घेतलेली गोष्ट सिद्धीला न जाईल तर संताप न करून घेतां त्यासंबंधानें खटपट करीत रहाणें ही राजांची उत्तम नीति होय. राजांना सिद्धि देणारी दुसरी गोष्ट ह्मटली ह्मणजे सचोटी ही होय. सत्यप्रिय राजा इहपर लोकीं सुखानें नांदतो. ऋषींचें सुद्धां श्रेष्ठ धन सत्यच आहे. त्याचप्रमाणें राजांमध्यें सुद्धां विश्वास उत्पन्न करण्याला सत्यावांचून दुसऱ्या कोणत्याही गोष्टीचा उपयोग होत नाहीं. गुणवान, शीलवान, मनोनिग्रही, मृदु, धर्मानें चालणारा, इंद्रियनिग्रही, देखणा, बारीक मोठी नजर न ठेवणारा, असा राजा संपत्तीपासून कधीं ढळत नाहीं. सर्व कामांमध्यें सरळपणा धरावा. परंतु नीतीच्या प्रश्नासंबंधानें आपला कमी पक्ष झांकून ठेवणें, शत्रूचें छिद्र काढून घेणें व मंत्रगुप्ती ठेवणें या ठिकाणीं मात्र सरळपणा उपयोगी नाहीं. राजा नेहमीं मऊ असला ह्मणजे चोहोंकडून त्याचा अनादर होतो. व तो फार कडक असला तर लोक त्याच्या जवळ येत नाहींत. म्हणून राजानें या दोन्हींचा आश्रय करावा. पाण्यापासून अग्नीची, ब्राह्मणापासून क्षत्रियाची व दगडापासून लोखंडाची उत्पत्ति असल्यामुळें यांचें सर्वत्र चालणारें तेज त्यांच्या त्यांच्या उत्पत्तिस्थानावर चालत नाहीं. लोखंड ज्या वेळीं दगडाला चिरडूं लागतें, अग्नि पाण्याला नाहींसें करूं पाहतो, व क्षत्रिय ब्राह्मणांचा द्वेष करूं लागतो तेव्हां हे तिघे संकटांत सांपडतात. तेव्हां धोंडा, अग्नि व क्षत्रिय ह्यांचा लोखंड, पाणी व ब्राह्मण यांच्याशीं विरोध पडला असतां त्यांत त्यांचाच नाश व्हावयाचा. म्हणून ब्राह्मणांला नेहमीं मान द्यावा. वेद यज्ञादिक पृथ्वीवरील ब्रह्मप्राप्तीचें द्वार या पूज्य ब्राह्मणांच्याच हातीं आहे. शस्त्र उगारून आपल्यावर चालून येणारा मग तो वेदपारग असला तरी धर्माची चाड असणाऱ्या राजानें स्वधर्माला जागून त्याला आवरावें. धर्म बुडत असतां जो त्याला राखतो तो धर्म जाणणारा कधींही धर्मविघातक होऊं शकणार नाहीं. कारण जो दुसऱ्यावर चालून जातो त्याचा रागच दुसऱ्याचे ठिकाणीं परावर्तन धर्मानें उत्पन्न होतो. गुरुस्त्रीशीं गमन, भ्रूणहत्या, राजद्वेष इत्यादि मोठमोठे अपराध झाले असतां सुद्धां ब्राह्मणावर कृपा करून त्यांना हद्दपार करावें. शारीरिक शिक्षा त्यांना कधीं देऊं नये. ब्राह्मणांवर जे भक्तीनें असतात त्यांवर राजाचें प्रेम असावें. पुरुषसंग्रहावांचून दुसरा कोणचाही खजिना राजानें मोठा समजूं नये. शास्त्रामध्यें राजाचे जे सहा प्रकारचे किल्ले सांगितले आहेत त्यांपैकीं मनुष्यबळाचा किल्ला दुर्भेद्य समजला आहे. ह्मणून शहाण्यानें नेहमीं चारी वर्णांवर दया ठेवावी. धर्मात्मा व खरें बोलणारा असाच राजा नेहमीं आपल्या प्रजेला रंजवितो. परंतु राजानें नेहमीं सर्व प्रकारच्या लोकांशीं केवळ क्षमाशीलही असूं नये. हत्तीप्रमाणें राजा सहनशीलच असल्यास त्याचे हातून अधर्म होईल. माहुत ज्याप्रमाणें हत्तीच्या डोक्यावर बसतो तसें नेहमीं क्षमाशील असणाऱ्या राजाच्या डोक्यावर नीच लोक बसतात. ह्मणून त्यानें फार मऊ किंवा फार कडक न राहतां फार थंडी ना फार ऊन्ह देणाऱ्या वसंतऋतूंतील श्रीमान सूर्याप्रमाणें असावें. प्रत्यक्ष, अनुभवानें, तर्कानें, उदाहरणावरून किंवा शास्त्राधारानें शत्रु व मित्र याची नेहमीं पारख करावी. राजानें सर्व व्यसनें टाकून द्यावीं. त्यांकडे कधींच बघूं नये असें नाहीं, परंतु भलत्याच प्रसंगीं त्यांचें सेवन करूं नये. व्यसनामध्यें गढलेला मनुष्य सर्वांना तुच्छ होतो. दीर्घ द्वेष करणाऱ्या राजापासून लोकांचीं मनें अस्वस्थ होतात. एखाद्या गर्भिणीप्रमाणें राजानें असावें. ज्याप्रमाणें गर्भिणी स्त्री आपणाला आवडणाऱ्या सर्व वस्तूंकडे दुर्लक्ष करून गर्भाच्या हितामध्यें दक्ष असते त्याप्रमाणें धर्मानें वागणाऱ्या राजानें आपल्या सुखाकडे दुर्लक्ष करून लोकांचें जें हिताचें असेल तें क-

रीत रहावें. त्यानें धैर्य कधीं सोडूं नये. धैर्यवान व अपराधाप्रमाणें उघड शासन देणाऱ्या राजाला मुळींच भीति नसते. **नोकर लोकांशीं फार थट्टामस्करी करूं नये.** त्यांत फार दोष आहेत. सलगीमुळें **नोकर लोक धन्याचा अवमान करूं लागतात, आपली पायरी सोडतात व त्याची आज्ञा मोडतात; काम सांगितलें असतां कांकूं करतात व गुप्त गोष्ट फोडतात, मागूं नये तें मागतात व राजासाठीं ठेवलेलें खाऊन टाकतात. एवढेंच नव्हे तर ते त्यावर खप्पा होतात, त्याहून वरचढ करतात व त्याच्या डोक्यावर जाऊन बसतात व लाज बाजूला ठेऊन फसवाफसवी चालवून त्याच्या कार्यांमध्यें विघ्नें आणतात. राजासारखीं खोटीं आज्ञापत्रें काढून** सर्व देशांत बचबच उडवून देतात. दासींशीं संबंध ठेवतात व राजासारखा पोषाख करतात. राजापुढें वांति करतात, थुंकतात व निर्लज्जपणें त्याच्यासंबंधानें वाटेल तसें बोलतात. थट्टेखोर व मऊ राजा असला ह्मणजे त्याच्या घोड्यावर, हत्तीवर किंवा त्याच्या रथांत त्याला न जुमानतां बसतात. त्याचे जिव्हाळ्याचे लोक देखील भरसभेमध्यें, 'हें कांहीं माझ्या हातून होणार नाहीं,' असें त्याला साफ उत्तर देतात. तो रागावला असतां हासतात, त्यानें मान दिला असतां त्याचें त्यांना कांहीं वाटत नाहीं. तें पाहून एकमेकांमध्यें हासतात मात्र. त्याचा मंत्र फोडतात व त्याचें वाईट कृत्य उघडकीला आणतात. थट्टेनें त्याच्यासंबंधीं अपूज्यभाव दाखवून आज्ञांकितपणा दाखवितात. अलंकार, भोजन, स्नान गंधादि अनुलेपन यासंबंधानें हेळणा करून त्याच्यापुढें निर्भयपणें असतात. आपल्या अधिकारांची निंदा करून ते ते सोडतात. आपल्या पगारानें त्यांना संतोष न होतां राजाच्या भागामध्यें सुद्धां हात घालतात. दोरीला बांधलेल्या पक्ष्याप्रमाणें राजाशीं खेळ करतात व राजा आपल्या मुठींतला आहे असें लोकांत सांगत फिरतात. याप्रमाणें राजा मऊ व मिळून मिसळून असणारा असला तर अनेक दुष्परिणाम घडतात.

राजानें नेहमीं उद्योगशील असावें. बायकांचा तसाच राजाचा उद्योगावांचून लौकिक होत नाहीं. **शत्रूंला अटकाव न करणारा राजा व प्रवास न करणारा ब्राह्मण या दोघांना बिळांत पडून राहणाऱ्या सापाप्रमाणें भूमि गिळून टाकते, असें शुक्राचार्यांचें मत आहे.** हें लक्षांत ठेवून सख्य जुळण्यासारखें असेल त्यांच्याशीं सख्य करावें व विरोध करणाऱ्यांशीं विरोध करण्यास कंबर बांधावी. स्वाम्यमात्यादि सात अंगें असणाऱ्या राजाच्या उलट जो वागेल तो मग गुरु असो किंवा मित्र असो त्याला ठार करावें. कार्याकार्य न जाणणारा असा गर्विष्ठ मनुष्य गुरु असला तरी त्यानें आडमार्ग घेतला असतां त्याला शिक्षा करावी.

बाहूचा मुलगा जो बुद्धिमान सगर यानें नगरवासी लोकांच्या हितासाठीं आपल्या असमंजस नांवाच्या वडील मुलाला तो पौरजनांच्या मुलांना शरयु नदीमध्यें नेऊन बुडवूं लागल्यामुळें त्याची निर्भर्त्सना करून हद्दपार केलें. उद्दालकांनींही आपल्या महातपस्वी श्वेतकेतूंना त्यांचें ब्राह्मणांशीं अयोग्य वर्तन झाल्यामुळें घालवून दिलें. प्रजेला खूष ठेवणें, सत्य पाळणें व सरळ व्यवहार ठेवणें हाच राजांचा सनातन धर्म आहे. दुसऱ्याचा पैसा उपटून घेऊं नये व यावयाचा पैसा वेळेवर देऊन टाकावा. पराक्रमी, खरा व क्षमाशील असा राजा आपल्या मार्गापासून ढळत नाहीं. मनोनिग्रही, राग जिंकून शास्त्राच्या अर्थावर ज्यानें परिश्रम केले आहेत व धर्मार्थमोक्षासंबंधानें जो नेहमीं दक्ष आहे, धर्मार्थकामांसंबंधानें ज्याचा मंत्र गुप्त आहे, तोच राजा आपल्या अधिकाराला पात्र आहे. मंत्र उघडकीला येणें याहून राजावर दुसरें मोठें संकट कोणचेंच नाहीं. चारी वर्णांचे धर्म राजानें राखावेत. धर्मसंकर न होऊं देणें हा राजांचा सनातन धर्म आहे, राजानें कोणावर विश्वास टाकूं नये; व एखाद्यावर टाकणें तोही बेताबातानेंच टाकावा. सहा राजगुणांतील गुणावगुणासंबंधानें नेहमीं काळजीपूर्वक विचार करावा. शत्रूचें छिद्र फोडण्याला टपलेला, त्याचप्रमाणें धर्मार्थकामांसंबंधानें दक्ष राहून हेर ठेवून शत्रूकडील लोकांना लाचलुचपतीनें फोडणारा राजा स्तुतीला पात्र होतो. न्यायाचा तराजू यमाप्रमाणें राखून त्यानें कुबेराप्रमाणें पैसा सांठविण्यांत दक्ष असावें. अमात्य, राष्ट्र, किल्ले, खजिना व शासन अशा आपल्या पांच व याच शत्रूक-

डील पांच गोष्टींची साम्यता किंवा न्यूनाधिकपणा या-संबंधानें त्यानें अंदाज ठेवावा. आपल्या नोकरांपैकीं ज्यांना पोटाला मिळालें नाहीं त्यांना द्यावें व ज्यांना पोटाला मिळालें आहे त्यांना तें बरोबर मिळालें किंवा नाहीं यावर नजर ठेवावी. राजाचें तोंड गोड असावें व त्यानें सदा हास्यमुख असावें. त्यानें वृद्धाची शुश्रूषा करावी. त्याच्यामध्यें दिरंगाई व लोभ नसावेत. भल्यांच्या वाटेनें त्यानें जावें व संतोष वृत्ति ठेवून प्रसन्न मुद्रा ठेवावी. चांगल्यांकडून पैसा त्यानें कधीं घेऊं नये. व वाईटांकडून पैसा घेऊन भल्यांकडे त्याचा व्यय करावा. स्वतः घाव देण्यांत हुशार असावें, प्रसंगीं हात सढळ ठेवावा; तो भोक्ता असावा. आचार चोख असावा; शूर, भक्त, शत्रूला न मिळणारे, कुलीन, निरोगी, शिष्ट, शिष्टाशीं संबंध असलेले, मानी, दुसऱ्याचा अवमान न करणारे, विद्वान, लौकिक संपन्न, परलोकासंबंधी विचार करीत राहणारे, धर्मामध्यें गढलेले, साधू, पर्वतासारखे कधीं न ढळणारे, अशा लोकांना वैभवाला चढूं पाहणाऱ्या राजानें जवळ करावें. छत्र व हुकमत यांशिवाय सर्व प्रकारें त्यांच्याशीं सारखेपणानें रहावें. अशा लोकांशीं त्यांच्या समक्ष व परोक्ष सारखी वृत्ति ठेवावी. अशा रीतीनें वागणारा राजा कधीं पेंचांत पडत नाहीं. **सर्वांवर संशय ठेवून मिळेल ते बुचाडून घेणारा राजा त्याच्या घांकड्या व लोभी वर्तनामुळें त्याच्या स्वजनाकडूनच घोंटाळ्यांत येतो.** शुद्धशील व लोकांचें मन आपल्याकडे ओढून घेण्यामध्यें दक्ष असणारा असा राजा कधीं खालीं येत नाहीं व शत्रूंनीं त्याला चोहोंकडून घेरलें असतांही तो लौकर सांवरतो. राग बिलकुल नसणारा, निर्व्यसनी, बेताची शिक्षा करणारा व जितेंद्रिय अशा हिमाचलासारख्या राजावर सर्वांचा विश्वास बसतो. जो शहाणा आहे, दानशील आहे, शत्रूच्या छिद्रासंबंधानें दक्ष आहे, ज्याचें रूप मनोहर आहे, सर्व वर्णांचें बरें वाईट ज्याला कळतें, कोणतेंही काम जो झटपट उरकतो, ज्यानें राग जिंकला आहे, ज्याचा प्रसाद लवकर होतो, जो थोर मनाचा असून रागीट नाहीं, योग्य कार्यांत निमग्न असून फुशारकी मारीत नाहीं, ज्यानें आरंभलेलीं कामें व्यवस्थितपणें शेवटास गेलेलीं दिसतात, ज्याच्या राज्यामध्यें बापाच्या घरीं राहणाऱ्या मुलाप्रमाणें लोक निर्भयपणें राहतात तोच खरा राजा. ज्याच्या राज्यांत प्रजेला आपलें वैभव झांकून ठेवावें लागत नाहीं न्याय अन्याय मिळतो; तसेंच ज्याच्या अमलाखालीं लोक आपापल्या कामांत दक्ष राहून, कर्तव्यासाठीं देहाची सुद्धां पर्वा ठेवीत नाहींत, व ज्यांचें राजाकडून यथायोग्य पालन झाल्यामुळें ते आत्मनिग्रही, वशवर्ती, वाटेल तसे वळणारे, सांगितलेलें ऐकणारे असे राहून परस्परांशीं भांडण तंटा करीत नाहींत तोच खरा राजा. ज्याच्या राज्यांत ढोंग, कपट, माया व मत्सर यांना जागा मिळत नाहीं त्याच्याच पदरीं सनातन धर्म पडतो. जो ज्ञानाला मान देऊन प्रजाजनांना हितावह अशा शास्त्रार्थांत निमग्न राहून भल्यांच्या वाटेनें जातो, ज्याच्या हातून योग्य प्रसंगीं पैसा सुटतो व ज्याचे हेर व मंत्र नेहमीं चालत राहून शत्रूला त्या संबंधानें एवढी सुद्धां बातमी लागत नाहीं तोच राजा राज्य करण्याला पात्र होतो. **आधीं राजा मिळवून घेऊन मग बायकोच्या व पैशाच्या मागें लागावें. राजा दुष्ट असेल तर कोठची बायको व कोठचा पैसा असे शुक्राचार्यांनीं राम चरित्रामध्यें ह्मटलें आहे.** राज्याची ज्यांना इच्छा आहे त्यांना प्रजेच्या रक्षणाशिवाय दुसरें कोणतेंही मोठें कर्तव्य नाहीं. रक्षणानेंच राज्य कायम राहते. **मुका गुरु, न पढलेला ऋत्विज, रक्षण न करणारा राजा, कजाग बायको, गांव कोंबडा गुराखी व रानांत फिरावेंसें वाटणारा न्हावी या सहांना पाण्यांत फुटलेल्या नावेप्रमाणें सोडून द्यावें, असें** प्रचेतस् मनूचें ह्मणणें आहे.

हें राजधर्माचें नवनीत मीं तुला सांगितलें आहे. बृहस्पति, शुक्राचार्य, इंद्र, प्राचेतसमनु, भारद्वाज, गौरशिर, या सर्वांनीं राजशास्त्रावर ग्रंथ लिहिले असून प्रजेचें रक्षण ह्यालाच त्या सर्वांनीं श्रेष्ठ धर्म ह्मटला आहे. आतां ह्याला साधनें काय तीं सांगतों ऐक. हेर, गुप्त बातमीदार व त्यांना योग्य वेळीं कांकूं न करतां वेतन देणें, प्रजेपासून युक्तीनें व बेताबातानें कर घेणें, शौर्य, दक्षता, खरेपणा, प्रजाहित, वांकड्या किंवा सरळ मार्गानें शत्रुपक्षांमध्यें फूट पाडणें, जुन्या मोडकळीला आलेल्या, पडक्या इमा-

रतींची दुरुस्ती करणें, प्रसंग येईल त्याप्रमाणें दोन प्रकारची शिक्षा देणें, भले व कुलीन असतील त्यांनाच पदरीं ठेवणें, संग्रह करून ठेवण्या जोगत्या सामुग्रीचा संग्रह करून ठेवणें, बुद्धिमानांना जवळ करणें, सैन्याला खूष ठेवणें, प्रजेवर नजर ठेवणें, कामाचा कंटाळा नसणें, खजिना वाढवीत राहणें, नगराचें रक्षण करणें, कोणावर विसंबून न राहणें, शहरांतील जमाव मोडणें, शत्रू, त्रयस्थ किंवा मित्र यांच्यावर बरोबर नजर ठेवणें, आपले लोक शत्रूंशीं कानगोष्टी करतात कीं काय यावर नजर ठेवणें, स्वतः नगराची पाहणी करणें, सर्वांवर अविश्वास धरणें, शत्रूला आश्वासन देत राहणें, राजनीतीला अनुसरून वागणें, नेहमीं व्यवसायशील राहणें, शत्रूंकडे दुर्लक्ष न करणें, नीचांशीं संबंध तोडणें, हीं साधनें होत. **उद्योग हें राजधर्माचें मूळ आहे.** ह्यामुळेंच अमृतप्राप्ति झाली, असुर मारले गेले व इंद्राला स्वर्गांत उत्तम पद मिळालें. उद्योगी मनुष्य केवळ तोंडाच्या बहाद्दरावर सरशी मिळवितो. तोंडाचे बहाद्दर उद्योगी पुरुषाला खूष करून चिकटून असतात. निरुद्योगी मनुष्य बुद्धिमान असला तरी बिन विषाच्या सापाप्रमाणें शत्रूच्या आहारीं जातो. बलवानानें शत्रु दुर्बल असला तरी त्याकडे दुर्लक्ष करूं नये. कारण विस्तवाची ठिणगी असली तरी ती जाळून टाकते व विष थोडें असलें तरी तें मारतें. **चतुरंग सैन्यापैकीं एक अंग जवळ असलें तरी शत्रूला आपल्या किल्ल्याचा आश्रय मिळाल्यानें तो मोठ्या संपन्न राजाच्या मुलखाला देखील भंडावून सोडतो.** राजाचें गुप्त भाषण, जयासाठीं सैन्य जमविणें, मनांतील कपटहेतु, राजकारण व वाईट बेत, ह्या सर्वांना सरळपणाचें पांघरूण घालावें. लोकांना फसविण्यासाठीं धार्मिक क्रिया आचराव्यात. ज्यांचीं इंद्रियें स्वाधीन नाहींत, अशांच्या हातीं राज्य रहात नाहीं. मृदु राजांच्या हातून कष्टमय असें राज्य चालविणें कठिण होतें. अमिषाप्रमाणें सर्वांची यावर झडप असल्यामुळें राज्य अगदीं सरळपणानें चालवितां येणें कठिण. ह्मणून कांहीं सरळपणा कांहीं वांकडेपणा ठेवून राज्य चालविलें पाहिजे. प्रजेचें रक्षण करीत असतां कष्टें सोसावीं लागलीं तरी तो उत्तम धर्म समजला आहे. हा राजधर्माचा थोडा भाग तुला मीं सांगितला आहे. आतां आणखी तुला जेथें शंका असेल ती विचार.’

यावर तेथें जमलेल्या मंडळींनीं मोठ्या आनंदानें त्यांची वाहवा केली. युधिष्ठिराचें मन दीन होऊन डोळे पाण्यानें भरून आले व त्यानें त्यांचे पाय धरले व, ‘सूर्य पृथ्वीवरील सर्व रस शोषून घेऊन अस्ताला चालला आहे, तेव्हां आतां उद्यां मी आपल्याला आपल्या शंका विचारीन, ह्मणून तो सर्व मंडळींसह भीष्मांना प्रदक्षिणा करून निघाला. दृषद्वती नदीच्या कांठीं आल्यावर स्नान करून जपजाप्य उरकून संध्योपस्थान केल्यावर ते हास्तिनापुरांत शिरले.

## १०० राजनीतीची व राजशब्दाची व्युत्पत्ति. (१२. ५९)

पुढें सकाळीं उठून प्रातर्विधि आटोपल्यावर सर्व मंडळी फिरून कुरुक्षेत्रीं भीष्मांकडे येऊन त्यांना सुखशयित विचारून त्यांच्याभोंवतीं बसली. नंतर युधिष्ठिर हात जोडून त्यांना ह्मणाला, ‘महाराज, हा राजशब्द जो प्रजारांत आहे तो कसा उत्पन्न झाला? हात, बाहू, मान, बुद्धि, इंद्रियें, सुख, दुःख, पाठ, तोंड, पोट, शुक्र, अस्थि, मज्जा, मांस, रक्त, श्वासोच्छ्वास प्राण, शरीर, जन्म, मरण, याप्रमाणें सर्व गुणांनीं राजा इतरांशीं सारखा असून विशिष्ट बुद्धीच्या शूर लोकांवर या एकट्याचें स्वामित्व कसें राहतें? शूर, वीर व थोर यांनीं भरलेल्या या संपूर्ण पृथ्वीचें एकटा कसें रक्षण करतो? सर्व लोक याच्या प्रसादाची कां इच्छा करतात? या एकट्याच्या प्रसन्नतेनें सर्व प्रसन्न कसे होतात, व एकट्याच्या संकटानें सर्व कसे गडबडतात? देवाप्रमाणें सर्व जग ह्या एकट्यापुढें नमतें, याला कांहीं सामान्य कारण नसलें पाहिजे.’

यावर भीष्म ह्मणाले, ‘कृतयुगामध्यें प्रथम राज्य कसें उत्पन्न झालें तें सविस्तर सांगतों ऐक. पूर्वी राज्य, राजा, शासन, शास्ता हीं कांहींच नव्हतीं, सर्व लोक धर्मानें वागूनच एकमेकांचें रक्षण करीत होते. याप्रमाणें राहत असतां पुढें त्यांना याचा त्रास वाटूं लागला. व पुढें ते मोहाच्या तावडींत गेले. त्यामुळें कार्याकार्य कळेनासें होऊन त्यांचा धर्म नाहींसा

झाला. नंतर लोभाच्या तावडींत सांपडून त्यांना जवळ नसलेलें हवेंसें वाटूं लागलें. पुढें कामनामक राक्षसानें त्यांना घेरलें व याप्रमाणें कामाच्या तावडींत गेल्यानें ज्या त्या वस्तूवर त्यांना अभिलाष उत्पन्न होऊं लागला व त्यामुळें कार्याकार्य कळेनासें झालें. वाटेल त्याच्याशीं संबंध ठेवावयाला लागून वाटेल तें बोलून व वाटेल तें खाऊन दोषादोष त्यांनीं बाजूला ठेविले. याप्रमाणें गोंधळ उडाला असतां वेदलोप होऊन त्यामुळें यज्ञ लोप झाला. वेद व यज्ञ नाहींसे झाल्यामुळें देव घाबरून जाऊन ब्रह्मदेवांना शरण आले व फारच कष्टी होऊन हात जोडून त्यांना ह्मणाले, ‘ महाराज, मृत्युलोकीं लोभमोहादिकांनीं वेद ग्रासून टाकिले आहेत. त्यामुळें धर्म बुडत चालला आहे. व आह्मी मनुष्यांच्या जोडीला गेलों आहों. मनुष्य अग्निमुखानें वर आमच्याकडे हवी पाठवीत असत त्यामुळें आह्मी खालीं पाऊस पाडीत होतों. परंतु त्यांच्या क्रिया बंद झाल्यामुळें आह्मी मोठ्या संकटांत सांपडलों आहों. तेव्हां या स्थितींत ज्यायोगें आमचें कल्याण होईल असा कांहीं विचार करा; ह्मणजे आपल्या प्रसादानें उत्पन्न झालेलें हें वैभव नष्ट होणार नाहीं. ’ यावर, ‘ सर्वांच्या कल्याणाचें जें असेल त्याचा मी विचार करतों, तुह्मी घाबरूं नका, ’ असें ब्रह्मदेवांनीं त्यांना सांगितलें. नंतर ब्रह्मदेवांनीं आपल्या बुद्धीनें एक लाख अध्यायांचा एक ग्रंथ केला. व त्यामध्यें धर्म, अर्थ, काम यांचें विवेचन केलें व ह्या समुदायाला त्रिवर्ग असें नांव दिलें. मोक्ष नांवाचा, निराळ्या अर्थाचा व निराळ्या गुणांचा त्यांनीं दुसरा ग्रंथ निर्माण केला. मोक्षामध्यें सत्व, रज, तम हे त्रिवर्ग व निष्काम कर्म यांचें वर्णन केलें. त्याचप्रमाणें दंडापासून राहणारी व्यापाराची स्थिरता, तपाची वृद्धि व चोरादिकांचा ऱ्हास ह्या त्रिवर्गाचाही त्यांत विचार केला. त्याचप्रमाणें आत्मा, देश, काल, उपाय, कृत्य, साहाय्य व कारण या सहा राजनीतींचाही त्यांत उल्लेख केला. त्याचप्रमाणें त्रयी, ज्ञानकांड, वार्ता, दंडनीति वगैरे अनेक विद्यांचा यांत उल्लेख केला. अमात्य, रक्षण, गुप्त बातमीदार, राजपुत्राचें लक्षण, नानावेषधारी हेर आणि निरनिराळ्या प्रकारचे राजसेवक, साम, भेद, दान, दंड आणि दुर्लक्ष हे पांच उपाय, ह्या सर्वांचेंही त्यांत विवेचन केलें. सर्व प्रकारचे मंत्र, भेदाचे उपाय, मंत्रांमधल्या चुका, सिद्धीपासून व असिद्धीपासून होणारीं फळें, त्याचप्रमाणें उत्तम, मध्यम व कनिष्ठ अशा तीन प्रकारच्या संधी व याला कारणीभूत असणारीं सत्कार, पैसा व भय हीं कारणें यांचा ह्यांत स्पष्ट उल्लेख केला. चार प्रयाणकाळ त्याचप्रमाणें न्यायानें मिळविलेला जय, लालूच देऊन मिळविलेला जय व कपटानें मिळविलेला असुरी जय यांचें यामध्यें पूर्ण विवेचन केलें. अमात्यादि पांचांचे उत्तम, मध्यम, कनिष्ठ या तीन भेदांनीं विचार केला. त्याचप्रमाणें आठ प्रकारचें गुप्त शासन व आठ प्रकारचें उघड शासन यांचा त्यांत चांगला विचार केला. रथ, हत्ती, घोडे, पायदळ, रोजमुऱ्यानें ठेवलेले हमाल, हेर, नावाडी व युद्ध सुरू असलेल्या ठिकाणचे चाकरीला ठेवलेले लोक ( देशिक ) हीं आठ सैन्याचीं उघड अंगें होत. कपडे, अन्न व मंत्रतंत्र यांच्यासंबंधनें परिणाम पावणारे तसेंच स्थावरजंगमापासून व चूर्णापासून उद्भवणाऱ्या विषासंबंधीं विचारही यांत आहे. मित्र, शत्रू व त्रयस्थ अशा तीन प्रकारच्या लोकांसंबंधानें यांत माहिती दिली. निरनिराळ्या प्रकारच्या वाटा, व निरनिराळ्या प्रकारचे भूमीचे गुण, आत्मसंरक्षण, रथादि यंत्र साधनें तयार होत असतां त्यांवर नजर ठेवणें, मनुष्य, हत्ती, घोडे व रथ यासंबंधाच्या निरनिराळ्या कल्पना, नाना प्रकारच्या व्यूहरचना, निरनिराळ्या प्रकारच्या युद्धकला, धूमकेतु वगैरे उत्पात, उल्कापात, निपात, लढाईंतून हूल दाखवून निसटावयाच्या उत्तम युक्त्या, शस्त्रांचें ज्ञान व तीं सांभाळावींत कशीं या संबंधीं माहिती सैन्यावरचें संकट, त्यांतून सुटका, सैन्याला हुरूप देणें, अनेक पीडा, प्रसंग, पायदळ यांसंबंधीं ज्ञान प्रसंगोपात सूचना देण्यासाठीं वाद्य वाजविण्याच्या व हुकूम सोडण्याच्या व निशाणें उभारून शत्रूला भिवविणाच्या युक्त्या, चोरांकडून, जंगली लोकांकडून, आगलाव्याकडून, विष घालणाऱ्याकडून व नकल्याकडून शत्रूच्या राज्यांत पीडा उत्पन्न करणें, त्याचप्रमाणे शत्रूकडील प्रमुख लोकांत फूट पाडून झाडाझुडपांचा फडशा पाडून शत्रूंकडील हत्ती कुचकामी करून, प्रतिपक्षाकडील जे

फितुर असतील त्यांचें मन धरून आणि शत्रूला भरंसा उत्पन्न करून त्यांचे राज्यांत गडबड उडवून देणें, राजासंबंधीं जीं सात आंगें त्यांची खुंट, वाढ व समता यांचें विवेचन, दूताच्या कर्तबगारीच्या बळावर राष्ट्र वाढविणें, शत्रू, त्रयस्थ व मित्र यांची बरोबर पारख करून ठेवणें, बलवानांना प्रसंगीं तुच्छ करून त्यांचा मोड करणें, अगदीं बारीकसारीक व्यवहार, दुष्ट लोक निवडून त्यांना बाहेर घालवून देणें, कुस्ती, शस्त्रशिक्षण, पैशाचा संग्रह, त्याचप्रमाणें प्रसंगीं खर्च, ज्यांना पोटाला मिळालें नसेल त्यांना पोटाला देणें व दिलें असेल त्यांचेवर नजर ठेवणें, व्यसनाशीं संबंध न ठेवणें, त्याचप्रमाणें राजाचे गुण व सेनापतीचे गुण, धर्मार्थकामाला कारण होणाऱ्या गोष्टी व त्यांमधील गुणदोष, नाना प्रकारचीं दुष्कृत्यें, नोकरांचें वर्तन, सर्वांचे ठिकाणीं संशयवृत्ति व सावधानपणा, त्याचप्रमाणें न मिळालेलें मिळविण्याविषयीं झटणें, व मिळालेलें वाढविणें, वाढविलेलें सुपात्रीं योग्य रीतीनें खर्चणें, पैशाचा धर्म अर्थ काम व प्रसंग या चार कारणांसाठीं खर्च इत्यादि गोष्टी यांत सांगितल्या. रागापासून त्याचप्रमाणें कामापासून उत्पन्न होणाऱ्या दहा व्यसनांचा यांत उल्लेख केला. मृगया, जुगार, दारू व स्त्रिया हीं चार कामापासून उत्पन्न होणारीं व्यसनें असून निष्ठुरपणा, उग्रता, कडक शासन, शारीरिक शिक्षा, आत्महत्या व आपल्या उद्देशाला मुकणें हीं सहा संकटें रागापासून उत्पन्न होतात. नाना प्रकारचीं यंत्रें व त्यांच्या क्रिया त्याचप्रमाणें शत्रूच्या मुलुखाची नासधूस, हल्ला, सरहद्दीच्या खुणा मोडून टाकणें, गांवझाडें तोडून टाकणें, किल्ल्याला वेढा देणें, शेती वगैरे गोष्टीवर नजर ठेवणें, पोषाख वगैरे जरूरीच्या वस्तूंचा संग्रह करणें व तीं तयार करण्याचीं साधनें या संबंधाची माहिती त्यांत सांगितली. पणव, आनक, शंख, भेरी इत्यादि वाद्यांचा उपयोग त्यांत सांगितला. रत्नें, पशु, जमीन, वस्त्रें, दासी सुवर्ण हीं सहा द्रव्यें व तीं मिळविण्याचीं व शत्रूकडील तीं नाहींशीं करण्याचीं साधनें, जिंकल्या मुलुखामध्यें स्वस्थता ठेवणें, मान्यांना मान देणें, विद्वानांशीं सख्य ठेवणें, दान व होमादि करण्यासंबंधात्रें ज्ञान, मंगल वस्तूंचा स्पर्श, शरीराची प्रतिक्रिया, अन्न तयार करून त्याचा उपयोग, आस्तिक्य बुद्धि, एकाच वाटेनें जाऊन उदयाला येणें, खरेपणा, गोड भाषण, उत्सवाच्या, सामाजिक मेळ्याच्या व नेहमीं घरीं करावयाच्या गोष्टी, सर्व सभांमधून घडणाऱ्या उघड व गुप्त गोष्टी, मनुष्याच्या वर्तनावर रोजच्यारोज देखरेख, ब्राह्मणाची शिक्षेला अपात्रता, बेताबाताची शिक्षा, जाति व गुण ओळखून सेवकांना मान देणें, प्रजेचें रक्षण व राष्ट्राची वाढ, बारा राजांच्या मंडलामध्यें राहणाऱ्या राजास असणारी काळजी, चार प्रकारचे मित्र, चार प्रकारचे त्रयस्थ या संबंधाचे विचार, शरीर नीट ठेवण्यासाठीं बहात्तर व्यायामादिकांचे प्रकार, त्याचप्रमाणें देश, जाति व कुल यांचे धर्म यांत सांगितले. निरनिराळ्या प्रकारचे पैसे मिळविण्याचे उपाय, शेतकी वगैरेच्या योगानें उत्पन्न वाढविण्याचे प्रकार, अनेक प्रकारच्या मायांचा प्रयोग, व वहातें पाणी कसें बिघडवून टाकावें वगैरे ज्या ज्या उपायांनीं लोक भल्यावाटेपासून ढळणार नाहींत अशा प्रकारचें नीतिशास्त्र वगैरे विषय यांत वर्णिले. धर्मार्थकामांचा लाभ होऊन लोकांवर उपकार व्हावा ह्मणून यांनीं हा ग्रंथ निर्माण केला; व ज्या अर्थी दंडानें लोकांचें रक्षण करून त्यांना वाटेवर ठेवण्याचें यांत सांगितलें त्याअर्थी याला **दंडनीति** हें नांव दिलें. सहा गुणांचें सार यांत ओतून सरस्वतीच्या बुद्धीपासून हें नवनीत काढून त्यांत धर्मार्थकाममोक्षांसंबंधानें पूर्ण विचार केला. प्रथम शंकरांनीं याचा पूर्ण अभ्यास केला व लोकांचें आयुष्य दिवसानुदिवस कमी होत आहेसें पाहून त्यांनीं हें ब्रह्मदेवाचें मोठें शास्त्र थोडक्यांत आणून वैशालाक्ष ह्मणून दाहा हजार ग्रंथ तयार गेला. इंद्रानें त्याला पांच हजारांत आणून बाहुदंतक नांव दिलें व बृहस्पतींनीं त्याला तीन हजारांत आणून त्याला बार्हस्पत्य हें नांव दिलें. व शुक्रांनीं त्याला एक हजारांत आणलें. पुढें अनेक ऋषींनींही मनुष्याच्या आयुष्याचा सरसकट ऱ्हास लक्षांत घेऊन तो ग्रंथ त्याहून थोडक्यांत आणून निरनिराळे ग्रंथ केले. पुढें विष्णूनें सर्व मृत्युलोकचा प्रभु होण्याकरितां आपल्या तेजापासून मनानें वीरज नांवाचा मुलगा उत्पन्न केला. परंतु त्या-

ला पृथ्वीवर प्रभुत्व करण्याची इच्छा नसल्यामुळें त्यानें तें टाकून दिलें. त्याचा मुलगा कीर्तिमान ह्मणून होता तोही पंचेंद्रियांपासून अनुभव मिळणाऱ्या विषयांची पर्वा न करतां तप करीत राहिला. त्याचा मुलगा कर्दम हाही मोठ्या तपांतच गढून राहिला. त्याचा मुलगा अनंग हा दंडनीतीमध्यें हुषार असून प्रजेचें चांगलें रक्षण करूं लागला. या अनंगाचा अतिबल नांवाचा नीतिमान मुलगा मोठें राज्य मिळाल्यावर विषयासक्त झाला. मृत्यूच्या मनापासून उत्पन्न झालेल्या मुलीनें याच्याशीं लग्न करून यापासून तिला वेन नांवाचा मुलगा झाला. तो प्रजेशीं योग्य रीतीनें न वागतां रागद्वेषांच्या तावडींत गेल्यामुळें ऋषींनीं अभिमंत्रण केलेल्या कुशांनीं त्याला मारून टाकलें. पुढें मंत्रांनीं त्यांनीं त्याची उजवी मांडी फोडली; त्यांतून कुरूप, ठेंगणा, जळलेल्या खांबासारखा लाल डोळे व काळेभोर केस असलेला एक पुरुष उत्पन्न झाला. त्याला ते निषीद(बैस) असें ह्मणाले. यापासून डोंगरांत व रानांत राहणारे असे क्रूर निषाद व विंध्य पर्वतामध्यें राहणारे हजारो म्लेंछ उत्पन्न झाले. फिरून त्या महर्षींनीं त्या वेनाचा उजवा हात फोडला असतां रूपानें प्रतिइंद्रासारखा एक पुरुष उत्पन्न झाला. त्याच्या अंगावर कवच असून कंबरेला तलवार व भाता बांधला होता. वेद व त्याच्या शाखा त्याला अवगत असून धनुर्विद्येंतही तो निष्णात होता. तशीच दंडनीति सगळी त्याला अवगत होती. तो त्या ऋषींना, 'काय आज्ञा आहे,' असें ह्मणाला असतां ऋषी त्याला ह्मणाले, 'आवडनावड, काम, क्रोध, लोभ व अभिमान टाकून सर्व प्राणिमात्रांशीं सारख्या रीतीनें वागून निःशंकपणें ऐस. जो कोणी मनुष्य धर्मापासून ढळेल त्याला वाटेवर आण. ह्या दंडनीतीला धरून धर्मानें वागून वेदांचें कायावाचामनेंकरून रक्षण कर. ब्राह्मणांना दंड करणार नाहीं व लोकांमध्यें संकर होऊं देणार नाहीं अशी शपथ दे.' त्या वेनपुत्रानें तें सर्व कबूल केलें व पुढें शुक्र त्याचे पुरोहित झाले. वालखिल्य मंत्री झाले, सारस्वत त्याच्याबरोबर असणारे गण झाले. गर्ग ऋषी त्याचे जोशी झाले. सूत,मागध याचे स्तुतिपाठक झाले. याचा मुलगा पृथु यानें सूतावर संतुष्ट होऊन त्याला समुद्रकिनाऱ्यावरील प्रदेश व मगधाला मागधदेश दिले. याच पृथूनें पृथ्वीवर सपाटी उत्पन्न केली. पूर्वीं पृथ्वीवर फार खाचखळगे असून यानें धनुष्याच्या शेंड्यानें धोंडे वगैरे काढून तिला सपाटी आणली. आणि याप्रमाणें त्यानें काढलेल्या त्या धोंड्यांनीं पर्वतांना वाढ मिळाली. पुढें विष्णु, इतर देव व ऋषी या सर्वांनीं मिळून त्याला अभिषेक केला. प्रत्यक्ष पृथ्वी त्याचप्रमाचें सागर अनेकविध रत्नें घेऊन त्याच्या पुढें आले. इंद्रानें कधीं खळ न पडेलसा पैसा त्याला दिला. मेरु पर्वतानें सोनें दिलें. त्याचप्रमाणें यक्षांचा स्वामी कुबेर यानें धर्मार्थकामांमध्यें समर्थ अशा ह्या पृथूला द्रव्य दिलें. हजार हत्ती, घोडे, रथ व लोक, यानें मनांत आणल्याबरोबर उत्पन्न झाले. ह्मातारपण, दुष्काळ, मानसिक किंवा शारीरिक रोग वगैरे नाहींसे होऊन, त्याच्या अमलाखालीं साप, चोर वगैरे कोणापासून भीति उरली नाहीं. तो चालला असतां समुद्र पाणी स्तंभन करून धरीत असे. पर्वत त्याला वाट देत असत, व त्याच्या ध्वजाचा मोड कधींच झाला नाहीं. पृथ्वीपासून लोकांसाठीं सतरा प्रकारचें धान्य त्यानें उत्पन्न केलें, व हें सर्व जग त्यानें धार्मिक करून सोडलें. **त्यानें प्रजेचें रंजन केल्यामुळें त्याला राजा हें नांव मिळालें. आणि ब्राह्मणांच्या क्षतांचें त्राण केल्यामुळें त्याला क्षत्रिय हें मिळालें.** आणि ही पृथ्वी धर्मानें प्रथित झाली म्हणून हिला पृथ्वी असें नांव मिळालें; कोणीही त्याच्या उलट जाऊं नये, ह्मणून विष्णु स्वतः त्याच्या शरीरामध्यें शिरून राहतो. ह्मणूनच सर्व जग राजांना देवांप्रमाणें नमतें. विष्णूनें, 'दंडनीतीनें प्रजेचें रक्षण कर; हेर फिरत ठेव; चोहोंकडे नजर ठेवून आपल्यावर कोणाचा हल्ला होऊं देऊं नकोस; चांगल्या कृत्यांचें फळ चांगलें मिळतें; स्वतःची बुद्धि व प्रसंग पाहून राजानें आपलें वर्तन ठेवावें;' असें त्याला सांगितलें. देवगुण अंगांत असल्यावांचून राजाच्या ताब्यांत सर्व लोक असण्याला दुसरें काय कारण असणार ? विष्णूच्या कपाळापासून सुवर्णकमल उत्पन्न होऊन त्यापासून श्री उत्पन्न झाली. ती धर्माची बायको झाली. धर्माला हिच्यापासून पैसा हा मुलगा झाला. व धर्म, श्री व

पैसा हीं संपत्तीच्या ठिकाणीं राहिलीं. पुण्यकर्माचा क्षय झाल्यानें स्वर्गलोकापासून खालीं पृथ्वीवर येऊन मनुष्य दंडनीतिविशारद असा राजा होतो. व विष्णूचा थोर अंश त्याच्यामध्यें असतो. तो मोठा बुद्धिमान असल्यामुळें मोठ्या वैभवाला चढतो; व देवांनीं त्याला अभिषेक केला असल्यामुळें सर्व लोक त्याच्या आज्ञेमध्यें रहातात. त्याचें सौम्य तोंड पाहिल्याबरोबर मनुष्य त्याच्या मनाप्रमाणें वागण्याला तयार होतो. त्या दंडाच्या महत्त्वामुळें स्पष्ट अशी दिसून येणारी नीति या जगांत प्रचारांत आली आणि यामुळेंच सर्व जग न्यायानें वागूं लागलें. गतगोष्टींचा इतिहास मोठमोठ्या ऋषींची, पवित्र तीर्थांची, ग्रहनक्षत्रादिकांची, चारी वर्णाश्रमांची, चारी प्रकारच्या होमांची, चारी विद्यांची, इतिहास, वेद, न्याय, तत्त्वज्ञान, अहिंसा, सत्यासत्य, नीति, वृद्धशुश्रूषा, दान, शुचिर्भूतता, व्यवसायशीलता, सर्व प्राणिमात्रांवर दया, वगैरे सर्व या ब्रह्मदेवांच्या नीतिशास्त्रामध्यें सांगितलें असल्यामुळें हे पाळणारे राजे व देव सारखे समजण्याचा प्रचार पडला आहे.

## १०१ चारी वर्णांचे सामान्य व विशेषधर्म. (१२. ६०–६१)

पुढें 'चारी वर्णांचे सर्वसामान्य धर्म कोणते? विशेष धर्म कोणते? चारी आश्रमांचे धर्म कोणते? राजाचे धर्म कोणते? कोणच्या उपायानें राष्ट्र, राजा, पौरजन, नोकर भरभराटीला चढतात? कशा प्रकारचा खजिना, शिक्षा, किल्ला, साह्यकारी, मंत्री, ऋत्विज, पुरोहित, गुरु राजानें दूर करावेत? कोणत्या प्रसंगीं कोणावर त्यानें विश्वास ठेवावा, कशापासून त्यानें आपलें रक्षण करून घ्यावें,' ह्मणून धर्मराजानें प्रश्न केला असतां यावर भीष्म ह्मणाले, '**राग मुळींच नसणें, खरें बोलणें, सारखी वांटणी करणें, क्षमा धरणें आपल्या स्त्रीच्या ठिकाणीं प्रजोत्पादन करणें, शुचिर्भूतता ठेवणें, कोणाचा हेवा न करणें, सरळ वर्तन ठेवणें व नोकरांना पोसणें हे नऊ धर्म सर्व वर्णांना सामान्य आहेत.** आतां ब्राह्मणालाच लागू असणारा विशेष धर्म सांगतों ऐक. आत्मनिग्रह हा त्यांना पहिला धर्म सांगितला आहे. त्याचप्रमाणें वेदाध्ययन व त्यावर परिश्रम हीं दोनच त्यांना मुख्य कर्में आहेत. **आतां ह्याला भलतीं कामें न करतां शांत वृत्तीनें आपल्या कर्मांमध्यें निमग्न असतां व विद्येमध्येंच संतुष्ट असतां आपोंआप पैसा मिळेल तर त्यानें लग्न करून संतति उत्पन्न करावी, दान, यज्ञ करावेत, व आपल्याला मिळालेल्या पैशाचा भल्याबरोबर उपभोग घ्यावा.** यानें वेदाध्ययन तेवढें केलें ह्मणजे सर्व कांहीं साधलें असें समजावें. मग दुसरें कांहीं तो करो न करो. **ब्राह्मण जगाचा मित्र समजला आहे.**

आतां क्षत्रियांचा धर्म सांगतों ऐक. **त्यानें दान करावें परंतु याचना करूं नये. त्यानें यज्ञ करावा परंतु करवूं नये. त्यानें वेदाध्ययन करावें परंतु दुसऱ्याला पढवूं नये. प्रजेचें परिपालन करावें. चोरांना नाहींसें करण्यांत नेहमीं दक्ष असावें रणामध्यें त्यानें पराक्रम करावा.** वेद पढून व यज्ञ करून ज्यांनीं युद्धामध्यें जय मिळविले आहेत ते लोकांचे उत्तम धनी होत. जो क्षत्रिय रणांतून जखम न घेतां परत येतो त्याचें तें कृत्य शास्त्रवेत्ते कांहीं नांवाजत नाहींत. ज्यांना क्षत्रिय या नांवाचा बट्टा लागला आहे अशांचें हें काम समजलें आहे. चोरांना नामशेष करण्याहून दुसरें उत्तम काम याला कोणतेंच समजलें नाहीं. दान, अध्ययन व यज्ञ राजाला कल्याणप्रद समजले असल्यामुळें धर्मेच्छु राजानें या सर्वांना कारणीभूत असें युद्ध केलें पाहिजे. सर्व प्रजेला आपापल्या धर्मामध्यें रहावयाला लावून त्यांच्याकडून सर्व कृत्यें यथायोग्य करवावीं. केवळ प्रजा परिपालनानें तो कृतकृत्य होतो. मग तो दुसरें कांहीं करो किंवा न करो.

आतां वैश्याचा धर्म ऐक. '**दान, अध्ययन, यज्ञ व सचोटीनें धन संचय करणें हे त्याचे मुख्य धर्म आहेत. काळजीपूर्वक त्यानें गुरांचें पालन करावें.** यावांचून तो दुसरें कांहीं करील तर तें त्यासंबंधानें भलतें काम समजावें. गुरें सांभाळण्यामध्यें त्याचें मोठें कल्याण आहे. कारण ब्रह्मदेवानें तीं निर्माण करून त्याच्या हवालीं केलीं

आहेत. सर्व प्रजा ब्राह्मण व क्षत्रिय यांच्या हवालीं केल्या आहेत. आतां यानें काय व्यवसाय करावा व कशावर पोट भरावें तें सांगतों ऐक. तो दुसऱ्याच्या सहा गाई पाळीत असला तर रोजमुऱ्या दाखल एका गाईचें दूध त्यानें घ्यावें. व शंभर पाळीत असला तर एक गायबैलाची जोडी त्यानें वेतनादाखल घ्यावी. दुसऱ्याच्या भांडवलावर व्यापार केल्यास फायद्याचा सातवा हिस्सा घ्यावा; शिंगाच्या व्यापारांतही सातवा हिस्सा व खुराच्या व्यापारांत सोळावा हिस्सा घ्यावा. दुसऱ्याचें बीं घेऊन यानें शेती केली तर त्यांतही उत्पन्नाचा सातवा हिस्सा यानें घ्यावा. हेंच त्याचें वार्षिक वेतन. मी गुरें सांभाळणार नाहीं असें त्यानें कधीं मनांत आणूं नये. आणि तो हें काम करीत असतां दुसऱ्या कोणी हें काम अंगावर घेऊं नये.

आतां **शूद्राचा धर्म** पुढें सांगितल्याप्रमाणें आहे. ब्रह्मदेवानें शूद्राला इतर तिन्ही वर्णांची सेवा करणारा म्हणून उत्पन्न केलें आहे. म्हणून **यानें तिन्ही वर्णांची सेवा करावी.** व त्यांतच यानें मोठें सुख मानून घ्यावें. **त्यानें कांहीं संचय बाळगूं नये.** तो पैसे जमवून वरच्या वर्णांतील एखाद्याला आपल्या नोकरीला ठेवील तर तो मोठा पापी समजावा. आतां राजानें परवानगी दिल्यावरून यानें पाहिजे तर धर्मबुद्धीनें धनसंचय करावा. यानें कशावर उदरपोषण करावें तें सांगतों ऐक. **तिन्ही वर्णांना आपापलें पोट अवश्य भरलें पाहिजे.** छत्री, डोक्याचें वस्त्र, बिछाना, पंखे हीं व इतर जुनीं वस्त्रें तिन्ही वर्णांनीं नोकरी करणाऱ्या शूद्राला द्यावीं. **तें शूद्राचें धर्मधन होय. जो शूद्र तिन्ही वर्णांपैकीं एखाद्याकडे नोकरीसाठीं जाईल त्याला त्यानें पोटाचें साधन करून दिलें पाहिजे. त्याला मूल नसेल तर पिंड दिले पाहिजेत; व म्हातारा, दुबळा असेल तर त्याला पोटाला दिलें पाहिजे. शूद्रानेंही कोणत्याही प्रसंगीं आपल्या धन्याला सोडतां कामा नये. धन्याजवळ पैसा नाहींसा झाला असतां याच्या शिलकेनें त्यानें आपल्या धन्याचें पोट भरलें पाहिजे. कारण शूद्राला स्वस्व ह्मणून मुळींच नसून त्याच्या पैशावर त्याच्या धन्याची मालकी असते.** तीन वर्णांना सांगितल्याप्रमाणें त्यालाही यज्ञ आहे. मात्र स्वाहाकार, वषट्कार, व दुसरे वैदिक मंत्र त्याला नाहींत. म्हणून शूद्रानें स्वतः व्रतस्थ न राहतां रोजच्या सामान्य यज्ञांनीं यज्ञ करावा. व या पाकयज्ञाची दक्षिणा पूर्ण पात्र ( दोनशें छपन्न मुठी तांदुळानें भरलेलें ताट ) असावी. एका पैजवन नांवाच्या शूद्रानें ऐंद्राग्न विधीनें यज्ञ करून हजार पूर्ण पात्रें दक्षिणा दिल्याचें ऐकिवांत आहे. सर्व यज्ञांमध्यें श्रद्धायज्ञ विशेष समजला आहे. यज्ञ करणाऱ्यांना श्रद्धा हेंच श्रेष्ठ दैवत समजलें आहे. तिन्ही वर्णांची उत्पत्ति ब्राह्मणांपासून असून ब्राह्मणांनीं निरनिराळ्या वासनांनीं यज्ञ केले असल्यामुळें देवांचे देखील देव असे जे हे ब्राह्मण त्यांनीं सांगितलेली गोष्ट हिताचीच असली पाहिजे. व तिन्ही वर्णांची उत्पत्ति ब्राह्मणांपासून असल्यामुळें स्वभावतःच सर्व वर्णांना सर्व यज्ञांचा अधिकार आला आहे. सबब ब्राह्मणानें सांगितलेला श्रद्धायज्ञ शूद्रांनाच नव्हे तर इतर सर्व वर्णांना सुद्धां प्रशस्त आहे. यज्ञांत दिलेला हविर्भागही देवतादि मंडळी अवश्य घेतात. सूर्योदयाचे पूर्वीं किंवा नंतर इंद्रियनिग्रह करून श्रद्धेनें धर्मांत सांगितल्याप्रमाणें आन्हिक होम देण्याला सुद्धां श्रद्धा हेंच मोठें कारण आहे. ह्या होमामध्यें प्रत्यक्ष हवी टाकणें हा एक मार्ग असून, प्रत्यक्ष न टाकतां मनानें आहुती देणें हा दुसरा पण चांगला मार्ग आहे. यज्ञाचीं स्वरूपें पुष्कळ असून त्याच्या क्रियाही निरनिराळ्या आहेत व फळेंही निरनिराळीं आहेत. ज्ञानाच्या आधारानें जो तीं सर्व ओळखतो तोच द्विज श्रद्धापूर्वक यज्ञ करण्याला पात्र होतो. मनुष्य चोर असो, पापी असो किंवा पाप्यांमधला पापी असो, जो यज्ञ करूं इच्छितो तो भला समजला पाहिजे. यज्ञासारखें तिन्ही लोकांत दुसरें साधन नाहीं. म्हणून इच्छेनुरूप यथाशक्ति यज्ञ करावा.

आतां आश्रमांचे वानप्रस्थ, संन्यास, थोर गार्हस्थ्य व ब्रह्मचर्य असे चार भेद असून हा चवथा केवळ ब्राह्मणांनाच सांगितला आहे. केस ठेवण्याचा संस्कार व मुंज झाल्यावर वेद पढून पुढें आधानादिक क्रिया कराव्या. नंतर मनुष्यानें बायको असो वा नसो, अंतर्मुख होऊन व इंद्रियनिग्रह

करून गृहस्थाश्रमांतील सर्व कामें उरकल्यावर वानप्रस्थाश्रम घ्यावा, व ऊर्ध्वरेत राहून वानप्रस्थाश्रमाचे सर्व धर्म यथायोग्य रीतीनें पाळल्यावर तो ब्रह्मस्वरूपाला जाऊन मिळतो. याचप्रमाणें मुंज होऊन ब्रह्मचर्य पाळल्यावर एकदम मोक्षेच्छूंना संन्यास घेऊन भिक्षेवर राहण्याचा अधिकार येतो. त्यानें घरदार न करतां व कशावरही इच्छा न ठेवतां, दिवस मावळेल तेथें राहून मिळेल तें खावें; आत्मनिग्रहानें सर्व इंद्रियें स्वाधीन ठेवून सर्वांशीं सारखें असावें. व कसलाही विषयोपभोग न घेतां मनाला कोणताही विकार होऊं देऊं नये. याप्रमाणें कल्याणप्रद आश्रम घेऊन ब्राह्मण परमात्म्याशीं सारूप्येतला मिळून जातो. गृहस्थानें वेद पढावा; सर्व कृत्यें यथास्थित करून संतति उत्पन्न करावी; सुखाचा उपभोग घेत दक्षतेनें मुनींना पसंत असलेला कठिण गृहस्थधर्म पाळून रहावें. स्वतःच्या बायकोवर त्यानें संतुष्ट असावें. ऋतुकालीं तिच्याशीं संबंध ठेवावा. शास्त्रांत सांगितल्याप्रमाणें वागावें. लुच्चेगिरीचें अगर वांकडें वर्तन ठेवूं नये. आहार बेताचा ठेवावा. देवावर भक्ति ठेवावी. त्यानें कृतज्ञ असून सचोटीनें वागावें; सर्वांशीं सौम्य रीतीनें वागून दुष्टपणा सोडून द्यावा. क्षमाशील, आत्मनिग्रही असें राहून दुसऱ्याचें ऐकावें. हव्यकव्यें मोठ्या लक्षपूर्वक करीत जावीं. नेहमीं अन्नदान करीत असावें. कोणाचा मत्सर करूं नये. वेदिकक्रिया करण्यामध्यें दक्ष असावें. खरेपणा, सरळपणा, अतिथिसत्कार, बायकापोरांचें पोषण, वेदांचें परिशीलन व नेहमीं यज्ञयागादि कर्में करीत राहणाऱ्या गृहस्थाला स्वर्गांत उत्तम फल मिळतें. त्यानें देह ठेविल्यावर सर्वसिद्धि दासाप्रमाणें त्याच्यापुढें हजर असतात.

ब्रह्मचाऱ्यानें एकटें राहून सर्व देवतांची आठवण व जप करीत असावें. मळ व चिखल यांनीं अंग भरून घेऊन एका गुरूची सेवा करीत व्रतस्थ रहावें. नेहमीं नियमस्थ व गुरूच्या आज्ञेंत रहावें. वेदाचें परिशीलन करीत व आपलीं सर्व कर्तव्यकर्में करीत गुरूशीं नम्रभावानें असावें. यज्ञ करून ठेवणें इत्यादि षट्कर्मांकडे लक्ष न देतां व कोणच्याही गोष्टीमध्यें प्रवृत्ति न ठेवतां कोणावर कृपा, कोणावर अवकृपा, कोणावर राग, कोणावर लोभ कांहीं न दाखवितां, त्यानें त्रयस्थपणानें असावें. ब्रह्मचाऱ्याला हा आश्रमधर्म सांगितला आहे.

## १०२ क्षात्रधर्म. (१२. ६२–६६.)

पुढें, ' माझ्या सारख्यांना कल्याण व अभ्युदयकारक, लोकमान्य, सुखावह व परपीडा नसून सहज होण्यासारखे धर्म कोणते, ' ह्मणून युधिष्ठिरानें फिरून विचारलें असतां भीष्म ह्मणाले, ' वरील चार आश्रम ब्राह्मणांना सांगितले असून बाकीचे तीन वर्ण ते घेत नाहींत. विपुल स्वर्ग दायक व राजाला योग्य अशीं कर्में सांगितलीं आहेत. तीं सर्व या ठिकाणीं सांगत नाहीं. कारण तीं सर्व प्रवृत्तिप्रधानच असणार. क्षत्रियांचीं, वैश्यांचीं किंवा शूद्रांचीं कर्में करणारा ब्राह्मण ह्या लोकीं निंद्य होऊन परलोकीं नरकास जातो. जीं टोपण नांवें गुलाम, कुत्रें लांडगे व दुसरे पशु यांना देण्यांत येतात तीं नांवें भलतेंसलतें काम करणाऱ्या ब्राह्मणाला लागूं पडतात. प्राणायाम, प्रत्याहार, ध्यान, धारणा, तर्क, समाधी या सहा कर्मांकडे लक्ष पुरवून आपलीं कर्तव्यें करीत राहणारा, स्थिर, आत्मनिग्रही, शुचिर्भूत, निरिच्छ, दानशील व तपस्वी अशा ब्राह्मणाला ब्रह्मलोकासारखे लोक मिळतात. जो ज्या ठिकाणीं ज्या स्थितींत ज्या प्रकारचें कर्म करतो तो तशा प्रकारचा होतो. अनेक उत्तम गुणांनीं युक्त असें वेदाध्ययन हें राज्याची वाढ, शेती, व्यापार व शिकार याच्याहून कांहीं कमी श्रेयस्कर नाहीं. कालाच्या फेऱ्यांत सांपडून त्याच्याच प्रेरणेनें मनुष्य परवशतेनें बरीं वाईट किंवा मध्यम कृत्यें करीत राहतो. **पूर्वीं घडलेल्या कृत्यांचा मनुष्याच्या पुढील आयुष्यक्रमावर परिणाम घडत** असतो; मनुष्याचीं चांगलीं कृत्यें नेहमीं शिलकेला राहत नाहींत व जीं नवीं कृत्यें त्याचे हातून होतात, त्यावरून त्याचा पुढील आयुष्यक्रम ठरत असतो.

**मत्स्यांचा ओढणें, शत्रूला मारणें, शेती, व्यापार, गुरें राखणें, पैशासाठीं दुसऱ्याची नोकरी करणें हीं ब्राह्मणाला फार अयोग्य समजलीं आहेत.** शाहण्या ब्राह्मणानें ब्राह्मणाला सांगितलेलीं षट्कर्में करावींत व याप्रमाणें गृहस्थाश्रमामध्यें **रुत-**

कृत्य झालेल्या ब्राह्मणानें अरण्यामध्यें राहवें. **राजसेवा, शेतीवर मिळविलेला पैसा, व्यापारावर उदरनिर्वाह, वांकडे वर्तन, परस्त्रीशीं संबंध व देवघेव सोडून द्यावी.** जो ब्राह्मण धर्मभ्रष्ट होऊन भलत्या रीतीनें वागतो, शूद्राच्या बायकोशीं लग्न लावतो, नीच वर्तन ठेवतो, नाचण्याचा धंदा करतो, राजाचा सेवक होतो, त्यानें वेद म्हटला असो किंवा नसो, त्या ब्राह्मणाधमाला शूद्रासारखा समजून जेवणाचे वेळीं त्याला निराळें पान द्यावें व देवकृत्यामध्यें त्याला घेऊं नये. जो ब्राह्मण मर्यादा सोडून, शुचिर्भूतता टाकतो, क्रूर वृत्ति धरतो व दुसऱ्यांना पीडा देऊन आपल्याला सांगितलेली वृत्ति सोडतो अशा ब्राह्मणाला हव्यकव्यांत घेऊं नये. कारण आत्मनिग्रह, शुचिर्भूतता, सरळपणा हे ब्राह्मणाचे धर्म सांगितले आहेत; व ब्रह्मदेवानें चार आश्रम ब्राह्मणाकरितांच निर्माण केले आहेत. जो आत्मनिग्रही, सोमप्राशन करणारा, चोख वर्तन ठेवणारा, सर्वांवर दया करणारा, सर्व सहन करणारा, निरिच्छ, सरळ, सौम्य, क्षमाशील व दुष्टपणा न करणारा असा असेल तोच ब्राह्मण; इतराला ब्राह्मण समजूं नये. सर्व जग धर्मासाठींच शूद्र, वैश्य, व क्षत्रिय यांचा आश्रय करतें. **तेव्हां जे एकमेकाला साहाय्य करून शांतिधर्मानें वागणार नाहींत त्यांवर ईशकृपा होत नाहीं.** व चारी वर्ण, यजनादिक वेदक्रिया, आश्रमासंबंधीं लौकिक क्रिया या कांहींच होणार नाहींत. चारी आश्रमांमध्यें ज्या निरनिराळ्या धर्मानें वागलें पाहिजे तें सांगतों ऐक. तिन्ही वर्णांनीं आपापल्या आश्रमांमध्यें राहावें असें ज्याला वाटतें अशा क्षत्रियाला ते माहीत असणें आवश्य आहे. आपलीं कर्तव्यें बजावून प्रजा वगैरे उत्पन्न केलेला अध्यात्मविषय श्रवण करणारा, धृति, शम इत्यादि दहा गुणांचा अंगीकार केलेला किंवा आपल्या वर्णापेक्षां श्रेष्ठ बनलेला अशा शूद्राला देखील राजाच्या परवानगीनें सर्व आश्रम सांगितले आहेत. मात्र शम, दम, हे त्याला निषिद्ध आहेत. वर सांगितल्या प्रकारच्या शूद्राला, त्याचप्रमाणें वैश्याला व राजपुत्राला संन्यासही सांगितला आहे. राजाच्या उपयोगीं पडून आपलें कर्तव्य बजावल्यावर ज्ञातारपणीं वैश्याला राजाच्या परवानगीनें निराळा आश्रम घेण्याला हरकत नाहीं. वेद व राजधर्म यथाशास्त्र शिकून प्रजोत्पानादि क्रिया केल्यावर प्रजा धर्मानें पालन करून, राजसूय, अश्वमेध इत्यादि यज्ञांचे शेवटीं सोमसेवन करून त्याचप्रमाणें ब्राह्मणाला पाठ म्हणविण्यासाठीं आणवून त्यांना दक्षिणा देऊन रणांत थोडा बहुत जय मिळविल्यावर औरस मुलाला किंवा अन्य गोत्रांतील प्रजापालन करण्याला समर्थ अशा क्षत्रियाला राज्यावर बसवून, पितरांना व देवांना यथाविधि यज्ञानें तृप्त करून त्याचप्रमाणें वेदांनीं ऋषींना बहुमान देऊन राजानें ज्ञातारपणीं आश्रमांतर करावें; व मग क्रमानें एका मागून एक आश्रम घेतले असतां त्याला उत्तम गति मिळते. राजर्षि बनण्यासाठीं राजानें भिक्षावृत्ति पत्करावी; पोटाकरितां पत्करूं नये; व गृहस्थाश्रम सुटल्यावरही पोटाला लागेल तेवढीच भिक्षा मागून राहवें. हा संन्यासाश्रम चारी वर्णांला घेतां येण्यासारखा असला तरी ब्राह्मणाशिवाय इतर तीन वर्णांला हा अवश्य सांगितलेला नाहीं. सर्व धर्मांमध्यें क्षत्रिय धर्म श्रेष्ठ आहे. कारण तिन्ही वर्णांचे धर्म व उपधर्म त्यांच्या भुजबलावरच अवलंबून आहेत. ज्याप्रमाणें हत्तीच्या पावलामध्यें बाकीचीं पावलें बुजून जातात त्याप्रमाणें राजधर्मामध्यें इतर धर्मांचा समावेश होतो. बाकीच्या धर्मांचा आधार थोडाच मिळतो व फळही थोडेंच मिळतें असें धर्मज्ञांचें मत आहे. मोठा आधार देणारा व कल्याणप्रद असा क्षात्रधर्म आहे. राजाकडून पाळण होईल तरच बाकी वर्णांचें अस्तित्व राहणार. राजधर्मामध्यें सर्व प्रकारच्या त्यागाचें फळ मिळतें. हा पुरातन क्षत्रियांचा राजधर्म सुटेल तर दंडनीति नाहींशी झाल्यामुळें वेद बुडून जातील व धर्म लयाला जातील. सर्व प्रकारचे त्याग राजधर्मामध्यें दिसून येतात व सर्व प्रकारचे नियम राजधर्मांत पाळले जातात. सर्व विद्येचा व लोकव्यवहाराचा यांत समावेश होतो. ज्याप्रमाणें सामान्य जनांनीं एरवीं पशु मारला असतां त्यांना पाप लागतें, त्याप्रमाणें राजधर्मावांचून असलेल्या बाकी सर्व धर्मांची गति होते. लोक निरनिराळ्या धर्माच्या मागें लागून स्वतःच्या धर्मावर आदर ठेवीत नाहींत. म्हणून चारी वर्णांचे धर्म त्याचप्रमाणें लौकिक व वैदिक धर्म क्षत्रिय धर्मावर

अवलंबून आहेत. क्षात्रधर्माची अव्यवस्था होईल तर लोकांचें कल्याण होणार नाहीं. निरनिराळ्या आश्रमांतील लोकांचे धर्म स्पष्ट नसून त्यांत सुटून जाण्याला पुष्कळ मार्ग आहेत. नानाप्रकारच्या पांडित्यानें त्यांच्या उद्देशामध्यें बिघाड आणण्यांत येतो. स्पष्ट, सुखदायक, आपल्या स्वतःची प्रचीति पटवून देणारा व सर्व लोकांला हितावह असा धर्म क्षत्रियांच्या ठिकाणींच आहे. पूर्वीं दंडनीतीसंबंधानें पुष्कळ राजे विष्णूपाशीं गेल्याचें ऐकण्यांत आहे. तसेंच साध्य, वसव इत्यादिक सुद्धां पूर्वीं क्षात्र धर्मानेंच राहिले आहेत. या बाबतींत विष्णु व मांधाता यांचें संभाषण लक्षांत ठेवण्याजोगें आहे. पूर्वीं मांधाता नांवाचा राजा राज्य करीत असतां जिकडे तिकडे दानवी होऊन बेबंदशाई माजून राहिली. तेव्हां तो यज्ञ करून विष्णूची भेट घेण्यासाठीं त्याला शरण गेला. त्यावेळीं भगवान विष्णु इंद्राच्या रूपानें त्याला दर्शन देऊन ह्मणाला, 'अनंत मायागुणांनीं ज्याचे मंत्र व वीर्य अतुल आहेत त्या अप्रमेय आदिदेवाचीं कशासाठीं भेट घेऊं इच्छितोस ? तो विश्वरूप परमात्मा मला किंवा ब्रह्मदेवाला सुद्धां दिसणें शक्य नाहीं. तुझ्या मनांत काय पाहिजे असेल तें त्याशिवाय मी तुला देतों. तूं सत्यानें वागणारा असून धर्मनिष्ठ, मनोनिग्रही व शूर आहेस. देवांवर तुझी चांगली निष्ठा आहे. तुझ्या बुद्धीमुळें, भक्तीमुळें व श्रद्धेमुळें मी तुला वाटेल तो वर देतों.' यावर मांधाता ह्मणाला, 'राग येऊं देऊं नकोस; मला खात्रीनें त्या आदिदेवाचें दर्शन होईल. आतां धर्मावर नजर ठेवून, सर्व वासना टाकून व अरण्यांत जाऊन लोकमान्य असा चांगला मार्ग मी घेऊं इच्छितों. या थोर क्षात्रधर्मापासून मीं पुष्कळ पुण्यण्यवान लोक मिळविले आहेत, व मोठें यश मिळविलें आहे. तरी पण हा लोकमान्य धर्म कसा आचरावा हें मला कळत नाहीं.'

यावर भगवान ह्मणाला, 'ज्यांना राजसाहाय्य नाहीं, असे लोक किती जरी धर्मनिष्ठ असले तरी धर्माच्या शिखराला ते कधींही जाऊन पोहोंचत नाहींत. क्षात्रधर्म हा आदिदेवापासून उत्पन्न झाला असून बाकीचे शेषभूत त्यानें मागून उत्पन्न केले आहेत. ह्मणून ह्या धर्मामध्यें बाकी सर्व धर्मांचा समावेश झाला असल्यामुळें हा सर्वांत श्रेष्ठ आहे. पूर्वीं विष्णूनें क्षात्रधर्मानेंच शत्रूंना जिंकून देव व ऋषी यांचें रक्षण केलें. त्यानें जर शत्रूंना त्यावेळीं मारलें नसतें तर ब्राह्मण, लोक, आदिकर्ता, हा धर्म, आदिधर्म हें कांहींच उरलें नसतें. मग चारी वर्ण किंवा चारी आश्रमांचे धर्म नाश पावले असते. ते सर्व नष्टप्राय झालेले धर्म क्षात्रधर्मानें त्यानें पुन्हां भरभराटीला आणले.

स्वार्थत्याग, सर्व प्राणिमात्रांवर दया, लोकज्ञान, पालन व लोकांना संकटांतून सोडविणें, या सर्व गोष्टींचा क्षत्रियधर्मामध्यें समावेश होतो. निर्मर्याद होऊन इच्छेच्या व रागाच्या तावडींत जाऊन त्यांच्या अनुरोधानें वागणारे लोक राजाच्या भीतीनेंच पाप करण्यास तयार होत नाहींत. राजांनीं राजधर्मानें सर्व प्राणिमात्र मुलांप्रमाणें पाळल्यामुळेंच या पृथ्वीवर ते खुशाल राहतात. ह्मणून अशा प्रकारचा हा धर्म तुझ्यासारख्या लोकहितेच्छूंनीं पाळला पाहिजे. याच्या उलट गेल्यास प्रजा नाहींशा होतील. जमिनीची दुरुस्ती, यज्ञयागादिकांनीं आत्मशुद्धि, स्वार्जित जीवन, प्रजेचें पालन सर्व भूतांवर दया हेच राजाचे विशेष गुण होत. रणामध्यें देह ठेवणें हा त्यांचा श्रेष्ठ धर्म समजला आहे. त्याग हा जर मुनींनीं श्रेष्ठ मानला आहे तर शरीरत्यागाहून आणखी श्रेष्ठ तें काय पाहिजे ? पुष्कळ वेद पढून, गुरुसेवा करून, लढाईंत मरण्याला तयार होऊन राहिलेले क्षत्रिय श्रेष्ठ होत. ब्रह्मचर्याश्रमानंतर क्षत्रियानें गृहस्थाश्रमांत राहून सामान्य व्यवहार आला असतां निस्पृहपणा राखण्याविषयीं मोठी खबरदारी घ्यावी. चारी वर्णांना पराक्रम, यत्न इत्यादि निरनिराळ्या उपायांनीं त्या त्या वर्णांत ठेवून त्यांचें पाळण करणें हा क्षत्रियांचा श्रेष्ठ धर्म असून यांत बाकी सर्व धर्मांचा समावेश होतो. या क्षात्रधर्मामुळेंच इतर वर्णांना आपापल्या वर्णाप्रमाणें वागावयाला सांपडतें. ह्मणून ते ते धर्म यावर अवलंबून आहेत. मर्यादा सोडून विषयामध्यें गढून जाणाऱ्या पशुतुल्य मनुष्यांना हा क्षात्रधर्म सरळ वाटेनें वागावयाला लावतो, त्रिवेदी ब्राह्मणांना जो मार्ग किंवा जे आश्रम सांगितले आहेत त्याप्रमाणेंच त्यानें वागावें. तो तसा न वागेल तर त्याच्या पोटाची त-

जवीज न करतां त्याला शूद्राप्रमाणें समजून ठार करावें. **कारण कर्मानेंच धर्म वाढत असतो. भलतीं कर्में करणारा ब्राह्मण मानाला पात्र नाहीं. आणि त्यावर विश्वास कधीं ठाकूं नये.** तेव्हां बाकींच्या वर्णांचे सर्व धर्म उत्कर्षाला पोहोंचविणें हाच क्षत्रियांचा धर्म असल्यानें तो सर्व श्रेष्ठ आहे.'

मांधाता ह्मणाला. 'यवन, किरात, गांधार, चीन, शबर, बर्बर, शक, तुषार, कंक, पल्हव, आंध्र, ब्राह्मण व क्षत्रिय यांपासून झालेल्या माझ्या राज्यांत असलेल्या अनेक लोकांनीं कोणता धर्म आचरण करावा व चोरीवर राहणाऱ्यांना माझ्या सारख्यांनीं वाटेवर कसें आणावें हें सांगा.'

इंद्ररूपी भगवान ह्मणाला, 'सर्व चोरांनीं आईबाप, गुरु, वडील, आश्रमामध्यें राहणारे या सर्वांची सेवा करावी. वेदांत सांगितलेल्या क्रिया त्यांनीं कराव्या, त्यांनीं पितृयज्ञ करावे, कुवे खणावे, पाणपोया ठेवाव्या, बिछाने वगैरे निरनिराळ्या प्रकारचीं दानें प्रसंगोपात करावीं, कोणाला पीडा देऊं नये, सचोटी ठेवावी, राग सोडून द्यावा, आपल्यावर अवलंबून असणाऱ्यांचें पालन करावें, मुलाबायकांचें पोषण करावें, शुचिर्भूतता ठेऊन कोणाचा द्रोह करूं नये, सर्व प्रकारचे पाकयज्ञ करून त्यांमध्यें दक्षिणा द्यावी. आतां सर्व वर्णांमध्यें वेषांतरानें चोर असतातच. त्या संबंधानें काय करावें ह्मणून विचारशील तर दंडनीति नाहींशी होऊन राजधर्म बुडाल्यामुळें राजाच्या दुष्टपणाचाच हा परिणाम आहे. हें कृतयुग संपल्यावर असंख्य भिक्षू त्याचप्रमाणें निरनिराळे वेषधारी व निरनिराळे आश्रम होतील. ते पुराण किंवा धर्म कांहीं न समजतां वासनांच्या व रागाच्या आधीन होऊन कुमार्गाला लागतील. दंडनीतीनें माहात्मे जेव्हां पाप्याला पापापासून परतवितात, तेव्हांच श्रेष्ठ असा शाश्वत धर्म कायम व स्थिर होतो. सर्व लोकांचा गुरु राजा त्याचा जो अवमान करतो, त्यानें केलेलें दान किंवा श्राद्ध किंवा त्यानें दिलेली आहुति फलद्रूप होत नाहीं. धर्मासाठीं अवतरलेला मनुष्यांचा स्वामी जो राजा त्याचा देव सुद्धां अवमान करीत नाहींत. ब्रह्मदेवानें सर्व जग निर्माण करून धर्मापासून भलतीकडे प्रवृत्ति न ठेवतां लोकांनीं सरळ वाटेनें जावें ह्मणून त्यांवर दाब ठेवण्याकरितां क्षात्रधर्म निर्माण केला. ज्या धर्मानें आपण जातों त्याच्या गतीसंबंधानें जो विचार करतो तो मला मान्य व पूज्य आहे. आणि क्षात्रधर्माची कामगिरी हीच आहे.'

असें सांगून विष्णु निघून गेले. तेव्हां अशा प्रकारचा जो क्षत्रियधर्म त्याला कोण शहाणा तुच्छ करील ? धर्मसंबंधांत खऱ्या वाटेपासून सुटून भलत्याच वाटेला लागलेले जन रस्त्याला लागलेल्या आंधळ्याप्रमाणें मध्येंच नाहींसे होतात. याप्रमाणें परमेश्वरानें प्रथम सुरू करून ठेवलेल्या या राहाटीमध्यें पडून त्याप्रमाणें तूं वाग.

आतां चांगल्या रीतीनें पाळलेल्या निरनिराळ्या आश्रमधर्मांचें फल राजाला कसकसें प्राप्त होतें तें सांगतों ऐक. नेहमीं वेदाध्ययनांत निमग्न राहून, क्षमाशीलपणानें गुरूचा सत्कार व सेवा केल्यानें राजाला ब्रह्मचर्य आश्रमाचें फळ मिळतें. ज्ञान असून दान करणें, कृपा व शासन करणें, शहाणपणानें सांगितल्याप्रमाणें वर्तन ठेवणें, धर्मानें आह्निक व जपजाप्य करून देवांची पूजा करणें, सर्व चराचर भूतमात्रांचें रक्षण करणें, भूतमात्रांवर जुलूम झाला असतां शरणांगताचें रक्षण करणें ज्यांच्या त्यांच्या योग्यतेप्रमाणें त्यांना मान देणें, लहान मोठ्या बायकांना, भावांना, मुलांना व नातवांना जरबेंत ठेवून त्यांच्यावर कृपा करणें, सत्कार ठाऊक असलेल्या पूज्य अशा भल्या लोकांचें पालन करणें, त्याचप्रमाणें निरनिराळ्या आश्रमांमध्यें असणाऱ्या लोकांना घरीं बोलावून त्यांना जेवावयाला घालणें, याच्या योगानें त्याला गृहस्थाश्रमाचें फल मिळतें. ज्ञाति, संबंधी व मित्र संकटांत सांपडले असतां त्यांना त्यांतून बाहेर काढणें व निरनिराळ्या आश्रमांतील ठळक ठळक लोक यांचा वरचेवर सत्कार करणें, आन्हिक क्रिया करून पितृयज्ञ, भूतयज्ञ, देवयज्ञ, मनुष्ययज्ञ, यथास्थित रीतीनें करणें, आपल्या जवळचें सर्व प्राणिमात्रांना वांटून देऊन अतिथींचा सत्कार करणें, भल्यासाठीं परराष्ट्राचा चुराडा उडविणें, वानप्रस्थामध्यें असलेल्या व वेद पठण केलेल्या ब्राह्मणांना यथेच्छ पैसा देणें, याच्या योगानें त्याला वानप्रस्थाश्रमाचें फल मिळतें. इच्छा, द्वेष न ठेवतां दंड-

नीतीच्या योगानें सर्व भूतमात्रांच्या ठिकाणीं सारखी दृष्टि ठेवणें, आपल्या जवळचें त्यांना वांटून देऊन मान्यांचा मान राखणें, सर्व प्राणिमात्रांचें त्याचप्रमाणें राष्ट्राचें पालन करणें, **एक मरण किंवा स्वराष्ट्राचें रक्षण या निश्चयानें प्राणाची पैज लावून राहणें,** सर्व भूतमात्रांचे ठिकाणीं सरळ व साधी वागणूक ठेवणें, यांच्या योगानें त्याला संन्यासाश्रमाचें फल मिळतें. सर्व प्राणिमात्रांची कीव करून त्यांच्यावर दया करणें यांच्या योगानें सर्व आश्रमांचें फल त्याला मिळतें. जो राजा ब्रह्मदेवानें उत्पन्न केलेला धर्म पूर्णपणें पाळतो त्याला सर्व आश्रमांचें याप्रमाणें फळ मिळतें. ज्याच्यामध्यें कोणत्याही गुणाला उणीव नाहीं तो आश्रमामध्येंच आहे असें समजावें. त्याचप्रमाणें जो देशधर्म, कुळधर्म ओळखून स्थळाला, काळाला व वयाला मान देतो व प्रजा पालन करून योग्य वेळीं संपत्ति व देण्ग्या योग्य लोकांना देतो व भीतीनें वगैरे गांगरला असतां सुद्धां ज्याची धर्माकडे नजर असते त्या राजाला सर्व आश्रमांचें फल मिळतें. धर्मामध्यें कुशळ असणारे लोक ज्या राजाच्या राज्यामध्यें त्याच्या संरक्षणाखालीं धर्माचरण करतात त्या राजाला त्या धर्माचा अंश मिळतो. धर्मामध्यें आनंदांत राहून त्यांत गढले असलेल्या लोकांचें जे राजे रक्षण करतात ते लोक त्या राजांचें पाप हरण करतात. या कामांत त्या राजांना जे साहाय्य करतात त्यांना सुद्धां त्या पुण्याचा वांटा मिळतो. आपण घेतलेला गृहस्थाश्रम अति उत्तम व पवित्र आहे, हें कांहीं ठरवावयला नको. आपल्याप्रमाणें सर्व प्राणिमात्रांकडे दृष्टि ठेऊन राग जिंकून जो कोणाला इजा करीत नाहीं त्याला येथें व परलोकीं सौख्य मिळतें. जिला शास्त्ररूपी नाडा आहे व बुद्धिरूपी सुकाणूचा जोर आहे अशी धर्माच्या साहाय्यानें नदींत सोडलेली व दानरूपी वाऱ्यानें जोरानें चाललेली राजधर्मरूपी नाव राजाला या संसारसागरांतून झटपट तारून नेते. सर्व विषयवासना दूर करून आत्मनिष्ठ राहिल्यानें त्याला ब्रह्मप्राप्ति होते. तेव्हां याप्रमाणें पालनामध्यें गढून राहिल्यानें तुला चारी आश्रमांचें फळ मिळेल. '

---

## १०३ अराजक स्थिति. (१२. ६७-८)

पुढें, ' राष्ट्रासंबंधानें मुख्य कर्तव्य काय तें सांगा, ' म्हणून युधिष्ठिरानें विचारल्यावरून भीष्म म्हणाले, 'राजाला अभिषेक करणें हें राष्ट्राचें पहिलें काम आहे. राजावांचून व सैन्यावांचून असलेल्या राष्ट्राला भुरटे जेरीस आणतात. अराजक राष्ट्रामध्यें धर्म रहात नाहीं. एकमेक एकमेकांला खाऊं लागतात. धिक्कार असो त्या अराजक स्थितीला ! राजा मागून घेणें म्हणजे प्रत्यक्ष इंद्राला मागून घेण्याप्रमाणें आहे असें श्रुतिवचन असल्यामुळें इंद्राप्रमाणेंच राजाला कल्याणेच्छूनें मान द्यावा. अराजक राष्ट्रामध्यें राहूं नये. त्यामध्यें दिलेला हवी सुद्धां अग्नि नेत नाहीं. **अराजक व निःसत्व अशा राष्ट्राकडे जर कोणी बलवान पुरुष राजा होण्याच्या आशेनें येईल तर लोकांनीं त्याला सामोरें जाऊन सन्मानपूर्वक त्याचें स्वामित्व पत्करावें हाच उत्तम विचार!** तो चांगल्या रीतीनें वागला म्हणजे सर्व यथास्थित जुळून जातें. कारण बलवान खवळला असतां कांहीं बाकी ठेवणार नाहीं. जी गाय मुकाट्यानें धार काढूं देत नाहीं तिला फार हाल सोसावे लागतात. तीच जी कांहीं गडबड न करतां धार काढूं देते तिच्या कोणी वाटेला जात नाहीं ! त्याचप्रमाणें जें तापविल्यावांचूनच वांकतें त्याला तापविण्याच्या भरीला कोणी पडत नाहीं. जें लांकूड आपल्या आपण वांकत नाहीं त्याला लोक वांकवितात. या दृष्टांतावरून **बलवानापुढें नमावें व कल्याणेच्छूंनीं नेहमीं राजा करावा.** राजा नसेल तर पैसा किंवा बायको कांहीं असून उपयोगी नाहीं. कारण अशा राष्ट्रामध्यें दुष्ट मनुष्याला दुसऱ्याचा पैसा उपटण्यांत मजा वाटते; व याचा दुसरे उपटूं लागले म्हणजे याला राजा हावा असें वाटूं लागतें. तेव्हां दुष्ट लोक सुद्धां अराजक स्थितींत सुखी नसतात. एकाचा पैसा दोघे उपटतात, व दोघांचे दहा उपटतात. जो स्वतंत्र आहे, तो गुलाम बनतो. बायकांवर बलात्कार होतात. म्हणूनच देवांनीं प्रजेचें पालन करणारे निर्माण केले आहेत. जगामध्यें जर शासन करणारा राजा नसेल तर पाण्यांतील माशाप्रमाणें दुबळ्यांना बलवान या न्यायानें प्रजा एकमेकांना खाऊन टाकतील. म्हणून आमच्या असें ऐकण्यांत आहे कीं,

पूर्वी सर्व प्रजा एकत्र जमून त्यांनीं आपल्यामधील बोलण्यांत शूर, कडक शिक्षा करणारे, परस्त्रीशीं संबंध ठेवणारे, दुसऱ्याचा पैसा उपटणारे असे जे लोक असतील त्यांना आपण दूर करावें असें ठरविलें. एकमेकांवर विश्वास बसण्यासाठीं आपसांत याप्रमाणें ठरवून ते राजा मागण्याकरितां ब्रह्मदेवांकडे गेले. तेव्हां ब्रह्मदेवांनीं मनूला तें काम सांगितलें असतां त्यांचें ह्मणणें त्याला कबूल झालें नाहीं. तो ह्मणाला, 'मी पापाला फार भितों. राज्य चालविणें फार कठीण आहे. विशेषतः नेहमीं आड वाटेनें जाणाऱ्या मनुष्यामध्यें तें चालविणें तर फारच कठीण आहे.' तेव्हां प्रजा त्याला ह्मणाली, 'भिऊं नका; पाप जो करील त्याला लागेल; आपल्या खजिन्यांत वाढ पडण्यासाठीं आह्मी आपल्या पशूंपैकीं व पैशापैकीं पन्नासावा, व धान्याचा दहावा हिस्सा तुह्माला देऊं. मुलींच्या कन्याधनासंबंधानें वाद उपस्थित झाला असतां त्याचा निकाल देण्यासाठीं एक सुंदर मुलगी आह्मी तुह्माला देऊं. आपल्या रक्षणाकरितां आमच्यांतील ठळक ठळक लोक हत्यारांनिशीं वाहनामधून आपल्या पुढें मागें राहतील व याप्रमाणें आपलें बल वाढून आपण शत्रूला अजिंक्य झाल्यावर यक्षराक्षसांना संभाळणाऱ्या कुबेराप्रमाणें आपण आमचें रक्षण करण्याला समर्थ व्हाल. आपल्या रक्षणाखालीं प्रजेच्या हातून जो धर्म घडेल त्याचा चौथा हिस्सा आपल्याला मिळेल. व त्यामुळें आपण सुखी व्हाल. सूर्याप्रमाणें शत्रूला तापवून सोडीत विजयासाठीं बाहेर पडून आपण शत्रूची मान उडवून द्या.' हें त्यांचें भाषण ऐकून तो मोठ्या बलानिशीं झळकत निघाला. त्याला पाहिल्याबरोबर सर्व पृथ्वीवरील लोक घाबरून जाऊन आपापल्या धर्माकडे लक्ष देऊं लागले. पाऊस पाडणाऱ्या ढगांप्रमाणें पृथ्वीवर चोहोंकडे फिरून जिकडे तिकडे शांति उत्पन्न करून त्यानें दुष्टांना आपापल्या कर्माकडे लाविलें. म्हणून लोकांनीं प्रथम राजा करून गुरू पुढें नमणाऱ्या शिष्याप्रमाणें त्याचे पुढें नम्र असावें. **कारण स्वजनांमध्यें मान असला तरच शत्रूकडून मान मिळतो.** स्वजनांत मान नसेल तर शत्रू पराभव करतात. राजाचा शत्रूंनीं पराभव केला असतां सर्वांलाच त्यांपासून त्रास होतो. म्हणून छत्र, वाहन, वस्त्र, आभरण, अन्नपान, घर, आसन, शय्या सर्व उपकरणें राजाला पुरवावींत. असें केल्यानें राजाला प्रजेचें नीट रक्षण करतां येऊन तो अजिंक्य होतो. राजानें गोड बोलावें; कोणी गोड बोलल असतां त्याच्याशीं उलट गोड बोलावें. त्यानें कृतज्ञ, फार भक्तिमान, इंद्रियनिग्रही असून आपल्या जवळच्या वस्तूंचा दुसऱ्याबरोबर उपभोग घ्यावा; व कोणी आपल्याकडे पाहिलें असतां त्याच्याकडे सौम्य दृष्टीनें पहावें. राजामुळेंच सर्व लोकांचा धर्म चाललेला दिसतो. राजाच्या भीतीनेंच प्रजा एकमेकाला खात नाहीं. सर्व प्रकारचीं बंधनें तोडण्याला तयार होऊन विषयासक्त होऊं पाहणाऱ्या सर्व लोकांना धर्मानें वाटेवर आणल्यामुळेंच राजाला राजशब्द शोभतो. ज्याप्रमाणें चंद्रसूर्य न उगवल्यामुळें सर्व प्रजा अंधारामध्यें बुडून जाते, ज्याप्रमाणें उथळ पाण्यामधील मासे किंवा निर्भय ठिकाणचे पक्षी एकमेकांचा फडशा पाडीत कांहीं वेळ मजेंत राहून सर्वांचा नाश करून घेतात, त्याचप्रमाणें राजा नसेल तर प्रजेचीही दुर्दशा उडेल. माझें म्हणून या जगांत कांहींच राहणार नाहीं. बायका, मुलें, पैसा दौलत कांहींच राहणार नाहीं. सर्व गोंधळ माजून राहील. वाहनें, वस्त्र, अलंकार वगैरे सर्व दुष्ट लोक बलात्कारानें उपटतील. धर्मानें राहणाऱ्यांवर अनेक प्रसंग येऊन अधर्माचें साम्राज्य माजेल. आई, बाप, ह्मातारे, गुरु, अतिथि, वडील या सर्वांना लोक त्रास देऊं लागतील किंवा प्रसंगीं ठार देखील करतील. जिवाला मुकणें, बंधनांत पडणें, हाल अपेष्टा सोसणें इत्यादि प्रसंग श्रीमानावर येतील. ममत्व म्हणून राहणार नाहीं. मरण अकाळीं येऊं लागेल, व सर्व लोक चोरांच्या ताब्यांत जातील; सर्व लोक भयंकर नरकांत पडतील. संबंधासंबंध दोष राहणार नाहीं. शेतकी व व्यापार बुडतील, धर्म राहणार नाहीं, वेद नाहींसे होतील, यज्ञ होणार नाहींत, लग्न, समाज, वगैरे कांहींच उरणार नाहींत. बैल गाईवर उडणार नाहींत. धार निघणार नाहीं. पाळीव गुरांचे कळप नाहींसे होतील, सर्व जग पडिलें जाऊन अस्वस्थता माजेल; व हाहाःकार उडून राहील, वर्ष वर्ष चालणारीं सत्रें निर्धास्तपणें चालणार ना-

हींत, विद्येनें व व्रतानें शुद्ध झालेले ब्राह्मण तपामध्यें गढून राहून वेदाध्ययन करणार नाहींत, ब्रह्महत्या करणाऱ्याला मारणाऱ्या मनुष्यास त्याच्या कृत्याबद्दल बक्षीस मिळणार नाहीं; आणि ब्रह्महत्या करणाऱ्यांना कांहीं शिक्षा न होतां ते निर्धास्तपणें वावरतील, लोक धडधडीत दुसऱ्याच्या हातांतून द्रव्य ओढून घेऊन चोऱ्या करूं लागतील, सर्व मर्यादा नाहींशा होऊन सर्वांची भयानें गाळण उडून पळापळ उडेल, अन्यायाचें साम्राज्य माजेल; वर्णसंकर होईल; राष्ट्र दुकाळानें ग्रासून जाईल. धार्मिकांचें योग्य रीतीनें रक्षण करण्याला राजा असेल तर लोकांना निर्भयपणें वाटेल तसें आपलें घर उघडें ठेवून निजतां येतें. कोणाच्या शिव्या कोणी सोशीत नाहींत, मग हात उचलण्याची गोष्ट राहिली बाजूलाच. बायकांना सर्व अलंकार घालून निर्भयपणें पुरुषांना बरोबर न घेतां रस्त्यांतून फिरतां येतें. लोक धर्मानें वागतात; कोणी कोणाला पीडा देत नाहींत; उलट एकमेकांला साहाय्य करतांत. तिन्ही वर्णांचे लोक निरनिराळ्या प्रकारचे मोठमोठे यज्ञ करतात; व दक्षतेनें वेदाध्ययन करतात. **या जगाचें अस्तित्व शेती व व्यापार यांवर असून वेदाच्या योगानें त्याला कायमपणा आहे.** या सर्व गोष्टी योग्य रीतीचें राजरक्षण असेल तरच घडतात. जेव्हां राजा हें राज्याचें जूं घेऊन प्रजेला वाटेनें नेतो, तेव्हांच ती सुखांत असते. राजा नसेल तर सर्व प्रजा नाहींशा होतात. त्याच्या अस्तित्वावरच हिचें अस्तित्व आहे. आतां सर्व लोकांना दरारा उत्पन्न करणाऱ्या त्याच्या ह्या भाराला जो हातभार लावतो त्यालाही इहलोक व परलोक मिळतो. जो त्या पुरुषासंबंधानें केवळ मनानें पाप चिंतील त्याला खात्रीनें ह्या लोकीं दुःख भोगावयाला लागून परलोकीं नरकाला जावें लागेल. केवळ मनुष्य म्हणून राजाचा अवमान करूं नये. मनुष्यरूपानें असणारी ही मोठी देवता आहे. हा प्रसंगानुसार अग्नि, सूर्य, काळ, यम, कुबेर या पांचांच्याही कामगिऱ्या बजावीत असतो. जेव्हां हा लुच्चेगिरीनें वागणाऱ्या जवळच्या दुष्ट लोकांना आपल्या उग्र तेजानें जाळून काढतो, तेव्हां हा अग्नीची कामगिरी करीत असतो. जेव्हां हेरांच्या द्वारानें सर्व प्राणिमात्रांवर नजर ठेवून त्यांचें कल्याण करतो तेव्हां हा सूर्याची कामगिरी बजावीत असतो; जेव्हां शेंकडों पापी लोकांचा त्यांच्या मुलां, नातवां, बांधवांसह फडशा पाडतो तेव्हां हा काळाची कामगिरी करतो. जेव्हां सर्व धर्मलंड लोकांना कडक शिक्षा देऊन वाटेवर आणतो व धार्मिकांवर कृपा करतो तेव्हां हा यमाची कामगिरी करीत असतो. जेव्हां उपकारी लोकांवर पैशाचा वर्षाव करून अपकारी लोकांपासून तो हिसकावून घेतो व याप्रमाणें कोणाला श्रीमान व कोणाला गरीब करतो तेव्हां हा कुबेराचें काम करीत असतो. काम करण्याची कुवत असून जो हुशार आहे त्यानें राजासंबंधीं कधीं वाईट बोलत फिरूं नये. राजाच्या उलट जाऊन कधीं कोणाला सुख मिळत नाहीं; मग तो भाऊ असो, मुलगा असो, मित्र असो किंवा कलिजा असो. पेट घेऊन वाऱ्याचें साहाय्य मिळालेला अग्नि देखील कांहीं बाकी ठेवील, परंतु राजाच्या तावडींत सांपडलेल्याची कांहीं बाकी उरणार नाहीं. राजाचा कांहीं अपहार न करतां मृत्यूप्रमाणें त्याच्यापासून दूर असावें. विषाला शिवणाऱ्या हरणाप्रमाणें त्याला हात लावणाऱ्याचा तात्काल नाश होतो. शहाण्यानें राजधन आत्मस्वाप्रमाणें जपावें. राजाचा पैसा उपटणारे अनेक कालपर्यंत घोर नरकांत पडतात. राजा, भोज, विराट्, सम्राट, क्षत्रिय, भूपति, नृप अशा थोर थोर नांवांनीं ज्याची स्तुति होते त्याला कोण बरें सन्मान देणार नाहीं? म्हणून ज्याला ह्या जगांत रहावयाचें आहे, त्यानें राजाश्रय करावा. विद्वान, शहाणा, थोर मनाचा, पूर्ण भक्तिमान, इंद्रियनिग्रही, धर्मिष्ठ नीतिविशारद अशा मंत्र्याचा राजानें सत्कार करावा. त्याचप्रमाणें वरील सर्व गुण असून जो शूर, भलती सलती कामगिरी न करणारा, व मनगटाची धमक बाळगून असेल अशा मनुष्याला राजानें आपल्या हातांत घ्यावें. शहाणपण मनुष्याला ताठा आणतें; व राजा त्याला मऊ आणतो. राजाची ज्यावर गैरमर्जी आहे, त्याला सुख कोठचें? **जो राजाश्रय करतो त्याला सुख मिळतें.** राजा हा प्रजेचें हृदय, त्यांची उत्तम गति व उत्तम सुख आहे. राजाश्रयानें असणारे लोक इहपर मिळवितात. आत्मनिग्रह, सत्य, कनवाळूपणा

यांनीं पृथ्वीचें राज्य करून व मोठमोठे यज्ञ करून राजा स्वर्गामध्यें जागा मिळवितो.

---

## १०४ राजाचें वर्तन ( १२. ६९–७० )

पुढें, ‘ राजानें कसें वागावें, आपला प्रांत कसा राखावा, शत्रूंना कसें जिंकावें, हेरांना कसें पाठवावें, चारी वर्ण, नोकर, बायका, मुलें यांवर कसा विश्वास टाकावा, ’ ह्मणून युधिष्ठिरानें विचारिल्यावरून, भीष्म ह्मणाले:—

‘ राजानें किंवा राजाच्या प्रतिनिधीनें कसें वागावें तें सांगतों ऐक. राजानें प्रथम स्वतःला जिंकून मग शत्रूला जिंकावें. स्वतःला न जिंकतां तो शत्रूला कसा जिंकणार ? स्वतःवर जय मिळविणें ह्मणजे पंचेंद्रियें ताब्यांत ठेवणें होय. तीं ताब्यांत राहिलीं ह्मणजे शत्रूवर याची मात्रा चालते. किल्ल्यामध्यें, सरहद्दीवर, नगराजवळच्या उपवनांत, शहरांतील बगिच्यामधून, निरनिराळ्या जमावाच्या ठिकाणीं सर्व शहरांतून व नगरांतून अंतःपुरामध्येंत्याचप्रमाणें राजवाड्यामध्यें त्यानें पहारेकरी ठेवावेत. त्यानें गुप्त हेर करावेत; ते दिसण्यामध्यें जड, आंधळे, बहिरे, असे असून मोठे शहाणे, भूक, तहान, श्रम यांना न जुमानणारे, चांगले पारखलेले असावेत. सर्व मंत्रिमंडळामध्यें त्याचप्रमाणें मित्रांमध्यें व मुलांमध्यें देखील हेर असावेत. त्याचप्रमाणें नगरामध्यें व मांडलिक राजांमध्यें हेर ठेऊन द्यावेत. हे हेर एकमेकांना ओळखतां येण्यासारखे नसावेत. त्याचप्रमाणें बाजारांत विहार करण्यांच्या ठिकाणीं समाजांमधून, संन्याशांमध्यें, बागांतून, वाटिकांमधून, विद्वानलोकांचे मेळ्यामध्यें, देशामध्यें, चवाठ्यांवर, सभांचे ठिकाणीं, निरनिराळ्या मोठमोठ्या लोकांच्या घरीं नजर ठेऊन शत्रूनें पाठविलेल्या हेरांची टेहळणी करावी. या रीतीनें हेरांकडून पूर्वीं बातमी लागल्यानें मोठा फायदा होतो. जेव्हां राजाला शत्रूपेक्षां आपण कमी आहों असें वाटेल, तेव्हां आमात्यांशीं विचार करून त्यानें बलवानांशीं संधि करावा. एवढेंच नव्हे तर आपण कमी आहों हें न कळलें तरी कांहीं मनांत गुप्तहेतु धरून त्यानें शत्रूशीं संधि करावा. जे गुणवान, उत्साहसंपन्न, धर्म कळणारे भले लोक असतील त्यांच्याशीं राजानें स्नेहानें असावें. आपला उच्छेद होण्याची वेळ आली असतां, राजानें पूर्वीं ज्यानें अपकार केला असेल किंवा ज्यांचा लोक द्वेष करीत असतील अशांना मारून टाकावें. जो उपकार करण्याला अथवा अपकार करण्याला समर्थ नाहीं, परंतु ज्याला उपटून काढणें शक्य नाहीं, अशाकडे त्यानें दुर्लक्ष करावें. कोणावर स्वारी करण्याचें मनांत येईल तर ज्याला मित्र अथवा बांधव साहाय्यास नाहींत, जो दुसऱ्यांशीं लढण्यांत गुंतला असल्यामुळें बेसावध आहे अशा दुबळ्यावर स्वतः जय्यत तयारी करून व नगराच्या रक्षणाची खबरदारी घेऊन मग चालून जावें. **एखादा मोठा शूर राजा असला तरी त्याच्या ताब्यांत राजानें कायमचें जाऊं नये.** बल व सामर्थ्य नाहींशीं झाली असतील तर शस्त्र, अग्नि किंवा विष इत्यादिकांचा उपयोग करून त्याच्या राष्ट्राला पीडा देत त्याला जर्जर करीत रहावें. त्याचे जे अमात्य व मानकरी असतील त्यांच्यामध्यें भांडण तंटे उत्पन्न करावेत, **राज्य मिळविण्यासाठीं युद्धाच्या कधीं भानगडींत पडूं नये.** साम, दाम, भेद या तीन उपायांनींच आपला हेतु साधून घ्यावा. या तीन उपायांनीं जेवढें मिळेल तेवढ्यावरच शाहणे संतुष्ट असतात. **प्रजेपासून जो कर घ्यावयाचा तो त्यांच्या प्राप्तीचा साहावा हिस्सा असून तो त्यांच्या संरक्षणाकडे लावावा.** मत्त, उन्मत्त इत्यादि दहा प्रकारचे शिक्षेला पात्र असणारे यांकडून थोडाबहुत दंड घेऊन तोही पौरांच्या संरक्षणाकडेसच लावावा. मुलांनातवांप्रमाणें प्रजेवर दृष्टि ठेवावी; पण व्यवहार आला असतां प्रेम बाजूला ठेवावें. न्यायान्यायाचा निवाडा करण्यासाठीं शाहणे व सर्व कळणारे लोक ठेवावेत, राज्याचें अस्तित्व यावरच आहे. खाणी, मिठागार, भुसार पेठ, तारी आणि हत्तीदळ यांजवर आपले हितेच्छु प्रधान किंवा आप्त नेमावेत. नेहमीं योग्य शासन ठेवावें. यानेंच राजाची प्रशंसा होते. वेद, वेदांगें हीं माहीत असून राजानें शाहणे, सदा दानशील व यज्ञशील असावें. हे गुण नसतील तर कीर्ति किंवा स्वर्ग त्याला कोठून मिळणार? बलवान शत्रूचा त्रास झाला असतां बुद्धिमान राजानें किल्ल्याचा आश्रय

नें सुद्धां रहावें. मात्र त्यानें दारू, मीठ, तीळ, घोडे, गाई, मेंढ्या, ह्मशी, बैल, मध, मांस, व शिजलेलें अन्न हे पदार्थ कोणत्याही प्रसंगीं विकूं नयेत. हे विकल्यानें ब्राह्मण नरकाला जातो. कारण बकरा विकल्यानें अग्नि विकल्याचें, मेंढी विकल्यानें वरुण विकल्याचें, घोडा विकल्यानें सूर्य विकल्याचें, अन्न विकल्यानें पृथ्वी विकल्याचें व गाय विकल्यानें यज्ञ किंवा सोम विकल्याचें पाप लागतें. शिजलेलें अन्न मोबदला देऊन कच्चें अन्न घेणें रास्त नाहीं असें शहाण्यांचें मत आहे. खाण्यासाठीं अन्न पाहिजे असेल तर कच्चें देऊन शिजलेलें विकत घ्यावें. आह्मी हें शिजलेलें अन्न खातों, तूं हें शिजीव, अशा करारानें अदलाबदल केल्यास त्यांत पाप नाहीं.असे व्यवहार नेहमीं चालत आले आहेत.'

यानंतर युधिष्ठिरानें विचारिलें. 'आतां सर्वच प्रजांनीं धर्म सोडून हातांत शस्त्र घेतल्यामुळें राजाचें सामर्थ्य कमी झालें असतां राजानें कशा रीतीनें आपली हुकमत चालवावी तें सांगा.'

भीष्म ह्मणाले. 'अशा प्रसंगीं दान, तप, यज्ञ, निर्द्रोहबुद्धि, आत्मनिग्रह यांनीं ब्राह्मणप्रमुख वर्णांनीं आपलें कल्याण पाहून घ्यावें; यांपैकीं ज्यांच्यामध्यें वेदाचें बळ असेल त्यांनीं चोहोंकडून उठून राजाला जोर द्यावा. **कारण शक्ति कमी होऊं लागली असतां राजाला ब्राह्मणाचाच आधार आहे.** ह्मणून शाहण्यानें या जोरावरच उठावें. राजानें जय मिळवून राष्ट्रांत जिकडे तिकडे स्वस्थता केली असतां सर्व वर्णांनीं आपापले धर्म यथायोग्य रीतीनें पाळावें. **परंतु बेबंदशाई मातून चोरांनीं सर्व गोलंकार करून टाकला असतां सर्व वर्णांनीं** हत्यार घेतलें असतां, त्यांना बट्टा लागत नाहीं.' युधिष्ठिर ह्मणाला. 'आतां सर्वच क्षत्रिय जर ब्राह्मणाविरुद्ध उठतील तर त्या ब्राह्मणांचा त्राता कोण? त्यानें कोणता धर्म स्वीकारावा? किंवा त्यानें काय करावें?'

भीष्म ह्मणाले, '**तपानें, ब्रह्मचर्यानें, शस्त्राच्या व बलाच्या सामर्थ्यानें, सरळपणें किंवा कपटानें त्यांनीं क्षत्रियांना वठणीला आणावें.** क्षत्रिय विशेषेंकरून ब्राह्मणांशीं मर्यादा सोडून वागूं लागला असतां ब्राह्मणानेंच त्याला वठणीला आणलें पाहिजे. कारण क्षत्रियांची उत्पत्ति ब्राह्मणापासून असल्यामुळें त्यांचें जोरावलेलें अतुल तेज व बल ब्राह्मणाच्या ठिकाणीं प्रगट होतें. ब्रह्मवीर्य कमी पडून क्षत्रवीर्य दुबळें झालें असतां, त्याचप्रमाणें सर्व वर्ण ब्राह्मणाविरुद्ध उठले असतां जे लोक जिवाची पर्वा न करतां ब्राह्मणासाठीं, धर्मासाठीं व आपल्यासाठीं युद्ध करण्याला तयार होतात ते धन्य होत. कारण ब्राह्मणासाठीं वाटेल त्यानें शस्त्र घ्यावें असें सांगितलें आहे; उत्तम रीतीनें वेदाध्ययन केल्यानें, कडक तप आचरल्यानें किंवा कांहीं न खातां अग्नीमध्यें शिरण्यानें जी गति मिळावयाची ती गति अशा शूरांना मिळते. ब्राह्मणानें कारणपरत्वें तिन्ही वर्णांवर हत्यार उचललें असतां त्याला दोष लागत नाहीं. अशा प्रकारें देह ठेवण्यापेक्षां दुसरा श्रेष्ठ धर्म नाहीं. जे लोक ब्राह्मणांचा द्वेष करणाऱ्यांना वाटेवर आणण्यासाठीं अशा रीतीनें प्राणांची आहुति देतात त्यांना मिळणारे लोक सुदैवानें आह्मांला मिळो. ज्याप्रमाणें अश्वमेधाच्या शेवटीं अवभृतस्नानानें याजक पावन होतात, त्याप्रमाणें दुष्टांना नाहींसें केल्यानें किंवा रणांत शस्त्रानें मेल्यानें क्षत्रिय पवित्र होतात. देशकालानुरूप धर्माला अधर्माचें व अधर्माला धर्माचें रूप येत असतें. देशकालाचा महिमा असा आहे. सर्वांशीं मित्रत्वानें वागणारा भूतदयेनें दुसऱ्यासाठीं क्रूरकर्म करूनही स्वर्गाला जातो. आत्मसंरक्षणासाठीं, वर्णावर्णांमध्यें बिघाड झाला असतां तो नीट करण्यासाठीं व दुष्ट लोकांना वाटेवर आणण्यासाठीं ब्राह्मणानें शस्त्र धरलें असतां दोष लागत नाहीं.'

यावर 'चोरांचा उठाव होऊन वर्णसंकर झाला असता व क्षत्रियांना आपलें कर्तव्य कळेनासें झालें असतां एकाद्या बलवान ब्राह्मणानें, वैश्यानें किंवा शूद्रानें शासन करण्याचें काम आपल्या शिरावर घेऊन चोरांपासून प्रजेचें रक्षण करावें किंवा न करावें? त्याला तें करूं द्यावें किंवा न द्यावें? अशा प्रसंगीं क्षत्रियांवांचून दुसऱ्यानें शस्त्र घ्यावें असें दिसतें,' असें युधिष्ठिर ह्मणाला; तेव्हां भीष्म ह्मणाले, 'असा पुरुष अपार अशा भवसमुद्रामध्यें तारून नेण्याला नाव होतो; मग तो शूद्र असो किंवा दुसरा कोणी

असो, तो सर्वस्वी मानाला पात्र आहे. ज्याच्या साहाय्यानें चोरांनीं भंडावून सोडून जर्जर झालेल्या अनाथांना सुखांत रहातां येतें त्याला त्यांनीं आपल्या बांधवाप्रमाणें समजून प्रेमपूर्वक मान द्यावा. जो आपल्याला निर्भय करतो तो नेहमीं मानाला पात्र असतो. जो बैल कामाला उपयोगी नाहीं, जी गाय दूध देत नाहीं; ज्या बायकोला मूल होत नाहीं, किंवा जो राजा रक्षण करीत नाहीं त्यांचा काय उपयोग? लांकडाचा हत्ती, चामड्याचा हरीण, षंढपुरुष, माळरान व रक्षण न करणारा राजा हीं सर्व कोरड्या ढगाप्रमाणें व्यर्थ आहेत. जो नेहमीं भल्यांचें रक्षण करून वाइटांना त्यांच्या वाटेपासून परतवील असाच राजा करावा.

आतां ऋत्विज कसा असावा सांगतों ऐक. ज्यांनीं ऋत्विजपणा करावयाचा त्यांना छंदाचें, सामाचें व श्रुतींत सांगितलेल्या कर्मांचें ज्ञान असलें पाहिजे. त्यांचें व राजाचें एकमत असून राजाशीं त्यांचें भाषण गोड असावें. ते एकमेकांशीं स्नेहानें असून त्यांची समदृष्टि असावी. ते दुष्ट नसावेत; सत्यवचनी असावेत; तसेंच सरळ असून त्यांनीं व्याजबट्टा करूं नये; त्यांनीं कोणाचा हेवा करूं नये; अभिमान धरूं नये; त्यांना भीड असावी; सहनशीलता असावी; ते दमशमांनीं युक्त असावेत. बुद्धिमान असावेत. त्यांनीं कोणाला पीडा देऊं नये व वासना व द्वेष यांचा त्यांना गंधही असूं नये. त्यांचे ठिकाणीं वेदज्ञान, विशुद्ध वर्तन व कुलीनता हे गुण असावेत. ज्ञानामध्येंच त्यांना संतोष वाटावा.' युधिष्ठिर ह्मणाला, 'वेदांमध्यें, यज्ञांत दक्षिणा देण्याविषयीं सांगितलें आहे. परंतु ज्याच्या त्याच्या ऐपतीप्रमाणें ज्यानें त्यानें इतकें द्यावें किंवा तितकें द्यावें हें कांहीं सांगितलें नाहीं. श्रद्धावानानें यज्ञ करावा अशी वेदाची आज्ञा आहे. परंतु त्यांत सांगितलेल्या रीतीनें दक्षिणा न देतां त्याबद्दल चरू देऊन यज्ञ केला असतां मग श्रद्धेचा काय फायदा?'

भीष्म ह्मणाले, 'वेदांकडे दुर्लक्ष करून कपटभाव किंवा फसवाफसव ठेवल्यानें कोणाचें कल्याण होत नाहीं. अशी बुद्धि तूं मनांतसुद्धां आणूं नकोस. दक्षिणा हें वेदांचें एक अंग असून वेदांचें पोषक आहे. दक्षिणेवांचून केलेले यज्ञ फलद्रूप होत नाहींत. परंतु दक्षिणेसंबंधीं म्हणशील तर एक पूर्ण पात्र वाटेल त्या दक्षिणेची बरोबरी करणारें आहे. सोम हा ब्राह्मणांचा राजा आहे, असें वेदांत सांगितलें आहे. तो पोट भरण्याकरितां नव्हे तर यज्ञासाठीं लोक विकून ह्या विकून आलेल्या पैशानें यज्ञ केला असतां त्यांत पाप न लागतां यज्ञाला साहाय्यच होतें, असें ऋषींचें मत आहे. यज्ञ करणारा मनुष्य, यज्ञ व सोम हे तिन्ही चोख पाहिजेत. वाईट चालीचा मनुष्य आपल्याला व दुसऱ्या कोणालाच उपयोगीं पडत नाहीं. फार शरीर कष्टवून केलेला यज्ञ श्रेयस्कर नाहीं असें म्हटलें आहे. आतां यज्ञापेक्षां तप श्रेष्ठ म्हटलें आहे, तें तप कोणतें तें सांगतों ऐक. कोणाला पीडा न देणें, खरें बोलणें, दुष्टपणा न धरणें, आत्मनिग्रह ठेवणें, सर्वांवर दया करणें याला शहाण्यांनीं तप ह्मटलें असून, शरीर सुकविणें हें कांहीं तप नव्हे. वेद खोटे मानणें, शास्त्राची आज्ञा न पाळणें आणि सर्व बंधनें तोडून टाकणें हें स्वतःच्याच नाशाला कारण आहे.

आतां जे ज्ञानयज्ञ करतात त्यांचा विधि तरी असाच आहे. योगसाधन हेंच त्यांचें स्रुक् असून मन हेंच आज्य आहे. व उत्तम ज्ञान पवित्र हवि आहे. वांकडेपणा प्राणिमात्राला मृत्यूकडे नेऊन पोहोंचवितो व सरळपणा ब्रह्मपदाला पोहोंचवितो, हेंच काय तें ज्ञानाचें तत्त्व आहे.'

---

## १०७ राजसचिव. (१२. ८०–८२)

युधिष्ठिर ह्मणाला, 'लहानसान गोष्ट सुद्धां कोणाच्या साहाय्यावांचून एकट्याच्या हातून शेवटाला जाणें कठीण आहे; मग राज्यासंबंधानें तर ती फारच कठीण असली पाहिजे. राजाच्या प्रधानाचें शील कसें असावें? त्याचा आचार कसा असावा? त्यानें कशा प्रकारच्या मनुष्यावर विश्वास ठेवावा, व कशा प्रकारच्या मनुष्यावर विश्वास ठेवूं नये?' भीष्म ह्मणाले, 'राजाचें मित्र चार कारणांनीं होतात. परस्पर साहाय्याच्या आशेनें, भक्तीमुळें किंवा स्वाभाविकपणें झालेला व कांहीं उपायानें करून घेतलेला. धर्मात्मा हा राजाचा पांचवा मित्र समजला आहे. परंतु तो कांहीं अमक्या एकाचा किंवा तमक्याचा मित्र नसतो. जिकडे धर्म तिकडे

तो असतो; आणि धर्माप्रमाणें तो वागतो. अशा मनुष्याला जें आवडत नसेल ती गोष्ट त्याला कधीं सांगूं नये. कारण राजांना जय मिळविण्यासाठीं प्रसंगीं धर्माचें तर प्रसंगीं अधर्माचें अवलंबन करावें लागतें. वर सांगितलेल्या चार मित्रांपैकीं मधले दोघे उत्तम असून पहिला व शेवटचा यांविषयीं संशयित राहिलें पाहिजे. जें काम राजानें स्वतः केलें पाहिजे त्या संबंधानें तर कोणावरच विश्वास ठेवूं नये. मित्र राखण्यामध्यें राजानें कधींही हयगय करूं नये. कारण त्यापासून राजाचें नुकसान होतें. वाईट असेल तो चांगला होतो व चांगला असेल तो वाईट होतो. शत्रु मित्र होतो व मित्र शत्रु होतो. ह्मणून चंचल मनाच्या मनुष्यावर पूर्ण विश्वास कोणीं टाकावा ? ह्मणून राजानें सर्व महत्त्वाचें काम स्वतः करावें. कोणावर पूर्ण विश्वास टाकणें हें धर्मार्थाला विघातक आहे. तसेंच ज्याच्या त्याच्यावर अविश्वास असणें हें मरणाहून मरण आहे; विश्वास टाकणें हा अकालिक मृत्यु आहे. कारण विश्वास टाकणारा घोंटाळ्यांत येतो. ज्याच्यावर विश्वास टाकावयाचा त्याचे इच्छेवर त्याचें जीवित अवलंबून रहातें. म्हणून कांहीं बाबतींत विश्वास टाकावा व कांहीं बाबतींत संशय धरावा ही पूर्वापार नीति लक्षांत ठेवावी. मी मेल्यावर हा पैसा अमक्याला जाईल असें ज्यासंबंधानें वाटतें अशा मनुष्यासंबंधानें नेहमीं संशयित रहावें. शहाणे त्याला शत्रु समजतात. ज्याच्या शेतांत पाणी शिरल्यावांचून आपल्या शेतांत येण्याची भीति नाहीं, त्याच्या मनांत आल्यावांचून पाण्याचे धक्के फुटत नाहींत. म्हणून पाणी शिरून शेताची नासाडी होईल अशी भीति असणारानें या मधल्या शेतवाल्यास आपल्या बाजूला मिळवून घेणें अवश्य आहे. तसेंच शेजारच्या राजाला शत्रूच्या भीतीनें आपल्या बाजूला करून घेतलें पाहिजे. परंतु तो अमित्र समजून त्याच्यावर विश्वास ठेवूं नये. आपली भरभराट ज्याला कधीं पुरेशी होत नाहीं व आपल्या क्षयानें जो फार दीन होतो तें उत्तम मित्राचें लक्षण सांगितलें आहे. ज्याच्यासंबंधीं आपण नाहींसे झालों असतां तो नाहींसा होणार अशी खात्री असेल त्यावर बापाप्रमाणें विश्वास टाकावा; त्याची शक्ति वाढत असली तर आणखी वाढवावी. जो धर्मकर्मामध्यें देखील अपायापासून आपलें रक्षण करतो अशा मनुष्याला उत्तम रीतीनें सांभाळावा. जो त्याचा अपाय व्हावा अशी इच्छा धरतो तो आपला शत्रु समजावा. आपल्या संकटासंबंधानें ज्याला नेहमीं भीति वाटते व आपल्या भरभराटीनें ज्याला वाईट वाटत नाहीं त्याला आत्मीय समजावें. रूप, वर्ण व आवाज चांगला असून जो कुलीन आहे, जो सुखदुःखांचे ठिकाणीं समान व असूयाहीन आहे, तो वरच्याहून कमी दर्जाचा होय. परंतु जो बुद्धिमान असून आठवणीचा आहे, जो दक्ष आहे, जो स्वभावतः क्रूर नाहीं, मान या किंवा न या ज्याच्या मनांत वाईट यावयाचें नाहीं, असा मनुष्य मग तो ऋत्विज असो, आचार्य असो, किंवा मित्र असो, तो प्रधान होऊन घरीं राहील तर मानाला पात्र आहे. धर्मार्थाच्या बाबतींत सर्व विचार व इंगित त्याला कळवून बापाप्रमाणें त्याच्यावर विश्वास टाकण्याला हरकत नाहीं. दोन किंवा तीन लोक कधीं एकाच कामावर नेमूं नयेत. कारण ते एकमेकांचा हेवा करतात. एकाच कामाकडे अनेक लावले असतां त्यांच्यामध्यें फूट पडते असा अनुभव आहे. जो मनुष्य मोठा कीर्तिमान आहे, नीतीची मर्यादा ज्याच्या हातून सुटत नाहीं, समर्थ आहेत त्यांचा जो द्वेष करीत नाहीं, भलतीसलती गोष्ट ज्याच्या हातून होत नाहीं, जो कांहीं इच्छा धरून भयानें, लोभानें किंवा रागानें धर्म सोडीत नाहीं, जो काम करण्यामध्यें दक्ष आहे व ज्याचें बोलणें असावें तसें असतें अशा मनुष्याला मुख्य प्रधान करावा. तो कुलीन असावा, शीलसंपन्न असावा, सहनशील असावा, फुशारक्या मारणारा नसावा, शूर असावा, थोर असावा, विद्वान असावा, कार्याकार्य त्याला कळत असावें, व अशाच गुणांचे लोक निरनिराळ्या कामांवर प्रधान नेमावेत. त्यांना मान देऊन त्यांची योग्य व्यवस्था लावून द्यावी. ह्मणजे त्यांचें चांगलें साहाय्य मिळून त्यांच्या त्यांच्या योग्यतेप्रमाणें, त्यांना कामगिऱ्या दिल्यानें मोठमोठ्या कल्याणाच्या गोष्टी ते घडवून आणतात, आणि चढाओढीनें सर्व कामें करून एकमेकांच्या विचारानें सर्व कामांत यश मिळवून देतात.

बातमीपासून सुद्धां नेहमीं मृत्यूसारखेंच भय बाळ-

न असावें. मांडलिक राजाप्रमाणें राजाचें वैभव ज्ञातीला सहन होत नाहीं. सरळ, कोंवळ्या अंतःकरणाचा, दानशील, भिडस्त, सत्यवादी अशा राजाचा नाश झाला असतां ज्ञातीशिवाय दुसऱ्या कोणालाही आनंद होत नाहीं. परंतु ज्यांना ज्ञाती नाहींत असे लोकही मोठे सुखी नसतात. ह्मणून ज्ञातीला अगदीं तुच्छही करूं नये. ज्याला ज्ञाती नाहीं अशा मनुष्याचा शत्रूच्या हातून मोड होतो. दुसऱ्यांनीं अपाय केला असतां ज्ञातींचाच मोठा आधार असतो. ज्ञातींपैकीं एकाची खोडी काढलेली दुसऱ्याला सहन होत नाहीं. त्यांना आपलीच ती खोडी काढली असें वाटतें. तेव्हां ज्ञातींपासून जसे फायदे आहेत तसे तोटेही आहेत. ज्याला ज्ञाती नाहीं त्याला कोणावर मेहेरबानी करावयाची नसते व कोणापुढें नमावयाचेंही नसतें. बरें व वाईट दोन्ही ज्ञातींमध्यें दिसून येतात. त्यांचा सन्मान करावा, तोंडानें व कृतीनें त्यांच्याशीं गोड असावें. त्यांचे नेहमीं प्रिय करावें. अप्रिय एवढें सुद्धां करूं नये. त्यांवर विश्वास टाकल्याप्रमाणें दाखवावें; परंतु विसंबून मात्र कधीं राहूं नये. अशा रीतीनें काळजीपूर्वक वागल्यानें त्याचे शत्रू देखील खूष होऊन मित्र बनतात.

जो ज्ञाती, संबंधी, मित्र, शत्रु व मध्यस्थ यांचे ठिकाणीं असा वागतो तो चिरकाळ नांवलौकिक मिळवितो. आतां ज्यांना वश करून घेणें इतकें कठिण आहे याबद्दल पूर्वी नारद व श्रीकृष्ण यांमध्यें झालेला संवाद सांगतों ऐक.'

श्रीकृष्ण ह्मणाला, 'जिव्हाळ्याच्या मनुष्याशिवाय कोणाला आपलें हृदय कळवूं नये. व तोही मूर्ख किंवा चंचल मनाचा असेल तर त्यालाही तें सांगूं नये. ह्मणून आपलें बुद्धिबल जाणून मी आपल्याला कांहीं विचारतों. ज्ञातींच्या वैभवाचें गोडवें गाऊन मी जरी त्यांचें दास्य करीत नाहीं तरी माझ्या सर्व वैभवापैकीं मी अर्धें वैभवच भोगतों; ते टाकून बोलतात तें सर्व सहन करतों. अग्नि उत्पन्न करणाऱ्या अरणीप्रमाणें त्यांचे दुःशब्द माझ्या हृदयाला पीडा देतात. माझ्या वैभवाला कांहीं कमी नाहीं. वृष्णि व अंधक या दोघांमध्यें पुष्कळ भाग्यशाली, बलवान, उत्साहसंपन्न, धैर्यवान असे आहेत. ते ज्या बाजूला मिळणार नाहींत त्यांचा सर्वस्वी नाश होऊन ते ज्या बाजूला मिळतील त्यांचें सर्व कांहीं साधेल. दोघेही एकमेकांविरुद्ध माझें मन वळवीत असल्यामुळें मला कोणाचीच बाजू धरवत नाहीं, आहुक व अक्रूर ह्या दोघांवरही ओढा असणें व दोघांवरही तो नसणें ह्या दोन्हीं गोष्टी दुःखाला सारख्याच कारण आहेत. एकमेकांशीं जुगार खेळणाऱ्या दोघां जुगारबाजांच्या आईप्रमाणें मी दोघांनाही जय यावा अशी आशा करीत आहें. तेव्हां अशा रीतीनें मी त्रासून गेलों असल्यामुळें माझें व ज्ञातीचें कशांत कल्याण आहे तें आपणच मला सांगा.'

नारद ह्मणाले, 'बाह्य किंवा अंतस्थ अशीं दोन प्रकारचीं संकटें आपल्या कृतीनें किंवा दुसऱ्या कारणांनीं मनुष्यावर येऊन गुदरतात. त्यांपैकीं हें अंतस्थ संकट तूं तुझ्या कर्मानेंच आपल्यावर ओढून घेतलें आहेस. बलदेव आणि दुसरी भोज मंडळी पैशासाठीं, लहरीखातर किंवा त्याच्या शब्दानें वळून किंवा द्वेषानें अक्रुराच्या बाजूला वळली आहेत. तुझ्यासंबंधानें पहावें तर तूं आपलें सर्व ऐश्वर्य दुसऱ्याला देऊन टाकलें आहेस. आणि जरी तुला मनुष्यबळ आहे तरी तुझें ऐश्वर्य ज्ञातीच्या स्वाधीन केलें असल्यामुळें, बाहेर टाकलेल्या ओकाप्रमाणें बभ्रू व उग्रसेन यांना दिलेलें राज्य, विशेषतः ज्ञातीमध्यें फूट पडेल या भीतीनें तुला परत घेतां येत नाहीं. असें करण्यांत पुष्कळ खटपट पडून पैशाची वगैरे मोठी हानि होणार आहे. ह्मणून जें शस्त्र पोलादी नसून मऊ परंतु सर्वांचें हृदय छाटून काढणारें आहे असें शस्त्र फिरून फिरून चांगल्या रीतीनें पाजळून सर्वांची जीभ छाटून काढून त्यांना मुके कर. आतां अशा प्रकारचें शस्त्र कोणतें तें सांगतों ऐक.

आपल्या सामर्थ्याप्रमाणें नेहमीं त्यांना खावयाला घालून त्यांचें बोलणें सहन कर. व सरळपणा व कोमल अंतःकरण ठेवून ज्यांच्या त्यांच्या योग्यतेप्रमाणें त्यांचा सत्कार कर. हेंच तें विन पोलादी हत्यार. ते कडू व लागून बोलूं लागले असतां मृदु शब्दांनीं त्यांना गप्प करून त्यांचें हृदय व मन गार कर. जो थोर मनुष्य नाहीं व आपल्या मनावर ज्याचा दाब नाहीं अशाला एखादें मोठें जूं मानेवर घेतां येणें शक्य नाहीं. तेव्हां वृष्णींना ताब्यांत ठेवण्याचें हा भार डोक्यावर घेऊन वहा. मोठें ओझें सुद्धां सपाटीवर

वाटेल तो बैल वाहून नेतो. परंतु कसलेला बैल असेल तोच मोठें ओझें चढणीवर वाहून नेऊं शकतो. फुटीच्या योगानें सर्व ज्ञातीचा फडशा पडणार आहे,व ह्या ज्ञातीचा तूं मुख्य आहेस. तुझ्यामुळें ही जूट फुटणार नाहीं अशी व्यवस्था कर. बुद्धि, क्षमा, इंद्रियनिग्रह, प्रसंगीं पदराला खार लावून घेणें हेच शहाण्यांमधले मुख्य गुण होत. आपल्या पक्षाला भरभराटीला चढविणें हें चांगलें, यशस्कर व आयुष्यवर्धक काम आहे. ज्ञातीचा ज्यामध्यें फडशा पडणार नाहीं अशी तजवीज कर. तुला सर्व मागचें पुढचें कळतें. त्याचप्रमाणें सर्व नीति ठाऊक आहे. यादव, कुकुर, भोज, अंधक हे सर्व तुझ्यावरच अवलंबून आहेत. ऋषींना सुद्धां तुझी बुद्धि मान्य आहे. तूं सर्व प्राणिमात्रांचा गुरु आहेस. तुझ्या साहाय्यानेंच सर्व यादव सुखांत राहूं इच्छितात. ' असें ह्मणून भीष्म म्हणाले, ' हा पहिला उपाय झाला. आतां दुसरा सांगतों ऐक. जो कोणी राजकार्य साधून देईल त्याचें राजानें रक्षण करावें. प्रधान खजिन्यावर डल्ला मारीत असतां तें जो कोणी राजाला कळवील, मग तो नोकर असो किंवा दुसरा कोणी असो, राजानें त्याचें ऐकून घेऊन प्रधानापासून त्याचें संरक्षण करावें. अशा प्रकारचे अफरातफर करणारे अमात्य त्याचें फार नुकसान करतात. राजाचा खजिना गडप करूं पाहणारे एकजूट होऊन खजिन्याचें रक्षण करणाऱ्याला पीडा देतात, व त्याचें रक्षण न होईल तर त्याचा नाश होतो. या बाबतींत कालकवृक्षीय मुनि व कोसल देशचा क्षेमदर्शी राजा यांजमधील गोष्ट लक्षांत ठेवण्याजोगी आहे. ते मुनि हातांत कावळ्याचा पिंजरा घेऊन, ' हा मला मागचें, पुढचें व सांप्रतचें सर्व सांगतों, ' असें सांगत पुष्कळ लोकांसह बातमी काढण्यासाठीं क्षेमदर्शीच्या राज्यांतून फिरत असतां सर्व कामदारांचीं वाईट कृत्यें त्यांच्या कानावर आलीं. तेव्हां सर्व कामगार राजाला बुचाडणारे आहेत असें कळून आल्यावर ते कावळ्याला घेऊन राजाला भेटण्याला आले. दरबारांत आल्यावर त्याच्या प्रधानाला अलंकार वगैरे घातलेला थाटांत बघून ते ह्मणाले,'अमक्या अमक्या ठिकाणीं असें असें तूं केलेस. फलाण्या फलाण्याला तें ठाऊक आहे. राजाचा खजिना तूं गडप केलास असें हा कावळा मला सांगतो. तेव्हां तें एकदम तूं कबूल कर.' राजाच्या खजिन्यावर डल्ला देणाऱ्या इतरांनाही ते असेंच ह्मणाले. त्यांच्या ह्मणण्यापैकीं एवढें देखील खोटें ठरलें नाहीं. याप्रमाणें सर्व कामगारांना यांनीं दोष दिल्यामुळें रात्रीं ऋषि निजले असतां कावळ्याला त्यांनीं बाण मारला. सकाळीं उठल्यावर त्याला बाण लागलेला पाहून ते क्षेमदर्शी राजाला ह्मणाले, 'राजा तूं सर्वांचा स्वामी, प्राण व ऐश्वर्य यांचा मालक असल्यानें तुला मी अभय मागतों. तुझी परवानगी होईल तर तुझ्या हिताची गोष्ट बोलतों. तुझ्या राष्ट्रामध्यें दुष्ट नोकर कोण आहेत, चांगले कोण आहेत, व नोकरापासून तुला भीति काय आहे ? हें कळून घेऊन सर्व गोष्ट तुझ्या कानांवर घालण्यासाठीं मी तुझ्याकडे आलों आहें. राजाच्या उपयोगीं पडणाऱ्याचें दुर्दैव पूर्वीच्याच विद्वानांनीं सांगून ठेविलें आहे. त्यांचें दैव मोठें खडतर व वाईट आहे. राजाशीं संबंध जुळणें ह्मणजे विषारी सापाशीं संबंध जुळल्याप्रमाणें आहे. राजाला पुष्कळ मित्र असतात. त्याचप्रमाणें पुष्कळ शत्रूही असतात. त्या सर्वांपासून राजाच्या उपयोगीं पडणाऱ्याला भीति असते. त्याचप्रमाणें राजापासून सुद्धां कोणच्या घटकेला भीति उत्पन्न होईल याचा नेम नसतो. राजकार्यामध्यें पूर्ण दुर्लक्ष होणें शक्य नाहीं व शहाण्यानें तें करूंही नये. कारण दुर्लक्ष झाल्यानें राजा बिघडेल व त्यापासून जिवाला अपाय होण्याची भीति आहे. राजाशीं कसें वागावें याचें पूर्ण ज्ञान करून घेऊन,पेटलेल्या अग्नीप्रमाणें मोठ्या हुशारीनें त्याच्याजवळ राहून विषारी सापाप्रमाणें मोठ्या हुशारीनें शीर हातांत घेऊन त्याची शुश्रूषा करावी. त्याच्याशीं भलतें सलतें बोलूं नये, त्याच्यापुढें वेड्या वांकड्या रीतीनें बसूं नये, वेड्या वांकड्या रीतीनें चालूं नये किंवा वेडेवांकडे चाळे करूं नयेत. देवतेप्रमाणें राजा प्रसन्न झाला असतां वाटेल तें साधून देईल. त्याचप्रमाणें अग्नीसारखा तो खवळला असतां समूळ जाळून टाकतो. तुझें मी चांगलें कल्याण करून देईन. आमच्यासारखा अमात्य संकटसमयीं बुद्धीचें साहाय्य देतो. ह्या तुझ्यावर उपकार करणाऱ्या कावळ्याचा तुझ्यासाठीं नाश झाला आहे. पण या बाबतींत तुला मी दोष देत

नाहीं. कारण ज्यांनीं हें केलें आहे त्यांना तूं कांहीं प्रिय नाहींस, आपलें हिताहित कळून घे. दुसऱ्यावर विसंबून राहूं नकोस. सर्व भूतमात्रांचें अकल्याण करूं इच्छिणारे, सर्व स्वाहा करूं पाहणारे असे लोक तुझ्या वाड्यांत आहेत. त्यांच्याशीं माझें वैर पडलें आहे. जो कोणी तुझा नाश करून मग राज्य उपटण्याची इच्छा धरील त्याची ती इच्छा तुझ्या अगदीं जवळच्या लोकांना हातीं घेतल्याशिवाय साधावयाची नाहीं. तर अशा लोकांच्या भीतीनें मी आपला दुसरीकडे जातों. निष्काम बुद्धीनें तुझें हित करूं पहाणाऱ्या माझ्या कावळ्याला त्यांनीं मारून टाकलें आहे. पुष्कळ सुसरी, मोठमोठे भयंकर मासे यांनीं भरलेली ही तुझी राष्ट्ररूपी नदी तसेंच, झाडांचे सोट, धोंडे, कांटे यांनीं त्याचप्रमाणें सिंहांनीं व वाघांनीं भरून शिरकाव होण्याला कठीण अशी ही तुझी राष्ट्ररूपी भयंकर दरी मी ह्या बिचाऱ्या कावळ्याच्या साह्यानें उतरून पार पडलों आहे. भयंकर आंधारांतून दिव्याच्या साहाय्यानें पार पडतां येतें व अगाध पाण्यांतून नावेच्या साहाय्यानें पार पडतां येतें. परंतु राज्यसंकटामधून पार पडण्याला शहाण्यांना अद्यापि कांहीं उपाय कळला नाहीं. आंधारानें भरून राहिलेलें हें तुझें राज्य भयंकर जंगलाप्रमाणें माजून राहिलें आहे. या ठिकाणीं तुला देखील निःशंकपणें राहतां येणें कठीण, मग माझी गोष्ट राहिली बाजूला. ह्मणून ज्या ठिकाणीं बऱ्यावाइटाची निवड नाहीं, अशा ह्या ठिकाणीं राहणें चांगलें नाहीं. या ठिकाणीं चांगल्या कृत्याबद्दल सुळीं जावें लागून दुष्कृत्य करणाऱ्याला निःशंक राहतां येणार आहे. ह्मणून या ठिकाणीं स्वस्थ राहणें ठीक नाहीं. शहाण्यानें एकदम पोबारा केला पाहिजे. सीता नांवाची एक नदी असून तींत होडग्ीं सुद्धां बुडतात असें ह्मणतात. अशा प्रकारचें हें राष्ट्र सर्वभक्षक जाळ्यानें पसरलें आहे. मधाच्या खालील कड्याप्रमाणें किंवा विषमिश्रित अन्नाप्रमाणें तूं आहेस. विषारी सापांनीं वेढलेल्या कुव्याप्रमाणें तूं भयंकर आहेस. जिच्या तीराची चढण भिंतीप्रमाणें उभट असल्यामुळें पाण्यापर्यंत जाऊन पोहोंचणें कठीण आहे, अशा कार्वी व वेत यांनीं भरलेल्या गोड पाण्याच्या नदीसारखा किंवा कुत्रीं, गिधाडें, कोल्हीं यांच्यामध्यें असलेल्या राजहंसासारखा तूं आहेस. ज्याप्रमाणें एका भल्या मोठ्या झाडाच्या आश्रयानें भलें मोठें जंगल वाढून आपल्या वाढीनें पुढें तें त्या झाडाला झांकून टाकतें; व त्या सर्पणाच्या साहाय्यानें भयंकर वणवा त्याच झाडाला जाळून टाकतो, तशा प्रकारचे तुझे अमात्य आहेत. त्यांचा नीट शोध कर. तूंच त्यांना अमात्य केलेंस व त्यांना सांभाळलेंस व ते आतां तुला फसवून तुझी नुकसानी करूं पाहतात. त्यांची चूक उघडकीला न आणतां, साप असलेल्या घरांत राहण्याप्रमाणें मी या ठिकाणीं तुझ्या नोकरांचें शील कसें आहे हें ओळखण्यासाठीं त्याचप्रमाणें तूं कसा आहेस, प्रजांना तूं आवडतोस किंवा नाहीं, प्रजावर तुझें प्रेम आहे किंवा नाहीं, हें पाहण्यासाठीं आजपर्यंत दिवस काढले. भुकेल्याला ज्याप्रमाणें अन्न तसा तूं मला फार आवडलास; परंतु तहान नसलेल्याला जसें पाणी आवडत नाहीं तसें तुझे अमात्य मला आवडत नाहींत. मी तुझें हित करणारा आहें हाच दोष माझ्यामध्यें त्यांना दिसला. दुसरीं कांहीं कारणें यांत मला दिसत नाहींत. माझ्या संबंधानें असा वाईट भाव धरण्याला मी त्यांचा कांहीं द्वेष करीत नाहीं. डवचलेल्या सापाप्रमाणें ज्यांच्या हृदयांत काळें आलें आहे अशा वैऱ्यापासून नेहमीं मनुष्यानें भिऊन असलें पाहिजे.' असें त्यांचें भाषण ऐकून राजा ह्मणाला, 'माझा मानपान व सत्कार घेत आपण खुशाल माझे घरीं रहा. ज्यांना आपण नको आहांत, अशा लोकांना माझ्या घरीं ठाव मिळणार नाहीं. जे असे लोक आहेत ते आपणच हुडकून काढून पुढें त्यांचें काय करावयाचें हेंही आपणच विचार करून ठरवा. राजशासन बरोबर रीतीनें चालून ज्यानें पुण्य माझ्या पदरांत पडेल, असा विचार सांगून मला चांगल्या वाटेला लावा.' मुनी ह्मणाले, 'त्यांचा गुन्हा त्यांना न कळवितां एकेकाचें सामर्थ्य आधीं कमी कर. आणि मग त्यांचा दोष त्यांच्या पदरीं घालून एकेकाला नाहींसा कर. एकच अपराध केलेले असे हे पुष्कळ असल्यामुळें हे कांट्यांना देखील चिरडून टाकतील. मसलत फुटेल या भीतीनें मी तुला हें सांगत आहें. आह्मी ब्राह्मण कृपाळू असून कड

क शिक्षा कोणाला करीत नाहीं. स्वतः सारखेंच तुझें त्याचप्रमाणें दुसऱ्यांचें कल्याण इच्छितों. राजा, मी कोण आहें सांगतों ऐक. मी कालकवृक्षीय मुनि तुझा संबंधी तुझ्या बापाचा मित्र आहें. तुझा बाप मेला असतां राज्यावर प्रसंग गुदरल्यामुळें सर्व इच्छा सोडून मी तप केलें. फिरून चूक होऊं नये ह्मणून स्नेहामुळें तुला मी सांगतों. असें मन चळूं देऊं नकोस. राज्य सहज मिळालें असल्यानें त्याच्या संबंधी सुखदुःखाचा विचार कर. राज्य प्रधानावर सोंपवून अशी चूक करूं नकोस. ' पुढें तो राजा त्यांच्या हितकर वचनाला अनुसरून सुखी झाला. '

---

## १०८ मंत्रिमंडळ आणि शिक्षा.
## ( १२.८३–८५ )

पुढें, ' कायदेकानु करणारे सभासद, साहाय्यकर्ते व चांगला सल्ला देणारे सुहृद, सैन्यवर्ग व सल्लागार कसे असावे, ' म्हणून युधिष्ठिरानें विचारलें असतां भीष्म ह्मणाले, ' भिडस्त, आत्मनिग्रही, खरेपणा व सरळपणा असणारे व प्रसंगीं योग्य सल्ला देणारे असे सभासद असावेत. जे नेहमीं आपल्या जवळ असतात, जे शूर, व विद्वान आहेत, जे राजावर मोठे संतुष्ट असून सर्व कृत्यांमध्यें मोठे उत्साहयुक्त असतात, अशांना सर्व संकटसमयीं साहाय्याला घ्यावें. जे कुलीन आहेत त्यांचा नेहमीं सत्कार केल्यानें ते कुचर करीत नाहींत. राजा खुष असो किंवा नाखुष असो, तो संकटांत. असो किंवा मेला असो, जे त्याला सोडीत नाहींत अशा प्रकारचे सुहृद असावेत. कुलीन आपल्या देशामध्यें जन्मलेले, शहाणे, बहुश्रुत, धीट, राजावर भक्ति असणारे असे लोक सैन्यामध्यें असावेत. हलक्या कुळांतली, लोभी, दुष्ट, निलाजरी अशी मंडळी जोंपर्यंत त्यांचा हात ओला आहे तोंपर्यंतच राजाच्या उपयोगीं पडतात. कुलीन, शीलसंपन्न, राजाचा हेतु ओळखून काम करणारे, दयाळू, देशकाल ओळखणारे, स्वामिकार्यामध्यें हित पाहणारे असे लोक सर्व गोष्टींत सल्लागार असावेत. पैसा, मानमरातब व कमी अधिक ऐषआराम दिल्यानें जे आपल्या उपयोगीं पडतील असें वाटतें त्यांना नेहमीं आपल्या सुखाचे वांटेकरी करावेत. ज्यांनीं आपली चाल सोडली नाहीं असे विद्वान, थोर चालींचे व सचोटीचे लोक नेहमीं राजाच्या हितामध्यें दक्ष असून ते त्याला कधीं सोडीत नाहींत. जे हलके असून वचनाची मातब्बरी ज्यांना कळत नाहीं व ज्यांनीं वचन मोडलें आहे त्यांच्यासंबंधानें खबरदारी घ्यावी. एक किंवा पुष्कळ ह्यांपैकीं कोणाला जवळ करावें हा प्रश्न आला असतां एकाला सोडून पुष्कळांना जवळ करावें. परंतु तो एकटा त्या पुष्कळांहून वरचढ असेल तर त्या पुष्कळांना सोडून त्या एकट्याला धरावें. चांगल्याचें लक्षण पुढें दिल्याप्रमाणें आहे. ज्याच्या अंगांत पराक्रम दिसून येतो, कीर्ति हीच ज्याला श्रेष्ठ वाटते, जो वचनाप्रमाणें वागतो, जो समर्थांचा सत्कार करतो व ज्यांचा द्वेष करूं नये अशांचा द्वेष करीत नाहीं, कोणच्याही हेतूनें, भीतीनें, रागानें किंवा लोभानें जो धर्म टाकीत नाहीं, ज्याला गर्व नाहीं, जो खरा धर्मशील व आत्मनिग्रही आहे व ज्याला अभिमान आहे तोच चांगला समजावा.

सर्व प्रसंगीं परीक्षा केलेले असले लोक राजाचे सल्लागार असावेत. याप्रमाणें राजा शहाणपणानें वागूं लागला असतां त्याचे शत्रू सुद्धां त्याचेवर खुष होऊन त्याचे मित्र होतात. कल्याणेच्छु राजानें प्रधानांचे गुणावगुण नीट लक्षांत आणावेत. ते प्रधान याचे संबंधी, आप्त, कुलीन, याच्या देशांत जन्मलेले, खजिन्याची अफरातफर न करणारे, व दुर्वर्तन न करणारे कुलीन, सर्वश्रुत, परंपरागत मीपणा नसणारे असे असावेत. ज्यांची बुद्धि विनयशील आहे, स्वभाव चांगला आहे, ज्यांच्या अंगांत धैर्य, तेज, क्षमा, शुचिर्भूतता, स्वामीचे ठिकाणीं प्रेम, नेकी, शहाणपणा इत्यादि गुण आहेत, जे वयांत आले असून राज्यकारभार पाहण्याला समर्थ आहेत व ज्यांच्यामध्यें कायिक, वाचिक इत्यादि पांच प्रकारचें कपट नाहीं अशा लोकांना चांगल्या रीतीनें पारखून त्यांच्यावर राज्यकारभार सोंपवावा. त्याचप्रमाणें हे मंत्री बोलण्यांत पटाईत, वीर, काम शेवटास नेण्यामध्यें हुशार, कुलीन, जोमदार, इंगित ओळखणारे, फार निष्ठुर नसणारे, देशकाल ओ-

ळखून स्वामीचें हित करणारे असे असावेत. तेजहीन अशा मनुष्याकडे काम सोंपविलें असतां त्याच्या हातून तें योग्य रीतीनें पार पडत नाहीं. असा मनुष्य खात्रीनें सर्व कामांत घोंटाळा आणतो. त्याचप्रमाणें ज्याला ज्ञान थोडें आहे असा मंत्री जरी कुलीन व धर्मार्थकामाकडे लक्ष देणारा असला तरी कोणच्याही सल्लामसलतीसंबंधानें बरें वाईट करण्याचें त्याचे अंगीं सामर्थ्य नसतें; त्याचप्रमाणें जो कुलीन नाहीं त्याला कितीही ज्ञान असलें तरी वाटाड्याशिवाय चालणाऱ्या आंधळ्याप्रमाणें लहानसान कामामध्यें सुद्धां तो गोंधळून जातो. त्याचप्रमाणें ज्याचा विचार ठाम नाहीं, असा मनुष्य बुद्धिमान, विद्वान व कोणच्या वेळीं काय करावें हें कळणारा असला तरी कोणतेंही काम नेटानें त्याचे हातून पार पडत नाहीं. ज्याला ज्ञान नाहीं अशा मूर्खानें एखादें काम हातीं घेतलें तरी त्याचा परिणाम काय होईल हें त्याला कळत नाहीं. ज्याचें आपल्यावर प्रेम नाहीं अशावर विश्वास टाकणें योग्य नाहीं; ह्मणून असल्या मनुष्याला मसलत सांगूं नये. अशा प्रकारचा वांकडा मनुष्य वाऱ्याच्या योगानें झाडाच्या भोंकामध्यें शिरून त्याला जाळून काढणाऱ्या अग्नीप्रमाणें इतर मंत्र्यांशीं संगनमत करून राजाला त्रास देतो. एखादे वेळीं राजा रागावला असतां नोकराला कामावरून दूर करतो, एखादे वेळीं टाकून बोलतो; परंतु फिरून लगेच प्रसन्न होतो. राजावर प्रेम असणाऱ्या मनुष्याला हें सर्व सहन होईल. इकडे मंत्र्याचा राग ह्मटला ह्मणजे विजेच्या कडाडण्याप्रमाणें असतो. राजाचें हित करण्यासाठीं ज्याला तो आवरतां येतो व जो सुखदुःखामध्यें सारखा असतो अशा मनुष्याचा राजानें हिताहितामध्यें सल्ला घ्यावा. जो सरळ नाहीं असा मनुष्य आपल्यावर प्रेम करणारा असून मोठा शहाणा व इतर सर्व गुणांनीं संपन्न असा असला तरी त्याला आपली मसलत सांगूं नये. त्याचप्रमाणें जो शत्रूंशीं मिळून पौरजनांना तुच्छ करतो तो आपला वैरी समजून त्यालाही आपली मसलत सांगूं नये. तसाच जो विद्वान नाहीं, शुद्धशील नाहीं, ताठ्यानें वागणारा, शत्रुसेवक, फुशारकी मारणारा रागीट व लोभी आहे अशाला आपली मसलत सांगूं नये. एखादा मनुष्य नवीन आला असेल तर तो आपल्या ठिकाणीं प्रेमानें असून मोठा ज्ञानी असला तरी त्याचा सत्कार करून त्याची व्यवस्था लावावी पण त्याला मसलतींत घेऊं नये. अन्यायामुळें ज्याच्या बापाला पूर्वीं दुखविलें असेल अशा मनुष्याला मान देऊन त्याच्या जाग्यावर नेमिलें असलें तरी त्याला मसलतींत घेऊं नये. त्याचप्रमाणें ज्याची दौलत अल्पस्वल्प कारणासाठीं जप्त केली असेल अशा मनुष्याच्या अंगीं दुसरे पुष्कळ गुण असले तरी त्याला मसलत विचारूं नये. जो शहाणा, बुद्धिमान, आपल्या देशांत जन्मलेला, शुचिर्भूत, सर्व कामांमध्यें चोख, ज्ञान व अनुभव यांनीं युक्त, आपल्या व शत्रूंच्या लोकांचा स्वभाव ओळखणारा, व राजाला स्वतःसारखा जिव्हाळ्याचा आहे, जो खरें बोलणारा, शीलसंपन्न, खोल, भिडस्त, मृदु, परंपरागत, संतुष्ट, सर्वांना मान्य, सरळ, पापाचा द्वेष करणारा, सल्ला मसलतीमध्यें वाकबगार, देशकाल जाणणारा, ज्यावर पौरजनांचा व देशांतल्या लोकांचा त्याच्या चोख वर्तनामुळें विश्वास बसला आहे, जो मोठा योद्धा असून ज्याला नीति कळते अशाला आपली मसलत सांगावी. जो समर्थ आहे तो सर्व जगाला आपल्या गोड शब्दांनीं वश करून घेतो. ह्मणून आपला योग्य अंमल चालावा अशी ज्याची इच्छा असेल त्यानें असल्याला आपली मसलत सांगावी. म्हणून या गुणांनीं संपन्न व परस्परांचा स्वभाव ओळखणारे आणि महत्त्वाची इच्छा असणारे असे तिघांहून अधिक मंत्री करून त्यांचा राजानें सत्कार ठेवावा. आपल्या प्रजेमधील, आपल्यामधील, शत्रूंमधील व राजामधील उणीवा काय आहेत हें यांनीं नीट लक्षपूर्वक पहावें. कारण मंत्र्यांच्या मसलतीवरच राज्याची वाढ अवलंबून आहे. आपलें छिद्र शत्रूला दिसूं देऊं नये आणि शत्रूचें छिद्र पाहून त्याचा समाचार घ्यावा. ज्या मंत्र्यांना मसलत गुप्त ठेवतां येते ते शहाणे. मंत्र हें राजाचें चिलखत असून सल्लागार हे त्याचे अवयव आहेत. हेर हीं राज्याचीं मुळें असून मसलत हें राज्याचें सार आहे. या जगांत वृत्तीसाठीं मंत्री आपल्या स्वामीच्या मागून असतात. उद्दामपणा, राग, अभिमान, हेवा यांना आवरून धरल्यानेंच राजे व मंत्री सु-

ळी होतात. कायिक, वाचिक वगैरे पांच प्रकारचें कपट ज्यांना माहीत नाहीं अशा मंत्र्यांबरोबर राजानें मसलत करावी. यांपैकीं तिघांच्या मतांचा पूर्ण विचार करून त्यांचें व आपलें मत आपल्या ब्राह्मण गुरूपुढें मांडून त्यांचा अभिप्राय पडेल त्याप्रमाणें राजानें उपाय करावा. अशा मंत्राच्या वेळीं खुजे, कुबडे, दुबळे, लंगडे, आंधळे, जडबुद्धीचे लोक, बायका व नपुंसक कोणच्याही कारणानें आसपास कोठेंही असूं देऊं नयेत. घराच्या गच्चीवर चढून अथवा ज्या ठिकाणीं कोणी नाहीं अशा उजेडाच्या शून्य प्रदेशीं, ज्या ठिकाणीं दर्भ, काश वगैरे कांहीं नाहीं अशा ठिकाणीं अंग वेडेंवांकडें न करतां व वेळ न दवडतां स्पष्टपणें मसलत करावी. भाषण कसें असावें या संबधानें पुढील इंद्र व बृहस्पती यांमधील संभाषण लक्षांत ठेवण्याजोगें आहे. 'कोणची गोष्ट बरोबर केल्यानें सर्व भूतांना मनुष्य प्रमाणभूत होऊन त्याला मोठी कीर्ति मिळेल,' म्हणून इंद्रानें विचारलें असतां बृहस्पती ह्मणाले, 'सर्व लोकांना सुखावह असें गोड भाषण सर्वांशीं बोललें असतां मनुष्य सर्वांना आवडता होतो. जो कांहीं एक बोलत नाहीं व ज्याच्या कपाळाला आठ्या असतात त्याचा सर्व द्वेष करतात. परंतु जो कोणालाही पाहिल्याबरोबर आपणच आधीं हासून बोलूं लागतो त्यावर लोक खुष असतात. गोड शब्द न बोलतां कोणाला कांहीं उचलून दिलें असतांही कालवणावांचून दिलेल्या अन्नाप्रमाणें तें गोड लागत नाहीं. कांहीं न देतां गोड बोलल्यानें सर्व जगाला आपल्या ताब्यांत ठेवतां येतें. ह्मणून योग्य अम्मल चालावा अशी ज्याची इच्छा आहे त्यानें गोड असावें. यानें त्याला फळ मिळून लोक यापासून घाबरत नाहींत. या गोड शब्दाची बरोबरी दुसऱ्या कशानेंही होणार नाहीं.'

आतां राजानें मंत्री कशा प्रकारचे किती ठेवावेत हें सांगतों ऐक. चार विद्वान, धीट, शुद्धशील, स्नातक ब्राह्मण, आठ बलवान व सशक्त क्षत्रिय, एकवीस श्रीमान वैश्य, तीन गरीब, शुद्ध वर्तनाचे असे शूद्र व शुश्रूषादि आठ गुणांनीं युक्त, पुराणादिकांची माहिती असलेला सूत असे हे मंत्री असावेत. हे सर्व पन्नास वर्षांच्या वयाचे असून प्रगल्भ असावेत. कोणाचा हेवा करणारे नसावेत. श्रुतींचें व स्मृतीचें यांना ज्ञान असावें. ते विनयसंपन्न असावेत. त्यांची समदृष्टि असावी. वादीप्रतिवादींच्या कामामध्यें योग्य निकाल देण्याला समर्थ, पैशाचा लोभ नसणारे, स्त्री, मृगया इत्यादि सात व्यसनांपासून अलिप्त असे हे असावेत. यांपैकीं आठांशीं मिळून राजानें मसलत करावी, व मसलतीचा निकाल राष्ट्रामधून माहितीकरितां पाठवावा. राजानें अशा रीतीनें वागून आपल्या प्रजेवर नजर ठेवावी. आपल्याजवळ ठेव ह्मणून ठेवलेलें द्रव्य किंवा दोघांच्या तंट्यामधील द्रव्य आपण गडप्प करूं नये. यानें न्यायामध्यें बिघाड येऊन राज्याला त्रास पोहोंचेल. आणि बहिरीससाण्यापासून ज्याप्रमाणें लहान लहान पक्षी पळून जातात त्याप्रमाणें राजापासून प्रजा भीतीनें दूर दूर पळूं लागेल; व असें राष्ट्र समुद्रांत फुटलेल्या नावेप्रमाणें हळूहळू नाहींसें होईल. जर राजा प्रजेचें पालन अयोग्य रीतीनें व अधर्मानें करील तर त्याच्या मनाला नेहमीं भीति राहून स्वर्गाचें द्वार त्याला बंद राहतें. आतां धर्म हाच ज्याला आधार आहे अशा न्यायासनावर बसून जे अधर्मानें वागतात, मग ते राजाचे अमात्य असोत अथवा मुलगे असोत किंवा त्यानें अधिकार दिलेले दुसरे कोणी असोत ते राजासकट स्वतःला नरकाकडे ओढून नेतात. बलवानांनीं बलात्कार केल्यामुळें दीनपणें रडत बसणाऱ्या अनाथांना राजानेंच हात दिला पाहिजे. दोघांमध्यें वाद उपस्थित झाला असतां साक्षीच्या जोरावर त्यांचा निकाल करणें चांगलें. आतां ज्या गरीबाला कोणी साक्षी नसेल अशाच्या बाबतींत राजानें विशेष लक्ष पुरवावें. दुष्टांना अपराधानुरूप शिक्षा असावी. श्रीमंत असतील त्यांना दंड करावा. ज्यांच्या जवळ पैसे नसतील अशा गरीबांना कैद करावें. आणि गैरचालीचे असतील त्यांना फटके मारून वठणीला आणावेत. गोड भाषणांनीं बक्षीस देऊन भल्या लोकांचें राजानें पाळण करावें. जो राजाला मारण्याबद्दल खलबत करील अशाला किंवा आगलाव्याला, चोराला किंवा भलत्या स्त्रीशीं संबंध ठेवून वर्णसं-

कर करणाऱ्याला देहांत शिक्षा द्यावी. योग्य शिक्षा देणाऱ्या किंवा याप्रमाणें देहांतशासन करणाऱ्या राजाला पाप लागत नाहीं. जो मूर्खपणानें केवळ लहरीखातर शिक्षा करतो त्याची ह्या लोकीं अपकीर्ति होऊन मेल्यावर त्याला नरक मिळतो. भलत्याच्या सांगण्यावरून भलत्याला शिक्षा देऊं नये. शास्त्रपूर्वक विचार करून मग एखाद्याला कैद करावा किंवा सोडून द्यावा. कशाही प्रसंगीं राजानें दूताला मारूं नये. दूताला मारणारा आपल्या मंत्र्यांसह नरकाला जातो. सांगितलेला निरोप कळविणाऱ्या दूताला मारल्यानें त्या राजाच्या वाडवडिलांना भ्रूणहत्येचें पाप लागतें. दूत कुलीन, कुलिनांशीं संबंध असणारा, बोलका, हुषार, गोड बोलणारा, सांगितलेला निरोप बरोबर कळविणारा, आठवणीचा असा असावा. राजाचे द्वारपाळ व शरीररक्षक व ठाणेदार यांचेमध्यें हेच गुण असावेत. याचा अमात्य कुलीन, सत्वसंपन्न, शुद्धशील, बुद्धिमान, धैर्यवान, भिडस्त, धर्मशास्त्राचें तत्त्व जाणणारा व मंत्र गूढ ठेवण्याला समर्थ असा असावा. सेनापतीच्या अंगीं वरील गुण असून सैन्याच्या निरनिराळ्या प्रकारच्या रचना त्याला माहीत असाव्या. यंत्रें व आयुधें यांची त्याला माहिती असावी; व तो पराक्रमी असावा. पाऊस, थंडी, ऊन्ह, वारा हीं सोसण्याचें त्याचे अंगीं सामर्थ्य असून शत्रूचा कमीपणा कोठें आहे हें त्याला कळत असावें. राजानें शत्रूला विश्वास दाखवून कोणावर विश्वास ठेवून राहूं नये. मुलावर देखील विश्वास ठेवणें चांगलें नाहीं. सर्वांवर अविश्वास हेंच राजाचें मुख्य गूढ आहे.

## १०९ मुलकी व्यवस्था. (१२. ८५-९१)

युधिष्ठिर म्हणाला ' राजानें कशा प्रकारच्या शहरांत रहावें किंवा कशा प्रकारचें शहर स्वतःकरितां करवावें, कशाप्रकारें राष्ट्राचें संरक्षण करवून त्याची मजबुती करावी ? '

भीष्म म्हणाले, ' ज्या नगरामध्यें मुलगे, ज्ञाती व बांधव यांसह रहावयाचें तें नगर कशा प्रकारचें असावें या संबंधाची माहिती असणें अवश्य आहे. म्हणून किल्ला कशा प्रकारचा असावा सांगतों ऐक. जंगिरा, भुईकोट, गड, सैन्याचा बुरूज, मातीचा किल्ला, जंगलांतला किल्ला अशा सहा प्रकारच्या किल्ल्यांपैकीं एखाद्याच्या आश्रयानें राजानें शहरें वससवावींत. तो किल्ला धनधान्यांनीं व आयुधांनीं भरला असावा. त्याचा तट मजबूत असून सभोंवतीं खंदक असावा. हत्ती घोडे, रथ त्यामध्यें पुष्कळ असावेत. तेथें हुषार कारागीर असून सामुग्री रेलचेल असावी. तेथील लोक धार्मिक व उद्योगामध्यें दक्ष असावेत. तेथें रगदार लोक, हत्ती व घोडे पुष्कळ ठेवून मोठमोठे चौक व दुतर्फा दुकानें यांनीं त्याला शोभा आणावी. या ठिकाणीं सर्व व्यवहार उघड चालून जिकडे तिकडे स्वस्थता असावी. भीतीचें म्हणून नांव नसावें. तो मोठा झगझगीत असून वाद्यांचा जिकडे तिकडे गजर चालू असावा. त्या ठिकाणीं मोठमोठ्या हवेल्या असून शूर व श्रीमान असे पुष्कळ लोक तेथें असावेत. ब्रह्मघोषानें तो दणाणला असावा. समाजसंबंधी उत्सव नेहमीं जिकडे तिकडे चालावेत व सदा देवतांचीं पूजार्चनें चालावींत. अशा ठिकाणीं प्रधान व सैन्य आपल्या स्वाधीन ठेवून राजानें रहावें; व त्या ठिकाणीं खजिना, सैन्य, मित्र व व्यवहार वाढवावा. शहरांत व आसपासच्या प्रांतांत कांहीं दोष राहूं देऊं नयेत; कोठार व आयुधागार यांना सामानांची व हत्यारांची भर टाकीत असावें. यंत्रें, हत्यारें, लांकडें, लोखंडी सामान, भुसा, कोळसे, इमारतीचीं लांकडें, शिंगें, हाडें, वेळू, मज्जा, तेल, चरबी, मध, सर्व प्रकारचीं औषधें, ताग, ज्वालाग्राही पदार्थ, बाण, ढाली, तात, वेत, मुंज वगैरे गवत या सर्वांचा तेथें भरपूर सांठा करावा. पुष्कळ पाण्याचे तलाव व विहिरी वाढवाव्यात. पिंपळ वगैरे पुष्कळ चिकाळ झाडें राखावींत. निरनिराळ्या शास्त्राचे गुरु, ऋत्विज, पुरोहित, मोठमोठे धनुर्धारी, कारागीर, ज्योतिषी, वैद्य, विद्वान, बुद्धिमान, आत्मनिग्रही, व्यवहारामध्यें हुषार, शूर, व्यवहारचतुर, कुलीन, सत्वसंपन्न आणि सर्व कामांमध्यें हुषार अशा लोकांचा काळजीपूर्वक सत्कार करावा. जे धार्मिक असतील त्यांचा सत्कार करून धर्मलंडांना वाटेवर आणावें. सर्व वर्णांना काळजीपूर्वक आपापल्या कामाकडे लावावें. सर्व नगरांतील व प्रांतांतील लोकांचे उघड व गुप्त

व्यवहार हेरांकडून कळवून घेऊन मग पुढें काय करावयाचें तें ठरवावें. हेर, मसलत, खजिना व शिक्षेची बाब या गोष्टींवर विशेषेंकरून राजाची नजर असावी. कारण सर्व कांहीं यावरच अवलंबून आहे. शत्रु, मित्र व त्रयस्थ यांची नगरांमधील व प्रांतांमधील सर्व हालचाल हेरांकडून समजून घ्यावी. व पुढें मोठ्या हुषारीनें त्याची काय वाट लावावयाची ती लावावी. आपल्यावर भक्तीनें आहेत त्यांचा सत्कार करून व द्वेष करणाऱ्यांना ताळ्यावर आणून कोणाला त्रास न देतां यज्ञ व दान करावें. प्रजेचें नीट रक्षण करावें. धर्माला बाध आणणारी गोष्ट कोणचीही करूं नये. गरीब, अनाथ, म्हातारे-कोतारे व विधवा बाया, यांचा समाचार घेऊन त्यांच्या पोटाची व्यवस्था लावावी. आश्रमांमधून तापसांकडे जाऊन वेळच्यावेळीं त्यांना वस्त्र, पात्र व अन्न सत्कारपूर्वक देत जावें. व अदबीनें त्यांच्यापुढें उभें राहून आपल्यासंबंधी, कार्यासंबंधी व राष्ट्रासंबंधी सर्व हकीकत त्यांच्या कानांवर घालावी. कुलवान, व्यवहारचतुर व सर्व टाकून बसलेल्या ह्या तापसांची सर्व प्रकारें काळजी घ्यावी व कशाही प्रसंगीं यांवर विश्वास टाकावा. कारण चोर सुद्धां यांच्यावर विश्वास टाकतात. त्यांच्यापाशीं पैसा ठेवून त्यांच्यापासून ज्ञान घ्यावें. परंतु लोकांना संशय न यावा म्हणून त्यांचेकडे वरचेवर जाणें येणें नसावें. आपल्या राष्ट्रामध्यें एखादा, शत्रूच्या राष्ट्रामध्यें एखादा, जंगलामध्यें एखादा, मांडलिक राजाच्या नगरांत एखादा असे चार ठिकाणीं चार तापसी मिळवून ठेवावेत. ते एखादें प्रसंगीं राजा आश्रयासाठीं आला असतां त्याला आश्रय देण्याला समर्थ होतात. ही तुला थोडक्यांत माहिती सांगितली. अशा प्रकारच्या नगरामध्यें राजानें रहावें.

आतां कशा प्रकारानें राष्ट्र सांभाळून त्याची मजबुती करावी तें सांगतों ऐक. प्रत्येक गांवावर एक एक अधिकारी नेमावा; दहा दहा गांवांवर देखरेखीला एक, पुढें वीस विसांला एक, नंतर शंभर शंभरांवर एक, व पुढें हजारा हजारांवर एक असे अधिकारी नेमावेत. गांवकामगाराला गांवामध्यें जे जे दोष दिसतील ते ते त्यानें दहा गांवांवरच्या अधिकाऱ्याला कळवावेत व त्यानें विसांवरच्या अधिकाऱ्याला कळवावे; याप्रमाणें अखेरपर्यंत व्यवस्था असावी. गांवांतील सर्व अन्नादिक खाद्य वस्तूंवर गांवकामगाराचा ताबा असून दहा गांवांवरच्या अधिकाऱ्याची त्यानें व्यवस्था ठेवावी. व दहा गांवांवरचा अधिकार ज्याकडे आहे त्यानें वीस गांवावरच्या अधिकाऱ्याला पोसावें. शंभर गांवांवरच्या अधिकाऱ्याचा सत्कार करून राजानें त्याला एक मोठा भरभराटीचा व वस्तीचा गांव स्वतंत्र तोडून द्यावा. परंतु हा गांव हजार गांवांवर अम्मल असणाऱ्या अधिऱ्याच्या ताब्यांत असावा. या हजार गांवांवरील अधिकाऱ्याला एक छोटेंसें शहर तोडून दिलें असावें. व त्यांतील सर्व वस्तूंचा उपभोग त्याला मिळावा. त्या संबंधी लढाईचें काम व अंतर्व्यवस्था हीं सुद्धां त्यानेंच पहावीं. व याचा निरनिराळ्या गोष्टींवर काळजीपूर्वक लक्ष देणारा एक धर्मज्ञ मंत्री असावा. नगरा नगराचे ठिकाणीं राजाच्या हिताकरितां लक्ष देणारा एक मनुष्य असावा. सर्व नक्षत्रांवर उच्चस्थानीं असणाऱ्या ग्रहाप्रमाणें तो सर्वांवर मुख्य असावा. हेरांकरवीं यानें त्यांची हालचाल कळवून घ्यावी. व जे खुनी, दुष्ट, लोकांना लुबाडणारे लुच्चे असतील अशांपासून त्यानें प्रजेचें रक्षण करावें. क्रयविक्रय, रस्ता, खाणें, व वस्त्रप्रावर्ण, जमा व शिल्लक या सर्व गोष्टी लक्षांत घेऊन व्यापाऱ्यांपासून कर घ्यावा. उत्पन्न, रोजमुरा, कारखान्याचें स्वरूप ह्या गोष्टी लक्षांत घेऊन कारखानदारांपासून कमी अधिक कर घ्यावा. **परंतु करांखालीं यांचें डोकें वर निघणार नाहीं असा कर बसवूं नये. मेहनत व उत्पन्न लक्षांत घेऊन सर्व कांहीं करावें.** फळाशिवाय विनाकारण कोणी कांहीं काम करीत नाहीं. राजा व काम करणारा दोघांना ज्याच्या योगानें फल मिळेल अशा बेतानें राजानें नेहमीं कर घ्यावा. हाव धरूं नये, व अतितृष्णेमुळें आपल्या व दुसऱ्याच्या मुळांशीं घाव घालूं नये. फार खादाड म्हणून नांवाजलेल्या राजाचा लोक द्वेष करतात, व ज्याचा लोक द्वेष करतात त्याचें कल्याण कोठून होणार ? पोक्त बुद्धीनें वासराला राखून धार काढली असतांच खोंड चांगला पोसून वाटेल तें काम करतो; परंतु तेंच गाईला निःशेष पिळून काढली असतां त्याच्या हातून बरोबर काम

होत नाहीं. त्याचप्रमाणें राष्ट्राला अगदीं पिळून घेतल्यानें त्याच्या हातून मोठेंसें काम होत नाहीं. जो राजा स्वतः राष्ट्राला सांभाळून त्यावर कृपा करतो व त्यापासून मिळेल त्या द्रव्यांशावर आपलें भागवितो त्याचा मोठा फायदा होतो; संकटकाळासाठीं गोळा झालेला पैसा राष्ट्रामध्यें वाढवावा. ह्मणजे राष्ट्र हाच खजिना बनून खजिना घरीं असल्यासारखें होईल. सर्व पौरजन, देशांतले लोक, जवळचे व दूरचे आश्रित यांच्याजवळ थोडा पैसा असला तरी या सर्वांशीं दयेनें असावें. प्रसंगीं चोरांचिरांना फुस लावून गांववाल्यांजवळून लागेल तेवढा पैसा घ्यावा. ह्मणजे सुखदुःखांमध्यें समवृत्तीनें असणारे लोक यावर रागावत नाहींत. पैसा उकळण्याचे पूर्वीं राष्ट्रामधून फिरून त्यांना भीतीचा बागुलबावा दाखवावा. 'हें संकट गुदरलें आहे, परचक्राचें मोठें भय आलें आहे, कळकाला फळ येण्याप्रमाणेंच याचा शेवट होणार. माझे शत्रू पुष्कळ भुरट्यांनिशीं उठून अखेर आपलाच नाश करून घेण्यासाठीं माझ्या राष्ट्राला पीडा देऊं पहात आहेत. या भयंकर प्रसंगीं तुमच्याच रक्षणासाठीं मी तुमच्याजवळ पैसा मागतों. भय नाहींसें झालें ह्मणजे तुमचा पैसा मी तुह्मांला परत देईन; शत्रू तुमच्यापासून जो बळजबरीनें पैसा काढून घेतील तो तुह्मांला परत मिळणार नाहीं. तुमच्या बायकांपोरांचा वगैरे नाश होईल. आतां बायकांपोरांसाठीं पैसा सांठवावयाचा हें जर खरें असेल तर तुमच्या वैभवाचा मला मोठा संतोषच आहे. व आपल्या मुलांप्रमाणें समजून मी तुमच्याजवळ पैसा मागतों. राष्ट्राला पिळून न घेतां मिळेल तेवढा पैसा मी घेईन. रगदार बैलाप्रमाणें तुह्मीं आपत्कालीं राष्ट्रभार सोसला पाहिजे. प्रसंगीं पैशाकडेच ओढा ठेवून रहातां कामा नये.' अशा रीतीच्या गोड, अनुकूल व औपचारिक शब्दांनीं त्यांना खुलवून आज्ञापत्रें देऊन कामगारांना लोकांकडे पाठवावें. तटाची मजबुती, नोकरांचें पोषण, खर्च, युद्धाचें भय, आदा व शिल्लक या सर्वांचा विचार करून, वैश्यांकडून कर घ्यावेत. कारण यांना अरण्यामध्यें राहण्याचा प्रसंग असल्यामुळें यांचेकडे दुर्लक्ष केल्यानें त्यांचा नाश होणार आहे. ह्मणून विशेषतः यांच्याशीं फार गोडीनें असावें. गोड भाषण, रक्षण, त्यांच्या गरजा भागविणें, स्थिरस्थावरपणा, त्यांची व्यवस्था लावणें इत्यादिकांकडे लक्ष द्यावें. त्यांच्याशीं यानें नेहमीं अशा रीतीनें वागावें कीं, त्या योगानें त्यांची उत्पादक शक्ति वाढावी राष्ट्र, व्यापार व शेती हीं त्यांच्या योगानें वाढतात. ह्मणून राजानें त्यांच्याशीं प्रेमभाव वाढवावा. व त्यांच्याशीं दयेनें राहून मोठ्या हुषारीनें हलके कर त्यांचेकडून घ्यावेत. यांच्याशीं चांगलें वागणें यासारखें कल्याणप्रद दुसरें नाहीं.'

'बरें, राजा समर्थ असतांही त्याला खजिना वाढविण्याची इच्छा झाली असतां त्यानें कसें वागावें,' ह्मणून युधिष्ठिरानें फिरून विचारलें असतां भीष्म ह्मणाले, 'देश, काल, बुद्धि व बल हीं सर्व लक्षांत घेऊन धर्माकडे लक्ष असणाऱ्या राजानें प्रजेच्या हितांत दक्ष राहून त्यावर अम्मल करावा. त्यांचें, त्याचप्रमाणें आपलें कल्याण लक्षांत घेऊन राष्ट्रांतील सर्व कामें त्यानें करावींत. भुंगे ज्याप्रमाणें झाडांतून मध काढून घेतात त्याप्रमाणें राजानें राष्ट्रापासून पैसा काढून घ्यावा. वासराकडे नजर पोहोंचवून धार काढतांना थान अगदीं पिळून टाकूं नये. जळूप्रमाणें न दुखवितां राष्ट्राचें रक्त शोषून घ्यावें. ज्याप्रमाणें उंदीर निजलेल्याचा पाय फुंकून फुंकून कुरतुडतो त्याप्रमाणें सौम्य उपायांनीं राष्ट्राला पीत जावें. आधीं थोडा थोडा कर घेऊन मग तो क्रमाक्रमानें वाढवीत रहावा. खोंडांना मऊ करीत करीत हलकें हलकें ओझें लादीत जाण्याप्रमाणें प्रथम मऊपणा दाखवून पुढें हलकें हलकें त्यांच्यावर कराचें ओझें टाकीत जावें. मऊ न आणतां एकदम त्यांच्यावर भार टाकला असतां त्याखालीं ते चेंपून जातील. योग्य उपायांनींच मोठ्या हुषारीनें त्यांच्याकडून कर घेत जावेत. सर्वांशीं सारख्या रीतीनें वागतां येणें मनुष्याला कठिण आहे. ह्मणून ठळक ठळक लोकांना मुठींत घेऊन इतरांशीं मनाप्रमाणें वागून त्यांचा उपयोग करून घ्यावा. भलत्या प्रसंगीं किंवा भलत्या काळीं लोकांवर कर बसवूं नये. योग्य प्रसंगीं क्रमाक्रमानें गोड बोलून नेमाप्रमाणें त्यांचेकडून कर घ्यावेत. हे राजनीतीचें खरें तत्त्व असून याला कपटविपट कांहीं समजूं न-

ये. घोड्यांना भलत्या रीतीनें वठणीला आणूं पाहिलें असतां ते जास्ती खवळतात. गुत्ते, वेश्या, कुंटिणी, नाटकी लोक, जुगारबाज व अशा प्रकारचे दुसरे लोक राष्ट्राला घोंटाळा आणणारे असल्यामुळें यांना वाटेवर आणण्याला प्रयत्न करावा. राष्ट्रामध्यें राहून हे दुसऱ्या चांगल्या लोकांना बिघडावितात. **प्रसंगावांचून कोणी कोणापाशीं तोंड पसरूं नये. असें प्रत्यक्ष मनूनें सांगितलें आहे, जर सर्व लोक काम न करतां भिक्षेवर राहूं लागतील तर जगच लवकर नाहींसें होईल.** सर्वांचा नियामक राजा असल्यानें अशांना तो जर वाटेवर न आणील तर त्याच्या पापाचा चौथा हिस्सा त्याला लागतो. पुढील दोष राजानें बंद करावेत. कारण ते सर्व भिकारपणा आणणारे आहेत. ज्याच्या मागें वासना लागली तो कोणचें वाईट काम करणार नाहीं? मांस, मद्य, यांत मजा मारून दुसऱ्याचा पैसा व बायका उपटण्याला असा मनुष्य तयार होतो. व या रीतीनें वासनेच्या तावडींत जाऊन अशा प्रकारचीं कामें करून दुसऱ्याला तो उदाहरण घालून देतो. जे एरवीं भिक्षेवर रहात नाहींत,अशा लोकांनीं संकटसमयीं भिक्षेवर रहावें. न्यायबुद्धीनें किंवा दयेनें त्यांना राजानें कांहीं द्यावें. परंतु भीतीनें कांहीं देऊं नये. राष्ट्रामध्यें भिक्षेकरी अथवा चोर असूं नयेत. चोरांवरच भिकाऱ्यांचा निर्वाह चालतो; व हे लोकांच्या सुस्थितीला कारण होत नाहींत. जे लोक लोकांवर कृपा करून त्यांच्या भरभराटीला कारण होतात, असे लोक राष्ट्रामध्यें असावेत. लोकांचा फडशा उडविणारे लोक नसावेत. लोकांकडून पैसा ओढण्याकडे लक्ष असणाऱ्या कामगारांना शिक्षा करून त्यांच्या जागीं दुसरे नेमून त्यांचेकडून योग्य कर घेववावेत. शेती, गुरें सांभाळणें, व्यापार व अशा प्रकारचीं दुसरीं कामें श्रमविभागाच्या तत्त्वावर निरनिराळ्या लोकांकडून करवावींत. असे धंदे करणाऱ्या लोकांना जर कोणापासून कांहीं उपसर्ग होईल तर राजावर त्याचा दोष येतो. जे श्रीमान असतील त्यांचा नेहमीं खाणें, पिणें, व कपडेलत्ते देऊन सत्कार करावा. आणि 'माझ्याप्रमाणेंच प्रजेवर लक्ष ठेवा' असें त्यांना विनवावें. श्रीमान लोक हें राष्ट्राचें मोठें अंग असून सर्व लोकांना हे वेंशिंडासारखे ह्मोरपे आहेत. शहाणा, शूर, पैसेवान, वजनदार, धार्मिक, तपस्वी, सचोटीचा, बुद्धिमान, असा मनुष्यच प्रजेचें रक्षण करूं शकतो. ह्मणून राजानें सर्व प्राणिमात्रांशीं प्रेमानें वागून खरेपणा व सचोटी धरावी व राग व दुष्टपणा सोडून द्यावा.

ज्याला खावयाचीं फळें येतात अशा प्रकारचीं राज्यांतील झाडें तोडूं नयेत. फळमुळांवर राहणें हा ब्राह्मणांचा धर्म आहे. त्यांना पुरून उरल्याचा उपयोग दुसऱ्यांनीं करावा. त्यांचेकडे दुर्लक्ष करून कोणीही त्यांचें उदरनिर्वाहाचें साधन काढून घेऊं नये. पोटाचें साधन नाहींसें झाल्यामुळें जर ब्राह्मण राज्य सोडून जाऊं लागेल तर त्याच्या पोटाची तजवीज करावी. शेती, गुरें सांभाळणें व व्यापार यांवर लोकांचें जीवन अवलंबून आहे. त्याचप्रमाणें स्वर्गप्राप्तीला वेद कारणीभूत आहेत. त्याची हयगय होत असतां जे त्याला मदत करतात ते चोर असून त्यांना शिक्षा करण्यासाठींच क्षत्रियाचा जन्म आहे. जो, ज्यांचें रक्षण केलें पाहिजे त्यांचें रक्षण करतो तोच उत्तम राजा समजला पाहिजे. जे रक्षण करीत नाहींत त्यांचा कांहीं उपयोग नाहीं. राजानें नेहमीं लोकहितासाठीं माहिती मिळवून घ्यावी. आणि त्यासाठीं हेर ठेवावेत. 'आपल्या लोकांपासून दुसऱ्यांचें, दुसऱ्या लोकांपासून आपल्या लोकांचें, दुसऱ्यापासून दुसऱ्यांचें व आपल्यापासून आपल्याचें व सर्वांपासून आपलें रक्षण करावें.' माझ्यापाशीं दोष काय आहे, मला व्यसन कसलें आहे, माझ्यामध्यें उणीव काय आहे, कशापासून मला दोष लागणार आहे, ' या गोष्टींचा राजानें नेहमीं विचार करावा. 'गेल्या दिवसाचें माझें कृत्य लोकांना पसंत आहे किंवा नाहीं,' हें गुप्त व विश्वासु हेर राज्यांत पाठवून काढून घ्यावें. 'माझें वर्तन लोकांना आवडतें किंवा नाहीं, माझा लौकिक त्यांना पसंत आहे किंवा नाहीं? इत्यादि गोष्टी काढून घ्याव्या. धर्मज्ञ, शहाणे, रणांतून पाय मागें न घेणारे, राष्ट्रामध्यें असणारे, नोकरलोक, अमात्य मंडळी तिऱ्हाईत लोक यांपैकीं जे आपली स्तुति करीत असतील किंवा जे निंदा करीत असतील या सर्वांकडे सारखें लक्ष पुरवावें. सर्वांना सारखें आवडणें हें

कांहीं शक्य नाहीं. सर्वांना मित्र, शत्रू व त्रयस्थ हे असावयाचेच.’

---

### ११० धर्म. (१२. ९०–९४)

‘बाहुबल त्याचप्रमाणें इतर गुण सारखे असतां कोणचा गुण विशेष असल्यानें त्यामुळें, राजाला मनुष्यावर राज्य करतां येतें, ’ असें युधिष्ठिरानें विचारलें असतां भीष्म ह्मणाले, ‘जंगम स्थावरांना खातात. दाढेचे प्राणी बिन दाढेच्या प्राण्यांना खातात. त्याचप्रमाणें मोठमोठे विषारी साप लहानसान सापांना खातात. हाच न्याय मनुष्यांना लागू असल्यामुळें राजानें आपल्या प्रजेसंबंधानें त्याचप्रमाणें शत्रूसंबधानें मोठ्या हुशारीनें असलें पाहिजे. थोडें दुर्लक्ष झालें कीं, हे गिधाडाप्रमाणें आपल्यावर येऊन पडतात. **लहान मोठी खरेदी करून अरण्यांमधून विसावा घेत फिरणारे वाणी आपल्या राष्ट्रांत कराच्या ओझ्याखालीं दबून गेले आहेत काय, शेतकऱ्यांना असह्य त्रास होऊन ते आपलें राष्ट्र सोडतात कीं काय, यांकडे राजाचें लक्ष असावें.** जें राज्यभार आपल्या माथ्यावर घेतात, त्यांच्यावरच इतर मंडळी, देव व पितर सुद्धां राहतात. तेव्हा यासंबंधानें ब्रह्मवेत्त्या उतथ्यांनीं मांधात्याला प्रेमपूर्वक जो उपदेश केला, तोच तुला सांगतों ऐक. ते ह्मणाले, ‘राजाचा जन्म धर्माच्या नांवानें स्वैर वागण्यासाठीं नाहीं. राजा लोकांचें रक्षण करणारा आहे. तो धर्म आचरण करील तर त्याला देवत्व येतें. अधर्मानें वागेल तर त्याला नरकाची वाट धरावी लागते. लोक धर्मावर अवलंबून आहेत व धर्म राजावर अवलंबून आहे. म्हणून हा धर्म जो नीट सांभाळतो तोच राजा. श्रीमान अशा मोठ्या धार्मिक राजाला प्रत्यक्ष धर्म संज्ञा आहे. राजाच्या हातून पापाचें निवारण न होईल तर देवांची निंदा होऊं लागतें. धर्म नाहीं असें लोक ह्मणूं लागतात, धर्माचरण बंद पडतें, मोठा अधर्म सुरू होतो, रात्रंदिवस मोठी भीति राहते, संभावितांना आत्मस्व असें कांहींच उरत नाहीं, व्यवस्था कांहींच उरत नाहीं. बायका, गुरें, शेतें व घरें या कशावरच मनुष्याचा ताबा रहात नाहीं. देवांना पूजेची व पितरांना स्वधेची ओळख रहात नाहीं. अतिथीचा सत्कार होत नाहीं. ब्राह्मण सारीं वेदव्रतें विसरतात. यज्ञ होत नाहींत. म्हाताऱ्याप्रमाणें सर्वांचीं मनें जाग्यावरून उडतात. जे स्वधर्मामध्यें राहतात, स्वतांचा त्यांचा हेतु साधून सर्व लोक त्या चांगल्या गोष्टीचें अनुकरण करतात. इहपराचा विचार करून ऋषी स्वतः धर्माचा पुतळा म्हणून राजा निर्माण करतात. ज्याच्या ठिकाणीं धर्म विराजमान असतो, त्यालाच राजा ह्मणावें. ज्याच्या ठिकाणीं याचा लोप दिसतो त्याला वृषल ही संज्ञा आहे. कारण वृष हें धर्माला दुसरें नांव असून त्याला हा लयाला नेतो. म्हणून धर्म वाढवावा. याच्या वाढीवरच सर्व प्राणिमात्रांची वाढ अवलंबून आहे. हा नाहींसा झाला असतां त्याच्याबरोबर प्रजा नाहींशी होते म्हणून धर्म लोप होऊं देऊं नये. धनाला, त्याचप्रमाणें धारणेला साधनीभूत असल्यानेंही याला धर्म म्हणण्याचा प्रचार आहे. अधर्माची यानें मर्यादा रेखून टाकली आहे. सर्व प्राणिमात्रांच्या भरभराटीसाठीं ब्रह्मदेवानें हा धर्म उत्पन्न केला असल्यामुळें प्रजेच्या कल्याणासाठीं धर्म राष्ट्रामध्यें प्रवर्तवावा. जो राजा कामक्रोधाच्या तावडींत न जातां धर्मानें प्रजेवर अम्मल करतो तोच खरा राजा. धर्माची उत्पत्ति ब्राह्मणांपासून असल्यानें त्यांचा योग्य सन्मान ठेवून काकू न करतां त्यांचीं कामें करावींत. त्यांचीं कामें न करण्यानें मोठें भय उत्पन्न होतें. मित्र जोडले न जातां पुष्कळ शत्रू मात्र उत्पन्न होतात. मूर्खपणानें ब्राह्मणांचा द्वेष केल्यानें विरोचनाचा मुलगा बली याला सोडून त्याची ऊज्वल संपत्ति इंद्राकडे गेली. आपली संपत्ति इंद्राकडे गेलेली पाहून मग त्याला मोठा पश्चात्ताप झाला. असूयेचें व अभिमानाचें हें फळ होय. तेव्हां ही आपल्याला न सोडील असें प्रत्येकानें वागावें. या संपत्तीला अधर्मापासून ताठा नांवाचा मुलगा झाला. श्रुतींत सांगितलें आहे कीं, त्यानें पुष्कळ देव, असुर व राजर्षी यांना धुळीला मिळविलें आहे. याला जिंकल्यानें मनुष्य राजा होतो. व हा ताठा जर मनुष्याला जिंकील तर तो त्याचा गुलाम बनतो. तेव्हां चिरकाल आपलें नीट असावें अशी इच्छा असेल तर या ताठ्यानें फुगून ज्या-

च्या योगानें आपले हातून अधर्म होणार नाहीं अशा रीतीनें मनुष्यानें वागावें. ताठ्यानें फुगलेला, बेपर्वा, पोरकट, धुंद, झिंगलेला यांच्यापासून दूर असावें. व हे सर्व गुण असणाऱ्यांच्या तर वाऱ्याला सुद्धां उभें राहूं नये. ज्याला शिक्षा केली आहे असा प्रधान व बायका यांच्यापासून दूर असावें. पर्वत, कठिण किल्ले, हत्ती. घोडे, साप यांच्यापासूनही दूर असावें. रात्रीचें भटकूं नये. कंजूषपणा, अभिमान, ढोंग, राग हे सोडून द्यावेत. अनोळखी बायकांशीं, नपुंसकांशीं, स्वच्छंद वागणाऱ्या बायकांशीं, दुसऱ्याच्या बायकांशीं व कुमारिकांशीं मैथुन करूं नये. वर्णसंकरामुळें चांगल्या चांगल्या कुळांत देखील दुष्ट राक्षस, नपुंसक, अंगविकल, जाड जिभा असलेले व वेडे खुळे अशा प्रकारचे लोक राजाच्या दुर्लक्षामुळें उपजतात. ह्मणून राजानें मोठ्या खबरदारीनें प्रजेच्या हिताकडे लक्ष दिलें पाहिजे. राजाच्या बेपर्वाईचा मोठा वाईट परिणाम होऊन प्रजासंकर करणारे अधर्म वाढतात. उन्हाळ्यांत थंडी वाजूं लागते. हिंवाळ्यांत बिलकुल थंडी रहात नाहीं. अति वृष्टि, अनावृष्टि, नाना प्रकारचे रोग लोकांमध्यें शिरतात. राजाचा नाश, अशुभसूचक नक्षत्रें, भयंकर ग्रह व उत्पात दिसूं लागतात. जो राजा स्वतःचें त्याचप्रमाणें प्रजेचें रक्षण करीत नाहीं त्याच्या प्रजेचा नाश होऊन त्याच्या मागून त्याचीही तीच वाट लागते. दोघे मिळून एकाला बुचाडतात व पुष्कळ मिळून या दोघांना बुचाडतात. अविवाहित मुलींचें कौमार्य नष्ट होतें. माझें ह्मणून कांहींच कोणाला वाटत नाहीं. जर राजा धर्मानें वागून पाऊस वेळेवर पडेल तर त्यानें प्रजा सुखांत राहते. ज्या पटाला कपड्याचा रंग काढून त्याचा मळ काढतां येत नाहीं तो निरुपयोगी समजावयाचा. तेव्हां चारी वर्णांच्या धर्मानुरूप ज्या क्षत्रियाला इतर वर्णांचे दोष दूर करून परटाप्रमाणें त्यांना चांगलें करतां येते, तोच त्यांना बापाप्रमाणें असून राजा होण्याला पात्र आहे. कृत वगैरे चार युगें राजाच्या वर्तनावर अवलंबून आहेत. राजाच युग समजला आहे. राजा बेपर्वा झाला असतां चारी वर्ण, वेद, चारी आश्रम, गार्हपत्य,दक्षिण व आहवनीय हे तीन अग्नि, त्याचप्रमाणें यज्ञ या सर्वांमध्यें घोंटाळा माजून राहतो. भूतमात्रांच्या भरभराटीला त्याचप्रमाणें नाशाला राजाच कारण होतो. जेव्हां तो धर्मानें वागतो तेव्हां तो त्यांना भरभराटीला चढवितो व त्यानें धर्म सोडला असतां तो त्यांच्या नाशाला कारण होतो. जेव्हां राजा धर्माविषयीं बेपर्वा होतो तेव्हां त्याचीं बायकामुलें, बांधव व सुहृद यांना वाईट वाटतें. हत्ती, घोडे, गाई, उंट, खेंचरें, गाढवें या सर्वांचा जोम कमी होतो. दुबळ्यांना सांभाळण्यासाठीं राजरूपी सामर्थ्य ब्रह्मदेवानें उत्पन्न केलें आहे. दुबळेपणांतही विशेष गुण आहे. कारण त्याच्या रक्षणानें स्वर्ग व अरक्षणानें नरक प्राप्त होतो, दुबळा मनुष्य व त्यावर अवलंबून असणारे लोक ज्या कांहीं गोष्टींचा उपभोग घेतात तो त्यांना राजा अधर्मी असल्यानें मिळत नाहीं; व त्यांना रडण्याचा प्रसंग येतो. दुबळा मनुष्य मुनि व साप यांचे डोळे फार कठिण असतात. ह्मणून दुबळ्याच्या तावडींत कोणी जाऊं नये. दुबळ्या लोकांचा नेहमीं अवमान होतो; ह्मणून दुबळ्यांचे डोळे आपल्याला आपल्या कुटुंबानिशीं जाळून टाकणार नाहींत अशा रीतीनें त्यांच्याशीं वागावें. दुर्बल मनुष्याच्या डोळ्यानें जळून गेलेल्याच्या कुळांत वाढ ह्मणून बिलकुल होत नाहीं. तो मुळासगट जाळून फडशा पाडतो. दुर्बळाशीं शहाण्यानें कधीं प्रसंग येऊं देऊं नये. त्यांना उगीच दुखविल्यानें त्यांच्या डोळ्यांतून येणारीं टिपें दुखविणाऱ्याचीं मुलें, बाळें, गुरें, ढोरें या सर्वांचा फडशा पाडतात. त्याचें फळ आपणाला भोगावें लागलें नाहीं तर आपले मुलगे, नातू, पणतु कोणाला तरी तें भोगावें लागतें. कारण गाईप्रमाणें पाप कर्म एकदम फळाला येत नाहीं. ज्या ठिकाणीं दुबळ्याला पीडा होऊन त्याला हात देणारा कोणी मिळत नाहीं, तेव्हां एखादी भयंकर दैवी शिक्षा येऊन पडते. सर्व मुलुखभर लोक जे वेळीं सतत ब्राह्मणाप्रमाणें भिक्षूच्या वेषानें भीक मागूं लागतात तेव्हां ते राजाच्या नाशाला कारण होतात. राष्ट्रामध्यें जेव्हां राजाचे पुष्कळ कामगार लोभाविष्ट होऊन काकुळत येणाऱ्या प्रजेकडून युक्तिप्रयुक्तीनें पैसा उकळतात तेव्हां ते राजाचेंच मोठें पाप समजलें पाहिजे. एक

मोठा वृक्ष उगवून वाढतो; व पुष्कळ प्राणी त्याचा आश्रय करतात. परंतु जेव्हां त्यालाच कापून काढतात किंवा जाळतात, त्यावेळीं त्याच्या आश्रयानें असलेले प्राणी निराश्रित होतात. जेव्हां राष्ट्रामध्यें राजाचे गुण गायले जाऊन उत्तम धर्म चालतो तेव्हां राजाला त्याचें फळ मिळतें. परंतु तेंच जर लोक पुण्यकर्म टाकून मूर्खपणानें, अधर्मानें वागूं लागतील तर राजावर संकट येतें. जेव्हां दुष्ट लोकांना ते दुष्ट आहेत हें माहीत असून भल्यामध्यें वावरण्याला त्यांना मुभा मिळते तेव्हां त्या राजामध्यें कलीचा शिरकाव होतो. तेंच वाईट लोकांना राजा वाटेवर आणील तर त्याचें राज्य भरभराटीला चढतें. जो राजा अमात्यांना मान देऊन त्यांना मसलतींत घेतो, व युद्धाचे कामगिरीवर पाठवितो अशाचें राज्य भरभराटीला येऊन तो चिरकाल पृथ्वीचा उपभोग घेतो. जो एखाद्याचें चांगले कृत्य किंवा चांगलें भाषण लक्षांत आणून त्याबद्दल त्याचा बहुमान करतो तेव्हां त्याचें चांगलें कल्याण होतें. दुसऱ्याशीं मिळून राज्याचा उपभोग घेणें, प्रधानांचा अवमान न करणें, बलाढ्य व गर्विष्ठ अशा लोकांना दाबून टाकणें, कायावाचामनानें सर्वांचा सांभाळ करणें, मुलाच्या अपराधाकडे देखील दुर्लक्ष न करणें, दुबळ्या लोकांना खावयाला देऊन त्यांना बलवान करणें, राष्ट्राचें रक्षण करून चोर नाहींसे करणें, युद्धामध्यें जय मिळविणें, तोंडानें किंवा हातानें पाप करणारा मग तो आपला आवडता असला तरी त्याजकडे डोळेझांक न करणें, व्यापाऱ्यांचा मुलांप्रमाणें सांभाळ करणें, योग्य मर्यादा उल्लंघन न करणें, काम, वासना व द्वेष न धरतां पुष्कळ दक्षिणा देऊन श्रद्धापूर्वक मोठमोठे यज्ञ करणें, गरीब, अनाथ, ह्यातारेकोतारे यांचे अश्रू पुसून त्यांना आनंदविणें, शत्रूला चवाठ्यावर ओढून मित्रांना साहाय्य देणें, साधूंचा सत्कार करणें, नेहमीं खरेपणा ठेऊन भूदान देणें, अतिथींचा सत्कार करून नोकरांचा समाचार घेणें, दंड व कृपा या दोन्ही गोष्टी ठेवणें हे राजधर्म असून याप्रमाणें वागणाऱ्याला इहपरलोकीं त्याचें फळ मिळतें.

‘ राजा हा यमधर्म समजला आहे. तेव्हां ज्याप्रमाणें यमधर्म सर्व प्राणिमात्रांचें नियमन करतो तसेंच त्याचें अनुकरण करून राजानें सर्व प्रजेला घाटेवर आणावें. क्षमा, बुद्धि, शहाणपण व प्रेम हे गुण काळजीपूर्वक वाढवावेत; व लोकांचे हातून घडणाऱ्या बऱ्या वाईट गोष्टी समजून घ्याव्यात. सर्व लोक मिळवून घेऊन, लोकोपकार व गोड भाषण या गुणांनीं प्रजेचें रक्षण करावें. राज्यकारभारांत लक्ष नसणाऱ्या राजाच्या हातून प्रजेचें रक्षण होत नाहीं. राज्याचा बोजा फार जड असून दंडनीति माहीत असणाऱ्या शहाण्या व शूर राजाच्या हातूनच त्याची योग्य व्यवस्था लागते. दंडनीति ठाऊक नसणाऱ्या मूर्ख व दुबळ्या राजाच्या हातून त्याची व्यवस्था लागणें कठीण. योग्य, कुलवान, हुशार, आपल्यावर अनुरक्त, व व्यवहार जाणणारा अशा लोकांकडून तापसांसकट सर्वांचे विचार समजून घ्यावेत. याच्या योगानें आपल्या व परकीय देशांत सर्व लोक कसे वागतात हें कळून येऊन राजधर्माला व्यत्यय येणार नाहीं. यासाठीं अर्थ व काम यांहून धर्माचीच विशेष मातब्बरी आहे. धर्मात्माच इहपरलोकीं सुख भोगतो. लोकांचा चांगला सत्कार केला असतां प्रसंगीं बायकांपोरांवर सुद्धां ते उदार होतात. लोकसंग्रह, दान, गोड भाषण, सावधगिरी, शुद्धशीलता हे गुण राजाला मोठे वैभवाला चढविणारे आहेत. राजानें मोठ्या हुशारीनें आपल्या व शत्रूच्या कमीपणाकडे लक्ष पोहोंचवावें. आपलें छिद्र दुसऱ्याला कळूं देऊं नये, व शत्रूचें छिद्र पाहून त्याच्यावर चाल करावी. धर्मानें वागणाऱ्या राजाचे गुण इहपरलोकीं सर्व गातात.

धर्म राखूं इच्छिणाऱ्या राजानें राजा वसुमान व वामदेव ऋषी यांजमधील पुढील संभाषण लक्षांत ठेवावें. वामदेव त्याला म्हणाले, ‘ धर्माप्रमाणेंच वागावें; धर्माहून श्रेष्ठ कांहीं नाहीं; धर्माप्रमाणें वागणारे राजे ही पृथ्वी जिंकतात. द्रव्यसंचयाहून धर्म श्रेष्ठ मानून जो तो वाढविण्याकडे लक्ष देतो, तो त्या धर्मानें फार सुलक्षण दिसतो. अधर्माकडे प्रवृत्ति ठेवून जो बळाच्या घमेंडीवरच वागतो तो लौकरच धर्मभ्रष्ट होऊन धर्म व अर्थ या दोहोंनाही मुकतो. धर्माच्या पायांवर कुऱ्हाड हाणणारा दुष्ट व पापी सचिव सर्व लोकांना वध्य होऊन आपल्या परिवारासकट लौकरच नाश पावतो. कार्यसिद्धीचें

धोरण लक्षांत न घेतां मनाप्रमाणें वागणाऱ्या गर्विष्ठ राजाला सर्व पृथ्वी मिळून सुद्धां त्याचा लौकरच नाश होतो. तोच हिताची गोष्ट लक्षांत ठेवून इंद्रियें ताब्यांत ठेवून जो कोणाचा हेवा करीत नाहीं, तो नद्यांच्या योगानें वाढणाऱ्या समुद्राप्रमाणें वाढत राहतो. धर्म, अर्थ, काम, बुद्धि व मित्र यांनीं आपण पूर्ण आहों, असें राजानें कधीं मानूं नये. कारण यावरच लोकयात्रा अवलंबून आहे. यांकडे लक्ष देणाऱ्या राजाला यश, कीर्ति, वैभव व प्रजा मिळतात. धर्माकडे लक्ष देऊन त्याचें चिंतन करीत असणारा राजा मोठ्या वैभवाला चढतो. तोच कंजूष, कोणावर स्नेह न करणारा, अंमलाच्या जोरावर प्रजा ताब्यांत ठेवणारा व अविचारी राजा लौकर नाश पावतो. मूर्ख राजाला आपलें वाईट कृत्य न कळतां ह्या जगीं त्याची अपकीर्ति होऊन पुढें त्याला नरक मिळतो. लोकांना मान देऊन पैसा देणारा आणि गोड भाषणाची किंमत ओळखून दुसऱ्यानें सांगितलेलें ऐकणारा, अशा प्रकारच्या राजावर संकट आलें असतां लोक तें आपल्यावर आलें आहे असें समजून त्याचें निवारण करतात. ज्याला धर्माच्या बाबतींत गुरु नसून जो दुसऱ्याचाही सल्ला घेत नाहीं व पैसा मिळविण्याच्या कामीं मनाप्रमाणें वागतो त्याला फार दिवस सुख मिळत नाहीं. तोच जो राजा धर्माच्या बाबतींत सर्व कांहीं गुरूला विचारून करतो, सर्व गोष्टींकडे स्वतः लक्ष देतो व धर्माकडे नजर देऊन पैसे मिळवितो तो चिरकाल सुखोपभोग घेतो.

ज्या ठिकाणीं बलवान राजा दुबळ्यांवर अधर्म लादतो तेथें त्या पापी राजाचाच किंवा त्याचे वंशज गिरवितात. व राष्ट्रामध्यें सर्वच लोक आडदांड होऊन तें राष्ट्र लवकरच लयाला जातें. धर्मानें वागणाऱ्या राजाचें अनुकरण लोक करतात. तेच आडमार्गाला जाणाऱ्या राजाचें वर्तन त्याच्या स्वजनांना सुद्धां आवडत नाहीं. अविचारानें वागणाऱ्या राजाचे हातून जें कांहीं पाप घडतें त्यानें त्याचा लवकरच नाश होतो. पूर्वीच्या श्रेष्ठांनीं, मग ते जिवंत असोत अथवा मृत असोत, घालून दिलेल्या मार्गानें जो चालत नाहीं, त्याचप्रमाणें पूर्वी आपलें हित केलेला असा शत्रु रणांत आपल्या हातीं लागला असतां द्वेषबुद्धीनें त्याला मान देत नाहीं तो राजा क्षात्रधर्मापासून भ्रष्ट होतो. जो सर्व यथास्थित चाललें असतां ऐषआरामांत असतो, पण प्रसंग आला असतां, आपलें कर्तव्य करण्यास चुकत नाहीं तो सर्व लोकांना आवडता होऊन वैभवापासून कधीं ढळत नाहीं. एखाद्यानें वांकडें केलें असतां फिरून त्याचें चांगलें करावें. वांकडें करणारा फिरून चांगलें करील तर तो एकदम त्याला आवडता होतो. खोटें बोलणें सोडून द्यावें. व कोणी तोंड पसरल्याशिवाय त्याचें बरें करावें. कोणच्याही हेतूनें, रागाच्या तडाक्यांत जाऊन किंवा द्वेषभावामुळें धर्म सोडूं नये. कोणी कांहीं विचारलें असतां भलतेंसलतें उत्तर देऊं नये. गडबड असूं नये. किंवा कोणाची असूया करूं नये. अशा रीतीनें लोक वश होतात. प्रजेचें हित लक्षांत ठेवून कोणचीही मनासारखी गोष्ट झाली असतां आनंदभरित होऊं नये. मनाविरुद्ध गोष्ट घडली असतां वाईट वाटून घेऊं नये. एखादा नुकसानीचा प्रसंग आला असतां संताप करून घेऊं नये, जो स्वाभाविकपणेंच नेहमीं लोकांचें चांगलें करीत रहातो त्याचीं सर्व कामें शेवटाला जाऊन तो वैभवाला मुकत नाहीं. जो आपल्या विरुद्ध कांहीं करीत नाहीं व आपलें हित करण्यांत नेहमीं तयार असतो अशा आपल्यावर भक्तीनें असणाऱ्या मनुष्याला राजानें मोठ्या काळजीनें जवळ करावा. ज्याचीं सर्व इंद्रियें ताब्यांत असून जो मोठा राजनिष्ठ आहे व ज्याचें वर्तन चोख असून जो एखादें काम करण्याला समर्थ आहे अशा आपल्यावर प्रेमानें असणाऱ्या मनुष्याला राजानें आपलें मोठें काम सांगावें. जो मूर्ख, विषयासक्त, लोभी, नीच वृत्तीचा, लुच्चा, कपटी, पीडाकर, दुर्बुद्धि, व्यवहारशून्य, संकुचित विचाराचा, दारू, जुगार, बायका व शिकार यांमध्यें गढलेला असा आहे त्याच्याकडे मोठें काम सोंपविलें असतां राजा वैभवाला मुकतो. स्वतःचें रक्षण करून ज्यांचें रक्षण केलें पाहिजे अशांचें जो रक्षण करतो त्याची प्रजा भरभराटीला चढून मोठ्या पदाला चढते. जिव्हाळ्याच्या लोकांकडून इतर राजांवर गुप्तपणें नजर ठेवल्यानें राजाला त्यांच्यावर वर्चस्व मिळतें. बलवानाची खोडी काढल्यावर मी त्यांजपासून

दूर आहे ह्मणून कधीं त्यानें स्वस्थ राहूं नये. ससाण्याप्रमाणें जरा दुर्लक्ष झालें कीं ते आपल्यावर येऊन पडतात. आपल्या राज्यांत सर्व सुस्थिति करून, मनांत दुष्ट हेतु न ठेवतां, आपलें बळ ओळखून जे बलहीन असतील त्यांच्यावर चालून जावें. जे आपल्याहून बलवान आहेत त्यांच्यावर चालून जाऊं नये. पराक्रमाच्या जोरावर पृथ्वी मिळवून प्रजा धर्मानें पाळावी. धर्माकडे लक्ष असणाऱ्या राजाला रणामध्यें मरणें चांगलें. कारण ह्या सर्वांचा शेवट नाशामध्यें असून अविनाशी असें या जगांत कांहीं नाहीं. राष्ट्राचा योग्य बंदोबस्त, युद्धाची तयारी, न्यायानें राज्य चालविणें, नेहमीं सल्लामसलत करणें व प्रसंगीं प्रजेला सुख देणें ह्या पांच गोष्टींनीं राज्य भरभराटीला चढतें. ह्या तजविजी ज्याच्या सुरळीत असतात तोच ह्या पृथ्वीचें राज्य करूं शकतो. ह्या सर्व गोष्टींकडे एकाच्यानें नजर पोहोंचविणें कठिण आहे. ह्मणून मंत्रिमंडळावर ह्या गोष्टी सोंपवाव्या. जो दानशील असून वैभवाचा चारचौघांशीं मिळून उपभोग घेतो व दयाळू, शुचिर्भूत असून लोकांना आपल्याकडे मिळवून घेतो त्याला लोक राजा करतात. दुसऱ्याचा हिताचा सल्ला ऐकून आपलें मत सोडून देऊन त्याप्रमाणें वागतो त्याचें लोक ऐकतात. जो दुसऱ्यांनीं सांगितलेली फायद्याची गोष्ट आपल्या मताच्या उलट असल्यामुळें ऐकत नाहीं किंवा ते दुर्लक्षपूर्वक ऐकतो व भलत्याप्रमाणें जो वागत नाहीं तो क्षात्रधर्मापासून भ्रष्ट होतो. मुख्य मंत्र्यांना सोडून हलक्यांना जो जवळ करतो तो संकटांत बुडाला असतां त्यांतून पार पडत नाहीं. जो मनाच्या चंचळतेनें, द्वेषभावामुळें किंवा रागाच्या तावतींत जाऊन ज्ञातीचें चांगलें पहात नाहीं तो लौकर नाश पावतो. तेंच जो गुणवान लोकांना त्यांचें चांगलें करून वश करून घेतो, तो लौकिक मिळवितो. भलत्याच वेळेस कराच्या रूपानें पैसा गोळा करूं नये. मनाच्या विरुद्ध गोष्ट घडली असतां संताप करून न घेतां व मनाप्रमाणें गोष्ट घडली असतां हर्षभरित न होतां, चांगल्या कामामध्यें गढून असावें. आपल्यावर प्रेमानें कोण आहेत, भयानें कोण जवळ झाले आहेत व त्रयस्थ कोण आहेत, हें नेहमीं पहात असावें. बलवान असून दुबळ्यावर कधीं विसंबून राहूं नये. स्वामी सर्व गुणांनीं संपन्न व गोड बोलणारा असला तरी लोक त्याचा हेवा करतात. ह्मणून त्यांवर विश्वास टाकून राहूं नये. युद्धावांचूनच जय मिळविण्याची खटपट करावी. युद्धानें मिळविलेला जय कमी समजला आहे. असलेल्या राज्याची बळकटी केल्याशिवाय नवीन मिळविण्याच्या खटपटीला लागूं नये. पाया डळमळीत असून नवीन राज्य मिळविल्यापासून कांहीं फायदा होत नाहीं. ज्या राजाचा देश मोठा वैभवसंपन्न असून ज्यांतील लोक संतुष्ट व राजभक्त आहेत, मंत्री गबर आहेत, व लोक सर्वांवर दयाळू असून धनधान्यसंपन्न आहेत, त्याचीच मुळें गादीवर कायम झालीं आहेत असें समजावें. ज्याचे योद्धे मोठे संतुष्ट असून राजानें ज्यांना खुष ठेविले आहेत व ज्यांना सर्व खाचाखोचा माहीत आहेत, अशा लहानशा सैन्यानिशींसुद्धां राजा पृथ्वी जिंकूं शकतो. आपल्या सद्दीचा काल आहे असें जेव्हां राजाला वाटेल तेव्हां त्यानें शत्रूचा प्रांत किंवा संपत्ति मिळविण्याच्या खटपटीला लागावें. ज्याचीं वैभवाचीं साधनें वाढत आहेत व जो सर्व प्राणिमात्रांचे ठिकाणीं दयावंत आहे, त्याचप्रमाणें जो दीर्घसूत्रीपणा न करतां स्वतःची नीट खबरदारी घेतो, अशाच्या राष्ट्राची वाढ कांहीं वेळ न लागतां होते. स्वजन आपणाशीं नीट वागत असतां जो त्यांच्याशीं कपटानें वागतो तो आपण होऊन आपल्या पायावर कुऱ्हाड हाणून घेतो. जो नेहमीं शत्रूवर घाव देत नाहीं, त्याचे शत्रू कधीं कमी होत नाहींत. जो रागाला ठार करण्याला शिकला त्याला द्वेष्टाच उरत नाहीं. भल्यांना नापसंत अशी गोष्ट शहाण्यानें कधीं करूं नये. ज्या कल्याणकारक गोष्टीविषयीं आपण चिंतन करीत असतों तिचें साधन करावें. काम संपवून जो सुख घेतो त्याला पश्चात्तापाला कारण उरत नाहीं व लोकांचाही दोष लागत नाहीं. या प्रकारानें जो राजा वागतो तो विजयी होतो.

### १११ शत्रूला जिंकण्याचा मार्ग.
### (१२. ९५—९७.)

'जो क्षत्रिय दुसऱ्याला युद्धांत जिंकूं इच्छितो त्यानें त्याला कसें जिंकावें, ह्मणून युधिष्ठिरानें वि-

चारल्यावरून भीष्म ह्मणाले, 'सैन्याच्या मदतीनें किंवा मदतीशिवाय ज्या राष्ट्राला जिंकावयाचें असेल त्या राष्ट्रामध्यें जाऊन राजानें ह्मणावें कीं, मी तुमचा राजा आहें. मी तुमचें नेहमीं रक्षण करीन. मला योग्य कर द्या नाहीं तर युद्धाला उठा. त्यांनीं जर त्याला राजा पसंत केला तर ठीकच आहे, पण ते स्वतः क्षत्रिय नसून, हा क्षत्रिय आपलें रक्षण करण्याला असमर्थ आहे ह्मणून हातीं शस्त्र घेत नाहीं अशा समजुतीनें ते जर त्याच्या विरुद्ध उठतील तर वाटेल त्या उपायानें त्यांना मऊ आणावें. आतां क्षत्रिय जर क्षत्रियावर चालून येईल, तर परस्परांनीं चिलखत घातल्याशिवाय लढूं नये. व चिलखत घालून तयार झाल्यावर लढतांना शत्रू जर घायाळ होईल तर त्याला सोडून द्यावें. तो सैन्यानिशीं येईल तर आपण सैन्यानिशीं तयार होऊन त्याला युद्धाला हाक मारावी. तो कपटानें युद्ध करील तर त्याच्याशीं कपटानें युद्ध करावें, व धर्मानें तो युद्ध करील तर धर्मानेंच त्याचें निवारण करावें. घोड्यावरून रथ्यावर चालून जाऊं नये. रथ्यावर रथांत बसून चालून जावें. जो संकटांत सांपडला आहे, जो भ्याला आहे किंवा जो जीत झाला आहे अशावर प्रहार करूं नये. **विषाचें पाणी दिलेले त्रिशूळाकृति बाण सोडूं नयेत. हीं दुष्टांचीं आयुधें आहेत.** न्यायानें युद्ध करावें. रागाच्या झपाट्यांत कधीं मारूं नये. फूट पडल्यामुळें जर भला मनुष्य व्यसनांत सांपडेल व तो जर शक्तिहीन, अपत्यहीन, भग्नशस्त्र, दुःखी किंवा विरथ असेल तर त्याला आपल्या राष्ट्रामध्यें आणून त्याची वैद्याकडून नीट व्यवस्था ठेवावी व जखम वगैरे बरी करून त्याला आपल्या घराकडे परत पाठवावा हा सनातन धर्म आहे. भल्याशीं भलेपणानें वागणें हा धर्म पाळल्यानें मनुष्याचा नाश होत नाहीं. कपटानें वागणारा जो क्षत्रिय अधर्मानें शत्रूला जिंकतो तो पापी आपल्या हातून आपला नाश करून घेतो. हें दुष्टांचें काम आहे. वाईटांना देखील चांगल्याच रीतीनें जिंकावें. न्यायानें वागून मरण आलेलें बरें. पण पापकर्मानें मिळालेला जय बरा नाहीं. आचरलेला अधर्म गाईप्रमाणें जरी एकदम फळ देत नाहीं तरी मुळें व फांद्या यांना जाळून काढून अखेर तो त्या पापी मनुष्याला गांठतो. पापी मनुष्य पापानें पैसा मिळवून खुष होतो; व चोरीवर भरभराटीला चढत चालला ह्मणजे तो त्यांतच गढून जगांत धर्मच नाहीं असें वाटून शुद्धशील लोकांना हासूं लागतो. याप्रमाणें धर्मशीलता नष्ट होऊन अखेर तोही नाश पावतो. यमाचा पाश गळ्यांत पडला असून तो स्वतःला अमर समजतो. वारा भरलेल्या कातड्याच्या कोथळ्याप्रमाणें फुगून जाऊन त्याची पुण्यकर्माशीं फारकत होते. नदीच्या कांठावरील झाडाप्रमाणें त्याचा समूळ फडशा पडतो. आणि नंतर फुटलेल्या मडक्याप्रमाणें लोक वाटेल तसें त्याला बोलूं लागतात. म्हणून विजय व खजिना न्यायानें मिळविण्याचा यत्न करावा. अधर्मानें जय मिळविण्याला कधीं इच्छा करूं नये. अधर्मानें जय मिळवून कोणीं संतोष मानावा? कारण तो विजय डळमळीत व स्वर्गाला मुकविणारा आहे; व राजाच्या व पृथ्वीच्या नाशाला कारण होतो. ज्याच्या अंगावरचें कवच फुटून गेलें आहे, जो शरण आला आहे किंवा ज्यानें हात जोडून हत्यार खालीं ठेविलें आहे असा शत्रू स्वाधीन झाला असतां त्याजवर घाव घालूं नये. आपल्या सैन्यानें जर शत्रूकडील राजाला जिंकलें असेल तर त्याच्याशीं एक वर्षभर युद्ध न करतां त्याला आपल्याकडे ठेवून घेऊन मी आपला गुलाम आहें असें त्याच्याकडून ह्मणवून घ्यावें. तो असें म्हणो किंवा न म्हणो, एक वर्षानंतर त्याचा पुनर्जन्म झाला समजून त्याला सोडून द्यावें. तसेंच शत्रूकडून बलात्कारानें उपटून आणिलेल्या मुलीला एक वर्षभर आपल्याशीं किंवा दुसऱ्या कोणाशीं लग्न करण्याला खुषी आहेस किंवा नाहीं म्हणून विचारून त्यानंतर ती खुषी नसेल तर तिला परत पाठवावी. त्याचप्रमाणें संपत्ति हुजरे वगैरे जें बलात्कारानें उपटून आणिलें असेल तें वर्षानें परत करावें. ज्यांना मारावयाचें असेल अशांचें जप्त केलेलें द्रव्य राजानें स्वतः घेऊं नये. शत्रूकडून घेतलेल्या गाई ब्राह्मणांना दूध प्यावयाला देऊन टाकाव्या. उपटलेले बैल शेतकीच्या कामाला लावावे किंवा परत पाठवावे. राजानें राजाशींच युद्ध करावें. जो राजा नाहीं त्यानें राजाशीं कधीं युद्धाला उठूं नये. दोन्हीं दळें भिडलीं असतां ब्राह्मण

जर दोघांचें संधि करून देण्यासाठीं मध्यें येईल तर युद्ध बंद करावें. जो ब्राह्मणाचें ह्मणणें उल्लंघन करील त्याला पुरातन मर्यादा उल्लंघन केल्याचें पाप लागेल. ती आज्ञा मोडणारा क्षत्रिय, क्षत्रिय जातीला बट्टा आणणारा ठरेल, व असा धर्म मोडून मर्यादा उल्लंघन करणारा क्षत्रिय, क्षत्रिय ह्मणविण्याला पात्र नसून त्याला समाजांतून दूर करावा. असें वर्तन विजयेच्छु राजानें ठेवूं नये. धर्मानें मिळणाऱ्या विजयापेक्षां दुसरा असा कोणता मोठा फायदा आहे ? **जिंकलेल्या राष्ट्रांतील अनार्य लोक असतील त्यांना गोड बोलून व लाचलुचपत दाखवून खुष ठेवावें ही राजांची उत्तम नीति होय.** परंतु यांना अन्यायानें चिरडूं लागले असतां आपल्या राज्यापासून ताप होऊन हे आपले शत्रू होतील, आपल्यावर संकटें येण्याची वाट पहात राहून आपल्या शत्रूला जाऊन मिळतील; व संकटसमयीं त्यांना साहाय्य करतील. शत्रूला फसवूं नये व त्यावर मोठा घाव घालूं नये. कारण अशानें कदाचित् त्याचा प्राण देखील जाण्याचा संभव आहे. जो राजा, विद्वान व पूजार्ह असे ऋत्विज, पुरोहित व गुरु यांचा बहुमान करतो त्याला लौकिक ज्ञान आहे असें समजावें. अशाच वर्तनानें पुष्कळ राजे इंद्रपदाला मिळाले आहेत.

प्रतर्दन राजानें रणामध्यें शत्रूला जिंकून भूमीशिवाय त्याची बाकी सर्व संपत्ति, अन्न व औषधी घेतली, तथापि त्याला पाप लागलें नाहीं. तेंच दिवोदास राजानें अग्निहोत्राचा अग्नि, हविर्भाग व शिजलेलें अन्न हें घेतलें ह्मणून तो दोषी झाला. त्याचप्रमाणें नाभाग राजानें शत्रूला त्याच्या राष्ट्रासकट जिंकून श्रोत्रिय व तापस यांच्या पैशाखेरीज राष्ट्रांतील बाकीचा सर्व पैसा ब्राह्मणाला दक्षिणारूपानें दिला. याप्रमाणें पूर्वीच्या राजांचें कमी अधिक प्रमाणानें घडलेलें धर्माचरण सर्व राजांना मान्यच असले पाहिजे. युद्धकलेचें आपल्या अंगांतील सर्व कौशल्य दाखवून जय मिळविण्याची इच्छा धरावी. परंतु कपटानें किंवा ढोंगी वर्तन ठेवून वैभवाला चढण्याची इच्छा धरूं नये. रणामध्यें अपाय करून लोकांना मारावें लागतें, तेव्हां या क्षत्र धर्मासारखा पापी धर्म दुसरा कोणचाही नाहीं असें तुला वाटत असेल तर या पापाचें निरसन कशानें होतें सांगतों ऐक. पापी लोकांना ताळ्यावर आणल्यानें, चांगल्या लोकांना जवळ केल्यानें, त्याचप्रमाणें यज्ञ व दान केल्यानें राजे निर्मळ व शुद्ध होतात. राजे जय मिळविण्याच्या हेतूनें लोकांचा नाश करतात; परंतु तेच फिरून जय मिळाल्यावर प्रजेला भरभराटीला चढवितात. व प्रजेच्या कल्याणासाठीं दानयज्ञादि करून पाप धुऊन काढतात व पुण्याला भर टाकतात. ज्याप्रमाणें शेताची भांगलणी करणारा शेतांत माजलेल्या गवताबरोबर कांहीं उगवलेलें धान्यही उपटून टाकतो परंतु त्यानें त्या धान्याची नुकसानी न होतां त्याची जोरानेंच वाढ होते. त्याप्रमाणें युद्धामध्यें पुष्कळ वाईटांबरोबर ज्या कांहीं थोड्या भल्यांचा नाश होतो त्या पापाचें क्षालन पुढें राहिलेल्या लोकांच्या सुस्थितीनें होतें दरवडे, प्राणनाश व अनेक प्रकारचे क्लेश यांपासून प्रजेचें रक्षण करून राजा अखेर त्यांना सुख देतो. व अभयरूपी दक्षिणा देऊन सर्व प्रकारच्या यज्ञांनीं कल्याण करून तो इंद्रलोकासारख्या लोकांना जातो. ब्राह्मणांसाठीं शत्रूच्या पुढें सरसावून जो युद्धामध्यें आत्मरूपी यूप उभारतो त्याचा तो रणयज्ञ अनंत फलदायक आहे. जो शत्रूला बाणांनीं झांकून काढून त्यांचे बाण आपल्या अंगावर घेतो, त्याहून चांगलें कृत्य देवांच्या दृष्टीनें दुसरें कोणचेंच नाहीं. रणांत जितक्या शस्त्रांचा ह्मणून त्यांच्या अंगावर प्रहार झाला असेल तितक्या इच्छित फल देणाऱ्या अक्षय्य लोकांचा तो उपभोग घेतो. त्याच्या अंगांतून जें रक्त निघतें त्या रक्तरूपी पापाबरोबरच त्याचें सर्व पाप धुऊन जातें. युद्धामध्यें शत्रूला ताप देतांना जीं दुःखें सहन करावीं लागतात, तींच त्याचीं निरनिराळ्या प्रकारचीं तपें होत. धार्मिक व भित्रे लोक पावसापासून पाण्याच्या इच्छेनें आ पसरून बसलेल्या लोकांप्रमाणें शूरांपासून संरक्षणाची इच्छा धरून असतात. तेव्हां या भित्र्यांना रणांत तोंडीं न देतां हे त्यांचें संरक्षण करतील तर तो उपकार जाणून ते यांना देवाप्रमाणें नमतात. रणांत दंगल उडून शत्रूबरोबर भिडण्याचे वेळीं सामान्य लोकांसारखाच दिसणारा परंतु शूर असेल तोच स्वर्गाचा उजळ मार्ग धरून

शत्रूवर तुटून पडतो. व भित्रा असतो तो आपल्या साह्यकाऱ्यांना संकटांत टाकून पळ काढतो. जे आपल्या साथीदारांना रणांत टाकून खुशाल घराकडे परत येतात असे नीच पुरुष कधीं निपजूं नयेत. देव कधीं त्यांचें कल्याण करीत नाहीं. जो आपल्या साथीदारांना टाकून याप्रमाणें आपले प्राण राखूं इच्छितो त्याला काठ्यांनीं किंवा दगडांनीं हाणून ठार करावा. किंवा चटयींत गुंडाळून पेटवून जाळावा किंवा गुराप्रमाणें बडवून चेंदा उडवून यावा. हागत मुतत, दीनाप्रमाणें रडत हांतरुणांत पडून मरणें हा क्षत्रियांचा धर्म नव्हे. अंगाला जखम न लागतां क्षत्रियानें मरणें प्रशंसेला पात्र होत नाहीं. या वीर बहाद्दरांना हें कृत्य भागूबाईपणाचें, अधर्माचें व भिकार समजलें आहे. दुर्गंधीनें भरून जाऊन केविलवाणें तोंड करून, 'हें फार असह्य आहे, हें मोठें कष्टप्रद आहे, यासारखें पाप नाहीं,' असें ह्मणत आपल्या जवळच्यांना रडवीत पडलेल्या मनुष्याला मरण येईल तर बरें असें वाटत: असतें. वीर, अभिमानी व थोरपणाची चाड असलेल्या मनुष्याला अशा प्रकारें मरणें योग्य नाहीं. रणामध्यें आपल्या ज्ञातीच्या घोळक्यांत शत्रूंची कत्तल उडवून देऊन तीक्ष्ण शस्त्रांनीं घायाळ होऊन मरणें क्षत्रियाला योग्य आहे. शूर असतो तो आवेशानें युद्ध करीत असतो व आपल्या आंगावर शत्रूचा मारा चालला असतांही तो त्याला कळत नाहीं. रणाला पाठ न देतां किंवा दैन्य न दाखवितां मेल्यानें त्याला अक्षय्य लोक मिळतात.

## ११२ रणांत मरणाऱ्या शूरांची वाट.
### (१२. ९८—९९)

'पाठ न दाखवितां जे रणांत मरतात त्यांना कोणचे लोक मिळतात,' ह्मणून युधिष्ठिरानें विचारलें असतां भीष्म ह्मणाले, 'या बाबतींत अंबरीष राजा व इंद्र यांमधलें भाषण ऐक. अंबरिष राजा दुर्लभ अशा स्वर्गाला गेला असतां सर्व बाजूंनीं तेजोमय अशा विमानांत बसून वर चाललेला आपला सेनापती तेथें पाहून त्याच्या त्या वैभवानें विस्मित होऊन तो इंद्राला ह्मणाला, 'या सागरान्त सर्व पृथ्वीचें यथायोग्य राज्य करून मीं धर्मबुद्धीनें चारी वर्णांशीं यथाशास्त्र वर्तन ठेविलें. कडक ब्रह्मचर्य, गुरु व वडील यांची शुश्रूषा, वेदाध्ययन, राजनीति हीं सर्व पाळून अतिथींना खाण्यापिण्याला देऊन, पितरांना स्वधेच्या योगानें, ऋषींना वेदाध्ययनानें व देवांना यज्ञांनीं तृप्त केलें युद्धामध्यें सर्व सैन्यावर स्वतः देखरेख ठेवून जय मिळविले. हा सुदेव माझा सेनापति होता. हा एक शांत स्वभावाचा योद्धा होता. यानें यज्ञादिक कर्में केलीं नाहींत व ब्राह्मणांनाही तृप्त केलें नाहीं तेव्हां हा माझ्यापेक्षां श्रेष्ठ कशानें झाला?' इंद्र ह्मणाला, 'यानें मोठा रणयज्ञ केला आहे. हा व अशा प्रकारचे लोक कवच घालून सैन्याच्या तोंडाला उभे राहून रणयज्ञाचा अधिकार मिळवितात. या यज्ञांतील यज्ञसाधनें अशी आहेत. हत्ती हे यांतले ऋत्विज व घोडे अध्वर्यु होत. शत्रूचें मांस हें हवी व रक्त हेंच आज्य होय. कोल्हीं, गिधाडें, डोमकावळे व पक्षी हे यांतले सदस्य होत. हे या यज्ञामध्यें आज्यशेष पिऊन हवी खात असतात. लखलखीत तीक्ष्ण विटा, तोमर, तलवारी, शक्ति व परशु हे याज्ञिकाच्या हातांतील स्रुक् होत. धनुष्यापासून वेगानें सुटणारा, तीक्ष्ण, शत्रूचे शरीरांतून पार निघून जाणारा, चांगला पाणी दिलेला बाण हाच स्रुक् होय. वाघाच्या कातड्याच्या म्यानामध्यें असलेलीं हस्तिदंती मुठीची, हत्तीची सोंड उतरून काढणारी तलवार हीच स्फिग् होय. लखलखीत व तीक्ष्ण पोलादी विटा, शक्ति, परशु इत्यादि हीच सज्जनाकडून मुदतीनें मागून आणलेली अगणित संपत्ति होय. या रणामध्यें जोरानें पडणारी जी रक्ताची धार तीच ह्या होमामधली सर्व इच्छा परिपूर्ण करणारी समृद्ध पूर्णाहुति होय. 'कापा, तोडा,' हे जे शब्द सैन्याच्या तोंडांतून निघत असतात हींच त्या यज्ञांतील सामें सामवेदी यमसदनामध्यें गात असतात. शत्रूच्या सैन्याचें तोंड हीच हवी ठेवण्याची जागा. हत्ती, घोडे व सज्ज झालेले वीर ह्यांचा समुदाय हाच ह्या यज्ञांतला शेनचित् नांवाचा अग्नि होय. लढाईमध्यें हजारों लोकांची कत्तल उडून जें धड उडत असतें तोच खैराचा अष्टपैलु यज्ञस्तंभ होय. अंकुश टोंचल्यानें निघणारा जो हत्तींचा चीं, चीं, शब्द तोच इडा मंत्र होय. दुंदुभी, नगारे, हेच

यांतील त्रिसामा व उद्गाता असून तरवारांच्या एकमेकांवर आपटण्यानें निघणारा शब्द तोच वषट्कार. ब्रह्मस्व हरण केलें जात असतां जो मनुष्य आपलें प्रियप्राण त्यांचें रक्षण करण्याकरितां खर्ची घालतो त्याच्या योगानें त्याला अनंत दक्षिणा देऊन यज्ञ केल्याचें श्रेय मिळतें. जो शूर स्वामीसाठीं सैन्याच्या तोंडाशीं पराक्रम गाजवितो, भयानें मागें परतत नाहीं व ज्याच्या निळ्या रंगाच्या म्यानामध्यें असलेल्या तलवारी रणभूमीभर पसरल्या आहेत व सैन्यामध्यें डुबत राहून विजय मिळविण्याला झटत असतां जो कोणाच्या साह्याची अपेक्षा धरीत नाहीं, त्याला माझ्या लोकासारखे लोक मिळतात. रक्ताच्या प्रवाहानें भरून जाऊन जिच्यामध्यें नगारे हेच बेडके व कासव आहेत, वीरांच्या अस्थिरूप खडकांनीं जी तरून जाण्याला कठीण झाली आहे, मांस व रक्त यांचा ज्यामध्यें चिखल भरला आहे, तलवारींच्या म्याना हींच ज्यांतील होडग्गीं आहेत, मेलेल्यांचे केंस हेच जिच्यांतील गवत व शेवाळ आहे, भरून निघालेले घोडे, हत्ती व रथ ह्यांचा जिच्यावर पूल झाला आहे, पताका व ध्वज हेच जिच्यांतील वेत आहेत, मेलेले हत्ती जिच्यांतील सुसरी आहेत, ऋष्टी व तलवारी ह्याच जिच्यांतील नावा आहेत. गिधाडें, कंक व डोमकावळे हींच जिच्यांतील होडग्गीं आहेत, मनुष्यभक्षकांचा जिच्याकांठीं संचार आहे, व पैल पार जाऊं इच्छिणाऱ्यांना दुस्तर व भिऱ्यांना गर्भगळित करून सोडणारी अशी रक्ताची नदी हेंच त्या शूरांचें अवभृत होय. या रणयज्ञाच्या वेदीवर शूरांचीं त्याचप्रमाणें हत्तीघोड्यांचीं मुंडकीं पसरलीं असतात; शत्रूच्या सैन्याचें तोंड हेंच शूरांचें प्रियसह निजण्याचें शयनमंदीर होय. आपल्या सैन्याचें तोंड ही या यज्ञांत हवी ठेवण्याची जागा आहे. याच्या दक्षिणेकडे असणारे योद्धे हे सदस्य असून उत्तरेकडे असणारे योद्धे हे आग्नध्रि होत. व सेना हीच या याजकाची प्रिय पत्नी होय अशा या शूर यज्ञ करणाऱ्याला सर्व लोक वश असतात. दोन्ही सैन्यांमधली जी मोकळी जागा ही याची वेदी; वेदात्रें हींच त्यांतील अग्नी होत. जो भिऊन परतला असतां शत्रूच्या हातून मरतो त्याचा दुर्लौकिक त्याला नरकाला नेऊन पोहोंचवितो. ज्याच्या रक्ताच्या चिरकांडीनें केंस, मांस व हाडें यांनीं भरलेल्या या वेदीवर शिंपण पडतें त्याला उत्तम गति मिळते. जो शत्रुपक्षाच्या सेनापतीला मारून त्याच्या रथावर चढतो तो विष्णूसारखा पराक्रमी व बृहस्पतींसारखा हुशार समजला जातो. शत्रूकडचा मुख्य, त्याचा मुलगा किंवा तत्पक्षीय दुसरा कोणीही सन्मान्य पुरुष याला जो जिवंत पकडतो त्याला उत्तम गति मिळते. युद्धांत मेलेल्या शूराबद्दल कधीं रडूं नये. त्याला स्वर्गांत मोठा मान मिळतो. त्याला अन्नपाणी देण्याचें कारण नाहीं. त्याबद्दल स्नान किंवा सुतक धरावयाला नको. हजारों अप्सरा तो आपला नवरा व्हावा ह्मणून त्याच्याकडे धांवत येतात. हेंच मोठें तप असून मोठें पुण्य आहे. जो युद्धाचे नियम पाळतो त्यानें चारी आश्रमधर्म पाळल्याप्रमाणें आहेत. ह्मातारे, मुलें, बायका किंवा ज्यांनीं पाठ फिरविली आहे किंवा ज्यांनीं दांतीं तृण धरलें आहे व मी आपला आहें ह्मणून शत्रूला शरण गेले आहेत अशांना मारूं नये. वृत्र, बल, पाक, नमुचि प्रल्हाद इत्यादि दैत्यांना मारूनच मी देवेंद्र झालों आहें.'

ही गोष्ट सांगून भीष्म फिरून ह्मणाले, 'पूर्वी प्रतर्दन व जनक यांचें युद्ध झालें असतां, रणदीक्षा घेतलेल्या जनकानें आपल्या योद्ध्यांनी उत्तेजन दिलें. त्या वेळचें त्याचें भाषण लक्षांत ठेवण्याजोगें आहे. आपल्या योद्ध्यांना स्वर्ग व नरक दाखवून तो ह्मणाला, 'सर्व इच्छा परिपूर्ण करणाऱ्या गंधर्व कन्यांनीं भरलेले हे अक्षय लोक पहा. युद्धामध्यें जे कचरत नाहींत त्यांसाठीं हे लोक आहेत. त्याचप्रमाणें हा इकडे नरक व कायमचा दुर्लौकिक तयार आहे. यांजकडे पाहून पुढें जसें वागावयाचें असेल तसें वागा. जिवाची पर्वा न धरतां शत्रूला जिंका. दुर्लौकिककारक नरकाला जाऊं नका. असें मरण हेंच शूरांना स्वर्गाच्या दरवाजाला हात लावण्याला साधन आहे.' याप्रमाणें त्यानें उत्तेजन दिलें असतां त्याच्या वीरांनीं रणांत शत्रूला जिंकलें. ह्मणून धीराच्या मनुष्यानें रणांत पुढें असावें. हत्तीदळाच्या मधून रथदळ ठेवून त्याच्यामागें स्वार व त्याच्या मागोमाग पायदळ असावें. व या

सर्वांनीं अंगांत चिलखत चढाविलें असावें. अशा व्यूहरचनेनें नेहमीं जय मिळतो. तापट लोक चांगल्या रीतीनें लढूनच स्वर्ग मिळवूं इच्छितात. मगराप्रमाणें सैन्यामध्यें खळबळ उडवून द्यावी. एकमेकांना धीर देऊन जे घाबरले असतील त्यांना विशेष धीर द्यावा. जिंकल्या प्रदेशाचें आधीं नीट रक्षण करावें. **मोड झालेल्या शत्रूचा फार पाठलाग करूं नये.** कारण जिवावर उदार होऊन चौताळून ते परतले असतां त्यांचा जोर सहन करण्याला फार कठीण जातो. शिवाय शूर जे आहेत त्यांना पळणाऱ्याच्या पाठीं लागणें संमत नसतें. म्हणून पळणाऱ्याचा फार पाठलाग करूं नये. पाठ, पोट, हात, पाय हे सर्वांचें सारखेच असतांही भित्र्याचा पराभव होतो. ह्मणून भयानें पीडिलेले हात जोडून शत्रूपुढें वांकून असतात. हे सर्व लोक मुलाप्रमाणें शूराच्या बाहूंवर अवलंबून असतात. ह्मणून सर्व प्रसंगीं शूराला मान मिळतो. तिन्ही लोकांमध्यें शौर्यासारखें दुसरें कांहीं नाहीं. सर्व राखणारा काय तो शूर असून सर्व कांहीं शूरावर अवलंबून आहे.'

---

## ११३ शत्रूवर स्वारी व त्याची वेळ.

### (१२. १००—१०२)

'आतां धर्माकडे कमी अधिक लक्ष पुरवून जयाची इच्छा बाळगणारे लोक कूच कसें करतात, त्यांचे लोक कसे असावेत व जयाचीं चिन्हें कोणतीं हें सांगा,' म्हणून युधिष्ठिरानें प्रश्न केला असतां, भीष्म ह्मणाले, 'क्षात्रधर्म, रणांत मरण्याचा निश्चय, सैनिकांशीं गोडी गुलाबी, व दरारा या चार उपायांवर धर्म अवलंबून आहे. धर्म व अर्थ हे साधण्याला जीं साधनें आहेत तीं सांगतों ऐक. चोर निर्मर्याद होऊन धर्मार्थाच्या आड येऊं लागले असतां त्यांचा बंदोबस्त करण्यासाठीं त्याचप्रमाणें सर्व कांहीं सिद्धीला जाण्यासाठीं शास्त्रोक्त उपाय सांगतों. सरळ व वांकड्या अशा दोन्ही प्रकारच्या राजनीति ठाऊक असून वांकड्याच्या कधीं वाटेला जाऊं नये. मात्र शत्रू त्या उपायाचें अवलंबन करील तर त्याच्या विरुद्ध त्याचा उपयोग करावा. शत्रू आपल्या लोकांमध्यें फूट पाडीत असतात. तेव्हां राजाला कपट माहीत असेल तर त्याप्रमाणें त्याला वागतां येतें. हत्तीवरचें कातड्याचें झूल त्याप्रमाणेंच बैलावर घालण्याचें झूल, कातडें, हाडें, कांटे, अणीदार बाण, चिलखतें, चवऱ्या, पाणी दिलेलीं हत्यारें, त्याचप्रमाणें निरनिराळ्या रीतींनें रंगविलेल्या पताका व निशाणें, ऋष्टि, तोमर, तलवारी, तीक्ष्ण परशु, भाले, ढाली इत्यादिकांची चांगली तयारी ठेवावी. सर्व हत्यारें पाजळलेलीं असून योद्धे दृढ निश्चयाचे असावेत. **चैत्र किंवा मार्गशीर्ष महिना स्वारीला चांगला** समजला आहे. कारण त्या वेळेला पृथ्वीवर जिकडे तिकडे धान्य तयार झालेलें असून पाणी पुष्कळ असतें. त्या वेळीं फार थंडी नसते व फार ऊन्ह नसतें. तेव्हां अशा वेळेला स्वारीला निघावें; किंवा पेंच असल्यास वेळ न पाहतां निघावें. शत्रूला पीडा देण्याला ह्याच वेळा चांगल्या असतात. वाटेवर पाणी व गवत असावें. ती सरळ असून किचकट नसावी. हुशार व जंगली अशा हेरांकडून आसपासच्या परदेशाची माहिती करून घेतली असावी. पशूंच्या घोळक्याप्रमाणें जंगलांतून जातां येणें शक्य नाहीं. म्हणून सैन्यामध्यें अशा हेरांचा उपयोग करतात. आघाडीला कुलीन व समर्थ अशा मर्दांची तुकडी असावी. तळ देण्याची जागा बिकट असून त्या ठिकाणीं पाणी असावें व चोहों बाजूंनीं मोकळें मैदान असावें. अशा ठिकाणीं शत्रू चालून आला असतां त्याला चांगलें रोखतां येतें. मोकळ्या पटांगणापेक्षां जवळ जंगल असणें पुष्कळ तऱ्हेनें अधिक चांगलें असें युद्धकुशल लोक समजतात. अशा ठिकाणीं सैन्याचा तळ जवळच द्यावा. अशा प्रकारें तळ देऊन व पायदळ नीट सुरक्षित ठेवून शत्रूवर उलट मारा करणें हा संकटसमयीं उत्तम उपाय आहे. **सप्तर्षींना पाठीवर घेऊन पर्वतावरून न डगतां युद्ध करावें.** वारा जिकडून वहात असेल किंवा सूर्य अथवा शुक्र ज्या बाजूनें प्रकाशित असतील त्या बाजूनें लढावें व तिघांचाही एकाच वेळेला प्रादुर्भाव असेल, तर अनुक्रमानें एकेकाचें साहाय्य घेऊन लढावें. बिन दलदलीची, बिन पाण्याची, बिन अटकावाची व ठिकठिकाणीं ढिकळे वगैरे नसलेली भूमि स्वारांना योग्य आहे. कोरडा ठणठणीत व खाचखळगे नसलेला प्रदेश र-

थदळाला चांगला. लहान लहान झुडपें, जंगल व पाणी असलेला प्रदेश हत्तीदळाला चांगला. डोंगराळ, जंगली, कळक व वेत यांनीं भरलेला असा प्रदेश, त्याचप्रमाणें पर्वत व उपवनें पायदळाला चांगलीं. ज्यामध्यें पुष्कळ पायदळ आहे असें सैन्य भक्कम. रथदळ व घोडेदळ पुष्कळ असणारें सैन्य पावसाळ्यावांचून इतर दिवसांत चांगलें. पायदळ व हत्तीदळ पुष्कळ असलेलें सैन्य पावसाळ्यांत चांगलें. हे सर्व गुण लक्षांत घेऊन, देशकालाप्रमाणें उत्तम तीथ व नक्षत्र पाहून स्वारीवर निघून सैन्याची योग्य व्यवस्था ठेविली असतां नेहमीं जय येतो. निजलेले, तहानेले, थकलेले, फाकाफाक झालेले, मोक्षाकडे नजर देऊन बसलेले, कूच करीत असलेले, हालचाल करीत असलेले, जेवणाखाणांत गुंतलेले, वेडे बनलेले, बेशुद्ध झालेले, घायाळ झालेले, दुबळे बनलेले, स्वस्थ पडून राहिलेले, त्याचप्रमाणें काम करीत असलेले, सुरुंगादिकांनीं भाजून निघालेले, घास, दाणा गोळा करण्याकरितां बाहेर पडलेले, किंवा गोळा करून आणणारे, तंबू ठोकणारे, तंबूबरोबर असणारे, परंपरागत राजाचे किंवा मंत्रिवर्गाचे रखवालदार अशा लोकांवर प्रहार करूं नये. जे शत्रूचें सैन्य खोडतात किंवा आपलें फुटलेलें सैन्य जमवितात त्यांची आपल्याबरोबर खाण्यापिण्याची व्यवस्था ठेवून त्यांचा पगार दुप्पट करावा. दहा शिपायांचा जो शूर नायक असेल त्याला मोठ्या काळजीपूर्वक शंभरांवरचा नायक करावा;व शंभरांवरच्याला हजारांवरचा करावा. सैन्यावरचे जे ठळक ठळक लोक असतील त्यांना एकत्र जमवून ह्मणावें कीं, ‘ आपण मोठ्या पेंचांत आहों. जय मिळविणें असेल तर आपण एकमेकांला सोडतां कामा नये. जे कोणी भागुबाई असतील व आणीबाणीच्या प्रसंगीं आपल्या वरिष्ठांना जे शत्रूच्या तोंडीं देऊन पळणार असतील अशा लोकांना आतांच परत जाऊं दे. सैन्य एकमेकांशीं भिडलें असतां आपलें व आपल्या पक्षांचें रक्षण करून जे आपला मोड न होऊं देतां आपल्या लोकांना वांचवितात असेच लोक शत्रूला रणांत मारतात. पळण्यामध्यें पैशाची खराबी, मरण, अकीर्ति, दुर्लौकिक, कर्णकटु व वाईट असे शब्द सोसावे लागतात. त्याचे दांतओठ पडून सर्व हत्यारें खालीं ठेवून शत्रूकडून तो जेरबंद होतो. असा प्रसंग आपल्या वैऱ्यावरच येवो. जे रणांत माघार घेतात ते मानवजातीपैकीं नीच असून ते खानेसुमारीला भर घालण्याच्याच उपयोगाचे. या पलीकडे इहलोकीं व परलोकीं त्यांचा कांहीं उपयोग नाहीं. विजयी शत्रू चंदन अंगाला चोपडून, नटून मोठ्या आनंदानें अशा पळपुट्याला सामोरे जातात. रणामध्यें आलेले शत्रू त्याचा लौकिक नाहींसा करतात. हे मरण्यापेक्षां दुःसह दुःख आहे. धर्माचें व सर्व सुखांचें मूळ जय आहे. भित्र्याला ज्याचा बाऊ फार वाटतो त्या मरणाला शूर मोठ्या हौसेनें कवटाळतात. ह्मणून जय डोळ्यांपुढें ठेवून जिवाची पर्वा न करतां आपण मरूं तर आपल्याला उत्तम गति मिळणार आहे. ’ याप्रमाणें जे भित्रे नाहींत ते शपथा करून जिवाची पर्वा न धरतां शत्रूच्या सैन्यांत शिरतात. तलवारी व ढाली यांनिशीं असलेलें मर्दांचें सैन्य पुढें असावें, रथदळ मागें असावें; **बायका मध्यें असाव्या.** शत्रूवर मारा करण्यासाठीं पायदळ वाढवीत असावें. कसलेले असे जे जुने लोक असतील ते पुढें असावेत. त्याचप्रमाणें संमत, रगदार व हुशार असे लोक पुढें असून त्यांचे मागून दुसरे लोक असावेत. भित्र्यांना सुद्धां धीर देऊन मोठ्या हुशारीनें बरोबर घ्यावें. कारण निदान सैन्य फुगलेलें दिसण्यासाठीं त्याचा उपयोग होतो. सैन्य थोडें असेल तर तें एकत्र ठेवून शत्रूशीं लढावें. पुष्कळ असेल तर तें चोहोंकडे पसरून ठेवावें. मोठ्या सैन्याशीं लहान सैन्यास युद्ध करावयाचें असल्यास सुईच्या टोंकाप्रमाणें सैन्याची व्यवस्था असावी. शत्रूशीं भिडत असतां किंवा भिडलें असतां एकमेकांच्या दंडाला धरून, ‘ शत्रूचा मोड झाला, मोड झाला, मदतीचें सैन्य आलें, नकचरतां ठोका, ’ अशा रीतीनें खरें किंवा खोटें ओरडून दांडग्या लोकांनीं एकच गोंधळ उडवून द्यावा व शत्रूला जर्जर करून सोडावें. जे आघाडीला असतील त्यांनीं, ‘ हर, हर ’ शब्द करून ककच, शिंग, नगारे, नौबती, संबळा वाजवून एकच गर्दी उडवून द्यावी.

आतां सैन्यांतले लोक कशा प्रकारचे, कशा शी-

लाचे व आचाराचे, कोणकोणतीं हत्यारें घेऊन कशा रीतीनें तयार असावेत तें सांगतों ऐक. ज्या त्या देशानुरूप पूर्वापार चालत आलेलीं शस्त्रें व हत्यारें असावींत. गांधार, सिंधु, सौवीर या देशचे लोक नखें व विटा यांनीं युद्ध करणारें असून, न कचरणारे व बलशाली आहेत. त्यांचें सैन्य वाटेल त्या प्रसंगांतून पार पडणारें आहे. उशीनर लोक सर्व शस्त्रांमध्यें मोठें प्रवीण असून रगदार आहेत. पूर्वेकडचे लोक चांगले गजयोधी असून कपटयुद्धांत प्रवीण आहेत. यवन, कांबोज व मथुरेच्या आसपासचे लोक बाहुयुद्धांत कुशल असून दक्षिणेकडचे लोक तलवारीनें चांगले लढतात. सर्व ठिकाणीं शूर लोक निपजतातच. परंतु त्यांचीं ठळक ठळक लक्षणें सांगतों. सिंह, वाघ यांसारखी ज्यांची चाल व डोळे आहेत, व पारवे व कुलिंग यांसारखे ज्यांचे डोळे आहेत ते सर्व शूर असून शत्रूचा चेंदा उडविणारे समजावेत. हरणासारखा शब्द, चित्ता व बैल यांसारखें डोळे असणारे लोक मोठे चपळ असतात. घाटयाप्रमाणें स्वर असणारे, मूर्ख व तापट असून त्यांच्या हातून चुका होतात. मेघांसारखा ज्यांचा आवाज आहे व चेहरा तापट आहे असे लोक, तसेंच कांहीं उंटासारखे लोक व वांकड्या जिभेचे व नाकाचे लोक मोठी मजल मारणारे व दूरवर नेम मारणारे असतात. मांजरासारखें ज्यांचें शरीर वांकडें आहे व कॆंस विरळ असून अंगावरचें कातडें पातळ असतें व गति शीघ्र असून जे चपळ असतात ते कोणाला हार जात नाहींत. तसेंच गोधेप्रमाणें ज्याचे डोळे झांकलेले असतात, स्वभाव लवचिक असतो व चाल व आवाज घोड्याप्रमाणें असतो ते वाटेल त्या प्रसंगांतून पार पडतात. ज्यांचा बांधा चांगला ठाकठीक असून छाती पसरट असते. ते शत्रूकडील रणवाद्य ऐकल्याबरोबर खवळतात व भ.डणाची त्यांना मोठी आवड असते. ज्यांचे डोळे पिंगट, खोल व बाहेर आलेले असतात तसेंच ज्यांचे मुंगुसाप्रमाणें डोळे असनात ते शूर व जिवाची पर्वा न करणारे असतात. ज्यांचे डोळे तिर्वे, कपाळ रुंद, हनुवटी बिन मांसाची, वज्रासारखे बाहू, बोटावर चक्र, अंग सडपातळ असून अंगावरच्या शिरा स्पष्ट दिसतात ते चकमक सुरू झाली असतां, मोठ्या जोरानें शत्रुसैन्यांत शिरतात व कोणाला आवरत नाहींत. ज्यांचे कॆंस तुळतुळीत व कुरळे असतात, ज्यांच्या बरगड्या व हनुवटी भरीव असतात, खांदे वर आलेले असतात, मान भरली असते, स्वरूप विक्राळ असतें, पिंढऱ्या भरीव असतात, ते गरुडाप्रमाणें उद्धट असतात. ज्यांचें डोकें वाटोळें असतें, तोंड लांबट असतें, मांजराप्रमाणें ज्यांचा चेहरा असतो, त्याचप्रमाणें शब्द मोठा असून जे रागीट असतात ते युद्धामध्यें शत्रूवर चालून जातात. धर्म माहीत नसून मोठे अभिमानी असणारे, घोर व विक्राळ सरहद्दीवरचे भिल्ल वगैरे लोक जिवाची पर्वा न करणारे व रणांतून पाय मागें न घेणारे असतात. रणांत यांना पुढें करावें. ते मरतील किंवा मारतील. धर्म वगैरे ठाऊक नसून वाटेल तसें वागणाऱ्या लोकांपुढें गोडीगुलाबीचे कांहीं चालावयाचें नाहीं. ते आपल्या राजावर देखील वाटेल तेव्हां खवळतात.

आतां सैन्याला होणारीं जयचिन्हें कोणतीं तीं सांगतों ऐक. प्रथम दैव फिरून मनुष्य काळाच्या तावडींत सांपडले असतां शहाणे लोक ज्ञानचक्षूनें याचा विचार करून जप, होम व मंगल कृत्यें प्रायश्चित्तासाठीं करून अनिष्टाची शांति करतात. ज्या सैन्यांतील योद्धे व वाहनें उत्साहसंपन्न असतात, ज्यांतून वारा अनुकूल वाहतो, मेघ त्याचप्रमाणें सूर्यकिरणें ज्याच्यामागून असतात, कोल्हीं, बगळे, गिधाडें जिच्यामध्यें अनुकूल असतात, त्याचप्रमाणें प्रसन्न व स्वच्छ अशा अग्नीच्या ज्वाळा सरळ वर व किंचित् दक्षिणाभिमुख चालल्या असतात, तसे आहुतीचा चांगला पुण्यकारक गंध येत असतो, शंख व नौबती खोल व मोठा नाद देत असतात, व कावळे व हरणें लढाईला निघालेल्यांच्या व निघणाऱ्यांच्या मागल्या बाजूला असतात तेव्हां हें सारें सर्व जयाचें चिन्ह समजावें. त्याचप्रमाणें हे कावळे व हरीण शत्रूवर तुटून पडतांना उजव्या बाजूला असतील तर काम फत्ते होईल ह्मणून ह्मणतात; व पुढें असतील तर कामाला हात घालूं नये ह्मणून सांगतात. त्याचप्रमाणें हंस, कुरकुंचे, सारस, तास हे पक्षी मंगल स्वर काढीत असतील तर व योद्ध्यांना उत्साह वाटून अंगांत रग वाटत असेल तर हें जयाचें चिन्ह आहे, असें

समजावें. हत्यारें, यंत्रें, कवचें, तरुणांचे तेजस्वी चेहरे यांच्या योगानें ज्या सैन्याकडे पहावत नाहीं तें सैन्य शत्रूला जिंकतें. अभिमान न धरतां स्नेहभावानें जे एकमेकांच्या उपयोगीं पडतात, ज्या सैन्यांतील योद्ध्यांनीं शुद्धता पाळली आहे, शब्द, स्पर्श, गंध ज्या सैन्यामध्यें आल्हाद देतात, व योद्ध्यांना जेथें हुरूप वाटत असते तें विजयाचें लक्षण आहे. सैन्यांत शिरलें असतांना डावीकडचा, शिरत असतां उजवीकडचा व मागें असणारा कावळा काम फत्ते होईल ह्मणून सांगत असतो व पुढें असणारा काम हातीं घेऊं नये असें सांगत असतो. मोठी चतुरंग सेना जुळवून प्रथम संधीचीच खटपट करावी. तें न जुळेल तर मग युद्धाला लागावें. युद्धानें मिळणारा जय गौण समजला आहे. युद्धानें येणारा जय प्रसंगोपात किंवा दैवानें जुळून येणारा आहे. पाण्याच्या जोराच्या प्रवाहाप्रमाणें किंवा घाबरून पळत सुटलेल्या हरणाच्या कळपाप्रमाणें मोठ्या सैन्यामध्यें एकदां फूट झाली असतां मग त्याला आवरण्याचें काम फार कठीण आहे. केवळ सैन्य फुटलें ह्मणूनच सर्व शहाणे सुद्धां फुटून पळूं लागतात. त्याला कांहीं मग दुसरें कारण लागत नाहीं. हें अफाट सैन्य हरणाच्या कळपाप्रमाणें असतें. मग त्यांत कितीका शूर शिपाई असेनात. सर्व उत्साहसंपन्न असून सर्वांनीं एकमेकांना ओळखून जिवाची पर्वा न करतां लढण्याचा निश्चय केला असेल तर असे पन्नास लोक सुद्धां शत्रुसैन्याला नाहींसें करतात. एवढेंच नव्हे तर दृढ निश्चयाचे कुलीन व सन्मान दिलेले पांच, सहा किंवा सात जरी एकत्र मिळाले तरी ते शत्रूवर जय मिळवितात. युद्धप्रसंग शक्य असेल तोंपर्यंत टाळावा. गोडीगुलाबी, फूट, व लाचलुचपत यांनंतर युद्धाच्या वाटेला लागावें. दैदीप्यमान वज्राप्रमाणें हें आपणावर कोठून पडेल अशी सैन्य पाहिल्याबरोबरच भित्र्यांना भीति वाटूं लागते. सैन्य लढाईला भिडलें आहे हें कळल्याबरोबरच त्यांच्या अंगाला दरदरून घाम येत असतो. सर्व देशचा देश घाबरून जातो. अस्त्रानें पीडलेल्या लोकांचा मगज नाहींसा होऊं लागतो. ह्मणून उग्र स्वरूप दाखवून गोडीनेंच सख्य जुळवावें. उलट पक्षाकडून त्रास होऊं लागला ह्मणजे मुकाट्यानें दुसरा पक्ष संधि करण्याला तयार होतो. शत्रूचे जे साह्यकारी असतील त्यांना फोडण्यासाठीं आंतून हेर सोडावेत, शत्रूहून प्रबल असा जो दुसरा राजा असेल त्याच्याशीं संधि करावा. कारण हा आपल्या शत्रूला पीडा देण्याला उत्तम मार्ग होय. आणि अशा रीतीनेंच शत्रूला चोहोंकडून घेरावें. भल्यांचे ठिकाणींच क्षमा असून दुर्यांचे ठिकाणीं ती नसते. ती केव्हां करावी, केव्हां न करावी हें सांगतो ऐक. शत्रूला जिंकून त्याजवर क्षमा केली असतां राजाचा लौकिक वाढतो. व याच्या हातून मोठा अपराध झाला तरी शत्रूंचा यावर विश्वास बसतो. शत्रूला जेरीला आणल्याशिवाय त्यावर क्षमा करणें चांगलें नाहीं. कारण तापविल्यावांचून वांकविलेलें लांकूड फिरून पहिल्यासारखें होतें असें शंबरांचें मत आहे. परंतु दुसऱ्या नीतिशास्त्रकारांना हें पसंत नसून तें हें चांगलें उदाहरण नाहीं असें ह्मणतात; न रागावतां, न नाश करतां मुलाप्रमाणें शत्रूला वाटेवर आणावें. जो राजा कडक आहे त्याचा सर्व लोक द्वेष करतात व मऊ असलेल्याचा अवमान करतात. ह्मणून दोन्ही थोडे थोडे ठेवावे. मार देण्याचा हेतु असतांना किंवा मार देतांना गोड बोलावें. मार दिल्यावर रडून दुःख झाल्याचें दाखवून कृपा दाखवावी. ‘ ज्या माझ्या लोकांनीं लढाईंत शत्रूंना मारलें ते मला पसंत नाहींत. फिरून फिरून सांगितलें तरी त्यांनीं कांहीं माझें ऐकलें नाहीं. अशाप्रकारचें लोक मेल्यापेक्षां जिवंत राहिले असतें तर बरें झालें असतें. रणांत पाय मागें न घेणारे लोक मिळणें कठीण. यांना मारणारे माझ्याही मनाविरुद्ध वागले समजावयाचे. ’ याप्रमाणें शत्रूकडच्या लोकांना बोलून खासगी रीतीनें त्यांचा सत्कार करावा. लोकांना आपल्याकडे वळवून घेण्यासाठीं मेलेल्यांच्या खांद्यावर हात ठेवून रडावें सुद्धां. याप्रमाणें सर्व प्रसंगीं गोडीनें वागल्यानें राजा लोकांना आवडता होऊन त्याला भीति उरत नाहीं. सर्व प्राणिमात्रांचा त्यावर विश्वास बसतो. व असा विश्वास बसल्यावर प्रसंगीं त्यांचा वाटेल तसा उपयोग करून घेतां येतो.

---

### ११४ शत्रूशीं वर्तन. ( १२.१०३ ).

‘ प्रबल अशा शत्रूशीं मऊ, कडक, अथवा कसें

वागावें, ' ह्मणून युधिष्ठिरानें विचारलें असतां, बृहस्पति व इंद्र यांजमधील पुढील संभाषण भीष्मांनीं त्यास सांगितलें. ते ह्मणाले, ' शत्रूशीं सावधगिरीनें कसें वागावें, त्याचा समूळ उच्छेद न करतां त्याला उपायानें ताब्यांत कसें आणावें,–कारण प्रसंग आला असतां जय कोणाला येईल सांगतां येत नाहीं,–तसेंच झगझगीत वैभव मला कशानें सोडणार नाहीं, म्हणून राजनीतिविशारद बृहस्पतींना इंद्रानें प्रश्न केला असतां बृहस्पति ह्मणाले, ' आपल्यास अपकार करणाऱ्यांना तंटा करून ताळ्यावर आणण्याचा प्रयत्न करूं नये. सहनशीलता नसलेलीं मुलें रागाच्या आवेशांत अशा वाटेला लागत असतात. आपल्या मनांत ज्याला मारावयाचें असेल अशा शत्रूला कधीं सावध करूं नये. आपला, राग, भीति, आनंद सर्व मनांतल्या मनांत आवरून शत्रूवर विश्वास न ठेवतां विसंबल्याप्रमाणें दाखवावें. त्याच्याशीं नेहमीं गोड बोलावें. त्याच्या मनाविरुद्ध एवढें देखील करूं नये. शुष्क वैर दाखवूं नये व ओरडून उगीच कंठशोष करून घेऊं नये. ज्याप्रमाणें शिकारी मोठ्या हुशारीनें पक्ष्याप्रमाणें शब्द काढून त्यांना आपल्या ताब्यांत घेतो, त्याप्रमाणें राजानें शत्रूला आपल्या ताब्यांत आणून मग त्याला ठार करावें. रोजच्या रोज शत्रूला डवचलें असतां स्वस्थ झोंप घेतां येणें शक्य नाहीं. कारण हा दुष्टात्मा जागत असून निष्काळजीपणानें विझविलेल्या विस्तवाप्रमाणें वाटेल तेव्हां फिरून पेट घेतो. जय कोणाला येईल हें निश्चयात्मक नसल्यामुळें शत्रूशीं भिडण्यांत कांहीं अर्थ नाहीं. विश्वास दाखवूनच त्याला ताब्यांत आणून आपलें काम साधून घ्यावें. त्याचें हृदय जिंकलें गेलें नसल्यामुळें त्याला तुच्छ समजून त्याची हयगय केली असतां तो आपल्या मंत्रविशारद अशा अमात्यांशीं विचार करून, आपला जरा पाय ढळला कीं, वेळ साधून घाव दिल्याशिवाय सोडणार नाहीं. आपल्या हितावर असलेल्या लोकांकडून शत्रूच्या सैन्यांत फूट पाडावी. मुळापासून सर्व पोंच लक्षांत आणून मनांतून त्याच्याशीं वैरभावानें असावें. शत्रूकडच्या सैन्याची पूर्ण माहिती करून घेऊन फूट पाडून, लाचलुचपत देऊन, त्याचप्रमाणें विषादिकांचा प्रयोग करून, त्यामध्यें बिघाड पाडावा. शत्रूशीं फार संसर्ग ठेवूं नये. पुष्कळ दिवसपर्यंत वाट पहात राहून सुद्धां शत्रूला ठार करावें. त्याचा विश्वास बसेल अशा रीतीनें संधीची वाट पहात दिवस काढवित. एकदम शत्रूला मारावयला उठूं नये. जय खात्रीनें येईल अशी खातरी करून घ्यावी. उगीच त्याच्या हृदयाला शल्य टोंचण्यांत किंवा तोंडानें जखम करण्यांत फायदा होत नाहीं. **वेळ आली असतां मात्र फिरून डोकें वर करणार नाहीं अशा रीतीनें घाव द्यावा. शत्रूला मारूं इच्छिणाऱ्यानें आलेली संधि एकबार दवडली तर ती फिरून येणें फार कठीण आहे.** भल्यांचा सल्ला घेऊन त्याचा जोर मोडून काढावा. वेळ आली नाहीं तोंपर्यंत त्याच्याशीं मित्रत्वानें असून त्याला त्रास देऊं नये. आशा, राग, अहंकार हे टाकून मोठ्या हुशारीनें शत्रूचें छिद्र पहात रहावें. मऊपणा, कडक शासन, आळस व दुर्लक्ष यांमुळें शत्रूनें केलेल्या कपटामुळें मूर्खाचा फडशा पडतो. ह्मणून हे चारी गुण टाकून शत्रूच्या कपटावर उलट कपट केल्यानें राजा खात्रीनें शत्रूला मारूं शकतो. जें एकाच्या मसलतीनें होण्यासारखें असेल, त्याला एकाचाच सल्ला घ्यावा. पुष्कळ मंत्र्यांना तें सांगितलें असतां ते एकमेकांवर टोलवाटोलवी करतात व प्रसंगीं फोडतातही. एकाची मसलत पुरी नाहींशी वाटेल तरच बाकीच्यांची घ्यावी. न दिसणारीं जीं संकटें आहेत त्यांना ब्रह्मदंड योजावे. व दिसणाऱ्याकडे चतुरंगसेनेचा उपयोग करावा. आधीं फूट व गोडीगुलाबी यांचा त्या त्या प्रसंगीं प्रसंग पाहून उपयोग करावा. बलवान शत्रु असेल तर प्रसंगीं त्याच्यापुढें नाक देखील घासावें. मोठ्या हुशारीनें सावध राहून तो जरा इकडे तिकडे झाला कीं त्याला ठार करावें. डोकें लववून, लांच देऊन, किंवा गोड शब्दानें शत्रूची सुद्धां सेवा करावी. त्याला संशय येईल असें कांहीं करूं नये. शंकेच्या जागा नेहमीं टाळाव्या. शत्रूवर कधीं राजानें विसंबून राहूं नये. कारण दुखविलेलें लोक नेहमीं टपून असतात. चंचळ मनाच्या लोकांचें वैभव त्याच्याजवळ रहाणें फार कठिण आहे. एवढेंच नव्हे तर त्याच्या जीविताचा सुद्धां भरंवसा

नसतो. मोठ्या हुशारीनें राहून मित्र कोण शत्रु कोण याचा विचार करावा. राजा मृदु असला ह्मणजे लोक त्याचा अपमान करतात व कडक असेल तर त्याला पाहून कांपतात. ह्मणून राजानें फार मऊ असूं नये व फार कडक असूं नये. ज्याप्रमाणें जोरानें वहाणाऱ्या पाण्यानें जलमय झालेल्या दरडेला नेहमीं भगदाड पडण्याची भीति असते, तशी दुर्लक्षामुळें राज्याची स्थिति होते. पुष्कळ शत्रूंशीं एकदम भिडूं नये. साम, दान, दंड, भेद यांनीं एकेकाला चिरडून, राहिलेल्याशीं मोठ्या हुषारीनें वागावें. समर्थ असला तरी सर्वांशीं त्यानें एकदम कंबर बांधूं नये. ज्या वेळेला चतुरंग दळानें व यंत्रादिक साधनांनीं भरलेली व आपल्यावर प्रेमानें असणारी अमात्य, कोश, इत्यादि, सहा अंगांनीं युक्त अफाट सेना जवळ असून शत्रूपेक्षां आपण पुष्कळच बलिष्ठ आहों अशी खातरी असेल तेव्हां विचार न करतां उघडपणें शत्रूंवर चालून जावें. नेहमीं साम, गुप्त खटपट, लवचिकपणा, गय, हल्ला, शेताची नासधूस, विषादिकांनीं जलसंचयाचा बिघाड किंवा अमात्य कोशादि सात साधनांचा विचार यांचा उपयोग होतो असें नसून प्रसंग पाहून यांपैकीं कोणत्याचा तरी उपयोग करावा. त्याचप्रमाणें नानाप्रकारचें कपट किंवा शत्रूशत्रूंमध्यें भांडण तंटे लावून देणें वगैरे दुष्ट उपायांचा प्रयोग करावा. परंतु आपल्या लौकिकाला त्यापासून बट्टा लागूं देऊं नये. यासाठीं आपल्या हिताचे लोक शत्रूच्या शहरांतून व देशांतून फिरवावेत. आपल्या नगरांतून योग्य बंदोबस्त ठेवून मग शत्रूच्या शहरांतून शिरून नानाप्रकारच्या भोग्य वस्तू जिंकून मिळवाव्यात. आंतून यथेच्छ पैसा देऊन, बाहेरून त्यांची दौलत जप्त करून फितूर झाले आहेत ह्मणून पुकारा करून आपल्या लोकांना शत्रूच्या राज्यांतून पाठवावे. त्याचप्रमाणें मोठे शास्त्रज्ञ व शास्त्रविशारद चांगले शिकलेले व विद्वान अशा लोकांकडून आपल्या राष्ट्रांत शत्रूला मारण्याचीं चेटकें करवावीं. आतां दुष्ट कसा असतो त्याची खूण सांगतों ऐक. तो एखाद्याच्या पाठीमागें त्याचे अवगुण गात असतो. त्याच्या चांगल्या गुणाचा हेवा करतो. दुसरे ते गाऊं लागले असतां तोंड फिरवून गप्प असतो. केवळ गप्प राहणें एवढीच खूण नसून सुस्कारा टाकतो, दांत ओठ चावतो व मान हालवितो. वरचेवर मंडळींत मिसळतो, परंतु कांहीं तरी वेड्यासारखें बरळतो. सांगितलेलें काम डोळ्यांआड करीत नाहीं व दृष्टीसमोर कांहींच बोलत नाहीं.तो एकलकोंडा जेवतो, व हें आज चांगलें नाहीं, तें आज चांगलें नाहीं ह्मणून दोष देतो. बसण्यांत, चालण्यांत, निजण्यांत विशेषेंकरून त्याचे गुण दिसून येतात. दुसऱ्याला दुःख झालें असतां दुःख होणें व सुख झालें असतां आनंद होणें हें मित्राचें लक्षण असून याच्या उलट असलें ह्मणजे शत्रूचें लक्षण जाणावें.'

---

## ११५ वैभवहानि. (१२. १०४—१०६)

'एखादा धार्मिक राजा संपत्तीला मुकून त्याला अमात्याचा त्रास होऊन खजिना व राजशासन याला तो मुकला असतां सुखासाठीं त्यानें कसें वागावें,' म्हणून युधिष्ठिरानें विचारलें असतां भीष्म ह्मणाले, 'या बाबतींत पुढील क्षेमदर्शीचा इतिहास लक्षांत ठेव. हा राजा मोठ्या संकटांत सांपडला असतां कालकवृक्षीय मुनींकडे येऊन ह्मणाला, महाराज, संपत्ति भोगण्याला पात्र असून वरचेवर खटपट करून सुद्धां ती न मिळेल तर प्राण देणें, तोंड पसरणें, दुसऱ्याची नोकरी करणें किंवा एखादी निंद्य गोष्ट करणें यांशिवाय माझ्या सारख्यानें काय करावें सांगा. माझ्यासारख्या मानसिक किंवा शारीरिक व्याधीनें ग्रासलेल्याला आपल्यासारख्या धर्मज्ञांचाच आधार आहे. मनुष्याला विषयांचा वीट आला असतां कोणच्याही वस्तूवरची प्रीति किंवा तिच्या संबंधानें शोक टाकून ज्ञानरूपी पैसा मिळाल्यानें तो सुखी होतो. परंतु ज्यांचें सुख पैशावर अवलंबून आहे त्यांसंबधानें मात्र मला कींव येते. मला पुष्कळ पैसा मिळाला व तो स्वभावप्रमाणें नाहींसाही झाला. जे मोठें वैभव सोडून देतात त्यांच्या हातून ती लहानसान गोष्ट घडते असें म्हणतां येत नाहीं. आमच्यासारख्याजवळ तें नसतांनाही आह्मांला तें टाकवत नाहीं. तेव्हां संपत्तीला मुकून अशा दीन स्थितीला मी येऊन मिळालों असल्यामुळें मला जेणेंकरून सुख होईल असें कांहीं सांगा.'

मुनी ह्मणाले, ' आधींच मी व माझें ह्मणून जें कांहीं आहे तें सर्व नाशवंत आहे हें तूं मनांत बाळगलें पाहिजेस. जें कांहीं तुला आहेसें वाटतें तें कांहीं नाहीं अशी भावना ठेव. अशा रीतीनें शहाणा मनुष्य मोठ्या संकटांत सांपडला असतांही त्याला दुःख होत नाहीं. सर्व मागें होऊन गेलेलें व पुढें होणारें नाहींसें होणार आहे. हें तत्त्व तुझ्या मनांत बिंबेल तर तुझ्या हातून अधर्म घडणार नाहीं. अगदीं पूर्वीं जे होऊन गेले व त्या मागून जे झाले ते सर्व नाहींसे झाले आहेत हें जाणून संताप कोणी वरें करून घ्यावा? जें होतें तें नाहींसें झालें आहे; नव्हतें तें उत्पन्न होईल. **शोकामध्यें कांहीं सामर्थ्य नाहीं.** तेव्हां शोक मुळींच करूं नये. तुझा बाप, तुझा आजा हे आज कोठें बरे आहेत. ह्यांना तूं दिसत नाहींस, तुला ते दिसत नाहींत. तेव्हां आपली अशाश्वतता लक्षांत घेऊन त्या संबंधानें तूं कां शोक करतोस? तूं, मी, सुहृद, शत्रु सर्व खात्रीनें नाहींसे होणार आहों. जे आज वीस वर्षांचे आहेत किंवा तीस वर्षांचे आहेत ते शंभर वर्षांचे आंतच नाहींसे होणार आहेत. आतां मोठी संपत्ति जर प्रत्यक्ष आपणाला सोडवत नसेल तर त्यावरील ममत्व सोडून तरी आपलें कल्याण करून घ्यावें. जें हातांत आलें नाहीं तें आपलें नाहीं, किंवा जें हातांतून गेलें तेंही आपलें नव्हे असें समजावें. शहाणे लोक दैव बलवान आहे असें समजतात. आणि तीच त्यांना धीराला जागा आहे. तुझ्यासारखीच केवळ नव्हे तर तुझ्याहून अधिक बुद्धि व सामर्थ्य असलेले लोक पैसे नसूनही जगले आहेत व त्यांनीं राज्य केलें आहे. तुझ्या सारखे ते रडत बसले नाहींत. तेव्हां तुला रडण्याला कारण नाहीं. राज्यादिक सर्व यदृच्छेनें मिळून कालानें तें नाहींसें होतें. खरें ओळखून कोणत्याही प्रसंगीं मागच्या संबंधानें किंवा पुढच्या संबंधानें शोक करूं नये. न मिळणाऱ्या वस्तूची कधीं इच्छा न धरतां मिळण्याजोगी असेल त्याचीच इच्छा धरून मिळाल्याचा उपभोग घेत सुखांत असावें. शुद्ध स्वभावानें मनुष्य पैशाला मुकला असतां सुद्धां शोक करीत नाहीं. मूर्ख मनुष्य असेल तोच गेल्या वैभवासंबंधानें ब्रह्मदेवाला दोष देऊन मिळाल्यावर संतुष्ट रहात नाहीं. दुसरे साधारण गरीब असले तरी त्याला श्रीमान वाटतात व त्यामुळें ईर्षा, अभिमान, मीपणा यांच्या योगानें त्याचें दुःख वाढतें. आपल्या जवळ संपत्ति नसली तरी दुसऱ्याजवळ ती आहेशी पाहून वाईट वाटून घेऊं नये. दुसऱ्याजवळच्या संपत्तीनें शहाण्याला सुखच होतें. द्वेष करणाऱ्या जवळ संपत्ति असली तरी ती त्याजवळून निघून जाते. वैभव, मुलेंबाळें वगैरे सर्व ज्यांना योगाची माहिती असून धर्म कळतो असे शहाणे स्वतःच टाकून देतात. फार चंचळ, दुर्लभ व पुष्कळ आयासानें मिळणारी असें समजून कांहीं लोक संपत्तीला टाकतात. तूं शहाण्यासारखा दिसत असून दुसऱ्या जवळच्या अशा संपत्तीच्या आशेनें तुला इतकें वाईट वाटत आहे! तेव्हां तूं ह्या ऐहिक विषयांना टाकून दे. **तुच्छ वस्तू महत्वाच्या रूपानें, महत्वाच्या वस्तू तुच्छ रूपानें भासतात. पैशांतच काय तें सुख आहे असें वाटून पैशाच्यामागें लागलें असतां तो नाहींसा होतो.** एखादा संपत्तींत गुंगला असतां तीच त्याला कल्याणकारक वाटून तिच्या पाठीमागें तो लागून अखेर फसतो किंवा मोठ्या कष्टानें इष्ट हेतु साधला असतां त्याच्या नाशानें पैशाचा त्याला वीट येतो व कोणच्याही कामाला हात घालूं नयेसें वाटतें. कोणी कुलीन लोक पारलौकिक सुखाची इच्छा धरून लौकिक गोष्टींचा कंटाळा करतात व धर्माकडे वळतात. कोणी द्रव्यावर लोभ ठेवून पैशावांचून सर्व फुकट आहे, जगण्यांत कांहीं अर्थ नाहीं, असें वाटून प्राण सोडतात. अशा लोकांचा किती हा भिकारपणा व कोती बुद्धि? जीवित असें अशाश्वत असतां हे मूर्खपणानें पैशावर दृष्टि देतात. **सर्व संचयाचा शेवट नाशामध्यें, आयुष्याचा शेवट मरण्यामध्यें व संबंधाचा शेवट वियोगामध्यें होणारा असल्यानें ह्यामध्यें कोणी मन घालावें?** मनुष्य पैशाला किंवा पैसा मनुष्याला खात्रीनें सोडतो. तेव्हां कोण शहाणा यासंबंधानें ताप करून घेईल? दुसऱ्याचा सुद्धां पैसा व त्याचप्रमाणें आप्त लोक नाहींसे होतात. तेव्हां याप्रमाणें दुसऱ्यावरचा प्रसंग पाहून आपलें मन, इंद्रिय व वाणी यांना आवरून धरावें, आपलें अहित करणारे दुर्बल

असले तरी त्यांना रोखवत नाहींसें पाहून दृश्य वस्तू दूर होऊन मिळेनाशा झाल्या ह्मणजे ज्ञानामध्यें समाधान मानून शहाण्यानें त्याबद्दल वाईट वाटून घेऊं नये. तुझ्यासारखा मनोनिग्रही, निश्चयी, स्थिर व ब्रह्मचर्य पाळणारा अशा थोड्या थोडक्यासाठीं शोक करीत बसत नाहीं. दुष्ट, वाईट, घातकी व नीच लोकांनीं पत्करलेली फसवेगिरीची भिक्षावृत्तीही तुझ्या सारख्याला योग्य नाहीं. सर्व प्राणिमात्रांवर दया ठेवून आत्मनिग्रहानें मोठ्या अरण्यामध्यें फलमूलांवर राहणें याहून चांगलें. मोठमोठ्या सुळ्याच्या हत्तींबरोबर अरण्यामध्यें राहून वन्य वस्तूमध्यें रमून जाणें हें शहाण्याला साजेलसेंच आहे. मोठा तलाव खळबळून सोडला असतां तो आपसूकच फिरून स्वच्छ होतो. त्याचप्रमाणें शहाण्या मनुष्याचें मन अस्वस्थ झालें असतां त्यानें स्वतःच तें फिरून स्वस्थ करून घ्यावें. संपत्ति त्याचप्रमाणें प्रधान वगैरेंना मुकून दैव प्रतिकूल झालें,असतां आतां काय करणें तुला उचित वाटतें? आतां तुझ्या अंगांत कांहीं जोम वाटत असेल तर राज्य मिळण्याचा मी तुला उपाय सांगतों. तो जर तूं शेवटाला नेशील तर तुझा हेतु साधून राज्यसाधन व झगझगीत वैभव तुला मिळेल. ढोंग, आशा, राग, आनंद व भय हीं सर्व बाजूला ठेवून शत्रूपुढें सुद्धां वांकून हात जोडून मोठ्या शुद्धतेनें त्याची सेवा कर. ह्मणजे तुझा शत्रु जनक तुला पुष्कळ पैसा देईल; तूं त्याचा उजवा हात होऊन राहशील; व सर्व लोकांना प्रमाणभूत होशील. मग तुला उत्साहसंपन्न निर्व्यसनी शुद्धशील असे साह्यकारी मिळतील. मन व इंद्रियें ताब्यांत ठेऊन नीतिशास्त्राकडे लक्ष देणारा आपल्या प्रजेला संकटांतून वर काढून आनंदवितो. जनकाकडून तुला मान मिळून तूं मोठ्या योग्यतेला चढलास ह्मणजे मोठें सैन्य जमवून चांगल्या मंत्र्यांच्या सल्यानें शत्रूच्या राष्ट्रांत फूट पाडून आपसांतच भांडण माजवून त्याचा नाश करीव किंवा तिसऱ्याशीं तंत्र जुळवून त्याच्या सैन्याचा नाश करीव किंवा चांगल्या चांगल्या बायका, उत्तम उत्तम कपडे, चांगले चांगले बिछाने व बैठकी, गाड्या, घोडीं, सुरेख घरें, पशु, पक्षी, उत्तम उत्तम खाण्याचे व वासाचे पदार्थ व फळें अशा प्रकारच्या ज्या दुर्मिळ वस्तु असतील यांत त्याला अगदीं चूर करून त्याचा नाश कर. त्याचा अशा रीतीनें नाश करावयाचा असला किंवा त्याच्याकडे दुर्लक्ष करावयाचें असलें तरी तें नीति लक्षांत ठेवून शत्रूला कळूं देऊं नये. आपल्या शत्रूच्या राज्यामध्यें विद्वानांना मान्य होऊन कुत्रा, हरीण व कावळा यांची वृत्ति धरून मजेंत रहा. शेवट लागण्यास कठीण अशीं मोठमोठीं कामें त्याच्याकडून आरंभवावीं. त्याचप्रमाणें मोठमोठ्या बागा, बिछाने, बैठकी वगैरे सुखाच्या वस्तूंकडे याचा खजिना रिकामा करवावा. यज्ञ करून त्याला दक्षिणा द्यावयाला सांगून त्या ब्राह्मणांना तूं आपल्याकडे वश करून घे. ह्मणजे ते तुझा प्रत्युपकार फेडून लांडग्याप्रमाणें त्याला खाऊन टाकतील. खजिना रिकामा झाला असतां शत्रू ताब्यांत येतो. तेव्हां स्वर्ग व जय यांला मूळ कारण जो खजिना तो नाहींसा कर. याच्यापाशीं प्रयत्नवाद न करतां दैववाद करीत जा. ह्मणजे दैवावरच अवलंबून राहिल्यानें त्याचा नाश होईल. त्याच्याकडून विश्वजित् यज्ञ करवून त्याला कफल्लक करून सोड. मग लोकांना करानें फार पीडा झाली आहे ह्मणून त्याजजवळ जाऊन सांग व कोणी योगसाधन जाणणाऱ्या मनुष्याचें नांव त्याजजवळ घे; ह्मणजे सर्व सोडून संन्यास घ्यावासें त्याला वाटेल. त्याचप्रमाणें विष वगैरे उपायांनीं त्याचे लोक, घोडे वगैरे सर्व मारून टाकीव. असे पुष्कळ उपाय करणाऱ्याला आहेत.'

यावर क्षेमदर्शी ह्मणाला, 'कपटानें किंवा ढोंगानें मी राहूं इच्छीत नाहीं. अधर्मानें कितीही पैसा मिळाला तरी तो मला नको. पूर्वींच मीं हें टाकून दिलें आहे. ज्याच्या योगानें लोकांना माझा संशय न येतां माझें उत्तम हित होईल अशा पीडारहित धर्मानें मी राहूं इच्छितों. आपण सांगतां हें करण्याला मी समर्थ नाहीं.' हें ऐकून मुनि ह्मणाले, 'तू ह्मणतोस तें तुझ्या स्वभावाला व बुद्धीला साजेलसेंच आहे. तेव्हां जनक आतां मजकडे येईल त्याला सांगून तुमचें दोघांचें सख्य करवून देऊन तुला त्याचा मी प्रधान करवितों. तो माझें ह्मणणें मोडणार नाहीं.' असें त्याला सांगून जनकाला बोलावून आणून त्याला ते ह्मणाले, 'हा राजकुलांत जन्मलेला अ-

सून याचें हृदय मी ओळखतों. याचें अंतःकरण शुद्ध आहे. याच्यामध्यें पाप मला एवढें सुद्धां दिसत नाहीं. तेव्हां याच्याशीं संधि करून माझ्याप्रमाणेंच याच्यावर विश्वास टाक. प्रधानाशिवाय राज्य तीन दिवस सुद्धां चालणें कठीण आहे. प्रधान शूर व बुद्धिमान असावा. राज्य सुरळीत चालण्याला हेंच दोन गुण पाहिजे आहेत. हा महात्मा राजपुत्र भल्यांच्या वाटेनें जाणारा असल्यामुळें तूं याला आपल्या जवळ केलास ह्मणजे तुझ्या पुष्कळ शत्रूंना हा जेरीस आणील. तेंच तूं संधि न केल्यानें क्षत्रियधर्माला स्मरून हा तुझ्याशीं युद्ध करण्याला उठेल; तव्हां तुलाही याच्याशीं युद्ध करावें लागणार व युद्धामध्यें जय अमक्याच पक्षाला येईल हें कांहीं खात्रीनें सांगतां येत नाहीं. आपण दुसऱ्याला समूळ नाहींसा करण्याचा प्रयत्न करीत असतां स्वतःचाच समूळ नाश होण्याची भीति असते.' हें त्या मुनींचें भषाण जनकाला पटून तसें करण्याला तयार होऊन तो क्षेमदर्शीला ह्मणाला, 'मीं धर्मानें व नीतीनें जग जिंकलें परंतु तूं आपल्या गुणांनीं मला जिंकलें आहेस. स्वतःला तुच्छ मानून न घेतां एकाया विजयी राजाप्रमाणें तूं ऐस. तुझ्या बुद्धीसंबंधानें तुच्छभाव बिलकुल माझ्या मनांत नाहीं. तुला जिंकलें म्हणून मी तुझा कांहीं अवमान करीत नाहीं.' असें म्हणून त्या दोघांनीं त्या मुनींचा सत्कार करून ते घराकडे गेल्यावर पाय अर्घ्यादिकांनीं त्यानें क्षेमदर्शीचा सत्कार केला व त्याला पुष्कळ नानाविध रत्नें देऊन आपली मुलगी दिली. हा राजांचा श्रेष्ठ धर्म आहे.'

## ११६ वडें मंडळ व संघशक्ति.

### (१२. १०७)

युधिष्ठिर ह्मणाला, 'ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र यांचे धर्म वगैरे सर्व आतांपर्यंत आपण मला सांगितले. आतां महामंडळाचें वर्तन कसें असावें, कसें वागल्यानें त्यामध्यें फूट न पडतां भरभराट होते, व साह्यकारी मिळून त्याला शत्रूला जिंकतां येतें हें मला सांगा. महामंडळाचा नाश फुटीनें होतो असें मला वाटतें, व पुष्कळ असल्यामुळें त्यांच्यामध्यें मसलतही गुप्त राहणें कठीण आहे.' भीष्म ह्मणाले, 'महामंडळ, कुळ व राजे यांमध्यें वैर पेटविण्याला लोभ व राग हे कारण आहेत. राजाला लोभ उत्पन्न होतो. नंतर त्याला रागाची जोड मिळते. मग ते एकमेकांचा ऱ्हास व फडशा पाडण्याला कारण होतात. गुप्त हेर, गुप्त मंत्रशक्ति, पैसा ओढणें, लाचलुचपत, साम व भेद इत्यादि उपायांनीं ते एकमेकांला खालीं ओढीत असतात. यांपैकीं एकजुटीनें असण्याकडे प्रवृत्ति असणारें महामंडळ राजाचें लक्ष पैसे ओढण्याकडे असलें ह्मणजे त्यापासून बिघडून फुटून भीतीनें शत्रूकडे मिळतें. फुटीच्या योगानें तें दुर्बळ होऊन शत्रूला हें मंडळ सहज जिंकतां येतें. म्हणून नेहमीं संघशक्ति ठेवून खटपट चालवावी. संघशक्ति व शौर्य यानें वाटेल ती गोष्ट साधते; व असें तें जुटीनें असलें ह्मणजे बाहेरचे लोक त्यांच्याशीं मैत्री करतात. याप्रमाणें जुटीनें हे एकमेकांच्या उपयोगीं पडत राहिल्यानें ज्ञानवृद्ध लोक त्यांची वाहवा करतात. व या संघशक्तीमुळें ते सुखांत राहतात. सर्व व्यवहार धर्मानें सुरळीत चालविल्यानें, सर्वांकडे योग्य नजर ठेवल्यानें, मुलगे, भाऊ या सर्वांना योग्य वळण लावून दिल्यानें, नम्र लोकांशीं चांगलें वागून त्याचप्रमाणें हेर, सल्लामसलत व खजिना यांमध्यें भर घालीत राहिल्यानें ह्या महामंडळाची भरभराट होत असते. शहाणे, शूर, उत्साहसंपन्न व कामामध्यें उत्साह दाखविणारे यांना नेहमीं मोठ्या हुशारीनें मान देत राहिल्यानें हें मंडळ वाढत जातें. सधन, शूर, शास्त्रास्त्रामध्यें प्रवीण असें हें मंडळ मोठ्या संकटांत पडलेल्यांना सुद्धां तारून पार पाडतें. राग, फूट, भीति, शिक्षा, छळ, जुलूम, देहांत शिक्षा यांच्या योगानें हे लोक एकदम शत्रूकडे वळतात. म्हणून यांचा विशेषेंकरून यांतील मुख्यांचा मान ठेवावा. कारण यांच्यावरच लोकयात्रा मुख्यत्वेंकरून अवलंबून आहे. सल्ला मसलत व हेरासंबंधी विचार यांमधील मुख्य असतील त्यांच्याशीं करावा. यांतील सर्वच बऱ्या लोकांना मसलत कळवूं नये. यांतील मुख्यांच्या विचारानें या मंडळाचें हित करावें. हें मंडळ फुटून वेगवेगळें झालें असतां कामें साधत नाहींत व अनर्थ उद्भवतात. ते एकमेकांशीं फुटून आपाप-

ल्या इच्छेनुरूप स्वतंत्र वागूं लागले असतां शहाण्यांनीं त्यांना एकदम ताळ्यावर आणलें पाहिजे. कुलामध्यें कुलाचा नाश करणारे निपजून त्यांतील ज्ञात्यांनीं त्यांच्याकडे दुर्लक्ष केलें असतां सबंध गोत्राचा ते नाश करतात. म्हणून वर आधीं सांभाळलें पाहिजे. ह्मणजे बाहेरच्या बेकीमध्यें कांहीं अर्थ नसतो. घरांत उद्भवणारी बेकी एकदम मुळें छाटून काढते. एकदम स्वाभाविकपणें रागानें, लोभानें किंवा मोहानें गणांपैकीं लोक एकमेकांशीं बोलेनासे होतात तेव्हां तें पराभवाचें लक्षण समजावें. तर याप्रमाणें जातीनें व कुळानें समान असणारें हें मंडळ शत्रूला खटपटीनें किंवा बुद्धीनें फोडतां येत नाहीं. फुटीनें व लांचलुचपतीनेंच फोडतां येतें.'

---

## ११७ गुरूंचा बहुमान-श्रेष्ठ धर्म.
## (१२. १०८)

'हा धर्ममार्ग फार मोठा असून याला पुष्कळ शाखा फुटल्या आहेत, तेव्हां धर्मामध्यें सर्वांत श्रेष्ठ व अवश्य कर्तव्य कोणतें,' म्हणून युधिष्ठिरानें विचारल्यावरून भीष्म ह्मणाले, 'आई, बाप व गुरु यांची पूजा सर्वश्रेष्ठ आहे. त्याकडे लक्ष दिल्यानें मनुष्याचा मोठा लौकिक होऊन त्याला उत्तम लोक मिळतात. ते जें सांगतील तें धर्माला धरून असो किंवा धर्मविरुद्ध असो तें करावें. त्यांच्या सांगण्याच्याविरुद्ध कांहीं करूं नये. ते सांगतील तो धर्म समजावा. **तिन्ही लोक, तिन्ही आश्रम, तिन्ही वेद व तिन्ही अग्नि सर्व कांहीं हेच समजावेत. बाप गार्हपत्याग्नि, आई दक्षिणाग्नि व गुरु आहवनीय अग्नि समजले आहेत. ही अग्नीची तिक्कल सर्वश्रेष्ठ आहे.** या तिन्हींकडे हुशारीनें लक्ष दिलें असतां तीन लोक साधतात. **बापाकडे लक्ष दिल्यानें हा लोक, आईकडे दिल्यानें परलोक व गुरूकडे लक्ष दिल्यानें ब्रह्मलोक प्राप्त होतात. यांचें सांगितलेलें कधीं मोडूं नये. यांच्या अगोदर खाऊं नये किंवा ते खातील त्यापेक्षां चांगलें अन्न खाऊं नये. त्यांची नेहमीं शुश्रूषा करावी. हेंच उत्तम पुण्य आहे. ज्यानें या तिहींकडे लक्ष दिलें त्यानें सर्व लोकांकडे लक्ष दिलें असें समजावें व यांकडे लक्ष न देतां त्यानें कांहीं केलें तरी तें व्यर्थ आहे. ज्यानें या तिघांना मान दिला नाहीं तो इहलोकालाही मुकतो व परलोकालाही मुकतो. येथें किंवा स्वर्गलोकीं त्याची कीर्ति झळकत नाहीं; व परलोकीं त्याचें कांहीं कल्याण होत नाहीं.** या तिघांसाठीं आजपर्यंत मीं जें कांहीं सोडलें, त्याच्या शंभरपट एवढेंच नव्हे तर हजारपट फल मला मिळालें आहे. त्याचप्रमाणें तिन्ही लोक आज माझ्या डोळ्यापुढें प्रकाशमान आहे. दहा वेद पढलेल्या ब्राह्मणापेक्षां एक आचार्य श्रेष्ठ आहेत. दहा आचार्यांपेक्षां एक उपाध्याय श्रेष्ठ आहे; व दहा उपाध्यायांपेक्षां एक बाप श्रेष्ठ आहे; दहा बापांपेक्षां किंबहुना सर्व पृथ्वीपेक्षां आई श्रेष्ठ आहे. महत्त्वामध्यें आई सर्वांत श्रेष्ठ असून तिच्यासारखा श्रेष्ठ दुसरा कोणी नाहीं. तथापि माझ्या मतानें बापापेक्षां किंवा आईपेक्षां गुरु श्रेष्ठ आहेत. हे दोघे आईबाप केवळ शरीर देणारे असून गुरूंच्या प्रसादानें जो जन्म मिळतो तो दिव्य असून अजरामर आहे. आईबापांनीं अपकार केले असतां सुद्धां त्यांना मारतां कामा नये. जे आपल्या पापी आईबापांचा धर्माकडे लक्ष देऊन मान ठेवतात त्यांच्यावर देवांची व ऋषींची कृपा कमी होत नाहीं. परंतु जो खरें शिक्षण देऊन दिव्यज्ञान देतो तो गुरु, आई व बाप या दोघांसमान समजला पाहिजे. जे लोक गुरूंपासून विद्या शिकून त्यांना मनानें व कृतीनें मान देत नाहींत त्यांना भ्रूणहत्येचें पाप लागून, त्यांच्याहून दुसरा पापी कोणी नाहीं. गुरु शिष्यावर ज्याप्रमाणें भावना ठेवतात त्याचप्रमाणें शिष्यानें गुरूंचा बहुमान ठेवावा. आपल्याला मिळेल तें त्यांना देऊन नंतर त्याचा उपभोग घ्यावा. ज्याच्या योगानें आपण पितरांना संतुष्ट करतों त्यानें प्रजापति संतुष्ट होतो, ज्याच्या योगानें आपण आईला संतुष्ट करतों त्यानें पृथ्वी संतुष्ट होते व ज्यानें गुरूला संतुष्ट करतो त्यानें ब्रह्म संतुष्ट होतें. ह्मणून आईपेक्षां किंवा बापापेक्षां गुरु पूज्य आहे. **गुरूचा सत्कार केला असतां ऋषी, देव, पितर सर्व संतुष्ट होतात.** कोणच्याही कारणानें गुरूस तुच्छ करूं नये. **ह्मणून आई, बाप, गुरु यांचा अवमान करूं नये किंवा त्यांच्या कृत्यांत**

दोष काढूं नये. त्याचप्रमाणें आईबापांपासून जन्म घेऊन त्यांनीं आपल्याला पोसलें असतां ह्यातारपणीं त्यांना जो पोसत नाहीं त्यालाही भ्रूणहत्येचें पाप लागतें. जो मित्राचा द्रोह करतो, कृतघ्न आहे तसाच स्त्रीचा किंवा गुरूचा वध करतो या चौघांच्या पापाला प्रायश्चित्त नाहीं. हें सामान्यतः सांगितलें. याप्रमाणें प्रत्येकानें वागावें. हेंच कल्याणकारक असून याहून कल्याणकारक दुसरें कांहीं नाहीं.'

---

## ११८ सत्यासत्यविचार.
## (१२. १०९)

'खरें व खोटें या दोहोंनीं जग भरलें आहे. तेव्हां धर्माप्रमाणें वागूं इच्छिणाऱ्यानें यांपैकीं कोणचा मार्ग स्वीकारावा; खरें कोणतें, खोटें कोणतें? कोणतें सनातन धर्माला धरून आहे? खरें केव्हां बोलावें? खोटें केव्हां बोलावें, हें सांगा,' ह्मणून युधिष्ठिर ह्मणाला असतां भीष्म ह्मणाले, 'खरें बोलणें हें फारच चांगलें. खऱ्याहून या जगांत श्रेष्ठ दुसरें कांहीं नाहीं. आतां लोकांमध्यें या संबंधानें भलता ग्रह भरला आहे. प्रसंगीं खोट्याला खऱ्याचें स्वरूप येतें. व खऱ्याला खोट्याचें स्वरूप येतें हें खरें; अशा प्रसंगीं खरें बोलून चालत नाहीं; खोटें बोलावें लागतें. ज्या मूर्खाला हा निर्णय होत नाहीं त्याच्या हातून दोष घडतात. ज्याला खऱ्या खोट्याचा खरा निर्णय कळतो त्यालाच खरा धर्म कळला. तो मनुष्य अनार्य असून त्याच्या बुद्धीवर कांहीं संस्कार घडला नसला व तो वाईट कर्म करणारा असला तरी सर्व प्राणिमात्रांना पीडा देणाऱ्या एका आंधळ्या प्राण्याला मारणाऱ्या बलाक नांवाच्या पारध्याप्रमाणें मोठें पुण्य त्याच्या पदरीं पडतें. तेंच हा निर्णय न समजणारा धार्मिक असला तथापि चोराला ब्राह्मणाचा सुगावा देणाऱ्या ऋषीप्रमाणें अधर्म त्याच्या पदरीं पडतो यांत नवल तें काय? गंगेच्या कांठचीं हजारों सापांचीं अंडीं फोडून टाकणाऱ्या वाघुळाप्रमाणें वाईट कृत्य करून सुद्धां प्रसंगीं पुण्य पदरीं पडतें. तुझा हा प्रश्न तशा प्रकारचा असून अमूकच खरें व अमूकच खोटें असें धर्माधर्मासंबंधानें सांगतां येणें कठीण आहे. भूतमात्रांच्या अभ्युदयासाठीं धर्मशास्त्राचा अवतार असल्यानें ज्याच्या योगानें तो हेतु साधेल तो धर्म होय. त्याचप्रमाणें तो लोकांना आपापल्या मार्गांत ठेवतो ह्मणूनही त्याला धर्म ह्मणतात; ही सर्व प्रजा धर्मानें बांधली गेली आहे, ह्मणून याप्रमाणें प्रजेला धरण्याला जो समर्थ आहे तो धर्म होय. त्याचप्रमाणें परपीडेच्या संबंधानें धर्म वचनें केलीं असल्यामुळें ज्याच्या योगानें परपीडा होत नाहीं तोच धर्म हें निश्चयानें समजावें. कोणी श्रुतींत सांगितलेला तोच धर्म ह्मणतात. कोणी तो नव्हे ह्मणतात. ह्या दोघांनाही दोष देण्याचें कारण नाहीं कारण श्रुतींत सर्वच धर्मांचा समावेश झाला नाहीं. जो कोणी एखाद्याचा पैसा अन्यायानें उपटूं पाहतो त्याला तो आपल्याला ठाऊक असला तरी न सांगणें हा धर्म आहे. गप्प राहिल्यानें जर सुटका होत असेल तर बोलूं नये. परंतु बोलल्यावांचून सुटका नाहीं किंवा गप्प राहिल्यानें संशय येण्याचा संभव आहे अशा ठिकाणीं खरें बोलण्यापेक्षां खोटें बोलणेंच चांगलें. अशा प्रसंगीं शपथ घेऊन सुद्धां दुष्टांच्या कचाट्यांतून मोकळें व्हावें. शक्य असेल तोंपर्यंत पैसा त्यांच्या हातीं लागूं देऊं नये. दुष्टाच्या हातीं पैसा लागूं देणाऱ्याला सुद्धां त्या कृत्याबद्दल त्याचें प्रायःश्चित्त भोगावें लागतें. प्राण वांचविण्यासाठीं किंवा लग्न जुळवून देण्यासाठीं किंवा पैशाचें रक्षण करण्यासाठीं किंवा दुसऱ्यावर उपकार होतांना खोटें बोलावें. त्या ठिकाणीं खरें धरून बसणें चांगलें नाहीं. एखाद्याला एखादें वचन दिलें असतां तें पूर्ण करावें. अंगांत सामर्थ्य असून जो तें मोडण्याला तयार होतो त्याच्याकडून बलात्कारानें तें पाळवावें. खोटा मनुष्य स्वधर्म टाकून खोट्यावर उदरनिर्वाह करूं इच्छील अशा कपटावर राहूं पाहणाऱ्या मनुष्याला वाटेल त्या उपायानें ठार करावा. अशा पापी मनुष्यांना पैसाच काय तो धर्म असें वाटत असतें. अशा लोकांची गय करूं नये किंवा त्यांच्याशीं संबंध ठेवूं नये. ते आपल्या कपटी वर्तनानेंच अधोगतीला गेले असतात. देवमनुष्यांमधून उठून ते प्रेताच्या मालिकेला मिळाले असतात. यज्ञ किंवा तप कांहीं ठाऊक नसलेल्या अशा लोकांशीं संबंध मुळीं जडूं देऊं नये. पैशासाठीं हे प्राण

सुद्धां घायला तयार होतात. असें कर किंवा तसें कर असें कांहीं त्यांना सांगण्याची सोय नसते. ते करतात तोच त्यांना धर्म वाटत असतो. अशा प्रकारच्या लोकांना मारण्यांत पाप नाहीं. ते आपल्या कर्मानेंच मेले असतात.कावळे किंवा गिधाड यांच्याप्रमाणेंच यांचेंही आयुष्य असून मेल्यावर हे त्या योनींत जन्म घेतात. जो ज्याच्याशीं जसा वागतो त्यानें त्याच्याशीं तसें वागावें हाच धर्म आहे. **कपटानें वागणाऱ्याशीं कपटानें वागावें व नीट वागणारांशीं नीट वागावें.**

---

## ११९ सेवकाशीं वर्तन
## ( १२. ११०–१११ )

'निरनिराळ्या गोष्टींनीं गांजलेल्या लोकांनीं संकटांतून पार कसें पडावें.' ह्मणून युधिष्ठिरानें विचारलें असतां भीष्म ह्मणाले, 'निरनिराळ्या आश्रमांमध्यें जे ब्राह्मण आत्मनिग्रहानें वागतात, जे दांभिकपणा सोडून सरळ वर्तन ठेवतात, विषयांपासून अलग राहतात, तोंडाला तोंड देत नाहींत, दुसऱ्यांनीं पीडा केली असतां त्यांना उलट पीडा देत नाहींत, शक्त्यनुसार दान देतात, कोणाला कांहीं मागत नाहींत, अतिथींना नेहमीं घरीं ठेवून घेतात, कोणाचा हेवा करीत नाहींत, वेदाध्ययन करून राहतात, आईबापांशीं योग्य वर्तन ठेवतात, दिवसां निजत नाहींत, जे मनानें, तोंडानें किंवा कृतीनें पाप करीत नाहींत, कोणावर हात उगारीत नाहींत, जे राजे विकारवश होऊन लोभानें कोणतीही गोष्ट न करतां आपल्या देशाचें रक्षण करतात, जे लोक अग्निहोत्र ठेवून व आपापल्या बायकांशीं योग्य वर्तन ठेवून त्यांच्याशीं ऋतुकालीं संबंध ठेवतात, जे शूर मरणाची भीति टाकून युद्धांत न्यायानें जय मिळवूं इच्छितात, जे जीव जाण्याचा प्रसंग आला असतांही खरें न सोडतां लोकांना आधारभूत होतात, ज्यांचें तोंड गोड असतें, ज्यांचे हेतू सरळ असतात, जे ब्राह्मण तपोनिष्ठ असून अनध्यायाचे दिवशीं वेदाध्ययन करीत नाहींत, जे लहानपणापासून ब्रह्मचर्य पाळून ज्ञान, वेदाध्ययन, व्रत व स्नान यांमध्यें गढले असतात, रजतमांपासून मोकळे होऊन ज्यांची सत्वस्थ वृत्ति झाली असते, ज्यांची कोणाला भीति वाटत नसून कोणाचीही ज्यांना भीति वाटत नसते व जे सर्वांचे ठिकाणीं सारखेपणानें असतात, दुसऱ्याचें वैभव पाहून ज्यांना संताप होत नाहीं, हलक्या सलक्या गोष्टींकडे ज्यांचें लक्ष नसतें, जे सर्व देवांना नमस्कार करून सर्व धर्म ऐकून त्यांवर श्रद्धा ठेवून शांत वृत्तीनें असतात, ज्यांना लोकांनीं आपणाला मान द्यावा असें वाटत नाहीं, जे दुसऱ्यांना मान देतात, व मान्य असतात त्यांच्यापुढें नमतात, अपत्याची इच्छा धरून जे तिथितिथीला मोठ्या शुद्ध मनानें श्राद्धें करतात, जे स्वतःचा राग आवरून रागावलेल्या लोकांना शांत करतात व कोणावर रागावत नाहींत जे मधु किंवा मांस याला कधीं शिवत नाहींत व ज्यांनीं जन्मांपासून दारू सोडली असते जे केवळ शरीर चालण्यासाठीं जेवतात व मुलासाठीं स्त्रीशीं संबंध ठेवतात व ज्यांच्या तोंडांतून कधीं असत्य भाषण निघत नाहीं, व जगाच्या हितामध्यें दक्ष, सर्वांचा, आप्त, मित्र, संबंधी, व सर्व जगाच्या उत्पत्तिस्थितीला कारणीभूत अशा या श्रीकृष्णरूपी परमात्म्याला जे भजतात ते सर्व संकटांतून मुक्त होतात.

यावर युधिष्ठिर ह्मणाला, 'कांहीं वाईट लोक चांगल्यासारखे दिसतात व चांगले वाईटासारखे दिसतात. तेव्हां त्यांना कसें ओळखावें ?' भीष्म ह्मणाले, 'या संबंधांत पुढील वाघ व कोल्हा यांमधलि भाषण लक्षांत ठेव. पूर्वी वैभवसंपन्न अशा पूरिका नांवाच्या नगरामध्यें पौरिक नांवाचा राजा होऊन गेला. हा क्रूर नराधम दुसऱ्याला पीडा देण्यांत गढला असे. आयुष्य संपल्यावर पूर्व कर्माच्या पापानें त्याला कोल्ह्याचा जन्म आला; व पूर्व जन्माच्या वैभवाची आठवण होऊन त्याला फार वाईट वाटलें. तो दुसऱ्यांनीं मांस वगैरे आणून दिलें असतांही तें खात नसे. कोणाला पीडा न देतां सत्य भाषण ठेवून व कडक व्रत पाळून भोजनसमयीं आपोआप खालीं पडलेल्या फळावर तो आपला उदरनिर्वाह करी. त्याचा जन्म स्मशानांत झाला होता. व तेथेंच राहणें त्याला पसंत वाटलें. त्याच्या जातभाईंना त्याची ही शुचिर्भूतता न आवडून ते नम्र शब्दांनीं त्याचें मन वळविण्याला

प्रयत्न करूं लागले. ते ह्मणाले, ‘ ह्या भयंकर स्मशानांत शुद्ध आचरणानें तूं राहूं इच्छितोस; परंतु तूं जात्या मांसाहारी असल्यानें तूं ही भलती बुद्धि धरली आहेस. तेव्हां तूं आमच्यासारखा हो. आह्मी तुला खाण्याला देत जाऊं. हा शुद्धपणा टाकून दे व आपलें नेहमींचें खाणें खात जा. ’ हें त्यांचें भाषण ऐकून तो शांतपणें ह्मणाला, ‘ मी जन्मावर मोठीशी मदार ठेवीत नाहीं. शीलानेंच कुळाचें उच्चत्व ठरतें. ज्यानें माझें यश वाढेल अशी गोष्ट मी करूं इच्छितों. मी जरीं स्मशानांत राहिलों आहें, तरी माझा निश्चय ऐका. ज्याच्या त्याच्या स्वभावाप्रमाणें कर्मे घडतात. धर्माला कारण आश्रम नाहीं. एखादा विवक्षित आश्रम स्वीकारून जर मनुष्यानें ब्रह्महत्या केली तर पाप होत नाहीं काय? तसेंच कांहीं आश्रम न पाळतां गाय दिली असतां तें दान व्यर्थ होतें काय? तुह्मी पोटाकडे लक्ष देऊन केवळ खाण्यांत गढलां आहां परिणामीं होणाऱ्या त्रिदोषांकडे मूर्खांचें लक्ष जात नाहीं; ह्मणून ज्या निंद्य व वाईट अशा वृत्तीपासून संतोष न होतां इहपरत्र जी स्वार्थाला मुकविणारी आहे अशी ती मला पसंत नाहीं. ’ याप्रमाणें तो मोठा शहाणा व शुद्धशील आहे असें समजून तेथेंच असणाऱ्या एका लोकविख्यात वाघानें त्याचा योग्य सत्कार करून त्याला आपला प्रधान होण्यास विनंति केली व आपल्याबरोबर राहून वाटेल त्या वस्तूचा उपभोग घेण्यास सांगितलें. तेव्हां त्यावद्दल कृतज्ञता दर्शवून कोल्हा किंचित् वांकून विनयपूर्वक ह्मणाला, ‘ धर्मार्थकुशल व शुद्धशील असे मंत्री साह्याला असावेत असें आपणाला वाटतें हें ठीकच आहे. प्रधानावांचून किंवा स्वतःला सुद्धां ज्याच्यापासून अपाय होण्याचा संभव आहे अशा दुष्ट प्रधानाच्या साहाय्यानें महत्त्व सांभाळतां येणें कठिण आहे. जे नीतिनिपुण असून ज्यांचा आपल्याशीं संबंध जुळला आहे, जे आपल्याशीं प्रेमानें आहेत, जे एकमेकांपासून स्वतंत्र आहेत, जे आपल्याला जय देण्याला झटत आहेत, जे लोभी व कपटी नाहींत, जे आपल्या हितामध्यें दक्ष आहेत, अशा शहाण्या मंत्र्यांना राजानें गुरुप्रमाणें किंवा वडिलांप्रमाणें मान द्यावा. परंतु मीं जो मार्ग धरला आहे, त्याहून दुसरा मार्ग मला पसंत नाहीं. ऐषआरामाच्या गोष्टी व तदनुषंगिक वैभव मला नको. तसेंच तुझ्या जुन्या सेवकांशीं माझें जुळणार नाहीं. जे वाईट शीलाचे आहेत ते माझ्या संबंधानें तुझ्या मनांत वांकडें भरवितील. दुसरा मोठा वैभवशील असला तरी त्याच्यावर अवलंबून राहणें हें मोठें चांगलें नाहीं. माझें अंतःकरण शुद्ध असून मी भाग्यवान आहें. पापी लोकांशीं सुद्धां मी फार कडक नसतों. मी मोठा दूरदर्शी, उत्साहसंपन्न, व सामर्थ्यवान् असून माझी दृष्टि फार सढळ आहे. मी यशस्वी असून माझें काम कधीं फसत नाहीं. मला वाटेल ते भोग मजपाशीं आहेत. थोड्याथोडक्यानें मी कधीं समाधान मानीत नाहीं. कष्टमय अशी सेवावृत्ति मी कधीं केली नसून वनांत नेहमीं स्वच्छंदानें वागत आलों आहे. राजाचा आश्रय करून राहणारांना राजाचें पुष्कळ बरें वाईट बोलणें सोसून घ्यावें लागतें. वनामध्यें राहणारांना निर्भयपणें कशाची पर्वा न धरतां व्रतशीलपणानें राहतां येतें. राजानें हाक मारली असतां जी एक प्रकारची भीति मनांत वाटत असते ती वनामध्यें फलमूलांवर संतुष्ट असणारांना रहात नाहीं. **श्रमावांचून मिळालेलें घोटभर पाणी व ज्याच्या पुढें धोका आहे असें मिष्टान्न यां दोहोंमध्यें विचार करून पाहिलें असतां ज्यामध्यें भीति नाहीं तेंच सुखाचें असें मला वाटतें.** आजपर्यंत खोट्या आरोपावरून दोष येऊन जितक्या नोकरांना मरण्याची पाळी आली आहे त्या सर्वांना खऱ्या अपराधावरूनच शिक्षा मिळाली असेल असें नाहीं. आतां मीं प्रधान व्हावें असें जर तुझ्या मनांत असेल तर तूं माझ्याशीं कसें वागावेंस याबद्दल कांहीं करार झाला पाहिजे. माझे जे असतील त्यांना तूं मान दिला पाहिजेस. माझें हिताचें भाषण तूं ऐकिलें पाहिजेस. मी ठरवून देईन तेवढ्या नेमणुकीवर राहिलें पाहिजेस. तुझ्या दुसऱ्या मंत्र्यांशीं मी कधीं मसलत करणार नाहीं. मी परका व नीतिमान असल्यानें आपलें वर्चस्व स्थापण्यासाठीं ते माझ्याविषयीं तुला खोटेंनाटें सांगतील. मी तुला एकट्याला एकांतामध्यें तुझ्या हिताची गोष्ट सांगत जाईन. तुझ्या जातीच्या हिताहितासंबंधी तूं मला विचारूं नयेस. माझी सल्ला घेतल्यावर मागून कोणा मंत्र्याला तूं त्रास

देऊं नयेस. माझ्या लोकांना तूं रागानें शिक्षा करूं नयेस. ' हें सर्व त्या वाघानें कबूल केल्यावर तो कोल्हा त्याचा प्रधान झाला. त्याचें सर्व काम वाघाला पटून त्याचा मान होतोसा पाहून त्याचे पूर्वीचे सेवक कट करून त्याचा द्वेष करूं लागले. त्या दुष्टबुद्धींनीं त्या कोल्ह्याला गोड बोलून आपल्या मालिकेला आणून बसविण्याची खटपट केली. कारण आजपर्यंत दुसऱ्याचा पैसा लुबाडण्याची भलतीच चटक लागली होती, पण आतां ह्या कोल्ह्याच्या दाबानें त्यांना कांहीं उपटतां येईनासें झालें होतें. तेव्हां फिरून आपलें डोकें वर निघावें ह्मणून निरनिराळ्या गोष्टी सांगून व पैशाची लाचलुचपत दाखवून ते त्याच्या बुद्धीला भुरळ पाडण्याला पाहूं लागले. परंतु त्याची बुद्धि बिलकुल ढळली नाहीं. तेव्हां बाकीच्यांनीं त्याला ठार करण्याचा विचार करून त्या वाघासाठीं तयार करून ठेवलेलें त्याच्या आवडीचें मांस उपटून नेऊन तें त्यांनीं कोल्ह्याच्या घरांत ठेविलें. तें कशाकरतां उपटलें, कोणीं उपटलें व त्यांचा विचार काय आहे हें सर्व कळून सुद्धां, मनांत कांहीं उद्देश धरून तो कोल्हा गप्प राहिला. कारण प्रधानगिरी पतकरतांना, आपल्यावर गैरविश्वास धरूं नये असा त्यानें करार केला होता. वाघ भुकेनें व्याकुळ होऊन आला असतां खाण्याकरितां जें मांस यावयाचें तें पुढें दिसेना. तेव्हां त्यानें चोर हुडकून काढण्यास सांगितलें. तेव्हां त्याच्या लुच्चा मंत्र्यांनीं, ' शहापणाची घमेंडी असलेल्या आपल्या शहाण्या प्रधानानेंच तें उपटून नेलें आहे, ' असें त्याला सांगितलें. तेव्हां त्या कोल्ह्याच्या धिटाईबद्दल वाघाला राग येऊन तो त्याला मारण्याचा विचार करूं लागला. ती संधि मिळाल्याबरोबर त्याचे पूर्वींचे मंत्री फिरून बोलूं लागले कीं, ' हा आमचें सर्वांचेंच अन्न असें तोडीत असतो. ज्याची अशा प्रकारची प्रवृत्ति तो काय करणार नाहीं ? जशा प्रकारचा हा आहे असें आपल्या कानावर आलें होतें तशा प्रकारचा हा नाहीं. याचा धार्मिकपणा तोंडांतच असून स्वभाव फार भयंकर आहे. वरून धर्माचें पांघरूण घेऊन आंतून ह्याचा आचार फार खोटा आहे, ह्यानें मुद्दाम खाण्यापिण्यामध्यें ढोंग केलें आहे. आपणाला प्रत्यक्ष पहावयाचें असेल तर तें मांस आह्मी दाखवितों. ' असें म्हणून त्यांनीं त्याला कोल्ह्याच्या घरीं घेऊन जाऊन तें मांस दाखविलें. तेव्हां वाघानें त्याला मारण्याचा हुकूम दिला. तेव्हां त्या वाघाची आई चार हिताच्या गोष्टी सांगण्याकरितां त्याजजवळ येऊन ह्मणाली, 'मुला, हें सगळें कपटानें रचलेलें तूं खरें मानूं नकोस. वाईट लोक मत्सरामुळें भल्याला देखील दोष देतात. कोणाच्या चांगल्या कृत्याचा हेवा वाटून त्यांना कोणाचें चांगलें पहावत नाहीं. शुद्ध अशा मनुष्यावर देखील ते दोषारोप करतात. वनांत स्वकर्म करीत राहणाऱ्या मुनींना देखील मित्र, शत्रू व त्रयस्थ असे तीन पक्ष उत्पन्न होतात. लोभी लोकांना शुद्ध लोक आवडत नाहींत, भित्र्यांना चपळ आवडत नाहींत, मूर्खांना शहाणे आवडत नाहींत, गरीबांना श्रीमान आवडत नाहींत, धर्मलंड लोकांना धार्मीक आवडत नाहींत, कुरूपांना देखणे आवडत नाहींत. पुष्कळ शहाणे ह्मणविणारे कपटी, लोभी लोक बृहस्पतीसारख्या बुद्धीच्या निर्दोष मनुष्याला सुद्धां अपराधी ठरवितात. तुझ्या घरांत कोणी नसतांना तें मांस त्यानें नेलें ह्मणावें तर तूं प्रत्यक्ष देत असतां सुद्धां तो मांस घेत नाहीं, ही गोष्ट लक्षांत घेण्याजोगी आहे. वाईट लोक भल्याप्रमाणें दिसतात व भले वाईटाप्रमाणें दिसतात. तेव्हां या बाबतींत नीट विचार केला पाहिजे. आकाश कढई वगैरेच्या पोकळीसारखें दिसतें. व काजवा ठिणगीप्रमाणें दिसतो. परंतु आकाश ह्मणजे ती पोकळी नव्हे किंवा काजव्यामध्यें अग्नि नाहीं. तेव्हां प्रत्यक्ष दिसणाऱ्या गोष्टीमध्यें सुद्धां बारीक विचार केला पाहिजे. बारीक विचार करून वस्तुस्थिति नीट कळून घेणाऱ्याला पुढें तापाला कारण उरत नाहीं. समर्थाला एखाद्याला सहज मारतां येणार आहे, परंतु अशा समर्थाच्या ठिकाणीं क्षमा असणें हें चांगलें असून यशाला कारण आहे. याला तूं प्रधान केलास. तुझ्या मांडलिक राजांमध्यें सुद्धां याचा मोठा लौकिक झाला आहे. एखादा चांगला मनुष्य लाधणें फार कठिण आहे. तेव्हां हा मिळालेला इसम गमावूं नकोस. एखाद्या भल्या मनुष्याला दुसऱ्यांनीं दोष दिल्यामुळें जो राजा आपणही दोषी समजतो त्याचा त्या बिघडलेल्या मंत्र्याकडून लौकरच नाश

होतो.' असें बोलणें चाललें आहे तोंच त्या वैऱ्याच्या मंडळामधूनच त्या कोल्ह्याचा कोणी हितकर्ता पुढें येऊन त्यानें तें सर्व कपट राजाला सांगितलें. तेव्हां वाघानें स्नेहपूर्वक त्या कोल्ह्याला आलिंगन दिलें. परंतु नीतिशास्त्र जाणणारा तो कोल्हा प्रायोपवेशन करून राहण्याच्या हेतूनें त्याला ह्मणाला, 'प्रथम माझा सत्कार करून मागून तूं माझा अपमान केलास. तूं दुसऱ्याच्या निंदेला मला पात्र केलेंस. ह्मणून मी येथें राहूं इच्छीत नाहीं. जे तुझे नोकर मानाला मुकून स्थानभ्रष्ट झाले आहेत आणि त्यामुळें असंतुष्ट झाले आहेत, राग, लोभ इत्यादि दुर्गुणांच्या आधीन होऊन जे आपल्या स्वामीच्या वाइटावर टपून बसले आहेत व तसें करण्याला ज्यांच्याजवळ पुष्कळ साधनें आहेत, असे तुझे पूर्वीचे नोकर, त्याचप्रमाणें अवमान झालेला मी या दोघांवर एकाच वेळीं तुझा विश्वास कसा बसावा? व मीं तरी तुजजवळ कसें रहावें? मी समर्थ आहें असें समजून मला जवळ करून अधिकार देऊन तूं माझी पारख केलीस. आणि केलेला करार मोडून तूं माझा अवमान केलास. एखादाच्या संबंधानें प्रथम सभेमध्यें तो शीलवान आहे ह्मणून वर्णन करून आपल्या शब्दांमध्यें मेळ ठेवूं इच्छिणाऱ्यानें मग त्याचे दुर्गुण काढीत बसूं नये. ह्याप्रमाणें तूं माझा अवमान केल्यावर माझ्यावर तुझा विश्वास बसणार नाहीं. आणि विश्वास उडाल्यानें तुझीही मला भीति रहाणार. तूं संशयित व नेहमीं भ्यालेला व संधीसाठीं टपून बसलेले निष्प्रेम व संतुष्ट होण्याला कठिण असे हे मंत्री. तेव्हां हें मोठें कठिण काम आहे. मोडलेलें जोडावयाचें काम फार कठिण आहे. तसेंच जोडलेलें मोडावयाचेंही काम तितकेंच कठिण आहे. मोडून जोडलेली जी प्रीति तिच्यामध्यें स्नेह रहात नाहीं. केवळ यजमानाचेंच हित करण्यासाठीं कोणी नोकरी करीत नाहीं. त्यामध्यें दोघांचेंही आपापल्या हिताहितांकडे लक्ष असतें. लोक स्वार्थांकडे लक्ष देऊन वागत असतात. भावपूर्वक स्नेहानें वागणारे फार थोडे आहेत. ज्या राजांचें चित्त चंचळ असतें अशांना मनुष्याचें ज्ञान होणें फार कठिण आहे. एखादा मनुष्य समर्थ आहे; त्याजविषयीं संशयाला जागा बिलकुल नाहीं; हें शंभरांमध्यें एखादा ओळखतो. मनुष्याला वैभवाला चढविणें किंवा खालीं पाडणें हें एकाएकीं घडलें असतां त्यावरून स्वामीच्या बुद्धीचा कोतेपणा दिसून येतो.'

याप्रमाणें धर्माला धरून सारासारविचार गोडीनें सांगून व त्याचें समाधन करून तो वनाला निघून गेला, व प्रायोपवेशन करून देह ठेवून स्वर्गाला गेला.

---

## १२० आळसाचा परिणाम.
## (१२. ११२)

'राजाला कोणत्या उपायानें सुखी रहतां येतें,' ह्मणून युधिष्ठिरानें विचारल्यावरून भीष्म ह्मणाले, 'यासंबंधीं तुला मी सिद्धान्त सांगतों ऐक. पुढील उंटाच्या गोष्टीप्रमाणें कोणीं वागूं नये.

पूर्वीं कृतयुगामध्यें एक उंट होऊन गेला. त्याला आपल्या पूर्वजन्माची आठवण होती. एका अरण्यामध्यें व्रतशीलपणानें तो मोठें तप करीत राहिला. सरतेशेवटीं ब्रह्मदेव संतुष्ट होऊन त्यांनीं त्याला वर मागण्यास सांगितलें. तेव्हां त्यानें चारशें कोस लांब मान मागितली. ब्रह्मदेवांनीं त्याला तो वर दिल्यावर तो आपल्या वनाला गेला. तेव्हां काळाच्या फेऱ्यानें बुद्धीला भ्रंश पडून त्या वराच्या योगानें तो चरण्याला बाहेर जाण्याचा आळस करूं लागला. आपली मान आळसानें शंभर योजनें लांबवून तो चरत राहिला. इतक्यांत एक मोठी वावटळ सुटली. तेव्हां तो आपली मान व डोकें एका गुहेमध्यें ठेवून राहिला. इतक्यांत सर्व जग जलमय करून सोडणारा मोठ्या जोराचा पाऊस आला. तेव्हां पाण्यानें थबथबलेला, थंडीनें कुडकुडणारा, श्रमानें भागलेला व भुकेलेला असा एक कोल्हा आपल्या बायकोसह त्या गुहेंत शिरला. तो मांसाहारी कोल्हा भुकेनें व्याकुळ झाला असतां त्याला ती उंटाची मान मिळाल्यावरोबर तो ती खाऊं लागला. आपल्याला कोणी खात आहे असें कळल्यावर ती मान आखडून घेण्यासाठीं मोठ्या कष्टानें तो ती वर खालीं करीत आहे तोंच कोल्ह्यानें व त्याच्या बायकोनें ती खाऊन टाकिली, व याप्रमाणें त्या उंटाला मारून खाऊन वारा व पाऊस बंद पडल्यावर तो खुशाल गुहेच्या बाहेर पडला. ह्याप्रमाणें त्या मूर्ख उंटानें

आपण होऊन आपल्यावर मरण ओढून आणलें. आळसाचा क्रमाक्रमानें काय परिणाम होतो तो पहा. तेव्हां अशा प्रकारचा आळस सोडून देऊन इंद्रियें स्वाधीन ठेवून तूं मोठ्या हुषारीनें रहावें. मनुष्याच्या विजयाला मूळ बुद्धि आहे असें प्रत्यक्ष मनूचें ह्मणणें आहे. बुद्धीनें केलेलीं कामें श्रेष्ठ असून केवळ मनगटाच्या जोरावर होणारीं मध्यम समजलीं आहेत. त्याचप्रमाणें तंगड्याच्या जोरावर होणारी कनिष्ठ असून भारवाहीपणाचीं तर फारच कनिष्ठ समजलीं आहेत. **ज्याचीं इंद्रियें स्वाधीन असून जो हुषार व महत्त्वाकांक्षी आहे त्याच्या जवळच लक्ष्मी रहाते.** राजनीतीची गुरुकिल्ली ज्याला कळली आहे, ज्याला साह्यकारी आहेत व जो विचारानें सर्व गोष्टी करतो त्याचें सर्व वैभव त्याचे जवळ रहातें.

---

## १२१ वेतसवृत्ति. ( १२. ११३ )

'दुर्लभ राज्य मिळालें असून ज्याचे जवळ कांहीं साधनें नाहींत अशा राजानें बलाढ्य राजाशीं कसें वागावें,' ह्मणून युधिष्ठिरानें विचारलें असतां भीष्म ह्मणाले, 'ह्या बाबतींत पुढील नद्यांचा व समुद्राचा संवाद ऐक. देवशत्रु जे असुर यांना कायमचा आश्रय देणाऱ्या समुद्रानें कोणे एके वेळीं सर्व नद्यांना आपल्या मनांत आलेली शंका विचारली. तो ह्मणाला, 'मोठमोठ्या धिप्पाड अशा झाडांना तुह्मी भरून येत असतां त्यांच्या मुळांसकट उपटून घेऊन येतां. परंतु त्या वेताला घेऊन येत नाहीं. तो फार मोठा नसून त्याचें सामर्थ्यही मोठें नाहीं व तो अगदीं तुमच्या कांठाला वाढतो. त्याला तुच्छ समजून तुम्ही आणीत नाहीं कां त्यानें तुमचें कांहीं केलें आहे ह्मणून तो तुमचा कांठ सोडून मजकडे येत नाहीं.' तेव्हां सर्व श्रेष्ठ गंगेनें त्याला मुद्याचें व पटण्यासारखें पुढील उत्तर दिलें. ती ह्मणाली, 'हीं झाडें आपली जागा अगदीं न सोडतां ताठ्यानें उभीं राहतात. या ताठ्यामुळें त्यांना आह्मी आपली जागा सोडावयाला लावतों. वेताची गोष्ट तशी नाहीं. आमच्या येणाऱ्या जोरापुढें तो नमतो, व आमचा जोर निघून गेल्यावर तो आपल्या जाग्यावर पुन्हां आपला कायम राहतो. त्याला वेळ प्रसंग समजतो. तो नेहमीं नम्र असतो. त्याचेमध्यें ताठा बिलकुल नाहीं. माऱ्याच्या जोरापुढें जे ताठा न धरतां वांकतात त्यांचा पराभव होत नाहीं.'

भीष्म म्हणाले, 'याप्रमाणें जो बाधण्याला किंवा नाश करण्याला समर्थ अशा वाढलेल्या शत्रूचा वेग प्रथम सहन करीत नाहीं त्याचा लवकर नाश होतो. आपलें व शत्रूचें बलाबल व वीर्य पाहून त्याप्रमाणें जो वागतो त्याचा मोड होत नाहीं. तेव्हां शहाण्या मनुष्याला आपला शत्रु फार प्रबळ झाला आहे असें जेव्हां वाटेल तेव्हां त्यानें वेताचा कित्ता घ्यावा हेंच शहाणपणाचें लक्षण होय.'

---

## १२२ निंदकांशीं वर्तन. ( १२.११४ )

'कडक भाषण करणाऱ्या धीट अशा मूर्खानें भर सभेमध्यें भल्याच्या नांवानें खडे फोडले असतां ह्या शहाण्या व सौम्य मनुष्यानें त्याच्याशीं कसें वागावें,' ह्मणून युधिष्ठिरानें विचारल्यावरून भीष्म म्हणाले, 'या बाबतींत काय करावें तें ऐक. बुद्धिवान मनुष्य या कोत्या बुद्धीच्या मनुष्याचें भाषण सहन करीत असतो. जो आपल्या नांवानें खडे फोडतो त्याच्यावर न रागावल्यानें त्याचें पुण्य आपल्याला लागून आपलें पाप तो घेतो. उगीच ओरडत असलेल्या टिटवीप्रमाणें त्याचेकडे लक्ष देऊं नये. म्हणजे लोक त्याचा द्वेष करावयाला लागून त्याची ओरड निष्फल होते. 'अमक्या अमक्या भल्या मनुष्याला भरसभेमध्यें मी असें असें बोललों त्यानें त्याचें तोंड उतरून झुकून तो मेल्यासारखा झाला आहे,' याप्रमाणें तो निलाजरा आपल्या निंद्य कर्माची फुशारकी मारीत असतो. म्हणून शहाण्यानें अशा नीच पुरुषाकडे लक्ष न देतां ह्या कोत्या बुद्धीचा मनुष्य जें कांहीं बोलेल तें मुकाट्यानें सोसावें. सामान्य मनुष्याच्या स्तुतीनें किंवा निंदेनें अरण्यामध्यें कावकाव करीत असलेल्या कावळ्याप्रमाणें याची बडबड व्यर्थ आहे. जर याच्या तोंडांतच एवढा गुण असतां तर अशा लोकांच्या 'मेलास तूं' वगैरे शापानें लोक पटापट मरून पडले असते. आपलें गुदद्वार उघडें करून लोकांना दाखवीत नाचण्यामध्यें ज्याप्रमाणें मोराला अभिमान वाटतो

त्याप्रमाणें हा आपल्या वर्तनानें व कृतीनें आपलें बीज निराळें आहे असें लोकांना दाखवीत असतो. काय बोलावें किंवा काय करावें याचा ज्याला ताळच नाहीं अशा दुष्ट कर्म करणाऱ्याशीं चोख मनुष्यानें कधीं बोलूं नये. जो तोंडापुढें लोकांचे गुण गाऊन पाठीमागें त्यांची निंदा करतो तो मनुष्य कुत्र्याप्रमाणें असून तो इहपराला मुकला असतो. दुसऱ्याच्या पाठीमागें निंदा करणाऱ्या मनुष्यानें जरी शंभर ब्राह्मणांना दान केलें किंवा होम केला तरी तें सर्व फुकट जाऊन त्याचा नाशच होतो. ह्मणून कुत्र्यानें शिवलेल्या मांसाप्रमाणें भल्यानें अशा मनुष्याचा अगदीं संबंध सोडावा. लोकांमध्यें निंदा करणारा दुष्ट मनुष्य फडा उभारणाऱ्या सापाप्रमाणें आपलें अवगुणच लोकांना दाखवितो. तो याप्रमाणें आपलें धर्म करीत असतांना त्याला तोंड देऊं पाहणें ह्मणजे राखेच्या ढिगामध्यें लोळणाऱ्या मूर्ख गाढवाप्रमाणेंच व्यर्थ श्रम आहेत परनिंदेंत गढलेल्या मनुष्याला कधीं समाधान नसतें. ह्याला मनुष्यरूपानें जन्मलेला प्रत्यक्ष लांडगा किंवा चीं, चीं, करणारा मस्त हत्ती, किंवा अति भयंकर कुत्रा समजून टाळावें. मूर्खांच्या वाटेला लागलेल्या व आत्मनिग्रह मुळींच नसलेल्या अशा ह्या शत्रूचें व्रत धरून नेहमीं दुसऱ्याचें अकल्याण करण्यांत टपलेल्या पापी मनुष्याला धिःक्कार असो. हे लोक आपल्याला टाकून बोलत असतां त्याबद्दल खेद मानून घेऊं नये. जे शहाणे आहेत ते भल्याचा नीच्याशीं संबंध झाला असतां त्याला नांवें ठेवतात. अशा प्रकारचा दुष्ट मनुष्य रागावला असतां एखादी थापट देईल किंवा तोंडावर धूळ किंवा कोंडा फेकील किंवा दांत विचकावून भिवडावील, ह्या गोष्टी ठरलेल्याच आहेत. जो भर सभेमध्यें दुष्टांनीं केलेली निंदा वर सांगितलेली गोष्ट लक्षांत ठेऊन सहन करील त्याचें कांहीं वाईट होणार नाहीं.'

---

## १२३ अधिकारी नेमण्यांत पात्रापात्र विचार. ( १२. ११५—११९ )

यानंतर युधिष्ठिर ह्मणाला, 'राज्यसंबंधी, कुलाच्या भावी हिताची, आजचें व पुढचें कल्याण वाढविणारी पुत्रपौत्रांना कल्याणकारक व राष्ट्राच्या उत्कर्षाला कारणीभूत अशी गोष्ट कोणती ती सांगा. अभिषिक्त राजानें आपल्या मंडळीसह राष्ट्रांत राहून प्रजांना कसें रंजवावें, प्रेमादि मनोविकाराच्या जोरावर इंद्रियांवर स्वामित्व न राहिल्यानें राजाला वाईट संगतीवर प्रेम बसतें व त्याचे कुलीन नोकर सुद्धां बिघडतात व नोकराचा त्याला कांहीं उपयोग होत नाहीं. तेव्हां या संबंधी राजाच्या व कुलाच्या हिताचे आपले विचार ऐकून मी सुखांत झोंप घेईन. सर्व गुणांनीं संपन्न असे कशा प्रकारचे नोकर जवळ करावेत, कशा लोकांशीं संबंध जुळवून घेऊन व्यवहार चालवावा हें सांगा. नोकरांवाचून एकट्या राजाच्या हातून राज्य चालविणें शक्य नाहीं. लोकांना कुलीन मनुष्य हवासा वाटतो.' यावर भीष्म ह्मणाले, 'एकट्याच्यानें राज्य चालवितां येणें शक्य नाहीं, **एकट्याला कांहीं मिळवितां येत नाहीं किंवा मिळविलेलें राखतां येत नाहीं.** ज्याचे सर्व नोकर व्यवहारचतुर, राजाचें हित चिंतणारे, कुलीन व राजावर प्रेम करणारे असतात त्यालाच राज्यसुख मिळतें. तसेंच ज्याचे मंत्री कुलीन, सहवासांत राहिलेले, कोणाला न फुटणारे, नेहमीं चांगला सल्ला देणारे, कोणत्याही गोष्टीचा पूर्वापार संबंध जाणणारे व देशकाल ओळखून पुढची तरतूद करून ठेवून मागच्याबद्दल शोक करीत न बसणारे असतात त्यालाच राज्यसुख मिळतें. त्याचप्रमाणें ज्याचे साहाय्यकारी त्याचें सुखदुःख आपलेंसें मानतात, जे यांच्या मनाप्रमाणें व खरेपणानें वागतात, ज्याच्या कामासंबंधानें यांच्या मनांत नेहमीं काळजी असते, ज्याच्या प्रजेला दुःख म्हणून ठाऊक नसून जी नेहमीं त्याच्यावर अनुरक्त असते, ज्यांना क्षुद्रपणा ठाऊक नसतो व जे नेहमीं सरळ मार्गानें वागतात; ज्याच्या संतोषानें मिळविलेल्या खजिन्याला दक्ष अशा आप्त लोकांकडून भर पडत असते, व ज्याचा खजिना प्रामाणिक, निर्लोभी व योग्य अशा लोकांककडून सांभाळला जाऊन वाढत असतो, ज्याच्या राज्यांत न्याय बरोबर मिळतो, फौजदारी निवाडे ज्याच्या राज्यांत शंखलिखिताच्या गोष्टींत सांगितल्याप्रमाणें होतात, ज्यानें चांगले लोक जवळ केले आहेत व जो संधि

वगैरे सहा राजगुणांकडे नेहमीं लक्ष देऊन असतो, तोच खरा धर्म जाणणारा असून त्यालाच धर्मफळ मिळतें. या बाबतींत मी पूर्वी परशुरामाचे आश्रमांत असतां ऋषींच्या तोंडून ऐकलेली एक गोष्ट लक्षांत ठेवण्याजोगी आहे. एका निर्जन अशा महावनांत कोणी एक ऋषि फलमूलांवर राहून, उपवासादिकांनीं अंतःकरणशुद्धी करून नेहमीं सत्वस्थ वृत्तीनें रहात असत. याप्रमाणें ते राहिले असतां त्यांचा तो सद्भाव पाहून त्या वनांतले सर्व सिंह, वाघ, तरस, लांडगे वगैरे क्रूर व भयंकर रक्तावर राहणारे प्राणी त्यांच्याकडे येऊन त्यांना खुशालीचे प्रश्न विचारून शिष्याप्रमाणें त्यांच्या सेवेला हजर राहून त्यांच्या मनाप्रमाणें वागत. त्या ठिकाणीं एक गांवठी कुत्रा त्या मुनींवर प्रेम व भक्ति ठेवून, फलमुलांवर उदर्निवाह करून उपवासानें अंग सुकवीत त्यांना कधींही न सोडतां त्यांचे जवळ रहात असे. नेहमीं त्यांच्या पायांशीं रहात असल्यामुळें तो अगदीं माणसाळला होता. ऋषींचा त्याच्यावर फार लळा बसला. इतक्यांत रक्तावर राहणारा भुकेनें व्याकूळ झालेला एक मोठा सामर्थ्यवान चित्ता खाद्य पुढें दिसल्यानें आनंदभरित होऊन जिभल्या चाटीत शेंपूट हालवीत आ पसरून प्रत्यक्ष काळाप्रमाणें त्या खाद्यावर झडप घालण्यासाठीं तेथें आला. त्या क्रूर जनावराला येतांना पाहून त्याच्यापासून आपलें संरक्षण करण्याविषयीं व प्राण वांचण्यासाठीं त्या कुत्र्यानें मुनींला विनविलें. मुनींनीं त्याचा भाव व भयाचें कारण ओळखून ‘ भिऊं नकोस, हा मी तुला चित्ता करतो, ’ असें म्हणून त्याला चित्ता केला. अंगावर चित्रविचित्र पट्टे व लखलखीत दांत यांनिशीं तो त्या वनांत निर्भयपणें फिरूं लागला. तेव्हां आपल्यासारखाच त्याला पाहून चालून आलेला चित्ता पुढें आला नाहीं. पुढें या नव्या बनलेल्या चित्त्यापुढें एक भुकेलेला वाघ रक्ताच्या इच्छेनें आ पसरून जिभल्या चाटीत आला. तेव्हां तो चित्ता फिरून प्राणसंरक्षणासाठीं त्या ऋषींना शरण गेला. तेव्हां स्नेहामुळें त्यांनीं त्याला त्याच्या शत्रूपेक्षां बलवान असा वाघ बनविला. तेव्हां त्याचें स्वरूप पाहून त्या वाघानें त्याला कांहीं मारलें नाहीं. याप्रमाणें हा कुत्रा बलवान वाघ बनल्यावर मांस खाऊं लागला; फलमूलें खाईनासा झाला. वनामध्यें राहणाऱ्या वाघाप्रमाणेंच तो अरण्यांतील श्वापदांना मारूं लागला. मारलेले पशू खाऊन आश्रमाजवळ तो खुशाल निजला असतां एक मदोन्मत्त हत्ती त्या ठिकाणीं आला. तो मोठा उंच असून त्याच्या गंडस्थळांतून मद वहात होता. अंग कमलांनीं भरून निघालें होतें. गंडस्थळ पसरट होतें. शेंपूट सुरेख, व शरीर धिप्पाड होतें. मेघाप्रमाणें त्याची गंभीर गर्जना होती. सामर्थ्याच्या जोरावर त्या हत्तीला आपल्याकडे येतांना पाहून तो वाघ फिरून त्या ऋषींना शरण गेला. तेव्हां ऋषींनीं त्याला मोठ्या मेघाप्रमाणें धिप्पाड हत्ती केला. तेव्हां तो हत्ती कमलवनामधून त्याचप्रमाणें साळईच्या वनामधून सर्वांग कमळाच्या आंतल्या रेणूंनीं भरून जाऊन फिरत असतां बरेच दिवस लोटले. पुढें हत्तींच्या कुलांचा फडशा उडविणारा पिंगट छटांचा एक सिंह त्या ठिकाणीं आला. त्याला भिऊन हत्ती त्या ऋषींना फिरून शरण गेला. तेव्हां त्यांनीं त्याला सिंह केला. तेव्हां जातिकुलाच्या सारखेपणामुळें तो वन्य सिंहाला जुमानीनासा झाला. पुढें त्याच्या भीतीनें त्या वनांतले दुसरे पशू घाबरून जाऊन त्या तपोवनाजवळ येईनासे झाले. पुढें कांहीं दिवसांनीं सर्व प्राण्यांचा फडशा उडविणारा आठ पायांचा व वर डोळे चढविलेला एक शरभ त्या वनांत त्या सिंहाला मारण्यासाठीं आला. तेव्हां त्या मुनींनीं त्या सिंहाला बलानें रसरसणारा असा शरभ केला. तेव्हां त्या उग्र ऋषींच्या शरभाला आपल्यापुढें पाहून तो वन्य शरभ त्या वनांतून पळून गेला. याप्रमाणें शरभाच्या योग्यतेला चढविलेला तो त्या मुनीजवळ सुखांत रहात असे. त्या शरभाला भिऊन सर्व पशू तेथून पळाले होते. तो शरभही प्राण्यांना मारण्यामध्यें गुंग होऊन मांसाहारी बनून फलमूलांकडे लक्ष देखील देईनासा झाला. तेव्हां रक्ताची लज्जत लागून गेल्यामुळें **कुत्र्याच्या जातीला अनुसरून कृतघ्नपणानें** एके वेळेला मुनीला मारण्याची त्याची बुद्धि झाली. तेव्हां तपाच्या सामर्थ्यानें मुनींनीं ज्ञानचक्षूनें त्याचा हेतु ओळखून त्याला ते म्हणाले, ‘ तुझ्यावर स्नेह जडल्यामुळें कुत्र्याचा मीं तुला या

योग्यतेला चढविला. परंतु जातिस्वभाव तूं सोडला नाहींस. ज्या अर्थी मला निरपराध्याला तूं मारूं इच्छितोस त्या अर्थी तूं फिरून कुत्रा होशील.' याप्रमाणें शाप मिळाल्याबरोबर तो फिरून कुत्रा झाला.

याप्रमाणें तो कुत्रा आपल्या मूळच्या पदावर आल्यावर त्याला फार वाईट वाटलें. ऋषींनीं त्याला फुंकाऱ्याबरोबर वनाच्या बाहेर घालवून दिलें. याप्रमाणें शहाण्या राजानें खरेपणा, शुचिर्भूतता, सरळपणा, स्वभाव, वेदज्ञान, वर्तन, कुल, आत्मनिग्रह, दया, बल, सामर्थ्य, प्रभाव, मोठेपणा, क्षमाशीलता इत्यादि गुण पाहून जे ज्या दर्जाला योग्य आहेत त्यांना त्यांना त्या त्या जागेवर नेमावे. पारख केल्यांवाचून राजानें प्रधान करूं नये. अकुलीन लोक जवळ केले असतां, राजाला सुख होत नाहीं. कुलीन मनुष्याला राजानें व्यर्थ दोष दिला असतां त्याच्या कुलीनतेमुळें राजासंबंधानें त्याचे मनांत वाईट येत नाहीं. तोंच भल्याच्या आधारानें दुर्लभ वैभव मिळालेल्या अकुलीन मनुष्याला जरा थोडा दोष दिला कीं तो वैरी बनतो. ह्मणून कुलीन, चांगलें वळण मिळालेला, शहाणा, सर्व कांहीं कळणारा, सहनशील, स्वदेशीं जन्मलेला, कृतज्ञ, बलवान क्षमाशील, आत्मनिग्रही, निर्लोभी, मिळेल त्यावर संतुष्ट राहणारा, स्वामीच्या व मित्राच्या वैभवाची इच्छा करणारा, देशकाल जाणणारा, लोकांना आपल्याकडे कसें ओढून घ्यावें हें कळणारा, हुशारीनें स्वामीच्या हितांत दक्ष राहणारा, आपल्या कामांत चोख, संधिविग्रह जाणणारा, राष्ट्रोन्नतीचे तीन गुण जाणणारा, प्रजांना आवडता, शत्रूच्या सैन्याला फोडण्याच्या व्यूहरचना ज्याला माहीत आहेत असा, सैन्याला उत्तेजन देण्याचें काम माहीत असलेला, आकार व इंगित यांची माहिती असलेला, हल्लयाची वेळ ओळखणारा, हत्ती शिकविण्याची ज्याला माहिती आहे, ज्याला अहंकार नाहीं, जो धीट, सभ्य व प्रसंगोचित काम करणारा आहे, स्वतः चोख असून चोख लोक ज्याच्याजवळ आहेत, ज्याला पाहिल्याबरोबर समाधान वाटतें, लोकांना आपल्याबरोबर नेण्याचें ज्याचे अंगीं सामर्थ्य आहे, राजनीति ज्याला पूर्ण माहीत आहे, गुणवान असून वाटेल तें करण्याला तयार, ज्याच्या अंगांत ताठा नाहीं, कोणतीही बारीक गोष्ट ज्याच्या तात्काळ लक्षांत येते, जो धैर्यवान, शूर, संपत्तिमान असून गोड बोलणारा आहे व देशकालाप्रमाणें गोष्टी घडवून आणण्याचें ज्याचे अंगीं सामर्थ्य आहे, अशा प्रकारचा मंत्री करून जो राजा त्याचा अवमान करीत नाहीं त्याचें राज्य चंद्राचे योगानें खुलणाऱ्या चांदण्याप्रमाणें पसरतें. अशा प्रकारच्या गुणांनीं युक्त व प्रजापालनामध्यें तत्पर अशा प्रकारचा धार्मिक राजा पुढील गुणांनीं लोकप्रिय होतो. तो शहाणा, सहनशील, शुद्धशील, प्रसंगीं कडक, उद्योगाची वेळ जाणणारा, थोरांची शुश्रूषा करणारा, शास्त्रांचें ज्ञान असलेला, लोकांचें ह्मणणें ऐकून कोणच्याही गोष्टींचा खल करण्यांत कुशल, बुद्धिमान, धारणायुक्त, योग्य गोष्ट शेवटाला नेण्याला समर्थ आत्मनिग्रही, गोड बोलणारा, शत्रूवर देखील क्षमा करणारा, दानशील, श्रद्धाळु, दिसण्यांत चांगला, संकटांत पडलेल्यांना हात देणारा, ज्याचे अमात्य त्याचें हित करण्याला तयार आहेत असा, निरभिमानी, निर्द्वंद्व, भलतें सलतें न करणारा, मंत्र्यांनीं कांहीं चांगलें काम केलें असतां योग्य बक्षीस देणारा, आपल्यावर भक्ति करणाऱ्या लोकांना आवडता, लोक जोडणारा, अंगीं ताठरपणा नसलेला, तोंड नेहमीं प्रसन्न असणारा, नोकरांच्या गरजांकडे लक्ष पुरविणारा, क्रोधहीन, थोर मनाचा, योग्य शिक्षा देणारा, लोकांना धर्माकडे लावणारा, हेरांकडून माहिती मिळवून प्रजेकडे लक्ष ठेवणारा, असा असावा. सर्व गुणांनीं युक्त असे चांगले योद्धे राज्य संभाळण्यासाठीं त्यानें जवळ करावेत. भरभराटीची इच्छा करणारानें त्यांचा अवमान करूं नये. ज्याच्या पदरीं निर्भयपणें हत्तीवर बसणारे, रथ चालविण्यांत प्रवीण, पुष्कळ पायदळ जवळ असलेले असे धनुर्विद्येंत प्रवीण, रणशूर व कृतज्ञ योद्धे असतात त्याचीच ही पृथ्वी होते. सर्व संग्रह करण्यामध्यें तत्पर असून जो उद्योगशील असतो व ज्याच्या जवळ पुष्कळ द्रव्य आहे तोच खरा राजा. ज्यानें योग्य लोक जवळ केले आहेत अशा राजाला शूर अशा हजार स्वारांनिशीं सुद्धां सर्व पृथ्वी जिंकतां येते.

सारांश, कुत्र्याच्या मालिकेंतले जे नोकर अस-

तील त्यांना तशा तशा कामाला जो लावतो त्यालाच राज्यफल मिळतें. कुत्र्याला त्याचा बहुमान करून त्याच्या जागेवरून काढून उच्चपदीं ठेविलें असतां त्याच्या डोळ्यावर धुंदी येते. अमात्य लोकांना ते ज्या ज्या जागेला योग्य असतील त्या त्या जागेवर नेमावेत. भलत्याला भलत्या जागीं नेमणें चांगलें नाहीं. ज्याच्या त्याच्या योग्यतेप्रमाणें जो नोकरांना कामें सांगतो तो त्यामुळें राज्यासुख भोगण्याला समर्थ होतो. शरभाला शरभाच्या ठिकाणीं, सिंहाला सिंहाचे ठिकाणीं, वाघाला वाघाचे ठिकाणीं व चित्त्याला चित्त्याचे ठिकाणीं याप्रमाणें नोकरांना त्यांच्या त्यांच्या योग्यतेनुरूप काम द्यावें. त्या त्या कामांचें योग्य फळ मिळवूं इच्छिणारानें याच्या उलट नोकराची नेमणूक करूं नये. जो मूर्ख राजा याकडे लक्ष न देतां योग्यतेच्या पलीकडे नोकरांना हुद्यावर चढवितो त्याची प्रजा खुष रहात नाहीं. पोरस्वभावाचे, क्षुद्र, मूर्ख, इंद्रियें स्वाधीन नसलेले असे अकुलीन लोक कधीं कामावर नेमूं नयेत. भले, कुलीन, शूर, ज्ञानी, दुसऱ्याचा हेवा न करणारे, क्षुद्र नसलेले, शुद्धशील व हुषार असे लोक राजाच्या जवळ असावेत. जे नेहमीं सेवा करण्याला तत्पर, शांत, शुद्धशील, अंगामध्यें चांगले गुण असलेले व लोक ज्यांच्या संबंधानें खडे फोडीत नाहींत असे लोक राजानें आपल्या मर्जीत घ्यावेत. सिंहानें आपल्याबरोबर सिंहालाच घ्यावें. भलताच मनुष्य सिंहाबरोबर राहिला म्हणजे त्याला उगीच सिंहाची योग्यता येते. तसेंच सिंहाचें काम करूं इच्छिणारा कुत्र्यांना जवळ करील तर सिंहाचें काम त्याचे हातून शेवटास जाणार नाहीं. त्याचप्रमाणें शूर, शहाणे, कुलीन, अशा लोकांच्या साह्यानेंच पृथ्वी जिंकतां येते. म्हणून ज्याला विद्या नाहीं, अक्कल नाहीं किंवा पैसा नाहीं किंवा ज्याच्या अंगीं सरळपणा नाहीं, अशा लोकांना राजानें जवळ करूं नये. स्वामिकार्याला तत्पर असून एखादें काम सांगितलें असतां तीराप्रमाणें जे सुटतात अशा लोकांशीं राजानें गोड असावें. तशीच खजिन्याची मोठी काळजी घ्यावी. खजिना हाच राजांच्या सुस्थितीला कारण असल्यानें त्याची स्थिति चांगली असावी. तो नेहमीं भल्याच्या ताब्यांत असावा. राजाचे नोकर नेहमीं दक्ष असून त्यांना रणाचे त्याचप्रमाणें घोड्यासंबंधी ज्ञान असावें. ज्ञाति व आप्त यांची काळजी घेऊन मित्र व संबंधी यांना राजानें जवळ करावें. त्याचप्रमाणें पौरकार्याकडे त्यानें लक्ष ठेवावें. प्रजेशीं कसें असावें यासंबंधीं हें कुत्र्याचें उदाहरण मीं तुला सांगितलें आहे.

---

## १२४ राजनीतीचें सार.

### ( १२. १२० )

धर्मराज ह्मणाला, ‘ पूर्वीच्या राजधर्मवेत्त्यांनीं सांगितलेल्या राजासंबंधाच्या अनेक गोष्टी आपण मला सांगितल्या. आतां राजधर्माचें सार थोडक्यांत मला सांगा. ’ हें ऐकून भीष्म ह्मणाले, ‘ सर्व प्राणिमात्रांचें रक्षण करणें हें क्षात्र धर्माचें मुख्य काम आहे ज्याप्रमाणें मोर निरनिराळ्या रंगाचीं पिसें धारण करतो त्याप्रमाणें राजनीतिकुशल राजानें बहुरूपीपणा धरला पाहिजे. कडकपणा, वक्रपणा, अभयदान, खरेपणा, सरळपणा, तिऱ्हाईतपणा, इत्यादि गुण अंगांत ठेवून सात्विक वृत्ति ठेवल्यानें त्याला सुख मिळतें. ज्या बाबतींत जें स्वरूप हिताचें असेल तें धरावें. बहुरूपी राजाचा एवढासुद्धां उद्देश विफळ होत नाहीं. शरदृतूमधील मोराप्रमाणें मसलत बाहेर न फोडतां त्यानें मुक्याप्रमाणें असावें. त्याचें भाषण गोड व थोडें असून तो सर्व शास्त्रांमध्यें पारंगत असावा. धक्क्यामधील भुशीप्रमाणें संकटाचीं जीं द्वारें असतील त्याकडे लक्ष असावें, पर्वतावर पाऊस पडून मोठ्या फुगून वाहणाऱ्या नद्याप्रमाणें तपःसिद्धि झालेल्या ब्राह्मणांचा यानें आश्रय करावा. आपला हेतु साधण्यासाठीं धर्माचा टेंभा मिरविणाऱ्याप्रमाणें वर्तन ठेवावें. नेहमीं दंड तयार ठेवावा. लोकांचा आदा व खर्च लक्षांत घेऊन माडाच्या झाडापासून माडी काढण्याप्रमाणें मोठ्या हुषारीनें, बेताबेतानें त्यांच्यापासून पैसा काढून घ्यावा. आपल्या प्रजेचे ठिकाणीं सरळ वागून शत्रूचे प्रदेश पायाखालीं तुडवावेत. आपला पक्ष जोरावर असतां शत्रूवर चालून जावें व आपला कमीपणा कोठें कोठें आहे हें लक्षपूर्वक पहात रहावें. शत्रूंचे दोष उघड करून दाखवावेत व त्यांचे साह्यकारी असतील त्यांची वाताहत लावावी. अरण्यामधील फुलें गोळा कर-

णाऱ्याप्रमाणें बाहेरून पैसा जमवीत असावा. जे वैभवानें फुगून पर्वताप्रमाणें ताठेरले असतील अशांना कांहीं गुप्त प्रकारानें किंवा दबा धरून छापा घालून नाहींसे करावे. पावसाळ्यांतील मोराप्रमाणें रात्रीच्या वेळीं कोणी नसेल अशा ठिकाणीं राहून आपल्या स्त्रिया तेवढ्या आपल्या जवळ ठेवाव्यात. आपलें चिलखत कधीं अंगावरून काढूं नये. व स्वतः स्वतःचें रक्षण करण्यामध्यें तत्पर असावें. शत्रूच्या हेरांनीं पसरलेलें जाळें टाळावें; अशा अवघड ठिकाणीं चुकून सांपडलें असतां नाश होण्याचा संभव आहे. राजानें मोराप्रमाणें वांकडा रस्ता धरणाऱ्या बलशाली शत्रूंना नाहींसें करून त्यांच्या सैन्याचा फडशा पाडावा. अशांना राज्यांतून बाहेर हाकलून द्यावें. मोराप्रमाणेंच आपल्या हिताचे असेल तेंच करीत राहून ते ज्याप्रमाणें अरण्यांतून किडे गोळा करतात त्याप्रमाणें चोहोंकडून शहाणपण गोळा करीत रहावें. याप्रमाणें राजानें मोराप्रमाणें आपलें राज्य सांभाळावें. शहाणपणानें आपली मनोदेवता सांगेल तशी नीति ठेवावी. आपल्या बुद्ध्यनुरूप कोणताही विचार ठरवून दुसऱ्याच्या विचारानें तो ठाम करावा. अशा प्रकारानें बुद्धीला निश्चय ठरवितां येणें याला शास्त्रज्ञान पाहिजे. शत्रूच्या ठिकाणीं गोडीगुलाबीनें विश्वास उत्पन्न करावा. आपलें सामर्थ्य लक्षांत घ्यावें. व सर्व मागील पुढील गोष्ट लक्षांत घेऊन काय तो विचार ठरवावा. गोडीगुलाबीनें काम साधून घेण्यामध्यें पटाईतपणा व काय करावें काय न करावें हें कळण्याचें शहाणपण अंगीं असावें. मोठ्या शहाण्या राजाला नवीन शिकावयाचें कांहीं शिल्लक नसावें. बुद्धीनें बृहस्पतीसारखा शहाणा असणारा मनुष्य लोकदूषणेला पात्र झाला तरी तापलेलें लोखंड पाण्यांत टाकलें असतां जसें थंड होतें तसा तो लवकर पूर्व स्थितीवर येतो. आपलीं किंवा दुसऱ्याचीं सर्व कामें शास्त्राकडे दृष्टि देऊन हातीं घ्यावीं. पैसा मिळविण्याचा मार्ग ज्याला ठाऊक आहे अशा राजानें ज्यांचा स्वभाव मृदु, हिंमत थोर, शहाणपण व बल हीं अधिक आहेत असे लोक आपल्या कामावर नेमावेत. ज्या ज्या सुराला लागेल तसतसें ताणलेल्या तारांप्रमाणें निरनिराळ्या लोकांना त्यांच्या त्यांच्या योग्यतेनुरूप कामें सांगून राजानें त्यांच्या मागून असावें. धर्माच्या आड न येतां सर्वांचें प्रिय करीत असावें. ज्या राजाच्या संबंधानें प्रजेपैकीं प्रत्येकाला ‘ हा माझा, हा माझा ’ असें वाटत असेल तो पर्वताप्रमाणें अचळ असतो, स्वतः लांबवर किरणें सोडणाऱ्या सूर्याप्रमाणें कोणच्याही गोष्टींत स्वतः पडून आवड नावड बाजूला ठेवून न्यायानें धर्माचेंच रक्षण करावें. कुलाचार, जनाचार व देशाचार जाणणारे, गोडबोले, मध्य वयांत आलेले, निर्दोष, शुद्धशील, त्याचप्रमाणें जे नेहमीं राजाच्या हितामध्यें गढलेले हुषार, निर्लोभी, सुशिक्षित, आत्मनिग्रही, धर्माधर्मामध्यें निष्ठावान, व धर्म व अर्थ राखण्याला समर्थ असतील अशा लोकांना सर्व कामांकडे लावावेत. याप्रमाणें कामांचा क्रम व परिणाम लक्षांत घेऊन हुषारीनें वागावें. व हेरांकडून बातमी मिळवीत राहून सुखांत रहावें. ज्याचा राग व कृपा हीं दोन्ही फुकट होत नाहींत, जो सर्व गोष्टींकडे स्वतः नजर देतो, व खजिन्यावर ज्याची स्वतःची नजर आहे त्याला ही पृथ्वी वाटेल तितका पैसा देते. ज्याची कृपा उघडपणें होत असते व शिक्षाही योग्य रीतीनें मिळत असते, जो आपली व राष्ट्राची खबरदारी घेतो, त्याच राजाला राजधर्म कळला ह्मणावयाचा. आपल्या किरणांनीं पहात राहणाऱ्या उगवलेल्या सूर्याप्रमाणें नेहमीं राष्ट्रावर नजर ठेवावी. हेर व आपले नोकर यांना ओळखून स्वतःची बुद्धि सांगेल तसें वागावें. प्रसंगीं लोकांकडून पैसा घ्यावा परंतु आपला उद्देश मात्र कळूं देऊं नये. ज्याप्रमाणें भुंगा फुलापासून मध गोळा करीत असतो त्याप्रमाणें राजानें पैसा मिळवून सांठवावा. सांठवून बाकी राहिलेला पैसा धर्मकामाकडे लावावा. शास्त्रज्ञ, बुद्धिमान व शहाण्या राजानें संचयांतून खर्च करूं नये व थोडा ह्मणून पैशाकडे दुर्लक्ष करूं नये. किंवा लहान ह्मणून शत्रूला तुच्छ करूं नये. स्वतःच्या बुद्धीनें स्वतःला ओळखावें. मूर्खावर विश्वास टाकूं नये. धृति, हुषारी, आत्मनिग्रह, बुद्धि, शरीरसंपत्ति, धैर्य, शौर्य व देशकाल यांजकडे लक्ष देणें हे आठ गुण संपत्तीच्या—मग ती लहान असो किंवा मोठी असो—वाढीला कारण होतात. तूप ओ-

तल्यानें लहानशी ज्वाळा मोठी होते. त्याचप्रमाणें एकाच बीजापासून हजारों झाडें होतात. त्याप्रमाणें जमाखर्च अवाढव्य आहे ह्मणून थोड्याशा पैशाबद्दल बेफिकिरपणा दाखवूं नये. शत्रु लहान असो, मोठा असो किंवा ह्मातारा असो तो बेफिकीर मनुष्याला मारतो. वेळ आली असतां तो याचीं पाळें मुळें खणून काढण्याला समर्थ होतो. ह्मणून काळ ज्याला कळतो, तोच श्रेष्ठ. द्वेष करणारा शत्रु प्रबळ असो किंवा दुर्बळ असो, ता आपली कीर्ति हरण करूं शकतो, धर्माच्या आड येऊं शकतो, व आपलें सामर्थ्य हाणून पाडतो. ह्मणून शत्रूसंबंधानें हुषार मनुष्यानें कधीं बेसावध असूं नये. बुद्धिमान राजाला वैभव व जय पाहिजे असेल तर खर्च, उत्पन्न, शिल्लक व राज्यव्यवस्था लक्षांत घेऊन मग संधि अथवा विग्रह करण्याला उठावें. यासाठीं त्यानें आपल्या बुद्धीला जवळ करावी. तीव्र बुद्धि बलवानाला सुद्धां हाणून पाडते. वाढत असलेलें सामर्थ्य त्याच्या योगानें कुंठित होतें. व वाढणारा शत्रु तिच्या योगानें नाहींसा होतो. ह्मणून बुद्धीचा विचार घेऊन जें काम होतें तें चांगलें. ज्याच्या अंगांत कांहीं दोष नाहीं अशा शहाण्या राजाला वाटेल त्या गोष्टी थोड्याशा श्रमानें मिळवितां येतात. ज्या राजाला खुशामत्यांनीं आपली खुशामत करावीशी वाटते त्याचा कल्याणाचा घडा थोडा देखील भरत नाहीं. ह्मणून राजानें सौम्यपणानें प्रजेपासून पैसा काढून घ्यावा. जर तो नेहमीं नेहमीं प्रजेवर जुलूम करूं लागेल तर क्षणभर चमकणाऱ्या विजेप्रमाणें लवकर तो नाहींसा होईल. विद्या ह्मणा, तप ह्मणा किंवा पुष्कळ पैसा ह्मणा उद्योगानें मिळणें शक्य आहे. व ह्या व्यवसाय मनुष्याच्या बुद्धीवर अवलंबून आहे. ज्या ह्या देहाचे ठिकाणीं मोठमोठ्या शहाण्यांची व थोरांची वस्ति झाली आहे अशा देहाला शहाण्यानें तुच्छ समजूं नये. जो लोभी असेल त्याला नेहमीं पैसा देत जाऊन वश करून घ्यावें. **कारण लोभ्याला दुसऱ्याच्या पैशावांचून कधींच समाधान होत नाहीं.** सुखाचा लोभ सर्वांना आहे. व सुख पैशावर अवलंबून आहे. ह्मणून पैशाला मुकला असतां मनुष्य धर्मकामाला मुकतो. लोभी मनुष्याला दुसऱ्याचा पैसा, सुख, बायका, पोरें सर्व हवींशीं वाटतात. लोभ्यामध्यें पुष्कळ दोष असतात. ह्मणून राजानें लोभी मनुष्याला जवळ करूं नये. शत्रूची हालचाल समजून घेण्यासाठीं एकाद्या हलक्यासलक्या मनुष्याला देखील पाठवून देण्याला हरकत नाहीं. शत्रूचीं सर्व हातीं घेतलेलीं कामें व उद्देश राजानें फसवावेत, धार्मिक लोकांमध्यें जो विश्रुत, ज्याचा मंत्र गुप्त व जो प्रजेच्या हितामध्यें दक्ष अशा कुलीन राजाला सामंत राजांना ताब्यांत ठेवतां येतें. याप्रमाणें शास्त्रांत वर्णिलेला सर्व राजधर्म मीं तुला थोडक्यांत सांगितला आहे. याप्रमाणें जो राजा वागेल तो पृथ्वी सांभाळण्याला समर्थ होईल. जो राजा नीतीनें मिळणाऱ्या सुखाकडे दुर्लक्ष करून नशीबानें मिळणाऱ्या सुखाच्या मार्गे लागतो तो राजसुखाला व सर्व उत्तम लोकांनाही मुकतो. संधिविग्रहाकडे योग्य लक्ष देऊन जो राजा हुषारीनें वागतो अशा राजाला वाटेल त्या शत्रूला नाहींसा करतां येतें. राजानें निरनिराळ्या रूत्यांनीं व उपायांनीं मिळणारीं साधनें मिळविण्यांत दक्ष रहावें. त्यानें केवळ नशीबावर कधीं अवलंबून राहूं नये. दुसऱ्याचे दोष पहात राहणाऱ्या मनुष्याला मोठी संपत्ति, लौकिक किंवा पैसा मिळत नाहीं. एकाच कामाला लागलेल्या दोन मित्रांपैकीं जो भारी ओझें शिरावर घेतो त्याचीच शहाणे प्रशंसा करतात.

---

## १२५ दंडशक्ति व तिचें स्वरूप.
## (१२. १२१–१२२)

युधिष्ठिर ह्मणाला, ' आपण आतांपर्यंत जो राजधर्म सांगितला त्यावरून सर्व प्राणिमात्र एवढेंच नव्हे तर सर्व चराचर दंडावर अवलंबून आहे असें दिसतें. तेव्हां हा दंड कोण आहे ? कशाप्रकारचा आहे ? कशा स्वभावाचा आहे? याचें स्वरूप काय? तो कसा झाला आहे ? त्याची उत्पत्ति कोठून ? त्याचें तेज काय ? तो प्रजेच्या संबंधानें इतक्या काळजीपूर्वक कसा जागत आहे ? प्रजापालन करीत जागत असणारा हा कोण आहे ? दंड नांवाचा अव्वल अखेरचा असा हा कोण ? हा कशावर अवलंबून आहे व याची गति काय, हें मला

सांगा.' ह्यावर भीष्म ह्मणाले, 'ज्याला दंड किंवा व्यवहार असें दुसरें नांव आहे त्याच्यावर सर्व जग अवलंबून आहे. नेहमीं जागृत असणाऱ्या धर्माचा लोप न होऊं देतां कायम ठेवणें हें त्याचें मुख्य काम असून हा दुसऱ्याचा अपहार होऊं देत नाहीं. ह्मणून याला व्यवहार हेंही नांव आहे. योग्य रीतीनें दंड चालवून पक्षपात न होऊं देतां ज्याच्या योगानें प्रजेचें रक्षण होतें तोच योग्य धर्म असें पूर्वी मनूनें ह्मटलें आहे. तेव्हां मीं हें सांगितलेलें मनूचें वचन असून ब्रह्मदेवाचें महावचन आहे. ह्मणून याला आदिवचन असेंही नांव आहे. हा दंड योग्य ठेवल्यानेंच धर्मार्थकाम सुरळीत चालतात. दंड हें मोठें दैवत असून पेट घेतलेल्या अग्नीप्रमाणें ह्याचें स्वरूप आहे. नीलकमलाच्या दळाप्रमाणें याचा शामवर्ण असून याला चार दाढा, चार हात, आठ पाय व अनेक डोळे आहेत. शंकूसारखे याचे कान असून याच्या अंगावरचे केंस ताठ उभे आहेत. याला जटा असून जिभा दोन आहेत व याचें तोंड तांबूस रंगाचें आहे. याच्या अंगावर काळविटाचें कातडें आहे. याप्रमाणें या दंडाचें उग्र स्वरूप असून त्याला कोणाच्यानें आळा घालवत नाहीं. तलवार, धनुष्य, गदा इत्यादि जीं कांहीं हत्यारें आहेत तीं सर्व मूर्तिमान दंडाचीं स्वरूपें असून दंडच या स्वरूपानें कापीत, तोडीत, दुखवीत, छाटीत, फाडीत, मारीत, जगामध्यें फिरत असतो. तलवार, कब्यार, धर्म, विजय, शास्ता, व्यवहार, धर्मपाल, रुद्रतनय, मनु, शिवंकर इत्यादि त्याचीं अनेक नांवें सांगितलीं असून दंड हाच प्रत्यक्ष भगवान विष्णु आहे. हा कायमचें महारूप धरीत असल्यानें याला महापुरुष असें नांव आहे. त्याचप्रमाणें दंडनीतीला ब्रह्मकन्या, लक्ष्मी, वृत्ति, सरस्वती, जगद्धात्री अशीं अनेक नांवें आहेत. दंडाचीं याप्रमाणें अनेक स्वरूपें आहेत. अर्थानर्थ, सुखदुःख, धर्माधर्म, बलाबल, भाग्याभाग्य, पुण्यापुण्य, गुणागुण, कामाकाम, ऋतु, महिने, रात्री, दिवस, क्षण, लक्ष, दुर्लक्ष, आनंद, राग, शम, दम, दैव, यत्न, मोक्ष, नरक, भय, अभय, हिंसा, अहिंसा, तप, यज्ञ, आत्मनिग्रह, विषाविष, आदि, अंत व मध्य, सर्व कृत्यांची निवडानिवड, माज, वेठ, उद्धटपणा, ढोंग, धैर्य, नय, अनय, शक्ति, अशक्तता, मान, ताठा, आदा, खर्च, नम्रता, दानशीलता, काल, अकाल, खरें, खोटें, ज्ञान, श्रद्धा, अश्रद्धा, दुबळेपणा, व्यवसाय, नफानुकसान, जय, अजय, कडकपणा, मऊपणा, मृत्यु, प्राप्ति, अप्राप्ति, विरोध, अविरोध, कार्य, अकार्य, असूया, अनसूया, लाज, निर्लज्जपणा, भीड, वैभव, निकृष्टदशा, तेज, कृत्य, विद्वत्ता, वाक्पांडित्य, बुद्धीची तीक्ष्णता, याप्रमाणें दंडाचीं जगांत अनेक रूपें आहेत. या जगांत दंड नसता तर लोकांनीं एकमेकांला चिरडून टाकलें असतें. दंडाच्या भयानेंच लोक एकमेकांना मारीत नाहींत. रोजच्या रोज दंडानें सांभाळिलेली प्रजा राजाला वैभवाला चढविते. ह्मणून दंडच प्रजेचा मुख्य आधार आहे. दंड हाच लोकांना वाटेवर ठेवतो. केवळ सत्यावर अवलंबून असणारा धर्म ब्राह्मणांच्या ठिकाणीं दिसून येतो. व धर्मयुक्त राहिल्यानेंच त्यांच्याजवळ वेद राहतो. वेदापासून यज्ञाची उत्पत्ति आहे; व यज्ञाच्या योगानेंच देवता तृप्त होऊन त्यांच्या शिफारशीनें प्रजेवर कृपा करण्यासाठीं इंद्र त्यांना अन्न देतो. सर्व प्राणिमात्रांचे प्राण अन्नावर अवलंबून आहेत. आणि दंड त्यांना वाटेवर ठेवण्यासाठीं क्षत्रियरूपानें त्यांचे ठिकाणीं नेहमीं मोठ्या हुषारीनें जागत राहतो. ईश्वर, पुरुष, प्राण, सत्व, चित्त, प्रजापति, भूतात्मा, जीव, अशा आठ नांवांनीं तो प्रसिद्ध आहे. जो बलाच्या साह्यानें सामर्थ्यवान, त्याचप्रमाणें धर्म, व्यवहार, दंड, ईश्वर व जीव असा पंच स्वरूपात्मक आहे त्या राजाच्या स्वाधीन ऐश्वर्य व दंड हे दोन केले आहेत. कुल, धन, वाहन, अमात्य, ज्ञान व निरनिराळ्या प्रकारचीं बळें त्याचप्रमाणें हत्तीदळ, रथदळ, स्वार, पायदळ, आरमार, वेठीचे लोक, पुष्कळ लोक व गुरें यांचा राजानें संग्रह करावा. रथदळ वगैरे हीं राजांचीं अष्टांगें समजलीं आहेत. रथदळ, हत्तीदळ, स्वार, पायदळ, मंत्री, वैद्य, भिक्षुक, न्यायाधीश, जोशी, दैवचिंतक, खजिना, मित्र, धान्य व इतर साधनें यांना सात प्रकृती व आठ अंगें यांनीं युक्त असें राजाचें शरीर समजलें आहे. परंतु दंड हेंच राजाचें मुख अंग असून त्यापासूनच बाकी सर्व आहे. ईश्वरानें मोठ्या काळजीनें क्षत्रिया-

च्या उपयोगासाठीं हा दंड पाठविला आहे. हें सनातन जग हेंच निःपक्षपाती दंडाचें स्वरूप होय. ज्याच्या योगानें धर्माची वाट दाखविली जाते त्या दंडावांचून दुसरें कोणतेंही राजांना पूज्य नाहीं. लोकांच्या संरक्षणासाठीं व ज्याच्या त्याच्या धर्मामध्यें ज्याला त्याला ठेवण्यासाठीं ब्रह्मदेवानें हा धर्म पाठविला आहे. वादीप्रतिवादीच्या वादविवादापासून एक व्यवहार उत्पन्न होतो. व त्यामध्यें दोघांच्या पुराव्यावर नजर देऊन निकाल द्यावा लागतो; म्हणून त्याला वादीप्रतिवादीच्या पुराव्याच्या स्वरूपाचाही ह्मणतात. त्याचप्रमाणें वेदापासून निघणारा दुसरा एक व्यवहार आहे त्याला वेदप्रमाणात्मक ह्मणतात. व तिसरा कुलाचाराचा व्यवहार असून हाही शास्त्रांत सांगितला आहे. जो वरतीं पुराव्याच्या स्वरूपाचा व्यवहार सांगितला तो राजाचे ठिकाणीं दंडस्वरूपानें असून त्या दंडामध्यें पुराव्यावरून निकाल देण्यांत येतो. हा जो पुराव्यावरून दंडाचा प्रकार सांगितलेला व्यवहार त्याला सुद्धां वेदाचा आधार आहेच. आतां जो वेदप्रमाणात्मक धर्म सांगितला तो नीतीकडे व कर्तव्याकडे लावणारा आहे. व नीति व कर्तव्य यांवर विश्वास असणाऱ्या लोकांना तो गुणकारी आहे. आतां तिसऱ्या प्रकारचा जो लौकिक व्यवहार सांगितला त्याला सुद्धां आधार वेदाचाच आहे. तो तिन्ही लोकांना कायम ठेवतो. व तो सत्यस्वरूपी व वैभव वाढविणारा आहे. दंड म्हणून जो सांगितला तो सनातन व्यवहार आहे. आणि ह्या व्यवहाराचें मूळ वेदांत आहे. आणि वेद हा केवळ नीति व सन्मार्ग यांचा उपदेशक आहे. ब्रह्मदेव हा सर्व सृष्टीचा उत्पादक असून याच्यापासूनच हा व्यवहार उत्पन्न झाला आहे. आणि त्यानें ह्या व्यवहारासंबंधानें असें ह्मटलें आहे कीं, स्वधर्मानें वागणाऱ्या राजाला आई, बाप, भाऊ, पुरोहित कोणालाही शिक्षा करण्याला हरकत नाहीं. या बाबतींत पुढील इतिहास लक्षांत ठेवण्या जोगा आहे.

अंग देशामध्यें वसुहोमा म्हणून कोणी तेजस्वी राजा होता. तो महातपस्वी, धर्मवेत्ता राजा देव, ऋषी व पितर यांना पूज्य अशा मुंजपृष्ठ प्रदेशाला आपल्या बायकोसह गेला. त्या ठिकाणीं हिमाचलाच्या शिखरावर सोन्याच्या मेरुपर्वतावर रामांनीं मुंजझाडाच्या छायेखालीं आपली जटा बांधली होती. त्या दिवसापासून त्या प्रदेशाला मुंजपृष्ठ असें नांव मिळून रुद्राचें तें नेहमीं राहण्याचें ठिकाण झालें. त्या ठिकाणीं राहून पुष्कळ चांगले गुण अंगांत आणल्यानें याला ब्राह्मण, देव व ऋषि चांगले मानूं लागले. कोणे एके वेळीं इंद्रसखा मांधाता त्या ठिकाणीं याकडे येऊन मोठ्या नम्रपणें त्याच्यापुढें उभा राहिला. वसुहोमानें त्याला पाय धुण्याला पाणी देऊन अर्घ्यादिकांनीं त्याची पूजा केल्यावर त्याच्या सप्तांगांनीं युक्त अशा राज्यासंबंधी कुशल विचारून शेवटीं ‘ काय काम आहे ’ म्हणून त्याला विचारिलें. तेव्हां मांधाता ह्मणाला, ‘ बृहस्पतींचें व शुक्राचार्यांचें शास्त्र सर्व आपल्याला ठाऊक आहे तेव्हां दंडाची उत्पत्ति कशी झाली ? याच्यापूर्वीं काय होतें ? क्षत्रियांशीं याचा कसा संबंध जडला वगैरे इतिहास मला सांगा. मी गुरुदक्षिणा पाहिजे तर यावयाला तयार आहें. यावर वसुहोमा ह्मणाला, ‘सांगतों ऐक. माझ्या ऐकण्यांत असें आहे कीं, ब्रह्मदेवांच्या मनांत यज्ञ करावयाचें आलें असतां त्यांच्या मनाजोगता ऋत्विज त्यांना कोणी मिळेना. म्हणून पुष्कळ वर्षेपर्यंत त्यांनीं एक गर्भ डोक्यावर धारण केला. हजार वर्षें झाल्यावर शिंकल्याबरोबर तो गर्भ खालीं पडला. त्याला क्षुप हें नांव मिळून तो सर्व लोकांचा स्वामी झाला. त्यानें ब्रह्मदेवाचें ऋत्विज्य केलें. याप्रमाणें ब्रह्मदेवांनीं आपलें उग्र स्वरूप टाकून यज्ञ करणाऱ्याचें सौम्य असें उघड स्वरूप घेतल्यानें त्यांच्या जवळ रहात असणारा दंड गुप्त झाला. तो गुप्त झाल्याबरोबर प्रजेमध्यें कालवाकालवी झाली. काय करावें, काय न करावें, काय खावें, काय न खावें, काय प्यावें, काय न प्यावें, कोणाशीं संबंध ठेवावा, कोणाशीं न ठेवावा, याचा कांहींच विधिनिषेध उरला नाहीं. लोक एकमेकांना पीडा देऊं लागले. आपला पैसा व दुसऱ्याचा पैसा यांमध्यें भेदच दिसेनासा झाला. मांसाचा तुकडा ओढणाऱ्या कुत्र्यांप्रमाणें लोक एकमेकांना बुचाडूं लागले. दुबळ्यांना बळवान मारूं लागले. कांहीं ताळच उरला नाहीं. तेव्हां ब्रह्मदेवांनीं विष्णूकडे जाऊन ही स्थिति त्याच्या कानावर घालून, ‘ प्रभो संकर न होईल अशी

कांहीं व्यवस्था कर,' अशी त्याची विनंति केली. तेव्हां भगवान विष्णु पुष्कळ वेळ विचार करून दंडस्वरूपानें उत्पन्न झाला. त्या स्वरूपांतून धर्मरूपी पायापासून नीतिरूपी सरस्वतीनें दंडनीति उत्पन्न केली. व ती दंडनीति सर्व जगभर प्रसिद्ध झाली पुढें फिरून कांहीं वेळ विचार करून त्या त्या वर्गावर एकेक शास्ता त्यानें निर्माण केला. सहस्राक्ष इंद्राला देवाचा स्वामी केला. यमाला पितरांचा केला. संपत्तीचा व राक्षसांचा स्वामी कुबेराला केलें. मेरूला पर्वतांचा स्वामी केला. नद्यांचा स्वामी समुद्राला करून सर्व प्राण्यांवर व असुरांवर वरुणाला स्वामित्व दिलें. त्याचप्रमाणें प्राण्यांचा स्वामी मृत्यु, तेजांचा स्वामी अग्नि, रुद्रांचा स्वामी ईशान, ब्राह्मणांचा स्वामी वसिष्ठ; वसूंचा स्वामी जातवेदस, ग्रहांचा स्वामी सूर्य, नक्षत्रांचा स्वामी चंद्र, ओषधींचा स्वामी अंशुमान, भूतांचा स्वामी स्कंद केला. त्याचप्रमाणें वाढ व नाश यांना कारणीभूत अशा कालाला सर्व प्राणिमात्रांचा व हत्यारें, रोग, यम व कर्म या मृत्यूच्या चार भागांचा व सुखदुःखांचा स्वामी केला. महादेवांना शूल देऊन रुद्रांचा स्वामी केला. असें श्रुतींत सांगितलें आहे. महादेवांनीं वर सांगितलेला ब्रह्मदेवाचा यज्ञ यथास्थित शेवटास गेल्यावर सर्वांचें रक्षण करणारा धर्मदंड विष्णूचे स्वाधीन केला. विष्णूनें तो अंगिरांना दिला, अंगिरांनीं इंद्र व मरीच यांना दिला; मरीचींनीं भृगूंना दिला, भृगूंनीं ऋषींना दिला व ऋषींनीं लोकपालांच्या स्वाधीन केला. लोकपालांनीं क्षुपाच्या हातीं दिला, क्षुपानें सूर्यपुत्र मनूचे स्वाधीन केला व या मनूनें सूक्ष्म धर्म व अर्थ यांसाठीं तो आपल्या मुलांचे स्वाधीन केला. दंडाचा उपयोग धर्माचा विचार करून नीट करावा. लहरीप्रमाणें कधीं करूं नये. दुष्टांना ताळ्यावर आणण्यासाठीं तो केला आहे. दंड हातीं घेणें हें लोकांच्या मनांत भीति उत्पन्न करण्यासाठीं असून राजांचा खजिना भरण्यासाठीं किंवा उगीच कांहीं तरी करण्यासाठीं नाहीं. हातपाय मोडणें, देहांत शिक्षा करणें, शरीराला पीडा देणें, कड्यावरून ढकलणें, हद्दपार करणें ह्या शिक्षा क्षुल्लक कारणावरून करूं नयेत. मनूनें प्रजेचे रक्षणासाठीं हा दंड दिला असून तो ह्याप्रमाणें प्रजेचें रक्षण करीत जागृत आहे. हें सर्व चराचर जग क्षत्रियांकडून दंडाच्या योगानें जागृत राहिलें आहे. ब्रह्मतेजानें युक्त असा हा दंड समाज एकत्र ठेवून सर्व आपापल्या ठिकाणीं नीट ठेवीत आहे. आरंभापासून अखेरपर्यंत काल नेहमीं जागा आहे. म्हणून धार्मिक राजानें दंडनीतीला अनुसरून योग्य रीतीनें राज्य करावें.'

---

## १२६ धर्मार्थकामविचार.

### ( १२. १२३. )

'ज्यांवर ही लोकयात्रा पूर्णपणें अवलंबून आहे त्या साधनांचा उद्देश काय ? त्यांचें मूळ काय ? कधीं कधीं त्या परस्परांचा संबंध जुळलेला दिसतो, कधीं कधीं ते वेगवेगळे दिसतात; यासंबंधी तुमचें निश्चित मत काय आहे तें सांगा,' ह्मणून युधिष्ठिरानें विचारलें असतां भीष्म ह्मणाले, 'जेव्हां लोक चांगल्या मनानें धर्माच्या साह्यानें अर्थसाधन करूं पाहतात तेव्हां धर्मार्थकाम हे तिन्ही काल, कारण व प्रसंग यांच्या अनुरूप एका ठिकाणीं एकत्र असूं शकतात. अर्थाला मूळ धर्म असून काम हें धर्मफल आहे. व या सर्वांना मूळ संकल्प आहे. संकल्पाचा संबंध विषयांशीं आहे व विषय भोगासाठीं आहेत. तेव्हां या संकल्पावर हे तीन अवलंबून आहेत. **यांपासून दूर असणें हाच मोक्ष होय. धर्माचा हेतु शरीर रक्षण, अर्थाची धर्मप्राप्ति, व कामाचा भोग**, या दृष्टीनें पाहिलें असतां हे तिन्ही रजोगुणात्मक आहेत व स्वर्गादिकांच्या इच्छेनें सकाम बुद्धीनें हें न आचरतां आत्मज्ञानासाठीं निष्काम बुद्धीनें आचरावेत. ज्यांच्या आरंभाला धर्म असून अखेरीला काम आहे अशा ह्या तिघांना अगदीं सोडूं नये. मात्र तपाच्या साधनानें विचारबुद्धि ठेवून यांच्या संबंधापासून मिळणाऱ्या फळाकडे लक्ष देऊं नये. कारण निष्काम बुद्धीनें आचरले असतां या तिघांचेंही अवसान मोक्षांतच आहे. मात्र अमके करून अमके फळ मिळवीन अशी बुद्धि ठेवली असतां यापासून तें फळ मिळेल किंवा न मिळेल याची वानवा असते. पैसा मिळविण्याला धर्माशिवाय दुसरीं साधनें आहेत शिवाय दैवानेंही तो मिळतो.

तेव्हां धर्मासाठीं अर्थाची जरूर नाहीं. शिवाय पैसा मिळून सुद्धां त्याचा धर्माकडे उपयोग न होतां दुसऱ्या भलत्या वाईट कामाकडे उपयोग होतो. धर्म वाढविण्याला उपवासव्रतादि दुसरीं साधनेंही आहेत. तेव्हां अज्ञानानें पिछाडलेल्या मूर्ख मनुष्याला पैशाच्या योगानें धर्माचें श्रेष्ठ फल मिळत नाहीं. फलेच्छा हाच धर्माचा मळ आहे. त्याचप्रमाणें पैशाला तो जपून ठेवणें हा मळ आहे. व त्यावरचें प्रेम ह्मणजे कामाचा मळ होय. तेव्हां हा त्या तिघांवरील मळ काढून टाकला असतां–ह्मणजे ते निष्कामबुद्धीनें केलें असतां–त्यांचे फार चांगले परिणाम होतात. यासंबंधांत कामंदक व आंगरिष्ठ यांचा संवाद लक्षांत ठेवण्याजोगा आहे. एके वेळीं आंगरिष्ठ राजानें कामंदक ऋषींकडे येऊन त्यांना विचारलें कीं, 'काममोहांचे तडाक्यांत सांपडून राजानें पाप केलें व पुढें त्यावद्दल त्याला पश्चाताप झाला तर त्याचें पाप कशाच्या योगानें दूर होईल. तसेंच एकाद्या मनुष्याच्या हातून धर्म समजून अधर्म घडेल तर त्यालाही राजानें आळा कसा घालावा?' कामंदक ह्मणाले, '**जो मनुष्य धर्मार्थाला सोडून केवळ सुखाच्या मागें लागतो त्यामुळें त्याच्या बुद्धीचा नाश होतो.** व बुद्धिनाशाबरोबर धर्म व अर्थ नाहींसा करणारा मोह येऊन त्याला घेरतो. मोहमुळें नास्तिकपणा उत्पन्न होऊन त्याच्या योगानें दुराचार सुरू होतो. दुराचारापासून बिघडलेल्या लोकांना राजा जर ताळ्यावर न आणील तर लोक साप असलेल्या घराप्रमाणें त्या राजाला भितात. प्रजा, ब्राह्मण, साधू, कोणी त्याच्या मागून जात नाहींत. व यामुळें संकटांत सांपडून ठार होण्याची त्याला पाळी येते. कालिमा लागून व अपमान होऊन त्याचें जीवित कष्टमय होतें. व कालिमा लागून तो जगला तरी तें त्याला मरणाप्रमाणेंच आहे. पूर्वीच्या विद्वानांनीं पाप दूर करण्याला पुढील उपाय सांगितले आहेत. वेद पढावा, ब्राह्मणांचा सत्कार करावा, धर्मसंबंधानें उदारबुद्धि ठेवावी, थोर कुळांत संबंध करावा, क्षमाशील व बुद्धिमान ब्राह्मणांची शुश्रूषा करावी, नेहमीं स्नान करून जपजाप्य करावें, वाईट लोकांना राज्याच्या बाहेर घालवून देऊन, धार्मिक लोकांना जवळ करावें, गोड शब्दांनीं व अनुकूल कृत्यांनीं लोकांना प्रसन्न करून घ्यावें, ज्याला त्याला मी आपला आहे असें ह्मणावें. दुसऱ्याचे गुण गावेत, अशा आचरणानें राजा निष्पाप होऊन लोकमान्य होतो. गुरु जो श्रेष्ठ धर्म सांगतील त्याप्रमाणें आचार ठेवल्यानें कल्याण होते.'

## १२७ शील. (१२. १२४.)

युधिष्ठिर ह्मणाला, 'जगामध्यें सर्व धर्माला मूळ शीलच आहे असें ह्मणून शीलाला वाखाणतात. तेव्हां त्याचें लक्षण काय आहे व तें कसें मिळवितां येतें?' यावर भीष्म ह्मणाले, 'पूर्वीं तुह्मी इंद्रप्रस्थामध्यें असतां तुमच्या त्या मोठ्या यज्ञाचे वेळीं तुमचें तें थोर वैभव पाहून दुर्योधनाच्या अंगाची लाही उडाली. त्या वेळीं धृतराष्ट्रानें शीलासंबंधानें विचारलें असतां नारदांनीं त्याला सांगितलेली गोष्ट तुला सांगतों ऐक. या शीलाच्या आश्रयानें दैत्येंद्र प्रल्हादानें इंद्राला जिंकून तिन्ही लोक आपल्या ताब्यांत आणिले, तेव्हां इंद्र बृहस्पतींजवळ येऊन हात जोडून उभा राहिला; व 'कल्याण कशांत आहे,' ह्मणून विचारूं लागला. तेव्हां बृहस्पतींनीं 'ज्ञानामध्यें कल्याण आहे ह्मणून सांगितलें.' तेव्हां 'त्याहून विशेष कांहीं आहे काय,' ह्मणून इंद्रानें विचारलें. त्यावर त्यांनीं त्याला शुक्राचार्यांकडे जाऊन त्यांना विचारण्यास सांगितलें. त्याप्रमाणें तो शुक्राचार्यांकडे आला असतां शुक्राचार्यांनीं त्याला प्रल्हादाकडे जाण्यास सांगितलें. तेव्हां तो ब्राह्मण वेष घेऊन प्रल्हादाकडे जाऊन, 'कल्याण कशांत आहे तें मला सांग,' असें ह्मणाला. तेव्हां प्रल्हाद ह्मणाला, 'तिन्ही लोकांचें राज्य करण्यामध्यें मी गुंतलों असल्यानें मला आतां वेळ नाहीं. [त्यावर ब्राह्मणरूपी इंद्र, 'वेळ असेल तेव्हां सांग,' असें ह्मणाला. तेव्हां प्रल्हाद संतुष्ट होऊन, चांगली वेळ पाहून त्यानें त्याला ज्ञानतत्त्व सांगितलें. तो ब्राह्मणही त्याजवळ राहून, उत्तम गुरुवृत्ति पाळून अगदीं मनोभावानें त्याच्या मनाप्रमाणें वागत गेला. पुढें एके वेळीं, हें त्रैलोक्याचें राज्य तुला कसें मिळालें,' ह्मणून

त्यानें प्रल्हादाला विचारलें असतां प्रल्हाद ह्मणाला, 'मी राजा आहें, ब्राह्मणांचा विरोध अगर हेवा कधीं मी करीत नाहीं. शुक्राचार्यांनीं सांगितलेलीं अनेक नीतितत्त्वें त्यांच्या तोंडून ऐकून त्याप्रमाणें मी वागतों व ते नेहमीं विश्वासपूर्वक मला जें सांगावयाचें तें सांगत असतात व आडमार्गाला गेलों असतां मला वाटेवर आणतात. मी नेहमीं शुक्राचार्यांच्या तत्त्वाप्रमाणें वागत असतों. ब्राह्मण व वडील यांची नेहमीं शुश्रूषा करतों. कोणाचा हेवा करीत नाहीं. मी धर्मानें वागतों. राग ह्मणून मला ठाऊक नाहीं. माझीं इंद्रियें मीं स्वाधीन ठेविलीं आहेत. मधमाशा ज्याप्रमाणें आपल्या पोळ्यामध्यें मध थेंब थेंब नेऊन सांठवीत असतात, त्याप्रमाणें माझे गुरु नेहमीं मला सदुपदेश देत असतात व मी सर्व विद्या ज्यांच्या तोंडीं आहे अशा विद्वानांच्या ज्ञानामृताचे घुटके चाखीत नक्षत्रांमध्यें असणाऱ्या चंद्राप्रमाणें स्वजातींत वर्चस्वानें राहिलों आहें. **ही ब्राह्मणमुखांतून पडणारी काव्यनीति या पृथ्वीवरील अमृत असून** हा प्राणिमात्रांचा उत्तम डोळा आहे. याप्रमाणें मी वागत असतों. हेंच कल्याण आहे. ' नंतर प्रल्हाद 'तुझ्या शुश्रूषेनें मी संतुष्ट आहे, वर माग, ' असें त्या ब्राह्मणाला ह्मणाला असतां, 'तुझें तेवढें शील मला दे,' असें त्या ब्राह्मणानें मागितलें. तेव्हां प्रल्हादाला संतोष वाटला व असा वर मागणारा हा ब्राह्मण कोणी सामान्य नसावा, असें वाटून त्याला भयही पडलें. ' बरें आहे, ' असें ह्मणून त्या ब्राह्मणाला वर देऊन तो निघून गेल्यावर प्रल्हादाला मोठें दुःख होऊन तो चिंताग्रस्त झाला. व काय करावें हें त्याला सुचेना. याप्रमाणें तो चिंताग्रस्त होऊन बसला असतां, एक देहधारी मोठें तेज त्याच्या शरीरांतून बाहेर पडलें. त्या धिप्पाड पुरुषाला ' तूं कोण ' ह्मणून प्रल्हादानें विचारलें असतां, ' मी शील आहें, तूं टाकल्यानें जो ब्राह्मण तुझा शिष्यपणा करीत होता त्या ब्राह्मणाकडे मी जातों, ' असें ह्मणून गुप्त होऊन तो इंद्राकडे गेला. मागोमाग तशाच प्रकारचा दुसरा एक पुरुष त्याच्या शरीरांतून बाहेर पडला. त्याला ' तूं कोण ' ह्मणून प्रल्हादानें विचारलें असतां, ' मी धर्म, त्या ब्राह्मणाकडे जात आहें, शील तेथें मी ' असें तो ह्मणाला. पुढें तेजानें झळकणारा अशाच प्रकारचा एक पुरुष त्याच्या शरीरांतून बाहेर पडला. ' तूं कोण ' ह्मणून प्रल्हादानें विचारलें असतां, ' मी सत्य, धर्माच्या मागून चाललों आहें ' असें ह्मणून तो निघून गेला. पुढें तशाच प्रकारचा आणखी एक पुरुष त्याच्या शरीरांतून बाहेर पडला. व ' तूं कोण ' ह्मणून प्रल्हादानें विचारलें असतां, ' मी वृत्त सत्याच्या मागून चाललों आहें ' असें ह्मणून तो निघून गेला. पुढें तसाच एक दुसरा पुरुष मोठा शब्द करीत बाहेर पडला व ' तूं कोण ' ह्मणून प्रल्हादानें विचारलें असतां, ' मी बल वृत्ताच्या मागून चाललों आहें, ' असें म्हणून तो निघून गेला. नंतर एक दैदीप्यमान देवी त्याच्या शरीरांतून बाहेर पडली व ' तूं कोण ' ह्मणून प्रल्हादानें विचारलें असतां, ती ह्मणाली, 'मी श्री आहें. आजपर्यंत तुझ्या ठिणाणीं मी आपण होऊन राहिलें, तूं टाकल्यानें आतां मी जातें. कारण मी बळाचे मागून असणारी आहें. पुढें तो ब्राह्मणश्रेष्ठ कोण म्हणून प्रल्हादानें विचारलें असतां, श्री म्हणाली, ' तो ब्राह्मणवेषधारी इंद्रच होय. शीलानें तूं तीन लोक जिंकलेस हें जाणून तुझाच गुरुमंत्र घेऊन त्यानें तुझें शील हरण केलें आहे. धर्म, सत्य वृत्त, बल तशीच मी हे आह्मी सारे शीलाच्या आधारावर असतों, ' असें म्हणून ती निघून गेली.

आतां हें शील अंगांत आणण्याचीं साधनें सांगतों ऐक, **कायावाचामनानें कोणाचा द्रोह करूं नये, लोकांवर कृपा करून शक्त्यनुसार मदत करावी. ज्या आपल्या शौर्यानें दुसऱ्याचें कल्याण होणार नाहीं किंवा जे स्वतःलाच लाजविणारें असतें असें शौर्य कधीं गाजवूं नये. ज्याच्या योगानें चार लोकांत स्तुति होईल असें काम करावें. हें शीलाचें थोडक्यांत लक्षण तुला मीं सांगितलें.** शीलहीन मनुष्याला चुकून संपत्ति मिळाली असली तरी सुद्धां तिचा त्याला चिरकाल उपभोग मिळत नाहीं.

---

## १२८ आशा. ( १२. १२५-१२९ )

युधिष्ठिर म्हणाला, ' आपण शील मुख्य म्हणून सांगितलें, आतां आशा कशी उत्पन्न झाली ? व तिचें काय ? या सुयोधनासंबंधानें मला मोठी आशा हो-

ती. युद्ध निघालेंच असतां प्रसंगाला उचित असेंच वागून तो अर्धे राज्य आह्मांला देऊन टाकील, असें वाटलें होतें. परंतु ती सर्व आशा फुकट गेली. मनुष्याला मोठी आशा निपजते व ती फुकट गेली असतां होणारें दुःख मरणप्राय आहे. त्या दुष्टानें मला निराश व मूर्ख करून सोडलें आहे. एखाद्या झाडाहून किंवा पर्वताहून सुद्धां ही आशा मोठी आहे. एखादे वेळीं आकाशाचा अंत लागेल परंतु हिचा अंत लागणें कठिण. तिचें स्वरूप कळलें तरी ती आवरतां येणें कठिण आहे. हिच्यापेक्षां दुर्मिळ अशी दुसरी वस्तु काय असणार? '

भीष्म ह्मणाले, ' यासंबंधी तुला एक गोष्ट सांगतों ऐक. पूर्वी सुमित्र ह्मणून कोणी हैहयाचा राजा होऊन गेला. एका हरणाला बाणानें मारून तो त्याच्या मागून चालला. तो सामर्थ्यवान हरीण क्षणांत सखल जागेंतून तर क्षणांत सपाटीवरून बाणासकट धांवत चालला. तो राजाही तारुण्याच्या जोरांत अंगांतील मूळच्या सामर्थ्यानें धनुष्यबाण व तलवार घेऊन नद्या, डबकीं, वनें सर्व ओलांडून त्याच्या मागोमाग चालला. तो हरीण कांहीं उद्देशानें मधूनमधून राजाच्या अगदीं जवळ येई; फिरून जोरानें पुढें धांवे; व फिरून जवळ येई. जणूं तो राजाशीं खेळतोच आहे असें दिसत होतें. ते वेळीं राजानें मर्मस्थळाला जाऊन भिडणारा एक बाण काढून तो धनुष्याला लावून त्यावर सोडला तों तो हरीण दोन कोसांच्या अंतरावर त्याच्या बाणाचा नेम चुकवून बाजूला हासत उभा राहिला, व तो लखलखीत बाण जमिनीवर पडल्यावर झपाट्यानें फिरून अरण्यांत शिरला. तो राजाही त्याच्या मागून त्या अरण्यांत शिरून एका तापसांच्या आश्रमाला येऊन अगदीं थकून गेला असल्यामुळें तेथें बसला. त्याला थकलेला व भुकेलेला पाहून त्याकडे येऊन त्या ऋषिनीं त्याचा यथाविधि सत्कार केला. ' तुमचें सर्व यथास्थित चाललें आहेना, ' ह्मणून त्यानें ऋषींना विचारल्यावर त्यांनींही त्याला कुशल विचारून ' तूं कोण, कोठला, येथें येण्याचें कारण काय, ' वगैरे विचारलें. तेव्हां त्या राजानें आपलें सर्व वर्तमान व हरणाच्या पाठीमागून आल्याची हकीकत सांगून तो ह्मणाला, ' राजचिन्हसुद्धां कांहीं जवळ न राहून दमून हताश झालेला मी तुमच्या आश्रयाला आलों आहें. याहून कष्टमय दुसरें काय असलें पाहिजे ! माझें राजचिन्ह नष्ट झाल्याचें अगर आपल्या राजधानीला मुकून इतक्या दूर आल्याचें सुद्धां या निराशेइतकें मला दुःख वाटत नाहीं. अंत न लागण्यासंबंधानें आकाशाशीं ताडून पाहतां हिमाचल किंवा महासागर कांहींच नाहींत. परंतु आशेशीं ताडून पाहतां आकशाचा सुद्धां अंत लागेलसें मला वाटतें. या आशेपेक्षां कांहीं मोठें आहे काय? तर याचें कारण काय, हें आपण मला सांगाल तर मजवर मोठे उपकार होतील. '

ते वेळीं त्यांपैकीं एक ऋषभ नांवाचे ऋषि हासून म्हणाले, ' पूर्वी मी तीर्थयात्रा करीत फिरत असतां नरनारायणाच्या दिव्य आश्रमाला गेलों होतो. त्या रम्य बदरी आश्रमाजवळच आकाश सरोवर आहे. त्या ठिकाणीं अश्वशिर ऋषि नेहमीं वेदपठण करीत असतात. त्या सरोवरामध्यें विधिपूर्वक देवांना व पितरांना तर्पण करून, मी त्या आश्रमाला गेलों. त्या ठिकाणीं एक उंच व कृशअसे लंगोटी व कातडें नेसलेले तनु नांवाचे ऋषी माझ्या दृष्टीस पडले. माझ्याशीं ताडून पाहतां त्यांची उंची आठपट होती. त्यांच्या सारखी कृशता मीं कोठेंच पाहिली नाहीं. त्यांचें शरीर करंगळीएवढें बारीक होतें. मान, हात, पाय, केंस विलक्षण दिसत होते. डोकें, कान, डोळे सर्व शरीराच्या मानानेंच होतीं. त्यांचा शब्द बारीक असून हालचाल अगदीं बंद होती. तशा प्रकारच्या त्या कृश विप्रेंद्राला पाहून अगदीं भयभीत होऊन उद्विग्न मनानें त्यांना अभिवादन करून मी त्यांच्या पुढें हात जोडून उभा राहिलों. व आपलें नांव, गोत्र, वडिलांचें नांव वगैरे त्यांना सांगितल्यावर त्यांनीं दाखवून दिलेल्या आसनावर मी बसलों. तेव्हां ऋषींमध्यें बसलेले ते ऋषिश्रेष्ठ धर्मार्थसंबंधानें गोष्टी बोलूं लागले. इतक्यांत सैन्य व जनाना यांसह मोठ्या वेगवान घोड्यावर बसून महा यशस्वी वीरद्युम्न आपल्या हारवलेल्या भुरिद्युम्न मुलाचा शोध करीत, ' येथें तो मला दिसेल, तेथें तो मला दिसेल, ' अशा आशेनें तेथें आला. त्या ऋषींना पाहून तो ह्मणाला, ' माझा एकुलता एक मुलगा अरण्यामध्यें हरवला आहे, तो कोठें सांपडत

नाहीं. मला त्याची मोठी आशा लागून राहिली आहे, व तिच्या योगानें मी मरणार यांत संशय नाहीं! तें ऐकून तनुऋषी खालीं पाहात कांहीं वेळ विचारांत गढून राहिले. तें पाहून राजाचें मन फार खट्टू होऊन तो ह्मणाला, 'महाराज हें दुर्लभ आहे काय? आशेपेक्षां प्रबल काय आहे?' तें ऐकून मुनि ह्मणाले, 'तुझ्या मुलानें दुर्दैवानें मूर्खपणामुळें पूर्वी एका ऋषींचा अपमान केला. एक सुवर्णपात्र व वल्कलें त्यांनीं मागितलीं असतां तिरस्कार दाखवून त्यानें तीं त्यांना दिलीं नाहींत. त्यामुळें ते फार खट्टू झाले. तेव्हां त्या ऋषींनीं पुष्कळ दिवसपर्यंत कोणापाशीं कांहीं मागावयाचें नाहीं अशा निश्चयानें कडक तप केलें. त्यांनीं मनांत विचार केला कीं, 'आशा ही मूर्ख मनुष्याला अस्वस्थ करते. त्या आशेला मी आपल्या मनांतून हुसकून लावतों.' असा निश्चय करून ते बसले. हें ऐकून वीरद्युम्नानें ऋषभांना फिरून विचारलें कीं, 'आशा किती काटकोळी आहे व पृथ्वीवर दुर्मिळ काय आहे?' 'तेव्हां कृशतेमध्यें आशेच्या तोडीचें कांहीं नाहीं. आणि दुर्मिळतेमुळेंच मला अनेक राजांना तोंड पसरावें लागलें,' असें ऋषभ ह्मणाले. हें ऐकून राजा ह्मणाला, 'आपला उद्देश मी समजलों. आशा ही फार काटकोळी असून निराशेसारखें सुख नाहीं असा आपला ह्मणण्याचा उद्देश. मनांतली आशा परिपूर्ण होणें किती कठीण आहे हें मला कळलें. आपलें हें भाषण मी वेदवाक्य समजतों.' ऋषि ह्मणाले. '**तोंड पसरणारा याचक समाधान पावला आहे ही गोष्ट या जगांत दुर्मिळ. तोंड पसरणारांचा अवमान न करणारा मनुष्य सांपडणें त्यांहून दुर्मिळ आहे.** त्याचप्रमाणें आदरपूर्वक आशा दाखवून ती आशा जो आपल्या शक्त्यनुसार परिपूर्ण करीत नाहीं, ती-त्यानें उत्पन्न करून पुरी न होणारी आशा-फार कृश आहे. कृतघ्न, दुष्ट, आळशी व परपीडक अशासंबंधानें उत्पन्न होणारी आशाही फार दुर्बळ असते. एकुलता एक मुलगा असून तो मेल्यानें किंवा नाहींसा झाल्यानें त्याला पाहण्याची उत्पन्न झालेली आशा हीही फार कठीण होय. त्याचप्रमाणें ह्मातारपणीं मूल होण्याची स्त्रियांची व श्रीमंत लोकांची आशा फार कठीण आहे. त्याचप्रमाणें लग्नाच्या गोष्टी चालल्या असतां वयांत आलेल्या मुलींच्या हृदयांत उत्पन्न होणारी आशा फार अनावर असते.' तेव्हां अशा प्रकारची जी ही कृश आशा तिला मनुष्यानें आपल्यापासून दूर हुसकून लावावी. व कर्तव्यतेकडे लक्ष देऊन शुद्धता ठेवून तप आचरावें. आईबापांची पूजा करावी, व शक्ति असेल तर अश्वमेध करून पुष्कळ दक्षिणा द्यावी. यानें मनुष्याला उत्तम गति मिळते.

---

## १२९ संकटसमयींचें मुख्य साधन द्रव्यबळ.
## (१२. १३०)

युधिष्ठिर ह्मणाला, 'ज्याला मित्रांनीं सोडलें असून शत्रू पुष्कळ झाले आहेत, ज्याचा खजिना रिकामा झाला आहे, ज्याच्या जवळ सैन्य नाहींसें झालें आहे, ज्याच्या भोंवतीं दुष्ट मंत्री जमले आहेत व ज्याची मसलत गुप्त राहीनाशी झाली आहे, जो राज्याला मुकत चालला असून ज्याला पुढें काय करावें तें सुचेनासें झालें आहे, परशत्रूवर चालून जाऊन त्याला चिरडण्याचा प्रयत्न करीत असतां ज्या दुबळ्या राजाचा बलवानांशीं प्रसंग जुळला असेल, ज्याच्या राष्ट्रामध्यें कोणी कोणाला विचारीनासें होऊन देशकालही ज्याला कळत नाहीं व राष्ट्राला पिळून घेतल्यामुळें ज्याचा शत्रूशीं संधि होत नाहीं किंवा ज्याला शत्रूंमध्यें फूट पाडतां येईनासें झालें आहे, अशा राजानें अशा प्रसंगीं वाटेल तसा पैसा गोळा करून आपलें अस्तित्व कायम ठेवावें कां निराशेनें प्राण द्यावा?'

यावर भीष्म ह्मणाले, 'धर्मासंबंधी तूं हा फार नाजुक प्रश्न विचारला आहेस. धर्मविचारच फार नाजूक आहे. शास्त्र पहात राहिल्यानें किंवा सदाचारसंपन्न लोकांच्या सेवेनें त्यांच्यापासून तो ऐकून घेऊन मनुष्य त्यांत निष्णात होतो. कोणचेंही बरें वाईट काम प्रजेच्याच हितासाठीं हातीं घेतलें असतां त्याचें फल मिळतें किंवा नाहीं अशा प्रकारच्या या तुझ्या प्रश्नाचें उत्तर आपल्या मनानेंच स्वतःला देणें शक्य आहे. राजाचा राज्यव्यवहार चालविण्याला संकटाच्या वेळचे अनेक उपाय आहेत. परंतु अशा प्रकारच्या उपायांची धर्मामध्यें गणना

होत नाहीं. प्रजेला अशा उपायांनीं पिळून घेणें हें पुढें राजाला जवळ जवळ नाशालाच कारण होतें, असें सर्व शहाण्यांचेंही मत आहे. मनुष्य ज्या ज्या प्रकारचें शास्त्र वाचीत राहतो त्या त्या प्रकारचें ज्ञान त्याला होऊन तेंच ज्ञान त्याला आवडूं लागतें. अज्ञानामुळें मनुष्याला कांहीं उपाय सुचत नाहीं. ज्ञानाच्याच साह्यानें उपाय सुचून तो त्याला वैभवाला चढवितो. मनांत संशय न धरतां मी सांगतों ऐक. राजाचा खजिना कमी पडल्यानेंच सैन्य कमी पडतें ह्मणून निर्जळ जागीं पाणी काढण्याप्रमाणें राजानें खजिना जमवावा. व संकटाची वेळ निघून गेल्यावर फिरून प्रजेवर कृपादृष्टि वळवावी. हाच उपाय पूर्वीच्या लोकांनींही योजिला आहे. सुस्थितीच्या वेळचा धर्म निराळा व संकटाच्या वेळचा धर्म निराळा. खजिन्यावांचून धर्मसंचय करतां येतो, परंतु धर्माहूनही वृत्ति मोठी आहे. आणि ही वृत्ति पैशावांचून चालणें ज्या अर्थीं शक्य नाहीं त्या अर्थीं ह्या पैसा मिळविण्याच्या आड येणारा धर्म कांहीं उपयोगाचा नाहीं. केवळ धर्मालाच धरून दुबळ्याला त्याच्या योग्यतेनुरूप साधन मिळत नाहीं; व त्यामुळें तो कितीही झटला तरी तो सामर्थ्यवान होत नाहीं. ह्मणून आपत्कालीं अधर्म सुद्धां धर्मच आहे असें ह्मणतात. परंतु त्या अधर्माचा अखेर दुष्परिणाम झाल्यावांचून रहात नाहीं. आतां संकटसमय निघून गेल्यावर क्षत्रियानें काय करावें ह्मणशील तर धर्माला ज्याच्या योगानें उतरती कळा लागणार नाहीं व ज्याच्या योगानें शत्रूच्या तावडींत जाण्याचा प्रसंग येणार नाहीं असें साधन त्यानें करावें. आपल्या किंवा दुसऱ्याच्या धर्माच्या सबबीवर आपला नाश होण्याची; पाळी येऊं देऊं नये. वाटेल त्या उपायांनीं आपणाला संकटांतून वर काढून घ्यावें. या बाबतींत धर्मवेत्त्यांचें धर्माला धरून असें मत आहे कीं, बाहुवीर्य हाच राजाचा धर्म असल्यामुळें हातपाय हालविणें हेंच त्याचें मुख्य कर्तव्य आहे. त्याच्या वृत्तीला अडथळा आला असतां तापसांच्या किंवा ब्राह्मणांच्या पैशाशिवाय कोणाचाही पैसा घेण्याला त्याला अधिकार आहे. ज्याप्रमाणें ब्राह्मण संकटांत सांपडला असतां भलत्यासलत्याचा सुद्धां यज्ञ करण्यास व खाऊं नये तें खाण्यास त्याला अधिकार आहे तशीच क्षत्रियाचीही गोष्ट आहे. जो पेंचांत सांपडला आहे त्याला राजमार्ग काय व आडमार्ग काय? कोठडींत कोंडून ठेवलेला मनुष्य वाट सांपडेल तेथून पळतो. खजिना व सैन्य नाहींसें झाल्यामुळें ज्या राजाचा सर्वांकडून पराभव झाला आहे त्याला ब्राह्मणाप्रमाणें भिक्षा मागतां येत नाहीं, वैश्याप्रमाणें धंदा करतां येत नाहीं किंवा शूद्रासारखी सेवा करतां येत नाहीं, कोणावर अवलंबून राहून पोट भरण्यापेक्षां क्षात्र धर्मानें विजय मिळवून किंवा आपल्या व दुसऱ्याच्या राष्ट्रांत धुमाकूळ उडवून देऊन राहणें हें श्रेष्ठ आहे. नेहमीं यांपैकीं पहिल्या मार्गानें राहणें श्रेयस्कर असलें तरी संकटसमयीं दुसऱ्या मार्गाचें अवलंबन करून सुद्धां रहावें. **आपल्या धर्मानें राहतां येत नाहीं असा प्रश्न आला असतां अन्यायानें रहावें.** पोटाचें साधन मिळेनासें झाल्यानें ब्राह्मणाला सुद्धां जर अधर्म करावयाला सांगितला आहे तर ती मोकळीक क्षत्रियालाच कां नसावी? ठळक ठळक लोकांपासून बेशक जुलुमानें कर घ्यावा; परंतु पैशावांचून आपला नाश कधींही होऊं देऊं नये. क्षत्रियाला प्रजेचें रक्षण करणारा व मारणारा असें ह्मटलें आहे. ह्मणून क्षत्रिय ह्मणविणारानें प्रजेच्याच संरक्षणासाठीं वाटेल तसा पैसा काढावा. पीडेवांचून या जगामध्यें कोणाचेंच चालत नाहीं. अरण्यांत एकटे राहणाऱ्या मुनीचें सुद्धां चालत नाहीं. केवळ नशीबावर हवाला देऊन राहतां येणें शक्य नाहीं. विशेषेंकरून प्रजापालन करून तसें राहतां येणें अगदीं अशक्य आहे. **आपत्कालीं एवढेंच नव्हे, नेहमीं राजा आणि राष्ट्र यांनीं परस्परांचें रक्षण केलें पाहिजे.** संकटसमयीं राजा ज्याप्रमाणें पैशाचा पूर वाहवून राष्ट्राचें संरक्षण करतो त्याप्रमाणें राष्ट्रानेंही संकटीं राजाचें संरक्षण केलें पाहिजे. खजिना, शासनपद्धति, सैन्य, मित्र व दुसरें जें कांहीं जमविलेलें असेल ह्यांना राजानें अगदीं निकराचे वेळीं सुद्धां टाकूं नये. धर्मवेत्त्यांनीं असें ह्मटलें आहे कीं, आपल्या नेहमींच्या खाण्यापासूनच बीं वगळून ठेविलें पाहिजे. मायाशास्त्रवेत्ता शंबर याचें या बाबतींत असें ह्मणणें आहे

कीं, ज्याचें राष्ट्र लयाला चाललें आहे अशा राजाच्या जीविताला धिक्कार असो; त्याचप्रमाणें पोटाला मिळत नाहीं ह्मणून ज्याला परदेशाला जावें लागतें त्या मनुष्याच्याही जीविताला धिक्कार असो. खजिना व सैन्य यांवर राजाचें अवलंबन असून सैन्य खजिन्यावर आहे; व तें सैन्य धर्माला कारण आहे. व धर्मावरच प्रजा अवलंबून आहे. दुसऱ्याला पीडा दिल्यावांचून पैसा मिळत नाहीं. मग सैन्य कोठून मिळणार ? त्यासाठीं पीडा दिल्यानें राजा दोषी होत नाहीं. यज्ञकर्मामध्यें यज्ञासाठीं सुद्धां जें करूं नये तें करण्यांत येतें. ह्मणून असें केल्यानें राजाला दोष लागत नाहीं. संकटसमयीं पैशासाठीं भलत्या मार्गाचें अवलंबन करावें लागतें. पैशासाठीं असें न केलें तरअनर्थ ओढवण्याचा संभव असतो. ज्याप्रमाणें यज्ञाकरितां पशू वगैरे साधनें लागतात, व यज्ञ हा अंतःशुद्धीसाठीं लागतो, व पशुयज्ञ व अंतःशुद्धि हीं सारीं मोक्षासाठीं आहेत, त्याप्रमाणें नीति आणि दंड हे खजिन्यासाठीं असून खजिना सैन्यासाठीं आहे. नीति, खजिना व सैन्य हीं तिन्ही शत्रूला जिंकून राज्याचें संरक्षण करून तें वाढविण्यासाठीं आहेत. या नीतीसंबंधानें तुला मी एक उदाहरण सांगतों. यज्ञासाठीं एक झाड तोडतात. तें झाड तोडीत असतांना त्याच्या आसपास असणारीं त्याला आड येणारीं झाडेंही तोडण्यांत येतात व तींही मोडून पडतां पडतां लहानसान झुडुपांना आपल्याबरोबर मोडून पाडतात. याप्रमाणें राष्ट्राचें मुख्य साधन जो खजिना त्याला आड येणारे जे लोक असतील त्यांना मारल्याशिवाय काम साधावयाचें नाहीं. पैशाच्या योगानेंच इहपर त्याचप्रमाणें सत्य व धर्म साधतात. **निर्धन मनुष्य जीवंत असून मेल्यासारखा आहे.** ह्मणून वाटेल त्या उपायांनीं संकटसमयीं पैसा मिळवावा. नेहमींप्रमाणें या वेळच्या या कृत्याला दोष लागत नाहीं. पैशासंबंधीच ‘ हें माझें, हें माझें ’ ह्मणून भांडण चाललें असतें. राज्याशिवाय श्रेष्ठ धर्म राजाला दुसरा कोणताच नाहीं. राजाचा नेहमींचा धर्म एक ठरवून ठेविला आहे. परंतु संकटाच्या वेळचा दुसरा आहे. पैसा नसणारा दुबळा व पैसा असणारा बलवान समजला जातो. पैसेवानाला सर्व कांहीं मिळण्याजोगें असून पैसेवानच सर्व संकटांतून पार पडतो. पैशानेंच धर्म, काम, परलोक व हा लोक साधतो. तरी पण अशा पैशाला धर्मानेंच मिळविण्याची खटपट करावी.

---

# आपद्धर्म.

## १२० दीर्घसूत्रीपणा.

### ( १२. १३१—१३७ )

युधिष्ठिर ह्मणाला, ‘ जो राजा दुर्बळ झाला असून दीर्घसूत्री आहे, जो आपल्या लोकांवरील प्रेमामुळें युद्ध करण्याला कचरतो, ज्याला नेहमीं चोहोंकडून संशयामध्यें रहावें लागतें, ज्याची मसलत बाहेर फुटते, ज्याचें नगर व देश शत्रूंनीं आपल्या स्वाधीन करून घेऊन त्याची व्यवस्था लावून टाकली आहे, व पैसा जवळ नसल्यामुळें ज्याला आपल्या इष्टमित्रांना सन्मानपूर्वक जवळ करतां येत नाहीं, मंत्रीवर्ग ज्यापासून फुटून राहिला आहे, परचक्रास तोंड देण्याचा प्रसंग येऊन ज्याला काय करावें हें सुचेनासें झालें आहे, अशा सर्व तऱ्हेनें दुबळा बनलेल्या राजानें काय करावें?’

हें ऐकून भीष्म ह्मणाले, ‘ अशा प्रसंगीं चालून येणारा राजा धर्मार्थकुशल असून शुद्धशील असेल तर त्याच्याशीं एकदम संधि करावा. व त्यानें पूर्वींचे बळकावलेले प्रदेश त्याला सोडून द्यावेत. आतां तो बलवान असून अधर्मानें जरी जय मिळविण्यासाठीं येत असेल तरी कांहीं प्रांत त्याला सोडून त्याच्याबरोबर संधीच करण्याची खटपट करावी. यालाही

तो जर न ऐकेल तर राजानें तेथून पाय काढून घेऊन पैशाच्या साह्यानें त्या संकटांतून पार पडावें व आपल्या अंगांतील राजगुणाच्या साह्यानें फिरून पैसा मिळवावा. ज्या ठिकाणीं पैसा व सैन्य खर्ची घातल्यानें संकटांतून पार पडतां येणें शक्य आहे, त्या ठिकाणीं धर्मार्थाचें तत्त्व ज्याला कळलें आहे असा कोण मनुष्य आपल्याला बळी देईल ? जनान्याची चांगली काळजी घ्यावी, परंतु प्रसंगीं त्यावर सुद्धां आशा न ठेवतां शक्य असेल तोंपर्यंत आपण शत्रूच्या तावडींत सांपडूं नये.'

युधिष्ठिर ह्मणाला, 'राष्ट्रामध्यें खळबळ उडून राहिली असून बाहेरूनही त्रास येऊन पोहोंचला असतां व जवळ खजिना नाहींसा होऊन मसलत फुटली असतां राजानें काय करावें.'

भीष्म ह्मणाले. 'अशा प्रसंगीं त्यानें एकदम संधि करून टाकावा किंवा एकदम तलवार तरी उपसावी. व अशा रीतीनें शत्रूला राष्ट्रांतून बाहेर काढावा. युद्धामध्यें मरणें हें परलोकाला हितावहच आहे. आपल्यावर प्रेमानें असून अनुकूल व उत्साहसंपन्न असें लहानसें सैन्य असलें तरी त्याच्या योगानें राजाला पृथ्वी जिंकतां येते. व अशा प्रसंगीं मेला तरी त्याला स्वर्ग मिळतो व मारल्यानें पृथ्वीचा उपभोग मिळतो. कारण युद्धांत प्राण सोडल्यानें इंद्रलोक मिळत असतो. धर्म ह्मणाला, '**ज्या वेळेला सर्व लोकांना हितावह असा श्रेष्ठ धर्म नाहींसा होऊन सर्व जीवितसाधनें चोरांच्या हातीं लागतात, अशा प्रसंगीं मुलाबाळांवरील प्रेमामुळें ज्याला त्यांना सोडतां येत नाहीं अशा ब्राह्मणानें कशावर रहावें?**' भीष्म ह्मणाले, 'अशा प्रसंगीं ब्राह्मणानें ज्ञानावर रहावें. ह्या जगीं सर्व कांहीं भल्यासाठीं असून दुष्टांसाठीं कांहीं नाहीं. जो कोणी दुष्टाजवळचा पैसा घेऊन तो भल्याला देण्याला कारण होतो त्याला आपद्धर्म कळला असें ह्मणावें. आपलें राज्य कायम ठेवण्यासाठीं लोकांना खवळून बंड करण्याचा प्रसंग न आणतां जो पैसा लोक सरळपणें देत नाहींत तो पैसा खुशाल हा माझा आहे ह्मणून त्यानें त्यापासून घ्यावा. नेहमीं सरळ व धर्मानें वागणाऱ्या राजाचें संकटसमयीं वांकडें पाऊल पडलें असतां तो निंदेला पात्र होत नाहीं. जे नेहमीं आपल्या बाहुबलावर रहात असतात त्यांना दुसऱ्या कोणच्याही प्रकारें राहणें आवडत नाहीं. बलवान लोक नेहमीं आपल्या तेजावर रहात असतात. संकटाच्या वेळेसाठीं जे निर्बाधक सामान्य नियम घालून ठेवलेले आहेत ते राजानें पाळावे. आपल्या बुद्धीच्या बळानें त्यांत त्यानें वाटेल तर कमी जास्ती करावें. अशा प्रसंगीं ऋत्विज, पुरोहित, गुरु, ब्राह्मण, अशा पूज्य मानलेल्या लोकांवर राजानें जुलूम करूं नये. अशा प्रसंगीं सुद्धां यांच्यावर जुलूम केल्यानें तो निंदेला पात्र होऊन त्याला पाप लागतें. हें जगांतील सामान्य तत्त्व असून अशाच दृष्टीनें या गोष्टीकडे पाहिलें पाहिजे व यावरूनच राजा चांगला किंवा वाईट याचा निर्णय ठरतो. पुष्कळ खेड्यांतले लोक रागानें एकमेकांला भलतें सलतें बोलतात. त्यांच्या बोलण्यावरून राजानें कोणाला मान देऊं नये किंवा शिक्षा देऊं नये. लोकांचा उणेपणा कधीं काढूं नये व तो ऐकूंही नये. अशावेळीं कान झांकून घ्यावे किंवा तेथून उठून दुसरीकडे जावें. दुसऱ्याचा उणेपणा काढावा हें दुष्टाचें काम आहे. भले असतात ते दुसऱ्याचे गुणच दुसऱ्यापुढें गात असतात. जसे चांगले वठणीला आणलेले सरळ जाणारे बैल जूं मानेवर घेऊन नीट ओझें वहात असतात, त्याप्रमाणें राजानें राज्यभार वहावा. ज्याच्या योगानें ह्याला पुष्कळ साह्यकारी मिळतील अशा रीतीनें त्यानें आचार ठेवावा. आचार हाच धर्माचें मोठें लक्षण आहे. कांहीं लोकांना पूर्वापार आचरण पसंत नसतें, त्यांना शंख व लिखित ह्यांचाच मार्ग पसंत होतो. आणि त्यांच्या ह्या मताला आधार ह्मणून भलत्या वाटेनें जाणाऱ्या गुरूंना सुद्धां शिक्षा करावी असें ऋषींचें मत ते पुढें करतात. परंतु याला विशेष प्रमाण कांहीं कोठें दिसत नाहीं. ज्यांना राजानें शिक्षा करूं नये असें सांगितलें आहे अशा लोकांच्या हातून घडलेल्या पापाबद्दल त्यांना शिक्षा करणें देवाकडे सोंपवावें. उगीच कपटानें पैसा गोळा करणारा राजा धर्माला मुकतो. जें नीतिशास्त्र सुस्थितीमध्यें सन्मान्य अशा भल्या लोकांनीं पसंत केलें आहे त्यालाच अनुसरावें. त्याचप्रमाणें हा धर्म आन्वीक्षिकी, त्रयी, वार्ता आणि दंडनीति

यांवर अवलंबून असून सापाच्या पावलांप्रमाणें याचीं पाउलें उमगणें कठीण आहे. ज्याप्रमाणें बाण मारलेल्या हरणांचा माग गळत गेलेल्या रक्ताच्या थेंबावरून लागतो, तसाच धर्माचा माग काढीत राहून भल्यांनीं जी वाट चोखळून ठेविली आहे, त्या वाटेनें मुकाट्यानें जावें.

आपल्या राष्ट्रांतून व परराष्ट्रांतून राजानें खजिना उभारावा. अगदीं पवित्र राहिल्यानें किंवा अगदीं दुष्ट नसल्यानें खजिना उभारतां येणें शक्य नाहीं. तेव्हां या दोहोंच्या मधला मार्ग धरून पैसा सांठवावा. दुबळ्याला पैसा कोठला? व पैसा जवळ नसेल तर सैन्य कोठलें? सैन्य नसेल तर राज्य कोठलें? व राज्य नसेल तर वैभव कोठलें? थोरांना वैभवहानि मरणप्राय आहे. ह्मणून राजानें खजिना, सैन्य व मित्र वाढवावित. ज्या राजाजवळ पैसा नाहीं त्याचा लोक अवमान करतात. असा राजा जें कांहीं थोडें देईल त्यानें संतुष्ट न होतां याचे नोकर लोक याचें काम करण्याला उत्साह दाखवीत नाहींत. संपत्तीमुळेंच राजाला मोठा मान मिळतो. **वस्त्र ज्याप्रमाणें मनुष्याचें गुह्यस्थान झांकतें त्याप्रमाणें ती याची सर्व पापें झाकून टाकते.** ज्यांचा यानें पूर्वी अपराध केला असेल अशा लोकांना याचें वैभव पाहून वाईट वाटत असतें. परंतु कुत्र्याप्रमाणें ह्या पीडा देणाऱ्यापाशींच ते फिरून जमतात. नेहमीं राजानें प्रयत्न करीत असावा. कधीं वाकूं नये; उद्योगांतच मर्दुमकी आहे. बिन कांड्याचे ठिकाणीं त्यानें मोडून जावें परंतु कधीं वाकूं नये. त्यानें रानांत जाऊन मृगामध्यें रहावें. परंतु चोरांप्रमाणें ज्यांनीं सर्व मर्यादा सोडून दिली आहे अशा आपल्या नोकरामध्यें कधीं राहूं नये. अरण्यांतले चोर देखील अचाट काम साधून देण्यासाठीं सैन्य जमवून देऊं शकतात.परंतु त्यांच्या ठिकाणीं सुद्धां गोडीगुलाबीनें व खरेपणानें वागलें पाहिजे. मर्यादा अगदीं सोडून दिल्यानें लोक भय पावतात. ज्याला दया ह्मणून माहीत नाहीं अशा राजाचा चोरांना देखील संशय येतो. लोकांचें मन आपल्याकडे ओढून घेण्यासारखी कांहीं मर्यादा त्यानें ठेवावी. लहानसान गोष्टींत देखील कांहीं नियम ठेवल्यानें लोक खुष असतात. हें जग ह्मणजे कांहीं नाहीं व परलोक ह्मणजे झूट आहे अशा नास्तिकवादी लोकांचें मन जरी अंतस्थ भीतीनें कचरत असलें तरी त्यांच्यावर विश्वास टाकूं नये. जर चोर आपली मर्यादा उल्लंघन न करतां लोकांची मालमत्ता मात्र चोरीत असतील तर त्यांच्याकडे विशेष लक्ष देऊं नये. कारण अशा प्रकारच्या चोरांकडून हजारों लोकांचे प्राण राखले जात असतात. व लढणाऱ्याला मारणें, जबरी संभोग करणें, कृतघ्नता दाखविणें, ब्राह्मणांचा पैसा हिरावून घेणें, एखाद्याला सर्वस्वी बुचाडणें, मुलींचें कौमार्य भ्रष्टविणें, गांवें बळकावून बसणें व दुसऱ्याच्या बायकांशीं व्यभिचार करणें, ह्या चोरांमध्यें सुद्धां निंद्य गोष्टी समजल्या आहेत. अशा चोरांशीं सख्य करून जे राजे त्यांचा आपल्या ठिकाणीं विश्वास उत्पन्न करतात, त्यांना त्यांच्या बारीक सारीक गोष्टी कळवून घेतां येऊन त्यांचा पूर्ण फडशा पाडतां येतो. ह्मणून चोरांशीं व्यवहार करतांना त्यांना एकदम नाहींसें करण्याचा प्रयत्न करूं नये. त्यांना आपल्या ताब्यांत आणून घेण्याचा प्रयत्न करावा. आपण बलवान आहों या घमेंडीवर त्यांच्याशीं क्रूरपणानें कधीं वागूं नये. जो राजा एकदम त्यांना नाहींसें करण्याच्या खटपटीला पडत नाहीं त्याला स्वतः नाहींसा होण्याची पाळी येत नाहीं.धर्म व अर्थ हेंही साधणें हें राजाचें मुख्य कर्तव्य आहे.धर्माचें सूक्ष्म विचार व भावी अदृश्य परिणाम यांचा विचार मनांत आणून हे दोन साधण्याला त्यानें कचरूं नये. जमिनीवर उमटलेलीं कांहीं पावलें पाहून तीं लांडग्याचीं आहेत किंवा नाहींत याचा विचार करीत बसणें जसें निरुपयोगी आहे, त्याचप्रमाणें धर्माच्या स्वरूपावर वादविवाद करीत बसणें व्यर्थ आहे. धर्माचें किंवा अधर्माचें फळ या जगांत कोणाला दिसून येत नाहीं. ह्मणून राजानें शक्ति मिळविण्याचा प्रयत्न करावा. शक्तिवानाच्या आधीन सर्व गोष्टी असतात. संपत्तिपासून बल येतें व बलापासून चांगले सल्लागार मिळतात. ज्याच्याजवळ पैसा नाहीं तो पतितच असतो. जें थोडकें असतें तें उष्ट्याप्रमाणें समजलें जातें. बलवानानें पुष्कळ वाईट गोष्टी केल्या तरी भीतीमुळें कोणाच्या हातून त्याचें कांहीं वांकडें होत नाहीं धर्म व बल यांची सत्याशीं सांगड जोडल्यानें त

मोठ्या संकटांतून पार पाडतात. आतां धर्म व बल यांमध्यें सुद्धां विचार केला असतां बलच अधिक ठरेल. बलापासूनच धर्म निघतो. सर्व जंगम वस्तू ज्याप्रमाणें पृथ्वीच्या आधारानें आहेत त्याप्रमाणें धर्म बलाच्या आधारावर आहे. वाऱ्याच्या अनुरोधानें असणाऱ्या धुराप्रमाणें धर्म बलाच्या मागून असतो,ज्याप्रमाणें वेली झाडाच्या आश्रयानें असतात त्याप्रमाणें **हा अनाथ धर्म बलाच्या आश्रयानें असतो**. जे नेहमीं चैनींत राहतात त्यांना जसें सुख मिळतें तसा धर्म बलवानांच्या मुठींत असतो. बलवानांना असाध्य कांहीं नाहीं व ते जें करतील तें सर्व चांगलें ठरतें. दुबळ्या मनुष्याच्या हातून एखादी वाईट गोष्ट घडली तर त्यांतून त्याला सुटतां येत नाहीं. बलवानाची लोकांना लांडग्याप्रमाणें भीति वाटत असते. लोकांनीं तुच्छ करून हीन दशेंत जगण्यापेक्षां कष्टमय जीवित दुसरें नाहीं. लोकांनीं नांवें ठेवून जगणें हें मरणप्राय आहे. एखाद्याच्या दुर्वर्तनामुळें त्याला इष्टमित्रांनीं सोडलें असतां जे वरचेवर वाग्बाण सोसावे लागतात त्यासारखें तापदायक दुसरें कांहीं नाहीं. आतां या पापापासून सुटण्याला वेद पढणें, ब्राह्मणांची शुश्रूषा करून त्यांचा सत्कार करणें, कायावाचामनानें लोकांना प्रसन्न करून घेणें, उदार बुद्धि ठेवणें, थोर कुलामध्यें संबंध ठेवणें, आपल्याला कमीपणा घेऊन लोकांचे गुण गाणें, स्नान व जप करीत राहणें, सौम्य राहून फार न बोलणें, ब्राह्मण व क्षत्रिय यांचा आश्रय करून असणें, हीं साधनें आहेत. लोक कांहीं बोलले तरी त्याकडे लक्ष देऊं नये. अशा वर्तनानें मनुष्याचें पाप नाहींसें होऊन तो लोकांच्या आदराला पात्र होतो. आणि या जगांत अनेक सुखें भोगून उभय लोकीं मोठें फळ मिळवितो.

चोरांशीं राजाचें वर्तन कसें असावें अशा विषयीं पुढील गोष्ट लक्षांत ठेवण्या जोगी आहे. क्षत्रियापासून एका निषादीला कायव्य नांवाचा एक निषाद झाला. तो शूर, बुद्धिमान, शास्त्र जाणणारा, निष्ठुरपणा म्हणून मुळींच ठाऊक नसलेला, ब्राह्मणभक्त व गुरूंची सेवा करणारा असून क्षत्रधर्माप्रमाणें वागत होता. जे अरण्यामध्यें आपल्या धर्माप्रमाणें वागणारे तापसी होते त्यांचें तो रक्षण करीत असे. जात्या निषाद असून त्याला स्वर्गसिद्धि मिळाली. सकाळ संध्याकाळ अरण्यामध्यें तो मृगांना खवळवीत असे. त्याला निषादाचे सर्व धर्म माहीत असून मृगाच्या आंगांतलेही सर्व गुण कळत होते. देशकाल ओळखून तो अरण्यांत फिरत असे. पशूंचें सर्व इंगित त्याला कळत असल्यानें त्याच्या भक्कम धनुष्यापासून सुटलेला बाण कधीं फुकट जात नसे. शेंकडों लोकांना तो एकटा मारण्याला समर्थ होता. त्या अरण्यामध्यें तो आपल्या आंधळ्या बहिऱ्या अशा म्हाताऱ्या आईबापांची शुश्रूषा करीत असे. मधु, मांस, फलमूलें आणि दुसऱ्या बऱ्या वाईट खाद्यांनीं मानाला पात्र अशा लोकांचें तो आतिथ्य करी आणि त्यांच्या पुष्कळ उपयोगीं पडे. संन्यास घेऊन अरण्यांत राहवयास आलेल्या ब्राह्मणांचा सत्कार करून तो वनामध्यें नेहमीं पशू मारून त्यांना नेऊन देत असे. चोर समजून त्याच्यापासून ते घेण्याला जे कचरत अशा लोकांच्या आश्रमांना भल्या पहाटेस जाऊन ते त्यांच्या घरीं तो ठेवून येत असे. एके दिवशीं निर्दय व स्वेच्छ वागणाऱ्या हजारों चोरांनीं येऊन आपला पुढारी होऊन आईबापांप्रमाणें आपलें पालन करण्याविषयीं त्याला विनंति केली. तेव्हां कायव्य म्हणाला, ' तुह्मीं स्त्रीला, भित्र्याला, मुलाला, तपस्व्याला किंवा पुढें राहून जो युद्ध करीत नाहीं अशाला मारतां कामा नये. बळजबरीनें स्त्रिया उपटतां कामा नये. कोणच्याही जातीपैकीं स्त्रीवध तुमच्या हातून होतां कामा नये. ब्राह्मणांचें नेहमीं कल्याण करून त्यांच्याकरितां लढावें. सत्याला कधीं हरताळ लावूं नये. मंगल कार्यामध्यें कधीं विघ्न करूं नये. ज्या घरामध्यें देव, पितर व आतिथि यांचा सत्कार होत असतो अशा घरांना तुह्मी पीडा देऊं नये. तुमच्या लुटालुटींत तुह्मी ब्राह्मणांना वर्ज करावें. एवढेंच नव्हे तर आपल्या जवळचें त्यांना देऊन त्यांचा सत्कार करावा. त्यांची इतराजी होऊन ते ज्याचा मोड व्हावा असें इच्छितात त्याला तिन्ही जगांत कोणाचा आधार मिळत नाहीं. **ब्राह्मणांसंबंधानें वाईट बोलून त्यांच्या नाशाची इच्छा केली असतां सूर्य उगवल्यानें जसा अंधार**

**नाहींसा होतो त्याप्रमाणें यानें त्यांचाच नाश होतो.** येथेंच राहून तुम्हीं आपल्या शौर्याच्या फलाची इच्छा करावी. आमचा अंश जे आम्हाला देणार नाहींत त्यांच्यावर सैन्य पाठविलें जाईल. दंड हा लोकांना ताळ्यावर आणण्यासाठीं असून आपलें वैभव वाढविण्यासाठीं नाहीं. जे भल्यांना पीडा देतात त्यांना शिक्षा म्हणजे ठार करणें ही होय. **जे राष्ट्रहिताच्या आड येऊन आपलें वैभव वाढवीत बसतात, ते प्रेतांतल्या किड्याप्रमाणें राष्ट्राच्या मागोमाग नाश पावतात.** आतां जे चोर असून मीं वर सांगितल्याप्रमाणें वागतील ते चोर असतांही उत्तम सिद्धि मिळवितील.'

नंतर त्या सर्वांनीं त्याच्या सांगण्याप्रमाणें केलें व पापापासून दूर राहून त्यांची भरभराट झाली. आतां राजानें खजिना कसा उभारावा या बाबतींत पुढील गोष्टी लक्षांत ठेवाव्या. यज्ञ करणाऱ्या लोकांचा पैसा त्याचप्रमाणें देवाचा पैसा राजानें कधीं घेऊं नये. चोरांचा त्याचप्रमाणें जे कांहीं कर्म करीत नाहींत त्यांचा पैसा राजानें घ्यावा. ह्या सर्व प्रजा व राज्यभोग क्षत्रियाचे असल्यानें या पैशावरही क्षत्रियाचीच मालकी आहे. दुसऱ्या कोणाचीही नाहीं. तो पैसा त्यानें सैन्य उभारण्यासाठीं किंवा यज्ञासाठीं जमवावा. उपयोगाच्या लायकीचीं नसतील अशीं झुडपें तोडून त्याच्या योगानें अन्न शिजवितात, त्याचप्रमाणें जो देव, पितर व मनुष्य यांना कांहीं देऊन सत्कार करीत नाहीं अशाजवळ असणारा पैसा निरर्थकच असतो. तो धार्मिक राजानें त्याजकडून घेऊन त्याच्या योगानें चांगल्यांना संतुष्ट केलें असतां तें गैर नाहीं. आपण मध्यें पडून दुष्टाजवळचा पैसा काढून जो भल्याला देतो तो धर्मवेत्ताच समजावा. वनस्पति त्याचप्रमाणें मुंग्या ज्याप्रमाणें वाढतात त्याप्रमाणें राजानें आपल्याला मिळणारे लोक वाढवीत जावें. गांधिलमाशा व गुंगुरटीं यांच्याप्रमाणें यज्ञ न करणारांना राज्यांतून घालवून देणें हाच राजाचा धर्म आहे. दगडावर दगडानें घासलेली धूळ ज्याप्रमाणें बारीक बारीक होत जाते त्याप्रमाणें धर्माचा छडा लावीत असावें.

पुढची तरतूद आधीं करून ठेवणारा, प्रसंगावधानी व दीर्घसूत्री यांपैकीं पहिल्या दोघांना सुख होऊन तिसरा नाश पावतो. या बाबतींत पुढील गोष्ट लक्षांत ठेवण्याजोगती आहे. एका उथळ पाण्याच्या सरोवरामध्यें पुष्कळ मासे होते. त्यांपैकीं एक अनागत, दुसरा प्रत्युत्पन्नमति, व तिसरा दीर्घसूत्री असे तीन मासे एकमेकांचे मोठे मित्र असून ते नेहमीं एकत्र रहात. कोणे एके वेळीं एक धीवर त्या सरोवराकडे येऊन त्यानें हजारों वाटांनीं सखलप्रदेशामध्यें पाणी काढून लावलें. त्या सरोवरांतलें पाणी कमी होतेंसें पाहून पहिला दूरदर्शी मासा दुसऱ्या दोघांना ह्मणाला, 'या सरोवरांतील जलचर प्राण्यांवर मोठें संकट ओढवणार आहे. तेव्हां वाट बंद होण्याच्या पूर्वीं आपण दुसऱ्या कोठें तरी जाऊं या. संकट ओढवलें नाहीं त्याच्या आधींच जो मोठ्या विचारानें त्याची तरतूद करून ठेवतो तो संकटांत सांपडत नाहीं.' हें ऐकून दीर्घसूत्री ह्मणाला, तूं ह्मणतोस तें ठीक आहे, परंतु इतक्यांत गडबड करण्याची कांहीं जरूर नाहीं.' तेव्हां प्रसंगावधानी दूरदर्शीला ह्मणाला, 'प्रसंग आला असतां मला त्याचा उपाय सुचल्याविना रहाणार नाहीं.' हें ह्यांचें भाषण ऐकून महाबुद्धिमान दूरदर्शी फोडून दिलेल्या एका पाटामधून खोल पाण्याच्या दुसऱ्या एका ठिकाणीं जाऊन राहिला. पुढें पाणी ओसरल्यावर त्या धीवरानें त्यांतील माशांना निरनिराळ्या उपायांनीं जाळ्यांत आडकाविलें. त्यावेळीं तलावांतील थोडें राहिलेलें पाणी ढवळलें जात असतां दुसऱ्या अनेक माशांबरोबर दीर्घसूत्री त्या जाळ्यांत सांपडला. जाळें वर काढीत असतां, प्रसंगावधानी मासा दुसऱ्या माशांबरोबर जाळ्याचा दोर तोंडांत धरून बाहेरच्या बाजूला इतर माशांशीं मेल्याप्रमाणें चिकटून राहिला. पुढें सर्व मासे यांत सांपडले असें वाटून धीवरानें तें जाळें वर काढून एका खोल पाण्यांत तें धुण्याधाटीं बुडविलें. तेव्हां तो प्रसंगावधानी मासा झटकन् दोरीला सोडून पाण्यांत बुडाला. तो मूर्ख व अक्कलशून्य दीर्घसूत्री मात्र निरुपाय होऊन मरण पावला. याप्रमाणें आलेली वेळ मूर्खपणानें ज्याला कळत नाहीं तो त्या दीर्घसूत्री माशाप्रमाणें नाश पावतो. मी हुशार आहें अशा घमेंडीवर जो आधीं तरतूद करून ठेवीत नाहीं तो प्रसंगावधान्याप्रमाणें संकटांत पडतो. त-

थापि पुढची तरतूद करून ठेवणारा व प्रसंगावधानी हे दोघे सुख भोगतात व दीर्घसूत्री मात्र नाश पावतो. लव, काष्ठा, कला, मुहूर्त, दिवस, रात्र, महिने, पक्ष, सहा ऋतु, कल्प, वर्ष असे वेळेचे पुष्कळ भेद आहेत. परंतु हा काल कधीं कोणाला दिसत नाहीं. कोणाचाही मनांतला हेतु शेवटास जाण्यास त्यासंबंधानें जसें मनांत आणावें तसें तें घडत असतें. धर्मार्थासंबंधानें तसेंच मोक्षासंबंधानें वरील दोन प्रकारचे लोक श्रेष्ठ समजले आहेत. देशकालाकडे लक्ष देऊन विचारपूर्वक कोणचीही गोष्ट केली असतां त्यापासून फळ मिळतें.

## १३१ बुद्धिबळ. (१२–१३८)

युधिष्ठिर ह्मणाला, ' आपण वर बुद्धीचें सामर्थ्य सांगितलें. आतां पूर्वी पीडा दिलेल्या अनेक शत्रूंनीं आपल्याला समूळ नाहींसें करण्याच्या विचारानें ग्रासून टाकिलें असतां त्या सर्वांशीं एकट्या राजानें कोणाचें साहाय्य नसतां कसें तोंड द्यावें; अशा प्रसंगीं मित्र कसा जोडावा; वैर कोणाशीं; करावें ज्याला आपण मित्र समजत आहों तो उलटला असतां काय केल्यानें सुख मिळेल;व सामर्थ्यवान असून पुष्कळ शत्रूंनीं एकदम घेरलें असतां अशा प्रसंगीं कसें वागावें वगैरे सर्व मला नीट सांगा. ' हें ऐकून भीष्म ह्मणाले, ' युधिष्ठिरा, सांगतों ऐक. प्रसंगानें शत्रु असेल तो मित्र होतो; मित्र असेल तो शत्रु होतो. नेहमीं प्रसंगानुरूप मनुष्यांच्या वर्तनांत फेर होत असतो; म्हणून देशकाल जाणून कार्याकार्य पाहून कोणावर विश्वासही टाकावा लागतो, कोणाशीं वैरही करावें लागतें. प्रसंग पाहून शहाण्यांनीं प्रसंगांत असलेल्या शत्रूंशीं सुद्धां सख्य करून प्राण वांचवावा. जो मूर्ख शत्रूंशीं कधीं सख्य करावयाचें नाहीं म्हणून धरून बसेल त्याला त्यापासून कांहीं फायदा न होतां फळही कांहीं मिळणार नाहीं. जो आपलें काम लक्षांत घेऊन शत्रूशीं सख्य करण्याला व मित्राशीं वैर जोडण्याला तयार होतो त्याला मोठें फळ मिळतें. या बाबतींत पुढील गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे.

एका मोठ्या अरण्यामध्यें एक मोठा वड होता. त्याला वेलींनीं अगदीं गुरफटून टाकलें असून पुष्कळ पक्षी त्यावर रहात होते. त्याचा बुंधा फार मोठा असून छाया गार व आल्हाददायक होती. त्याच्या मुळाशीं एक बिळ करून व त्याला हजारों वाटा ठेवून त्यामध्यें पलित नांवाचा एक मोठा शहाणा उंदीर रहात होता. त्याच्या फांदीच्या आश्रयानें लोमश नांवाचें एक मांजर अनेक पक्ष्यांना खात मोठ्या सुखानें रहात होतें. एक चांडाळ त्या ठिकाणीं येऊन झोपडें बांधून राहिला. तो दररोज सूर्य अस्ताला गेल्यावर आपलें तातींनीं विणलेलें भक्कम जाळें त्या ठिकाणीं लावून ठेवून झोंपड्याकडे जाऊन स्वस्थ झोंप घेई व उजेडल्यावर त्या ठिकाणीं येई. रात्रीं त्या जाळ्यामध्यें पुष्कळ जनावरें सांपडत. एके दिवशीं गैरसावधपणें तें मांजर त्या जाळ्यांत सांपडलें. आपला नेहमींचा वैरी जाळ्यांत सांपडलेला पाहून तो पलित उंदीर निर्भयपणें बाहेर पडून हिंडूं लागला. तो त्या ठिकाणीं भक्ष्य शोधीत खुशाल फिरत असतां फार वेळानें त्याला त्या जाळ्यामध्यें भक्ष्य दिसलें. त्या जाळ्यावर चढून आपल्या वैऱ्याकडे पहात हासत तो तें मांस खाण्यांत गढला असतां दुसरा एक भयंकर शत्रू पुढें आलेला त्याला दिला. हा बिलवासी हरिण नांवाचा मुंगूस असून वेताच्या फुलाप्रमाणें याचा वर्ण होता. याचे डोळे लाल व चंचल होते. उंदराचा वास लागूनच खायासाठीं जिभळ्या चाटीत वर डोळे लावून तो त्या ठिकाणीं दत्त म्हणून येऊन उभा राहिला होता. इतक्यांत झाडाच्या ढोलीमध्यें राहणारा दुसरा एक शत्रु तीक्ष्ण चोंचीचा रात्रीं फिरणारा चंद्रक नांवाचा घुबड वर झाडाच्या फांदीवर त्याला दिसला. याप्रमाणें मुंगूस व घुबड या दोन शत्रूंच्या नजरेच्या तावडींत सांपडला असतां त्या आणीबाणीच्या प्रसंगीं त्याला मोठी काळजी पडली. याप्रमाणें चोहोंकडून भय उत्पन्न होऊन मरण येऊन ठेपलें असतां शहाण्यानें काय करावें ह्मणून तो विचार करूं लागला. ' पेंचामध्यें सांपडलेल्यानें सर्व संकटांतून पार पडून जीव वांचविणें हेंच शहाणपणाचें काम आहे. माझ्यावर तर हा चोहोंकडून प्रसंग येऊन ठेपला आहे. मी अविचारानें जर खालीं जमिनीवर जाईन तर हें मुंगूस मला खाऊन टाकील. येथेंच राहिलों तर घुबड खाऊन टाकणार. एखादी तात तोडून जाळ्यांत

शिरावें तर मांजर खाणार! असें आहे, तरी माझ्या सारख्या शहाण्यानें गांगरतां कामा नये. बुद्धीच्या जोरावर प्राण वांचविण्याची खटपट केली पाहिजे. बुद्धि असून नीतिशास्त्रांत पटाईत असणाऱ्यानें भयंकर प्रसंग आला असतां सुद्धां खचतां कामा नये. हल्लींच्या प्रसंगीं या मांजरावांचून मला दुसरा कांहीं उपाय दिसत नाहीं. हा शत्रु संकटामध्यें सांपडला असून याचें माझ्या हातून मोठें काम होण्याजोगें आहे. ह्मणून आज तीन शत्रूंनीं मला घेरलें असून माझा प्राण मला वांचवावयाचा असल्यानें ह्या शत्रूचा मीं आश्रय करावा. नीतिशास्त्राला धरून त्याच्या फायद्याची गोष्ट त्याला सांगून आपल्या बुद्धीच्या जोरावर या तीन शत्रूंच्या हातांवर तुरी देऊन मला निघून गेलें पाहिजे. हा जरी माझा हाडवैरी आहे तरी मोठ्या पेचांत आहे. तेव्हां हा मूर्ख आपल्या फायद्यासाठीं माझ्याशीं मिळून सख्य करण्याला तयार होईल तर पहावें. बलवानाशीं प्रसंग आला असतां जीव बचावण्यासाठीं शत्रूलासुद्धां आपलासा करून घ्यावा असें ह्मटलें आहे. शहाणा शत्रु बरा पण मूर्ख मित्र कामाचा नाहीं. यावेळीं तर माझा प्राण हा माझा वैरी जें मांजर यावर अवलंबून आहे. तेव्हां याच्याच बचावासंबंधानें यापाशीं गोष्ट काढून माझ्या संगतीनें हा शहाणा झाला तर पहावें. याप्रमाणें शत्रूशीं काय करावयाचें हें ठरवून कोणती गोष्ट कशी पार पाडावी हें समजून संधि, विग्रह यांची वेळ ओळखणारा तो त्या मांजराला गोड शब्दांनीं ह्मणाला, ‘ हे भाऊ, मी स्नेहामुळें विचारतों कीं, तूं खुशाल आहेसना? तूं जजगावेंस असेंच मला वाटतें, कारण आपल्या दोघांचें हिताहित सारखेंच आहे. मित्रा, तूं अगदीं घाबरूं नकोस. तुला अगदीं भीति नाहीं. मला मारण्याचें मनांत न आणशील तर मी तुला वांचवीन. या स्थितींत मला एक उपाय सुचतो आहे, तो जरी कठीण आहे तरी त्यापासून तुझी सुटका होऊन माझेंही कल्याण होणार आहे. मीं आपल्या मनाशीं विचार करून आपल्या दोघांसाठीं हा उपाय योजून काढला आहे. मुंगूस व घुबड हे दोघे पापबुद्धि मला धरून मारण्याला टपले आहेत. हा दुष्ट घुबड कसा घूं घूं करीत डोळे फिरवीत झाडाच्या फांदींतून मजकडे पहात आहे पहा! सात पाउलें बरोबर गेल्यानें भल्याची मैत्री जुळत असते. तर अशा प्रकारचा तूं माझा भला मित्र आहेस. आपण सहवासानें राहिलों आहों तर आज मीं तुझें मित्रकार्य करतों. माझ्या साहाय्यावांचून हा पाश तुला तोडतां येणार नाहीं. तूं मला मारणार नाहींस तर मी तुझे पाश तोडतों. तूं ह्या झाडाच्या वर व मी ह्याच्या बुडाशीं फार दिवसापासून रहात आहों हें तुला ठाऊकच आहे. ज्याच्यावर कोणी विश्वास टाकीत नाहीं किंवा जो कोणावर विश्वास टाकीत नाहीं अशा नेहमीं भीतीमध्यें राहणाऱ्या दोघांना शहाणे लोक चांगले ह्मणत नाहींत. ह्मणून आपल्या दोघांचें प्रेम वाढून संबंध जडणें उचित आहे. संधि चालविणें कांहीं शहाण्यांना पसंत नाहीं. ह्मणून आतां प्रसंगानुरूप मी ह्मणतो तें ऐक. तूं जगावेंस असें मला वाटत आहे व मीं जगावें असें तुला वाटत आहे. कोणी एखादा मनुष्य एखादी खोल मोठी नदी ओंडक्याच्या साहाय्यानें तरून चाललला असतां तो त्या ओंडक्याला पैल पोहोंचवितो व तो ओंडका त्याला पैल पोहोंचवितो. याप्रमाणें आपला संबंध दोघांनाही हितावह होणार आहे. मी तुला तारीन व तूं मला तारशील. ’ याप्रमाणें दोघांच्या हिताचें त्याला पटेलसें भाषण मुद्देसूदपणें बोलून तो काय उत्तर देतो हें पहाण्यासाठीं तो त्याजकडे पहात गप्प राहिला. शहाणपणाचें, मान्य करण्याजोगें, हितकर भाषण ऐकून व आपली स्थिति लक्षांत घेऊन तें शहाणें व बोलकें मांजर त्याचा बहुमान करून गोडीनें ह्मणालें, ‘ मित्रा, तुला पाहून मला मोठा आनंद होत आहे. जर तुला कांहीं उपाय दिसत असेल तर तो झटकन् करून टाक. मी मोठ्या पेंचांत असून तूं माझ्याहून अधिक पेचांत आहेस. तेव्हां याप्रमाणें दोघेही संकटांत असल्यानें कांहीं विचार न करतां आपलें दोघांचें एकदम सख्य होऊं दे. प्रसंगाला उचित अशीच माझ्या हातून गोष्ट होईल. मला तूं संकटांतून सोडविशील तर तुझे उपकार तसेच राहणार नाहींत. मी सर्वस्वी तुझा आहें. त्याचप्रमाणें मी तुझा पूर्ण भक्त झालों असून शिष्याप्रमाणें तुझें हित करण्याला तयार आहें. मी तुला शरण आलों असून तुझ्या

सांगण्याप्रमाणें करण्याला तयार आहें.' याप्रमाणें मांजराचें भाषण ऐकून तें आपल्या अगदीं ताब्यांत आलें आहेसें पाहून प्रसंग ओळखणारा तो उंदीर मोठ्या गंभीर व अर्थप्रचुर शब्दांनीं ह्मणाला, 'तूं ह्मणालास तें सर्व ठीक असून तुझ्या सारख्यानें असें ह्मणावें यांत नवल नाहीं. मी जो हिताचा उपाय योजला आहे तो ऐक. मी तुझ्या मांडींत शिरतों. कारण या मुंगसाची त्याचप्रमाणें या झडप घालूं पाहणाऱ्या घुबडाची मला मोठी भीति येऊन पडली आहे. मला सांभाळ, मारूं नकोस. तुला वांचविण्याचें माझ्या अंगीं सामर्थ्य आहे. मी तुझे पाश तोडीन हें मी शपथपूर्वक सांगतों.' तें न्यायाचें व रास्त भाषण मांजरानें कबूल करून व आनंदभरित होऊन प्रेमपूर्वक तो त्याला ह्मणाला, 'मित्रा, एकदम ये पाहूं. तूं मला माझ्या सारखाच मित्र आहेस. तुझ्या बुद्धीच्या प्रसादानें बहुधा मी वांचेन. तर हे प्राणदात्या, अशा स्थितीमध्यें माझ्या हातून जें जें कांहीं म्हणून होण्यासारखें असेल ती मला आज्ञा कर; मी तें सारें करण्याला तयार आहें. मित्रा, आतां सख्यावांचून दुसरी गोष्ट बोलूं नकोस. या संकटांतून तूं मला सोडविलेंस ह्मणजे मी व माझें सर्व गोतावळ्याचें मिळून तुझ्या मनाजोगें सर्व कांहीं तुझ्या हिताचें करण्याला तयार राहूं. मित्रा या संकटांतून मी सुटलों ह्मणजे माझें प्रिय करणाऱ्या तुझा सत्कार करून तुला संतोष होईल असें मी वागेन. प्रत्युपकार करणारानें किती जरी केलें तरी तें उपकार करणाराच्या उपकाराच्या तोडीला लागणार नाहीं. पहिला आपल्यावर केलेल्या उपकाराबद्दल उलट उपकार करीत असतो व दुसरा तसा कांहीं हेतु नसून निष्कारण उपकार करीत असतो.' याप्रमाणें त्या मांजराला त्याचा फायदा दाखवून तो उंदीर आपल्या बापाप्रमाणें त्या आपल्या वैऱ्यावर विश्वास टाकून त्याच्या पुढ्यांत शिरून खुशाल त्याच्या मांडींत जाऊन पडला. याप्रमाणें तो त्याच्या मांडींत पडलेला पाहून मुंगस व घुबड निराश झाले. व त्यांच्यामध्यें जुळलेलें तें प्रेम पाहून त्यांना आश्चर्य वाटून ते अगदीं घाबरून गेले. त्यांच्या अंगांत सामर्थ्य असून अक्कल होती तरी त्या उंदराच्या नीतिबलानें त्याला त्यांच्यानें उपटून नेतां येईना, व याप्रमाणें एकमेकांच्या कामासाठीं सख्य करून राहिलेल्या त्या दोघांना पाहून तें मुंगस व घुबड एकदम आपापल्या ठिकाणाला गेले. ते वेळीं तो उंदीर सावकाशपणें ते पाश तोडीत असतां तें मांजर उतावीळ होऊन त्याला ते तोडण्यास घाई करूं लागलें. तें म्हणालें, 'मित्रा, गडबड कां करीत नाहींस ? तुझें काम झालें म्हणून तूं आतां मला फशीं देऊं पाहतोस काय ? मित्रा, तो चांडाळ येण्याच्या पूर्वी हे पाश तोडून टाक.' हें त्याचें भाषण ऐकून तो उंदीर त्या मूर्ख मांजराला पथ्याचें व आपल्या हिताचें असें म्हणाला, 'मित्रा, स्वस्थ ऐस. घाई किंवा धांदल करूं नकोस. मला वेळ काळ कळत आहे. अद्यापि वेळ जात चालली नाहीं. अकाळीं केलेलें काम कर्त्याच्या फायद्याचें होत नाहीं. तेंच वेळीं हातीं घेतलें असतां तें मोठें फायदेशीर होतें. वेळ न येतां मी तुला सोडवीन तर मला तुझ्यापासून भय उत्पन्न होईल. ह्मणून वेळेची वाट पहा. उगीच अशी गडबड करूं नकोस. ज्यावेळीं त्या चांडाळाला हातामध्यें शस्त्र घेऊन येतांना पाहीन त्या वेळीं दोघांवर एकदम प्रसंग आला असतां तुझे पाश मी तोडीन. त्या वेळीं मीं तुला सोडविलें असतां तूं एकदम झाडावरच चढशील. मग जीव वांचविण्याशिवाय दुसऱ्या कशाकडे तुझें लक्ष जाणार नाहीं. याप्रमाणें भिऊन घाबरून तूं निघून गेल्यावर मी आपला बिळामध्यें शिरेन व तूं खांदीवर जाऊन बसशील.' तें मांजर आपला जीव वांचण्याबद्दल अगदीं उतावीळ झालें असल्यानें तो दिरंगाई लावीत आहेसें पाहून नम्रपणें त्याला गडबड करीत ह्मणालें, 'भले लोक मित्राचें काम अशा रीतीनें करीत नसतात. मीं जसें तुला एकदम संकटांतून सोडविलें त्याचप्रमाणें तूंही माझें काम झटपट करून आपल्या दोघांचें रक्षण होईल अशी तजवीज कर. अथवा मागचें वैर मनांत ठेवून तूं जर वेळ घालवीत असशील तर तुझें आयुष्य सरलें असें समज. मी जर मागें चुकून तुझें कांहीं वाईट केलें असेन तर कृपा करून तें मनांत आणूं नकोस. मी तुला पदर पसरतों.' त्यावर सर्व शास्त्रतत्त्वें पूर्ण अवगत

असणारा जो उंदीर त्याला ह्मणाला, 'तूं आपल्या फायद्याचें बोललास तें मीं ऐकलें; व माझ्या फायद्याचें मी जें बोललों तेंही तूं ऐकलेंच आहेस. जो भीतिनें मित्र जोडला गेला असून ज्याच्या मैत्रीमध्यें भीति आहे त्यासंबंधानें सापाच्या तोंडांत सांपडलेल्या हाताप्रमाणें पूर्ण खबरदारी घेतली पाहिजे. बलवानाशीं मैत्री करून आपल्यासंबंधानें जो खबरदारी घेत नाहीं ती बाधक अन्नाप्रमाणें त्याच्या फायद्याची होत नाहीं. कोणी कोणाचा मित्र नाहीं, कोणी कोणाचा जिव्हाळ्याचा नाहीं. परंतु मित्र ह्मणा किंवा शत्रू ह्मणा कांहीं उद्देशानें जोडले जातात. हत्तीमुळेंच जसे रानहत्ती बांधले जातात, त्याप्रमाणें हेतूंनीं हेतू जोडले जातात. काम झाल्यावर मग कोणी काम करणाराची पर्वा धरीत नाहीं. ह्मणून दुसऱ्याचें कोणतेंही काम निःशेष करून टाकूं नये. मीं पुष्कळ तांती तोडल्या असून आतां एकच बाकी राहिली आहे. मी ती कांहीं वेळ न लागतां तोडीन. स्वस्थ ऐस.' याप्रमाणें संकटांत सांपडून ते एकमेकांशीं बोलत असतां रात्र सरल्यामुळें लोमशाला भीति पडली. पुढें उजेडल्यावर काळसर पिंगट वर्णाचा, जाड ओठाचा, लांब कानाचा मोठा जवडा असलेला दिसण्यांत भयंकर असा विक्राळ परिघ नांवाचा चांडाळ हातामध्यें शस्त्र घेऊन कुत्र्याच्या घोळक्यामध्यें त्या ठिकाणीं आला. यमदूताप्रमाणें त्याला येतांना पाहून मन जाग्यावरून उडून जाऊन भीत भीत आतां पुढें काय करणार ह्मणून त्या मांजरानें त्या उंदराला विचारलें. ते वेळीं त्या उंदरानें त्या मांजराचा राहिलेला पाश तोडला. त्या बरोबर तें मांजर थेट त्या झाडावर चढलें, व तो उंदीर त्याच्यां तावडींतून सुटून बिळांत शिरला. तो चांडाळही तें रिकामें जाळें उचलून घेऊन निराश होऊन चोहोंकडे नजर टाकीत तेथून निघून गेला. तेव्हां त्या मोठ्या संकटांतून सुटून दुर्मिळ जीव परत मिळाल्यानें तें मांजर त्या झाडावरून बिळांत शिरलेल्या उंदराला ह्मणालें, 'तुझ्याशीं कांहीं न बोलतां मी एकदम झाडावर चढलों म्हणून तूं मला कतघ्न समजत नाहींस ना? माझ्यावर विश्वास टाकून मला प्राणदान देऊन आतां मित्राशीं मिळून मजा मारण्याच्या वेळीं तूं आतां मजकडे कां बरें येत नाहींस? मित्र जोडून पुढें जो त्यांना विसरतो त्या मूर्खाला पुढें संकटांत सुद्धां मित्र मिळत नाहींत. तूं आपल्या सामर्थ्यानें मला मित्र जोडून घेऊन माझा बहुमान केला आहेस. तेव्हां मी जो तुझा मित्र झालों आहें त्या माझा मित्राचार तूं घ्यावास. जे ह्मणून माझे मित्र किंवा गोतावळ्याचे आहेत ते सर्व शिष्य ज्याप्रमाणें प्रिय गुरूचा सत्कार करतात त्याप्रमाणें तुझा बहुमान करतील. मी तुला देव्हाऱ्यामध्यें ठेवीन. प्राणदात्याला कोण डोकीवर घेणार नाहीं? माझ्या देहाचा त्याचप्रमाणें घराचा मालक तूं आहेस. माझ्या सर्व कामामध्यें तुझा सल्ला राहील. माझा प्रधान होऊन बापाप्रमाणें तूं मला आज्ञा कर. मी आपल्या जिवाची शपथ घेऊन सांगतों, आमच्यापासून तुला बिलकुल भय नाहीं. बुद्धीनें तूं प्रत्यक्ष शुक्राचार्यासारखा असून आमच्या अंगीं बल आहे. कारण आज मंत्रबलाच्या सामर्थ्यानें तूं मला माझा जीव दिला आहेस.' याप्रमाणें गार करून सोडणारें त्या मांजराचें भाषण ऐकून त्या चांगल्या मंत्रविशारद उंदरानें गोड शब्दांनीं आपल्या हिताचें असें पुढील उत्तर दिलें. 'मित्रांनाही ओळखून असावें व शत्रूंनाही ओळखून असावें; हें काम मोठें नाजूक आहे असें शहाण्यांचें मत आहे. प्रसंगीं मित्र शत्रूंसारखे व शत्रू मित्रांसारखे दिसत असतात. कामक्रोधांच्या आधीन होणाऱ्या प्राणिमात्रांना सख्य केल्यानें बांधून घेतां येत नाहीं. मित्र ह्मणून कांहीं वस्तु जगांत नाहीं किंवा शत्रू ह्मणूनही कांहीं नाहीं. प्रसंगानें मित्र किंवा शत्रू होत असतात. ज्याच्यामुळें तो जिवंत असेपर्यंत आपल्या स्वार्थाला बाध नाहींसें वाटत असतें तोंपर्यंत एक दुसऱ्याचा मित्र असतो. कायमचें मित्रत्व किंवा कायमचें शत्रुत्व म्हणून जगांत कांहींच नाहीं. स्वार्थदृष्टीनेंच मित्र किंवा शत्रू होत असतात. तेंच वेळ फिरली ह्मणजे मित्र शत्रु होतो व शत्रु मित्र होतो. स्वार्थ हाच मोठा आहे. जो केवळ प्रेम ह्मणून प्रसंग न ओळखतां मित्रावर विश्वास टाकतो व शत्रूवर टाकीत नाहीं त्याचें चित्त चळलें आहे असें समजावें. विश्वासाला नालायख अशावर विश्वास

टाकूं नये व विश्वास टाकलेल्यावरही फार विसंबून राहूं नये. विश्वासापासून जो प्रसंग ओढवतो तो आपलीं पाळेंमुळें खणून काढतो. आई, बाप, मुलगा, मामा, भाचा, आप्त, संबंधी हा सारा संबंध तरी स्वार्थामुळेंच जडतो. प्रसंगांत पडलेल्या मुलाला आईबाप सोडतात व दुसरे लोक कांहीं फायद्यासाठीं त्याला संभाळतात, तेव्हां हा स्वार्थाचा जोर कसा आहे पहा ! तुला संकटांतून सोडविल्याबरोबर तूं आपल्या शत्रूवर प्रत्युपकार करून उपकाराची फेड करूं पहात आहेस हें ठीकच आहे. तूं पूर्वीं याच ठिकाणीं वडावरून खालीं आलास. तुझ्या चंचळपणामुळें आधीं या ठिकाणीं लावून ठेवलेलें जाळें तुला दिसलें नाहीं. चंचळ मनुष्य स्वतःच्या उपयोगाला येत नाहीं, मग दुसऱ्याच्या तो कोठून येणार? **ह्मणून चंचळ मनुष्य सर्वच कामामध्यें घोंटाळा आणीत असतो**. निष्कारण ह्या जगांत कोणाची कोणावर प्रीति जडलेली मला कांहीं माहीत नाहीं. **एका आईच्या पोटांतून आलेले दोघे भाऊ किंवा नवराबायको यांचें प्रेम स्वाभाविक असून जरी कांहीं कारणानें ते एकमेकांवर रागावले तरी स्वभावानेंच ते एकमेकांवर प्रेम करूं लागतात**. कोणी दानानें आवडता होतो, कोणी गोड बोलून होतो; मंत्र, जप, होम इत्यादिकांनीं कोणी होतो. मिळून लोकांचें प्रेम कामासाठीं असतें. त्याचप्रमाणें कांहीं कारणामुळें आपलें प्रेम जुळलें. तें कारण-नाहींसें झाल्याबरोबर तें प्रेमही नाहींसें झालें. मला गट्ट करण्याच्या इच्छेशिवाय मी तुला आवडता होण्याला दुसरें काय बरें कारण असणार ? आणि त्यासंबंधानें आह्मी बोल्यानें दुध पिणारें आहों असें तूं समजूं नकोस. काळानें मूळ उद्देश पालटून स्वार्थ मनुष्याच्यामागें लागतो. हा स्वार्थ शहाण्याला कळतो ह्मणून लोक शहाण्याच्या मागून असतात. तूं माझ्यापेक्षां बळवान आहेस त्याअर्थी तुझा हा सख्य करण्याचा प्रयत्न अवेळीं आहे. तेव्हां संधि, विग्रह यांची वेळ मला चांगली कळत असल्यानें मी आपल्या स्वार्थापासून चळणार नाहीं. आकाशांतील फिरत्या ढगाप्रमाणें संधिविग्रहाच्या वेळा क्षणोक्षणीं पालटत असतात. आजच तूं माझा शत्रु असून आजच मित्र झालास व फिरून आजच शत्रु झालास. तेव्हां युक्तीचा खेळ पहा. जोंपर्यंत कारण होतें तोंपर्यंत आपली मैत्री होती. त्या कालानें जुळवून आणलेल्या कारणाबरोबरच ती मैत्री नाहींशी झाली आहे. कारण जात्या तूं माझा शत्रु असून प्रसंगानें मित्र बनलास व तो प्रसंग नाहींसा झाल्याबरोबर फिरून पूर्वीचें शत्रुत्व कायम झालें. तेव्हां याप्रमाणें शास्त्र मला पूर्णपणें अवगत असून तूं मजसाठीं टाकित असलेल्या फासांत मी कसा बरें सांपडेन ? तुझ्या सामर्थ्यानें माझी सुटका झाली व माझ्या सामर्थ्यानें तुझी सुटका झाली. दोघांनीं एकमेकांचे उपकार फेडून टाकले आहेत. आतां फिरून एकत्र जुळण्याची गोष्ट काढूं नकोस. आतां मला खाण्यावांचून तुझें माझ्याशीं दुसरें कांहीं काम उरलें नाहीं. मी तुझें खाद्य असून तूं मला खाणारा आहेस. तसाच मी दुबळा असून तूं बलवान आहेस. तेव्हां याप्रमाणें आपल्यामध्यें अंतर असून आपण एकमेकांपासून वेगळे असल्यानें आतां सख्याचें नांव काढूं नकोस. तूं आतांपर्यंत अडकून पडला असल्यामुळें भुकेला आहेस; तेव्हां अनायासानें भक्ष्य मिळावें ह्मणून सुटल्याबरोबर तूं चालविलेली ही माझी स्तुति ठीकच आहे. शिवाय तुला बायकामुलें आहेत. तुला माझ्याबरोबर पाहून तुझी आवडतीं बायकामुलें तुझ्यावर जरी प्रेमानें असलीं तरी मोठ्या खुषीनें मला कां बरें खाऊन टाकणार नाहींत? मी तुझ्याशीं संबंध करणार नाहीं. माझे उपकार स्मरत असशील तर माझें कल्याण चिंतीत रहा. तुझें कल्याण असो. मी चाललों. दुरून देखील तुला पाहून मी कांपतों आहे. जर मीं केलेले उपकार तूं स्मरत असशील तर भल्या मैत्रीला साजेलसें वाग. तुझ्या मनांत दुष्ट हेतु नसला तरी बलवानासंबंधानें मला भिऊनच असलें पाहिजे. वर सांगितल्याप्रमाणें जर तुझा स्वार्थ नसेल तर मी काय करूं सांग. प्राणाशिवाय सर्व कांहीं मी देण्याला तयार आहें. **पैसा किंवा बायकामुलें सुद्धां प्रसंगीं खर्ची घालून स्वतःचें रक्षण करून घ्यावें. आपल्या रक्षणामध्यें दक्ष असून कोणतीही गोष्ट विचारानें करणाऱ्यावर आपल्या चुकीनें कांहीं प्रसंग येत नाहीं.**' याप्रमाणें उंदरानें स्पष्ट रीतीनें केलेली निंदा ऐकून मां-

जर लाजून म्हणालें, 'मी तुझी शपथ घेऊन सांगतों कीं मित्रद्रोह फार निंद्य आहे. तूं शहाणा असून माझें हित पहाणारा आहेस. आतां नीतितत्त्वाला धरून आपल्यामध्यें फूट पडेल म्हणून तूं म्हणालास तरी माझ्यासंबंधानें असा भलता ग्रह ठेवणें तुला शोभत नाहीं. तूं मला प्राणदान दिल्यानें तुझ्यावर माझें प्रेम जडलें आहे. मला धर्म कळतो; मी गुण ओळखतों; शिवाय मी कृतज्ञ आहे; मित्रांशीं मी चांगला असून तुझ्यावर माझी भक्ति आहे. म्हणून तूंही माझ्याशीं असेंच वागावेंस हें चांगलें. तूं मला दोष देशील तर आपल्या बांधवांसह मी आपले प्राण ठेवणार नाहीं. आमच्यासारख्या विचारी लोकांवर शहाण्यांनीं विश्वास टाकला आहे. तेव्हां तुझ्यासारख्या धर्मतत्त्व कळणारानें अशी शंका घेऊं नये. याप्रमाणें त्या मांजरानें स्तुति केली असतांही निर्धाराचा पक्का असल्यानें तो उंदीर म्हणाला, 'तूं भला आहेस, मी तुझ्यावर संतुष्ट आहें. पण मला नीति ठाऊक असल्यानें मी तुझ्यावर विश्वास मात्र टाकणार नाहीं. तूं माझी कितीही जरी स्तुति केलीस अगर मला पैसा उचलून दिलास तरी मी आतां तुझ्या तावडींत सांपडणार नाहीं. मित्रा, शहाणे लोक विनाकारण शत्रूच्या तावडींत जात नाहींत. यासंबंधानें शुक्राचार्यांचें वचन ऐक. दोघांवर एकच प्रसंग आला असतां बलवान शत्रूशीं सख्य करून नीतितत्त्वाला धरून मोठ्या हुशारीनें असावें, व काम झाल्यावर मग त्यावर विश्वास टाकूं नये. विश्वास टाकण्याला लायक नाहीं अशावर विश्वास टाकूं नये व लायख असेल त्यावरही फार टाकूं नये. नेहमीं दुसऱ्याचा आपल्यावर विश्वास उत्पन्न करून घ्यावा, पण आपण दुसऱ्यावर विश्वासूं नये. साशंक राहिलें तर दुबळ्यांना सुद्धां शत्रूंच्या हातून मरण्याची पाळी येत नाहीं; तेंच विश्वास ठेवल्यानें बळवानांना सुद्धां दुबळ्यांच्या हातून मरण्याची पाळी येते. तुझ्यासारख्याची मला मोठी खबरदारी घेतली पाहिजे. तूंही चांडाळ जातीच्या दुष्टपणापासून आपला सांभाळ करून घे.' याप्रमाणें चांडाळाचें नांव घेतल्याबरोबर घाबरून तें मांजर ती फांदी सोडून दुसरीकडे निघून गेलें. तो उंदीरही याप्रमाणें आपल्या बुद्धीचा पगडा त्यावर बसवून तें बीळ सोडून दुसरीकडे गेला. याप्रमाणें दुर्बळ असून त्या शहाण्या उंदरानें आपल्या बुद्धिबलानें एकट्यानें पुष्कळ शत्रूंना दाद दिली नाहीं. तेव्हां सामर्थ्यवान अशा शत्रूंशीं सुद्धां सख्य करावें. याप्रमाणें क्षत्रधर्म मीं विस्तारानें सांगितला. याचें थोडक्यांत सार लक्षांत ठेव. जेव्हां एकमेकांचे जात्या वैरी असलेले दोघे परस्परांशीं सख्य करतात तेव्हां त्यांचा एकमेकांना फसविण्याचा इरादा असतो. त्यांमध्यें जो शहाणा असतो तो आपल्या बुद्धीच्या बळानें दुसऱ्याच्या हातावर तुरी देतो; किंवा शहाणा सुद्धां दुर्लक्षामुळें शहाण्यांकडून फसला जातो. म्हणून भिऊन राहून निर्भय असल्याप्रमाणें दाखवून, न विश्वासतां विश्वासल्यासारखें राहून जो सावध असतो त्याचें पाऊल कधीं चुकत नाहीं व चुकलें तरी त्यामुळें त्याचा घात होत नाहीं. प्रसंगीं शत्रूंशीं सख्य व मित्राशीं वैर करावें असेंच संधीचा विचार कळणाऱ्यांचें मत आहे. हें लक्षांत ठेवून प्रसंग ओळखून नेहमीं हुशार व प्रसन्न राहून भय येऊन पडण्याचें पूर्वी भ्याल्यासारखें असावें व परस्पर सख्य जुळवावें. प्रसंग पडला असतां नीट लक्ष पुरविल्यानें बुद्धि सुचते. भय येऊन पडण्याच्यापूर्वी जो भ्याल्यासारखा असतो त्याच्यावर प्रसंग गुदरत नाहीं. निर्भयपणें विश्वासून राहणारावर मोठें भय येऊन गुदरतें. जो नेहमीं निर्भय राहतो त्याला सल्ला द्यावा. **शहाण्यानें आपल्याला कळत नसेल तर शहाण्यांचा सल्ला घ्यावा. तेव्हां शहाण्यानें बचकून राहून न भ्याल्यासारखें दाखवावें व पुष्कळ विश्वास दाखवून कोणावर विश्वास टाकूं नये, मोठ्या प्रसंगाच्या वेळीं सुद्धां खोटें वर्तन ठेवूं नये.** तेव्हां वरील गोष्ट लक्षांत ठेवून मोठ्या शहाणपणानें मित्र कोण, शत्रू कोण, संधि करण्याची वेळ कोणती, सख्य करण्याची वेळ कोणती, सुटकेचा उपाय कोणता हें सर्व ओळखावें. एकमेकांचें काम एकमेकांकडे असतां बलवान शत्रूंशीं सुद्धां सख्य करून संबंध जडल्यावर मोठ्या हुशारीनें रहावें. काम झाल्यावर कोणावरही विश्वास टाकूं नये.'

---

## १३२ सूड व अविश्वास. ( १२. १३९. )

'विश्वास ठेवल्यापासून मोठें भय उत्पन्न होतें ह्मणून आपण सांगितलें, पण कोणावर विश्वास न टाकतां राजानें कसें वागावें व शत्रूंना जिंकावें तरी कसें,' म्हणून युधिष्ठिरानें विचारलें असतां भीष्म म्हणाले, 'यासंबंधानें राजा ब्रह्मदत्त व पूजनी पक्षिणि यांच्यामधील संवाद लक्षांत ठेव.

कांपिल्यामध्यें ब्रह्मदत्त राजाच्या अंतःपुरामध्यें पूजनी नांवाची एक पक्षीण फार दिवसपर्यंत रहात होती. चकोराप्रमाणें सर्व प्राणिमात्रांचें शब्दज्ञान तिला असून नीच योनींत जन्म होता तरी तिला सर्व शास्त्र कळत होतें. राजाच्या राणीबरोबरच तिला एक तेजस्वी मुलगा झाला. तीं दोन्ही मुलें पुष्ट व्हावींत म्हणून ती कृतज्ञ पूजनी समुद्रतीराला जाऊन बल व तेज वाढविणारीं दोन अमृततुल्य फळें नित्य नित्य त्यांना आणून देत असे. तें फळ खाऊन त्या राजपुत्राची वाढ चांगली झाली. तेव्हां दाईच्या कडेवरून तो राजपुत्र फिरत असतां त्यानें सहज तो पक्षी पाहिला. तेव्हां बालस्वभावामुळें त्याला एकटाच घेऊन खेळत असतां त्याला मारून तो फिरून दाईकडे आला. पुढें ती पूजनी फळें घेऊन आली असतां तिनें त्या राजपुत्रानें खालीं मारून टाकलेलें आपलें मूल पाहिलें. तेव्हां डोळे पाण्यानें भरून येऊन पुत्रशोकानें दुःखी होऊन ती ह्मणाली, 'क्षत्रियाबरोबर संबंध उपयोगी नाहीं, त्यावर प्रेम उपयोगी नाहीं किंवा त्याच्याशीं जिव्हाळा उपयोगी नाहीं. कामासाठीं हे गोड गोड बोलून काम सरलें कीं सोडतात. वाटेल त्यावर हत्यार उपसणाऱ्या क्षत्रियांवर विश्वास उपयोगी नाहीं. अपकार करून सुद्धां हे नेहमीं गोड गोड बोलतात. या कृतघ्न, दुष्ट व विश्वासघातकी राजपुत्राच्या अपराधानुरूपच मी आज त्याचा सूड घेतें. बरोबर उपजलेला, बरोबर वाढलेला, बरोबर खाणारा व त्याच्यावर अवलंबून असणारा अशा माझ्या मुलाला मारून ह्यानें तीन प्रकारचें पातक केलें आहे.' असें म्हणून आपल्या पायांनीं त्या राजपुत्राचे दोन्ही डोळे फोडून समाधान पावल्यावर ती ह्मणाली, 'मुद्दाम होऊन केलेल्या पापाचें फळ पाप करणाराला तात्काळ भोगावें लागतें. कोणी अपराध केला असतां त्याचा सूड उगविल्यानें कांहीं बाध येत नाहीं. प्रसंगीं पापाचें फळ जरी करणाराला भोगावें लागलें नाहीं तरी त्याच्या मुलांना, मुलांच्या व मुलींच्या मुलांना भोगावें लागतें.' ब्रह्मदत्तानें पूजनीनें आपल्या मुलाचे डोळे काढलेले पाहून त्याच्या कृत्याबद्दल तो सूड आहेसें जाणून तो पूजनीला ह्मणाला, 'पूजनी, आमच्या हातून अपराध झाला व तूं त्याचा मोबदला घेतलास. तेव्हां आतां हें जशासतसें झाल्यानें आतां तूं आमचेकडे रहा. जाऊं नकोस.' पूजनी ह्मणाली, 'अपराध करून मग तेथेंच फिरून निर्धास्त राहणें शहाण्यांना संमत नाहीं. मग तेथून पाय काढणेंच चांगलें. एखाद्याशीं वैर केल्यावर मग तो किती जरी गोड बोलला तरी त्यावर विसंबून राहूं नये. त्यावर विश्वास टाकून राहणारा लवकरच प्राणाला मुकतो. कारण वैर कांहीं कधीं शमत नाहीं. एकवार वैर जुळलें ह्मणजे परस्परांचे मुलगे, नातू यांचा सुद्धां फडशा पडून परलोकाला मुकावें लागतें. एकदां वैर जडलें ह्मणजे विश्वास न टाकतां राहणेंच कल्याणाचें आहे. विश्वास घातक्यावर कधीं विश्वास टाकूं नये. कारण विश्वास टाकल्यानें जें भय उत्पन्न होतें तें विश्वास टाकणाराचीं पाळेंमुळें खणून काढतें. आईबाप हे आप्तांपैकीं पहिल्या प्रतीचे आहेत; बायको ह्मटली ह्मणजे ह्मातारपणाला मूळ आहे; मुलगा ह्मटला ह्मणजे बीजापुरताच असून भाऊ वैरी आहे; व हात ओले राहीतोंपर्यंत मित्र. सुखदुःख भोगणारे आपण आपले एकटेच आहों. एकमेकांचे अपराध करून वैर जडल्यावर सख्य उपयोगाचें नाहीं; व आतां माझें येथें राहण्याचें कारणही सरलें. ज्यानें आपला अपराध केला आहे त्याचाच फिरून पैशानें व मानानें सत्कार होऊं लागला असतां त्याच्या मनांत शंका उत्पन्न होऊन दुबळ्यांना त्यापासून त्रास होतो. ज्या ठिकाणीं पूर्वी मान मिळाला असून पुढें अवमान झाला आहे तें ठिकाण मग शत्रूकडून मान मिळत असला तरी शहाण्यानें सोडावें. मी तुझ्या घरीं पुष्कळ दिवस बहुमानानें राहिलें. परंतु आज हें वैर उत्पन्न झाल्यानें मी आतां एकदम जातें.' ब्रह्मदत्त ह्मणाला, 'अ-

पराधाबद्दल जो सूड घेतो तो त्याबद्दल दोषी होत नाहीं. त्यापासून तो ऋणमुक्तच होतो. तेव्हां तूं खुशाल आतां येथें रहा.' पूजनी ह्मणाली, 'असें जरी आहे तरी अपराध करणारा व ज्याचा अपराध केला आहे त्यांमध्यें सख्य कधीं जुळत नाहीं. दोघांचें अंतःकरणच त्याला साक्ष देत असतें.' ब्रह्मदत्त ह्मणाला, 'अपराध करणारा व सूड घेणारा यांच्यामध्यें वैर मिटून सख्य जुळल्याची व फिरून कोणाच्या मनांत पाप न आल्याचीं पुष्कळ उदाहरणें आहेत.' पूजनी ह्मणाली, '**वैर कधीं शमत नाहीं**, व दुसरा गोड बोलला ह्मणून कधीं त्यावर विश्वास टाकूं नये, विश्वासानें मनुष्य जाळ्यांत सांपडतो ह्मणून एकमेकांचें फिरून दर्शन नसावें हेंच बरें. बळानें अगर तीक्ष्ण शस्त्रानें ज्यांना धरतां येत नाहीं तें जसे हत्तीणीकडून हत्ती तसे गोड शब्दांनीं धरले जातात.' ब्रह्मदत्त ह्मणाला, 'जीव घेणाऱ्यांच्या ठिकाणीं सुद्धां सहवासानें परस्पर स्नेह जडतो याला उदाहरण चांडाळ व त्याचा कुत्रा हें आहे. एकमेकांनीं एकमेकांचा अपराध केला असतांही सहवासानें वैर मऊ पडून कमलावरच्या पाण्याप्रमाणें रहात नाहीं.' पूजनी ह्मणाली, 'बायकोसाठीं जमिनीसाठीं, लागून बोलल्यामुळें, परस्पर स्वाभाविक शत्रुभावामुळें व एकमेकांची खोडी काढल्यामुळें अशा पांच प्रकारांनीं वैर जडत असतें. शिवाय क्षत्रियानें विशेषेंकरून दात्याला उघड ह्मणा किंवा चोरून ह्मणा मारूं नये; व हातून अपराध झाला असतां त्याचा नीट विचार करावा. एकदा वैर जडल्यावर मग त्या मित्रावर सुद्धां विश्वास टाकूं नये. लांकडामध्यें झांकून असलेल्या अग्नीप्रमाणें वैर झांकून असतें. पैशानें, खरमरीत कान उघाडणीनें, किंवा गोड शब्दांनीं समुद्रांतील वडवानळाप्रमाणें वैराग्नि कधीं थंड पडत नाहीं. **एकमेकांच्या अपराधामुळें पेट घेतलेला वैराग्नि जाळून दोघांपैकीं एकाचा फडशा पाडल्यावांचून कधीं निवत नाहीं.** एखाद्यानें प्रथम आगळिक करणाराचा जरी पैशानें व मानानें सत्कार केला तरी त्यानें मित्राप्रमाणें त्यावर कधीं विश्वास टाकूं नये. हें, काम दुर्बळाला शेवटीं त्रासाला कारण होतें. आजपर्यंत मीं तुझा किंवा तूं माझा अपराध केला नसल्यानें मी तुझ्यावर विश्वासून होतें. आतां ती स्थिति बदलली असल्यानें माझा तुझ्यावर विश्वास नाहीं.' ब्रह्मदत्त ह्मणाला, 'काळ सर्व कांहीं करीत असतो; काळाच्या अनुरोधानें सर्व गोष्टी घडत असल्यानें ह्या जगांत कोण कोणाचा अपराध करतो? जन्ममरणाची गोष्ट सुद्धां अशीच आहे. काळ आला असतां जन्म होतो व काळ येतो तेव्हांच मरण येतें. कांहीं एकदम मरतात, कांहीं एक एक मरतात व कांहीं पुष्कळ दिवस जगतात. सर्पणाशीं संबंध झाला असतां विस्तव ज्याप्रमाणें त्याला जाळून टाकतो त्याप्रमाणें काळच सर्वांना गाठून नाहींसा करतो. तेव्हां माझ्या दुःखाला तूं किंवा तुझ्या दुःखाला मी कारण नसून काळच सर्वांचीं सुखदुःखें ठरवून ठेवतो. ह्मणून तूं येथें स्नेहपूर्वक खुशाल रहा. तूं केलेलें मी विसरलों आहे व माझें तूं विसर.' पूजनी ह्मणाली, 'तुझ्या ह्मणण्याप्रमाणें काळच जर सर्व कर्ता करविता आहे तर कोणी कोणाचें वैर करण्याचें कारण नाहीं. मग लोक आपल्या आप्तइष्टांना मारल्याबद्दल सूड कां घेतात? जर काळानें सुखदुःख, जन्ममरण यांचा निर्णय होत असेल तर देव व असुर यांनीं तरी एकमेकांना कां मारलें? मग वैद्य रोग्याला औषध तरी कशाला देतात? काळाच्या योगानेंच जर सर्व शिजत आहे तर मग औषधाचें काय काम व लोक शोकानें वेडे बनून इतका आक्रांत तरी कशासाठीं करतात? तसेंच काळ हाच जर सर्व कर्ता, करविता असेल तर पुण्य कर्म करणारांना त्याचें फळ तरी कां मिळावें? तुझ्या मुलानें माझ्या मुलाला मारलें, मीं त्याला मारलें, उलट तूं मला मारावेंस हें साहजिकच आहे. पुत्रशोकानें माझ्या हातून पाप घडून गेलें. आतां तूं कां मला मारावेंस सांगतें ऐक. मनुष्यांना पक्षी एक खेळण्यासाठीं किंवा खाण्यासाठीं हावे असतात. त्यांना मारणें किंवा कैदेंत ठेवणें यावांचून दुसरा कोणताही हेतु असणें शक्य नाहीं; व या दोन भीतीमुळेंच पक्षी सुटूं पहात असतात. मरणाचें दुःख फार कठीण असून ज्याला त्याला आपले प्राण तसेच मुलगे प्यार असतात. दुःख ह्मणजे सर्वांना कांपरें भरतें; सर्वांना सुख हावें असतें. ह्मातारपण, पैसा नाहींसा होणें, नकोसा असल्याशीं संबंध, पा-

हिजे असल्याचा वियोग, ह्या सर्व गोष्टी दुःखाला कारण आहेत. त्याचप्रमाणें मरण, बंधन, स्त्रिया, किंवा कांहीं स्वाभाविक गोष्टी दुःखाला कारण होत असतात. मुलामुळें होणारें दुःख मनुष्याला नेहमीं पिळून घेत असतें. दुसऱ्याच्या दुःखापासून दुःख कसचें ह्मणून मूर्ख लोक ह्मणतात. ज्याला दुःखाचा अनुभव नाहीं तोच लोकांत अशी वडबड करतो. ज्याला दुःखानें पिळून घेतलें आहे त्याच्या तोंडांतून असें कसें निघेल? **ज्याला सर्व दुःखांची ओळख पटली आहे तो आपल्याप्रमाणेंच दुसऱ्याचें दुःख समजत असतो.** तुझ्या हातून माझें जें झालें आहे किंवा माझ्या हातून तुझें जें झालें आहे तें शंभर वर्षांनीं सुद्धां पुसलें जाणें शक्य नाहीं. याप्रमाणें एकमेकांची आपण खोडी काढली असल्यानें आपणामध्यें सख्य जुळणें शक्य नाहीं. मुलाची आठवण होऊन होऊन तुझें वैर वाढत राहील. वैर उशाशीं बाळगून जो प्रीति करूं पाहतो त्याच्या हातून फुटलेल्या मडक्याप्रमाणें तें सांधलें जाणें शक्य नसतें. **विश्वास दुःखाला कारण होतो हें नीतिशास्त्रांचें तत्व ठरलें आहे.** या बाबतींत शुक्राचार्यांनीं प्रल्हादाला सांगितलें आहे कीं, वैरी खऱ्या भावाचा असो किंवा खोट्या भावाचा असो जो त्यावर विश्वास टाकतो तो, मधावर नजर देऊन चाललेल्याला ज्याप्रमाणें वरचेवर वाळक्या गवतांनीं झांकलेल्या खड्यांत पडण्याची पाळी येते त्याप्रमाणें, पेंचांत सांपडतो. सबंध कुळाचा फडशा पाडल्यानें सुद्धां वैर शमत नाहीं. कारण कुळांत एखादा पुरुष जरी जिवंत असला तरी त्याला मागची गोष्ट सांगणारे भेटतात. राजे लोक सख्य करून गोडीनें राहून वैर शमवितात; पण वेळ आली ह्मणजे वैऱ्याला भरल्या घड्याप्रमाणें दगडावर आपटून चिरडतात. राजानें एखाद्याची खोडी काढून मग त्यावर विश्वास टाकूं नये. दुसऱ्याचा अपराध करून विश्वास टाकल्यानें तें दुःखाला कारण होतें.' ब्रह्मदत्त ह्मणाला, 'अविश्वासापासून कांहीं लाभ न होतां उलट आपले उद्देशही साधत नाहींत. नेहमीं भयानें त्याला मेल्यासारखें रहावें लागतें.' पूजनी ह्मणाली, 'पायाला इजा झाली असून जो चालण्याचा प्रयत्न करतो तो किती सावधपणें चालला तरी ठेंचळल्यावांचून रहात नाहीं, डोळ्याला इजा झाली असून जो वाऱ्यासमोर दृष्टि देतो त्याच्या डोळ्याला तो वारा फारच झोंवतो. आपलें सामर्थ्य न जाणतां भलत्या वाटेला लागून त्याच वाटेनें जाण्याचा जो आग्रह धरतो त्यामध्येंच त्याचा शेवट ठरला आहे. प्रयत्नामध्यें कमी असा जो शेतकरी पावसाची वेळ न कळतां शेत नांगरतो त्याच्या कधीं धान्य हातीं येत नाहीं. जो नेहमीं मधुर व हिताचें खाणें मग तें तिखट असो, कडू असो किंवा गोड असो खात असतो त्याला तें अन्न अमृततुल्य होतें. पथ्याचें सोडून जो मूर्खपणानें परिणामाकडे लक्ष न देतां अपायकारक अन्न खातो त्याचा त्यांतच शेवट होतो. **दैव व प्रयत्न हीं एकमेकांच्या आश्रयानें असतात.** थोर असतात ते प्रयत्नाच्या मागें असतात; व जे दुबळे असतात ते दैवावर अवलंबून राहतात. आपल्या हिताची गोष्ट मग ती तीक्ष्ण असो वा सौम्य असो ती करावी. **हातपाय बांधून घेऊन बसणारा दरिद्री संकटांनीं ग्रासला जातो.** ह्मणून सर्व गोष्टी बाजूला ठेवून आपलें सामर्थ्य दाखवीत असावें. **सर्वांवर पाणी सोडून आपलें हित करून घ्यावें; विद्या, शौर्य, हुशारी, बळ व धैर्य हे पांच स्वाभाविक मित्र असून शहाणे लोक या जगांत त्यांच्या अनुरोधानें आयुष्यक्रम काढतात. घर, जडजवाहिर, जमीन, बायको व जिव्हाळ्याचे लोक हीं उपसाधनें असून वाटेल त्या ठिकाणीं मिळूं शकतात.** शहाणा मनुष्य वाटेल तेथें रमून पुढें येतो. कोणाला हा भिवडावीत नाहीं व कोणी भिवडाविलें असतां भीत नाहीं. शहाण्याजवळ पैसा किती थोडा असला तरी तो वाढत जातो. तो सर्व कामें मोठ्या हुशारीनें करतो व आत्मनिग्रहामुळें त्याची मोठी कीर्ति वाढते. खेकड्याचीं पोरें ज्याप्रमाणें आईला खाऊन टाकतात त्याप्रमाणें जे **कोत्या बुद्धीचे लोक घरावर प्रेम धरून घर सोडीत नाहींत, त्यांना त्यांच्या कजाग बायका खाऊन टाकतात, कोणी माझें घर म्हणून, कोणी माझें शेत ह्मणून, कोणी माझे मित्र ह्मणून, कोणी माझा देश ह्मणून बुद्धीला भुरळ पडून घरांत कुजत रहा-**

तात. रोग व दुष्काळ यांनीं काहूर आणून सोडलें असेल तर आपल्या देशांतून एकदम बाहेर पळ काढून दुसऱ्या ठिकाणीं रहाण्याला जावें. स्वदेशीं जर बहुमान असेल तरच रहावें. ह्मणून मी आतां दुसरीकडे जातें. येथें आतां रहाण्याला धीर होत नाहीं. तुझ्या मुलासंबंधानें माझ्या हातून फार वाईट कृत्य घडलें आहे. वाईट बायको, वाईट मुलगा, वाईट राजा, वाईट सख्य, वाईट संबंध, वाईट देश हीं सोडून दूर जावें. वाईट मुलावर विश्वास रहात नाहीं. वाईट बायकोवर प्रेम कोठून असणार? वाईट राज्यांत सुख नाहीं व वाईट देशांत जिवाचीच शाश्वती नसते. नेहमीं ज्याचें प्रेम चंचळ असणार अशा वाईट मित्राशीं संगति कसची? वाईट संबंध केल्यानें पडता काळ आला असतां अवमान होतो. जी गोड बोलते तीच बायको; ज्यापासून सुख होतें तोच मुलगा; ज्यावर विश्वास टाकतां येतो तोच मित्र; व जेथें जगतां येतें तोच देश. ज्या ठिकाणीं बलात्कार नाहीं तेथें भीतीचें नांव नसतें, व जो कडक अम्मल ठेवून गरिबांना पाळण्याची इच्छा धरतो त्या राजाशींच पाल्यपालक संबंध योग्य. बायको, देश, मुलगे, मित्र, संबंधी, आप्त, इष्ट, हे सर्व राजा गुणवान असून धर्माकडे नजर देणारा असला म्हणजे ठीक असूं शकतात. राजा अधर्मी असेल तर त्याच्या जुलमानें प्रजा लयाला जाते. धर्मार्थकामांना मूळ राजा असल्यानें त्यानें मोठ्या हुशारीनें प्रजापालन केलें पाहिजे. सहावा हिस्सा कर घेऊन तो गिळून बसून जो प्रजेचें बरोबर रक्षण करीत नाहीं, तो राजा चोरच समजावा. प्रजांना आश्रय देऊन पैशाच्या लोभामुळें जो स्वतः आपलें वचन जुमानीत नाहीं, त्याच्या माथीं सर्व लोकांचें पाप बसून तो अधर्मबुद्धि राजा नरकाला जातो. प्रजेला अभय देऊन व स्वतः त्याप्रमाणें वागून जो राजा धर्मानें प्रजा पाळतो तोच प्रजेला पूर्ण सुख देणारा समजावा. आई, बाप, गुरु, पालक, अग्नि, कुबेर, व यम या सातांचे गुण राजामध्यें पाहिजेत असें मनूनें ह्मटलें आहे. जो प्रजेवर दया करतो तो राजा राष्ट्राचा बाप होय. अशा राजाशीं खोटेपणानें वागणारा मनुष्य पुढील जन्मीं हलक्या योनींत जन्मतो. आईप्रमाणें हा राजा प्रजेचें कल्याण करून गरिबांची काळजी घेत असतो. अग्नीप्रमाणें दुष्टांना तो जाळून टाकून यमाप्रमाणें तो त्यांना वाटेवर ठेवतो. कुबेराप्रमाणें आवडत्यांना तो पैसा देतो. प्रजेला चांगला उपदेश देत असल्यानें हा त्यांचा गुरु होतो व त्यांचें पाळण केल्यानें हा त्यांचा पालक होतो. आपल्या राष्ट्रांतील सर्व लोकांना जो आपल्या गुणांनीं रंजवितो त्याचें राज्य धर्म राखल्यानें डळमळत नाहीं. प्रजेचा बहुमान कसा करावा हें ज्या राजाला कळतें तो इहपर सुख मिळवितो. कराच्या ओझ्याखालीं दबून जाऊन ज्याची प्रजा नेहमीं उद्विग्न असते त्या राजावर अनर्थ कोसळून त्याचा मोड होतो. सरोवरांतील कमळाप्रमाणें ज्याची प्रजा भरभराटीला चढत असते त्याला सर्व सुख मिळून स्वर्गीं त्याचा जयजयकार होतो. बळवानांशीं तंटा कधीं करूं नये. बळवानांशीं कंबर बांधल्यावर राज्य कसचें व सुख कसचें? असें ह्मणून ब्रह्मदत्ताचा निरोप घेऊन ती पक्षीण निघून गेली.'

## १३३ कुटिल नीति. (१२. १४०)

युग सरतेवेळीं धर्मलोप होऊन चोरांनीं भंडावून सोडलें असतां राजानें कसें वागावें ह्मणून युधिष्ठिरानें फिरून विचारलें असतां भीष्म म्हणाले, अशा प्रसंगीं राजानें दयामाया सर्व बाजूला ठेवून वागावें. यासंबंधानें सौवीर देशाच्या शत्रुंजय राजानें भारद्वाजांकडे जाऊन 'न मिळालेलें मिळवावें कसें, मिळविलेलें वाढवावें कसें, वाढविलेलें राखावें कसें, व राखलेले खर्चावें कसें,' म्हणून विचारलें असतां त्यांनीं त्याला जें उत्तर दिलें तेंच तुला सांगतों ऐक. नेहमीं दंड उगारून राहून आपला पराक्रम दाखवीत असावें. आपल्यामध्यें कांहीं उणीव न ठेवतां शत्रूचें उणें पहात रहावें; व छिद्र पाहून हात शिरकवावा. नेहमीं जो दंड तयार ठेवून असतो त्याला लोक भीत असतात. ह्मणून सर्वांना दंडानें ताब्यांत आणावें. नीतितत्त्व ओळखणारे शहाणे दंडाचा असा महिमा सांगतात. ह्मणून सामदामादि जे चार प्रकार आहेत त्यांत दंडच विशेष गुणकारी आहे.

झाडाचें मूळच कापून काढलें तर सर्व फांयांचें जीवन काढून घेतल्यासारखें होतें. झाडाचें मूळ तोडल्यावर फांद्या कशा राहणार? ह्मणून शहाण्यानें शत्रुपक्षाच्या मुळाशींच आधीं घाव घावा, व त्याच्याच अनुरोधानें पुढें तत्पक्षी व साहाय्यकारी यांना जिंकावें. प्रसंग आला असतां त्याप्रमाणें उत्तम सल्ला घेणें, चांगला पराक्रम गाजविणें, नेटानें युद्ध करणें किंवा एकदम पळ काढणें जें कांहीं करणें असेल तें एकदम करावें. विचार करीत बसूं नये. तोंडानें मोठें गोड असून हृदय वस्तान्याप्रमाणें तीक्ष्ण ठेवावें. कामक्रोधांच्या तावडींत जाऊं नये. शत्रूशीं मिळून एखादें काम साधून घ्यावयाचें असल्यास त्याबरोबर सख्य करावें, पण त्यावर विश्वास टाकूं नये. आपलें काम झाल्याबरोबर शहाण्यानें त्यापासून दूर व्हावें. मित्ररूपी शत्रूशीं वरून गोडीनें राहून साप असलेल्या घराप्रमाणें नेहमीं त्यापासून भिऊन असावें. मागच्या गोष्टी सांगून गोड गोड बोलून त्याच्या बुद्धीला भूरळ पाडावी; तो मूर्ख असेल तर पुढच्या गोड गोड थापा देऊन त्याला भुलवावें; व तो शहाणा असेल तर सद्यःस्थितीचें चित्र त्याच्या पुढें ठेवून त्याला आपलासा करून घ्यावा. हात जोडून, शपथ घेऊन, डोकें लववून, गोड बोलावें. एवढेंच नव्हे, तर वैभव पाहिजे असेल तर डोळ्यांतून टिपें सुद्धां ढाळावीं. प्रसंग असे तोंपर्यंत शत्रूला खांद्यावर सुद्धां वहावें. वेळ आलीशी पाहून दगडावर फोडून टाकावयाच्या मडक्याप्रमाणें त्याचा चुराडा उडवावा. **टेंभुरणीच्या कोलतीप्रमाणें क्षणभर कां होईना चमकलेलें चांगलें, पण ज्वालेवांचून उगीच धुमसत राहणाऱ्या कोंड्यांतील धगीप्रमाणें उगीच पुष्कळ दिवस धुमसत राहण्यांत कांहीं अर्थ नाहीं. अनेक प्रसंग ज्याला आहेत त्यानें कृतघ्नाबरोबर कांहीं कामामध्यें संबंध ठेवूं नये.** एखाद्याचें काम आहे तोंपर्यंत आपल्याला त्याचा वाटेल तसा उपयोग करून घेतां येतो खरा; पण काम झाल्यावर तो आपल्याला मानीत नाहीं. ह्मणून दुसऱ्याचें कोणतेंही काम पूर्णपणें करून न टाकतां त्यांत बाकी ठेवावी. कोकिला, डुक्कर, मेरू, रितें घर, नाटकी व भक्तिमान मित्र यांचें अनुकरण करून राजानें आपल्या कल्याणाचें असेल तें करीत रहावें. नेहमीं नेहमीं शत्रूकडे जाऊन वाईट झालें असलें तरी मोठ्या कळकळीनें त्याचें कुशल विचारीत असावें. **जे आळशी असतात, दुबळे असतात, अभिमानी असतात लोकांच्या हाकाटीला भितात किंवा सदा सर्व काळ विचार करीत राहतात त्यांना आपलें काम साधून घेतां येत नाहीं. आपलें छिद्र शत्रूला कळू देऊं नये पण शत्रूचें छिद्र आपल्याला माहीत असावें.** कांसवाप्रमाणें आपलें अंग लपवून घेऊन आपलें छिद्र झांकून ठेवावें. बगळ्याप्रमाणें काय करावयाचें याचा विचार करून ठेवून सिंहाप्रमाणें पराक्रम गाजवावा, व लांडग्याप्रमाणें दबून राहून बाणाप्रमाणें शत्रूचा चुराडा उडवावा. मद्यसेवन, जुगार, बायका, शिकार, गाणेंबजावणें यांकडे बेताबातानें लक्ष ठेवावें. यांच्या नादीं लागणें हानिकारक आहे. धनुष्य तृणमय करून हरणाप्रमाणें गप्प पडून असावें. प्रसंगीं डोळे मिटून असावें. एवढेंच नव्हे तर न ऐकल्यासारखें सुद्धां करावें. शहाण्यानें प्रसंग, वेळ पाहून पराक्रम गाजवावा. प्रसंग वेळ निघून गेल्यावर पराक्रम फुकट जातो, वेळ, अवेळ बलाबल ओळखून आपलें व शत्रूचें बळ पाहून मग झुंजण्याला तयार व्हावें. दंडानें वठणीला आणलेल्या शत्रूला जो दाबून टाकीत नाहीं तो खेकडीच्या गर्भाप्रमाणें मृत्यूलाच निमंत्रण देतो. **चांगलें फुलून राहून फळ दाखवूं नये, फळ दाखविलें तरी सहज हातीं लागूं देऊं नये, पिकल्यसारखें दाखवून कडक राहवें, व कशाही प्रसंगानें वठून पडूं नये.** लांबलांबच्या आशा दाखवून त्याला मध्यें कांहीं अडचणी दाखवाव्या व सकारण अडचणी सांगून त्यांना कारणें लावावीं. भय येऊन पडलें नाहीं तोंपर्यंत भ्याल्यासारखें रहावें; परंतु प्रसंग येऊन गुदरल्यावर न कचरतां घाव घावा. **संकटाला तोंड दिल्यावांचून मनुष्य चांगले दिवस पहात नाहीं.** संकटाला तोंड दिल्यानें त्यांतून वांचल्यास त्याला चांगले दिवस दिसतात. राजानें पुढच्या संकटासंबंधानें विचार करीत राहून आलेलीं संकटें दूर करावीं व तीं दूर केल्यावरसुद्धां दूर झालीं नाहींत असेंच समजून त्यांसंबंधानें खबरदारी ठे-

वावी. वाढून आलेलें सुख लाथाडून पुढच्या सुखाची आशा करीत बसणें ही कांहीं शहाण्याची नीति नव्हे. जो शत्रूशीं तह करून त्यावर विश्वासून सुखांत झोंप घेतो तो झाडाच्या शेंड्याला निजलेल्या मनुष्याप्रमाणें खड्ड्यांत पडल्यावर जागा होतो. प्रसंगांत सांपडल्यावर घोर ह्मणा अगर मऊ ह्मणा उपाय करून आपल्याला त्यांतून वर काढून घ्यावें व सामर्थ्य आल्यावर मग धर्मानें रहावें. शत्रूचे जे शत्रू असतील त्यांची बरदास्त ठेवावी. आपल्या हेरांना सुद्धां शत्रूंनीं मथविलें आहे असें धरून चालावें. आपल्याला किंवा शत्रूला ओळखतां येऊं नये असें हेरांना स्वरूप द्यावें. त्यांना भोंदूंचा व तापसांचा वेष देऊन परराष्ट्रांतून पाठवावें. बागा, विहाराच्या जागा, पाणपोई, मठ, गुत्ते, वेशी, तीर्थाचीं ठिकाणें, सभा अशा ठिकाणांतून कंटकप्राय धर्मलंड, दुराचारी भुरटे जमत असतात. त्यांना ओळखून वाटेवर आणावें. विश्वासाला पात्र नाहीं अशावर विश्वास टाकूं नये व पात्र असणारावरही फाजील विश्वास टाकूं नये. विश्वास टाकल्यापासून संकट ओढवतें. मनुष्याची पारख केल्यावांचून त्यावर विश्वास टाकूं नये. त्याच्याच फायद्याची आशा दाखवून शत्रूचा आपल्यावर विश्वास बसवून घ्यावा; व त्याचा इकडे तिकडे जरा पाय चळला कीं त्याच्यावर घाव देण्याला चुकूं नये. ज्याच्यासंबंधानें शंकेला जागा नाहीं अशा संबंधानें सुद्धां साशंक राहून संशयी मनुष्यासंबंधानें नेहमींच शंकित असावें. ज्याच्यासंबंधानें आपण निःशंक रहातों अशापासून उद्भवणारें भय आपला समूळ घात करतें. धर्माकडे लक्ष, मौन वगैरे दाखवून भगवीं वस्त्रें, जटा, कातडीं इत्यादिकांनीं आपल्या द्वेष्ट्यांचा आपल्यावर विश्वास उत्पन्न करून घेऊन लांडग्याप्रमाणें त्यावर झाप टाकावी. आपल्या हेतूंच्या आड येणारा मग तो मुलगा असो, बाप असो, भाऊ असो किंवा मित्र असो वैभवाला चढूं पहाणाऱ्यानें त्याला ठार करावें. कार्याकार्य न ओळखता ताठेरपणानें आडवाटेला जाणारा मग तो गुरु असला तरी त्याला दंड हीच शिक्षा आहे. ज्याप्रमाणें कांहीं पांखरें आपल्या तीक्ष्ण चोचींनीं झाडावरचें फूलनाफूल व फळनाफळ नासून टाकतात, त्याप्रमाणें आदरसत्कार, मान, लाचलुचपत यांनीं शत्रूला जवळ करून त्याच्या सर्व आशेचा बीमोड करून टाकावा. भयंकर कर्म करून शत्रूच्या मर्मस्थळावर घाव देऊन धीवराप्रमाणें त्याचा प्राण घेतल्यावांचून मनुष्य वैभवाला चढावयाचा नाहीं. स्वभावतःच कोणी कोणाचा मित्र किंवा कोणी कोणाचा शत्रु नसतो. प्रसंगाच्या जोरावर लोक मित्र किंवा शत्रू होत असतात. शत्रु किती जरी दांत किरकला तरी त्याला सोडूं नये. पूर्वी अपकार केलेल्या वैऱ्याला मारण्याबद्दल वाईट अगदीं वाटून घेऊं नये. प्रजेपैकीं कोणाचा हेवा न करतां लोक आपल्याकडे मिळवून घेऊन त्यांवर अनुग्रह करण्यामध्यें राजानें दक्ष असावें, व ज्यांना शिक्षा केली पाहिजे त्यांना शिक्षाही करावी. शत्रूवर घाव देण्याचा विचार असतां त्याच्याशीं गोड बोलावें व घाव दिल्यावर सुद्धां गोडच असावें. तलवारीनें मुंडकें छाटून सुद्धां वाईट वाटलेंसें दाखवून रडावें. गोड शब्दांनीं, सन्मान देऊन सहनशीलतेनें राजानें लोकांना आपल्याकडे वळवून घ्यावें. शुष्क वैर माजवून मनगटाच्या जोरावर नदी तरून जाण्याच्या भानगडींत पडूं नये; गाईचें शिंग चावत बसणें मनुष्यपणाला साजेलसें नसून अनर्थकारक आहे. उगीच दांत दुखावून रस कांहीं त्यापासून मिळत नाहीं. धर्मार्थकामांशीं जखडलेले तीन गुण व तीन अवगुण आहेत. पैकीं अवगुण टाकून गुण घ्यावेत. कर्जाची बाकी, विस्तवाची बाकी व शत्रूची बाकी ह्या तीन बाक्या शिल्लक ठेवल्यानें वाढत जातात. ह्मणून यांची बाकी ठेवूं नये. वाढणारें कर्ज, पराभव करून राखलेले शत्रु व हयगय केलेले रोग मोठा भयंकर प्रसंग आणून सोडतात. भलती गोष्ट न करतां नेहमीं हुशारीनें असावें. कांटासुद्धां चांगला उपसून काढला नाहीं तर फार वेळ इजा देतो. लोक मारून, रस्ते मोडून, व घरें पाडून परराष्ट्राचा धुव्वा उडवून द्यावा. गिधाडासारखी नजर ठेवून बगळ्यासारखें टपून असावें, व कुत्र्याप्रमाणें हालचाल ठेवून सिंहाप्रमाणें शौर्य दाखवावें. तसेंच कावळ्याप्रमाणें संशयित राहून न कचरतां सापाप्रमाणें कृति ठेवावी. शूर असेल त्याच्यापुढें हात जोडून, भितरा असेल त्याला

धमकी दाखवून, लोभ्याची मूठ दाबून फितूर करावा व आपल्या तोडीचा असेल त्याला दोन हात दाखवून सामना द्यावा. **निरनिराळ्या जातींमधील मुख्यामध्यें फूट पाडून आपल्या मर्जींतील असतील त्यांना खुष ठेवावें.** व मंत्रीमंडळ न फुटेल किंवा एकत्र मिळून आपल्यावर न उठेल अशी खबरदारी घ्यावी. मऊ असल्यानें अवमान होतो. व कडक असल्यानें लोक कांपतात ह्मणून कडक असण्याचे वेळीं कडक असावें व मऊ असण्याचे वेळीं मऊ असावें. मृदूनेंच मृदूचा फडशा पाडावा. मोठमोठ्यांचा सुद्धां मऊ उपायानें फडशा पडतो. **मृदूला असाध्य कांहींच नाहीं.** ह्मणून मृदूला तीक्ष्णाहून तीक्ष्ण समजलें आहे. प्रसंगीं कडक असून प्रसंगीं जो मऊ होतो तो सर्व कांहीं साधून घेऊन शत्रूवर वर्चस्व मिळवितो. शहाण्याशीं विरोध करून त्याच्यापासून दूर आहे ह्मणून कधीं निश्चिंत असूं नये. कारण शहाण्याचे हात फार लांब असून त्यांनीं तो दुखविणाराला ठार करतो. जें तरून जातां यावयाचें नाहीं तें तरण्याच्या खटपटीमध्यें पडूं नये; जें पचवितां येणार नाहीं तें उपटण्याच्या भानगडींत पडूं नये; ज्याचें मूळ काढून टाकतां येणार नाहीं अशा खणण्याच्या नादीं लागूं नये व ज्याचें मुंडकें उडवितां येणार नाहीं अशाला घाव देण्याच्या भानगडींत पडूं नये. या वर सांगितलेल्या दुष्ट गोष्टी भल्या मनुष्यानें अमलांत आणूं नयेत. परंतु दुसऱ्यानें यांचा प्रयोग केला असतां तें कळून कसें वागावें एवढ्यासाठींच ह्या सांगितल्या आहेत.'

## १३४ दुष्काळच्या वेळचा शिष्टाचार.

## (१२.१४१)

यावर धर्मराजानें विचारलें, 'श्रेष्ठ धर्म नष्ट होऊन जेव्हां सर्व लोक तो मोडूं लागतात, अधर्माला धर्माचें स्वरूप येऊन धर्माला अधर्माचें स्वरूप येतें, धर्मनिश्चय डळमळीत होऊन सर्व मर्यादा मोडून जातात, राजे व परकीय यांच्या पीडा होऊं लागून सर्वाश्रमी लोकांचीं यथायोग्य कर्में लुप्त होतात, व ते बुद्धिभ्रष्ट होऊन काम, लोभ व मोह यांच्या तावडींत गेल्यानें त्यांना जिकडे तिकडे भय दिसूं लागतें, व कोणाचा कोणावर विश्वास बसत नाहीं, लुच्चेगिरीनें लोक एकमेकांना मारूं लागतात किंवा फसवूं लागतात, पाऊस न पडतां देशांमध्यें जिकडे तिकडे आगी लागून ब्राह्मणांना पीडा होऊं लागते, व आपसांत दुही माजून राहते, अशा कठीण प्रसंगीं ममतेमुळें मुलाबाळांना सोडण्याचा ज्याला धीर होत नाहीं अशा ब्राह्मणानें कसें वागावें, व याप्रमाणें लोक बिघडून गेले असतां राजा तरी कशा रीतीनें वागला असतां धर्मार्थापासून भ्रष्ट होणार नाहीं?'

भीष्म म्हणाले, '**प्रजेचें योगक्षेम न चालणें, चांगला पाऊस न पडणें, प्रजेमध्यें रोगराई उत्पन्न होऊन मरण येणें व नाना प्रकारच्या भयांनीं त्यांना घेरून सोडणें ह्या सर्वांना राजा कारण आहे.** कृत, त्रेता, द्वापार, कलि ह्या सर्व युगांच्या मुळाशीं राजा आहे. अशी वाईट वेळ आली असतां मनुष्यानें आपल्या ज्ञानाच्या बळावर राहिलें पाहिजे. यासंबंधानें चांडाळवाड्यांत विश्वामित्र ऋषी व चांडाळ यांमध्यें झालेलें भाषण लक्षांत ठेवण्याजोगें आहे तें ऐक.

त्रेता व द्वापर यांच्या संधीच्या वेळीं प्रजा फार वाढून दैवयोगानें बारा वर्षें पाऊस न पडतां दुष्काळ पडला होता. गुरूची उलट गति होऊन चंद्र आपली कक्षा सोडून दक्षिणेला वळला. धुक्याचें सुद्धां नांव नाहींसें झालें होतें. मग ढगाची गोष्ट राहिली बाजूला. नद्यांचें प्रवाह आटून जाऊन त्यांचे ओढे बनले. ह्या दैविक प्रसंगामुळें सरोवरें, नद्या, विहिरी, झरे यांचें स्वाभाविक सौंदर्य जाऊन त्यांचा मागमूस नाहींसा झाला. पाण्याचीं ठिकाणें कोरडीं पडल्यामुळें सर्व पाणपोया उठून गेल्या. यज्ञ व अध्ययन बंद पडून वषट्कार वगैरे मंगल कार्यें बंद पडलीं. शेती व गुरें यांचा फडशा पडून बाजार व दुकानें सर्व उठून गेलीं. यज्ञाचे खांब व दुसरीं यज्ञद्रव्यें गोळा करण्याच्या कोणी नादीं पडेना. उत्सव सर्व बंद पडले. जिकडे तिकडे हाडांचे ढीग दिसूं लागून एकच हाहाकार उडून राहिला. शहरेंच्या शहरें ओसाड पडून गांवांतील सर्व घरांचा जळून फडशा पडला. कोठें दरवडेखोरांनीं तर कोठें हत्यारांनीं, कोठें वाईट राजांनीं तर कोठें एकमेकांच्या भीतीनें प्रजेचा फडशा पडून जिकडे तिकडे

शून्याकार होऊन गेलें. देवळें ओसाड पडलीं. लोक ह्यातान्या कोतान्यांना घराच्या बाहेर घालवून देऊं लागले. गाई, मेंढ्या, बकरी व ह्मशी एकमेकांना मारूं लागले. ब्राह्मण मरूं लागले; कोणी रक्षण करणारा उरला नाहीं. वनस्पतींचा वगैरे सांठा नाहींसा झाला. सर्व पृथ्वीला प्रेतकळा आली. याप्रमाणें भयंकर वेळ येऊन धर्म बुडाला असतां लोक भुकेनें व्याकुळ होऊन एकमेकांना खाऊं लागले. ऋषी सर्व नियम सोडून, अग्नि टाकून देऊन आश्रम सोडून चोहोंकडे धांवूं लागले. याप्रमाणें थोर विश्वामित्र ऋषी भुकेनें व्याकुळ होऊन काय खावें काय न खावें याचा विधिनिषेध न धरतां घरदार सोडून भटकत असतां एका वनामध्यें सर्व प्राण्यांना मारून खाणान्या चांडाळांच्या वाडीकडे आले. त्या ठिकाणीं जिकडे तिकडे मडकीं फुटून पडलीं होतीं; चोहोंकडे कुतऱ्यांचीं चामडीं, मारलेल्या डुकरांचीं व गाढवांचीं हाडें व कवट्या पसरल्या होत्या. मेलेल्यांच्या अंगावरचे कपडेही चोहोंकडे पडले होते. झोंपड्यांना निर्माल्याच्या माळा टांगल्या होत्या. पुष्कळ झोंपड्यांना सापांच्या कातींनीं सजविलें होतें. जिकडे तिकडे कोंबडीं कूं कूं करीत असून गाढवें ओरडत होतीं. कर्कश स्वरानें लोक मोठ्यानें एकमेकांशीं भांडत होते. देवळांवरून घुवडांचा घूं घूं शब्द चालला असून लोखंडी घंट्यांनीं त्यांत टांगल्या होत्या. वाडी कुतऱ्यांनीं भरून गेली होती. भुकेनें व्याकुळ झालेले विश्वामित्र ऋषी अशा ह्या वाडीमध्यें शिरून कांहीं खाण्याला मिळविण्याची खटपट करूं लागले. त्यांनीं पुष्कळांपाशीं तोंड पसरलें तरी मांस, अन्न किंवा फलमूलें कांहीं त्यांना मिळालीं नाहींत. तेव्हां काय हें संकट माझ्यावर ओढवलें आहे ह्मणून कष्टी होऊन विश्वामित्र धाडकन त्या ठिकाणीं खालीं पडले. तेव्हां नुकतेंच मारून पसरून टाकलेला कुतऱ्याच्या कंबरेचा भागतेथें त्यांच्या दृष्टीस पडला. तो पाहून त्यांनीं विचार केला कीं हल्लींच्या प्रसंगीं प्राणधारणेचा कांहीं उपाय उरला नसल्यानें चोरी करावी. प्रसंगीं चांगल्या लोकांना सुद्धां चोरी करणें वाईट नाहीं. ब्राह्मणानें जीव राखण्यासाठीं चोरी करावी, प्रथम हलक्याच्या ठिकाणीं चोरी करावी. ती न साधेल तर आपल्या बरोबरीच्याकडे चोरी करावी व तीही न साधेल तर आपल्यापेक्षां चांगले धार्मिक असतील त्यांच्याकडेसुद्धां चोरी करण्याला हरकत नाहीं. असा विचार करून रात्र अंधाराची असून जिकडे तिकडे सर्व सामसूम पाहून ते हळूंच उठून एका चांडाळाच्या झोपडींत शिरले. तेथें चांभार निजला असून त्याच्या डोळ्यावर वडस वाढलें होतें. यांचें पाऊल ऐकून तो विक्राळस्वरूपी चांडाळ घोगऱ्या स्वरानें ह्मणाला, 'चांडाळवाड्यामध्यें जिकडे तिकडे सामसूम पाहून कुतऱ्याच्या कंबरेच्या भागाला कोण हात लावीत आहे? मी जागा आहें. झोंपेंत नाहीं. मेलास समज.' त्या आपल्या कर्मानें घाबरून जाऊन लाजेनें तोंड लहान होऊन विश्वामित्र भीत भीत त्याला ह्मणाले, 'भो आयुष्मन्, मी विश्वामित्र भुकेनें व्याकुळ होऊन आलों आहे. जर तुला सारासार विचार असेल तर मला मारूं नकोस.' तें त्या शुद्धशील थोर ऋषींचें भाषण ऐकून हांथरुणावरून गडबडीनें उठून तो त्यांच्यापुढें गेला. व आदरबुद्धीनें हात जोडून डोळ्यांतून आंसवें गाळून ह्मणाला, 'महाराज, रात्रीच्या वेळीं आपण हें आरंभिलें आहे काय?' विश्वामित्र त्याची समजूत घालीत ह्मणाले, मी भुकेला असल्यानें हें मांस नेण्याच्या विचारांत आहे. भुकेनें व्याकुळ होऊन पाप करण्याला तयार झालों आहें. **पोटापुढें लाज उरत नाहीं.** भुकेनें मला हें काम करावयाला लावलें. भुकेनें माझा प्राण जात आहे; वेद सारा विसरत चालला आहे. दुबळा झाल्यानें अक्कल जाऊन भक्ष्याभक्ष्याचा विचार उरला नाहीं; हा अधर्म आहे हें जाणून मी हें मांस नेण्याला तयार झालों आहें. ह्या तुमच्या चांडाळ वाड्यांत मी भीक मागत फिरलों तरी मला कांहीं मिळालें नाहीं ह्मणून हें पाप करण्याचें मीं मनांत आणिलें. अग्नि देवांचें मुख असून शुद्ध द्रव्यें घेणारा आहे; तथापि तो ज्याप्रमाणें सर्व कांहीं खाणारा ब्रह्मस्वरूपी आहे, तसा तूं मला समज.' यावर चांडाळ त्यांना ह्मणाला, 'महाराज, मी ह्मणतों तें ऐकून घेऊन मग धर्माला ज्यानें व्यत्यय येणार नाहीं असें वागा. आपला धर्म काय आहे सांगतों ऐका. कोल्ह्यापेक्षां कुत्रा निंद्य समजला असू-

न त्याच्या कमरेचा भाग तर फारच निंद्य गणला आहे. तेव्हां चांडाळाकडचें विशेषतः अभक्ष्य चोरण्याचें हें निंद्य कृत्य आपण आरंभिलें हें चांगलें नाहीं. जीव वांचविण्यासाठीं दुसरा एखादा चांगला उपाय पहा. मांसाच्या लोभानें आपल्या तपाचा नाश होऊं नये. शास्त्रांतील धर्म आपल्याला कळत असतां धर्मसंकरकारक गोष्ट आपल्या हातून घडूं नये. आपण धर्माचरण करणाऱ्यांमध्यें श्रेष्ठ आहां; तर असा धर्म सोडूं नका.' यावर विश्वामित्र ह्मणाले, 'पोटाला कांहीं न मिळतां भटकण्यांत आज माझे बरेच दिवस गेले. जीव राखण्याला मला कांहीं साधन सांपडत नाहीं. तेव्हां अशा प्रसंगीं प्राण चालला असतां कसेंही करून तो वांचवितां आल्यास सामर्थ्य आल्यावर धर्म आचरतां येईल. क्षत्रियांचा पालनात्मक ऐंद्र धर्म असून ब्राह्मणांचा सर्व स्वाहा करणारा अग्निस्वरूपी धर्म आहे. ब्राह्मणांचा सर्वभक्षक वेदरूपी अग्नि हाच माझें बळ असल्यानें मी हें मांस खाऊन आपली भूक भागवितों. हयगय न करतां जेणेंकरून जगतां येईल अशी गोष्ट केली पाहिजे. **मरण्यापेक्षां जगणें अधीक श्रेयस्कर आहे.** मनुष्य जगेल तर त्याला वाटेल तेवढा धर्म जोडतां येईल. ह्मणून मी मुद्दाम हें अभक्ष्य सुद्धां खाण्याला तयार झालों आहें. तेव्हां तूं मला परवानगी दे. प्रकाशणारे ग्रह ज्याप्रमाणें अंधार दूर करतात त्याप्रमाणें तप व वेद यांनीं सर्व पापांचें क्षालन करून मी आपल्याला सामर्थ्यवान करून घेईन.' चांडाळ ह्मणाला, 'हें खाल्ल्यानें पुष्कळ आयुष्य वाढेल किंवा चांगला तकवा येईल असें कांहीं नसून अमृताप्रमाणें यापासून समाधानीही व्हावयाची नाहीं. दुसरी कांहीं भिक्षा पहा. ब्राह्मणाला कुतरा अभक्ष्य असल्यानें कुतऱ्याचें मांस खाण्यांत मन घालूं नका.' विश्वामित्र ह्मणाले, 'चांडाळा, ह्या दुष्काळांत दुसरें एखादें मांस मिळण्याचें काम सोपें नसून मजपाशीं पैसाही नाहीं. मी फार भुकेला असून आतां निरुपाय व निराश आहे. ह्या कुतऱ्याच्या मांसांतच सहा रस मला सांपडतील.' चांडाळ ह्मणाला, '**पांचपांच नखांचे पशूच ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य यांनीं खावे ह्मणून सांगितले आहेत.** आपल्याला शास्त्र प्रमाणच आहे. तेव्हां या अभक्ष्यामध्यें मन घालूं नका.' विश्वामित्र ह्मणाले, 'अगस्त्यांनीं भुकेला वातापि राक्षस खाऊन टाकला होता. तेव्हां मी ह्या प्रसंगांत सांपडलों असल्यानें भुकेमुळें हें कुतऱ्याचें मांस खातों.' चांडाळ ह्मणाला, 'दुसरी भिक्षा पहा ह्मणून मीं आपल्याला सांगितलें. असें भलतें काम करणें आपल्याला रास्त नाहीं. वाईटांनीं एखादें काम केलें तर तो पूर्वापार धर्म होत नाहीं. कांहीं तरी मिषानें भलतें काम करण्यांत अर्थ नाहीं. शिवाय अगस्त्यांनीं केलें तें ब्राह्मणांच्या प्रार्थनेवरून केलें. ह्मणून त्याला पाप म्हणतां येत नाहीं. ज्यांत पाप नाहीं तो धर्म होय. शिवाय ब्राह्मण जे सर्वांचे गुरू आहेत त्यांचें अनेक उपायांनीं रक्षण करणें रास्त आहे' विश्वामित्र ह्मणाले, '**शिष्ट लोक धर्माला कारण असून ते वागले तसाच मी वागत आहें.** उत्तम पवित्र खाद्यापेक्षां मी हें कुतऱ्याचें मांस चांगलें समजतों. अगस्त्यासारख्याच्या हातून पाप घडणें शक्य नाहीं. शिवाय कुतऱ्यामध्यें व हरणामध्यें मी भेद समजत नाहीं. मी ब्राह्मण असून हा देह माझा मित्र आहे. एवढेंच नव्हे तर तो मला आवडता व मोठा पूज्य आहे. त्याला पोसण्यासाठीं मी हें घेणार. अशा पापांना मी भीत नाहीं.' चांडाळ ह्मणाला, 'लोक प्राण देतात पण अभक्ष्याकडे लक्ष देत नाहींत. भूक आंवरून शहाणे वाटेल ती इच्छा परिपूर्ण करून घेतात, तसें आपणही करून घ्या.' विश्वामित्र ह्मणाले, 'मेल्यावर तसें फळ मिळत असेल, तें सारें ठीक आहे. परंतु जिवंत असतांना न खाल्यानें कर्म कांहीं न होतां धर्मलोप होतो हें प्रत्यक्ष दिसतें. **धर्माचें मूळ शरीर आहे.** मी व्रतशील व शमपर आहें. हें मूळ शरीर राखण्यासाठीं मी अभक्ष्य खाणार. सारासार विचार बुद्धीनें यांत पुण्य आहे हें मला स्पष्ट दिसतच आहे. आतां अहंपणाच्या अभिमानानें जरी मीं कुतऱ्याचें मांस खाल्लें तरी मी तुझ्यासारखा त्यानें चांडाळ न राहतां तें पाप तपानें दूर करण्याचें माझ्या अंगांत सामर्थ्य आहे.' चांडाळ ह्मणाला, 'या पापकृत्यापासून आपलें मन फिरवावें असें मला पक्कें वाटत असल्यानें मी आपल्याला फिरून फिरून सांगत आहें. आतां मी

हलक्या जातीचा दुष्ट असून आपल्यासारख्यांना बोलत आहें हें चांगलें नाहीं. परंतु मित्रत्वानें मी आपल्याला सांगत आहें कीं मोहानें भलतें सलतें करूं नका.' विश्वामित्र ह्मणाले, बेडकें ओरडत असतात तरी गाई खुशाल पाणी पीत असतात. धर्म सांगत बसण्याच्या भानगडींत पडूं नकोस. मी मित्रसा वाटत असून माझ्या सुखाकडे तुझें लक्ष असेल तर या संकटांतून तूं मला वर काढ. एवढें कुत्र्याचें मांस देशील तर धर्मानें माझें संरक्षण केल्यासारखें होईल.' चांडाळ ह्मणाला, 'हें देण्याचा मला धीर होत नाहीं. शिवाय माझें अन्न आपणाला नेतांना मुकाट्यानें माझ्यानें पहात बसवणार नाहीं. मी देऊन आपण जर हें मांस घेऊन जाल तर दोघेही परलोकीं पापांत बुडूं.' विश्वामित्र ह्मणाले, 'मी आज हें पापकर्म करून जगलों तर मोठें पवित्र कर्म करीन व शुद्ध होऊन धर्मसाधनच करीन. तेव्हां आतां हें मांस न खाणें किंवा खाऊन पुढें शुद्ध होणें यांत चांगलें कोणतें तूंच सांग.' चांडाळ ह्मणाला, 'कुलधर्माच्या बाबतींत ज्याचें त्याचें मनच त्याला साक्षी असतें. तेव्हां या बाबतींत पाप काय हें आपल्यालाच ठाऊक. जो भक्ष्य ह्मणून कुतऱ्याचें मांस सुद्धां आदरून घेतो त्याला टाकण्यासारखें कांहींच नाहींसें मला वाटतें.' विश्वामित्र ह्मणाले, 'अशा प्रकारचें अन्न घेऊन खाण्यांत दोष आहे. नाहीं असें नाहीं. पण वेळकाळ पाहून त्याला अपवाद असतो. शिवाय यांत हिंसा किंवा खोटेपणा नसून थोडा लोकापवाद यावयाचा असल्यानें त्याचें कांहीं विशेष महत्त्व नाहीं.' चांडाळ ह्मणाला, 'हें मांस खाण्यामध्यें आपला एवढाच जर हेतु असेल तर वेद किंवा आर्यधर्म यांची आपण पर्वा करीत नाहीं हें उघड आहे; व आपल्या ह्या मतावरून भक्ष्याभक्ष्यामध्यें दोष आहे असें मला मुळींच वाटत नाहीं.' विश्वामित्र ह्मणाले, 'अभक्ष्य खाण्यांत मुळींच पाप नाहीं. दारू पिऊं नये ह्मणून लोकांना आळा घालण्यासाठीं उगीच पोकळ प्रतिबंध आहे. करूं नये ह्मणून सांगितलेल्या दुसऱ्या गोष्टींसंबंधानें तरी हाच प्रकार आहे. पाप केल्याबरोबर पुण्य नाहींसें होतें हें उगीच आहे.' चांडाळ ह्मणाला, 'अशा भलत्या ठिकाणाहून चोरीनें किंवा माझ्यासारख्या हलक्याकडून असलें निंद्य भक्ष्य मिळविणें हें भल्याऱ्या भलेपणाला बाध आणणारें आहे. जो अशा रीतीनें कुत्रा मिळवितो त्याच्यासंबंधानें देणारालाही दोष लागतोच.' याप्रमाणें तो चांडाळ बोलून निघून गेल्यावर विश्वामित्र जीव वांचविण्यासाठीं तें कुत्र्याचें मांस बायकोसह खावें ह्मणून तें घेऊन वनाला निघून गेले. तेथें गेल्यावर देवांना विधिपूर्वक त्याचा भाग देऊन तृप्त करून मग आपण तें खावें असें त्यांना वाटलें. तेव्हां ब्रह्मविधीनें अग्नी पेटवून ऐंद्राग्नेय विधीनें त्यांनीं स्वतः चरु तयार केला. व देवांना व पितरांना भाग देण्याचा विधि सुरूं करून त्याचे निरनिराळे भाग करून इंद्रादि देवांना ते बोलावूं लागले. इतक्यांत इंद्रानें पुष्कळ पाऊस पाडून लोकांमध्यें जीव आणला व सर्व वनस्पति तरारले. भगवान विश्वामित्र ऋषींनींही तें कर्म आटपून हवि तोंडांत न घालतां तपानें त्यांनीं मोठी सिद्धि मिळवून देवांना व पितरांना तोषविलें. याप्रमाणें संकटांत धैर्य खचूं न देतां प्राण धरण्यासाठीं वाटेल तो उपाय करून संकटांतून आपल्याला वर काढावें. मनुष्य जगला तरच पुण्य संचय करून कल्याण करून घेतां येतें.

---

## १३५ धर्माचा सारासारविचार.

### (१२. १४२).

युधिष्ठिर ह्मणाला, 'जर खोट्या सारखी दिसणारी व जीवर कधीं भरंवसा ठेवूं नये अशी ही गोष्ट खरी ह्मणून दृष्टांतादाखल सांगण्यांत येते तर मग मनुष्यानें टाळावी अशी चोरीची मर्यादा तरी कोणती? मी वेडा होऊन माझें मन अगदीं जाग्यावरून उडालें आहे. धर्मबंधन अगदीं ढिलें पडल्यासारखें झालें आहे. मी आपल्या मनाला समजूत घालतों आहे तरी अशी गोष्ट करणें रास्त असें माझ्या मनांतच येत नाहीं.' भीष्म ह्मणाले, 'वेदाच्या आधारानें हें सारें मी तुला सांगत आहें असें समजूं नकोस. शहाण्यांनीं आपल्या बुद्धीनें मिळवून एकवटून ठेवलेला हा अनुभव आहे. शहाण्यांनीं गोळा केलेला हा मधच समज. राजांनीं अनेक निरनिराळ्या ठिकाणांहून शहाणपण

मिळविलें पाहिजे. एकपक्षीय धर्माच्याच योगानें ही जीवितयात्रा पार पाडतां येणें शक्य नाहीं. आपल्या बुद्धीच्या शहाणपणावर व भल्यांच्या आचारावर धर्म ठरवावा लागतो. तेव्हां मी सांगतों हें लक्षांत ठेव. ज्यांची बुद्धि श्रेष्ठ आहे असेंच राजे जय मिळवितात. चोहोंकडून मिळविलेल्या अनुभवानें राजानें धर्म ठरवावा लागतो. पुढच्या उदाहरणांनीं ज्यानें शहाणपण मिळविलें नाहीं अशा दुबळ्या राजाला ज्ञान कोठून असणार? प्रसंगानुसार धर्माधर्मस्वरूप ज्याला ओळखत नाहीं तो धर्माचें भिन्न स्वरूप दिसल्याबरोबर गोंधळून संशयांत पडतो. ह्मणून प्रसंग येण्याच्या पूर्वींच धर्माधर्माचें स्वरूप ओळखण्याची संवय ठेवावी. हें ज्ञान करून घेऊन मग शहाण्या राजानें आपल्या शहाणपणाच्या जोरावर जें काय करणें तें करावें. अशा प्रसंगीं याच्या हातून घडणारीं कृत्यें सामान्य लोकांना विपरीत भासतात. कांहींना खरें तत्त्व कळलें असतें. कांहींचें ज्ञान खोटें असतें. तें पूर्णपणें ओळखून शहाणा राजा भल्याचें शहाणपण घेत असतो. धर्माच्या आड येणारे लोक धर्मशास्त्राला विरुद्ध अशीं अर्थशास्त्रें खोटीं ह्मणतात, व हें कफल्लक अर्थशास्त्र अप्रमाण आहे असें ठरवूं पाहतात. विद्येवर आपलें काम साधून नांव मिळवून पोट भरूं पाहणारे सर्व पापी असून धर्माच्या आड येणारें आहेत. त्यांची बुद्धि परिपक्व झाली नसून त्यांना खरें इंगित कळलें नसतें. शास्त्राचा बारीक भेद व त्यांतील युक्ति त्यांना न कळल्यामुळें त्यांतील दोष तेवढे पाहून ते शास्त्राच्या नांवानें खडे फोडीत राहतात. प्रसंगीं शास्त्राचा अर्थ कळून सुद्धां तें बरोबर नाहीं असें सांगत सुटतात. उगीच दुसऱ्याच्या विद्येची निंदा करून आपलें ज्ञान ते स्थापूं पाहतात. तोंड हेंच त्यांचें अस्त्र व तोंड हाच त्यांचा बाण असून विद्येचें सर्व सार आपल्यामध्यें उतरलें आहे अशा रीतीनें ते बोलत असतात. **हे विद्येचा व्यापार करणारे वाणी असून यांना राक्षस समजावें.** उगीच कांहीं तरी मिषानें भल्यांनीं ठरविलेल्या धर्माची हे टर उडवितात. केवळ वाक्पांडित्यानें किंवा अकलेच्या जोरावर धर्मनिर्णय होत नाहीं असें प्रत्यक्ष बृहस्पतींचें वचन आहे. शास्त्रवचनें कांहींच निरर्थक नाहींत. कांहीं लोक मात्र ह्या ठरलेल्या शास्त्राप्रमाणें वागत नाहींत. **कांहीं लोक ह्मणतात कीं धर्म दुसरा कांहीं नसून पसंत केलेला जगाचा वर्तन क्रम असून शहाण्यानें भल्यांनीं सांगून ठेवलेला धर्मच स्वतः शोधून काढावा.** शहाणा मनुष्य सुद्धां जर रागाच्या झपाट्यांत, शास्त्र न कळतां किंवा अज्ञानानें शास्त्र सांगण्याला उठेल तर सभेमध्यें तें प्रमाण धरलें जात नाहीं. शास्त्रांचा खरा अर्थ कळून सांगितलेला धर्मच प्रशंसनीय असून बाकी कशाही रीतीनें सांगितला तरी तो व्यर्थ आहे. अडाण्यांच्या तोंडून निघालेलेंसुद्धां अकलेचें भाषण चांगलें समजलें जातें. युक्तीला पटत नाहीं तें व्यर्थ असें ह्मणणें अज्ञानाचें आहे, ह्मणून **शास्त्रानें युक्तीला किंवा युक्तीनें शास्त्राला बाध आणूं न देतां दोहोंची सांगड घालूनच व्यवहार ठेवावा.** संशयात्मक ज्ञान असलें किंवा नसलें सारखेंच आहे. ह्मणून अशा प्रकारचें ज्ञान समूळ नाहींसें करावें. हें जो न ओळखील तो आड मार्गाला लागला असें समजावें. उग्र कर्म करण्यासाठीं तुझा जन्म झालेला आहे हें तुला दिसत नाहीं काय? तसेंच माझ्याकडे पहा! ज्या वर्णामध्यें मी जन्मलों त्या वर्णाचें काम करून त्यावर उपकार करण्यासाठींच असंख्य क्षत्रियांना मीं स्वर्गाला पाठविले आहेत! बकरा, घोडा व क्षत्रिय यांना लोकांच्या उपयोगीं पडण्यासाठींच निर्माण केलें आहे. ह्मणून क्षत्रियानें नेहमीं सर्व प्राणिमात्रांचें सुख पहात असावें. ज्याला मारूं नये त्याला मारण्यामध्यें जो दोष आहे तोच दोष मारलें पाहिजे त्याला न मारण्यांत आहे. ही धर्माधर्माची मर्यादा ओळखून ती ओलांडूं नये. ह्मणून राजानें कडकपणा धरून प्रजेला स्वधर्मामध्यें ठेवावें. नाहींतर लांडग्याप्रमाणें त्या एकमेकांना खात सुटतील. कावळे ज्याप्रमाणें पाण्यावरून मासे उपटतात त्याप्रमाणें ज्याच्या राज्यांत चोर दुसऱ्यांच्या मालमत्तेवर चैन करीत राहतात तो राजा क्षत्रियांना कलंक आणणारा समजावा. वेदविद्येनें संपन्न असे कुलीन प्रधान करून राजानें धर्मानें पृथ्वीचें पालन करावें. जो राजा व्यवहार न समजून प्रजेचें पालन करीत नाहीं व कर अन्यायानें घेतो तो त्याचा दुबळे-

पणा समजावा. राजानें फार कडकही असतां कामा नये किंवा अगदीं पुळपुळींतही असतां कामा नये; परंतु दोन्हींची मर्यादा मात्र सोडूं नये. क्षत्रधर्म मोठा कठीण आहे. त्यांत तुझा जन्म झाला असल्यानें राज्य नीट कर. तुझ्यावरील माझ्या स्नेहामुळें मी तुला हें सांगतों.'

---

## १३६ अतिथि सत्कार–कपोताची कथा.
## ( १२. १४३—४९ )

'शरणागतांचें पालन करण्यामध्यें काय पुण्य आहे तें सांगा,' ह्मणून युधिष्ठिरानें विचारल्यावर भीष्म ह्मणाले, 'युधिष्ठिरा, शरण आलेल्यांचा सांभाळ करण्यांत मोठें पुण्य आहे. शिबि प्रभृति राजांनीं शरणागतांचें पालन करूनच मोठी सिद्धि मिळविली. या संबंधानें मुचकुंद राजानें परशुरामांना विचारलें असतां त्यांनीं जी पारव्याची गोष्ट त्याला सांगितली ती मी तुला सांगतों ऐक.

कोणी एक दुराचारी काळासारखा भयंकर पारधी एका घोर अरण्यामध्यें फिरत होता. त्याचा वर्ण कावळ्यासारखा काळा असून डोळे लाल होते. मांड्या लांब, पाय आखूड, तोंड पसरट, हनुवटी जाड असा तो विक्राळस्वरूप होता. त्याला कोणी जिव्हाळ्याचे, संबंधी किंवा आप्त नसून त्याच्या त्या घोर कर्मामुळें त्याच्या सोबत्यांनीं सुद्धां त्याला सोडलें होतें.. **ज्याचें वर्तन वाईट आहे अशापासून शहाण्यांनीं दूर असावें.ज्याला स्वतःचें हित कळत नाहीं तो दुसऱ्याचें हित काय करणार ?** जे दुराचारी लोक प्राण्यांचे प्राण घेणारे असतात त्यांच्यापुढें लोकांनीं सापाप्रमाणें कांपत असावें. हा जाळें घेऊन नेहमीं पक्ष्यांना मारून त्यांना विकत असे. याप्रमाणें तो पोट भरून रहात असतां बराच काळ लोटला तरी हा अधर्म आहे ह्मणून त्याला कळेना. दैवयोगानें बुद्धीला भुरळ पडून तो अशा रीतीनें बायकोसह रहात असतां त्याला दुसरा कोणताच धंदा आवडेनासा झाला. याप्रमाणें तो एके वेळीं वनांत फिरत असतां झाडांना उमळून पाडते आहे कीं काय अशा रीतीची मोठी वावटळ सुटली. आकाश ढगांनीं भरून जाऊन विजा चमकूं लागल्या. इतक्यांत व्यापारी लोकांच्या नावा ज्यावर पसरल्या आहेत अशा तुडुंबलेल्या समुद्राप्रमाणें जलमय करून सोडणारा धों धों पाऊस पडून एका क्षणांत पृथ्वी पाण्यानें भरून निघाली. त्या संततधारेच्या योगानें तो अगदीं भांबावून जाऊन थंडीनें कुडकुडत अरण्यांतून भटकत असतां आश्रयाला योग्य असा सखल प्रदेश त्याला सांपडेना. त्या अरण्यांतील त्याची वाट पाण्यानें भरून गेली होती. पावसाच्या तडाक्यानें पुष्कळ पक्षी मरून किंवा कुडकुडत खालीं पडले होते. मृग, सिंह, डुकरें निवाऱ्याच्या जागा पाहून पडले होते. त्या सोसाट्याच्या वाऱ्यानें व पावसानें त्या अरण्यांतील सर्व प्राणी घाबरून जाऊन भयानें व भुकेनें व्याकुळ होऊन घोळक्यानें भटकूं लागले. हा पांखरेंमाऱ्या थंडीनें कांकडला होता तरी तसाच त्या अरण्यांतून चालला होता. याप्रमाणें तो चालला असतां थंडीनें कुडकुडलेली एक पारवी त्याच्या दृष्टीस पडली. स्वतः थंडीनें कांकडला होता तरी त्या दुरात्म्यानें तिला पाहिल्याबरोबर उचलून पिंजऱ्यांत टाकिलें. स्वतः संकटांत असून दुसऱ्याला पीडा देण्याची काय ही नीच बुद्धि! याप्रमाणें पाप करून तो दुष्ट चालला असतां त्या वनांत काळ्या ढगासारखा एक मोठा वृक्ष त्याच्या दृष्टीस पडला. शेंकडों पक्षी छायेसाठीं व फळासाठीं त्याचा आश्रय करून होते. ब्रह्मदेवांनीं परोपकारासाठीं तो एक साधूच निर्माण केला होता. इतक्यांत एका क्षणांत आकाश स्वच्छ होऊन त्यांत तारे चमकूं लागले व फुललेल्या कमळांनीं शोभायमान सरोवराप्रमाणें त्याला शोभा आली. त्या स्वच्छ आकाशावरून रात्र बरीच झालेली दिसली. चोहोंकडे नजर टाकून तेथून आपलें बिऱ्हाड फार दूर आहेसें त्याला समजल्यावरून त्या झाडाखालीं रात्र काढण्याचा विचार करून या झाडावर ज्या कांहीं देवता असतील त्यांना मी शरण आहे असें म्हणून हात जोडून नमस्कार करून तो त्या झाडाखालीं जमिनीवर दगडाला डोकें टेकून पडला. त्या झाडावर रंगीबेरंगी पिसांचा एक पारवा आपल्या आतइष्टांसह फार दिवस रहात होता. पहाटे चरण्याला गेलेली त्याची बायको रात्र पडली तरी परत आली नाहींसें पाहून त्याला चैन पडेना. **गृहस्थाला बायकोशिवाय घर शून्य आहे.**

**घराला कांहीं घरपणा नसून बायकोमुळेंच त्याला घरपणा येतो.** ती नसेल तर घर अरण्याप्रमाणें समजलें आहे. त्याला वाटलें कीं, जिच्या अंगावर चित्रविचित्रित ठिपके असून जिचे डोळे आरक्त आहेत अशी ती मधुरस्वरा प्रिया आज न येईल तर मला प्राण ठेवण्याचें कांहीं काम नाहीं. मीं खाल्ल्याशिवाय ती खात नसे. मीं स्नान केल्याशिवाय ती अंग धूत नसे. मी बसल्याशिवाय ती बसत नसे व मी निजल्यावांचून ती निजत नसे. मला आनंद झाला असतां तिला आनंद होई व मला दुःख झालें म्हणजे तिला दुःख होई. मी तिला सोडून गेलों असतां तिचें तोंड उतरे व मी रागावलों तरी ती गोड बोलणें सोडीत नसे. त्या पतिव्रतेला पतीचा काय तो आधार वाटत असून पतीचें हित करण्यामध्यें ती नेहमीं दक्ष असे. अशी बायको मिळणाराचें भाग्यच समजलें पाहिजे. मी केव्हां दमलों आहें, मला केव्हां भूक लागली आहे हें सर्व ती बिचारी ओळखीत असे. तिचें माझ्यावर प्रेम असून दृढ भक्ति होती. **बायकोबरोबर झाडाखालीं असलें तरी तें घर असून तिच्यावांचून मोठ्या थोरल्या वाड्यांत राहिलें तरी तें भयाण अरण्याप्रमाणें आहे.** धर्मार्थकामाचे वेळीं बायकोच मनुष्याची साहाय्यकर्त्री असून परदेशाला जातांना विश्वासाला जागा तीच आहे. बायको हें पुरुषाचें मोठें साधन आहे असें म्हटलें आहे. ही लोकयात्रा पार पाडण्याला कोणाचें साहाय्य नसलें तरी तिचाच मोठा आधार असतो. त्याचप्रमाणें रोगानें पीडलें असतां किंवा संकटांत सांपडलें असतां बायकोसारखें उत्तम औषध नाहीं. बायकोसारखा दुसरा कोणी आप्त नसून तिच्यासारखा आधार दुसरा नाहीं. धर्मसंग्रह करण्याला तिच्यासारखी मदत दुसरी नाहीं. **ज्याच्या घरामध्यें गोड बोलणारी साध्वी बायको नाहीं त्यानें अरण्याला जावें.** त्याचें घर म्हणजे अरण्यासारखेंच होय.' याप्रमाणें त्याचे करुणापर शब्द ऐकून त्या पारध्याच्या तावडींत सांपडलेली ती पारवी ह्मणाली, 'केवढें तरी माझें हें भाग्य कीं आज माझ्यावर पतीचें एवढें प्रेम आहे! माझ्यामध्यें मग ते गुण असोत किंवा नसोत हे माझे किती तरी गुणानुवाद गाताहेत! **पति जिच्यावर संतुष्ट नाहीं तिला कांहीं बायको समजूं नये. बायकांवर त्यांचा नवरा संतुष्ट असेल तर सर्व देव तिच्यावर संतुष्ट असतात.** अग्नीला साक्षी ठेवून विवाहसंबंध होतो तेव्हां पति बायकांना श्रेष्ठ दैवत होतो. पुष्पगुच्छानें लगटलेली लता ज्याप्रमाणें वणव्यानें जळून खाक होते त्याप्रमाणें जिच्यावर नवरा संतुष्ट असत नाहीं ती स्त्री जळून खाक होते.' याप्रमाणें आपल्याशीं विचार करून कष्टी होऊन आपल्या कष्टी झालेल्या नवऱ्याला ती ह्मणाली, 'महाराज, आपल्या कल्याणाची गोष्ट मी आपल्याला सांगतें ती ऐकून आपण त्याप्रमाणें करा. महाराज, विशेषतः आपण या शरणागताला हात द्या. आपल्या राहण्याच्या ठिकाणाच्याच आश्रयानें हा पारधी थंडीनें व भुकेनें पिडून जाऊन कुडकुडत निजला आहे. याचा सत्कार करा. जो कोणी ब्राह्मण, लोकमाता गाय किंवा शरणागत यांना मारील त्याला सारखेंच पातक आहे. आपल्या जातीच्या धर्मानुसार आपण ज्ञातेच असल्यानें शक्त्यनुसार वागा. जो गृहस्थ यथाशक्ति **क्षत्रियधर्म** पाळतो त्याला मेल्यावर अक्षय लोक मिळतात. आपल्याला मुलगा आहे. तेव्हां धर्मार्थीकडे लक्ष देऊन आपल्या देहावरची ममता सोडून याचें मन संतुष्ट होईल अशारीतीनें आपण ह्याचा सत्कार करा. आपण माझ्यासंबंधानें वाईट वाटून घेऊं नका.' याप्रमाणें धर्माला व युक्तीला धरून असलेलें बायकोचें भाषण ऐकून मोठ्या आनंदानें डोळे खुलून जाऊन त्या पारव्यानें त्या पारध्याला पाहून मोठ्या आदरपूर्वक त्याचा सत्कार केला आणि स्वागत करून त्याला ह्मणाला, 'तूं आपल्या घरींच आहेससें समज. तुझी काय इच्छा आहे, तुझ्यासाठीं काय करूं लवकर सांग तूं शरण आला असल्यानें मी हें तुला प्रेमपूर्वक विचारीत आहें. शत्रु देखील घरीं आला असतां त्याचें आतिथ्य करणें उचित आहे. झाड तोडण्याला आलेल्यावरही झाड आपली सावली कमी करीत नाहीं. शरण आलेल्याचें आतिथ्य पांच यज्ञ करून असणाऱ्या गृहस्थानें विशेष काळजीपूर्वक केलें पाहिजे. जो गृहस्थाश्रमामध्यें राहून न कळतां पांच

यज्ञ करीत नाहीं त्याला हा लोक किंवा परलोक दोन्ही साधत नाहीं. तेव्हां खुशाल मनांत असेल तें सांग. तूं सांगशील तें सर्व मी करण्याला तयार आहें. उगीच दुःखांत पडूं नकोस. ' त्याचें तें भाषण ऐकून पारधी ह्मणाला, ' मला फार थंडी वाजत आहे, त्याच्या निवारणार्थ कांहीं उपाय कर. ' हें ऐकून त्या पक्ष्यानें आपल्या शक्तिप्रमाणें जमिनीवर पाचोळा जमवून विस्तव आणण्याकरितां लागलीच निघून गेला. लोहाराच्या घराकडे जाऊन त्यानें विस्तव आणला, व तो त्या पाचोळ्यामध्यें टाकून त्यानें विस्तव पेटविला व मोठा जाळ करून त्या पारध्याला निर्भयपणें चांगलें शेकण्यास सांगितलें. बरें ह्मणून यथेच्छ शेकून जीव आल्यावर तो मोठ्या आनंदानें त्या पक्ष्याला ह्मणाला, 'मला फार भूक लागली आहे. कांहीं खाण्याला देशील तर पहा. ' तें ऐकून पक्षी ह्मणाला, ' तुझी भूक शमवितां येण्यासारखें मजपाशीं वैभव नाहीं. आह्मी अरण्यवासी नेहमींच्या नेहमीं पोटाला मिळवून त्यावर रहात असतों. मुनींप्रमाणें आह्मी अन्न सांठवून ठेवीत नाहीं.' हे शब्द उच्चारीत असतां त्या बिचाऱ्याचें तोंड उतरलें, व आतां पुढें काय करावें म्हणून मोठ्या चिंतेंत पडून तो आपल्या वृत्तीची निंदा करूं लागला. क्षणांत विचार सुचून तो त्या पारध्याला ह्मणाला, ' क्षणभर वाट पहा मी तुला तृप्त करतों. ' असें ह्मणून पाचोळा पेटवून आनंदभरित होऊन तो ह्मणाला, ' अतिथींचा सत्कार करण्यांत मोठा धर्म आहे हें मीं ऋषींच्या, देवांच्या व पितरांच्या तोंडून ऐकिलें आहे. माझ्यावर कृप कर. अतिथीचा सत्कार करण्याचा माझा पूर्ण निश्चय ठरला आहे. ' याप्रमाणें आपला निर्धार कळवून हास्यमुखानें अग्नीला तीन प्रदक्षिणा करून तो त्यामध्यें शिरला. त्याला अग्नींत शिरलेला पाहून 'हें मीं काय केलें ' असें त्या पारध्याला वाटलें. तो शोकानें ह्मणूं लागला, 'अरेरे आपल्या कर्मानेंच निंद्य झालेल्या माझ्या दुष्टाच्या हातून हा मोठा अधर्म झाला यांत संशय नाहीं. मूर्खपणानें पापकर्मच करण्याचा निश्चय करून व सर्वांला अविश्वाला कारण होऊन मीं सगळे चांगले धंदे सोडून देऊन हा पांखरें मारण्याचा धंदा पतकरला ! ह्या महात्म्या पाखरानें आपलें स्वतःचें मांस मला देऊन मला दुष्टाला आज हा चांगला धडाच घालून दिला यांत कांहीं संशय नाहीं. आजपासून ज्याप्रमाणें लहान डबकीं उन्हाळ्यांत सुकत रहातात त्याप्रमाणें सर्व भोग टाकून देऊन भूक, तहान, उन्ह सोसण्याची संवय करून शरीर सुकवून त्याचा सांपळा उरवून घेईन. नानाप्रकारचे उपाय करून परलोक साधन करीत राहीन. केवढें हें आश्चर्य कीं यानें आपला देह खर्चीं घालून अतिथि सत्काराचें महत्त्व मला सांगितलें! म्हणून आतां मी धर्माचरण करीत राहीन. धर्म हाच मुख्य आधार आहे. ह्या पक्षिश्रेष्ठाच्या ठिकाणीं उत्तम धर्म मला दिसून आला आहे.' याप्रमाणें मनाचा निश्चय करून व कडक नियमानें राहून तो क्रूरकर्मा पारधी महाप्रस्थानाच्या तयारीला लागला. त्या पिंजऱ्यामध्यें धरलेल्या पारवीला सोडून देऊन त्यानें हातांतील काठी, सळई, जाळें, पिंजरा सर्व टाकून दिलीं.

याप्रमाणें तो पारधी अरण्यांत तप करण्याला निघून गेल्यावर ती पारवी नवऱ्याची आठवण करून कष्टी होऊन रडत ह्मणाली, ' प्रिया, आपल्या मनाविरुद्ध मला वागल्याचें कधीं आठवत नाहीं. बायकोला पुष्कळ मुलगे असले तरी पती गेल्यानें तिला शोक होतोच. नवरा गेल्यानें बिचारीच्या आप्तांना तिची कींव वाटते. आपण नेहमीं माझा लडिवाळ करून मला बहुमानानें चांगली ठेविलीत. गोड, प्रेमळ व चांगल्या शब्दांनीं आपण मला सुखांत ठेविलें. दऱ्या, झरे व रम्य असे झाडांचे शेंडे यांवर मी आपल्याबरोबर रमलें. त्याचप्रमाणें आकाशामध्येंही आपल्याबरोबर उडून मीं मोठ्या आनंदांत विहार केला. त्या सर्वांना आज मी मुकलें आहे. **बाप, भाऊ, मुलगा यांनीं किती दिलें तरी तें नियमितच असून अनियमित असें देणारा पतीवांचून कोणी नाहीं.** तेव्हां कोणती बायको अशा पतीचा बहुमान करणार नाहीं ? **पतीसारखा मित्र नसून पतीसारखें सुख नाहीं.** सर्व धर्म बाजूला ठेवून बायकांना नवराच काय तो एक धर्म आहे. तेव्हां आपल्यावांचून मला आतां जगून कांहीं काम नाहीं. पतीवांचून कोणती बायको जगण्याची आशा धरून राहील ? ' याप्रमाणें पुष्कळ शोक करून ति-

नें त्या पेटलेल्या आगींत उडी घेतली. त्याबरोबर विमानामध्यें बसून पुण्यवान लोक ज्याचा जयजयकार करीत आहेत असा तिचा पति तिला दिसला. त्याच्या अंगावर नानाप्रकारच्या माळा असून चित्रविचित्रित वस्त्रें होतीं. ती त्या आपल्या नवऱ्याला जाऊन मिळाली व ते दोघे विमानांतून स्वर्गाला जाऊन तेथें सुखांत राहिले.

त्यांना त्याप्रमाणें विमानांतून जातांना पाहून त्या पारध्याला आपणही तपानें अशीच गति मिळवावी असें वाटून महाप्रस्थानाला जाण्याचा दृढनिश्चय करून स्वर्गाची इच्छा धरून तो कशावरही ममता न ठेवतां वायुभक्षण करून कांहीं हालचाल न करतां राहिला. याप्रमाणें निश्चय करून चालला असतां कमलांनीं शोभा आलेलें, नानापक्ष्यांनीं गजबजलेलें, मनाला आल्हाद देणारें एक सरोवर त्याच्या दृष्टीस पडलें. त्याचें पाणी फार स्वच्छ व गार असून त्याला पाहिल्याबरोबर तान्हेल्याची तहान भागून जाईल असें तें सरोवर होतें. परंतु तो पारधी उपासानें सुकून गेला होता तरी त्याकडे उगीच नजरसुद्धां न टाकतां दृढनिश्चयानें तो एका मोठ्या अरण्यांत शिरला. तो आंत शिरतो तोंच कांट्यांनीं त्याचें अंग ओरखडून रक्तबंबाळ झालें. तरी तसाच तो त्या वनांत चालला असतां मोठा वारा सुटून झाडांच्या एकमेकांना घसटण्यानें विस्तव उत्पन्न होऊन त्या अरण्याला वणवा लागला. त्या युगान्त कालीन अग्नीसारख्या वणव्यानें त्या रानांतील झाडें, वेली या सर्वांचा जाळून फडशा पाडला. वाऱ्यानें त्याच्या ठिणग्या चोहोंकडे पसरून जाळ होऊन त्या वनामध्यें कांहीं बाकी राहिलें नाहीं. तेव्हां आपला देह त्यामध्यें टाकण्यासाठीं तो पारधी मोठ्या आनंदानें त्या वाढत चाललेल्या वणव्याकडे धांवला. त्यांत उडी घेतल्यानें त्याचें सर्व पाप धुवून जाऊन त्याला मोठी सिद्धि मिळाली. तो स्वर्गामध्यें जाऊन यक्षगंधर्वांमध्यें इंद्राप्रमाणें झळकूं लागला. याप्रमाणें तो पारवा, पारवी व पारधी तिघेही पुण्य कर्मानें स्वर्गाला गेले. याप्रमाणें जी नवऱ्याच्या मागून देह ठेवते ती या पारवीप्रमाणें स्वर्गाला जाते. गोवधासारखें पापसुद्धां प्रायश्चित्तानें नाहींसें होईल. पण शरणागताला जो मारील त्या पापाला प्रायश्चित्तच नाहीं.'

## १३७ अबुद्धिपूर्वक केलेलें पाप.

### (१२. १५०-१५२)

'अबुद्धिपूर्वक केलेल्या पापापासून मनुष्य कसा मुक्त होतो,' ह्मणून युधिष्ठिरानें विचारल्यावरून भीष्म ह्मणाले, 'यासंबंधानें शौनकपुत्र इंद्रोतांनीं जनमेजय राजाला जें सांगितलें तें तुला सांगतों ऐक.'

परीक्षितीचा मुलगा जनमेजय ह्मणून कोणी राजा होता. त्याच्या हातून चुकून ब्रह्महत्या घडली, त्यामुळें सर्व ब्राह्मणांनीं एवढेंच नव्हें तर त्याच्या ऋत्विजांनीं व प्रजांनीं सुद्धां त्याला सोडलें. तेव्हां रात्रंदिवस चैन नाहींसें होऊन तो वनाला गेला. पश्चात्तापानें अगदीं चरफड उडून जाऊन त्यानें पुष्कळ दिवसपर्यंत तप केलें, व ब्रह्महत्येचें पाप दूर व्हावें ह्मणून नाना देशांमधून सर्व पृथ्वीभर पुष्कळ ब्राह्मणांना विचारीत भटकत फिरला. भटकतां भटकतां तो व्रतशील शौनकपुत्र इंद्रोतांकडे आला. त्यांच्याजवळ येऊन त्यानें त्यांचे घट्ट पाय धरिले. त्या ऋषींनीं त्या राजाला पाहून त्याची खूप निंदा केली. ते ह्मणाले, 'भ्रूणहत्या करणारा महापापी तूं इकडे कशाला आलास ? आमच्यामध्यें तुझें काय काम आहे ? आह्मांला मुळीं शिवूं नकोस. जा, जा, नीच. तुला पाहून आमच्या मनाला बरें वाटत नाहीं. रक्ताप्रमाणें तुझ्या अंगाला दुर्गंध येत असून प्रेताप्रमाणें तुझें दर्शन अमंगळ आहे. कोल्ह्याप्रमाणें तूं अमंगळ असून वास्तविक मेलास असून जित्याप्रमाणें हिंडत आहेस. ब्राह्मणाला मारून अशुद्ध अंतःकरणानें तूं मजेंत राहिला आहेस. तुझें जगणें व्यर्थ आहे. निंद्य अशा पापकर्मासाठींच तुझा अवतार झाला आहे. अनेक प्रकारच्या कल्याणाची इच्छा धरून आईबाप तप, दान, दैवतांची आराधना इत्यादिकांनीं मुलांची आशा करतात. तुझ्यासाठीं तुझ्या वडिलांचें कुळ नरकाला गेलें आहे पहा. तुझ्या वाडवडिलांच्या तुझ्यासंबंधी सर्व आशा अगदीं निष्फळ झाल्या आहेत. ज्यांची पूजा केल्यानें लोकांना स्वर्ग, आयुष्य व यश मिळतें त्या ब्राह्म-

णांचा तूं व्यर्थ द्वेष केला आहेस. हें जग सोडल्यावर खालीं डोकें करून तूं तुझ्या ह्या पापकर्मामुळें चिरकाळ नरकांत पडशील. तेथें गिधाडें व मोर आपल्या लोहमय कठीण चोंचींनीं तुला टोंचून काढतील. तेथून फिरून तूं या जगांत आल्यावर पापयोनींत तुझा जन्म होईल. हें जगच झूट आहे, मग दुसऱ्याची गोष्ट कशाला असें जर तुला वाटत असेल तर यमाचे दूत तुला याची आठवण करून देतील. '

जनमेजय ह्मणाला, ' आधींच जो मी दोषाला पात्र असा निंद्य झाला आहें त्या मला आपण फिरून दोष कशाला देतां ? धिक्कारण्याला पात्र अशा माझा आपल्यासारख्यांनीं धिक्कार करूं नये. पेट घेतलेल्या आगीप्रमाणें मी ह्या पापकर्माबद्दल मी जळत आहें. माझ्या दुष्कृत्यामुळें माझें मन मला टोंचीत आहे. मला यमाची मोठी भीति खरी.तेव्हां हें माझ्या हृदयांतलें शल्य निघाल्यावांचून मी जगणार तरी कसा? सर्व राग सोडून आपण मला उपदेश करा. ब्राह्मणासंबंधानें मला मोठा आदर होता व पुढेंही राहील. ह्या कुलाचें नामशेष न होतां बाकी राहूं दे. जे ब्राह्मणाला मारून वेदाज्ञेप्रमाणें जनाला मुकले आहेत त्यांचें कुळ पुढें चालावें हें कांहीं ठीक नाहीं खरें. तरी मी अगदीं निराश होऊन सांगतों कीं अरण्यामध्यें मुनीजन ज्याप्रमाणें गरिबांना आश्रय देतात त्याप्रमाणें आपण मला राखा. यज्ञ न करणारांना स्वर्ग न मिळतां पुलिंद, शबर, इत्यादि म्लेंच्छ जातीप्रमाणें नरकाकडे जावें लागतें. मी मूढ असल्यानें विद्वान गुरु आपल्या शिष्याला किंवा बाप मुलाला उपदेश देतो त्याप्रमाणें मला कृपा करून कांहीं सांगा. ' इंद्रोत ह्मणाले, ' अविद्वानाच्या हातून दुष्कृत्यें घडावीं यांत आश्चर्य तें काय ? हें तत्त्व ओळखूनच शहाणे लोक दुसऱ्यावर रागावत नाहींत. शहाणपणाच्या गच्चीवर चढून सर्व शोचनीय स्थितीपासून मोकळा होऊन शहाणा दुसऱ्याची कींव करीत असतो. आपल्या ज्ञानाच्या योगानें त्याला आपण पर्वतावर असून लोक खालीं भूमीवर आहेतसें वाटत असतात. जो भल्याच्या निंदेला पात्र होऊन त्यांचा द्वेष करतो व त्यांच्यापासून तोंड लपवितो त्याचें कांहीं कल्याण होत नाहीं. वेदांत व शास्त्रांत सांगितलेलें ब्राह्मणांचें वीर्य व माहात्म्य काय आहे हें तूं जाणतोस. तेव्हां आतां मनाला शांति मिळेल व ब्राह्मण तुझ्यावर रागावणार नाहींत असें वागल्यानें परलोकसाधन होईल. अथवा तुला जर पश्चात्ताप होत असेल तर दांभिकपणा व अभिमान सोडून देऊन धर्माकडे नजर ठेवून सर्व भूतमात्रांच्या हितामध्यें दक्ष रहा. भयानें, कृपणतेनें किंवा लोभानें मी तुला उपदेश देण्याला तयार झालों आहें असें समजूं नकोस. मला तुझ्यापासून कांहीं मिळवावयाचें नाहीं. केवळ धर्मबुद्धीनें मी तुला उपदेश करीत आहें. तुला ब्रह्मवात्यालाजवळ केल्यानें सर्व लोक माझा धिक्कार करून माझ्या नांवानें खडे फोडतील व मला धर्म कळत नाहीं ह्मणतील. माझे आप्त व सुहृद् मला सोडतील. ते लोकांचे धिक्कारयुक्त शब्द ऐकून माझ्या सुहृदांना माझ्याबद्दल फार ताप होईल. कांहीं थोडे चांगले शहाणे असतील त्यांनाच माझ्या कृत्याची बरोबर ओळख पटेल. ब्राह्मणांसंबंधानें माझे विचार ऐक. ज्यानें त्यांचें कल्याण होईल असें वाग. फिरून त्यांचा द्रोह करूं नकोस. तूंच मला विचारीत असल्यानें मी तुला हा धर्म सांगतों. प्रथम कडक असून पुढें दयाभूत होणें हें जरा विलक्षणच आहे. जो प्रथमपासून कडक असतो तो सर्व जगाला जाळून टाकतो ह्मणतात. पण तूं प्रथम कडक असून हल्लीं तुझी धर्माकडे वृत्ति वळली आहे ! पुष्कळ दिवस भक्ष्य भोज्य टाकून तूं तप करूं लागला आहेस हेंच अधर्मांत बुडलेल्यांना आश्चर्यकारक वाटणार आहे. श्रीमान मनुष्य आपला पैसा देऊन टाकण्याला सढळ असतो व तपस्वी आपलें तप खर्चीं घालण्याला कंजूष असतो या दोन्ही गोष्टींत नवल नाहीं. या दोन्हींचे हेतू अगदीं जवळ जवळ एकच आहेत. पूर्वापार विचार न होतां जी गोष्ट होते ती संकटपरंपरा आणते. जी गोष्ट विचारपूर्वक होते ती फार हितावह होते. यज्ञ, दान, दया, वेद, सत्य हीं पांच त्याचप्रमाणें चांगल्या रीतीनें केलेलें तप हीं मनुष्याला पावन करणारीं आहेत. त्यांच्या योगानें तुला चांगला धर्म लाभणार आहे. त्याचप्रमाणें तीर्थाच्या ठिकाणांना जाणें हेंही फार पवित्र समजलें आहे. ययातीनें

यासंबंधानें ह्मटलें आहे कीं, जो मनुष्य पुष्कळ दिवस जगेल त्यानें आदरून यज्ञ करून पुढें सर्व टाकून तप करावें. कुरुक्षेत्राला पवित्र समजलें आहे. त्यांतून सरस्वती नदीला फार पवित्र समजलें आहे. तिच्यापेक्षां तिच्या कांठचीं तीर्थें अधिक पवित्र असून त्यामध्यें पृथूदक फार पवित्र आहे. त्या ठिकाणीं स्नान करून तिचें पाणी प्यालें असतां लवकर मरण आल्याबद्दल रडण्याची पाळी येणार नाहीं. **महासर, पुष्कर तीर्थें, प्रभास, उत्तरमानस व कालोदक या तीर्थांना जा ह्मणजे तुला दीर्घ आयुष्य मिळेल.** सरस्वती व दृषद्वती यांच्या संगमाच्या ठिकाणीं मानससरोवर आहे. वेदाध्ययन करीत राहून या ठिकाणीं स्नान करावें, दान करणें श्रेष्ठ धर्म असून सर्वत्याग करणें त्याहून चांगलें आहे असें मनूचें ह्मणणें आहे. मनुष्यानें पुण्य किंवा पाप न करतां मुलांप्रमाणें असावें. प्राणिमात्रांना वास्तविक पाहिलें असतां दुःखही नाहीं व सुखही नाहीं. हीं दोन्ही भलत्या कल्पनेचा परिणाम आहेत. याप्रमाणें पापपुण्याची बाकी पूज्य ठेवून मरणें चांगलें. आतां राजानें मुख्यतः काय करावें सांगतों ऐक. आपली सहनशीलता व दानशीलता दाखवून राजानें जग जिंकावें. ज्याच्या अंगांत धैर्य व सामर्थ्य आहे त्यालाच धर्म लाधतो. ब्राह्मणांसाठीं व सुखासाठीं तूं राज्य कर. पूर्वीं जसें तूं त्यांना तुच्छ केलेंस तसेंच त्यांना आतां तोषीव. आपलें कोणतेंही काम करीत असतां आपलें उत्तम कल्याण ज्यांत असेल असेंच काम कर. राजांमध्यें कोणी बर्फाप्रमाणें गार, कोणी अग्नीप्रमाणें प्रखर, कोणी नांगराप्रमाणें शत्रूला उखळून काढणारे, व कोणी विजेप्रमाणें शत्रूला भाजणारे असतात. ज्याला आपला नाश करून घ्यावयाचा नसेल त्यानें कोणत्याही सामान्य अगर विशेष कारणासाठीं दुष्टांशीं मिसळूं नये. **पापकर्म चुकून एकदांच हातून घडलें असतां पश्चात्ताप झाल्यानें मनुष्य त्यापासून मुक्त होतो, दुसऱ्यांदां घडल्यानें फिरून माझ्या हातून असें घडणार नाहीं असा निश्चय केल्यानें त्यापासून मुक्त होतो, तिसऱ्यांदां घडलें असतां कांहीं नियम पाळण्याचा निश्चय केल्यानें त्यापासून मुक्त होतो व अनेकवार घडलें असतां तीर्थांना गेल्यानें त्यापासून मुक्त होतो. सुखांत रहावयाचें असेल त्यानें चांगल्या गोष्टीच करीत रहाव्या.** जे सुगंधी पदार्थ जवळ करतात त्यांच्या अंगाला सुगंध येत असून जे दुर्गंधी पदार्थ जवळ करतात त्यांच्या अंगाला त्याप्रमाणें दुर्गंधी येते. तपश्चर्या केली असतां मनुष्य तत्काळ पापापासून मुक्त होतो. एक वर्षपर्यंत अग्नीची उपासना करून मनुष्य नाना पापांपासून मुक्त होतो, व तीन वर्षें अग्नीची उपासना करून मनुष्य भ्रूणहत्येच्या पापापासून मुक्त होतो. भ्रूणहत्या करणारा महासर, पुष्करतीर्थ, प्रभास व उत्तर मानस यांपैकीं कोणच्या तरी तीर्थाला निघून त्यापासून शंभर योजनें अंतरावर आला असतां सुद्धां तो त्यापासून मुक्त होतो. मनुष्यानें ज्या जातीचे जितके प्राणी मारलें असतील त्या जातीच्या तितक्या प्राण्यांना संकटांतून सोडविल्यानें तो त्या पापापासून मुक्त होतो. ऋतंच सत्यं चाभीद्धा इत्यादि ऋचा तीनदां उच्चारून पाण्यांत बुडी मारली असतां तें अश्वमेधानंतरच्या अवभृत स्नानाप्रमाणें आहे असें मनूचें ह्मणणें आहे. त्याच्या योगानें पाप एकदम नाहींसें होऊन मनुष्याचा सत्कार होतो. सर्व प्राणिमात्र मुकाट्यानें वेड्यासारखे याच्या आज्ञेंत राहतात. एके वेळीं देव व असुर यांनीं येऊन बृहस्पतींना सविनय विचारलें कीं, ‘ धर्माचें त्याचप्रमाणें पापकृत्यांचें फळ आपल्याला ठाऊक आहे. पापपुण्य ज्याचें समान आहे तो ह्या दोहोंतून मुक्त होत नाहीं काय? पुण्य फळ काय व पुण्यापासून पाप कसें दूर होतें? ’ यावर बृहस्पती ह्मणाले, ‘चुकून पाप घडून पुढें त्याचा परिणाम ओळखून आदरून पुण्यकर्म हातून घडेल तर त्यामुळें खारांनीं धुतलेल्या कपड्याप्रमाणें मनुष्य त्या पापापासून मुक्त होतो. पाप करून त्याची फुशारकी मिरवूं नये. श्रद्धा कायम ठेवून दुसऱ्याचा हेवा न केल्यानें मनुष्याचें कल्याण होतें. जो मनुष्य भल्यांचे दोष उघडकीस आले असतां सुद्धां त्यांवर पांघरूण घालतो तो पापी असला तरी सूर्य ज्याप्रमाणें उगवला असतां अंधार दूर करतो त्याप्रमाणें तो आपलें पाप पार नाहींसें करूं शकतो.’ याप्रमाणें इंद्रोतांचें भाषण ऐकून त्याप्रमाणें यज्ञ करून

सर्व पापांपासून मुक्त होऊन जनमेजय आकाशामध्यें झळकणाऱ्या पूर्णचंद्राप्रमाणें झळकत आपल्या राजधानीमध्यें शिरला.

---

## १३८ स्वार्थाची मजा-मेलेला उठल्याची कथा. ( १२. १५३ )

'कोणी मेलेला फिरून जगला आहे काय,' ह्मणून युधिष्ठिरानें विचारलें असतां भीष्म ह्मणाले, 'यासंबंधानें पूर्वी नैमिषारण्यांत गिधाड व कोल्हा यांमध्यें झालेलें संभाषण ऐक. कोणा एका ब्राह्मणाला मोठ्या सायासानें झालेला एकुलता एक मुलगा लहानपणींच बाळग्रहाच्या पीडेनें मेला. सर्व कुळाला एकुलता एक असल्यानें त्याच्या मरणानें शोकाकुळ होऊन रडत त्या मेलेल्या मुलाला घेऊन त्याचे आप्तबांधव स्मशानाकडे निघाले. एकमेकांच्या हातून त्या मुलाला घेऊन त्याचे गुण व भाषण फिरून फिरून आठवत फार कष्टी होऊन ते रडत होते. त्याला स्मशानामध्यें ठेवून परत जाण्याला त्यांचा पाय घेईना. एक गिधाड त्यांचा रडण्याचा शब्द ऐकून तेथें येऊन ह्मणालें, ' ह्या तुमच्या एकुलत्याएक मुलाला येथें सोडून झटकन् परत जा. या ठिकाणीं हजारों स्त्रीपुरुषांना काळानें ओढून आणिलें असून त्यांचे बांधव त्यांना सोडून गेले आहेत. हें सर्व जग सुखदुःखांनीं भरलें आहे याकडे नजर द्या. **संयोग व वियोग एकामागून एक मनुष्याच्या वांट्याला येत असतात.** मेलेल्याबरोबर जे जन्माला येतात व जे त्याच्या आधीं किंवा मागून येतात ते सर्व त्यांच्या त्यांच्या आयुर्मर्यादेप्रमाणें कधींना कधीं मरतातच. या सर्व प्राण्यांना भय उत्पन्न करणारीं भयंकर गिधाडें, कोल्हीं यांनीं त्याचप्रमाणें हाडांच्या सांपळ्यांनीं भरलेल्या या स्मशानांत उगीच बसून राहूं नका. कालधर्माला अनुसरून मेलेला आजपर्यंत कोणी उठला नाहीं मग तो आवडता असो किंवा नावडता असो. सर्व प्राणिमात्रांची गतिच अशा प्रकारची आहे. ह्या मृत्युलोकीं ज्यानें ज्यानें ह्मणून जन्म घेतला आहे त्या सर्वांना मरावयाचें आहे. काळानें ठरवून ठेवलेल्या या मार्गांत मेलेल्याला जगविण्याचें कोणाच्या अंगीं सामर्थ्य आहे? सूर्य अस्ताला जात चालला असून लोक आपापलीं कामें बंद करीत आहेत. तेव्हां मुलावरचें प्रेम सोडून देऊन आपल्या घराकडे जा.' हें त्या गिधाडाचें भाषण ऐकून त्या मुलाला तेथें टाकून तो आतां कसचा भेटतो ह्मणून निराश होऊन बांधव रडत परतले. इतक्यांत कावळ्यासारखा काळा कुळकुळीत एक कोल्हा बिळांतून बाहेर पडून ते चालले असतां त्यांना उद्देशून ह्मणाला, ' खरोखर मनुष्य प्राणी निर्दय आहेत. अजून सूर्य आहे. भय सोडून स्नेह धरा. कोणती वेळ कशी येते सांगतां येत नाहीं. कदाचित् हा जगेल. पुत्रस्नेह सोडून याला स्मशानामध्यें असें खालीं टाकून देऊन तुह्मी कां निर्दयाप्रमाणें चालला? ज्याच्या केवळ शब्दांनीं तुमचें मन प्रसन्न होत होतें त्या ह्या गोड भाषण करणाऱ्या तुमच्या मुलासंबंधानें तुह्मांला स्नेह मुळींच दिसत नाहीं! पशुपयक्ष्यांमध्यें मुलांवर स्नेह कसा असतो पहा. ते त्यांना संभाळतात त्याचें त्यांना फळ सुद्धां कांहीं मिळत नाहीं. परलोकाकडे लक्ष लावून असलेल्या मुनींच्या निष्काम यज्ञ यागादिक क्रियांप्रमाणें त्यांचा स्नेह निष्काम असतो. मुलांवर ते प्रेम करतात त्याबद्दल त्यांना येथें व वरती कोठेंच फळ मिळतेंसें दिसत नाहीं. आपलीं आवडतीं मुलें त्यांच्या डोळ्याआड झालीं असतां त्यांच्या शोकाला पारावार नसतो. दुबळ्या स्थितींत, खटला होऊन न्यायासनापुढें जाण्याचा प्रसंग आला असतां, त्याचप्रमाणें स्मशानाकडे निघालें असतां बांधवच बरोबर येतात; दुसरें कोणी येत नाहीं. सर्वांना प्राण प्यार असून स्नेह कोणाला सुटला नाहीं. नुकतेंच लग्न करून, न्हाऊं घालून फुलांनीं सजविलेल्या या कमलासारख्या विशालाक्ष मुलाला सोडून तुमच्यानें जाववतें तरी कसें?' हे त्या कोल्ह्याचें कळकळीचे शब्द ऐकून ते लोक फिरून त्या शवाकडे परतले. त्यांना परतलेले पाहून तें गिधाड फिरून ह्मणालें, ' अरेरे, ह्या कोत्या बुद्धीच्या दुष्ट व क्षुद्र कोल्ह्याच्या बोलण्यावरून तुह्मी कां परततां? पंचभूतांनीं सोडून लांकूड बनलेल्या ह्या मुलाबद्दल दुःख करतांना तुमचीं तुह्मांलाच कींव कशी येत नाहीं? कडकडीत तप करा ह्मणजे पापापासून मुक्त व्हाल. तपानें वाटेल तें मिळतें. उगीच रडत बसण्यांत

अर्थ काय आहे ? मनुष्य जन्माला येतो त्याबरोबरच सर्व त्याचीं अनिष्टें त्याबरोबर येत असतात. ह्मणूनच हा मुलगा असें तुह्मांला मोठें दुःख देऊन गेला आहे. द्रव्य, गाई, सोनें, हिरे, माणकें मूलवाळ सर्व कांहीं तपानें मिळणारें आहे. ज्याप्रमाणें प्राणिमात्रांच्या ठिकाणीं बऱ्या वाईट रीतीनें मनुष्य वागला असेल त्याप्रमाणें सुखदुःखांचें गांठोडें बरोबर घेऊन मनुष्य जन्माला येत असतो. बापाच्या कर्मानें मुलाला किंवा मुलाच्या कर्मानें बापाला ठरलेल्या वाटेहून निराळ्या वाटेनें नेतां येत नाहीं. ह्मणून मोठ्या दक्षतेनें धर्म आचरून अधर्माकडे मन घालूं नका. प्रसंगानुसार देवता व ब्राह्मण यांच्या ठिकाणीं योग्य वर्तन ठेवा. शोक व दैन्य टाकून पुत्रस्नेह सोडा. ह्या ओसाड जागीं याला सोडून जा. बांधव आपल्या आवडत्या बांधवाला येथें सोडून परत जातात. येथेंच थांबत नाहींत. शहाणा असो, मूर्ख असो, सधन असो, निर्धन असो जो तो आपापल्या बऱ्या वाईट कर्माचें गांठोडें बरोबर घेऊन काळाच्या तावडींत जातो. सर्वांचा स्वामी काळ असून त्याची सर्वांवर न्यायानें सारखी दृष्टि आहे. तरुण, लहान, ह्मातारे, गर्भामधले सर्वांना हा काळ झपाटतो. अशा प्रकारचें हें जग आहे. ' कोल्हा ह्मणाला, 'पुत्रस्नेहानें रडत असणाऱ्या तुमचा स्नेह ह्या कोत्या बुद्धीच्या गिधाडानें कमी करून टाकल्यासारखा दिसतो. पण यांत कांहीं नवल नाहीं. तो पहा तो मनुष्य याच्या खात्री पटविण्यासारख्या मुद्देसूद व गार करून सोडणाऱ्या शब्दांना भुलून कठीण स्नेह सोडून परत चालला आहे. आपल्या गमावलेल्या पाडसासंबंधानें होणाऱ्या गाईच्या दुःखाप्रमाणें मनुष्यांना आपल्या आप्ताचें प्रेत स्मशानांत सोडून जाते वेळीं रडतांना पाहून त्यांना फार दुःख होत असावें अशी माझी समजूत होती; पण आज त्यांच्या शोकाचें खरें स्वरूप मला कळलें. यांच्या स्नेहामुळें आजपर्यंत मीं सुद्धां डोळ्यांतून पाणी काढलें आहे. मनुष्य नेहमीं यत्न करीत राहिल्यानें दैवानें अखेर त्याला फळ मिळतें. **दैव व यत्न हीं जुळल्यावर मग जें फळ मिळावयाचें असेल तें मिळतें. आशा कधीं सोडूं नये.** निराश झाल्यावर मग सुख कोठचें? **प्रयत्नानें कार्यभाग साधतो.** मग असें निर्दय होऊन कां चाललां ? आपल्या मांसापासूनच झालेला आपल्या अर्ध्या शरीरासारखा असणारा बापाचा वंश राखणारा अशा ह्या बाळाला येथें वनांत टाकून चाललां कोठें ? आतां सूर्य अस्ताला जाऊन संध्याकाळ होईल तर याला तरी घेऊन जा किंवा येथें याजवळ असा. ' गिधाड म्हणालें, 'मला आज हजार वर्षें झालीं. एवढ्या अवधींत कोणी म्हणजे मेलेला उठल्याचें माझ्या पाहण्यांत नाहीं. कोणी पोटांतच मेलेले निपजतात, कोणी जन्मल्याबरोबर मरतात, कोणी रांगतांना मरतात, कोणी तरुणपणीं मरतात, पशुपक्ष्यांचें भाग्य सुद्धां निश्चित नाहीं. सर्व स्थावरजंगमांची आयुष्यमर्यादा आधीं ठरून राहिली आहे. इष्ट, बायका, पोरें मेल्यानें हजारों लोक रोजच्यारोज कष्टी होऊन येथून परत जातात. शेंकडों लोकांना मग ते आवडते असोत किंवा नावडते असोत नित्य येथें टाकून जाण्याचा प्रसंग असतो. प्राण निघून जाऊन लांकडासारख्या कठिण व निस्तेज झालेल्या याला सोडा. यांतील प्राण दुसऱ्या देहामध्यें जाऊन हें लांकूड बनलें असतां याला टाकून तुह्मी कां जात नाहीं ? हा तुमचा स्नेह फुकट असून ही तुमची खटपट व्यर्थ आहे. मोक्षधर्माला अनुसरून माझें हें मुद्याचें भाषण ऐकून आपल्या घराकडे जा. प्रेताला पाहून त्याचीं पूर्वस्थितींतील कृत्यें आठवून शोक कमी न होतां उलट वाढतोच. ' हें त्याचें भाषण ऐकून ते लोक परततातहेतसें पाहून कोल्हा फिरून ह्मणाला, 'ह्या गिधाडाचें भाषण ऐकून बापाला पिंड देणाऱ्या गोंडस मुलाला टाकून कसे चालला. याला टाकून गेल्यानें स्नेह, शोक किंवा रडें कमी न होतां तुह्मांला खात्रीनें पश्चात्ताप मात्र फार होईल. रामानें आपल्या पराक्रमानें शंबूक शूद्राला मारल्यानें मेलेला ब्राह्मणाचा मुलगा उठल्याचें ऐकण्यांत आहे. त्याचप्रमाणें श्वेत नांवाच्या राजर्षीचा मुलगा अकालीं मेला असतां त्या धर्मनिष्ठ राजानें त्याला फिरून उठविलें. त्याप्रमाणें कोणी सिद्ध, मुनी किंवा देवता येऊन तुह्मी येथें रडत बसाल तर तुमच्यावर दया करील. ' हें ऐकून फिरून परत येऊन त्या मुलाला मांडीवर घेऊन ते मोठ्यानें रडत

बसले. तेव्हां तें गिधाड फिरून म्हणालें, ' तुह्मी या मुलाच्या अंगावरून हात फिरवून व्यर्थ याला अस-वांनीं भिजवून काढीत आहां. यमधर्माच्या आज्ञेनें याला कायमची झोंप आली आहे. मोठमोठे श्रीमान, तपस्वी सर्व मृत्यूच्या तावडींत सांपडले आ-हेत. हजारों लहान मोठ्या बांधवांना मुकून पुष्कळ लोक ह्या जगांत रात्रंदिवस शोक करीत रा-हिले आहेत. उगीच शोकच करीत बसावयाचें ह्मणून हट्ट धरूं नका. हा फिरून जगेल हें संभवनी-य नाहीं. ह्मणून हा देह सोडल्यावर फिरून अशा शेंकडों कोल्ह्यांनीं आपले प्राण दिले तरी शेंकडों वर्षांच्या खटपटीनें सुद्धां हा जिवंत होणार नाहीं. आतां रुद्र, कार्तिकस्वामी, ब्रह्मदेव किंवा विष्णु जर प्रसन्न होऊन वर देतील तर मग हा उठण्याचा संभव आहे. आसवें ढाळल्यानें, सुस्कारे टाकल्यानें किंवा रडल्यानें तो उठण्याचा कांहीं संभव नाहीं. मी, हा कोल्हा, तुह्मी सर्व याचे बांधव आपण सर्व धर्म किंवा अधर्म यांचें गांठोडें बरोबर घेऊन या वा-टेला लागलों आहों. दुसऱ्याला न आवडेल अशी गोष्ट, निष्ठुर भाषण, परद्रोह, परस्त्री, अधर्म व खोटें ह्यांच्यापासून शहाण्यानें दूर असावें. धर्म, सत्य, स-र्वांचें कल्याण, न्याय, सर्व प्राणिमात्रांवर थोर दया, सरळपणा व खरेपणा ह्यांच्या मागें मोठ्या काळजी-पूर्वक लागावें. आई, बाप, बंधु, जिव्हाळ्याचे लोक यांकडे ते जिवंत असतां न पाहणें अधर्म आहे. डोळे मिटले आहेत व हालचाल बंद झाली आहे अशा मेलेल्या प्राण्यासाठीं मागून रडण्यांत काय फायदा आहे ? ' हें ऐकून फिरून त्यांचें मन बदलू-न ते निघालेले पाहून कोल्हा ह्मणाला, ' हा सर्व प्राणिमात्रांचा फडशा पाडणारा मृत्युलोक फार भ-यंकर आहे, नेहमीं ह्या ठिकाणीं इष्टबांधवांचा वि-योग होत असून हें आयुष्यही फार थोडें आहे. क-पट, खोटें, दुर्भाषण व कटु भाषण यांनीं हा भरला आहे. दुःख व शोक वाढविणारा हा फिरून जन्म-मरणाचा फेरा पाहून तर हें जग मला मुळींच आ-वडत नाहीं. अहो, तुह्मी अगदीं मूर्खाप्रमाणें ह्या गि-धडाचें ऐकून दगडासारखे होऊन कसे चाललां ? परतां. सुखाच्या मागून दुःख व दुःखाच्या मागून सुख हा ह्या सुखदुःखानें भरलेल्या जगाचा नियम आहे. ह्या ठिकाणीं एकच कायमचें मिळणार असें नाहीं. हा मला अगदीं जिवंत असल्यासारखा दि-सतो. हा नाश पावेलसें दिसत नाहीं. खात्रीनें तु-ह्मांला सुख मिळणार आहे. तेव्हां याला टाकून मू-र्खासारखे कां चालला ? ' याप्रमाणें वरून धर्मा-विरुद्ध गोड बोलून खायासाठीं रात्रीची वाट पहात टपून बसलेल्या त्या कोल्ह्याच्या स्वार्थाच्या भाषणा-नें तेथें ते फिरून आडकले. ते पाहून गिधाड फि-रून ह्मणाले, ' हा भयंकर अरण्यप्रदेश प्रेतांनीं भ-रला असून यक्षराक्षसांची येथें वस्ती आहे. त्या-चप्रमाणें घुबडांच्या घूं घूं शब्दांनीं हा भरून रा-हिला आहे. तेव्हां येथें प्रेत ठेवून सूर्य अस्ताला गेला नाहीं व दिशा उजळ आहेत तोंपर्यंत जाऊन प्रेतकार्य उरका. ससाणे भयंकर शब्द करीत असून कोल्हीं कुईं कुईं करीत आहेत. सिंह गर्जत असून सूर्य अस्ताला चालला आहे. चितांच्या निळ्या धुरानें झाडांना निळसर रंग चढत आहे. स्मशान-देवतांना कांहीं खावयाला न मिळून त्या ओरडत आहेत. ह्या ठिकाणचे सर्व विक्राळ व मांसहारी प्रा-णी तुह्मांवर हल्ला करतील. हा प्रदेश फार भयंकर असून तुमच्यावर खास कांहीं तरी प्रसंग गुदरेल. ह्या लांकूड बनलेल्या शवाला सोडा. ह्या कोल्ह्या-चें शब्द मुकाट्यानें ऐकून घ्या. जर ह्याचे नि-ष्फळ व लुच्चेगिरीचे शब्द तुह्मी मनावर घ्याल तर तुह्मां सर्वांचा खास नाश होईल. ' को-ल्हा ह्मणाला, ' येथेंच रहा, जाऊं नका. सूर्य आहे तोंपर्यंत तुह्मांला भिण्याचें कारण नाहीं. तोंपर्यंत पुत्र-स्नेहामुळें निराश न होतां असा. मोकळेपणानें र-डत याकडे पहात रहा. सूर्य असे तोंपर्यंत तुह्मीं येथें रहाच. या मांसभक्षक प्राण्याच्या शब्दाकडे तुह्मी कशाला लक्ष देतां ? जर तुह्मी या गिधाडाचें क-डक व मूर्खपणाचें भाषण ऐकाल तर तुमचा मु-लगा तुह्मांला मिळणार नाहीं. ' सूर्य अस्ताला गे-ला असें गिधाड त्यांना ह्मणे, अजून गेला नाहीं म्हणून कोल्हा त्यांना थांबवी. याप्रमाणें ते दोघे-गिधाड व कोल्हा भुक तहानेनें व्याकुळ झाले अ-सल्यामुळें आपापले हेतू साधण्यासाठीं कंबरा बां-धून तयार राहून नीतीला धरून त्यांना उपदेश क-रीत होते. त्या दोन नीतिकुशल पशुपक्ष्यांचीं भा-

षणें ऐकून एकदां त्या मुलाच्या आप्तांना जावेंसें वाटे, एकदां रहावेंसें वाटे. अगदीं शोकानें दीन होऊन ते तेथें रडत राहिले. आपापलीं कामें साधून घेण्यांत पटाईत अशा त्या दोघांनीं आपल्या हुशारीनें त्यांना वेड लावून सोडलें होतें. याप्रमाणें त्या दोघांचें भाषण ऐकत ते त्या ठिकाणीं उभे असतां पार्वतीनें पाठविल्यावरून शंकर तेथें येऊन करुणेनें डोळे पाण्यांनीं भरून येऊन, 'मी वर देण्याला आलों आहें,' असें म्हणाले. तेव्हां तो एकच मुलगा असल्यानें तो उठावा म्हणून त्यांनीं वर मागितला. तेव्हां शंकरांनीं त्याला उठवून शंभर वर्षें आयुष्य दिलें. त्याचप्रमाणें त्या कोल्ह्याला व गिधाडाला भूक ह्मणून लागणारा नाहीं असा त्यांनीं वर दिला. नंतर ते सर्व त्यांना नमस्कार करून कृतकृत्य झाल्यानें आनंदभरित होऊन निघून गेले. मोठी आशा धरून दृढ निश्चय ठेवल्यानें व महेश्वराच्या प्रसादानें मनुष्याला फळ तात्काळ मिळतें. त्या बांधवांचा निश्चय व दैवाची वेळ पहा. निश्चयानें थोड्याच वेळामध्यें शंकराच्या प्रसादानें या रडणाऱ्यांचे अश्रु पुसले जाऊन यांना सुख झालें, व ते त्या मुलाला घेऊन नगराकडे परत गेले.

---

## १३९ शरीरबळ व बुद्धिबळ.

## ( १२. १५४--५७ )

' उपकार व अपकार करण्याला समर्थ व नेहमीं सज्ज असणाऱ्या बळवान राजाच्या शेजारीं असणाऱ्या दुबळ्या क्षुद्र राजानें, आपल्या मूर्खपणाच्या बडबडण्यानें त्याला राग आणल्यावर तो बळवान त्यावर चालून आला असतां त्यानें कसें वागावें, ' ह्मणून युधिष्ठिरानें विचारलें असतां भीष्म ह्मणाले, 'या संबंधांत पुढील सांवरीचें झाड व वारा यांमधलें संभाषण ऐक.

हिमालय पर्वतावर एक मोठा सांवरीचा वृक्ष होता. तो हजारों वर्षांचा जुनाट असून त्याचा बुंधा फार मोठा होता व असंख्य फांद्यांनीं तो पसरला असून त्याला अगणित पानें होतीं. त्या ठिकाणीं दमून घामाघूम झालेले मोठमोठे हत्ती त्याचप्रमाणें दुसरीं श्वापदें येऊन विसावा घेत. त्याच्या बुंध्याचा घेर चारशें हात असून छाया अगदीं दाट होती. पुष्पफलांनीं तो अगदीं भरला असून साळुंकी, राघु यांनीं त्याचा आश्रय केला होता. व्यापाऱ्यांचा तांडा, वाणी लोक, तापसी, वनवासीलोक हें सर्व प्रवासांत ह्या रम्य झाडाखालीं उतरत असत. एकेवेळीं नारद तेथें येऊन त्याचा तो बुंधा व असंख्य शाखा पाहून त्याला ह्मणाले, ' हे सांवरी, तूं फार रमणीय व मनोहर आहेस. तुला पाहून आह्मांला फार संतोष होतो. नेहमीं अनेक मनोहर पशुपक्षी मोठ्या आनंदानें तुझा आश्रय करतात. तुझ्या असंख्य बारीक मोठ्या फांद्या वाऱ्यानें मुळींच मोडल्या जात नाहींत. वारा तुझ्यावर कशानें संतुष्ट आहे, कां तो तुझा मित्र आहे कळत नाहीं. तो सर्व लहान मोठ्या झाडांचा फडशा पाडीत असून तुलाच तेवढा राखतो. तो आपल्या जोरानें पर्वतांचीं शिखरें हलवून सोडतो; तो वाहूं लागला ह्मणजे सरोवरें, नद्या, समुद्र चटसारीं आटवून तो पाताळाला सुद्धां जाऊन भिडतो. असा हा वारा तुला राखीत आहे. तेव्हां तें मित्रत्वामुळेंच असलें पाहिजे. ह्मणूनच तुला ह्या असंख्य फांद्या असून पानें व फुलें भरगच्च आहेत. हे पक्षी मोठ्या आनंदानें तुझ्या ठिकाणीं रमलेले पाहून किती तरी मौज वाटते ? तुला मोहोर येतो त्यावेळीं यांचा मनोहर किलकिल शब्द मोठ्या मजेचा कानावर पडतो. त्याचप्रमाणें आपल्या कळपांना शोभा आणणारे हे गरजणारे हत्ती घामानें डबडबून तुझ्याकडे आले असतां त्यांचा शीण जाऊन त्यांना सुख होतें. तसेंच ह्या दुसऱ्या पशुजातींनीं तुला किती तरी शोभा आली आहे? त्याचप्रमाणें सर्व जातीचे प्राणी तुझ्या आश्रयानें असल्यामुळें मेरुप्रमाणें तुला शोभा आली आहे. ब्राह्मण, तापसी, सिद्ध, श्रमण वगैरे लोक तुझा आश्रय करीत असल्यानें तुला स्वर्गाची शोभा आली आहे. ह्या जगांत असें कोणतेंही झाड, पर्वत किंवा वाडा नाहीं कीं, ज्याला वाऱ्यानें फडशा न पाडतां राखलें आहे. असें असून त्यानें जेव्हां तुला अगदीं शाबूद ठेविलें आहे तेव्हां याला कांहीं कारण असलें पाहिजे. ' सांवरीचा वृक्ष ह्मणाला, ' अहो ब्रह्मन्, वारा माझा मित्र नाहीं, बंधु नाहीं किंवा जिव्हाळ्याचा नाहीं. तसाच तो मोठा ब्रह्मदेव नाहीं ह्मणून तो मला राखीत

आहे ! माझें तेज व बळ वाऱ्यापेक्षां उग्र आहे. माझ्या सामर्थ्याचा अठरावा हिस्सा सुद्धां वाऱ्याच्या अंगीं सामर्थ्य नाहीं. मोठ्या जोराचा वारा आला तरी मी त्याला आपल्या सामर्थ्यानें थोपवितों. जो झाडें, पर्वत व दुसऱ्या वस्तू मोडून टाकतो तो मजकडे आला म्हणजे मी त्याचा पूर्ण मोड करतों. म्हणून वारा मोठा खवळला म्हणून मला त्याची भीति नाहीं.' नारद ह्मणाले, 'तुझे डोळे फिरले आहेत यांत संशय नाहीं. वाऱ्याचें बळ आजपर्यंत कोणाच्या अंगांत असल्याचें मला माहीत नाहीं. इंद्र, यम, कुबेर, वरुण हे सुद्धां वाऱ्याच्या तोडीला लागणार नाहींत; मग तुझी कथा काय ? ह्या जगामध्यें जे म्हणून प्राणी हालचाल करतात त्या सर्वांच्या हालचालीला व प्राणधारणेला वारा कारण आहे. हा बरोबर वहात असतो तेव्हां सर्वांचें ठीक असतें. पण हा कां वेड्यावांकड्या रीतीनें वाहूं लागला तर प्राण्याच्या संकटांना पारावार नाहीं. सर्व प्राण्यामध्यें श्रेष्ठ जो हा पूज्य वायु ह्याला तूं तुच्छ करतोस तेव्हां तुझी ही कोती बुद्धीच समजली पाहिजे. तुझ्या अंगांत कांहीं तशी ताकत नसून तुझी ही मूर्खपणाची वडबड आहे. रागाच्या झपाट्यांतच तूं हें कांहीं तरी बरळत आहेस हें पाहून मला फार राग आला आहे. मी स्वतः जाऊन हें तुझें सर्व गर्वाचें भाषण वाऱ्याला सांगतों. तुझ्यापेक्षां मोठमोठे बळवान चंदन, तिवस, साळ, देवदार, वेत, धन्वन यांनीं सुद्धां शहाणपणानें वाऱ्याला असें तुच्छ केलें नाहीं. त्यांना सुद्धां वाऱ्याचें बळ काय आहे, आपलें बळ काय आहे हें कळलें आहे; ह्मणून ते वाऱ्यापुढें नमतात. तुला मात्र मूर्खपणानें वाऱ्याचें अपार सामर्थ्य कळत नाहीं. ह्मणून हा मी त्याच्याकडे जाऊन सर्व त्याला सांगतों.' असें ह्मणून नारदांनीं वाऱ्याकडे जाऊन त्या सांवरीचें सर्व गर्वाचें भाषण त्याच्या कानावर घातलें. तेव्हां वारा सांवरीकडे जाऊन रागानें त्याला ह्मणाला, 'हे सांवरी, तूं माझी निंदा केलीस ती नारद जातां जातां मला सांगून गेले. मी वारा आहें समजलास. मी आपला प्रभाव व बळ दाखवितों. तूं मला माहीत आहेस. मी तुला पक्का ओळखतों. प्रजा उत्पन्न करण्याचे वेळीं तुझ्यावर ब्रह्मदेवांनीं विसावा घेतला होता त्यामुळें मीं तुझ्यावर हा प्रसाद केला होता. त्यामुळें तुझें रक्षण होत आहे; तुझ्या स्वतःच्या सामर्थ्यानें नव्हे, समजलास. ज्याअर्थीं एखाद्या सामान्याप्रमाणें समजून तूं मला तुच्छ करीत आहेस त्याअर्थीं मी आपलें बळ तुला दाखवितों, ह्मणजे मग असा तूं माझा अवमान करणार नाहींस.' त्यावर सांवरीचें झाड हासूनच ह्मणालें, 'वाऱ्या, तुला काय आपलें सामर्थ्य दाखवावयाचें असेल तें दाखीव. उगीच माझ्यावर रागावूं नकोस. रागावून तुझ्या हातून माझें काय होणार आहे! तुझें स्वतःचें जरी कितीही सामर्थ्य असलें तरी मी तुला भीत नाहीं. मी तुझ्यापेक्षां बळवान आहें. मग मला भिण्याचें काय कारण? बुद्धीनें जे बळवान तेच खरे बळवान. ज्यांना केवळ शरीरबळ आहे तें कांहीं बळवान नव्हेत.' हें ऐकून, 'बरें, उद्यां मी तुला आपलें तेज दाखवीन,' असें वारा ह्मणाला. इतक्यांत रात्र पडली. पुढें वाऱ्याचें सामर्थ्य मनांत आणून आपण त्याहून कमी आहों, नारदांशीं आपण बोललों तें खोटें असें त्या झाडाला वाटलें. तसेंच आपण दुसऱ्या झाडांहून सुद्धां बळानें कमी असलों तरी बुद्धीनें झाडामध्यें आपल्या जोडीचा कोणी नाहीं, तेव्हां बुद्धीच्या बळानें आपण या वाऱ्याच्या तडाक्यांतून सुटूं असा मनांत विचार करून त्यानें स्वतःच आपल्या मोठमोठ्या खांद्या, लहानमोठ्या डाहळ्या मोडून टाकिल्या. याप्रमाणें फांद्या, पानें, फुलें चट सारीं नाहींशीं करून तो एकटा सोट सकाळीं येणाऱ्या वाऱ्याला तोंड देऊन उभा राहिला. वारा अगदीं खवळून जाऊन सों सों करीत मोठमोठ्या झाडांना उनमळून पाडीत त्या सांवरीकडे आला. शेंडा व फांद्या नाहींशा होऊन त्यावर एकसुद्धां पान किंवा फूल नाहींसें पाहून त्याच्याकडे पहात व हासत वारा त्याला ह्मणाला, 'फांद्या, पानें तोडून टाकून तूं आपली जी दशा करून घेतली आहेस तीच दशा मीं तुझी केली असती. फुलें, शेंडें, अंकूर, पानें या सर्वांना तूं आपल्या स्वतःच्याच वाईट सल्ल्यानें मुकून तूं आपण होऊनच माझ्या तावडींत आला आहेस.' हें त्याचें भाषण ऐकून सांवरी लाजली व नारदांच्या भाषणाची आठवण होऊन तिला वाईट वाटलें. याप्रमाणें दुबळ्यानें बळवानाशीं वैर आरंभिलें असतां

त्या मूर्खाला पस्तावावें लागतें. ह्मणून बळवानाशीं वैर करूं नये. थोर लोक अपकार करणारांवर वैर एकाएकीं दाखवीत नाहींत. हळू हळू ते आपलें बळ दाखवीत असतात. **मूर्खानें बुद्धिमानाशीं वैर करूं नये.** बुद्धिमानाची बुद्धि गवतामध्यें शिरणाऱ्या विस्तवाप्रमाणें वाटेल तिकडे शिरत असते. मनुष्याच्या ठिकाणीं बुद्धीसारखें दुसरें कांहीं नाहीं. तसेंच बळासारखेंही दुसरें कांहीं नाहीं. ह्मणून मनुष्यानें एखाद्या मुलाच्या, वेड्याच्या, आंधळ्याच्या किंवा बहिऱ्याच्या अपराधाप्रमाणें बळानें जो अधिक असेल त्याचा अपराध निमुटपणें सोसून असावें. आणि तुझें वर्तन तसेंच झालें आहे. दुर्योधनाच्या अकरा अक्षौहिणी व तुमच्या सात अक्षौहिणी मिळून एकट्या अर्जुनाच्या तोडीच्या नव्हत्या; आणि ह्मणूनच त्यानें त्यांना मारून त्यांचा फडशा पाडला आहे.'

---

## १४० लोभ. (१२-१५८)

युधिष्ठिर ह्मणाला, 'पाप कशावर अवलंबून आहे व कशापासून होतें सांगा.' यावर भीष्म ह्मणाले, '**एकटा लोभ सर्वभक्षक मोठा आहे. तो मोठा ग्राह असून त्यापासून पाप होऊं लागून मोठें दुःख ओढवतें.** कपटाला मूळ हाच आहे. याच्यामुळेंच लोक पाप करण्याला तयार होतात. राग, इच्छा, मोह, माया, अभिमान, ताठेरपणा, परावलंबन, असहनशीलता, निलाजरेपणा, वैभवनाश, धर्मक्षय, चिंता, अपकीर्ति, कंजूषपणा, हावेरपणा, पापमूलक सर्व क्रिया, कुळाचा, विद्येचा, रूपाचा व ऐश्वर्याचा माद, सर्वांच्या ठिकाणीं द्रोहभाव, तुच्छबुद्धि, अविश्वास व वांकडेपणा, दुसऱ्याचा पैसा उपटणें, दुसऱ्यांच्या बायकांवर हात टाकणें, तोंडाचा फटकळपणा, मनाची धांव, यथेच्छ निंदा करण्याची संवय, कटिशूळ, अधाशीपणा, मृत्यूची झडप, मोठी पापदृष्टि, अनावर खोटें बोलण्याची संवय, अनिवार खादाडपणा, कर्णसुख घेण्याची पराकाष्ठेची संवय, कुत्सितपणा, फुशारकी, मत्सर, भलतें सलतें कृत्य, करूं नये अशा सर्व साहस कृत्यांकडे प्रवृत्ति, इत्यादि दुर्गुण लोभापासून जडतात. एकदां हा जडला ह्मणजे मग तो लहानपणीं जडो, कौमारावस्थेमध्यें जडो किंवा यौवनदशेंत जडो, तो आजन्म मनुष्याला सुटत नाहीं. मनुष्य खंगला तरी तो कधीं खंगत नाहीं. पुष्कळ पाण्याच्या हजारों नद्यांची भर पडून सुद्धां समुद्र ज्याप्रमाणें कधीं भरत नाहीं तशी याची किती जरी भर केली तरी समाधानी होत नाहीं. किती भर घातली तरी ज्याला आनंद होत नाहीं, किती इच्छा पूर्ण झाली तरी ज्याचें समाधान होत नाहीं व ज्याची खरी ओळख देवांना, गंधर्वांना, असुरांना, किंवा कोणालाही पटत नाहीं, अशा प्रकारच्या लोभाला त्याचा सोबती जो मोह त्यासह मनुष्यानें आत्मनिग्रहानें जिंकावें. दांभिकपणा, द्रोहभाव, निंदा, चुगलखोरी, मत्सर, हे गुण ज्यांचा आत्मनिग्रह नाहीं अशा लोभ्यांच्या ठिकाणीं दिसून येत असतात मोठमोठीं शास्त्रें अवगत असून बहुश्रुत व दुसऱ्यांच्या शंका दूर करणारे असले तरी कोत्या बुद्धीमुळें लोक या लोभाच्या पायीं दुःखांत पडतात. द्वेष, राग यांनीं ते भरले असून लोकाचार त्यांनीं झुगारून दिला असतो. मनामध्यें अगदीं खवळले असून गवतांनीं झांकलेल्या कुव्याप्रमाणें वरून मात्र ते गोड बोलत असतात. धर्माचा ध्वज फडकावून धर्माच्या ढोंगाखालीं ते जगाला लुबाडीत असतात. **लोभ डोळ्यांपुढें ठेवून आपला स्वार्थ साधण्यासाठीं निरनिराळीं दिखाऊ तत्त्वें व तदनुसार शेंकडों निरनिराळे पंथ काढून भल्यांचे मार्ग ते नाहींसे करून टाकतात. याप्रमाणें धर्माला उतरती कळा लावून लोभानें घेरलेल्या दुष्टांनीं ज्या ज्या सनातन संस्थांमधून फेर करून नव्या उत्पन्न केल्या असतात त्यापुढें तशाच कायम चालू होतात.** गर्व, राग, माज, धुंदी, अत्यानंद किंवा अति शोक हे गुण लोभी मनुष्याच्या ठिकाणीं दिसून येतात. हे नेहमीं लोभानें पछाडलेले लोक हलके समजावेत.

आतां शुद्धशील शिष्ट कसे असतात सांगतों ऐक. त्यांना पुनर्जन्माची किंवा परलोकाची बिलकुल भीति नसते. **मांसाला ते हात लावीत नसून** आवडनावडीच्या भानगडींत ते पडत नाहींत. शिष्टांचा आचार असेल तोच त्यांना नेहमीं आवडतो. आत्मनिग्रह हा गुण त्यांच्या अंगवळणीं असतो. त्यांना सुख किंवा दुःख सारखेंच वाटत असून सत्य हाच काय-

तो त्यांचा एक आधार असतो. ते नेहमीं दुसऱ्याला देत असतात. दुसऱ्यापुढें हात कधीं पसरीत नाहींत. दयावंत असतात. पितर, देव व अतिथि यांकडे त्यांचें लक्ष असतें. नेहमीं ते उद्योगी असतात, सर्वांवर उपकार करणारे असतात; वीर असतात; समग्र धर्म जशास तसा पाळतात; सर्वांचें हित करणारे असतात; वाटेल ते दुसऱ्याला देण्याला तयार असतात; धर्मापासून कोणाच्यानेंही त्यांना चाळवितां येत नाहीं. पूर्वीं भले ज्या वाटेनें चालले त्यापासून त्यांचें एवढें सुद्धां वांकडें पाऊल पडत नाहीं. ते कोणावर त्रासत नाहींत. ते चंचळ नसतात; उग्र नसतात. नेहमीं भल्या वाटेनें चालतात. साधु लोक नेहमीं त्यांजवळ असून ते कधीं कोणाला पीडा देत नाहींत. कामक्रोध, ममता, अहंकार हे त्यांच्या गांवीं सुद्धां नसतात. चांगले व्रतशील असून मर्यादा एवढी सुद्धां त्यांच्या हातून उल्लंघिली जात नाहीं. पैशासाठीं किंवा नांवासाठीं ते कधीं धर्मानें नसतात. इतर शरीरक्रियांप्रमाणें अवश्य कर्तव्य ह्मणून ते धर्माचरण करीत असतात. भय, राग, चंचळपणा, शोक हीं त्यांना मुळीं ठाऊक नसतात. धर्माचा टेंभा ते मिरवीत रहात नाहींत. गुप्त ह्मणून त्यांपाशीं कांहीं नसतें. लोभ, मोह त्यांच्या गांवीं नसून ते नेहमीं सरळ व खरे असतात. त्यांचें मन कधीं चळत नाहीं. लाभ झाला असतां त्यांना आनंद होत नाहीं व हानीनें दुःख होत नाहीं. ते नेहमीं भलेपणानें असून सर्वांवर त्यांची सारखी नजर असते. धर्मप्रिय अशा ह्या महानुभावांचा मोठ्या काळजीपूर्वक बहुमान करावा. व हा लोभ दूर होण्यासाठीं सत्संग धरावा.

---

## १४१ अज्ञान. ( १२. १५९ )

युधिष्ठिर ह्मणाला, ‘ पितामह, आतां मला अज्ञान, त्याची उत्पत्ति, ठिकाण, वाढ, नाश, मूळ, स्वाभाविक धर्म, गति, काळ, कारण व हेतु यांसंबंधानें समग्र माहिती सांगा. ’ हें ऐकून भीष्म म्हणाले, ‘ जो अज्ञानानें पाप करून आपण आपल्या हातानें आपल्या पायावर धोंडा मारून घेत आहों हें उमगत नाहीं व ज्यांचें चांगलें वर्तन आहे अशांचा जो नेहमीं द्वेष करतो तो लोकनिंदेला पात्र होतो. अज्ञानानें मनुष्य दुर्गतीला मिळून नरकाला जातो. अज्ञानानें क्लेश होऊन त्याला संकटांत बुडावें लागतें. वस्तूवर आसक्ति, द्वेष, मोह, हर्ष, शोक, मीपणा, काम, क्रोध, दर्प, दिरंगाई, आळस, इच्छा, द्वेष, संताप, दुसऱ्याचें चांगलें न पाहवणें व दुसऱ्या पापमूलक क्रिया यांनाच अज्ञान ह्मटलें आहे. अज्ञान व अतिलोभ हे एकच असून ह्या दोघांमध्यें सारखेच दुर्गुण असून दोघांचे परिणाम सारखेच आहेत. जेथें लोभ असतो तेथें अज्ञान असून त्याबरोबरच हें वाढतें व कमी होतें. याचे नानाविध निरनिराळे परिणाम होत असतात. अज्ञानात्मक लोभाचें मूळ बुद्धिनाश आहे. व हाच बुद्धिनाश त्याचा नैसर्गिक धर्म आहे. लोभाच्या ज्या वेळीं चिंधड्या उडतात, ज्या वेळीं लोभाची फलप्राप्ति होत नाहीं, तोच अज्ञानाच्या उत्पत्तीचा काळ होय. लोभानें अज्ञान व अज्ञानानें लोभ अशी परस्परांची उत्पत्ति आहे. याप्रमाणें अज्ञानाचें कारण व कार्य लोभ आहे, आणि सर्व दोष तरी लोभापासून उद्भवतात. म्हणून शहाण्यानें लोभ सांडावा. जनक, युवनाश्व, वृषादर्भि, प्रसेनजित वगैरे राजे तरी लोभ सोडूनच स्वर्गाला गेले. लोभ टाकल्यानें इहपर सुख मिळतें.

---

## १४२ आत्मनिग्रह. ( १२. १६० )

‘हा धर्ममार्ग मोठा विस्तृत असून त्याला पुष्कळ फांटे आहेत. तेव्हां यांपैकीं अत्यंत आवश्यक व उत्तम कल्याणकारक काय आहे तें सांगा,’ म्हणून युधिष्ठिरानें विचारलें असतां भीष्म ह्मणाले, ‘ मी तुला अत्यंत श्रेयस्कर काय आहे तें सांगतों. ह्मणजे तें अमृत पिऊन तुला तृप्ति होईल. निरनिराळ्या ऋषींनीं आपापल्या ज्ञानाप्रमाणें जे धर्माचे निरनिराळे विधि सांगितले आहेत त्यांमध्यें आत्मनिग्रह श्रेष्ठ असून उत्तम कल्याणकारक आहे. **विशेषेंकरून आत्मनिग्रह हा ब्राह्मणांचा सनातन धर्म समजला आहे. आत्मनिग्रहानें त्यांच्या सर्व क्रियांची सिद्धि बरोबर होत असते. आत्मनिग्रह हा दान, यज्ञ, व वेदाध्ययन यांहून श्रेष्ठ आहे. हा मनुष्याचें तेज वाढवितो. हा मोठा पवित्र आहे.** याच्या योगानें पाप नाहींसें होऊन अंगावर तेज चढून मोठें कल्याण होतें. आत्मनि-

ग्रहासारखा दुसरा धर्म नाहीं. सर्व धर्माचरण करणारांनीं हाच मोठा प्रशस्त धर्म समजला आहे. याच्या योगानें मनुष्याला इहपर मोठें सुख मिळतें. आत्मनिग्रही मनुष्याच्या हातून चांगलें धर्माचरण होतें. आत्मनिग्रही मनुष्य सुखानें निजतो, सुखानें उठतो, सुखानें वावरतो; व त्याचेंच मन सदा प्रसन्न असतें. आपलें मन ज्याच्या ताब्यांत नाहीं अशा मनुष्याला पावलोंपावलीं क्लेश भोगावे लागतात; व त्याच्या स्वतःच्या दोषामुळेंच दुसरे पुष्कळ अनर्थ त्याच्यावर ओढवतात. चारी आश्रमांना आत्मनिग्रहासारखें व्रत नाहीं. आतां त्याचें स्वरूप सांगतों ऐक. क्षमा, धैर्य, अहिंसा, समबुद्धि, सत्य, सरळपणा, इंद्रियांवर जय, दक्षता, सौम्यपणा, भीड, स्थिरता, दानशीलता, विचारबुद्धि, समाधान, गोड भाषण, अनसूया ह्या समुदायाचाच दमामध्यें समावेश होतो. त्याचप्रमाणें आत्मनिग्रही मनुष्य गुरूंचा सत्कार करून सर्वांवर दया करतो. चुगलखोरपणा, टवाळी, खोटें भाषण, स्तुति, निंदा, काम, क्रोध, लोभ, दर्प, ताठेरपणा, फुशारकी, रोष, ईर्षा, अवमान ह्या गोष्टी त्याच्या वाऱ्याला सुद्धां नसतात. लोकनिंदेला तो कधीं पात्र होत नाहीं. तो निरिच्छ असून लहानसान गोष्टीकडे कधीं लक्ष पुरवीत नाहीं. समुद्राप्रमाणें या क्षुल्लक ऐहिक गोष्टींनीं त्याची तृप्ति कधींच होत नाहीं. तूं माझा, मी तुझा, ते माझे, मी त्यांचा, याप्रमाणें पूर्व संबंधाचा विटाळ आत्मनिग्रही मनुष्याला लागत नाहीं. सर्व ग्राम्य त्याचप्रमाणें वन्य विषयांपासून तो अलिप्त राहून निंदा किंवा स्तुति यांच्या भानगडींत पडत नाहीं. तो मोठा शीलवान असून सर्वांशीं मित्रत्वानें असतो, व आपल्या स्वतःला ओळखत राहून नेहमीं प्रसन्न असतो. आत्मनिग्रही मनुष्याचा येथें सत्कार होऊन त्याला उत्तम गति मिळते. या जगांत जें शुभकर्म असेल व भले ज्याप्रमाणें वागत आले असतील तो रस्ता हा ज्ञानी मुनी कधीं सोडीत नाहीं. हा ज्ञानसंपन्न आत्मनिग्रही मनुष्य वनाचा आश्रय करून कालाकडे नजर देऊन धर्माचरण करीत ब्रह्मस्वरूप होण्याला पात्र होतो. सर्व प्राणिमात्रांपासून हा निर्भय असून यापासूनही कोणाला बिलकुल भीति नसते. हा आपल्या देहापासून सदा मुक्त असल्यानें त्याला कोठूनच कसलेंही भय म्हणून नसतें. तो आपल्या सर्व कर्मांचा उपभोग घेत राहून कर्म सांठविण्याच्या भानगडींत पडत नाहीं. सर्वांच्या ठिकाणीं समदृष्टीनें राहून तो जगमित्र होतो. ज्याप्रमाणें आकाशामध्यें संचार करणाऱ्या पक्ष्यांचा किंवा पाण्यावर फिरणाऱ्या पाणकोंबड्यांचा माग दिसत नाहीं त्याप्रमाणें ह्या जगांतला त्यांचा क्रम कोणाला कळत नाहीं. घरदार सोडून तो नेहमीं मोक्षाकडे नजर देऊन असल्यानें चिरकाळ त्याला तेजोमय लोक मिळतात. सर्व कर्में, तप, नानाविध विद्या व इतर सर्व गोष्टी सकाम बुद्धीनें करण्याचें सोडून देऊन, सर्व बंधनापासून मुक्त होऊन, शुद्धतेनें व प्रसन्न अंतःकरणानें स्वतःला ओळखूं लागून, शुद्ध अशी वासना ठेवल्यानें येथें सत्कार मिळून तो उत्तम लोकाला धनी होतो. वैदिक तपानें मिळणारें ब्रह्मदेवाचें गूढ असें श्रेष्ठ स्थान आत्मनिग्रहानें मिळत असतें. सर्व प्राणिमात्रांच्या ठिकाणीं अनुकूलतेनें राहून ज्ञानामध्यें रमलेल्या विद्वानाला पुनर्जन्माची भीति नाहीं, मग परलोक मिळेल कां नाहीं याची भीति कशाला? आत्मनिग्रहामध्यें दोष पाहिला तर एकच असून दुसरा कांहीं दिसत नाहीं. तो दोष ह्मटला ह्मणजे या क्षमाशील आत्मनिग्रही मनुष्याला लोक दुबळे समजतात. हा एक यामध्यें दोष असला तरी यांत गुण फार आहेत. आत्मनिग्रही मनुष्याला अरण्याची काय मोठी जरूर आहे? त्याचप्रमाणें आत्मनिग्रह नाहीं अशाला अरण्य तरी काय करणार? आत्मनिग्रही मनुष्य राहील तें ठिकाण त्याला अरण्य असून तोच त्याला आश्रम आहे.

---

## १४३ तप. ( १२.१६१ ).

फिरून भीष्म ह्मणाले, ' या सर्वांना मूळ फिरून तप आहे. ज्यानें तप केलें नाहीं अशा मूर्खाला क्रियांचें फळ मिळत नाहीं. ब्रह्मदेवांनीं हें सर्व जग; अन्न वगैरे आपल्या तपाच्या सामर्थ्यानेंच उत्पन्न केलें आहे. त्याचप्रमाणें ऋषींना वेद तपानेंच मिळाले. तपःसिद्धि मिळालेले सिद्ध तपानेंच समाधींच्या योगानें तिन्ही लोक पाहूं शकतात. वनस्पति, औषधें, नानाविध क्रिया तपानेंच साधतात.

जें कांहीं मिळण्याला कठीण तें सर्व तपानें मिळतें. ऋषींना वैभव मिळालें तें निःसंशय तपानेंच होय. दारू पिणारा, परस्व अपहार करणारा, भ्रूणहत्या करणारा, गुरुपत्नीशीं संबंध ठेवणारा असे महापापीसुद्धां तपानेंच पापापासून मुक्त झाले आहेत. तपाचीं निरनिराळीं स्वरूपें असल्यानें निरनिराळ्या मार्गानें लोक त्या वाटेला लागतात. सर्व सोडून तप करूं इच्छिणाराला अन्न सोडण्यासारखें दुसरें उत्तम तपाला साधन नाहीं. अहिंसा, सत्यभाषण, दान, इंद्रियनिग्रह यांपेक्षां सुद्धां अन्न सोडणें श्रेष्ठ आहे. दानापेक्षां कठीण दुसरें कांहीं नाहीं, मातृसेवेहून दुसरा श्रेष्ठ आश्रम नाहीं, तीन वेद अवगत असणाऱ्याहून श्रेष्ठ कोणी नाहीं. तसेंच सर्वत्यागाहून श्रेष्ठ तप दुसरें नाहीं. स्वर्गासाठीं व धर्मासाठीं इंद्रियें स्वाधीन ठेवण्यांत येत असतात, त्या संबंधांत सुद्धां अन्न सोडण्यासारखें दुसरें तप नाहीं. ऋषी, देव, पितर, मनुष्य वगैरे सर्व चराचर भूतमात्र तपावर असून जी कांहीं सिद्धि त्यांना मिळाली आहे ती तपानेंच होय. याचप्रमाणें देवांना जें महत्त्व मिळालें आहे तें तपाचेंच फळ आहे. ह्या ग्रहनक्षत्रांना जो त्यांच्या त्यांच्या सुखाचा वांटा मिळाला आहे तें त्यांच्या तपाचेंच फळ आहे. निश्चय ठेवून तप केल्यानें देवत्वसुद्धां मिळतें.

---

## १४४ सत्य. ( १२.१६२ )

पुढें युधिष्ठिरानें सत्याविषयीं मला कांहीं सांगा म्हणून विचारलें असतां भीष्म म्हणाले, ' चारी वर्णांच्या धर्मांचा संकर उपयोगी नाहीं; तथापि सर्व वर्णांना सत्य हा धर्म सारखाच आहे. सत्य हा भल्यांचा नेहमींचा धर्म असून हा सनातन धर्म आहे. सत्याला नेहमीं नमून असावें, कारण सत्य हीच श्रेष्ठ गति आहे. धर्म, तप, योग, सनातन ब्रह्म, सर्व श्रेष्ठ सत्यच असून सर्व कांहीं सत्याच्या आधारावर आहे. आतां तुला मी सत्याचा आचार व स्वरूप त्याचप्रमाणें सत्याची प्राप्ति कशानें होते तें यथाक्रमानें सांगतों ऐक. सत्य, समता, आत्मनिग्रह, निर्मात्सर्य, क्षमा, भीड, सहनशीलता, अनसूया, त्याग, ध्यान, सभ्यपणा, धृति, दया, अहिंसा हे सत्याचे तेरा प्रकार आहेत. सत्य हें अविनाशी, कायमचे व निर्विकारी आहे. कोणत्याही धर्माला बाधक नसणाऱ्या योगानें ह्याची प्राप्ति होते. आपल्या ठिकाणीं त्याचप्रमाणें, आवडत्यावर व नावडत्यावर तसेंच शत्रूवर सारखी दृष्टि ठेवणें हें इच्छा, द्वेष, काम क्रोध नाहींसे झाल्यानें अंगीं येतें. दम म्हणजे दुसऱ्याच्या वस्तूची इच्छा न धरतां नेहमीं गंभीरतेनें, धैर्यानें व निर्भयपणें राहून रोगापासून अलिप्त असणें होय. हा गुण ज्ञानानें अंगीं येत असतो. दानांत व धर्मांत गढून राहणें हीच निर्मत्सरता होय. नेहमीं सत्यामध्यें गढून राहिल्यानें हा गुण अंगीं येतो. क्षमा व अक्षमा यांचा विचार म्हटला म्हणजे ज्या गुणानें सन्मान्य भले लोक बरें, वाईट दोन्ही सहन करतात त्याला क्षमा म्हणतात. खरें बोलणाराच्या अंगींच हा गुण असतो. ज्याच्या योगानें बुद्धिमान मनुष्य मनामध्यें व भाषणामध्यें बेतानें राहून पुष्कळ चांगल्या गोष्टी पार पाडतो व लोकनिंदेला कधीं पात्र होत नाहीं त्याला भीड म्हणतात. धार्मिकपणा अंगांत असल्यानें हा गुण अंगीं येतो. धर्मासाठीं, ज्या गुणानें मनुष्य सहन करतो ती सहनशीलता होय. हा एक क्षमेचाच प्रकार आहे. धैर्यानें हा गुण अंगीं येतो. लोकसंग्रह करण्याचा धर्म याच्या अंगीं आहे. स्नेह तसेंच विषय यांपासून दूर होणें यालाच त्याग हें नांव असून रागद्वेष गेल्यावांचून हा गुण अंगीं यावयाचा नाहीं. ज्याच्या योगानें मनुष्य काळजीपूर्वक सर्वांचें चांगलें करीत राहतो त्याला भलेपणा नांव असून याचें कांहीं विशेष स्वरूप नाहीं. याच्या योगानें मनुष्याची कशावर विशेष आसक्ति रहात नाहीं. सुखदुःखांत ज्याच्या योगानें मनुष्य चळत नाहीं त्याला धैर्य म्हणतात. कल्याणेच्छूनें हा गुण नेहमीं अंगीं ठेवण्याचा प्रयत्न करावा. मनुष्यानें नेहमीं क्षमाशील व सत्यपर असावें. आनंद, राग, भय, हीं बाजूला सारतां आलीं म्हणजे मनुष्याच्या अंगीं धैर्य येतें. हातानें, मनानें किंवा तोंडानें कोणाचा द्रोह न करणें, कृपा करणें व शक्त्यनुसार दान करणें हा भल्यांचा सनातन धर्म आहे. सत्याचे हे तेरा निरा-

ळे प्रकार सांगितले तरी या सर्वांचा समावेश सत्यामध्यें होतो. हे सर्व सत्याला आधार देऊन जोर आणतात. सत्याचे सर्व गुण सांगतां येणें शक्य नाहीं, ह्मणूनच सर्व सत्याची प्रशंसा करतात. सत्याहून श्रेष्ठ धर्म नाहीं. असत्याहून श्रेष्ठ पातक नाहीं. **धर्माचा पाया सत्य आहे, ह्मणून सत्य नाहींसें करूं नये.** दान, यज्ञ, त्रेताग्निहोत्र, वेद व दुसरे सर्व धर्मनिर्णय सत्यापासून निघतात. हजार अश्वमेध व सत्य ताजव्यांत घातलीं असतां सत्याचेंच पारडें खालीं जाईल.

## १४५ कामक्रोधादि तेरा विकार. ( १२. १६३ )

काम, क्रोध, शोक, मोह, दुसऱ्याचें वाईट करण्याची बुद्धि, असहनशीलता, लोभ, मत्सर, ईर्ष्या, कुत्सितपणा, असूया, कृपा, भय हीं कशापासून उद्भवतात हें सांगा म्हणून युधिष्ठिरानें विचारिलें असतां भीष्म ह्मणाले, 'हे तेरा विकार प्राणिमात्रांचें मोठे बळवान शत्रू समजले आहेत. हे नेहमीं दक्ष राहून मनुष्याचें जरा दुर्लक्ष झालें कीं त्याला त्रास देण्याला तयार असतात. मनुष्याला पाहिल्याबरोबर लांडग्याप्रमाणें हे त्यावर बलात्कारानें झडप घालतात. यापासूनच दुःख, पाप, वगैरे उद्भवतात, हें मनुष्यानें लक्षांत ठेवावें. हे कशापासून उद्भवतात, कोठें असतात, कशानें नाहींसे होतात हें सांगतों ऐक. **राग** हा लोभामुळें उत्पन्न होऊन दुसऱ्याचे दोष पाहून हा पेट घेतो. **क्षमेच्या** योगानें याची वाढ नाहींशी होऊन. हा हळू हळू नाहींसा होतो. **वासना** संकल्पापासून निघून उपभोगानें तिची वाढ होते. शहाणा मनुष्य यापासून जेव्हां माघार घेतो तेव्हां तीं एकदम नाहींशी होते. राग व लोभ यांच्यापासून हेवा उत्पन्न होतो व सर्वप्राणिमात्रांवर **दया** व **वैराग्य** यांच्या योगानें हा नाहींसा होतो. **असूया** दुसऱ्यामधील दोष पाहून उत्पन्न होऊन ज्ञानानें नाहींशी होते. **मोहाची** उत्पत्ति अज्ञानापासून असून पापाच्या संवयीनें तो दृढ होत जातो. शहाण्या लोकांमध्यें रममाण होत राहिल्यानें हा एकदम नाहींसा होतो. मनुष्य ज्यावेळीं शास्त्रें भलत्या दृष्टीनें पाहूं लागतो तेव्हां **दुसऱ्याचें वाईट करण्याची बुद्धि** उत्पन्न होते. **तत्वज्ञानानें** ती नाहींशी होते. एखाद्या प्रिय वस्तूवरील प्रेमामुळें तिचा वियोग झाल्यानें **शोक** उत्पन्न होतो, व शोक करणें व्यर्थ असून त्यापासून फायदा कांहीं नाहीं हें जेव्हां कळतें तेव्हां तो नाहींसा होतो. **दुसऱ्याचें बरें न पाहवणें** हा दोष राग व लोभ यांचा अभ्यास ठेवल्यानें उत्पन्न होतो; व सर्व प्राणिमात्रांवरील **दया** व **वैराग्य** या गुणांनीं तो नाहींसा होतो. सत्य सोडून अपायकारक गोष्टींना कवटाळल्यानें **मत्सर** उत्पन्न होतो व **साधूंची संगत** केल्यानें हा नाहींसा होतो. कुळ, ज्ञान व ऐश्वर्य यांच्या योगानें **माद** येऊन यांनाच चांगलें ओळखल्यानें तो नाहींसा होतो. वासना व नीच संगतीची गोडी यांपासून **ईर्ष्या** उत्पन्न होते, व शहाणपणानें ती नाहींशी होते. लोकांच्या सामान्य क्रमाहून भलत्या रीतीनें वागून द्वेष उत्पन्न करणाऱ्या भलत्या शब्दांची संवय ठेवल्यानें **कुत्सितपणा** अंगीं येतो. सर्व लोकांकडे नजर फेंकल्यानें हा दोष नाहींसा होतो. आपला अपकार करणाऱ्या बळवानाचा योग्य सूड घेतां न आल्यानें **असूया** उत्पन्न होऊन **दयाबुद्धीनें** ती नाहींशी होते. गरीबांना पाहून आपलें अंतःकरण अस्वस्थ करून सोडणारी **कृपा** उत्पन्न होऊन धर्मतत्व ओळखल्यानें ती नाहींशी होते. लोभाची उत्पत्ति अज्ञानापासून असून भोग नश्वर आहेत हें जेव्हां दिसूं लागून उमगतें तेव्हां ती नाहींशी होतें. **शमानें** या तेरांना जिंकतां येतें. हे तेरा दुर्गुण दुर्योधनाच्या ठिकाणीं होते. तूं मात्र थोरांच्या शुश्रूषेनें जिंकले आहेस.

## १४६ दुष्टपणा. ( १२–१६४ )

युधिष्ठिर ह्मणाला, 'थोरांना पाहून दया काय आहे हें मला कळलें आहे. पण दुष्टपणाचें स्वरूप मला कळत नाहीं. कांटे, विहीर किंवा विस्तव यांना जसें लोक टाळतात त्याप्रमाणें दुष्ट मनुष्यांना लोक टाळतात. तेव्हां यासंबंधानें धर्मनिर्णय मला सांगा.' हें ऐकून भीष्म ह्मणाले, 'दुष्ट मनुष्याला नेहमीं दुष्ट व निंद्य कर्म करण्याची आवड राहून त्याप्रमाणें नेहमीं दुष्ट कृत्य त्याच्या हातून

होत असतें. दुसऱ्याच्या नांवानें खडे फोडून तो नेहमीं स्वतःला लोकनिंदेला पात्र करून घेतो. सर्व लोकांनीं आपल्याला फसविलें आहे असें त्याला वाटत असतें. एवढेंसें दुसऱ्याला दिलें तरी तें तो जरी सांगत फिरतो. तो नेहमीं वांकडा, क्षुद्र, कपटी व लुच्चा असतो. दुसऱ्याला देऊन कोणत्याही वस्तूचा उपभोग घेण्याची त्याला संवय नसते. तो मोठा असतांही नेहमीं वाईट संगति धरीत असतो, व आपली फुशारकी मारीत असतो. सर्वांविषयीं त्याची संशयवृत्ति असून कावळ्याप्रमाणें लोकांना फसविण्याकडे त्याचें लक्ष्य असतें. तो फार कृपण असतो. नेहमीं आपल्या सोबत्यांची तो प्रशंसा करीत राहतो. आश्रमांसंबंधानें त्याच्या मनांत नेहमीं द्वेषभाव असून संकर करण्याकडे त्याचें लक्ष असतें. परपीडेंमध्येंच त्याला मजा वाटत राहून गुणावगुणांची त्याला खातर नसते. त्याचें फार वांकडें वर्तन असून तो फार लोभी असतो व नेहमीं दुष्कृत्यें त्याच्या हातून होतात. धर्मशील व गुणवान असेल त्याला तो पापी समजतो. आपल्या स्वतःच्या शीलावरून तो दुसऱ्या कोणावर विश्वास ठेवीत नाहीं. दुसऱ्याचा झांकलेला दोष असला तरी तो उघडकीस आणतो. आपल्या अंगीं अशाच प्रकारचे दोष असले तरी आपलें पोट चालण्यासाठीं त्यांचें नांव काढीत नाहीं. त्याचप्रमाणें आपल्यावर उपकार करणाराला साधा समजून आपण त्याला छान फसविलें असें त्याला वाटत असतें. आपल्यावर उपकार करणाऱ्याला एखादे वेळीं द्रव्य देण्याचा प्रसंग आला असतां सुद्धां त्याच्या अंगचा संताप उडतो. खाण्यापिण्याचे उत्तम उत्तम पदार्थ जो दुसऱ्यांच्या डोळ्यांसमोर एकटा खातो त्याला दुष्ट समजावें. आधीं ब्राह्मणांना देऊन इष्टमित्रांच्या बरोबर जो खातो त्याला उत्तम सुख मिळतें. अशा प्रकारचा दुष्ट मनुष्य नेहमीं टाळावा.'

---

## १४७ नाना पापें व प्रायश्चित्तें.

### ( १२. १६५ )

भीष्म ह्मणाले, 'आतां तुला धर्माचा सारासार विचार सांगतों एक. ज्यांचें सर्वस्व लुबाडलें गेलें आहे, जे यज्ञ करीत आहेत, सर्व वेद ज्यांना पूर्ण अवगत आहेत, गुरु व पितर यांसंबंधानें ज्यांना आपलें कर्तव्य बजावून वेदाध्ययनामध्यें आपले दिवस घालवावयाचे आहेत अशा गरीब धार्मिकांना हात देण्यासाठीं पैसा व ज्ञान द्यावें. जे गरीब नाहींत अशा ब्राह्मणांना नुसती दक्षिणा द्यावी. जे पतित झाले आहेत अशांना कच्चें अन्न वेदीच्या बाहेर द्यावें. वेद, यज्ञ सर्व ब्राह्मणच आहेत. एकमेकांच्या चढाओढीनें धार्मिक बुद्धीनें ते यज्ञ करीत असतात. ह्मणून राजानेंही द्रव्य, रत्नें त्यांना देत असावें. तीन वर्षें किंवा त्याहून अधिक काळ कुटुंबपोषणासाठीं पुरेलसें धान्य ज्याच्याकडे आहे, त्याला यज्ञ करून सोम पिण्याला पात्रता आहे. परंतु राजा धार्मिक व यज्ञ करणारा असून विशेषेंकरून ब्राह्मणाचा यज्ञ एक चतुर्थांश खर्चासाठीं अडला असेल तर तेवढा पैसा तो यज्ञ शेवटास पोहोंचविण्यासाठीं राजानें ज्या वैश्यापाशीं पुष्कळ गुरें असून तो यज्ञ करीत नाहीं अशा वैश्यापासून घ्यावा. शूद्राच्याकडून त्यानें कांहीं घेऊं नये. कारण यज्ञामध्यें शूद्राचा परिग्रह कांहीं नसतो. शंभर गाई असून ज्यानें घरीं अग्नि ठेवला नाहीं किंवा हजार गाई असून जो यज्ञ करीत नाहीं, अशापासून देखील राजानें कांहीं विचार न करतां पैसा घ्यावा. जे कधीं दान करीत नाहींत अशापासून राजानें सांगून सवरून पैसा घ्यावा. असें वागल्यानेंच पूर्ण धर्म राजाच्या पदरीं पडतो. सहा जेवणें ज्याला मिळालीं नाहींत अशा ब्राह्मणानें उद्यांची काळजी न करतां एका दिवसापुरतें अन्न उखळांतून, शेतांतून, बागेंतून मिळेल तेथून नीच कर्मानें मिळवून आणावें, परंतु राजाला मात्र मग तो विचारो किंवा न विचारो त्यानें तें कळविलें पाहिजे. धर्म कळणाऱ्या राजानेंही त्याला शिक्षा करूं नये. कारण क्षत्रियांच्याच मूर्खपणानें ब्राह्मण भुकेनें मरतो. तो किती पढला आहे व त्याचें शील कसें आहे हें कळून घेऊन त्यानें त्याच्या पोटाची व्यवस्था करावी, व बाप ज्याप्रमाणें आपल्या पोटच्या पोराचें रक्षण करतो त्याप्रमाणें याचें रक्षण करावें. दुसरा कशाही प्रकारचा यज्ञ करण्याला मनुष्याला सामर्थ्य नसेल तर त्यानें प्रत्येक वर्षाच्या अखेरीला वैश्वानर यज्ञ क-

रावा. वैकल्पिक सांगितलेल्या धर्मकृत्यानें धर्महानि होत नाहीं असें धर्मज्ञांचें मत आहे. विश्वेदेव, साध्य, मोठमोठे ऋषी हे प्रसंगीं मरणाच्या भीतीनें विकल्पानें सांगितलेला धर्म निःशंक आचरतात. परंतु मुख्य धर्माप्रमाणें वागण्याचें सामर्थ्य असून जो त्याच्या ऐवजीं सांगितलेला धर्मच पाळतो त्या मूर्खाला मात्र स्वर्गफल मिळत नाहीं. वेदज्ञ ब्राह्मणानें आपल्यासंबंधानें राजाला कांहीं सांगूं नये. त्याच्या याच्या वीर्याची तुलना केली असतां याचेंच वीर्य श्रेष्ठ असल्यानें ब्रह्मतेज राजतेजापेक्षां दुःसह आहे. ब्राह्मण हा कर्ता, शास्ता, उत्पादक व देव आहे. भलते किंवा वायफळ शब्द त्याला कधीं बोलूं नये. क्षत्रियावर प्रसंग पडला असतां त्यानें आपल्या बाहुवीर्यानें त्यांतून पार पडावें, वैश्य व शूद्र यांनीं पैशाच्या बळावर पार व्हावें व ब्राह्मणांनीं मंत्र व होम यांनीं त्यांतून पार निघावें. मुलगी, तरुण स्त्री, मंत्र येत नसलेला मनुष्य, पोरकट मनुष्य व अपवित्र मनुष्य इतक्यांना अग्नीमध्यें आहुति देण्याला अधिकार नाहीं. यांपैकीं कोणी आहुति देईल तर आहुती देणारे व ज्यासाठीं ते आहुती देतात तो असे दोघेही नरकांत पडतात. ह्मणून यज्ञकर्मामध्यें कुशल अशा वेदपारग होत्यावांचून अग्नींत कोणी आहुती देऊं नये. यज्ञिय अग्नि सिद्ध करून प्राजापत्य घोडा दक्षिणा देत नाहीं त्याला धर्मवेत्ते अनाहिताग्नि समजतात. इंद्रियें स्वाधीन ठेवून भक्तिपूर्वक मनुष्यानें पुण्यकर्में करावीं. दक्षिणेवांचून कोणताही यज्ञ करूं नये. दक्षिणेवांचून केलेल्या यज्ञानें मनुष्य प्रजा, पशु व स्वर्ग या सर्वांना मुकतो व त्याचीं इंद्रियें, यश, कीर्ति व आयुष्य हीं नष्ट होतात. जे ब्राह्मण विटाळशीशीं संबंध ठेवितात, घरांत अग्नि ठेवीत नाहींत व ज्यांच्या घरीं वैदिक नाहींत ते सारे शूद्र समजले आहेत. ज्यागांवीं एका विहिरीचेंच पाणी सगळ्यांना काढून घ्यावें लागतें अशा गांवांत शूद्रीशीं लग्न करून बारा वर्षें राहणारा ब्राह्मण शूद्रच होतो. बायकोवांचून दुसऱ्या स्त्रीशीं शयनसंबंध ठेवणारा त्याचप्रमाणें शूद्राला थोरपणा देऊन स्वतःची योग्यता कमी करून घेणारा व एकाच आसनावर त्यांच्याजवळ बसणारा ब्राह्मण अशा एका रात्रीच्या पापाबद्दल तीन वर्षें व्रतशील राहिल्यानें त्या पापापासून मुक्त होतो. थट्टेंत केलेलें, स्त्रियांच्यासंबंधाचें, लग्नाच्या बाबतींतलें, गुरूच्यासाठीं किंवा आपला जीव वांचविण्यासाठीं केलेलें खोटें भाषण या पांच प्रसंगाच्या खोट्या भाषणाबद्दल दोष नाहीं. **चांगली विद्या हलक्यापासूनसुद्धां श्रद्धेनें मिळवावी; अपवित्र ठिकाणापासून सुद्धां कांहीं विचार न करतां सोनें घेण्याला हरकत नाहीं; वाईट कुळांतली सुद्धां मुलगी करावी; तसेंच विषापासून सुद्धां अमृत घेऊन प्यावें. स्त्रिया, रत्नें व पाणी यांना धर्मानें दोष नाहीं.** गाई ब्राह्मण, व आपलें रक्षण यासाठीं व वर्णसंकर झाला असतां वैश्यानें हत्यार धरावें. दारू पिणें, ब्रह्महत्या करणें व गुरुपत्नीशीं संबंध ठेवणें हीं पापें बुद्धिपूर्वक केलीं असतां त्याला दुसरें कोणतें ही प्रायश्चित्त नसून प्राण देणें हेंच एक प्रायश्चित्त आहे असा निश्चय आहे. त्याचप्रमाणें सोनें चोरणें, ब्राह्मणस्व चोरणें, दारू पिण्यांत मजा मारणें, जिच्याशीं संबंध ठेवूं नये अशीशीं संबंध ठेवणें, पतिताशीं व्यवहार ठेवणें, ब्राह्मणस्त्रीशीं संबंध ठेवणें, यांनीं मनुष्य कायमचा पतित होतो. एक वर्षपर्यंत पतिताकडून यज्ञ करविणें, त्यांना वेद पढविणें किंवा त्यांच्याशीं योनिसंबंध ठेवणें, यांच्या योगानें मनुष्य पतित होतो. परंतु त्याच्याबरोबर गेल्यानें, बसल्यानें किंवा खाल्ल्यानें तो पतित होत नाहीं. वर सांगितलेल्या पांच पातकांखेरीज बाकीच्यांना प्रायश्चित्त आहे. बाकीच्या संबंधानें सांगितल्याप्रमाणें प्रायश्चित्त घेऊन मनुष्यानें पापमुक्त होऊन फिरून पाप करूं नये. दारू पिणारा, ब्रह्महत्या करणारा व गुरुपत्नीशीं संबंध ठेवणारा ह्या तीन पतितांपैकीं कोणी मरून त्यांचीं प्रेत कर्में झालीं नसलीं तरी त्यांच्या सपिंडाशीं विचार न करतां अन्न घेऊन संबंध ठेवावा. धार्मिक मनुष्यानें पतिताला मग तो अमात्य किंवा गुरु जरी असला तरी सोडावें. प्रायश्चित्त न घेईतोंपर्यंत त्याच्याशीं भाषण सुद्धां उपयोगी नाहीं. अधर्म करणारा पुढें धर्मानें वागून तप करील तर त्याचें पाप दूर होतें. चोराला चोर ह्मटल्यानें सुद्धां तितकेंच पाप लागतें, व चोर नसणाराला चोर ह्मटल्यानें दुप्पट पाप लागतें. जी मुलगी दुसऱ्याला आपल्यापाशीं संबंध करूं देऊन बिघडली असते तिला ब्रह्महत्येचें

तीन चतुर्थांश पाप लागतें व तिला जो बिघडवितो त्याला बाकीचा चवथा हिस्सा लागतो. **ब्राह्मणांची निंदा केल्यानें किंवा त्यांवर हात टाकल्यानें मनुष्याची शंभर वर्षेंपर्यंत दुष्कीर्ति होते, व त्यांना ठार मारल्यानें हजार वर्षें तो नरकांत राहतो.** ह्मणून ब्राह्मणांची निंदा करूं नये किंवा त्यांना ठार मारूं नये. मारलेल्या ब्राह्मणाच्या रक्तानें जितके रजःकण भिजतात तितकीं वर्षें त्याला नरकांत रहावें लागतें. भ्रूणहत्या करणारा रणामध्यें गोब्राह्मणासाठीं लढत असतां शस्त्रानें किंवा पेटलेल्या आगींत उडी घेऊन मरेल तर तो त्या पापापासून मुक्त होतो. दारू पिणारा तापविलेली लाल दारू पिऊन त्या उन्हउन्ह दारूनें अंग भाजून मेला असतां त्या पापापासून मुक्त होतो. त्या पापापासून सुटण्याला याशिवाय दुसरा कांहीं उपाय नाहीं. गुरुपत्नीशीं संबंध ठेवणारा मनुष्य स्त्रीच्या आकाराच्या लाल लोखंडी प्रतिमेला प्रेमानें आलिंगून अथवा शिश्न व वृषण कापून आपल्या हातामध्यें घेऊन नैऋत्य दिशेकडे जाऊन कांहीं पाप मनांत न ठेवतां मेल्यानें शुद्ध होतो, किंवा ब्राह्मणासाठीं मेल्यानें किंवा अश्वमेध किंवा गोयज्ञ किंवा अग्निष्टोम केल्यानें त्या पापापासून मुक्त होतो. व इहपर त्याचा बहुमान होतो. ब्रह्महत्या करणाऱ्यानें बारा वर्षें ब्रह्मचर्यानें तपांत गढून मारलेल्या मनुष्याची कवटी हातांत घेऊन आपलें पाप जगाला सांगत फिरावें ह्मणजे तो त्या पापापासून सुटतो, किंवा त्यानें तपांत गढून ऋषीसारखें रहावें. गर्भारशी बायकोला ती तशी असल्याचें ठाऊक असून मारणाराला सुद्धां हेंच प्रायश्चित्त आहे. अशा बायकोला जाणूनबुजून मारण्यांत ब्रह्महत्येच्या दुप्पट पाप लागतें. दारू पिणारा ब्रह्मचर्यानें तीन वर्षेंपर्यंत मिताहारानें जमिनीवर पडून राहून व अग्निष्टोमाच्या वरचा यज्ञ करून हजार बैल व गाई दान करून शुद्ध होतो. वैश्याला मारलें असतां असें व्रत दोन वर्षें पाळून शंभर शंभर गाई व बैल द्यावेत व शूद्राला मारलें असतां एक वर्षच असें व्रत पाळून शंभर शंभर गाई व बैल द्यावेत. कुत्रा, डुक्कर किंवा गाढव मारलें असतां शूद्राला मारल्याबद्दल सांगितलेलेंच व्रत करावें. मांजर, तास, बेडूक, कावळा, साप व उंदीर या प्राण्यांना मारण्यांत एखाद्या पशूला मारल्यासारखेंच पाप लागतें.

आतां निरनिराळीं प्रायश्चित्तें सांगतों ऐक. लहानसान दोष न कळत केल्यानें मनुष्यानें पश्चात्तापदाखवून कांहीं सामान्य व्रतें एक वर्षपर्यंत पाळावीं. चांगल्या वेद पढलेल्या मनुष्याच्या बायकोशीं संबंध ठेविला असतां तीन वर्षें व इतर परस्त्रीशीं संबंध ठेविला असतां दोन वर्षें मनुष्यानें ब्रह्मचर्य व्रतानें राहून दिवसाचे चवथ्या प्रहरीं थोडें अन्न खावें. बायकांच्या बरोबर एकाच ठिकाणीं एकाच बैठकीवर बसून मजा मारण्याबद्दल तीन दिवस पाण्यावर राहिल्यानें मनुष्य पापमुक्त होतो. आगीवर केरकचरा टाकून तो विझविल्याबद्दलही हेंच प्रायश्चित्त आहे. त्याचप्रमाणें जो आईबाप किंवा गुरु यांना योग्य कारणावांचून सोडतो तो पतित होतो. **बदचालीच्या बायकोला किंवा कैदेंत पडलेलीला अन्नवस्त्र मात्र द्यावें. बदचालीच्या पुरुषाला जें प्रायश्चित्त सांगितलें आहे तेंच अशा प्रकारच्या स्त्रीनें पाळावें. जी बायको उच्च वर्णाच्या नवऱ्याला टाकून हलक्या वर्णाच्या मनुष्याशीं संबंध ठेविते तिला राजानें मोठ्या प्रेक्षकसमुदायांसमोर कुत्र्याकडून खाववावी. भल्या राजानें बदकाम करणाऱ्या मनुष्याला तापलेल्या लोखंडी पत्र्यावर ठेवून खालीं लांकडें पेटवून त्याला जाळावें, हीच शिक्षा व्यभिचार करणाऱ्या स्त्रीलाही द्यावी.** जो पापी पाप केल्यापासून वर्षाच्या आंत प्रायश्चित्त घेत नाहीं त्याला त्या मूळच्या पापाच्या दुप्पट पाप लागतें. अशा मनुष्याशीं जो दोन वर्षें संबंध ठेवतो त्यानें तीन व जो चार वर्षें संबंध ठेवतो त्यानें पांच वर्षें मुनीच्या व्रतानें भिक्षेवर पृथ्वीवर भटकत रहावें. थोरल्या भावाच्या आधीं धाकट्या भावानें लग्न केलें असतां त्यामुळें दोघे भाऊ व ती बायको असे तिघेही पतित होतात. या तिघांनींही गृहस्थाग्नि न ठेवणाऱ्या ब्राह्मणाला सांगितलेलें प्रायश्चित्त करावें, किंवा एक महिनाभर चांद्रायण व्रत किंवा दुसरें एकादें कडक व्रत पाळावें. नंतर धाकट्या भावानें ती सून ह्मणून थोरल्या भावाच्या स्वाधीन करावी आणि मग त्याच्या परवानगीनें तिला घ्यावी. याप्रमाणें ते तिघेही त्या पापापासून मुक्त होतात. **पशुजातीमध्यें गाईवांचून दुसऱ्या कोणत्याही पशूला मारण्यांत दोष नाहीं.**

**कारण सर्व पशूंवर मनुष्यांचा तावा आहे असें विद्वानांचें मत आहे.** चमरमृगाची चवरी लावून रंगभूमीवर येणाऱ्या ब्राह्मणानें हातामध्यें मातीचें भांडें घेऊन दररोज सात घरें आपलें पाप सांगत भिक्षा मागून तेथंच खात बारा दिवस रहावें ह्मणजे तो शुद्ध होतो. याप्रमाणें ती धरून वर सांगिल्याप्रमाणें व्रत पार पाडण्यास तो समर्थ नसेल तर हें व्रत त्यानें वर्षभर करावें. अशा प्रकारचें प्रायश्चित्त घ्यावें किंवा दान करण्याचें सामर्थ्य असेल त्यानें दान करावें. ज्यांची धर्मावर श्रद्धा आहे त्यांनीं गाय देऊन शुद्ध व्हावें. कुत्रा, डुक्कर, मनुष्य, कोंबडा गाढव यांचें मांस किंवा विष्ठा खाल्लयानें किंवा मूत्र प्याल्यानें मनुष्याची फिरून मुंज केली पाहिजे. सोम पिणारा दारू प्यालेल्याच्या तोंडाचा जर वास घेईल तर त्यानें त्या पापाच्या प्रायश्चित्तासाठीं तीन दिवस उन्ह पाणी व तीन दिवस तापविलेलें दूध प्यावें, किंवा तीन दिवस उन्ह पाणी पिऊन तीन दिवस वाऱ्यावर रहावें. हीं पापांचीं प्रायश्चित्तें असून ज्या ब्राह्मणाचे हातून अज्ञानानें किंवा अविवेकानें यांपैकीं एखादें पाप घडलें असेल त्यानें विशेषतः वरील प्रायश्चित्तें करावीं.

---

### १४८ तलवारीचा इतिहास. (१२. १६६)

याप्रमाणें गोष्टी चालल्या असतां मध्यें खड्गयुद्ध विशारद नकुल ह्मणाला, 'पितामह, धनुष्य हें उत्तम हत्यार समजलें आहे; परंतु माझ्या मतानें तलवारच चांगली वाटते. कारण धनुष्य मोडून जाऊन रथाचे घोडे निरुपयोगी झाले असतां तलवारीनें मनुष्याला आपलें रक्षण चांगल्या रीतीनें करून घेतां येतें. धनुष्य, गदा किंवा शक्ति घेऊन लढणारांचा एकट्या तलवार घेऊन लढणाराला समाचार घेतां येतो. तेव्हां सर्व हत्यारांमध्यें श्रेष्ठ हत्यार कोणतें; कोणीं, कशासाठीं कशी उत्पन्न केली व प्रथम ती तलवार कोणीं धरली, हें मला सांगा.' यावर भीष्म ह्मणाले, 'सांगतों ऐक. तुझ्या ह्या प्रश्नानें मनशिला धातूनें झांकलेल्या पर्वताप्रमाणें मला हलवून सोडलें आहे. हें सर्व जग पूर्वीं जलमय होतें, तें अगदीं स्थिर असून वर आकाश वगैरे कांहीं नव्हतें, व जमिनीचा भाग त्यावर मुळीं सुद्धां दिसत नव्हता. तें अंधारानें भरलें असून त्याला कोणाचा हात लागत नव्हता. त्याचें स्वरूप फार उग्र होतें. जिकडे तिकडे शांत होतें. अशा ह्या जगामध्यें प्रथम ब्रह्मदेव अवतरले. त्यांनीं नंतर वायु, अग्नि, वीर्यशाली सूर्य, आकाश, वातावरण, पाताळ, चंद्र, तारे, नक्षत्रें, ग्रह, वर्ष, ऋतू, महिने, पंधरवडे, क्षण वगैरे कालाचे बारीक भेद निर्माण केले. नंतर ब्रह्मदेवांनीं दृश्य स्वरूप धरून आपल्या इच्छाशक्तीनें मोठे तेजस्वी महर्षी मरीचि, अत्रि, पुलस्त्य, पलह, क्रतु, वसिष्ठ, अंगिरस, रुद्र, प्राचेतस व दक्ष हे मुलगे उत्पन्न केले. दक्षापासून साठ मुली उत्पन्न झाल्या. ह्या साठ मुलींना ब्रह्मर्षींनीं प्रजा उत्पन्न करण्यासाठीं आपल्याशा केल्या, व त्यांपासून सर्व विश्वें, भूतमात्रें, देव, पितृगण, गंधर्व, अप्सरा, निरनिराळे राक्षस, पक्षी, पशू, मासे, वानर, मोठमोठे साप, पाण्यावर व जमिनीवर असणारे निरनिराळे प्राणी, वनस्पति, घामापासून, अंड्यापासून, व गर्भापासून उत्पन्न होणारे प्राणी याप्रमाणें सर्व स्थावर जंगम जग निर्माण झालें. याप्रमाणें ब्रह्मदेवांनीं भूतसृष्टि निर्माण करून वेदामध्यें सांगितलेला शाश्वत धर्म सुरू केला. सर्व देव, त्यांचे गुरु व पुरोहित, आदित्य, वसु, रुद्र, साध्य, मरुत, अश्विन, भृगु, अत्रि, अंगिरस, सिद्ध, कश्यप, वसिष्ठ, गौतम, अगस्त्य, नारद, पर्वत, वालखिल्य, प्रभास, सिकत, घृतप, सोमवायव्य, वैश्वानर, मरीचिप, अरुष्ट, हंस, अग्नीपासून झालेले ऋषी, वानप्रस्थ व प्रश्नय हे सारे ब्रह्मदेवांच्या आज्ञेप्रमाणें धर्मानुसार वागूं लागले. हिरण्यकश्यपु, हिरण्याक्ष, विरोचन, शंबर, विप्रचित्ति, प्रल्हाद, नमुचि, बलि, हे व दुसरे पुष्कळ दैत्य, राग व लोभ यांच्या आधीन होऊन धर्माची मर्यादा उल्लंघून यथेच्छ स्वैर वागूं लागले. देव व आह्मी जातीनें एकच असल्यानें आह्मी देवांसारखेच आहों असें ह्मणून देव व ऋषी यांच्याबरोबर ते स्पर्धा करीत राहिले. कोणाही भूतमात्राचें कांहीं चांगलें न करतां व कोणावर दया म्हणून न करतां ते राहिले. सामादि तीन उपाय झुगारून देऊन केवळ दंडाच्या जोरावर ते लोकांना पीडा देऊं लागले. ताठ्यानें लोकांशीं सलगीनें वागणेंच त्यांनीं सोडून दिलें. एके समयीं नानाविध रत्नांनीं भरलेल्या हिमाचलाच्या शंभर योजनें विस्ती-

र्ण अशा शिखरावर ब्रह्मदेव ब्रह्मर्षींबरोबर लोकांचा कार्यभाग साधून देण्यासाठीं जाऊन राहिल्यानंतर हजार वर्षें लोटल्यावर त्यांनीं एक मोठा यज्ञ केला. तो यथासांग कर्म करणाऱ्या यज्ञपटु ऋषींकडून यथाशास्त्र पार पडला. त्याठिकाणीं सर्व देव हजर असून ब्रह्मर्षींनीं त्याला फार शोभा आली होती. त्याठिकाणीं एक भयंकर गोष्ट घडून आली. चोहोंकडून अग्नीला बाजूला सारून तारागणांनीं युक्त अशा स्वच्छ आकाशामध्यें उगवणाऱ्या चंद्राप्रमाणें त्यांतून एक प्राणी बाहेर पडला. निळ्या कमळाप्रमाणें त्याचा वर्ण असून त्याच्या दाढा फार तीक्ष्ण होत्या. पोट झडलेलें असून बांधा उंच होता. तो कोणाला हार जाण्यासारखा नसून त्याचें तेज मोठें अतुल होतें. तो बाहेर पडला असतां पृथ्वी चळचळ कांपली. मोठमोठ्या लाटा उसळून भोंवरे पडून समुद्र अगदीं खवळून राहिला. मोठमोठे उल्कापात होऊन उत्पात होऊं लागले. झाडाच्या फांद्या मोडून पडूं लागल्या. सर्व दिशा खवळून जाऊन सोसाट्याचा वारा सुटला. प्राणिमात्रांची भीतीनें अगदीं गाळण उडाली. तेव्हां त्या उत्पन्न झालेल्या घोर प्राण्याला पाहून, ' असुरांचा नाश करून सर्व लोकांचें रक्षण करण्यासाठीं मीं हा **तलवार** नांवाचा वीर्यशाली प्राणी उत्पन्न केला आहे, ' असें ब्रह्मदेव महर्षी, देव व गंधर्व यांना ह्मणाले. तेव्हां तें स्वरूप टाकून तो प्राणी लखलखीत तीक्ष्ण धारेची प्रतिकाळासारखी तरवार बनला. तेव्हां अधर्माला आळा घालणारी ती तलवार ब्रह्मदेवांनीं शंकराच्या स्वाधीन केली. तेव्हां रुद्रांनीं ती घेऊन निराळें उग्र स्वरूप धरलें. चार हात उत्पन्न करून घेऊन ते सूर्याला जाऊन भिडेसे उंच झाले. शरीर पसरट करून घेऊन वर दृष्टि देऊन तोंडावाटें ते ज्वाळा बाहेर टाकूं लागले. निळा, पांढरा, तांबडा असा अंगाचा निरनिराळा वर्ण दाखवीत सोन्याचें ठिपकें असलेलें, ताऱ्याप्रमाणें लखलखणारें हरणाचें कातडें त्यांनीं अंगावर घेतलें होतें. सूर्यासारखा एक तेजस्वी डोळा त्यांच्या कपाळावर होता. त्यांचे दुसरे दोन डोळे, एक काळा व एक पिंगट, फारच लकाकत होते. हे भगाचे डोळे काढणारे शूलधारी पराक्रमी महादेव एका हातांत प्रळयकाळच्या अग्नीसारखी ती तलवार व दुसऱ्या हातांत विजांनीं युक्त मेघासारखी तीन गांठींची ढाल घेऊन तलवारींची फेक करीत मंडळ करीत फिरूं लागले असतां त्यांचें स्वरूप फारच उग्र दिसत होतें. याप्रमाणें उग्र रूप धरून त्यांना युद्धाला तयार होऊन उभे राहिलेले ऐकून दैत्यही मोठ्या आनंदानें त्यांच्यावर चालून आले, व त्यांनीं मोठमोठे धोंडे, कोलती, व दुसरीं पाणीदार पोलादी हत्यारें त्यांवर सोडण्यास सुरवात केली; परंतु त्या योगानें त्यांचें तेज कमी न पडतां वाढतच चाललेलें पाहून दैत्यसैन्य घाबरून कचरलें. हातांत तलवार घेऊन छाटीत, भोसकीत, घाव करीत, कापीत, फाडीत ते इतक्या जलदीनें मंडळे करीत शत्रुसैन्यामधून वणव्याप्रमाणें फिरत होते कीं, ते एकटे असून दैत्यांना ते हजारांप्रमाणें वाटत होते. तलवारीच्या फेकांनीं हात, पाय, बरगड्या छाटून निघून आंतड्या बाहेर पडून दैत्य पटापट खालीं पडत होते. कांहीं तलवारीचे घाव लागून दुखावल्यामुळें एकमेकांना धीर देत पळत सुटले. कांहीं जमिनीमध्यें शिरले. कांहीं पर्वतांमध्यें दडले, कांहीं आकाशांत उडाले व कांहीं पाण्यामध्यें शिरले. याप्रमाणें तें घोर रणकंदन चाललें असतां भूमि मांसरक्ताच्या रेंद्यानें व रक्तानें माखलेल्या दैत्यांच्या शरीरांनीं चोहोंकडून भरून जाऊन तिला चोहोंकडून उग्र स्वरूप आलें. याप्रमाणें दैत्यांना मारून पृथ्वीवर फिरून धर्म स्थापिल्यावर शंकरांनीं तें भयंकर रूप टाकून आपलें कल्याणप्रद रूप फिरून धरलें. त्या जयामुळें सर्व मोठमोठे ऋषी व देव यांनीं त्यांचा बहुमान केला. नंतर दैत्यांच्या रक्तानें भरलेली धर्मरक्षक ती तलवार शंकरांनीं विष्णूला दिली. विष्णूनें मरिचींला, मरिचींनीं महर्षींना महर्षींनीं इंद्राला, इंद्रानें लोकपालांना, लोकपालांनीं सूर्यपुत्र मनूला, देऊन त्याला मनुष्यांचा स्वामी केला, व जिच्यामध्यें धर्म सांठविला आहे अशा त्या तलवारीनें केवळ लहरीखातर लोकांना दंड न करतां जे शरीर व मन यांसाठीं धर्माची मर्यादा सोडतील त्यांना शिक्षा करून प्रजेचें रक्षण करण्यास सांगितलें. **कोणाला तोंडानें बोलावें, कोणाला अटकेंत ठेवावें, कोणाला दंड करावा, कोणाचे हातपाय वगैरे तोडून शरीर व्यंग**

**करावें व कोणाला ठार करावें; मात्र हीं देहान्त शिक्षा लहानसान कारणावरून देऊं नये, अशी त्याला ताकीद दिली.** हे कटु शब्दादि प्रकार तलवारीचीं इतकीं रूपेंच आहेत, व राजशासन ओलांडिल्यानें तलवार हीं वर सांगितलेलीं रूपें धरीत असते. मनूनें प्रजेच्या रक्षणासाठीं ही तलवार क्षुपाला राजा करून राज्य त्यावर सोंपविलें त्यावेळीं त्याला दिली. क्षुपापासून ती इक्ष्वाकूला, इक्ष्वाकूपासून पुरूरव्याला, पुरूरव्यापासून आयूला, आयूपासून नहुषाला, त्यापासून ययातीला, ययातीपासून पुरूला, पुरूपासून अमूर्तरयाला, त्यापासून भूमिशयाला,भूमिशयापासून दुष्यंताचा मुलगा भरत याला, त्यापासून ऐलविलाला, त्यापासून धुंधुमाराला, धुंधुमारापासून कंबोज देशच्या मुचुकुंदाला, मुचुकुंदापासून मरुत्ताला, मरुत्तापासून रैवताला, त्यापासून युवनाश्वाला, युवनाश्वापासून यादवभोजाला, यदूपासून शिबीला, शिबीपासून प्रतर्दनाला, त्यापासून अष्टकाला, अष्टकापासून पृषदश्वाला, त्यापासून भरद्वाजांना, त्यांपासून द्रोणांना, त्यांपासून कृपांना मिळाली व त्यांपासून तुला व तुझ्या भावांनाही मिळाली. या तलवारीचें नक्षत्र कृत्तिका असून अग्नि हिचें दैवत आहे. त्याचप्रमाणें रोहिणी गोत्र असून रुद्र हिचा गुरु आहे. असि, विशसन, खड्ग, तीक्ष्णधार, दुरासद, श्रीगर्भ, विजय, धर्मपाल हीं तलवारीचीं आठ नांवें आहेत. सर्व प्रहार करण्याच्या हत्यारांमध्यें तलवार पहिली आहे. आतां धनुष्यासंबंधानें ह्मणशील तर तें प्रथम पृथूनें निर्माण केलें. त्या वेनपुत्रानें याच्या साहाय्यानें पृथ्वीपासून पुष्कळ धान्य मिळविलें. '

---

## १४९ धर्मार्थकामांचे गुणावगुण.

### ( १२–१६७ )

याप्रमाणें बोलून भीष्म गप्प झाल्यावर युधिष्ठिर घरीं जाऊन आपल्या भावांना व विदुरांना ह्मणाला, ' धर्मार्थकामांवर लोकवृत्ति अवलंबून आहे तेव्हां यांपैकीं उत्तम, मध्यम व कनिष्ठ कोणते व या तिघांना जिंकण्यासाठीं कशाकडे लक्ष द्यावें ? ' हें ऐकून विदुर ह्मणाले, ' बहुश्रुतपणा, तप, त्याग, यज्ञक्रिया, क्षमा, भावशुद्धि, दया, सत्य, आत्मसंयमन हींच आत्म्याचीं वैभवें आहेत. हीं मिळविण्याविषयीं मनुष्यानें झटत राहून मन चळूं देऊं नये. धर्म व अर्थ यांचें मूळ एकच असून सर्वांचा एका धर्म शब्दांत समावेश करतां येईल. धर्मानेंच ऋषी तरले असून धर्मावरच सर्व कांहीं अवलंबून आहे. धर्मानेंच देव वाढले असून अर्थही धर्माच्या ठिकाणींच आहे. धर्म हा श्रेष्ठ असून अर्थ मध्यम व काम कनिष्ठ समजले जातात. म्हणून आत्मनिग्रहानें धर्म विशेषेंकरून डोळ्यांपुढें ठेवून असावें. आपल्याप्रमाणेंच सर्व भूतमात्रांच्या ठिकाणीं वागावें. ' यावर अर्जुन ह्मणाला, ' ही कर्मभूमि असून येथें कर्मच चांगलें ह्मटलें आहे. शेती, व्यापार, गुरें बाळगणें व नानाप्रकारच्या कला यांतच पैसा असून पैसा हीच सर्वांची मर्यादा आहे. पैशावांचून धर्म व काम साधत नाहींत अशी श्रुति आहे. पैशानेंच धर्म व विषय मिळवून घेतां येतात. चांगल्या चांगल्या कुळांत जन्मलेले सुद्धां ब्रह्मदेवांप्रमाणें नेहमीं पैसेवानाला भजतात. ज्यांनीं हरणाचें कातडें धारण करून जटा वाढविल्या आहेत, आत्मनिग्रह करून अंग चिखलानें भरवून घेतलें आहे व डोकें मुंडून निष्ठापूर्वक ब्रह्मचर्य पतकरलें आहे, अशा लोकांची सुद्धां पैशावरची आशा सुटत नाहीं. त्याचप्रमाणें काषाय वस्त्र धारण करून दाढी वाढविलेले, भिडस्त, विद्वान, शांत व सर्व पाशांतून सुटलेले सुद्धां या पैशाच्या आशेपासून सुटले नाहींत. तसेंच कुळाचारांप्रमाणें आपापल्या धर्माप्रमाणें वागून स्वर्ग मिळविण्याची इच्छा करणारे आस्तिक असोत, नास्तिक असोत किंवा मोठ्या योगामध्यें गढले असोत, सर्वांनीं पैशाचें श्रेष्ठत्व कबूल केलें आहे. जो नोकरांना सर्व भोग देऊन शत्रूला दंड करतो तोच पैसेवान समजावा. आतां हे नकुलसहदेव यासंबंधानें काय ह्मणतात तें ऐका. ' यावर नकुलसहदेव ह्मणाले, ' उठल्या बसल्या, निजल्या, चालतांना, सदोदित मोठ्या काळजीपूर्वक मनुष्यानें पैसा मिळविण्याला झटावें. जर दुर्लभ व फार प्रिय असा पैसा मिळेल तर त्यापासून सर्व इच्छा निःसंशय पूर्ण होतात. ज्या पैशाचा धर्माशीं संबंध आहे किंवा ज्या धर्माचा पैशाशीं संबंध आहे, तोच पैसा किंवा तोच धर्म अ-

मृतारखा गोड होतो. ज्याजवळ पैसा नाहीं त्याच्या इच्छा तरी कशाच्या पूर्ण होणार व धर्माच्याच पाठीं लागलेल्याला पैसा तरी कोठून मिळणार? धर्मार्थीनीं ज्याला सोडलें आहे, अशा मनुष्याला लोक कांपत असतात. ह्मणून आत्मनिग्रहानें धर्म डोळ्यांपुढें ठेवून मनुष्यानें पैसा मिळविला पाहिजे. हें जो पक्कें लक्षांत ठेवील त्याचेच सर्व हेतू साधतात. प्रथम धर्म पाळून धर्माच्या अनुरोधानें पैसा मिळविण्याचा प्रयत्न करावा व पैसा मिळवून मग त्याच्या साहाय्यानें विषयोपभोग घ्यावेत.' यावर भीमसेन ह्मणाला, 'ज्याची इच्छा ह्मणून नाहींशी झाली आहे त्याला पैशाची इच्छा रहात नाहीं किंवा धर्माची इच्छा रहात नाहीं. त्याला इच्छा ह्मणून कांहींच रहात नाहीं. ह्मणून इच्छा हीच सर्वांमध्यें श्रेष्ठ आहे. इच्छेमुळेंच ऋषी पानें, फळें, मुळें, यांवर राहून किंवा वायुभक्षण करून, आत्मनिग्रहानें, कोणी तपामध्यें, कोणी वेदाध्ययनामध्यें, कोणी श्राद्ध यज्ञ इत्यादि क्रिया करण्यामध्यें, कोणी दान देण्यामध्यें व कोणी दान घेण्यामध्यें, गढले असतात. व्यापारी, शेतकरी, गुरें पाळणारे, मजूर, कारागीर, व देवकृत्यामध्यें गढलेले लोक हे तरी आपापल्या कामामध्यें या इच्छेमुळेंच गढले असतात. कोणी समुद्रामध्यें शिरतात, ते तरी इच्छेमुळेंच. इच्छेचीं निरनिराळीं स्वरूपें आहेत. व सर्व कांहीं इच्छेनें भरलें आहे. ज्यामध्यें इच्छेचें अंग नाहीं असें कांहीं नाहीं, नव्हतें, किंवा असणार नाहीं. हें मुख्य तत्त्व असून धर्म व अर्थ ह्यांचा पाया वासनाच आहे. दह्याचा अर्क ज्याप्रमाणें लोणी आहे, तशीच धर्मार्थसंबंधानें वासना आहे. पेंडीपेक्षां तेल चांगलें, ताकापेक्षां तूप चांगलें, व खांद्यांपेक्षां फुलें व फळें चांगलीं. त्याप्रमाणेंच वासना हीच धर्मार्थांहून श्रेष्ठ आहे. ज्याप्रमाणें फुलांपासून मध काढून घ्यावयाचा, त्याप्रमाणें धर्मार्थांपासून वासना काढून घेतली पाहिजे. वासना ही धर्मार्थांचें मूळ असून तत्स्वरूपी आहे. वासनेवांचून ब्राह्मण गोड गोड अन्न व दक्षिणा ब्राह्मणांना देणार नाहीं. वासनेवांचून जगांत घडणारी हालचाल दृष्टीस पडणार नाहीं. ह्मणून या तिहींमध्यें कामाचीच मातबरी अधिक आहे, असा विचारांतीं माझा निश्चय ठरला आहे. माझे हे शब्द फोल समजूं नका, धर्म, अर्थ, व काम या तिघांकडे सारखें लक्ष देतो तो हलका मनुष्य समजावा. यांपैकीं जो दोहोंकडे लक्ष देतो, तो मध्यम प्रतीचा असून जो सर्वांकडे लक्ष देतो तोच उत्तम होय.' याप्रमाणें बोलून भीष्म थांबल्यावर युधिष्ठिर ह्मणाला, 'निःसंशय धर्मशास्त्रासंबंधीं तुमचीं मतें ठरलीं असून तुह्मी त्यासंबंधीं आधार जाणता आहां; तुह्मीं आपापलीं निश्चयात्ममक मतें सांगितलीं तीं मीं ऐकलीं. आतां माझें ह्मणणें तुह्मी नीट ऐकून घ्या. जो पाप किंवा पुण्य यांमध्यें न गढतां धर्म, अर्थ व काम यांजकडे लक्ष देत नाहीं व सर्व दोषांपासून मुक्त राहून मातीचा ढिकळा व सोनें हीं सारखीं लेखतो तो सुखदुःखांपासून तसेंच कोणतेंही काम साधण्याच्या भानगडीपासून सुटतो. सर्व प्राणीमात्र जन्ममरणाच्या त्याचप्रमाणें ह्मातारपणाच्या वगैरे तावडींत सांपडलेले असतात. ते सर्व मोक्षाची प्रशंसा करतात; परंतु मोक्ष काय आहे हें कोणालाच कळत नाहीं. स्नेहपाश तुटल्याशिवाय मोक्ष नाहीं. शहाणे लोक निर्वाणाकडे लक्ष देऊन असतात. ह्मणून प्रिय किंवा अप्रिय गोष्ट करण्याच्या भानगडींत पडूं नये. हेंच मत चांगलें असून मनाप्रमाणें वागणें चांगलें नव्हे. सर्व भूतमात्र दैवाच्या आज्ञेप्रमाणें वागत असतात. दैव बलवत्तर आहे. मनुष्याच्या प्रयत्नानें अप्राप्य कधीं मिळावयाचें नाहीं. जें घडावयाचें तें घडत असतें. धर्मार्थकामांपासून अलग असणारा सुद्धां मोक्ष मिळवूं शकतो. ह्मणून मोक्ष हा खऱ्या लोकहिताचा आहे.' हें मुद्देसूद व पटणारें उत्तम भाषण ऐकून सर्वांना आनंद होऊन त्यांनीं युधिष्ठिराला हात जोडले.

---

## १९० संगतीचा परिणाम कृतघ्नता.

## ( १२. १६८—१७३. )

पुढें दुसरे दिवशीं सर्व मंडळी फिरून भीष्मांकडे गेल्यावर युधिष्ठिर त्यांना ह्मणाला, 'कशा प्रकारचे लोक सौम्य समजावेत, कोणाशीं उत्तम सख्य जुळणें शक्य आहे, व कोण आज किंवा पुढें कल्याण करण्याला समर्थ असतात, हें मला सांगा. माझें मत असें आहे कीं, सुहृदाच्या तोंडीला मोठी संपत्ति,

बांधव किंवा नातेवाईक कोणीही लागणार नाहींत. आपल्या मनाप्रमाणें वागून आपलें हित करणारा जिव्हाळ्याचा मनुष्य मिळणें फार कठिण काम आहे.' यावर भीष्म ह्मणाले, 'कोणाशीं सख्य करावें, कोणाशीं करूं नये, हें सारें मी सांगतों ऐक. लोभी, क्रूर, धर्मलंड, कपटी, लुच्चा, हलकट, पापी, संशयात्मक, आळशी दीर्घसूत्री, वांकडा, बदलौकिकी, गुरुस्त्रीशीं संबंध ठेवणारा, मित्रांना संकटीं सोडणारा, दुरात्मा, निर्लज्ज, पापाकडे दृष्टि ठेवणारा, नास्तिक, वेदनिंदक, इंद्रियें स्वाधीन न ठेवतां त्यांना स्वैर सोडणारा, खोटा, लोकांच्या द्वेषाला पात्र झालेला, कराराप्रमाणें न वागणारा, चहाडखोर, मूर्ख, मत्सरी, पापाशीं जखडून राहिलेला, ज्याचें शील वाईट आहे, ज्याचें अंतःकरण शुद्ध झालें नाहीं, दुष्ट, जुगारबाज, मित्राचें नेहमीं जो वाईट करण्याला पहात असतो, जो दुसऱ्याला बुचाडूं पहातो, यथाशक्ति साहाय्य केलें असतां ज्याला समाधान होत नाहीं, जो मित्राला कधीं धीर देत नाहीं, रागावण्याला कांहीं कारण नसून जो रागावतो, जो चंचळ आहे, जो वाटेल तेव्हां वांकडा होतो, चांगल्या जिव्हाळ्यांच्या मित्रांना सोडण्याला ज्या पाप्याच्या मनामध्यें कांहीं किंतु वाटत नाहीं, जो नेहमीं आपल्या फायद्याकडे लक्ष देऊन मित्राच्या हातून चुकून लहानसान अपराध घडला तरी त्याच्याबरोबर भांडण्याला कंबर बांधतो, जो वैऱ्याप्रमाणें वागून वरून मित्राप्रमाणें गोड बोलतो, ज्याची वांकडी नजर असून ज्याला स्वहित दिसत नाहीं, कल्याणामध्यें ज्याला आनंद होत नाहीं, अशा मनुष्याशीं स्नेह करूं नये. त्याचप्रमाणें दारूबाज, द्वेषी, रागीट, निर्दय, निष्ठुर, दुसऱ्यांना ताप देणारा, मित्रद्रोह करणारा, प्राण्यांना मारण्यांत गढलेला, कृतघ्न, नीच, व लोकांचें छिद्र पहात रहाणारा, अशाशीं कधीं सख्य करूं नये. आतां सख्य कोणाशीं करावें सांगतों ऐक. कुलीन, चांगलें व अदबीनें बोलणारा, मोठा ज्ञानी, देखणा, गुणवान, निर्लोभी, श्रमाची पर्वा न करणारा, मित्रत्वाला भला, कृतज्ञ, सर्वज्ञ, गोड, नेकीचा, जितेंद्रिय, व्यायामशील, थोर कुळांत जन्मून कुलवृद्धि करणारा, अंगांत कांहीं दोष नसून नांवाजलेला, असे लोक राजानें जवळ करावे. आपल्या शक्त्यनुसार राज्याशीं वागल्यानें ज्यांला संतोष होऊन समाधान वाटतें, जे विनाकारण न रागावतां उगीच नाखुष होत नाहींत, व नाखुष झाले तरी मनानें सुद्धां वाईट करण्याला तयार होत नाहींत, ज्यांना अर्थ पूर्ण कळतो, आपल्याला शिणवून सुद्धां जे सुहृदाचें काम करण्याला तयार असतात, लोकरीच्या लाल कापडाप्रमाणें जे मित्राशीं विटत नाहींत, जे रागावून निर्धनाकडे दुर्लक्ष करीत नाहींत व लोभ किंवा मोह यामुळें बायकांना बिघडवीत नाहींत, जे मित्रांना वांकडा रस्ता दाखवून देत नाहींत, जे विश्वसनीय असून धर्मप्रिय असतात, ज्यांना सोनें व ढेंकूळ सारखें वाटत असून मित्रांवर ज्यांची दृढबुद्धि असते, जे आपला मोठेपणा बाजूला ठेवून सर्वप्रमाण शास्त्रांच्या व आरंभिलेल्या कामाच्या मार्गे असतात व जे लोकांना मिळवून घेऊन स्वामिकार्याकडे गढले असतात, अशा उत्तम लोकांशीं राजानें सख्य जोडावें. जो अशांशीं सख्य करतो त्याचें राज्य चांदण्याच्या योगानें वाढणाऱ्या चंद्राच्या वैभवाप्रमाणें वाढत रहातें. शास्त्रनीति ठाऊक असून राग ज्यांचा स्वाधीन आहे व जे नेहमीं रणामध्यें शौर्य गाजवितात, अशा जन्मशीलादि गुणांनीं संपन्न लोकांशीं सख्य जोडावें. ज्यांना टाळावें ह्मणून सांगितलें अशापैकीं सुद्धां जे कृतघ्न व मित्रांचा घात करणारे असतात ते फारच नीच समजले आहेत. अशा दुराचरणी लोकांना तर अवश्य टाळावें. या मित्रद्रोही कृतघ्नासंबंधानें उत्तर दिशेला म्लेंच्छांच्या राज्यांत जी एक गोष्ट घडली ती सांगतों ऐक.

मध्यदेशचा कोणी एक वेदवीद कांहीं एक येत नसलेला ब्राह्मण एक भरभराटीचें गांव पाहून भिक्षेसाठीं त्यामध्यें शिरला. तेथें सर्व वर्णांमधील कमजास्तीपणा जाणणारा एक सत्यसंध, दानशील व ब्राह्मणांवर भक्ति असलेला चोर होता. त्याच्या घरीं जाऊन या ब्राह्मणानें त्याच्यापाशीं राहण्याला एक घर व वर्षभर पुरेल असें सामान मागितलें. त्या चोरानें त्याला एक दशेसहित वस्त्र व नवरा नसलेली अशी एक बाई दिली. याप्रमाणें त्या चोरापासून सर्व कांहीं मिळाल्यानें तो गौतम नांवाचा ब्राह्मण त्या चोरानें दिलेल्या घरांत तिच्याशीं रममाण झाला. दासीच्या कुटुंबालाही साहाय्य करीत

तो त्या शिकाऱ्यांच्या गांवांत पुष्कळ वर्षें राहिला. तेथें बाण मारावयास शिकण्याचाही त्यानें चांगला यत्न केला. पुढें इतर चोरांप्रमाणेंच तो रानामध्यें जाऊन नेहमीं त्या ठिकाणीं असणारे पुष्कळ हंस मारूं लागला. याप्रमाणें तो निर्दय बनून मारण्यांत प्राविण्य मिळवून प्राण्यांचा वध करण्यांत गढून गेला; व चोरांच्या संगतीनें चोरांच्या जोडीला जाऊन मिळाला. याप्रमाणें त्या चोरांच्या गांवांत तो सुखानें पुष्कळ पक्षी मारीत राहिला असतां त्या गांवाला जटा वाढून अंगावर फाटकीं तुटकीं वस्त्रें असलेला, वेद पढलेला, शुद्ध, गौतमाच्याच गांवचा व त्याचा मित्र असा दुसरा एक ब्राह्मण आला. शूद्रानें दिलेलें अन्न तो घेत नसल्यामुळें ब्राह्मणाचें घर शोधीत तो त्या रामोशांनीं भरलेल्या गांवांतून फिरतां फिरतां त्या गौतमाच्या घरांत शिरला. गौतमही त्याच वेळीं रानांतून घराकडे परत येत होता. ते दोघे एकमेकांना भेटले. हातामध्यें धनुष्यबाण, खांद्यावर मारलेल्या हंसांचें ओझें, शरीर रक्तानें भरलेलें, नरभक्षक पतितासारखा त्याला पाहून ओळखून तो ब्राह्मण लाजून ह्मणाला, 'तूं कुलवृद्धि करणारा ब्राह्मण असून मूर्खपणानें हें काय आरंभिलें आहेस. मध्यदेशामध्यें तुझा जन्म झाला असून अशा रामोशांच्या मालिकेंत तूं कसा जाऊन मिळालास? आपल्या वेदपारग प्रसिद्ध पूर्वजांना आठव. त्यांच्या वंशांत तूं असा कुलकलंकी जन्माला आला आहेस! आपलें बीज, शील, वैदिकपणा, आत्मनिग्रह, भूतदया हे गुण लक्षांत आणून हें घर सोड, सद्धेतूनें त्यानें याप्रमाणें केलेलें जिव्हाळ्याचें भाषण ऐकून गौतम कष्टी होऊन विचार करून ह्मणाला, 'मजजवळ पैसा नसून मला वेदही येत नाहीं. पैशासाठीं मी येथें आलों. तुझ्या भेटीनें आज मी कृतार्थ झालों आहें. उद्यां आपण बरोबर जाऊं. ही रात्र आज आपण येथें बरोबर काढूं.' असें बोलला असतां त्या आलेल्या ब्राह्मणाला दया येऊन त्यानें ती रात्र तेथें काढिली; परंतु तो फार भुकेला असूनही गौतमानें फार आग्रह केला तरी तो कशाला शिवला सुद्धां नाहीं. ती रात्र सरून तो ब्राह्मण निघून गेल्यावर गौतम घरांतून बाहेर पडून कांहीं दर्यावर्दी व्यापाऱ्यांशीं मिळून समुद्राकडे निघाला. वाटेंत एका दरीमध्यें त्या व्यापारी लोकांच्या तांड्याला एका मस्त हत्तीनें मारून टाकिलें. तो ब्राह्मण त्या महासंकटांतून कसाबसा सुटला. दिशाभूल पडून जीव बचावण्यासाठीं उत्तर दिशेकडे त्यानें पळ काढला. याप्रमाणें त्या तांड्याला मुकून रानामध्यें तो एकटा किंपुरुषाप्रमाणें भटकत असतां समुद्राकडे जाणाऱ्या एका वाटेला लागून फुलांनीं भरलेल्या अशा एका रम्य वनामध्यें येऊन पोहोंचला. सर्व ऋतूंमध्यें फुलून असणारी यक्षकिन्नरांनीं सेवित नंदनवनासारखी रम्य राई त्या ठिकाणीं होती. शाल, ताड, तमाल, कालागरु, चंदन यांचीं वनें तेथें लागून राहिलीं होतीं. रम्य व घमघमाट सुटलेल्या अशा त्या पर्वताच्या माथ्यावर चोहोंकडे पक्ष्यांचा किलकिलाट ऐकूं येत होता. त्यामध्यें मनुष्यासारखीं तोंडें असणारे भारुंड नांवाचे पक्षी तसेच भूलिंग वगैरे पर्वतामध्यें उत्पन्न होऊन समुद्रावर राहणारे पक्षी होते. त्या सर्व पक्ष्यांचा मनाला आल्हाद देणारा किलकिल शब्द ऐकत तो चालला असतां सोन्याच्या वाळूनीं भरलेल्या स्वर्गासारख्या रमणीय अशा त्याप्रदेशावर रमणीय व विस्तृत असें एक वडाचें झाड त्याच्या दृष्टीस पडलें. त्याला शोभणाऱ्या पुष्कळ खांद्यांच्या योगानें तर त्याला छत्रीचें स्वरूप आलें होतें. त्याच्या खालीं सुवासिक चंदनाचें पाणी शिंपडलें होतें. उत्तम फुलें पसरलेली अशी मनाला आल्हाद देणारी ती सुंदर जागा पाहून गौतमाला फार आनंद झाला. देवलोकासारखें पवित्र व रम्य असें तें ठिकाण पाहून गौतम त्या ठिकाणीं बसला. तो तेथें बसला असतां सुखकारक व मंगळप्रद असा फुलांवरून येणारा वारा गौतमाच्या सर्व अंगाला आल्हाद देत वहात होता. तो ब्राह्मण थकून गेला असल्यानें तो शुद्ध वारा त्याच्या अंगाला लागल्यानें सुख होऊन तो तेथें पडला व इकडे सूर्य अस्ताला गेला. याप्रमाणें सूर्य अस्ताला जाऊन संध्याकाळ झाली असतां तेथें रहात असलेला एक पक्षी ब्रह्म लोकांहून त्या झाडावर राहण्याला आला. त्याचें नांव नाडिंधम असून तो ब्रह्मदेवांचा सखा होता. तो बगळा कश्यपापासून जन्मला असून तो राजधर्म या नांवानें प्रसिद्ध होता. तो एका

श्रीमान व विद्वान देव कन्येचा मुलगा असून प्रत्यक्ष देवांप्रमाणें कांतिमान होता. सूर्याप्रमाणें लखलखीत अलंकारांनीं पायापासून डोक्यापर्यंत मढवून काढला असल्यानें तो देवगर्भांतून झालेला पक्षी कांतीनें फारच झळकत होता. त्याला त्याठिकाणीं आलेला पाहून गौतमाला फार आश्चर्य वाटलें. भूक व तहान फार लागली असल्यानें त्या पक्ष्याला मारण्याच्या उद्देशानें त्या ब्राह्मणानें त्यावर नजर लाविली. त्याला पाहून राजधर्म ह्मणाला, 'तुझें स्वागत असो. सूर्य मावळून संध्याकाळ झाली आहे. तूं निर्दोष व प्रिय असा अतिथि आज माझ्या घराला आला आहेस, बरें झालें ! मीं तुझा सशास्त्र सत्कार केल्यावर मग उद्यां उठून तूं जा.' ही त्याची मधुर वाणी ऐकून गौतमाला फार विस्मय वाटून कौतुकानें तो त्याकडे पाहूं लागला. तें पाहून राजधर्म त्याला ह्मणाला, 'हे ब्राह्मणा, मी कश्यपाचा मुलगा असून दाक्षायणी माझी आई आहे. तूं गुणवान अतिथि माझ्या घरीं आला आहेस तेव्हां तुझें स्वागत असो.' असें ह्मणून त्याचा सशास्त्र सत्कार करून, शालपुष्पाचा उत्तम बिछाना त्याला तयार करून देऊन, भगीरथाचा रथ ज्या ठिकाणाहून गेला होता त्या गंगेमधील मोठमोठे लठ्ठ मासे त्यानें त्याला खावयाला दिले व शेकण्याला चांगला विस्तव पेटवून दिला. ते खाऊन तो संतुष्ट झाल्यावर त्याचा शीण घालविण्यासाठीं त्यानें आपल्या पंखांनीं त्याला वारा घातला. याप्रमाणें विसावा घेऊन तो बसल्यावर त्यानें त्याला त्याचें गोत्र विचारलें. तें सांगून तो ब्राह्मण त्या सुवासिक पुष्पशय्येवर सुखानें पडला असतां त्या पक्ष्यानें त्याला तेथें येण्याचें कारण विचारलें तेव्हां '**दारिद्र्यामुळें पैसे मिळविण्यासाठीं समुद्रावर सफर करण्याला मीं निघालों आहें,**' असें तो ब्राह्मण त्याला ह्मणाला. तें ऐकून राजधर्म त्याला ह्मणाला, 'पैशासंबंधानें काळजी करूं नकोस. तुझा हेतु साधून पुष्कळ पैसा घेऊन तूं घराला परत जाशील. **वडिलोपार्जित प्राप्ति, दैव, महत्त्वाकांक्षा व मैत्री हीं चार पैसा मिळविण्याला साधनें आहेत.** मी तुला मित्र मिळालों असून तुझ्यासंबंधानें माझ्या मनांत सद्भाव उत्पन्न झाला आहे. ह्मणून तूं पैसेवान होशील अशी मी खटपट करीन.' पुढें सकाळीं उठल्यावर त्याला आनंदांत पाहून पक्षी त्याला ह्मणाला, 'या वाटेनें जा ह्मणजे तुझें काम होईल. येथून तीन योजनांवर माझा परम मित्र विरूपाक्ष नांवाचा महा बलशाली राक्षसांचा राजा आहे. त्याकडे तूं जा. माझ्या सांगण्यावरून तो तुझ्या सर्व इच्छा खात्रीनें पूर्ण करील.' त्यानें असें सांगितलें असतां यथेष्ट अमृततुल्य फळें खात तो चंदन, अगरु, दालचिनी यांच्या वनांतून त्यांचा घमघमाट वास घेत एकदम निघून त्या राक्षसाच्या मेरुव्रज नांवाच्या नगराला आला. त्याला दगडी वेशी व तट असून त्याभोंवतीं खंदक होते, व तटावर मोठमोठे धोंडे व तोफा ठेविल्या होत्या. त्या राक्षसाला तो आल्याची वर्दी मिळाली. आपल्या मित्रानें पाठविलेला तो प्रिय अतिथी आल्याचें कळल्यावर त्या राक्षसानें आपल्या नोकरांना त्याला लवकर आपल्याकडे घेऊन येण्यास सांगितलें. तेव्हां ते नोकर ससाण्याप्रमाणें टणूटण् उडत वेशीकडे जाऊन त्या ब्राह्मणाला म्हणाले, 'लवकर चला. महाराज आपली गांठ घेण्याला वाट पहात बसले आहेत.' तें ऐकून आश्चर्य वाटून शीण वगैरे सर्व जाऊन त्या शहराचें तें मोठें वैभव पहात पहात तो त्या नोकरांबरोबरच लगबगीनें राक्षसाला भेटण्याला उतावीळ होऊन राजवाड्याकडे आला.

त्या उत्तम राजवाड्यांत घेऊन जाऊन त्या नोकरांनीं त्याला राजाला भेटविलें. राक्षसानें सत्कारपूर्वक त्या ब्राह्मणाला उत्तम आसनावर बसविलें. पुढें त्या राक्षसानें त्याला त्याचें गोत्र, शाखा, वेदाध्ययन, ब्रह्मचर्य यांसंबंधानें विचारलें. तेव्हां तो ब्राह्मण फक्त आपलें गोत्र सांगून स्वस्थ बसला. तेव्हां वेदाध्ययन कांहीं नसून अंगावर ब्रह्मतेज मुळीं नसलेल्या त्या ब्राह्मणाला फक्त आपलें गोत्र सांगतांना पाहून आपण रहातां कोठें, आपली बायको कोण, वगैरे निर्भयपणें सांगा म्हणून त्या राक्षसानें त्याला विचारलें. तेव्हां गौतम ह्मणाला माझा जन्म मध्यदेशांत झाला असून मी रामोसवाडींत राहतों. **एका शूद्र विधवेशीं माझें लग्न झालें आहे.**' हें ऐकून तो राक्षस विचार करूं लागला

कीं, आतां येथें काय करावें? काय करणें या ठिकाणीं पुण्यकारक होणार आहे! हा जन्मानें ब्राह्मण असून त्या महात्म्याचा मित्र आहे. त्या राजधर्मानें याला मजकडे पाठविलें आहे. तो नेहमीं माझ्या आश्रयानें असून माझा भाऊ, बांधव व कलिजा आहे. तेव्हां त्याचें प्रिय मला केलें पाहिजे. आज कार्तिक महिन्याचा दिवस असून हजार ब्राह्मण माझे घरीं जेवावयाचे आहेत. त्यांमध्यें हाही जेवील व याला मी द्रव्य देईन. आज अशा प्रकारचा चांगला दिवस असून हा अतिथि आला आहे. ब्राह्मणाला द्यावयाचा पैसा संकल्प करूनच ठेविला आहे. मग आतां विचार कसला उरला? इतक्यांत हजार विद्वान ब्राह्मण स्नान करून स्वच्छ मुकटे नेसून तेथें आले. ते आले असतां त्या विरूपाक्षानें विधिपूर्वक त्यांचें स्वागत केलें. नोकरांनीं राक्षसाच्या सांगण्यावरून त्यांना बसावयाला खालीं दर्भासनें ठेविलीं. त्यांवर ते बसल्यावर तीळ, दर्भ व पाणी यांनीं त्या राक्षसानें त्यांची यथाविधि पूजा केली. त्यांना विश्वेदेव, पितर व अग्नि कल्पून त्यांच्या अंगाला चंदन चोपडून त्यांना फुलें देऊन त्या राक्षनानें त्यांची पूजा केल्यावर नकशी काढलेलीं, शुद्ध व लखलखीत सोन्याचीं ताटें मधतुपांत तयार केलेल्या पक्वान्नांनीं भरून त्यांना दिलीं. नेहमीं आषाढ व माघ महिन्यांत पूर्णिमेला ब्राह्मणांना त्या राक्षसाकडून सत्कारपूर्वक इच्छित अन्नाचें उत्तम जेवण मिळत असे. शरत्काल जाऊन कार्तिकी पौर्णिमेला विशेषेंकरून रत्नें सोनें, रुपें, पांच, मोतीं, मौल्यवान हिरे, वैडूर्यमणी, चांगलीं चांगलीं हरणांचीं कातडीं, तो ब्राह्मणांना देत असे. याप्रमाणें दक्षिणेसाठीं नानाविध रत्नांचे ढीग पुढें ठेवून यांतून तुह्मांला वाटेल तेवढें व नेववेल तितकें घेऊन आपापलीं जेवलेलीं भांडीं सुद्धां बरोबर घेऊन चला असें तो त्या ठिकाणीं जमलेल्या ब्राह्मणांना म्हणाला. असें तो ह्मणाला असतां ब्राह्मण उचलवेल तितकें द्रव्य घेऊन सन्मान घेऊन घराकडे निघाले असतां तो राक्षस आपल्या राक्षसांना दाबून त्यांना ह्मणाला, 'आज एक दिवस तुह्मांला कोणाही राक्षसापासून मुळीं भय नाहीं. खुशाल आनंदानें तुह्मांला वाटेल तिकडे चला. हें त्याचें भाषण ऐकून सर्व आपापल्या ठिकाणांला गेले. गौतमही तें सोन्याचें ओझें घेऊन मोठ्या कष्टानें कसाबसा त्या वडाच्या झाडाखालीं आला, व भुकेनें अगदीं थकून भागून जाऊन तो त्याखालीं बसला. इतक्यांत मित्रवत्सल राजधर्म तेथें येऊन स्वागतपूर्वक त्यानें त्याचें अभिनंदन केलें. पंखांनीं वारा घालून त्याचा शीण दूर केला, व त्याची पूजा करून त्याच्या जेवणाची तयारी केली. जेऊन खाऊन स्वस्थ झाल्यावर त्या ब्राह्मणाच्या मनांत विचार आले कीं, लखलखीत सोन्याचें हें जड ओझें मी लोभानें व वेडेपणानें घेऊन आलों आहें. मला लांब तर पुष्कळ जावयाचें आहे, प्राण धरण्यासाठीं वाटेंत खाण्याला मजपाशीं कांहीं नाहीं; तेव्हां प्राणधारणेची वाट काय करावी? याप्रमाणें पुष्कळ विचार केला असतां खाण्यासारखें कांहीं जेव्हां त्याला दिसेना तेव्हां त्या कृतघ्नाच्या मनांत आलें कीं, आपल्याजवळ असणाऱ्या त्या मांसपिंड बगळ्याला मारून घेऊन जावें.

तेथें जवळच वाऱ्याच्या जोरानें पेटत राहिलेली एक आगटी त्याला शेकण्यासाठीं त्या पक्ष्यानें पेटवून ठेविली होती, व आपणही जवळच निःशंकपणें निजला होता. त्या कृतघ्न दुरात्म्यानें आपल्यापुढें असणाऱ्या त्याला मारण्याचा विचार करून एका जळक्या कोलतीनें त्यानें त्याला भाजून मारलें व मारून त्याला मोठा आनंद झाला. पण पुढें त्याचा परिणाम काय होईल हें कांहींच त्याच्या लक्षांत आलें नाहीं. त्याचीं पिसें व लोकर काढून त्यानें त्याला आगीवर भाजलें. तो भाजलेला पक्षी व तें सोनें बरोबर घेऊन निघाला. पुढें एक दिवस लोटल्यावर विरूपाक्ष राक्षस आपल्या मुलाला ह्मणाला, 'मुला, राजधर्म मला भेटला नाहीं. तो दररोज सकाळीं ब्रह्मदेवांना वंदन करण्याला जातो व परत जातांना मला भेटल्यावांचून तो कधीं घरीं जात नाहीं. आज दोन दिवस झाले तो मजकडे आला नाहीं. ह्मणून माझ्या मनाला चुटपूट लागली आहे. तेव्हां त्याचा तपास कर. वेदाक्षर नसून ब्रह्मतेज ज्याच्या अंगावर मुळीं नव्हतें असा तो नीच ब्राह्मण त्याला मारण्यालासुद्धां कमी करणार नाहीं.

त्याच्या सर्व लक्षणांवरूनच तो दुराचारी व दुर्बुद्धि असावा असें मीं ताडलें. त्याचें स्वरूप उग्र असून दयेचा त्याच्या ठिकाणीं लेश दिसत नव्हता. रामोशांप्रमाणेंच तो नीच दिसत होता. तो त्याकडे गेला ह्मणून मला मोठी काळजी लागली आहे.' असें तो राक्षस ह्मणाला असतां त्याचा मुलगा राक्षसांना बरोबर घेऊन त्या वडाच्या झाडाखालीं गेला. तेथें राजधर्माचीं हाडें त्याच्या दृष्टीस पडलीं. तेव्हां रडत तो बुद्धिशाली राक्षसाचा मुलगा मोठ्या त्वरेनें गौतमाला धरण्याला त्याच्या मागून गेला. पुढें थोडक्याच अंतरावर राक्षसांनीं त्याला धरलें. त्याच्यापाशीं पंख, हाडें व पाय यांवांचून राजधर्माचें धड त्यांना सांपडलें. त्याला घेऊन ते राक्षस मोठ्या त्वरेनें मेरुव्रजाकडे गेले व त्यांनीं तें राजधर्माचें धड राजाला दाखवून त्या कृतघ्न पापी गौतमाला राजापुढें उभें केलें. त्या पक्ष्याला पाहून राजा मोठ्यानें रडूं लागला व त्याच्या बाड्यांत एकच कल्होळ उडून राहिला. सर्व नगरांतील बायकापोरें सुद्धां अस्वस्थ झालीं. पुढें राजा आपल्या मुलाला ह्मणाला 'ह्या पाप्याला ठार करा, याच्या मांसावर या सर्वांना यथेष्ट मजा मारूं दे.' राक्षस याप्रमाणें म्हणाला असतांही राक्षस त्या कृतघ्न प्राण्याला खाण्याला तयार होईनात. ते वांकून ह्मणाले याला रामोशाच्या हवालीं करा. हा पापी मनुष्य आह्मांला खाण्याला देऊं नका. असे ते ह्मणाले असतां 'बरें तर याला रामोशाच्या हवालीं करा,' असें तो राक्षस ह्मणाला, तेव्हां शूल व पट्टीश यांनीं त्याचे तुकडे तुकडे करून ते रामोशाच्या स्वाधीन केले, पण तेही त्या पाप्याला खाईनात. मांसभक्षक सुद्धां कृतघ्नाला खात नाहींत. ब्रह्महत्या करणारा, दारू पिणारा, चोर व व्रत मोडणारा यांना प्रायश्चित्त आहे; परंतु कृतघ्न मनुष्याला प्रायश्चित्त नाहीं. मित्रद्रोही कृतघ्न अशा दुष्ट नराधमाला मांसाहारी किंवा किडे सुद्धां खात नाहींत.

पुढें त्या राक्षसानें त्या बगळ्यासाठीं रत्न, सुवासिक पदार्थ व वस्त्रें यांनीं सजविलेली एक चिता तयार करविली व त्याला जाळून त्या राक्षसानें त्याचे प्रेतसंस्कार विधिपूर्वक केले. तेचवेळीं दक्षकन्या सुरभि आकाशामध्यें त्या चितेवर आली. तिच्या कांसेंतील दुधांनीं मिसळलेला फेंस तिच्या तोंडांतून त्या राजधर्माच्या चितेवर पडला. त्यानें तो बगळा जिवंत झाला, व उडून तो विरूपाक्षाजवळ आला. तेव्हां इंद्र त्या विरूपाक्षाच्या नगराला येऊन तूं याला जिवंत केलेंस बरें झालें असें ह्मणाला. पुढें त्यानें पूर्वीं राजधर्माला ब्रह्मदेवाचा शाप झाल्याची हकीकत विरूपाक्षाला सांगितली. तो ह्मणाला, 'कोणे एके वेळीं हा बगळा ब्रह्मदेवाकडे जाण्याला चुकला असतां ब्रह्मदेवानीं रागावून ज्या अर्थीं हा मूढ बक आज सभेला आला नाहीं त्या अर्थीं हा पुष्कळ दिवस न मरतां पृथ्वीवरच राहील, असा त्यांनीं त्याला शाप दिला आणि त्या शापामुळेंच अमृतसिंचनानें हा फिरून उठला आहे.' याप्रमाणें बोलून इंद्र गप्प झाल्यावर राजधर्म नमून त्याला म्हणाला, 'हे सुरेश्वरा, माझ्यावर जर तुझी कृपा असेल तर माझ्या मित्राला ह्या गौतमाला जिवंत कर.' त्याचें तें भाषण ऐकून इंद्रानें त्याला अमृत शिंपडून जिवंत केलें. तेव्हां बगळा मोठ्या प्रेमानें त्याला आलिंगन देऊन त्याच्या पैशासकट त्याला निरोप देऊन परत आपल्या घराकडे आला. इकडे गौतमानें आपल्या घराकडे आल्यावर त्या शूद्र स्त्रीच्या ठिकाणीं त्यानें दुराचारी मुलगे उत्पन्न केले. 'विधवेच्या पोटीं पुष्कळ दिवसपर्यंत मुलगे उत्पन्न करून हा कृतघ्न नरकाला जाईल,' म्हणून देवांनीं त्याला शाप दिला. याप्रमाणें याचा इतिहास आहे. कृतघ्नाला यश कोठचें, स्थान कोठचें किंवा सुख तरी कोठचें? कृतघ्नावर कधीं विश्वास ठेवूं नये. कृतघ्नाला प्रायश्चित्त नाहीं. मनुष्यानें विशेषेंकरून मित्रद्रोह करूं नये. मित्रद्रोही चिरकाळ घोर नरकांत पडतो. मनुष्यानें नेहमीं कृतज्ञ असून मित्राच्या हितांत दक्ष असावें. मित्रापासूनच सर्व कांहीं मिळून सत्कार मिळतो. मित्रामुळेंच सर्वभोग मिळून, मित्रामुळेंच संकटांतून सुटका होते. म्हणून शहाण्यानें मोठ्या सत्कारानें मित्राचा बहुमान करावा. शहाण्यांनीं पापी, कृतघ्न, निर्लज्ज, मित्रद्रोही, कुलांगार अशा नराधमाला दूर सोडावें. महात्म्या भीष्माच्या तोंडून ही कृतघ्नाची गोष्ट ऐकून युधिष्ठिराला मोठा संतोष झाला.

---

# मोक्षधर्म.

## १९१ शोक. ( १२—१७४ )

युधिष्ठिर ह्मणाला, 'पितामह, राजधर्माला धरून आपण अनेक चांगली कर्तव्यें मला सांगितलीं. आतां चारी आश्रमांचा जो उत्तम धर्म असेल तो सांगा.' भीष्म ह्मणाले, 'सर्व आश्रमांसंबंधानें निरनिराळे धर्म सांगितले आहेत. तपाचें फळ मनुष्याला येथेंच मिळतें. ज्याला पुष्कळ द्वारें आहेत अशा ह्या धर्मासंबंधानें या जगांत कोणतीच क्रिया फुकट जात नाहीं. जो जो मनुष्य ज्या ज्या विषयाकडे आपलें लक्ष पुरवितो त्याला त्याला तो तो विषय उत्तम वाटतो. जसजसा हा जगाचा क्रम खोटा आहे हें कळूं लागतें तसतसें या संबंधानें वैराग्य उत्पन्न होतें. ह्मणून पुष्कळ दोषांनीं युक्त अशा या जगामध्यें शहाण्या मनुष्यानें आत्ममोक्षासाठीं झटावें.' युधिष्ठिर ह्मणाला, 'पैसा नाहींसा झाला असतां अथवा बायको, मुलगा किंवा बाप मेला असतां कोणती बुद्धि धरल्यानें मनुष्याला शोक होत नाहीं?' भीष्म ह्मणाले, 'अशा प्रसंगीं हें सर्व जग दुःखमयच आहे असा विचार मनांत आणून शोक नाहींसा करावा. यासंबंधानें पुत्रशोकानें संतप्त होऊन शोकाकुळ व खिन्न झालेल्या सेनाजित राजाला ब्राह्मणानें जो उपदेश केला तो लक्षांत ठेवण्याजोगा आहे. तो त्याला ह्मणाला, 'तुझ्या संबंधानें दुसऱ्यांनीं रडावें अशी तुझी स्थिति असतां तूं मूर्खासारखा असा शोकाकुल कां झाला आहेस. तुझ्यासाठीं शोक करणारे देखील बिचारे पुढें त्याच गतीला मिळणार आहेत; तूं, मी, त्याचप्रमाणें दुसरे जे कोणी तुझ्याजवळ आहेत हे आपण सर्व जेथून आलों त्याच ठिकाणीं परत जाणार आहों. हे उत्तम, मध्यम व अधम लोक आपापल्या कर्मामध्ये पडून दुःख भोगताहेत पहा. 'हा प्रत्यक्ष माझा आत्मा माझा नव्हे किंवा ही सर्व पृथ्वी माझी आहे व ती जशी माझी आहे तशी बाकीच्यांचीही पण आहे,' हा विचार मनांत ठेवल्यानें मनुष्याला दुःख होत नाहीं. ज्याप्रमाणें महासागरांत दोन ओंडके एकत्र जमतात व एकत्र जमल्यावर फिरून वेगवेगळे होतात त्याचप्रमाणें हा प्राणिमात्रांचा समागम आहे. ह्मणून मुलगे, नातू ज्ञाती, बांधव यांवर स्नेह करूं नये. कारण त्यांचा वियोग खात्रीनें व्हावयाचा आहे. अदृश्य ठिकाणाहून ते खालीं आले व फिरून त्या ठिकाणीं गेले. तूं कोण हें तुझ्या मुलाला ठाऊक नाहीं, व तो कोण हें तुला ठाऊक नाहीं. मग त्याच्याबद्दल उगीच शोक कशाला करतोस? आशा वाढल्यानें दुःख होतें व दुःख नाहींसें केल्यानें सुख होतें. सुखापासून दुःख व दुःखापासून सुख उपजत असून हीं दोन एकामागून एक रहाटगाडग्याप्रमाणें मनुष्याकडे येत असतात. कायमचें दुःख किंवा कायमचें सुख मनुष्याला कधींच मिळावयाचें नाहीं. सुखाचें घर शरीर आहे तसेंच तें दुःखाचेंही आहे; मनुष्य जें जें कर्म ज्या ज्या शरीरानें करतो, त्या त्या शरीरानें त्या त्या कर्माचें फळ तो भोगतो. याच देहाबरोबर हा जीव उत्पन्न होतो. दोघे बरोबरच या संसारांत फिरत राहून दोघे बरोबरच नाहींसे होतात. नानाप्रकारच्या स्नेहपाशांनीं जखडून जाऊन विषयांकडे लागलेले लोक हिरमोड झाल्यानें पाण्याच्या कांठच्या वाळूच्या कड्याप्रमाणें खचत रहातात. स्नेहामुळें घाण्यांत पिळून निघणाऱ्या तिळाप्रमाणें अज्ञानापासून उत्पन्न होणाऱ्या क्लेशांचा दाब बसून या संसारचक्रांत मनुष्य पिळून निघतो. बायकापोरांकरितां ह्मणून मनुष्य पापकर्माचें गांठोडें जवळ करतो. पण त्याबद्दलचें प्रायश्चित्त या जगीं व परलोकीं त्याला एकट्यालाच भोगावें लागतें. बायका, पोरें व कुटुंब यांमध्यें गढलेले लोक दलदलींत रुतणाऱ्या खंगलेल्या वनगजाप्रमाणें शोकरूपी चिखलांनीं भरलेल्या समुद्रामध्यें बुडतात. पुत्रनाश, पैशाचा नाश, ज्ञाती व संबंधी यांचा नाश, यांच्या

योगानें वणव्याप्रमाणें संताप भडकून रहातो. या जगामध्यें सुख, दुःख, जगणें व मरणें हें सर्व दैवाधीन आहे, **मनुष्याला मित्र असो वा शत्रु असो, जिव्हाळ्याचा कोणी असो किंवा नसो, त्याला बुद्धि असो वा नसो, दैवानें त्याला सुख मिळत असतें. जिव्हाळ्याचे लोक ह्मणून सुख देऊं शकत नाहींत व शत्रु ह्मणून दुःख देऊं शकत नाहींत. शहाणपणा आहे ह्मणून पैसा मिळत नाहीं, व पैसा आहे ह्मणून सुख मिळत नाहीं. बुद्धि असली कीं पैसा मिळतो व ती नसली कीं भिकेला लागतो असें कांहीं नाहीं.** हा जो जगाचा क्रम आहे तो शहाण्यावांचून दुसऱ्या कोणाला कळत नाहीं. बुद्धिमान, शूर, मूर्ख, भ्याड, जड, शहाणा, दुबळा किंवा बलवान कोणी असो, ज्याचे वांट्याला ह्मणून सुख ठेवलें आहे त्याला तें मिळत असतें. गाय ही वांसराची, गुराख्याची, मालकाची तशीच चोराचीही आहे. ज्याला तिचें दूध प्यावयास मिळेल त्याचीच ती समजावयाची. **जे ह्मणून अगदीं मूर्ख आहेत किंवा जे बुद्धिज्ञानाच्या पलीकडे गेले आहेत ते सुखांत असतात व मध्यमांना क्लेश होतात.** शहाणे लोकांना दोन शेवटांमध्येंच मजा वाटते. मध्यस्थितींत अर्थ वाटत नाहीं. ह्या दोन शेवटांमध्येंच सुख असून मध्यस्थितींत दुःख आहे. जें सुखदुःखादि द्वंद्वाच्या बाहेर पडून निर्मत्सर होऊन ज्ञानापासून मिळणारें सुख भोगीत आहेत, त्यांना पैसे किंवा गरिबी यांपैकीं कशामुळेंच दुःख होत नाहीं. आतां जे या पायरीला गेले नाहींत; परंतु अगदीं मूर्ख स्थितींतून वर आले आहेत त्यांनाच फार आनंद किंवा फार संताप होत असतो. मोठ्या गर्वाच्या योगानें मूर्ख लोक दुसऱ्याचा मोड झाल्यानें वेडे बनून जाऊन अत्यानंद पावतात. **सुखाचा शेवट दुःखांत होणार हें लक्षांत ठेवून कष्टमय अशा दक्षतेचें फळ सुख आहे हें पक्कें समजावें.** वैभव आणि संपत्ति दक्ष मनुष्याच्या ठिकाणीं रहात असून आळशाच्या ठिकाणीं तीं रहात नाहींत. सुख असो किंवा दुःख असो प्रिय असो किंवा अप्रिय असो, जें कांहीं येऊन पडेल त्याला न भितां तोंड द्यावें. दररोजच्या दररोज शोकाला हजारों कारणें व भयाला शेंकडों कारणें मूर्खाला उद्भवतात. शहाण्याला उद्भवत नाहींत. जो बुद्धिमान, शहाणा, वृद्धसेवी, कोणाचा हेवा न करणारा व आत्मनिग्रही आहे, त्याला शोक शिवत सुद्धां नाहीं. आपण कोठून येतों व कोठें जातों हें जो जाणतो त्याला शोक मुळीं होत नाहीं. **ज्याच्यासाठीं शोक, ताप, दुःख किंवा कष्ट होतात असा तो मग प्रत्यक्ष आपल्या अंगाचा भाग असला तरी त्याला दूर करावें.** जर कां एकदां कशावर ममत्व जडलें तर तें संतापाला कारण होतें. जेवढी जेवढी ह्मणून वासना दूर करावी तेवढें तेवढें सुखाला कारण होतें. वासनांच्या मागें लागलेला मनुष्य त्यांबरोबरच नाश पावतो. **वासना सफल झाल्यानें होणारें सुख किंवा मोठें स्वर्गसुख किंवा हीं दोन्हीं आशेचा बीमोड करून टाकल्यानें होणाऱ्या सुखाच्या सोळाव्या हिश्शाला सुद्धां लागणार नाहींत.** पूर्वजन्मीं केलेलें बरें वाईट कर्म मनुष्याला मग तो शहाणा असो, किंवा मूर्ख असो किंवा शूर असो चिकटल्यावांचून रहात नाहीं. याचप्रमाणें प्रिय व अप्रिय गोष्टी व सुख व दुःख यांचा फेरा चालला असतो. हा विचार मनांत ठेवून शहाणा सुखी असतो. सर्व वासना तुच्छ समजून त्यांना बाजूला करावें. ही वासना एकदां कां मनांत उत्पन्न होऊन वाढली ह्मणजे प्रत्यक्ष तो मृत्यूच आहे. यालाच पुढें ती पूर्ण न झाल्यामुळें रागाचें स्वरूप येतें. **कांसव आपलें अंग आंखडून घेतें त्याप्रमाणें मनुष्य ज्या वेळेला आपल्या सर्व वासना आंखडून घेऊन आपल्या ठिकाणीं प्रकाशमान आपला आत्मा आपल्या ठिकाणीं पाहूं लागतो.** जेव्हां हा कोणाला भीत नाहीं, किंवा याच्यापासून कोणाला भीति वाटत नाहीं, खरें, खोटें, शोक, आनंद, भय, अभय, प्रिय अप्रिय सोडून देऊन हा शांत होतो व कोणाही प्राणिमात्राच्या ठिकाणीं हातांनीं, मनांनीं किंवा तोंडांनीं पाप करीत नाहीं, तेव्हां हा ब्रह्मस्वरूपी होतो. **मूर्खांना जिला सोडवत नाहीं व मनुष्य ह्मातारा झाला तरी जी ह्मातारी होत नाहीं अशी प्राण घेणारी ही आशा सोडल्यांतच सुख आहे.** पिंगला कांहीं तसा महत्त्वाचा प्रसंग नसतांना सुद्धां

आत्मज्ञान होऊन सुखी झाली. कोणे एके वेळीं ही वेश्या संकेताच्या ठिकाणीं गेली असतां तिचा यजमान त्या ठिकाणीं संकेताप्रमाणें आला नाहींसें पाहून कष्टी झाली तेव्हां एकदम तिच्या मनावर उजेड पडून तिची वृत्ति शांत झाली; आणि ती ह्मणाली, 'वेडी बनलेली मी शांत अशा माझ्या कांताजवळ रहात असून इतक्याजवळ असणाऱ्या याला जवळ करण्याला म्य। आजपर्यंत कधीं प्रयत्न केला नाहीं. आतां एका खांबावर उभारलेलें नऊ दारें असलेलें हें आपलें घर मी झांकून टाकतें. या ठिकाणच्या कांताला कांत ह्मणून तरी कोण ओळखणार आहे? नरकरूपी लुच्चा यजमानांनीं कामरूपानें मला आजपर्यंत फसविलें आहे; परंतु यापुढें आतां मी फसली जाणार नाहीं. मी जागी होऊन आतां निरिच्छ झालें आहें. **दैवानें किंवा पूर्वकर्मानें संकटसुद्धां फायद्याला कारण होतें.** यापुढें आतां मी कांहीं पूर्वींसारखी उच्छृंखल नाहीं. **निराश मनुष्य सुखानें झोंप घेतो. निराशा हेंच उत्तम सुख आहे.'**

## १९२ मेधावीची गोष्ट–सत्य.

## ( १२–१७५ )

युधिष्ठिरानें विचारिलें, 'सर्व प्राणिमात्रांचा फडशा पाडणारा हा काल असा चालला असतां मनुष्यानें कोणत्या कल्याणकारक गोष्टीच्या मागें लागावें?' भीष्म ह्मणाले, 'या संबंधानें पुढील बापलेकांचा संवाद लक्षांत ठेव. वेदाध्ययनामध्यें गढलेल्या कोणा एका ब्राह्मणाचा मेधावी नांवाचा बुद्धिमान मुलगा होता. त्याला मोक्षधर्म अवगत होता व लौलिकधर्महीं ठाऊक होते. त्यानें एकदां आपल्या बापाला विचारिलें कीं, 'मनुष्याचें आयुष्य असें भराभर निघून चाललें असतां शहाण्यानें काय करावें? कशा प्रकारचा धर्म आचरावा?' तेव्हां बापानें त्याला उत्तर दिलें, 'ब्रह्मचर्यामध्यें राहून, वेद शिकून, वडिलांच्या उद्धारासाठीं संतति करावी वअग्नि ठेवून विधिपूर्वक यज्ञ करावा; मग वनांत जाऊन मुनि व्हावें.' मुलगा ह्मणाला, 'मृत्यूनें सर्व लोकांवर हल्ला करून जरेनें त्यांना घेरून टाकलें आहे, दिवसरात्र, एका मागून एक येत जात आहेत. यांचें हें येणें जाणें फुकट नसून जसजशी एकेक रात्र निघून जाते, तसतसें आयुष्य कमी होत जात आहे. एक दिवस गेला कीं, तो फुकट गेला असें मनुष्यानें समजावें. मृत्यु हा कोणासाठीं कधीं थांबत नाहीं. मनुष्याच्या वासना पूर्ण होणाच्या पूर्वींच मृत्यु त्याला येऊन गांठतो. अशी गोष्ट असल्यानें उथळ पाण्यांतील माशांप्रमाणें कोणाला सुख होणार? बकऱ्याला उचलून नेणाऱ्या लांडग्याप्रमाणें–भलतीकडे लक्ष देऊन फुलें वेंचीत असलेल्या मनुष्याप्रमाणें एकेक वासना पूर्ण करीत राहिलेल्या मनुष्याला--मृत्यु वाटेल तेव्हां घेऊन जातो. म्हणून वेळ न दवडतां जेव्हांच्या तेव्हांच आपल्या कल्याणाची गोष्ट करीत असावी. उद्यांचें काम आज उरकावें व दुपारचें सकाळीं उरकून घ्यावें; कारण याचें काम झालें आहे किंवा नाहीं म्हणून **मृत्यु कधीं कोणाची वाट पहात नाहीं. आज मृत्युकाल कोणाचा आहे हें कोणाला कळतें? ह्मणून मनुष्यानें तरुणपणापासूनच धर्मशील असावें.** कारण जीविताची कांहीं शाश्वती नाहीं. धर्म केल्यानें इहलोकीं कीर्ति होऊन परलोकीं सुख होतें. बुद्धीला भुरळ पडून बायकापोरांसाठीं खटपटीला लागलेला मनुष्य वाटेल तें करून त्यांना पोसतो. याप्रमाणें मुलांमध्यें व गुराढोरांमध्यें अगदीं गढून गेलेल्याला त्याच्या वासना तृप्त होण्याच्या पूर्वींच, वाघानें ज्याप्रमाणें झोंपीं गेलेल्या पशूला पटकन् उचलून न्यावें, त्याप्रमाणें मृत्यु उचलून नेतो. हें मीं आज केलें आहे, हें करावयाचें आहे, हें अर्धवट केलेलें आहे, याप्रमाणें मनोराज्यांत मनुष्य गढला असतांच काळ त्याला बगलेंत मारतो. शेती, व्यापार, घरदार यांसंबंधीं मनुष्यानें केलेल्या कामाचें फळ त्याला मिळण्यापूर्वीं मनुष्याला, मग तो दुबळा असो, किंवा बलवान असो, शूर असो किंवा भित्रा असो, जड असो किंवा शहाणा असो, मृत्यु घेऊन जातो. मृत्यु, जरा, व्याधि व अनेक कारणांपासून होणारीं दुःखें मनुष्याच्या देहाला चिकटून राहिलीं असतांना मनुष्यानें स्वस्थ कसें बसावें? मनुष्य जन्माला आल्याबरोबरच मृत्यु व जरा हीं त्याच्या पाठीस लागलीं असतात. सर्व स्था-

वर जंगम पदार्थांना हे दोघे चिकटले आहेत. **गांवामध्यें राहण्याची आवड हें मृत्यूचें तोंड असून अरण्य हा इंद्रियांना कोंडवाडा आहे.** गांवांत राहण्याची आवड ही मनुष्याला जखडणारी काढणी आहे. पुण्यवान लोक हिला तोडून निसटून जातात. पाप्यांना हिला तोडतां येत नाहीं. जो मनानें, शब्दानें किंवा कृतीनें कोणाला पीडा देत नाहीं, त्याला जीवित व पैसा अपहार करणाऱ्या प्राण्यापासून कधीं पीडा होत नाहीं. असत्याला **गिळून टाकणाऱ्या सत्याखेरीज आपल्याकडे येणाऱ्या मृत्युसेनेला आळा घालण्याचें काम कोणाच्यानें होत नाहीं. सत्यामध्येंच अमरत्व आहे. ह्मणून सत्यव्रत, सत्याचार, आत्मनिग्रह वगैरेंनीं सत्याशीं आपल्याला जखडून घेऊन मृत्यूला जिंकावें.** अमरत्व व मृत्यु हे दोघेही देहाला धरून आहेत. मोहपाशामध्यें पडल्यानें मृत्यु येतो व सत्याच्या योगानें अमरत्व येतें. म्हणून कोणाला पीडा न देतां सत्याकडे लक्ष ठेवून कामक्रोधांना दूर झुगारून देऊन सुखदुःखांची सारखीच पर्वा ठेवून मनुष्यानें खुशाल अमर होऊन मृत्यूला टाळावें. सूर्य उत्तरायणाला जाते वेळीं **आत्मनिग्रहानें शांतियज्ञ, ब्रह्मयज्ञ, वाग्यज्ञ, मनोयज्ञ व कर्मयज्ञ करीत रहावें. परपीडक अशा पशुयज्ञामध्यें किंवा पिशाच्चाप्रमाणें नाशवंत अशा आत्मयज्ञामध्यें कांहीं अर्थ नाहीं.** ज्याचें तोंड व मन योग्य रीतीनें ताब्यांत असून ज्याकडून तप, योग व सत्य यांकडे योग्य लक्ष दिलें जातें त्याला सर्व कांहीं मिळतें. **ज्ञानासारखा डोळा नाहीं किंवा सत्यासारखें दुसरें तप नाहीं; त्याचप्रमाणें वासनेसारखें दुःख नाहीं व त्यागासारखें सुख नाहीं.** आत्म्याकडून आत्म्याच्या ठिकाणीं आपली उत्पत्ति झाली असल्यानें मुलाबाळांची पर्वा न करितां आत्मनिष्ठ राहून आत्म्याशीं मिळून जावें. **मुलें मला तारतील ही आशा धरूं नये.** एकांतांत राहणें, सर्वांशीं सारखें वागणें, खरेपणा ठेवणें, शील, स्थिरता, कोणाला पीडा न देणें, सरळपणा व क्रियांपासून मुक्त असणें, यासारखें ब्राह्मणाला दुसरें धन नाहीं. धन, बांधव किंवा बायको यांना घेऊन काय करावयाचें आहे? आपल्या ठिकाणीं गुप्त अशा जागीं शिरून राहिलेल्या आत्म्याला शोधीत रहावें. **आपले वाडवडील कोठें गेले याचा कांहीं पत्ता आहे काय? ह्मणून मनुष्यानें नेहमीं सत्यपरायण असावें.'**



---

## १५३ शंपाकाची गोष्ट—त्याग.
## ( १२.—१७६ )

युधिष्ठिर ह्मणाला, 'जे कोणी धनवान किंवा गरीब आपापल्या परीनें स्वतंत्र वागतात त्यांवर सुखदुःखें कशीं येऊन पडतात?' भीष्म म्हणाले, 'या बाबतींत वाईट बायको व भूक यांनीं पीडलेल्या व शेवटीं शांतीच्या योगानें मुक्त झालेल्या शंपाक नांवाच्या ब्राम्हणानें त्यागासंबंधानें जे उद्गार काढले आहेत ते लक्षांत ठेवण्याजोगे आहेत. तो म्हणाला, 'जन्मापासून नानाप्रकारच्या सुखदुःखांनीं मनुष्याला गांठलें आहे; त्यांपैकीं जें कोणचें येतें तें दैवामुळें येतें असें समजून सुख मिळालें असतां हर्षभरित होऊं नये व दुःख आलें असतां संतापूं नये. फटिंगपणानें फिरत राहून मनुष्यानें सुखाची गोडी चाखावी. जो गरीब आहे तो सुखानें झोंप घेतो व सुखानें उठतो. **गरीबी हीच ह्या जगामध्यें सुखकारक, पथ्यकारक, कल्याणकारक व निर्बाध आहे.** या वाटेला शत्रूचें नांव सुद्धां ठाऊक नाहीं. इच्छेच्यामागें लागलेल्यांना दुर्लभ पण निरिच्छ झालेल्यांना सुलभ असा हा मार्ग आहे. **हे तिन्हीं लोक धुंडाळून पाहतां शुद्ध व वैराग्यसंपन्न अशा गरीबाच्या तोडीचा मला कोणी दिसत नाहीं. गरीबी व राज्य यांना ताजव्यांत घातलें असतां राज्यापेक्षां सुद्धां गुणांनीं अधिक अशा दारिद्र्याचें पारडें खालीं बसेल.** दारिद्र्य व राज्य यांमध्यें हा मोठा फरक आहे कीं, धनवान मनुष्य नेहमीं मृत्यूच्या जबड्यांत सांपडल्याप्रमाणें काळजींत असतो. आशेला झुगारून देऊन, पैसा टाकून देऊन फटिंग बनलेल्या मनुष्यापुढें आग, संकटें मृत्यु किंवा चोर या कोणाचेंच कांहीं चालत नाहीं. स्वेच्छेनें वागून खालीं भुईवर हाताचीच उशी करून पडणाऱ्या या शांत मनुष्याची देवसुद्धां प्रशंसा करतात. धनवान मनुष्य राग व लोभ यांनीं

झपाटला जाऊन त्याची अक्कल निघून जाते. वांकडी दृष्टी, सुकलेलें तोंड, कपाळाला आंठी, ओंठ चांवणें, राग व निष्ठुर भाषण यांनीं तो भरला असतो. तो जरी ही सर्व पृथ्वी देण्याला तयार झाला तरी त्याच्याकडे कोणाच्यानेंही बघवत नाहीं. **नेहमीं संपत्तीशीं संबंध जडल्यानें मूर्खाला भुरळ पडते.** वारा ज्याप्रमाणें शरत्कालच्या ढगांना उडवून देतो त्याप्रमाणें हा संबंध याचें मन चळवून सोडतो. याला आपल्या रूपाचा व पैशाचा अभिमान वाटतो. मी मोठ्या कुळांत जन्मलों आहें, वाटेल तें करण्याचें माझ्या अंगांत सामर्थ्य आहें, मीं कांहीं यःकश्चित सामान्य मनुष्य नाहीं, अशा विचारांनीं त्यांचें मन वेडें होऊन जातें. विषयोपभोगांकडे मन गढून गेल्यामुळें वडिलोपार्जित संचय सर्व उधळून टाकून कफल्लक बनल्यावर दुसऱ्याला बुचाडणें, त्याला बरें वाटूं लागतें व तो याप्रमाणें मर्यादा सोडून वागूं लागला म्हणजे दुसऱ्यांना त्याला आळा घालावा लागतो. अशा प्रकारचीं हीं अनेक दुःखें टाळण्याला, लोकधर्माला अनुसरून विचाराच्या योगानेंच वासना त्याचप्रमाणें या जगांतील सर्व भासमान गोष्टी तुच्छ करण्याला नित्य झटावें; **त्यागाशिवाय सुखप्राप्ति होत नाहीं, त्यागाशिवाय ब्रह्मप्राप्ति होत नाहीं किंवा त्यागाशिवाय निर्धास्त झोंप घेतां येत नाहीं; ह्मणून त्याग हाच सर्वश्रेष्ठ असल्यानें सर्व सोडून सुखी व्हावें.'**

---

## १५४ इच्छेचें प्राबल्य व हिरमोड.

### ( १२. १७७–७८ )

युधिष्ठिर ह्मणाला, ' कोणतीही गोष्ट करावयाची मनांत आली असून ती करण्याला जर जवळ पैसा नसेल तर धनतृष्णेनें झपाटलेल्या अशा या मनुष्यानें काय केलें असतां त्याला सुख होईल ? ' भीष्म ह्मणाले, '**सर्वांच्या ठिकाणीं सारखा भाव, व्यर्थ खटपटीपासून मोकळें राहणें; सत्य भाषण, वैराग्य व कोणत्याही कृत्यासंबंधानें आतुरता न ठेवणें हीं पांच मनुष्याच्या मनाला शांति देण्याला कारणें होतात.** यासारखें दुसरें उत्तम सुख नाहीं. या संबंधांत पुढील मंकीची गोष्ट लक्षांत ठेवण्याजोगी आहे. पैशाच्या मागें लागलेला हा मंकी फिरून फिरून यत्न करीत असतांही त्याचा हिरमोड झाला. कोणे एके वेळीं त्याच्या जवळ जी कांहीं थोडी पुंजी होती ती खर्चीं घालून त्यानें दोन खोंड व एक जूं विकत घेतलें. त्यांना त्या जुंवाला घट्ट बांधून वठणीला आणण्यासाठीं त्यांना घेऊन तो बाहेर पडला. वाटेंत एक उंट बसला होता त्याच्यावरून ते भरधांव चालले असतां त्या उंटाला तें सहन न होऊन त्यांना आपल्या मानेवर टाकून घेऊन तो पळत सुटला. तो दांडगा उंट त्यांना घेऊन चालला असतांना आपले बैल आतां त्याच्या तावडींतून जिवंत सुटत नाहींतसें पाहून मंकी ह्मणाला, 'नशीबीं नसेल तर मनुष्याला तो कितीही झटपटला तरी पैसा मिळणें शक्य नाहीं. मीं आजपर्यंत मोठ्या दक्षतेनें पुष्कळ खटपट केली; परंतु आज माझ्यावर दैवानें कसा प्रसंग आला पहा ! हा उंट उंच सखल जागेंतून धांवत धांवत खडतर वाटेंतून ह्या माझ्या बैलांना वर खालीं करीत घेऊन पळत चालला आहे. हे दोन माझे खोंड याच्या मानेवर मण्यांप्रमाणें लोंबत आहेत ! हा शुद्ध दैवाचा खेळ असून **दैवापुढें मनुष्याच्या प्रयत्नाचें कांहीं चालत नाहीं. प्रयत्न ह्मणून कांहीं आहे असें जरी कोणी ठरवील तरी त्याच्या मुळाशीं सुद्धां दैवच आहे.** म्हणून ज्याला सुखाची इच्छा असेल त्यानें वैराग्य धरलें पाहिजे. ऐहिक विषयांवर आसक्ति न ठेवतां पैसा मिळवण्याला जो आ पसरून बसला नाहीं त्यालाच सुखानें झोंप येते. ज्याच्या सर्व वासना पूर्ण झाल्या आहेत व ज्यानें वासनाच मुळीं सोडून दिल्या आहेत, या दोघांसंबंधानें विचार केला असतांसुद्धां वासना पूर्ण होण्यापेक्षां वासना सोडण्याचीच विशेष मातब्बरी आहे. वासनेची तृप्ति झाली आहे अशी गोष्ट कधींच घडून आली नाहीं. शरीराच्या ठिकाणीं किंवा जीविताच्या ठिकाणीं मूर्खाची तृष्णा वाढत राहते. तेव्हां वासनेच्या मागें लागलेल्या मूर्खा, आतां याचा वीट येऊन आशेपासून मागें फीर. अनेक वेळां तूं फसला गेला असून अजून तुला याचा वीट येत नाहीं ! हे आशे, जर तुझ्या मनांतून माझा घात करावयाचा नसेल व बा-

डुलीप्रमाणें जर तूं मला घेऊन खेळत नसशील तर या लोभाशीं तूं मला आतां जखडूं नकोस. मी जसजसें द्रव्य सांठवितों तसतसें तें नाहींसें होतें. **हे पैशाच्या मागें लागलेल्या मूर्खा, ही तुझी पैशाची हांव कधीं सुटेल काय ?** केवढा तरी हा मूर्खपणा कीं, मी या आशेच्या हातांतली खेळण्याची बाहुली होऊन बसलों आहें. **ह्या आशेमुळें मनुष्य दुसऱ्यांचा गुलाम बनत नाहीं काय ?** आजपर्यंत कोणाच्याही आशेची तृप्ति झाली नाहीं व पुढेंही होणार नाहीं. सर्व खटपटींतून मोकळा होऊन मी आतां चांगला जागा झालों आहें. हे आशे, खरोखर तुझें हृदय वज्रासारखें कठीण आहे; कारण कीं, शेंकडों अनर्थांनीं तुला घेरलें असून त्याचे अद्यापि शेंकडों तुकडे होत नाहींत. हे आशे, मी तुला ओळखतों व तुझें हित कशांत आहे हेंही मी जाणतों; म्हणून तुझें हित करण्यासाठीं आत्म्याच्या ठिकाणींच मी आतां सुख मिळवितों. तुझें मूळ आतां मला सांपडलें आहे. तुझी उत्पत्ति संकल्पापासून आहे; म्हणून मनांत संकल्पच न आणतां तुला समूळ नाहींशी करतों. पैशाची इच्छा सुखाला कारण नसून तो मिळाला असतांही फिरून मोठी काळजीच राहते व मिळालेल्याचा नाश झाला असतां मरणासारखें दुःख होतें व तो मिळण्याचीही वानवाच असते. एवढेंच नव्हे तर मनुष्य हा देह खर्चीं घालण्याला तयार झाला तरी तो मिळत नाहीं. याहून आणखी दुःखाची गोष्ट ती काय असली पाहिजे ? तो मिळाल्यावरही मनुष्य संतुष्ट नसतो. तो फिरून अधिकाच्या मागें लागतो. गोड अशा गंगेच्या पाण्याप्रमाणें पैसा हा अधिक अधिक तहान वाढविणारा आहे. मला तर हा रडविणारा आहे. मी आतां जागा झालों आहे. जी ही आशा पंचभूतात्मक ह्या माझ्या देहाला चिकटून राहिली आहे ती वाटेल तिकडे जावो किंवा तेथेंच खुशाल राहो मला तिची आतां पर्वा नाहीं. कामलोभाच्या मागें लागणाऱ्या विकारांनो, माझें आतां तुमच्यावर प्रेम मुळीं उरलें नाहीं. सर्व वासना सोडून देऊन सत्वगुणाचा मीं आतां आश्रय केला आहे. सर्व भूतमात्रांना मी आपल्या देहामध्यें व मनामध्यें पाहूं लागून योगाकडे बुद्धि, श्रवणाकडे एकाग्रता व ब्रह्माकडे मन लावून कशावर आसक्ति न ठेवतां तुह्मी मला पुनः अशा दुःखामध्यें टाकणार नाहीं अशा रीतीनें खुशाल सुखानें फिरत राहीन. हे वासने, तूं मला अगदीं घेरून सोडल्यानें मला दुसरी गतीच उरली नव्हती. तूं आशा, शोक व कष्ट यांचें उत्पत्तिस्थान आहेस. धनाशेमध्यें सर्वांत अधिक दुःख आहे. पैशाला मुकलेल्या मनुष्याचा ज्ञाती, मित्र सर्व अवमान करतात. याप्रकारें हजारों अवमानकारक कष्टतर दोष पैशाला मुकल्यामध्यें आहेत. पैशामध्यें जें कांहीं थोडेंसें सुख दिसतें तें सुद्धां दुःखानेंच भरलेलें आहे. याजवळ पैसा आहे ह्मणून आधीं चोर याला मारण्याला तयार होतात, नाना प्रकारें त्याला पीडा देऊन त्रास देतात व धमकी देतात. पैशाला हापापणें यांत फार दुःख आहे; असें आतां मला पुष्कळ दिवसांनीं कळून आलें आहे. हे वासने, ज्याला ज्याला ह्मणून तूं धरतेस त्याच्या त्याच्या मागेंच तूं लागतेस. तुला तत्त्व कळत नाहीं. तूं मूर्ख आहेस. संतोष ह्मणून तुला ठाऊक नाहीं. अग्नीप्रमाणें, तुला पुरें ह्मणून कधीं होत नाहीं. मिळण्याला सुलभ कोणतें आहे, दुर्लभ कोणतें आहे, हें कांहीं तुला समजत नाहीं. पाताळाप्रमाणें तुझा खड्डा कधीं भरून निघावयाचा नाहीं. तूं उगीच मला दुःखाशीं जखडून टाकूं पहात होतीस. आजपासून तुमचें आमचें पटावयाचें नाहीं. सहज द्रव्यनाश झाल्यानें वैराग्य येऊन माझी समाधानवृत्ति झाली आहे. आतां वासनांचा विचार माझ्या मनांत मुळींच येत नाहीं. आजपर्यंत मीं पुष्कळ क्लेश सोसले आहेत; पण मी मूर्ख, उमगलों नाहीं. धनाशानें मला फसविल्यामुळें आतां मी निश्चिंत होऊन झोंप घेतों; तुला इतर सर्व मनोविकारांबरोबर आतां मी दूर सोडून देतों. आतां माझ्या ठिकाणीं तुला बिऱ्हाड मिळून माझ्यावर वाटेल तशी मजा मारण्याला मिळणार नाहीं. मला जे टाकून बोलतील त्यांचें तें बोलणें मी सहन करीन. कोणीं पीडा दिल्यास त्यांना उलट पीडा देणार नाहीं. कोणीं द्वेष केला तरी त्याजकडे लक्ष न देतां त्याच्याशी गोड बोलेन. सर्व इंद्रियें स्वाधीन ठेवून समाधानीनें मिळेल त्यावर पोट भरून राहीन. माझी वैरीण जी तूं त्या तुझी इच्छा मी आतां कधीं

सफल करणार नाहीं. वैराग्य, शांति, समाधानी, सत्य, आत्मनिग्रह, सर्व प्राणिमात्रांवर दया हे गुण आतां मीं धरले आहेत; ह्मणून काम, लोभ, तृष्णा आणि दैन्य यांनीं आतां मला सोडावें. काम, लोभ सोडून सुखी झालेला मी आतां लोभाच्या तावडींत जाऊन फिरून दुःखी होणार नाहीं. वासनेचा जेवढा जेवढा ह्मणून भाग टाकावा तेवढें तेवढें सुखाला कारण होतें. वासनेच्या तावडींत गेलेल्या मनुष्याला दुःखावांचून कांहीं मिळत नाहीं. कामाच्या मागें लागलेल्याला कामक्रोधापासून उत्पन्न होणारें दुःख, निर्लज्जपणा व असमाधानी हींच कायतीं मिळतात. हा मी उन्हाळ्यांतील थंड पाण्याच्या झऱ्याप्रमाणें शांत होऊन ब्रह्माकडे निघालों आहें. आतां दुःखाचा ह्मणून मजपाशीं वारा नसून केवळ सुख मजकडे धांव घेत आहे. आपल्यासकट सातवा जो हा काम याला टाकून अविनाशी अशा ब्रह्मपुराला जाऊन मी राजाप्रमाणें सुखी होतों.' तो खेंडाला मुकल्यामुळें अशी बुद्धि धरून सर्व वासना टाकून सर्वांत थोर ब्रह्मसुख मिळवून, अमर होऊन थोर ब्रह्मसुख घेत राहिला. कामाचें मूळच त्यानें तोडून टाकल्यानें त्याला हें मोठें सुख मिळालें. या संबंधानें जनकाचेही पुढील उद्गार लक्षांत ठेवण्याजोगे आहेत. तो ह्मणाला, 'माझी संपत्ति जरी अगणित आहे तरी माझें ह्मणून कांहींच नाहीं. सर्व मिथिलेला आग लागली तरी माझें कांहींच जळणार नाहीं.' त्याचप्रमाणें वैराग्यानें शांति मिळवून शास्त्रज्ञानामध्यें समाधान पावून राहिलेल्या बोध्य ऋषींना नहुष राजानें, 'तुमची अशी शांतवृत्ति कशानें झाली आहे,' ह्मणून विचारलें असतां ते ह्मणाले, 'मी दुसऱ्याचा उपदेश घेऊन त्याप्रमाणें वागत असतों, पिंगला, कुररी, साप, मधमाशा, एक बाणकार व एक कुमारी हे माझे गुरु आहेत. आशा बलवान असून नैराश्य हेंच उत्तम सुख आहे. आशेचा बीमोड करून पिंगलेला सुखानें झोंप आली. एका कुररीच्या तोंडांत मांस असल्यामुळें दुसऱ्या तिला मारूं लागल्या असतां तें मांस टाकून देऊन ती सुखी झाली. घर करणें दुःखाला कारण असून सुखाला नाहीं. सर्प दुसऱ्यानें केलेल्या घरांत शिरून सुखांत असतो. मधमाशीप्रमाणें कोणाही भूतमात्राचा द्वेष न करतां भिक्षावृत्तीमध्यें मुनी सुखात असतात. कोणी एक बाण करणारा बाण करण्यामध्यें गढला असतां त्या एकाग्रतेमध्यें जवळून राजा जातांना सुद्धां त्याला दिसला नाहीं. कोणी एक मुलगी आपल्या बापाच्या घरीं असतां गुप्त रीतीनें ब्राह्मणाला जेवूं घालण्यासाठीं तांदूळ कांडीत असतां तिच्या चुड्यांचा आवाज होऊं लागला. तेव्हां दुसऱ्याला समजेल ह्मणून तिनें एकेक ठेवून बाकीचे सर्व चुडे फोडून टाकले. त्याप्रमाणें पुष्कळ असलें कीं भांडण व्हावयाचें व दोघांमध्यें सुद्धां कांहीं संभाषण व्हावयाचेंच ह्मणून मी एकटा फिरत असतों.

## १९९ आजगरवृत्ति. (१२. १७९)

'कोणती वृत्ति धरून कसें राहिल्यानें मनुष्याला उत्तम गति मिळते,' ह्मणून युधिष्ठिरानें विचारलें असतां भीष्म ह्मणाले, 'यासंबंधानें प्रल्हाद व अजगरमुनी यांचा पुढील संवाद लक्षांत ठेव. अजगरमुनी रागद्वेषांपासून मुक्त होऊन दृढनिश्चयानें फिरत असतां प्रल्हाद त्यांना ह्मणाला, "आपण स्वस्थ, वाटेल तें करण्याला समर्थ, सर्वांशीं मृदु, आत्मनिग्रही, कशाची पर्वा न करतां व कोणाचा हेवा न करतां सर्वांशीं गोड बोलून शहाण्याप्रमाणें धैर्यानें व अगदीं साधेपणानें फिरत आहां, कांहीं मिळविण्याची हांव धरीत नाहीं, न मिळाल्याबद्दल वाईट वाटून घेत नाहीं, नेहमीं समाधानवृत्तींत राहून कशाचीच आपण पर्वा ठेवीत नाहीं. सर्व प्रजा या प्रवाहामधून वहात चालल्या असतां धर्मकामार्थसंबंधानें बेपर्वाई ठेवून आपण अगदीं स्वस्थ दिसतां. धर्म, अर्थ किंवा काम यांपैकीं कशाचीच आपल्याला फिकीर नाहीं. इंद्रियविषय तुच्छ करून मोकळे होऊन, साक्षीप्रमाणें आपण सर्व कांहीं पहात फिरतां, याचें कारण काय तें मला सांगा.' हें प्रल्हादाचें भाषण ऐकून बोध्यांनीं गोड शब्दांनीं मुद्देसूदपणें त्याला उत्तर दिलें. ते ह्मणाले, 'प्रल्हादा, भूतमात्रांची उत्पत्ति, क्षय, वाढ व नाश हीं कांहीं कारणावांचून होतांना पाहून मला आनंदही होत नाहीं किंवा दुःखही होत नाहीं. या सर्व चालू प्रवृत्ति स्वाभाविक चालल्या असून सर्व कांहीं आपापल्या स्वभावानें घडत अ-

सल्यानें मला कशाचाच संतोष वाटत नाहीं. संयोग ह्मटला कीं त्याच्यामागें वियोग लागलेलाच व संचय ह्मटला कीं कधीं तरी त्याचा नाश ठेवलेलाच, ह्मणून मी यांच्या ठिकाणीं मन घालीत नाहीं. गुणधर्मयुक्त सर्व भूतमात्रांचा शेवट ठरलेला आहे. उत्पत्ति व नाश हे कळल्यावर मग बाकी काय राहिलें? जलामध्यें असणाऱ्या प्राण्यांचा देखील मग ते मोठे असोत किंवा लहान असोत क्रमानें शेवट दृष्टीस पडतोच. त्याचप्रमाणें पृथ्वीवरील स्थावरजंगम सर्व भूतमात्रांना व आकाशांत फिरणाऱ्या पक्ष्यांना मृत्यु दिसतो. बलवान लोकांना देखील वेळ आली असतां मृत्यु गांठतो. आकाशांत फिरणारे लहान मोठे तारे देखील त्यांची त्यांची वेळ आली असतां खालीं पडतात. याप्रमाणें सर्व प्राणिमात्रांना मृत्यु चिकटलेला पाहून त्या स्वाभाविक नियमाकडे लक्ष दिल्यानें मी खुशाल सुखांत असतों. मला सहजगत्या पुष्कळ अन्न मिळालें तरी तें मी खातों व कित्येक दिवसपर्यंत कांहीं न खातांही पडतों. कधीं मला उत्तम उत्तम प्रकारचें खाणें लोक खाऊं घालतात, व कधीं थोडें देखील मिळत नाहीं. कधीं एका दाण्यावर रहावें लागतें, कधीं पेंडीवर देखील रहावें लागतें, व कधीं साळीचा भात खातों. कधीं मांस खातों. याप्रमाणें बरें वाईट अन्न मी खातों. त्याचप्रमाणें कधीं पलंगावर पडतों, कधीं जमिनीवर पडतों व कधीं मला वाड्यांत निजावयाला जागा मिळते. कधीं मी चिंध्या नेसतों, कधीं गोणपाट नेसतों, कधीं मलमल नेसतों, कधीं कातडें नेसतों व कधीं कधीं मोठीं मौल्यवान वस्त्रें नेसतों. धर्माला बाध न येणारा सहजगत्या मिळालेला उपभोग मी टाकीत नाहीं. व जो मिळण्याला कठीण आहे त्याच्या मागें लागत नाहीं. मीं धरलेलें हें स्थिर, अमरत्व देणारें, कल्याणप्रद, शोक ज्यामध्यें ठाऊक नाहीं असें शहाण्याच्या मतानें ब्रह्माशीं जुळवून टाकणारें अनुपमेय आजगरव्रत आहे. मूर्खांना हें पसंत नसून ते कधीं याच्यामागें लागत नाहींत. या धर्मापासून माझें मन कधीं ढळत नाहीं. माझी हालचाल मीं नियमित करून टाकिली आहे. बरें वाईट मला कळतें. भय, राग, लोभ, मोह हीं मीं सोडून दिलीं आहेत. भक्ष्य, भोज्य, पेय यांसंबंधानें मीं कांहीं नियम ठेविला नाहीं. सर्व कांहीं देशकालाप्रमाणें घडत असल्यानें देशकालाचीही आमच्यासारख्यांना पर्वा नसते. हें आजगरव्रत हृदयाला मोठें सुख देणारें आहे. हलक्यांच्या हातून हें व्रत कधीं पाळलें जात नाहीं. तृष्णेनें घेरलेले लोक निरनिराळ्या गोष्टींच्यामागें लागून पैसा न मिळाल्यानें हिरमोड पावतात. तत्त्वबुद्धीनें हें पक्कें ओळखून मीं हें व्रत धरलें आहे. पैशासाठीं लोक दीनपणें भलत्यासलत्याची सेवा करण्याला तयार झालेले पाहून, आत्मनिग्रहानें याकडे लक्ष न देतां मीं शांतवृत्ति धरली आहे. सुख, दुःख, लाभ, हानि, प्रेम, निष्प्रेम, मरण आणि जीवित हें सर्व दैवाधीन आहे असें माझें मत ठरलें आहे. भय, मनोविकार, मोह, दर्प टाकून देऊन धैर्य, बुद्धि व विचार धरून शांतपणें जें मिळेल त्यावर अजगर रहात असतात, हें ऐकून मी तसा राहतों. शयन किंवा आसन यांसंबंधानें नियम न ठेवतां स्वभावानें आत्मनिग्रह, नियम, व्रत, सत्य व शुद्धता ठेवून फलसंचय कांहीं न ठेवतां मी आनंदांत राहतों. वासनाच नाहींशी करून टाकल्यामुळें दुःखाचें सर्व कारण नाहींसें झालें आहे आणि माझ्या मनावर प्रकाश पडला आहे. ह्या हपापलेल्या उच्छृंखल मनाला ताब्यांत ठेवण्यासाठीं मीं हें आजगरव्रत धरलें आहे. माझें हृदय, मन, व वाणी मला भलतीकडे घेऊन जाऊं इच्छितात त्यांकडे लक्ष न देतां आणि या संबंधीं जीं सुखें तीं मिळण्याला कठीण असून नश्वर आहेत असें समजून मीं हें व्रत धरलें आहे. ज्यांनीं आपली विद्वत्ता दाखविण्यासाठीं निरनिराळे तर्क प्रतिपादिले आहेत, अशा मोठमोठ्या विद्वानांनीं सुद्धां हें व्रत उत्तम म्हटलें आहे. मूर्ख लोकांना याचें खरें स्वरूप कळत नाहीं; मला हें अज्ञाननाशक आहे हें पक्कें कळलें आहे. आणि अमरत्व देण्याचें व अनेक संकटें दूर करण्याचें सामर्थ्य याच्या अंगीं आहे असें समजून तृष्णा टाकून या आजवरवृत्तीनें मी या जगांत फिरत आहें, या वृत्तीनें राहणाऱ्या मनुष्याला आपले दिवस मोठ्या आनंदांत घालवितां येतात ? '

---

## १५६ प्रज्ञा. ( १२. १८० )

' बांधव, कर्में, पैसा व प्रज्ञा यांपैकीं मनुष्याचा

मुख्य आधार कोणता म्हणून युधिष्ठिरानें विचारलें असतां भीष्म म्हणाले, 'प्रज्ञा हा सर्व भूतमात्रांचा मुख्य आधार असून श्रेष्ठ लाभ आहे. हीच मोठी कल्याणकारक असून स्वर्ग देणारी आहे. बली, प्रऱ्हाद, नमुची व मंकी हे वैभवाला मुकले असतां यामुळेंच त्यांचा कार्यभाग साधला. हिच्याहून श्रेष्ठ असें या जगामध्यें दुसरें काय आहे ? या संबंधानें पुढील इंद्र व काश्यप ब्राह्मण यांचा संवाद लक्षांत ठेवण्याजोगा आहे. काश्यप नांवाच्या कोणा एका ऋषिपुत्रांना पैशानें फुगलेल्या एका वैश्यानें आपल्या रथाचा धक्का लावून खालीं पाडलें. त्यामुळें दुःख होऊन त्यांना राग आला व धैर्य सोडून गर्वानें जगण्यांत अर्थ नाहींसें वाटून जीव देण्याला ते तयार झाले. याप्रमाणें वेडे बनून मरण्यास तयार होऊन स्वस्थ बसले, इतक्यांत इंद्र कोल्ह्याचें रूप घेऊन अगदीं क्षुब्ध झालेल्या त्या कश्यपांना ह्मणाला, 'सर्व प्राणिमात्रांना मनुष्यजन्म हवासा वाटतो; त्यामध्यें सुद्धां ब्राह्मणजन्म चांगला ह्मणतात. त्याप्रमाणें तुला ब्राह्मण जन्म आला आहे; व तूं वेद पढला आहेस. तेव्हां हा सुदुर्लभ जन्म मिळाला असून मूर्खपणानें जीव देण्याला तयार होणें तुला योग्य नाहीं. सर्व लोभांच्या मुळाशीं अभिमान हा आहेच. तुझ्या तोंडावरून तुझी संतोषवृत्ति दिसते. हा जो तुला अभिमान वाटत आहे तो केवळ लोभामुळें आहे. मूर्खपणामुळें तूं असा मरण्याला तयार झाला आहेस. ज्यांना हात आहेत त्यांचें किती तरी काम चाललें आहे ? हात असणाऱ्यांचा मला मोठा हेवा वाटतो; जसा तुला पैसा हवासा वाटतो, तसे मला हात हवेसे वाटतात. हातांवांचून दुसरा कोणताही मोठा लाभ नाहीं. हात नसल्यानें आह्मांला पायाला बोंचलेला कांटा काढतां येत नाहीं किंवा अंगावर बसून चावणाऱ्या लहान मोठ्या प्राण्यांना हाकलतां येत नाहीं. आतां ज्यांना दहा बोटांनिशीं दोन हात आहेत, त्यांना लहान सहान कृमिकीटक चावूं लागले असतां खाजवून त्यांना हाकलतां येतें. पाऊस, थंडी, उन्ह यांपासून आपलें संरक्षण करून घेतां येतें. वस्त्र, अन्न, उत्तम शय्या, सुख, निवारा यांचा उपभोग घेतां येतो, बैलावर बसून मजा मारतां येते व त्यांना आपल्याला वाटेल तिकडे वाहवून नेतां येतें व अनेक उपायांनीं त्यांना आपल्या ताब्यांत ठेवतां येतें. ज्यांना जीभ नाहीं, जे अनाथ आहेत, ज्यांच्या अंगांत फार थोडी ताकद आहे, त्यांना वर सांगितल्याप्रकारचीं सर्व दुःखें सहन करावीं लागतात. तुझ्या नशिबानें कोल्हा, किडा, उंदीर, साप, बेडूक यांच्या किंवा दुसऱ्या एखाद्या नीच योनींत तुझा जन्म झाला नाहीं; एवढ्यानें सुद्धां तूं संतुष्ट असलें पाहिजे होतें; परंतु तुला तर सर्वांत श्रेष्ठ ब्राह्मण जन्म मिळाला आहे. ही माझी स्थिति पहा. हे कृमिकीटक माझ्या अंगावर बसताहेत त्यांना, हात नसल्यामुळें मला हाकलतां येत नाहीं. आतां मी जर प्राण देण्याला तयार होईन तर त्या भलत्या कृत्याबद्दल याहून वाईट योनीमध्यें मी पडेन; कारण याहूनही पुष्कळ वाईट योनी आहेत. फक्त जातीमुळेंच कांहीं सुखी असतात व कांहीं फार दुःखी असतात. पूर्णसुख या जगांत कोणालाच मिळत नाहीं. मनुष्याला पैसा मिळाला ह्मणजे राज्याची हांव सुटते, राज्य मिळालें ह्मणजे देवत्व हवेंसें वाटतें व देवत्व मिळालें ह्मणजे इंद्रत्व पाहिजेसें वाटतें. पाहिजे ती वस्तु मिळाल्यानें कधीं तृप्ति होत नाहीं. पाण्यानें कधी तहान शमत नाहीं. उलट सर्पण घातलेल्या अग्नीप्रमाणें ती वाढतच रहाते. शोक तसा आनंदही तुझ्या ठिकाणींच आहे. आतां तो मिळविणें तुझ्या हातीं आहे. याप्रमाणें दोन्ही तुझ्या जवळच असतां दुःखाला जागा कोठें उरली ? बुद्धि व इंद्रियें जीं सर्व वासनांना व कर्मांना मूळ आहेत, त्यांना पिंजऱ्यांत कोंडून ठेवलेल्या पक्ष्याप्रमाणें कोंडून ठेवावें. **ज्याप्रमाणें एकदां मान तुटली ह्मणजे पुन्हां ती तुटण्याची भीति उरत नाहीं व दोन हात छाटून निघाल्यावर तिसरा हात तुटण्याची भीति उरत नाहीं, त्याप्रमाणें जगांत द्वैतच नसल्यानें त्या संबंधानें भीति तरी कोठची उरणार.** ज्याला कोणत्याही गोष्टीची गोडी ठाऊक नसते, त्याला ती वासना कधीं उत्पन्न होत नसते. स्पर्शानें, पहाण्यानें किंवा ऐकण्यानें ही वासना उत्पन्न होते. तुला मद्याची किंवा कवड्या पक्ष्याच्या मांसाची गोडी माहीत नाहीं. त्यांच्याहून लज्जतदार पदार्थच दुसरे नाहींत. याचप्रमाणें आणखी दुसरे जे कांहीं खा-

ण्याचे पदार्थ तूं चाखले नाहींस त्यांची तुला आठवण सुद्धां होत नाहीं. गोडी न घेणें, न शिवणें किंवा न पाहणें यासारखें दुसरें उत्तम व्रत नाहीं. ज्यांना हात आहेत ते बळवान असून पैसा त्यांच्या घरीं आहे. **मनुष्यानेंच मनुष्याला गुलाम करून सोडलें आहे.** मनुष्य जरी वध, बंधन व नानाप्रकारचे क्लेश यांनीं त्यांना दुःख सोसावें लागतें तरी मोठ्या मजेंत, हासून आनंदांत असतात. दुसऱ्या कांहींना मनगटांत जोर; विद्या व शहाणपणा असून निंद्य अशी हलकट वृत्ति धरावी लागते व दुसरी वृत्ति पहाण्याचें त्यांच्या मनांत असलें तरी स्वकर्मानें ते तिच्याशीं जखडलें जातात. पुल्कस व चांडाळ अशा नीच जातीचे लोक सुद्धां जीव देऊं इच्छीत नाहींत. ते सुद्धां आपल्या त्या जातीमध्यें संतुष्ट असतात. ही माया कशी आहे पहा. कुबडे, अर्धांग वायु झालेले, रोगग्रस्त अशा लोकांकडे नजर देऊन या तुझ्या जातीमध्यें सर्व अवयवांनीं संपूर्ण कांहीं रोगरायीवांचून तूं आहेस याकडे दृष्टि दे. ज्याअर्थी तुला ब्राह्मणदेह मिळाला असून तुझीं सर्व इंद्रियें शाबूत व निर्दोष आहेत व जातींतून बाहेर पडण्यासारखा एखादा काळिमा लागून लोकांनीं तुझा धिक्कार केला नाहीं, त्या अर्थीं उठून धर्माचरणासाठीं तयार हो. असें जीव देणें तुला शोभत नाहीं. जर माझें हें भाषण ऐकून याच्यावर तुझा विश्वास असेल तर तुला वेदोक्त धर्माचें मुख्य फळ मिळेल. मोठ्या काळजीपूर्वक वेदाध्ययन करीत राहून अग्नि ठेव. खऱ्या रीतीनें वाग, आत्मनिग्रह ठेव व दान कर. कोणाशीं चढाओढ करूं नकोस. ज्यांना वेदाध्ययनाचा व यज्ञ करण्याचा आणि करविण्याचा अधिकार मिळाला आहे त्यांना असें रडत बसून भलतें सलतें मनांत आणणें शोभतें काय ? जे चांगल्या तिथीला, चांगल्या नक्षत्रावर व चांगल्या मुहूर्तावर जन्मले असतात ते यज्ञ, दान व संतति यांसाठीं यथाशक्ति झटतात व त्यांना मोठें सुख मिळतें. तसेंच जे कोणी वाईट तिथीला, वाईट मुहूर्तावर व आसुर नक्षत्रावर जन्मले असतात, ते यज्ञ व संतति यांवांचून राहतात. मला शहाणपणाची मोठी घमेंड असून मी हेतुवाद करणारा व वेदनिंदक होतों. फुकटच्या वरवर दिसणाऱ्या गोष्टींवरून कुतर्क काढण्यामध्यें मी गढला असें. मोठमोठ्या सभेमध्यें विद्वानांपुढें वितंडवाद चालवून मी वेदवाक्याला तुच्छ करीत असें व ब्राह्मणांची निंदा करीत असें. नास्तिक, शंकेखोर, मूर्ख व विद्वत्तेची घमेंड बाळगणारा असा मी होतों. त्याचें हें फळ मला कोल्ह्याचा जन्म आला आहे. शेंकडों दिवस लोटल्यावर तरी मला फिरून मनुष्यजन्म मिळेल, काय असें मला वाटत आहे. मला तो जन्म मिळेल तर मी त्यांत संतुष्ट राहून सावध राहीन. यज्ञ, दान व तप यांकडे लक्ष देईन, ओळखलें पाहिजे तें ओळखीन व टाळलें पाहिजे तें टाळीन.' हें भाषण ऐकून त्या मुनींना विस्मय होऊन ते त्याला ह्मणाले, 'तूं मोठा बुद्धिमान आहेस. पुढें ज्ञानदृष्टीनें पहातात तों तो इंद्र आहे असें कळल्यावर त्यांनीं त्याचा सत्कार केला व त्याचा निरोप घेऊन घराकडे आले.

---

## १५७ कर्म. ( १२. १८१ )

'दान किंवा यज्ञ, तप व गुरुशुश्रूषा यांचा या प्रजा वृद्धीकडे कांहीं उपयोग होतो का,' ह्मणून युधिष्ठिरानें विचारिलें असतां भीष्म ह्मणाले, 'कामक्रोधादि दुष्ट मनोविकारांकडे बुद्धि लावल्यानें मनुष्याचें मन पापांत गढतें व याप्रमाणें निंद्यकर्म करून तो नरकाला अधिकारी होतो. पापकृत्य करणाऱ्या बिचाऱ्यावर दुष्काळावर दुष्काळ, क्लेशावर क्लेश, भयावर भय व मरणावर मरण येऊन पडतात. श्रद्धापूर्वक आत्मनिग्रहानें चांगलें कृत्य करीत रहाणाऱ्या श्रीमानांना नाना उत्सव, सुख व स्वर्ग मिळतात. नास्तिक लोकांना हातांत खोडे पडून मोठमोठे साप व हत्तीं यांनीं दुर्गम व चोरांनीं भयंकर अशा प्रदेशांतून भटकण्याची पाळी येते. ज्यांना देव, अतिथि व साधु प्रिय आहेत व जे उदार आहेत, ते आपल्या दानानें सुखावह व क्षेमकर अशा आत्मनिग्रही लोकांना मिळणाऱ्या वाटेला लागतात. मनुष्यांपैकीं धर्मलंड लोक धान्यांमधल्या फोलकटाप्रमाणें किंवा पक्ष्यांमधील धुंगुरड्याप्रमाणें निरुपयोगी आहेत. **मनुष्य कितीही जोरानें धांवत सुटला तरी त्याचें कर्म त्याच्या मागून धांवत असतें. तो निजला ह्मणजे त्याच्या बरोबर**

**तें निजतें, तो उठला ह्मणजे उठतें, तो चालला ह्मणजे चालूं लागतें, तो कांहीं करूं लागला ह्मणजे हें त्याच्या बरोबर करूं लागतें. छायेप्रमाणें हें त्याच्या मागून असतें.** ज्यानें ज्यानें जसजसें पूर्वी कर्म केलें असेल तें तें त्यानें केलेलें कर्म त्याला एकट्याला भोगावें लागतें. स्वकर्मानें एखाद्या योनींत पडून आपलें केलेलें कर्म भोगावें लागणाऱ्या सर्व प्राणिमात्रांना काळ ओढीत आहे. **ज्याप्रमाणें झाडांना त्या त्या काळीं फलपुष्पें बिनचुक येतात, त्याप्रमाणें पूर्वी केलेलें कर्म आपली वेळ कधींही चुकवूं देत नाहीं.** कृतकर्माची पुंजी सरल्यावर मान, अवमान, लाभ, हानि, क्षय, उदय यांचीही त्याबरोबरच वाट लागते. आपणच पूर्व दशेमध्यें तयार करून ठेवलेलें दुःख किंवा सुख गर्भाशयांत पडल्याबरोबर मनुष्य भोगूं लागतो. मनुष्य लहानपणीं, तरुणपणीं किंवा ह्मातारपणीं ज्या ज्या वेळीं जें जें बरें वाईट कृत्य करतो त्या त्या स्थितींत तो त्याचें फळ भोगतो. ज्याप्रमाणें पाडस हजारों गाईमध्यें बिनचुक आपल्या आईकडे जातें त्याप्रमाणें पूर्वजन्मीं केलेलें कर्म करणाराला बिनचुक गांठतें. मळकट कापड पाण्यांत भिजवून ठेवून धुतल्यानें जसें मळबिळ जाऊन स्वच्छ होतें, त्याप्रमाणें उपवासादि देहदंडांनीं उत्तम सुख मिळतें. पुष्कळ दिवसपर्यंत तपोवनामध्यें तप करून धर्माचरणानें पाप धुवून टाकल्यानें सर्व मनोरथ परिपूर्ण होतात. पक्ष्यांच्या आकाशांतील किंवा माशांच्या पाण्यांतील मार्गाप्रमाणें ज्ञान्याचा मार्ग कळत नाहीं. आपल्या नांवानुरूप मनुष्यानें कर्तव्य करीत रहावें.'

---

## १५८. सृष्टीची उत्पत्ति. (१२. १८२)

युधिष्ठिर ह्मणाला, 'हें सर्व विश्व कोठून उत्पन्न झालें, प्रलयकालीं हें कशामध्यें लय पावतें? समुद्र, आकाश, पर्वत, ढग, भूमि, अग्नि, वारा, यांसह हें जग कोणीं उत्पन्न केलें? सर्व प्राणिमात्र कसे झाले? वर्णभेद कसा निघाला? शुद्धाशुद्धतेची व धर्माधर्माची कल्पना कशी निघाली? ह्या सजीव प्राण्यांमधील जीव कशा प्रकारचा असतो व मेल्यावर लोक कोठें जातात?' भीष्म ह्मणाले, 'कैलास पर्वतावर आपल्या महातेजानें झळकणारे भृगुऋषी बसले असतां भरद्वाजांनीं त्याना हाच प्रश्न केला होता. तेव्हां त्यांनीं जें उत्तर दिलें तें सांगतों ऐक. महर्षींमध्यें प्रसिद्ध असलेले मानस हे सर्वांत आदि ऋषि होत. ज्याला आदि नाहीं किंवा अंत नाहीं, जो प्रकाशमान आहे, जो अभेद्य आहे, तसाच जो अजर, अमर, अव्यक्त, शाश्वत, अक्षय व अव्यय आहे, त्याच्यापासून भूतमात्र उत्पन्न होतात व मरतात. यानें प्रथम महत् उत्पन्न केलें, त्यापासून अहंकार उत्पन्न झाला, ह्या अहंकारानें आकाश उत्पन्न केलें, आकाशापासून पाणी उत्पन्न झालें, पाण्यापासून अग्नि व वायु उत्पन्न झाले, अग्नीच्या व वायूच्या संयोगानें पृथ्वी उत्पन्न झाली. तेव्हां स्वयंभू मानसानें देदीप्यमान दिव्य कमल उत्पन्न केलें. त्या कमलापासून वेदाचा केवळ सांठा असे वेदस्वरूपी ब्रह्मदेव निर्माण झाले. सर्व भूतमात्रांना उत्पन्न करणारा हा ब्रह्मस्वरूपी मानस अहंकार ह्मणून प्रसिद्ध आहे. त्याचप्रमाणें हा महातेजस्वी ब्रह्मा पंच धातूंचा बनला आहे. पर्वत हेच त्याच्या शरीरांमधील अस्थि असून पृथ्वी ही मेद व मांस आहे. समुद्र हे त्याच्या अंगामधील रक्त असून आआकाश हें उदर आहे. त्याचप्रमाणें वायु याचा श्वासोच्छ्वास, अग्नि तेज, नद्या शिरा, पर्यायानें चंद्रसूर्य ह्मणून प्रसिद्ध असलेले अग्नि व सोम डोळे, वरील आकाश मस्तक, पृथ्वी पाय व दिशा हात, याप्रमाणें याचें अचिंत्य स्वरूप सिद्धांना सुद्धां कळण्याला कठीण आहे. सर्व पंचमहाभूतांनीं बनलेला हा सर्व भूतमात्रांच्या ठिकाणीं असणारा विष्णु अनंत नांवानें प्रसिद्ध असून आत्मशुद्धि ज्यांची झाली नाहीं त्यांना याची ओळख पटणें नाहीं. सर्व भूतमात्रांच्या उत्पत्तीसाठीं यानें अहंकार उत्पन्न केला. गगन, दिशा, भूतल व वायु यांचें प्रमाण काय आहे ह्मणून विचारशील तर ज्या ठिकाणीं सिद्ध व देव राहतात अशा आकाशाला अंत नाहीं. तें मोठें रम्य असून नाना प्रकारचे लोक त्यामध्यें आहेत. चंद्र किरणांच्या वरखालच्या गतीच्या पलीकडे त्यांना हें दिसत नाहीं. त्या ठिकाणीं अग्नीप्रमा-

णें तेजस्वी आपल्या तेजानें प्रकाशणारे पुष्कळ तारे आहेत. ते सुद्धां दुर्गम व अनंत असल्यानें या आकाशाचा अंत लागत नाहीं. वरवर स्वयंप्रकाश अशा दैदीप्यमान लोकांनीं हें अनंत आकाश भरलें आहे. पृथ्वीनंतर समुद्र व समुद्रापलीकडे अंधार आहे. या अंधाराच्या पलीकडे फिरून पाणी असून त्याच्या पलीकडे अग्नि आहे. खालीं रसातलाच्या खालीं पाणी व त्या पाण्याखालीं मोठमोठे नाग, त्या खालीं फिरून आकाश व आकाशाच्या पुढें पाणी अशी स्थिति आहे. याप्रमाणें जलरूपी या भगवानाचें व अग्नि, वायु, पाणी यांचें प्रमाण देवांना देखील कळत नाहीं. अग्नि, वायु, पाणी व पृथ्वी यांचें स्वरूप आकाशाप्रमाणेंच असून अज्ञान्यांना तें निराळें दिसतें. आतां निरनिराळ्या शास्त्रांमधून त्रैलोक्य व समुद्र यांचें प्रमाण जरी सांगितलेलें दिसतें, तरी जेथें जातां येत नाहीं व जें दिसत नाहीं, अशाचें प्रमाण नक्की कोणाला सांगतां येणार? सिद्ध व देव यांची जरी गति कळली तरी नांवाप्रमाणें ज्याचें स्वरूप आहे अशा या अनंतनामक मानसाचा अंत लागणें नाहीं. याचें जें कमी अधिक रूप होतें तें याच्याचसारख्या दुसऱ्या व्यक्तीवांचून कोणाला कळणार? याप्रमाणें त्या कमलापासून धर्ममूर्ति पहिले प्रजापति ब्रह्मदेव निर्माण झाले. आतां या कमलापासून ब्रह्मदेवाची उत्पत्ति असल्यानें कमलालाच पहिलें कां समजलें नाहीं ह्मणून विचारशील तर जी ही मानसाची ब्रह्मस्वरूपी मूर्ति झाली तिच्या आसनासाठीं या पृथ्वीलाच कमल ह्मटलें असून त्या कमलाचा बीजकोश आकाशाला जाऊन भिडलेला जो मेरु आहे त्या ठिकाणीं बसून हा जगतांचा प्रभू सर्व लोक निर्माण करतो.'

## १५९ पंचमहाभूतांची उत्पत्ति व धर्म.
## (१२. १८३–१८५)

'या मानसानें नाना प्रकारच्या प्रजा उत्पन्न करतांना सर्व भूतमात्रांच्या संरक्षणासाठीं प्रथम पाणी उत्पन्न केलें. हें पाणीच सर्वांचा प्राण असून याच्या योगानेंच प्राणी वाढतात व हें न मिळाल्यानें नाश पावतात. या पाण्यानेंच सर्व विश्व भरलें आहे. पृथ्वी, पर्वत, ढग व जे दुसरे कांहीं मूर्त पदार्थ आहेत ते सर्व पाण्याच्या संयोगानें बनले आहेत. ही उत्पत्ति कशी झाली तें सांगतों ऐक. पूर्वी या अनंत आकाशांत चंद्र, सूर्य, वारा कांहीं नसून झोंपीं गेल्याप्रमाणें जिकडे तिकडे सामसूम होतें. पुढें अंधारामध्यें पुनश्च अंधाराप्रमाणें त्यामध्यें पाणी उत्पन्न झालें, व बिन भोकाच्या भांड्यांत पाणी भरलें असतां जसा वारा शब्द करीत बाहेर पडतो, त्याप्रमाणें तें भरलें जात असतां त्याच्या दाबानें वायु शब्द करीत बाहेर पडला. याप्रमाणें घन आकाशांतून पाण्याचा अडथळा होऊन वारा शब्द करीत बाहेर पडून आकाशामध्यें संचार करीत आहे. या पाण्याच्या व वाऱ्याच्या संघर्षणानें मोठा तेजस्वी व बलशाली अग्नि उत्पन्न होऊन त्यानें आकाशांतील अंधार नाहींसा केला. तो अग्नि वाऱ्याशीं मिळून पाण्याला आकाशांत उडवीत असतां त्या दोहोंमुळें त्याला घनत्व येऊन पृथ्वी बनली. याप्रमाणें सर्व रस, गंध, प्रवाही पदार्थ त्याचप्रमाणें सर्व प्राणी यांचें उत्पत्तिस्थान ही पृथ्वी असून या ठिकाणीं सर्व उत्पन्न होतें.

आतां या मानसानें हजारों भूतमात्र उत्पन्न केले असतां या पांचांनाच महत्त्व कसें आलें ह्मणून विचारशील तर ज्यांना प्रमाण नाहीं त्यांना हा महत् शब्द लागतो. सर्व भूतमात्रांची उत्पत्ति यांच्यापासून असल्यानें यांना महाभूतें ह्मटलें आहे. प्राणिमात्रांच्या ठिकाणीं होणारी हालचाल हाच वायु असून त्याच्या मधली रिकामी जागा हें आकाश होय. अंगांतील उष्णता हा अग्नि असून प्रवाही पदार्थ पाणी आहे व अस्थि वगैरे पृथ्वीचा अंश आहेत. याप्रमाणें सर्व स्थावरजंगम या पांचांनीं बनलें आहे. कान, नाक, जीभ, त्वचा व दृष्टि यांना इंद्रिय नांव आहे.'

भरद्वाज ह्मणाले, '[जर हींच पंचमहाभूतें सर्व स्थावरजंगमामध्यें आहेत ह्मणावें तर स्थावरांच्या ठिकाणीं हीं दिसत नाहींत. जड अशा झाडांमध्यें उष्णता दिसत नाहीं, हालचाल दिसत नाहीं. ते ऐकतात, पहातात किंवा त्यांना रसज्ञान आहे असें कांहीं दिसत नाहीं. त्याचप्रमाणें द्रवत्व, उष्णता,

भूमिगुण, वायुगुण, व आकाशाचा गुण यांमध्यें दिसत नाहीं.' भृगु ह्मणाले, ' **झाडें वगैरे जड पदार्थांमध्यें सुद्धां खात्रीनें पंच महाभूतांचे गुण आहेत.** त्यांमध्यें आकाश आहे कारण त्यामधून फुलें व फळें नेहमीं बाहेर पडतात. उष्णतेच्या योगानें त्यांचीं पानें, सालीं, फळें व फुलें कोमेजतात व गळून पडतात, ह्मणून त्यांचे अंगीं स्पर्श गुण आहे. अग्नि, वीज, यांच्या शब्दानें त्यांचीं फळें व फुलें गळून पडतात; व शब्दज्ञान कानानें होत असतें ह्मणून झाडें ऐकतात ह्मणण्याला कांहीं हरकत नाहीं. त्याचप्रमाणें वेली झाडांना वेढतात व डोळ्यांशिवाय वाट दिसत नाहीं. ह्मणून झाडें पहातात ह्मणण्याला कांहीं हरकत नाहीं. व बऱ्या वाईट वासांनीं किंवा नाना प्रकारच्या धूपांनीं वठलेल्या झाडांना टवटवीत करून फुलें आणतां येतात ह्मणून त्यांना घ्राणेंद्रियज्ञान आहे ह्मणण्याला कांहीं हरकत नाहीं. झाडें वाऱ्याच्या साहाय्यानें मुळांनीं पाणी शोषून घेतात व त्यांना रोग जडतो व त्याचा प्रतिकार होतो. यावरून त्यांना रसज्ञान आहे ह्मणण्याला हरकत नाहीं. त्यांना सुखदुःख कळतें व तोडले असतां ते फिरून वाढतात ह्मणून ते अचेतन नसून त्यांना जीव आहे. झाडानें शोषून घेतलेलें पाणी अग्नि व वायु जिरवितात व त्यांनीं पोटांत घेतलेलें अन्न जिरल्यानें त्यामध्यें द्रवता व वाढ होते. याप्रमाणें सर्व जंगम वस्तूंच्या ठिकाणींसुद्धां निरनिराळ्या प्रमाणानें हीं पांच भूतें असून त्यांच्या योगानें त्यांची हालचाल होते.शरीरांतील त्वचा, मांस, अस्थि, मज्जा व स्नायु हीं पांच पृथ्वीच्या अंशानें झालेलीं आहेत. तेज, राग, डोळा, शरीरांतील उष्णता व शरीरांतील अन्न पचविणारा अग्नि हे अग्नीच्या अंशानें बनले आहेत. कान, नाक, तोंड, हृदय व पोट हे आकाशाच्या अंशापासून झालेले आहेत. श्लेष्मा, पित्त, घाम, चर्बी व रक्त हे पाण्याच्या अंशापासून झाले अहित. प्राणवायूच्या योगानें मनुष्याची हालचाल होऊन व्यानाच्या योगानें कोणत्याही कामाचा प्रयत्न होतो; अपान खालीं सरत असून समान हा हृदयामध्यें सारखेपणानें राहिला आहे व उदानाच्या योगानें श्वासोच्छ्वास होऊन ऊर, गळा, टाळू इत्यादि ठिकाणीं त्याच्या आदळण्यानें ध्वनि उत्पन्न होतो. याप्रमाणें हे मनुष्याच्या देहामधील पांच वायु वायूचे अंश असून हे मनुष्याची हालचाल करवितात. भूमीपासून गंधगुण, पाण्यापासून रस, डोळ्यानें दर्शविलेल्या अग्नीपासून रूप व वायूपासून स्पर्शगुण मनुष्याला कळतो. गंध, स्पर्श, रस, रूप, शब्द हे भूमीमध्यें पांच गुण आहेत. त्यांपैकीं बरा, वाईट, गोड, कडू, उग्रट, नाना प्रकारचा तुपकट, तेलकट, घमघमाटाचा हे नऊ पृथ्वीच्या गंधगुणाचे प्रकार आहेत. डोळ्यानें प्रकाश दिसतो व वाऱ्यानें स्पर्श कळतो. शब्द, स्पर्श, रूप आणि रस हे पाण्याचे गुण असून रसाचे मधुर, खारट, तिखट, कडवट, आंबट व कडू हे भेद आहेत. शब्द, स्पर्श, रूप हे तीन अग्नीचे प्रकार असून त्यांच्या योगानें ऱ्हस्व, दीर्घ, स्थूल, चौकोन, बारीक, वाटोळें, पांढरें, काळें, तांबडें, पिंवळें, निळें, कठीण, चकचकीत, तुळतुळीत, मऊ, उग्र अशीं रूपें दिसतात. शब्द व स्पर्श, हे वायूचे गुण असून यांच्या योगानें स्पर्श कळतो. ते स्पर्श उष्ण, शीत, सुखकर, दुःखकर, प्रेमळ, प्रसन्न, कठीण, मऊ, रुक्ष, हलका व वजनदार असे बारा प्रकारचे आहेत. शब्द हा आकाशाचा एकच गुण असून षड्ज, ऋषभ, गांधार, मध्यम, धैवत, पंचम, निषाद, हे सात त्याचे भेद आहेत. हा सर्वत्र भरून आहे तरी नगारे, मृदंग, ढोल, शंख, गडाडणें, रथाचा घरघर शब्द त्याचप्रमाणें सजीव किंवा निर्जीव प्राण्यांपासून जो कांहीं शब्द ऐकूं येतो त्या सर्वांचा या सातांमध्यें समावेश होतो. याप्रमाणें आकाशापासून उत्पन्न झालेल्या या शब्दाचे पुष्कळ भेद आहेत. वायूच्या निरनिराळ्या प्रकारच्या शब्दानें हे निरनिराळ्या प्रकारचे ध्वनि उत्पन्न होतात व कांहीं प्रतिबंध न झाला तर ते स्पष्ट ऐकूं येतात व प्रतिबंध झाला असतां ऐकूं येत नाहींत. आपापल्या सजातीयांशीं मिळून हे धातू वाढतात. पाणी, अग्नि व वारा हीं मनुष्यांच्या देहामध्यें नेहमीं जागीं आहेत. हें शरीराचें मूळ असून प्राणाला व्यापून ते शरीरामध्यें राहिले आहेत.

' आतां शरीरांतील अग्नि व वायु शरीराचें चलनवलन कसें करवितात तें सांगतों ऐक. **शरीरांतील अग्नि डोळ्यांमध्यें राहून शरीराचें रक्षण करतो व प्राणवायु डोक्यामध्येंच या अग्नीच्या**

**ठिकाणीं राहून हालचाल करतो.** सर्व प्राण्यांमधला जीव हाच असून मन, बुद्धि, अहंकार व शब्दादिविषय हाच आहे. याप्रमाणें **प्राणाकडून** प्रथम हालचाल होऊन मागून **समान** निरनिराळ्या इंद्रियांच्या ठिकाणीं त्यांची हालचाल करवितो. मूत्राशय व गुद यांच्या ठिकाणच्या अग्नीशीं जुळून राहून **अपान** मूत्र व पुरीष वहात फिरतो. प्रयत्न, कर्म व सामर्थ्य या तिघांच्या ठिकाणीं असणाऱ्या वायूला **उदान** ह्मणतात. व मनुष्याच्या शरीरामध्यें निरनिराळ्या संधीच्या ठिकाणीं व्यापून राहिलेल्याला **व्यान** ह्मणतात. या पंचभूतात्मक शरीरामध्यें भरून राहिलेला व समान वायूनें उद्दीपित केलेला अग्नि सर्व रस व धातू व पित्तादिक दोष उत्पन्न करीत असतो. अपान व प्राण यांच्यामध्यें या दोघांच्या मदतीनें नाभिकमलाच्या ठिकाणीं समानवायु राहून योग्य रीतीनें अन्न पचवितो. तोंडापासून गुदापर्यंत एक नळी गेली असून तिच्यापासूनच सर्व शरीरांतील शिरा फुटतात. यांमधून वायूचा जोरानें संचार चालला असतां उष्णता उत्पन्न होते. त्या अग्नीला ऊष्मा असें नांव असून तो मनुष्याच्या देहामध्यें अन्न पचवीत असतो. अग्नीच्या जोरानें वाहणारा प्राणवायु गुदाच्या ठिकाणीं आदळून पुन्हां वरतीं मस्तकामध्यें जाऊन अग्नि उत्पन्न करून चोहोंकडे पाठवीत असतो. **नाभीच्या खालच्या भागाला पक्वाशय असून वरच्या भागाला आमाशय आहे.** या नाभीमध्यें सर्व शरीरांतील वायू असून तेथून ते सर्व वर,खालीं, आजूबाजूला निघतात. **नाग, कूर्म, कृकल, देवदत्त व धनंजय हे पांच व प्राणादि पांच असे दहा वायु नाड्यांतून अन्नरस वहात असतात.** योगाचा मार्ग हाच असून श्रमाला न जुमानणारे धैर्यशाली योगी आत्म्याला मस्तकाच्या ठिकाणीं धरून ब्रह्मप्राप्ति करून घेतात. याप्रमाणें मनुष्याच्या शरीरांतल्या प्राणादि वायूंमध्यें अग्नि एखाद्या भांड्यांत ठेविल्याप्रमाणें जळत राहिला आहे.'

---

## १६० जीवाचें स्वरूप.

### (१२. १८६—१८७.)

भरद्वाज ह्मणाले, 'जर प्राणाच्या योगानेंच मनुष्य जिवंत राहून त्याची हालचाल होते, त्याचा श्वासोच्छ्वास होतो व तो बोलतो आणि जर उष्म्याच्या स्वरूपाचा हा अग्नि सर्व अन्नाचें चावून पृथक्करण करून तें जिरवितो, तर मग जीव म्हणून जो पदार्थ आहे तो निरर्थक आहे. मनुष्याचा नाश झाला असतां जीव कांहीं त्याला सोडतांना दिसत नाहीं; वायूच त्याला सोडून जातो व उष्णता नाहींशी होते. जर जीव हा वायूमय असेल किंवा वायूशीं याचा संबंध असेल तर वाऱ्याशीं मिळून जातांना तो वावटळीप्रमाणें किंवा पाण्याचें भांडें समुद्रामध्यें बुडविलें असतां पाण्याहून वेगळें दिसणाऱ्या भांड्याप्रमाणें हा वेगळा दिसला पाहिजे. आतां हा वायुस्वरूपी असून वायूशीं मिसळून जातो ह्मणावें तर विहिरींत टाकलेल्या पाण्याप्रमाणें किंवा पेटलेल्या आगींत मिळून गेलेल्या आगीप्रमाणें हा हवेशीं मिळून नाहींसा झाला पाहिजे. मग याला निराळें अस्तित्व कोठून राहणार ? या पंचमहाभूतांनीं बनलेल्या शरीरामध्यें जीव ह्मणून निराळा कोठून असणार ? कारण या पांचांपैकीं एकाचा नाश झाला असतां बाकींचे नाहींसे होतात. कांहीं न खाल्ल्यानें पाणी व अग्नि नाहींसा होतो. श्वासोच्छ्वास बंद ठेविल्यानें वायु बंद होतो. व कोठ्याचा अवरोध झाला असतां रिकामी जागा नाहींशीं होते. व्याधि, जखम व इतर क्लेश यांच्या योगानें शरीरांतील पृथ्वीचा भाग नाहींसा होतो. या पांचांपैकीं एकाला इजा झाली असतां हे पांच वेगळे होऊन निरनिराळे जातात. याप्रमाणें हे पांच पाचांशीं मिळून गेले असतां जीव कोणाच्या मागून जातो, त्याला काय ज्ञान असतें, तो ऐकतो काय किंवा बोलतो काय ? ही गाय मला परलोकीं तारील ह्मणून गाय देऊन मनुष्य जेव्हां मरतो तेव्हां ती गाय कोणाला तारते ? कारण गाय, ती दान घेणारा व दान देणारा हे सर्व या ठिकाणींच नाश पावतात. तेव्हां त्यांचा समागम फिरून कसा होणार ? पक्ष्यांनीं खाऊन टाकलेल्या, कड्यावरून पडलेल्या किं-

वा अग्नीनें जाळून टाकलेल्या मनुष्याचें पुनरुज्जीवन कोठून होणार? तोडून टाकलेलें झाड कधीं मूळ धरीत नाहीं. बीजच वाढतें. तेव्हां मेलेला फिरून कोठून उत्पन्न होणार? पूर्वी बीजच उत्पन्न केलें असून त्याच्या योगानेंच हें रहाटगाडगें चाललें आहे. मेला तो मेला. बीजापासून बीज वाढतें.' भृगु ह्मणाले, 'जीव, दान किंवा एखादें **केलेलें कृत्य त्यांचा नाश कधीं होत नाहीं.** प्राणी एक शरीर सोडून दुसऱ्या शरीरांत जातो. शरीर मात्र नाहींसें होतें. शरीरामध्यें असणारा जीव कांहीं तें नाहींसें झाल्यानें जाळलेल्या समिधांमधील अग्नीप्रमाणें नाहींसा होत नाहीं.' भारद्वाज ह्मणाले, 'समिधांमधल्या अग्नीप्रमाणें जर याचा नाश होत नाहीं ह्मणत असाल तर समिधाच जळून गेल्यावर त्यांमधला अग्नि तरी कोठें रहातो. लांकूडफांटा जळून गेल्यावर त्यामधील अग्नि नाहींसा होतो. त्याची गति, त्याचें प्रमाण किंवा रहाण्याचें ठिकाण कांहींच दिसत नाहीं.' भृगु ह्मणाले, 'लांकूडफांटा जळून गेल्यावर अग्नि दिसत नाहीं ह्मणतोस तें खरें आहे; परंतु त्याला आधार घेण्याला कांहीं वस्तु न राहिल्यानें तो आकाशांत निघून गेल्यामुळें आपल्याला दिसत नाहीं. त्याप्रमाणें जीव या देहाला सोडल्यावर आकाशरूपानें आकाशांत रहातो, व त्याच्या सूक्ष्मपणामुळें जळून गेलेल्या लांकडांतील अग्नीप्रमाणेंच तो दिसत नाहीं. प्राणांना धारण करणारा जो अग्नि तोच जीव समज. हा वायूंना कायम ठेवणारा अग्नि श्वासोच्छ्वास बंद झाल्यानें दिसेनासा होतो. व हा शरीराग्नि बाहेर गेल्यानें देह अचेतन होऊन पडतो व भूमीशीं मिळून जातो. कारण भूमी हेंच त्याचें कायमचें ठिकाण आहे. वायु आकाशाच्या मागून जातो व अग्नि वायूच्या मागून जातो. कारण हे तिघे एक आहेत. बाकीचे दोन खालीं भूमीवर रहातात. जेथें आकाश तेथें वायु व वायु तेथें अग्नि असे हे तिघे अदृश्य असून मनुष्याच्या शरीरामध्यें आल्यानें त्यांना दृश्यत्व येतें.' भारद्वाज ह्मणाले, 'मनुष्याचें शरीर पंचभूतात्मक असल्यानें त्या शरीरामध्यें जीव कशा प्रकारचा असतो? मांस, रक्त, मेद, स्नायु व अस्थि यांनीं बनलेलें शरीर शव होतांना जीव कांहीं दिसत नाहीं. आतां ह्या पंचभूतात्मक शरीरामध्यें जीव नाहीं ह्मणावें तर शारीरिक किंवा मानसिक दुःख झालें असतां तें कोणाला कळतें? एखादें बोललेलें कानानें जीवाला ऐकूं येतें, परंतु मन व्यग्र असलें तर तेंच त्याला ऐकूं येत नाहीं. मन जाग्यावर असेल तरच त्याला सर्व कांहीं दिसतें. तेंच मन जाग्यावर नसेल तर दृष्टि लाविली असली तरी त्याला कांहीं दिसत नाहीं त्याचप्रमाणें मनुष्य झोंपेमध्यें असतां त्याला कांहीं दिसत नाहीं किंवा वास येत नाहीं. तो कांहीं बोलत नाहीं किंवा ऐकत नाहीं व स्पर्श व चव हीं त्याला कळत नाहींत. तेव्हां ह्या देहामध्यें आनंद कोणाला होतो, राग कोणाला येतो, शोक कोणाला होतो, भय कोणाला वाटतें, वासना कोणाला आहे, विचार कोण करतो, द्वेष कोण करतो, व बोलतो कोण?' भृगू ह्मणाले, 'शरीराप्रमाणेंच मन हें पंचमहाभूतात्मक असल्यानें त्याचा कांहीं या गोष्टींत उपयोग होत नाहीं. एकटा अंतरात्मा हें शरीर धारण करीत असून गंधरसादिकांचें ज्ञान त्या एकट्यालाच आहे. या पंचभूतात्मक देहामध्यें **पांच गुण** पहात राहून तो सर्व अवयवांमधून भरून राहिला आहे. सुखदुःख त्यालाच कळत असून तो नाहींसा झाल्यानें देहाला तें कांहीं कळत नाहीं. ज्या प्रमाणें अग्नि शांत झाला ह्मणजे या मधील रूप, स्पर्श, ऊष्मभावादिगुणही नाहींसें होतात, त्या प्रमाणें देहांतून हा जीवात्मा नाहींसा झाला ह्मणजे देहाची सुखदुःख जाणण्याची शक्तिही नष्ट होते. हें सर्व जग जलमय आहे. प्राणीमात्रांच्या देहांना जें देहत्व आलें आहे तेंही जलानेंच आलें आहे. व ह्या जलसृष्टीमध्यें सर्व प्राणिमात्रांच्या ठिकाणीं असणारा, सर्व लोकांना उत्पन्न करणारा व मनामध्यें व्यक्त होणारा **ब्रह्म हाच आत्मा आहे. याच्या ठिकाणीं त्रिगुणात्मक विकार दिसूं लागले ह्मणजे याला क्षेत्रज्ञ असें ह्मणतात व या गुणांपासून अलग राहिला असतां त्याला परमात्मा ह्मणतात.** हा सर्व लोकांचा हित करणारा आत्मा कमलाच्या ठिकाणीं असणाऱ्या पाण्याच्या बिंदूप्रमाणें मनुष्याच्या देहामध्यें राहिला आहे. तम, रज व सत्व हे जीवाचे तीन गुण आहेत. हा आत्मा सचेतन असून हे गुण या-

च्या ठिकाणीं असल्यामुळें त्याची स्वतःची हालचाल होऊन सर्व जगाची तो हालचाल करतो. जो आत्मा साती भुवनें उत्पन्न करतो तो ह्या जीवांच्या पलीकडचा आहे. देह नाहींसा झाल्यानें जीवाचा नाश होत नाहीं. त्याला मेला असें अज्ञानी लोक ह्मणतात. जीव एका देहापासून दुसऱ्या देहामध्यें जातो. **मरण हें शरीराचें पंचत्वाला मिळणें आहे.** याप्रमाणें सर्व भूतमात्रांच्या ठिकाणीं हा गुप्त रीतीनें फिरत असून ज्ञान्यांना हा त्यांच्या सूक्ष्म व श्रेष्ठ अशा बुद्धीनें दिसत असतो. **शहाणे लोक शुद्ध अंतःकरणानें नेहमीं मिताहार ठेवून पहिल्या व शेवटच्या रात्रीला समाधि लावून ह्या आपल्या आत्म्याला आपल्या ठिकाणीं पाहूं शकतात. मन प्रसन्न ठेवून शुभाशुभ कर्म सोडून आत्म्याच्या ठिकाणीं तल्लीन झाल्यानें यांना श्रेष्ठ सुख मिळतें.** मनुष्यांच्या शरीरामध्यें असणारा जो **हा मानसाग्नि याला जीव ह्मणतात.** व यापासूनच ही सर्व सृष्टि उत्पन्न झाली आहे.'

---

## १६१ प्रजेची उत्पत्ति व चारी वर्णांचे धर्म. ( १२. १८८–८९ )

'प्रथम ब्रह्मदेवांनीं आपल्या तेजानें अग्नीसारखे दैदीप्यमान ब्राह्मण उत्पन्न केले. त्यांना प्रजापति ह्मणतात. पुढें या ब्रह्मदेवांनीं सत्य, धर्म, तप, शाश्वत असे वेद, आचार व शुद्धता हीं लोकांना स्वर्ग मिळावा ह्मणून उत्पन्न केलीं. पुढें देव, दानव, गंधर्व, दैत्य, असुर, मोठमोठे साप, यक्ष, राक्षस, नाग, पिशाच, ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र व दुसऱ्या जाति निर्माण केल्या. **ब्राह्मणांचा वर्ण पांढरा, क्षत्रियांचा तांबडा, वैश्यांचा पिंवळा व शूद्रांचा काळा असे वर्ण केले.**' भारद्वाज ह्मणाले, 'या चारी वर्णांचा वर्णभेद जर वर्णावरून समजावयाचा तर सर्व वर्णांमध्येंच वर्णसंकर झाल्यासारखा दिसतो. आह्मा सर्वांमध्येंच जर काम, क्रोध, भय, लोभ, शोक, चिंता, भूक, श्रम हे गुण दिसून येतात व जर आमच्या सर्वांच्या शरीरांतून घाम मूत्र, पुरीष, श्लेष्मा, पित्त व रक्त वहातात तर हा वर्णभेद कशासाठीं? त्याचप्रमाणें, स्थावरजंगमाच्या हजारों जाति आहेत. त्या नाना जातींचा वर्णनिश्चय तरी कसा व्हावा?' भृगु ह्मणाले, '**या वर्णामध्यें कांहीं भेद नसून ब्रह्मदेवांनीं पूर्वीं सर्व ब्राह्मणच निर्माण केले होते. पुढें आपापल्या कर्मांनीं निरनिराळे वर्ण झाले.** वासना व भोग यांची गोडी लागून ते तीक्ष्ण, रागीट बनून त्यांना साहस कृत्यें आवडूं लागलीं. ज्यांनीं आपले धर्म सोडले, अशा तांबड्या वर्णाचे ब्राह्मण क्षत्रिय झाले. जे आपला धर्म सोडून गुरांवर व शेतीवर आपला उदरनिर्वाह करूं लागले ते पिंवळ्या वर्णाचे ब्राह्मण वैश्य झाले. परपीडा व खोटें ज्यांना आवडूं लागलें व लोभानें वाटेल तें काम करून जे आपलें पोट भरूं लागले असे शुद्धतेपासून भ्रष्ट झालेले काळ्या वर्णाचे ब्राह्मण शूद्र झाले. **याप्रमाणें आपापल्या कर्मांनीं निरनिराळे झालेल्या** वर्णांना धर्म व यज्ञक्रिया यांचा कांहीं प्रतिबंध नाहीं. याप्रमाणें चार वर्ण निर्माण करून ब्रह्मदेवांनीं त्यांच्यासाठीं चार वेद निर्माण केले. पुढें लोभानें मनुष्य अज्ञानी बनले. ब्राह्मण वेदाच्या तंत्रानें राहिल्यानें त्यांचें तप कायम राहून व्रत व नियम यांच्या योगानें यांनीं ब्रह्मज्ञान कायम ठेवलें आहे. ह्मणून यांचें तप कधीं फुकट जात नाहीं. **ब्रह्म हेंच प्रथम निर्माण झालें आहे हें जाणत नाहींत ते ब्राह्मण नव्हेत.** यांच्या पिशाच, राक्षस, प्रेत वगैरे निरनिराळ्या म्लेच्छ जाती असून त्यांना श्रेष्ठज्ञान झालेलें नसतें व ते वाटेल तसे वागत असतात. जे ऋषी प्रथम ब्रह्मदेवाच्या इच्छामात्रें करून झाले त्यांनीं पुढें स्वकर्मामध्यें गढलेल्या व वैदिक संस्कार करणाऱ्या प्रजा निर्माण केल्या. आदिदेवापासून उत्पन्न झालेली ब्रह्ममूलक जी अक्षय व अव्यय मानससृष्टि आहे तिचा शेवट योगाभ्यासानें ब्रह्मपद प्राप्तीमध्यें आहे.'

पुढें 'ब्राह्मण कशानें होतो, क्षत्रिय कशानें होतो, वैश्य कशानें होतो व शूद्र कशानें होतो,' ह्मणून भारद्वाजांनीं विचारिलें असतां भृगु ह्मणाले, 'जातकर्मादिक संस्कार मिळून शुचिर्भूत व वेदाध्ययनसंपन्न असा राहून जो स्नान, होम, जप, पूजा, आतिथ्य व वैश्वदेव हीं षट्कर्में

संन्यासी किंवा जे दुसरे कोणी संकल्प करून व्रत नियम आचरीत असतात अशांना भिक्षा किंवा देवतादिकांना बळी किंवा आश्रितादिकांना अन्न यांच्यापासूनच मिळतें. वानप्रस्थांनीं पैशाला शिवूं नये. बहुतकरून हे साधू चांगल्या व हितकर अन्नावर राहून वेदाध्ययन करीत निरनिराळीं तीर्थं फिरत रहातात. उठून त्यांच्याजवळ जाऊन त्यांना नमस्कार करावा व गोड बोलून शक्तीप्रमाणें त्यांना आसन, शयन, अन्न वगैरे देऊन त्यांचा सत्कार करावा. यासंबंधीं असें ह्मटलें आहे कीं, घरांतून अतिथी हिरमोड होऊन परतला असतां तो त्या गृहस्थाला आपलें पाप देऊन त्याचें पुण्य घेऊन जातो. या गृहस्थाश्रमामध्यें यज्ञयागादि क्रिया केल्यानें देव, पितृतर्पणानें पितर, विद्याभ्यास, श्रवण व धारणा यांनीं ऋषी व संतति उत्पन्न केल्यानें ब्रह्मदेव संतुष्ट होतात. या आश्रमांत राहणाऱ्यानें कानाला सुखकर असें सर्वांशीं प्रेमळ भाषण बोलावें. पीडा देणें, हिरमोड करणें, निष्ठुर भाषण करणें, अपमान करणें, अहंकार व ढोंग करणें, निंद्य समजलें आहे. **अहिंसा, सत्य व अक्रोध हें सर्व आश्रमांना लागू असें उत्तम तप आहे.** या आश्रमामध्यें फुलांच्या माळा, आभरणें, वस्त्रें, अभ्यंग, नेहमींचे उपभोग, नृत्य, गायन, वादन इत्यादि कानांला व डोळ्यांला सुखकर गोष्टी त्याचप्रमाणें भक्ष्य, भोज्य, पेय, चोष्य, इत्यादि खाद्यें नानाप्रकारचे उपभोग, यथेच्छ विहार कामसुख इत्यादि मिळतात. धर्मार्थकामांकडे त्याचप्रमाणें सत्व, रज व तम या गुणांकडे लक्ष देऊन जो या गृहस्थाश्रमामध्यें वागतो त्याला येथें सुख मिळून भल्यांना मिळणारी उत्तम गति मिळते. खालीं पडलेलें धान्य वेंचून त्यावर स्वधर्माप्रमाणें चालणाराला कामसुखाच्यामागें लागून तो कोणतेंही काम न करील तर स्वर्ग कांहीं दुर्लभ नाहीं.

वानप्रस्थ पवित्र तीर्थें, नद्या, झरे या ठिकाणीं धर्माप्रमाणें वागून हरीण, रेडे, डुकरें, वाघ, हत्ती, यांनीं भरलेल्या निर्जन अरण्यामध्यें तप करीत फिरतात. ग्राम्यवस्त्रें, अन्न व उपभोग सोडून देऊन वन्य औषधि, फळमूलें व पानें हीं घेतानें खाऊन खालीं जमिनीवरच बसून जमीन, धोंडे, रेती, खडे, वाळू, राख, यांवर निजतात. काश, दर्भ, कांतडीं, साली यांनीं आपलें अंग झांकून घेतात; केंस, दाढी नख व अंगावरचे केंस काढीत नाहींत; ठरल्या वेळेस स्नान करून बली व होम देण्याला चुकत नाहींत; समिधा, दर्भ व फुलें आणल्यावर स्थंडिलाचे जागीं सडासंमार्जन करून मगच विसावा घेतात. थंडी, वारा, ऊन्ह, पाऊस हीं सोसल्यानें त्यांच्या अंगाला भेगा पडलेल्या असतात; नानाप्रकारचे नियम, व्रतें, धर्मकृत्यें करीत राहिल्यानें मांस व रक्त कमी होऊन त्यांचें अंग सुकून जाऊन केवळ त्वचा व अस्थि राहिल्या असतात. धैर्यानें सत्वस्थ राहून ते शरीर झिजवीत असतात. ज्याच्या हातून हा आश्रम पाळला जाईल त्याला अग्नीप्रमाणें सर्व पापें जाळून दुर्जय असे लोक मिळवितां येतील. आतां संन्याशांचा आचार पुढें सांगितल्याप्रमाणें आहे. अग्नीला फांटा देऊन पैसा, बायको वगैरे लटांबर तो सोडतो. विषयभोगाच्या ठिकाणीं आसक्ति न ठेवतां ढेंकूळ व सोनें सारखें लेखतो, धर्मार्थकामांकडे लक्ष देत नाहीं, शत्रु, मित्र व त्रयस्थ या सर्वांच्या ठिकाणीं त्यांची सारखी नजर असते. स्थावर, जरायुज, स्वेदज, उद्भिज, अशा सर्व भूतमात्रांचा तो शब्दानें, मनानें किंवा कृतीनें द्रोह करीत नाहीं. तो घर करीत नाहीं. पर्वत, वाळवंट, देवळें इत्यादि ठिकाणीं किंवा झाडांखालीं रहातो. नगरांत किंवा गांवांत मुक्काम करण्याचा प्रसंग आला असतां शहरामध्यें पांच रात्री व गांवांत एक रात्र यानें रहावें. प्राणधारणेसाठीं ज्यांचें शुद्ध वर्तन आहे अशा ब्राह्मणांच्या घरीं भिक्षेला जाऊन न मागतां पात्रांत पडेल ती भिक्षा घ्यावी. काम, क्रोध गर्व, लोभ, मोह, दैन्य, ढोंग, परनिंदा, हिंसा, पीडा हीं त्यानें सोडावीं. ह्यासंबंधीं असें ह्मटलें आहे कीं, जो मुनि सर्व प्राणिमात्रांना अभय देत फिरतो त्याला कोणापासून भीति रहात नाहीं. अग्निहोत्र करून आपल्या शरीरांतील अग्नीला आपल्या तोंडामध्यें भिक्षेनें मिळालेल्या हवींनीं जो आहुति देतो त्याला उत्तम लोक मिळतात. जो याप्रमाणें शुचिर्भूततेनें संकल्पापासून बुद्धीला वेगळें करून लांकूडफांटा न घातलेल्या शांत अशा जळणाऱ्या ज्योतीप्रमाणें हा मोक्षाश्रम पाळतो त्याला ब्रह्मलोक मिळतो.'

'ह्या लोकापलीकडे दुसरा लोक आहे ह्मणून

ऐकण्यांत आहे, परंतु तो कधीं पहाण्यांत येत नाहीं. तरी त्या संबंधानें माहिती सांगा,' ह्मणून भारद्वाजांनीं विचारलें असतां भृगु ह्मणाले, ' सर्व गुणांनीं संपन्न अशा पुण्यवान हिमाचलाच्या उत्तरेच्या बाजूला पवित्र, क्षेमकर व इष्ट असा लोक आहे. त्या ठिकाणीं पुण्यकर्म करणारे, शुचिर्भूत व अगदीं निर्मळ असे लोक आहेत. त्यांना लोभ किंवा मोह ठाऊक नसून ते कोणाला उपद्रव देत नाहींत. तो देश स्वर्गासारखा असून त्यामध्यें पुष्कळ चांगले गुण आहेत. मृत्यु योग्य वेळीं येत असून व्याधी त्या ठिकाणीं मुळीं ठाऊक नाहींत. दुसऱ्याच्या बायकांवर लोभ न राहतां तेथें लोक आपल्या बायकांकडे लक्ष देऊन असतात. कोणी एकमेकांना पीडा देत नाहींत व द्रव्याची कोणाला हाव नसते. अधर्म ठाऊक नसून धर्मनिश्चय ठाम ठरला असल्यानें संदेह ह्मणून त्या ठिकाणीं उरत नाहीं. केल्या कर्माचें फळ त्या ठिकाणीं प्रत्यक्ष मिळतें. खाणें, पिणें व आसन यांची रेलचेल असून लोक वाड्यांतून व हवेल्यांतून रहातात. कांहींना सुवर्णभूषणें मिळून त्यांचे सर्व काम परिपूर्ण झालेले असतात. कांहीं केवळ प्राणधारणेपुरतीच पर्वा बाळगून असतात; व कांहीं तीही मोठ्या कष्टानें करतात. या ठिकाणीं कांहीं धर्माकडे लक्ष देणारे आहेत व कांहीं लुच्चे आहेत. कांहीं सुखी आहेत, कांहीं दुःखी आहेत. कांहीं पैसेवान आहेत, कांहीं गरीब आहेत. श्रम, भय, मोह, भूक यांची बाधा ह्या ठिकाणीं तीव्र होते. पैशाचा लोभ मनुष्यांना न सुटतां मूर्खावर त्याची भुरळ पडते. धर्म व अधर्म या संबंधी अनेक मतें प्रचलित आहेत. जो विद्वान तीं जाणतो तो यापासून अलग असतो. फसवेगिरी, कपट, चोरी, निंदा, असूया, जुलूम, पीडा, चुगलखोरी, खोटें भाषण यांकडे जो लक्ष देतो त्याचें तप कमी होतें. जो यांकडे लक्ष देत नाहीं त्याचें तप वाढतें. धर्म कोणता, अधर्म कोणता ह्मणून नानाप्रकारच्या चिंता ह्या ठिकाणीं उत्पन्न होतात. ही कर्मभूमि असून या ठिकाणीं बरें वाईट कृत्य हातून घडून त्यात्याप्रमाणें बरें वाईट फळ मिळतें. ह्या ठिकाणीं पूर्वीं ब्रह्मदेवांनीं त्याचप्रमाणें ऋषींनीं व देवांनीं इष्ट तप करून पवित्र होऊन ते ब्रह्मलोकाला गेले. उत्तरेकडचा पृथ्वीचा जो भाग तो सर्वांत पवित्र आहे. योगाकडे लक्ष ठेवून जे पुण्य करतात ते त्या ठिकाणीं उत्पन्न होतात. बाकीचे नीच योनीमध्यें जन्मून आयुष्य सरल्यावर नाश पावतात व एकमेकांला खाण्यांत गढून लोभ व मोह यांनीं भरलेले येथेंच फिरून फिरून जन्माला येत राहून ते उत्तर दिशेला कधीं जात नाहींत. जे नेमस्तपणानें ब्रह्मचर्य व्रत धरून गुरूंची शुश्रूषा करतात, त्यांना सर्व लोकांची वाट कळते.'

---

## १६४ आचार. ( १२—१९३ )

'आचाराचा विधि आपल्या तोंडून ऐकण्याची माझी इच्छा आहे,' असें युधिष्ठिर ह्मणाला असतां भीष्म ह्मणाले, ' दुराचारी, वाईट कृत्य करणारे, मूर्ख व साहस कृत्यांची ज्यांना आवड आहे, अशांना असाधु ह्मणतात; व **जे आचारसंपन्न आहेत त्यांना साधु ह्मणतात.** जे राजरस्त्यावर, गोठ्यांत किंवा उभ्या शेतामध्यें मलमूत्र विसर्जन करीत नाहींत ते भले होत. आवश्यक अशी आत्मशुद्धि करून, आचमन करून नदींत स्नान करून मग देवांना तर्पण करावें. सदोदित सूर्योपस्थान करावें. सुर्योदयाच्या वेळीं निजूं नये. सकाळ संध्याकाळ अनुक्रमें पूर्वेकडे व पश्चिमेकडे तोंड करून संध्या करावी. हात, पाय व तोंड धुवून पूर्वेकडे तोंड करून जेवावें. खावयाच्या अन्नाची निंदा करूं नये. चांगलें चांगलें अन्न खावें; हात धुवून उठावें. ओल्या पायांनीं रात्रीं निजूं नये. पवित्र देश, बैल, देऊळ, गोठा, चव्हाटा, धार्मिक ब्राह्मण व ग्रामवृक्ष यांना प्रदक्षिणा करावी. अतिथि, नौकर, स्वजन या सर्वांशीं एकच अन्न मनुष्यानें खावें; **वेदांत सांगितल्याप्रमाणें जो सकाळ संध्याकाळ जेऊन मध्यें अन्नाकडे पहात नाहीं, त्याला उपवासाचें फळ मिळतें; त्याचप्रमाणें वेळच्या वेळीं होम देऊन ऋतुकाळीं आपल्या स्त्रीशीं संबंध ठेवून परस्त्रीकडे जो बघत नाहीं तो ब्रह्मचारी समजावा. आईच्या अंतःकरणाप्रमाणें ब्राह्मणाचें उष्टें अमृततुल्य समजलें आहे.** भले लोक त्याचा आदर करून ब्रह्म मिळवितात. चिखल तुडविणारा, गवत कापणारा, नखानें खाणा-

रा, नेहमीं उष्टें जेवणारा व परतंत्र असा मनुष्य दीर्घायु होत नाहीं. मांस खाणें सोडून दिलेल्यानें यजुर्वेदानें पवित्र केलेलें मांस सुद्धां खाऊं नये; त्याचप्रमाणें पाठीचें मांस किंवा यज्ञांत पवित्र न केलेलें मांस खाऊं नये. स्वदेशामध्यें असो किंवा परदेशामध्यें असो अतिथीला उपाशी टाकूं नये. कोणचीही इच्छा धरून केलेल्या कामाचें फळ मिळालें असतां ते वडिलांना अर्पण करावें. गुरूंना आसन देऊन अभिवादन करावें. **गुरूंचा सत्कार केल्यानें आयुष्य, यश व वैभव वाढतें. उगवत्या सूर्याला त्याचप्रमाणें नागव्या परस्त्रीला पाहूं नये.** मैथुनसुद्धां ऋतुकालीं एकांतांत करावें. **सर्व तीर्थांमध्यें गुरु हें श्रेष्ठ तीर्थ असून सर्व पवित्र वस्तूंमध्यें अग्नि श्रेष्ठ आहे.** गाईच्या शेंपटाला शिवणें वगैरे भले जें जें करीत आले तें तें प्रशस्त समजावें. नेहमीं प्रत्येक भेटीच्या वेळीं कुशल प्रश्न विचारावा. सकाळ संध्याकाळ ब्राह्मणांना अभिवादन करून यथाविधि त्यांचा सत्कार करावा. देवळांमध्यें, गाईमध्यें, ब्राह्मणासंबंधी क्रिया करतांना, वेदाध्ययनाचे वेळीं व जेवतांना उजवा हात उपयोगांत आणावा. **वर सांगितल्याप्रमाणें ब्राह्मणांचा सत्कार केला असतां व्यापाराला व शेतीला बरकत येऊन धान्यें समृद्ध उत्पन्न होऊन इंद्रियोपभोग्य वस्तूंची रेलचेल होते.** जेवणाच्या वेळीं पुरे झालें का, पाणी पिण्याच्या वेळीं समाधानी झाली का व खीर कण्हेरी, तीळभात देतांना शिजलें आहे का ह्मणून विचारावें. हजामत केल्यावर, थुंकल्यावर, स्नान केल्यावर ब्राह्मणांना अभिवादनादिकांनीं संतोषवावें. याप्रमाणें त्यांना संतोषविल्यानें व्याधिग्रस्तांचें आयुष्य वाढतें. सूर्याकडे पाहून मुतूं नये व स्वतःचा मल पाहूं नये. **बायकोला जवळ घेऊन निजूं नये किंवा जेऊं नये. वडील जे असतील त्यांना नांवानें हांक मारणें किंवा अरेतुरे ह्मणणें सोडून द्यावें.** आपल्यापेक्षां लहान असतील किंवा आपल्या बरोबरीचे असतील त्यांना अशी हांक मारली असतां दोष नाहीं. पापी लोकांचें हृदय त्यांनीं केलेलें पाप सांगत असतें. मुद्दाम केलेलें पाप थोरांपुढें झांकून ठेवल्यानें मनुष्याचा नाश होतो. जाणूनबुजून केलेलें पाप मनुष्य झांकतो खरा व मनुष्यांना तें दिसत नाहीं; परंतु देवांना दिसतें. पापानें झांकलेल्या पापामुळें पापच घडत राहतें. व धर्मा-खालीं झांकलेल्या धर्मामुळें धर्म वाढत रहातो. मूर्खाला केलेल्या पापाची आठवण रहात नाहीं; परंतु फिरून फिरून ह्या भवचक्रांत पडणाऱ्या कर्त्याच्या मागून राहू जसा चंद्राच्यामागें लागला असतो त्याप्रमाणें त्याचें कर्म लागलें असतें. मोठ्या आशेनें सांठविलेल्या पैशाचा क्वचितच उपभोग मिळतो. ह्मणून शहाण्या लोकांना तें पसंत नाहीं. मरण कोणाची वाट पहात नाहीं. कृतीपेक्षां मनानें धर्मानें वागणें श्रेष्ठ समजलें आहे. ह्मणून सर्व प्राणीमात्रांचें मनानें कल्याण करीत रहावें. धर्माचरण एकट्यानें करावें. धर्मामध्यें मदतनिसाची जरूर ठेवूं नये. **मन शुद्ध नसतां केवळ बाहेरून धर्माप्रमाणें वागणाऱ्या मनुष्याला मदतनीस काय करणार?** धर्म हा मनुष्याचें मूळ आहे व देवांचें हें अमृत आहे. मेल्यावर धर्मानेंच शाश्वत सुख मिळतें.'

---

## १६९ अध्यात्मविचार. (१२.१९४)

युधिष्ठिर म्हणाला, 'अध्यात्म म्हणून जें कांहीं या जगांत म्हणतात तें काय आहे; हें सर्व स्थावर-जंगम विश्व कोठून उत्पन्न झालें व प्रलयकालीं हें कोठें जातें?' भीष्म म्हणाले, 'ज्या ह्या अध्यात्मासंबंधानें तूं मला प्रश्न केलास तें श्रेयस्कर व सुखकर असून विश्वाच्या उत्पत्तीशीं व प्रलयाशीं त्याचा संबंध आहे. हें कळल्यानें मनुष्याला या जगांत प्रेम व सौख्य मिळून त्याची इच्छा परिपूर्ण होते. हें सर्व भूतमात्रांच्या हिताचें आहे. पृथ्वी, वायु, आकाश, जल व तेज हीं पंचमहाभूतें असून हीं सर्व भूतमात्रांच्या उत्पत्तीला व लयाला कारण आहेत. समुद्राच्या लाटांप्रमाणें जेथून हीं उत्पन्न झालीं तेथेंच हीं फिरून जाऊन मिळत असतात. ज्याप्रमाणें कांसव आपलें अवयव पसरून पुन्हां आंखडून घेत असतें त्याप्रमाणें सर्व भूतांचा उत्पन्न करणारा परमात्मा तो भूतमात्रांना उत्पन्न करून पुनः आपल्या ठिकाणीं घेऊन जातो. यानें सर्व भूतमात्रांच्या ठिकाणीं हीं पंचमहाभूतें निरनिराळ्या प्रमाणानें उत्पन्न केलीं आहेत; परंतु जीवा-

ला हें दिसत नाहीं. शब्द, कान व शरीरांतील निरनिराळीं भोंकें यांची उत्पत्ति आकाशापासून आहे. स्पर्श, हालचाल व त्वचा यांची उत्पत्ति वायूपासून आहे. रूप, डोळा व पचन यांची तेजापासून उत्पत्ति आहे. चव, ओलसरपणा व जीभ यांची उत्पत्ति जलापासून आहे. वास, नाक व शरीर हे भूमीपासून आहेत. याप्रमाणें हीं पंचमहाभूतें असून मन सहावें आहे. इंद्रियें व मन हीं ज्ञानविषयक आहेत. सातवी बुद्धि व आठवा क्षेत्रज्ञ या शरीरामध्यें आहेत. इंद्रियांचा उपयोग विषय पहाण्यासाठीं आहे **याच्या साहाय्यानें मन त्या ठिकाणीं संशय उत्पन्न करतें व बुद्धि निश्चय ठरवितें व हा क्षेत्रज्ञ साक्षीप्रमाणें सर्व पहात राहिला आहे.** पायापासून वर सर्व शरीरभर सर्व जागीं भरून राहून हा पहात राहिला आहे. मनुष्यानें या इंद्रियांना, मनाला व बुद्धीला पूर्ण ओळखावें. सत्व, रज व तम हे यांवर अवलंबून असणारे तीन गुण आहेत; यांसह बुद्धीला त्याचप्रमाणें मनुष्यांचें या जगांत येणें, यांला पूर्ण ओळखल्यानें मनुष्याला उत्तम शांति मिळते. या गुणांनीं बुद्धि निरनिराळ्या विषयांकडे नेली जाते. यासंबंधीं बुद्धि, मन, इंद्रियें व त्यांनीं उमज पडणाऱ्या वस्तू ही सर्व एकच समजावीं. बुद्धीचा नाश झाला असतां या गुणांचें कांहीं चालत नाहीं. हें सर्व स्थावर जंगम जग बुद्धिमय असून तिच्यापासूनच याची उत्पत्ति आहे व शेवटीं तिच्यामध्येंच याचा लय आहे. ह्मणून बुद्धि हीच सर्व वस्तूंचें दर्शक आहे असें ह्मटलें आहे. ज्यानें मनुष्य पाहतो तो डोळा, ज्यानें ऐकतो तो कान व ज्यानें वास घेतो तें नाक होय. जिव्हेनें चव कळते व त्वचेनें स्पर्शबोध होऊन बुद्धीवर एकदम त्याचा विकार घडतो. **जेव्हां बुद्धीला कांहीं हवेंसें वाटतें तेव्हां त्याला मनाचें स्वरूप येतें.** पांच इंद्रियें हीं निरनिराळीं कार्यें साधून देणारे पांच मदतनीस आहेत. चिदात्मा यांना धरून अदृश्य रीतीनें राहिला आहे. मनुष्यामध्यें असणारी ही बुद्धि त्याला सत्व, रज व तम या तीन गुणांकडे लावते. ह्मणून केव्हां तिला प्रीति वाटते, केव्हां दुःख होतें व केव्हां दुःख किंवा सुख कांहींच होत नाहीं. याप्रमाणें मनुष्याच्या मनामध्यें या तीन भावांनीं राहिलेली ही बुद्धि योगाच्या सामर्थ्यानें लाटांनीं फुगलेला समुद्र ज्याप्रमाणें कधीं कधीं आपली अगदीं शेवटची मर्यादा सोडतो त्याप्रमाणें या तिन्ही गुणांच्या पलीकडे जाऊन रहाते. जी ही बुद्धि तिन्ही भावांच्या पलीकडे जाऊन शुद्ध अशा सत्तामात्र स्थितींत राहिली असते तिला कर्म करावयास लावणारा रजोगुण फिरून लवकरच गांठतो व त्यानें गांठलें असतां बुद्धि इंद्रियांना आपापल्या कामाला फिरून लावते. नंतर विषयांचें यथार्थ ज्ञान करून देणारा सत्वभाव तसाच विषयांचें अयथार्थ ज्ञान करून देणारा तमोभाव हे दिसूं लागतात. प्रीति हें सत्वगुणाचें लक्षण असून शोक हें रजोगुणाचें लक्षण आहे. आणि मोह हें तमोगुणाचें लक्षण आहे. याप्रमाणें बुद्धीच्या ह्या निरनिराळ्या गति आहेत. मनुष्यानें या सर्व इंद्रियांवर जय मिळवावा. सत्व, रज व तम हे गुण सर्व प्राणिमात्रांच्या ठिकाणीं असून हे तिघे सात्विक, राजस व तामस अशा निरनिराळ्या तीन प्रकारांनीं सर्व प्राणिमात्रांच्या ठिकाणीं ज्ञान उत्पन्न करतात. सत्वाचा परिणाम सुखकर असून रजाचा दुःखकर आहे आणि हे दोघे तमाशीं मिळाले असतां सुख किंवा दुःख उत्पन्न न करतां केवळ नुसता मोह उत्पन्न करतात. **शरीरामध्यें किंवा मनामध्यें जेव्हां प्रेमाचा भाव उत्पन्न होतो तेव्हां त्याला सत्वगुण ह्मणावें. जेव्हां अप्रीतीकर असे दुःखाचे विकार उत्पन्न होतात तेव्हां रजाची प्रवृत्ति झाली आहे असें समजावें. आणि विषयाचें स्पष्ट ज्ञान न करून देणारे अव्यक्त असे अस्पष्ट विकार जेव्हां उत्पन्न होतात तेव्हां तो तमोगुण समजावा.** हर्ष, प्रीति, आनंद, सुख, मनाची शांतता हे सात्विक गुण फार क्वचित् प्रसंगीं उत्पन्न होत असतात. असमाधानी, परिताप, शोक, लोभ, असहनशीलता हीं रजाचीं चिन्हें कधीं सकारण व कधीं अकारण दिसून येतात. अवमान, मोह, प्रमाद, झोंप, सुस्ती हे तामसगुण कधीं कधीं दिसून येतात. दूरवर व चोहोंकडे पोहोंचणारें व तोंड पसरण्याला कचरणारें असें मन ज्याचे पूर्ण ताब्यांत असतें तो इहपरलोकीं सुखी होतो. **बुद्धिसत्व व क्षेत्रज्ञ या दोन्ही सूक्ष्मांमधील भेद हा**

आहे कीं, एक गुणांना उत्पन्न करतो व दुसरा त्यांना उत्पन्न करीत नाहीं. उंबर आणि त्यांतला किडा किंवा जल व त्यांतला मासा याप्रमाणें हे दोघे एकच जरी आहेत तरी ते एकमेकांपासून अगदीं वेगळे आहेत. या गुणांना आत्म्याची ओळख नाहीं; परंतु तो त्यांना ओळखतो. हा गुणांचा साक्षीभूत असून हे व आपण एकच आहों असें तो पहात असतो. इंद्रियें, बुद्धि व मन या हालचाल न करणाऱ्या अज्ञान सातांकडून क्रिया घडवीत राहून यांच्यामध्यें चेतना उत्पन्न करण्याकरितां हा भांड्यांत असलेल्या दिव्याप्रमाणें शरीरामध्यें राहिला आहे. चिच्छक्ति गुण उत्पन्न करीत असून हा त्याकडे पहात राहणारा आहे. अशा प्रकारचा या दोघांचा संबंध आहे. हे दोघेही कशावर अवलंबून नाहींत. चिच्छक्तीपासून मनाची उत्पत्ति असून गुणांची नाहीं. ज्यावेळीं मनानें इंद्रियांच्या काढण्या योग्य रीतीनें आवरल्या जातात, तेव्हां भांड्यामध्यें जळणाऱ्या दिव्याप्रमाणें शरीरामध्यें प्रकाशणाऱ्या आत्म्याचा आपल्यावर उजेड पडतो. जो सामान्य कर्में सोडून नेहमीं आत्म्याच्या ठिकाणीं तल्लीन राहून सर्व प्राणिमात्रांच्या ठिकाणीं असणारा आत्मा आपण आहों असें पाहूं लागतो, तेव्हां त्याला उत्तम गति मिळते. ज्याप्रमाणें पाण्यावर फिरत रहाणारा पक्षी त्या पाण्यापासून अलग असतो, त्याप्रमाणें असें ज्ञान झालेला मनुष्य सर्व भूतमात्रांमध्यें त्यांपासून अलग राहून वावरत असतो. ही स्थिति ओळखून मनुष्यानें शोक, आनंद, कांहीं न ठेवतां सर्वांच्या ठिकाणीं समभाव ठेवून मत्सरभाव सोडून वागावें. याप्रमाणें वागणारा मनुष्य धागे निर्माण करणाऱ्या कोळ्याप्रमाणें स्वतःच गुण निर्माण करीत असतो; गुणांचा यावर परिणाम होत नाहीं. हे गुण या कोळ्याच्या धाग्याप्रमाणेंच समजावेत. अशा मनुष्यासंबंधाचे गुण सर्व नाश पावत नाहींत असें कांहीं लोक स्मृतीच्या आधारानें ह्मणतात व कांहीं त्याच आधारानें ते नाश पावतात असें ह्मणतात. हीं दोन्ही मतें लक्षांत घेऊन मनुष्यानें यासंबंधी विचार करावा. याप्रमाणें बुद्धीला भेद करणारी ही हृदयाची बळकट गांठ तोडून संशयमुक्त होऊन शोक न करतां सुखानें असावें. मळकट लोक भरल्या नदींत स्नान करून जसें स्वच्छ होतात, त्याप्रमाणें मलीन लोक हें ज्ञान करून घेऊन सिद्धि मिळवितात. नदीचा पैलतीर दिसत असला तरी मनुष्याला ती तरण्याचा तापच वाटतो; परंतु ती तरून जाण्याला नाव वगैरे साधन मिळाल्यानें तो ताप नाहींसा होतो; परंतु हें सत्यज्ञान केवळ कळल्यानें सुद्धां ताप होत नाहीं व फलाचें ज्ञान झालें असतां तो तरून जातो. याप्रमाणें हें आत्मज्ञान कैवल्यदायक व उत्तम आहे. सर्व प्राणिमात्रांचें जगांत येणें व जाणें याप्रमाणें ओळखून व त्यावर सावकाश विचार करून मनुष्याला शांति मिळते. ज्याला त्रिवर्गाची ओळख पटली आहे व ती पटून ज्यानें त्यांना सोडून दिलें आहे असा तत्त्वदर्शी मनुष्य निश्चिंत असतो. अनिवार्य अशा इंद्रियांना आत्मा पूर्णपणें कळत नाहीं. हें आत्म्याचें स्वरूप ओळखून मनुष्यानें शहाणें व्हावें. हें कळल्यानें शहाणे लोक आपल्याला धन्य समजतात. मूर्खांना ज्याचें मोठें भय वाटत असतें त्यासंबंधानें शहण्याला बिलकुल भीति वाटत नाहीं. मोक्षाशिवाय दुसरी श्रेष्ठ गति नाहीं. परंतु हा मोक्षसुद्धां मनुष्याच्या शरीरांतील चांगल्या गुणांच्या कमी अधिक प्रमाणानुरूप कमी जास्ती प्रकारचा मिळतो. फळाची आशा न ठेवतां निष्कामबुद्धीनें काम केल्यानें मनुष्य पूर्वीं केलेलीं पापकृत्यें नाहींशीं करण्यास समर्थ होतो. अशा मनुष्याला पूर्वींचीं कर्में व हल्लीं करीत असलेलीं निष्काम कर्में हीं कांहीं बाधक होत नाहींत. जो मनुष्य लोभमोहादिकांनीं ग्रासला त्याला लोक नांवें ठेवतात. हे दुर्गुण मनुष्याला दुसऱ्या जन्मीं नीच योनींत जन्माला घालतात. आपली संपत्ति नाहींशी झाली असतां जे वाईट लोक रडत बसतात त्या लोकांकडे त्याचप्रमाणें अशा स्थितीमध्यें असणाऱ्या विवेकी लोकांकडे बारीक नजर दिली असतां त्यांमधला भेद कळून येईल. ज्यांना सावकाश मिळणाऱ्या व तात्काळ मिळणाऱ्या मोक्षाचें स्वरूप कळलें आहे, तेच शहाणे होत.'

---

## १६६ ध्यानयोग. ( १२. १९५ )

भीष्म ह्मणाले, 'आतां तुला ध्यानाचे चार प्रकार सांगतों ऐक. हे चार प्रकार कळून महर्षींनीं

कायमची सिद्धि मिळविली आहे. योगामध्यें गढलेले मोठमोठे ऋषी ज्ञानामध्येंच तृप्ति मानून मोक्षसुखाकडे लक्ष देऊन उत्तम प्रकारचें ध्यान लावतात व संसारदोषापासून मुक्त होऊन फिरून या संसारांत पडत नाहींत. जन्माचा फेरा चुकवून आत्मस्थितींत राहून, सुखदुःखादि द्वंद्वांपासून मोकळे होऊन व धैर्यानें नियमशील राहून ते नित्यमुक्त असतात. ज्या ठिकाणीं बायकामुलादिकांचा संबंध नाहीं व बोलावयासही दुसरा कोणी मनुष्य नाहीं अशा, मनाला शांति देणाऱ्या, एकांताच्या ठिकाणीं ध्यानाकडे मन एकाग्रतेनें लावावें. सर्व इंद्रियें एकत्र करून लांकडाप्रमाणें निश्चेष्ट असावें; कानानें त्यानें ऐकूं नये, त्याला स्पर्शज्ञान कळूं नये, डोळ्यानें रूप कळूं नये, त्याचप्रमाणें जिभेनें रसांची गोडीही त्याला कळूं नये. या योग्यानें ध्यानाच्या योगानें सर्व वास सोडावे. पांच इंद्रियांना खवळून सोडणाऱ्या या विषयांची त्यानें आशा करूं नये. याप्रमाणें या पांची इंद्रियांना आपल्यामध्यें घेऊन भटकणाऱ्या मनाला या पांच इंद्रियांसह स्थिर करावें. चंचळ अशा विषयांसंबंधानें हीं पांच द्वारें स्थिर करावी. प्रथम या ध्यानमार्गाकडे मनाला लावावें. याप्रमाणें या कामीं सांगितलेल्या ध्यानमार्गामध्यें जेव्हां मनुष्य आपलीं इंद्रियें व मन एकाग्र करतो तेव्हां याप्रमाणें दावांत ठेवलेलें मन ढगांमधल्या विजेप्रमाणें चंचल रीतीनें बाहेर पडण्यास प्रयत्न करतें. ज्याप्रमाणें कमलावरील पाण्याचा बिंदु चंचल राहून तो इकडे तिकडे फिरत राहतो त्याप्रमाणें ह्या योग्याचें मन प्रथम ध्यानाकडे लावतांना चंचल असतें. ह्या ध्यानमार्गाकडे लावलें असतां तें कांहीं वेळ स्थिर राहून फिरून या वायुमार्गामध्यें भटकूं लागून त्या वायूप्रमाणेंच याची चलबिचल उडते. परंतु ध्यानयोग पूर्ण माहीत असणाऱ्या योग्यानें न कंटाळतां किंवा न कष्टतां आळस व मत्सर टाळून त्याला पुन्हां एकाग्र करावें. जेव्हां मौनव्रत धरून हा एकाग्रतेनें योगाकडे मन लावण्याला प्रयत्न करतो तेव्हां विचार, विवेक व वितर्क उत्पन्न हातात. या मनाच्या चंचलतेमुळें खेद झाला असतांही त्यानें निराश न होतां मन एकाग्र करून आत्महित करून घ्यावें. ज्याप्रमाणें धळ, राख किंवा राखुंडी यांच्या ढिगांवर पाणी शिंपडलें असतां ते एकदम दबत नाहींत परंतु अंशतः भिजले तरी वर उडण्याला प्रयत्न करीत असतात व फिरून फिरून पाणी शिंपडून त्यांना अगदीं दाबून टाकावें लागतें, त्याप्रमाणें योग्यानें आपलीं इंद्रियें क्रमाक्रमानें आवरून हळू हळू त्यांना विषयांपासून एकीकडे करावें लागतें. असें केल्यानें त्याला यांना ताब्यांत ठेवतां येऊन मन आणि इंद्रियें याप्रमाणें ध्यानमार्गाकडे लावून निश्चल योगानें त्यांना आपल्या पूर्ण ताब्यांत आणून घेतां येतें. इंद्रियें व मन ताब्यांत ठेवल्यानें मनुष्याला जें सुख मिळतें तें प्रयत्नानें किंवा दैवानें कधीं मिळत नाहीं. हें सुख झाल्यानें तो ध्यानामध्यें गर्क होतो व त्याच्या योगानें निर्बाध असें मोक्षसुख मिळतें.'

---

## १६७ जपविधि. ( १२. १९६–२०० )

युधिष्ठिर ह्मणाला, 'जप करणारांना काय फळ मिळतें, त्यांना कोणते लोक मिळतात, जपाचा विधि काय आहे, जप ज्याला ह्मणतात हा काय सांख्यमार्ग आहे, योगमार्ग आहे, क्रियामार्ग आहे किंवा ब्रह्मयज्ञाचा मार्ग आहे?' भीष्म ह्मणाले, 'सांख्य व योग या मार्गांपैकीं सांख्य मार्गामध्यें जप करूं नये असें सांगितलें आहे. सर्व वेदवादांचा यामध्यें ब्रह्माच्या ठिकाणीं शेवट झाला आहे. पण सांख्य व योग या दोन्ही मार्गांशीं ह्या जपविधीचा संबंध आहे; तसाच दोहोंशींही संबंध नाहीं ह्मटलें तरी चालेल. यांचा संबंध काय व तो कसा आहे सांगतों ऐक. त्या दोहोंप्रमाणें यामध्येंही मनाची समाधि, इंद्रियांचा जय, सत्य, अग्निकार्य, एकांतांत बसणें, ध्यान, तप, आत्मनिग्रह, सहनशीलता, हेवा न करणें, नियमित आहार ठेवणें, विषयांपासून मन काढून घेणें, मितभाषण करणें, शांति धरणें इत्यादि गोष्टी सांगितल्या आहेत. ह्या गोष्टी सकाम झाल्या असतां फिरून फिरून संसाराच्या फेऱ्यांत घालतात. आतां मोक्षाला ह्या गोष्टी कशा कारण होतात तें सांगतों ऐक. दृश्य किंवा अदृश्य यांवर अवलंबून न राहतां मोक्षाचा मार्ग धरून या सर्व गोष्टी केल्या असतां मनुष्याला त्या संसाराच्या फेऱ्यांतून काढण्याला कारण होतात. दर्भासनावर बसून हातांत व डोक्यावर दर्भ घेऊन सभोंवतीं दर्भा-

नींच स्वतःला झांकून घेऊन विषयांना नमस्कार ठोकून त्यांच्याविषयीं नुसता विचारही मनांत न आणतां जीव व ब्रह्म ह्यांचा एकभाव मनामध्यें आणून, मनामध्येंच मन एकाग्र करून त्या जीवब्रह्मांच्या एक बुद्धीनें हितकारक अशा गायत्रीचा जप करीत ब्रह्माचें ध्यान करावें व चित्तस्थैर्य होऊं लागल्यावर तो जप सुद्धां सोडून द्यावा. तपाच्या योगानें या गायत्रीच्या बलावर आत्मनिग्रहामुळें अंतःकरण शुद्ध झाल्यानें द्वेष, वासना वगैरे नाहींशा होऊन ध्यान लागतें. कोणत्याही वस्तूवर आसक्ति किंवा मोह न जडतां सुखदुःखादि द्वंद्वांपासून मोकळा होऊन हा कशासंबंधानें शोक करीत नाहीं किंवा कशावर आसक्ति ठेवीत नाहीं. कोणच्याही कारणांचें किंवा क्रियांचें कर्तृत्व आपल्याकडे घेत नाहीं. अशी त्याची स्थिति होते. मन कशावरही अहंकारयुक्त न ठेवतां कोणतीही वस्तू घेण्याकडे प्रवृत्ति ठेवीत नाहीं. कोणाचा अवमान न करतां निष्कामपणें ध्यानाकडेच लक्ष दृढ करून ध्यानामध्यें गढून राहतो. मग ध्यानावरील ऐकाग्र्यही सोडून देतो व निर्विकल्पक समाधीची अवस्था मिळवून सुखी होतो. व निरिच्छ असेल तर प्राण सोडून ब्रह्मचाच्या शरीरामध्यें मिळून जातो; व ब्रह्मशरीरामध्यें मिळण्याची त्याची इच्छा नसेल तर वरवर चढत राहून जन्ममरणाच्या फेऱ्यांत पडत नाहीं व आत्मबुद्धि प्राप्त होऊन शांत व निर्बाध असा झाल्यावर अमर, रजोगुणापासून मुक्त व शुद्ध असा आत्मस्वरूपी होतो. जापकांना एवढीच गति नसून त्यांच्या क्रियांच्या निरनिराळ्या स्वरूपाप्रमाणें याहून कमी दर्जाच्या आणि ह्मणूनच नरकासारख्या निरनिराळ्या गती मिळतात. जो वर सांगितल्याप्रमाणें यथासांग जप न करतां कांहीं न्यून ठेवतो किंवा प्रीति किंवा आनंद न होतां अश्रद्धेनें तें करतो किंवा कांहीं वेडगळपणानें फलाची इच्छा धरून करतो, तो ज्यावर त्याची वासना राहते त्या त्या ठिकाणीं उत्पन्न होतो. आणिमादि दैविक ऐश्वर्यासाठीं जप केले असतां ती नरकरूपी प्राप्ति त्याला होऊन त्यांतून तो सुटत नाहीं. जो जापक बुद्धीवर मोह पडून चंचल मनानें जप करतो अशा दुर्बुद्धि व आत्मशुद्धि न झालेल्या मनुष्याला नरकरूपी अस्थिरगति मिळते. बुद्धीवर पूर्ण संस्कार न होतां ज्या मूर्ख जापकाला मोह पडतो त्याला नरक मिळतो व तेथें जाऊन त्याला शोक करण्याचा प्रसंग येतो. मी जप करणार अशा दृढ निश्चयानें जप करावयाला बसलेला मनुष्य देखील विषयांवर विरक्तता न येतां आग्रहानें ते टाकल्यानें त्याचा जप शेवटास न जातां तो नरकाला जातो. जीं महात्म्या देवांचीं नाना प्रकारचीं, नाना वर्णांचीं, नाना रूपांचीं व नाना फल देणारीं ठिकाणें आहेत, त्याचप्रमाणें वाटेल तिकडे फिरणारीं दिव्य विमानें, सभा, व विहारस्थानें, सोन्याचीं कमलवनें, चार लोकपालांचीं व शुक्र, बृहस्पती वगैरे देवांचीं स्थानें आहेत तीं सर्व या परमात्म्याच्या ठिकाणाशीं ताडून पाहिलीं असतां नरकासारखींच आहेत. हें ब्रह्माचें ठिकाण स्वतःसिद्ध असून अभयप्रद असें आहे. याठिकाणीं क्लेश ह्मणून मुळीं माहीत नाहीं. सुखदुःखादि द्वंद्वें ह्या ठिकाणीं ठाऊक नसून सत्व, रज, तम या तीन गुणांच्या पलीकडे हें आहे. पंचेंद्रियें, मन, बुद्धि, आत्मा ह्या आठांचा या ठिकाणीं संबंध नाहीं. त्याचप्रमाणें ज्ञेय, ज्ञान, व ज्ञाता हा भाव या ठिकाणीं नसून दृष्टि, श्रुति, मति व विज्ञाति हे चार गुणही या ठिकाणीं नाहींत; त्याचप्रमाणें ज्ञानाची जीं चार कारणें तींही या ठिकाणीं नाहींत. हर्ष, आनंद, शोक व श्रम या ठिकाणीं माहीत नाहींत. या ठिकाणीं काल आहे, परंतु त्याचें प्रभुत्व नाहीं. काल व स्वर्ग यांचा प्रभु तो एक ब्रह्मच आहे. तेथें जाऊन आत्म्याशीं एकरूपता झाल्यावर मनुष्याला शोकाला कारण उरत नाहीं. ह्मणून हें स्थान श्रेष्ठ असून बाकीचे नरकासारखे आहेत. या संबंधामध्यें सूर्यपुत्र इक्ष्वाकु राजा, ब्राह्मण, धर्म, यम, काळ व मृत्यु यांच्यामध्यें झालेलें भाषण ऐक.

कोणी एक धर्मशील शीक्षा, कल्प, व्याकरण, निरुक्त, छंद व ज्योतिष हीं षडंगें माहीत असणारा कौशिक कुळांतला ब्राह्मण पिप्पलादीचा मुलगा होता. या सहा अंगांमध्यें त्याला ज्ञानचक्षूनें ज्ञान होऊन सर्व वेदांमध्यें तो निष्णात झाला होता. तो हिमाचलाच्या पायथ्याशीं आत्मनिग्रहानें गायत्री जप करीत अर्थज्ञानयुक्त ब्रह्माचें तप करीत राहिला होता. अशा तपामध्यें त्याचीं हजार वर्षें गेलीं असतां प्रत्यक्ष

देवी गायत्रीनें त्याला दर्शन देऊन मी संतुष्ट आहें असें सांगितलें. तरी पुढें तसाच जप चालू ठेवून त्यानें तिला कांहीं उत्तर दिलें नाहीं. त्यायोगानें संतुष्ट होऊन तिला त्याची कींव आली. त्या वेदमातेनें त्याच्या त्या जपाची प्रशंसा केली. जप संपल्यावर उठून तो तिच्या पायां पडला. सावित्री त्याला ह्मणाली, 'तुझी काय इच्छा आहे सांग. तूं सांगशील त्याप्रमाणें सर्व होईल.' तेव्हां तो ह्मणाला, 'जपामध्यें माझी समाधि अधिकाधिक दृढ होत जाऊन ही माझी जपाची इच्छा वाढत राहो.' 'ठीक आहे,' असें ह्मणून त्याचें प्रिय करण्यासाठीं ती त्याला फिरून ह्मणाली, 'ब्राह्मणा, तूं नरकाला न जातां स्वतःसिद्ध व जें अनिंदित ब्रह्माचें ठिकाण आहे त्याला जाशील. मी आतां जातें. तूं जें मागितलेंस तीं तुझी इच्छा पूर्ण होईल. आत्मनिग्रहपूर्वक एकाग्रतेनें जप करीत रहा. धर्म, यम, काळ व मृत्यु तुजकडे येतील व त्यांचा व तुझा या संबंधांत संवाद होईल.' असें ह्मणून ती आपल्या ठिकाणाला गेली. हा ब्राह्मणही राग वगैरे सोडून आत्मनिग्रहानें शंभर दिव्य वर्षें होत तोंपर्यंत जप करीत राहिला. तेव्हां प्रत्यक्ष धर्म संतुष्ट होऊन त्याकडे येऊन ह्मणाला, 'ब्राह्मणा, मी धर्म तुझ्याकडे आलों आहें. या जपाचें जें कांहीं फल आहे तें समग्र तुला मिळालें आहे. जे कांहीं देवांचे किंवा मनुष्यांचे लोक आहेत ते तूं जिंकले आहेस. हें शरीर ठेवून तुला वाटेल त्या ठिकाणीं तूं जा.' यावर ब्राह्मण ह्मणाला, 'महाराज, मला ते लोक घेऊन काय करावयाचें आहे. पुष्कळ सुखदुःखांला कारणीभूत जो हा देह तो मी टाकूं इच्छीत नाहीं. ह्या देहावांचून मला स्वर्ग नको. मला स्वर्गाची कांहीं इतकी इच्छा नाहीं.' धर्म ह्मणाला, 'ब्राह्मणा, हा देह तुला कधीं तरी टाकलाच पाहिजे, तेव्हां याच्यावरची प्रीति टाकून देह ठेवून सुखी हो व स्वर्ग किंवा दुसऱ्या तुला वाटेल त्या लोकाला जा.' ब्राह्मण ह्मणाला, 'मी जपांतच सुखांत रहातों, मला हे सनातन लोक घेऊन काय करावयाचें आहे? मला या शरीरासकट स्वर्गाला जावयाचें आहे. नाहींतर मला कांहीं नको आहे.' यावर धर्म ह्मणाला, 'जर शरीर टाकण्याचें तुझ्या मनांत नसेल तर हा काळ, मृत्यु व यम तुझ्याकडे आले आहेत.' असें तो ह्मणतो तोंच ते तिघे त्याकडे येऊन ह्मणाले, 'ह्या तुझ्या उत्तम रीतीनें केलेल्या तपाचें श्रेष्ठफळ तुला मिळालें आहे.' काळ ह्मणाला, 'ज्या अर्थीं तुला या तपाचें उत्तम फळ मिळालें आहे त्याअर्थीं स्वर्गाला जाण्याची तुझी वेळ आली आहे.' मृत्यु ह्मणाला, 'मी मृत्यु मूर्तिमान काळाच्या सांगण्यावरून तुला नेण्याकरितां आलों आहे.' त्या ब्राह्मणानें त्या सर्वांचें स्वागत करून त्यांना अर्घ्य व पाद्य देऊन, 'मी आपल्या शक्त्यनुसार तुमचें काय करूं,' असें ह्मणाला. इतक्यांत सूर्यपुत्र इक्ष्वाकु त्या ठिकाणीं आला. त्यानें त्याचाही सत्कार करून कुशल विचारल्यावर 'आपल्या शक्त्यनुसार मी तुझें काय करूं' ह्मणून त्याला विचारलें. राजानें उत्तर दिलें, 'षट्कर्में करीत राहणारे आपण ब्राह्मण असून मी राजा आहें. आपल्याला मी वाटेल तितका पैसा देतों, किती देऊं सांगा.' तें ऐकून ब्राह्मण ह्मणाला, 'प्रवृत्ति मार्गांतले व निवृत्ति मार्गांतले असे दोन प्रकारचे ब्राह्मण असून धर्मही असाच दोन प्रकारचा आहे. माझा कोणाचें कांहीं घ्यावयाचें नाहीं असा नियम आहे. जे वासनेच्या मागें लागले आहेत त्यांना तूं दान दे. मी कधीं प्रतिग्रह घेणार नाहीं. तुला काय देऊं सांग ह्मणजे तें मी तपानें साधून देतों.' राजा ह्मणाला, 'मी क्षत्रिय असून देहि हा शब्द मला माहीत नाहीं. मागावयाचें असलेंच तर युद्ध दे एवढेंच आम्ही मागतों.' ब्राह्मण ह्मणाला, 'तूं स्वधर्मानें संतुष्ट असून मीही आपल्या धर्मामध्यें संतुष्ट आहें. तेव्हां तुला वाटेल तसें कर.' यावर राजा ह्मणाला, 'पूर्वीं शक्त्यनुसार आपण देतों ह्मणालां आहां. जपाचें फळ मला द्या.' यावर ब्राह्मण म्हणाला, 'नेहमीं मीं युद्ध मागत असतों अशी फुशारकी मिरवून माझ्याशीं युद्ध कां मागत नाहींस?' राजा म्हणाला, 'ब्राह्मणाचें हत्यार तोंड असून क्षत्रिय मनेगटावर राहतात. तेव्हां आपल्याशीं जें मागावयाचें तें हें तीव्र वाग्युद्ध मी आपल्यांकडे मागितलें.' ब्राह्मण म्हणाला, 'ठीक आहे. तुझ्या इच्छेप्रमाणें माझ्या जपाचें अर्धें किंवा सगळें तुला वाटेल तेवढें फल तूं घे.' यावर राजा म्हणाला, 'मीं जें तुमच्याकडे जपाचें फळ मागितलें

तें कांहीं मला नको. आपलें कल्याण असो. हा मी चाललों. या आपल्या जपाचें फळ काय, तेवढें मला सांगा.' ब्राह्मण म्हणाला, 'फळ काय हें माझें मलाच ठाऊक नाहीं; तथापि मीं तुला आपल्या जपाचें फळ दिलें आहे; त्याला हे धर्म, काळ, यम व मृत्यु साक्षी आहेत.' राजा ह्मणाला, 'ज्याचें फळ आपल्यालाच माहीत नाहीं अशा धर्माच्या फळाचा मला काय उपयोग? जर आपल्या जपाचें फळ काय आहे हें आपण सांगत नाहीं, तर मला तें संशयात्मक फळ नको. आपल्याजवळच तें असो.' ब्राह्मण म्हणाला, 'मला हें तें कांहीं कळत नाहीं. माझ्या जपाचें फळ मीं तुला दिलें आहे. माझें त्याचप्रमाणें तुझें बोलणें खरें झालें पाहिजे. मीं जपासंबंधी इच्छाच जर पूर्वीं कधीं ठेविली नाहीं, तर त्याचें फळ तरी मला कसें कळणार? तूं दे ह्मणालास व मी देतों ह्मणालों. तेव्हां आतां मागें घेऊन सत्याला बाध आणूं नकोस. आतां मीं सांगितल्याप्रमाणें जर तूं करणार नाहींस तर तुला खोट्याचा मोठा दोष लागणार आहे. आपलें बोलणें खोटें करणें तुला शोभत नाहीं व माझें बोलणेंही खोटें होणार नाहीं. मी पूर्वीं कांहीं कांकूं न करतां देतों ह्मणालों आहें. येथें येऊन तूं माझ्या जपाचें फळ मागितलेंस. तेव्हां तूं जर खरा असशील तर खऱ्याला जागून मीं दिलेलें घे. जो खोटें बोलतो त्याला इहपर न मिळतां त्याला आपल्या पूर्वजांना सुद्धां तारतां येत नाहीं. मग तो आपल्या वंशजांना कोठून तारणार? यज्ञाचें, दानाचें किंवा नियमाचें फळ सुद्धां सत्याच्या तोडीला लागणार नाहीं. शेंकडों झालेलीं व होणारीं तपें यांहून सत्याची मातब्बरी विशेष आहे. कधीं कमी न होणारें ब्रह्म, तप, यज्ञ, वेदाध्ययन सर्व कांहीं सत्य आहे. वेदाच्या ठिकाणीं सत्यच जागत असून सत्याचें फळ फार मोठें आहे. धर्म, आत्मनिग्रह हे सत्यापासून असून सर्व कांहीं सत्यावरच अवलंबून आहे. वेद, वेदांगें, विद्या, विधि, ब्रह्मचरण, प्रणव, हीं सर्व सत्यच असून प्राण्यांची उत्पत्ति व संतति हीं सत्यावरच अवलंबून आहेत. सत्यानेंच वारा वाहतो; सूर्य प्रकाशतो व अग्नि जळतो. स्वर्ग सुद्धां सत्याच्या आधारानेंच आहे. यज्ञ, तप, वेद, साममंत्र, मंत्र व सरस्वती सत्यच आहे. धर्म व सत्य ताजव्यांत घातलीं असतां सत्याचेंच पारडें खालीं बसेल. जेथें धर्म तेथें सत्य असून सर्व सत्यानें वाढतें. तेव्हां आपलें भाषण तूं खोटें कां करूं इच्छितोस? सत्याच्या ठिकाणीं दृढ भाव ठेव. देहि ह्मणून उच्चारलेले आपले शब्द कां खोटे करतोस? जपाचें मीं दिलेलें फळ जर तूं घेणार नाहींस तर तूं धर्मभ्रष्ट होऊन जगांत भटकत राहशील. देतों ह्मणून वचन देऊन जो देणार नाहीं व याचना करून जो घेणार नाहीं ते दोघेही खोटे ठरतात.' राजा ह्मणाला, 'युद्ध करणें व रक्षण करणें हा क्षत्रियांचा धर्म असून क्षत्रिय दाते समजले आहेत. मग मीं कसें वरें घ्यावें.' ब्राह्मण ह्मणाला, 'तुझ्या घरीं येऊन मी कांहीं तुझ्या पाठीस लागलों नव्हतों. येथें येऊन तोंड पसरून आतां तें कां घेत नाहींस?' धर्म ह्मणाला, 'तंटा करूं नका. या ब्राह्मणाला धर्मफळ मिळून राजाला सत्याचें फळ मिळेल.' स्वर्ग त्या ठिकाणीं मूर्तिमान येऊन ह्मणाला, 'तुह्मीं तंटा करूं नका. दोघांनाही सारखें फळ मिळेल.' राजा ह्मणाला, 'स्वर्गा, मला तुझें कांहीं काम नाहीं. आलास तसा चालता हो. या ब्राह्मणांना जर तुझ्या ठिकाणीं जाण्याची इच्छा असेल तर मी आचरलेल्या धर्माचें फळ यांना देतों.' ब्राह्मण ह्मणाला, 'लहानपणीं अज्ञानानें हात पसरला असला तर मला ठाऊक नाहीं; परंतु आतां सकाम कर्म सोडून देऊन मी गायत्री जपीत राहिलों आहें; तेव्हां निवृत्तिमार्गाला लागलेल्या मला तूं उगीच भुरळ कां पाडीत आहेस? मी आपलें काम साधून घेण्याला खंबीर आहें. तुझ्यापासून फलाची इच्छा मी करीत नाहीं.' राजा ह्मणाला, 'जर जपाचें फळ आपण मला देऊन टाकिलें आहे तर आपल्या दोघांचें फळ एकत्र करून आपण समसम करून घेऊं. ब्राह्मण प्रतिग्रह घेणारे असून राजे दाते असतात हा धर्म आपल्याला ठाऊकच आहे; तेव्हां निदान आपलें फल समसमान असूं दे. आतां माझ्याशीं समान असण्याची जर आपली इच्छा नसेल तर मीं आचरलेल्या धर्माचें सर्व फळ आपण घ्या.' इतक्यांत दोन अंगावर भिकार कपडे असलेले पुरुष एकमेकांच्या खांद्यांवर हात टाकून त्या ठिकाणीं

आले. त्यांपैकीं एक 'तूं माझें कांहीं लागत नाहींस,' असें ह्मणाला व दुसरा 'मी लागतों,' ह्मणाला.' 'आपला हा वाद राजा मिटवील,' असें ह्मणून ते राजास ह्मणाले, 'तूंच परीक्षा करून ज्यानें आह्मी निंद्य होणार नाहीं असा निकाल कर!' त्यांपैकीं एक विरूप ह्मणाला, 'या विकृताचें मी एक गोदानाचें फळ लागतों, तें मी देत असतां हा घेत नाहीं.' विकृत ह्मणाला, 'हा माझें कांहीं लागत नाहीं. खरें भासण्यासारखें हा हें खोटें बोलत आहे.' राजा ह्मणाला, 'विरूपा, तूं याचें काय लागतोस तें सांग. ह्मणजे मी तें ऐकून त्याप्रमाणें निकाल देतों.' विरूप ह्मणाला, 'मी या विकृताचें काय लागतों तें नीट ऐक. यानें पूर्वी धर्मप्राप्तीसाठीं एक उत्तम गाय एका वेद पढणाऱ्या तपःशील ब्राह्मणाला दिली.त्याचें फळ मीं याला मागितलें असतां मोठ्या शुद्ध अंतःकरणानें तें त्यानें मला दिलें. पुढें आत्मशुद्धीसाठीं पुण्यकर्म करून मीं दोन दुभत्या गाई वासरांसकट विकत घेतल्या व धान्यकण वेंचून त्यावर राहणाऱ्या अशा एका ब्राह्मणाला त्या दिल्या. त्याचें तें दुप्पट फळ मी आज याला देत आहें, पण हा घेत नाहीं; तेव्हां आतां खरा कोण व दोषी कोण याचा निकाल लावून आह्मांला वाटेल लाव.' राजा ह्मणाला, 'हा तुझें ऋण देत असतां तूं कां घेत नाहींस? तूं दिलेंस त्याप्रमाणें तें आतां घे.' विकृत ह्मणाला, 'हा माझें लागतो आहे असें ह्मणतो आहे व मी याला देऊन टाकलें ह्मणतों. तेव्हां हा माझें कांहीं लागत नाहीं; तेव्हां याला वाटेल तिकडे जाऊं दे.' राजा ह्मणाला, 'हा देत असतां तूं घेत नाहींस तेव्हां तूं मला मोठा वांकडा दिसतोस. तुला निःसंशय दंड केला पाहिजे.' विकृत ह्मणाला, 'मीं याला देऊन टाकलेलें परत कसें घ्यावें. या गोष्टींत माझा अपराध जर वाटत असेल तर मला खुशाल शिक्षा कर. यानें आपण होऊनच मागितल्यामुळें मीं याला दिलें. तेव्हां तें कांहीं मी आतां परत घेत नाहीं.' असें ते ह्मणत असतां ब्राह्मण राजाला म्हणाला, 'तूं यांचें भाषण ऐकलेंस, तेव्हां मीं जें तुला देण्याचें वचन दिलें आहे, तें विचार न करतां घ.' राजानें विचार केला कीं, ही मोठ्या विचाराची गोष्ट आहे. हा ब्राह्मण तर आग्रह धरून बसला आहे. हें व्हावें तरी कसें? हा ब्राह्मण देत असतांना मी जर घेणार नाहीं तर मला पाप तरी कसें लागणार नाहीं? आज माझ्या राजधर्माला बट्टा लागतां कामा नये. राजांनीं स्वधर्म पाळला पाहिजे. दुर्दैवानें हा मोठा गहन ब्राह्मणधर्म माझ्या कपाळीं आला आहे. या राजधर्माला धिक्कार असो कीं, ज्याच्या योगानें हा कार्याकार्यविचार मला येऊन पडला आहे. आतां मला दान घेतलें पाहिजे. मी आतांपर्यंत हा हात देण्यासाठीं पुढें करीत आलों. तो आज घेण्यासाठीं पसरला पाहिजे.' असा विचार करून तो त्या ब्राह्मणाला ह्मणाला, 'बरें जें कांहीं आपण माझें लागतां तें द्या. ब्राह्मण ह्मणाला 'गायत्री जपतांना जें पुण्य मीं केलें असेन तें जर कांहीं असेल तर तूं घे.' राजा ह्मणाला. 'हें तुझें पाणी माझ्या हातावर पडलें. आतां आपल्या दोघांचें फळ सारखें होण्यासाठीं माझ्या पुण्याचरणाचें फळ तूं घे.' इतक्यांत विरूप त्याला ह्मणाला, 'राजा, आह्मीं कामक्रोध आहोंत. आह्मींच तुला असें वागण्याला प्रेरणा दिली. सारखें फल ह्मणून जें तूं ह्मणालास तें तुला व या ब्राह्मणाला सारखे लोक मिळोत. हा विकृत माझें कांहीं लागत नाहीं. तुझी परीक्षा पाहण्यासाठींच आह्मीं तुह्मां दोघांमध्यें तंटा उपस्थित केला. तूं आपल्या कर्मानें जे लोक मिळविले आहेस त्यांपैकीं तुला वाटेल तिकडे जा. नंतर बरें ह्मणून त्या सर्वांचा सत्कार केल्यावर तो ब्राह्मण राजाला ह्मणाला, 'राजा, माझ्या जपाचें फळ घेऊन तूं श्रेष्ठ होऊन जा. मी तुझ्या परवानगीनें फिरून जप करीत राहतों. देवीनें मला पूर्वी वर दिला आहे.' राजा ह्मणाला, 'जर मला दान दिल्यानें तुझी सिद्धि नाहींशी होऊन फिरून जप करण्याची तुझी इच्छा असली तर जपाचें दान करून मिळालेल्या पुण्यानें तुझें वाढलेलें जपाचें फळ घेऊन तूं मजबरोबर चल.' ब्राह्मण ह्मणाला, 'तूं या सर्वांसमक्ष पुष्कळ प्रयत्न केले आहेस. तर समसमान पुण्यानें आपण आपल्याला जी गति मिळाली असेल तिकडे जाऊं या.' हा त्या दोघांचा निश्चय जाणून इंद्रप्रभृति सर्व देव, मुनि, गंधर्व वगैरे सर्व त्या ठिकाणीं आले. आकाशामध्यें नौबती, न-

गारे वाजूं लागले. वरून दिव्य पुष्पांचा वर्षाव होऊं लागला. अप्सरा चोहोंकडे नाचूं लागल्या. तेव्हां स्वर्ग पूर्वीसारख्या शरीरामध्येंच ब्राह्मणाला व राजाला ह्मणाला, 'तुह्मीं दोघांनीं चांगली सिद्धि मिळविली आहे.' नंतर त्या दोघांनीं याप्रमाणें एकमेकांना पुण्य देऊन विषयांपासून त्यांनीं आपलें मन काढून घेतलें. प्राण, अपान, समान, उदान व व्यान हे वायू हृदयामध्यें एकत्र करून प्राण व अपान या दोघांच्या ठिकाणीं त्यांनीं मन लाविलें व त्या दोन्ही वायूंना नाभीकमलाच्या ठिकाणीं ठेवून त्यांनीं आपली दृष्टि दोन्ही भुवयांच्यामधून नाकाच्या शेंड्याकडे लाविली व हे प्राण व अपान वायु मनाच्या साह्यानें भिंवयाच्या मध्यभागीं आणून ठेवून अगदीं हालचाल न करतां दृष्टि स्थिर करून शांतपणें आत्मा मस्तकाच्या ठिकाणीं नेला. पुढें त्या महात्म्या ब्राह्मणाची टाळू फोडून एक मोठी ज्योति बाहेर पडून स्वर्गाला गेली. ती ज्योति सर्व वाहवा करीत असतां ब्रह्मामध्यें शिरली. प्रजापती पुढें सरून प्रादेशमात्र अशा त्या पुरुषाला सामोरें जाऊन त्याचें स्वागत करून म्हणाले, 'जापकांना व योग्यांना प्रत्यक्ष दर्शन हें सारखें फळ आहे. परंतु जापकांना ब्रह्म पुढें सामोरें जातें एवढें विशेष आहे.' पुढें, 'माझ्या ठिकाणीं रहा,' असें म्हणून ब्रह्मानें त्याला कायमचें चेतविलें व तो ब्राह्मण निर्भयपणें त्यांच्या तोंडांत शिरला. राजाही त्याच प्रकारानें भगवान पितामहाच्या तोंडांत शिरला. ते वेळीं स्वायंभूला नमस्कार करून देव म्हणाले, 'जापकांना सामोरें जाणें हा विशेष भेद आहे. यासंबंधानें आपला हा प्रकार पहाण्यासाठीं आम्ही येथें जमलों.योगी व जप करणारे यांना सर्व लोक मागें टाकून वाटेल तिकडे जातां येतें हें त्यांचें मोठें फळ आज आमच्या नजरेस आलें.' ब्रह्म म्हणालें, 'महाश्रुति जे वेद किंवा त्यांच्या मागून झालेल्या स्मृती जो वाचील त्याचप्रमाणें ज्याची योगामध्यें भक्ति असेल त्याला माझे लोक मिळतात.' याप्रमाणें बोलून सर्व देव त्या ठिकाणीं गुप्त झाले. याप्रमाणें गायत्रीचा जप करणारा ब्रह्मस्वरूपी होतो किंवा वासनेनें मोह पडून जर तो जप करील तर त्या त्या प्रमाणें त्याला गति मिळते.

---

## १६८ ज्ञानयोग. (१२. २०१–२०६)

'ज्ञानयोग, वेद त्याचप्रमाणें नियम यांचें फळ काय व भूतात्म्याला कसें ओळखावें, हें सांगा,' म्हणून युधिष्ठिरानें विचारलें असतां भीष्म ह्मणाले, 'यासंबंधांत आदि प्रजापति मनु व त्यांचे शिष्य महर्षि बृहस्पति यांचा संवाद ऐक. पूर्वी बृहस्पतींनीं मनूंना विचारलें कीं,'जगाचें कारण काय आहे? कर्मकांड कोठून उत्पन्न झालें? ज्ञानाचें फळ काय त्याचप्रमाणें वेदवाक्यांनीं सुद्धां जें स्पष्ट झालें नाहीं व धर्मार्थकाम यांसंबंधीं शास्त्र, वेद, इषेत्वो वगैरे मंत्र, अनेक यज्ञ, गोप्रदानें यांच्या योगानें मोठमोठ्या ऋषींनीं जें फळ मिळविण्याचा प्रयत्न केला तें फळ काय व कोठें मिळणार? ही पृथ्वी, व यावर उत्पन्न झालेले पदार्थ, वारा, आकाश, जलचरप्राणी, जल, स्वर्ग, देव ज्यापासून उत्पन्न झाले तें पुराणब्रह्म कशा प्रकारचें आहे? ज्या वस्तूचें लोक ज्ञान करून घेण्याविषयीं इच्छितात, त्याकडे त्यांची प्रवृत्ति असते. पुरातन असें जें ब्रह्म याचें ज्ञान न होतां उगीच ढोंगानें जी त्याच्याकडे माझी प्रवृत्ति आहे, या ढोंगापासून मी कसा सुटणार? सर्व ऋक्, साम, यजुर्वेद, छंदें, ज्योतिष, निरुक्त, व्याकरण, कल्प व शिक्षा मी पढलों आहे. तरी भूतमात्रांचा आधार जो आत्मा तो मला अजून उमगत नाहीं. ह्मणून सामान्य व विशेषणात्मक शब्दांनीं त्यासंबंधानें माहिती सांगून ज्ञानाचें व कर्माचें काय फळ आहे, व जीव या देहाला सोडून गेल्यावर दुसऱ्या शरीरामध्यें कसा जातो हें आपण मला सांगा.' यावर मनु ह्मणाले, 'ज्याला ज्याला जें जें आवडतें तें तें त्याला सुखकर वाटून जें आवडत नाहीं तें त्याला दुःखकर वाटतें. **चांगलें तेवढें मला हवें, वाईट नको, अशा बुद्धीमुळें कर्मकांडाची प्रवृत्ति झाली; व ज्ञानमार्गाची प्रवृत्ति बरें व वाईट दोन्ही टाळण्याकरितां झाली.** वासना धरून कर्म करणारांना त्या त्या वासनेप्रमाणें त्या त्या कर्माचीं फळें मिळतात व हींच कर्में निरिच्छ बुद्धीनें झालीं असतां ब्रह्मप्राप्ति होते. सुखाच्या इच्छेनें नाना प्रकारच्या कर्ममार्गाला लागलेला मनुष्य, ब्रह्माशीं तुलना केली असतां जें नरकासारखें आहे अशा निरनिराळ्या ठिकाणाला जातो. मनुष्याचें लक्ष सुखामध्यें शेवट होणा-

ज्या इष्ट प्राप्तीकडे व ज्याच्या योगानें दुःखें ओढवतात अशीं अनिष्टें टाळण्याकडे लागलें असतें; आणि वासना सोडून हीं कर्में करीत राहून यांपासून मुक्त राहिल्यानें ब्रह्मप्राप्ति होते. कर्ममार्गाची प्रवृत्ति यासाठीं झाली आहे. कर्मविधि ज्यांचीं अंतःकरणें वासनेपासून सुटलीं नाहींत त्यांनाच मोह पाडतात. मोक्षाची इच्छा असणारा मनुष्य कर्ममार्गाला लागून त्या कर्मांनीं शुद्ध होऊन शेवटीं ब्रह्मस्वरूपानें झळकूं लागतो. कर्मांपासून मुक्त झाल्यानेंच मनुष्याला ब्रह्मप्राप्ति होते. व कर्मफळांमध्यें हें सर्वांत उत्तम फळ आहे. सर्व प्राणिमात्र मनानें व कर्मानें उत्पन्न झाले आहेत; तरी हे दोनच लोकांनीं स्वीकारलेले उत्तम मार्ग समजले आहेत. कारण प्रत्यक्ष कर्में शाश्वत फळ देणारीं व नाशवंत आहेत. मनानें फळाची इच्छा सोडून देणें हेंच शाश्वत फळ मिळण्याला कारण आहे. ज्याप्रमाणें रात्र सरून उजेड झाल्यावर डोळा मनुष्याला आपल्या सामर्थ्यानें योग्य मार्गाला नेऊं शकतो, त्याप्रमाणें बुद्धीला ज्ञान झालें असतां टाळण्याजोगीं कर्में त्याला कळूं लागतात. साप, दर्भाचीं अग्रें, त्याचप्रमाणें खाचखळगे हें वाटेंत दिसले असतां शहाणे लोक ते टाळतात. अज्ञानी लोक मात्र तेथें जाऊन पडतात. यावरून ज्ञानाचें विशेष फळ कसें आहे तें पहा. विधिपूर्वक उच्चारलेले मंत्र, यज्ञ, दक्षिणा, अन्नदान व मनाची समाधि अशीं पांच प्रकारचीं कर्में फलदायक समजलीं आहेत. हीं सर्व कर्में सत्व, रज व तम या तीन गुणांनीं होत असून ज्या अर्थी हीं कर्में मंत्राच्या साधनांनीं होतात त्या अर्थी त्या मंत्रामध्येंही हे तीन गुण येतात. त्याचप्रमाणें ज्या विधीनें हीं कर्में होतात, त्यामध्येंही हे तीन गुण येतात. कर्माचीं फळें मनावर अवलंबून असून तीं भोगणारा जीव आहे. उत्तम उत्तम शब्द, रूप, रस, स्पर्श व गंध हीं कर्माचीं फळें असून तीं स्वर्गामध्यें मिळतात; तथापि ज्ञानाचें फळ मनुष्याला येथेंच मरणाच्या पूर्वी मिळतें. जीं जीं कर्में मनुष्य या शरीरानें करतो त्याचें त्याचें फळ तशा तशा प्रकारच्या शरीरामध्येंच मिळतें. हें शरीरच सुखदुःखांचें घर आहे. जें जें कर्म वाचेनें होतें त्याचें त्याचें फळ वाचेनें भोगावें लागतें. मनानें होणाऱ्या कर्माचें फळ मनाचे योगानें भोगावें लागतें. जशा जशा फलाच्या इच्छेनें ज्या ज्या प्रकारचें कर्म मनुष्य करतो त्या त्या गुणांशीं स्वतःला जखडून घेऊन त्या त्या प्रकारचें आपल्या कर्माचें बरें वाईट फळ तो भोगीत रहातो. ज्याप्रमाणें इच्छा नसली तरी पाण्याच्या वेगामुळें माशाला प्रवाहास अनुसरून जावें लागतें त्याप्रमाणें पूर्वजन्मींच्या कर्मास मनुष्य अनुसरतो. व तो आपल्या चांगल्या कृत्याप्रमाणें सुख किंवा वाईट कृत्याप्रमाणें दुःख भोगीत रहातो. ज्यापासून ह्या जगाची उत्पत्ति झाली आहे, ज्याला ओळखल्यानें मनुष्य शुद्ध होऊन या संसारांतून पार पडतो, वेदवाक्यांनीं सुद्धां ज्याचें स्पष्ट रूप कळत नाहीं, अशा परमात्म्याचें स्वरूप असें आहे. नानाप्रकारचे रस, गंध, शब्द, स्पर्श, रूप यांपासून तो अलग असून इंद्रियांनीं त्याची ओळख पटण्यासारखी नाहीं. तो अव्यक्त आहे, त्याला वर्ण नाहीं व तो अद्वितीय आहे, पंचभूतात्मक प्रजा तोच उत्पन्न करतो. तो स्त्री नाहीं, पुरुष नाहीं, नपुंसक नाहीं. तो आहे असेंही नाहीं व नाहीं असेंही नाहीं. केवळ ब्रह्मवेत्ते ज्याला पाहूं शकतात. तो अक्षर असून कधीं कमी होत नाहीं. या कधीं कमी न होणाऱ्या शाश्वत पुरुषापासून प्रथम आकाश, आकाशापासून वायु, वायूपासून ज्योती, ज्योतीपासून जल, जलापासून पृथ्वी उत्पन्न झाली. नंतर या पृथ्वीवर सर्व भूतमात्र उत्पन्न झाले. हे भूतमात्रांचे देह लयाचे वेळीं प्रथम पाण्यामध्यें शिरून नंतर ज्योतीमध्यें, पुढें वायूमध्यें व शेवटीं आकाशामध्यें शिरून त्यांचा लय होतो. आतां जे मोक्षाकडे लागले असतात त्यांना आकाशापासून फिरून ह्या जगामध्यें यावें न लागतां ब्रह्माशीं ते मिळून जातात. हें ब्रह्म ऊष्ण नाहीं, शीत नाहीं, मृदु नाहीं, तीक्ष्ण नाहीं, आंबट नाहीं, कषाय नाहीं, गोड नाहीं किंवा तिखट नाहीं. याला शब्द नाहीं, गंध नाहीं, रूप नाहीं व स्वभाव नाहीं. शरीराला स्पर्श कळतो, जिभेला चव कळते, नाकाला वास कळतो, कानाला शब्द कळतो. व डोळ्यांना रूप कळतें, परंतु त्याच्या पलीकडे जें असे तें ज्यांना अध्यात्म ज्ञान झाल नाहीं त्यांना दिसत नाहीं. जिभेला रसापासून, नाकाला गंधापासून, कानांला शब्दापासून, त्वचेला स्पर्शापासून व

डोळ्यांला रूपापासून परतवून घेतल्यानें मनुष्याला आत्मस्वरूप दिसूं लागतें. कर्ता, कर्म, कारण, क्रिया घडणारी जागा, वेद, सुखदुःखांसंबंधी प्रवृत्ति या सर्व समुदायांचा हेतुभूत जो चिन्मात्र तोच आत्मा होय. जो सर्व व्यापून आहे व जो निरनिराळीं रूपें घेऊन सर्व कांहीं करतो, जो सर्वांचें कारण आहे, श्रेष्ठांहून जो श्रेष्ठ आहे व जो अद्वितीय आहे तोच सर्वांचें कारण असून त्या व्यतिरिक्त जें कांहीं तें सर्व कार्य समजावें. ज्याप्रमाणें मनुष्यानें केलेल्या कर्माप्रमाणें परस्परविरोधी बरीं वाईट दोन्ही प्रकारचीं फळें एकत्र राहूं शकतात, त्याचप्रमाणें जड शरीर व जडाहून वेगळें ज्ञान अशा या दोन जडाजडांचा संबंध या शरीरामध्यें आहे. ज्याप्रमाणें जळत असणारा दिवा आजूबाजूला असणाऱ्या पदार्थांवर प्रकाश पाडतो, त्याप्रमाणें या पंचेंद्रियरूपी झाडावर ज्ञानानें पेटविलेला दिवा या ज्ञानाच्या साह्यानें वस्तूवर उजेड पाडतो. ज्याप्रमाणें सल्ला देणारे राजाचे मंत्री असतात, त्याप्रमाणें ज्ञानाच्या हाताखालचीं हीं पांच इंद्रियें आहेत. ज्ञान हें त्या सर्वांहून श्रेष्ठ आहे. ज्याप्रमाणें अग्नीच्या ज्वाळा, वाऱ्याचा वेग, सूर्याचीं किरणें व पाण्याचा प्रवाह हीं जात येत असतात, त्याप्रमाणें प्राणिमात्रांच्या शरीराची स्थिति आहे. ज्याप्रमाणें हातांत कुऱ्हाड वगैरे घेऊन झाड तोडूं लागलें असतां त्यांतला धूर किंवा अग्नि दिसत नाहीं, त्याप्रमाणें देह, पोट, हात, पाय कापले असतां त्याहून निराळा जो आत्मा तो दिसत नाहीं. तेच लांकडें एकमेकांशीं घासल्यानें ज्याप्रमाणें धूर व अग्नि दिसूं लागतो, त्याप्रमाणें ज्ञानानें इंद्रियें व जीव यांचें ऐक्य केल्यानें मनुष्याला त्यांहून श्रेष्ठ असा आत्मा दिसूं लागतो. ज्याप्रमाणें स्वप्नामध्यें मनुष्य आपलें शरीर आपल्यापासून वेगळें होऊन पृथ्वीवर पडलेलें पाहतो, त्याप्रमाणेंच दशेंद्रियें, पंच प्राण, मन व बुद्धि यांनीं युक्त असा जीव मरणानंतर आपलें शरीर याप्रमाणें वेगळें पहात दुसऱ्या शरीरामध्यें शिरतो. आत्म्याला जन्म, वाढ, नाश किंवा मरण नाहीं. तरी अज्ञानामुळें अदृश्य रीतीनें हा एक शरीर सोडून केल्या कर्मांचें गांठोडें बरोबर घेऊन दुसऱ्या शरीरामध्यें शिरतो. कोणालाही हा आत्मा दिसत नाहीं किंवा याला स्पर्श करतां येत नाहीं. इंद्रियांकडून हा कांहीं कार्य साधीत नाहीं. इंद्रियांना तो दिसत नाहीं, तथापि तो त्या सर्वांना पाहतो ज्याप्रमाणें विस्तवामध्यें ठेवलेल्या एखाद्या वस्तूवर त्याच्या प्रकाशानें व ऊष्णतेनें तो तो रंग दिसतो, त्याप्रमाणें हा ज्या ज्या शरीरांत शिरतो त्या त्या शरीराचा वर्ण यावर उमटतो आणि हा पंचभूतात्मक एक देह सोडून दुसऱ्यांत शिरतांना त्या त्या पंच महाभूतांमध्यें आपल्याला मिळवून घेतो. याच्या सभोंवतीं असलेल्या आकाश, वायु, अग्नि, पाणी व पृथ्वी यांमध्यें तो अशा रीतीनें शिरतो कीं, त्यांच्या सूक्ष्म शरीरांतील प्रत्येक तत्त्व त्या त्या तत्त्वाशीं मिळून जातें व तीं तीं कामें करणारीं निरनिराळीं श्रोत्रादि इंद्रियें आपापल्या शब्दादि गुणांचा आश्रय करतात. कानाची उत्पत्ति आकाशापासून असल्यामुळें तो शब्द गुणाचा आश्रय करतो. नाकाची उत्पत्ति पृथ्वीपासून असल्यामुळें तें गंधाचा आश्रय करतें. डोळ्यांची उत्पति तेजापासून असल्यामुळें ते तेजोमय रूपाचा आश्रय करतात. जिभेची उत्पत्ति जलापासून असल्यानें ती रसाचा आश्रय करते. त्वचेची उत्पत्ति वायूपासून असल्यामुळें ती स्पर्शाचा आश्रय करते. याप्रमाणें पंचेंद्रियें आपापल्या कर्माप्रमाणें शब्दादि पंच गुणांचा आश्रय करून राहतात. याप्रमाणें शब्दादि पांच गुण पंचतत्त्वांमध्यें मिळून राहतात. हीं पांच तत्त्वें व हीं पंचमहाभूतें मनाच्या मागून असतात, मन बुद्धीच्या मागून असतें व बुद्धि आत्म्याच्यामागून असते. कर्ता या आपल्या नवीन शरीरामध्यें पूर्व जन्मामधून केलेल्या बऱ्यावाईट कर्मांचें गांठोडें बरोबर घेऊन येतो व अनुकूल अशा पाण्याच्या प्रवाहाबरोबर वहात जाणाऱ्या जलचर प्राण्याप्रमाणें हीं बरींवाईट कृत्यें मनाच्यामागून असतात. ज्याप्रमाणें नावेंत बसून चाललेल्या मनुष्याला किनाऱ्यावरचीं झाडें उलट चाललेलीं दिसतात, किंवा सूक्ष्म वस्तु दुर्बिणींतून मोठी दिसते, किंवा मनुष्याला आपलें तोंड आरशामधून दिसूं शकतें, त्याप्रमाणें हा आत्मा सूक्ष्म व अदृश्य आहे तरी अज्ञानकल्पित बुद्धीच्या योगानें तो उलट पंचमहाभूतात्मक व दृश्य भासूं लागतो.

इंद्रियांच्या साहाय्यानें पुष्कळ दिवसांनीं मागच्या गोष्टी मनाला स्मरतात, हीं इंद्रियें जेव्हां बु-

द्धीमध्यें लीन होतात तेव्हां आत्मा बुद्धीरूपामध्यें आपल्या पूर्व स्वभावांत प्रकट होतो. हा जीव निरनिराळ्या वेळीं व निरनिराळ्या ठिकाणीं घडलेल्या गोष्टी व पाहिलेल्या वस्तू अव्यवस्थित रीतीनें एकत्र पाहूं शकतो. यावरून इंद्रियें व शरीर यांहून वेगळा व स्वतंत्र असा तो फिरत आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. जागृति, स्वप्न, सुषुप्ति यांमध्यें सत्व, रज व तम या त्रिगुणात्मक सुखदुःखांचें या जीवाला ज्ञान असतें; परंतु तो त्याचा अनुभव घेत नाहीं. तो मुकाट्यानें प्रत्येक गोष्ट पहात असतो. वारा ज्याप्रमाणें लांकडांतील अग्नीमध्यें शिरतो त्याप्रमाणें हा आत्मा इंद्रियामध्यें शिरतो. हा गुणरहित असल्यानें मनुष्याला डोळ्यानें याचें रूप दिसत नाहीं, स्पर्शेंद्रियानें याचा स्पर्श कळत नाहीं व कानानें तो ऐकूं येत नाहीं. व श्रुतीच्या योगानें जेव्हां एखाद्या इंद्रियाला याचें स्वरूप दिसूं लागतें तेव्हां त्या इंद्रियाचें स्वतंत्र अस्तित्वच नाहींसें होतें. या श्रोत्रादि इंद्रियांना आपापलीं स्वरूपें सुद्धां दिसत नाहींत. आत्मा मात्र सर्वज्ञ व सर्व पहाणारा असून त्याला हें सर्व दिसतें. ज्याप्रमाणें हिमाचलाचा किंवा **चंद्राचा मागचा भाग कोणीं पाहिला नाहीं** म्हणून तो नाहीं असा नाहीं, त्याप्रमाणें सर्व भूतमात्रांच्या ठिकाणीं असणारा सूक्ष्म व ज्ञानस्वरूपी आत्मा डोळ्यांना कधीं दिसला नाहीं म्हणून तो नाहीं असें म्हणतां येत नाहीं. **पृथ्वीचें प्रतिबिंब कलंक रूपानें चंद्रावर दिसत असून** ती पृथ्वी आहे हें ज्याप्रमाणें कळत नाहीं, त्याप्रमाणें आत्म्याचें ज्ञान आहे. तें दुसऱ्या कशामुळें होत नसून स्वतंत्रच झालें पाहिजे. ज्याप्रमाणें उगवण्याच्या पूर्वीचें व नाश झाल्यावरचें झाडाचें स्वरूप किंवा सूर्याची गति यांचें अनुमान शहाणे लोक बुद्धीनें करतात, त्याप्रमाणें ज्ञानरूपी दिव्यानें दुर्लक्ष्य अशा ज्ञानस्वरूपी ब्रह्माचें ज्ञान शहाणे लोक अनुमानानेंच करतात. यत्न केल्याशिवाय कांहीं साधत नाहीं. जाळ्यांच्या योगानें धीवर लोक मासे धरतात, मृगांच्या योगानें मृग धरतात, पक्ष्यांच्या योगानें पक्षी धरतात, हत्तींकडून हत्ती धरतात, त्याप्रमाणें ज्ञानाच्या योगानें आत्म्याचें ज्ञान होतें. सापाचीं पावलें सापालाच ओळखतात असें ह्मणतात; त्याचप्रमाणें शरीरामध्यें सूक्ष्म रीतीनें असणारा आत्मा ज्ञानानेंच दिसतो. इंद्रियांना ज्याप्रमाणें इंद्रियें दिसत नाहींत, त्याप्रमाणें बुद्धीला आत्मा दिसत नाहीं. अमावास्येच्या दिवशीं चंद्राचें स्वरूप सूर्यामध्यें झांकून गेल्यानें तो दिसत नाहीं ह्मणून त्याचा नाश झाला असें होत नाहीं, तीच स्थिति आत्म्याची आहे. स्थूल देह नाहींसा झाल्यामुळें ज्याप्रमाणें अमावास्येला चंद्र दिसत नाहीं, त्याप्रमाणें या देहाला सोडल्यावर जीव दिसत नाहीं; परंतु आकाशांत निराळ्या ठिकाणीं उगवलेला चंद्र ज्याप्रमाणें फिरून झळकूं लागतो, त्याप्रमाणें दुसऱ्या शरीरामध्यें गेल्यावर हा आत्मा फिरून दिसूं लागतो. जन्म, वृद्धि व क्षय हे गुण देहामध्यें दिसत असून आत्म्याशीं यांचा कांहीं वास्तविक संबंध नाहीं. ज्याप्रमाणें अमावास्येनंतर दिसणारा चंद्र तोच पूर्वीचा असें ज्ञान असतें, त्याप्रमाणें जन्म, वृद्धि व क्षय यांमध्यें फरक पडत असतांही तोच हा आत्मा असें अनुमान होतें. राहू हा चंद्राकडे जातांना किंवा त्याला सोडतांना दिसत नाहीं, त्याचप्रमाणें हा जीव देहाला सोडतांना किंवा देहामध्यें शिरतांना दिसत नाहीं; परंतु तोच राहू चंद्राला शिवला असतां राहू असा दिसूं लागतो, त्याप्रमाणें या आत्म्याचा शरीराशीं संबंध जडला असतां तो आत्मा म्हणून दिसूं लागतो. ज्याप्रमाणें चंद्रसूर्यांला सोडल्यावर राहू दिसत नाहीं, त्याप्रमाणें आत्मा शरीराला सोडल्यावर दिसत नाहीं. ज्याप्रमाणें अमावास्येच्या दिवशीं सुद्धां चंद्र आपल्या नक्षत्रांना बरोबर घेऊन असतो, त्याप्रमाणें आत्म्यानें शरीराला सोडलें तरी तो आपलें कर्माचें गांठोडें बरोबर घेऊन असतो.

स्वप्नामध्य हें स्थूल शरीर स्वस्थ पडून असून सूक्ष्म शरीर फिरत असतें. हीच संसाराची गोष्ट आहे. ह्मणजे एक शरीर सोडलें तरी दुसरें शरीर धारण करणें यासच संसार म्हणतात व सुषुप्तीमध्यें ज्ञान या सूक्ष्माला सोडून वेगळें असतें. याप्रमाणें मोक्ष आहे. ह्मणजे शरीररहित असणें यासच मोक्ष म्हणतात. ज्याप्रमाणें पाणी स्वच्छ असतां त्यामध्यें स्वरूप दिसत व तें खळबळलें असतां त्यांत रूप दिसत नाहीं, त्याचप्रमाणें शुद्ध अशा बुद्धीला आत्मा दिसतो; परंतु इंद्रिय विकार पावलीं असतां बुद्धीला तो दि-

सेनासा होतो. अज्ञानाच्या योगानें मोह उत्पन्न होतो, मोहानें मन दूषित होतें व मन दूषित झाल्यानें त्यावर अवलंबून असणारीं पंचेंद्रियेंही कलुषित होतात. अज्ञानामध्येंच समाधान पावून विषयांमध्यें गढलेल्या मनुष्याचें कधीं समाधान होत नाहीं. आपापल्या प्राक्तन कर्माप्रमाणें विषयांचा उपभोग घेण्यासाठीं हा आत्मा फिरून जन्म घेतो. पापानें मनुष्याची तृषा शांत होत नाहीं. जेव्हां हें पाप नाहींसें होतें तेव्हां ही तृषा दूर होते. विषयांचा संबंध जडून त्यांच्याशीं आपल्याला कायम जखडून घेतल्यानें मनामध्यें भलत्याच वासना उत्पन्न होऊन ब्रह्म लाधत नाहीं. पापकर्मांचा क्षय झाल्यानेंच मनुष्यांना ज्ञान उत्पन्न होतें व स्वच्छ अशा आरशाप्रमाणें आपल्या ठिकाणीं तो आत्म्याला पाहूं लागतो. इंद्रियांना पसरूं दिल्यानें मनुष्य दुःखी होतो व त्यांना आवरून धरल्यानें मनुष्य सुखी होतो. म्हणून इंद्रियें शब्दादि विषयांपासून आवरून धरावीं. इंद्रियांच्या वरचें मन, मनाच्या वरची बुद्धि, बुद्धीच्या वरचा आत्मा व आत्म्याच्या वरचें महत् अशी ही पायरी आहे. अव्यक्तापासून आत्मा, आत्म्यापासून बुद्धि, बुद्धीपासून मन, उत्पन्न झालें असून हें मन या इंद्रियांच्या साहाय्यानें शब्दादि विषय योग्य रीतीनें पाहूं लागतें. स्थूल, सूक्ष्म व कारण या तीन देहांचा त्याग करून मनुष्य कैवल्याचा उपभोग घेतो. ज्याप्रमाणें सूर्य उगवतांना आपलीं किरणें चोहोंकडे पसरतो व अस्ताला जावयाचे वेळीं तीं फिरून आपल्या ठिकाणीं संकुचित करून घेतो, त्याप्रमाणें शरीरामध्यें असणारा आत्मा शरीरामध्यें शिरून सर्व इंद्रियांमध्यें आपलीं किरणें पसरून देतो, व शरीर सोडतेवेळीं पंचेंद्रियांचे रूपादि गुण आवरून घेतो. याच्या कर्मानें तयार करून ठेवलेल्या मार्गाला फिरून फिरून लागून प्रवृत्तिमार्गामुळें मिळालेलें प्राक्तन कर्माचें फल हा भोगीत रहातो. विषयोपभोग घ्यावयाचे नाहींत अशा निश्चयानें मनुष्याचे विषय दूर होतात; परंतु वासना दूर होत नाहीं. परंतु आत्म्याला पाहूं लागल्यानें त्याच्या वासनाही पुढें नाहींशा होतात. विषयांवर आसक्ति न ठेवतां ज्यावेळीं बुद्धि मनाच्या ठिकाणीं स्थिर होते, त्या वेळीं ब्रह्माच्या ठिकाणीं लागलेल्या मनामुळें त्याला ब्रह्मप्राप्ति होते. ब्रह्म हें स्पर्शानें, शब्दानें, गोडीनें, दृष्टीनें किंवा वासानें जाणण्याजोगें नाहीं. किंवा तर्कानें सुद्धां तें कळण्याजोगें नाहीं. सर्व विषयांपासून काढून घेतलेल्या बुद्धीलाच तें कळण्याजोगें आहे. सर्व विषयांचा मनाच्या ठिकाणीं, मनाचा बुद्धीच्या ठिकाणीं व बुद्धीचा जीवात्म्याच्या ठिकाणीं व त्याचा ब्रह्माचे ठिकाणीं लय होतो. मनाचें कार्य इंद्रियांना साधतां येत नाहीं. मनाला बुद्धीची उमग पडत नाहीं व बुद्धीला आत्म्याची उमग पडत नाहीं; परंतु हा सूक्ष्म आत्मा मात्र सर्वांना पहातो.

शारीरिक किंवा मानसिक दुःखामुळें मनुष्याच्या हातून आत्मप्राप्तीचा प्रयत्न होत नाहीं म्हणून मनुष्यानें त्या दुःखासंबंधी विचारच करीत राहूं नये. **दुःखासंबंधी विचार न करणें हेंच त्यावर उत्तम औषध आहे.** त्याच्यावर विचार करीत राहिल्यानें तें फिरून फिरून वाढत रहातें. बुद्धीच्या योगानें मानसिक दुःख व औषधांनीं शारीरिक दुःख दूर करावें. ज्ञानाचें सामर्थ्य हें आहे. मूर्खांच्या जोडीला जाऊन मिळूं नये. तारुण्य, रूप, आयुष्य, द्रव्यसंचय, आरोग्य, प्रियसंवास या गोष्टी अशाश्वत असल्यानें शहाण्यानें त्यांवर लोभ ठेवूं नये. **सर्व देशावरच्या दुःखासंबंधानें एकट्यानें शोक करूं नये. शोक न करतां प्रतिकाराचा कांहीं उपाय दिसत असेल तर तो करावा.** या आयुष्यामध्यें सुखाहून दुःखच फार आहे. इंद्रियविषयांच्या ठिकाणीं प्रेम जडल्यानें मूर्खपणानें मरण बरें वाटत नाहीं. जो सुख व दुःख दोन्ही सोडतो त्याला खात्रीनें ब्रह्म मिळतें. या जगामध्यें पैशाबरोबर दुःख लागलें असून त्याचें रक्षण करण्यामध्यें दुःख आहे. व तो मोठ्या कष्टानें मिळतो. म्हणून त्याचा नाश झाला असतां त्यासंबंधी विचार करूं नये. ब्रह्मस्वरूपी ज्ञान निरनिराळ्या दृश्य वस्तूंमध्यें आहे. आणि म्हणूनच ह्या ज्ञानाचा मन हा धर्म समजला गेला आहे. जेव्हां हें मन या ज्ञानेंद्रियांनीं युक्त होतें तेव्हां बुद्धि विषयाकार होते. जेव्हां ही बुद्धि विषयांपासून निघून मनाकडे लागते तेव्हांच ध्यानसमाधीनें ब्रह्माची ओळख पटते. पर्वतापासून वहाणाऱ्या झऱ्याप्रमाणें अज्ञानापासून निघालेली ही इं-

द्रियांकडे लागलेली बुद्धि बाह्य विषयांकडे धांव घेते. जेव्हां हिचा मनामध्यें लय होऊन निर्गुणाच्या ध्यानामध्यें ही गढते, तेव्हां कसाच्या धोंड्यावरील सोन्याच्या रेघेप्रमाणें ब्रह्माच्या ज्ञानाचा हिच्यावर प्रकाश पडतो. इंद्रियविषय दाखविणारें हें मन प्रथम त्या विषयांपासून काढून घेतलें पाहिजे. प्रत्यक्ष विषयाची अपेक्षा धरणाऱ्या मनाला निर्गुण ब्रह्म दाखवितां येणार नाहीं. सर्व इंद्रियरूपी द्वारें बंद करून बुद्धीचा एकाग्रतेनें मनाकडे लय केला असतां ब्रह्मप्राप्ति होते. जेव्हां इंद्रियविषय नाहींसे झाले असतां पंचमहाभूतात्मक इंद्रियें त्या विषयांपासून परतून तन्मात्रांमध्यें लय पावतात, तेव्हां बुद्धि या इंद्रियांसह मनामध्यें राहूं लागते व निश्चयपूर्वक आंतल्या आंत याप्रमाणें ती गढली असतां मनाशीं तादात्म्य पावते. ज्या वेळेला ध्यानानें श्रेष्ठत्व पावलेलें हें मन इंद्रिय विषयांसह त्रिगुणात्मक मूलप्रकृतीस मिळून तिलाही सोडतें, तेव्हां तें निर्गुण ब्रह्मस्वरूपाला मिळतें. अव्यक्त अशा ब्रह्माचें दृष्टान्तानें बरोबर ज्ञान करून देतां येत नाहीं. ज्याच्यासंबंधानें कांहीं सांगतांच येत नाहीं, अशाला प्रत्यक्षपणानें कसें दाखवून देतां येणार ? तपानें, अनुमानानें, शमदमादिकांनीं आपापल्या जातीच्या स्वधर्मानें, वेदश्रवण केल्यानें शुद्ध अंतःकरण करून घेऊन ब्रह्माचें ज्ञान करून घेतलें पाहिजे. विषयांपासून मुक्त झालेले तत्त्वदर्शी लोक आत्म्याला आपल्या ठिकाणींच पाहूं लागतात; एवढेंच नव्हे, तर सर्व बाह्य वस्तूंमध्यें सुद्धां ते त्याला पाहूं लागतात. हें ज्ञेयसंज्ञक ब्रह्म निर्गुण असून आधींचें असल्यानें तर्काच्या पलीकडे आहे. विषयांपासून मन काढून घेतल्यानें ब्रह्मप्राप्ति होते व विषयांकडे तें लावल्यानें तें त्या विषयांकडेसच परततें. गुणांमध्यें फिरत राहणाऱ्या बुद्धीची लांकडामध्यें असणाऱ्या अग्नीप्रमाणें स्थिति असते. ज्याप्रमाणें सुषुप्तीमध्यें इंद्रियें आपापल्या कर्मांपासून मोकळीं असतात, त्याप्रमाणें सर्व गुणांपासून मुक्त असें श्रेष्ठ ब्रह्म प्रकृतीच्या पलीकडे आहे. सर्व प्राणिमात्र गुणधर्मांकडे प्रवृत्ति ठेवल्यानें प्रवृत्तिमार्गाकडे लागतात व गुणांतून मन काढून घेतल्यानें निवृत्तिमार्गाला लागतात. जीव, प्रकृति, बुद्धि, विषय, इंद्रियें, अहंकार व अभिमान या सर्वांना भूतसमूह ह्मटलें आहे. ह्या सृष्टीची मूळ उत्पत्ति प्रधान पुरुषापासून झाली असून पुढील उत्पत्ति स्त्रीपुरुषांच्या संबंधापासून आहे. ही दुसऱ्या प्रकारची उत्पत्ति पंचमहाभूतांखेरीज बाकी सर्वांना लागू असून सजातीय मिथुनापासून त्या त्या जातीची उत्पत्ति व्हावयाची, या सृष्टिनियमानें ती नियंत्रित आहे. धर्मापासून कल्याण होतें व अधर्मापासून अकल्याण होतें. वासनेशीं जेव्हां मनुष्य स्वतःला जखडून घेतो, तेव्हां तो जन्ममरणाच्या फेऱ्यांत पडतो व विरक्त झाल्यानें त्याला ब्रह्मज्ञान होतें.

जेव्हां पंचेंद्रियात्मक विषय, पंचेंद्रियें व मन ह्यांच्याशीं मिळून जातात, तेव्हां रत्नामध्यें ओंवलेल्या सूत्राप्रमाणें ब्रह्म त्यांमध्यें झळकूं लागतें. ज्याप्रमाणें एकच सूत्र सोन्यामधून, मोत्यांमधून, पोंवळ्यांमधून किंवा मातीच्या वस्तूंमधून असतें, त्याप्रमाणें हा आत्मा घोडा, मनुष्य, हत्ती, पशु, किडे, पक्षी या सर्वांशीं आपापल्या कर्मांप्रमाणें स्वतःचा संबंध जडवून घेतो. हा ज्या ज्या शरीरांमध्यें जें जें कर्म करतो त्या त्या शरीरांमध्यें तें तें फळ भोगतो. ज्याप्रमाणें एक जातीची जमीन निरनिराळ्या झाडांप्रमाणें त्यांना पोषक द्रव्य देतें, त्याप्रमाणें हा साक्षीभूत आत्मा बुद्धीला त्या त्या कर्माप्रमाणें ठेवतो. ज्ञानापासून इच्छा उत्पन्न होते. इच्छेपासून त्यावर आसक्ति जडते, आसक्तीपासून कर्म होतें व कर्मापासून फळ मिळतें. ह्मणून फळ हें कर्मावर अवलंबून असून कर्म बुद्धीवर अवलंबून आहे. बुद्धि ज्ञानावर अवलंबून असून ज्ञान हें ब्रह्मावर अवलंबून आहे. ज्ञान, फल, बुद्धि व कर्म या सर्वांचा नाश झाल्यावर जें उत्तम फळ मिळतें तें श्रेष्ठ ब्रह्मज्ञान होय. श्रेष्ठ ब्रह्म फार मोठें असून योग्यांनाच तें लाधतें. गुणाकडे बुद्धि लावलेल्या मूर्खांना आपल्याच ठिकाणीं असणारें तें ब्रह्म दिसत नाहीं. पृथ्वीहून पाण्याचा विस्तार मोठा आहे, तेजाचा पाण्याहून अधिक आहे, वायूचा तेजाहून अधिक आहे व आकाशाचा वायूहून अधिक आहे; मन आकाशाहून मोठें आहे व बुद्धि मनाहून मोठी आहे. काल हा बुद्धीहूनही मोठा असून ज्या भगवान विष्णूचें हें सर्व जग आहे, तो काळाहूनही श्रेष्ठ आहे. या देवाला आदि नाहीं,

मध्य नाहीं किंवा अंतही नाहीं; ह्मणूनच हा अव्यय आहे. तो सर्व दुःखांच्या पलीकडे आहे; कारण दुःखाला शेवट आहे. तो विष्णूच श्रेष्ठ ब्रह्म असून तोच सर्व श्रेष्ठांहून श्रेष्ठ आहे. शहाणे लोक त्याला ओळखून कालाच्या सपाट्यांतून चुकून मोक्ष मिळवितात. या सर्व जगांतील वस्तू गुणधर्मामुळें दिसतात. ब्रह्म हें निर्गुण असल्यानें याच्याहून श्रेष्ठ आहे. निवृत्ति नांवाचा जो धर्म तोच श्रेष्ठ असून मोक्षदायक आहे. ऋक्, यजु व साम यांचा शरीराशीं संबंध असून जिभेपासून ते बाहेर पडतात. ते यत्नसाध्य आहेत व ते नाशवंत आहेत. ब्रह्म याप्रमाणें शरीरावर अवलंबून नाहीं. तें यत्नसाध्य नाहीं. त्याला आदि, मध्य व अंतही नाहीं. या ऋक्, यजु व साम यांना आदि व अंत आहे. हे ब्रह्माला नाहींत. अनादित्व व अनंतत्व यामुळें तो अनंत व अव्यय आहे व अव्यय असल्यामुळें दुःखाचा त्याला संबंध नसून सुखदुःखादि द्वंद्वें त्याला माहीत नाहींत. अदृष्टामुळें, प्रयत्न न केल्यामुळें व कर्माचा अडथळा येत असल्यामुळें ब्रह्माकडे लावणारा मार्ग मनुष्यांना दिसत नाहीं. विषयांसंबंधी आसक्ति राहिल्यानें व थोर असें स्वर्गसुख डोळ्यांपुढें राहिल्यानें मनामध्यें भलतीच इच्छा राहून मनुष्य ब्रह्माला मुकतो. कांहीं लोकांना जे जे विषय येथें दिसतात ते ते त्यांना हवेसे वाटतात व विषयाच्या मागें लागलेले हे विषयापलीकडचें जें ब्रह्म त्याची इच्छाच मुळीं करीत नाहींत. या हलक्या प्रतीच्या गुणाकडे लागलेल्या मनुष्याला उच्च प्रतीच्या गुणांनीं युक्त अशा या ब्रह्माचें ज्ञान व्हावें तरी कसें? अनुमानानें गुणांच्या व अवयवांच्या पलीकडच्या या ब्रह्माचें ज्ञान करून घेतलें पाहिजे. सूक्ष्म अशा मनानेंच तें ओळखतां येणारें आहे. शब्दांनीं त्याचें वर्णन देतां येणें शक्य नाहीं. सूक्ष्म मनानेंच स्थूलमन व अंतर्दृष्टीनेंच बाह्य दृग्गोचर विषय आवरले पाहिजेत. ज्ञानाच्या योगानें बुद्धि व बुद्धीनें मन शुद्ध करून मनाच्या योगानें इंद्रियें आवरल्यानें मनुष्याला ब्रह्मप्राप्ति होते. विचारानें विषयांपासून मुक्त झाल्यानें निर्गुण व वासनारहित अशा ब्रह्माची प्राप्ति होत असून लांकडामध्यें असणाऱ्या अग्नीपासून वारा ज्याप्रमाणें अलग असतो, त्याप्रमाणें विषयवासनेनें अस्वस्थ झालेले लोक ब्रह्मापासून अलग राहतात. सर्व विषय आपल्या ठिकाणीं नाहींसे केले असतां बुद्धीच्या पलीकडचें जें निर्गुण ब्रह्म त्याच्या प्राप्तीला मन पात्र होतें. तेच विषय निरनिराळ्या रीतीनें घेतले असतां बुद्धिकल्पित जें ऐश्वर्यसंपन्न विराटस्वरूपी ब्रह्म त्याची प्राप्ति होते व हाच मार्ग पुढें ठेवून सर्व विषय नाहींसे झाले असतां ब्रह्मस्वरूप प्राप्त होतें. आत्मा जरी अव्यक्त आहे तरी गुणांचें ज्या वेळीं याच्यावर पांघरूण पडतें, तेव्हां याचीं रूपें व्यक्त दिसूं लागतात व देहनाश झाला असतां तीं फिरून अव्यक्त होतात. आत्मा खरोखर अचल असून सुखदुःख उत्पन्न करणाऱ्या इंद्रियांशीं संबंध जोडून घेऊन तो राहिला आहे. देह व इंद्रियें यांच्याशीं संबंध जडवून घेऊन पंचमहाभूतांमध्यें तो मिळून राहिला आहे. परंतु या अव्यय व श्रेष्ठ ब्रह्माकडून त्याचें सामर्थ्य काढून घेतल्यामुळें त्याची हालचाल बंद पडते. या पृथ्वीचा नाश कोणीं पाहिला नाहीं, परंतु तो खात्रीनें होणारा आहे. समुद्रामध्यें झोले खाणारी नाव ज्याप्रमाणें अखेरीला सुरक्षितपणें किनाऱ्याला जाऊन लागते, त्याप्रमाणें या जगांत विषयांनीं गडबडून गेलेले लोक अखेरीला खात्रीनें या अखेरच्या आश्रयाला जाऊन मिळणार आहेत. सूर्य आपलीं किरणें बाहेर टाकून जगाला प्रकाश देतो व मावळतांना तीं काढून घेऊन आपल्यामधला पूर्वीचा प्रकाशाचा गुण नाहींसा करतो, त्याचप्रमाणें सर्व भेद सोडून तपानें मनुष्य शेवटीं अविनाशी व निर्गुण अशा ब्रह्मामध्यें शिरतो. ज्याला जन्म नाहीं, जो पुण्यवानांचा मोठा आधार आहे, जो स्वयंभु आहे, ज्याच्यापासून सर्व उत्पन्न झालें असून ज्याच्यामध्यें फिरून त्याचा लय होणार आहे, जो अव्यय आहे, ज्याला आदि, अंत व मध्य नाहीं, अशा या सनातन परमात्म्याला नीट ओळखल्यानें मनुष्य मोक्षाला जातो.'

---

### १६९ श्रीकृष्णपरमात्म्याचें प्रभुत्व.

### ( १२. २०७–२०९ )

युधिष्ठिर ह्मणाला, 'तात, जो या सृष्टीचा कर्ता असून ज्याला करणारा कोणी नाहीं, ज्याचें तेज

मोठें असून ज्यानें पूर्वी महत्कृत्य केलें आहे, त्यानें कोणत्या कामासाठीं हलक्या योनीमध्यें जन्म घेतला व पूर्वी या प्रजांचे स्वामी कोण होते त्याचप्रमाणें प्रत्येक दिशेला कोण कोण ऋषी आहेत हें मला सांगा.' हें ऐकून भीष्म ह्मणाले, 'भगवान श्रीकृष्ण सर्वांचा प्रभु असून या महात्म्यानें पूर्वी जीं जीं कर्में केलीं तीं सांगतों ऐक. प्रथम यानें पंचमहाभूतें उत्पन्न करून ही पृथ्वी निर्माण केल्यावर या तेजोमय पुरुषश्रेष्ठानें पाण्यावर शयन केलें. पुढें प्रथम यानें मनासह अहंकाराला उत्पन्न केलें. हा उत्पन्न झालेल्या व होणाऱ्या अशा सर्व प्राणिमात्रांना आधार आहे. हा प्रगट झाला असतां याच्या नाभिकमलापासून सूर्यासारखें देदीप्यमान कमल उत्पन्न झालें. त्या कमलावर सर्व दिशांना प्रकाशमान करणारे सर्व भूतमात्रांचे पितामह उत्पन्न झाले. त्यानंतर तमोगुणाचें कार्यभूत मधु नांवाचा मोठा असुर उत्पन्न झाला. उग्र कर्म करण्याकडे प्रवृत्ति असणाऱ्या त्याला ब्रह्मदेवांचें कल्याण करण्यासाठीं या परमात्म्यानें मारलें. त्यामुळें योग्यांमध्यें श्रेष्ठ अशा या पुरुषर्षभाला मधुसूदन हें नांव मिळालें. मरीचि, अत्रि, अंगिरा, पुलस्त्य, पुलह, क्रतु व दक्ष असे सात मुलगे ब्रह्मदेवांना झाले. या मरीचींनीं कश्यप नांवाच्या तेजस्वी मुलाला संकल्पानें उत्पन्न केलें. ब्रह्मदेवांनीं अंगठ्यापासून मरीचींच्याही पूर्वी दक्ष प्रजापतींना उत्पन्न केलें. यांना प्रथम तेरा मुली झाल्या. या दक्षप्रजापतींच्या तेरा मुलींमध्यें दिति वडील होती. मरीचींचे पुत्र जे सर्व धर्मांमधील कमी अधिक भेद जाणणारे महायशस्वी कश्यप ते या सर्वांचे पती झाले. पुढें दक्षांनीं आणखी दहा मुली उत्पन्न करून त्या त्यांनीं धर्माला दिल्या. धर्माला वसु, रुद्र, विश्वेदेव, साध्य व मरुत्वान हे मुलगे झाले. या दहा मुलींहून ज्या धाकट्या सत्तावीस मुली त्या दक्षांनीं सोमाला दिल्या. यांपासून गंधर्व, घोडे, गाई, किंपुरुष, मासे, झाडें व वनस्पती उत्पन्न झाल्या. अदितीपासून देवांमध्यें श्रेष्ठ आदित्य उत्पन्न झाले. त्यामध्यें विष्णूंनीं वामनरूप घेऊन आपल्या पराक्रमानें देवांचें वैभव वाढविलें व दानवांचा पराभव केला. दनूपासून दितीला विप्रचित्ती वगैरे असुर झाले. या मधुसूदनानें दिवस, रात्र, काल, ऋतु, दिवसाचा पूर्वभाग व अपरभाग निर्माण करून ध्यानानें मेघ, सर्व स्थावरजंगम पृथ्वी व विश्व निर्माण केलें. या महाभाग श्रीकृष्णानें नंतर आपल्या मुखापासून शंभर ब्राह्मण, बाहूंपासून शंभर क्षत्रिय, मांड्यांपासून शंभर वैश्य व पायांपासून शंभर शूद्र उत्पन्न केले. याप्रमाणें चार वर्ण उत्पन्न करून ब्रह्मदेवांना त्यांचे स्वामी व शास्ते केले. ह्या ब्रह्मदेवांनीं वेदांचे अर्थ स्पष्ट केले. व या कृष्णानें विरूपाक्ष ब्रह्मदेवांना भूतमात्र व मातृगण यांचे स्वामी केले. पितर व पापी यांना शासन करण्यासाठीं यमाला निर्माण केलें, त्याचप्रमाणें सर्व संपत्तीचा स्वामी कुबेर निर्माण केला, पाण्याचा व जलचर प्राण्यांचा स्वामी वरुण उत्पन्न केला. पुढें इंद्राला सर्व देवांचा स्वामी केला. यावेळीं मनुष्यांना वाटेल तितके दिवस देह धरून रहातां येत असून यमाची त्यांना बिलकुल भीति नव्हती. मैथुनसंबंध तेवेळीं मुळींच घडत नसून केवळ संकल्पानेंच संतति उत्पन्न होत होती. पुढें त्रेतायुगामध्यें एकमेकांच्या स्पर्शापासून प्रजा उत्पन्न होऊं लागली. मैथुनसंबंध त्यांनाही ठाऊक नव्हता. द्वापारामध्यें हा मैथुनसंबंध होऊं लागून कलियुगामध्यें जोडप्यांचा संबंध होऊं लागला. हा परमात्मा सर्व भूतमात्रांचा स्वामी आहे. दक्षिणेकडे जन्मणारे सर्व आंध्रक, गुह, पुलिंद, शबर, चूचुक, मद्रक त्याचप्रमाणें उत्तरेकडे जन्मणारे यौवन, कांबोज, गांधार, किरात व बर्बर या जातींचे सर्व लोक नरकाचें साधन करणारे पापी असून चांडाळ, कावळे, गिधाडें याप्रमाणें यांचें वर्तन आहे. हे कृतयुगामध्यें पृथ्वीवर मुळीं नव्हते. त्रेतायुगापासून हे उत्पन्न होऊन वाढूं लागले. त्रेता व द्वापार यांच्या मधल्या मोठ्या दुष्काळाच्या भयंकर काळींच क्षत्रिय एकमेकांशीं भिडून लढूं लागले. याप्रमाणें उत्पन्न झालेल्या या श्रीकृष्णाला प्रत्यक्ष नारदांनींसुद्धां श्रेष्ठ समजून त्याचें पुराणत्व कबूल केलें आहे.

आतां प्रजांचे स्वामी निरनिराळ्या दिशेला असणारे महर्षी सांगतों ऐक. पूर्वी एकटे स्वयंभु ब्रह्मदेव झाले असून मरीचि, अत्रि, अंगिरा, पुलस्त्य, पुलह, क्रतु व वसिष्ठ हे त्यांच्याच तोडीचे सात स्वयंभु प्रजापती निर्माण झाले. अत्रींच्या वंशामध्यें

भगवान प्राचीनबर्हि उत्पन्न झाले. त्यांपासून दहा प्राचेतस उत्पन्न झाले. या दहा प्राचेतसांमध्यें दक्ष नांवाचा एक मुलगा होता. या दक्षांना दक्ष व क अशीं दोन नांवें आहेत. मरीचींचे मुलगे जे कश्यप यांनाही अरिष्टनेमी व कश्यप अशीं दोन नांवें आहेत. अत्रींना मांडीपासून सोम नांवाचा एक मुलगा झाला. त्यांनीं हजार दिव्ययुगेंपर्यंत तप केलें. भगवान अर्यमा व त्याचे मुलगे हे सर्व पृथ्वीला आज्ञा करणारे असून सर्व भुवनांचे उत्पादक होते. शशबिंदूला हजार बायका असून त्या प्रत्येकीला हजार मुलगे झाले. त्याप्रमाणें या दशलक्षांपैकीं प्रत्येक आपल्यावांचून दुसऱ्या कोणाला प्रजापती समजेनात. पुढें झालेल्या प्रजांना शशबिंदूची प्रजा समजली आहे. हिच्यांतच वृष्णीच्या थोर वंशाची उत्पत्ति समजली आहे. भग, अंश, अर्यमा, मित्र, वरुण, सविता, धाता, विवस्वान, त्वष्टा, पूषा, इंद्र व विष्णू हे कश्यपांपासून झालेले देवांमधले बारा आदित्य समजले आहेत. नासत्य व दस्त्र हे दोन अश्विनीकुमार, मार्तंडाचे मुलगे आहेत. त्वष्ट्याच्या मुलांपैकीं विश्वरूप, अजैकपाद, अहिर्बुध्न्य, विरूपाक्ष, रैवत, हर, बहुरूप, त्र्यंबक, सावित्र, जयंत, पिनाकी हे मुलगे होते. अष्ट वसु पूर्वींच सांगितले आहेत. हे प्रजापती मनूच्या वेळीं देव समजले जात. सिद्ध व साध्य यांमध्यें रूप व यौवन यावरून या निरनिराळ्या दोन जाति समजण्यांत आल्या. ऋभु व मरुत् हे देवांमधले गण आहेत. आदित्य हे क्षत्रिय समजले असून मरुत वैश्य समजले आहेत. व उग्र तपामध्यें गढलेले जे अश्विनीकुमार ते शूद्र समजले आहेत. अंगिरा ऋषींपासून झालेले देव ब्राह्मण समजले आहेत. याप्रमाणें ही देवांमधील चारी वर्णांची व्यवस्था आहे.

यवक्रीत, रैभ्य, अर्वावसु, परावसु, औशीनस, कक्षिवान व बल हे अंगीरा ऋषीचे पुत्र समजले आहेत. हे व मेधातिथीचे पुत्र कण्व व बर्हिषद हे तिन्ही लोकांना उत्पन्न करणारे ऋषी पूर्व दिशेला असतात. उन्मूच, विमुच, स्वस्त्यात्रेय, प्रमुच, इध्मवाह, दृढव्रत व मित्रावरुणांचे पुत्र अगस्त्य हे ऋषी नेहमीं दक्षिण दिशेला असतात. उषंगु, कवष, धौम्य-परिव्याध, एकत, द्वित, त्रित व अत्रिपुत्र सारस्वत हे पश्चिम दिशेला असतात. अत्रिपुत्र, वसिष्ठ, काश्यप, गौतम, भरद्वाज, विश्वामित्र, ऋचिकपुत्र जमदग्नि हे सात उत्तर दिशेला असतात. याप्रमाणें हे सर्व ऋषी या दिशांमध्यें साक्षीरूपानें आहेत.

पूर्वी ठळक ठळक असुर क्रोधलोभानें भरून जाऊन माजल्यामुळें व युद्धामध्यें आपण कोणाला हार जाणार नाहीं, असें त्यांना वाटूं लागल्यामुळें देवांचें वैभव त्यांना पहावेना. देव व देवर्षी त्यांच्याकडून गांजून निघाल्यामुळें त्यांना सुख नाहींसें होऊन ते उद्विग्न झाले. असुरांनीं व्यापून गेलेल्या पृथ्वीला त्यांचा भार सहन न होतां ती खचूं लागली. तेव्हां देव घाबरून जाऊन ब्रह्मदेवांना ह्मणाले, 'हा दैत्यांचा जुलूम आह्मांला कसा सहन होणार?' ब्रह्मदेवांनीं त्यांना उत्तर दिलें, 'मीं पूर्वींच याला उपाय करून ठेवला आहे. वर मिळाल्यानें, बलानें व मदानें डोळ्यांवर धुंदी येऊन, वराहरूपी विष्णु त्यांना दिसत नाहीं. हा विष्णु ते आहेत त्याठिकाणीं जाऊन जमिनींत शिरलेल्या त्या घोर दैत्यांना मारील.' हें ऐकून सर्व देवांना आनंद झाला, पुढें महातेजस्वी विष्णु वराहरूप घेऊन जमिनींत शिरून दैत्यांकडे गेला. तो अमानुष प्राणी पाहून काळ ओढवल्यानें त्यांच्या बुद्धीला भ्रम पडून ते मोठ्या जोरानें त्याच्यावर चालून गेले व त्यांनीं मोठ्या त्वेषानें चोहोंकडून त्याला ओढण्याला सुरवात केली. पण त्याच्यापुढें त्यांचें कांहीं चालेना. तेव्हां त्यांना आश्चर्य व भय वाटून आपले दिवस भरलेसें वाटूं लागलें. तेव्हां योगस्वरूपी व योगाचें साह्य असणाऱ्या त्या देवाधिदेवानें मोठा शब्द करून दैत्यांमध्यें खळखळ उत्पन्न करून सोडली. त्या शब्दानें सर्व लोक व दिशा दणाणून जाऊन सर्व लोकांमध्यें गडबड उडून राहिली. देवसुद्धां घाबरून गेले. सर्व जग अगदीं स्तब्ध झालें. सर्व स्थावरजंगम त्यानें मोहित झालें. त्या शब्दानें भिऊन जाऊन विष्णूच्या तेजानें मोह पडून सर्व दैत्य मरून पडले. रसातळामध्यें जाऊन त्या वराहानें त्या दैत्यांना आपल्या खुरांनीं फाडून मांस, मज्जा, व हाडें यांचा ढीग निर्माण केला. इकडे हा कसला शब्द आहे, ह्मणून देव घाबरून गेले आहेत, इतक्यांत वराहरूप घेतलेला भगवान विष्णु हें महत्कृत्य करून वर आला. मो-

ठमोठे ऋषी त्याची स्तुति करीत होते. याप्रमाणें हा भगवान सर्वांचा उत्पादक असून संहारक काळही हाच आहे; तसेंच सर्व लोकांना धारण करणारा हा आहे ह्मणून हा सर्व लोकांना वंद्य आहे.’

## १७० अध्यात्मयोग.
## ( १२. २१०–२१७)

‘ज्याच्या योगानें मोक्ष मिळेल असा श्रेष्ठ योगमार्ग सांगा,’ ह्मणून युधिष्ठिर ह्मणाला असतां भीष्मांनीं उत्तर दिलें कीं, ‘यासंबंधांत मोक्षदायक असा गुरुशिष्यांचा संवाद ऐक. कोणा एका जितेंद्रिय, तेजोराशी, ऋषिश्रेष्ठांना त्यांच्या मोठ्या बुद्धिमान शिष्यानें कल्याण करून घेण्याच्या हेतूनें त्यांचे पाय घट्ट धरून हात जोडून प्रश्न केला. तो ह्मणाला, ‘गुरुमहाराज, माझ्या शुश्रूषेनें आपण जर प्रसन्न झालां असाल तर माझी एक मोठी शंका आहे, तिचें आपण कृपा करून निरसन करा. मी कोठून आलों, आपण कोठून आलां, हें आपण मला स्पष्टपणें सांगा. त्याचप्रमाणें आपला शेवट काय आहे व सर्व प्राणिमात्रांच्या उत्पत्तीचें आदिकारण एकच असून त्यांचा जन्म व नाश यांमध्यें असा फरक कां दिसतो; त्याचप्रमाणें वेदामध्यें निरनिराळ्या जातींकरितां निरनिराळे विधि कां सांगितले आहेत; आणि स्मृतीच्या सर्व जातींना लागू अशा ज्या आज्ञा आहेत त्यांसंबंधी माहिती सांगा.’ गुरु ह्मणाले, ‘तूं हा जो प्रश्न केलास, तो वेदगुह्य अशा श्रेष्ठ अध्यात्मिक ज्ञानासंबंधानें असून सर्व वेद व शास्त्रें यांमध्यें तें ज्ञान श्रेष्ठ आहे. वासुदेवरूपी हें श्रेष्ठ ब्रह्म ह्या विश्वाचें त्याचप्रमाणें वेदाचें आदिकारण आहे, हें सत्यच यज्ञ, ज्ञान, तप, आत्मनिग्रह व धर्मस्वरूपी असून वेदवेत्ते याला सनातन विष्णु समजतात. उत्पत्ति व लय करणारें हें अव्यक्त व शाश्वत ब्रह्म असून ज्या त्या वर्णाच्या मनुष्यानें त्या त्या वर्णाच्या मनुष्याकडून याचें ज्ञान करून घेण्याजोगें हें आहे. हेंच आदि व अंत नसणारें कालचक्र असून सृष्टि व लय यांचें स्वरूप दाखविणारें आहे. या भूतेशाच्या ठिकाणीं त्रैलोक्य चक्राप्रमाणें फिरत आहे. हें कधीं कमी न होणारें अव्यक्त अमर, व शाश्वत ब्रह्म असून लोक या पुरुषश्रेष्ठाला केशव ह्मणतात. पितर देव, यक्ष, राक्षस, नाग, असुर व मनुष्य त्याचप्रमाणें वेदशास्त्र व निरंतरचे लोकाचार या अव्यय पुरुषश्रेष्ठानेंच उत्पन्न केले आहेत. प्रत्येक युगाच्या आरंभाला सर्वांचा लय करून तो फिरून प्रकृति उत्पन्न करीत असतो. ज्याप्रमाणें निरनिराळ्या ऋतूंचीं चिन्हें त्या त्या कालीं दिसूं लागतात त्याप्रमाणें त्या त्या युगाच्या आरंभाला त्या त्या युगाचीं चिन्हें दिसूं लागतात. काळाप्रमाणें जें जें युग सुरू होतें त्या त्या युगाप्रमाणें लोकयात्रा कायम ठेवणारें तशा तशा प्रकारचें ज्ञान उत्पन्न होतें. युगाच्या शेवटीं नाहींसे झालेले वेद व इतिहास महर्षींना प्रथम ब्रह्मदेवांच्या तोंडून तपाच्या प्रभावामुळें मिळतात. वेदाचें ज्ञान ब्रह्मदेवांला राहून बृहस्पतींना वेदांगाचें ज्ञान मिळतें व भृगुपुत्र शुक्राचार्य यांना जगाच्या हिताला कारणभूत असें नीतिशास्त्र मिळतें. गायनशास्त्र नारदांना माहीत होऊन धनुर्विद्येचें शास्त्र भारद्वाजांना कळतें. देवांचें चरित्र गार्ग्यांना कळून कृष्णवर्ण अशा अत्रिपुत्रांना वैद्यकीचें ज्ञान मिळतें. त्याचप्रमाणें निरनिराळ्या ऋषींच्या नांवानें प्रचलित असलेलीं वैशेषिक, सांख्य, पातंजल इत्यादि शास्त्रें त्या त्या ऋषींना माहीत होतात. या ब्रह्मासंबंधानें माहिती ऋषींनीं बुद्धीच्या, वेदाच्या व तर्काच्या आधारावरून दाखवून दिली आहे. ज्याला आदि किंवा अंत नाहीं अशा श्रेष्ठ ब्रह्माचें ज्ञान देवांना किंवा ऋषींना सुद्धां नसून एकट्या नारायणाला त्याचें ज्ञान होतें व दुःखांना औषधरूपी जें हें ज्ञान तें त्यापासून जुन्या ऋषींना, देवांना, असुरांना व राजर्षींना झालें. ज्यावेळीं या पुरुषाच्या प्रेरणेवरून प्रकृति महदादि भाव उत्पन्न करते, तेवेळीं या शक्तीच्या साह्यानें जग सुरू होतें. ज्याप्रमाणें एका दिव्यापासून हजारों दिवे लागतात, त्याप्रमाणें या प्रकृतीपासून हजारों वस्तू उत्पन्न होतात. या प्रकृतीला अंत नसल्यामुळें ती कमी होत नाहीं. या अव्यक्त प्रकृतीपासून, कर्मासारखी बुद्धि, बुद्धीपासून अहंकार, अहंकारापासून आकाश, आकाशापासून वायु, वायूपासून तेज, तेजापासून पाणी व पाण्यापासून पृथ्वी अशा ह्या आठ प्रकृति उत्पन्न होऊन यांवर या जगाची इमारत रचली गेली आहे. या आठ प्रकृतींपासून त्यांचें विकार पांच ज्ञानेंद्रियें

पांच कर्मेंद्रियें, पांच शब्दादि विषय व मन हीं सोळा उत्पन्न झालीं. श्रोत्र, त्वक्, चक्षु, जिव्हा व घ्राण हीं पांच ज्ञानेंद्रियें असून पाय, गुद, शिश्न, हात व वाणी हीं कर्मेंद्रियें आहेत. शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध हे पांच विषय असून ह्या सर्वांच्या ठिकाणीं मन भरून आहे. रसज्ञानाच्या वेळीं हेंच रसनेंद्रियाचें स्वरूप घेतें व बोलण्याचे वेळीं ह्यालाच वाणी ह्मणतात. निरनिराळ्या इंद्रियांसकट जें कांहीं व्यक्त आहे, तें सर्व हें मनच आहे. ह्या सोळा विकाररूपी देवता मनुष्याच्या देहामध्यें असून ह्यांना ज्ञान करून देणारा जो आत्मा त्याची उपासना करतात. पाण्याचा गुण रसनेंद्रिय असून घ्राणेंद्रिय हा पृथ्वीचा गुण आहे. श्रोत्र आकाशाचा गुण आहे. चक्षुरिंद्रिय हा तेजाचा गुण आहे व स्पर्शेंद्रिय हा वायूचा गुण आहे. सर्व काळीं सर्व प्राणिमात्रांची व्यवस्था अशा प्रकारें असते. मन जीवापासून होत असून जीवाची उत्पत्ति प्रकृतीपासून आहे व ही प्रकृति सर्वांच्या हृदयामध्यें असणाऱ्या आत्म्यापासून उत्पन्न होते. हे सर्व भाव कांहीं कृत्य न करतां राहिलेल्या प्रकृतीहून पलीकडच्या आत्म्याच्या आश्रयानें सर्व चराचर जग चालवितात. नऊ दरवाजांनीं युक्त असें हें पवित्र शरीररूपी पुर या वर सांगितलेल्या भावांनीं निर्माण झालें असून याला व्यापून महात्मा आंत निजला आहे ह्मणून त्याला पुरुष असें ह्मणतात. हा अजर व अमर असून सर्व व्यक्त व अव्यक्त यांचें याला ज्ञान आहे. हा सर्वव्यापी असून सगुण, सूक्ष्म व सर्व पंचमहाभूतांना व गुणांना आधार आहे. ज्याप्रमाणें दिवा लहान असो किंवा मोठा असो, तो चोहोंकडे प्रकाश पाडतो, त्याप्रमाणें हा ज्ञानस्वरूपी आत्मा सर्व प्राणिमात्रांच्या ठिकाणीं आहे. कानाला जें ऐकावयाचें तें ऐकावयाला लावून तोच तें ऐकतो. त्याचप्रमाणें डोळ्यांना पहावयाचें तें पहावयाला लावून तोच तें पहातो. हा देह ज्ञानाला निमित्तमात्र असून ज्ञानाश्रय तो आत्माच आहे. लांकडामध्यें असणारा अग्नि ज्याप्रमाणें तें तोडल्यानें दिसत नाहीं, परंतु घर्षणादि उपायांनीं त्याचें अस्तित्व दृष्टोत्पत्तीस येतें, त्याप्रमाणें ह्या आत्म्याचें शरीरामधलें अस्तित्व दुसऱ्या कशानें दृष्टोत्पत्तीस न येतां केवळ योगानेंच कळतें. नदी ह्मटली कीं, पाण्याचा व सूर्य ह्मटला कीं किरणांचा संबंध जसा लक्षांत येतो, तसा देह व आत्मा यांचा संबंध कायमचा आहे. स्वप्नामध्यें पांच सूक्ष्म इंद्रियांनिशीं आत्मा शरीराला सोडून बाहेर फिरत असतो, त्याचप्रमाणें मरण आलें असतां सूक्ष्म इंद्रियांनिशीं हा एक देह सोडून दुसऱ्या देहांत शिरण्याला जातो. हा आपल्या पूर्व देहांतील कर्माशीं जखडला गेला असून त्या त्या याच्या अपरिहार्य कृत्याप्रमाणें ह्याला दुसरा जन्म येतो. हा एक देह सोडून दुसऱ्या देहांत कसा शिरतो व हे सर्व भूतमात्र आपापल्या कर्माप्रमाणें कसे जन्माला येतात हें तुला सांगतों.

'चारी प्रकारच्या स्थावर व जंगम भूतमात्रांची उत्पत्ति व नाश दिसून येत नाहींत. अव्यक्त अशा आत्म्यामध्यें राहिलेल्या मनाचें स्वरूपही अव्यक्तच आहे. पिंपळाच्या लहानशा फुलामध्यें ज्याप्रमाणें मोठें झाड झांकून असतें व उगवल्यावरच तें दृष्टोत्पत्तीला येतें, त्याचप्रमाणें अव्यक्तापासून पुन्हां दृश्यरूपानें जन्म होतो. लोखंडाचा तुकडा अचेतन असतांही चुंबकाकडे धांव घेतो, त्याप्रमाणें पूर्वजन्मांतील कर्मसंस्कार त्या जीवाच्या मागून जातात व ज्याप्रमाणें अज्ञानामुळें वासनादिकांपासून उत्पन्न झालेले संस्कार त्याच्या मागून असतात, त्याचप्रमाणें प्रत्यक्ष ब्रह्मापासून मिळालेले सच्चिदानंदात्मक संस्कारही त्याच्या बरोबर असतात. पृथ्वी, आकाश, स्वर्ग, सर्व भूतमात्र, प्राणवायु, धर्म किंवा अधर्म यांपैकीं जीवाशिवाय कोणत्याचेही पूर्वी अस्तित्व नसून अविद्येनें कलुषित केलेल्या या जीवाशीं यांचा कांहीं संबंध नाहीं. आत्मा शाश्वत व अविनाशी असून तो सर्व प्राण्यांमध्यें आहे. मनाला कारण हाच असून हा निर्गुण आहे. हें आपण पहात असलेलें जग अज्ञानमूलक असून आत्म्याचें स्वरूपज्ञान पूर्वजन्मींच्या वासनांमुळें आहे. या वासनेशीं संबंध जडल्यानें याच्या हातून कर्में घडूं लागतात व हीं कर्में घडूं लागलीं असतां फिरून नवीन नवीन वासना उत्पन्न होतात व त्याप्रमाणें फिरून फिरून कर्में घडूं लागतात व याप्रमाणें हें भवचक्र सतत फिरत रहातें. ही अव्यक्त वासनात्मक बुद्धि या चाकाचा तुंबा असून व्यक्त असें शरीर

व इंद्रियें त्याच्या आरा आहेत. ज्ञान व क्रिया ही धांव असून रजोगुणांचें वंगण मिळून आत्म्याच्या नजरेखालीं हें चाक फिरत राहिलें आहे. तेली ज्याप्रमाणें घाण्यांतून तेल पिळून काढतो, त्याप्रमाणें अज्ञानानें झपाटलें जाऊन रजोगुणानें स्निग्ध बनलेलें हें जग या चक्रामधून पिळून निघतें. या अनेक जन्मांच्या फेऱ्यांमधून प्राणी अहंकारानें आशेच्या मागें लागून कर्में करीत राहतो व हा कार्यकारणांचा संबंध जडला असतां हीं कर्में फिरून कारण बनतात. कर्में कारणामध्यें व कारणें कर्मांमध्यें न शिरतां कर्में उत्पन्न होण्याला कालच कारण होत असतो. वर सांगितलेल्या आठ प्रकृति व त्यांचे सोळा विकार कारणामुळें आत्म्याच्या देखरेखीखालीं एकत्र राहतात. जीव देहापासून पूर्ण भ्रष्ट झाला असतां प्राण, सूक्ष्मेंद्रियें व संस्कार यांनिशीं पूर्व जन्मींच्या कर्माच्यां सामर्थ्यानें आत्मा दाखवील त्या वाटेनें वाऱ्याच्या मागून जाणाऱ्या धुळीप्रमाणें चालला असतो. परंतु ते भाव ह्या आत्म्याला चिकटत नाहींत व त्यांना हा चिकटत नाहीं. वारा कधीं धुळीशीं मिसळून जात नाहीं तसाच हा जीव व आत्मा यांमधला भेद आहे, आत्म्याचा देहेंद्रियादिकांशीं संबंध आहे, ह्मणून त्यांचे गुण याला लागले आहेत असें समजूं नये. आत्मा हा स्वरूपामध्यें स्वतंत्र आहे. अशा रीतीनें शंकेचें निरसन होत असतांही दुःख टाळून सुख मिळविण्यासाठीं लोक कर्में व विधि यांकडे धांव घेतात. भाजून काढलेलें बीं उगवत नाहीं त्याप्रमाणें ज्ञानानें जाळून टाकलेल्या क्लेशाचा आत्म्यावर परिणाम होत नाहीं. ज्याप्रमाणें प्रवृत्तिमार्गाकडे लागलेल्या लोकांना त्यावांचून दुसरा धर्म आवडत नाहीं, त्याप्रमाणें ज्ञानाकडे लक्ष लागलेल्या लोकांना ह्या ज्ञानावांचून दुसरें कांहीं आवडत नाहीं. वेदज्ञ व वेदवाक्याप्रमाणें वागणारे कांहीं थोडे लोक स्वर्ग व मोक्ष यांपैकीं मोक्ष श्रेष्ठ असल्यानें त्या प्रशस्त ज्ञानमार्गाची इच्छा करतात. भल्यांनीं हा मार्ग स्वीकारला असल्यानें हा मार्ग अनिंद्य आहे व याकडे बुद्धि लावल्यानें मनुष्याला श्रेष्ठ असा मोक्ष मिळतो. मनुष्य मूर्खपणानें राजस व तामस अशा क्रोधलोभादि विकारांच्या मागें लागून विषयसंग्रह करतो. देहाचा संबंध तोडून टाकून मोक्षाची इच्छा असेल तर अशुद्ध आचरण करूं नये. आपल्या कर्मानें मोक्षाची वाट चोखाळून ठेवून स्वर्गादि उत्तम लोकांची सुद्धां पर्वा करूं नये. ज्याप्रमाणें लोखंडाशीं मिसळलेलें सोनें चकाकत नाहीं, त्याप्रमाणें विषयादि दोषांनीं कलुषित झालेलें ज्ञान झळकत नाहीं. जो लोभानें कामक्रोधांच्या मागें लागून धर्माची वाट सोडून अधर्मानें वागतो त्याचा पूर्ण नाश होतो. स्वतःचा फायदा ज्याला करून घ्यावयाचा असेल त्यानें शब्दादि विषयांवर आसक्ति ठेवूं नये. यांपासून राग आनंद व विषाद उत्पन्न होतात. सत्व, रज, तम या गुणांनीं युक्त अशा या पंचभूतांनीं बनलेल्या देहासंबंधानें कोणी कोणाची कशी स्तुति करावी किंवा कोणी कोणाला कसें दूषण द्यावें. स्पर्शादि विषयांच्या ठिकाणीं अज्ञानामुळें आपला पार्थिव गुण न कळतां मूर्ख लोक त्यावर आसक्ति ठेवतात. ज्याप्रमाणें मातीचें घर मातीनेंच लिंपून काढावें, त्याप्रमाणें मातीनें बनलेला हा देह मातीच्या पोषक द्रव्यांनीं लिंपला जातो. मध, तेल, दूध, लोणी, मांस, मीठ, फलमुलें व निरनिराळीं धान्यें हीं पाणी व मातीं यांचेच भेद आहेत. ज्याप्रमाणें अरण्यामध्यें राहणारा मुनि उत्तम अन्नावर इच्छा न ठेवतां जीव धरून राहण्यासाठीं जाडेंभरडें व तेंही बेचव खातो, त्याप्रमाणें या संसाररूपी अरण्यामध्यें पडलेल्या मनुष्यानें कष्ट करीत राहून रोगावर जसें औषध त्याप्रमाणें प्राणधारणेपुरतें अन्न खाऊन रहावें. शांति मिळविण्याची इच्छा असणाऱ्या मनुष्यानें आपल्याला येऊन चिकटूं पहाणाऱ्या विषयांची पूर्ण निवडानिवड करून न कचरतां सत्य, शुद्धशीलता, सरळपणा, त्याग, वर्चस्व, विक्रम, सहनशीलता, धैर्य, बुद्धि, विचार व तप यांनीं इंद्रियांचा निग्रह करावा. प्राणी सत्व, रज व तम या तीन गुणांनीं मोहित होऊन अज्ञानामुळें जन्ममरणाच्या फेऱ्यांत सांपडून फिरत राहतात; ह्मणून अज्ञानापासून चिकटणाऱ्या दोषांचा नीट विचार करून अज्ञानापासून उत्पन्न होणारा आणि दुःखाला कारणीभूत असा अहंकार सोडून द्यावा. पंचमहाभूतें, इंद्रियें, सत्व, रज, तम, हे गुण, त्रैलोक्य व ईश्वर हे सर्व अहंकारावर अवलंबून आहेत. ज्याप्रमाणें बांधलेला काळ

त्या त्या काळीं, त्या त्या ऋतूंचे गुण प्रकट करतो, त्याप्रमाणें अहंकार सर्व भूतमात्रांकडून कर्म करवितो. अज्ञानापासून उत्पन्न होणारा कृष्णवर्ण तमोगुण मोह पाडणारा आहे. प्रीति व दुःख हीं सर्व या तीन गुणांमुळें आहेत. प्रसन्नता, आनंदापासून उत्पन्न होणारी प्रीति, निश्चळ धैर्य, स्मृति हे विकार सत्वगुणाचे असून काम, क्रोध, प्रमाद, लोभ, मोह, भय, थकवा, खेद, शोक, असमाधान, मान, दर्प व दुष्टपणा हे रज व तम या गुणांचे विकार आहेत. आपल्यामध्यें असणाऱ्या यांपैकीं प्रत्येकाच्या कमी अधिकपणाची चांगली परीक्षा करून त्यावर विचार करावा.'

युधिष्ठिर ह्मणाला, 'कोणते दोष मोक्षेच्छु अगदीं समूळ टाकून देतात, कोणते कमी करतात, कोणते फिरून फिरून त्यांना चिकटतात व कोणते मोहामुळें क्षुल्लक समजून त्यांकडे त्यांचें दुर्लक्ष होतें? व शहाण्या मनुष्यानें बुद्धीनें व विचारानें कोणत्या दोषांच्या बलाबलासंबंधानें विचार करावा?' भीष्म ह्मणाले, 'दोषांना मुळापासून उपटून टाकल्यानें मनुष्याचें अंतःकरण शुद्ध होऊन तो भवपाशांतून सुटतो. ज्याप्रमाणें पोलादी कुऱ्हाड पोलादी सांखळीला तोडते, त्याप्रमाणें शुद्ध अंतःकरण झालेला मनुष्य स्वाभाविकपणें उत्पन्न होणारे तामस दोष नाहींसे करून स्वतः मुक्त होतो. ह्मणून राजस, तामस व सात्विक गुण हे बीज असून यांपासून सर्व प्राणिमात्रांची उत्पत्ति आहे; ह्यांपैकीं सत्वगुणानेंच मनुष्य ब्रह्मस्वरूपाला मिळतो. ह्मणून शुद्ध अंतःकरणाच्या मनुष्यानें रज व तम हे गुण टाकून द्यावेत. ह्यांपासून मोकळा झालेला सत्वगुण फारच शुद्ध रीतीनें झळकतो. मंत्रांच्या साह्यानें आत्मशुद्धीसाठीं केलेलीं यज्ञयागादि कर्में वाईट आहेत असें कांहींचें मत आहे; परंतु तीं आत्म्याचा देहाशीं संबंध तोडण्याला व शुद्ध धर्म पाळविण्याला कारण आहेत. रजोगुणामुळें अधर्माचीं, सहेतुक त्याचप्रमाणें वासनात्मक कृत्यें होतात, तमोगुणामुळें लोभ व क्रोध यांसंबंधी कृत्यें मनुष्याच्या हातून घडतात, व त्याला झोंप व सुस्ती घेरून टाकते. नंतर परपीडा व शरीरसुख यांकडे त्याचें लक्ष राहून त्याला समाधान कधीं होत नाहीं. श्रद्धा व ज्ञान यांनीं युक्त असा सात्विक कर्में करीत रहाणारा मनुष्य शुद्ध अशा रीतीनें झळकत राहतो. रजोगुणामुळें मोह उत्पन्न होऊन तमोगुणामुळें क्रोध, लोभ, भय, दर्प हे दोष जडतात. या सर्वांना छाटून काढल्यानेंच मनुष्याला शुद्ध होऊन अक्षय, अव्यय व ज्याचें स्वरूप अव्यक्त आहे अशा परमात्म्याची प्राप्ति करून घेतां येते. त्याच्या मायेमध्यें झांकलेल्या लोकांचें ज्ञान नाहींसें होऊन त्यांच्या बुद्धीला मोह पडतो. व याप्रमाणें त्यांचें ज्ञान कलुषित झाल्यानें ते क्रोधाच्या तावडींत जातात. क्रोधापासून वासना, लोभ, मोह, मान, दर्प व अहंकार जडून, अहंकारामुळें क्रिया सुरू होतात. क्रिया सुरू झाल्यानें स्नेह जडतो व स्नेहामुळें शोक उत्पन्न होतो. व स्नेहामुळें सुखदुःखात्मक क्रिया सुरू होऊन त्यांपासून जन्ममरणाला बिऱ्हाड मिळतें. जन्माला बिऱ्हाड मिळाल्यानें शुक्र व शोणित यांपासून उत्पन्न होणारा गर्भवास मिळतो व त्या ठिकाणीं नेहमीं रक्ताची उत्पत्ति होत असल्यानें घाणेरड्या रीतीनें मलमूत्रामध्यें त्याला तेथें रहावें लागतें. तृष्णेनें झपाटल्यामुळें वर सांगितलेल्या क्रोधादि गुणांनीं मनुष्य जखडला जातो. परंतु त्याची त्यापासून सुटण्याची खटपट चालली असते. यासंबंधांत संसाराचा ओघ चालू ठेवण्याला बायका कारण आहेत. प्रकृतीनेंच उत्पादक अशा त्या क्षेत्रभूत असून पुरुष उत्पन्न करणारे क्षेत्रज्ञासारखे आहेत. ह्मणून शहाण्या लोकांनीं मुख्यत्वेंकरून या बायकांच्या नादीं लागूं नये. या भयंकर कृत्या, मूर्खांना भुरळ पाडतात. इंद्रियांना वेधून घेणाऱ्या अशा या प्रत्यक्ष रजोगुणात्मक मूर्ति असल्यानें त्यांच्यासंबंधीं उत्पन्न होणाऱ्या वासनेमुळें बीजापासून जंतु उत्पन्न होतात. ज्यांना आपण आपलेसे समजत नाहीं असे आपल्या देहापासून उत्पन्न होणारे किडे वगैरे ज्याप्रमाणें आपण दूर फेंकून देतों त्याचप्रमाणें जे आपले नसून ज्यांना आपण आपलीं मूलें ह्मणतों त्या किड्यांना सुद्धां सोडून द्यावें. शुक्रापासून त्याचप्रमाणें घाम वगैरे पदार्थांपासून या देहांतून स्वाभाविकपणें त्यांच्या त्यांच्या कर्मानुसार जंतु उत्पन्न होतात, ह्मणून शहाण्यानें त्यांकडे दुर्लक्ष करावें. रजोगुण तमोगुणावर अवलंबून असून सत्वगुण

रजोगुणावर आहे. अव्यक्त असें तमोगुण ज्ञानावर आपलें झांकण घालून बुद्धि व अहंकार उत्पन्न करतो व हेच दोन सर्व प्राणिमात्रांचें बीज असून यांना जीव ह्मणतात. कालानें ठरवून ठेवलेल्या कर्माप्रमाणें या संसारामध्यें यांचें भ्रमण चाललेलें असतें. ज्याप्रमाणें स्वप्नामध्यें हा जीव मनानें आपल्याला देह आहे अशा समजुतीनें रमला असतो त्याचप्रमाणें कर्ममूलक गुणांनीं या जीवाचा गर्भामध्यें देहाशीं संबंध जडतो. त्या ठिकाणीं असतांना जें जें इंद्रिय बीजरूप कर्मानें उत्पन्न होतें त्याला त्याला वासनायुक्त मन व अहंकार कारण आहेत. याप्रमाणें अस्तित्वाला येणाऱ्या या प्राण्याला ऐकण्यावर वासना राहिली असल्यामुळें कान उत्पन्न होतात. रूपासंबंधी वासनेमुळें डोळा उत्पन्न होतो. वास घेण्याची इच्छा राहिल्यामुळें नाक व स्पर्शाची इच्छा राहिल्यानें त्वचा उत्पन्न होते; त्याचप्रमाणें प्राणादि पंचवायु उत्पन्न होऊन देह चालतो. पूर्वकर्मामुळें पूर्ण वाढ झालेल्या सर्व इंद्रियांनीं युक्त अशा शरीरामध्यें हा जीव, ज्याच्या आरंभीं, मध्याला व अखेरीला शारीरिक व मानसिक दुःखच आहे असा जन्म घेतो. देह व इंद्रियें यांशीं स्वतःला चिकटून घेतल्याबरोबर दुःखाला सुरवात होऊन मीपणा जडून त्याच्या वाढीला सुरवात होते. जन्माला कारणीभूत ज्या वासना त्या सोडल्यानें दुःखाचा शेवट होतो व दुःखाचा शेवट झाल्यानें मनुष्य मुक्त होतो. शहाण्यानें इंद्रियांची उत्पत्ति व नाश हे दोन्ही रजोगुणामध्यें आहेत हें लक्षांत घेऊन रहावें. ज्यानें तृष्णा बाजूला सारली आहे अशा मनुष्याला विषय ज्ञानेंद्रियाकडे आले असतां सुद्धां त्यांची बाधा होत नाहीं व इंद्रियांची प्रसरणशीलता याप्रमाणें खुंटविल्यानें त्याला फिरून पुनर्जन्म येत नाहीं. याला उपाय याप्रमाणें आहे. तत्त्वज्ञानाकडे लक्ष देऊन वागणाऱ्या मनुष्याला उत्तम गति मिळते. सर्व भूतमात्रांमध्यें पुरुष हा श्रेष्ठ असून पुरुषांमध्यें ब्राह्मण श्रेष्ठ आहे व ब्राह्मणांमध्येंही वेद पढलेला ब्राह्मण श्रेष्ठ आहे. वेदशास्त्र जाणणारे व खऱ्या तत्त्वासंबंधानें ज्यांचें ठाम मत ठरलें आहे असे ब्राह्मण सर्व प्राणिमात्रांचे आत्मस्वरूपी असून ते सर्वज्ञ व सर्वांच्या ठिकाणीं सारखी दृष्टि ठेवणारे असतात. ज्याप्रमाणें आंधळा मनुष्य रस्त्यावरून एकटा चालला असतां त्यावर पुष्कळ प्रसंग ओढवतात, तीच स्थिति ज्याला ज्ञान नाहीं अशा मनुष्याची होते. ह्मणून या जगांत ज्ञानी लोक श्रेष्ठ आहेत. धर्मसंचय करण्यासाठीं ह्मणून लोक निरनिराळा धर्म पाळतात; परंतु त्यापासून त्यांना मोक्ष न मिळतां फक्त वाक्शुद्धि, देहशुद्धि व मनःशुद्धि त्याचप्रमाणें क्षमा, सत्य, धैर्य व स्मृति हे गुण मात्र अंगीं येतात. ब्रह्मप्राप्ति करून देणारें जें ब्रह्मचर्यव्रत तें सर्व धर्मांमध्यें श्रेष्ठ असून त्याच्या योगानेंच मोक्ष मिळतो. या ब्रह्मचर्याचा पंचप्राण, मन, बुद्धि पंचज्ञानेंद्रियें व पंचकर्मेंद्रियें यांच्याशीं कांहीं संबंध नसून शब्दादि विषयांशींही याचा कांहीं संबंध नाहीं. केवळ शब्दरूपानें हा ऐकला जाऊन याचें स्वरूप डोळ्यांला न दिसतां त्याची कल्पनाच करावयाची असते; ह्मणून इंद्रियांपासून ज्यांचें ज्ञान होतें अशा सर्वांपासून हें अलग आहे. याचें अस्तित्व मनालाच कळण्याजोगतें आहे व ही शुद्ध स्थिति बुद्धीच्या योगानें मिळण्याजोगी आहे. हें ब्रह्मचर्यव्रत योग्य रीतीनें पाळणारा मनुष्य ब्रह्मलोकाला जातो, जो अर्धवट पाळतो तो देवलोकाला जातो व कनिष्ठ रीतीनें हें पाळणारा श्रेष्ठ अशा ब्राह्मणाच्या जन्माला जातो. हें जें दुष्कर ब्रह्मचर्यव्रत आहे तें पुढील उपायांनीं नीट रीतीनें पाळलें जातें. उत्पन्न होऊन वाढूं लागलेला रजोगुण तेव्हांच्या तेव्हांच दाबून टाकावा. बायकांच्या गोष्टी ऐकूं नयेत, त्यांना नागव्या पाहूं नयेत, कदाचित् त्यांना पाहिल्यानें दुबळ्यांच्या मनांत विकार उत्पन्न होण्याचा संभव आहे. वासना उत्पन्न झाली असतां तीन दिवस सकाळीं, तीन दिवस संध्याकाळीं व तीन दिवस मिळेल तें खाऊन कृच्छ्रव्रत पाळावें व फारच पीडा झाली असतां पाण्यामध्यें शिरून रहावें. स्वप्नामध्यें जर वासना उत्पन्न होईल तर पाण्यामध्यें उभें राहून ऋतंच सत्यंच इत्यादि तीन ऋचा ह्मणून अघमर्षण जप करावा. व याप्रमाणें देहामध्यें उत्पन्न झालेलें रजोगुणात्मक पाप ज्ञानानें शहाण्यानें धुवून काढावें. मलवाहिनी आंतडी ज्याप्रमाणें शरीराशीं अगदीं चिकटून आहे त्याप्रमाणें आत्म्याचा शरीराशीं अगदीं निकट संबंध आहे. मनुष्याच्या शि-

रांच्या जाळ्यामधून कफ, वात, पित्त हे रक्त, कातडें, मांस, स्नायु, हाडें, मज्जा व सर्व शरीर यांचे निरनिराळे रस पोषण करतात. पंचेन्द्रियांचीं कामें व्यवस्थित रीतीनें सुरू ठेवणाऱ्या दहा मुख्य नाड्या असून यांपासून हजारों सूक्ष्म नाड्या शरीरामध्यें पसरल्या आहेत. या सर्व आपल्यामधून रस घेऊन जाऊन त्या त्या काळीं समुद्राला भर पाडणाऱ्या नद्यांप्रमाणें देहरूपी समुद्राला भर पाडीत असतात. हृदयामध्यें एक मनोवाह नांवाची शीर असून मनुष्याच्या शरीरामध्यें संकल्पापासून उत्पन्न होणारें शुक्र सर्व गात्रांपासून ती ओढून घेते. सर्व गात्रांमध्यें पसरलेल्या तिच्याशीं संबंध असणाऱ्या अनेक शिरा असून त्या आपल्यामधून तेजरस वहात ठेवून विषयाचें ज्ञान उत्पन्न करतात. ज्याप्रमाणें दुधामध्यें मिसळून असलेलें लोणी रवीनें घुसळून काढतात त्याप्रमाणें संकल्पामुळें स्त्रियांच्या दर्शनादिकांनीं उत्पन्न झालेलें शुक्र एकत्र जमविलें जातें. स्वप्नामध्यें देखील संकल्पजन्य मनोविकार उत्पन्न होऊन या मनोवाह शिरेमधून हें शुक्र बाहेर पडतें. थोर अत्रि ऋषींना ह्या शुक्राच्या उत्पत्तीसंबंधानें पूर्ण माहिती आहे. अन्नरस, मनोवाह शीर व संकल्पजन्य वासना या तिहींपासून शुक्राची उत्पत्ति असून त्याची देवता इंद्र असल्यामुळें त्याला इंद्रिय असें नांव आहे. ही शुक्राची गति भूतमात्रांच्या संकराला कारण आहे. हें जाणून जे आत्मनिग्रह करतात ते आपलीं सर्व पापें जाळून टाकून जन्ममरणाच्या फेऱ्यांत सांपडत नाहींत. जो सत्व, रज, तम या गुणांना मनाच्या योगानें साम्यतेला आणून ठेवून केवळ प्राणधारणेपुरती क्रिया करीत राहतो व मरणसमयीं पंचप्राणांना या मनोवाह शिरेमध्यें आणून ठेवतो तो जन्ममरणाच्या फेऱ्यांतून सुटतो. मनामध्यें सर्व वस्तूंचें स्वरूप प्रगट होत असल्यानें मनाला ज्ञान खात्रीनें होतें. महात्म्यांचीं मनें ध्यानानें सिद्धि पावून वासनेपासून मुक्त होऊन निरंतर प्रकाशमान रहातात ह्मणून मनाचें स्वतंत्र अस्तित्व नाहींसें करण्यासाठीं नेहमीं निष्पाप कर्में करीत रहावें व रजतमांपासून सुटल्यानें इष्ट सिद्धि खात्रीनें होते. तरुणपणामध्यें मिळालेलें सामान्य ज्ञान ह्मातारपणीं मलिन होत असतें; तथापि ज्याची बुद्धि परिपक्व झालेली आहे तो शुभकारक अशा पूर्व संस्कारामुळें वासना नाहींशा करूं शकतो. व अनेक संकटांनीं भरलेल्या वाटेंतून ज्याप्रमाणें शहाणा प्रवासी पार पडतो, त्याप्रमाणें देहेंद्रियादिकांच्या बंधनांतून सुटून सर्व दोषांतून पार पडून तो मोक्षसुख घेतो. प्राणी ज्यांचा कधीं शेवट होत नाहीं अशा इंद्रियविषयांकडे लागल्यानें खालीं खालीं जात रहातात. जे यांमध्यें आसक्त रहात नाहींत तेच महात्मे श्रेष्ठ गतीला मिळतात. जन्म, जरा, मृत्यु यांचीं दुःखें, व्याधि व मानसिक कष्ट यांनीं हें जग भरलेलें पाहून शहाण्यानें मोक्षासाठीं झटावें, शरीरानें, मनानें व वाणीनें शुद्ध राहून अहंकार सोडून द्यावा. ज्ञानामुळें शांत वृत्ति ठेवून कशाची अपेक्षा न ठेवतां भिक्षावृत्तीनें सुखांत रहावें. आतां जर प्राणिमात्रांवरील दयेमुळें मनामध्यें स्नेह उत्पन्न होत असेल तर तेव्हां सुद्धां हें जग ज्या त्या मनुष्याच्या कर्माचें फळ आहे हें ओळखून त्याकडे दुर्लक्ष करावें. जें कांहीं बरें वाईट कृत्य करावें त्याचें फळ भोगावें लागतें म्हणून बुद्धिपुरस्सर चांगलीं कर्में करीत रहावें. अहिंसा, सत्य भाषण, सर्व प्राणिमात्रांच्या ठिकाणीं सरळपणा, क्षमाशीलता, सावधगिरी हे गुण ज्याच्या अंगामध्यें आहेत, तो सुखी होतो. ह्मणून बुद्धीच्या योगानें मन स्वस्थ ठेवून सर्व प्राणिमात्रांच्या ठिकाणीं तें शुद्ध ठेवावें. जो सर्व भूतमात्रांना सुखकारक व दुःखापासून सोडविणारा हा श्रेष्ठ धर्म जाणतो तो सुखी होतो. दुसऱ्याचें वाईट करण्याचें कधीं मनांत आणूं नये.. भलती सलती इच्छा धरूं नये व नसत्या गोष्टीवर विचार करूं नये. ज्याच्या योगानें खात्रीनें यश मिळेल अशा प्रयत्नानें मन ज्ञानाकडे लावावें. वेदांतवाक्यानें व निश्चयात्मक प्रयत्नानें अशा प्रकारचें ज्ञान खात्रीनें होतें. चांगलें बोलून सूक्ष्मधर्म पाळण्याचें ज्याच्या मनांतून आहे त्यानें खरें बोलत राहून कोणाला पीडा देऊं नये व अप्रामाणिकपणाचें, लुच्चेगिरीचें, निष्ठुर, क्रूर व कपटाचें भाषण कधीं करूं नये. मनांत ताठा न ठेवतां वर सांगितल्या प्रकारचें व तेंही स्वल्प भाषण ठेवावें. सर्व जग शब्दावर अवलंबून आहे. ज्याच्या मनांत वैराग्य उत्पन्न झालें असेल त्यानें शुद्ध अंतःकरणानें नम्रपणें आपलीं वाईट कर्में

उघड बोलून दाखवावींत. रजोगुणानें झपाटला जाऊन जो कर्मे करूं लागतो तो ह्या जगांत दुःखांत पडून शेवटीं नरकांत पडतो. ह्मणून मनुष्यानें मन, भाषण, व शरीर या तिहींमध्यें आत्मनिग्रह ठेवावा. संसारभार वाहणारे अज्ञानी लोक कळपांतून मेंढी पळवून नेणाऱ्या चोराप्रमाणें आहेत. ते त्यांना निरुपयोगी अशा मार्गासंबंधानें सावध असतात. तेव्हां अशा वाटेला लागलें असतां आत्मसंरक्षणासाठीं चोरानें गांठलें असतां जसा आपला माल टाकून द्यावा लागतो, त्याप्रमाणें ज्याला खरें सुख पाहिजे असेल त्यानें रज व तम या गुणांनीं प्रेरित कर्मे टाकून द्यावींत. जो मनुष्य वासना टाकून देऊन सर्व विषयांपासून मुक्त झाला आहे, आत्मनिग्रह ठेवून एकांतामध्यें मिताहारावर तप करीत राहिला आहे व ज्ञानानें सर्व क्लेश जाळून टाकून योगामध्यें गढला आहे, त्याला अशा रीतीनें मनाला स्वैर संचार करूं न देतां आवरून धरल्यानें श्रेष्ठ अशा ब्रह्माची प्राप्ति होते. शहाण्यानें बुद्धीला आवरून बुद्धीनें मन आवरावें व मनानें सर्व इंद्रियांना आळा घालावा. ह्याप्रमाणें इंद्रियें व मन आवरल्यानें सर्व इंद्रियें प्रकाशमान होऊन ब्रह्माशीं मिळतात. जेव्हां सर्व इंद्रियें मनामध्यें मिळतात, तेव्हां त्यामध्यें ब्रह्म प्रकाशूं लागून इंद्रियांचा नाश झाल्यानें आत्मा स्वतःच्या शुद्ध स्वरूपामध्यें झळकूं लागून ब्रह्मस्वरूपी होण्याला पात्र होतो. **मनुष्यानें आपल्या योगाचा कधीं भपका करूं नये.** परंतु योगाचे नियम पाळून आपलीं इंद्रियें स्वाधीन ठेवण्याला प्रयत्न करावा. **अर्थात् त्यानें ज्यांच्या योगानें आपलें वर्तन व स्वभाव शुद्ध होईल असे योगाचे नियम पाळण्याकडे लक्ष द्यावें. हें योगसाधन करणाऱ्यानें पोटाचें साधन न करतां धान्यकण,** पेंड, भाजीपाला, जव व सातु ह्यांची कांजी व फलमूलें वगैरे जें कांहीं भिक्षेवर मिळेल त्यावर त्यानें रहावें व आपल्या आवडीप्रमाणें विचार करून देशकालाप्रमाणें आहार ठेवावा. एखादें आरंभलेलें कृत्य मध्येंच सोडूं नये; सर्पण घालून जळत ठेवलेल्या अग्नीप्रमाणें त्याला ज्ञानानें हळू हळू वाढत ठेवावें. असें केल्यानें ब्रह्मज्ञान सूर्याप्रमाणें प्रकाशमान होतें. अज्ञानाची उत्पत्ति ज्ञानापासून आहे, परंतु याचा अंमल आल्यावर बसल्याबरोबर अहंकारादि विकार उत्पन्न होतात व याप्रमाणें अज्ञानाचा पगडा बसलेल्या बुद्धीच्या या मलीन ज्ञानानें आत्म्यापासून उत्पन्न होणाऱ्या वस्तु त्याला स्वतंत्र अशा वेगळ्या भासूं लागतात. अज्ञानी मनुष्याला आत्मा सत्व, रज व तम, या तीन गुणांच्या पलीकडे असतां त्याचा यांच्याशीं संबंध आहेसा वाटत असल्यामुळें आत्म्याचें खरें ज्ञान होत नाहीं. परंतु यांचा संबंध याच्याशीं कितपत आहे व कितपत नाहीं हें जेव्हां त्याला कळूं लागतें तेव्हां त्याची आसक्ति नाहींशी होऊन तो मुक्त होतो. अशाप्रकारचें ज्ञान झालें असतां वय, जरा व मृत्यु यांना जिंकून अमर, अव्यय व कधीं कमी न होणारें असें ब्रह्म तो मिळवितो. निष्पाप असें ब्रह्मचर्यव्रत पाळूं इच्छिणाऱ्या योग्यानें स्वप्नामध्यें उत्पन्न होणारे दोष लक्षांत घेऊन झोंप अजीबात टाळावी; कारण स्वप्नामध्यें मनुष्याला रज व तम हे गुण झपाटतात व नव्या देहांत शिरल्याप्रमाणें वासना उत्पन्न होतात. ज्ञानाचा अभ्यास करण्यासाठीं व त्यावर विचार व मनन करण्यासाठीं योगी नेहमीं जागा असतो. या संबंधांत असें विचारण्यांत येतें कीं, इंद्रियें सर्व लीन झालीं असतां मनुष्याला आपण विषयांमध्यें असून क्रिया करीत आहोंसें वाटतें, ती स्वप्नामधील स्थिति कशा प्रकारची? याला उत्तर हें आहे कीं, इंद्रियें जरी थकून स्वस्थ झालीं असलीं तरी सर्वांमध्यें मिसळून असणारें मन लीन झालें नसल्यामुळें स्वप्नें पडतात. मनुष्य कार्यांत गढला असतां जागेपणीं सुद्धां स्वप्नाप्रमाणें मनाच्या धर्मानें उत्पन्न होऊन निरनिराळे विचारतरंग त्याच्या मनामध्यें उठत असतात. विषयांमध्यें गढलेल्या मनुष्याच्या मनामध्यें असंख्य अशा पूर्वजन्मांचे हे संस्कार उमटत असतात; कारण मनावर हे सर्व दृढ होऊन बसले असतात व आत्म्याला त्या सर्वांची साक्षीभूतपणानें आठवण असते. पूर्वकर्मामुळें उत्पन्न झालेल्या सत्व, रज व तम या गुणांपैकीं ज्या गुणाचा तेवढ्या वेळेपुरता मनावर ठसा उमटतो त्या त्याप्रमाणें पंचात्मक सूक्ष्मस्वरूप त्या वेळेला दिसतें. आणि त्या गुणानुरूप मनुष्याला सु-

ख किंवा दुःख होतें. या स्वप्नांना कफ, वात व पित्त मुख्य कारण असून अज्ञानामुळें व पूर्वसंस्कारामुळें तीं टाळतां येत नाहींत. त्याचप्रमाणें ज्या ज्या वस्तू मनुष्य जागेपणीं इंद्रियांनीं पाहतो त्या त्या स्वप्नामध्यें इंद्रियें स्वस्थ असतां सुद्धां मनामध्यें येतात. कारण हें व्यापक मन सर्व भूतमात्रांच्या ठिकाणीं आत्म्याच्या स्वभावामुळें कांहीं अडथळा न होतां राहिलें आहे. या आत्म्याला नीट ओळखावें; कारण सर्व तत्त्वें याच्या ठिकाणींच आहेत. आतां सुषुप्तीमध्यें स्वप्नाचें द्वार जें हें व्यक्त शरीर तें मनामध्यें लीन होतें व या शरीरासह मन अव्यक्त व सद्सत् अशा सर्व वस्तू ज्यावर अवलंबून आहेत अशा आत्म्याच्या ठिकाणीं लीन होऊन त्याला सर्वसाक्षीभूत अशा आत्म्याचें स्वरूप येतें. ज्या योग्याची वासनेमुळें ज्ञान, त्याग इत्यादि दिव्य गुणांपैकीं एखादा गुण संपादण्याची इच्छा असेल त्यानें शुद्ध मन हेंच त्याला कारण आहे असें समजावें. कारण आत्मस्वरूपी झालेल्या शुद्ध मनावरच या सर्व कांहीं गोष्टी अवलंबून आहेत; व ही गोष्ट तपानें साधते. जो योगी अज्ञानाच्या पलीकडे गेला आहे तो सूर्याप्रमाणें देदीप्यमान होऊन झळकतो. अज्ञान नाहींसें झाल्यावर मनुष्य तिन्ही लोकांना कारणीभूत जें परब्रह्म त्याच्या सारूप्यतेला पावतो. देवांनीं तपोगुण धरला असून तपाला विघ्नकारक असा तमोगुण असुरांनीं धरला आहे. ज्ञानगुणात्मक हें जें ब्रह्म हें देवांना किंवा असुरांना दोघांनाही दुर्लभ आहे. सत्व, रज व तम हे तीन गुण देव व असुर यांमध्यें दिसून येतात. त्यांपैकीं सत्वगुण देवांमध्यें व दुसरे दोन असुरांमध्यें आहेत. ब्रह्म हें या तिन्ही गुणांच्या पलीकडे असून तें शुद्धज्ञान आहे. तें अमर, देदीप्यमान व कधीं कमी न होणारें असें आहे. याला ओळखणारे मोक्षाला जातात. ज्ञानचक्षूनें हेतुवादानें याचें ज्ञान करून देतां येणें शक्य आहे. किंवा सर्व इंद्रियें मनामध्यें लीन केल्यानें याची ओळख पटण्याजोगी आहे. ज्याला स्वप्न, सुषुप्ति, सगुण व ब्रह्म या चार विषयांचें ज्ञान झालें नाहीं, त्याचप्रमाणें व्यक्त शरीर व अव्यक्त तत्त्व याची ओळख पटली नाहीं, त्याला ब्रह्माचें ज्ञान झालें नाहीं असें समजलें पाहिजे. जें ह्मणून व्यक्त आहे तें सर्व मृत्यूचें मुख असून अव्यक्त हें अमरपद देणारें आहे. नारायण ऋषींनीं सांगितलेल्या प्रवृत्तिधर्मामध्यें सर्व चराचर त्रैलोक्य राहिलें आहे. निवृत्त्यात्मक जो धर्म तो प्रत्यक्ष अव्यक्त ब्रह्म आहे. प्रवृत्ति ह्मणजे पुनर्जन्म व निवृत्ति ह्मणजे श्रेष्ठ गति. ही गति, ज्या मुनीनें पापपुण्य ओळखून व ब्रह्मज्ञानामध्यें गढून निवृत्तिधर्माकडे लक्ष दिलें आहे तो मिळवितो. त्याचप्रमाणें प्रकृति व पुरुष या दोघांना नीट ओळखावें. यांच्या पलीकडचा यांहून श्रेष्ठ तो परमात्मा. याला शहाण्यानें विशेषेंकरून ओळखावें. या दोन्ही प्रकृति व पुरुष यांना आदि किंवा अंत नसून स्वरूप नाहीं. हे दोघेही नित्य व अचल असून महत्तत्वाहून श्रेष्ठ आहेत. एवढ्या गोष्टींत या दोघांचा सारखेपणा असून पुढील भेद त्यांच्यामध्यें आहेत. प्रकृतीमध्यें सत्व, रज, तम हे तीन गुण असून सृष्टि उत्पन्न करण्याचा धर्म तिच्यामध्यें आहे. याच्या उलट गुण पुरुषामध्यें आहेत. प्रकृतीचे सर्व विकार त्याला कळत असून तो कोणाला दिसत नाहीं. तो सर्व गुणांच्या पलीकडे आहे. आतां पुरुष व ईश्वर हे दोघेही ग्रहणशक्तीच्या पलीकडे असून लिंगहीन व त्यामुळेंच अलग असे आहेत. ज्याप्रमाणें डोक्यावर पागोटें असलेल्या मनुष्याच्या डोक्यावर वस्त्राच्या तीन पट्ट्या असून त्या मनुष्याशीं त्यांचें तादात्म्य नसतें, त्याप्रमाणें आत्म्याच्या भोंवतीं सत्व, रज, तम या तीन गुणांचें पांघरूण आहे तरी या गुणांशीं त्याचा कांहीं संबंध नाहीं. ह्मणून प्रकृति व पुरुष यांच्या मधला एकपणा व भेद त्याचप्रमाणें पुरुष व ईश्वर यांच्यामधला एकपणा व भेद या चार विषयांवर अनाद्यनंतत्व, चित्त्व, इतरांपासून भेद आणि चलनशक्ति ह्या चार गोष्टी नीट समजून घ्याव्यात. ज्याला हें सर्व कळतें तो कधीं मोह पावत नाहीं. ज्याला आपल्या उत्तम कल्याणाची इच्छा असेल त्यानें मन शुद्ध करून शारीरिक व इंद्रियांसंबंधी तप करावें व फलेच्छा न ठेवतां योगसाधन करावें. या सर्व त्रैलोक्यामधून देदीप्यमान योगसामर्थ्य भरून राहिलें आहे. चंद्रसूर्य हे त्याच सामर्थ्यामुळें भासतात. त्याचप्रमाणें योगाचें फळ ज्ञान आहे. हें या जगामध्यें फार महत्त्वाचें आहे. रज व तम यांचा नाश

करणारें ह्मणून जें जें कांहीं आहे तें सर्व योगाच्या स्वरूपाचें आहे. ब्रह्मचर्य व अहिंसा हें शारीरिक तप असून वाणी व मन ताब्यांत ठेवणें याला मानसिक तप ह्मणतात. ज्याला सर्व विधि माहीत आहेत अशा ब्राह्मणापासून मिळविलेलें अन्न श्रेष्ठ समजलें आहे. खाण्यामध्यें नियम ठेवल्यानें रजोगुणापासून उत्पन्न होणारें पाप नाहींसें होतें. अशा या अन्नावर राहणाऱ्या योग्याचीं इंद्रियें विषयांपासून परततात. ह्मणून योग्यानें शरीराला लागेल एवढेंच अन्न घ्यावें व जें ज्ञान त्याला योगसाधनानें क्रमाक्रमानें मिळेल तें त्यानें अंतकालीं प्रसन्नतेनें आपल्या हृदयामध्यें ठेवावें. आत्मा रजोगुणापासून मुक्त झाला असतां एकदम मुक्त न होतां सूक्ष्म देह धरून सूक्ष्म इंद्रियांनिशीं आकाशामध्यें फिरत राहतो. जेव्हां मन कर्मापासून अलग होतें, तेव्हां त्या त्यागामुळें हें सूक्ष्मरूप नाहींसें होऊन ब्रह्माशीं न मिळतां तो प्रकृतीमध्यें मिळून जातो. कारण हें ब्रह्म प्रकृतीहून पलीकडे आहे. हा जड देह ठेवल्यावर दक्षता ठेवल्यानेंच मनुष्य जड, सूक्ष्म व कारण ह्या तीन देहांपासून मुक्त होऊन मोक्षाला जातो. सर्व भूतमात्रांचें जन्ममरण अविद्येवर अवलंबून आहे. खरें ब्रह्मज्ञान झालें असतां या जन्ममरणाचें कारण उरत नाहीं. परंतु जे जो आत्मा नव्हे त्यालाच आत्मा समजतात, त्यांचें या सर्व दृश्य वस्तूंच्या जन्मगरणाकडे लक्ष लागलें असून मोक्षाची त्यांना आशा नाहीं. तपानें देह धरून राहून बुद्धीच्या योगानें वासनेपासून जे आपलें मन काढून घेतात व इंद्रियविषयांपासून अलग राहून योगानें मन शुद्ध करून शास्त्रांत सांगितल्याप्रमाणें वागून परमात्म्याकडे जे लक्ष लावतात त्यांना बुद्धीच्या योगानें त्याचें ज्ञान होऊन दुसऱ्या कशावर अवलंबून नसून जें स्वतःवर अवलंबून आहे अशा ब्रह्मामध्यें ते मिळून जातात. कांहींजण याला मूर्तीमध्यें व कांहीं गुणामध्यें भजतात. कांहीं विजेप्रमाणें चमकणाऱ्या अविनाशी श्रेष्ठ दिव्य तत्त्वामध्यें याला पहातात. कांहीं तपानें आपलीं पापें धुवून काढून शेवटीं ब्रह्माला मिळतात. ज्ञानचक्षूनें सोपाधिक ब्रह्माचीं निरनिराळीं सूक्ष्म लिंगें त्याच्या सामान्य लिंगापासून निराळीं ओळखावीं. ज्या योग्याला देहाची पर्वा उरली नाहीं व ज्यानें विरक्त होऊन मन योगाकडे लाविलें आहे, तो अव्यक्त ब्रह्माशीं मिळून जातो. ज्यांनीं ज्ञान मिळविण्याकडे लक्ष दिलें आहे, ते प्रथम मृत्युलोकांपासून मुक्त होऊन पुढें रजोगुणांनीं त्यांना सोडल्यानें ते श्रेष्ठ गतीला जातात. हा ब्रह्मप्राप्तीच्या मार्गाचा धर्म सर्वश्रेष्ठ असून जे जे ज्या ज्या मानानें हा पाळतात त्या त्या मानानें त्यांना श्रेष्ठ गति मिळते. ज्यांना निर्मळ व स्थिर असें ब्रह्मज्ञान उत्पन्न होतें ते प्रथम श्रेष्ठ लोकांना जातात व पुढें त्यांच्या त्यांच्या सामर्थ्याप्रमाणें मुक्त होतात. आशा बाजूला ठेवून ज्ञानामध्यें संतुष्ट राहून शुद्ध अंतःकरणानें आपल्या ठिकाणीं असणाऱ्या हरीला जे शरण जातात ते स्वतः अविनाशी होऊन फिरून भवचक्राच्या फेऱ्यांत पडत नाहींत; व श्रेष्ठ स्थान मिळून आनंदांत असतात. अशा प्रकारचें हें ब्रह्मज्ञान असून हें ज्ञान ज्ञान्यांना आहे व अज्ञान्यांना नाहीं. आशेनें जखडून गेलेलें हें जग चक्राप्रमाणें फिरत आहे. कमळामध्यें ज्याप्रमाणें बिसतंतू भरून असतात त्याप्रमाणें आदि व अंत नसणारे आशातंतू या देहामध्यें भरून आहेत. ज्याप्रमाणें कोष्टी धोट्यानें वस्त्रांत सूत सारून देत असतो त्याप्रमाणें आशेच्या धोट्यानें हें संसारसूत्र मनुष्याला आवळून टाकतें. विकार, प्रकृति, पुरुष व सनातन यांची ज्याला पूर्ण ओळख पटली त्याची आशा नाहींशी होऊन तो मुक्त होतो.'

---

## १७१ जनकाची कथा.

## (१२. २१८–१९)

'कशा प्रकारचें वर्तन ठेवून मिथिलेचा राजा जनक सर्व ऐहिक भोग सोडून मोक्षाला गेला,' ह्मणून युधिष्ठिरानें विचारलें असतां भीष्म ह्मणाले, 'सांगतों ऐक. हा मिथिलेचा राजा जनक ब्रह्मज्ञानाकडे लक्ष देऊन त्याच्या चिंतनामध्यें गढून होता. त्याच्या वाड्यांत नेहमीं शंभर आचार्य रहात असत. ते त्याला आश्रमामध्यें रहाणारांचे निरनिराळे धर्म सांगत असत. स्वतः वेदाभ्यासामध्यें गढून असलेल्या या राजाला मरण व पुनर्जन्म यांसंबंधीं जीं त्यांचीं

मतें त्यासंबंधानें फारसें समाधान होत नसे. पंचशिख नांवाचे महामुनि सर्व पृथ्वी फिरत फिरत एके वेळीं तेथें आले. सर्व धर्मांमध्यें त्यागाच्या तत्त्वज्ञानासंबंधानें त्यांचें ठाम मत ठरलें असून आपलें कर्तव्यही त्यांनीं ठरवून टाकलें होतें. त्यांना संशय ह्मणून मुळीं राहिला नसून ते सुखदुःखादि द्वंद्वाच्या पलीकडे गेले होते. ते सर्व ऋषींमध्यें श्रेष्ठ असून ब्रह्मज्ञानापासून होणारें जें दुर्लभ शाश्वतसुख तें निष्काम बुद्धीनें लोकांमध्यें प्रसिद्ध करण्यासाठीं ते सर्व पृथ्वीवर फिरत होते. त्यांना सांख्यलोक कपिल ह्मणत; व आसुरीचे पहिले शिष्य ते चिरंजीवी समजले जात. त्यांनीं हजार वर्षेंपर्यंत मानस यज्ञ केला असून ब्रह्मप्राप्तीसाठीं शास्त्रांत सांगितलेले सर्व विधि व यज्ञ त्यांनीं केले होते. देहाला झांकणाऱ्या अन्नमयादि पंचकोशांचें त्यांना चांगलें ज्ञान होतें. ब्रह्मोपासनेच्या पांच विधींकडे त्यांचें लक्ष होतें व शमदमादि पांच गुण त्यांच्या अंगामध्यें बाणले होते. हे एके वेळीं सांख्य मतानुयायी एका मोठ्या ऋषिमंडळाकडे आले असतां ज्यावर पंचकोश अवलंबून आहेत त्या अव्यक्त ब्रह्मसंबंधानें त्यांनीं माहिती विचारली. आसुरींनीं आपल्या गुरूंना विचारून त्यांकडून व तपाच्या सामर्थ्यानें हें ज्ञान करून घेतलें होतें व देह व आत्मा यांचा भेद त्यांना पूर्ण कळत होता व त्या सभेमध्यें त्यांनीं पंचशिखांना निरनिराळ्या स्वरूपांमध्यें दिसणाऱ्या ब्रह्माचें चांगलें स्पष्टीकरण केलें. पंचशिख हे त्यांचे शिष्य झाले. या आसुरींची कपिला नांवाची बायको होती. तिनें यांना आपल्या मुलाप्रमाणें समजून आपलें दूध यांना पाजलें. यामुळें यांना कापिलेय हें नांव मिळालें. त्यांची बुद्धि ब्रह्माकडे लागली. हे पंचशिख एके वेळीं जनक राजाचें लक्ष आपल्या सर्व गुरुंवर सारखें आहे असें समजल्यावरून त्याकडे आले व आपल्या मुद्देसूद भाषणांनीं त्यांनीं त्याच्या शंभर आचार्यांना थक्क करून सोडलें. यांचें ज्ञान पाहून जनकाचें त्यांच्यावर प्रेम जडलें व आपल्या शंभर आचार्यांना सोडून तो यांच्यामागें लागला. या योग्य व आपल्यापुढें नम्र झालेल्या जनकाला सांख्यमार्गांत सांगितलेला श्रेष्ठ मोक्षमार्ग त्यांनीं सांगितला. प्रथम जातीमुळें उत्पन्न होणारें दुःख सांगून पुढें कर्मापासून उत्पन्न होणारें दुःख व शेवटीं जीविताच्या सर्व स्थितीमध्यें उत्पन्न होणारें दुःख त्यांनीं त्याला स्पष्ट करून सांगितलें. ज्यापासून धर्म, कर्म व फलप्राप्ति उत्पन्न होतात, अशा अविश्वासिक, विनाशी, अशाश्वत व अनिश्चयात्मक मोहासंबंधानेंही त्यांनीं त्याला माहिती सांगितली. ते ह्मणाले कीं, संशयवाद्यांचें मत असें आहे कीं, 'या देहाचें मरण प्रत्यक्ष दिसत असून केवळ शास्त्रावर विश्वास ठेवून या देहाहून निराळा आत्मा ह्मणून कांहीं आहे असें जे प्रतिपादन करतात त्यांचा वरील प्रमाणावरून खात्रीनें वादांत मोड होतो. ते असेंही ह्मणतात कीं, मरणाबरोबरच आत्म्याचाही नाश होतो. व क्लेश, जरा आणि रोग हीं आत्म्याचा हळूहळू ऱ्हास होण्याला कारणें आहेत. जे अज्ञानानें देहाहून आत्मा निराळा असून देहनाशानंतर तो कायम असतो असें समजतात त्यांचें तें मत चुकीचें आहे. जें जगामध्यें नाहीं तें आहे असें जर समजावयाचें तर राजाला शास्त्राधारानें जरा किंवा मरण नसलें पाहिजे. एखादी वस्तु आहे किंवा नाहीं असा प्रश्न आला असतां व ती नसल्याचीं स्पष्ट चिन्हें दिसत असतां लोकांनीं त्यांचा निश्चय कशावर ठरवावा. अनुमान व शास्त्र यांचें मूळसुद्धां प्रत्यक्ष प्रमाणावर आहे. प्रत्यक्ष प्रमाणानें शास्त्रामधला भेद दाखवून देतां येतो. अनुमानाचें वळ कांहीं फार मोठें नाहीं. कोणत्याही विषयासंबंधानें केवल अनुमान प्रत्यक्ष पुराव्यापेक्षां महत्त्वाचें नाहीं. जीव ह्मणून ज्याला ह्मणतात असें या शरीराहून निराळें कांहीं नाहीं. वडाच्या झाडाच्या बियांमध्यें फुलें, फळें, मुळें व साली उत्पन्न करण्याची शक्ति आहे. गाय जें गवत खाते व जें पाणी पिते त्यामध्यें दूध व लोणी उत्पन्न करण्याची शक्ति आहे. ह्याप्रमाणें हे जे जे पदार्थ बनतात यांचे स्वभाव, ज्यांपासून हे बनतात, त्यांहून फार निराळे आहेत. ज्या वेळेला निरनिराळे पदार्थ पाण्याशीं एकजीव होतात तेव्हां त्यापासून मादक दारू उत्पन्न होते. याचप्रमाणें रेतापासून शरीर त्याच्या सर्व घटकावयवांसह बनतें. दोन लांकडें एकमेकांशीं घांसलीं असतां विस्तव उत्पन्न होतो. सूर्यकांतमण्याचा सूर्यकिरणांशीं संबंध जडला असतां

त्यापासून विस्तव उत्पन्न होतो. एखादी घन धातु तापविली असतां पाणी शोषून घेण्याचा धर्म तिच्या अंगामध्यें येतो. याप्रमाणें या शरीरापासून मन, दर्शन, स्मृति, तर्क इत्यादि त्याचे धर्म उत्पन्न होतात. ज्याप्रमाणें लोहचुंबक लोखंडाला चलनशक्ति देतो त्याप्रमाणें मनाच्या साह्यानें इंद्रियांना चलनशक्ति मिळते.' हे संशयवादी लोकांचे मुद्दे आहेत. परंतु त्यांचे हे मुद्दे चुकीचे आहेत. कारण मनुष्य मेला असतां चिच्छक्ति नाहींशी होऊन त्याबरोबर देह नाहींसा होत नाहीं. यावरून हे दोन्ही एक नसून आत्मा हा देहाहून निराळा असून त्याच्यामागें रहातो हें सिद्ध होतें. जर देह व आत्मा हे एकच असते तर ते दोन्ही एकाच वेळेला नाहींसे झाले पाहिजे होते; परंतु मरणक्रिया घडल्यावर पुढें कांहीं वेळपर्यंत देह कायम असलेला दिसतो. यावरून मरण ह्मणजे देहापासून वेगळी असलेल्या कांहीं अनिर्वाच्य वस्तूचें देहाला सोडून जाणें आहे असेंच ह्मणावें लागतें. जे लोक आत्म्याचें निराळें अस्तित्व नाकबूल करतात ते सुद्धां देवांचा धांवा करतात. हा एक आत्मा हा देहाहून वेगळा आहे हें सिद्ध करण्याला दुसरा मुद्दा आहे. कारण ज्या देवांची लोक प्रार्थना करतात तेही दिसत नाहींत किंवा त्यांनाही स्पर्श करतां येत नाहीं. तेही सूक्ष्मरूपानें आहेत असें समजण्यांत येतें. मग देवांना जर सूक्ष्मरूपामध्यें समजण्यांत कांहीं बाध येत नाहीं तर आत्मा सूक्ष्मरूपानें आहे असें समजण्याला तरी हरकत कोणती ? आतां या संशयवाद्यांच्या विरुद्ध दुसरा एक मुद्दा असा आहे कीं, त्यांचें ह्मणणें खरें धरलें असतां कर्मवैफल्य दिसून येतें. कारण देह व आत्मा एकदमच मरतात असें समजलें तर त्यानें आपल्या सर्व जन्मामधून केलेलीं कर्में त्याबरोबरच नाहींशीं झालीं पाहिजेत. परंतु हा निर्णय खरा धरल्यानें जगामध्यें दिसून येणाऱ्या निरनिराळ्या स्थितींना कारण देतां येत नाहीं. वर सांगितलेले मुद्दे व व्यक्त स्वरूपें हीं अव्यक्त अशा आत्म्याला कारण असूं शकणार नाहींत. अव्यक्ताशीं व्यक्तांचें तादात्म्य अतर्क्य आहे. ह्मणून जे व्यक्त पदार्थ आहेत ते अव्यक्ताच्या उत्पत्तीला कारण असूं शकणार नाहींत. कांहीं पुनर्जन्म कबूल करून त्याला अज्ञान, कर्मवासना, लोभ, अप्रमाद व अशा प्रकारचे दुसरे दोष कारण देतात. अविद्या ही जमीन असून त्यांत पेरलेलीं कर्में हीं बीजें व तीं बीजें वाढण्याला वासना हें पाणी आहे असें ते ह्मणतात. याप्रमाणें ते पुनर्जन्माचा उलगडा करतात. ते ह्मणतात कीं, याप्रमाणें अदृश्य रीतीनें अज्ञानाचें अस्तित्व धरल्यानें एक प्राणी मेला असतां लगेच त्यापासून दुसरा उत्पन्न होतो आणि ज्ञानाच्या साहाय्यानें त्याला जाळून टाकिलें असतां त्याबरोबर अस्तित्वाचा नाश होऊन मनुष्याला निर्वाण मिळतें. परंतु हें मत सुद्धां चुकीचें आहे. यावर असा प्रश्न निघतो कीं, फिरून जन्म घेणारा मनुष्य स्वभाव, जन्म, व उद्देश या सर्वांमध्यें पहिल्याहून निराळा असल्यानें तोच हा असें मानण्यांत काय अर्थ आहे; ह्यावरून एवढेंच मानतां येईल कीं, एखाद्या मनुष्याची पुनर्जन्माची सांखळी व्यवस्थित जोडलेल्या कड्यापासून नसून निरनिराळ्या जन्माचा परस्परांशीं संबंध नाहीं; त्याचप्रमाणें पुनर्जन्म घेणारा प्राणी पूर्व स्थितीहून जर निराळा असणार तर ज्या आपल्या कृत्यांचें फळ दुसऱ्या जन्मांत दुसऱ्या मनुष्याला मिळणार अशीं धर्मकृत्यें, ज्ञानार्जन व तप करण्यांत त्याला सुख तरी काय होणार ? या मताचा दुसरा आणखी एक असा परिणाम होणार कीं, एखाद्या मनुष्याला या जन्मांत दुसऱ्या एखाद्याच्या पूर्वजन्मींच्या कर्माबद्दल दुःख सोशीत बसावें लागणार. तथापि ह्या जगामध्यें जें प्रत्यक्ष घडत आहे त्यावरून अदृश्यासंबंधानें निराळा निर्णय ठरवितां येईल. पुनर्जन्मामध्यें उत्पन्न होणारी बुद्धि पूर्व जन्मींच्याहून निराळी अशी मानतां येईल; परंतु या निराळ्या बुद्धीचा उद्भव ज्या रीतीनें या मतांत सांगितला आहे तें तर्काला धरून नाहीं. कारण पूर्वजन्मामध्यें असणारी बुद्धि शाश्वत नसून विनाशी व शरीराच्या नाशापर्यंतच टिकणारी होती व जिचा नाश आहे त्यापासून पुढें दुसऱ्या बुद्धीची उत्पत्ति झाली असें ह्मणतां येणार नाहीं व असें जर समजतां येणें शक्य असेल तर मुसळानें कुटला जाऊन मेलेल्या मनुष्याच्या देहापासून दुसरा देह उत्पन्न व्हावा; त्याचप्रमाणें त्यांच्या निर्वाणाच्या मताला सुद्धां हा अपवाद आहे कीं, ऋतु, वर्ष, युग, उ-

ष्णता, थंडी व इष्टानिष्ट गोष्टी हेही फिरून फिरून यावे. हा वाद टाळण्यासाठीं, ज्याला सर्व जाऊन मिळतात अशा प्रकारच्या कायमच्या आत्म्याचें अस्तित्व ते घेऊन चालतात; परंतु तसें घेतलें तरी ज्याप्रमाणें एखाद्या इमारतीचें सामान फार दिवसांनीं जीर्ण झालें असतां त्याबरोबर त्या इमारतीचा नाश होतो, त्याप्रमाणें जरेमुळें व विनाशी अशा मृत्यूमुळें अशा आत्म्याचा नाश झाला पाहिजे. इंद्रियें, मन, वायु, रक्त, मांस व हाडें ह्या सर्वांचा एका मागून एक नाश होऊन आपापल्या धातूंना जाऊन तीं मिळतात. बुद्ध्यादि गुणांना आश्रयभूत असून त्यापासून वेगळ्या अशा या प्रकारच्या आत्म्याचें अस्तित्व घेऊन चाललें असतां त्याला दुसरा एक असा अपवाद येतो कीं, फलेच्छेनें केलेल्या दानधर्मादि क्रिया, त्याचप्रमाणें कर्म करावयास सांगणारीं श्रुतिवाक्यें व लौकिकव्यवहार यांमध्यें कांहीं अर्थ राहणार नाहीं. याप्रमाणें या बाबतींत नाना प्रकारचे वितर्क उत्पन्न होतात व कोणतें खरें आणि कोणतें खोटें हें ठरविण्याला साधन नाहीं. निरनिराळ्या मतांवर विचार करणारे निरनिराळे लोक त्या त्या मतानें वागूं लागून त्यांतच गढून जातात. याप्रमाणें बऱ्या वाईट गोष्टींकडे लक्ष देऊन दुःखांत बुडणाऱ्या लोकांना हत्तीला वाटेवर आणणाऱ्या माहुताप्रमाणें वेदच वाटेवर आणतात. पुष्कळ कोत्या बुद्धीचे लोक अत्यंत सुख देणाऱ्या गोष्टींची इच्छा करतात व त्यापासून भयंकर दुःख होऊन मग ती इष्ट वस्तु टाकून मृत्यूच्या तावडींत जातात. ज्याचें जीवित अशाश्वत आहे अशा खात्रीनें नाश होणाऱ्या मनुष्याला बंधु, बायकापोरें, मित्र व दुसऱ्या गोष्टी घेऊन काय करावयाच्या आहेत; कारण या सर्वांना सोडून तो एका क्षणांत निघून जातो व फिरून कधीं परत येत नाहीं. पृथ्वी, आकाश, पाणी, अग्नि व वायु हे आपापल्या परीनें नेहमीं शरीराला पोशीत असतात, हा विचार मनांत येऊन शरीरावर प्रेम कोण करील? नाशवंत अशा या शरीरामध्यें आनंददायक असें कांहीं नाहीं.' हें निष्कपट व मोह दूर करणारें भाषण ऐकून जनक राजा फिरून ह्मणाला, 'जर कोणाही मनुष्याला या स्थितींतून नाहींसें झाल्यावर या स्थितीचें कांहीं ज्ञान उरत नाहीं, तर मग ज्ञानापासून काय फायदा व अज्ञानापासून तोटा तरी काय? सर्वांचा शेवट समूळ नाशामध्यें व्हावयाचा असल्यानें मनुष्य हुशार झाला किंवा बेपर्वा असला तरी तो काय करणार? जर मोक्षाचा अर्थ भोग्य वस्तूंशीं वियोग हा आहे तर मनुष्यांनीं कर्माकडे लक्ष कां द्यावें व कर्मे करून तीं मनाप्रमाणें शेवटास नेण्यास प्रयत्न तरी कां करावा?' याप्रमाणें हुशार असून मोह पडून त्या राजाला भ्रमल्यासारखा झालेला पाहून पंचशिख ह्मणाले, 'या ज्ञानाचा शेवट कशाचा समूळ नाश करण्यामध्यें किंवा कांहीं मिळवून देण्यामध्यें होत नसून गळ्यांत असून त्यासंबंधीं विसर पडलेल्या कंठ्याप्रमाणें स्वरूपाचें ज्ञान करून देण्यांत होतो. हा आपणाला दिसतो तो शरीर, इंद्रियें व मन यांचा एकत्र संबंध आहे. ते एकमेकांच्या आधारानें एकमेकांपासून वेगळे असून कर्म करीत आहेत. ज्यांचें हें शरीर बनलें आहे ते पांच धातू या शरीरामध्यें स्वभावानें एकत्र राहिले असून स्वभावानेंच फिरून वेगळे होतात. हे पांच एकत्र असतात तेव्हां त्यांना शरीराचें स्वरूप येतें. शरीर हें कांहीं एक तत्त्व नाहीं. ज्ञान, उष्मा व वायु हे तीन शरीरामध्यें कार्य करणारे आहेत. या तिघांपासून इंद्रियें, इंद्रियांचे विषय, स्वभाव, चेतना, मन, प्राणापानादि वायु व रसादि निरनिराळे विकार उत्पन्न होतात. श्रोत्र, त्वक्, जिव्हा, चक्षु, व घ्राण हीं पंचेंद्रियें असून त्यांना कारणीभूत जें मन त्यापासून त्यांच्या अंगीं त्यांचे त्यांचे धर्म आले आहेत. हें चित्प्रेरित मन सुखदुःख व दोहींचा अभाव या तीन स्थितींत असतें. शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध व ज्यांमध्यें हे गुण आहेत अशा वस्तू ह्या मनुष्याच्या शरीरामध्यें मरावयाच्या वेळेपर्यंत ज्ञान उत्पन्न करण्याला कारण आहेत. स्वर्गप्राप्ति करून देणारीं सर्व कर्में व ब्रह्मप्राप्ति करून देणारा त्याग व सर्व तत्त्वांसंबंधी ठाम निश्चय हीं सर्व या इंद्रियांवरच अवलंबून आहेत. या तत्त्वार्थाचा निश्चय करणें हेंच जीविताचें मोठें काम असून मोक्षाचें बीज आहे. त्याप्रमाणें बुद्धि अव्यय अशी ब्रह्मप्राप्ति करून देणारी आहे. गुणांचा समुदायभूत जें हें शरीर

त्यालाच जो आत्मा समजतो, तो त्याच्या ह्या खोट्या ज्ञानामुळें अनंत दुःखाला जागा देतो. जे लोक ऐहिक विषयांचा आत्म्याशीं कांहीं संबंध नाहीं हें ओळखून त्यावर प्रेम किंवा आसक्ति ठेवीत नाहींत त्यांना दुःख सोसावें लागत नाहीं. कारण दुःखाला त्यांच्यापाशीं कांहीं आश्रयच मिळत नाहीं. या संबंधांत त्यागासंबंधानें विवेचन करणारें **सम्यग्वध** नांवाचें उत्तम मोक्षप्राप्ति करून देणारें सांख्य शास्त्र आहे. कर्मत्याग मोक्षप्राप्तीला मुख्य सांगितला आहे. परंतु योग्य ज्ञान न मिळाल्यानें ज्यांना त्यागावांचून शांति मिळेल असें वाटतें त्यांना दुःखाचा मोठा भार सोसावा लागतो. वेदामध्यें सांगितलेले यज्ञ व दुसऱ्या क्रिया द्रव्याच्या त्यागासाठीं आहेत. विषयोपभोगाच्या त्यागासाठीं व्रतें आहेत, व सुख सोडण्यासाठीं तप आहे व सर्वत्याग हाच सर्वांत श्रेष्ठ आहे आणि हा पुढचा मार्ग त्यासाठीं सांगितला आहे. जे हा मार्ग धरतात ते सर्व दुःख दूर करण्याला समर्थ होतात; परंतु जे त्यापासून भलतीकडे जातात त्यांना दुःख व संकटें सोसावीं लागतात. प्रथम पंच ज्ञानेंद्रियें, मन आणि बुद्धि यांसंबंधानें सांगतों. दोन हात हे कर्मेंद्रियें आहेत. दोन पाय हे चलनेंद्रियें आहेत. शिश्न प्रजोत्पत्ति करण्याचें इंद्रिय आहे. गुद मल वाहून नेणारें इंद्रिय आहे. व वाणी हें शब्द उच्चारण्यासाठीं आहे. या सर्व पांच कर्मेंद्रियांचा मनाशीं संबंध आहे. पांच ज्ञानेंद्रियें, पांच कर्मेंद्रियें यांसकट मनाला बुद्धीमध्यें लीन करावें. ऐकण्याला कान, शब्द व मन या तिघांची आवश्यकता आहे व हाच प्रकार स्पर्श, रूप रसादिकांचा आहे; तेव्हां एकंदर सर्व इंद्रियांच्या ज्ञानासंबंधानें पंधरा गुण लागतात, व हे सर्व गुण फिरून सत्व, रज व तम असे त्रिगुणात्मक आहेत. कांहीं कारणामुळें किंवा कारणावांचून होणारे प्रहर्ष प्रीति, आनंद, सुख, शांतचित्तता, इत्यादि विकार सात्विक गुणांपासून उत्पन्न होतात. असमाधान, संताप, शोक, लोभ, असहनशीलता हे रजोगुणाचें कार्य असून ते सकारण किंवा अकारण दिसून येतात; त्याचप्रमाणें कोणत्याही कारणापासून उत्पन्न होणारे अविवेक, मोह, प्रमाद, झोंप, व सुस्ति हे तमोगुणापासून होणारे विकार आहेत. शरीर किंवा मन यासंबंधानें प्रीतिकारक किंवा समाधानकारक जी स्थिति रहाते ती सात्त्विक स्वभावामुळें समजावी. असमाधान व असंतोष, अशा प्रकारची जी स्थिति रहाते ती रजोगुणापासून समजावी व प्रमादात्मक स्थिति झाली असतां तें तमोगुणाचें चिन्ह समजावें. श्रोत्र हें आकाशापासून झालें असून शब्दाला याचा आधार आहे; तेव्हां तोही आकाशाचाच भेद झाला; तेव्हां शब्दज्ञान झालें असतां त्याबरोबर एकदम जरी श्रोत्र व आकाश यांचें ज्ञान झालें नाहीं तरी तें अज्ञान फार वेळ रहात नाहीं. श्रोत्र नाहींसें करून शब्द व आकाश नाहींशीं करतां येतात. तसेंच मनच नाहींसें केल्यानें या सर्वांचा नाश होतो. हीच स्थिति बाकीच्या सर्व इंद्रियांसंबंधानें आहे. आपापल्या कर्मामध्यें गढलेलीं हीं पांच ज्ञानेंद्रियें व पांच कर्मेंद्रियें त्याचप्रमाणें अकरावें मन व बारावी बुद्धि हे एकत्र आहेत. हे एकत्र नाहींत ह्मणावें तर सुषुप्तीमध्यें मरण आलें पाहिजे; परंतु तसें होत नसल्यानें असें अनुमान निघतें कीं, हीं बारा त्यांच्यासंबंधानें एकत्र परंतु आत्म्याशीं विचार करतांना मात्र निराळीं अशीं आहेत. सामान्य भाषेंत आत्मा व हीं एक आहे असें जें ह्मणणें आहे तें सामान्य व्यवहारापुरतें सामान्य लोकांचें ह्मणणें आहे. स्वप्नामध्यें मनुष्य त्याच्या पूर्वीच्या अनुभवाच्या वासनेवरून विषयसंबंध मनांत आणून स्वप्नामध्यें सत्वादि त्रिगुणांनीं युक्त असा जागृतावस्थेप्रमाणें सूक्ष्म शरीरांत आपण शरीरवान आहों असेंच समजून जागेपणीं करीत असल्याप्रमाणें कर्में व हालचाल करीत असतो. तमोगुणानें युक्त असें मन स्वप्नामध्यें हा जो शरीराशीं आत्म्याचा संबंध एकदम तोडतें त्यापासून होणारें सुख तमोगुणात्मक असून या जड शरीरालाच होतें. त्याचप्रमाणें अहंभावाची जागृति असल्यामुळें वेदोक्तींनीं मनांत जागृत होणाऱ्या, ज्यामध्यें यत्किंचित् दुःखाचा लेश नाहीं, अशा या मोक्षसुखामध्यें सुद्धां तमोगुणाचा भाग आहेसें वाटतें. परंतु या मोक्षसुखामध्यें हा तमोगुण मुळीं नसतो. आतां सुषुप्तीप्रमाणेंच मोक्षामध्यें अहंकारापासून घटादिकांपर्यंत सर्व दृश्यमान आपापल्या कर्माप्रमाणें उत्पन्न होणारे भोग्यवर्ग शरीरापासून दूर असतात. ज्यांना अज्ञानानें

सोडलें नाहीं, अशा कांहीं लोकांमध्येंच हे घट्ट रीतीनें कायम असतात. ज्यांनीं अविद्येच्या पलीकडे जाऊन ज्ञान मिळविलें आहे त्यांना हे कधीं चिकटत नाहींत. देह व आत्मा यांचें ज्ञान असणारे इंद्रियादिकांच्या संघाताला क्षेत्र असें ह्मणतात व या संघाताची बीजभूत जी सत्ता त्याला क्षेत्रज्ञ ह्मणतात. याप्रमाणें सर्व भूतमात्र कारणामुळें स्वभावानें अस्तित्वांत असल्यामुळें या दोघांचा संबंध कसला, व कोण विनाशी आहे, व जो शाश्वत आहे त्याचा नाश तरी कसा होणार? ज्याप्रमाणें लहान लहान नद्या मोठ्या नद्यांशीं मिळाल्या असतां व मोठ्या नद्या समुद्राशीं मिळाल्या असतां त्यांचा वेगळेपणा नाहींसा होऊन त्यांचें स्वरूप व नांव हीं नाहींशीं होतात, त्याचप्रमाणें जीवाचें आत्म्याशीं मिळून जाणें याला मोक्ष ह्मणतात. याप्रमाणें सोपाधिक जीव परमात्म्याशीं मिळून जाऊन त्याच्या उपाधि नाहींशा झाल्या असतां त्याला वेगळेपणानें कसें सांगतां येणार! मोक्षप्राप्तीकडे दक्षतेनें लक्ष लावून जो त्याच्या मागें लागला आहे, त्याला कमलावर शिंपडलेल्या पाण्याप्रमाणें अनिष्टकारक अशीं कर्माचीं फळें चिकटत नाहींत. बायकापोरें, यज्ञयागादि कर्में, यांवरील प्रेमामुळें जखडून टाकणाऱ्या अतिशय मजबूत अशा पाशापासून जेव्हां मनुष्य सुटतो व सुखदुःख टाकून मुक्त असा रहातो तेव्हां त्याला श्रेष्ठ गति मिळून तो ब्रह्माशीं मिळून जातो; व त्याच्यामध्यें वेगळेपणा मुळीं रहात नाहीं. जेव्हां मनुष्याला ब्रह्माचें बरोबर अनुमान करण्याला लावणारीं वेदवाक्यें पूर्ण कळूं लागतात आणि या विधींमध्यें सांगितल्याप्रमाणें त्याचें शुद्ध आचरण होऊं लागतें, तेव्हां जन्ममरणाची पर्वा न करतां त्याला स्वस्थ रहातां येतें. पापपुण्यें नाहींशीं झाल्यावर त्यांपासून उद्भवणाऱ्या सुखदुःखात्मक फळांचा नाश होतो. मग मनुष्य कशावर आसक्ति न ठेवतां प्रथम सगुणब्रह्मामध्यें लीन होतो. व नंतर आपल्या बुद्धीच्या ठिकाणीं निर्गुण ब्रह्म पाहूं लागतो. ह्या जगामध्यें रेशीम करणारा किडा स्वतःच केलेल्या रेशमाच्या तंतूंच्या कोशामध्यें रहात असून त्यांतून मोकळा झाल्यावर स्वतंत्र फिरूं लागतो, त्याप्रमाणें मनुष्य अविद्येमुळें आपल्या कर्मांनीं करून घेतलेल्या कोशामध्यें जन्ममरणाच्या फेऱ्यांत सांपडून फिरत रहातो व हा कोश कर्मापासून मुक्त झाल्यावर तो सोडतो, आणि याचा परिणाम असा होतो कीं, जोरानें खडकावर आदळून फुटून जाणाऱ्या ढेंकळाप्रमाणें त्याचीं सर्व कर्में नाश पावतात व शिंग टाकून देऊन स्वस्थ फिरणाऱ्या रुरु नांवाच्या हरणाप्रमाणें किंवा कात टाकणाऱ्या साप्राप्रमाणें कोणाला न दिसतां दुःख टाकून तो रहातो. ज्याप्रमाणें पाण्याच्या कांठीं असलेलें पडावयास झालेलें झाड सोडून त्यावर असणारा पक्षी निघून जातो, त्याचप्रमाणें मनुष्य वासनांपासून मुक्त होऊन सुखदुःख दूर करून सूक्ष्म व सूक्ष्मतर अशा स्वरूपापासून मोकळा होऊन अतिशय कल्याणकारक अशा पदाला मिळतो.'

---

## १७२ दम. ( १२. २२०–२१ )

'कशानें मनुष्य सुखी होतो, कशानें दुःखी होतो व कशानें त्याला सुख किंवा दुःख कांहींच होत नाहीं,' ह्मणून युधिष्ठिरानें विचारलें असतां भीष्म ह्मणाले, 'ज्यांनीं आपलें लक्ष श्रुतीकडे लावलें आहे, असे वृद्ध लोक सर्व वर्णांना व विशेषेंकरून ब्राह्मणांना दम हाच गुण चांगला आहे असें ह्मणतात. ज्याच्या ठिकाणीं आत्मनिग्रह नाहीं त्याचीं कर्में बरोबर साधत नाहींत. क्रिया, तप, सत्य सर्व कांहीं यावर अवलंबून आहेत. हाच मनुष्याचें तेज वाढवीत असून हा पवित्र समजला आहे. आत्मनिग्रही मनुष्य निष्पाप व निर्भय होऊन मोठा लाभ करून घेतो. तो सुखानें निजतो व सुखानें जागा होतो. सुखानें तो लोकांमध्यें वावरतो. त्याचें मन प्रसन्न असतें, त्याच्यामध्यें उत्साहशक्ति असते. सर्व प्रकारची मनाची चलबिचल तो शांत रीतीनें स्वस्थ करतो. तो आपल्या सर्व शत्रूंच्या ठिकाणीं आपले कामक्रोधादि जे पुष्कळ शत्रू त्यांना आपल्याहून वेगळे पाहूं लागतो. हिंस्र प्राण्यांप्रमाणें ज्यांचा आपल्या इंद्रियांवर ताबा नाहीं अशा लोकांपासून भूतमात्रांना नेहमीं भीति वाटते; व यांना ताब्यावर ठेवण्यासाठींच ब्रह्मदेवानें राजा निर्माण केला आहे. सर्व आश्रमांमध्यें आत्मनिग्रह श्रेष्ठ असून त्यांतील निरनिराळ्या धर्माचें जें फळ मिळतें

त्याहून आत्मनिग्रहाचें फळ अधिक आहे. आत्मनिग्रहामध्यें खालील गुणांचा समावेश होतो. थोरपणा, शांतस्वभाव, संतोष, श्रद्धाळुपणा, अक्रोध, साधेपणा, उगीच बडबड न करणें, निरभिमान, गुरूंचा सत्कार करणें, असूया न करणें, सर्व भूतांच्या ठिकाणीं दया ठेवणें, दुष्टपणा सोडून देणें, कुचाळी, असत्य भाषण, स्तुति आणि निंदा हीं सोडून देणें. आत्मनिग्रही मनुष्य सुखदुःखाचे अनुभव घेत असतां पुढचा व मागचा विचार करीत न बसतां वेळेला जें कांहीं सुख किंवा दुःख येऊन पडेल तें तो भोगीत रहातो. तो कोणाशीं वैर करीत नाहीं; त्याचा आदर औपचारिक नसतो; निंदा व स्तुति यांची त्याला सारखीच पर्वा असते, त्याचें वर्तन चोख असून तो शीलसंपन्न व प्रसन्न असा आपल्यावर आपला ताबा ठेवून असतो. या जगामध्यें सत्कार मिळवून तो स्वर्गाला जातो. सर्व प्राणिमात्रांना दुर्मिळ अशा वस्तू मिळवून देऊन तो सुखानें आनंदांत असतो. सर्व भूतमात्रांचें हित करण्यामध्यें दक्ष राहून तो कोणाचा द्वेष करीत नाहीं. मोठ्या तलावाप्रमाणें शांत असून ज्ञानामध्येंच तो तृप्त राहून प्रसन्न असतो. कोणाही भूतमात्रांची याला भीति नसते व याची कोणाला भीति नसते. सर्वांना हा वंद्य असतो. मोठा फायदा झाला ह्मणून त्याला हर्ष होत नाहीं व संकट आलें ह्मणून त्याला दुःख होत नाहीं. तो नेहमीं समाधानवृत्तींत असतो. अशा आत्मनिग्रही मनुष्याला ब्राह्मण समजतात. वेदसंपन्न असून भलीं कर्मे करीत रहाणारा आत्मनिग्रही मनुष्य त्याचें मोठें फळ भोगतो. अनसूया, क्षमा, शांति, संतोष, प्रियभाषण, सत्य, दान, हुषारी हे गुण दुष्टाच्या अंगीं नसतात. काम, क्रोध, लोभ, दुसऱ्याची ईर्षा, फुषारकी हे गुण त्याच्यामध्यें असतात. काम क्रोध ताब्यांत आणून ब्रह्मचर्य व्रतानें आत्मनिग्रह ठेवून या घोर संसारामध्यें ब्राह्मणानें व्रतशील राहून शांतपणें काळाकडे लक्ष देऊन फिरत रहावें.' ब्राह्मण यज्ञयागादि कर्माकडे लक्ष देऊन मद्यमांसादिकांचा देवतादिकांना दिलेला अवशेष स्वर्गप्राप्ति किंवा पुत्रप्राप्ति यांसाठीं खातात, यासंबंधानें आपलें काय मत आहे,' ह्मणून युधिष्ठिरानें विचाल्यावरून भीष्म ह्मणाले, 'वेदोक्त विधीवांचून स्वेच्छेनें मद्यमांस खाणारे ह्या जगामध्येंच पतित समजले जातात व फलेच्छेनें वेदोक्त रीतीनें जे याचें सेवन करतात त्यांना त्याचें फळ मिळतें; परंतु त्यांचें पुण्य संपल्यावर ते स्वर्गांतून खालीं येतात.' युधिष्ठिर ह्मणाला, 'सामान्य लोक उपवासाला तप समजतात; तेव्हां उपवास हें तप आहे किंवा तप याहून कांहीं निराळें आहे.' भीष्म ह्मणाले, 'महिने, पंधरवडे, दिवस यांनीं मोजले जाणाऱ्या उपवासास लोक तप समजतात खरें; परंतु भल्याच्या दृष्टीनें तें तप नसून ज्ञानप्राप्तीला तो अडथळा आहे. सर्व कर्मांचा त्याग व सर्वांच्या ठिकाणीं नम्रता हेंच श्रेष्ठ तप आहे. अशा प्रकारचें तप करणारा मनुष्य नेहमींचा उपवासी व नेहमींचा ब्रह्मचारी समजला आहे. हा मुनी, एवढेंच नव्हे, तर देवाप्रमाणें समजला आहे. व नेहमीं जागा असणारा हा कुटुंबामध्यें असला तरी धार्मिकच समजला आहे. मनुष्यानें दुसऱ्याला देऊन नंतर स्वतः खावें व आतिथ्यशील असावें. श्रद्धाळूपणानें देवब्राह्मणाची पूजा करावी.' युधिष्ठिर ह्मणाला, 'मनुष्य सदा उपवासी कसा होतो व सदाब्रह्मचारी कसा होतो व कसें वागल्यानें अवशिष्ट खाऊन अतिथिसत्कार केल्याचें श्रेय त्याला येतें?' भीष्म ह्मणाले, 'सकाळ संध्याकाळ ठरल्यावेळीं खाऊन फिरून मध्यें जो कांहीं खात नाहीं तो सदा उपवासी समजला आहे. स्त्रीशीं ऋतुकाळीं संबंध व सत्य भाषण ठेवून नेहमीं ज्ञानाकडे लक्ष देऊन राहणारा मनुष्य सदा ब्रह्मचारी समजला आहे. यज्ञामधील मांसाखेरीज इतर मांस न खाणारा मनुष्य मांसभक्षक समजला जात नाहीं. नेहमीं दानाकडे लक्ष देणारा मनुष्य पवित्र समजला आहे व दिवसा न निजणारा मनुष्य सदा जागा समजला आहे. सेवक व अतिथी यांना खाऊं घालून जो खातो तो केवळ अमृत खातो. त्यांना खाऊं घातल्यावांचून जो खात नाहीं त्याच्या त्या नियमानें तो स्वर्ग जिंकतो. देवता, पितर, नोकर, अतिथी यांना देऊन खाणारा मनुष्य अवशिष्ट खाणारा मनुष्य समजला आहे. अशा लोकांना अनंत सुखकारक लोक मिळतात. देवांना व पितरांना देऊन खाणारे

पुत्रपौत्रांमध्यें सुखांत राहून शेवटीं हा देह ठेवल्यावर श्रेष्ठ गति मिळवितात.'

## १७३ इंद्र व प्रल्हाद यांचा संवाद-कर्तृत्व. (१२. २२२)

'या जगामध्यें ज्याचें फळ मनुष्याला भोगावें लागतें अशा शुभाशुभ कृत्यांचा कर्ता मनुष्य आहे किंवा नाहीं,' ह्मणून युधिष्ठिरानें विचारल्यावरून भीष्म ह्मणाले, "या संबंधांत पुढील इंद्र व प्रल्हाद यांचा संवंध लक्षांत ठेव. कुलवान व बहुश्रुत असा प्रल्हाद आपलें सर्व पाप धुवून टाकून, विषयांमध्यें गढून न राहतां ताठा व अहंकार सोडून धैर्यानें व्रतशील असा राहून स्तुति व निंदा यांची पर्वा न करतां आत्मनिग्रह ठेवून एका शून्य घरामध्यें रहात होता. सर्व भूतमात्रांची उत्पत्ति व नाश यांची पूर्ण ओळख असल्यानें प्रिय किंवा अप्रिय यासंबंधानें आनंद किंवा राग त्याला माहीत नव्हता. सोनें व मातीचें ढेंकूळ सारखें समजून कल्याणप्रद अशा आत्मज्ञानासंबंधीं ठाम मत ठरवून त्याकडे लक्ष ठेऊन तो होता. सर्व भूतमात्रासंबंधानें श्रेष्ठ व कनिष्ठ यांची ओळख करून घेऊन सर्वज्ञतेमुळें सर्वांशीं तो सारखा असे. अशा ह्या आत्मनिग्रहानें एकांतांत राहिलेल्या प्रल्हादाकडे येऊन त्याची अशी बुद्धि कशानें झाली हें समजून घेण्यासाठीं इंद्र त्याला ह्मणाला, 'ज्यांच्या योगानें मनुष्य लोकांमध्यें संमत होतो असे सर्व गुण तुझ्यामध्यें ठाम मला दिसताहेत. तुझी बुद्धि मुलाप्रमाणें अगदीं साधी दिसते. कोणत्याही वस्तूवर तुझें प्रेम किंवा द्वेष कांहींच दिसत नाहीं. आत्म्याची पूर्ण ओळख तुला पटल्यासारखी दिसते. तेव्हां कल्याणकारक असा मार्ग तुला कोणता दिसतो? आपल्या स्थानापासून भ्रष्ट होऊन पाशांनीं जखडला जाऊन तूं शत्रूच्या ताब्यांत सांपडला आहेस; संपत्तीला मुकल्यामुळें स्वतःसंबंधानें वाईट वाटलें पाहिजे असून त्याबद्दल तुला कांहींच वाटत नाहींसें दिसतें. हा तुझ्यामधला फरक ज्ञानामुळें आहे किंवा धैर्यामुळें आहे. अशा संकटांत सांपडला असून सुद्धां तूं स्वस्थ दिसतोस.' याप्रमाणें इंद्रानें विचारलें असतां तत्त्वज्ञानासंबंधानें ज्याचें ठाम मत ठरलें आहे असा तो प्रल्हाद त्याचें शहाणपण ज्याच्या योगानें दिसून येत होतें अशा मधुर शब्दांनीं त्याला ह्मणाला, 'ज्याला भूतमात्राची उत्पत्ति व नाश यांसंबंधानें बरोबर ज्ञान नसतें त्याला मूर्खपणानें ताठा चढतो. शहाण्याला चढत नाहीं. सर्व भावाभाव स्वभावानें अस्तित्वांत येऊन नाहींसे होतात. या ठिकाणीं पुरुषार्थाचें कांहीं चालत नाहीं व पुरुषार्थाच्या अभावीं कोणी कर्ता उरत नाहीं. स्वतः न करतांसुद्धां अज्ञानानें कर्तृत्वाचा ताठा उत्पन्न होतो. जो बऱ्यावाईट गोष्टींचें कर्तृत्व आपल्याकडे घेतो त्याच्या त्या कोत्या बुद्धीला खरें ज्ञान नसतें. आपलें कल्याण करणारा जर मनुष्यच असेल तर त्याचे सर्व आरंभ सिद्धीला जाऊन त्यांमध्यें विघ्न न आलें पाहिजे होतें. कांहीं मनुष्यें आपली पराकाष्ठा करून झटत असतांही अनिष्ट गोष्टी न घडणें व इष्ट गोष्टी घडून येणें हें होत नाहीं; मग पुरुषार्थ कोठें उरला? कधीं कधीं आपण असें पहातों कीं, मनुष्याच्या प्रयत्नांशिवाय आपल्या आपणच अनिष्ट गोष्टी न घडतां इष्ट घडतात. कांहीं फार बुद्धिमान असून त्यांच्या बुद्धीला न साजेसें विद्रूप व मूर्ख अशा लोकांपाशीं त्यांना तोंड पसरावें लागतें. सर्व बरे वाईट गुण स्वाभाविक रीतीनेंच मनुष्यामध्यें येत असतात; अशी स्थिति असतां उगीच अभिमान बाळगण्याचें काय कारण? मोक्षासुद्धां सर्व गोष्टी स्वभावानें घडत असतात. या जगामध्यें सर्व बरीं वाईट फळें कर्मामुळें मिळतात. ज्याप्रमाणें अन्न खात असणारा कावळा कावकाव करून त्याचें ज्ञान आपल्या जातभाईंना करून देत असतो, त्याप्रमाणें सर्व कर्में स्वभावाचीं सूचक असतात. विकारच तेवढे ओळखून त्यांच्या पलीकडच्या प्रकृतीला जो जाणत नाहीं, त्याला अज्ञानानें ताठा उत्पन्न होत असून शहाण्याला तो कधीं होत नाहीं. सर्व गोष्टी या जगांत स्वभावानें घडतात असा ज्याचा ठाम निश्चय ठरला आहे, त्याला दर्प किंवा मान काय करणार? सर्व धर्मांचे विधी त्याचप्रमाणें प्राणिमात्रांची अनित्यता मला कळत असल्यानें सर्वांचा नाश आहे असें जाणून मला वाईट वाटत नाहीं. ममता, अहंकार, इच्छा व पाश यांपासून अलग होऊन स्व-

स्थपणें देहादिकांवरचा अभिमान जाऊन स्वरूपापासून न ढळतां सर्व भूतमात्रांची उत्पत्ति व नाश मी स्वस्थपणें पहात राहिलों आहें. जो शहाणा, आत्मनिग्रही, समाधानवृत्तीचा व निराश आहे त्याला सर्व जग आत्मस्वरूपामध्यें बघून वाईट वाटत नाहीं. प्रकृति व तिचे विकार यासंबंधानें मला बरें वाईट वाटत नाहीं व माझा द्वेष्टा किंवा माझा मित्र असा कोणीच आज मला दिसत नाहीं. स्वर्ग, हा लोक किंवा नरक यांपैकीं कशाचीच मला इच्छा राहिली नाहीं. आत्मज्ञान झाल्यानें सुखच उरत नाहीं असें नाहीं; परंतु आत्मा शरीराहून वेगळा असल्यामुळें तो कोणत्याही गोष्टीपासून सुखदुःखाचा अनुभव घेत नाहीं. ह्मणून माझी कशावरच वासना उरली नाहीं.' 'हें ज्ञान व ही शांति ज्यानें मिळते तो उपाय मला नीट सांग,' ह्मणून इंद्रानें फिरून विचारलें असतां प्रल्हाद ह्मणाला, 'सरळपणानें, दक्षतेनें, प्रसन्नतेनें, आत्मनिग्रहानें व वृद्धशुश्रुषेनें मनुष्याला हा मोठा लाभ होतो. स्वभावानेंच हें ज्ञान होऊन शांति मिळते.' हें त्याचें सांगणें पटल्यामुळें इंद्राला संतोष झाला व त्याचा बहुमान करून तो निघून गेला."

---

## १७४ इंद्र व बली यांचा संवाद—वैभवहानि. ( १२. २२३–२६ )

'कालदंडानें चिरडून टाकलें असतां वैभवापासून मुकलेल्या मनुष्यानें जगांत कसें वागावें,' ह्मणून युधिष्ठिरानें विचारलें असतां पुढील इंद्र व बली यांचा संवाद भीष्मांनीं त्याला लक्षांत घेण्यास सांगितलें. ते ह्मणाले, 'कोणे एके वेळीं इंद्रानें असुरांना जिंकल्यावर ब्रह्मदेवांकडे येऊन हात जोडून त्यानें त्यांना बलीसंबंधी माहिती विचारली. तो ह्मणाला, 'भगवन्, वाटल तस दान करीत होता तरी ज्याच्या संपत्तीला कधीं खळ पडला नाहीं, तो बली आतां मला कोठें सांपडणार? वायु, वरुण, सूर्य, चंद्र सर्व आजपर्यंत तो असून सर्व भूतमात्रांना अग्नीच्या रूपानें तो उष्णता देत असे व सर्वांना जल त्याच्याकडूनच मिळत असे. सूर्य होऊन सर्वत्र प्रकाश पाडून तो अस्ताला जात असे व आळस न करतां वर्षाव करून सर्वांना पाणी देत असे. तो बली आज मला कोठें दिसत नाहीं. तो मला कोठें सांपडणार सांगा.' यावर ब्रह्मदेव ह्मणाले, 'अशा प्रसंगीं त्याची चौकशी करणें तुला शोभत नाहीं. परंतु विचारलें असतां खोटें बोलूं नये ह्मणून सांगतों कीं, उंट, गाई, गाढव किंवा घोडें अशा स्वरूपामध्यें कोणत्या तरी निर्जन ठिकाणीं अशा प्रसंगीं तो पडून राहिला असला पाहिजे.' इंद्र ह्मणाला, 'आपण सांगतां अशा ठिकाणीं तो मला सांपडला असतां त्याला ठार मारूं किंवा नको?' यावर ब्रह्मदेव ह्मणाले, 'त्याला मारूं नकोस, तो मारण्याला पात्र नाहीं. तुला वाटेल ती नीति त्याला तूं विचार.' असें ब्रह्मदेव बोलले असतां ऐरावतावर बसून वैभवामध्यें झळकत इंद्र बलीचा शोध करीत पृथ्वीवर फिरत असतां गाढवाच्या रूपामध्यें एका शून्य ठिकाणीं तो त्याला दिसला. त्याला पाहून इंद्र ह्मणाला, 'हा नीच गाढवाचा जन्म घेऊन तूं कोंडा खात राहिला आहेस. कधीं शत्रूच्या तावडींत न येणारा तूं आज शत्रूच्या तावडींत सांपडून वैभव व मित्र यांना मुकला आहेस. तुझें वीर्य व पराक्रम हीं नाहींशीं झालीं आहेत. हजारों गाड्याघोड्यांनिशीं आपल्या ज्ञातींमधून आह्मांला तुच्छ करून सर्व लोकांना तूं पूर्वी ताप देत होतास. दैत्य तुला गुरु समजून तुझ्याकडे नजर देऊन राहून तुझ्या आज्ञेंत असत. तुझ्या वैभवाच्यावेळीं ही पृथ्वी नांगरल्यावांचून धान्य देत असे. त्या तुझ्यावर आज असा प्रसंग ओढवला असून त्याबद्दल तुला वाईट वाटत नाहीं! ज्यावेळीं पूर्वी मोठ्या अभिमानानें पूर्व समुद्राच्या तीरावर आपल्या जातीमध्यें संपत्ति तूं वांटून देत होतास त्यावेळीं तुझें मन कसें होतें? पूर्वी वैभवामध्यें तूं झळकत असतांना हजारों देवस्त्रिया तुझ्यापुढें नाचत असून त्यांच्यामध्यें तूं विहार करीत असस; तुझें रत्नखचित असें सोन्याचें छत्र असे; तूं मोठमोठे यज्ञ करीत असतांना त्यावेळेला सोन्याचे मोठमोठे स्तंभ उभारून तूं ब्राह्मणाला लाखों गाई दिल्यास. त्रेसष्ट अंगुळें सोडगा फेंकीत जाऊन तो ज्या ठिकाणीं पडेल त्या त्या ठिकाणीं यज्ञ करीत तूं सर्व पृथ्वीभर फिरलास, त्यावेळीं तुझ्या मनाची स्थिति काय

होती ? आज तो तुझा सोन्याचा लोटा, छत्र, चवऱ्या किंवा ब्रह्मदेवांनीं दिलेली ती माळ ह्यांपैकीं कांहींच मला दिसत नाहीं. ' बळी ह्मणाला, ' तुला तीं आज दिसत नाहींत. तीं माझीं रत्नें मीं गुहेमध्यें लपवून ठेविलीं आहेत. माझा काळ येईल तेव्हां तीं तुला दिसतील. मी अशा निकृष्ट अवस्थेला येऊन पोंचलों असतां अशा वैभवामध्यें अशा रीतीनें मला हिणविणें तुझ्या नांवाला किंवा कुळाला शोभत नाहीं. ज्यांची बुद्धि सुसंस्कृत होऊन ज्ञानामध्यें ज्यांना समाधान वाटतें अशा क्षमाशील,बुद्धिमान शहाण्यावर प्रसंग पडला असतां त्यांना वाईट वाटत नाहीं व वैभव आलें असतांही त्यांना आनंद होत नाहीं. तूं मात्र सामान्य लोकांप्रमाणें बुद्धि दाखवून फुशारकी मारीत आहेस. माझ्यासारखा जेव्हां तूं होशील तेव्हां असे शब्द तुझ्या तोंडून निघणार नाहींत. ' असें बोलून तो मोठ्या सापाप्रमाणें सुस्कारे टाकीत गप्प झाला. पण इंद्र त्याला फिरून ह्मणाला, 'पूर्वींचें तें वैभव व हल्लींचा हा प्रसंग पाहून तुला वाईट वाटत नाहीं काय ? ' बळी ह्मणाला, ' काळाच्या फेऱ्याला अनुसरून या सर्व गोष्टी मला अशाश्वत वाटतात व या सर्वांचा नाश होणारा असल्यामुळें मला त्याबद्दल वाईट वाटत नाहीं. यांत माझा अपराध बिलकुल नाहीं. हें जीवित व शरीर स्वभावानेंच एकत्र उत्पन्न होऊन एकत्र वाढून एकत्र नाश पावतात. अशा प्रकारचें हें अस्तित्व माझ्या निरुपायानें मला मिळालें आहे, हें मला कळत असल्यामुळें मला शोक करण्याला कारणच उरलें नाहीं. ज्याप्रमाणें सर्व नद्यांचा निकाल समुद्रामध्यें लागतो त्याप्रमाणें सर्व भूतमात्रांचा निकाल मरणामध्यें लागतो. ज्यांना हें नीट कळतें ते कधीं भांवावत नाहींत; परंतु रजोगुणानें उत्पन्न झालेल्या मोहामध्यें पडलेल्यांना हें कळत नाहीं; ह्मणून संकट आलें असतां खचून जाऊन त्यांची बुद्धि नाहींशी होते. बुद्धीमुळेंच मनुष्य सर्व अनिष्ट गोष्टी दूर करूं शकतो. निष्पाप मनुष्याच्या अंगींच सत्वगुण येऊन त्याची उल्हासवृत्ति असते. परंतु या सत्वगुणाला जे मुकले आहेत ते फिरून फिरून जन्ममरणाच्या फेऱ्यांत सांपडून निरनिराळ्या वासनांच्या व इंद्रियविषयांच्या स्वाधीन होऊन अनाथ होऊन ताप पावतात. इष्टसिद्धि, अनर्थ, जीवित, मरण किंवा सुखदुःखात्मक फळें यांची मी इच्छा करीत नाहीं किंवा तीं आलीं असतां त्याबद्दल वाईट वाटून घेत नाहीं. एक जेव्हां दुसऱ्याला मारतो तेव्हां तो आधींच मेलेल्याला मारीत असतो व तो स्वतःही मेलेलाच असतो. कोणी मारलें व कोण मेला हें त्या दोघांनाही कळत नसते. जो मारून किंवा जिंकून फुशारकी मिरवितो तो कांहीं त्या कृत्याचा कर्ता नसतो. निराळाच कर्ता तें करवीत असतो. कारण या जगाची उत्पत्ति व नाश कोण करतो ? उत्पत्तिनाशात्मक गोष्टी जेव्हां मनुष्याच्या हातून घडतात, तेव्हां तो त्याचा कर्ता नसून त्याचा कर्ता निराळाच आहे. सर्व भूतमात्र पृथिव्यादि पंचमहाभूतात्मक असल्यानें त्यासंबंधानें शोक कसला राहिला ? मनुष्य मोठा विद्वान असो किंवा त्याला थोडी विद्या असो, तो बळवान असो किंवा दुबळा असो, देखणा असो किंवा कुरूप असो, दैववान असो किंवा दैवहीन असो, कसाही असला तरी त्याला गंभीर असा काळ आपल्या तेजानें आपल्या ताब्यांत घेत असतो. याप्रमाणें काळाच्या तावडींत गेलों असतां त्याबद्दल वाईट वाटण्याला मला कारण कोठें उरलें ? आधींच ज्याची वाट लागली आहे त्याची मनुष्य वाट लावीत असतो; व आधींच त्याच्या दैवीं जें लिहून ठेविलें आहे तें त्या मनुष्याला मिळत असतें. या काळरूपी समुद्रामध्यें विश्रांतीला बेटसुद्धां सांपडण्याची मुष्कील, मग याचा किनारा कशानें हातीं येणार ? याची मर्यादा कोणाला दिसून येण्यासारखी नाहीं. यावर पुष्कळ विचार करतों तरी या काळाचा मला शेवट दिसत नाहीं. माझ्या डोळ्यांसमोर काळानें भूतमात्रांचा नाश केला नसता तर मला हर्ष, दर्प, राग आला असता. या एकांतामध्यें गाढवाचें रूप धेऊन कोंडा खात राहिलों असतांना तूं येऊन माझी निंदा करतोस. मला वाटेल तर तुला भीति उत्पन्न करण्यासारखें वाटेल तें विक्राळ रूप घेण्याचें माझे अंगांत सामर्थ्य आहे. तें पाहून तूं पळून जाशील. काळच सर्व कांहीं देत असतो व परत घेत असतो, व तोच सर्व कांहीं ठरवून ठेवीत असतो. उगीच पुरुषार्थाची फुशारकी मिरवूं नकोस. पूर्वी सर्व मीं जर्जर करून सोडले होते. या जगाचा सनातन

धर्म मला कळतो. तसाच तो तूं ओळखून गर्व सोडून दे. ऐश्वर्य व त्याचें आविष्करण या गोष्टी आपल्या ताब्यांत नाहींत. पूर्वींप्रमाणेंच अजून तुझा पोरस्वभाव आहे, डोळे उघडून तत्त्वविचाराकडे दृष्टि दे. पूर्वी सर्व देव, मनुष्य, पितर, गंधर्व वगैरे माझ्या ताब्यांत होते हें तुला ठाऊकच आहे. ' हल्लीं ज्या दिशेला विरोचनपुत्र बली असेल त्या दिशेला नमस्कार असो, ' अशा रीतीनें, अज्ञानानें मूर्ख बनून लोक मला शरण येत असत. त्या वैभवाला आतां मी मुकलों आहे, ह्मणून मला वाईट वाटत नाहीं. या बाबतींत माझ्या बुद्धीचा ठाम विचार ठरला असून मी या गोष्टींत त्या विधात्याच्या ताब्यांत आहें. कुलवान, देखणा व प्रतापवान असा मनुष्य दुःखामध्यें रहातांना दिसतो व वाईट कुलांत जन्मलेला मूर्ख सुखामध्यें असतांना दिसतो. तेव्हां ही भवितव्यताच अशी दिसते. एखादी रूपसंपन्न अशी स्त्री दुःखांत काळ काढतांना दिसते व विद्रूप व अवलक्षणी अशी दुसरी सुखांत दिसते. आमची अशी स्थिति झाली आहे व तूं अशा स्थितींत आहेस ह्याला कारण आह्मी किंवा तूं नाहींस. चढती किंवा पडती दशा काळाच्या फेऱ्यानें येत असते. तूं आज मोठ्या वैभवानिशीं येऊन माझ्यापुढें गर्जत आहेस; परंतु माझा हल्लीं आहे असा काळ नसता तर एका मुठीनें तुझ्या वज्रासकट तुला मीं चीत केला असता. परंतु हा माझा पराक्रमाचा काळ नसून शांतीचा काळ आहे. कालच सर्व व्यवस्था लावून शिजवून ठेवीत असतो. मी सर्व दानवांचा स्वामी असून सर्व माझा बहुमान करीत होते. मोठ्यानें गर्जत मी प्रताप गाजवीत होतों. त्या मला जर काळानें गांठलें तर तो गांठणार नाहीं कोणाला ? पूर्वी माझ्या एकट्यामध्यें तुझ्यासह बारा आदित्यांचें तेज रहात असे. पाणी शोषून घेऊन मीच तें पुन्हां खालीं सोडीत असे. प्रकाश पाडून तिन्ही लोकांना ऊन्ह माझ्यामुळेंच मिळत असे. संरक्षण करणारा मीच असून नाश करणाराही मीच होतों. मी देत असे व घेत असे मी दुसऱ्याला बांधीत असे व सोडीत असे व मी सर्वांचा स्वामी असे. तें माझें स्वामित्व आज काळाच्या सैन्यानें मला घेरल्यामुळें नाहींसें झालें आहे. मी, तूं किंवा तिसरा कोणी कर्ता नसून कालगतीनें आपल्याआपण ही सर्व व्यवस्था लागत असते. महिने व पंधरवडे हे ज्याचें शरीर असून रात्र व दिवस हे त्यावरचें आच्छादन आहे व ऋतू हे इंद्रियें असून वर्ष ज्याचें मुख आहे असा हा शाश्वत काळ ब्रह्मस्वरूपीच आहे. कांहीं लोक हें सर्व जग ब्रह्ममय पहावें असें ह्मणतात. परंतु वास्तविक पहातां आत्म्याला झांकून ठेवणारे आनंदमयादि पंचकोशच ध्यानांत किंवा पाहण्यांत येत असून ब्रह्म वस्तुतः महासागराप्रमाणें खोल व दुर्गम आहे. त्याला आदि, अंत व नाश नाहीं. तें नाशवंत ह्मटलें असतां नाशवंत आहे व नाहीं ह्मटलें असतां नाहीं. जरी तें निर्गुण आहे तरी जड पदार्थांशीं संबंध केल्यानें तें सगुण आहेसें अज्ञानामुळें भासतें. व ह्मणूनच तत्त्ववेत्ते पुरुष त्या ब्रह्मास निरुपाधिक असेंच समजतात. सर्व भूतमात्रांना हा कालच गति असल्यानें शेवटीं त्याकडे गेल्यावांचून काय गति आहे. धांवून व उभा राहून त्याला टाळतां येणें शक्य नाहीं. या पंचेंद्रियांना तो दिसत नाहीं. कोणी याला अग्नि ह्मणतात, कोणी प्रजापति ह्मणतात, कोणी ऋतु, कोणी महिने, कोणी अर्धे महिने, कोणी दिवस, कोणी क्षण, कोणी पूर्वाण्ह, कोणी अपराण्ह, कोणी मध्यान्ह याप्रमाणें निरनिराळे लोक ह्याला—जो हा एकच आहे—निरनिराळ्या नांवानें हांक मारतात. सर्वांना त्याच्या तावडींत जावें लागतें. तुझ्यासारख्या बलानें व वीर्यानें संपन्न असे हजारों इंद्र आजपर्यंत होऊन गेले आहेत व बलानें फुगलेल्या तुला देखील वेळ आली असतां तो मोठा वीर्यशाली काळ गार करून टाकील; कारण सर्वांना गडप करणारा तो आहे ह्मणून न चढतां स्थिर हो. तो तुला, मला किंवा पूर्वीच्या कोणालाही मागें टाकतां येण्याजोगा नाहीं. ही उत्तम राज्यश्री मिळवून ती माझ्या ठिकाणीं कायम झाली असें जें तुला वाटत आहे तें खोटें आहे. तुझ्याहून चढ अशा हजारों इंद्रांच्या ठिकाणीं ती पूर्वी राहिली आहे. ही चंचळ आतां मला सोडून तुझ्याकडे आली आहे. तूं असा बेफाम होऊं नकोस; नाहीं तर ही तुलाही सोडून दुसऱ्याकडे जाईल. ' असें बली ह्मणत आहे तोंच देदीप्यमान व मूर्तिमान अशी श्री बलीच्या शरीरा-

तूंन बाहेर पडली. तेव्हां विस्मयचकित होऊन, ‘तुझ्या शरीरांतून ही कोण बाहेर पडत आहे,’ म्हणून इंद्रानें बलीला विचारलें. बलीनें उत्तर दिलें, ‘ ही कोणी आसुरी स्त्री आहे, देव स्त्री आहे किंवा मानवी स्त्री आहे हें मला माहीत नाहीं. तूंच हिला विचारून घे.’ यावर, ‘बलीच्या शरीरांतून निघालेली माझ्याजवळ आपल्या तेजानें दिपवून सोडीत उभी असणारी तूं कोण व तूं या दैत्यश्रेष्ठाला कां सोडलेंस,’ म्हणून इंद्रानें तिला विचारलें. तेव्हां श्री म्हणाली, ‘विरोचनालाही मी ठाऊक नव्हतें व या बलीलाही ठाऊक नाहीं. कोणी मला दुःसहा म्हणतात, कोणी विधित्सा म्हणतात; कोणी विधि, कोणी लक्ष्मी व कोणी श्री म्हणतात. इंद्रा, तुला किंवा कोणत्याही देवाला सुद्धां मी कोण आहें हें ठाऊक नाहीं.’ इंद्रानें विचारलें, आज तूं चिरकाल या बलीपाशीं राहिली असून आज जी तूं याला सोडते आहेस ती माझ्यासाठीं सोडते आहेस किंवा बलीसाठीं?’ श्री म्हणाली ‘ धाता किंवा विधाता यांचें माझ्यावर कांहीं चालत नाहीं. काळाच्या योगानें मी निरनिराळ्या ठिकाणीं फिरत रहातें. म्हणून तूं याला तुच्छ करूं नकोस.’ इंद्र म्हणाला, ‘ बलीला तूं कां व कसें सोडलेंस व मला कशानें सोडणार नाहींस हें सांग.’ यावर श्रीनें उत्तर दिलें, ‘ सत्य, दान, व्रत, तप, पराक्रम व धर्म यांच्या आधारानें मी असतें. बली यांपासून पराङ्मुख झाला आहे. पूर्वी याची ब्राह्मणांवर भक्ति असून हा सत्यवादी व जितेंद्रिय होता. पुढें हा ब्राह्मणांचा द्वेष करूं लागून उष्ट्या हातानें यज्ञिय तुपाला शिवूं लागला. पूर्वी हा यज्ञशील असून पुढें काळाच्या फेऱ्यांत सांपडल्यामुळें मूर्खपणानें माझ्याच संबंधानें सर्वांपुढें फुशारकी मारीत राहूं लागला. म्हणून मी त्याला सोडून आतां तुझ्याकडे रहाणार. मला तपामध्यें व पराक्रमामध्यें गढून राहून मोठ्या हुषारीनें तूं संभाळ.’ यावर इंद्र म्हणाला, ‘ जो एकटा तुला संभाळील असा कोणी पुरुष देवांमध्यें, मनुष्यांमध्यें किंवा दुसऱ्या कोणामध्यें कोणी नाहीं, तेव्हां माझ्या ठिकाणीं तूं नेहमीं कशानें राहशील तें सत्यं सांग, म्हणजे मी त्याप्रमाणें करीन.’ श्री म्हणाली, ‘ मी तुझ्या ठिकाणीं कायम कशानें राहीन तें सांगतें ऐक. ‘ माझे चार भाग करून मला चार ठिकाणीं ठेव.’ यावर इंद्र म्हणाला, ‘ माझ्या शक्त्यनुरूप मी तुला चार ठिकाणीं ठेवतों. तुझ्या पुढें माझें एवढें सुद्धां अयोग्य वर्तन होणार नाहीं, सर्व भूतमात्रांच्या अस्तित्वाला कारणीभूत अशी ही सर्वांना धारण करणारी पृथ्वी तुझ्या चौथ्या अंशाला धारण करण्याला समर्थ आहे असें मला वाटतें.’ श्री म्हणाली, ‘ हा मीं आपला चवथा भाग तिच्या ठिकाणीं ठेवला. दुसऱ्या चतुर्थांशाला चांगलें ठिकाण पहा.’ इंद्र म्हणाला, ‘ पाणी आपल्या प्रवाही स्वरूपामध्यें मनुष्याच्या पुष्कळ उपयोगीं पडतें. तें तुझा एक अंश धारण करण्याला समर्थ आहे.’ ती म्हणाली, ‘ हा पहा मीं आपला एक अंश पाण्यामध्यें ठेवला. आतां तिसरा अंश कोठें तो कायम कर.’ इंद्र म्हणाला, ‘ ज्याच्या आधारानें सर्व वेद, यज्ञ, व देव आहेत तो अग्नि तुझा तिसरा भाग उत्तम रीतीनें धारण करील.’ श्री म्हणाली, ‘ हा मीं एक भाग अग्नीच्या ठिकाणीं कायम केला. आतां माझा चवथा भाग कोठें तरी कायम कर.’ इंद्र म्हणाला, ‘ मनुष्यांमध्यें जे खरें बोलून ब्रह्माकडे लक्ष देऊन आहेत असे भले लोक हा तुझा चवथा हिस्सा धारण करतील.’ श्री म्हणाली, ‘ हा मीं आपला चौथा भाग भल्यांच्या ठिकाणीं ठेवतें. अशा प्रकारें चार ठिकाणीं चार भाग ठेवून राहिलेल्या माझा नीट संभाळ कर.’ इंद्र म्हणाला, ‘ याप्रमाणें तुझी व्यवस्था लावून ठेवलेल्या तुला जो पीडा देईल त्याला मी शासन करीन.’ याप्रमाणें श्री बलीला सोडून निघाली असतां बली म्हणाला, ‘ हल्लीं सूर्य मेरुपर्वताच्या चारी दिशांना सारख्या रीतीनें प्रकाशित आहे. तो त्या मेरूच्या मध्यभागीं सर्व लोकांवर सारखा प्रकाशूं लागून जेव्हां अस्ताला जाणार नाहीं तेव्हां देवासुरांचें युद्ध होऊन त्यामध्यें मी तुला जिंकीन.’ इंद्र म्हणाला, ‘ ब्रह्मदेवांनीं तुला मारूं नको म्हणून सांगितलें असल्यानें हें वज्र मी तुझ्या डोक्यावर हाणीत नाहीं. खुशाल तुला वाटेल तिकडे जा. सूर्य कधीं मेरूच्या मध्यभागीं राहून प्रकाशणार नाहीं. ब्रह्मदेवांनीं पूर्वीच त्याची मर्यादा ठरवून टाकली आहे. सर्वांना उष्णता देत हा निरंतर सहा महिने दक्षिणायनाम-

ध्यें व सहा महिने उत्तरायणामध्यें फिरत आहे व आपल्या या फिरण्यानें तो थंडी व उष्णता उत्पन्न करीत आहे.' असें ह्मणून इंद्र उत्तरेकडे निघून गेला व बली दक्षिणेकडे गेला.

याच संबंधांत इंद्र व नमुची यांचा पुढील संवाद लक्षांत ठेवण्या जोगा आहे. कधीं न क्षुब्ध होणाऱ्या सागराप्रमाणें संपत्तीला मुकला असतांही स्वस्थ बसलेल्या नमुचीकडे येऊन इंद्र त्याला म्हणाला, 'तूं शत्रूच्या तावडींत जाऊन पाशांनीं जखडला गेला आहेस, तसाच संपत्तीला मुकला आहेस, असें असून सुद्धां त्याचे तुला कांहीं वाईट वाटत नाहीं!' हें ऐकून नमुची म्हणाला, 'जो टाळतां येत नाहीं अशा शोकानें शरीर मात्र उगीच वाळतें व शत्रूंना आनंद होतो. शिवाय शोकानें दुःख तरी कमी होतें असेंही नाहीं. म्हणून मी शोक करीत नाहीं. सर्व विनाशी आहे हें मी जाणतों. संतापामुळें रूप, संपत्ति, आयुष्य व धर्म या सर्वांवर पाणी पडतें. मनाला उदासीन करणारें येऊन पडलेलें दुःख आवरून शहाण्यानें मनाला आनंद देणाऱ्या आपल्या श्रेष्ठ कल्याणाकडे लक्ष द्यावें. ज्या वेळेला मनुष्य याकडे लक्ष देतो तेव्हां त्याचे सर्व उद्देश खात्रीनें शेवटाला जातात. या भूतलावर शास्ता म्हणून एकच असून गर्भामध्यें असणाऱ्या पुरुषाला तो वाटेला लावीत असतो. सखल प्रदेशांतून वहात असणाऱ्या पाण्याप्रमाणें त्याच्या आज्ञेनेंच मी चाललों आहें. बंधमोक्ष काय आहेत ते मला ठाऊक असून त्यांमध्यें मोक्ष श्रेष्ठ आहे हेंही मला कळतें; परंतु तें मिळविण्याची खटपट मात्र माझ्या हातून कांहीं होत नाहीं. सर्व धर्माधर्माच्या गोष्टी त्याच्या आज्ञेप्रमाणें मी करीत राहिलों आहें. मनुष्याला जें जें मिळावयाचें असतें, तें तें मिळतें व जें जें व्हावयाचें असतें तें तें होतें. प्राण्याला फिरून फिरून गर्भामध्यें ज्या ज्या ठिकाणीं त्याच्या मनांतून ठेवावयाचें असतें त्या त्या ठिकाणीं त्याला रहावें लागत असून स्वतःच्या इच्छेचें तेथें कांहीं चालत नाहीं. मजवर असा प्रसंग यावा अशी माझी भवितव्यताच होती असें जो नेहमीं मनांत ठेवतो तो कधीं मोह पावत नाहीं. कालगतीप्रमाणें आलटून पालटून येऊन पडणाऱ्या सुखदुःखांचें कर्तृत्व कोणाकडेसच रहात नाहीं; परंतु अप्रिय असें दुःख येऊन पडलें असतां त्यासंबंधी मीपणाचा भाव हेंच दुःखाला कारण होतें. ऋषी, देव, मोठमोठे असुर व रानांत राहणारे मुनी यांपैकीं कोणाला आपत्तींनीं सोडलें आहे? परंतु चांगलें वाईट ओळखणारे शहाणे मात्र भांबावून जात नाहींत. प्रसंगीं विद्वान रागावत नाहीं, विषयासक्त होऊन रहात नाहीं, खचून जात नाहीं किंवा आनंदभरित होत नाहीं. स्वभावानें हिमाचलाप्रमाणें अचल राहून प्रसंग गुदरला असतां तो शोक शोक करीत बसत नाहीं. काम फत्ते झालें असतां किंवा संकट आलें असतां वेडा न बनतां जो सुखदुःख मिळेल तें घेऊन रहात असतो तोच श्रेष्ठ मनुष्य. जी जी स्थिति येईल त्या त्या स्थितीमध्यें संताप करून न घेतां आनंदांत असावें. मनापासून उद्भवणाऱ्या पीडाकर अशा वाढणाऱ्या दुःखाला मनुष्यानें आपल्यापासून दूर करावें. जीमध्यें आलें असतां दुष्टाला आपल्या दुष्कृत्याबद्दल भीति वाटत नाहीं ती विद्वानांची सभा नव्हे. धर्मतत्त्वांची पूर्ण ओळख करून घेऊन त्याप्रमाणें जो वागतो तोच श्रेष्ठ पुरुष. शहाण्यांचीं कामें कोणाच्या लक्षांत येत नाहींत, व गडबडण्याच्या वेळीं सुद्धां तो गडबडत नाहीं. वृद्ध गौतम आपल्या स्थानापासून भ्रष्ट होऊन प्रसंगांत पडले असतांही गडबडले नाहींत. मंत्र, बल, वीर्य, शहाणपण, पराक्रम, पौरुष, शील वर्तन, किंवा पैसा यांपैकीं कशानेंही अलभ्य वस्तु मनुष्याला मिळत नाहीं. मग त्यासंबंधानें शोक कां करावा? माझ्या संबंधानें माझ्या जन्माच्या पूर्वींच जें ठरवून ठेविलें आहे, तसा मी वागत आहें. मला मृत्यु काय करणार? मिळावयाचें तें मिळतें, जावयाचें तें जातें. जीं सुखदुःखें आपल्या वांट्याला आहेत तीं मिळतात. हें सर्व जाणून जो दुःखाचे वेळीं वेडा न होतां खुशाल असतो तोच सर्व संपत्तिमान समजावा.'

## १७५ संकटसमयीं धैर्य. (१२. २२७)

युधिष्ठिर ह्मणाला, 'बंधुनाश व राज्यनाश होऊन मनुष्य संकटांत बुडाला असतां त्याला क-

ल्याणकारक काय आहे ?' भीष्म ह्मणाले, 'बायकापोरें, सुख किंवा पैसा याला मुकून मनुष्य संकटांत पडला असतां धैर्य हेंच मोठें कल्याणकारक आहे. मनुष्याच्या अंगीं धैर्य असेल तर त्याचें शरीर कधीं न सुकतां त्याला शोक होत नाहीं व सुख होऊन उत्तम आरोग्य मिळतें. व आरोग्यामुळें फिरून त्याला संपत्ति मिळते. ज्या शहाण्यानें सात्विक वृत्ति धरली आहे त्यालाच ऐश्वर्य मिळतें व त्याच्याच अंगीं धैर्य राहून सर्व कामें त्याच्या हातून नेटानें पार पडतात. यासंबंधांत पुढील इंद्र व बली यांचा संवाद लक्षांत ठेवण्याजोगा आहे. ज्यामध्यें पुष्कळ दैत्यांचा फडशा पडला अशा देवदानवांच्या युद्धानंतर विष्णूनें वामनरूपानें बलीला नागविल्यावर चारी वर्णांचे लोक आपापल्या धर्मांत राहून त्रैलोक्य फिरून ऋद्धिसंपन्न झालें असतां इंद्र मोठ्या थाटांत ऐरावतावर बसून त्रैलोक्यामधून फिरतां फिरतां समुद्राच्या कांठीं पर्वताच्या एका गुहेकडे आला. तेथें बलीला पाहून तो त्याकडे गेला. इंद्राला त्याप्रमाणें वैभवामध्यें पाहून बलीला त्याचें एवढें सुद्धां वाईट वाटलें नाहीं. याप्रमाणें त्याच्या मनाची यत्किंचित्‌ही चलबिचल झाली नाहींसें पाहून इंद्र हत्तीवरूनच त्याला ह्मणाला, 'बले, कशामुळें तुझी अशी वृत्ति झाली आहे ? शौर्यामुळें, वृद्धसेवेमुळें कां तपानें शुद्धांतःकरण झाल्यामुळें? अशी वृत्ति होणें फार कठिण आहे. शत्रूच्या तावडींत सांपडून तूं आपल्या स्थानापासून भ्रष्ट झाला आहेस. तूं पूर्वीं आपल्या स्वजातीमध्यें श्रेष्ठ असून उत्तम उत्तम भोग भोगले आहेस; त्या तुझें सर्वस्व आतां शत्रूंनीं उपटलें आहे. पूर्वीं तुझ्या वडिलोपार्जित राज्याचा तूं मालक असून तें आज शत्रूंनीं घेतलें आहे. वरुणाच्या पाशांनीं तुला जखडून टाकून वज्रानें तुला मारलें आहे. बायका, संपत्ति सगळ्याला तुला नागविलें असतांही तुला वाईट कसें वाटत नाहीं ? याप्रमाणें एवढ्या थोरल्या त्रैलोक्याच्या राज्याला मुकून तुझ्यावांचून दुसरा कोण जिवंत राहील ?' याप्रमाणें इंद्र पुष्कळ तिरस्कारपूर्वक निष्ठुर बोलला असतां अगदीं न गडबडतां खुशाल तें ऐकून घेऊन बलीनें उत्तर दिलें. तो ह्मणाला, 'याप्रमाणें मी अगदीं जखडून गेलों असतां तुझी ही फुशारकी कशाला पाहिजे. आज तूं वज्र उगारून उभा दिसतोस; पूर्वीं तूं अशक्त असून आतां कसाबसा शक्तिमान झाला आहेस. तुझ्या शिवाय दुसरा कोण असें क्रूर भाषण करावयास तयार होईल ? जो शक्तिमान असून शत्रू हातांत आला असतां त्याच्यावर दया करतो तोच पुरुष. दोघे युद्धाला तयार झाले असतां जय अमक्यालाच मिळेल हें खात्रीचें नसून एकाचा जय व एकाचा पराजय खात्रीनें होतो; तेव्हां हें करणें तुला योग्य नाहीं. तूं आपल्या पराक्रमानें मला जिंकून स्वामित्व मिळविलें आहेस असें नाहीं. तुला अशी स्थिति आली असून आमची अशी स्थिति झाली आहे, हें आमच्यामुळें किंवा तुझ्यामुळें नव्हे. तूं आज आहेस तसा मी होतों व मी आहें तसा तूं होतास. मीं कांहीं मोठें पाप केलें असें समजून मला तूं तुच्छ करूं नकोस. मनुष्याला सुखदुःखें कालगतीनें मिळत असतात. त्याच कालगतीच्या अनुरोधानें आज तुला शक्रत्व आलें असून तुझ्या श्रमाचें तें फळ आहे असें तूं समजूं नकोस. वेळ आली असतां काळ सर्वांना त्याच्या अनुरोधानें घेऊन जात असतो. आईबापांची सेवा, देवतेची पूजा किंवा दुसरा एखादा गुण मनुष्याच्या सुखाला कारण होत नाहीं. विद्या, तप, दान, मित्र, बांधव हे काळानें पीडिलेल्याला सोडविण्याला समर्थ होत नाहींत. मोठमोठ्या बुद्धिमानांना देखील येऊन पडणारा अनर्थ शेंकडों उपायांनीं टाळतां येत नाहीं. काळाचा सपाटा ज्यावर बसतो त्याला सोडविणारा कोणी नाहीं. मीं हें केलें असें समजणें हेंच दुःखाला कारण आहे. जर मानवी कर्ता खरा कर्ता असेल तर तो कांहीं न करतां स्वस्थही बसूं शकेल. परंतु ज्या अर्थीं त्याच्या हातून निरुपायानें सुद्धां क्रिया घडत असतात त्या अर्थीं तो पराधीनच आहे. माझा काळ होता तेव्हां मीं तुला जिंकलें व तुझा काळ आला तेव्हां तूं मला जिंकलेंस. सर्वांना क्रिया करावयास लावणारा काळ असून त्यांचा नाशही तोच करतो. कोत्या बुद्धीमुळें तुला मात्र आपला नाश कळत नाहीं. तूं आपल्या कर्मीनें मोठेपणा मिळविलास असें समजून कांहीं तुला बहुमान देतील; परंतु लोकप्रवृत्ति ज्याला क-

 

ळते अशा माझ्यासारख्यानें काळाचा तडाखा बसला असतां शोकानें कसें बरें वेडें व्हावें ? काळाच्या फेऱ्यांत सांपडलेल्या माझ्यासारख्याची बुद्धि संकटामध्यें फुटक्या नावेप्रमाणें कधीं तरी खचेल काय ? मी, तूं, त्याचप्रमाणें दुसरे शेंकडों इंद्र, आजपर्यंत मागें शेंकडोंशें इंद्रांनीं जी वाट धरली आहे तीच वाट धरणार. याप्रमाणें वैभवानें झळकणाऱ्या तुला तुझा काळ त्याची वेळ आली असतां माझ्याप्रमाणेंच नाहींसा करील. निरनिराळ्या युगामध्यें काळामुळें हजारों इंद्र होऊन गेले आहेत. काळ हा कोणाला टाळतां येण्याजोगा नाहीं. हें स्थान मिळवून तुला फार मोठेपणा वाटत आहे व तूं स्वतःला शाश्वत अशा ब्रह्माप्रमाणें समजत आहेस. हें तुझें स्थान अचल नसून तें कोणाला कायमचें मिळालें आहे असें नाहीं. तूंच मात्र पोरबुद्धीनें मलाच हें मिळालें आहे असें समजतोस. ज्यावर विसंबूं नये त्यावर विसंबून रहातोस व खोट्याला खरें समजतोस. काळाच्या फेऱ्यांत सांपडलेल्या मनुष्याची नेहमीं अशीच बुद्धि होत असते. ही राजश्री माझी आहे असें मूर्खपणानें तुला वाटत आहे; परंतु आजपर्यंत ती कोणाच्याच ठिकाणीं स्थिर राहिली नाहीं. आजपर्यंत पुष्कळांना सोडीत सोडीत ती आज तुझ्याकडे आली आहे. चंचळ अशी ती तुझ्याकडे कांहीं दिवस राहून पुढें **गोठा सोडून जाणाऱ्या गाईप्रमाणें** ती तुला सोडून जाईल. आजपर्यंत हजारों राजे होऊन गेले आहेत त्यांची गणती सांगतां येत नाहीं व पुढेंही तुझ्याहून वरचढ असे पुष्कळ होतील. झाडें, वनस्पती, रत्नें, लोक, वनें व खाणी यांनीं संपन्न अशा या पृथ्वीचा आजपर्यंत ज्यांनीं उपभोग घेतला आहे ते आज दिसत नाहींत. पृथु, ऐल, मय प्रभृति शेंकडों, ज्यांचीं नांवें आपण ऐकतों, असे नरवीर काळाचा तडाखा बसून पृथ्वी सोडून गेले आहेत. काळ हा सर्वांहून बलवत्तर आहे. या वरील सर्वांनीं शंभर शंभर यज्ञ केले आहेत. तूंच एकटा शंभर यज्ञ करणारा आहेस असें समजूं नकोस. हे सर्व धर्मपरायण असून नेहमीं सत्र ठेवीत होते व युद्धामध्यें तोंड देऊन लढत होते. यांच्यामध्यें सुद्धां अनेक श्रेष्ठ गुण असून रणांतून पराभव पावून ते कधीं परतले नाहींत. याप्रमाणें वैभवानें झळकणारे व प्रताप गाजविणारे असे ते असतांही काळानें त्यांना आपलेसें केलें आहे. तुला जेव्हां ह्या पृथ्वीचा उपभोग घेऊन हिला सोडण्याची पाळी येईल तेव्हां तुला आपला शोक अनावर होईल. ह्मणून वासनात्मक विषयभोगाच्या ठिकाणची इच्छा सोड. त्याचप्रमाणें हा संपत्तिपासून येणारा मद टाकून दे. तरच राज्याला तूं मुकलास ह्मणजे तुला शोक आवरतां येणार आहे. शोकाच्या वेळीं शोक न करतां हर्षाच्या वेळीं हर्षभरित होऊं नकोस. मागच्याचा किंवा पुढच्याचा विचार करीत न बसतां सांप्रतच्यावर समाधानानें रहा. नेहमीं हुशारीनें दक्ष असणाऱ्या माझ्यावर जर काळ आला तर तुझ्यावरही तो लवकरच येईल. पण तसें होऊं नये म्हणून तूं क्षमा धर. तूं मला वाग्बाण मारून दुखवीत आहेस. मीं शांत वृत्ति धरलेली पाहून तुला स्वतःचा मोठेपणा वाटत आहे. हा काळ प्रथम माझ्याकडे आला असून तो तुझ्याकडे धांवत आहे. ह्मणून प्रथम माझ्यावर काळाचा सपाटा बसल्यानें तूं असा गर्जत आहेस. पूर्वी मी खवळलों असतां रणांत माझ्यापुढें उभें रहाण्याचीही कोणाची छाती होत नव्हती. परंतु बळवान काळानें मला गांठल्यानें तूं असा माझ्यापुढें उभा राहिला आहेस. हीं तुझीं वैभवाचीं हजार वर्षेंही निघून जातील आणि मग तुझेंही सामर्थ्य नाहींसें होऊन तूंही माझ्यासारखाच लुला पडशील. त्रैलोक्याच्या स्वामिपदापासून मी भ्रष्ट झालों आहें व काळाच्या फेऱ्यामुळें इंद्रपद येऊन या विचित्र जगांत तुझा हल्लीं बहुमान होत आहे; या सर्वाला कारण काळ आहे. नाश, विनाश, ऐश्वर्य, सुखदुःख, जन्ममरण हीं सर्व त्याच्या स्वाधीन असल्यामुळें यांपैकीं कोणत्यानेंच मनुष्यानें आनंदभरित किंवा कष्टी होऊं नये. आह्मी कसे होतों याची तुला ओळख असून तूं कसा होतास हेंही आह्मी जाणतों. तेव्हां काळानें हा फेर पाडल्यामुळें निलाजऱ्याप्रमाणें अशी फुशारकी कां चालविली आहेस ? माझ्या मनगटांतला जोर तुला पूर्ण ठाऊक असून पूर्वी देवासुरांच्या युद्धांत एकवटलेल्या देवांचा पूर्ण पाडाव करून पर्वत व त्याचें खडकाळ शिखर तुझ्या डोक्यावर हाणून मीं फोडले आहेत; परंतु आतां माझ्या हातून काय हो-

णार ? काळ दुर्लंघ्य आहे. नाहीं तर एका मुठीनें तुला तुझ्या वज्रासकट मला ठार करतां आलें नसतें असें नाहीं; परंतु हल्लीं माझा पराक्रम करण्याचा काळ नसून क्षमेचा काळ असल्यानें तुझ्यापेक्षां शेंकडोंशें पटीनें मी तापट आहें तरी मी तुझें सर्व सोसून घेत आहें. काळपाशानें जखडून जाऊन काळाग्नींत सांपडलेल्या अशा मजपुढें तूं फुशारकी मारीत आहेस. तो हा लोकांना टाळतां न येण्याजोगा श्यामवर्ण उग्र पुरुष दोरीनें पशूला जखडून टाकावें त्याप्रमाणें मला बांधून टाकून उभा आहे. लाभ, हानि, सुखदुःख, कामक्रोध, जन्ममरण, वध, बंध किंवा मोक्ष सर्व कांहीं काळानें मिळत असतें. मी कर्ता नाहीं किंवा तूंही कर्ता नाहींस. सर्वांचा स्वामी जो हा काळ तो झाडाला आलेल्या फळाप्रमाणें सर्वांना पक्वदशेला आणीत आहे. जीं कर्में केल्यानें मनुष्याला एखादेवेळीं सुख मिळतें तींच कर्में उलट प्रसंगीं दुःखाला कारण होतात. ज्याला हा काळ समजतो त्यानें याचाच आपल्यावर अंमल बसला असल्यामुळें शोक करूं नये. शोकामध्यें कोणाचाच उपयोग होत नाहीं. कारण शोक करीत बसल्यानें संकट कांहीं दूर होत नाहीं. उलट हा शोक त्याला दुला पाडतो. ह्मणून मी शोक करीत नाहीं.' यावर इंद्र त्याच्या पाशाकडे पाहून ह्मणाला, 'हे पाश कोणाला पीडा देणार नाहींत ? प्रत्यक्ष सर्वांतक मृत्यूलासुद्धां पीडा देणारे हे पाश जेव्हां तुला पीडा देत नाहींत तेव्हां तुझ्या बुद्धीला तत्त्व कळून ती त्यामध्यें स्थिर झाली आहे, आणि तुझ्या धैर्यामुळेंच तुला दुःख होत नाहीं. कोण मनुष्य पैशावर किंवा शरीरावर, जगाची अशी स्थिति पाहून विसंबून राहील ? मलाही आतां हें जग काळाग्नीमध्यें सांपडलें असून काळाचा अंमल बसलेल्याचा निरुपाय आहे हें कळूं लागलें आहे. सर्व लहान मोठे प्राणिमात्र काळाकडून शिजून निघत आहेत. काळावर कोणाचा अंमल नसून तो आपल्या कार्यांत मोठा हुषार आहे. काळचक्रांत एकदां सांपडल्यावर त्यांतून सुटका नाहीं. लोकांचें त्याकडे दुर्लक्ष असेल; परंतु तो अगदीं दक्ष असून जागत आहे. आजपर्यंत कोणीही कशाही खटपटीनें त्याला टाळल्याचें ऐकण्यांत नाहीं. हा जो शाश्वत व पुराण धर्ममूर्ति काळ हा सर्वांच्या ठिकाणीं सारखा आहे. हा कधीं कोणाला टाळतां येत नसून हा आपला रस्ता कधीं सोडीत नाहीं. दिवस, रात्र, महिने, क्षण, कला, काष्ठा, लव इत्यादि आपल्या भागानें तो मुदलाला भर टाकीत राहणाऱ्या सावकाराप्रमाणें आपल्या भांडवलाला भर टाकीत राहिला आहे. नदीचा वेग ज्याप्रमाणें तिच्या तीरावरील झाडांना उपटून नेतो, त्याप्रमाणें आज हें करीन, उद्यां तें करीन, असें ह्मणत असतां असतां काळ मनुष्याला घेऊन जातो. आतां मीं याला पाहिला, इतक्यांत कसा मेला अशा प्रकारचे काळ नेत असलेल्या लोकांबद्दल प्रलाप ऐकूं येत असतां, ऐश्वर्य, भोग, स्थान एवढेंच नव्हे, तर जीवित सुद्धां काळ येऊन घेऊन जातो. सर्व वैभवांचा नाश आहे. हें सर्व अनित्य व अशाश्वत आहे खरें; परंतु अशी खात्री होणें हेंच काम कठीण आहे. तुला मात्र खरें तत्त्व कळल्यानें दुःख होत नाहीं. मी पूर्वीं कोणी मोठा होतों हें तुझ्या मनांतसुद्धां येत नाहीं. हा बलवान काळ येऊन लहानथोरांचा विचार न करतां सर्वांना घेऊन जातो; परंतु मनुष्याला मात्र हा बिळांत पडलेला फांस कळत नाहीं. कामक्रोधादि अनेक विकारांनीं लोक वेडे होऊन जातात. तुला मात्र खरें ज्ञान झालें असल्यानें हातांतल्या आंवळ्याप्रमाणें हा काळ स्पष्ट दिसत आहे. काळाचें सर्व चरित्र तुला कळलें आहे, व मनावर तुझा दाब असल्यानें सुखदुःखाला जागा न देतां ज्या ठिकाणीं वैर ह्मणून ठाऊक नाहीं असा सर्व भूतमात्रांचा सुहृद जो आत्मा त्याच्याकडे तूं लक्ष देऊन आहेस. तुला पाहून मला तुझी दया येते. तुझ्यासारख्या शहाण्याला बंधनामध्यें मारण्याची माझी इच्छा नाहीं. दयाभूतपणा हा श्रेष्ठ धर्म आहे. काळाच्या अनुरोधानें लोकांच्या गैरवर्तनानें तुझे हे पाश एकेक तुटतील. ज्या वेळेला सून ह्मातान्या सासूला आपलें काम करावयाला लावील, मुलगा बापाला काम करण्याला पाठवील, शूद्र ब्राह्मणांकडून पाय रगडून घेऊन ब्राह्मणांच्या बायकांबरोबर निर्भयपणें संबंध ठेवूं लागतील, जे वेळीं लोक भलत्यासलत्या योनीमध्यें बीज ठेवूं लागतील, केरकचरा कांशाच्या भांड्यांतून नेतील व बली भलत्यासलत्या भांड्यांतून नेऊं लागतील,

व चारी वर्णांचे लोक मर्यादा सोडून वागूं लागतील, तेव्हां तुझे पाश क्रमानें सुटतील. आमच्यापासून तुला भीति बिलकुल नाहीं. वेळेची वाट पहात रहा. कोणाची पीडा न होतां स्वस्थ मनानें खुशाल ऐस. ' असें ह्मणून इंद्र स्वर्गाला निघून गेला.

---

## १७६ श्रीचें वास्तव्य. (१२. २२८)

'जय किंवा अपजय येणाराला पूर्वीं काय चिन्हें होतात ह्मणून युधिष्ठिरानें विचारलें असतां भीष्म ह्मणाले, ' जय किंवा अपजय सांगणारें मनुष्याचें मन हें मुख्य आहे. या संबंधांत पुढील श्री व इंद्र यांचा संवाद ऐक.

आपल्या तपाच्या प्रतापानें बरे, वाईट लोक पहात महामुनी नारद त्रैलोक्यामध्यें फिरत असतां एके दिवशीं सकाळीं ध्रुवद्वारापासून निघणाऱ्या गंगेमध्यें विहार करण्याकरितां गेले. त्या ठिकाणीं इंद्रही तेवेळीं सहजगत्या आला होता. दोघांनीं स्नान करून थोडक्यांत जप आटोपून घेतल्यावर त्या गंगेच्या सुवर्णवालुकामय अशा तीरावर ते पुण्यवान अशा महर्षींनीं सांगितलेल्या थोर पुरुषांच्या गोष्टी बोलत बसले. ते याप्रमाणें पूर्व इतिहासाच्या गोष्टी बोलण्यांत गढले असतां आपलें किरणजाल पसरीत उगवणाऱ्या भगवान सूर्यनारायणाला पाहून त्यांनीं उठून त्याची स्तुति केली. इतक्यांत आकाशामधून गरुड आणि सूर्य जोडलेल्या वैष्णवविमानांत बसून प्रतिसूर्याप्रमाणें देदीप्यमान अशी एक ज्योति आपलेकडे येतांना त्यांनीं पाहिली. ही ज्योति दुसरें कोणी नसून कमलवननिवासिनी प्रत्यक्ष श्री होती. नक्षत्राप्रमाणें लखलखीत असे अलंकार तिच्या अंगावर असून गळ्यामध्यें मोत्यांचा हार होता. स्त्रियांमध्यें अप्रतिम लावण्यवती अशी ती आपल्या त्या श्रेष्ठ विमानांतून उतरून इंद्र व नारद यांकडे आली. नारदांसह सामोरें जाऊन हात जोडून तिची पूजा केल्यावर, इंद्रानें तिला, 'तूं कोण, कशासाठीं व कोठून येथें आलीआहेस व कोठें चालली आहेस, ' ह्मणून विचारलें; त्यावर श्रीनें उत्तर दिलें, 'सर्व स्थावरजंगम प्राणिमात्र मनापासून जिची इच्छा करतात अशी मी सर्व प्राणिमात्रांच्या कल्याणासाठीं सूर्यविकासिनी कमलापासून उत्पन्न झालेली श्री आहें. मला भूति, लक्ष्मी, श्रद्धा, मेधा वगैरे अनेक नांवें आहेत. विजयी राजांच्या सेनांच्या पुढें त्यांच्या ध्वजांवर, धर्मशील अशा लोकांच्या देशांमध्यें, नगरांमध्यें व घरांमध्यें त्याचप्रमाणें रणांतून पाय मागें न घेणाऱ्या विजयी अशा शूरांच्या ठिकाणीं तसेंच धर्मनिष्ठ, बुद्धिमान, ब्राह्मणभक्त, सत्यवादी, विनयसंपन्न व दानशील अशा लोकांच्या ठिकाणीं मी नेहमी रहातें. असुरांच्या ठिकाणीं त्यांच्या सत्यधर्मानें बांधली जाऊन आजपर्यंत मी राहिलें. परंतु हल्लीं त्यांचें वर्तन त्याविरुद्ध झाल्यामुळें मी तुझ्या ठिकाणीं रहाण्यासाठीं आलें आहे.' इंद्र ह्मणाला, 'हे शुभानने, दैत्यांचें कशा प्रकारचें वर्तन असल्यामुळें तूं त्यांच्या ठिकाणीं राहिली होतीस व त्यांचें कशा प्रकारचें वर्तन पाहून तूं त्यांना सोडून आलीस?' श्री ह्मणाली, 'आजपर्यंत ते स्वधर्मानें वागत होते, धैर्यापासून कधीं ढळले नव्हते; स्वर्गमार्ग त्यांना पसंत होता. दान, अध्ययन, यज्ञ, यजन, पितर, देव, गुरु व अतिथी यांचा सत्कार ठेवून सत्याकडे त्यांचें लक्ष होतें. ते आपलीं घरें स्वच्छ झाडून सारवून ठेवीत. स्त्रीलंपट न राहतां अग्नीला आहुती देत. आत्मनिग्रहानें वडिलांची शुश्रूषा करून ब्राह्मणांकडे लक्ष ठेवीत. श्रद्धाळू व दानशील राहून राग त्यांनीं जिंकला होता; असूया त्यांना ठाऊक नव्हती; मुलें, अमात्य व बायका यांचें नीट पोषण करीत होते. ईर्षा व असहनशीलता त्यांना ठाऊक नसून एकमेकांचा ते हेवा करीत नव्हते व मोठ्या वैभवानें त्यांच्या डोळ्यांवर धूर येत नव्हता. ते काटकसरीनें राहून दान करीत होते, व थोर वर्तन ठेवून दुसऱ्यांवर दया व प्रसाद करीत होते. त्यांचें वर्तन साधें असून त्यांची भक्ति दृढ होती. आपल्या नौकरांना व सचिवांना ते संतुष्ट ठेवीत. ते कृतज्ञ व गोड बोलणारे होते. ते ज्याच्या त्याच्या पदवीप्रमाणें त्याची त्याची योग्यता ठेवीत. त्यांना भीड होती व ते व्रतशील होते. नेहमीं पर्वकाळीं तेल लावून उत्तम रीतीनें स्नान करून स्वतःला ते विभूषित करीत असत. उपवास व तप यांकडे लक्ष देत असत. विश्वसनीय राहून वेदाकडे त्यांचें लक्ष असे. ते सूर्योदयाच्यावेळीं किंवा पहाटेस कधीं निजत नसत. रात्रीं, दहीं, व

सत्तू कधीं खात नसत. पहाटे तूप व दुसरे मंगलकारक पदार्थ यांचें दर्शन घेऊन शुचिर्भूततेनें ब्राह्मणांची पूजा करीत. नेहमीं धर्म त्यांच्या तोंडून निघे व ते कधीं दान घेत नसत. ते अर्ध रात्रीं निजावयास जात असत व दिवसा कधीं निजत नसत. कृपण, अनाथ, म्हातारे, दुबळे, रोगी व बायका यांच्यावर दया करून आपल्याजवळ असलेलें त्यांना देत व नंतर आपण त्याचा उपभोग घेत. त्रासलेले, निरुत्साह, चिंतातुर, भयभीत, व्याधिग्रस्त, दुबळे, ज्यांचें सर्व चोरीस गेलें आहे व जे संकटांत सांपडले आहेत अशांना ते नेहमीं धीर देत असत. धर्माला अनुसरून त्यांचें वर्तन असून एकमेकांना ते कधीं पीडा देत नसत. कोणतेंही काम करण्याला त्यांची तयारी असून गुरु व वृद्ध यांची ते नेहमीं सेवा करीत असत. पितर, देव व अतिथी यांचा योग्य सत्कार करून बाकी राहिलेलें ते खात असत. मिष्टान्न ते कधीं एकटे खात नसत. परस्त्रीशीं संबंध ठेवीत नसत. सर्वांना आपल्याप्रमाणें लेखून त्यांवर दया करीत असत. आकाशामध्यें, पशूंच्या ठिकाणीं, भलत्या योनीमध्यें किंवा पर्वकाळीं रेत टाकणें त्यांना आवडत नसे. दान, दक्षता, सरळपणा, उत्साह, क्षमा, सत्य, दान, तप, शुचिर्भूतता व दया हे गुण त्यांच्यामध्यें असून अहंकार त्यांना ठाऊक नव्हता. स्नेहाला फार चांगले असून कधींही ते निष्ठुर भाषण करीत नसत. मित्रांचा ते द्रोह करीत नसत. पूर्वी हे गुण त्यांच्यामध्यें असल्यामुळें सृष्टीच्या उत्पत्तीपासून अनेक युगांपर्यंत मी त्यांच्यापाशीं राहिलें. परंतु काळ फिरल्यामुळें त्यांचें वर्तनही फिरलें व त्यांचा धर्म सुटला. कामक्रोधाच्या तावडींत जाऊन झोंप, आळस, निष्प्रेमता, असूया, दुर्लक्ष, असंतोष, विषाद, हांव हे गुण त्यांच्यामध्यें शिरले. वृद्ध अशा सभासदांना भल्यांच्या गोष्टी सांगतांना ऐकून त्यांच्यापेक्षां यांच्या अंगांत कमी गुण असूनही त्यांना हे हांसत. वडील माणसें आलीं असतां बसून राहून उठून अभिवादन करून त्यांच्या योग्यतेप्रमाणें त्यांचा सत्कार करीतनासे झाले. बाप सर्व चालवीत असतां मुलांचा अंमल चालू झाला. ज्यांनीं कधीं सेवा केली नाहीं अशांनीं सेवाधर्म पतकरून निर्लज्जपणें तो तें सांगत फिरूं लागले. त्याचप्रमाणें धर्मबाह्य अशा निंद्य कृत्यांपासून पैसा मिळविण्याकडे त्यांचें लक्ष लागून त्यांची गर्जना फार वाढूं लागली व अग्निहोत्राचा अग्नि मंदावला. मुलें बापाचें ऐकेनाशीं झालीं व बायका नवऱ्यांचें ऐकेनाशा झाल्या. आई, बाप, म्हातारे, गुरु, अतिथी यांचा वडीलपणा त्यांना गोड वाटेनासा होऊन मुलांना त्या पाळीनातशा झाल्या. भिक्षा किंवा बली न देतां व यजन करून पितर, देवता, अतिथी व गुरू यांना न देतां तें अन्न खाऊं लागले. त्यांचे आचारी सर्व प्रकारें अमंगळ राहूं लागले व अन्न उघडें राहूं लागलें. कावळ्यांना व उंदरांना भक्ष्य होऊन धान्य पसरून पडूं लागलें. दूध उघडें राहूं लागलें व उष्ट्या हातांनीं ते तुपाला शिवूं लागले. कुदळी, सुरे, कांशाचीं भांडीं सर्व अस्ताव्यस्त पडून यजमानणीचें त्यांकडे लक्ष राहीनासें झालें. घर व घराच्या भिंती यांच्या पडझडीकडे ते बघेनासे झाले. गाईंना बांधून ठेवून त्यांच्या पोटापाण्याची ते व्यवस्था पाहीनातसे झाले. मुलें तोंडाकडे पहात असतां त्यांना न देतां त्याचप्रमाणें नोकरांना खाऊं न घालतां ते स्वतः एकटेच खाऊं लागले. खीर, तिळभात, मांस, अपूप, शष्कुली या जिनसा स्वतःसाठीं शिजवूं लागले. यज्ञामध्यें विनियोग न केलेल्या मांसाचा ते उपयोग करूं लागले. सूर्य उगवल्यावर व पहाटेस निजूं लागले. रात्रंदिवस घरोघरीं भांडणें सुरू झालीं. हलक्या प्रतीचे लोक थोर बसले असतां त्यांचा मान राखीनातसे झाले. आश्रमधर्मानें राहणाऱ्यांचा धर्मलंड लोक द्वेष करूं लागले. संकर सुरू झाला. शुचिर्भूतता नाहींशी झाली. वेद येणाऱ्यांना मान नाहींसा होऊन वेदऋचा ज्यांना ठाऊक नाहींत अशांना कांहीं भय उरलें नाहीं. मानाला पात्र व अपमान करण्याजोगे अशा दोघांमध्यें कांहीं अंतर राहिलें नाहीं. दासींचें वर्तन बिघडून वाटेल तशा त्या नटूं लागल्या, वाटेल तशा वेषानें वाटेल तिकडे जाऊं येऊं लागल्या व वाटेल तिकडे पाहूं लागल्या. बायका पुरुषांच्या वेषामध्यें व पुरुष बायकांच्या वेषामध्यें क्रीडा व विहार यांमध्यें मोठी मजा मारूं लागले. पूर्वी जे त्यांचे समर्थ असे पूर्वज पात्र पाहून दान करीत असत, त्यांचेच वंशज अंगांत सामर्थ्य असतां ना-

स्तिकपणामुळें तसें न वागतां ते परत घेऊं लागले. एखादें काम होण्याला कांहीं अडचण दिसल्यामुळें मित्रांनीं त्यांच्याकडे तोंड पसरलें असतां त्यामध्यें त्यांचा अगदीं यत्किंचित् स्वार्थ असला तरी तेवढ्यासाठीं ते मित्रकार्य नासून टाकूं लागले. दुसऱ्याला बुचाडण्याची त्यांना लज्जत लागून राहून उत्तम जातीमधले लोक देखील व्यापार व देवघेव करूं लागले. शूद्र तप करूं लागून वेद ह्मणूं लागले व व्रतशील राहूं लागले. गुरूची शिष्य सेवा करीनासा होऊन उलट तो त्याचा मित्र बनला. आईबाप ह्मातारपणामुळें सामर्थ्य न उतरतां उत्साह नाहींसा होऊन मुलांपाशीं अन्नासाठीं तोंड पसरूं लागले. सागराप्रमाणें गंभीर असे वेदवेत्ते शहाणे मूर्ख बनून शेती करूं लागले व श्राद्ध खाऊं लागले. रोज रोज सकाळीं उठून कुशल प्रश्न विचारून कांहीं काम आहे का पाहून तें करण्याचें काम शिष्यांनीं सोडून देऊन गुरूच उलट तें करूं लागले. सुना सासूसासऱ्यांच्या देखत नोकरांवर हुकूम बजावण्यास लागून नवऱ्याला हाक मारून शहाणपणाच्या गोष्टी सांगूं लागल्या. बाप मोठ्या मिनतवारीनें मुलाचें मन धरूं लागला; एवढेंच नव्हे तर भिऊन जाऊन संपत्ति त्याला वांटून देऊन आपण कष्टांत काळ काढूं लागला. आग, चोर किंवा राजे यांच्यामुळें नष्ट झालेली संपत्ति पाहून मित्र ह्मणविणारे देखील द्वेषानें हंसूं लागले. ते सर्व कृतघ्न, नास्तिक, पापी व गुरुस्त्रिशीं संबंध ठेवणारे असे झाले आहेत. अभक्ष्य भक्षण करण्याची त्यांना गोडी लागून त्यांनीं मर्यादा सोडली आहे. व पूर्वीचें त्यांच्यामधलें तेज नाहींसें झालें आहे. या प्रकारें त्यांचें गैरवर्तन झालें असल्यामुळें मी त्यांना सोडून तुझ्याकडे आलें आहें. तेव्हां तूं माझा बहुमान कर. ह्मणजे सर्व देवांपासून मला बहुमान मिळेल. जेथें मी तेथेंच माझ्याशीं प्रेमानें असून माझ्याशीं मिळून माझ्यावर अवलंबून असणाऱ्या आशा, श्रद्धा, धृति, शांति, विजिती, सन्नती, क्षमा व आठवी जया ह्या आठ असतात. आह्मीं सर्वांनीं असुरांना सोडलें आहे. देव धर्मानें व निष्ठेनें आहेत ह्मणून यांजवळ आह्मी यापुढें रहाणार.' असें ती बोलली असतां त्या दोघांनीं तिचा जयजयकार केला देवमार्गामध्यें वारा चांगला वाहूं लागला व इष्ट ठिकाणीं देव तिचा जयजयकार करण्यासाठीं उभे राहिले. नारदांनीं हिची ही स्वर्गीं येण्याची वेळ फारच मंगलदायक आहे असें सांगितलें. आकाश स्वच्छ होऊन ब्रह्मलोकीं अमृताचा वर्षाव झाला; दुंदुभी कोणी न बडवितां आपल्या आपण वाजूं लागल्या. दिशा प्रसन्न झाल्या. ज्या त्या ऋतूमध्यें उगवणाऱ्या धान्याला पाऊस मिळूं लागला व कोणीही धर्ममार्गाला सोडून चालेनासा झाला. पृथ्वी अनेक रत्नाभरणांनीं भूषित झाली आणि सर्व लोक धर्ममार्गाला लागून वेदकृत्यामध्यें आनंद मानून राहूं लागले. देव, किन्नर, यक्ष, राक्षस सर्वांची भरभराट होऊन सर्व उत्साहसंपन्न झाले. झाडावरचें फूल सुद्धां —मग फळाची गोष्ट विचारावयासच नको—अकाळीं वाऱ्यानें जोरानें हालवून सोडलें असतां हीं खालीं गळून पडेनासें झालें. गाई वाटेल तेव्हां धार काढली असतां मधुर दूध देऊं लागल्या; व निष्ठुर शब्द कोणाच्या तोंडून निघतनासे झाले. हीं वैभवाचीं मुख्य चिन्हें आहेत.'

———

## १७७ शील व लोकप्रियता.

( १२. २२९–३०. )

'कशा प्रकारचें शील, आचार, विद्या व पराक्रम असल्यानें मनुष्य प्रकृतीच्या पलीकडचें श्रेष्ठ ब्रह्मपद मिळवितो, व या जगामध्यें लोकप्रिय व सर्व गुणसंपन्न असा कोण आहे,' ह्मणून युधिष्ठिरानें विचारलें असतां भीष्म ह्मणाले, 'पुण्यवान लोकांची जी श्रेष्ठ गति आहे व ज्याकडे लक्ष देऊन ते वागतात व ज्याच्या योगानें त्यांना शांति मिळते ती गोष्ट सांगतों ऐक. कोणीं निंदा अगर स्तुति केली असतां त्याबद्दल ते सारखेच असतात. आपले नियम व सत्कृत्यें ते झांकून ठेवितात. ते कधीं लोकांना टाकून बोलत नाहींत. ज्याचा वाईट परिणाम होईल अशा प्रकारची हिताची दिसणारी गोष्ट सुद्धां ते सांगत नाहींत. कोणी पीडा दिली असतां उलट पीडा देत नाहींत. गतगोष्टीसंबंधानें शोक करीत नाहींत, एवढेंच नाहीं, परंतु तें मनांतसुद्धां आणीत नाहींत. सामर्थ्य असलें तर एखाद्यानें सां-

गितलेलें काम आदरून लक्षपूर्वक करतात. त्यांचें ज्ञान परिपक्व असून ते मोठे शहाणे असतात. राग व इंद्रियें त्यांनीं जिंकलीं असतात. कायावाचामनानें ते कधीं कोणाचा अपराध करीत नाहींत. कोणाचा हेवा करीत नाहींत व दुसऱ्याचें वैभव पाहून त्यांना संताप होत नाहीं. दुसऱ्याची निंदा किंवा स्तुति करण्याच्या ते भानगडींत पडत नाहींत, व दुसऱ्यांनीं केलेल्या निंदेचा किंवा स्तुतीचाही त्यांच्या मनांवर कांहीं परिणाम होत नाहीं. अगदीं शांत राहून सर्व भूतमात्रांच्या हितामध्यें ते दक्ष असतात. त्यांना राग किंवा आनंद माहीत नसून त्यांच्या हातून कधीं अपराध होत नाहींत. निःशंकपणानें ते यथेष्ट पृथ्वीवर संचार करीत रहातात. त्यांना कोणी मित्र किंवा शत्रु नसून ते कोणाचे मित्र किंवा शत्रु नसतात. जे लोक अशा रीतीनें धर्माला अनुसरून वागतात ते सुखांत काल काढतात. जे ह्या मार्गापासून ढळतात त्यांना नेहमीं भीतींत रहावें लागतें. ज्याला तत्त्व कळलें आहे त्यानें अवमानाबद्दल अमृताप्रमाणें संतुष्ट रहावें व सन्मानासंबंधानें विषाप्रमाणें भिऊन असावें. दुसऱ्यांनीं ज्याचा अपमान केला आहे तो इहपर लोकीं सर्व दोषांपासून मुक्त होऊन सुखांत रहातो, व अपमान करणाऱ्याचे पुढें डोळे उघडतात. अशा प्रकारचें वर्तन ठेवल्यानें मनुष्य सुखी होऊन श्रेष्ठ पद मिळवितात व याच्या तोडीला देवगंधर्वसुद्धां लागत नाहींत.

आतां जगामध्यें सर्वमान्य असे नारद असून त्यांचे गुणानुवाद सर्व करतात तेव्हां त्यांच्यामध्यें असे चांगले गुण काय आहेत ते थोडक्यांत सांगतों. आपल्या वर्तनामध्यें लोकांच्या देहाला ताप देणारा असा अहंकार त्यांना मुळीं माहीत नाहीं. श्रुतींत सांगितल्याच्या बाहेर त्यांचें पाऊल एवढेंसुद्धां पडत नाहीं. असमाधान, राग, क्षुद्रपणा, भीति हे गुण त्यांच्या अंगीं नसून हुषारी व शूरत्व त्यामध्यें आहेत. ते सर्वांना पूज्य असून बोलल्याप्रमाणें करण्यांत कामानें किंवा लोभानें यत्किंचितही ढळत नाहींत. अध्यात्मज्ञान त्यांना चांगलें असून सहनशील, सामर्थ्यवान, जितेंद्रिय, सरळ, सत्यवादी असे ते आहेत. तेज, यश, बुद्धि, ज्ञान, विनय, जन्म व तप यांनीं ते वृद्ध असून सुशील आहेत. त्यांचें रहाणें व खाणें चांगलें असून ते स्वतः शुचिर्भूत व आदरशील आहेत. त्यांची वाणी चांगली असून कोणाचा ते हेवा करीत नाहींत. ते सर्वांचें कल्याण करतात. पाप त्यांना मुळीं ठाऊक नाहीं. दुसऱ्याचें वाईट झाल्यानें त्यांना बरें वाटत नाहीं. वेदश्रुति, पुराण व इतिहास ह्यांच्या योगानें ऐहिक विषय नेहमीं जिंकण्याला त्यांची खटपट असते. ते त्यागशील आहेत. कोणी त्यांचा अवमान करीत नाहींत. सर्वांशीं त्यांचा समभाव असल्यानें त्यांना कोणी आवडता किंवा नावडता नाहीं. दुसऱ्याच्या मनाला अनुकूल असेंच त्यांचें भाषण असतें. ते बहुश्रुत असून त्यांच्या भाषणांत वैचित्र्य आहे. ते विद्वान आहेत. लोभ, कपट, दैन्य किंवा क्रोध त्यांना ठाऊक नाहीं. कोणत्याही विषयासंबंधानें, पैशासंबंधानें किंवा कोणत्याही कामासाठीं कोणाशीं कधीं त्यांचें भांडण झालें नाहीं. सर्व दोष त्यांच्यापासून पार नाहींसे झाले आहेत. ब्रह्मावर त्यांची दृढ भक्ति असून हे अति स्तुत्य आहेत. श्रुति यांना पूर्ण अवगत आहे. क्रूरपणा अगदीं ठाऊक नाहीं. मोह ह्मणून त्यांना कधीं पडत नाहीं. ते सर्व विषयांसंबंधानें विरक्त असून त्यांत गढल्याप्रमाणें दिसतात. त्यांचा संशय फार वेळ टिकत नाहीं. ते मोठे वक्ते आहेत. काम व अर्थ यांसंबंधानें त्यांची मुळीं आतुरता नाहीं. स्वतःची ते कधीं बढाई मिरवीत नाहींत. ईर्षा त्यांना ठाऊक नाहीं. भाषण फार मृदु आहे. लोकांचे निरनिराळे स्वभाव पहात राहून कोणाला ते नांवें ठेवीत नाहींत. वस्तूच्या उत्पत्तीसंबंधानें त्यांना पूर्ण ज्ञान असून कोणत्याही शास्त्रासंबंधानें त्यांना असूया नाहीं. आपल्या मताप्रमाणें वाटणाऱ्या नीतीनें ते वागतात. त्यांचा काळ कधा फुकट जात नाहीं. स्वतःवर त्यांचा दाब चांगला आहे. उत्तम श्रम करून त्यांनीं ज्ञानार्जन केलें आहे. योगसमाधीची त्यांना तृप्ति म्हणून कधीं नाहीं. निर्भीड न रहातां दुसऱ्यांनीं सांगितलें असतां काम करण्याला ते नेहमीं दक्ष असतात. दुसऱ्यांची गुप्त गोष्ट ते कधीं फोडीत नाहींत. कोणताही हेतु साधला असतां आनंद किंवा न साधल्यानें दुःख त्यांना कधीं होत नाहीं. त्यांची बुद्धि स्थिर असून ते कशामध्यें

गढून जात नाहींत. अशा प्रकारचे ते सर्वगुणसंपन्न असल्यानें सर्वांना प्रिय झाले आहेत.'

---

## १७८ कालमान आणि सृष्टीची उत्पत्ति व संहार. (१२. २३१-३३)

युधिष्ठिर ह्मणाला, ' निरनिराळ्या गुणांचा काल, त्या त्या युगांतील आयुष्य, ध्यानमार्ग, कर्म, लोकतत्त्व व भूतमात्रांची उत्पत्ति आणि लय कोठून होतात हें सर्व आपण मला सांगा. ' भीष्म ह्मणाले, ' यासंबंधांत शुकांनीं आपले वडील जे व्यास यांना विचारलें असतां त्यांनीं जें सांगितलें तेंच सांगतों ऐक. व्यास ह्मणाले, 'ज्याला आदि व अंत नाहीं व जन्म व जरा नाहीं असें सत्य, अव्यय व तर्काच्या आणि ज्ञानाच्या पलीकडचें ब्रह्म सृष्टीच्या पूर्वी अस्तित्वांत होतें. पंधरा निमिषें ह्मणजे एक काष्ठा, तीस काष्ठा ह्मणजे एक कला, तीस कला ह्मणजे एक मुहूर्त व तीस पूर्णांक एक दशांश मुहूर्त ह्मणजे एक अहोरात्र, तीस अहोरात्र ह्मणजे एक महिना, बारा महिने ह्मणजे वर्ष, याप्रमाणें मनुष्याचें कालमान असून वर्षाचे उत्तरायण व दक्षिणायन असे दोन भाग आहेत. सूर्य या मानवी अहोरात्रींचे प्राणिमात्रांना झोंप घेण्याकरिता रात्र व कर्म करण्याकरितां दिवस असे दोन भाग करतो. पितरांची अहोरात्र ह्मणजे मानवांचा महिना असून कर्म करण्यासाठीं शुक्लपक्ष त्यांचा दिवस असून कृष्णपक्ष रात्र आहे. देवांची अहोरात्र मानवांचें वर्ष असून उत्तरायण हा त्यांचा दिवस आहे व दक्षिणायन रात्र आहे. कृतयुगामध्यें ऐन चार हजार व संध्या आणि संध्यांश यांचीं अनुक्रमें चारचारशें वर्षें मिळून एकंदर चार हजार आठशें ( देवांचीं ) वर्षें आहेत. पुढें त्रेत, द्वापार, व कलि या प्रत्येक युगामध्यें क्रमानें हा काल चतुर्थांशानें क्रमानें कमी होत जातो. व हीं सर्व युगें मिळून सनातन लोकांना धारण करतात. आणि या युगाख्यकालाला ब्रह्मवेत्ते शाश्वत ब्रह्म ह्मणतात. कृतयुगामध्यें चार पायांनीं संपूर्ण असा धर्म व सत्य असून अधर्मानें कोणतीही विद्या किंवा गोष्ट मिळत नाहीं. इतर युगांमध्यें नियमित प्रमाणाहून हा धर्म चौथ्या हिश्शानें कमी होत जातो व चोरी, खोटें व कपट यांनीं अधर्म वाढत जातो; कृतयुगामध्यें लोकांचें वय चारशें वर्षें असून ते निरोगी असतात. व त्यांचे सर्व उद्देश शेवटाला जातात. पुढें प्रत्येक युगामध्यें वेदांत सांगितलेलें फळ, सुख व आयुष्य क्रमाक्रमानें चतुर्थांशानें कमी कमी होत जातात. युगाच्या ऱ्हासाला अनुरूप मनुष्यांचे धर्म कृतयुगामध्यें निराळे, त्रेतायुगामध्यें निराळे, द्वापारामध्यें निराळे व कलियुगामध्यें निराळे असतात. कृतयुगामध्यें तपाला श्रेष्ठत्व असून त्रेतायुगामध्यें ज्ञानाला श्रेष्ठत्व आहे. द्वापारामध्यें यज्ञाला श्रेष्ठत्व असून कलियुगामध्यें दानाला श्रेष्ठत्व आहे. हीं देवांच्या बारा हजार वर्षांचीं चार युगें हजारदां फिरलीं असतां ब्रह्माचा एक दिवस होतो व तितकाच काल फिरून गेला असतां रात्र होते. ह्या ब्रह्माच्या दिवसाच्या सुरवातीपासून सृष्टीची सुरवात होते. प्रळयाच्या वेळीं ध्यान धरून तो ईश्वर निद्रिस्त होतो, व काल संपल्यावर फिरून तो जागा होतो. याप्रमाणें याचा हजार युगांचा दिवस व हजार युगांची रात्र मिळून अहोरात्र होते. रात्र सरून जागा झाल्यावर अक्षय अशा ब्रह्मावर मायेचें पांघरूण घालून तो सृष्टि घडण्याला सुरवात करतो. प्रथम महत् भूत उत्पन्न करून त्यापासून व्यक्तस्वरूपी मन उत्पन्न करतो. ब्रह्म हें तेजोमय बीज असून त्यापासूनच हें सर्व स्थावरजंगमात्मक जग उत्पन्न झालें आहे. दिवस सुरू झाला असतां जागा होऊन अविद्येच्या साहाय्यानें तो आत्मा जग उत्पन्न करतो. प्रथम हें महत् तत्त्व उत्पन्न होऊन पुढें लगेच त्याचें व्यक्त अशा मनाच्या स्वरूपांत रूपांतर होतें. हें सर्वत्र व दूरवर पल्ला मारणारें वासनात्मक व संशयात्मक मन सृष्टि उत्पन्न करण्याच्या इच्छेनें प्रेरित होऊन आत्म्यावर अविद्येचें पांघरूण घालून सात प्रकारची मानस सृष्टि उत्पन्न करतें. मनापासून प्रथम शब्दगुणात्मक आकाश उत्पन्न होतें. विकार पावणाऱ्या आकाशापासून सर्व प्रकारचे गंध वहाणारा, शुचिर्भूत व बलवान असा वायु उत्पन्न होतो. त्याचा स्पर्श गुण आहे. विकार पावणाऱ्या याच्यापासून देदीप्यमान ज्योति उत्पन्न होते. त्याचें बीज तेजस्वी असून त्याचा रूपगुण आहे. या

ज्योतीपासून विकारानें रसगुणात्मक जल उत्पन्न होतें व त्यापासून पुढें भूमि व भूमिचा गंधगुण हीं उत्पन्न होतात. याप्रमाणें सर्व सृष्टीची मूळ उत्पत्ति आहे. या पंचमहाभूतांपैकीं प्रत्येक आपल्या पूर्वींच्या मधील गुण घेत असतो. याप्रमाणें आकाशामध्यें एक शब्दगुणच असून पुढें क्रमानें प्रत्येकांत एकेक गुण वाढत जाऊन पृथ्वीमध्यें सर्वही गुण आहेत. पाण्यामध्यें गंधगुण पाहून हा पाण्याचा गुण आहे असें जर कोणी ह्मणतील तर ती त्यांची चूक आहे. हा गंधगुण पृथ्वीचा असून पाण्याशीं व वायूशीं या पृथ्वीचा संबंध असल्यानें त्यांच्या ठिकाणीं हा दिसून येतो. महत्, मन व पंचमहाभूतें हीं सप्तविध मानससृष्टि. हीं निरनिराळ्या सामर्थ्यांचीं पूर्वीं निरनिराळीं असतां त्यांना सर्व एकत्र जमल्यावांचून प्रजा उत्पन्न करतां येईना. ह्मणून ते महात्मे एकत्र जमून एकमेकांच्या आश्रयानें शरीर स्वरूप होण्याच्या स्थितींत आल्यावर त्यांना पुरुष ही संज्ञा मिळते. व याप्रमाणें शरीराचा आश्रय करण्याला लायक झाल्यानें दशेंद्रियें, मन व पंचमहाभूतें यांनीं बनलेलें मूर्तिमान शरीर तयार होतें. त्यामध्यें सूक्ष्म पंचमहाभूतें कर्मांसह शिरतात. याप्रमाणें त्या सूक्ष्म सर्व भूतांना घेऊन त्या सूक्ष्म शरीररूपी उपाधींत स्वस्वरूपज्ञानरूप तपश्चरण करण्याकरितां सर्व भूतमात्रांचा आदिकर्ता परमेश्वर प्रवेश करतो. त्यालाच प्रजापति ह्मणतात. पुढें तो सर्व स्थावर जंगम भूतमात्र उत्पन्न करतो. देव, ऋषी, पितर, मनुष्य, लोक, नदी, समुद्र, दिशा, पर्वत, वनस्पति, किन्नर, राक्षस, पशु, पक्षी, साप वगैरे सर्व अविनाशी व विनाशी अशी स्थावरजंगमात्मक दोन प्रकारची सृष्टि हा उत्पन्न करतो. निर्माण होणाऱ्या सृष्टीच्या पूर्व सृष्टीच्या वेळीं त्या त्या स्थावरजंगमांचीं जीं जीं कर्में असतात, तीं तीं कर्मेंच फिरून फिरून उत्पन्न होत असतां त्यांच्यामध्यें येतात. हिंसा, अहिंसा, मृदुपणा, क्रूरपणा, धर्म, अधर्म, खरें, खोटें इत्यादि जे जे भाव मनांत धरावे ते तेच पुढें आवडूं लागतात. धाताच सर्व महाभूतांच्या ठिकाणीं त्याचप्रमाणें इंद्रियविषयांच्या ठिकाणीं व स्वरूपात्मक वस्तूंच्या ठिकाणीं हे निरनिराळे प्रकार वांटून देऊन या वस्तूंचा या निरनिराळ्या महाभूतांशीं निरनिराळा संबंध जोडून देत असतो. या भूतसृष्टीवर विचार करणाऱ्यांपैकीं कांहींजण फलप्राप्तीला प्रयत्न मुख्य आहे असें ह्मणतात, कांहीं दैव मुख्य आहे ह्मणतात व कांहीं स्वभाव मुख्य आहे ह्मणतात; व दुसरे कांहीं प्रयत्न व दैव यांपासून घडणारीं कृत्यें स्वभावाच्या साहाय्यानें फलदायक होतात ह्मणून या तिघांपैकीं, एकाच्याच योगानें फळ मिळतें असें ह्मणण्यापेक्षां या तिघांच्या संमेलनानें ती फलप्राप्ति होते असें ह्मणतात. या विषयासंबंधानें कांहीं कर्मवादी लोक हें असेंच आहे ह्मणतात, कांहीं असें नाहीं ह्मणतात, कांहीं दोन्ही खरें ह्मणतात, व कांहीं दोन्ही खोटें ह्मणतात; परंतु ज्यांची दृष्टि सत्याकडे लागली आहे असे सत्वस्थ लोक ब्रह्म कारण आहे हें ओळखतात. तप मनुष्याला कल्याणकारक असून त्याच्या योगानें ज्या कांहीं इच्छा मनामध्यें असतात, त्या पूर्ण होतात. हें जग उत्पन्न करणारें ब्रह्मरूपी महद्भूत तपानें मिळतें आणि ज्यांना तपानें त्याची प्राप्ति होते ते सर्वांचे स्वामी होतात. तपाच्या योगानेंच ऋषी रात्रंदिवस वेदाध्ययन करण्याला समर्थ होतात. आरंभाला स्वयंभू प्रजापतीनें ज्याला आदि व नाश नाहीं असें ज्ञानभांडार-वैदिक शब्द-तोंडांतून काढलें व तें शिष्यपरंपरेनें अस्तित्वांत आलें. या शब्दांपासूनच ऋषींचीं नांवें, वेदांमध्यें सांगितलेल्या सृष्टी, भूतमात्रांचीं नाना रूपें व नाना कर्में हीं ईश्वरानें प्रथम उत्पन्न केलीं. रात्र सरल्यावर या ईश्वरानें पूर्वींच्या नमुन्यावरहुकूम सर्व वस्तू उत्तम रीतीनें निर्माण केल्या. वेदांमध्यें वेदाध्ययन, गृहस्थाश्रमस्वीकार, तप, कर्म, यज्ञ, कीर्तिकर कामें, ध्यान, कैवल्यसिद्धि व जीवन्मुक्ति हीं क्रमानें सांगितलीं आहेत. वेद कळणाऱ्यांनीं वेदामध्यें त्याचप्रमाणें उपनिषदांमध्यें ज्या गहन गोष्टींसंबंधानें विचार केला आहे त्याचें ज्ञान या क्रमानें करून घ्यावें. ज्याला मला देह आहे असें वाटत असतें त्याचा सुखदुःखात्मक द्वंद्वांनीं मुक्त असा हा विनयपणा धर्मामुळें उत्पन्न होतो; परंतु जो जीवन्मुक्त झालेला आहे तो ज्ञानाच्या साहाय्यानें हा वेगळेपणाचा भाव टाकून देतो. शब्दब्रह्म व परब्र-

ह्म अशीं दोन प्रकारचीं ब्रह्में असून शब्दब्रह्मामध्यें निष्णात झालेला परब्रह्मप्राप्ति करून घेतो. क्षत्रियांना पशु मारणारा हिंसात्मक यज्ञ सांगितला आहे. हवि देऊन यज्ञ करणें वैश्यांना सांगितला आहे. सेवायज्ञ शूद्राला सांगितला असून तपोयज्ञ ब्राह्मणांना सांगितला आहे. हे यज्ञाचे प्रकार त्रेतायुगामधील असून कृतयुगाला लागू नाहींत व द्वापारामध्यें आणि कलीमध्यें हे बुडत जातात. कृतयुगामध्यें एकच धर्म ठाऊक असल्यानें ऋक्, साम व यजु हे वेद व दुसरीं वासनात्मक इष्टयादि सकाम कर्में आपल्या इष्टप्राप्तीहून निराळीं समजून तपानेंच लोक योगसाधन करीत रहातात. त्रेतायुगामध्यें पुष्कळ बलवान लोक उत्पन्न होऊन ते स्थावरजंगमाचें नियमन करतात. ह्मणून या युगांत वेद, यज्ञ, निरनिराळे वर्णाश्रम हे एकत्र सुस्थितींत रहातात. परंतु द्वापारामध्यें आयुष्य कमी झाल्यामुळें हेही कमी कमी होत जातात. कलियुगामध्यें तर हे सर्व वेद दिसतात न दिसतातसे होतात. व अधर्माचा पगडा बसून यज्ञ व हे सर्व वेद समूळ नाहींसे होतात. कृतयुगामध्यें दिसून येणारा धर्म कलियुगांत आत्मनिग्रही, तपस्वी अशा कांहीं वैदिक ब्राह्मणांमध्येंच दिसून येतो. युगायुगामध्यें धर्माला धरून असणारीं कर्तव्य कर्में न टाकतां स्वधर्म पाळीत रहाणारे लोक शास्त्राधाराला अनुसरून धर्म, व व्रतें इत्यादिक सकाम बुद्धीनें करण्याला प्रवृत्त होतात. ज्याप्रमाणें निरनिराळ्या ऋतूंमध्यें क्रमानें निरनिराळीं चिन्हें दिसूं लागतात त्याप्रमाणें ब्रह्म, हर इत्यादिकांच्या ठिकाणीं सृष्टि व संहार यांचें सामर्थ्य निरनिराळ्या प्रमाणानें दिसतें. कालच सर्वांना उत्पन्न करून त्यांचा नाश करतो. सर्व सुखदुःखात्मक द्वंद्वांनीं युक्त असे असंख्य भूतमात्र जे आपापल्या स्वभावाप्रमाणें वागत आहेत, त्यांना काल हाच आधार आहे. काल हाच ह्या निरनिराळ्या स्वरूपांमध्यें त्यांना पोसतो व धारण करतो. याप्रमाणें सृष्टी, काल, क्रिया वेद, कर्ता, कार्य, फल यांसंबंधानें ही माहिती आहे. आतां दिवस सरून या ईश्वराची रात्र आली असतां तो सर्वांचा आपल्यामध्यें फिरून संहार कसा करतो ह्मणजे अर्थात या सर्व स्थूल विश्वाला तो ईश्वर अगदीं सूक्ष्म बनवून आपल्या पोटांत कसें घेतो हें ऐक. आकाशामध्यें सूर्य त्याचप्रमाणें सात अग्नि एकदम पेट घेऊन त्या अग्नीच्या योगानें हें सर्व जग एकदम जळूं लागतें. पृथ्वीच्या ठिकाणीं जीं जीं ह्मणून स्थावरजंगम भूतें आहेत तीं प्रथम भूमीच्या स्वरूपाला मिळून सर्व पृथ्वीवर झाडें वगैरे कांहीं न उरतां तिला कांसवाच्या पाठीचें स्वरूप येतें. पुढें भूमीचा गंधगुण पाण्यानें आपल्यामध्यें घेतल्यानें भूमि लय पावते ह्मणजे तिचें कारण जें जल त्यांत मिळते. ह्मणजे ती जलरूप होते. नंतर सर्व जलमय होऊन मोठमोठ्या जोराच्या लाटा उसळूं लागतात. पुढें पाण्याचा गुण तेज आपल्यामध्यें घेतें व पाण्याचें तेजामध्यें रूपांतर होतें. ह्मणजे लय होतो. सूर्यासंबंधीं तेजाला अग्नीच्या ज्वाळा झांकून काढितात व सर्व आकाश ज्वाळांनीं जळूं लागतें. पुढें याचा रूपगुण वायु आपल्यामध्यें घेतो व तेज वायूमध्यें नाहींसें होऊन मोठ्या सोसाट्याचा वारा जिकडे तिकडे वाहूं लागतो. पुढें वायूचा स्पर्शगुण आकाश गिळून टाकतें. त्यामुळें वारा बंद पडून आकाश रूप, रस, स्पर्श, गंध या वांचून सनाद असें मूर्तिमान उरतें. पुढें आकाशाचा शब्दगुण मन गिळतें व याप्रमाणें मनःकल्पित विराटस्वरूपाचा सूक्ष्म मनामध्येंच प्रळय होतो. नंतर मन निस्सीम ज्ञानवैराग्य, ऐश्वर्यधर्मात्मक कर्मामध्यें लीन होऊन हिरण्यगर्भ त्याला आपल्या समष्टिमनामध्यें लीन करतो. याप्रमाणें मनाचा लय झाला असतां पुढें पुष्कळ कालानें त्या संकल्पमात्र शरीर अशा हिरण्यगर्भ समष्टिमनाला योगी परमेश्वर आपल्या, 'मीच सर्व आहे,' अशा ज्ञानामध्यें स्वाधीन करून घेतो. व मी आहें एवढाच जो प्रत्यय तद्रूप ज्ञानाला काळ गिळीत असून त्या काळाला बलाख्यशक्ति ( अनेक असें कांहींच नाहीं असें ज्ञान ) आपल्या ताब्यांत घेते. हें ज्ञान होते वेळीं होणारा आकाशगुण नाद याचा ब्रह्मांत लय होतो. तेंच अव्यक्त, शाश्वत व सर्वश्रेष्ठ परब्रह्म होय. याप्रमाणें सर्व भूतमात्रांचा ब्रह्मामध्यें लय होतो. '

---

## १७९ ब्राह्मणांचें कर्तव्य.

( १२. २३४–३९ )

व्यास ह्मणाले; ' सृष्टीच्या उत्पत्तीसंबंधानें तुझ्या प्रश्नाचें मीं उत्तर दिलें. आतां ब्राह्मणांचें जें कांहीं कर्तव्य आहे त्यासंबंधानें सांगतों ऐक. जातकर्मापासून समावर्तनापर्यंत ज्या कर्मांना दक्षिणा सांगितली आहे अशीं सर्व कर्में वेदपारग अशा गुरूकडून व्हावींत. गुरुशुश्रूषेमध्यें दक्ष राहून सर्व वेद पढल्यावर गुरूच्या ऋणांतून मुक्त होऊन यज्ञाची माहिती करून घेऊन गुरुगृहापासून परत यावें व गुरूच्या परवानगीनें चार आश्रमांपैकीं एक आश्रम घेऊन असावें. ह्मणजे यथाशास्त्र लग्न करून घेऊन संतति उत्पन्न करीत गृहस्थाश्रमामध्यें किंवा ब्रह्मचर्य आश्रमामध्यें किंवा वानप्रस्थाश्रमामध्यें गुरूजवळ किंवा संन्यासधर्मानें देह ठेवीपर्यंत तो तो आश्रम पाळीत रहावें. या सर्व आश्रमांचें मूळ गृहस्थ समजला आहे. गृहस्थ आत्मनिग्रहाच्या योगानें सर्व ऐहिक विषयांवरील आसक्ति सोडून उत्तम स्थिति मिळवितो. प्रजा उत्पन्न करून वेदज्ञान करून घेऊन व यज्ञ करून तीन ऋणांतून मुक्त झाल्यावर त्यानें पुढें कर्मांनीं शुद्ध होऊन दुसरा एखादा आश्रम घ्यावा. जगामध्यें जें त्याला अति पुण्यकारक ठिकाण आहे असें कळेल तेथें राहून उत्तम यशामध्यें वर्चस्व मिळविण्याला त्यानें यत्न करावा. कडक तप, सर्व विद्यांमधील पारंगता, यज्ञ व दान यांच्या योगानें ब्राह्मणाचें यश वाढून याची यशस्कर कीर्ति पृथ्वीवर जोंवर आहे तोंवर पवित्र लोकांना मिळणारे अनंत लोक त्याला मिळतात. ब्राह्मणानें शिकवावें, शिकावें; यज्ञ करवावा, करावा; भलता प्रतिग्रह घेऊं नये किंवा भलत्याला दान देऊं नये. यज्ञ करविल्याबद्दल किंवा शिष्यापासून किंवा मुलीचा मिळालेला पैसा यज्ञ किंवा दान यांमध्यें खर्च करावा. एकट्यानें कधीं त्याचा उपभोग घेऊं नये. घरामध्यें रहाणाऱ्या गृहस्थाला देव, ऋषी, पितर, गुरु, वृद्ध, व्याधिग्रस्त व भुकेले यांच्यासाठीं प्रतिग्रहावांचून दुसरें साधन नाहीं. गुप्त शत्रूपासून ज्यांना पीडा झाली आहे किंवा उदरनिर्वाहासाठीं जे यथाशक्ति खटपट करीत आहेत त्यांना आपल्या शक्तीच्या बाहेर द्रव्य द्यावें एवढेंच नव्हे, परंतु शिजविलेल्या अन्नापैकीं सुद्धां त्यांना द्यावें. योग्य मनुष्याला देऊं नये असें कांहींच नाहीं. उच्चैःश्रव घोडासुद्धां त्याला लागल्यास मिळवून दिला पाहिजे. मोठा व्रतशील सत्यसंध रंतिदेव नम्रतापूर्वक आपले प्राण खर्चीं घालून ब्राह्मणाचे प्राण वांचवून स्वर्गाला गेला. सांकृतीच्या रंतिदेव मुलानें केवळ कोमट पाणी वसिष्ठांना दिल्यामुळें स्वर्ग मिळविला. अत्रिपुत्र इंद्रदमनानें सुपात्रीं पुष्कळ द्रव्य देऊन अनंत लोक मिळविले. उशीनरपुत्र शिबी हा आपले अवयव व पोटचा मुलगा ब्राह्मणासाठीं खर्चीं घालून स्वर्गाला गेला. काशीराजा प्रतर्दनानें आपले डोळे ब्राह्मणाला काढून देऊन इहपर अतुल कीर्ति मिळविली. देवावृध राजा सोन्याच्या आठ काड्यांची उत्तम छत्री ब्राह्मणाला देऊन आपल्या राष्ट्रासह स्वर्गाला गेला. अत्रिपुत्र सांकृती यांनीं निर्गुण ब्रह्माचा आपल्या शिष्यांना उपदेश करून उत्तम लोक मिळविले. अंबरीष अकरा अर्बुदें गाई ब्राह्मणांना देऊन राष्ट्रासकट स्वर्गाला गेला. सावित्रीनें दिव्य कुंडलें व जनमेजयानें शरीर ब्राह्मणाला देऊन उत्तम लोक मिळविले. वृषदर्भाचा मुलगा युवनाश्व हा सर्व रत्नें, आवडत्या स्त्रिया व रम्य असें घर ब्राह्मणाला देऊन स्वर्गाला गेला. विदेहाचा राजा निमी यानें आपलें राष्ट्र त्याचप्रमाणें परशुराम व गय यांनीं पृथ्वी ब्राह्मणाला दिली. एके वेळीं पाऊस पडेनासा झाला असतां प्रति प्रजापतिसारख्या वसिष्ठांनीं सर्व भूतमात्रांना वांचविलें. करंधमपुत्र मरुत यानें आपली मुलगी अंगिरांना देऊन स्वर्ग मिळविला. त्याचप्रमाणें बुद्धिमानांमध्यें श्रेष्ठ पांचाल देशचा राजा ब्रह्मदत्त यानें निधी व शंख ब्राह्मणांना देऊन उत्तम लोक मिळविले. मित्रसह राजा आपली प्रिया दमयंती महात्म्या वसिष्ठांना देऊन तिच्यासह स्वर्गाला गेला. राजर्षि सहस्रजित राजानें आपले आवडते प्राण ब्राह्मणासाठीं दिले. शतद्युम्न राजा सर्व मनोरथांनीं परिपूर्ण असें सोन्याचें घर मुद्गलांना देऊन स्वर्गाला गेला; त्याचप्रमाणें शालदेशच्या नीतिमान राजानें ऋचीकांना राज्य देऊन उत्तम लोक मिळविले. राजर्षि लोमपाल यांनें आपली मुलगी शांता ऋष्यशृंगांना देऊन सर्व काम परिपूर्ण

करून घेतले. मादिराश्व राजानें आपली मुलगी सुमध्यमा हिरण्यास्तांना देऊन देवांना देखील वंद्य असे लोक मिळविले. त्याचप्रमाणें प्रसेनजित राजानें लक्ष सवत्स गाई ब्राह्मणांना देऊन उत्तम लोक मिळविले. ह्या व अशाच प्रकारच्या दुसऱ्या पुष्कळ महात्म्यांनीं दानानें, तपानें व आत्मनिग्रहानें उत्तम कीर्ति मिळविली व ती त्यांची कीर्ति पृथ्वी कायम असे तोंपर्यंत कायम आहे.'

'वेदामध्यें सांगितलेली त्रयीविद्या व वेदांगें यांचें ज्ञान ऋक्, साम, यजु व अथर्वण यांपासून करून घ्यावें. यांमध्यें सांगितलेल्या षट्कर्मांमध्यें भगवान परमात्म्याचें वास्तव्य आहे. वेदवाक्यामध्यें व अध्यात्मज्ञानामध्यें निष्णात असलेल्या महाभागांना या सृष्टीची उत्पत्ति व लय दिसूं लागतो. याप्रमाणें धर्मामध्यें राहून शिष्टाप्रमाणें क्रिया करीत रहावें. कोणाला पीडा न देतां पोटाला मिळवावें. भल्यापासून ज्ञान मिळवून घेऊन सत्वशीलपणानें त्यासाठीं सांगितलेले धर्म पाळावे. गृहस्थाश्रमामध्यें रहाणाऱ्यानें वर सांगितलेलीं षट्कर्में पाळावीं. श्रद्धापूर्वक नेहमीं पांच यज्ञ करावे. धैर्यवान, सावध, आत्मनिग्रही, धर्मवेत्ता, आनंद, राग व मद टाकलेला असा ब्राह्मण कधीं नाश पावत नाहीं. दान, अध्ययन, यज्ञ, तप, भीड, सरळपणा, आत्मनिग्रह यांनीं तेज वाढून पाप नाहींसें होतें; व याप्रमाणें पाप धुवून गेल्यावर आहार थोडा ठेवून कामक्रोधांना आपल्या ताब्यांत ठेवून ब्रह्मप्राप्ति करून घेण्याचा प्रयत्न करावा. अग्नि व ब्राह्मण यांची पूजा करून देवांना नमस्कार करावा. अभद्र शब्द बोलूं नये व अधर्मकारक पीडा देऊं नये. ही ब्राह्मणाची पूर्ववृत्ति असून पुढें ज्ञान मिळवून कर्म करीत राहिल्यानें त्याला सिद्धि मिळते. पंचेंद्रियें हेंच ज्यामधलें पाणी असून राग हाच जिच्यामधला चिखल आहे अशी लोभ हाच तीर असलेली घोर व तरून जाण्याला कठीण अशी संसारनदी बुद्धिमानच तरून जातो. ज्याचा प्रतिकार करतां येणें कठीण असा मोह पाडणारा महाबलशाली काळ नेहमीं तयार आहे हें लक्षांत ठेवावें. स्वभावाच्या योगानें वळण मिळून हें जग नेहमीं त्याबरोबर वाहलें जात आहे. वर्षें हेच ज्यामधील भोंवरे आहेत, महिने ज्यामधील लाटा आहेत, ऋतु हाच ज्याचा वेग आहे, पक्ष हेच ज्यावरून वहात जाणाऱ्या काड्याकुड्या आहेत, डोळ्याचें पातें लवणें हाच ज्यावरील फेंस आहे, अहोरात्र हेंच ज्यांतलें पाणी आहे, वासनारूपी मगरांनीं ज्याला भयंकर स्वरूप आलें आहे, वेद व यज्ञ हेच ज्यामधील तरून नेणाऱ्या होड्या आहेत, धर्म हाच ज्यामधलें बेट आहे, अर्थकाम हेच ज्याच्या कांठचे झरे आहेत, सत्य भाषण व मोक्ष हेच ज्याचे तीर आहेत, हिंसाशून्यत्वरूपी झाडांना जो वाहून नेत आहे आणि युग हेंच याच्या प्रवाहाच्या बाजूनें असणारीं सरोवरें आहेत, व ब्रह्मदेवाप्रमाणेंच ज्याच्या उगमाचा पत्ता नाहीं, अशा कालरूपी प्रवाहाकडून विधाता सर्वभूतमात्रांना यमलोकाला घेऊन चाळला आहे. बुद्धिमान लोक ज्ञानरूपी होड्यांनीं यांतून तरून पार पडतात. ज्यांना अशाप्रकारचें होडगें नाहीं त्या मूर्खांच्या हातून काय होणार ? जो शहाणा आहे तो या प्रवाहांतून तरून जातो; दुसरा कोणी जात नाहीं हें रास्तच आहे. कारण शहाणा असतो तो गुणदोष दुरूनच पहात असतो आणि त्याप्रमाणें तो आपलें वर्तन ठेवतो. परंतु जो मनुष्य चलचित्त व कोत्या मनाचा आहे व वासनेनें ज्याचें मन भरून गेलें आहे अशा मूढाला हा ओघ तरून जातां येत नाहीं. त्याचप्रमाणें जो संशयामध्यें हातपाय आंखडून बसतो त्यालाही हा तरून जातां येत नाहीं. ज्याला ज्ञानरूपी तर मिळाली नाहीं तो मोठमोठ्या संकटांत गटंगळ्या खाऊन बुडतो. वासनारूपी मगरीनें ज्याला धरलें आहे त्याला ज्ञानरूपी नावेचा सुद्धां उपयोग होत नाहीं. म्हणून शहाण्यानें यांतून वर निघण्याचा प्रयत्न करावा, व ब्राह्मण ( ब्रह्मज्ञानी ) होणें हाच त्याला उपाय आहे. थोर कुलांत जन्म होऊन शिकविणें, यज्ञ करविणें व दान घेणें या तीन गोष्टी सोडून, शिकणें, यज्ञ करणें व दान देणें यांच्या योगानें यांतून तरून जाण्याचा प्रयत्न करावा. असा मनुष्य ज्ञानरूपी तरीनें यांतून तरून जाऊं शकतो. ज्याच्या मनावर संस्कार घडला आहे अशा नियमशील आत्मनिग्रही मनुष्याला इहपरसिद्धि फार दूर नाहीं. ब्राह्मणानें गृहस्थाश्रमामध्यें राहून राग व अ-

सूया सोडून द्यावी, वर सांगितल्याप्रमाणें वागावें, व पंचमहायज्ञांनीं देवतांना संतुष्ट करून देव, पितर व अतिथी यांना अन्न देऊन नंतर आपण खावें. भल्यांच्या धर्मानें वागावें व शिष्टाप्रमाणें क्रिया कराव्या. कोणालाही पीडा न देतां अनिंद्य अशा रीतीनें पोटाला मिळविण्याचा प्रयत्न करावा. ज्याला वेदतत्त्व कळलें आहे, जो शिष्टाचाराप्रमाणें वागतो, स्वधर्माप्रमाणें क्रिया करीत रहातो, आपल्या कर्मानें संकर उत्पन्न करीत नाहीं, कोणाचा हेवा न करतां श्रद्धापूर्वक आत्मनिग्रहानें कर्म करीत रहातो व ज्याला धर्म व अधर्म यांमधला फरक कळतो तो सर्व संकटांतून पार पडतो. ही ब्राह्मणाची पूर्वापार वृत्ति असून ज्ञानी होऊन कर्म करीत रहाणारा सिद्धि पावतो. नाहींतर मूर्खाच्या हातून धर्म करण्याच्या हेतूनें अधर्म होत असतो. अशा मनुष्याच्या हातून विचारांतीं सुद्धां धर्म म्हणून अधर्म व अधर्म म्हणून धर्म होत असतो. याप्रमाणें धर्माधर्म न जाणणारा तो जन्ममृत्यूच्या फेऱ्यांत सांपडतो.

---

## १८० योग व सांख्यसिद्धि. (१२. २३६)

जर मोक्ष पाहिजे असेल तर मनुष्यानें ज्ञान मिळवावें. या संसारप्रवाहामध्यें वर खालीं जात असणाऱ्या मनुष्याला ज्ञान हीच नाव आहे. ज्ञानाच्या योगानें ज्यांचे विचार ठाम ठरले आहेत असे शहाणे लोक मूर्खांना ज्ञानरूप नावेच्या योगानें तारतात. जे मूर्ख आहेत त्यांना स्वतःला किंवा दुसऱ्याला तारतां येत नाहीं. ज्यानें आपल्यामधील सर्व दोष दूर करून मौन धरलें आहे अशा योग्यानें द्वेष, कर्म, प्रीति, अर्थ, उपाय, अपाय, निश्चय, दृष्टि, आहार, विषयप्रवृत्तीपासून संकोच, मन, व जन्ममृत्यु व जराव्याधि इत्यादिक पहाणें या बारा गोष्टींकडे लक्ष द्यावें. ज्याला उत्तम ज्ञानाची इच्छा असेल त्यानें तोंड आणि मन आवरून धरावें व ज्याला मनाच्या शांतीची इच्छा असेल त्यानें ज्ञानाच्या योगानें आपल्यावर दाब ठेवावा. या गोष्टींकडे लक्ष दिल्यानें मनुष्य मोठा दयाळू असो किंवा क्रूर असो, सर्व वेद त्याला येत असो किंवा एक ऋचाही येत नसो, धार्मिक असा यजन करणारा असो किंवा पापी असो, मोठा शूर असो किंवा नाजूक व भित्रा असो, तो तरण्याला कठीण असा जरामरणरूपी महासागर तरून जातो. याप्रमाणें अखेरपर्यंत योगाकडे लागून नुसतें ब्रह्मज्ञान करून घेऊं इच्छिणारा देखील कर्मकांडांतून सुटून त्याच्या पलीकडे जातो. धर्म हाच ज्यामध्यें सारथ्याला बसण्याची जागा आहे, उपाय व अपाय हे धुरीचे दांडे, अपानवायु आंस, प्राणवायु जूं, ज्ञान व आयुर्मर्यादा हींच धुराडीं हुशारीनें उत्तम आचारानें वागणें हीच धांव, **दर्शन, स्पर्शन, घ्राण व श्रवण हीं चार त्या रथाला जुंपण्याचे घोडे**, व ज्याचा ज्ञानरूपी सारथी सर्व शास्त्ररूपी चाबूक घेऊन तयार असून परमात्मा ज्यामध्यें बसला आहे, श्रद्धा व आत्मनिग्रह हे ज्याच्यापुढें धांवत आहेत व कल्याणप्रद दानशीलता ज्याच्या अगदीं मागोमाग आहे, असा जीवानें युक्त दिव्यरथ अंतःशुद्धिरूपी मार्गानें ज्ञानाच्या योगानें ब्रह्माशीं एक होऊन जाण्याच्या ठिकाणाला निघालेला ब्रह्मलोकामध्यें फार झळकत रहातो. याप्रमाणें अविनाशी ब्रह्माकडे जाण्याच्या इच्छेनें असा रथ जोडून तयार करूं इच्छिणाराला लौकर सिद्धि मिळवून देणारे उपाय सांगतों ऐक. योगी आत्मनिग्रह, नियम इत्यादि पाळून सात धारणांचा अभ्यास करतो. या धारणांचे चंद्रसूर्यध्रुवमंडलादिकांवर रहाणाऱ्या दूरच्या व नाकाच्या शेंड्यावर भुंवयावर वगैरे रहाणाऱ्या जवळच्या निरनिराळ्या प्रधारणांचे तितकेच प्रकार होतात. क्रमाक्रमानें याच्या अंगीं पृथ्वीचें, वायूचें, आकाशाचें, पाण्याचें, अग्नीचें अहंकाराचें, बुद्धीचें व अव्यक्त परमात्म्याचें ऐश्वर्य येतें. याप्रमाणें बाह्य विषयांपासून लक्ष काढून घेऊन योगामध्यें गढलेल्या मनुष्याला जे अनुभव क्रमानें येऊन सिद्धि मिळते त्यासंबंधानें सांगतों ऐक. गुरूनें सांगितलेल्या युक्तीप्रमाणें स्थूल देहावरील मिथ्या भाव टाकल्यावर सूक्ष्मत्वामुळें पुढील रूपें तो क्रमानें पहातो. ज्याप्रमाणें हिंवाळ्यामध्यें आकाशांत धुकें भरलें असतें त्याप्रमाणें देहापासून मुक्त झालेल्या योग्याचें पूर्वस्वरूप होत असतें. पुढें अधिक सिद्धीनें हें धुकें नाहींसें झाल्यावर जलानें भरलेल्या आकाशाप्रमाणें झाला आपल्या ठिकाणीं

आत्मस्वरूप जलमय दिसूं लागतें. पुढें हें जलस्वरूप नाहींसें होऊन अग्निस्वरूप प्रकाशमान होतें, पुढें पाणी दिलेल्या शस्त्राप्रमाणें लखलखीत वायुस्वरूप प्रकट होतें, व पिंजलेल्या लोंकरीसारखें तें झळकणारें पांढरें शुभ्र असें सूक्ष्म वायुस्वरूप नाहींसें झाल्यावर नीलवर्ण असें सूक्ष्म आकाशस्वरूप त्या ब्रह्मज्ञान्याच्या आत्म्याला प्राप्त होतें. आतां हीं निरनिराळीं स्थित्यंतरें होत असतां त्या त्या स्थित्यंतरामध्यें काय काय सामर्थ्य असतें तें सांगतों ऐक. ज्यानें भूततत्वावर जय मिळविला आहे त्याला या त्याच्या सामर्थ्याच्या योगानें सृष्टि उत्पन्न करतां येते. कधीं न गडबडणारा प्रति प्रजापतीप्रमाणें तो आपल्या शरीरापासून प्रजा उत्पन्न करतो. वायुगुण याच्या अंगीं आला असतां हातानें, पायानें किंवा फक्त एका अंगठ्यानें त्याला सर्व पृथ्वी हालवून सोडतां येते. तो आकाशस्वरूप झाला असतां आकाशाशीं सवर्ण झाल्यामुळें तो आकाशामध्यें झळकत रहातो. आणि त्याला वाटेल तेव्हां गुप्त होतां येतें. जलाचें स्वरूप याला आलें असतां मोठमोठे समुद्र व जलाशय याला गट्ट करून टाकतां येतात. हा अग्निस्वरूप झाला असतां त्याकडे कोणाचे डोळे ठरत नाहींत. अहंकार यानें जिंकला असतां हीं पंचमहाभूतें याच्या मुठींत असतात. आणि पंचमहाभूतें व अहंकार यांना मूल अशा बुद्धीला जिंकलें असतां योग्याला प्रभुत्व येतें व सर्व वस्तूसंबंधानें निर्दोष अशी दृष्टि प्राप्त होते. यामुळें बुद्ध्यादिरूपानें व्यक्ततेस पावलेल्या जीवास ज्यापासून हें सर्व जग बाहेर पडून व्यक्तात्मक होतें व त्यामध्येंच फिरून लीन होतें, अशा ब्रह्मरूपानेंच तो पाहतो.

आतां सांख्य तत्त्वाप्रमाणें या व्यक्तासंबंधानें व अव्यक्तासंबंधानें जें कांहीं महत् आहे तें विस्तारानें सांगतों ऐक. योग व सांख्य या दोन्ही शास्त्रांमध्यें पंचवीस तत्त्वांसंबंधानें एकच सांगितलें आहे. त्यांचें विशेष स्वरूप काय आहे तें ऐक. जन्म, वाढ, जरा व मृत्यु या चार लक्षणांनीं संपन्न असलेल्याला व्यक्त हें नांव असून हीं लक्षणें ज्यामध्यें नाहींत त्याला अव्यक्त ह्मणतात. वेदामध्यें व त्यांपासून निघालेल्या सिद्धांतामध्यें दोन प्रकारचे आत्मे सांगितले आहेत; पैकीं पहिला जीवात्मा. याला या वर सांगितलेल्या चार लक्षणांनीं युक्त अशा महदहंकार, पंचतन्मात्रें, एकादशेंद्रियें व पंचभूतें हीं उपाधिभूत असून धर्मार्थकाममोक्षांकडे दृष्टि लावून तो आहे. याला व्यक्त असें नांव आहे. दुसऱ्या आत्म्याला ह्मणजे ईश्वराला माया उपाधि आहे. हे अनुक्रमें अचिदात्मक व चिदात्मक आहेत. याप्रमाणें जीव व क्षेत्रज्ञ ईश यासंबंधानें व्यवस्था आहे. या दोन्ही प्रकारच्या आत्म्यांचा विषयांशीं संबंध आहे. जीवात्मा व परमात्मा यांचा भेद तात्त्विक आहे असें मूढांचें मत असून तो उपाधीमुळें आलेला व उपाधींचा आपापल्या कारणांत लय केल्यानें तो जाऊन त्या दोघांचें ऐक्य होतें असें सांख्यांचें मत आहे. याप्रमाणें तत्त्वज्ञान झालेल्याचीं लक्षणें पुढें दिलीं आहेत. ज्यानें विषयांवर आसक्ति न ठेवतां अहंकार सोडला आहे, सुखदुःखादि द्वंद्वांच्या बाहेर पडून संशयांतून जो दूर झाला आहे; राग, द्वेष, खोटें भाषण ज्याला ठाऊक नाहीं, लोकांनीं आपल्या नांवानें खडे फोडले असतां किंवा आपल्याला मारलें असतां सुद्धां जो त्यांच्याशीं मित्रत्वानें वागून त्यांचें अकल्याण चिंतीत नाहीं, ज्याचा आपल्या तोंडावर, कृत्यांवर व मनावर दाब आहे व जो सर्वांच्या ठिकाणीं सारखा वागतो, तो ब्रह्माकडे जाऊन पोहोंचतो. इच्छेनें ज्याला घेरलें नाहीं व जो अगदीं निरिच्छ झाला आहे असेंही नाहीं, जो केवळ पोटापुरतें मिळविण्यासाठीं व्यवसाय करीत रहातो, लोभ किंवा खेद ज्याला माहीत नाहींत, ज्यानें आत्मनिग्रह केला आहे, जो अवश्य तेवढीं कर्में करीत रहातो, नटण्याकडे ज्याचें विशेष लक्ष नसतें, ज्याचीं इंद्रियें व मन एकाग्र झालीं आहेत, ज्याचे उद्देश कधीं विफल होत नाहींत, जो सर्व भूतांशीं सारखा मित्रत्वानें असतो, ढेंकूळ व सोनें ज्याला सारखें वाटतें, प्रिय व अप्रिय ज्याला सारखेंच असून जो निंदा व स्तुति यांची सारखीच पर्वा ठेवतो, जो सर्व वासनांपासून अलिप्त आहे, ज्यानें ब्रह्मचर्यव्रत चांगलें पाळलें आहे व जो कोणाला पीडा देत नाहीं असा योगी सांख्याच्या मतानें मुक्त होतो. आतां कोणत्या साधनांनीं मनुष्य योगमार्गानें मुक्त होतो, तें सांगतों ऐक. जो योगैश्वर्याच्या पलीकडे पोहोंचून चाल-

ला जातो तो मुक्त होतो. याप्रमाणें सांख्य व योग या दोन्ही मार्गांनीं मुक्तीच्या संबंधानें विचार आहेत. हे जरी दिसण्यांत भिन्न भिन्न दिसतात तरी वास्तविक पाहिलें असतां सारखेच असून जो मनुष्य सुखदुःखादि द्वंद्वांच्या पलीकडे गेला आहे तो ब्रह्माला जाऊन मिळतो.'

## १८१ ज्ञान. ( १२. २३७–३८ )

'याप्रमाणें या संसारसागरांत वर खालीं चालला असतां धीराच्या मनुष्यानें मोक्षप्राप्तीसाठीं ज्ञानरूपी नावेला धरून तिला चिकटून रहावें.' शुक ह्मणाले, 'आपण सांगतां तें ज्ञान कशा प्रकारचें आहे? तें ज्ञान ह्मणजे अज्ञान दूर होऊन ज्यानें सत्य दिसूं लागतें तें किंवा ज्यांच्या योगानें सारूप्यतेला मिळतां येतें अशीं प्रवृत्तिमार्गांत सांगितलेलीं कर्मे किंवा आत्मोच्छेदरूपी निवृत्तिमार्ग?' व्यास ह्मणाले, 'जो आत्मा नाहीं ह्मणून प्रतिपादन करणारा नैरात्मवादी मूर्ख सर्व कांहीं आपल्या आपणच स्वभावानें अस्तित्वांत असून त्याला आधार कशाचा नाहीं अशा समजावर अशा प्रकारचें मत दुसऱ्याच्या मनांत भरवून देऊन वादविवाद करण्याची अक्कल नसलेल्यांना आपल्या वाक्पांडित्यानें गप्प करतो त्याला गवतांतल्या काडीप्रमाणें खरें ज्ञान न होतां कांहीं फायदा होत नाहीं. मनाला मोह पडल्यामुळेंच त्याचें असें मत होतें व त्या योगानें त्याचा नाश होतो. सृष्टी स्वभावतःच आहे किंवा तिच्या उत्पत्तीला स्वभाव हेंच कारण आहे, या दोन्ही मतांसंबंधानें सांगतों ऐक. शेतकीचीं वगैरे कामें, धान्य गोळा करून ठेवणें, वहानें, आसन, घरें, बागा, रोगावर औषध इत्यादि गोष्टी शहाणपणाच्या योगानें होत असतात. हेतु सफल करणारे उपाय योजणें हें ज्ञानाचें काम आहे. हितकारक फळें ज्ञानापासून मिळतात. राजे व प्रजा हे सारखे असतांही राजे लोक त्यांवर शहाणपणाच्या, योगानें राज्य करतात. लोकांमध्यें कमी अधिकपणा व लहान, थोर वगैरे भेद शहाणपणानेंच दिसून येतात. शहाणपणच श्रेष्ठगति आहे. नानाप्रकारच्या भूतमात्रांमध्यें गर्भापासून उत्पन्न होणारे, अंड्यापासून उत्पन्न होणारे, भूमींतून अंकुरादिरूपानें वर येणारे आणि घाणीच्या वगैरे उष्णतेपासून उत्पन्न होणारे (जरायुज, अंडज, उद्भिज व स्वेदज) असे चार प्रकारचे जन्म आहेत. स्थावरापेक्षां जंगम विशेष समजले गेले आहेत व हें ठीकच आहे; कारण चेष्टा हा गुण त्यांच्यामध्यें विशेष आहे. या जंगमामध्यें पुष्कळ पायाचे व दोन पायाचे असे दोन भेद असून या दोघांमध्यें दोन पायांचे श्रेष्ठ आहेत. द्विपादांमध्यें पृथ्वीवर रहाणारे व आकाशामध्यें रहाणारे असे दोन भेद आहेत. त्यांपैकीं पृथ्वीवरील प्राणी श्रेष्ठ समजले आहेत; कारण ते निरनिराळ्या प्रकारचें अन्न खातात. ह्या पृथ्वीवरील दोन पायांच्या प्राण्यांमध्यें मध्यम व उत्तम असे दोन भेद असून त्यांमध्यें **मध्यम श्रेष्ठ** होत; कारण हें जाति व धर्म पाळतात. मध्यमामध्यें सुद्धां धर्म जाणणारे व इतर असे दोन भेद असून कार्य, अकार्य समजत असल्यानें धर्मज्ञ त्यांमध्यें श्रेष्ठ आहेत. या धर्मज्ञांमध्यें वेदज्ञ व इतर असे दोन भेद असून वेदज्ञ त्यांमध्यें श्रेष्ठ आहेत; कारण त्यांच्यामध्यें वेदानें ठाणें घेतलें असतें. या वेदज्ञांमध्यें बोलके व दुसरे असे दोन भेद असून त्यांमध्यें बोलकेच श्रेष्ठ आहेत;कारण सर्व धर्म त्यांच्या डोळ्यापुढें असतो. सर्व वेद, त्यांतील धर्म, क्रिया व फळें हीं त्यांना माहीत असतात. धर्मानिशीं सर्व वेद यांच्यापासूनच निघालेले असतात. या उपदेशकांमध्यें सुद्धां आत्मज्ञान झालेले व दुसरे असे दोन भेद असून त्यामध्यें जन्ममरणाचें स्वरूप कळत असल्यानें आत्मज्ञानी श्रेष्ठ आहेत. प्रवृत्त्यात्मक व निवृत्त्यात्मक असे दोन प्रकारचे धर्म ज्याला कळले आहेत तोच सर्वज्ञ व सर्व धर्म जाणणारा समजला आहे. तोच त्यागी, सत्यसंकल्पवान, खरा, शुद्ध व ईश्वर होय. देव ज्याची ब्रह्मज्ञानापर्यंत मजल पोंचली आहे त्यालाच ब्राह्मण समजतात; केवळ वेदशास्त्रांकडे लक्ष देऊन प्रवृत्तिमार्गाकडे लागलेल्याला समजत नाहींत. अशा प्रकारचा मनुष्यही वेदामध्यें निष्णात असून आत्म्याकडे लक्ष लावून असतो. ज्यांना ज्ञान झालें आहे ते आंतबाहेर सर्वत्र आत्मस्वरूप पाहूं लागतात. हेच खरे ब्राह्मण असून देवही हेच आहेत. हें सर्व जग यांच्या ठिका-

र्णी आहे. यांच्या माहात्म्यासारखें माहात्म्य दुसरें कोठेंच सांपडावयाचें नाहीं. जन्म, मरण व कर्म या सर्वांच्या पलीकडे जाऊन चतुर्विध भूतमात्रांचे हे स्वामी झालेले असतात. हेच प्रत्यक्ष स्वयंभू असतात.

ही ब्राह्मणाची नित्यवृत्ति सांगितली असून ज्ञानवानाचीं कर्मेंही स्वाभाविक आहेत. किंवा ज्ञान हेंच कर्म आहे म्हटलें तरी चालेल. अशा प्रकारचा, कर्मसिद्धीसाठीं संशय न उरेल तर, कर्मे करून सुद्धां सिद्धि पावतो. यासंबंधांत ज्ञानासाठीं जर कर्मविधि सांगितला आहे तर तो नित्य समजला पाहिजे. कोणी कर्मासंबंधानें प्रयत्नाला कारण समजतात, कोणी दैवाला कारण समजतात व कोणी स्वभावाला कारण समजतात. कोणी कर्मे, पौरुष, दैव व स्वभाव या तिन्हींमुळें घडतात ह्मणतात. कोणी यांपैकीं एक व कोणी हीं तिन्हीही कारण आहेत ह्मणतात. कर्मवाद्यांपैकीं कोणी हें असें आहे ह्मणतात, कोणी असें नाहीं ह्मणतात, कोणी दोन्ही खरीं ह्मणतात, कोणी दोन्ही खोटीं ह्मणतात. ब्रह्मवेत्ते मात्र याला ब्रह्म हेंच कारण आहे हें ओळखतात. त्रेता, द्वापर व कली यांमध्यें लोकं संशययुक्त असतात. कृतयुगामध्यें मात्र ते तपामध्यें गढून संशयापासून मुक्त असे शांत व धार्मिक असतात. या युगामध्यें ऋक्, साम व यजु यांना लोक सारखे समजतात. लोभमोहाचें पृथक्करण करून ते फक्त तप आचरतात. तपामध्यें गढून त्यामध्यें दृढ राहून कडक नियमानें सर्व मनांतील कामना एकट्या तपानेंच मनुष्य मिळवितो. या तपाच्या योगानें तो ब्रह्मस्वरूपी होऊन सर्व भूतमात्र उत्पन्न करण्याला समर्थ होतो. वेदवादामध्यें त्याचें स्वरूप सांगितलें असूनही वेदवाद्यांना तें गूढ पडून वेदांतामध्यें फिरून तें व्यक्त केलें आहे. परंतु कर्मामध्येंच गढून राहिल्यानें त्याची प्राप्ति होणें शक्य नाहीं. हिंसात्मक यज्ञ क्षत्रियांना सांगितला असून वैश्यांना हविर्यज्ञ सांगितले आहेत. शूद्रासाठीं सेवायज्ञ असून ब्राह्मणांना जपयज्ञ सांगितला आहे. आपापलीं कर्मे निष्ठेनें करून वेदाध्ययन केल्यानें मनुष्य द्विज होतो. तो दुसरें एखादें कृत्य करो किंवा न करो. केवळ सर्वांशीं मित्रत्वानें वागल्यानें तो ब्राह्मण होतो. त्रेतायुगामध्यें वेद, यज्ञ व वर्णाश्रम जसे असावे तसे पूर्ण असून द्वापारामध्यें व कलियुगामध्यें आयुर्मर्यादा कमी कमी होत गेल्यानें हे कमी कमी होत जाऊन कलीच्या शेवटीं तर वेद दिसतात न दिसतात अशी स्थिति होऊन जाते. व अधर्माची बाधा होऊन स्वधर्म नाश पावतात. त्याचप्रमाणें गाई, पृथ्वी, पाणी, वनस्पती यांच्यामधला रस कमी होतो. सर्व अधर्ममय झाल्यानें त्यामध्यें वेद, वेदधर्म व आश्रम गडप होतात. सर्व प्रकारच्या आश्रमांमध्यें स्वधर्मनिष्ठ लोकांमध्यें व स्थावरजंगमामध्यें बदल पडतो. ज्याप्रमाणें पाऊस पृथ्वीवरील सर्वांना वाढीला लावतो, त्याचप्रमाणें प्रत्येक युगामध्यें वेदाचीं निरनिराळीं अंगें वाढीला लागतात. खरोखर काळच निरनिराळें स्वरूप धारण करतो. त्याला आदि किंवा अंत नाहीं. हाच सर्वांना उत्पन्न करून सर्वांना फिरून जाळून टाकतो. सर्वांचा नियामक हा काळच आहे. नानाप्रकारचे भूतमात्र आपापल्या स्वभावाप्रमाणें यावर अवलंबून आहेत.' यानंतर शुकांनीं फिरून विचारलें, 'शहाणा, श्रोत्रिय, यज्ञ करणारा अशा मनुष्यालाही प्रत्यक्ष प्रमाणानें किंवा अनुमानानें ज्याची ओळख पटत नाहीं व वेदालासुद्धां हें अमुक असें सांगतां येत नाहीं अशा ब्रह्माची प्राप्ति कशानें होते! तपानें, ब्रह्मचर्यानें, सर्वत्यागानें, बुद्धीनें, सांख्य किंवा योगमार्गानें, कशानें होतें? मनाचें किंवा इंद्रियांचें अशा प्रकारचें एकाग्रत्व कोणत्या उपायानें होतें?' व्यास ह्मणाले, 'विद्या, तप, इंद्रियनिग्रह, सर्वत्याग यांवाचून कोणाला कधीं सिद्धि मिळत नाहीं. ब्रह्मदेवांनीं पंचमहाभूतें प्रथम निर्माण केलीं आहेत. तीं पुष्कळ अंशानें प्राणीमात्रांच्या शरीरामध्यें शिरलीं आहेत. भूमीच्या अंशापासून हा देह उत्पन्न झाला असून यांतील स्निग्ध पदार्थ पाण्याच्या अंशापासून उत्पन्न झाले आहेत. तेजापासून डोळ्यांची उत्पत्ति झाली असून वायु हा प्राणापानादिकांना आश्रय देऊन आहे. शरीरांतील रंध्रांमध्यें आकाशाचा भाग आहे. सर्व प्राणिमात्रांच्या पायामध्यें विष्णु असून बाहूंमध्यें इंद्र आहे. अग्नी पोटामध्यें राहून अन्न भक्षण करीत असतो. कानांच्या ठिकाणीं दिशा अ-

सून जिव्हेच्या ठिकाणीं सरस्वती आहे. श्रोत्र, त्वक, चक्षु, जिव्हा, घ्राण, हीं पांच इंद्रियें निरनिराळे विषय ग्रहण करण्याकरितां द्वारें आहेत. शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध हे पांच इंद्रियविषय असून ते इंद्रियांपासून निराळे आहेत. ज्याप्रमाणें यंता घोड्यांना आपल्या ताब्यांत ठेवतो त्याप्रमाणें मन इंद्रियांना आपल्या ताब्यांत ठेवतें व हृदयामध्यें असणारा भूतमात्रांचा जीवात्मा मनाला ताब्यांत ठेवतो. मन हें सर्व इंद्रियांना आपापल्या कामाकडे प्रवृत्त करण्यासंबंधानें व त्यांना आवरण्यासंबंधानें जसें स्वामी आहे तसा जीवात्मा मनावर स्वामी आहे. इंद्रियें, इंद्रियविषय, स्वभाव, चेतना, मन, प्राणापान वायु व जीव हे मनुष्याच्या देहामध्यें रहात असतात. जीवात्म्याच्या आधारभूत शरीराचें वास्तविक अस्तित्व नाहीं तेव्हां शरीर हा कांहीं जीवात्म्याचा आधार नाहीं. सत्वरजतमात्मक प्रकृति हीच जीवात्म्याचा आधार असून ही केवळ शब्दस्वरूपाची आहे. आत्मा हाही जीवात्म्याचा आधार नाहीं. जीवात्म्याला उत्पन्न करणारी वासना आहे. तरी ती वासना गुणांना उत्पन्न करीत नाहीं. याप्रमाणें ज्यानें आत्मनिग्रह केला आहे अशा विद्वानाला मनाच्या साधनानें आपल्या ठिकाणीं सोळा गुणांनीं युक्त असा सतरावा जीवात्मा गुरफटलेला दिसतो. हा डोळ्यांना किंवा इतर इंद्रियांना दिसत नाहीं. मनरूपी दिव्याच्या उजेडानेंच हा महात्मा प्रकाशमान दिसतो. शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध, शरीर व इंद्रियें कांहींच ज्याला नाहीं असें याचें स्वरूप आहे. जो अशा या अव्यक्ताला सर्व प्राणिमात्रांच्या देहामध्यें आश्रय करून राहिलेला पहातो तो देह ठेवल्यावर ब्रह्मस्वरूप होण्याला पात्र होतो. विद्या व कुल यांनीं संपन्न असा ब्राह्मण, गाय, हत्ती, कुत्रा किंवा चांडाळ ह्या सर्वांच्या ठिकाणीं विद्वानांची समदृष्टि असते. जो हें सर्व व्यापून राहिला आहे तो एकटा महात्मा सर्व स्थावरजंगमामध्यें रहात असतो. मनुष्य ज्या वेळीं सर्वांच्या ठिकाणीं आपल्याला व आपल्या ठिकाणीं सर्वांना पाहूं लागतो तेव्हां त्याला ब्रह्मप्राप्ति होते. जितक्या अंशानें मनुष्य हें आत्मसर्वत्व पाहूं लागतो त्या त्या मानानें तो ब्रह्मस्वरूपी होण्याला पात्र होतो. प्रत्यक्ष देवांना सुद्धां याच्या मागून निघाले असतां याचा माग उमगत नाहीं; व जो हा सर्व भूतांचा आत्मस्वरूपी सर्व भूतमात्रांच्या हितामध्यें गढून ब्रह्माच्या मागें लागलेला असतो ह्याच्या वाटेची त्यांना भूल पडते. ज्याप्रमाणें आकाशामध्यें पक्ष्यांची व पाण्यामध्यें माशांची वाट उमगत नाहीं त्याचप्रमाणें ज्ञान्यांची वाट कोणाला दिसत नाहीं. काल सर्वांना आपल्या ठिकाणीं **शिजवितो**; परंतु काल ज्यामध्यें **शिजला** जातो ती वस्तु कोणाला उमगत नाहीं. ती ही वस्तु वर, मध्यें, खालीं आजूबाजूला कोठेंही नाहीं. ती अमुकच ठिकाणीं सांपडावयाची असें नाहीं. हे सर्व लोक त्यामध्यें असून त्याबाहेर कांहीं एक नाहीं. मनुष्य एकसारखा मनोवेगानें धांवत राहिला तरी त्याला सर्वांचें आदिकारण अशा ब्रह्माचा अंत लागणार नाहीं. ह्मणून हें सर्वसूक्ष्म असून याच्याहून स्थूल असेंही कांहींच नाहीं. याचे हात, पाय, डोळे, कान, मस्तक व तोंड हीं सर्वत्र पसरलीं असून हा परमात्मा सर्व व्यापून आहे. अणूहून हें ब्रह्म लहान असून सर्वांत मोठ्या वस्तूहून मोठें आहे. सर्व भूतमात्रांचा हा परमात्मा शेवट असून हा कायम आहे तरी कोणाला दिसत नाहीं. अक्षर व क्षर अशीं याचीं दोन स्वरूपें आहेत. सर्व भूतमात्रांच्या ठिकाणीं याचें अस्तित्व क्षर असून चैतन्यस्वरूपी याचें दिव्य अस्तित्व अक्षर आहे. जरी हें ब्रह्म सर्व चराचरांचा स्वामी असून अचंचल व निर्गुण आहे तरी नऊ द्वारांनीं युक्त अशा देहरूपी नगरीमध्यें शिरल्यावर गतिमान होतें. जे विद्वान असून ज्यांना पैलपार दिसतो ते ह्मणतात कीं, महदादि नवांसंबंधीं गति, सुखदुःख, रूप इत्यादिकांच्या योगानें परमात्म्याला गतिमत्व येतें. हें गतियुक्त अविनाशी ब्रह्म दुसरें कोणतेंही नसून अचंचल असें अविनाशी ब्रह्मच होय. याला मिळाल्यानें मनुष्य जन्ममरणाच्या फेऱ्यांतून सुटतो.'

---

## १८२ योगमार्ग. (१२. २४०)

'सांख्य ज्ञानानें हा ब्रह्मप्राप्तीचा मार्ग मीं तुला सांगितला. आतां योगमार्गानें ब्रह्मप्राप्ति कशी होते तें सांगतों ऐक. बुद्धि, मन, इंद्रियें यांना सर्व-

व्यापी आत्म्याशीं एकत्वाला नेणें हें उत्तम ज्ञान, शांति, आत्मनिग्रह, अध्यात्म ज्ञानाकडे लक्ष, आत्मसुख, बुद्धि व शुद्ध कर्म यांनीं तसेंच गुरूपदेशानें योगासंबंधी काम, क्रोध, लोभ, भय व स्वप्न हे पांच दोष दूर करून, करून घ्यावें. शांतीच्या योगानें राग जिंकावा. संकल्प सोडून देऊन वासना जिंकावी. बुद्धीच्या योगानें विचार करण्यासारख्या विषयांवर विचार करीत रहावें. निद्रा नाहींशी करावी. धृतीच्या योगानें शिश्न व उदर यांचें रक्षण करून चक्षुरिंद्रियाच्या योगानें हातापायांचें रक्षण करावें. चक्षुरिंद्रिय व श्रोत्रेंद्रिय यांचें मनाच्या योगानें व मन व वाणी यांचें कर्मानें रक्षण करावें. सावधगिरीच्या योगानें भीति व शहाणे लोकांच्या संगतीनें दांभिकपणा जिंकावा. याप्रमाणें नेहमीं सावध राहून योगांतील दोष जिंकावे. अग्नि व ब्राह्मण यांची पूजा करून देवतांना नमस्कार करावा. फाजील, त्रासदायक व मनाला घरें पाडणारें असें भाषण सोडून द्यावें. ब्रह्म हें तेजोमय बीज असून त्या तेजाच्या अर्कापासून हें सर्व जग उत्पन्न झालें आहे. सर्व उत्पन्न झालेल्या स्थावरजंगमात्मक विश्वाची तो दृष्टि आहे. ध्यान, अध्ययन, दान, सत्य, भीड, सरळपणा, क्षमा, शुचिर्भूतता, शुद्ध आचार, इंद्रियनिग्रह यांच्या योगानें तेज वाढून पाप नाहींसें होतें. यामुळें सर्व अर्थ साधून अनुभवज्ञान होऊं लागतें. सर्वांच्या ठिकाणीं समदृष्टि होऊन जें कांहीं मिळेल न मिळेल त्यावर राहून पाप नाहींसें करून तेजस्वीपणानें थोडा आहार व आत्मनिग्रह ठेवून तसेंच कामक्रोध जिंकून ब्रह्मपद मिळविण्याच्या नादाला लागावें. शांतपणें सर्व इंद्रियें व मन यांची एकाग्रता करून रात्रीच्या पहिल्या व शेवटच्या वेळीं मन आत्म्याकडे लावावें. मनुष्याच्या पांच इंद्रियांपैकीं एका इंद्रियाला जरी छिद्र असलें तरी भोंक पडलेल्या पखालींतून ज्याप्रमाणें सर्व पाणी गळून जातें त्याप्रमाणें त्या छिद्रांतून सर्व शहाणपण गळून जातें. धीवर ज्याप्रमाणें नाठाळ माशाला प्रथम पकडूं पहातो त्याप्रमाणें प्रथम योग्यानें मनाला आपल्या ताब्यांत आणावें आणि नंतर श्रोत्र, चक्षुरिंद्रिय, जिव्हा, घ्राण यांना जिंकून मनामध्यें कोंडून ठेवावें. पुढें मनाला संकल्पापासून ओढून घेऊन त्याला बुद्धीच्या ठिकाणीं ठेवावें. याप्रमाणें पंचेंद्रियें व बुद्धि हीं बुद्धीमध्यें एकाग्र होऊन प्रसन्न राहिलीं म्हणजे स्वच्छ अशा अग्नीच्या ज्वालेप्रमाणें किंवा तेजःपुंज अशा सूर्याप्रमाणें ब्रह्म प्रकाशूं लागतें. आकाशांतील विजेप्रमाणें मनुष्य आत्म्याला त्याच्या व्यापकत्वामुळें सर्वांच्या ठिकाणीं व सर्वांला आत्म्याच्या ठिकाणीं पाहूं लागतो. विद्वान धैर्यवान, बुद्धिमान व सर्व प्राणिमात्रांच्या हितामध्यें गढलेलेच महात्मे त्याला पाहूं शकतात. याप्रमाणें कांहीं नियमित कालपर्यंत (सहा महिनेपर्यंत) कडक नियम पाळून एकांतामध्यें एकटें राहिल्यानें ब्रह्माशीं साम्यतेला जातां येतें. लय, विक्षेप, निरनिराळीं रूपें प्रगट करण्याची शक्ति, अद्भुत वास, शब्द व देखावे, त्याचप्रमाणें गोडी व स्पर्श, शीतोष्णाचे सुखकारक विकार, वायुस्वरूप होणें, सकल शास्त्र एकदम डोळ्यांपुढें येणें व अप्सरेशी संबंध इत्यादि गोष्टी योगानें साध्य झाल्या तरी त्यांकडे दुर्लक्ष करून त्या बुद्धीमध्यें गडप करून टाकाव्या. रात्र पडल्यावर, पहाट व सकाळ या शांत वेळीं आत्मनिग्रहानें डोंगरावर, पाराखालीं किंवा झाड डोळ्यांपुढें ठेवून योगाभ्यास करावा. सर्व इंद्रियांना हृत्कमलाच्या ठिकाणीं एकाग्र करून द्रव्यादिकांकडे लक्ष लागलेल्या मनुष्याप्रमाणें एकाग्रतेनें नित्य योगाकडे लक्ष लावून त्यापासून मन ढळूं देऊं नये. सर्वसंगापासून मुक्त राहून ज्या उपायानें या चंचल मनाला आवरतां येईल तो उपाय करून त्यापासून ढळूं नये. चिटपांखरूं नसलेल्या निर्जन पर्वतामधील गुहा, देवळें किंवा मोकळीं घरें ह्या ठिकाणीं रहाण्याला जावें. कायावाचामनानें कशावर आसक्ति न ठेवतां सर्वांकडे दुर्लक्ष करून मिताहार ठेवून मिळाल्याबद्दल किंवा न मिळाल्याबद्दल सारखीच प्रवा ठेवावी. जो कोणी आपली प्रशंसा करील किंवा जो कोणी निंदा करील त्या दोघांकडे सारखी नजर ठेवून बऱ्या वाइटाचा विचार करूं नये. लाभ झाला असतां आनंदभरित होऊं नये व तो झाला नसतां त्याबद्दल काळजी करूं नये. वाऱ्याप्रमाणें सर्व भूतमात्रांच्या ठिकाणीं सारखें राहून त्यांपासून अलग असावें. याप्रमाणें स्वस्थचित्त ठेवून व सर्वांच्या ठिकाणीं समदृष्टि ठेवून नेहमीं योगांत गढून राहि-

लेल्या साधूला सहा महिन्यांमध्यें शब्दब्रह्माचा स्पष्ट साक्षात्कार होऊं लागतो. असा साधु कर्ममार्गाच्या पलीकडे जातो. सर्व प्रजा चिंतेमध्यें बुडालेल्या पाहून योग्यानें ढेंकूळ व सोनें सारखें लेखावें व ह्या पैसा मिळविण्याच्या मार्गांतून आपल्याला काढून घेऊन त्यासंबंधानें मोहित न होतां त्याचा वीट येऊं द्यावा. याप्रमाणें धर्म संपादूं इच्छिणारा मनुष्य हीन जाति किंवा स्त्री असली तरी या मार्गानें गेल्यानें त्यांना श्रेष्ठ गति मिळते. ज्यानें इंद्रियांना ढळूं न देतां मनाला जिंकलें आहे त्याला आपल्या बुद्धीच्या योगानें अज, पुराण, अजर, सनातन, अणूपेक्षां सूक्ष्म व स्थूलांपेक्षां स्थूल अशा ब्रह्माची प्राप्ति होते. शहाणे लोक वर सांगितल्याप्रमाणें वागून ब्रह्मदेवांच्या समतेला पोंचून ब्रह्मलोकीं त्यांच्याबरोबर सुखोपभोग घेऊन त्या बरोबरच मुक्त होतात.

---

## १८३ कर्माकर्मविचार.

### ( १२. २४१–४६ )

शुक म्हणाले, ‘ कर्म कर आणि कर्म सोड, अशा दोन्ही प्रकारचीं वेदवचनें आहेत. तेव्हां ज्ञानानें मनुष्य कोणत्या गतीला जातो व कर्म केल्यानें कोणत्या गतीला जातो ? हे दोन्ही एकमेकांपासून निराळे असून एकमेकांच्या अगदीं उलट आहेत. ’ व्यास म्हणाले, ‘ कर्म विनाशी असून ज्ञान अविनाशी आहे. ज्ञानानें मनुष्य कोणत्या गतीला जातो व कर्मानें कोणत्या गतीला जातो हें नीट ऐक. आकाशाप्रमाणें या दोघांमधलें अंतर अनंत आहे. प्रवृत्ति व निवृत्ति असे दोन प्रकारचे मार्ग असून यावरच वेद उभे आहेत; व या दोन्हीं संबंधानें वेदामध्यें उत्तम विवेचन आहे. प्राणिमात्र कर्मानें बांधला जाऊन ज्ञानानें मुक्त होतो. म्हणून ज्यांना पैलपार दिसत आहे असे यति कर्म करीत नाहींत. कर्मापासून मेल्यावर फिरून सोळा मूलतत्त्वात्मक शरीरानें मनुष्य जन्माला येतो. व ज्ञानानें नित्य, अव्यक्त व अव्यय अशा ब्रह्मस्वरूपी होऊन जातो. जे कोत्या बुद्धीचे आहेत ते कर्माची प्रशंसा करतात व त्यामुळें ते निरनिराळे देह घेत रहातात; परंतु धर्माकडे ज्यांची बारीक नजर पोंचली आहे, अशा श्रेष्ठ बुद्धीचे लोक नदीचें पाणी पिणारे ज्याप्रमाणें कुव्याच्या पाण्याची वहावा करीत नाहींत, त्याप्रमाणें कर्माची प्रशंसा करीत नाहींत. सुखदुःख, जन्ममृत्यु हीं कर्माचीं फळें होत. जेथें गेल्यानें शोक करण्याचा प्रसंग येत नाहीं, जन्ममृत्यु टळतो व अस्तित्वभाव दूर होतो, तें ब्रह्म ज्ञानानें मिळतें. हें ब्रह्म अव्यय, अचल, ध्रुव, अस्पष्ट, आयासरहित व ज्या ठिकाणीं वियोग म्हणून माहीत नाहीं अशा प्रकारचें असून, सुखदुःखादि द्वंद्वें किंवा संकल्प यांची बाधा याठिकाणीं मुळीं नसते. अशा प्रकारचे ब्रह्म जाणणारे लोक सर्व भूतमात्रांच्या ठिकाणीं सारखे असून सर्वांचे मित्र असतात. व सर्व भूतमात्रांच्या हितामध्यें रत असतात. ज्ञानवान पुरुष एका प्रकारचा असतो व कर्म करणारा एका प्रकारचा असतो. अमावास्येला सूक्ष्म कलेनें असणाऱ्या चंद्राप्रमाणें ज्ञानवान कायम रहातो, असें याज्ञवल्क्यांनीं बृहदारण्यामध्यें स्पष्ट सांगितलें आहे. आतां कर्म करणाऱ्या मनुष्याची स्थिति आकाशांतील वांकड्या तंतूप्रमाणें दिसणाऱ्या नव्या चंद्रासारखी आहे. कारण अकरा इंद्रियात्मक विकारांनीं युक्त व अहंकारादिकांनीं मूर्तिमान व त्रिगुणात्मक कर्मफलरूपी तो चंद्राप्रमाणें वाढत व कमी होत रहातो. कमलपत्रावरील जलबिंदूप्रमाणें या शरीराच्या आश्रयानें असणारा जो आत्मा तोच योगानें नित्य व मन व जीव यांच्या पलीकडचा क्षेत्रज्ञ होय. सत्व, रज आणि तम हे जीवाचे गुण असून जीव आत्म्यापासून व आत्मा परमात्म्यापासून आहेत. चैतन्ययुक्त देह हा जीवापासून आहे. जीवच सर्व देहांना चेष्टा करावयास लावून जिवंत ठेवतो. ज्यांना क्षेत्र म्हणजे काय हें माहीत आहे तें ज्यानें सात लोक निर्माण केलें आहेत त्या परमात्म्याला या जीवाच्या पलीकडचा समजतात. ’

शुक म्हणाले, ‘ क्षरापासून चोवीस तत्त्वांनीं युक्त अशी ईश्वरी सृष्टि व इंद्रियें व त्यांचे विषय तद्विषयक जी बुद्ध्यैश्वर्यापासून झाली आहे ती जीवसृष्टि, अशा दोन प्रकारच्या सृष्टी मीं आपल्यापासून ऐकल्या. दुसरी पहिलीच्या वर असून ती त्याहून श्रेष्ठ

आहे. आतां निरनिराळ्या युगाप्रमाणें अस्तित्वांत असणाऱ्या, जे भले लोक पाळतात, अशा सद्वर्तना-संबंधानें मला कांहीं सांगा. वेदामध्यें कर्म करण्याला व सोडण्याला सांगितलें आहे. यांपैकीं खरें कोणतें व खोटें कोणतें हें मला कसें कळावें? तेव्हां हें मला स्पष्ट करून सांगा. आपल्यापासून लोक वृत्तांताचें इंगित कळवून घेऊन बुद्धीला संस्कार मिळाल्यानें शुद्ध होऊन देह ठेवल्यावर अविनाशी असें ब्रह्म मी पहाण्याला समर्थ होईन.' व्यास ह्मणाले, 'हा वर्तनक्रम पूर्वीं प्रत्यक्ष ब्रह्मदेवांनीं ठरविला असून पूर्वींच्या ऋषींनीं ब्रह्मचर्यानें वागून श्रेष्ठ लोक मिळविले आहेत. मन बुद्धीकडे लावून कल्याणकारक गोष्टींकडे लक्ष देऊन व वनामध्यें फलमूलांवर कडक तप करीत त्याचप्रमाणें कोणालाही पीडा न करतां पवित्र ठिकाणाला जात राहून, जेथे मुसळ व धूर यांचा संबंध नाहीं अशा वानप्रस्थांच्या रहाण्याच्या ठिकाणांतून वेळच्या वेळेला भिक्षा मागत राहिल्यानें ब्रह्मस्वरूप होण्याला मनुष्य पात्र होतो. ह्मणून कोणाची स्तुति न करतां किंवा कोणाला नमस्कार न करतां बरें वाईट दोन्ही सोडून देऊन अरण्यामध्यें एकटा फिरत रहा.' शुक ह्मणाले, 'जीं वेदवचनें सामान्य दृष्टीच्या विरुद्ध दिसतात त्यासंबंधी हें खरें किंवा तें खरें असा संशय उत्पन्न झाला असतां दोन्हीला शास्त्राधार कोठून मिळणार? व दोन्ही खरीं कशीं ठरणार? कर्माला बाधा न येतां मोक्ष कसा मिळावा?' व्यास त्याच्या त्या प्रश्नाची वहावा करून ह्मणाले, 'ब्रह्मचारी, गृहस्थ, वानप्रस्थ व भिक्षु ह्या चारी आश्रमांतील लोक त्या त्या आश्रमांत सांगितल्याप्रमाणें वागून श्रेष्ठ गतीला जाऊन मिळतात. रागद्वेष सोडून जो कोणी हे सर्व आश्रम क्रमाक्रमानें यथाविधि पाळील तो ब्रह्मज्ञानाला पात्र होतो. कारण, ही चार आश्रमरूपी शिडी ब्रह्माला जाऊन लागली आहे. ही शिडी चढून जाऊन मनुष्य ब्रह्मलोकाला जाऊन पोंचतो. आयुष्याचा चतुर्थांश कोणाचा हेवा न करतां गुरू अथवा गुरुपुत्र यांच्याजवळ राहून ब्रह्मचर्यामध्यें घालवावा. गुरूंच्या घरीं गुरूंच्या मागून निजून त्यांच्या आधीं उठावें. शिष्य अथवा नोकर यांनीं करावयाचें सर्व आपण करून तें सर्व झाल्यावर गुरूंजवळ येऊन उभें रहावें. सर्व कामांत निष्णात होऊन नोकराप्रमाणें वाटेल तें काम करण्याला त्यानें तयार असावें. सर्व कामें बाकी न ठेवतां केल्यावर कल्याणेच्छूनें गुरूंच्या जवळ बसून अध्ययन करावें. नम्रता ठेवून तोंडांतून भलता शब्द काढूं नये. बोलाविलें असतांच गुरूंच्याजवळ जावें. शुचि, दक्ष व सर्वगुणसंपन्न असून मधून मधून अनुकूल असें बोलत जावें. आत्मनिग्रह ठेवून अव्ययतेनें गुरूंकडे पहावें. गुरूंनीं खाल्यावांचून आपण खाऊं नये, ते प्याल्यावांचून आपण पिऊं नये, ते बसल्यावांचून आपण बसूं नये व ते निजल्यावांचून आपण निजूं नये. उताण्या हातांनीं गुरूंच्या पायास स्पर्श करावा व उजव्यानें उजवा व डाव्यानें डावा गुरूंचा पाय घट्ट धरून अभिवादन करून, 'भगवान मला शिकवा,' असें ह्मणावें. 'हें मी करीन, हें केलें, आपण जें सांगाल तेंही करतों,' असें ह्मणून स्वतःला गुरूंना वाहून घेऊन त्यांनीं सांगितलेलें सर्व करून केल्याबद्दलची त्यांना वर्दी द्यावी. ब्रह्मचारी असतांना जे सुवास किंवा जी गोडी घेतां येत नाहीं तें सर्व गुरूंच्यापासून घरीं गेल्यावर घ्यावें. जे ब्रह्मचर्याचे नियम विस्तारानें सांगितले असतील ते पाळून गुरूंच्या जवळच असावें. याप्रमाणें यथाशक्ति गुरूला आनंदवून एक आश्रम सोडून दुसरा याप्रमाणें सर्व आश्रम घेऊन त्यांतील कर्में करावीं. याप्रमाणें आयुष्याचा चौथा भाग वेदाध्ययन, व्रतें व उपवास यांमध्यें घालवून गुरुदक्षिणा द्यावी. नंतर गुरूंच्या आज्ञेनें घरीं जाऊन गृहस्थाश्रम घ्यावा, व यथाशास्त्र बायको करून घेऊन गृहस्थाग्नि ठेवून व्रतें व उपवास करीत गृहस्थाश्रम पाळावा. याप्रमाणें आयुष्याचा दुसरा भाग गृहस्थाश्रमामध्यें व्रतशील राहून काढावा. तीन वर्षांला पुरेल इतकें धान्य सांठवून रहाणें, वर्षाच्या बेगमीचें धान्य वाळगून रहाणें, उद्यांची पर्वा न करतां आजच्या पुरतें बघून रहाणें व धाऱ्याचे कण वेंचून त्यावर रहाणें या गृहस्थाश्रमाच्या चार वृत्ति सांगितल्या आहेत. त्यांपैकीं पुढचे पुढचे मागच्याहून श्रेष्ठ समजले आहेत. यजन याजन, अध्ययन, अध्यापन, दान व प्रतिग्रह हीं षट्कर्में पहिल्या प्रकारच्या गृहस्थाला सांगितलीं अ-

सून दुसऱ्याला यजन, अध्ययन व दान हीं तीनच सांगितलीं आहेत. तिसऱ्याला दान व अध्ययन हीं दोनच सांगितलीं असून चौथ्याला वेदाध्ययन एवढेंच सांगितलें आहे. गृहस्थाश्रमाचीं व्रतें हीं फार मोठीं समजलीं आहेत. केवळ स्वतःसाठीं अन्न शिजवूं नये किंवा पशू मारूं नये. प्राणी किंवा झाडझुडूप, यजुर्मंत्रानें तोडावे. दिवसां किंवा पूर्वरात्रीं किंवा रात्रीच्या शेवटीं निजूं नये. मध्यें कांहीं खाऊं नये. ऋतुकालावांचून बायकोला जवळ बोलावूं नये. घरामध्यें आलेल्या कोणाही ब्राह्मणाचा सत्कार केल्यावांचून किंवा त्याला अन्न दिल्यावांचून राहूं नये. वेदपारग व्रतशील व स्नानशील अशा हव्यकव्य पोंचविणाऱ्या अतिथींचा नेहमीं सत्कार करीत असावें. स्वधर्मानें रहाणारे, आत्मनिग्रही, क्रियावान व तपस्वी अशांचा त्यांच्या त्यांच्या योग्यतेप्रमाणें सत्कार करावा. देवांना व पितरांना द्यावयाचें हव्यकव्यही अशा सत्पुरुषांच्या सत्कारासाठींच आहे. जन्म किंवा कर्म यांकडे लक्ष न देतां ज्यानें नखें वाढविलीं आहेत, जो धर्मध्वज घेऊन असतो, ज्यानें अग्निहोत्राचा अग्नि ठेविला नाहीं किंवा जो गुरूचें वाईट करतो, अशा सर्वांना सुद्धां त्याचप्रमाणें जे अन्न शिजवीत नाहींत अशा ब्रह्मचाऱ्यांना व भिक्षूंना गृहस्थानें वांटा दिला पाहिजे. यानें **विघसान्न** भोजन व अमृतभोजन करीत असावें. हवीनें युक्त जो यज्ञ त्यांतील शेष तेंच याला अमृत समजलें असून नोकरचाकरांना देऊन खाणें हेंच विघसाशन समजलें आहे. आपल्याच बायकोच्या ठिकाणीं लक्ष ठेवून रहावें व यानें कोणाची असूया करूं नये. आत्मनिग्रह ठेवावा. ऋत्विज, पुरोहित, आचार्य, मामा, अतिथी, आश्रित, ज्ञातारे, लहान, रोगी, वैद्य, ज्ञाती, संबंधी, बांधव, आईबाप, आपल्या गोत्रांतील बायका, भाऊ, मुलगा, बायको, मुलगी नोकरलोक यांच्याशीं न भांडतां राहिल्यानें हा सर्व पापांपासून मुक्त होऊन उत्तम लोक मिळवितो. आचार्य ब्रह्मलोकाचे स्वामी असून बाप प्रजापति लोकांचा स्वामी आहे. अतिथी इंद्र लोकांचें, ऋत्विज देव लोकांचें, गोत्रांतील बायका अप्सरांच्या लोकांच्या, ज्ञाती विश्वेदेवांच्या लोकांचे, संबंधी आणि बांधव दिशांचे, आई व मामा पृथ्वीचे, व ज्ञातारे, बाळ, आजारी व कृश हे लोक आकाशाचे मालक असल्यानें यांना योग्य मान दिल्यानें ते ते लोक मिळतात. वडील भाऊ पित्यासारखा आणि बायको व मुलगा आपले प्रति शरीर असून नोकरलोक आपल्या सावलीप्रमाणें आहेत व मुलगी प्रीतीचें घर आहे. ह्मणून ह्यांचे उणे शब्द न संतापतां सहन करून घ्यावें. गृहस्थधर्म पाळणाऱ्या धर्मशील गृहस्थानें पैशासाठीं कर्में करीत राहूं नये. गृहस्थास सांगितलेल्या या चार वृत्तींपैकीं शेवटल्या तीन उपजीविकेला श्रेष्ठ असून त्यामध्यें पुढच्या पुढच्या श्रेष्ठ आहेत; त्याचप्रमाणें चार आश्रमांमध्येंही पुढचे पुढचे आश्रम उत्तम समजले आहेत व कल्याणेच्छूनें त्यांत सांगितलेले नियम जसेच्या तसे पाळावे. वर्षाच्या बेगमीचें धान्य ठेवून, उंछवृत्तीनें किंवा कपोतवृत्तीनें रहाणारे गृहस्थ ज्या देशामध्यें असतात तें राष्ट्र भरभराटीला चढतें. जो ही वर सांगितलेली गृहस्थवृत्ति न कंटाळतां पाळील तो पूर्वीच्या दहा व पुढच्या दहा पिढ्यांना उद्धरतो व मांधात्यासारख्या चक्रवर्ती राजांना मिळालेली गति त्याला मिळते. हीच गति आत्मनिग्रही लोकांना सांगितली आहे. उदार मनाच्या व नियमशील अशा गृहस्थांना वेदांत सांगितल्याप्रमाणें रमणीय व विमानांनीं युक्त असा हा स्वर्ग मिळतो. ज्या अर्थी हा गृहस्थाश्रम ब्रह्मदेवांनीं स्वर्गाला कारणभूत केला आहे त्या अर्थी गृहस्थ क्रमानें हा दुसरा आश्रम पाळून स्वर्गलोकामध्यें सुखांत रहातो. यापुढें क्रमानें तिसरा वानप्रस्थाश्रम आहे, तो हा गृहस्थाश्रम टाकल्यावर घ्यावयाचा असून बायकोसह वनामध्यें व्रतशीलपणानें राहून यामध्यें कष्ट काढावयाचे असतात. मुद्दाम विचार करून हा आश्रम घेऊन पुण्यदेशामध्यें रहाणाऱ्यांचे धर्म पुढें सांगितल्याप्रमाणें आहेत. सर्व लोकांच्या व सर्व आश्रमांच्या धर्मांचा यांत समावेश होतो. जेव्हां गृहस्थाला आपल्या अंगाला वळ्या पडून केंस पिकले आहेत असें दिसेल तेव्हां त्यानें नातवंडें पाहिल्यावर हा तिसरा वानप्रस्थाश्रम घ्यावा. पूर्वी ठेविलेल्या अग्नीचीच सेवा करून देवांची पूजा करावी. नियमशील व मिताहारी राहून दिवसाच्या शेवटच्या

सहाव्या भागी खावें. त्यानें नेहमीं दक्ष असावें, अग्निहोत्र ठेवावें, गाई पाळाव्या व त्यांची योग्य शुश्रूषा करावी. सर्व यज्ञविधि यथासांग पाळावे. आपोआप उगवणाऱ्या व्रीहि, जव, देवभात वगैरे धान्यांवर रहावें. तीं झालीं तरी नोकर चाकर वगैरे लोकांना देऊन नंतर आपण खावीं. अग्निहोत्र, दर्श, पूर्णमास, चातुर्मास व सोम हे पांच यज्ञ करून त्यांमध्यें हवी द्यावे. वानप्रस्थाश्रमामध्येंही चार प्रकारच्या वृत्ति सांगितल्या आहेत. त्या त्या दिवसापुरतें मिळवून रहाणारे कांहीं असतात, कांहीं अतिथीसत्कारासाठीं व यज्ञासाठीं महिन्याची बेगमी करून असतात, कांहीं वर्षाची बेगमी करून असतात, कांहीं बारा वर्षांची बेगमी करून असतात. वानप्रस्थांनीं पावसाळ्यांत पावसामध्यें उघडें राहून हिंवाळ्यामध्यें पाण्यामध्यें असावें व उन्हाळ्यामध्यें चार बाजूंला चार अग्नि ठेवून उन्हांत बसावें. नेहमीं यांचा आहार बेताचा असावा. बसणें, निजणें जमिनीवर असून पायाच्या बोटावर उभें रहावें. निजण्या बसण्याला जमीन किंवा चटया असाव्या. सकाळ, दुपार व संध्याकाळ अशा त्रिकाल अग्निहोत्राच्या पूर्वी स्नान करावें. या आश्रमांपैकीं कोणी दांतांनींच धान्य चावून खातात, तर कोणी दगडानें कुटून खातात; कोणी थोडीशी आंच दिलेली कण्हेरीच व तीही फक्त शुक्ल पक्षामध्यें खातात, तर कोणी केवळ कृष्णपक्षामध्यें मिळेल तशी पिऊन रहातात; कोणी ही वैखानसवृत्ति धरून मिळेल त्या फलमूलावर किंवा फुलांवर रहातात. याप्रमाणें त्यांचे अनेक धर्म आहेत. उपनिषदांत सांगितलेला आत्मानात्मविचारादिक हा संन्यास धर्म असून बाकीच्या सर्वाश्रमांमध्यें पाळतां येण्याजोगा आहे. याच युगामध्यें सर्व अर्थ कळणाऱ्या अगस्त्य, सप्तर्षी, मधुच्छंद प्रभृति पुष्कळ महात्म्यांनीं हा धर्म पाळून स्वर्ग मिळविला आहे. यापुढें जरेनें घेरून व्याधिग्रस्त झाल्यावर आयुष्याच्या चौथ्या भागांत वानप्रस्थाश्रम सोडून संन्यासाश्रम घ्यावा. एका दिवसांत संपेल अशा प्रकारची इष्टि करून आपल्या जवळ असेल नसेल तें सर्व दक्षिणा द्यावी आपलें स्वतःचें श्राद्धादिक करून केवळ स्वतःवर अवलंबून राहून आत्म्याच्या ठिकाणीं रममाण व्हावें. सर्व संसार लचांड सोडून आपल्या ठिकाणींच अग्नि ठेवावा. जर पूर्ण वैराग्य न होईल तर एका दिवसांत पूर्ण होणारे यज्ञ व इष्टि करीत रहावें व अशा रीतीनें यज्ञ करतां करतां आपल्या ठिकाणीं यज्ञ सुरू होतो तेव्हां हृदय, मन व तोंड या तीन अग्नींना मोक्षप्राप्तीसाठीं आपल्या ठिकाणीं यजन करावें. अन्नाची निंदा न करतां पांचसहा घांस प्राणादिकांकरितां यजुर्मंत्रानें खावे. डोक्यावरचे केंस, अंगावरचे केंस व नखें काढून मनुष्य पवित्र होऊन वानप्रस्थाश्रमापासून पवित्र अशा संन्यासाश्रमाला जातो. जो संन्यास घेऊन सर्व प्राणिमात्रांना अभय देतो त्याला मेल्यावर तेजोमय असे लोक मिळून शेवटीं अनंताशीं तो मिळून जातो. चांगलें शील व वर्तन ठेवून पापापासून मुक्त होऊन त्यानें इह व पर या दोन्हींसाठीं कांहीं करण्याच्या खटपटींत पडूं नये. आत्मज्ञानानें राग, मोह बाजूला ठेवून कोणाशीं स्नेह किंवा कोणाशीं तंटा करण्याच्या भानगडींत न पडतां उदासीनाप्रमाणें असावें. यम किंवा नियम यांनीं स्वतःला फार कष्ट करून घेऊं नयेत. आपल्या आश्रमांत सांगितलें असेल त्याप्रमाणें वागून वेद, जानवें वगैरे सर्व सोडून द्यावें, इंद्रियनिग्रह करून धर्मनिष्ठ राहिल्यानें आत्मज्ञानी मनुष्याला खात्रीनें त्याच्या इच्छेप्रमाणें उत्तम गति मिळते. तीन आश्रमांमध्यें चित्ताचे दोष नाहींसे करून हा आश्रम धरावा. मनुष्यानें या आश्रमामध्यें कोणाच्या साहाय्यावांचून एकटें राहून ब्रह्मप्राप्तीसाठीं योगाभ्यास करावा. जो एकटा योगाभ्यास करीत राहून सर्व आत्ममय पाहूं लागून कशालाच तुच्छ करीत नाहीं, त्याला मोक्ष मिळतो. यानें घरदार किंवा अग्नि न करतां राहून भिक्षेसाठीं गांवांत शिरावें. यानें उद्यांची तरतूद न करतां चित्ताचें समाधान ठेवावें. थोडें, ठरल्या वेळीं प्रत्यहीं एकदां खावें. पाणी पिण्याचें पात्र, झाडाखालीं निजणें, फाटकें तुटकें नेसणें, कोणाला बरोबर न घेणें, कोणाही भूतमात्राकडे दुर्लक्ष ठेवणें हीं संन्याशाचीं लक्षणें आहेत. ज्याला बोललेलें दुर्भाषण, विहिरीमध्यें गडप होणाऱ्या घाबरलेल्या हत्तीप्रमाणें त्याच्यामध्यें गडप

होऊन जाऊन तें करणाऱ्याकडे फिरून येत नाहीं अशानेंच या कैवल्यदायक आश्रमामध्यें रहावें. कोणासंबंधानें अवाच्य बोलूं नये किंवा भलत्या दृष्टीनें पाहूं नये. विशेषेंकरून ब्राह्मणासंबंधानें तर तसें कधींच बोलूं नये. नेहमीं ब्राह्मणांसंबंधानें चांगलेंच बोलत जावें. कोणी निंदा केली असतां गप्प असणें हेंच त्याचें औषध आहे. जो एकटा असून पूर्ण आकाशाप्रमाणें सर्व भरून असतो व रूपादिकांचें ग्रहण न करीत राहिल्यानें जनांनीं पूर्ण असे लोक सुद्धां ज्याला शून्य दिसतात, जो मिळेल तें अंगावर घेऊन मिळेल त्यावर राहून जागा सांपडेल तेथें पडून रहातो, लोक समुदायापासून जो सापाप्रमाणें भिऊन दूर असतो, जो मिष्टान्नादिकांपासून होणाऱ्या तृप्तीला नरकाप्रमाणें व स्त्रियांना प्रेताप्रमाणें समजून त्यांपासून भिऊन अलग असतो, त्यालाच देव ब्राह्मण समजतात. मान मिळाला ह्मणून आनंदभरित होऊं नये किंवा अपमान झाला ह्मणून रागावूं नये. सर्व भूतांना अभय देणाऱ्या मनुष्यानें मरण किंवा जीवित या दोन्हींचें अभिनंदन न करतां आज्ञेची वाट पहात असणाऱ्या नोकराप्रमाणें कालाची वाट पहात रहावें. मनाचे त्याचप्रमाणें वाणीचे दोष नाहींसे करावे. सर्व पापांपासून मुक्त होऊन ज्याला शत्रु ह्मणून उरला नाहीं त्याला मग भीति कसली उरली ! सर्व प्राणिमात्रांपासून ज्याला अभय असून जो सर्व प्राणिमात्रांना अभय देणारा आहे अशा मोहापासून सुटलेल्या मनुष्याला कोठेंच भय नाहीं. ज्याप्रमाणें हत्तीच्या पावलांमध्यें पायीं जाणाऱ्या सर्वांचीं पावलें गडप होतात, त्याप्रमाणें अहिंसा धर्मामध्यें सर्व धर्मांचा समावेश होतो. जो हिंसा करीत नाहीं तो नेहमीं अमरच असतो. हिंसा न करणारा, सर्वांवर समदृष्टि ठेवणारा, सत्यवादी, धृतिमान, इंद्रियनिग्रही, सर्व प्राणिमात्रांनां आधारभूत अशा मनुष्याला उत्तम गति मिळते. ज्ञानानें तृप्त असून जो निर्भय व निरिच्छ आहे त्याच्यापुढें मृत्यूचें कांहीं न चालतां त्याचाच मृत्यूवर पगडा बसतो. सर्व संगापासून मोकळा होऊन आकाशाप्रमाणें सर्वांपासून अलग असून जो सर्व ठिकाणीं भरून आहे, ज्याला आपलें ह्मणून कांहींच नाहीं, जो एकटा शांत असा भटकत रहातो, ज्याचे जीवित धर्मासाठीं असून ज्याचा धर्म त्याचें फल जवळच्या लोकांना मिळावें ह्मणून असतो, रात्रंदिवस ज्याचे हात पुण्याकडे लागतात, जो कांहींच काम हातीं घेत नाहीं, कोणाला नमस्कार करीत नाहीं, कोणाची स्तुति करीत नाहीं, सर्व पाशांपासून मुक्त असतो, त्यालाच देव ब्राह्मण समजतात. सर्व प्राणिमात्रांना सुख चांगलें वाटत असून दुःख नकोसें वाटतें ह्मणून त्यांना भय उत्पन्न होईल ह्या भीतीनें कर्माच्या मुळाशीं हिंसा असल्यानें कर्मे मुळींच करूं नयेत. भूतमात्रांना अभय देणें हें सर्व दानांमध्यें श्रेष्ठ आहे. जो परपीडा आधीं सोडून देतो, त्याला ज्याच्यापासून लोकांना अभय मिळतें अशा प्रकारचा मोक्ष मिळतो. जो उघड्या तोंडामध्यें सांगितलेले पांच सहा घास प्राणाहुतिसुद्धां टाकीत नाहीं तो नाभिपासून खालीं किंवा मस्तकापासून हनुवटीपर्यंत प्रदेशाचे ठिकाणीं त्याचप्रमाणें नाभिपासून हृदयापर्यंत प्रादेशमात्र जागेंत प्रकट असलेल्या चैतन्याचे ठिकाणीं वैश्वानरबुद्धि ठेवतो. हा स्वतःचेच यजन करणारा प्राणाची आहुति देत असतो व याप्रमाणें आत्माहुति देऊन केलेलें अग्निहोत्र सर्वमान्य असून असे प्राणाग्निहोत्र करणारे सूक्ष्म तेज, जल व पृथिवी या तीन रूपांनीं असणारें सूत्रात्मस्वरूप व त्रिगुणात्मक मायोपाधीनें युक्त ईश्वररूप व निरुपाधिक आत्मस्वरूप जाणतात; व हेंच पुरुष प्रशंसनीय होत. शरीरामध्यें असणाऱ्या ह्या आत्म्याच्या ठिकाणीं वेद, आकाशादि विषय, कर्मकांड, निरुक्त आणि परमात्म्याचें श्रेष्ठ स्वरुप जे पृथ्वीपसून अलग, आकाशाहून अफाट, हिरण्मय, अंड्यांतून उत्पन्न होऊन अंड्यांतच असणारें, पक्ष्याप्रमाणें दोन पिसांनीं युक्त, तेजःकिरणांनीं देदीप्यमान, असें परमात्म्याचें स्वरूप पाहूं लागतात, ते सर्वांना प्रशंसनीय होतात. नेहमीं फिरत असून अविनाशी व सर्वांचें अस्तित्व गडप करून टाकणारे असें सहा नाळ, बारा आरा, उत्तम सांधा असून ज्याच्या उघड्या तोंडामध्यें हें सर्व जग गडप होण्याला शिरत असतें अशा ह्या कालचक्राला जो आपल्या बुद्धीच्या ठिकाणीं ठेवतो तो जगांत मान्यता पावतो. ब्रह्म हें सुषुप्तीचें साक्षीभूत असून त्यापासून हें सर्व

जग निघतें ह्मणून सुषुप्ति स्थितींत जगाचें मूल शरीर असून सर्व स्थूलसूक्ष्मामध्यें तें भरून आहे. जीव यामध्यें राहून सूक्ष्म प्राण व इंद्रियें यांना तृप्त करतो व याप्रमाणें तृप्त झालेलीं इंद्रियें गिळण्याला आ पसरून बसलेल्या मूळ सुषुप्त स्थितीच्या तोंडाला नेऊन सर्वांना त्यांत टाकून तृप्त करतात. तेजोमय व नित्य असा हा जीव पुराण असून याला विवक्षित मार्गाचें अवलंबन केल्यानें अभयदायक असे अनंत लोक मिळतात. ज्याच्यापासून भूतमात्रांला भीति वाटत नाहीं. भूतमात्रांची ज्याला भीति वाटत नाहीं. जो स्वतः दोषपात्र नसून दुसऱ्याला नांवें ठेवीत नाहीं. अशा विप्राला परमात्मदर्शन होतें. मोह बाजूला सारून पापापासून मुक्त झाल्यानें, सामान्य लोक ज्यांचा अनुभव घेतात ते भोग तो इहपर अनुभवीत नाहीं. संन्याशानें राग व मोह बाजूला ठेवून ढेंकूळ व सोनें सारखें लेखावें. कशाचाही संग्रह करूं नये. कोणाशीं स्नेह किंवा तंटा, स्तुति किंवा निंदा न करतां व आवडनावड न ठेवतां उदासीनाप्रमाणें असावें. प्रकृतीचे विकार, इंद्रियें व मन यांच्यामुळें कर्तृत्व, भोक्तृत्व इत्यादि भाव ज्याला आले आहेत अशा जीवात्म्याला इंद्रियें वगैरे ओळखीत नाहींत; परंतु हा त्यांना ओळखतो. जेरीस आणलेल्या मजबूत अशा चांगल्या घोड्याकडून ज्याप्रमाणें हांकणारा काम करून घेतो त्याप्रमाणें हा जीवात्मा या इंद्रियांकडून व मनाकडून काम करून घेत असतो. इंद्रियांहून इंद्रियविषय श्रेष्ठ असून त्याहून मन श्रेष्ठ आहे. मनापेक्षां बुद्धि व बुद्धीपेक्षां महत् नामक आत्मा श्रेष्ठ आहे. महतापेक्षां अव्यक्त प्रकृति श्रेष्ठ असून तिच्याहून ब्रह्म श्रेष्ठ आहे. ब्रह्मापेक्षां उत्तम दुसरें कांहीं नसून हेंच अखेरीरची गति आहे. याप्रमाणें सर्व भूतमात्रांच्या ठिकाणीं झांकून असलेला आत्मा सामान्य लोकांना दिसत नाहीं. योग्यांना त्यांच्या श्रेष्ठ बुद्धीमुळें सूक्ष्म दृष्टीनें हा दिसतो. योगी, मन, इंद्रियें त्याचप्रमाणें इंद्रियविषय हे बुद्धीच्या योगानें आत्म्याच्या ठिकाणीं लीन करून ध्येय, ध्यान व ध्याता या तीन अहंभावात्मक स्थितीवर विचार करीत राहतो; नंतर विचारानें विषयोपभोगापासून परावृत्त होऊन मीच ब्रह्म आहें या ज्ञानानें मन तयार करून ईश्वरभाव बाजूला ठेवतो; व शांततेनें ज्या योगें अमरत्व येतें ती स्थिति मिळवितो. परंतु इंद्रियांचा गुलाम बनल्यामुळें ज्याच्या मनांत योग्यायोग्य विचारांचा घोंटाळा उडाला असतो तो याप्रमाणें आपण होऊनच मृत्यूच्या स्वाधीन झाल्यामुळें मरण पावतो. सर्व वासना नाहींशा करून स्थूल बुद्धीला सूक्ष्म बुद्धीच्या ठिकाणीं लीन करून कालंजर पर्वताप्रमाणें मनुष्यानें निश्चल असावें. अंतःशुद्धीनें योगी शुभ व अशुभ या दोहींच्याही पलीकडे जाऊन पोंचतो व प्रसन्न होऊन आत्म्याच्या ठिकाणीं राहून राहिल्यानें तो श्रेष्ठ सुख मिळवितो. गाढ झोंपेमध्यें जें सुख मिळतें किंवा निवाऱ्यामध्यें दिवा ज्याप्रमाणें जळत असतांना कांपत नाहीं अशी ही स्थिति प्राप्त होणें हें प्रसन्नतेचें लक्षण आहे. रात्रीच्या आरंभीं व शेवटीं मिताहार व शुद्ध अंतःकरण ठेवून स्वतःच्या ठिकाणीं योगानें स्वतःचा लय करून योगी आपल्या ठिकाणीं पाहूं लागतो. हें सर्व वेदांचें रहस्य आहे. याची सत्यता अनुमानानें किंवा शास्त्रानें कळण्याजोगी नाहीं. केवळ श्रद्धेनेंच हें कळून घेतलें पाहिजे. सर्व धर्मग्रंथांतून व सत्यासंबंधी ग्रंथांतून त्याचप्रमाणें दहा हजार ऋचांमधून अमृतरूपी हें धन ताकामधून लोणी काढून घ्यावें किंवा लांकडांतून विस्तव पाडून घ्यावा त्याप्रमाणें स्नातकाकरितां काढून घेतलें आहे. ज्याचें अंतःकरण शांत नसून इंद्रियें स्वाधीन नाहींत, ज्यानें तप केलें नाहीं, जो वेद पढला नाहीं, गुरूपुढें जो हात जोडून उभा नाहीं, ज्याच्यांतून मत्सर नाहींसा झाला नाहीं, ज्याच्यामध्यें साधेपणा नाहीं, जो वाटेल तसा वागतो व जो वितर्कवादी किंवा नीच आहे, अशा मनुष्याला हें ज्ञान कळवून देण्याच्या भानगडींत पडूं नये. जो कीर्तिमान, प्रशंसनीय, शांत व तपस्वी आहे अशाला, त्याचप्रमाणें आवडत्या मुलाला किंवा आज्ञाधारक शिष्याला हें धर्मरहस्य सांगावें. दुसऱ्या कोणाला, तो रत्नसंपूर्ण अशी पृथ्वी देण्याला जरी तो तयार होईल तरी, हें ज्ञान सांगूं नये.’

---

## १८४ इंद्रियादिकांचें स्वरूप
## ( १२. २४७–४९ )

‘आतां मी याहून गुह्य अशा अध्यात्म ज्ञा-

नाविषयीं तुला सांगतों. पृथ्वी, पाणी, तेज वायु, आकाश या पंचमहाभूतांपासून सर्वांची उत्पत्ति असून ज्यापासून या सर्व भूतमात्रांची उत्पत्ति आहे तीं वास्तविक जरी सर्व एकच आहेत तरी समुद्रावरील लाटांप्रमाणें तीं निराळीं मानण्यांत येतात. ज्याप्रमाणें कांसव आपलें अंग बाहेर काढून फिरून आंत घेतें त्याप्रमाणें हीं पंचमहाभूतें हजारों निरनिराळ्या रूपांमध्यें राहून उत्पत्ति व नाश इत्यादि रूपांतर पावत असतात. या जगांतील सर्व स्थावरजंगम पदार्थांमध्यें मूल हीं पंचमहाभूतें आहेत. त्यांच्या उत्पत्तिनाशासंबंधी प्रत्येकाचा संबंध यांकडे दाखवून देतां येतो. तथापि ब्रह्मदेवांनीं हीं पंचमहाभूतें कांहीं हेतूमुळें निरनिराळ्या वस्तूंमध्यें निरनिराळ्या प्रमाणानें ठेवून सर्वांच्या ठिकाणीं यांची सारखी वांटणी केली नाहीं. शब्द, कर्णेंद्रिय आणि शरीरांतील सर्व रंध्रें यांची उत्पत्ति आकाशापासून आहे. प्राण, हालचाल व स्पर्श यांची उत्पत्ति वायूपासून आहे. रूप, चक्षुरिंद्रिय, व पचनशक्ति हे तीन तेजाचे प्रकार आहेत. रस, रसनेंद्रिय, व स्निग्धता हे तीन पाण्याचे गुण आहेत. वास, घ्राणेंद्रिय, व शरीर हे भूमीचे गुण आहेत. इंद्रियांसंबंधी पंचमहाभूतांचे इतके विकार आहेत. वायूचा स्पर्श, पाण्याचा रस, तेजाचें रूप, आकाशाचा शब्द, व भूमीचा गंध गुण सांगितला आहे. मन, बुद्धि आणि स्वभाव यांची उत्पत्ति पूर्व स्थितीपासून असून पुनर्जन्मामध्यें हे गुण ग्रहण करण्याची शक्ति येऊन त्या त्या प्रमाणें ते गुण घेण्यांत येतात. ज्याप्रमाणें कांसव आपलें शरीर, आपले अवयव पसरून पुनः आखडून घेत असतें, त्याचप्रमाणें बुद्धि इंद्रियांना उत्पन्न करून फिरून आपल्यामध्यें घेऊन टाकीत असते. पायाच्या तळव्यांपासून डोक्यापर्यंतच्या या शरीरासंबंधानें अहंभाव जो असतो, तो या बुद्धीचें कार्य आहे. बुद्धीचेंच पंचेंद्रियांमध्यें व मनामध्यें रूपांतर होत असतें. बुद्धीच्या अभावीं गुण कोठून असणार? मनुष्याच्या ठिकाणीं पांच इंद्रियें, सहावें मन, सातवी बुद्धि व आठवा आत्मा आहे. चक्षुरिंद्रिय हें वस्तु पहाण्यासाठीं असून त्यापासून उत्पन्न होणाऱ्या विकारासंबंधानें मन संशय घेतें व बुद्धि निश्चय ठरविते. आत्मा हा केवळ साक्षीरूपानें असतो. सत्व, रज, तम हे तीन गुण आपापल्या पूर्वस्थितीवरून उत्पन्न होतात. हे सर्वांच्या ठिकाणीं सारखेच दिसून येतात. आतां यांमध्यें प्रेमाचें, शांत व शुद्ध असें जें कांहीं दिसून येतें तो सत्वगुण समजावा. शरीर किंवा मन यांसंबंधी यांना संताप देणारा जो विकार तो रजोगुण समजावा. जे विषयाचें स्पष्ट ज्ञान करून न देतां मोह पाडणारें असतें त्या अतर्क्य व कळून न येणाऱ्या विकाराला तमोगुण समजतात. हर्ष, प्रीति, आनंद, समता, स्वस्थचित्तत्व हे विकार अकस्मात् किंवा कांहीं कारणांवरून उत्पन्न होतात, तेव्हां ते सात्विक गुण समजावे. अभिमान, खोटें बोलणें, लोभ, मोह, चुरस हे विकार रजोगुणापासून उत्पन्न होतात. मोह, प्रमाद, निद्रा, आळस, सुप्ति हे तमापासून उत्पन्न होतात.

'मन पदार्थांचें चित्र उत्पन्न करीत असून बुद्धि त्यासंबंधानें निश्चय ठरविते. त्यामुळें कोणतें बरें व कोणतें वाईट हें हृदयाला कळतें. याप्रमाणें कर्माला प्रवर्तक अशा ह्या तीन शक्ती आहेत. इंद्रियविषय इंद्रियांच्या पलीकडे असून त्याच्या पलीकडे मन, मनाच्या पलीकडे बुद्धि व बुद्धीच्या पलीकडे आत्मा आहे. सामान्य व्यवहारासाठीं बुद्धीच आत्मा समजली जाते. ज्यावेळीं ही बुद्धि आपण होऊन विषयांचीं स्वरूपें आपल्यापुढें आणते तेव्हां तिला मन ही संज्ञा येते. सर्व इंद्रियांचें स्वरूप निरनिराळें असल्यामुळें ही एकच बुद्धि निरनिराळ्या इंद्रियांमध्यें निरनिराळ्या स्वरूपानें भासमान होते. ऐकण्याच्या वेळीं तीच श्रवणसाधन होते. स्पर्श करतांना ती स्पर्शज्ञानास साधन होते. पाहूं लागली असतां तिला दर्शनसाधनता येते. गोडी घेतांना ती रसज्ञानकारण बनते व वास घेतांना तीच गंधज्ञानसाधन होते. याप्रमाणें बुद्धीच निरनिराळे विकार पावत असते. बुद्धीचे जे हे विकार यांनाच इंद्रियें हें नांव असून त्यावर आत्मा हा साक्षीभूत आहे. मनुष्याच्या ठिकाणीं असणारी ही बुद्धि सत्व, रज व तम या तीन गुणांमध्यें असते. केव्हां केव्हां हिच्या ठिकाणीं प्रेम दिसतें, केव्हां शोक दिसतो व केव्हां केव्हां सुख व दुःख या दोहींचा अभाव दिसतो. ज्याप्रमाणें समुद्र हा त्यांत पडणाऱ्या नद्यांच्या मोठमोठ्या प्रवाहांहून निराळा अ-

सतो त्याप्रमाणें ही भावमय बुद्धि या तीन भावांच्या वर असते. जेव्हां या बुद्धीला कांहीं हवेंसें वाटूं लागतें तेव्हां तिला मनाचें स्वरूप येतें. हीं इंद्रियें जरी दिसण्यांत निराळीं आहेत तरी सर्वांची गणना बुद्धीमध्येंच होते. जें इंद्रिय जेव्हां बुद्धीशीं ऐक्य पावतें तेव्हां बुद्धि त्या इंद्रियाचा जो संकल्पात्मक घटादि विषय तदाकार होते व त्या विषयाचें ज्ञान त्या वेळीं होतें. याप्रमाणें निरनिराळ्या इंद्रियांचें बुद्धीशीं ऐक्य असतांना निरनिराळे विषयांचें ज्ञान क्रमानें होतें. एकाच वेळीं सर्व ज्ञानें होत नाहींत. सत्व, रज व तम हे मन, बुद्धि व अहंकार यांना चिकटले आहेत. आणि रथाच्या तुंब्याला चिकटलेल्या आरा ज्याप्रमाणें त्याच्या मागून असतात त्याप्रमाणें हे त्यांच्या मागून अर्थाच्या पाठीमागें लागले असतात. आत्मज्ञानाला बाहेर ठेवणाऱ्या अंधकाराला दूर करण्यासाठीं मनानें इंद्रियरूपी दिवा घ्यावा. योगी जें हें ज्ञान योगसाधनानें मिळवितात तें ज्ञान मनुष्याला विषयापासून अलिप्त राहिल्यानें सहज मिळत असतें. याप्रमाणें हें जग केवळ बुद्धिपरिकल्पित आहे, असें ज्ञान असल्यानें विद्वान मनुष्याला याचा मोह पडत नाहीं, त्याला कधीं दुःख किंवा आनंद कांहींच होत नाहीं, व कशासंबंधानें मत्सरही वाटत नाहीं. जीं इंद्रियें या ऐहिक विषयाच्या मागें लागून फिरत रहातात त्यांना आत्मा दिसणें शक्य नाहीं. ज्यांची इंद्रियें शुद्ध आहेत, अशा पुण्यवान लोकांना सुद्धां मोठ्या खटपटीनेंही हा दिसण्याला कठीण जातो, तेव्हां पाप्यांना कसा दिसणार ? तथापि जेव्हां मनुष्य मनाच्या साह्यानें इंद्रियांच्या काढण्या नीट आवरून धरतो तेव्हां दिव्याच्या साह्यानें दिसणाऱ्या अंधारांतील पदार्थाप्रमाणें तो दिसतो. वस्तूला झांकून टाकणारा अंधार दूर झाला असतां ज्याप्रमाणें ती वस्तु दिसूं लागते त्याप्रमाणें आत्म्याला झांकून टाकणारें अज्ञान दूर झाल्यावर तो दिसूं लागतो. ज्याप्रमाणें पाण्यावर फिरणाऱ्या पाणकोंबड्याच्या अंगावर पाणी कधीं रहात नाहीं, त्याचप्रमाणें सत्व, रज, तम या तीन गुणांचे दोष योग्याला कधीं लागत नाहींत. याप्रमाणें विद्वान मनुष्य विषयांमध्यें गढून न राहतां विषयोपभोग घेत असतो, त्यामुळें त्याला दोष लागत नाहींत. पूर्वकर्म टाकून देऊन आपल्या ठिकाणीं जो गढून रहातो अशा सर्व भूतमात्रांचा आत्मभूत आणि सर्व गुणांपासून अलग रहाणाऱ्या मनुष्याची बुद्धि व गुण आत्माच उत्पन्न करीत असतो. हे गुण आत्म्याला ओळखत नाहींत, पण आत्मा त्यांना ओळखतो. हाच गुणांचा साक्षी असून उत्पन्न करणारा आहे. बुद्धि व आत्मा या दोन सूक्ष्मांमधलें अंतर हें आहे कीं, एक गुण उत्पन्न करीत असतो व दुसरा ते करीत नसतो. हे दोघे स्वभावतः जरी निराळे आहेत तरी ते एकमेकांशीं लागून आहेत. पाण्यांत रहाणारा मासा हा पाण्याहून निराळा आहे तरी त्याचा व पाण्याचा जसा एकपणा आहे किंवा उंबर व उंबरांतील किडा यांचा जसा एकपणा आहे तितकाच एकपणा यांच्यामध्यें आहे.



बुद्धि ही विषय उत्पन्न करीत असते व आत्मा त्यांच्याशीं कांहीं संबंध नसूनही त्यांच्या वर असतो. ज्याप्रमाणें कोळी धागे उत्पन्न करीत असतो त्याप्रमाणें बुद्धि मूळ त्रिगुणांपासून निरनिराळे विषय उत्पन्न करीत असते. ऐश्वर्यभावानें आत्मा यांच्याशीं न मिळतां त्यांवर साक्षित्वानें असतो. बुद्धि उत्पन्न करणारे विषय तिच्या स्वभावानुरूप असतात. योगज्ञानानें गुण दूर केले असतां ते नाहींसे झाल्याची कांहीं खूण दिसत नाहीं ह्मणून ते नाहींसे होत नाहींत असें कांहीं ह्मणतात व कांहीं ते पूर्णपणें नाश पावतात ह्मणून ह्मणतात. या दोन मतांवर विचार करून प्रत्येकानें आपलें योग्य तें मत ठरवावें व याप्रमाणें वर्चस्व मिळवून आत्म्याचा आधार घ्यावा. आदि व अंत नाहीं अशा आत्म्याला ओळखून मनुष्यानें राग, आनंद किंवा मत्सर यांच्या तावडींत न जातां कर्म करीत रहावें. व हृदयांतील बुद्धीच्या क्रियेनें उत्पन्न होणारी तोडण्यास कठीण व ज्ञानानें तोडतां येण्याजोगी संशयाची गांठ तोडून सुखी असावें. पोहोतां न येणाऱ्या मनुष्याची पाण्यांत पडून जी स्थिति होते, अशी स्थिति आत्म्याला न ओळखतां या संसारांत पडणाऱ्यांची होत असते. सत्य जाणणारा विद्वान मात्र यामध्यें दुःखी न होतां जमिनीवर चालल्याप्रमाणें स्वस्थ

वावरत असतो. जो ज्ञानस्वरूपी अशा चिन्मय आत्म्याला ओळखतो त्याला कधीं दुःख ह्मणून होत नाहीं. याप्रमाणें सर्व भूतमात्रांची उत्पत्ति, नाश व भेद ओळखल्यानें मनुष्याला उत्तम सुख होतें. आत्मज्ञान व वर सांगितल्या प्रकारचें सुख हीं मोक्षाला नेणारीं आहेत. हें ज्ञान मिळाल्यानें मनुष्य खरा विद्वान होतो. ज्ञान मिळाल्यानें मनुष्य आपल्याला कृतार्थ समजून मुक्त होतो. हीच ज्ञानाची दुसरी खूण आहे. अज्ञान्यांना ज्या गोष्टी भयदायक असतात, त्यांपासून ज्ञान्यांना मुळींच भीति वाटत नाहीं. जी शाश्वत गति ज्ञान्याला मिळतें त्याहून दुसरी श्रेष्ठ गति नाहीं. सामान्य मनुष्य विषयादि भोगासंबंधानें असूयेनें युक्त असून दुसऱ्यांना त्यांचा उपभोग घेतांना पाहून दुःखी होतो. परंतु ज्यांना खरें खोटें उमगतें अशा विद्वानांना त्यावद्दल कांहीं वाईट न वाटतां उलट आनंद होतो. असा मनुष्य जो निष्काम बुद्धीनें कर्म करीत असतो त्यानें त्याच्या पूर्व जन्मींच्या कृत्यांचाही नाश होतो, व त्याचीं कर्में बरें किंवा वाईट कांहींच फळ उत्पन्न करीत नाहींत.

---

## १८५ मोठीं कर्तव्यें. ( १२. २५०–५१ )

शुक ह्मणाले, 'ज्याहून दुसरा श्रेष्ठ धर्म नाहीं असा धर्म कोणता तो सांगा.' हें ऐकून व्यास ह्मणाले, 'अशा प्रकारचा सर्वांहून श्रेष्ठ पुराणधर्म सांगतों ऐक. बाप ज्याप्रमाणें आपल्या अज्ञान मुलाला आवरतो, त्याप्रमाणें चोहोंकडे सैरावैरा धांव घेणाऱ्या इंद्रियांना बुद्धीच्या योगानें ताब्यांत ठेवावें. इंद्रियें व मन यांना विषयांपासून काढून एकाग्र करणें हा सर्व धर्मांमध्यें श्रेष्ठ धर्म आहे. नाना प्रकारचे विचार उत्पन्न करणाऱ्या बाह्य विषयांचा विचार न करतां इंद्रियें व मन यांना आवरून आपल्या ठिकाणीं तृप्त रहावें. हीं जेव्हां बाह्य विषयांपासून परतून आत्म्याकडे लागतील तेव्हां मनुष्य सर्वांच्यामध्यें असणाऱ्या श्रेष्ठ आत्म्याला, धूर वगैरें नाहींसा झालेल्या अग्नीप्रमाणें स्वच्छ पाहूं लागतो. फलपुष्पांनीं भरलेल्या पुष्कळ फांद्यांच्या मोठ्या झाडाला ज्याप्रमाणें आपलें फूल कोठें आहे व फळ कोठें आहे हें कळत नाहीं, त्याप्रमाणें जन्ममरणाच्या फेऱ्यांत सांपडलेल्या जीवात्म्याला मी कोठून आलों व कोठें चाललों आहे हें कळत नाहीं. अंतरात्मा हा याहून निराळा असून त्याला सर्व कांहीं दिसतें. मनुष्य लावलेल्या ज्ञानरूपी दिव्यानें आत्म्याला आपल्या ठिकाणीं पाहूं लागतो, तेव्हां बुद्धीच्या योगानें आत्म्याला याप्रमाणें पाहूं लागून आत्मवेत्ता निरुपाधिक होतो, व कात टाकलेल्या सापाप्रमाणें सर्व पापापासून मोकळा होऊन या श्रेष्ठ बुद्धीच्या योगानें तो निश्चिंत होतो. ही चोहोंकडे पसरणारी व लोकांना वाहून नेणारी जीवितरूपी नदी फार भयंकर आहे. पंचेंद्रियें ह्याच यांतील सुसरी असून, मन व संकल्प हे तिचे कांठ आहेत. लोभ व मोहरूपी शेवाळ्यानें ही झांकली असून कामक्रोधरूपी साप हिच्यांत भरले आहेत. हिच्या क्रोधरूपी चिखलवट तीराला सत्यरूपी तीर्थ आहे. असत्यरूपी लाटांनीं ही खळवळून गेली आहे. हिचा उगम अव्यक्तापासून असून ही मोठ्या झपाट्यानें वहात आहे व ज्यांचें हृदय शुद्ध झालें नाहीं त्यांना ही तरून जाण्याला फार कठीण आहे. कामरूपी जलचरांनीं भरलेली संसारसागराकडे जाणारी ही नदी बुद्धीनें तरून जावी.

हिची उत्पत्ति आपल्या कर्मांपासून असून जीव हेच यांतील भोंवरे आहेत व यामुळें ही तरून जाण्याला फार कठिण झाली आहे. शहाणा मनुष्य आत्म्याला ओळखून सर्व प्रकारें शुद्ध होऊन ही तरून जातो. ह्मणून अशी श्रेष्ठ बुद्धि धरल्यानें मनुष्य ब्रह्मस्वरूपी होतो. ऐहिक विषयापासून स्वतःला अलग करून घेऊन अंतःकरण शुद्ध होऊन सर्व पापांपासून सुटल्यानें डोंगरावरील मनुष्य ज्याप्रमाणें पृथ्वीवरील मनुष्याकडे पहात असतो त्याप्रमाणें हा जगाकडे पहात रहतो. राग; आनंद किंवा दुष्टपणा यांच्या आधीन न झाल्यानें मनुष्य सर्व भूतमात्रांची उत्पत्ति व नाश पाहूं शकतो. शहाणे लोक त्यालाच सर्वांत श्रेष्ठ धर्म समजतात. सर्वव्यापि हें परमात्म्याचें ज्ञान ज्यानें आत्मनिग्रह केला आहे, जो अनुकूल व आज्ञाधारी आहे त्यालाच सांगावें. हें आत्म्याची ओळख पटवून आत्मज्ञान देणारें सर्वांमध्यें अगदीं गुह्य श्रेष्ठ आहे. ब्रह्म हें स्त्री, पुरुष किंवा नपुंसक नसून याला सुखदुःख कांहींच माहीत नाहीं व हें त्रिकाळ

व्यापक आहे. या ब्रह्माला ओळखल्यानें पुरुष अथवा स्त्री कोणीही जन्ममरणाच्या फेऱ्यांत सांपडत नाहींत. जन्ममरणाच्या फेऱ्यांतून सुटण्यासाठीं हा धर्म सांगितला आहे. गंध किंवा रस किंवा कोणत्याही प्रकारचें सुख, त्याचप्रमाणें निरनिराळे अलंकार यांकडे लक्ष देऊं नये. मान, कीर्ति व यश यांची पर्वा करूं नये. जो सर्व वेद पढला आहे, ज्यानें गुरुशुश्रूषेनें ब्रह्मचर्य पाळलें आहे व ऋक्, यजु व साम हे वेद ज्याला माहिती आहेत, त्यालाच केवळ ब्राह्मण ह्मणतां येत नसून जो सर्व भूतांचे ठिकाणीं आपल्या ज्ञातीच्या लोकांप्रमाणें वागतो व ज्याला ब्रह्मज्ञान आहे, त्यालाच खरें वेदज्ञान झालें ह्मणावयाचें. आत्मज्ञानानें तृप्त राहून जो वासनेपासून मुक्त आहे तो कधींच मरत नाहीं. अशा वर्तनाचा व अशा मनोवृत्तीचा मनुष्य खरा ब्राह्मण होय. मनुष्य दयाभूत नसेल तर किंवा त्यानें वासना सोडली नसेल तर केवळ दक्षिणा देऊन नाना प्रकारच्या धर्मक्रिया व यज्ञ केल्यानें त्याला ब्राह्मणत्व येत नाहीं. जेव्हां याला कोणाची भीति न उरतां कोणी याला भीत नाहीं व जेव्हां याच्या ठिकाणीं इच्छा किंवा तिटकारा रहात नाहीं, जेव्हां कायावाचामनानें भूतमात्रांच्या ठिकाणीं पापविचार याच्या मनामध्यें येत नाहींत, तेव्हां याला ब्रह्मप्राप्ति होते. वासनारूपी पाशावांचून या जगांत दुसरा पाश नाहीं व तो पाश तुटल्यानें मनुष्य ब्रह्मस्वरूपी होण्याला पात्र होतो. काळसर ढगापासून बाहेर पडलेल्या चंद्राप्रमाणें वासनेपासून सुटून स्वच्छ झालेला मनुष्य धैर्यानें कालाची मार्गप्रतीक्षा करीत रहातो. कितीही नद्या येऊन मिळाल्या असतां समुद्र ज्याप्रमाणें आपली मर्यादा सोडीत नाहीं, त्याप्रमाणें सर्व वासना ज्याच्यामध्यें गडप होतात त्यालाच शांति मिळते. वासनेच्या मागें लागलेल्याला ती कधीं मिळत नाहीं. असा मनुष्यच पूर्णकाम होऊन सुखी होतो. जो वासनेच्या मागें लागला असतो त्याला कधीं सुख न होतां तो स्वर्गाला गेला तरी फिरून खालीं येतो. वेदाचें रहस्य सत्य, सत्याचें रहस्य इंद्रियनिग्रह, इंद्रियनिग्रहाचें रहस्य दान, दानाचें रहस्य तप, तपाचें रहस्य त्याग, त्यागाचें रहस्य सुख, सुखाचें रहस्य स्वर्ग व स्वर्गाचें रहस्य सर्व आत्मनिग्रह आहे. समाधानासाठीं शांत बुद्धि धरावी. ही बुद्धि उत्तम असून मोक्षदायक आहे. आणि हीच बुद्धि दुःख, संताप व तृष्णा यांना भाजून काढून नाहींशी करते. समाधान, शोक नसणें, निर्भयता, शांति, प्रसन्नता व निर्मत्सरता हे सहा गुण ज्याच्या अंगीं आहेत त्यालाच पूर्णता मिळते. जो विद्वान शरीरासंबंधानें अहंभाव सोडून देऊन शरीरामध्यें असणारा व सत्य, दम, दान, तप, त्याग व शम या सहा सत्वात्मक गुणांनीं त्याचप्रमाणें श्रवण, मनन व निदिध्यास यांनीं जाणण्याजोगा जो आत्मा त्याला जिवंतपणींच ओळखतो त्यालाच पूर्वोक्त मुक्तीचें स्वरूप कळलें ह्मणावयाचें. अकृत्रिम आणि म्हणूनच अविनाशी, स्वभावसिद्ध व गुणापासून मुक्त असल्यानें संस्कार न लागणारें जें शरीरामध्यें असणारें ब्रह्म त्याला ओळखल्यानें विद्वान शाश्वत असें सुख मिळवितो. चोहोंकडे भटकणारें मन फक्त ब्रह्माकडेच लावल्यानें जें समाधान मिळतें तें दुसऱ्या कोणत्याही साधनानें मिळणें शक्य नाहीं. ज्याच्या योगानें उपाश्याचें पोट भरतें, गरीबाची तृप्ति होते व निःस्नेहाला उत्साह येतो त्यालाच वेदाचें खरें ज्ञान झालें असें समजावयाचें. आपलीं इंद्रियें इकडे तिकडे भटकूं न देतां जो ध्यानामध्यें गढून राहतो तो श्रेष्ठ ब्रह्मवेत्ता असून त्याला खरें आत्मसुख मिळतें. वासना नाहींशा करून श्रेष्ठ ब्रह्मतत्त्वाकडे जो मन लावतो त्याचें सुख शुक्लपक्षीं वाढत राहणाऱ्या चंद्राच्या कलेप्रमाणें वाढत राहतें. पंचतन्मात्रें, बुद्धि, महत् आणि प्रकृति यांना सोडून योग्याचें दुःख सुखानें, सूर्य ज्याप्रमाणें अंधार नाहींसा करतो त्याप्रमाणें नाहींसें होतें. याप्रमाणें जो कर्में व गुणक्षय यांच्या पलीकडे जाऊन विषयांपासून अलग राहिला आहे अशा ब्रह्मवेत्त्याला जरामृत्यु शिवत नाहींत. याप्रमाणें जेव्हां तो सर्वांपासून मुक्त होऊन सारखेपणानें वागूं लागतो तेव्हां जिवंतपणींच तो इंद्रियें व इंद्रियविषय यांवर पगडा मिळवितो. प्रकृतिरूपी कार्याच्या पलीकडे जाऊन परब्रह्मरूपी कारणाला ज्यानें मिळविलें आहे त्याला तें श्रेष्ठपद मिळविल्यानें जन्ममरणाचें कारण उरत नाहीं.

सुखदुःखादि द्वंद्वांच्या पलीकडे जाऊन व धर्मा-

र्थ साधून जो मुक्तीच्या पाठीमागें लागला आहे अशाला भल्या गुरूनें अध्यात्म विषयासंबंधी हें सर्व विस्तारानें सांगावें. आकाश, वायु, तेज, जल व पृथ्वी त्याचप्रमाणें भाव, अभाव व काल हे पंचभूतात्मक सर्व भूतांमध्यें आहेत. आकाश हें दुसरें कांहीं नसून मोकळी जागा होय. श्रोत्र आकाशमय आहे; व याचा शब्दगुण आहे; गति, प्राणवायु, त्वचा हे वाय्वात्मक असून ह्यांचा स्पर्शगुण आहे. उष्णता, पाचक अग्नि, प्रकाश, ज्योति व डोळा हे तेजोमय असून तांबूस, गोरा, पांढरा, इत्यादि रूपें हा त्याचा गुण आहे. द्रवता, प्रवाही पदार्थ, व रसनेंद्रिय हे सर्व जलात्मक असून यांचा रसगुण आहे. घनपदार्थ, हाडें, दांत, नखें, दाढी, रोमांच, केंस, शिरा, स्नायु, कातडें, घ्राणेंद्रिय हे पृथिव्यात्मक असून यांचा गंधगुण आहे. या पंचमहाभूतांपैकीं पुढच्या पुढच्यामध्यें आपला गुण असून शिवाय मागच्यांचें गुण असतात. याशिवाय अविद्या, काम आणि कर्म हीं तत्त्वें सर्व प्राण्यांमध्यें असतात. पंचमहाभूतें व हीं तत्त्वें मिळून आठ, नववें मन, दहावी बुद्धि, अनंत आत्मा अकरावा याप्रमाणें ही परंपरा आहे. हा आत्मा सर्वश्रेष्ठ आहे. मन हें संशयात्मक असून जाणून निश्चय ठरविणें हें बुद्धीचें काम आहे. जेव्हां हा वर सांगितलेला अनंत आत्मा स्वतःला कर्माच्या अनुरोधानें शरीरामध्यें गुरफटून घेतो तेव्हां त्याला जीवात्मा ही संज्ञा मिळते. जेव्हां या सर्व भावांनीं युक्त असलेले कालात्मक प्राणी त्यापासून कलुषित न होतां वेगळे आहेत असें मनुष्य पाहूं लागतो तेव्हां त्याच्या हातून सकाम कर्म घडत नाहीं. याप्रमाणें शास्त्रवेत्ते या शरीरामध्यें असणारा सूक्ष्म जीवात्मा शरीरापासून वेगळा आहे हे आपल्या कर्मांनीं जाणतात. ज्याप्रमाणें सूर्याची किरणें दाट अशा सर्व आकाशांतून भरून राहिलीं असतांही साध्या डोळ्याला तीं न दिसतां तर्कानेंच जाणावीं लागतात, त्याप्रमाणें स्थूल शरीरांना सोडून गेलेले जीव या सृष्टीमध्यें संचार करीत असतांना मनुष्यांना दिसत नाहींत. ज्याप्रमाणें सूर्यकिरण पाण्यामध्यें प्रतिबिंबरूपानें दिसतें त्याप्रमाणें योग्याला स्थूल शरीरामध्यें प्रतिबिंबरूपानें राहिलेला हा आत्मा दिसतो. त्याचप्रमाणें इंद्रियनिग्रह होऊन आत्मज्ञान झालेल्या योग्यांना स्थूल शरीरापासून वेगळे झालेले सूक्ष्म रूपानें असलेले हे जीव दिसतात. ते आपल्या स्वतःच्या आत्म्याच्या साहाय्यानें या अदृश्य सत्वांना पाहूं शकतात. झोंपेंत किंवा जागेपणीं, रात्रीं व दिवसां जे, बुद्धीमध्यें रजोगुणापासून उत्पन्न होणारे विकार त्याचप्रमाणें योगैश्वर्य दूर झुगारून देऊन योगाकडे स्वतःला लावतात, त्यांना या लिंगदेहाला पूर्णपणें आपल्या ताब्यांत ठेवतां येतें. या योग्यामध्यें असणारा महत्, अहंकार व पंचमहाभूतांची पंचतन्मात्रें या सातांनीं युक्त जो जीवात्मा तो जरामृत्यूपासून मोकळा राहून सदा व सर्वत्र संचार करीत रहातो. आतां सदा व मृत्यूपासून मोकळा ह्या शब्दांचा व्यावहारिक अर्थच घ्यावयाचा; कारण लिंगदेहाचा वास्तविक अंत आहे. परंतु जो मनुष्य मन व बुद्धि यांच्यावर पगडा न मिळवितां त्यांच्या ताब्यांत जातो त्याला स्वप्नामध्यें सुद्धां आपला देह व दुसऱ्याचा देह, सुख व दुःख, यांचा अनुभव मिळतो. अर्थात त्यालाही योग्याप्रमाणें लिंगशरीर असतें. हा आपल्या स्वप्नामध्यें सुखोपभोग घेतो, दुःख अनुभवतो व राग व लोभ यांच्या तावडींत जाऊन संकटांत सांपडतो. स्वप्नामध्यें याला मोठें सुख होतें व हा पैसेवान होतो. मोठमोठीं पुण्यकर्मे करतो व जाग्यासारखेंच पाहणें, ऐकणें वगैरे क्रिया करतो. स्वप्नामध्यें एवढेंच नव्हे, परंतु गर्भाशयामध्यें पोटांतल्या उष्णतेंत दहा महिने काढून सुद्धां हा जीवात्मा पोटांतल्या अन्नाप्रमाणें जिरून नाहींसा होत नाहीं. रजतमानें जे घेरून गेले आहेत अशा लोकांना तेजोमय परमात्म्याचा अंशभूत सर्व प्राणिमात्रांच्या स्थूल शरीरामध्यें असणारा जो जीवात्मा तो दिसत नाहीं. आत्मज्ञानासाठीं जे योगशास्त्राकडे लागतात ते या स्थूल त्याचप्रमाणें लिंग व प्रळयाच्या वेळींही ज्याचा नाश होत नाहीं अशा कर्मशरीरापासून मोकळे होतात. संन्यास धरून चार आश्रमांसंबंधानें ज्यामध्यें मन व बुद्धि यांचा पूर्ण लय झाला असतो असे योगप्रधानधर्म शांडिल्य ऋषींनीं छांदोग्य उपनिषदांत सांगितले आहेत. इंद्रियें, इंद्रियविषय, मन, बुद्धि, महत्, प्रकृति व पुरुष या सात

सूक्ष्म तत्त्वांना ओळखून त्याचप्रमाणें सर्वज्ञता, तृप्ति, बोध, स्वतंत्रता, अलुप्तदृष्टि, व अनंत शक्ति या सहा गुणांनीं युक्त असा जो जगाला आदिकारण त्याला त्याचप्रमाणें हें जग केवळ त्रिगुणात्मक अविद्येपासून झालेलें आहे हें जो ओळखतो त्याला हें श्रेष्ठ ब्रह्म शास्त्राच्या साहाय्यानें दिसतें.

---

## १८६ वासनेचें स्वरूप.

## ( १२. २५४—५९ )

मनुष्याच्या हृदयामध्यें वासनरूपी विलक्षण वृक्ष आहे. मोहरूपी बीजापासून याची उत्पत्ति आहे. राग आणि मान हा त्याचा मोठा बुंधा आहे. कर्म करण्याची इच्छा हीच त्याच्या भोंवतालचें आळें आहे. अज्ञान हें त्याचें मूळ असून प्रमाद हाच त्याला घालावयाचें पाणी आहे. असूया त्याचीं पानें असून पूर्वजन्मीं केलेल्या दुष्कृत्यांनीं हा जोरावतो. संमोह व चिंता ह्या त्यांच्या डहाळ्या असून शोक त्याच्या खांद्या आहेत. भय त्याचे अंकुर आहेत. निरनिराळ्या विषयांसंबंधानें तृष्णा याच वेलींनें तो चोहोंकडून वेष्टिला आहे. लोभी लोक त्याच्या फलाच्या इच्छेनें या फळदायक झाडाशीं स्वतःला वासनामय लोखंडी बिड्यांनीं जखडून घेऊन याची उपासना करतात. जो ह्या बिड्या आपल्या ताब्यांत ठेवून या झाडाला कापून काढतो व सुखदुःखांना झुगारून देतो तो यांपासून दूर सुटतो. ज्या वेळीं मूर्ख मनुष्य या झाडाची नेहमीं जोपासना करीत रहातो तेव्हां ज्याप्रमाणें विषारी गोळ्या रोग्याचा नाश करतात त्याप्रमाणें त्याचा तें नाश करतें. परंतु शहाणा मनुष्य योगाच्या साहाय्यानें समाधिरूपी तीक्ष्ण धारेच्या तलवारीनें या झाडाचीं लांबवर जाऊन पोंहचणारीं मुळें छाटून काढतो. जो फलाची इच्छा धरून हातीं घेतलेल्या कामाचा शेवट पुनर्जन्म व पाश यांमध्यें होतो हें जाणतो तो दुःखांतून सुटतो. हें शरीर शहर असून बुद्धि ही याची स्वामिनी आहे व यामध्यें राहणारें मन ह्या निश्चयात्मक बुद्धीचा मंत्री आहे. इंद्रियें मनानें हिच्या कामीं लावलेले नागरिक आहेत. याचा लडिवाळ करण्यासाठीं मन नाना प्रकारचीं कर्में करण्याकडे मोठा कल दाखवितें. या कर्मासंबंधानें रज व तम हे दोन मोठे दोष आहेत. या कर्माच्या फलावर हे नागरिक त्याचप्रमाणें मन, बुद्धि व अहंकार हे नगराधिकारी अवलंबून आहेत. वर सांगितलेले हे दोन दोष, करूं नये अशीं सांगितलेलीं कर्में केल्यानें घडतात. अशी स्थिति असल्यामुळें या रजतमांना हार न जाणारी बुद्धि अशा कर्माला प्रवृत्त झाल्यानें मनाच्या जोडीला येऊन बसते. नंतर इंद्रियें या कलुषित झालेल्या मनाच्या योगानें क्षुब्ध होऊन त्यांची स्थिरता नाहींशी होते, व ज्या विषयप्राप्तीसाठीं त्यांना चांगले समजून बुद्धि खटपट करूं लागते ते विषयही दुःखाला कारण होऊन शेवटीं नाशच पावतात. यांचा नाश झाल्यावरही मनाला दुःख होतें, व त्याबरोबरच बुद्धीलाही दुःख होतें. कारण ज्यांचा निश्चय करण्याचें सामर्थ्य ज्याच्या अंगीं नाहीं असे विकार उत्पन्न करण्याच्या त्याच्या मुख्य कामासंबंधानें मात्र मन बुद्धीहून वेगळें आहे. नाहीं पेक्षां वास्तविक मन व बुद्धि इतर बाबतींत सामान्यतः एकच आहेत. दुःख व संकट उत्पन्न करणाऱ्या या रजोगुणानें बुद्धीला याप्रमाणें घेरल्यावर आरशामध्यें असणाऱ्या स्वरूपाप्रमाणें रजानें कलुषित झालेल्या बुद्धीमध्यें असणाऱ्या आत्म्यावरही याचा परिणाम घडतो. प्रथम मन या रजोगुणाशीं स्नेह करून नंतर ज्याप्रमाणें विश्वासघातकी मंत्री शत्रूशीं संगनमत करून राजाला व शहरच्या लोकांना धरून त्याच्या ताब्यांत देतो त्याप्रमाणें हें मन आत्मा, बुद्धि व इंद्रियें यांना धरून रजाच्या हवालीं करतें. आतां महाभूतांचे गुण फिरून एकवार सांगतों ऐक. स्थिरता, वजन, कठिणपणा, उत्पन्न करण्याची शक्ति, गंध, गुरुत्वाकर्षण, गंध घेण्याचें सामर्थ्य, स्थापना, धृति हे पृथ्वीचे गुण आहेत. शैत्य, गोडी, द्रवता, स्निग्धता, सौम्यपणा, रसनेंद्रिय, पाझर घनीभवन, हे पाण्याचे गुण आहेत. दुर्धर्षता, ज्योती, ताप, पचनशक्ति, प्रकाश पाडण्याची शक्ति, शोक, राग, हलकेपणा, तीक्ष्णता व ऊर्ध्व गति हे तेजाचे गुण आहेत. अनियमित स्पर्श, वाणीला साहाय्य करण्याचें सामर्थ्य, स्वतंत्रता, बल, शीघ्रता, मलमूत्रादि विसर्जनाला मदत, वस्तूंना वर फेंकण्याचें सा-

मर्थ्य, श्वासोच्छ्वासादि चेष्टा, प्राणरूपानें चिदात्म्याचें उपाधित्व, जन्ममरण, हे वायूचे गुण आहेत. शब्द, व्यापकता, छिद्रता, निराश्रयता, आधाराची अनावश्यकता, अव्यक्तता, अविकारिता, अप्रतिबंधकता, श्रवणेंद्रिय व शरीरांतील छिद्रें हीं आकाशाचे गुण आहेत. याप्रमाणें पंचमहाभूतांचे हे पन्नास गुण आहेत. धैर्य, ऊहापोह करण्याची शैली, आठवण, विसर, कल्पना, क्षमा, बऱ्याकडे तसाच वाइटाकडे कल, चंचलता हे नऊ मनाचे गुण आहेत. इष्टानिष्टनाश, व्यवसाय, समाधि, संशय, प्रत्यक्ष प्रमाणावरून वस्तुनिर्णय, हे पांच बुद्धीचे गुण आहेत. इंद्रियांचा बुद्धीच्या गुणांमध्यें समावेश होत असल्यानें पांच इंद्रियें व त्यांचे पन्नास गुण व बुद्धीचे पांच गुण मिळून बुद्धीचे एकंदर साठ गुण आहेत व हे नेहमीं चैतन्याशीं मिळून आहेत, व याप्रमाणें हे एकाहत्तर गुण यापासून उत्पन्न झाले असल्यामुळें ते आत्म्याप्रमाणें शाश्वत नाहींत.'

---

## १८७ धर्माचें स्वरूप–तुलाधार व जाजली यांचा संवाद. ( १२. २५९–६५ )

युधिष्ठिर ह्मणाला, 'या सर्व लोकांना ज्या ह्या धर्मासंबंधानें शंका पडते, तो धर्म कशाप्रकारचा आहे, त्याची उत्पत्ति कोठून आहे, धर्माचा उपयोग ह्या लोकीं आहे किंवा दोन्ही लोकीं आहे, हें मला सांगा.' भीष्म म्हणाले, 'सदाचार, स्मृति, व वेद या तीन प्रकारचें धर्माचें लक्षण आहे. ज्यासाठीं ह्मणून एखादें काम हातीं घेतलें जातें त्यालाही विद्वान धर्माचें चौथें लक्षण समजतात. ऋषींनीं धर्म काय आहे हें सांगितलें असून, चांगला कोणता, वाईट कोणता, हें ठरवून ठेविलें आहे. जगाचा व्यवहार चालावा ह्मणूनच धर्माचे नियम करून ठेविले आहेत. इहपर अशा दोन्ही लोकीं धर्माचें फळ सुखकारक मिळतें. पापी मनुष्याला सूक्ष्म धर्म न कळतां तो पापाला धनी होतो. पापी लोक पापापासून कधीं मुक्त होत नाहींत. आपत्कालीं खोटें बोलून सुद्धां मनुष्याला खरें बोलल्याचें श्रय मिळतें व अधर्माचें कृत्य करून सुद्धां धर्म पदरीं पडतो. आचार हाच धर्माचा आधार आहे. धर्माचें स्वरूप आचारानेंच ओळखावें. आपले दोष न दिसतां दुसऱ्याचे दोष पाहून सांगत फिरणें हा मनुष्याचा स्वभावच आहे. चोर सुद्धां धर्मासाठीं ह्मणूनच दुसऱ्याचा पैसा चोरीत असतो. व बेबंदशाहीमध्यें दुसऱ्याला लुबाडण्यांत त्याला आनंद होत असतो; परंतु याचा पैसा मात्र दुसरे लुबाडूं लागले असतां मग याला राजा असावासा वाटतो. परंतु अशा वेळीं देखील जे आपल्या पैशानें संतुष्ट आहेत अशांचा पैसा आपल्याला मिळावा असें याच्या मनांत येतच असतें; परंतु अगदीं न कचरतां निःशंक व शुद्ध अशा मनानें तो राजद्वारीं जाऊन उभा राहतो. याच्या मनामध्यें सुद्धां आपलें वर्तन योग्य नाहीं असें वाटत नसतें. खरें बोलणें हें चांगलें आहे. याच्याहून श्रेष्ठ कांहीं नाहीं. सर्व सत्यामुळें चाललें असून सर्व कांहीं यावर अवलंबून आहे. अगदीं पापी लोक देखील आपसांमध्यें खरेपणाची शपथ घेऊन भांडणाचें मूळ काढून टाकून एकमेकांशीं जुळून इमानावर अवलंबून राहूनच पापकर्में करण्याला निघतात. ते सुद्धां एकमेकांशीं खोटेपणानें वागतील तर खात्रीनें त्यांचा नाश होईल. दुसऱ्याचा अपहार मनुष्यानें कधीं करूं नये. हा सनातधर्म आहे. परंतु बलवानांना दुबळ्यांनीं हा धर्म प्रचारांत आणला आहे असें वाटत असतें; परंतु दैव फिरून हे तसे झाले ह्मणजे मग यांना तो आवडूं लागतो. नेहमींच बलवान किंवा नेहमींच सुखी कोणी नाहीं म्हणून मनुष्यांनीं वांकडी बुद्धि कधीं धरूं नये. अशा मनुष्याला दुष्टापासून, चोरापासून किंवा राजापासून कोणापासूनच भीति उरत नाहीं. कोणाला कांहीं इजा न केल्यानें, शुद्ध अंतःकरणानें याला निर्भयपणें रहातां येतें. अरण्यांतून गांवामध्यें हुसकून लावलेल्या हरणाप्रमाणें चोराला प्रत्येकासंबंधानें भिऊन रहावें लागतें. आपण केलेलीं पापकर्में तो दुसऱ्याच्या ठिकाणीं पहात असतो. जो शुद्ध असतो त्याला निर्भयपणें आनंदांत जगांत वावरतां येतें. अशा मनुष्याला आपले दोष दुसऱ्याच्या ठिकाणीं दिसत नाहींत. सर्व प्राणिमात्रांच्या हितामध्यें दक्ष असणाऱ्यांनीं दान करावें असाही धर्म सांगितला आहे; परंतु श्रीमानांना, भिकाऱ्यांनीं हा नियम घालून ठेविला आहे असें वाटत असतें. प-

रंतु दैवानें यांना भिकारपणा आला असतां तेंच त्यांना बरें वाटतें. कायमचा श्रीमान किंवा कायमचा सुखी जगांत कोण आहे ? मनुष्यांना दुसऱ्यांनीं आपल्याशीं जसें वागलेलें आवडत नाहीं तसें त्यापासून आपल्याला किती दुःख होतें हें लक्षांत घेऊन त्यानें दुसऱ्याशीं वागूं नये. जो मनुष्य परस्त्रीचा जार आहे त्याला दुसऱ्यानें तशी गोष्ट केली असतां काय बोलतां येणार ? तथापि असें दृष्टीस पडतें कीं, असा मनुष्यसुद्धां आपल्या स्त्रीचा दुसऱ्या एखाद्याशीं संबंध पाहून तें त्याला सहन होत नाहीं. स्वतः जगावें असें ज्याला वाटतें त्यानें दुसऱ्याला मारून त्याला जगांतून कसें बरें मुकवावें ? आपल्याला जसें वाटतें तसेंच दुसऱ्याला वाटत असेल हें लक्षांत ठेवावें. आपल्याजवळ असलेल्या द्रव्यानें गरीबांचा समाचार घ्यावा. व्याजबट्टा वगैरे करून पैसा वाढविण्याचा उद्देश हाच आहे. ज्या मार्गानें गेल्यानें देवाची भेट होण्याची आशा आहे, त्याच मार्गानें जावें. पैसा मिळाला असतां धर्मामध्यें बुद्धि रहाणें चांगलें. अनुकूल अशा उपायांनीं हेतु साधणें हा धर्म समजला आहे. तेव्हां धर्माधर्मासंबंधानें ही कसोटी लक्षांत ठेवावी. पूर्वी ब्रह्मदेवांनीं सर्व जग एकत्र ठेवण्याची शक्ति देऊन हा धर्म निर्माण केला आहे. भल्याचें चरित्र पुष्कळ सूक्ष्म धर्मांनीं बांधलेलें असतें. ह्मणून शहाण्यानें कधीं वांकडी बुद्धि धरूं नये.'

युधिष्ठिर ह्मणाला, 'आपण ह्मणतां कीं, धर्माचे विचार फार सूक्ष्म आहेत, व पुष्कळ नियमांनीं ते बांधले जात असून भल्यांच्या चरित्रांवरून ते कळण्याजोगे आहेत व त्यांचीं लक्षणें वेदामध्यें सांगितलीं आहेत. परंतु मला यासंबंधानें कांहीं शंका आहे ती मी आपल्याला विचारतों. हे सर्व प्राणिमात्र आपापल्या स्वभावानेंच जन्माला येऊन कांहीं दिवस राहून मरतात; ह्मणून धर्म काय व अधर्म काय हें केवळ शास्त्रावरून ठरवितां येत नाहीं. जो मनुष्य सुस्थितींत असतो त्याचा धर्म निराळा, संकटांत असलेल्याचा धर्म निराळा. संकटें नाना प्रकारचीं असल्यामुळें केवळ शास्त्रावरूनच आपद्धर्म कसे ओळखतां येणार ? भल्यांचें आचरण हा धर्म आहे असें आपण ह्मणतां, परंतु भले तरी कृत्यावरूनच ठरावयाचे असल्यानें यावरूनही धर्मनिर्णय ठरवितां येत नाहीं. असें दृष्टीस पडतें कीं, एखाद्या सामान्य मनुष्याच्या हातून धर्म ह्मणून अधर्म होतो व एखाद्या चांगल्याच्या हातून अधर्माप्रमाणें दिसणारें कृत्य होऊन त्यापासून धर्म साधत असतो; त्याचप्रमाणें वेदाच्या आज्ञाही युगायुगामध्यें निराळ्या होतात. कृतयुगांतले धर्म निराळे, त्रेतायुगांतले निराळे, द्वापारांतले निराळे व कलियुगांतले निराळे. यावरून त्या त्या युगांतल्या मनुष्याच्या शक्तीप्रमाणें त्या त्या युगांतले धर्म ठरविले असावे असें वाटतें. तेव्हां ज्या अर्थी वेदांच्या आज्ञा सर्व कालीं सारख्या लागू पडत नाहींत त्या अर्थी वेदवाक्य प्रमाण हें ह्मणणें केवळ लौकिक अर्थानें आहे व श्रुतीपासूनच स्मृतींचीं उत्पत्ति असून त्यांचा प्रचार फार विस्तारानें आहे. आतां वेद जर प्रमाण असतील तर तें प्रमाणत्व स्मृतीलाही लागू पडलें पाहिजे. कारण स्मृती त्यावर बसविल्या आहेत. परंतु या दोघांमध्यें जेव्हां मेळ पडत नाहीं तेव्हां यांपैकीं एकाला प्रमाणभूत कसें घ्यावें ? त्याचप्रमाणें कांहीं दुष्ट बलवान लोकांनीं आपल्या बलाच्या जोरावर ज्या ज्या संस्था मोडल्या आहेत त्याही त्याबरोबर कायमच्या नाहींशा झाल्या आहेत. आह्माला हें कळो किंवा न कळो, धर्माची गति क्षुरधारेहून बारीक व पर्वताहून मोठी आहे. यज्ञयागादिक कर्मांच्या स्वरूपाचे धर्म आकाशामध्यें असणाऱ्या गंधर्वनगराप्रमाणें प्रथम भव्य दिसतात, परंतु विद्वान लोक त्याचा बारीक विचार करूं लागले ह्मणजे ते नाहींसे होतात, ज्याप्रमाणें गुरें पाणी पिण्याचीं लहान लहान डबकीं व शेताच्या शेजारचे उथळ पाट हीं तेव्हांच आटून जातात त्याचप्रमाणें स्मृतींत सांगितलेले शाश्वतधर्म कमी कमी होत जाऊन पुढें अगदीं दिसेनासे होतात. कांहीं जे भले नाहींत असे लोक सुद्धां कोणी कांहीं इच्छेनें, कोणी कांहीं इच्छेनें धर्माचें ढोंग आणतात. आतां हीं कृत्यें अशा लोकांनीं केलीं ह्मणून धार्मिक नाहींत असें ह्मणतां यावयाचें नाहीं. शिवाय मूर्ख लोक ह्मणतात कीं, धर्म हा उगीच भल्यांच्या ठिकाणीं दिसणारा पोकळ शब्द आहे. ते अशा लोकांची टर करून यांना वेडे समजतात. शिवाय पुष्कळ लोक आप-

त्या वर्णाचा धर्म सोडून राजधर्म स्वीकारतात. तेव्हां असें कोणतेंही वर्तन सर्व जगाच्या हिताचें आहे असें ह्मणतां यावयाचें नाहीं. ज्या एखाद्या प्रकारच्या वर्तनानें एखाद्या मनुष्याला पुण्य लागतें त्याच वर्तनानें दुसऱ्याला पाप लागतें व तिसऱ्याला त्यापासून पापपुण्य कांहींच लागत नाहीं. याप्रमाणें ज्या वर्तनानें एखादा पुण्यवान होतो तेंच दुसऱ्याला बाधक होतें. याप्रमाणें निरनिराळ्या आचारांमध्येंही कांहींच एकपणा नाहीं. पूर्वींच्या विद्वानांनीं ज्याला धर्म ह्मटला आहे तो अजूनही धर्म या नांवाखालीं चालत आहे, आणि त्याच पूर्वींच्या आचारामुळें कायमची संस्था चालत आली आहे.' भीष्म ह्मणाले, 'या संबंधांत जाजली व तुलाधार यांचा संवाद सांगतों ऐक. कोणी जाजली नांवाचे ब्राह्मण स्नान व आचमन यांमध्यें गढून सकाळ संध्याकाळ अग्नीची सेवा करीत घोर तप करीत होते. ते याप्रमाणें वनांत तप करीत राहिले असतां मी मोठा धार्मिक असा कांहीं त्यांना गर्व झाला नाहीं. पावसाळ्यांत ते उघड्या हवेमध्यें पडत. व हेमंत ऋतूमध्यें पाण्यामध्यें असत. उन्हाळ्यामध्यें ते वारा व ऊन सोसून असत. त्यांच्या नाना प्रकारच्या कष्टमय शय्या असून प्रसंगीं ते भूमीवर सुद्धां पडत. याप्रमाणें कोणे एके वेळीं पावसाळ्यांत ते आकाशाखालीं बसले असतां वरचेवर डोक्यावर पाणी पडून त्यांची जटा भिजून तिच्या गांठी गांठी झाल्या होत्या, व नेहमीं रानांत फिरावयाचें असल्यामुळें त्यांच्या अंगावर मळ बसला होता. कोणे एके वेळीं कांहीं न खातां वायु भक्षण करून मोठें तप करीत ते लांकडाप्रमाणें निश्चळ राहिले असतां कुलिंग पक्ष्याच्या जोडप्यानें त्यांच्या डोक्यावर घरटें केलें. त्या दयावान ऋषींनीं गवताच्या काड्यांनीं आपल्या जटेमध्यें त्यांना घरटें करतांना पाहून त्याकडे दुर्लक्ष केलें व पूर्वीप्रमाणेंच अगदीं हालचाल न करतां स्वस्थ होते. याप्रमाणें ते दोन पक्षी मोठ्या विश्वासानें सुखांत राहिले असतां पावसाळा जाऊन हिंवाळा आला. तेव्हां त्यावर बसलेल्या पूर्ण विश्वासामुळें काममोहित होऊन ब्रह्मदेवाच्या प्राजापत्यविधीनें या दोन पक्ष्यांनीं त्यांच्या डोक्यावर अंडीं घातलीं. तेव्हां सुद्धां धर्माकडे लक्ष लागलें असल्यामुळें अगदीं न चळतां अधर्म त्यांनीं मनांत आणला नाहीं. विश्वास वसल्यानें दररोजच्या दररोज येऊन ते पक्षी मोठ्या आनंदानें त्यांच्या डोक्यावर रहात. अंडीं पोसलीं गेल्यावर त्यांतून पिलें बाहेर पडलीं व तीं तेथें वाढलीं तरी पण ते ऋषी त्या अंड्यांचें रक्षण करीत अगदीं हालचाल न करतां स्वस्थ होते. पुढें कांहीं दिवसांनीं तीं मोठीं होऊन त्यांना पंख फुटले तेव्हां त्या पक्ष्यांना पाहून त्यांना मोठा संतोष झाला. याप्रमाणें पिसें फुटल्यावर तीं उडून जाऊन फिरून दररोज संध्याकाळीं त्यांच्या डोक्यावर येऊन बसत. त्यांच्या आईबापांनीं त्यांना सोडलें. सर्व दिवसभर बाहेर राहून संध्याकाळीं ते तेथें राहण्याला येऊं लागले. कधीं कधीं पांच पांच दिवस बाहेर राहून सहाव्या दिवशीं ते येऊं लागले. पुढें त्यांच्या अंगांत सामर्थ्य आल्यानें ते बरेच दिवस परत आले नाहींत. त्यांना जाऊन एक महिना झाला तरी ते परत आले नाहींतसें पाहून जाजलीला आपल्यासंबंधानें आश्चर्य वाटून आपण मोठी सिद्धि मिळविली असा त्यांना गर्व झाला. व याप्रमाणें त्या पक्ष्यांना आपल्या डोक्यावर वाढूं दिल्यानें आपण कोणी मोठे आहों असें वाटून त्यांना मोठा आनंद झाला. पुढें नदीमध्यें स्नान करून अग्नीला आहुती देऊन सूर्याचें उपस्थान केल्यावर त्या पक्ष्यांना डोक्यावर वाढूं दिल्यामुळें त्यांनीं आपण धर्मसंचय केला ह्मणून दंड थोपटून घेतले. तेव्हां, 'धर्मामध्यें तूं त्या तुलाधाराच्या तोडीला लागणार नाहींस, काशीमध्यें तुलाधार ह्मणून मोठा बुद्धिमान आहे तो देखील इतका गर्विष्ठ नाहीं,' अशी आकाशवाणी झाली. ती ऐकून संतापून जाऊन तुलाधाराची गांठ घेण्यासाठीं निघून जेथें संध्याकाळ होईल तेथें मुक्काम करीत बरेच दिवसांनीं ते काशीला येऊन पोहोंचले. तेथें तुलाधार माल विकीत बसलेला त्यांना दिसला. भांडवलाच्या नफ्यावर पोट भरणाऱ्या तुलाधारानेंही त्यांना येतांना पाहून मोठ्या आनंदानें उठून स्वागतपूर्वक त्यांचा सत्कार केला. नंतर तो ह्मणाला, 'आपण निघाला तें मला कळलें. समुद्राच्या कांठीं आपण मोठें तप केलें तरी मी मोठा धार्मिक आहें असा विचार आपल्या मनांत आला

नाहीं. याप्रमाणें तपाची सिद्धि मिळून आपण राहिलां असतां आपल्या डोक्यावर कांहीं पक्षी निपजून वाढले. त्यांना पिसें फुटून चाऱ्यासाठीं जेव्हां ते उडून गेले तेव्हां या पक्ष्यांसंबंधानें मोठा धर्म आपण संपादन केला असा गर्व आपल्या मनांत उत्पन्न झाला. तेव्हां माझ्यासंबंधानें आकाशवाणी झाली ती सहन न होऊन मला भेटण्याला आपण आलां आहां. तेव्हां आपल्या मनांत काय आहे सांगा. ' याप्रमाणें तो तुलाधार बोलला असतां तापसश्रेष्ठ जाजली ह्मणाले. ' तूं सर्व प्रकारचे रस, सुगंधी पदार्थ, वनस्पती, ओषधी व फलमूलें विकणारा असून अशी निश्चयात्मक बुद्धि तुझी कशानें झाली आहे ? ' हें ऐकून सर्व धर्मार्थांचें तत्त्व जाणणारा तो वैश्य तुलाधार ह्मणाला, ' भो ब्रह्मन्, धर्माचें सनातन रहस्य मला ठाऊक आहे. कोणाचें नुकसान न करतां किंवा स्वल्प नुकसानीनें ज्या योगानें रहातां येतें तो श्रेष्ठ धर्म असून तसा मी रहातों. लांकूड व गवत कापून आणून त्यांनीं मीं हें आपलें घर केलें आहे. आळता, पद्मक, केशर त्याचप्रमाणें कमी जास्ती सुवासिक पदार्थ, दारूशिवाय नाना प्रकारचे रस, दुसऱ्याकडून विकत घेऊन तेही ठकबाजी न करतां मी विकतों. जो सर्वांचा मित्र असून कायावाचामनानें दुसऱ्याच्या हितामध्यें गढलेला असतो, त्यालाच धर्मतत्त्व कळलें ह्मणावयाचें. मी कोणाची कास धरीत नाहीं किंवा कोणाशीं वैर करीत नाहीं. कोणी मला हवासा नाहीं किंवा कोणी नकोसा नाहीं. मी सर्वांच्या ठिकाणीं सारखा असून माझी तागडी सर्वांना सारखी आहे. दुसऱ्याच्या कृत्यांची मी स्तुति किंवा निंदा करीत नाहीं. आकाशाप्रमाणें मी जनवैचित्र्य पहात रहातों. सोनें व ढेंकूळ मी सारखीं लेखतों. ज्यांचीं इंद्रियें देवानें बंद केलीं आहेत अशा प्रकारचे आंधळे, बहिरे वगैरे लोक ज्याप्रमाणें समाधानानें असतात तसा मी असतों. जसे ह्मातारे, रोगी व कृश लोक विषयासंबंधानें निस्पृह असतात त्याप्रमाणें पैशासंबंधानें व इतर विषयोपभोगासंबंधानें मी निरिच्छ असतों. ज्या मनुष्याला कोणापासून भीति नसते व कोणाला ज्यापासून भीति नसते व जेव्हां हा काया वाचा मनानें कोणासंबंधानें पापबुद्धि ठेवीत नाहीं तेव्हां मनुष्याला ब्रह्मप्राप्ति होते. ज्याला भूत, भविष्य किंवा धर्म कशाची पर्वा नसून जो सर्वांना अभय देणारा आहे त्याला निर्भय असें स्थान मिळतें. उलट ज्याच्या निष्ठुर शब्दानें किंवा कडक वर्तनानें लोक त्याला भितात त्याला मोठी भीति असते. जे आपल्या पुत्रपौत्रांनिशीं धर्मशास्त्रांत सांगितल्याप्रमाणें वागून रहातात, अशा पीडापराङ्मुख महात्म्यांचें वर्तन डोळ्यांपुढें ठेवून मी वागत असतों. **कांहीं मूर्ख लोक धर्मशास्त्रामध्यें कांहीं व्यंग काढून अजीबातच तो सोडून देतात. परंतु आत्मनिग्रही शहाणे असतात ते त्यांत दिसून येणारा गौण भाग सोडून बाकी त्याप्रमाणें वागून मोक्ष मिळवितात.** जो मनुष्य इंद्रियनिग्रह करून परपीडाबुद्धि टाकून देऊन भले वागतात तसें वागतो त्याला तात्काळ उत्तम धर्मफल मिळतें. नदीमध्यें ज्याप्रमाणें वहात चाललेलीं लांकडें सहजगत्या एकमेकांशीं जुळून फिरून तशींच सहजगत्या वेगळीं होतात; ज्याप्रमाणें गवत, काटक्या, शेणी एकमेकांशीं एकत्र होतात; त्याप्रमाणें ह्या संसारामध्यें बायकामुलांचा संबंध सहजगत्या घडून येत असून त्याला कांहीं विशेष कारण नसतें. ज्याच्यापासून कोणाला कशाही प्रकारच्या भीतीचें कारण उरत नाहीं तो सर्व प्राणिमात्रांपासून निर्भय असतो. लांडग्याप्रमाणें ज्यापासून सर्व लोक कांपत असतात त्याला वडवानलापासून भिऊन तीरावर धांव घेणाऱ्या जलचराप्रमाणें सर्वांपासून भ्यावें लागतें. हा कोणाला पीडा न करण्याचा धर्म अशाप्रकारें अस्तित्वांत आला असून मनुष्यानें आपल्या शक्त्यनुसार तो अनुसरावा. ज्याला साह्य असून ज्याच्याजवळ पैसा आहे, त्यानें तर हा आदरून पाळावा. हा खात्रीनें वैभव व स्वर्ग देणारा आहे. दुसऱ्याचें संकट दूर करण्याचें सामर्थ्य असल्यामुळें धनवान व त्यांचे साह्यकर्ते यांना विद्वान श्रेष्ठ समजतात. सामान्य सुखाच्या मार्गे लागलेले लोक हा धर्म कीर्तीसाठीं ह्मणून पाळतात; परंतु विद्वान लोक हा मोक्षासाठीं पाळतात. तप, यज्ञ, दान, सत्य भाषण, विद्वानांकडे लक्ष इत्यादिकांनीं जें फळ मिळतें तें फळ अभयदानानें मिळत असतें. जो ह्या जगामध्यें सर्व लोकांना अभयदक्षिणा देतो त्याला सर्व

यज्ञ केल्याचें पुण्य मिळून उलट अभयदक्षिणा मिळते. अहिंसेहून चांगला असा दुसरा धर्मच नाहीं. ज्याच्यापासून कोणाला भीति नाहीं त्याला कोणापासून भीति उरत नाहीं. घरांत असलेल्या सापाप्रमाणें ज्याला सर्व लोक कांपतात, त्याला इहलोकीं किंवा परलोकीं कोठेंच धर्मफल मिळत नाहीं. सर्व स्थितींतून पार पडून जो सर्वांचा आत्मभूत आहे व सर्वांना जो आपल्या ठिकाणीं पहातो अशाच्या पावलांमागें लागलेल्या देवांना देखील त्यांच्या पावलांचा माग लागत नाहीं. अभयदान हें सर्व दानांमध्यें श्रेष्ठ दान आहे, हें पक्कें लक्षांत ठेवा. जो सकाम कर्माच्या मागें लागतो त्याला प्रथम वैभव मिळतें; परंतु फिरून कर्मफल संपल्यावर आपत्तींत पडावें लागतें. कर्मनाश लक्षांत घेऊन शहाणे लोक कांहीं कर्में चांगलीं ह्मणत नाहींत. उद्देशावांचून असणारा असा एकही धर्म नाहीं. हा धर्म फार सूक्ष्म आहे. वेदांत सांगितलेले हे धर्म ब्रह्मप्राप्तीसाठीं तसेच स्वर्गासाठीं आहेत. या आचाराचीं रहस्यें अनेक आहेत. तीं इतकीं सूक्ष्म आहेत कीं, तीं कोणाला पूर्णपणें कळत नाहींत. नाना प्रकारच्या परस्परविरोधी धर्मांमध्यें भल्यांच्या आचारावरून कांहीं थोड्यांनाच धर्मतत्त्व खरें उमगतें. जे बैलाचे अंड वडवितात, नाकाला भोंक पाडतात, त्यांना ओझें वहावयास लावतात किंवा त्यांना बांधतात किंवा जेर आणतात, त्याचप्रमाणें जे प्राण्यांला मारून खातात किंवा मनुष्यालाच मनुष्य गुलाम करतात व मारतात किंवा कैदेंत टाकतात, त्यांची कधीं कोणीं निंदा केली आहे काय? या मारण्यामध्यें किंवा बांधण्यामध्यें त्याला होणाऱ्या दुःखाचा कधीं कोणीं विचार केला आहे काय? पंचेंद्रियांनीं युक्त अशा सर्व भूतमात्रांच्या ठिकाणीं सर्व देवता रहात असतात. सूर्य, चंद्र, वायु, ब्रह्म, प्राण, यज्ञ, यम हे सर्व प्राणिमात्रांच्या ठिकाणीं रहात असतात. तर अशा सजीव प्राण्यांना मारण्यामध्यें सुद्धां जेव्हां कांहीं विचार नसतो तेव्हां मेलेल्या प्राण्यांना विकण्यासंबंधीं विचार हावा कशाला. बकरा हा अग्नि असून मेंढा वरुण आहे. घोडा सूर्य असून पृथ्वी विराट आहे. गाय आणि वांसरूं हीं सोम आहेत. यांना विकणाऱ्यांना कधीं सिद्धि मिळणार नाहीं. तेल, तूप, मध, ओषधी विकण्यामध्यें काय मोठा दोष आहे? ज्या ठिकाणीं चिलटें व दुसऱ्या प्रकारचे त्रासदायक प्राणी नाहींत अशा ठिकाणीं सुखांत वाढलेल्या त्यांच्या आयांच्या लाडक्या पशूंना लोक धरून चिलटांनीं भरलेल्या चिखलवट प्रदेशांत घेऊन जातात व नाना प्रकारें त्यांचा छल करतात. पुष्कळांना ओझ्याखालीं चिरडून टाकतात व कित्येकांना शास्त्रांत सांगितलें नाहीं अशा प्रकारें निष्ठुरतेनें वागवून मारतात. अशा प्रकारचें कृत्य भ्रूणहत्येहून कमी नाहीं. लोक शेती चांगली ह्मणतात; पण तीही फार भयंकरच आहे. लोखंडी फाळ लावलेल्या नांगरानें जमिनीला त्याचप्रमाणें तींत असणाऱ्या अनेक प्राण्यांना दुखवावें लागतें. नांगराला जुंपलेल्या बैलांकडे कधीं कोणीं लक्ष दिलें आहे काय? श्रुतीमध्यें गाईंना मारूं नये असें सांगितलें आहे. ह्मणून जे गाय किंवा बैल यांना मारतात ते मोठें वाईट काम करतात. पूर्वी नहुष राजाला ब्राह्मण ह्मणाले होते कीं, 'सर्वांची माता जी गाय व प्रजापती जो बैल त्याला मारून तूं निंद्य कृत्य केलें आहेस. तुझ्यामुळें आह्मांला त्रास होणार.' असें ह्मणून नाहुषाला त्या पापापासून मुक्त करण्यासाठीं त्या पापाचे एकशें एक रोगरूपी तुकडे करून ते सर्व प्राणीमात्रांमध्यें सोडून दिले व, 'भ्रूणहत्या करणाऱ्या तुझ्या घरीं आह्मी होम करणार नाहीं,' असें ह्मणून पुढें ध्यानानें विचार करून पाहिल्यावर त्यानें बुद्धिपुरःसर ते मारले नाहींत असें जाणून ते शांत झाले. अशा प्रकारचे दुष्ट व भयंकर आचार जगांत चालू असून केवळ प्रचारांत आहेत ह्मणूनच त्यांचें स्वरूप आपल्या लक्षांत येत नाहीं. स्वतःच्या बुद्धीनेंच जो योग्य दिसेल तो धर्म मनुष्यानें पाळावा. उगीच डोळे मिटून लोक वागतात तसें वागूं नये. जो मला मारील किंवा जो माझी स्तुति करील त्या दोघांनाही मी सारखेंच लेखतों. हाच विद्वन्मान्य धर्म भले लोक नीट विचार करून पाळतात.

जाजली ह्मणाले, 'तूं जो हा धर्म सांगतोस हा धर्म सर्वांना स्वर्गाचें द्वार बंद करतो; एवढेंच नव्हे तर उदरनिर्वाहाच्या साधनांच्या सुद्धां आड येतो. अन्न हें शेतीपासूनच मिळत असून तूं सुद्धां शेतीवरच जगला आहेस. पशू, व वनस्पती यांवर मनु-

ध्यें जगतात व यांपासूनच यज्ञ होतात. तुझें हें मत नास्तिकपणाचें आहे. उदरनिर्वाहाचें साधनच सोडून दिलें तर जगच नाहींसें होईल.' तुलाधार ह्मणाला, 'मनुष्यानें कशावर रहावें हें आतां सांगतों ऐका. मी नास्तिक नाहीं व यज्ञाची मी निंदा करीत नाहीं. यज्ञाचें तत्त्व कळणारा मनुष्य सांपडणें फार कठिण आहे. त्या ब्राह्मणयज्ञाला त्याचप्रमाणें ज्यांना यज्ञ कळला आहे अशांना माझा नमस्कार असो. या ब्राह्मणांनीं आपला यज्ञ टाकून देऊन क्षत्रियांचा यज्ञ उचलला आहे. पुष्कळ लोभी, पैशाच्या मागें लागलेल्या भोळ्या लोकांनीं वेदाचा खरा अर्थ न कळतां खऱ्याप्रमाणें दिसणारा, 'हें द्यावें, तें द्यावें, हेंही द्यावें, ह्मणूनच सांगितलें आहे,' अशा प्रकारें खोटा धर्म प्रचारांत आणला आहे व यामुळेंच चोरी व भलतीं सलतीं कामें प्रचारांत येतात. सचोटीनें मिळवून दिलेल्या हवीनें देव संतुष्ट होतात. धर्मशास्त्राचा याला आधार आहे कीं, नमस्कार, हवि, वेदाध्ययन किंवा ओषधी यांनीं देवांचा सत्कार होतो. मूर्खांच्या धर्मकृत्यापासूनच त्यांत सकामता असल्यामुळें दुष्ट संतति उत्पन्न होते. लोभ्यापासून लोभी संतति उत्पन्न होते, व सर्वांशीं सारखेपणानें असणाऱ्यापासून तशाच प्रकारची प्रजा उत्पन्न होते. यज्ञ करणारा व ऋत्विज हे जर यज्ञ करतांना फलेच्छा धरतील तर त्यांची संतति तशीच उत्पन्न होते. आकाशापासून पडणाऱ्या स्वच्छ पाण्याप्रमाणें निष्काम यज्ञापासून चांगली संतति उत्पन्न होते. अग्नींत टाकिलेल्या आहुती वर सूर्याकडे जातात आणि सूर्यापासून पाऊस पडतो, पावसापासून अन्न उत्पन्न होतें व अन्नापासून प्रजा उत्पन्न होते; ह्मणून पूर्वी निष्ठावान लोकांच्या सर्व इच्छा पूर्ण होत होत्या. भूमि मशागत केल्यावांचून धान्य देत असे, व केवळ इच्छेनेंच ओषधी उत्पन्न होत असत. पूर्वींचे लोक फलेच्छेनें कधीं यज्ञ करीत नव्हते व आपण फल भोगलें पाहिजे असेंही त्यांना कधीं वाटत नव्हतें. जे साशंक मनानें कसा तरी यज्ञ करतात ते पुढच्या जन्मीं अप्रामाणिक, लुच्चे, लोभी, पैशाला हापापलेले असे जन्माला येतात. जो कुतर्कानें सर्व शास्त्रांतील प्रमाणें वाईट ह्मणून प्रतिपादितो तो या पापकृत्याबद्दल पातकी लोकांना मिळणाऱ्या लोकाला जातो, किंवा त्याला येथेंच रखडावें लागतें. वेदांत सांगितलेलीं नित्यकृत्यें जो अवश्य समजतो व तीं एखादे वेळीं न झालीं असतां ज्याच्या मनाला चटपट लागते व सर्व यज्ञसाधनें ब्रह्मस्वरूपी समजून जो कर्तृत्वाचा अभिमान स्वतःकडे ठेवीत नाहीं तो खरा ब्रह्मवेत्ता असून अशाचीं कृत्यें अपुरीं राहिलीं किंवा त्याला अनेक प्रकारें अडथळे आले तरी तीं अपुरीं राहिलेलीं कर्में सुद्धां विशेष समजलीं पाहिजेत. आतां उलट, हीं कृत्यें फलाच्या इच्छेनें होत असून जर त्याला मध्यें अडथळा आला तर मग मात्र प्रायश्चित्ताची जरूर पडते. जे लोक सर्व प्रकारच्या ऐहिक विषयांवरील लोभ सोडून मोक्षप्राप्तीकडे लक्ष देऊन निर्मत्सरपणें उद्यांची काळजी न करतां रहातात, असे लोक सत्ययज्ञ, किंवा इंद्रियनिग्रहरूपी यज्ञ करून असतात. ज्यांना देह व आत्मा यांमधील भेद कळला आहे असें प्रणवाचें ध्यान करीत रहाणाऱ्या योगाकडे लागलेल्या लोकांपासून दुसऱ्याला देखील संतोष होतो. विश्वामध्यें भरून असणारें जें हें प्रणवरूपी ब्रह्म सर्व देवतांमध्यें आहे तेंच ब्रह्मवेत्त्यामध्यें असल्यामुळें जेव्हां असा मनुष्य तृप्त असतो तेव्हां त्याबरोबर सर्व देवताही तृप्त असतात. सर्व रसांची गोडी चाखून तृप्त झालेल्या मनुष्याला ज्याप्रमाणें कोणत्याही एखाद्या विशेष रसाची गोडी वाटत नाहीं, त्याचप्रमाणें ब्रह्मज्ञानानें परिणामीं सुखदायक अशी नित्यतृप्ति रहाते. जे हे शहाणे लोक धर्माचे आधार असून धर्मांतच आनंद मानून रहातात त्यांना काय करावयाचें व काय करावयाचें नाहीं याबद्दल खात्रीचें ज्ञान असतें. अशा प्रकारचा मनुष्य जगांतील सर्व वस्तु आपल्यापासूनच उत्पन्न झाल्या आहेत असें समजत असतो. ज्या कांहीं थोड्या ज्ञानी लोकांना पैलपार जाण्याची इच्छा असते, असे थोडे सात्विक लोक जो मोठा सुखदायक असून पुण्यकारक आहे, ज्या ठिकाणीं पुण्यवान लोक रहातात व जेथें दुःख ह्मणून ठाऊक नसल्यानें पुनर्जन्मही ठाऊक नाहीं अशा ब्रह्मलोकाला जातात. अशांना स्वर्गाची इच्छा नसते. द्रव्यद्वारा ते ब्रह्माचें यजन करीत नाहींत. भल्यांच्या वाटेनें जाऊन ज्यामध्यें कोणत्याही प्राण्याची हिंसा नसते, असा यज्ञ

ते करतात. झाडें, वनस्पती, फलमूलें हेच हवि त्यांच्या यज्ञाला ठाऊक असतात. पैशासाठीं हापापलेले ऋत्विज अशांचा यज्ञ चालवीत सुद्धां नाहींत. अशा अहिंसात्मक यज्ञ करणाऱ्यांना जरी कांहीं करावयाचें उरलें नसतें तरी सर्वांच्या कल्याणाच्या बुद्धीनें ते हा यज्ञ करतात व त्यामध्यें स्वतःच यज्ञ सामुग्री बनतात. ह्मणून जे लोभी ऋत्विज आहेत, ते मूर्खपणानें मुक्तीकडे न लागतां स्वर्गप्राप्तिसाठीं जे यज्ञ करतात, अशांचाच यज्ञ चालवितात; परंतु जे निष्काम बुद्धीनें कर्मे करणारे असतात अशा प्रकारचे साधू आपल्या धर्माचरणानेंच लोकांना स्वर्गाला पोहोंचवितात. हे दोन्ही प्रकार लक्षांत घेऊन मी हिंसा सोडून देऊन सर्वांच्या ठिकाणीं समबुद्धि ठेविली आहे. जे बुद्धिमान या जगीं सकाम व निष्काम यज्ञ करतात ते दोघेही देवमार्गानें जातात; परंतु पहिल्यांना गेलेल्या लोकांतून परत यावें लागतें व दुसऱ्यांना यावें लागत नाहीं. याप्रमाणें दोघांच्या फलामध्यें हा भेद आहे. अशा लोकांसाठीं बैल आपण होऊन जुंवाला मान देतात किंवा ओझीं वहातात व गाईच्या स्तनांतून यांच्या मनांत आल्याबरोबर आपोआप दूध गळूं लागतें. केवळ मनानेंच सर्व यज्ञसामुग्री उत्पन्न करून असे लोक पुष्कळ प्रकारचे यज्ञ करतात व अशांनीं वेळीं हिंसा केली असतां सुद्धां तें बाधक होत नाहीं; परंतु ज्यांची बुद्धि अशी झाली नाहीं त्यांनीं 'वनस्पती व ओषधी यांच्या साह्यानेंच यज्ञ करून त्यामध्यें प्राण्यांना मारूं नये. त्यागामध्यें अशा प्रकारचा गुण असल्यानें तो डोळ्यांपुढें ठेवून मी बोलत आहे. ज्यानें सर्व वासना सोडून दिल्या आहेत, जो ऐहिक कृत्यें आदरून करण्याच्या भानगडींत पडत नाहीं, जो कोणापुढें वांकत नाहीं, कोणाची स्तुति करीत नाहीं व ज्याला कर्मे कमीं पडलीं तरी तो कमीपणां भासत नाहीं त्यालाच देव ब्राह्मण ह्मणतात. जो दुसऱ्याला वेद ह्मणून दाखवीत नाहीं, यज्ञ वरोबर करीत नाहीं, योग्य ब्राह्मणांना दक्षिणा देत नाहीं व काम्य वृत्तीच्या मार्गे लागतो, तो वाईट गतीला मिळतो. त्यागासंबंधी कर्तव्यें पूर्ण ओळखल्यानें मनुष्याला खात्रीनें ब्रह्मप्राप्ति होते.' जाजली ह्मणाले, 'जे केवळ मनोयज्ञ करतात, अशा मुनींचें रहस्य आजपर्यंत माझ्या ऐकण्यांत आलें नव्हतें. हीं रहस्यें कळण्याला फार कठीण आहेत ह्मणून तीं तूं मला सांग. पूर्वींचे ऋषी या मताला अनुसरत नव्हते. त्यांच्यामागून आलेल्या ऋषींनीं हीं तत्वें सामान्य रीतीनें पाळण्याचीं ह्मणून सांगितलीं नाहींत. केवळ पशुवृत्तीच्या लोकांना या आत्मतीर्थाच्या ठिकाणीं यज्ञ करणें साधावयाचें नाहीं, असें जर तुझें ह्मणणें असेल तर यांना श्रेष्ठ सुख कशानें मिळेल?' तुलाधार ह्मणाला, 'कधीं कधीं लोकांनीं केलेल्या कांहीं यज्ञांना त्यामध्यें त्यांचा विश्वास नसल्यानें यज्ञत्व येत नाहीं. असे लोक मानसिक किंवा बाह्य कशाच प्रकारचे यज्ञ करण्याला पात्र नसतात. ज्यांचा विश्वास आहे त्यांना एकटी गाय तूप, दूध, दहीं, केंस, शिंगें व खूर इत्यादि साधनांनीं सर्व यज्ञसामुग्री पुरविण्याला बस्स होतें. वेदामध्यें अविवाहिताला यज्ञ करतां येत नाहीं असें सांगितलें आहे, तरी वर सांगितल्या प्रकारचा अहिंसात्मक यज्ञ करण्याला श्रद्धेलाच बायको समजून अशा प्रकारच्या अहिंसात्मक आहुती देतां येतात. अशा प्रकारच्या यज्ञासंबंधानें आदर ठेवून मनुष्याला ब्रह्मप्राप्ति होते. सर्व प्राण्यांपेक्षां पुरोडाश फार पवित्र मानला आहे. सर्व नद्या सरस्वतीसारख्या असून सर्व पर्वत पवित्र आहेत; एवढेंच नव्हे तर हा आत्माच उत्तम तीर्थ आहे. ह्मणून त्यासाठीं सर्व जगभर भटकत बसण्याचें कारण नाहीं. व मनुष्याला हा अहिंसात्मक धर्म पाळून व आपल्या शक्तीप्रमाणें धर्मसंचय करण्यास प्रयत्न करून मेल्यावर उत्तम लोक मिळवितां येतात. कशा प्रकारच्या मनुष्यांनीं हा धर्म पाळला आहे, हें प्रत्यक्ष पाहून कळणार आहे. हे आपल्या डोक्यावर वाढलेले पक्षी, ससाणे वगैरे दुसऱ्या पक्ष्यांमध्यें वर आकाशांत उडत आहेत. पिसें व पाय आखडून घेऊन आपापल्या घरट्यांमध्यें शिरण्याच्या हे तयारींत आहेत. आपण वाढविल्यामुळें बापाप्रमाणें आपल्यावर प्रेम दाखवीत आहेतसें दिसतें. तेव्हां यांना हांक मारा.' हें ऐकून जाजलींनीं हांक मारल्याबरोबर त्यांच्या पूर्वीच्या अहिंसात्मक धर्माला स्मरून त्यांनीं अनुकूल उत्तर दिलें. असें अहिंसात्मक केलेलें प्रत्येक कर्म मनुष्याला इहपरलोकीं उपयोगीं पडतें. हिंसात्मक कृत्यांनीं मनुष्याचा वि-

श्वास उडतो, व याप्रमाणें विश्वास नाहींसा झाल्यानें मनुष्याचा नाश होतो. लाभालाभ सारखा मानून आत्मनिग्रहानें श्रद्धापूर्वक शांत मनानें कर्तव्य म्हणून जे यज्ञ करतात, त्यांचा तो यज्ञ फलदायक होतो. श्रद्धा ही सूर्याची मुलगी आहे. ती रक्षण कर्त्री असून उत्तम फल प्रसवणारी आहे. वेदाध्ययन व ध्यान यांपासून मिळणाऱ्या पुण्याहून ती श्रेष्ठ आहे. मनाच्या किंवा वाणीच्या चुकीनें उणें पडलेलें कृत्य श्रद्धा भरून काढते. या संबंधानें पुढील वाक्य विद्वानांनीं म्हणून ठेविलें आहे. 'जो मनुष्य शरीरानें व कृतीनें शुद्ध असून श्रद्धावान नाहीं अशाच्या यज्ञांतील हवि व शरीरानें व कृतीनें अशुद्ध असून जो श्रद्धाळू आहे, त्याच्या यज्ञांतील हवि हे दोन्ही देव सारखेच समजतात; त्याचप्रमाणें वेदज्ञान असून जो कृपण आहे व देवघेव करणारा असून जो उदार आहे यांचें अन्नही ते सारखेंच समजतात.' परंतु या त्यांच्या समजामध्यें देखील चुकी आहे, असें ब्रह्मदेवांनीं त्यांना दाखवून दिलें. ते म्हणाले, 'जो उदार आहे त्याचें अन्न श्रद्धेनें पवित्र होतें; परंतु ज्याला श्रद्धा नाहीं अशाचें अन्न त्या अश्रद्धेमुळें कुचकामीं ठरतें. उदार बुद्धीच्या देवघेव करणाराचें अन्न घ्यावें; परंतु कृपणाचें अन्न कधीं घेऊं नये. या जगामध्यें फक्त एक अश्रद्धाळू मनुष्य हवि देण्याला अयोग्य आहे व अशानें दिलेला हवि घेऊं नये. अश्रद्धा हें मोठें पाप असून श्रद्धा सर्व पापांचें क्षालन करणारी आहे. साप कात काढून टाकतो त्याप्रमाणें श्रद्धा त्याचें सर्व पाप दूर करते. सर्व पवित्र गोष्टींमध्यें श्रद्धेसह निवृत्तिमार्ग श्रेष्ठ आहे. सर्व वर्तनांमधील दोष दूर करून असणारा श्रद्धावान मनुष्य नेहमीं पवित्रच असतो; त्याला तप, वर्तन किंवा क्षमाशीलता यांची गरज नाहीं. प्रत्येक मनुष्य श्रद्धामय आहे आणि सत्व, रज, तम अशा त्रिगुणात्मक श्रद्धेपैकीं ज्याची जशी श्रद्धा असते तो तसा असतो. धर्माचा अर्थ कळणाऱ्या भल्यांनीं हा अशा प्रकारचा धर्म सांगितला आहे. तेव्हां श्रद्धा ठेवल्यानें श्रेष्ठ ब्रह्मपद मिळेल. ज्याला श्रद्धा आहे व जो त्याप्रमाणें वागतो तोच खरोखर धर्मज्ञ समजला पाहिजे. जो आपल्या वाटेनें चालतो तो सर्वांत श्रेष्ठ आहे.'

याप्रमाणें तुलाधाराचें व जाजलींचें भाषण होऊन दोघेही स्वर्गाला जाऊन ज्याच्या त्याच्या पुण्याप्रमाणें स्थान मिळून सुखांत राहिले. या तुलाधाराला अहिंसाधर्म पूर्ण कळत होता, व शाश्वत धर्म त्यानें याप्रमाणें जाजलींना सांगितला व तो ऐकून जाजलींनाही शांति मिळाली. याचसंबंधांत विचख्नूचे सर्व भूतांवरील त्यांच्या दयेमुळें निघालेले पुढील उद्गार लक्षांत ठेवण्याजोगे आहेत. यज्ञमंडपांतील पशु मारण्याच्या ठिकाणीं बैलाचे छिन्नभिन्न झालेलें शरीर त्याचप्रमाणें पशूचे दीनस्वर ऐकून व त्या ठिकाणीं त्यांना मारण्यासाठीं जमलेल्या ब्राह्मणांना पाहून गाईचें कल्याण असो असे आशिर्वादात्मक शब्द त्याच्या तोंडून निघाले, आणि त्यावेळीं ते असेंही म्हणाले कीं, मर्यादा उल्लंघन करून वागणारे जे मूर्ख नास्तिक आहेत व ज्यांना यज्ञयागादिक धर्मकृत्यांनीं कीर्ति मिळवावी अशी हांव असते तेच यज्ञामध्यें पशुवधाचें महत्व गातात. सर्व कर्मांमध्यें अहिंसा श्रेष्ठ आहे, असें प्रत्यक्ष धर्मात्म्या मनूचें म्हणणें आहे. यज्ञामध्यें केवळ फलेच्छेनें लोक पशूंना मारतात म्हणून पशूंना मारणें किंवा न मारणें याच्या संबंधानें आधार पाहून मग मनुष्यानें खरा धर्म जो असेल तो पाळावा. कारण हा धर्म फार सूक्ष्म आहे. सर्व प्राणिमात्रासंबंधानें अहिंसा ठेवणें हा सर्वांत श्रेष्ठ धर्म आहे. मनुष्यानें गृहस्थाश्रम सोडून गांवाच्याजवळ राहून संन्यास घेऊन कडक नियम पाळीत वेदांत सांगितलेल्या कृत्यांच्या फलाकडे दुर्लक्ष करावें. जे कृपण आहेत तेच फलाची इच्छा धरतात. मोठ्या धार्मिकपणानें यज्ञ, झाडें, व यूप यांचीं नांवें घेऊन लोक यज्ञासाठीं म्हणून तयार न केलेले मांस खाऊं नये म्हणतात. परंतु हा कांहीं मोठा प्रशंसनीय धर्म नाहीं, कारण कशाही प्रकारचें हिंसात्मक मांस खाऊं नये. मद्य, मासे, मध, मांस, अमली दारू, तिळभात हे पदार्थ लुच्चे लोकांनीं प्रचारांत आणले आहेत. यज्ञामध्यें यांचा उपयोग वेदांत सांगितला नाहीं. मान, मोह व लोभ यामुळें यांची हांव सुटते. जे खरे ब्राह्मण आहेत त्यांना सर्व यज्ञामध्यें विष्णु दिसतो. पायस, वेदांत सांगितलेल्या झाडांचीं फलपुष्पें त्याचप्रमाणें योग्य अशीं सांगितलेलीं कर्में यांनीं शुद्ध

अंतःकरणानें सर्व लोकांनीं याची पूजा करावी.'

## १८८ चिरकारींची गोष्ट–विचार.
## ( १२. २६६. )

युधिष्ठिर ह्मणाला, 'हें शरीर व नाना प्रकारच्या आपदा यांमध्यें नेहमीं भांडण आहे. तेव्हां ज्यानें हिंसा अगदीं सोडून दिली आहे व जो त्यामुळें कांहींच करीत नाहीं, त्याची शरीरयात्रा तरी कशी चालेल?' भीष्म ह्मणाले, 'ज्याच्या योगानें शरीर न सुकतां मृत्यूच्या तावडींत जाणार नाहीं अशा रीतीनें कर्म करीत राहून सामर्थ्याप्रमाणें धर्माचरण करावें.' या संबंधांत आंगिरसांच्या कुळांतील चिरकारीची गोष्ट ऐक. पुष्कळ वेळ विचार करून कोणतेंही काम करणाऱ्या शहाण्या मनुष्याच्या हातून कोणतीही चूक घडत नाहीं. गौतम ऋषींचे कोणी मोठे शहाणे चिरकारी नांवाचें मुलगे होते. ते सर्व कामें चिरकाल विचार करून करीत असत. त्यांना विचाराला फार वेळ लागे. जागत तर जागतच, झोंप तर झोंपच घेत किंवा एखाद्या कामाचा विचार तर विचारच करीत ते फार वेळ बसत; ह्मणून त्यांना चिरकारी असें नांव मिळालें होतें. तसेंच लोकांत आळशी ह्मणून त्यांना टोपण नांव मिळालें असून कोत्या बुद्धीचे अदूरदर्शी लोक त्यांला मूर्ख ह्मणत. कोणे एके वेळीं आपल्या बायकोच्या हातून व्यभिचार घडला असतां इतर मुलांना सोडून गौतमांनीं विचार न करतां यांना तिला ठार मारण्यास सांगून ते वनाला निघून गेले. यांच्या स्वभावामुळें पुष्कळ वेळानें बरें असें ह्मणून पुष्कळ वेळ ते त्यावर विचार करीत राहिले. ते आपल्या मनाशीं विचार करूं लागले कीं, 'पित्याची आज्ञा कशी पाळूं व आईला तरी कसें न मारतां ठेवूं ? दुष्ट मनुष्याप्रमाणें या परस्परविरोधीधर्मामध्यें मी कसा पापांत बुडणार नाहीं ? बापाची आज्ञा पाळणें हा श्रेष्ठ धर्म आहे; तसेंच आईचें रक्षण करणें हा मुलाचा धर्म आहे. मुलाचें जीवित स्वतंत्र नाहीं. कशानें मला पश्चात्तापाला कारण उरणार नाहीं ? स्त्रीला विशेषें करून आईला मारून कोण बरें सुखी होईल ? तसेंच इकडे बापाची आज्ञा मोडून तरी काय प्रतिष्ठा मिळेल ? बापाची आज्ञा पाळणें अवश्य असून आईचें रक्षण करणें हेंही कर्तव्य आहे. तेव्हां कसें वागल्यानें या दोन्ही कर्तव्यांना जागल्याप्रमाणें होईल; कारण बाप हा स्वतःलाच बायकोच्या गर्भामध्यें ठेवून घेऊन शील, चरित्र, गोत्र व कुल चालू ठेवण्यासाठीं मुलगा ह्मणून जन्म घेतो. त्या मला बापानें त्याचप्रमाणें आईनें मुलगा ह्मणून उत्पन्न केलें आहे. याप्रमाणें आपल्या उत्पत्तीचें ज्ञान असून हें मी कसें बरें न ओळखावें ? जातकर्माच्या वेळीं व पुढें गुरूपासून परत आल्यावर होणाऱ्या संस्काराचे वेळीं बाप जे मंत्र उच्चारतो ते, त्याला मान किती द्यावा हें बरोबर ठरविण्याला पुरे आहेत. मुलाला वाढवून वेदाध्ययन सांगण्याच्या कामीं बाप हा सर्वांहून श्रेष्ठ गुरु आहे. बाप जें सागतो तो सर्वांत श्रेष्ठ धर्म आहे असें प्रत्यक्ष वेद ह्मणतात. बापाला मुलगा नुसता आनंद देणारा आहे; परंतु मुलाला बाप सर्वस्व आहे; कारण शरीरादि सर्व गोष्टी त्याला बापापासूनच मिळतात; ह्मणून बापाचें वचन ऐकलें पाहिजे. त्यासंबंधानें विचार करतां कामां नये. बापाची आज्ञा पाळणाऱ्याचीं सर्व पापें नाहींशीं होतात. सर्व भोग्य वस्तू, खाण्याचे पदार्थ, वेदाचें शिक्षण आणि जगाचें ज्ञान त्याचप्रमाणें मुलाच्या जन्माच्या पूर्वींचे गर्भाधान व सीमंतोन्नयन हे संस्कार बापापासून मिळत असतात. बाप हाच धर्म असून बाप हाच स्वर्ग आहे. व बाप हेंच श्रेष्ठ तप आहे. बाप संतुष्ट झाला असतां सर्व देवता संतुष्ट होतात. बापानें उच्चारलेले मुलासंबंधाचे सर्व मंत्र त्याला आशिर्वाद होतात व त्याचे अभिनंदनपर उच्चारलेले शब्द याला सर्व पापांतून मुक्त करतात. फुलें देंठापासून व फळें झाडापासून गळून पडतात; परंतु बापाला कितीही कष्ट झाले तरी पितृप्रेमामुळें तो मुलाला सोडीत नाहीं. याप्रमाणें मुलाच्या बापावरच्या पूज्य भावासंबंधानें विचार झाला. बाप कांहीं सामान्य नाहीं. आतां आईसंबंधानें विचार केला असतां मनुष्यपणामुळें जीं पंचभूतें माझ्यामध्यें एकत्र मिळालीं आहेत त्याला अग्नी उत्पन्न करण्याला कारण जसा अरणी असतो त्याप्रमाणें ती कारण आहे. या देहाला उत्पन्न करणारी ही अरणीरूपी असून सर्व संकटांमध्यें ही

सुखाची खाण आहे. आईमुळेंच मनुष्य सनाथ होत असून ती नसेल तर तो अनाथाप्रमाणें असतो. मनुष्याजवळ पैसा नसला तरी ज्याला घरीं शिरून आई ह्मणून हांक मारतां येते, त्याला दुःखाला कारणच उरत नसून ह्मातारपणाचा सुद्धां त्यावर घाला बसत नाहीं. ज्याला आई आहे अशा मनुष्याला मुलगे, नातू झाले असून शंभर वर्षे जरी झालीं असलीं तरी तो दोन वर्षांच्या सारखा दिसतो. मनुष्य समर्थ असो किंवा असमर्थ असो, कृश असो किंवा लठ्ठ असो, आई त्याचें रक्षण करते. दुसरा कोणी मुलाला राखता नाहीं. आई नाहींशी झाली ह्मणजेच मुलगा ह्मातारा होतो, दुःखी होतो व सारें जग त्याला शून्य होतें. आईसारखी दुसरी छाया नसून, आईसारखी दुसरी गति नाहीं. आईसारखें दुसरें त्राण नसून आईसारखी कोणी आवडती नाहीं. पोटांत ठेवल्यामुळें तिला धात्री हें नांव मिळालें असून जनन दिल्यामुळें जननी हें नांव तिला मिळालें आहे; त्याचप्रमाणें सर्व अवयवांची ती वाढ करून देणारी असल्यामुळें तिला अंबा हें नांव मिळालें आहे. वीराला प्रसवणारी असल्यामुळें तिला वीरसू हें नांव मिळालें आहे. मुलांची शुश्रूषा करणारी असल्यामुळें तिला शुश्रु ह्मणतात. आई ही मनुष्याचें प्रत्यक्ष शरीर आहे. जिच्या काळजीमुळें याचें डोकें रस्त्याच्या बाजूला सुकत पडलें नाहीं अशा आईला कोण विचारी मनुष्य मारण्याला उठेल ? नवराबायकांच्या संबंध होतो, तेव्हां मुलासंबंधीं दोघांची इच्छा सारखीच असते; परंतु ती सफल होण्याचें बापापेक्षां आईवर विशेष अवलंबून असतें. मुलगा कोणत्या कुळांत झाला आहे आणि कोणापासून झाला आहे हें आईला ठाऊक असतें. गर्भ राहिल्यापासून तिला त्याचा आनंद होऊन ती त्यावर प्रेम करूं लागते. आतां फिरून बापासंबंधानें विचार केला तर वेद ह्मणतात कीं, मुलगा हा केवळ बापाचाच होय. आई त्याला उत्पन्न करणारी केवळ भट्टी आहे. जेव्हां पुरुष पाणिग्रहण करून तुला न सोडतां तुझ्या बरोबर धर्मसंचय करीन ह्मणून शपथ घेऊन परस्त्रीशीं संबंध ठेवण्याला पहातात तेव्हां ते मानाला अपात्र होतात. नवरा, बायकोचें भरण करतो ह्मणून त्याला भर्ता व पालन करतो ह्मणून पती ह्मणतात. जेव्हां हीं दोन कामें तो करीनासा होतो तेव्हां अर्थात् भर्तृत्वाला व पतित्वाला तो मुकतो; शिवाय स्त्रीच्या हातून कांहीं पाप होणें शक्य नाहीं. पाप करणारा काय तो पुरुषच. व्यभिचार केला असतां त्याचें पाप पुरुषालाच लागतें. शिवाय असेंही ह्मटलें आहे कीं, बायकांना नवरा श्रेष्ठ असून तोच उत्तम दैवत आहे. माझ्या आईनें आपला पवित्र देह बापाच्या वेषानें आलेल्या दुसऱ्याला (इंद्राला) दिल्यानें व्यभिचाराचा दोष तिला लागत नाहीं. बायकांच्या हातून हें पाप घडणें शक्य नाहीं, पुरुषांच्याच हातून हें पाप घडतें; कारण स्त्रियांच्या प्रत्येक कृतींत दिसून येणाऱ्या स्वाभाविक दुबळेपणामुळें व कोणाच्या विनवण्यांना नाकारण्याचें त्यांच्या अंगीं धैर्य नसल्यामुळें बायकांना दोषी धरतां येत नाहीं. त्वष्ट्याच्या त्रिशिर नांवाच्या मुलाला मारून इंद्राला ब्रह्महत्येचें पाप लागलें, त्याचे दोन हिस्से झाडें व पृथ्वी यांमध्यें ठेवून एक हिस्सा जेव्हां त्यानें स्त्रियांमध्यें रजोरूपानें ठेविला, तेवेळीं तुह्मांला मैथुनतृप्ति जननपर्यंत होणार नाहीं ह्मणून त्यानें जो वर दिला त्याची आठवणच यावेळीं तिनें प्रत्यक्ष इंद्राला करून दिली असल्यामुळें माझ्या आईला कांहीं यासंबंधांत दोषी धरतां येत नाहीं. याप्रमाणें स्त्री असून आई असल्यामुळें अधिक महत्वाला पात्र अशा आईला मारूं नये, हें मूर्ख अशा पशूंना सुद्धां कळतें. बापाच्या ठिकाणीं फक्त देवताच एकवटल्या असून आईच्या ठिकाणीं सर्व देवता त्याचप्रमाणें मानव स्नेहानें एकवटले असतात. ' याप्रमाणें जात्याच कोणत्याही कामांत दिरंगाई करणारा असल्यानें विचार करण्यांत त्याचे बरेच दिवस गेले व इकडे त्याचे वडील परत आले. एवढ्या वेळामध्यें बायकोला मारण्याची शिक्षा दिली हें फार वाईट केलें असें त्यांचें मत ठरल्यामुळें अगदीं घाबरून डोळ्यांतून पाणी काढीत वेदाध्ययन व धैर्य यांनीं मनाला आलेल्या प्रसन्नतेमुळें त्यांना पश्चात्ताप होऊन ते स्वतःच्या मनाशीं विचार करूं लागले. ' त्रैलोक्याचा स्वामी देवेंद्र ब्राह्मणाचें रूप घेऊन अतिथी ह्मणून माझ्याकडे आला. गोड शब्द

बोलून त्याचें मीं स्वागत केलें व यथान्याय अर्घ्य व पाय देऊन तो प्रसन्न राहील ह्मणून मी आपला सेवक आहें असें ह्मणालों. आतां अशी सर्व स्थिति असून जर तो भलत्या रीतीनें वागला तर यामध्यें तिला कांहीं दोषी धरतां येत नाहीं. अशी सर्व गोष्ट असल्यानें यांत कोणालाच दोषी ठरवितां येत नाहीं. जर कोणाला दोष लागत असेल तर तो माझ्या निष्काळजीपणाला दिला पाहिजे. ईर्षेपासून मोठें दुःख ओढवतें असें मुनींनीं ह्मटलें आहे. मला तिनें पछाडल्यामुळें मी ह्या दुःखसागरांत बुडालों आहें. मी त्या साध्वी स्त्रीचें—जिनें आपल्या नवऱ्याबरोबर संकटें सोसण्याला तयार होऊन वनवास स्वीकारला होता तिचें—पोषण करावयाचें सोडून तिला मारल्यानें आतां मला यापासून कोण तारणार ? त्या उदार बुद्धीला मी मूर्खपणानें चिरकारी असें नांव दिलें आहे. त्यानें जर आपलें नांव आज राखलें असेल तर तोच तेवढा मला आज या पापापासून तारण्याला समर्थ आहे. बा चिरकारे, आज जर तूं आपल्या नांवाला जागला असशील तर चिरकारी होऊन मला, तुझ्या आईला, माझ्या तपाला, तसेंच आपल्या स्वतःला आज पापापासून तार. मोठ्या बुद्धीमत्तेमुळें चिरकाल विचार करून एखादी गोष्ट करावयाची हें तुझ्या आंगवळणींच पडलें आहे. तेव्हां ती तुझी संवय आज तुझ्या कामीं पडो. आईनें तुझी चिरकाल आशा करून चिरकाल तुला पोटांत ठेविलें, तेव्हां चिरकाल विचार करून एखादें काम करण्याची जी तुझी संवय ती सफल होवो. कदाचित् दुःखामुळें त्यानें उशीर लावला असेल, कदाचित् ती गोष्ट मनांत ठेवून त्यावर विचार करीत तो झोंपी गेला असेल, कदाचित् त्याला व मला चिरकाल होणाऱ्या संतापाचा विचार करून त्यानें तें कृत्य शेवटास नेण्याचें लांबणीवर टाकलें असेल.' याप्रमाणें दुःखी होऊन विचार करीत ते आश्रमाकडे आले असतां चिरकारी त्यांच्या जवळ येऊन उभा राहिला. व बापाला याप्रमाणें कष्टी झालेला पाहून शस्त्र खालीं ठेवून पायांवर डोकें ठेवून खालीं पडला. तें पाहून त्याचप्रमाणें बायकोलाही जवळच लज्जेनें अगदीं स्वस्थ उभी पाहून त्यांना मोठा आनंद झाला. तेव्हांपासून त्या विजन अशा अरण्यांतील आश्रमामध्यें त्या बायकोपासून किंवा त्या दक्ष मुलापासून ते कधीं वेगळे राहिले नाहींत. बायकोला मारावयास सांगून कांहीं उद्देशानें ते आश्रमांतून निघून गेल्यापासून ती आज्ञा शेवटास नेण्यासाठीं हातांत शस्त्र घेऊन तो चिरकारी ती शेवटास न नेतां उभा होता. त्याला आतां आपल्या पायांवर पडलेला पाहून गौतमांना वाटलें कीं, आपण आईवर उगारण्यासाठीं हातीं शस्त्र धरल्याबद्दल तो आपली क्षमा मागत आहे. त्यांनीं त्याची पुष्कळ स्तुति केली व चिरकाळ त्याचें मस्तक हुंगून त्याला घट्ट आलिंगन दिलें व 'चिरकाळ जग,' ह्मणून त्याला आशीर्वाद दिला. नंतर जें कांहीं घडून आलें त्यामुळें समाधान वाटून ते आपल्या मुलाला ह्मणाले, ' मुला, तूं नेहमीं कोणतेंही काम करण्यापूर्वी याप्रमाणेंच दीर्घ विचार करीत जा. माझी आज्ञा शेवटास नेण्यामध्यें तुझ्या हातून घडलेल्या उशिरानें आज मला सुखी केलें आहे. जर करावयाची गोष्ट एखाद्या मित्राला मारणें किंवा एखादें पुष्कळ विचारानें हातीं घेतलेलें काम सोडून देणें, राग, ताठा, गर्व, भांडण, पापकर्में यांच्या स्वाधीन होणें किंवा दुसऱ्या वाईट गोष्टी करणें, अशा प्रकारची असेल तर त्यामध्यें दिरंगाई करणें चांगलें. एखाद्या बांधवावर, मित्रावर किंवा नोकरावर दोष पूर्ण शाबीत झाला नसतां त्याला शिक्षा देण्याचे पूर्वी पुष्कळ वेळ विचार करावा. सर्व कृत्यांमध्यें मनुष्यानें फार वेळ विचार करून मग काय करावयाचें तें ठरवावें. याप्रमाणें वागलें असतां मनुष्याला चिरकाल दुःख करण्याचा प्रसंग येत नाहीं. जो मनुष्य फार वेळ राग आवरून धरून कोणतेंहीं कृत्य करण्यापूर्वी विचार करतो, त्याच्या हातून ज्याच्या योगानें पश्चात्ताप होईल असें कृत्य कधीं घडत नाहीं. जे वृद्ध आहेत अशांची सेवा चिरकाल करून त्यांच्याजवळ बसून त्यांना मान द्यावा. मनुष्यानें आपलीं कर्तव्यें ठरवून तीं बजावण्याकडे चिरकाल लक्ष द्यावें. जे विद्वान आहेत त्यांची सेवा चिरकाल करून शिष्टांची संगत करून स्वतःला नीट दाबांत ठेवल्यानें मनुष्य चिरकाल लोकांच्या आदराला पात्र होतो. एखाद्यानें धर्म व

कर्तव्य यांसंबंधानें विचारलें असतां विचार केल्याशिवाय कधीं उत्तर देऊं नये; ह्मणजे फार वेळ पश्चात्तापाला कारण उरत नाहीं.'

## १८९ द्युमत्सेन व सत्यवान यांचें भाषण-अहिंसा. ( १२. २६७. )

'राजानें प्रजेला न मारतां प्रजेचें रक्षण कसें करावें,' ह्मणून युधिष्ठिरानें विचारलें असतां भीष्म ह्मणाले, 'यासंबंधांत पुढील द्युमत्सेन व सत्यवान यांचा संवाद ऐक.

कोणे एके प्रसंगीं कांहीं लोकांना द्युमत्सेनाच्या आज्ञेनें देहान्त शासन देण्यासाठीं नेत असतां मुलाच्या तोंडून निघूं नयेत असे शब्द सत्यवानाच्या तोंडून निघाले. तो ह्मणाला धर्माला अधर्माचें व अधर्माला धर्माचें स्वरूप कधीं कधीं येतें; पण दुसऱ्याचा प्राण घेणें याला मात्र कधीं धर्म ह्मणतां येणार नाहीं.' द्युमत्सेन ह्मणाला, 'जर ज्यांना देहान्त शिक्षा दिली पाहिजे त्यांना न मारणें हा धर्म समजला जाईल, जर चोरांना मारण्यांत येणार नाहीं, तर सर्व बेबंदशाही माजेल. हें माझें, हें त्याचें नव्हे, असें कांहींच या कलियुगामध्यें उरणार नाहीं. लोकयात्रा चालणार नाहीं. तुला जर एखादा उपाय ठाऊक असेल तर तो मला खुशाल सांग.' सत्यवान ह्मणाला, 'सर्व तिन्ही वर्णांना ब्राह्मणांच्या ताब्यांत करावें. हे तीन वर्ण जर धर्मानें वागूं लागतील तर पोटजातीही त्यांचें अनुकरण करतील. यामध्यें जो ब्राह्मणाच्या सांगण्याप्रमाणें वागणार नाहीं, त्याच्यासंबंधानें, 'हा माझें ऐकत नाहीं,' ह्मणून ब्राह्मणानें राजाचे कानावर घालावें व राजानें त्या अपराध्याला शिक्षा करावी. त्याचा प्राण न घेतां जी शास्त्रानें शिक्षा सांगितली असेल ती त्याला द्यावी. नीतिशास्त्र व अपराधाचें स्वरूप लक्षांत घेऊन राजानें तसें वर्तन ठेवावें. एका अपराध्याला ठार केल्यानें राजा पुष्कळ निरपराध्यांना त्याबरोबर मारतो; कारण एका चोराला मारल्यानें त्यावर अवलंबून असणाऱ्या सर्व माणसांना मारल्यासारखें होतें. तेव्हां दुसऱ्यानें अपकार केला असतां राजानें शिक्षेसंबंधानें मोठा विचार करावा. कदाचित् जे दुष्ट असतात त्यांमध्ये देखील भल्याच्या संगतीनें सद्गुण येतात, व दुष्टांना देखील भली संतति होते. ह्मणून मुळाशीं घाव देऊं नये. हा कांहीं सनातन धर्म नाहीं. त्यांना स्वल्प शिक्षा देऊन वाटेवर आणण्यास सांगितलें आहे. त्यांना भेवडवावें, बांधून कोंडून ठेवावें किंवा विरूप करावें. सभेमध्यें पुरोहितादिकांच्या देखत चोरांना ठार करून त्यांच्या आप्तइष्टांना रडवूं नये. जेव्हां गुन्हेगार पुरोहितांना शरण येऊन, 'फिरून आह्मी असें करणार नाहीं,' असें ह्मणतात, तेव्हां त्यांना सोडून द्यावें. उलट **दंड व अजिन धारण करून डोकें मुंडलेला असा ब्राह्मण असला तरी त्याला अपराधाबद्दल शिक्षा करावी. जर मोठे लोक धर्माचें उल्लंघन करतील तर त्या मानानें त्यांची शिक्षाही मोठी असावी.** आतां ज्यांच्या हातून वरचेवर अपराध घडतात त्यांना पहिल्यांदाच अपराध करणाऱ्याप्रमाणें अगदीं शिक्षेवांचून सोडणें चांगलें नाहीं.' द्युमत्सेन ह्मणाला, 'जोंपर्यंत लोकांनीं मर्यादा उल्लंघन केल्या नाहींत तोंपर्यंतच त्याला धर्म ही संज्ञा रहाते. देहदंड दिला नाहीं तर सर्व मर्यादा मोडून जाऊन बंडाळी माजेल. पूर्वीं पूर्वीं लोक सहज ताब्यांत ठेवतां येत होते. वर्तन व भाषण यांमध्यें सरळ, साधे, कोणाचा द्रोह न करणारे व राग ज्यांना अगदीं थोडा आहे असे लोक पूर्वीं असत. पूर्वीं धिक्कार एवढीच शिक्षा असून पुढें पुढें तोंडानें बोलणें जरूर पडूं लागलें. पुढें पुढें दंड हातीं घेणें जरूर पडून हल्लीं देहान्त दंडापर्यंत मजल येऊन ठेपली आहे. कांहीं लोक तर देहान्त शिक्षेलासुद्धां जुमानीत नाहींत. चोर हे देव, मनुष्य, गंधर्व, पितर कोणाचेच नाहींत. यांचा कोणाशीं काय संबंध आहे? स्मशानांतून मेल्या मढ्यावरचे देखील हे दागिने उपटून नेतात. व भूत लागून वेडे बनलेल्या लोकांना सुद्धां हे लुबाडतात. यांच्याशीं करार मदार करून रहाणारे लोक मूर्ख समजले पाहिजेत.' सत्यवान ह्मणाला, 'यांना जर वाटेवर आणतां येत नसेल व मारल्यावांचून उपाय नाहीं असें वाटूं लागेल तर एखादा यज्ञ करून त्यामध्यें तरी यांना मारावें. राजे लोकांचें सगळें सुरळित चालावें ह्मणून मोठें तप होत असतें आणि जेव्हां त्यांच्या राज्यामध्यें चोर वाढत जातात तेव्हां त्याची त्यांना लाज

वाटते, व त्यांना नाहींसें करून प्रजेला सुखी करण्यासाठीं ते तपश्चर्या करतात. तुमच्या भीतीनेंसुद्धां प्रजेला प्रामाणिक ठेवतां येते. चांगले राजे सूड घेण्यासाठीं कधीं दुष्टांना ठार मारीत नाहींत. केवळ सदाचरणानेंच त्यांना आपल्या प्रजेवर योग्य रीतीनें अंमल चालवितां येतो.राजा योग्य रीतीनें वागेल तर त्याची वरिष्ट प्रतीची प्रजा योग्य रीतीनें वागते व खालच्या प्रतीचे लोक त्यांचें अनुकरण करतात. मनुष्य स्वभावच असे आहेत कीं, त्यांना जे आपले वरिष्ठ वाटत असतात त्यांचें तें अनुकरण करतात. स्वतःला नीट वाटेवर न ठेवतां जो राजा दुसऱ्यांना वाटेवर ठेवण्याचा प्रयत्न करतो अशा प्रकारच्या ऐहिक विषयांचा दास बनलेल्या राजाला त्याच्या ह्या विषयासक्तीमुळें लोक हंसतात. जो दांभिकपणानें किंवा मूर्खपणानें राजाचें कांहीं वांकडें करील, त्याला हरतऱ्हेनें वाटेवर आणलेंच पाहिजे. तरच नवे अपराध त्याच्या हातून घडणार नाहींत. परंतु राजानें आधीं स्वतःला आपल्या ताब्यांत ठेवून मग अपराध्यांना वाटेवर आणण्याचा प्रयत्न करावा. जरूर पडल्यास मित्र व बांधव यांनासुद्धां त्यानें कडक शिक्षा करावी. ज्या राज्यामध्यें नीच अशा गुन्हेगारांना कडक शिक्षा मिळत नाहीं त्या ठिकाणीं गुन्हे वाढूं लागून धर्मऱ्हासाला सुरवात होते. कृतयुगामध्येंच अगदीं साध्या अशा निरुपद्रवी उपायांनीं प्रजेला वाटेवर ठेवावें. व पुढें निरनिराळ्या युगामध्यें धर्म ज्या मानानें एक एक चतुर्थांशानें कमी कमी होत जातो तसतसें शिक्षेचें रूप बदलत जाऊन राजे तसतसे वागत जातात. राजांच्या दुष्टपणामुळें सृष्टिक्रमाप्रमाणें जेव्हां कलि माजतो तेव्हां राहिलेल्या एक चतुर्थांश धर्मापैकींसुद्धां पंधरा हिस्से नाहींसे होऊन एक सोळावा हिस्सा रहातो. कृतयुगांतलें शिक्षेचें धोरण हल्लीं ठेवल्यानें सर्व गोंधळ माजून राहील. राजांनीं मनुष्याच्या आयुष्याची मर्यादा, त्याचें सामर्थ्य व कालाचें स्वरूप लक्षांत घेऊन शिक्षा द्यावी. मनूनें मनुष्यांवर दया करून ज्ञानानें मोक्ष मिळवितां येईल असा उत्तम मार्ग दाखवून ठेवलेला आहे.'

---

## १९० कपिलमुनी व गाय यांचा संवाद.

## (१२. २६८-)

'प्राणिमात्राला पीडा न देतां ऐश्वर्यादि सहा गुण अंगीं आणून देणारा योग असा स्वीकारावा कीं ज्याच्या योगानें उपभोग व मोक्ष हे दोन्ही धर्म साधतील. गृहस्थधर्म व योगधर्म या दोन्हींचा उद्देश एकमेकांपासून फारसा वेगळा नाहीं. तरी यामध्यें श्रेष्ठ कोणता तो सांगा,' असा प्रश्न युधिष्ठिरानें विचारल्यावरून भीष्म ह्मणाले, 'हे दोन्ही धर्म उत्तम असून आचरण्याला कठिण; मोठे फलदायक व भल्यांनीं आचारलेले आहेत. दोहोंच्या प्रामाण्यासंबंधानें पुढील कपिल व गाय यांमधील संवाद लक्षांत घेण्याजोगा आहे. पूर्वीं नहुष राजाकडे त्वष्टा गेला असतां सनातन वेदाच्या आज्ञेप्रमाणें अतिथीसत्कारासाठीं नहुषानें एक गाय मारण्यासाठीं काढिली. ती मारावयास काढलेली गाय पाहून थोर मनाचे कपिल, ज्यांची बुद्धि ठाम व नैष्ठिक झाली होती, त्यांच्या तोंडांतून, 'अरेरे, काय हें वेड,' असें उद्गार निघाले. तेव्हां स्यूमरश्मि नांवाचे ऋषी आपल्या योगसामर्थ्यानें त्या गाईमध्यें शिरून कपिलांना ह्मणाले, 'जर वेदांमधील या वाक्यांवरून वेद निंद्य ठरत असतील तर अहिंसात्मक वाक्यें जीं त्यांमध्यें आहेत तीं तरी प्रमाण कां धरावीत? जे बुद्धिमान आहेत व शास्त्राधाराप्रमाणें वागतात, ते वेदांतील सर्व ऋषिप्रणीत आज्ञा ईश्वरापासून आलेल्या आहेत असें समजतात; तेव्हां ज्याला कांहीं फळाची इच्छा नाहीं, ईर्षाद्वेषादि विकारांपासून जो अलग आहे, अशा परमात्म्याचे ते शब्द असल्यामुळें त्यांच्या संबंधानें कोणी काय बरेंवाईट म्हणावें बरें?' कपिल ह्मणाले, 'मी वेदांची निंदा करीत नाहीं किंवा त्यावर कांहीं चर्चाही करीत नाहीं. निरनिराळ्या आश्रमांच्या धर्मांचा परिणाम एकच आहे. संन्याशी, वानप्रस्थ, गृहस्थ व ब्रह्मचारी हे चारी शाश्वत अशा देवमार्गांतूनच जातात; परंतु यांच्या कमी अधिकपणामुळें यांचें कमी अधिक सामर्थ्य त्यांच्या फलामध्यें सांगितलें आहे, हें ओळखून स्वर्ग व इतर सुखें देणारीं कर्में करावींत अशीही वेदाज्ञा आहे व

तीं करूं नयेत अशीही वेदाज्ञा आहे. आतां कर्मे न करणें हें जर चांगलें असेल तर तीं करणें चांगलें-च दोषावह आहे. जेव्हां शास्त्र असें वादात्मक आहे, तेव्हां त्याचें बलाबल समजणें फार कठीण आहे. वेदाधारावांचून प्रत्यक्ष आधारानें अहिंसेसंबंधानें कांहीं ठाऊक असल्यास मी ऐकण्याला तयार आहें.' यावर स्यूमरश्मि ह्मणाले, 'स्वर्गाची इच्छा असणाऱ्यानें यज्ञ करावा अशी श्रुति नेहमीं ऐकूं येते. प्रथम फलाचा विचार करून मग मनुष्य यज्ञाच्या तयारीला लागतो. बकरा, घोडा, मेंढी, गाय, ग्राम्य व वन्य नानाविधपक्षी व ओषधी हें प्राणिमात्रांचें अन्न समजलें आहे. व अन्न रोजच्या रोज सकाळ संध्याकाळ घ्यावें असें सांगितलें आहे. त्याचप्रमाणें पशू व धान्य हीं श्रुतींमध्यें वेदांचीं अंगें सांगितलीं आहेत. ब्रह्मदेवांनीं यज्ञाबरोबरच हीं उत्पन्न केलीं आहेत, व यांच्या साहाय्यानें ब्रह्मदेवांनीं देवांकडून यज्ञ करविला. गाय, बकरा, मनुष्य घोडा, मेंढी, खेचर व गाढव हे सात ग्राम्य, त्याचप्रमाणें सिंह, वाघ, डुक्कर, रेडा, हत्ती, अस्वल व वानर हे सात वन्य प्राणी यज्ञाला योग्य समजले असून यांमध्यें सुद्धां पुढचे पुढचे मागच्यांहून कनिष्ठ समजले आहेत. फिरून वेदांत असेंही सांगितलें आहे कीं, सर्व विश्व यज्ञासाठीं आहे व पुरुष यासाठींच आहे, व याला अनेक पूर्वींच्या लोकांची अनुमती मिळाली आहे. कोण मनुष्य यज्ञासाठीं प्राण्यांमधून आपल्या शक्तीप्रमाणें प्राणी निवडून काढीत नाहीं? पशू, मनुष्य, झाडें, ओषधी सर्वांची ओढ स्वर्गाकडे असून त्यांची इच्छा परिपूर्ण होण्याला यज्ञावांचून दुसरें साधन नाहीं. ओषधी, पशू, झाडें, लता, आज्य, दूध, दहीं, हवि, भूमि, दिशा, श्रद्धा, काल, ऋचा, यजुषें, साम, यजमान व गृहपति अग्नि हीं सतरा यज्ञाचीं साधनें आहेत. श्रुतींत सांगितल्याप्रमाणें यज्ञ हें जगाचें मूळ आहे. आज्य, दूध, दहीं, शेण दह्यादुधाचें मिश्रण, कातडें, शेपटीचे केंस, शिंगें व खूर यांच्या योगानें एकटी गाय सर्व यज्ञसाधनें पुरविण्याला समर्थ आहे. यांतील निरनिराळ्या वस्तू निरनिराळ्या यज्ञासाठीं सांगिल्या आहेत, त्या वस्तू व ऋत्विज व दक्षिणा यांवर यज्ञ अवलंबून आहे. हीं सर्व गोळा करून लोक यज्ञ शेवटास नेतात. श्रुति असें सांगतें कीं, हीं सर्व द्रव्यें यज्ञासाठीं उत्पन्न केलीं आहेत; व यांच्याच साधनांनीं पूर्वींच्या लोकांनीं यज्ञ केले आहेत; तथापि जो मनुष्य यज्ञ करावा ह्मणून सांगितलें आहे एवढ्याचसाठीं फलाची इच्छा न धरतां तो करतो, तो कोणाही प्राण्याला पीडा देत नाहीं व कोणाचा द्रोह करीत नाहीं व कांहीं ऐहिक वस्तू साधून घेण्याच्या खटपटीला पडत नाहीं. हीं वर सांगितलेलीं यज्ञांगें व यज्ञासाठीं लागणाऱ्या वस्तू ह्या यज्ञ शेवटास नेण्यासाठीं परस्परांच्या आधारावर आहेत. ज्यांमध्यें वेदांचा समावेश झाला आहे अशीं स्मृतिवाक्यें सुद्धां ऋषिप्रणीत आहेत.तीं ब्राह्मणाला धरून असल्यामुळें विद्वान लोक त्यांला आधारभूत समजतात. यज्ञांची उत्पत्ति देखील ब्राह्मणांवर असून ते ब्राह्मणांच्या आधारानेंच आहेत.सर्व जग यज्ञाच्या मागून असून यज्ञ सर्व जगाच्या मागून आहे. ओम् यापासूनच सर्व वेदांची उत्पत्ति आहे. ओं, नमः, स्वहा, स्वधा आणि वषट् हे शब्द ज्यानें उच्चारून यथाशक्ति यज्ञयागादि क्रिया केल्या आहेत त्याला तिन्ही लोकांमध्यें परलोकासंबंधानें भीति नाहीं असें सर्व वेद, सिद्ध व मोठमोठे ऋषी ह्मणतात. ज्याच्या ठिकाणीं ऋचा, यजुषें, साम व स्तोभ दिसून येतात तोच ब्राह्मण. अग्निहोत्र,सोमयज्ञ व दुसरें मोठमोठे यज्ञ यांचीं फलें काय आहेत हीं तुह्मांला ठाऊकच आहेत; ह्मणून मनुष्यानें मनांत कामना न आणतां यज्ञ करावे व दुसऱ्याचे चालवावे. जो स्वर्गफल देणारे यज्ञ करतो त्याला स्वर्गसुखाच्या स्वरूपानें महाफल मिळतें. जे यज्ञ करीत नाहींत ते इहपर लोकाला मुकतात. ज्यांना वेदतत्वांचा खरा अर्थ कळतो तें कर्म करावयास सांगणाऱ्या व करूं नका ह्मणून सांगणाऱ्या अशा दोन्ही प्रकारच्या वेदाज्ञा आधारभूत धरतात.' कपिल ह्मणाले, 'कर्मांनीं मिळणारीं फलें अशाश्वत आहेत. हें लक्षांत घेऊन आत्मनिग्रहानें शमपर राहून यति लोक ज्ञानानेंच ब्रह्मप्राप्ति करून घेतात. त्यांच्या मार्गांत आड येणारें कांहीं नाहीं; कारण, केवळ इच्छामात्रें करून ते आपल्या कामना परिपूर्ण करून घेतात. सुखदुःखादि द्वंद्वापासून ते मोकळे असतात.कोणापुढें वाकत

नाहींत, आशापाश त्यांना कुठें नसतो. सर्व पापापासून मोकळे होऊन ते शुद्ध असतात. सर्व नाशवंत पदार्थ त्याचप्रमाणें संन्यास या संबंधानें त्यांचें काम नष्ट झालेलें असतें, व ब्रह्मावर निष्ठा ठेवून त्याकडे लय लावून ते ब्रह्ममय झालेले असतात. शोक नाहींसा होऊन रजोगुणापासून ते अलग झालेले असतात; ह्मणून यांना सनातन लोक मिळतात; तेव्हां अशी श्रेष्ठ गती यांना मिळत असल्यानें गृहस्थाश्रमाचें काय कारण उरलें ? ' स्यूमरश्मि ह्मणाले, ' जरी याला श्रेष्ठ लाभ समजला व हीच उत्तम गति समजली तरी गृहस्थाश्रमाला सोडून दुसरे कोणतेही आश्रम चालत नाहींत. ज्या प्रमाणें आईवरच सर्व प्राणी पोसले जातात त्याप्रमाणेंच इतर आश्रम गृहस्थाश्रमावर अवलंबून आहेत. गृहस्थालाच यज्ञ करतां येतो, तप करतां येतें व जो कोणी जें कांहीं करतो त्याला गृहस्थाश्रम मूळ आहे. संतति उत्पन्न करणें हें सर्व सुखाचें मोठें साधन आहे, असें सर्व प्राणिमात्र समजतात; परंतु ही गोष्ट दुसऱ्या कोणत्याही आश्रमामध्यें शक्य नाहीं. प्रत्येक प्रकारचें गवत व धान्य देणाऱ्या अशा पर्वतावर वाढणाऱ्या ओषधी यांच्या मुळाशीं तरी गृहस्थाश्रमच आहे. यांच्यावर प्राणिमात्रांचे प्राण अवलंबून आहेत आणि जगामध्यें ज्या अर्थी प्राणावांचून दुसरे कांहींच नाहीं त्या अर्थी गृहस्थाश्रम सर्व जगाचा आधार आहे. तेव्हां गृहस्थाश्रम मोक्ष देत नाहीं असें ह्मणणाऱ्या कोणाचा शब्द खरा धरावा. ' श्रद्धारहित, मूर्ख, अदूरदर्शी, अप्रतिष्ठित, आळशी, श्रमले भागलेले व आपल्या कर्मांचा ज्यांना पश्चात्ताप होत आहे अशा मूर्खांनाच संन्यासाश्रमामध्यें मोठी शांति दिसते. वेदांमध्यें सांगितलेल्या शाश्वत आज्ञेच्या आधारावरच त्रैलोक्य आहे. ज्याला वेदज्ञान आहे त्या वर्णांतील थोर पुरुष जन्मापासून पूज्य समजला जातो. तहत गर्भाधानापासून इहपर प्राप्तीसाठीं होणारीं सर्व कर्में शेवटास जाण्यास मंत्र लागतात. जाळण्याच्या वेळीं, पुनर्जन्म घेऊन खाऊं पिऊं लागतांना, यमलोकामध्यें असणारी वैतरणी नदी ओलांडून जाण्यास त्याला साह्य व्हावें ह्मणून गोदान देण्याचे वेळीं व पाण्यामध्यें पिंड टाकण्याचे वेळीं मंत्र लागतात. अर्चिष्मत्, बर्हिषद् व क्रव्याद हे तीन प्रकारचे पितर देखील मृतासंबंधानें मंत्र पसंत करतात. मंत्र हे ज्या करतां संस्कार घडतात तीं तीं फळें देण्याला पूर्ण उपयोगी असे समजले जातात. याप्रमाणें वेदाज्ञा असून मनुष्य पितर, ऋषी व देव यांच्या ऋणांत असतां कांहीं केल्यावांचून मोक्ष कसा मिळावा ? वेदाज्ञेचा उद्देश ह्मणून पाडणारी व खोटी असून खऱ्यासारखी दिसणारी ही एकांतांत रहाण्याची खोटी कल्पना वैभवाला मुकलेल्या अशा आळशी विद्वानांनीं अस्तित्वांत आणली आहे. वेदाज्ञेप्रमाणें जो यज्ञ करतो त्याला कधीं पाप लागत नाहीं व यज्ञानेंच त्यानें यज्ञांत मारलेल्या पशूंसहित तो उत्तम लोकाला जातो व त्याच्या सर्व इच्छा परिपूर्ण होऊन स्वतः संतुष्ट होऊन या पशूंच्या सर्व इच्छा पूर्ण करून त्यांना हा संतुष्ट करतो. वेदाकडे दुर्लक्ष करून किंवा कपटानें अथवा मायेनें वागून मनुष्याला ब्रह्मप्राप्ति न होतां वेदांत सांगितल्याप्रमाणें वागल्यानेंच ती प्राप्ति होते. ' कपिल ह्मणाले, ' जरी कर्में नित्य असलीं तरी दर्श, पौर्णमास, अग्निहोत्र, चातुर्मास्य आणि दुसरीं कर्में बुद्धिमान मनुष्याकरितां असून तीं करण्यामध्यें सनातन धर्म साधतो, मग हिंसात्मक कर्मेंच कशाला पाहिजेत ? संन्यासी लोक जे सर्व कर्मांपासून निवृत्त असतात ते, त्यांच्या ब्रह्मज्ञानानेंच देव, ऋषी व पितर यांच्या ऋणांतून मुक्त होतात. जो असा सर्व प्राणिमात्रांचा आत्मभूत असून सर्वांना आपल्या ठिकाणीं पहातो, अशा या ब्रह्मज्ञानी मनुष्याच्या कांहीं माग न उमटलेल्या वाटेवर देव देखील मोह पावतात. जो हा पर, विराटसूत्र, अंतर्यामी व शुद्ध अशा चार स्वरूपाचा, दोन हात, वाणी, उदर व शिश्न या चार द्वारांनीं त्याचप्रमाणें शरीर, इंद्रियें, मन व बुद्धि या चार मुखांनीं युक्त असा या शरीरामध्यें आहे, तो परमात्मा गुरूच्या उपदेशानेंच कळणें शक्य आहे; ह्मणून मनुष्यानें हीं चार द्वारें नीट बंदोबस्तानें ठेवावीं. मनुष्यानें जुगार खेळूं नये, दुसऱ्याचा पैसा उपटून घेऊं नये, भलत्या योनींत जन्म झालेल्या हलक्या मनुष्याच्या घरीं त्याचा यज्ञ करूं नये, रागाच्या तावडींत जाऊन दुसऱ्याला मारूं नये. अशा रीतीनें वागणें ह्मणजे हातपाय चांगले स्वाधीन ठेवणें होय. उगीच दुसऱ्याच्या नांवानें खडे फोडूं न-

येत. वृथा वडबड, चहाडखोरपणा, व लोकनिंदा करूं नये. खरें व मितभाषण करून वाग्द्वाराचें चांगलें रक्षण होतें. अगदीं न खातां राहूं नये, किंवा फार खाऊं नये. मनुष्यानें लोभ सोडून भल्याची संगत करावी, व पोटाला पाहिजे तेवढेंच खावें. असें वागल्यानें उदराचें रक्षण होतें. त्याचप्रमाणें धर्माचरणासाठीं आपली बायको असतांना विषयांध होऊन परस्त्रीशीं संबंध ठेवूं नये व बायकोशींही ऋतुकालाखेरीज संबंध ठेवूं नये. याप्रमाणें एकपत्नीव्रत धरून रहाणाऱ्या मनुष्याच्या शिश्नाचें उत्तम प्रकारें रक्षण झालें असें समजावें. ज्याचीं हीं चार द्वारें याप्रमाणें उत्तम रीतीनें सुरक्षित नाहींत, त्याची सर्व तपश्चर्यादि कृत्यें व्यर्थ होतात. त्याच्या तपाचें तरी काय फल, यज्ञाचें काय फल व त्याचा स्वतःचा तरी काय उपयोग ? लज्जारक्षणापुरत्या वस्त्रावांचून ज्याच्या अंगावर दुसरें वस्त्र नाहीं व जो जमिनीवर कांहीं न टाकतां त्यावरच उशाला हात घेऊन खुशाल पडतो, विवाहित जोडपीं ज्या सुखाचा उपभोग घेतात, त्या सुखाचा एकटा असून जो उपभोग घेतो, जो दुसऱ्याच्या सुखाचा किंवा दुःखाचा विचार करीत नाहीं, ज्यानें ही सर्व प्रकृति व तिचे विकार त्याचप्रमाणें भूतमात्रांची गती ओळखली आहे, जो सर्व भूतमात्रांना अभय देणारा असून कोणापासून ज्याला भीति उरली नाहीं व सर्व भूतमात्रांचा जो आत्मभूत आहे, तोच ब्राह्मण होय. दानयज्ञादि कर्मांचें फल जी अंतःशुद्धि ती मिळविल्यावांचून मूर्ख लोकांना गुरूपदेश झाला असतां सुद्धां ब्राह्मणपणाला ज्या गोष्टींची आवश्यकता असते त्या लाधत नाहींत व ह्या खऱ्या ज्ञानाच्या अभावामुळें स्वर्ग व इतर सुखें अशा प्रकारच्या दुसऱ्या फलाकडे ते लागतात. जो सर्व धर्मामध्यें सुक्ष्मरूपानें धाग्याप्रमाणें शिरलेला आहे व जो घेतल्यानें चारी आश्रमांतले विद्वान लोक आपापलीं कर्में व तपें हींच अज्ञान व संसारदुःखें यांचा नाश करण्यासाठीं भयंकर शस्त्रें बनवितात, असा शाश्वत व खात्रीनें फल देणारा जो सदाचार तो यत्किंचितही पाळतां येत नसल्यानें मूर्ख लोक ऐश्वर्यसंपन्न व अविचारी अशा उघड फळ दाखविणाऱ्या कर्मांना निष्फल व शास्त्रविरुद्ध समजतात. वास्तविक पहातां जशा प्रकारच्या सदाचारामध्यें आपद्धर्म खेरीजकरून निराळ्या प्रकारच्या आचारांचा समावेश होत असल्यानें, हा विशेष लक्ष देण्याजोगा असून कामक्रोधादिकांचा यावर कधीं परिणाम होत नाहीं. आतां यज्ञासंबंधानें विचार केला असतां त्याचे गुण कळण्याला फार कठीण आहेत व कळले तरी तसें ह्यातून घडणें त्याहून कठीण आहे, व ह्यातून घडलें असतां सुद्धां त्यापासून मिळणारें फल विनाशी आहे; तेव्हां हें नीट लक्षांत ठेवून मनुष्यानें ज्ञानाच्या मार्गाला लागावें.' स्यूमरश्मि ह्मणाले, 'वेदांत कर्में करावीं व न करावीं असे दोन्ही मार्ग सांगितले आहेत. याप्रमाणें परस्पर विरोधी आज्ञा त्यांत असल्यानें ते प्रमाणभूत कसे समजावे व संन्यास सफल तरी कसा व्हावा ? तेव्हां या दोहोंचा मेळ कसा बसवावयाचा तें सांगा.' कपिल ह्मणाले, 'भल्यांच्या मार्गाला लागून त्यागाचें फल प्रत्यक्ष अनुभवानेंच घेतां येण्याजोगें आहे. आतां कर्माच्या मागें लागलेले लोक ज्या विषयांच्या मागें लागलेले असतात त्यांचें दृश्य फल काय बरें आहे ?' स्यूमरश्मि ह्मणाले, 'मी स्यूमरश्मि असून ज्ञान मिळविण्यासाठीं येथें आलों आहें व स्वतःचें कल्याण करून घेण्यासाठीं शुद्धभावानें मी हा विषय काढला असून उगीच कांहीं तरी वादविवाद करण्याचा माझा इरादा नाहीं. या भयंकर संशयानें मला घेरलें असल्यामुळें आपण तो दूर करा. आपण ह्मणतां कीं, ज्यानें ब्रह्मप्राप्ति होते अशा भल्यांच्या वाटेला गेलेल्या लोकांना फलाचा प्रत्यक्ष अनुभव मिळतो; तेव्हां इंद्रियानें प्रत्यक्ष अनुभव घेतां येण्याजोगें ज्याच्या मागें तुह्मी सर्व लागलां आहां असें तें आहे काय ? केवळ वादात्मक अशी सर्व शास्त्रें टाकून मी सर्व आगमांचें योग्य रीतीनें अध्ययन केलें आहे. आगम ह्मणजे मी वेदाज्ञा समजतों, व ज्यांच्या योगानें वेदांचा खरा अर्थ कळतो अशीं तर्कावर बसविलेलीं शास्त्रें यांचाही मी त्यांतच समावेश करतों. मनुष्य ज्या ज्या आश्रमामध्यें असेल त्या त्या आश्रमाला सांगितलेलीं विशेष कर्में न टाळतां आगमांत सांगितलेल्या गोष्टी मनुष्यानें पाळाव्या. ह्या पाळल्यानें मनुष्याला सिद्धि मिळते. आगमांतील निर्णय खात्रीचे असल्यामुळें

त्यांपासून मिळणारी सिद्धि प्रत्यक्ष अनुभवितां येण्याजोगी आहे असें ह्मणण्याला हरकत नाहीं. ज्याप्रमाणें निराळ्या दिशेनें हांकलेली नाव इच्छिलेल्या ठिकाणाला घेऊन जाऊं शकत नाहीं, त्याप्रमाणें पूर्वकर्मानुसार वहात चाललेला प्राणी या अनंत संसारांतून पार पडून कायमच्या विश्रांतीच्या ठिकाणाला कधींही जाऊन पोंहोचणार नाहीं. तेव्हां या विषयासंबंधानें आपण मला कांहीं सांगा. ज्यानें सर्व टाकलें आहे, ज्याची पूर्ण समाधान वृत्ति झाली आहे, ज्याला शोक किंवा रोग ठाऊक नाहीं, कर्म करण्याची इच्छा ज्याची अगदीं गेली आहे, किंवा ज्यानें सर्व संग किंवा कर्में सोडलीं आहेत असा मनुष्य सांपडणें कठीण. आपल्या सारखीं माणसें देखील आमच्या प्रमाणें आनंद व शोक यांच्या तावडींत गेलेलीं दिसतात, व इंद्रियविषयही इतरांप्रमाणेंच आपल्या मागें लागले आहेत. याप्रमाणें सर्व स्थिति असतां चारी वर्णाश्रमासंबंधाचें उत्तम सुख पाहूं गेलें असतां तें कशांत आहे हें सांगा.' कपिल ह्मणाले, 'सर्व गोष्टींत मनुष्य ज्या ज्या श्रुतीच्या आधारानें चालतो ती ती श्रुति कधीं निष्फळ नसते. मनुष्य कोणत्याही मताला धरून चालला तरी आत्मनिग्रह व योग यांनीं त्याला श्रेष्ठ गति खात्रीनें मिळते. ज्ञान हें जन्ममृत्युरूपी अपार नदी ओलांडून जाण्याला मनुष्याला उपयोगी पडतें. परंतु ज्ञानाला सोडून ज्यांचें वर्तन होऊं लागतें तें त्यांचें वर्तन त्यांच्या नाशाला कारण होतें. ज्याच्या योगानें सर्व जग ब्रह्ममय दिसूं लागतें असें ज्ञान कधीं कोणी प्राप्त करून घेतो आहे काय? शास्त्र बरोबर न ओळखतां कोणी वादविवादाच्या जोरावर तर कोणी वासना व द्वेष यांमुळें अहंकाराच्या तावडींत गेले आहेत. शास्त्र बरोबर न उमगतां शास्त्रावर दरवडा घालणारे हे ब्रह्मचोर दंभ व मोह यांच्या तावडींत जाऊन शमदमादि आत्मशुद्धीचीं कर्में करीनातसे होतात. सर्व कांहीं यांना निष्फळ दिसूं लागतें, व जर कदाचित् ज्ञानाचें सामर्थ्य यांच्या अंगीं चुकून आलें तर ते दुसऱ्यांना त्याचा फायदा कधीं देत नाहींत. तमोगुणांनीं भरुन निघालेल्या त्यांचा तमच मुख्य आधार होऊन बसतो. ज्या ज्या प्राण्याचा जसा जसा स्वभाव असतो, तो तो त्या त्या प्रमाणें असतो. ह्मणून तमोगुणी मनुष्यच्या अंगांत द्वेष, वासना, राग दांभिकपणा, खोटेपणा, माज हे गुण नेहमीं भरले असतात. असा विचार करून व गुरूपदेशानें सर्व दोष पाहूं लागून सर्व शुभाशुभ सोडून देऊन यती योगाकडे लक्षं देतात.' स्यूमरश्मि ह्मणाले, 'कर्मामधील चांगुलपणा व त्यागामधील वाईटपणा यासंबंधानें मी जें कांहीं बोललों तें सर्व शास्त्राला धरूनच बोललों. तथापि हें खरें आहे कीं, शास्त्राचा पूर्ण अर्थ कळल्याशिवाय शास्त्राच्या खऱ्या उद्देशाप्रमाणें वागण्याकडे मनुष्याची प्रवृत्ति होत नाहीं. जो जो ह्मणून आचार न्यायाला धरून असतो तो तो शास्त्राला धरून असतो व न्यायाला सोडून असणारा आचार शास्त्रालाही सोडूनच आहे असा समजावा. शास्त्राला झुगारून देऊन शास्त्राज्ञेप्रमाणें कोणाचें वर्तन घडेल हें नांव नको. तसेंच जें जें ह्मणून वेदाला सोडून आहे तें सर्व अशास्त्रच होय. प्रत्यक्ष प्रमाणावर विश्वास ठेवणारे पुष्कळ लोक केवळ हें दृश्य जग पहातात व यांच्या पलीकडचें जें विश्वासगम्य त्याकडे नजर पोंहोचवीत नाहींत. शास्त्रामध्यें सांगितलेल्या दोषांकडे ते लक्ष देत नाहींत आणि त्यांना आमच्यासारखें रडत बसण्याची पाळी येते. इंद्रियविषय जरी तुह्मांला व इतरांना सारखेच आहेत तरी तुमच्या सारख्यांना आत्मज्ञान झालें असून त्यांना तें झालें नसल्यानें तुह्मां दोघांमध्यें केवढें तरी अंतर आहे? चारी वर्णांचे तसेच चारी आश्रमांचे लोक त्यांचे धर्म कितीही निराळे असोत श्रेष्ठ सुख या एकाच गोष्टीकडे त्यांचे लक्ष लागलेलें असतें. असें असतां आपल्या सारख्या बुद्धिमानांनीं या निरनिराळ्या धर्मांपैकीं अमक्यानें इष्ट हेतु साध्य होतो ह्मणून अनंत ब्रह्मासंबंधानें सांगून माझें अंतःकरण गार करून टाकलें आहे. आह्मी मात्र आत्म्याचें खरें स्वरूप ओळखण्याचें ज्ञान नसल्यानें सत्याला मुकलों आहों. आमचें ज्ञान क्षुद्र वस्तूंसंबंधानें असून गाढ अंधःकारांत आह्मी बुडालें आहों. तथापि ब्रह्मप्राप्तीसाठीं आपण सांगितलेला मार्ग स्वीकारण्याला फार कठीण आहे. सर्व धर्म बरोबर पाळून योगाकडे लक्ष देऊन स्वतःवर अवलंबून जो वाटेल तेथें फिरण्यास समर्थ झाला आहे, व आत्मनिग्रहा-

नें सर्व नीतीबंधनाच्या पलीकडे जाऊन पोंहोचून ज्याला सर्व जग तुच्छ वाटूं लागलें आहे, त्यालाच कर्मसंबंधाच्या वेदाच्या आधाराकडे दुर्लक्ष करून हा मोक्ष ह्मणून दाखवून देतां येणार आहे. तथापि संसारामध्यें गुंतून राहिलेल्यांना हा मार्ग फार कठीण आहे. दान, अध्ययन, यज्ञ, संतति, सरळपणा, हे गुण अंगामध्यें आणून सुद्धां जर मोक्ष मिळत नाहीं,तर जो तो मिळविण्याची खटपट करतो त्याला धिक्कार असो. त्याचप्रमाणें त्या मोक्षालाही धिक्कार असो. यासंबंधानें केलेले सर्व श्रम फुकट दिसतात. वेदांत सांगितलेलीं कर्में न करतां त्यांकडे दुर्लक्ष केल्यानें मनुष्यावर नास्तिकपणाचा दोष येतो. तेव्हां वेदाज्ञेला धरून वागल्यानें मोक्षप्राप्ति कशी होते हें आपण मला सांगा.' कपिल ह्मणाले, 'वेद हे सर्वांनीं प्रमाण मानले असून त्यांला कोणीं तुच्छ केलें नाहीं. शब्दब्रह्म व त्या पलीकडचें श्रेष्ठ ब्रह्म अशीं दोन प्रकारचीं ब्रह्में आहेत. शब्दब्रह्माचें ज्याला ज्ञान झालें त्याला पलीकडच्या ब्रह्माची प्राप्ति होते. गर्भाधान विधीपासून बाप जें शरीर मंत्राच्या साहाय्यानें बनवितो तें मंत्रानें शुद्ध होतें व याप्रमानें विधिपूर्वक देह शुद्ध झाला ह्मणजे त्या मनुष्याला ब्राह्मण ही संज्ञा मिळून ब्रह्मज्ञान मिळविण्याला तो पात्र होतो. कर्मफल हें केवळ मोक्षप्राप्ति करून देणाऱ्या अंतःशुद्धीचें साधन आहे. आतां कर्मांनीं ही अंतःशुद्धि होते किंवा नाहीं याचा अनुभव ज्याचा त्यालाच येण्यासारखा असून अनुमानानें हें कळण्यासारखें नाहीं. ज्यांना कांहीं आशा नसून पुढच्यासाठीं संचय करून ठेवण्याच्या भानगडींत न पडतां जें जें मिळेल तें तें देऊन टाकतात व लोभ, राग, द्वेष हे ज्यांनीं दूर केले आहेत ते यज्ञ केवळ धर्म समजूनच करीत असतात. पात्रीं दान करणें हाच पैशाचा योग्य व्यय होय. कधींही पापकर्में न करितां वेदांत सांगितल्याप्रमाणें क्रिया करीत राहून आपल्याला वाटेल त्या इच्छा पूर्ण करून घेण्याचें सामर्थ्य ज्यांच्या अंगांत आलें आहे, शुद्ध ज्ञानाच्या योगानें ज्यांचीं मतें ठाम झालीं आहेत, क्रोध, असूया, अहंकार, मत्सर सोडून देऊन ज्यांनीं योगाकडे लक्ष दिलें आहे, जन्म, कर्म व विद्या या तीन प्रकारची शुद्धता ज्यांच्या अंगीं आली आहे, व जे सर्व प्राणिमात्रांच्या हितामध्यें गढले आहेत, असें आपलीं कर्में न सोडणारे अनेक राजे व ब्राह्मण पूर्वीं झाले आहेत. हे सर्वांच्या ठिकाणीं सारखे, आर्जवशील, संतोषवृत्तीचे असून सत्यज्ञान यांना झालें होतें. त्यांच्या धर्माचें फळ त्यांना प्रत्यक्ष मिळत असून सोपाधिक व निरुपाधिक अशा दोन्ही प्रकारच्या ब्रह्मावर त्यांचा विश्वास असे. प्रथम अंतःकरण शुद्ध करून घेऊन विधिपूर्वक व्रतें पाळून बिकट प्रसंगींही ते धर्म बरोबर पाळीत. एकत्र मिळून ते पुण्यकर्में करीत व त्यामुळें त्यांना मोठें सुख लाधे. व ज्या अर्थीं यापासून ते बिलकुल ढळत नसत त्या अर्थीं प्रायश्चित्त करण्याची त्यांवर कधीं पाळी येत नसे. सत्यधर्माचा आश्रय केल्यानें विलक्षण सामर्थ्य त्यांच्या अंगीं आलें होतें. पुण्यकर्मांमध्यें आपल्या मनाप्रमाणें धर्मच्छल त्यांच्या हातून कधीं होत नसे. याप्रमाणें शास्त्रांत सांगितलेला धर्म जशाचा तसा पाळून पर्याय धर्म ते कधीं आचरीत नसल्यानें प्रायश्चित्ताची पाळी त्यांवर कधीं येत नसे. कारण अशा प्रकारें धर्म पाळणाऱ्यांना प्रायश्चित्ताची कधीं पाळी येत नाहीं. ज्या दुबळ्या लोकांच्या हातून धर्म बरोबर पाळला जात नाहीं त्यांच्यावरच प्रायश्चित्ताची पाळी येते. तेव्हां अशा प्रकारचे बरोबर धर्म पाळणारे यशस्वी ब्राह्मण पूर्वीं पुष्कळ होते. ते रोजच्या रोज यज्ञामध्यें ब्रह्माचें यजन करून वासनेपासून मुक्त असत. त्यांचे यज्ञ, वेद व कर्में शास्त्रांत सांगितल्याप्रमाणें घडत. वेद त्या वेळीं योग्य काळीं पढला जाई आणि त्यांच्या इच्छेमध्यें लोभ किंवा क्रोध यांचा अंश बिलकुल नसे. आणि कसाही प्रसंग पडला असतां शुद्ध वर्तन ठेवून चांगली कर्में त्यांच्या हातून घडत. याप्रमाणें आपल्या वर्णाचे व आश्रमाचें धर्म पाळून त्यांचीं अंतःकरणें शुद्ध, सद्भावयुक्त व शांत झाल्यामुळें यांचे यज्ञ प्रत्यक्ष ब्रह्मस्वरूपी असत. अशा सद्वर्तनशील व पुण्यकर्म करणाऱ्या महात्म्यांचीं तपें, ऐहिक वासनांचा मोड करण्याला उत्तम हत्यारें बनून रहात. याप्रमाणें फार पुरातन, शाश्वत व विलक्षण असा जो हा कायमचा सदाचार भल्यामध्यें सुद्धां संकटसमयीं निराळा दिमत असून इतर प्रसंगींच बरावर दिसून येतो व जो दक्ष-

तेशीं साम्यानें आहे, ज्याच्यावर, राग, लोभ, व दुसरे दुष्ट विकार यांचा परिणाम कधीं घडत नाहीं, व ज्यामुळें मनुष्यांची मर्यादा कधीं सुटली नाहीं, अशा प्रकारच्या ह्या सदाचराचे पुढें चार आश्रमांला अनुसरून ज्यांना हा संपूर्ण एकत्र पाळतां येईना त्यांनीं चार भाग केले. परंतु भले लोक हा सदाचार संन्यासाश्रमांत, वानप्रस्थाश्रमांत, गृहस्थाश्रमांत, किंवा ब्रह्मचर्याश्रमांत कोठेंही पाळून श्रेष्ट गति मिळवितात. ब्राह्मण आकाशामध्यें आपली हितावह किरणें चोहोंकडे टाकित ग्रह, नक्षत्र व तारे यांच्या रूपानें आपापल्या ठिकाणीं प्रकाशत राहिले आहेत. संतोषाच्या योगानें ते ब्रह्माला जाऊन मिळाले आहेत असें वेदाचें मत आहे. पूर्वकर्मांच्या अवशेषामुळें त्यांना जरी ह्या जगांत फिरून जन्म घ्यावा लागला, तरी पापकृत्यांनीं ते कधीं दोषी होत नाहींत. ज्यानें ब्रह्मचर्य पाळून गुरूची शुश्रूषा केली आहे व आत्म्यासंबंधानें ठाम निश्चय ठरवून ज्यानें योगाकडे लक्ष दिलें आहे, तोच खरा ब्राह्मण असून याहून निराळा केवळ नांवांचा ब्राह्मण समजावा. कोण ब्राह्मण किंवा कोण ब्राह्मण नव्हे, याचा निर्णय ज्या अर्थीं कर्मांवरूनच ठरतो त्या अर्थीं बऱ्या वाईट कर्मांवरूनच मनुष्याचें सुखदुःख ताडतां येतें. ज्यांनीं सर्व दुष्ट मनोविकार अंतःशुद्धीनें जिंकले आहेत त्यांना ब्रह्माचें ज्ञान होऊन अनंत ब्रह्म दिसूं लागल्यानें ते प्रत्येक वस्तु ब्रह्ममय पाहूं लागतात. शम, दम, उपरम, संन्यास, भक्ति व समाधि हे जे धर्म मोक्षाकडे लागलेले असे हे लोक पाळतात ते धर्म चारी वर्णांना व चारी आश्रमांना सारखे असून आत्मनिग्रहानें ज्यांची अंतःशुद्धि झाली आहे अशानांच हें ज्ञान मिळतें. समाधानानें ज्यांनीं सर्व सोडलें आहे, त्यांच्याच ठिकाणीं खरें ज्ञान रुजलेलें असतें. मोक्षप्राप्ति करून देणारें ज्ञान ज्यामध्यें आहे असा यतींचा संन्यासधर्मच शाश्वत आहे. हा संन्यासधर्म कधीं कधीं दुसऱ्या आश्रमांच्या धर्माशीं मिसळून असतो. परंतु तो तसा असो किंवा स्वतंत्र असो ज्याच्या त्याच्या वकुबीप्रमाणेंच ज्याच्या त्याच्या हातून तो पाळला जातो व ज्या ज्या मानानें मनुष्याच्या मनांतून वासनेचा वींमोड झालेला असतो, त्या त्या मानावर हा अवलंबून असतो. कोणत्याही प्रकारच्या मनुष्याला त्याग हाच मोठ्या फायद्याचा आहे. दुबळ्यालाच हा साधत नाहीं. जो मनुष्य शुद्ध अंतःकरणानें ब्रह्मप्राप्तीच्या मार्गे लागतो तो या दुःखमय जगांतून सुटतो.' स्यूमरश्मि ह्मणाले, 'जे विषयोपभोगाकडे लागलेले असतात, जे दान करतात, जे यज्ञ करतात, जे वेदाध्ययन करतात व द्रव्यार्जन करून जे त्याचा त्याग करतात, अशांपैकीं कोणाला मेल्यावर स्वर्गांत उत्तम स्थान मिळतें?' कपिल ह्मणाले, 'जे गृहस्थाश्रम पाळून राहतात तेही चांगलेच असून प्रत्येक प्रकारचा गुण त्यांना सिद्ध होतो. परंतु त्यागाच्या योगानें जें सुख होतें तें अशांना होत नाहीं हें उघड आहे.' स्यूमरश्मि ह्मणाले, 'तुमच्या सारखे लोक मोक्ष प्राप्तीसाठीं ज्ञानावर अवलंबून असतात. व गृहस्थाश्रमानें राहणाऱ्यांचा कर्मावर विश्वास असतो. परंतु सर्व आश्रमांचा भाव मोक्ष प्राप्तीकडेच आहे ह्मणून सिद्धीच्या कामीं अधिकपणासंबंधानें यांत कांहीं फरक दिसत नाहीं हें कसें?' कपिल ह्मणाले, 'कर्में हीं केवळ शरीराला शुद्ध करीत असून ज्ञानासाठीं प्रत्येकाचा प्रयत्न असतो. कर्मांनीं सर्व अंतःकरणाचे दोष नाहींसे होऊन ब्रह्मानंदज्ञान ठाम होतें व परोपकार, क्षमा, शान्ति, दया, सत्य, सरळपणा, अहिंसा, निराभिमान, भीड, त्याग व शम (कर्मापासून पराङ्मुखता) हे ब्रह्म प्राप्तीचे गुण अंगीं येतात व यांच्या योगानें मनुष्य श्रेष्ठ गती (ब्रह्म) मिळवितो. अंतःकरणाचे सर्व दोष दूर करण्याला कर्मेंच कारण आहेत. हें ती सिद्धि मिळाल्यावर विद्वान मनुष्याला कळूं लागतें. ज्याला वेदाचें, त्याचप्रमाणें वेदांत सांगितलेल्या कर्मब्रह्माचें व कर्मांच्या यथास्थितीचें ज्ञान झालें त्यालाच वेदाचें खरें ज्ञान झालें समजावयाचें याहून निराळ्या प्रकारच्या मनुष्याला वारा सोडणारा भाताच समजला पाहिजे. ज्याला वेदाचें ज्ञान झालें त्याला सर्व कळलें. कारण वेदामध्येंच सर्व कांहीं आहे. खरोखर वर्तमान, भूत, भविष्य हें सर्व वेदामध्यें आहे. शास्त्रांपासून हें जग आहे व नाहीं हा निर्णय काढतां येतो. ज्ञानी मनुष्याला हें सर्व दृश्य आहे व नाहीं. त्याला

हे अंत्य व मध्य आहे. पूर्ण त्याग झाल्यावर मनुष्याला पुरे इतकें मिळतें. हें ज्ञान वेदावर अवलंबून आहे. त्याचप्रमाणें संतोष हा मोक्षाच्या मार्गे असून त्यावर अवलंबून आहे. तेज, क्षमा व निर्वासनेमुळें उत्पन्न झालेली उपरति ह्या तीन गोष्टी पूर्णानंदाला कारण आहेत व या तिघांच्या साहाय्यानें ज्यांना ज्ञानचक्षू प्राप्त झाले आहेत ते त्या अविनाशी ब्रह्माला जाऊन मिळतात.

## १९१ कुंडधार व ब्राह्मण यांचा संवाद–धर्माचें महत्त्व. (१२. २७१)

युधिष्ठिर म्हणाला, 'धर्म, अर्थ व काम ह्या तिहींची वेदांमध्यें प्रशंसा केली आहे. परंतु या तिघांमध्यें कोणतें विशेष महत्त्वाचें आहे?' भीष्म म्हणाले, 'या संबंधांत पूर्वी कुंडधारानें प्रेमानें आपल्या भक्तांवर जो उपकार केला आहे ती कथा सांगतों ऐक.

कोणी एक गरीब ब्राह्मण पैशाच्या लोभानें धर्माचरण करीत होता. यज्ञाचें कामीं खर्च करण्याकरितां पैसा मिळावा ह्मणून तो घोर तप करीत होता. त्यानें अनेक देवतांची उपासना केली, तरी त्याला पैसा मिळेना. तेव्हां कोणती देवता मनुष्यांनीं वारंवार उपासना करून मद्द करून ठेवली नसल्यामुळें मला लवकर प्रसन्न होईल, ह्मणून तो शांतपणें विचार करूं लागला असतां एक देवांचा सेवक कुंडधार नांवाचा मेघ त्याला पुढें दिसला. त्याबरोबर त्याच्यावर याची भक्ति जडली. त्याच्या स्वरूपावरूनच हा आपलें कल्याण करील कसें त्याला वाटलें. देवांशीं त्याचा निकट संबंध असून कोणी मनुष्यानें त्याला घेरून टाकलें नसल्यानें तो कांहीं काल न लागतां आपल्याला प्रसन्न होऊन वाटेल तेवढा पैसा देईल असा मनांत विचार करून धूप, नाना प्रकारचे सुवासिक पदार्थ, फुलें व बली यांच्या योगानें त्यानें त्याची पूजा केली तेव्हां लवकरच तो मेघ संतुष्ट होऊन त्याला ह्मणाला, 'ब्रह्महत्या करणारा, दारू पिणारा, चोर, व व्रत मोडलेला यांना यांच्या पापाबद्दल भल्यांनीं प्रायश्चित्त सांगितलें आहे; परंतु **कृतघ्नाला प्रायश्चित्त मुळींच नाहीं**. धर्माची उत्पत्ति आशेपासून असून रागाची असूयेपासून आहे; व लोभाचा उद्भव कपटापासून आहे. परंतु कृतघ्नाला संततीच नाहीं.' असें तो ह्मणाल्यावर त्या कुंडधार मेघाचें तेज अंगामध्यें येऊन तो ब्राह्मण दर्भावर पडला असतां सर्व प्राणिमात्र त्याला स्वप्नामध्यें दिसले. कुंडधारासंबंधी त्याच्या भक्तीच्या योगानें सर्व विषयांपासून अलिप्त होऊन त्यानें पुढील प्रकार पाहिला. महात्मा मणिभद्र देवामध्यें उभा राहून चांगलें कर्म करणाऱ्यांना राज्यें व संपत्ति देत असून वाईट कर्में करणारांपासून ती हिरावून घेत होता. त्या ठिकाणीं कुंडधार देवांच्या पुढें नमस्कार घालून पडला असतां देवांच्या आज्ञेवरून मणिभद्रानें तुला काय पाहिजे ह्मणून त्याला विचारलें. तेव्हां, 'हा ब्राह्मण मोठ्या भक्तीनें मला भजत आहे, तेव्हां याला सुख होईल अशी कांहीं याच्या संबंधानें कृपा व्हावी,' असें तो ह्मणाला. तेव्हां मणिभद्र ह्मणाला, 'ठीक आहे. त्याला जर पैसा पाहिजे असेल तर देवांच्या आज्ञेवरून त्याला वाटेल तेवढा पैसा मी देतों.' यावर मनुष्याच्या स्थितीचा चंचलपणा व अशाश्वतपणा लक्षांत घेऊन ब्राह्मणाचें लक्ष तपाकडे लावावें असें कुंडधाराला वाटून तो ह्मणाला, 'मी यासाठीं पैसा मागत नाहीं. यासाठीं मी दुसराच वर मागतों. मोतीं, रत्नें किंवा ही सर्व पृथ्वी कांहींच त्याच्यासाठीं मी मागत नाहीं. त्याचें लक्ष धर्माकडे चांगलें लागावें एवढेंच मी मागतों.' मणिभद्र ह्मणाला, 'धर्माचें फळ राज्य व सुख अशा दोन प्रकारचें आहे. तीं दोन्ही प्रकारचीं सुखें कोणत्याही प्रकारचें शरीरदुःख न अनुभवतां याला मिळतील.' असें तो ह्मणाला असतांही धर्मावांचून याला कांहीं नको ह्मणून कुंडधारानें आग्रह धरला. तें पाहून देवांना फार संतोष झाला. व त्यांनीं त्याला तो वर दिला. कुंडधारालाही आपल्या इच्छेप्रमाणें वर मिळाल्यावर आनंद झाला. इकडे आपल्या भोंवतीं बारिक सारिक चिंध्या पाहून त्या ब्राह्मणाला जगाचा वीट आला. हा मेघ सुद्धां जर उपकार स्मरत नाहीं तर दुसरा कोण स्मरणार? तेव्हां वनांतच जाऊन धर्मानें रहावें, असा विचार करून देवांच्या त्या वरामुळें उदासीनता येऊन वनांत जाऊन त्यानें घोर तप आरंभिलें. देवता व

अतिथि यांना देऊन राहिलेलीं फळें तो खात असे. याप्रमाणें धर्माच्या ठिकाणीं त्याची फार दृढ भक्ति जडली. पुढें फलमूलें टाकून तो पानांवर राहूं लागला व पुढें तींही सोडून पाण्यावर राहूं लागला. व पुढें पाणी सोडून पुष्कळ वर्षें वायु भक्षण करीत राहिला. तरी याचें शरीर यत्किंचित्‌ही क्षीण झालें नाहीं. याप्रमाणें श्रद्धापूर्वक धर्मामध्यें गढून कडक तप करीत पुष्कळ काळ राहिला असतां त्याला दिव्य दृष्टि आली; तेव्हां त्याला वाटलें जर कोणावर संतुष्ट होऊन मी त्याला पैसा देतों किंवा राज्य देतों म्हटलें तर तें माझें ह्मणणें कधीं खोटें व्हावयाचें नाहीं. याप्रमाणें त्याच्या मनांत विचार घोळत असतां त्यावरील स्नेहभावामुळें व त्यानें मिळविलेल्या सिद्धीमुळें संतुष्ट होऊन कुंडधार त्याकडे येऊन ह्मणाला, ‘ तुला आतां दिव्य दृष्टि अली आहे. तिच्या योगानें राजांना जी कांहीं गति मिळाली आहे, ती पाहून सर्व लोकांकडे दृष्टि फेंक. ’ असें तो ह्मणाला असतां त्या ब्राह्मणाला त्याच्या दिव्य दृष्टीनें हजारों राजे नरकांत बुडालेले दिसले. नंतर कुंडधार फिरून ह्मणाला, ‘ तूं माझी याप्रमाणें भक्तीनें पूजा केली असून जर तुझ्या वांट्याला असें दुःख आलें असतें तर माझ्या हातून तुझें काय चांगलें झालें असें ह्मणतां आलें असतें; व माझ्या कृपेची तरी काय किंमत झाली असती ! विषयोपभोगाची इच्छा करून लोक कोणत्या गतीला जातात पहा. स्वर्गाचें द्वार अशांना बंद असतें. पुढें नंतर त्या ब्राह्मणानें या जगांतील पुष्कळ लोक काम, क्रोध, लोभ, भय, मद, निद्रा, सुस्ती व आळस यांच्या तावडींत सांपडलेले पाहिले. तेव्हां कुंडाधार ह्मणाला, ‘ या व्यसनांनीं हे सर्व जखडले गेले आहेत. देवांना मनुष्यांची भीति वाटत असून देवांच्या आज्ञेनें हीं व्यसनें त्यांना चोहोंकडून घेरतात. देवांच्या आज्ञेशिवाय मनुष्याच्या हातून धर्माचरण कधीं व्हावयाचें नाहीं व त्यांच्याच आज्ञेनें वाटेल तें दुसऱ्याला देण्याचें हें सामर्थ्यही तुझ्या अंगीं आलें आहे. ’ हें त्याचें भाषण ऐकून त्या ब्राह्मणानें त्यापुढें आपलें मस्तक लवविलें. तो ह्मणाला, ‘ तुझी मजवर मोठी कृपा झाली आहे. तुझ्या प्रेमाचें स्वरूप न कळतां कामलोभाच्या तावडींत सांपडून मी पूर्वीं तुझ्यासंबंधानें मनांत वाईट आणलें त्याबद्दल क्षमा कर. ’ असें ह्मणून याप्रमाणें तपःसिद्धि मिळवून तो ब्राह्मण जगभर सुखांत फिरत राहिला. धर्म व तप यांच्या सामर्थ्यानें मनुष्याला आकाशांतून फिरतां येऊन त्याच्या सर्व इच्छा परिपूर्ण होऊन त्याला उत्तम गति मिळवितां येते. अशा मनुष्याची सर्व पूजा करतात. श्रीमंत असून जे विषयाच्या तावडींत सांपडले त्यांना कोणी भले मानीत नाहींत. पैशामध्यें थोडेंसें सुख असलें तर असेल किंवा नसेल परंतु धर्मामध्यें फार मोठें सुख आहे.

---

## १९२ यज्ञ व अहिंसा. ( १२. १७२ )

युधिष्ठिर ह्मणाला, ‘ ज्यांचा हेतु अंतःशुद्धि होऊन ईश्वरावर प्रेम जडणें हाच एक आहे अशा नानाविध यज्ञांमध्यें कोणचा यज्ञ केवळ धर्मासाठीं ह्मणून असून सुख व इतर लाभ यासाठीं नाहीं ? ’ भीष्म म्हणाले, ‘ या संबंधानें दाणे टिपून त्यावर राहून यज्ञ करणाऱ्या पुढील ब्राह्मणाची गोष्ट ऐक.

कोणी एक ब्राह्मण उंछवृत्तीनें तपामध्यें गढून विष्णूची उपासना करण्यामध्यें गढला असे. शामाक, सूर्यपर्णी, सुवर्चला, या कडु व बेचव वनस्पति खाऊन तो रहात असे. परंतु यांना सुद्धां तपाच्या योगानें एक प्रकारची गोडी आली होती. वनामध्यें अंतःशुद्धि मिळवून कोणाही प्राणिमात्राची हिंसा न करतां फलमूलांनीं केलेला यज्ञ उत्तम फल देणारा होतो. त्याची बायको व्रतानें वाळून गेलेली व पवित्र अशी पुष्करधारिणी नांवाची होती. यज्ञासाठीं या सत्य नांवाच्या ब्राह्मणानें तिला बोलावल्यावरून शापाच्या भीतीनें त्याच्या स्वभावानुरूप त्याच्या ह्मणण्याप्रमाणें ती वागत असे. मोरांची गळून पडलेलीं पिसें ती वस्त्राच्या ऐवजीं अंगावर घेत असे. तिच्या मनांत नसतांना होतृत्व स्वीकारलेल्या आपल्या नवऱ्याच्या सांगण्याप्रमाणें ती यज्ञाला मदत करण्याला तयार झाली. शुक्राच्या आज्ञेनें कोणी एक पर्णाद नांवाचा धर्मवेत्ता त्या वनामध्यें त्याच्या जवळच मृगरूपानें रहात होता. तो सत्याकडे येऊन त्याला ह्मणाला, ‘ तूं हें मोठें पाप करीत आहेस. हा तुझा यज्ञ मंत्रांत सांगितल्या गोष्टीमध्यें गौणत्वानें होत आहे. तेव्हां मला

मारून होम करून शुद्ध होऊन तूं स्वर्गाला जा.' पुढें सावित्रीनें प्रत्यक्ष दर्शन देऊन त्याला तसेंच सांगितलें असतां, ' मी आपल्या बरोबर राहणाऱ्याला मारणार नाहीं, ' असें तो ब्राह्मण ह्मणाला. तेव्हां ती गप्प होऊन आणखी या यज्ञामध्यें काय काय अनन्वित गोष्टी घडतील या भीतीनें त्या यज्ञाग्नीमध्यें शिरून रसातळाला गेली. पुढें त्या हरणानें फिरून हात जोडून त्याला आपली आहुती देण्यास विनविलें. तेव्हां त्याला आलिंगून, 'तूं जा,' असे तो ब्राह्मण ह्मणाला. आठ पावलें जाऊन तो परत फिरला आणि, 'मला मार ह्मणजे तुला उत्तम गति मिळेल. मी दिलेल्या दिव्य चक्षूंनीं या स्वर्गांतल्या अप्सरा व हीं गंधर्वांचीं विमानें पहा, ' असें फिरून ह्मणाला. तेव्हां आशाळूपणानें त्यावर बराच वेळ विचार करून त्या मृगाकडे पाहून त्याला मारल्यानें स्वर्ग मिळेल असा लोभ मनांत उत्पन्न होऊन तसें करण्याचें त्याच्या मनांत आलें. हरिणरूपानें त्या वनामध्यें राहणारा तो धर्म त्याचा प्रतिकार करून ह्मणाला, ' हिंसा करणें हा कांहीं यज्ञांतला विधि सांगितला नाहीं. तुझ्या मनांत हिंसा करण्याचा विचार आल्यानेंच तुझें बरेंच तप कमी झालें आहे. यज्ञाला हिंसा ही कांहीं अवश्य नाहीं. पुढें धर्मानें स्वतः त्या यज्ञामध्यें त्याला मदत केली. अहिंसा हाच खरा धर्म असून हिंसाधर्म अहितकारक आहे. ब्रह्मवादी लोकांचा हा धर्म नव्हे. '

---

## १९३ असित देवल व नारद यांचा संवाद. ( १२. २७३–२७९ )

युधिष्ठिर ह्मणाला, ' कशाच्या योगानें मनुष्य पापी होतो, कशाच्या योगानें पुण्यवान होतो व कशाच्या योगानें वैराग्य येऊन मोक्षप्राप्ती होते ? ' भीष्म ह्मणाले, ' तुला सर्व धर्म कळतात. आपलीं मतें ठाम करून घेण्यासाठींच तूं हा प्रश्न विचारला आहेस. तेव्हां मोक्ष, वैराग्य, पाप व पुण्य या संबंधानें मुळापासून सांगतों ऐक. शब्दादि पांच इंद्रियविषयांपैकीं एखादा पुढें आला असतां वासना किंवा द्वेष त्यांच्या मागून धांव घेऊन तो मिळविण्याविषयीं खटपटीला लागून मनुष्य कर्म करूं लागतो व इष्ट असे जे रूपरसादि विषय यांचा उपभोग घेण्याविषयीं त्याची फिरून फिरून खटपट होते. पुढें त्यासंबंधानें प्रीति किंवा तिरस्कार उत्पन्न होऊन नंतर लोभ उत्पन्न होतो. पुढें मोह पडतो. या लोभमोहादिकांनीं वेढून खेचल्यावर मनुष्याची बुद्धि धर्माकडे लागत नाहीं. मग तो ढोंगानें धर्माचरण करूं लागतो. धर्म त्याचप्रमाणें अर्थ कपटानें मिळविण्याकडे त्याची प्रवृत्ति होते. व याप्रमाणें पैसा मिळण्यांत यश आलें असतां तिकडे त्याचें मन लागतें. व सुहृदांचें व शहाण्यांचें न ऐकतां पाप करण्याचें तो मनांत आणूं लागतो. आणि आपण जें कांहीं करतों त्याला शास्त्राधार काढून देऊं लागतो. रागमोहांपासून उत्पन्न होणारीं कायिक, वाचिक व मानसिक अशीं तीन प्रकारचीं त्याचीं पापें वाढत राहतात. कारण, त्याच्या मनांत पाप घोळत असतें. तोंडानेंही तेंच निघत असतें व हातानेंही तेंच घडत असतें. याप्रमाणें पापमार्गाकडे प्रवृत्ति झाली असतां भल्यांनाच त्याचे दोष दिसतात. त्याच्या जोडीचे जे असतात त्यांचें त्याच्याशीं सख्य जुळतें. अशा मनुष्याला इह लोकीं सुद्धां सुख मिळत नाहीं, मग पर लोकाची गोष्ट कशाला पाहिजे ? पापी मनुष्य अशा प्रकारचा असून पुण्यवान कसा असतो सांगतों ऐक. पुण्यवान मनुष्य दुसऱ्याच्या कल्याणाकडे लक्ष देतो, त्यामुळें त्याचें कल्याण होऊन त्या योगानेंच त्याला उत्तम गति मिळते. आपल्या बुद्धीच्या योगानें ज्याला हे वर सांगितलेले दोष आधींच दिसतात व सुख कशानें होतें, दुःख कशानें होतें हें जाणण्याची ज्याला शक्ति आहे व जो भल्यांना धरून असतो तो आपल्या उत्तम आचारानें व अशा संगतीनें आपल्या पुण्याला भर टाकीत राहतो. त्याला उत्तम मित्र मिळतात, व मित्र व पैसा यांचा लाभ होऊन इहपरलोकीं तो आनंदांत राहतो. शब्दस्पर्शादि इंद्रियविषयांवर पगडा मिळविणें हें धर्माचें फळ आहे. हें धर्मफळ मिळाल्यानें मनुष्य कधीं आनंदित होत नाहीं व अशा दृश्य फळांनीं समाधानी न होतां ज्ञानचक्षूंनीं तो वैराग्याकडे लागतो व ज्ञानचक्षूंनीं याप्रमाणें विषयांमध्यें मन घालीनासा झाला ह्मणजे वासनेपासून मुक्त होतो. परंतु तेव्हां सुद्धां तो धर्माचरण सोडीत नाहीं. पुढें सर्व जग विनाशी आहे, हें पाहून

तो सकाम धर्म सोडून देऊन हात पाय बांधून न बसतां उपायांनीं मोक्ष मिळविण्याकडे लागतो. पापकर्म सोडून दिल्यामुळें हळूहळू त्याला वैराग्य येतें व त्याचें अंतःकरण धर्माकडे लागून नंतर त्याला श्रेष्ठ असा मोक्ष मिळतो. आतां हा मोक्ष मिळविण्याचा उपाय असा आहे. ज्याप्रमाणें मडकें तयार करीत असतां त्यासंबंधानें जी बुद्धि असते, ती पुढें तें तयार झाल्यावर रहात नाहीं. त्याचप्रमाणें यज्ञयागादिकांच्या योगानें अंतःशुद्धि झाल्यावर पुढें ह्या क्रिया करणाऱ्यांचा पूर्वींचा भाव उरत नाहीं. जो रस्ता पूर्वसमुद्राकडे जातो तो पश्चिमसमुद्राला कधींही नेऊन पोहोंचविणार नाहीं. त्याचप्रमाणें मोक्षाला पोहोंचविणारा एकच रस्ता आहे. तो सविस्तर सांगतों ऐक. क्षमेच्या योगानें मनुष्यानें राग नाहींसा करून संकल्प सोडून देऊन वासनेचा वींमोड करावा. आळस टाकून सत्त्वशीलतेनें निद्रा नाहींशी करावी. दक्षतेनें भय नाहींसें करावें. आल्यावर विचार करून श्वासोच्छ्वास ताब्यांत आणावेत. इच्छा द्वेष व वासना यांना धैर्यानें परतवावें. लोभ, मोह व संशय अभ्यासानें दूर करावे. ज्ञानाच्या मागें लागून चौकसखोरपणा व शुष्क गोष्टीची चौकशी दूर करावी. थोडें व सहज पचण्या जोगतें अन्न खाऊन सर्व रोग व उपाधि दूर कराव्या. संतोषाच्या योगानें लोभाला व मोहाला मागें टाकावें. तत्त्वदर्शनानें विषयांना दूर करावें. दयाभूतपणानें अधर्म जिंकावा व सर्व प्राणिमात्रांकडे लक्ष देऊन धर्म जोडावा. पुढें नजर देऊन आशेचा वींमोड करावा. व अभिलाष न ठेवतां पैशावर वरपगडा मिळवावा. या जगामध्यें सर्व अनित्य आहे, हें लक्षांत ठेवून स्नेह मागें करावा. भुकेला योगाभ्यासानें मागें सारावें. दयाळुपणानें अहंपणा जिंकावा व संतोषानें तृष्णेला जिंकावें. उद्योगानें आळस जिंकावा व निश्चयात्मक ज्ञानानें संशय दूर करावा. मौन धरून बडबड बंद करावी व शौर्यानें भय नाहींसें करावें. वाणी व मन यांना बुद्धीच्या योगानें जिंकावें. बुद्धीला ज्ञानानें जिंकावें. व ज्ञानाला अहंकारयुक्त आत्म्यानें जिंकून त्याला परमात्म्यानें जिंकावें. ही अखेरची गोष्ट शुद्धकर्मानें ज्याचें अंतःकरण शांत झालें आहे, अशालाच लाधणें शक्य आहे, व याला उपाय काम, क्रोध, लोभ, भय व स्वप्न या योगाला अडथळा आणणाऱ्या पांच गोष्टी टाळून नियमित भाषण ठेवून ध्यान, अध्ययन, दान, सत्य, भीड, सरळपणा, क्षमा, शुचिर्भूतता शुद्धान्नसेवन व इंद्रियनिग्रह हेच आहेत. यांच्या योगानें तेज वाढून पाप नाहींसें होतें. सर्व संकल्प सिद्धि पावतात आणि श्रेष्ठ ज्ञान वाणूं लागतें. याप्रमाणें मिताहार वैं आत्मनिग्रह यांनीं पाप धुवून जाऊन अंगीं तेज आल्यावर काम व क्रोध यांना ताब्यांत आणून ब्रह्मपद मिळविण्याकडे लागावें. शास्त्राभ्यसानें अज्ञान दूर करून व वैराग्यानें संग, काम, क्रोध, दैन्य, दर्प, अहंकार, भीति व घरदार सोडावें. हा मोक्षाचा पसंत, निर्दोष व शुद्ध असा मार्ग आहे. निष्कामबुद्धीनें कायावाचामनाचा निग्रह करणें हा मोक्षप्राप्तीचा मार्ग आहे.

पूर्वीं देवल ऋषी बसले असतां भूतमात्रांच्या उत्पत्तीनाशासंबंधानें नारदांनीं त्यांना ' हें जग कोठून उत्पन्न झालें आहे व प्रलयाचे वेळीं हें कशामध्यें लय पावतें, ' ह्मणून प्रश्न केला. तो ऐकून देवल ह्मणाले, ' योग्य वेळ आली असतां परमात्म्याच्या प्रेरणेनें काल स्वतः पंचमहाभूतें उत्पन्न करतो. हीं शाश्वत, अविनाशी, व अनादि आहेत. हीं पांच व काल या सहांमध्यें स्वभावतःच मोठें तेज आहे. या आप, तेज, आकाश, पृथ्वी व वायु यांच्या पलीकडे कांहीं नाहीं. श्रुतीच्या आधारानें किंवा तर्कानें या पांचांहून दुसरी एखादी वस्तु आहे असें ह्मणतां येणार नाहीं. ह्या सहांपासूनच सगळ्यांची उत्पत्ति असून त्या सर्व दृश्य वस्तूंना असत ह्मणतात. हे पांच, काल, पूर्वसंस्कार व अज्ञान हीं आठ सर्व प्राणीमात्रांच्या जन्ममरणाला कारण आहेत. जेव्हां प्राणीमात्र नाहींसे होतात तेव्हां ते यांमध्यें जाऊन मिळतात व यांपासूनच फिरून उत्पन्न होतात. मेल्यावर प्राणी खरोखर या पंचमहाभूतांशीं मिळून जातो. त्याचें शरीर हा पृथ्वीचा भाग असून श्रोत्र आकाशापासून झाले आहेत. चक्षुरिंद्रिय तेजापासून होत असून प्राणाची उत्पत्ति वायूपासून आहे व रक्ताची उत्पत्ति जलापासून आहे. दोन डोळे, नाक, दोन कान, त्वचा व जीभ यांना इंद्रियें ह्मणतात व निरनिराळ्या त्या त्या विषयाचें ज्ञान

करून देण्यासाठीं हीं आहेत. पाहणें, ऐकणें, वास घेणें, स्पर्श करणें, व चव घेणें हीं या इंद्रियांचीं कामें आहेत. उपपत्तीनें ह्या पंचेंद्रियांचा पांच विषयांशीं निरनिराळ्या पांच रीतींनीं कसा संबंध आहे हें कळतें. रूप, रस, गंध, स्पर्श, शब्द हे पांच गुण असून पंचेंद्रियें निरनिराळ्या रीतीनें यांना ओळखतात. वास्तविक पाहतां या पांच गुणांचें ज्ञान इंद्रियांना होत नसून यांच्या द्वारें आत्म्यालाच होत असतें. या पंचेंद्रियांच्याहून जें श्रेष्ठ आहे त्याला चित्त ह्मणतात. चित्ताहून श्रेष्ठ मन आहे. मनाहून श्रेष्ठ बुद्धि व बुद्धीहून श्रेष्ठ क्षेत्रज्ञ आत्मा आहे. प्रथम प्राणी निरनिराळे विषय इंद्रियांच्या द्वारानें पाहतो. नंतर मनानें तो त्यांवर विचार करतो. बुद्धीच्या योगानें निश्चय ठरवितो. **पंचेंद्रियें, चित्त, मन व बुद्धि या आठांना अध्यात्मवेत्ते ज्ञानेंद्रियें ह्मणतात. हात, पाय, गुद, शिश्न, व वाणी यांना पंचकर्मेंद्रियें ह्मणतात.** वाणी बोलण्याचें व खाण्याचें काम करते. पाय चलनवलनाचें काम करतात. हात कामें करतात, गुद व शिश्न इच्छेनुरूप मलमूत्र व रेत बाहेर टाकण्याचीं कामें करतात. याशिवाय बल ह्मणून सहावें एक कर्मेंद्रिय आहे. याप्रमाणें हीं ज्ञानेंद्रियें व कर्मेंद्रियें दमल्यामुळें कामें करीनातशीं होतात तेव्हां तीं बंद पडल्यामुळें हीं इंद्रियें धारण करणारा प्राणी निजला आहे असें ह्मणतात. यांचीं कामें बंद पडली असतां सुद्धां मन आपलें काम बंद पाडीत नाहीं. व तें आपल्या विषयामध्यें गढलें असतें. या त्याच्या ज्ञानाच्या स्थितीला स्वप्न ह्मणतात. जागेपणीं सत्व, रज, तम एतद्रूप मनाच्या तीन स्थिति असतात, याच तीन स्थितींमध्यें स्वप्नामध्येंही तें असतें. जागृतीमध्यें उत्पन्न होणाऱ्या या तीन वासना ह्मणजे स्थिती स्वप्नामध्यें सुद्धां तितक्याच भोगप्रद होऊन आनंददायक होतात. आनंद, कर्माची सिद्धि, ज्ञान व वैराग्य ह्या गोष्टी सात्विक गुणाचीं लक्षणें आहेत. ज्या सत्वरजतमोरूपी कर्मरूपानें दृश्यमान होणाऱ्या स्थिती मनुष्य जागेपणीं अनुभवितो त्याच स्वप्नामध्यें फिरून मनांत येतात. जागृतावस्थेंतील विचारांचा स्वप्नामध्यें व स्वप्नावस्थेंतील विचारांचा जागृतावस्थेमध्यें प्रादुर्भाव या गोष्टी सुषुप्तीमध्यें प्रत्यक्ष अनुभवाला येतात; व ही स्थिति शाश्वत असून इष्ट आहे. पांच ज्ञानेंद्रियें, पांच कर्मेंद्रियें चित्त, मन, बुद्धि, अहंकार, सत्त्व, रज, तम मिळून हे एकंदर सतरा होतात व या शरीराचा स्वामी जो जीवात्मा तो आठरावा. अविद्येसह शरीरामध्यें असणारे हे सतरा गुण याच्याशीं मिळून आहेत व हा जेव्हां शरीरांतून नाहींसा होतो, तेव्हां याच्याबरोबर हेही नाहींसे होतात. ह्मणजे हें शरीर पंचभूतात्मक असून तीं नाहींशीं व्हावयाचीं ह्मटलें तरी चालेल. हे अविद्येसह अठरा गुण जीवात्मा व शरीरांतील उष्मा या विसांना पंचभौतिक अशी संज्ञा आहे. महत् प्राणवायूसह या विसांना धारण करतो. व शरीराच्या नाशाच्या वेळीं देखील त्या प्रभावसंपन्न महताला देह नाहींसा करण्याला हा प्राणवायु एक साधन आहे. जो जो ह्मणून प्राणी उत्पन्न होतो तो तो त्याचें पापपुण्य सरलें ह्मणजे या पंचमहाभूतांशीं मिळून जातो व फिरून त्या जन्मांतल्या संचित पापपुण्यानें तयार करून ठेवलेल्या नवीन शरीरामध्यें शिरतो. याप्रमाणें अविद्या, वासना व कर्में यांनीं तयार करून ठेवलेल्या निरनिराळ्या देहांमध्यें कालाच्या आज्ञेनें ज्याप्रमाणें मनुष्य एका घरांतून दुसऱ्या घरांत शिरत राहवा त्याप्रमाणें शिरत राहतो. जे शहाणे आहेत व ज्यांना निश्चित ज्ञान झालें आहे, त्यांना हें भ्रमण पाहून शोक होत नाहीं. फक्त जे मूर्ख असतात त्यांनाच देह व जीव यांचा वास्तविक कांहीं संबंध नसता संबंध जोडून या स्थित्यंतरामुळें शोक होतो. हा जीव कोणाचा संबंधी नाहीं. हा नेहमीं एकटा आहे व स्वतःचें शरीर व सुखदुःख हाच उत्पन्न करून घेत असतो. हा कधीं जन्मत नाहीं किंवा कधीं मरत नाहीं. प्रसंग विशेषीं हा या शरीरपाशापासून सुटून श्रेष्ठ गतीला मिळतो. व कर्मनाश झाल्यामुळें पापपुण्यात्मक देहाच्या बंदीशाळेंतून सुटून हा ब्रह्मस्वरूप होतो. हें पापपुण्य नाहींसें होण्याला सांख्यशास्त्रांत ज्ञानच कारण सांगितलें आहे. ज्या वेळीं पापपुण्य नाहींसें होऊन जीव ब्रह्मपदाला जाऊन मिळतो तेव्हां त्याला मिळालेली श्रेष्ठ गती विद्वानांना आपल्या ज्ञानचक्षूंनीं दिसते.'

---

## १९४ जनकाचे उद्गार. आशा.

### ( १२. २७६ )

युधिष्ठिर ह्मणाला, ' आमचे भाऊ, वडील, नातू, मुलगे, ज्ञाति, सुहृद, यांना आह्मीं पैशासाठीं क्रूरपणें मारलें. तेव्हां ही पैशाची हाव कशी नाहींशीं करावी ? या तृष्णेनें आमच्या हातून भयंकर पापें घडविलीं ! ' भीष्म ह्मणाले, ' या संबंधांत मांडव्य ऋषीनें विचारलें असतां विदेह राजानें पुढील उत्तर दिलें तें ऐक. तो ह्मणाला, ' **माझें ह्मणून मला कांहींच नसल्यानें मी मोटा सुखांत आहें.** या सर्व मिथिलेला आग लागली तरी यांत माझें कांहीं जळणार नाहीं. पैसा पुष्कळ असणें हें विद्वानाला दुःखालाच कारण आहे. परंतु मूर्खांना एवढेंसें वैभव देखील भुरळ पाडतें. वासनेची तृप्ति झाल्यानें या जगांत जें कांहीं सुख मिळतें किंवा, मोठें स्वर्गसुख ह्मणून जें कांहीं आहे, तें वासनेचा बींमोड करण्यामध्यें जें सुख आहे त्याच्या सोळाव्या हिश्शाला सुद्धां लागणार नाहीं. ज्याप्रमाणें गायीच्या वाढीबरोबरच तिच्या शिंगांची वाढ होत असते; त्याप्रमाणें पैसा वाढत राहिला असतां त्याबरोबर आशा वाढत राहते. ज्या कशावर थोडेंसें ममत्व जडतें त्याचा नाश झाला असतां त्यापासून फार दुःख होतें. मनुष्यानें वासनांच्या मार्गे लागूं नये. वासनांवर आसक्ति ठवणें दुःखाला कारण आहे. पैसा मिळाला असतां वासना सोडून देऊन धर्माकडे त्याचा व्यय करावा. विद्वान मनुष्य सर्व भूतमात्रांना आपल्या सारखें लेखतो व शुद्धांतःकरणानें कृतकृत्य होऊन खरें, खोटें, शोक, आनंद, प्रिय, अप्रिय, भय, अभय, सर्व कांहीं सोडून शांत व निश्चिंत होतो. ती तृष्णा मूर्खांना टाकवत नाहीं मनुष्य वठला तरी जी वठत नाहीं व जी प्राणाचा शेवट करणारा रोग आहे, ती ही आशा सोडल्यानेंच मनुष्याला सुख मिळणें शक्य आहे. जो धर्मात्मा चंद्राप्रमाणें उज्वल आपलें शुद्ध चरित्र सर्व वाईट गोष्टी पासून सुटलेलें पाहतो तोच इहपर लोकीं कीर्ति मिळवितो. '

---

## १९५ बापलेकांचा संवाद.

### ( १२. २७७-७८ )

युधिष्ठिर ह्मणाला, ' सर्व प्राणीमात्रांना भयावह असा हा काल निघून चालला असतां मनुष्यानें कल्याणकारण असें काय करावें ? ' यावर भीष्म ह्मणाले, ' पुढील बापलेकांचा संवाद या संबंधांत ऐक. कोणी एक ब्राह्मण वेदाध्ययनामध्यें गढला असे. त्याला मेधावी नांवाचा एक मुलगा होता. मोक्षधर्माकडे लक्ष न देतां वेदाध्ययनामध्येंच आपल्या बापाला गढून राहिलेला पाहून तो ह्मणाला, ' तात, मनुष्याचें आयुष्य हं हं ह्मणतां कमी होत चाललें असतां मनुष्यानें स्वतःच्या कल्याणाचें काय करावें, हें मला नीट सांगा, ह्मणजे आपल्या त्या उपदेशाप्रमाणें मी धर्माकडे लक्ष देईन. ' बाप ह्मणाला, ' ब्रह्मचर्याश्रमामध्यें वेदाध्ययन करून गृहस्थाश्रम धरून पितरांचा उद्धार करण्यासाठीं संतति उत्पन्न करावी व अग्नि ठेवून यथाविधि यज्ञ केल्यावर मग वनाला जाऊन वानप्रस्थाश्रमामध्यें राहवें. नंतर मुनी होऊन सर्व संन्यास करावा. ' मुलगा ह्मणाला, ' ह्या जगाला जरेनें चोहोंकडून घेरून यावर मृत्यूचा घाला पडला असतां व दिवस व रात्र यांचे नेमके ठोसे बसत असतां आपण असे शांतपणाचे विचार कसे सांगतां. मृत्यु या जगांत कोणाची वाट न पाहतां एकाएकीं सर्वांना घेऊन जातांना मला दिसत असतां मी याप्रमाणें अज्ञानामध्यें स्वतःला गुरफटून घेऊन पहात राहून आपण सांगतां या सर्व गोष्टींकडे लक्ष कसें पुरवावें ? जसजसी रात्र निघून जाते तसतसें त्याबरोबर आयुष्य कमी होत चाललें असतां उथळ पाण्यामधील माशाप्रमाणें कोण या जगांत सुखांत राहील ? भलतीकडे लक्ष देऊन फुलें तोडणाऱ्या मनुष्याप्रमाणें निरनिराळ्या व्यवसायांत गढलेल्या मनुष्याला त्याच्या त्या त्या इच्छा परिपूर्ण होण्यापूर्वींच मृत्यु गांठतो. ह्मणून उद्यांचें काम आज करून दुपारचें काम सकाळीं करावें. कारण मृत्यु कधीं याचें काम संपलें किंवा नाहीं याची कांहीं वाट पहात नाहीं. आपल्या कल्याणाचें जें असेल तें उद्यांला न ठेवतां आजच करून टाकावें. आपलें काम होण्याच्यापूर्वी मृत्यु आपल्याला गांठणार

नाहीं याची खबरदारी घ्यावी. आजच आपल्याला मृत्यु येणार नाहीं असें खात्रीनें कोणाला सांगवणार? ह्मणून तारुण्यापासूनच धार्मिक असावें. कारण जीविताचा कांहीं निश्चय नाहीं. धर्मसंचय केल्यानें इहपर लोकीं सुख मिळणार आहे. मोहजालांत सांपडून मनुष्य आपल्या वायकापोरांसाठीं कामें करण्याला कंबर बांधतो. व बरीं वाईट कामें करून तो त्यांना संतुष्ट ठेवतो. याप्रमाणें गुरांपोरांमध्यें राहून त्यांकडे लक्ष देणाऱ्या मनुष्याला निजलेल्या हरणाला घेऊन पळणाऱ्या वाघाप्रमाणें मृत्यु घेऊन जातो. अनेक वासना तृप्त करून घेण्यामध्यें गढून विषयोपभोगाची वासना तृप्त होण्याच्या पूर्वींच एखाद्या लांडगीनें ज्याप्रमाणें मेंढीला घेऊन पळून जावें त्याप्रमाणें मृत्यु याला घेऊन पळतो. हें मीं केलें आहे; हें करावयाचें आहे; हें अर्धें झालें आहे;' अशा विचारांत तो असतो तोंच त्याची वासना पूर्ण होण्याच्या आधीं त्याचें काम संपलें आहे किंवा नाहीं याची पर्वा न करतां काळ त्याला ओढून नेतो. शेत, दुकान, घर अशा गोष्टींमध्यें गढलेल्या मनुष्याला त्याच्या कर्माचें फळ मिळण्याच्या पूर्वीच मृत्यु घेऊन जातो. मनुष्य दुबळा असो, बलवान असो, शहाणा असो, शूर असो, मूर्ख असो, विद्वान असो; त्याच्या वासना पूर्ण झाल्या असोत किंवा झाल्या नसोत मृत्यु त्याला घेऊन जातो. मृत्यु, जरा, रोग, शोक आणि दुसऱ्या यांसारख्या नाना गोष्टी मनुष्याला टाळतां येण्याजोग्या नाहींत. मनुष्य जन्माला आल्याबरोबर जरा आणि मृत्यु त्याचा नाश करण्याकरितां त्याला येऊन चिकटतात. हें सर्व स्थावरजंगम भूतमात्र या दोहोंनीं घेरले गेले आहेत. ही मृत्युसेना आपल्यावर येऊं लागली असतां एका सत्यावांचून दुसऱ्या कशाचेही अंगीं हिला थोपविण्याचें सामर्थ्य नाहीं. कारण सत्यामध्येंच अमरत्व आहे. गांवांमध्यें राहण्यांत आनंद वाटणें हें मृत्यूला घर करून देण्यासारखें आहे; ज्याला अरण्य ह्मणतात तें देवांचें राहण्याचें ठिकाण आहे. उलट लोकांमध्यें राहण्यामध्यें जो आनंद तो त्या राहणाऱ्याला जखडण्यासाठीं पाशच आहे. धार्मिक लोकच हा पाश तोडून त्यांतून सुटतात, पाप्यांना हा तोडतां येत नाहीं. जो कायावाचामनानें कोणाला पीडा देत नाहीं किंवा त्यांच्या वृत्तीचें साधन काढून घेऊन त्यांना दुःख देत नाहीं, त्याला कोणापासून पीडा होत नाहीं. ह्मणून मनुष्यानें खरेपणानें राहून खऱ्याकडेच लक्ष द्यावें. सर्व इंद्रियें ताब्यांत ठेवून व सर्व प्राणीमात्रांवर सारखी नजर ठेवून मनुष्यानें सत्याच्या योगानें मृत्युला जिंकावें. अमरत्व व मृत्यु हीं दोन्हीं मनुष्याच्या देहामध्येंच आहेत. मूर्खपणामुळें मृत्यु येतो व खरेपणानें अमरत्व येतें. कामक्रोध व परपीडा सोडून सत्य धरून मृत्यूला टाळावें व अमर व्हावें. शांतियज्ञामध्यें गढून आत्मनिग्रहानें ब्रह्मयज्ञ करावे. त्याचप्रमाणें वाणी, मन व कर्में यांची आहुति देऊन यज्ञ करावे. ज्यामध्यें हिंसा आहे असा क्षत्रियासाठीं सांगितलेला हा पिशाच्च यज्ञ कोणी करावा? शिवाय या यज्ञाचें फल तरी विनाशीच आहे-ना. आपले आपण आपल्याकडूनच उत्पन्न झालों आहों हा विचार ठेवून संतति उत्पन्न करण्याच्या भानगडींत न पडतां स्वतःवरच अवलंबून राहून मी आत्मयज्ञ करीन. मला तारण्याला मुलें नकोत. ज्याचे तोंड व मन ताब्यांत आहे, ज्यानें तप केलें, त्याग केला, व ज्याला योगाची माहिती आहे, त्याला याच्या योगानें वाटेल तें मिळण्यासारखें आहे. ज्ञानासारखा दुसरा डोळा नाहीं; ज्ञानासारखें दुसरें फल नाहीं; विषयासक्तीसारखें दुसरें दुःख नाहीं व त्यागासारखें सुख नाहीं. ब्राह्मणाला एकांतामध्यें राहण्यासारखें दुसरें धन नाहीं. एकांतवास समदृष्टी, खरेपणा, शील, स्थिति, शिक्षा न करणें, सरळपणा व सर्व क्रियांपासून उपरम यासारखें त्याला दुसरें धन नाहीं. पैशाची, सुहृद बांधवांची किंवा बायकोची काय गरज आहे. कारण मनुष्याला मरावयाचें आहे. गुहेंमध्यें असलेल्या आत्म्याला हुडकावें. आपले आजे पणजे कोठें गेले याचा कांहीं पत्ता आहे काय?

प्राकृतीच्या पलीकडच्या शाश्वत ब्रह्मप्राप्तीसाठीं मनुष्यानें याप्रमाणें झटावें. मोक्षधर्माकडे लागलेल्या मनुष्यानें आहार बेताचा ठेवून इंद्रियें स्वाधीन ठेवावीं. घर सोडावें. लाभ, हानी सारखीं लेखावीं. सर्व इंद्रियविषय मिळत असतांही ते तुच्छ समजून संन्यास घ्यावा. दृष्टीनें, शब्दानें किंवा मनानें

दुसऱ्याला तुच्छ करूं नये. एखाद्याच्या समोर किंवा त्याच्या मागें कोणाला वाईट बोलूं नये. कोणाही प्राणीमात्राला पीडा न करतां सूर्याप्रमाणें सर्वांशीं मित्रत्वानें असावें.या जन्माला येऊन कोणाशींही शत्रुत्वानें वागूं नये. कोणी वाईट बोललें असतां सोसून घ्यावें व मोठेपणाचा अभिमान धरूं नये. दुसऱ्यानें खवळविलें असतांही शांतपणें अनुकूल भाषण करावें. दुसऱ्यांनीं आपल्या नांवानें खडे फोडले असतांही आपण उलट तसें करूं नये. गांवांत लोकांशीं सरळ किंवा वांकडें कसेंच वागण्याच्या भानगडींत पडूं नये. भिक्षेसाठीं निघालें असतां पुष्कळ घरें भिक्षा मागूं नये. व पूर्वी आमंत्रण घेऊन ठेवलेल्या घरीं जेवावयाला जाऊं नये. अंगावर चिखल वगैरे टाकला असतांही आपल्या कर्तव्यापासून न ढळतां अशा मनुष्याला वाईट बोलूं नये. दयाभूत असावें. कोणी दुःखविलें असतां उलट त्याला दुखवूं नये. धावरूं नये. आत्मस्तुति कधीं करूं नये. मुसळ बाजूला गेलें आहे व धूर नाहींसा होऊन विस्तव विझला आहे आणि भांडींबिंडीं घरांत गेलीं आहेतसें पाहून संन्याशानें त्या घरीं भिक्षेला शिरावें. केवळ शरीरधारणेपुरत्या भिक्षेवर त्यानें संतुष्ट असावें. समाधान होईल इतक्या अन्नाची सुद्धां त्यानें इच्छा करूं नये. भिक्षा मिळाली नसतां रागावूं नये व मिळाल्यास हर्ष मानूं नये. सामान्य लोकांना जें हवेंसें वाटतें त्याची यानें इच्छा करूं नये. आदरून बोलाविलेल्या घरीं जाऊन जेवूं नये. आदरपूर्वक मिळालेल्या गोष्टी तुच्छ कराव्या. पुढें आलेल्या अन्नासंबंधानें दोष काढूं नये किंवा त्याची प्रशंसा करूं नये. शयन व आसन मनुष्य वस्तीपासून दूर पहावें. त्यानें कोणी रहात नसलेलें घर, झाडाचें मूळ, जंगल किंवा गुहा अशीं एकांतांतील ठिकाणें राहण्याला पहावीं. आपण जें कांहीं करतों तें त्यानें दुसऱ्याला कळूं देऊं नये. अथवा त्यावर भलतेंच पांघरूण घालावें. व आत्म्याच्या ठिकाणीं लीन असावें. सर्व संगांपासून मुक्त होऊन योगाकडे लागून त्यानें सम, अचल व दृढ असावें. कर्माच्या योगानें पापपुण्य सांठविण्याच्या भानगडींत पडूं नये. नेहमीं समाधानवृत्ति ठेवून संतुष्ट व प्रसन्न असावें. निर्भयपणें जपामध्यें गढून राहून वैराग्य धरून कोणाशीं बोलूं नये. आपल्या व दुसऱ्या प्राणिमात्रांच्या शरीराची व इंद्रियांची फिरून फिरून होणारी उत्पत्ति व त्यांचा नाश होऊन पंचमहाभूतांमध्यें होणारा लय लक्षांत घेऊन त्यानें वासनेपासून मुक्त असावें. व शिजल्या किंवा कच्चा अन्नावर राहून सर्वांवर समदृष्टि ठेवण्याला शिकावें. मिताहार व इंद्रियनिग्रह केल्यानें आपल्या आपणच शांति येते. शब्द, मन, राग, हिंसा, पोट, शिश्न यांचा जोर कमी करून यानें स्वतःला परनिंदेची बाधा होऊं देऊं नये. सर्वांशीं त्रयस्थपणें राहून निंदा व स्तुति त्यानें सारख्या लेखाव्या. हा संन्यासाश्रमाचा श्रेष्ठ मार्ग आहे. मन थोर ठेवून आत्मनिग्रहानें सर्व संगांपासून त्यानें स्वतःला दूर ठेवावें. पूर्वी गेलेल्या जागीं जाऊं नये व पूर्वीच्या ओळखीच्या लोकांशीं संबंध ठेवूं नये. घरदार न करतां सर्वांशीं सौम्य राहून त्यानें आत्मचिंतनामध्यें गढून रहावें. वानप्रस्थ किंवा गृहस्थ यांच्याशीं मिसळूं नये. पूर्वी ठरवून न ठेवतां अनायासें मिळालेलें अन्न त्यानें घ्यावें. मनाला कधीं हर्ष होऊं देऊं नये. अशा प्रकारचें संन्यासवर्तन हेंच विद्वानांना मोक्षाचें साधन आहे.मूर्खांना हें फार जड जातें. जो घरदार सोडून सर्व प्राणिमात्रांला अभय देतो त्याला उत्तम व शाश्वत लोक मिळतात.'

---

## १९६ वृत्र व शुक्राचार्य यांचा संवाद.
### ( १२. २७९–८० )

युधिष्ठिर ह्मणाला, 'सर्व लोक आह्मांला धन्य धन्य ह्मणतात; परंतु वास्तविक पाहतां आमच्यासारखें दुःखी कोणीच नसेल. मनुष्यामध्यें देवांपासून जन्म झाला असून व लोकांमध्यें बहुमान असून असें दुःख आमच्या वांट्याला आलें आहे! तेव्हां या जगांत देहधरणें हेंच दुःखाला कारण आहे, असें मला वाटतें. तेव्हां सर्व दुःख नाहींसा करणारा संन्यासाश्रम आह्मांला केव्हां मिळणार? दशेंद्रियें, पंचवायु, मन व बुद्धि हीं सतरा, त्याचप्रमाणें काम क्रोध, लोभ, भय, व स्वप्न हींही योगाच्या आड येऊन मनुष्याला जन्ममरणाच्या फेऱ्यांत घालणारीं पांच इंद्रियें व पांच इंद्रियविषय व सत्व, रज, तम हे

तीन गुण असे हे आठ या सर्वांपासून मुक्त होऊन जे मुनी कडकडीत व्रत पाळतात त्यांना जन्ममरणाच्या फेऱ्यांत पडावें लागत नाहीं. तेव्हां हें राज्य सोडून संन्यास घेण्याची पाळी आमच्यावर केव्हां येणार ? ' भीष्म ह्मणाले, ' तात, प्रत्येक वस्तूचा, शेवट आहे. प्रत्येकाला मर्यादा आहे. तसाच पुनर्जन्माचा सुद्धा शेवट आहे. या जगामध्यें कायम असें कांहींच नाहीं. वैभवामध्यें संसारांत आसक्ति उत्पन्न करण्याचा गुण असल्यानें त्यामध्यें तुला दोष दिसतो त्यांत कांहीं वावगें नाहीं. तुझ्यासारखे धर्मज्ञ उयोगानें कालांतरानें मोक्षाला जातात. देहामध्यें असणारा हा जीव पापपुण्याचा कर्ता नाहीं. मात्र तो पापपुण्यापासून उद्भवणाऱ्या अज्ञान तमामध्यें झांकला जातो.ज्याप्रमाणें वाऱ्याला कांहीं रंग नसून काजळ किंवा मनशीळ यांच्याशीं मिळाल्यानें तो तो रंग त्याच्या ठिकाणीं दिसूं लागून सर्व दिशा तशा भासवितो,त्याप्रमाणें जीवाला कांहीं रंग नसून या तमोगुणामध्यें झांकला गेल्यानें कर्मफलानुरूप तो निरनिराळ्या रंगाचा दिसूं लागून निरनिराळ्या देहांत फिरत राहतो. जेव्हां ज्ञानाच्या योगानें हा जीव तम दूर करतो तेव्हां सनातन ब्रह्म प्रकाशमान होऊं लागतें. कर्म विनाशी असल्यानें कर्मांना धरून ब्रह्माशीं मिळून जातां येणार नाहीं. ह्मणून जे मुक्त झाले आहेत यांची उपासना केली पाहिजे. कारण मोठमोठे ऋषी ब्रह्मोपासनेपासून कधीं ढळत नाहींत. यासंबंधांत पुढील वृत्र व शुक्राचार्य यांचा संवाद लक्षांत ठेव.

शत्रूंनीं जिंकून कोणी साहाय्य न राहतां राज्य व वैभव यांला मुकून शत्रूंमध्यें असतांना देखील केवळ श्रेष्ठ बुद्धीच्या जोरावर वृत्राला बिलकूल शोक न करतांना पाहून शुक्राचार्यांनीं त्याला, 'पराभव झाल्यामुळें तुला कांहीं दुःख होत नाहीं काय, ह्मणून विचारलें; तेव्हां वृत्र ह्मणाला, ' सत्य व तप यांच्या योगानें भूतमात्रांची उत्पत्ति व नाश हें मला कळत असल्यानें मला कशापासून दुःखही होत नाहीं किंवा आनंदही होत नाहीं. कालाच्या आज्ञेनें प्राणिमात्र पराधीन होऊन नरकांत पडतात; व त्यांमध्यें जे शहाणे असतात ते स्वर्गाला जाऊन सुखांत असतात. त्या त्या ठिकाणीं ठरलेला काळ घालवीत कांहीं अवशिष्ट राहिलेल्या काळाच्या योगानें फिरून फिरून ते जन्माला येतात. वासनापाशांनीं जखडले जाऊन प्राणिमात्र हजारों नीच योनींमध्यें जन्माला जाऊन नरकांत पडून त्यांतून वर येत असतात. कर्म तसें फल असें शास्त्र आहे. प्राणिमात्र हलकी योनि, मनुष्य योनि, देव योनि अशा मोक्षाशीं तुलना केली असतां नरकासारख्या निरनिराळ्या योनींमध्यें पडतात. पूर्व जन्मींच आपल्या बऱ्यावाईट कृत्यांनीं सुखदुःखाचें गाठोडें तयार करून ठेवून तें प्राणिमात्र भोगीत राहतात; व त्या कर्मानुरूप फल अनुभवल्यावर त्यांच्या कर्मांनीं ठरविलेल्या पहिल्या मार्गाला ते फिरून येतात. ' याप्रमाणें ब्रह्मस्वरूपी सृष्टीच्या मुख्य आधारासंबंधानें वृत्र बोलत असतां, ' अशी वायफळ बडबड काय चालविली आहेस, ' ह्मणून शुक्राचार्य त्याला ह्मणाले, तेव्हां वृत्र फिरून ह्मणाला, ' जयाच्या आशेनें मीं कडकडीत तप केलें हें आपण जाणतांच. सर्व भूतमात्रांमधील नानाप्रकारचे गंध व रस एकट्यानेंच वळकावून आपल्या तेजानें मीं तिन्ही लोकांना मागें सारलें. ज्योतिर्मालिकेमधून मी आकाशांतून फिरूं लागलों. मला कोणाची भीति न उरतां मला जिंकण्याचें सामर्थ्य कोणाच्या अंगीं राहिलें नाहीं. माझ्या तपानें मला ऐश्वर्य मिळालें व आपल्या कर्मानें मी त्याला मुकलों. म्हणून धैर्य धरून आतां त्या संबंधानें मी शोक करीत नाहीं. महेंद्राबरोबर माझें युद्ध चाललें असतां सनातन भगवान विष्णु मला दिसला. त्याच्या दर्शनाच्या फलाची कांहीं बाकी आज खात्रीनें असली पाहिजे. ह्मणूनच कर्मफलासंबंधानें आपल्याला प्रश्न करण्याची मला बुद्धि झाली आहे. ब्रह्मैश्वर्य कोणच्या वर्णांच्या ठिकाणीं राहिलें आहे, तें ऐश्वर्य कमी कशानें होतें, प्राणिमात्र कोणापासून उत्पन्न होतात, कसे जगतात, त्यांच्या हातून क्रिया कशा घडतात कोणत्या फलाच्या योगानें प्राणी शाश्वत ब्रह्मस्वरूपी होतात व कोणत्या कृत्यानें किंवा कोणत्या ज्ञानानें तें फल मिळवितां येतें, हें मला सांगा. ' याप्रमाणें यांचें संभाषण चाललें असतां, महामुनी सनत्कुमार त्याचा संशय दूर करण्यासाठीं त्या ठिकाणीं आले. सत्कार होऊन ते आसनावर बसल्यावर शुक्राचार्यांनीं त्यांना वृत्राला

विष्णूचें महात्म्य सांगण्यास सांगितलें. तें ऐकून, सनत्कुमार ह्मणाले, ' हे दानवेंद्रा, तुला भगवान विष्णूचें महात्म्य सांगतों ऐक. हें सर्व जग विष्णूच्या ठिकाणीं आहे, हें तूं लक्षांत ठेव. हें सर्व चराचर भूतमात्र तोच उत्पन्न करतो. वेळ आली असतां याचा संहार करून, फिरून वेळ येईल तेव्हां तो याला उत्पन्न करतो. सर्व याच्या मध्येंच लयाला जाऊन याच्यापासूनच फिरून उत्पन्न होतात. शास्त्राच्या ज्ञानानें, तपानें किंवा यज्ञानें याची प्राप्ति होणें शक्य नाहीं. केवळ इंद्रियनिग्रहानेंच हा लाधणें शक्य आहे. आतां, यज्ञयागादिक अगदींच निरुपयोगी आहेत असें नाहीं. कारण बाह्य व अंतरक्रियांनीं त्याच प्रमाणें मनाच्या योगानें मनुष्याला इंद्रियशुद्धि करून घेतां येते, व ह्याच्या योगानें त्याला ब्रह्मसुख घेतां येतें. ज्याप्रमाणें सोनार धातूला वरचेवर भट्टींत टाकून मोठ्या आयासानें त्याचा हिणकसपणा काढून टाकतो त्याप्रमाणें जीव शेंकडों जन्मांमधून जाऊन स्वतःला शुद्ध करून घेत असतो. कोणी मोठ्या खटपटीनें एकाच जन्मामध्यें स्वतःला शुद्ध करून घेऊं शकतात. ज्याप्रमाणें एखाद्यानें अंगावर पडलेला थोडासा चिखल तो घट्ट बसण्याच्या पूर्वीं काढून टाकावा त्याप्रमाणें मनुष्यानें आपल्या अंगामधले दोष मोठ्या यत्नानें दूर करावे. तिळांमधें थोडी फुलें चुरलीं असतां तिळांचा वास जाऊन त्या फुलांचा वास त्यांला लागत नाहीं, त्याप्रमाणें थोड्या अंतःशुद्धीनें आत्मदर्शन होणें शक्य नाहीं. परंतु ज्याप्रमाणें ते तीळ पुष्कळ फुलांमध्यें फिरून फिरून चुरल्यानें तिळांचा वास जाऊन फुलांचा वास त्यांला लागतो; त्याप्रमाणें विषयांवरील आसक्तिरूप दोष पुष्कळ जन्मांमधून बुद्धीच्या योगानें सत्वगुणाच्या साहाय्यानें, अभ्यासानें धुऊन निघतात. कर्मामध्यें गढलेले व त्यांत न गढलेले अशा प्रकारचे प्राणिमात्र ज्याच्या योगानें निरनिराळीं कर्में करूं लागतात, ते कर्में कशीं करूं लागतात व कशीं सोडतात हें सर्व सांगतों ऐक. ज्याला आदि व अंत नाहीं असा श्रीमान नारायण सर्व चराचर भूतमात्र उत्पन्न करतो. सर्व भूतमात्रांमध्यें क्षर व अक्षर असा तो आहे. अकरा विकारांनीं युक्त असा तो आपल्या इंद्रियरूपी किरणांनीं सर्व जग गिळून टाकतो. ही पृथ्वी त्याचे पाय असून स्वर्ग हें त्याचें डोकें आहे. निरनिराळ्या दिशा हे त्याचे बाहू आहेत. आकाश त्याचे कान आहेत. सूर्य त्याच्या डोळ्यांतील तेज आहे; चंद्र मन आहे. ज्ञान बुद्धि आहे व जल जीव आहे. ग्रह त्याच्या भिंवयांच्या मधला प्रदेश असून नक्षत्रचक्र त्याच्या डोळ्यांतला प्रकाश आहे. सत्व, रज, तम हे गुण त्याच्यापासूनच उत्पन्न होत असून सर्व आश्रमांचें व सर्व जपतपादि कर्मांचें फल तोच आहे; व कर्मांच्या उपरमाचें फलही तोच आहे. छंदस् त्याच्या अंगावरील रोमांच असून प्रणव त्याची वाणी आहे. निरनिराळे वर्णाश्रम त्याचा आश्रय असून त्याला पुष्कळ तोंडें आहेत. धर्म हा त्याच्या हृदयांत असून श्रेष्ठ धर्म व श्रेष्ठ तप तोच आहे. सत्, असत् तोच असून श्रुती, शास्त्र, सोमपात्रें, सोळा ऋत्विज व प्रत्यक्ष यज्ञ तोच आहे त्याच्यावांचून दुसरें कांहीं नाहीं. ऋत्विज त्याला निरनिराळ्या रूपानें समजतात तरी तो एकच आहे. हें सर्व विश्व त्या एकाच्याच ताब्यांत आहे. याच्या ठिकाणीं असणारे वेद सर्व प्राणिमात्रांना एकस्वरूपानें पाहतात. जेव्हां प्राणी सत्य ज्ञानानें हा एकपणा ओळखतो तेव्हांच त्याला ब्रह्मप्राप्ति होते. उत्पत्तीपासून लयापर्यंत सृष्टीचा जो एक अस्तित्वकाल त्याला कल्प ह्मणतात. जीव त्याचप्रमाणें जड भूतमात्र अशीं हजारों कल्पें जिवंत राहतात. प्रत्येक सृष्टीचा काल हजारों विहिरीच्या विस्तारावरून पुढें दिल्याप्रमाणें मोजतात. एक योजन रुंद, एक कोस खोल व पांचशें योजनें लांब अशी एक विहीर अशा हजारों कल्पून त्यांतून दररोज एकदां केसाच्या टोंकांतून घेतां येईल इतकें पाणी काढून त्या कोरड्या करण्याला जितका वेळ लागेल तितके दिवस एका सृष्टीचा काळ समजावा. सर्व प्राणीमात्रांमध्यें काळा, करडा, निळा, तांबडा, पिंवळा व पांढरा यांपैकींच एखादा रंग दिसून येतो. सत्व, रज, तम या तीन गुणांच्या निरनिराळ्या प्रकारच्या मिश्रणांनीं हे रंग बनतात. तमाचा जोर असून सत्व कमी व रज नियमित असल्यानें काळा रंग उत्पन्न होतो, व तम अधिक असून सत्व व रज यांच्या प्रमाणांत वरच्यामध्यें आदलाबदल झाली असतां त्यापासून करडा रंग उत्पन्न होतो.

रज अधिक, सत्व कमी व तम नियमित या मिश्रणापासून निळा रंग उत्पन्न होतो. रज अधिक असून, सत्व तमाची वरच्यामध्यें आदलाबदल झाली असतां तांबडा रंग उत्पन्न होतो. हा रंग पूर्वीहून सुखकर आहे. जेव्हां सत्व अधिक रज कमी व तम बेताचा अशी स्थिति असते तेव्हां पिंवळा रंग उत्पन्न होतो. हा फार सुखावह आहे. सत्व अधिक होऊन रज तम जेव्हां पूर्वीच्याहून उलट प्रमाणांत असतात तेव्हां पांढरा रंग उत्पन्न होतो; व हा फारच सुखदायक आहे. हा सर्वांत श्रेष्ठ रंग आहे. रागद्वेषापासून अलग असल्यानें हा निष्कलंक आहे. त्याचप्रमाणें प्रवृत्तीपासून उत्पन्न होणारा श्रम किंवा शोक याला ठाऊक नाहीं. ह्मणून हा पांढरा रंगच मोक्षफलरूपी सिद्धि देणारा आहे. गर्भांतून हजारों जन्म घेतल्यावर जीवाला ही मोक्षसिद्धि मिळते. ही गति शास्त्राधारानें अनुभवात्मक आहे. जी गति लोकांना मिळते ती वर्णावर अवलंबून असून तो वर्ण जो जो काल सुरू होतो त्या त्या कालाच्या स्वरूपावर अवलंबून असतो. जीवाला ज्या ज्या गतींतून जावें लागतें त्या एकंदर चौदा लक्ष आहेत आणि त्यामध्यें जीव प्रसंगवशानें वर चढतो, तींत कायम राहतो, किंवा खालीं जातो. कृष्णवर्ण जीवाला जी गति मिळते ती फार नीच आहे. कारण ह्याच्या योगानें नरकांत पडून ह्याला कुजत रहावें लागतें. वाईट कर्मामध्यें गढून राहिल्यानें जीवाला या स्थितींत हजारों कल्पें रहावें लागतें. तेथें याप्रमाणें हजारों वर्षें काढल्यावर त्याला करडा रंग येऊन त्याचा तिर्यग् योनीमध्यें जन्म होतो व तेथेंही पराधीनतेनें तो पुष्कळ वर्षें राहतो. या स्थितीमध्यें ओढवणारीं दुःखें सोसल्यामुळें त्याचीं पापें नाहींशीं होऊन त्याचें मन संग सोडून त्यागाकडे लागतें. जेव्हां जीव सत्वगुणानें युक्त होतो तेव्हां तो बुद्धीनें तमोगुणात्मक सर्व टाकून आपल्या कल्याणाच्या खटपटीला लागतो. त्यामुळें त्याला तांबडा रंग येतो. परंतु हा सत्वगुण जर न येईल तर तो जीव निळा रंग घेऊन ह्या जन्ममरणाच्या फेऱ्यांत सांपडून राहतो. ह्याप्रमाणें मानवजन्म येऊन एक कल्पपर्यंत कर्मपाशानें पीडला जाऊन पुढें त्याला पिंवळा रंग येऊन देवत्व येतें व त्या स्थितींत शंभर कल्पपर्यंत राहून तो परत ती योनी सोडून फिरून एकवार मनुष्ययोनीला येतो. पिंवळा रंग आल्यावर हजार कल्पेंपर्यंत देवयोनीमध्यें जीव सुखांत राहतो. तेथें तो कांहीं मुक्त होत नाहीं. परंतु मोक्षाशीं तुलना केली असतां नरकतुल्य अशा मागल्या कल्पामध्यें केलेल्या वऱ्यावाईट कर्माचें फल भोगीत तो त्या ठिकाणीं एकुणीस हजार निरनिराळ्या स्थितींतून फिरत राहतो. फलदायक कर्मांच्या स्वर्ग अथवा देवत्वरूपी नरकांतून नंतर तो सुटतो. कारण याप्रमाणें देवलोकामध्यें पुष्कळ कल्प मजेंत राहून पुढें फिरून तो मनुष्ययोनीमध्यें पडतो. या स्थितींत तो एकशें आठ कल्प राहतो. नंतर तो मुक्त होतो. या दुसऱ्यांदा आलेल्या मनुष्य स्थितींत कलिरूप कालामुळें वाईट कर्में त्याच्या हातून घडलीं तर फिरून काळा रंग त्याला येऊन तो अगदीं सर्वांत निकृष्ट अशा स्थितींत जाऊन पडतो.

आतां जीवाला मोक्ष कसा मिळतो सांगतों ऐक. मोक्षाच्या इच्छेनें हा सत्वगुणप्रधान अशा सातशें प्रकारचीं कर्में करूं लागून तांबड्या, पिंवळ्या व पांढऱ्या वर्णांमधून जात राहतो. ह्या पांढऱ्या वर्णामध्यें आला असतां ज्याच्या खालीं आठ सुखदायक लोक आहेत अशा अनेक लोकांमधून मोक्षस्वरूपी निष्कलंक अशा रूपामध्यें हा फिरत राहतो. साठशें पोटविभागाशीं जे एक आहेत असे वर सांगितलेले आठ लोक दैदीप्यमान योग्यांना केवळ मनाची सृष्टि असून त्यांचें खरें स्वतंत्र अस्तित्व त्यांना दिसत नसतें. हा पांढरा वर्ण मिळवून घेतलेल्यांना जें कांहीं मिळवावयाचें असतें ती जाग्रत्स्वप्नसुषुप्तीच्या पलीकडची तूर्यस्थिति होय. योगैश्वर्यानें मिळविलेलें वैभव ज्याच्यानें सोडवत नाहीं अशा योग्याला एकाच देहामध्यें शंभर कल्पपर्यंत वैभवांत राहून पुढें महर्, जन, तप व सत्य अशा चार लोकांमध्यें रहावें लागतें. या सहाव्या वर्णसंबंधानें, सर्व संग व राग सोडून ज्या योग साधलेल्याला श्रेष्ठ अशी पूर्ण सिद्धि मिळाली नाहीं अशाला एवढी सिद्धि तरी मोठीच समजावयाची. वर सांगितल्या प्रकारची सिद्धि मिळून जो योगी योगभ्रष्ट होतो त्याला आपल्या पूर्व कर्माची बाकी भोगून टाकण्यासाठीं शंभ

कल्पपर्यंत स्वर्गांत राहवें लागतें. व या स्थितींत तो पंचेंद्रियें; मन व बुद्धि यांचा कलंक पूर्वीपासूनच त्यांचा सत्वगुणाकडे कल असल्यानें धूत राहतो. हा वर सांगितलेला काळ संपल्यावर असा मनुष्य फिरून या मृत्युलोकीं जन्माला येऊन मग उत्तम गति मिळवितो. मनुष्यलोकांपासून निघून वरवरच्या पायरीचे नवीन नवीन जन्म घेण्याला तो निघतो, व ह्यावेळीं भूर्, भूवर्, स्वर्, महर्, जन, तप व सत्य या सात लोकांमधून सातवेळां जातो, व या अवधींमध्यें समाधि व व्युत्थान (पुनर्जागृति) यांच्यायोगानें याचें योगैश्वर्य नेहमीं वाढत राहतें. मोक्षेच्छु योगी योगाला विघ्न आणणारीं पांच ज्ञानेंद्रियें, मन व बुद्धि यांना आवरून सर्व संग सोडून ह्या मृत्युलोकामध्यें राहून अविनाशी व अनंत असें जें मोक्षपद त्याला जाऊन मिळतो. कोणी याला महेश्वराचें पद ह्मणतात, कोणी विष्णूचें ह्मणतात, कोणी ब्रह्मदेवाचें म्हणतात, कोणी शेषाचें म्हणतात, कोणी नराचें म्हणतात, कोणी दैदीप्यमान चित्स्वरूपाचें ह्मणतात व कोणी सर्वव्यापी परमात्म्याचें म्हणतात. प्रळयकालीं ज्यांनीं ज्ञानानें जड, सूक्ष्म व कारण देह जाळून खाक केले आहेत अशा प्रकारचे हे लोक व ब्रह्माहून वेगळीं अशीं त्यांचीं कर्मात्मक इंद्रियें ब्रह्माशीं मिळून जातात. देवस्वरूपाला मिळाल्यावर ज्या जिवांचीं कर्मफळें पूर्णपणें भोगून सरलीं नाहींत त्यांना कल्पक्षयानंतर नवीन कल्पामध्यें पूर्वीच्या स्थितीमध्यें फिरून यावें लागतें. सर्व कल्पांच्या सारखेपणामुळें असें घडून येत असतें. प्रळयकाळीं ज्यांचीं कर्मफळें भोगून सरलीं आहेत ते ही पुढील कल्पांत स्वर्गांतून खालीं येऊन मृत्युलोकामध्यें जन्म घेतात. कारण ज्ञानावांचून शेंकडों कल्पांनीं सुद्धां मनुष्याला आपल्या कर्मांचा नाश करितां येत नाहीं. सारखें सामर्थ्य व स्वरूप असणारे उच्च प्रतीचे प्राणी पूर्वसृष्टीच्या वेळेप्रमाणेंच प्रळयानंतर नव्या सृष्टीच्या वेळीं वरवर किंवा खालीं खालीं जात आपापले जन्म फिरून घेत राहतात. ब्रह्मज्ञान झालेला मनुष्य जोंपर्यंत पूर्वीच्या कल्पांतील आपल्या कर्माचें फळ भोगीत राहतो तोंपर्यंत सर्व प्राणिमात्र तशाच परा व अपरा विद्या त्याच्या ठिकाणीं असतात. योगानें चित्त शुद्ध होऊन मायाचा तो अभ्यास करूं लागला असतां हें सर्व जग त्याला आपल्या पंचेंद्रियात्मक दिसूं लागतें, व त्या व्यवधानाच्या योगानें जीवाला उच्च व शुद्ध गति मिळून तेथून तो अक्षयपदाला जाऊन मिळतो, व शाश्वत व दुर्लभ अशा ब्रह्माची प्राप्ति करून घेतो.' वृत्र ह्मणाला, 'आपण ह्मणतां हें अगदीं खरें आहे आणि ह्मणूनच मला दुःखाला कारण दिसत नाहीं. दैदीप्यमान विष्णूचें मोठें सामर्थ्यवान कालचक्र फिरत राहिलें आहे हें मला दिसतें. ज्यापासून सर्व प्राणिमात्र उत्पन्न होतात तें पद शाश्वत आहे. तो विष्णु परमात्मा असून सर्व भूतमात्रांमध्यें श्रेष्ठ आहे. सर्व जग त्याच्या आधारानें आहे.' असें ह्मणून प्राण सोडून आपल्याला योगानें परमात्म्यामध्यें लीन करून घेऊन वृत्र श्रेष्ठ पदाला गेला. तो महा योगैश्वर्यसंपन्न महादेव सर्वांच्या मुळाशीं आहे. तेथून तो परमात्मा आपल्या सामर्थ्यानें हे सर्व नानाप्रकारचे भूतमात्र उत्पन्न करतो. त्याच्या आठव्या अंशापासून ह्या अच्युत केशवाची उत्पत्ति आहे, व त्या आठव्या अंशानें हा हें सर्व जग उत्पन्न करतो. सामान्य प्राणिमात्राशीं ताडून पाहतां हा नित्य आहे तरी कल्पांतीं हा नाश पावतो. परंतु तो महासामर्थ्यवान परमात्मा मात्र प्रळयकाळीं स्वस्वरूपाचे ठिकाणीं राहतो. हा केशवच सर्व भूतमात्रांच्या स्वरूपानें सर्व लोकांमधून फिरत राहतो. तोच अनंत व सनातन सर्व जग भरून काढून सर्व लोकांतून फिरत राहतो. गुणादिकांनीं अमर्यादित असा तो महात्मा हें सर्व विचित्र जग उत्पन्न करतो.' युधिष्ठिर ह्मणाला, 'अर्थात् वृत्राला आपली उत्तम गति पुढें दिसत असल्यानें तो सुखी असून त्याला दुःखाला कांहीं कारण उरलें नाहीं. शुक्लवर्ण धरून जो शुद्ध व निष्कलंक जातींत जन्म घेतो व जो साध्यांच्या जोडीला जाऊन बसला आहे, त्याला पुनर्जन्माच्या फेऱ्यांत पडावें लागत नाहीं. अशा प्रकारचा मनुष्य नरक किंवा नीच योनी यांपासून सुटला असतो. परंतु ज्याला पिंवळा किंवा तांबडा वर्ण प्राप्त झाला आहे तो प्रसंगीं तमोगुणानें घेरला जाऊन तिर्यग् योनीमध्यें येऊन पडतो. आमच्या संबंधानें पाहतां आह्मी फार कष्टी झालों असून सुखदुःखांमध्यें गढ-

ळा आहों. तेव्हां आम्हांला कोणता वर्ग येणार, निळा किंवा काळा, कांहीं कळत नाहीं. ' भीष्म ह्मणाले, ' तुमचा शुद्ध कुळांत जन्म झाला असून तुह्मीं कडकडीत व्रत पाळलें असल्यानें देवलोकामध्यें सुखांत राहून फिरून मनुष्यजन्माला याल. सृष्टि राही तोंपर्यंत सुखांत राहून पुढें तुह्मी देवत्वाला मिळाल व तेथें सर्व सुखांचा उपभोग घेऊन पुढें सिद्धांमध्यें गणले जाऊं लागाल. तेव्हां न घाबरतां खुशाल ऐस. '

---

## १९७ वृत्र व इंद्र यांचा प्रसंग.
## ( १२. २८१–८३ ).

युधिष्ठिर ह्मणाला, ' त्या अतुल तेजस्वी वृत्राचीं भागवतपणा, ज्ञान व विष्णुभक्ति किती तरी मोठीं ह्मणावीं ? त्या विष्णूचें पद कोणाला कळण्याजोगें नसून वृत्राला तें इतकें चांगलें कसें कळलें ? आपण सांगितलें या गोष्टींवर माझा विश्वास आहे; परंतु उपनिषदें व वेदान्त यांपासून खरें ज्ञान ज्याला झालें होतें अशा विष्णुभक्त धार्मिकाला इंद्रानें कसें मारलें ही माझी एक शंका आहे, तेवढी आपण दूर करा. ' भीष्म ह्मणाले, ' पूर्वी देवगणासह इंद्र रथांत बसून चालला असतां ज्याची उंची पांचशें योजनें आहे व घेर तीनशें योजनें आहे असा पर्वतप्राय वृत्र त्याला दिसला. त्रैलोक्याला अजिंक्य अशा त्याला पाहून देवांना भीति व चिंता उत्पन्न झाली. अशा वृत्राला पाहून इंद्राचे तर भितीनें गुडघेच मोडले. देवदानवांच्या मोठ्या युद्धाच्या वेळीं चोहोंकडून मोठा शब्द होऊन वाद्यांचा एकच नाद उठून राहिला. इंद्राला आपल्यापुढें युद्धाला तयार राहिलेला पाहून वृत्र डगमगला नाहीं, त्याला भीति वाटली नाहीं व कांहीं विशेष खटपट करण्याची आवश्यकताही दिसली नाहीं. त्रैलोक्याला भीति उत्पन्न करणारें त्या दोघांमध्यें युद्ध सुरू झालें. उभय पक्षांमधील सैन्यांनीं व नानाविध शस्त्रास्त्रांनीं सर्व अंतरिक्ष भरून गेलें. ब्रह्मदेव प्रभृति सर्व देव महाभाग ऋषी, सिद्ध व गंधर्व आपआपल्या विमानांतून बसून तें युद्ध पाहण्याला आले होते. तेव्हां वृत्रानें सर्व अंतरिक्षाला व्यापून धोंड्यांचा वर्षाव करून एका क्षणांत देवेंद्राला झांकून टाकलें. तेव्हां देवांनींही खवळून जाऊन बाणांचा वर्षाव करून त्या धोंड्यांच्या वर्षावाचा प्रतिकार केला. तेव्हां महामायावी वृत्रानें मायायुद्धानें देवेंद्राला मोहून टाकलें. याप्रमाणें वृत्रानें जर्जर केलेल्या इंद्राला मोठा मोह पडला असतां रथंतर सामाच्या योगानें वसिष्ठांनीं त्याला शुद्धीवर आणलें. वसिष्ठ त्याला ह्मणाले, ' तूं सर्वश्रेष्ठ असून त्रैलोक्याचें बळ तुझ्या अंगा आहे; तेव्हां असा तूं खचतोस कसा? हे सर्व देव तुझ्याकडे पहात आहेत. एखाद्या सामान्य मनुष्याप्रमाणें असा धीर सोडूं नकोस. युद्धाचा थोर विचार मनांत ठेवून शत्रूला जिंक. हे तिन्ही लोकांचे गुरु त्रिनयन शंकर तुझ्याकडे पहात आहेत. तेव्हां मोह बाजूला कर. हे सर्व देव तुला जय यावा ह्मणून तुझी स्तुति करीत आहेत. ' या वसिष्ठांच्या भाषणानें इंद्राला हुरूप येऊन मोठ्या योगबलानें त्यानें त्या वृत्राच्या मायेचा प्रतिकार केला. ते वेळचें तें वृत्राचें अलौकिक सामर्थ्य पाहून वसिष्ठप्रभृतींनीं त्रैलोक्याच्या हितासाठीं शंकरांकडे जाऊन वृत्राला मारण्यासाठीं त्यांनीं त्यांची प्रार्थना केली. तेव्हां भगवान शंकरांचें भयंकर तेज ज्वररूपानें वृत्रामध्यें शिरलें. तेव्हां भगवान विष्णुही लोकांच्या संरक्षणासाठीं इंद्राच्या वज्रांत शिरले. नंतर वसिष्ठप्रभृति इंद्राकडे येऊन, 'स्वस्थपणानें युद्ध करून वृत्राला मार,' असें त्याला ह्मणाले. शंकर त्याला ह्मणाले, ' हा वृत्र सर्व विश्वाचा आत्मभूत व वाटेल तेथें जाण्याला समर्थ असून मोठा मायावी आहे हें सर्वांना ठाऊक आहे. तेव्हां त्रैलोक्याला अजिंक्य अशा याला योगबलानें मार. हयगय करूं नकोस. यानें बलासाठीं सात हजार वर्षें तप केलें आहे व ब्रह्मदेवांनीं योग्यांचें महत्त्व, मोठी माया, मोठें बल व उग्र तेज याला दिलीं आहेत. हें माझें तेज त्याच्यामध्यें शिरत आहे, त्यामुळें तो गडबडला आहे, तेव्हां त्याला तूं आपल्या वज्रानें मार !' याप्रमाणें शंकर बोलत असतां ज्वर त्या असुरामध्यें शिरतांना पाहून देवांना व ऋषींना मोठा आनंद झाला. असुरांच्या बुद्धीला भ्रम पडला. एका क्षणांत त्यांचें मायाबल नाहींसें झालें. याप्रमाणें त्याची स्थिति झालेली पाहून, सर्व देव व ऋषी इंद्राला उत्तेजन देऊं लागले. त्यामुळें इंद्राचें तेज अलौकिक दिसूं लागलें.

इकडे वृत्रामध्यें ज्वर शिरला असतां त्याच्या तोंडांतून भयंकर ज्वाळा बाहेर पडूं लागल्या. त्याचें तोंड एकदम विलक्षण फिकें पडलें. अंग थरथर कांपूं लागलें. व श्वासोच्छ्वास कमी अधिक होऊं लागले. अंगावर रोमांच उभे राहिले. भयंकर कोल्ह्याच्या स्वरूपानें त्याच्या तोंडांतून स्मृति बाहेर पडूं लागली. उल्कापात, त्याच्या डावी उजवीला होऊं लागले. गिधाडें, कंक व बगळे त्याच्या भोंवतीं मोठा भयंकर शब्द करीत घिरट्या घालूं लागलीं. इंद्रानें वज्र उगारून त्या दैत्याकडे दृष्टि लाविली. तेव्हां वृत्रानें अमानुष शब्द केला. व तीव्र ज्वरानें घेरला जाऊन त्यानें जांभई दिली. याप्रमाणें जांभई देत असतां, इंद्रानें त्यावर वज्र सोडलें. तेव्हां कालाग्नीसारख्या त्या वज्रानें एकदम त्या धिप्पाड दैत्याला खालीं आणलें. तेव्हां फिरून एकदां चोहोंकडे मोठा शब्द झाला. याप्रमाणें त्या दानवाला मारून त्या विष्णुतेजानें युक्त अशा वज्रासह महायशस्वी इंद्र स्वर्गाला गेला. पुढें त्या वृत्राच्या शरीरापासून भयंकर लोकांना थरकांप उत्पन्न करणारी विक्राळ, काळसर पिंगट वर्णाची ब्रह्महत्या बाहेर पडली. तिचे केस विसकळले असून डोळे उग्र होते. तिच्या गळ्यांत रुंडमाळा असून ती कृत्येप्रमाणें दिसत होती. ही रक्तानें माखली असून चिंध्या व साली नेसली होती. अशा स्वरूपामध्यें ती वृत्राच्या शरीरांतून बाहेर पडून इंद्राला शोधूं लागली. व इंद्र कांहीं कामासाठीं निघाला असतां त्याला गांठून ती त्याला चिकटूं लागली. तेव्हां इंद्र घाबरून जाऊन कमलाच्या देठाच्या तंतूमध्यें पुष्कळ वर्षें लपून राहिला. परंतु ब्रह्महत्या त्याच्या मागेंच होती. याप्रमाणें तिनें घेरल्यामुळें इंद्र निस्तेज झाला व तिला दूर करण्याचा त्यानें पुष्कळ प्रयत्न केला पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. शेवटीं याप्रमाणें तिनें पछाडल्यामुळें इंद्र ब्रह्मदेवांकडे गेला व साष्टांग नमस्कार करून त्यानें त्यांची पूजा केली. याप्रमाणें ब्रह्महत्येनें त्याला पछाडलेलें पाहून कांहीं वेळ विचार करून मधुर शब्दांनीं शांतवन करीत ते ब्रह्महत्येला म्हणाले, 'हे सुंदरि, माझ्यासाठीं ह्या देवेंद्राला सोड. तुझ्यासाठीं मी काय करूं सांग.' ब्रह्महत्या म्हणाली, 'आपल्यासारखे त्रैलोक्याचे कर्ते मजवर संतुष्ट झाले आहेत एवढें मला पुरें आहे. जग कायम रहावें म्हणून ब्राह्मणाला मारणाऱ्याला ब्रह्महत्या लागेल हा नियम आपणच केलेला आहे. आतां ज्या अर्थीं आपण मजवर संतुष्ट झालेले आहांत, त्या अर्थीं, मी इंद्राला सोडतें. परंतु मला राहण्याला जागा दाखवा.' नंतर ब्रह्मदेवांनीं बरें म्हणून इंद्राच्या शरीरांतून ब्रह्महत्या दूर करण्यासाठीं उपाय योजला. त्यांनीं अग्नीचें ध्यान केलें. त्याबरोबर, 'काय आज्ञा आहे,' म्हणून अग्नि प्रगट झाला. त्याला ब्रह्मदेव म्हणाले, 'इंद्राला मोकळा करण्यासाठीं मी या ब्रह्महत्येचे भाग करतों, त्यांपैकीं एक चौथा भाग तूं घे,' यावर अग्नि म्हणाला, 'माझी तिच्यापासून कशी सुटका होणार?' तेव्हां ब्रह्मदेव म्हणाले, 'जो मनुष्य तमोगुणानें घेरला जाऊन, बीज, ओषधी, व रस यांची आहुति तुला प्रज्वलित करून त्यामध्यें देणार नाहीं त्याच्यामध्यें ही तूं घेतलेली ब्रह्महत्या शिरेल. तूं काळजी करूं नकोस. याप्रमाणें ब्रह्मदेव बोलले असतां ब्रह्महत्येचा चौथा भाग अग्नीमध्यें शिरला, नंतर ब्रह्मदेवांनीं झाडें, ओषधी व गवत यांना बोलावून पूर्वीप्रमाणें ब्रह्महत्येचा एक चौथा भाग घेण्यास सांगितलें. तीं म्हणालीं, 'आमची यापासून सुटका कशी होणार. दैवानेंच आह्मी संकटांत असतां आणखी आपण आमच्यावर हें संकट कां लादतां? उन्ह, थंडी, वारा, पाऊस हीं सर्व आह्मांला सोसावीं लागतात. शिवाय लोक आह्मांला तोडतात, मोडतात, तरी आह्मी आपल्या आज्ञेबाहेर नाहीं; परंतु हें पाप आह्मांला कसें सोडील याचा कांहीं उपाय सांगा.' यावर ब्रह्मदेव म्हणाले, 'जो मोहानें पूर्वकालीं तुह्मांला तोडील, मोडील त्याला ही ब्रह्महत्या तुह्मांला सोडून जाऊन चिकटेल. पुढें ब्रह्मदेवांनीं अप्सरांना बोलावून त्यांना त्याचा चौथा हिस्सा घेण्यास सांगितलें. तेव्हां त्याला त्या कबूल होऊन आपली त्यापासून सुटका कशी होणार म्हणून त्यांनीं विचारलें. ब्रह्मदेव म्हणाले, 'जो मनुष्य रजस्वलेशीं संबंध करील त्याला ही ब्रह्महत्या तुह्मांला सोडून जाऊन चिकटेल. पुढें ब्रह्मदेवांनीं पाण्याचें ध्यान करून तें आलें असतां त्याला राहिलेला ब्रह्महत्येचा एक चौथा हिस्सा घेण्यास सांगितलें. तेव्हां

त्याला कबूल होऊन आपली त्यापासून सुटका कशी होणार ह्मणून त्यानें विचारलें असतां ब्रह्मदेव ह्मणाले, ‘ तुह्माला तुच्छ समजून मूर्खपणानें जो शेंबूड, मलमूत्र तुमच्यामध्यें टाकील त्याला ही जाऊन चिकटेल. ’ याप्रमाणें ब्रह्मदेवांनीं व्यवस्था केल्यावर ब्रह्महत्या इंद्राला सोडून चार ठिकाणीं गेली; व इंद्र अश्वमेध करून शुद्ध झाला.

वर सांगितलेल्या ज्वराची पुढें दिल्याप्रमाणें उत्पत्ति आहे. पूर्वी सावित्री नांवाचें दैदीप्यमान सर्व रत्नांनीं विभूषित असें मेरूचें शिखर होतें. तें कोणाला मोजतां येण्यासारखें नसून तेथें कोणाला जातां येण्यासारखेंही नव्हतें. त्या सुवर्णमय शिखरावर महेश्वर उमेसह बसत असत. याठिकाणीं सर्व देव, गंधर्व यांच्या सेवेला हजर असत. शुक्राचार्य, सनत्कुमार वगैरे ऋषीही त्याठिकाणीं येत. नानाप्रकारच्या गंधासह शुद्ध मंगलकारक वारा त्याठिकाणीं वहात असे. त्याठिकाणीं असणारीं झाडें सर्व ऋतूंतील फुलांनीं शोभायमान दिसत. त्याठिकाणीं पुष्कळ राक्षस व पिशाच्च असत. तेथें नंदी त्या ईशांच्या आज्ञेला हजर असे. सर्व नद्यांमध्यें श्रेष्ठ गंगा मूर्तिमान त्याठिकाणीं त्यांजवळ हजर असे. याप्रमाणें सर्व देव व ऋषी यांनीं पूजित असे शंकर त्या मेरूच्या पर्वतावर रहात असतां कांहीं दिवस लोटल्यावर दक्ष प्रजापतीनें विधिपूर्वक यज्ञ आरंभिल्यावरून इंद्रासह सर्व देव तिकडे निघाले. याप्रमाणें देवांना जातांना पाहून ते कोठें जात आहेत ह्मणून पार्वतीनें शंकरांना विचारलें. तेव्हां, ‘ दक्षप्रजापती अश्वमेध करीत आहे, तिकडे हे जात आहेत, ’ ह्मणून शंकरांनीं उत्तर दिलें. तेवेळीं पार्वतीनें, ‘आपण कां जात नाहीं, ’ ह्मणून विचारलें. तें ऐकून शंकर ह्मणाले, ‘ पूर्वी देवांनीं आपसांत ठरवून मला यज्ञामध्यें भाग ठेवला नाहीं व त्या वहिवाटीप्रमाणें ते मला भाग देत नाहींत. ’ पार्वती ह्मणाली, ‘ आपण सर्व भूतमात्रांमध्यें ऐश्वर्यवान आहांत. गुण, सामर्थ्य, यश व वैभव यांमध्यें आपण कोणाला कमी नाहीं. ह्मणून आपल्याला याप्रमाणें यज्ञांत भाग नसलेला पाहून मला मोठें वाईट वाटतें. ’ तेव्हां तिचा उद्देश जाणून नंदीला त्याठिकाणीं पार्वतीजवळ असण्यास सांगून सर्व योगबल अंगांत आणून योगिराज महातेजस्वी शंकर दक्षाच्या यज्ञाकडे त्याचा विध्वंस करण्यासाठीं आपल्या सर्व भयंकर गणांसह निघाले. त्यांच्या गणांपैकीं कोणी मोठ्यानें शब्द केला, कोणी खदखदां हांसले, कोणी रक्तानें यज्ञाग्नि विझविला, कोणी यूप उपटून फेंकून दिले व कोणी याज्ञिकांना खाऊन टाकूं लागले. याप्रमाणें त्या यज्ञाची चोहोंकडून वाताहत लागत चालली असतां यज्ञ हरणाचें रूप घेऊन आकाशांतून पळूं लागला. तेव्हां शंकरही रागानें धनुष्यबाण घेऊन त्याच्या मागें लागले. तेव्हां त्यांच्या कपाळावर एक भयंकर घामाचा बिंदु आला तो बिंदु खालीं पृथ्वीवर पडल्यावरोबर त्यापासून युगांत काळच्या वणव्यासारखा अग्नि बाहेर पडला. त्या अग्नींतून एक विक्राळ, ठेंगणा, रक्तासारखे लाल डोळे व हिरवी दाढी असलेला असा पुरुष बाहेर पडला. बहिरीससाण्याच्या किंवा घुबडाच्या अंगावरच्या केसांप्रमाणें त्याच्या अंगावरचे केंस होते. त्याचें स्वरूप भयंकर होतें. त्याचा वर्ण काळा होता. पोषाख तांबडा लाल होता. गवताच्या गंजीला जाळून खाक करणाऱ्या अग्नीप्रमाणें त्या अतुल सामर्थ्यवान पुरुषानें एकदम यज्ञाला गिळून टाकलें व पुढें तो देव व ऋषी यांच्यामध्यें गेला. तेव्हां सर्व देव भीतीनें दश दिशांला पळाले. याप्रमाणें तो इकडून तिकडे फिरत असतां पृथ्वी अगदीं दरदरूं लागली. जिकडे तिकडे हाहाकार उडून गेला. हें पाहून ब्रह्मदेव शंकराकडे जाऊन ह्मणाले, ‘ प्रभो, सर्व देव आपल्याला भाग देतील. हा राग आवरा. या आपल्या रागामुळें सर्व देव व ऋषी घाबरून गेले आहेत. हा आपल्या घामापासून उत्पन्न झालेला पुरुषही सर्व प्राणिमात्रांमध्यें ज्वर नांवानें संचार करीत राहील. याचें सर्व सामर्थ्य एकवटून राहील तर तें या संपूर्ण पृथ्वीला सहन होणार नाहीं. ह्मणून याला आपले पुष्कळ भाग करूं द्या. ’ याप्रमाणें ब्रह्मदेवांनीं बोलून यज्ञामध्यें आपला वांटा मिळूं लागल्यामुळें शंकरांना आनंद झाला; आणि ‘ बरें, ’ ह्मणून त्यांनीं सर्व भूतमात्रांमध्यें स्वस्थता रहावी ह्मणून ज्वराचे पुष्कळ भाग केले व ते पुढें दिल्याप्रमाणें निरनिराळ्या वस्तूंच्या ठिकाणीं वांटून दिले. हत्तींच्या गंडस्थलाम-

ध्यें शिर्षाभिताप म्हणून ठेवला; पर्वतामध्यें शिलाजिताच्या स्वरूपानें ठेवला; पाण्यामध्यें शेवाळयाच्या रूपानें ठेवला; सापामध्यें कातीच्या रूपानें ठेवला; बैलामध्यें खुराच्या ठिकाणीं ठेवला; पृथ्वीमध्यें नापीक भूमीच्या स्वरूपानें ठेवला; पशूंच्यामध्यें दृष्टीची मंदाई या रूपानें ठेवला; घोड्यामध्यें गळ्यांत होणाऱ्या रोगाच्या रूपानें ठेवला; मोरामध्यें त्याच्या डोक्यावर उत्पन्न होणाऱ्या शेंडीच्या रूपानें ठेवला; कोकिलामध्यें डोळ्याच्या रोगाच्या रूपानें ठेवला; मेंढरामध्यें पित्तदोष रूपानें ठेवला; राघूच्या ठिकाणीं उचकीच्या रूपानें ठेवला; वाघाच्या ठिकाणीं श्रमाच्या रूपानें ठेवला; व मनुष्याच्या ठिकाणीं ज्वर ह्या नांवानेंच ठेवला; हा ज्वर मनुष्याला जन्मतांना, मरतांना व मध्यें येत असतो. तेव्हां हा ज्वर म्हणून जो आहे हें शंकरांचें भयंकर तेज आहे. आणि या ज्वराच्याच योगानें वृत्राचा वर सांगितल्याप्रमाणें नाश झाला; व मोठें योगसामर्थ्य असलेला तो वृत्र वज्राच्या योगानें याप्रमाणें मरून विष्णुलोकाला गेला. विष्णूवरील त्याच्या भक्तीच्या योगानेंच सर्व जगाला जिंकण्याला तो समर्थ झाला व त्या योगानेंच तो मेल्यावरही विष्णुलोकाला गेला.

---

## १९८ शिवमाहात्म्य–वीरभद्राची उत्पत्ति.
## ( १२. २८४ )

वर सांगितल्याप्रमाणें दक्ष हिमाचलावर गंगाद्वारीं यज्ञ करीत असतां सर्व देव, गंधर्व, अप्सरा, हाहा, हूहू गंधर्व, नारद, तुंबर आदित्य, वसु, रुद्र, साध्य, उष्मपा, सोमपा, धूमपा, आज्यपा अशाप्रकारचे मोठमोठे ऋषी त्याठिकाणीं यज्ञांश घेण्यासाठीं आले होते. निमंत्रणानें आलेले सर्व देव आपापल्या स्त्रियांनिशीं त्याठिकाणीं विमानांमधून झळकत होते. त्या सर्वांना तेथें पाहून शंकर त्यांमध्यें न दिसल्यानें दधीचि रागावून म्हणाले, ‘ ज्याठिकाणीं रुद्राला आहुति मिळत नाहीं तो यज्ञ नव्हे व तो धर्महीं नव्हे. तुम्हां सर्वांवर मरण्याची पाळी आहे? काय तरी काळाचा हा फेरा! मोह पडून काळ जवळ आला असतां सुद्धां यांना कसा दिसत नाहीं? हें ओढवलेलें महासंकट हे कसें जाणत नाहींत.’ असें म्हणून ते आपल्या ज्ञानचक्षूनें पाहतात तों पार्वती व नारद यांसह शंकर बसलेले त्यांना दिसले. योगवेत्त्या दधीचींना तें पाहून फार संतोष झाला. या सर्वांनीं शंकरांना न बोलावण्यामध्यें एक विचार केला आहे असें वाटून तेथून पाय काढून दधीचि म्हणाले, ‘ मानाला पात्र नसल्याचा सत्कार किंवा मान्याचा असत्कार केल्यानें मनुष्य मारल्याचें पाप लागतें. मी कधीं खोटें बोललों नाहीं. मी खात्रीनें सांगतों कीं, आज यज्ञामध्यें मुख्य भाग घेणारे शंकर येथें आलेले तुम्हांस दिसतील.’ दक्ष म्हणाला, शूलधारी, कपर्दी येथें पुष्कळ रुद्र हजर आहेत. मी कोणा महेश्वराला ओळखत नाहीं. ’ दधीचि म्हणाले, ‘ शंकरांना न बोलावण्यांत सर्वांचा एक विचार दिसतो. परंतु त्यांहून श्रेष्ठ ज्याअर्थी मला कोणी दिसत नाहीं त्याअर्थी खात्रीनें सांगतों कीं, या यज्ञाचा विध्वंस होणार आहे. ’ दक्ष म्हणाला, ‘ हा येथें पात्रामध्यें हवि आहे तो मी अप्रतिम सर्वश्रेष्ठ विष्णूला देणार आहें. ’

याप्रमाणें इकडे चाललें असतां उमा शंकरांना म्हणाली, ‘ मी काय दान देऊं, काय तप करूं किंवा काय व्रत करूं कीं ज्यानें आपल्याला यज्ञामध्यें अर्धा किंवा तिसरा भाग मिळूं लागेल? याप्रमाणें तिचे उद्गार ऐकून तिला रागावलेली पाहून शंकर हासून म्हणाले, ‘ हे कृशांगि, माझ्या संबंधानें असें म्हणणें तुला शोभत नाहीं. ज्यांना ध्यानाचें ज्ञान नाहीं तेच मला ओळखत नाहींत. तुझा मोह पडून सर्व जग मोहित झालें आहे. यज्ञामध्यें मंत्र म्हणणारे माझी स्तुति करतात, सामगायक रथंतर साम माझ्यासाठींच गातात, व वेदज्ञ ब्राह्मण यज्ञ करतात तो माझ्यासाठींच. अध्वर्यु जो यज्ञ भाग देतात तो माझ्यासाठींच. ’ यावर, ‘ सामान्य लोक देखील बायकांमध्यें आपली स्तुति करून घेतात, ’ असें पार्वती टोंचून बोलली असतां शंकर म्हणाले, ‘प्रिये, मी आपली स्तुति करून घेत नाहीं. आतां मी जें करतों तें पहा. या यज्ञाचा विध्वंस करण्याकरितां मी आतां कसा प्राणी उत्पन्न करतों पहा. ’ असें पार्वतीला म्हणून शंकरांनीं आपल्या तोंडांतून ज्वाला बाहेर काढून अंगावर रोमांच उभे राहू-

तील असा एक घोर प्राणी उत्पन्न करून त्याला दक्षाच्या यज्ञाचा विध्वंस करण्यास त्यांनीं आज्ञा दिली. तेव्हां तो सिंहासारखा पराक्रमी पुरुष कोणाच्या साह्यावांचून सहज लीलेनें पार्वतीचा राग शमविण्यासाठीं निघाला. पार्वतीही महाकाली या नांवानें स्वतः उग्रस्वरूप धरून त्या यज्ञाचा विध्वंस स्वतःच्या डोळ्यांनीं पहाण्याकरितां निघाली. शौर्य, बल व रूप यांमध्यें हा शंकरांच्या तोडीचा होता. त्याचें बल किंवा वीर्य याला परिमिति नव्हती. पार्वतीचा राग दूर करण्याकरितां अवतरलेला हा पुरुष वीरभद्र या नांवानें प्रसिद्ध आहे. त्यानें आपल्या रोमरंध्रांतून पुष्कळ रौभ्य नांवाचे रुद्रासारखेच पराक्रमी रुद्रगण उत्पन्न केले. हे सर्व दक्षाच्या यज्ञाचा विध्वंस करण्यासाठीं त्याठिकाणीं गेले असतां, त्यांच्या किलकिल शब्दानें सर्व आकाश भरून जाऊन देवसुद्धां घाबरून गेले. भयंकर वारा सुटून समुद्रावर लाटा उसळूं लागल्या. पर्वताच्या कपऱ्या तुटून पडूं लागल्या. पृथ्वी हालूं लागली. त्याठिकाणीं पेटलेले अग्नि जळेनासे झाले. सूर्याचें तेज मंद पडलें, ग्रह व तारे त्याचप्रमाणें चंद्र यांचा प्रकाश नाहींसा झाला. ऋषी, देव व मनुष्य निस्तेज झाले. जिकडे तिकडे काळोख पसरला. अशा प्रसंगीं त्या गणांपैकीं कांहीं तेथें ठोकीत निघाले, कांहीं यज्ञयूपें उपटून टाकूं लागले, कांहीं त्यांचा चुराडा करून टाकूं लागले. याप्रमाणें ते वायुवेगानें सर्व यज्ञपात्रें व उत्तम उत्तम आभरणें यांचा चुराडा करीत इकडून तिकडे धांवत होते. त्यांचे चूर होऊन पृथ्वीवर पडणारे तुकडे ताऱ्यांप्रमाणें लखलखकत होते. उत्तम उत्तम अन्नपान व भक्ष्य यांच्या पर्वतासारख्या राशी त्याठिकाणीं पडल्या होत्या; तूपदुधाच्या रेंघानें भरून दुधाची नदी त्याठिकाणीं वाहूं लागली असून दहींही त्यांत यथेच्छ मिसळलें होतें. साखरेचे कण हेच तिच्या कांठावरील वाळू होती. या नदीमध्यें षड्रस असून तिच्या कांठीं काकवीचे सुंदर कुवे झाले होते. उत्तम उत्तम निरनिराळ्या प्रकारचें मांस व दुसऱ्या प्रकारचें भक्ष्य व नानाप्रकारचीं पेयें, लेह्यें व चोष्यें त्याठिकाणीं होतीं. त्या सर्वांवर या रुद्रगणांनीं यथेच्छ ताव मारून बाकीचा ते चोहोंकडे फेंकून देत होते.

रुद्राच्या रागानें हे सर्वच कालाग्नीप्रमाणें उग्र दिसत होते. ह्यांनीं कांहीं वेळ न लागतां एका क्षणांत त्या यज्ञाचा, सर्व देव तेथें रक्षण करीत असतां, विध्वंस केला. त्या यज्ञाचें मुंडकें छाटून काढून मोठ्या आनंदामध्यें ते आरोळ्या देत होते; ब्रह्मदेव व दक्ष यांनीं त्याला तूं कोण आहेस ह्मणून विचारलें; तेव्हां वीरभद्र ह्मणाला, ' मी किंवा ही देवी या ठिकाणीं हा यज्ञभाग खाण्यासाठीं आलों नाहीं किंवा मोठ्या कौतुकानें हा यज्ञ पाहण्यालाही आलों नाहीं. यज्ञाचा फडशा पाडण्यासाठीं शंकरांच्या रागापासून निघालेला मी वीरभद्र नांवाचा पुरुष आहें; ह्याचप्रमाणें पार्वतीच्या रागापासून निघालेली ही भद्रकाली आहे. शंकरांनीं पाठविल्यावरून आह्मी येथें आलों आहों. त्या शंकरांलाच तूं शरण जा. त्या देवाचा राग बरा; परंतु दुसऱ्याचें वरदान कांहीं त्यापेक्षां चांगलें नाहीं. ' हें वीरभद्राचें भाषण ऐकून दक्षानें महेश्वराला नमून स्तुति करून त्याला संतोषविलें. तेव्हां महादेव प्राणापान वायु आवरून त्या ठिकाणीं यज्ञकुंडांतून प्रगट झाले. हजारों सूर्यांप्रमाणें त्यांची कांति असून प्रलयकालीन अग्नीप्रमाणें ते दिसत होते. हांसून ते दक्षाला ह्मणाले, ' मी तुझ्यासाठीं काय करूं ? ' तेव्हां दक्ष हात जोडून भयानें अगदीं गांगरून जाऊन डोळे पाण्यानें भरून येऊन ह्मणाला, ' जर मजवर आपली कृपा झाली असेल तर या ठिकाणीं जाळून खाऊन पिऊन नाश करून किंवा भ्रष्ट करून टाकलेले हे फार दिवस मेहनत करून मोठ्या काळजीनें जमविलेले पदार्थ फुकट जाऊं देऊं नका. ' हें ऐकून शंकर ह्मणाले, ' ठीक आहे. ' याप्रमाणें तो वर मिळाल्यावर दक्षानें गुडघे टेंकून विश्वरूपदर्शक एक हजार आठ नांवांनीं त्या महेश्वराची स्तुति करून तो त्याला ह्मणाला, ' ज्या अर्थीं सर्व भूतमात्रांचा उत्पन्नकर्ता, सर्वांचा स्वामी व हा यज्ञ करणारा तूंच आहेस, त्याअर्थीं मुद्दाम किंवा तुझ्या सूक्ष्म मायेनें मोह पडल्यामुळें मीं तुला बोलाविलें नाहीं, त्याबद्दल मला क्षमा कर. तुझ्या ठिकाणीं लक्ष लागून राहिलेल्या माझ्यावर तूं कृपा कर. माझें अंतःकरण, माझी बुद्धि, माझें मन सर्व तुझ्या ठिकाणीं लागून राहिलें आहे. ' याप्रमाणें स्तुति करून तो

गप्प झाला असतां फार प्रसन्न होऊन शंकर फिरून त्याला ह्मणाले, 'तुझ्या या स्तुतीनें मी संतुष्ट आहें. तूं मजजवळ कायमचा राहून हजार अश्वमेध व शंभर वाजपेय यज्ञ यांचें फल माझ्या प्रसादानें तुला मिळेल. यज्ञामध्यें हें विघ्न आलें ह्मणून मनाला वाईट वाटून घेऊं नकोस. मी तुला आणखी कांहीं वर देतों, तो ऐक. सहा अंगांनीं युक्त अशा वेदापासून, त्याचप्रमाणें सांख्य व योग या शास्त्रांपासून देवदानवांनीं मिळून एक निराळा पंथ काढला आहे, व त्याला धरून त्यांनीं पुष्कळ वर्षे कडक तप केलें आहे; तथापि मीं काढलेला धर्म अतुल असून सर्व दिशांनीं कल्याणप्रद आहे, व सर्व आश्रमांतील लोकांना तो सारखाच पाळतां येण्याजोगा असून मोक्षदायक आहे. आत्मनिग्रहानें पुष्कळ वर्षे तप करून तो साधण्याजोगा आहे. हा चारी वर्णाश्रमांच्याहून निराळा असून कांहीं तत्त्वांमध्यें याच्या त्याच्यामध्यें सारखेपणा आहे. या मीं निर्माण केलेल्या पाशुपत मार्गाचें अवलंबन केलें असतां जें फल मिळतें तें तुला मिळेल, तूं मनस्ताप सोड.' असें ह्मणून शंकर अदृश्य झाले.'

---

## १९९ अध्यात्मविचार. (१२. २८५)

युधिष्ठिर ह्मणाला, 'ज्याला अध्यात्मविचार ह्मणतात, त्याच्यासंबंधानें आणखी एकवार मला माहिती सांगा.' भीष्म ह्मणाले, 'अध्यात्मज्ञानानें मनुष्याला वाटेल तें करण्याचें सामर्थ्य येतें. हें सर्वांहून श्रेष्ठ ज्ञान आहे. पृथ्वी, आप, तेज, वायू, आकाश, हीं पंचमहाभूतें आहेत. सर्व प्राणिमात्रांच्या उत्पत्तीला व नाशाला हीं कारण आहेत. सर्व सूक्ष्म व स्थूल प्राण्यांचे देह या पांचांच्या मिश्रणापासून झाले आहेत. हे पंचमहाभूतात्मक गुण वारंवार एकत्र होऊन अस्तित्वांत येत असतात, व फिरून नाश पावत असतात. या पांचांपासून सर्व प्राणिमात्रांची उत्पत्ति असून समुद्रापासून उत्पन्न होणाऱ्या लाटा ज्याप्रमाणें समुद्रांत मिसळून जात असतात, त्याप्रमाणें हे पंचमहाभूतांमध्यें मिसळून जातात. ज्याप्रमाणें कांसव आपलें अंग बाहेर काढून फिरून आंत ओढून घेतें, त्याप्रमाणें हे असंख्य प्राणिमात्र ह्या पंचमहाभूतांपासून उत्पन्न होऊन फिरून पंचमहाभूतांमध्येंच मिळून जातात. ध्वनि हा आकाशापासून उत्पन्न होतो, व कठीण वस्तु पृथ्वीपासून उत्पन्न होते, वायूपासून प्राण उत्पन्न होत असून जलापासून रस उत्पन्न होतो, व तेजाचा गुण रूप आहे. याप्रमाणें सर्व चराचर जगामध्यें हीं पंचमहाभूतें निरनिराळ्या प्रकारानें दिसतात. प्रलयकालीं नानाप्रकारचे प्राणिमात्र या पांचांमध्यें मिळून जाऊन फिरून सृष्टिकालीं या पांचांपासून उत्पन्न होतात. ब्रह्मदेवांनीं हीं पंचमहाभूतें सर्व प्राण्यांमध्यें आपल्या मनाप्रमाणें ठेविलीं आहेत. शब्द, श्रोत्र, व रंध्रें हीं तीन आकाशापासून झालीं आहेत. रस, स्निग्ध पदार्थ व जिव्हा यांची उत्पत्ति जलापासून आहे. रूप, चक्षु व पचनशक्ति हीं तीन तेजापासून आहेत. गंध, घ्राणेंद्रिय व शरीर हीं भूमीपासून झालीं आहेत. प्राण, स्पर्श व क्रिया हे वायुगुण आहेत. परमेश्वरानें यांना उत्पन्न करून सत्व, रज, तम, काल, कर्म, बुद्धि व मन हीं सहा त्यानें यांच्याशीं जोडून दिलीं. जिला बुद्धि ह्मणतात ती पायाच्या तळव्यापासून मस्तकापर्यंतचा जो भाग त्यामध्यें भरून राहिली आहे. मनुष्याच्या ठिकाणीं पांच इंद्रियें, मन, बुद्धि, व आत्मा हीं आठ आहेत. इंद्रियें व कर्ता यांना त्यांच्या त्यांच्या कार्यावरून ओळखावें. सत्व, रज व तम हे भाव इंद्रियांच्या आश्रयानें असतात. इंद्रियें विषयज्ञानापुरतीं असून संशय उत्पन्न करणें हें मनाचें व निश्चय ठरविणें हें बुद्धीचें काम आहे; व क्षेत्रज्ञ हा यांच्या कार्यांचा साक्षी आहे. सत्व, रज, तम, काल व कर्म हे बुद्धीचे प्रवर्तक असून बुद्धि हीच पांच इंद्रियें व वर सांगितलेले पांच गुण आहे. बुद्धीच्या अभावीं पांच इंद्रियें, मन व हे पांच गुण हींही नसल्याप्रमाणेंच समजावीं. बुद्धि ज्याच्या साह्यानें पाहते त्याला डोळा ह्मणतात, ज्याच्या साह्यानें ऐकते त्याला कान ह्मणतात, वास घेते त्याला नाक ह्मणतात, रस चाखते त्याला जीभ म्हणतात, स्पर्श जाणते त्याला त्वचा म्हणतात, व कशाची इच्छा करते त्याला मन म्हणतात. बुद्धीचींच निरनिराळ्या वेळीं हीं निरनिराळीं रूपांतरें होतात. बुद्धीला आधारभूत घ्राणादि पांच व मन

यांना इंद्रियें अशी संज्ञा आहे व हीं दूषित झालीं असतां बुद्धि ही दूषित होते. जीवाच्या ठिकाणीं बुद्धि, सत्व, रज, तम, या तीन भावांनीं असते. केव्हां केव्हां तिला आनंद होतो, केव्हां केव्हां दुःख होतें व केव्हां केव्हां हे दोन्ही विकार होत नाहींत. या तीन भावांनीं युक्त अशी ही बुद्धि या तीन भावांमध्येंच गुरफटून रहाते. ज्याप्रमाणें समुद्र आपली मर्यादा सोडीत नाहीं त्याप्रमाणें ही बुद्धि हे भाव, इंद्रियें व मन यामध्यें गुंतून असते. जेव्हां रजोगुण जागृत होतो, तेव्हां ही रजोगुणात्मक होते. मोठा हर्ष, प्रीति आनंद, सुख, मनाचें समाधान हे जीवाच्या ठिकाणीं प्रसंगीं सत्वगुणापासून होतात. ताप, शोक, संताप, असमाधानी, असहनशीलता हीं रजोगुणाचीं चिन्हें प्रसंगीं त्याच्या ठिकाणीं दिसून येतात. अज्ञान, राग, मोह, प्रमाद, दर्प भय, नीचपणा, दैन्य, स्वप्न, आळस हे तमोगुणापासून उद्भवतात. जेव्हां शरीर अथवा मन ह्यांच्या ठिकाणीं प्रीतियुक्त एखादा विकार उत्पन्न होतो तेव्हां तें सत्वगुणामुळें आहे असें समजावें. जेव्हां दुःखात्मक व अप्रिय असा एखादा विकार उत्पन्न होतो तेव्हां तो रजोगुणामुळें होतो असें समजावें, व न गडबडतां त्याचा प्रतिकार करण्यासंबंधानें खटपट करावी. मोहात्मक जो कांहीं विकार शरीरामध्यें किंवा मनामध्यें उत्पन्न होतो तो तमोगुणामुळें उत्पन्न होतो. याप्रमाणें हे बुद्धीचे नानाविकार आहेत, हें समजून घेऊन मनुष्य ज्ञानवान होतो. ज्ञानाचें आणखी दुसरें लक्षण तें काय आहे. आतां बुद्धि व आत्मा या दोन सूक्ष्मांमध्यें भेद आहे. त्यांपैकीं बुद्धि गुण उत्पन्न करते व आत्मा करीत नाहीं. हे दोघे एकमेकांपासून वेगळे आहेत. तरी मासा व पाणी याप्रमाणें त्यांचा एकत्र संबंध आहे. गुणांना आत्मा ठाऊक नाहीं परंतु आत्मा त्यांना ओळखतो. अज्ञानी लोक आत्मा व गुण हे, मनुष्य व त्याच्या अंगचे गुण हे जसे एकत्र असतात त्याप्रमाणें एकत्र आहेत असें समजतात; परंतु वास्तविक अशी स्थिति नसून आत्मा हा केवळ साक्षीभूत आहे. बुद्धीला कांहीं आश्रय नाहीं. चेतना म्हणून जिला म्हणतात ती हे गुण एकत्र झाल्यानें उत्पन्न होते, बुद्धीपासून उत्पन्न होणाऱ्या गुणांहून वेगळ्या अशा कारणांनीं बुद्धि उत्पन्न होऊन ती शरीरामध्यें रहाते. गुणांचें खरें स्वरूप कोणाला कळत नाहीं. वर सांगितल्याप्रमाणें बुद्धि हीच गुण उत्पन्न करीत असून आत्मा हा साक्षीभूत आहे. हा या दोघांमधला संबंध कायमचा आहे. शरीरामध्यें असणाऱ्या या बुद्धीला जड व स्वतःला ज्यांना ज्ञान नाहीं अशा इंद्रियांच्या साह्यानें ज्ञान होतें. स्वतः न बघतां दुसऱ्याला पाहण्याला साधनीभूत होणाऱ्या दिव्याप्रमाणें हीं इंद्रियें आहेत. हें पक्कें ओळखून शोक किंवा आनंद याला हार न जातां मनुष्यानें प्रसन्न असावें. अशा मनुष्याला मत्सर म्हणून ठाऊक नसतो. ज्याप्रमाणें कोळी स्वभावानें धागे उत्पन्न करतो त्याप्रमाणेंच ही बुद्धि गुणांना उत्पन्न करते. गुणांचा नाश झाल्याबरोबर ते नाहींसे होतात असें कांहींचें मत आहे. व त्यांचा नाश झाला असतां ते नाहींसे होत नाहींत; परंतु त्यांचें प्रत्यक्ष अस्तित्व मात्र नाहींसें होतें; परंतु अशांचें अस्तित्व अनुमानानें काढतां येतें, असें कांहींचें मत आहे. हें बुद्धि व विचार यांनीं निकाल लावावयाचें गहन प्रमेय सोडवून आणि संशयापासून दूर होऊन मनुष्यानें दुःख टाकून सुखी व्हावें. मोहात्मक जलानें भरलेल्या ह्या अगाध संसाररूपी नदींत पडल्यानें तिचा तळ न कळल्यामुळें मनुष्याला दुःख होतें. त्याचप्रमाणें बुद्धीचा हा संबंध न ओळखणारा मनुष्य दुःखी होतो. अध्यात्मज्ञान असलेल्या धैर्यवान ज्ञानी लोकांना कधीं दुःख होत नाहीं. कारण ते याच्या पैलपार जाण्याला समर्थ असतात. या नदीमधून तरून जाण्याला ज्ञान हीच उत्तम नाव आहे. अज्ञान्यांना जी मोठी भीति वाटते ती ज्ञान्यांना वाटत नाहीं. ज्ञान्यांना जी गति मिळते ती कमी जास्ती नसून त्यांच्यामध्यें सारखेपणा दिसून येतो. ज्ञान्याच्या हातून पूर्वी अज्ञानदशेंत जीं कांहीं कर्में घडलीं असतील त्याचप्रमाणें ज्ञानावस्थेंत जीं कांहीं अन्यायाचीं कृत्यें त्याच्या हातून घडतात त्या सर्वांचा नाश केवळ ज्ञानाच्या योगानें तो करतो, व या स्थितींत दुसऱ्याच्या दुष्ट कृत्यांबद्दल दोष देणें व रागाच्या तावडींत जाऊन स्वतः दुष्ट कृत्यें करणें या दोन्ही गोष्टी त्याच्या हातून होत नाहींत.

## २०० नारद व समंग यांचा संवाद-जगाचें अज्ञान दुःखादिकांना कारण. ( १२-२८६ )

' सर्व प्राणिमात्रांना शोक व मृत्यु यांची मोठी भीति असते, तेव्हां ही दूर कशानें होते तें सांगा, ' म्हणून युधिष्ठिरानें विचारलें असतां भीष्म ह्मणाले, ' यासंबंधांत नारद व समंग यांचा संवाद ऐक.

एके वेळीं नारद समंगांना म्हणाले, ' सामान्य लोक नुसतें मस्तक लवून आपल्या गुरूंना नमस्कार करतात, परंतु आपण जमिनीला छाती लावून साष्टांग नमस्कार करतां. आपण ही भवनदी केवळ आपल्या हातानेंच तरून जाण्यांत गढलासें दिसतां. नेहमीं दुःखापासून मुक्त असून आपण प्रसन्न दिसतां. चिंता म्हणून आपल्याला बिलकुल दिसत नाहीं. समाधानवृत्तीनें नेहमीं सुखांत राहून आपण मुलासारखे आनंदांत आहां. तेव्हां याचें कारण काय ! ' समंग ह्मणाले, ' मी सर्व भूत, वर्तमान, भविष्य जाणतों म्हणून कधीं उद्विग्न होत नाहीं. उपक्रम व कर्माचीं नानाप्रकारचीं फळें हीं मला कळत असल्यामुळें मला उद्विग्न होण्याला कारण दिसत नाहीं. मूर्ख, गरीब, श्रीमंत, आंधळे, वेडे त्याचप्रमाणें आह्मी हे सर्वच जिवंत आहों, एवढेंच नव्हे; तर देव सुद्धां आपल्या पूर्वजन्मींच्या कर्मानेंच जिवंत रहातात. ज्यांच्या जवळ हजार आहे किंवा ज्यांच्या जवळ शंभर आहे ते जगतात तसेंच दुःखांत असलेलेही जगतात, व आह्मीही जगून आहों. आह्मीं शोक सोडून दिला असल्यामुळें आम्हाला धर्माची किंवा कर्माची काय पर्वा ? मनुष्य ज्याच्या योगानें शहाणा लेखिला जातो त्या शहाणपणाचें मूळ सुद्धां इंद्रियांचा प्रसाद हें आहे. हीं इंद्रियेंच शोकमोहाच्या तावडींत जातात. ज्याचीं इंद्रियें मोहाच्या तावडींत गेलीं आहेत त्याला शहाणा ह्मणून ह्मणतां येणार नाहीं. मोहाच्या तावडींत गेलेल्या मनुष्याला जो एक ताठा असतो तो सुद्धां त्याच्या त्या मोहाचा एक प्रकारच आहे. जो मोहाच्या तावडींत गेला आहे, त्याला इहलोक साधत नाहीं किंवा परलोक साधत नाहीं. दुःखही चिरकाल टिकत नाहीं व सुखही चिरकाल मिळत नाहीं. निरनिराळीं स्थित्यंतरें उत्पन्न करणाऱ्या या आयुष्यक्रमाच्या, माझ्या सारख्यानें कधीं नादीं पडूं नये, व विषयोपभोगाची, किंवा ती मिळाल्यानें होणाऱ्या सुखाची किंवा न मिळाल्यानें होणाऱ्या दुःखाची पर्वा करूं नये. स्वस्थ चित्त ठेवून दुसऱ्याचें घेण्याची इच्छा करूं नये. न मिळालेलें मिळविण्याच्या भरीस पडूं नये व एखादा लाभ झाल्यानें मोठा हर्ष मानून घेऊं नये. पुष्कळ पैसा मिळाल्यानें अत्यानंद मानून घेऊं नये, किंवा पैसा नाहींसा झाल्यानें खचूं नये. एका शीलावांचून बांधव, पैसा, थोर कूळ, वेदज्ञान, मंत्र किंवा वीर्य यांपैकीं कोणतेंही दुःखापासून आपल्याला सोडवून परलोकीं शांति देण्याला उपयोगीं पडत नाहीं. ज्यानें आपलें लक्ष योगाकडे लाविलें नाहीं त्याला अक्कल नाहीं. योगावांचून सुख नाहीं. धैर्य धरणें व दुःख न करणें हीं दोन सुखाला कारणें आहेत. प्रियवस्तूपासून हर्ष होऊन हर्षापासून गर्व येतो व गर्वाचा परिणाम नरक आहे. ह्मणून शोक, भय, गर्व, मोह, सुखदुःख हीं सर्व या देहाची हालचाल होत असल्यामुळें केवळ साक्षीरूपानें पहात राहून अर्थ, काम, शोक, संताप, तृष्णा, मोह या सर्वांना रजा देऊन मी या पृथ्वीवर फिरत आहें. अमृत प्यायलेल्या मनुष्याप्रमाणें मृत्यु, अधर्म, लोभ किंवा दुसरी एखादी वस्तु यांपासून मला येथें किंवा परलोकीं भीतीच उरली नाहीं. हें ज्ञान मोठ्या तपानें मला प्राप्त झालें असल्यामुळें शोक मजकडे आला असतां सुद्धां मला त्याची बाधा होत नाहीं. '

---

## २०१ गालव व नारद यांचा संवाद-शास्त्राचें इंगित. (१२-२८७)

'शास्त्राचें इंगित न कळतां नेहमीं संशयांत राहून आत्मदर्शनासाठीं ज्यानें शमदमादि अनुष्ठान केलें नाहीं त्याला हिताचें काय आहे हें मला सांगा,' ह्मणून युधिष्ठिरानें विचारल्यावरून भीष्म म्हणाले, ' गुरूंची पूजा करणें, वृद्धांच्या जवळ असणें व शास्त्र श्रवण करणें, ह्या गोष्टी मनुष्याच्या हिताच्या आहेत. या संबंधांत पुढील गालव व नारद यांचा संवाद लक्षांत ठेव.

कोणे एके वेळीं इंद्रियनिग्रही गालव आपल्या कल्याणाच्या इच्छेनें ज्यांना मोह किंवा श्रम ठाऊक नाहीं अशा ज्ञानामध्येंच संतुष्ट असणाऱ्या नारदांना ह्मणाले, 'ज्यांच्या योगानें मनुष्य जगामध्यें मान्य होतो ते गुण आपणामध्यें मला पूर्ण दिसतात. तेव्हां आपण माझा संशय दूर करा. वेदाज्ञा निरनिराळ्या असल्यामुळें मनुष्याला त्यासंबंधानें संशय येतो. निरनिराळ्या आश्रमांमध्यें निरनिराळ्या वर्तनाची प्रशंसा आहे. शास्त्रामध्यें, हें चांगलें, तें चांगलें, असें निरनिराळ्या प्रकारांनीं सांगितलें असतें. याप्रमाणें चारी आश्रमांना निरनिराळ्या शास्त्राज्ञा असून त्या त्या त्यांना संमत आहेत; तेव्हां या भिन्न दिशेकडे चाललेल्या यांना पाहून आमचें शास्त्र आह्मांला बरें वाटत असल्यानें खऱ्या हिताचें काय हें आह्मांला कळेनासें झालें आहे. सर्व शास्त्र जर एक असतें तर कल्याण कशांत आहे हें उघड झालें असतें; परंतु या वेगवेगळ्या शास्त्रांच्या योगानें खरें गूढ त्यांमध्यें झांकूनच गेलें आहे व त्या खऱ्या गूढाचा या घोंटाळ्यामध्यें कालवा झाला आहे. तेव्हां या संबंधानें आपण मला कांहीं सांगा.' नारद ह्मणाले, 'चार आश्रम असून ज्यासाठीं ते निर्माण झाले आहेत, त्या कामीं त्यांचा उपयोग होतो. त्यामध्यें सांगितलेले धर्म वेगवेगळे आहेत तरी योग्य गुरूपासून ते समजून घेऊन त्यावर विचार करावा. त्यांत सांगितलेले धर्म नाना स्वरूपांचे असून आत्मज्ञान करून देण्याचा उद्देश त्यांमध्यें निरनिराळ्या प्रकारांनीं सांगितला आहे. स्थूल दृष्टीनें पाहिलें असतां या चार आश्रमांचा खरा उद्देश लक्षांत येत नाहीं; परंतु सूक्ष्म दृष्टीनें त्या सर्वांमधील श्रेष्ठ गति दिसूं लागते. मित्रावर अनुग्रह, शत्रूचा निग्रह, धर्मार्थकामसंग्रह, पापकर्मापासून निवृत्ति, नेहमींची पुण्यशीलता, भल्यांशीं चांगलें वर्तन, सर्वभूतमात्रांच्या ठिकाणीं मार्दव, व्यवहारामध्यें सरळपणा, मधुर वाणी, देवता, पितर व अतिथी यांना ज्यांचा त्यांचा अंश देणें, नौकरांना न सोडणें, खरें बोलणें, या गोष्टी फार कल्याणकारक आहेत. परंतु खरें काय हें कळणें हेंच फार कठीण आहे. ज्यामध्यें प्राणिमात्रांचें पुष्कळ हित आहे तेंच सत्य समजावें. अहंकार सोडून देणें, प्रमाद घडूं न देणें, संतोष, एकटें रहाणें, वेद व वेदान्त यांचें अध्ययन, ज्ञान करून घेण्याची इच्छा, ह्या गोष्टी फार कल्याणकारक आहेत. शब्दस्पर्शादि पांच विषयांचें जरूरीपुरतें सेवन करून कल्याणेच्छूनें हे फाजील सेवूं नयेत. रात्रीं भटकणें, दिवसा निजणें, आळस, चुगलखोरी, मद, विषयोपभोग फाजील सेवन करणें किंवा ते अगदींच सोडणें या गोष्टी कल्याणेच्छूनें टाळाव्या. लोकांची निंदा करून आपला मोठेपणा वाढवून घेण्याचा प्रयत्न करूं नये. आपल्या गुणांनींच सामान्य लोकांवर वरपगडा मिळविण्याचा प्रयत्न करावा. खरोखर अंगांत गुण नसून आपल्यासंबंधानें मोठा अहंभाव ठेवून मूर्ख लोक आपल्या अंगामध्यें गुण नसल्यामुळें खऱ्या गुणवानांना दोष देतात. जेव्हां कोणी त्यांना सरळ मार्गाला आणण्याच्या भानगडींत पडत नाहींत तेव्हां मी मोठा आहें अशा विचारानें फुगून खऱ्या गुणी लोकांहून आपण श्रेष्ठ आहों असें यांना वाटूं लागतें. **कोणाची निंदा किंवा आत्मस्तुति न करतां शहाणा व गुणवान मनुष्य मोठा लौकिक मिळवितो.** फुलें आपला शुद्ध व मधुर सुगंध सांगत न फिरतां चोहोंकडे पसरतात, त्याचप्रमाणें विमल सूर्यही आकाशांत गपचिप प्रकाशतो. याचप्रमाणें ज्ञानी आपल्या बुद्धीच्या योगानें वर सांगितल्या प्रकारचे दोष टाकून आपल्या कीर्तीनें जगामध्यें झळकत रहातात व कोणाला आपले गुण सांगत फिरत नाहींत. केवळ आत्मस्तुति करीत फिरल्यानें जगामध्यें मूर्ख कधीं पुढें येत नाहींत. खरा विद्वान खळग्यामध्यें झांकून ठेविला असला तरी तेथून तो झळकतो. वाईट शब्द किती जरी मोठ्यानें उच्चारला तरी कान ते विसरतात; चांगले शब्द हळू उच्चारले असतां सुद्धां पुष्कळ दिवस त्यांचा विसर पडत नाहीं. ज्याप्रमाणें सूर्यकांतामध्यें सूर्य आपलें अग्निस्वरूप दाखवितो त्याप्रमाणें गर्विष्ठ मूर्खांचे पुष्कळ वायफळ शब्द केवळ त्यांच्या हृदयाची साक्ष पटवितात. एवढ्याचसाठीं लोक नानाप्रकारचें शहाणपण मिळविण्यासाठीं झटतात. **नाना लाभांमध्यें अकलेच्या लाभासारखा दुसरा लाभ नाहीं.** कोणी विचारल्याशिवाय किंवा अन्यायानें विचारलें असतां उत्तर देऊं नये. आपल्याला कळत असलें तरी

घुम्याप्रमाणें गप्प बसावें. धर्मिष्ठ, प्रामाणिक, उदार, व स्वधर्मामध्यें रत अशा लोकांमध्यें शहाण्यानें रहाण्याचा यत्न करावा. ज्याठिकाणीं चारी वर्णांचा संकर झाला आहे, त्याठिकाणीं कल्याणेच्छूनें राहूं नये. कांहीं हातपाय न हालवितां मिळेल त्यावर संतुष्ट राहून मनुष्याला जगतां येतें. पुण्यवानांमध्यें राहून मनुष्याच्या पदरीं पुण्य पडतें व पाप्यामध्यें राहून पाप चिकटतें. पाणी, अग्नि व चंद्र यांचा स्पर्श ज्याप्रमाणें जाणवला जातो, त्याप्रमाणें पुण्यपापांचें सुखदुःखात्मक फल मिळतें. अतिथींना वगैरे देऊन अवशिष्ट खाणारे लोक पदार्थांची चव न पहातां पुढें आलें असेल तें अन्न केवळ पोट भरण्यासाठीं ह्मणून खातात. जे लोक मोठ्या काळजीपूर्वक गोडी घेऊन निरनिराळे पदार्थ सेवन करतात त्यां इंद्रियपोषकांना कर्मपाशांनीं बद्ध झाल्यामुळें संसाराचा फेरा चुकत नाहीं. ज्याठिकाणीं आपल्यासंबंधानें प्रमाणपूर्वक ज्ञान आपल्या शिष्याला त्याचा आदर नसतां उगीच त्यानें विचारल्यावरून सांगण्यांत येतें तें ठिकाण ब्राह्मणानें सोडावें; परंतु ज्याठिकाणीं गुरुशिष्यांची वृत्ति असावी तशी असते तें ठिकाण कोण सोडील ? आपला मोठेपणा राखण्याची ज्याला इच्छा आहे असा कोणता विद्वान शहाण्यांचे, ज्याला कांहीं आधार नाहीं असे दोष ज्या ठिकाणीं निघतात तेथें राहील ? ज्या ठिकाणीं लोभी लोकांनीं धर्ममर्यादा अगदीं डळमळीत करून सोडली आहे तें ठिकाण पेट घेतलेल्या वस्त्राच्या शेवटाप्रमाणें कोण सोडावयाला तयार होणार नाहीं? निर्मत्सर राहून निःशंकपणें ज्या ठिकाणीं धर्म पाळतां येतो त्या पुण्यशील साधूंच्या जवळ भल्यानें रहावें. ज्या ठिकाणीं पैशासाठीं ह्मणून लोक धर्माचरण करतात त्यांच्या वाऱ्याला मनुष्यानें राहूं नये; कारण ते पापी लोक असतात. व उपजीविकेसाठीं ज्या ठिकाणीं लोक पापाचरणामध्यें रहातात तेथून तर तें साप असलेल्या घराप्रमाणें समजून पळच काढावा. कल्याणेच्छूनें ज्याच्या योगानें पूर्व कर्मापासून उत्पन्न होणाऱ्या वासनेशीं जखडून जाऊन दुःखग्रस्त होण्याची पाळी येते असें काम आरंभापासूनच सोडावें. ज्या ठिकाणीं राजा आणि त्याचे कामगार हे सारखा अधिकार गाजवितात व लोककुटुंबांना न पोसतां आपण आधीं खातात असें राष्ट्र शहाण्यानें सोडावें. ज्या ठिकाणीं श्रोत्रिय ब्राह्मणांना आधीं जेवावयास मिळतें व ज्या ठिकाणीं ते नेहमीं धर्मांत गढले राहून यजन व अध्यापन यांमध्यें गढलें असतात व जेथें स्वधा, स्वाहा, वषट्कार योग्य रीतीनें होतात, त्या ठिकाणीं मनुष्यानें कांहीं विचार न करतां खुशाल रहावें. पोटाला न मिळाल्यामुळें ज्या ठिकाणीं ब्राह्मणावर भलतीं सलतीं कामें करण्याचा प्रसंग येतो तें राष्ट्र शहाण्यानें विषमिश्रित मांसाप्रमाणें सोडावें. ज्या ठिकाणीं मागण्याच्या आधीं लोक आनंदानें देतात अशा ठिकाणीं धार्मिक मनुष्यानें स्वस्थ चित्तानें कृतकृत्य होऊन रहावें. त्याचप्रमाणें ज्या ठिकाणीं दुष्टांना दंड होऊन भल्यांना सत्कार मिळतो अशा पुण्यशील साधूंमध्यें मनुष्यानें रहावें. ज्या देशाचा वैभवशील राजा नेहमीं धर्मानें वागून कामवश न होतां जे आत्मनिग्रही लोकांवर आपला राग पाखडतात अशा दुष्ट व लोभी लोकांना योग्य शासन करतो, त्या राज्यामध्यें मनुष्यानें रहावें. अशा रीतीनें वागणारा राजा आपल्या देशांत रहाणाऱ्या लोकांना ते वैभवाला मुकूं लागले असतां फिरून वैभवाला चढवितो. थोडक्यांत आत्मकल्याणाची गोष्ट अशी आहे. यासंबंधानें विस्तार सांगावा तितका थोडा आहे. जो या जगांत चरितार्थ चालवीत असतां सर्व प्राणिमात्रांच्या हितामध्यें दक्ष राहून वरच्याप्रमाणें वागतो त्याचें पुष्कळ कल्याण होईल.'

---

## २०२ अरिष्टनेमी व सगर यांचा संवाद
## ( १२. २८८ )

"'आमच्यासारख्या राजांनीं श्रेष्ठ हेतूंकडे लक्ष देऊन या जगांत कसें वागावें,' ह्मणून युधिष्ठिरानें विचारलें असतां भीष्म ह्मणाले, 'पूर्वी सगरानें अशाच प्रकारचा प्रश्न अरिष्टनेमींना विचारला असतां त्यांनीं जें सांगितलें तें सांगतों ऐक.

'कशाच्या योगानें मनुष्याला येथें सुख होऊन शोकक्षोभादि विकारांपासून त्याला मुक्त रहातां येईल,' ह्मणून सगरानें विचारलें असतां अरिष्टनेमी

ह्मणाले, ' मोक्षसुख हें ह्या जगांत सर्व सुखांमध्यें श्रेष्ठ असून बायकापोरें, गुरेंढोरें, धनधान्य यांमध्यें गढलेल्या मूर्खाला तें कळत नाहीं. ऐहिक विषयांमध्यें गढलेली बुद्धि व तृष्णाकुल झालेलें मन यांपुढें कोणाचा इलाज चालत नाहीं. स्नेहपाशानें जखडलेल्या मूर्खाला मोक्ष कधीं मिळत नाहीं. हे तोडावयाचे स्नेहपाश पुढें दिल्याप्रमाणें आहेत. योग्यकालीं पुत्र उत्पन्न करून ते यौवनावस्थेला आले असतां त्यांचें लग्न करून देऊन आपलें पोट भरण्याला ते समर्थ झाले आहेत असें पाहून त्यांचा संग सोडून मनुष्यानें जगांत सुखानें फिरत रहावें. बायकोचें लालन करून तिला मुलगा झाल्यावर ती ह्मातारी होऊन मुलाकडे तिचें लक्ष लागलें ह्मणजे सर्वांहून श्रेष्ठ उद्देश डोळ्यांपुढें ठेवून कांहीं काळानें तिला सोडावें. मुलगा होवो वा न होवो, पूर्वावस्थेमध्यें इंद्रियविषयांचा इंद्रियांनीं उपभोग घेऊन पुढें त्यांपासून मुक्त होऊन सुखांत रहावें. इंद्रियांचें कोड पुरविल्यावर त्यांना दाबून सर्व संगापासून मुक्त व्हावें व सहज मिळेल तेवढ्यावर आनंद मानून सर्व प्राणिमात्रांवर सारखी दृष्टि ठेवून रहावें. ज्यांनीं संग सोडून दिला असे लोक निर्भय होऊन सुखांत रहातात. जे विषयांत गढून गेले आहेत ते खात्रीनें नाश पावतात. किडे व मुंग्या अन्नसंचयाच्या मागें लागून त्यांतच नाश पावतात. विषयासक्त न झालेले लोक सुखी असून विषयांमध्यें गढलेले दुःखी असतात. मोक्षाकडे लक्ष दिलेल्या मनुष्यानें माझ्याशिवाय यांचें कसें चालेल, ह्मणून स्वजनांसंबंधानें काळजी करूं नये. मनुष्य आपल्या आपण उत्पन्न होतो, आपल्या आपण वाढतो व सुखदुःख व मृत्यु आपल्या आपण आणून घेतो. अन्न व कपडालत्ता आपल्या मेहनतीनें किंवा आईबापांच्या संग्रहापासून तो मिळवितो तें सर्व पूर्वकर्माचें फळ आहे. आपल्या कर्मांनीं राखलेल्या या सर्व भूतमात्रांसाठीं ब्रह्मदेवानें त्यांच्या त्यांच्या कर्माप्रमाणें भक्ष्य निर्मून ठेविलें आहे, तें मिळवीत ते या पृथ्वीवर भटकत फिरतात. आपण स्वतः मातीचा गोळा असून पराधीन असतां स्वजनांचें पोषण करण्याचा किंवा रक्षण करण्याची काय ह्मणून चिंता करावी? कारण मनुष्यानें किती खटपट केली तरी त्याच्या स्वजनाला मृत्यु त्याच्या देखत घेऊन जातो; एवढ्या गोष्टीनेंच मनुष्यानें शहाणे झालें पाहिजे. तसेंच स्वजनांच्या जिवंतपणींच पोषण व रक्षण करण्याचें मनुष्याचें काम संपण्यापूर्वींच त्यावर त्यांना सोडून मरण्याची पाळी येते. स्वजन मरून ह्या जगांतून गेल्यावर त्याठिकाणीं त्यांचें काय होतें, त्यांना तेथें दुःख होतें किंवा सुख होतें, हें आपल्याला कळत नाहीं. आपल्या जिवंतपणीं किंवा आपल्या मागें ज्या अर्थी आपले स्वजन त्यांच्या कर्मांच्या फळाप्रमाणें स्वतःचें पोषण करण्याला समर्थ असतात त्या अर्थी या गोष्टीवर विचार करून मनुष्यानें स्वतःच्या फायद्याचें असेल तें करावें. या जगामध्यें कोण कोणाचा आहे. ' ही गोष्ट लक्षांत घेऊन मनुष्यानें मोक्षप्राप्तीकडे लक्ष द्यावें. भूक, तहान व अशा प्रकारचे दुसरे विकार, क्रोध, लोभ, मोह हे ज्यानें जिंकले आहेत, जो मूर्खपणानें जुगार, दारू, रांडा व शिकार यांमध्यें गढत नाहीं तो खरोखर मुक्तच आहे. जो रोजच्या रोज सकाळ संध्याकाळ किती खावें याप्रमाणें खाण्यासंबंधानें काळजी बाळगतो त्यालाच आयुष्यामधील खरे दोष उमगले आहेत असें समजावें. जो नेहमीं सावध राहून मन स्त्रियांच्या अभिलाषापासून काढून घेतो, प्राणिमात्रांची उत्पत्ति, नाश व हालचाल जो पूर्णपणें ओळखतो, जो भरलेल्या हजारों खटाऱ्यांमधून पोटापुरतें मूठभरच काढून घेतो, तसेंच कळकाचें झोंपडें व भव्य वाडा यांमध्यें कांहीं अंतर समजत नाहीं व जो हें सर्व जग मृत्यु, व्याधि व दुष्काळ यांनीं पीडिलेलें आहे हें जाणतो तो मुक्तच आहे. जो जग अशा प्रकारचें आहे हें पहातो तो नेहमीं समाधानवृत्तीमध्यें असतो. ज्याची दृष्टि अशी नाहीं त्याचा नाश होतो. जो थोडक्यामध्यें संतुष्ट असतो, हें सर्व जग खाणारा व खाद्य यानेंच भरलेलें आहे हें जाणून ज्याला मोहानें उत्पन्न होणारे नानाप्रकारचे विकार होत नाहींत, पलंगावर निजणें व जमिनीवर पडणें, साळीचा भात खाणें किंवा कण्या खाणें, बारीक वस्त्र व जाडें भरडें, रेशमी किंवा झाडाच्या साली, कमवलेलें बकऱ्याचें कातडें किंवा बिन कमावलेलें कातडें ह्यांमध्यें ज्याला अंतर दिसत नाहीं, हें सर्व जग पंच भूतात्मक आहे हें जाणून जो तसें वागतो, सुखदुःख,

लाभहानि, जय अपजय, इच्छा द्वेष, भय व चिंता ह्या गोष्टी ज्याला सारख्या आहेत तो मुक्त असल्याप्रमाणेंच आहे. जेव्हां मनुष्य हें शरीर रक्त, मलमूत्र इत्यादि नाना दोषांनीं भरलेलें आहे, असें पाहूं लागतो, त्याचप्रमाणें ह्यातारपणानें पडणाऱ्या सुरकुत्या, पिकणारे केस, येणारी रुशता, भेसुरपणा व वांकडेपणा ज्याला डोळ्यांपुढें दिसतात, त्याचप्रमाणें शक्तिहीनता, दृष्टिमांद्य, बहिरेपणा, दुर्बलता ह्या गोष्टी ज्याच्या नजरेला येतात, देव, ऋषी, असुर, निरनिराळ्या प्रभावांनीं युक्त असे हजारों राजे ही पृथ्वी सोडून गेले आहेत हें ज्याला कळतें, त्याचप्रमाणें या जगामध्यें अर्थलाभ दुर्लभ असून क्लेश मात्र सुलभ आहेत व कुटुंबाच्या मागें लागणें हें नेहमीं दुःखाला कारण आहे हें ज्याला कळतें तो मुक्त होतो. मुलामध्यें व बाकीच्या लोकांमध्यें पुष्कळ दोष लक्षांत घेऊन मोक्ष कोण बरा ह्मणणार नाहीं ? शास्त्रावरून व जगाच्या अनुभवावरून ह्या जगांतील सर्व मनुष्यव्यवहार जो वायफळ समजतो तो मुक्तच आहे; मग मनुष्य गृहस्थाश्रमामध्यें असो किंवा बुद्धीला मोह पडूं न देतां दुसऱ्या कोणत्याही मार्गानें मोक्षाच्या मार्गें लागो.'

---

## २०२ शुक्राचार्यांचा इतिहास.
### ( १२. २८९ )

युधिष्ठिर ह्मणाला, 'देवर्षी विद्वान उशना देवांचें अप्रिय करून असुरांचें प्रिय कां करूं लागले? नेहमीं देवांशीं कंबर बांधलेल्या त्यांचें तेज हे कां वाढवीत राहिले ? त्यांना शुक्राचार्य हें नांव कसें मिळालें ? त्यांना एवढी थोरली सिद्धि कशी मिळाली? व इतकें सर्व असून आकाशाच्या मधून ते कधीं कां जात नाहींत ? ' भीष्म म्हणाले, 'सांगतों ऐक. हे भार्गवकुलोत्पन्न मुनी पूर्वीं विष्णुचक्रानें आपल्या आईचें मस्तक उडविलें ह्या कारणामुळें देवांचें वांकडें करण्याला प्रवृत्त झाले. इंद्र हा जगताचा स्वामी असून त्याच्या खजिन्याचा मालक कुबेर आहे. कोणे एके वेळीं योगबलानें त्या कुबेरामध्यें शिरून त्याला मोहित करून त्या योगबलानें त्याचें कांहीं चालूं न देतां त्याचा सर्व पैसा यांनीं हरण करून घेतला. याप्रमाणें पैसा नेल्यामुळें कुबेराच्या मनाला चैन पडेना. दीन व चिंतातुर होऊन तो शंकरांकडे आला व झालेली हकीकत त्यानें त्यांना कळविली तेव्हां महायोगी शंकरांना राग येऊन डोळे लाल करून हातांत शूल घेऊन तयार होऊन तो कोठें आहे असें ते म्हणाले. उशना योगबलानें त्यांचा उद्देश जाणून आपण आतां येथून निघून जावें किंवा येथेंच रहावें किंवा यांच्याकडे जावें असा विचार करीत दूर उभे राहिले. पुढें योगसिद्धीनें ते शंकरांच्या शूलाच्या टोंकामध्यें शिरून बसले. हें शंकरांनीं जाणून त्यांनीं ते शूल वांकविलें व ते ऋषी हातीं सांपडले असतां आ पसरून त्यांनीं त्यांना तोंडांत सोडून दिलें. याप्रमाणें त्यांनीं वांकविलेल्या शूलाला तेव्हांपासून पिनाक हें नांव मिळालें. शुक्राचार्य शंकरांच्या पोटांत गेल्यावर तेथें ते फिरत राहिले. पुढें शंकर पाण्यांत शिरून लाखों वर्षें कडक तप करून पुढें त्या सरोवरांतून बाहेर पडले. तेव्हां त्यांच्या त्या तपाच्या योगानें शुक्राचार्यांचेंही तेज वाढून ते त्या तपानें व पूर्वीं मिळविलेल्या द्रव्यानें वैभवशाली होऊन तिन्ही लोकांत झळकूं लागले. पुढें शंकर योग धरून बसले. उशनाही त्यांच्या पोटामध्यें फार चिंतातुर होऊन राहिले व तेथून त्यांनीं बाहेर पडण्याला वाट मिळावी ह्मणून स्तुतीनें शंकरांना तुष्ट केलें; परंतु रुद्रांनीं आपलीं सर्व द्वारें बंद करून त्यांना बाहेर येऊं दिलें नाहीं. पुढें, 'माझ्यावर कृपा करा, ' ह्मणून त्यांना फार विनंति करतांना ऐकून, 'शिश्नाच्यावाटें बाहेर पड, ' ह्मणून शंकरांनीं त्यांला सांगितलें. चोहोंकडून बंद होऊन पडलेल्या उशनांना तें द्वार लवकर न सांपडतां महादेवांच्या तेजानें होरपळत ते त्या ठिकाणीं बराच वेळ होते; परंतु पुढें तें द्वार सांपडून त्यांतून ते बाहेर पडले. यामुळें त्यांना शुक्र हें नांव मिळालें व यामुळेंच आकाशामध्यें त्यांना जातां येत नाहीं. त्यांना तेजःपुंज असे बाहेर पडलेले पाहून शंकर शूल घेऊन फिरून त्याच्या रागानें त्यांना मारण्याला निघाले, तेव्हां पार्वतीनें मध्यें पडून त्यांना मारूं दिलें नाहीं व यामुळें त्यांना त्या देवीचें पुत्रत्व आलें. देवी शंकरांना ह्मणाली, 'हा आपल्या पोटांतून येऊन माझा मुलगा झाला

असल्यामुळें याला मारणें उचित नाहीं.' ह्या पार्वतीच्या शब्दानें शांत होऊन शुक्राचार्यांना त्यांनीं वाटेल तिकडे जाण्यास सांगितलें. पुढें त्या शिवपार्वतींना नमस्कार करून शुक्राचार्य वाट फुटली तिकडे निघून गेले.'

## २०४ पराशरगीता. (१२. २९०-९८)

युधिष्ठिर ह्मणाला, 'आणखीही मनुष्याच्या कल्याणाचें जें कांहीं असेल तें मला सांग. आपल्या भाषणानें माझी वृत्ति मुळींच होत नाहीं. काय केल्यानें मनुष्याचें इहपर श्रेष्ठ हित साधतें तें मला सांग.' भीष्म ह्मणाले, 'या संबंधांत पुढील पराशर व जनक यांचा संवाद लक्षांत ठेव. पूर्वी जनकानें अशाच प्रकारचा प्रश्न पराशरांना केला असतां महात्मे पराशर राजावर अनुग्रह करण्याच्या बुद्धीनें ह्मणाले, 'कर्मांनीं संचय केलेला धर्मच इहपर कल्याणाला कारण आहे व याप्रमाणें धर्म पदरीं पाडून घेतल्यानें मनुष्याला स्वर्ग लोकामध्यें मान मिळतो. सारा कर्मविधि धर्मात्मक असून निरनिराळ्या आश्रमांतले सज्जन धर्माकडे लक्ष देऊन आपापलीं कर्में करीत राहतात. ब्राह्मणांसाठीं दान, क्षत्रियांसाठीं कर, वैश्यांसाठीं शेती व शूद्रांसाठीं सेवा याप्रमाणें चतुर्विध धर्म या जगांत सांगितला आहे. यांपैकीं जो ज्या धर्मानें वागतो त्यांत त्याचा उदरनिर्वाह होतो. या उदरनिर्वाहासाठीं पापपुण्यात्मक निरनिराळीं कर्में करून मनुष्य मेल्यावर त्या त्या कर्मानुसार त्याला निरनिराळ्या गती मिळतात. पांढऱ्या शुभ्र अशा पितळेच्या भांड्याला सोन्याचा अथवा रुप्याचा मुलामा दिल्यानें त्या त्या धातूचा रंग जसा त्यावर चढतो त्याप्रमाणें मनुष्य आपापल्या पूर्व कर्माच्या स्वरूपावरून पूर्वी सांगितलेल्या सहा रंगांपैकीं एखादा रंग धारण करतो. बीजावांचून कांहीं उगवत नाहीं. सुखदायक कर्में केल्यावांचून मनुष्याला कधीं सुख मिळावयाचें नाहीं. हा देह पंचमहाभूतांशीं मिळाला असतां पूर्वजन्मीं केलेल्या चांगल्या कर्मानेंच मनुष्याला सुख मिळतें. चार्वाक ह्मणतो कीं, 'दैव किंवा पूर्वजन्मांतील पापपुण्यात्मक कर्म यांचें फल या जगांत कांहीं नाहीं. अनुमानावरून दैवाचें अस्तित्व ठरत नाहीं. देव, गंधर्व, असुर या सर्वांना ती ती स्थिति स्वभावतःच आली आहे. पूर्वजन्माच्या कर्माचें फल मनुष्याच्या पुढच्या जन्मासाठीं कधीं रहात नाहीं. एखाद्या जन्मांत मिळणाऱ्या फलाला मागील जन्मांतील नित्य, नैमित्तिक, काम्य व निषिद्ध अशा चार प्रकाराचीं कर्में कधीं कारण होत नाहींत. वेदाज्ञा केवळ मनुष्यांचें वर्तन या जगांत नियमित करून त्याच्या मनाला शांति देण्यासाठीं आहेत.' परंतु हें वरील चार्वाकाचें मत चुकीचें आहे. डोळ्यानें, मनानें, तोंडानें व हातानें मनुष्य जीं चार प्रकारचीं कर्में करतो त्यांचें फळ त्याला मिळतें. कर्मांच्या फलानुरूप मनुष्याला कधीं सबंध सुख मिळतें, कधीं संबंध दुःख मिळतें व कधीं सुख व दुःख हीं दोन्ही मिळतात. कर्में, मग तीं बरीं असोत किंवा वाईट असोत तीं भोगल्यावांचून कधीं नाहींशीं होत नाहींत. कधीं कधीं चांगल्या कर्मामुळें मिळणारें सुख इतकें झांकलें रहातें कीं, वाईट कर्माचें फल दुःख मनुष्य सोशीत असे तोंपर्यंत तें कधीं आपलें डोकें वर काढीत नाहीं. दुःख पूर्णपणें सोसून झाल्यावर मनुष्य आपल्या चांगल्या कर्माचें फल भोगूं लागतो, व चांगल्या कर्माचीं फलें भोगून झाल्यावर वाईट कर्मांचीं फलें भोगूं लागतो. आत्मनिग्रह, क्षमा, धैर्य उत्साह, संतोष, सत्य, भीड, अहिंसा, नानाप्रकारच्या व्यसनांपासून अलिप्तता आणि दक्षता हीं सुखाला कारण आहेत. कोणाही मनुष्याला त्याच्या चांगल्या कृत्यांचेंच किंवा वाईट कृत्यांचेंच सदा फल मिळतें असें नाहीं. शहाण्या मनुष्यानें नेहमीं आपलें मन जाग्यावर स्थिर ठेवण्याचा प्रयत्न करावा. मनुष्याला दुसऱ्याच्या बऱ्यावाईट कृत्यांचें फल कधीं भोगावें लागत नाहीं. तो जीं कृत्यें करतो त्याचेंच फल त्याला भोगावें लागतें. जो मनुष्य सुख व दुःख या दोन्हींची पर्वा करीत नाहीं, तो एका ज्ञानमार्गानें पुढें चालला असतो; परंतु जे ऐहिक विषयांशीं आपल्याला जखडून घेतात ते याहून निराळ्या मार्गानें चालले असतात. दुसऱ्यानें एखादी गोष्ट केली असतां ज्याबद्दल आपण त्याची निंदा करूं अशी गोष्ट आपण स्वतः कधीं करूं नये. अशी गोष्ट केल्यानें लोकांच्या उपहासाला आपण कारण होतों. धैर्यहीन क्षत्रिय, वाटेल तें खाणारा ब्राह्मण,

हातपाय बांधून बसणारा वैश्य व आळशी शूद्र, शीलावांचून असलेला विद्वान्, सद्वर्तनहीन कुलीन, सत्यापासून ढळलेला ब्राह्मण, जारकर्म करणारी स्त्री, विषयाशीं लगटलेला योगी, आपल्यासाठीं अन्न शिजविणारा मनुष्य, बोलावयास उठलेला मूर्ख, राजावांचून असलेलें राज्य, प्रजेवर स्नेह नसणारा राजा, या सर्व गोष्टी शोचनीय आहेत.

हा शरीररूपी रथ मिळून जो मनुष्य विषयरूपी घोड्यांना ज्ञानरूपी लगाम ओढून आवरतो तोच शहाणा समजला पाहिजे. आपल्याहून वरिष्ठ प्रतीच्या गुरूपासून ज्ञान करून घेऊन व आपल्या वृत्तीकडे लक्ष न देतां मन स्वाधीन ठेवून ईश्वरभक्ति ठेवणें चांगलें. हें ज्ञान आपल्या बरोबरीच्या मनुष्यापासून मिळवून घेण्याचा प्रयत्न करण्यांत कांहीं अर्थ नाहीं. हें मर्यादित आयुष्य कष्टानें मिळालें असून विषयोपभोगामध्यें मनुष्यानें तें घालवूं नये; परंतु प्रयत्नानें पुण्यकर्मामध्यें घालवून क्रमानें आपल्या उन्नतीचा मार्ग धरावा. जीवाला प्राप्त होणाऱ्या सहा निरनिराळ्या वर्णांपैकीं जो उच्च वर्णापासून नीच वर्णाला येऊन मिळतो तो निंदेला पात्र होतो. ह्मणून ज्याला पुण्यकर्माचें फल मिळालें आहे, त्यानें रजोगुणात्मक अशीं कर्में टाळावींत. पुण्यकर्मानें मनुष्यानें उच्च वर्ण मिळवून घ्यावा. परंतु हें काम फार कठीण असून हा वर्ण मिळवितां न आल्यानें मनुष्य पापकर्में करून आपला घात करून घेतो. अज्ञानानें जीं पापकर्में घडतात त्यांचा तपानें नाश होतो; परंतु जाणून बुजून घडणारीं पापकर्में पुष्कळ दुःखाला कारण होतात. ह्मणून मनुष्यानें दुःखदायक फल देणारीं पापकर्में करूं नयेत. ज्यांचा परिणाम पापामध्यें आहे असें कर्म मोठें फल देणारें असलें तरी शुचिर्भूत मनुष्य ज्याप्रमाणें चांडाळाला शिवत नाहीं, त्याप्रमाणें शहाण्या मनुष्यानें त्याच्या वाटेला जाऊं नये. पापकर्मामुळें मनुष्याची दृष्टि बिघडून जो हा देह व त्याबरोबरच्या विनाशी गोष्टी यांनाच आत्मा समजूं लागतो, व ज्या मनुष्याला वैराग्य झालें नाहीं, तो परलोकाला निघाला असतां त्याला मोठा ताप होतो. बिनरंगाचें कापड मळ लागला असतां धुवून स्वच्छ करतां येतें; परंतु काळ्या रंगांत रंगविलेल्या कापडाला तसें करतां येत नाहीं, तीच स्थिति पापाची आहे. जो मनुष्य जाणून पाप करून तें नाहींसें करण्यासाठीं चांगल्या रीतीनें वागतो त्याला सुद्धां आपल्या बऱ्या व वाईट कृत्यांचीं फळें निरनिराळ्या रीतीनें भोगावीं लागतात. ब्रह्मवादी लोक वेदाच्या आधारावरून ह्मणतात कीं, 'अज्ञानानें केलेलीं हिंसात्मक कर्में पुण्यात्मक कर्मांनीं नाश पावतात; परंतु मुद्दाम केलेलीं अशीं कर्में मात्र चांगल्या कर्मांनीं नाहींशीं होत नाहींत.' परंतु यासंबंधानें खरा विचार पाहिला असतां कोणतींच कर्में तीं बरीं असोत किंवा वाईट असोत, जाणून बुजून घडलीं असोत किंवा चुकून घडलीं असोत, फल भोगल्याशिवाय त्यांचा कधीं नाश होत नाहीं. जीं कर्में पूर्ण विचारांतीं मनानें घडतात त्यांच्या स्थूल सूक्ष्म मानानें फलेंही तशाच प्रकारचीं मिळतात; मोठीं हिंसात्मक कर्में अज्ञानानें घडलीं असतां त्यांचे वाईट परिणाम भोगावे लागतात खरे; परंतु भेद येवढाच आहे कीं, तीं कर्में व त्यांचीं फलें त्या त्या कर्माच्या मानानें फार लहान असतात. जीं संशयात्मक कर्में देवता व मुनी यांच्या हातून घडलीं आहेत तशा प्रकारचीं कर्में भलत्यानें करूं नयेत व तीं ऐकून त्याबद्दल त्यांना नांवेंही ठेवीत बसूं नये. जो मनुष्य विचार करून व आपली शक्ति जाणून एखादें चांगलें काम पार पाडतो तो चांगले दिवस पहातो. कोऱ्या मडक्यांत ठेवलेलें पाणी कमी कमी होऊन नाहींसें होतें, तेंच मुरलेल्या मडक्यांत ठेवलेलें तसें होत नाहीं. त्याचप्रमाणें विचार न करतां बुद्धिपुरस्सर केलेलीं कर्में कल्याणदायक होत नाहींत; तींच चांगला विचार करून केलेलीं चांगलीं कर्में वाढत राहून चांगलीं फलदायक होतात. पाणी असलेल्या भांड्यांत पाणी ओतलें असतां तें जसें वाढत रहातें त्याचप्रमाणें विचार करून केलेलीं बरीं वाईट कर्में त्याच्या पूर्वसंचिताला भर घालीत रहातात. आपले शत्रु व आपल्यावर जे वर्चस्व स्थापूं पहातात अशांना जिंकून योग्य रीतीनें राज्य करून राजानें आपल्या प्रजेचें रक्षण करावें. अग्नि पेटवून नानाप्रकारच्या पवित्र यज्ञांनीं त्यामध्यें आहुती द्याव्या, व मध्य वयांत किंवा झातारपणीं वनांत जाऊन रहावें. आत्मनिग्रही, मनुष्यानें धर्म-

शील राहून सर्व प्राणिमात्रांच्या ठिकाणीं आत्मभाव ठेवावा व आपल्या शक्तीप्रमाणें थोरांचा सत्कार करून शील व नेकी यांच्या योगानें सुख मिळवावें. या जगांत कोण कोणावर उपकार करतो किंवा कोण कोणाला देतो. जो तो आपल्या स्वार्थासाठीं धडपड करीत असतो. मोठेपणा जाऊन स्नेह नाहींसा झाला असतां प्रत्यक्ष बाप किंवा भाऊ यांना सुद्धां मनुष्य टाकण्याला तयार होतो, मग दुसऱ्याची गोष्ट कशाला पाहिजे. विशिष्ट मनुष्याला दान देणें व विशिष्टापासून दान घेणें हीं दोन्ही सारखीं आहेत; तरी या दोहोंमध्यें गरीबाला दान देणें हें अधिक चांगलें आहे. न्यायानें मिळवून न्यायानें वाढविलेला पैसा धर्मासाठीं मोठ्या यत्नानें राखून ठेवावा. धर्मासाठीं म्हणून दुष्ट कृत्यांनीं पैसा मिळवूं नये. मनुष्यानें वैभवाच्या मागें न लागतां आपल्या शक्तीप्रमाणें काम करीत असावें. पाणी मग तें थंड असो किंवा तापविलेलें असो, आपल्या शक्तीप्रमाणें शुद्ध अंतःकरणानें अतिथीला दिल्यानें भुकेलेल्याला अन्न दिल्याचें फल मिळतें. केवळ फलमूलें व पानें मुनींना देऊन त्यांचा सत्कार केल्यानें रंतिदेवाला सिद्धि मिळून उत्तम लोक मिळाले. अशाच फलपत्रांनीं सूर्याची त्याच्या पारिपार्श्वकांसह पूजा करून शिबीनें उत्तम लोक मिळविले. या जगामध्यें मनुष्य,देव, अतिथी, पितर, नोकर व स्वतः इतक्यांचें ऋण घेऊन जन्माला येतो; तेव्हां यांच्या ऋणांतून मुक्त होण्याला त्यानें यत्न करावा. वेदाध्ययनाच्या योगानें ऋषींच्या, यज्ञानें देवांच्या, श्राद्ध देऊन पितरांच्या, सत्कारानें लोकांच्या, वेदशास्त्रांचे श्रवणमननादिकांनीं व दुसऱ्याला देऊन राहिलेलें खाऊन आपलें रक्षण केल्यानें स्वतःच्या ऋणांतून मनुष्य मुक्त होतो. नोकरांची कामीं नीटें विचारपूस करावी. पैसा नसून सुद्धां प्रयत्नानें मोठी सिद्धि मिळाल्याचीं उदाहरणें आहेत. बरोबर रीतीनें अग्नीला होम देऊन मुनींनीं सिद्धि मिळविली आहे. ऋचीकांचे मुलगे विश्वामित्रांचे पुत्र होऊन त्यांनीं ऋचांनीं यज्ञभागी देवांची स्तुति करून मोठी सिद्धि मिळविली. उशनांना शंकराच्या स्तुतीनें शुक्रत्व येऊन पार्वतीची स्तुति केल्यानें ते आकाशांत यशानें झळकत राहिले आहेत. त्याचप्रमाणें असित, देवल प्रभृति अनेक महर्षींनीं शांत मनानें विष्णूची स्तुति करून त्याच्या प्रसादानें मोठी सिद्धि मिळविली. त्याच विष्णूची स्तुति करून पुष्कळ अपात्र लोक पात्रतेला आले आहेत. **निंद्य कर्म करून वैभवाला चढण्याची मनुष्यानें इच्छा करूं नये. धर्मानें मिळालेला पैसाच खरा असून अधर्मानें मिळालेल्या पैशाला धिक्कार असो. धर्म हा या जगांत कायमचा असून पैशाच्या आशेनें त्यावर पाणी सोडूं नये.** ज्या धर्मात्म्यानें घरीं अग्नि ठेविला आहे, तोच मोठा पुण्यवान समजावा. वेदसुद्धां या तीन अग्नींवरच अवलंबून आहेत. ज्याच्या कर्मामध्यें वैगुण्य येत नाहीं त्यानेंच खरा अग्नि ठेविला आहे असें समजावें. अग्नि न ठेवणें बरें; परंतु अग्निहोत्र ठेवून क्रिया न करणें चांगलें नाहीं. **अग्नि, आत्मा, माता, आपल्याला उत्पन्न करणारा बाप व गुरु यांची यथायोग्य सेवा करावी.** जो मनुष्य गर्व सोडून वृद्धांपुढें हात जोडून उभा राहून त्यांची शुश्रूषा करतो, कामबुद्धि सोडून सर्वांच्या ठिकाणीं प्रेमभावानें पहातो, व ताठा न ठेवतां आणि कोणाला पीडा न करतां धर्मानें रहातो त्याला भले लोक मान देतात.

चवथ्या हलक्या वर्णानें वरील तीन वर्णांवर आपला उदरनिर्वाह चालवावा हें चांगलें. त्यानें प्रेमानें व पूज्यभावानें केलेल्या सेवेपासूनच तो धार्मिष्ठ होतो. शूद्राची वडिलोपार्जित वृत्ति नसेल तर दुसऱ्या वृत्तीच्यामागें न लागतां सेवावृत्तीच त्यानें धरावी. त्यामध्यें सुद्धां त्यानें नेहमीं कशाही प्रसंगीं भल्या धार्मिकाशीं संबंध ठेवावा. वाईटाशीं कधीं ठेवूं नये. **ज्याप्रमाणें उदयाचलावर असणारे पदार्थ सूर्याजवळ असल्यामुळें प्रकाशतात त्याप्रमाणें भल्याजवळ असल्यानें नीच मनुष्य सुद्धां झळकतो.** पांढऱ्या कपड्याला जो रंग द्यावा तो रंग त्यावर चढतो, अशीच स्थिति मनुष्याची आहे. म्हणून मनुष्यानें गुणामध्यें मन घालून अवगुणापासून तें काढून घ्यावें. मनुष्याचें जीवित अशाश्वत असून चंचल आहे. जो मनुष्य सुखामध्यें त्याचप्रमाणें दुःखामध्यें चांगलें तेवढेंच करीत रहातो, त्यालाच शास्त्र उमगलें असें समजावें. धर्माला सोडून असणारे कर्म जरी मोठें फल देणारें असलें तरी तें

करूं नये. तें कधीं हिताचें नसतें. जो राजा हजारों गाई त्यांच्या मालकापासून उपटून घेऊन भलत्यालाच देतो तो केवळ नांवाचाच राजा असून वास्तविक चोर आहे. स्वयंभूनें प्रथम लोकमान्य धात्याला उत्पन्न केलें. धात्यापासून लोकांना पोसणारा एक पुत्र निघाला. त्याला पुजत राहून वैश्यानें आपल्या उदर निर्वाहासाठीं शेती व गुरें यांकडे लक्ष द्यावें, क्षत्रियानें बाकी तिन्ही वर्णांचें रक्षण करण्याचें काम आपल्या अंगावर घ्यावें, ब्राह्मणानें सर्वांना वळण लावण्याचें काम आपल्या शिरावर घ्यावें व लुच्चेगिरी न करतां सरळपणानें हव्यकव्यादि जुळवून संमार्जनादि करून शूद्रानें रहावें, म्हणजे धर्म बुडत नाहीं. धर्म न बुडाल्यानें प्रजा सुखी होतात व प्रजा सुखी झाल्यानें स्वर्गामध्यें देवता सुखी होतात. म्हणून जो राजा आपल्या धर्माप्रमाणें तीन वर्णांचें रक्षण करतो तो मानाला पात्र होतो. याचप्रमाणें वेदाध्ययनामध्यें गढलेला ब्राह्मण, आपल्या उद्योगांत गढलेला वैश्य व इंद्रियें स्वाधीन ठेवून लक्षपूर्वक सेवा करणारा शूद्र हे मानाला पात्र होतात. याहून निराळ्या रीतीनें वागल्यानें प्रत्येक वर्ण आपापल्या धर्मापासून भ्रष्ट होतो. न्यायानें व शरीराला कष्ट देऊन मिळविलेल्या वीस कवड्या दान दिल्या असतां सुद्धां मोठ्या फलदायक होतात. याहून निराळ्या तऱ्हेचें हजारों दान करणें सुद्धां व्यर्थ आहे. जे ब्राह्मणांना योग्य मान देऊन त्यांना दान करतात त्यांना त्या त्या दानाप्रमाणें फल मिळतें. एखाद्याला हाक मारून मोठ्या आदरानें दान करणें हें उत्तम समजलें आहे. कोणी मागितलें असतां दान करणें मध्यम समजलें आहे व धिक्कारपूर्वक अश्रद्धेनें जें दान दिलें जातें तें फार कमी प्रतीचें समजलें आहे. या संसारसमुद्रांत बुडत असतां मनुष्यानें नाना उपायांनीं यांतून पैलपार जाण्याला झटावें. ब्राह्मण आत्मनिग्रहानें, क्षत्रिय विजयानें, वैश्य पैशानें, शूद्र सेवेनें झळकतो.

ब्राह्मणाजवळ दानानें मिळविलेला, क्षत्रियाजवळ विजयानें मिळविलेला, वैश्याजवळ त्याच्या धर्मानें मिळालेला व शूद्राजवळ सेवेनें मिळालेला पैसा कितीही थोडा असला तरी तो चांगला असून धर्मकार्यासाठीं तो मोठा फलदायक आहे. ब्राह्मणाला उदरनिर्वाहाची पंचाईत पडली असतां त्यानें क्षत्र किंवा वैश्य धर्म स्वीकारला असतां तो धर्मभ्रष्ट होत नाहीं, परंतु तोच त्यानें शूद्र धर्म पतकरला असतां मात्र तो भ्रष्ट होतो. शूद्राला जेव्हां तीन वर्णांच्या सेवेनें पोटाला मिळेनासें होतें तेव्हां व्यापार, गुरें पाळणें, कारागिरी हे धंदे शूद्रालाही सांगितले आहेत. **रंगभूमीवर सोंग घेऊन येणें, बहुरूपीपणा, बाहुल्यांचा खेळ करून दाखविणें, दारू व मांस विकणें, लोखंड व कातडें यांचा व्यापार करणें, हे धंदे पूर्वी ज्यानें केले नाहींत अशानें हातीं घेऊं नयेत;** कारण यांपैकीं प्रत्येक निंद्य समजला आहे; उलट हे धंदे करणाऱ्यांपैकीं एखाद्यानें जरी हा धंदा सोडला तरी त्याला मोठें पुण्य लागतें. जेव्हां जगामध्यें फत्ते पावल्यानें त्याच्या ताठ्यांत मनुष्य पाप करतो तेव्हां तें त्याचें वर्तन दुसऱ्यांनीं प्रमाण धरूं नये. पुराणांमध्यें असें वाचण्यांत येतें कीं, पूर्वी प्रजा आत्मनिग्रही, धर्माकडे विशेष लक्ष देणारी व सरळ रीतीनें वागणारी असून त्यांना नुसतें तोंडाचें शासन पुरें होतें. सदा मनुष्यांमध्यें धर्मच चांगला समजला गेला आहे. धर्मामध्यें चांगली गति करून घेऊन लोक चांगल्या गुणांनाच भजत असत; परंतु असुरांना तो धर्म न आवडून ते संख्येनें व सामर्थ्यानें वाढून प्रजेमध्यें शिरले, त्यामुळें प्रजेमध्यें धर्मविध्वंसक ताठा उत्पन्न झाला. ताठ्यानें भरून गेल्यामुळें पुढें त्या क्रोधानें झपाटल्या गेल्या. क्रोधाच्या तावडींत गेल्यानें लाज नाहींशी होऊन पुढें त्यांना मोह उत्पन्न झाला. पुढें त्या एकमेकांला पूर्वीप्रमाणें बधेनाशा झाल्या. एकमेकांचा अवमर्द करून त्या खुशाल परस्परांना पीडून गबर होऊं लागल्या. यापुढें तोंडच्या शिक्षेचा कांहीं उपयोग होईनासा झाला; देव व ब्राह्मण यांना तुच्छ करून त्या विषय सेवूं लागल्या. तेव्हां देव शिवाला शरण गेले. नंतर देवांच्या तेजानें वाढून त्या योगानें शंकरांनीं एका बाणानिशीं काम, क्रोध, लोभ या गगनामध्यें असणाऱ्या तीन असुरांना त्यांच्या पुरासह खालीं पाडलें. त्यांचा एक भयंकर पराक्रमी स्वामी होता; त्यालाही शंकरांनीं शूलानें मारलें. याप्रमाणें तो मेल्यावर प्रजा फिरून एकवार आपाप-

त्या पूर्वस्थितींत स्वस्थ झाली; पूर्वीप्रमाणें वेदशास्त्र शिकूं लागली. पुढें स्वर्गामध्यें देवांच्या राज्यावर इंद्राला अभिषेक करून सप्तर्षी लोकांना दंड करण्याचें काम स्वतः करूं लागले. सप्तर्षींनंतर राजा पृथु त्याचप्रमाणें दुसऱ्या पुष्कळ क्षत्रियांनीं निरनिराळ्या लोकांवर निरनिराळ्या रीतीनें राज्य केलें. महादेवांनीं पूर्वी आसुरभाव नाहींसा केला असतां मोठमोठ्या कुळांतील कांहीं ज्ञात्यांच्या हृदयांतून तो नाहींसा झाला नाहीं व ह्या त्यांच्या मनाच्या दुष्ट स्थितीमुळें पुष्कळ भयंकर पराक्रम गाजविणारे राजे होऊन ते आसुरकर्मच करूं लागले. मूर्ख लोक या दुष्ट कृत्यांना चिकटून तीं प्रमाण समजून त्याप्रमाणें वागतात; ह्मणून शास्त्राच्या साह्यानें नीट विचार करून हिंसात्मक कर्में सोडून देऊन ब्रह्मज्ञान मिळविण्याच्यामागें लागावें. न्यायाला झुगारून देऊन संकरानें शहाण्यानें धर्मासाठीं पैसा मिळविण्याच्या खटपटीला लागूं नये. असें करणें कल्याणकारक नाहीं. इष्टानिष्ट हे दोन्ही प्रसंग मनुष्यावर गुदरणारे असल्यामुळें त्याप्रमाणें स्नेह किंवा वैर उत्पन्न होतें. या जीवाला हजारों जातींतून फिरत रहावें लागत असून त्या प्रत्येकामध्यें ह्या दोन्हींचा अनुभव त्याला येतो; ह्मणून मनुष्यानें गुणाच्या ठिकाणीं रंजलें जाऊन दोषाकडे लक्ष ठेवूं नये. निर्गुण असा दुर्बुद्धि मनुष्य असला तरी त्याला आपल्या गुणांची मनुष्यानें स्तुति केली असतां बरें वाटतें. धर्म, अधर्म हे दोन मनुष्यांमध्येंच दिसून येत असून इतर प्राण्यांमध्यें ते दिसून येत नाहींत; ह्मणून मनुष्याला या जगामध्यें कशाची इच्छा असो वा नसो, त्यानें धर्मशील राहून कोणाला पीडा न देतां सर्वांना आपल्यासारखें समजून रहावें. मनामध्यें जेव्हां वासना न उरतां अज्ञान दूर होतें, तेव्हां मनुष्याचें कल्याण होतें.

बहुतकरून संबंधामुळें रजतमोगुणात्मक विकारांनीं गृहस्थाच्या ठिकाणीं ममत्व उत्पन्न होतें. गृहस्थाश्रमाचा आश्रय केल्यानें गाई, शेतें, पैसा, बायको, पोरें, नोकर हीं मागें लागतात व याप्रमाणें गृहस्थाश्रमाकडे लागून याकडे दृष्टि लागली असतां यांचा नश्वरपणा लक्षांत न येतां यासंबंधानें रागद्वेष वाढत रहातो, व यांनीं मनुष्य घेरला गेल्यावर मोहामुळें उत्पन्न होणारी भोगेच्छा याच्यामागें लागते. जो विषयोपभोग घेत राहिला आहे तोच धन्य, असें समजून सर्व त्याच्यामागें लागतात, व त्यामध्यें गढून राहिल्यानें विषयोपभोगापासून होणाऱ्या ग्राम्यसुखापेक्षां मोठा दुसरा लाभच नाहीं, असें त्यांना वाटूं लागतें व याप्रमाणें संगापासून उत्पन्न होणाऱ्या लोभानें झपाटला जाऊन मनुष्य गोतावळा वाढवीत बसण्याच्या नादीं लागतो व नंतर त्यांना पोसण्यासाठीं पैशाच्या मागें लागतो व एखादें काम अयोग्य आहे असें समजून उमजूनसुद्धां मुलांच्या स्नेहामुळें पैशासाठीं तें हातीं घेतो व तो पैसा गेला ह्मणजे त्याला फार दुःख होतें. पुढें अभिमानयुक्त होऊन आपला हिरमोड न होऊं देण्याविषयीं खबरदारी घेत असतां ज्यामुळें भोग मिळतील असें त्याला वाटत असतें त्यामुळेंच त्याचा नाश होतो. जे बुद्धिमान, ब्रह्मवेत्ते व शुभकर्म करीत राहून वाईट टाकणारे आहेत त्यांनाच खरें सुख मिळतें. स्नेहाच्या आधारभूत गोष्टींचा त्याचप्रमाणें पैशाचा नाश झाल्यानें व आधिव्याधीनें पीडून गेल्यानें मनुष्य बैतागतो व त्यामुळें आत्मज्ञानाची जागृति होऊन शास्त्राकडे लक्ष लागतें व शास्त्रावर विचार केल्यानें मनुष्याला तपाचें महत्त्व कळूं लागतें. सारासारविचार करणारा मनुष्य मिळणें फार दुर्मिळ आहे. बायकापोरें इत्यादिकांच्या सुखापासून पुढें क्लेश उत्पन्न होऊं लागले ह्मणजे मनुष्य तपाच्या मागें लागतो. तप हें सर्वांसाठीं असून हीनवर्णालासुद्धां तें सांगितलें आहे. तप इंद्रियनिग्रही मनुष्याला स्वर्गाचा मार्ग दाखवितें. तपाच्या योगानेंच मधून मधून ब्रह्माकडे लक्ष देऊन व्रतस्थ राहून ब्रह्मदेवांनीं प्रजा उत्पन्न केली; त्याचप्रमाणें आदित्य, वसु वगैरे सर्व स्वर्गवाशांनींही तपानेंच सिद्धि मिळविली आहे. ब्रह्मदेवांनीं प्रथम तपानें निर्माण केले ते ब्राह्मण चांगल्या वर्तनानें पृथ्वी व आकाश यांमध्यें फिरत राहिले आहेत. या पृथ्वीवर जे कांहीं राजे किंवा मोठ्या कुळांत जन्मलेले इतर गृहस्थ दिसतात, तें सर्व तपाचें फल आहे. रेशमी वस्त्रें, उत्तम अलंकार, गाड्या घोडीं, उत्तम उत्तम बैठकी, चांगले चांगले पदार्थ, मनाला अनुकूल अशी रूपवती बायको, रहाण्यास भव्य

वाडा हें सर्व तपाचें फल आहे. चांगलें कर्म करणारांना त्यांच्या मनासारखें सर्व मिळतें. तपाला दुर्मिळ असें या जगामध्यें कांहींच नाहीं. ज्यांचें अंतःकरण शुद्ध होऊन तत्त्वज्ञान झालें नाहीं, त्यांना विषयोपभोग सुटून वैराग्य उत्पन्न होणें हें तपाचें फल आहे. मनुष्य सुस्थितींत असो किंवा दुःस्थितींत असो, त्यानें मन व बुद्धि यांच्या योगानें शास्त्रावर विचार करून लोभ टाकून द्यावा. असंतोष हा दुःखाला कारण असून लोभानें इंद्रियें चळतात. व त्यामुळें अभ्यास न ठेवल्यानें ज्याप्रमाणें विद्या नाहींशी होते, त्याप्रमाणें अक्कल जाते व मग त्याला न्यायान्याय कळेनासा होतो; ह्मणून सुख नाहींसें झालें असतां मनुष्यानें उग्र तप करावें. जें कांहीं मनाला प्रिय तेंच सुख असून अप्रिय तें दुःख समजलें आहे.तेव्हां केलेल्या व न केलेल्या तपाचें हें फल आहे. शुद्ध असें तप केल्यानें मनुष्य नेहमीं सुखी होऊन त्याला विषयोपभोग मिळतात व त्याची मोठी कीर्ति होते; परंतु जो शुद्ध तप न करतां वासनात्मक तप करतो त्याला अवमान व नानाप्रकारचीं दुःखें, त्या वासनात्मक तपाचे परिणाम ह्मणून भोगावीं लागतात. धर्म, तप व दान यांची आवश्यकता लक्षांत न येतां, करूं नये म्हणून सांगितलेलीं कर्में त्याला करावींशीं वाटूं लागतात. व अशीं पापकर्में घडूं लागल्यानें तो नरकाला जातो. जो मनुष्य सुखामध्यें किंवा दुःखामध्यें त्याला सांगितलेल्या धर्मापासून भ्रष्ट होत नाहीं त्यालाच शास्त्रदृष्टि आहे असें समजावें. स्पर्शादि विषयोपभोगाची तृप्ति करून घेतल्यानें होणारें सुख बाण सुटल्यापासून तो जाऊन पडेपर्यंतच्या कालाइतका अल्पकालपर्यंत टिकणारें आहे. तें क्षणिक सुख मिळून गेलें म्हणजे मनुष्याला फार तीव्र वेदना होतात. ज्याच्या तोडीचें दुसरें सुख नाहीं असें मोक्षसुख मूर्खच नांवाजीत नाहींत. विषयोपभोगामध्यें असणारें दुःख लक्षांत घेऊन शहाणे लोक मोक्षप्राप्तीसाठीं शांति व आत्मनिग्रह हे गुण वाढवीत रहातात व त्यांच्या सद्वर्तनानें संपत्ति व सुख यानें त्यांना कधीं दुःख होत नाहीं. विषय हे पूर्वजन्मांच्या कर्माप्रमाणें मिळणारें असल्यानें प्रयत्न न करतां जे जे मिळतील ते ते भोगीत रहावें; परंतु धर्माची गोष्ट तशी नसल्यानें तो मात्र मोठ्या हुशारीनें पाळण्याचा प्रयत्न झाला पाहिजे. मानी व थोर कुलांत जन्म होऊन शास्त्राकडे ज्यांची दृष्टि आहे अशांच्या वर्तनाचें अनुकरण धर्मलंड लोकांच्या हातून होणें शक्य नाहीं. अभिमानानें होणाऱ्या सर्व कर्मांचा नाश होतो; ह्मणून थोर व धार्मिक लोकांना तपावांचून दुसरें सत्कृत्य नाहीं. आतां जे लोक गृहस्थाश्रमामध्यें आहेत त्यांनीं बुद्धिपूर्वक मोठ्या हुशारीनें हव्यकव्यासाठीं स्वधर्म पाळीत रहावें. ज्याप्रमाणें सर्व नद्यांना समुद्राचा आधार आहे, त्याप्रमाणें इतर सर्व आश्रमांना गृहस्थाश्रमाचा आधार आहे.' जनक म्हणाला, 'निरनिराळ्या वर्णांच्या मनुष्यांमध्यें पूर्वीं सांगितलेले निरनिराळे वर्ण कशानें उत्पन्न होतात? ज्याची ज्यापासून उत्पत्ति असते तें त्याप्रमाणें असतें असें वेदांत सांगितलें आहे, तेव्हां एका ब्राह्मणापासून उत्पन्न झालेल्यांमध्यें हा निरनिराळेपणा कसा उत्पन्न झाला?' पराशर ह्मणाले, 'ज्यापासून ज्याची उत्पत्ति आहे तोच तो असतो यांत कांहीं शंका नाहीं; परंतु तपाचा ऱ्हास झाल्यामुळें निरनिराळ्या जाती उत्पन्न होतात. चांगलें शेत व चांगलें बीं यांपासून चांगलें फल उत्पन्न होतें. याहून निराळ्या प्रकारच्या हीनापासून कमी दर्जाचें फल उत्पन्न होतें. शिवाय तोंड, बाहू, मांड्या व पाय या चारींपासून ब्रह्मदेवांनीं प्रजा उत्पन्न केली आहे असें म्हणतात. तोंडापासून उत्पन्न झालेले ब्राह्मण असून बाहूंपासून झालेले क्षत्रिय, मांड्यांपासून झालेले वैश्य व पायांपासून झालेले शूद्र याप्रमाणें चार वर्णांची उत्पत्ति असून यांहून निराळे आहेत ते यांच्या संकरापासून उत्पन्न झाले आहेत. अतिरथ, अंबष्ठ, उग्र, वैदेह, श्वपाक, पुक्कस, स्तेन, विषाद, सूत, मागध, अयोग, कर्ण, व्रात्य व चांडाल हे चार वर्णांच्या परस्पर संकरापासून उत्पन्न झाले आहेत.' जनक म्हणाला, 'एका ब्राह्मणापासून उत्पन्न झालेल्यांना निरनिराळीं गोत्रें कशीं आलीं? कारण या जगांत पुष्कळ गोत्रें दिसून येतात. निरनिराळ्या योनींत उत्पन्न झालेले मुनी ब्राह्मणयोनीला कसे जाऊन मिळाले? कारण शुद्ध व अशुद्ध अशा दोन्ही योनींतून जन्मलेले ब्राह्मण झाले आहेत.' पराशर ह्मणाले, 'राजा, तपानें ज्यांचीं अंतःक-

रणें शुद्ध झालीं आहेत अशा महात्म्यांची स्थिति नीच योनीमध्यें जन्म झाल्यानें कमी होत नाहीं. मोठमोठ्या ऋषींनीं वाटेल त्या योनींत पुत्र उत्पन्न करून आपल्या तपाच्या जोरावर त्यांना ऋषित्व दिलें आहे. माझे आजोबा वसिष्ठ, ऋष्यशृंग, कश्यप, वेद, तांड्य, कृप, काक्षीवत, कमठ, यतक्रीत, द्रोण, आयु, मतंग, दत्त, द्रुमद, मात्स्य यांनीं आपल्या तपाच्या जोरावर मोठेपणा मिळविला आहे. मूळचीं अंगिरस, काश्यप, वसिष्ठ व भृगु अशीं चारच गोत्रें असून पुढें निरनिराळीं गोत्रें त्याच्या त्याच्या उत्पादकाच्या तपःप्रभावावरून त्याला त्याला मिळालीं व भले लोक त्याचा उपयोग करतात.' जनक म्हणाला, 'निरनिराळ्या वर्णांचे विशेष धर्म कोणते व सामान्य धर्म कोणते?' पराशर ह्मणाले, 'दान घेणें यज्ञ करविणें व वेद पढविणें हे तीन ब्राह्मणांचे विशेष धर्म असून रक्षण करणें क्षत्रियाचा, गाई पाळणें व उदीम वैश्याचा व या तीन जातींची सेवा करणें हा शूद्राचा विशेष धर्म आहे. भूतदया, अहिंसा, लक्ष, आपल्या जवळचें दुसऱ्याला देऊन मग उपभोग घेणें, श्राद्धकर्म, अतिथिसत्कार, सत्य, अक्रोध, स्वस्तःच्या स्त्रीवर संतोष, शुचिर्भूतता, कोणाचा हेवा न करणें, आत्मज्ञान व सहनशीलता हे सर्व वर्णांचे साधारण धर्म होत. ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य यांची द्विजातीमध्यें गणना होत असून वर सांगितलेले धर्म पाळण्याला त्यांना सारखा अधिकार आहे. हे तीन वर्ण त्यांना त्यांना सांगितलेल्या धर्मांहून निराळे धर्म आचरूं लागले असतां त्यांच्या त्यांच्या स्थितीपासून खालीं येतात. व आपल्या धर्मासाठीं एखाद्या भल्या मनुष्याचा कित्ता डोळ्यांपुढें ठेवून ते उन्नतीला चढतात. शूद्र कधीं खालीं जात नाहीं किंवा त्याला कांहीं संस्कारही सांगितला नाहीं. वेदोक्त धर्म त्याला सांगितला नाहीं. परंतु त्यानें धर्म पाळूं नये असेंही सांगितलें नाहीं. वेदज्ञ लोक भल्या शूद्राला ब्राह्मणासमान समजतात; परंतु मी त्याला क्षत्रियासारखा समजतों. वर येण्याची इच्छा असलेल्या नीच योनींतल्यांनीं भल्यांच्या वर्तनाचें अनुकरण करावें व याप्रमाणें उन्नतीला पोंचविणाऱ्या सर्व क्रिया मंत्रावांचून कराव्या. ज्या ज्या मानानें इतर लोक चांगलें वर्तन ठेवितात त्या त्या मानानें येथें व परलोकीं ते सुख मिळवितात.' जनक ह्मणाला, 'मनुष्याला आपल्या कर्मांनीं कमीपणा येतो कीं ज्या जातींत तो जन्माला येतो त्या जातीनें कमीपणा येतो?' पराशर ह्मणाले, 'दोन्ही कमीपणा आणणारे आहेत यांत संशय नाहीं. परंतु यांमध्यें भेद इतकाच आहे कीं, जो जातीनें कमी असून पापकर्में करीत नाहीं तोच पुरुष. परंतु जो जातीनें श्रेष्ठ असून निंद्य कर्म करतो त्याला तें कर्म कमीपणा आणतें; ह्मणून वाईट कर्म चांगलें नव्हे.' जनक ह्मणाला, 'जीं दुसऱ्याला बाधक होत नाहींत अशीं चांगलीं कर्में कोणतीं?' पराशर ह्मणाले, 'दुसऱ्याला पीडा न देणारीं चांगलीं कर्में पुढें दिल्याप्रमाणें आहेत. गाई स्थाग्नि सोडून देऊन ज्यांनीं कांहीं हुरहुर न धरतां स्वतःला सर्व संगापासून मुक्त करून घेतलें आहे व ज्यांनीं योगमार्गामध्यें क्रमाक्रमानें उच्चपद मिळविलें आहे, जे विश्वास, विनय, आत्मनिग्रह, उत्तम बुद्धि यांनीं युक्त आहेत, असे लोक अविनाशी अशा पदाला जातात. सर्व वर्णांचे लोक धर्मकृत्यें योग्य रीतीनें पाळून व सत्य वचन ठेवून भयंकर अधर्म टाळून स्वर्गाला जातात.

बाप, मित्र, गुरू, गुरुपत्नी, असे लोक भक्तीमुळें उत्पन्न होणारा गुण भक्तिहीनांना देऊं शकत नाहींत. केवळ भक्तिमान, प्रियवादी, आपल्या हितामध्यें दक्ष व गुरूच्या आज्ञेमध्यें वागणारे अशांनाच भक्तीपासून मिळणारा गुण मिळतो. बाप सर्वश्रेष्ठ दैवत आहे. हा आईहून श्रेष्ठ आहे. ज्ञानाचा लाभ सर्वश्रेष्ठ असून जितेंद्रिय लोकांनाच मोक्ष मिळतो. ज्या रणामध्यें शररूपी अग्नीवर पडून क्षत्रिय मरण पावतो तो देवांना सुद्धां दुर्लभ अशा स्वर्गाला जाऊन यथेच्छ स्वर्गफल भोगीत रहातो. दमलेला, भ्यालेला, हातांतून शस्त्र गळून पडलेला, रडत असणारा, रणांतून पराङ्मुख झालेला, रथ, घोडे, कवच इत्यादिकांना मुकलेला, लढाईला तयार होऊन उभा नसणारा, रोगी, जीवदान मागणारा, बाल किंवा वृद्ध, अशांना रणांत मारूं नये. रथ, घोडे, कवच इत्यादिकांनीं सज्ज होऊन आपल्या बरोबर युद्धाला तयार होऊन राहिलेल्या क्षत्रियांशीं राजानें रणांत सामना द्यावा. आपल्या बरोबरीच्या किंवा

आपल्याहून श्रेष्ठ अशा मनुष्याच्या हातून मरणें चांगलें. आपल्याहून कमी दर्जाच्या, भित्र्या किंवा रूपणाच्या हातून मरणें चांगलें नाहीं. पापी, पापवर्तन असणारा, व नीच अशांच्या हातून मरणें नरकाला साधन समजलें आहे. ज्याची आयुर्मर्यादा संपली आहे, त्याला कोणी वांचवूं शकत नाहीं व ज्याचें आयुष्य बाकी आहे त्याला कोणी मारूं शकत नाहीं. आपल्यावर प्रेम करणाऱ्या वडिलांच्या हातून सेवा घेऊं नये. किंवा हिंसात्मक कामें करूं नयेत व दुसऱ्याचा प्राण घेऊन त्यावर आपला उदरनिर्वाह करूं नये. गृहस्थाश्रमांतील कर्मे करून राहणाऱ्या व बन्धमुक्त होऊं इच्छिणाऱ्या गृहस्थांनीं मरते वेळीं पवित्र नद्यांच्या वाळवंटावर देह ठेवणें श्रेयस्कर आहे. आयुर्मर्यादा संपून पंचत्वाला जेव्हां मनुष्य मिळतो तेव्हां ही गोष्ट सहजगत्या घडते किंवा मुद्दाम घडवून आणली जाते. जो मनुष्य हा देह मिळून पवित्र ठिकाणीं जीव देऊन मुद्दाम या देहाचा नाश करतो त्याला अशाच प्रकारचा दुसरा देह धरावा लागतो. व ह्मणूनच तो मोक्षमार्गाला लागला असतांही कुमार्गांत असल्याप्रमाणेंच समजावा. क्षेत्राच्या ठिकाणीं मरून सुद्धां फिरून देह धरण्याला यावांचून दुसरें कारण नाहीं. अध्यात्मज्ञानी लोक हा देह शिरा, स्नायू, हाडें, दुसरे किळसवाणे अपवित्र पदार्थ, पंचमहाभूतें इंद्रियें व इंद्रियविषय यांपासून बनला असून त्वचांनीं तो वरून झांकला आहे असें समजतात. स्वरूपता जाऊनही पूर्वजन्मांतील वासनांच्या जोरावर फिरून मनुष्यरूप धरण्याची पाळी येते. या देहाच्या मालकानें सोडलें असतां शरीर निचेष्ट व हालचाल न करणारें असें होतें. जेव्हां महाभूतें आपापल्या तत्त्वांशीं मिळून जातात व फिरून कर्मावरून त्यांच्याशीं याचा संबंध जडून त्या त्याप्रमाणें हा फिरून उत्पन्न होतो. खरोखर ज्या ज्या स्थितीमध्यें मनुष्य देह ठेवतो त्या त्या स्थितीवरून त्याचें पुढील जन्म ठरून तो मागल्या कृत्यांचें फल अनुभवीत रहातो. कांहीं वेळपर्यंत मोठ्या ढगाप्रमाणें जीव आकाशामध्यें फिरत राहून फिरून त्याला रहावयास घर मिळाल्यावर हा फिरून जन्माला येतो. जीवात्मा हा मनाहून श्रेष्ठ असून मन इंद्रियांहून श्रेष्ठ आहे. नानाप्रकारच्या भूतमात्रांमध्यें जंगम श्रेष्ठ मानले आहेत. जंगमामध्यें दोन पायांचे प्राणी श्रेष्ठ मानले आहेत. यांमध्यें द्विज श्रेष्ठ मानले आहेत. त्यांमध्यें बुद्धिमान श्रेष्ठ मानले आहेत, व बुद्धिमानांमध्यें आत्मज्ञानी व आत्मज्ञान्यांमध्यें निर्मानी श्रेष्ठ मानले आहेत. मनुष्य जन्माला आल्याबरोबर मरण त्याच्यामागें लागलें आहे. व लोक आपापल्या गुणानुरूप ज्यांचा नाश आहे अशीं कर्में करूं लागतात. सर्व पापांपासून स्वतःला शुद्ध करून घेऊन व आपल्या शक्त्यनुरूप सर्व कर्में करून मरण येईल तेव्हां त्याला डोकें देण्याला तयार राहून जो उत्तरायणामध्यें सूर्य असतांना चांगल्या नक्षत्रावर व मुहूर्तावर मरण पावतो तो पुण्यवान होय. विषानें, टांगून घेऊन, आगीनें, चोराच्या हातून, हिंस्र पशूच्या दांतांनीं मरणें हें मध्यम मानलें आहे. जे पुण्यवान लोक आहेत अशा लोकांना अगदीं दुःसह, मानसिक व शारीरिक पीडा झाली असतांही अशा प्रकारचें मरण येत नाहीं. पुण्यवान लोकांचे प्राण सूर्यमंडल भेदून वर जातात. मध्यम प्रतीच्या लोकांचें मध्यें रहातात व पाप्यांचे अधोगतीला जातात. मनुष्याला अज्ञान एवढाच काय तो एक शत्रु आहे. त्यानें घेरला जाऊन मनुष्य भयंकर व दुष्ट कृत्यें करण्याला तयार होतो. ज्याला जिंकण्याकरितां श्रुतींत सांगितल्याप्रमाणें वृद्धांच्या शुश्रूषेनें पूर्ण खटपट केली पाहिजे व सततच्या प्रयत्नावांचून ज्याला जिंकतां येणार नाहीं, असा हा अज्ञानरूपी शत्रु ज्ञानरूप बाणांनींच चिरडून जातो. धर्मसंचय करूं इच्छिणाऱ्या मनुष्यानें प्रथम ब्रह्मचर्य पाळून तपानें राहून वेदाध्ययन करावें. पुढें गृहस्थाश्रम धरून शक्त्यनुसार पंचमहायज्ञ करावे व वंश कायम करून मोक्षाच्या इच्छेनें वनाला जावें. सर्व उपभोग सोडून देऊन स्वतःचा नाश कधीं करून घेऊं नये. चांडालयोनीमध्यें सुद्धां मनुष्य जन्म चांगला मानिला आहे. कारण ह्या योनीमध्यें जन्म घेतल्यानें चांगलीं कर्में करून स्वतःचा उद्धार करून घेतां येतो. या योनींतून आपण भ्रष्ट होऊं नये ह्मणून लोक शास्त्राधाराप्रमाणें कर्में करीत असतात. हा दुर्लभ मनुष्य जन्म मिळून द्वेषभावानें धर्म तुच्छ करून जो वासनेच्या मागें लागतो तो खात्रीनें त्या-

च्यायोगानें फसला जातो. दिव्याप्रमाणें स्नेहानें वाढविण्याला योग्य अशा दृष्टीनें जो सर्व भूतमात्रांकडे स्नेहपूर्वक पहातो, जो विषयांकडे लक्ष देत नाहीं, जो गोड शब्द बोलून भूतमात्रांना अन्न देतो व त्यांच्या सुखानें सुखी व दुःखानें दुःखी होतो त्याला परलोकीं थोरपणा येतो. पृथ्वीवरील सरस्वती, पुष्कर, नैमिष इत्यादि पवित्र ठिकाणीं जाऊन दान, त्याग, प्रसन्न मुद्रा, पाणी व तप यांनीं आत्मशुद्धि ठेवावी. घरीं ज्यांचा प्राण गेला आहे त्यांना संस्कारपूर्वक बाहेर काढून तिरडीवर घालून स्मशानामध्यें घेऊन जाऊन शौचविधीनें जाळावें. इष्टि, पुष्टि, यजन, याजन, दान, पुण्य कर्में करणें, सामर्थ्यानुरूप मांगितलेलें पितृकार्य करणें, हीं सर्व मनुष्य स्वतःसाठीं करीत असतो. धर्मशास्त्रें, वेद, षडंगें हीं सारीं पुण्यवानाच्या कल्याणासाठीं आहेत.'

'उत्तम कल्याणकारक असें काय आहे, उत्तम मार्ग कोणता, कशाचा कधीं नाश नाहीं व कोठें गेलें असतां फिरून परत येण्याची भीति नाहीं,' ह्मणून जनकानें फिरून विचारलें असतां, पराशर ह्मणाले, 'कशाशीं संबंध न ठेवणें हें कल्याणाचें मूळ आहे. ज्ञान हा उत्तम मार्ग आहे. केलेलें तप व सत्पात्रीं केलेलें दान कधीं फुकट जात नाहीं. अधर्ममय पाश तोडून मनुष्याला जेव्हां धर्मामध्यें गोडी लागते व जेव्हां तो सर्वांना अभयदान देतो तेव्हांच मनुष्याला सिद्धि मिळते. जो हजार गाई व शंभर घोडे दान करतो त्याला सर्व भूतमात्रांपासून नेहमीं अभय मिळतें. विषयामध्यें राहून देखील शहाणा मनुष्य त्यापासून अलिप्त असतो; परंतु मूर्ख विषयांशीं संबंध नसतांनाही त्यांमध्यें गढून असतो. कमलाच्या पत्रास जलाप्रमाणें अधर्म बुद्धिमानाला स्पर्श करीत नाहीं. जो मूर्ख आहे अशाला लांकडाला लाख जशीं घट्ट चिकटते त्याप्रमाणें पाप चिकटतें. भोगल्यावांचून न सुटणारें पाप कर्त्याला कधीं सोडीत नाहीं. वेळ आली असतां कर्त्याला तें भोगावें लागतें. जे शुद्ध अंतःकरणाचे असून ब्रह्माचें अस्तित्व ज्यांना कळूं लागलें आहे, अशांना कर्मफलापासून दुःख भोगण्याची पाळी येत नाहीं. कर्मेंद्रियें व ज्ञानेंद्रियें यांसंबंधानें बेपर्वा राहून ज्याला आपलीं पापें कळत नाहींत व जो बऱ्या व वाईट



अशा दोन्ही प्रकारच्या कर्मामध्यें गढला रहातो त्याला मोठी भीति आहे. जो नेहमीं संगापासून मुक्त राहून क्रोध आवरतो तो विषयांमध्यें असला तरी पापापासून अलग असतो, ज्याप्रमाणें धक्का बांधला असतां तो वाहून न गेल्यास त्यामुळें धक्क्याच्या आंतील पाणी फुगतें, त्याचप्रमाणें विषयांमध्यें न गढतां धर्मरूपी धक्का शास्त्राधारांच्या साधनानें जो बांधतो तो कधीं न खचतां त्याचें पुण्य व तप वाढत रहातें. ज्याप्रमाणें सूर्यकांतमणी सूर्यकिरणांना आपल्याकडे ओढून घेतो त्याप्रमाणें समाधीच्या योगानें योगी ब्रह्मरूपता मिळवितो. जसजसे तीळ निरनिराळ्या सुवासिक फुलांमध्यें कुसकुरले असतां त्याच्यामध्यें मनाला आल्हाद देणारे नाजूक गुण येतात, त्याप्रमाणें लोकांच्या अंतःकरणाच्या शुद्धीच्या मानानें त्यांच्यामध्यें सत्वगुण येत असतो. ज्यावेळीं स्वर्गाच्या इच्छेनें बायका, पैसा, गाड्याघोडीं, मोठा हुद्दा व निरनिराळ्या क्रिया मनुष्य सोडतो तेव्हां याची बुद्धि विषयांपासून अलग होते. ज्याची बुद्धि विषयांमध्यें गढली आहे त्याला स्वतःचें हित मुळींच कळत नाहीं आणि मांसाच्या लालुचीनें ज्याप्रमाणें मासा गळांत सांपडून ओढला जातो तशी त्याची सर्व प्रकारें स्थिति होते. शरीरांतील निरनिराळ्या भूतमात्रांप्रमाणेंच सर्व लोक एकमेकांच्या आधारानें आहेत. केळीच्या गाभ्याप्रमाणें त्यांच्यामध्यें कांहीं अर्थ नसून पाण्यांतील फुटलेल्या नावेप्रमाणें ते बुडून नाश पावतात. मनुष्याला धर्माचरण करण्याला विशेष एक वेळ आहे असें नाहीं. कारण मृत्यु कांहीं मनुष्याची वाट पहात नाहीं. मनुष्य नेहमीं मृत्यूच्या तोंडांत असल्यामुळें नेहमीं धर्माचरण करणें चांगलें. ज्याप्रमाणें आंधळा मनुष्य नेहमींच्या संवईनें आपल्या घरांत वावरतो त्याप्रमाणें योगाकडे मन लावल्यानें मनुष्य मोक्षाला जातो. जन्मामध्येंच मरण असून जन्म हा मरणाच्या आश्रयानें आहे. ज्या मूढाला मोक्षधर्म कळला नाहीं तो जखडला जाऊन चक्राप्रमाणें जन्ममरणाच्या फेऱ्यांत सांपडून फिरत राहतो. बुद्धीनें दाखवून दिलेल्या मार्गानें जो जातो त्याला इहलोकीं व परलोकीं सुख मिळतें. अग्निहोत्रादिक पसारा क्लेशाला कारण असून त्यागादिक थोडक्या गोष्टी

सुखाला कारण आहेत. अग्निहोत्रादिक पसारा आत्म्याहून निराळीं अशीं जीं इंद्रियें यांच्या तृप्तीसाठीं असून संन्यास हा आत्म्याच्या हितासाठीं आहे. ज्याप्रमाणें कमलाच्या देंठाला लागलेला चिखल तेव्हांच धुवून जातो त्याप्रमाणें आत्मा मनापासून वाटेल तेव्हां मोकळा होतो. मनच आत्म्याला योगाकडे लावतें, आणि तो योगी या मनाला आपल्यामध्यें लीन करून घेतो, आणि याप्रमाणें योगामध्यें गढल्यावर तो सर्वोपाधिरहित अशा आत्म्याला पाहूं लागतो. इंद्रियादिकांची तृप्ति करून देण्यामध्यें गढून राहणें हीच आपली इतिकर्तव्यता असें ज्याला वाटतें तो आपलें आत्मप्राप्तीचें मुख्य कार्य जी मोक्षप्राप्ति तिला मुकतो. जो शहाणा आहे त्याला आपल्या सुकृतानें स्वर्गामध्यें उत्तम गति मिळते व जो पापी आहे त्याला याहून भिन्न अर्थात् अधोगति, म्हणजे नीच योनीमध्यें जन्म, मिळतो. ज्याप्रमाणें मातीच्या पक्क्या भांड्यामध्यें प्रवाही पदार्थ झिरपून कमी होत नाहीं, त्याप्रमाणें वर सांगितलेल्या योगाचें अवलंबन करणाऱ्या योग्याचें लिङ्गशरीर ब्रह्मलोकापर्यंत हव्या त्या विषयांचा उपभोग घेत राहतें. तरी पण याच्या साक्षिभूत आत्मस्वरूपाचा त्या भोगाशीं कांहीं संबंध नसतो. कारण वैराग्यानें विषयत्याग करणाऱ्या भोक्त्या जीवात्म्यासच विषयभोगाची प्राप्ति होते आणि विषयत्याग किंवा विषयग्रहण कांहींच न करणाऱ्या उदासीन साक्षिभूत आत्म्याला विषयभोगाचा कांहींच संबंध जडत नाहीं. ज्याप्रमाणें जातीच्या आंधळ्याला वाट कळत नाहीं त्याप्रमाणें अज्ञानपटलरूपी धुक्यामध्यें गुरफटून शिश्नोदराच्या मागें लागलेल्या मनुष्याला खरा मोक्षाचा मार्ग कळत नाहीं. समुद्रामध्यें जाणारे वाणी ज्याप्रमाणें आपापल्या भांडवलाच्या मानानें फायदा मिळवितात, त्याप्रमाणें या भवसागरांत मनुष्य आपापल्या कर्माप्रमाणें गति मिळवितो. वारा गिळून टाकणाऱ्या सापाप्रमाणें कालप्रधान अशा या लोकांमध्यें मृत्यु जरेच्या रूपानें वावरून सर्वांना गिळून टाकतो. मनुष्य जन्मास आल्याबरोबर त्यानें केलेलीं पूर्वजन्मींचीं कर्में त्याच्या मागें लागतात. पूर्वी केलें नाहीं असें कांहींच बरें वाईट या जन्मीं त्याला मिळत नाहीं. मनुष्य निजला असो, चालला असो, बसला असो किंवा कांहीं काम करीत असो, त्याचीं बरींवाईट कर्में त्याच्या मागून असतात. जो या भवसागराच्या पैलपार गेला आहे तो उलट तरून येण्याच्या खटपटीला लागत नाहीं. या महासागरामध्यें याचा कधीं नाश होत नाहीं. धीवर ज्याप्रमाणें पाण्यांत बुडवून ठेवलेली नाव वाटेल तेव्हां वर काढतो त्याप्रमाणें मन योगसाधनानें जीवाला वाटेल तेव्हां संसारांतून वर खेंचून काढतें. ज्याप्रमाणें समुद्राकडे वहाणाऱ्या सर्व नद्या त्याला जाऊन मिळतात त्याचप्रमाणें योगांत गढलेलें मन मूळ प्रकृतीशीं मिळून जातें. ज्यांचीं मनें निरनिराळ्या स्नेहपाशांनीं जखडलीं जातात, असें अज्ञानामध्यें बुडालेले लोक पाण्यांत बांधलेल्या वाळूच्या घराप्रमाणें नाहींसे होतात. जो मनुष्य या शरीराला एक घर मानतो व शुद्धतेला पवित्र जल समजतो व जो बुद्धीनें दाखवून दिलेल्या वाटेनें जातो त्याला इहपरलोकीं सुख मिळतें. मित्र वगैरे संकल्पाचे असून ज्ञाती कारणाच्या आहेत. बायका, मुलें, नोकर, आपल्या अर्थाचा उपभोग घेतात. आई, बाप, कोणालाही आपलें एवढेंसुद्धां हित करतां येत नाहीं. मार्गांत उपयोगी पडणाऱ्या शिदोरीप्रमाणें स्वर्गमार्गांत उपयोगीं पडणारें दान तें करणाऱ्या मनुष्याला स्वकर्माचें फल देतें. ज्याप्रमाणें सोन्याच्या नाण्याची योग्यता सोन्यावरच अवलंबून असून त्यावरील शिक्क्याची विशेष मातबरी नाहीं, त्याप्रमाणें मनुष्याची उन्नती त्याच्या स्वतावर असून आई, बाप, भाऊ, मुलगा, बायको, मित्र हे सारे कुच कामाचे आहेत. सर्व बरीं वाईट कृत्यें मनुष्यालाच भोगावीं लागतात. कर्मफल भोगण्याची वेळ आलेली पाहून अंतरात्मा बुद्धीला प्रेरणा करतो. प्रयत्नावर अवलंबून राहून जो साह्य मिळवून एखादें कार्य आरंभतो तो कधीं नाश पावत नाहीं. ज्याप्रमाणें सूर्यकिरण सूर्याला कधीं सोडीत नाहीं, त्याप्रमाणें ज्याचें मन स्थिर असून जो योगाकडे लागला आहे, जो शूर, वीर व शहाणा आहे, त्याला श्री कधीं सोडीत नाहीं. जो मनुष्य आस्तिक्य बुद्धीनें व मनापासून योग्य साधनांच्या साह्यानें गर्व सोडून, बुद्धीवर अवलंबून राहून एखादें काम आरंभतो, त्याचा कधीं नाश होत नाहीं. मनुष्य आईच्या पोटांत आल्यापासून त्यानें पूर्वज-

न्मीं केलेलीं बरीं वाईट फळें त्याच्याबरोबर असतात. वारा लांकडाच्या भुशाला ज्याप्रमाणें उडवून देतो, त्याप्रमाणें याच्या कर्मानुरूप मृत्यु, नाश करून टाकणाऱ्या कालाच्या साह्यानें त्याचा निकाल लावतो. मनुष्यानें पूर्वजन्मीं केलेल्या बऱ्यावाईट कर्माप्रमाणें त्याला सोनें, पशु, बायकामुलें, कुल, पैसा, वैभव ह्या साऱ्या गोष्टी मिळत असतात.'

## २०५ हंस व साध्य यांचा संवाद—क्षमा. (१२—२९९)

युधिष्ठिर ह्मणाला. 'सत्य, आत्मनिग्रह, क्षमा व ज्ञान यांची लोक प्रशंसा करतात यासंबंधानें आपलें मत काय आहे? भीष्म ह्मणाले, 'पूर्वी ब्रह्मदेव सोन्याच्या हंसाचें रूप घेऊन तिन्ही लोकांमध्यें फिरत असतां साध्यांकडे आले. तेव्हां त्यांच्यामध्यें झालेला संवाद लक्षांत घे. साध्य ह्मणाले, 'आपण विद्वान असून मोक्षधर्म आपल्याला ठाऊक आहे तेव्हां आपण मोक्षधर्म आह्मांला सांगा. सर्वांत श्रेष्ठ आपण कशाला समजतां व आपलें मन कशामध्यें रमतें व काय केल्यानें मनुष्य सर्व पाशांपासून लौकर सुटतो?' हंसरूपी ब्रह्मदेव ह्मणाले, 'हे अमृतभोजी साध्यानों, सांगतों ऐका. तप, आत्मनिग्रह, सत्य व मनोनिग्रह यांच्या योगानें हृदयाच्या गांठी सोडून प्रिय व अप्रिय अशा दोन्ही गोष्टींना मनुष्यानें आपल्या ताब्यांत आणावें, हृदयाला घरें पाडणारे शब्द तोंडावाटें काढूं नयेत; व धर्मशास्त्र हीनापासून कळवून घेऊं नये. ज्याच्या योगानें दुसऱ्यांला उद्वेग उत्पन्न होईल असें हृदयाला जाळणारे व नरकाला पोंचविणारे शब्द उच्चारूं नयेत. वाग्बाण तोंडावाटे निघून त्यांच्या योगानें मनुष्य नेहमीं जळत रहातो. मर्मस्थळावांचून दुसऱ्या ठिकाणीं ते कधीं जाऊन लागत नाहींत. ह्मणून असे शब्द कधीं उच्चारूं नयेत, जर शहाण्याला कोणी वाग्बाण मारले तर त्यानें शांति धरावी. जो मनुष्य खवळला असतां सुद्धां रागाच्या तावडींत जात नाहीं त्याला त्या खवळविणाराचें पुण्य मिळतें. जो पुण्यवान मनुष्य आनंदानें व निर्मत्सरतेनें ज्याच्या योगानें दुसऱ्यासंबंधानें वाईट बोलून वैर जोडण्याची पाळी येईल असा आलेला क्रोध आवरतो, तो दुसऱ्याचें पुण्य घेत असतो; ह्मणून कोणी आपल्यासंबंधानें वाईट बोलला असतां क्षमा करावी. क्षमा, सत्य, सरळपणा व दया हे सर्वांत श्रेष्ठ गुण आहेत. वेदाचें मुख्य रहस्य सत्य असून सत्याचें रहस्य आत्मनिग्रह आहे व आत्मनिग्रहाचें रहस्य मोक्ष आहे. हेंच सर्व शास्त्रांमध्यें सांगितलें आहे. जो वाणीचा, मनाचा, क्रोधाचा, एखादी गोष्ट करण्याचा व शिश्नोदराचा जागृत झालेला वेग दाबतो तोच ब्राह्मण असून मुनि समजावा. जो रागावत नाहीं तो रागावणाराहून श्रेष्ठ आहे. तप न करणाराहून तें करणार श्रेष्ठ आहे. मनुष्यपणा नसणाराहून मनुष्यपणा असणारा श्रेष्ठ आहे; तसेंच ज्ञान नसणाराहून ज्ञानी श्रेष्ठ आहे. कोणी आपल्याला टाकून बोललें असतां उलट आपण त्याला बोलूं नये. अशा वेळीं जो क्रोध आवरतो तो टाकून बोलणाराला जाळून टाकून त्याचें पुण्य घेतो. ज्याला टाकून बोललें असतां जो बरें किंवा वाईट कांहींच बोलत नाहीं व दुसऱ्यांनीं हात टाकला असतां त्यावर हात टाकीत नाहीं, त्याची संगति देतांना सुद्धां हवीशी वाटते. पाप्यानें वाईट केलें असतां त्याला क्षमा करावी, असें वागल्यानें मनुष्य सिद्धि पावतो. माझ्या सर्व आशा जरी पूर्ण झाल्या आहेत तरी भल्यांची मी उपासना करतों. मला कांहीं करण्याची इच्छा नाहीं. माझा क्रोध दबला आहे. क्रोधाच्या तावडींत जाऊन मी कधीं सन्मार्गापासून ढळत नाहीं व कशासाठींही कोणापुढें तोंड पसरीत नाहीं. कोणीं शाप दिला असतां उलट शाप देत नाहीं. आत्मनिग्रह हा अमर होण्याचा मार्ग आहे हें गुह्य ब्रह्म आहे. मनुष्यपणाहून श्रेष्ठ कांहीं नाहीं. ढगांतून मोकळा झालेल्या चंद्राप्रमाणें पापमुक्त व शुद्ध होऊन कालाची वाट पहात राहिल्यानें मनुष्याला धैर्याच्या योगानें सिद्धि मिळते. जो कुलीन मनुष्य सर्वांचा आधारस्तंभ होऊन सर्वांना पूज्य होतो व ज्याच्या संबंधानें लोक चांगले शब्द बोलतात तो आत्मनिग्रही मनुष्य देवत्वाला जाऊन मिळतो. निंदक ज्याप्रमाणें एखाद्याचे दोष काढावयास टपलेले असतात, तसे ते त्याचे चांगले गुण बोलण्याला तयार नसतात, ज्याची वाणी व मन

हीं पूर्ण आवरलेलीं असून ब्रह्माकडे लावलेलीं असतात, वेद, तप, त्याग या सर्वांचा त्याला याच्या योगानें लाभ झाल्यासारखाच असतो. दुसऱ्या संबंधानें वाईट बोलून किंवा त्याचा अपमान करून मूर्खाला ताळ्यावर आणण्याची शहाण्यानें खटपट करूं नये; त्याच्या योगानें त्याचें पुण्य वाढवून स्वतःचा नाश करून घेऊं नये. अवमानाच्या योगानें मनुष्यानें अमृताप्रमाणें तृप्त असावें. ज्याचा अवमान केला जातो तो सुखांत झोंप घेतो. अवमान करणाऱ्याचा मात्र नाश होतो. जो मनुष्य क्रोधाच्या तावडींत जाऊन यज्ञ करतो, दान देतो, तप करतो व अग्नीमध्यें आहुती देतो त्याचें तें पुण्य यम हिरावून घेतो व त्याचे ते श्रम मात्र फुकट जातात. शिश्न, उदर, हातपाय व चवथें तोंड हीं चार द्वारें ज्याचीं चांगलीं रोखलीं गेलीं आहेत, त्यालाच धर्माचें इंगित समजलें ह्मणावयाचें. सत्य, आत्मनिग्रह, सरळपणा, दया, धृति, त्याग व वेदाध्ययन यांकडे लक्ष देऊन जो दुसऱ्याच्या वस्तूची इच्छा करीत नाहीं व एकांतामध्यें राहून स्वतःच्या कल्याणामध्यें गढला असतो तो स्वर्गाला जातो. गाईचें वांसरूं ज्याप्रमाणें गाईचे चारी स्तन सारखें पितें त्याप्रमाणें या सर्वांकडे सारखें लक्ष द्यावें. सत्यापेक्षां अधिक पवित्र कांहीं आहे असें मला ठाऊक नाहीं. सत्य हें समुद्रांतून तरून जाण्याला ज्याप्रमाणें नाव असतें त्याप्रमाणें स्वर्गाला चढण्याचा जिना आहे. मनुष्य जशा प्रकारच्या मनुष्याशीं संबंध ठेवतो, जशांची शुश्रूषा करतो, व ज्यासारखा होण्याची मनांत इच्छा धरतो तशा प्रकारचा तो होतो; जर तो चांगल्याची सेवा करील, जर वाईटाची करील किंवा एखाद्या चोराची करील तर कपड्यांवर ज्याप्रमाणें त्याला द्यावा तो रंग बसतो त्याप्रमाणें तो तसा होतो. देव भल्याशीं नेहमीं बोलूं इच्छितात व मनुष्य ज्या विषयामध्यें गढलें असतात ते त्यांना डोळ्यांपुढें सुद्धां नकोसें वाटतात. जो मनुष्य मनुष्याला आवडणारे विषय हे कमी अधिक होणारे आहेत हें जाणतो, त्याचा कोणी द्वेष करणारा नसून चंद्र किंवा वारा याहून देखील तो श्रेष्ठ आहे. शरीरामधील पुरुष निष्कलंक असतो व तो भल्याच्या मार्गानें जातो. देवांनासुद्धां अशा संबंधानें आनंद होतो. जे लोक शिश्नोदरात्मक विषयांमध्यें, चोरी करण्यामध्यें व दुसऱ्याला निष्ठुर बोलण्यामध्यें गर्क असतात, अशांनीं प्रायश्चित्तानें पाप दूर केलें तरी देव त्यांच्यापासून दूर असतात. जो वाटेल तें खाऊन, वाटेल तें करून रहातो अशा नीच बुद्धीच्या मनुष्यावर देव संतुष्ट नसतात. जे सत्यानें वागतात, कृतज्ञ असतात व धर्मामध्यें गढले असतात, अशांशीं मिळून ते सुखोपभोग घेतात. बोलण्यापेक्षां गप्प रहाणें चांगलें, गप्प रहाण्यापेक्षां खरें बोलणें चांगलें व न्यायाला धरून असणारें खरें बोलणें हें नुसत्या खऱ्याहून चांगलें व धर्माला धरून असून कानाला गोड असें एखादें बोलणें हें त्याहून चांगलें.' साध्य ह्मणाले, 'हें जग कशानें भरून राहिलें आहे? कशानें प्रकाशित नाहीं, कशामुळें लोक आपले मित्र टाकतात व कशामुळें ते स्वर्गाला मुकतात?' हंसानें उत्तर दिलें. 'जग हें अज्ञानानें झांकून निघालें आहे, मत्सरामुळें लोक प्रकाशत नाहींत, लोभानें ते मित्र सोडतात व संगाच्या योगानें तें स्वर्गाला मुकतात.' साध्य ह्मणाले, 'ब्राह्मणांमध्यें कोण नेहमीं सुखी आहे? त्यामध्यें कोण पुष्कळांत राहून सदां गप्प असतो? व कोण दुबळा असून बलवान समजला जातो व कोण तंटा करीत नाहीं?' हंस ह्मणाला, 'जो ज्ञानी आहे असाच मनुष्य सुखांत असून लोकांत राहुन गप्प असतो. ज्ञानवान मनुष्यच दुबळा असून बळवानाप्रमाणें समजला जातो व असा मनुष्यच कोणाशीं तंटा करीत नाहीं.' साध्य ह्मणाले, 'ब्राह्मणांचें देवत्व कशामध्यें आहे? चांगलेपणा कशांत आहे, वाईटपणा कशांत आहे व मनुष्यपणा कशांत आहे?' हंसानें उत्तर दिलें, 'वेदाध्ययन हें त्यांचें देवपण असून व्रत व नियम यांमध्यें त्यांचा चांगुलपणा आहे. निंदेमध्यें त्यांचा वाईटपणा असून मरणामध्यें त्यांचें मनुष्यपण कळून येतें.'

---

## २०६ योग व सांख्य शास्त्रांतील तत्त्वें व त्यांतील भेद (१२. ३०१-२)

'सांख्य व योगशास्त्रांमध्यें भेद काय आहे,' ह्मणून युधिष्ठिरानें विचारल्यावरून भीष्म ह्मणाले, 'सांख्य-

मतानुयायी सांख्यशास्त्र चांगलें ह्मणतात व योगी योगशास्त्राची स्तुति करतात. दोघेही आपापल्या मताचें वर्चस्व स्थापण्याकरितां आपापलें शास्त्र चांगलें ठरविण्याचा प्रयत्न करतात. योगाकडे लागलेले लोक जे ईश्वराच्या अस्तित्वावर विश्वास ठेवीत नाहींत त्यांना मोक्ष कधीं मिळावयाचा नाहीं हें दाखवून देण्यासाठीं चांगले आधार पुढें आणतात. त्याचप्रमाणें सांख्यमतानुयायीही सर्व गती संबंधानें खरें ज्ञान होऊन मनुष्य ऐहिक संगापासून मुक्त होऊन हा देह सोडून मुक्तीला जातो हें दाखविण्यासाठीं चांगलें आधार पुढें आणतात. चांगल्या चांगल्या लोकांनीं याप्रमाणें सांख्यतत्त्व प्रतिपादिलें आहे. याप्रमाणें दोन्ही बाजूंला प्रमाणें समसमान असल्यानें जी बाजू घेण्याकडे ज्याचा कल असेल त्या बाजूनें दिलीं जाणारीं कारणें प्रमाण धरून चालावें व तींच त्याला हितावह आहेत असें त्यानें समजावें. भल्यानें शिष्टांचीं मतें ग्राह्य समजून घ्यावींत. योगाचीं प्रमाणें प्रत्यक्ष आहेत व सांख्याचीं शास्त्राच्या आधारावर आहेत. दोन्ही चांगलीं आहेत, व दोन्हीही चांगल्यांनीं जर त्यामध्यें सांगितलेल्या मार्गानें पाळलीं तर दोन्हीच्या योगानें मनुष्याला श्रेष्ठ गति मिळवितां येईल. दोन्हीमध्यें शुद्धता, तप, सर्व प्राणिमात्रांच्या ठिकाणीं दया, व्रत, नियम सारखीं असून हे मार्ग दाखवून देणारीं शास्त्रें कायतीं निराळीं आहेत. ' युधिष्ठिरानें विचारिलें, 'जर व्रतादि सर्व नियम व फलें सारखींच आहेत तर मग तीं दाखवून देणारीं शास्त्रें एकच कां नाहींत? ' भीष्म ह्मणाले, 'योगानें राग, मोह, स्नेह, काम, क्रोध हे पांच दोष नाहींसे करून ज्याप्रमाणें मोठा मासा जाळें तोडून फिरून मोकळ्या पाण्यामध्यें जातो किंवा मजबूत जनावर आपल्या वाटेला लागतें, त्याप्रमाणें योगी लोभापासून उत्पन्न होणाऱ्या सर्व बंधनांतून सुटून पापांतून मुक्त होऊन शुद्ध व कल्याणकारक अशा मार्गाला लागून श्रेष्ठ पदाला जाऊन मिळतात. जाळ्यांत सांपडलेले लहान मासे किंवा दुबळीं जनावरें ज्याप्रमाणें मृत्यूच्या तोंडांत सांपडतात त्याचप्रमाणें योगमार्गामध्यें अगदीं नवखे असलेले लोक नाश पावतात. ज्याप्रमाणें बारीक जाळ्यांत सांपडले असतां लहान पक्षी त्या ठिकाणीं विपत्तींत सांपडून मरतात, परंतु बलवान त्यांतून सुटून जातात त्याप्रमाणें कर्मबंधनांनीं जखडल्यामध्यें योगमार्गाकडे लागलेल्यांपैकीं दुबळे तेवढे नाश पावतात व त्यांत पूर्णता मिळविलेले मुक्त होऊन जातात. ज्याप्रमाणें थोडा विस्तव असला म्हणजे त्यावर भारी सर्पण टाकल्यानें त्याच्या भारानें तो विझतो त्याप्रमाणें दुबळा योगी नाश पावतो, परंतु तोच अग्नि वाऱ्याच्या साह्यानें एकदां जोरावला असतां सर्व पृथ्वीचा जाळून फडशा पाडूं शकतो त्याप्रमाणें योगामध्यें बळ मिळविलेला मोठा बलवान व तेजस्वी असा योगी प्रलयकालच्या सूर्याप्रमाणें सर्व जग जाळून टाकूं शकतो. ज्याप्रमाणें एखादा दुबळा मनुष्य प्रवाहामधून वहावला जातो, त्याप्रमाणें बलहीन असा योगी विषयाकडून निरुपाय होऊन खेंचला जातो. तोच मोठा हत्ती कशाही मोठ्या प्रवाहाला जुमानीत नाहीं त्याप्रमाणें योगाचें बल मिळालें असतां नानाविषयांना तोंड देऊन सुद्धां योगी स्वतंत्रपणें त्यांना जुमानीत नाहीं. ज्याच्या अंगामध्यें अतुल तेज आहे, अशा योग्यावर ब्रह्मदेव, ऋषी, देव, पंचमहाभूतें, खवळलेला असा भयंकर मृत्यु यांचें देखील कांहीं चालत नाहीं. योगाच्या बलावर स्वतःपासून हजारों देह निर्माण करून घेऊन योगी त्यांसकट सर्व पृथ्वीभर फिरत रहातो, त्यांपैकीं कांहीं मधून मधून विषयोपभोग भोगून फिरून उग्र अशा तपाकडे स्वतःला लावतात व फिरून सूर्य ज्याप्रमाणें आपलीं किरणें आवरून घेतो त्याप्रमाणें आपलें तेज आंवरून घेतात. योगसामर्थ्य उत्तम पावलेला मनुष्य सर्व पाशांवर स्वामित्व मिळवून मोक्ष मिळविण्याला समर्थ होतो. योगानें येणाऱ्या या सामर्थ्यासंबंधानें मी तुला माहिती सांगतों. धारणा व समाधि यांचीं सूक्ष्म लक्षणें लक्षांत घे. ज्याप्रमाणें पारधी एकाग्रतेनें, मोठ्या हुशारीनें नेम धरून लक्ष्याला पाडतो त्याप्रमाणें योगामध्यें पूर्ण गढलेला योगी खात्रीनें मोक्ष मिळवितो. ज्याप्रमाणें प्रवाही पदार्थानें भरलेला घडा डोक्यावर घेऊन त्याकडे लक्ष ठेवून मनुष्य जिना चढतो त्याप्रमाणें हा योगी आत्म्याकडे लक्ष लावून त्याला सूर्याप्रमाणें लखलखीत करतो; ज्याप्रमाणें सुकाणूं धरणारा एकाग्रता लावून मोठ्या समुद्रांतून

नावेला झटपट पैलपार नेतो त्याप्रमाणें आत्म्याकडे एकाग्रता लावून देह ठेवल्यावर योगी दुर्लभ असें मोक्षपद मिळवितो. ज्याप्रमाणें सारथी चांगल्या घोड्यांना रथाला जुंपून हुशारीनें त्यांना न्यावयाचें तेथें घेऊन जातो, त्याप्रमाणें योगी धारणेमध्यें लक्ष देऊन तीर ज्याप्रमाणें कांहीं वेळ न लागतां लक्ष्याला जाऊन लागतो, त्याप्रमाणें श्रेष्ठ पदाला जाऊन मिळतो. आत्म्याला आपल्या ठिकाणीं लीन करून घेऊन जो पर्वताप्रमाणें निश्चळ रहातो तो सर्व पापांचा नाश करून पुण्यवानांचें जें अविनाशी ठिकाण त्याला जाऊन मिळतो. जो योगी मोठ्या एकाग्रतेनें आपल्या सूक्ष्म आत्म्याला नाभि, कंठ, डोकें, हृदय, ऊर, बरगड्या, डोळे, कान, नाक या ठिकाणीं योग्य रीतीनें नेऊन ठेवूं शकतो तो पर्वतप्राय असलेलीं आपलीं बरीं वाईट कर्में जाळून टाकून वाटेल तेव्हां मोक्षाला जातो. ' युधिष्ठिर ह्मणाला, ' कशा प्रकारचे आहार ठेवून व कशांना जिंकून योग्याच्या अंगीं योगसामर्थ्य येतें ? ' भीष्म ह्मणाले, ' स्निग्ध पदार्थांना न शिवतां धान्याचे कण किंवा पेंड खाल्यानें योग्याच्या अंगीं योगबल येतें. तशा प्रकारचें रुक्ष अन्न जितकें पुष्कळ दिवस तो एकदां खाऊन राहील तितकें त्याला जास्ती सामर्थ्य येईल. दूध व पाणी मिसळून तें रोज एकदां, नंतर पधरवड्याला एकदां, पुढें महिन्याला एकदां, पुढें सहा महिन्यांला एकदां व पुढें वर्षाला एकदां याप्रमाणें पीत राहिल्यानें त्याच्या अंगांत योगबल वाढत जातें. मांस भक्षण बिलकूल सोडून देऊन शुद्ध अंतःकरण ठेवल्यानें त्याला योगसामर्थ्य येतें. राग, लोभ, थंडी, ऊन्ह, पाऊस, भय, शोक व श्वास व पुरुषाला प्रिय असे शब्द व विषय हे स्वाधीन ठेवून त्याचप्रमाणें जिंकण्याला कठीण अशी हांव, भयंकर तृष्णा, संयोगापासून होणारें सुख, निद्रा सुस्ती, हीं जिंकून संगापासून मुक्त होऊन ध्यान व अध्ययन हेंच वैभव मिळवून बुद्धीच्या योगानें योगी सूक्ष्म आत्म्याला प्रकाशमान करतात. शहाण्या ब्राह्मणांचा हा मार्ग घेण्याला फार कठीण आहे. या मार्गानें खुशालपणें फार थोडक्यांनाच जातां येतें. ज्याप्रमाणें पुष्कळ साप व दुसरे सरपटणारे प्राणी यांनीं भरलेल्या, पुष्कळ खड्डे असलेल्या, निर्जल, चालून जाण्याला कठीण, पुष्कळ कांट्यांनीं भरलेल्या, ज्या ठिकाणीं खावयाला कांहीं मिळत नसून जंगलच जंगल वाढलें आहे, व ज्या ठिकाणीं वणव्याच्या योगानें झाडें कांहीं कांहीं ठिकाणीं जळून गेलीं आहेत, अशा घोर अरण्यांतून ज्या वाटेला चोर भरले आहेत अशा वाटेनें एखाद्या तरुणाला क्वचितच खुशालपणें जातां येतें, त्याचप्रमाणें हा योगमार्ग घेतलेल्या मनुष्याला क्वचितच खुशाल जातां येतें कारण या मार्गामध्यें अडथळे फार आहेत. चांगल्या धारेच्या वस्तऱ्यावर उभें रहाणें सुद्धां सोपें काम आहे, परंतु ज्याचें अंतःकरण शुद्ध झालें नाहीं, अशांना योगाची धारणा धरून रहाणें फार कठीण आहे. नावाड्यावांचून असणारी नाव समुद्रामध्यें ज्याप्रमाणें मनुष्याला सरळ नेत नाहीं त्याचप्रमाणें बिघडलेली धारणा मनुष्याला चांगल्या गतीला पोंचवीत नाही. जो धारणेच्या ठिकाणीं शास्त्रांत सांगितल्याप्रमाणें राहूं शकतो तो जन्म, मरण, दुःखसुख यांपासून मोकळा होतो. नानाप्रकारच्या शास्त्रांमध्येंही योगासंबंधानें माहिती सांगितली आहे. योगाची उत्तम सिद्धि द्विजातींच्या ठिकाणीं दिसून येते. ही सिद्धि ह्मणजे ब्रह्माशीं तादात्म्य होऊन जाणें आहे. ऐश्वर्यवान अशा या महात्म्या योग्याला सर्व देवतांचा स्वामी ब्रह्मदेव, वरदविष्णू, शंकर, धर्म, कार्तिकेय, महानुभाव ब्रह्मपुत्र, कष्टतर तमोगुण, मोठे रजोगुण, शुद्ध असे सत्वगुण, श्रेष्ठ प्रकृति, वरुण स्त्री, देवी सिद्धी, सर्व तेज, सर्व सहन करणारें मोठें धैर्य, आकाशामधील स्वच्छ चंद्र व तारे, सर्व विश्वेदेव, साप, पितर, पर्वत, समुद्र, घोर नद्या, सर्व वनें, नाग टेंकड्या, यक्षगण, गंधर्व, पुरुष व बायका या सर्वांमध्यें शिरतां येऊन फिरून कांहीं वेळ न लागतां त्यांतून सुटतां येतें. योगी सर्वश्रेष्ठ होऊन नारायण स्वरूपी होतो; आणि सर्व वस्तू उत्पन्न करण्याचें सामर्थ्य त्याच्या अंगीं असतें.

ही योगमार्गासंबंधानें माहिती आहे. आतां आत्मज्ञान झालेल्या सांख्याचीं सूक्ष्म तत्त्वें काय आहेत तीं सांगतों ऐक. सर्व मोठ्या व योगैश्वर्यसंपन्न अशा कपिलप्रभृति यतींनीं हीं तत्त्वें ठरवून ठेविलीं आहेत. यामध्यें पुष्कळ गुण आहेत. व एक देखील दोष

नाहीं. सर्व विषय सदोष आहेत. मनुष्य, राक्षस, इत्यादिकासंबंधाचे जे विषय या सर्वांमध्यें दोष आहेत. या जगामध्यें मनुष्याच्या आयुष्याची मर्यादा काय आहे, येथें ज्याला सुख ह्मणतात त्याचें श्रेष्ठ तत्त्व काय आहे, व वेळ आली असतां विषयांमध्यें गढलेल्यांना पशुपक्ष्यादि नीच योनीमध्यें त्याचप्रमाणें नरकामध्यें पडणाऱ्यांना दुःख काय आहे, स्वर्गामध्यें गुण काय आहेत, दोष काय आहेत, त्याचप्रमाणें वेदवाद व वेद यांमध्यें गुणदोष काय आहेत, योग व सांख्य शास्त्रांमध्यें गुणदोष काय आहेत, सत्वगुण आनंद, प्रीती इत्यादि दशगुणांनीं व रजोगुण, आस्तिक्य, कृपणतेचा अभाव इत्यापि नऊ गुणांनीं युक्त आहे; तमोगुण, मोह, महामोह इत्यादि अष्टगुणांनीं युक्त आहे. बुद्धीमध्यें महत् अहंकार, पंच तन्मात्रें असे सात गुण आहेत; व श्रोत्रादि पंचकासह मन षड्गुण आहे. आकाश, वायवादिकासह पंच गुणात्मक आहे. बुद्धि संशय, निश्चय, गर्व व स्मरण या चारांनीं युक्त आहे. त्याचप्रमाणें अप्रतिपत्ति, प्रतिपत्ति व विपरीत प्रतिपत्ति (अज्ञान, अंशतः विज्ञान व चुकीचें ज्ञान ) हे तीन तमामधील धर्म असून प्रवृत्ति व दुःख हे दोन रजामधले व प्रकाश हा सत्वामधला धर्म आहे. प्रलयकाळीं सर्वांना धरावा लागणारा मार्ग कोणता आहे व आत्मज्ञानाचा मार्ग कोणता आहे, या सर्वांचें शास्त्राधारानें व अनुभवानें ज्ञान मिळवून सात्विक लोक भावनेनें शुद्ध होऊन आकाशामध्यें भरून राहणाऱ्या किरणांप्रमाणें शुभ अशा मोक्षसुखाला पावतात. दृष्टि रूपाशीं, नाक गंधगुणाशीं, कान शब्दाशीं, जीभ रसाशीं, शरीर स्पर्शाशीं व वायु आकाशाशीं चिकटून आहे. मोह तमाच्या आधारानें असून लोभ पैशाच्या आधारानें आहे. विष्णूचा गतीशीं, इंद्राचा मलाशीं, अग्नीचा पोटाशीं, पृथ्वीचा पाण्याशीं, पाण्याचा तेजाशीं, तेजाचा वायूशीं, वायूचा आकाशाशीं, आकाशाचा महत्तत्त्वाशीं ( अहंकाराशीं, ) अहंकाराचा बुद्धीशीं, बुद्धीचा तमाशीं, तमाचा रजाशीं, रजाचा सत्वाशीं, सत्वाचा आत्म्याशीं, आत्म्याचा ईश देव जो नारायण त्याच्याशीं व या नारायणाचा मोक्षाशीं संबंध आहे. या मोक्षाचा मात्र कशाशीं संबंध नाहीं. हें सत्वगुणात्मक शरीर सोळा गुणांनीं युक्त असून स्वभाव व चेतना हीं देहाच्या आधारानें आहेत. व या शरीरामध्यें रहाणारा एकटा आत्मा शरीरापासून अगदीं अलग असून त्याच्या ठिकाणीं पाप म्हणून बिलकुल नाहीं. इंद्रियविषयात्मक कर्मांचें स्वरूप काय आहे, आत्म्याच्या आधारानें असणारीं इंद्रियें व इंद्रियविषय यांचें स्वरूप काय आहे हें सर्व जाणून त्याचप्रमाणें श्रुतीच्या आधारावरून मोक्ष किती दुर्मिळ आहे हें लक्षांत घेऊन प्राणापानादि पांच वायु त्याचप्रमाणें एक खालीं व एक वर असे जाणारे आणखी दोन वायु, याप्रमाणें सात कामें करण्यासाठीं ठेवलेले सात वायु, त्याचप्रमाणें प्रजापती, ऋषी व अनेक धर्मांचे थोर मार्ग, सप्तर्षी, असंख्य राजर्षी, देवर्षी व दुसरे ऋषी हेही पुष्कळ दिवसांनीं योगैश्वर्यापासून भ्रष्ट होतात. सर्व जगांतील मोठमोठीं भूतमात्रें देखील नाश पावतात. पापकर्में करणारांची गति वाईट होते व यमलोकामधील वैतरणी नदीमध्यें पडणाऱ्यांना दुःखें भोगावीं लागतात. प्राणिमात्रांना हिंडिस अशा निरनिराळ्या गर्भांमधून फिरत रहावें लागून रक्त, पाणी, श्लेष्मा, मलमूत्र इत्यादिकांनीं त्याचप्रमाणें शुक्र, शोणित, मगज, स्नायु इत्यादिकांनीं भरून उग्र दर्प येणाऱ्या पोरामध्यें हजारों नाड्यांनीं भरलेल्या नऊ द्वारांनीं युक्त अशा अमंगळ नगरामध्यें रहावें लागतें. हें लक्षांत घेऊन स्वतःच्या हिताचें काय आहे, निरनिराळे योग काय आहेत, तामस, राजस व सात्विक लोकांमध्यें निंद्य काय आहे, ज्ञान झालेल्या सांख्याच्या मतानें मोक्ष देण्याला योग्य नाहीं ह्मणून काय निंद्य समजलें गेलें आहे, हें ओळखून चंद्र व सूर्य यांवर पडणारीं संकटें, तारांचें खालीं पडणें व नक्षत्रांचें स्थित्यंतर, सर्व एकत्र झालेल्या वस्तूंचा निरुपाय होऊन होणारा वियोग, प्राणिमात्रांचें एकमेकांना खाणें, मनुष्यांमधील बाल्यावस्थेंतील अज्ञान व देहाचा नाश, हें जाणून राग व मोह आला असतां सत्वगुण ठेवणारा मनुष्य विरळा. हजारांमध्यें एकटा मोक्षाकडे लक्ष देतो, मनुष्याचें न मिळाऱ्याकडे फार लक्ष असून मिळालेल्याकडे उदासीनता रहाते. विषय दुष्ट आहेत, प्राण गेल्यावर देहाची अमंगळ स्थिति होते व प्राणिमात्रांना आपापल्या कुळामध्यें पोरावाळांत मो-

ळ्या दुःखानें रहावें लागतें. ब्रह्महत्या करणारे, मांठे पातित झालेले, दारू पिण्यांत गुंतलेले, व गुरुपत्नीशीं संबंध ठेवणारे दुरात्मे ब्राह्मण यांना वाईट गति मिळते. त्याचप्रमाणें आई व देव यांसंबंधानें ज्यांचें योग्य वर्तन नसतें त्यांना मिळणारी गति. यावरून वाईट कर्माचें फळ ओळखून व पशुपक्ष्यादि नीच योनींमध्यें असणारांची गति ध्यानांत घेऊन, वेदशास्त्रें जाणून अगणित वर्षें, ऋतु, महिने, पंधरवडे यांचा होणारा ऱ्हास, चंद्राचा क्षय व वृद्धि, समुद्राला येणारी भरती व ओहोटी, पैशाची वाढ व हानि, युगांचा ऱ्हास, एकत्र जमलेल्या वस्तूंचा वियोग, पर्वत, नद्या व चारी वर्ण यांचा क्षय व फिरून फिरून येणारी जरा, मृत्यु, व जन्म व इतर दुःखें, देहामधील दोष व मनुष्याला होणारीं दुःखें व देहाचीं निरनिराळीं स्वरूपांतरें व आपल्यामध्यें असणारे सर्व दोष, त्याचप्रमाणें अमंगळ गंध हे मनुष्यानें लक्षांत घ्यावे.'

युधिष्ठिर ह्मणाला, 'या शरीरामध्यें काय काय दोष आहेत तें सांगा.' भीष्म ह्मणाले, 'कपिलप्रभृति सांख्यशास्त्र जाणणारे या देहामध्यें काम, क्रोध, भय, निद्रा व श्वास हे पांच दोष आहेत असें ह्मणतात. हे दोष सर्व प्राणिमात्राच्या शरीरामध्यें दिसून येतात. क्षमेच्या योगानें क्रोध, संकल्प सोडून देऊन काम, सत्वाच्या अभ्यासानें निद्रा, हुषारीनें भय आणि थोडका आहार ठेवून श्वास आहारीं ठेवणें शक्य आहे. शेंकडों गुणांनीं गुण, दोषांनीं दोष व नानाप्रकारच्या कारणांनीं कारणें जाणून त्याचप्रमाणें हें विष्णूच्या हजारों मायांनीं झांकलेलें जग पाण्यावरील फेंसाप्रमाणें चित्र काढलेल्या भिंतीप्रमाणें किंवा भेंडाप्रमाणें आंत पोंकळ किंवा ज्यामध्यें काळाकुट्ट अंधार पडला आहे, अशा खड्ड्याप्रमाणें किंवा पाण्यावरील बुडबुड्याप्रमाणें असून याचा नाश होणारा आहे. यांत सुख बिलकुल नाहीं व परिणामीं खात्रीचा नाश आहे. त्याचप्रमाणें चिखलांत बुडून परतंत्र झालेल्या हत्तीप्रमाणें रज व तम यांमध्यें हें बुडून गेलें आहे हें जाणून महाबुद्धिमान सांख्य लोक बुद्धीच्या योगानें सर्वव्यापी त्या मोठ्या सांख्यशास्त्राच्या ज्ञानाच्या योगानें मुलांबाळांवरील नात्यासंबंधाचें प्रेम दूर करून अमंगळ असे राजस व तामस गंध, त्याचप्रमाणें सत्वगुणाचे चांगले गंध व शरीराच्या आश्रयानें असणारीं इंद्रियांला होणारीं स्पर्शजन्य सुखें, दूर करून ज्ञानयोगानें सिद्धि मिळवून हा भवसागर तरतात. ज्या ह्या भवसागरामध्यें दुःख हेंच पाणी असून चिंता व शोक हेच ज्याच्या कांठचीं मोठमोठीं सरोवरें आहेत. रोग व मृत्यु हे ज्यामधील सुसरी वगैरे जलचर प्राणी आहेत. वरचेवर मनाला वाटणारी मोठी भीति हेच ह्यांतील मोठमोठे साप आहेत. तमोगुणांनीं होणारीं कर्में यांतील कांसवें असून रजोगुणांनीं होणारीं कर्में यांतील मासे आहेत. इंद्रियविषयांसंबंधानें मनांत येणारा स्नेह हाच ह्यामधील चिखल आहे. जरा हीच ह्याच्यामधील दुर्गम स्थान आहे. ज्ञान हेंच वाट दाखविणारा दिवा आहे. कर्में हीच ज्याची खोली आहे. सत्य हें तीर आहे. पुण्यकारक व्रतें हींच ह्यावरून वाहणारें हिरवें गवत आहे. हिंसा हाच ह्याचा जोराचा व झपाट्यानें चाललेला प्रवाह आहे. नानाप्रकारचे अंतःकरणाचे रस हेच ह्यामधील रत्नें असण्याचें ठिकाण असून नानाप्रकारच्या प्रीति हींच ह्याच्यामधील उत्तम उत्तम रत्नें आहेत. दुःख व ज्वर हींच यावरून वाहणारा वारा असून शोक व तृष्णा हेच यामधील मोठमोठे भोंवरे आहेत. तीव्र असे रोग हेच यामधील मोठमोठे हत्ती आहेत. हाडांचा समुदाय हाच यावर घाट आहे. श्लेष्मा हाच यावरचा फेंस आहे. दान हेंच मोतीं सांपडण्याचें ठिकाण आहे. व भयंकर रक्ताचीं सरोवरें हींच पोंवळीं सांपडण्याचें ठिकाण आहे. खदखदा हंसणें हेच यामधील घों घों शब्द आहेत, नानाप्रकारच्या ज्ञानाच्या योगानेंच हा तरून जाण्याला कठीण झाला आहे. रडण्यापासून निघणारे अश्रु हाच ह्याच्यांतील खारट पदार्थ आहे. संग सोडून देणें हेंच हा तरून जाऊं इच्छिणाऱ्यांना मोठा आधार आहे. बायकामुलें हींच ह्यामधल्या असंख्य जळवा आहेत. मित्र व बांधव हेच ह्याच्या कांठचीं बंदराचीं शहरें आहेत. अहिंसा व सत्य हीच याची मर्यादा आहे. मृत्यु हाच ह्यामधील मोठी लाट आहे. वेदांताचें ज्ञान हेंच ह्यामधील आश्रयाचें बेट आहे. सर्व प्राणिमात्रांवरील दया हीच ह्यावरील गोळे व मोक्ष हाच ह्यावरून प्रवास

करणाऱ्यांना मिळणारा सौदा आहे. समुद्रांतील वडवानलाप्रमाणें ह्यामध्येंही अनेक वडवानल भरले आहेत. असा हा समुद्र सिद्धि पावलेले यति ज्ञानरूपी नावेनें तरून जाऊन स्वच्छ अशा आकाशामध्यें शिरतात, या ठिकाणीं त्या धन्य सांख्यज्ञान्यांना सूर्य आपल्या किरणांनीं वाहून नेतो. ज्याप्रमाणें कमलाचे देठांतील तंतु पाण्यांतून रस शोषून घेऊन ते फुलाला पोंचवितात त्याप्रमाणें सूर्य आपल्या किरणांनीं या ज्ञानयोग्यांना वाहून नेऊन जगांतील सर्व विषय त्यांना पोंचवितो. त्यांना फार उच्च प्रतीचे ज्ञानापासून उत्पन्न होणारें ऐश्वर्य प्राप्त होतें. सर्व संग दूर होऊन सिद्धि मिळविलेल्या या वीर्यवान व तपोधन यतींना सूक्ष्म, थंड, सुगंधी, अंगाला गोड लागणारा असा वारा वाहून नेतो. जो वारा सात वाऱ्यांमध्यें श्रेष्ठ असून शुभ लोकांमध्यें ज्याचा संचार आहे अशा प्रकारचा तो श्रेष्ठ वायु आकाशाच्या अखेरच्या पल्ल्याला त्यांना पोंचवितो. आकाश रजाच्या अखेरच्या पल्ल्याला व रज सत्वाच्या अखेरच्या पल्ल्याला पोंचवून सत्व त्यांना शुद्ध अशा नारायणाकडे वाहून नेऊन शुद्धात्मा प्रभु नारायण त्याला स्वतः परमात्म्याकडे पोंचवितो. ह्या परमात्म्याकडे जाऊन पोंचल्यावर ते तन्मय होऊन गेलेले शुद्ध लोक अमर होण्याला योग्य होऊन त्या स्थितींतून ते कधीं परत येत नाहींत. सत्य, सरळपणा व सर्व प्राणिमात्रांवर दया यांमध्यें गढलेल्यांची सुखदुःखादि द्वंद्वांपासून मुक्त होऊन मिळविलेली ही श्रेष्ठ गति आहे.' युधिष्ठिर ह्मणाला, 'या स्थिरव्रत महात्म्यांना ऐश्वर्यानें व सुखानें भरलेलें हें उत्तम स्थान मिळाल्यावर पूर्वीच्या जन्ममरणासंबंधानें त्यांना कांहीं स्मृति रहाते काय? शास्त्रावरून मोक्षामध्यें हा दोष मला दिसून येतो. कोणी ह्मणतात, त्या ठिकाणीं ज्ञान नाहींसें होतें, कोणी त्याच्या उलट ह्मणतात, जर त्या स्थितीला पोंचून यती अहंकारयुक्त रहात असतील तर त्यावरून प्रवृत्तिरूपी धर्मच चांगला ठरतो. त्याच्या उलट या स्थितींत अहंभाव नाहींसा होत असेल तर त्यांत व अज्ञानांत कांहींच फरक नाहीं. सुषुप्तीप्रमाणें ज्ञान झालें असतां सुद्धां ज्ञान आहे असें तर ह्मणतां यावयाचेंच नाहीं.

भीष्म ह्मणाले, 'तूं विचारलेला हा प्रश्न किती जरी कठीण असला तरी फार योग्य आहे. हा प्रश्न अशा प्रकारचा आहे कीं, यामध्यें मोठमोठे विद्वान सुद्धां घोंटाळून जातात. आतां यासंबंधानें उत्तर देतों ऐक. महात्म्या कपिलांच्या अनुयायांनीं यावर चांगला विचार करून ठेविला आहे. प्राणिमात्रांच्या शरीरामध्यें असणारीं ज्ञानेंद्रियें आपापल्या निरनिराळ्या कामांकडे लागलेलीं असतात. तीं त्याचीं साधनें आहेत; कारण त्यांच्यामधून याला सर्व विषयांचें ज्ञान होतें. आत्म्यापासून वेगळीं केल्यावर हीं इंद्रियें लांकडाच्या कुडाप्रमाणें आहेत आणि समुद्रावरचा फेंस ज्याप्रमाणें नाहींसा होतो त्याप्रमाणें आपापलीं कर्में करण्यासंबंधानें त्यांचा उपयोग होत नाहीं. ज्या वेळेला प्राणी आपल्या इंद्रियांसह झोंपीं जातो त्यावेळीं सूक्ष्म आत्मा आकाशामध्यें फिरणाऱ्या वाऱ्याप्रमाणें सर्व विषयांमधून फिरत रहातो. हा सूक्ष्मात्मा स्वप्नामध्यें सर्व आकार, सर्व रूपें पहात असतो, सर्व विषय स्पर्श करीत असतो व जागृतावस्थेप्रमाणेंच सर्व विषय ग्रहण करीत असतो. झोंपेमध्यें सर्व इंद्रियें विष काढून घेतलेल्या सापाप्रमाणें अनीशत्वामुळें प्रवृत्ति बंद पडून आपापल्या ठिकाणीं लय पावून राहतात. यावेळीं सूक्ष्म आत्मा सर्व इंद्रियांमधून जात राहून त्याच्या त्याच्या कामगिऱ्या बजावीत रहातो. सत्वाचे, रजाचे, तमाचे, मनाचे, आकाशाचे, वायूचे, प्रवाही पदार्थांचे, पाण्याचे, पृथ्वीचे या सर्वांचे गुण जीवात्म्यामध्यें असणारीं हीं इंद्रियें व यांचे गुण जीवात्म्याला व्यापून असून परमात्म्याचा यांवर दाब असतो; व शुभाशुभ कर्में या जीवाकडून होतात. गुरूपुढें हात जोडून उभा असणाऱ्या शिष्याप्रमाणें हीं इंद्रियें जीवात्म्यापुढें हात जोडून उभीं असतात. जेव्हां हा जीवात्मा प्रकृतीच्या पलीकडे जातो तेव्हां तो अव्यय, सर्वश्रेष्ठ नारायणस्वरूपी, द्वंद्वापासून मुक्त व प्रकृतीच्या पलीकडचा जो परमात्मा त्याला जाऊन मिळतो. पापपुण्यापासून मुक्त होऊन त्या अनामय, श्रेष्ठ व गुणहीन अशा परमात्म्यामध्यें मिळाल्यावर तेथून हा परतत नाहीं. याप्रमाणें समाधीमध्यें परमात्मस्वरूप झाल्यावर मग जें अवशिष्ट रहातें तें मन व इंद्रियें असून समाधीची स्थिति नाहींशी झाल्यावर हें मन व इंद्रियें यांना परतावें लागून गुरू-

च्या आज्ञेप्रमाणें आपलीं कर्में करीत रहावें लागतें. परंतु पुढें थोड्या वेळानेंच देह सोडून याप्रमाणें मोक्षाच्या मार्गे लागलेल्या ज्ञानसंपन्न व गुणाची आशा करून असलेल्या यतीला मोक्षरूपी शांति मिळते. सांख्यमताप्रमाणें वागणारे या ज्ञानाच्या योगानें श्रेष्ठ गतीला जाऊन मिळतात. या ज्ञानासारखें दुसरें ज्ञान नाहीं. यासंबंधानें संशय धरण्याचें कारण नाहीं. सांख्यज्ञान सर्वश्रेष्ठ आहे. हें ज्ञान कधीं कमी न होणारें असून शाश्वत आहे. हें पूर्ण सनातन ब्रह्म आहे. याला आदि, मध्य, अंत किंवा कांहीं नाहीं. सर्व द्वंद्वांपासून मुक्त असून सर्व सृष्टीच्या उत्पत्तीला कारणभूत असें हें शाश्वत आहे. ज्याला शहाणे लोक कूटस्थ ह्मणतात असें हें नित्य ज्ञान आहे. उत्पत्ति व लय इत्यादि विकार ज्यापासून घडतात व ज्याची ऋषींनीं शास्त्रामध्यें फार प्रशंसा केली आहे असें हें ब्रह्मापासून उत्पन्न होणारें सर्वश्रेष्ठ, प्रकाशमान, अनंत व कधीं कमी न होणारें ज्ञान आहे. विषयाकडे लागलेले लोक मायेमध्यें असणाऱ्या गुणांचा यावर आरोप करून याची स्तुति करतात. योगाकडे योग्य रीतीनें लागलेल्या योग्यांचें व फार दूरवर दृष्टि असणाऱ्या सांख्यांचें यासंबंधानें एकच मत आहे. सांख्यवेदांत तत्त्व अमूर्त अशा परब्रह्माच्या रूपाचें आहे असें श्रुतींत सांगितलें आहे. त्या शास्त्राचीं मतें सर्वमान्य समजलीं आहेत.

या पृथ्वीवर स्थावर व जंगम अशा दोन प्रकारचीं भूतमात्रें आहेत; त्यांमध्यें जंगम श्रेष्ठ आहेत. ब्रह्मवेत्त्यांच्या ठिकाणीं असणारें, त्याचप्रमाणें वेद, शास्त्रें, योग व पुराणें यांमध्यें जें श्रेष्ठ ज्ञान आढळून येतें तें या सांख्यशास्त्रामध्यें आहे. मोठमोठ्या इतिहासामध्यें, शिष्टसंमत अर्थशास्त्रामध्यें किंवा लोकांमध्यें जें कांहीं ज्ञान दिसून येतें, त्या सर्वांचा उगम सांख्यशास्त्रापासूनच दिसतो. यामध्यें शम दिसून येतो, मोठें सामर्थ्य दिसून येतें, शास्त्रांत सांगितलेलें सूक्ष्म ज्ञान दिसून येतें, सूक्ष्म तपें व सुखें दिसून येतात. हें ज्ञान पूर्ण मिळालें नसतां सांख्यमतानुयायी देवत्वाला पावतात व तेथें पुष्कळ दिवस सुखानें रहातात व तेथें यथेष्ट सुख भोगल्यावर फिरून ब्राह्मणांमध्यें आणि तेंही यतीमध्यें येऊन पडतात व सर्वमान्य व थोर अशा सांख्यशास्त्रामध्यें पूर्वीपेक्षां अधिक गढून राहून हा देह सोडून आकाशामध्यें शिरणाऱ्या देवांप्रमाणें परमात्म्याच्या ठिकाणीं मिळून जातात. या सांख्यमताला अनुसरणाऱ्या लोकांना जरी श्रेष्ठ सिद्धि मिळाली नाहीं तरी पशुपक्ष्यादि नीच योनीमध्यें किंवा पापी लोकांमध्यें त्यांचा जन्म कधीं होत नाहीं. या विशाल सर्वश्रेष्ठ, जुनाट, समुद्राप्रमाणें अफाट, स्वच्छ व थोर सांख्यज्ञानाकडे जे द्विज लागले आहेत ते नारायणरूपी होतात. हें ज्ञान हेंच नारायणस्वरूपी आहे व पुरातन कालापासून अस्तित्वांत असलेल्या जगाचा यामध्यें समावेश होतो. उत्पत्तीची वेळ आली असतां हा सर्व सृष्टि उत्पन्न करतो व नाशाची वेळ आली असतां सर्वांना आपल्या पोटांत घेऊन हा जगताचा अंतरात्मा पाण्यामध्यें झोंप घेतो.'

---

## २०७ वसिष्ठ व कराल यांचा संवाद—क्षर व अक्षर. (१२-३०२)

युधिष्ठिर ह्मणाला, 'ज्याची प्राप्ति न झाल्यानें मनुष्याला फिरून जन्म घ्यावा लागतो तें अक्षर काय आहे व ज्याच्या योगानें मनुष्याला जन्माला यावें लागतें तें क्षर काय आहे हें मला सांगा.' भीष्म ह्मणाले, 'यासंबंधांत पुढील वसिष्ठ व जनकाच्या कुलांतील कराल यांचा संवाद मी तुला सांगतों ऐक. कोणे एके वेळीं सूर्याप्रमाणें तेजस्वी मुनिश्रेष्ठ वसिष्ठ आपल्या आसनावर बसले असतां हात जोडून गोड शद्बांनीं कांहीं कुतर्क मनांत न आणतां कराल पुढील प्रश्न त्यांना विचारला. तो ह्मणाला, 'ज्याच्या प्राप्तीनें मनुष्याला परत यावें लागत नाहीं अशा सनातन परब्रह्मासंबंधानें त्याचप्रमाणें ज्याला क्षर ह्मणतात व ज्यामध्यें हें सर्व जग गडप होतें व ज्याला कल्याणकारक, क्षेमकर व अनामय असें अक्षर ह्मणतात त्यासंबंधानें आपल्या तोंडून मी कांहीं ऐकूं इच्छितों.' वसिष्ठ ह्मणाले, 'ज्यानें हें जग नाश पावतें त्याचप्रमाणें जें कधींही नाश पावत नाहीं त्यासंबंधानें सांगतों ऐक. बारा हजार वर्षांचें एक युग होत असून हीं चार युगें मिळून हजार वेळां झालीं असतां एक कल्प होतो. हा एक

कल्प ह्मणजे ब्रह्मदेवाचा एक दिवस असून त्याची रात्रही एवढीच आहे. याप्रमाणें याच्या शेवटीं ज्याच्यामध्यें अणिमा, लघिमा इत्यादि ऐश्वर्यें स्वभावतः आहेत असें योगशास्त्र ह्मणतें, असा निराकार शंभु फिरून त्या प्रथम झालेल्या ज्याचीं कर्में असंख्य आहेत अशा सर्वश्रेष्ठ जगत्स्वरूपी मूर्तिमान् भूताला उत्पन्न करतो. हा शंभु शुद्ध ज्योती असून अव्यय आहे व यालाच ईशान ह्मणतात. यानें उत्पन्न केलेल्या हिरण्यगर्भस्वरूपी पुरुषाचे हात, पाय, डोळे, तोंड, डोकें, कान हे सर्वत्र पसरले असून हा सर्व भरून आहे. यालाच वेदांतामध्यें बुद्धि ह्मटली आहे. योगामध्यें महान विरिंची व अज अशीं नांवें आहेत. सांख्यशास्त्रामध्यें विचित्ररूप, विश्वात्मा, एकाक्षर अशीं अनेक नांवें आहेत. याला अनेक रूपें असून, सर्व जगाचा आत्मभूत अशा याला याच्या बहुरूपत्वामुळें विश्वरूप ह्मटलें आहे. हाच विकार पावून स्वतःपासून स्वतःची उत्पत्ति करून घेतो. याच्यामध्यें मोठें सामर्थ्य असून हा अहंकार व अहंकारानें विकृत असा प्रजापति उत्पन्न करतो. या व्यक्त हिरण्यगर्भाची याप्रमाणें अव्यक्तापासून उत्पत्ति आहे. याला विद्वान लोक ज्ञानसृष्टि ह्मणतात. महत् व अहंकार यांची जी हिरण्यगर्भापासून उत्पत्ति याला अविद्यासृष्टि ह्मणतात. यांपैकीं एका किंवा दुसऱ्यामुळें अविद्या किंवा विद्या यांच्यामुळें विधि व अविधि उत्पन्न झाले. अहंकारापासून सूक्ष्म भूतांची जी उत्पत्ति ती तिसरी होय. सर्व प्रकारच्या अहंकारामध्यें जो विकार ही चवथी सृष्टि होय. वायु, ज्योति, आकाश, पाणी, पृथ्वी, शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध हीं दहा एकदमच उत्पन्न झालीं व या महाभूतांच्या एकवटण्यापासून उत्पन्न झालेली जी सृष्टि ती पांचवी होय. कान, त्वचा, डोळे, जीभ व नाक हे पांच व तोंड, हात, पाय, गुद व मेंदु हीं दहा इंद्रियें असून पैकीं पहिलीं पांच ज्ञानेंद्रियें व दुसरीं कर्मेंद्रियें, हीं मनाबरोबर उत्पन्न झालीं. हीं चोवीस तत्त्वें सर्व प्राणिमात्रांमध्यें दिसून येतात. यांना योग्य रीतीनें ओळखून तत्त्व पाहूं लागलेल्या ब्राह्मणांना शोक करण्याची पाळी येत नाहीं. हीं चोवीस तत्त्वें एकत्र मिळवून बनलेलें हें शरीर देवदानवांपासून पशुपक्षी वगैरे सर्व जलचर व स्थलचर प्राणिमात्र धारण करतात. अशी एक ही जागा नाहीं कीं, ज्या ठिकाणीं हें शरीर न धरणारे प्राणी आहेत. या सर्वांचा व्यक्तामध्यें समावेश होत असून दिवसानुदिवस याचा नाश होतांना दिसतो; ह्मणून या चोविसांपासून उत्पन्न झालेल्यांना क्षर असें ह्मणतात. ज्यामुळें जग नाश पावतें त्याला अक्षर ही संज्ञा आहे. अव्यक्तापासून स्पष्टतेला आलेलें हें जग मायामय आहे. सर्वांत आधीं उत्पन्न झालेला जो महान् त्याला सुद्धां क्षराचेंच उदाहरण समजतात. तेव्हां या चोविसांच्या पलीकडे जो पंचविसावा आहे तो विष्णु होय. हा या तत्त्वांपासून अलग असून या सर्व विश्वामध्यें भरून असल्यानें त्याला तत्त्वसंज्ञा आली आहे. आणि ज्याअर्थीं व्यक्तापासून या सर्वांची उत्पत्ति आहे त्याअर्थीं या सर्वांना मूर्तिस्वरूप आलें आहे. चोविसावी प्रकृति तिच्या विकारांपासून झालेल्या सर्वांच्या वर अधिष्ठात्री आहे; परंतु पंचविसावा विष्णु निराकार असल्यानें त्याला या विश्वाचा अधिष्ठाता ह्मणतां येत नाहीं. त्यावर चिच्छाया पडली असतां अनुपाधिक असूनही सचेतन होऊन जन्ममृत्यु या गुणांनीं युक्त प्रकृतीच्या योगानें स्वतः अमूर्तिमान असून मूर्तिमान दिसतो. याप्रमाणें हा उत्पत्ति व मरण हे जिचे गुण आहेत अशा प्रकृतीच्या योगानें जन्ममरणात्मक होऊन निर्गुण असून सुद्धां गुणवानासारखा दिसतो. हा थोर, उत्पत्ति व प्रलय जाणणारा आत्मा प्रकृतीशीं जडला जाऊन विकार पावल्यानें अज्ञानानें मीपणा धरतो. सत्व, रज व तम या तीन गुणांशीं स्वतःचा संबंध जडवून घेऊन स्वतःला विसरून गेल्यानें मूर्ख जनांच्या नादीं लागल्यानें ह्याला निरनिराळ्या योनींतील प्राण्यांशीं तदाकार व्हावें लागतें. याला जन्म व मरण हे प्रकृतीशीं याचा संबंध जडला असल्यामुळें आहेसें दिसल्यानें हा आपण कोणी दुसरे आहों असें न मानतां मी अमक्याचा अमुक असें ह्मणूं लागून गुणांच्या मागें लागतो. तमाच्या योगानें नानाप्रकारचे तमोगुण याच्या अंगीं येतात, रजाच्या योगानें रजोगुण येतात व सत्वाचा आश्रय केल्यानें सत्वगुण येतात. सर्वांमध्यें पांढरा, तांबडा व काळा अशा तीन प्रकारचे वर्ण असतात. हे सर्व प्रकृतीच्या

संबंधाचे वर्ण आहेत. तेव्हां मनुष्य ज्या प्रकृतीशीं स्वतःला तादात्म्य करून घेतो, तिच्या स्वरूपाप्रमाणें तो त्या त्या वर्णाचा बनतो. तमाच्या योगानें तो नरकाला जातो, रजाच्या योगानें मनुष्यांमध्यें जन्माला येतो व सत्वाच्या योगानें देवलोकाला जाऊन सुखाचा उपभोग घेतो. केवळ पापाच्या योगानें मनुष्याला पशुपक्ष्यांच्या हलक्या योनींत जन्म येतो. पापपुण्याच्या योगानें मनुष्यांमध्यें जन्म येतो व केवळ पुण्याच्या योगानें देवांमध्यें जन्माला येतो. याप्रमाणें अक्षर अव्यक्त अशा प्रकृतीशीं संबंध जडून क्षर होतें; तथापि ज्ञानाच्या योगानें हा पंचविसावा अक्षर दिसूं लागतो.'

---

## २०८ पुनर्जन्म व अहंभाव.
## (१२. ३०३–३०४)

'याप्रमाणें आपल्याला विसरून जाऊन अज्ञानाच्या मागें लागल्यानें मनुष्याला एका देहापासून दुसरा देह याप्रमाणें हजारों देह धरावे लागतात. याचा गुणांशीं संबंध जडून त्या गुणांच्या सामर्थ्यामुळें हजारों पशुपक्ष्यादि नीच योनींमध्यें व केव्हां देवांमध्येंही याला जन्म घेण्याचा प्रसंग येतो. मनुष्यपणापासून स्वर्गाला जातो व स्वर्गाहून फिरून मनुष्य जन्माला येतो, व मनुष्य जन्मापासून अनंत वर्षें नरकामध्यें पडून राहतो. ज्याप्रमाणें कोळी तंतूच्या जाळ्यांमध्यें नेहमीं आपल्याला गुरफटून घेतो त्याप्रमाणें हा निर्गुण असून गुणांशीं स्वतः गुरफटून घेतो व सुखदुःखादि रोग याला कांहीं नसून निरनिराळ्या योनींमध्यें तीं तीं सुखदुःखें भोगतो. मस्तकशूळ, खुपऱ्या वगैरे डोळ्यांचे रोग, दंतशूळ, गंडमाळा, जलोदर, तृष्णारोग, पटकी, भाजून निघणें, दमाखोकला, फेंपरें व दुसरे जे कांहीं प्रकृतीपासून शरीरामध्यें उत्पन्न होणारे रोग ते सर्व मलाच होतात असें हा मानूं लागतो. हजारों पशुपक्ष्यादि नीच योनींमध्यें व कधीं कधीं देवांमध्यें जो जन्म होतो त्याठिकाणीं अज्ञानानें मीपणा धरून तो आपल्या पापपुण्यात्मक कर्माचीं फळें आपण भोगतों असें समजतो. कधीं कधीं पांढरें शुभ्र वस्त्र नेसावयास मिळालें असतां तें मला मिळालें आहे असें तो मानतो व कधीं वाईट मिळालें असतां तेंही आपल्याला मिळालें आहे असें समजतो. नेहमीं जमिनीवर कधीं बेडकासारखे हातपाय आंखडून तर कधीं वीरासनामध्यें, तर कधीं फाटक्या तुटक्यामध्यें, कधीं मोकळ्या आकाशाखालीं बसणें उठणें तर केव्हां विटा पसरून त्यांवर पडणें हें आपणच करीत आहों असें मानितो. अथवा कांट्यावर त्याचप्रमाणें राखेवर किंवा जमिनीवर, कधीं कधीं रणभूमीवर, कधीं कधीं चिखलांत व कधीं कधीं फळ्यावर अशा नानाप्रकारच्या ठिकाणीं जो पडण्याचा प्रसंग येतो तो आपल्याला येतो असें तो मानतो. फलेच्छा धरून कधीं कधीं मुंज गवताचा बनविलेला तुकडा, आपण नेसलों आहों, कधीं नागवे आहों, कधीं कधीं रेशमी वस्त्रें नेसलों आहों, कधीं कधीं हरणाचें कातडें नेसलों आहों, कधीं कधीं तागाचें वस्त्र नेसलों आहों, कधीं कंबळ परिधान केलें आहे असें मानतो. कधीं वाघाचें कातडें तर कधीं सिंहाचें कातडें, कधीं कधीं गोणपाट वगैरे, कधीं कधीं साली तर कधीं कांटेरी झाडांपासून बिनविलेलीं वस्त्रें, कधीं कधीं कीटकांवसन (किड्यांनीं बनविलेलीं वस्त्रें) तर कधीं फाटक्या तुटक्या चिंध्या, याप्रकारें नानाप्रकारच्या वस्त्रांचा, भोजनाचा व रत्नांचा जो शरीराला भोग मिळतो तो मलाच मिळतो असें तो समजतो. एका आड एका रात्रीला जेवणें, दिवसांतून एकदां जेवणें, चार दिवसांनीं, सहा दिवसांनीं, आठ दिवसांनीं एकदां जेवणें, सहा रात्रींनीं, सात रात्रींनीं, किंवा आठ रात्रींनीं तसेंच दहा दिवसांनीं किंवा बारा दिवसांनीं जेवणें, महिनाभर उपास करणें, फलमूलें खाऊन रहाणें, वायुभक्षण करून रहाणें, पाण्यावर रहाणें, पेंड, दहीं, शेण, खाऊन रहाणें, गोमूत्रावर राहणें, भाजी किंवा फुलें खाऊन राहणें, किंवा शेंगा खाऊन राहणें अथवा कच्चें अन्न खाऊन रहाणें, खालीं गळून पडलेल्या पानांवर किंवा फळावर रहाणें असे अनेक प्रकारचे खाण्याचे नियम सिद्धि मिळण्यासाठीं तो पाळतो. चांद्रायणादि नानाप्रकारचे शास्त्रांत सांगितलेले विधि, चारी आश्रमांचे व निरनिराळ्या पंथांचे विधि, एवढेंच नव्हे; तर निरनिराळीं पाखांड मतें सुद्धां आपणच पाळतों असें त्याला वाटत असतें. एकांत, पर्वतावरील गुहे-

मध्यें बसणें, छायेखालीं दगडावर बसणें, झऱ्याच्या थंडगार अशा बाजूला बसणें, नदीच्या एकांताच्या तीराला, निर्जन वनामध्यें, निरनिराळ्या पवित्र व एकांतांतील देवळांमध्यें, सरोवराच्या कांठांना बसणें व एकांतांतील पर्वतांमधल्या घरासारख्या गुहा इत्यादिकांचा उपभोग आपण घेतों असा याला अभिमान असतो. नानाप्रकारचें एकांतामधलें जग, नानाप्रकारचीं व्रतें, व नियम, अनेक प्रकारचीं तपें, नानाप्रकारचे विधि हे सर्व मीच करतों असा त्याला अभिमान राहतो. कधीं कधीं मी व्यापारी, मी ब्राह्मण, मी क्षत्रिय, मी वैश्य, मी शूद्र असा अभिमान त्याच्यामध्यें दिसतो. गरीब, आंधळे व अनाथ इत्यादिकांना नानाप्रकारचीं दानें अज्ञानामुळें माझ्या हातून घडतात असें याला वाटतें. अज्ञानामध्यें गुरफटला गेल्यामुळें हा आत्मा सत्व, रज, तम यांचे गुण त्याचप्रमाणें धर्मार्थकाम यांचा सर्व बोजा आपल्यावरच घेतो. याप्रमाणें आत्मा आपल्याला प्रकृतीशीं अगदीं एकरूप करून घेतो. स्वाहा, स्वधा, वषट्कार, नमस्कार, याजन, अध्यापन, दान, प्रतिग्रह, यजन, अध्ययन व दुसरीं अशा प्रकारचीं कर्मैं आपण करतों असें त्याला वाटत असतें. जन्म, मृत्यु, वादविवाद, जीव घेणें इत्यादि जीं बरीं वाईट कर्मैं आहेत हीं सर्व आपल्याकडूनच होतात असें त्याला वाटतें. वास्तविक पहातां जन्ममरण हे प्रकृतीमुळें घडून येत असून सूर्य ज्याप्रमाणें आपले किरण आपल्यामध्यें आंवरून घेऊन एकटा रहातो त्याप्रमाणें प्रलयकालच्या वेळीं सर्व पदार्थांना व गुणांना आपल्यामध्यें लीन करून घेऊन परमात्मा एकटा रहातो. व ज्याप्रमाणें सूर्य फिरून सकाळच्या वेळीं आपले किरण बाहेर टाकतो त्याप्रमाणें उत्पत्तीची वेळ आली असतां फिरून हा उत्पत्ति करून सर्व भूतमात्र सर्वत्र पसरून देतो. याप्रमाणें मजेनें हा या या स्थितीशीं आपल्याला तादात्म्य करून घेतो. याप्रमाणें जरी आत्मा तिन्ही गुणांच्या पलीकडे आहे, तरी विकार पावून जन्म व मरण यांनीं युक्त व सत्व, रज व तम या गुणांशीं तादात्म्य असणाऱ्या प्रकृतीला उत्पन्न करतो. याप्रमाणें या मार्गाला लागल्यावर अमक्या अमक्या क्रियेमध्यें अमुक अमुक गुण असून अमुक अमुक फल आहे असें तो मानतो. हें सर्व जग प्रकृतीच्या योगानें आंधळें होऊन रज, तम यांनीं नानाप्रकारांनीं व्यापून गेलें आहे. याप्रमाणें प्रकृतीचा आत्म्याशीं संबंध जडल्यानें सुखदुःखात्मक द्वंद्वें फिरून फिरून येऊन पडतात. आणि ह्या अज्ञानामुळेंच जीवाला हीं दुःखें मला होतात व माझ्या पाठीमागें लागलीं आहेत असें वाटतें. ‘हीं सगळीं मला निस्तरलीं पाहिजेत; त्याचप्रमाणें चांगल्या कर्माचेंही फल मला देवलोकाला जाऊन भोगावयाचें आहे किंवा तीं बरीं वाईट फळें मी येथेंच भोगीन किंवा नेहमीं चांगलें कर्म करीत राहिल्यानें अनेक जातींमध्यें अगदीं अखेरपर्यंत मला सुखच होईल; त्याचप्रमाणें माझ्या हातून घडणाऱ्या येथील वाईट कृत्यांनीं मला अनंत दुःख होईल, मनुष्य जन्म हा मोठ्या दुःखाला कारण आहे, कारण येथून नरकाला जावें लागतें; परंतु नरकांतूनही फिरून पुष्कळ कालानें मी फिरून मनुष्य जन्माला येईन, मनुष्य जन्मांतून देवत्वाला मिळेन, त्या उच्च स्थितीपासून फिरून मनुष्य जन्माला येईन व येथून फिरून नरकाला जाईन; याप्रमाणें तो मीपणाचा विचार करीत रहातो. जो मनुष्य पंचभूतात्मक देह, इंद्रियें व त्यांमधील चिच्छाया ह्यालाच आत्मा समजूं लागतो त्याला फिरून फिरून देव व मनुष्य यांमध्यें जन्म घ्यावा लागून नरकांत बुडावें लागतें. नेहमीं ममत्व ठेवल्यानें या जन्ममरणाच्या फेऱ्यांत त्याला सांपडावें लागतें. मरणामध्यें ज्यांचा शेवट आहे अशा निरनिराळ्या मूर्तींमध्यें त्याला हजारों कोटी जन्म घ्यावे लागतात. जो याप्रमाणें बरीं वाईट फल देणारीं कर्मैं करतो त्याला याप्रमाणें तिन्ही लोकांमध्यें देह धरून फळ भोगावें लागतें. हीं शुभाशुभ कर्मैं प्रकृतीच्या हातून होत असून या वासनेच्या मागें लागलेल्या प्रकृतीला त्रैलोक्यामध्यें त्याचें फल भोगावें लागतें. पशुपक्ष्यादि नीच योनी, मनुष्ययोनी व देवयोनी हीं या तीन प्रकृतीचीं ठिकाणें होत. प्रकृति स्वतः लिंगहीन असून तिचें आपण महदादि लिंगांच्या योगानें अनुमान करतों; त्याचप्रमाणें पुरुषाचें लिंगही चैतन्याचा देहावर विकार होऊन जीं कर्मैं घडतात त्यांवरून ताडतों. जरी आत्म्याला कोणत्याही प्र-

कारचा विकार होत नसून प्रकृतीला चेष्टा करावयास लावणारा हा मुख्य आहे, तरी कर्मेंद्रियें व ज्ञानेंद्रियें यांनीं युक्त अशा शरीरांत शिरल्यावर या इंद्रियांवर स्वामित्व ठेवून हीं सर्व कर्मे आपल्याच हातून होतात असें तो मानूं लागतो. श्रोत्रादि पांच ज्ञानेंद्रियें त्याचप्रमाणें वाणी वगैरे पांच कर्मेंद्रियें अशीं हीं दहा इंद्रियें सत्व, रज, तम या तीन गुणांशीं जुळून निरनिराळ्या कामामध्यें गढून राहतात; परंतु जीव हीं सर्व कर्में आपणच करतों व या इंद्रियांशीं याचा कांहीं संबंध नसतां आपणच तीं सर्व आहोंत असें मानतो. याला देह वगैरे कांहीं नाहीं तरी आपण देहधारी आहों असें याला वाटतें, वेळेचा याच्यावर कांहीं परिणाम होत नाहीं तरी आपण वेळेच्या ताब्यांत आहोंत असें याला वाटतें, बुद्धीशीं संबंध नसून तो आहे असें याला वाटते, आणि चोवीस तत्त्वांपासून अलग असून आपण तीं आहोंत असें याला वाटतें. याला मृत्यु नसून आपल्याला मृत्यु आहे, हालचाल नसून हालचाल आहे, क्षेत्र नसून क्षेत्र आहे, जन्म नसून जन्म आहे, तपाशीं याचा कांहीं संबंध नसून आपण तप करतों, गति नसून गति आहे, भय नसून भय आहे व अक्षर असून आपण विनाशी आहों असें वाटून अज्ञानामुळें अहंभावानें हा सर्व आपल्यावर ओढून घेत असतो.'

'याप्रमाणें अज्ञानामुळें व अज्ञानी लोकांशीं संबंध जडल्यामुळें मनुष्य हजारों नाशवंत जन्मांला जातो. अज्ञानयुक्त अशा चित्स्वरूपामध्यें त्याचें रूपांतर झाल्यामुळें नीच योनी मनुष्य व देव यांमध्यें हजारों नाशवंतदेहांमध्यें तो जातो. अज्ञानामुळें चंद्राप्रमाणें त्यालाही हजारों वेळां कमी अधिक व्हावें लागतें. हा अज्ञानांत पडल्याबरोबर हा याचा स्वभावच बनून जातो. चंद्राच्या सोळा कळा असून त्यांपैकीं पंधरा वाढतात व कमी होतात व सोळावी कायम असते; त्याचप्रमाणें जीवाच्या सोळा कळा असून त्यांपैकीं आभासयुक्त मूलप्रकृति दहा इंद्रियें व अंतःकरण चतुष्टय अशीं हीं पंधरा कमी अधिक होतात. सोळावें जें शुद्ध चैतन्य याला विकार मुळींच होत नाहीं. अज्ञानयुक्त होऊन जीव या वर सांगितलेल्या पंधरांमध्यें फिरून फिरून जन्म घेत असतो. तो सोळावा भाग फार सूक्ष्म असून तो सोम ह्मणून प्रसिद्ध आहे. इंद्रियांचा त्याला आधार नसून इंद्रियांचा तो आधार आहे. ज्या अर्थी मनुष्याच्या जन्माला हीं सोळा कारणभूत आहेत त्या अर्थी यांच्या साह्यावांचून मनुष्याला जन्म घेतां येणार नाहीं. यांना प्रकृति ही संज्ञा आहे. प्रकृतीशीं मिळण्याचा धर्म नाहींसा होणें हाच मोक्ष होय. पंचविसावा जो महात्मा त्यानें जर या अव्यक्त सोळा कळांनीं युक्त अशा देहाकडे लक्ष ठेवलें तर त्याला फिरून फिरून जन्म घ्यावा लागतो. जें विमल व शुद्ध आहे त्याला न ओळखतां शुद्धाशुद्ध मिळून झालेल्या देहासंबंधानें अभिमान धरल्यानें स्वभावतः स्वच्छ असा आत्मा अस्वच्छ होतो. मूळचा जरी तो ज्ञानी आहे तरी अज्ञानाशीं याचा वरचेवर संबंध जडतो व त्याचप्रमाणें प्रकृतीचे तीन गुण घेतल्यानें हा त्रिगुणात्मक होतो.'

---

## २०९ प्रकृति व पुरुष.

### ( १२. ३०५–६ )

जनक ह्मणाला, 'हा पुरुष व प्रकृति यांचा संबंध पुरुष व स्त्री यांच्यामधील संबंधाप्रमाणें दिसतो. पुरुषावांचून स्त्रीला गर्भ धारण करतां येणार नाहीं किंवा स्त्रीवांचून पुरुषाला आपलें रूप फिरून उत्पन्न करतां येणार नाहीं. त्यांच्या एकमेकांच्या संबंधामुळें व एकमेकांच्या गुणांचा आश्रय केल्यामुळें प्राणिमात्रांचीं रूपें सर्व योनींमध्यें एकापासून एक निघतांना दिसतात. रतिसंबंधाकरितां एकमेकांशीं जुळून एकमेकांच्या गुणांचा आश्रय केल्यानें ऋतुकालीं एकापासून एक अशीं रूपें उत्पन्न होतात. आतां या नव्या रूपामध्यें पुरुषाचे कोणते गुण व आईचे कोणते गुण येतात तें सांगतों ऐक. हाडें, स्नायु व मज्जा हे बापाचे गुण असून त्वचा, मांस, व रक्त हे आईचे गुण आहेत, असें शास्त्रांत सांगितलें आहे. व वेदशास्त्रांमध्यें सांगितलेल्या ह्या गोष्टी प्रमाणभूत असून वेद व त्याच्या अनुरोधानें असणारीं शास्त्रें यांचा आधार सनातन आहे. याप्रमाणें प्रकृति व पुरुष हीं एकमेकांशीं सारख्या व एकमेकांच्या उलट अशा गुणांनीं जुळलीं जात असल्या-

मुळें मोक्ष असूं शकणार नाहीं. आपल्याला ज्ञानचक्षु असून सर्व गोष्टी प्रत्यक्षाप्रमाणें दिसतात, ह्मणून मोक्षाच्या अस्तित्वासंबंधानें कांहीं प्रत्यक्ष पुरावा आपल्याला माहीत असेल तर सांगा.'

वसिष्ठ ह्मणाले, 'वेद व शास्त्रें यांच्या या बाबतींतील प्रमाणासंबंधानें तूं ह्मणतोस तें अगदीं खरें आहे. हीं प्रमाणे जरी तूं जशींच्या तशीं घेतलीं आहेस तरी केवळ या दोन्हींचें शब्दार्थापलीकडे तुला ज्ञान झालें नसून त्यांचें खरें तत्त्व तुला कळलें नाहीं. या वेदशास्त्रांचें खरें तत्त्व न ओळखतां जो केवळ शब्दार्थ ध्यानांत घेतो त्याची ती क्रिया व्यर्थ आहे. तत्त्व ओळखल्यावांचून केवळ शब्दार्थ ध्यानांत ठेवणारा फुकट भार वहाणारा समजला आहे. ज्यानें तत्त्व ओळखलें आहे त्यालाच त्याचा कांहीं फायदा आहे. ग्रंथाचें तत्त्व विचारलें असतां चांगल्या अभ्यासानें कळलेलें तत्त्व त्याला सांगणें हें प्रत्येकाचें काम आहे. विद्वानांच्या सभेमध्यें जो मूढ हीं तत्त्वें सांगण्यास नाकारतो त्याच्याकडून तीं तत्त्वें कधींच बरोबर रीतीनें सांगितलीं जात नाहींत. मूर्ख मनुष्य हीं तत्त्वें सांगूं लागला असतां उपहासाला पात्र होतो; एवढेंच नव्हे; तर विद्वान मनुष्य देखील जर त्यानें हीं तत्त्वें अभ्यासानें पक्कीं करून घेतलीं नसतील तर त्याला लोकांचा उपहास सोसावा लागतो. आतां सांख्य व योगशास्त्र जाणणाऱ्या महात्म्यांनीं या मोक्षधर्मावर काय सांगितलें आहे तें सांगतों ऐक. जें योग्यांना दिसतें तेंच मिळण्यासंबंधानें सांख्यांचा प्रयत्न चालतो. जो सांख्य व योगशास्त्र एकच समजतो तोच खरा बुद्धिमान. त्वचा, मांस, रक्त, मेद, पित्त, मज्जा, स्नायु त्याचप्रमाणें हीं इंद्रियें हीं सर्व एकापासून एक उत्पन्न होतात. बीजापासून जसें बीज उत्पन्न व्हावें तसें एका देहापासून दुसरा देह उत्पन्न होतो. ज्या वेळीं परमात्मा इंद्रियें, बीज, द्रव्य, देह यांवांचून असतो तेव्हां तो निर्गुण असल्यानें त्याच्यापासून गुणांची उत्पत्ति कशी व्हावी? गुण हे गुणापासून उत्पन्न होऊन गुणांमध्येंच लय पावतात. तसेच आकाशादि सर्व गुण प्रकृतीपासून उत्पन्न होऊन प्रकृतीमध्येंच नाहींसे होतात. त्वचा, मांस, रुधिर, मेद, पित्त, मज्जा, हाडें व स्नायु या प्रकृतीपासून उत्पन्न होणाऱ्या आठांची कधीं कधीं केवळ शुक्रापासून उत्पत्ति होते. जीवात्मा व हें विश्व हे दोन्हीही सत्व, रज, तम या तीन प्रकृतीच्या गुणांनीं युक्त होऊन त्रिगुणात्मक बनतात. परमात्मा या जीवात्म्याहून व विश्वाहून निराळा आहे. ज्याप्रमाणें ऋतू प्रत्यक्ष दिसत नसून त्या त्या ऋतूंत उत्पन्न होणाऱ्या फलमूलांनीं त्यांच्या अस्तित्वाचें अनुमान होतें त्याप्रमाणें प्रकृतीला जरी रूप नाहीं तरी तिच्यापासून होणाऱ्या महदादि तत्त्वांमुळें तिचें अस्तित्व काढतां येतें; त्याचप्रमाणें परमात्मा जरी निर्गुण असून विमल आहे तरी चैतन्याच्या शरीरांतील अस्तित्वामुळें त्याच्या अस्तित्वाचें अनुमान होतें. आदि, अंत व नाश नसून सर्व कांहीं पहाणारा निरामय असा हा आत्मा या देहाशीं व दुसऱ्या गुणांशीं अभिमान जडवून घेऊन राहिल्यानें गुणवान समजण्यांत येतो. गुणवानामध्येंच गुण असणार, निर्गुणामध्यें ते कोठून असणार! जेव्हां जीवात्मा प्रकृतीच्या सर्व गुणांना जिंकतो तेव्हां या गुणांच्या नाशाच्या योगानें तो परमात्म्याला पाहूं लागतो. जे बुद्धीच्या पलीकडे असून प्रकृतीशीं सर्व संबंध सोडल्यानें मोठे शहाणे व सर्वज्ञ आहेत, त्याचप्रमाणें जें अज्ञानाच्या पलीकडे असून अव्यक्त, निर्गुण, ईश्वर व नित्य असून प्रकृति व प्रकृतीपासून उत्पन्न होणारे गुण यांच्यावर आहे, अशा त्या परमात्म्याला सांख्य व योगशास्त्र जाणणारे मोठे ऋषीच ओळखतात. हें ब्रह्म पंचविसावें आहे. जेव्हां ज्ञानवान लोक जन्म व निरनिराळ्या अवस्था यांना भिऊन अव्यक्ताला ओळखतात तेव्हां त्याबरोबरच ते परमात्म्याला ओळखतात. बुद्धिमान मनुष्य जीवात्म्याचें परमात्म्याशीं ऐक्य अगदीं शास्त्रसिद्ध असून बरोबर आहे असें समजतो; पण अबुद्धिमान मनुष्य हे दोन निरनिराळे आहेत असें समजतो; हाच बुद्धिमान व अबुद्धिमान यांमधला फरक आहे. क्षर व अक्षर यांचें स्वरूप याप्रमाणें तुला सांगितलें आहे. अक्षर ह्मणजे एकता व क्षर ह्मणजे अनेकता. मनुष्य जेव्हां या पंचवीस तत्त्वांचा अभ्यास करून तीं जाणूं लागतो तेव्हां आत्म्याची एकता व अनेकता हीं दोन्ही शास्त्रसिद्ध आहेत हें त्याला कळूं लागतें. उ-

त्पन्न झालेलीं चोवीस तत्त्वें व त्याच्या पलीकडील पंचविसावें यांचीं स्वरूपें याप्रमाणें आहेत. या पंचविसांच्याही पलीकडे सव्विसावें आहे. या पंचवीस उत्पन्न झालेल्या तत्त्वांना त्यांच्या निरनिराळ्या वर्गाप्रमाणें जाणण्याला शिकणें हेंच या सर्वांना जाणणें आहे. या सर्वांच्या पलीकडे तें सनातन ब्रह्म आहे.'

'जनक ह्मणाला, एकत्व हा अक्षराचा गुण असून अनेकत्व क्षराचा गुण आहे असें आपण बोललां खरें; तथापि मला तें स्पष्ट कळलें नाहीं. या दोहोंचा स्वभाव स्पष्टपणें माझ्या ध्यानांत आला नाहीं. यांच्या स्वरूपांसंबंधानें अद्यापि माझ्या मनांत संशय आहे. अज्ञानी लोक आत्मा बहुविध आहे असें मानतात; परंतु ज्ञानी लोक त्याला एकच मानतात. माझी बुद्धि जड असल्यानें हें सर्व कसें घडतें हें मला कळत नाहीं. यांवर सविस्तर आपल्या तोंडून ऐकूं इच्छितों.' वसिष्ठ ह्मणाले, सांगतों, ऐक. प्रथम योगशास्त्रासंबंधानें सांगतों. योग्यांना ध्यान हें अवश्य असून त्यामध्येंच त्यांचें मोठें सामर्थ्य आहे. तें ध्यानही मनाची एकाग्रता व प्राणायाम अशा दोन प्रकारचें आहे. प्राणायाम, जपाच्या साधनानें केलेला व त्यावांचून केलेला असे दोन प्रकारचे आहेत. मलमूत्र सोडणें व भोजन करणें या तीन वेळां खेरीज बाकीचा सारा वेळ ध्यानाकडे लावावा. इंद्रियांना मनाच्या साह्यानें इंद्रियविषयांपासून परतवून बुद्धिमान मनुष्यानें शुचिर्भूत होऊन बावीस प्रकारच्या प्राणायामांनीं जीवात्म्याला चोवीस तत्त्वांच्या पलीकडे असणाऱ्या अजर अशा परमात्म्याशीं जोडून द्यावें. या बावीस प्रकारांनींच परमात्म्याची ओळख होणें शक्य आहे. ज्याचें मन दुष्ट मनोविकारांनीं घेरलें नाहीं त्यालाच हें योगसाधन होणें शक्य आहे. दुसऱ्या कोणाला हें साधणें शक्य नाहीं. सर्व संगांपासून मुक्त होऊन आहार थोडा ठेवून मनानें सर्व इंद्रियें ताब्यांत ठेवून बुद्धीच्या योगानें मन स्थिर व दगडासारखें निश्चल करून पूर्वरात्रीं व रात्रीच्या अखेरीस तें आत्म्याच्या ठिकाणीं लावावें. जेव्हां स्थाणूप्रमाणें अगदीं हालचाल न होतां पर्वताप्रमाणें निश्चल राहून मनुष्य नानाप्रकारचे योगाचे नियम जाणून ते पाळतो तेव्हां त्याला योगाकडे लागलेला असें ह्मणतात; अर्थात् जेव्हां हा ऐकत नाहीं, वास घेत नाहीं, रस चाखत नाहीं, पहात नाहीं, स्पर्श जाणत नाहीं, कांहीं संकल्प करीत नाहीं, कशावरही अभिमान ठेवीत नाहीं, लांकडाप्रमाणें कशाचेंही ज्ञान धरीत नाहीं, तेव्हांच शुद्ध स्वरूपाला मिळण्याच्या मार्गाला हा लागला असतो व जेव्हां निवांत जागीं जळणाऱ्या दिव्याप्रमाणें आत्मा प्रकाशूं लागून सूक्ष्म देहापासूनसुद्धां मुक्त होतो अशा वेळीं तो ब्रह्माशीं तदाकार बनला असतो. याप्रमाणें ऊर्ध्वगति मिळाली असतां पुढें त्याला कोठेंच वर जावयाचें नसतें व खालींही यावयाचें नसतें. ज्यावेळीं अंतरात्मा शरीरामध्यें असणारें ब्रह्म मीच आहें असें आत्मसाक्षात्कार होऊन अनुभवाच्या बलानें जाणूं लागतो; तेव्हां त्याला ब्रह्म दिसूं लागतें. अशावेळीं परमात्मा योग्याच्या हृदयामध्यें स्वच्छ अशा अग्नीप्रमाणें, लखलखीत अशा सूर्याप्रमाणें किंवा आकाशांतील विजेच्या चमकेप्रमाणें चमकूं लागतो. हें ब्रह्म अणुपेक्षां लहान व जगांतील सर्वांत मोठ्या वस्तूंपेक्षां मोठें आहे. हें सर्व प्राणिमात्रांच्या हृदयांमध्यें असून त्यांना दिसत नाहीं. ज्यांच्याजवळ बुद्धिरूपी दौलत आहे, व मनोरूपी दिवा आहे, त्यांनाच हा लोकांना उत्पन्न करणारा परमात्मा दिसतो. हा मोठ्या तमाच्या पलीकडे असून ईश्वराच्या पलीकडचा आहे. सर्व वेदपारगांनीं याला तमाला दूर करणारा, विमल, तमापासून अलग असून सूत्रात्म्याहून अन्य असा मानला असून तो लिंगहीन आहे. हाच योग्यांचा योग आहे. याहून दुसरें योगाचें लक्षण काय असणार? या साधनानें योगीलोक अजर अशा सर्वश्रेष्ठ परमात्म्याला ओळखतात. योगशास्त्रासंबंधानें एवढीच माहिती असून आतां ज्या सांख्यशास्त्राच्या योगानें क्रमाक्रमानें अज्ञान दूर होऊन परमात्म्याचें स्वरूप दिसूं लागतें त्या सांख्यशास्त्रासंबंधानें माहिती सांगतों ऐक. सांख्यशास्त्र मूलप्रकृतीवर बसविलें आहे. सांख्यशास्त्रवादी ह्मणतात कीं, अव्यक्त अशी प्रकृति ही पहिली असून त्यापासून दुसरें महत् उत्पन्न झालें. महतापासून तिसरा अहंकार व अहंकारापासून पंचतन्मात्रें. याप्रमाणें या आठ मूळ प्रकृती ते समजत असून त्यांचे पंच महाभूतें, पांच

ज्ञानेंद्रियें, पांच कर्मेंद्रियें व मन मिळून सोळा विकार समजतात. याप्रमाणें सांख्यशास्त्रामध्यें गढून असणारे, त्या शास्त्राचे विधि व विधान जाणणारे या चोवीस तत्त्वामध्यें सर्वांचा समावेश करतात. ज्याची ज्यापासून उत्पत्ति असते, त्याचा त्यामध्यें लय होतो. परमात्म्यापासून उत्पन्न झालेलीं हीं तत्त्वें उलट रीतीनें त्यामध्यें लय पावतात. प्रत्येक सृष्टीच्या वेळीं समुद्राच्या लाटांप्रमाणें गुण सरळ क्रमानें उत्पन्न होत असून उलट क्रमानें लय पावतात. याप्रमाणें प्रकृतीची उत्पत्ति व नाश होत असतो. प्रलयाच्या वेळीं परमात्मा एकत्व पावत असून उत्पत्तीच्या वेळीं तो नानात्व धारण करतो. व याप्रमाणें त्याच्या नानात्व पावण्याला कारण प्रकृति आहे. प्रकृतीचेंही याप्रमाणें एकत्व व नानात्व आहे; कारण तीही प्रलयाच्या वेळीं एक होत असून उत्पत्तीच्या वेळीं नानाविकार पावते व परमात्मा या प्रकृतीला जिच्यामध्यें हा उत्पादक गुण आहे तिला नानाप्रकारचे विकार पावावयास लावतो. या प्रकृतीला क्षेत्र अशी संज्ञा असून चोवीस तत्त्वांच्या पलीकडचा परमात्मा यावर अधिष्ठान पावला आहे; ह्मणून त्याला अधिष्ठाता ह्मणतात व अव्यक्त क्षेत्राला तो जाणतो ह्मणून त्याला क्षेत्रज्ञ असेंही ह्मणतात. व हा अव्यक्त क्षेत्रामध्यें (पुर्यष्टकामध्यें) शिरतो ह्मणून त्याला पुरुष ह्मणतात. क्षेत्र हें क्षेत्रज्ञापासून अगदीं निराळें आहे. क्षेत्र हें व्यक्त असून चोवीस तत्त्वांच्या पलीकडचा जो परमात्मा त्याला ज्ञाता ह्मणतात. आतां ज्ञान व ज्ञेय हीं दोन्ही एकमेकांपासून निराळीं आहेत; अव्यक्त हें ज्ञान असून पंचविसावा हा ज्ञेय समजला आहे. अव्यक्ताला क्षेत्र, सत्व, त्याचप्रमाणें ईश्वर अशा संज्ञा असून अनीश्वर व तत्त्वांच्या पलीकडचा पंचविसावा व्यवहारांत तत्त्व संज्ञक परमात्मा आहे. सांख्यवादी प्रकृतीला सृष्टीचें कारण समजतात आणि सर्व स्थूल तत्त्वांचा चैतन्यामध्यें लय करून परमात्म्याला ते पहातात. प्रकृतीसह या चोवीस तत्त्वांचा योग्य अभ्यास करून त्यांचा स्वभाव निश्चित करून हे या चोविसांच्या पलीकडच्या पंचविसाव्याला पाहूं शकतात. जीव हा प्रकृतीच्या पलीकडचा तो परमात्मा असून या चोविसांहून तो श्रेष्ठ आहे. जेव्हां तो प्रकृतीपासून स्वतःला वेगळें करून परमात्म्याला जाणूं लागतो तेव्हां तो कैवल्यस्वरूपी परमात्मा होऊन जातो. हेंच सांख्यशास्त्राचें मुख्य तत्त्व असून याप्रमाणें हें ओळखणारे साम्यतेला पावतात. ज्याप्रमाणें ज्यांची बुद्धि मोहानें घेरली आहे त्यांना इंद्रियविषयांचें ज्ञान प्रत्यक्ष असतें, त्याप्रमाणें मोहापासून दूर झालेल्यांना ब्रह्माचें प्रत्यक्ष ज्ञान होतें; व जे याप्रमाणें त्या स्थितीला जाऊन पोंचतात त्यांना शरीराचा नाश झाल्यावर फिरून परत जन्माला यावें लागत नाहीं व जे या जन्मामध्यें मुक्त झालेले असतात त्यांना समाधि व अव्ययस्थिति यामुळें मिळणारें ऐश्वर्य व शाश्वतसुख ते अक्षरत्वाला पोंचल्यामुळें मिळतें. ज्यांना ही सृष्टि एकाच्या ऐवजीं अनेकत्वानें दिसते, त्यांची दृष्टि चुकीची असून ब्रह्मासंबंधानें ते आंधळे असतात. अशा लोकांना जगामध्यें फिरून फिरून जन्माला यावें लागून नाना जातींमध्यें देह धरावा लागतो. ज्यांना वर सांगितलेलें सर्व ज्ञान पूर्ण होतें त्यांना सर्वज्ञता येऊन हा देह सोडल्यावर फिरून देह धरण्याचें प्रयोजन रहात नाहीं.’

## २१० विद्या व अविद्या ( १२-३०७ )

वसिष्ठ ह्मणाले, ‘ आतां विद्या कशाला ह्मणतात व अविद्या कशाला ह्मणतात हें क्रमानें सांगतों ऐक. अव्यक्त अशा, उत्पत्ति व नाश हे धर्म जिच्यामध्यें आहेत त्या प्रकृतीला अविद्या हें नांव असून उत्पत्ति व नाश या धर्मांपासून वेगळ्या अशा पंचविसाव्या पुरुषाला विद्या हें नांव आहे. आतां या विद्येचे अवांतर भेद असे आहेत. कर्मेंद्रियें व ज्ञानेंद्रियें यांमध्यें ज्ञानेंद्रियांना विद्या ही संज्ञा आहे. ज्ञानेंद्रियें व देहारंभक स्थूल भूतें त्यांत दुसऱ्यांना विद्या ह्मणतात. हीं देहारंभक स्थूल भूतें व मन यामध्यें मनही विद्या आहे. मन व वासनामात्र शब्दादि विषय यांमध्यें दुसऱ्यांना विद्या संज्ञा आहे. हीं तन्मात्रें व अहंकार यांमध्यें अहंकार विद्या आहे, अहंकार व महत् यांमध्यें महत् ही विद्या आहे, महतापासूनचीं सर्व तत्त्वें व प्रकृति यांमध्यें प्रकृति ही विद्या आहे, सर्वश्रेष्ठ चोवीस तत्त्वांच्या पलीकडचा पुरुष विद्या आहे. सर्व ज्ञानामध्यें ज्ञे-

य हें अव्यक्त समजलें आहे. ज्ञान याला अव्यक्त असें नांव असून पंचविसावा ज्ञेय आहे. याप्रमाणें विद्या व अविद्या यांचे भेद आहेत. आतां अक्षर व क्षर यांसंबंधानें भेद सांगतों ऐक. जीव व प्रकृति या दोघांना अक्षर व क्षर अशीं दोन्ही नांवें आहेत याचें कारण असें आहे. या दोघांना आदि व अंत नसून हे दोघेही सृष्टीच्या उत्पत्तीसंबधानें श्रेष्ठ समजले आहेत. या दोघांनाही यावर विचार करणाऱ्यांनीं तत्त्वें ह्मटलें आहे. उत्पत्ति व नाश करण्याचे धर्म व्यक्त प्रकृतीच्या ठिकाणीं असल्यामुळें हिला अक्षर ह्मटलें आहे. ही अव्यक्त प्रकृति तत्त्वें उत्पन्न करण्यासाठीं वरचेवर विकार पावते; त्याचप्रमाणें महदादि तत्त्वें उत्पन्न करण्याला पुरुषाचीही तितकीच आवश्यकता आहे. कारण या दोघांच्या साहाय्यावांचून यांची उत्पत्ति होणें नाहीं. ह्मणून पुरुष व प्रकृति हे एकमेकांवर अवलंबून असल्यामुळें पंचविसाव्या पुरुषालाही क्षर व अक्षर समजण्यांत आलें आहे. ज्यावेळीं योगी सर्व तत्त्वांना आखडून घेऊन त्यांचा अव्यक्त ब्रह्मामध्यें लय करतो, तेव्हां पंचविसावा जीव किंवा पुरुष हाही आपल्या सर्व तत्त्वांसह लय पावतो. ज्यावेळीं सर्व तत्त्वें आपापल्या उत्पत्तीच्या ठिकाणीं लय पावतात तेव्हां प्रकृति तेवढी एकटी रहाते; जेव्हां क्षेत्रज्ञ आपल्या उत्पत्तिस्थानामध्यें लय पावतो तेव्हां जें कांहीं रहातें तें केवळ ब्रह्म असतें. ह्मणून प्रकृति व तिचीं सर्व तत्त्वें क्षर होते व ही प्रकृति आपल्याला या तत्त्वांपासून वेगळी करून घेते तेव्हां तिला निर्गुणत्व येतें. याप्रमाणें क्षेत्रज्ञाला आपल्या क्षेत्राचें ज्ञान नाहींसें झालें ह्मणजे तो स्वभावानेंच निर्गुण होतो व जेव्हां हा क्षर होतो तेव्हां हा गुणांनीं जखडला जातो. तथापि जेव्हां हा स्वरूपाला जाऊन पोंचतो तेव्हां याला आपल्या वास्तविक निर्गुणस्थितीचें ज्ञान होतें. प्रकृतीला दूर करून आपण तिच्यापासून वेगळे आहों हें ओळखूं लागल्यानें बुद्धिमान क्षेत्रज्ञ विशुद्ध होतो. ज्या वेळीं जीव प्रकृतीशीं संबंध तोडून रहातो तेव्हां तो ब्रह्माशीं तादात्म्य पावतो. तोच तो प्रकृतीशीं संबंध ठेवून राहिला तर तो ब्रह्माहून वेगळा दिसूं लागतो. जेव्हां तो प्रकृति व तिचीं तत्त्वें यांवर आसक्ति दाखवीत नाहीं तेव्हां परमात्म्याला तो पाहूं लागतो. व एकदां त्याला पाहूं लागला ह्मणजे त्या सुखाला मुकण्याची त्याला इच्छा होत नाहीं. सत्य ज्ञानाचा त्यावर उजेड पडला असतां तो याप्रमाणें पश्चात्ताप करूं लागतो. अरेरे! 'जाळ्यांत सांपडलेल्या माशाप्रमाणें अज्ञानानें प्रकृतीच्या जाळ्यांत सांपडण्यांत मीं किती मूर्खपणा केला, अज्ञानानें पाणीच काय तें आपल्याला आधार आहे असें समजून एका पाण्यांतून दुसऱ्या पाण्यांत जात रहाणाऱ्या माशाप्रमाणें मी अज्ञानानें एका देहांतून दुसऱ्या देहांत जात राहिलों. खरोखर माशाला ज्याप्रमाणें पाण्यावांचून दुसरें कांहीं आपलेंसें वाटत नाहीं, त्याप्रमाणें बायकामुलांशिवाय दुसरें कांहीं माझें असल्याचें मला कधींच भासलें नाहीं. परमात्म्याला विसरून मी अज्ञानानें एका देहांतून दुसऱ्या देहांत जात राहिलों त्या मला मूर्खाला धिक्कार असो! हा परमात्माच कायतो माझा बंधु असून याच्याशीं सख्य केल्यानेंच माझी धडगत आहे. त्याच्याशीं साम्यतेला पावून एक होऊन गेल्यामुळें मी त्याच्यासारखा होऊन गेलों आहें. त्याच्याशीं माझें असलेलें सादृश्य मला दिसूं लागलें आहे. वास्तविक मी अगदीं त्याच्या सारखा आहें. खरोखर मी शुद्ध आहे. अज्ञानामुळें व मोहामुळें मी अचेतन प्रकृतीशीं स्वतःचा संबंध जडवून घेतला, तिच्याशीं कांहीं संबंध नसतां फुकटचा संबंध जडवून घेऊन मीं पुष्कळ दिवस व्यर्थ दवडिले! अरेरे! इतके दिवसपर्यंत तिला न ओळखतां मी तिच्या तावडींत गेलों. उच्च, मध्यम व नीच अशा नानाप्रकारच्या तिच्या रूपांमध्यें मी आजपर्यंत राहिलों तरी कसा? मी तिच्याबरोबर कसें रहावें? केवळ अज्ञानानें मीं तिची सोबत धरण्याला धांवलों! आतां मी आपलें मन स्थिर करणार. आतां यापुढें मला तिच्या सोबतीची जरूर नाहीं; कारण, तिच्याबरोबर इतके दिवस घालविल्यानें निर्विकार अशा मला विकारी अशा तिनें आजपर्यंत फसाविलें. असो. हा तिचा कांहीं अपराध नाहीं, माझाच आहे; कारण, मी परमात्म्यापासून पराङ्मुख होऊन माझ्या मतानेंच तिला लगटलों आणि त्यामुळें स्वतः अमूर्तिमान असून नानामूर्तिमध्यें मला रहावें लागलें. याप्रमाणें

स्वभावतः मला स्वरूप नसून ममत्व धरल्यानें मला रूप धरावें लागून याप्रमाणें माझे पिंडवडे होऊन मला दुःख भोगावें लागलें. प्रकृतीच्या विकारांसंबंधानें ममत्व धरल्यानें मला नाना जातींमध्यें जन्म घ्यावे लागले व खरोखर ममत्वापासून अलग असणाऱ्या माझ्या ठिकाणीं हें ममत्व आल्यानें किती या निरनिराळ्या योनींमध्यें बुद्धि जाऊन नानाप्रकारचीं वाईट कर्में माझ्या हातून घडलीं. अहंकारयुक्त अशा तिच्याशीं मला आतां कांहीं कर्तव्य नाहीं; कारण आपल्याला अनेक प्रकारें निरनिराळ्या रीतीनें प्रकट करून ही फिरून फिरून मला जखडण्याला प्रयत्न करते. हा मी आतां जागा झालों आहें. यापुढें ममत्व व अहंकार मीं सोडून दिला आहे. हिच्यासंबंधानें नेहमीं माझ्याठिकाणीं असणारें व अहंकारांनीं बनलेलें हिच्यासंबंधाचें ममत्व, त्याचप्रमाणें प्रत्यक्ष हिला टाकून देऊन निरायम अशा परमात्म्याचा मी आश्रय करीन. त्याच्याशीं मी साम्यतेला जाऊन मिळेन. या अचेतन प्रकृतीशीं कधीं मिळणार नाहीं. त्याच्याशीं मिळाल्यानें माझें कल्याण होणार आहे. हिच्याशीं माझा सारखेपणा बिलकुल नाहीं. याप्रमाणें पंचविसावा जीवात्मा जेव्हां परमात्म्याला ओळखूं लागतो तेव्हां क्षराला सोडून कल्याणभूत अशा अक्षराला जाऊन मिळतो. स्वभावतः निर्गुण व खरोखर अव्यक्त असा असून हा जीव व्यक्त व सगुण दिसूं लागतो; जेव्हां निर्गुण व व्यक्ताचें मूल अशाला हा पाहूं लागतो, तेव्हां हा तदाकार बनून जातो. अक्षर व क्षर यांचा हा अनुभव आहे. आतां सूक्ष्म, शुद्ध व निश्चित असें ज्ञान कशानें येतें तें सांगतों ऐक. सांख्यशास्त्र व योगशास्त्र हीं एक आहेत, तरी सांख्यांचें ज्ञान एकदम मनावर उजेड पाडणारें असून शिष्यांचें हित व्हावें ह्मणून तें स्पष्ट रीतीनें सांगितलें आहे. हें शास्त्र फार विस्तृत आहे. या शास्त्रासंबंधानें त्याचप्रमाणें वेदासंबंधानें योग्यांना मोठा आदर आहे. या सांख्यशास्त्रामध्यें पंचविसाव्या पलीकडे तत्त्व मानलें गेलें नाहीं. योगशास्त्रामध्यें सांगितलें आहे कीं, ज्ञानाचें सार जें ब्रह्म याला केवळ अज्ञानानें जीवस्वरूप येतें. याप्रमाणें योगशास्त्रांत जीव व ब्रह्म या दोघांसंबंधानें सांगितलें आहे.'

---

## २११ परमात्मा व जीवात्मा.

## (१२-३०८)

वसिष्ठ ह्मणाले, 'आतां बुद्ध व अबुद्ध यासंबंधानें सांगतों ऐक. मायेमुळें नानारूपें धरल्यानें परमात्मा जीव बनून या सर्व निरनिराळ्या स्वरूपांना खरें समजूं लागतो. व अशा निरनिराळ्या स्वरूपाशीं स्वतःचें ऐक्य समजूं लागल्यानें परमात्म्याला ओळखीनासा होतो; कारण, सत्वरजादि गुण धरून याप्रमाणें हा निरनिराळेपणाचा भाव उत्पन्न करून स्वतःमध्यें मी कर्ता, मी भोक्ता इत्यादि भाव उत्पन्न करीत असतो. सतत हा आपल्या आपणच विकार पावत रहातो. व अव्यक्ताचें ज्ञान होणें याला शक्य असल्यानें याला बुद्धिमान असें नांव आहे. अव्यक्त प्रकृतीला, निर्गुण अशा ब्रह्माची तें सगुणामध्यें व्यक्त झालें असतांही कधीं ओळख पटत नाहीं; ह्मणून प्रकृतीला अबुद्ध असें ह्मटलें आहे. श्रुतीमध्यें असें ह्मटलें आहे कीं, जर कदाचित् या प्रकृतीला पंचविसावा जीवात्मा ओळखतां आला तर ते वेळीं ही त्याच्याशीं सरूप होऊन एकत्व पावते; तथापि जो परमात्मा याहून वेगळा असून याच्याशीं त्याचा बिलकुल संबंध नाहीं व जो पंचविसाव्याच्या पलीकडचा आहे, त्याला प्रकृति कधीं ओळखूं शकत नाहीं. याप्रमाणें जो व्यक्त नाहीं व स्वरूपामध्यें जो विकारात्मक नाहीं अशा जीवाचा प्रकृतीशीं संबंध जडल्यानें त्यालाही अबुद्ध असें ह्मणण्यांत येतें व याला अव्यक्ताला ओळखतां येते ह्मणून बुद्धचमान असेंही ह्मणण्यांत येतें. तथापि याला शुद्ध व द्वंद्वाच्या पलीकडच्या ज्ञानस्वरूपी अमेय व शाश्वत अशा परमात्म्याची सहजासहज ओळख पटत नाहीं; तथापि या सविसाव्या परमात्म्याला जीव व प्रकृति यांना ओळखतां येतें. जें अव्यक्त असून स्वभावानें दृश्यादृश्याशीं मिळून आहे व जें जगामध्यें स्वतंत्र तत्त्व आहे त्या ब्रह्माला केवळ विद्वान लोक ओळखूं शकतात. जेवेळीं जीव आपल्याला तो खरो-

स्वर आहे याहून निराळा, ह्मणजे लठ्ठ, पातळ, गोरा, काळा, ब्राह्मण, शूद्र असा समजूं लागतो तेव्हांच तो परमात्म्याला, स्वतःला व ज्या प्रकृतीशीं हा मिळाला आहे त्या प्रकृतीला ओळखीनासा होतो; परंतु जेव्हां आपल्याहून प्रकृति निराळी आहे अशा रीतीनें तिला तो ओळखूं लागतो तेव्हां त्याचें स्वरूप त्याला प्राप्त होऊन शुद्ध व निर्मल अशी श्रेष्ठ बुद्धि त्याला आली असें समजावें व जेव्हेळीं अशी चांगली बुद्धि येते तेव्हां सव्विसाव्या ब्रह्माचें शुद्धज्ञान त्याला येतें. नंतर तो उत्पत्ति व नाश या गुणांनीं युक्त अशा अव्यक्त प्रकृतीला झुगारून देतो. जेव्हां सत्व, रज व तम या गुणांच्या विकारांना वश व अबुद्ध अशा या प्रकृतीला तो ओळखतो तेव्हां तो स्वतः निर्गुण बनतो व ही अव्यक्त प्रकृति आपल्याहून निराळी आहे असें ओळखल्यानें परमात्म्याचें स्वरूप त्याला येतें व याप्रमाणें सत्व रजादिकांच्या गुणांपासून वेगळा होऊन परमात्म्याशीं मिळाल्यानें तो त्याच्याशीं तादात्म्य पावतो. या परमात्म्याला तत्त्व व निस्तत्त्व अशा दोन्ही प्रकारांनीं समजतात. हा अजर व अमर आहे. जरी व्यक्त अशा तत्त्वांनीं बनलेलें हें शरीर त्या परमात्म्याला आश्रयभूत आहे तरी त्यामधले गुण याच्यामध्यें येत नाहींत. जीवासह एकंदर पंचवीस तत्त्वें असून यांपैकीं एक तत्त्वही याच्यामध्यें नाहीं. हा बुद्ध असून यांच्या पलीकडे आहे. मी ब्रह्म आहें हें जें ज्ञानाचें लक्षण तें सुद्धां तो लवकरच सोडून देतो. जेव्हां जीव अजरामर असा सव्विसावा परमात्मा आपण आहों असें समजूं लागतो तेव्हां तो त्याच्याशीं सारखेपणाला मिळतो. याप्रमाणें या सव्विसाव्याकडून जागा झाला असतांही जीव अज्ञानाच्या ताब्यांत राहिल्यानें श्रुतींत व सांख्यशास्त्रामध्यें सांगितलेलें नानात्व त्याला येतें. प्रकृतीशीं मिळालेला जीव जेव्हां आपला निराळेपणा गमावतो तेव्हां त्याचें नानात्व जाऊन तो एक बनतो. जेव्हां सुखदुःखांशीं जखडलेला अहंभावयुक्त हा जीव ज्ञानाच्या पलीकडच्या परमात्म्याशीं एकत्वाला पावतो तेव्हां तो पापपुण्यापासून मुक्त होतो. सर्व संगापासून मुक्त, अज व ईश्वर अशा परमात्म्याशीं मिळून जाऊन त्याला जेव्हां हा पूर्णपणें ओळखूं लागतो तेव्हां हा ऐश्वर्यसंपन्न होऊन अव्यक्त अशा प्रकृतीला दूर झुगारून देतो. जेव्हां हा त्या सव्विसाव्याला ओळखूं लागतो तेव्हां चोवीस तत्त्वें त्याला असार दिसूं लागतात. याप्रमाणें अव्यक्त प्रकृति, जीव व परमात्मा यांचीं स्वरूपें आहेत. श्रुतींच्या आधारानें याप्रमाणें एकत्व व नानात्व ओळखलें पाहिजे. उंबर व त्यांतील किडा किंवा मासा व पाणी या उदाहरणांवरून जीवात्मा व परमात्मा यांचा भेद लक्षांत येतो. यांचें नानात्व व एकत्व याप्रमाणें ओळखणें हेंच स्वतः प्रकृतीहून निराळें आहों असें समजणें किंवा मुक्ती पावणें आहे. शरीरामध्यें असणाऱ्या पंचविसाव्या जीवात्म्याला प्रकृति व बुद्धीच्या पलीकडचा परमात्मा यांची ओळख पटवून देऊन मुक्त करावें हाच कायतो त्याला मुक्त करण्याचा मार्ग आहे. हा रहात असलेल्या झुजर्वी क्षेत्राहून हा निराळा असूनही याचा त्याच्याशीं संबंध जडल्यानें त्याचा स्वभाव याच्या अंगीं येतो. शुद्धाशीं संबंध जडून हा शुद्ध होतो. बुद्धाशीं संबंध जडून बुद्ध होतो. मुक्ताशीं संबंध जडून मुक्त होतो. विरक्ताशीं संबंध जडून विरक्त होतो. मुक्तीसाठीं झटणाऱ्याशीं संबंध ठेवून हा तशा प्रकारचा होतो. शुद्धकर्म करणाराशीं संबंध ठेवून हा तसा होतो, शुद्ध अंतःकरणाच्या मनुष्याशीं संबंध ठेवून हा शुद्ध अंतःकरणाचा होतो व स्वतंत्र अंतःकरणाच्या मनुष्याशीं संबंध ठेवून स्वतंत्र अंतःकरणाचा होतो. याप्रमाणें शाश्वत, विमल व आद्य अशा ब्रह्माची माहिती आहे. आत्म्याला जागृत करणारी ही माहिती वेदज्ञान असून जो नम्र आहे व ब्रह्मज्ञान करून घेण्याची ज्याला इच्छा आहे अशा मनुष्याला द्यावें. जो खोटा आहे, कपटी आहे, दुष्ट आहे, दुबळा आहे, व ज्याची बुद्धि वांकडी आहे किंवा जो विद्वानाचा हेवा करणारा आहे किंवा दुसऱ्याला ताप देणारा आहे, अशाला हें ज्ञान देऊं नये. ज्याला श्रद्धा आहे, जो गुणवान आहे, जो कधीं कोणासंबंधानें वाईट बोलत नाहीं, शुद्ध हेतु धरून ज्यानें तपाकडे लक्ष दिलें आहे, जो ज्ञानी व विद्वान आहे, वेदांत सांगितल्याप्रमाणें जो यज्ञयागादिक कर्में करीत आहे, जो क्षमाशील, दयावान, सर्वांचें चांगलें

करणारा, एकांतशील व शास्त्रांत सांगितलेल्या सर्व क्रिया करणारा आहे, भांडण तंटा ज्याला आवडत नाहीं व जो आत्मनिग्रही व शांत आहे, अशाला हें ब्रह्मज्ञान सांगावें. ज्याच्या अंगांत हे गुण नाहींत त्याला हें कांहीं सांगूं नये. अपात्राला हें ज्ञान दिलें असतां त्यापासून कांहीं फायदा किंवा चांगलें फळ मिळावयाचें नाहीं. ज्यानें व्रत, नियम पाळले नाहींत अशाला, त्यानें रत्नांनीं व पैशांनीं भरलेली सबंध पृथ्वी जरी मोबदला दिली तरी हें ज्ञान सांगूं नये. प्रत्यक्ष हिरण्यगर्भापासून प्राप्त झालेलें हें ज्ञान जन्म, मरण, भय व शोक, या सर्वांना दूर करून मंगल देणारें आहे. हें ज्ञानच मोक्षवेत्त्यांना आधारभूत आहे.'

'भीष्म ह्मणाले, 'ह्याप्रमाणें हें ब्रह्मज्ञान वसिष्ठांनीं करालाला सांगितलें. हें ज्ञान झाल्यानें जीवाला पुनर्जन्म नाहीं. अजरामर अशा परमात्म्याला न ओळखल्यानेंच जीवाला या जगांत फिरून फिरून यावें लागतें. जो मनुष्य क्षर व अक्षर यांना ओळखतो तो भीतीपासून मुक्त होतो. ज्याला हें ज्ञान नाहीं त्यालाच काय ती याची भीति. ब्रह्माच्या अज्ञानामुळेंच मूर्खांना या जगांत जन्ममरण. देह ठेविल्यावर ज्यांचा शेवट मरणामध्यें आहे, अशा हजारों योनींमध्यें, कधीं देवांमध्यें, कधीं मनुष्यांमध्यें, कधीं नीचयोनींमध्यें अशा प्रकारें त्याला फिरून फिरून जन्म घ्यावा लागतो; जर या क्रमामध्यें तो अज्ञानसागरांतून पार पडला तर तो जन्ममरणांतून सुटून ब्रह्मस्वरूप होतो. भवसागर हा फार भयंकर आहे, तो अगाध असून त्याचा तळ दिसत नाहीं. दिवसानुदिवस प्राणिमात्र यांत पडून बुडतांना दिसतात.'

---

## २१२ धर्मकाम विचार (१२-३०९)

'कोणी एक वसुमान नांवाचा जनकाच्या कुळांतील राजा निर्जन वनामध्यें मृगया करीत असतांना भृगुवंशांतील एक ऋषी त्याच्या दृष्टीस पडले. त्यांच्या पायावर डोकें ठेवून बसल्यावर त्यांच्या परवानगीनें, 'वासनेच्या तावडींत गेलेल्या मनुष्याला या नश्वर देहामध्यें काय करणें इहपर कल्याणकारक आहे,' ह्मणून विचारलें असतां ऋषी ह्मणाले, 'जर इहपर आपल्या मनाप्रमाणें घडावें अशी तुझी इच्छा असेल तर आत्मनिग्रहानें दुसऱ्याला न आवडेल अशी गोष्ट करूं नकोस. भल्यांना धर्म हाच हितकारक असून धर्म हाच त्यांचा आश्रय आहे. सर्व चराचरात्मक त्रैलोक्याची उत्पत्ति धर्मापासून आहे. वासनेच्या मागें लागून मनुष्याच्या वासनेची तृप्ति कधीं होत नाहीं? मनुष्याला मध तेवढा दिसत असतो; पण खड्डा त्याच्या लक्षांत येत नाहीं. ज्याप्रमाणें ज्ञानाच्या फळाची इच्छा असणाराला ज्ञानाची ओळख करून घ्यावी लागते, त्याचप्रमाणें धर्माचें फळ हवें असणाराला धर्माचा परिचय करून घेतला पाहिजे. जर पापी मनुष्य धर्मासाठीं विमल व शुद्ध कर्म करण्याला झटेल तर त्याला त्याचें फल मिळणें फार सायासाचें आहे. तेंच पुण्यवान मनुष्य त्यासाठीं खटपट करील तर दुष्कर असें फल सुद्धां त्याला सहज मिळेल; जर मनुष्य रानांत रहात असून सुद्धां गांवांत राहिल्याप्रमाणें सर्व सुखांचा यथेष्ट उपभोग घेत राहील तर त्याला गांवांत रहाणाराप्रमाणेंच समजलें पाहिजे. तेंच एखादा मनुष्य गांवांत रहात असून वनामध्यें रहाणाऱ्याप्रमाणें वागेल तर त्याला वनांतला तपस्वीच समजावें. प्रवृत्त्यात्मक किंवा निवृत्त्यात्मक कर्मामध्यें पुण्यापुण्य जाणून मनुष्यानें एकाग्रतेनें कायावाचामनेंकरून धर्माचरणाकडे लक्ष द्यावें. देशकाल पाहून व्रत व शौच यांनीं शुद्ध होऊन भल्यांना कांकूं न करतां चांगलें दान करावें. खऱ्या मार्गानें पैसा मिळवून मनुष्यानें सत्पात्रीं राग सोडून तो दान करावा व दान केल्यावर त्याबद्दल पश्चात्ताप होऊं देऊं नये; किंवा त्याचा आपल्या तोंडानें दांडोरा पिटवीत राहूं नये. दयावान, शुद्ध, इंद्रियनिग्रही, सत्यवक्ता, सरळ व शुद्ध कुळांत जन्मलेला असा मनुष्य दानाला पात्र आहे. जिला एकच नवरा असून तो व ती एकाच जातीची असतात, अशा आईपासून ज्याचा जन्म झाला आहे तो मनुष्य पवित्र समजला आहे. खरोखर तीन वेद कळत असून जो विद्वान आहे व यजनयाजनादिक सहा कर्तव्यें ज्याला कळतात, असा ब्राह्मण दानाला पात्र आहे. कर्ता, देश व काल यांवरून प्र-

संगीं धर्म अधर्म होतो व अधर्म धर्म होतो. अंगावरील चिखलाप्रमाणें थोडें पाप थोड्या श्रमानें व पुष्कळ पुष्कळ श्रमानें दूर केलें जातें. जुलाब घेतल्यावर ज्याप्रमाणें तूप खाणें शरीराला हितावह आहे त्याप्रमाणें पाप धुवून काढून जर मनुष्य धर्माचरणाकडे प्रवृत्ति ठेवील तर त्या धर्माचरणाचें फल परलोकीं फार सुखकर होतें. सर्व भूतमात्रांच्या मनामध्यें बरे व वाईट विचार असतात. मनाला वाईट विचारांपासून परतवून चांगल्यांकडे लावावें. मनुष्याला सदा आपल्या वर्णाच्या क्रियासबंधानें आदर असावा. आणि त्यानें ज्याच्या योगानें स्वधर्मामध्यें प्रीति उत्पन्न होईल अशा रीतीनें वागावें, मनुष्यानें धैर्य धरून शहाणे व शांत असावें. त्यानें शहाण्याप्रमाणें वागावें. जो मनुष्य भल्यांच्या सहवासात असतो तो आपल्या तेजानें इहपर लोकीं कल्याणप्रद अशीं साधनें मिळवूं शकतो. महाभिष नांवाचा राजर्षि अंगांत धृति नसल्यानें स्वर्गापासून खालीं आला; तोच ययाती त्याचें पुण्य सरलें असतांही फिरून धृतीमुळें उत्तम लोकाला गेला. धर्माचरण करणाऱ्या तपस्वी विद्वानांच्या शुश्रूषेनें मनुष्याला चांगली बुद्धि येते. याप्रमाणें ऋषींनीं सांगितल्यावरून वसुमानानें कामापासून मन काढून घेऊन त्याला धर्माकडे लाविलें.'

---

## २१३ देवराती व याज्ञवल्क्य यांचा संवाद. (१२.३१०–३१८)

'धर्माधर्म, जन्ममृत्यु, पापपुण्य किंवा संशय या सर्वांपासून अलग असून सदा कल्याणप्रद अभयदायक, सदा अविनाशी, अव्यय, शुद्ध व आयासरहित असें काय आहे; ह्मणून युधिष्ठिरानें विचारलें असतां भीष्मांनीं पुढील याज्ञवल्क्य व जनकाच्या कुलांतील देवराती यांचा संवाद त्याला सांगितला. 'किती प्रकारचीं इंद्रियें आहेत, प्रकृती किती प्रकारच्या आहेत, अव्यक्त श्रेष्ठ असें ब्रह्म काय आहे, त्याहून श्रेष्ठ काय आहे, जन्म व मृत्यु काय, कालाची संख्या किती आहे, हें सर्व आपण मला सांगावें, आपल्या कृपेला मी आ पसरून बसलों आहें,' असें देवराती ह्मणाला असतां याज्ञवल्क्य ह्मणालें, 'राजा, योगाकडे लागलेले व विशेषेंकरून सांख्यमतानुयायी यांचें हें जें श्रेष्ठ ज्ञान तूं मला विचारीत आहेस त्यासंबंधानें सांगतों ऐक. कोणी विचारिलें असतां त्याला उत्तर देणें हा सनातन धर्म आहे. अव्यक्त प्रकृती, महान, अहंकार, व पृथ्वी, वायु, आकाश, आप, ज्योति या आठांना प्रकृति हें नांव असून कान, त्वचा, डोळा, जीभ, नाक त्याचप्रमाणें शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध, वाणी, हात, पाय, उपस्थ, मेंढ़ हे सोळा त्यांचे विकार आहेत. यामध्यें शब्दापासून पुढच्या दहांची उत्पत्ति पंचतन्मात्रांमध्यें असून त्यांना विशेष ही संज्ञा आहे. पांच ज्ञानेंद्रियांना सविशेष अशी संज्ञा आहे. अध्यात्मवेत्ते मन ही या विकारांमध्यें सोळावें समजतात. अव्यक्त प्रकृतीपासून प्रथम महदात्मा उत्पन्न होतो, व ही या प्रकृतीसंबंधानें पहिली उत्पत्ति समजली आहे. महतापासून अहंकार उत्पन्न होतो ही दुसरी सृष्टि. अहंकारापासून पंचतन्मात्रांचे गुण आहेत अशी मनरूपी तिसरी सृष्टि उत्पन्न झाली. मनापासून पंचमहाभूतें उत्पन्न झालीं ही चवथी सृष्टि होय. हिला मानसिक सृष्टि ह्मणतात. शब्द, स्पर्श. रूप, रस, गंध यांची या पंचमहाभूतांपासून उत्पत्ति असून यांना पांचवी सृष्टि ह्मणतात. कान, त्वचा, डोळा, जीभ व नाक ही सहावी सृष्टि होय. नंतर कर्मेंद्रियें ही सातवी सृष्टि उत्पन्न होते. यांना इंद्रियसंबंधी सृष्टि अशी संज्ञा आहे. नंतर वर वाहणारा प्राण व इकडे तिकडे वहाणारे इतर वायु यांची आठवी उत्पत्ति होते. याला आर्जवक ह्मटलें आहे. नंतर खालून निरनिराळ्या भागांत वहाणारे समान, उदान, व व्यान त्याचप्रमाणें खालीं वहाणारा अपान यांची उत्पत्ति आहे. यांनाही आर्जवक ह्मटलें असून ही नववी उत्पत्ति आहे. याप्रमाणें ह्या नऊ प्रकारच्या उत्पत्ति व चोवीस प्रकारचीं तत्त्वें शास्त्रांत सांगितल्याप्रमाणें आहेत.आतां कालसंख्येसंबंधानें सांगतों ऐक.'

'अव्यक्त अशा परमात्म्याचा एक दिवस हजार कल्पांचा आहे व त्याची रात्रही तेवढीच आहे. त्याची रात्र संपल्यावर त्यानें जागा होऊन प्रथम औषधी व वनस्पति उत्पन्न केल्या व त्यावरच प्राणिमात्र रहातात.; नंतर त्यानें ब्रह्मदेवांना सोन्याच्या

अंड्यापासून उत्पन्न केलें. सर्व उत्पन्न केलेल्या वस्तूंची उत्पन्न करणारी मूर्ति हे ब्रह्मदेवच आहेत. एक संवंध वर्षभर या सोन्याच्या अंड्यामध्यें राहून महातपस्वी ब्रह्मदेव ज्यांना प्रजापति असेंही नांव आहे ते त्यांतून बाहेर आले व त्यांनीं सर्व पृथ्वी व आकाश निर्माण केलें. वेदांत असें सांगितलें आहे कीं, नंतर त्यांनीं आकाश या दोहोंच्या मध्यें ठेवून या दोघांना विभक्त केलें, सात हजार पांचशें कल्प हा ब्रह्मदेवांचा दिवस आहे. त्यांची रात्र तितकीच आहे. पुढें या महत्स्वरूपी ब्रह्मदेवांनीं दिव्यात्मक अहंकाररूपी भूत निर्माण केलें. या पंचमहाभूतांपासून मूर्तिमान देह उत्पन्न करण्यापूर्वी मन, बुद्धि, अहंकार व चित्त असे पितरांचे पितर निर्माण केले. पितृसंज्ञक पंचमहाभूतांपासून पंच ज्ञानेंद्रियें व अंतःकरणचतुष्टय हीं उत्पन्न झालीं आहेत. सर्व चराचर भूतमात्रांनीं भरलेलें हें विश्व पंचमहाभूतात्मक आहे. अहंकारानें या सूक्ष्म पंचभूतांपासून पृथ्वी, आकाश, वायु, आप व तेज यांना उत्पन्न केलें. यांना विशेष अशी संज्ञा असून पंचमहाभूतांमध्यें हीं आहेत. ज्यापासून तिसरी उत्पत्ति होते त्या ह्या अहंकाराची कालसंख्या पांच हजार कल्पांचा दिवस व तेवढीच रात्रही आहे. शब्द, स्पर्श रूप, रस, गंध या पांचांना विशेष ही संज्ञा असून ते या पंचमहाभूतांमध्यें आहेत. या पंचमहाभूतांनीं भरलेले सर्व प्राणिमात्र यांना एकमेकांचा सहवास हवासा वाटतो. एकमेकांच्या हिताविषयीं ते दक्ष असतात. प्रसंगीं एकमेकांवर वरचढ करूं पाहतात, हेवा करतात व मारक व अव्यय अशा गुणांच्या नादीं लागून एकमेकांना मारावयास निघतात, आणि त्यामुळें ह्याच जगांत निरनिराळ्या नीच योनींमध्यें जन्म घेत फिरतात. ह्या भूतमात्रांची कालसंख्या तीन कल्पांचा दिवस व तीन कल्पांची रात्र आहे. इंद्रियाबरोबर राहून मन सर्व वस्तूंच्या ठिकाणीं फिरत रहातें. या इंद्रियांच्या द्वारें मनच ज्ञान करून घेतें. डोळ्यांना निरनिराळीं रूपें मनाच्या योगानें दिसतात, डोळ्यांच्या योगानें दिसत नाहींत. मन व्याकुळ झालें असतां डोळा पहात असला तरी त्याला कांहीं दिसत नाहीं. त्याचप्रमाणें सर्व इंद्रियांना त्या त्या इंद्रियाचें ज्ञान आहे असें ह्मणण्यांत येतें; परंतु वास्तविक इंद्रियांना तें तें ज्ञान होत नसून मनाला होतें; कारण, ज्या वेळेला मनाची क्रिया बंद पडते त्या वेळेला इंद्रियांच्या क्रियाही बंद पडतात; ह्मणून इंद्रियव्यापार बंद पडणें ह्मणजे वास्तविक मनाचा व्यापार बंद पडण्यासारखेंच आहे. याप्रमाणें इंद्रियें मनाच्या ताब्यांत असून मन हें त्यांचा स्वामी मानलें आहे. याप्रमाणें हीं वीस भूतें आहेत.'

'याप्रमाणें सृष्टीची उत्पत्ति व कालसंख्या असून आतां क्रमानें शाश्वत व अक्षर असे ब्रह्मदेव सृष्टि वरचेवर उत्पन्न करून तिचा संहार कसा करितात तें सांगतों ऐक. यांचा दिवस सरून रात्र आल्यावर झोंप घेण्याचें मनांत येऊन अव्यक्त असा हा भगवान अहंकारांनीं युक्त अशा महारुद्राला या सृष्टीचा संहार करण्याला सांगतो, तेव्हां यांच्या सांगण्यावरून हजारों किरणांनीं युक्त होऊन पेट घेतलेल्या अग्नीप्रमाणें बारा आदित्यांमध्यें स्वतःला विभागून घेऊन आपल्या तेजानें जरायुज, अंडज, स्वेदज व उद्भिज अशा चार प्रकारच्या सृष्टीला हा महारुद्र जाळून टाकतो. तेव्हां डोळ्याची पापणी लवण्याच्या इतक्या अवधींत सर्व स्थावरजंगमाचा नाश होऊन ही पृथ्वी कांसवाच्या पाठीसारखी होते, याप्रमाणें अतुल पराक्रमी रुद्र ही संपूर्ण पृथ्वी जाळून काढून मग तो ती मोठ्या वेगाचा प्रवाह असलेल्या पाण्यानें भरून काढतो; नंतर तो कालाग्नि उत्पन्न करतो व तो अग्नि तें पाणी शोषून घेतो. याप्रमाणें पाणी नाहींसें होऊन मोठा अग्नि जळत राहिला असतां जोराचा वारा आपल्या आठ स्वरूपांमध्यें उत्पन्न होऊन तो त्या सात ज्वाळांनीं युक्त अशा जळत राहिलेल्या अग्नीला गिळून टाकतो. याप्रमाणें त्याला गिळून तो महावेगवान खालीं वर दश दिशांला जोरानें वहात राहिला असतां भयंकर व अफाट आकाश त्याला आपल्यामध्यें गडप करून टाकतें. त्या आकाशालाही मन मोठ्या मजेनें गिळून टाकतें. नंतर सर्व प्राणिमात्रांचा आत्मा भूत, वर्तमान, भविष्य जाणणारा प्रजापति अहंकार त्याला गिळून टाकतो, व यालाही सर्व प्राणिमात्रांचा स्वामी शंभु गिळून टाक-

तो. हा शंभु अणिमा, लघिमा इत्यादि योगसिद्धींनीं युक्त असून त्याचे हात, पाय, डोळे, मस्तक, तोंड व कान चारी दिशांला भरून आहेत. सर्व प्राणिमात्रांना व्यापून तो राहिला आहे. सर्व भूतमात्रांचा तो हृदयभूत असून आंगठ्याच्या पेऱ्याएवढा तो आहे. जगताचा स्वामी अनंत परमात्मा याप्रमाणें सर्व जग गिळून टाकून अविनाशी व एकटा असा निर्दोष रहातो. हा भूत, वर्तमान, भविष्य यांचा उत्पादक आहे. आतां तुला अध्यात्म, अधिभूत व अधिदैव यासंबंधानें सांगतों ऐक.'

'दोन पायांना अध्यात्म संज्ञा असून चालण्याच्या क्रियेला अधिभूत ह्मणतात व विष्णू याचें अधिदैवत आहे. गुद याला अध्यात्म संज्ञा असून मलविसर्जन अधिभूत आहे व मित्र अधिदैवत आहे. जननेंद्रिय अध्यात्म असून त्यासंबंधी जो आनंद तो अधिभूत आहे व प्रजापति त्याचें अधिदैवत आहे. हात अध्यात्म असून त्याच्या क्रिया अधिभूत व इंद्र त्याचें अधिदैवत आहे. वाणी अध्यात्म असून तिच्याबाटें निघणारे शद्ब अधिभूत व अग्नि अधिदैवत आहे. डोळा अध्यात्म असून रूप अधिभूत आहे व सूर्य त्याचें अधिदैवत आहे. कान अध्यात्म असून शद्ब अधिभूत आहे व दिशा त्याचें अधिदैवत आहे. जीभ अध्यात्म असून रस अधिभूत आहे व जल त्याचें अधिदैवत आहे. नाक अध्यात्म असून गंध त्याचें अधिभूत व पृथ्वी अधिदैवत आहे. त्वचा अध्यात्म असून स्पर्श तिचा अधिभूत आहे व वायु अधिदैवत आहे. मन अध्यात्म असून मनन करण्याचा विषय अधिभूत व चंद्रमा अधिदैवत आहे. अहंकार अध्यात्म असून अभिमान अधिभूत आहे व बुद्धि अधिदैवत आहे. बुद्धि अध्यात्म असून जाणण्याची वस्तु अधिभूत व क्षेत्रज्ञ अधिदैवत आहे. ह्याप्रमाणें व्यक्तिशः ईश्वराच्या विभूती आरंभाला, मध्यें व अखेरीला असतात. प्रकृति आपल्या मनाप्रमाणें सहज मजेखातर विकार पावून हजारों विकारात्मक गुण उत्पन्न करिते. ज्याप्रमाणें मनुष्याला एका दिव्यापासून हजारों दिवे लावतां येतात; त्याचप्रमाणें प्रकृति विकार पावून स्वतःपासून पुरुषाच्या सत्व, रज, तम या गुणांनीं हजारों विकारात्मक गुण निर्माण करिते. सत्व, आनंद, वैभव, प्रीति, इंद्रियांची प्रसन्नता, सुख, शुद्धि, आरोग्य, संतोष श्रद्धाळूपणा, औदार्य, दया, क्षमा, धृति, अहिंसा, समता, सत्य, आनृण्य, मार्दव, भीड, अचापल, शौच, सरळपणा, आचार, अलौल्य, हृदयाची स्वस्थता, बरी वाईट गोष्ट, किंवा केलेल्या गोष्टी याचा विस्फोट न करणें, कोणी दिलें असतां घेणें, निर्लोभता, दुसऱ्याच्या हितासंबंधानें दक्षता व सर्व भूतमात्रांवर दया ह्या गोष्टी सत्वगुणापासून येतात. रूप व ऐश्वर्य या संबंधानें अभिमान, तंटा, देण्याची वासना नसणें, निर्दयपणा, सुख व दुःख भोगणें, दुसऱ्याची निंदा करण्यामध्यें गोडी, वादविवादांत मन घालीत बसणें, अहंकार, दुसऱ्या संबंधानें अनादर, चिंता, वैर करणें, मनाचा संताप, दुसऱ्याला लुबाडणें, निर्लज्जपणा, वांकड्या वाटेला जाणें, फूट पाडणें, निष्ठुरपणा धरणें, काम, क्रोध, मद, दर्प, द्वेष व परनिंदा हे गुण रजोगुणापासून येतात. मोह स्मृतिभ्रंश, अंधार, मरणरूपी पूर्ण अंधार व क्रोधरूपी अंधार, खाणें वगैरे गोष्टींमध्यें गोडी, खाण्यापिण्यांत कधीं समाधानी न होणें, गंध, वस्त्र, खेळ, आसन, दिवसां निजणें, लोकांची निंदा करणें, दुर्लक्षपणानें कामें करण्याची आवड, गाणें वजावणें, नाच इत्यादिकांवर अज्ञानानें श्रद्धा, धर्मासंबंधानें द्वेष, हे तामस गुण होत.'

'हे प्रकृतीचे मुख्य तीन गुण असून सर्व जगांतील वस्तूंमध्यें हे गुण त्यांना चिकटून आहेत. सहा योगगुणांनीं संपन्न असा अव्यक्त पुरुष हजारों रूपांतरें करून त्यांमध्यें हे तीन गुण धरीत असतो. सत्वगुणाला उच्च, रजोगुणाला मध्यम व तमोगुणाला नीच, पदप्राप्ति अध्यात्म शास्त्रांत सांगितली आहे. केवळ पुण्यानें उच्चपद मिळतें. पापपुण्याच्या मिसळीनें मनुष्ययोनी मिळते व अधर्मानें नीच योनी मिळते. या तीन गुणांचीं निरनिराळ्या प्रकारचीं मिश्रणें दिसून येतात; कधीं कधीं सत्वामध्यें रज दिसून येतो, कधीं रजामध्यें तम दिसून येतो, कधीं तमाशीं सत्वगुण मिसळलेला दिसतो, कधीं कधीं हे तिन्ही गुण एकत्र सारख्या प्रमाणांत मिसळलेले दिसतात, तेव्हां त्यापासून अव्यक्त (प्रकृति) उत्पन्न होते. जेव्हां अव्यक्त (पुरुष) सत्वगुणांनीं युक्त असतो तेव्हां मनुष्य देवलोकाला जा-

तो. रज व सत्व या दोन गुणांनीं युक्त असतां त्याला मनुष्यत्व येतें आणि रज व तम या गुणांनीं युक्त असतां त्याला पशुपक्ष्यादि नीच योनींमध्यें जन्म घ्यावा लागतो. सत्व, रज व तम या तिन्ही गुणांनीं युक्त असणाराला मनुष्ययोनींत जन्म घ्यावा लागतो. पापपुण्यांपासून अलग अशा महात्म्यांना शाश्वत, अव्यक्त, अक्षय, अमृत असें स्थान मिळतें. हें केवळ ज्ञान्यांना मिळणारें असून निर्दोष व अढळ आहे. इंद्रियज्ञानाच्या पलीकडे हें आहे. याला उत्पादक कोणी नसून जन्म, मृत्यु, अज्ञान यांना दूर करणारें हें आहे. अव्यक्त पुरुषांमध्यें रहाणाऱ्या परमात्म्याचें स्वरूप असें आहे कीं, तो प्रकृतीमध्यें रहात असतांही तिचा स्वभाव त्याला कांहीं न लागतां तो स्वस्वरूपामध्यें असतो. प्रकृति अचेतन व अबुद्धिमान असून जेव्हां पुरुषाचें तिच्या ठिकाणीं अधिष्ठान असेल तेव्हांच तिला उत्पत्ति व संहार करतां येतात. ' जनक ह्मणाला, प्रकृति व पुरुष दोघे अनादि असून त्यांना रूप नाहीं, त्यांचा नाश नाहीं, दोन्हीही कल्पनाशक्तीच्या बाहेर आहेत असें असून त्यांपैकीं एकाला अचेतन व अबुद्धिमान व दुसऱ्याला सचेतन व बुद्धिमान असें कसें ह्मणतां येईल? तसेंच दुसऱ्याला क्षेत्रज्ञ असें कां ह्मटलें आहे? महाराज, मोक्षधर्म पूर्णपणें समजून घेण्याची माझी इच्छा आहे. तेव्हां जीवात्म्याची प्रकृतीशीं एकता व वेगळेपणा या संबंधानें, शरीरामध्यें असणाऱ्या देवतांची व प्राणी मेल्यावर कोठें जातात याची, त्याचप्रमाणें कालगतीनें अखेरीला ते ज्या ठिकाणीं जाऊन मिळतात त्याची, तसेंच योगशास्त्र व सांख्यशास्त्र यांची मला निरनिराळी माहिती द्या. त्याचप्रमाणें मरणाच्या लक्षणासंबंधानेंही मला माहिती द्या; कारण हे सर्व विषय हातांतल्या आवळ्याप्रमाणें आपल्याला पूर्णपणें अवगत आहेत.' याज्ञवल्क्य ह्मणाले, ' जें निर्गुण आहे त्याचें गुणांनीं वर्णन करतां येणें शक्य नाहीं; तथापि गुणवान कोणाला ह्मणतात व अगुणवान कोणाला ह्मणतात, तें सांगतों ऐक. तांबड्या फुलांचें प्रतिबिंब ज्याप्रमाणें कांचेंत दिसतें, त्याप्रमाणें जीवात्म्यावर गुणांचें ज्यावेळेला प्रतिबिंब पडतें तेव्हां त्याला गुणवान ह्मणतात; परंतु प्रतिबिंबापासून अलग असणाऱ्या कांचेप्रमाणें जेव्हां हा गुणापासून अलग असतो, तेव्हां गुणांपासून अलग असणारें याचें खरें स्वरूप दृष्टीस पडतें. अव्यक्त प्रकृति स्वभावतः गुणांनीं युक्त असून तिला या गुणांच्या पलीकडे जातां येत नाहीं. ती स्वभावतः अज्ञान असून आपल्याला या गुणांशीं जखडून घेते. या अव्यक्त प्रकृतीला स्वभावतःच कांहीं ज्ञान नसून पुरुष ( जीवात्मा ) स्वभावानेंच ज्ञानवान आहे. माझ्यापेक्षां श्रेष्ठ कांहीं नाहीं, हें ज्ञान पुरुषाला नेहमीं असतें. या कारणानें अव्यक्त प्रकृतीचा शाश्वत व अविनाशी अशा या पुरुषाशीं संबंध जडल्यानें तिच्या विनाशीपणामुळें अचेतन व अबुद्ध असूनही स्वरूपामध्यें न रहातां ती सचेतन व बुद्धिमान होते. जेव्हां हा जीवात्मा अज्ञानामुळें वरचेवर स्वतःला गुणांशीं जखडून घेतो, तेव्हां हा आपल्या स्वरूपाला ओळखेनासा होतो आणि ह्मणून मोक्षापासून ढळतो. प्रकृतीपासून निघणाऱ्या तत्त्वांवरील याच्या स्वामित्वामुळें त्यांचा स्वभाव याच्या अंगीं येतो;त्याचप्रमाणें सृष्टीच्या उत्पत्तीचें कर्तृत्व याच्याकडे असल्यानें सृष्टीचा धर्मही याच्यामध्यें मानला जातो; त्याचप्रमाणें योगाचें कर्तृत्वही याच्याकडे असल्यानें योगधर्मही याच्यामध्यें मानले जातात; तसेंच प्रकृतीचें कर्तृत्व याकडे असल्यानें प्रकृतीचे धर्म, त्याचप्रमाणें सर्व उत्पत्तीच्या बीजांचें कर्तृत्व याकडे असल्यानें सर्व बीजांचें धर्म याच्या ठिकाणीं समजण्यांत येतात, आणि सर्व गुणांची उत्पत्ति व संहार याच्याकडे असल्यानें यालाही त्यांच्याप्रणेंच विनाशी समजण्यांत येतें. त्याचप्रमाणें हा सर्वांचा साक्षीभूत असून याच्याहून दुसरें कांहीं नसल्यानें व प्रकृतीवरील याच्या अभिमानामुळें सर्व चिंतेपासून दूर झालेले, सिद्धि मिळविलेले अध्यात्मवेत्ते यती हा नित्य व अव्यक्त असून अनित्य व व्यक्त असा समजतात. परंतु ज्यांची मदार ज्ञानावर आहे असें सांख्यशास्त्र जाणणारे ह्मणतात कीं, वास्तविक खरी नसून खऱ्याप्रमाणें भासणाऱ्या प्रकृतीहून पुरुष निराळा आहे. ज्याप्रमाणें मुंज गवत त्याच्या बाहेरील वेष्टनाहून निराळें असतें त्याप्रमाणें पुरुष प्रकृतीहून निराळा आहे. उंबर व त्यांत रहाणारा किडा किंवा मासा व

ज्यांत तो रहातो तें पाणी हे एकत्र असतांही ज्याप्रमाणें वेगळे वेगळे आहेत तशीच पुरुष व प्रकृति यांची स्थिति आहे. कुंड व त्यांतील अग्नि हे एकमेकांला चिकटून आहेत तरी ते एकजीव समजले जात नसून वेगवेगळे समजण्यांत येतात. पाण्यांत तरंगणारें कमल पाण्यापासून वेगळें समजण्यांत येतें, यांचा एकमेकांशीं संबंध सामान्य लोकांना बरोबर कळत नाहीं.त्याचप्रमाणें प्रकृति व पुरुष यांचा संबंध वरच्याहून भिन्न समजणारांना सुद्धां बरोबर कळत नाहीं ह्मटलें पाहिजे व अशांना घोर अशा नरकामध्यें जाण्याची पाळी येते. ह्याप्रमाणें हें उत्तम सांख्यशास्त्र असून यावरून सर्व वस्तूंचें यथार्थ ज्ञान होतें. याप्रमाणें प्रकृति व पुरुष यांचें स्वरूप ओळखून सांख्यमतानुयायी मोक्षाला मिळतात. आतां मी तुला योगशास्त्रासंबंधानें सांगतों ऐक.'

'सांख्यज्ञानासारखें दुसरें ज्ञान नाहीं व योगसामर्थ्यासारखें दुसरें बल नाहीं. ज्यांना बुद्धि नाहीं, ते सांख्य व योग शास्त्रें एकमेकांपासून वेगळीं समजतात; तथापि विद्वान् लोक पूर्ण विचारांतीं त्यांना एकच समजतात. जे योग्यांच्या डोळ्यांपुढें असतें तेंच सांख्यांच्याही डोळ्यांपुढें असतें. जो सांख्य व योगमार्ग एकच समजतो त्यालाच विश्वाचें खरें तत्त्व कळलें समजावयाचें. प्राण व इंद्रियें हीं योगाभ्यासाचीं मुख्य साधनें आहेत. हीं व प्राण स्वाधीन ठेवल्यानें योग्यांना त्यांना वाटेल तेथें फिरतां येतें. अणिमादि आठ ऐश्वर्यांनीं युक्त असे योगी स्थूल शरीर ठेवल्यावर देखील सूक्ष्म शरीरानें वाटेल तर इच्छेस येईल त्या सुखाचा उपभोग घेत सर्व विश्वामधून फिरत रहातात; कारण योगापासून आठ प्रकारच्या सिद्धि मिळतात; त्याचप्रमाणें योगाला प्राणायाम, प्रत्याहार, ध्यान, धारणा, समाधि, यम, नियम हीं आठ अंगें आहेत.त्याचप्रमाणें योग्यांचे सबीज व निर्बीज असे दोन प्रकारचे मार्ग आहेत. मनोधारणा करून प्राणायाम करणें हा पहिला मार्ग व मनाची एकाग्रता करून इंद्रियनिग्रह करून ध्याता, ध्येय व ध्यान यांमधील भेद विसरून जाणें हा दुसरा मार्ग आहे. यांपैकीं पहिल्याला सबीज ह्मणत असून दुसऱ्याला निर्बीज ह्मणतात. तसाच प्राणायाम हा सबीज योग असून निर्बीज योगामध्यें मनाचे सर्व व्यापार बंद करून तें स्थिर करावें लागतें. प्रथम सबीज प्राणायामाचा अभ्यास करावा; कारण, जर पूरक करून कुंभक केलेला वायु नियमित मंत्रानें एखाद्या विवक्षित मूर्तीकडे मन लावून सोडण्यांत न येईल तर नाकांतून वहाणारा वायु वाढून तो अपायकारक होईल. रात्रीच्या पहिल्या प्रहरीं प्राणायामाचे बारा प्रकार सांगितले असून मधल्या प्रहरीं त्याचप्रमाणें निजून उठल्यावर शेवटल्या प्रहरीं बारा प्रकार सांगितले आहेत. मनुष्यानें मनाची शांति ठेवून आत्मनिग्रह करून स्वतःमध्यें संतुष्ट राहून एकांतामध्यें आत्म्याला परमात्म्याकडे लावावें. पंच ज्ञानेंद्रियांना त्यांच्या पांच रूपरसादिविषयांपासून काढून घेऊन प्रतिभाव व अपवर्ग ( विक्षेप व लय ) दूर करून सर्व इंद्रियांना मनाकडे लावावें. नंतर मनाला अहंकाराकडे लावावें, अहंकाराला बुद्धीकडे लावावें व बुद्धीला प्रकृतीच्या ठिकाणीं लीन करावें. याप्रमाणें सर्वांचा लय करून रजो गुणापासून मुक्त, विमल, नित्य, अनंत, शुद्ध, निर्दोष, अभेद्य, अजर, अमर, शाश्वत अशा सर्वश्रेष्ठ ब्रह्माचें केवळ ध्यान करावें. आतां योगामध्यें गढलेल्यांचीं लक्षणें सांगतों ऐक. सुखानें निजलेल्या मनुष्याप्रमाणें समाधींत असलेल्या मनुष्याची प्रसन्नता व समाधानवृत्ति असते. तेलानें पोसलेला दिवा ज्याप्रमाणें निवाऱ्याच्या ठिकाणीं संथपणें वर ज्योती ठेवून जळतो तशी ह्या समाधींतल्या मनुष्याची स्थिति असते.पावसाचा पूर लोटला तरी ज्याप्रमाणें खडक आपल्या जागेपासून ढळत नाहीं त्याप्रमाणें याची अचल स्थिति असते. शंख, दुंदुभि, नानाप्रकारचीं गायनें व नानाप्रकारचीं वाद्यें यांनीं सुद्धां तो चळत नाहीं. ज्याप्रमाणें शांत व निश्चयी स्वभावाचा मनुष्य तेलानें भरलेलें भांडें हातांत घेऊन जिना चढत असतां कोणी हत्यार उगारून त्याला भेवडाविलें असतां सुद्धां जसें तेलाचें एक टिपूस सुद्धां त्याच्या हातून सांडलें जात नाहीं, त्याप्रमाणें समाधीमधल्या मनुष्याचे सर्व इंद्रियव्यापार बंद असल्यानें तो बिलकुल चळत नाहीं. समाधीमध्यें असलेल्या मनुष्याला काळोखामधून दिसणाऱ्या लखलखीत प्रकाशाप्रमाणें ब्रह्मदर्शन होतें. याप्रमाणें पुष्कळ वर्षांच्या खटपटीनें त्याला मोक्षप्राप्ति होते.

हाच योग्यांचा योग असून हा कळल्यानें विद्वान लोक आपलें काम झालें असें मानतात.'

'त्याचप्रमाणें निरनिराळ्या अवयवांमधून प्राण गेला असतां काय काय गति मिळते तें ऐक. जर प्राण पायांमधून जाईल तर त्याला विष्णूचें स्थान मिळतें. तो पोटरीमधून गेला असतां वसूंचें स्थान मिळतें. गुडघ्यांमधून गेला असतां साध्यांचें स्थान मिळतें. गुदामधून गेला असतां मित्राचें स्थान मिळतें. कुल्ल्यांमधून गेला असतां पृथ्वी मिळते. मांड्यांमधून गेला असतां प्रजापतीचें स्थान मिळतें. बरगड्यांमधून गेला असतां मरुतांचें स्थान मिळतें. त्याचप्रमाणें बाहूंमधून गेला असतां इंद्राचें स्थान मिळतें. छातीमधून गेला असतां रुद्राचें स्थान मिळतें. मानेंतून गेला असतां नराचें स्थान मिळतें. तोंडांतून गेला असतां विश्वेदेवाचें स्थान मिळतें. कानांतून गेला असतां दशदिशांमधील देवतांचें स्थान मिळतें. नाकांतून गेला असतां वायूचें स्थान मिळतें. डोळ्यांतून गेला असतां अग्नीचें स्थान मिळतें. भुंवयांमधून गेला असतां अश्विनीकुमारांचें स्थान मिळतें. कपाळांतून गेला असतां पितरांचें स्थान मिळतें. त्याचप्रमाणें डोक्यांतून गेला असतां सर्वश्रेष्ठ ब्रह्माचें स्थान मिळतें. याप्रमाणें निरनिराळ्या भागांतून प्राण गेला असतां निरनिराळी गति मिळते. आतां विद्वान लोकांनीं जीं अरिष्टें सांगितलीं आहेत तीं ऐक. ज्याला पूर्वीं पाहिलेली अरुंधती किंवा ध्रुव दिसत नाहीं, चंद्र किंवा दिवा हा दक्षिणेकडे कापलेला ज्याला दिसतो, दुसऱ्याच्या डोळ्यामध्यें ज्याला आपलें प्रतिबिंब दिसत नाहीं, अशा प्रकारच्या लोकांचें आयुष्य एक वर्षभरच उरलेलें असतें. त्याचप्रमाणें फाजील तेज किंवा फाजील बुद्धि, कमी तेज किंवा कमी बुद्धि, स्वभावामध्यें फेरबदल, देवतांचा अवमान, ब्राह्मणाबरोबर विरोध काळ्या रंगाच्या ऐवजीं धुरकट रंग येणें या चिन्हांवरून मनुष्य पुढें सहा महिन्यांच्या आंत मरणार असें समजावें. कोळ्याच्या जाळ्याप्रमाणें ज्याला चंद्रामध्यें त्याचप्रमाणें सूर्यामध्यें भोकें भोकें दिसतात, देवळांमधून वगैरे ठिकाणीं चांगला वास सुटला असतां शवाप्रमाणें ज्याला दुर्गंधी येते, असा मनुष्य सात दिवसांच्या आंत मरतो. कान व नाक दबणें, दांत व दृष्टि यांचा रंग पालटणें, बुद्धि, अंगांतील उष्मा नाहींसा होणें हें तात्काल मृत्यु येण्याचें लक्षण आहे; त्याचप्रमाणें एकाएकीं डाव्या डोळ्यांतून पाणी येणें किंवा डोक्यांमधून वाफ बाहेर पडणें हेंही तात्कालिक मरणाचें चिन्ह आहे. याप्रमाणें हे दुष्ट शकुन आहेत ते ओळखून मनुष्यानें रात्रंदिवस आपल्याला समाधीमध्यें परमात्म्याशीं अंतकालपर्यंत स्वतःला जोडून घ्यावें. आतां अशा मनुष्याला जर न मरतां ह्या जगांत रहाण्याची इच्छा असेल तर सर्व गंधादि विषय टाकून त्यानें इंद्रियांना आळा घालून रहावें. याप्रमाणें सांख्यमार्ग धरून आत्म्याकडे लक्ष लावून मनुष्य मृत्यूला सुद्धां जिंकून आपल्याला परमात्म्याशीं जोडून घेऊं शकतो व पाप्याला जें मिळणें शक्य नाहीं असें शाश्वत ब्रह्मपद मिळवितो.

'आतां प्रकृतीमध्यें गूढ असलेल्या परब्रह्मासंबंधानें तूं केलेल्या प्रश्नाचें उत्तर देतों ऐक. ऋषींनीं सांगितलेल्या विधीनें नम्रपणें वागून तपानें सूर्याची आराधना केली ते वेळीं त्यानें प्रसन्न होऊन कितीही दुर्लभ वर मागण्यास मला सांगितलें; तेव्हां मस्तक त्यापुढें लववून मी त्याला ह्मणालों; 'मला यजुर्वेदाचें ज्ञान मुळीं नाहीं त्याचें ज्ञान मला एकदम व्हावें.' याप्रमाणें मीं विनंति केली असतां, 'सरस्वती तुझ्या तोंडांत राहील व तुला यजुर्वेद येईल,' असा त्यानें वर दिला. तेव्हां सरस्वतीनें मला तोंड उघडण्यास सांगितलें व मीं त्याप्रमाणें तोंड उघडल्यावर सरस्वती माझ्या तोंडामध्यें शिरली, तेव्हां माझ्या अंगाचा फार दाह होऊं लागल्यामुळें मी पाण्यांत शिरलों आणि अज्ञानामुळें, जें कांहीं सूर्यानें केलें होतें तें माझ्याच हितासाठीं होतें हें न उमगतां मी त्यावर रागावलों देखील. ते वेळीं भगवान सूर्यनारायणानें मला क्षणभर तें सोस ह्मणजे पुढें तूं गार होशील, ह्मणून मला सांगितलें. मी गार झाल्यावर तो मला ह्मणाला, वेद त्याचप्रमाणें परशाखेंतून जरूरीसाठीं घेतलेले मंत्र, उपनिषदें हीं तुला अंतर्ज्ञानानें येतील व तूं सर्व शतपथ ब्राह्मण तयार करशील व शेवटीं तुला मोक्ष मिळेल, व सांख्ययोगानें मिळविण्याचें स्थान तुला मिळेल.' असें ह्मणून भगवान सूर्यनारायण अस्ताचलाकडे

गेला. तो निघून गेल्यावर मीं आनंदानें घराकडे येऊन सरस्वतीचें स्मरण केलें; त्यावेळेला स्वर, व्यंजनें यांनीं विभूषित फार मंगल अशी देवी सरस्वती प्रगट झाली. विधिपूर्वक मीं तिची व सूर्याची अर्घ्यादिकांनीं पूजा केली व आसनावर बसून त्याचें रहस्य, व सार व परिशेष यांसह सर्व शतपथ ब्राह्मण तयार करून मीं ते आपल्या शंभर शिष्यांना शिकविले. त्यामुळें माझा मामा जो वैशंपायन त्याला व त्याच्या शिष्यांना वाईट वाटलें. नंतर आपल्या किरणांनीं झळकणाऱ्या सूर्याप्रमाणें मी आपल्या शिष्यांमध्यें झळकत राहिलों. पुढें तुझ्या महात्म्या वडिलांच्या यज्ञाची सर्व व्यवस्था आपल्या हातीं घेतली. पुढें त्या यज्ञाची दक्षिणा कोणीं घ्यावी या संबंधानें माझ्यामध्यें व माझ्या मामामध्यें भांडण सुरू झालें असतां देवलाच्या देखत अर्धी दक्षिणा मीं घेतली व अर्धी त्याला दिली. तुझा पिता, सुमंत, पैल, जैमिनी व दुसरे ऋषी यांना ही व्यवस्था कबूल झाली. याप्रमाणें मला सूर्यापासून पन्नास यजुर्मंत्र मिळाले. पुढें रोमहर्षाजवळ मी पुराणें शिकलों; नंतर ते मूलमंत्र व सरस्वती यांना डोळ्यांपुढें ठेऊन सूर्याच्या अनुभवानें मीं शतपथ तयार केले व ते मीं आपल्या शिष्यांना शिकविले. मनानें व शरीरानें शुद्ध असे माझे सर्व शिष्य आनंदित झाले. पन्नास शाखांनीं युक्त सूर्याकडून मिळालेली ही विद्या त्यांच्या ठिकाणीं याप्रमाणें कायम करून मी ब्रह्माचें चिंतन करीत राहिलों तेव्हां वेदांतज्ञान जाणणाऱ्या विश्वावसूनें येऊन मला पुढील चोवीस त्याचप्रमाणें आन्वीक्षिकी संबंधानें एक असे पंचवीस प्रश्न केले, ते प्रश्न हे होते. विश्व ह्मणजे काय? अविश्व ह्मणजे काय? अश्वा, अश्व, मित्र, वरुण, ज्ञान, ज्ञेय, अज्ञ, ज्ञाता, ह्मणजे काय? विकार कशाला आहेत? कशाला नाहींत? सूर्याला भक्षण करणारा कोण? सूर्य कोण? विद्या काय? अविद्या काय? वेद्य काय? अवेद्य काय? अचल काय? चल काय? अपूर्व काय? अक्षय काय? क्षय काय? याप्रमाणें त्यानें प्रश्न केल्यावर कांहीं वेळ त्याला थांबण्यास सांगून विचार करून मीं त्याला पुढील उत्तरें दिलीं. हीं उत्तरें दह्यापासून वर येणाऱ्या लोण्याप्रमाणें माझ्या डोळ्यांपुढें आलीं. आन्वीक्षिकी डोळ्यापुढें ठेवून उपनिषदें व वेदांसंबंधानें किरकोळ शास्त्रें मीं मनानेंच निर्माण केलीं. नंतर मोक्ष मार्ग सांगणाऱ्या ज्या संबंधानें मी पूर्वीं तुझ्याशीं बोललों आहें त्या पंचविसाव्या जीवात्म्यासंबंधाच्या चवथ्या शास्त्रावर मी त्याच्याशीं बोललों. मी त्याला ह्मणालों, तुझ्या प्रश्नांचीं उत्तरें देतों ऐक. विश्वस्वरूपी ही अव्यक्त मूलप्रकृति जन्ममरणांनीं युक्त आहे व मोक्षेच्छूंनाही भीति उत्पन्न करणारी आहे व ज्या सर्वांमध्यें सत्व, रज, तम आहेत, अशीं तत्वे हिच्यापासून उत्पन्न होत असल्यामुळें ही या तीन गुणांनीं युक्त आहे. अविश्व हा निर्गुण परमात्मा होय. अश्वा व अश्व प्रकृति व पुरुष होत. त्याचप्रमाणें मित्र हा पुरुष असून वरुण प्रकृति आहे. ज्ञान ही प्रकृति व ज्ञेय हा पुरुष आहे. अज्ञ व ज्ञाता हे दोघे निर्गुण पुरुष आहेत; कारण, अज्ञानामुळेंच पुरुषापासून जीवाची उत्पत्ति आहे. क हा पुरुष आहे. प्रकृति विकारयुक्त असून पुरुष निर्विकार आहे. अवेद्य ही प्रकृति असून वेद्य हा पुरुष आहे. प्रकृति चल आहे; कारण, ही विकार पावून उत्पत्ति व नाश करते व अचल हा पुरुष आहे; कारण, तो स्वतः विकार न पावतां उत्पत्ति व नाश यांना साह्य करतो. वेद्य ही प्रकृति असून अवेद्य पुरुष आहे. प्रकृति व पुरुष हे दोघेही अज्ञ, ध्रुव, अक्षय, अज, व नित्य असे आहेत. उत्पत्ति व नाश यासंबंधानें प्रकृति अक्षय असल्यानें या अज अशा प्रकृतीला अविनाशी मानलें आहे; त्याचप्रमाणें पुरुषाला अक्षय मानलें आहे; कारण, त्याला क्षय नाहीं. प्रकृतीमधल्या गुणांचा नाश आहे, परंतु तिच्या ठिकाणीं कर्तृत्व असल्यामुळें तिचा नाश नाहीं व ती विकार पावून सृष्टीच्या उत्पत्तीला कारणभूत होते. तिच्यापासून उत्पन्न झालेले पदार्थ उत्पन्न होतात व नाश पावतात; पण मूलप्रकृति नाश पावत नाहीं; ह्मणूनच तिला अक्षय ह्मटलें आहे. याप्रमाणें चवथें आन्वीक्षिकीशास्त्र असून याचा शेवट मोक्षामध्यें आहे. याचें चांगलें ज्ञान करून घेऊन गुरूची उपासना करून ऋक, यजु व साम ह्यांचा आदरानें अभ्यास करावा. जे वेद व त्याच्या शाखा पढून ज्यापासून सर्व वस्तूंची उत्पत्ति असून ज्यामध्यें सर्वांचा लय आहे व ज्याचें ज्ञान वेद करून देण्याला झटतात तें

ब्रह्म ज्यांना कळलें नाहीं; अर्थात् जें प्रस्थापित करण्याविषयीं वेदांची खटपट आहे, तें ज्यांला ओळखलें नाहीं त्यांचें वेदपठण व्यर्थ असून ते केवळ हा भार वहातात. लोण्यासाठीं गाढवीचें दूध घुसळलें असतां पाहिजे तें न मिळतां दुर्गंधियुक्त बेरकट मात्र सांपडावयाचें; त्याचप्रमाणें वेद पढून जर पुरुष व प्रकृति यांना ओळखतां आलें नाहीं तर त्याच्या योगानें मनुष्याची मन्द बुद्धि मात्र दिसून येऊन तो त्या वेदाचा भार उगीच वहातो असें समजलें पाहिजे. मनुष्यानें मोठ्या दक्षतेनें प्रकृति व पुरुष यांवर विचार केला पाहिजे; ह्मणजेच पुनर्जन्म व पुनर्मरण असा हा फेरा त्याला टाळतां येणार. पुनर्जन्म व पुनर्मरण यावर विचार करून व ज्यांचें फार झालें तर नाशवंत फल मिळणार अशीं कर्में सोडून अविनाशी अशा योगधर्माकडे मनुष्यानें लागावें. जीवात्म्याचें स्वरूप व परमात्म्याशीं त्याचा संबंध यावर नेहमीं विचार करीत राहिल्यानें मनुष्य सर्व पाशांपासून सुटून परमात्म्याला पाहूं लागतो. शाश्वत व अव्यक्त परमात्मा पंचविसाव्या जीवात्म्याहून वेगळा आहे असें मूर्ख लोक समजतात. शहाणे लोक या दोघांना एकच समजतात. जन्ममरणाच्या फेऱ्यांनीं भिऊन गेलेले सांख्यशास्त्रवेत्ते त्याचप्रमाणें योगी जीवात्म्याला व परमात्म्याला अगदीं एक समजतात.' विश्वावसूनें विचारलें, 'आपण जीवात्मा अविनाशी असून परमात्म्यापासून वेगळा नाहीं असें ह्मणाला, परंतू हें समजण्याला जरा कठीण आहे. तेव्हां आपण याचें कृपा करून स्पष्टीकरण करावें. शास्त्रांमध्यें आपण श्रेष्ठ असून मोठे वक्ते आहां. आपण मोठे विद्वान आहां व आपल्याला ठाऊक नाहीं असें कांहीं नाहीं. पितृलोक व देवलोक यांमध्यें आपण श्रुतींचा ठेवा आहां असें ह्मणण्यांत येतें व प्रत्यक्ष सूर्य आपला गुरु आहे. आपल्याला योगशास्त्र व सांख्यशास्त्र चांगलें अवगत आहे. आपण ज्ञानी असून सर्व चराचरांचें आपल्याला ज्ञान आहे. तेव्हां कणीच्या तुपाप्रमाणें गोड असें आपलें या विषयावरील भाषण कानावर पडावें अशी माझी इच्छा आहे.' याज्ञवल्क्य ह्मणाले, 'तुला सर्व ठाऊक आहे तरी मला विचारतोस तेव्हां सांगतों ऐक. अज्ञ अशा प्रकृतीला हा पंचविसावा जीवात्मा ओळखतो; परंतु याला ती ओळखत नाहीं. जीवाचे प्रकृतीवर प्रतिबिंब पडल्यानेंच प्रकृतीला सांख्यशास्त्रवेत्ते प्रधान ह्मणतात. ज्यावेळेला जीवात्मा स्वस्वरूपामध्यें जागृति व स्वप्नावस्था यांमध्यें दिसणाऱ्या प्रत्येक वस्तूसंबंधानें साक्षिरूपानें असतो तेव्हां त्याला स्वतःचें तसेंच प्रकृतीचें भान असतें; परंतु सुषुप्ति व योगसमाधी यांमध्यें ही साक्षित्वानें पहाण्याची स्थिति बंद पडून तो सव्विसावा जो परमात्मा याला पाहूं लागतो. या जीवात्म्याला आपल्याहून श्रेष्ठ कांहींच नाहीं असें वाटतें; परंतु परमात्मा दिसत असून हा त्याला पहात नाहीं; परमात्मा मात्र याला पहात असतो. शहाण्यांनीं प्रकृति व जीवात्मा यांला एक कधीं समजूं नये. जीवात्म्याचें अगदीं निराळें अस्तित्व आहे. मासा पाण्यांत रहातो तो आपल्या स्वभावानेंच त्यामध्यें शिरतो. परंतु तो पाण्यांत रहात असला तरी तो त्याहून वेगळाच समजला पाहिजे; त्याचप्रमाणें जीवात्म्याला ओळखलें पाहिजे. जरी हा प्रकृतीशीं जुळून आहे तरी स्वभावतः हा तिच्यापासून वेगळा असून स्वतंत्र आहे. जेव्हां हा ममत्वानें झपाटला जाऊन मायेच्या योगानें परमात्म्याशीं आपलें जें तादात्म्य हें ओळखीनासा होतो आणि प्रकृति व आपण एक असें मानूं लागतो तेव्हां हा खालीं खालीं बुडतो; परंतु जेव्हां हा या विचारापासून मुक्त होतो, तेव्हां तो वरवर जाऊं लागतो. जेव्हां आपण निराळे व ज्या प्रकृतीबरोबर आपण रहातों ती निराळी असें जीवात्म्याला कळूं लागतें तेव्हां तो परमात्म्याला पाहूं लागून त्याच्याशीं ऐक्य पावतो. परमात्मा वेगळा व जीवात्मा वेगळा; परंतु परमात्मा जीवात्म्याच्या वर असल्यानें शहाणे लोक दोघांना एकच समजतात; ह्मणून सांख्यशास्त्रवेत्ते योगी जन्ममरणाला भिऊन जाऊन सव्विसाव्या परमात्म्याला डोळ्यांपुढें ठेवून शुद्धपणानें त्याकडे लक्ष देऊन या अविनाशी जीवात्म्याला बरा समजून जवळ करीत नाहींत. जेव्हां मनुष्य परमात्म्याला पाहूं लागून वेगळेपणा विसरून जाऊन त्याच्याशीं एक होऊन जातो तेव्हां त्याला सर्व कळूं लागून पुनर्जन्म येत नाहीं. याप्रमाणें अज्ञानी प्रकृति व ज्ञानसंपन्न परमात्मा यांचा भेद आहे. जो मनुष्य द्रष्टा व

दृश्य, ज्ञाता व ज्ञेय यामध्यें कांहीं अंतर पहात नाहीं, तो केवळ आहे तसाच अकेवल असून दिसण्यांत परमात्म्याहून वेगळा दिसत असला तरी त्याच्याशीं एकच आहे व असा मनुष्य विश्वाचें आदिकारण आहे.' यानंतर हें खरें शुभकारक, हितकर व मोक्षदायक भाषण ऐकून विश्वावसू त्यांचें कल्याण चिंतून स्वर्गाला निघून गेला. व स्वर्गास गेल्यावर माझ्यापासून मिळालेलें ज्ञान ब्रह्मलोकांत असणाऱ्या देवतांना त्याचप्रमाणें पृथ्वीवरील व खालच्या लोकांमध्यें जे जे म्हणून कोणी मोक्षेच्छू होते त्या सर्वांना त्यानें हें शास्त्र शिकविलें. सांख्यशास्त्रवेत्ते सांख्यधर्मामध्यें रत असतात व योगी योगधर्मामध्यें रत असतात; व दुसरे कांहीं मोक्षेच्छू आहेत त्यांना ज्ञान प्रत्यक्ष फलदायक आहे. ज्ञानापासूनच मोक्ष असून अज्ञानापासून तो मिळत नाहीं म्हणून खऱ्या ज्ञानाच्या मार्गें लागून आपल्याला जन्ममृत्यूपासून सोडवून घ्यावें. ज्ञान हें ब्राह्मणापासून, क्षत्रियापासून, वैश्यापासून अथवा नीच अशा शूद्रापासून देखील मिळवून नेहमीं त्याच्यावर विश्वास ठेवावा. जन्ममृत्यु कधीं अशाच्या जवळ येत नाहींत. सर्व वर्ण ब्रह्मापासून झाले आहेत. सर्व ब्रह्मोच्चार करतात. ब्रह्मापासून आलेल्या व ब्रह्माकडे लागलेल्या माझ्या बुद्धीनें मी हें खरें ब्रह्मशास्त्र सांगतों. खरोखर हें सर्व जग ब्रह्ममय आहे. ब्रह्माच्या तोंडापासून ब्राह्मण झाले असून बाहूपासून क्षत्रिय झाले, नाभीपासून वैश्य व पायांपासून शूद्र झाले. सर्व वर्णांची याप्रमाणेंच उत्पत्ति आहे. अज्ञानामुळें कर्मापासून मिळणाऱ्या जन्माच्या फेऱ्यांत सांपडून त्या कर्मामुळेंच मृत्यु येतो. ज्ञानहीन होऊन सर्व वर्णांचे लोक भयंकर अज्ञानानें ओढले जाऊन प्रकृतीपासून उत्पन्न होणाऱ्या निरनिराळ्या योनीमध्यें पडतात; म्हणून सर्वांनीं ज्ञान मिळविण्यासाठीं झटावें. जो ज्ञानवान आहे तोच ब्राह्मण. हें मोक्षशास्त्र वाटेल त्याला पतकरतां येण्याजोगें आहे.'

याप्रमाणें याज्ञवल्क्यांनीं देवरातीच्या प्रश्नांचीं उत्तरें दिलीं असतां तो राजा मोठा संतुष्ट होऊन त्यानें त्यांचा सत्कार करून त्यांना निरोप दिला व पुढें आपल्या मुलाला गादीवर बसवून यतिधर्म स्वीकारला. सर्वसामान्य धर्म तुच्छ समजून सांख्यशास्त्र व योगशास्त्र यांचें पूर्ण अध्ययन तो करीत राहिला. आपल्याला अनंत असें समजून धर्माधर्म, पापपुण्य, सत्यासत्य, जन्ममृत्यु व दुसऱ्या सर्व प्राकृत गोष्टी तुच्छ समजून जो नित्य व केवळ अशा परमात्म्यावर विचार करीत राहिला. सांख्यशास्त्रवेत्ते त्याचप्रमाणें योगशास्त्रवेत्ते आपल्या शास्त्रांच्या आज्ञांवरून हें जग व्यक्ताव्यक्तांच्या कृतीमुळें बनलें आहे असें समजतात. ब्रह्म हें बऱ्या वाईटापासून अलिप्त असून स्वतंत्र, सर्वश्रेष्ठ, शाश्वत व शुद्ध आहे. दान करणारा, दान घेणारा व दान हीं सर्व अव्यक्त ब्रह्म आहेत. याहून वेगळा कोणी नाहीं असाच भाव नेहमीं ठेवावा. सगुण प्रकृति काय आहे व पुरुष काय आहे हें ज्याला कळलें नाहीं त्यानें तीर्थाला जावें किंवा यज्ञ करावे. वेदाध्ययन, तप किंवा यज्ञ या कशानेंही मनुष्याला मोक्ष मिळावयाचा नाहीं. जेव्हां मनुष्य अव्यक्त परमात्म्याला ओळखतो तेव्हांच तो आदरणीय होतो. जे महत् तत्त्वाकडे लागतात त्यांना महल्लोक मिळतात, जे अहंकाराकडे लागतात त्यांना अहंकाराचे लोक मिळतात व याच्याहून श्रेष्ठाकडे जे लक्ष देतात त्यांना श्रेष्ठपद मिळतें. जे प्रकृतीहून पलीकडच्या शाश्वत ब्रह्माला ओळखतात ते जन्ममृत्यूंपासून सुटून सत् व असत् असे होऊन सर्व गुणांपासून वेगळें असें पद मिळवितात. ज्ञान हें सर्वश्रेष्ठ आहे. यज्ञाची त्याच्याशीं बरोबरी होणार नाहीं. ज्ञानाच्या साह्यानें संकटांनीं भरलेला हा संसारसागर तरून जाण्याला मनुष्य समर्थ होतो; परंतु यज्ञानें तो तरण्याला समर्थ होत नाहीं. जन्म, मृत्यु व दुसरीं भौतिक संकटें मनुष्याला सामान्य यत्नानें टाळतां यावयाचीं नाहींत. यज्ञ, तप, नियम व व्रत यांनीं मनुष्याला स्वर्ग मिळून तेथून फिरून त्याला खालीं यावें लागतें म्हणून सर्वश्रेष्ठ परमात्म्याला मनुष्यानें भजावें. क्षेत्राला ओळखून ज्ञानयज्ञ करून मनुष्य ज्ञानी होतो.'

---

## २१४ पंचशिख व जनक यांचा संवाद.

### ( १२–३१९ )

युधिष्ठिर म्हणाला, 'पुष्कळ ऐश्वर्य, संपत्ति व

दीर्घायुष्य मिळून मनुष्यानें मृत्यूला कसें टाळावें ? तप, वेदांत सांगितलेलीं निरनिराळीं कर्मे, वेदाचें ज्ञान किंवा रसायनें यां पैकीं कशानें मनुष्य जरा व मृत्यु यांपासून सुटतो? ' भीष्म ह्मणाले, 'या संबंधांत पुढील संन्यासी पंचशिख व जनकराजा यांचा संवाद ऐक. धर्मार्थासंबंधानें ज्यांचा सर्व संशय दूर झाला आहे अशा पंचशिख ऋषींना जनकानें एकवेळ विचारलें कीं, 'भगवन् मनुष्याला जन्ममृत्यु तपानें, बुद्धीच्या योगानें, कर्मानीं, वेदज्ञानानें किंवा कशानें टाळतां येईल? ' याप्रमाणें त्यानें प्रश्न केला असतां सर्व अदृश्य गोष्टींचें ज्यांना ज्ञान आहे असे विद्वान पंचशिख त्याला ह्मणाले, 'हे दोन अपरिहार्य आहेत तरी यांना मुळींच टाळतां येणार नाहीं असें नाहीं. दिवस, पंधरवडे व महिने चालले आहेत त्यांना बंद पाडण्याचें कोणाच्या हातीं नाहीं. मनुष्य अशाश्वत असतांही शाश्वत असा जो मार्ग घेतो त्याला हे टाळतां येतात. नाश हा सर्व प्राणिमात्रांना गांठीत असून कालाच्या अनंत प्रवाहाबरोबर वहात जाऊन कालसागरामध्यें हा बुडतो व याला यांतून काढण्याला होडगें वगैरे कांहीं मिळत नाहीं. या महासागरामध्यें जरा व मृत्यु हेच मोठे जलचर असून प्राण्याला यांच्या हातून सोडविणारा कोणी दिसत नाहीं. याला कोणी नाहीं व हा कोणाचा नाहीं. बायको व दुसरे नातेवाईक सहज वाटेमध्यें मिळाले असून यांच्याशीं कायमचा सहवास कोणालाच मिळाला नाहीं. या कालाच्या प्रवाहांतून प्राणिमात्र वहात चाललें असतां गर्जत एकमेकांशीं जुळून विस्कळित होणाऱ्या ढगांप्रमाणें एकत्र जुळतात व वेगळे होतात. जरा व मृत्यु हे लांडग्याप्रमाणें सर्व प्राणिमात्रांना मग ते बलवान असोत, दुबळे असोत, लहान असोत, मोठे असोत, खाऊन टाकतात. ह्याप्रमाणें या नश्वर प्राणिमात्रांमध्यें भूतात्मा तेवढा कायमचा आहे. असें असतां जन्मल्यासाठीं आनंद किंवा मेल्यासाठीं दुःख कां व्हावें? मी कोठून आलों ? कोण आहें? कोठें जाणार ? कोणाचा आहें ? कशापुढें उभा आहें? मी काय होणार? असा विचार केल्यावर मनुष्याला कशासंबंधानें कशाप्रकारचें दुःख करण्याचें कारण उरलें ? स्वर्ग किंवा नरक पहाणारा तरी आपल्यावांचून दुसरा कोण आहे ? ह्मणून शास्त्राला न सोडतां मनुष्यानें दान करावें व यज्ञ करावा.

---

## २१९धर्मध्वज व सुलभा यांचा संवाद.
## ( १२–३२० )

युधिष्ठिर ह्मणाला, 'गृहस्थधर्म न सोडतां बुद्ध्यादिकांचा लय करून मोक्षतत्त्व कोणी ओळखलें आहे काय ? स्थूल व सूक्ष्म आत्मा कसा सोडतां येतो हें मला सांग; त्याचप्रमाणें मोक्षाचें श्रेष्ठ तत्त्वही सांगा. ' भीष्म ह्मणाले, 'यासंबंधांत पुढील धर्मध्वज व सुलभा यांचा संवाद उदाहरण देतात. पूर्वी जनककुलामध्यें धर्मध्वज नांवाचा कोणी संन्यासधर्माकडे लक्ष देऊन रहाणारा राजा होता. वेद, मोक्षशास्त्र व राजधर्म हे त्याला अवगत होते. इंद्रियें स्वाधीन ठेवून तो पृथ्वीचें राज्य करीत होता. त्या वेदवेत्त्या बुद्धिमानाचें तें भलें वर्तन ऐकून लोकांना त्याचें अनुकरण करावेंसें वाटे. सत्ययुगामध्यें सुलभा नांवाची कोणी संन्याशीण योगधर्म पाळीत पृथ्वीवर फिरत होती. फिरतां फिरतां संन्याशांच्या तोंडून या राजासंबंधानें बातमी तिच्या कानावर आली. ती ऐकून त्याचा खरेपणा पहाण्यासाठीं धर्मध्वजाची भेट घेण्याचा तिनें विचार केला. योगसामर्थ्यानें आपलें पूर्वस्वरूप टाकून ज्यामध्यें एकाही अवयवांत दोष काढतां येणार नाहीं, असें उत्तम रूप तिनें धरलें व एका निमिषामध्यें तीराप्रमाणें ती मिथिलेला गेली. जी पुष्कळ लोकांनीं गजबजून राहिली होती अशा मिथिलेला येऊन पोंचल्यावर भिक्षेच्या मिषानें तिनें राजाची गांठ घेतली. तिचें तें सुकुमार रूप पाहून ही कोण, कोठून आली ह्मणून आश्चर्य चकित होऊन त्यानें तिचें स्वागत केलें व उत्तम आसन तिला बसावयास देऊन व पाय धुण्यास पाणी देऊन चांगल्या अन्नानें त्यानें तिला तृप्त केलें. याप्रमाणें जेऊन तृप्त झाल्यावर ती आपल्या प्रधानांमध्यें व विद्वानांमध्यें बसलेल्या राजाला प्रश्न करूं लागली. निवृत्तीचा धर्म पाळून राजा मुक्त झाला आहे किंवा नाहीं हें पहाण्यासाठीं योगसामर्थ्याच्या योगानें आपलें सत्व त्याच्या सत्वामध्यें तिनें मिळवून दिलें

व आपल्या डोळ्याच्या प्रकाशानें त्याच्या डोळ्याचा प्रकाश दिपवून सोडून खरें काढण्यासाठीं योगबंधनांनीं तिनें त्याला जखडून टाकिलें. आपण कोणाला हार जाणार नाहीं असा अभिमान असणाऱ्या त्या राजानें तिचा हेतु फसवून तिच्यावर ताण केली. तिचा निश्चय त्यानें ताडला. ते वेळीं एकाच ठिकाणीं असणारा तो राजा व त्रिदंड नसलेली सुलभा यांमध्यें पुढील संभाषण झालें. राजा ह्मणाला, 'तूं कोण, कोणाची, तुझा आश्रम कोणता, येथील काम सरल्यावर तूं कोठें जाणार ? प्रश्न केल्यावांचून दुसऱ्याचें शास्त्रज्ञान व जाति, यांच्या संबंधानें मनुष्याला माहिती होत नाहीं. मीं छत्र व राजदंड यांसंबंधानें सर्व अभिमान सोडून दिला आहे. तूं मानार्ह आहेस. आतां मोक्षधर्मासंबंधानें मी सांगतों ऐक; व पूर्वी हें विशेष ज्ञान कोणापासून मिळविलें हेंही सांगतों ऐक. पंचशिख नांवाच्या पराशर गोत्रांतील पूज्य अशा संन्याशांचा मी शिष्य असून सांख्य व योगशास्त्रें त्याचप्रमाणें हे मोक्षाचे तीन प्रसिद्ध मार्ग यांतील माझ्या सर्व शंका त्यांनीं दूर केल्या आहेत. शास्त्रमार्गाला धरून पृथ्वीवर फिरत असतां पूर्वी एकदां ते विद्वान पंचशिख मजकडे आले होते. माझ्या घरीं पावसाळ्यांत चार महिने राहिले असतां त्या श्रेष्ठ सांख्यवेत्त्यांनीं मला कळेल अशा रीतीनें सत्याच्या अनुरोधनानें मोक्षप्राप्तीचीं निरनिराळीं साधनें मला सांगितलीं. विषयांसंबंधानें आसक्ति सोडून देऊन परब्रह्माकडे लक्ष लावून मोक्षधर्मामध्यें सांगितलेले तीन मार्ग मी बरोबर रीतीनें पाळीत राहिलों आहे. वैराग्य हाच मोक्षाचा उत्तम मार्ग असून ज्याच्यापासून मनुष्य मुक्त होतो, असें हें वैराग्य ज्ञानापासूनच येतें. ज्ञानानेंच हातून प्रयत्न होऊन ब्रह्मप्राप्ति होते. आत्मज्ञानानेंच मनुष्य सुखदुःखादिकांच्या पलीकडे जाऊन मरणाला मागें टाकून मोठी सिद्धि मिळवितो. तें श्रेष्ठज्ञान मला झालें असल्यानें सर्व द्वंद्वापासून मी सुटलों आहें. जिवंतपणींच मोह व आसक्ति दूर झाली आहेत. ज्याप्रमाणें भिजून मऊ झालेल्या जमिनीमध्यें बी रुजून अंकुर फुटतो त्याप्रमाणें कर्मापासून पुनर्जन्म येतो; परंतु तवा किंवा दुसऱ्या कशावर भाजलेलें बी त्यामध्यें पूर्वी अंकुर धरण्याचें सामर्थ्य असूनही ज्याप्रमाणें पुढें अंकुर धरीत नाहीं त्याप्रमाणें माझी बुद्धि त्यांच्या शिक्षणाच्या योगानें वासनेपासून उत्पन्न होणाऱ्या जनकशक्तीपासून सुटली असल्यानें विषयासक्तिरूपी फल उत्पन्न करीत नाहीं. कोणासंबंधानें प्रेम किंवा द्वेष कांहींच माझ्या मनामध्यें येत नाहीं. दोघांचाही वायफळपणा लक्षांत घेऊन मी दोघांपासून अलिप्त असतों. जो माझा उजवा हात चंदनानें माखतो व जो डावा छाटून काढतो या दोघांनाही मी सारखेच लेखतों, सत्यज्ञान झाल्यानें मी सुखी आहें; व ढेंकूळ, धोंडा, सोन्याचा गोळा हे मला सारखे आहेत. राज्य करीत आहें तरी कोणत्याही प्रकारची आसक्ति माझ्या ठिकाणीं नाहीं. ह्मणून सर्व दंडधाऱ्याहून मी विशेष आहें. कांहीं मोक्षशास्त्रवेत्ते ज्ञान, उपासना व कर्मकांड असे तीन मार्ग आहेत ह्मणतात, कांहीं या जगाचें खरें ज्ञान हेंच मोक्षाचें साधन समजतात, कांहीं पूर्ण कर्मत्याग ह्याचें साधन समजतात, कोणी ज्ञानच त्याला साधन आहे ह्मणतात, कांहीं सूक्ष्मदर्शी कर्म कारण आहे ह्मणतात. महात्मे पंचशिख या सर्व ज्ञान व कर्मसंबंधी मतांना तुच्छ करून तिसऱ्यालाच मोक्षाचें खरें साधन समजतात. गृहस्थाश्रम पाळणारे मनुष्य जर ते यमनियम पाळतील तर ते संन्याशाच्या तोडीचे असतात. उलट जर संन्याशी काम, द्वेष, बायका, पोरें, मान, ढोंग, स्नेह यांच्या तावडींत सांपडतील, तर ते गृहस्थाच्या तोडीलाच येऊन बसतात. जर मोक्ष हा ज्ञानानेंच मिळत असेल, तर तो त्रिदंडामध्येंच असून छत्र व राजदंड यांमध्येंच कां नसावा ? कारण विशेषतः दोन्ही घेण्याला हेतु एकच असल्यानें तो एकामध्यें असून दुसऱ्यामध्यें कां नसावा याला कारण नाहीं. स्वार्थदृष्टीनें ज्या ज्या गोष्टीशीं मनुष्याचें कारण असतें ती ती गोष्ट तो अवलंबन करतो. गृहस्थाश्रमामध्यें दोष लक्षांत आणून जो दुसरा आश्रम घेतो. तो एक सोडून दुसरा घेतो तरी संगापासून मोकळा होत नाहींत. निग्रहानुग्रहाधिकार राजे व संन्यासी यांचा सारखाच असतां संन्यासी तेवढे मुक्त होऊन राजांनीं कां होऊं नये? ह्मणून मनुष्य केवळ ज्ञानाच्या योगानेंच परब्रह्माच्या ठिकाणीं राहून सर्व पापांपासून

मुक्त होतो. भगवीं वस्त्रें घेणें, डोकें बोडणें, दंड-कमंडलू घेणें हीं केवळ वरवरचीं चिन्हें आहेत. मोक्ष मिळवून देण्याला हीं बिलकुल उपयोगी नाहींत. तेव्हां ज्या अर्थी हीं चिन्हें धरलीं असतां सुद्धां ज्ञानच दुःखापासून सोडविण्याला साधन आहे, त्याअर्थी केवळ हीं वरवरचीं लिंगें धारण करणें वायफळ आहेत. संन्यासाश्रमामध्यें दुःख कमी करण्याचें सामर्थ्य आहे ह्मणून जर एकानें तो आश्रम घ्यावयाचा तर राज्योपभोगामध्यें तें दुसऱ्याला कां दिसूं नये? गरीबीमध्यें मोक्ष व श्रीमंतीमध्यें पाश असा कांहीं नियम नाहीं. श्रीमंतीमध्यें असो किंवा गरीबीमध्यें असो मनुष्य ज्ञानानेंच मुक्त होतो. ह्मणून जरी वरकरणी धर्म, अर्थ, काम, राज्य, बायको इत्यादि बंधनाला साधनीभूत गोष्टींमध्यें मी गढलेला दिसतों, तरी मी मुक्त स्थितींत राहिलों आहें. राज्य, ऐश्वर्य व विषयासक्ति यासंबंधीं बंधनें हीं मोक्षशास्त्ररूपी सहाणेवर घासलेल्या तीक्ष्ण त्यागरूपी तरवारीनें मीं तोडून टाकिलीं आहेत. तेव्हां अशा रीतीनें स्वतः मोकळा झालेल्या मला तुझ्यासंबंधानें आपपर भाव वाटत नसल्यानें मी तुला सांगतों कीं, तूं जो आश्रम घेतला आहेस त्याला साजेलसें तुझें वर्तन नाहीं. तुझें रूप मोठें सुकुमार असून बांधा फार देखणा आहे. तूं तरुण आहेस. असें सर्व असून तूं नियमशील दिसतेस. या तुझ्या लिंगाला शोभेलसें तुझें कृत्य नाहीं. कारण मी मुक्त आहें किंवा नाहीं हें पहाण्यासाठीं तूं आली आहेस. वासना ह्मणून ज्याच्या मनांत आली, अशा योग्याला मग दंड कांहीं उपयोगाचा नाहीं. हा दंड राखावा तसा तुझ्या हातून राखला जात नाहीं. जे मुक्त आहेत त्यांनीं आपलें फिरून पतन न होऊं देण्याविषयीं खबरदारी घेतली पाहिजे. मनानें माझ्याशीं संबंध जडविण्यांत तुझ्या हातून काय काय दोष झाले आहेत ते सांगतों ऐक. कशाकरितां तूं माझ्या राज्यामध्यें किंवा नगरामध्यें शिरलीस? कोणाच्या सांगण्यावरून तूं माझ्या हृदयामध्यें शिरलीस? तूं सर्वांमध्यें उच्च अशा ब्राह्मण जातीपैकीं असून मी क्षत्रिय आहें; तेव्हां आपल्या दोघांमध्यें संबंध सांगितला नाहीं. तेव्हां असा वर्णसंकर कां करतेस? तूं मोक्षधर्मामध्यें असून मी गृहस्थाश्रमामध्यें आहें. तेव्हां या तुझ्या वर्तनानें हा दुसरा आश्रमसंकर झाला आहे. आतां तुझें माझें गोत्र एक आहे किंवा वेगळें आहे हें मलाही ठाऊक नाहीं व तुलाही पण ठाऊक नाहीं. आतां जर तें एक असेल तर आणखी गोत्रसंकराचा दोष लागतो. शिवाय तुझा नवरा जिवंत असेल किंवा दूरदेशीं असेल तर दुसऱ्याच्या बायकोशीं संबंध होऊं नये तो झाल्यानें हा चौथा धर्मसंकर घडला. अशा रीतीनें मनांत कांहीं उद्देश धरून अज्ञानानें किंवा खोट्या समजुतीनें भलतें काम करण्याला तूं तयार झालीस. तूं जरी तुझ्या अंगच्या दोषांमुळें स्वतंत्र असलीस तरी जर शास्त्र कांहीं तुझ्या कानांवरून गेलें असेल तर हे तुझ्या हातून अन्याय घडले आहेत, असें तुला दिसून येईल. शिवाय या कृत्यांनीं मनाची शांति नाहींशी करणारा तिसरा एक दोष तुझ्या हातून घडत आहे. आपलें वर्चस्व स्थापित करण्याचा प्रयत्न करून दुष्ट स्त्रीचें चिन्ह तूं दाखविलें आहेस. माझ्यावर जय मिळविण्याच्या ह्या तुझ्या इच्छेनें माझाच तूं पाडाव करूं पहात आहेस. एवढेंच नसून येथें जमलेल्या माझ्या विद्वान सभासदांचाही तूं पराभव करूं पहात आहेत. त्यांच्यावर अशा प्रकारची दृष्टि फेंकून त्यांना तोंड खालीं करावयास लावून आपला बडेजाव वाढविण्याचा तुझा बिचार आहे. याप्रमाणें आपल्या योगसामर्थ्यानें डोळ्यावर धुंदी येऊन माझ्या सामर्थ्यासंबंधानें मनांत मत्सर धरून तूं याप्रमाणें तुझ्या माझ्या सत्वांचा संबंध जडवून देऊन वीष व अमृत एकत्र मिसळून टाकलें आहेस. जेव्हां स्त्रीपुरुषांपैकीं प्रत्येकाला दुसऱ्याची इच्छा रहाते तेव्हां तो संबंध अमृताप्रमाणें गोड असतो. तेंच जेव्हां स्त्रीची इच्छा असून तिच्यावर प्रेम करणारा पुरुष जेव्हां तिला मिळत नाहीं तेव्हां त्यापासून उत्पन्न होणारा दोष विषासारखा असतो. तेव्हां हें नीट लक्षांत घेऊन आपला संन्यासधर्म राख. कारण मी मुक्त आहें किंवा नाहीं हें जाणण्यासाठीं हें तूं केलें आहेस. आतां अशा रीतीनें हें तूं स्वतःचा कांहीं हेतु साधण्यासाठीं किंवा दुसऱ्या कोणाकरितां केलें आहेस हें माझ्यापासून झांकून ठेवण्यांत कांहीं अर्थ नाहीं. राजा, ब्राह्मण व जी बायको स्त्रीधर्मानें पूर्ण वागते, यांच्याशीं मनुष्यानें कपट करूं नये; कारण राजाचें बल

ऐश्वर्य असून वेद हें ब्रह्मवेत्या ब्राह्मणांचें बल आहे. त्याचप्रमाणें रूप, यौवन व सौभाग्य हें स्त्रियांचें अत्युत्तम बल आहे. तेव्हां अशा बलांनीं युक्त यांकडे आपलें कल्याण इच्छिणाऱ्या मनुष्यानें सरळपणानें जावें, वांकडेपणानें गेल्यास नुकसान आहे; ह्मणून तुझी जाति, ज्ञान, वृत्ति, भाव स्वभाव त्याचप्रमाणें येथें येण्याचा हेतु मला खरेपणानें सांग.' याप्रमाणें कडक, अयोग्य व असमंजस अशा शब्दांनीं जरी राजानें तिचा तिरस्कार केला तरी न डगमगतां ती अधिकच गोड शब्दांनीं त्याला ह्मणाली. 'भाषणामध्यें नऊ शब्ददोष, त्याचप्रमाणें नऊ बुद्धिदोष नसावेत. त्याचा अर्थ स्पष्ट होत असावा, व पुढील अठरा गुणांनीं तें संपन्न असावें. सौक्ष्म्य (संदिग्धता), सांख्य (गुणदोषसंख्यान), क्रम (त्याचा बळाबळ विचार करणें), विनिर्णय (सिद्धान्त), प्रयोजन (अनुष्ठान), हे पांच गुण भाषणामध्यें असले ह्मणजे त्याला वाक्य ह्मणतात. यांचीं लक्षणें पुढें दिल्याप्रमाणें आहेत. जेव्हां ज्ञेय वस्तु निरनिराळ्या असून त्यांच्यासंबंधानें ज्ञान निरनिराळ्या रीतीनें रहातें तेव्हां त्यासंबंधीं निरनिराळ्या ठिकाणीं असणारी बुद्धि त्याला सौक्ष्म्य (संदिग्धता) ह्मणतात. कोणत्याही गोष्टीसंबंधानें गुणदोषांचे वेगवेगळ्या रीतीनें विचार करून प्रमाण ठरविणें याला सांख्य ह्मणतात. बोलावयाच्या भाषणामध्यें हें आधीं, हें मागून बोलावयाचें याला क्रम ह्मणतात. धर्मार्थकाममोक्षांसंबंधानें शास्त्रामध्यें सांगितलेल्या गोष्टींचा विचार करून निश्चय ठरविणें याला विनिर्णय ह्मणतात. इच्छा व द्वेष यांपासून उद्भवणारीं दुःखें वाढत असतांना तीं दूर करण्यासाठीं जी मनुष्याची वृत्ति रहाते तिला प्रयोजन ह्मणतात; तेव्हां जेवेळीं वर सांगितलेल्या ह्या सौक्ष्म्यादि गोष्टींकडे नीट लक्ष पुरविलें जातें तेव्हांच वाक्य पूर्ण व स्पष्ट असतें. तेव्हां आतां मी जें तुला बोलणार त्यांत अर्थ राहून तें संदिग्धतेपासून दूर, स्पष्ट व न्यायाला धरून राहील. त्यांत कांहीं पाल्हाळ रहाणार नाहीं. उगीच मोठमोठे शब्द येणार नाहींत. मधुर, सत्य, निश्चयात्मक व चांगलें असेल. धर्मार्थकामांला सोडून रहाणार नाहीं. प्राकृत असणार नाहीं, त्यांत कांहीं कमी असणार नाहीं. कठोरपणा रहाणार नाहीं. कळण्याला अवघड असणार नाहीं. त्याचा क्रम योग्य राहील. व त्यांत उगीच ओढून ताणून अर्थ लावीत बसावें लागणार नाहीं. त्यांचा एकमेकांशीं कार्यकारण संबंध राहील. व प्रत्येकाचा कांहीं विवक्षित अर्थ राहील. काम, क्रोध, भय, लोभ, दैन्य, नीचपणा, भीड, दया किंवा मान यांमुळें मी कांहीं बोलत नाहीं. जेवेळीं बोलणारा, ऐकणारा व बोलावयाचें भाषण यांमध्यें बोलतांना मेळ रहातो तेव्हांच त्याचा अर्थ स्पष्ट होतो. जेव्हां बोलतेवेळीं वक्ता ऐकणाराकडे लक्ष न देतां केवळ आपल्या मनाप्रमाणें बोलतो तेव्हां ते शब्द कितीही चांगले असले तरी ऐकणाराला त्याचा कांहीं अर्थ होत नाहीं. त्याचप्रमाणें स्वतःच्या अर्थाकडे लक्ष न देतां केवळ आलंकारिक गोड शब्द वापरून ऐकणाराला गार करण्याचा हा प्रयत्न करतो तेव्हां ऐकणाराच्या मनावर भलता परिणाम हा उत्पन्न करतो. जो वक्ता आपला अर्थ स्पष्ट करणारे शब्द वापरतो व ऐकणारालाही ते सुबोध असतात तेव्हांच त्याला वक्ता हें नांव शोभतें. ह्मणून सुबोध व स्पष्ट अर्थ देणारें माझें भाषण तूं नीट ऐकून घे. तूं मला, मी कोण वगैरे प्रश्न केलेस त्यांचें उत्तर देतें ऐक. ज्याप्रमाणें लाख आणि लांकूड किंवा धूळ व पाण्याचे थेंब एकत्र असतात, त्याप्रमाणें प्राणिमात्रांच्या अस्तित्वाची गोष्ट आहे. शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध त्याचप्रमाणें इंद्रियें हीं जरी आपापल्या तत्वांसंबंधानें वेगळीं आहेत तरी लाख व लांकूड याप्रमाणें तीं एकत्र आहेत. यांपैकीं कोणाला तूं कोण वगैरे प्रश्न कोणी केल्याचें ठाऊक नाहीं. यांपैकीं प्रत्येकाला स्वतःचें त्याचप्रमाणें दुसऱ्यांचें ज्ञान नसतें. डोळ्यांला स्वतःला पहातां येत नाहीं. कानांला स्वतःला ऐकतां येत नाहीं; त्याचप्रमाणें डोळ्यांना दुसऱ्या कोणत्याही इंद्रियांची कामगिरी बजावितां येत नाहीं. हे सर्व एकमेकांशीं मिळून असले तरी एकत्र असलेल्या धूळ व पाण्याप्रमाणें त्यांना एकमेकांना ओळखतां येत नाहीं. आपापल्या कामगिऱ्या बजाविण्यासाठीं बाह्य विषयांच्या संबंधाची त्यांना जरूर असते. डोळा रूप व प्रकाश हे तीन पहा-

ण्याला हेतु असतात. हीच गोष्ट दुसरीं इंद्रियें व तत्संबंधी ज्ञान या संबंधानें आहे. शिवाय इंद्रियांच्या पहाणें, ऐकणें वगैरे कामगिऱ्यांमध्यें इंद्रियांहून निराळें असें एक मन आहे,व त्याचें स्वतंत्रपणें निराळें काम आहे. त्याच्या साह्यानें सत् व असत् यांमधील भेद मनुष्य जाणतो. पांच ज्ञानेंद्रियें व पांच कर्मेंद्रियें हीं दहा असून मन अकरावें आहे. व बुद्धि बारावी आहे. जाणण्याच्या वस्तूंसंबंधानें जेव्हां संशय उत्पन्न होतो; तेव्हां तो दूर करण्याचें काम बुद्धीचें आहे. या बारांनंतर सत्व हा तेरावा गुण आहे. त्याच्या योगानें एखादा प्राणी महासत्व आहे किंवा अल्पसत्व आहे, हा भेद कळतो. त्यामध्यें अहंकार हा चौदावा गुण असून त्याच्या योगानें हें माझें, हें माझें नव्हे, असा भेद उत्पन्न होतो. याच्यानंतर वासना हा पंधरावा गुण असून त्याच्या योगानेंच जग अस्तित्वांत आलें आहे.सोळावी अविद्या आहे व यामुळें सतरावी प्रकृति व अठरावी व्यक्ति (माया व प्रकाश) हे गुण उत्पन्न होतात. सुख, दुःख, जरा, मृत्यु, लाभ, हानी, प्रिय, अप्रिय इत्यादिकांचें द्वंद्व हें एकोणीसावें आहे. यांच्या पलीकडे विसावा काळ आहे. याच्यामुळेंच सर्व प्राणिमात्रांचा जन्ममृत्यु असतो. हे वीस एकत्र असून यांच्याशिवाय पंचमहाभूतें व सद्भाव व असद्भाव मिळून एकंदर सत्तावीस होतात व यांच्या पलीकडे विधि, शुक्र व बल (वासनांचें बरें वाईट बीज, त्याचे अंकुरोत्पादक साधन व वासना पुरविणारें सामर्थ्य ) हीं तीन मिळून एकंदर तीस तत्वें होतात. हीं तीस तत्वें जेथें एकवटून असतात त्याला शरीर ह्मणतात. कांहीं लोक अव्यक्त, प्रकृतीला या तीस तत्वांचें कारण समजतात. अनीश्वरवादी सांख्य मतानुयायांचें हें मत आहे. स्थूलदर्शी कणादादिक व्यक्त अशा परमाणूंना याचें कारण समजतात. अव्यक्त प्रकृति किंवा व्यक्त परमाणु याचें कारण असोत किंवा पुरुष, माया, जीव व अविद्या हें याचें कारण असोत; अध्यात्मवेत्ते प्रकृतीलाच सर्व प्राणिमात्रांचें कारण समजतात. अव्यक्त प्रकृतीच यांच्या रूपानें व्यक्त होते. मी, तूं व दुसरें सर्व देहधारी हे सर्व आपल्या शरीरासंबंधानें पाहिलें असतां या प्रकृतीमुळेंच आहोंत' बीजारोपण व गर्भावस्था हीं शुक्र व शोणित एकत्र मिसळल्यामुळें प्राप्त होतात. या बीजारोपणाचा पहिला परिणाम कलल हा असून त्यापासून बुद्बुद व त्यापासून पेशी उत्पन्न होते. या पेशीपासून निरनिराळे अवयव व्यक्त होतात व यापासून नखें व केंस उत्पन्न होतात. नऊ महिने पुरे झाल्यावर प्राणी उत्पन्न होऊन त्याच्या लिंगावरून स्त्री किंवा पुरुष हें कळण्यांत येतें. जेव्हां प्राणी गर्भांतून बाहेर येतो, तेव्हां त्याचीं नखें व बोटें तांब्याप्रमाणें लाल असतात. पुढील कौमारावस्था आल्यावर हें त्याचें रूप रहात नाहीं. पुढें यौवनावस्था येऊन नंतर ह्मातारपण येतें वँ या क्रमानें पहिली पहिली स्थिति न उरतां नवी नवी स्थिति येते. शरीरांतील निरनिराळ्या वाढणाऱ्या परमाणूंमध्यें क्षणोक्षणीं बदल होत असतो. परंतु त्यांच्या सूक्ष्मपणामुळें तो दिसून येत नाहीं. दिव्याच्या ज्योतीच्या गतीप्रमाणें निरनिराळ्या अवस्थेमध्यें यांची उत्पत्ति व नाश दिसून येत नाहींत. शरीराची अशी स्थिति असतां अर्थात् शर्यतीला लागलेल्या पाणीदार घोड्याप्रमाणें याच्या गतीमध्यें क्षणोक्षणीं बदल होत असतां कोण कोठून आला आहे व कोण कोठून आला नाहीं, याला कोणाचें ह्मणतां येईल किंवा कोणाचें ह्मणतां येणार नाहीं, हें कोठून आलें किंवा कोठून आलें नाहीं असें ह्मणतां येईल. आपल्या प्रत्यक्ष अवयवांशीं प्राणिमात्रांचा काय संबंध उरतो ? गारगोटी व चकमक किंवा दोन लांकडें यांपासून अग्नि उत्पन्न होतो त्याप्रमाणें या वर सांगितलेल्या तीस तत्वांच्या संबंधाच्या योगानें प्राणिमात्र उत्पन्न होतात. ज्याप्रमाणें तूं आत्म्याला आपल्या शरीरामध्यें पहातोस त्याप्रमाणें दुसऱ्याच्या शरीरामध्यें तूं त्याला कां पहात नाहींस व आपल्याला आणि दुसऱ्याला एक दृष्टीनें जर तूं पहात असशील तर मी कोण ह्मणून तूं मला कां विचारतोस ? ज्याच्या योगानें हें माझें, हें माझें नव्हे, असा भाव उत्पन्न होतो, त्या द्वैतापासून जर तूं मुक्त असशील तर तूं कोण, कोणाची, कोठून आलीस या प्रश्नांमध्यें काय अर्थ आहे? मित्र, शत्रु, मध्यस्थ, जय, संधि, विग्रह यांसंबंधानें जो इतरांप्रमाणें वागतो त्या राजाचे ठिकाणीं मुक्त झाल्याचें चिन्ह काय ओळखावें ? एकमेकांशीं संबंधा-

नें वेगवेगळ्या रीतीनें सात प्रकारानें व्यक्त होणाऱ्या धर्मार्थकामांचें खरें स्वरूप जो ओळखत नाहीं त्याच्या ठिकाणीं मुक्त झाल्याचें लक्षण काय ओळखावें ? प्रिय, अप्रिय, दुर्बळ व बलवान् यांवर ज्याची सारखी नजर नाहीं त्याच्या ठिकाणीं मुक्त झाल्याचें काय लक्षण आहे ? तेव्हां मोक्षामध्यें चांगल्या रीतीनें न गढलेल्या तुझा हा अभिमान तुझ्या सुहृदांनीं दूर केला पाहिजे. अपथ्य सेवन करणाराला दिलेल्या औषधाप्रमाणें हा तुझा मोक्षप्राप्तीचा प्रयत्न आहे. राज्य, बायका वगैरे संगाला कारणीभूत अशा गोष्टींचा नीट विचार करून मनुष्यानें आपली नजर आपल्या ठिकाणीं लावण्याला शिकावें. मुक्त झाल्याचें लक्षण याहून दुसरें काय आहे. ? शयन उपभोग, भोजन व आच्छादन इत्यादिकांसंबंधानें जी आसक्ति उत्पन्न होते तिचें सूक्ष्म स्वरूप सांगतें ऐक; कारण, तूं जरी मोक्षधर्म स्वीकारल्याचा बाणा बाळगतोस तरी याशीं अद्यापि तूं जखडला आहेस. जो या संपूर्ण पृथ्वीवर अंमल गाजवितो तोही एकटाच असून एकाच शहरांत त्याला रहावें लागतें; एवढेंच नव्हे, तर त्या शहरामध्यें देखील एकाच वाड्यांत, एकाच खोलींत व एकाच अंथरुणावर त्याला रात्रीं पडावें लागतें; एवढेंच नव्हे, तर त्या अंथरुणापैकीं अर्धा भाग आपल्या बायकोला द्यावा लागतो. यावरून राजा जें कांहीं माझें माझें ह्मणतो त्यापैकीं सुद्धां राजाचें किती थोडें आहे हें दिसून येईल. त्याच्या उपभोगाच्या गोष्टी, खाण्याचें अन्न व वापरण्याचे कपडे यांच्या संबंधाची सुद्धां गोष्ट अशीच आहे. याप्रमाणें फार मर्यादित गोष्टींशीं याचा संबंध आहे. निग्रह व अनुग्रह यासंबंधाची गोष्ट पाहिली तरी अशीच आहे. राजा नेहमीं परतंत्र असून तो जें कांहीं माझें माझें ह्मणतो त्यापैकीं सुद्धां फार थोड्याचाच त्याला उपभोग मिळतो; व तेवढ्यामध्यें त्याला आसक्त होऊन रहावें लागतें. संधि, विग्रह, स्त्रिया, क्रीडा व विहार कशामध्येंही राजाला स्वतंत्रता नाहीं. सल्लामसलत घेण्यांत त्याचप्रमाणें सभेमध्यें त्याला स्वतंत्रता ह्मणून कशा प्रकारची आहे ? दुसऱ्यावर हुकूम सोडतांना तो मोठा स्वतंत्र आहे असें वाटत असतें; परंतु एकदां हुकूम सोडल्यावर ज्यावर हा हुकूम सोडतो त्यांकडूनच त्या त्या हुकमासंबंधानें याची स्वतंत्रता नाहींशी होते. त्याला जर निजावेंसें वाटलें तर याच्याशीं ज्यांचें काम असतें अशा लोकांमुळें त्याला निजतां येत नाहीं. ते निजूं देतील तेव्हांच त्याला निजतां येत असून जरूरीच्या कामाकरितां कोणी आलें असतां त्याला झोंपमोड करून उठावें लागतें. स्नान करा, उठा, खा, प्या, अग्नीला आहुती द्या, यज्ञ करा, बोला, ऐका, असे शब्द राजाला ऐकावे लागून ते ऐकून त्यांचे याला गुलाम बनावें लागतें. लोकांच्या झुंडीच्या झुंडी याच्याकडे येऊन कांहीं तरी मागण्या करीत असतात. परंतु सार्वजनिक खजिना याला संभाळावयाचा असल्यामुळें कधीं कधीं अगदीं योग्य मनुष्याला सुद्धां याला देणगी देतां येत नाहीं. हा देणगी देईल तर याचा खजिना रिता पडतो. न देईल तर हिरमोड झालेले याचक याचे शत्रू बनतात. याप्रमाणें तो अगदीं गांजला जाऊन अगदीं वैतागून जातो. पुष्कळ शहाणे, शूर व श्रीमान लोक एकत्र राहिले कीं, राजाचें मन संशयानें घेरून जातें. जे ह्याच्याजवळ असून याच्या सेवेंत दक्ष असतात त्यांच्या संबंधानें सुद्धां कांहीं कारण नसतां राजाला भीति रहाते. तेही त्याला नांवें ठेवूं लागतात. आतां दुसरा विचार केला असतां जो तो आपल्या घरीं राजा आहे, जो तो अपल्या घरीं यजमान आहे, जो तो आपल्या घरीं शिक्षा व अनुग्रह करीत असतो. राजाप्रमाणेंच प्रत्येकाजवळ बायका पोरें, सेवक, खजिना, मित्र व संचय असतात. या बाबतींत राजामध्यें व त्यांमध्यें कांहीं भेद नसतो. देशाचा नाश झाला, शहराला आग लागून त्याचा फडशा झाला, मुख्य हत्ती मेला; अशा गोष्टींनी सामान्य लोकांप्रमाणेंच अज्ञानानें राजाला दुःख होतें, इच्छाद्वेषांपासून उद्भवणाऱ्या मानसिक दुःखापासून ही तो सुटलेला नसतो. डोकें दुखणें, नानाप्रकारच्या व्याधि व सुखदुःखादि द्वंद्वें त्याच्या मागें लागलेलीं असतात. प्रत्येक गोष्टीपासून त्याला भीति वाटत असते. शत्रू व नानाप्रकारचे अडथळे यांनीं राज्य घेरलें असल्यामुळें राजा त्याचा उपभोग घेत असतांना रात्रीच्यारात्रीं याला डोळ्याला डोळा

न लावतां काढाव्या लागतात; ह्मणून राज्यामध्यें फार थोडें सुख व पुष्कळ दुःख असून यांत कांहीं अर्थ नाहीं. अथवा गवताला लागलेल्या अग्नीच्या ज्वालेप्रमाणें, फेंसाप्रमाणें, बुडबुड्याप्रमाणें त्यांत कांहीं जीव नसतां राज्याची कोण आशा धरील? व तें मिळून शांति कोणाला मिळेल? हें राज्य व हा वाडा तूं आपला समजतो आहेस; त्याचप्रमाणें हें सैन्य, हा खजिना, हे मंत्री तुला आपलेसे वाटत आहेत; परंतु हें कोणाचे आहेत? नगर, राष्ट्र, मित्र, अमात्य, दंड, खजिना व राजा या सात अंगांनीं युक्त असें हें राज्य त्रिदंडासारखेंच असून या एकमेकांमधील गुणदोष सारखे आहेत; तेव्हां कशाला अधिक ह्मणतां येणार? कारण त्या त्या वेळीं त्या त्या अंगाची विशेष मातब्बरी ठरते. ज्याच्या योगानें ज्या ज्या वेळीं काम साधतें त्या त्या वेळीं त्याला त्याला श्रेष्ठता येते. वर सांगितलेलीं सात अंगें व वृद्धि, क्षय व स्थान मिळून दहा राजाप्रमाणेंच राज्याचा उपभोग घेतात. जो राजा उत्साहसंपन्न असून क्षत्रधर्मामध्यें गढला असतो, त्यानें आपल्या प्रजेच्या उत्पन्नाच्या दहाव्या हिश्शानें संतुष्ट असावें. कांहीं राजे तर याहून कमी हिश्शावर संतुष्ट असतात. आपल्या बरोबरीला दुसरा कोणी नसून आपण एकटाच राज्याचा उपभोग घेणारा राजा सांपडणें कठीण असून राजावांचून राज्य सांपडावयाचें नाहीं. राजा नसेल तर धर्म कोठून रहाणार? व धर्म नसेल तर मोक्ष कोठून मिळणार? जो अतिश्रेष्ठ व पवित्र धर्म आहे तो राजा व राज्य यांवर अवलंबून आहे. राज्य चांगलें केल्यानें, पृथ्वी दक्षिणा देऊन जें फल मिळतें त्याच्यापेक्षां अधिक फल मिळतें. अशा प्रकारचे हजारों दोष मला सांगतां येतील. प्रत्यक्ष माझ्या देहाशीं जर माझा संबंध नाहीं तर दुसऱ्याच्या देहाशीं तो कोठून येणार? तेव्हां संकरासंबंधानें जें तूं मला बोललास त्यांत कांहीं अर्थ नाहीं. पंचशिखापासून मोक्षधर्म, त्याचीं साधनें; उपाय, कृति व निर्णय यांसकट समग्र तूं कधीं ऐकून घेतला आहेस काय? सर्व बंधनें तोडून सर्व पाश सोडून जर तूं असशील तर छत्रादिक विशेष गोष्टीशीं हा संबंध तुला कशाला हवा? शास्त्र तुझ्या कानावरून गेलें नाहीं, तें ऐकून तुझ्या मनावर त्याचा योग्य परिणाम झाला नाहीं. शास्त्राप्रमाणें भासणारें दुसरें कांहीं तरी तुझ्या कानावरून गेलें आहे. केवळ लौकिक ज्ञान तुला असून घर, बायका, स्पर्श इत्यादि बंधनांनीं सामान्य जनांप्रमाणें तूं बांधला गेला आहेस असें दिसतें. जर तसें नसतें तर केवळ मी आपल्या सत्वानें तुझ्या ठिकाणीं शिरल्यांत तुझें काय बिघडलें? शून्य अशा ठिकाणीं रहावें असा यतीचा धर्म आहे, त्याप्रमाणें सत्यज्ञानापासून शून्य अशा तुझ्या बुद्धीमध्यें क्षणभर मीं राहिल्यानें कोणाचा काय अपराध माझ्या हातून घडला? हातानें, बाहूंनीं, पायांनीं, मांड्यांनीं किंवा दुसऱ्या कोणत्याही अवयवानें मी तुला शिवलें नाहीं. तुझा मोठ्या कुलांत जन्म झाला असून भीड ह्मणून तुला कांहीं आहे तसाच पोंच आहे; तेव्हां ही आपल्यामध्यें घडलेली गोष्ट मग ती चांगली असो किंवा वाईट असो, भर सभेंत बोलून दाखविणें हें तुला योग्य नव्हतें. हे सर्व ब्राह्मण थोर असून मला मान्य आहेत. त्यांचा राजा असल्यानें तूंहीं त्यांच्या मानाला पात्र आहेस. त्यांना मान देऊनच त्यांच्या मानाला तूं पात्र होतोस. या सर्वांचा विचार करून तुला काय बोलावें काय नाहीं हें जर ठाऊक असतें तर भिन्न जातीच्या आपल्या दोघांस्त्रीपुरुषांचा संबंध भर सभेंत तूं बोलून दाखविला नसतास. तुझ्या ठिकाणीं कमलपत्रावरील जलबिंदूप्रमाणें तुला न शिवतां मी राहिलें आहे. असें असूनही जर माझा स्पर्श तुला भासत असेल तर मग पंचशिखांच्या उपदेशाचा तुझ्यावर कांहींच परिणाम झाला नाहीं ह्मणावयाचें. इकडे गृहस्थाश्रमालाही मुकून इकडे दुर्मिळ मोक्षही न मिळतां उगीच मोक्षाचें नांव मात्र ठाऊक होऊन तूं मध्यें लोंबत आहेस; कारण मुक्ताशीं संबंध किंवा पुरुषाचा प्रकृतीशीं संबंध, तूं ज्याला इतका भीत आहेस, त्या वर्णसंकराला कधीं कारण होत नाहीं. फक्त जे देह व आत्मा एक समजतात व निरनिराळे वर्णाश्रम भिन्न समजतात त्यांनाच ह्या वर्णसंकराची भीति रहाते. हा देह तुझ्या देहाहून वेगळा असेल, परंतु हा आत्मा तुझ्या आत्म्याहून वेगळा नाहीं. भांडें हातामध्यें असून त्यांत दूध अ-

सतें व त्या दुधांत माशी असते; जरी हात व भांडें आणि दूध व माशी एकमेकांशीं संबंध जडून आहेत तरी तीं एकमेकांपासून वेगळीं आहेत. भांड्यामध्यें दुधाचा गुण किंवा दुधामध्यें माशीचा गुण कधीं येत नाहीं. या सर्वांची स्थिति स्वतःवर अवलंबून असून ज्याच्याशीं तात्पुरता संबंध झालेला असतो त्या योगानें तीं पालटत नाहींत; तेव्हां याप्रमाणें निरनिराळे वर्णाश्रम जो मुक्त झाला आहे त्याच्या ठिकाणीं एकत्र असले तरी त्यापासून वर्णसंकर कसा होतो? शिवाय मी उत्तम जो ब्राह्मण त्या जातीची नसून वैश्य किंवा शूद्र जातीचीही नाहीं. शुद्ध कुळांत झालेली मी तुझ्या वर्णाचीच आहें. प्रधान नांवाचे राजऋषी तुझ्या ऐकण्यांत असतीलच; त्यांच्या कुळांत झालेली मी सुलभा आहें. माझ्या पूर्वजांनीं केलेल्या यज्ञामध्यें इंद्र द्रोण, शतशृंग, शक्रद्वार या पर्वतांसह हजर रहात असे. अशा कुळांत जन्म झाला असून मला योग्य असा नवरा न मिळाल्यानें मोक्षधर्म शिकून मी एकटी मुनिव्रत पाळून राहिल्यें आहें. संन्यास धर्माचें मीं ढोंग केलें नाहीं. दुसऱ्याला मी विचारणारी नव्हें, बुचाडणारी नव्हें, धर्मसंकर करणारी नव्हें, परंतु कडकडीत व्रत पाळून मी आपल्या धर्मामध्यें गढून आहें. मी आपल्या प्रतिज्ञेमध्यें स्थिर आहें. विचार केल्याशिवाय मी कांहीं बोलत नाहीं व तुझ्याकडे विचार केल्यावांचून आल्यें नाहीं. मोक्षाकडे तुझी बुद्धि लागली आहे असें ऐकून तुझ्या कल्याणासाठीं हा तुझा मोक्ष कशा प्रकारचा आहे हें कळवून देण्यासाठीं मी येथें आल्यें. स्वतःचें नांव करून प्रतिपक्षाचा हिरमोड करण्यासाठीं मी हें बोलत नसून अगदीं सद्भावानें बोलत आहें. जो मुक्त झालेला असतो तो दुसऱ्यावर जय मिळवावा ह्मणून कधींही वादविवादांत मन घालीत नाहीं. शांतीचें माहेरघर असें जें परब्रह्म त्याकडे जो लक्ष लावतो तोच खरा मुक्त होय. ज्याप्रमाणें संन्यासी शहरांतल्या घरांत एक रात्र रहातो, त्याप्रमाणें तूं माझें मानदानांनीं व शब्दांनीं आतिथ्य केलें असल्यामुळें एक रात्र या ठिकाणीं खुशाल झोंप काढून उद्यां निघून जाईन.' हें तिचें मुद्देसूद भाषण ऐकून राजा गप्प झाला.'

---

## २१६ शुकाचें वैराग्य. (१२. ३२१–२२)

शुकाचार्यांना वैराग्य कसें आलें हें सांगा ह्मणून युधिष्ठिरानें विचारलें असतां भीष्म ह्मणाले, 'सामान्य जनांप्रमाणें चांगलें वर्तन ठेवून निर्भयपणें रहात असलेल्या आपल्या मुलाला सर्व वेद पढविल्यावर एके दिवशीं व्यास त्यांना ह्मणाले, 'मुला, इंद्रियनिग्रहानें कडक ऊन्ह व थंडी, भूक, तहान, वारा यांना जिंकून धर्माकडे लाग. सत्य, सरळपणा, दम, तप, अहिंसा, दया, कोणावर न रागावणें किंवा कोणाचा द्वेष न करणें हे गुण योग्य रीतीनें अंगांत बाणीव. धर्मामध्यें गढून सत्यानें वागून वांकडेपणा सोडून दे. देवता व अतिथी यांचा समाचार घेऊन बाकीच्यावर उदरनिर्वाह कर. हा देह क्षणांत नाहींसा होणाऱ्या पाण्यावरील फेसाप्रमाणें क्षणिक असून हा जीव त्यावर बसलेल्या पक्ष्याप्रमाणें आहे. प्रिय वस्तूशीं संबंध अशाश्वत आहे असें असून तूं झोंप घेत कसा पडला आहेस? अगदीं हुषारीनें जागत नेहमीं जय्यत तयार असून शत्रू संधीची वाट पहात असतां पोरस्वभावामुळें अद्याप तुला तें उमगत नाहीं. दिवस जसजसे एका मागून एक चालले आहेत तसतशी आयुष्याची मर्यादा क्षीण होऊन जीवित कमी होत चाललें असतां उठून गुरूकडे धांव कां घेत नाहींस? नास्तिक लोक मांस व रक्त यांना वाढविणाऱ्या ऐहिक गोष्टींकडे लक्ष देऊन परलोकाला उपयोगीं पडणाऱ्या गोष्टींसंबंधानें खुशाल झोंप घेतात. जे बुद्धीला मोह पडून धर्माचा द्वेष करतात अशा भलत्या वाटेला लागलेल्या लोकांच्या मागून जाणाऱ्यालासुद्धां पीडा होते. जे मोठे सामर्थ्यवान महात्मे संतुष्ट राहून श्रुतीकडे लक्ष देऊन धर्ममार्गाला लागले आहेत त्यांची शुश्रूषा करून त्यांना विचारावें व अशांचा उपदेश घेऊन चांगल्या बुद्धीच्या योगानें भलतीकडे जाणाऱ्या मनाला आंवरावें. आजच्याकडे लक्ष देऊन उद्यांची गोष्ट दूर आहे असें समजून निर्भयपणें वाटेल तें सर्व कांहीं खात रहाणारे मूढ लोक या कर्मभूमीला ओळखत नाहींत. धर्मरूपी जिन्याला लागून हलके हलके त्याच्या पायऱ्या चढूं लागाव्या. रेशमाचा किडा ज्याप्रमाणें स्वतःला आपल्याच नाशासाठीं तंतूंनीं वेढून घेत असतो, त्याप्रमाणें हा जीव आपल्याला

कर्मांनीं वेढून घेत असून तें जाणत नाहीं. जो नास्तिक आहे, मर्यादा सोडून वागतो, त्याचप्रमाणें जो तीरांना फोडून काढणाऱ्या पुराप्रमाणें आहे, अशा ताठारलेल्या मनुष्याला कमलाप्रमाणें एका बाजूला करावें. योगरूपी नावेनें हा संसारसागर तरून जावा. या सागरामध्यें पंचेंद्रियरूपी पाणी असून वासना, क्रोध व मृत्यु हे यांतील मोठे जलचर आहेत, व जन्मरूपी भोंवरे यांत आहेत. या जरामृत्यूंनीं घेरलेल्या जगावर अहोरात्ररूपी वज्रांचा कायमचा प्रहार चालला आहे. मृत्यु हा मनुष्याला प्रत्येक क्षणीं मग तो बसला असो किंवा निजला असो, हुडकून गट्ट करण्याला तयार आहे. बकऱ्याला पळवून नेणाऱ्या लांडगीप्रमाणें जो पैसा मिळविण्यांत गढला असून विषयोपभोगापासून तृप्त झाला नसतो अशाला तो विषयोपभोगामध्यें असतांच मृत्यु पळवून नेतो. मनुष्याला केव्हांनाकेव्हां काळोखांत शिरावयाचें असल्यानें धर्मबुद्धिरूपी, ज्याची ज्योत काळजीपूर्वक राखली आहे अशा प्रकारचा दिवा त्यानें बरोबर तयार करून ठेवावा. निरनिराळ्या योनीमध्यें जन्म घेण्याचा प्रसंग आला असतां ब्राह्मण जन्म मोठ्या कष्टानें मिळतो; तेव्हां तो मिळाला असतां तो संभाळण्याविषयीं प्रयत्न करावा. यथेच्छ वासनेच्या मागें लागण्यासाठीं ब्राह्मणाचा जन्म नसून इहलोकीं क्लेश सोसून तप करून परलोकीं अनुपम सुख घेण्यासाठीं तो आहे. पुष्कळ तपानें ब्राह्मणत्व येत असून तें मिळालें असतां विषय सुखाकडे लागून तें फुकट दवडूं नये. वेदाध्ययन, तप व दम यांमध्यें गढून आपल्या कल्याणाकडे लक्ष द्यावें. मनुष्याचें वय हें घोड्याप्रमाणें असून त्याची प्रकृति अव्यक्त आहे. पूर्वी सांगितलेल्या सोळा कलांनीं याचें शरीर बनलें असून याचा आत्मा फार सूक्ष्म आहे. क्षण, त्रुटि आणि निमिष हेच त्याच्या अंगावरील केंस आहेत. दोन संध्यासमय हेच दोन खांद्यांचे सांधे असून शुक्ल व कृष्ण पक्ष हे त्याचे दोन डोळे आहेत. महिने हे त्याचे दुसरे अवयव आहेत. असा हा घोडा सतत धांवत आहे. जर मनुष्याचे डोळे आंधळे नसतील तर याला याप्रमाणें सतत जगामध्यें चाललेला पाहून मनुष्यानें गुरूपासून परलोकासंबंधानें ज्ञान करून घेऊन धर्माकडे लक्ष देऊन रहावें. जे धर्मभ्रष्ट होऊन स्वैर वागतात व दुसऱ्याच्या नांवानें खडे फोडून भलता मार्ग धरतात, त्यांना यमलोकीं पुष्कळ क्लेश सोसावे लागून अधर्मापासून घ्यावे लागणारे पुष्कळ कष्टमय देह घ्यावे लागतात. जो राजा धर्मानें वागून विचारपूर्वक दुष्टांना शिक्षा देऊन भल्यांचें रक्षण करतो, त्याला चांगले लोक मिळतात. नानाप्रकारचीं कर्मे करून सुद्धां त्याला निर्दोष असें, हजार जन्मांनीं सुद्धां न मिळणारें शुद्ध सुख मिळतें. मोठ्या क्रूर वर्तनाचे कुत्रे, लोहमयचोंचींचे कावळे, गिधाडें व दुसरे पक्षी, त्याचप्रमाणें रक्त शोषून घेणारे किडे जो मनुष्य आपल्या आईबापांच्या व गुरूच्या आज्ञा मोडतो अशाचें रक्त शोषून घेतात. जो मनुष्य ब्रह्मदेवांनीं घालून ठेविलेल्या अहिंसादि दहा मर्यादा स्वेच्छाचारानें उल्लंघन करतो त्याला पितृलोकामधील निबिड अरण्यामध्यें मोठ्या दुःखांत काळ काढावा लागतो. जो मनुष्य लोभानें घेरला असून असत्य ज्याला आवडतें व जो ढोंग व कपट करून दुसऱ्यांना पीडा देतो असा दुष्कर्म करणारा मनुष्य घोर नरकांत जाऊन मोठें दुःख सोसतो. अशा मनुष्याला कडकडीत पाण्याच्या वैतरणीनदीमध्यें स्नान करावें लागून ज्याचीं पानें तरवारीच्या धारेप्रमाणें आहेत अशा वनांमधून अंग फाटत राहून फिरावें लागतें व परशु पसरलेल्या ठिकाणीं पडावें लागतें, व याप्रमाणें घोर नरकांत मोठ्या दुःखानें काळ काढावा लागतो. ब्रह्मदेव वगैरे देवांच्या लोकांसंबंधानें तूं बडबड करतोस; परंतु मृत्यु आणणाऱ्या जरादिकांना ओळखीत नाहींस. तेव्हां याप्रमाणें मोठें भय पुढें वाढून ठेविलें असतां स्वस्थ न बसतां पुढच्या खटपटीला लाग. मेल्यावर लवकरच यमाच्या आज्ञेनें तुला त्याकडे जावें लागणार. कडक अशा तपानें पुढच्या सुखासाठीं धर्मसंचय करून ठेव. दुसऱ्याच्या रडण्याकडे लक्ष न देणारा प्रभु यमधर्म आप्तबांधवांसह तुझा प्राण हरण करून नेईल. त्याला निवारण करणारा कोणी नाहीं. लौकरच त्याचा तुझ्यावर घाला पडून त्याच्यापुढें तुला जावें लागेल. तेव्हां त्या ठिकाणीं तुझ्या उपयोगीं पडेल असें कांहीं सांठवून ठेव. य-

माच्यापुढें असणारा जो वायु तो लौकरच तुझ्याजवळ वाहूं लागून तुला एकट्याला तो घेऊन जाईल; तेव्हां परलोकाचें साधन कांहीं तरी कर. हा वायु तुझ्यापुढें लवकरच वाहूं लागून त्या भयंकर प्रसंगीं तुला दिशाभूल पडेल. निरुपाय होऊन तूं चाललास असतां वेदांचा तुला विसर पडेल. ह्मणून उत्तम अशी समाधि लाव. ज्यामध्यें चूक दिसून येते आहे, अशा प्रकारचें पूर्वी केलेलें शुभाशुभ कर्म आठवून रडण्याची पाळी न यावी ह्मणून जो कांहीं केवळ अमोल्य सांठा आहे तो सांठीव. ह्मातारपणानें तुझें शरीर जर्जर होऊन तुझें बल, तुझे अवयव व तुझें रूप नाहींसें होण्यापूर्वी तो कैवल्यस्वरूपी अप्रतिम सांठा सांठविण्याला प्रयत्न कर. साह्याला रोग घेऊन काळानें तुझे प्राण घेण्यासाठीं तुझें शरीर फोडून काढलें नाहीं त्यापूर्वीच मोठें तप करून ठेव. मनुष्यदेहामध्यें दिसून येणाऱ्या भयंकर लांडग्यांचा चोहोंकडून तुझ्यावर हल्ला होण्याच्यापूर्वी पुण्य सांठविण्याच्या खटपटीला लाग. तुला एकट्याला गडप अंधकार पहाण्याची वेळ येऊन पर्वताच्या शिखरावर सोन्याचीं झाडें दिसूं लागण्याच्या पूर्वी जलदी कर. तुझे वाईट सोबती व मित्रासारखे दिसणारे शत्रू यांनीं तुझ्या दृष्टीला भूल पाडली नाहीं त्या पूर्वी जें कांहीं सर्वश्रेष्ठ आहे त्याच्यासाठीं प्रयत्न कर. ज्या द्रव्याला राजापासून किंवा चोरापासून भीति नसून जें मेल्यावरही आपल्याला सोडीत नाहीं अशा द्रव्याचा संचय कर. या द्रव्याचा परलोकीं कोणाला वांटा यावा लागत नसून जो कांहीं ज्याचा संचय असेल तो त्याला तेथें भोगण्याला मिळतो. परलोकीं ज्यानें जगतां येतें तें या लोकीं दान कर. जें अक्षय्य व कायमचें द्रव्य आहे, अशा द्रव्याचा तूं संचय कर. घृतकुल्या, मधुकुल्या यांचा चमचमीत उपभोग घेऊन नंतर मोक्षाकडे लागेन असा विचार मनांत आणूं नकोस; कारण विषयोपभोगाची तृप्ति होण्यापूर्वीच झटपट तुला मरण्याची पाळी येईल. आई, मुलगा, बांधव, गोंजारलेले आवडते लोक वगैरे कोणीही, मनुष्य मरून चालला असतां त्या संकटाच्या वेळीं त्याच्या मागून जात नाहीं. पूर्वी केलेलें जें शुभाशुभ कर्म असेल तेंच तो स्वर्गाला चालला असतां त्याच्या जोडीला असतें. बरीं वाईट कर्में करून सांठविलेलें सोनें व रत्नें मेल्यावर मनुष्याला उपयोगीं पडत नाहींत. परलोकाला निघाला असतां मनुष्यानें केलेल्या बऱ्या वाईट कर्मांचा साक्षी त्याच्या आत्म्यासारखा दुसरा कोणी नाहीं. जेव्हां हा परलोकीं जातो तेव्हां शरीराचा नाश होतो. व हें योग्याला हार्दाकाशामध्यें शिरलें असतां ज्ञानचक्षूनें दिसत असतें; शिवाय ह्या जगांत व शरीरामध्यें रहाणारे अग्नि, सूर्य व वायु हे मनुष्याचें शुभाशुभ पहात राहून त्याचे साक्षी असतात. प्रकाश पाडण्याचा व अंधकारामध्यें झांकून ठेवण्याचा गुण ज्यांमध्यें आहे असे दिवस व रात्री मनुष्याला सतत शिवून असून मनुष्याचें आयुष्य कमी करीत चालले आहेत. परलोकाचा रस्ता पुष्कळ लोखंडी चोंचीच्या पक्ष्यांनीं, लांडग्यांनीं आणि विरूप व भयंकर अशा क्षुद्र प्राण्यांनीं भरून राहिला आहे. ह्मणून मनुष्यांनीं आपल्या कर्माबद्दल खबरदारी घ्यावी; कारण त्याचें कर्मच त्या ठिकाणीं त्याच्या बरोबर येत असतें. त्या ठिकाणीं आपलें कर्म दुसऱ्या कोणाला वांटून यावें लागत नसून जें कांहीं आपण केलें असेल त्याचेंच फल आपल्याला भोगावयास मिळतें. अप्सरा व मोठमोठे ऋषि ह्यांना ज्याप्रमाणें मोठें सुख भोगावयास मिळतें त्याचप्रमाणें पुण्यवान् लोकांना विमानांत बसून फिरावयाला मिळून आपल्या कर्मांचें फल भोगण्याला मिळतें. निष्पाप रीतीनें शुद्ध अंतःकरणानें ह्याठिकाणीं पुण्यवान लोकांकडून शुद्ध जन्म घेऊन जें कर्म होतें तेंच फल त्यांना मिळतें. ते गृहस्थधर्माच्या सेतूनें प्रजापती बृहस्पति व इंद्र यांच्या लोकांना जाऊन श्रेष्ठ गति मिळवितात. याप्रमाणें हजारों उदाहरणें देतां येतील. प्रभु धर्म सर्व मूर्ख लोकांना अज्ञानापासून उत्पन्न होणाऱ्या मोहामध्यें ठेवीत असतो. चोवीस वर्षें सरून तुला पंचविसावें लागलें आहे; तेव्हां धर्मसंचय कर. तुझें वय निघून चाललें आहे. प्रमादरूपी तुझ्या गृहामध्यें रहाणाऱ्या काळानें तुझ्या इंद्रियसेनेला हतवीर्य करून टाकलें नाहीं त्या पूर्वी सावध होऊन धर्म पदरीं सांचविण्याची त्वरा कर. ज्याअर्थी पुढें मागें तुला स्वतःलाच घेऊन एकटे जाण्याची वेळ येणार, त्या

अर्थी तुला ह्या देहाला किंवा दुसऱ्या कोणाला घेऊन काय करावयाचें आहे ? ज्याअर्थी मनुष्याला सोबतीवांचून एकट्यालाच परलोकाला जावें लागतें त्याअर्थी संकटप्रसंगीं साह्यासाठीं धर्मरूपी उत्तम सांठा करून ठेवावा. कोणाची कींव न बाळगणारा यम मनुष्याच्या कुळाला मुळासकट घेऊन जातो. त्याला आडविण्याचें कोणाच्या हातीं नाहीं. ह्मणून मनुष्यानें धर्म जवळ सांठवून ठेवावा. हीं मीं सांगितलेलीं उदाहरणें धर्माला धरून आहेत. तर तूं याप्रमाणें वाग. जो मनुष्य आपल्या वर्णाला सांगितल्याप्रमाणें वागून देह धारण करतो व जो कोणत्याही फलाची इच्छा न करतां धर्म करतो तोच अज्ञानरूपीमोहामुळें उत्पन्न होणाऱ्या गुणापासून मुक्त होतो. पुण्यकर्म करणाऱ्याला श्रुतीच्या ज्ञानापासून जें ज्ञान मिळतें त्यामुळें सर्वज्ञता येते. ती सर्वज्ञताच मोक्ष आहे. कृतज्ञाला दिलेला उपदेश हितावह होतो. गांवांत राहण्याची आवड राहणें हाच मनुष्याला बांधून टाकणारा पाश आहे. गुणवान लोक याला तोडून निघून जातात. पाप्यांना याला तोडतां येत नाहीं. जो तूं कधीं तरी खात्रीनें मरणार त्या तुला पैसा, बांधव किंवा मुलें यांना घेऊन काय करावयाचें आहे ? गुप्त ठिकाणीं दडून राहिलेल्या आत्म्याला शोधून काढ, तुझे सर्व पूर्वज कोठें गेले याचा विचार कर. उद्यांचें काम आज करावें व दुपारचें काम सकाळीं करावें. कारण याचें काम संपलें किंवा नाहीं ह्मणून कांहीं मृत्यु याची वाट पहात बसत नाहीं. मनुष्य मेल्यावर त्याचे बांधव, ज्ञाती व मित्र स्मशानापर्यंत त्याच्याबरोबर जाऊन त्याला अग्नींत टाकून परततात. जे नास्तिक आहेत, ज्यांना दया नाहीं, जे दुष्ट मार्गाला लागले आहेत, अशा लोकांना खात्रीनें दूर करून दक्षतेनें सर्वश्रेष्ठवस्तु मिळविण्याच्या खटपटीला लाग. याप्रमाणें जगावर मृत्यूचा घाला पडत असतां मोठ्या नेटानें सर्व लक्ष तिकडे लावून धर्म सांठीव. जो मनुष्य मोक्षसाधनाचा उपाय पूर्ण जाणतो व स्वधर्म योग्य रीतीनें ओळखून पाळतो तो परलोकीं सुख भोगतो. देह नाहींसा झाला असतांही जीव मरत नाहीं हें ओळखून जे भल्यांनीं लावून दिलेल्या वाटेपासून ढळत नाहींत, त्यांना मरण नाहीं. जो धर्म वाढवीत रहातो तोच शहाणा. धर्मापासून भ्रष्ट होणारा मूर्ख. जो पुण्यकर्मामध्यें गढला आहे त्याला स्वर्ग त्याचप्रमाणें दुसरीं त्यानें कर्में केलीं असतील तशा प्रकारचीं उत्तम फळें मिळतात. जो वाईट कर्मामध्यें गढला असतो तो नरकाला जातो. स्वर्गाचा जो जिना आहे, असा हा दुर्लभ मनुष्य जन्म मिळाला असतां अशा प्रकारच्या कर्मामध्यें गढून असावें कीं, ज्याच्या योगानें फिरून भ्रष्ट होण्याची पाळी येऊं नये. स्वर्गाच्या वाटेकडे लागलेली ज्याची बुद्धि त्या वाटेपासून ढळत नाहीं, तोच खरा पुण्यवान असून त्याच्या मरणाबद्दल मुलांना व बांधवांना शोक करण्याचें कारण नाहीं. ज्याची बुद्धि स्थिरपणानें ब्रह्माकडे लागली आहे तो स्वर्गाला जातो; त्याला नरकाला जाण्याच्या भीतीचें कारण उरत नाहीं. **कामभोग ज्यांना माहीत नाहींत, अशा तपोवनामध्येंच जन्मून गेलेल्यांच्या प रीं मोठेंसें पुण्य पडत नाहीं परंतु जे सर्व भोगांना सोडून शरीरानें तप करतात, त्यांनीं साधलें नाहीं असें कांहींच नाहीं, आणि हच मला विशेष संमत आहे.** आजवर हजारों आईबाप व शेंकडों बायकापोरें झालीं व होणार. ते कोणाचे व आपण कोणाचे ? मी एकटा आहें, माझा कोणी नाही, मी कोणाचा नाहीं. मी ज्याचा आहें किंवा जो माझा आहे असा मला कोणीच दिसत नाहीं, हा विचार ठेवावा. त्यांना तुझ्यापासून कांहीं उपयोग नाहीं व तुला त्यांपासून कांहीं नाहीं. आपल्या पूर्वकर्मानुसार त्यांनीं जन्म घेतला आहे व तुलाही तुझ्या कर्मानुसार नवा जन्म घेण्यासाठीं जावें लागणार आहे. **ह्या जगामध्यें श्रीमंतांचेच आप्त त्यांच्याशीं आप्तांप्रमाणें वागतात. गरीबांचे आप्त जिवंतपणींच त्यांना नाहींसे होतात.** मनुष्य बायकोसाठीं पाप पदरीं सांठवितो व त्यामुळें इहपरलोकीं दुःख भोगतो. तर वर सांगितल्याप्रमाणें आचरण ठेव. ही कर्मभूमि आहे, हें लक्षांत ठेवून परलोकाची इच्छा असणारानें चांगलीं कृत्यें करीत असावें. काळ या जगामध्यें आपलें मोठें सामर्थ्य चालवून महामोहरूपी काहिलीमधून महिने व ऋतु या

पल्यांनीं ढवळून सर्व प्राणिमात्रांच्या कर्मांचे,जे खात्रीनें फल देणारे साक्षिदार आहेत, असे दिवसरात्ररूपी सर्पण घालून सूर्यरूपी विस्तवाची आंच देऊन सर्व प्राणिमात्रांना शिजवून काढीत आहे. ज्या पैशाचें दान होत नाहीं किंवा उपभोग घेतला जात नाहीं, असा पैसा असून काय उपयोग ? ज्याच्या योगानें शत्रूला पीडा होत नाहीं, असें बळ असून तरी काय करावयाचें आहे ? तसेंच ज्याच्यायोगानें धर्माचरण होत नाहीं, असें शास्त्रज्ञान असून तरी काय करावयाचें आहे व ज्याच्यायोगानें इंद्रियनिग्रह होऊन दुष्कृत्यांपासून परततां येत नाहीं असा आत्मा असून तरी काय उपयोग ! ' हें बापाचें हितावह भाषण ऐकून शुक, मोक्षोपदेश देईल असा गुरु पहात निघून गेले. '

युधिष्ठिर ह्मणाला, 'दान, यज्ञ, चांगल्या रीतीनें केलेलें तप व गुरू आणि वडील याची केलेली एकनिष्ठ सेवा यांचा काय गुण आहे? यावर भीष्म ह्मणाले, 'बुद्धि वाइटाकडे लागली असतां मन पापामध्यें शिरतो. ह्याप्रमाणें पुढें मनुष्याचें कर्म वाईट होऊं लागून तो मोठ्या दुःखांत पडतो. दुकाळांवर दुकाळ, संकटांवर संकटें व भयांवर भय त्यावर येऊन गुदरतात.पापकर्म करणारे भिकार लोक मेल्याहून मेले समजावयाचे.आत्मनिग्रहानें श्रद्धापूर्वक चांगलीं कर्मै करणाऱ्या उत्तम लोकांना एकाहून एक श्रेष्ठ असें वैभव, स्वर्ग व सुखें मिळतात, जे नास्तिक लोक आहेत त्यांना मोठमोठे साप, हत्ती व चोर यांनीं भरलेल्या अशा कठीण अरण्यांतून चांचपडत जावें लागतें. ज्यांना देव, अतिथी व साधू आवडतात, अशा उदारांना शुद्ध अशा आत्मनिग्रही लोकांची सुखकर वाट सांपडते. मोडांची ज्याप्रमाणें धान्यामध्यें गणना होत नाहीं, किंवा अंड्यांची ज्याप्रमाणें पक्ष्यांमध्यें गणना होत नाहीं, त्याप्रमाणेंच जे धर्मलंड आहेत त्यांची मनुष्यांमध्यें गणना होत नाहीं. मनुष्य कितीही जोरानें धांवत असला तरी ज्यानें ज्यानें जें जें कर्म केलें असेल तें तें त्याचें त्याच्या बरोबर धांवत असतें. तो निजला असतां त्याच्या बरोबर तें निजतें, व बसला असतां त्याच्या बरोबर बसतें, त्याच्या हातून कृत्य घडत असतां त्याचीं पापेंही त्याच्या बरोबर तें करीत असतात. अगदीं सावलीप्रमाणें तें त्याच्या मागून असतें. मनुष्य कोणत्याही साधनांनीं कोणत्याही स्थितींत कशा प्रकारचेंही कर्म करो, पुढें खात्रीनें त्याला तें भोगावें लागतें. काळ चोहोंकडून त्याला ओढीत असतो. ज्याप्रमाणें फुलें व फळें ती ती वेळ आली असतां बिनचूक येतात, त्याप्रमाणें पूर्वी केलेलीं कर्मै अपापली वेळ चुकवीत नाहींत. सन्मान किंवा अवमान, लाभ किंवा हानि, क्षय किंवा संचय हीं होऊं लागलीं असतां त्यांना परतवितां येत नाहीं; परंतु या सर्वांचा त्या त्या वेळी नाश हा आहेच. दुःख हें आपणच तयार करून ठेविलेलें असतें व सुखही आपणच तयार करून ठेविलेलें असतें. गर्भामध्यें येऊन मनुष्य पूर्व देहामध्यें केलेल्या कर्मांचें फळ अनुभवितो. बालपण, तारुण्य किंवा ह्मातारपण यांमध्यें जें कांहीं बरें वाईट कृत्य याच्या हातून घडलें असेल, त्यप्रमाणें निरनिराळ्या जन्मीं त्या त्या अवस्थेंत तें तें तो भोगतो. ज्याप्रमाणें हजारों गाईमध्यें वासरूं आपल्या आईला जाऊन धरतें त्याप्रमाणें पूर्वी केलेलें कर्म त्या करणाराला जाऊन गच्च धरतें. ज्याप्रमाणें मळकट वस्त्र पाण्यांत धुतल्यानें स्वच्छ होतें, त्याप्रमाणें उपवासांनीं फार दिवसपर्यंत शरीर तावून काढून मनुष्यें शाश्वतसुख मिळवितात. पुष्कळ दिवसपर्यंत तप करून पुण्याचरणानें पाप धुवून काढिलें असतां मनुष्याचे मनोरथ परिपूर्ण होतात. ज्याप्रमाणें आकाशामध्यें पक्ष्यांची किंवा पाण्यामध्यें माशांची गति दिसून येत नाहीं. त्याचप्रमाणें पुण्यवानांची गति दिसून येत नाहीं. उगीच दुसऱ्याची निंदा करीत बसणें किंवा त्यांच्या चुका दाखवीत बसणें यांत कांहीं अर्थ नाहीं. मनुष्यानें स्वतःला अनुकूल, चांगलें हितांचें जें असेल तें करावें.

## २१७ शुकांची कथा. (१२ ३२३-३३)

'व्यासांना मोठे तपस्वी शुक कसे झाले ? त्यांना थोर सिद्धि कशी मिळाली? त्यांची आई किंवा त्यांचा जन्म यांसंबंधीं आह्मांला कांहींच माहिती नाहीं. लहानपणींच सूक्ष्म अशा ब्रह्मज्ञानाकडे त्यांची बुद्धि कशी वळली ? दुसऱ्या कोणामध्येंही अशी गोष्ट शक्य दिसत नाहीं. तेव्हां शुकांचें माहात्म्य

त्याचप्रमाणें आत्मसमाधि व त्यांचें ब्रह्मज्ञान यासंबंधानें आपण सविस्तर हकीकत सांगा.' असें युधिष्ठिर ह्मणाला असतां भीष्म ह्मणाले, 'वर्षांवरून, पिकल्या केंसांवरून, पैशावरून किंवा गोतावळ्यावरून ऋषींनीं कधीं धर्म ठरविला नाहीं. वेद ह्मटलेलाच त्यांना मोठा आहे. तूं आतां मला जो प्रश्न केला आहेस या सर्वांच्या मुळाशीं तप आहे, आणि तें तप इंद्रियनिग्रह केल्यानेंच साधतें. इंद्रियांना मोकळें सोडण्यांत पुष्कळ दोष आहेत. तीं आवरण्यामध्यें मोठी सिद्धि आहे. हजार अश्वमेध व शंभर वाजपेय यज्ञ हे योगाच्या सोळाव्या हिशाला लागणार नाहींत. शुकांचा जन्म, योग व श्रेष्ठगति हीं पापी लोकांना कळणें कठीण आहे. पूर्वी मेरूच्या शिखरावर कर्णिकार वनामध्यें आपल्या उग्र अशा भूतगणांसह महादेव विहार करीत होते. त्या ठिकाणीं पार्वतीही होती, व आदित्य, रुद्र, ब्रह्मर्षी, सिद्ध, गंधर्व वगैरे मंडळीही तेथें शंकरांजवळ होती. देवर्षींनीं भरलेल्या त्या रम्य वनामध्यें योगधर्मामध्यें गढलेले व्यास योगानें आपल्या ठिकाणीं लीन होऊन धारणा धरून, धैर्यामध्यें अग्नि, भूमि, जल, वायु किंवा आकाश यांच्या तोडीचा आपल्याला मुलगा व्हावा ह्मणून मनांत संकल्प धरून मुलासाठीं मोठें तप करीत बसले. शंभर वर्षें केवळ वायु भक्षण करून बहुरूपी महादेवाची ते आराधना करीत होते, तरी त्यांची शक्ति कमी झाली नाहीं किंवा त्यांना ग्लानि आली नाहीं. उलट ते अतुल तेजस्वी योगामध्यें गढले असतां त्यांची जटा अग्निशिखेप्रमाणें लखलखीत दिसत होती. या प्रकारच्या त्यांच्या तपानें त्याचप्रमाणें भक्तीनें शंकर प्रसन्न होऊन त्यांची मनीषा पूर्ण करण्याच्या विचारानें त्यांजवळ येऊन ह्मणाले, तुझ्या इच्छेप्रमाणें तुला मुलगा होईल त्याचप्रमाणें त्याला आपण व ब्रह्म एक आहों या ज्ञानामुळें ब्रह्माकडेसच लक्ष राहून ब्रह्मामध्यें तो गढून राहील, आणि आपल्या तेजानें तिन्ही लोकांना झांकून टाकून यश मिळवील.

याप्रमाणें शंकरांपासून वर मिळाल्यावर अग्नि काढण्यासाठीं ते दोन अरणी एकमेकांवर घांशीत असतां घृताची नांवाची अप्सरा अप्रतिम रूप धरून आपल्या तेजानें झळकत त्यांकडे आली. तिला पाहून ते एकदम काममोहित झाले. त्यांना त्या स्थितींत पाहून ती शुद्ध होऊन त्यांच्या जवळ गेली. ते मोठ्या धैर्यानें मन आवरीत होते तरी खवळलेलें मन त्यांना आवरतां येईना. भवितव्यता घडून यावयाची असल्यामुळें तिला पाहून त्यांचें शुक्र एकाएकीं त्या अरणीमध्यें पडलें. तरी तें कांहीं मनांत न आणतां तसेच त्या अरणी ते घांशीत असतां शुक्र घांसलें जाऊन मोठे तपस्वी, महायोगी, महर्षी असे शुक त्या अरणीपासून उत्पन्न झाले. यज्ञांत हवि दिलेला अग्नि ज्याप्रमाणें झळकतो, त्याप्रमाणें आपल्या बापासारखा ज्यांचा अप्रतिम वर्ण होता असे ते शुक जन्मले तेव्हां आत्मतेजानें धूर नाहींसा झालेल्या अग्नीप्रमाणें झळकत होते. सरिच्छ्रेष्ठ गंगा प्रत्यक्ष त्या पर्वतावर येऊन आपल्या पवित्र पाण्यानें तिनें त्यांना स्नान घातलें व त्यांच्यासाठीं आकाशांतून दंड व कृष्णाजिन खालीं पडलें. त्यांच्यासाठीं गंधर्व गात होते, अप्सरा नाचत होत्या, देवदुंदुभी मोठ्यानें वाजत होत्या, नारद, तुंबर, हाहा, हूहू वगैरे गंधर्व त्या शुकांच्या जन्माची वाहवा करींत होते, इंद्रादि सर्व लोकपाल, देव, देवर्षी, ब्रह्मर्षी वगैरे सर्व मंडळी त्यांकडे आली. वायु सर्व प्रकारच्या दिव्य पुष्पांचा त्यांवर वर्षाव करीत होता. सर्व स्थावरजंगम जग आनंदभरित झालें. ते जन्मल्याबरोबर महात्म्या उमापतींनीं पार्वतीबरोबर स्वतः येऊन विधिपूर्वक त्यांची मुंज केली. देवेंद्रानें दिव्य व दिसण्यांत मोठा अद्भुत कमंडलु व दिव्य वस्त्रें मोठ्या प्रेमानें त्यांना दिलीं. हजारों हंस, शतपत्र सारस, राघू व तास त्यांना उजवी घालीत होते. याप्रमाणें अरणीपासून झालेले हे महातेजस्वी शुक त्याच ठिकाणीं एकाग्रतेनें व्रताचरण करीत राहिले होते. उपजल्याबरोबर वेद, उपनिषदें, वेदसार त्यांना त्यांच्या वडिलांप्रमाणेंच आपोआप येऊं लागलीं; परंतु धर्माकडे लक्ष देऊन त्यांनीं बृहस्पतींना गुरु करून ते सर्व वेद, इतिहास, राजनीति त्यांपासून शिकले व गुरूला दक्षिणा देऊन घराकडे परत येऊन ब्रह्मचर्य व्रतामध्येंच कडक तप करीत राहिले. ते महातपस्वी आपल्या ज्ञानानें व तपानें लहानपणींच देवांना व ऋ-

षींना मान्य होऊन त्यांचा त्यांनीं विचार घेण्यालायक ते झाले. मोक्षधर्म डोळ्यांपुढें ठेवून असणाऱ्या त्यांचें लक्ष गृहस्थादि तीन आश्रमांकडे लागेना. मोक्षाचाच विचार करीत कल्याणाची इच्छा मनांत ठेवून पित्याकडे येऊन विनयपूर्वक त्यांना अभिवादन करून, ' मोक्षधर्मामध्यें आपण कुशल आहांत तेव्हां माझ्या मनाला चांगली शांति मिळेल असा उपाय सांगा,' असें ते ह्मणाले. तें मुलाचें भाषण ऐकून मोक्षधर्म त्याचप्रमाणें नानाप्रकारचे दुसरे धर्म व्यासांनीं त्यांना पढविले. पित्याच्या आज्ञेनें सर्व योगशास्त्र त्याचप्रमाणें कापिलशास्त्र शुक पूर्णपणे पढलें. याप्रमाणें ब्रह्मश्रीनें झळकूं लागून मोक्षधर्मामध्यें त्यांना निष्णात झालेले पाहून, 'तूं जनकराजाकडे जा ह्मणजे तो सर्व मोक्षधर्माचा अर्थ तुला उलगडून सांगेल,' ह्मणून व्यासांनीं त्यांना सांगितलें. त्यावरून मोक्षधर्माचें तत्व कळून घेण्यासाठीं ते मिथिलेला निघाले. ' योगसामर्थ्यानें आकाशांतून न जातां मनुष्यासारखें पायीं आर्जव धरून जनकाकडे जा, सुखासाठीं त्याकडे जाऊं नकोस, वाटेंत कांहीं विशेष गोष्टींच्या नादीं लागूं नकोस; कारण त्या मनुष्याला विषयांशीं जखडून टाकण्याला कारण होतात. ज्याचा यज्ञ करण्याला आपल्याला अधिकार आहे अशा त्या राजासंबंधानें अहंकार धरूं नकोस, त्याच्या आज्ञेंत रहा; ह्मणजे तो तुझा संशय दूर करील. तो सांगेल त्याप्रमाणें मनांत शंका न आणतां वाग,' असें व्यास निघतांना त्यांना ह्मणाले. ह्मणून आपल्या सामर्थ्यानें सर्व पृथ्वी आकाशांतून ओलांडण्यांचे समर्थ असतांही पायांनींच शुक मिथिलेकडे निघाले. अनेक डोंगर, नद्या, तीर्थें, सरोवरें, साप व श्वापदें यांनीं भरलेलीं अरण्यें व वनें, मेरुवर्ष, हरिवर्ष त्याचप्रमाणें हैमवतवर्ष क्रमानें ओलांडून ते भारत वर्षामध्यें येऊन पोंचले. चीन, हूण, निषध इत्यादि लोकांचे नाना देश पहात ते आर्यावर्ताला आले. पित्याचें वचन ध्यानांत ठेवून केवळ एका मोक्षाकडे लक्ष देऊन आकाशांत फिरणाऱ्या पक्ष्याप्रमाणें ते मार्ग ओलांडीत चालले होते. नानाप्रकारचीं रम्य पट्टणें व झगझगीत शहरें डोळ्यांपुढें असतांही त्यांच्याकडे लक्ष न देतां, नानाप्रकारचीं रम्य उद्यानें व पवित्र तीर्थें ओलांडून ते लवकरच जनकाच्या संरक्षणाखालीं असलेल्या विदेहाला आले. त्या ठिकाणीं पुष्कळ खायपेयांनीं परिपूर्ण, गुरांढोरांनीं गजबजलेलीं व लोकांचा कलकलाट चाललेलीं अशीं श्रीमान गांवें, साळी आणि जवस यांनीं शोभायमान दिसणारीं शेतें ज्यामध्यें आहेत व ज्याचा हंस व सारस यांनीं आश्रय केला आहे व जो कमलांनीं शोभायमान व श्रीमान लोकांनीं भरलेला असा होता, तो विदेह देश ओलांडून मिथिलेच्या जवळच्या रम्य उपवनामध्यें ते आले. तें उपवन हत्ती, घोडे यांनीं भरलें असून बायकापुरुषांनीं गजबजलें होतें. त्या कशाकडे न पाहितां व आपल्या हेतूपासून न ढळतां मनांत एकच विचार ठेवून त्यावरच विचार करीत आपल्याठिकाणीं संतुष्ट असे ते मुनि प्रसन्न अंतःकरणानें मिथिलेच्या वेशीजवळ येऊन निःशंकपणें आंत शिरूं लागले. तेव्हां द्वारपालानें दरडावून त्यांना मज्जाव केला. तरी न रागावतां ते तेथेंच उभे राहिले. उन्हाचा किंवा वाटेचा शीण मुळींच न वाटतां भूक, तहान किंवा श्रम त्यांच्या गांवीं सुद्धां नव्हते. उन्हानें त्यांना यत्किंचित् ताप किंवा शीण झाला नाहीं. व सावलींत न जातां ते त्या उन्हांतच उभे होते. त्या द्वारपालांपैकीं एकाला वाईट वाटून डोक्यावर आलेल्या सुर्याप्रमाणें त्यांना उभे पाहून यथाविधि त्यांची पूजा करून त्यानें त्यांना राजवाड्याच्या दुसऱ्या चौकांत नेलें. त्या ठिकाणीं ते सावली व ऊन्ह सारखींच समजून मोक्षाकडे लक्ष लावून बसले असतां पुढें लवकरच राजाचा मंत्री त्या ठिकाणीं येऊन हात जोडून त्यांच्याजवळ येऊन तो त्यांना तिसऱ्या चौकांत घेऊन गेला. त्या ठिकाणीं अंतःपुराला लागून एक चैत्ररथासारखें सुंदर प्रमदावन होतें. त्यामध्यें निरनिराळीं जलमंदिरें असून नानाप्रकारचीं फुललेलीं फळझाडें होतीं. तेथें त्यांना आसन देऊन तो निघून गेला व त्यानें दिसण्यांत सुंदर अशा कांहीं वारांगनांना चांगला वेष देऊन त्यांच्या सेवेला पाठविल्या. त्या लाल व झिरझिरीत पातळ नेसल्या असून लखलखीत असे सोन्याचे अलंकार त्यांच्या अंगावर होते. गोड व मोहक भाषण कसें करावें हें त्यांना पूर्ण ठाऊक

असून, नृत्य गायनामध्यें त्या कुशल होत्या. त्यांचें भाषण हंसून होतें. रूपानें त्या अप्सरेसारख्या होत्या. कामोपचारामध्यें त्या मोठ्या पटाईत असून लोकांचें मन त्यांना चटकन् ओळखतां येत होतें. अशा पन्नास वारांगनांनीं त्यांकडे येऊन त्यांना पाद्यादिक देऊन त्यांची चांगली पूजा केली व त्याच समयाला उचित असें मिष्टान्न त्यांना खावयास घालून त्यांचें जेवण झाल्यावर यांपैकीं प्रत्येकीनें त्यांना त्या प्रमदावनांतून फिरवून निरनिराळ्या चमत्कारिक गोष्टी दाखविल्या. मनुष्याला ओळखणाऱ्या त्या हंसत, गात, खेळत त्या महात्म्याची सेवा करीत होत्या. परंतु ते शुद्धांतःकरणी शुक मनाची चलबिचल होऊं न देतां इंद्रियें स्वाधीन ठेऊन आनंद किंवा राग न धरितां आपल्या व्यवसायांत गर्क होते. ज्यावर उत्तम कपडा टाकला आहे अशी देवांना उचित, रत्नविभूषित शय्या त्या स्त्रियांनीं त्यांना दिली. संध्याकाळीं पाय धुवून संध्या केल्यावर शुक त्या आसनावर आपल्या मनांतल्या मुख्य मुद्यावर विचार करीत पूर्वरात्रीं ध्यानामध्यें गढून राहून मध्यरात्रीच्या वेळीं झोंपीं गेले. पुढें लवकरच उठून शुद्ध होऊन त्या स्त्रियांच्यामध्येंच ते ध्यानस्थ झालें. याप्रमाणें तो दिवस व ती रात्र त्यांनीं राजवाड्यांत घालविली. दुसरे दिवशीं जनकराजा आपले मंत्री व अंतःपुरांतील बायका यांना बरोबर घेऊन पुरोहिताला पुढें करून त्याचप्रमाणें आसन व नानाप्रकारचीं रत्नें बरोबर घेऊन पूजासाहित्य आपल्या डोक्यावर घेऊन त्या गुरुपुत्राकडे आला, व पुरोहिताच्या हातामध्यें असलेलें उत्तम आसन त्याच्या हातून घेऊन तें त्यानें शुकांना दिलें व त्यावर ते बसल्यावर त्यांची त्यानें यथाशास्त्र पूजा केली. प्रथम पाय, पुढें अर्घ्य देऊन नंतर गाय दिली. ती पूजा घेतल्यावर शुकांनीं राजाला त्याच्या अनुयायांसह सर्वांचें कुशल विचारून त्यांना बसावयास सांगितलें; तेव्हां तो कुलीन महात्मा जनक आपल्या अनुयायांसह हात जोडून खालींच बसला व त्यानें कुशलपूर्वक त्यांना येण्याचा उद्देश विचारला. तेव्हां शुक ह्मणाले, 'जनकाला मोक्षधर्म ठाऊक आहे, त्याच्याजवळ गेलास तर प्रवृत्ति किंवा निवृत्तीसंबंधानें तुझ्या मनांतील संशय तो दूर करील,' असें तातांनीं सांगितल्यावरून मी तुझ्याकडे आलों आहें; तेव्हां ब्राह्मणानें काय करावें, मोक्ष कशाप्रकारचा आहे, तो कसा मिळवावा, ज्ञानानें किंवा तपानें' हें तूं मला सांग.' जनक ह्मणाला, 'जन्मल्यापासून ब्राह्मणानें काय करावें तें सांगतों ऐका; उपनयन झाल्यावर त्यानें वेदामध्यें गढून रहावें. तप, गुरुशुश्रूषा व ब्रह्मचर्य यांच्या योगानें देवता व पितर यांच्या ऋणांतून मुक्त व्हावें. कोणाची असूया करूं नये. इंद्रियनिग्रहानें, वेद पढल्यावर गुरूला दक्षिणा देऊन त्यांची परवानगी घेऊन घराकडे परत यावें; नंतर गृहस्थाश्रमामध्यें आपल्या बायकोकडेच लक्ष देऊन कोणाची असूया न करितां यथाविधि अग्नि ठेवून राहून पुत्रपौत्र उत्पन्न केल्यावर वानप्रस्थाश्रम घ्यावा व तोच पूर्वींचा अग्नि यथाशास्त्र पूजीत अतिथींची आवड ठेवून रहावें. पुढें वनामध्यें तोच अग्नि क्रमानें आपल्या ठिकाणीं धारण करून सुखदुःखादि द्वंद्वांतून मुक्त होऊन असक्ति सोडून संन्यासाश्रमामध्यें रहावें.' शुक ह्मणाले, 'सुखदुःखादि द्वंद्वांपासून मुक्त झालेल्या हृदयामध्यें कायमचें ज्ञान व त्याचा अनुभव उत्पन्न झालीं असतां मनुष्यानें ब्रह्मचर्यादि पहिल्या तिन्ही आश्रमांमध्यें राहिलें पाहिजे काय? यासंबंधानें वेदाचा आधार काय आहे तो सांग.' जनक ह्मणाला, 'ज्ञान व अनुभव यांशिवाय मोक्ष मिळत नाहीं व हें ज्ञान गुरूशीं संबंध झाल्याशिवाय होत नाहीं. गुरूच तारून नेणार असून ज्ञान ही तारणारी नाव आहे. ज्ञानानें कृतकृत्य होऊन पैलपार गेल्यावर मग या दोन्हींना सोडावें. कर्मांचा समूळ नाश न होतां त्यांवर अवलंबून असणाऱ्या लोकांचा नाश होऊं नये ह्मणून चारी आश्रमांसंबंधाचे धर्म पूर्वींचे लोक पाळीत आले. याच क्रमानें निरनिराळीं चांगलीं वाईट कृत्यें सोडून अनेक जन्मांनीं मोक्ष मिळत असतो. अनेक जन्मांमध्यें इंद्रियशुद्धि झाल्यावरच अंतःकरण शुद्ध होऊन मनुष्याला पहिल्या आश्रमामध्यें मोक्ष मिळतो. याप्रमाणें तो मिळून त्या योगानें सर्व दृश्य वस्तूंसंबंधानें खरें ज्ञान झाल्यावर मोक्षेच्छूला पुढें तीन आश्रम घेऊन काय मिळवावयाचें आहे? मनुष्यानें नेहमीं राजस व तामस गुणांपासून उत्पन्न होणारे दोष टाळावे व सात्वि-

क रस्ता धरून बुद्धीनें आत्म्याला पाहूं लागावें. सर्व भूतमात्रांच्या ठिकाणीं स्वतःला व स्वतःच्या ठिकाणीं सर्व भूतमात्रांना पाहूं लागून जलामध्यें संचार करणाऱ्या जलचर प्राण्याप्रमाणें त्यापासून अलिप्त असावें. सुखदुःखादि द्वंद्वांपासून सुटून शांत होऊन हा देह सोडल्यावर खालून वर उडून जाणाऱ्या पक्ष्याप्रमाणें मनुष्य मोक्षसुखाला धनी होतो. ब्रह्मज्योति आपल्या ठिकाणींच असून दुसऱ्या कोठें नाहीं; व सर्वांच्या ठिकाणीं ती सारखीच आहे, आणि योगाकडे लागल्यानें मनुष्याला ती दिसते. जेव्हां कोणाही प्राण्याच्या ठिकाणीं कायावाचामनानें हा पापभाव ठेवीत नाहीं, मनाला मोह पाडणारी ईर्षा, त्याचप्रमाणें काम मोह सोडून मनाला आत्म्याकडे लावतो, जेव्हां सर्व कानावर पडणाऱ्या व दिसणाऱ्या वस्तूंसंबंधानें त्याचप्रमाणें सर्व प्राणिमात्रांसंबंधानें निर्द्वंद्व होऊन सारखी दृष्टि ठेवितो व जेव्हां स्तुति किंवा निंदा, सोनें किंवा लोखंड, सुख किंवा दुःख, थंडी किंवा ऊन्ह, चांगलें किंवा वाईट, प्रिय किंवा अप्रिय, जीवित किंवा मरण यांना सारखीं लेखतो, तेव्हां याला ब्रह्मप्राप्ति होते. ज्याप्रमाणें कांसव आपले अवयव पसरून फिरून आंखडून घेतो त्याप्रमाणें मोक्षेच्छूनें इंद्रियें व मन यांना आवरावें. अंधारगुडूप झालेल्या घरामध्यें ज्याप्रमाणें दिव्याच्या योगानें पहातां येतें त्याप्रमाणें बुद्धिरूपी दिव्यानेंच आत्म्याला पहातां येतें. आतां हे सर्व गुण आपल्यामध्यें दिसून येत असून दुसरेंही जें काय जाणावयाचें तें आपल्याला कळल्यासारखें दिसतें. गुरूच्या प्रसादानें व आपल्या ग्राहक शक्तीनें आपल्याला ठाऊक नाहीं असें कांहींच दिसत नसून विषयाच्या तावडींतून आपण सुटला आहां. मलासुद्धां हें जें दिव्य ज्ञान मिळालें आहे हें त्यांच्याच प्रसादानें मिळालें असून त्यामुळेंच मीं आपल्याला ओळखलें. आपलें ज्ञान आपल्याला वाटतें आहे त्याहून अधिक असून आपली गतिही त्यामध्यें अधिक आहे. त्याचप्रमाणें आपलें योगसामर्थ्यही अधिक आहे हें आपण मात्र जाणीत नाहीं. बालभावामुळें किंवा संशयामुळें किंवा मोक्ष मिळेल कीं नाहीं या भीतीमुळेंच ज्ञान उत्पन्न झालें असूनही आपल्याला तें झालें आहे किंवा नाहीं याचा संशय पडला आहे. संशय दूर होऊन हृदयांतील संशयाची गांठ सुटल्यावर शुद्ध अशा व्यवसायानें मनुष्य या ज्ञानाला धनी होतो. आपल्याला अशा प्रकारचें खरें ज्ञान झालें आहे. आपली बुद्धि स्थिर झाली आहे व लोभ नाहींसा झाला आहे. मनुष्याला हातपाय हालविल्यावांचून तें श्रेष्ठ ब्रह्म मिळत नाहीं. सुखदुःखांमध्यें आपल्याला भेद दिसत नाहीं. नृत्यगायनामध्यें आपल्याला उत्सुकता वाटून त्यामध्यें आपली आसक्ति जडत नाहीं. बांधवांच्या ठिकाणीं आपल्याला पाश नाहीं व भीतिदायक गोष्टींसंबंधानें आपल्याला भीति वाटत नाहीं. ढेंकूळ, धोंडा व सोनें सर्व आपल्याला सारखींच वाटतात. अनामय अशा अक्षय्य मार्गाला आपण लागलां आहां. ब्राह्मणाला जें फल मिळावें त्या मोक्षाच्या वाटेला आपण आहां. आतां आणखी काय विचारावयाचें आहे ?

हें जनकाचें भाषण ऐकून शुक्राचार्य आपल्या ठिकाणीं तल्लीन होऊन बुद्धीच्या योगानें आत्म्याला पाहूं लागून आपलें काम झाल्यानें शांत व सुखी होऊन मुकाट्यानें वाऱ्याप्रमाणें अंतरिक्षांतून उत्तरेला हिमालयाकडे चालले. या संधीला सिद्धचारणादिकांनीं भरलेल्या, शांत आवाजानें भरून राहिलेल्या, व पाणकावळा, ताजवा, चकोर, मोर, राजहंस व कृष्णवर्ण कोकिळा इत्यादि पक्ष्यांनीं गजबजलेल्या त्या हिमालयाला देवर्षी नारद आले. याच ठिकाणीं पूर्वी महात्म्या विष्णूनें मुलासाठीं तप केलें होतें व याच ठिकाणीं कार्तिकस्वामींनीं देवांना तुच्छ करून त्रैलोक्याला न जुमानतां एक शक्ति जमिनीमध्यें रोंवून म्हणाले कीं, 'माझ्याहून जो अधिक सामर्थ्यवान असेल व ज्याला ब्राह्मण प्रिय असतील अशानें ही शक्ति उपटून काढावी किंवा निदान हाळवावी.' तें ऐकून ती कोण उपटून काढणार म्हणून सर्व लोक चिंतेंत पडले. याप्रमाणें सर्व देवांना काळजींत पडलेले पाहून याप्रसंगीं काय करणें उचित होईल म्हणून भगवान विष्णूनें विचार केला व कार्तिकस्वामींचें तें धिक्कारयुक्त भाषण सहन न होऊन ती दैदीप्यमान गदा धरून त्यांनीं ती आपल्या उजव्या हातानें गदगदां हालविली; त्याबरोबर संपूर्ण पृथ्वी

कांपूं लागली. ती शक्ति उपटून काढण्याचें सामर्थ्य अंगांत असतां नुसती ती हालवून या सामर्थ्यवान भगवानानें कार्तिकेयांची अब्रू राखली. याप्रमाणें ती हालवून भगवान प्रल्हादाला म्हणाला, 'हें कुमाराचें वीर्य पहा. अशी कृति दुसऱ्या कोणाचे हातून व्हावयाची नाहीं.' हें भाषण सहन न होऊन ती उपटून काढण्याच्या इरायानें प्रल्हाद ती धरून हालवूं लागला; परंतु ती न हालतां मोठ्यानें ओरडून मूर्छा येऊन तो विव्हळ होऊन ह्या पर्वतावर पडला. या पर्वताच्या उत्तरेकडे जाऊन शंकर कडक तप करीत होते. या आदित्य नांवाच्या पर्वतावर पापी लोकांना एवढेंच नव्हे, तर यक्ष, राक्षस व असुर यांना सुद्धां जातां येत नाहीं. याचा विस्तार दहा योजनें असून याच्या भोंवतीं अग्नीच्या ज्वाळा पसरल्या आहेत. शंकराला येणारीं विघ्नें दूर करीत प्रत्यक्ष अग्नि त्या ठिकाणीं राहिला आहे. देवांचीं हजार वर्षे देवांना भीति उत्पन्न करीत महादेव त्या ठिकाणीं एका पायावर तप करीत राहिले. याच पर्वताच्या पूर्वेला एकांतामध्यें व्यास, सुमंतु, वैशंपायन, जैमिनी व पैल या आपल्या चार शिष्यांना वेद पढवीत राहिले होते. अशा त्या रम्य, पित्याच्या आश्रमाकडे पेटलेल्या अग्नीप्रमाणें दैदीप्यमान शुक धनुष्यापासून सुटलेल्या बाणाप्रमाणें वेगानें येऊन पित्याचे पाय धरून क्रमानें दुसऱ्यांची भेट घेऊन जनकापाशीं घडलेली सर्व गोष्ट त्यांनीं व्यासांना कळविली. याप्रमाणें आपल्या शिष्यांना पढवीत व्यास तेथें राहिले असतां सांग वेदाचें पूर्ण ज्ञान झाल्यावर कोणे एके वेळीं शिष्य त्यांच्या भोंवतीं बसले असतां त्यांना हात जोडून ह्मणाले, 'आपण आह्मांला मोठे सामर्थ्यवान करून नांवाला चढविलें आहे. आतां आह्मीं आपल्यापाशीं एक अनुग्रह मागतों. आह्मांला एक वर द्या. आह्मीं चौघे व गुरुपुत्र या पांचांवांचून सहाव्याचें नांव होऊं नये. वेद आमच्यामध्यें राहावे.' हें शिष्यांचें वचन ऐकून धर्मात्मे व्यास परलोकाचा विचार करून त्यांना ह्मणाले, 'ब्राह्मण असून वेद ऐकण्याची ज्याची इच्छा असेल अशाला ब्रह्मलोकामध्यें राहूं इच्छिणाऱ्यानें नेहमीं वेद सांगावा. तुह्मी पुष्कळ होऊन वेदाचा प्रसार करा. जो शिष्य नाहीं, व्रतशील नाहीं किंवा ज्याचें अंतःकरण शुद्ध नाहीं अशाला वेद कधीं सांगूं नयेत. हे सर्व शिष्याचे गुण नीट ओळखावे. ज्याची वर्तणूक नीट पारखली नाहीं त्यालाही ही विद्या देऊं नये. ज्याप्रमाणें शुद्ध सोनें तावून, तोडून, घुलाखून पारखलें जातें त्याचप्रमाणें कूळ व गुण यांनीं शिष्याची परीक्षा करावी. न सांगण्यासारखी गोष्ट किंवा ज्यामध्यें भय आहे अशी गोष्ट शिष्यांना सांगूं नये. जशी बुद्धि, जसें सांगणें त्याप्रमाणें विद्या फलद्रूप होते. सर्व शिष्य संकटांतून पार पडून चांगले दिवस पाहोत. **ब्राह्मणांना पुढें करून चारी वर्णांना वेद ऐकवावा. वेदाध्ययनासंबंधानें हा नियम असून हेंच महत्कार्य आहे.** देवांच्या स्तुतीसाठीं ब्रह्मदेवांनीं हे वेद निर्माण केले. वेदपारग ब्राह्मणाची मूर्खपणानें जो निंदा करील तो त्याच्या त्या कृत्याबद्दल पराभव पावेल. जो अधर्मानें ज्ञान मिळवूं इच्छितो व जो अधर्मानें तें सांगतो, ते दोघेही पतित होतात व त्या दोघांमध्यें स्नेहभाव न उरतां द्वेष वाढतो. हा वेदाध्ययनाचा व पढविण्याचा सर्व विधि मीं तुह्मांला सांगितला आहे; ह्या गोष्टी लक्षांत घेऊन याप्रमाणें तुह्मीं शिष्यांशीं वागावें.'

हें गुरूचें वाक्य ऐकून ते शिष्य मोठ्या आनंदानें एकमेकांना आलिंगन देऊन गुरूंना ह्मणाले, 'मागचें पुढचें लक्षांत घेऊन आपण जें बोलला तें आमच्या मनांत ठसलें. आह्मी त्याप्रमाणें करूं. आह्मी आतां या पर्वतावरून खालीं पृथ्वीवर जाऊंमं वेदाचे आपल्याला पसंत असेल तर अनेक भाग करतों.' तें ऐकून व्यास ह्मणाले, 'तुह्मी पृथ्वीवर किंवा देवलोकाला वाटेल तिकडे जा; परंतु मोठी हुशारी बाळगा. वेदांमध्यें पुष्कळ आडकाठी आहे हें लक्षांत ठेवा.' असें ह्मणून गुरूंनीं परवानगी दिल्यावर त्यांना प्रदक्षिणा करून त्यांच्या पायांवर डोकीं ठेवून पृथ्वीवर अग्निहोत्रापासून सोमयज्ञापर्यंत यज्ञ करून ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य यांचा यज्ञ करीत ब्राह्मणांपासून सत्कार घेत यज्ञ व अध्यापन करीत लोकांमध्यें कीर्ति मिळवून गृहस्थाश्रम पाळीत ते राहिले. याप्रमाणें शिष्य पृथ्वीवर गेल्यावर व्यास आपल्या मुलासह त्या निर्जन प्रदेशीं स्वस्थ ध्यानामध्यें गढून राहिले

असतां नारद तेथें येऊन ह्मणाले, 'अहो ब्रह्मर्षी, वेदघोष हल्लीं बंद आहे. आपण एकटेच ध्यानामध्यें गढून विचारांत पडल्याप्रमाणें असें कां स्वस्थ आहां? रजतमानें युक्त राहूनें झांकून गेलेल्या सूर्याप्रमाणें वेदघोषावांचून हा पर्वत शोभत नाहीं. येथें हल्लीं देव आहेत तरी निषादांच्या वाडीप्रमाणें वेदघोष बंद पडल्यानें याची शोभा निघून गेली आहे; एवढेंच नव्हे; तर ऋषी, देव, गंधर्व यांचेंही वेदघोषावांचून तेज कमी होत चाललें आहे.' हें ऐकून व्यास ह्मणाले, 'मुने' आपण ह्मणतां हें सर्व मला पसंत आहे, आपण सर्वज्ञ व सर्वदर्शी असल्यामुळें तिन्ही लोकांत जी घडामोड होते ती आपल्याला कळल्यावांचून रहात नाहीं. मला काय आज्ञा आहे ती सांगा. माझे शिष्य मला सोडून गेल्यामुळें माझ्या मनाला उल्हास वाटत नाहीं.' यावर नारद ह्मणाले, 'वेदाचें अध्ययन न होईल तर त्याला मलिनता येते. व्रतशीलपणा नसणें हें ब्राह्मणाला मलिनता आणतें, **बाल्हीक लोक पृथ्वीला मलीनपणा आणतात**, व कौतूहल स्त्रियांना मलीनपणा आणणारें आहे. तेव्हां मुलांसह आपण वेदाध्ययन चालवून राक्षसांच्या भीतीनें उत्पन्न होणारा अंधार वेदघोषानें दूर करा.' याप्रमाणें ते मुनी बोलले असतां व्यास बरें ह्मणून आपल्या मुलाबरोबर मोठ्या स्वरानें योग्य शब्दांवर जोर देऊन वेदाभ्यास करून सर्व लोक त्यांनीं गर्जून सोडले. याप्रमाणें त्यांचा अभ्यास चालला असतां समुद्रावरील वारा जोर लागून सोसाट्यानें वाहूं लागला; तेव्हां आज अनध्याय ह्मणून व्यासांनीं मुलाचें ह्मणणें बंद पाडलें असतां मोठ्या कौतूहलानें शुकांनीं विचारिलें कीं, 'हा वारा कोठून सुटला? हें व याची सर्व हालचाल आपण मला कृपा करून सांगा.' तें ऐकून व्यास ह्मणाले, 'तुला दिव्य चक्षु उत्पन्न झाले असून तुझें मन अगदीं शुद्ध झालें आहे. रज व तम यांपासून मुक्त होऊन तूं सात्विक वृत्तीनें आहेस; तेव्हां ज्याप्रमाणें आरशामध्यें आपलें प्रतिबिंब पहावें त्याप्रमाणें आपल्या ठिकाणींच ब्रह्मस्वरूपाला पाहूं लागून अंतःकरणामध्यें लय पावून मनामध्यें वेदाचा विचार करीत रहा. विष्णूच्या मार्गाला देवयान हें नांव असून तमोगुणांनीं युक्त अशा दुसऱ्या मार्गाला पितृयान हें नांव आहे. हें जग सोडल्यावर स्वर्गाला व अधोगतीला पोंचविणारे हे मार्ग आहेत. पृथ्वीवर व आकाशांत वहाणारे सात वायु सात प्रकारांनीं वहात असतात. ते कसें तें सांगतों ऐक. हें शरीर इंद्रियांनीं युक्त असून साध्य व दुसरें महात्म्ये यांचें आधिपत्य यावर आहे. यांच्यापासून कोणाला हार न जाणारा समान झाला. समानाचा उदान, उदानापासून व्यान, व्यानापासून अपान व अपानापासून प्राण असे वायू उत्पन्न झाले. कोणाची मात्रा चालू न देतां शत्रूला भाजून काढणाऱ्या या प्राणाला मात्र पुढें अपत्य झालें नाहीं. यांचीं निरनिराळीं कर्में पुढें दिल्याप्रमाणें आहेत. प्राण्याच्या शरीरामध्यें वायूच सर्व ठिकाणीं हालचाल चालू ठेवितो. व प्राणी त्याच्या योगानें जिवंत रहातात; ह्मणूनच त्याला प्राण असें ह्मणतात. वरच्या मालिकेंतील पहिला प्रवह नामक वायु, धूर व उष्णता यांपासून बनणारे ढग आकाशाला नेऊन पोंचवितो. अंतरिक्षामधून संचार करीत पाण्याशीं याचा संबंध झाला असतां त्याच्यापासून तो विजेसारखा कांतिमान दिसतो. दुसरा आवह नांवाचा वायु सोसाट्यानें वहात संचार करीत राहून हाच सोम व दुसऱ्या प्रकाशमान ग्रहनक्षत्रादिकांचा उदय करतो. शरीरामध्यें असतांना याला विद्वान लोक उदान ह्मणतात. जो वायु चारी समुद्रांपासून पाणी बरोबर घेऊन तें आकाशामध्यें ढगांना नेऊन पोंचवितो व याप्रमाणें ढगांना सजल करून पर्जन्याच्या स्वाधीन करतो त्या मोठ्या वायूला उद्वह ह्मणतात. जे ढगांना वहात असून त्यांचे निरनिराळे तुकडे करतात व त्यांना वितळवून पाऊस पाडवितात त्यांना घनाघन ह्मणतात. पुढें त्याच्या योगानें ढगांचे एकमेकांवर आदळून तुकडे होतात. अशा शब्द करणाऱ्या, सर्व जगाच्या रक्षणासाठीं एकवटलेल्या वायूंना नद अशी संज्ञा आहे. जो भूतमात्रांचीं विमानें आकाशामधून वाहून नेतो त्या चवथ्याला संवाहन हें नांव असून याच्या अंगीं पर्वतांना सुद्धां फोडून टाकण्याचें सामर्थ्य आहे. पांचवा मोठा जोराचा व वेगवान विवह नांवाचा

वायु झाडांनासुद्धां उपटून टाकण्याला समर्थ आहे. त्याच्याशीं ढग जुळले असतां त्यांना बलाहक ही संज्ञा येते. हा वायु मोठमोठे भयंकर उत्पात उत्पन्न करून आकाशामध्यें गर्जत फिरत असतो. सहावा परिवह नांवाचा विजयी वायु सर्व आकाशांतील पाण्यांना बरोबर घेऊन खालीं पडूं देत नाहीं व आकाशगंगेच्या पवित्र पाण्याला आधार देऊन तो त्याला खालीं गळूं देत नाहीं. याच्याच दुरून होणाऱ्या प्रतिबंधानें सर्व जगाला प्रकाशमान करणारा सहस्ररश्मि एक तेजाचा गोळा दिसूं लागून त्याच्या योगानें पृथ्वीवर उजेड पडतो. याच्याच योगानें पुष्टि मिळून कमी कमी होत जाणारा चंद्र पुढें पूर्ण मंडलानें युक्त होतो. जो सर्व प्राणिमात्रांचे, काळ आला असतां प्राण हरण करतो व ज्याच्या मागून काळ व यम असतात अशा वायूला परावह असें नांव आहे. त्याच्यापुढें कोणाचें कांहीं चालत नाहीं. नेहमीं योगामध्यें गढलेल्या सूक्ष्मदर्शी योग्यांना अमरत्व देण्याला हाच कारण आहे. याच्याच साह्यानें दक्षाचे हजारों मुलगे पृथ्वीच्या शेवटाला जाऊन पोंचले. याच्या स्पर्शाच्या योगानें प्राणिमात्र मोक्षाला जाऊन पुनर्जन्माच्या फेऱ्यांतून सुटतो. याप्रमाणें हे दितीचे मुलगे मोठे अद्भुत वायु आहेत. हे नेहमीं वाटेल तेथें सर्व वस्तूंना बरोबर घेऊन वहात असतात; परंतु या वहाणाऱ्या वायूनें आज पर्वताला हालवून सोडलें आहे हें मोठें विलक्षण आहे. हा जोरानें वहाणारा विष्णूचा श्वासरूपी वायु जेव्हां एकदम मोठ्यानें वाहूं लागतो तेव्हां जगावर संकट पडतें. तेव्हां अशा प्रकारें हा जोरानें वहात असतां ब्रह्मवेत्ते वेद ह्मणत नाहींत. वेदोच्चारण होत असतां उत्पन्न होणाऱ्या वायूला या वायूपासून भीति असून त्यापासून या जगाला भीति उत्पन्न होण्याचा संभव आहे.' यानंतर वारा बंद पडल्यावर मुलाला फिरून अध्ययन करण्याला सांगून, व्यास स्वतः आकाशगंगेला स्नानाला गेले.

इकडे व्यास स्नानाला निघून गेले असतां नारद वेदांत गढलेल्या शुकांना वेदाचा अर्थ विचारण्यासाठीं त्यांच्याकडे आले. त्यांना आलेले पाहून वेदोक्तविधीनें शुकांनीं अर्घ्यपूर्वक त्यांची पूजा केली; तेव्हां संतुष्ट होऊन, 'कशानें मी तुझें कल्याण करूं,' ह्मणून नारदांनीं शुकांना विचारिलें असतां, 'या जगामध्यें जी माझ्या कल्याणाची गोष्ट असेल त्याकडे मला आपण लावा,' असें शुकाचें भाषण ऐकून नारद ह्मणाले, 'अंतःकरण शुद्ध होऊन तत्त्व कळून घेण्याची इच्छा करणाऱ्या पूर्वीच्या ऋषींना सनत्कुमारांनीं जें सांगितलें तें ऐक. ते ह्मणाले, विद्येसारखा दुसरा डोळा नसून सत्यासारखें दुसरें तप नाहीं. विषयासक्तीसारखें दुसरें दुःख नाहीं व त्यागासारखें दुसरें सुख नाहीं. पापकर्मापासून निवृत्ति, सदा पुण्यशीलता, सद्वृत्ति व चांगला आचार हेंच मनुष्याचें उत्तम कल्याण आहे. हा कष्टमय मनुष्यजन्म येऊन जो विषयांना चिकटतो तो मोहामध्यें पडतो. तो कधीं दुःखांतून सुटत नाहीं. विषयाला चिकटणें हें दुःखाचें लक्षण आहे. जो यांना चिकटला त्याची बुद्धि चळून ती मोहजाल वाढविते. व या मोहजालामध्यें गुरफटून जाऊन इहपरलोकीं त्याला दुःख भोगावें लागतें. ह्मणून कल्याणेच्छूनें हरतऱ्हा करून कामक्रोधांना आवरावें;कारण हे आपल्या कल्याणावर पाणी ओतण्यासाठीं उठले असतात. नेहमीं रागापासून तपाचें, मत्सरापासून वैभवाचें, मानापमानापासून विद्येचें व दुर्लक्षापासून स्वतःचें रक्षण करावें. दयाभूतपणा हाच श्रेष्ठ धर्म असून क्षमा हेंच थोर बल आहे; आत्मज्ञान हेंच श्रेष्ठ ज्ञान आहे. सत्याहून जास्ती कांहीं नाहीं. खरें बोलणें चांगलें आहे; परंतु प्रसंगविशेषीं जें हितकर असेल तें बोलणें अधिक श्रेयस्कर आहे. प्राणिमात्राच्या जें अत्यंत हिताचें असेल तेंच खरें सत्य. कोणतीही गोष्ट फलाशेवांचून हातीं घेणें, आशेला दूर सोडणें व बायकापोरें वगैरेच्या लचांडांतून सुटणें हीं ज्यानें पत्करिलीं आहेत तोच खरा विद्वान व तोच खरा शहाणा. जो इंद्रियविषयांना न चिकटतां त्यांपासून अलग राहून इंद्रियांना पूर्ण ताब्यांत ठेवून विषयोपभोग घेत रहातो, ज्याचें अंतःकरण शांत झालें आहे, सुखदुःखादिकांचा आपल्यावर परिणाम घडूं न देतां जो एकाग्रतेनें योगामध्यें गढून असतो,ज्याचा इंद्रियांशीं संबंध असून जो त्यांपासून अलग आहे, त्याचप्रमाणें देहवान असून जो त्याच्याशीं

तादात्म्य पावला नाहीं, असा मनुष्य मुक्त होऊन कांहीं वेळ न लागतां श्रेष्ठ अशा कल्याणाला धनी होतो. जो कोणाकडे पहात नाहीं, कोणाला शिवत नाहीं, कोणाशीं बोलत नाहीं, अशालाच खऱ्या कल्याणाचा लाभ होतो. मनुष्यानें कोणाला पीडा देऊं नये. उलट सर्वांशीं मित्रत्वानें असावें. हा मनुष्यजन्म येऊन त्यानें कोणाशीं वैर बांधूं नये. सर्व ऐहिक वस्तूंकडे दुर्लक्ष, पूर्ण संतोष, निरिच्छता स्थिरता, हे गुण आत्मज्ञान्याला फार श्रेयस्कर आहेत. मनुष्यानें सर्व लचांड दूर करून इंद्रियें स्वाधीन ठेवून इहपरलोकीं ज्याच्यासंबंधानें शोकाला कारण उरणार नाहीं असें अभयपद मिळवावें. इच्छा ह्मणून ज्याला उरली नाहीं, त्यांना रडण्याची पाळी येत नाहीं. ह्मणून इच्छेच्या पाठीं लागूं नये. इच्छा सोडल्यानें मनुष्य दुःखतापापासून मोकळा होतो. मनुष्यानें आत्मनिग्रहानें नेहमीं तपांत गढून राहून विषयांमध्यें न गढतां ताब्यांत, न आलेलें ब्रह्म ताब्यांत वेण्याच्या नादीं लागावें. निरनिराळ्या विषयांमध्यें न गढतां नेहमीं एकटें राहिल्यानें मनुष्य कांहीं वेळ न लागतां उत्तम सुखाला धनी होतो. जोडप्याच्या सुखामध्यें गढलेल्या भूतमात्रांमध्यें राहून ज्याला एकटें रहाण्यांत मजा वाटते तोच ज्ञानामध्यें संतुष्ट समजावा. ज्ञानानें संतुष्ट झालेल्या मनुष्याला दुःख करण्याची पाळी येत नाहीं. चांगल्या कर्मांनीं मनुष्याला देवत्व येतें. बऱ्या वाईट अशा भेसळ कर्मांनीं तो मनुष्य योनीमध्येंच जन्मतो व वाईट कर्मांच्या योगानें निरुपाय होऊन नीच योनीला जातो. त्याठिकाणीं नेहमीं जरा, मृत्यु इत्यादिक दुःखांना बळी पडून प्राणी या संसारामध्यें शिजून निघत असतो. अहिताला हित, खोट्याला खरें व अनर्थाला अर्थ समजून तो नाश पावतो. मोहामुळें आपणच निर्माण केलेल्या विषयांमध्यें तंतुजालामध्यें गुंतणाऱ्या रेशमाच्या किड्याप्रमाणें गुरफटला जात असतां मनुष्याला तें कळत नाहीं. नाना उपाधींच्या पाठीं मनुष्यानें लागूं नये,कारण त्यांपासून फार अपाय आहे. कारण कोश करण्याच्या नादीं लागलेला कोशकारकिडा. उपाधींच्या मागें लागल्यामुळें त्यामध्यें जखडला जातो. बायका, पोरें, कुटुंब यांमध्यें जखडलेले लोक सरोवरांतील चिखलांत रुतून नाश पावणाऱ्या वनगजाप्रमाणें दिवसानुदिवस बुडत रहातात. ज्याप्रमाणें मोठ्या जाळ्यांनीं वर खेंचलें जाऊन जमिनीवर आलेले मासे तडफडतात त्याप्रमाणें स्नेहजालांनीं खेंचलेल्या प्राण्यांना तडफडावें लागतें. कुटुंब, बायका, पोरें, शरीर व सर्व संचय, हे परकीय असून त्यांत तथ्य कांहीं नाहीं. केवळ मनुष्यानें केलेलें बरें वाईट कर्म त्याला पुढें उपयोगीं पडतें. ज्याअर्थी मनुष्याला सर्व सोडून निरुपाय होऊन एकटें जाणें भाग आहे, त्याअर्थी अनर्थामध्यें गढून मनुष्यानें आपलें खरें हित कां बुडवावें ? अंधकारमय अशा निबिड अरण्यांतलि ज्या वाटेनें मनुष्याला जावयाचें आहे त्या वाटेनें विश्रांतीला बसण्याला जागा नाहीं. धरण्याला आधार नाहीं. त्या ठिकाणीं जवळ कांहीं शिदोरी रहात नाहीं किंवा एखादा देशही लागत नाहीं. अशा त्या रस्त्यानें मनुष्य निघाला असतां कोणी त्याच्यामागून जात नसून फक्त एक बरें वाईट कर्मच त्याच्यामागून त्याच्याबरोबर जात असतें. विद्या, कर्म, शुद्धता, नानाप्रकारचें ज्ञान हीं सर्व कांहीं करण्यासाठीं पाळलीं जात असून तें कारण सरलें ह्मणजे सोडून देण्यांत येतें. गांवांत रहाण्यासंबंधानें गोडी असणें ही संशयाला जखडणारी दोरी आहे. जे लोक पुण्यवान असतात तेच हिला तोडून पार पडतात. पापी लोकांना ही तोडतां येत नाहीं. रूप हेंच जिचें तीर आहे, मन जिचा प्रवाह आहे, स्पर्श जी मधील बेटें आहेत व रस जिचा ओघ आहे, गंधरूपी चिखलानें भरलेली व शब्दरूपी जलांनीं पूर्ण भरलेली अशा प्रकारची ही संसाररूपी नदी असून स्वर्गाकडे लावणाऱ्या हिच्या मार्गांत मोठे अडथळे आहेत. **शरीररूपी नावेंत बसून** क्षमारूपी जिला वल्हें आहे, सत्यरूपी धर्म हाच स्थिर ठेवणारे जिच्या शिडाला बांधलेले दोरखंड आहेत, व दानरूपी वाऱ्यानें जी वाटेला लागली आहे, अशा जलद जाणाऱ्या नावेत बसून ही नदी तरून पार पडलें पाहिजे. धर्माधर्म त्याचप्रमाणें सत्यासत्य टाकून नंतर ज्याच्या योगानें सत्यासत्य टाकलें जातें तो अहंकार सुद्धां मागून टाकावा. सर्व संकल्प सोडून धर्म टाकावा; त्याचप्रमाणें वासना सोडून अधर्म टाकावा. दोन्ही सत्यासत्य चांगली बुद्धि धरून सोडावें व नंतर पर-

ब्रह्मरूपी श्रेष्ठ वस्तूचा निश्चय मनांत ठेवून ही बुद्धि सुद्धां सोडावी. ज्याला हाडें हेच खांब आहेत, स्नायु ह्याच जखडणाऱ्या काढण्या आहेत, मांस व रक्त यांचा ज्याला लेप असून वरून जें कांतड्यानें मढविलें आहे असें दुर्गंधयुक्त मलमूत्रांनीं भरलेलें, जरा, शोक व रोग यांचें घर व शोकामुळें व्याकुळ झालेलें, रजोगुण ज्याच्यामध्यें जोरावर आहेत, असें हें जीवाचें रहाण्याचें ठिकाण जें शरीर त्याला सोडावें. हें सर्व जग व याच्या पलीकडचें जे कांहीं महत् किंवा बुद्धि ही पंचभूतात्मक आहे. हें महत् परमात्म्याच्या आश्रयानें आहे. सत्व, रज व तम यांसह पंचेंद्रियादि सतरा, पंच विषयेंद्रियें, अहंकार व बुद्धि हीं सात मिळून हीं चोवीस तत्त्वें आहेत. हीं चोवीस तत्त्वें एका ठिकाणीं मिळालीं असतां त्याला पुमान (जीव) ही संज्ञा येते. ज्याला धर्मार्थकाम हा त्रिवर्ग त्याचप्रमाणें जन्म व मृत्यु हे कळतात, त्यालाच खरोखर व चांगल्या रीतीनें उमगलें. त्यालाच उत्पत्ति व नाश यांचें इंगित कळलें. ज्ञानासंबंधी जें कांहीं कळून घ्यावयाचें असेल तें हळूहळू क्रमाक्रमानें जाणून घ्यावें. ज्यांचें इंद्रियांना ज्ञान होतें त्यांना व्यक्त हें नांव असून जे इंद्रियांतीत असून केवळ खुणेनेंच कळतात त्यांना अव्यक्त ह्मणतात. उन्हामधून चाललेला मनुष्य ज्याप्रमाणें पावसानें समाधान पावतो त्याप्रमाणें इंद्रियें ताब्यांत ठेवलेल्या मनुष्याची स्थिति होऊन तो सर्व लोकांच्या ठिकाणीं आपण भरून राहिलों असून लोक आपल्या ठिकाणीं भरून राहिले आहेत असें पाहूं लागतो. याप्रमाणें जिच्या मुळाशीं ज्ञान आहे अशी ही सर्व स्थितींत आत्मस्वरूप दिसण्याची शक्ति एकदां परमात्मस्वरूप पाहूं लागल्यावर कधींच नाहींशी होत नाहीं. चुकीनें उत्पन्न होणाऱ्या सर्व प्रकारच्या दुःखांतून जो ज्ञानाच्या योगानें सुटतो त्याचा सर्व प्राणिमात्रांशीं संबंध जडला असतां सुद्धां त्याच्यावर त्याचा कांहीं वाईट परिणाम होत नाहीं. याच्या बुद्धीवर उजेड पडून लोकमार्ग जो त्याला दिसतो त्यामध्यें त्याला कधीं दोष दिसत नाहीं. मोक्षधर्म ज्याला उमगला आहे तो परमात्म्याला आदि व नाश नसून त्याला जन्म नाहीं. व तो अव्यय असा आपल्या ठिकाणीं राहिला आहे, तो कांहीं न करतां केवळ साक्षित्वानें आहे व त्याला कांहीं आकार नाहीं, असें ह्मणतो. जो मनुष्य आपण केलेल्याच निरनिराळ्या कर्मांनीं नेहमीं दुःखी असतो तो तें दुःख निवारण्यासाठीं अनेक प्राण्यांना मारतो व याप्रमाणें फिरून नानाप्रकारचीं नवीं कर्में पदरीं घेत रहातो. व मोहामुळें अंध होऊन दुःखांनाच सुख समजून अपथ्य खाणाऱ्या रोग्याप्रमाणें फिरून फिरून ताप पावून कर्माच्या योगानें बांधला जाऊन रवीनें घुसळून निघावें त्याप्रमाणें घुसळून निघतो व याप्रमाणें आपल्या कर्मांनीं जखडला जाऊन तो त्या त्या कर्माप्रमाणें ठरलेल्या योनीमध्यें जन्माला येतो व नानाप्रकारच्या यातना सोशीत जन्ममरणाच्या फेऱ्यांत सांपडून ह्या संसारचक्रांत फिरत रहातो. ह्मणून मनुष्यानें सर्व कांहीं जाणूं लागून सर्वांना आपल्या ताब्यांत ठेवून सर्वकर्मांपासून निवृत्त व्हावें व सर्व अस्तित्वामध्यें असणाऱ्या वस्तूंपासून मुक्त व्हावें. तपाच्या सामर्थ्यानें, आत्मनिग्रहानें नवापाश तोडून पुष्कळ लोकांनीं ज्यामध्यें सुख आहे अशी अबाधित सिद्धि मिळविली आहे. ज्याच्या योगानें शोक नाहींसा होऊन सुख व शांति मिळते असें चांगलें शास्त्र ऐकून मनुष्याला चांगली बुद्धि येते व त्यामुळें त्याला सुख होतें. हजारों शोकाला कारणें व शेंकडो भयाला कारणें रोजच्या रोज मूर्खांवर येऊन गुदरतात, शहाण्यावर तीं कधीं येऊन गुदरत नाहींत. ह्मणून शोक नाहींसा करण्याचा उपाय सांगतों ऐक. मनुष्याची बुद्धि त्याच्या ताब्यांत असेल तर त्याला खात्रीनें सुख होतें. नावडत्या गोष्टीशीं प्रसंग येऊन आवडत्या गोष्टीला मुकावें लागल्यानें कोत्या लोकांच्या मनाला दुःख होतें. गतगोष्टीसंबंधानें त्यांचे गुण आठवून दुःख करूं नये. जो यांना मनामध्यें नेहमीं धरून बसतो त्याचा स्नेहपाश कधीं सुटत नाहीं. ज्या गोष्टीवर प्रेम जडूं लागतें त्यांत कांहीं दोष असून कांहीं तरी त्यापासून अपाय आहे हें ताडल्यानें मनुष्य लवकर त्यापासून विरक्त होतो. जो मनुष्य गेल्या गोष्टी संबंधानें रडत बसतो त्याचा कांहीं त्यांत फायदा होत नाहीं, किंवा धर्म अगर कीर्ति कांहींच पदरीं पडत नाहीं. जें एकदां नाहींसें झालें तें त्याला कधींच मिळत नाहीं. प्राणिमात्रांला ऐहिक विषय कधीं लाभतात, कधीं लाभत ना-

हींत. जे जे ह्मणून प्रसंग येऊन गुदरतात त्या स-र्वांसंबंधानें रडत बसेन ह्मटलें तर हें कोणाच्यानेंच होणार नाहीं. मेल्याबद्दल किंवा नाहींसे झाल्याब-द्दल जो शोक करीत बसतो तो त्या दुःखानें आ-णखी दुःख पदरीं घेऊन दुहेरी अनर्थाला बळी प-डतो. जे लोक बुद्धीच्या योगानें या जगांत जन्ममरणाचा क्रम लक्षांत घेऊन रडत बसत नाहींत त्यांनाच योग्य ज्ञान झालें ह्मणावयाचें. अशांना अश्रु ढाळीत बसण्याचा कधींच प्रसंग येत नाहीं. शारीरिक किंवा मानसिक दुःख वाढविणारा प्रसंग येऊन गुदरल्यावर शक्य तेवढ्या प्रयत्नानें सुद्धां जेव्हां तो टाळतां येत नाहीं तेव्हां अशा गो-ष्टीसंबंधानें चिंता करीत बसूं नये. त्याच्यावर वि-चार करीत न बसणें हें दुःखावर औषधच आहे. त्यावर विचार करीत बसल्यानें तें नाहींसें होत नाहीं; उलट वाढतें मात्र. शहाणपणाच्या योगानें मानसिक व औषधांनीं शारीरिक रोग नाहींसें करावे. ज्ञानाचें सामर्थ्य हेंच आहे. मुलांच्या ओळीला जाऊन बसूं नये. रूप, यौवन, जीवित, द्रव्यसंचय, आरोग्य, आवडत्या गोष्टींशीं संबंध हीं सर्व अशाश्वत आहेत. ह्मणून शहाण्यानें यांमध्यें मन घालूं नये. सर्व लोकांवरील दुःखासंबंधानें एकस्यानें शोक करीत बसूं नये. शोक करीत बसल्यावांचून जर कांहीं उपाय दिसेल तर तो करावा. या आयुष्यामध्यें सुखापेक्षां दुःख अधिक आहे. मनुष्यांना मोहामुळें इंद्रियविषयावर प्रेम स्वाभाविकपणें असून मरण आवडत नाहीं. जो मनुष्य सुख व दुःख हीं दोन्ही सोडून देतो तो ब्रह्माला जाऊन मिळतो. शहाणे लोक त्यासंबंधानें बिलकूल शोक करीत नाहींत. पैसा हातांतून सुटतांना दुःख देतो, तो संभाळणेंही मोठें सुखाचें नाहीं व मिळविण्यालाही बरेच आ-यास पडतात. तेव्हां असा पैसा नाहींसा झाल्यामुळें त्यासंबंधानें विचार करूं नये. पैशाची निरनिराळी विशेष स्थिति आली असतांही जे तृप्त होत नाहींत ते नाश पावतात. विद्वान लोक मात्र संतोष पाव-तात. संचय ह्मटला कीं, तो नाहींसा व्हावयाचा. चढला तो पडणारच. संबंध आला कीं, त्या ठि-काणीं ताटातूट ठेवलेलीच आहे व आयुष्य ह्मटलें कीं तेथें मरण आहेच. या आशेला अंत नसून संतोषासारखें सुख नाहीं. ह्मणून शहाणे लोक सं-तोष हाच पैसा समजतात. वय चाललें असून एक निमेषभर सुद्धां तें थांबत नाहीं. याप्रमाणें आपलें शरीर अशाश्वत असतां त्यावर नेहमीं कां विचार करीत बसावें? सर्व भूतमात्रांच्या स्वभावावर वि-चार करून आपल्या तर्काच्या ते पलीकडे आहेत असें समजून श्रेष्ठ गति डोळ्यांपुढें ठेवून वाटेला लागलेले लोक त्यासंबंधानें शोक करीत नाहींत. वासनांची तृप्ति न होतां त्यांवरच विचार करीत बसणाऱ्या या मनुष्याला जनावराला उपटून घे-ऊन पळणाऱ्या वाघाप्रमाणें मृत्यु घेऊन जातो. असें आहे तरी दुःखांतून सुटण्याच्या उपायाकडे लक्ष द्यावें, शोक न करतां तें आरंभावें, व दुःखांतून सुटून संकटांतून मोकळें व्हावें. शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध यांचा श्रीमंत असो किंवा गरीब असो त्याला भोगाच्या पलीकडे दुसरा उपयोग नाहीं. संबंध जडणाच्यापूर्वी मनुष्याला दुःख ठाऊक नस-तें; ह्मणून वियोगाचे वेळींही न डगमगतां कोणासं-बंधानें शोक करूं नये. धैर्यानें शिश्नोदराची खबर-दारी घेऊन हातापायांची डोळ्यांनीं खबरदारी घ्यावी. डोळे व कान यांची मनानें व मन आणि वाणी यांची ज्ञानानें खबरदारी घ्यावी. नांवाजले-ल्या किंवा इतर लोकांसंबंधानें प्रेम आवरून मनु-ष्यानें ताठा सोडून नम्रपणानें असावें. अशा रीतीनें असणारा मनुष्यच सुखी, हाच शहाणा. जो आ-त्म्याच्या ठिकाणीं रमून कशाचीही आशा करीत नाहीं व स्वतःच्या साह्यानेंच जो रहातो तो सुखी होतो.

सुखदुःखें आळीपाळीनें येत असून शहाण-पण, विचार किंवा उद्योग यांना तीं टाळतां येत नाहींत; परंतु मनुष्यानें स्वभाव कायम ठेवून यत्न करीत रहावें. यत्न करणारा नाश पावत नाहीं. जरा, मरण व रोग यांपासून आपल्या आवडत्या आत्म्याला वर काढावें; कारण शारीरिक त्याचप्रमाणें मानसिक रोग ब-ळकट हाताच्या मनुष्याच्या हातून सुटलेल्या बाणा-प्रमाणें मनुष्याच्या शरीराला पीडा देतात. तृष्णेनें पीडून तळमळणाऱ्या, जीविताची हांव लागलेल्या दुबळ्या मनुष्याचें शरीर नाशाकडे ओढून नेलें जात

असतें. नद्यांचे प्रवाह नेहमीं पुढें चालले असून ते कधीं मागें वळत नाहींत. याचप्रमाणें फिरून फिरून येणारे दिवसरात्र मनुष्यांचें आयुष्य कमी करीत चालले असतात. शुक्ल व कृष्णपक्षही जन्मलेल्यांना वठवीत एकसारखे चालले असून एक निमेषभरसुद्धां थांबत नाहींत. त्याचप्रमाणें ज्याला वृद्धावस्था ह्मणून ठाऊक नाहीं असा सूर्य उदयास्त पावत राहून नेहमीं मनुष्याच्या सुखदुःखांना कमी करीत चालला आहे. या रात्री, दैवावर अवलंबून असणाऱ्या मनुष्याच्या ध्यानीं मनीं नसणारे असे त्यावर येऊन गुदरणारे बरे वाईट संग यांना आपल्या बरोबर घेऊन एकसारख्या चालल्या आहेत. मनुष्याच्या क्रियेचें फल जर परतंत्र नसतें, तर ज्याच्या ज्याच्या मनांत जें जें येईल तें तें त्याला मिळालें असतें; परंतु आत्मनिग्रही, हुशार व बुद्धिमान लोक कांहीं कर्म न करतां राहून निष्फल झालेले दिसतात, कांहीं मूर्ख. निर्गुण व नीच असे असून त्यांच्या मनांत कांहीं आशा नसतां त्यांच्या इच्छा परिपूर्ण झालेल्या दिसतात. मनुष्यामध्यें कोणी नेहमीं हिंसेमध्यें व फसविण्यांत गढला असून त्याचा सुखांत शेवट होतो. कोणी हातपाय न हालवितां स्वस्थ बसला असून लक्ष्मी त्याच्या जवळ येते व कोणी कर्म करीत असून देखील एखादी यःकश्चित् गोष्ट त्याला मिळत नाहीं. स्वभावतः एकासंबंधानें उत्पन्न झालेल्या शुक्राचा दुसऱ्या ठिकाणीं विनियोग होतो, तेव्हां हें त्या पुरुषाचें कर्मफल नव्हे काय? त्याचप्रमाणें योनीमध्यें गेलेल्या त्या शुक्राचा एखादे वेळेला गर्भ होतो किंवा एखादे वेळेला होत नाहीं. याप्रमाणें निरर्थक घडणारा संबंध पुष्पें येऊन फल न येणाऱ्या आम्रवृक्षासारखा होतो. कोणी वंश चालण्यासाठीं मुलाच्या मागें लागून ते सिद्धीला जाण्यासाठीं खटपट करीत असतां त्यांना गर्भ रहात नाहीं व कोणाला विषारी सापाप्रमाणें गर्भाची भीति वाटत असून त्यांना केवळ आपली प्रतिमा फिरून निर्माण झाल्यासारखा दीर्घायुषी मुलगा होतो. देवांकरितां होम करून, तप करून बिचाऱ्या मुलाला हापापलेल्यांनीं दहा महिनेपर्यंत संभाळलेले कुलाला कलंक लावणारे निपजतात, व अशाच स्थितींत निर्माण झालेले दुसरे वडिलांनीं मिळविलेले पुष्कळ धनधान्यादिक भोग भोगीत रहातात. मैथुन प्रसंगीं दोघां स्त्रीपुरुषांचा संबंध असून गर्भ हा एकट्या आईलाच शनीसारखा त्रास देणारा होतो. प्राणानें देह सोडल्याबरोबर ज्याचीं कर्मे मांसश्लेष्मादिकांनीं बनलेल्या एका शरीरामध्यें घडलीं असतात तें स्थूल शरिर याप्रमाणें नाहींसें झाल्यावर तो दुसऱ्या शरीरामध्यें शिरतो व याप्रमाणें पहिल्याप्रमाणेंच असणाऱ्या नाशवंत शरीरामधून आपल्या मधील माल लोटून देण्याकरितां ज्याप्रमाणें एक नांव दुसरीकडे जात असते त्याप्रमाणें एक देह जळून नाहींसा झाल्यावर दुसरा, त्यामागून तिसरा याप्रमाणें देह तयार असतात. मैथुन प्रसंगीं पोटांत एक अचेतन रेताचा बिंदु ठेवला जाऊन तो कोणाच्या खटपटीनें जिवंत असा गर्भ होतो ? ज्या ठिकाणीं खाल्ले प्यालेले नानापदार्थ जिरून खाक होतात त्याच पोटामध्यें अन्नाप्रमाणेंच हा गर्भ कां बरें जिरून पार होत नाहीं? गर्भामध्यें मलमूत्रामध्यें याचा वास नियमित केला आहे. त्या ठिकाणीं रहाण्यासंबंधानें त्या जीवाच्या हातांत कांहीं नसतें. कांहीं गर्भ गळून पडतात, कांहीं पूर्ण होऊन जन्माला येतात व कांहींसाठीं दुसरे देह तयार होऊन बसले असल्यामुळें गर्भातच त्यांचा नाश होतो. याप्रमाणें मनुष्य या प्रसंगीं बीज ठेवीत असून त्यापासून वेळेला मुलगा किंवा मुलगी कांहीं तरी संतति होते. फिरून मैथुनसंबंध चालतो. मनुष्याची आयुर्मर्यादा जसजशी संपत जाते तसतसा जन्मापासून नाशापर्यंतच्या दहा स्थितींपैकीं त्याच्याबरोबर उत्पन्न झालेला पंचभूतात्मक देह सातवी ज्ञातारपणची स्थिति व नववी प्राण बंद पडण्याची स्थिति यांना पोहोंचून नाहींसा होतो; तरी त्या जीवामध्यें कांहीं फेरबदल होत नाहीं. पारध्यांनीं ज्याप्रमाणें लहानसान जनावरांच्या मागें लागावे; त्याप्रमाणें सर्व लोक नाना व्याधींनीं पीडले जाऊन उठून हातपाय हालविण्याचेंसुद्धां त्याच्या अंगांत सामर्थ्य रहात नाहीं. याप्रमाणें ते व्याधींनीं पीडिले असतां वाटेल तितका पैसा ओतून सुद्धां व वैद्यांची वाटेल तितकी खटपट झाली तरी त्यांच्या वेदना कमी होत नाहींत; एवढेंच नव्हे तर ते मोठे कुशल वैद्य त्यांच्याजवळ पुष्कळ

औषधें असूनही व्याधीकडून खेंचले जातात. ते नानाप्रकारचे उपाय व बनविलेलें तूप घेतात तरी धिप्पाड हत्तींनीं मोडून पाडलेल्या झाडाप्रमाणें जोरें वहून पडतात. पशू पक्षी त्याचप्रमाणें गरीब लोक रोगानें पीडले असतां त्यांना कोण औषधोपचार करितात? असें असून ते कधीं रोगपीडित होत नाहींत. घोर, कडक व कोणाला पुढें येऊं न देणारे अशा राजांना सुद्धां रोग घेरून सोडतात. याप्रमाणें वेदनेनें गांगरून जाऊन मोह व शोक यांमध्यें बुडून कालरूपी महाप्रवाहांत पडून वहात चाललेल्या मनुष्याला पैसा, राज्य किंवा कडक तप यांच्यानें सुद्धां जें जें म्हणून त्याच्या कपाळीं लिहून ठेविलें आहे त्याच्याहून पलीकडे जाववत नाहीं. प्रयत्नाचें फल मिळालेंच पाहिजे असें जर असतें, तर कोणी मेला नसता, कोणी म्हातारा झाला नसता, कोणाच्या मनाविरुद्ध कांहीं घडलें नसतें, सर्वांच्या सर्व इच्छा पुरल्या असत्या, सर्व लोक वरवर जाऊं पहातात व त्याप्रमाणें खटपटही करतात; परंतु तसें घडून मात्र येत नाहीं. जे काळजी घेणारे प्रामाणिक, शूर व पराक्रमी आहेत, अशांना सुद्धां संपत्ति व मद्य यानें धुंद झालेल्यांच्या पुढें हात जोडून रहावें लागतें. कोणाचे क्लेश त्याला कळण्यापूर्वींच नाहींसे होतात; तसेंच कोणाला आपल्या जवळचें सुद्धां मिळत नाहीं. कर्में सारखीं घडलीं असून फलें मात्र पुष्कळ निरनिराळीं असतात. कोणी शिबिका वहातात, कोणी तिच्या मधून बसून जातात; सर्वांनाच पुष्कळ पैसा हवासा वाटत असून त्यांपैकीं कांहींच्या पुढेंच हत्ती, घोडे झुलतात. कांहीं लोकांना एक बायको गेल्यावर दुसरी मिळत नाहीं व कांहींना हजारों बायका मिळतात. सुखदुःखें जवळ जवळ असून तीं एका मागून एक मनुष्याला मिळतात. हें जें मीं तुला पूर्वीं सांगितलें याच्याच योगानें देव हे मृत्युलोक सोडून स्वर्गाला गेले.' हें नारदांचें भाषण ऐकून शुकांनीं मनांत विचार केला तरी त्यांचा निश्चय कांहीं ठरेना. बायकामुलांपासून पुष्कळ क्लेश असून विद्या व वेद हीं मिळविण्याला पुष्कळ श्रम लागतात असें त्यांना वाटलें. व शाश्वत व कोणत्याही क्लेशापासून मोकळें, परंतु महावैभवदायक असें स्थान कोणतें आहे याबद्दल क्षणभर मनांत विचार करून व आपली काय गति ठरली आहे यासंबंधानें विचार करून धर्मासंबंधानें बरी वाईट गति ठाऊक असणाऱ्या त्या महात्म्यांनीं फार कल्याणकारक अशी गति मिळविण्याचा निश्चय केला. त्यांनीं मनांत विचार केला कीं, सर्वसंग सोडून देऊन आपण उत्तम गतीला कसे मिळणार? जेथून निरनिराळ्या योनींमध्यें यावें लागणार नाहीं, अशा स्थानाला मी कसा जाऊन पोहोंचणार? जेथून प्राणी फिरून परत येत नाहीं, अशा श्रेष्ठ पदाला जाऊन मिळावें असें माझ्या मनांत आहे. सर्व संग सोडून मनानें निश्चित गति ठरवून मी ती गति मिळवीन. ज्या ठिकाणीं माझ्या या आत्म्याला शांति मिळेल अशा अक्षय, अविनाशी व शाश्वत स्थानाला जाऊन तेथें मी राहीन. ती उत्तम गति योगाखेरीज मिळणें शक्य नाहीं. मनुष्याला ज्ञान झालें असतां कर्माच्या योगानें मनुष्याला नीच पाश जडत नाहींत; म्हणून योगाचा आश्रय करून हा देह टाकून वायुरूप होऊन तेजोराशी सूर्यामध्यें मी प्रवेश करीन; जेव्हां जीव यामध्यें शिरतो, तेव्हां देवाकडून चंद्राप्रमाणें त्याला क्षय पावावें लागून पृथ्वीवर येऊन पुनः वर चढत बसण्याचा प्रसंग येत नाहीं; कारण अर्चिमार्ग व धूममार्ग यांपैकीं धूममार्गाला लागल्यानें मनुष्य चंद्राप्रमाणें फिरून फिरून क्षय व वाढ याला लागतो, तें कांहीं मला नको आहे. सूर्य आपल्या प्रखर किरणांनीं सर्व लोकांना तापवून चोहोंकडून सर्व वस्तूंमधून तेज ओढून घेत असतो व त्याचें मंडल कधीं कमी होत नाहीं; म्हणून मला दैदीप्यमान सूर्यामध्येंच जाऊन मिळणें पसंत वाटतें. या ठिकाणीं निःशंक अशा अंतःकरणानें कोणाचेंही माझ्या पुढें कांहीं चालूं न देतां मी राहीन. सूर्यलोकामध्यें हा देह ठेवून ऋषींबरोबर फार दुःसह अशा सूर्याच्या तेजामध्यें मी जाऊन मिळेन, व नंतर या सर्व पृथ्वीवरील भूतमात्रांमध्यें मिळून मी तद्रूप होईन.आज योगाचें सामर्थ्य सर्वांच्या दृष्टीस पडेल,' असें म्हणून नारदांना आपला हेतु कळवून त्यांची आज्ञा घेऊन शुक आपल्या पित्याकडे गेले व त्यांना अभिवादन करून प्रदक्षिणा केल्यावर त्यांनीं त्यांनाही आपला हेतु कळविला;तेव्हां तो ऐकून व्यासांना आनंद होऊन

ते त्यांना ह्मणाले, ' मुला, कांहींवेळ येथें रहा. तोंपर्यंत मी तुझ्याकडे बघून आपल्या डोळ्यांचें पारणें फेडून घेईन. परंतु शुकांना कशाची पर्वा न उरून स्नेह व संशय दूर झाला असल्यामुळें मोक्षाचाच विचार मनांत आणून त्यांनीं निघण्याचें मनांत आणलें व पित्याला सोडून ज्यावर सिद्धांचा वास आहे अशा विशाळ कैलासपृष्ठाकडे निघून गेले. त्या पर्वताचें शिखर चढल्यावर सपाट अशा प्रदेशांत एकांतामध्यें ज्याठिकाणीं गवत वगैरे कांहीं वाढलें नव्हतें अशा ठिकाणीं बसून शास्त्राप्रमाणें यथाविधि पायापासून सर्व गात्रांच्या ठिकाणीं क्रमाक्रमानें ध्यान लावलें. पुढें सूर्य उगवल्याबरोबर पूर्वेकडे तोंडकरून अगदीं नम्रपणें ते बसले. त्याठिकाणीं पक्षीसुद्धां नसून शब्द बिलकुल कानावर येत नव्हता व भयंकर असें कांहीं दिसत नव्हतें. याप्रमाणें तेथें बसले असतां आपला आत्मा सर्व संगापासून मुक्त होऊन ब्रह्माकडे लागलेला पाहून आनंद होऊन शुक मोठ्यानें हंसले व मोक्षमार्गाला लागण्यासाठीं फिरून योग लावून महायोगी बनून ते वातावरण ओलांडून गेले; नंतर नारदाला प्रदक्षिणा करून आपली योगधारणा त्यांना सांगून ते ह्मणाले, 'मला मार्ग दिसूं लागला असून मी तिकडे निघालों आहे. अहो महामुने, आपल्या प्रसादानें मी इष्ट गतीला जाऊन मिळेन. ' पुढें नारदांची परवानगी घेऊन त्यांना अभिवाद करून फिरून योग लावून ते आकाशांत गेले. याप्रमाणें अंतरिक्षांतून निश्चयपूर्वक वायुरूप होऊन ते चालले असतां प्रत्यक्ष गरुडाप्रमाणें दिसत होते. व त्यावेळेस वाऱ्याप्रमाणें किंवा मनाप्रमाणें त्यांची गति होती. याप्रमाणें सूर्यासारखे तेजस्वी झालेल्या शुकांना त्रैलोक्य एक दिसूं लागून ते आपल्या दूरच्या वाटेला लागले असतां त्यांचें मन एकाग्र झालें असून त्याला व्यग्रता किंवा भीति ह्मणून बिलकुल दिसत नव्हती. तें पाहून सर्व चराचर भूतमात्रांनीं यथाशक्ति त्यांची पूजा केली. देवांनीं दिव्य पुष्पांचा त्यांच्यावर वर्षाव केला, अंतरिक्षामध्यें तपानें सिद्धि मिळवून दृष्टी शरीरामधून काढून वर, आकाशाकडे लावून आमच्या सर्वांच्या नेत्रांना सुख देत कोण चालला आहे, ह्मणून सर्व गंधर्व, अप्सरा, ऋषी वगैरे आश्चर्यानें थक्क झाले. आपल्या शब्दाच्या नादानें सर्व आकाश भरून काढून त्यांना वर चाललेले पाहून पंचचूडा प्रभृति अप्सरा डोळे आश्चर्यानें खुलून फार आश्चर्यचकित झाल्या. त्यांना वाटलें हें कोणतें दैवत याप्रमाणें गतीला मिळालें आहे? कारण कांहीं वासना न उरतां अगदीं मुक्ताप्रमाणें हें इकडे येत आहे. नंतर शुक ज्यावर नेहमीं उर्वशी व उपचित्ती यांचा वास आहे अशा मलय पर्वताला आले. त्या दोघींनाही यांना पाहून फार आश्चर्य वाटून त्यांना त्या ह्मणाल्या, ' या वेदाभ्यासामध्यें गढलेल्या ब्राह्मणांची केवढी तरी ही एकाग्रता.! हं हं ह्मणतां हे चंद्राप्रमाणें आकाश ओलांडून जातील. बापाची शुश्रूषा केल्यानें ही उत्तम बुद्धि यांनीं मिळविली आहे. बापावर पूर्ण भक्ति असून उत्तम तपामध्यें गढलेल्या या प्रेमळ मुलाला यांच्या पित्यानें सोडलें तरी कसें ? ' हें उर्वशीचें भाषण ऐकून शुकांनीं तिकडे लक्ष देऊन सर्व दिशांकडे नजर फेंकली. तेव्हां अंतरिक्ष व सर्व पृथ्वी त्यावरील डोंगर, अरण्यें, सरोवरें व नद्या त्यांच्या पाहण्यांत आल्या. ते वेळीं सर्व देवता बहुमानपूर्वक हात जोडून त्यांचेकडे पहात असतां, ' माझे तात,जर मला हांक मारीत माझ्यामागून येतील तर तुह्मीं सर्वांनीं मिळून, माझ्यावर तुमचें प्रेम असेल तर त्यांना उत्तर द्या, ' असें शुक त्यांना ह्मणाले; तेव्हां सर्वांनीं बरें ह्मणून त्यांना उत्तर दिलें. याप्रमाणें शुक चारी प्रकारचे दोष टाकून सिद्धि मिळवून निघाले. आठ प्रकारचे तमोगुण, पांच प्रकारचे रजोगुण तसेच सत्वगुण हीं त्यांनीं टाकून ते शाश्वत, निर्गुण व लिंगवर्जित अशा ब्रह्मपदीं स्वच्छ जळणाऱ्या अग्नीप्रमाणें लीन होऊन राहिले. ते वेळीं उल्कापात होऊन दिशा पेट घेतलेल्या दिसूं लागल्या. धरणीकंप होऊन झाडांच्या फांद्या कडाकड मोडून पडूं लागल्या. व पर्वतांचीं शिखरें ढांसळून पडूं लागलीं. मोठमोठे शब्द निघून त्यांच्या योगानें हिमालय पर्वत दुभंगतो आहेसा दिसला. सूर्याचें तेज नाहींसें झाल्यासारखें दिसूं लागून अग्नीही पेट घेईनासा झाला. नद्या व सरोवरें क्षुब्ध होऊन गोड व सुवासिक असा पाऊस पडूं लागला. मोठा सुगंधी व पवित्र वारा सुटला. याप्रमाणें शुक अंतरिक्षांतून निघाले

असतां एक हिमालयाचें व दुसरें मेरूचें अशीं दोन शिखरें जुळलेलीं त्यांना दिसलीं. त्यांपैकीं एक सोन्याचें असल्यामुळें पिंवळें दिसत होतें व दुसरें रुप्याचें असल्यामुळें पांढरें दिसत होतें. त्यांपैकीं प्रत्येकाची लांबी व उंची शंभर शंभर योजनें होती. त्यांना पाहून न कचरतां त्यांना जाऊन हे भिडले असतां तीं दोन्ही एकत्र जुळलीं होतीं तरी यांच्या त्या जोराच्या धक्यानें दुभंगून वेगळीं वेगळीं झालीं. तेव्हां तीं फारच विलक्षण दिसत होतीं. या शिखरांमधून शुक बाहेर पडून निघाले; कारण त्यांना प्रतिबंध करण्याचें सामर्थ्य त्यांच्या अंगीं नव्हतें. या वेळीं त्या पर्वतावर रहाणाऱ्या देवादिकांचा मोठा शब्द ऐकूं आला. पर्वताला दुभंगून शुकांना निघून गेलेले पाहून शाबास शाबास ह्मणून ते ओरडले. त्या सर्वांनीं त्यांचा बहुमान केला. व दिव्य पुष्पांनीं आकाश चोहोंकडून भरून राहिलें. रम्य व जिच्या तटावर फुलांनीं भरलेल्या झाडांचीं वनें होतीं अशा त्या मंदाकिनीवरून शुक चालले असतां तिच्या पाण्यामध्यें अप्सरा क्रीडा करीत असलेल्या त्यांना दिसल्या. शुकांना पाहून त्यांना लज्जा मुळीं वाटली नाहीं. व्यास पुत्रप्रेमानें याच वाटेनें त्यांच्या मागून येत होते. इकडे शुक वातावरणाच्या पलीकडे पोहोंचून ब्रह्मस्वरूप झाले होते. व्यासही योगसामर्थ्यानें त्या सूक्ष्म मार्गाला लागून शुक जेथून प्रथम आपल्या प्रवासाला निघाले त्या वाटेला लागले असतां तो दुभंगलेला पर्वत त्यांना दिसला. तेव्हां तेथें असलेल्या ऋषींनीं त्यांच्या मुलाचें अलौकिक कर्म त्यांच्या कानावर घातलें; तेव्हां तिन्ही लोकांना ऐकूं जाईल अशा मोठ्या शब्दानें व्यासांनीं त्यांना हांक मारिली.! सर्वांच्या ठिकाणीं मिळून जाऊन सर्वस्वरूपी बनून गेल्यामुळें सर्व ठिकाणीं ज्याचें तोंड भरून राहिलें होतें अशा शुकांनीं भो ह्मणून प्रत्युत्तर दिलें. या शब्दाचा ध्वनि सर्व जगांमधून निघाला. त्या वेळेपासून आतापर्यंत गुहेमधून किंवा पर्वतावर शब्द केला असतां शुकाकरितां ह्मणून प्रतिध्वनि निघत असतो. याप्रमाणें शब्दादि गुण टाकून शुक श्रेष्ठ पदाला जाऊन मिळाले. तो आपल्या मुलाचा महिमा पाहून व्यास त्यासंबंधानेंच विचार मनामध्यें घोळवीत त्या पर्वतावर बसले असतां मंदाकिनीच्या तीरावर क्रीडा करीत असलेल्या अप्सरा त्यांना दिसल्या. यांना पाहून त्या सगळ्यांची गडबड उडून कोणी पाण्यांत शिरल्या तर कोणी झाडांवर चढल्या व कोणी लगबगीनें आपलीं वस्त्रें अंगावर घेऊं लागल्या; तेव्हां आपल्या मुलाची ती मुक्तस्थिति व आपला ऐहिक विषयांशीं जडलेला संबंध लक्षांत येऊन व्यासांना मोठें समाधान वाटलें व त्याबरोबर आपल्या संबंधानें एकप्रकारची लाजही वाटली. ते वेळीं व्यास याप्रमाणें तेथें बसले असतां पिनाकधारी शंकर तेथें येऊन त्यांचें समाधान करून ह्मणाले, 'पूर्वी अग्नि, पृथ्वी, जल, आकाश, वायु यांचें सामर्थ्य अंगीं असणारा मुलगा तूं मागितला होतास व तपाच्या सामर्थ्यानें तूं उत्पन्न केलेला मुलगा तशा प्रकारचा होता. माझ्या कृपेनें ब्रह्मतेजानें पूर्ण असा तो शुद्ध असून ज्यांचीं इंद्रियें स्वाधीन नाहींत अशा देवांना सुद्धां मिळण्याला कठीण अशी गति त्याला मिळाली आहे. तेव्हां त्याच्या संबंधानें तुला शोक करण्याचें कारण नाहीं. जोंपर्यंत पर्वत व समुद्र कायम रहातील तोंपर्यंत त्याची कीर्ती कमी न होतां कायम राहील. माझ्या कृपेनें तुझ्या मुलाची छाया नेहमीं क्षणभरसुद्धां तुला न सोडतां तुझ्या जवळ दिसत राहील.' याप्रमाणें शंकराची कृपा झाल्यावर व्यासांना आपल्या मुलाची छाया आपल्या बाजूला दिसूं लागली. व व्यास मोठ्या आनंदानें आपल्या ठिकाणीं परत आले.'

---

## २१८ नारद व नारायण यांचा संवाद.

### (१२. ३३४-३३९)

युधिष्ठिर ह्मणाला, ' मनुष्य, गृहस्थ, ब्रह्मचारी, वानप्रस्थ किंवा संन्यासी असो; त्याच्या मनांतून जर सिद्धि मिळवावयाची असेल तर त्यानें कोणत्या देवतेचें आराधन करावें ? मनुष्याला स्वर्ग कशानें खात्रीनें मिळतो व मोक्ष कशानें मिळतो ? देव व पितर यांना कोणत्या विधीनें त्यानें होम करावा. मुक्त कोणत्या गतीला जातो ? मोक्ष कशा प्रकारचा आहे ? मनुष्य स्वर्गाला गेल्यावर तेथून क-

शानें खालीं येत नाहीं ? देवतांमध्यें श्रेष्ठ कोण व पितरांमध्यें श्रेष्ठ कोण व त्यांच्यावरही कोण आहेत?' भीष्म ह्मणाले, 'तुझा हा प्रश्न फार गूढ असून तर्कानें शेंकडों विषय सांगितले तरी सांगतां येण्याजोगा नाहीं. केवळ नारायणाच्या प्रसादानें किंवा सत्यज्ञान होऊनच याचें उत्तर देतां येण्याजोगें आहे. हा तुझा प्रश्न गूढ आहे तरी माझ्या हातून होईल तसें मी याचें उत्तर देतों. या संबंधांत पुढील नारायण व नारद यांचा संवाद सांगत असतात. माझ्या पित्यापासून मीं ऐकलें आहे कीं, पूर्वीं कृतयुगामध्यें स्वयंभू मनूपासून सनातन नारायणानें धर्मपुत्र ह्मणून नर, नारायण, हरी व कृष्ण या चार रूपांनीं जन्म घेतला; यांपैकीं नर व नारायण यांनीं हिमाळयाच्या एकांतांतील बदर्याश्रमाला जाऊन आपल्या सुवर्णरथांत बसून कडक तप केलें. या शकटाला आठ (अविद्या) चाकें असून पंचमहाभूतांचें केलेलें हें फारच मनोरम होतें. त्या ठिकाणीं हे लोकांचे स्वामी तपानें अगदीं कृश होऊन अस्थिपंजर उरले होते तरी त्यांच्या तेजानें देवांना देखील त्यांच्याकडे पहावत नसे. ज्यावर यांची कृपा होते त्यांनाच यांच्याकडे पाहववते, यांच्याच धारणेवरून यांच्यावर भक्ति असलेले नारद मेरूपर्वतावरून गंधमादनावर उतरून तेथून सर्व पृथ्वीवर संचार करतां करतां कौतूहलानें बद्रिकाश्रमाकडे आले व नरनारायणांना आपल्या आन्हिक क्रिया करतांना पाहून ते मनांत ह्मणाले, 'यांच्या ठिकाणीं देवांसह सर्व जग आहे. पूर्वीं एक मूर्ति असून तिच्याच धर्माचें कोड वाढविण्यासाठीं हे चौघे झाले आहेत. त्यापैकीं पूर्वीं ज्या ठिकाणीं हरी व कृष्ण रहात होते तेथेंच हल्लीं हे दोघे नरनारायण तपानें पुण्यसंचय करीत राहिले आहेत. हे दोघे जगाचे श्रेष्ठ आधार आहेत; तेव्हां यांच्या या आन्हिकाचें स्वरूप तरी काय असावें? सर्वांना थोर हे असून सर्वांची देवता हेच आहेत; तेव्हां हे कोणत्या देवाची उपासना करीत आहेत ? सर्वांचे पितर असे हे कोणत्या पितरांची आराधना करीत आहेत? याप्रमाणें विचार करीत ते त्या दोघांजवळ आले असतां आन्हिक आटोपल्यावर त्यांनीं नेहमींच्या विधीप्रमाणें शास्त्रोक्त रीतीनें त्यांचा सत्कार केला. तें त्या दोघांचें विलक्षण वर्तन पाहून नारद त्या सत्कारानें संतुष्ट होऊन त्या महादेवाला नमस्कार करून मोठ्या उत्साहपूर्वक नारायणाकडे दृष्टि देऊन ह्मणाले, 'वेद, पुराण व वेदांगें यांमध्यें नारायणा, तुझी स्तुति गाइली जात असून अज, शाश्वत, अमर असा तूं सर्व वस्तूंचा स्वामी आहेस. भूत, वर्तमान एवढेंच नव्हे तर हें सर्व जग तुझ्या ठिकाणीं आहे. गृहस्थाश्रममूलक चारी आश्रमामधील लोक नाना मूर्तींच्या ठिकाणीं असणाऱ्या तुझ्या उद्देशानें यज्ञ करतात. सर्व जगाचा आईबाप तसाच शाश्वत गुरु तूंच आहेस. असें असून तूं कोणाला आज यज्ञ करीत आहेस ? हें मला समजत नाहीं.' हें ऐकून भगवान नारायण ह्मणाला, 'या तुझ्या प्रश्नाचें उत्तर फार गूढ असून सांगण्यासारखें नाहीं; परंतु तूं माझा मोठा भक्त असल्यानें त्यांतील तत्त्व सांगतों ऐक. सूक्ष्म, कोणाला न कळण्यासारखा, अव्यक्त, अचल, कायमचा, इंद्रिय, विषय व पंचमहाभूतें यांच्याशीं कांहीं संबंध नसलेला सर्व भूतमात्रांच्या हृदयांमध्यें असणारा, अशा परमात्म्याला क्षेत्रज्ञ असें ह्मणतात. तो त्रिगुणांपासून अलग असून त्याला पुरुष असेंही ह्मणतात. त्यापासून त्रिगुणात्मक अव्यक्त, अविनाशी प्रकृति उत्पन्न झाली. ही सर्व व्यक्त अशा पदार्थांमध्यें आहे. या प्रकृतीपासून आमची उत्पत्ति असून जो हा सदसदात्मक पुरुष त्यालाच देव, पितर, सर्व कांहीं समजून आह्मी त्याची पूजा करतों. त्याहून दुसरा श्रेष्ठ देव किंवा पितर कोणी नाहीं. तो आमचा आत्मा असून त्यानेंच ही लोकांना कायम ठेवण्याला मर्यादा घालून दिली. देवकार्य व पितृकार्य करावें अशी त्याचीच आज्ञा आहे. ब्रह्मा, स्थाणू, मनु, दक्ष, भृगु, धर्म, यम, मरीचि, अंगिरा, अत्रि, पुलस्त्य क्रतू, वसिष्ठ, परमेष्ठी, विवस्वान, सोम, कर्दम, क्रोध, आवाकं, विक्रीत असे एकवीस उत्पन्न झालेले प्रजापती या परमात्म्यानें घालून दिलेली ही सनातन मर्यादा पाळतात. द्विजश्रेष्ठ याप्रमाणें दैव, व पितृकर्में करून त्यांना वाटेल तें मिळवितां येतें. जे कोणी स्वर्गामधील प्राणी सुद्धां त्यांना नमतात ते त्यांच्या प्रसादानें त्यानें ठरवून ठेवलेल्या गतीला जातात. पंचेंद्रियादि सतरा गुण, कर्में त्याचप्रमाणें पंचवीस कला यांपासून जे अलग आहेत ते खात्रीनें

मुक्तच आहेत आणि या मुक्तांची गति ब्रह्म आहे. याला शास्त्रांत सगुण तसाच निर्गुण ह्मणतात. ज्ञानाच्याच योगानें हा दिसतो. अशा प्रकारच्या या सनातन आत्म्याला ओळखून आह्मी याची पूजा करतों. वेद, निरनिराळ्या मतांचे सर्व आश्रम भक्तीनें याची पूजा करतात. हाच भक्तीनें प्रसन्न होऊन लोकांना चांगली गति देतो. त्याच्याशीं तादात्म्य पावलेले लोक त्याच्या भक्तीनें उच्च गतीला मिळतात; कारण ते त्यामध्यें शिरून तत्स्वरूपी झाले असतात.'

हें नारायणाचें भाषण ऐकून नारद ह्मणाले, 'ज्यासाठीं आपल्या सामर्थ्यानें धर्माच्या घरीं चार रूपांनीं तूं जन्म घेतला आहेस तें आपलें काम साध. मी तुझ्या मूलप्रकृतीला भेटण्याला जातों. नेहमीं गुरूची पूजा करून दुसऱ्याचें गूढ मीं कधीं फोडिलें नाहीं. मी वेद चांगले पढलों आहें. तप आचरिलें आहे व कधीं खोटें बोललों नाहीं. हात, पाय, शिश्न व उदर या चारांसंबंधानें चांगली खबरदारी घेतली आहे, शत्रु व मित्र यांच्या ठिकाणीं नेहमीं सारख्या दृष्टीनें आहें व त्या आदिदेव परमात्म्याला शरण जाऊन नेहमीं भजतों. याप्रमाणें चोख आचरणानें अंतःकरण शुद्ध केलें असल्यानें जगाचा जो अनंत ईश तो मला कां बरें दिसणार नाहीं?' हें त्यांचें भाषण ऐकून त्यांचा यथाशास्त्र सत्कार करून सनातनधर्मरक्षक नारायणानें जा ह्मणून त्यांना आज्ञा दिली. नारदही त्या पुराणऋषींची पूजा करून आपल्या अलौकिक सामर्थ्यानें आकाशांत उडून एकदम मेरूवर उतरून त्याच्या एका शिखरावर विसांवा घेण्यासाठीं कांहीं वेळ बसले. तेव्हां वायव्येकडे त्यांची नजर जाऊन त्याठिकाणीं अद्भुत चमत्कार त्यांना दिसला. क्षीरसागराच्या उत्तरेला अफाट श्वेतद्वीप नांवाचें प्रसिद्ध द्वीप त्यांना दिसलें. हें द्वीप मेरूपासून बत्तीस हजार योजनांवर आहे, असें विद्वानांचें मत आहे. याठिकाणीं लोकांना इंद्रियें वगैरे कांहीं नसून ते कांहीं खात नाहींत. त्यांच्या डोळ्याची पापणी लवत नाहीं, अंगाला सुवास येतो, ते गोरेपान असून त्यांच्या ठिकाणीं पाप ह्मणून बिलकुल नाहीं. पापी लोकांचे डोळे ते हरण करतात. त्यांचीं हाडें व देह वज्रासारखीं असून मानापमान ते सारखेच लेखतात. त्यांचे अवयव व रूप दिव्य असून योगप्रभावापासून आलेलें उत्तम बळ त्यांच्या अंगामध्यें आहे. त्यांचें डोकें छत्रीसारखें असून मेघगर्जनेप्रमाणें त्यांचा शब्द आहे. त्यांचें वृषण व खांदे पुढें आलेले नसून त्यांच्या पायाच्या तळव्यावर रेघा आहेत. त्यांना साठ पांढरे शुभ्र दांत असून आठ दाढा आहेत. ते आपल्या जिभेनें ज्याच्या तोंडांत सर्व विश्व आहे अशा सूर्याच्या योगानें स्पष्ट होणाऱ्या महाकालाला चाटीत असतात.' युधिष्ठिर ह्मणाला, 'आपण जें यांचें असें वर्णन दिलें असे हे लोक कसे उत्पन्न झाले? त्यांना मिळणारी उत्तम गति कोणती? मोक्षाला मिळणाऱ्यांचीं व यांचीं लक्षणें एकच काय?' भीष्म ह्मणाले, 'या संबंधानें थोडक्यांत गोष्ट सांगतों ऐक. उपरिचर नांवाचा कोणी इंद्राच्या तोडीचा राजा होऊन गेला. तो नारायणाचा मोठा भक्त असून धार्मिक व पित्याच्या ठिकाणीं मोठ्या भक्तीनें राहणारा होता. नारायणाच्या वरानें त्याला साम्राज्य मिळालें. सूर्याच्या तोंडून निघालेल्या पंचरात्रविधीनें प्रथम त्या नारायणाची पूजा करून नंतर ब्रह्मदेवाची व त्यानंतर ब्राह्मणाची पूजा करून राहिलेलें अतिथींना वांटून मग तो अवशिष्ट अन्न खात असे. नेहमीं सत्यपर असून कोणाला तो पीडा देत नसे. पूर्ण भावानें तो त्या जगत्कर्त्या जनार्दनाकडे लक्ष देऊन असे. नारायणासंबंधानें त्याची भक्ति पाहून इंद्र आपलें अर्धे आसन त्याला देत असे. आपलें राज्य, पैसा, बायको, वाहनें सर्व त्या नारायणापासून मिळालीं आहेत असें समजून तो तीं नारायणाला अर्पण करीत असे. या पंचरात्रविधीनें एकाग्रतेनें सर्व काम्य व नैमित्तिक विधि तो पाळीत असे, त्या थोर राजाच्या वाड्यामध्यें पंचरात्रविधि ठाऊक असलेले पुष्कळ ब्राह्मण नारायणाला अर्पण केलेलें अन्न सर्वांच्या आधीं ग्रहण करीत असत. जोंपर्यंत तो धर्मानें आपलें राज्य चालवीत होता तोंपर्यंत असत्य किंवा वाईट त्याच्या तोंडून कधीं आलें नाहीं. त्याच्या हातून एवढें देखील पाप घडत नसे. मरीचि, अत्री, अंगिरा, पुलस्त्य, पुलह, क्रतु व वसिष्ठ ज्यांना चित्रशिखंडी ह्मणत असत त्या या महातेज-

स्वी सात ऋषींनीं मेरु पर्वताच्या शिखरावर यासाठीं एक मोठें लोकांनीं वागावें कसें याबद्दल धर्मपुस्तक तयार केलें. हे सात ऋषी व आठवे स्वयंभू मनू हे मूळ प्रकृति असून यांनींच याच्यासाठीं वर सांगितलेलें धर्मपुस्तक तयार केलें. इंद्रियें व मन पूर्ण ताब्यांत ठेवून योगाकडे लक्ष देऊन भूत, वर्तमान व भविष्य जाणणाऱ्या या आठांनीं एकाग्रतेनें सत्यधर्माकडे नजर देऊन हें चांगलें आहे, हें ब्रह्म आहे, हें फार कल्याणकारक आहे, असा विचार मनांत करून ह्या सर्व विश्वासाठीं नीति व धर्म यांचें पुस्तक तयार करून त्यामध्यें धर्मार्थकाममोक्षांसंबंधानें लिहून ठेविलें. प्रभु नारायणाचीं हजार वर्षेंपर्यंत तपानें आराधना केल्यावर नंतर त्यांनीं हें पुस्तक रचिलें. त्यांच्या तपानें व आराधनेनें संतुष्ट होऊन नारायणानें सरस्वतीला त्यांच्यामध्यें प्रवेश करण्यास सांगितलें. सरस्वती जगाच्या कल्याणासाठीं त्याप्रमाणें त्यांच्यामध्यें शिरली; त्यामुळें हा ग्रंथ शब्द, अर्थ व हेतु यांमध्यें अप्रतिम असा त्यांच्या हातून बठला. प्रथम ॐकारानें पवित्र करून हा ग्रंथ निर्माण करून त्यांनीं नारायणाला वाचून दाखविला; तेव्हां भगवान प्रसन्न होऊन अशरीरिणी वाणीनें त्यांना ह्मणाले, 'हे हजार श्लोक तुह्मीं फार उत्तम केले आहेत. लोकांच्या वागण्याबद्दलचे सर्व धर्म यांत आलेले आहेत. प्रवृत्ति व निवृत्ति अशा दोन्ही मार्गांला हें साधनीभूत होईल. ऋक्, यजु, साम व अंगिराचें अथर्वण या चारी वेदाला हें धरून असून सर्व जगामध्यें प्रवृत्ति व निवृत्तीसंबंधानें हा ग्रंथ आधारभूत होईल. शास्त्राला धरून माझ्या कृपेपासून ब्रह्मदेव, रागापासून रुद्र यांना, तसेंच तुह्मांला प्रकृति ह्मणून उत्पन्न केलें आहे. सूर्य, चंद्रमा, वायु, पृथ्वी, जल व अग्नि त्याचप्रमाणें सर्व ग्रहनक्षत्रें व जें कांहीं भूतसंज्ञक आहे, तसेंच वेद ह्मणणारें आपापल्या अधिकारामध्यें ज्याच्या योगानें रहातील असें हें उत्तम शास्त्र असून हेंच सर्वांना आधारभूत होईल. ही माझी आज्ञा आहे. स्वयंभूमनू स्वतः याच्याच साह्यानें लोकांना धर्म सांगेल; त्याचप्रमाणें पुढें उत्पन्न होणारे शुक्र व बृहस्पती हेही आपले नीति व धर्म या वरील ग्रंथाच्याच आधारानें लिहितील. त्या तिघांचे ग्रंथ निर्माण झाल्यावरही तुह्मीं निर्माण केलेला हा ग्रंथ वसू उपरिचर नांवानें प्रसिद्ध असलेला राजा बृहस्पतीपासून शिकेल व याच्याच आधारानें तो सर्व धर्म पाळील. नीति व धर्म यावरील हा तुमचा ग्रंथ सर्वांमध्यें अग्रस्थान मिळवील. हा फार गूढ असून धर्मार्थ देणारा आहे. या तुमच्या ग्रंथामुळें एका मोठ्या कुळाचे तुह्मी उत्पादक व्हाल. राजा उपरिचरही मोठेपणाला व वैभवाला चढेल. त्याच्या मरणानंतर हा ग्रंथ जगांतून नाहींसा होईल, असें बोलून नारायण अदृश्य होऊन त्या ऋषींना ठाऊक नाहीं अशा ठिकाणीं निघून गेले व धर्मावरील हा पहिला ग्रंथ त्या ऋषींनीं प्रचारांत आणला, व कृतयुगामध्यें अंगिराच्या कुळामध्यें बृहस्पती झाले, तेव्हां त्यांना उपनिषदाला धरून असणाऱ्या या ग्रंथाचा प्रसार करण्यास सांगितलें. याप्रमाणें हे सप्तर्षी नीतिशास्त्राचे उत्पादक होते.

पुढें मोठा कल्प संपल्यावर जेव्हां अंगिराच्या कुळांत बृहस्पती जन्मले तेव्हां सर्व देवांना फार आनंद झाला. बृहत्, ब्रह्म व महत् हे शब्द पर्यायवाचक असून या देवगुरूंना ते या सर्वगुणांनीं युक्त असल्यामुळें बृहस्पती नांव पडलें. राजा उपरिचर यांचा शिष्य झाला व लौकरच शिष्यांमध्यें त्यानें अग्रस्थान मिळविलें. व त्यांपाशीं या सात ऋषींनीं तयार केलेलें शास्त्र शिकला. यज्ञ व विधि यांनीं अंतःकरण सर्व पापांपासून शुद्ध करून घेऊन स्वर्गाचें राज्य करणाऱ्या इंद्राप्रमाणें तो पृथ्वीचें राज्य करूं लागला. ह्या प्रसिद्ध राजानें अश्वमेध केला, त्यांत बृहस्पती होते. प्रजापतिपुत्र एकत, द्वित आणि त्रित हे त्याचप्रमाणें धनुष, रैभ्य, अर्वावसु, परावसु, मेधातिथी, तांड्य, शांति, वेदशिरा, शालिहोत्राचे वडील कपिल, कठ, वैशंपायनांचे वडील भाऊ तैत्तिर, कण्व व देवहोत्र हे सोळा सदस्य होते. या मोठ्या यज्ञाची सर्व सामग्री जुळून तो सुरू झाल्यावर राजाज्ञेप्रमाणें त्यांत पशुवध झाला नाहीं; कारण तो मोठा दयाळू होता. शुद्ध व उदार मनांचा असल्यानें त्यानें वासना सर्व सोडिल्या होत्या. शिवाय सर्व विधि त्याला ठाऊक होते. त्या ठिकाणीं सर्व वनस्पतींचे हविर्भाग तयार ठेविले होते. पुराणपुरुष हरीला या यज्ञामुळें मोठा सं-

तोष झाला. दुसऱ्या कोणाला दर्शन न देतां त्यानें त्याला दर्शन दिलें व आपला पुरोडाशाचा भाग हुंगून अदृश्यपणेंच तो घेऊन निघून गेला. हें पाहून बृहस्पतींना राग आला, व स्रुक् घेऊन ती त्यांनीं आकाशांत फेंकली आणि डोळ्यांतून पाणी काढून उपरिचराला ह्मणाले, ' हा मी येथें भाग ठेवतों तो नारायणानें प्रत्यक्ष नेला पाहिजे. ' यावर युधिष्ठिरानें विचारलें, ' त्या यज्ञांत सर्व देवांनीं येऊन जर आपापले भाग प्रत्यक्ष नेले तर मग नारायणानेंच आपण स्वतः न दिसतां तो कां नेला ? ' भीष्म ह्मणाले, 'जेव्हां बृहस्पती रागावले तेव्हां उपरिचर, वसु व दुसरे सभासद यांनीं त्यांची समजूत घालण्याचा प्रयत्न केला. ते ह्मणाले, 'असें रागावणें आपल्याला ठीक नाहीं. कृतयुगामध्यें कोणालाचअसा राग नसावा.ज्या देवाला आपण यज्ञभाग ठेवला त्याला स्वतःला राग मुळीं नाहीं. आह्मांला किंवा आपल्याला तो दिसणें शक्य नाहीं. ज्याच्यावर त्याची कृपा होणार त्यालाच तो दिसणार. ' नंतर त्या सप्तर्षींचें शास्त्र ज्यांना पूर्ण अवगत आहे असे एकत, द्वित व त्रितह्मणाले, 'आह्मी ब्रह्मदेवाचे मानसपुत्र समजले गेलों आहों. आह्मी मेरूच्या उत्तरेला क्षीरसमुद्राच्या तीराला जाऊन नारायण आह्मांला कसा दिसणार, हा विचार मनांत आणून कडक तप करूं लागलों; तेव्हां त्या तपाच्या अखेरीस अशरीरिणी वाणी अशी आमच्या कानावर आली कीं, ' तुह्मीं मोठ्या सुप्रसन्न अंतःकरणानें तप केलें आहे. नारायण आह्मांला कसा दिसणार असें तुमच्या मनांत आहे. क्षीरसमुद्राच्या उत्तरेला मोठें झगझगीत श्वेतद्वीप आहे. त्याठिकाणीं सर्व लोक नारायणामध्यें तल्लीन असून त्याचे मोठे भक्त आहेत. ते त्या सहस्रार्चीं, सनातन देवामध्यें प्रवेश करीत असतात. तें एकांतामध्यें त्याच्या भक्तीमध्यें गढून असतात; तेथें जा. मीं तेथें स्वतःला प्रगट केलें आहे. ' याप्रमाणें ती अशरीरिणी वाणी ऐकून आनंदभरित होऊन सांगितल्या मार्गानेंच त्या देशाला गेलों. त्याला भेटण्याच्या आतुरतेनें त्याच्याचकडे लक्ष ठेवून आह्मी श्वेतद्वीपाला गेलों असतां आमची दृष्टि त्याच्या तेजानें दिपून गेली. तेव्हां त्याच्याच प्रसादानें आमच्या मनांत कल्पना आली कीं, पूर्ण तप झाल्यावांचून त्याला पहातां येणें शक्य नाहीं. विचारानें त्या प्रसंगानुरूप फिरून शंभर वर्षे आह्मीं कडकडीत तप केलें. तें तप संपल्यावर चंद्राप्रमाणें तेजस्वी व सर्व लक्षणांनीं युक्त असे तेथील पुण्यवान लोक आमच्या दृष्टीस पडले. नेहमीं ईशान्येकडे तोंड करून हात जोडून ते महात्मे मानस जप करीत होते. युगक्षयाच्या वेळीं सूर्याचें जें तेज असतें तसें तेज त्या ठिकाणीं एकेकाचें होतें. तें द्वीप तेजाचें अगरच आहे असें आह्मांला वाटलें. सर्वांचें तेज त्या ठिकाणीं सारखें असून कोणाचें कमी अधिक नव्हतें. त्यावेळीं आह्मांला एकदम हजार सूर्यांच्या तेजाप्रमाणें तेज दृष्टीस पडलें. तेथील लोक मोठ्या आनंदानें. 'नमोनमः' ह्मणत आदरपूर्वक त्यांकडे धांवले. त्यांच्या त्या मोठ्या शब्दावरून ते त्याला बलि नेत असावेत असें दिसत होतें; कारण आह्मांला तर त्याच्या तेजानें एकदम भिवबून मन जाग्यावरचे एकदम उडून जाऊन डोळे, बल व इंद्रियें गळून गेल्यामुळें कांहींच दिसेना. हे 'पुंडरीकाक्षा, तूं मिळविलेंस, हे आदिपुरुषा, तुला नमस्कार असो.' याप्रमाणें निघणारा शब्द चोहोंकडे भरून राहिलेला आमच्या कानावर पडला. जो हा शब्द कानावर पडत होता तो वर्णोच्चारासंबंधानें जसा असावा तसा होता. याचवेळीं सुगंध व पवित्र असा वारा वाहूं लागून या त्यांच्या कर्मांच्या वेळीं उपयोगांत आणलेल्या दिव्य फुलांचा व वनस्पतींचा सुगंध सुटला होता. त्या पंचकाल ( पंचरात्र ) वेत्त्यांनीं परमात्म्याकडे लक्ष लावून मोठ्या भक्तीनें कायावाचामनेंकरून ते वेळीं त्याची पूजा केली; तेव्हां हरी प्रत्यक्ष तो शब्द उठला होता त्या ठिकाणीं दृश्य झाला असला पाहिजे. त्याच्या मायेनें मोहित झाल्यामुळें आह्मांला मात्र तो दिसत नव्हता. याप्रमाणें तो सुगंधी वायु बंद पडून त्यांचें बलिदान झाल्यावर आमचीं मनें फार चिंताकुल झालीं; कारण शुद्ध योनींत जन्मलेल्या त्या हजारों लोकांमध्यें कोणीही आमच्या संबंधानें विचार केला नाहीं किंवा आमच्याकडे नजर केली नाहीं. याप्रमाणें ते स्वस्थपणें एकाग्रतेनें त्याच्याकडे लागून ब्रह्ममय होऊन त्याच्या ध्यानांत गर्क होऊन गेले असल्यामुळें आमच्यासंबंधानें त्यांनीं कांहीं विचार-

च केला नाहीं. आधींच तपानें सुकलेले आह्मी श्रमानें अगदीं थकून गेलों होतों; इतक्यांत आकाशामधून आकाशवाणी झाली कीं, 'तुह्मीं बिन इंद्रियांचे हे लोक पाहिलेत. परमात्मा यांनाच काय तो दिसतो. मुळीं वेळ न लावतां आलां तसे येथून परत जा. अभक्तिमान लोकांना तो मुळीं दिसत नसतो. जे पुष्कळ दिवसपर्यंत केवळ त्याच्याकडे ध्यान लावून बसलेले असतात, अशांनाच आपल्या प्रभामंडळानें लोकांचे डोळे दिपवून टाकणारा असा हा परमात्मा दिसतो. हे द्विजश्रेष्ठांनो, कृतयुग सरून वैवस्वत कालपर्यायानें त्रेतायुग आलें असतां तुह्मांला मोठें कार्य करावयाचें आहे. देवांचें कार्य शेवटास नेण्यासाठीं तुह्मी साह्य व्हा.' ते वेळीं तें अद्भुत शब्द ऐकून त्याच्याच प्रसादानें आह्मी या ठिकाणीं परत आलों. याप्रमाणें हव्यकव्यें देत राहून आह्मीं मोठें तप केलें आहे तरी तो आह्मांला दिसला नाहीं; तेव्हां देवासुरांना मान्य असा विश्वकर्ता तो महाभूत नारायण तुला कसा दिसणार? याप्रमाणें एकत, द्वित, त्रित, व दुसरे सदस्य यांनीं समाधान केल्यावरून थोर बृहस्पतींनीं तो यज्ञ संपवून त्या देवतेची पूजा केली. राजाचा यज्ञ शेवटास गेल्यावर तोही प्रजा चांगल्या रीतीनें पाळीत राज्य करीत राहिला. नारायणाच्या भक्तीनें त्याला पुढें स्वर्ग मिळाला असतां ब्राह्मणशापानें त्याला फिरून खालीं येऊन पृथ्वीमध्यें जावें लागलें; कारण कोणे एके वेळीं देव, 'अजाचा बलि देऊन यज्ञ केला पाहिजे, कारण अज ही संज्ञा बकऱ्यालाच असून दुसऱ्या कोणत्याही पशूला नाहीं,' असें ह्मणाले असतां ऋषी ह्मणाले कीं, धान्याची आहुति देऊनच वेदांत यज्ञ करण्यास सांगितला आहे. धान्यांनाच अज ही संज्ञा आहे. तेव्हां बकऱ्याला मारणें हें योग्य नाहीं. पशू मारणें हा भल्यांचा धर्म नव्हे; शिवाय हें कृतयुग असल्यानें पशू कसा मारावा? याप्रमाणें या दोघांमध्यें वाद चालला असतां आकाशांतून चाललेला श्रीमान राजा उपरिचर त्या ठिकाणीं आला. त्याला पाहून हा यज्ञ करणारा दानशूर व सर्व लोकांचें हित लक्षांत घेणारा असल्यानें आपला संशय दूर करील, हा कधीं खोटें बोलणार नाहीं असें ठरवून त्याकडे सर्व मिळून जाऊन त्यांनीं त्याला आपला संशय दूर करण्यास सांगितलें. तेव्हां उपरिचर वसूनें त्यांपैकीं कोणांचें काय मत होतें तें विचारल्यावरून ऋषी ह्मणाले कीं, 'धान्यानें यज्ञ करावा असें आमचें मत आहे व पशू मारून यज्ञ करावा असें देवांचें मत आहे.' तें ऐकून देवांची बाजू उचलून, 'बकरा मारून यज्ञ करावा,' असें तो ह्मणाला; तेव्हां त्यानें याप्रमाणें देवांची बाजू उचललेली पाहून ऋषींना राग आला व त्याला त्यांनीं शाप दिला कीं, 'ज्याअर्थीं देवांची बाजू उचलून पक्षपातानें तूं उत्तर दिलेंस त्याअर्थीं तूं पृथ्वीवर जाऊन तिच्यामध्यें शिरशील. आकाशांतील तुझी गति बंद होईल; या त्यांच्या शापानें एकदम राजा उपरिचर खालीं येऊन भूमीच्या विवरामध्यें गेला. नारायणाच्या आज्ञेनें त्याची आठवण मात्र गेली नाहीं. इकडे सर्व देव मिळून, आपल्यामुळें त्याला शाप मिळाला असल्यानें त्याचें प्रिय करण्यासाठीं विचार करूं लागले व लगेच निश्चय ठरवून त्यांनीं राजा उपरिचराला सांगितलें कीं, 'तूं देवब्राह्मणांची भक्ति ठेवून सुरासुरगुरु जो हरी त्याच्याकडे लक्ष ठेव; ह्मणजे तो संतुष्ट होऊन तुला शापापासून सोडवील. ब्राह्मणांचा तूं अवश्य मान ठेव. त्यांचें तप फळलेंच पाहिजे, आणि ह्मणूनच तूं आकाशांतून खालीं आला आहेस. आतां तुझ्यावर आह्मी एक अनुग्रह करतों कीं, जोंपर्यंत तूं या शापामुळें पृथ्वीवर काळ काढीत रहाशील तोंपर्यंत ब्राह्मणांनीं यज्ञामध्यें दिलेली वसुधारा तुझा मिळत जाईल. आमच्याकडे लक्ष देऊन राहिल्यानें भूमीच्या पोटीं असे तोंपर्यंत वसुधारा पिऊन तुझें सामर्थ्य वाढत राहील, व तुझा ग्लानि, भूक किंवा तहान वाटणार नाहीं. आमच्या वरानें तो परमात्मा संतुष्ट होऊन तुला ब्रह्मलोकाला घेऊन जाईल.' याप्रमाणें वर देऊन देव आपल्या ठिकाणीं निघून गेले. इकडे वसु विश्व उत्पन्न करणाऱ्या परमात्म्याची पूजा करून प्रत्यक्ष नारायणाच्या तोंडांतून निघालेले मंत्र जपत राहिला. त्या ठिकाणीं सुद्धां पांच वेळां पंचयज्ञ करीत राहिला; तेव्हां त्याच्या एकनिष्ठ भक्तीनें भगवान हरी संतुष्ट होऊन आपल्याजवळ असणाऱ्या मोठ्या वेगवान गरुडाला ह्मणाला, 'हे पक्षिराजा, माझ्या आज्ञेनें

धर्मात्म्या वसूची गांठ घे. ब्राह्मणांच्या शापानें पृथ्वीमध्यें शिरून जाऊन त्यांचषा शब्दाला मान दिला आहे, त्याला माझे आज्ञेनें वर आकाशामध्यें लवकर घेऊन ये.' हें ऐकून गरुडानें आपले पंख पसरून वाऱ्यासारख्या वेगानें वसु होता त्या ठिकाणीं गेला व त्याला उचलून त्यानें आकाशांत आणून सोडिलें. तेव्हां राजा उपरिचरचें फिरून दिव्य शरीर होऊन आपल्या शरीरासह तो ब्रह्मलोकाला गेला.

इकडे नारदमुनि श्वेतद्वीपाला आल्यावर चंद्राप्रमाणें कांतिमान असे त्या ठिकाणचे लोक पाहून त्या लोकांनीं त्यांचा सत्कार केल्यावर त्यांनींही मस्तक लववून मनानें त्यांचा सत्कार केला; नंतर परमात्म्याच्या दर्शनाची इच्छा धरून तेथेंच राहून एकाग्रतेनें हात वर करून योगसमाधि लावून ते कडक नियम पाळीत राहिले. परमात्म्याचे अनेक गुणदर्शक शतनामावळीनें त्यांनीं त्यांची स्तुति केली. याप्रमाणें गूढ व योग्य अशी नामावळी घेऊन त्यांनीं स्तुति केली असतां परमात्म्यानें विश्वरूपामध्यें त्यांना दर्शन दिलें. त्याचें रूप चंद्राहून कांहींसें शुद्ध असून थोडेंसें निराळें होतें. कांहींसा अग्नीप्रमाणें, कांहींसा नक्षत्राप्रमाणें, कांहींसा पोपटाच्या पंखाप्रमाणें, कांहींसा स्फटिकाप्रमाणें, कांहींसा काजळाच्या ढिगाप्रमाणें, कांहींसा सोन्याप्रमाणें, कांहींसा प्रवालाच्या अंकुराप्रमाणें, कांहींसा पांढरा, कांहींसा वैडूर्यासारखा, कांहींसा नील वैडूर्यासारखा, कांहींसा इंद्रनीलासारखा, कांहींसा मोराच्या मानेसारखा, कांहींसा मोत्यांच्या हारासारखा याप्रमाणें त्या सनातन परमात्म्याच्या रूपामध्यें नानावर्ण होते. त्याला हजारों डोळे व पाय असून शेंकडों डोकीं व हजारों हात व पोटें होतीं. तो कांतीनें फार झळकत होता. त्याच्या तोंडांतून ॐकार व त्याच्यामागून गायत्री बाहेर पडत होती. त्याच्या इतर तोंडांतून आरण्यकसंज्ञक वेदभाग व नानावेद बाहेर पडत होते. वेदी, कमंडलु, पांढरे शुभ्र मणी, दर्भ, हरणाचें कातडें, दंड व पेटलेला अग्नि हीं त्याच्या हातामध्यें होतीं. अशा या प्रसन्न परमात्म्याला पाहून नारदांच्या मनाला आनंद होऊन त्यांनीं मस्तक लववून त्या आदिदेवाला नमस्कार केला. तेवेळीं परमात्मा ह्मणाला, 'एकत, द्वित व त्रित माझ्या दर्शनाला आतुर होऊन या ठिकाणीं आले होते; परंतु त्यांना माझें दर्शन झालें नाहीं व माझ्या पूर्ण भक्तावांचून तें दुसऱ्या कोणाला होणें नाहीं. धर्माच्या घरीं जे माझे चार देह उत्पन्न झाले आहेत, त्यांना तूं यथाविधि भजत रहा. मी प्रसन्न आहें; वाटेल तो वर मागून घे.' नारद ह्मणाले, 'भगवन्, आज आपलें दर्शन झाल्यानें माझ्या तपाचें, इंद्रियनिग्रहाचें, व नियमाचें मला फळ मिळालें आहे. आज आपलें दर्शन झालें हाच वर मला पुष्कळ आहे.' याप्रमाणें नारदाला दर्शन दिल्यावर परमात्मा ह्मणाले, 'नारदा, येथून आतां लवकर जा. याठिकाणच्या माझ्या भक्तांना एकाग्रतेनें माझें चिंतन करण्याला विघ्न करूं नकोस. हे मोठे सिद्ध असून यांची भक्ति फार दृढ आहे. रज व तम ह्यांपासून मुक्त होऊन हे खात्रीनें माझ्यामध्यें मिळतील. जो हा डोळ्यांनीं दिसत नाहीं, त्वचेला लागत नाहीं, नाकाला ज्याचा वास येत नाहीं, व जो रसज्ञानाच्या पलीकडे आहे व सत्व, रज व तम गुण ज्याला शिवत नाहींत, जो सर्वांच्यामध्यें साक्षित्वानें आहे, त्याला आत्मा ह्मणतात. हे पंचमहाभूतात्मक देह नाहींसे झाले असतां जो नाहींसा होत नाहीं, ज्याला जन्म नसून जो नित्य, शाश्वत, निर्गुण व पूर्ण आहे, त्या चोवीस तत्त्वांच्या पलीकडच्या पंचविसाव्याला पुरुष ह्मणतात. हा कांहीं करीत नाहीं. ज्ञानानेंच हा पहातां येण्याजोगा आहे. ज्याच्यामध्यें शिरल्यानें लोक मुक्त होतात त्या ह्या सनातन परमात्म्याला वासुदेव ह्मणतात. याचें माहात्म्य व सामर्थ्य केवढें आहे पहा. शुभाशुभ कर्मांचा याला कांहीं विटाळ होत नाहीं. सर्व शरीरांमध्यें संचार करीत राहणाऱ्या या गुणांना सत्व, रज, तम असें ह्मणतात. यांच्या कृत्यांची मजा हा पाहतो; परंतु याच्यावर त्यांचा कांहीं परिणाम होत नाहीं. याप्रमाणें हा निर्गुण असून गुणांचा भोक्ता आहे. गुणांचा उत्पादक असून त्यांच्या पलीकडे आहे. जगाला आधारभूत ही पृथ्वी प्रलयकालीं जलामध्यें लीन होते, जल ज्योतीमध्यें, ज्योती वायूमध्यें, वायु आकाशामध्यें, आकाश मनामध्यें व हें महाभूत मन अव्यक्त प्रकृतीमध्यें लीन होतें. व ही प्रकृति कांहीं न करणाऱ्या त्या पुरुषा-

च्या ठिकाणीं लय पावते. या जगांतील सर्व चराचरांमध्यें त्या सनातन वासुदेवाच्या पलीकडे कांहीं नसून त्याहून दुसरें कांहीं नित्य नाहीं; कारण तो महाबलशाली सर्व प्राणिमात्रांच्या हृदयांमध्यें आहे. पृथ्वी, वायु, आकाश, आप व ज्योति हीं पांच एकवटलीं असतां त्याला शरीर ह्मणतात. सूक्ष्म व कोणाला न दिसणारा असा प्रभु वासुदेव या पंचमहाभूतांपासून उत्पन्न झालेल्या शरीरामध्यें शिरतो. यालाच जन्मही संज्ञा आहे. याप्रमाणें जन्म घेऊन तो या शरीराची हालचाल करवितो. याप्रमाणें हीं पंचमहाभूतें एकत्र मिळाल्याशिवाय शरीरच बनावयाचें नाहीं व या शरीरामध्यें जीवाचा प्रवेश झाल्याशिवाय त्यामध्यें असणाऱ्या मनाकडून शरीराची हालचालच व्हावयाची नाहीं. हा जो मोठा सामर्थ्यवान् शरीरामध्यें शिरतो यालाच जीव, त्याचप्रमाणें शेष आणि संकर्षण असेंही ह्मणतात. या संकर्षणापासून आपल्या कर्मांनीं निपजणारा जो त्याला सनत्कुमार ह्मणत असून याच्या ठिकाणीं प्रलयकालच्यावेळीं सर्व भूतमात्रें लय पावतात. हाच सर्व प्राणिमात्रांचें मन असून याला प्रद्युम्न ह्मणतात. या प्रद्युम्नापासून सर्व सृष्टीचा उत्पादक कारणरूपी व कार्यरूपी अनिरुद्ध उत्पन्न होतो. यालाच ईशान ह्मणतात, व सर्व कृत्यांमध्यें हा व्यक्त आहे. याच्यापासूनच सर्व चराचर उत्पन्न होतें. वासुदेव हाच निर्गुण क्षेत्रज्ञ असून जीव ह्मणून जेव्हां हा जन्म घेतो तेव्हां याला संकर्षण ह्मणतात. संकर्षणापासून मनोरूपानें प्रद्युम्न होतो व प्रद्युम्नापासून अहंकाररूपी अनिरुद्ध उत्पन्न होतो. याप्रमाणें माझ्यापासूनच अविनाशी व विनाशी, सत् व असत्, सर्व चराचर विश्व उत्पन्न झालें आहे. जे माझे भक्त आहेत ते माझ्यामध्यें शिरून मुक्त होतात. कारण, मीच पंचविसावा ह्मणून असणारा तो पुरुष आहे. मी निर्गुण, पूर्ण, सर्वद्वंद्वांपासून व बायकापोरें वगैरे यांपासून मुक्त आहें. हा जो मी रूपवानासारखा दिसत आहें हें माझें रूप आहे असें तूं समजूं नकोस. मला वाटेल तर एका क्षणामध्यें हें रूप नाहींसें करण्याचें माझ्या अंगीं सामर्थ्य आहे; कारण जगाचा मी गुरु असून तूं पहात आहेस ही मीं निर्माण केलेली माया आहे. सर्व भूतमात्रांचे गुण ज्या माझ्या अंगीं आहेत तो मी अशा प्रकारचा आहें असें तूं समजूं नकोस. याप्रमाणें मी आपल्या चार मूर्तींचें वर्णन सांगितलें आहे. जीव नांवाचा जो कांहीं आहे तो मीच असून जीव माझ्या ठिकाणींच आहे, तूं जें कांहीं हें पहात आहेस त्यावरून मीं जीवात्मा पाहिला असें मात्र समजूं नकोस. मी सर्वांमध्यें व्यापून असून सर्व भूतमात्रांचा अंतरात्मा आहें. सर्व भूतमात्रांचे देह नाश पावले असतां त्याबरोबर मी नाश पावत नाहीं. ज्या महात्म्यांना सिद्धि मिळून त्यांची मजवर भक्ति जडते ते तम व रज या गुणांपासून मुक्त होऊन मला मिळून जातात. या जगताचा आदिकर्ता जो चतुर्मुख हिरण्यगर्भ ज्याला ब्रह्मदेव असेंही ह्मणतात व सनातन निरुक्तानें ज्याची ओळख पटते तोच माझीं अनेक कार्यें घडवून आणणारा आहे. माझ्या क्रोधानें रुद्र हा माझ्या कपाळापासून निघाला, हे अकरा रुद्र माझ्या उजवे बाजूला; त्याचप्रमाणें हे बारा आदित्य माझ्या डावे बाजूला आहेत पहा. त्याचप्रमाणें हे आठ वसु माझ्यापुढें व नासत्य व दस्र हे दोन वैद्य माझ्यामागें आहेत पहा. सर्व प्रजापती, ऋषी, वेद, यज्ञ, अमृत, ओषधि, निरनिराळें तप, यम व नियम, त्याचप्रमाणें हें आठ प्रकारचें ऐश्वर्य, श्री, लक्ष्मी, कीर्ति, वरिंड असलेली पृथ्वी, वेदमाता सरस्वती व हा आकाशामधला सर्व ताऱ्यांमधील श्रेष्ठ ध्रुव, हे ढग, सरोवरें, त्याचप्रमाणें हे चार मूर्तिमान पितर व निराकार तीन गुण माझ्या ठिकाणीं असलेले पहा. देवकार्याहून पितृकार्य विशेष आहे. देव व पितर यांचा मी मूलपिता आहें. पश्चिमोत्तर ( वायव्य ) समुद्रामध्यें मीच वडवाग्नि होऊन श्रद्धेनें दिलेलें हव्यकव्य घेत असतों. पूर्वी मीं उत्पन्न केलेल्या ब्रह्मदेवानें मजसाठीं यज्ञ केला असतां मीं संतुष्ट होऊन त्याला उत्तम वर दिला कीं, प्रत्येक कल्पाच्या आरंभाला तूं माझा मुलगा होत राहून सर्व लोकांचा स्वामी होत रहाशील. अहंकार हे पर्यायवाचक नांव तुला मिळेल. तूं घालून दिलेली मर्यादा कोणी उल्लंघन करणार नाहीं. वराची इच्छा करणाऱ्यांना तूंच वरद होशील. सर्व देव, असुर, पितर व नानाभूतमात्र हे तुझी उपासना करतील.

मी देवकार्यासाठीं नेहमीं प्रकट होईन तेवेळीं आपल्या मुलाप्रमाणें तूं मला शिक्षा लावीत असावेंस. हे व अशाच प्रकारचे दुसरे वर संतुष्ट होऊन ब्रह्मदेवाला देऊन मीं निवृत्तिमार्ग धरला. सर्व धर्मकर्मापासून बंद रहाणें हीच उत्तम निवृत्ति होय; ह्मणून मनुष्यानें निवृत्तिमार्ग धरून सर्व प्रकारें सुखी होऊन असावें. सांख्यशास्त्राच्या तत्वावरून ठाम मत झालेले विद्वान लोक मला ज्ञानवान असा कपिल समजून सूर्यमंडळामध्यें मी योगामध्यें गढून आहें असें समजतात. वेदामध्यें नेहमीं हिरण्यगर्भ ह्मणून माझी स्तुति होते. त्याच मला योगशास्त्रामध्यें योगामध्यें आनंद मानून रहाणारा असें मानिलें आहे. मी शाश्वत असून व्यक्तरूप धरून स्वर्गांत राहिलों आहें. हजार युगांनंतर फिरून जग मी आपल्या पोटांत घेईन व याप्रमाणें सर्व भूतांना माझ्या पोटांत ठेऊन विद्येबरोबर मी एकटा मजेंत राहीन. फिरून तिच्याच साह्यानें मी हें जग निर्माण करीन. या जगामध्यें जी माझी चौथी मूर्ति, तिच्यापासून अव्यय असा शेष उत्पन्न झाला. त्यालाच संकर्षण हें नांव असून संकर्षणापासून प्रद्युम्न व त्यापासून अनिरुद्ध याप्रकारें मी जन्म घेत राहून त्या प्रद्युम्नाच्या नाभिकमलापासून ब्रह्मदेव व ब्रह्मदेवापासून सर्व चराचर याप्रमाणें प्रत्येक कल्पाच्या आरंभाला ही सृष्टिपरंपरा चालते. सूर्योदय व सूर्यास्त याप्रमाणें ही उत्पत्ति व संहार हीं एकामागून एक चाललीं आहेत. ज्याप्रमाणें अतुल तेजस्वी काल अस्त पावलेल्या सूर्याला फिरून खेंचून वर आणीत असतो त्याप्रमाणें मी वराहरूप धरून माझ्या सर्व सामर्थ्यानें सर्व प्राणिमात्रांच्या हितासाठीं पृथ्वीला तिच्या समुद्ररूपी मेखलेसह पाण्यांत बुडाली असतां वर ओढून काढीन. नंतर दितीचा मुलगा हिरण्याक्ष आपल्या सामर्थ्यानें फुगला असतां मी त्याला मारीन. पुढें नरसिंहरूप धरून मी देवांच्या कल्याणासाठीं यज्ञाचा विध्वंस करणाऱ्या हिरण्यकशिपूला मारीन, कोणाच्या हातूनही न मरणारा विरोचनपुत्र बली इंद्राला त्याच्या पदापासून दूर करून त्रैलोक्याचें राज्य बळकावील, तेव्हां अदितीच्या गर्भामध्यें कश्यपापासून मी जन्म घेऊन वामनरूपानें इंद्राला त्याचें पद परत मिळवून देईन व बलीला पाताळांत घालीन. त्रेतायुगांत भृगु कुलांत परशुराम ह्मणून जन्म घेऊन बल व ऐश्वर्य यांनीं फुगलेल्या क्षत्रियांना मी समूळ नाहींसे करीन. त्रेता व द्वापार यांच्या मधील संध्याकाळीं मी जगत्पति दाशरथि राम ह्मणून इक्ष्वाकुकुलांत जन्म घेईन, तेवेळीं एकत व द्वित हे त्रितांना दुखविल्याबद्दल वानर होतील व त्यांच्यापासून झालेले मोठे बलवान वानर माझें कार्य शेवटास नेण्यास मला साहाय्य करतील. त्यांच्या साहाय्यानें मी पुलस्त्यकुलाला कालिमा आणणाऱ्या, सर्व जगाला कांट्यासारखा होऊन राहिलेल्या रावणाला त्याच्या मुलांसह व अनुयायांसह ठार करीन. द्वापार व कलि यांच्यामधील संध्याकाल सरतां सरतां मी फिरून मथुरेमध्यें कंसाला मारण्यासाठीं कृष्णजन्म घेईन व कांट्यासारख्या असंख्य दानवांचा फडशा पाडून द्वारकेमध्यें कुशस्थळींत राहीन. तेथें राहिलों असतां अदितीचे मुलगे नरक, भौम, मुरु, व पीठ यांना मारून पुष्कळ प्रकारच्या संपत्तीनें युक्त असे रम्य प्राग्ज्योतिष नगर मी तेथील दानवश्रेष्ठाला मारून कुशस्थलींत आणून सोडीत. बाणासुराचें प्रिय करणाऱ्या महेश्वर, महासेन या दोन माझ्यावर उठलेल्या देवांचा मी पराभव करीन; नंतर हजार बाहू असलेल्या त्या बलिपुत्र बाणाला जिंकून सौभामध्यें रहाणाऱ्या सर्वांचा मी फडशा पाडीन. गर्गांच्या तेजामुळें वाढलेल्या कालयवन दैत्याचाही माझ्या हातूनच नाश होईल. सर्व राजांचा विरोध करणारा असा गिरिव्रजामध्यें जरासंध नांवाचा असुर होईल. माझ्या बुद्धिप्रभावानें त्याचा वध होईल. धर्मराजाच्या यज्ञामध्यें सर्व बलवान राजे तेथें जमले असतां त्यांच्यासमक्ष शिशुपालाचा नाश होईल. इंद्रपुत्र अर्जुन मला साह्यकर्ता होईल; युधिष्ठिराची त्याच्या भावांसह स्वराज्यावर स्थापना करीन. आह्मां दोघांना लोककार्यासाठीं क्षत्रियांना जाळण्याला तयार झालेले नरनारायणऋषी ह्मणतील. याप्रमाणें पृथ्वीचा मनाप्रमाणें भार उतरून नंतर सर्व यादव त्याचप्रमाणें द्वारका यांचा भयंकर फडशा पाडीन. याप्रमाणें असंख्य कर्में करून मी आपल्या लोकांना निघून जाईन. हंस, कूर्म, मत्स्य, वराह, नरसिंह, वामन, राम, दाशरथिराम, कृष्ण, कल्की,

याप्रमाणें मी प्रकट होत जाईन. ज्यावेळीं वेदश्रुती नष्ट झाली तेव्हां मीं कृतयुगामध्यें ती परत आणली. ते वेद फिरून नाहींसे होऊन पुराणांतून कोठें कोठें आढळतात. माझे पुष्कळ उत्तम अवतारही आतां अप्रत्यक्ष झाले आहेत. लोककार्य करून ते नाहींसे झाले आहेत. ब्रह्मदेवांला सुद्धां, जें आज तुला एकनिष्ठाला मिळालें आहे, अशा प्रकारचें हें दर्शन कधीं झालें नाहीं. तूं भक्तिमान असल्यानें मागचें पुढचें हें सर्व रहस्य मीं तुला सांगितलें आहे.' असें बोलून तो विश्वमूर्ती परमात्मा तेथें गुप्त झाला व नारदही याप्रमाणें इष्ट असा अनुग्रह मिळाल्यावर बदरिकाश्रमाला निघून गेले. या वर सांगितलेल्या महोपनिषदाचा चारी वेदांशीं त्याचप्रमाणें सांख्ययोगाशीं मेळ असल्यानें या प्रत्यक्ष नारायणाच्या तोंडून पडलेल्या रहस्याला पंचरात्र हीसंज्ञा आहे. हें रहस्य नारदांनीं ब्रह्मसभेमध्यें सर्व ऋषींना ऐकविलें, त्या ऋषींच्या तोंडून सूर्यानें तें ऐकून आपल्या बरोबर असणाऱ्या सहासष्ट हजार ऋषींना त्याचप्रमाणें नेहमीं याच्यापुढें चालण्यासाठीं निर्माण केलेले महात्मे यांना ऐकविलें. या ऋषींनीं मेरुपर्वतावर जमलेल्या देवांना तें ऐकविलें. महातपस्वी असितांनीं देवांपासून तें ऐकून पितरांना ऐकविलें व शांतनूपासून ऐकून मीं तें तुला ऐकविलें आहे. ज्या मुनींनीं व देवांनीं हें ऐकलें आहे ते त्या परमेश्वराला भजतात. जो वासुदेवाचा भक्त नाहीं त्याला हें सांगण्यांत अर्थ नाहीं. आजपर्यंत तूं ऐकलेल्या हजारों गोष्टींचें हें सार आहे. ज्याप्रमाणें पूर्वी देव व असुर यांनीं समुद्रमंथन करून अमृत काढलें, त्याप्रमाणें सर्व ऋषींनीं श्रुतींचें मंथन करून अमृततुल्य उत्तम फल देणारें हें रहस्य शोधून काढलें आहे.

## २१९ कार्यविभाग. ( १२-३४० )

युधिष्ठिर ह्मणाला, 'हा भगवान नारायण स्वतः यज्ञ करणारा असून स्वतः यज्ञाचा उपभोग घेणारा हें कसें? शिवाय क्षमावान भगवानानें निवृत्तिमार्ग धरून तो जगाला सांगितला आहे, मग प्रवृत्तिमार्गाला अनुसरून देवांना यज्ञ करण्याला व हविर्भाग घेण्याला कां लावतो? बरें प्रवृत्तिमार्गच यानें सांगितला आहे ह्मणावें तर कांहीं निवृत्तिमार्गाकडेही लागलेले दिसतात. हें सर्व जग ज्याच्या योगानें वैभव मिळेल अशा गोष्टीकडे लागलेलें दिसतें. आपण तर मोक्ष सर्वांत श्रेष्ठ आहे ह्मणून सांगितलें जे लोक पापपुण्यांपासून मुक्त होतात तेच या सहस्रार्चि परमात्म्यामध्यें जाऊन मिळतात. हा मोक्षधर्म पाळण्याला फार कठीण दिसतो. हा सोडून देव हव्यकव्य घेऊं लागले आहेत. तेव्हां ब्रह्मा, रुद्र वगैरे या सर्वांना आपल्या भोंवतीं यांच्या कर्मांनींच निर्माण झालेला प्रलय दिसत नाहीं ह्मणून हे या शाश्वत मार्गाला लागले नाहींत. व कालानें मापतां येण्याजोगी आठवण ज्यांत रहाते अशी स्थिति देणाऱ्या प्रवृत्तिमार्गाकडे लागले आहेत. प्रवृत्तिमार्गामध्यें हा मोठा दोष दिसतो कीं, त्याचें फल नेहमीं नाशवंत असतें. तेव्हां यासंबंधानें आपलें मत काय आहे तें सांगा. देव यज्ञामध्यें कसे अंश घेतात त्याचप्रमाणें ते स्वतः कां यज्ञ करतात? जे स्वतः यज्ञभाग घेतात ते यज्ञामध्यें भाग कोणाला देतात? भीष्म ह्मणाले, 'सांगतों ऐक. ज्याला सांख्ययोगवेत्ते परमात्मा ह्मणतात, त्याला त्याच्याच कर्मानें महापुरुष ही संज्ञा मिळाली आहे. त्याच्यापासून जिला प्रधानही ह्मणतात, अशी अव्यक्त प्रकृति उत्पन्न झाली. या सर्व शक्तिमान अव्यक्तापासून जगाच्या उत्पत्तीसाठीं व्यक्त पुरुष उत्पन्न झाला. यालाच अनिरुद्ध ह्मणतात. याच्यापासूनच ब्रह्मदेवाची उत्पत्ति झाली. या अनिरुद्धालाच अहंकार असें दुसरें नांव असून त्याच्यामध्यें पूर्ण तेज आहे. अहंकारापासून पृथ्व्यादि पंचमहाभूतें निर्माण करून नंतर गंधादि त्यांचे गुण त्यानें निर्माण केले. या पंचमहाभूतांपासून मरीचि, अंगिरा वगैरे पूर्वी सांगितलेल्या आठ प्रकृति उत्पन्न झाल्या. त्यांच्याच आधारानें हें सर्व जग आहे. नंतर ब्रह्मदेवांनीं लोकांच्या सिद्धीसाठीं वेद, वेदांगें, तशींच यज्ञ व यज्ञांगें निर्माण केलीं. या आठ प्रकृतींपासून विशाल विश्वाची उत्पत्ति आहे. क्रोधापासून रुद्राची उत्पत्ति होऊन उपजल्याबरोबर आणखी दहा रुद्र त्यानें आपल्या जोडीला उत्पन्न करून घेतले. या अकरांना विकारपुरुष ह्मणतात. या प्रकृती, हे रुद्र व दुसरे उत्पन्न झालेले देवऋषी सृष्टि व सृष्टिक्रिया

सुरळीत चालाव्या ह्मणून ब्रह्मदेवांकडे जाऊन ह्मणाले कीं, आमचा कोणाचा काय अधिकार असून कोणत्या अधिकारानें आह्मीं एखादें विवक्षित कोणतें काम पतकरावें, व आमची कामगिरी बजाविण्याला आमच्यामध्यें किती सामर्थ्य रहाणार ?' याप्रमाणें ते बोलले असतां ब्रह्मदेव ह्मणाले, 'ठीक विचारलेंत, माझ्या मनांतही तोच विचार घोळत होता. तिन्ही लोक कसे कायम ठेवावे; त्याचप्रमाणें तुमच्या व माझ्या बलाचा या कामीं कसा उपयोग करावा याच काळजींत मी होतों. ह्मणून आपण सर्व आतां सर्व लोकांचा साक्षिभूत जो अव्यक्त महापुरुष त्याला शरण जाऊं. तो आपल्याला आपल्या हिताचें असेल तें सांगेल.' असें ह्मणून नंतर ते देव व ऋषी ब्रह्मदेवांसह लोकहितासाठीं क्षीरसमुद्राच्या उत्तर तीराला गेले. व त्या ठिकाणीं ब्रह्मदेवांनीं वेदांत सांगितल्याप्रमाणें महानियमनांवाच्या कडक तपाला आरंभ केला. हात व नजर वर करून मन अगदीं एकाग्र केलें व एका पायावर अगदीं लांकडाप्रमाणें हालचाल न करतां देवांची हजार वर्षें त्यांनीं कडक तप केलें. तेवेळीं वेद व वेदांगें यांनीं शोभायमान अशी परमात्म्याची मधुर वाणी त्याच्या कानावर पडली. तो ह्मणाला, 'भो भो ब्रह्मादिदेव व तपोधन ऋषी हो, तुमचें स्वागत करून मी सांगतों ऐका. तुमच्या मनांतील मी ओळखलें. तुमच्या मनांत जें आहे तें लोकांच्या मोठें हिताचें आहे. प्रवृत्तिमार्गाकडे लावून तुमचें सामर्थ्य मला वाढविलें पाहिजे. देवहो, माझ्या आराधनेमध्यें तुह्मीं चांगलें तप केलें आहे त्याचें उत्तम फल भोगा. हा सर्व लोकांचा गुरु, लोकपितामह थोर ब्रह्मदेव व तुह्मी मिळून एकाग्रतेनें मजसाठीं यज्ञ करीत राहून त्यामध्यें मला यज्ञभाग देत जा; ह्मणजे तुमच्या अधिकाराप्रमाणें तुह्मांला कामगिरी देऊन तुमचें कल्याण करीन.' हें त्या देवदेवाचें भाषण ऐकून अंगावर रोमांच उभे राहून ते सर्व देव व महर्षि यांनीं वेदांत सांगितलेल्या विधीनें वैष्णवयज्ञ करून त्यांत स्वतः ब्रह्मदेवांनीं व देवांनीं आणि देवर्षींनीं कृतयुगाच्या धर्माला अनुसरून अगदीं पवित्र असे आपापले यज्ञभाग काढून ठेवून सूर्याप्रमाणें ज्याचा वर्ण आहे अशा तमोगुणाच्या पलीकडच्या त्या विशाल, दैदीप्यमान अशा वरद परमात्म्याला दिले. याप्रमाणें त्यांनीं भाग देऊन सत्कार केला असतां तेथें जमलेल्या त्या देवांना तो महादेव अदृश्यपणें अशरीरिणी वाणीनें ह्मणाला, 'ज्यानें जो भाग मला दिला तो मला मिळाला, त्याच्या योगानें संतुष्ट होऊन अर्थात् जन्ममरणाच्या फेऱ्यांत घालणारें असें फळ मी तुह्मांला देतों. हें तुमचें आतां आजपासून माझ्या प्रसादानें विशेष लक्षण राहील कीं, प्रत्येक युगामध्यें चांगली चांगली दक्षिणा देऊन, उत्तम उत्तम यज्ञ करून तुह्मी त्याचें फळ भोगीत रहाल. जगामध्यें जे लोक वेदांत सांगितल्याप्रमाणें यज्ञ करतील ते आपल्या यज्ञामध्यें तुह्मां सर्वांना त्या त्या प्रमाणें भाग देतील. ज्या ज्याप्रमाणें तुह्मीं मला भाग दिला आहे त्या त्याप्रमाणें तुह्मांला भाग मिळत राहील. याप्रमाणें लोकांच्या कार्यावर नजर ठेवून तुह्मांला त्या यज्ञांत मिळणाऱ्या भागावर अवलंबून असणाऱ्या तुमच्या सामर्थ्यानुरूप तुह्मी जग कायम ठेवण्याचा प्रयत्न करा. या प्रवृत्तिधर्मानें होणाऱ्या कर्मापासून सामर्थ्य मिळवीत राहून या जगामधील कामें कायम ठेवण्याला तुह्मी प्रयत्न करा. लोकांनीं केलेल्या यज्ञांनीं पोसले जाऊन तुह्मी मला पोसा. हाच तुमच्या संबंधानें मीं विचार करून ठेवला आहे, आणि याचसाठीं वेद, यज्ञ, ओषधी वगैरे मीं निर्माण केल्या आहेत. यांच्या योगानें या पृथ्वीवर लोकांनीं योग्य आराधना केली असतां देव संतुष्ट होतील. याप्रमाणें प्रवृत्तीमार्गावर अवलंबून ठेवून कल्पाच्या अखेरपर्यंत मीं तुह्मांसाठीं हें निर्माण करून ठेविलें आहे; तेव्हां आपापल्या अधिकाराप्रमाणें लोकहीत करीत रहा. मरीचि, अंगिरा, अत्री, पुलस्त्य, पुलह, क्रतु व वसिष्ठ हे मनापासून निर्माण केलेले सप्तर्षी वेदवेत्त्यांमध्यें श्रेष्ठ धरून वेदाचार्य होतील. ते प्रवृत्तिमार्गाचे होऊन प्रजा उत्पन्न करतील. हा प्रवृत्तिधर्माचा सनातन मार्ग सांगितला, लोकांची उत्पत्ति करणाऱ्या प्रभूला अनिरुद्ध ह्मणतात. सन, सनत्सुजात, सनक, सनंदन सनत्कुमार, कपिल व सनातन हे सात ब्रह्मदेवाचे मानसपुत्र असून आपोआप यांना ज्ञान मिळालें आहे यांचा निवृत्तीधर्म आहे. योगशास्त्रवेत्त्यामध्यें हे अ-

प्रणी आहेत. सांख्यशास्त्राचेंही यांना उत्तम ज्ञान आहे. धर्मशास्त्रांचे हे गुरु असून मोक्षधर्मप्रवर्तक आहेत. अव्यक्ता (प्रकृति) पासून अहंकार व सत्व, रज, तम हे तीन गुण उत्पन्न झाले असून या प्रकृतीच्या जो पलीकडे आहे तोच क्षेत्रज्ञ मी आहें. प्रवृत्तिमार्गाला लागून जे क्रिया करीत रहातात त्यांच्यामागें जन्ममरण लागतें. निरनिराळे प्राणी या दोन मार्गांपैकीं निरनिराळ्या मार्गासाठीं उत्पन्न केले असल्यानें कांहीं प्रवृत्तिमार्गाकडे वळतात व त्या त्याप्रमाणें ते फलाचा उपभोग घेतात. हे ब्रह्मदेवच सर्व जगाचे स्वामी असून आपल्या सामर्थ्यानें हें जग उत्पन्न करतात. सर्वांचे आईबाप, सर्व कांहीं हेच आहेत. माझ्या आज्ञेनें सर्व प्राणिमात्रांना यांच्याकडून वर मिळेल. यांच्या ललाटापासून उत्पन्न झालेले रुद्र सर्व प्राणिमात्रांना कायम ठेवतील. तुह्मी जाऊन आपापले अधिकार पहात राहून जगाच्या कल्याणामध्यें दक्ष रहा. एकदम जाऊन सर्व क्रिया लोकांमध्यें सुरू करा. क्रिया व त्यांप्रमाणें मिळणाऱ्या गति सांगून टाका. लोकांच्या आयुष्याची मर्यादाही ठरवून टाका. हें सर्वांत पहिलें कृतयुग असून यांत यज्ञामध्यें पशु मारूं नये. यामध्यें धर्म पूर्णपणें वृद्धिंगत होत राहील. यानंतर त्रेतायुग सुरू होऊन त्यामध्यें वेदांचा एक चतुर्थांश नाहींसा होऊन तीन चतुर्थांश राहील. यांत यज्ञामध्यें पशूला मंत्रानें प्रोक्षण करून मारतील. धर्म एक चतुर्थांशानें कमी होईल. यानंतर मिश्रकाल द्वापर सुरू होईल. त्यावेळीं धर्माचे दोन अंश नाहींसे होऊन दोन अंशच रहातील. यापुढें कलीला पुढें करून तिष्ययुग येईल. या युगामध्यें धर्म तीन चतुर्थांश नाहींसा होऊन एक चतुर्थांशच राहील. याप्रमाणें परमात्मा बोलला असतां देवांनीं व ऋषींनीं त्यांना विचारलें, ‘जर या युगांत धर्म एक चतुर्थांशच रहाणार तर आह्मीं कोठें जावें व काय करावें?’ यावर परमात्मा ह्मणाला, ‘या युगामध्यें जेथें वेद, यज्ञ, तप, सत्य, आत्मनिग्रह व अहिंसा हे धर्म पाळले जातील, अशा ठिकाणीं तुह्मी रहा. पाप तुह्मांला कधीं स्पर्श करणार नाहीं.’ याप्रमाणें परमात्म्यानें सांगितल्यावर देव व ऋषी त्यांना नमस्कार करून आपापल्या ठिकाणाला निघून गेले. फक्त ब्रह्मदेव अनिरुद्धरूपानें असणाऱ्या त्या परमात्म्याचें दर्शन घेण्यासाठीं तेथें राहिले. हातांत कमंडलु व त्रिदंड घेऊन वेद व वेदांगें यांचा उच्चार करीत परमात्मा त्यांपुढें उभा राहिला. त्या अतुल सामर्थ्यवान भगवानाला त्या रूपामध्यें पाहून ब्रह्मदेवांनीं मस्तक लववून त्या वरद परमात्म्याची पूजा करून आदरपूर्वक हात जोडून ते त्याच्यापुढें उभे राहिले; तेव्हां परमात्मा त्यांना आलिंगन देऊन ह्मणाला, ‘लोकांनीं कोणत्या मार्गानें जावें यासंबंधानें नीट विचार कर. सर्व उत्पन्न झालेल्या लोकांना मार्गाला लावणारा तूंच असून सर्व जगाचा स्वामी तूं आहेस. हा जगाचा भार तुझ्यावर ठेवून मी स्वस्थ राहीन; तथापि जे जे वेळीं ह्मणून आपलें काम पार पाडण्याचें तुला कठीण जाईल त्या त्या वेळीं प्रसंगाचें महत्व लक्षांत घेऊन त्या त्याप्रमाणें मीं अवतार घेईन.’ असें ह्मणून तें वडव्याचें रूप अदृश्य झालें व ब्रह्मदेव आपल्या ठिकाणाला गेले आणि ह्मणूनच कमलनाभि परमात्म्याला यज्ञामध्यें आद्भाग मिळूं लागून यज्ञाचा तो आधार झाला. त्यानें स्वतः अविनाशी फलाच्या इच्छेनें लोकांची ज्यासंबंधानें खटपट चाललेली असते, तो निवृत्तिमार्ग धरला आहे; तथापि जगाला वैचित्र्य देण्याकरितां लोकांना प्रवृत्तिमार्ग त्यांनीं सांगून ठेविला आहे. सर्वांचा आदि, अंत व मध्य तो आहे. सर्वांचा उत्पादक कर्ता तो असून त्याच्या ध्यानाचा विषय तोच आहे. कर्ता व कार्य दोन्ही तोच असून युगाच्या अखेरीला सर्व जगाला आपल्या पोटांत घेऊन फिरून युगाच्या आरंभाला तो सर्व विश्वाला उत्पन्न करतो. ज्याला कधीं जन्म नाहीं, विश्व हेंच ज्याचें रूप आहे व देवांचा जो आश्रय आहे, अशा त्या निर्गुण परमात्म्याला तुह्मी नमस्कार करा. सर्व प्राणिमात्रांचा स्वामी तो आहे. त्याचप्रमाणें रुद्र, आदित्य, वसु, अश्विनीकुमार, मरुत, वेदांत सांगितलेले यज्ञ व वेदांग यांचा तो स्वामी आहे. समुद्रामध्यें याचें वास्तव्य आहे. याला हरी ह्मणत असून मुंजगवताप्रमाणें याचे केंस आहेत. याचें स्वरूप शांत असून सर्वांना हा मोक्षधर्म सांगणारा आहे. सर्व तप, तेज व यश त्याचप्रमाणें वाणी व नद्या यांचा हा स्वामी आहे. वराह, एकशृंग, विवस्वान, अश्वशिर, चतुर्मूर्तिधर

असा हा आहे. हा अगदीं गुह्य असून कोणाला दिसत नाहीं. याचा नाश आहे व नाहींही. याची गति सर्वत्र ठिकाणीं आहे. हेंच श्रेष्ठ ब्रह्म असून केवळ ज्ञानचक्षूनें हें दिसण्याजोगें आहे.'

---

## २२० परमात्म्याच्या कांहीं नांवांचें स्पष्टीकरणपुराणकथा.

### ( १२. ३४१–४२ )

जन्मेजय ह्मणाला, ज्या ह्या अनेक नांवांनीं आपण ईश्वराची स्तुति केली याचा अर्थ मला सांगा? वैशंपायन ह्मणाले, ' पूर्वी अर्जुनानें परमात्म्याला हाच प्रश्न केला असतां त्यानें जें आपल्या कित्येक नांवांचें स्पष्टीकरण त्याला सांगितलें तेंच मी तुला सांगतों ऐक. भगवान त्याला ह्मणाला, ' ऋग्वेद, यजुर्वेद, अथर्वणवेद, सामवेद, पुराण, उपनिषदें, ज्योतिष, सांख्य, योगशास्त्र व आयुर्वेद यांमध्यें मोठमोठ्या ऋषींनीं माझीं अनेक नांवें सांगितलीं आहेत. त्यांपैकीं कांहीं गुणावरून आलीं असून कांहीं कृतीवरून आलीं आहेत. त्यांपैकीं कांहींचा अर्थ सांगतों ऐक. पूर्वी नररूपानें तूं माझा अर्धा भाग होतास त्या नारायणाला नमस्कार असो. प्रसादापासून ब्रह्मदेव व क्रोधापासून रुद्र यांची उत्पत्ती आहे. अष्टादश गुणात्मक जें सत्व तें सर्व चराचराच्या उत्पत्तीचें स्थान आहे. अठरा गुणांनीं युक्त जी प्रकृति ती पृथ्वी व आकाश भरून राहिली असून योगानें लोकांना धारण करते. ती लोकांना त्यांच्या त्यांच्या कर्माप्रमाणें फल देणारी असून तिचें चिन्मात्र स्वरूप आहे. तिला मरण किंवा पराभव ठाऊक नाहीं. ती सर्व लोकांमध्यें भरून आहे. उत्पत्ति व नाश यांचे सर्व विकार तिच्यापासून आहेत. तिला जाति नसून स्त्री किंवा पुरुष असा जो तो तोच यज्ञ करणारा आहे. पुराणपुरुष तोच आहे. याला अनिरुद्ध ह्मणून निराळें नांव असून लोकांच्या उत्पत्तीला व नाशाला हा कारण आहे. ब्रह्माची रात्र सरली असतां त्या अतुल तेजस्वी पुरुषाच्या प्रसादापासून कमल उत्पन्न होऊन त्या कमळापासून ब्रह्मदेव उत्पन्न होतो. त्याचा दिवस सरतांना रागावलेल्या अशा त्याच्या कपाळापासून संहार करणारा रुद्र उत्पन्न होतो. हे दोघे प्रसाद व राग यांपासून उत्पन्न झालेले श्रेष्ठ देव प्राणिमात्रांच्या उत्पत्तीला व संहाराला केवळ निमित्तमात्र आहेत. या रुद्रालाच कपर्दी हें नांव असून केव्हां केव्हां याच्या डोक्यावर जटा, केव्हां केव्हां टक्कल असतें. स्मशानामध्यें यानें आपलें घर केलें आहे. उग्रव्रत पाळणारा हा मोठा कडक योगी आहे. दक्षाच्या यज्ञाचा फडशा यानेंच पाडला असून भगाचा डोळा यानेंच काढला. हा रुद्र केवळ नारायणस्वरूपी आहे. याची आराधना केली असतां नारायणाची आराधना होते. मी सर्व विश्वाचा आत्मा असून हा रुद्र माझा आत्मा आहे, ह्मणून त्या आत्म्याची मी आराधना करतों. त्या वरद अशा शिवाची जर मीं आराधना केली नाहीं तर लोकही माझी आराधना करणार नाहींत; कारण, मी घालून दिलेले नियमच लोक जगामध्यें पाळीत असतात. यांनीं नेहमीं पूज्य मानावें ह्मणूनच मीं नेहमीं यांना पूज्य मानितों. रुद्राला ज्यानें ओळखिलें त्यानें मला ओळखिलें व जो रुद्राचा भक्त आहे तो माझा भक्त आहे; कारण रुद्र व नारायण हे एकाचेच दोन बनून व्यक्तीमध्यें भरून राहून त्यांच्या हातून कर्म करवितात. रुद्रावांचून मला उमगण्याला कोणी समर्थ नाहीं; ह्मणूनच पूर्वी मीं पुत्रप्राप्तीसाठीं रुद्राची आराधना केली; कारण विष्णू हा स्वतःवांचून कोणाला नमत नाहीं, आणि ह्मणूनच रुद्र हा आत्मस्वरूप असल्यानें मी त्याला भजतो. ब्रह्मदेवादि देव व मोठमोठे या नारायणऋषीला भजतात. हा विष्णू भूत, वर्तमान, भविष्य यांतील सर्व प्राण्यांमध्यें श्रेष्ठ आहे; ह्मणून त्याची मनुष्यानें नेहमीं आदरानें पूजा करावी. चार प्रकारचे भक्त आहेत त्यांपैकीं जे दुसऱ्या कोणाला न भजतां अनन्य भावानें मलाच भजतात, ते सर्वांमध्यें श्रेष्ठ होत. त्यांना जें कांहीं पाहिजे असतें तें केवळ मीच असल्यानें ते कधीं कर्माच्या फलाची इच्छा करीत नाहींत. बाकीच्या तीन वर्गांचे भक्त फलाची इच्छा करतात. त्याप्रमाणें त्यांना उत्तम सुखाचे लोक मिळतात; परंतु पुण्य सरल्यावर त्यांना तेथून खालीं यावें लागतें. ह्मणून माझ्या भक्तांपैकीं ज्यांना पूर्ण ज्ञान झालें आहे त्यांनाच श्रेष्ठगति मिळते. ज्यांना याप्रमाणें ज्ञान झालें आहे यांचा प्रभाव वर्तनामध्यें दिसतो. तो

ब्रह्मदेवाला भजो, महादेवाला भजो अथवा दुसऱ्या कोणालाही भजो, सरतेशेवटीं तो मलाच येऊन मिळतो. याप्रमाणें माझ्या भक्तांमधील भेद आहेत. भूभार हरण करण्यासाठीं मीं नरनारायणांचा अवतार घेतला आहे. अध्यात्मसंबंधीं अनेक योग मला कळत असल्यानें मी कोण, कोठून आलों वगैरे सर्व मीं जाणतों, मला निवृत्तिधर्म ठाऊक असून सर्व भूतमात्रांच्या कल्याणाला जें उपयोगीं पडतें तेंही मला ठाऊक आहे. मी सर्व नरांचा अयन आहें ह्मणून व पूर्वी पाण्याला, नरापासून ( जीवापासून ) झाल्यामुळें नार हें नांव असून तें माझें पूर्वी अयन (विसाव्याचें ठिकाण) असल्यानें मला नारायण असें ह्मणतात. विश्वावर सूर्य किरणरूपानें वसन घालतो व सर्व भूतमात्रांचा अधिवास ( आश्रय ) मी आहें ह्मणून मला वासुदेव ह्मणतात. सर्व भूतमात्रांची मी गति असून त्यांना उत्पन्न करणारा मीच आहें. सर्व आकाश व पृथ्वी मी व्यापून आहें व माझी कांति सर्वांना मागें टाकिते, सर्व प्राणिमात्र शेवटीं जें मिळविण्याच्या मार्गे लागले असतात तोच मी आहें, आणि विच्छ्धातूमध्यें हा सर्व अर्थ असल्यानें मला विष्णु ह्मणतात. लोक दमानें (आत्मनिग्रहानें,) आकाश, पृथ्वी, ज्याच्या उदरामध्यें आहे अशा माझ्या प्राप्तीसाठीं झटत असल्यानें मला दामोदर ह्मणतात. पृश्नी या शब्दामध्यें अन्न, वेद, पाणी व अमृत यांचा समावेश होतो व हीं चारी माझ्या पोटांत असल्यामुळें मला पृश्निगर्भ ह्मणतात. पूर्वी एकत व द्वित यांनीं त्रितांना कांहीं कारणावरून एका खोल विहिरींत फेंकून दिलें असतां त्यांनीं हे पृश्निगर्भा यांतून तूं आह्माला वर काढ ह्मणून या नांवानें माझा धांवा केला असतां मीं त्यांना वर काढलें. जगाला उष्णता देणाऱ्या सूर्यापासून त्याचप्रमाणें पेटलेल्या अग्नीपासून जीं किरणें बाहेर पडतात तेच माझे सर्व अंगावरील केंस होत; ह्मणून मला केशव ह्मणतात. पूर्वी महामुनि उतथ्य आपल्या स्त्रीच्या ठिकाणीं गर्भ ठेवून निघून गेले असतां बृहस्पती तिच्याकडे पापवासनेनें आले असतां आतील गर्भानें त्यांना निवारिलें; याप्रमाणें वासनेचा मोड केल्याबद्दल दीर्घतम नांवानें तूं जन्मांध होऊन रहाशील असा त्या गर्भाला बृहस्पतींनीं शाप दिला असतां पुढें त्या दीर्घतम ऋषींनीं चार वेद, त्यांचीं अंगें व उपांगें यांचें ज्ञान मिळवून केशव या नांवानें फिरून फिरून त्यांनीं माझा धांवा केला, तेव्हां त्यांना डोळे येऊन ते गौतम या नांवानें प्रसिद्धीस आले. अग्नि आणि सोम हे एकाच वस्तूमध्यें शिरून एकच कार्य करतात ह्मणून सर्व चराचर भरून असल्यामुळें ते जगाला धारण करणारे आधार मानिले आहेत.'

अर्जुन ह्मणाला, 'अग्नि आणि सोम हे पूर्वी एक कार्य करणारे कसे होते?' भगवान ह्मणाले, 'सांगतों, लक्षपूर्वक ऐक. जे वेळीं देवांच्या मानाप्रमाणें चारहजार युगें संपून विश्वाचा प्रळय काळ येतो तेवेळीं सर्व व्यक्त अव्यक्तामध्यें गडप होतें. सर्व चराचरप्राणी नाश पावतात. तेज, पृथ्वी, वायु, सर्व नाहींसे होतात. जिकडे तिकडे अंधार भरून सर्व जलमय होतें. जेव्हां तें अफाट जल ब्रह्मासारखें निःशब्दपणें शांत असतें तेव्हां दिवसही नसतो किंवा रात्रही नसते. सत् किंवा असत्, व्यक्त किंवा अव्यक्त या सर्वांचाच अभाव असतो. सर्व जगाची अशी स्थिति असतां जो शाश्वत व अव्यय असा हा अंधार तो नारायणाचे सर्व शक्तिमत्ता इत्यादि गुण दाखविणारा असून अविनाशी, व शाश्वत व अतींद्रिय आहे. प्रत्यक्ष सत्यस्वरूप असून विश्वसृष्टि निर्माण करण्याची ज्यामध्यें शक्ति आहे व ज्याला आदि, अंत व मध्य नाहीं अशा प्रकारच्या या शाश्वत तमापासून हरी उत्पन्न झाला. श्रुतीचें सुद्धां असेंच प्रमाण आहे कीं, पूर्वी दिवस नव्हता, रात्र नव्हती, सत् नव्हतें, असत् नव्हतें, कांहीं नव्हतें. सर्व विश्वरूपात्मक तमानें भरलें असून तें तमच नारायणाची रात्र होय;व तमाचा अर्थही हाच आहे. याप्रमाणें ब्रह्मापासून झालेला जो तम त्याला झालेल्या या हरीपासून ब्रह्मदेवाची उत्पत्ति झाली. ब्रह्मदेवांनीं सृष्टि निर्माण करण्याच्या इच्छेनें आपल्या डोळ्यापासून अग्नि व सोम निर्माण केले. पुढें सृष्टीच्या उत्पत्तीच्या वेळीं सर्व सृष्टि निर्माण झाली असतां प्रजा उत्पन्न करण्याच्या क्रमामध्यें प्रथम ब्राह्मण व क्षत्रिय हे उत्पन्न झाले. जो सोमापासून उत्पन्न झाला तोच ब्राह्मण. ह्मणून सोम हा दुसरा कोणी नसून ब्राह्मण आहे व ब्राह्मण ह्मणून

जे कांहीं झालें ते सर्व सोम आहेत. अग्नि तेच क्षत्रिय ह्मणून ब्राह्मण क्षत्रियांहून बलवान आहेत, व लोकांमध्येंही याचा प्रत्यक्ष अनुभव आहे. ब्राह्मणाच्या आधीं कोणी उत्पन्न झालें नाहीं. ब्राह्मणाच्या तोंडामध्यें आहुति दिली असतां अग्निमध्यें आहुति दिल्याप्रमाणें आहे. याप्रमाणें ब्रह्मदेवानें सर्व सृष्टि निर्माण करून तो त्यांची त्या त्याप्रमाणें व्यवस्था लावून त्यांचें धारण करतो. याला श्रुतीचाही आधार आहे. त्यांत असें ह्मटलें आहे कीं, 'हे अग्ने, तूं विश्वाचा होता आहेस. देव मनुष्य यांसकट सर्व विश्वाचें तूं हित करतोस. आणि तुझ्यामुळेंच देव व लोक जगाचें कल्याण करतात.' अग्नि हा यज्ञाचा होता व कर्ता आहे. अग्नि हाच ब्रह्म आहे. मंत्र ह्मटल्याशिवाय अग्नीमध्यें आहुति देतां येत नाहीं व मनुष्याशिवाय तपाचा संभव नाहीं. देव, ऋषी व मनुष्य यांची पूजा मंत्रानें हवि देऊनच होते; ह्मणून अग्नीला यज्ञांचा होता असें मानिलें आहे; ब्राह्मणांना दुसऱ्यांकडून यज्ञ करविण्याचा अधिकार आहे. तो दुसऱ्या क्षत्रिय वैश्य या द्विजातींना नाहीं. ब्राह्मणच अग्नीप्रमाणें यज्ञाला आधार आहेत. ते यज्ञांत देवांना तृप्त करतात व याप्रमाणें तृप्त झालेले देव पृथ्वीला बळकटी आणतात. याप्रमाणें यज्ञाचें फळ ब्राह्मणांपासून आहे. ब्राह्मणाच्या तोंडामध्यें आहुति दिली असतां ती पेटलेल्या अग्नीमध्यें दिल्याप्रमाणेंच आहे. याप्रमाणें ब्राह्मण हे अग्निरूपी असून जे विद्वान आहेत ते अग्नीला मानितात. हा अग्नि फिरून विष्णू आहे. हा सर्वांमध्यें शिरून त्यांचे प्राण धारण करतो. यासंबंधानें सनत्कुमारांचेंही असेंच ह्मणणें आहे कीं, ब्रह्मदेवांनीं विश्व निर्माण करतांना प्रथम ब्राह्मणांना निर्माण केलें. हे ब्राह्मण वेदाध्ययनानें अमर होऊन याच्याच अभ्यासानें स्वर्गाला गेले. बुद्धि, वाणी, कर्म, श्रद्धा, तप, हीं पृथ्वी आणि स्वर्ग यांना शिंक्यावरील दह्यादुधाप्रमाणें चांगलीं संभाळतात. सत्याहून दुसरें श्रेष्ठ कांहीं नाहीं. आईपेक्षां अधिक आदराला पात्र असें दुसरें कोणी नाहीं व इहपर सुख देण्याला ब्राह्मणावांचून दुसरा कोणी नाहीं, ज्या देशांत ब्राह्मणांना स्वतःच्या उदरनिर्वाहासाठीं खात्रीचें कांहींच साधन नसतें, अशा राष्ट्रांतील लोकांना फारच दुःख सोसावें लागतें. तेथें बैल लोकांना वहात नाहीं किंवा नांगर ओढीत नाहीं. यत्नांचाही त्यांना कांहीं विशेष उपयोग होत नाहीं. रवीनें घुसळतांना लोणीच निघत नाहीं; लोक अगदीं कंगाल बनून चोरटे बनतात. जेथें ब्राह्मणांना निर्वाहाला साधन नाहीं त्या ठिकाणीं अशी स्थिति होते. वेद, पुराणें, इतिहास दुसरे आधार ग्रंथ यांमध्यें नारायणाच्या तोंडांतून उत्पन्न झालेले ब्राह्मण सर्व प्राणिमात्रांचे कर्ते समजले गेले आहेत. असें ह्मटलें आहे कीं, तो वरद नारायण तोंड बंद करून नियमस्थ असतां त्याच्या तोंडापासून ब्राह्मण झाले असून ब्राह्मणापासून दुसरे वर्ण उत्पन्न झाले. याप्रमाणें ब्राह्मण हे सुर व असुर यांहून श्रेष्ठ आहेत; कारण त्यांना मीं आपल्या अवर्णनीय अशा ब्रह्मस्वरूपामध्यें उत्पन्न केलें आहे. देव, असुर व महर्षी यांना याप्रमाणें मीं उत्पन्न करून त्यांना त्या त्या स्थितींत ठेवून प्रसंगविशेषीं मर्यादा उल्लंघन केल्याबद्दल मी त्यांना शासन करीत असतों. अहिल्येशीं प्रसंग केल्यामुळें गौतमांच्या शापानें इंद्राचे केंस पिकले व कौशिकाच्या शापानें त्याचें वृषण नाहींसें होऊन त्याबद्दल बकऱ्याचें वृषण लावावें लागलें. अश्विनी कुमारांना यज्ञामध्यें च्यवन हाविर्भाग देत असतां तो न द्यावा ह्मणून प्रतिबंध करण्यासाठीं इंद्रानें त्या ऋषींवर वज्र उगारलें असतां त्याचे हातच त्या ऋषींनीं बंद पाडले. यज्ञाचा विध्वंस केल्यामुळें राग येऊन दक्षप्रजापतीनें फिरून कडक तप करून डोळ्यासारखा तिसरा एक डोळा रुद्राच्या कपाळावर त्यानें उत्पन्न केला. त्रिपुराचा नाश करण्याची शंकरांनीं दीक्षा घेतली असतां शुक्राचार्यांना राग येऊन त्यांनीं आपल्या जटेचे केंस उपटून त्यांवर फेंकले. तेच मोठमोठे साप होऊन त्यांपासून त्यांना पीडा झाल्यामुळें त्यांच्या गळ्याला निळेपणा आला. पूर्वीं स्वयंभू मनूच्या वेळीं नारायणानें आपल्या हातानें शंकराची मान धरल्यानेंही त्याला नीलत्व आलें. अमृत उत्पन्न करण्याच्या वेळीं पुरश्चरण करूं लागण्याच्या आधीं बृहस्पती आचमन करीत असतां पाणी स्वच्छ झालें नाहीं, तेव्हां ज्याअर्थीं माझ्या आचमनाचे वेळीं स्वच्छ न होतां तुह्मीं

गढूळ राहिलां त्याअर्थी आजपासून मोठमोठे मासे, मगर, कांसव व दुसरे जलजंतु यांनीं गढूळ रहाल,' असा बृहस्पतींनीं रागानें त्यांना शाप दिला. ते दिवसापासून पाण्यामधून जलचर प्राणी भरून राहिले. त्वष्ट्याचा मुलगा विश्वरूप देवांचा पुरोहित होता. त्याची आई असुरांची बहीण होती. हा त्वष्टा यज्ञामध्यें देवांना प्रत्यक्ष हविर्भाग देत असून असुरांना मागें ( अप्रत्यक्षपणें ) देत असे. तेव्हां हिरण्यकशिपु वगैरे मंडळी आपल्या बहिणीकडे जाऊन तिला ह्मणाली, 'तुझा मुलगा ( त्रिशिरांचा ) विश्वरूप देवांचा उपाध्याय आहे. तो यज्ञामध्यें देवांना प्रत्यक्ष हविर्भाग देऊन आह्मांला अप्रत्यक्ष देतो ह्मणून देव वाढत चालले आहेत व आह्मी कमी होत चाललों आहों; तेव्हां त्याचें निवारण करून तो आमच्या बाजूला येईल असें कर. तेव्हां तिनें नंदनवनांत जाऊन आपल्या मुलाला सांगितलें कीं, 'तूं शत्रूचा पक्ष वाढवून आपल्या पक्षाचा नाश करतोस हें चांगलें नाहीं.' यावर आईची आज्ञा मोडतां येत नाहीं असें पाहून त्या शब्दाला मान देऊन तो हिरण्यकशिपूकडे आला; तेव्हां हिरण्यकशिपूचे पूर्वीचे उपाध्याय जे वसिष्ठ यांना राग येऊन, 'ज्याअर्थी तूं दुसरा होता निवडला आहेस त्याअर्थी यज्ञ संपण्यापूर्वी अपूर्व अशा प्राण्यापासून तुला मरण येईल.' असा त्यांनीं शाप दिल्यामुळें हिरण्यकशिपूला त्या शापामुळें नारसिंहरूपी प्राण्याच्या हातून मरण आलें. पुढें आपल्या आईचा पक्ष वाढविण्यासाठीं विश्वरूप कडक तप करूं लागला असतां त्याचा व्रतभंग करण्यासाठीं इंद्रानें मोठ्या देखण्या अप्सरा त्याकडे पाठविल्या. त्यांना पाहिल्याबरोबर त्याच्या मनाची चलबिचल उडून एकदम त्याचें मन त्यांवर गेलें. तें पाहून आपलें कार्य झाल्यामुळें त्या 'आह्मी आल्या ठिकाणीं जातों' असें ह्मणून निघाल्या; तेव्हां 'कोठें जातां, मजजवळ रहा ह्मणजे तुमचें कल्याण होईल,' असें तो ह्मणाला. तेव्हां 'आह्मीं सर्व शक्तिमान इंद्राशिवाय कोणाला वरीत नाहीं,' असें बोलून त्या निघून चालल्या पुढें 'आज तुमच्या इंद्रासह सर्व देवांचा फडशा पाडतों पहा,' ह्मणून तो मंत्र जपूं लागला असतां त्याच्या योगानें त्याला तीन डोकीं उत्पन्न होऊन त्यां पैकीं एकाच्या योगानें सर्व लोकांमध्यें क्रियावान ब्राह्मणांनीं यज्ञांत दिलेला सोम तो पिऊन टाकूं लागला, एकानें अन्न खाऊन टाकूं लागला व एकानें इंद्रादि देवांचें सामर्थ्य शोषून घेऊं लागला. याप्रमाणें सोम पिऊन फुगून त्याला वाढतांना पाहुन इंद्रादि देवांना चिंता उत्पन्न झाली. त्यांनीं ब्रह्मदेवांकडे जाऊन त्यांना सर्व हकीकत कळविली. तेव्हां ब्रह्मदेवांनीं दधीचि ऋषींचीं हाडें मागून घेऊन त्याचें वज्र करण्यास सांगितलें; तेव्हां देवांनीं दधीचि ऋषी तप करीत होते त्या ठिकाणीं जाऊन 'तप ठीक चाललें आहेना?' ह्मणून विचारिलें; तेव्हां दधीचींनीं त्यांचें स्वागत, 'करून काय काम आहे,' ह्मणून विचारिलें. तेव्हां, 'लोककल्याणासाठीं आपण आपला देह ठेवा,' ह्मणून त्यांनीं त्यांची विनंति केली; तेव्हां सुखदुःख ज्यांना समान आहे अशा महायोगी दधीचींनीं बिलकूल वाईट न वाटतां समाधि लावून देह ठेविला. त्यांच्या देहामधून याप्रमाणें परमात्मा निघून गेल्यावर धात्यानें तीं हाडें घेऊन त्यांचें अभेद्य वज्र केलें. व भगवान विष्णूही अंशरूपानें त्यामध्यें शिरला; तेव्हां त्या वज्रानें इंद्रानें त्रिशिराला मारिलें. त्याच्या अवयवांच्या घर्षणापासून देवांचा शत्रु वृत्र उत्पन्न झाला. त्यालाही इंद्रानें आपल्या वज्रानें ठार मारिलें; परंतु पुढें या दुहेरी ब्रह्महत्येनें भिऊन देवराज्य सोडून मानससरोवरामध्यें जाऊन योगाच्या सामर्थ्यानें तो कमलाच्या देंठाच्या तंतूमध्यें लपून राहिला. याप्रमाणें तिन्ही जगांचा स्वामी नाहींसा झाल्यामुळें देवांना रज व तम यांनीं घेरलें. ऋषींनीं उच्चारलेल्या मंत्रांमध्यें कांहीं सामर्थ्य उरलें नाहीं. जिकडे तिकडे राक्षस उत्पन्न होऊन वेद नाहींसे होण्याची पाळी आली. सर्व जगावरील लोकांना राजा न उरल्यानें त्यांचें सामर्थ्य कमी होत जाऊन राक्षसादिकांना ते बळी पडत चालले. तेव्हां आयूचा मुलगा जो नहुष त्याला त्याच्या कपाळावर पांचशें ज्योतींचें तेज असून वाटेल त्या तेजस्वी प्राण्याचें तेज हरण करण्याचें सामर्थ्य त्याच्या ठिकाणीं असल्यानें त्यांनीं इंद्र केलें. तो याप्रमाणें इंद्रपदाला पावला असतां इंद्राची बायको शची हिचा अभिलाष धरल्यानें व पुढें ब्राह्मणांना वहानाला जोडून त्यांत बसून

त्यांना तुच्छ केल्यानें त्या नहुषाला इंद्रपदाला मुकावें लागून खालीं जमिनीवर साप होऊन पडावें लागलें. पुढें शचीच्या व देवांच्या प्रयत्नानें विष्णूच्या सांगण्यावरून देवांनीं अश्वमेध यज्ञ केल्यावर त्याच्या योगानें इंद्र ब्रह्महत्येपासून मुक्त होऊन आपल्या पूर्वपदाला पावला. या यज्ञामध्यें देवांनीं घोड्याऐवजीं एक काळवीट आणून त्यालाही यज्ञांत न मारतां पुढें इंद्र त्यावर बसूनच आपल्या ठिकाणाला गेला. यापासून सुटलेली ब्रह्महत्या बायका, अग्नि, झाडें व गुरें यांमध्यें जाऊन राहिली.

पूर्वी भारद्वाजऋषी आकाशगंगेला गेले असतां त्रिपादधारी विष्णूचा एक पाय त्या ठिकाणीं पाहून एक पसाभर पाणी त्यांनीं त्यावर फेंकिलें. त्याबरोबर विष्णूच्या छातीवर श्रीवत्स चिन्ह उत्पन्न झालें. महर्षि भृगूंच्या शापानें अग्नीला सर्वभक्षत्व आलें. एके वेळीं देवमाता आदितीनें आपल्या मुलांना त्यांनीं असुरांना मारण्यासाठीं समर्थ व्हावें ह्मणून सामर्थ्यवान करण्यासाठीं कांहीं अन्न शिजवून तयार केलें होतें. ( बुध ) तिच्याकडे भिक्षा मागण्याला गेला असतां आपण तयार केलेलें अन्न आपल्या मुलांच्या आधीं कोणीं खाऊं नये असें वाटून तिनें त्याला भिक्षा नाहीं असें ह्मटलें; तेव्हां या बुधानें अदितीला शाप दिला कीं, ' विवस्वान तुझ्या गर्भामध्यें जेव्हां दुसऱ्यानें अंडरूपानें जन्म घेईल तेव्हां तुला फार वेदना होतील. ' ह्मणून या विवस्वानाला ज्याची श्राद्धामध्यें पूजा होते त्याला मार्तंड हें नांव पडलें.

प्रजापति दक्षाच्या साठ मुलींपैकीं दहा धर्माला दिल्या होत्या, तेरा कश्यपाला दिल्या होत्या, दहा मनूला दिल्या होत्या, सत्तावीस सोमाला दिल्या होत्या, सोम आपल्या या सत्तावीस बायकांपैकीं त्रिवेणीवरच जास्त प्रेम करीत असल्यामुळें बाकीच्यांना मत्सर वाटून त्यांनीं ती गोष्ट आपल्या बापाला कळविली; तेव्हां 'तुला यक्ष्मा ( क्षय ) लागेल ह्मणून दक्षानें त्याला शाप दिला. त्याबरोबर त्या रोगानें चंद्राच्या ठिकाणीं विन्हाड केलें; तेव्हां तो दक्षाकडे गेला असतां, 'तूं आपल्या सर्व बायकांशीं सारखा वागत नाहींस ह्मणून मीं तुला शाप दिला. पश्चिम दिशेला समुद्रामध्यें हिरण्यसर ह्मणून तीर्थ आहे तेथें जाऊन स्नान कर ह्मणजे तूं बरा होशील,' असें दक्ष ह्मणाल्याबरोबर तो त्या तीर्थाकडे जाऊन त्यांत त्यानें स्नान केलें. त्याबरोबर तें पाणीही याच्यायोगानें आभासित ( लखलखीत ) झालें ह्मणून त्याला प्रभास हें नांव मिळालें. असें जरी झालें तरी चंद्र पौर्णिमेपासून अमावास्येपर्यंत क्षय पावत जाऊन पुढें पौर्णिमेपर्यंत वाढत रहातो. चंद्रबिंबावरही तेव्हांपासून कलंक राहिला. व तेव्हांपासून आजपर्यंत त्यावर हरणासारखे काळे ठिपके दिसतात.

कोणे एके वेळीं मेरुपर्वतावर स्थूलदर्शी नांवाचे ऋषी कडक तप करीत असतां उन्हाच्या तापानें ते तापले जात होते ह्मणून सर्व गंधांनीं भरलेला असा शुद्ध वारा त्यांच्या अंगावरून वाहून त्यांना जणूं वारा घालीत होता. त्यामुळें त्यांच्या मनाला बरें वाटे; तेव्हां चढाओढीनें झाडांनीं फुलें उत्पन्न करून त्यांना सुखवून संतुष्ट करण्याचा प्रयत्न केला. तेव्हां या हेव्यादाव्यामुळें राग येऊन यापुढें तुह्मांला सर्व ऋतूंत फुलें येणार नाहींत ह्मणून त्यांनीं त्यांना शाप दिला. पूर्वी नारायण वडवामुख ऋषीचें रूप घेऊन मेरुपर्वतावर तप करीत असतां त्यानें समुद्राला आपल्याजवळ बोलाविलें. समुद्रानें ती आज्ञा मोडिली. त्याबरोबर त्यानें रागावून अंगांतील उष्णतेनें तें पाणी गोंठून टाकिलें व अंगांतील घामाप्रमाणें त्याला खारटपणा आणिला व हें कोणाला पिण्याच्या लायकीचें असणार नाहीं; फक्त वडवामुख नांवाच्या प्राण्यानें प्राशन केलें असतां त्याला मात्र तें गोड लागेल, ' असा त्यांनीं शाप दिला. अद्यापपर्यंत समुद्राचें पाणी पिणाराला खारट लागतें. मात्र त्या पाण्यामध्यें असणाऱ्या वडव्याला तें अमृताप्रमाणें गोड असतें. हिमवताची मुलगी उमा हिला रुद्राला देण्याचें ठरलें होतें. भृगूंनीं जाऊन तिला मागणी घातली असतां हिमाचलानें आपण शंकराला पूर्वीच निवडलें असल्याचें त्यांना सांगितलें. त्याबरोबर, ' यापुढें तुझ्याजवळ रत्नें राहणार नाहींत, ' असा त्यांनीं शाप दिला. व आजपर्यंत त्या ऋषींचें वचन खरें होऊन राहिलें आहे. अशा प्रकारचा हा ब्राह्मणांचा महिमा आहे. क्षत्रिय देखील ब्राह्मणांच्याच प्रसादानें ही पृथ्वी स्त्री मिळवून तिचा उपभोग घेत आहेत; तेव्हां ज्या या दोघांची अग्नि व सोम यांपासून उत्पत्ति आहे. त्यावरच हें

जग अवलंबून आहे. त्याचप्रमाणें अग्नि व सोम हे नारायणाचे डोळे आहेत, व किरण हे त्याच्या अंगावरचे केंस आहेत. हे दोघे सूर्य व चंद्र क्रमानें जगाला उष्णता देऊन सामर्थ्य देतात ह्मणून, जगाचें हे हर्षदायक समजले गेले आहेत. याप्रमाणें या दोघांच्या कृत्यानें जगाला आधार मिळत असल्यानें मला हृषीकेश ह्मणतात. मी सर्वांचा वरद स्वामी असून लोकांना उत्पन्न करणारा आहें. 'इलोकपहूतोसहदिवा' इत्यादि मंत्रांनीं मला हांक मारिली असतां यज्ञामध्यें मी हविर्भाग हरण करतों म्हणून व त्याचप्रमाणें माझा वर्ण हरित नांवाच्या रत्नाप्रमाणें असल्यामुळें मला हरी ह्मणतात. सर्वांचें विश्रांतीचें ठिकाण मी असून सत्य व अमृत मीच आहें; ह्मणून मला विद्वान ऋतधामा ह्मणतात. पूर्वी गोमाता पृथ्वी समुद्रांत बुडून खोल गेली असतां मीं तिला वर काढिली ह्मणून मला गोविंद ह्मणतात. शिपिविष्ट असेंही माझें नांव आहे; कारण ज्याच्या अंगावर केंस नाहींत अशाला शिपी ह्मणतात व अशा रूपानें जो सर्व व्यापून आहे त्याला शिपिविष्ट ह्मणतात. यास्क ऋषींनीं या नांवानें पुष्कळ यज्ञांत मला हांक मारल्यानें त्यांना पाताळांत बुडालेल्या निरुक्तांना वर काढितां आलें. मी कधीं जन्माला आलों नाहीं, मी कधीं जन्म घेत नाहीं व घेणार नाहीं; त्याचप्रमाणें मी सर्वप्राणिमात्रांमध्यें असणारा क्षेत्रज्ञ आहें ह्मणून मला अज ह्मणतात. कधीं क्षुद्र किंवा अश्लील माझ्या तोंडून निघालें नाहीं. देवी सरस्वती, जी प्रत्यक्ष सत्याचा अवतार आहे ती माझ्या मुखांत आहे. सर्व सत् व असत् माझ्या ठिकाणीं आहे; ह्मणून ब्रह्मसदन जें पुष्कर तेथील ऋषी मला सत्य या नांवानें ओळखतात. मी आजपर्यंत कधीं सत्वापासून ढळलों नाहीं व सत्वगुण हा माझ्यापासूनच निघाला आहे. त्याचप्रमाणें पूर्वजन्मांतील या सत्वगुणानें या जन्मींही मला सोडलें नाहीं. याप्रमाणें सत्वावर अवलंबून राहून कर्मफलाची इच्छा न ठेवितां निष्पाप राहून मी कर्म करीत राहतों व सत्वगुण धरून मिळविलेल्या ज्ञानानेंच मी दिसतों व या गुणांनीं युक्त अशा लोकांमध्यें मी आहें म्हणून मला सात्वत म्हणतात. लोखंडी मोठा फाळ होऊन मी जमीन नांगरतों; त्याचप्रमाणें माझा वर्णही काळा आहे म्हणून मला कृष्ण म्हणतात. पृथ्वी पाण्याशीं, आकाश वायूशीं, वायु तेजाशीं जोडून टाकतांना त्या कृत्यांत माझें सामर्थ्य कुंठित झालें नाहीं ह्मणून मला वैकुंठत्व आलें. निर्वाण हेंच श्रेष्ठ ब्रह्म असून हाच श्रेष्ठ धर्म समजला गेला आहे. त्यापासून मी कधीं च्युत न झाल्यामुळें मला अच्युत हें नांव आहे. पृथ्वी व आकाश सर्वव्यापी समजलीं गेलीं आहेत, त्यांना मी एकत्र धारण करीत असल्यामुळें मला अधोक्षज म्हणतात. वेदाच्या अर्थाचें चिंतन करीत रहाणारे वेदवेत्ते यज्ञामध्यें या नांवानें माझी स्तुति करीत रहातात. ज्यावर सर्व प्राणिमात्रांचे प्राण अवलंबून आहेत त्या माझ्या अर्ची आहेत म्हणून मला घृतार्ची ह्मणतात. शरीरामध्यें ज्यांची उत्पत्ति कर्मापासून आहे असे कफ, वात, पित्त हे तीन धातु आहेत. यांच्या योगानें प्राणी जिवंत रहात असून हे नाहींसे झाले असतां प्राणी नाहींसा होतो; म्हणून मला आयुर्वेदवेत्ते त्रिधातू म्हणतात. लोकांमध्यें धर्माला वृष हें नांव आहे ह्मणून निघंटु नांवाच्या वैदिक ग्रंथांत मला वृष ह्मटलें आहे. कपि याचा अर्थ श्रेष्ठ वराह आहे व धर्माला वृष ह्मणतात; म्हणून प्रजापती कश्यपांनीं मला वृषाकपि म्हटलें आहे. मला आदि, मध्य व अंत नाहीं म्हणून मला अनाद्य, अमध्य, अनंत असा लोकसाक्षी सर्वस्वामी म्हटलें आहे. पवित्र अशाच गोष्टी मी नेहमीं ऐकत असतों; पापी अशा गोष्टी कधीं मी ऐकत नाहीं, म्हणून मला शुचिश्रवा म्हणतात. एक शृंगाचा वराह होऊन मीं ही पृथ्वी वर काढिली म्हणून मला एकशृंग ह्मणतात; तें रूप घेतलें असतां मला तीन वशिंडें (ककुत) होतीं ह्मणून मला त्रिककुत हें नांव पडलें. कपिलशास्त्रवेत्ते परमात्म्याला विरंची ह्मणतात व त्यालाच प्रजापति हें दुसरें नांव आहे. व मीच प्रजापति असून सर्वांमध्यें चेतना उत्पन्न करणारा असल्यानें हा विरंची व मी एकच आहों. सांख्यशास्त्रवेत्ते, मी फक्त विद्येलाच जोडीला घेऊन सूर्यमंडळामध्यें रहाणारा आहें असें समजतात. वेदामध्यें दितिमान हिरण्यगर्भ ह्मणून ज्याची स्तुति केली आहे व योगामध्यें ज्याची याप्रमाणें पूजा होते तोच या पृथ्वीवर मी आहें. मीच एकवीस हजार ऋग्वेद त्याचप्रमाणें

ज्याला हजार शाखा आहेत असा सामवेद समजला गेलों आहें. जे फार दुर्लभ आहेत, असे माझे भक्त माझी आरण्यकामध्यें स्तुति करतात, ज्या यजुर्वेदामध्यें एकशेंएक शाखा आहेत असा यजुर्वेद मीच असे मला आध्वर्यवामध्यें ह्मटलें आहे. पांच कल्प व सर्वकर्त्ये यांनीं बनलेला जो अथर्वण वेद तो मीच असें अथर्वणवेत्ते समजतात. वेदांमधील सर्व शाखा, त्याचे सर्व भेद, त्या शाखेमधील मंत्र, स्वर, वर्ण व उच्चार हे सर्व मीच केले आहेत. जो ब्रह्मदेवाच्या प्रार्थनेवरून क्षीरसमुद्रांतून वर येऊन वर देतो तो मीच आहें. वेदाच्या पदांमध्यें सांगितलेले वर्ण व उच्चार यांसंबंधी शास्त्राचा सांठा मीच आहें. वामदेवांनीं सांगितलेल्या मार्गानें जाऊन पांचालऋषींनीं माझ्याच प्रसादानें सनातन परमात्म्यापासून वर्ण व शब्द यांच्या विभागासंबंधाच्या नियमासंबंधानें ज्ञान मिळविलें. या बाभ्रव्य कुलांत झालेल्या गालवांना तपःसिद्धीनें या नारायणापासून वर मिळून त्यांनीं वर्ण व शब्द यांच्या संबंधानें व शिक्षेसंबंधानें नियम केले, व या विषयावर पहिल्या प्रतीचे विद्वान ह्मणून प्रसिद्धीला आले. कुंडरीक व प्रतापशाली राजा ब्रह्मदत्त यांनीं सतत जन्ममरणाच्या दुःखासंबंधानें विचार करून माझ्या कृपेनें सात जन्मांमध्यें योगाकडे लागलेल्या लोकांना मिळणारें वैभव मिळविलें. पूर्वीं कांहीं कारणानें मी धर्माचा पुत्र झालों ह्मणून मला धर्मज ह्मणतात, व मीं धर्मसंबंधीं आणि दुसरीं कृत्यें करण्याला साहाय्यभूत अशा वहानामध्यें बसून नरनारायण या दोन रूपांमध्यें जन्म घेऊन गंधमादन पर्वतावर कडक तप केलें तें वेळीं दक्षाचा मोठा यज्ञ झाला त्यामध्यें रुद्राला यज्ञभाग दक्षानें देण्याचें नाकारल्यावरून दधीचि ऋषींच्या सांगण्यावरून शंकरांनीं त्या यज्ञाचा विध्वंस केला, व वरचेवर ज्वाळा बाहेर टाकणारा एक शूल रागानें सोडला, त्यानें दक्षयज्ञाचा पूर्ण फडशा पाडून जोरानें, आह्मी होतों त्या बदरी आश्रमाला येऊन तो नारायणाच्या छातीवर पडला. त्याच्या तेजानें नारायणाच्या अंगावरचे केंस मुंज वर्णाचे झाले; ह्मणून त्याला मुंजकेश नांव पडलें. नारायणाच्या हुंकारानें तो शूल परतून शंकरांकडे गेला; तेव्हां शंकर त्या दोघांवर धांवून गेले, तेव्हां नारायणानें त्यांच्या कंठाला धरलें ह्मणून त्यांना शितिकंठत्व आलें. तेव्हां त्यांचा नाश करण्यासाठीं नरानें एक काडी उचलून ती मंतरल्याबरोबर त्याचा परशु झाला. तो रुद्रावर जोरानें फेंकल्याबरोबर त्याचे तुकडे तुकडे झाले; ह्मणून मला खंडपरशु असें नांव पडलें. याप्रमाणें हे युद्धाला भिडले असतां सर्व लोक उद्विग्न झाले, अग्नि यज्ञामध्यें बरोबर रीतीनें दिलेला हवि घेईनासा झाला, शुद्ध अंतःकरणाच्या ऋषींच्या डोळ्यांपुढें वेद येईनासे झाले, रज व तम या गुणांनीं देवांना घेरलें, पृथ्वी कांपूं लागली, आकाश फाटलें, सर्व ग्रहांचें तेज नाहींसें झालें, ब्रह्मदेव आपल्या आसनावरून ढळले, समुद्र आटला, हिमाचल फाटला; याप्रमाणें स्थिति झाली असतां ब्रह्मदेव, देव व ऋषी यांना बरोबर घेऊन जेथें युद्ध चाललें होतें त्या ठिकाणाला आले व ज्यांचें ज्ञान फक्त वेदानेंच होण्याजोगें आहे असे ते चतुर्मुख हात जोडून रुद्राला ह्मणाले, 'लोकांच्या कल्याणासाठीं आयुध खालीं ठेवा. ज्याला अक्षर, अव्यय, लोकांना कायम ठेवणारा, कूटस्थ कर्ता असून कांहीं न करणारा असा समजतात त्याच व्यक्त रूपाला पावलेल्या परमात्म्याच्या या दोन नरनारायणमूर्ती धर्मकुलांत जन्मून मोठ्या तपांत गढल्या आहेत. यांच्या पूर्वजन्मामध्यें कांहीं कारणानें ह्या परमात्म्याच्या प्रसादापासून माझा जन्म झाला असून यांच्या रागापासून आपली उत्पत्ति झाली आहे. तेव्हां या व्यक्त रूपाला तुष्ट करून जगाला लवकर शांती द्या.' हें ऐकून रुद्रांनीं आपला राग सोडून प्रभु नारायणाला शरण जाऊन त्यांना प्रसन्न करून घेतलें; तेव्हां त्यानें नारायण संतुष्ट होऊन तो व रुद्र एक झाले; नंतर तो परमात्मा शंकरांना ह्मणाला, 'जो तुला ओळखतो तो मला ओळखतो, जो तुझ्यामागून आहे तो माझ्यामागून आहे. आपल्यामध्यें मुळीं अंतर नाहीं. याहून निराळा विचार मनांत अगदीं ठेवूं नकोस आजपासून ही शूळाची खूण जी माझ्या छातीवर पडली आहे तें श्रीवत्स होऊन राहील व तुझ्या गळ्याला लागलेल्या हाताच्या खुणेनें तूं श्रीकंठ होऊन रहाशील.' याप्रमाणें परस्परांच्या शरीरावर परस्परांचें चिन्ह ठेवून नारायणांचे शंकराशीं सख्य जुळल्यावर सर्वांना रजा देऊन शांत अ-

शा अंतःकरणानें ते फिरून तपाला बसले. याप्रमाणें मीं तुझ्या प्रश्नांचें उत्तर दिलें आहे. अशीं मी निरानिराळीं रूपें घेऊन या पृथ्वीवर, ब्रह्मलोकामध्यें व शाश्वत सुखाच्या गोलोकामध्यें फिरत असतों. माझ्या साह्यानेंच ह्या झालेल्या थोर रणामध्यें तुला जय मिळाला आहे. युद्धाचे वेळीं तुझ्या रथाचे पुढें जो प्राणी होता तो रुद्रच. त्यालाच कपर्दि, काल अशीं दुसरीं नांवें असून तो माझ्या रागापासून झाला आहे. युद्धांत तूं ज्यांना मारिलें आहेस त्यांना प्रथम त्यानेंच मारून ठेविलें होतें; त्याच्या सामर्थ्यासंबंधानें यापूर्वीं मीं तुला सांगितलेंच आहे; तेव्हां त्या रुद्राला तूं नमस्कार कर.'

## २२१ नारद व नारायण यांचा संवाद.

### ( १२. ३४३–४६ )

जनमेजय म्हणाला, 'नारदमुनी परमात्म्यांच्या भाषणावर विचार करीत परतल्यावर बदरी आश्रमाला येऊन कडक तपांत गढलेल्या नरनारायणांची गांठ घेऊन तेथें किती वेळ राहिले व ते आणि नरनारायण यांच्यामध्यें काय भाषण झालें? हा नारायणाचा संवाद खरोखर आपण भारताच्या एक लाखश्लोकांच्या समुद्रामधून मथन करून अमृतच काढिलें आहे. दह्यापासून लोणी काढावें, मलयाचलावरून चंदन निवडून घ्यावा, वेदांमधून आरण्यक काढून घ्यावें किंवा ओषधीमधून अमृत काढून घ्यावें त्याप्रमाणें नारायणाच्या संबंधाचें हें अमृत जगांत असणाऱ्या अनेक इतिहासपुराणांतून आपण काढिलें आहे. नारायण हा परमात्मा आहे व ऐश्वर्यसंपन्न असा तो सर्वांचा आत्मभूत आहे. त्याच्या सामर्थ्याला कोणाला आळा घालतां येत नाहीं. ब्रह्मादिदेव कल्पाच्या अंतीं याच्यामध्येंच गडप होतात. ह्मणून या नारायणाहून पवित्र, पृथ्वीवर किंवा स्वर्गांत मला कांहींच दिसत नाहीं. पृथ्वीवरील सर्व तीर्थांना जाऊन त्यांमध्यें स्नान करणें हें या नारायणाच्या गुणानुवादाच्यासारखें फलदायक नाहीं. या हरीच्यासंबंधीं हा संवाद मुळापासून ऐकून मी सर्वपापांतून मुक्त होऊन पुनीत झालों आहे. वासुदेव त्याच्या साह्याला होता ही गोष्ट लक्षांत आणतां कुरुक्षेत्रामध्यें झालेल्या मोठ्या युद्धांत माझ्या पितामह अर्जुनांना जो जय मिळाला त्यांत मला कांहींच विशेष वाटत नाहीं. जगाचा स्वामी विष्णु ज्याचा पाठीराखा आहे त्याला जगांत दुर्मिळ कांहींच नाहीं. ज्यांच्या ऐहिक व पारलौकिक कल्याणाकडे लक्ष देणारा स्वतः परमात्मा जनार्दन होता ते माझे पितामह मोठे भाग्यवान समजले पाहिजेत. सर्व लोकांना पूज्य असा पवित्र नारायण तपानेंच दिसणें शक्य आहे; तथापि श्रीवत्सांकित अशा त्याचें त्यांना सुदैवानें दर्शन झालें. त्यांच्याहूनही मी त्या अव्यय नारदमुनींना विशेष धन्य समजतों; कारण कीं श्वेतद्वीपाला जाऊन त्यांनीं प्रत्यक्ष हरीचें दर्शन घेतलें हें त्या परमात्म्याच्या कृपेमुळेंच झालें असें मीं समजतों. त्या नारायणाचें अनिरुद्धाच्या स्वरूपामध्यें दर्शन झालें असतां नारद फिरून नरनारायणाच्या दर्शनासाठीं बदरी आश्रमाला कां आले? नरनारायण व नारद यांच्यामध्यें काय संभाषण झालें?' वैशंपायन ह्मणाले, 'व्यासांच्या कृपेनें त्यांच्यामध्यें काय संभाषण झालें तें सांगतों ऐक. श्वेतद्वीपामध्यें परमात्म्याचें दर्शन घेतल्यावर त्यांचें महत्त्वाचें भाषण मनांत धरून ते मेरु पर्वताकडे निघाले; नंतर तेथून ते गंधमादनाकडे निघून विशाल अशा बदरी आश्रमाला येऊन पोहोंचले. तेथें ते पुराणऋषी नरनारायण स्वतःवर अवलंबून राहून कडक तप करीत होते. दोघांच्या छातीवर श्रीवत्स चिन्ह असून दोघांच्याही डोक्यांवर जटा वाढल्या होत्या. जगाला प्रकाशमान करीत असणाऱ्या त्यांच्या तेजानें प्रत्यक्ष सूर्यालासुद्धां ते मागें सारीत आहेतसें दिसलें. प्रत्येकाच्या हातावर हंसाचें चिन्ह असून पायावर चक्र वगैरे प्रत्यक्ष परमात्म्याचींच सर्व चिन्हें त्यांच्या अंगावर होतीं; यावरून ते महापुरुष दिसत होते. त्यांना पाहून नारद आनंदभरित झाले. परस्परांचा आदरसत्कार होऊन कुशल प्रश्न झाल्यावर त्या दोघांना पाहून नारदाच्या मनांत विचार आले कीं, हे जगमान्य दोन पुराणऋषी श्वेतद्वीपांत मीं पाहिलेल्या लोकांशीं कितीतरी सारखे दिसताहेत? असा विचार करून त्यांनीं दिलेल्या पवित्र दर्भासनावर ते बसले. यानंतर तप, कीर्ति, यश व तेज यांचें आगर अशा ह्या दोन शमदमांनीं युक्त पुराण ऋषींनीं

सकाळचें आन्हिक आटोपल्यानंतर नारदांची स्वस्थपणानें पाद्य अर्घ्य इत्यादिकांनीं पूजा करून त्यांचें आतिथ्य करून आपापल्या आसनावर बसले. तेवेळीं तुपाच्या आहुतीच्या ज्वाळांनीं जशी यज्ञाची जागा प्रकाशमान होते त्याप्रमाणें ती जागा प्रकाशूं लागली. नंतर याप्रमाणें नारदांनीं सुखानें विसावा घेतल्यावर नरनारायणांनीं त्यांना विचारलें, 'आमची जो श्रेष्ठ प्रकृति आहे त्या परमात्म्याला श्वेतद्वीपामध्यें भेटून आलांना?' नारद म्हणाले, 'विश्वरूप धरणारा तो अव्यय श्रीमान पुरुष त्याचप्रमाणें तेथील सर्व लोक, देव व ऋषी यांना मीं पाहिलें. आतांसुद्धां तुम्हांला पाहून तो परमात्मा माझ्या डोळ्यांपुढें दिसतो. तुमच्या ठिकाणीं जीं हीं लक्षणें दिसत आहेत तीं अगदीं हुबेहुब मीं त्याच्या ठिकाणीं पाहिलीं. त्या ठिकाणीं तुम्हां दोघांना त्याच्याजवळ पाहिलें होतें. त्या परमात्म्याचा निरोप घेऊन मी तुमच्याकडे आलों आहें. तेज, यश व श्री यांमध्यें तुम्हां दोघांशिवाय त्याच्या तोडीचा त्रैलोक्यांत कोण असणार? क्षेत्रज्ञासंबंधानें सर्व कांहीं धर्म त्यानें मला सांगितले; त्याचप्रमाणें त्याचे या जगतामध्यें होणारे अवतारही त्यानें मला सांगितले. त्याठिकाणीं असणारे पंचेंद्रियवर्ज ज्ञानी लोक सर्व त्याचे भक्त असून ते सदा त्याची पूजा करीत असतात. व तोही त्यांच्या ठिकाणीं रममाण झालेला असतो. कारण, भगवान परमात्म्याला भक्त फार आवडतात. सर्व विश्वाचा भोक्ता, सर्वव्यापी माधव, भक्ताचा फार कनवाळू आहे. कर्ता, कारण, कार्य, सर्वशक्तिमत्ता, अतुल तेज, हेतु, शास्त्राचे आधार सर्व शास्त्रतत्त्वें हीं सर्व तोच महायशस्वी आहे. तपामध्यें गढून त्यानें असें कांहीं तेज संपादन केलें आहे कीं, तें श्वेतद्वीपाहून श्रेष्ठ आहे. तपानें ज्याचें अंतःकरण पूत झालें आहे त्या परमात्म्यानें सर्व जगाला शांति दिली आहे. अशा चांगल्या बुद्धीनें तो उत्तम तपामध्यें गढून राहिला आहे. ज्या ठिकाणीं तो राहिला आहे त्याला सूर्याच्या योगानें प्रकाश मिळत नाहीं, चंद्राच्या योगानें शोभा येत नाहीं व वारा तेथें वहात नाहीं. आंठ अंगुळांचें स्थंडिल करून तो विश्वकर्ता त्या ठिकाणीं एका पायावर हात वर करून पूर्वेकडे पहात उभा राहून आपल्या अंगासह तोंडानें वेद म्हणत राहून कडक तप करीत आहे. जें कांहीं हव्यकव्य ब्रह्मदेव, ऋषी वगैरे विधिपूर्वक देतात तें सर्व त्याच्या पायांपाशीं जाऊन पोहोंचतात. एकनिष्ठा धरून त्याच्या भक्तांनीं केलेल्या सर्व क्रिया तो परमात्मा आपल्या मस्तकावर धरितो. ज्ञान झालेल्या महात्म्याहून अधिक प्रिय त्याला कोणी नाहीं. त्यानें निरोप दिल्यावरून मी येथें त्या परमात्म्याची भक्ति करीत रहाणार आहें.'

नरनारायण म्हणाले, 'प्रत्यक्ष परमात्म्याचें आपल्याला दर्शन झालें आहे तेव्हां आपण धन्य असून त्याचा आपल्यावर अनुग्रह झाला आहे. प्रत्यक्ष ब्रम्हदेवांना सुद्धां त्याचें प्रत्यक्ष दर्शन झालें नाहीं. त्याची उत्पत्ति कोणाला ठाऊक नसून तो कोणाला दिसत नाहीं. भक्तांहून अधिक प्रिय त्याला कोणी नाहीं; ह्मणूनच त्यानें आपल्याला दर्शन दिलें आहे. ज्या ठिकाणीं तो तप करीत राहिला आहे, त्याठिकाणीं आह्मां दोघांखेरीज कोणाला जातां येत नाहीं. त्यानें झळकणाऱ्या त्या ठिकाणाला हजार सूर्याच्या तेजाचें तेज आलें आहे. त्याच्याचपासून पृथ्वीच्या क्षमारूप गुणाची उत्पत्ति आहे. त्याच्याचपासून रसाची उत्पत्ति असून या गुणांचा पाण्याशीं संबंध जडला आहे. त्याच्याचपासून रूपगुणात्मक तेजाची उत्पत्ति होऊन त्याचा सूर्याशीं संबंध जडून सूर्य प्रकाशत आहे. त्याच्यापासूनच स्पर्शगुण उत्पन्न होऊन तो वाऱ्याशीं मिळून वारा स्पर्शविकार उत्पन्न करीत वहात असतो. शब्दगुण त्याच्यापासूनच उत्पन्न होऊन तो आकाशाला मिळून त्याच्या योगानें आकाश मोकळेपणानें पसरून राहिलें आहे. त्याच्या योगानेंच सर्व प्राणिमात्रांमध्यें भरून असणारें मन उत्पन्न झालें असून चंद्रम्याशीं त्याचा संबंध जडून त्यांच्या ठिकाणीं प्रकाश गुण उत्पन्न झाला आहे. यज्ञामध्यें दिलेल्या सर्व हव्यकव्यांचा भोक्ता नारायण ज्या ठिकाणीं आपल्या विद्येला बरोबर घेऊन रहातो त्या ठिकाणाला वेदांमध्यें सत् ह्मणून सर्व वस्तूंचें उत्पत्तिस्थान मानलें आहे. पापापासून मुक्त होऊन निष्कलंक झालेल्या लोकांचा मार्ग मोठा क्षेमकर आहे. सर्व जगतावरील अंधःकार दूर करणारा सूर्य मुक्त झा-

लेल्या लोकांना ब्रह्मद्वार आहे. सूर्यामध्यें शिरल्यावर अशांचें सर्व अंग जळून गेल्यानें ते अदृश्य होतात; कारण पुढें ते कोणत्याही स्वरूपामध्यें दिसत नाहींत. परमाणुस्वरूप होऊन ते नारायणामध्यें मिळून पुढें त्याच्यामधूनही बाहेर पडून अनिरुद्धाच्या देहामध्यें ते शिरतात; पुढें जड देह सोडून मनोमय होऊन प्रद्युम्नामध्यें शिरतात व तेथून संकर्षणरूपी जो जीव त्याच्यामध्यें मिळून जातात; नंतर सत्व, रज, तम या तीन गुणांपासून मुक्त होऊन या तीन गुणांनीं मुक्त अशा क्षेत्रज्ञ नांवाच्या परमात्म्यामध्यें ते शिरून जातात. क्षेत्रज्ञ ज्याला ह्मणतात तो हा वासुदेवच आहे. हा वासुदेवच जगांतील सर्व वस्तूंना मूळ आधार आहे. ज्यांचें मन एकाग्र होऊन सर्व प्रकारचा निग्रह ज्यांच्या हातून झाला आहे असें एकनिष्ठ लोकच परमात्म्याशीं मिळून जाऊं शकतात. आह्मी दोघे धर्माच्या घरीं जन्म घेऊन त्या परमात्म्याचे देवांना आवडते असे जे अवतार त्रैलोक्यामध्यें होणार त्यांच्या कल्याणासाठीं कडक तप करीत राहिलों आहों. आह्मांलाही त्या परमात्म्याचें श्वेतद्वीपामध्यें दर्शन झालें आहे. त्या परमात्म्याशीं संकेत केल्याप्रमाणें आपण येथें आलां आहांत, हें आह्मी जाणतों; कारण, या चराचर त्रैलोक्यामध्यें जें कांहीं बरें वाईट घडणार, घडलें व घडत आहे तें सर्व आह्मांला कळतें. ' हें त्या नरनारायणांचें भाषण ऐकून एक हजार दिव्य वर्षें त्या आश्रमामध्यें राहून नारदांनीं केवळ नारायणाकडे लक्ष देऊन त्यासंबंधाचे नानामंत्र विधिपूर्वक जपले. याप्रमाणें तेथें राहून देवांसंबंधीं क्रिया केल्यावर ते पितृक्रिया करूं लागले असतां नारायणानें त्यांना विचारिलें कीं, देव व पितर यांच्यासंबंधानें कोणाला उद्देशून आपण क्रिया करतां? हें आपण काय कर्म करतां व याच्या कोणत्या फलाची आपल्याला इच्छा आहे?' नारद ह्मणाले, ' नारायणा, तूंच पूर्वी देवासंबंधीं क्रिया कराव्या ह्मणून मला सांगितलेंस. या क्रियाच श्रेष्ठ यज्ञ असून परमात्म्याची हीच थोर पूजा आहे असें तूंच सांगितलेंस. त्या उपदेशावरून या क्रियांनीं मी शाश्वत अशा विष्णूचें यजन करीत आहें. त्यापासूनच माझे पितामह ब्रह्मदेव उत्पन्न झाले असून त्यापासून तातदक्षांची उत्पत्ति आहे. प्रथम सर्वांच्या आधीं ब्रह्मदेवापासून मनानें माझी उत्पत्ति झाली असून पुढें दक्षांच्या शापानें मला त्यांचा मुलगा व्हावें लागलें. नारायणासाठीं त्यानेंच सांगितलेल्या विधीनें मी ही पितृक्रिया करीत आहें. तोच भगवान् जगाचा पिता, माता, पितामह सर्व कांहीं आहे. सर्व पितृयज्ञामध्यें त्याचेंच यजन होत असतें. पूर्वी कांहीं देवांनीं ( जे बाप होते त्यांनीं ) आपल्या मुलांना श्रुति सांगितली. पुढें स्वतः ती श्रुती विसरल्यामुळें त्यांना ती आपल्या मुलांपासून शिकावी लागली. याप्रमाणें मुलांना आपल्या बापाला मंत्र सांगावे लागल्यामुळें मुलांना वडीलपणा आला. त्यावेळीं देवांनीं काय केलें हें आपल्याला ठाऊकच आहे. मुलांना व वडिलांना परस्परांची पूजा करावी लागली. दर्भ पसरून त्यांवर तीन पिंड ठेवून याप्रमाणें त्यांनीं परस्परांची पूजा केली. तरी पण पितरांना पिंड संज्ञा कां आली हें मला कळत नाहीं. ' नरनारायण म्हणाले, ' पूर्वी ही पृथ्वी समुद्रामध्यें बुडाली असतां गोविंदानें वराहरूप धरून ती बाहेर काढिली. तिला पूर्वीप्रमाणें तिच्या ठिकाणीं कायम करून पाणी व चिखल यांनीं ज्याचें अंग भरलें होतें अशा लोककार्यासाठीं तयार असलेल्या त्या परमात्म्यानें सूर्य डोक्यावर येऊन आन्हिक क्रिया करण्याची वेळ आली असतां आपल्या दाढेला ( दंष्ट्रेला ) लागलेले चिखलाचे तीन पिंड ( गोळे ) खालीं दर्भ पसरून त्यावर ठेविले; आणि स्वतःला उद्देशून यथाविधि पितृक्रिया केली, आणि त्यांना पिंड समजून त्यांच्या शरीरांतील उष्णतेपासून निघालेल्या तेल असलेल्या तिळांनीं त्यांवर यथाविधि प्रोक्षण करून पूर्वेकडे तोंड करून बसून त्यांचा दानविधि पुरा केला. ते वेळीं लोकांमध्यें मर्यादा घालून देण्यासाठीं तो ह्मणाला, ' मीं पितरांना उत्पन्न करण्याचा निश्चय केला आहे.' असें म्हणून पितरांसंबंधानें करावयाच्या विधीसंबंधानें तो विचार करूं लागला असतां दाढेपासून काढलेले ते तीन पिंड दक्षिणेकडे पडलेले त्याला दिसले. ते पाहून तो म्हणाला, ' हे माझ्या दाढेंतून निघालेले तीन पिंड खालीं दक्षिणेकडे पडले आहेत. हेच मीं उत्पन्न केलेले पिता, पितामह व

प्रपितामह असे तीन पितर असोत. मीच या पिंडांमध्यें आहें असें समजावें. मला कोणी श्रेष्ठ नाहीं. ज्याची मीं पूजा करावी असा या जगामध्यें कोण आहे ? व या जगांत मला पिता, पितामह किंवा प्रपितामह तरी कोण आहे ? या सर्व विश्वाला मीच एकटा कारण आहें, असें म्हणून वराहपर्वतावर पिंड देऊन आपला सत्कार करून घेऊन तो गुप्त झाला. असा प्रकार घडला असून याप्रमाणें पितरांना पिंड ही संज्ञा आली. त्या वेळच्या त्या परमात्म्याच्या आज्ञेप्रमाणें पितर लोकांनीं केलेली पूजा घेत असतात. जे कायावाचामनानें देव, पितर, गुरु, मान्य, घरीं आलेले अतिथि गाई, श्रेष्ठ ब्राह्मण, भूमाता व आई यांची पूजा करतात ते प्रत्यक्ष विष्णूचेंच यजन करतात. प्रभु नारायण सर्व भूतमात्रांच्या शरीरांमध्यें असून तोच सर्वांचा आत्मा आहे. सुखदुःखाचा विकार त्यावर न घडतां तो सर्वांशीं सारखा आहे. तो महात्मा ईश्वर जगांतील सर्वांचा आत्मा समजला गेला आहे. ' याप्रमाणें नरनारायणांचें भाषण ऐकून नारदांची परमात्म्यावर पूर्ण भक्ति जडून त्या आश्रमामध्यें एकनिष्ठेनें एक हजार वर्षें राहून पुढें हरीचें दर्शन होऊन मग ते हिमाचलाकडे आपल्या आश्रमाला निघून गेले. नरनारायण हे आपल्या त्या रम्य आश्रमामध्यें कडक तप करीत राहिले. जो कर्मानें, वाणीनें किंवा कृतीनें त्या अव्यय परमात्म्याचा द्वेष करतो, त्याला परलोक किंवा इहलोक कांहींच साधत नाहीं. त्याचे पितर कायमचे नरकांत बुडतात. कोणाला आपला आत्मा कधीं द्वेष्य झाला आहे काय ? विष्णु हा दुसरा कोणी नसून प्रत्यक्ष आपला आत्माच आहे व हें भगवद्गीतेमध्यें ज्याला हरिगीता किंवा नारायणगीताही ह्मणतात, तीमध्यें पूर्वीं थोडक्यांत त्याच्या विधीसकट सांगितलें आहे. तो श्रेष्ठ ऋषि सर्व लोकांचा व भुवनांचा स्वामी आहे. तो या विशाल पृथ्वीला धारण करणारा आहे. कृति व विनय यांचा तो सांठा आहे. त्याचप्रमाणें यम, नियम यांचाही तो सांठा असून स्वतः तो त्यामध्यें गढलेला असतो. तो असुरांचा नाश करणारा असून यशाचें भाजन आहे. त्यानेंच मधुकैटभ राक्षसांचा नाश केला आहे. धर्मशास्त्रवेत्त्यांना अभय देऊन गती देणारा व यज्ञभाग घेणारा असा तो तुह्मांला आधार असो. तो त्रिगुणात्मक असून निर्गुण असा आहे. तो चतुर्मूर्ति परमात्मा तळीं, विहीरी वगैरे खणणें इत्यादिपासून मिळणाऱ्या पुण्याचा भाग स्वतः घेणारा आहे. कोणाला हार न जाणारा मोठा सामर्थ्यवान असा तो पुण्यवान ऋषींना सदा गती आहे. सर्व लोकांचा साक्षीभूत असा तो पुराणपुरुष आहे. सूर्याप्रमाणें त्याचा वर्ण असून तो सर्वांना आधार आहे. ज्या परमात्म्यापुढें प्रत्यक्ष नारायण लीन होतो त्याला तुह्मीं नमस्कार करा. सर्व जगाला मूळ तो असून त्यालाच अमृत म्हणतात. ज्यावर सर्व वस्तू अवलंबून आहेत असा सर्वांचा आधार तो आहे. अचल हें पद त्यालाच लागू आहे. सांख्य व योगवेत्ते त्याला आपल्या बुद्धीनें जाणतात. '

## २२२ हयशिराची उत्पत्ति. ( १२. ३४७ )

जनमेजय ह्मणाला, ' परमात्मा हरी यानें जें हयशिराचें रूप घेतलें तें कशासाठीं हें मला सांगा. ' वैशंपायन ह्मणाले, ' या जगामध्यें देहरूपानें असणारी प्रत्येक वस्तू परमात्म्याच्या संकल्पमात्रानें जुळणारी पंचमहाभूतात्मक आहे; कारण हा विराट्‍स्वरूपी ईश्वर जगताचा उत्पादक असून सर्व भूतमात्रांमध्यें असणारा अंतरात्मा आहे; मग त्याला तुह्मीं सगुण ह्मणा किंवा निर्गुण ह्मणा. पृथ्वीचा पाण्यामध्यें लय होऊन प्रथम सर्व जलमय होतें. पुढें जलाचा तेजामध्यें, तेजाचा वायूमध्यें, वायूचा आकाशामध्यें, आकाशाचा मनामध्यें, मनाचा व्यक्त अशा अहंकारामध्यें, व्यक्त अहंकाराचा अव्यक्त प्रकृतीमध्यें व या प्रकृतीचा जीवात्म्यामध्यें व जीवात्म्याचा सर्वव्यापी पुरुषामध्यें लय झाला असतां जिकडे तिकडे अंधारमय होऊन कांहीं दिसत नाहीं. या तमापासून पुढें सृष्टि उत्पन्न करण्याचें सामर्थ्य असणाऱ्या ब्रह्माची ( परव्योमाची ) उत्पत्ति होते. ह्मणून हें तम मूळ अज असून अमर आहे. हा ब्रह्मा प्रपंचात्मक विराट्‍ स्वरूपामध्यें आपल्या सामर्थ्यानें वाढून पुरुष बनतो. त्यालाच अनिरुद्ध व प्रधान हीं नांवें आहेत. तीच त्रिगुणात्मक अव्यक्त प्रकृति आहे. केवळ विद्येला बरो-

वर घेऊन विष्वक्सेन हरी प्रथम योगनिद्रेमध्यें पाण्यांत शयन करतो. पुढें नानाप्रकारची विचित्रित व नाना गुणांनीं युक्त अशी सृष्टि उत्पन्न करण्याचें त्याच्या मनांत आल्याबरोबर त्याला आपल्या थोर गुणांची आठवण होते; त्याबरोबर अहंकाराची उत्पत्ति होते. हाच अहंकार चतुर्मुख ब्रह्मदेव असून याला हिरण्यगर्भ व सर्व लोकांचा पितामह ह्मणतात. अनिरुद्धापासून निघालेल्या कमलामध्यें याची उत्पत्ति होऊन तो त्या ठिकाणीं बसला असतां चोहोंकडे त्याला पाणीच दिसलें. पुढें सत्वगुण धरून या परमेष्ठीनें सृष्टि उत्पन्न करण्यास सुरवात केली. या सूर्याप्रमाणें देदीप्यमान अशा मूळ कमळामध्यें उत्तम गुणांनीं युक्त असे दोन बिंदु टाकले होते. त्यावर या अनादि व अविनाशी नारायणानें दृष्टि फेंकल्याबरोबर त्यांपैकीं एक बिंदु मधासारखा दिसूं लागला व त्यापासून नारायणाच्या आज्ञेनें तमोगुणात्मक मधु नांवाचा दैत्य उत्पन्न झाला. दुसरा जो जलबिंदू फार कठीण होता त्यापासून रजोगुणात्मक कैठभ दैत्य उत्पन्न झाला. हे दोघे रजतमांनीं युक्त असे बलवान दैत्य जन्मल्याबरोबर या मूल कमलामधून संचार करीत फिरूं लागले असतां अतुल तेजस्वी ब्रह्मदेवांना त्या कमलामध्यें बसून सर्वांच्या आधीं मूर्तिमान चार वेद निर्माण करतांना पाहून त्यांच्या देखत ते चार वेद हिसकावून घेऊन एकदम ईशान्य समुद्रामध्यें आंत पृथ्वींत शिरले. याप्रमाणें वेद उपटून नेल्यामुळें ब्रह्मदेवांना वाईट वाटून ते परमात्म्याला ह्मणाले, 'वेद माझे डोळे आहेत, वेद माझें मोठें बल आहे, वेद माझा आश्रय आहे आणि वेद हेंच श्रेष्ठ ब्रह्म आहे. दैत्यांनीं वेद बलात्कारानें उपटून नेल्यामुळें मला सर्व लोक अंधकारमय झाले आहेत. वेदांवांचून माझ्या हातून सृष्टि कशी उत्पन्न होणार? यामुळें मला फार दुःख होत असून मी शोकसागरामध्यें बुडून गेलों आहें. या सृष्टीचा मूळ असा जो तूं त्या तुला मी हात जोडतों. तूं सांख्य व योग यांचा निधि असून व्यक्त व अव्यक्त यांना उत्पन्न करणारा आहेस. तूं कोणाला उमगणारा नसून क्षेमकर असा मार्ग धरला आहेस. सर्व विश्वाचा भोक्ता तूं असून सर्व भूतमात्रांचा अंतरात्मा आहेस. स्वयंभू असा जो तूं त्या तुझ्या प्रसादापासून केवळ तुझ्या इच्छामात्रेंकरून माझा पहिला जन्म झाला असून माझा दुसरा जन्म तुझ्या डोळ्यांपासून, तिसरा वाणीपासून, चौथा तुझ्या कानापासून, पांचवा नाकापासून, सहावा अंडापासून व हा सातवा कमलापासून याप्रमाणें तुझ्यापासून माझे सात जन्म झाले आहेत. मला तीन गुणांमध्यें श्रेष्ठ जो सत्वगुण त्यानें युक्त असा हा जन्म आला आहे. हे निर्गुणा, प्रत्येक उत्पत्तीच्या वेळीं माझी तुझ्यापासून उत्पत्ति होत असते. तूं ईश्वर असून श्रेष्ठस्वभावानें युक्त आहेस. तूं स्वयंभू असून माझी उत्पत्ति तुझ्यापासून झाली आहे. वेद माझे डोळे असल्यानें मीं काळालाही मागें सारलें आहे. ते माझे वेद माझ्यापासून उपटून नेल्यानें मी आंधळा झालों आहे. तेव्हां योगनिद्रेंतून जागा होऊन माझा डोळा मला परत दे.', याप्रमाणें ब्रह्मदेवांनीं स्तुति केली असतां भगवान निद्रा टाकून वेदासंबंधीं कामासाठीं उठून तयार झाला. योगसामर्थ्यानें त्यानें दुसरा देह धारण केला. त्याचें नाक सुबक व त्याचा देह चंद्राप्रमाणें कांतिमान दिसत होता. वेद सांठविण्याची जागा असें मोठें पांढरें शुभ्र घोड्याचें डोकें त्यानें धारण केलें. नक्षत्रें व तारे यांसह आकाश त्याचें डोकें बनलें. सूर्यकिरणाप्रमाणें देदीप्यमान असे त्याचे केंस लांब होते. आकाश व पाताळ हे दोन त्याचे कान असून पृथ्वी त्याचें कपाळ होतें. गंगा व सरस्वती त्याचे जघनभाग होते. महासागर त्याच्या भिंवया होत्या. चंद्र व सूर्य डोळे असून संध्यासमय हेंच नाक होतें. ॐकार हाच त्याचा संस्कार होतां व वीज जीभ होती. सोमप ह्मणून प्रसिद्ध असलेले पितर त्याचे दांत होते. गोलोक व ब्रह्मलोक हे त्याचे ओंठ होते. तीन गुणांना मागें टाकणारी कालरात्रि त्याची मान होती. याप्रमाणें नाना वस्तु ज्याचें अवयव होते असें हयाशिर ( घोड्याचें तोंड) धारण करून विश्वांचा स्वामी गुप्त होऊन पृथ्वींत शिरला व त्याठिकाणीं शिरल्यांवर थोर योगसामर्थ्यानें शिक्षेला धरून मोठा स्वर त्यानें काढला त्या स्पष्ट ध्वनीनें सर्व वातावरण भरून राहिलें. याप्रमाणें एका टोंकापासून दुसऱ्या टोंकापर्यंत पाताळ शब्दानें भरून राहिलें असतां आपण वेदांना घेण्या-

स फिरून केव्हां येऊं ह्यासंबंधानें वेदांशीं संकेत करून ते दोन असुर त्या वेदांना खालीं पाताळांत ठेवून जेथून नाद उठतो आहेसा वाटला, त्याच्या अनुरोधानें ते निघाले. इतक्यांत त्या पाताळामध्यें असगारा हयशिर परमात्मा त्या वेदांना घेऊन ब्रह्मदेवांकडे आला व त्यानें ते त्याच्या स्वाधीन केले. याप्रमाणें वेद ब्रह्मदेवांच्या स्वाधीन करून त्यानें त्या हयशिराला ईशान्य महासागरांत ठेवून आपली मूलप्रकृति धारण केली. त्या दोन दैत्यांना ज्यापासून तो ध्वनि निघत होता तो पुरुष न सांपडून ते तरत परत आपल्या ठिकाणीं आले आणि पहातात तों ज्या ठिकाणीं वेद त्यांनीं ठेविलें होतें तेथें ते त्यांना दिसेनात. तेव्हां मोठ्या जलदीनें पाताळांतून निघून ज्यांपासून त्यांचा जन्म झाला होता त्या कमलाकडे आले. त्या ठिकाणीं आदिकर्ता अनिरुद्धाच्या स्वरूपांत चंद्राप्रमाणें झळकत त्यांना दिसला. आपल्या देहाला पुरे इतकी जागा व्यापून पाण्यामध्यें योगनिद्रेंत निष्कलंक अशा सत्वगुणानें युक्त असा तो, ज्याच्या तोंडांतून ज्वाला बाहेर पडत आहेत अशा शेषावर पडला होता. त्याला पाहून ते दानव गर्जून ह्मणाले, ' यानेंच आमचे वेद पाताळांतून चोरून आणले आहेत. हा कोणाचा कोण आहे ? हा असा सापावर कां पडला आहे ?' असें म्हणून त्यांनीं त्याला योगमायेंतून जागें केलें; तेव्हां आपल्याशीं हे लढण्याला आले आहेत असें जाणून त्यानेंही त्यांची इच्छा पूर्ण करण्याचें मनांत आणिलें व त्या रजतमांनीं युक्त अशा दोघांना मारून ब्रह्मदेवांना संतुष्ट केलें. तेव्हांपासून याला मधुसूदन ह्मणूं लागले. याप्रमाणें दोन राक्षसांना मारून ब्रह्मदेववांना वेद परत देऊन त्यांचा शोक त्यानें दूर केला. याप्रमाणें हरीच्या साह्यानें वेदांची मदत घेऊन ब्रह्मदेवांनीं त्यांतील सर्व चराचर भूतमात्रांसह सर्व लोक निर्माण केले. याप्रमाणें ब्रह्मदेवांना सृष्टि उत्पन्न करण्याला उत्तम बुद्धि देऊन परमात्मा अंतर्धान पावून जेथून आला होता त्या ठिकाणीं गेला. पुढें जगामध्यें प्रवृत्तिमार्ग सुरू करण्यासाठीं त्यानें फिरून एक वेळ हेंच रूप धारण केलें. या हयशिराचें माहात्म्य फार थोर आहे. कडक तपानें याचें भजन करून पांचाल ( गालव ) ऋषींनी रुद्रांनी दाखवून दिलेल्या मार्गानें वेदांतील क्रमाचें ज्ञान मिळविलें जगांतील कार्यें सुरळीत चालविण्यासाठीं जें जें रूप त्याला धरावेंसें वाटतें तें तें रूप तो आपल्या अंगांतील सामर्थ्यानें लगेच धरतो. वेद, तप, योग, सांख्य, हवि, हीं सर्व तोच असून वेद, यज्ञ, तप, गती सत्य,सरळपणा व ज्याच्या योगानें पुनर्जन्म स्वर्गीही नाहींसा होतो असा धर्म हीं सर्व त्याच्यावर अवलंबून आहेत. प्रवृत्त्यात्मक धर्मही नारायणात्मकच आहे. भूमींचा मुख्य गुण जो गंध,जलाचा जो रस,तेजाचा जो रूप, वायूचा जो स्पर्श, आकाशाचा जो शब्द हे सर्व गुण नारायणापासून आहेत. प्रकृतीचा गुण ज्याच्या ठिकाणीं आहे अशा मनालासुद्धां कारण नारायणच आहे.आकाशांतील ज्योतिषांच्या गतीवरून ज्याची गणना होते अशा कालालासुध्दां तोच कारण आहे. कीर्ति, श्री व लक्ष्मी यांनासुद्धां मूळ तोच आहे, सांख्य व योगशास्त्र यांचा आधारही तोच आहे. पुरुषरूपानें, त्याचप्रमाणें प्रकृतिरूपानें तो सर्वांला कारण आहे. ज्यावर सर्व वस्तू अवलंबून आहेत असा तो सर्वांचें अधिष्ठान, कर्ता व कारण आहे. या जगामध्यें ज्या नानाप्रकारच्या चेष्टा दिसतात त्या त्याच्यामुळेंच असून दैवही त्याच्यावांचून दुसरें कांहीं नाहीं. याप्रमाणें अधिष्ठान, कर्ता, कारण, चेष्टा व दैव या पांचांसंबंधानें चोहोंकडून कारण लावून तत्त्व शोधून काढणाऱ्यांना हरीवांचून यांत दुसरा कोणी कारण सांपडत नाहीं. हाच एकटा महायोगी हरी त्याला कारण सांपडतो. सर्व देव, योगी, ऋषी, वगैरेंचें हृद्गत त्या केशवाला कळतें; परंतु त्याचें हृद्गत कोणाला कळत नाहीं. देव व पितर यांसाठीं ज्या ज्या क्रिया केल्या जातात, जें जें दान दिलें जातें, जें जें तप केलें जातें त्या सर्वांना आश्रय विष्णु आहे. सर्वांचा तो आश्रयस्थान असल्यानें त्याला वासुदेव ह्मणतात. हा नित्य असून सर्वश्रेष्ठ आहे. हा मुख्य ऋषि आहे. याचें तप मोठें कडक आहे. हा सत्वादि तीन गुणांच्या पलीकडे आहे. ज्याप्रमाणें काळाला कांहीं स्वरूप नसून निरनिराळ्या ऋतूंनीं त्याला स्वरूप येतें त्याप्रमाणें वास्तविक हा निर्गुण असून आपल्याला व्यक्त करण्यासाठीं गुणवान बनतो. त्याची गती म-

हात्म्यांना सुद्धां कळत नाहीं, त्या गुणातीत अशा परमात्म्याचें स्वरूप केवळ ज्ञान्यांना कळतें.'

## २२३ एकनिष्ठ भक्तांची महती.
## ( १२. ३४८ )

जनमेजय ह्मणाला, 'एकनिष्ठ अशा भक्तांवर हरि संतुष्ट राहून विधिपूर्वक त्यांनीं केलेली पूजा हा स्वतः घेत असतो. पापरूपी सर्पण जाळून टाकून पापपुण्यांतून जे सुटले आहेत, ते, परंपरेनें मिळणाऱ्या गतीसंबंधानें आपण सांगितलें आहे, त्याप्रमाणें ( संकर्षण प्रद्युम्न, अनिरुद्ध यानंतरच्या ) चवथ्या स्थितींतच वासुदेवाला जाऊन मिळतात; परंतु जे एकनिष्ठ भक्त आहेत ते तावडतोव श्रेष्ठ पदाला मिळतात; ह्मणून हा एकांतभक्तीचा मार्ग श्रेष्ठ असून नारायणाला फार आवडता आहे;कारण यामध्यें पहिल्या तीन गतींमधून न जातां एकदम हरीकडे जातां येतें.जे ब्राह्मण यथाविधि उपनिषदांसह सर्व वेद पढले आहेत, ज्यांनीं यतिधर्म पाळला आहे, अशा ब्राह्मणांना जी गति मिळते तीहून हरिभक्तपरायण लोकांना मिळणारी गति श्रेष्ठ आहे; तेव्हां हा एकनिष्ठ भक्तीचा धर्म कोणत्या देवांनीं किंवा ऋषींनीं सांगितला ? यांचे आचार कशा प्रकारचे असतात ? ते कधीं उत्पन्न झालें वगैरे माहिती मला सांगा.' वैशंपायन ह्मणाले, 'कौरव पांडवांचें सैन्य युद्धाला जय्यत तयार होऊन उभें असून अर्जुनानें ऐन प्रसंगीं हातपाय गाळले असतां स्वतः भगवानानें निरनिराळ्या लोकांना ज्या निरनिराळ्या गती मिळतात व ज्या मिळत नाहींत ह्मणून सांगून ठेविलें आहे; त्यामध्येंच त्यानें सांगून ठेवलेला हा धर्म मोठा गहन असून ज्यांचें अंतःकरण शुद्ध झालें नाहीं अज्ञांना तो कळणें कठीण आहे. पूर्वी कृतयुगामध्यें सामवेदाला अगदीं धरून हा धर्म निर्माण करून स्वतः नारायणानें तो धारण केला. पूर्वी यासंबंधानें श्रीकृष्ण, भीष्म वगैरे मंडळीच्या देखत अर्जुनानें व्यासांना प्रश्न केला असतां त्यांनीं त्याला जें सांगितलें तेंच सांगतों ऐक. पूर्वी जे वेळीं केवळ परमात्म्या नारायणाच्या इच्छामात्रेंकरून त्याच्या मुखापासून ब्रह्मदेवाची उत्पत्ति झाली, तेव्हां स्वतः नारायणानें ह्या धर्माला अनुसरून आपलीं देवकार्यें व पितृकार्यें केलीं. नंतर फेंसावर राहणाऱ्या ऋषींना त्यापासून हा धर्म मिळाला; पुढें त्यांपासून वैखानस नांवाच्या ऋषींना व त्यांपासून सोमाला हा धर्म मिळाला; पुढें हा जगांतून नाहींसा झाला; पुढें जेव्हां ब्रह्मदेवांचा जन्म नारायणाच्या डोळ्यांपासून झाला तेव्हां सोमापासून हा धर्म फिरून ब्रह्मदेवांला मिळाला. त्यांनीं हा नारायणस्वरूपी धर्म रुद्रांला दिला, रुद्रांनीं वालखिल्याला हा समग्र धर्म पढविला. पुढें त्या नारायणाच्या मायेनें हा फिरून नाहींसा झाला.पुढें नारायणाच्या वाणीपासून ब्रह्मदेवाचा तिसरा जन्म झाला असतां फिरून हा धर्म स्वतः नारायणापासून उत्पन्न झाला व त्या श्रेष्ठ पुरुषापासून तो सुपर्ण नांवाच्या ऋषींना मिळाला. सुपर्ण हा रोज तीन वेळ पढत असत ह्मणून याला जगांत त्रिसुपर्ण ह्मणण्याचा परिपाठ पडला. याचा उल्लेख ऋग्वेदांत आहे. यांत सांगितलेले धर्म पाळण्याला फार कठीण आहेत. सुपर्णापासून असा सर्व प्राणिमात्रांचे प्राणाला आधारभूत हा शाश्वत धर्म वायूला मिळाला. त्यानें तो यज्ञावशेष अतिथि वगैरेंना देऊन, नंतर तो स्वतः खाऊन त्यावर राहणाऱ्या ऋषींना सांगितला. त्या ऋषींपासून तो महासागराला मिळून फिरून तो गुप्त होऊन नारायणामध्यें जाऊन मिळाला. पुढें त्या नारायणाच्या कानापासून ब्रह्मदेवांची पुनः उत्पत्ति झाली असतां त्या वेळेला त्यांना मुखापासून व पायापासून सृष्टि उत्पन्न करण्यास सांगून त्यांच्या कल्याणासाठीं या कामाला पुरेसें त्यांना सामर्थ्य व बल दिलें, व सात्वत नांवानें प्रसिद्ध हा धर्म त्यांना दिला व त्याच्या योगानें कृतयुग निर्माण करून त्याची सर्व नीट व्यवस्था लावण्यास सांगितली. याप्रमाणें तो श्रेष्ठ धर्म, त्यांतील सर्व रहस्य व सार, त्याचप्रमाणें आरण्यकें यांसह ब्रह्मदेवांना देऊन, 'निरनिराळ्या युगांतील पाळावयाचे धर्म तुझ्यापासून निघतील,' असें सांगून नारायण अंतर्धान पावून तमाच्या पलीकडच्या ज्या ठिकाणीं आशेवांचून कर्में होत असतात अशा ठिकाणाला गेला. पुढें लोक पितामह ब्रह्मदेवांनीं सर्व स्थावरजंगमात्मक लोक निर्माण केले व प्रथम कल्याणकारक अशा कृतयुगाला सुरवात हो-

ऊन ते वेळीं हा सात्वत धर्म सर्वत्र व्यापून होता. त्याच धर्मानें प्रभु ब्रह्मदेव नारायणाची पूजा करीत असत. पुढें लोकहितासाठीं ह्या धर्माचा प्रसार व्हावा ह्मणून स्वारोचिष नांवाच्या मनूला त्यांनीं हा धर्म सांगितला. त्या मनूपासून त्याचा मुलगा जो शंखपद त्याला मिळून त्यापासून सर्व दिशा व उपदिशांचा स्वामी जो त्याचा मुलगा सुवर्णाभ त्याला तो मिळाला व त्याला तो मिळून पुढें तो नाहींसा झाला. पुढें फिरून त्रेतायुग सुरू होऊन ते वेळीं ब्रह्मदेवांची नारायणाच्या नाकापासून उत्पत्ति झाली असतां ब्रह्मदेवांच्यापुढें हा धर्म नारायणानें उच्चारला. पुढें ब्रह्मदेवांपासून सनत्कुमारांना व सनत्कुमारांपासून प्रजापति वीरण यांना हा धर्म मिळाला. पुढें त्यांपासून रैभ्याला व त्यापासून त्याच्या शुद्ध व व्रतशील बुद्धिमान अशा कुक्षी नांवाच्या मुलाला तो मिळून फिरून तो नाहींसा झाला. फिरून ब्रह्मदेवांची नारायणाच्या अंडांपासून उत्पत्ति झाली असतां हा धर्म नारायणाच्या तोंडून ब्रह्मदेवांना मिळून त्यांच्यापासून बर्हिषद् नांवाच्या ऋषींना व त्यांपासून सामवेदामध्यें पूर्ण अशा ज्येष्ठ नांवाच्या ब्राह्मणाला मिळाला; ह्मणून याला ज्येष्ठसामव्रतहरी हें नांव मिळालें. त्यापासून हा धर्म अविकंपनाला मिळून फिरून हा नाहींसा झाला व पुढें हा जो ब्रह्मदेवांचा कमलापासून झालेला सातवा जन्म त्यामध्यें नारायणानें हा ब्रह्मदेवांला सांगून ब्रह्मदेवांपासून दक्ष, दक्षापासून त्याच्या आपल्या मुलीचा मुलगा सवित्याचा वडील जो आदित्य त्याला मिळाला व त्यापासून विवस्वानाला मिळाला. नंतर मनूला व मनूपासून इक्ष्वाकूला मिळाला, व इक्ष्वाकूनें प्रसार केल्यावरून हा सर्व जगामध्यें पसरला. प्रलयकालीं हा फिरून नारायणामध्यें जाऊन मिळेल. हा मोठा थोर सनातन धर्म असून तो सहज कळण्याला व आचरण्याला कठीण आहे. सत्वगुणांनीं युक्त अशा लोकांजवळच हा असतो. ज्यामध्यें हिंसात्मक कांहीं नाहीं अशा कर्तव्यजागृतीनें चांगल्या रीतीनें शेवटास नेलेल्या कर्माच्या योगानेंच नारायण संतुष्ट होतो. कोणी याला ( अनिरुद्धाच्या ) एकरूपामध्यें, कोणी ( अनिरुद्ध व प्रद्युम्न अशा ) दोन रूपांमध्यें, कोणी ( अनिरुद्ध, प्रद्युम्न व संकर्षण अशा ) तीन रूपांमध्यें, व कोणी ( अनिरुद्ध, प्रद्युम्न, संकर्षण व वासुदेव अशा ) चार रूपांमध्यें भजतात. हा नारायणच क्षेत्रज्ञ असून हा संपूर्ण आहे. सर्व प्राणिमात्रांमधील पंचमहाभूतांच्या गुणांच्या पलीकडचा जीव हाच आहे. पंचेंद्रियांना प्रवर्तक असें मन हाच आहे. बुद्धिमान असा हाच लोकांची उत्पत्ति करून व्यवस्था लावणारा आहे. हा कांहीं करणारा नसून सर्व कांहीं कर्ता हाच आहे; त्याचप्रमाणें कार्य व कारण आहे. याच्या मनाला वाटेल त्याप्रमाणें यानें हा खेळ मांडला आहे. याप्रमाणें हा एकनिष्ठ भक्तीचा मार्ग मीं तुला सांगितला. एकभावानें नारायणाची भक्ति करणारे फार थोडे असतात. जर सर्व प्राणिमात्रांवर दया करणारे, आत्मज्ञानी व परहित करण्यामध्यें गढलेले असे लोक असते तर कृतयुग सुरू झालें असतें व सर्व लोक निष्काम कर्म करण्यांत गढले असते. जे लोक पूर्णपणें नारायणाची भक्ति करतात त्यांना शेवटीं ब्रह्मस्वरूपी त्या नारायणाची प्राप्ति होते.'

जनमेजय ह्मणाला, 'महाराज, ज्ञानी लोकांनीं पाळलेला हा नानाप्रकारचा धर्म निरनिराळ्या व्रतांमध्यें गढलेले दुसरे लोक कां पाळीत नाहींत?' वैशंपायन ह्मणाले, ' प्राणिमात्रांचा या देहाशीं संबंध जडतो त्याबरोबर सात्विक, राजस व तामस असे तीन प्रकारचे स्वभाव उत्पन्न होतात, जो सात्विक गुणांनीं युक्त असतो तो खात्रीनें मोक्षाला जाणार हें ठरलेलें असतें. या सत्वगुणाच्या योगानेंच मनुष्याला ब्रह्मवेत्ता ओळखतां येतो. हा मोक्ष केवळ नारायणावर अवलंबून असल्यानें यालाच सात्विक समजलें आहे. या नारायणाचें एकभक्तीनें चिंतन केल्यानें मनुष्याची बुद्धि चांगली होऊन जे कोणी अशा प्रकारचे यती मोक्षधर्माकडे लागतात त्यांची तृष्णा समूळ नाहींशी होते व भगवान नारायण त्यांचे योगक्षेम वहातो. जन्ममरणाच्या दुःखांत सांपडलेल्या ज्याच्याकडे भगवान नारायण कृपादृष्टीनें पहातो तो सात्विक पुरुष होऊन मोक्ष खात्रीनें त्याला ठेवलेला आहे. एकनिष्ठेनें जे नारायणाची भक्ति करतात त्यांचा हा धर्म सांख्यमार्गाच्या तोडीचा आहे. हा स्वीकारल्यानें नारायणात्मक मोक्ष मिळून उत्तम गति मिळते. ज्याच्यावर नारा-

यणाची कृपादृष्टि होते त्यालाच ज्ञान होतें. केवळ स्वेच्छामात्रेंकरून कोणाला ज्ञान होणें शक्य नाहीं. राजस व तामस यांचा ज्यामध्यें अंश आहे त्याला मिश्र प्रकृति ह्मणतात. जन्ममरणाच्या फेऱ्यांत सांपडलेल्या अशा प्रकारच्या लोकांवर प्रवृत्तीच्या फेऱ्यांत ते पडले असल्यामुळें हरीची दृष्टि कधीं जात नाहीं. या दोन हलक्या गुणांचा त्यांच्यावर पगडा बसल्यानें ब्रह्मदेवांची त्यांच्यावर नजर राहून जन्ममरणाच्या फेऱ्यांत सांपडलेले असे ते त्यांना दिसत असतात. देव व ऋषी हे सत्वगुणी असतात खरे; परंतु सूक्ष्म प्रकारचा सत्वगुण त्यांच्या ठिकाणीं नसल्यानें अहंकारविकारानें युक्त असें ते समजले जातात.' जनमेजय ह्मणाला, 'मग अशा प्रकारच्या या लोकांना मोक्ष कसा मिळतो व यासंबंधानें प्रवृत्ति कशी होते ?' वैशंपायन ह्मणाले, 'पंचविसावा जो जीव तो कर्मापासून सुटला असतां अगदीं सूक्ष्म सत्वगुणसंपन्न व ॐकारांतील अ, ऊ, म, ह्या तीन अक्षरांनीं युक्त अशा श्रेष्ठ पुरुषाला जाऊन मिळतो. सांख्यशास्त्र, आरण्यक वेद, पंचरात्र हीं सर्व एकाचींच अंगें आहेत. सर्व नारायणमय आहे. हाच एकनिष्ठ भक्तीच्या लोकांचा धर्म असतो. ज्याप्रमाणें समुद्रामधून कितीही निरनिराळ्या लाटा निघाल्या तरी त्या सर्व पुनः एका समुद्रांतच मिळतात, त्याप्रमाणें या निरनिराळ्या प्रकारच्या ज्ञानाच्या लाटा एका नारायणापासूनच निघून फिरून त्यामध्यें जाऊन गडप होतात. याप्रमाणें हा सात्वत धर्म काय आहे तो मीं तुला सांगितला. हा एकांतधर्म गृहस्थादिक शुभ्र वस्त्रधारी, त्याचप्रमाणें यती या सर्वांना सारखाच आहे. हा आचरण्याला फार कठीण आहे. या जगाला कायम ठेवणारा व मोह पाडणारा उत्पत्ति करणारा व संहार करणारा हाच नारायण आहे.'

## २२४ सांख्य, योग, पांचरात्र, आरण्यक इत्यादिकांचा मेळ. (१२. ३४९)

जनमेजय ह्मणाला, 'सांख्य, योग, पांचरात्र, आरण्यक हीं निरनिराळीं शास्त्रें लोकांत चालू आहेत. या सर्वांमध्यें धर्मतत्त्वें एकच सांगितलीं आहेत कां निरनिराळीं आहेत ?' वैशंपायन ह्मणाले, तुझ्या प्रश्नाचें उत्तर देण्यापूर्वीं जे ब्रह्मदेवांपासून सहावे नारायणाचा अवतार आहेत असे विभूतिमान, मोठे उदार व अज्ञान दूर करणारे गुरुवर्य व्यास यांना मी नमस्कार करतों. या वेदांच्या निधानांना नारायणानें पूर्वीं कृतयुगामध्यें आपले पुत्र ह्मणून उत्पन्न केले.' जनमेजय ह्मणाला, 'पूर्वीं वसिष्ठांचे मुलगे जे शक्ति त्यांच्या पराशर नांवाच्या मुलापासून यांचा जन्म झाला असें आपण सांगितलें व आतां यांचा नारायणापासून जन्म झाला ह्मणतां तेव्हां यांत खरें कोणतें ? यांचा पूर्वींचा एखादा जन्म नारायणापासून झाला किंवा कसें? तसें असेल तर त्यासंबंधानें मला हकीकत सांगा.' वैशंपायन ह्मणाले, 'सांगतों ऐक. पूर्वीं सातव्या कमलापासून सृष्टीच्या उत्पत्तीच्या वेळीं शुभ व अशुभ या दोहोंपासून अलग असा महायोगी नारायण यानें प्रथम ब्रह्मदेवांना नाभिकमलापासून उत्पन्न करून शहाणी व मूर्ख अशी नानाप्रकारची प्रजा उत्पन्न करण्यास सांगितलें. तेवेळीं ब्रह्मदेवांना चिंता पडून ते त्याला ह्मणाले, 'माझ्या अंगांत प्रजा उत्पन्न करण्याची काय शक्ति आहे. मी मूढ आहें हें लक्षांत घेऊन काय करावयाचें तें करा.' असें ब्रह्मदेव ह्मणाले असतां अंतर्धान पावून ब्रह्मदेवांनीं बुद्धीचें स्मरण केलें; तेव्हां ती मूर्तिमान येऊन त्यांपुढें उभी राहिली असतां तिला योगसामर्थ्य देऊन भगवानानें तिला लोक उत्पन्न करण्याच्या कामांत सिद्धि येण्यासाठीं ब्रह्मदेवांमध्यें शिरण्यास सांगून व स्वतः त्याच ठिकाणीं अंतर्धान पावून आपल्या दैदीप्यमान अशा स्थानाला निघून गेले व आपल्या मूल अव्यक्त प्रकृतीला मिळून सर्वांशीं एकमय होऊन गेले. तेवेळीं ब्रह्मदेवांनीं निर्माण केलेली नानाविध प्रजा पाहून त्यांच्या मनाला वाटलें कीं, 'ब्रह्मदेवानें दैत्य, दानव, गंधर्व, राक्षस इत्यादिकांनीं भरलेली पृथ्वी निर्माण केली आहे. ही बिचारी त्यांच्या भाराखालीं दडपून जाईल. पृथ्वीवर पुष्कळ बलशाली दैत्य, दानव, राक्षस तप करून मजपासून खात्रीनें वर मिळवितील व त्या वरदानांनीं गर्व चढून देव व ऋषी यांना ते पीडा देऊं लागतील; तेव्हां नाना अवतार घेऊन दुष्टांना दंड व साधूंवर अनुग्रह क-

रून या बिचाऱ्या पृथ्वीचें रक्षण करीन तरच ही सत्यस्वरूप पृथ्वी कायम राहील; कारण, पातालामध्यें शेषरूपानें मी हिला आधार देऊन असल्यानेंच सर्व चराचर विश्वाला हिचा आधार मिळतो; ह्मणून निरनिराळे अवतार घेऊन हिचा मला सांभाळ करावा लागणार. वराह, नारसिंह, वामन इत्यादि अवतार धरून मला अडदांड देवशत्रूंना मारावे लागणार. असा विचार करून पुढें त्यानें 'भोः' असा शब्द उच्चारून सर्व पृथ्वी भरून टाकिली. या त्याच्या मुखांतून निघालेल्या सरस्वती रूप वाणींतून अपांतरतमा नांवाचे भूत वर्तमान भविष्य जाणणारे सारस्वत ऋषी उत्पन्न झाले. ते परमात्म्यापुढें मस्तक लववून नम्र झाले असतां देवांचा अधिभूत जो अव्यय नारायण यानें त्यांना वेदांची व्यवस्था लावण्यास सांगितलें. त्याप्रमाणें स्वायंभू मनूच्या कल्पांत त्या ऋषींनीं वेदांची त्याप्रमाणें निरनिराळी व्यवस्था लाविली. त्याच्या योगानें त्याचप्रमाणें त्यांचें कडक तप, यम व नियम यांनीं संतुष्ट होऊन भगवान परमात्मा त्यांना ह्मणाला, 'निरनिराळ्या मन्वंतरामध्यें याप्रमाणें तूं वेदांची व्यवस्था लावशील व याकरितां तूं अचल राहून कोणाची तुझ्यावर मात्रा चालणार नाहीं; तसेंच फिरून कलियुग आलें असतां तुझ्यापासून भरत कुलांत झालेले कौरव नांवानें प्रसिद्ध राजे होतील. तुझ्यापासून यांचा जन्म होऊन त्यांच्या कुळांत फूट पडेल व तुझ्याशिवाय या सर्वांचा फडशा पडेल. तेवेळीं ही वेदांची निरनिराळी व्यवस्था तुझ्या हातून लागेल. हें कलियुग आलें कीं, तुझा वर्ण काळा राहील व नानाविध धर्मांचा तूं प्रवर्तक होशील. तुझ्या हातून कडक तप होईल; परंतु विषयवासनेपासून मात्र तूं मुक्त होणार नाहींस. परंतु शंकराच्या प्रसादानें तुझ्या मुलाला तें वैराग्य येऊन ते मुक्त होतील. आतां जे ब्रह्मदेवांच्या इच्छामात्रेंकरून झाले आहेत असें ह्मणतात व ज्यांचें तेज सूर्याहून जास्ती आहे अशा तपोनिधि वसिष्ठांच्या शक्ती नांवाच्या मुलाचे मुलगे जे पराशर त्यांपासून एका कुमारिकेच्या ठिकाणीं तुझा जन्म होईल. तुला भूतवर्तमानभविष्यासंबंधानें कांहीं संशय न उरतां शेंकडों हजारों वर्षांचें तुला ज्ञान राहील, व पुढचेंही शेंकडों हजारों वर्षांचें कळेल. त्यावेळीं अज व अमर हातांत चक्र घेतलेल्या अशा माझें यादव कुलामध्यें कृष्णरूपानें तुला दर्शन होईल. या सर्व गोष्टी माझ्यासंबंधीं तुझ्या एकनिष्ठ भक्तीनें घडून येतील. तूं अगदीं जगद्विख्यात होऊन तुझी मोठी कीर्ति होईल. सूर्यपुत्र शनैश्चर हाच पुढें एका युगामध्यें त्यावेळचा एक मनु होईल; त्या मन्वंतरामध्यें तूं निरनिराळ्या मन्वंतरांतील मनूंपेक्षांही माझ्या प्रसादानें श्रेष्ठ रहाशील. ह्या जगामध्यें जें जें ह्मणून आहे तें सर्व माझ्या चेष्टेचें फल आहे. मनुष्याचे विचार निराळे व फल निराळें असें होऊं शकतें; परंतु माझ्यासंबंधानें सर्व माझ्या मनाप्रमाणें घडत असतें.' याप्रमाणें त्या अपांतरतम मुनींना सांगून त्यांना जाण्यास सांगितलें. याप्रमाणें व्यासांच्या पूर्वजन्माचा इतिहास आहे.'

'आतां तूं पूर्वी विचारलेल्या सांख्य, योग, पांचरात्र वेद व पाशुपत इत्यादि निरनिराळ्या नांवांखालीं मोडणाऱ्या या शास्त्रांच्या संबंधानें सांगतों ऐक. सांख्यशास्त्र कपिलमुनींपासून निघालें आहे असें ह्मणतात. वेदशास्त्रांच्या उत्पादक प्रत्यक्ष पुरातन ब्रह्मदेव आहे. वर सांगितलेले अपांतरतमे हे वेदांचे आचार्य आहेत. कोणी यांना प्राचीनगर्भही ह्मणतात. भूतपति शंकर यांच्या तोंडून हें पाशुपत शास्त्र बाहेर पडलें आहे, व हें पांचरात्र तर प्रत्यक्ष नारायणाच्याच तोंडून बाहेर पडलें आहे. या सर्व शास्त्रांमध्यें केवळ नारायणासंबंधानेंच सांगितलें असून त्या त्या शास्त्रांतील त्या त्या ज्ञानाप्रमाणें एकट्या नारायणावरच निष्ठा ठेवण्यास या सर्वांत सांगितलें आहे. तमानें ज्यांची दृष्टि गेली आहे ते हा अशा प्रकारचा आहे हें ओळखत नाहींत. जे विद्वान व शहाणे लोक आहेत, ते हें सर्व जग त्यानें व्यापिलें असून त्यावांचून कांहीं नाहीं असें समजतात, ज्यांचे मनांतील संशय दूर झाले आहेत अशांच्या हृदयांमध्यें प्रभु नारायण राहिला आहे. ज्यांचें मन संशयात्मक असून जे तर्कांच्या जोरावर वादविवाद करतात त्यांच्या ठिकाणीं तो कधीं नसतो. पांचरात्र शास्त्र कळून त्यांत सांगितल्याप्रमाणें जे वागत असतात व त्यांत सांगितलेले धर्म एकाग्रतेनें पाळतात ते या हरीमध्यें मिळून जातात. सांख्य, योग व सर्व वेद हीं शाश्वत आहेत. या सर्व शास्त्रांमध्यें हें सर्व

पुरातन विश्व नारायणच आहे असें ऋषींचें ह्मणणें आहे. स्वर्ग, पृथ्वी, अंतरिक्ष व पाणी यांपैकीं कोठें-ही घडणारीं वेदांत सांगितलेलीं बरीं वाईट कर्में त्या-च्यापासूनच निघून घडतात, ह्मणून सर्व तोच आहे.'

---

## २२९ पुरुषाचा एकानेकत्वविचार
## ( १२. ३५०–५१ )

जनमेजय म्हणाला, 'पुरुष अनेक आहेत किंवा एकच? व एकच असल्यास दृश्यमान सर्व पुरुषांचें उत्पत्तिनिमित्त असा तो या जगांमधील श्रेष्ठ पुरुष कोण? सर्वांचें मूळ काय?' वैशंपायन म्हणाले, 'लोकांत सांख्य व योग यांच्या विचारानें बरवर या शास्त्राला अनुसरणारे सामान्य दृष्टीनें एकच पुरुष आहे असें म्हणत नाहींत; अर्थात् ते पुरुष अनेक मानतात. पण सामान्यदृष्ट्या अनेक पुरुषांची उत्पत्ति त्या एकट्या श्रेष्ठ पुरुषापासूनच मानली आहे व त्याच अलौकिक गुणांनीं युक्त अशा पुरुषाशीं हें सर्व जग एकमय आहे. तें कसें तें सांगतों ऐक. पुरुषासंबंधानें हा विचार सर्व वेदांमध्येंच सांगितला असून ऋत् व सत्य हा पुरुषच आहे. अध्यात्मविचारासंबंधानें विचार करून कपिल प्रभृति मुनींनीं यासंबंधी आपले विचार सामान्यतः व विशेष रीतीनें सांगितले आहेत. पुरुषाच्या एकत्वासंबंधानें व्यासांचें काय मत आहे तें थोडक्यांत सांगतों ऐक. या संबंधांत ब्रह्मदेव व महादेव यांचा पुढील संवाद उदाहरण देतात. क्षीरसमुद्राच्यामध्यें वैजयंत नांवाचा सोन्याप्रमाणें दैदीप्यमान पर्वत आहे. आपल्या झगझगीत अशा रहाण्याच्या ठिकाणापासून ब्रह्मदेव त्या ठिकाणीं जाऊन, अध्यात्म विचार करीत बसत. याप्रमाणें ते एकदां तेथें बसले असतां त्यांच्या कपाळापासून उत्पन्न झालेले महादेव जगांतून फिरतां फिरतां ब्रह्मदेवांना त्या पर्वतावर बसलेले पाहून त्या ठिकाणीं एकदम खालीं उतरले, व त्यांनीं मोठ्या प्रेमानें त्यांच्यापुढें जाऊन त्यांचे पाय धरले.त्यांना हात धरून उठवून ब्रह्मदेवांनीं कुशल वगैरे विचारून तप, वेदाध्ययन वगैरे नीट चाललें आहेना म्हणून विचारलें. तें सर्व ठीक चाललें आहे असें सांगून ते म्हणाले, 'आपण आपली दैदीप्यमान जागा सोडून या एकांताच्या ठिकाणीं कां येऊन बसलां आहां? याचें कारण जाणून घेण्याची मला मोठी उत्सुकता लागली आहे. याला कांहीं लहानसान कारण नसावें.' ब्रह्मदेव ह्मणाले, 'या ठिकाणीं नेहमीं येऊन बसून एकाग्रतेनें विराट्स्वरूपी पुरुषाचें मीं चिंतन करीत असतों.' रुद्र म्हणाले, 'आपण स्वतः स्वयंभू असून आपल्यापासून पुष्कळ पुरुष उत्पन्न झाले आहेत व होत आहेत, व तो विराट्स्वरूपीही एक पुरुष आहे. तेव्हां आपण या कोणत्या एकट्या पुरुषाचें चिंतन करीत आहां?' ब्रह्मदेव म्हणाले, 'तूं म्हणतोस त्याप्रमाणें पुष्कळ पुरुष आहेत खरे; परंतु मीं ज्याचें चिंतन करीत आहें तो एकटाच असून तो या सर्वांच्या पलीकडचा व अदृश्य आहे. या जगांत असणारे जे पुष्कळ पुरुष यांना तो आधार असून हे सर्व अनंत पुरुष त्या एकट्या पुरुषापासून झाले आहेत, त्या अर्थीं त्यांना गुणांना बाजूला करतां आलें म्हणजे या निर्गुण, गुणातीत, शाश्वत अशा विराट्स्वरूपी परमात्म्याशीं ( पुरुषाशीं ) एक होऊन जातां येतें. या पुरुषाचें लक्षण असें आहे. तो शाश्वत, अव्यक्त, अक्षय, अनुमान करतां न येण्यासारखा व सर्वत्र भरून राहिलेला आहे. तुला किंवा मला तो दिसण्याजोगा नाहीं. ज्यांना बुद्धि व इंद्रियें असून आत्मनिग्रहादि गुण नाहींत, त्यांला तो कधीं दिसावयाचा नाहीं. ज्ञानानेंच फक्त तो दिसणारा आहे. स्वतःला देह नसून तो सर्वांच्या देहांमध्यें आहे व सर्वांच्या देहांमध्यें रहात असून तो त्यांपासून अलिप्त आहे. तो माझा अंतरात्मा आहे, तुझा आहे. सर्वांच्या हृदयांमध्यें त्यांचीं कर्में पहात तो राहिला आहे. त्याला कोणाला कधींही धरतां येणार नाहीं. सर्वांचीं मस्तकें त्याचें मस्तक असून सर्वांचे हात, पाय, डोळे, नाक वगैरे सर्व त्याचे हातपाय वगैरे आहे. या क्षेत्र संज्ञक सर्व देहांमधून त्याचा एकट्याचा स्वैर संचार आहे. आणि हीं क्षेत्रें व सर्व बरीं वाईट कर्में तो जाणतो म्हणून त्या योगात्म्याला क्षेत्रज्ञ म्हणतात. त्याची या देहामध्यें गति कशी होते व यांतून तो बाहेर कसा पडतो हें कोणाला कळत नाहीं. सांख्य व योगमार्गांनीं मी त्या पुरुषाच्या गतीसंबंधानें विचार करीत बसलों

आहे; परंतु ती कांहीं मला कळत नाहीं. त्या पुरुषाचें मला ज्या प्रकारचें जसें ज्ञान झालें आहे, त्याचप्रमाणें त्याचा एकपणा व महत्त्व सांगतों ऐक. विद्वान याला एक पुरुष म्हणतात व यालाच महापुरुष असें नांव आहे. अग्नि एकच असून निरनिराळ्या ठिकाणीं जळतांना दिसतो. सूर्य एकच असून निरनिराळ्या ठिकाणीं प्रकाशतांना दिसतो, सर्व तपांचें मूल एकच आहे. एकच वारा या जगामध्यें नानातऱ्हेनें वहात असतो. पाण्याचें मूळ एकटाच महासागर आहे; त्याचप्रमाणें विश्वरूपी निर्गुण असा पुरुष एकटा असून त्यामध्यें सर्व प्राणिमात्र गडप होतात. या अचिंत्य पुरुषाचें अस्तित्व उमगून अनिरुद्ध, प्रद्युम्न वगैरे चार सूक्ष्म स्वरूपांमध्यें त्याला ओळखूं लागल्यानें मनुष्याच्या मनाला शांति येऊन तो त्या परमात्म्याला पावतो. योग मतासारख्या मताचे कांहीं लोक व सांख्य जीवात्मा व परमात्मा एकच समजतात. जो परमात्मा आहे तो नेहमीं निर्गुण आहे आणि तोच नारायण; तोच सर्व विश्वाचा आत्मा असून तोच पुरुष. कमलावरच्या पाण्याप्रमाणें कर्मफलांचा त्यावर कांहीं परिणाम होत नाहीं. कर्म करीत रखडणारा आत्मा दुसरा आहे व तो मोक्ष किंवा पाश यांना त्याच्या कर्माप्रमाणें जखडून असतो. हा सतरा तत्त्वांनीं युक्त आहे. याप्रमाणें नानाप्रकारच्या पुरुषांसंबंधानें सांगितलें; परंतु जो वास्तविक एक पुरुष आहे तो या विश्वासंबंधीं सर्व विधींचा आधारभूत आहे. श्रेष्ठज्ञान त्याचप्रमाणें जाणणारा व जाणण्याची वस्तु, विचार करणारा व विचार करण्याची वस्तु, खाणारा खाद्य, वास घेणारा वास, घेण्याचा पदार्थ, स्पर्श करणारा, स्पर्श करण्याचा पदार्थ, पहाणारा किंवा दृश्य वस्तु, ऐकणारा व श्राव्य वस्तु, ज्ञाता, ज्ञेय वस्तु, ज्याला नित्य, शाश्वत व अव्यय असा प्रधान म्हटलें आहे व ज्याच्या योगानें धात्यासंबंधानें मूळ विधि उत्पन्न झाला, त्याला अनिरुद्ध म्हणतात. वेदांपासून उत्पन्न झालेलें चांगलें कर्म जगामध्यें सुरू असतें त्याला मूळ तोच आहे. सर्व देव व ऋषी शांतपणें प्राग्वंश स्थंडिलाजवळ उभे राहून यज्ञभाग वांटीत असतां त्याला हे त्या हवी मधला पहिला भाग देतात. याप्रमाणें अनिरुद्धादि चार स्वरूपांमध्यें स्वतःला विभागून घेऊन तो परमात्मा या जगांत रमला आहे. अशा प्रकारचा हा परमात्मा आपल्या ज्ञानाच्या योगानें जागा आहे. याप्रमाणें सांख्य व योग यांमध्यें सांगितलेलें तुझ्या प्रश्नाचें उत्तर आहे.'

## २२६ नाग व ब्राह्मण यांचा संवाद—उंछवृत्ति. (१२. ३५२–६५)

युधिष्ठिर भीष्मांना ह्मणाला, 'मोक्षधर्मासंबंधानें आपण सांगावयाचें तें सांगितलें. बाकीच्या आश्रमांमध्यें राहून धर्माप्रमाणें वागणाऱ्यांमध्यें श्रेष्ठ कोण सांगा.' भीष्म म्हणाले, 'ज्या त्या आश्रमांत सांगितलेले धर्म योग्य रीतीनें पाळले असतां ते स्वर्ग व थोर सत्य फल देणारे होतात. ज्याला अनेक द्वारें आहेत, अशा या धर्मासंबंधानें कोणतीही क्रिया फुकट जात नाहीं. जो कोणी मनुष्य, कोणताही धर्म श्रद्धेनें दृढनिश्चयपूर्वक स्वीकारतो तो बाकी सर्वांपेक्षां त्या धर्माची स्तुति करतो. पूर्वीं इंद्रानें नारदांना, या जगांत आपल्याला अद्भुत काय वाटतें म्हणून विचारिलें असतां त्या प्रश्नाचा उद्देश डोळ्यांपुढें ठेवून त्यांनीं त्याला पुढील गोष्ट सांगितली. ते म्हणाले, 'गंगेच्या दक्षिण तीराला पद्मनाभ नांवाचें शहर आहे. त्या ठिकाणीं सोमवंशामध्यें झालेला एक भला विप्र ईश्वराकडे लक्ष लावून होता. सोमवंशामध्यें त्याचा जन्म झाला असून वेदांमध्यें त्याची बरीच गती होऊन त्याचे संशय दूर झाले होते. नेहमीं क्रोध व वैर हें सर्व सोडून तो धर्मामध्यें गढून होता. भल्यांना तो मान्य असून न्यायानें पैसा मिळवून जी विशेषवृत्ति त्यानें धरली होती, त्याप्रमाणें तो यथायोग्य वागत होता. पुष्कळ मुलेंबाळें पाहून तो विशेष पुण्याचरण करीत राहिला. त्याचें वर्तन नेहमीं चोख होतें. वेदोक्त, शास्त्रोक्त व लौकिक अशा तीन प्रकारच्या धर्मासंबंधानें मनांत येऊन, 'काय केल्यानें माझें कल्याण होईल, काय मला केलें पाहिजे,' म्हणून तो नेहमीं विचार करीत असून त्याचा निश्चय कोणत्याही संबंधानें ठरेना. याप्रमाणें तो चिंताकुल असतां कोणी एक मोठा धर्मिष्ठ ब्राह्मण त्याच्याकडे आला. त्याचा विधिपू-

वेक सत्कार वगैरे करून त्यानें जरा विसावा घेतल्यावर तो ब्राह्मण त्या अतिथीला म्हणाला, 'आपल्या गोड भाषणानें मला अगदीं मोहून टाकिलें आहे. स्नेहभावानें मी आपल्याला कांहीं विचारतों त्याचें उत्तर द्या. गृहस्थधर्म मुलाच्या हवालीं करून श्रेष्ठ धर्माकडे लागावें म्हणतों, तर याला मार्ग कोणता? स्वतःला आत्म्याकडे लावून मी आपली व आत्म्याची एकस्थिति करूं इच्छितों. सामान्य संसारपाशांनीं मला जखडून टाकावें अशी माझी इच्छा नाहीं. आजपर्यंत माझें वय मुलें, बाळें वगैरे होण्याकडे लक्ष देऊन त्यामध्यें गेलें; तेव्हां आतां तरी परलोकाची शिदोरी कांहीं बरोबर घेण्याच्या खटपटीला लागावें म्हणतों. या संसारसागराच्या पैलतीराला जाण्याची इच्छा मला उत्पन्न झाली आहे; पण त्याला धर्मरूपी नाव कोठून मिळणार कळत नाहीं. देवादिक सात्विक वृत्तीच्या लोकांना सुद्धां पीडा सोसावी लागून कर्मफळें भोगावीं लागतात हें व यमाचे ध्वज व निशाणें सर्व प्राणिमात्रांच्या डोक्यावर फडकत आहेत हें पाहून अनेक भोग्य वस्तूंचा उपभोग घेतांना त्या ठिकाणीं माझें मन रमत नाहीं. त्याचप्रमाणें यतींना आपल्या उदरनिर्वाहाकरितां भिक्षेवर रहावें लागतें, तेव्हां तोही मार्ग मला पसंत नाहीं. तेव्हां बुद्धि व बल यांच्या जोरावर चालणारा एखादा धर्म मला सांगा.' यावर तो अतिथि म्हणाला, 'अशाच प्रकारचे विचार माझ्या मनामध्यें येत असून त्यासंबंधानें माझा अजून कांहीं निर्णय ठरला नाहीं. कोणी मोक्ष चांगला म्हणतात, कोणी यज्ञयागादिक कर्मे करून त्यांचें फल चांगलें म्हणतात. कोणाला वानप्रस्थाश्रम बरा वाटतो, कोणाला गृहस्थाश्रम बरा वाटतो, कोणाला राजधर्म बरा वाटतो, कोणाला आत्मनिग्रहानें मिळणारें ज्ञानच वस्स असतें; कोणाला गुरु व वडील यांच्या सेवेनें पदरीं पडलेला धर्मच बरा वाटतो, कोणाला तोंड बंद करणें बरें वाटतें; कोणी आईबापांची चांगली शुश्रूषा करून, कोणी दयाभूतपणा धरून, कोणी सत्यानें वागून, कोणी लढाईला तोंड देऊन त्यांत मरून, कोणी उंच्छवृत्तीनें, याप्रमाणें अनेकांनीं अनेक प्रकारें स्वर्गमार्ग सुधारला आहे. कोणीं वेदाध्ययनाकडे लक्ष दिलें आहे, कोणीं आत्मनिग्रह करून स्वर्गप्राप्ति करून घेतली आहे, कांहीं प्रामाणिक व सरळ लोकांना दुष्टांनीं मारल्यामुळें स्वर्ग मिळून तेथें त्यांना मान मिळाला आहे. याप्रमाणें हजारों वाटांनीं लोक स्वर्गाला जात असतात. वाऱ्यानें विस्कळून टाकलेल्या मेघाप्रमाणें तुझ्या प्रश्नानें माझी बुद्धि गोंधळून गेली आहे; तरी तुला एक मार्ग सांगतों. त्याप्रमाणें कर म्हणजे तुझें कार्य होईल. ज्या ठिकाणीं पूर्व सृष्टीच्या वेळीं धर्मचक्र सुरू झालें त्या नैमिषारण्यामध्यें नागाव्हय नांवाचें शहर आहे. सर्व देवांनीं पूर्वीं त्या ठिकाणीं जमून एक मोठा यज्ञ केला. त्या ठिकाणीं राजा मांधात्यानें इंद्राचा पराभव केला. पद्मनाभ किंवा पद्म नांवाचा एक धर्मात्मा बलवान नाग त्या ठिकाणीं रहात आहे. कर्म, ज्ञान व भक्ति या तीन मार्गांनीं चालून कायावाचामनानें तो सर्वांना संतुष्ट करतो. सर्व गोष्टींवर नीट विचार करून सामदानादि चार उपायांनीं पापी लोकांना शिक्षा करून पुण्यवानांवर कृपा करून त्यांचें तो रक्षण करतो. तेथें जा म्हणजे तो तुला श्रेष्ठ धर्म कोणता हें सांगेल. अतिथींची त्याला मोठी आवड आहे व त्याला शास्त्रज्ञान चांगलें आहे. त्याच्यामध्यें जे गुण आहेत ते दुसऱ्यामध्यें सांपडणें कठीण. पाण्याच्या योगानें करावयाचे सर्व विधि त्याला स्वभावतः आवडतात. वेदाध्ययनामध्यें त्याचें लक्ष आहे. आत्मनिग्रहानें तो तपामध्यें गढून असतो. यज्ञ करून तो चांगलें दान देतो. कोणाची हिंसा करीत नाहीं. क्षमाशील व सत्यभाषणी असून मत्सर म्हणून त्याला ठाऊक नाहीं. त्याचें वर्तन योग्य असून इंद्रियें पूर्ण ताब्यांत आहेत. अतिथी, आश्रित वगैरे लोकांना दिल्यावर मग तो अन्न घेत असतो. त्याचें भाषण मोठें अनुकूल असतें. चांगलें कोणतें, सरळ व रास्त कोणतें, निंद्य कोणतें हें त्याला कळतें. आपण केलें काय व काय करावयाचें उरलें याचा त्याच्याजवळ हिशोब असतो. सर्व प्राणिमात्रांच्या जें हिताचें असेल तें करण्यामध्यें तो गढला असतो. गंगेच्या पाण्याप्रमाणें शुद्ध व निष्कलंक अशा कुलांत त्याचा जन्म आहे.' याप्रमाणें त्याचें भाषण ऐकल्यावर तो ब्राह्मण म्हणाला, 'हें आपलें समाधानकारक भाषण ऐकून शिरावरचें एखादें

मोठें ओझें उतरल्याप्रमाणें मला झालें आहे. वाट चालून दमलेल्याला आंथरूण, उभा राहून दमलेल्याला आसन, तान्हेल्याला पाणी, भुकेल्याला अन्न, व अतिथीला घरांत शिरल्यावरोबर जेवण, मुलासाठीं आतुर झालेल्या ज्ञात्याला मुलगा किंवा मनांत चिंतिल्याबरोबर झालेली प्रियजनांची भेट त्याप्रमाणें आपलें भाषण मला आनंद देत आहे. डोळे लावून असलेल्या मनुष्याप्रमाणें हें आपलें भाषण ऐकून त्यावर मी विचार करीत आहें. आपल्या सांगण्याप्रमाणें उद्यां मी तिकडे जाण्याला निघतों. आपण ही रात्र येथें काढून श्रम दूर करा. सूर्याचीं किरणें मंद पडून तो खालीं चालला आहे.' याप्रमाणें बोलून त्यानें त्याचें आतिथ्य केलें व ती रात्र त्याच्याबरोबर संन्यासधर्माच्या गोष्टी बोलण्यांत सुखांत घालवून उजाडल्यावर त्याची पूजा करून त्याला निरोप देऊन त्यानें सांगितल्याप्रमाणें मनाचा दृढ निश्चय करून तो नागाव्हय नगराकडे निघाला. नाना रम्य वनें, सरोवरें व तीर्थें ओलांडून तो चालला असतां एक मुनी त्याला वाटेंत भेटले. त्यांपासून नागपुरीची माहिती घेऊन तो ब्राह्मण थेट पुढें निघाला व त्या नागाच्या घरीं येऊन, 'अहो घरांत कोण आहे, मी एक ब्राह्मण अतिथी आलों आहे,' म्हणून ओरडून म्हणाला. तें ऐकून त्या नागाची धर्मशील पतिव्रता स्त्री पुढें आली. आतिथ्य करण्यामध्यें नेहमीं दक्ष असणाऱ्या तिनें स्वागतपूर्वक त्याची पूजा करून, 'काय आज्ञा आहे,' म्हणून विचारलें. ब्राह्मण म्हणाला, 'तुझ्या या मधुर शब्दांनीं माझा चांगला सन्मान होऊन माझे श्रम दूर झाले आहेत. तुझ्या पतीची भेट घेण्यासाठीं मी मुख्यतः येथें आलों आहें. येथें येण्याचा माझा मुख्य हेतु काय तो एवढाच आहे.' नागस्त्री म्हणाली, 'ते सूर्याचा रथ ओढण्यासाठीं एक महिन्यासाठीं तिकडे गेले आहेत. सात आठ दिवसांनीं ते परत येतील. हें ते घरीं नसण्याला कारण आहे. दुसरें कांहीं काम असेल तर सांगा.' यावर ब्राह्मण म्हणाला, 'मी मुद्दाम त्याला भेटण्यासाठींच आलों आहें; तेव्हां या शेजारच्या अरण्यामध्यें मी त्याची वाट पहात रहातों. तो आल्याबरोबर प्रथम मी आल्याचें वर्तमान त्याला कळावी व मलाही तो आला म्हणजे कळीव; तोंपर्यंत मी या गोमतीच्या तीरावर त्याची वाट पहात कसाबसा रहातों.' असें म्हणून गोमतीच्या तीराला तो जाऊन राहिला.

त्या ठिकाणीं कांहीं न खातां तो रहात असल्यामुळें तेथील नागांना वाईट वाटलें व त्या नागराजाचे जे बांधव, भाऊ, मुलगे, बायका वगैरे होत्या ती सर्व मंडळी जमून, एकांतामध्यें वाळवंटावर व्रतस्थ रीतीनें कांहीं न खातां जपामध्यें गढून राहिलेल्या त्या ब्राह्मणाजवळ येऊन फिरून फिरून त्याला स्पष्टपणें म्हणाली कीं, आज आपल्याला येथें येऊन सहा दिवस झाले. आपण कांहीं खात नाहीं. आपण आमच्याकडे तर आलां आहां, आपलें आतिथ्य करणें हें आमचें काम आहे; कारण आह्मी सर्व त्या नागाच्या कुटुंबांतील आहों; म्हणून आह्मीं आपणांकडे आलों आहों. फलमूलें, पानें, पाणी किंवा अन्न काय जें आपल्या मनाला वाटेल तें आपण कृपा करून खावें. आपण कांहीं न खातां वनांत राहिला असल्यामुळें अतिथिधर्म बुडतो म्हणून आबालवृद्धांना वाईट वाटत आहे; कारण भ्रूणहत्या करणारा उपजतांच ज्याचें मूल मेलें आहे किंवा देव अतिथी किंवा दुसरे यांना न देतां त्यांच्या आधीं खाणारा, असा आमच्या कुटुंबामध्यें आजपर्यंत कोणी झाला नाहीं.' ब्राह्मण म्हणाला, 'तुमच्या या आग्रहामुळें मी जेवलों असें समजा; नागाला येण्याला आठ दिवसांची अवधि आहे. आठ दिवसांत जर तो आला नाहीं तर मी आहार घेईन; कारण हें व्रत मीं त्यासाठीं आरंभिलें आहे. तुह्मी उगीच वाईट वाटून घेऊं नका. आलां तसे परत जा. त्यासाठीं आरंभिलेलें हें व्रत तुह्मी मोडूं नका.' याप्रमाणें त्यानें समाधान करून जाण्यास सांगितलें असतां आलेलें काम न होतां ते आपल्या घराकडे परत गेले. पुढें ठरलेली वेळ संपल्यावर सूर्याची कामगिरी बजावून त्याची आज्ञा झाली असतां तो नाग परत आला; तेव्हां त्याची साध्वी बायको सामोरी जाऊन तिनें पाय वगैरे धुतल्यावर तिला त्यानें विचारिलें, 'हे कल्याणी, मीं पूर्वी सांगितल्याप्रमाणें व तशा सारख्याच अन्य प्रकारानें देवता व अतिथी यांच्या पूजेमध्यें तूं लक्ष दिलें हो-

तेंसना ? स्त्रीस्वभावाला अनुसरून माझ्या वियोगामुळें धैर्य सुटून त्याच्या योगानें धर्ममर्यादा तर तूं उल्लंघन केली नाहींसना? ' स्त्री म्हणाली, ' गुरुशुश्रूषा हें शिष्याचें, वेदाध्ययन करून तें लक्षांत ठेवणें हें ब्राह्मणाचें, यजमानाची आज्ञा पाळणें हें नोकरांचें, प्रजापालन हें राजाचें, सर्व भूतमात्रांचें रक्षण करणें हें क्षत्रियाचें, यज्ञयागादिक करून अतिथीसत्कार करणें वैश्याचें व तिन्ही वर्णांची शुश्रूषा करणें शूद्रांचें कर्तव्य आहे. नेहमीं बाताबेतानें खाऊन व्रतशील राहणें हें सर्वांचें कर्तव्य आहे. आणि अशा रीतिनें रहात असतां इंद्रियांचा धर्माशीं विशेष संबंध येतो. जो संन्यास घेऊन राहिला आहे त्यानें मी कोण, कोणाचा,कोठून आलों,अशा विचाराकडे लक्ष देऊन नेहमीं असावें. तसेंच बायकोला पातिव्रत्य हाच श्रेष्ठ धर्म सांगितला आहे आणि आपल्या उपदेशानें तो मला पूर्ण कळत आहे. याप्रमाणें मला धर्म कळत असून आपणही अशा प्रकारें धर्मशील असतांना मला मार्ग टाकून वाईट वाटेला मीं कशी लागेन ? देवतांचें एवढें सुद्धां कमी पडूं न देतां अतिथींच्या सत्कारामध्यें मी नेहमीं दक्ष असतें; परंतु आज सात आठ दिवस झाले कोणी ब्राह्मण आपल्याकडे आला आहे.काय काम आहे तें कांहीं तो मला सांगत नाहीं. आपल्याला भेटावयाचें आहे ह्मणतों. या गोमतीच्या कांठीं आपल्याला भेटण्याला उत्कंठित होऊन कडकडीत व्रत पाळीत वेद ह्मणत तो राहिला आहे. त्यानें मला, ' नाग आल्याबरोबर माझ्याकडे पाठवून दे ' म्हणून सांगितलें आहे. तेव्हां डोळेच ज्यांना कान आहेत, असे आपण त्याला जाऊन भेटावें असें मला वाटतें. '

नाग ह्मणाला, 'ब्राम्हणरूपामध्यें तो कोण असावा असें तुला वाटतें ? एखादा सामान्य मनुष्य असावा किंवा देव असावा ? कारण कोणता मनुष्य याप्रमाणें मला भेट म्हणून हुकूम करण्याला समर्थ आहे ? देव, असुर, देवर्षी या सर्वांमध्यें नाग मोठे वीर्यवान व वेगवान असून त्यांच्या अंगाला एकप्रकारचा घमघमाट येत असतो. लोकांनीं विशेषेंकरून मनुष्यांनीं] आम्हांला वंदन करून आमच्या मागून असावें म्हणून त्याला कांहीं भेटूं नये असें मला वाटतें.' त्याची बायको म्हणाली, 'त्याच्या एकंदर सरळपणावरून तो देव नसावा असें मला वाटतें. तशीच त्याची आपल्यावर पूर्ण भक्ति असून पावसाची वाट पहात बसलेल्या चातकाप्रमाणें तो आपली वाट पहात आहे. आपली भेट न झाल्यामुळें त्याचें कांहीं बरें वाईट न होवो म्हणजे झालें. आपल्यासारख्या थोर कुलांत जन्मून अतिथींकडे असें दुर्लक्ष करून कोणी थोरपणाला चढला नाहीं. तेव्हां हा सहज आलेला राग टाकून त्याला भेटा. त्याचा हिरमोड करून आपल्याला जाळून घेऊं नका. आपल्याकडे आशेनें आलेल्या मनुष्याचे डोळे न पुसल्यानें राजा असो किंवा राजपुत्र असो, त्याला भ्रूणहत्येचें पातक लागतें. मौन धरल्यानें ज्ञानप्राप्ति होते, दानानें मोठी कीर्ति मिळते, खरें बोलल्यानें मनुष्याच्या अंगीं बोलकेपणा येऊन शिवाय स्वर्गामध्यें सुद्धां त्याला मान मिळतो. भूमिदान केल्यानें आश्रमवाशांना जी गति मिळते ती त्याला मिळते. न्यायानें पैसा मिळविल्यानें त्यापासून पुष्कळ इष्ट गोष्टी घडतात, नेहमीं स्वतःच्या हिताचें असेल तें यथासांग करीत राहिल्यानें मनुष्य कधीं नरकाला जात नाहीं, असें भल्या लोकांचें म्हणणें आहे.' हें ऐकून नाग म्हणाला, 'माझा जो हा ताठा तो गर्वामुळें नसून हा जातीचाच मोठा दोष आहे, तो तूं आज हा संकल्पापासून उत्पन्न झालेला राग आपल्या शब्दरूपी अग्नीनें जाळून टाकिला आहेस. रागापेक्षां वाईट मला दुसरें कांहींच दिसत नाहीं आणि त्या फाजील रागामुळेंच लोक नागांना विशेष नांवें ठेवितात. या रागामुळेंच तो प्रतापशील रावण इंद्राचा प्रतिस्पर्धी झाल्यानें रामांनीं त्याला मारिलें. आपल्या वाड्यांत शिरून परशुरामांनीं वांसरूं परत नेलें या अपमानानें रागावल्यामुळेंच परशुरामांनीं कार्तवीर्याला मारून त्याच्या मुलांचा फडशा पाडला; याप्रमाणें तपाच्या व कल्याणाच्या आड येणारा राग मी तुझ्या सांगण्यावरून हा पहा आवरला. तुझ्यासारखी बायको मिळाल्यानें मी आपल्याला विशेषेंकरून धन्य मानून घेतों. हा पहा मी त्या ब्राह्मणाकडे निघालों. तो आपलें काम सांगेल तर त्याचे हेतु परिपूर्ण होऊन तो येथून जाईल. ' असें म्हणून त्या ब्राह्मणाकडेसच लक्ष देऊन त्याचें काय काम असे-

ल म्हणून विचार करीत तो त्या ब्राह्मणाकडे आला, आणि मधुरशब्दांनीं त्याला म्हणाला, 'महाराज, मी आपल्याला हात जोडून विनवितों, आपण मजवर रागावूं नका. येथें आपण कोणाकडे व कशासाठीं आला? स्नेहामुळें मी आपल्याला विचारीत आहें.' हें ऐकून ब्राह्मण म्हणाला, मी धर्मारण्य नांवाचा ब्राह्मण असून पद्मनाभ नागाला भेटण्याकरितां आलों आहें. त्याच्याकडे माझें कांहीं काम आहे. तो येथें नसून बाहेर गेल्याचें त्याच्या लोकांकडून ऐकल्यावरून मी त्याची येथें वाट पहात आहें. त्याच्यावरील सर्व संकट दूर होऊन त्यानें खुशाल यावें म्हणून मी योगांत गढून वेद पढत आहें.' नाग म्हणाला, 'आपण मोठे धन्य आहां. हा मी आपल्या पुढें उभा आहें. काय आज्ञा आहे सांगा. आपण आल्याचें बायकोकडून कळल्यावरून मी आपल्याकडे आलों आहें. आपण जे मजकडे आला आहां ते आपले हेतु परिपूर्ण होऊन परत जाल. काय काम आहे तें निःशंकपणें सांगा. विशेषेंकरून आपल्या गुणांनीं आपण आम्हांला गुलाम करून टाकिलें आहे.' ब्राह्मण म्हणाला, मी तुझ्याकडे तुला भेटून कांहीं विचारावें म्हणून आलों आहें. मी आपल्या ठिकाणीं गढून आत्म्याला उत्तम गति मिळवून देण्याची इच्छा करीत आहें. मी या संसारांत गढूनही नाहीं किंवा यांतून सुटलोंही नाहीं. तूं आपले गुण व कीर्ति यांनीं झळकतो आहेस. आधीं माझ्या प्रस्तुत उत्पन्न झालेल्या प्रश्नांचें उत्तर दे. मग मी आपल्या येण्याचें काम सांगेन. तूं सूर्याचा रथ ओढण्याला आपल्या पाळीला गेला होतास तेव्हां त्या ठिकाणीं कांहीं आश्चर्यकारक पहाण्यांत आलें असेल तर तें मला सांग.' नाग म्हणाला, 'ज्याच्यापासून सर्व त्रैलोक्य उत्पन्न होतें तो भगवान् सूर्यनारायण अनेक आश्चर्यांचें ठिकाण आहे. फांद्यावरून बसणाऱ्या पक्ष्यांप्रमाणें त्याच्या हजारों किरणांच्या ठिकाणीं हजारों सिद्धि पावलेले देव व मुनि रहात असतात. जो वारा याच्यापासून निघून सूर्यकिरणांमध्यें राहून सर्व जगांत वृद्धिंगत होतो त्या वायूचे हा वेगळे वेगळे विभाग करून पावसाळ्यांत पाणी पाडतो. ज्यां हा सूर्याच्या मंडळामध्यें परमात्मा राहून सर्व लोकांवर आपली तेजःपुंज दृष्टि टाकितो तो हा सूर्य आपल्या काळ्या किरणांनीं आकाशांत मेघ बनून आठ महिनेपर्यंत आपल्या शुद्ध किरणांनीं पाणी शोषून घेऊन पुढें चार महिनें तें पृथ्वीवर सोडतो. याच्या एका विशेष तेजामध्यें परमात्म्याचें वास्तव्य असून तोच सर्वांचें बीज व ह्या चराचर पृथ्वीचें धारण करणारा आहे. ज्याला आदि किंवा अंत नाहीं अशा प्रकारचा शाश्वत पुरुषोत्तम त्याच्या ठिकाणीं राहिला आहे. याहून आणखी आश्चर्य तें काय असलें पाहिजे; तथापि सर्व आश्चर्यांमध्यें आश्चर्यकारक अशी एक गोष्ट जी स्वच्छ अशा आकाशामध्यें सूर्याच्या जवळ असल्यामुळें माझ्या पहाण्यांत आली ती सांगतों; ऐक. एके दिवशीं भरदुपारच्या वेळीं सूर्य तापत असतां प्रतिसूर्याप्रमाणें एक पुरुष जिकडे तिकडे दिसूं लागला. तो आपल्या तेजानें चोहोंकडे उजेड पाडीत जणूं आकाश फाडीत सूर्याकडे येत होता. आहुति दिलेल्या अग्नीप्रमाणें त्याचीं किरणें पसरलीं होतीं. तो जवळ आला असतां सूर्यानें स्वागतासाठीं आपले दोन हात पुढें केले. तेव्हां त्यानेंही आपला उजवा हात पुढें करून सूर्याचा बहुमान केला. व याप्रमाणें आकाश भेदून तो सूर्यमंडळामध्यें जाऊन मिळाला व त्याचें आणि सूर्याचें तेज एक होऊन एका क्षणांत तो सूर्याशीं मिळून गेला. याप्रमाणें ते दोघे एकत्र होऊन गेल्यावर त्यांपैकीं सूर्य कोण व हा नवीन आलेला गृहस्थ कोण याचीच आम्हांला पंचाईत पडून हा नवीन आलेला गृहस्थ कोण म्हणून आम्हीं सूर्याला विचारिलें; तेव्हां सूर्य म्हणाला, 'हा देव, असुर किंवा नाग असा कोणी नसून उंच्छवृत्तीनें सिद्धि मिळवून स्वर्गाला गेलेला एक मुनि आहे. फलमूलें, गळून पडलेलीं पानें, पाणी, वायु यांवर एकनिष्ठेनें राहून त्यानें संहितांनीं शंकरांची स्तुति करून स्वर्गद्वाराची खटपट केली व त्याप्रमाणें त्याला स्वर्ग मिळाला. कोणाची संगत न करतां व कशाची इच्छा न करतां नेहमीं उंच्छवृत्तीनें राहून सर्व भूतांच्या हितामध्यें हा दक्ष होता. उत्तम गतीला मिळालेल्यांची बरोबरी देव, गंधर्व, असुर, नाग यांना सुद्धां करतां येत नाहीं.'

ब्राह्मण म्हणाला, 'मोठें आश्चर्य खरें आणि या

तुझ्या भाषणांनीं मला वाट दाखविली आहे. आतां तूं खुशाल ऐस. मी येतों. माझी आठवण राहूं दे.' नाग म्हणाला, 'आलेलें काम न सांगतां निघालां कोठें? काय काम आहे तें सांगा. काम सांगून तें झाल्यावर मग माझा निरोप घेऊन जा. झाडाखालीं उतरल्याप्रमाणें नुसतें असें भेटून मी जाऊं देणार नाहीं. आपलें मजवर व माझें आपल्यावर प्रेम जडल्यासारखें झालें आहे. हे सर्व नगरवासी लोक आपले आहेत; तेव्हां आतां विचार कसला?' यावर ब्राह्मण म्हणाला, 'तूं म्हणतोस तें खरें आहे. तुला आत्मज्ञान झालें आहे. देव तुझ्याहून जास्ती नाहींत, आमच्या तुमच्यांमध्यें भेद नाहीं. तूं, मी व सर्व भूतमात्र या सर्वांना त्या एका ठिकाणींच जावयाचें आहे. पुण्यसंचय कोणत्या प्रकारानें करावा याबद्दल मला संशय होता तो या तूं सांगितलेल्या उंच्छवृत्ती ब्राह्मणाच्या उदाहरणानें दूर झाला आहे. आतां मी आपल्या हिताच्या पाठीमागें लागतों. माझें काम झालें.' असें म्हणून त्याचा निरोप घेऊन तो ब्राह्मण निघून गेला व त्या नागानें सांगितल्याप्रमाणें वनांत जाऊन यमनियमादि पाळीत मोजक्या उंच्छवृत्तीवर राहून शेवटीं मोक्षाला गेला.'

# १३ अनुशासनपर्व.

## २२७ गौतमी, व्याध, सर्प, मृत्यु व काळ यांचा संवाद. (१३. १)

युधिष्ठिर म्हणाला 'अहो पितामह आपण माझी आतांपर्यंत पुष्कळ तऱ्हेनें समजूत घातलीत, परंतु माझ्या मनाला शांति ती कसली मिळत नाहीं. साहजिकच आहे; ज्यांच्या हातून प्रत्यक्ष कांहीं अपराध घडला आहे त्यांची नुसत्या शब्दांनीं कशी समाधानी व्हावी? तात, तुमचें हें बाणांनीं विद्ध झालेलें शरीर पाहून माझें मन सारखें तळमळतें. तुम्हांला माझ्याकरितां अशी अवस्था प्राप्त झाली! तसेंच माझ्याकरितां हजारों राजेही आपल्या मुलांबाळांसह प्राणाला मुकले. कौरवांनीं व आम्हीं कालाच्या आधीन होऊन रागाच्या झंपाट्यांत हें निंद्य कर्म केलें. आतां याबद्दल आम्हांला कोणची गति मिळणार हें समजत नाहीं. त्यांतल्या त्यांत दुर्योधनच माझ्यापेक्षां भाग्यवान म्हणावयाचा! कारण तो आपलें हें दुःख पहाण्याला तरी राहिला नाहीं. हा प्रसंग माझ्याच कपाळीं आला. अशा रीतीनें जगण्यापेक्षां मरणें काय वाईट? असो. आतां तरी पुढें या पातकापासून आम्ही कसें मुक्त होऊं. हें आपणाला आमच्या कल्याणाची इच्छा असेल तर सांगा.'

भीष्म म्हणाले, 'तुझ्याकडे कांहीं नसून तूं कां व्यर्थ या सर्व कृत्यांबद्दल आपल्याला दोषी मानून घेतोस. यासंबंधांत गौतमी, व्याध, सर्प, मृत्यु व काळ यांच्यामध्यें झालेलें भाषण मी तुला सांगतों ऐक. गौतमी नांवाची कोणी एक वृद्ध स्त्री होती ती मोठी साध्वी असून नेहमीं शांत असे. कोणे एके वेळीं तिचा मुलगा साप चावून मेला. नंतर त्या सापाला अर्जुनक या नांवाच्या व्याधानें बांधून गौतमीच्या पुढें आणलें; व 'या दुष्टाला अग्नींत टाकूं किंवा याचे तुकडे तुकडे करूं,' म्हणून त्यानें तिला विचारलें. तेव्हां गौतमी म्हणाली, 'अर्जुनका, तूं मूर्ख आहेस, तुला कळत नाहीं, याला न मारतां तसाच सोडून दे. पुढचा विचार न करितां प्राणिहत्या करून मुद्दाम नरकाचें साधन कोणीं करून घ्यावें? धर्मनिष्ठ लोक नावेप्रमाणें धर्मरूपीनावेनें या भवसागरांतून तरून पार पडतात. प-

रंतु पातकी लोक लोखंडी शस्त्राप्रमाणें दिवसेंदिवस खालींच बुडत जातात. याला मारल्यानें माझा मुलगा कांहीं परत येत नाहीं. बरें याला जिवंत ठेविल्यानेंही तुझें कोणत्याही तऱ्हेनें नुकसान होत नाहीं. याला ठार केलें तर मात्र नरकाला तुला जावें लागेल.' व्याध ह्मणाला, 'देवि थोर लोक सर्वांच्या दुःखानें स्वतः दुःखी होतात हें मला माहीत आहे. परंतु असला उपदेश ज्याच्यावर प्रत्यक्ष कोणताही दुःखाचा प्रसंग आला नाहीं, त्याच्याच हातून होत असतो. ज्याला दुःख भोगावें लागतें त्याला हें सुचत नाहीं. शांत चित्ताचे साधू लोक, ज्याप्रमाणें दुःख आलें त्याप्रमाणें कालगतीनें तें नाहींसें होईल, असा विचार करून आपल्या मनाचें समाधान करून घेतात. जशास तसें या न्यायानें वागणारे अर्थवादी, ज्याच्यापासून आपल्याला दुःख भोगावें लागतें त्याचा नाश केला असतांच आपलें दुःख कमी होईल असा विचार करून ते दुःख देणाराचा नाश करून आपलें समाधान करून घेतात. आतां तिसऱ्या प्रकारचे मूर्ख लोक यांपैकीं कांहींच न करतां विनाकारण दुःख मात्र करीत बसतात. मी याला मारून तुझा शोक कमी करतों.' गौतमी ह्मणाली, 'सज्जन हे नेहमीं धर्मनिष्ठच असतात. माझ्यासारख्यांना असल्या गोष्टीपासून केव्हांही दुःख होत नाहीं. माझा मुलगा केव्हां तरी मरावयाचाच होता तो मेला. आतां या सापाचा मी फिरून नाश करूं इच्छित नाहीं. ब्राह्मणांना केव्हांही राग येत नाहीं. शिवाय राग करणाऱ्यांनाही नेहमीं दुःखच भोगावें लागतें. ह्मणून याला क्षमा करून सोडून दे. शत्रूला धरून ठार केल्यानें काय मिळतें? किंवा त्याला सोडून दिल्यानें काय मिळत नाहीं ?'

व्याध ह्मणाला, 'ह्याच्यापासून पुष्कळ प्राण्यांचें रक्षण करणें हेंच उचित आहे. धर्मात्मे अपराधी मनुष्याला नेहमीं नाहींसेंच करतात.' गौतमी ह्मणाली, 'याला मारल्यानें माझा मुलगा परत येत नाहीं किंवा दुसरा कोणताही फायदा होत नाहीं, ह्मणून विनाकारण याला कां मारावें?'

व्याध ह्मणाला, 'देवेंद्रानें वृत्रासुराला मारिलें. पिनाकपाणी शंकरांनीं यज्ञाला मारून आपला भाग मिळविला. त्याप्रमाणें आपल्या शत्रूंचा नाश करणें हेंच उचित आहे.'

अशा रीतीनें व्याध तिची पुष्कळ समजूत घालीत होता तरी सापाला मारावें असें तिच्या मनांत येईना. इतक्यांत आपल्या जिवाचा धडा करून अगदीं जखडला असल्यामुळें हळूंच श्वास टाकीत तो साप मानवीवाणीनें ह्मणाला.

'हे अर्जुनका, यांत माझा दोष काय आहे? मीं परतंत्र आहें. मृत्यूनें मला सांगितलें म्हणून मीं हें केलें. मीं आपल्या इच्छेनें रागाच्या आधीन होऊन या गौतमीच्या मुलाला चावलों नाहीं. व्याधा, याबद्दल जर कोणी दोषी असेल तर तो मृत्यु आहे.'

व्याध ह्मणाला, 'जरी तूं दुसऱ्याच्या आज्ञेनें हें निंद्य कर्म केलेंस तरी तूं या कर्माला कारण झालास हें खास. तेव्हां तुझ्याहीकडे दोष येतोच. मातीचें भांडें बनवितांना चाक व तें फिरविण्याकरितां हातांत धरण्याची कुंभाराची काठी हेही ज्याप्रमाणें त्यः मातीला भांड्याचें रूप देण्याला कारण होतात त्याप्रमाणें तूंही ह्याच्या वधाला कारण झाला आहेस. ह्मणून तुला या दोषाबद्दल ठार केला पाहिजे.' साप ह्मणाला, 'कुंभाराची काठी व चाक हीं ज्याप्रमाणें कुंभाराच्या आधीन असतात, त्याप्रमाणें मीही परतंत्र असल्यानें माझ्यावर हा दोष मुळींच लागूं होत नाहीं. लागूं होतो असें जर तुला वाटत असेल तर परंपरेनें सर्वांवरच लागूं होतो.'

व्याध ह्मणाला, 'तूं जर कारण नसतास तर तुला याला मारण्याचा दोष लागताना? ज्याअर्थी तूं मारलें आहेस त्याअर्थी अपराध तुझ्यावर लागूं होतो ह्मणून तुला ठार केलें पाहिजे. कोणतेंही दुष्ट कृत्य करून तें करणारावर जर त्याचा दोष लागूं होणार नाहीं तर या जगांत निंद्य कर्म करणारांना शासन करणेंच अयोग्य होईल.' साप ह्मणाला, 'कार्य नसेल तर कारण असून नसून सारखें ह्मणून कारणाकडे कोणचाही दोष येत नाहीं. आणि तूं जर मला या कर्माबद्दल कारण असें समजत असशील तर याचा दोष माझ्याकडे न येतां मला हें कर्म करावयाला लावणाराकडे जाईल.'

व्याध ह्मणाला, 'दुष्टा बालहत्या करून उगीच किती बडबडतोस, तुला ठार केलें पाहिजे हेंच खरें.'

साप ह्मणाला, 'ज्याप्रमाणें यज्ञामध्यें अग्नीला आहुती देणाऱ्या ऋत्विजांना त्याचें कांहींच फळ मिळत नाहीं त्याप्रमाणें मलाही ह्या माझ्या कर्माचें फल मिळणें योग्य होणार नाहीं.'

अशा रीतीनें व्याध व साप यांचें भाषण चाललें आहे, इतक्यांत मृत्यु तेथें येऊन तो सापाला ह्मणाला, 'सापा, मला कालानें सांगितलें ह्मणून मीं तुला सांगितलें. खरोखर यांत माझा किंवा तुझा मुळींच दोष नाहीं. ज्याप्रमाणें वाऱ्याच्या योगानें ढग इकडून तिकडे हलतात त्याप्रमाणें मीही कालाच्या आज्ञेनें सर्व कांहीं करतों. प्राणिमात्रांच्याठिकाणीं सात्विक, राजस किंवा तामस यांपैकीं जे जे गुण येतात तेही कालाच्या योगानेंच येतात. ही सर्व चराचरसृष्टी, स्वर्गांतील इंद्रादिदेवगण, विष्णु, सूर्य, अग्नि वगैरे देवता, आकाश, पर्जन्य, वायु वगैरे उपदेवता प्राणिमात्रांच्या ठिकाणची संसाराविषयीं प्रवृत्ति व निवृत्ति किंवा त्यांच्या ठिकाणचे नानाप्रकारचे विचार, प्राणिमात्रांचें ऐश्वर्य किंवा दारिद्र्य, फार काय पण हें विश्व देखील त्या कालाच्याच अनुरोधानें उत्पन्न होतें व पुन्हा नाशाला पावतें. असें असून सापा, तूं मजकडे याचा दोष कसा लावतोस? तुझ्या मतानें जर माझ्याकडे दोष येत असेल तर मग तूंही याबद्दल दोषी आहेस.' साप ह्मणाला, 'मृत्यो, मी तुला दोषी किंवा निर्दोषी कांहींच ह्मणत नाहीं. फक्त तूं मला हें कर्म करावयाला सांगितलेंस येवढेंच माझें ह्मणणें आहे. काल याबद्दल दोषी असो किंवा तोही नसो, आह्मां दोघांकडेही याचा दोष लागू होत नाहीं, एवढेंच मला सांगावयाचें आहे.' असें ह्मणून साप पुन्हा व्याधाला ह्मणाला, 'अर्जुनका, मृत्यु काय बोलला हें तूं ऐकलेंसच. मला निरपराध्याला विनाकारण जखडून बांधणें हें तुला उचित नाहीं.'

व्याध ह्मणाला, मीं तुमचें दोघांचेंही बोलणें ऐकलें, तरी पण तूं निर्दोषी मुळींच होत नाहींस. ह्या बालाच्या नाशाला तुह्मी दोघेही कारण आहां. ज्यांनीं कर्म केलें त्यांच्याहातून तें घडलें नाहीं असें ह्मणणें केव्हांही बरोबर होणार नाहीं. सबब प्राणिमात्रांचा नाश करणाऱ्या ह्या दुष्ट मृत्यूला धिक्कार असो! पाप्या, ह्या पातकाबद्दल मी तुला व या मृत्यूला दोघांनाही ठार करणार. मृत्यु ह्मणाला, 'जर विचार करून पाहशील तर आमच्याकडे मुळींच दोष येत नाहीं. कारण आह्मीं कालाचे आधीन आहों. कालाच्या अनुरोधानें वागणाऱ्या आह्मांला तूं याबद्दल दोषी मानूं नकोस.

अशा रीतीनें धर्मार्थाविषयीं वाद चालला असतांना काल तेथें आला व तो, मृत्यु, सर्प व व्याध यांना ह्मणाला, 'मी, हा मृत्यु किंवा हा साप यांपैकीं कोणीच प्राण्याच्या मरणाला कारण नाहीं. त्या गौतमाच्या मुलानें जें कांहीं कर्म केलें त्यानेंच आह्मांला त्याला मारावयाला लाविलें. याच्या स्वतःच्या कर्मावांचून याच्या नाशाला कारण दुसरा कोणी नाहीं. या जगांत प्राणिमात्रांना त्यांचें कर्मच तारतें किंवा मारतें. कर्माच्याच आज्ञेनें आह्मीं एकमेकांला प्रेरणा करून या गौतमाच्या मुलाला मारलें. ज्याप्रमाणें कुंभार आपल्या मातीच्या गोळ्याची वाटेल तशी आकृति बनवितो त्याप्रमाणेंच मनुष्यालाही कर्माच्या योगानें आपल्याला वाटेल तसें फळ मिळवितां येतें. ज्याप्रमाणें ऊन्ह आणि सावली यांचा एकमेकांशीं नित्य संबंध आहे त्याप्रमाणेंच कर्म आणि त्याचा कर्ता यांचाही एकमेकांशीं नित्यसंबंध आहे. यावरून मी, हा मृत्यु, साप, तूं किंवा ही वृद्ध गौतमी यांपैकीं या मुलाच्या मरणाला कोणीही कारण नाहीं. हा मुलगाच आपल्या नाशाला कारण झाला आहे.' हें ऐकून अर्जुनकाच्या मनांतील विषाद नाहींसा होऊन त्यानें सापाला सोडून दिलें व मृत्यु, काल व साप हे आपापल्या ठिकाणीं परत गेले.

याप्रमाणें धर्मा, तूंही प्राणिमात्रांच्या कर्माप्रमाणें त्यांना सुखदुःख प्राप्त होतें हें लक्षांत ठेवून शोक सोडून दे. आतांपर्यंत घडलेला हा सर्व प्रकार तूंही केला नाहींस किंवा दुर्योधनानेंही केला नाहीं. कालाच्या अनुरोधानेंच जें व्हावयाचें होतें तें झालें.' हें ऐकून राजा धर्माचें समाधान झालें; नंतर तो पुन्हा भीष्मांना ह्मणाला, 'अहो, महाप्राज्ञ तात, आपलें ह्मणणें मीं ऐकलें. आतां गृहस्थाश्रमांत राहून त्यांतील योग्य धर्माचरणानें मृत्यूला कोणीं जिंकिलें, हें मला सांगा.

---

## २२८ सुदर्शनाची गोष्ट–गृहस्थाश्रमधर्म. (१३.–२)

हें ऐकून भीष्म ह्मणाले ' राजा, प्रजापतिमनूला इक्ष्वाकु नांवाचा मुलगा झाला. त्या इक्ष्वाकूला पुढें शंभर मुलगे झाले. त्यांपैकीं दहावा मुलगा दशाश्व नांवाचा होता. त्या दशाश्वाचा मदिराश्व नांवाचा मुलगा अत्यंत धार्मिक व शूर होता. त्या मदिराश्वाला पुढें द्युतिमान नांवाचा मुलगा झाला. त्यालाच पुढें सुवीर नांवाचा एक जगविख्यात मुलगा झाला. त्या सुवीराचा सुदुर्जय नांवाचा एक मुलगा होता. सुदुर्जयाला दुर्योधन नावांचा मुलगा झाला. हाही अत्यंत धर्मनिष्ठ असून शूर होता. त्याच्या राज्यांत अवर्षण कधींही पडत नसे. त्याचें सर्व राज्य हिरे, माणकें, नानाप्रकारचे अलंकार, पशू व सर्वप्रकारचें धनधान्य यांनीं संपन्न होतें. त्याच्या राज्यांत दरिद्री, रोगिष्ट किंवा किरकोळ असा एकही मनुष्य नव्हता. तो नेहमीं यज्ञयाग करून ब्राह्मणांना विपुल दक्षिणा देत असे. हा उत्तम वेदवेत्ता असून यानें कधींही कोणाचा अवमान केला नाहीं. अत्यंत शूर असूनही हा जितेंद्रिय होता. पुढें कोणे एके वेळीं ह्या सर्वांगसुंदर शूर व धर्मनिष्ठ अशा राजाला पाहून देवनदी नर्मदा मोहित झाली. तेव्हां तिच्या विनंतीवरून यानें तिचें पाणिग्रहण केलें. नंतर या दुर्योधनापासून नर्मदेला सुदर्शना नांवाची अतिलावण्यवती मुलगी झाली. ती इतकी सुंदर होती कीं, तिच्या इतका सौंदर्यवान प्राणी आजपर्यंत कोणी झाला नाहीं. पुढें अशा प्रकारच्या तिला पाहून अग्नि मोहित झाला. ह्मणून त्यानें ब्राह्मणाचें रूप घेतलें व राजाकडे जाऊन तिच्याबद्दल मागणी केली. पण राजाच्या मनांत अशा प्रकारच्या दरिद्री ब्राह्मणाला आपली सुस्वरूप मुलगी द्यावी असें येईना. ह्मणून त्यानें नाहीं ह्मणून त्याला सांगितलें. त्याबरोबर तो ब्राह्मण तेथून गेला, पण लगेच ह्या राजाच्या यज्ञांतील अग्निही नष्ट झाला. हें पाहून राजाला फार वाईट वाटलें. तो सर्व ब्राह्मणांना ह्मणाला, ' हे द्विजश्रेष्ठहो, माझ्या हातून असें कोणतें पातक झालें आहे ह्मणून हा अग्नि नाहींसा झाला. कांहीं तरी महत्पातक झालें असलें पाहिजे. त्याशिवाय अग्नि नाहींसा व्हावयाचा नाहीं. आपल्याहातून किंवा माझ्याहातून काय अपराध झाला आहे याचा तपास लावा. ' हें राजाचें भाषण ऐकून सर्व ब्राह्मण अग्नीला शरण गेले. तेव्हां अग्नीनें त्या सर्व ब्राह्मणांना आपलें प्रत्यक्ष दर्शन दिलें व तो त्या ब्राह्मणांना ह्मणाला, ' मी दुर्योधनाच्या कन्येशीं लग्न करावें असें ह्मणतों. ' त्याप्रमाणें दुसरे दिवशीं प्रातःकाळीं उठून सर्व ब्राह्मण राजाकडे जाऊन झालेली सर्व हकीकत सांगूं लागले. तें ऐकून राजाला फार आनंद झाला. त्यानें ' बरें आहे; ' ह्मणून अग्नीची प्रार्थना केली व अग्नि आल्याबरोबर ' तूं नेहमीं माझ्या जवळ असावेंस, ' हेंच कन्याधन मला दे, ह्मणून त्यानें अग्नीला मागितलें. अग्नीनें तें कबूल केलें. त्याप्रमाणें माहिष्मती नगरीमध्यें अद्यापपर्यंत अग्नीचें सान्निध्य आहे. नंतर राजा दुर्योधनानें आपल्या कन्येचे अग्नीशीं विधिपूर्वक लग्न लाविलें. तिचें कुल शील व रूप पाहून अग्नीला फार संतोष झाला. त्याच्यापासून तिला सुदर्शन नांवाचा पूर्णचंद्राप्रमाणें तेजस्वी मुलगा झाला. हा लहानपणींच ब्रह्मवेत्ता झाला. ओघवान नांवाचा एक राजा होता. त्याला ओघवती नांवाची मुलगी व ओघरथ नांवाचा एक मुलगा अशीं दोन अपत्यें होतीं. ह्या राजानें स्वतःच ह्या विद्वान ब्राह्मणाला आपली ओघवती नांवाची मुलगी दिली. तिच्यासह आपल्या गृहस्थाश्रमाचे धर्म परिपूर्ण करण्याकरितां हा वेदनिष्ठ ब्राह्मण कुरुक्षेत्रामध्यें जाऊन राहिला. 'मी गृहस्थाश्रम पाळूनच मृत्यूला जिंकीन, ' अशी प्रतिज्ञा करून त्यानें आपल्या बायकोला अशी आज्ञा केली कीं, तूं अतिथीच्या उलट केव्हांही जाऊं नकोस. तो ज्यानें ज्यानें संतुष्ट होईल तें सर्व तूं कर. गृहस्थांना अतिथीच्या सेवेशिवाय दुसरें कर्तव्यच नाहीं. तेव्हां ही माझी आज्ञा पूर्ण लक्षांत ठेवून मी घरीं असो किंवा नसो, तूं अतिथींचा अवमान केव्हांही करूं नकोस. हें ऐकून ओघवतीनें नम्रपणें हात जोडून त्याला आपला रुकार दिला.

सुदर्शनाचा हा दृढ निश्चय पाहून मृत्यूही त्याची प्रतिज्ञा मोडण्याला लावण्याची संधि केव्हां मिळेल ह्मणून अगदीं टपून बसला. त्यानें तेव्हांपासून याची पाठ केव्हांही सोडली नाहीं. एकदां सुदर्शन

समिधा आणण्याकरितां बाहेर गेला असतां एक ब्राह्मण ओघवतीकडे येऊन ह्मणाला, 'साध्वि, आतिथ्याची इच्छा आहे. आतिथीचा सत्कार करणें हा गृहस्थाश्रमाचा धर्म आहे. तो तुला मान्य असेल तर तूं माझा सत्कार कर.' त्याबरोबर व्रतशील ओघवतीनें वेदोक्तविधिपूर्वक त्या ब्राह्मणाला आसनपाद्य वगैरे देऊन हात जोडून नम्रपणें काय आज्ञा आहे ह्मणून विचारलें. तेव्हां आतिथी ह्मणाला, 'कल्याणि, माझी तुझ्यावर इच्छा गेली आहे. गृहस्थाश्रमाला जागून एवढी माझी इच्छा पूर्ण कर.' तेव्हां तिनें त्याविरुद्ध त्याचें मन वळविण्याचा पुष्कळ प्रयत्न केला. परंतु तो ब्राह्मण कांहीं केल्या ऐकेनासा पाहून ओघवतीनें आपल्या पतीच्या आज्ञेनुरूप मोठ्या लज्जेनें त्या ब्राह्मणाच्या विनंतीला रुकार दिला.

इतक्यांत हिकडे सुदर्शन समिधा घेऊन आश्रमाकडे आला. तेव्हां ओघवती त्याला दिसेना. ह्मणून त्यानें, 'कोठें आहेस कोणीकडे आहेस,' ह्मणून मोठ्यानें हाक मारली. तेव्हां त्या ब्राह्मणानें तिला आपल्या हातानें धरली होती. एवढ्यानेंच, 'मी आतां उष्टी झालें,' असें वाटून लज्जित होऊन ती फार कष्टी झाली होती. यामुळें त्या साध्वीला आपल्या पतीच्या शब्दाला मुळींच प्रत्युत्तर देववेना! कांहीं उत्तर येत नाहीं असें पाहून सुदर्शनानें पुष्कळ गयावया येऊन प्रेमळपणानें तिला फिरून हाक मारली. तेव्हां आंतून त्या ब्राह्मणानें उत्तर दिलें, 'हे अग्निपुत्रा, मी ब्राह्मण तुझ्या येथें अतिथि आलों आहे. ही तुझी पत्नी आतिथीला योग्य अशा सर्व प्रकारच्या सत्कारानें मला संतुष्ट करीत असून मला रतिसुख देत आहे,' हें त्याचें भाषण चाललें आहे इतक्यांत मृत्यु हातामध्यें पाश व दंड घेऊन यानें आपली प्रतिज्ञा नष्ट केली तर त्याला तेथल्या तेथें मारावें ह्मणून तेथें येऊन उभा राहिला. परंतु सुदर्शनाला त्या ब्राह्मणाच्या भाषणाबद्दल वाईट वाटलें असें त्याच्या तोंडावरून दिसलें नाहीं. तो आनंदानें हासून ह्मणाला, 'हे ब्रह्मश्रेष्ठा, आलेल्या आतिथीचा यथोचित सत्कार करणें व त्याच्या इच्छा पुरवून त्याला संतुष्ट करणें हाच गृहस्थाश्रमीयांचा मुख्य धर्म आहे. माझी सर्व संपत्ति, बायको, फार तर काय प्रत्यक्ष माझे प्राणही मी आतिथीला देईन, अशी माझी प्रतिज्ञा आहे. पृथ्वी, वायु, आकाश, जल, ज्योति, हीं पंचमहातत्वें व बुद्धि, आत्मा, मन, काल आणि दहा दिशा हीं सर्व नेहमीं प्राणिमात्रांचें सुकृत किंवा दुष्कृत जें काय चाललें असेल तें लक्षपूर्वक पहात असतात. ह्मणून मीं माझी प्रतिज्ञा आजपर्यंत खरी केली असेल तर ह्या देवता माझें रक्षण करोत, नाहीं तर मला आतांच्या आतां जाळून भस्म करोत.'

असे त्या सुदर्शनाच्या तोंडून उद्गार निघाल्याबरोबर चहूंकडून एकदम, 'तूं आपली प्रतिज्ञा शेवटास नेलीस, तूं आपली प्रतिज्ञा खरी केलीस,' असा ध्वनि उमटला. नंतर अतिथीरूपानें आलेला तो तेजःपुंज ब्राह्मणही आश्रमांतून बाहेर आला व सर्व पृथ्वी दुमदुमून टाकणाऱ्या अशा आपल्या गंभीर स्वरानें सुदर्शनाला हाक मारून ह्मणाला, 'ईश्वर तुझें कल्याण करो. मी धर्म आहें. तुझी प्रतिज्ञा कसाला लावून पहाण्याकरितां मी आलों होतों, त्याप्रमाणें तूं सत्यप्रतिज्ञ आहेस हें पाहून मला फार संतोष झाला; जो तुझें उणें पहाण्याकरितां रात्रंदिवस तुझ्या मागोमाग हिंडतो आहे, त्या ह्या मृत्यूला तूं आपल्या निश्चयानें जिंकून टाकलेंस. तुझ्या ह्या साध्वी स्त्रीकडे नुसते डोळे उघडून पाहण्याची सुद्धां या अखिल विश्वांत कोणाची छाती नाहीं. हिनें आपल्या पातिव्रत्याला योग्य अशा सद्गुणांनीं व तुझ्या पुण्याईनें आपलें रक्षण करून घेतलें आहे. हिच्या तोंडातून जो शब्द निघेल, तो खरा होईल. आतां ही पतिव्रता आपल्या योगबलानें स्वतःचे दोन देह निर्माण करून एकानें तुझी सेवा करील व दुसऱ्यानें लोकांना त्याच्या पातकापासून मुक्त करण्याकरितां नदी होऊन पृथ्वीवर वहात राहील. हिच्यासह आतां तूं शाश्वतपदाला जाशील. तेथें गेल्यावर तुला पुनर्जन्म येणार नाहीं. गृहस्थाश्रमांतील धर्मानेंच तूं काम, क्रोध, स्नेह, राग, मोह यांना जिंकलेंस. त्याचप्रमाणें पंचमहाभूतें व मृत्यु यांनाही तूं जिंकलेंस. त्यामुळें तूं याच देहानें मुक्तिपदाला जाशील. तूं आपल्या ह्या तपोबलानें व गृहस्थाश्रमानें जेवढें पुण्य मिळविलेंस तेवढें पुण्य तुझ्या ह्या साध्वी स्त्रीनें केवळ तुझ्या से-

वेनेंच मिळविलें आहे. असें हा ब्राह्मण सांगत आहे इतक्यांत पांढरे शुभ्र हजार घोडे जुंपलेल्या रथांत बसून देवेंद्रही त्या सत्यप्रतिज्ञ ब्राह्मणाच्या दर्शनाकरितां तेथें आला.' याप्रमाणें याब्राह्मणानें अतिथीपूजनानेंच मृत्यु, पंचमहाभूतें कामक्रोधादि षड्विकार, यांना जिंकून अक्षयपद मिळविलें. गृहस्थाश्रमीयांना अतिथिपूजनासारखें दुसरें दैवतच नाहीं हें तूं लक्षांत ठेव. अतिथीनें संतुष्ट होऊन दिलेल्या आशीर्वादानें जें पुण्य मिळतें तें शंभर यज्ञ केल्यानेंही मिळत नाहीं. सत्पात्र असा अतिथी द्वारीं आला असतांना जो त्याचा अवमान करतो, त्याचें सर्व पुण्य त्या अतिथीला मिळतें व त्या अतिथीच्या पातकाचें ओझें याच्यावर बसतें.'

## २२९ विश्वामित्रांना ब्राह्मणत्व येण्याचें कारण. (१३.-३-४)

युधिष्ठिर म्हणाला, 'तात, क्षत्रिय, वैश्य व शूद्र ह्या तीन वर्णांला ब्राह्मणत्व मिळणें अशक्य आहे, असें असून क्षत्रियश्रेष्ठ विश्वामित्रांना ब्राह्मणत्व कसें मिळालें ? ह्या विश्वामित्रांनीं क्रोधवश होऊन वसिष्ठांचे शंभर मुलगे मारले, त्याचप्रमाणें रागाच्या सपाट्यांत आक्राळविक्राळ शरीराचे असे राक्षस निर्माण केले, ऋचिकाचा मुलगा शुनःशेप याला पशुरूप प्राप्त झालें असतां त्या रूपापासून ह्यांनीं आपल्या तपोबलानें त्याला मुक्त केलें. हरिश्चंद्राच्या यज्ञामध्यें यांनीं आपल्या तेजानें देवांना संतुष्ट करून राजा हरिश्चंद्राला मुलगा दिला. पण पुढें त्या वडील भावाला बाकीचे पन्नास भाऊ नमस्कार करीनात, तें पाहून विश्वामित्रांनीं त्यांना शाप दिला. त्याबरोबर ते पशुयोनींत गेले. इक्ष्वाकु कुळांतील त्रिशंकूला वसिष्ठांनीं शाप दिला असतां विश्वामित्रांनीं आपल्या तपोबलानें त्याला स्वर्गीं नेऊन दक्षिण दिशेस स्थान दिलें. त्याच ऋषीसत्तमांच्या प्रभावानें उत्पन्न झालेली कौशिकी नांवाची नदी अत्यंत पुण्यकारक आहे. ह्मणून मोठमोठे ब्रह्मर्षी व देवगण हिच्या कांठीं वास करतात. रंभा नांवाची दिव्य अप्सरा ह्यांच्या तपाचा भंग करण्याला आली असतांना तिलाच यांच्या शापानें पर्वत होऊन पडावें लागलें. वसिष्ठांनासुद्धां यांची भीति पडली होती. ते यांच्या भीतीनें एकदां पाण्यांतसुद्धां बुडून राहिले होते. पुढें त्या पाण्यांतून निघाल्यानंतर तेथें विपाश नांवाच्या पवित्र नदीचा उगम झाला. ते तपोधन वसिष्ठ आकाशामध्यें उत्तर दिशेला ध्रुव व सप्तर्षी यांच्यामध्यें आपल्या तेजानें झळकत आहेत. या क्षत्रियांचें अशाप्रकारचें अद्भुत कर्म पाहून मला मोठें कौतुक वाटतें. तात दुसरा जन्म न घेतां त्याच जन्मांत त्याच देहाला ब्राह्मणत्व कसें मिळालें ? शूद्रापासून ब्राह्मण स्त्रीच्या ठिकाणीं झालेल्या मुलाला ज्याप्रमाणें ब्राह्मणत्व येत नाहीं त्याचप्रमाणें ब्राह्मणावांचून बाकीच्या तीन वर्णांनाही ब्राह्मणत्व मिळत नाहीं. असें असून विश्वामित्रच कसे ब्राह्मण झाले हें मला सविस्तर रीतीनें सांगा.'

हें ऐकून भीष्म ह्मणाले, 'विश्वामित्र ब्रह्मर्षी पदाला कसे पोहोंचले सांगतों ऐक. पूर्वी भरतकुलामध्यें आजमीढ नांवाचा दानशूर राजा होऊन गेला. त्याला जन्मो नांवाचा मुलगा होता. त्याच जन्मोच्या पोटीं पुढें गंगेनें जन्म घेतला. त्याच जन्मोच्या पोटीं याच्याच तोडीचा पराक्रमी व गुणवान सिंधुद्वीप नांवाचा राजा जन्माला आला. पुढें या सिंधुद्वीपापासून बलाकाश, बलाकाशापासून वल्लभ, वल्लभापासून कुशिक व कुशिकापासून गाधि असे परंपरेनें राजर्षी जन्माला आले. ह्या गाधि राजाला पुत्रसंतति नव्हती म्हणून हा पुत्रप्राप्तीसाठीं तपश्चर्या करण्याकरतां अरण्यामध्यें गेला. तेथें गेल्यावर त्याला अत्यंत रूपवान अशी सत्यवती नांवाची मुलगी झाली. तिच्याबद्दल भार्गवकुलांतील च्यवन ऋषींच्या महातपस्वी अशा ऋचीक नांवाच्या मुलांनीं मागणी केली. परंतु गाधि राजाला ह्या दरिद्री ब्राह्मणाला आपली रूपवती मुलगी द्यावीसें वाटेना. ह्मणून तो ऋचिकांना चंद्रासारखे तेजस्वी व वायूसारखे वेगवान असे एक हजार श्यामकर्ण घोडे मला यात तर मी आपली मुलगी तुह्माला देईन असें ह्मणाला. त्याबरोबर ऋचीक वरुणाकडे जाऊन राजानें सांगितल्याप्रमाणें हजार घोडे मागूं लागले. तेव्हां वरुणानें 'तूं जेथें ह्मणशील तेथें तुझ्या मनांत आल्याबरोबर हजार घोडे एकदम येऊन उभे रहातील,' असें सांगितलें. त्याप्रमाणें

ऋचिकांनीं गंगेच्या कांठीं जाऊन मनांत आणिल्या बरोबर हजार घोडे त्यांच्यापुढें एकदम उभे राहिले. कान्यकुब्जाच्या जवळच गंगेच्या कांठीं हें अश्वतीर्थ अद्यापि आहे. नंतर ऋचिकांनीं शुल्क ह्मणून गाधीला हे हजार घोडे दिले. असें याचें तपसामर्थ्य पाहून गाधीराजाला आपण यांना कन्या दिली नाहीं तर हे कदाचित् आपणाला शाप देतील अशी भीति पडली. ह्मणून त्यानें मुकाट्यानें आपली मुलगी सालंकृत करून त्यांना दिली. त्याबरोबर सत्यवतीला फार आनंद झाला व तिचें सच्छील पाहून ऋचिकांनाही फार संतोष झाला. ह्मणून त्यांनीं मी तुला एक मुलगा देईन असा आशीर्वाद दिला. तिनेंही ही आनंदाची वार्ता आपल्या आईला सांगितली. त्याबरोबर तिची आई ह्मणाली 'मुली मलाही मुलगा नाहीं, तर तुझ्या पतींचा मजवरही प्रसाद होऊन मलाही महातपस्वी व सामर्थ्यवान असा मुलगा होऊं दे.' तें ऐकून सत्यवतीनें आपल्या आईची इच्छा पतीला कळविली. त्याबरोबर ऋचीकांनीं 'तुझ्या आईला माझ्या प्रसादानें लवकरच सर्वगुणसंपन्न असा मुलगा होईल, व तुलाही आमच्या सर्व वंशाचा उद्धार करणारा असा महातपस्वी मुलगा होईल; ऋतुस्नात झाल्यावर तिनें अश्वत्थाला व तूं औदुंबराला स्पर्श करावा. हे दोन मंतरलेले चरु घे. ह्यांपैकीं एक तूं खा व दुसरा तुझ्या आईला दे ह्मणजे तुह्मा दोघींना आपापल्या कुलाला अनुरूप असे मुलगे होतील.' तें ऐकून सत्यवतीला फार आनंद झाला. ते चरु घेऊन आपल्या आईकडे जाऊन झालेली सर्व हकीकत तिनें तिला सांगितली. तेव्हां आई तिला ह्मणाली' 'बाळे मी तुला वडील असल्यानें अत्यंत पूज्य आहें. ह्मणून मी सांगतें तसें कर. तुझ्या पतीनें मंत्रून दिलेला हा तुझा चरु मला दे व माझा तूं घे. त्याचप्रमाणें त्या ऋषिसत्तमांनीं स्पर्श करण्याला सांगितलेल्या वृक्षांचाही फेरबदल करूं. प्रत्येकाला आपलें मूल सर्वांत चांगलें निपजावें असें वाटत असतें आणि त्याप्रमाणेंच तुझ्या पतीनें यांवेळीं योजना केली असेल. ह्मणून तुझा चरु व तुला सांगितलेला वृक्ष यावर माझें मन बसलें आहे.' हें ऐकून सत्यवतीनें आपल्या आईच्या बोलण्याला



रुकार दिला. नंतर दोघींनींही त्या ऋषिवर्यांच्या सांगण्याप्रमाणें न करितां एकमेकींचा चरु व वृक्ष बदलला. पुढें गर्भधारणा झाल्यावर एकदां ऋचिकांनीं सहज आपल्या बायकोकडे पाहिलें; त्याबरोबर त्यांना ती सर्व हकीकत कळून आली. तेव्हां त्यांना फार वाईट वाटलें. ते आपल्या बायकोला ह्मणाले, 'तूं खात्रीनें आपला चरु व वृक्ष बदलला आहेस. ब्रह्मबीजाला योग्य अशा प्रकारच्या सर्व गुणांचें अभिमंत्रण मीं तुझ्या चरूमध्यें केलें होतें. व तुझ्या आईच्या चरूमध्यें क्षत्रवीर्याला योग्य अशा प्रकारचे गुण ठेविले होते. तुझा मुलगा तिन्ही लोकांमध्यें सर्व प्रकारें प्रख्यात असा ब्रह्मऋषी व्हावा, व तुझ्या मातेला क्षत्रियाला योग्य अशा प्रकारें पराक्रमशाली मुलगा व्हावा अशी मीं योजना केली होती. आतां ज्या अर्थी तुह्मीं आपल्या चरूंचा व वृक्षांचा फेरबदल केला आहे त्या अर्थी तुझ्या मातेला तपोनिधी अशा प्रकारचा ब्रह्मपुत्र होईल व तुला उग्रकर्में करणारा क्षत्रिय पुत्र होईल. तूं आपल्या आईकरितां असें केलेंस खरें पण हें बरोबर केलें नाहींस.' असें ऋचिकांनीं सांगितल्याबरोबर तिला फार वाईट वाटलें. नंतर आपल्या पतीच्या पायांवर डोकें ठेवून नम्रपणें ती त्यांना ह्मणाली, 'मी आपल्याला शरण आलें आहें. मजवर कृपा करा. माझ्या पोटीं तरी क्षत्रिय जन्माला येऊं नये. माझा नातू तसा झाला तर होऊं द्या.' ही आपल्या बायकोची दीनवाणी ऐकून ते मुनिश्रेष्ठ म्हणाले. 'तथास्तु.' नंतर पुरे महिने लोटल्यावर सत्यवतीला जमदग्नी झाले व तिच्या आईच्या पोटीं विश्वामित्र झाले.

याप्रमाणें ब्रह्मऋषींच्या आशीर्वादांनीं विश्वामित्र क्षत्रिय कुलांत जन्मूनही महान् तपस्वी ब्राह्मण झाले, येवढेंच नव्हे, पण पुढें त्यांच्या वंशांत सर्व ब्राह्मणच जन्माला आले. ते सर्व महान् तपस्वी असून गोत्रवृद्धि करणारे होते. मधुच्छंद, देवरात्र, वगैरे साठ वासष्ठ मुलगे यांना होते.

---

## २३० इंद्र व पोपट यांचा संवाद. (१३,५)

पुढें, 'दुसऱ्याचे दुःखानें कळवळणाऱ्या अशा प्रेमळ मनुष्याचे गुण काय असतात ते मला सांगा,'

ह्मणून युधिष्ठिरानें विचारल्यावरून भीष्मांनीं त्याला इंद्र व पोपट यांच्यामध्यें झालेला पुढील संवाद सांगितला. ते ह्मणाले, 'काशीराजाच्या राज्यामध्यें कोणी एक व्याध रहात होता. तो कोणे एके दिवशीं शिकार करण्याकरितां आपले विषारी बाण बरोबर घेऊन अरण्यामध्यें गेला. तेथें गेल्यावर त्याला आपल्यापासून बऱ्याच अंतरावर एक हरिणांचा कळप दिसला. त्याबरोबर त्यानें प्रत्यंचा आकर्ण ओढून जोरानें एक विषारी बाण सोडला. पण त्याचा नेम चुकून मध्येंच असलेल्या एका मोठ्या झाडामध्यें तो बाण घुसला; त्या बाणाच्या फळावर मोठें जहर विष चोपडलें असल्यामुळें बाण झाडांत घुसल्याबरोबर एकदम त्या झाडाचीं पानें खळखळ गळून पडलीं व तो वाळला सोट होऊन उभा राहिला. अशी त्या झाडाची दशा उडाली तरी त्याच्या ढोलींत आजपर्यंत राहिलेला एक राघू त्याच्यावर अत्यंत प्रेम जडल्यामुळें तेथून हालेना. झाडापासून आजपर्यंत आपल्याला आश्रय मिळाला अशी त्याच्या अंतःकरणांत कृतज्ञताबुद्धि वागत असल्यामुळें तो आहारविहार अगदीं सोडून ढोलींतच स्वस्थ राहिला. त्यामुळें त्याला ग्लानि येऊन त्याच्या तोंडांतून चांगलासा शब्द सुद्धां उमटेना. तरीही पण त्यानें आपल्या आश्रयदात्याला सोडलें नाहीं. अशा प्रकारची ह्या उदार राघूची सुखदुःखासंबंधानें समदृष्टि पाहून इंद्राला फार आश्चर्य वाटलें. हा राघू पक्षी असूनही मनुष्यापेक्षांही अधिक विचारी कसा झाला, व दुसऱ्याच्या दुःखानें दुःखी होऊन आपणही संकट भोगण्याला कसा तयार झाला याबद्दल त्याला मोठें गूढ पडलें. पण त्याला एवढें गूढ पडण्याचें कांहीं कारण नव्हतें. प्रत्येक जातीच्या प्राण्यामध्यें सर्व तऱ्हेचे गुण वास करीत असतात. पुढें इंद्र ब्राह्मणरूपानें त्या पोपटाकडे येऊन ह्मणाला, 'हे पक्षिश्रेष्ठा, दक्षात्मजा शुकी तुझ्यासारख्या सत्पुत्राच्या योगानें आज धन्य झाली. तूं अजून हा वृक्ष कां सोडीत नाहींस?' असें तो ब्राह्मण ह्मणाला असतां, 'हे देवेंद्रा, तुला नमस्कार असो. मीं आपल्या तपोबलानें तुला तेव्हांच ओळखलें,' असें बोलून त्या पोपटानें आपली मान खालीं वाकविली. अशा प्रकारचें त्याचें ज्ञान पाहून इंद्रानें आश्चर्यचकित होऊन आपली मान डोलविली. ज्याचीं सर्व पानें गळून पडलीं आहेत, व ज्यावर फळ मुळींच नाहीं अशा, पक्ष्यांना रहाण्याला अयोग्य झालेल्या वृक्षाचा एवढें मोठें अरण्य असतांनाही, आपण आसरा काय म्हणून केला याबद्दल इंद्राला आश्चर्य वाटतें आहेसें पाहून मोठ्यानें सुस्कारा टाकून तो पोपट खोल स्वरानें ह्मणाला, 'माझा जन्म याच झाडावर झाला. लहानपणीं याच्याच ढोलीमध्यें माझें रक्षण झालें. मजविषयीं दया दाखवून आजपर्यंत ह्यानें दिलेल्या आश्रयाची निष्फळता कशी करावी? ह्याला ह्या स्थितींत सोडून जाणें बरें नव्हे, असा विचार करून मी येथें राहिलों आहे. दीनाची कींव हें साधूंचें लक्षण आहे. साधूंनीं दाखविलेल्या दयेमुळें प्राणिमात्रांच्या अंतःकरणांत त्यांच्याबद्दल प्रीति उत्पन्न होते. आतां मजवर कींव दाखवून मला उपदेश करून हें झाड सोडावयालों लावणें हें तुला उचित नाहीं. हें झाड जेव्हां टवटवीत होतें तेव्हां त्यानें मला आश्रय दिला. मग तें वठल्याबरोबर मीं तरी त्याला कसें सोडावें?' हें त्या पोपटाचें बोलणें ऐकून व त्याचें कोमळ अंतःकरण पाहून इंद्राला फार आनंद झाला, व तुला जो पाहिजे तो वर माग असें तो ह्मणाला. त्याबरोबर त्या पोपटानें आपल्या आश्रयाच्या वृक्षाला पुन्हा पालवी फुटून पूर्वीप्रमाणें टवटवी यावी ह्मणून वर मागितला. तें ऐकून इंद्रानें अमृत शिंपडलें, त्याबरोबर त्या झाडाला एकदम चहूंकडून पालवी फुटून पूर्वीप्रमाणें टवटवी आली. याप्रमाणें त्या पोपटाच्या दृढप्रेमानें त्या झाडाला आपली पूर्वीची स्थिति प्राप्त झाली व पुढें तो पोपटही दुसऱ्याच्या दुःखानें दुःखी होणाऱ्या अशा आपल्या प्रेमळ स्वभावानें अंतीं इंद्रलोकाला गेला. याप्रमाणेंच हे राजेंद्रा दृढप्रेम करणारा असा एकनिष्ठ मनुष्य आपल्या पदरीं असला ह्मणजे या झाडाप्रमाणें आपल्यालाही सर्व कामांत यश मिळतें.

---

## २३१ वसिष्ठ व ब्रह्मदेव यांचा संवाद–नशीब व उद्योग यांचें निराकरण. (१३.६)

दैव व उद्योग यांपैकीं श्रेष्ठ काय म्हणून धर्मानें विचारल्यावरून भीष्मांनीं पुढील ब्रह्मदेव व वसिष्ठ

यांच्यामधील संवाद त्याला सांगितला. ते ह्मणाले, 'अशा प्रकारचा प्रश्न पूर्वी वसिष्ठांनीं ब्रह्मदेवांना केला असतां ब्रह्मदेव त्यांना म्हणाले, 'बीजावांचून कोणतीही वस्तु उत्पन्न होत नाहीं. फळ बीजापासून उत्पन्न होतें व बीज बीजापासूनच उत्पन्न होतें. शेतकरी आपल्या शेतामध्यें चांगलें अगर वाईट ज्या तऱ्हेचें बी पेरतो त्या तऱ्हेचेंच चांगलें अगर वाईट त्याला फल मिळतें. जमिनीची जर चांगली मशागत झाली नसेल तर बी ज्याप्रमाणें फुकट जातें त्याप्रमाणेंच पुरुषप्रयत्नावांचून दैवही निरर्थक होतें. उद्योग ही जमीन होय, दैव हें बी होय. जमीन व बी यांचा योग्य तऱ्हेनें संयोग झाला ह्मणजे ज्याप्रमाणें पीक चांगलें येतें त्याप्रमाणें उद्योग व दैव या दोन्हींच्या साहाय्यानें मनुष्याला सुखप्राप्ति होते. जो जें कर्म करतो त्याचें फल त्यालाच भोगावें लागतें. चांगल्या कर्मापासून सुख व पापकर्मापासून दुःख मिळतें याचा प्रत्यहीं आपल्याला या जगीं अनुभव येतो. कोणतेंही फल झालें तरी केल्यावांचून कांहीं मिळत नाहीं. उद्योगी पुरुष भाग्याला चढतो व त्याला सर्व लोक मान देतात. निरुद्योगी पुरुष दरिद्री व दुःखी होतो आणि या दुःखावर डाग देण्याकरितांच कीं काय सर्व लोक पुन्हा त्याचा उलट अपमान करतात. तपाच्या योगानें सुंदर रूप, उत्तम तऱ्हेचें भाग्य, नाना प्रकारचीं रत्नें हीं मनुष्यमात्राला प्राप्त होतात. पण केवळ दैवाच्या योगानें कांहींच मिळत नाहीं. स्वर्गसुद्धां मनुष्याच्या उद्योगानेंच मिळतो. चंद्रसूर्यादि ग्रह, वायु इत्यादि देवताही आपल्या उद्योगानेंच देवत्वाला पावल्या. पैसा, जिवलग स्नेही व आपल्या कुलाला अनुरूप असें ऐश्वर्य हीं निरुद्योगी मनुष्याला केव्हांही मिळत नाहींत. ब्राह्मणाला शुद्धाचरणानें संपत्ति मिळते. क्षत्रियाला पराक्रमानें मिळते, वैश्याला उद्योगानें मिळते व शूद्राला आपल्या स्वामीच्या एकनिष्ठसेवेनें मिळते. कृपण, नपुंसक, निरुद्योगी, दुराचारी, भ्याड व पाखंडी यांपैकीं एकाकडेही लक्ष्मी केव्हांही जात नाहीं. ज्यानें देव, दैत्य, नानाप्रकारचे प्राणी, फार काय सर्व चराचर विश्व, निर्माण केलें आहे तो भगवान विष्णूही समुद्रामध्यें नेहमीं तप करीत असतो. ह्या जगांत कर्माला फळ मिळालें नसतें तर सर्व लोक उदासीनपणें दैवावर हवाला ठेवून स्वस्थ बसले असते. कांहीं उद्योग न करितां केवळ दैवावर हवाला ठेवून जो स्वस्थ बसतो त्याचे सर्व मनोरथ, नपुंसक पतीच्या योगानें पुत्रप्राप्तीची इच्छा करणाऱ्या स्त्रीच्या इच्छेप्रमाणें नेहमीं व्यर्थच होतात. दैव अनुकूल नसल्यानें या जगामध्यें आपणांला जें दुःख भोगावें लागतें त्यापेक्षां येथें निरुद्योगी राहून पापाधीन झाल्यानें परलोकीं भोगावें लागणारें दुःख फार दुःसह आहे. मनुष्याचे प्रयत्न त्याला त्याचे दैवाप्रमाणें कमी अधिक फल देतात. परंतु निरुद्योगी मनुष्याला त्याचें दैव कांहींच देत नाहीं. देवादिकांनासुद्धां कालांतरानें होणाऱ्या पुण्यक्षयानें जर खालीं यावें लागतें तर मग प्राणिमात्रांचें सुदैव तरी त्यांनीं आपल्या सत्कर्मांनीं वरचेवर भर घातल्याशिवाय कायम कसें रहावें. देव आपला पराभव होईल या भीतीनें या जगांतील पुण्यकर्म्यांना नेहमीं अडथळा आणीत असतात. यामुळें ऋषी व देव यांच्यामध्यें नेहमीं तंटे चालले असतात. याप्रमाणें देव व ऋषी नेहमीं उद्योगांतच गढलेले असतात. तथापि दैवावांचून कांहींच होत नाहीं. ज्याच्यापासून दैव निर्माण होतें त्या सुकर्मालाही दैवाची अनुकूलता असावी लागते. दैव प्रबल असल्यावांचून हातून सुकर्म घडत नाहीं. पूर्वीच्या सुकर्मानें आतांचें दैव होतें, त्या दैवानें हातून सुकर्म घडतें व याच सुकर्मानें पुढें स्वर्गप्राप्ति होते. अशी ही दैवपरंपरा आहे. आपला आपणच मित्र किंवा शत्रु आहों. आपल्या कर्माकर्माचें फळ आपणांवांचून दुसरा कोणी भोगीत नाहीं. प्राणिमात्रांचें सुदैव किंवा दुर्दैव तो येथें कर्म करूं लागला ह्मणजे त्याच्या प्रत्ययाला येतें. त्याचप्रमाणें प्राणिमात्राच्या हातून नेहमीं बरीं वाईट कर्में घडत असल्यामुळें त्याच्या दैवालाही केवळ आपल्या इच्छेप्रमाणेंच सुख दुःख देतां येत नाहीं. कारण येथें होणाऱ्या पापपुण्यानें दैवाच्या बरेवाईटपणांतही फरक पडतो. मनुष्य पुण्यवान असला ह्मणजे त्याच्यावर त्याच्या दुर्दैवाचें कांहीं चालत नाहीं. पूर्वी ययाति राजा पुण्यक्षयानें स्वर्गांतून खालीं आला असतां त्याच्या नातवांनीं आपल्या पुण्याईनें त्याला पुन्हां स्वर्गीं चढविलें. राजा पुरूरवा ब्राह्मणांच्या

आशीर्वादानेंच स्वर्गाला गेला. अश्वमेधादिक पुष्कळ तऱ्हेचे यज्ञ करून बराच पुण्यसंचय केला असतांही कोसलाधिप सौदास याला ऋषींच्या शापानें नरमांस भक्षण करणाऱ्या राक्षसयोनीला जावें लागलें. अश्वत्थामा व परशुराम हे दोघेही श्रेष्ठ ब्राह्मणाचे मुलगे असून स्वतःही चांगले शूर होते. पण त्यांच्या हातून येथें चांगलीं कर्मे न झाल्यामुळें त्यांना स्वर्गति मिळाली नाहीं. वसूनें इंद्राप्रमाणेंच शंभर यज्ञ केले, पण शेवटीं एकदां पशुयज्ञाबद्दलची श्रुति अप्रमाण आहे, असें विनाकारण खोटें बोलल्याबद्दल त्याला रसातळीं जावें लागलें. विरोचनाचा मुलगा बली यानें आपल्या धर्माचरणानें आपलें दैव बळकट केलें असतांनाहीं विष्णूनें त्याला स्वतःच्या पराक्रमानें पातालांत ढकललें. इंद्राच्या अनुरोधानें जनमेजयानें ब्राह्मणस्त्रीचा वध केला असतांही तो स्वर्गाला गेला. त्याला त्याच्या दैवानें कांहीं अडथळा करवला नाहीं. वैशंपायन ऋषींनीं न जाणतां एक ब्राह्मण मारला व एक बालहत्याही केली, तरी पण दैवानें त्यांचें वांकडें काय केलें? मोठे मोठे यज्ञ करून ब्राह्मणाला गोप्रदानें देऊन पुण्यसंचय केला असतांही राजा नृगाला सरड होऊन पडावें लागलें. राजा धुंदुमाराला देवांनीं प्रसन्न होऊन वर दिला असतांही तो म्हातारपणामुळें यज्ञ करतां करतांच त्या यज्ञ चाललेल्या पर्वतावर मरून पडला. मोठमोठे तपस्वी मुनिवर्य एखादे वेळेला रागावून जो शाप देतात तो ते आपल्या दैवबलानें देतात काय? नाहीं. आपल्या तपोबलानें देतात. दैवानें एकादे वेळेस चुकून ऐश्वर्य प्राप्त झालें तरी तें पातकी मनुष्याजवळ फार वेळ टिकत नाहीं. तें तेव्हांच नाहींसें होतें. लोभी व मूर्ख मनुष्याचें दैव त्याला सुख देण्याला असमर्थ असतें. ज्याप्रमाणें लहानशा ठिणगीपासून वाऱ्याच्या सोसाट्यानें अग्नि पेट घेतो त्याप्रमाणें नेहमीं सत्कर्मे करीत राहिलें म्हणजे आपलें दैवही दिवसेंदिवस प्रबळ होत जातें, आणि त्याच्या उलट ज्याप्रमाणें तेल संपलें म्हणजे दिवा नाहींसा होतो त्याप्रमाणें आपल्या आळसानें आपलें नशीबही लवकर कमी पडतें. पुष्कळ संपत्ति, नानाप्रकारचे भोग व सुंदर स्त्रिया हीं सर्व मिळालीं असूनही कर्महीन अशा करंट्याला त्याचा उपभोग घेतां येत नाहीं, आणि तोच उद्योगी मनुष्य संपत्ति वगैरे भोग, देवादिकांनीं अगदीं पाताळांत नेऊन जरी दडपून ठेविले तरीही तो आपल्या उद्योगानें त्यांना वर काढून त्यांचा उपभोग घेतो. आपल्या धर्मबुद्धीनें मनुष्य जरी दरिद्रतेला पावला तरी देव त्याला टाकीत नाहींत. त्याच्या सदाचाराबद्दल ते त्याच्यावर अत्यंत प्रीति करतात व शेवटीं त्याला उत्तम गति देतात. याप्रमाणें आपल्या धर्मबुद्धीनें दरिद्री होऊन एखादा मनुष्य इहलोकच्या सुखाला जरी मुकला तरी त्याला त्याच्या सदाचरणाबद्दल स्वर्गलोकींचें सुख मिळतें. पण सर्व प्रकारच्या संपत्तीनें युक्त अशा प्रकारचा मनुष्य जर आचाररहित असेल तर त्याच्याकडे देव ढुंकूनही पहात नाहींत. त्याच्या गृहादि ऐश्वर्याला ते स्मशानाप्रमाणें समजतात. निरुद्योगी मनुष्याला या जगांत कांहींच मिळत नाहीं. मनुष्याच्या अनाचाराला आळा घालण्याचें सामर्थ्य दैवाच्या अंगीं नाहीं. मनुष्य ज्याप्रमाणें कर्मे करील त्याप्रमाणें फल देणें एवढेंच दैवाच्या हातीं आहे. म्हणून पूर्वीच्या सुकर्मानें बनलेल्या दैवाच्या योगानें येथें सुख घ्यावें व पुन्हां येथें सुकर्मे करून पुढें स्वर्गसुख घ्यावें.'

## २३२ कर्मांचीं फळें. (१३. ७)

त्यावर युधिष्ठिर म्हणाला, 'कोणकोणत्या शुभ कर्मांचीं कोणकोणतीं फळें मिळतात?' भीष्म म्हणाले, 'सांगतों ऐक. मनुष्य, मन व देह यांपैकीं ज्यानें जशीं कर्मे करतो त्याप्रमाणें फळहीं तसेंच मिळतें. म्हणजे केवळ मनांत आणलेल्या कर्माचें फळ त्याला फक्त स्वप्नांतच उपभोगाला मिळतें. व स्वतःच्या देहाला झिजवून केलेल्या कर्माचें फळ त्याच्या प्रत्यक्ष शरीराला उपभोगाला मिळतें. बाळपणीं, तरुणपणीं, म्हातारपणीं, संकटकालीं किंवा सुखकालीं मनुष्य ज्या ज्याप्रमाणें जशीं जशीं कर्मे करतो त्याप्रमाणें त्यांचें फलही त्याला अन्य जन्मीं त्या त्या अवस्थेंतच भोगावें लागतें. ह्या पंचेंद्रियांच्या योगानें केलेल्या कर्माचें फळ मिळत नाहीं असें केव्हांही होत नाहीं. हीं ह्याला आपलीं फळें देण्याला नेहमीं तयार असतात. आले-

त्या अतिथीकडे चांगल्या अंतःकरणानें प्रेमपूर्वक पहावें, त्याच्याशीं गोड बोलावें, त्याच्या जवळ बसावें व त्याच्या बरोबर हिंडावें हाच गृहस्थाश्रमीयांचा यज्ञ होय. प्रवासानें दमून आलेल्या अतिथीला, मग तो अनोळखी कां असेना, जो अन्न देतो त्याला त्याबद्दल बरेंच मोठें पुण्य मिळतें. वानप्रस्थाश्रमामध्यें राहून नेहमीं स्थंडिलावरच निजणाराला अन्य जन्मीं उत्तम घरें व आंथरुणें मिळतात; व नेहमीं वल्कलें नेसून राहणाराला उत्तम प्रकारचीं वस्त्रें व दागदागिने मिळतात; जो राजा तपश्चर्या करीत योगनिष्ठ होऊन नेहमीं अग्नीजवळ राहतो तो राजा अत्यंत पराक्रमी होऊन गाड्या घोडीं वगैरे ऐश्वर्याचा उपभोग घेतो; रसरहित पदार्थ खाल्ले असतां सौभाग्य मिळतें, व मांसराहित पदार्थ खाल्ले असतां पशू व पुत्र यांची प्राप्ति होते, जो खालीं डोकें करून लोंबत राहील, जो नेहमीं पाण्यांत राहील किंवा जो नेहमीं ब्रह्मचर्य व्रतानें एकटाच निजेल त्याला त्याच्या इच्छेप्रमाणें सद्गति प्राप्त होईल. अतिथीला पाद्य, आसन, दीप, अन्न व आश्रय देणें हाच गृहस्थाश्रमीयांचा दक्षिणायुक्त यज्ञ आहे. वीरासन घालून वीरशय्येवर जो निजेल त्याला कायमची स्वर्गप्राप्ति होते व त्या ठिकाणीं त्याला सर्व प्रकारचीं सुखें यथेच्छ भोगावयास सांपडतात. धर्म केला असतां संपत्ति मिळते, मौन व्रत धारण केलें असतां आज्ञाधारक सेवक मिळतात, तपश्चर्येनें सर्व प्रकारचे उपभोग भोगावयाला मिळतात व ब्रह्मचर्यानें दीर्घायुष्य मिळतें व कधींही कोणाची हिंसा केली नाहीं तर रूप, ऐश्वर्य व आरोग्य हीं तिन्ही मिळतात. फलमूलें खाऊन राहणाऱ्याला राज्यप्राप्ति होते, व केवळ पानें खाऊन राहणाऱ्याला स्वर्गप्राप्ति होते, निराहार करणाऱ्याला नेहमीं सर्व प्रकारचें सौख्य मिळतें व नुसता वनस्पत्याहार करणाराला पुष्कळ गायी मिळतात. स्त्रीसुख वर्ज करून जो तीन वेळां स्नान करील व केवळ वायु भक्षण करून राहील त्याला सर्व प्रकारच्या यज्ञाचें फल मिळतें. सत्यव्रतानें स्वर्गसुख मिळतें व यज्ञदीक्षेनें उत्तम कुलांत जन्म येतो. जो अग्निहोत्री फक्त पाणी पिऊन राहील व आपल्या अग्नीचें अखंड रक्षण करून गायत्री मंत्राचा जप करीत राहील त्याला सर्व समुद्रवलयांकित पृथ्वीचें राज्य मिळतें. बारा वर्षें पर्यंत उपोषित राहून जो यज्ञ करील किंवा तीर्थाटण करीत राहील त्याला स्वर्गलोकापेक्षां उच्च प्रतीच्या लोकाची ह्मणजे ब्रह्मलोकाची प्राप्ति होते. जो सर्व वेदांचें यथाशास्त्र अध्ययन करतो तो तात्काळ सर्व दुःखांपासून मोकळा होतो. त्याचप्रमाणें मनाला स्थिर करून त्याच्या सर्व दुष्ट वासना नाहींशा करून जो व्रतस्थ राहील त्यालाही स्वर्गसुख मिळतें. मूर्ख लोकांना जी सोडतां येत नाहीं व जी कधींही कमी होत नाहीं, एवढेंच नव्हे, पण प्राणिमात्रांच्या अंतकालपर्यंत जी त्यांची पाठ सोडीत अशा दुर्धर तृष्णेचा जो नाश करतो त्याला तर तत्कालच सर्व सुखें मिळूं लागतात. हजारों गाईंचा तांडा एके ठिकाणीं असला तरी वासरूं आपल्या आईकडे ज्याप्रमाणें अचुक जातें त्याप्रमाणें प्राणिमात्रांचें पूर्वजन्मींचें कर्मही त्याला त्याच्या पापपुण्याचें फल देण्याकरितां त्याच्याकडे अचुक येतें. फलांना व पुष्पांना कोणीही सांगणारा नसतांही तीं आपल्या योग्यवेळीं ज्याप्रमाणें न चुकतां येतात, त्याप्रमाणें पूर्वजन्मींचें कर्मही आपलें फळ वेळच्या वेळीं न चुकतां देतें. जो आपल्या सदाचरणानें आपल्या बाळाला तोषवितो त्याच्यावर प्रजापति ब्रह्मदेवही संतुष्ट असतात; जो आपल्या आईला सुख देतो, त्याला पृथ्वीपूजेचें फल मिळतें. त्याचप्रमाणें आपल्या उपाध्यायाला जो संतुष्ट ठेवतो त्याला ब्रह्मपूजेचें फल मिळतें. व या तिघांनाही जो संतुष्ट ठेवतो त्याला सर्व धर्मांचें फल मिळतें. पण या तिघांचा अनादर करून त्यांना जो दुःख देतो त्याचें सर्व पुण्य व सर्व सत्क्रिया निष्फळ होतात. मंत्राचा अयोग्यकर्माकडे उपयोग केल्यानें, दक्षिणेवांचून सोमयाग केल्यानें व मंत्रावांचून होम केल्यानें जें पातक मिळतें तितकें सर्व पातक एका खोटें बोलण्यानें प्राप्त होतें.'

---

### २३३ ब्राह्मणांचें महत्व. (१३.८–९)

धर्मराज ह्मणाला, 'पूज्य कोण आहेत, नमस्कार कोणाला करावा, संकटकालीं व सुखकालींही आपलें मन कोणाकडे लागलेलें असतें, कोणामुळें आपणाला या जगांत रहावेंसें वाटतें?'

हें ऐकून भीष्म ह्मणाले, ' जे आपल्या तपश्चर्येनें व स्वाध्यायानें स्वर्गाला अगदीं हस्तगत करून घेतात, ब्रह्मविद्या हेंच ज्यांचें धन आहे व ज्यांच्यापैकीं अगदीं लहान व वृद्ध हे दोघेही परंपरेनें आलेल्या आपल्या ब्रह्मराज्याचें जूं तरुणाप्रमाणेंच नेटानें वाहतात अशा ब्राह्मणांबद्दलच माझ्या अंतःकरणामध्यें आदर आहे. विद्येनें नम्र झालेले, गोड भाषण करणारे, इंद्रियनिग्रही, ब्रह्मवेत्ते, वेदमार्गानें चालणारे, अशा मंगलरूप ब्राह्मणांचे हितकारक शब्द मोठमोठ्या सभांतून नेहमीं ऐकूं येतात. हंस ज्याप्रमाणें पाणी मिसळलेल्या दुधांतून फक्त दूधच तेवढें काढून घेतो त्याप्रमाणें हे विद्वान ब्राह्मणही बऱ्यावाईट गोष्टींनीं भरलेल्या जगांतील फक्त चांगल्याच गोष्टी लोकांना उघड करून दाखवितात. अशा सद्वृत्त ब्राह्मणांचे हितकारक शब्द लक्षपूर्वक ऐकून जे कोणी त्याप्रमाणें वागतात त्या गुणी पुरुषांबद्दलही मला आदर वाटतो. तपोनिष्ठ ब्राह्मणांना स्वच्छ, साजूक, रुचकर व पवित्र असें अन्न जे नेहमीं देतात त्यांना मी मान देतों. युद्धांमध्यें छातीवर वार घेत घेत शत्रूशीं लढणें हेंही एकवेळ सोपें आहे, पण निर्मल अंतःकरणानें दान करणें फार कठीण आहे. ह्मणून सर्व शूरामध्यें दानशूरच अत्यंत श्रेष्ठ आहे. मी एखाद्या हीन ब्राह्मणकुलांत जन्माला आलों तरी मी आपल्याला धन्य मानून घेईन. आणि तेच एकाद्या सत्कुलांत जन्म घेऊन सदाचार, वेदविद्या व तपस्याचरण यानें युक्त झालों तर मग विचारावयालाच नको. हे धर्मा, मला या जगांत तुझ्यावांचून प्रिय असें कांहींच नाहीं. पण ब्राह्मण मला तुझ्याहीपेक्षां अधिक प्रिय आहेत. माझ्या तातांच्या ठिकाणीं, पितामहांच्या ठिकाणीं व सर्व सुहृदजनांच्या ठिकाणीं इतकें माझें प्रेम नाहीं, पण तें या ब्राह्मणांच्या ठिकाणीं आहे. ब्राह्मणांची सेवा करून मिळवावयाचें असें मला कांहींच नाहीं. तरी मी नेहमीं त्यांचा यथोचित सत्कार करीत असतों. कारण ते तसे पूज्यच आहेत. मनानें, वाणीनें किंवा इतर इंद्रियांनीं ब्राह्मणांबद्दल माझ्यांकडून आजपर्यंत कांहीं तरी सत्कर्म घडलें आहे ह्मणूनच आतां मला या अंतकालीं कोणत्याही तऱ्हेचा पश्चात्ताप होत नाहीं. ब्राह्मणभक्त असे मला सर्व लोक ह्मणतात तें ऐकून मला मोठा आनंद होतो. असें ह्मणवून घेणें हेंच या जगांतील अत्यंत पवित्र कर्म आहे. ब्राह्मणांची सेवा करणाऱ्याला उत्तम लोकांची प्राप्ति होते. ह्मणून बापा धर्मा, मलाही आतां लवकरच तो अक्षय्य लोक मिळेल. ज्याप्रमाणें पतिव्रता स्त्रीला पतीवांचून अन्य दैवत नाहीं, त्याच्या सेवेवांचून अन्य धर्माचरण नाहीं, त्याचप्रमाणें क्षत्रियांनाही ब्राह्मणावांचून अन्य दैवत नाहीं व त्यांच्या सेवेवांचून अन्य कर्तव्य नाहीं. क्षत्रिय शंभर वर्षांचा असला तरी दहा वर्षांचा ब्राह्मणबटु देखील त्याला पित्याप्रमाणें पूज्य आहे. पति मेला असतां स्त्री ज्याप्रमाणें आपल्या दीराची सेवा करून रहाते त्याचप्रमाणें ही पृथ्वी ब्राह्मण राजा मिळाला नाहीं तर क्षत्रियाला धरून राहते. ह्मणून हे कुलश्रेष्ठा, क्षत्रियांनीं ह्या ब्राह्मणाचें आपल्या मुलाप्रमाणें रक्षण करावें, गुरुजनाप्रमाणें त्यांचा सन्मान ठेवावा व त्यांची अग्नीप्रमाणें सेवा करावी. सरळ, सत्यशील, सदाचारी, सर्व प्राणीमात्रांच्या कल्याणाकरितां झटणारे पण अपमान झाला असतां सापाप्रमाणें क्षुद्रदिशीं रागावणारे अशा ब्राह्मणांची नेहमीं नम्रपणें सेवाच करीत असलें पाहिजे. आपल्या तेजाची किंवा तपोबलाची घमेंड न बाळगतां ब्राह्मणांच्या तेजाबद्दल व तपोबलाबद्दल नेहमीं भिऊनच राहिलें पाहिजे. आपला अपमान झाला असतांना ब्राह्मण व क्षत्रिय या दोघांनाही सारखाच राग येतो; पण ब्राह्मण हे तपोनिष्ठ असल्याकारणानें ते आपल्या तपोबलानें इतरांना जाळून टाकतात, पण तेच एकाद्या क्षमाशील ब्राह्मणाचा अपमान झाला तर त्याचा परिणाम फारच भयंकर होतो. त्याच्या न रागावण्यानेंच अपमान करणाराचा सर्वस्वी नाश होतो. ज्याप्रमाणें गौळी गाईचें उत्तम तऱ्हेनें रक्षण करतो त्याप्रमाणें क्षत्रियांनींही ब्राह्मणांचें एकनिष्ठपणानें रक्षण करावें. ह्मणून हे राजा धर्मा, बाप ज्याप्रमाणें आपल्या मुलांचें रक्षण करतो त्याप्रमाणें तूंही एकनिष्ठपणें या ब्राह्मणांचें रक्षण कर, व त्यांच्या घरांत त्यांच्या उपजीविकेचें साधन आहे कीं नाहीं हें नित्य पहात जा.

ब्राह्मणांना एकदां देतो म्हणून सांगून जो देत

नाहीं त्याच्या सर्व इच्छा निष्फल होतात. जन्माळा आल्यापासून मरेतोंपर्यंत त्याच्या हातून यज्ञ, तप वगैरे जें जें कांहीं सुकृत झालें असेल तें सर्व एवढ्या वचनभ्रष्टतेनें एकदम नाहींसें होतें. या पातकापासून मुक्त होण्याला एक हजार शामकर्ण घोडे दान द्यावे लागतात म्हणजे हजार शामकर्ण मिळणें ज्याप्रमाणें दुर्मिळ आहे त्याप्रमाणेंच या पातकापासून मुक्त होणें दुर्घट आहे.

कोणे एके काळीं दोन पुरुष अगदीं स्नेहानें रहात होते. पुढें ते आयुष्य संपल्यानंतर मृत्युलोक सोडून गेले. पण लगेच त्यांच्या कर्मगतीनें त्यांपैकीं एकजण कोल्हा झाला व दुसरा वानर झाला. कोल्हा आपल्या जातीधर्माप्रमाणें स्मशानांत जाऊन प्रेतें फाडून खात असे. तें पाहून या वानराला वाईट वाटलें व लगेच आपल्या पूर्वजन्मींचीही आठवण झाली. तो एके दिवशीं कोल्ह्याला म्हणाला, ‘तूं नासकें कुचकें घाणेरडें प्रेत नित्य फाडून खात असतोस तेव्हां असें पूर्वजन्मीं पातक तरी कोणतें केलें आहेस.’ तें ऐकून कोल्हा वानराला म्हणाला, ‘हे वानरा, मी आपल्या पूर्वजन्मीं दान देण्याचें वचन देऊन तें दिलें नाहीं याबद्दल या अधम योनींत राहून असलें निंद्य भक्ष्य मला खावें लागत आहे. बरें हे वानरा, तूं पूर्वजन्मीं कोणतें कर्म केलेंस म्हणून आतां वानर झालास.’ वानर म्हणाला, ‘मी पूर्वीं ब्राह्मणांचीं फळें उपटून नेत होतों म्हणून मला या जन्मीं वानर व्हावें लागलें. याकरितां शहाण्या मनुष्यानें केव्हांही ब्राह्मणांचें द्रव्य हरण करूं नये. त्यांच्याशीं कोणत्याही प्रकारचा वादविवाद न करतां मुकाट्यानें, त्यांना देतों म्हणून सांगितलेलें द्यावें.’ ब्राह्मणाला एकदां देतों म्हणून सांगितलें कीं तें लगेच द्यावें. मग त्यावर आपली आशा ठेवूं नये. कारण आपण देतों म्हणून सांगितल्याबरोबर त्याच्या अंतःकरणांत त्या वस्तूबद्दल आशा उत्पन्न होते व जसजसे दिवस लोटतील तसतशी ती आशा तूप ओतून पेटविलेल्या अग्नीप्रमाणें जास्त जास्तच पेट घेते. अशा आशायुक्त अंतःकरणानें तो ब्राह्मण रागावून ज्याच्याकडे पाहील त्याची पेटलेल्या अग्नीवर पडलेल्या गवताप्रमाणें एक क्षणांत राखरांगोळी उडते. आणि तोच संतुष्ट होऊन आनंदानें आशीर्वाद देईल तर दात्याला तो अतिशय लाभदायक होतो. मुलगे, नातू, पशु, बांधव, मंत्रिजनादि चाकर, आपली प्रजा या सर्वांचें केवळ त्याच्या आशीर्वादानेंच पोषण होतें. इतकें ब्राह्मणाचें तेज प्रखर आहे. ब्राह्मणाला दान केलें असतां निश्चयेंकरून स्वर्ग मिळतो. मृत्युलोकामध्यें ब्राह्मणांना केलेल्या धर्मानें स्वर्गींच्या देवता संतुष्ट होतात. पितर सुखी होतात. म्हणून शहाण्या मनुष्यानें ब्राह्मणांना धर्म करीत असावें. ब्राह्मण हेच पुण्यक्षेत्र होय. ब्राह्मण कोणच्याही वेळीं आपल्याकडे आला असतां त्याचा अनादर करून विन्मुख पाठवूं नये.’

## २३४ हीन पुरुषाला उपदेश करण्यापासून लागणारे दोष. (१३. १०)

युधिष्ठिर ह्मणाला, ‘मैत्री अगर स्नेह यामुळें हीन पुरुषाला सदुपदेश केला असतां तो करणाऱ्याला त्याबद्दल कांहीं दोष आहे कीं काय? भीष्म ह्मणाले, ‘जातिहीनाला केव्हांही उपदेश करूं नये. करणाऱ्याला त्याबद्दल मोठा दोष लागतो. नीच मनुष्य संकटांत असला तरी त्याला केलेला उपदेश दोषावहच होतो. हिमालयाच्या पायथ्याशीं ब्रह्माश्रम नांवाचा मोठा पुण्यकारक आश्रम आहे. नानाप्रकारचे पक्षी, वृक्ष, वेली, व फळझाडें यांनीं तो अगदीं गजबजला असून फार रम्य असल्यामुळें त्याठिकाणीं सिद्ध, चारण वगैरे उपदेवता नेहमीं वास करीत असतात. त्याचप्रमाणें ब्रह्मचर्यादि व्रतें एकनिष्ठपणें आचरण करणारे मोठमोठे तपस्वी, अध्ययन करणारे बटु, यज्ञ करणारे ब्राह्मण, वालखिल्यादि ऋषी हे आपल्या उज्वल तेजानें, पवित्र आचरणानें व पुण्यकारक वेदघोषानें ह्या आश्रमाला नेहमीं जास्तच भूषवीत असतात.

अशा या पवित्र आश्रमामध्यें एकदां कोणीएक शूद्र मोठी हिम्मत करून आला. मुनींनीं त्याला पाहिल्याबरोबर त्याचा यथोचित सत्कार केला. येथील ऋषींच्या शरीरांवरील ती दिव्य कांति, कानाला गोड लागणारे असे ते वेदघोष, त्याचप्रमाणें मुनींचीं नानाप्रकारचीं व्रताचरणें हीं पाहून त्याला फार

आनंद झाला व आपणही तपश्चर्या करावी असें त्याच्या मनांत आलें. म्हणून तो तेथील कुलपतींना त्यांचे पाय घट्ट धरून म्हणाला, 'भगवन्, आपण मजवर कृपा करून मला धर्मोपदेश करा व मला संन्यासदीक्षा द्या. मी अत्यंत हीन अशा शूद्रजातीमध्यें जन्मलों आहे; आतां आपली सेवा करून येथेंच रहावें अशी माझी इच्छा आहे, तर या शरणागतावर कृपा करा.' हें ऐकून कुलपति ह्मणाले, 'शूद्राच्या हातून संन्यास धर्माचें आचरण होणें शक्य नाहीं. तुझ्या मनांत आलें असलें तरी तें सोडून दे. फक्त सेवा करूनच रहा. नुसत्या सेवेनेंच तुला निःसंशय सद्गति मिळेल.' हें ऐकून त्या शूद्राला धर्माचरणाबद्दल आपल्या अंतःकरणांत इच्छा उत्पन्न झाली असून ती पूर्ण कशी होणार ह्मणून मोठी काळजी पडली. येथील सर्व कृति आपण पाहिलीच आहे, तर या आश्रमापासून लांब जाऊन त्याप्रमाणें करावें. असा विचार करून त्या आश्रमापासून दूर जाऊन तेथें त्यानें एक पर्णशाळा तयार केली. त्या ठिकाणीं एक वेदी तयार केली, देव ठेवण्याला जागा केली व आपल्या स्वतःलाही बसण्याउठण्याला एक जागा केली. तो तेथें मुनीवेषानें राहून त्रिकाल स्नान करून देवपूजा करूं लागला. होमहवन वगैरे करून व जितेंद्रिय राहून केवळ फलाहारावर राहूं लागला. आसपास मिळणाऱ्या कंदमूलफलांनीं आल्यागेल्या अतिथींचाही तो यथोचित सत्कार करीत असे. अशा रीतीनें त्याचा त्या ठिकाणीं बराच काल लोटला. पुढें एकदां कोणी एक ऋषी आपल्या शिष्यपरिवारासह तेथें आले. त्यांचा त्यानें यथोचित सत्कार करून कोठून आलां. कसें काय आहे वगैरे वर्तमान त्यांना विचारिलें. ऋषी त्याचीं उत्तरें देऊन निघून गेले. पण पुन्हा वरचेवर त्या शूद्राला पाहण्याकरितां तेथें येऊं लागले. अशा रीतीनें नेहमीं येत असतां कोणी एक वेळीं त्या तपोधन ऋषींना तो शूद्र ह्मणाला कीं, मला पितृकार्य करावयाचें आहे, तर आपण कृपा करावी. त्या ऋषींनीं बरें आहे असें ह्मटल्यावरून त्या शूद्रानें शुचिर्भूत होऊन त्यांना पाय, दर्भ, वनस्पती व पवित्र आसन हीं दिलीं. त आसन घालतांना त्याच्या दशा दक्षिणेकडे केलेल्या पाहून ऋषींनीं त्या शूद्राला याच्या दशा पूर्वेकडे करून उत्तरेकडे तोंड करून बसण्यास सांगितलें. त्याप्रमाणें आसन घालून तो बसला. पुढें त्या ऋषींच्या सांगण्याप्रमाणें त्यानें सर्व क्रिया यथाविधि केल्या. हें पितृकार्य आटोपल्याबरोबर ते ऋषीही आपल्या आश्रमाला परत गेले. पुढें कालांतरानें तो शूद्र व ते त्याचे पितृकार्य करणारे ऋषी हे दोघेही मरण पावले. नंतर हा शूद्र मोठ्या राजकुलांत जन्माला आला व हे ऋषी त्याच्याच पुरोहितकुलांत जन्मले. पुढें क्रमाक्रमानें ह्या दोघांनाही आपापल्या दर्जाला योग्य असें शिक्षण मिळून त्यांत ते निष्णात झाले. चारी वेद, कल्पप्रयोग, ज्योतिष ह्या सर्वांमध्यें हा पुरोहितपुत्र निष्णात झाला. पण या सर्वांमध्यें सांख्यशास्त्राचा याला फार नाद लागला. पुढें बापाच्या मरणानंतर त्या राजपुत्राला त्याच्या मंत्रीजनांनीं राज्याभिषेक केला. त्याचप्रमाणें वृद्ध पुरोहिताच्या पश्चात् त्याच्या पुत्रालाही त्याचें पद दिलें. या पुरोहिताच्या साहाय्यानें राज्याची व्यवस्था उत्तम तऱ्हेची ठेवून प्रजेचें त्या राजानें पुत्राप्रमाणें पालन केलें. हा पुरोहित राजगृहीं पुण्याहावाचन होमहवन इत्यादि धर्मकृत्याकरितां जेव्हां जेव्हां जाई तेव्हां तेव्हां हा राजा त्या पुरोहिताकडे पाहून मोठ्यानें हसे. तें पाहून त्या पुरोहिताला फार राग येई. पुढें एके दिवशीं अगदीं एकांतामध्यें राजाची व पुरोहिताची गांठ पडली असतां गोड गोड गोष्टी सांगून पुरोहितानें राजाला संतुष्ट केलें. नंतर तो हळूच ह्मणाला, 'हे नृपश्रेष्ठा, तुला मी एक गोष्ट विचारतों ती खरी सांग' पुण्याहावाचन शांति होम वगैरे धर्मकृत्याच्या वेळीं तूं माझ्याकडे पाहून हासतोस काय म्हणून? तें पाहून मला मोठें वाईट वाटतें. त्याला कांहीं तरी कारण असलें पाहिजे. विनाकारण कांहीं तुला हासें येत नसलें पाहिजे.' राजा ह्मणाला, 'आपण वचनच घेतलें आहे. तेव्हां सांगण्याजोगें नसलें तरी तें मला आपल्याला सांगितलें पाहिजे. सांगतों ऐका. आपल्याला मी पूर्वजन्मींचा वृत्तांत सांगतों. मला पूर्वजन्माची आठवण आहे. मी पूर्वजन्मीं शूद्र असून एका आश्रमामध्यें तपश्चर्या करीत राहिलों होतों. त्यावेळीं आपण तपस्वी ऋषी होता. त्यावेळीं एकदां आपण

संतुष्ट होऊन माझ्यावर अनुग्रह करण्याच्या हेतूनें पितृकार्याच्या वेळीं आसन, दर्भ, हव्यकव्य वगैरे संबंधानें मला उपदेश केला. त्या कर्मदोषानें मी राजा होऊन आपण आतां माझे पुरोहित झाला आहां. मला आपण उपदेश केला त्याचें फळ आपल्याला भोगावें लागत आहे ! हें पाहून मला हासूं येतें. बाकी यांत हासावयाचें कांहींच कारण नाहीं. आपण श्रेष्ठ असून माझें गुरू आहां. मागल्या जन्मीं मला उपदेश केल्यानें आपली सर्व तपश्चर्या फुकट गेली ह्मणून, आतां तरी हें पौरोहित्य टाकून देऊन आपल्या जन्माचें सार्थक करण्याकरितां जा. जेणेंकरून पुन्हां अशी योनी येणार नाहीं असें कांहीं तरी करा. दानधर्म करण्याकरितां आपल्याला लागेल तेवढा पैसा मी देतों. धर्म करून आपण पवित्र व्हा.'

हें राजाचें भाषण ऐकून त्या पुरोहितानें ब्राह्मणांला पुष्कळ दानधर्म करून सर्व ठिकाणच्या तीर्थयात्रा करून तेथेंही गोप्रदानें दिलीं. नंतर आपल्या पूर्वींच्या आश्रमाला जाऊन मोठी कडक तपश्चर्या केली व सिद्धि मिळवून त्या आश्रमांतील सर्व ऋषींमध्यें पूज्यतेला पावला. ह्मणून ब्राह्मणानें हीन जातीला कांहीं सांगूं नये. सांगितल्यास या ऋषीप्रमाणें हीनत्व येतें. ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य ह्या तिन्ही जाती द्विजामध्यें मोडतात. ह्मणून एकादे वेळेस यांना कांहीं तरी सांगितल्यास त्याबद्दल सांगणाऱ्या ब्राह्मणाला मोठासा दोष येत नाहीं. धर्माचें रहस्य फार गूढ आहे. तें सामान्य जनाला कळणें अशक्य आहे. आणि ह्मणूनच मोठमोठे मुनीही आपलीं सर्व कर्मे अगदीं मौन व्रतानें करतात. नुसत्या बोलण्यानेंच कांहीं तरी पातक लागेल ह्मणून ते मुळींच बोलत नाहींत. धार्मिक,सद्गुणी, सत्यशील असे पुण्यवान ब्राह्मणही हीन पुरुषाशीं भाषण केल्यानें दोषाला पात्र होतात. हीन पुरुषाला उपदेश केला असतां त्याचें पातक त्या उपदेश करणारालां भोगावें लागतें. ह्मणून शहाण्या मनुष्यानें बोलावयाचें तें विचार करून बोलावें. पैशाच्या लोभानें जर उपदेश केला तर तो उपदेश करणारा अगदीं अधःपाताला जातो. कोणी कांहीं विचारल्यास त्याबद्दलचा उपदेश करणें तो अगदीं विचार करून करावा. जेणेंकरून आपला पुण्यक्षय होणार नाहीं असेंच नेहमीं वर्तन करावें.'

---

## २३५ रुक्मिणी व लक्ष्मी यांचा संवाद–लक्ष्मी कोणापाशीं रहाते. (१३. ११)

युधिष्ठिर ह्मणाला, 'तात, कोणच्या प्रकारच्या मनुष्याजवळ लक्ष्मी नेहमीं रहाते?' भीष्म ह्मणाले, 'यासंबंधानें मी तुला रुक्मिणी व लक्ष्मी यांचा संवाद सांगतों ऐक.

कोणे एके वेळीं श्रीकृष्णाच्या देखत त्याच्या मांडीवर बसलेल्या लक्ष्मीला रुक्मिणीनें विचारलें कीं, कोणच्या प्रकारच्या मनुष्याजवळ तूं हत्ती, घोडे, गाड्या इत्यादि संपत्तीच्या रूपानें व धैर्य, औदार्य, सौंदर्य, शौर्य इत्यादि सद्गुणांच्या रूपानें राहतेस?' हें ऐकून लक्ष्मी हासत म्हणाली, 'वक्ता, सुंदर, नेहमीं आपल्या कामांत दक्ष, कधीं न रागावणारा, ईश्वरभक्त, कृतज्ञ, जितेंद्रिय व गर्वहीन, अशा पुरुषाजवळ मी नेहमीं राहतें. ज्यांना आपलीं कर्तव्यें करावयाला नकोत, जे नास्तिक आहेत, व जे परस्त्रीशीं गमन करतात, कृतघ्न, स्वधर्म सोडणारे, नेहमीं कर्कश बोलणारे, चोरी करणारे, गुरूचा हेवा करणारे, तेजहीन, बलहीन, सत्वहीन, थोड्याशा दगदगीनें त्रासून जाऊन उगीच रागावणारे, मनांत एक बाहेर एक अशा रीतीनें चालणारे, मूर्खपणानें आत्मसर्वस्वाचें मातेरें करून आळशी राहून सहज रीतीनें जें मिळेल तेवढ्यावर संतुष्ट राहणारे, अशा अजागळांच्या जवळ मी कधीही रहात नाहीं. धर्मशील, वडिलांची सेवा करणारे, आपल्या शरीरावर ताबा ठेवून सदाचरणानें वागणारे व अंगीं सामर्थ्य असून क्षमा करणारे अशा धर्मवेऱ्यांजवळ, त्याचप्रमाणें आपल्या इंद्रियांना उच्छृंखल होऊं न देतां अगदीं सदाचरणानें वागणाऱ्या, क्षमाशील, नेहमीं खरें बोलणाऱ्या, नेहमीं नम्रतेनें राहून सर्वांशीं आर्जवानें वागणाऱ्या, देव व ब्राह्मण यांची एक निष्ठतेनें पूजा करणाऱ्या, स्वकर्तव्यदक्ष, स्त्रियांजवळ मी नेहमीं राहतें. पतीशीं भांडणाऱ्या, घरांतील भांडींकुंडीं अस्ताव्यस्त पडलीं असतांही तिकडे लक्ष न देणाऱ्या, परगृहीं रत होणाऱ्या, निर्लज्ज, पा-

पाचरणी, अमंगळ, नेहमीं वेडींवाकडीं तोंडें करून ओठ चाटणाऱ्या, उगीच कळ काढून भांडत बसणाऱ्या, भित्र्या, आळसानें अहोरात्र निजून राहणाऱ्या या व अशाच दुसऱ्या गुणांनीं युक्त, अशा दुष्ट स्त्रियांकडे मी ढुंकूनही पहात नाहीं. नेहमीं सत्य बोलणाऱ्या, मंगल रीतीनें वागणाऱ्या, सौभाग्यदायक वस्तूंनीं युक्त, आपल्या व्यवस्थित आचरणांनीं आपल्याला भूषविणाऱ्या, पातिव्रत्याचें तिळभरही उल्लंघन न करणाऱ्या, अशा सर्वसद्गुणांनीं युक्त मधुरभाषिणी कल्याणींना सोडून मी केव्हांही कोठेंही जात नाहीं. मोठ्या आदरानें नेहमीं यांच्याच जवळ रहातें. त्याचप्रमाणें गाड्या, रथ इत्यादि वाहनें, उत्तम प्रकारच्या मुली, नानाप्रकारचे दागिने, सर्व प्रकारचे यज्ञ, विपुल वर्षाव करणारे मेघ, प्रफुल्ल कमलें, तेजःपुंज नक्षत्रें, हत्ती, गाई व गाईंचे गोठे, सुंदर सुंदर आसनें, विकासलेल्या कमलांनीं युक्त अशीं मोठमोठालीं सरोवरें, ज्याच्या कांठीं सुंदर हंस व क्रौंच यांचा मधुर शब्द चाललेला असतो, दोन्ही तीर नाना प्रकारच्या वृक्षांनीं गजबजलेले असतात, ज्यांतून नेहमीं पाणी जोरानें वहात असतें, मस्त हत्ती, बैल, मोठमोठे राजे व सिंह यांच्या क्रिडेनें ज्यांचें पाणी खळवळून जातें व ज्यांच्या तीरीं मोठमोठे तपस्वी नेहमीं आनंदानें वास करितात, अशा नद्या, राजांचीं सिंहासनें, सत्पुरुष, राजा व जेथें नेहमीं होमहवन चाललें आहे, गाई, ब्राह्मण, देव यांची पूजा चालली आहे; यथाकाल फलपुष्पांनीं अतिथींचा यथोचित सत्कार होत आहे, अशा प्रकारचीं पवित्र घरें, नेहमीं वेदाध्ययन करणारे ब्राह्मण, स्वधर्मानें वागून प्रजेचें योग्य रीतीनें पालन करणारे क्षत्रिय, शेतकी व व्यापार यांजमध्यें गढून गेलेले वैश्य व तत्परतेनें सेवा करणारे शूद्र ह्या सर्वांच्या ठिकाणीं नेहमीं माझा वास असतो. भगवान नारायणाजवळ मात्र अंतःकरणपूर्वक अगदीं एकनिष्ठेनें मी हें प्रत्यक्ष शरीर धारण करून नेहमीं रहात असतें. हा मला अत्यंत प्रिय आहे. प्रत्यक्ष शरीर धारण करून त्या भगवंतावांचून कोणाजवळच मी रहात नाहीं. अंगच्या सद्गुणांमुळें ज्याच्याकडे माझें अंतःकरण वेधतें त्याच्या धर्म, यश, अर्थ, काम या सर्वांची नेहमीं वृद्धि होत असते.'

---

## २३६ भंगास्वन राजाची गोष्ट.
## ( १३. १२ )

युधिष्ठिर म्हणाला, 'संयोगाचे वेळीं स्त्री व पुरुष यांपैकीं अधिक सुख कोणाला होतें ?' भीष्म ह्मणाले, 'ह्याबद्दल मी तुला भंगास्वन राजाची गोष्ट सांगतों ऐक.

पूर्वी भंगास्वन या नांवाचा एक अत्यंत धर्मनिष्ठ राजर्षी होऊन गेला. त्याला पुत्रसंतति नव्हती, ह्मणून त्यानें पुत्रप्राप्तीकरितां अग्निष्टुत नांवाचा यज्ञ केला. ह्या अग्निष्टुत यज्ञामध्यें इंद्राचा हविर्भाग मुळींच नसतो. तेव्हां ज्यामध्यें आपला भाग नाहीं असा यज्ञ राजानें केला हें पाहून इंद्राला फार राग आला. त्याबद्दल ह्या राजाचा सूड घेण्याकरितां तो अगदीं टपून बसला होता. पण पुष्कळ दिवसपर्यंत त्याला संधि मिळाली नाहीं. पुढें एकदां राजा शिकार करण्याकरितां अरण्यांत गेला असतां ही योग्य संधि आहे असें पाहून इंद्रही गुप्त रीतीनें त्याच्या मागोमाग गेला. इंद्रानें प्रथमतः त्याच्या मनाला भुरळ पाडली. त्यामुळें राजाला आपण कोणीकडे चाललों आहों हें कळेना. तो एकटाच घोड्यावर बसून वाट फुटेल तिकडे चालला. ह्या भटकण्यानें त्याला अतिशय श्रम झाल्यामुळें तो भुकेनें व तान्हेनें व्याकूळ झाला. प्यावयाला कोठें तरी पाणी मिळेल काय म्हणून तो हिकडे तिकडे शोध करूं लागला. इतक्यांत पाण्यानें तुडुंब भरलेलें असें एक सुंदर सरोवर त्याच्या दृष्टीस पडलें. तेव्हां तेथें जाऊन घोड्याला पाणी पाजून त्या दाटछायेच्या झाडाखालीं त्यानें त्याला बांधलें व आपणही स्नान करण्याकरितां सरोवरांत शिरला. पण स्नान करून बाहेर येतो तों आपणाला स्त्रीरूप प्राप्त झालें आहे असें त्याच्या नजरेस पडलें. त्याबरोबर लाजेनें खालीं मान घालून आतां पुढें काय करावें ह्मणून तो विचार करूं लागला. मी आतां घोड्यावर बसून नगरांत कसा जाऊं व अग्निष्टुत यज्ञानें मला महाबलशाली शंभर मुलगे झाले आहेत. त्यांना काय सांगूं ? आपल्या बायकांना हें तोंड कसें दा-

खवूं ? पुरुष हे स्वभावतःच काटक असून स्त्रिया जातीनेंच नाजूक असतात. ही स्त्रीदशा मला कशानें आली तें कळत नाहीं. ह्या स्त्रीरूपानें घोड्यावर बसून जाण्याला मला धीर होत नाहीं.' अशा रीतीनें कांहीं वेळ विचार करीत तेथें तो उभा राहिला. पुढें तसाच धीर धरून घोड्यावर बसून तो आपल्या नगराला परतला. तेव्हां मुलगे, बायका, नोकर लोक व प्रजा त्यांना ह्याचें हें स्त्रीरूप पाहून हा काय चमत्कार असावा ह्मणून ते त्याकडे विस्मयानें पाहूं लागले. राजानें अरण्यांत झालेली सर्व हकीकत त्यांना सांगितली. नंतर आपल्या मुलांना सुखानें राज्य करण्यास सांगून तो अरण्यांत निघून गेला. तेथें एका तपस्व्याची व याची गांठ पडली. पुढें त्या तपस्व्यापासून त्याला शंभर मुलगे झाले. पुन्हां ह्या सर्व शंभर मुलांना घेऊन आपल्या पहिल्या मुलांकडे तो आला व 'मी पुरुष असतांना तुह्मी मला झाला व हे मुलगे मी स्त्री असतांना मला झाले आहेत; तेव्हां तुह्मी सर्वजण भाऊच आहां, म्हणून तुह्मी सर्वजण मिळून आनंदानें राज्याचा उपभोग घ्या,' असें सांगून तो परत अरण्याकडे निघून गेला. इकडे हे दोनशें भाऊही प्रेमानें एकत्र राहून आनंदानें राज्याचा उपभोग घेऊं लागले. हें पाहून इंद्राला अधिक काळजी पडली. मी त्याला अपकार करावयाला गेलों पण उलट त्यानें उपकारच झाला. पूर्वी शंभर मुलगे होते, आतां दोनशें झाले, व ते सर्वजण मिळून आनंदानें राज्य करीत आहेत असें म्हणून इंद्र ब्राह्मणवेषानें त्यांच्यामध्यें फूट पाडण्याकरितां त्यांकडे येऊन म्हणाला, 'एका बापाच्या पोटीं जन्म घेतलेल्या भावांमध्येंसुद्धां इतकें बंधुप्रेम रहात नाहीं. कश्यपाच्या पोटीं जन्मलेले सुर आणि असुर यांनीं आपापसांमध्यें राज्याकरितां कितीतरी तंटा केला. तुह्मी राजा भंगास्वनापासून झाला आहां व हे एका तपस्व्यापासून झाले आहेत. हीं तपस्व्याचीं मुलें पितृपरंपरेनें तुम्हांला मिळालेल्या राज्याचा उगीच उपभोग घेत आहेत हें बरें नव्हे;', अशाप्रकारें इंद्रानें बुद्धिभेद केल्यामुळें ते सर्वजण आपआपसांमध्यें युद्धाला प्रवृत्त झाले व त्या युद्धांत सर्वांचाही नाश झाला. हें जेव्हां त्या स्त्रीरूप भंगास्वन राजाला कळलें तेव्हां तिला फार वाईट वाटून ती शोक करूं लागली; इतक्यांत इंद्र पुन्हां ब्राह्मणवेषानें तिच्याकडे येऊन, 'सुंदरि, तूं कां रडतेस? तुला काय दुःख झालें,' म्हणून विचारूं लागला; तेव्हां त्या तापसीनें त्याला आपल्या सर्व स्थितीची व दोनशें मुलांची हकीकत सांगून पुन्हां रडूं लागली. अशा प्रकारें तिला शोकाकुल पाहून इंद्र म्हणाला, 'कल्याणि, तूं इंद्राला ज्यामध्यें हविर्भाग नाहीं अशा प्रकारचा अग्निष्टुत यज्ञ केलास; मी इंद्र आहें; तूं माझा अनादर केलास म्हणून मीही तुझ्याशीं वैर मांडून तुला संकटांत पाडलें.' हें ऐकून ती तापसी त्या इंद्राच्या पायांवर डोकें ठेवून दीनवाणीनें, 'मीं मुलासाठीं तो यज्ञ केला त्याबद्दल मला क्षमा कर,' असें ह्मणाली. त्याबरोबर इंद्र संतुष्ट होऊन तिला ह्मणाला, 'मी तुझ्यावर प्रसन्न आहें, आतां ह्या तुझ्या दोनशें मुलांपैकीं कोणते मुलगे जिवंत करूं तें सांग. आईच्या नात्यांत झालेल्यांना करूं कां बापाच्या नात्यांत झालेल्यांना करूं.' तें ऐकून तापसी हात जोडून ह्मणाली, 'मी स्त्री असतांना मला झालेल्या मुलांना जिवंत कर.' हें ऐकून इंद्राला मोठें आश्चर्य वाटलें. तो तिला म्हणाला, 'तूं पुरुष असतांना तुला जे मुलगे झाले त्यांवर इतकी इतराजी कां व स्त्रीपणीं झालेल्यावर इतकी अधिक प्रीति कां ? तापसी ह्मणाली, आपल्या मुलाबद्दल स्त्रियांच्या अंतःकरणांत जितकी प्रीति असते तितकी पुरुषांच्या नसते.' हें ऐकून इंद्रानें आनंदानें सर्वच मुलगे उठविले व त्याला पुरुषत्व किंवा स्त्रीत्व यांपैकीं वाटेल तें देण्यास तयार झाला. तेव्हां तापसी म्हणाली, 'पुरुषत्वाची मला इच्छा नाहीं. स्त्रीत्वच असूं दे.' यावर पुरुषत्व टाकून स्त्रीत्वाची कां इच्छा करतोस ? ह्मणून इंद्रानें विचारल्यावरून ती म्हणाली, 'रतिसुख पुरुषापेक्षां स्त्रियांनाच अधिक मिळतें. पुरुष असतांना मला जें सुख झालें त्यापेक्षां हल्लीं मला अधिक सुख होत आहे. ह्मणूनच स्त्रीत्व मला आवडतें.' बरें तर, असें म्हणून तिचा निरोप घेऊन इंद्र स्वर्गीं निघून गेला.'

## २१७ उपमन्यूची कथा, शंकराचें सामर्थ्य.
## ( १३. १३–१५ )

नंतर ही लोकयात्रा सुखानें जाण्याकरितां मनुष्यानें कसें वागावें ह्मणून युधिष्ठिरानें विचारल्यावरून भीष्म म्हणाले, ' हिंसा, चोरी, परस्त्रीची आवड हीं तीन कायिक पापें, खोटें बोलणें, मर्मभेदक भाषण, चुगली, व वडबड हीं चार वाचिक पातकें, परद्रव्यापहाराची इच्छा, द्वेष, व हिंसा करण्याची इच्छा, हीं तीन मानसिक पापें अशीं दहा पातकें मनुष्यानें सोडून द्यावीं. पापकर्म करणाऱ्याला वाईट व पुण्यकर्म करणाऱ्याला चांगलें फल मिळतें ह्मणून पापकर्म सोडल्यानें ही लोकयात्रा सुखानें जाईल.

यावर सुरासुरगुरु शंकराचीं नांवें युधिष्ठिरानें विचारल्यावरून भीष्म ह्मणाले, 'जो प्रभु महादेव सर्वव्यापी आहे पण कोठें दिसत नाहीं त्या शंकराचीं नांवें सांगतां येणें फार कठिण आहे. सर्व देवादिकांना त्यानेंच निर्माण केलें आहे. पिशाचापासून तों थेट ब्रह्मापर्यंत सर्वजण याचीच उपासना करतात. गुणक्षोभिणी मायेला जन्माला घालून तिच्यापासून ब्रह्मादिकांची उत्पत्ति यानेंच केली. तेव्हां अशा महासमर्थ विश्वेशाचे गुण वर्णन करणें माझ्यासारख्या गर्भ, जन्म व जरा यांनीं युक्त अशा पामराच्यानें कसें होईल? शंखचक्रगदाधारी नारायणच ह्याचे गुण वर्णन करण्याला समर्थ आहे. यानें पूर्वी बदर्याश्रमीं हजारों वर्षे मोठी कडक तपश्चर्या करून चराचर गुरु शिवाला संतुष्ट करून घेतलें. त्यामुळेंच तिन्ही लोकांमध्यें याचें वर्चस्व आहे.' असें ह्मणून भीष्म जवळच असलेल्या श्रीकृष्णाला ह्मणाले, 'युधिष्ठिरानें विचारल्याप्रमाणें विष्णुरूप शंकराचीं पूर्वी तंडी नांवाच्या ऋषींनीं ब्रह्मलोकामध्यें सहस्रनामें घेतलीं तीं हजार नांवें तूं याला सांग !' हें ऐकून श्रीकृष्ण ह्मणाले, ' हिरण्यगर्भादि देव, मोठमोठे ऋषी यांनाही त्या ईशाच्या लीलेचा थांग लागला नाहीं. वस्तु कितीही सूक्ष्म असली तरी तिचा थांग लावणाऱ्या सूक्ष्मदर्शी आदित्यासारख्या ग्रहांनाही त्याच्या स्थानाचा पत्ता लागला नाहीं, मला थोडेबहुत गुण माहीत आहेत ते मी ....' असें ह्मणून श्रीकृष्ण डोळ्याला पाणी लावून शुचिर्भूत होऊन ह्मणाला, ' रुक्मिणीच्या मुलानें शंभरासुराला मारल्यावर बारा वर्षांनीं जांबवती मजकडे आली. प्रद्युम्न, चारुदेष्ण वगैरे रुक्मिणीच्या सर्व गुणसंपन्न मुलांना पाहून आपणालाही असेच गुणरूपसंपन्न मुलगे असावेत असें तिला वाटलें. ह्मणून ती हात जोडून मला ह्मणाली कीं, 'भगवन्, शूर, बलिष्ठ, रूपवान, पुण्यशील असे आपल्या सारखे मुलगे मला व्हावेत. आपल्याला दुर्घट कांहींच नाहीं. पूर्वी बारा वर्षेपर्यंत अगदीं व्रतस्थ राहून आपण शंकराची आराधना केली, त्याच्या योगानें रुक्मिणीला चारुदेष्ण, सुचारु, चारुवेश, यशोधर. चारुश्रवा, चारुयश, प्रद्युम्न व शंभू असे एकापेक्षां एक चांगले मुलगे झाले. याप्रमाणेंच रूपानें व शौर्यानें युक्त मुलगे मलाही पण व्हावेत.' हें ऐकून मी शंकराला तुष्ट करण्याकरितां निघालों. गरुडाचें स्मरण केल्याबरोबर त्यानें येऊन मला आपल्या खांद्यावरून हिमालयावर नेऊन पोहोंचविलें. तेथें पोहोंचल्यावर मीं गरुडाला जाण्याला निरोप दिला. त्या तपस्व्यांच्या मूळस्थानाला गेल्याबरोबर तेथला तो विलक्षण देखावा पाहून मला फार आनंद झाला. त्याठिकाणीं कळंब, नारळ, केवडा, जांभुळ, वड, बोरी, बेल, आंबा, कवठ, कुंद, पुन्नाग, अशोक, अतिमुक्त, मधुमालती, चाफा, फणस, हीं व अशींच दुसरीं वन्य फलपुष्पांचीं झाडें आणि लता यांनीं तो सर्व पर्वत भरला होता; त्या सर्व झाडांवर नाना प्रकारचे पक्षी बसून त्यांचीं गोड फळें खात आनंदानें शब्द करीत होते. काळवीट, वानर, वाघ, सिंह, हत्ती, हरीण, मोर, मांजर, साप, म्हैस, अस्वल, वगैरे पशु त्या अरण्यांतून आनंदानें हिकडून तिकडे भटकत होते. नाना प्रकारच्या फुलांच्या सुवासांनीं व मदोन्मत्त हत्तींच्या गंडस्थळांतील दानोदकाच्या दर्पानें भरून वाहणारा वारा स्वर्गांतील अप्सरांच्या गाण्यांचे मंजुळ आवाज आपल्याबरोबर वाहून आणीत असल्यामुळें कान व नाक हीं दोन्ही एकदम तृप्त होऊन मनाला अतिशय आल्हाद होत असे. पक्ष्यांचा मंजुळ आवाज, हत्तींची गर्जना, किंनरांचें गाणें, व सामवेद्यांचे सुस्वर ध्वनी, हीं सर्व एकवटून तेथें ऐकूं येत होतीं. तेथें कमलांनीं भरले

लीं अशीं रमणीय सरोवरें पुष्कळ होतीं. तेथेंच पवित्र अशा भागीरथीच्या कांठीं अग्नीप्रमाणें तेजस्वी असे मोठमोठे मुनी, ज्यांपैकीं कित्येक केवळ वायु भक्षण करून होते, कित्येक पाणी पिऊन होते, कित्येक धूम्रपान करून होते, कित्येक दूध पिऊन होते, कित्येक नुसते ध्यानांत गढून होते, कित्येक उन्हांत बसून होते, कित्येक पिंपळाचीं फळें खाऊन होते, कित्येक नुसत्या पाण्यांत पडून होते, कित्येकांनीं वल्कलें धारण केलीं होतीं, व कित्येकांनीं कातडीं पांघरलीं होतीं, असे तपोधन आश्रमांमधून आपल्या शरीराला अशा रीतीनें कष्टवीत केवळ तपश्चर्येमध्यें गढून होते. आकाशांतील चंद्रमंडलाप्रमाणें तें आश्रमस्थान फारच शोभायमान दिसत होतें. शिवादिदेवगणसुद्धां त्या स्थानाला पूज्य मानीत. त्या ठिकाणीं साप आणि मुंगुस, हरीण आणि वाघ, असे स्वभाववैरी सुद्धां ऋषींच्या तपाच्या प्रभावानें मित्रत्वानें रहात होते. अशा ह्या दिव्य आश्रमामध्यें शिरून मी चहूंकडे पाहूं लागलों तों तेथें ज्यांच्या सभोंवार शिष्य मंडळी बसली आहेत व ज्यांनीं जटा वल्कलें धारण केलीं आहेत असे सूर्यासारखे दैदीप्यमान एक तपोधन माझ्या दृष्टीस पडले. त्यांना मीं शिरसाष्टांग नमस्कार केला, तेव्हां माझें अभिनंदन करून व चांगली कडक तपश्चर्या करून ईश्वराला संतुष्ट कर म्हणजे तुला तुझ्याच सारखा रूपगुणवान मुलगा होईल, असा आशीर्वाद देऊन ते म्हणाले, 'प्रभु शंकर आपल्या पत्नीसह येथेंच क्रीडा करीत असतो. इंद्रादि देवगण व मोठमोठे ऋषी यांनींहि याच ठिकाणीं ब्रह्मचर्यव्रतांत राहून तपश्चर्या केली व त्याला तोषवून आपल्या इच्छा पूर्ण करून घेतल्या. सर्व सृष्टिमात्र आपल्या लीलेनें उत्पन्न करून फिरून संहार करणारा ईश्वर येथेंच आहे. पूर्वीं हिरण्यकश्यपू नांवाचा जो महाबलाढ्य दानव झाला त्यानेंही या शर्वालाच आपल्या तपश्चर्येनें प्रसन्न करून घेऊन त्याच्यापासून दहा कोटी वर्षेंपर्यंत स्वर्ग लोकींचें राजैश्वर्य भोगलें. पुढें त्याच शंकराच्या आशीर्वादानें हिरण्यकश्यपूला मंदार नांवाचा लोकविश्रुत असा महापराक्रमी मुलगा झाला, तो इंद्राशीं दहा कोटी वर्षेंपर्यंत युद्ध करीत होता. हा इतका बलाढ्य होता कीं, त्याच्यावर प्रहार केल्यानें इंद्राचें वज्र व विष्णूचें चक्र यांचा देखील चुराडा उडाला. पशुपतीनें पूर्वीं मदोन्मत्त अशा,पाण्यांत दड[illegible] बसलेल्या राक्षसांचा वध करून हें तेजस्वी चक्र [illegible]र्माण केलें, तेंच पुढें तुला दिलें. ज्यावेळीं हें निर्माण केलें तेव्हांच शंकरांनीं सांगितलें होतें कीं, माझ्यावांचून याच्याकडे कोणीही पाहूं शकणार नाहीं, आणि ह्मणूनच याचें नांव सुदर्शन ठेवलें. केशवा, अशाप्रकारच्या सुदर्शनाचाही त्या मंदारावर प्रहार करितांना चुराडा झाला. ज्याला त्या प्रभूचा वर आहे त्याच्यावर अशीं हजारों चक्रें व वज्रें येऊन पडलीं ह्मणून काय होणार !

विद्युत्प्रभावरही संतुष्ट होऊन त्याला यानें हजार वर्षें पर्यंत तिन्ही लोकांचें साम्राज्य भोगावयाला दिलें. व त्याला 'आतां तूं माझाच अनुचर होऊन रहा,' असें सांगून त्यांनीं त्याला एक लक्ष पुत्र देऊन कुशद्वीपाचें राज्य दिलें.

त्याचप्रमाणें शतमुख नांवाचा एक असुर होऊन गेला. हा त्या शंकरांना संतुष्ट करण्याकरितां आपल्या अंगांतील मांस काढून शंभर वर्षेंपर्यंत रोज त्याची अग्नीला आहूति देत असल्यामुळें भगवान शंकर संतुष्ट होऊन, 'त्याला काय इच्छा आहे,' असें ह्मणाले. तेव्हां शतमुख ह्मणाला, 'शाश्वत टिकणारें बल व अद्भुत योगसामर्थ्य मला द्या.' त्यावरोबर शंकर बरें आहे असें ह्मणाले. स्वयंभू ब्रह्मा मुलाकरितां योगसमाधि लावून तीनशें वर्षेंपर्यंत तपश्चर्या करीत होता तेव्हां संतुष्ट होऊन शंकरांनीं त्याला हजार पुत्र दिले.

याज्ञवल्क्य या नांवाचे एक धार्मिक ऋषी होऊन गेले. यांनीं महादेवाला संतुष्ट करून अतुल यश मिळविलें. त्याचप्रमाणें पराशरसुत वेदव्यासांनींही प्रभूची आराधना करून त्याला संतुष्ट केलें.

पूर्वीं एकदां इंद्रानें वालखिल्यांचा अपमान केला तेव्हां ते सर्वजण रागावून शंकराला संतुष्ट करण्याकरितां तपश्चर्या करण्याला बसले. त्यांच्या तपश्चर्येनें संतुष्ट होऊन शंकरांनीं त्यांना सोम हरण करणाऱ्या गरुडाला उत्पन्न करण्यास सांगितलें. त्याचप्रमाणें एकदां महादेवांच्या कोपानें भूतलावरील सर्व पाणी नाहींसें झालें. तेव्हां शोकाकुल होऊन

सर्वांनीं मिळून त्याला विनविलें, तेव्हां संतुष्ट होऊन पुन्हां पूर्वीप्रमाणें त्यांनीं पाणी उत्पन्न केलें.

अत्रिऋषींची बायको त्यांच्यावर रागावून फिरून मी नवऱ्याच्या केव्हांही आधीन होणार नाहीं ह्मणून या शंकरांला शरण गेली व तेथें तीनशें वर्षेपर्यंत कांहीं न खातां फक्त मुसलावर निजून राहून तिनें तपश्चर्या केली. त्या वेळीं महादेव हासून तिला ह्मणाले, ' पतीवांचूनच तुला पुत्र होईल व तुझ्याच नांवानें तो प्रसिद्धीला येईल.

शाकल्याच्या तपाला संतुष्ट होऊन ' तूं ग्रंथकार होशील व तुझी अक्षय्य कीर्ति राहील, तुझें कुल अक्षय्य सत्पुरुषांनीं अलंकृत असें राहील, तुझा मुलगा प्रसिद्ध सूत्रकर्ता होईल, ' असा यांनीं वर दिला सावर्णीलाही त्याच्या तपानें संतुष्ट होऊन, ' तूं लोकविख्यात ग्रंथकर्ता होशील, ' ह्मणून यांनीं आशीर्वाद दिला. ' इंद्रानें वाराणशीमध्यें दिगंबर व सर्वांगाला भस्म चर्चून कडक तपश्चर्या करून या महादेवांला संतुष्ट करून घेऊन देवराज्य मिळविलें. नारदांनींही अशाच रीतीनें एकनिष्ठ आराधना करून महादेवाला संतुष्ट करून घेतलें. तेव्हां, ' तेजानें, तपानें, कीर्तीनें तुझ्यासारखा कोणी होणार नाहीं, गीतवाद्यादिकांनीं तूं नेहमीं माझी उपासना करीत राहशील, ' असे ते त्यांना ह्मणाले.

मीं सुद्धां पूर्वी पशुपतीची आराधना केली ती कां व कशाकरितां केली सांगतों ऐक. पूर्वी कृतयुगीं व्याघ्रपाद नांवाचे वेदवेदांगपारग असे महान् तपस्वी मुनी होऊन गेले. त्यांच्या पोटीं मी व माझा धाकटा भाऊ असे दोघेजण जन्माला आलों. पुढें एकदां आपल्या बालभावानुसार मी खेळत खेळत शेजारींच असलेल्या दुसऱ्या एका ऋषींच्या आश्रमाकडे गेलों. तेथें गाईची धार काढतांना आह्मीं पाहिलें. अमृतापेक्षांही गोड असें तें दूध पाहून मी पळत पळत आपल्या आईकडे गेलों व मला ' दूधभात दे,' असें ह्मणालों. घरीं दूध नसल्यामुळें आईला माझे शब्द ऐकून फार वाईट वाटलें. नंतर तिनें पाण्यामध्यें पीठ कालवून तें पिठवणी 'हेंच दूध' ह्मणून आमच्यापुढें ठेवलें. पण पित्यानें एकदां मला एका मोठ्या यज्ञांत नेलें होतें, त्या ठिकाणीं सुरभीचें अमृतासारखें गोड दूध पिऊन मला दुधाची गोडी ठाऊक असल्यामुळें तें पिठवणी पिऊन माझें समाधान होईना व ' तूं जें मला दूध ह्मणून दिलेंस तें दूध नाहीं, ' असें मी तिला ह्मणालों. तेव्हां तिला फार वाईट वाटून तिनें प्रेमानें मला मांडीवर घेतलें व आलिंगन देऊन ती मला ह्मणाली, 'बाळा, अंतःशुद्धीकडे लागलेल्या, आमच्यासारख्या, फलमूलांवर नदीच्या कांठीं रहाणाऱ्या, वनवासी मुनींना दूध कोठून मिळणार ? आह्मी कधीं कधीं तर जंगलामध्यें वाऱ्यावर रहात असतों, आह्मांला नागरिक लोकांच्या अन्नाची ओळख सुद्धां ठाऊक नाहीं. या वनांत गाईलाच मुळीं ठिकाण नसल्यानें दूध कोठून मिळणार ? नदीकांठीं, पर्वताच्या गुहेमध्यें किंवा डोंगरावर किंवा निरनिराळ्या तीर्थांच्या ठिकाणीं तपांमध्यें गढून जप करीत रहाणाऱ्या आह्मांला तो शिवच कायतो एक आधार आहे. त्या विरूपाक्ष वरदाला प्रसन्न करून घेतल्यावांचून दूध कोठून मिळणार, कपडेलत्ते कोठून मिळणार किंवा निरनिराळीं सुखें तरी कोठून मिळणार ? तेव्हां सर्वभावानें त्याला शरण जा, ह्मणजे त्याच्या प्रसादानें तुझ्या सर्व कांहीं इच्छा पूर्ण होतील. ' हें आईचें भाषण ऐकून मी ह्मणालों, ' आई हा शंकर कोण आहे, तो कोठें रहातो, तो कशानें प्रसन्न होतो, तो कसा भेटणार, त्याचें रूप कशा प्रकारचें आहे, त्याचें ज्ञान कशानें होईल व प्रसन्न झाला असतां तो मला दर्शन देईल किंवा नाहीं? ' हें माझें भाषण ऐकून गहिंवरून तिचे डोळे पाण्यानें भरून आले व माझ्या अंगावरून हात फिरवून दीनवाणें ह्मणाली, ' बाळा हा महादेव ओळखण्याला फार कठीण असून त्याचा आधार मिळणें दुरापास्त आहे. त्याच्या प्राप्तीमध्यें पुष्कळ विघ्नें आहेत. ज्यांची अंतःशुद्धि झाली नाहीं अशांना त्याचें आकलन होऊन दर्शन होणें फार कठीण आहे. विद्वान लोक त्याचीं अनेक रूपें व स्थानें आहेत असें ह्मणतात. त्या परमेश्वराचें थोर चरित्र व त्यानें पूर्वी धारण केलेलीं अनेक रूपें कोणाला ओळखणार ? तो कशी क्रीडा करतो व कसा प्रसन्न होतो हें कोणाला सांगतां येणार ? तो विश्वरूप महेश्वर सर्वांच्या हृदयामध्यें असून भक्तांची कींव करण्यासाठींच दर्शन दिल्याचें मीं मुनींच्या तोंडून ऐकलें आहे. ब्राह्मणावर दया कर-

ण्यासाठीं त्यानें धारण केलेल्या नानारूपांचें पुढील वर्णन देवांच्या तोंडून ऐकण्यांत येते. हा ब्रह्मा, विष्णु, इंद्र, रुद्र, आदित्य, अश्विनीकुमार, विश्वेदेव, याप्रमाणें सर्व पुरुष व देवस्त्रिया यांचें रूप धारण करतो. हा प्रेत, पिशाच्च, किरात, शबर, कूर्ममत्स्यादि जलचर प्राणी, शंख, पोळे, यक्ष, राक्षस, सर्प, दैत्य, दानव, बिळांत रहाणारे प्राणी, वाघ, सिंह, हरीण, लांडगे, अस्वल, पक्षी, घुबड, कोल्हीं, हंस, कावळे, मोर, सरड, सारस, बगळे, गिधाडें, चक्रवाक याप्रमाणें नानारूपें धरतो. वस्त्रें किंवा पर्वत हाच होतो. हाच गाईचें, हत्तीचें, उंटाचें, गाढवाचें, बकऱ्याचें, चित्त्याचें व व दुसऱ्या अनेक पशुपक्ष्यांचें रूप धरतो. दंड, छत्री किंवा कमंडलु धारण करणारा हाच आहे, याला सहा तोंडें आहेत, तशींच पुष्कळ तोंडें आहेत, याला तीन डोळे व पुष्कळ डोकीं आहेत. पुष्कळ कंबरा, पुष्कळ पाय, अनेक पोटें, अनेक तोंडें, अनेक हात, अनेक बरगड्या अशीं निरनिराळीं रूपें हा धरतो. याच्या भोंवतीं गणांचा घोळका असतो. ऋषी, गंधर्व, सिद्ध, चारण, यांचें रूप हाच धरतो, सर्व अंग भस्मानें पांढरें करून घेऊन चंद्राच्या कोरीनें आपल्याला हा भूषवून घेतो, नानास्वरांमध्यें ह्मटलेल्या अनेक स्तोत्रांनीं याचा जयजयकार होऊन अनेक स्तुतींच्या योगानें लोक याची पूजा करितात. सर्व लोकांचा नाश करणारा हाच असून सर्वांना आधार हाच आहे. हा सर्वव्यापी असून सर्व कांहीं याच्या तोंडूनच निघतें. ज्याची ज्याची जी जी ह्मणून इच्छा असते व जो जो ज्या ज्यासाठीं याची आराधना करतो ती ती इच्छा याला कळते; ह्मणून याला तूं शरण जा. हा कधीं आनंदांत असतो, कधीं रागांत असतो, कधीं हुंकार सोडीत असतो. याच्या हातामध्यें चक्र, शूल, गदा मुसळ, तरवार, परशु याप्रमाणें निरनिराळ्या प्रसंगीं निरनिराळीं आयुधें दिसतात. पृथ्वीला धारण करणारा शेष हाच आहे, ह्याला सापाचा कडदोरा असून सापाचींच कुंडलें व सापाचेंच जानवें आहे. यानें आपल्या अंगावर हत्तीचें कातडें घेतलें आहे, हा आपल्या गणांमध्यें मिळून हासतो, गातो, मनोहर नाचतो, नानावाद्यें वाजवितो, गोष्टी सांगतो, जांभई देतो, रडतो, रडवितो कधीं वेड्याचें तर कधीं झिंगल्याचें स्वरूप दाखवून, कधीं फार गोड बोलतो. कधीं कधीं आपल्या डोळ्यांनीं सर्व प्राणिमात्रांला भेवडावीत हा खदखदां हासतो. हा मनाला वाटेलत्याप्रमाणें जागतो, निजतो किंवा जांभई देतो. हा कधीं जप करतो व कधीं दुसऱ्याच्या जपाला विषय बनतो, कधीं तप करतो, कधीं दुसऱ्याच्या तपाचा विषय बनतो. कधीं देतो, कधीं घेतो, कधीं ध्यानांत गढतो, कधीं दुसऱ्यांच्या ध्यानाचा विषय बनतो, वेदीमध्यें पशु मारण्याच्या ठिकाणीं, गोठ्यामध्यें, अग्नीमध्यें, अशा निरनिराळ्या ठिकाणीं निरनिराळ्या वेळीं तो दिसतो. कधीं तो बाल दिसतो, कधीं ह्मातारा दिसतो, व कधीं तरुण दिसतो, केंस वर उभारलेला, महालिंगवान, नग्न व डोळे विक्राळ, असा हा ऋषिकन्या व ऋषिस्त्रिया यांच्याशीं क्रीडा करीत असतो. याचा वर्ण गौर आहे, श्याम आहे, काळा आहे. फिक्ट आहे, धुरकट आहे, तसाच तांबडाही आहे, त्याचे डोळे फार विशाल असून उग्र आहेत. दिशा ह्याच याचें वस्त्र असून सर्वांना हा पांघरूण घालणारा आहे. जो हा रूपहीन, मायावी, नानाकार्यांचीं स्वरूपें धारण करणारा असून ज्याला आदि, अंत व जन्म नाहीं अशा ह्या अनंताचें खरें स्वरूप कोणाला कळणार? हा सर्वप्राणिमात्रांच्या हृदयामधला प्राण, मन, व जीव आहे. योगात्मा हाच असून योग हें नांव यालाच आहे. योगी ज्या ध्यानामध्यें गढले असतात, तें ध्यान हाच असून हा परमात्मा केवळ भावानें जाणवणारा आहे. वाजविणारा, गाणारा हाच असून यालाच हजार डोळे आहेत. याला एक, दोन, तीन त्याचप्रमाणें लक्षावधि तोंडें आहेत. तेव्हां त्याची भक्ति धरून त्याच्याकडे लक्ष लावून त्यावर निष्ठा ठेवून त्याचाच कायतो आधार घे व त्याला भज, ह्मणजे तुझ्या मनाप्रमाणें सर्व इच्छा परिपूर्ण होतील.' हें आईचें भाषण ऐकून तेव्हांपासून त्या महादेवावर माझी एकाग्र भक्ति जडून एक हजार वर्षें डाव्या पायाच्या आंगठ्यावर उभा राहून, उग्र तप करून मीं त्याला तोषविलें. पुढें शंभर वर्षें फळें खाऊन राहिलों. दुसरीं शंभर, गळून पडलेलीं पानें खाऊन राहिलों. तिसरीं पाण्यावर रा-

हिलों. व पुढें सातशें वर्षें वाऱ्यावर राहिलों. याप्रमाणें एक हजार वर्षें शंकराची आराधना केली. तेव्हां संतुष्ट होऊन हा माझा एकनिष्ठ भक्त आहे कीं नाहीं ह्याची परीक्षा पाहण्यासाठीं इंद्राच्या रूपामध्यें हातांत वज्र घेऊन व सर्व देवांना बरोबर घेऊन ज्याचे डोळे लाल असून कान फिरले होते व सोंड ज्यानें आंखडून घेतली होती अशा चार दातांच्या पांढऱ्या शुभ्र मस्त हत्तीवर बसून किरीट, हार व बाहुभूषणें यांमध्यें आत्मतेजानें झळकत तो मजकडे आला. त्याच्यावर पांढरें शुभ्र छत्र धरिलें असून अप्सरा व गंधर्व दिव्य गायन करीत त्याच्या बरोबर चालत होत्या. मजजवळ येऊन, 'मी संतुष्ट आहें वर माग,' असें तो ह्मणाला; परंतु तें भाषण मला न आवडून मी ह्मणालों कीं, 'शंकरावांचून दुसऱ्या कोणाही देवतेपासून वर मिळविण्याची माझी इच्छा नाहीं. त्या महेश्वरावांचून दुसरी गोष्टच माझ्या कानाला गोड लागत नाहीं. त्यांच्या आज्ञेनें मी किडा किंवा ज्याला पुष्कळ फांद्या आहेत असें झाड होईन, परंतु त्याच्या प्रसादावांचून त्रिभुवनाचें राज्यही मला नको. त्या महादेवाच्या पायाचें वर्णन करण्यामध्यें गढलों असतां मला चांडाळयोनींत जन्म आला तरी तो पत्करला; पण त्याची भक्ति नसून इंद्रभुवन मिळालें तरी तें मला नको आहे. देव व असुर यांचा गुरु अशा त्या विश्वेश्वराच्या ठिकाणीं ज्याची भक्ति नाहीं त्याचा दुःखक्षय पाणी पिऊन किंवा वायुभक्षण करून तरी कोठून होणार? ज्यांचें एक क्षणभरसुद्धां हरचरणाकडे लक्ष लागत नाहीं अशांना बाकीच्या धर्मासंबंधी गोष्टी व्यर्थ आहेत. पापी असें कलियुग आलें असतां एक क्षणसुद्धां याच्या भजनावांचून घालवूं नये. हरभक्तिरूपी अमृत जो प्याला आहे त्याला भवभय मुळींच उरत नाहीं. त्याच्या प्रसादावांचून त्याच्याकडे एक दिवस, अर्धा दिवस, मुहूर्त, क्षण, एवढेंच नव्हे, पण एक लवभर देखील लक्ष लागावयाचें नाहीं. त्याच्या प्रसादानें मी किडा किंवा पतंग होईन; परंतु तुझ्या हातून त्रैलोक्य देखील मला नको. मला स्वर्ग नको, देवांचें राज्य नको, ब्रह्मलोक नको, मुक्ति नको, माझी कोणतीही इच्छा नाहीं; फक्त त्याचा दास व्हावें एवढी इच्छा आहे. जोंपर्यंत ज्याच्या कपाळावर पांढरा शुभ्र असा चंद्र झळकत आहे असा महेश प्रसन्न झाला नाहीं तोंपर्यंतच जन्म, जरा, मरण इत्यादिकांचें ठोंसे बसून या देहावर जीं दुःखें येऊन पडतात तीं मी मुकाट्यानें सहन करीत आहें. जरामरणापासून मुक्त, चंद्रसूर्य व अग्नि याप्रमाणें देदीप्यमान, सार, व आधारभूत अशा सर्व वस्तूंचें आदिकारण असा तो रुद्र त्याला प्रसन्न करून घेतल्याशिवाय कोणत्या मनुष्याच्या मनाला शांति मिळेल? माझ्या चुकीनें जर मी पुनर्जन्माच्या फेऱ्यांत पडलों तर या नवीन नवीन येणाऱ्या जन्मांमध्यें देखील त्या शंकरावांचून मी दुसऱ्या कोणावर भक्ति ठेवणार नाहीं.' इंद्र ह्मणाला, 'तो सर्वांचा स्वामी आहे, सर्व कारणांचें मूळ आहे, याला काय पुरावा आहे? ह्मणून त्याच्यावांचून दुसऱ्या कोणापासून तुला प्रसाद नकोसा वाटतो.' हें ऐकून मी ह्मणालें, 'ब्रह्मवेत्ते ज्याला सतही ह्मणतात, असतही ह्मणतात, व्यक्त ह्मणतात, अव्यक्त ह्मणतात, एक ह्मणतात, अनेक ह्मणतात, असा तो नित्य असून त्याला आदि, मध्य व अंत नाहीं. तो ज्ञानैश्वर्यानें संपन्न आहे, तो परमात्मा आहे. जें दुसऱ्या कोणीं उत्पन्न केलें नाहीं असें सर्वैश्वर्य त्याच्यापासून आहे. ज्याच्या उत्पत्तीला कांहीं बीज नसून जो हा सर्वांच्या उत्पत्तीचें बीज आहे, जो हा तमाच्या पलीकडचा असा तेजरूपी आहे, सर्व तपाचा अर्क जो हाच आहे, त्या ह्याला ओळखल्यानें शोक करीत बसण्याची पाळी येत नाहीं. सृष्टीची उत्पत्ति व सर्व प्राणिमात्रांचे भाव ह्याला कळतात. त्याचप्रमाणें सर्व भूतमात्रांच्या नाशालाही हाच कारण आहे. हा सर्वव्यापी असून वाटेल तें देणारा आहे. तर्कशास्त्राला हा अद्यापि सांपडला नाहीं व सांख्य आणि योगशास्त्रांचा हा मुख्य आधारभूत विषय आहे. तत्ववेत्ते याचीच उपासना करतात. प्रत्यक्ष तुझा आत्मा हा तोच आहे. हा सर्व भूतमात्रांचा गुरु आहे. सर्व आकाश व्यापून त्यापासून एक अंड उत्पन्न करून त्यामध्यें त्रैलोक्याला निर्माण करणाऱ्या ब्रह्मदेवाला यानेंच उत्पन्न केलें. अग्नि, वायु, जल, पृथ्वी, आकाश, मन व महत् यांना उत्पन्न करणारा यांवाचून दुसरा कोण आहे? मन, बुद्धि, अहंकार, तन्मात्रें, इंद्रियें यांना तरी यावांचून दुसरा उत्पन्न करणारा

कोण ? हें विश्व ब्रह्मदेवानें उत्पन्न केलें म्हणतात; परंतु हा ब्रह्मदेवसुद्धां त्याची आराधना करूनच मोठें वैभव भोगीत आहे. जें मोठें सामर्थ्य ब्रह्मा, विष्णु व महेश्वर यांच्या ठिकाणीं दिसून येतें तें याच्यापासूनच आहे. या महादेवाला थोर असा दुसरा कोणी आहे काय ? दितीचे मुलगे जे दानव त्यांना जें वैभव व दुसऱ्यांना पीडा देण्याचें सामर्थ्य आलें आहे तें याच्यावांचून दुसऱ्या कोणापासून ? दिशा, काल, सूर्य, व प्रकाशमान वस्तू त्याचप्रमाणें ग्रह, वायु, चंद्र तारे या सर्वांची उत्पत्ति शंकरापासूनच आहे. यज्ञाची उत्पत्ति, त्रिपुराचा नाश इत्यादि सर्व यापासूनच आहेत. उगीच पुष्कळ कानाला गोड लागणारे तर्कवाद करीत बसण्याची जरूर नाहीं. सर्व सिद्ध, गंधर्व, देव व ऋषी यांपासून तुला जो बहुमान मिळतो हा त्याच्यामुळेंच आहे. हें सर्व सचेतन व अचेतन भूतमात्र ज्याच्यामध्यें तो व्यापून राहिला आहे तें सर्व प्राणिमात्रांच्या भोगासाठीं त्यानें उत्पन्न केलें आहे. भू, भुव, स्वर् व मह या लोकांमध्यें, त्याचप्रमाणें लोकालोक पर्वतामध्यें, मेरुपर्वतावर, सर्व सुखदायक वस्तूंच्या ठिकाणीं व सर्व भूतमात्रांच्या ठिकाणीं तो भरून राहिला आहे. देव व दानव यांना जर यावांचून दुसरा कोणी श्रेष्ठ दिसला असता तर असुरांकडून देवांना त्रास पोहोंचतांना त्यांनीं त्याचा आश्रय केला नसता काय ? देव, यक्ष, उरग, राक्षस यांचे एकमेकांचा फडशा पाडणारे जे प्रसंग जुळतात त्यामध्यें त्यांच्या त्यांच्या कर्माप्रमाणें नाश पावणाऱ्यांना हाच वैभव देतो. अंधक, शक्र, दुंदुभी, महिष, बल, आणि मोठमोठे यक्ष व राक्षस, त्याचप्रमाणें निवातकवच यांना वर देऊन ते पुन्हां हिसकावून घेण्याला यावांचून दुसऱ्या कोणाच्या अंगांत सामर्थ्य आहे ? यानेंच आपलें शुक्र अग्नीमध्यें आहुति दिल्यानें त्यापासून सोन्याचा पर्वत झाला नाहीं काय ? दुसऱ्या कोणाच्या वीर्यामध्यें इतकें सामर्थ्य आहे ? दिशा हींच ज्याचीं वस्त्रें आहेत असा फटिंग याशिवाय दुसरा कोण आहे ? जो आपलें वीर्य वर ओढून घेऊन स्वस्थ राहिला आहे असा यासारखा ब्रह्मचारी तरी दुसरा कोण आहे ? त्याचप्रमाणें ज्यानें आपलें अर्धांगच आपल्या आवडत्या बायकोला देऊन टाकलें आहे असा तरी दुसरा कोण आहे ? मदनाला यावांचून दुसऱ्या कोणीं जाळून पार केलें आहे ? देवांना सुद्धां पसंत असें श्रेष्ठ व सुखाचें स्थान यावांचून दुसऱ्या कोणी मिळविलें आहे ? ज्याचें क्रीडास्थान स्मशान असून तेथें तो नर्तन करीत असतो. ज्याचें ऐश्वर्य शाश्वत असून जो नेहमीं भूतपिशाचांबरोबर क्रीडा करीत असतो. ऐश्वर्याची घमेंड असणाऱ्या देवांमध्यें त्याच्या तोडीला कोणीही लागणार नाहीं. त्याच्यावांचून कोणाच्या स्थानाची अचल म्हणून कीर्ति होऊन तें त्रैलोक्यांत सन्मान्य झालें आहे ? पाऊस पाडणें, ऊन्ह व तेज देणें हें त्यावांचून दुसरें कोण करतो ? त्याचप्रमाणें ओषधींची समृद्धि तरी त्याच्यावांचून दुसऱ्या कोणापासून होते ? सर्व प्रकारची संपत्ति तरी याच्यावांचून दुसरा कोण धारण करतो ? सर्व चराचरात्मक त्रैलोक्यामध्यें यथेष्ट विहार यावांचून दुसऱ्या कोणाचा आहे ? हा सर्वांचें आदिकारण आहे. ज्ञान, सिद्धि व शास्त्रांत सांगितलेले विधी यांच्या योगानें योगी, ऋषी, गंधर्व व सिद्ध हे याची आराधना करतात. यज्ञ, कर्म व शास्त्रांत सांगितलेले नियम पाळून देव तसेच असुर याला भजतात. कर्मफलें याला कधींच शिवत नाहींत; कारण हा त्यांच्या पलीकडे आहे; म्हणूनच याला मी आदिकारण म्हणतों. स्थूल व सूक्ष्म अशा दोन्ही प्रकारचा असून हा अतुल आहे. इंद्रियांना याचा उमग पडत नाहीं. हा गुणवान, तसाच गुणहीनही आहे. तसाच हा गुणांचा स्वामी आहे; कारण सर्व गुण याच्या ताब्यांत आहेत. सृष्टीची उत्पत्ति, स्थिति व नाश यांना कारण हाच आहे. वर्तमान, भूत व भविष्य हाच असून सर्व वस्तूंचा जनक हाच आहे. अचल, अव्यक्त, ज्ञान व अज्ञान, कृत्य व अकृत्य, धर्म व अधर्म सर्व कांहीं हाच आहे. याच्यामध्यें दोन्ही जातींचीं लिंगें स्पष्ट दिसतात. तुझी मर्जी असेल तर कृपेसाठीं त्याला शरण जा. या महादेवामध्यें दिसून येणाऱ्या दोन लिंगांच्या संयोगापासून या सर्व चराचर सृष्टीची उत्पत्ति उघड दिसून येत आहे. हें विश्व सगुण व निर्गुण अशा वस्तुजातांनीं मिळून ब्रह्मदेवांच्या बीजापासून उत्पन्न

झालें आहे. ब्रह्मा, विष्णु, इंद्र, अग्नि व दुसरे देव आणि दानव ज्यांच्या हजारों इच्छा परिपूर्ण झाल्या आहेत तेसुद्धां याच्यांचून दुसरा कोणी नाहीं असें ह्मणतात; तेव्हां अशा या चराचराला माहीत असणाऱ्या देवाची इंद्रियनिग्रहपूर्वक कांहीं हेतु धरून मी प्रार्थना करीत आहें. हा सर्वांत श्रेष्ठ आहे, याला दुसरा आणखी पुरावा काय पाहिजे? याच्यावांचून दुसऱ्या कोणाच्या लिंगाची कधीं कोणीं पूजा केली आहे काय? ब्रह्मा, विष्णु व प्रत्यक्ष तूं याच्या लिंगाची पूजा करतां; तेव्हां याच्याहून पूज्यतम दुसरा कोण असणार? कमल हें ब्रह्मदेवाचें, चक्र हें विष्णूचें, वज्र हें तुझें लिंग आहे; पण याची कधीं कोणी पूजा केली नाहीं. लिंग व पिंडिका हीं दोन शिवपार्वतींचीं लिंगें सर्व भूतमात्रांच्या ठिकाणीं दिसून येतात; ह्मणून यांची महादेवापासून उत्पत्ति झाली असली पाहिजे. स्त्रीलिंगी प्राणी उमेपासून झाले असल्यानें पिंडिका हें तिचें लिंग त्यांच्या ठिकाणीं दिसून येतें; त्याचप्रमाणें पुल्लिंगी प्राणिमात्र शिवापासून उत्पन्न झाले असल्यामुळें त्याचें लिंग त्यांच्या ठिकाणीं दिसून येतें. या सर्व चराचरामध्यें महेश्वरावांचून दुसरें कोणी कारण आहे असें समजणारा अधम असून तो प्राणिमात्रांच्या बाहेरचा समजावा. पुल्लिंगीं प्राणी ईश्वरस्वरूपी असून स्त्रीलिंगी उमास्वरूपी आहे. या दोन स्त्रीपुल्लिंगी प्राण्यांनीं सर्व चराचर भरलें आहे; तेव्हां अशा या महादेवापासूनच वर मिळविण्याची माझी इच्छा आहे. ती परिपूर्ण न होईल तर मी मरावयास तयार आहें. तूं जा, रहा किंवा वाटेल तें कर. मला वर मिळो किंवा शाप मिळो, तो एका शंकरापासून पाहिजे. दुसरी कोणतीही देवता मला मान्य नाहीं; असें ह्मणून मी इतकें कडक तप केलें असतां शंकर अद्यापि मला प्रसन्न होत नाहीं ह्मणून कष्टी होतों तोंच हंस, जाईचें फूल, कमलाचे देंठ, रुपें किंवा दुधाचा महासागर याप्रमाणें पांढरा शुभ्र असा बैल त्या हत्तीच्या ठिकाणीं मला दिसूं लागला. त्याचें शरीर मोठें धिप्पाड असून शेंपटीचा गोंडा काळा कुळकुळीत होता. डोळे मधासारखे पिंगट होते. त्याचीं शिंगें वज्रासारखीं कठिण असून शुद्ध सोन्यासारखीं लखलखीत होतीं. टोंकाला तीं फार बारीक असून तांबूस होतीं. अशा आपल्या त्या शिंगांनीं तो जमीन उकरतांना दिसला. सुवर्णमालांनीं तो भरून निघाला होता. तोंड, खूर, नाक, कान, कंबर, मागचा भाग हीं सुबक असून त्याचा खांदा पसरट होता. तो मोठा रूपवान व देखणा होता. वशिंड मानेपर्यंत येऊन पोहोंचलें असून हिमाचलाच्या शिखराप्रमाणें किंवा पांढऱ्या ढगाच्या पुंजक्याप्रमाणें फारच शोभायमान दिसत होतें. त्यावर पार्वतीसह बसलेला महादेव पौर्णिमेच्या चंद्राप्रमाणें शोभत होता. मेघांमध्यें लकाकणाऱ्या विजेसारखें त्याचें तेज हजारसूर्यांप्रमाणें सर्वत्र भरून राहिलें होतें. युगांतकाळीं सर्व भूतमात्रांना जाळून टाकण्याला तयार झालेल्या प्रलयकालीन अग्नीप्रमाणें त्यांच्या दुःसह तेजावर डोळे न ठरतां चिंताकुल होऊन हें काय ह्मणून मी विचारांत पडलों. क्षणभर त्या तेजानें सर्व दिशा भरून काढून पुढें त्या महादेवाच्या मायेनेंच तें जिकडे तिकडे शांत झाल्यावर सर्वांपासून अलग अठरा भुजांचा असा तो तेजोनिधि भगवान मला पुढें दिसला. तो पांढरें शुभ्र वस्त्र नेसला असून त्यानें पांढऱ्या माळा घातल्या होत्या व पांढरें चंदन अंगाला चोपडलें होतें. कोणाला खालीं आणतां येणार नाहीं असा त्याचा पांढरा शुभ्र ध्वज होता. त्याच्या गळ्यांत पांढरें शुभ्र जानवें होतें. त्याच्याच तोडीच्या पराक्रमाचे पार्श्वगण त्याच्या भोंवतालून गात, नाचत व वाद्यें वाजवीत होते. पांढुरकी चंद्राची कोर मुकुटाऐवजीं त्याच्या डोक्यावर असून ती शरत्कालीं उगवलेल्या चंद्राप्रमाणें दिसत होती. उगवलेल्या तीन सूर्यांप्रमाणें आपल्या तीन डोळ्यांनीं त्यानें जिकडे तिकडे प्रकाश फांकून दिला होता. ज्यामध्यें पद्म व रत्नें गुंफलीं आहेत असा सोन्याचा कंठा त्याच्या अंगावर रुळत होता. त्या अतुलपराक्रमी ईश्वराचीं सर्व तेजोमय अस्त्रें त्याठिकाणीं मला मूर्तिमान दिसलीं. पिनाक नांवाचें त्याचें इंद्रधनुष्यासारखें लखलखीत धनुष्य एका मोठ्या सापाचें बनविलें होतें. या सापाचें अंग विशाल असून त्याला सात फडा व तीक्ष्ण दांत होते. त्याचें विष फार जालीम होतें. त्याच्या मानेला प्रत्यंचेची दोरी आवळली असून तो मूर्तिमान पुरुषरूपानें त्याठिकाणीं उभा होता. त्याचा सूर्यासारखा बाण प्रलयकालच्या अग्नीप्रमाणें लखलखत होता. हेंच त्याचें

मोठें भयंकर, अद्वितीय, अवर्णनीय व सर्व भूतमात्रांना कांपरें भरविणारें पाशुपतास्त्र होय. तें फार मोठें असून त्याचे तोंडांतून विस्तवाच्या ठिणग्या बाहेर पडत होत्या. त्याला एक पाय असून काळासारखे दांत होते. हजार डोकीं, पोट, हात, जीभ व डोळे यांतून जणूं अग्नि बाहेर टाकीत होतें. ब्राह्म, नारायण, ऐंद्र, आग्नेय व वारुण या सर्व अस्त्रांहून हें विशेष असून सर्व शस्त्रांचा फडशा पाडण्याचें त्याच्या अंगांत सामर्थ्य दिसून येत होतें. याच्या योगानेंच केवळ लीलेनें पूर्वीं त्यानें त्रिपुरनगराची जाळून राखरांगोळी उडविली. शंकरानें सोडलेल्या या बाणाच्या अंगीं सर्व चराचर त्रैलोक्य एका अर्ध्या निमिषांत जाळून टाकण्याचें सामर्थ्य आहे. ब्रह्मा, विष्णु इत्यादि देवांमध्यें देखील त्याला अवध्य कोणी नाहीं; त्याचप्रमाणें दुसरें शूल नांवानें प्रसिद्ध असलेलें अस्त्र मीं त्या ठिकाणीं पाहिलें. शंकरांनीं सोडलेल्या अस्त्राच्या अंगीं पृथ्वी फाडून काढण्याचें, महासागर शोषून घेण्याचें किंवा सर्व जगाचा फडशा पाडण्याचें सामर्थ्य आहे. पूर्वीं यानें लवणाच्या हातांत हें देऊन त्याच्याकडून त्रैलोक्याला जिंकणारा महातेजस्वी चक्रवर्ती यवनाश्वाचा मुलगा मांधाता याचा त्याच्या सैन्यासकट फडशा पाडविला. तो फार तीक्ष्णटोंकाचा व भयंकर शूल पहाणाराच्या अंगावर कांटा उभा करण्यासारखा होता. तीन फाळीचा असा तो जणूं कपाळाला तीन आंठ्या चढवून लोकांना धिक्कारीतच होता. उगवलेल्या काळसूर्याप्रमाणें तो लखलखीत होता. हातांत पाश असलेल्या प्रत्यक्ष अंतकाप्रमाणें सापाच्या मुठीचा तो फारच अवर्णनीय दिसत होता; त्याचप्रमाणें तीक्ष्णधारेचा तो क्षत्रियांचा समूळ नाश करणारा परशुही मीं त्या ठिकाणीं पाहिला. त्यानेंच पूर्वी परशुरामांनीं कार्तवीर्याला मारून एकवीस वेळ पृथ्वी निःक्षत्रिय केली. त्याचप्रमाणें त्या ठिकाणीं आणखीही दुसरीं पुष्कळ अस्त्रें होतीं; परंतु मीं हीं ठळक ठळक अस्त्रांचीं नांवें सांगितलीं. त्याच्या डाव्या बाजूला महावेगवान अशा हंस जोडलेल्या रथामध्यें ब्रह्मदेव व गरुडावर बसलेला शंखचक्रगदाधारी भगवान विष्णु होते. प्रति अग्नीप्रमाणें झळकणारा स्कंद, शक्ति व घंटा बरोबर घेऊन मोरावर बसून पार्वतीजवळ होता. त्याच्यापुढें हातांत शूल घेऊन उभा असलेला नंदी तर प्रतिशंकराप्रमाणेंच दिसत होता. स्वयंभू वगैरे मनू, भृगु वगैरे ऋषी, इंद्र वगैरे देव, सर्व भूतगण व देवमाता त्या महात्म्याला नमस्कार करून स्तोत्रांनीं त्याची स्तुति करीत त्याच्या समोर उभे होते. ब्रह्मदेव रथंतर ह्मणत असून भगवान नारायण ज्येष्ठसाम ह्मणत होता, व इंद्र शतरुद्रीय ह्मणत होता. हे तिघे अग्नीप्रमाणें त्याच्याजवळ शोभत होते. त्यांच्यामध्यें शरत्कालीन ढगांपासून बाहेर पडलेल्या, सूर्याप्रमाणें तो मला दिसला; ते वेळीं हजारों चंद्रसूर्य मला आकाशांत दिसले. तेव्हां त्यांना पाहून विश्वरूपदर्शक अनेक नांवांनीं नमस्कारपूर्वक त्याची स्तुति करून मी ह्मणालों, 'भगवन् मी जो तुझा दीन व गरीब भक्त आहें त्यावर प्रसन्न होऊन या दुबळ्याला तूं गति हो. तुझ्या या अलौकिकरूपानें मोहित होऊन अर्घ्य, पाय वगैरे कांहीं मीं तुला दिलें नाहीं, यामध्यें जो माझा अपराध झाला तो, हा माझा भक्त आहे, हें मनांत आणून तूं पोटांत घाल.' याप्रमाणें त्याची स्तुति करून भक्तिपूर्वक त्याला अर्घ्य व पाय देऊन सर्व कांहीं मीं त्याला अर्पण केलें व हात जोडून मी त्याच्यापुढें उभा राहिलों. तेव्हां शीत अशा जलकणांनीं युक्त व उत्तम वास ज्यापासून सुटला आहे अशी पुष्पवृष्टि माझ्या मस्तकावर पडली. देवदूत नौबती वाजवूं लागले. वारा एक प्रकारचा सुगंधी व सुखकारक वाहूं लागला. ते वेळीं वृषभध्वज शंकर मला आनंदवीत देवांना ह्मणाला, 'याची माझ्या ठिकाणीं भक्ति कशी आहे पहा. हा नेहमीं माझ्या ठिकाणीं एकभक्तीनें राहिला आहे.' असें तो परमात्मा ह्मणाला असतां देवांनीं हात जोडून, मला वर देऊन माझ्या सर्व कामना पूर्ण करण्यास त्याला सांगितलें. तेव्हां तो भगवान हासत हासत ह्मणाला, 'वत्सा, उपमन्यो, तुझ्या माझ्यावरच्या दृढ भक्तीची मीं परीक्षा केली. तुझ्या या भक्तीनें मी फार संतुष्ट झालों आहें. तेव्हां तुझ्या मनांत असेल ती इच्छा मी परिपूर्ण करतों.' हें त्याचें भाषण ऐकून माझ्या डोळ्यांत आनंदाश्रु वाहूं लागून माझ्या अंगावर हर्षरोमांच

उभे राहिले. गुडघे टेंकून त्याला नमस्कार करून मी गद्गदवाणीनें ह्मणालों, 'हे सुरासुरगुरो, आज तूं माझ्यापुढें उभा आहेस यामुळें आज माझ्या जन्माचें साफल्य झालें. जो खरोखर देवांच्या सुद्धां कधीं दृष्टीस पडावयाचा नाहीं त्याला मी आज प्रत्यक्ष आपल्यापुढें पहात आहें, तेव्हां माझ्याहून धन्य दुसरा कोण आहे? विद्वान लोक ज्या सनातन ज्ञानरूपी परमात्म्याचें ध्यान करतात तो तूं भगवान सर्व भूतमात्रांचा मूल, अविनाशी व प्रधानपुरुष आहेस. तुझ्या उजव्या अंगापासून सृष्टिकर्ता ब्रह्मदेव उत्पन्न झाला असून डाव्या अंगापासून विश्वरक्षक विष्णु उत्पन्न झाला आहे. युगाचा अंतकाल आला असतां तूं सर्व स्थावर जंगम सृष्टीचा संहार करण्यासाठीं रुद्राला उत्पन्न करतोस. जो हा महातेजस्वी काल अग्निरूपी संवर्तक होऊन युगाच्या शेवटीं सर्व भूतमात्रांना गिळून टाकीत असतो, तोच हा रुद्र कल्पाच्या अखेरीला सर्वांची स्मृति आपल्या पोटामध्यें घेऊन बसतो. तूं सर्वसंचारी असून सर्वभूतमात्रांचा अंतर्यामी आहेस. तूं सर्व देवांना अदृश्य असा सर्व भरून राहिला आहेस. माझ्यावर तूं संतुष्ट झाला असून मला जर तुला वर द्यावयाचा असेल तर तूं मला हा वर दे कीं, माझी तुझ्या ठिकाणीं नेहमीं भक्ति राहूं दे. तुझ्या प्रसादानें भूतभविष्यवर्तमानाचें मला ज्ञान राहूं दे व बांधवांसह मला दूधभात खावयास मिळूं दे, माझ्या आश्रमामध्यें तूं नेहमीं जवळ रहा.' हें ऐकून तो भगवान मला ह्मणाला, 'तूं अजर व अमर होऊन दुःख ह्मणून तुला उरणार नाहीं. तूं यशस्वी व तेजस्वी होशील. तुला दिव्य ज्ञान राहील. ऋषी तुझ्याजवळ रहातील. शील व गुणसंपन्न होऊन तूं लोकांना आवडशील. तुला कायमचें तारुण्य राहून अग्नीप्रमाणें तूं आपल्या तेजानें झळकत रहाशील. क्षीरसागर तुला वाटेल त्या ठिकाणीं हजर राहील. दूधभात व त्याबरोबर अमृत खात तूं आपल्या बांधवांसह कल्पाच्या अखेरपर्यंत राहून पुढें तूं मला येऊन मिळशील. तुझे बांधव, कूळ व गोत्र कायमचें राहून माझ्या ठिकाणीं तुझी भक्ति कायमची राहील. मी तुझ्या आश्रमामध्यें तुझ्या सान्निध्याला राहीन. तूं खुशाल कांहीं काळजी न करतां ऐस. आठवण केल्यावरोबर मी तुला फिरून दर्शन देईन.' कोटी सूर्याप्रमाणें तेजस्वी तो परमात्मा याप्रमाणें मला वर देऊन त्या ठिकाणीं गुप्त झाला. याप्रमाणें हे कृष्णा, समाधि लावल्यानें मला परमात्म्याचें दर्शन होऊन माझ्या मनाप्रमाणें मला सर्व मिळालें व त्या वराचें प्रत्यक्ष फल माझ्याजवळ सर्व सिद्ध, ऋषी वगैरे असून झाडें, वेली व गुंफा हीं सर्व, सर्व ऋतूंतील सुवासिक पुष्पांनीं, पानांनीं व फळांनीं भरलेलीं आहेत हें पहा.' हें त्या ऋषींचें भाषण ऐकून आश्चर्यचकित होऊन श्रीकृष्ण ह्मणाला, 'द्विजश्रेष्ठ, ज्या आपल्या जवळ त्या परमात्म्याचें नेहमीं सांनिध्य आहे ते आपण धन्य आहां. मलाही याप्रमाणें त्या भगवान शंकराचें दर्शन होऊन माझ्यावर प्रसाद होईल काय?' उपमन्यु ह्मणाले, 'हे श्रीकृष्णा, तुला खात्रीनें त्या महादेवाचें लवकरच दर्शन होईल. ज्ञानचक्षूनें मला असें कळतें कीं, त्या अतुल पराक्रमी देवाचें आजपासून सहाव्या महिन्यांत तुला दर्शन होऊन तुला त्यापासून चोवीस वर मिळतील. त्याच्यापासून मला वर्तमान, भूत, भविष्य यांचें ज्ञान झालें आहे. या येथें असलेल्यावर त्याचप्रमाणें हजारों दुसऱ्यांवर त्यानें कृपादृष्टी केली आहे; तेव्हां तो तुझ्यावर कां करणार नाहीं? तुझ्यासारख्या ब्राह्मणप्रिय, कनवाळू व श्रद्धाळू मनुष्याचा समागम देवांनासुद्धां हवा असतो. तुला मी मंत्र देतों. तो जपत रहा, ह्मणजे तुला शंकराचें दर्शन होईल.' यांप्रमाणें उपमन्यूंनीं सांगितल्यावर आठ दिवस एका घटकेप्रमाणें त्यांच्या समागमांत गोष्टीमध्यें गेले. आठवे दिवशीं त्यांनीं विधिपूर्वक मला दीक्षा दिली. मुंडण करून, दंड घेऊन, लंगोटी घालून, अंगाला तूप माखून घेऊन व कंबरेला मुंज गवताचा कडदोरा बांधून दर्भासनावर एक महिनाभर मी फळें खाऊन राहिलों, दुसरा पाण्यावर राहिलों. तिसरा, चौथा व पांचवा हात वर करून झोंप न घेतां एका पायावर वायु भक्षण करीत उभा राहिलों. तेवेळीं हजार सूर्यांच्या तेजासारखें एक तेज मीं पाहिलें. त्याच्यामध्यें निळ्या डोंगराप्रमाणें एक ढगाचा तुकडा असून त्याच्या भोंवतीं इंद्रधनुष्य वेढिलें होतें व विजा त्यामधून चमकत होत्या व आकाशाच्या त्या भागाला बगळ्यांनीं एक प्रकारची विलक्षण शोभा आली होती. त्या ठि-

काणीं भगवान परमात्मा आपल्या प्रियेसह तप, तेज, कांती व दैदीप्यता यांनी झळकत ढगामध्यें चंद्रासह असणाऱ्या सूर्याप्रमाणें दिसत होता. त्याला पाहून अंगावर रोमांच उभे राहून आश्चर्यानें माझे डोळे प्रफुल्लित झाले. सर्व देवांचें संकट दूर करणारा परमात्मा तेथें मला दिसला. त्याच्या मस्तकावर किरीट असून हातामध्यें गदा व शूल हीं होतीं. त्याच्या अंगावर वाघाचें कातडें असून हातांमध्यें दंड, पिनाक वगैरे होतीं. सापाचें यज्ञोपवित त्याच्या गळ्यांत असून नानावर्णांची उत्तम माळ त्याच्या गळ्यामध्यें पायाच्या बोटापर्यंत रुळत होती. पावसाळा सरण्याच्या वेळच्या संध्याकाळच्या खळ्यामध्यें असणाऱ्या चंद्राप्रमाणें तो मला माझ्यापुढें दिसला. ब्रह्मदेव, इंद्र वगैरे मंडळी त्याच्या भोंवतीं होती. याप्रमाणें त्याला माझ्यापुढें पाहून सर्व जग माझ्याकडे टकटक पाहूं लागलें. माझे कांहीं त्याच्यावर डोळे ठरेनात. तो परमात्मा मला ह्मणाला, 'कृष्णा, माझ्याकडे पहा, तूं शेंकडों, हजारों वेळ माझी आराधना केली आहेस. त्रैलोक्यामध्यें तुझ्यासारखा प्रिय मला कोणी नाहीं.' नंतर मी त्या उमामहेश्वरांना वंदन करून त्या विश्वव्यापी स्वरूपाचें यथास्थित वर्णन केलें असतां सर्व चराचरविश्वांतून सिंहनाद उठला. त्या ठिकाणीं असलेल्या सर्व देव, ब्राह्मण वगैरे मंडळींनीं त्याला नमस्कार केला. माझ्या मस्तकावर पुष्पवृष्टि झाली. नंतर शंकर पार्वतीकडे पाहून मला आठ वर मागण्यास सांगून ते कितीही दुर्घट असले तरी देतों असें ह्मणाले; तेव्हां आनंदभरित होऊन मी ह्मणालों, 'धर्मामध्यें ठामबुद्धि, शत्रूचा नाश करण्याचें सामर्थ्य, यश, उत्तम प्रकारचें बल, योगसाधनाकडे लक्ष, तुझें सान्निध्य, त्याचप्रमाणें शेंकडों मुलें एवढा वर हे भगवन्, मला दे.' तेव्हां 'शंकराच्या वरानें तुला सांब मुलगा होईल. माझ्यापासूनही तूं आठ वर मागून घे.' असें पार्वती ह्मणाली. तेवेळीं, 'ब्राह्मणांच्या ठिकाणीं प्रेम, मातापित्यांची कृपा, शंभर मुलें, उत्तम भोग, कुटुंबवात्सल्य, शांति आणि चाणाक्षता एवढे वर मला तूं दे' ह्मणून मी ह्मणालों. 'बरें हें सर्व तुझ्या मनाप्रमाणें होऊन सातशें ब्राह्मण नेहमीं तुझ्या घरीं जेवतील असा वर देऊन परमात्मा शंकर आपल्या सर्व गणांसह त्या ठिकाणीं गुप्त झाला. याप्रमाणें शंकरासारखा देव नसून त्यासारखी दुसरी गति नाहीं. त्यासारखा दाता दुसरा कोणी नसून रणामध्येंही त्याच्या तोडीचा कोणी नाहीं.'

---

### २३८ तंडीची कथा. ( १३. १६–१८ )

भीष्म ह्मणाले, 'कृतयुगामध्यें तंडी नांवाचे कोणी ऋषी होते. त्यांनीं मोठी समाधि लावून भक्तिपूर्वक हजार वर्षें शंकराची आराधना केली; तेव्हां या अलौकिक भक्तीचें जें त्यांना फळ आलें तें असें. त्यांना त्या महादेवाचें प्रत्यक्ष दर्शन होऊन त्यांनीं त्याची स्तुति केली. त्यांनीं ध्यानामध्यें या अक्षय्य व अविनाशी परमात्म्याचें मोठ्या भक्तीनें याप्रमाणें चिंतन केलें. 'ज्याला सांख्यलोक सर्वश्रेष्ठ, सर्वव्यापी प्रधानपुरुष व सर्व वस्तूंचा स्वामी ह्मणून वर्णितात व योगी ज्याचें अशा प्रकारें ध्यान करतात, उत्पत्ति व नाश याला कारण व देव, असुर, मुनी यांच्याहून श्रेष्ठ, ज्याच्याहून श्रेष्ठ दुसरें कांहीं नसून ज्याला जन्म नाहीं व आदि अंत नाहीं, जो केवळ सुखाचा गड्डा आहे, अशा निष्पाप तेजस्वी परमात्म्याला मी शरण आहें.' याप्रमाणें ध्यान केलें असतां अनुपमेय, कलाहीन, संपूर्ण योग्यांच्या परमानंदाला साधनीभूत, मोक्षस्वरूपी, मन, इंद्रियें, अग्नि, वायु वगैरे सर्वांना गतिभूत व जो जीवरूपी आपल्यामध्यें मनोरूपीज्योतीनें दृश्यमान होऊन राहिला आहे, अशा त्या परमात्म्यानें आपल्या दर्शनाला पुष्कळ वर्षें याप्रमाणें आतुर होऊन राहिलेल्या त्या तंडींना जेव्हां प्रत्यक्ष दर्शन दिलें तेव्हां तंडींनीं त्याची याप्रमाणें स्तुति केली कीं, हे देवा, सर्व पवित्रवस्तूंमध्यें तूं पवित्र असून सर्व गति देणाऱ्यांमध्यें श्रेष्ठ आहेस. सर्व तेजांमध्यें तूं प्रखर तेज असून सर्व तपांमध्यें श्रेष्ठ तप आहेस. तूं आपल्या पुष्कळ भक्तांचें कल्याण करणारा आहेस. जन्ममरणाला भिऊन ज्यांची खटपट चालली आहे अशा यतींना मोक्ष देणारा तूंच आहेस. ब्रह्मादिकांना सुद्धां तुझें खरें स्वरूप कळलें नाहीं. तें आह्मांला कसें कळणार? सर्वांची उत्पत्ति तुझ्यापासून असून सर्व तुझ्याच आधारावर आहे. काल, पुरुष, ब्रह्म वगैरे सर्व तूंच आहेस. पुराणवेत्ते तुला तीन तनु आहेत असें सम-

जतात. अधिपौरुष, अध्यात्म, अधिभूत, अधिदैवत, अधिलोक, अधिविज्ञान, अधियज्ञ सर्व कांहीं तूंच आहेस. आपल्या देहामध्यें असणाऱ्या, देवांना देखील ओळखण्याला कठीण, अशा तुला ओळखून विद्वान लोक मुक्त होऊन अनामय अशा श्रेष्ठ भावाला जाऊन मिळतात. तुला न ओळखणारे अनेक जन्ममृत्यूंच्या फेऱ्यांत सांपडतात. स्वर्ग व मोक्ष यांचें तूं द्वार आहेस. सर्व पसारा मांडून तो पुन्हां तूंच आंवरून घेतोस. स्वर्ग, मोक्ष, काम, क्रोध, सत्व, रज, तम, वर, खालीं, ब्रह्मा, विष्णु, मनु, धाता, कुबेर, पृथ्वी, वायु वगैरे स्थिति, बुद्धि वगैरे सर्व तूंच असून सर्व कर्मे त्याचप्रमाणें सत्य व असत्य तूंच आहेस. तूं आहेस व नाहींस. इंद्रियें व इंद्रियविषय तूंच असून तूं प्रकृतीच्या पलीकडे आहेस. विश्व व अविश्व, चिंत्य व अचिंत्य असें परब्रह्मस्वरूपी श्रेष्ठ पद तूंच आहेस. सांख्ययोग्यांची जी उत्तम गति ती तूंच आहेस. खात्रीनें आज मी कृतार्थ होऊन, ज्ञानानें ज्यांची बुद्धि निर्मळ झाली आहे, अशा भल्यांना मिळणारी गति मला मिळाली आहे. ज्या तुला विद्वानांनीं मात्र ओळखलें आहे त्या तुला आज इतके दिवस बुद्धि जाऊन मूर्ख बनल्यानें मीं ओळखलें नाहीं. आज ती तुझी भक्ति इतक्या जन्मांनीं माझ्या ठिकाणीं उत्पन्न झाली. तूं भक्तांवर अनुग्रह करणारा असून तुला ओळखल्यानें मनुष्य अमर होतो. देव, असुर व मुनी यांना सुद्धां तुझें गूढ राहिलें असून हें गुहेमध्यें झांकून राहिलेलें परब्रह्म मुनींना सुद्धां कळण्याला कठीण आहे. सर्व कांहीं उत्पन्न करून चोहोंकडे तोंडें असणारा, सर्वांचा आत्मभूत, सर्व कांहीं पहाणारा, सर्वव्यापी व सर्ववेत्ता तूंच आहेस. देह उत्पन्न करून त्याला पोसून त्यामध्यें राहून त्याचा उपभोग घेणारा, देहधाऱ्यांना गति तूंच आहेस. प्राणवान व प्राणदाता असा प्राण उत्पन्न करून त्याला पोसून तूंच प्राण्यांची गति आहेस. पुनर्जन्म टाळण्यासाठीं तुझें चिंतन करीत राहिलेल्या आत्मवेत्त्यांना आधारभूत तूंच आहेस. सर्व भूतमात्रांना बरी वाईट गति तूंच देतोस व तूंच त्यांच्यामागें जन्ममरण लावून देतोस. सिद्धीच्या मार्गे लागलेल्या साधकांना तूंच गति आहेस. भुवादि लोक त्याचप्रमाणें सर्व देव उत्पन्न करून आपल्या आठ तनूंनीं त्यांना आधार देऊन तूं पोसतोस. तुझ्यापासूनच सर्व कांहीं निघून सर्व कांहीं तुझ्याच आधारानें आहे व अखेरीस सर्वांचा तुझ्यामध्येंच लय होतो. सत्याच्या मार्गे लागलेल्यांचा सत्यलोक तूंच आहेस. मुक्त झालेल्यांना क्रमानें मुक्ति देणारा ब्रह्मलोक तूंच आहेस. आत्मवेत्त्यांना प्रत्यक्ष मोक्ष तूंच देतोस. देव, असुर, मनुष्य इत्यादिकांना दिसूं नयेस म्हणून ब्रह्मादिक सिद्धांनीं तुला गुहेमध्यें झांकून ठेवून दिलें आहे. जें तुला भक्तिपूर्वक शरण येतात त्यांनाच तूं सर्वांच्या हृदयामध्यें असणारा प्रत्यक्ष दर्शन देतोस. ज्या तुला ओळखल्यानें पुनर्जन्म व मरण उरत नाहीं, ज्या तुला ओळखल्यानें ओळखावयाचें कांहीं उरत नाहीं व ज्या तुझा लाभ झाल्यानें अधिक कांहीं मिळावयाचें रहात नाहीं. अतिसूक्ष्म अशा तुझी प्राप्ति झाल्यानें मनुष्य अक्षय व अविनाशी होतो. सांख्यशास्त्रवेत्ते ज्यांना गुणांचें तत्त्व कळून सूक्ष्म तन्मात्रादिकांचें ज्ञान झालें आहे त्यांना अविनाशी व सूक्ष्म अशा तुझें ज्ञान झाल्यानें ते सर्व बंधनापासून मुक्त होतात. वेदवेत्ते वेदांतामध्यें प्रतिपादिलेली ज्ञान करून घेण्यालायक अशी तूं एकच वस्तु आहेस असें म्हणतात. हे लोक प्राणायामामध्यें गढून तुझें ध्यान करीत राहून अखेरीस ॐकाररूपी रथांत बसून तुझ्यामध्यें शिरतात. देवयानरूपी सूर्यमार्ग किंवा पितृयानरूपी चंद्रद्वार तूंच आहेस. काष्ठा, दिशा, वर्षें, युगें, आकाश, स्वर्ग व पृथ्वी यांमधील श्रेष्ठ लाभ, त्याप्रमाणें दक्षिणायन व उत्तरायण तूंच आहेस. पूर्वी नील व रक्तवर्ण अशा तुझा पुष्कळ स्तव करून ब्रह्मदेवांनीं प्रजा उत्पन्न करण्यासाठीं तुझी प्रार्थना केली. ज्यांना ऋचांचें ज्ञान आहे असे ब्राह्मण पुष्कळ ऋचांनीं तुझा कशाशीं संबंध नाहीं व तूं रूपहीन आहेस अशी तुझी स्तुति करतात. यज्ञामध्यें अध्वर्यु श्रौत, स्मार्त व ध्यान अशा तीन प्रकारांनीं यजुर्वेदानें तुला होम देतात; शुद्धबुद्धीचे असे सामवेत्ते साम गाऊन तुझी स्तुति करतात. ऋत, सत्य, परब्रह्म म्हणून अथर्ववेत्ते तुझी स्तुति करतात. यज्ञाचा उगम तुझ्यापासूनच असून त्याचा स्वामी तूंच आहेस. रात्र व दिवस हे तुझे कान व डोळे असून पंधरवडे व महिने तुझें डोकें व हात आहेत. ऋतु तुझें वीर्य

असून तप हें तुझें धैर्य आहे. वर्ष हे गुह्य, मांड्या व पाय आहेत. मृत्यु, यम, अग्नि व काल तूंच असून तूंच वेगानें संहार करीत असतोस. कालाचा अगदीं मूळ तूं असून सनातन काल तूंच आहेस. चंद्र, सूर्य, ग्रह, तारे, वायु, ध्रुव, सप्तऋषि, सप्त लोक, प्रधान, महत्, अव्यक्त व व्यक्तजग ब्रह्मापासून ते क्षुद्र वनस्पतीपर्यंत ही सर्व सृष्टि तूंच आहेस. सर्व प्राणिमात्रांचा मूळ तूंच असून सत् व असत् दोन्ही तूंच आहेस. आठ प्रकृति तूंच असून त्या प्रकृतींच्या पलीकडचा तूंच आहेस. या जगामधील सर्व कांहीं तुझेंच अंशभूत आहे. शाश्वत व श्रेष्ठ सुख ह्मणून जें कांहीं आहे तें तूंच आहेस. सर्व विरक्त लोकांना मिळणारी गति तूंच असून भल्याचें श्रेष्ठ प्रकारचें जें अस्तित्व तें तूंच आहेस. ज्या ठिकाणीं चिंतेचा ह्मणून लेश नाहीं असें सनातन ब्रह्मपद तूंच आहेस. शास्त्र व वेदांगें पढलेल्या लोकांच्या ध्यानांचा विषय तूंच आहेस. मोठी काष्ठा, कला, सिद्धि, गति, थोर शांति, थोर सुख सर्व तूंच आहेस. तुझाच लाभ झाल्यानें योग्यांना आपण धन्य झालों असें वाटतें. मोठा संतोष, मोठी सिद्धि, श्रुति, स्मृति, योग्यांची अध्यात्मगति, ज्ञान्यांचा मोठा लाभ, वासनेच्या मागें लागून पुष्कळ दक्षिणा देऊन यज्ञ करणाऱ्यांना मिळणारी गति, त्याचप्रमाणें योगामध्यें गढून जप केल्यानें मिळणारी शांति, तसेंच पुष्कळ हाल सोसून तप करणारांना व कर्म टाकून विरक्त झालेल्यांना मिळणारी गति, पुनर्जन्म नको ह्मणून वैराग्यानें राहणारांची गति तूंच आहेस. ज्ञान व विज्ञान यांकडे लागलेल्यांना मिळणारी अवर्णनीय, निष्कलंक व कैवल्यरूपी जी गति तीही तूंच आहेस. ह्या वेद, शास्त्र व पुराणें यांत सांगितलेल्या पांच गति तुझ्या प्रसादानेंच मिळतात.' याप्रमाणें तपोराशी तंडींनीं त्या परमात्म्याची स्तुति करून त्याच्या परमात्मस्वरूपदर्शक सहस्र, नामावळीनें त्याला तोषविलें. त्यायोगें संतुष्ट होऊन भगवान परमात्म्यानें त्याला वर दिला कीं, 'तूं अक्षय व अविनाशी होऊन दुःख ह्मणून तुला रहाणार नाहीं. तूं यशस्वी होशील, तेजस्वी होशील, तुला दिव्य ज्ञान राहील. ऋषी नेहमीं तुझ्याजवळ रहातील व तुझा मुलगा माझ्या प्रसादानें सूत्रकार होईल.' असें सांगून आणखी काय तुझी इच्छा आहे ह्मणून शंकरांनीं विचारिलें. तेव्हां 'तुझ्या ठिकाणीं माझी दृढ भक्ति राहो,' असें तंडींनीं मागितलें. व ठीक आहे ह्मणून परमात्मा त्या ठिकाणीं अंतर्धान पावला.

याप्रमाणें श्रीकृष्णानें आपली हकीकत सांगून तो थांबला असतां व्यास म्हणाले, 'मी सुद्धां पूर्वी मेरुपर्वतावर या शंकराचीच आराधना करून मुलगा होऊन माझ्या कामना पूर्ण झाल्या.' देवांना देखील मान्य असे सांख्यशास्त्रकार कपिल ह्मणाले, 'पुष्कळ जन्म त्याची आराधना केल्यावर मजवर संतुष्ट होऊन त्यानें मला जन्ममरणापासून सोडविणारें ज्ञान दिलें; नंतर इंद्रमित्र चारुशीर्ष ह्मणाले, 'पूर्वी मीं गोकर्णाला जाऊन शंभर वर्षें कडक तप केलें. त्याचें फल मला स्त्रीसंभोगाशिवाय शंभर आत्मनिग्रही, धार्मिक, तेजस्वी, शोकरोगांपासून मुक्त, असे सहस्रायु मुलगे मिळाले.' वाल्मीकि ह्मणाले, 'कोणे एके वेळीं घरीं अग्नि ठेवून रहाणाऱ्या ब्राह्मणांचा व माझा वादविवाद चालला असतां, 'तूं ब्रह्महत्या करणारा आहेस,' ह्मणून ते मला ह्मणाले. त्याबरोबर त्या पापानें मला पछाडलें; तेव्हां त्रिपुराचा फडशा पाडणाऱ्या या दुःखनाशक शंकराच्या हातूनच, त्याला मी शरण गेलों असतां मुक्त झालों. 'तुझा चांगला लौकिक होईल' असा त्यानें मला वर दिला. त्या ऋषिमंडळामध्यें दैदीप्यमान सूर्याप्रमाणें झळकणारे परशुराम ह्मणाले, 'मी पितृतुल्य अशा वडील भावांना मारून शुद्ध होण्यासाठीं त्या शंकराला शुचिर्भूत होऊन शरण गेलों व त्याची या सहस्र नामावळीनें स्तुति केली; तेव्हां भगवान शंकरांनीं माझ्यावर संतुष्ट होऊन मला परशु व दुसरीं दिव्य आयुधें दिलीं व ह्मणाले कीं, 'तूं सर्व पापांपासून मुक्त होऊन युद्धामध्यें अजिंक्य होशील. प्रत्यक्ष मृत्यूची तुझ्यापुढें मात्रा चालणार नाहीं व रोगांपासून तूं मुक्त रहाशील.' विश्वामित्र ह्मणाले, 'पूर्वी मी क्षत्रिय असून या शंकरांच्या भक्तीनें हें श्रेष्ठ व दुर्मिळ असें ब्राह्मणपद मला मिळालें,' असितदेवल ह्मणाले, 'पूर्वी शक्राच्या शापानें माझें सर्व पुण्य नाहींसें झालें असतां या शंकरांनीं मला दयाळूपणें तें सर्व पुण्य परत देऊन आणखी थोर कीर्ति व दीर्घायुष्य हीं दिलीं.

प्रसिद्ध इंद्राचे मित्र गृत्समद नांवाचे ऋषी बृहस्पतीसारखे तेजस्वी होते. पूर्वी इंद्रानें हजार वर्षेपर्यंत चाललेला यज्ञ केला तेव्हां त्यामध्यें यांना साम ह्मणण्याला ठेवलें. ब्रह्मदेवांच्या डोळ्यापासून झालेल्या मनूचे मुलगे वसिष्ठ तेथें आले. तेव्हां मला उद्देशून ते ह्मणाले, 'सामवेद ह्मणावा तसा ह्मणण्यांत येत नाहीं. अशा अशुद्ध रीतीनें ह्मणण्याचें सोडून देऊन तो नीट शीक. यज्ञाला निरुपयोगी असें हें पाप करूं नकोस.' असें ह्मणून ते क्रोधनशील फिरून मला ह्मणाले, 'तूं बुद्धिहीन असा पशु होऊन शोक, भीति यांच्या तावडींत सांपडून वारा पाणी कांहीं नसून ज्यामध्यें चिटपांखरूं सांपडावयाचें नाहीं व ज्यामध्यें यज्ञाला पवित्र अशीं उपयोगी झाडें सुद्धां मिळावयाचीं नाहींत, अशा वनांत एकटा फिरत रहाशील.' तेव्हां मी लगेच पशु झालों. तेव्हां मी शंकरांना शरण गेलों असतां, 'तूं अजरामर होऊन सर्व दुःखांतून मुक्त होशील तुला अमरत्व मिळेल व इंद्र आणि तूं यांमध्यें सख्य राहून दोघांचाही यज्ञ वाढत राहील, ' असें ते ह्मणाले. जैगीषेय ह्मणाले, 'पूर्वी वाराणशीमध्यें मीं शंकरांची आराधना केली असतां प्रभुशक्तीचे आठ गुण त्यांनीं मला दिले.' गर्ग ह्मणाले, 'माझ्या मानस यज्ञानें सरस्वतीच्या पवित्र तीरावर कालज्ञानाचें पवित्र तत्त्व त्याच्या चौसष्ट अंगांसह या शंकरांनीं मला सांगितलें.' पराशर ह्मणाले, 'मी पूर्वी तपस्वी, वीर्यवान, थोर, योगामध्यें गढलेला, त्रैलोक्यामध्यें कीर्ति करून सोडणारा व वेदांची व्यवस्था लावून वैभवाचें आगर होऊन राहणारा, ज्याचें वेदब्राह्मणांकडे लक्ष राहून दयाभूतपणाबद्दल जो प्रसिद्ध राहील, असा मुलगा व्हावा ह्मणून त्यांची आराधना करून त्यांना संतुष्ट केलें. तेव्हां माझें मन ओळखून मला ते ह्मणाले, 'माझ्यापासून जें कांहीं मिळावें ह्मणून इच्छा धरून तूं आहेस त्याची फलसिद्धि ह्मणून तुला त्रैलोक्यामध्यें कृष्ण ह्मणून प्रसिद्ध मुलगा होईल. संवर्त मनूच्या सृष्टीच्या वेळीं त्याची सप्तऋषींमध्यें गणना होऊन तो सर्व वेद फिरून व्यवस्थेनें लावील, व कौरवांचा वंश वाढवील. जुना इतिहास त्याला पूर्ण अवगत राहील. त्याला कांहीं रोगराई न होतां तो अमर राहील. याप्रमाणें त्या महातपस्वी योग्याकडून मला वर मिळाला.' मांडव्य ह्मणाले, 'मी चोर नसतां चोर ह्मणून मला सुळावर चढविलें,तेव्हां त्या ठिकाणीं या परमात्म्याचा मीं धांवा केला. तेव्हां मला दर्शन देऊन, तूं या शूळापासून मुक्त होऊन शेंकडों वर्षे रहाशील; शूलाचा तुला कांहीं त्रास होणार नाहीं. दुःख, रोग तुला कांहीं रहाणार नाहींत व ब्रह्मदेवाच्या चवथ्या अंशानें ज्या अर्थी तुझा जन्म झाला आहे, त्या अर्थी तूं शाश्वत होऊन अतुल होशील. आपला जन्म सफल कर. कांहीं प्रयासावांचून पृथ्वीवरील सर्व तीर्थांमध्यें तुला स्नान घडत राहील, आणि देह ठेवल्यावर अंतकाल तुला शुद्ध स्वर्गसुख मिळेल.' असें ह्मणून व्याघ्रचर्म धारी तो परमेश्वर अंतर्धान पावला.' गालव ह्मणाले, 'पूर्वी माझे गुरु जे विश्वामित्र यांच्या पायांपाशीं विद्यार्जन केल्यावर त्यांची परवानगी घेऊन पित्याला भेटण्यासाठीं मी घराकडे आलों. तेव्हां माझी माता मला पाहून कष्टी होऊन, ह्मणाली, 'याप्रमाणें वेदसंपन्न होऊन तूं आलास; परंतु पित्याची भेट होण्याचें तुझ्या नशीबीं नाहीं.' हें ऐकून निराश होऊन एकाग्रतेनें मीं महेश्वराला संतुष्ट केलें. तेव्हां तो मला दर्शन देऊन ह्मणाला, 'तुझे मातापितर त्याचप्रमाणें तूं मृत्यूच्या तडाक्यांतून सुटाल. घरीं जाऊन पित्याची भेट घे.' याप्रमाणें त्या भगवानाची आज्ञा घेऊन घरीं येतों तों पिता इष्टीहून हातामध्यें इध्म, दर्भ व कांहीं पडलेलीं फळें घेऊन परत आलेला मला दिसला. तीं सर्व खालीं ठेवून डोळे आनंदाश्रूंनीं भरून येऊन मीं नमस्कार करूं लागलों असतां मला आलिंगन देऊन तो मला ह्मणाला, 'गुरूपाशीं विद्यार्जन करून परत येऊन सुदैवानें तूं मला भेटलास.'

श्रीकृष्ण फिरून ह्मणाला, 'जे पापी लोक आहेत त्यांना याची प्राप्ति होत नाहीं. रजतमांमध्यें गुरफटले जाऊन त्यांना याकडे जातां येत नाहीं. ज्यांचें अंतःकरण शुद्ध आहे अशांनाच याची प्राप्ति होते. मनुष्य सर्व सुखोपभोग भोगीत असला तरी नुसत्या त्याच्यावरच्या भक्तीनें शुद्ध अंतःकरणाच्या तपस्व्यांच्या तोडीचा हा होतो. रुद्र एखाद्यावर संतुष्ट झाला असतां तो त्याला ब्रह्मा, विष्णु, इंद्र यांचें पद एवढेंच नव्हे तर त्रैलोक्याचें स्वामित्व देतो. जे

केवळ मनानें याला भजतात ते सर्व पापांपासून मुक्त होऊन त्यांना देवांसह स्वर्गवास मिळतो. जे घरें पाडतात, तलाव, सरोवरें वगैरे उध्वस्त करतात, ते सुद्धां या त्रिनेत्राला भजतील तर सर्व पापांपासून मुक्त होतील. कृमि, कीटक व पक्षी असे हलके प्राणी सुद्धां याच्या भक्तीच्या योगानें निर्भयपणें जगांत फिरत रहातात. जे याचे भक्त आहेत ते जन्ममरणापासून मुक्त होतात. हा सर्वस्वरूपी आहे. व या सर्व सृष्टीची याच्यापासून उत्पत्ति आहे. ज्या याचें विद्वान तपानें ध्यान करतात त्याहून बाकीच्या वस्तू स्थूल आहेत. हें सूक्ष्म ब्रह्म प्राणाला कारणीभूत आहे. त्याला भक्तिभावानें भजलें असतां तो आपल्या सर्व कामना पूर्ण करतो. हें शंकराचें माहात्म्य वाचल्यानें ब्राह्मणाला वेदज्ञान होतें, क्षत्रियाला जय मिळतो. वैश्याला संपत्ति व शहाणपणा येतो व शूद्र इहपर सुखी होतो. सर्व पापांपासून मुक्त करणारें हें माहात्म्य वाचल्यानें यशस्वी लोकांचें मन रुद्रावर बसतें. हें वाचल्यानें मनुष्याच्या अंगावर जितकीं रोमकूपें आहेत, तितकीं वर्षे तो स्वर्गामध्यें रहातो.'

---

## २३९ अष्टावक्र व दिशा यांचा संवाद-सहधर्म. ( १३. १९–२१ )

युधिष्ठिर ह्मणाला, 'जो हा स्त्रीच्या पाणिग्रहणाच्या वेळचा स्त्रीधर्म ह्मणून सांगितला आहे तो कशाप्रकारचा आहे? तो सहधर्म ह्मणजे सर्वच धर्म बायकोशीं मिळून करावयाचा किंवा तो प्रजोत्पत्तीसंबंधापुरता अगर रतिसुखापुरताच समजावयाचा हें मला सांगा. मला वाटतें कीं स्त्रीपुरुषांच्या संबंधाला जीं स्वाभाविक कारणें होतात त्याच्या विरुद्ध ही शास्त्राज्ञा आहे. ज्याला सहधर्म ह्मणतात त्याचा शेवट या जन्माबरोबर झाला पाहिजे. मेल्यावर त्याचा काय संबंध उरावा? सहधर्म पाळणाऱ्यांना मेल्यावर स्वर्ग मिळतो ह्मणतात. आतां सहधर्म आचरण करणारे दोघे एकदम न मरतां त्यांपैकीं एक आधीं मरतो मग दुसरा तेवेळीं कोठें असतो? मनुष्य नानाप्रकारच्या निरनिराळ्या कर्मांमध्यें गढले असून त्यांना निरनिराळ्या धर्माचरणानें त्याचीं निरनिराळीं फळें मिळतात. त्यांच्या निरनिराळ्या कर्मांप्रमाणें त्यांना निरनिराळ्या नरकाकडेही जाण्याचा प्रसंग येतो. स्त्रिया खोट्या असतात असें सूत्रकारांनींच सांगून ठेविलें आहे. तेव्हां हा दोघांमध्यें सहधर्म कसा रहाणार? स्त्रिया खोट्या असें वेदामध्यें सुद्धां सांगितलें आहे; तेव्हां वेदांत सांगितलेला हा सहधर्म कांहीं तरी सामान्य अर्थवाचक असून त्यांत कांहीं विशेष अर्थ नसला पाहिजे. या सहधर्मशब्दांत कांहीं खरा अर्थ नसून केवळ हा औपचारिक असला पाहिजे. मी यावर सतत विचार करीत आहें तरी याचा मला कांहीं उमग पडत नाहीं. तेव्हां आपण कृपा करून याचा सविस्तर खुलासा करा आणि सहधर्म ह्मणजे काय, तो कशा प्रकारचा आहे व तो सुरू कसा झाला तें आपण मला सांगा.'

भीष्म ह्मणाले, 'यासंबंधांत अष्टावक्र व दिशा यांमधलें संभाषण तुला सांगतों ऐक. पूर्वी महातपस्वी अष्टावक्रांच्या मनांत लग्न करून घेण्याचें येऊन त्यांनीं वदान्यांच्या सुप्रभा नांवाच्या मुलीला मागणी घातली. रूपामध्यें तर तिच्या तोडीची पृथ्वीवर कोणी नसून गुण, तेज, शील व आचरण यांमध्यें ती फार चांगली होती. वसंतऋतूमध्यें नानाप्रकारच्या चित्रविचित्र पुष्पांनीं फुलून राहिलेल्या वनराईप्रमाणें केवळ दृष्टादृष्ट झाल्याबरोबर तिनें त्यांचें मन ओढून घेतलें. ते वेळीं वदान्य ह्मणाले 'मी आपल्याला माझी मुलगी देतों; पण आधीं आपण पवित्र अशा उत्तर दिशेकडे प्रवास करून या. त्या ठिकाणीं पुष्कळ पहाण्यासारख्या गोष्टी आपल्या नजरेस पडतील.' अष्टावक्र ह्मणाले, 'तेथें काय पाहून येऊं तें सांगा म्हणजे त्याप्रमाणें करतों.' वदान्य म्हणाले, 'कुबेराचा प्रांत त्याचप्रमाणें हिमाचल ओलांडून पुढें गेल्यावर ज्या ठिकाणीं सिद्ध व चारण यांसह रुद्राचें ठाणें आहे त्या ठिकाणाला जाऊन पोहोंचल्यावर तेथें नानाप्रकारच्या तोंडांचे शंकरांचे नाना पार्षदगण मोठ्या आनंदानें नाचत असलेले आपल्या दृष्टीस पडतील; त्याचप्रमाणें नानाप्रकारचे सुवासिक पदार्थ अंगाला चोपडून घेऊन काशाच्या भांड्याच्या वाद्यांच्या तालावर नाचत विजेप्रमाणें इकडे तिकडे फिरत व मधून मधून थांबत मोठ्या आनंदानें

दिवस काढणारीं पिशाच्चेंही तेथें आपल्याला दिसतील. त्या ठिकाणीं पार्वतीनें शंकर मिळण्यासाठीं कडक तप केलें असल्यामुळें तें ठिकाण शंकर व पार्वती या दोघांनाही फार प्रिय झालें आहे. उत्तरेकडच्या त्या महापार्श्व शिखरावर सर्व ऋतू, काल, रात्रीं व अनेक देवता व मनुष्यें प्रत्यक्ष स्वरूपामध्यें शंकरांची उपासना करीत आहेत. तें ठिकाण ओलांडून पुढें गेल्यावर एक मेघासारखें नीलवर्ण, रम्य व मनोवेधक वन आपल्याला दिसेल. त्या वनामध्यें एक मोठी भाग्यवान तपस्वी म्हातारी दासी घेऊन राहिलेली आपल्या दृष्टीस पडेल. तिची भेट घेऊन चांगल्या रीतीनें तिचा सत्कार करून आपण परत आल्यावर माझी मुलगी मी आपल्याला देईन. हें पटत असेल तर याप्रमाणें करा.' अष्टावक्र बरें म्हणून जेथें सिद्ध व चारण रहात होते अशा पर्वतश्रेष्ठ हिमाचलाकडे उत्तरेला वर वर निघाले. त्या पर्वतावर जिचें पाणी फार पवित्र होतें अशा बाहुदा नदीच्या तीराला आल्यावर शोक दूर करणाऱ्या तिच्या स्वच्छ तीर्थामध्यें स्नान करून देवतांना तर्पण करून दर्भ पसरून त्या ठिकाणीं त्यांनीं रात्र सुखांत काढिली. पुढें उजाडल्यावर फिरून तिच्यामध्यें स्नान करून अग्नि पेटवून वेदमन्त्रांनीं त्याची व शंकर व पार्वती यांची त्यांनीं पूजा केली व श्रमपरिहार झाल्यावर ते उत्तरेला कैलासाकडे निघाले. पुढें एक मोठी लखलखीत सोन्याची वेस, व कमलांनीं भरलेली मंदाकिनी त्यांच्या दृष्टीस पडली; त्या ठिकाणीं कुबेराचीं तीं तिच्यामधील सुवर्ण कमलें राखण्यासाठीं मणीभद्रप्रभृति पुष्कळ राक्षस उभे होते. यांना पाहून या आपल्या प्रसिद्ध पाहुण्याचा सत्कार करण्यासाठीं सर्व मिळून यांना सामोरे आले. अष्टावक्रांनींही त्यांचा उलट बहुमान करून आपण आल्याचें वर्तमान तावडतोब कुबेराला कळविण्यास सांगितलें; तेव्हां मणिभद्र प्रभृति म्हणाले, 'आपण आल्याची त्याचप्रमाणें आपल्या कामाची महाराजांना आधींच बातमी लागून हे पहा ते प्रत्यक्ष आपल्याला सामोरे येत आहेत.' असें म्हणताहेत तोंच कुबेरानें त्यांकडे येऊन यथाविधि कुशल विचारून माझ्या वाड्याकडे चला व आपल्या इच्छेप्रमाणें सत्कार घेऊन मग निर्विघ्नपणें आपण पुढें चला,' असें त्यांना म्हणून तो त्यांना घेऊन निघाला. घरीं आल्यावर त्यांना आसन, पाय धुण्याला पाणी व अर्घ्य देऊन ते बसल्यावर त्यांचें उत्तम आतिथ्य करण्यासाठीं उर्वरा, मिश्रकेशी, रंभा, उर्वशी, अलंबुषा, घृताची, चित्रा, चित्रांगदा, रुची, मनोहरा, सुकेशी, सुमुखी, हासिनी प्रभा, विद्युती, प्रशमी, दांता, विद्युता, रति प्रभृति अप्सरा यांचें गायन नर्तन सुरू होऊन गंधर्व नानाप्रकारचीं वाद्यें वाजवूं लागले. याप्रमाणें एक देवांचें वर्ष होईतोंपर्यंत अष्टावक्र तेथें सुखांत राहिले. पुढें त्या मनुष्याचें मन अगदीं हरण करून टाकणाऱ्या वाद्यगायनानें तृप्ति कधींच होणार नाहींशी पाहून अष्टावक्र म्हणाले, 'मी तुझ्या ह्या आदरातिथ्यानें संतुष्ट झालों आहें. हें सर्व तुझ्या सारख्याला उचितच आहे. तुझ्या कृपेनें वदान्यांच्या सांगण्याप्रमाणें मी आतां पुढें जातों. तुझें वैभव असेंच वाढत राहो.' असें म्हणून ते पुढें निघाले. कैलास व मंदार ओलांडून त्याच्या पलीकडे असणाऱ्या किरात वेषधारी शंकरांच्या स्थानाला येऊन पोहोंचल्यावर खालीं जमिनीवर उतरून त्याला प्रदक्षिणा करून एकाग्र मनानें त्यांनीं आपलें मस्तक त्यापुढें नमविलें व फिरून तीन वेळ प्रदक्षिणा करून मोठ्या उत्साहानें ते पुढें चालले. तेव्हां एक दुसरा रमणीय वनप्रदेश त्यांच्या दृष्टीस पडला. सर्व ऋतूंतील फलमूलांनीं व नाना पक्षिगणांनीं तो भरला असून नाना रमणीय भागांनीं जिकडे तिकडे त्याला शोभा आली होती. त्या ठिकाणीं अष्टावक्रांना एक उत्तम आश्रमप्रदेश दिसला. त्याच्या भोंवतीं रत्नांनीं मढविलेलें नाना आकारांचें सोन्याचें शिखर होतें. रत्नांनीं मढवून निघालेल्या त्या ठिकाणीं अनेक कमलांनीं भरलेलीं फार रमणीय अशीं पुष्कळ तळीं व सरोवरें होतीं. तो सर्व रमणीय देखावा पाहून त्या धूतपाप महर्षींचें मन तेथें फारच रमलें. त्या ठिकाणीं एक अगदीं रत्नांनीं मढवून काढलेलें सुवर्णमंदीर त्यांच्या दृष्टीस पडलें. तें इतकें कांहीं विलक्षण दिसत होतें कीं, प्रत्यक्ष कुबेरभुवनाला तें मागें सारणारें होतें. पुष्कळ हिरेजडित सोन्याच्या टेंकड्या, नानाप्रकारचीं मनोहर विमानें व नानाप्र-

कारचीं रत्नें यांनीं तें भरलें होतें. त्या ठिकाणीं मंदाकिनी नदी वहात असून पारिजातकाच्या फुलांनीं ती झांकून निघाली होती. त्या ठिकाणचे प्रदेश आपल्या प्रभेनें प्रकाशत असून नानाप्रकारच्या हिऱ्यांनीं तीं जमीन मढवून निघाली होती. त्या मंदिरामध्यें हजारों खोल्या असून त्याच्या कमानदार दरवाजांना नानाप्रकारचीं रत्नें जडविलीं होतीं. मधून रत्नजडित हजारों मोत्यांचे हार त्या खोल्यांतून जिकडे तिकडे टांगले होते. त्याचप्रमाणें मन व दृष्टि यांना वेधून घेणारे नानापदार्थ त्या ठिकाणीं होते. हा रम्य आश्रम अनेक ऋषींनीं भरला होता. हा सर्व रमणीय देखावा पाहून आपण कोठें उतरावें ह्मणून त्यांना विचार पडला व त्या मंदिराच्या दारापुढें जाऊन, 'कोण आहे हो, मी अतिथी आलों आहें,' ह्मणून त्यांनीं हाक मारली. ती ऐकून आंतून निरनिराळ्या स्वरूपांमध्यें सात मनोहर मुली बाहेर पडल्या. त्यांपैकीं जिच्या जिच्यावर ह्मणून यांची नजर गेली, तिनें तिनें यांचें मन वेधून घेतलें. त्यांना आपलें मन आवरतां न येऊन त्यांच्या मनाची अगदीं चलबिचल उडाली. तेव्हां बुद्धीचा त्यावर पगडा बसवून डोळ्यांनीं त्या मुलींनीं त्यांना आवरलें. 'भगवन्, आंत चला,' असें त्या मुली त्यांना ह्मणाल्या. त्यांच्या त्या सुंदर रूपानें व तें सुंदर मंदिर पाहून एक प्रकारचें कौतूहल वाटून ते आंत शिरले. त्या ठिकाणीं पांढरीं शुभ्र वस्त्रें नेसून सर्व अलंकारांनीं विभूषित अशी एक वृद्ध स्त्री पलंगावर बसलेली यांच्या दृष्टीस पडली. अष्टवक्रांनीं कुशल विचारलें असतां तिनेंही उठून त्यांना बसण्यास सांगितलें. पुढें, 'जी शहाणी व शांत असेल अशा एकीला येथें माझ्याजवळ राहूं दे व बाकीच्यांना येथून जाऊं दे,' असें ते ह्मणाले. तेव्हां त्या मुली नमस्कार करून तेथून निघून गेल्या. ती वृद्ध स्त्री मात्र त्या ठिकाणीं राहिली. पुढें रात्रीं निजावयाचे वेळीं त्यांनीं तिलाही निजावयास सांगितलें. तेव्हां जवळच एक दुसरा बिछाना टाकून ती पडली. कांहीं वेळानें थंडीनें कुडकुडत आहेंसें दाखवून त्या महर्षींच्या बिछान्यावर ती गेली व प्रेमानें त्यांना आलिंगूं लागली असतां काटक्यांच्या कुडाप्रमाणें ते अगदीं निर्विकार राहिले. तें पाहून ती त्यांना सखेद ह्मणाली, 'ब्रह्मन्, बायकांना पुरुषांपासून कामतृप्तीहून दुसरें सुख नाहीं. मी काममोहित होऊन आपल्याजवळ आलें आहें; तेव्हां मोठ्या आनंदानें माझा अंगीकार करा. आपल्यावर माझें फार मन बसलें आहे; आपण संचय केलेल्या धर्माचें हें उत्तम फल आहे. आपल्याला पाहिल्याबरोबरच आपण मला प्रिय झालां; तेव्हां आपण माझा अंगीकार करा. माझी ही सर्व संपत्ति त्याचप्रमाणें जें कांहीं दुसरें माझें ह्मणून आहे तें सर्व आपलें आहे. या सर्वांचें स्वामी आपण व्हा. आपल्या सर्व इच्छा मी परिपूर्ण करीन. सर्व कामना परिपूर्ण करणाऱ्या अशा रमणीय वनामध्यें माझ्याशीं आपण रममाण व्हा. मी आपल्या आज्ञेंत राहीन. आपण आपल्या सर्व इच्छा परिपूर्ण करून घेऊं. कामपीडित स्त्रिया आपल्या प्रियाकडे अगदीं तापलेल्या धुळींतून चालल्या असतां सुद्धां त्यांचे पाय पोळत नाहींत.' अष्टावक्र ह्मणाले, हे कल्याणि, मी परस्त्रीशीं कधींही संबंध ठेवणार नाहीं. परस्त्रीशीं संबंधाला धर्मशास्त्रांत दोष सांगितला आहे. मी शपथपूर्वक सांगतों कीं, मी लग्न करून घेण्याच्या विचारांत आहें. विषयसुख मला नको. केवळ धर्मासाठीं संतति उत्पन्न करून मुलांच्या योगानें उत्तम लोकाला जाण्याचा माझा विचार आहे. तेव्हां धर्म लक्षांत घेऊन हा भलता विचार सोडून दे.' स्त्री म्हणाली, 'वायु, अग्नि, वरुण व जे दुसरे कांहीं देव आहेत, यांपैकीं कोणीच स्त्रियांना कामाइतका प्रिय नाहीं; कारण बायकांचें नेहमीं रतिसुखाकडे लक्ष असावयाचें. हजारांमध्यें किंवा लाखांमध्यें एखादी पतिव्रता सांपडली तर सांपडेल. कुल, बाप, आई, भाऊ, नवरा, मुलगा, दीर या कोणाला त्या ओळखत नाहींत. मोठमोठ्या नद्या ज्याप्रमाणें आपल्या तटांचा फडशा पाडतात, त्याप्रमाणें या आपल्या कुलांचा फडशा पाडतात. असें प्रत्यक्ष ब्रह्मदेवांचें मत आहे.' याप्रमाणें स्त्रियांचे दोषच तिच्या तोंडून ऐकून ऋषी ह्मणाले, 'कामापासून उत्पन्न होणारा हा नाद सोडून बाकी काय करूं सांग.' स्त्री म्हणाली, 'देशकाल लोटल्यावर आपल्यालाच आपल्याआपण हें कळूं लागेल. कांहीं दिवस माझ्या घरीं रहा, ह्मणजे आपलें काम होईल.' 'तुझ्या मर्जीस वाटेल तितके दिवस रहातों,'

असें म्हणून ते तेथें राहिले. तेथें रहात असतां म्हातारपणानें तिला अगदीं जख्खड झालेली पाहून त्यांच्या मनाला चैन पडेना. ज्या ज्या म्हणून अवयवावर त्यांची नजर जाई, तेथून तेथून त्या संबंधानें वीट येऊन ती उडत असे. या घरची ही देवता असून शापानें असें हें हिचें विरूप झालें असावें काय, असें त्यांच्या मनांत येई. तरी एकदम अविचारानें याचें कारण शोधण्याच्या भानगडींत पडण्यांत कांहीं अर्थ नाहीं असें वाटून ती कोण वगैरे जाणण्याची उत्कट इच्छा होती, तरी मनामध्यें तोच विचार घोळवीत अगदीं अस्वस्थ मनानें त्यांनीं तो दिनशेष तसाच घालविला. संध्याकाळच्या वेळेला ती स्त्री त्यांच्याकडे येऊन, ‘ महाराज, संध्याकाळच्या ढगामुळें सूर्य आरक्त झाला आहे. या वेळीं आपल्याला काय पाहिजे, ’ असें म्हणाली. तें ऐकून ऋषींनीं तिला स्नानसंध्येला पाणी आणण्यास सांगितलें. ‘ बरें ’ म्हणून तिनें उत्तम तेल व स्नानाचा पंचा आणून ऋषींच्या परवानगीनें तें तेल त्यांच्या अंगाला हळू हळू चोपडलें. नंतर ते स्नानगृहाकडे गेले. त्या ठिकाणीं एक नवें उत्तम आसन होतें. ऋषी त्यावर बसल्यावर मऊ हातांनीं त्यांचें अंग चोळून त्या स्त्रीनें त्यांना उटणें वगैरे लावून स्नान घातलें. याप्रमाणें सुखांत ती सबंध रात्र निघून गेली तरी ऋषींना कळली नाहीं. सूर्य पूर्वेला अंतरिक्षावर येतांना पाहून ते आश्चर्यचकित झाले. त्यांना तें सर्व स्वप्नवत् वाटूं लागलें. नंतर त्या सहस्ररश्मि भगवानाची त्यांनीं उपासना केल्यावर त्या स्त्रीनें आणलेलें अमृततुल्य गोड अन्न त्यांनीं थोडेंसें खाल्लें. कारण त्याच्या अतिमाधुर्यामुळें त्यांना तें फार खाववलें नाहीं. याप्रमाणें तो दिवस जाऊन फिरून रात्र आली असतां त्या स्त्रीनें त्या मुनींना निजावयास सांगून आपणही जवळच दुसऱ्या एका अंथरुणावर निजली. फिरून मध्यरात्रीच्या वेळीं उठून ती त्या ऋषींकडे गेली. तेव्हां ते तिला ह्मणाले, ‘ भले, दुसऱ्यांच्या बायकांवर माझें मन कधींही जाणार नाहीं. तुझें कल्याण होईल. तूं होऊनच हा नाद सोडून दे. ’ याप्रमाणें त्या ऋषींचें भाषण ऐकून ती ह्मणाली, ‘ मी स्वतंत्र आहें. धर्म मोडल्याचा दोष आपल्याला बिलकुल लागणार नाहीं. ’ ऋषी ह्मणाले, ‘बायका कधींच स्वतंत्र नाहींत. तेव्हां तूं मी स्वतंत्र आहें ह्मणतेस हें कसें? जिला स्वतंत्र ह्मणतां येईल अशी एकही बायको त्रैलोक्यांत सांपडावयाची नाहीं. कारण, लहानपणीं बाप, तारुण्यावस्थेंत नवरा व म्हातारपणीं मुलगे तिचें रक्षण करतात. स्त्रियांना स्वतंत्रता मुळींच नाहीं. ’ स्त्री ह्मणाली, ‘ मी कौमार्यापासून ब्रह्मचर्य धरून कुमारिकाच राहिलें आहें. तेव्हां आपण माझ्याशीं लग्न करून घ्या. आपल्यावरच्या माझ्या भक्तीचा याप्रमाणें मोड करूं नका. ’ याप्रमाणें बोलत असतां तिला कुमारिका झालेली पाहून तिच्याप्रमाणेंच यांच्याही मनाची चलबिचल उडून कशानें त्या ऋषींच्या आज्ञेचा भंग होणार नाहीं ह्मणून त्यांना विचार पडला. दिव्य अशा वस्त्रालंकारांनीं विभूषित अशी ती सुंदरी आजपर्यंत जरेमध्यें झांकून कां असावी व आजच ती अशी कुमारिका कां झाली असावी व याच्यापुढें तिचें काय स्वरूप होणार, हें कांहींच त्यांना उमगेना. असें झालें तरी धैर्य सोडून त्यांनीं मन चळूं दिलें नाहीं व सत्याला जागून ते तिला ह्मणाले, ‘हे स्त्रिये, तुझें रूप असें कसें बदललें? मी ब्राह्मण आहें ही गोष्ट लक्षांत घेऊन खरें असेल तें सांग. ’ ती ह्मणाली, ‘ या सर्व दिगंतरीं कोठें गेलें तरी कामवासना सुटत नाहीं. मीं आपल्याला कसाला लावून आपलें मन किती स्थिर आहे, हें पाहिलें. मन स्वाधीन ठेवून आपण चांगल्या लोकांचें साधन केलें आहे. मी उत्तरदिशा आहे. स्त्रियांमध्यें चंचलता किती असते हें आपल्या नजरेला आणून दिलेंच आहे. अगदीं थेरड्या बायकांना सुद्धां मदनानें सोडलें नाहीं. आपले सर्व वाडवडील व देव आपल्या ह्या वर्तनानें संतुष्ट झाले आहेत. आपण ज्यासाठीं येथें आलां तें आपलें कार्य झालें आहे. माझ्याकडून उपदेश घेण्यासाठीं त्या मुलीच्या बापानें मजकडे आपल्याला पाठविलें आहे; व त्याप्रमाणें तो उपदेश आपल्याला मिळाला आहे. आतां आपण कांहीं श्रम न होतां खुशाल घरीं जाऊन पोहोंचाल व ती मुलगी मिळून तिला आपल्यापासून मुलगा होईल. मुद्दाम मी आपली परीक्षा करीत असतां आपल्याकडून मला चोख उत्तर मिळालें आहे. ही विषयवासना त्रैलोक्यामध्यें दाबतां येण्यासारखी

नाहीं. तेव्हां हें उत्तम काम बजावून आतां आपण खुशाल परत जा.' नंतर अष्टावक्र हात जोडून तिची आज्ञा घेऊन घराकडे आले व झालेली सर्व हकीकत त्यांनीं वदान्यांना सांगितली. तेव्हां आपल्या मुलीला हेच योग्य आहेत असें समजून चांगल्या नक्षत्रावर त्यांनीं तिचें अष्टावक्रांशीं लग्न लावून दिलें. व अष्टावक्र त्या भल्या बायकोबरोबर आपल्या आश्रमामध्यें सुखांत राहिले.'

## २४० देवपितृकार्यासंबंधानें मनुष्याची पात्रापात्रता. (१३. २२–२३)

युधिष्ठिर ह्मणाला, 'दानाला सत्पात्र कोण समजला आहे? ब्रह्मचर्यादि लिंगधारी किंवा दुसरे?' भीष्म ह्मणाले, 'जो कोणी आपल्या आश्रमाच्या धर्माप्रमाणें वागणारा असेल मग तो पहिल्या वर्गांतला असो किंवा दुसऱ्या वर्गांतला असो, दोघेही दानाला योग्य समजले आहेत.' युधिष्ठिर ह्मणाला, 'अपवित्र मनुष्य मोठ्या श्रद्धेनें जर हव्यकव्य किंवा एकादें दान देईल तर त्याला काय दोष लागतो?' भीष्म ह्मणाले, 'अशा प्रकारचा मनुष्य श्रद्धाळू असून आत्मनिग्रही असला तर तो त्या श्रद्धेनें त्याच्या सर्व कृत्यासंबंधानें पवित्र होतो.' युधिष्ठिर ह्मणाला, 'देवकार्याला जो ब्राह्मण लावावयाचा त्याच्यासंबंधानें विचार करूं नये; परंतु पितृकार्यासंबंधानें लावावयाचा मनुष्य मात्र पाहून लावावा असें आहे. त्यासंबंधानें आपलें काय ह्मणणें आहे?' भीष्म ह्मणाले, 'देवकार्यें केवळ देवाच्या प्रसादामुळेंच चालत असल्यामुळें त्यासंबंधानें पात्रापात्र विचार करण्याची जरूरी नाहीं; परंतु पितरांना दिलेलें त्यांना ब्राह्मणकरवीं पोहोंचत असल्यानें पितृकार्यामध्यें ब्राह्मणाच्या पात्रापात्रतेसंबंधानें विचार केला पाहिजे.' युधिष्ठिर ह्मणाला, 'परका, विद्वान, संबंधी, तपस्वी व यज्ञशील असेच लोक याला पात्र समजले आहेतना?' भीष्म ह्मणाले, 'यांपैकीं पहिले तिघे जेव्हां कुलीन, कर्मठ, विद्वान, दयाळू, भिडस्त, सरळ व खरें बोलणारे असतील तेव्हांच ते या पितृकार्याला पात्र असतात; यासंबंधांत पृथ्वी, काश्यप, अग्नि व मार्कंडेय यांचें असें मत आहे. पृथ्वीचें मत असें आहे कीं, ज्याप्रमाणें ढेकूळ महासागरांत टाकलें असतां एकदम विरघळून नाहींसें होतें त्याप्रमाणें याजन, अध्यापन व दान या तीन गुणांनीं सर्व पापें नाहींशीं होतात.' शील सोडलेल्या मनुष्याला वेद, त्यांचीं सहा अंगें, सांख्यशास्त्र, पुराण किंवा थोर कुलांत जन्म यांपैकीं कांहींच चांगली गति देत नाहींत असें काश्यपांचें मत आहे. जो वेदाध्ययन करणारा स्वतःलाच शहाणा मानून आपल्या विद्येच्या मानानें दुसऱ्याची कीर्ति नाहींशी करतो, तो भ्रष्ट होऊन त्या सत्यभ्रष्टाला चांगले लोक मिळत नाहींत असें अग्नीचें मत आहे. मार्कंडेयांचें मत असें आहे कीं, जरी हजार अश्वमेध व सत्य ताजव्यांत घातलीं तरी पहिल्याचें पारडें दुसऱ्याचे बरोबरीला येणार नाहीं.' युधिष्ठिरानें विचारलें, 'जर ब्रह्मचर्यव्रत पाळणारा मनुष्य आपण होऊन श्राद्धाला बसेल तर त्याला अन्न दिल्यानें तें श्राद्ध बरोबर होतें किंवा नाहीं?' भीष्म ह्मणाले, 'ब्रह्मचर्यव्रत पाळून वेदांग पढलेला ब्रह्मचारी जर स्वतः आमंत्रण घेऊन श्राद्धान्न सेवन करील तर तो भ्रष्ट होतो; परंतु श्राद्धाला त्यामुळें बिघाड येत नाहीं.' युधिष्ठिरानें विचारलें, 'धर्माच्या गति अनेक असून त्याला अनेक द्वारें आहेत, असें ह्मणतात. तर यासंबंधानें आपलें मत काय आहे?' भीष्म ह्मणाले, 'अहिंसा, सत्य, अक्रोध, दया, आत्मनिग्रह, सरळपणा हीं धर्माचीं लक्षणें आहेत. जगामध्यें असे कांहीं लोक आहेत कीं, ते जगभर धर्माच्या चांगलेपणाचा दांडोरा पिटीत फिरतात; परंतु स्वतः तसे कधीं न वागतां संकर करण्यामध्यें गढले असतात. जो कोणी अशा मनुष्याला सोनें, रत्नें, गाई, घोडे दान करतो तो दहा वर्षेंपर्यंत मेलेल्या गुरांचें मांस खाणारे त्याचप्रमाणें ब्रह्महत्यादि करणारे पुल्कस वगैरे गांवाच्या बाहेर रहाणारे हलक्या जातीचें लोक किंवा दुसऱ्याच्या हातून झालेली एखादी भलती गोष्ट किंवा चूक लोकांपुढें सांगत बसणारे अशा लोकांची विष्ठा खात नरकांत रहातो. जे लोक ब्रह्मचर्य पाळून असणाऱ्याला वैश्वदेव देत नाहींत त्यांना वाईट लोक मिळतात.' युधिष्ठिर ह्मणाला, 'ब्रह्मचर्याहून चांगलें काय? धर्माचें श्रेष्ठ लक्षण काय व उत्तम प्रकारची शुद्धता कशाला ह्म-

णावी ?' भीष्म ह्मणाले, मधुमांसापासून अलिप्त असणें हेंच उत्तम ब्रह्मचर्य. धर्म नेहमीं मर्यादेमध्यें आहे व शम हें याचें चिन्ह आहे.' युधिष्ठिर ह्मणाला, 'धर्म केव्हां आचरावा, द्रव्य केव्हां मिळवावें व सुख केव्हां भोगावें ?' भीष्म ह्मणाले, 'पूर्व कालीं पैसा मिळवून नंतर धर्म आचरून पुढें कामसेवन करावें; परंतु त्यामध्यें लगटून राहूं नये. ब्राह्मण व गुरू यांना मान देऊन सर्व भूतमात्रांशीं अनुकूल वागून मार्दव धरावें. न्यायसभेमध्यें खोटें बोलणें, राजाशीं कपटानें वागणें व गुरूशीं खोटें वागणें यांचें पातक ब्रह्महत्येच्या तोडीचें आहे. राजावर किंवा गाईवर हात टाकूं नये. या दोहींचें पातक भ्रूणहत्येच्या तोडीचें आहे. होमाग्नि किंवा वेद सोडूं नयेत, ब्राह्मणाच्या कधीं वाटेला जाऊं नये, याचें पातक ब्रह्महत्येच्या तोडीचें आहे.' युधिष्ठिर म्हणाला, 'कशा प्रकारचे लोक भले समजावे, कोणाला दिलेलें दान महाफलदायक होतें व कोणाला जेऊं घातलें असतां चांगलें ?' भीष्ण ह्मणाले, 'राग नाहींसा झालेले, धर्मपर, सत्यनिष्ठ, आत्मनिग्रही अशांना भले समजावे; यांना दिलेलें दान त्याचप्रमाणें गर्वहीन, सर्व सहन करणारे, निश्चयानें आपल्या हेतूच्या पाठीमागें लागलेले, सर्व भूतमात्रांच्या हितामध्यें दक्ष, सर्वांशीं मित्रत्वानें असणारे, लोभहीन, शुचिर्भूत, विद्वान व सुरवतीचे, स्वकर्मामध्यें गढलेले त्याचप्रमाणें जे सांग चार वेद पढले आहेत व मांसवर्जनादि ज्या शास्त्रांत सहा गोष्टी सांगितल्या आहेत त्या पाळीत असतात असे लोक दानाला पात्र असून यांना दिलेलें दान महाफलदायक आहे. यांना दिलेल्या दानाचें हजारों पटीनें अधिक फल मिळतें. शहाणपण व वेदज्ञान असलेला, सद्वर्तनी व शीलसंपन्न असा एकटा मनुष्य सुद्धां सर्व कुलाला तारण्याला समर्थ होतो; मग अशा पुष्कळांची गोष्ट विचारावयाला कशाला पाहिजे. ह्मणून गाय, घोडा, पैसा अन्न व दुसऱ्या वस्तु अशा प्रकारच्या मनुष्याला दिल्या असतां मेल्यावर रडत बसण्याची पाळी येत नाहीं. एखाद्या भल्यांना मान्य व सर्वगुणसंपन्न अशा ब्राह्मणाची बातमी कानावर आली असतां दुरून आणून सुद्धां त्यांचा सत्कार करावा.'

युधिष्ठिरानें विचारलें, 'श्राद्धकालीं देव व पितर यासंबंधी ऋषींनीं काय कार्य सांगितलें आहे ? भीष्म म्हणाले, 'स्नानादिकांनीं शुद्ध व मंगलाचारसंपन्न होऊन मोठ्या दक्षतेनें देवकार्यें पूर्वाण्हीं करावींत; परंतु पितृकार्यें अपराण्हीं करावींत व मनुष्यांना द्यावयाचें तें आदरपूर्वक दुपारच्या वेळीं द्यावें. अकाळीं दिलेलें, ओलांडलेलें किंवा चाटलेलें, भांडून दिलेलें, विटाळशीनें पाहिलेलें, लोकांमध्यें ज्यासंबंधानें वाच्यता झाली आहे अशा प्रकारचें, ज्यांतील थोडा भाग अव्रतशील मनुष्यानें खाल्ला आहे, जो कुत्र्यानें पाहिला किंवा चाटला आहे, ज्यांत केंस, किडे पडले आहेत किंवा थुंकी व लाळ यांनीं जें अपवित्र झालें आहे, ज्यामध्यें डोळ्याचे अश्रु पडले आहेत, ज्याच्यावर पाय पडला आहे, ॐकार ठाऊक नाहीं अशानें, शस्त्रधाऱ्यानें किंवा दुष्टानें ज्याचा थोडा अंश खाल्ला आहे, अशा प्रकारचें, ज्याचा भाग आधीं थोडासा दुसऱ्यानें खाल्ला आहे किंवा ज्यांतील कांहीं भाग देव, अतिथी किंवा मुलें यांना देण्यांत आला नाहीं, अशा प्रकारचें अन्न राक्षसाचा अंश समजला आहे. अशा प्रकारचें अन्न देव किंवा पितर यांना दिलें असतां ते घेत नाहींत. तें त्याचप्रमाणें ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य यांपैकीं जे कोणी मंत्र व क्रिया सोडून पात्राभिघारण न करतां श्राद्ध करतात, तो भाग राक्षसाला जातो; तसेंच दुराचाऱ्यांनीं खाऊन राहिलेलें अन्न राक्षसांचा भाग बनतो. याप्रमाणें हे राक्षसांचे भाग सांगितले. आतां दानाला अयोग्य मनुष्य कोण यासंबंधानें विचार ऐक. पतित, वेडे, पांढऱ्या कुष्ठाचे, क्लीब, कोड भरलेले, क्षयरोगी, अपस्मार झालेले, आंधळे, वैद्य, पुजारी, दांभिक, सोम विकणारे, गाणें, नाचणें, बजावणें करणारे, कसरतीचा खेळ करणारे, गोष्टी सांगणारे मल्ल, शूद्रांचा यज्ञ करविणारे, त्यांना पढविणारे, त्यांचें शिष्यत्व पतकरलेले, ज्याला गुरुपणाबद्दल वेतन मिळतें किंवा अशा प्रकारच्या गुरूचें ज्यानें शिष्यत्व पतकरलें आहे, अशा प्रकारचे, वेदविक्रय करणारे, तसेंच ज्याला आधींच श्राद्धांत जेऊं घातलें आहे किंवा ज्यानें शूद्रस्त्रीशीं लग्न लाविलें आहे असा ब्राह्मण सर्व विद्यांनीं संपन्न असला तरी त्या-

ला श्राद्धाला बोलावूं नये. तसेंच ज्यांनीं अग्नि ठेविला नाहीं, जे प्रेतवाहक, शूद्र किंवा पतित आहेत, ज्यासंबंधानें माहिती नाहीं, जे टोळीचे नायक आहेत, जे पुत्रिकापूर्व पुत्र ( हिला झालेला पहिला मुलगा माझा अशा करारानें मिळालेले ) आहेत तसाच जो कर्जबाजारी, व्याजावर रहाणारा, प्राण्यांना विकून त्यावर पोट भरणारा, बायकोला विकून त्या पैशावर रहाणारा, वेश्येच्या पैशावर रहाणारा, जप न करणारा आहे, असे ब्राह्मण श्राद्धाला बोलाविण्याला योग्य नाहींत. याप्रमाणें दोष असूनही देव व पितृकार्यांना कांहीं कारणानें पुढील लोक चालतात; शेती करणारे असले तरी गुणवान असून ज्यांनीं व्रतें पाळिलीं आहेत व जे गायत्री जपून यथाविधि क्रिया करतात त्यांना श्राद्धाला बोलवावें; ब्राह्मण क्षत्रधर्मानें चालत असला तरी तो कुलीन असला तर त्याला श्राद्धाला बोलविण्याला हरकत नाहीं; परंतु असा मनुष्य वाण्याचा धंदा करीत असेल तर मात्र तो श्राद्धाला चालावयाचा नाहीं. जो अग्निहोत्री असून गांवांत रहातो, जो चोरी वगैरे न करतां अतिथींचा सत्कार करीत असतो व जो त्रिकाल गायत्री जपून भिक्षेवर क्रिया करीत रहातो त्याला श्राद्धाचें निमंत्रण द्यावें. जो सकाळीं पैसा मिळवून संध्याकाळीं कफल्लक होतो व संध्याकाळीं मिळविलेला पैसा सकाळपर्यंत पार करतो व जो कोणाची हिंसा करीत नाहीं, असा मनुष्य त्याच्या अंगीं अल्पस्वल्प दोष असले तरी श्राद्धाला बोलाविण्याला पात्र आहे. जो दांभिक नसून शुष्कवाद करीत बसत नाहीं व घरोघर भिक्षा मागून रहातो त्याला बोलाविण्याला हरकत नाहीं; जो व्रत वगैरे कांहीं पाळीत नसून लबाड व चोर आहे व प्राण्यांना विकून त्यावर किंवा उदिमावर रहातो, असा मनुष्य पुढें सोम प्याला असला तर त्याला श्राद्धाला बोलाविण्याला हरकत नाहीं. वाटेल तशा घोर कर्मांनीं पैसा मिळवून पुढें तो देव व अतिथी यांकडे लक्ष देईल तर त्यालाही बोलवावें. वेद विकून, बायकांवर किंवा दीन भाषणानें मिळविलेला पैसा पितर व ब्राह्मण यांकडे खर्चूं नये. श्राद्ध संपलें असतां शेवटीं तें चालविणारा युक्त असें जर न ह्मणेल तर त्याला गाईसंबंधानें खोटें बोलल्याचें पाप लागतें. ब्राह्मण, दहीं, तूप श्वापदांचें मांस या जिनसा जेव्हां मिळतील तसेंच ज्या दिवशीं अमावास्या असेल तोच श्राद्धाला चांगला दिवस समजावा. ब्राह्मणाचें श्राद्ध संपलें असतां तृप्त होऊन स्वधा ह्मणावें. क्षत्रियाच्या श्राद्धाच्या शेवटीं पितर संतुष्ट होवोत असें ह्मणावें. वैश्याच्या शेवटीं अक्षय्य ह्मणावें, व शूद्राच्या शेवटीं स्वस्ति ह्मणावें. ब्राह्मणाचें पुण्याहवाचन ॐकारपूर्वक असावें. क्षत्रियासंबंधानें तो ॐकार गाळावा व वैश्याच्या पुण्याहवाचनांत देव संतुष्ट होवोत असें ह्मणावें. जातकर्मादि क्रिया तिन्ही वर्णांना मंत्रोक्त सांगितल्या आहेत. ब्राह्मणांना मुंज गवताचा कडदोरा असावा, क्षत्रियाला धनुष्याच्या दोरीचा असावा व वैश्याला बालवजी नांवाच्या गवताचा असावा.

दान करणारा व प्रतिग्रह घेणारा या दोघांच्या पापपुण्यासंबंधानें आतां सांगतों ऐक. खोटें बोलल्यानें ब्राह्मणाला जें पाप लागतें त्याच्या चौपट क्षत्रियाला व आठपट वैश्याला लागतें. पहिल्यानें एका ब्राह्मणाचें, क्षत्रियाचें किंवा वैश्याचें आमंत्रण घेऊन मग दुसऱ्याचे घरीं जेवूं नये. मागून बोलावणें आलेल्या मनुष्याच्या घरीं जेवल्यानें त्याला कमीपणा येऊन पशुहत्या केल्याचें पाप लागतें; या तीन वर्णांच्या देव व पितृकार्यांमध्यें जो ब्राह्मण स्नान केल्यावांचून जेवील त्याला गाईसंबंधानें खोटें बोलल्याचें पाप लागतें. जो ब्राह्मण अशौच्य असतांना जाणूनबुजून लोभानें अशा प्रसंगीं या तिन्ही वर्णांपैकीं कोणाच्या तरी घरीं जेवील तर त्याला हेंच पाप लागतें. जो तीर्थाला जाण्याचें किंवा धर्मकृत्य करण्याचें ढोंग करून पैसा मिळवून त्यावर रहातो त्याला खोटें बोलण्याचें पाप लागतें. जे वेद पढले नाहींत, व्रतशील नाहींत, किंवा ज्यांना आचार ठाऊक नाहीं, अशांना श्राद्धासारख्या प्रसंगीं तीन वर्णांपैकीं जो एखादा मनुष्य बोलावून अन्न देईल तो खात्रीनें पापाला धनी होतो.' युधिष्ठिर ह्मणाला, 'देव व पितृकार्यामध्यें कोणाला दिलें असतां तें उत्तम फलदायक होतें?' भीष्म ह्मणाले, 'पावसाळ्यांत शेतकरी ज्याप्रमाणें पावसाकरितां मोठ्या आतुरतेनें वाट पहात रहातात, त्याप्रमाणें ज्या ब्राह्मणांच्या बायका त्यांच्या उष्ट्यासाठीं आतुरतेनें वाट

पहात असतात, अशा ब्राह्मणांना पोसावें. जे नेहमीं शुद्धाचरणानें चैन बाजूला ठेवून अन्न सुद्धां कमी करून शरीर सुकवीत व्रत पाळीत रहातात, असे लोक कांहीं मिळावें या हेतूनें आपल्याकडे आले असतां त्यांना दान द्यावें. जें वर्तन हेंच अन्न, वर्तन हेंच कुटुंब, वर्तन हेंच मुलेंबाळें, वर्तन हेंच बळ व वर्तन हाच आधार असें समजतात, अशा प्रकारचे लोक जेव्हां निरुपाय होऊन भिक्षेला येतात तेव्हां त्यांना दिलेलें मोठें फलदायक होतें. चोर किंवा लुबाडणारे लोक यांनीं लुबाडल्यामुळें जो भिक्षेला येतो त्याला तसेंच आपल्या वर्गांतील ज्यांनीं भिक्षा मागून दुसऱ्यापासून थोडें मिळविलें आहे त्याच्यापुढें सुद्धां ज्याला तोंड पसरावें लागतें त्याला दिलेलें महाफलदायक होतें. देशावर येऊन पडलेल्या संकटामध्यें ज्यांचीं बायकामुलें व सर्वस्व नाहींसें झालें आहे असे लोक मागावयास आले असतां त्यांना दिलें असतां त्याचें फळ फार मोठें आहे. जे व्रत पाळून वेदांत सांगितल्याप्रमाणें नियमस्थ रहात असतात असे लोक आपलीं व्रतें संपूर्ण करण्यासाठीं मागावयास आले असतां त्यांना दिलेलें दान मोठें फलदायक होतें. दुष्ट लोकांच्या रहाटीपासून जे दूर असतात अशा गरीब दुबळ्यांना दिलें असतां मोठें पुण्य लागतें. बलवान लोकांनीं ज्यांना उगीचच्या उगीच लुबाडलें आहे असे लोक केवळ पोटासाठीं तोंड पसरतात तेव्हां त्यांना दिलेलें दान श्रेयस्कर होतें. जे तपस्वी तपामध्यें गढले आहेत अशासाठीं जें कांहीं थोडें बहुत मिळेल तें मिळविण्यासाठीं जे भिक्षा मागतात त्यांना देण्यांत मोठें पुण्य आहे. याप्रमाणें हें दानफल मीं तुला सांगितलें. आतां ज्याच्या योगानें मनुष्य नरकाला जातो तीं कर्में सांगतों ऐक. गुरुकार्य किंवा अभयदान यांशिवाय इतर प्रसंगीं जे खोटें बोलतात, परस्त्रीवर जे हात टाकून जुलूम करतात किंवा तिला पळविण्यांत मदत करतात, जे दुसऱ्याचा पैसा उपटतात किंवा त्यांचा पैसा किंवा मालमत्ता यांचा नाश करतात, जे दुसऱ्यांचे दोष सांगत बसतात, जे पाणपोई, सभा, पूल, घरें हीं मोडून विध्वंस करतात, अनाथ, तरुण, बाल, वृद्ध, भ्यालेली अशा गरीब स्त्रियांना जे फसवितात, दुसऱ्याच्या उदरनिर्वाहाचें साधन जे नाहींसें करतात, घर मोडून त्यांच्या बायकांना उपटतात. मित्राची व त्यांची ताटातूट करतात, आशेचा हिरमोड करतात, दुसऱ्याच्या वृत्तीवर रहातात, मित्रांनीं केलेले उपकार जाणीत नाहींत, पाखंडवादी होऊन वेदाची निंदा करतात, करार पाळीत नाहींत, जे आपल्या स्थानापासून खालीं येतात, व्यवहार नीट ठेवीत नाहींत, जबर नफा घेतात, द्यूत खेळतात, व दुष्ट कृत्यांमध्यें निःशंक असतात, प्राणिमात्रांची हिंसा करतात, बक्षिसाची किंवा अमुक एक मिळेल म्हणून आशा करीत असतात, कांहीं उपयोगीं पडल्याबद्दल मोबदल्याची वाट पहात असणाऱ्या पगारी नोकरांना धन्याकडून काढून लावितात, बायकापोरांना, अग्नीला, किंवा नोकरचाकरांना दिल्याशिवाय स्वतः खातात, देव व पितर यांचीं कार्यें शास्त्रांत सांगितल्याप्रमाणें करीत नाहींत, वेदविक्रय करतात किंवा पैसा घेऊन वेद लिहितात, चारी आश्रमांच्या किंवा श्रुतीच्या बाहेर राहून दुष्ट कर्में करीत राहतात, केंस, विष किंवा दूध विकून त्यावर रहातात, ब्राह्मण, गाई व मुली यांच्या कामांत आड येतात, शस्त्रें, धनुष्यें व बाण करतात किंवा विकतात, रस्ते धोंडे, कांटे किंवा खळगे यांनीं बंद पाडतात. गुरू, नोकर किंवा भक्तिमान अनुयायी यांना कांहीं अपराधावांचून टाकतात, खोंड वयांत येण्याच्या पूर्वीं त्याला कामाला लावतात, बैल व दुसरीं जनावरें यांना वठणीला आणण्यासाठीं, त्यांच्या नाकांत वेसण घालतात, जे राजे आपल्या प्रजेकडून जुलुमानें षष्ठांश करभार घेऊन त्यांचें रक्षण करीत नाहींत, जे स्वतः समर्थ असून जवळ साधन असतां दान करीत नाहींत, क्षमाशील, आत्मनिग्रही, शहाणे यांना जे सोडतात, त्याचप्रमाणें ज्यांच्याशीं पुष्कळ दिवस संबंध जडला असून त्यांच्याशीं आपलें काम साधल्याबरोबर त्यांना रजा देतात, मुलें, म्हातारे, नोकर यांना न देतां जे आपणच खातात असे लोक नरकाला जातात. आतां स्वर्गाला कोण धनी होतात तें सांगतों ऐक. देवकार्यामध्यें ब्राह्मणाला अडथळा आणणारांचीं मुलें व गुरें मरून त्यांना स्वर्ग मिळत नाहीं. जे दान, तप, व सत्य पाळून धर्माप्रमाणें वागतात, जे गुरुसेवा क-

रून तपानें विद्या संपादन करून प्रतिग्रहाची पर्वा ठेवीत नाहींत, ज्यांच्यामुळें दुसऱ्या लोकांची भीति पाप, व्याधि वगैरे दूर होतात, जे क्षमावान व शहाणे असून धर्मकार्यामध्यें दक्ष असतात, ज्यांचा आचार फार शुद्ध आहे, मधु, मांस, परस्त्री, मद्य यांपासून जे पराङ्मुख आहेत, आश्रम, कुल, देश किंवा नगर जे स्थापतात; त्याचप्रमाणें जे वस्त्र, आभरण, अन्नपान देतात, जे दुसऱ्याचें लग्न करून देतात, हिंसा म्हणून ज्यांना ठाऊक नाहीं, वाटेल तें सहन करण्याला जे तयार असतात, ते सर्वांना आधारभूत असतात. इंद्रियें स्वाधीन ठेवून जे आईबापांची सेवा करतात, भावाशीं जे स्नेहानें वागतात, श्रीमान, बलवान व तारुण्यांत असून ज्यांचीं इंद्रियें स्वाधीन आहेत, अपराध केलेल्यांशीं सुद्धां जे स्नेहानें असतात, जे सर्वांशीं मृदु असून ज्यांचा स्वभाव चांगला आहे असे लोक ज्यांना आवडतात, जे दुसऱ्याची मर्जी राखून त्यांना सुखी ठेवितात, जे हजारोंना संभाळतात, हजारोंना दान देतात, व हजारोंना संकटांतून सोडवितात, जे सोनें, गाई, गाड्या घोडी दान देतात, जे लग्नामध्यें लागणाऱ्या वस्तु, नोकर, दासी, कपडेलत्ते देतात, सार्वजनिक घरें, क्षेत्रें, विहारस्थानें, उद्यानें, विहिरी, विश्रांतिस्थानें, सभालयें, तलाव व शेतें तयार करतात, जे घरें, शेतें, वसलेलीं गांवें दान करतात, जे रस, बीं व धान्य स्वतः उत्पन्न करून दुसऱ्याला देतात, जे कोणत्या का कुळांत उत्पन्न झाले असेनात, पुष्कळ मुलें उत्पन्न करून शंभर वर्षेपर्यंत चिरकाल राग आवरून दुसऱ्यावर दया करीत रहातात अशा प्रकारचे लोक स्वर्गाला अधिकारी होतात. याप्रमाणें परलोकासाठीं लोक जीं देव व पितृकार्यें त्याचप्रमाणें दानधर्म करतात व पूर्वीच्या ऋषींनीं जीं केलीं तीं मीं तुला सांगितलीं.'

---

## २४१ स्थलमाहात्म्य. (१३. २४–२६)

युधिष्ठिर ह्मणाला, 'हिंसा केल्यावांचून कशानें ब्रह्महत्या जडते, हें सांगा; तसेंच तीर्थांचें दर्शन व श्रवण, त्याचप्रमाणें त्यामध्यें स्नान केल्याचें फल व कोणते देश, प्रांत, आश्रम, व पर्वत व नद्या फार पुण्यवान आहेत, हें सर्व मला सांगा.' भीष्म ह्मणाले, 'भिक्षा मागत फिरणाऱ्या ब्राह्मणाला हाक मारून मागून नाहीं असें ह्मटल्यानें, जो वेद व वेदांगें पढला असून ज्याची जगावर आसक्ति नाहीं अशाची वृत्ति हरण केल्यानें, तान्हेल्या गुरांच्या पाण्यासंबंधानें विघ्न आणल्यानें, मुनिप्रणीत चालू असलेलीं श्रुति व शास्त्रें कळून न घेतां त्यांना दोष दिल्यानें, आपल्या मुलीला योग्य वर पाहून न दिल्यानें, अधर्मामध्यें गढून द्विजांना मर्मभेदक बोलून दुखविल्यानें, आंधळा, पांगळा किंवा वेडा यांचें सर्वस्व हरण केल्यानें किंवा मूर्खपणानें आश्रम, वन, गांव किंवा नगर यांवर अग्नि टाकल्यानें मनुष्याला ब्रह्महत्येचें पातक लागतें.

आतां नाना तीर्थांचें माहात्म्य ऐक. लाटांनीं भरलेली चंबळा, जिला वितस्ताही ह्मणतात, तिच्यामध्यें स्नान करून सात दिवस कांहीं न खातां राहिल्यानें मनुष्याला निर्मळ मुनीत्व येतें. काश्मीर प्रांतांत ज्या नद्या सिंधूला मिळतात त्यांमध्यें स्नान केल्यानें मनुष्य शीलसंपन्न होऊन स्वर्गाला जातो. पुष्कर, प्रभास, नैमिष, समुद्र, देविका, इंद्रमार्ग व स्वर्णबिंदु यांमध्यें स्नान केल्यानें मनुष्य विमानांतून स्वर्गाला जाऊन त्या ठिकाणीं अप्सरा त्याचा गुणानुवाद गातात. हिरण्यबिंदु, कुशेशय व देवंत या तीर्थांमध्यें स्नान करून अभिवादन केल्यानें मनुष्याचें सर्व पाप धुवून निघतें. गंधमादनाजवळील इंद्रतोया व कुरंगदेशांतील करतोया यांमध्यें स्नान करून तीन रात्रीं उपवास केल्यानें मनुष्याला अश्वमेधाचें फळ मिळतें. गंगाद्वारीं, कुशावर्तीं, बिल्वकामध्यें, नीलपर्वतावर त्याचप्रमाणें कनखलीमध्यें स्नान केल्यानें मनुष्याचें पाप नाहींसें होऊन तो स्वर्गाला जातो. अपांह्रदामध्यें स्नान करून राग आवरून खरेपणानें कोणाला पीडा न देतां ब्रह्मचारिव्रतानें राहिल्यानें मनुष्याला अश्वमेधाचें फळ मिळतें. ज्या उत्तर दिशेला गंगा शंकरांच्या मस्तकावरून पडून तीन प्रवाहांनीं वाहूं लागते, त्या ठिकाणीं स्नान करून एक महिनाभर कांहीं न खातां राहिल्यानें मनुष्याला देवता दिसूं लागतात. सप्तगंगा, त्रिगंगा व इंद्रमार्ग या ठिकाणीं तर्पण केल्यानें पुनर्जन्म आला असतां त्यामध्यें अमृत सेवन करण्याला मिळतें. महा-

श्रमाच्या ठिकाणीं स्नान करून शुचिर्भूततेनें एक महिनापर्यंत कांहीं न खातां अग्निहोत्रामध्यें गढून राहिल्यानें एका महिन्यांत मनुष्याला सिद्धि मिळते. महाऱ्हदामध्यें त्याचप्रमाणें भृगुतुर्गी स्नान करून तीन रात्रीं उपवास केल्यानें मनुष्य ब्रह्महत्येच्या पापापासून मुक्त होतो. कन्याकूप व बलाका या ठिकाणीं स्नान केल्यानें मनुष्याला देवामध्यें कीर्ति मिळून यशानें तो फार झळकतो. देविकेच्या ठिकाणीं त्याचप्रमाणें सुंदरिकाऱ्हद व अश्विनी तीर्थ यांमध्यें स्नान केल्यानें मेल्यावर मनुष्याला पुढच्या जन्मीं उत्तम रूप प्राप्त होतें. महागंगा त्याचप्रमाणें कृत्तिका अंगारक या ठिकाणीं स्नान करून एक पंधरवडा कांहीं न खातां राहिल्यानें मनुष्य शुद्ध होऊन स्वर्गाला जातो. वैमानिक व किंकिणिकाश्रम या ठिकाणीं स्नान केल्यानें मनुष्याला अप्सरांमध्यें वाटेल तिकडे फिरण्याला मुभा मिळून त्यांमध्यें त्याला मोठा मान मिळतो. कालिकाश्रमाला जाऊन विपाशेमध्यें स्नान करून राग दूर करून ब्रह्मचारीमतामध्यें तीन दिवस राहिल्यानें मनुष्य मुक्त होतो. कृत्तिकाश्रमामध्यें स्नान करून पितरांना तर्पण करून शुद्ध होऊन महादेवाला तोषविलें असतां मनुष्याला स्वर्गप्राप्ति होते. महापुरीं स्नान करून तीन रात्रीं शुद्धतेनें उपवास केला असतां मनुष्याला स्थावरजंगम त्याचप्रमाणें द्विपाद प्राणी यांची भीति उरत नाहीं. देवदारु वनामध्यें स्नान करून पाणी देऊन सात रात्रीं राहिल्यानें मनुष्य देवलोकाला जातो. शरस्तंब, कुशस्तंब, द्रोणशर्मपद या ठिकाणीं धबधब्यामध्यें स्नान केल्यानें अप्सरा त्या मनुष्याची सेवा करतात. चित्रकूट व जनस्थान या ठिकाणीं तसेंच मंदाकिनीमध्यें स्नान करून कांहीं न खातां राहिल्यानें मनुष्याला राजलक्ष्मी प्राप्त होते. श्यामाश्रमाला जाऊन तेथें स्नान करून कांहीं न खातां एक पंधरवडा राहिल्यानें मनुष्याला अंतर्धानविद्येपासून मिळणारें फल मिळतें. कौशिकीजवळ एकवीस रात्रीं वायुभक्षण करून राहिल्यानें मनुष्य स्वर्गाला जातो. मतंगवापीमध्यें स्नान केल्यानें एका रात्रींत सिद्धि मिळतें. अनालंब, अंधक, नैमिष व स्वर्गतीर्थ या ठिकाणीं स्नान करून पाणी दिल्यानें मनुष्याला नरमेधाचें फल मिळतें. गंगाऱ्हद त्याचप्रमाणें उत्पलावन याठिकाणीं एक महिनाभर स्नान करून पाणी दिल्यानें अश्वमेधाचें फल मिळतें. गंगायमुनेच्या संगमामध्यें त्याचप्रमाणें कालंजर पर्वतावर एक महिनाभर पाणी दिल्यानें दहा अश्वमेधांचें फल मिळतें. षष्ठिह्रदामध्यें स्नान करणें हें अन्नदानाहून श्रेष्ठ आहे. तीन कोटी दहा हजार तीर्थें माघ महिन्यामध्यें प्रयागेंत येतात ह्मणून माघ महिन्यांत आत्मनिग्रह करून कडक व्रत पाळून जो एक महिनाभर तेथें स्नान करून रहातो त्याला स्वर्ग मिळतो. मरुद्गणाच्या ठिकाणीं, पित्राश्रमामध्यें व वैवस्वत तीर्थी स्नान केल्यानें मनुष्य अगदीं शुद्ध होतो. ब्रह्मसराला जाऊन त्याठिकाणीं भागीरथीमध्यें स्नान करून पितरांना पाणी देत कांहीं न खातां एक महिनाभर राहिल्यानें मनुष्याला सोमलोक मिळतो. उत्पातकामध्यें स्नान करून अष्टावक्रामध्यें पाणी देत बारा दिवस कांहीं न खातां राहिल्यानें मनुष्याला नरमेधाचें फल मिळतें. अश्मपृष्ठावर त्याचप्रमाणें नरविंद पर्वतावर व क्रौंचपद्यामध्यें स्नान केल्यानें मनुष्य ब्रह्महत्येच्या पापापासून मुक्त होतो. कलमिकामध्यें स्नान केल्यानें मनुष्याला मेल्यावर पुष्कळ पाणी मिळतें व अग्निपुरामध्यें स्नान केल्यानें अग्निकन्यापुरामध्यें रहावयास सांपडतें. करवीरपुरामध्यें विशालेमध्यें स्नान करून पाणी दिल्यानें, त्याचप्रमाणें देवऱ्हदामध्यें स्नान केल्यानें मनुष्य ब्रह्मस्वरूप होऊन झळकतो. पुनरावर्तनंदा व महानंदा यांमध्यें स्नान केल्यानें अप्सरा हात जोडून त्याच्या सेवेला हजर राहतात. कार्तिकी पौर्णिमेला उर्वशीला जाऊन लोहित्यामध्यें विधिपूर्वक स्नान केलें असतां पुंडरीक यज्ञाचें फल मिळतें. रामऱ्हदामध्यें स्नान करून विपाशेमध्यें पाणी देऊन बारा दिवस कांहीं न खातां राहिल्यानें मनुष्य सर्व पापांपासून मुक्त होतो. शुद्ध मनानें महाऱ्हदामध्यें एक महिनाभर स्नान करीत कांहीं न खातां राहील तर मनुष्याला जमदग्नीला मिळालेली गति मिळेल. विंध्य पर्वतावर स्वतःला कष्टवून एक महिनाभर तप करीत राहिल्यानें मनुष्याला उत्तम सिद्धि मिळते. नर्मदेमध्यें त्याचप्रमाणें शूर्पारक तीर्थांत एक पंधरवडा स्नान करून कांहीं न खातां राहिल्यानें मनुष्य राजपुत्र होतो. एकाग्रतेनें तीन

महिने आत्मनिग्रह करून जंबुमार्गाला लागलें असतां तेथें एका अहोरात्रीमध्यें सिद्धि मिळते. चंडालिकाश्रमाला जाऊन कोकामुखामध्यें स्नान करून फाटकींतुटकीं नेसून भाजीपाल्यावर राहिल्यानें दहा मुली भोगण्यास मिळतात. कन्याह्रदाच्या ठिकाणीं ज्याला राहण्याला मिळालें त्याला यमसदनाला जाण्याची पाळी न येतां देवलोक मिळतात. अमावास्येच्या एकारात्रीं प्रभास तीर्थामध्यें राहिलें असतां मनुष्याला सिद्धि मिळून तो अमर होतो. आर्ष्टिषेणाच्या आश्रमाजवळील उज्जानक तीर्थामध्यें त्याचप्रमाणें पुढें पिंगेच्या आश्रमामध्यें स्नान केल्यानें मनुष्य सर्व पापांपासून मुक्त होतो. कुल्येमध्यें स्नान करून अधमर्षणाचा जप करीत त्रिरात्र उपवास केल्यानें मनुष्याला अश्वमेधाचें फल मिळतें. पिंडारकामध्यें स्नान करून एक रात्रभर उपवास केला असतां दुसऱ्या दिवशीं उजाडल्याबरोबर तो शुद्ध होऊन त्याला अग्निष्टोमयज्ञाचें फल मिळतें. त्याचप्रमाणें धर्मारण्याला शोभा देणाऱ्या ब्रह्मसरोवराला जाऊन तेथें स्नान केलें असतां मनुष्याला पुंडरीक यज्ञाचें फल मिळतें. एक महिनाभर सर्व वासना दाबांत ठेवून मैनाक पर्वतावर स्नानसंध्या करीत राहिल्यानें सर्व यज्ञांचें फल मिळतें. कालोदक, नंदिकुंड त्याचप्रमाणें उत्तरमानस यांना शंभर योजनांवरून गेलें असतां भ्रूणहत्येपासून मनुष्य मुक्त होतो. नंदीश्वराच्या मूर्तीचें दर्शन घेतल्यानें मनुष्य सर्व पापांपासून मुक्त होतो. स्वर्गमार्गामध्यें स्नान केल्यानें मनुष्य ब्रह्मलोकाला जातो. सर्व रत्नांची खाण, सिद्धचारणांचें वसतिस्थान असा जो शंकराचा सासरा पुण्यवान हिमाचल त्या ठिकाणीं अनाशक तीर्थीं विधिपूर्वक देह ठेविल्यानें मनुष्य सिद्धि मिळवून ब्रह्मलोकाला जातो. काम, क्रोध व लोभ जिंकून जो तीर्थांच्या ठिकाणीं रहातो त्याला दुर्मिळ कांहींच नाहीं. सर्व तीर्थें पहाण्याचें ज्याच्या मनांत असेल त्यानें अगम्य, अशा तीर्थांना मनानेंच जावें. याप्रमाणें हें तीर्थमाहात्म्य आहे. आतां तुला स्थलमाहात्म्य सांगतों ऐक. कोणी एक सिद्ध एका शिलोंच्छवृत्ति गृहस्थाच्या घरीं आला असतां यथासांग सत्कार होऊन रात्रीं तो तेथेंच सुखांत राहिला. दुसरे दिवशीं सकाळीं प्रातर्विधि आटोपून शिलोंच्छवृत्ति त्या ऋषींकडे आला. तेव्हां ते दोघे एकत्र बसून त्यांनीं वेद व उपनिषदें यांवर संभाषण चालविलें. त्या संभाषणाच्या शेवटीं त्या शिलोंच्छवृत्तीनें पवित्र देश कोणता म्हणून प्रश्न केला असतां ते सिद्ध म्हणाले, ‘ ज्यांमधून सर्व नद्यांमध्यें श्रेष्ठ अशी गंगा वहाते, तेच देश, तेच प्रांत, तेच आश्रम व तेच पर्वत पवित्रतेमध्यें थोर. गंगेचें सेवन केल्यानें मनुष्याला जी गति मिळते ती तपानें, ब्रह्मचर्यानें, यज्ञांनीं किंवा त्यागानें मिळणें शक्य नाहीं. ज्या मनुष्यांच्या अवयवांना गंगेच्या पाण्याचा स्पर्श झाला आहे किंवा ज्यांचीं हाडें तिच्यामध्यें पडलीं आहेत त्यांना स्वर्गापासून कधीं ढळावें लागत नाहीं. ज्यांचीं सर्व कृत्यें गंगेच्या पाण्यानें होतात, ते ही पृथ्वी सोडून स्वर्गामध्यें रहातात. पूर्वगंगेच्या शुद्ध पाण्यामध्यें स्नान करून शुद्ध झालेल्या लोकांना मिळणारी गति शेंकडों यज्ञांनीं सुद्धां मिळत नाहीं. मनुष्यांचीं हाडें जितकीं गंगेच्या पाण्यामध्यें असतात तितकीं हजार वर्षें तो स्वर्गामध्यें बहुमानानें असतो. गंगेच्या पाण्यानें स्नान होऊन निघालेला मनुष्य, ज्याप्रमाणें अंधाराला बाजूला सारून सूर्य झळकतो, त्याप्रमाणें सर्व पापांना बाजूला सारून झळकत रहातो. ज्याप्रमाणें चंद्रावांचून रात्र, फुलावांचून झाडें, धर्मज्ञानावांचून वर्णाश्रम, सोमावांचून यज्ञ, सूर्यावांचून आकाश, पर्वतावांचून पृथ्वी व वायूवांचून आकाश, त्याप्रमाणें गंगेच्या पवित्र पाण्यावांचून सर्व दिशा व्यर्थ होत. या तिन्ही लोकांमध्यें जे कांहीं प्राणी आहेत ते ह्या गंगोदकसेवनानें मोठें समाधान पावतात. जो सूर्य किरणांनीं तापलेलें गंगेचें पाणी पितो त्याला गाईच्या मलांतून पडणारे यव वेंचून त्यावर रहाण्याच्या व्रताहून श्रेष्ठ फल मिळतें. शरीराला पावन करणारीं हजार चांद्रायणव्रतें व गंगेचें पाणी पिणें याचें फल सारखें आहे. हजार युगें एका पायावर उभें रहाणें व एक महिनाभर गंगेमध्यें उभें रहाणें हीं दोन्ही कदाचित् बरोबर होतील किंवा नाहीं. दहा हजार युगें पाय टांगून उलटें रहाणें याहून गंगेमध्यें वाटेल तसें उभें रहाणें हेंच विशेष फलदायक आहे. अग्नीमध्यें टाकलेला कापसाचा ढीग जसा जळून फस्त होतो त्याप्रमाणें

गंगेमध्यें स्नान केल्यानें सर्व पापें धुवून जातात. दुःखांत सांपडून त्यांतून सुटण्याची वाट पहात असणाऱ्यांना गंगेसारखी दुसरी गति नाहीं. गरुडाला पाहिल्याबरोबर ज्याप्रमाणें सापाचें विष जागच्याजागीं जिरून जातें, त्याप्रमाणें गंगेच्या दर्शनानें सर्व पापें नाहींशीं होतात. ज्यांना प्रतिष्ठा नसून धर्माचा आधार नाहीं त्यांची प्रतिष्ठा, आधार, हित व पांघरूण सर्व कांहीं गंगा आहे. अनेक पापकर्मांमध्यें गढून नरकांत पडूं घातलेले देखील गंगेचा आश्रय केल्यानें तरतात. जे गंगेला जातात ते मुनींच्या किंवा देवांच्या तोडीचे होत. अविनयी व आचारहीन असे पापी नराधमसुद्धां गंगेचा आश्रय करून पुण्यवान होतात. ज्याप्रमाणें देवांना अमृत, पितरांना स्वधा, व नागांना सुधा त्याप्रमाणें मनुष्यांना गंगाजल आहे. ज्याप्रमाणें भुकेलीं मुलें आईची पाठ सोडीत नाहींत, त्याप्रमाणें कल्याणेच्छु लोक गंगेला सोडीत नाहींत. ज्याप्रमाणें सर्व स्थानांमध्यें ब्रह्मदेवाचें स्थान श्रेष्ठ आहे त्याप्रमाणें स्नानाला सर्व नद्यांमध्यें गंगा श्रेष्ठ आहे. ज्याप्रमाणें देवादिकांना गाय व पृथ्वी ह्यांचा मुख्य आधार आहे, त्याप्रमाणें सर्व प्राणिमात्रांना गंगेचाच मुख्य आधार आहे. पुष्कळ दिवस चालणाऱ्या यज्ञामध्यें दिलेल्या व चंद्र व सूर्य यांच्या ठिकाणीं सांठून असलेल्या अमृतावर ज्याप्रमाणें देव रहातात, त्याप्रमाणें मनुष्य गंगेच्या पाण्यावर रहातात. गंगेच्या वाळवंटांतून उठलेल्या रेतीनें अंग भरून निघाल्यानें मनुष्य देवाप्रमाणें शोभतो. गंगेच्या कांठची माती जो आपल्या डोक्यावर घेतो तो अंधार दूर करण्याला निघालेल्या सूर्याप्रमाणें झळकतो. गंगेच्या तुषारांनीं युक्त असा वारा मनुष्याच्या अंगावरून गेला असतां त्याबरोबर त्याचें पाप दूर होतें. व्यसनांनीं गांजून नाश होऊं घातलेल्या मनुष्याला गंगेचें दर्शन झाल्याबरोबर एक प्रकारचा आनंद होऊन त्याबरोबर त्याचीं सर्व संकटें दूर होतात. हंस, क्रौंच व दुसरे पक्षी यांच्या मधुर शब्दांच्या योगानें गंगा गंधर्वांशीं व तिच्या उंच उंच कड्यांच्या योगानें मोठमोठ्या पर्वतांशीं स्पर्धा करीत आहेसें दिसतें. हंस आदिकरून नाना पक्ष्यांनीं झांकून निघालेली व जिच्या तीरावर गुरें चरत आहेत, अशा गंगेला पाहून स्वर्गाचीसुद्धां आठवण होत नाहीं. सर्व मनोरथांचा उपभोग घेणाऱ्या देवांना जो आनंद असतो तो गंगेच्या कांठावर राहाणाऱ्या लोकांना होतो. वाचिक, मानसिक व कायिक अशा पापांनीं गांजलेला मनुष्य गंगेचें दर्शन घेऊन खात्रीनें पावन होतो. गंगेचें दर्शन घेऊन तिला स्पर्श करून तिच्यामध्यें स्नान करणारा मनुष्य पुढच्या सात व मागच्या सात कुळांना तारतो. गंगेसंबंधी कथा ऐकणारा, तिची इच्छा धरून तिचें दर्शन घेणारा, तिला स्पर्श करून व तिच्यामध्यें स्नान करून तिचें पाणी पिणारा मनुष्य आई व बाप या दोघांच्या कुळांना उद्धरतो. तिच्या दर्शनानें, तिला शिवल्यानें, तिचें पाणी प्याल्यानें व गंगा ह्मणून तिचें नांव घेतल्यानें शेंकडों, हजारों लोकांना ती पावन करते. आपला जन्म, जीवित व विद्या याला सफल करून घ्यावयाचें असेल त्या मनुष्यानें गंगेला जाऊन देव व पितर यांना तर्पण करावें. गंगेला जाऊन जें फळ मिळतें तें मुलें, पैसा किंवा पुण्यकर्म यांच्या योगानें मिळत नाहीं. अंगांत सामर्थ्य असून जे पवित्र अशा गंगाजलाला डोळ्यानें पहात नाहींत ते जात्यंध मेलेले किंवा पंगु समजावे. भूत, वर्तमान, भविष्य कळणारे ऋषी, देव, वानप्रस्थ, गृहस्थ, यती, ब्रह्मचारी व विद्वान या सर्वांनीं जिला जवळ केली आहे तिचा कोण आश्रय करणार नाहीं? भल्या मनुष्यानें प्राण जाण्याचे वेळीं गंगेचें चिंतन केलें असतां त्याला उत्तम गति मिळते. देह पडेपर्यंत तिला जवळ करणाऱ्या मनुष्याला कोणत्याही प्रकारचें भय, पाप किंवा राजभीति उरत नाहीं. आकाशांतून पडत असतां जिला शंकरांनीं आपल्या मस्तकावर धरिली तिचाच स्वर्गीं देवांनीं आश्रय केला आहे. तिच्या तीन पावन करणाऱ्या प्रवाहांनीं तीन लोक पावन केले आहेत. जो हिचें जल सेवन करील तो धन्य होतो. आकाशामध्यें देवांना ज्याप्रमाणें सूर्य, पितरांना चंद्र व लोकांना ज्याप्रमाणें इंद्र आहे तशी नद्यांमध्यें ही आहे. आई, बाप, मुलें, बायका, पैसा यांना मुकल्यानें सुद्धां गंगेला मुकल्याइतकें दुःख मनुष्याला होणार नाहीं. गंगेला पाहून जितका आनंद होतो इतका अरण्य, इष्ट विषय, मुलें, पैसा यांच्या योगानें कधीं व्हावयाचा नाहीं. पूर्ण चंद्राला पाहून मनुष्याच्या डोळ्यांना जितका आ-

नंद होतो त्याप्रमाणें तीन प्रवाहांनीं वहाणाऱ्या या गंगेला पाहून होतो. तिच्यावरच श्रद्धा ठेवून तिच्याकडेच लक्ष देऊन, तिच्यावरच निष्ठा ठेवून, तीच कायती आधार असें समजून भक्तीनें तिच्या मार्गे लागलेला तिला प्रिय होतो. पृथ्वीवरील, आकाशांतील व स्वर्गांतील सर्व कमी अधिक दर्जाच्या मनुष्यांनीं तिच्यामध्यें स्नान करावें हें मुख्य कर्तव्य आहे. तिच्या पावन करण्याच्या गुणाबद्दल तिची कीर्ति सर्व जगभर भरून आहे; कारण राखरांगोळी होऊन गेलेल्या सगरांच्या मुलांना तिनें स्वर्गाला नेऊन पोहोंचविलें आहे. वाऱ्यानें उंच उंच उसळणाऱ्या अशा मनोहर तिच्या लाटांमध्यें स्नान करणाऱ्या मनुष्यांचीं सर्व पापें नाहींशीं होऊन सहस्ररश्मी सूर्याप्रमाणें ते झळकतात. यज्ञामध्यें दिलेल्या हवीप्रमाणें पवित्र व मोठमोठ्या यज्ञांच्या तोडीचें फल देणाऱ्या तिच्या पाण्यामध्यें आपला देह सोडून दिलेल्या लोकांना देवपद मिळालें आहे. जे अंध, वेडे किंवा पंगु आहेत अशांची सुद्धां, जिला सर्व देव व मोठमोठे ऋषी भजतात ती ही मोठी यशस्वी व विश्वस्वरूपी गंगा कामना परिपूर्ण करते. ज्यांनीं ज्यांनीं तीन प्रवाहांनीं वाहून सर्व प्रकारचें कल्याण करणाऱ्या, जिचें पाणी मधाप्रमाणें गोड आहे, अशा या विश्वरक्षित्री गंगेचा आश्रय केला आहे, त्यांना त्यांनां स्वर्गसुख मिळालें आहे. तिच्या कांठीं राहून दररोज तिचें दर्शन घेणारे तिच्या दर्शनानें व स्पर्शानें पावन झाले आहेत. देवांनीं अशांना इह लोकीं व परलोकीं प्रत्येक प्रकारचें सुख दिलें आहे. विष्णुमाता प्रश्नि हीच आहे. वाणी हीच आहे. सामान्यतः हातीं लागणार नाहीं अशी ही आहे. हीमंगलदायक व वैभवरूपी आहे. प्रभुत्वादि सहा ऐश्वर्यें देणारी हीच आहे. प्रसाद करण्याला नेहमीं ही तत्पर आहे. जगांतील सर्व वस्तू उघड करून दाखविणारी हीच आहे. सर्व प्राणिमात्रांना मुख्य आधार हीच आहे. ज्यांनीं इह लोकीं हिचा आधार घेतला आहे त्यांना खात्रीनें स्वर्ग मिळतो. हिची कीर्ति सर्व आकाश, स्वर्ग, पृथ्वी, दिशा व उपदिशा भरून राहिली आहे. हिच्या पाण्याचें सेवन केल्यानें मनुष्याला सिद्धि मिळाली आहे. स्वतः हिचें दर्शन घेऊन जे दुसऱ्याला ही दाखवून देतात त्यांना ही जन्ममरणांतून सोडवून मुक्त करते. देवांचा सेनानी जो गुह त्याला, त्याचप्रमाणें सर्व धातूंमध्यें श्रेष्ठ जें सोनें त्याला पोटांत ठवणारी हीच आहे. दररोज सकाळीं हिच्या पाण्यामध्यें जे स्नान करतात त्यांना धर्मार्थकाम या तिहींची प्राप्ति होते. यज्ञामध्यें मंत्रानें टाकलेल्या आहुतीच्या तोडीचें हिचें पाणी पवित्र आहे. पापापासून पावन करण्याचें हिच्या अंगांत सामर्थ्य असून हिचा अवतार स्वर्गांतून आहे. ही प्रत्येकाला पूज्य आहे. ही हिमवानाची मुलगी, शंकराची बायको व स्वर्ग आणि पृथ्वी यांचें भूषण आहे. प्रत्येक प्रकारचें कल्याण देण्याचें हिच्या अंगांत सामर्थ्य आहे. तिन्ही लोकांमध्यें ही मोठी पवित्र आहे. ही प्रत्यक्ष धर्मस्वरूपी असून पृथ्वीवर प्रवाहरूपानें वहाणारें तेज हीच आहे. मोठमोठ्या लाटांनीं व हिच्यामध्यें स्नान करणाऱ्या ब्राह्मणांनीं हिला मोठी शोभा आली आहे. स्वर्गाची ही माता असून त्या उच्च हिमवत पर्वतापासून सर्व प्राणिमात्रांच्या हितासाठीं ही खालीं पृथ्वीवर वहात आली आहे. सर्व वस्तुमात्राचें मुख्य कारण हीच आहे. ही अगदीं निर्मल आहे, ब्रह्माप्रमाणें सूक्ष्म आहे, व मरूं घातलेल्यांना उत्तम शय्या आहे. ही लोकांना कांहीं वेळ न लागतां स्वर्गाला नेते. ही मोठ्या प्रवाहानें वहात असून सर्व प्राणिमात्रांना नावालौकिकाला चढविते. सिद्धांना ही प्रिय आहे. हिच्यामध्यें स्नान करणारांना ही स्वर्गाची वाट आहे. क्षमा, रक्षण व धारण यांमध्यें ही पृथ्वीच्या व तेज आणि प्रकाश यांमध्यें सूर्य व अग्नि यांच्या तोडीची आहे व ब्राह्मणांवर कृपा करण्यामध्यें ही कार्तिकस्वामीच्या तोडीची आहे. या आयुष्यामध्यें जे केवळ मनानें या विष्णूच्या पायापासून निघालेल्या गंगेचें चिंतन करतात ते ब्रह्मलोकाला जातात. मुलें, मालमत्ता व सर्व सुखें यांनीं युक्त असे सर्व लोक अशाश्वत व नाशवंत आहेत अशा विचारानें लोक आत्मनिग्रहपूर्वक त्या ब्रह्मस्वरूपी शाश्वत पदासाठीं आदरून मुलगा ज्याप्रमाणें आईवर प्रेम करतो त्याप्रमाणें हिला भजतात. ज्याला सिद्धी पाहिजे असेल त्या शुद्ध अंतःकरणाच्या मनुष्यानें या गंगेचा आश्रय घ्यावा. सामान्य दुधाच्या ऐवजीं अमृत देणाऱ्या

गाईप्रमाणें ही आहे. ही सर्वज्ञ असून सर्व प्राणिमात्रांच्या हितासाठीं हिचा अवतार आहे, व सर्व प्राणिमात्रांच्या अन्नाला ही मुख्य आधार आहे. सर्व पर्वतांची ही जननी आहे. सर्व पुण्यवान लोकांचा आश्रय आहे. हिचें ऐश्वर्य व सामर्थ्य अतुल आहे व ब्रह्माच्या हृदयालासुद्धां ही आनंद देणारी आहे. कडकडीत तपानें सर्व देवांना व विष्णूला प्रसन्न करून घेऊन भगीरथानें हिला खालीं पृथ्वीवर आणलें. हिला जवळ केल्यानें मनुष्याला या जगांत किंवा परलोकीं भीति उरत नाहीं. याप्रमाणें हिचा हा महिमा थोडक्यांत सांगितला आहे. मेरूपर्वतावरील धोंडे मोजतां येतील किंवा समुद्राचें पाणी मापतां येईल; परंतु हिचा महिमा समग्र सांगतां येणार नाहीं. ही गंगा, जे विनयपूर्वक हिला भजतात त्यांवर प्रसाद करते व अशांना प्रत्येक प्रकारें सुखी करते.'

---

## २४२. ब्राह्मण्याची दुर्मिळता.
## (१३. २७–२९.)

युधिष्ठिर ह्मणाला, 'क्षत्रिय, वैश्य किंवा शूद्र यांपैकीं कोणाला ब्राह्मणत्व पाहिजे असेल तर तें कशानें येईल तें सांगा. तपानें किंवा दुसऱ्या एकाद्या पुण्यकर्मानें अगर शास्त्रज्ञानानें?' भीष्म ह्मणाले, 'बा युधिष्ठिरा, क्षत्रियादिक तीन वर्णांना ब्राह्मणत्व मिळणें कठिण आहे; कारण सर्व भूतमात्रांमध्यें हें श्रेष्ठ पद आहे. नानायोनींमध्यें फिरून फिरून जन्म घेत असतां केव्हां तरी त्या फेऱ्यामध्यें एकवार ब्राह्मणजन्म येतो. यासंबंधांत पुढील इतिहास उदाहरणादाखल देतात. कोणे एके ब्राह्मणाचा मतंग नांवाचा सर्वगुणसंपन्न एक मुलगा होता. त्याचा जन्म दुसऱ्या वर्णापासून झाला असून त्याचे सर्व संस्कार ब्राह्मणाप्रमाणें झाले होते. त्याच्याकडून यज्ञ करविण्याकरितां बापानें त्याला समिधा वगैरे आणण्याकरितां जाण्यास सांगितलें. तेव्हां तो गाढवाचें पोर जुंपलेल्या रथांत बसून निघाला. तें गाढवाचें पोर रथ आपल्या आईकडे घेऊन चाललें असतां फिरून फिरून तो त्याच्या नाकावर चाबकाचे रपके देऊं लागला. त्या ठिकाणीं तीव्र व्रण पाहून मुलासंबंधानें प्रेमळ अशी गाढवी आपल्या मुलाला ह्मणाली, 'बाळा, वाईट वाटून घेऊं नकोस. रथांत चांडाळ बसला आहे. ब्राह्मणाच्या ठिकाणीं असा कडकपणा कधीं नसावयाचा. सर्वांचा जो मित्र त्याला ब्राह्मण ह्मणतात. तो सर्व प्राणिमात्रांचा गुरू व शास्ता असल्यानें अशा निर्दयपणें तो कोणाला कधीं मारील काय? परंतु हा पापी मुलावर देखील दया करीत नाहीं. हा आपल्या जातीला जागत आहे. जातीस्वभावाप्रमाणें मनुष्याला बुद्धि होत असते.' हे तिचे भयंकर शब्द ऐकून रथांतून खालीं उतरून तो ब्राह्मण ह्मणाला, 'माझी आई कशानें चांडाळ झाली; मी चांडाळ असून माझें ब्राह्मणत्व नाहींसें झालें आहे हें तुला काय ठाऊक?' गाढवी ह्मणाली, 'विषयांध झालेल्या ब्राह्मणीच्या ठिकाणीं न्हाव्याचा धंदा करणाऱ्या शूद्रापासून तुझा जन्म झाला आहे. याप्रमाणें तूं चांडाळ असून तुझें ब्राह्मणत्व नाहींसें झालें आहे.' हें ऐकून तो ब्राह्मण तडक घराकडे परत आला. त्याला पाहून 'समिधा आणण्याच्या महत्त्वाच्या कामाला तुला पाठविला असून तूं परत कां आलास, तूं सुखी आहेसना,' ह्मणून बापानें विचारलें. तेव्हां तो ह्मणाला, 'ज्याची उत्पत्ति नीचापासून आहे किंवा ज्याची उत्पत्ति कोणापासून आहे हें कळत नाहीं तो सुखी कसा असणार? बाबा, ज्याची आई अशा प्रकारची त्याला सुख कसचें? मनुष्य नसतां गाढवी मला मी शूद्रापासून ब्राह्मणस्त्रीच्या ठिकाणीं झालों आहें ह्मणून सांगते, ह्मणून मी आतां कडक तप करणार.' असें ह्मणून दृढनिश्चयानें एका मोठ्या अरण्यामध्यें जाऊन तो कडक तप करूं लागला व कडक तपानें सहज ब्राह्मणत्व मिळवावें ह्मणून आपल्या तपाच्या योगानें देवावर त्यानें फार भार घातला. तेव्हां इंद्र त्याकडे येऊन ह्मणाला, 'मतंगा, मनुष्यांना उपभोग्य भोग भोगीत रहाण्याच्या ऐवजीं उगीच तूं तप करीत कां बसला आहेस? तुला वाटेल तो वर देतों. तुझी इच्छा असेल तें लवकर मांग.' मतंग ह्मणाला, 'ब्राह्मणत्वाची इच्छा धरून मीं हें तप आरंभिलें आहे, तेव्हां तें मिळालें ह्मणजे मी चाललों.' हें ऐकून इंद्र ह्मणाला, 'मतंगा, हें तूं मांगत असलेलें ब्राह्मणत्व दुर्मिळ आहे. ज्यांची

अंतःशुद्धि झाली नाहीं, त्यांना हें मिळणें शक्य नाहीं. उगीच वेड्यासारखा तूं आपला नाश मात्र करून घेशील. तेव्हां हा विचार सोडून दे. सर्व भूतमात्रांमध्यें उच्च प्रकारचें जें ब्राह्मणत्व तें केवळ तपानें मिळण्याजोगें नाहीं; तेव्हां या उच्च पदाची हांव धरून तूं उगीच आपला नाश करून घेऊं नकोस. देवता, असुर व मनुष्य या सर्वांमध्यें जें पद पवित्र समजलें आहे तें चांडाळ योनीमध्यें झालेल्याला कधीं मिळणें शक्य नाहीं.' इंद्र असें ह्मणून गेला असतां तो मतंग ब्राह्मण एका पायावर कडकडीत नियम पाळून शंभर वर्षें उभा राहिला; तेव्हां फिरून येऊन इंद्रानें पूर्वीप्रमाणेंच सांगून त्याचें निवारण केलें. तो ह्मणाला, 'मी फिरून फिरून नको ह्मणत असतां तूं हें श्रेष्ठ पद तपानें मिळविण्याच्या नादाला लागला आहेस; तेव्हां तुझा खात्रीनें नाश होण्याची वेळ आली आहे. पशुपक्ष्यादिकांच्या योनीमध्यें असणाऱ्याला जर मनुष्य जन्म आला तर तो पुल्कस किंवा चांडाळ अशा नीच योनीमध्यें प्रथम जन्मांला येतो व त्या योनीमध्यें बरेच दिवस फिरत हजार वर्षें लोटल्यावर त्याला शूद्रयोनी प्राप्त होते. त्या योनीमध्यें पुष्कळ दिवस फिरत राहिल्यावर तीस हजार वर्षांनीं त्याला वैश्यत्व येतें व या योनीमध्यें बरेच दिवस फिरत राहिल्यावर याच्या सातपट वर्षांनीं त्याचा क्षत्रिय कुलांत जन्म होतो. व पुढें त्याच्या साठपट वर्षें लोटल्यावर त्याचा नामधारी ब्राह्मण जातींत जन्म होतो व यामध्यें वरच्याच्या दोनशें पट वर्षें काढल्यावर शस्त्रें करून विकून त्यावर रहाणाऱ्याचा त्याला जन्म येतो; पुढें वरच्याच्या तीनशें पट वर्षें त्यांत फिरत राहिल्यावर जप करणाऱ्या ब्राह्मणकुलांत त्याचा जन्म होतो व पुढें चारशें पट वर्षांनीं श्रोत्रिय कुलांत त्याचा जन्म होतो. या जन्मामध्यें आनंद, शोक, काम, द्वेष, गर्व, निंदा यांचा त्यावर हल्ला होतो व या शत्रूंना तो जिंकील तर मग त्याला सद्गति मिळते, आणि त्यांनीं जर यावर पगडा बसविला तर ताडाच्या झाडावरून ज्याप्रमाणें खालीं पडावें त्याप्रमाणें धाडकन् हा खालीं येतो. तेव्हां ही गोष्ट लक्षांत घेऊन दुसरा एखादा वर मागून घे.' याप्रमाणें इंद्र बोलला असतांही त्यानें गयेला जाऊन अंगठ्यावर उभें राहून कडक तप सुरू केलें, व याप्रमाणें कडकडीत योग लावून हाडें व कातडें उरवून अंगाचा त्यानें केवळ सापळा उरवून घेतला. अशा स्थितींत तो अगदीं पडण्याच्या बेतांत असतां इंद्रानें येऊन त्याला सांवरलें, आणि फिरून तो त्याला ह्मणाला, 'हे मतंगा, तूं हें अगदीं भलतें मागत आहेस. ब्राह्मणपद तुला मिळणें शक्य नाहीं. त्याच्या वाटेमध्यें पुष्कळ अडथळे आहेत. ब्राह्मणाचा बहुमान केल्यानें मनुष्याला सुख मिळतें व त्याचा अनादर केल्यानें त्याला दुःख होतें. सर्व भूतमात्रांचे योगक्षेम वहाणारा ब्राह्मण आहे. ब्राह्मणाच्या द्वारानेंच देव व पितर तृप्त होतात. सर्व भूतमात्रांमध्यें ब्राह्मण श्रेष्ठ आहे. जी गोष्ट जशा प्रकारें करण्याचें त्याच्या मनांत येतें त्या प्रकारानें तो ती करून टाकतो. नाना प्रकारच्या पुष्कळ योनींमधून जाऊन पाळी आल्यावर मनुष्याला ब्राह्मणत्व मिळतें; म्हणून अशुद्ध लोकांना दुर्मिळ अशी ही हांव सोडून दे.' यावर मतंग ह्मणाला, 'आधींच कष्टी झालेल्या मला असें टोंचून मेलेल्याला फिरून कां मारतोस ? ब्राह्मणत्व मिळून त्याची तूं चीज करीत नाहींस हें पाहून तुझीच मला कींव येते. जर तिन्ही वर्णांना ब्राह्मणत्व दुर्लभ असेल तर असा हा दुर्लभ ब्राह्मणजन्म मिळून दुर्मिळ द्रव्याप्रमाणें ब्राह्मणत्वाला जो ओळखीत नाहीं तो पाप्याहून पापी असून अगदीं अधम समजला पाहिजे. खरोखरच ब्राह्मणत्व दुर्मिळ असून तें मिळालें असतां तें राखणें त्याहून कठीण आहे. पण हें दुर्मिळ ब्राह्मणत्व मिळून लोक त्याप्रमाणें वागत नाहींत.मी सुखदुःखादि द्वंद्वांपासून मुक्त होऊन बायकापोरादिकांचें लचांड सोडून देऊन अहिंसा व आत्मनिग्रह धरून केवळ आत्म्याच्या ठिकाणीं गढून गेलों आहें तरी ब्राह्मणत्वाला कसा पात्र नाहीं? केवळ आईच्या दोषामुळें मी धर्मज्ञ असूनही या स्थितीला आलों आहें तेव्हां हें दैवच समजलें पाहिजे. खरोखर मनुष्यप्रयत्नानें दैवाला मागें सारतां येणें शक्य नाहीं; कारण मी इतकी खटपट करूनही मला ब्राह्मणत्व मिळत नाहीं. बरें तर मग माझ्यावर तुझी कृपा असेल तर दुसरा एखादा वर मला दे.' 'यावर वाटेल तो वर मागून घे' ह्मणून इंद्र ह्मणाला असतां 'वाटेल तें रूप घेऊन वाटेल

तसें आकाशामध्यें मला फिरतां यावें, ब्राह्मण व क्षत्रिय या दोघांमध्यें मला पूजा मिळावी व माझी अक्षय्य कीर्ति व्हावी, ' ह्मणून मतंगानें वर मागितला. ' बरें छंदोदेव म्हणून तूं स्त्रियांमध्यें पूज्य होऊन तिन्ही लोकांत तुझी अतुल कीर्ति होईल, ' असें बोलून इंद्र गुप्त झाला. मतंगही प्राण सोडून उत्तम गतीला जाऊन मिळाला. '

---

## २४३ वीतहव्यराजाची गोष्ट.
## ( १३. ३० )

युधिष्ठिर ह्मणाला, ' आपण ब्राह्मणत्व दुर्भिळ म्हणतां, मग पूर्वी विश्वामित्रांना त्याचप्रमाणें वीतहव्य राजाला ब्राह्मणत्व कसें मिळालें ? ' भीष्म म्हणाले, ' लोकमान्य असें दुर्मिळ ब्राह्मणत्व महायशस्वी वीतहव्याला कसें मिळालें सांगतों ऐक. धर्मानें प्रजापालन करीत असणाऱ्या मनूला शर्याति नांवाचा जगविख्यात मुलगा होता. त्याच्या कुळांत वत्सापासून हैहय व तालजंघ नांवाचे दोघे राजे झाले. हैहयाला आपल्या दहा बायकांपासून युद्धांत कधीं पाय मागें न घेणारे असे शंभर शूर मुलगे झाले. त्यांनीं धनुर्विद्येंत व वेदविद्येंत चांगले परिश्रम केले. इकडे काशीमध्यें दिवोदासाचा आजा हर्यश्व नांवाचा विख्यात राजा होता. त्याला गंगा यमुनेच्यामध्यें रण करून त्यामध्यें वीतहव्याच्या मुलांनीं मारून ते निर्भयपणें आपल्या नगराला परत गेले. हर्यश्वाचा मुलगा सुदेव जो प्रत्यक्ष धर्माचा दुसरा अवतार होता त्याला काशीराज्याचा अभिषेक होऊन त्यानें पृथ्वीचें उत्तम रीतीनें पालन केलें. त्याचाही वीतहव्याच्या मुलांनीं येऊन युद्धांत पराभव करून ते परत निघून गेले. पुढें याचा मुलगा जो दिवोदास याला राज्याभिषेक झाला. त्यानें वीतहव्याच्या मुलांचें सामर्थ्य जाणून इंद्राच्या आज्ञेवरून वाराणशी फिरून उत्तम तऱ्हेनें बांधली. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र यांनीं ती भरून सोडून अनेक लहानमोठ्या वस्तूंनीं ती भरून काढली. मोठमोठीं दुकानें व पेठा वसविल्या. गंगेच्या उत्तर तीरापासून गोमतीच्या दक्षिण तीरापर्यंत ती इंद्राच्या अमरावतीप्रमाणें त्यानें वसविली. त्या ठिकाणीं फिरून हैहयाच्या मुलांनीं येऊन त्याच्यावर स्वारी केली. नगराबाहेर पडून त्यानें त्यांना युद्ध दिलें. तें घोर युद्ध हजार दिवस चाललें होतें. त्यामध्यें दिवोदासाचे योद्धे, वहानें वगैरे मरून पडून खजिन्याला तूट पडल्यामुळें शह सोडून त्याला पळून जावें लागलें. तो आपले पुरोहित जे भरद्वाज त्यांच्या आश्रमाकडे गेला; तेव्हां त्यांनीं येण्याचें कारण विचारलें असतां राजा ह्मणाला, ' वीतहव्याच्या मुलांनीं माझ्या सर्व वंशाचा फडशा पाडून मला सुद्धां पळ काढण्यास लावल्यानें मी आपल्याला शरण आलों आहे; तेव्हां या आपल्या शिष्याचें रक्षण करणें आपल्या हातीं आहे. त्या पाप्यांनीं माझ्या सर्व वंशामध्यें मला एकट्याला बाकी ठेविलें आहे. ' भरद्वाज ह्मणाले, ' भिऊं नकोस, मी तुझ्यासाठीं पुत्रकामेष्टी यज्ञ करतों. त्या योगानें होणाऱ्या मुलाच्या साह्यानें तूं हजारों वीतहव्यांना मारण्याला समर्थ होशील. ' असें ह्मणून त्यांनीं पुत्रकामेष्टी यज्ञ केला. त्या योगानें त्या राजाला प्रतर्दन नांवाचा मुलगा झाला. तो झाल्याबरोबर एकदम तेरा वर्षांचा वाढला व वेद आणि धनुर्विद्या शिकला. योगसामर्थ्यानें भरद्वाज त्याच्यामध्यें शिरले; त्यामुळें तो अतुल तेजस्वी होऊन उगवलेल्या सूर्याप्रमाणें कांतिमान असा तो कवच चढवून देवर्षी व भाट यांचा स्तुतिपाठ घेत निघाला. त्याला पाहून दिवोदासाला मोठा आनंद होऊन वीतहव्याचे मुलगे जळून पार झाले असें त्याला वाटूं लागलें. हा प्रतर्दन गंगा उतरून वीतहव्याच्या मुलांच्या नगरीवर चालून गेला. त्याच्या रथाचा उठलेला शब्द ऐकून चिलखत वगैरे चढवून मोठमोठ्या नगरासारख्या आपल्या रथांत बसून ते नगराबाहेर पडले, व आपलीं आयुधें तयार करून त्यांनीं प्रतर्दनाला बाणांनीं झांकून काढलें. प्रतर्दनानेंही त्यांचें निवारण करून वज्राच्या तोडीचे आपले बाण त्यांवर सोडले. त्या शेंकडों हजारों भल्ल बाणांनीं मुंडकीं उडून जाऊन रक्तानें माखून निघून छाटून पाडलेल्या पिंपुरणीच्या झाडाप्रमाणें ते खालीं पडले. याप्रमाणें त्यांना मारल्यावर वीतहव्य आपलें नगर सोडून एकदम भृगूंच्या आश्रमाकडे पळून जाऊन त्यांना तो शरण गेला; तेव्हां त्यांनीं त्याला अभय दिलें. त्याच्या मागोमागच प्रतर्दन त्या आश्र-

माला येऊन, 'या आश्रमांत कोण आहे, मला मुनींचें दर्शन घ्यावयाचें आहे,' असें ह्मणाला. तेव्हां भृगुऋषी आश्रमांतून बाहेर येऊन त्यांनीं त्याचा सत्कार केला, व येण्याचें कारण विचारलें. तेव्हां प्रतर्दन ह्मणाला, 'महाराज, वीतहव्य आपल्याकडे आला आहे त्याला आपण सोडा; कारण त्याच्या मुलांनीं माझ्या वंशाचा फडशा पाडून राष्ट्राचा विध्वंस केला आहे. बीर्याची वमेंड बाळगणाऱ्या याच्या शंभर मुलांना मीं मारून टाकलें आहे. आज याला मारून मी आपल्या पित्याच्या ऋणांतून मुक्त होईन.' तें ऐकून भृगु ह्मणाले, 'ह्या ठिकाणीं कोणी क्षत्रिय नसून येथें असणारे सर्व ब्राह्मण आहेत.' हें त्यांचें भाषण ऐकून त्यांचे पाय धरून हर्षभरित होऊन प्रतर्दन ह्मणाला, 'बरें तर मग आज मी कृतकृत्य झालों आहे; कारण या राजाला मीं आज आपली जात सोडण्यास लाविली. मी आतां येतों. माझें कल्याण चिंतीत जा.' असें ह्मणून सापाप्रमाणें विष ओकून तो आल्याप्रमाणें निघून गेला. केवळ भृगूंच्या शब्दांनीं वीतहव्याला ब्राह्मणत्व आलें, व त्याच योगानें त्याला पूर्ण ब्रह्मज्ञान प्राप्त झालें. त्याचा गृत्सम नांवाचा इंद्राच्या तोडीचा मुलगा होता त्याला एकेवेळीं दैत्यांनीं इंद्र समजून पीडा दिली. हा गृत्सम पुढें ब्रह्मचर्य पाळून रहाणारा मोठा ऋषी झाला. याला सुचेता नांवाचा मुलगा असून त्याचा वर्चा, वर्चाचा विहव्य विहव्याचा वितत्य, वितत्याचा सत्य, सत्याचा संत, संताचा श्रवा, श्रवाचा तम, तमाचा प्रकाश, प्रकाशाचा वागिंद्र असे मुलगे झाले. या वागिंद्राला प्रमिती नांवाचा मुलगा असून या प्रमितीपासून घृताचीला रुरु नांवाचा मुलगा झाला. व रुरुपासून प्रमद्वरेच्या ठिकाणीं शुनक झाले व त्यांना शौनक झाले. याप्रमाणें वीतहव्याला ब्राह्मणत्व आलें.'

---

## २४४ ब्राह्मणाचें महत्त्व.

### (१३. ३१–३७)

'त्रैलोक्यांत कोण पूज्य आहेत,' म्हणून युधिष्ठिरानें विचारल्यावरून भीष्म म्हणाले, 'या संबंधांत पुढील नारद व वासुदेव यांचा संवाद ऐक. नारदांना ब्राह्मणांना हात जोडून बहुमान करतांना पाहून 'मुने, आपण कोणाला नमस्कार करतां,' म्हणून श्रीकृष्णानें विचारलें. तेव्हां नारद म्हणाले, 'वरुण, वायु, सूर्य, पर्जन्य, अग्नि, शंकर, स्कंध, लक्ष्मी, विष्णु, ब्रह्मदेव, बृहस्पति, चंद्र, जल, पृथ्वी, सरस्वती यांना जे नमस्कार करतात त्या तपोधन, वेदवेत्त्या व सत्पात्र अशा ब्राह्मणांना मी हा बहुमान देत आहें. हे ब्राह्मण कांहीं न खातां देवकार्यें अभिमान सोडून करीत असतात; नेहमीं संतुष्ट असून क्षमावान असतात, आत्मनिग्रह व इंद्रियनिग्रह ठेवून जे नेहमीं इष्टि करीत असतात; सत्य व धर्म यांना बहुमान दाखवून गाई व पृथ्वी दान करतात; नेहमीं फलमूलांवर तप करीत राहून कांहीं संग्रह करण्याच्या भानगडींत न पडतां क्रिया करीत रहातात. आपल्या नोकर माणसांना पोसण्याला समर्थ असून नेहमीं अतिथींकडे लक्ष देतात व देवतांना देऊन राहिलेलें सेवन करतात. वेद यांच्या ताब्यांत असल्यामुळें हे कोणाला हार जात नाहींत; नेहमीं यज्ञ करविणें व वेद पढविणें यांमध्यें गढले राहून सर्व प्राणिमात्रांच्या ठिकाणीं नेहमीं प्रसन्न अंतःकरणानें असतात; पाठ तापून निघेपर्यंत वेदाध्ययनामध्यें गढले राहून गुरूच्या प्रसादासंबंधानें यत्न करीत राहून असूया न करतां त्यांची शुश्रूषा करीत असतात. अशा ह्या ब्राह्मणांना मी हा बहुमान देतों. हे मोठे व्रतशील, ब्रह्मवेत्ते व सत्यप्रतिज्ञ असून देव व पितर यांना हव्यकव्यें यांच्याकडूनच पोहोंचतात. हे नेहमीं भिक्षा मागून रहातात व गुरूच्या घरीं राहून गुरुशुश्रूषेनें अंग सुकवून घेत असतात. यांना सुख किंवा पैसा स्वप्नींही ठाऊक नसतो. या जगांत यांचें कशावर प्रेम नसून हे कशाचा द्वेषही करीत नाहींत. हें दिगंबरवृत्तीनें रहात असून यांना कशाची जरूरी नसते. नेहमीं हे अहिंसेमध्यें गढले राहून आत्मनिग्रहानें शांति धरून असतात. गृहस्थ धर्म पाळून देवता व अतिथी यांच्या पूजेमध्यें हे गढले असतात. हें नेहमीं कांहीं संग्रह न करतां कपोतवृत्तीनें रहातात. यांच्या सर्व कृत्यांमध्यें धर्मार्थकाम दिसून येत असून त्यांचें मन कधीं ढळत नाहीं. हे नेहमीं शिष्टाचाराप्रमाणें वागत असतात. लोभ ह्मणून यांना ठाऊक नसून हे

मोठे पुण्यशील असतात. पाणी, वायु, सुधा यांवर हे रहात असतात; नाना व्रतांमध्यें हे गढले असतात. यांपैकीं कोणी अविवाहित असतात, व कोणी विवाह करून घेऊन अग्नि ठेवून वेदाला आधार देऊन असतात. हे महर्षी सर्व सृष्टीचे उत्पादक असून हे सर्वांच्या आधींचे आहेत. सूर्याप्रमाणें लोकांचा अज्ञानरूपी अंधकार दूर करणारे हे प्रति सूर्य आहेत. सत्काराला पात्र अशा यांचा सत्कार केला असतां तें इहपर सुख देतात. जे नेहमीं येतील त्या अतिथींकडे, गाई व ब्राह्मण यांकडे, तसेंच सत्याकडे लक्ष देऊन असतात, शांति ठेवून कोणाचा हेवा करीत नाहींत, नेहमीं वेदाध्ययनामध्यें गढून राहून सर्व देवांना नमस्कार करतात, आत्मनिग्रहानें श्रद्धापूर्वक चांगल्या ब्राह्मणांपुढें नम्र होऊन दानामध्यें गढून असतात व कौमारदशेपासून ब्रह्मचर्यव्रत पाळून तपानें अंतःकरण शुद्ध करून घेतात, देवता, अतिथि, नोकर व पितर यांच्या सत्कारामध्यें गढले राहून यांना देऊन राहिलेलें आपण भक्षण करतात, यथाशास्त्र अग्नि तयार करून तो कायम ठेवून त्याची पूजा करतात, सोमामध्यें आहुती देतात व आई, बाप, गुरु यांच्या ठिकाणीं योग्य वर्तन ठेवितात ते सर्व संकटांतून मुक्त होतात.

तेव्हां जो ह्मणून अभिषिक्त राजा आहे त्याला उत्तम सुखाची इच्छा असेल तर त्यानें आपल्या नगरांत व प्रांतांत रहाणाऱ्या श्रोत्रिय व वृद्ध अशा बहुश्रुत ब्राह्मणांचा गोड शब्दांनीं नानाभोग देऊन व नमस्कारांनीं सत्कार करावा. हें राजानें नेहमीं आपलें पहिलें काम समजावें. आपल्या स्वतःप्रमाणें किंवा आपल्या मुलाप्रमाणें त्यांचें परिपालन करावें. यांमध्यें जे फारच पूज्य असतील त्यांचा आदरून बहुमान करावा. ते शांत झाले असतां सर्व राष्ट्र वैभवाला चढतें. पितरांप्रमाणें ते पूज्य, नमस्काराला योग्य व मान्य असून इंद्राप्रमाणेंच सर्व भूतमात्रांची लोकयात्रा यांच्यावर अवलंबून असते. रागावले असतां मंत्रतंत्रांनीं, इतर कांहीं साधनांनीं एवढेंच नव्हे, तर केवळ मनानें हे जाळून टाकण्याला समर्थ असतात. यांचा नाश करण्याचें कशाच्याही अंगीं सामर्थ्य दिसत नाहीं. यांचें सामर्थ्य अमर्यादित आहे. अग्नीची ज्वाळा ज्याप्रमाणें खवळली असतां अरण्याचा समाचार घेते त्याप्रमाणें रागावून ह्यांनीं लोकांकडे पाहिलें असतां होतें. मोठमोठे साहसी लोकसुद्धां यांना भिऊन असतात; कारण यांच्यामध्यें अलौकिक गुण आहेत. यांपैकीं कांहीं गवत उगवून त्यानें झांकलेल्या कूपाप्रमाणें असतात व कांहीं स्वच्छ आकाशासारखे असतात; कोणी कडक स्वभावाचे असतात, कोणी कापसाप्रमाणें मऊ असतात. कांहीं मोठे वस्ताद असतात, कांहीं तपस्वी असतात, कांहीं शेती व गुरें यांवर रहातात व कांहीं भिक्षेवर रहातात; कोणी चोर असतात, कोणी खोटे असतात, कोणी नट असतात, कोणी नर्तक असतात, कांहीं वाटेल तें करण्याला समर्थ असतात. याप्रमाणें हे नाना स्वरूपांचे असून नानाप्रकारच्या कर्मांमध्यें गढून, नानाविध कर्मांवर उदरनिर्वाह करून असतात. देव, पितर, मनुष्य, नाग, राक्षस, साप या सर्वांच्या ब्राह्मण आधींचा असल्यानें देव किंवा पितर त्याचप्रमाणें गंधर्व राक्षसादिकांच्या हातून यांचा मोड होणें शक्य नाहीं. ज्याच्या ठिकाणीं देवपणा नाहीं त्याच्या ठिकाणीं तो आणण्याला किंवा ज्याच्या ठिकाणीं देवपणा आहे त्याचा तो नाहींसा करण्याला ते समर्थ आहेत. त्यांना अमक्याला राजा करावा असें वाटल्याबरोबर तो राजा होईल, व अमुक राजा नसावा असें वाटेल तर तो राज्यापासून भ्रष्ट होईल. मूर्खांनीं ब्राह्मणाची कधीं निंदा करूं नये; केली असतां खात्रीनें त्यांचा नाश होईल. स्तुति व निंदा यांमध्यें निष्णात असून दुसऱ्याच्या कीर्तीला तसेंच अपकीर्तीला कारणीभूत असे हे यांच्या द्वेष करणाऱ्यांवर राग सोडतात. ज्याची ब्राह्मण स्तुति करतात तो भरभराटीला चढतो, व ब्राह्मण ज्याला दूर करतात त्याचा एका क्षणांत फडशा पडतो. ब्राह्मणाची कृपा नसल्यानेंच शक, इहवन, कांबोज, द्राविड, कलिंग, पुलिंद, उशीनर, कूलिसर्प, महीषक वगैरे निरनिराळ्या क्षत्रियजाती शूद्रत्वाला जाऊन मिळाल्या आहेत. ब्राह्मणांवर जय मिळविण्यापेक्षां त्यांच्या हातून झालेला पाडाव बरा; सर्व प्राणिमात्रांना मारणें हें एका ब्राह्मणाला मारण्याच्या तोडीचें नाहीं. ब्रह्महत्या फार वाईट आहे, असें मोठमोठ्या ऋषींनीं ह्मटलें आहे. ब्राह्मणनिंदा कधींही ऐकूं नये. ती

चालली असतां खालीं तोंड घालून गप्प बसावें किंवा तेथून उठून चालतें व्हावें. ब्राह्मणांशीं विरोध करून सुखांत राहिला आहे, असा मनुष्य आजपर्यंत कोणी झाला नाहीं व पुढेंही होणार नाहीं. वाऱ्याला मुठींत धरणें, चंद्राला हात लावणें व पृथ्वीला आधार देणें हें जसें अशक्य आहे तसेंच ब्राह्मणांना जिंकतां येणें शक्य नाहीं. नेहमीं यांचा बहुमान करावा. सोम हा यांचा राजा असून हे सुखदुःख देण्याला समर्थ आहेत. तेव्हां नाना भोगांनीं, अलंकारांनीं व दुसरें जें कांहीं यांना पाहिजे असेल तें देऊन बापाप्रमाणें यांचें रक्षण करावें; ह्मणजे इंद्रापासून ज्याप्रमाणें भूतमात्रांची स्वस्थता रहाते त्याप्रमाणें राष्ट्रामध्यें स्वस्थता रहाते. राष्ट्रामध्यें शुद्ध अशा ब्रह्मतेजानें झळकणाऱ्या ब्राह्मणांचा त्याचप्रमाणें शत्रूला ताप देऊन सोडणाऱ्या महारथी क्षत्रियांचा जन्म होत असावा. कुलवान व कडकडीत व्रत पाळणाऱ्या अशा ब्राह्मणाला घरीं ठेवून घ्यावा. याच्याहून चांगलें दुसरें कांहींच नाहीं. ब्राह्मणाला दिलेला हवि देवता व पितर घेत असतात. सर्व देव ब्राह्मणामध्यें शिरूनच अन्न घेत असतात. ज्याच्या घरीं ब्राह्मण जेवीत नाहींत त्या ब्राह्मणद्वेष्ट्या पाप्याच्या घरचें अन्न देव व पितर कधीं घेत नाहींत. ब्राह्मण संतुष्ट झाले असतां देव व पितर संतुष्ट होतात; त्याचप्रमाणें जे हा हवि देतात तेही याच्या योगानें तृप्त होऊन इहपरलोकीं नाश पावत नाहींत. त्यांना उत्तम गति मिळते. ज्या ज्या हवीच्या योगानें मनुष्य ब्राह्मणांना तृप्त करतो त्या त्या हवीनें देव व पितर संतुष्ट होतात. यज्ञादिकांची उत्पत्ति ब्राह्मणापासूनच असून त्यापासून प्रजेची उत्पत्ति आहे. ज्यापासून ह्या विश्वाची उत्पत्ति व नाश आहे त्या ब्रह्मांची याला पूर्ण ओळख आहे. स्वर्ग व नरक यांचा रस्ता, त्याचप्रमाणें भूतभविष्य याला माहीत आहे. त्याला स्वधर्म पूर्ण ठाऊक आहे. जे याच्यामागून असतात त्यांचा पराभव कधीं होत नाहीं. ब्राह्मणाच्या तोंडून निघालेलें जे ऐकतात त्यांना पराभव ह्मणून ठाऊक नसतो. प्रतापानें झळकणाऱ्या क्षत्रियांचें तेज व बळ ब्राह्मणाच्या ठिकाणीं गार पडतें. भृगुऋषींच्या वंशजांनीं तालजंघांना, अंगिरांच्या मुलांनीं नीपांना, भारद्वाजांनीं वीतहव्याच्या मुलांना व एलांना जिंकलें आहे. नानाप्रकारचीं आयुधें ह्या क्षत्रियांजवळ आहेत तरी कृष्णाजिन, हाच ज्यांचा ध्वज फडकत आहे अशा ब्राह्मणांनीं त्यांना जिंकलें आहे. ब्राह्मणाला पृथ्वी देऊन या सत्कृत्यानें दोन्ही लोकांवर प्रकाश पाडणारें कृत्य केल्यानें सर्व हेतु सिद्ध होतात. लांकडांत झांकलेल्या अग्नीप्रमाणें जे कांहीं या जगामध्यें बोलण्यांत, ऐकण्यांत किंवा वाचण्यांत येतें तें सर्व ब्राह्मणाचे ठिकाणीं झांकून आहे. यासंबंधानें पृथ्वीचें असें ह्मणणें आहे कीं, ब्राह्मणांची सेवा करावी; त्याच्या योगानें सर्व पाप नाहींसें होऊन मनुष्य वैभवाला व कीर्तीला चढतो. बुद्धि व आत्मज्ञान यांपासूनच प्राप्त होतात. क्षत्रिय याप्रमाणें ब्राह्मणाला मान देऊन वागला तर तो महारथी होऊन शत्रूला ताप देण्याला समर्थ होतो व त्याची मोठी कीर्ति होते. सर्व उच्चनीचांमध्यें श्रेष्ठ अशा ब्राह्मणांपैकीं श्रेष्ठांनीं ज्याची स्तुति केली तो वैभवाला चढतो. ब्राह्मणासंबंधानें वाईट बोलणाऱ्याचा कांहीं वेळ न लागतां पाडाव होतो. ज्याप्रमाणें मातीचा ढिकळा समुद्रामध्यें विरघळून जातो, त्याप्रमाणें ब्राह्मणासंबंधी सर्व दुष्कृत्यांचा परिणाम हानिकारक होतो. चंद्रावरचा कलंक, समुद्राचा खारटपणा, त्याचप्रमाणें इंद्राच्या अंगाला पडलेलीं भगें हीं याला उदाहरणें आहेत. पुढें ब्राह्मणाच्या कृपेनेंच हीं हजार भगें जाऊन त्या ठिकाणीं इंद्राला हजार डोळे आले. तेव्हां ह्या अशा गोष्टी असल्यामुळें ज्याला कीर्ति, वैभव व अनेक सुखाचे लोक हवे असतील त्यानें मुकाट्यानें ब्राह्मणांच्या आज्ञेंत असावें. केवळ ब्राह्मण आपल्या जन्माच्या योगानेंच पूजेला पात्र होतो व तयार केलें अन्न आधीं घेण्याचा त्याला हक्क येतो. धर्मार्थकामादि सर्व यांच्यापासूनच असून सर्व विश्वांतील भूतमात्रांचे ते मित्र आहेत. तसेंच देवांचें ते मुख आहेत. त्यांचा योग्य सत्कार केला असतां ते आपली भरभराट व्हावी म्हणून चिंतन करीत रहातात. स्वकर्म करीत राहिल्यानें ब्रह्मतेज त्यांच्यामध्यें झळकत असतें, व भूतमात्रांना आधारभूत व नियमन करणारें असे ते होतात. केवळ वेदाध्ययनानें श्री, बुद्धि, तेज, लोकांना दिपवून सोडणारा मोठे-

पणा वगैरे पुष्कळ गुण त्यांच्या अंगांत येतात. आहवनीय अग्नीला आहुती दिल्यानें ब्राह्मणाला मोठे महत्त्व प्राप्त होत असून ब्रह्मतेजानें झळकणाऱ्या त्याला शिजलेलें अन्न मुलाच्याही आधीं घेण्याचा हक्क येतो. कोणाचा द्रोह न केल्यामुळें उत्तम श्रद्धा उत्पन्न होऊन आत्मनिग्रह व वेदाध्ययन यांमध्यें गढून राहिल्यानें त्यांच्या सर्व कामना पूर्ण होतात. मनुष्यलोकामध्यें किंवा देवांमध्यें जें कांहीं आहे तें सर्व तप, ज्ञान व नियम यांनीं मिळण्याजोगें आहे. ब्राह्मणाच्यापुढें कोणाचें कांहीं चालण्याजोगें नसून ते मोठे प्रखर व वाटेल तें काम तेव्हांच शेवटास नेण्याला समर्थ आहेत. यांमध्यें कांहींच्या अंगीं सिंहा इतकें, कांहींच्या अंगीं वाघाइतकें, कांहींच्या अंगीं डुकराइतकें, कांहींच्या अंगीं हरणाइतकें, कांहींच्या अंगीं जलचर प्राण्याइतकें सामर्थ्य असतें. कोणाचा स्पर्श सापासारखा तर कोणाचा मगरासारखा असतो. कोणी केवळ शब्दानें तर कोणी केवळ डोळ्यानें नाश करण्याला समर्थ असतात. कांहीं सापाप्रमाणें कडक तर कांहीं अगदीं मऊ असतात. याप्रमाणें ब्राह्मण नाना स्वभावाचे असतात. ब्राह्मणांना तुच्छ केल्यानें असुरांना पाण्यांत शिरून रहावें लागलें व त्यांच्या प्रसादानें देवांना रहाण्याला स्वर्ग मिळाला. आकाशाला हात लावणें, हिमाचलाला हलविणें किंवा गंगेला बंधारा घालणें जसें अशक्य आहे, त्याचप्रमाणें ब्राह्मणांचा पराभव होणें अशक्य आहे. ब्राह्मणांशीं विरोध करून पृथ्वीवर अंमल करतां येणें शक्य नाहीं. देवांचेंही ते दैवत आहेत. त्यांना दान केल्यानें त्यांचें तेज कमी पडतें. जे प्रतिग्रह घेत नाहींत अशांपासून राजानें मोठ्या दक्षतेनें आपलें रक्षण करून घ्यावें. या संबंधांत पुढील इंद्र व शंबरासुर यांचा संवाद लक्षांत घेण्याजोगा आहे. कोणे एके वेळीं इंद्र वेष पालटून जटा वगैरे वाढवून अंगाला राख फांसून एका वेड्यावाकड्या रथामध्यें बसून शंबराकडे जाऊन म्हणाला कीं, 'तूं कोणच्या वर्तनानें आपल्या जातीवर वर्चस्व मिळविलें आहेस ? कशाच्या योगानें ते तुला श्रेष्ठ समजतात?' शंबर म्हणाला, 'मी ब्राह्मणांचा कधीं हेवा करीत नाहीं. त्यांचें मत मला नेहमीं संमत असून त्यांनीं सांगितलेला शास्त्रार्थ मी आदरपूर्वक ऐकून घेऊन त्यांना मी कधीं तुच्छ करीत नाहीं किंवा त्यांचा कधीं अपराध करीत नाहीं. त्यांचा बहुमान करून, त्यांचे पाय धरून मी त्यांच्याकडून ज्ञान मिळवून घेत असतों. ते माझ्याशीं विश्वासपूर्वक बोलतात, व माझें कुशल चिंतितात. त्यांच्या हातून चूक घडली तरी मी आपल्या हातून चूक होऊं देत नाहीं. ब्राह्मणांचा हेवा न करतां त्यांच्याकडे लक्ष देऊन शास्त्रमार्गाला मी लागलों असल्यानें मधानें पोळें भरून काढणाऱ्या मधमाशांप्रमाणें माझ्यामध्यें ते ज्ञान भरून काढीत असतात. ते जें संतुष्ट होऊन मला सांगत असतात तें मी नेहमीं त्यांच्या उलट न जातां लक्षपूर्वक ऐकून घेत असतों. त्याच्यावर नेहमीं माझी निष्ठा असून त्यांच्याहून आपला कमीपणा मी जाणून आहें. त्यांच्या जिभेच्या अग्रभागीं असणाऱ्या विद्यामृताचा मी नेहमीं आस्वाद घेत असतों, आणि म्हणूनच तारागणावर वर्चस्व मिळविलेल्या चंद्राप्रमाणें स्वजातीवर मीं वर्चस्व मिळविलें आहे. ब्राह्मणांच्या तोंडून निघालेलें शास्त्र पृथ्वीवर उत्तम प्रकारचें अमृत असून हा अप्रतिम डोळा आहे, हें जाणूनच पूर्वी देवासुरांच्या युद्धामध्यें यांचा प्रभाव पाहून थक्क होऊन यांना ही सिद्धि कशी मिळाली म्हणून माझ्या पित्यानें चंद्राला विचारलें. तेव्हां चंद्रानें उत्तर दिलें कीं, 'तपानें ब्राह्मणांना सिद्धि मिळून त्यांच्या शब्दामध्यें मोठें सामर्थ्य आलें आहे. क्षत्रियांच्या मनगटांत जोर असून यांच्या तो तोंडामध्यें असतो. गुरुगृहीं रहाण्याचे कष्ट सोसून ब्राह्मणानें वेद अथवा निदान प्रणव शिकावा व राग आणि ऐहिक विषयांवर आसक्ति सोडून यती बनून सर्वांवर समदृष्टि ठेवावी. बापाच्या घरीं राहून सर्व वेद पढून त्याला बहुमानाचें पद मिळालें असतांही घरकोंबडा म्हणून लोक त्याला नांवेंच ठेवतील. ज्याप्रमाणें साप उंदराला गिळून टाकतो त्याप्रमाणें युद्ध करण्याला कंटाळलेला राजा व प्रवासाला कंटाळलेला ब्राह्मण यांना पृथ्वी गिळून टाकते. अभिमान मंदबुद्धि लोकांचें वैभव नाहींसें करतो. कुमारिकेला गर्भ राहिल्यानें ती दूषित होते. त्याप्रमाणें घर धरून राहिल्यानें ब्राह्मण निंदेला पात्र होतो.' याप्रमाणें चंद्राचें भाषण ऐकून माझा बाप ब्राह्मणांचा सत्कार करूं ला-

गला; व मीही त्याचप्रमाणें करीत आहें. ' हें शंबराचें भाषण ऐकून इंद्रालाही त्याचप्रमाणें वागून देवेंद्रत्व मिळालें.'

युधिष्ठिर म्हणाला, ' जो अगदीं परका आहे किंवा जो नेहमीं आपल्याजवळ आहे किंवा जो दुरून आला आहे यांपैकीं कोण दानाला पात्र आहे?' भीष्म म्हणाले, ' हे सर्वच त्यांच्या त्यांच्या निरनिराळ्या उद्देशानुरूप दानाला पात्र असतात. जो जो ज्या ज्या हेतूनें मागण्याला येईल त्या त्या हेतूसाठीं त्याला दान करावें; परंतु आपल्या नोकरचाकरांच्या पोटावर पाय आणून दान करण्याच्या भानगडींत पडूं नये; कारण त्याच्या योगानें मनुष्याला स्वतःलाच पीडा होते. जो परका मनुष्य प्रथमच आला आहे, त्याचप्रमाणें जो नेहमींच्या ओळखीचा आहे तसाच जो दुरून आला आहे, हे तिघेही दानाला पात्र असतात असें वर सांगितलेंच आहे व कोणाला पीडा न होतां शास्त्राला बाध न येईल अशा रीतीनें पात्रापात्रविचार करून अशा रीतीनें दान करावें कीं, त्याच्या योगानें पुढें वाईट वाटण्याचा प्रसंग येऊं नये. ऋत्विज, पुरोहित, आचार्य, शिष्य, संबंधी, बांधव हे सर्वच विद्वान व असूयारहित असतील तर मान्य आहेत; परंतु तसे नसतील तर त्यांचा बहुमान करणें उचित नाहीं. म्हणून ज्यांच्याशीं असा प्रसंग येतो त्यांची नेहमीं मोठ्या हुषारीनें परीक्षा करावी. राग नसणें, खरें बोलणें, अहिंसा, आत्मनिग्रह, सरळपणा, कोणाचा द्रोह न करणें, ताठा नसणें, भीड, सहनशीलता व शांति हे गुण त्याचप्रमाणें भलत्या सलत्या गोष्टी ज्याच्या ठिकाणीं अजीबात दिसत नाहींत तो मनुष्य मग तो पुष्कळ दिवसांच्या ओळखीचा असो किंवा नुकताच आलेला असो, पूर्वीं कधीं पाहिलेला नसो किंवा नेहमीं पहाण्यांतला असो तो मानाला पात्र आहे. जो वेदाला जुमानीत नाहीं, शास्त्र तुच्छ करतो व समाजमर्यादा मोडतो तो आपला स्वतःचाच नाश करून घेतो; तेव्हां असा मनुष्य दानाला पात्र नाहीं. ज्याला आपल्या विद्येची घमेंड आहे, जो वेदाची निंदा करतो, जो वृथा कुतर्क करण्यामध्यें गढला असतो व जो विद्वानांमध्यें नीति व धर्म यांसंबंधी कारणें खोडून काढून सर्व दैवाच्या योगानें होतें असें ठरवून वादविवादांत आपली सरशी करून घेण्याला पहातो, जो दुसऱ्याची निंदा करतो, ब्राह्मणांना नांवें ठेवितो, सर्वांसंबंधानें शंकित रहातो, असा मूर्ख, अविचारी व कडु बोलणारा, कुत्र्याप्रमाणें तिरस्कार्य समजावा. ज्याप्रमाणें कुत्रा दुसऱ्याच्या अंगावर भुंकून जाऊन त्याला चावण्याचा प्रयत्न करतो त्याप्रमाणें वायफळ शब्द दवडून शास्त्राला ठार करण्याचा अशा मनुष्याचा प्रयत्न असतो. समाज वाटेवर ठेवणारे आचारधर्म व आपल्या हिताच्या सर्व गोष्टी लक्षपूर्वक पाळाव्या. याकडे लक्ष देणारा मनुष्य वैभवाला चढतो. देव, ऋषी, पितर, ब्राह्मण व अतिथी यांचें ऋण फेडून शुचिर्भूततेनें शास्त्राज्ञेकडे योग्य लक्ष दिल्यानें मनुष्य धर्मापासून भ्रष्ट होत नाहीं.'

## २४५ पंचचूडा व नारद यांचा संवाद-- स्त्रीस्वभाव. ( १३. ३७-४३ )

युधिष्ठिर ह्मणाला, 'स्त्रियांचा स्वभाव आपल्या तोंडून ऐकण्याची माझी इच्छा आहे; कारण हलक्या मनाच्या ह्या स्त्रियाच सर्व दोषाला कारण आहेत.' भीष्म ह्मणाले, 'या संबंधांत पुढील नारद व स्वैर वागणारी पंचचूडा यांचा संवाद ऐक. पूर्वी एकेवेळीं नारद सर्व लोक फिरतां फिरतां ब्रह्मलोकाला गेले असतां त्या ठिकाणीं सर्व अवयवांमध्यें देखण्या अशा पंचचूडा नांवाच्या अप्सरेला पाहून ह्मणाले, ' माझ्या मनांत कांहीं संशय आहे त्याचा तूं उलगडा करशील काय ? स्त्रियांचा स्वभाव तुझ्या तोंडून ऐकण्याची माझी इच्छा आहे. ' तें ऐकून ती ह्मणाली, ' मी स्वतः बायको असून बायकांची निंदा कशी करूं ? बायका कशा व कोणत्या स्वभावाच्या असतात हें आपल्याला ठाऊकच आहे. हें मला आपण विचारूं नये. तरीं आपण विचारतांच तर सांगतें.' असें म्हणून ती स्त्रियांच्या अंगचे कायमचे दोष सांगूं लागली. ती म्हणाली, 'स्त्रिया कुलीन व सुंदर असून त्यांना नवरे असले तरी त्या कधीं आळ्यांत रहात नाहींत, हा त्यांच्यामध्यें सर्वांत मोठा दोष आहे. स्त्रियांपेक्षां पापी दुसरें कोणी नाहीं. सर्व दोषांला मूळ स्त्रिया आहेत. मोठे कीर्तिमा-

न, श्रीमान, धनवान व त्यांच्या अगदीं मुठींतले असे जरी त्यांचे नवरे असले तरी त्या संधीची वाट पहात असतात. त्यांच्यावर नजर ठेवतां येणें अशक्य आहे. आह्मां स्त्रियांचा हा मोठा दुष्ट स्वभाव आहे कीं, आह्मी लाज अगदीं सोडून देऊन पापी लोकांच्या सुद्धां मागें लागतों. जो हिला शब्द टाकतो, जो हिच्याजवळ जातो, किंवा जो यत्किंचित् हिच्या उपयोगीं पडतो तो तो यांना हवासा वाटूं लागतो. या अमर्याद स्त्रिया कोणी पुरुषच त्यांच्या वाटेला न गेल्यामुळें किंवा नोकर लोकांच्या भीतीनें नवऱ्याच्या ठिकाणीं मर्यादेनें रहातात. यांना ह्मणजे कोणाला जवळ करूं नये असा कोणीच नाहीं. वयाचीही या पर्वा करीत नाहींत. पुरुष कुरूप असो किंवा रूपवान असो, केवळ पुरुष ह्मणून यांना रमण्याला बस्स होतो. भीतीनें, दयेनें, पैशासाठीं किंवा जाती व कुळ लक्षांत घेऊन बायका कधीं नवऱ्याशीं इमानानें रहात नाहींत. तारुण्याच्या बहरांत वस्त्रालंकार घालून स्वच्छंद वागणाऱ्या स्त्रियांना पाहून कुलस्त्रियांना सुद्धां तसें वागावेंसें वाटतें. नेहमीं नवऱ्यांनीं बहुमानपूर्वक प्रेमानें ज्यांना वागविलें आहे अशा स्त्रिया सुद्धां कुबडे, आंधळे, वेडे, खुजे, पांगळे अशा प्रकारच्या निंद्य लोकांशीं संबंध ठेवितात. यांना अगम्य असा पुरुषच सांपडणें कठीण. कोठेंही पुरुषाचाच जर यांना माग न मिळेल तर आपसामध्येंच कृत्रिम उपायांनीं कामवासना या शांत करून घेत असतात; परंतु नवऱ्याच्या ठिकाणीं इमानानें ह्मणून कधीं रहात नाहींत. पुरुष नच मिळाला तर किंवा नोकरांच्या, मरणाच्या किंवा अडकून पडण्याच्या भीतीनें त्या मर्यादेमध्यें रहातात. त्या मोठ्या चंचल स्वभावाच्या असून कधीं एकाशींच संबंध ठेवून रहाणाऱ्या नव्हत. त्याचा भाव कधीं कोणाला समजावयाचा नाहीं. शहाण्याच्या शब्दाचा जसा कधीं कोणाला स्पष्ट उमग पडत नाहीं तसा यांच्या स्वभावाचा उमग कधीं कोणाला पडावयाचा नाहीं. कितीही लांकडें घातलीं तरी ज्याप्रमाणें अग्नीची समाधानी होत नाहीं, कितीही नद्या मिळाल्या तरी ज्याप्रमाणें समुद्राची तृप्ति होत नाहीं व कितीही लोकांना गट्ट करून काल ज्याप्रमाणें समाधान पावत नाहीं त्याप्रमाणें कितीही पुरुष मिळाले तरी बायकांना समाधान ह्मणून व्हावयाचें नाहीं. सर्व बायकांसंबंधानें आणखी हें एक रहस्य लक्षांत ठेवण्याजोगें आहे कीं, मनाला मोह पाडण्याजोगा पुरुष पाहिल्याबरोबर त्यांचा काम पेट घेतो. त्यांच्या इच्छा पूर्ण करून त्यांच्या मनाप्रमाणें वागणारा त्याचप्रमाणें त्यांचें योग्य रक्षण करणारा असा त्यांचा नवरा असला तरी त्याला त्या मानीत नाहींत. विषयोपभोग, पुष्कळ अलंकार किंवा दुसऱ्या वस्तू या त्यांना रतिसुखाइतक्या कधीं प्रिय नसतात. काळ, वायु, मृत्यु, पाताळ वडव्याचें तोंड, वस्तऱ्याची धार, विष, साप, अग्नि या सर्वांचा स्त्रियांमध्यें समावेश आहे. जेव्हांपासून पंचमहाभूतें, लोक, पुरुष व बायका ब्रह्मदेवानें निर्माण केल्या, तेव्हांपासूनच बायकांमध्यें हे दोष ठेविले आहेत.' युधिष्ठिर ह्मणाला, 'देवानेंच घातलेल्या मोहानें वेडे बनून या जगांत पुरुष नेहमीं स्त्रियांच्या ठिकाणीं व स्त्रिया पुरुषांच्या ठिकाणीं आसक्त होत असले पाहिजेत. यासंबंधानें माझ्या मनांत मोठा संशय आहे. या कोणाशीं प्रेमळ असतात व कोणाशीं निष्प्रेम असतात, यांचें रक्षण पुरुषांनीं कसें करावें, कारण कितीही लक्ष ठेविलें तरी पुरुषांना फसविल्यावांचून या सोडीत नाहींत. यांच्या हातांत आलेला कोणीही पुरुष यांच्या तावडींतून कधीं सुटत नाहीं. गुरें ज्याप्रमाणें नवें नवें गवत पहात फिरतात त्याप्रमाणें ह्या नवा नवा पुरुष पहात फिरतात. शंबरासुराची जी माया, नमुचीची जी माया, बलीची जी माया, व कुंभीनसीची जी माया ती सर्व स्त्रियांना ठाऊक आहे. हासणाऱ्याशीं या हासतात, रडणाऱ्यांशीं रडतात, काळ वेळ पाहून कोणी मनाविरुद्ध बोललें असतांसुद्धां गोड शब्दांनीं त्याला उत्तर देतात. शुक्राचार्यांना जें शास्त्र ठाऊक होतें, बृहस्पतींना जें शास्त्र ठाऊक होतें, तें सर्व स्त्रीबुद्धीहून जास्ती कधींही ठरणार नाहीं; तेव्हां यांचें रक्षण कसें करावें? या खोट्याला खरें व खऱ्याला खोटें ह्मणून ठरवितात. बृहस्पती वगैरे शहाण्यांनीं जें नीतिशास्त्र तयार केलें तें यांच्या बुद्धीचा अर्क काढून त्यापासून तयार केलें असावें असें मला वाटतें. पुरुष यांना बहुमानपूर्वक वागवोत किंवा तुच्छ रीतीनें वागवोत, यांचें मन पुरुषांच्या ठिकाणीं सविकार झाल्यावांचून कधीं र-

हात नाहीं. आतां ह्या धर्मानें वागणाऱ्या होत्या ह्म- णून केवळ आमच्या ऐकण्यांत मात्र आहे. यांचा कोणी सत्कार करो किंवा कोणी असत्कार करो, या पुरुषांच्या मनाला विकार उत्पन्न केल्यावांचून रहात नाहींत, तेव्हां यांचें रक्षण कशानें होणार ? हें कृपा करून सांगा. ' भीष्म ह्मणाले, ' महावा- हो, स्त्रियांसंबंधानें तूं ह्मणतोस तें कांहीं खोटें नाहीं. आतां पूर्वीं महात्म्या विपुलानें यांचें कसें रक्षण केलें, ब्रह्मदेवांनीं यांना कसें व कशाकरितां उत्पन्न केलें हें तुला सांगतों ऐक. स्त्रि- यांहून दुष्ट या जगांत दुसरें कांहीं नाहीं. पेटलेला अग्नि, मयासुराची माया, वस्तऱ्याची धार, विष, सर्प, हे सर्व स्त्रियांच्या ठिकाणीं एकवटले आहेत. पूर्वी ह्या सर्व प्रजा धार्मिक असून त्या सर्व देवत्वाला जाऊन मिळणार ह्मणून देवांना भीति उत्पन्न होऊ- न ते ब्रह्मदेवांकडे गेले व आपलें मनोगत त्यांना कळवून खालीं तोंड घालून स्वस्थ राहिले; तेव्हां त्यांचा उद्देश जाणून ब्रह्मदेवांनीं मनुष्याला भुरळ पाडण्यासाठीं या कृत्या बायका निर्माण केल्या. याच्या पूर्वीच्या युगांत साध्व्या बायका होत्या; परंतु या उत्प- त्तीबरोबर त्या असाध्व्या उत्पन्न करून त्यांना पु- ष्कळ काम लावून ठेवला आहे. त्याला लुब्ध झा- लेल्या बायका पुरुषांना पीडा देतात. ब्रह्मदेवांनीं या कामाच्या जोडीला क्रोध उत्पन्न केला. सर्व प्रजा या दोन कामक्रोधांच्या तावडींत जाऊन बायकांच्या ठिकाणीं आसक्त होऊन राहूं लागली. बायकांना कृत्याकृत्य कांहींच नाहीं हा अगदीं ठरलेला सि- द्धांत आहे. यांचीं इंद्रियें यांच्या स्वाधीन नसून शा- स्त्राला झुगारून देणाऱ्या या केवळ खोट्याचा पुत- ळा आहेत असें श्रुतीचें मत आहे. ब्रह्मदेवांनीं श- य्या, आसन, अलंकार, अन्न, पान, नीचपणा, फ- टकळपणा व रतिसुख ही दौलत बायकांना देऊन ठेवली आहे. प्रत्यक्ष ब्रह्मदेवांना त्यांचें रक्षण कर- तां येणें शक्य नाहीं, मग यःकश्चित् मनुष्यांची गो- ष्ट पाहिजे कशाला? तोंडानें, मारानें, बांधून ठेवि- ल्यानें किंवा नानाप्रकारच्या क्लेशांनीं त्यांचें रक्षण होणें शक्य नाहीं. त्या नेहमीं उच्छृंखल असतात. मात्र पूर्वीं त्या महात्म्या विपुलानें आपल्या गुरुपत्नी- चें मोठ्या कष्टानें रक्षण केलें.

देवशर्मा ह्मणून कोणी मोठे ऋषी होते. त्यांची रुचि नांवाची बायको असून रूपामध्यें पृथ्वीवर तिच्या तोडीचें कोणी नव्हतें. तिच्या रूपाला सर्व देव, गंधर्व व असुर भुलून गेले होते. विशेषतः इंद्र तिला पाहून भाळला होता; तेव्हां बायकांचें चरित्र व इंद्राचा परस्त्रीशीं स्वैरविहार जाणून आपल्या सा- मर्थ्यानुरूप ते आपल्या बायकोचें रक्षण करीत होते. कोणे एके वेळीं यज्ञ करण्याचें त्यांच्या मनांत ये- ऊन बायकोचें रक्षण कसें होणार ह्मणून त्यांना का- ळजी पडली व कशा प्रकारें तिचें रक्षण करावयाचें यासंबंधानें मनांत विचार ठरवून भृगुकुलांत उत्पन्न झालेल्या आपल्या विपुल नांवाच्या आवडत्या शि- ष्याला बोलावून ते त्याला ह्मणाले, ' मी यज्ञ क- रण्याला जातों. इंद्र रुचीवर सदां टपला आहे; ते- व्हां यथाशक्ति मोठ्या हुषारीनें तूं तिचें रक्षण कर. तो मोठा मायावी असून घटकोघटकेला निरनिरा- ळीं अनेक रूपें घेण्यांत मोठा पटाईत आहे, केव्हां त्याच्या डोक्यावर किरिट असतो, केव्हां हातांत वज्र असतें, केव्हां धनुष्य असतें, केव्हां कानांत कुंडलें असतात, केव्हां तो चांडाळासारखा दिसतो, केव्हां त्याला शेंडी दिसते, केव्हां त्याच्या डोक्यावर जटा असतात, केव्हां तो फाटकींतुटकीं वस्त्रें नेसलेला अ- सतो, केव्हां मोठा धिप्पाड असतो तर केव्हां अग- दीं काळाकुट्ट असतो, केव्हां गोरा, केव्हां काळा, केव्हां सांवळा, केव्हां कुरूप, केव्हां मोठा रूपवान, केव्हां तरुण, केव्हां ह्मातारा, केव्हां ब्राह्मण, केव्हां क्षत्रिय, केव्हां वैश्य, केव्हां शूद्र, केव्हां हलक्या जातीच्या बापापासून वरिष्ठ जातीच्या आईच्या पो- टीं व केव्हां वरिष्ठ जातीच्या बापापासून हलक्या जा- तीच्या आईच्या पोटीं झालेला अशीं निरनिराळीं रूपें तो घेतो. तो केव्हां राघू, केव्हां हंस, केव्हां कोकिळ, केव्हां सिंह, केव्हां वाघ, केव्हां हत्ती हो- तो. देवाचें, दैत्याचें किंवा राजाचें वाटेल तें रूप तो घेतो. केव्हां तो लठ्ठ दिसतो, केव्हां वायूनें अंग मोडलेला दिसतो, केव्हां पक्षी होतो, केव्हां पशु हो- तो, केव्हां माशा, धुंगुरटें यांचेंही हा रूप घेतो. तो कोणचें रूप घेईल हें प्रत्यक्ष त्या सृष्टिनिर्माण क- रणाऱ्या ब्रह्मदेवाला सुद्धां सांगतां येणार नाहीं. प्र- त्यक्ष ज्ञानचक्षूनें मात्र त्याचें गूढ रूप कळण्याजोगें

आहे. प्रसंगीं तो वाऱ्याचें सुद्धां रूप घेतो; ह्मणून हिचें मोठ्या दक्षतेनें रक्षण करून यज्ञामध्यें हवि चाटणाऱ्या कुत्र्याप्रमाणें हिला त्याच्या हातून भ्रष्ट होऊं देऊं नकोस.' असें ह्मणून ते यज्ञ करण्यासाठीं निघून गेले. इकडे विपुलाला तें गुरूचें भाषण ऐकून मोठी काळजी पडली. गुरुपत्नीच्या रक्षणासाठीं मला काय करितां येणार ? हा इंद्र मोठा मायावी असून त्याच्यापुढें कांहीं कोणाचें चालावयाचें नाहीं. तो नानाप्रकारचीं रूपें घेत असल्यामुळें आश्रमांत लपून बसून सुद्धां त्याच्यावर लक्ष ठेवितां येणार नाहीं; कारण वायुरूपानें येऊन सुद्धां तो तिला बाटवील; ह्मणून योगबलानें प्रत्येक अवयवागणिक हिच्यामध्यें शिरून राहिल्यानेंच हिचें रक्षण करतां येणार आहे, दुसऱ्या कोणत्याही उपायानें हिचें रक्षण करतां येणें शक्य नाहीं. गुरूंना दिव्य ज्ञान असल्यामुळें ही भ्रष्ट झाली असें त्यांना कळेल तर ते मला शाप दिल्यावांचून सोडणार नाहींत. इंद्र मोठा मायावी असल्यानें मी मोठ्या संकटांत सांपडलों आहे. गुरूंची आज्ञा तर मोडतां येत नाहीं; ह्मणून योगसामर्थ्यानें हिच्या शरीरामध्यें शिरूनच हिचें रक्षण केलें पाहिजे. रजोगुणात्मक विकार मनांत न आणतां कमलपत्रावरील जलबिंदूप्रमाणें ज्याप्रमाणें एखादा वाटसरू आपल्या प्रवासामध्यें एखाद्या रिकाम्या धर्मशाळेंत झुजवी राहतो त्याप्रमाणें अलिप्त होऊन हिच्या ठिकाणीं राहिलों असतां मला कांहीं दोष लागणार नाहीं. याप्रमाणें धर्माधर्मविचार करून तिच्या रक्षणासंबंधानें मनामध्यें विचार ठरवून त्यानें आपल्या जवळ बसलेल्या गुरुपत्नीला बोलतां बोलतां भुरळ पाडून आपल्या डोळ्यांचें तेज तिच्या डोळ्यांच्या तेजाशीं मिळवून देऊन वारा ज्याप्रमाणें आकाशांत भरून रहातो त्याप्रमाणें तो तिच्या सर्व अवयवांमधून भरून कांहीं हालचाल न करतां गुप्त रीतीनें छायेप्रमाणें तिच्या ठिकाणीं राहून गुरु यज्ञ संपवून येईपर्यंत तिचें रक्षण करीत राहिला; परंतु तिला मात्र तें समजलें नाहीं. इकडे या अवधींत देवेंद्र ही संधि पाहून मोह पाडणारें अप्रतिम रूप धारण करून त्या आश्रमाला आला. त्या ठिकाणीं त्यानें डोळे ताठवून अगदीं हालचाल न करतां चित्राप्रमाणें असलेलें विपुलाचें धड त्याचप्रमाणें त्याच्याजवळ बसलेली कमलनयना, शशिमुखी, सुंदरी रुचि पाहिली. त्याला पाहिल्याबरोबर त्याच्या रूपानें थक्क होऊन उठून त्याच्याकडे जाऊन तूं कोण ह्मणून त्याला विचारण्याचें तिच्या मनांत आलें. हा उठण्याचा विचार तिच्या मनांत आल्याबरोबर विपुलानें जागच्याजागीं तिला डांबून धरल्यानें तिला हालचाल करतां येईना. इंद्र मोठ्या गोड शब्दांनीं तिला ह्मणाला, 'हे सुहास्यवदने, तुझ्यासाठीं हा मी इंद्र आलों आहें. तुझ्या इच्छेमुळें जागृत झालेल्या कामानें मी फार पीडिलों आहें; तेव्हां वेळ फुकट न दवडतां मला वश हो.' विपुल गुरुपत्नीच्या शरीरामधूनच इंद्राला पहात असून त्याचें हें बोलणें ऐकत होता. विपुलानें तिला अगदीं स्तब्ध करून टाकिली असल्यामुळें तिच्यानें उठवेना किंवा कांहीं बोलवेना, तिचा आकार ओळखून योगसामर्थ्यानें तिचीं सर्व इंद्रियें त्यानें अगदीं घट्ट जखडून टाकिलीं होती. याप्रमाणें तिला विकारशून्य पाहून 'मजकडे ये,' असें इंद्र पुनः ह्मणाला. तेव्हां तिच्या मनांतून उत्तर द्यावयाचें होतें; परंतु ते शब्द विपुलाच्या योगसामर्थ्यानें जसेच्यातसे परत जाऊन 'कां आलां,' एवढेच शब्द तिच्या तोंडांतून आले. तेव्हां इंद्राला मोठें वाईट वाटलें व पुढें ज्ञानचक्षूनें तो पाहूं लागला असतां आरशांत दिसणाऱ्या प्रतिबिंबाप्रमाणें तिच्या शरीरामध्यें त्याला तो विपुल दिसला. कडकडीत तपानें युक्त अशा त्याला त्या ठिकाणीं पाहून शापाची भीति वाटूं लागून इंद्र घाबरून थरथर कांपूं लागला. इकडे विपुल त्या गुरुपत्नीचें तें शरीर सोडून स्वतःच्या शरीरामध्यें शिरून त्या घाबरलेल्या इंद्राला ह्मणाला, 'हे अजितेंद्रिय मूढ पाप्या, यापुढें देव किंवा मनुष्य तुझा बहुमान करणार नाहींत. गौतमांनीं तुझ्या शरीरांत भोकें भोकें करून तुला सोडून दिला तें तूं विसरलास वाटतें. तें कांहीं तुझ्या मनांत चांगलें बिंबलें नाहीं ! चंचल असा तूं मूढमती असून स्वतःवर तुझा मुळीं दाब नाहीं. मूर्खा, मी हिचें रक्षणकर्ता आहें; तेव्हां आलास तसा येथून निघून जा; नाहींतर तुला मी जाळून खाक करून टाकीन. तुझी कींव येऊन मी तुला जाळूं इच्छित नाहीं. माझे कडक गुरु तुला पाप्याला पाहिल्याबरोबर आपल्या

लाल डोळ्यांनीं तुला जाळून टाकितील. इंद्रा, फिरून तूं असें कधीं करूं नकोस. ब्राह्मणांना तूं मान द्यावास, ब्राह्मणांच्या बलानें त्रास पोहोंचून आपलीं मुलें बाळें व मंत्री यांसह उगीच नाश पावूं नकोस. मी अमर आहें या घमेंडीनें जो तूं वागत आहेस हें कांहीं ठीक नाहीं. ब्राह्मणांचा अवमान करूं नकोस. तपाला दुःसाध्य असें कांहींच नाहीं.' हें त्याचें भाषण ऐकून इंद्र लाजून तेथेंच गुप्त झाला. पुढें लवकरच यज्ञ संपवून गुरू आपल्या आश्रमाला आले. ते आल्यावर त्यांच्या त्या लाडक्या विपुलानें त्याच्यामागें घडलेला सर्व वृत्तांत त्यांना कळविला; तेव्हां त्याच्या त्या शीलानें, वर्तनानें, तपानें व नियमानें संतुष्ट होऊन गुरूच्या ठिकाणीं त्याचें तें वर्तन, त्याची ती भक्ति व धर्माच्या ठिकाणीं स्थिर बुद्धि पाहून गुरू शाबास! शाबास!! ह्मणाले व त्याला वर मागण्यास सांगितलें. तेव्हां 'धर्मामध्यें माझें मन कायम राहो,' ह्मणून त्यानें वर मागितला. तो देऊन त्यांनीं त्याला जाण्यास आज्ञा दिली. तेव्हां गुरूचा निरोप घेऊन जाऊन तो कडक तप करीत राहिला. देवशर्माही इंद्रापासून निर्भय होऊन आपल्या बायकोसह निर्जन वनांत सुखानें काळ काढीत राहिले.

गुरूच्या आज्ञेप्रमाणें कडक तप करीत राहिला असतां विपुलाला आपल्या ठिकाणीं बरेंच तपोबल आलें आहे असें वाटूं लागलें व त्या अभिमानानें मोठ्या आनंदानें पृथ्वीवर तो निर्धास्त फिरत राहिला व त्याचा मोठा लौकिकही झाला; आपल्या विपुल तपानें आपण दोन्ही लोक जिंकलें असें त्याला वाटूं लागलें. याप्रमाणें कांहीं दिवस लोटल्यावर इकडे रुचीच्या बहिणीचा आदानसंस्कार असून त्यामध्यें पुष्कळ धनधान्य वांटलें जाणार होतें; याच वेळेला कोणी एक उत्तम रूपवान सुंदर स्त्री आकाशांतून चालली असतां ज्यांचा उत्तम घमघमाट सुटला आहे अशीं कांहीं उत्तम फुलें देवशर्म्याच्या आश्रमाजवळच खालीं पडलेलीं चारुनयना रुचीनें उचलून घेतलीं; पुढें लवकरच तिला अंगदेशाहून तिच्या बहिणीकडून बोलावणें आलें; कारण ही वर सांगितलेली तिची वडील बहीण अंगराज चित्ररथाची बायको होती. याप्रमाणें बोलावणें आल्यावर तीं फुलें डोक्यांत खोंवून ती अंगराजाच्या घराला गेली. अंगराजाच्या बायकोनें तीं फुलें पाहून आपल्यासाठीं तीं आणविण्यास आपल्या बहिणीस सांगितलें. तेव्हां तिनें आपल्या नवऱ्याला तें कळविलें. ऋषीलाही तें बरें वाटून त्यांनीं विपुलाला हांक मारून फुलांसाठीं जाण्यास सांगितलें. याप्रमाणें गुरूची आज्ञा ऐकून कांहीं विचार न करतां तो ज्या ठिकाणीं तीं फुलें आकाशांतून पडलीं होतीं त्या ठिकाणाला गेला. त्या ठिकाणीं पूर्वी रुचीला सांपडलेल्या फुलांप्रमाणेंच आणखी कांहीं फुलें अगदीं न कोमेजतां पडलीं होतीं. ज्यांचा उत्तम घमघमाट सुटला आहे अशीं तीं आपल्या तपाच्या प्रभावानें मिळालेलीं फुलें घेऊन तो चाफ्याच्या झाडांनीं भरलेल्या चंपानगरीकडे चालला. वाटेंत एका निर्जन वनामध्यें एक मनुष्याचें जोडपें हातांत हात घालून चक्राप्रमाणें गरगर फिरतांना त्याच्या दृष्टीस पडलें. त्यांपैकीं एक आपल्या जलद पाऊल टाकण्यानें दुसऱ्याचीं पाउलें बुजवून टाकीत होता; यामुळें दोघांमध्यें तंटा उत्पन्न झाला. एक ह्मणे तूं लवकर पाय टाकतोस, दुसरा ह्मणे मी नाहीं. याप्रमाणें ते एकमेकांचें ह्मणणें नाकबूल करीत असतां विपुलाच्या कानावर पडेल अशा मोठ्या स्वरानें शपथ घेऊन ह्मणाले कीं, 'आमच्यापैकीं जो खोटें बोलत असेल त्याला विपुलाला जी परलोकीं गती मिळेल ती मिळो.' हें ऐकून विपुलाचें तोंड खर्कन् उतरलें. त्याला वाटलें, 'माझें तप तर कडक आहे; परंतु यांचा वादविवादही तितकाच आवेशाचा असून माझ्या दुःखाला कारणीभूत दिसतो. या जोडप्याचें मीं काय वांकडें केलें असावें ह्मणून सर्व प्राणिमात्रांमध्यें अति वाईट अशी गति मला मिळणार ह्मणून तें ह्मणत आहे. याप्रमाणें दीन मनानें तोंड खालीं घालून आपण काय पाप केलें असावें ह्मणून विचार करीत तो चालला असतां सहा पुरुष सोन्याच्या फांशांनीं जुगार खेळत असलेले त्याला दिसले. त्यामध्यें अंगावर रोमांच उभे रहातील अशा कडाक्याचा वाद चालला होता. आपल्या कानांवर पडेल इतक्या मोठ्या स्वरानें त्यांना बोलतांना त्यानें ऐकिलें. ते ह्मणाले, 'आपल्यामध्यें जो खोट्या रीतीनें खेळेल त्याला विपुलाला परलोकीं

जी गति मिळणार ती मिळेल. ' हें ऐकून आपल्या हातून आजन्म असें कांहीं धर्मसंकर करणारें काम घडलें असल्याचें त्याला आठवलें नाहीं. त्यामुळें अग्नीमध्यें ठेवलेल्या अग्नीप्रमाणें तशा प्रकारचा तो शाप ऐकून त्याचें मन व्याकुळ झालें. याप्रमाणें पुष्कळ दिवस रात्रंदिवस विचार करीत असतां रुचीच्या रक्षणासाठीं तिच्या प्रत्येक अवयवाशीं आपण आपले अवयव मिळवून देऊन आपण तिचें रक्षण केलें; परंतु ती सर्व हकीकत आपण गुरूला कळविली नाहीं, तेंच पाप आपल्या हातून खात्रीनें घडलें असलें पाहिजे असें त्याला वाटलें. पुढें चंपा नगरीला येऊन त्यानें तीं आणलेलीं फुलें गुरूंच्या स्वाधीन करून, ' महाराज वनामध्यें जे लोक मला भेटले व जे मला पूर्ण ओळखतातसें दिसतें तें कोण, ' ह्मणून त्यानें त्यांना विचारलें. तेव्हां देवशर्मा ह्मणाले, ' तें जें चक्राप्रमाणें फिरत असलेलें जोडपें तूं पाहिलेंस तें दिवस व रात्र असून जे फांशांनीं मोठ्या आनंदानें खेळतांना तूं पाहिलेस ते सहा ऋतू होत. त्या सर्वांना तुझें पाप ठाऊक आहे. **पापकर्में करून माझीं पापकर्में कोणाला ठाऊक नाहींत अशा घमेंडीवर मनुष्यानें कधीं स्वस्थ असूं नये.** मनुष्य गुप्तपणें पापकर्म करीत असतां नेहमीं दिवस व रात्र त्याचप्रमाणें ऋतू त्याला पहात असतात. तूं जें कृत्य केलेंस तें जसेंच्या तसें मला न सांगितल्यामुळें पापी लोकांना मिळणारे लोक तुला मिळावयाचे होते. तूं कृत्य केलेंस तें मला न सांगतां मला ठाऊक नाहीं ह्मणून मोठ्या आनंदांत तुला पाहून तुला त्याची आठवण देण्यासाठीं तुला ऐकूं येईल अशा प्रकारें ते तें बोलले. दिवस व रात्र, त्याचप्रमाणें ऋतू मनुष्याच्या हातून घडणारीं पापपुण्यें जाणत असतात. व्यभिचार घडल्याच्या भीतीनें तें तूं केलेलें कृत्य मला कळविलें नाहींत, हें जाणून ते तसें बोलले. त्याच तुझ्या कृत्याबद्दल तुला, पापी लोकांना मिळावयाचे लोक मिळणार होते. स्त्री दुर्वर्तनापासून रक्षण करण्याला कठीण अशी असून तुझ्या हातून वेडेंवांकडें कांहीं झालें नाहीं, ह्मणून मी तुझ्यावर फार संतुष्ट आहें. बायका पुरुषाच्या ठिकाणीं आसक्त होतात व पुरुषांनाही तेंच हवें असतें; परंतु तूं माझ्या बायकोचें रक्षण फार निराळ्या रीतीनें केलेंस. याहून निराळ्या रीतीनें तूं वागतास तर तुला माझ्याकडून खात्रीनें शाप मिळाला असता. तूं तिचें रक्षण केलेंस व ती गोष्ट प्रत्यक्ष तूं सांगितल्याप्रमाणें मला समजली आहे. ह्मणून मी फार संतुष्ट झालों आहें. तूं खुशाल ऐस. तूं स्वर्गाला जाशील. ' पुढें देवशर्मा, त्यांची स्त्री व विपुल हे सर्व स्वर्गाला जाऊन तेथें सुखांत राहिले.

ह्मणून ह्मणतों कीं, नेहमीं बायकांचें रक्षण करणें फार कठीण आहे. नेहमीं बरेपणा तसाच वाईटपणा हे दोन्ही गुण त्यांच्यामध्यें दिसून येत असतात. महाभाग्यशील अशा साध्वी स्त्रिया लोकमाता असून त्या सर्वांच्या बहुमानाला पात्र आहेत. त्यांच्यावरच ही पृथ्वी अवलंबून आहे; त्याचप्रमाणें कुळावर पाणी पाडणाऱ्या पाप बुद्धीच्या व बदचालीच्या कांहीं वाईट बायकाही असतात. अशा बायका त्यांच्या तोंडावरील स्वाभाविक दुष्ट चिन्हांनींच ओळखूं येण्याजोग्या असतात. यांचें रक्षण वर सांगितल्याप्रमाणेंच करतां येणें शक्य आहे. दुसऱ्या कोणत्याही मार्गानें यांचें रक्षण होणें शक्य नाहीं. या मोठ्या कडक असून यांचा पराक्रमही तसाच कडक आहे. यांना प्रिय ह्मणून कोणीच नाहीं. संभोगाच्या वेळेपुरता तो तो त्यांना प्रिय होतो. ह्या कृत्या असून एकाशीं रहाण्याचें कबूल करून सुद्धां त्याला सोडून दुसऱ्याच्या मागें जातात. एका पुरुषावरच प्रेम ठेवून या कधीं रहात नाहींत. ह्मणून मनुष्यानें याच्याशीं फार लगटही करूं नये किंवा यांचा द्वेषही करूं नये. त्यांच्याशीं मनोभावानें लगटलें न जातां केवळ कसेंबसें धर्माकडे लक्ष देऊन त्यांच्याशीं संबंध ठेवावा. याहून निराळ्या रीतीनें वागल्यानें मनुष्याचा खात्रीनें नाश होतो. यांच्याशीं लगटून न रहाण्यांतच बहुमान मिळतो. बिचाऱ्या एकट्या विपुलानेंच स्त्रीचें रक्षण केलें. त्रैलोक्यांत दुसऱ्या कोणाच्या हातून हें होणें शक्य नाहीं. '

---

## २४६ लग्नासंबंधी विचार.
## ( १३०. ४४–४३ )

युधिष्ठिर ह्मणाला, 'धर्म, सुजन, घर, पितर, देवता व अतिथी या सर्वांना जो मूळ विवाहविधि त्यासंबंधानें मला कांहीं सांगा. माझ्या मतानें हा सर्वांत श्रेष्ठ धर्म समजला आहे; ह्मणून मनुष्यानें कशा प्रकारचा वर पाहून आपली मुलगी द्यावी ?' भीष्म ह्मणाले, 'मनुष्याचें शील, वर्तन, विद्या, जन्म, कर्म हीं सर्व लक्षांत घेऊन उत्तम असा वर पाहून त्याला बोलावून अनुकूलतेप्रमाणें त्याला देणगी वगैरे देऊन आपली मुलगी द्यावी. हा ब्राह्म नांवाचा विधि ब्राह्मणांना संमत आहे ; तसाच शिष्ट अशा क्षत्रियांचा देखील हा सनातन धर्म आहे. आपली इच्छा बाजूला ठेवून मुलीच्या इच्छेप्रमाणें तिला जो पसंत असेल व ज्याला ती पसंत असेल अशाला मुलगी देणें हा गांधर्वविधि आहे. पुष्कळ पैसा देऊन विकत घेऊन किंवा आप्तांना पैशानें मोह पाडून मुलगी मिळविणें याला आसुरविधि ह्मणतात. आप्तांना मारून मुंडकी छाटून रडत असलेल्या मुलीला जुलुमानें उपटून नेणें याला राक्षसविधि ह्मणतात. या पांचांपैकीं पहिले तीन लोक संमत असून शेवटचे दोन आसूर व राक्षस हे कधीं कोणीं करूं नयेत. पहिले तीन धर्माला धरून असून वेगवेगळ्या रीतीनें किंवा तिन्ही मिळून व्यवहारांत ठेवण्यास हरकत नाहीं. ब्राह्मणानें तीन, क्षत्रियांनीं दोन व वैश्यांनीं एक अशा बायका कराव्या. या सर्वांच्या ठिकाणीं झालेल्या मुलांचा हक्क सारखा होय. ब्राह्मणाच्या बायकांपैकीं त्याची ब्राह्मण जातीची बायको वडील असावी. क्षत्रियाची क्षत्रिय जातीची वडील असावी. रतिसुखासाठीं शूद्राची कोणी करावी असें ह्मणतात व कोणी करूं नये असें ह्मणतात. शूद्रेच्या ठिकाणीं मूल होणें हें भल्यांना संमत नाहीं. शूद्रेच्या ठिकाणीं संतती उत्पन्न करणारा ब्राह्मण प्रायश्चित्ताला प्राप्त होतो. तीस वर्षांच्या वयाच्या मनुष्यानें एका वस्त्रानिशीं (नग्निका) असणारी बायको करावी व एकवीस वर्षांचा मनुष्यानें सात वर्षांची मुलगी मिळवावी. जिला भाऊ किंवा बाप नसेल अशीशीं लग्न करूं नये; कारण, तिच्या मुलावर बापाचा हक्क राहून कदाचित् ती पुत्रिका धर्मानें असेल. मुलीला ऋतु आला असतां तीन वर्षें वाट पाहून चवथें वर्ष सुरू झाल्यावर मग स्वतः नवरा पाहून लग्न करण्याला तिला हरकत नाहीं. अशा प्रकारानें झालेल्या प्रजेला किंवा रतिसुखाला एवढा सुद्धां गौणपणा येत नाहीं. याहून निराळ्या रीतीनें वागलें असतां मात्र मनुष्य निंदेला पात्र होतो. आईच्या बाजूनें सपिंड व बापाच्या बाजूनें सगोत्र अशांना मुलीसंबंधानें कधीं विचारूं सुद्धां नये असें मनूचें मत आहे.' युधिष्ठिर ह्मणाला, 'एकानें मुलीकरितां पैसा दिला असेल, एकानें देतों ह्मटलें असेल, कोणीं बलात्कारानें उपटून नेतों ह्मणून धमकाविलें असेल व कोणीं मुलीच्या बाजूच्या लोकांना पैसा देऊं केला असेल तर अशा प्रसंगीं ती मुलगी कोणाची समजावयाची ?' भीष्म ह्मणाले, 'अमक्याला मुलगी द्यावयाची असें ठरून चांगल्यांशीं विचार करून जें कांहीं दैवी किंवा मानुषकर्म घडतें तें पुढें खोटें ठरविणें महत्पातक आहे. बायको, तिला होणारें मूल, ऋत्विज, उपाध्याय, आचार्य व शिष्य सर्वच या खोट्या कृत्याबद्दल दंडाला पात्र आहेत असें कांहींचें मत आहे व कांहीं तें तसें नाहीं ह्मणतात. जुलुमाचा संबंध मनूला सुद्धां पसंत नाहीं. हें अन्यायाचें व धर्माला सोडून असून व्यर्थ धर्माला खवळविणें आहे. ज्याला नातेवाइकांनीं मुलगी दिली आहे अशा मुलीला किंवा जिच्याकरितां पैसा दिला आहे तिला अशा मनुष्यानें उपटून नेण्यांत मुळीं पाप नाहीं. मुलीच्या नातेवाइकांनीं रुकार दिल्यावर मंत्र, होम वगैरे विधि व्हावेत, असें झालें असतांच ते मंत्र यथासांग ठरतात. नातेवाइकांनीं तिला दिली नसेल तर तिच्या संबंधानें झालेले मंत्र व होम व्यर्थ आहेत. नातेवाइकांनीं केलेला करार खात्रीनें बंधक व पवित्र समजला आहे; तरी मुलीनें नवऱ्याशीं केलेला करार याहून विशेष बंधक होतो. शास्त्राधाराप्रमाणें नवरा बायको ईश्वरदत्त समजतो ह्मणून जिच्या नातेवाइकांनीं जिला दुसऱ्याला देण्याचें कबूल केलें आहे किंवा जिच्यासंबंधानें त्यांनीं पैसा घेतला आहे अशा मुलीला सुद्धां तिच्या खु-

**शीनें यानें वरलें असतां याला दोष लागत नाहीं.'** युधिष्ठिर ह्मणाला, 'मुलीसंबंधानें पैसा घेतल्यावर तिच्या वडिलाला धर्मार्थकाम या तिन्ही गोष्टींनीं विचार करतां त्याहून चांगला नवरा जर मिळेल, तर पहिल्याला नाकारून दुसऱ्याला ती दिल्यानें खोटेपणाचा दोष त्याच्यावर येतो काय? अशा वेळीं दोन्ही गोष्टी दोषकारक दिसतात; कारण ज्याला मुलगी कबूल केली आहे, त्याला ती नाहीं ह्मणणें हें कांहीं मोठें चांगलें नसून त्याहून चांगला नवरा सोडणें हेंही पण चांगलें नव्हे; तेव्हां अशा स्थितींत तिच्या वडिलानें कसें बरें वागावें?' भीष्म ह्मणाले, 'केवळ पैसा दिल्यानें मुलीवर बायकोपणाचा हक्क पोंचत नाहीं हें तो पैसा देणारा सुद्धां जाणत असतो व तो केवळ तिचा सौदा ह्मणून तो पैसा विसारादाखल देत असतो; शिवाय भले लोक पैशाच्या लालुचीनें आपली मुलगी कधीं देत नाहींत. जेव्हां नातेवाईक नवऱ्यामध्यें कांहीं तरी निराळे गुण पाहतात; तेव्हां ते पैसा मागतात; परंतु जो तुझ्या अनुकूलतेप्रमाणें हिला अलंकार घालून हिच्याशीं लग्न कर ह्मणतो तो पैसा घेतो किंवा अलंकार घालणारा पैसा देतो असें मात्र होत नसून याला कांहीं विकरा ह्मणतां येत नाहीं. प्रतिग्रहपूर्वक मुलीला देणें हा सनातन धर्म आहे. 'मी तुला ही मुलगी देईन,' असें जे पूर्वीं ह्मणाले असतात, जे ह्मणाले नसतात, किंवा जे खात्रीपूर्वक ह्मणाले असतात त्या कोणाचेंच तें ह्मणणें खरें धरतां येत नाहीं; कारण लग्न होईतोंपर्यंत पुष्कळ लोक एकमेकांला मागण्या करीत असतात. हा मरुतांनीं मुलींना पूर्वीं दिलेला वरच आहे. पसंत नसलेल्या मनुष्याला मुलगी देऊं नये असें ऋषींचें मत आहे; कारण काम व संतती यांना मुली कारणीभूत आहेत. **मुलींना विकण्याचा व विकत घेण्याचा जो हा फार दिवसांचा परिपाठ त्याच्या नेहमींच्या अनुभवावरून त्यामध्यें पुष्कळ दोष असल्यामुळें तिच्या संबंधाचा पैसा देणें व घेणें यामुळें केवळ ती बायको होऊं शकत नाहीं;** कारण पूर्वीं मागध, काशी व कोसल लोलोकांना जिंकून मीं विचित्रवीर्यासाठीं दोन मुली आणल्या असतां त्यांपैकीं एकीचें लग्न झालें होतें व एकीबद्दल पैसा आला होता, त्यांपैकीं लग्न झालेलीला तावडतोब सोडून देऊन दुसरीशीं लग्न लाव ह्मणून माझे काका जे बाल्हिक त्यांनीं मला सांगितलें; तेव्हां आचार ठरवून घेण्यासाठीं, 'आचार काय आहे तो मला नीट सांगा,' ह्मणून मीं फिरून फिरून त्यांना विचारलें. तेव्हां ते ह्मणाले, '**योग्य रीतीनें पाणिग्रहण झाल्यापेक्षां तिच्याकरितां पैसा दिल्याघेतल्यानेंच मुलगी बायको ठरते असें जर तुझें मत असेल तर त्यासंबंधानें जिच्याकरितां पैसा दिला आहे तिनें दुसरा नवरा करावा अशी स्मृति आहे. पाणिग्रहणापेक्षां पैसा घेतल्यानेंच मुलगी बायको ठरते असें ज्यांचें ठाम मत आहे त्यांचें वाक्य प्रमाण नाहीं असें धर्मवेत्ते समजतात.** प्रत्यक्ष बापानें मुलीचें कन्यादान केल्यानेंच नवरा बायकोचा संबंध ठरतो. केवळ विक्रय व सौदा केल्यानें ती बायको होऊं शकत नाहीं. या दुसऱ्या रीतीनें ती बायको होते असें ह्मणणाऱ्यांना धर्म कळत नाहीं. अशा लोकांना कोणीं आपली मुलगी देऊं नये. हे लोक लग्नाला पात्र नसतात. **मुलगी कधीं विकत घेऊं नये. व तिच्या बापानें तिला विकत देऊंही नये.** जे लोभी लोक कामासाठीं दासीचा क्रयविक्रय करतात असे पापी लोकच पैसा दिल्याघेतल्यानें एखादी मुलगी बायको होऊं शकते असें समजतात. या विषयावर पूर्वीं लोकांनीं सत्यवान राजाला, 'जर नातेवाइकांना मुलीचा पैसा देणारा तिचें लग्न होण्याच्या पूर्वीं मरेल तर दुसऱ्याला तिच्याशीं लग्न करतां येईल काय,' ह्मणून प्रश्न विचारला होता; तेव्हां सत्यवानानें त्यांना उत्तर दिलें कीं, 'अशा मुलीच्या नातेवाइकांना तिला दुसऱ्याला देण्याला बिलकुल हरकत नाहीं. भले लोक पैसा देणारा जिवंत असला तरी याप्रमाणें वागतात; मग मेल्यासंबंधी गोष्ट विचारावयास कशास पाहिजे? नवरा नाहींसा झाल्यानें किंवा मेल्यानें जी अक्षत योनी आहे अशा लग्न झालेल्या कुमारिका मुलीनें तिच्या धाकट्या दिराशीं किंवा दुसऱ्या बांधवांशीं संबंध ठेवण्याला हरकत नाहीं. नवरा मेल्यावर वाटेल तर तिनें दिराशीं संबंध ठेवावा, वाटेल तर तप करीत रहावें. याप्रमाणें

अक्षतयोनी कुमारिकेशीं तिच्या बांधवांपैकीं दुसऱ्या कोणालाही संबंध ठेवण्याला सार्वत्रिक अधिकार आहे, असें कांहींचें मत आहे, व कांहींचें मत असें आहे कीं, हा जरी प्रचार आहे तरी धर्माच्या आज्ञेपेक्षां इच्छेवरच हें जास्त अवलंबून आहे. जे असें ह्मणतात, अर्थात् अशांच्या मतानें हिच्यासंबंधानें पैसा दिला घेतला असला तरी हिला दुसऱ्या योग्य मनुष्याला देण्याला हरकत नाहीं असें आहे. मुलगी देण्याचें वचन होऊन लग्नाच्या पूर्वींचे सर्व विधि आटोपले असले तरी तिला देऊं केलेल्या नवऱ्याहून निराळा नवरा करण्याला हरकत नाहीं. फक्त एवढ्यानें देणाराला तेवढाच खोटेपणाचा दोष लागतो; परंतु नवराबायकोच्या संबंधाला यानें कांहीं बाध येत नाहीं. लग्नांतील मंत्रामध्यें सप्तपदीनेंच नवराबायकोचा संबंध न तोडतां येण्याजोगा जुडतो. आणि नवऱ्याच्या हातावर पाणी सोडल्यानेंच ती त्याची बायको होते. जी नाखुष नाहीं, जी आपल्या कुलाच्या तोडीच्या कुलांतील आहे व जिचें पाणिग्रहण तिच्या भावानें करून दिलें आहे अशा कुमारिकेशीं श्रेष्ठ प्रतीच्या ब्राह्मणानें लग्न लावावें व हें लग्न अग्निसाक्ष यथाशास्त्र होऊन नेहमींप्रमाणें प्रदक्षिणा होऊन व्हावें.'

युधिष्ठिर ह्मणाला, 'मुलीचा पैसा देणारा जर नाहींसा झाला तर तिचें लग्न करून देण्याला योग्य अशा तिच्या नातेवाइकांनीं पुढें काय करावें?' भीष्म ह्मणाले, 'अशा प्रकारच्या कुमारिकेचा बाप जर निपुत्रिक व श्रीमान असेल तर पैसा देणारा परत येईल तेव्हां त्याला ती देण्यासाठीं त्यानें तिला आपल्याजवळ बाळगावी. जर घेतलेला पैसा तो परत करणार नाहीं तर ती कुमारिका त्या पैसे देणाराचीच समजली जाऊन त्यासाठीं शास्त्रांत सांगितल्याप्रमाणें संतति उत्पन्न करण्याला सुद्धां तिला अधिकार आहे; परंतु दुसऱ्या कोणाला समंत्रक तिच्याशीं लग्न करण्याला अधिकार नाहीं. बापाच्या आज्ञेनें मुलीनें आपण होऊन नवरा निवडून त्याच्याशीं लग्न करणें कांहींच्या मतें पसंत आहे, कांहींना पसंत नाहीं. भले लोक कधीं असे वागले नाहींत व भल्यांचा जो आचार असेल तोच श्रेष्ठ धर्म समजला जातो. कोणत्याही स्थितींत बायकांना स्वातंत्र्य उपयोगी नाहीं असें धडधडीत शास्त्र सांगत असून भले जर याप्रमाणें वागले नसतील तर हा नियमच शास्त्रांत दिसला नसता; तेव्हां या संबंधांत भल्याच्या वर्तनासंबंधानें प्रश्नच उरत नाहीं. तेव्हां याहून भिन्न रीतीनें वागून याला हरताळ कसा लावावा? कारण, वेडेपणानें धर्मावर कुऱ्हाड उगारणें हें आसुरी काम आहे. पूर्वीच्या लोकांच्या कृत्यांमध्यें असें आह्मीं कधींही ऐकिलें नाहीं. नवरा व बायको यांचा संबंध फार सूक्ष्म आहे. स्त्री व पुरुष यांच्या रतिसुखासंबंधाच्या इच्छेनें घडणाऱ्या संबंधाहून हा निराळा आहे.'

## २४७ दायविभाग. (१३. ४५-४७)

युधिष्ठिर ह्मणाला, 'मनुष्याला मुलगा नसेल तर लोक त्याचा पैसा कोणत्या आधारानें घेतात; कारण त्याची मुलगी ही त्याला मुलाप्रमाणेंच होण्याला हरकत दिसत नाहीं.' भीष्म ह्मणाले, 'आपण तोच मुलगा व मुलगा आणि मुलगी सारखींच असें असल्यानें आत्मस्वरूपी मुलगी असतां दुसऱ्याला त्याचा पैसा घेण्याला कसा अधिकार पोहोंचतो? आतां आईचें जें स्त्रीधन असेल तो मुलीचाच भाग आहे. निपुत्रिक बापाचा पैसा मुलीच्या मुलालाच घेण्याला अधिकार आहे; कारण, बापाप्रमाणेंच आईच्या बापाचेंही तो श्राद्ध करतो. मुलगा आणि मुलीचा मुलगा यांमध्यें धर्मानें कांहीं अंतर नाहीं. आतां मनुष्याला एकच मुलगी असून तिला मुलगा समजून मालमत्तेची व्यवस्था केल्यावर त्याला मागून जर मुलगा होईल तर त्या मुलाला सर्व दौलत न जातां दौलतीचे पांच भाग करून दोन त्या मुलीला व तीन मुलाला याप्रमाणें त्याची वांटणी करावी. आतां मुलीला मुलाप्रमाणें मानल्यावर पुढें तो जर दत्तक घेईल तर ती मुलगी मुलाहून श्रेष्ठ समजली जाऊन तिला तीन हिस्से जाऊन त्या मुलाला दोन हिस्से जातात. पुढील स्थितींत मात्र मुलीच्या मुलाला तो हक्क कां पोहोंचावा याला कारण नाहीं. ती स्थिति ही कीं, जेव्हां बापानें मुलीला विकून

टाकिलें असतें. अशा विकून टाकलेल्या मुलीच्या मुलांवर त्यांच्या बापाचा पूर्ण हक्क असतो. मुलीला विकून तिच्यावरचा सर्व हक्क नाहींसा झाला असल्यामुळें मुलीच्या बापाचा या मुलांवर कांहीं हक्क रहात नाहीं. या आसुर धर्मानें उत्पन्न झालेले विषम वृत्तीचे असूया करणारे, अधर्मिष्ठ, परस्व हरण करणारे असे नीच असतात. धर्मशास्त्रानें बांधले जाऊन धर्माप्रमाणें वागणारे ह्मणतात कीं, जो मनुष्य मुलाला किंवा मुलीला विकून पोटासाठीं पैसा मिळवितो त्याला काल नांवाच्या सात भयंकर नरकांमध्यें बुडून राहून तेथें घाम, मल, मूत्र यांवर पुष्कळ दिवसपर्यंत रहावें लागतें. आर्ष विवाहामध्येंही लग्न करून घेणारा जेव्हां गाईचें जोडपें मुलीच्या बापाला देतो याला सुद्धां मुलीसाठीं दिलेलें धन असेंच कांहीं समजतात; व त्याला असें समजूं नये असें कांहींचें मत आहे; परंतु वास्तविक मुलीसाठीं ह्मणून जें कांहीं दिलें जातें तें मग कितीही थोडें किंवा पुष्कळ असो, त्या प्रकाराला विक्रयच समजावा. **जरी कांहीं लोकांमध्यें हा मुलीसाठीं पैसा देण्याचा प्रचार दिसून आला तरी याला जुनी वहिवाट समजतां येत नाहीं.** दुसरेही लग्नाचे कांहीं प्रकार दिसतात. उदाहरणार्थ आपल्याला वश असलेल्या मुलीला तिच्या नातेवाइकांपासून उपटून नेऊन संबंध ठेवणें. जे लोक मुलीला याप्रमाणें बळजबरीनें उपटून तिच्याशीं संबंध ठेवितात तें त्यांचें कृत्य पापी असून त्याबद्दल त्यांना नरकांत बुडावें लागतें. ज्याच्याशीं **आपला कांहीं संबंध नाहीं, अशा मनुष्याला सुद्धां विकणें रास्त नाहीं, मग आपल्या संततीला विकणें कसें रास्त होणार?** याप्रमाणें अधर्ममूलक मिळविलेल्या पैशानें कोणचेंही धर्मकृत्य होणें शक्य नाहीं. ज्या मुलीसंबंधानें तिच्या नातेवाइकांनीं कांहीं घेतलें नसतें त्याला विक्रय असें ह्मणतां येणार नाहीं. **मुलींना अर्हण ह्मणून जें देणें तें चांगलेंच आहे; परंतु याप्रमाणें मिळालेलें सर्व मुलीला दिलें पाहिजे.** बाप, भाऊ, सासरा, दीर या सर्वांनीं पुष्कळ कल्याण व्हावें ह्मणून मुलीला शृंगारून तिचा बहुमान करावा. जर बायकोला नवरा पसंत नसेल किंवा त्याला ती आनंदवीत नसेल तर त्याच्या योगानें संतति वाढत नाहीं; ह्मणून नेहमीं स्त्रियांचा बहुमान करून त्यांना गोंजारीत असावें. ज्या ठिकाणीं स्त्रियांना बहुमान मिळतो त्या ठिकाणीं देवता रमतात, ज्या ठिकाणीं यांचा बहुमान होत नाहीं त्या ठिकाणीं सर्व क्रिया निष्फळ होतात. बायकांना रडण्याची पाळी आली कीं तें कुळ नाहींसें झालें ह्मणून समजावें. बायकांचा ज्या घरांना शाप झाला त्यांचीं पाळेंमुळें त्यांनीं खणलीं ह्मणून समजावीं. तीं घरें लक्ष्मीहीन होऊन कधीं वैभवाला चढत नाहींत किंवा वाढत नाहींत. मनूनें स्वर्गाला जातांना अबला, दुष्टांना सहज उपटून नेतां येण्याजोग्या, असूयाखोर, रागीट, मानाला हापापलेल्या, मूर्ख, परंतु जिवाला जीव देणाऱ्या व सचोटीच्या ह्मणून रक्षणासाठीं पुरुषाच्या स्वाधीन केल्या. स्त्रिया मानाला पात्र आहेत; ह्मणून पुरुषांनीं त्यांना मान द्यावा. धर्म, रति व भोग या सर्वांना कारण स्त्रियाच आहेत. अपत्य उत्पन्न करणें, झालेल्याचा सांभाळ करणें व आनंदांत लोकयात्रा पार पाडणें हीं सर्व स्त्रियांवर अवलंबून आहेत. यांना बहुमान दिला असतां आपलीं सर्व कामें यथास्थित पार पडतात. बायकांना यज्ञक्रिया सांगितल्या नाहींत, श्राद्ध सांगितलें नाहीं, उपवास सांगितला नाहीं. केवळ आपल्या नवऱ्याची शुश्रूषा करणें एवढ्याच धर्मानें त्या स्वर्ग मिळवितात. कौमारामध्यें बाप, तरुणपणीं नवरा व ह्मातारपणीं मुलगे तिचें रक्षण करण्याला असून स्त्रीला स्वतंत्रता ह्मणून कधींच नाहीं. स्त्रिया ह्या क्षम्य असल्यानें वैभव पाहिजे असणाऱ्यानें यांचा सत्कार करावा. यांचें पालन करून चांगला सांभाळ केला असतां स्त्री प्रत्यक्ष लक्ष्मी होते.'

युधिष्ठिर ह्मणाला, 'ब्राह्मणाला चार बायका सांगितल्या आहेत. त्या चौघींना झालेल्या मुलांना बापानें आपला पैसा कसा वांटून द्यावा. बापाच्या पैशांतून कोणीं काय घ्यावें?' भीष्म ह्मणाले, 'ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य हे तीन द्विजाती समजले असून यांच्याशीं लग्न करणें ब्राह्मणाचा धर्मच आहे. परंतु चुकीनें, लोभानें किंवा विषयासक्तीनें ब्राह्मण शूद्रेशीं लग्न करतो त्याला शास्त्राधार नाहीं. शूद्रेला शयनावर घेऊन हा अधोगतीला जातो, व याबद्-

ल त्याला सशास्त्र प्रायश्चित्त सांगितलें आहे. आतां तिला जर ह्याच्यापासून अपत्य होईल तर तें प्रायश्चित्त दुप्पट सांगितलें आहे. बापाची दौलत त्याच्यामध्यें कशी वांटली जावी या संबंधानें सांगतों ऐक. बैल, गाडी, घोडें वगैरे ज्या मुख्य मुख्य ठळक गोष्टी असतील तो मुख्य वांटा ह्मणून ब्राह्मणस्त्रीच्या मुलानें घ्यावा व बाकीच्याचे दहा भाग करून त्यामधलेही फिरून चार भाग त्यानें घ्यावे. त्याचा क्षत्रियेचा मुलगा ब्राह्मणच खरा; पण आईच्यामध्यें फरक असल्यामुळें तो तीन भागांला मालक होतो. आतां तिसऱ्या वर्णाच्या वैश्य स्त्रीला जरी ब्राह्मणापासूनच मुलगा झालेला असला तरी दोन भाग त्यानें घ्यावे. ब्राह्मणापासून शूद्रेला झालेल्या मुलाला मुळीं कांहीं हक्क नाहीं; परंतु त्या शूद्रेच्या मुलाला कांहीं तरी थोडें द्यावें ह्मणून त्या दहा भागांपैकीं एक भाग त्याला द्यावा. एकाच वर्णाच्या बायकोपासून झालेल्या अनेकांना सारखे हिस्से असावे. शूद्रेपासून झालेल्या मुलाला वेदादिकांचा अधिकार नसल्यानें अब्राम्हण समजण्यांत येतें; परंतु ब्राम्हणापासून बाकीच्या तीन वर्णांच्या स्त्रियांना झालेले मुलगे ब्राह्मण समजले जातात. हे चारच वर्ण असून पांचवा वर्ण नाहीं. शूद्रेच्या मुलाला दहावा हिस्सा जो सांगितला तो बापानें दिलेलाच त्याला घेण्याला अधिकार आहे; पण बापानेंही तो त्याला अवश्य दिलाच पाहिजे; कारण, दया हा सर्वांत श्रेष्ठ धर्म असून ती कोणासंबंधानें उत्पन्न झाली तरी चांगलीच. **बाप सपुत्र असो किंवा अपुत्र असो, शूद्रेच्या मुलाला मात्र दहाव्याहून अधिक हिस्सा त्यानें देऊं नये. तीन वर्षांला खाण्याला पुरेल याहून अधिक जो पैसा असेल त्यानें त्यानें यज्ञ करावा. उगीच पैसा सांठवीत बसूं नये. नवऱ्यानें बायकांना द्यावयाची मोठ्यांत मोठी रक्कम ह्मटली ह्मणजे तीन हजार नाणीं असावींत.** या नवऱ्यानें दिलेल्या पैशाचा त्यांनीं वाटेल तसा उपभोग घ्यावा, नवरा निपुत्रिक मेला असतां त्याच्या पैशाचा फक्त उपभोगा पुरता बायकांना अधिकार असून त्याचा अपहार करण्याचा त्यांना अधिकार नाहीं. स्त्रीला तिच्या बापानें जो पैसा दिला असेल तो तिच्या मुलीनें घ्यावा; कारण मुलगा व मुलगी सारखींच आहेत. याप्रमाणें हा दायविभागाचा नियम आहे.'

युधिष्ठिर ह्मणाला, 'जर ब्राह्मणापासून झालेल्या शूद्रेच्या मुलाचा त्याच्या पैशावर कांहीं हक्क नाहीं असें शास्त्र आहे तर त्याला दहावा हिस्सा कोणत्या आधारानें दिला जातो? शिवाय ब्राह्मणीला झालेल्याप्रमाणेंच जर वैश्य व शूद्र या स्त्रियांना ब्राह्मणापासून झालेले ब्राह्मण समजण्यांत येतात तर मग यांच्यामध्यें पितृधन कमी अधिक प्रमाणानें कां वांटण्यांत येतें?' भीष्म ह्मणाले, 'दारा या एकाच नांवामध्यें जरी सर्व बायकांचा समावेश होतो तरी त्यामध्यें हा मोठा फरक आहे. पूर्वी तीन बायका करून मागून जरी ब्राह्मणाची केली तरी तीच वडील, पूज्य व मोठी होते. त्याच्या स्नानाचे, अंगाला लावण्याचे, दांत घासण्याचे पदार्थ, काजळ, हव्यकव्य व दुसऱ्या ज्या ज्या कांहीं घरामध्यें असणाऱ्या गोष्टी त्या ती घरीं असतांना दुसरीला करण्याला अधिकार नाहीं. हें सर्व तिलाच करण्याला अधिकार आहे. अन्न, पान, माला, कपडेलत्ते व आभरणें हीं सर्व ब्राह्मण स्त्रीनेंच नवऱ्याला दिलीं पाहिजेत; कारण तीच वडील आहे. मनूनें सांगितलेल्या शास्त्रांत सुद्धां हाच धर्म सांगितला आहे. आतां कामवश होऊन जर एखादा ब्राह्मण याहून निराळ्या रीतीनें वागेल तर तो ब्राह्मणांमधला चांडाळ समजला पाहिजे. क्षत्रियेला झालेला मुलगा जरी ब्राह्मणाच्या जोडीचा सांगितला आहे, तरी क्षत्रियेपेक्षां ब्राह्मणी श्रेष्ठ असल्यानें तिच्या मुलाला श्रेष्ठत्व आलें आहे; ह्मणून तिच्या मुलाला क्षत्रियेच्या मुलापेक्षां श्रेष्ठ समजलें पाहिजे. आणि ह्मणूनच बापाच्या दौलतीचा ठळक ठळक भाग त्याला मिळतो. त्याचप्रमाणें वैश्याची बायको क्षत्रियेच्या जोडीची कधीं होणार नाहीं; कारण वैभव, राज्य, खजिना, सागरान्त पृथ्वी हीं सर्व क्षत्रियाचींच आहेत; कारण क्षत्रियच स्वधर्मानें मोठें वैभव मिळवितो. शिक्षा करणारा राजाच असून रक्षण त्याच्यावांचून दुसऱ्याच्या हातून होत नाहीं. थोर ब्राह्मण हे देवांचें दैवत असून शास्त्राधारानें क्षत्रिय त्यांचा बहुमान करतात. चोरांनीं घेरलें अ-

सतां सर्व वर्णांच्या बायकापोरांचें रक्षण क्षत्रियाच्या हातून होतें; ह्मणून वैश्याच्या मुलापेक्षां क्षत्रियेचा मुलगा अधिक आहे आणि ह्मणूनच त्याला वैश्येच्या मुलापेक्षां अधिक वांटा मिळतो.' युधिष्ठिर ह्मणाला, 'ब्राह्मणाच्या संबंधानें हा दायविभाग झाला. आतां इतर वर्णांसंबंधानें काय नियम आहे तो सांगा.' भीष्म ह्मणाले, 'क्षत्रियाला दोन बायका सांगितल्या असून तिसरी शूद्राची असूं शकते; परंतु ही कांहीं शास्त्रांत सांगितलेली नव्हे. क्षत्रियाच्या पैशाचे आठ भाग करून त्यांपैकीं चार क्षत्रियस्त्रीपासून झालेल्या मुलानें घ्यावे. तसेंच युद्धासंबंधी ज्या बापाच्या जिनसा असतील त्या त्यानें घ्याव्या. त्याच्या वैश्येच्या मुलानें तीन भाग घ्यावे व एक भाग शूद्रेच्या मुलानें घ्यावा; आणि तोही बापानें दिल्यावरून घ्यावा. वैश्याला एकच बायको सांगितली असून दुसरी शूद्राची करतां येते; पण तें कांहीं शास्त्रांत सांगितलेलें नाहीं. वैश्याला आपल्या वैश्यस्त्रीपासून मुलगा असून शिवाय शूद्रस्त्रीपासून असेल तर त्याच्या पैशाचे पांच हिस्से करून पैकीं चार वैश्येच्या मुलाला देऊन एक तोही वैश्याच्या अनुमतीनें शूद्रेच्या मुलानें घ्यावा. तिन्ही वर्णांनीं दिलेला पैसाच शूद्राला घेण्याला अधिकार आहे. शूद्राला आपल्या वर्णाची केलेली एकच स्त्री करण्याचा अधिकार आहे व त्याला तिच्यापासून शंभर मुलगे झाले तरी त्या सर्वांना सारखा वांटा सांगितला आहे. सर्वच वर्णांत ज्या त्या वर्णाच्या बायकोपासून झालेल्या अनेक मुलांना अनेक भाग सांगितले आहेत. वडील मुलाचा वांटा एका हिश्शानें ठळक ठळक वस्तूंमध्यें इतर भावांपेक्षां अधिक असतो. हा दायविभाग प्रत्यक्ष ब्रह्मदेवांच्या तोंडून पडलेला आहे. नवऱ्याच्याच जातीच्या बायकोंच्या मुलांमध्यें कांहीं एकमेकांमध्यें अंतर नाहीं; तरी यामध्यें आधीं आधीं जिच्याशीं लग्न झालें आहे ती ती पुढचीहून श्रेष्ठ समजली गेली असून त्या सर्वांचे मुलगे सारखे असले तरी वडील मुलानें ठळक ठळक वस्तूंचा एक भाग जास्ती घ्यावा. त्याच्या मागून झालेल्या मुलानें त्याच्या खालोखाल वांटा घ्यावा. हाच नियम इतर वर्णांच्या बायकांसंबंधानें आहे. नवऱ्याच्या वर्णाच्या बायका श्रेष्ठ समजल्या आहेत. मरीचीपुत्र काश्यपांचेंही यासंबंधानें असेंच मत आहे.'

---

## २४८ वर्णसंकरापासून झालेल्या उत्पत्तीचे भेद. ( १३. ४८ )

युधिष्ठिर ह्मणाला, 'पैशाच्या लालुचीनें, लोभानें, कामानें, किंवा अज्ञानानें वर्णसंकर होतो. तेव्हां अशाप्रकारचा वर्णसंकर होऊन उत्पन्न झालेल्यांचा धर्म कोणता व त्यांचीं कर्में कोणतीं?' भीष्म ह्मणाले, 'पूर्वी ब्रह्मदेवांनीं यज्ञासाठीं केवळ चार वर्णांचे धर्म व चार वर्णांचीं कर्में निर्माण केलीं. प्रत्येक वर्णामधून एकेक याप्रमाणें ब्राह्मणाला चार वर्णांतून चार बायका करण्याचा अधिकार आहे. पैकीं पहिल्या दोन वर्णांमध्यें तो स्वतः जन्म घेत असून त्याच्या स्वतःचे सर्व हक्क त्या मुलांना असतात. परंतु खालच्या दोन वर्णांचे त्याचे मुलगे कमी समजले असून त्यांचा दर्जा बापावरून न ठरतां आईवरून ठरत असतो. ब्राह्मणापासून शूद्रेला झालेला मुलगा प्रेतापासून झाल्यांसारखा समजला जाऊन त्याप्रमाणें तो अमंगळ समजला गेला आहे व त्याला पराशव संज्ञा असून त्याच्या बापाच्या त्या वर्णाच्या बायकोपासून झालेल्या मुलांची त्यानें सेवा करावी. त्याला सांगितलेला सेवाधर्म त्यानें सोडूं नये. तो वडील असला तरी त्याच्या सामर्थ्यानिरूप सर्व उपायांनीं त्यानें आपल्या बापाच्या उच्च प्रतीच्या बायकांपासून झालेल्या धाकट्या मुलांची सुद्धां सेवा करावी व आपल्याला मिळालेलें त्यांना द्यावें. क्षत्रियाला तीन बायका करण्याचा अधिकार असून त्यांपैकीं दोघींमध्यें तो स्वतः जन्म घेतो. त्याची तिसरी शूद्र वर्णाची बायको कमी समजली असून तिच्यापासून होणारे मुलगे उग्र असे शूद्र जातीचे समजले आहेत. वैश्याला दोन बायका करण्याचा अधिकार असून त्या दोघींमध्येंही हा स्वतः जन्म घेतो. शूद्राला आपल्या स्वतःच्या जातीपासूनच बायको करण्याचा अधिकार असून तिच्यापासून होणारा मुलगा शूद्रच असतो; याहून निराळ्या रीतीनें वरिष्ठ प्रतीच्या

स्त्रीशीं हलक्या प्रतीच्या पुरुषाचा संबंध होऊन होणारे मुलगे कमी समजले जाऊन त्यांपासून चारी वर्णांना निंद्य अशी चारी वर्णांच्या बाहेरची संतति उत्पन्न होते. जर क्षत्रियापासून ब्राह्मणाच्या बायकोला मुलगा झाला तर त्याची गणना चार वर्णांत न होतां तो सूत जातीचा समजण्यांत येतो. राजे व दुसरे वडे लोक यांचा स्तुतिपाठ गाणें हें त्याचें काम समजलें आहे. वैश्यापासून ब्राह्मणस्त्रीला झालेला मुलगा वैदेहक समजला असून कुलीन लोकांचें अंतःपुर संभाळणें हें त्याचें काम समजलें आहे. या जातीच्या लोकांना कांहीं संस्कार सांगितले नाहींत. शूद्रापासून ब्राह्मणस्त्रीला झालेला मुलगा चांडाळ समजला असून मरणाची कडक शिक्षा त्याच्या हातून दिली जाते, व त्यानें गांवाच्या बाहेर रहावें ह्मणून सांगितलें आहे. वैश्यापासून क्षत्रियस्त्रीला होणारे वंदी व मागध समजले आहेत. त्यांचें काम स्तुतिपाठाचें आहे. शूद्राचा क्षत्रियस्त्रीशीं संबंध होऊन होणारा मुलगा निषाद समजला जाऊन त्याचें काम मासे धरण्याचें आहे. व वैश्य स्त्रीशीं त्याचा संबंध होऊन होणारा मुलगा अयोगव समजला जाऊन त्याचें काम सुतारीचें समजलें आहे. अशांपासून ब्राह्मणानें प्रतिग्रह घेऊं नये. यांना स्वतःचा ह्मणून पैसा करण्याचा अधिकार नाहीं. याप्रमाणें संकरजातीमध्यें त्या त्या जातीच्या स्त्रियांपासून उत्पन्न झालेले मुलगे त्या त्या जातीचे होतात; परंतु या जातींपैकींही उच्च जातीच्यापासून नीच जातीच्या स्त्रीला होणारे मुलगे नीच जातीचे ठरतात; कारण, ते आईच्या जातीचे असतात. याप्रमाणें मूळच्या चार वर्णांपैकीं पुरुषांना आपापल्या वर्णाच्या किंवा आपल्या वर्णाच्या खालच्या वर्णांपासून संतति उत्पन्न करतां येते; परंतु याहून निराळ्या कमी दर्जाच्या बायकांना यापासून होणारे मुलगे त्या त्या बायकोच्या जातीचे होतात व ह्या जातीचीं हीं मुलें जेव्हां फिरून आपल्या जातीच्या बायका करितात तेव्हां त्यांना त्यांच्या बापाचाच दर्जा येतो. मात्र जेव्हां ते आपल्याहून निराळ्या दर्जाच्या स्त्रीशीं संबंध करितात तेव्हां त्यांना कमी दर्जाची संतति होते. जेव्हां चारी वर्णांच्या बाह्य अशा वर्णाचा मनुष्य चारी वर्णांच्यापैकीं एखाद्या वर्णाच्या स्त्रीशीं संबंध ठेवून तीपासून त्याला मुलगा होतो तेव्हां तो त्याच्याहून कमी दर्जाचा असतो. ह्या चारी वर्णांच्या बाहेरच्या वर्णांमध्यें देखील उच्च नीच वर्णांचा संबंध घडून त्याहून नीच वर्णाची संतति उत्पन्न होते. याप्रमाणें एकंदर कमी अधिक मानानें पंधरा नीच जाती झाल्या आहेत. जिच्याशीं संबंध ठेवूं नये अशा स्त्रीशीं संबंध ठेविल्यानें संकरात्मक जाती उत्पन्न होतात. अशा चार वर्णांच्या बाह्यजातींपैकीं सैरंध्रीशीं मागधांचा संबंध होऊन जी जात होते ती गुलाम नसतां गुलामवृत्तीमध्यें रहाणारी होऊन राजाच्या अंगाला शृंगारणें वगैरे कामें त्यांचीं असतात. त्याचप्रमाणें एका जातीच्या मागधांचा सैरंध्रीशीं संबंध होऊन जाळें तयार करून त्यावर रहाणारी अयोगव जात उत्पन्न होते. वैदेहांचा सैरंध्रीशीं संबंध होऊन मैरेयक जात होते. यांचा धंदा दारू तयार करण्याचा आहे. निषादांपासून नावेवर पोट भरणाऱ्या मद्गुर व दास ह्या जाती उत्पन्न होतात. त्याचप्रमाणें चांडालापासून श्वपाक नांवाची स्मशानरक्षक जात उत्पन्न होते. मगधजातीच्या स्त्रीचे ठायीं चार निरनिराळ्या हलक्या जातींपासून लुच्चेगिरीवर रहाणाऱ्या मांस, पादूकर, क्षौद्र व सौगंधक नांवाच्या चार जाती उत्पन्न होतात. वैदेहकापासून एक क्रूर, पापी, लुच्चेगिरीवर रहणारी जात उत्पन्न होते. निषादांपासून मद्रनाभ नांवाची एक जात उत्पन्न होऊन ते गाढवांच्या गाडींतून जातात. चांडालापासून गाढव, घोडे व हत्ती यांवर पोट भरून मढ्यावरचे कपडे काढून अंगावर घेऊन फुटक्या परळामध्यें जेवणारी पुक्कस नांवाची जात उत्पन्न होते. आयोगव जातीच्या स्त्रीला निरनिराळ्या तीन जातींच्या पुरुषांपासून तीन हलक्या जातींची संतति होते. वैदेहापासून क्षुद्र, व त्याचप्रमाणें शहराच्या हद्दीच्या बाहेर रहाणारी आंध्र या जाती उत्पन्न होतात. त्याचप्रमाणें चर्मकारापासून निषादीला कारावर नांवाची जात उत्पन्न होते. चांडाळापासूनच कळक सोलून त्याच्या बुरड्या वगैरे करणारी पांडुसौपाक नांवाची जात उत्पन्न होते. निषादांपासून वैदेही जातीच्या स्त्रीला आहिंडक नांवाची जात उत्पन्न होते. चांडाळाच्याच बरोबरीची दुसरी एक सौपाक नांवाची जात उत्पन्न होते. निषाद स्त्रीला चांडाळापासून गां-

वाच्या बाहेर स्मशानांत रहाणारी एक जात उत्पन्न होते, व या जातीला गांवच्या बाहेर रहाणाऱ्या जातीसुद्धां कमी समजतात. याप्रमाणें आईबापांच्या हातून भलता व्यवहार झाल्यानें या संकरात्मक जाती उत्पन्न झाल्या आहेत. यांची उत्पत्ति कळो किंवा न कळो, त्यांच्या त्यांच्या कर्मांवरून त्या त्या जाती ओळखतात. मूळच्या चार वर्णांनाच धर्म सांगितला असून दुसऱ्या कोणालाही धर्म सांगितला नाहीं. ह्या धर्मबाह्य वर्णांची संख्या नाहीं. ज्यांच्याकरितां यज्ञ सांगितले नाहींत किंवा जे भल्यांच्या उपदेशाला मुकले आहेत, अशा प्रकारचे लोक मग ते चारी वर्णांपैकीं असोत कीं चारी वर्णांच्या बाहेरचे असोत; अनिवार विषयाच्या तावडींत जाऊन धर्मविचार न करितां दुसऱ्या जातींच्या स्त्रियांशीं संबंध करून ज्या निरनिराळ्या संकरात्मक जाती उत्पन्न करतात, त्यांचे धंदे व रहाणें त्यांच्या उत्पत्तीच्या निरनिराळ्या स्थितीवर अवलंबून असतें. अशा लोकांनीं चौकांमध्यें, स्मशानामध्यें, पर्वतावर अथवा जंगलामध्यें घर करून राहून लोखंडाचे अलंकार अंगांवर घालून स्वकर्मानें आपल्या पोटाला मिळवून रहावें; त्याचप्रमाणें हिंसा न करितां ब्राह्मण, गाई, यांना साह्य करावें. दया, आनृशंस्य, सत्य भाषण, व क्षमा ठेवून आपला देह खर्ची घालून सुद्धां दुसऱ्यांचें रक्षण करीत राहिल्यानें यांना सिद्धि मिळते. याप्रमाणें सर्व विचार लक्षांत घेऊन योग्य स्त्रीच्या ठिकाणीं संतति उत्पन्न करावी. हीन योनीच्या ठिकाणीं संतति उत्पन्न केल्यानें मुक्त होण्याच्या ऐवजीं दगड बांधून पोहावयास निघालेल्या मनुष्याप्रमाणें मनुष्य खालींच बुडत जातो. कामक्रोधांच्या तावडींत सांपडलेला मनुष्य, मग तो विद्वान असला तरी बायका त्याला भलत्या मार्गाला ओढतात; मग मूर्खाची गोष्ट पाहिजे कशाला? पुरुषांना बिघडविणें हा स्त्रियांचा स्वभावच आहे. ह्मणून शहाणे लोक बायकांच्या ठिकाणीं फार चिकटत नाहींत.' युधिष्ठिर ह्मणाला, 'भ्रष्टयोनीपासून नीच योनींत झालेला नीच मनुष्य भल्यासारखा दिसतो, त्याला ओळखावें कसें?' भीष्म ह्मणाले, 'योनीसंकरापासून झालेल्या मनुष्याच्या ठिकाणीं निरनिराळे गुण दिसून येतात. भल्याचीं कर्में अंगांत दिसून आलीं ह्मणजे त्यावरून त्याची उत्पत्ति शुद्धयोनीपासून आहे असें समजावें. हलकटपणा, अनाचार, क्रूरपणा आणि शास्त्रांत सांगितलेलीं कर्में न करणें, यांवरून मनुष्य भ्रष्टयोनीपासून जन्मला आहे हें सिद्ध होतें. मनुष्याच्या अंगीं प्रसंगीं बापाचें, प्रसंगीं आईचें किंवा प्रसंगीं दोघांचेंही शील दिसून येतें. भ्रष्टयोनीपासून झालेल्या मनुष्याचा स्वभाव झांकला जात नाहीं. ज्याप्रमाणें वाघाच्या पिलाच्या अंगावर त्याच्या आईप्रमाणें किंवा बापाप्रमाणें पट्टे दिसून येतात, त्याप्रमाणें मनुष्य आपआपल्या जन्माच्या वळणावर जातो. मनुष्याचा जन्म कितीही गुप्त असो, तो जर भ्रष्ट असेल तर तो कमी अधिक प्रमाणांत दिसून आल्याशिवाय रहाणार नाहीं. मनुष्य धर्माचरणाचें कितीही ढोंग करो. त्याच्या वर्तनामध्यें त्याचा स्वभाव कसा आहे हें दिसून आल्याशिवाय रहाणार नाहीं. जगामध्यें लोक निरनिराळ्या स्वभावाचे असून त्यांचे व्यवसाय निरनिराळे आहेत; परंतु शुद्ध कुलामध्यें जन्म व शील यांसारखें त्याला शोभणारें दुसरें कांहीं नाहीं. मनुष्य जर नीच जातींत जन्मला असेल तर शास्त्राध्ययनानें बुद्धि कितीही संस्कृत झाली तरी ती त्याला त्यापासून काढूं शकत नाहीं. चांगली बुद्धि देखील उच्च, मध्यम व कमी अशा तीन प्रकारची असून नीच योनींत जन्मलेल्या मनुष्यामध्यें ती क्षणिक दिसून आली तरी ती फार वेळ टिकत नाहीं. **कुळानें उत्तम असून शील नसेल तर त्याला बहुमान देऊं नये. चांगल्या रीतीनें वागणारा शूद्र असला तरी त्याला बहुमान द्यावा.** आपल्या बऱ्या वाईट कृत्यानें, बऱ्या वाईट शीलानें, बऱ्या वाईट वागण्यानें व बऱ्या वाईट कुळाच्या योगानें मनुष्य आपण कसे आहों हें सांगत असतो. आपलें स्वतःचें कूळ अगदीं खालीं गेलें असलें तरी मनुष्याला आपल्या कर्माच्या योगानें त्याला वर काढितां येतें. ह्मणून शाहाण्या लोकांनीं या संकरात्मक किंवा दुसऱ्या नीच योनींशीं संबंध ठेवून संतति उत्पन्न करूं नये.'

---

## २४९ निरनिराळ्या प्रकारची संतति. (१३. ४९)

युधिष्ठिर ह्मणाला, 'कोणापासून उत्पन्न झालेला कशा प्रकारचा मुलगा असतो, कोणाला मुलगा ह्मणतां येईल व किती प्रकारचे मुलगे आहेत, हें सांगा.' भीष्म ह्मणाले, 'स्वतःपासून उत्पन्न झालेल्याला आत्मज ह्मणतात; त्याचप्रमाणें स्वतःच्या बायकोला दुसऱ्यापासून आपल्या संमतीनें झालेला त्याला निरुक्तज ह्मणतात व संमतीवांचून झालेल्याला प्रसूतज ह्मणतात; त्याचप्रमाणें पतित नवऱ्यापासून बायकोला झालेला मुलगा पतितज ह्मणतात; त्यांचप्रमाणें कोणीं दिलेला किंवा विकत घेतलेला तोही मुलगाच होतो; त्याचप्रमाणें गर्भिणीशीं लग्न होऊन पुढें झालेला अध्यूढ मुलगा; व कुमारीला लग्नाच्या पूर्वी झालेला कानीन मुलगा हे सर्व आपले मुलगे होतात; त्याचप्रमाणें तीन खालच्या वर्णांच्या ठिकाणीं ब्राह्मणाला झालेले तीन, दोन खालच्या वर्णांच्या ठिकाणीं क्षत्रियाला झालेले दोन व शूद्राच्या ठिकाणीं वैश्याला झालेला एक अशा या सहा मुलांना अपध्वंसज नांव आहे; शूद्राला ब्राह्मणस्त्रीच्या ठिकाणीं झालेला चांडाळ,क्षत्रियस्त्रीच्या ठिकाणीं झालेला व्रात्य व वैश्याच्या ठिकाणीं झालेला वैद्य, त्याचप्रमाणें वैश्याला ब्राह्मणस्त्रीच्या ठिकाणीं झालेला मागध व क्षत्रियस्त्रीच्या ठिकाणीं झालेला वामक व क्षत्रियाला ब्राह्मणस्त्रीच्या ठिकाणीं झालेला सूत यांना अपसद हें नांव आहे. ह्या सर्वांना मुलगे नाहींत असें कांहीं ह्मणतां यावयाचें नाहीं.' युधिष्ठिर ह्मणाला, 'कोणी स्त्रीच्या ठिकाणीं झालेल्याला मुलगा ह्मणतात, कोणी आपल्या शुक्रापासून झालेल्याला मुलगा ह्मणतात, तेव्हां हे दोघे सारखेच किंवा कसें? व कोणच्या प्रकारचा मुलगा कोणाचा?' भीष्म ह्मणाले, 'आपल्या रेतापासून झालेला आपला मुलगा असून आपल्या स्त्रीच्या ठिकाणीं अन्यरेतापासून झालेला त्या दुसऱ्यानें त्यावरचा हक्क सोडून दिला असेल तर आपला मुलगा होतो; त्याचप्रमाणें गर्भिणी स्त्रीशीं लग्न करून झालेल्या मुलासंबंधानें तिच्या ठिकाणीं त्या रेत ठेवणाऱ्यानें त्यासंबंधीं करार मोडला असतां तो याचा होतो.' युधिष्ठिर ह्मणाला, 'आपल्या रेतापासून उत्पन्न झालेला आपला मुलगा हें ठीक आहे; परंतु आपल्या स्त्रीच्या ठिकाणीं दुसऱ्यापासून उत्पन्न झालेल्या मुलासंबंधानें काय शास्त्र आहे; त्याचप्रमाणें गर्भिणी स्त्रीशीं लग्न लावून पुढें तिला झालेल्या मुलासंबंधानें रेतसिंचन करणारानें त्याच्या संबंधानें नियम मोडला हें कसें समजावयाचें?' भीष्म ह्मणाले, 'जो स्वतः मुलगा उत्पन्न करून कांहीं कारणानें त्याला सोडून देतो अशा प्रसंगीं रेत हें पुत्रत्वाला कारण होत नसून त्या बायकोच्या नवऱ्याचाच तो मुलगा होतो; त्याचप्रमाणें मुलासाठीं जो गर्भिणी स्त्रीशीं लग्न करतो अशा ठिकाणीं त्या स्त्रीचा मालकच बाप बनत असून रेत ठेवणाराचा तो मुलगा होत नाहीं. स्त्रीच्या ठिकाणीं दुसऱ्यापासून झालेल्या मुलाचें स्वरूप त्याच्या ह्या बापाहून निराळें असतें. व त्याचा तोंडवळा झांकत नाहीं. पाहिल्याबरोबर तो ओळखतां येतो. कधीं कधीं पाळलेल्या मुलाला पाळल्यामुळेंच पुत्रत्व येत असून त्या ठिकाणीं रेत किंवा स्त्रीची मालकी दोन्ही पुत्रत्वाला कारण होत नाहींत. , युधिष्ठिर ह्मणाला, 'ज्याच्यासंबंधानें रेत किंवा स्त्री पुत्रत्वाला कारण होत नसून जो केवळ पाळल्यामुळेंच मुलगा होतो, असा पाळलेला मुलगा आपला मुलगा कशावरून समजावयाचा?' भीष्म ह्मणाले, 'जेव्हां रस्त्यावर आईबापांनीं टाकून दिलेला मुलगा एखादा पाळतो, व जेव्हां त्याला त्याचे आईबाप सांपडत नाहींत तेव्हां त्यावर मालकी करण्याला कोणीच न उरल्यानें तो त्या पालन करणाराचा मुलगा होतो, व तो पालन करणारा ज्या वर्णाचा असतो त्या वर्णाचाच तो होतो; त्या वर्णाला लागू असलेच त्याचे संस्कार होतात व त्याच्याच वर्णांतील मुलीशीं त्याचें लग्न व्हावें, हें उचित आहे. परंतु जेव्हां अशा मुलाच्या आईचा पत्ता न लागेल तेव्हां हा प्रकार सांगितला आहे. कुमारिकेला झालेला मुलगा, त्याचप्रमाणें लग्नाच्या पूर्वी गर्भार असलेल्या स्त्रीला झालेला मुलगा हे जरी फार हलके समजले आहेत तरी त्यांचे, त्याचप्रमाणें आपल्या स्त्रीच्या ठिकाणीं दुसऱ्यापासून उत्पन्न झालेल्या अशा प्रकारच्या मुलांचे संस्कार ब्राह्मणादिकांनीं आपल्या मुलाप्रमाणें करावे. धर्म-

शास्त्रामध्यें वर्णासंबंधानें याप्रमाणें निश्चय सांगितला आहे.'

---

## २५० नहुष व च्यवन यांचा संवाद—गाईचें माहात्म्य (१३. ५०–५१)

युधिष्ठिर ह्मणाला, ' दर्शन त्याचप्रमाणें सहवास यांपासून कशा प्रकारचा स्नेह उत्पन्न होतो हें व गाईचें थोर भाग्य काय आहे तें सांगा, ' भीष्म ह्मणाले, ' या संबंधानें नहुषराजा व च्यवनऋषी यांमधील पुढील संवाद ऐक. पूर्वी च्यवन ऋषी काम, क्रोध, हर्ष, शोक इत्यादि मनोविकार नाहींसे करून व्रत धरून बारा वर्षे पाण्यांत राहिले होते. सर्व जलस्थलचर प्राण्यांच्या ठिकाणीं चंद्राप्रमाणें विश्वास उत्पन्न करून याप्रमाणें शुचिर्भूततेनें देवांना नमस्कार करून गंगायमुनेच्या संगमामध्यें अगदीं लांकडाप्रमाणें स्थिर होऊन पाण्यांत शिरून जोराच्या वाऱ्यासारख्या घों घों वहाणाऱ्या त्या दोन नद्यांचा भयंकर वेग आपल्या मस्तकानें सहन करीत ते त्या ठिकाणीं राहिले असतां गंगा, यमुना व त्या ठिकाणीं मिळणाऱ्या दुसऱ्या नद्या त्यांना त्रास न देतां उजवी घालून वहात होत्या. कांहीं दिवस पाण्यामध्यें पडून राहून पुढें ते पाण्यावर बसून राहिले. पाण्यामध्यें असणाऱ्या सर्व प्राण्यांना ते फार आवडूं लागून मोठ्या आनंदानें ते प्राणी त्यांचा ओंठ हुंगत. याप्रमाणें बरेच दिवस लोटल्यावर कोणे एकेवेळीं कांहीं बलवान धीवर मासे धरण्याच्या निश्चयानें जाळीं घेऊन त्या ठिकाणीं आले. त्या मासे असलेल्या ठिकाणीं त्यांनीं आपलीं सर्व नव्या सुतानें विणलेलीं लांब रुंद अशीं जाळीं एकत्र करून तें एकच मोठें केलेलें जाळें पाण्यामध्यें पसरून टाकिलें, व मोठ्या जोरानें ते खळबळून हलवून नंतर पाण्यांत उतरून तें ओढूं लागले. याप्रमाणें एकमेकांच्या सल्लयानें वागणाऱ्या त्या कोळ्यांनीं मोठ्या आनंदानें मासे व दुसरे जलचर प्राणी त्या जाळ्यांत धरले, त्या बरोबर माशांमध्येंच असून नदीच्या शेवाळानें अंगावरचे केंस व जटा हिरव्या झालेल्या व शंख वगैरे अंगाला चिकटलेल्या अशा च्यवनांनाही सहज त्यांनीं त्या माशांबरोबरच वर ओढून घेतलें. त्या वेदपारग ब्राह्मणांला जाळ्यामधून वर ओढलेले पाहून सर्वांनीं त्यांच्यापुढें हात जोडून नमस्कार केला. जाळ्याच्या हेलकाव्यानें व जमिनीला अंग लागल्यानें त्रास व पीडा होऊन सर्व मासे पटापट मरून पडले. ती माशांची कचल पाहून त्या ऋषींना कींव येऊन ते फिरून फिरून उसासा टाकूं लागले. ' चुकून आमच्या हातून हें पाप घडलें तेव्हां आमच्यावर कृपा करा, आपण सांगाल तें करण्यास आह्मी तयार आहों, ' असें ते कोळी ह्मणाले. तेव्हां माशांमध्येंच असलेले ते ऋषी त्यांना ह्मणाले, 'आज मी या माशांबरोबर प्राण तरी देणार एक किंवा तुह्मी मला यांच्याबरोबर विका तरी एक. यांच्याबरोबर पाण्यामध्यें मी एकत्र राहिलों असल्यानें माझ्यानें यांना सोडवत नाहीं. ' याप्रमाणें ते ह्मणाले असतां भयानें कांपत तोंड उतरून जाऊन त्या कोळ्यांनीं नहुष राजाकडे जाऊन ती हकीकत त्याला कळविली.

याप्रमाणें च्यवन अशा स्थितींत आल्याची वार्ता नहुषाला कळतांच तो आपल्या अमात्य पुरोहितांसह त्यांकडे आला व हात जोडून त्यांचेपुढें उभा राहून आपण आल्याचें त्यानें त्यांना कळविलें. राजाच्या पुरोहितानें त्या देवतुल्य ऋषींची पूजा केल्यावर, ' आपलें मी काय करूं, आपण सांगाल तें कितीही दुर्घट असलें तरी मी करावयास तयार आहें, ' असें नहुष ह्मणाला. तेव्हां च्यवन त्याला ह्मणाले, ' या माशांवर पोट भरणाऱ्या कोळ्यांना फार श्रम झाले आहेत तेव्हां माझी त्याचप्रमाणें या माशांची यांना किंमत दे. ' हें ऐकून ऋषिमहाराजांचें मोल ह्मणून हजार नाणीं द्या, ह्मणून नहुष आपल्या पुरोहिताला ह्मणाला असतां च्यवन म्हणाले, ' हजार नाण्यांनीं माझें मोल करणें ठीक नाहीं. माझें योग्य मोल असेल तें आपल्या बुद्धीनें ठरवून त्यांना दे. ' तेव्हां नहुषानें लक्ष नाणीं त्यांबद्दल देण्यास सांगितलें. तेव्हां फिरून ऋषींनीं मंत्र्यांसह त्यास विचार करण्यास सांगितलें. पुढें कोट नाणीं, अर्ध राज्य, एवढेंच नव्हे तर अखेरीस सगळे राज्य तो देण्याला तयार झाला असतांही, ' माझ्या योग्य मोबदला काय ह्या संबंधानें एखाद्या ऋषींचा सल्ला घे, ' ह्मणून त्यांनीं त्याला

सांगितलें. याप्रमाणें ते बोलले असतां नहुष राजा आपल्या अमात्य पुरोहितांसह विचारांत पडला. ते वेळीं त्याचठिकाणीं गाईपासून झालेले फलमूलांवर असणारे एक ऋषी जवळ होते ते ह्मणाले, 'मी ह्या ऋषींना आतां संतुष्ट करतों. आजपर्यंत मी कधीं थट्टेंत सुद्धां खोटें बोललों नाहीं; तेव्हां मी सांगेन तसें तूं निःशंकपणें कर.' नहुष ह्मणाला, 'भगवन्, यांच्या तोडीची किंमत सांगून माझें, माझ्या राज्याचें व कुळाचें रक्षण करा. कारण हे ऋषिमहाराज रागावले असतां त्रैलोक्याचा सुद्धां फडशा पाडण्याला समर्थ आहेत, मग केवळ मनगटाच्या जोरावर रहाणाऱ्या तपोहीन अशा माझी काय कथा ? तेव्हां खोल पाण्यामध्यें बुडत असलेल्या मला तारण्याला आपणच नाव आहां. यांची योग्य किंमत आपण करा.' हें राजाचें भाषण ऐकून ते ऋषी ह्मणाले, 'सर्ववर्णांमध्यें श्रेष्ठ अशा ब्राह्मणांची त्याचप्रमाणें गाईची किंमत नाहीं. तेव्हां यांच्या किमतीबद्दल गाय दे.' हें ऐकून सर्वांना आनंद झाला व आनंदभरित होऊन गाय देऊन राजानें त्या च्यवन ऋषींना विकत घेतलें. तेव्हां च्यवन ह्मणाले, 'राजा, गाईच्या तोडीचें द्रव्य या जगांत दुसरें नाहीं. तिचें नांव घेणें, तिचें कीर्तन, श्रवण, दर्शन व दान हें पुण्यकारक असून सर्व पाप नाहींसें करणारें आहे. सर्व वैभवाला मूळ गाय असून तिच्या ठिकाणीं पाप ह्मणून नाहीं. सर्व भूतमात्रांचें अन्न ही गायच असून देवांची हवि हीच आहे. स्वाहाकार, वषट्कार यांवरच अवलंबून असून यज्ञ चालविणाऱ्या त्याचप्रमाणें यज्ञाचें मुख या गाईच आहेत. कधीं न सरणारें उत्तम अमृत यांच्या ठिकाणीं असून यांच्यापासूनच तें नेहमीं गळत असतें; ह्या अमृताचा सांठा आहेत, तशाच सर्व लोकांना ह्या पूज्य आहेत. तेजानें व स्वरूपानें या अग्नीसारख्या आहेत; सर्व प्राणिमात्रांना या सुखदात्या आहेत. ज्या ठिकाणीं गाई रहात असून त्यांचा श्वासोच्छ्वास होत असतो ती जागा फार झळकत राहून पाप ह्मणून त्या ठिकाणीं उरत नाहीं. गाई ह्याच स्वर्गाच्या पायऱ्या आहेत. ह्या वाटेल तें देणाऱ्या असून सर्व मनकामना पूर्ण करणाऱ्या आहेत. यांच्याहून श्रेष्ठ या जगांत दुसरें कांहीं एक नाहीं.' नंतर निषाद च्यवनांना ह्मणाले, 'आह्मांला दर्शन देऊन आमच्याशीं आपल्या चार गोष्टी झाल्या आहेत. सात पावलें बरोबर गेल्यानें भल्यांची मैत्री जुळते ह्मणतात; तेव्हां आपण आमच्यावर कृपा करा. अग्नि, त्याला दिलेलें वाटेल तें हवि घेत असतो; आपणही प्रत्यक्ष अग्नीप्रमाणें आहांत. आह्मी नम्र होऊन आपल्याला हात जोडतों. आमच्यावर कृपा करण्यासाठीं ही गाय आपण घ्या.' च्यवन ह्मणाले, 'ज्याप्रमाणें वणवा सर्व रानाचा जाळून फडशा पाडितो, त्याप्रमाणें कृपण, मुनी व साप यांचा डोळा मनुष्याला समूळ जाळून टाकतो. कोळ्यानों, तुह्मीं दिलेली गाय मी घेतों, तुह्मी पापांतून मुक्त होऊन या माशांबरोबरच स्वर्गाला जा.' याप्रमाणें ते बोलले असतां ते कोळी त्यांच्या प्रभावानें त्या माशांबरोबरच स्वर्गाला गेले. च्यवनांनीं नहुष राजाला वर मागण्यास सांगितलें असतां 'धर्मामध्यें माझा कायमपणा राहो,' ह्मणून त्यानें वर मागितला. तो त्याला देऊन आपण धरलेलें व्रत पूर्ण झाल्यामुळें ते आपल्या आश्रमाला निघून गेले, व नहुषही त्याप्रमाणें वर मिळवून आपल्या नगराकडे गेला. दर्शन व सहवास यांपासून उत्पन्न होणारा स्नेह अशा प्रकारचा असून गाईचें भाग्य असें आहे.

---

## २५१ च्यवन व कुशिक यांचा संवाद–
## (१३. ५२–५६)

युधिष्ठिर ह्मणाला, 'जमदग्निपुत्र परशुरामासंबंधानें मला मोठें कौतूहल वाटतें. त्यांचा जन्म कसा झाला; ऋषिकुलांत जन्मून क्षत्रियधर्म त्यांनीं कसा स्वीकारला, त्याचप्रमाणें कुशिकाच्या क्षत्रियकुलांत उत्पन्न झालेले विश्वामित्र ब्राह्मण कसे झाले. ऋचिकांचा मुलगा क्षत्रिय न होतां त्यांचा नातू क्षत्रिय कसा झाला; त्याचप्रमाणें कुशिकाचा मुलगा ब्राह्मण न होतां त्याचा नातू ब्राह्मण कां झाला, हा सर्व वृत्तांत मला सांगा.' भीष्म ह्मणाले, 'सांगतों ऐक, भृगुकुलोत्पन्न च्यवनऋषींना पुढें आपल्या कुळाला लागणारा बट्टा कळून त्याचें महत्त्व लक्षांत घेऊन कुशिककुळाचा नाश करण्याच्या विचारानें कुशिकाकडे येऊन, 'तुझ्याबरोबर कांहीं दिवस रहाण्याचा माझा विचार आहे,' असें

ते त्याला ह्मणाले.तेव्हां राजानें 'ठीक आहे,' असें ह्मणून आपल्या बायकोसह त्यांची शुश्रूषा करण्याला तयार होऊन त्यांना त्यानें झारीमधून पाय धुण्यास पाणी दिलें व मधुपर्क देऊन त्यांचा सत्कार केल्यावर तो ह्मणाला, ' आह्मी आपलें दास आहों. काय आज्ञा आहे सांगावी. हें राज्य, द्रव्य, गाय, दान वाटेल तें आपल्यास देण्यास मी तयार आहें. हें घर, हें राज्य, हें धर्मासन आपलें असून आपणच याचे स्वामी आहां. ह्या पृथ्वीचें राज्य आपण करा. ' याप्रमाणें राजा बोलला असतां च्यवन मोठ्या संतोषानें त्याला ह्मणाले, ' मला राज्य, पैसा, बायका, गाई, देश, कांहीं नको. मी सांगतों तें ऐक. तुह्मांला रुचत असेल तर मी एक नियम आरंभणार आहें. मनांत कांहीं किंतू न आणतां तुह्मी मोठ्या दक्षतेनें माझी सेवा करा. ' हें ऐकून त्या दंपतीला मोठा आनंद होऊन ' ठीक आहे ' असें ते ह्मणाले, व त्या घरामध्यें एका उत्तम ठिकाणीं त्यांना घेऊन जाऊन, ' हें आपल्याला रहाण्याला ठिकाण, आपल्याला संतुष्ट करण्याला आमच्या हातून होईल तेवढा यत्न आह्मी करूं, ' असें तो राजा ह्मणाला. याप्रमाणें त्यांचें भाषण चाललें असतां सूर्य मावळला; तेव्हां ऋषींनीं त्या राजाला खाण्यापिण्याचें आणावयास सांगितलें; तेव्हां नम्रपणानें, ' आपल्याला खाण्यास काय आणूं, ' म्हणून राजानें विचारिलें. तेव्हां, तुला योग्य वाटेल तें घेऊन ये, ' म्हणून ऋषी ह्मणाले, पुढें त्यांना उचित असा आहार राजानें आणला. तो घेतल्यावर ऋषी 'मला झोंप येते,' असें ह्मणाले व निजावयाच्या खोलींत जाऊन निजले. राजा आपल्या बायकोसह त्यांच्या जवळ बसून राहिला, ' मला न उठवितां अष्टौप्रहर जागत राहून माझे पाय रगडा, ' असें त्या ऋषींनीं त्यांना सांगितलें. पुढें रात्र सरली असतांही त्यांना न उठवितां त्यांनीं सांगितल्याप्रमाणें तीं दोघें त्यांच्या सेवेमध्यें गढून होतीं. ऋषी याप्रमाणें कुशी देखील न बदलतां एका कुशीवर एकवीस दिवस निजून होते. तें दंपत्य तितके दिवस कांहीं न खातां त्यांच्या सेवेमध्यें दक्ष होतें. एकवीस दिवसांनंतर च्यवन आपल्या आपणच उठले व कांहीं न बोलतां घराबाहेर पडले. तें दंपत्य भुकेनें व श्रमानें अगदीं सुकून गेलें होतें तरी तसेंच त्यांच्या मागून चाललें. तरी ऋषींनीं त्याकडे पाहिलें नाहीं. पुढें ते दोघे बघत असतां त्यांच्या दृष्टीसमोर ते ऋषी गुप्त झाले; तेव्हां राजा एकदम धाडकन् जमिनीवर पडला. क्षणभरानें फिरून तो त्यांना शोधीत निघाला.

पुढें ते कोठें दिसेनासे झाल्यामुळें थकून जाऊन लज्जायमान होऊन वेड्यासारखा तो राजा आपल्या नगराकडे परतला. दीन होऊन च्यवनांच्या त्या कृत्यावरच विचार करीत कोणाशीं कांहीं न बोलतां उद्विग्न झालेला असा तो आपल्या वाड्यांत शिरला असतां त्या ऋषींना फिरून आंथरुणावर निजलेले त्यानें पाहिलें. त्यांना तेथें पाहून आश्चर्यानें तो थक्क झाला. त्यांच्या दर्शनानें त्या दंपत्याचे श्रम परिहार होऊन ते फिरून त्यांच्या जवळ उभें राहून त्यांचें आंग रगडूं लागले. ऋषी दुसऱ्या कुशीवर निजले ते फिरून तितक्याच दिवसांनीं जागे झाले. हे काय करतील न जाणों या भीतीनें त्या दंपत्यानें तोंडावर एवढा देखील विकार दाखविला नाहीं. जागे झाल्यावर, ' माझ्या अंगाला तेल लावा, मी स्नान करणार आहें, ' असें ते ह्मणाले; तेव्हां भुकेनें व्याकुळ होऊन अगदीं दमून गेलें होतें तरी शंभर आंच देऊन काढलेलें उत्तम सुवासिक तेल घेऊन येऊन मुकाट्यानें तें त्यांच्या अंगाला तीं दोघे चोळूं लागलीं. ऋषी पुरे ह्मणून कांहीं ह्मणेनात. तरी त्या दंपत्याच्या तोंडावर कांहीं विकार उमटला नाहीं. हें पाहून एकदम उठून ते स्नानाच्या न्हाणीकडे गेले. स्नानाच्या वेळीं अंगाला लावण्याचे राजोपभोग्य नाना पदार्थ त्या ठिकाणीं ठेवले होते. त्या कशालाच न शिवतां ऋषी फिरून त्या ठिकाणीं गुप्त झाले. तरी राजानें मनांत कांहीं वाईट आणलें नाहीं. पुढें स्नान करून सिंहासनावर बसलेले ते त्या राजाच्या दृष्टीस पडले. तेव्हां तोंडावर यत्किंचितही विकार न दाखवितां हास्यमुख करून तो नम्रपणें, ' अन्न तयार आहे, ' असें ह्मणाला; तेव्हां ऋषी ' आण ' ह्मणून त्याला ह्मणाले. तेव्हां, राजानें मांसाचे नाना प्रकार, नाना प्रकारच्या भाज्या, नाना प्रकारचे मसालेदार पदार्थ, हलकीं पेयें, चवदार अपूपें, नाना प्रकारचे मोदक

व खांडव, त्याचप्रमाणें नाना प्रकारचे रसे व रानामधील मुनीनां योग्य असे पदार्थ, राजोपभोग, नाना प्रकारचीं बोरें, हिंगणबेटें, शिवणीं, बिब्वे इत्यादि गृहस्थ व वनवासी लोकांचीं खाण्याचीं फळें, शापाला भिऊन हजर केलीं. याप्रमाणें आपल्याकरितां ठेविलेलें सर्व अन्न त्याचप्रमाणें आंथरूण, बैठका हीं सर्व आपल्यापुढें आणवून अन्नावर झांकलेल्या पांढऱ्या शुभ्र वस्त्रानिशीं त्या सर्व वस्तू त्यांनीं पेटवून दिल्या तरी त्या दंपत्याला राग ह्मणून मुळीं आला नाहीं. तें बघत असतां ते ऋषी फिरून गुप्त झाले. राजा रात्रभर तसाच कांहीं न बोलतां गप्प होता; परंतु राग ह्मणून त्याला मुळीं आला नाहीं. दररोज त्या राजवाड्यामध्यें नाना प्रकारचें तयार केलेलें अन्न, नाना प्रकारचे बिछाने व स्नानाच्या वेळचे अनेक पदार्थ व नाना प्रकारचीं वस्त्रें तयार ठेविलेलीं असत. त्या च्यवन ऋषींना एवढें देखील कोठें छिद्र सांपडेना; तेव्हां एके वेळीं त्यांनीं त्या राजाला रथांतून आपणास वाहून नेण्यास सांगितलें. तेव्हां, ' फिरावयास जावयाच्या वेळचा रथ जुंपूं, कां लढाईच्या वेळचा रथ जुंपूं. ' ह्मणून राजानें विचारिलें. तेव्हां लढाईच्या वेळचा रथ तयार करून त्यांत आयुधें, पताका, शक्ति, सोन्याची काठी, शेंकडों उत्तम उत्तम बाण तयार ठेवून सोन्यानें त्याला मढवून काढण्यास त्या ऋषींनीं सांगितलें. राजानें बरें ह्मणून त्याप्रमाणें रथ तयार करून आपल्या बायकोला डाव्या जुंवाला जुंपून स्वतःला उजव्या जुंवाला जुंपून घेतलें. तीन मुठीचा वज्रासारखा कठीण व अणीदार एक अंकुश त्यानें त्या रथामध्यें ठेविला. याप्रमाणें सर्व व्यवस्था करून, ' महाराज रथ कोठें न्यावयाचा, सांगाल तेथें घेऊन जाण्यास दास तयार आहें, ' असें तो ऋषींना ह्मणाला. तेव्हां ऋषी ह्मणाले, रथ मला श्रम न होईल अशा मोठ्या सुखकारक रीतीनें घेऊन चला. वाटेंत सर्व लोकांना तें पाहूं दे. वाटेमध्यें येणाऱ्या कोणालाही एकीकडे सारूं नका. त्यांना मी ते जें मागतील तें देणार आहें, तेव्हां विचार न करतां अगदीं मीं सांगितल्याप्रमाणें कर. ' हें ऐकून राजानें, ' ऋषी सांगतील तें सर्व कांहीं विचार न करतां देऊन टाका, ' ह्मणून आपल्या नौकरांना ताकीद दिली. तेव्हां नाना प्रकारचीं रत्नें, स्त्रिया, बकरीं, सोन्याचीं नाणीं, नुसतें सोनें, पर्वतप्राय हत्ती वगैरे घेऊन सर्व प्रधानमंडळ ऋषींच्या मागून चाललें होतें. ते वेळीं नगरामध्यें जिकडे तिकडे हाहाकार उडून गेला होता, राजा आणि राणी तीक्ष्ण असे अंकुश पाठीवर टोंचले जात असतांही तोंडावर यत्किंचित् विकार न दाखवितां पन्नास दिवस उपास पडल्यानें कांपत कांपत कसेबसे तो रथ ओढीत चालले होते. पुष्कळ ठिकाणीं अंकुश टोंचले गेल्यानें ते रक्तबंबाळ झाले होते, तें पाहून पौरजनांना फार दुःख झालें; परंतु शापाच्या भीतीनें कोणाला कांहीं बोलण्याची छाती होईना, दोघे दोघे मिळून आपसांत मात्र कुजबुजूं लागलें कीं, 'तपाचें सामर्थ्य कसें आहे पहा, आह्मी इतके रागावलों आहों तरी मुनींकडे उगीच पहाण्याची आमची छाती नाहीं. केवढें तरी ह्या महर्षीचें हें सामर्थ्य ? त्याचप्रमाणें राजा व राणी यांचेंही धैर्य तरी केवढें कीं, इतके दमले आहेत तरी तोंडावर एवढा सुद्धां विकार न दाखवितां ते कसेबसे रथ ओढीत आहेत !' याप्रमाणें रथ ओढावयास लाविलें असतांही त्या दंपत्याच्या तोंडावर यत्किंचित्ही विकार नाहींसा पाहून कुबेराप्रमाणें ते च्यवनऋषी पैसे उधळीत चालले; तरी राजा मोठ्या आनंदानें त्यांच्या सांगण्याप्रमाणें करीत होता; तेव्हां भगवान च्यवन संतुष्ट होऊन रथांतून उतरून त्या दंपत्याला जुंवापासून सोडवून प्रसन्न होऊन गोड व मधुर शब्दांनीं ह्मणाले, ' मी तुम्हांला वर देण्याला तयार आहें, काय पाहिजे तें मागा. ' असें ह्मणून स्नेहपूर्वक त्यांनीं आपले अमृततुल्य हात त्यांच्या घायाळ झालेल्या अशा सुकुमार अंगावरून फिरविले; तेव्हां राजा म्हणाला, ' भगवन्, आम्हांला श्रम बिलकूल झालें नाहींत. आपल्या प्रभावानें आम्ही ताजेतवाने झालों आहों. ' यावर ऋषी त्याला फिरून ह्मणाले, ' हा गंगेचा रमणीय प्रदेश असल्यानें मी या ठिकाणीं कांहीं वेळ स्वस्थ रहातों. तूं आतां आपल्या बायकोसह नगराला जा, व विसावा घेऊन उद्यां फिरून या ठिकाणीं तूं माझी गांठ घे, मनांत राग बिलकूल आणूं नकोस. तुझें कल्याण जवळ आलें आहे. तुझ्या मनांत असेल तें सर्व होईल. ' असें

ते ह्मणाले असतां, ' महाराज, आमचा राग बिलकूल नाहीं. उलट आम्ही आपल्यामुळें पावन झालों आहों. फिरून आह्मी तरुण व बलवान होऊन तेजःपुंज झालों. आमच्या अंगावरील अंकुशाच्या जखमा अगदीं नाहींशा झाल्या आहेत; आपल्यासारख्या प्रभावशाली पुरुषासंबंधानें त्यांत कांहींच विलक्षण नाहीं. ' असें म्हणून तो त्यांना अभिवादन करून आपल्या बायकोसह नगराला गेला; तेव्हां, अमात्य, पुरोहित, सैनिक प्रधानमंडळ वगैरे मंडळी त्याला सामोरी आली. त्यांच्यामधून भाटांचा स्तुतिपाठ ऐकत मोठ्या आनंदानें तो नगरामध्यें शिरला. सर्व प्रातर्विधी आटोपून जेवण केल्यावर अंगांतील सर्व वेदना दूर होऊन त्या ब्राह्मणश्रेष्ठाच्या प्रसादानें फिरून मिळालेल्या यौवनाचा उपभोग घेत त्या दिवशीची रात्र त्यांनीं नगरांत काढली. इकडे त्या ऋषींनीं एवढ्या अवधींमध्यें तें वन आपल्या योगसामर्थ्यानें इंद्राच्या नगरीलाही मागें सारील अशा रीतीनें वैभवसंपन्न करून सोडलें. दुसरे दिवशीं सकाळीं उठून प्रातर्विधी आटपून राजा आपल्या बायकोसह त्या वनाला गेला असतां, ज्याला अनेक रत्नांचे खांब होते असा गंधर्वनगरासारखा एक भव्य वाडा त्याच्या दृष्टीस पडला. त्या ठिकाणीं सर्व स्वर्गीय व्यवस्था त्याच्या दृष्टीस पडत होती: ज्याला रुपेरी लखलखीत शिखरें आहेत असे पर्वत, कमलांनीं भरून राहिलेलीं सरोवरें, अनेक प्रकारच्या चित्रविचित्र वस्तूंनीं भरलेले वाडे व नानाप्रकारच्या कमानी त्यानें तेथें पाहिल्या. कोठें हिरव्या गवताचें मैदान तर कोठें सोन्यानें मढविलेली भूमी त्याच्या दृष्टीस पडत होती. फुललेले आंबे, केतक, भोकरी, अशोक, कुंद, कुसरी, चांफा, तिवस, फणस, तिळवा, पांगारा, वाघांटी, केळी, अष्टपदिका लता, यांनीं तें ठिकाण जिकडे तिकडे भरगच्च दिसत होतें. ज्यापाशीं नानाप्रकारचीं कमलें वाढून सर्व ऋतूंतील फुलांनीं जीं लगटलीं होतीं, अशीं सुंदर झाडें त्या ठिकाणीं त्याच्या दृष्टीस पडलीं; त्याचप्रमाणें विमानासारखे व पर्वतप्राय असे पुष्कळ सुंदर वाडे व कांहीं गार पाण्याचे व कांहीं कढत पाण्याचे झरेही तेथें त्याच्या दृष्टीस पडले. नानाप्रकारचीं आसनें व ज्यावर पलंगपोस पसरले आहेत असे उत्तम उत्तम बिछाने, रत्नजडित सोन्याचे पलंग, नानाप्रकारचे खाण्याचे पदार्थ, बोलके राघू, सारिका, मोठमोठे भुंगे, कोकिला, सुतार, टिटवी, लावे, मोर, कोंबडे, पाणकावळे, जीवंजीवक, चकोर, वानर, हंस, सारस, चक्रवाक वगैरे मनाला आल्हाद देणारे पक्षी त्या ठिकाणीं मोठ्या आनंदामध्यें असलेले त्याला दिसले. त्याचप्रमाणें कोठें अप्सरांचे तर कोठें गंधर्वांचे घोळके, व कोठें प्रेमालिंगनामध्यें गढलेलीं जोडपीं त्याच्या दृष्टीस पडलीं. हा सर्व प्रकार मधून मधून त्यांना दिसे, मधून मधून दिसेनासा होई. मधून मधून मधुर असा गाण्याचा ध्वनि त्यांच्या कानावर पडे, मधून मधून वेद पढविण्याचा शब्द कानीं येई. मधून मधून हंसांचे सुस्वर शब्द कानीं पडत. हा सर्व प्रकार पाहून हें स्वप्न आहे, कां हा बुद्धीला भ्रम आहे, कां हें सर्व सत्य आहे ह्मणून राजाला भ्रांति पडूं लागली. सशरीर उत्तम गतीला मिळून पवित्र अशा उत्तर कुरूला अगर इंद्राच्या अमरावतीला आपण आलों आहों असें त्याला वाटूं लागलें. हा सर्व अद्भुत चमत्कार काय आहे हेंच त्याला समजेना. याप्रमाणें तो विचारांत मग्न झाला असतां, रत्नाच्या खांबांनीं भरलेल्या त्या सोन्याच्या भव्य वाड्यामध्यें मोठ्या भव्य अशा शयनावर पडलेले ऋषी त्याच्या दृष्टीस पडले, मोठ्या आनंदानें हा त्यांच्याकडे जात आहे तोंच ते ऋषी त्याचप्रमाणें ती शय्या दोन्हीही नाहींशीं झालीं. पुढें जवळच दुसऱ्या वनामध्यें दर्भासनावर जप करीत बसलेले ते त्याच्या दृष्टीस पडले. याप्रमाणें योगसामर्थ्यानें त्या राजाला मोह पाडून एका क्षणामध्यें त्यांनीं तें निर्माण केलेलें वन नाहींसें केलें; व त्या गंगेच्या तीरावर जिकडे तिकडे सामसूम दिसूं लागून तें पूर्वीप्रमाणें दर्भांनीं व वारुळांनीं भरलेलें दिसूं लागलें. यामुळें राजा आश्चर्यचकित होऊन आपल्या बायकोला ह्मणाला, ' प्रिये, पहा. कधीं पहावयाला मिळावयाच्या नाहींत अशा गोष्टी या भगवान मुनींच्या प्रसादानें पहावयास मिळाल्या. तपाच्या सामर्थ्यावांचून याला दुसरें कारण काय देतां येणार ? तपाच्या योगानें वाटेल तें होणें शक्य आहे; कारण, त्रैलोक्याच्या राज्यापेक्षां तप हें श्रेष्ठ आहे. कडकडीत अशा आ-

चरलेल्या तपाच्या योगानेंच मोक्ष मिळणें शक्य आहे. महात्म्या भगवान च्यवन ऋषींचा केवढा तरी हा प्रभाव ! तपाच्या सामर्थ्यानें केवळ मनांत आल्यावरून हे प्रतिलोक निर्माण करतील. पवित्र वाणी, बुद्धि व कर्में यांसाठींच ब्राह्मणांचा जन्म आहे. राज्य मिळणें फार सोपें आहे; परंतु ब्राह्मणत्व मिळणें फार कठीण आहे. त्याच्याच प्रभावानें आज आपण जुंवाला जुंपलों गेलों. याप्रमाणें त्याचे हे विचार ऋषींना कळून त्यांनीं राजाला एकदम जवळ बोलाविलें. तेव्हां वंदनीय अशा त्यांना राजानें नमस्कार केला. तव्हां आशीर्वाद देऊन त्यांनीं त्याला बसावयास सांगितलें. व शांतपणें मधुर शब्दांनीं त्याला तोषवीत ते ह्मणाले, ‘ राजा, तूं आपलीं पांच कर्मेंद्रियें, पांच ज्ञानेंद्रियें व मन पूर्णपणें स्वाधीन ठेविलीं असल्यामुळें आज मोठ्या संकटांतून सुटलास. तूं माझी अगदीं बरोबर रीतीनें आराधना केलीस. तुझ्यामध्यें एवढा देखील दोष मला आढळून आला नाहीं. आतां तुझा निरोप घेऊन मी आलों तसा परत जातों. मी संतुष्ट आहें, वर माग. ’ कुशिक ह्मणाला, ‘अग्नीमध्यें असल्याप्रमाणें आपल्याजवळ असतां आपण मला जाळून टाकलें नाहीं हेंच पुष्कळ आहे. आपण मजवर संतुष्ट झाल्यानें माझ्या कुलाचें रक्षण झालें आहे, हाच मोठा वर मिळाला असें मी समजतों. आपल्या प्रसादाचें, माझ्या जीविताचें, या राज्याचें व माझ्या तपाचें हेंच फल मी समजतों. आतां मला कांहीं संशय आहे तेवढा आपण दूर करा. आपला माझ्या घरीं रहाण्यांत व त्या ठिकाणीं कुशी देखील न बदलतां एकवीस दिवस निजून रहाण्यांत, व कांहीं न बोलतां उठून चालते होण्यांत काय उद्देश होता? आपण अदृश्य होऊन फिरून दृश्य कां झालां? फिरून एकवीस दिवस आपण कां निजलां? अंगाला तेल वगैरे लाविल्यावर स्नान न करितां तसेच निघून कां गेलां? नानाप्रकारचे खाण्याचे पदार्थ आणावयास सांगून ते न खातां जाळून कां टाकिले? नगरांतून रथामधून जाण्यांत आपला उद्देश काय होता? एवढा पैसा जो आपण वांटलांत त्यांत तरी आपला हेतु काय होता? योगसामर्थ्यानें वनामध्यें जो चमत्कार दाखविला तो कशाकरितां? व तो नाहींसा तरी कां केला? या सर्वांचें कारण कळून घेण्याची माझी इच्छा आहे. च्यवन ह्मणाले, ‘सर्व सांगतों ऐक. पूर्वी देवमंडळी जमली असतां त्या ठिकाणीं ब्रह्मदेवाच्या तोंडून मीं ऐकिलें कीं, ब्राह्मण व क्षत्रिय यांच्या भांडणामध्यें माझ्या कुलाचा संकर होणार. तुझा नातू मोठा तेजस्वी व वीर्यवान होणार. तेव्हां तुझ्या कुलाचा जाळून फडशा पाडावा ह्मणून तुझ्या नगरामध्यें येऊन राहून,‘मी कांहीं नियम पाळणार आहें, तूं माझी सेवा कर,’ ह्मणून मीं तुला सांगितलें. तुझ्या घरीं असतांना एवढा देखील तुझा दोष मला दिसला नाहीं ह्मणूनंच तूं अद्यापपर्यंत जिवंत आहेस; नाहीं तर तूं केव्हांच नाहींसा झाला असतास. कांहीं तरी तुझ्यामध्यें दोष सांपडावा, ह्मणूनच तूं मला उठविशील अशा समजुतीवर मी एकवीस दिवस निजलों; तरी तुह्मीं मला उठविलें नाहीं. कोठें निघालां असें तुह्मी विचाराल ह्मणून उठून मुकाट्यानें चाललों तरी तुह्मीं कांहीं विचारलें नाहीं. योगसामर्थ्यानें गुप्त होऊन, फिरून तुझ्या घरीं दृश्य होऊन, भुकेनें व श्रमानें पीडल्यामुळें तरी तुमच्या मनांत माझ्या संबंधानें वाईट येईल म्हणून फिरून एकवीस दिवस निजलों. परंतु त्यामुळें सुद्धां तुह्मांला राग आला नाहीं. तुह्मांला राग यावा म्हणूनच अन्न वगैरे आणून जाळलें व तुह्मांला रथाला लाविलें; परंतु त्या कशानेंच तुला राग न येतां तें सर्व तूं निमूटपणें सोसून घेतलेंस. तुह्मांला संतोषविण्यासाठीं या देहामध्येंच तुह्मांला मीं स्वर्गाची झुळूक दाखविली. ते वेळीं तें पाहून सुद्धां स्वर्गप्राप्तीची इच्छा तुझ्या मनांत न येतां ब्राह्मणत्वाचें महत्व मला देऊन ब्राह्मणत्व असावें असें तुला वाटलें. तेव्हां ती तुझी इच्छा परिपूर्ण होईल. तुझ्यापासून तिसऱ्याला ब्राह्मणत्व येईल. भृगूंच्या सामर्थ्यानें तुझा नातू अग्नीप्रमाणें तेजस्वी असा तपस्वी होईल व सर्वांमध्यें दरारा उत्पन्न करील. मी आतां तीर्थयात्रेला लवकर निघणार.’ कुशिक म्हणाला, ‘आपला हा माझ्यावर मोठा प्रसाद आहे. आपण म्हणतां तसें घडून माझ्या वंशाला ब्राह्मणत्व येवो म्हणजे झालें. आतां तें कसें येणार एवढें कृपा करून सांगाल तर बरें होईल.’ च्यवन म्हणाले, सांगतों ऐक. क्षत्रियांचे यज्ञ करविणारे नेहमीं

भृगु कुळांतले आहेत. दैववशानें या दोषांमध्यें विटुष्ट पडून क्षत्रिय भृगूच्या वंशजांना मारून त्यांचें कुल नाहींसें करतील, आईच्या गर्भांतील मुलांनासुद्धां ते ठेवणार नाहींत, तेव्हां भृगुकुलांत ऊर्व नांवाचे ऋषी उत्पन्न होतील. त्रैलोक्याचा फडशा पाडण्यासाठीं ते क्रोधाग्नि उत्पन्न करतील; व सर्व पृथ्वीची राखरांगोळी उडवितील. पुढें तो अग्नि समुद्रामध्यें वडव्याच्या तोंडांत सोडून त्यांचा तो राग कांहीं कालपर्यंत कमी होईल. त्यांच्या ऋचीक नांवाच्या मुलांना सर्व धनुर्विद्येचें ज्ञान कांहीं दैविककारणामुळें क्षत्रियांच्या समूळ नाशासाठीं आपल्या आपण उत्पन्न होईल. तपानें शुद्ध झालेल्या जमदग्नींना ते ती विद्या देतील. नंतर ते जमदग्नी तुझ्या वंशाला वर काढण्याकरितां तुझ्या वंशांतील तुझी नात गाधीची मुलगी हिच्याशीं लग्न करतील, तिच्यापासून त्यांना क्षत्रधर्मी मुलगा होईल; त्याचप्रमाणें तुझ्या कुळांत गाधीला बृहस्पतीसारखा तेजस्वी, ब्रह्मकर्म करणारा मोठा तपस्वी क्षत्रिय मुलगा त्यांच्या प्रसादानें होईल. या उलटापालटीला ब्रह्मदेवांच्या सांगण्यावरून स्त्रिया कारण होतील. तुझ्यापासून तिसरा पुरुष ब्राह्मण होईल व तुमचा आणि भृगूचा संबंध जडेल.' हें ऐकून कुशिकाला मोठा आनंद झाला व 'माझें कुल ब्राह्मण होऊन धर्मामध्यें त्याचें मन गढून असो, एवढाच वर मला पुरे आहे,' असें तो म्हणाला, 'बरें आहे,' असें म्हणून च्यवन त्याला विचारून तीर्थयात्रेला निघून गेले.'

---

## २९२ निरनिराळ्या दाननियमांचीं फळें.
## (१३. ५७-५९)

'कोट्यावधि राजांना रणांत मारल्यामुळें मनाला संताप वाटत असून त्यांच्या स्त्रियांची काय गति होणार, खालीं डोकें करून आपल्याला खात्रीनें नरकांत पडावें लागणार, तेव्हां कडक तपाकडे शरीर लावावें हें चांगलें,' या विचारापासून युधिष्ठिराचें मन अद्याप फिरत नाहींसें पाहून भीष्म विचार करून त्याला म्हणाले, 'ज्या योगानें जी गति मिळते तें गूढ तुला सांगतों ऐक. तपानें स्वर्ग मिळतो, तपानें यश मिळतें, तपानें आयुष्य, वैभव, नानाप्रकारचे भोग, ज्ञान, विज्ञान, आरोग्य, रूप, संपत्ति, सौभाग्य, द्रव्य वगैरे मिळतें. मौनव्रत धरल्यानें सर्व जग त्याच्या ताब्यांत असतें. दानाच्या योगानें नाना प्रकारचे उपभोग मिळून पुष्कळ पैसा मिळतो. ब्रह्मचर्य पाळल्यानें आयुष्य वाढतें. अहिंसेचें फल रूप आणि आरोग्य व दीक्षा धरल्याचें फल उत्तम कुळांत जन्म आहे. फलमूलावर रहाणाऱ्याला राज्य मिळून, पानावर, पाण्यावर किंवा गवतावर रहाणाऱ्याला स्वर्ग मिळतो. गुरुशुश्रूषेनें विद्या व नित्यश्राद्धानें संतति होते. भाजीपाला खाऊन रहाणाऱ्या मनुष्याजवळ गुरांची समृद्धि होते. तीन वेळ नियमपूर्वक स्नान करून राहिल्यानें चांगल्या बायका मिळतात. वायु भक्षण करून राहिल्यानें प्रजापतीचे लोक मिळतात. नेहमीं स्नान करून सकाळ संध्याकाळ जप करीत रहाणारा दक्षस्वरूप होतो. निर्जल अशा प्रदेशीं कांहीं न खातां साधन करीत रहाणारा मनुष्य स्वर्गाला चढतो. स्थंडिलावर पडून रहाणाऱ्यांना चांगलीं घरें व बिछाने मिळतात. चिंध्या व साली नेसून रहाणाऱ्यांना उत्तम वस्त्रालंकार मिळतात. योगामध्यें गढून रहाणाऱ्या तपस्व्याला उत्तम बिछाने, आसनें व गाड्याघोडीं मिळतात. अग्नीमध्यें प्रवेश केल्यानें ब्रह्मलोकामध्यें त्याचा बहुमान होतो. नानाप्रकारच्या गोडीला न चटकल्यानें दैव उदयाला येतें. मांस न खाल्ल्यानें दीर्घायुषी संतति होते. पाण्यामध्यें बुडून रहाणारा राजा होतो. खरें बोलणारा मोठ्या आनंदानें देवांमध्यें रहातो. दानाच्या योगानें कीर्ति वाढते. ब्राह्मणाची सेवा केल्यानें राज्य व ब्राह्मणत्व मिळतें. पाणी, सुवासिक पदार्थ व फळें दिल्यानें शाश्वत कीर्ति होते. अन्न दिल्यानें सर्व प्रकारच्या इच्छा तृप्त होऊन नानाभोग मिळतात. सर्व भूतमात्रांना शांति देणाऱ्याला शोक म्हणून उरत नाहीं. देवाच्या शुश्रूषेनें राज्य व दिव्यरूप मिळतें. अंधाराच्या ठिकाणीं दिवा ठेविल्यानें मनुष्य डोळस होतो. चांगल्या वस्तू दिल्यानें आठवण व बुद्धि वाढते. केंस व दाढी वाढविल्यानें चांगली संतति होते. बारा वर्षेपर्यंत दीक्षा धरून स्नान करून, उपवास करीत राहिल्यानें वीराला मिळणाऱ्या स्थानाहून श्रेष्ठ स्थान मिळतें. ब्राह्मविधीनें मुलीचें लग्न करून दिल्यानें दासदासी, अलंकार, शेतें व घरें मिळतात. यज्ञ व उपवास यांनीं मनुष्य

स्वर्गाला जातो. फलपुष्पें दिल्यानें मनुष्याला उत्तम ज्ञान प्राप्त होतें. सुवर्णमंडित शिंगाच्या हजार गाई दिल्यानें देवलोक मिळतात. वांसरासह सुवर्णमंडित शिंगाची कपिला गाय व त्याबरोबर धारेला कांसेचें भांडें दिल्यानें ती गाय त्या मनुष्यांच्या त्या त्या इच्छा परिपूर्ण करते. गोप्रदान केल्यानें त्या गाईच्या अंगावर जितके केंस असतात तितके दिवस तो स्वर्गांत राहून तो आपल्या पुत्रपौत्रांना व सात पिढ्यांपर्यंत सर्व कुलाला तारतो. धारेसाठीं कांसेच्या भांड्यासह सोन्याची शिंगाची तिळाची गाय वर मौल्यवान वस्त्रें घालून देऊन त्यावर दक्षिणा दिली असतां मनुष्य वसूंचे लोक जवळ करतो. आपल्या कर्मांनीं जखडून जाऊन भयंकर अंधारानें भरलेल्या नरकामध्यें बुडत चाललेल्या मनुष्याला महासागरांत वहात आलेल्या नावेप्रमाणें गोदान तारतें. जो ब्राह्मविधीनें मुलीचें लग्न करून देतो, ब्राह्मणाला भूमिदान देतो, त्याचप्रमाणें विधिपूर्वक अन्न देतो, त्याला इंद्रलोक मिळतो. जो शय्यादि सर्व सामानासह थाटविलेलें घर वेदाध्ययन व आचरण यांनीं शुद्ध अशा ब्राह्मणाला देतो, त्याला उत्तर कुरूमधील चांगले लोक मिळतात. जुंवाला लावण्यासारखे बैल दान केल्यानें वसूंचे लोक मिळतात. सुवर्णदानानें स्वर्गलोक मिळतो. व शुद्ध सोनें दिल्यानें त्याहून श्रेष्ठ लोक मिळतात. छत्री दिल्यानें चांगलें घर मिळतें व जोडा दिल्यानें गाड्याघोडीं मिळतात. वस्त्रदान केल्यानें उत्तम स्वरूप मिळतें व सुवासिक पदार्थ दिल्यानें मनुष्याच्या अंगाला सुवास रहातो. फलपुष्पांनीं संपन्न असें झाड दिल्यानें मोठें वैभवसंपन्न व अनेक रत्नांनीं परिपूर्ण असें घर त्याला मिळतें. नानाप्रकारचे खाण्यापिण्याचे पदार्थ दिल्यानें मनुष्याला खात्रीनें तशा प्रकारचे पदार्थ मिळतात. माला, धूप, सुवासिक पदार्थ, उटणीं, निरनिराळे स्नानाचे पदार्थ त्याचप्रमाणें फुलें ब्राह्मणाला दिल्यानें मनुष्य निरोगी व रूपवान होतो. धान्य व शय्या यांनीं भरलेलें घर ब्राह्मणाला दिल्यानें मनुष्याला नानारत्नांनीं भरलेलें घर मिळतें. सुवासिक अशा चित्रविचित्र आच्छादनांनीं झांकलेला बिछाना उशांसह ब्राह्मणाला दिला असतां थोर कुळांतील रूपसंपन्न अशी बायको त्याला अनायासानें मिळते. वीरशय्येवर पडणारा ब्रह्मदेवाच्या तोडीचा होतो. याहून श्रेष्ठ फल कशांतच नाहीं.

आतां जी ही सुंदर, वीर्यशाली, चित्रविचित्र, व अनेक धातूंनीं विभूषित व नानाभूतमात्रांनीं भरलेली भूमि श्रेष्ठ समजली आहे, तिच्या कोणकोणत्या भागाला तलाव बांधण्यांत किंवा जलाशय तयार करण्यांत काय काय विशेष फायदे आहेत ते सांगतों ऐक. तलाव बांधणारा तिन्ही लोकांत पूज्य होतो. तलाव हा मित्राच्या घराप्रमाणें सुखकर असून सूर्याला आनंद देणारा व देवांचा पोषक आहे. तलाव खणल्यानें मोठी कीर्ति होते. त्याच्या योगानें धर्मार्थकाम या तिहींचें फल मिळतें. उत्तम ठिकाणीं खणलेला चांगला तलाव चारी प्रकारच्या भूतमात्रांना आधार होतो. तलाव हे त्या ठिकाणचें वैभव दाखवितात. देव, गंधर्व, मनुष्य, राक्षस, पितर व सर्व चराचर भूतमात्र जलाशयाचा आश्रय करतात, ह्मणून या तलावापासून फार मोठें फल मिळतें. ज्यानें खणलेल्या तलावांत पावसाळ्यांत पाणी रहातें त्याला अग्निहोत्राचें फल मिळतें. ज्याच्या तलावांत शरत्कालीं पाणी रहातें त्याला मेल्यावर हजार गाई दिल्याचें फल मिळतें. हेमंतकालीं ज्याच्या तलावांत पाणी रहातें त्याला पुष्कळ सोनें देऊन केलेल्या यज्ञाचें फल मिळतें. शिशिरऋतूमध्यें ज्याच्या तलावांत पाणी रहातें त्याला अग्निष्टोम यज्ञ केल्याचें फल मिळतें. ज्यानें खणलेला उत्तम तलाव वसंतऋतूमध्यें आश्रयाचें ठिकाण होतो, त्याला अतिरात्र यज्ञाचें फल मिळतें. उन्हाळ्यांत ज्याच्या तलावांत पाणी असतें त्याला अश्वमेधाचें फल मिळतें. ज्यानें खणलेल्या तलावांत गाई, भले लोक, व पशुपक्षी पाणी पितात त्याला अश्वमेधाचें फल मिळून तो आपल्या कुळाला उद्धरतो. त्यांतील पाणी जें पिण्याकडे, स्नानाकडे किंवा आराम देण्याकडे लागतें त्याच्या अनंतपट फल मेल्यावर त्याला मिळतें. मेल्यावर पाणी मिळणें फार मुष्किलीचें काम आहे; ह्मणून पाणी दिल्यानें शाश्वत सुख मिळतें. नेहमीं तीळ, पाणी, व दिवा देऊन जागत राहून ज्ञातिमध्यें आनंदांत रहावें. हें मेल्यावर मिळणें कठीण आहे. पाणी देणें सर्व दानांत श्रेष्ठ आहे.

आतां झाडें लावण्यामध्यें काय पुण्य आहे तें सां-

गतों ऐक. झाडें, झुडपीं, लता, वेली, वासाच्या जातीचे व गवताच्या जातीचे असें स्थावरामध्यें सहा प्रकार आहेत. हीं लावल्यानें मनुष्याची या लोकीं कीर्ति होऊन मेल्यावर उत्तम लोक मिळून पितरांबरोबर बहुमानामध्यें तो रहातो. देवलोकीं गेल्यावर सुद्धां त्याचें नांव मागें पडत नाहीं. बापाच्या कुळांतील मागचे पुढचे या सर्वांना तो तारतो. हीं झाडें त्याच्या मुलाच्या ठिकाणीं होतात, व परलोकाला गेल्यावर त्याला अक्षय्य लोक मिळतात. या त्यानें लाविलेल्या झाडांच्या फुलांनीं तो देवांना, फळांनीं पितरांना व छायेनें अतिथीला तोषवितो. देव, गंधर्व, मनुष्य, ऋषिगण सर्व झाडांचा आश्रय करतात. हीं आपल्या फळांनीं व फुलांनीं लोकांना संतोषवितात. झाडें लावणाराला तीं मुलाप्रमाणें तारतात; ह्मणून तलावाजवळ कल्याणेच्छूनें चांगलीं चांगलीं झाडें लावून तीं चांगलीं संभाळावींत. ज्यानें तलाव बांधिले आहेत, झाडें लाविलीं आहेत, यज्ञ केले आहेत व जो सत्यवादी आहे या सर्वांना स्वर्गामध्यें बहुमान मिळतो.

आतां वेदाच्या बाहेर जीं दानें सांगितलीं आहेत त्यामध्यें श्रेष्ठ दान कोणतें तें सांगतों ऐक. सर्व भूतमात्रांना अभय देणें, संकटांत असणाऱ्यावर अनुग्रह करणें, जरूर असून मागणाऱ्याला तो मागतो तें मीं हें दिलें असा अभिमान न धरतां देणें, त्याचप्रमाणें सुवर्णदान, गोदान व पृथ्वीदान करणें हीं दानें मनुष्याच्या बरोबर राहून त्याला पापापासून मुक्त करून तारतात. हीं दानें नेहमीं भल्याला करावीं. लोकांमध्यें जें जें पाहिजे असेल व आपल्या घरीं जें आवडीचें असेल तें तें आपल्याला अक्षय्य वैभव असावें अशी इच्छा असणाऱ्यानें देत असावें. नेहमीं दुसऱ्यांच्या मनाप्रमाणें वागून त्यांना पाहिजे ती वस्तु देणारा सर्वांना आवडता होऊन पाहिजे तें त्याला मिळत असतें. जो अभिमानामुळें निराश्रित अशा तोंड पसरणाऱ्या गरीबाला देत नाहीं तो दुष्ट समजला पाहिजे. दीन असून शरण आलेला, मग तो शत्रु असला तरी जो संकटांत असतां त्याच्यावर अनुग्रह करतो तोच खरा पुरुष. जो विद्वान असून अगदीं वाळून गेला आहे व ज्याला पोट भरण्याला साधन नाहीं, अशा संकटांत पडलेल्या मनुष्याची भूक जो शमवील त्याच्या तोडीचा मनुष्य नाहीं. बायकापोरांनीं गांजल गेले असून नेमधर्मानें वागणाऱ्या भल्यांना ते याचना करीत नसले तरी त्यांना हरतऱ्हेनें बोलवून घ्यावें. जे देव किंवा मनुष्य यांना तोंड पसरीत नसून पात्र आहेत, व मिळेल त्यावर नेहमीं संतुष्ट असतात, अशा आपल्या तेजानें सापाप्रमाणें उग्र असलेल्या लोकांपासून शहाणपानें आपलें रक्षण करून घ्यावें; त्या श्रेष्ठ ब्राह्मणांची मांहिती आपल्या मुद्दाम त्या कामाकडे लावलेल्या लोकांकडून काढून घेऊन त्यांना बोलवून घेऊन घरदार, नोकर, सामानसुमान वगैरे जिनसा याव्या. भल्या धार्मिकांनीं कर्तव्य ह्मणूनच दुसरा कांहीं हेतू न धरितां दान करावें. अशा प्रकारचें श्रद्धापूर्वक दिलेलें दानच चांगले लोक घेत असतात. विद्येनें व व्रतानें शुद्ध असे कांहीं लोक आपल्या उदरनिर्वाहाकरितां कोणावर अवलंबून रहात नसतात. वेदाध्ययन व तप यांकडे लक्ष लावून आपलें कृत्य ते कोणाला सांगत नसतात. अशा शुद्धशील इंद्रियनिग्रही व आपल्या बायकोवर समाधान मानून असणाऱ्या मनुष्याला दिलेलें दान आपल्या बरोबर त्रैलोक्यामध्यें येत असतें. अग्निहोत्रामध्यें दिलेल्या शुद्ध आहुतीचें जें फळ आहे तें अशा दानाचें फल आहे; तेव्हां अशा प्रकारचें दान सर्वांहून श्रेष्ठ आहे. अशा प्रकारच्या लोकांसंबंधानें केलेल्या ह्या यज्ञामध्यें दान देण्याच्या वस्तूवर शिंपडलें जाणारें पाणी हेंच पितरांना यावयाच्या अन्नाचें काम करतें, व त्या संबंधानें दाखविलेली भक्ति व सत्कार यांच्या योगानें मनुष्य देवऋणांतून मुक्त होतो. जे कधीं रागाच्या तावडींत न जातां दुसऱ्याच्या काडीचा सुद्धां लोभ धरीत नाहींत व गोड बोलतात असे लोक सत्काराला पात्र होत. हे लोक आपल्याला दिलेल्या दानाबद्दल दात्याचे मिंधेपणानें मोठेसे आभार मानीत नाहींत, व अशा प्रकारचें दान मिळण्याचीही फारशी खटपट करीत नाहींत. तरी दात्यांनीं मुलाप्रमाणें अशांचें परिपालन करावें. त्यांना नमस्कार करीत जाऊन अभय देत जावें ऋत्विज, पुरोहित, आचार्य यांना वेद येत असून दुसऱ्याच्या ठिकाणीं मृदुपणा असल्यानें ते अ-

शा प्रकारचे होतात. क्षत्रियतेजाचें ब्राह्मणावर कांहीं चालत नाहीं. मी राजा आहें, माझ्या अंगीं पुष्कळ बळ आहे, मजजवळ पुष्कळ पैसा आहे, या घमेंडींत राजानें ब्राह्मणाला सोडून अन्नवस्त्राचा उपभोग घेऊं नये. क्षत्रियधर्म पाळून त्यानें आपल्याजवळ जें कांहीं असेल त्याच्या योगानें ब्राह्मणाचा सत्कार करावा. योग्य रीतीनें वागणाऱ्या ब्राह्मणांना नमस्कार करीत राहून त्यांना खुशाल मुलाप्रमाणें आपल्याशीं लडिवाळपणानें वागूं द्यावें; नेहमीं प्रसन्न राहून हितचिंतन करणारे व थोडक्यांत संतुष्ट असणारे अशा ब्राह्मणांचें पोट भल्या राजावांचून दुसरा कोण चालविणार ? ज्याप्रमाणें स्त्रियांचा नवऱ्याच्या आज्ञेमध्यें रहाणें हा पूर्वापार धर्म आहे, त्याचप्रमाणें क्षत्रियांना ब्राह्मणाशिवाय गति नाहीं. क्षत्रियांमध्यें दिसून येणाऱ्या क्रूरतेमुळें ब्राह्मणांचा सत्कार न होऊन त्यांनीं जर त्यांना सोडलें तर आपलें काम न बजावतां वेदसंस्कार, यज्ञसंस्कार व परलोक यांना मुकून राहणाऱ्या त्या क्षत्रियांच्या जगण्यामध्यें तरी काय अर्थ आहे ? या संबंधी पुरातन धर्म असा आहे कीं, पूर्वीं राजे ब्राह्मणांची सेवा करीत आले असून, वैश्य राजांची सेवा करीत आले व शूद्र वैश्यांची सेवा करीत आले. अग्नीप्रमाणें झळकणाऱ्या ब्राह्मणाची शूद्रानें दुरून सेवा करावी; क्षत्रिय व वैश्य यांना मात्र शिवून सेवा करण्याचा अधिकार आहे. सौम्य स्वभावाचे, सत्यशील व खरेपणानें वागणारे असे ब्राह्मण रागावले असतां सापाप्रमाणें असतात. सर्व लहानथोरांहून ते श्रेष्ठ आहेत. तेज व बल यानें झळकणाऱ्या क्षत्रियाचें तेज व तप यांच्या ठिकाणीं गार पडतें. ब्राह्मणाहून अधिक प्रिय मला कांहींच नाहीं हें मी तुला अगदीं खरोखर सांगतों; आणि याच खरेपणामुळें मला ब्रह्मलोकादि उत्तम लोक मिळून त्या ठिकाणीं मी चिरकाळ राहीन. हे लोक मला डोळ्यांपुढें आज प्रत्यक्ष दिसत आहेत, आणि त्याचमुळें मला आजपर्यंत मी ब्राह्मणांशीं ज्या रीतीनें वागत आलों त्याबद्दल वाईट वाटत नाहीं.'

---

## २५३ याचना. (१३. ६०)

युधिष्ठिर म्हणाला, 'आचार, विद्या व जन्म यांनीं सारखे असून एक याचना करीत नाहीं व एक याचना करतो तर अशांमध्यें दानाला योग्य कोण ?' भीष्म म्हणाले, 'धीर सोडून दीनवाणें तोंड पसरणाऱ्यापेक्षां धैर्यानें राहून न मागणारा दानाला विशेष पात्र आहे. रक्षण करण्यामध्यें क्षत्रियाचें धैर्य दिसून येत असून न मागण्यामध्यें ब्राह्मणाचें धैर्य दिसून येतें. धैर्यानें आपल्या स्थितींत संतुष्ट रहाणारा विद्वान ब्राह्मण देवांना सुद्धां संतुष्ट करतो. तोंड पसरणें हा आपल्यावर ताबा नसणाऱ्या दुबळ्या मनुष्याचा निंद्य गुण समजला आहे, तोंड पसरणारे नेहमीं सर्व प्राणीमात्रांना चोराप्रमाणें घाबरवून सोडतात. याचना करणारा मृत्यूच्या तावडींत सांपडत असून देणारा कधीं सांपडत नाहीं. उलट तो स्वतःला व याचना करणाराला त्यापासून सोडवितो. दया हा श्रेष्ठ धर्म असल्यामुळें याचना करणाराला तो मागतो तें त्यामुळेंच देण्यांत येतें. संकटांत असून न मागणारांना आपल्याकडे हरप्रयत्नानें बोलवून घ्यावें. असे लोक राखेंत झांकून असलेल्या अग्नीप्रमाणें जर आपल्या राष्ट्रामध्यें रहात असतील तर हरप्रयत्नानें त्यांना शोधून काढावें. जपानें झळकणाऱ्या अशांचा सत्कार न होईल तर ते या सर्व पृथ्वीला जाळून टाकतील. अशा प्रकारचे लोक बहुमानाला पात्र असतात. ज्ञान, विज्ञान, तप, योग यांनीं युक्त अशा या पूज्य ब्राह्मणांचा बहुमान करावा. जे याचना करीत नाहींत त्यांच्याकडे जाऊन आपण त्यांना पाहिजे असेल तें द्यावें. सकाळ संध्याकाळ यथाविधि आहुती दिलेल्या अग्निहोत्राचें जें फळ आहे तें फळ वेदसंपन्न व व्रतशील ब्राह्मणाला दान केल्यांत आहे. विद्या, वेद, व्रत यांनीं शुद्ध होऊन जे पोटासाठीं दुसऱ्यावर अवलंबून नसतात व ज्यांच्या ठिकाणीं वेद व तप हीं झांकून असतात अशा कडकडीत ब्राह्मणांना बोलावून नोकरमाणसें व सामानसुमान यांनीं थाटविलेलीं घरें देऊन व दुसऱ्या त्यांच्या वासना पूर्ण करून त्यांना संतुष्ट करावें. धर्माचा सारासारविचार कळणारे असे हे ब्राह्मण श्रद्धापूर्वक दिलेलें दानच, दात्याला विन्मुख करूं नये म्हणून प्रतिग्रह घेत असतात; ज्यांच्या बायका, शेतकरी ज्याप्रमाणें पावसाची वाट पहात असतात

त्याप्रमाणें आपल्या नवऱ्याची वाट पहात असतात, अशा ब्राह्मणांना बोलवून त्यांना पोटभर अन्न देऊन घरीं अन्नासाठीं काव काव करीत असून पुढची आशा दाखवून त्यांच्या बायकांनीं गप्प ठेविलेल्या मुलांना देतां येईल एवढी सामुग्री त्यांच्या बरोबर द्यावी. आत्मनिग्रही ब्राह्मण दुपारच्यावेळीं घरीं जेविल्यानें ते ज्याच्या घरीं जेवतात, त्या गृहस्थाचे तीन अग्नी तें संतुष्ट करतात. माध्यान्हकाळीं दानयज्ञ आपल्या घरीं सुरू ठेवून गृहस्थानें गाय, सोनें, वस्त्रें दान देत असल्यानें मनुष्य प्रत्यक्ष इंद्राला संतुष्ट करतो. देव, पितर व ब्राह्मण यांना जें दिलें जातें तें तिसऱ्या यज्ञाच्या ठिकाणीं होत असून तेंच वैश्वदेवाच्या ठिकाणीं होतें. सर्व प्राणिमात्रांना अभय देऊन आपण खातों तें त्यांना देणें, इंद्रियनिग्रह करून दान करणें, त्याग करणें, धैर्य व सत्य धरणें हेंच या दानयज्ञाचें अवभृत स्नान आहे. भक्ति, श्रद्धा व पुष्कळ दक्षिणा यांनीं या यज्ञाला पवित्रता आली आहे. हा यज्ञ सर्वांहून विशेष आहे.'

## २५४ दान व यज्ञ यांमधील वैशेष्य.
## (१३–६१)

युधिष्ठिर ह्मणाला, 'दानाचें फळ मोठें किंवा यज्ञाचें मोठें, व तें फळ मनुष्याला येथें मिळतें कीं, परलोकीं ? दान कोणाला करावें, दान व यज्ञ कशा रीतीनें व केव्हां करावे, यज्ञवेदीमध्यें केलेलें दान श्रेष्ठ किंवा तिच्या बाहेर केलेलें दान श्रेष्ठ ?' भीष्म ह्मणाले, 'क्षत्रिय नेहमीं क्रूर कर्मांत गढला असल्यानें यज्ञ व दान हीं त्याला शुद्ध व पावन करणारीं समजलीं आहेत. पापामध्यें गढलेल्या क्षत्रियापासून साधू लोक कधीं दान घेत नाहींत; ह्मणून राजानें यज्ञ करून त्यांत पुष्कळ दान करावें. जर भले लोक राजापासून दान घेण्याला तयार होतील तर मोठ्या श्रद्धापूर्वक त्यानें वारंवार दान करीत रहावें; कारण हेंच चांगलें असून त्याला पावन करणारें आहे. व्रतशीलतेनें यज्ञ करून, सर्व भूतमात्रांचा मित्र, धार्मिक, वेदवेत्ता, शील, वर्तन व तप यांनीं संपन्न अशा ब्राह्मणाला राजानें संतुष्ट करावें. अशा प्रकारचे ब्राह्मण जर आपलें दान घेणार नाहींत तर आपल्याला कांहींच पुण्य लागणार नाहीं. पुष्कळ दक्षिणा देऊन यज्ञ करून साधूंना त्यांत चांगलें अन्न खाऊं घालावें. दान दिल्यानें आपल्या हातून यज्ञच होतो आहे असें समजावें. यज्ञ करणाऱ्या ब्राह्मणांना दान द्यावें, त्याच्या योगानें त्यांच्या यज्ञाच्या फळाचा वांटा आपल्याला मिळतो. दुसऱ्याला स्वर्गाला पाठविण्याला समर्थ अशा, मुलेंबाळें असलेल्या ब्राह्मणांना पोसल्यानें मनुष्याला संतति होते. भले लोकच सत्कृत्यांना आधारभूत होतात. ह्मणून मनुष्यानें सर्वस्वानें अशा लोकांना पोसावें. स्वतः वैभवाचा उपभोग घेत असतां आपण ब्राह्मणांना गाय, बैल, अन्न, छत्री, वस्त्र, जोडे, गाड्या, घोडीं, सरंजामासह घोडे, घरें वाडे, बिछाने वगैरे दान करावें. अशा प्रकारचीं दानें वैभवकारक, संपत्तिदायक व शुद्ध समजलीं आहेत. ज्यांच्या वर्तनामध्यें दोष काढण्याला एवढी देखील जागा नाहीं आणि ज्यांच्या जवळ उदरनिर्वाहाचें साधन नाहीं, अशा ब्राह्मणांना शोधून काढून गुप्तपणें किंवा उघडपणें त्यांचा समाचार घ्यावा. याच्यामुळें राजसूय किंवा अश्वमेध केल्यापेक्षांही अधिक फल मिळून मनुष्य सर्व पापांतून मुक्त होऊन खात्रीनें स्वर्गाला जातो. खजिना भरून राजानें आपल्या राष्ट्राचें पालन केलें असतां दुसऱ्या जन्मीं त्याला ब्राह्मणत्व येऊन पुष्कळ पैसा मिळतो. राजानें आपली व दुसऱ्याची वृत्ति राखून आपल्या नोकरांना व प्रजेला मुलाप्रमाणें संभाळावें. ब्राह्मणांचें नेहमीं योगक्षेम पहात राहून त्यांच्याकरितांच राजानें आपलें जीवित आहे असें समजावें. त्यानें त्यांचें पालन न करतां राहूं नये. पैशाचा संचय करणें हें ब्राह्मणाला मोठें अनर्थकारक आहे. पैशाशीं नेहमीं संबंध जडल्यानें त्याला ताठा चढून त्याच्या मनाला भुरळ पडण्याचा संभव आहे, व याप्रमाणें तो मूढ बनल्यावर धर्माचा खात्रीनें नाश होणार व धर्म नाहींसा झाल्यानें प्राणिमात्रांचें अस्तित्वच बुडणार. सांठविलेला पैसा खजीनदाराच्या स्वाधीन करून जो आपल्या कामगारांना प्रजेपासून मिळेल तेवढा पैसा यज्ञासाठीं बुचाडून आणा ह्मणून सांगून भीति दाखवून राष्ट्राला धुवून काढतो, व अशा क्रूरपणें लुबाडलेल्या पैशानें यज्ञ करतो त्या यज्ञाबद्दल भले

लोक त्याची कधीं वहावा करीत नाहींत. भरभराटीमध्यें असणाऱ्या लोकांकडून खुषीनें जो पैसा मिळेल त्याच पैशानें राजानें यज्ञ करावा. प्रजेला पिळून काढलेल्या पैशानें त्यानें कधीं यज्ञ करूं नये. जेव्हां प्रजेच्या हितामध्यें हा दक्ष असल्यानें प्रजा खुषीनें आणून पैशाचा त्याच्यावर वर्षाव करतात, तेव्हां अशाच पैशानें त्यानें यज्ञ करून त्यांत पुष्कळ दक्षिणा द्यावी. ह्मातारे, अज्ञान, आंधळे, दुबळे अशा लोकांचें द्रव्य राजानें संभाळावें. दुष्काळामध्यें विहिरी वगैरे खणून कसाबसा आपला उदरनिर्वाह करणारे त्याचप्रमाणें पोटासाठीं धाय धाय रडणाऱ्या स्त्रिया यांना राजानें बुचाडूं नये. गरीब व निराश्रित अशा लोकांपासून घेतलेला पैसा राष्ट्राचा त्याचप्रमाणें राजलक्ष्मीचा फडशा पाडतो. राजानें भल्या लोकांना नेहमीं भोग्य वस्तु देत राहून त्यांची उपाशी मरण्याची भीति नाहींशी करावी. ज्याच्या अन्नाकडे मुलें आतुरतेनें डोळे लावतात अशा मनुष्यापेक्षां पापी मनुष्य दुसरा कोणी नाहीं. असा मुलाप्रमाणें भुकेनें व्याकुळ होऊन जर एखादा ब्राह्मण एखाद्या राष्ट्रामध्यें उपाशीं मरेल तर अशा कृत्याबद्दल त्या राजाला भ्रूणहत्येचें पातक लागतें. ज्याच्या राष्ट्रामध्यें एखादा ब्राह्मण किंवा दुसरा एखादा मनुष्य उपाशीं मरतो त्याला धिक्कार असो, असें प्रत्यक्ष शिवी ह्मणाला आहे. ज्याच्या राष्ट्रांत स्नातक ब्राह्मण उपाशीं मरतो तो राजा व तें राष्ट्र विपत्तींत सांपडतें. अशा प्रकारचा राजा निंदेला पात्र होतो. ज्या राष्ट्रामध्यें नवरा व मुलें राग व दुःख यांनीं रडत असतां त्यांच्यामधून बायका सहज उपटून नेल्या जातात तें राष्ट्र असून नसल्यासारखें आहे. जो राजा प्रजेचें रक्षण न करतां केवळ तिला लुटीत सुटतो, व सर्व भेदाभेद बाजूला ठेवितो, व जो त्यांचा पुढारीपणा घेत नाहीं, त्यांची दया करीत नाहीं, किंवा जो अतिपापी आहे, अशा राजाला ठार करण्याला प्रजेनें हत्यार उपसावें. मी तुमचें रक्षण करतों असें सांगून जो प्रजेचें रक्षण करण्याला समर्थ नाहीं, अशा राजाला पिसाळलेल्या रोगिष्ट कुत्र्याप्रमाणें प्रजेनें मिळून ठार करावें, जो राजा प्रजेचें रक्षण करीत नाहीं, त्याच्या माथीं प्रजेचें सर्व पाप लागतें असें कांहीं शास्त्रकार ह्मणतात, कांहीं अर्धे पाप लागतें असें ह्मणतात; पण मी मनूच्या आधारावरून एक चतुर्थांश लागतें एवढेंच ह्मणतों; त्याचप्रमाणें जो प्रजेचें रक्षण करतो त्याच्या रक्षणाखालीं असलेल्या प्रजेच्या पुण्याचाही चौथा हिस्सा त्याला मिळतो. भूतमात्रांना पावसाप्रमाणें, पक्ष्यांना मोठ्या झाडाप्रमाणें, राक्षसांना कुबेराप्रमाणें, देवांना इंद्राप्रमाणें, आपल्या प्रजांना आपण आजन्म आधार वाटूं अशा रीतीनें राजानें आपलें वर्तन ठेवावें. ज्ञाति व सुहृद् हे आपल्या आश्रयानें रहातील असें आपलें वर्तन असावें.'

---

## २९९ भूमिदान. ( १३. ६२ )

युधिष्ठिर ह्मणाला, 'हें द्यावें, तें द्यावें, अशा निरनिराळ्या श्रुती असून राजांना देण्यासारखें पुष्कळ असतें. तेव्हां सर्वांत श्रेष्ठ दान कोणतें ?' भीष्म म्हणाले, 'सर्व दानांमध्यें पृथ्वीदान पहिलें आहे. अचल व अक्षय्य अशी ही भूमि नानाप्रकारचे उत्तम मनोरथ पूर्ण करणारी आहे. वस्त्रें, रत्नें, पशू, धान्य, सर्व ही देते. भूमिदान करणारा मनुष्य फार दिवस वैभव भोगतो. जोंपर्यंत पृथ्वी कायम आहे तोंपर्यंत तो वैभवांत असतो. याच्याहून श्रेष्ठ दान दुसरें नाहीं. सर्वांनीं थोडेंबहुत पृथ्वीदान केल्याचें आमच्या ऐकण्यांत आहे व त्या पृथ्वीदानामुळेंच त्यांना पृथ्वीचा उपभोग मिळतो. या जगांत म्हणा किंवा पुढल्या जगांत म्हणा, मनुष्य आपापल्या कर्माप्रमाणें असतो. पृथ्वी हीच वैभवकारक मोठी देवी असून तिचें दान करणाऱ्या मनुष्याचें ती प्रिय करते. ही अक्षय्य भूमि दान करणारा मनुष्य पुढें मनुष्यजन्माला येऊन पृथ्वीपति होतो. मनुष्याचें या जन्मांतील सुख त्याच्या पूर्वजन्मींच्या दानाच्या प्रमाणावर असतें. रणांत मरणें किंवा पृथ्वीदान करणें हेंच क्षत्रियाला वैभवकारक आहे. पृथ्वीदानानें मनुष्य पावन होतो. जो मनुष्य पापी, ब्रह्महत्या करणारा व असत्यवादी आहे तो सुद्धां पृथ्वीदानानें पावन होतो. भले लोक पापी अशा राजांपासून पृथ्वीदानाखेरीज दुसरें कांहीं घेत नसतात. आईप्रमाणें पृथ्वी ही देणाराला व घेणाराला दोघांनाही पावन करीत असल्यानें प्रियदत्ता असें हिला गुप्त नांव आहे. पृथ्वी

दान चांगलें असून जो राजा विद्वान ब्राह्मणाला पृथ्वी-दान करतो, त्याला पुढच्या जन्मीं राज्य मिळून तो राजा होतो. राजावांचून दुसऱ्या कोणाला भूमिदान देतां येत नाहीं. अपात्र अशा मनुष्यानें भूमिदान घेऊंही नये. ज्यांना पृथ्वी पाहिजे असेल त्यांनीं याप्रमाणें भूमिदान करावें ह्मणजे त्याला भूमि मिळून इहपर लोकीं कीर्ति मिळते. अमक्या अमक्यानें दिलेल्या जमिनींत आह्मी रहातों असें ज्या धर्मशाल राजासंबंधानें ब्राह्मण बोलतात, त्याच्यासंबंधानें त्याच्या शत्रूला सुद्धां यत्किंचित् वाईट बोलतां येत नाहीं. उदरनिर्वाहाला नसल्यामुळें जीं पापें मनुष्याच्या हातून घडतात तीं सर्व गोचर्मभर भूमिदान केल्यानें नाहींशीं होतात. जे निंद्य व क्रूर कर्म करणारे राजे आहेत, त्यांना ह्या उत्तम भूमिदानासंबंधानें सांगावें. जे अश्वमेध यज्ञ करतात, व जे भल्यांना भूमिदान देतात, यांमध्यें फार थोडें अंतर आहे. एखादें पुण्य करून त्याच्या फलाबद्दल शहाण्यांना शंका राहील; पण या भूमिदानासंबंधानें शंका रहाणें संभवनीयच नाहीं. भूमिदान करणाराच्या हातून सोनें, रुपें, वस्त्र, हिरे मोतीं, पैसा या सर्वांचें दान झाल्यासारखें आहे. तप, यज्ञ, विद्या, शील, निर्लोभता, सत्यता, गुरु व देव यांची पूजा हीं सर्व भूमिदान करणाराच्या हातून घडल्यासारखीं समजावीं. आपल्या यजमानाच्या कल्याणामध्यें गढून ब्रह्मलोकाला गेलेले सिद्ध लोक सुद्धां भूमिदान करणाऱ्याहून अधिक नाहींत. ज्याप्रमाणें आई दुधानें आपल्या मुलाचें नेहमीं पोषण करते त्याप्रमाणें पृथ्वी भूमिदान करणाऱ्यावर सर्व रसांची कृपा करते. मृत्यु, काल, दंड, तम, घोर अग्नि, त्याचप्रमाणें घोर व भयंकर असे पाश हे भूमिदान करणाऱ्याजवळ कधीं येत नाहींत. पितृलोकामधले पितर व देवलोकामधले देव यांना भूमिदान करणारा संतुष्ट करतो. उदरनिर्वाहाचें साधन नाहींसें होऊन, वाळून मरूं घातलेल्या मनुष्याच्या उदरनिर्वाहाच्या साधनाला भूमि दिल्यानें मनुष्याला यज्ञ केल्याचें फळ येतें. ज्याप्रमाणें पोरावर प्रेम करणारी गाय कांसेंतून दूध गाळीत आपल्या पोराकडे धांव घेते त्याप्रमाणें भूमि भूमिदान करणाऱ्याकडे धांव घेत असते. नांगरलेली, पेरलेली किंवा उभ्या शेताची जमीन अगर मोठें घर दान केल्यानें मनुष्याच्या सर्व इच्छा परिपूर्ण होतात. शुद्ध वर्तनशील व घरांत अग्नि ठेविलेला अशा ब्राह्मणाकडून भूमिदान घेवविल्यानें मनुष्य थोर आपत्तींत सांपडत नाहीं. ज्याप्रमाणें चंद्राची वाढ रोजच्या रोज होत असते, त्याप्रमाणें भूमिदानाचें फल पिकापिकाला वाढत असतें. 'मला द्या, मला द्या, मला दिल्यानें इहपरलोकीं माझी तुह्मांला प्राप्ति होईल,' हें वेदमान्य वाक्य पूर्वींच्या लोकांच्या तोंडून ऐकून परशुरामांनीं काश्यपांना भूमिदान केलें; म्हणून ब्राह्मणानें श्राद्धाच्या वेळीं हें म्हटलें असतां महाफल मिळतें. त्याचप्रमाणें मारणजारणादि केल्यासंबंधीं जें पाप त्याचें प्रायश्चित्त भूमिदानानें होऊन, आई व बाप या दोघांकडील दहा पिढ्यांना तो उद्धरतो. पृथ्वी ही सर्व प्राणिमात्रांची मूळ असून हिची अधिष्ठात्री अग्नि देवता आहे; तेव्हां राजाला अभिषेक झाल्यावर हा शास्त्रमंत्र त्याच्या कानावर घातला असतां त्याच्या हातून भूमिदान होऊन भल्यापासून ती हिसकावून घेण्याचें काम कधीं होणार नाहीं. हें शास्त्र ब्राह्मण व राजा या दोघांसाठीं आहे; कारण राजा धर्मामध्यें कुशल असला तरच एकंदर भरभराट रहाते. ज्यांचा राजा अधर्मी व नास्तिक असतो त्यांना निजतां उठतां केव्हांच सुख मिळत नसून, त्याच्या दुर्वर्तनानें नेहमीं लोक उद्विग्न असतात, व राष्ट्रामध्यें योगक्षेमाचें म्हणून नांव रहात नाहीं. आतां जो राजा धार्मिक व शहाणा असतो त्याची प्रजा सुखामध्यें राहून त्याच्या उत्तम राज्याच्या योगानें ती सुखी होऊन आपल्या कर्मांनीं योगक्षेम व वृष्टि यांच्या योगानें वाढत रहातात. जो भूमिदान करतो तोच कुलीन, तोच पुरुष, तोच बंधु, तोच पुण्य करणारा, तोच दाता. वेदवेत्त्या ब्राह्मणाला ही वैभवशाली भूमि जे दान करतात ते या पृथ्वीवर सूर्याप्रमाणें झळकत रहातात. सूर्य, वरुण, विष्णु, ब्रह्मदेव, सोम, अग्नि, शंकर हे सर्व भूमिदान करणाऱ्याची वहावा करतात. सर्व लोकांची भूमीपासून उत्पत्ति असून शेवट यामध्येंच आहे. हे चारी प्रकारचे भूतमात्र या भूमिगुणांनींच भरले आहेत. जगाचे आईबाप सर्व भूमीच आहे, व हिच्यासारखें दुसरें कोणीच नाहीं. शंभर यज्ञ करून पुष्कळ दक्षिणा दिल्यावर कोणत्या दानापासून स्व-

र्गामध्यें अक्षय्य व मोठें सुख मिळतें,' ह्मणून इंद्रानें बृहस्पतींना विचारिलें असतां ते ह्मणाले कीं, 'सुवर्णदान, गोदान व भूमिदान या तीन दानांमुळें मनुष्य सर्व पापांपासून मुक्त होतो. भूमिदानाहून श्रेष्ठ कांहीं नाहीं. जे युद्धाची इच्छा करणारे शूर रणांत मरून स्वर्गाला जाऊन ब्रह्मलोकाचें सुख भोगीत राहिले आहेत त्यांना सुद्धां भूमिदान करणाऱ्यांना मागें सारतां येत नाहीं. भूमिदान करणारा पूर्वीच्या पांच व पुढच्या सहा मिळून अकरा पिढ्यांचा उद्धार करतो. रत्नानें भरलेल्या भूमीचें दान करून मनुष्य सर्व पापांपासून मुक्त होऊन स्वर्गी त्याचा बडेजाव होतो व त्याच्या सर्व वासना परिपूर्ण होऊन तो राजाधिराज होतो. यासारखें दुसरें उत्तम दान नाहीं. सर्व प्रकारांनीं परिपूर्ण अशा भूमीचें दान केल्यानें त्यावरील सर्व भूतमात्रांना 'हा माझें दान करीत आहे, हा माझें दान करीत आहे,' असें वाटत असतें. सर्व काम परिपूर्ण करणारें, सर्व गुणांनीं संपन्न असें गोदान ज्याच्या हातून घडतें, तो स्वर्गाला जाऊन मध, तूप, दहीं यांचा ज्यांमधून पूर वहात आहे अशा नद्यांनीं तृप्त होतो. भूमिदानासारखें दुसरें दान नाहीं. आपल्या शस्त्राच्या जोरावर जिंकून ह्या समुद्रवलयांकित पृथ्वीचें जो दान करतो त्याचें जोंपर्यंत ही पृथ्वी आहे तोंपर्यंत लोक नांव घेत असतात. सर्वरसांनीं परिपूर्ण अशी ही पवित्र भूमि जो दान करतो त्याला त्यामुळें वरचे लोक कधीं कमी पडत नाहींत. ह्मणून कल्याणेच्छु राजानें शास्त्रांत सांगितल्याप्रमाणें भूमिदान करीत असावें. मनुष्यानें पाप केलें असलें तरी भूमिदानानें साप ज्याप्रमाणें जुनी कांत टाकून देतो, त्याप्रमाणें हा सर्व पापांपासून मुक्त होतो. समुद्र, नद्या, पर्वत, अरण्यें, तलाव, पाणवटे, सरोवरें, सर्व प्रकारचे रस, जोमदार औषधी, फलपुष्पांनीं संपन्न असे पर्वत वगैरे सर्वांचें दान केल्याचें श्रेय भूमिदानामध्यें येतें. उत्तम रीतीनें दक्षिणा देऊन केलेल्या अग्निष्टोमादिक यज्ञयागादिकांनाही भूमिदानाचें फल नाहीं. भूमिदान करणारा दहा पिढ्यांना उद्धरतो, व न देतां ती उपटून घेणारा त्या दहा पिढ्यांना नरकांत बुडवून आपण स्वतःही नरकाला जातो. वचनानें बांधला न जातां दिलेलें जो परत घेत नाहीं असा मनुष्य मृत्यूच्या आज्ञेनें कधीं जखडला न जातां त्याला संतापाला कारण उरत नाहीं. अग्नि ठेवून यज्ञ करणारा व सद्वर्तनानें शरीर झिजविणारा अशा अतिथीचा समाचार घेणाऱ्या ब्राह्मणाला जे भजतात त्यांना यमाकडे जाण्याची पाळी येत नाहीं. राजानें ब्राह्मणांसंबंधानें आपलें कर्तव्य बजावून इतर वर्णांपैकीं जे दुबळे असतील त्यांना वर काढावें. पोटाला नसल्यामुळें वाळत चाललेल्या ब्राह्मणाला दुसऱ्यानें दिलेली भूमी राजानें कधीं हिरावून घेऊं नये; कारण दीन होऊन दुःखांत पडलेल्या त्याच्या डोळ्यांतील टिपें याच्या तीन पिढ्यांना समूळ नाहींसें करतील. राज्यापासून भ्रष्ट झालेल्या राजाला जो फिरून गादीवर बसवील त्याला बहुमानपूर्वक स्वर्गामध्यें जागा मिळते. ऊस, जवस, गहूं यांनीं शोभायमान व गाई, घोडे व दुसरीं वहानें यांनीं युक्त, त्याचप्रमाणें पोटांत पुष्कळ पैसा असून सर्व रत्नांनीं संपन्न अशी आपल्या बाहुवीर्यानें मिळविलेली पृथ्वी दान केल्यानें मनुष्याला अक्षय्य लोक मिळतात; कारण तें त्याचें भूमिसत्रच समजावयाचें. भूमिदान करणारा पापापासून मुक्त होऊन शुद्ध होऊन ह्या लोकामध्यें भल्यांना मान्य होतो. ज्याप्रमाणें पाण्यावर पडलेला तेलाचा बिंदु पसरतो त्याप्रमाणें भूमिदान पिकापिकाला वाढत रहातें. रणामध्यें रणाला शोभा देणारे वीर शत्रूंशीं तोंड देऊन मेले असतां ब्रह्मलोकीं दिव्यमाला वगैरे घालून नृत्यगायनामध्यें तत्पर अशा अप्सरा ज्याप्रमाणें त्यांच्या सेवेला हजर असतात, त्याचप्रमाणें भूमिदान करणाऱ्यापुढेंही त्या हजर रहातात, व देवगंधर्वांकडून बहुमान होऊन तो सुखांत रहातो. शंख, भद्रासन, छत्र, उत्तम घोडे, उत्तम उत्तम वहानें, फुलें, सोन्याचे ढीग हे सर्व भूमिदान करणाराला मिळून त्याची आज्ञा अप्रतिबद्ध चालून त्याचा नेहमीं जयजयकार होतो. अमृत प्रसवणारी ही भूमि भूमिदान करणाराला फिरून मिळते. **भूमीसारखें दुसरें दान नाहीं. आईसारखा गुरू नाहीं. सत्यासारखा धर्म नाहीं व दानासारखा सांठा नाहीं.'**

---

## २५६ अन्नदान. (१३. ६३)

युधिष्ठिर ह्मणाला, 'कोणत्या दानापासून तत्का-

ल संतोष होऊन तें इहपरलोकीं फळदायक होतें ?'
भीष्म ह्मणाले, 'अन्न हेंच देव व ऋषिगण यांनीं पसंत केलें आहे; कारण लोकयात्रा त्याचप्रमाणें संज्ञा हीं सर्व अन्नावर आहेत. अन्नासारखें दान मागें झालें नाहीं व पुढें होणार नाहीं. अन्न वीर्य वाढविणारें असून अन्नावरच प्राण अवलंबून आहेत. सर्व विश्व त्याचप्रमाणें हें जग अन्नावरच आहे. गृहस्थ, भिक्षुक व तापस हे सर्व अन्नापासूनच असून प्रत्यक्ष प्राणाला कारण अन्नच आहे. कल्याणेच्छूनें कुटुंब संकटांत असतांही मागावयास आलेल्या ब्राह्मणास अन्न द्यावें. योग्य अशा याचकाला जो अन्न देतो तो परलोकची उत्तम सामुग्री तयार करून ठेवितो. वाटेमध्यें दमून घराकडे आलेल्या, वृद्ध व सत्पात्र अशा मनुष्याला, आलेला राग बाजूला ठेवून निर्मत्सरपणानें अन्न देणारा मनुष्य येथें व सर्व लोकीं सुख पावतो. घरीं आलेल्या मनुष्याचा अवमान करूं नये किंवा त्याला धिक्कारपूर्वक बाहेर घालवूं नये. चांडाल असो किंवा कुत्रा असो त्याला दिलेलें सुद्धां अन्नदान फुकट जात नाहीं. जो चांगलें अन्न वाटेंत असलेल्या गरजू अशा परक्या मनुष्याला देतो तो मोठें पुण्य पदरीं घेतो. जो देव, ऋषी, पितर व अतिथी यांना अन्नानें संतुष्ट करतो त्याला मोठें पुण्यफळ मिळतें. फार वाईट कर्म केल्यावरही जो याचकाला विशेषेंकरून ब्राह्मणाला अन्न देईल त्याला तें पाप चिकटत नाहीं. ब्राह्मणाला दिलेलें अन्नदान कधीं कमी होत नाहीं. शूद्राला दिलेलेंही महाफलदायक होतें. गोत्र, आचार, वेदाध्ययन, देश, कांहींएक न विचारतां तोंड पसरणाऱ्या ब्राह्मणाला अन्नदान द्यावें. अन्न देण्यासाठीं सर्व वासना परिपूर्ण करणारे अन्नवृक्ष इहपरलोकीं तयार असतात. शेतकरी चांगल्या पावसाची वाट पहात असतात, त्याप्रमाणें आमचा मुलगा किंवा नातू आम्हांला अन्न देईल म्हणून पितर आ पसरून असतात. ब्राह्मण सर्वांत थोर असून तो आपण होऊन देही म्हणून याचना करण्यास आला असतां इच्छा धरून म्हणा किंवा निरिच्छपणानें म्हणा, त्याला अन्न दिलें असतां त्याचें मोठें पुण्य पदरीं पडतें. ब्राह्मण हा सर्व भूतमात्रांचा अतिथी असून त्याला सर्वांच्या आधीं अन्न खाण्याला अधिकार आहे. घरीं ब्राह्मण मागावयास आले असतां त्यांचा सत्कार होऊन ते गेले ह्मणजे त्या घराला चांगली वाढ येऊन त्या मनुष्याला मेल्यावर चांगल्या कुलामध्यें जन्म येतो. जो मनुष्य अन्न देतो त्याला उत्तम स्थान राहण्यास मिळतें, व जो मिष्टान्न देतो तो स्वर्गामध्यें बहुमानानें रहातो. अन्न देणाऱ्याला गुरें, मुलें, पैसा वगैरे सर्व भोग भोगण्याला मिळतात. तसेंच दीर्घ आयुष्य व चांगलें रूप हींहीं त्याला मिळतात. अन्न देणारा प्रत्यक्ष प्राण देणारा असल्यामुळें अन्नदान करणाऱ्याला सुख होऊन देवांकडून त्याचा बहुमान होतो. ब्राह्मण हें शेत असून या ठिकाणीं पेरलेल्या बीजाचें जें मोठें पुण्यफल हातीं येतें तें प्रत्यक्ष दान घेणारा व देणारा या दोघांनाही आनंददायक होतें. बाकींचीं सर्व दानें परोक्षफल देणारीं आहेत. अन्नापासून सर्व प्राणिमात्रांची उत्पत्ति असून संतोष हा अन्नापासूनच आहे. धर्म, अर्थ व आरोग्य याला कारण अन्नच आहे. अन्न हें अमृत असून पृथ्वी, स्वर्ग, आकाश सर्व अन्न आहे. अन्न नाहींसें झाल्यानेंच शरीरांतील पांच धातु वेगवेगळे होऊन नाश पावतात. अन्न नसल्यानेंच बळ नाहींसें होतें. आवाह विवाह, यज्ञ हीं सुद्धां अन्नावांचून होत नाहींत. वेदाचें सुद्धां पर्यवसान यामध्येंच आहे. जें कांहीं स्थावर जंगम आहे. तें सर्व अन्नावर असून त्रैलोक्यामधील धर्म, अर्थ अन्नावर अवलंबून आहेत. अन्नदान करणाऱ्याचेंच बल, वीर्य यश, व कीर्ति त्रैलोक्यामध्यें होते. प्राणांचा स्वामी वायु सूर्यानें शोषून घेतलेलें पाणी ढगांवर ठेवितो व इंद्र तें पृथ्वीवर पाडतो. सूर्य आपल्या किरणांनीं पृथ्वीवरचें पाणी शोषून घेतो, वारा तें फिरून खालीं पाडतो, व ढगांतून पाणी पृथ्वीवर पडलें ह्मणजे ती भिजून लोक तीमध्यें निरनिराळ्या प्रकारचीं धान्यें पेरतात व त्यांच्या उत्पन्नावर सर्व जग अवलंबून असतें. याप्रमाणें उत्पन्न झालेल्या अन्नापासून मांस, चर्बी, अस्थि, शुक्र तयार होतात, व या शुक्रापासून प्राणिमात्रांची उत्पत्ति होते. शरीरामध्यें असणारे अग्नि व सोम या शुक्राला उत्पन्न करून पोसतात. याप्रमाणें अन्नापासून सूर्य, वायु व शुक्र यांची उत्पत्ति होते. या सर्वांची एक रास अ-

सून त्यापासून सर्व प्राणिमात्रांची उत्पत्ति आहे. म्हणून जो घरीं आलेल्याला अन्न देतो तो त्याला बळ व तेज देतो. आतां या अन्नापासून कोणते लोक मिळतात हें ऐक. अशा लोकांना मिळणारीं स्थानें आकाशामध्यें तान्यांप्रमाणें झळकणारीं असून चंद्रमंडळाप्रमाणें स्वच्छ व नाना मण्यांनीं शोभायमान अशीं तीं अनेक खांबांवर उभीं असतात. नुकत्याच उगवलेल्या सूर्याप्रमाणें तीं रक्तवर्णाचीं असून कांहीं जागच्याजागीं ठाम असतात व कांहीं हालचाल करणारीं असतात. यांमध्यें हजारों जलचर व स्थलचर प्राणी असतात. यांपैकीं कांहींचा वैडूर्यासारखा व कांहींचा सूर्यासारखा वर्ण असून हीं सर्व सोन्यारुप्याचीं असतात. या वाड्यांमध्यें येथील लोकांचे सर्व मनोरथ परिपूर्ण करणारे, अनेक वृक्ष असतात; त्याचप्रमाणें येथें अनेक विहिरी, रस्ते सभास्थानें, कुवे, जलमंदिरें असतात. पांढऱ्या शुभ्र अशा ढगांप्रमाणें येथें अनेक वाडे असून सोन्यासारखे दैदीप्यमान बिछाने असतात. '

## २५७ नक्षत्रयोग दान. ( १३.६४ )

युधिष्ठिर म्हणाला, 'निरनिराळ्या नक्षत्रांचा योग असतां दिलेल्या दानाचें फळ काय ? ' भीष्म म्हणाले, ' सांगतों ऐक. कृत्तिकेचा योग असतां सत्पात्र अशा ब्राह्मणाला तूप घालून खीर दिली असतां मनुष्याला चांगले लोक मिळतात.रोहिणीच्या योगाला,तयार केलेलें हरणाचें मांस, तूप, दूध, अन्न व पाणी यांसह ब्राह्मणाला देऊन त्याच्या ऋणांतून मुक्त व्हावें. मृगशीर्षाचा योग असतां वांसरासह दुभती गाय दिल्यानें या मृत्युलोकांतून मनुष्य स्वर्गाला जातो. आर्द्रेचा योग असतां उपोषण करून तिळमिश्रित खिचडी दिल्यानें मनुष्य सर्व संकटांतून तरून मोठमोठ्या धारेच्या खडकाळ अशा पर्वताच्या पैलपार जातो. पुनर्वसुनक्षत्राचा योग असतां वडे, घारगे, त्याचप्रमाणें निरनिराळ्या प्रकारचें अन्न सत्पात्रीं दिल्यानें मनुष्य यशस्वी व रूपसंपन्न होऊन, मेल्यावर जेथें अन्नाची रेलचेल आहे अशा कुलांमध्यें जन्म घेतो. पुष्य नक्षत्रावर शुद्ध किंवा अशुद्ध सोनें दान दिल्यानें अंधारमय अशा ठिकाणीं चंद्राप्रमाणें तो प्रकाशत रहातो. आश्लेषेचा योग असतां रुपें किंवा बैल दान दिल्यानें मनुष्य सर्व भयांपासून मुक्त होऊन समृद्धिमान होतो. मघानक्षत्राच्या योगाला तिळानें भरलेलें परळ देऊन मुलें व गुरेंढोरें पुष्कळ मिळून मेल्यावर तो मोठ्या आनंदामध्यें रहातो. पूर्वाफल्गुनीच्या योगावर गूळ मिसळून नानाप्रकारचे खाण्याचे पदार्थ दिल्यानें मनुष्य दैववान होतो. तूप, दूध मिसळलेलें षष्ठिक अन्न उत्तराफल्गुनीच्या योगावर देऊन मनुष्याला स्वर्गलोकामध्यें बहुमान मिळतो. उत्तराफल्गुनीच्या योगावर जें जें म्हणून दान दिलें जातें तें तें महाफलदायक होतें. हस्तनक्षत्रावर उपाशी राहून चार हत्ती जोडलेला रथ दान केल्यानें पुण्यवान व सर्व कामांनीं परिपूर्ण असे लोक मिळतात. चित्रानक्षत्रावर बैल किंवा सुवासिक पदार्थ दिल्यानें मनुष्य अप्सरांच्या लोकीं फिरत राहून नंदनवनांत मोठ्या सुखांत दिवस घालवितो. स्वातीनक्षत्रावर धनदान केल्यानें मनुष्याचे मनोरथ पूर्ण होऊन ह्या लोकीं मोठें यश मिळून चांगले लोक त्याला मिळतात. विशाखेला बैल, दुभती गाय, त्याचप्रमाणें हाऱ्यासह व वर झांकण्याच्या वस्त्रासह धान्यानें भरलेला गाडा देऊन पितर व देव यांना संतोषवून मनुष्य मेल्यावर उत्तम सुख भोगतो. ब्राह्मणांला, ते मागतील तें दिल्यानें मनुष्याला त्याच्या मनाजोगतें उदरनिर्वाहाचें साधन मिळून नरकादिक कष्ट त्याला भोगावे लागत नाहींत. अनुराधानक्षत्रावर उपाशीं राहून जरतारी वस्त्रें व उत्तम उत्तम अन्न दिल्यानें शंभर युगेंपर्यंत मनुष्य स्वर्गांत बहुमानामध्यें रहातो. ज्येष्ठानक्षत्रावर मुळासकट कालशाक दान केल्यानें मनुष्य वैभवाला चढून त्याला इष्ट गति मिळते. मूळनक्षत्रावर नियमस्थ राहून फलमूलें दिल्यानें पितर तृप्त होऊन मनुष्याला इष्ट गति मिळते पूर्वाषाढा नक्षत्रावर उपास करून कुलाचारसंपन्न अशा वेदवेत्या ब्राह्मणाला दह्यानें भरलेलें मडें दान केल्यानें जेथें पुष्कळ गुरें ढोरें आहेत, अशा ठिकाणीं मनुष्याचा जन्म होतो. उत्तराषाढेला तूप व गूळ मिसळलेलें सत्तूचें पाणी उदकुंभ दिल्यानें मनुष्याच्या सर्व कामना परिपूर्ण होतात. अभिजित योग असतां दूध, मध व तूप दान केल्यानें मनुष्याला स्वर्गामध्यें बहुमान मिळतो. श्र-

वणावर घोंगडी व जाडें वस्त्र दान केल्यानें पांढऱ्या शुभ्र अशा वाहनामध्यें बसून सर्व स्वर्गलोकांमधून तो खुशाल फिरत रहातो. धनिष्ठेला बैल जोडलेल्या गाड्या किंवा पुष्कळ पैसा किंवा कपडे दान केल्यानें मनुष्याला स्वर्गप्राप्ति होते. शतभिषा योग असतां चंदन व अगरू यांचें दान केल्यानें नेहमीं सुवासिक पदार्थ भोगण्याला मिळून अप्सरांशीं संबंध जडतो. पूर्वाभाद्रपदाचा योग असतां राजमाष दान केल्यानें मनुष्याला सर्व प्रकारच्या खाद्याची व फलाची समृद्धि राहून मेल्यावर पुढच्या जन्मीं सुखप्राप्ति होते. उत्तरेचा योग असतां बकऱ्याचें मांस दान करून पितरांना तृप्त करून मनुष्य अक्षय्य पुण्य पदरीं घेतो. रेवती नक्षत्रावर धार काढण्यास कांसेच्या भांड्यासह गाय दिली असतां ती गाय सर्व कामना परिपूर्ण करण्यासाठीं स्वर्गामध्यें दात्याजवळ हजर रहाते. अश्विनीनक्षत्रावर घोडे जुंपलेला रथ दान केल्यानें पुढल्या जन्मीं हत्ती, घोडे, गाड्या यांनीं समृद्ध अशा कुळामध्यें जन्म होऊन मनुष्य महा तेजस्वी होतो. भरणी नक्षत्रावर गाय व तीळ दान केल्यानें मनुष्याला कीर्ति व पुष्कळ गाई मिळतात.'

---

## २९८ तूप, जोडे इत्यादिकांचें दान.
## ( १३.६५-६९ )

'हरिश्चंद्र राजानें असें ह्मटलें आहे कीं, सुवर्णदान मनुष्याचें सर्व पाप धुवून काढून त्याला दीर्घायुषी करतें, व पितरांना तें महाफलदायक होतें. पिण्याच्या पदार्थांचें दान करणें चांगलें, असें मनूचें म्हणणें आहे; म्हणून विहिरी, तलाव, बावड्या वगैरे खणाव्या. पाण्यानें भरलेल्या विहिरीपासून नानाप्रकारच्या प्राण्यांनीं पाणी नेलें असतां त्याच्या योगानें ती खणणाराचें अर्धे पाप नाहींसें होतें. गाई, ब्राह्मण व धार्मिक लोक, ज्यानें खणलेल्या विहिरीमध्यें किंवा तलावामध्यें आपली तहान भागवितात त्याचें सर्व कुल नरकांतून उद्धरतें. कांहीं अडथळा न होतां यानें खणलेल्या विहिरींतून लोकांनीं पाणी नेलें असतां हा सर्व संकटांतून मुक्त होतो. बृहस्पती, पूषा, भग, अश्विनीकुमार व अग्नि यांना तृप्त करणारें तूप असून यामध्यें पुष्कळ औषधीगुण आहेत. यज्ञाचें हें उत्तम साधन आहे. सर्व रसांमध्यें हें श्रेष्ठ आहे. याचें दान सर्वांत श्रेष्ठ आहे. कीर्ति व वैभव मिळून परलोकीं सुख मिळावें अशी ज्याची इच्छा असेल त्यानें शुचिर्भूत होऊन शुद्ध अंतःकरणानें तुपाचें दान ब्राह्मणाला द्यावें. जो मनुष्य आश्विन महिन्यामध्यें ब्राह्मणांना तुपाचें दान देतो, त्याच्या योगानें अश्विनीकुमार संतुष्ट होऊन त्याला रूपवान करितात. जो तूप घालून खीर ब्राह्मणाला देतो, त्याच्या घरावर राक्षसांचा कधीं घाला पडत नाहीं. जो पाण्याचीं भांडीं वगैरे भरून ब्राह्मणांना देतो त्याला कधीं तहानेनें मरण्याची पाळी येत नाहीं. त्याला लागणाऱ्या सर्व वस्तू यथेच्छ मिळून संकट किंवा दुःख म्हणून त्याला ठाऊक नसतें. जो आत्मनिग्रहपूर्वक भक्तीनें चांगल्या ब्राह्मणाला दान करतो, त्याला त्या ब्राम्हणांनीं तपानें मिळविलेल्या पुण्याचा सहावा हिस्सा मिळतो. जवळ साधन असणारा जो मनुष्य ब्राह्मणाला स्वयंपाकाला व शीतनिवारणार्थ लांकडें देतो त्याचे सर्व हेतू व त्याचीं सत्कृत्यें सफल होतात, व तो आपल्या शत्रूवर झळकत रहातो. भगवान अग्निनारायण त्याच्यावर संतुष्ट असतो; शिवाय गुरेंढोरें त्याला कधीं कमी पडत नाहींत व युद्धांत नेहमीं त्याला जय येतो. जो छत्री देतो त्याला संतति व संपत्ति मिळते; नेत्ररोग त्याला कधीं न होतां यज्ञभाग त्याला मिळतो. उन्हाळ्यांत व पावसाळ्यांत जो छत्री देतो त्याला संतापाला कारण उरत नाहीं, व सर्व पेंचांतून तो पार पडतो. महाभाग शांडिल्यांनीं सर्वदानांमध्यें गाडीचें दान चांगलें ह्मटलें आहे.

जो समाधानानें ब्राह्मणांना जोडे देतो तो सर्व कांट्यांना उडवून टाकून संकटांतून पार पडतो, व आपल्या शत्रूच्या डोक्यावर रहातो. खेचरें जुंपलेल्या सोन्यारुप्याच्या लखलखीत गाड्या त्याला मिळतात. जो जोडे देतो त्याला घोडे जुंपलेली गाडी दान दिल्याचें फल मिळतें.'

---

## २९९ तिळाचें दान. ( १३. ६६-६९ )

'आतां तिळाच्या दानाचें महात्म्य सांगतों ऐक. तीळ हे पितरांना उत्तम अन्न ह्मणून ब्रह्मदेवांनीं नि-

र्माण केले असल्यामुळें तिळदानानें पितरांना फार संतोष होतो. माघमहिन्यांत ब्राह्मणांना तिळदान करणाऱ्या मनुष्याला भयंकर प्राण्यांनीं भरलेला नरक कधीं पहाण्याची पाळी येत नाहीं. पितरांना तिळदान देणाऱ्याला सर्वयज्ञ केल्याचें फळ मिळतें. श्राद्ध कधीं अहेतुकपणें करूं नये. महर्षि कश्यपांच्या शरीरापासून तिळांची उत्पत्ति आहे ह्मणून दानाला हे फार उत्तम समजले आहेत. तीळ हे पौष्टिक व सतेज करणारे असून सर्वपाप दूर करणारे आहेत. अपस्तंभ, शंख, लिखित व गौतम हे ऋषी तिळांनेंच स्वर्गाला गेले. स्त्रीशीं संबंध नियमित ठेवून प्रवृत्तिमार्गाकडे लागलेले, तिळदान करणारे ब्राह्मण गाईच्या तुपानें हवन करणाऱ्यांच्या तोडीचे समजले आहेत. तिळदान सर्व दानांमध्यें अक्षय्य फल देणारें आहे. पूर्वी तूप मिळेनासें झालें असतां तिळानें त्रिकाल अग्नीला आहुति देऊन कुशिकांनीं उत्तम गति मिळविली. याप्रमाणें तिळदानाचा महिमा आहे. पूर्वी एक वेळ यज्ञ करण्याच्या इच्छेनें त्यासाठीं चांगलें ठिकाण पाहिजे ह्मणून ब्रह्मदेवांकडे जाऊन देव ह्मणाले कीं, ' भगवन्, आपण त्रैलोक्याचे स्वामी आहांत, यजमानाची परवानगी न घेतां एखाद्या ठिकाणीं यज्ञ केला असतां त्याचें फळ मिळत नाहीं, ह्मणून आपल्या आज्ञेनें एखाद्या ठिकाणीं यज्ञ करण्याची आमची इच्छा आहे. ' तेव्हां ब्रह्मदेवांनीं पृथ्वीवर त्यांना जागा देण्याचें अभिवचन दिल्यावरून त्या ठिकाणीं यज्ञ करण्याला ते तयार झाले असतां अगस्त्य, कण्व, भृगु, अत्रि, वृषाकपि, असित वगैरे ऋषी त्या देवांच्या यज्ञाला हजर होते. पर्वतश्रेष्ठ हिमालयावर देवांनी तो यज्ञ समाप्त केला. त्या यज्ञाच्या सहाव्या हिश्शाच्या तोडीचें भूमिदान सांगितलें आहे. ह्मणून जो मनुष्य निदान बोटभर चांगली जमीन ब्राह्मणाला दान करील तो पेंचांत न येतां सर्व संकटांतून पार पडतो. थंडी, वारा, ऊन यांचा त्रास न होईल असें चांगलें तयार केलेलें घर दान केल्यानें स्वर्गलोक मिळून पुण्य सरल्यावर सुद्धां तेथून ढळण्याचा प्रसंग न येतां आनंदानें इंद्राच्या बरोबर मनुष्य तेथें रहातो. रहाण्याचें घर दान करून त्या ठिकाणीं वेदाध्ययन पढविणारा इंद्रियनिग्रही श्रोत्रिय राहील तर त्यामुळें श्रेष्ठ लोकांमध्यें बहुमान मिळतो. थंडी, पाऊस यांचा त्रास न होईल अशा प्रकारचा मजबूत गोठा गाईसाठीं दिल्यानें मनुष्य सात कुळांचा उद्धार करतो. लागवडीची जमीन दान केल्यानें उत्तम वैभव मिळतें, व रत्नाच्या खाणी ज्या ठिकाणीं आहेत अशी जमीन दिल्यानें वंशाची वाढ होते. नापीक, भाजलेली, स्मशानाजवळची किंवा पापी लोक रहात असलेली अशी भूमि कधीं दान करूं नये. दुसऱ्याच्या जागेवर पितरांना श्राद्ध केलें असतां त्या भूमीचा त्याचप्रमाणें त्या श्राद्धकर्माचा पितरांकडून नाश होतो; ह्मणून थोडी तरी जमीन विकत घेऊन त्या ठिकाणीं श्राद्ध करावें. अशा ठिकाणीं पितरांना दिलेला पिंड शाश्वत फल देणारा होतो. अरण्य, पर्वत, नदी व तीर्थें या सर्वांवर कोणाची मालकी नसल्यानें या ठिकाणीं मात्र जागा विकत न घेतां श्राद्ध केलें असतां चालतें. याप्रमाणें भूमिदानाचें फल आहे. आतां गोदानाचें फल सांगतों ऐक. गाई ह्या तपस्व्याहून सुद्धां श्रेष्ठ आहेत; ह्मणून त्यांना जवळ घेऊन शंकरांनीं तप केलें. ह्या सोमासह ब्रह्मलोकामध्यें रहातात. त्यांच्या साह्यानें ब्रह्मर्षी व सिद्ध श्रेष्ठ गति मिळवूं इच्छितात. या आपल्या दुधानें, तुपानें, दह्यानें, शेणानें, कातड्यानें, हाडांनीं, शिंगांनीं, केसांनीं दुसऱ्यावर उपकार करतात. यांना थंडी, वारा, पाऊस यांपासून कांहीं त्रास न होतां या नेहमीं काम करीत असतात. ब्राह्मणाबरोबरच या उत्तम गतीला जातात; ह्मणूनच गाई व ब्राह्मण यांना लोक सारखे समजतात. रंतिदेवाच्या यज्ञामध्यें यांना बळी देण्याला काढलें असतां यांच्या कातड्यापासून चर्मण्वती नांवाची नदी निघाली. तेव्हांपासून बळीकडे यांचा उपयोग न होतां दानाकडे होऊं लागला. तेव्हां जो यांना श्रेष्ठ ब्राह्मणांना दान करतो तो संकटांत असेल तर त्यांतून पार पडतो. हजार गाई दान करणाऱ्याला जिकडे तिकडे विजय मिळून मेल्यावर तो स्वर्गाला जातो. गाईचें दूध अमृत ह्मटलें आहे; ह्मणून जो गाय दान देतो तो त्याला अमृतच देतो. अग्नीला होम करण्याच्या द्रव्यामध्यें हें अमृत श्रेष्ठ समजलें आहे. ह्मणून गाय दान करणारा अग्नीला होमद्रव्य देतो. जो गुणवान

ब्राह्मणाला बैल दान देतो त्याला स्वर्ग लोकामध्यें बहुमान मिळतो. हे प्राणिमात्रांचे प्राण आहेत. ह्मणून जो गाय देतो तो प्रत्यक्ष प्राणदानच देतो. गाई ह्या प्राणिमात्रांचा आसरा आहेत; ह्मणून गोदान दिल्यानें एखाद्याला आश्रय दिल्याचें फल मिळतें. **कसायाला, शेत कसणाऱ्याला, नास्तिकाला किंवा गाईवर पोट भरणाराला गाय देऊं नये.** अशीं पापकर्मे करणारांना गाय देणारा अक्षय्य नरकात जातो. फिडकिडीत, जिचें वांसरूं जगत नाहीं अशी, वांझ, रोगिष्ट, कांहीं व्यंग असलेली, त्याचप्रमाणें थकलेली गाय ब्राह्मणाला देऊं नये. दहा हजार गाई दिल्यानें दाता इंद्रासह आनंदांत रहातो, व लक्ष गाई देणाराला अक्षय्य लोक मिळतात. याप्रमाणें या सर्व दानांचा महिमा आहे. अन्नदान सर्वांत श्रेष्ठ समजलें आहे. अन्नदानानेंच रंतिदेव स्वर्गाला गेला. थकून भुकेलेल्याला जो अन्न देईल त्याला थोर ब्रह्मलोक मिळतो. सोनें, वस्त्रें किंवा दुसऱ्या एखाद्या दानानें मनुष्याला अन्नदानाप्रमाणें पुण्य मिळत नाहीं. अन्न हें मुख्य द्रव्य असून हें श्रेष्ठ वैभव समजलें आहे. अन्नापासूनच प्राण, बल, तेज, वीर्य या सर्वांची उत्पत्ति आहे. जो नेहमीं एकनिष्ठेनें अन्नदान करतो तो कधीं संकटांत पडत नाहीं. यथाविधि देवांची पूजा करून जें अन्न आपण खात असूं तेंच अन्न त्यांना, नैवेद्य करावें. कार्तिकाच्या शुक्लपक्षामध्यें जो अन्नदान देतो त्याला अत्यंत सुख मिळतें. आपण जेवण्याच्या अगोदर जो अतिथीला अन्नदान देईल त्याला ब्रह्मवेत्त्यांना मिळणारे लोक मिळतात. अन्नदान करणारा मोठा पेंचांत सांपडला असतांही त्यांतून पार पडतो.'

युधिष्ठिर म्हणाला, 'आतां पाणी दिल्याचें काय फल आहे तें सांगा.' भीष्म म्हणाले, 'सांगतों ऐक. जो अन्न किंवा पाणी दान करून मग त्याचा उपभोग घेतो त्याहून श्रेष्ठ कांहींच नाहीं. अन्नापासूनच सर्व प्राणिमात्रांचें अस्तित्व आहे; म्हणून अन्न सर्वांमध्यें श्रेष्ठ आहे. देवयज्ञामध्यें अन्नदान करणें हें प्राणदान केल्याप्रमाणें आहे. व प्राणदानाहून श्रेष्ठ कांहीं नाहीं असें लोमेशाचें वचन आहे. पूर्वी शिबीला, कपोताला प्राणदान देऊन जें फल मिळालें तें फळ अन्नदानानें मिळतें. व ह्या अन्नाची उत्पत्ति पाण्यापासून आहे; कारण पाण्यावांचून कांहींच उत्पन्न होत नाहीं. ताराधिपति चंद्राची पाण्यापासून उत्पत्ति आहे. अमृत, सुधा, स्वधा, दूध, अन्न, ओषधि व झाडपाला या सर्वांची उत्पत्ति पाण्यापासून असून त्यापासूनच सर्व प्राणिमात्रांच्या प्राणांची उत्पत्ति आहे. अमृत हें देवांचें अन्न असून सुधा नागाचें व स्वधा पितरांचें आहे. व झाडपाला पशूंचें अन्न आहे. म्हणून पाण्याच्या दानाहून दुसरें कांहीं श्रेष्ठ नसल्यानें कल्याणेच्छूनें पाणी दान करावें. हें दान सुखाला, यशाला व दीर्घायुष्याला कारण होतें. जलदान करणाऱ्याचे सर्व मनोरथ पूर्ण होऊन त्याला शाश्वत कीर्ति मिळते, व तो सर्व पापांपासून मुक्त होऊन श्रेष्ठ सुख घेतो. जलदान देणारा स्वर्गाला जाऊन अक्षय्य सुख मिळवितो असें मनूचें म्हणणें आहे.

पूर्वी गंगायमुनेच्यामध्यें यामुनपर्वताच्या पायथ्याला पर्णशाला नांवाची प्रसिद्ध नगरी असून त्या ठिकाणीं पुष्कळ विद्वान ब्राह्मण रहात होते. एके वेळीं ज्याचे डोळे लाल असून अंगावर रोमांच उभे आहेत व ज्याच्या मांड्या, डोळे व नाक हीं कावळ्यासारखीं होतीं अशा कृष्णवस्त्रधारी पुरुषाला यमानें, त्या नगरीला जाऊन शमामध्यें गढून वेदाध्ययन करीत रहाणारा, ज्याचें वर्तन अगदीं उघड होतें अशा अगस्त्य कुळांतील शर्मी नांवाच्या ब्राह्मणाला बहुमानपूर्वक आणण्यास सांगितलें,व त्याच्याजवळच त्याच्यासारखाच दुसरा आहे त्याला आणूं नकोस म्हणून सांगितलें; परंतु त्या दूताच्या हातून त्याच्या उलट घडून ज्याला त्यानें नको म्हणून सांगितलें होतें त्याला त्यानें धरून आणलें. तेव्हां उठून त्याचा सत्कार करून यमानें आपल्या दूतास, त्याला परत घेऊन जाण्यास सांगून दुसऱ्यास आणण्यास सांगितलें; तेव्हां 'माझें वेदाध्ययन संपून मी जगाला कंटाळलों आहें तेव्हां मी आतां माझा बाकीचा काल येथेंच काढितों,' असें तो ब्राह्मण म्हणाला. तेव्हां यम त्याला म्हणाला, 'मला काळाची आयुर्मर्यादा ठाऊक नाहीं; तेव्हां काळाच्या सांगण्याखेरीज मला येथें कोणाला ठेवतां येत नाहीं. जगामध्यें ज्याच्या हातून जेवढा धर्म पडतो तेवढ्याची नोंद माझ्याकडे होत अस-

ते, तेव्हां तूं आपल्या घराकडे परत जा.' तेव्हां ब्राह्मणानें 'कशाच्या योगानें मनुष्याला महत्पुण्य मिळतें,' म्हणून विचारलें असतां यम म्हणाला, 'तिळाचें दान श्रेष्ठ असून यापासून शाश्वत पुण्य मिळतें. यथाशक्ति तिळदान देत असावें. नित्य तिळदान केल्यानें सर्व वासना परिपूर्ण होतात. श्राद्धामध्यें सुद्धां तिळ चांगले म्हणून सांगितलें आहे. वैशाखी पौर्णिमेला तिळदान देऊन ब्राह्मणांना ते खाऊं घालावे. कल्याणेच्छूनें नेहमीं याप्रमाणें आपल्या घरीं करीत असावें. याचप्रमाणें मनुष्यानें जलदान करीत राहून पाणपोया ठेवाव्या, मनुष्याला खाऊं घातल्यावर विशेषतः त्याला पाणी पाजावें.' याप्रमाणें त्याला सांगून आपल्या दूताकरवीं त्याला परत पाठवून त्यानें शर्मीला त्याकडून आपल्या जवळ आगविलें व त्याचा सत्कार करून, त्याला उपदेश देऊन जगांत परत पाठविलें. इतरांच्या कल्याणासाठीं जलदानाप्रमाणेंच यमानें दीपदान चांगलें म्हणून सांगितलें आहे; म्हणून अंधाऱ्या ठिकाणीं उजेडासाठीं नेहमीं दिवा लावून ठेवावा. दीपदानानें देवतांची, पितरांची व स्वतःची दृष्टि मोठी होते; त्याचप्रमाणें रत्नदानंही फार चांगलें म्हणून सांगितलें आहे. रत्नदान घेऊन यज्ञासाठीं तें विकण्यांत दोष लागत नाहीं. रत्नदान घेऊन फिरून तें दुसऱ्यास दिलें असतां त्यापासून अक्षय्य पुण्य मिळून ज्याच्यापासून तें रत्न मिळालें आहे, त्याला सुद्धां अक्षय्य पुण्याचा लाभ होतो. आपल्या लग्नाच्या बायकोवर संतुष्ट राहून जो वस्त्रदान करतो त्याला चांगलें वस्त्र मिळून त्याचा चांगला वेष रहातो. याप्रमाणें वेदाधारावरून गाई, सोनें व तिळ यांचें हें माहात्म्य सांगितलें आहे. लग्न करून पुत्रोत्पादन करावें. सर्व लाभांमध्यें पुत्रलाभ हा श्रेष्ठ आहे.' युधिष्ठिर म्हणाला, 'इष्टि करूं इच्छिणाऱ्या ब्राह्मणाला क्षत्रियानें भूमिदान करावें व ब्राह्मणानें विधिपूर्वक त्याचा प्रतिग्रह करावा असें आहे. क्षत्रियावांचून दुसरा कोणी भूमिदान करण्याला पात्र नाहीं; परंतु फलेच्छा धरून असणाऱ्या सर्व वर्णांला जें कांहीं दान वेदांत सांगितलें असेल तें सांगा.' भीष्म म्हणाले, 'गो या एकाच शब्दानें दर्शविलीं जाणारीं भूमिदान, गोदान व विद्यादान हीं तीन सारखींच मनकामना पूर्ण करणारीं आहेत. जो शिष्याला वेदांतील पुण्यकारक वाक्यें सांगेल त्याला भूमिदान व गोदान यांचें फल मिळतें. त्याचप्रमाणें गाईही देण्याला चांगल्या ह्मणून सांगितल्या असून त्याहून श्रेष्ठदान नाहीं. उत्तम फल त्या तात्काल देतात. सर्व प्राणिमात्रांना ह्या मातेप्रमाणें शुभदायक आहेत. आपली भरभराट व्हावी अशी इच्छा असणारानें नेहमीं यांना प्रदक्षिणा करावी, मारूं नये किंवा त्यांच्यामधून जाऊं नये. कल्याणाचें ह्या आगर असल्यानें नेहमीं ह्यांना पुजावें. देवांनीं फक्त यज्ञभूमि नांगरण्याचेवेळीं बैलाला काठीनें चुचकारलें होतें, ह्मणून अशा प्रसंगीं मात्र त्यांवर काठीचा उपयोग करण्यांत दोष नाहीं. याहून निराळ्या प्रसंगीं यांना कधीं मारूं नये. या चरत असोत किंवा निवाऱ्यांत बसल्या असोत, यांना कधीं बुजवूं नये. तहानेल्या अशा ह्या ज्याकडे रागानें बघतील त्याचा त्या त्याच्या कुळासकट नाश करतील. पितरांसाठीं केलेलीं स्थंडिलें त्याचप्रमाणें देवघरें नेहमीं यांच्या शेणानें पवित्र होतात. तेव्हां याहून अधिक काय पाहिजे? स्वतः व्रतशीलपणानें उपाशीं राहून एकवर्षपर्यंत जो दुसऱ्याच्या गाईला मूठभर घास देईल, त्याला संतति, संपत्ति, यश व वैभव मिळून त्याच्या सर्व वासना पूर्ण होतील. त्याचें सर्व पाप नाहींसें होऊन दुःस्वप्न वगैरे त्याला कांहीं पडणार नाहीं.' युधिष्ठिर म्हणाला, 'कशा प्रकारच्या गाई द्याव्या, कशा प्रकारच्या देऊं नयेत, कोणाला द्याव्या, कोणाला देऊं नयेत?' भीष्म म्हणाले, 'ज्याचें वर्तन चांगलें नाहीं, जो पापी, लोभी, असत्यवादी आहे व हव्यकव्य ज्याला ठाऊक नाहीं अशाला कधीं गाय देऊं नये. जो श्रोत्रिय असून ज्याच्या घरांत औपासन अग्नि आहे, अशा पुष्कळ मुलें असणाऱ्या याचक ब्राह्मणाला दहा गाई दिल्यानें त्या दात्याला उत्तम फल मिळतें. ज्याला गाई दिल्या आहेत, त्याच्या हातून त्यामुळें जो कांहीं धर्म घडेल, त्या सर्व फळाचा वांटा त्या दात्याला मिळतो; कारण त्या धर्माला कारण तो होत असतो; कारण मनुष्याला जो उत्पन्न करतो, जो भयापासून तारतो व जो याला पोटाचें साधन करून देतो ते तिघेही त्याचे बाप समजले आहेत. गुरुशुश्रूषेनें पाप नाहींसें होतें.

मानाच्या योगानें यश नाहींसें होतें. तीन मुलांच्या योगानें अपुत्रता नाहींशी होते, व उदरनिर्वाहाची वाण दहा गाईंनीं नाहींशी होते. ज्याला वेदांतज्ञान पूर्ण असून जो बहुश्रुत व शहाणा आहे, इंद्रियांवर ज्याचा दाब आहे, शास्त्रमर्यादा जो पाळतो, संगापासून जो मुक्त आहे, जो सर्वांशीं गोड आहे, भुकेच्या तावडींत गेला असतां सुद्धां ज्याच्या हातून वाईट कृत्य घडत नाहीं, ज्याचा स्वभाव शांत आहे व ज्याला अतिथी आवडतात, अशाच प्रकारच्या मनुष्याला उदर निर्वाहाचें साधन करून द्यावें. सत्पात्रीं गोदान दिल्याचें जें फल आहे तितकेंच ब्रह्मस्व हरण केल्यामध्यें पाप आहे, ह्मणून ब्राह्मणस्व कधीं हरण करूं नये व त्याच्या वायकोपासून दूर असावें.'

## २६० नृगराजाची गोष्ट—ब्राह्मणस्व-अपहार. ( १३. ७० )

'ब्रह्मस्व हरण केल्यानें नृगराजावर मोठें संकट ओढवलें. कोणे एके वेळीं यादवकुलांतील कांहीं मुलें पाण्याचा शोध करतां करतां गवत व वेली यांनीं झांकलेल्या अशा एका विहिरीजवळ आलीं. तिचें तोंड त्यांनीं साफ केल्यावर तीमध्यें एक मोठा सरड त्यांना दिसला. तो पर्वतप्राय असून काढण्या व कातडींपट्टे यांच्या योगानें त्यांनीं त्याला वर काढण्याची पुष्कळ खटपट केली तरी त्यांना तो वर काढतां येईना. तेव्हां त्यांनीं तसेंच जाऊन श्रीकृष्णास सांगितलें; तेव्हां कृष्णानें जाऊन त्याला वर काढून 'तूं कोण' ह्मणून विचारलें. तेव्हां, 'पूर्वी पुष्कळ यज्ञ केलेला मी नृगराजा आहें,' ह्मणून त्यानें सांगितलें. तेव्हां, 'तुझ्या हातून यत्किंचितही पाप घडलें नसून इतकीं पुण्यकर्में घडलीं असतां व हजारों, लाखों गाई तूं ब्राह्मणांला दान केल्या असतां तुला अशी गति कां प्राप्त झाली' ह्मणून श्रीकृष्णानें पुन्हा विचारल्यावरून नृग त्याला ह्मणाला, 'एकेवेळीं एका नियमशील अग्निहोत्री ब्राह्मणाची एक गाय तो घरीं नसतां पळून येऊन माझ्या गाईंमध्यें मिसळली, व माझ्या गुराख्यांनीं दान करावयाच्या हजार गाईंमध्यें तिला धरली व मेल्यावरच्या सुखाची इच्छा करणाऱ्या मीं याप्रमाणें ती ब्राह्मणाला देऊन टाकली. त्या गाईच्या मालकाला शोधतां शोधतां दुसऱ्याच्या घरीं ती दिसली; तेव्हां ही माझी असें तो त्या दुसऱ्या ब्राह्मणाला ह्मणाला, व कडाक्यानें तंटा करीत माझ्याकडे येऊन त्यांपैकीं एक, तूं मला ही दिलीस व दुसरा, तूं माझी ही चोरलीस असें मला ह्मणाले. तेव्हां मीं ज्याला गाय दिली होती त्याला शेंकडों गाई मोबदल्यांत घेऊन ती परत मागितली, तेव्हां तो ह्मणाला, 'देशकालाप्रमाणें ही चांगली दुभती गाय मला मिळाली असून ही गरीब आहे, हिचा आमच्यावर लळा बसला आहे, हिचें दूध फार गोड आहे, माझ्या घरांत ती सुखांत असून आईचें दूध न मिळणाऱ्या रोडक्या मुलांचें तिच्यापासून पोषण होत आहे; तेव्हां मी कांहीं परत देणार नाहीं.' असें ह्मणून तो निघून गेला. नंतर, 'आपल्या गाईबद्दल लक्ष गाई मोबदल्यांत घ्या' ह्मणून मी त्या दुसऱ्या ब्राह्मणाला ह्मणालों. तेव्हां तो ह्मणाला, 'मी राजापासून प्रतिग्रह कधीं घेत नाहीं. माझें पोट भरण्याचें माझ्या अंगांत सामर्थ्य आहे.' असें ह्मणून मी सोनें, रुपें, घोडे, गाड्या, वाटेल तें द्यावयास तयार झालों तरी तें न घेतां तो तमाच निघून गेला. पुढें माझे दिवस भरून मी पितृलोकाला जाऊन यमधर्माकडे गेलों; तेव्हां माझा सत्कार करून यमधर्म मला ह्मणाला, 'तुझ्या पुण्यकर्माला अंत नाहीं; परंतु न कळत तुझ्या हातून थोडेंसें पाप झालें आहे; तेव्हां त्या पापाचें फळ तुला वाटेल तर आधीं भोग, वाटेल तर मागून भोग. राज्याभिषेकाच्या वेळेला मी रक्षण करीन, असें प्रजेला वचन देऊन त्याप्रमाणें तुझ्या हातून रक्षण झालें नाहीं; शिवाय ब्रह्मस्व तूं घेतलेंस याप्रमाणें दुहेरी पाप तुझ्या हातून झालें आहे.' हें त्याचें भाषण ऐकून 'प्रथम दुःख भोगून मागून मी सुख भोगीन,' असें मी ह्मणालों. त्याबरोबर मी या पृथ्वीवर येऊन पडलों. पडतां पडतां, 'वासुदेव तुझा उद्धार करील व हजार वर्षांनीं तुझें पाप नाहींसें झाल्यावर आपल्या शुभकर्मांनीं मिळविलेल्या शाश्वत लोकाला तूं येऊन मिळशील,' असें यमधर्माचें भाषण मीं ऐकिलें. त्याप्रमाणें सरड होऊन

खालीं डोकें असा मी या विहिरींत पडलों. या हलक्या जातींत माझा जन्म झाला तरी माझी आठवण गेली नाहीं. त्या मला आज तूं तारलें आहेस. आतां मी तुझ्या आज्ञेनें स्वर्गाला जातों.' असें ह्मणून तो स्वर्गाला गेला. ह्मणून ब्राह्मणस्व कधीं हरण करूं नये. ब्राह्मणस्व हरण केल्यानें नृगराजाप्रमाणें मनुष्याचा नाश होतो. भल्याचा समागम कधीं फुकट जात नाहीं. भल्याचा समागम झाल्यानेंच नृगराजा नरकांतून मुक्त झाला. दानफलाप्रमाणेंच द्रोहफल आहे; तेव्हां गाई कधीं हरण करूं नयेत.'

---

## २६१ उद्दालकी व नाचिकेत यांचा संवाद–गोदानफल. (१३.७१–८१)

'गोदानाचें फल फिरून विस्तारानें मला सांगा,' ह्मणून युधिष्ठिर ह्मणाला असतां भीष्म ह्मणाले, 'उद्दालकी ऋषी व त्याचा मुलगा नाचिकेत यांचा यासंबंधांत संवाद ऐक. कोणे एके वेळीं उद्दालकी ऋषी 'मी दीक्षा घेतों, तूं माझी सेवा कर,' ह्मणून आपल्या मुलाला ह्मणाले. त्यांचा तो नियम संपूर्ण झाल्यावर ते फिरून आपल्या मुलाला ह्मणाले, 'वेदाध्ययनामध्यें गढून स्नान करतां करतां मी नदीच्या तीरावर इध्म, दर्भ फुलें, पाण्याचें भांडें व भाजीपाला वगैरे विसरून आलों तीं घेऊन ये.' या आज्ञेप्रमाणें नाचिकेत नदीच्या तीराला गेले असतां नदीच्या जोराच्या प्रवाहामधून तीं वाहून गेल्यामुळें तीं त्यांना सांपडलीं नाहींत. त्यांनीं तें आपल्या बापाला कळविलें; तेव्हां भूक, तहान, श्रम यांनीं पीडून गेले असल्यामुळें त्या महा तपस्वी उद्दालकींनीं, 'यमाची भेट घे,' ह्मणून रागानें आपल्या मुलाला शाप दिला. याप्रमाणें पित्याचा वाक्वज्रप्रहार झाल्याबरोबर नाचिकेत मरून खालीं पडले; तेव्हां तें पाहून उद्दालकींना फार वाईट वाटलें, व माझ्या हातून हें काय झालें ह्मणून शोकाकुल होऊन ते खालीं पडले; याप्रमाणें कष्टी होऊन रडतां रडतां तो बाकीचा दिवस व ती भयाण रात्र निघून गेली. बापाचे अश्रू त्या प्रेतावर पडून पावसानें जीव धरणाऱ्या धान्याप्रमाणें तें उठलें. ज्याच्या अंगाचा दिव्य घमघमाट सुटला आहे, अशा त्या मुलाला स्वप्नांतून उठल्याप्रमाणें फिरून जिवंत झालेला पाहून ते ह्मणाले, 'बाळा, तूं आपल्या कर्मानें उत्तम लोक मिळविले आहेस. माझ्या सुदैवानेंच फिरून तूं मला मिळालास. तुझा हा कांहीं मानवदेह मला दिसत नाहीं.' हें ऐकून नाचिकेत ह्मणाले, 'मीं आपल्या आज्ञेप्रमाणें विशाल व झगझगीत अशा यमपुरीला जाऊन हजारों योजनें लांबरुंद व सोन्यानें दैदीप्यमान अशी यमसभा पाहिली, मला त्या सभेकडे येतांना पाहून लगेच मला आसन देण्याकरितां सांगून यमानें अर्घ्यादि पूजासाहित्यानें माझा सत्कार केला. नंतर मी हळूच त्याला ह्मणालों, 'मी आपल्याकडे आलों आहे, तेव्हां मी ज्या लोकाला पात्र असेन तिकडे मला पाठवावा.' तेव्हां यम ह्मणाला, 'तूं कांहीं मेला नाहींस. तुझ्या बिचाऱ्या अग्निप्रमाणें तेजस्वी बापानें 'यमाची भेट घे,' ह्मणून तुला सांगितलें, तेव्हां त्या थोर ऋषींचें वचन खोटें होऊं नये ह्मणून तूं माझी भेट घेतली आहेस. आतां तुझ्या देहाला उत्पन्न करणारा तो तुझा बाप रडत बसला आहे त्याच्याकडे जा. तुला आणखी कांहीं पाहिजे असेल तें मी देण्याला तयार आहें.' हें ऐकून मी ह्मणालों, 'जेथून कधीं परततां येत नाहीं अशा आपल्या लोकाला आलों आहें तेव्हां आपले पुण्यवानांना मिळणारे समृद्ध लोक पहाण्याची माझी इच्छा आहे.' हें ऐकून घोडे जुंपलेल्या लखलखीत रथामध्यें बसवून त्यानें मला आपले सर्व लोक दाखविले. त्याठिकाणीं मीं पुष्कळ महात्म्यांचीं दैदीप्यमान स्थानें पाहिलीं. त्यांचे ते वाडे नानाप्रकारचे असून नानारत्नमय होते. चंद्रमंडलासारखे ते पांढरे शुभ्र होते. घांट्यांचा त्यामधून घणघणाट निघत होता. त्यांमध्यें जलमंदिरें व रम्यवनें होतीं. तीं सोन्यारुप्याचीं असून वैडूर्याप्रमाणें झळकत होतीं. त्यांपैकीं कांहीं स्थावर व कांहीं जंगम होतीं. त्यांमध्यें नानाप्रकारच्या खाण्याच्या पदार्थांचें डोंगरच्याडोंगर, त्याचप्रमाणें वस्त्रें व बिछाने होते. त्या वाड्यांमधून अनेक कामना पूर्ण करणारीं झाडें होतीं. त्या ठिकाणीं नद्या, रस्ते, सभा, विहिरी, जलमंदिरें वगैरे जिकडे तिकडे असून हजारों जुंपलेल्या रथांचा घरघर शब्द होत होता. नद्यांतून दुधाचा

पाट चालला असून पर्वतांवरून तुपाचे ओघळ चालले होते. त्या ठिकाणचें पाणी अगदीं आरशाप्रमाणें स्वच्छ होतें. यमधर्माच्या आवडीचे, पूर्वी कधीं न पाहिलेले पुष्कळ देश त्या ठिकाणीं पाहिल्यावर मी यमधर्माला ह्मणालों, 'ह्या दुधातुपाच्या नद्या कोणाला खाण्यासाठीं आहेत?' तेव्हां यमधर्म ह्मणाला, 'दूध जे दुसऱ्याला देतात अशांच्या खाण्यासाठीं हें आहे; त्याचप्रमाणें गोदान करण्यांत जे नेहमीं गढले असतात त्यांच्यासाठीं दुसरे शाश्वत लोक आहेत. नुसतें दान करणें मोठेंसे पुण्यकारक नाहीं. पात्र, काल, कशा प्रकारची गाय, कोणत्या विधीनें द्यावयाची या सर्व गोष्टी लक्षांत घेतल्या पाहिजेत. ब्राह्मण व गाय याच्यामधील गुण लक्षांत घेऊन मग ती गाय त्याला दान करावी. आग किंवा ऊन्ह यांपासून जेथें तिला त्रास होण्याचा संभव आहे अशा ठिकाणीं ती कधीं देऊं नये. ज्यानें वेदाध्ययन करून कडक तप आचरिलें आहे असा यज्ञ करणारा ब्राह्मण गोदान घेण्याला पात्र आहे. जी गाय संकटांतून सुटून पोषण होण्यासाठीं आपल्याकडे आली आहे, अशा प्रकारची गाय दानाला योग्य समजली आहे. तीन रात्री उपवास करून, पाण्यावर राहून आणि जमिनीवर पडून गाईला चांगलें खाण्यापिण्यास घालून मग वासरासह अशा प्रकारची गाय ब्राह्मणास, त्यालाही चांगलें जेऊं घालून तृप्त करून द्यावी. ही गाय वेळच्यावेळीं विणारी असावी, व हिच्या दानाबरोबर आणखी कांहीं वस्तूही दान कराव्या. याप्रमाणें गोदान केल्यावर तीन दिवस गाईच्या दुधावर रहावें. बिन खोडीची, चांगलें वासरूं असणारी व पळून न जाणारी अशा प्रकारची गाय तिच्या धारेच्या कांशाच्या भांड्यांसह दान केल्यानें तिच्या अंगावर जितके केंस असतील तितकीं वर्षें तो स्वर्गामध्यें सुखांत रहातो. वडविलेला, जुंवाला लावण्याजोगा, धनकट, बलवान, धिप्पाड असा खोंड दान दिल्यानें गोदानाच्याच तोडीचे लोक मिळतात. जो गाईंना सौम्य रीतीनें वागवितो, जो गाईच्या आधारावरच आहे, कृतज्ञ असून ज्याला पोट भरण्याचें साधन नाहींसें झालें आहे असा मनुष्य गोदानाला पात्र आहे. ह्मातारा मनुष्य आजारी पडला असतां, दुष्काळ पडला असतां, यज्ञामध्यें, नांगरण्याच्या वेळीं किंवा होमाच्या योगानें मुलगा झाला असतां, किंवा गुरूला अथवा मुलाला पोसण्यासाठीं म्हणून गोदान दिलें असतां देशकाल पाहून दान झालें समजावें. पुष्कळ दुधाची, गरीब, पैसे देऊन किंवा दुसरें जनावर मोबदला देऊन विकत घेतलेली, विद्वत्तेसाठीं बक्षीस मिळालेली, मनगटाच्या जोरावर जिंकून आणलेली किंवा लग्नादि संस्कारांमध्यें गोप्रदान म्हणून मिळालेली अशा प्रकारची गाय देण्याला योग्य समजली आहे.' यावर गाय न मिळेल तर काय दान केल्यानें गोदानाचें फळ मिळतें ह्मणून मीं विचारलें असतां यम ह्मणाला, 'गाईच्या अभावीं तिच्याबद्दल ह्मणून सांगितलेलें दान केल्यानें गोदानाचें फल मिळतें. प्रत्यक्ष गाय न मिळेल तर तुपाची गाय करून द्यावी. त्याच्या योगानें प्रेमळ आईप्रमाणें तें दान यासाठीं तुपाचे लोट वाहवितें. तूपही न मिळेल तर तिळाची गाय दिल्यानें मनुष्य संकटांतून मुक्त होऊन दुधाच्या नदीमध्यें मोठ्या आनंदांत मजा मारीत रहातो. तिळही न मिळतील तर त्याच्या मोबदला पाण्याची गाय देईल तर त्यामुळें सर्व कामना परिपूर्ण करणाऱ्या अशा थंडगार पाण्याच्या नदीचा त्या ठिकाणीं त्याला उपभोग मिळतो. याप्रमाणें सर्व कांहीं त्याठिकाणीं यमधर्मानें मला सांगितलें; तेव्हां हा जो गोदानरूपी यज्ञ हा मोठा चांगला आहे. या पुढें ज्याला फार खर्च येत नाहीं असा हा यज्ञ मला सांपडला असून वेदाज्ञेच्याही तो बाहेरचा नाहीं. आपण मला दिलेला शाप मजवर अनुग्रहच होऊन यमधर्माची व माझी गांठ पडली, व हा दानमहिमा मला कळला. यमधर्मानें संतुष्ट होऊन मला फिरून फिरून सांगितलें कीं, नेहमीं दान करीत राहून शुद्ध झालेल्या मनुष्यानें विशेषेंकरून गोदान करावें. हा विषय पावन करणारा असून दानासंबंधानें वर सांगितल्याला कोणी तुच्छ करूं नये. त्याचप्रमाणें हें दान देशकाल पाहून सत्पात्रीं करावें. दानमार्गाकडे लागलेल्या पुष्कळ महात्म्यांनीं पूर्वी उग्र तप आपल्या हांतून होईल किंवा नाहीं ह्या भीतीनें शक्त्यनुसार गोदान दिलें आहे. काल पाहून शक्त्यनुसार मत्सरभाव सोडून शुद्ध अंतःकरणानें, श्रद्धापूर्वक गोदान करणारे पुण्यवान लोक स्वर्गामध्यें येऊन ह्म-

ळकत राहतात. याप्रमाणें न्यायानें मिळविलेलें का-म्याष्टमी नांवाच्या शुद्ध अष्टमीला सत्पात्र अशा ब्राह्मणाला दान करून गाईचें दूध, शेण किंवा मूत यावर पुढें दहा दिवस रहावें. बैल दान दिल्यानें देवव्रत पाळल्याचें श्रेय येतें. दोन गाई दिल्यानें वेद येऊं लागतो. बैल जोडलेली गाडी दिल्यानें तीर्थाच्या ठिकाणीं स्नान केल्याचें फल मिळतें. न्यायानें मिळविलेली कपिला गाय दिल्यानें सर्व पापांपासून मनुष्य मुक्त होतो. गाईच्या दुधाहून गुणावह दुसरें कांहीं नसल्यानें गोदानासारखें दुसरें कांहींच चांगलें नाहीं. गाईच दुधाच्या योगानें लोकांना तारतात व गाईच अन्न तयार करतात. हें जाणून जो गाईवर दया करणार नाहीं तो खात्रीनें नरकाला जाईल. जो हजार, शंभर, दहा, पांच निदान एक गाय भल्या ब्राह्मणाला दान करतो त्याला ती परलोकीं पवित्र पाण्याची नदी होऊन भोगावयास मिळते. वैभव, वाढ, लोकांचें संरक्षण यांमध्यें गाई सूर्यकिरणाच्या तोडीच्या आहेत, व या दोघांसंबंधानें गो हा शब्दही एक आहे. ह्मणून गोदान करणाराचा वंश वाढून तो सूर्याप्रमाणें झळकत रहातो. शिष्यानें गुरूला दान घ्यावयास लावावें ह्मणजे तो खात्रीनें स्वर्गाला जाईल. शास्त्रविधि जाणणारांनीं गुरूला दानासाठीं निवडलें आहे. हा मुख्य विधि असून बाकी सर्व यावर अवलंबून आहेत. नीट पाहून, ब्राह्मण पसंत करून मग न्यायानें मिळविलेली गाय त्याला दान करावी, व तें दान घेण्याबद्दल त्याचें मन वळवावें. देव, मनुष्य वगैरे सर्व दुसऱ्याचें कल्याण इच्छिणारे अशा दान करणाऱ्याला नावाजतात. ह्याप्रमाणें त्यानें सांगितल्यावर त्याचा निरोप घेऊन मी तुमच्याकडे आलों असें नाचिकेत ह्मणाले.'

युधिष्ठिर ह्मणाला, 'आपल्यापासून गोदानासंबंधानें मीं बरेंच ऐकिलें. आतां गोदान करणारासाठीं कशा प्रकारचे लोक आहेत तें सांगा.' भीष्म ह्मणाले, 'या संबंधांत पुढील इंद्र व ब्रह्मदेव यांचा संवाद लक्षांत घे. कोणे एके वेळीं इंद्र ब्रह्मदेवाला ह्मणाला कीं, 'हे गोलोकामध्यें रहाणारे लोक वैभवानें स्वर्गवासी लोकांना मागें सारीत आहेत; तेव्हां यांचे लोक कशा प्रकारचे असतात, कोणतें फल देणारे असतात, त्यांमध्यें उत्तम गुण काय असतो, लोक अगदीं निर्भयपणें तेथें कसे जातात, गोप्रदानाचें फल दात्याला किती दिवस भोगण्यास मिळतें, पुष्कळ गाई दान करणारा थोड्या गाई दान करणाराच्या जोडीला किंवा थोड्या गाई दान करणारा पुष्कळ गाई दान करणाऱ्याच्या जोडीला, कशानें जातो व गोप्रदानामध्यें कोणती दक्षिणा मुख्य सांगितली आहे.' ब्रह्मदेव ह्मणाले, 'तुझ्या या प्रश्नाचें उत्तर देतों ऐक. तुला दिसत नाहींत असे पुष्कळ लोक आहेत. ते फक्त मला किंवा ज्या बायका एकपतिव्रतानें असतात त्यांना दिसतात. आपल्या शुभ कर्मांनीं चांगल्या बुद्धीचे, उत्तम व्रतशील असे ऋषी आपल्या शरीरासह या लोकांना जातात. जे चांगले व्रतशील आहेत ते स्वप्नामध्यें दिसणाऱ्या उत्तम लोकासारख्या या लोकांना आपल्या निर्मल मनाच्या योगानें योगसमाधीनें हा देह या ठिकाणीं ठेवून कांहीं कालपर्यंत मोक्ष मिळवून पाहूं शकतात. या लोकामध्यें गुण काय आहेत सांगतों ऐक. या ठिकाणीं कालगति अगदीं बंद असून ह्मातारपण ठाउक नाहीं व सर्वव्यापी अग्निही त्या ठिकाणीं नाहीं. रोग, थकवा किंवा दुसरा कोणताही अपाय त्या ठिकाणीं नाहीं. त्या ठिकाणीं असणाऱ्या गाईंना त्यांना हवें तें मिळतें. हा मला प्रत्यक्ष अनुभव आहे. वाटेल तेथें जाण्याचें सामर्थ्य त्यांच्या अंगीं असून त्यांच्या मनांत येतील त्या सर्व वासना परिपूर्ण होतात. विहिरी, सरोवरें, नद्या, नानाप्रकारचीं वनें, वाडे, टेंकड्या व दुसऱ्या सर्वप्राणिमात्रांला आल्हाद देणाऱ्या वस्तू त्या ठिकाणीं आहेत. याहून अधिक सुखदायक लोक मिळणार नाहींत. जे सर्व लोकांशीं क्षमाशील, सहनशील व प्रेमळ असतात, जे गुरूंना योग्य मान देतात व ज्यांना अहंकार माहीत नाहीं, अशा प्रकारचे लोक या लोकाला जातात. ज्यानें हरतऱ्हेचें मांस सोडलें आहे, ज्याचें अंतःकरण शुद्ध आहे, जो धार्मिक असून बहुमानपूर्वक आईबापांचा सत्कार करतो, ज्याचें भाषण व वर्तन खरें आहे, जो ब्राह्मणांच्या सेवेला तत्पर असतो, ज्याच्या वर्तनामध्यें दोष ह्मणून नाहीं, गोब्राह्मणांवर राग ह्मणून ज्याला माहीत नाहीं, कर्तव्यामध्यें जो अगदीं दक्ष आहे, जो दानामध्यें गढून असतो व आपली कोणीं खोडी केली असतां जो क्षमा करतो, जो आत्मनिग्रही व सौम्य आहे, देव-

त सिंबंधानें ज्याला आदर आहे व जो आतिथ्यशील आहे, अशा मनुष्यालाच हे शाश्वत व अक्षय्य गोलोक मिळतात. जो व्यभिचारी, गुरुघाती, खोटें बोलणारा, भांडखोर, ब्राह्मणांशीं वैर करणारा, मित्रद्रोही, फसव्या, कृतघ्न, लुचा, वांकडा, धर्मद्वेष करणारा व ब्रह्महत्या करणारा आहे, त्याला पुण्यवानांना मिळणारा हा लोक मनानें सुद्धां दिसणें शक्य नाहीं. आतां गोदानफल सांगतों ऐक. जो आपल्याला न्यायानें मिळालेल्या वडिलोपार्जित पैशानें गाय विकत घेऊन दान करतो, त्याला अक्षय्य सुखाचे लोक मिळतात. जो जुगारामध्यें पैसे मिळवून त्यानें गाय विकत घेऊन दान करतो त्याला देवांचीं दहा वर्षेपर्यंत सुख मिळतें. ज्याला वडिलोपार्जित मिळकतीच्या वांटणीमध्यें गाय मिळते ती त्याला यथान्याय मिळाली असें समजावें व अशा प्रकारची गाय दान करण्याला कांहीं हरकत नाहीं. अशा प्रकारची गाय दान केल्यानें उत्तम लोक मिळतात. त्याचप्रमाणें दान घेतलेली गायही दान केल्यानें चांगले लोक मिळतात. जो आजन्म खरें बोलतो, व गुरू आणि ब्राह्मण यांचें सर्व सहन करतो अशा क्षमाशील ब्राह्मणाला गोदानाचें फल मिळतें. ब्राह्मणाला अयोग्य शब्द कधीं बोलूं नये. त्याचप्रमाणें गाईला मनानें सुद्धां दुखवूं नये. गाईचा स्वभाव धरून तिच्यावर दया करावी. आतां खरें बोलणाराला काय फल मिळतें सांगतों ऐक. असा मनुष्य एक गाय दान करील तर त्याला हजार गाई दान केल्याचें फल मिळतें. अशा प्रकारचा क्षत्रिय एक गाय दान करील तर त्याचें तें पुण्य ब्राह्मणाच्या पुण्याच्या जोडीचें होतें, असें शास्त्रांत आहे. अशा प्रकारचा वैश्य अशी गाय देईल तर त्याला पांचशें गाई दिल्याचें फल आहे, व अशा प्रकारचा विनयशील असा एखादा शूद्र जर याप्रमाणें एक गाय देईल तर सव्वाशें गाई दिल्याचें फल त्याला येतें. तप व सत्य यांमध्यें गढून गुरुशुश्रूषेनें सर्व शास्त्रांत निपुणता मिळवून क्षमाशीलतेनें, शांत चित्तानें देवतांच्या पूजेमध्यें गढून अहंभाव सोडून मन व शरीर शुद्ध ठेवून जो मनुष्य ब्राह्मणाला एक गाय देतो त्याला चांगलें दूध देणाऱ्या त्या गाईच्या योग्य दानाचें चांगलें फल मिळतें; म्हणून एकनिष्ठेनें व सत्यशीलतेनें गुरुसेवेमध्यें दक्ष राहून मनुष्यानें गोदान करावें; जो राजसूय यज्ञ करतो किंवा सोन्याचा ढीग दान करतो अशांना मिळणारें थोर पुण्य गाईसंबंधानें आदर दाखविणाराला मिळतें. जो सत्यवादी व शांतचित्त मनुष्य आदरपूर्वक, निश्चयानें, रोज नियमानें, अन्न घेण्याच्यापूर्वी थोडें अन्न गाईला देतो त्याला यामुळें हजार गाई दान केल्याचें पुण्य मिळतें. जो रोज एकदां जेवून दुसऱ्या वेळचें आपलें सर्व अन्न गाईला देतो असा मनुष्य या त्याच्या गाईसंबंधाच्या दयेमुळें दहा वर्षेपर्यंत अनंत सुख भोगतो. जो मनुष्य एकदां जेवून राहून व दुसरें जेवण सांठवून त्याच्या योगानें गाय विकत घेऊन ती दान करतो त्या दानानें त्या गाईच्या अंगावर जितके केंस असतील तितक्या गाई दान केल्याचें त्याला फल मिळतें. हें फल ब्राह्मणाला असून क्षत्रियाला पांच, वैश्याला अडीच व शूद्राला सव्वा वर्ष ह्याप्रमाणें फल मिळतें. जो स्वतःला विकून घेऊन त्या पैशावर गाई विकत घेऊन ब्राह्मणाला दान करतो तो जोंपर्यंत त्या गाईची खूण पृथ्वीवर आहे तोंपर्यंत स्वर्गामध्यें उत्तम सुख भोगतो. तिच्या रोमारोमाला अक्षय्य लोक सांगितले आहेत. जो युद्धामध्यें गाई जिंकून त्या दान करतो त्यालाही वरच्याप्रमाणेंच गोदान दिल्याचें फल मिळतें. गाईच्या अभावीं तिळाची गाय करून इंद्रियनिग्रहपूर्वक ती दान केली असतां तो सर्व संकटांतून मुक्त होतो. केवळ गाईचें दानच फलप्रद होतें असें नाहीं. दान घेणाराची पात्रता, काल, गाईचें स्वरूप आणि दान करण्याचा विधि या सर्व गोष्टी लक्षांत घेतल्या पाहिजेत. अग्नि व ऊन्ह यांचा ताप ज्याच्या घरीं होण्याचा संभव आहे अशा ब्राह्मणाला कधीं गाय दान करूं नये. जो चांगला वैदिक असून उत्तम कुळांतील आहे व जो नेहमीं यज्ञ करीत असून पापभीरू आहे; त्याचप्रमाणें जो सौम्य व बहुश्रुत असून गाईची कींव करणारा आहे, व आश्रय मागणारांना जो आश्रय देतो, असा मनुष्य उदरनिर्वाहाचें त्याला साधन नसेल तर गोदानाला चांगला समजला आहे. ज्या गाईचा स्वभाव कळला आहे अशा पूर्वी सांगितल्याप्रमाणें न्यायानें मिळविलेल्या गाई दानाला योग्य समजल्या आहेत. ज्या मजबूत

असून गरीब आहेत व ज्यांच्या अंगापासून सुगंध सुटतो, अशा गाई दानाला चांगल्या. ज्याप्रमाणें गंगा सर्व नद्यांमध्यें श्रेष्ठ आहे त्याप्रमाणें गाईच्या जातींत कपिला श्रेष्ठ समजली आहे. तीन दिवस कांहीं न खातां पाण्यावर राहून आणि जमिनीवर पडून नंतर ब्राह्मणांला जेऊं घालून त्यांना दक्षिणेसह गोदान करावें. अशा गाईंना कांहीं खोड नसावी, व वांसरें चांगलीं असावीं. याप्रमाणें दान केल्यावर पुढें तीन दिवस त्यानें गाईच्या दुधावर रहावें. याप्रमाणें गरीब व जी मुकाट्यानें धार काढूं देते, जिला चांगलीं वांसरें होतात व जी दिलेल्याच्या घरांतून पळून जात नाहीं अशी गाय दान केल्यानें तिच्या अंगावर जितके केंस आहेत तितके दिवस मनुष्य स्वर्गांत सुखानें रहातो. त्याचप्रमाणें ज्याला नांगराला लावतां येईल किंवा ज्यावर पुष्कळ ओझें लादतां येईल व ज्याला श्रमाची खातर नाहीं असा तरणा बांड, सामर्थ्यवान व गरीब खोंड दान केल्यानें दहा गाई दान केल्याचें फल मिळतें. जो अरण्यामध्यें गाई व ब्राह्मण यांना संकटांतून सोडवितो तो स्वतः प्रत्येक संकटांतून मुक्त होऊन त्याला अश्वमेधाचें फल मिळतें. व मरतेवेळीं त्याच्या वाटेल त्या वासना पूर्ण होतात. त्या गाईच्या आज्ञेनें अनेक सुखदायक लोकांमध्यें तो बहुमान मिळून रहातो. जो स्वतः गवत, शेण, व झाडाचीं पानें यांवर राहून कांहीं फलेच्छा न धरतां यासाठीं गाईच्या पाठीमागून वनांतून फिरतो तो वासनेपासून मुक्त होऊन मोठ्या आनंदांत माझ्या किंवा दुसऱ्या वाटेल त्या उत्तम लोकामध्यें देवांच्या समागमांत सुखानें रहातो. जो खाण्यासाठीं, विकण्यासाठीं किंवा ब्राह्मणाला दान देण्यासाठीं गाईचा अपहार करतो, त्यालाही हें फल मिळतें. जो विकण्यासाठीं तिला मारतो किंवा निर्भयपणें तिला खातो किंवा मारणाराला जो पैशासाठीं सल्ला देतो, तो मारणारा, खाणारा किंवा सल्ला देणारा त्या गाईच्या अंगावर जितके केंस असतील तितकीं वर्षें नरकांत बुडतो. जे दोष ब्राह्मणाच्या यज्ञामध्यें अडथळा आणण्यानें लागतात तशा प्रकारचे दोष गाय विकण्यामध्यें किंवा तिला पळविण्यामध्यें आहेत. जो गाय उपटून ती ब्राह्मणाला दान करतो त्या दानाचें फल ह्मणून तो जितकीं वर्षें स्वर्गांत रहातो, तितकींच वर्षें तो नरकामध्यें रहातो. गोप्रदानाला दक्षिणा सोन्याची सांगितली आहे; कारण, दक्षिणेसाठीं सोनें फार उत्तम मानलें आहे. गोप्रदानाच्या योगानें पूर्वींच्या सात व पुढच्या सात पिढ्यांना मनुष्य तारतो, व सुवर्णदक्षिणा देऊन त्याच्या दुप्पट पिढ्यांना तारतो. सर्व पावन करणाऱ्या वस्तूंमध्यें सोनें श्रेष्ठ समजलें आहे; ह्मणून ही दक्षिणा सांगितली आहे.’

युधिष्ठिर म्हणाला, ‘आपल्या भाषणानें मनाला थोडी शांति आली आहे, आतां व्रत व नियम यांचें काय व कशा प्रकारचें फल आहे. चांगलें वेदाध्ययन केल्याचें काय फल आहे, दानाचें फल काय आहे, वेद म्हणत राहिल्याचें काय फल आहे, पढविण्यांत काय फल आहे, दान न घेणाराला काय फल आहे. जो ज्ञान पढवितो त्याला काय फल मिळतें, आपल्या कर्मामध्यें गढलेल्या शूरांना काय फल मिळतें, शुचिर्भूततेमध्यें काय फल आहे, ब्रह्मचर्यामध्यें काय फल आहे, आईबापांची त्याचप्रमाणें गुरूंची व वडिलांची सेवा करण्यांत काय फल आहे, दया किंवा कींव करण्यांत काय फल आहे, हें सर्व जाणण्याची मला फार इच्छा आहे.’

भीष्म म्हणाले, ‘जो जें व्रत ज्याप्रमाणें सांगितलें आहे, त्याप्रमाणें खंड न पाडतां बरोबर पाळतो त्याला सनातन लोक मिळतात. नियमांचें फल या जगांत प्रत्यक्षच दिसून येतें. आज हें जें तुला फल मिळालें आहे हें नियम व यज्ञ यांचेंच आहे. चांगलें अध्ययन केल्यानें इहलोकीं व ब्रह्मलोकीं मनुष्य आनंदांत रहातो. आत्मनिग्रहाचें फल विस्तारपूर्वक ऐक. आत्मनिग्रही लोक सर्वत्र सुखी व खुशाल असून त्यांना वाटेल तिकडे जातां येतें व शत्रूचा नायनाट उडवितां येतो. त्यांना जें जें हवेंसें वाटतें तें तें मिळतें. त्यांच्या सर्व इच्छा परिपूर्ण होतात. क्षमाशील असे आत्मनिग्रही लोक नानाप्रकारच्या दानांनीं व यज्ञांनीं स्वर्गामध्यें आपल्या तपाच्या व शौर्याच्या योगानें झळकत रहातात. दानापेक्षांही आत्मनिग्रह अधिक समजला आहे. कारण, दान करणाऱ्या मनुष्याला देते वेळीं प्रसंगीं राग येतो; परंतु आत्मनिग्रही मनुष्याला तो कधीं येत नाहीं. जो न रागावतां दान करतो त्याला स-

नातन लोक मिळतात. राग हा दानाचें फल नाहींसें करतो, म्हणून दानाहून दमाचें फल अधिक आहे. स्वर्गामध्यें हजारों अदृश्य ऋषींचीं स्थानें आहेत. दमाच्या योगानें मोठमोठे ऋषी थोर पदाच्या मार्गे लागून त्या ठिकाणाला जातात. वेद पढविणारा, त्याला होणाऱ्या श्रमाबद्दल, विधिपूर्वक अग्नीला होम देऊन ब्रह्मलोकीं अक्षय्य फल भोगतो. जो वेदाध्ययन करून चांगल्या धार्मिक विद्यार्थ्यांना पढवितो व आपल्या गुरूच्या कृत्याची जो प्रशंसा करतो तोही स्वर्गामध्यें महत्त्व मिळवितो. अध्ययन, यजन व दान यांमध्यें गढून युद्धामध्यें जो दुसऱ्याला हात देतो तो क्षत्रिय स्वर्गामध्यें मोठेपणा मिळवितो. आपल्या कर्मामध्यें गढलेल्या वैश्याला महाफल मिळतें. शूद्रालाही आपल्या कर्मामध्यें गढून सेवेच्या योगानें स्वर्ग मिळतो. नानाप्रकारचे शूर सांगितले आहेत, त्यांचे प्रकार व त्यांना मिळणारें फळ सांगतों ऐक. कोणी यज्ञामध्यें शूर असतात, कोणी आत्मनिग्रहामध्यें असतात, कोणी सत्य भाषणामध्यें, कोणी युद्धामध्यें, कोणी दानामध्यें, कोणी सांख्यशास्त्रामध्यें, कोणी योगशास्त्रामध्यें, कोणी अरण्यवासामध्यें, कोणी गृहस्थाश्रमामध्यें, कोणी संन्यासामध्यें, कोणी सरळपणामध्यें, कोणी शांतीमध्यें. याप्रमाणें निरनिराळ्या नियमांमध्यें निरनिराळे शूर असतात. कोणी वेद पढण्यामध्यें तर कोणी वेद पढविण्यामध्यें, कोणी आईबाप व गुरु यांच्या सेवेमध्यें, कोणी भिक्षावृत्तीमध्यें,कोणी अतिथीसत्कारामध्यें शूर असतात. या सर्वांना आपापल्या कर्मानें मिळविलेले उत्तम लोक मिळतात. सर्व वेद पाठ ठेवणें, सर्वतीर्थांमध्यें स्नान करणें व सत्य भाषण करणें यांची बरोबरी कदाचित् होईल किंवा होणार नाहीं. हजार अश्वमेध व सत्य ताजव्यांत घातलें असतां हजार अश्वमेधांहून सत्याचेंच पारडें खालीं जाईल. सत्याच्याच योगानें सूर्य प्रकाशतो, सत्यानेंच अग्नि जळतो, सत्यानेंच वारा वहातो. सर्व कांहीं सत्याच्या आधारावर आहे. सत्याच्या योगानेंच देव, पितर व ब्राह्मण संतुष्ट होतात. सत्य हा श्रेष्ठ धर्म सांगितला आहे; म्हणून सत्य कधीं सोडूं नये. मुनी हे सत्यामध्यें गढले असून सत्यावर त्यांची मदार आहे व सत्याप्रमाणें ते वागतात म्हणून सत्य श्रेष्ठ आहे. सत्यभाषण करणारे लोक स्वर्गांत आनंदात नांदतात. आत्मनिग्रह हें सत्याचेंच फल आहे. जो विनयसंपन्न आहे, त्याला स्वर्गी बहुमान मिळतो. ब्रह्मचर्याचें फल असें आहे कीं, जो आजन्म ब्रह्मचर्य पाळतो त्याला दुर्मिळ असें कांहींच रहात नाहीं. शेंकडों कोटी ऋषी सत्यामध्यें गढून आत्मनिग्रहानें ऊर्ध्वरेत राहून ब्रह्मलोकामध्यें सुखांत नांदतात. विशेषेंकरून ब्राह्मणानें पाळलेल्या ब्रह्मचर्याच्या योगानें सर्व पापांचा जळून फडशा पडतो. ब्राह्मण हा अग्नि समजला आहे. ब्रह्मचाऱ्याला तुच्छ केल्यानें तो रागावला असतां प्रत्यक्ष इंद्र सुद्धां त्याच्यापुढें थरथर कांपतो. हें ब्रह्मचर्याचें अगदीं उघड फल आहे. जो आईबापांच्या सांगण्याच्या विरुद्ध न जातां त्यांची, त्याचप्रमाणें वडील भावाची, गुरूची व वडिलांची सेवा करतो त्याला स्वर्गलोकामध्यें बहुमानाची जागा मिळते. या गुरुशुश्रूषेच्या योगानें त्याला नरक पाहण्याची पाळी येत नाहीं.'

युधिष्ठिर म्हणाला, 'आतां गोदानाचा विधि ऐकण्याची माझी इच्छा आहे.' भीष्म म्हणाले, 'सांगतों ऐक. पूर्वी हा गोदानविधि भल्यांकरितां उत्पन्न झाला असून पुढें तो सर्व लोकांसाठीं म्हणून प्रचारांत आला; म्हणून आदिकालापासून प्रचारांत आलेला हा गोदानविधि आहे. पूर्वी दानासाठीं गाई पुढें आणिल्या असतां मांधाता राजाला संशय उत्पन्न होऊन त्यानें बृहस्पतींना विचारलें तेव्हां त्याचा संशय दूर करण्यासाठीं प्रत्यक्ष बृहस्पतींनीं त्याला हा विधि सांगितला आहे. नियमस्थ राहून गोदान करणारानें ब्राह्मणाचा आदल्या दिवशीं सत्कार करून उद्यां गाय देणार म्हणून ठरवून ठेवावें. गोदानासाठीं रोहिणी गाय निवडावी. 'सुमंगे,बहुले,' म्हणून तिला हांक मारून गोठ्यांत शिरून 'गाय माझी माता आहे, बैल बाप आहे, माझें कल्याण करून हे मला स्वर्ग देवोत, गायच काय ती मला आधार आहे,' असें वेदवाक्य उच्चारून रात्र त्या गोठ्यांत काढून पुन्हा गोप्रदानाच्या वेळीं तेच शब्द उच्चारावे; याप्रमाणें त्या गोठ्यांत एकरात्र त्या गाईच्या जवळ तिच्यासारखें होऊन राहिल्यानें मनुष्य सर्वपापांपासून मुक्त होतो. सूर्यदर्शन झाल्याबरोबर ती गाय व तिच्या बरोबर एक बैल व

वांसरूं दिल्यानें मनुष्याला स्वर्ग मिळतो व त्या मंत्रांत सांगितल्याप्रमाणें त्याचें कल्याण होतें. गाई सामर्थ्यवान असून बुद्धिमान आहेत. यज्ञानें मिळणाऱ्या अमरत्वाला त्या मूळ असून या जगाला त्या आधार आहेत. ऐश्वर्याची कायमची वाढ व संतति यांना त्या कारण आहेत, व त्या कुलवृद्धि करणाऱ्या आहेत, असें वेदवाक्य आहे. 'ह्या मी देत असलेल्या गाई माझें पाप दूर करोत, त्यांच्यामध्यें सूर्य व सोम यांचे गुण आहेत, त्या मला स्वर्गाला पोहोंचवोत मुलाकडे धांव घेणाऱ्या आईप्रमाणें त्या मजकडे येवोत, त्याचप्रमाणें ह्या मंत्रांत न सांगितलेलीं बाकीचीं कल्याणेंही मला मिळोत,' असें ह्मणावें. क्षयासारखे रोग नाहींसे करण्याला त्याचप्रमाणें या देहापासून सुटण्यासाठीं पंचगव्य घेतलें असतां या सरस्वतीप्रमाणें त्याचें कल्याण करतात. 'तुह्मी सर्व पुण्य मिळवून देणाऱ्या आहांत, तेव्हां प्रसन्न होऊन तुह्मी मला इष्ट गति दाखवा,' असें ह्मणून, 'जशा तुह्मी तसाच मी आज झालों आहें तेव्हां तुह्मांला देऊन मी आज आपल्या स्वतःचेंच दान करीत आहें,' असें गोप्रदान करणारानें ह्मणावें व दान घेणारानें, 'आजपासून तुह्मी देणाराच्या नसून माझ्या झाला आहांत तेव्हां सूर्य व सोम यांचे धर्म ज्या तुह्मांमध्यें आहेत त्या तुह्मीं दात्याला व मला दान घेणाराला सर्व वैभवांनीं संपन्न करा,' असें ह्मणावें. जो मनुष्य गाईच्या बदला तिची किंमत, वस्त्रें किंवा सोनें देतो तोही गोदान करणाराच समजला जातो. गाईची किंमत देणारानें ती देतेवेळीं, 'ही वर तोंड केलेली गाय देत आहें ही घे,' असें ह्मणावें. गाईच्याबद्दल वस्त्र देणारानें ही भवितव्या (मोबदला) देत आहें,' असें ह्मणावें. व सोनें देणारानें 'वैष्णवी (मोबदल्यांत सोनें) देत आहें,' असें ह्मणावें. याप्रमाणें निरनिराळ्या वेळीं निरनिराळे शब्द उच्चारावे. याप्रमाणें गोदान करणाराला क्रमानें छत्तीस हजार, आठ हजार व वीस हजार वर्षें स्वर्गवास मिळतो. हें फल गाईचा बदला देणारालाहि असून प्रत्यक्ष गाय देणारालाही हेंच फल मिळतें; परंतु तें दान घेणारा आठ पावलें जात आहे तोंच त्याला मिळतें. जो प्रत्यक्ष गाय देतो तो या जगांत शीलवान होतो, जो तिची किंमत देतो तो निर्भय होतो, व मोबदल्यांत सोनें देणाऱ्यावर दुःख कधीं पडत नाहीं. या तिन्ही प्रकारचे लोक त्याचप्रमाणें जे नियमानें दररोज पहाटे स्नान करून आपलीं कर्में करतात व ज्यांना महाभारत पूर्ण अवगत आहे ते विष्णुलोकाला व सोमलोकाला जातात. गोदान केल्यावर त्रिरात्रव्रत पाळून एक रात्र गाईबरोबर रहावें व काम्याष्टमीपासून तीन दिवस दूध, शेण, व गोमूत्र यांवर रहावें. बैल दिल्यानें देवव्रत (ब्रह्मचर्य) पाळल्याचें फल मिळतें. दोन गाई दिल्यानें वेदज्ञान होतें; त्याचप्रमाणें यज्ञ करून विधिपूर्वक गोदान दिल्यानें श्रेष्ठ लोक मिळतात. विधि न करणाराला ते मिळत नाहींत. पुष्कळ दूध देणारी एक गाय दिल्यानें सुद्धां पृथ्वीवरील सर्व काम्यवस्तू दिल्याचें फल मिळतें. मग कांस भरून असलेल्या, हव्यकव्याला उपयोगी अशा पुष्कळ गाई दिल्याचें फल काय विचारावयाचें? चांगले बैल दान करणें याहून अधिक श्रेष्ठ आहे. जो शिष्य नाहीं, जो व्रतशील नाहीं, श्रद्धावान नाहीं किंवा वांकड्या बुद्धीचा आहे अशाला हा धर्म सांगूं नये. वाटेल तेथें हा विधि सांगूं नये. या जगामध्यें कांहीं श्रद्धावान लोक आहेत व कांहीं मनुष्यरूपी हलकट राक्षसही आहेत. यांना त्याचप्रमाणें नास्तिकांना हें सांगितलें असतां त्याचें चांगलें फल होणार नाहीं.'

युधिष्ठिर ह्मणाला, 'गोप्रदानाचें फल मला फिरून बरोबर सांगा.' भीष्म म्हणाले, 'गरीब, गुणसंपन्न, न उतरलेली अशा प्रकारच्या गाईवर वस्त्र घालून दान केलें असतां मनुष्य सर्व पापांपासून मुक्त होऊन ज्या ठिकाणीं सूर्यप्रकाश ह्मणून ठाऊक नाहीं अशा अंधारमय लोकाला त्या मनुष्याला जावें लागत नाहीं. जिला पाणी पिववत नाहीं किंवा घास खाववत नाहीं, जिचें दूध आटलें आहे, जिचीं इंद्रियें शिथिल झाली आहेत, जी वठून रोगिष्ट झाली आहे, अशा कोरड्या विहिरीप्रमाणें खंगलेल्या गाईचें दान करून मनुष्य केवळ त्या दान घेणाराला कष्टांत पाडतो; यामुळें त्याला अंधारमय अशा नरकांत पडावें लागतें. रागीट, खोडसाळ, रोगिष्ट, दुबळी, जिच्याबद्दलची किंमत दिली नाहीं, अशी गाय कधीं दान करूं नये. अशा निष्फल दानानें त्या दान

घेणाराला तो फुकट क्लेशांत पाडितो. यामुळें याला निर्वीर्य व निष्फल असे लोक मिळतात. बलवान, वयांत आलेली, जिच्या अंगापासून घमघमाट सुटत आहे, अशा गाई दानाला श्रेष्ठ समजल्या आहेत; ज्याप्रमाणें सर्व नद्यांमध्यें गंगा श्रेष्ठ आहे त्याप्रमाणें सर्व रोहिणी गाईमध्यें कपिला श्रेष्ठ आहे. या कां श्रेष्ठ समजल्या आहेत याबद्दलचा इतिहास ऐक. पूर्वी ब्रह्मदेवांनीं दक्षाला प्राणी उत्पन्न करण्यास सांगितलें असतां भूतमात्रांच्या कल्याणेच्छेनें प्रथम त्यानें त्यांच्या उदरनिर्वाहाचें साधन उत्पन्न केलें. ज्याप्रमाणें देव अमृतावर रहातात त्याप्रमाणें दक्षानें निर्माण केलेल्या यावर सर्व चराचर रहातात. चराचरामध्यें हालचाल करणारे प्राणी श्रेष्ठ असून त्यांमध्यें ब्राह्मण श्रेष्ठ आहेत. यज्ञ यांच्यावर अवलंबून असून अमृत यज्ञावर अवलंबून आहे. आणि यज्ञ गाईवर अवलंबून आहेत. देवही यज्ञांनींच संतुष्ट झाले. तेव्हां याप्रमाणें सृष्टीमध्यें प्रथम उदरनिर्वाहाचें साधन उत्पन्न होऊन मग प्राणिमात्र उत्पन्न झाले. प्राणिमात्र उत्पन्न झाल्यावरोबर ते अन्नाकरितां ओरडूं लागले, व आईबापांकडे धांव घेणाऱ्या मुलाप्रमाणें अन्नासाठीं ते त्यांना उत्पन्न करणाऱ्याकडे गेले. त्यांचा हेतु उमगून आपण उत्पन्न केलेल्यां त्यासाठीं दक्षानें स्वतः थोडेंसें अमृत पिऊन ढेंकर दिली. त्याबरोबर जिकडे तिकडे सुगंध पसरून एक गाय उत्पन्न झाली. याप्रमाणें दक्षाच्या तोंडापासून उत्पन्न झालेली सुरभी ही दक्षकन्या होय. हिला पुष्कळ वांसरें झालीं. ह्या जगाच्या माता समजल्या आहेत. त्या सर्वांचा वर्ण सोन्यासारखा असल्यामुळें त्यांना कपिला हें नांव पडलें. सर्व लोकांच्या पोटाला ह्या साधनीभूत झाल्या. ह्या अमृतवर्ण गाईंनीं दुधाचा लोट सोडला, तेव्हां तो जिकडे तिकडे पसरून उसळणाऱ्या लाटांप्रमाणें त्यांवर फेंस भरून राहिला, व दूध पिणाऱ्या वांसरांच्या तोंडांतून गळणारा कांहीं फेंस खालीं पृथ्वीवर बसलेल्या शंकरांच्या डोक्यावर पडला; त्यामुळें त्यांना राग येऊन त्यांच्यावर डोळे वटारून आपल्या कपाळावरील तिसऱ्या डोळ्यानें ते त्यांना जाळून टाकीत आहेतसें वाटलें. ज्याप्रमाणें सूर्य ढगांवर निरनिराळे रंग उत्पन्न करतो त्याप्रमाणें या महादेवांच्या तिसऱ्या डोळ्यापासून निघालेल्या तेजानें त्या गाईंवर निरनिराळे रंग उमटले. त्यांपैकीं ज्या थोड्या सोमलोकांत शिरून यांच्या रागांतून वांचल्या त्यांचा पूर्वीचा वर्ण कायम राहिला. शंकर रागावलेले पाहून दक्ष म्हणाला, 'आपण अमृतानें भिजून निघालां आहां. आईचें थान पिणाऱ्या या वांसरांच्या तोंडांतून पडणारें दूध हें उष्टें समजूं नका. ज्याप्रमाणें अमृत पिऊन चंद्र तें फिरून खालीं पाडतो; परंतु त्याच्या योगानें तें उष्टें होत नाहीं; त्याचप्रमाणें हीं वांसरें पीत असलेले दूध अमृतापासून निघालें असल्यामुळें उष्टें समजण्याला कारण नाहीं. वारा, अग्नि, सोनें, समुद्र हे कधीं अपवित्र होत नाहींत; तसेंच अमृत देव प्यायले असतांही त्याला उष्टेपणा येत नाहीं; त्याचप्रमाणें गाईचें दूध वांसरें तिच्या थानाला लागलीं असतांही उष्टें होत नाहीं. या गाई आपल्या दुधानें व त्यापासून होणाऱ्या तुपानें या जगाला पोसतील. यांचें अमृतमय वैभव भोगण्याची सर्वांची इच्छा असते.' असें ह्मणून दक्षानें शंकरांना एक बैल देऊन त्यांना प्रसन्न केलें. शंकर प्रसन्न होऊन त्यांनीं त्या बैलाला आपलें ध्वज व वहान केलें; तेव्हांपासून त्यांना वृषभध्वज हें नांव पडून पशुपतित्व आलें व याप्रमाणें गुरांमध्यें असणाऱ्या त्या शंकरांना वृषभांक असेंही नांव पडलें. याप्रमाणें ज्यांच्या वर्णामध्यें कांहीं बदल झाला नाहीं अशा मोठ्या सामर्थ्यवान कपिला गाई देणें हें उत्तम समजलें आहे. गाई ह्या सर्वलोकांमध्यें श्रेष्ठ असून सर्व जगांचें पोट भरण्याचें साधन यांपासूनच मिळतें. ह्यांचा स्वामी रुद्र आहे. दुधाच्या रूपानें त्या अमृत देतात. या मोठ्या गरीब, पवित्र, वाटेल ती इच्छा परिपूर्ण करणाऱ्या असून लोकांना प्राण देणाऱ्या आहेत.'

'गाईच्या अंगाचा मोठा सुगंध असून गुग्गुलाप्रमाणें त्यांच्या अंगाचा वास असतो. सर्वभूतमात्रांना आधारभूत गाईच असून सर्वांच्या मोठ्या कल्याणाला त्याच कारण आहेत. भूत, भविष्य सर्व त्याच असून शाश्वत अशा वाढीला त्याच कारण आहेत. वैभवाचें मूळ त्याच असून त्यांना दिलेलें कधीं फुकट जात नाहीं. मुख्य अन्न गाईपासूनच

मिळत असून देवांना हवि यांपासूनच मिळतो. स्वाहाकार, वषट्कार यांवरच अवलंबून असून यज्ञफल गाईच आहेत; व यज्ञ गाईवरच अवलंबून आहे. सकाळ संध्याकाळ होमाच्या वेळीं गाईच ऋषींना होमद्रव्य देतात. जीं कांहीं संकटें असतील किंवा केलेलीं पापें असतील तीं सर्व गोदान करणारे तरून जातात. दहा गाई ज्याच्याजवळ आहेत त्यानें एक गाय, शंभर गाई, असणाऱ्यानें दहा गाई, व हजार असणाऱ्यानें शंभर गाई दान केल्या असतां या तिघांना सारखेंच फल आहे. शंभर गाई असून ज्यानें घरीं अग्नि ठेविला नाहीं, हजार गाई असून जो यज्ञ करीत नाहीं किंवा पैसा असून जो कृपण आहे, हे तिघेही मानाला पात्र नाहींत. जे वांसरासह व धारेला कांशाच्या भांड्यासह गरीब अशी कपिला गाय तिच्यावर वस्त्र घालून दान करितात ते दोन्ही लोक जिंकतात. जे सर्व अवयवांनीं धनकट, शंभर बैलांमध्यें निवडलेला, मोठमोठ्या शिंगांचा खोंड सजवून श्रोत्रिय ब्राह्मणाला देतात त्यांना निरनिराळ्या जन्मांमध्यें ऐश्वर्य मिळतें. गाईचें स्मरण केल्याखेरीज निजूं नये किंवा उठण्याच्या वेळीं त्यांचें नामस्मरण करून उठावें. सकाळ संध्याकाळ त्यांना नमस्कार केल्यानें मनुष्य वैभवाला चढतो. त्यांच्या मलमूत्राला कधीं भिऊं नये व त्यांचें मांस कधीं खाऊं नये. त्यांचें नेहमीं नामस्मरण करीत राहून त्यांना कधीं तुच्छ करूं नये. दुःस्वप्न पडलें असतां गाईचें नांव घ्यावें. शेण अंगाला लावून स्नान करावें व गोंवरीवर बसावें. मलमूत्र व शेंबूड गाईच्या शेणांत टाकूं नये. पश्चिम दिशेला तोंड करून भिजलेल्या कांतड्यावर बसून जेवावें. इंद्रियानिग्रह ठेवून खालीं जमिनीवर पडून तुपावर राहिल्यानें मनुष्याला गाईचें वैभव मिळतें. तुपानें अग्नीला आहुति द्यावी. तुपानेंच स्वस्तिवाचन करवावें. तूप दान करावें, तूप प्यावें, गोमतीमंत्रानें तिळाच्या गाईचें अभिमंत्रण करून सर्व रत्नांनीं तिला मढवून काढून दान केल्यानें हातून कांहीं भलतेंसलतें घडल्याबद्दल किंवा घडावयाचें तें न घडल्याबद्दल मनुष्याला शोक करण्याची पाळी येत नाहीं. 'सोन्याच्या शिंगाच्या पुष्कळ दुधाच्या गाई सुरभि व सुरभीच्या मुली समुद्राकडे जशा नद्या जातात त्याप्रमाणें मजजवळ राहोत, माझें नेहमीं गाईकडे लक्ष आहे, त्याप्रमाणें त्यांचें माझ्याकडे राहो, गाई आमच्या व आह्मी त्यांचे, जेथें गाई तेथेंच आह्मी, ' याप्रमाणें नेहमीं रात्रंदिवस बऱ्या वाईट स्थितींत किंवा मोठ्या भीतीच्या प्रसंगीं ह्मणत राहिल्यानें मनुष्य मोठ्या भयांतून सुटतो.

'या जगामध्यें सर्व दक्षिणांमध्यें आपण उत्तम दक्षिणा व्हावें, आपल्याला दोष ह्मणून मुळीं लागूं नये, आपल्या शेणाच्या स्नानानें लोक पावन व्हावे, देव व मनुष्य यांनीं सर्व स्थावरजंगमाला पावन करण्यासाठीं आपल्या शेणाचा उपयोग करावा व आपल्याकरितां असलेले लोक आपलें दान करणारांना मिळावे, ' म्हणून पूर्वीं उत्पन्न केलेल्या गाईंनीं लाख वर्षें तपश्चर्या केली आहे. तेव्हां शेवटीं ब्रह्मदेव प्रगट होऊन त्यांनीं त्यांच्या मनाप्रमाणें त्यांना वर दिले. म्हणून ह्या भूतभविष्याच्या माता ज्या गाई ह्यांना सकाळ संध्याकाळ नमस्कार केल्यानें मनुष्य वैभवाला चढतो. या तपानंतरच त्या ह्या जगाला आधारभूत मानण्यांत आल्या. म्हणूनच त्या फार पवित्र समजून सर्वांहून श्रेष्ठ समजल्या जातात. उत्तम प्रकारच्या वांसरासह चांगल्या दुधाची गरीब कपिला गाय तिच्यावर वस्त्र टाकून दिली असतां मनुष्याला ब्रह्मलोकीं मान मिळतो. अशाच प्रकारची तांबडी गाय अशाच विधीनें दिली असतां सूर्यलोकीं मान मिळतो. निरनिराळ्या रंगाच्या दिल्यानें चंद्रलोकांत मान मिळतो. पांढरी दिल्यानें इंद्रलोकांत, काळी दिल्यानें अग्निलोकांत, धुरकट रंगाची दिल्यानें यमलोकांत, पाण्याच्या फेंसाच्या वर्णाची दिल्यानें वरुणलोकांत, धुळीच्या रंगाची दिल्यानें वायुलोकांत, पिंगट डोळ्यांची व सोन्याच्या रंगाची दिली असतां कुबेरलोकांत, काडीच्या धुराच्या वर्णाची दिली असतां पितृलोकांमध्यें त्याला मान मिळतो. पोळी असलेली, पुष्ट गाय शृंगारून वांसरासकट दान केली असतां विश्वेदेवाचे श्रेष्ठ लोक मिळून तेथें कांहीं त्रास न होतां रहातां येतें. अशाच प्रकारची गरीब गाय अशाच विधीनें दिली असतां वसूचे लोक मिळतात. पांढऱ्या कांबळ्याच्या रंगाची गाय, वांसरूं व धारेला कांश्याचें भांडें यांसह तिच्यावर वस्त्र घालून दिली

असतां साध्याचे लोक मिळतात. वशिंडाचा बैल शृंगारून दिला असतां देवांचे लोक मिळतात. वयांत आलेला, तुळतुळीत खोंड सर्व रत्नांनीं मढवून दिला असतां गंधर्व व अप्सरा यांचे लोक मिळतात. पोळीचा बैल रत्नांनीं शृंगारून दिला असतां शोकाला कारण न उरतां मनुष्य प्रजापतीच्या लोकाला जातो. गोप्रदानामध्यें गढ़लेला मनुष्य ढगांना फोडून त्यामधून सूर्यासारखा लखलखीत विमानांत बसून स्वर्गाला जाऊन त्या ठिकाणीं झळकत रहातो. त्या ठिकाणीं खुपसूरत हजारों देवस्त्रिया अशा मनुष्याला रमवितात. वीणा, वल्लकी यांच्या नादांनीं त्याचप्रमाणें नूपुरांच्या रुणझुण आवाजांनीं हरिणाक्षी त्याठिकाणीं सुखानें निजलेल्या याला जागें करतात. जितके केंस त्या गाईच्या अंगावर असतात, जितकीं वर्षें हा तेथें बहुमानानें राहून स्वर्गांतून खालीं मृत्युलोकामध्यें आल्यावर देखील हा चांगल्या श्रीमंत घरांत जन्माला येतो.

पुष्कळ दूध देणाऱ्या गाईपासून तूप मिळत असून तुपापासूनच त्यांची उत्पत्ति आहे. 'तुपाच्या नद्या व तुपाच्या लाटा ज्यांच्यापासून उत्पन्न होतात, अशा ह्या गाई नेहमीं माझ्या घरामध्यें असोत; तूप हेंच माझ्या हृदयांत असून माझ्या नाभीच्या ठिकाणीं, माझ्या सर्व अवयवांच्या ठिकाणीं, त्याप्रमाणें माझ्या मनाच्या ठिकाणीं राहिलें आहे, माझ्या पुढें मागें सर्व बाजूंला नेहमीं गाई असून मी गाईंच्या मध्यें रहात आहें, ' याप्रमाणें नेहमीं सकाळ संध्याकाळ आचमन करून जप करीत राहिल्यानें मनुष्य त्या त्या दिवशीं केलेल्या पापापासून मुक्त होतो. ज्या ठिकाणीं सोन्याचे वाडे असून वसुधारा वहाणारी मंदाकिनी नदी आहे अशा गंधर्व व अप्सरा रहात असलेल्या लोकाला हजार गाई दान करणारा मनुष्य जातो. त्या ठिकाणीं, लोण्याचा चिखल, दुधाचें माणी व दह्याचें शेवाळें यांनीं भरलेल्या नद्या वाहत असतात. जो लक्ष गाई विधिपूर्वक दान करतो तो इहलोकीं मोठें वैभव भोगून स्वर्गलोकीं त्याला बहुमान मिळतो. असा मनुष्य आईबापांच्या दहा पिढ्यांचा उद्धार करून त्यांना उत्तम लोकांना पोहोंचवून सर्व कुळाला पावन करतो. गाईच्या एवढीच तिळाची गाय देऊन पाणी देणाऱ्या मनुष्याला यमलोकीं कशाही प्रकारची यातना भोगावी लागत नाहीं. पवित्र व देवांना आधारभूत अशा ज्या ह्या जगाच्या माता गाई यांना उजवी घालून सत्पात्र पाहून दान करावें. वांसरासकट मोठ्या शिंगाची कपिला गाय तिच्यावर वस्त्र घालून व तिच्याबरोबर धारेला कांश्याचें भांडें देऊन जो दान करतो तो शिरण्याला कठिण अशा यमसभेमध्यें निर्भयपणें शिरतो. 'चांगल्या रूपाच्या, अनेक रूपांच्या, विश्वरूपाच्या माता ज्या गाई त्या मला आधार देवोत,' असें नेहमीं तोंडानें ह्मणावें. याहून पवित्र दान नाहीं, याहून पवित्र फल नाहीं. गाईच्या तोडीचें कांहीं झालें नाहीं किंवा होणार नाहीं. कातडें, केंस, शिंगें, शेंपटीचें केंस, दूध, चर्बी या सर्वांच्या योगानें गाय यज्ञाच्या उपयोगीं पडते; ह्मणून तिच्याहून अधिक काय असणार? तेव्हां ज्या गाईचे योगानें सर्व चराचर भरून राहिलें आहे, त्या गाईला नेहमीं नमस्कार करावा. याहून श्रेष्ठ दान नाहीं व याहून श्रेष्ठ आधार नाहीं. सर्ववस्तूंमध्यें गाई श्रेष्ठ व पावन करणाऱ्या असून त्या मानवांना तारतात. ह्या प्रजांना तुपांनीं व दुधांनीं कायम ठेवितात. त्रैलोक्यामध्यें त्यांच्याहून पवित्र कांहीं नसून त्या देवांच्याही वरच्या लोकामध्यें रहातात. मांधाता, यौवनाश्व, ययाति, नहुष प्रभृति राजांनीं हजारों गाई देऊनच देवांना देखील दुर्मिळ असें स्थान मिळविलें. पूर्वी गाईंना शिंगें नसून त्यांनीं शिंगांसाठीं त्या अव्यय परमात्म्याची उपासना केली. ते वेळीं प्रायोपवेशन करून बसलेल्या गाईंकडे येऊन ब्रह्मदेवांनीं त्या सर्वांना त्यांच्या मनांप्रमाणें वर दिल्यामुळें जिच्या तिच्या इच्छेप्रमाणें त्यांना शिंगें फुटलीं, व नाना वर्णांच्या त्या गाई शिंगांच्या योगानें झळकूं लागल्या. त्यांच्यामध्यें हव्यकव्यादि देण्याचे नाना गुण राहून त्या फार सुरेख दिसूं लागल्या. त्यांच्यामध्यें दिव्य तेज आलें. म्हणून गाईंचें दान श्रेष्ठ सांगितलें असून जे भले लोक मत्सर टाकून यांचें दान करतात त्या पुण्यवानांना सर्व दानांचें फल मिळून पवित्र असे गोलोक मिळतात. या गोलोकांमध्यें झाडांना गोड फळें असून उत्तम फलपुष्पांनीं तीं शोभायमान दिसतात. या फुलांना चांगला सुवास असतो, तेथील

सर्व भूमि मणिमय असून सोन्याची त्यावर वाळू आहे. तेथील हवेमध्यें सर्व ऋतूंतील सुखकारक प्रकार आहेत. चिखल किंवा धूळ त्या ठिकाणीं नाहीं. तेथें वहाणाऱ्या लखलखीत नद्यांतून रक्तकमलें विकसत असतात, व त्यांच्या तीराला रत्नें सोनें हीं सकाळच्या सूर्याप्रमाणें चमकत असतात. त्या ठिकाणीं पुष्कळ सरोवरें असून त्यामध्यें ज्याला माणकांचीं पानें व सोन्याचे केसर आहेत अशीं नानाप्रकारचीं नीलकमळें झळकत आहेत. त्या ठिकाणच्या कण्हेरी अगदीं फुललेल्या असून हजारों वेलींनीं त्या वेष्टिल्या असतात. फुललेल्या संतानक वनांनीं त्याना फार शोभा आली आहे. त्या ठिकाणच्या नद्यांच्या तीराला पाणीदार मोत्यें, चमकणारे हिरे व लखलखीत सोनें यांनीं चित्रविचित्रता आली आहे. या लोकांतील कांहीं भागाच्या झाडांना हिऱ्यामाणकांनीं शोभा आली आहे. कांहीं सोन्याचीं असून अग्नीप्रमाणें देदीप्यमान दिसतात. त्या ठिकाणीं पुष्कळ सोन्याचे पर्वत असून हिऱ्यामाणकांच्या टेंकड्या व उंचवटे आहेत. त्यांच्या रत्नमय उंच शिखरांनीं ते फारच खुलून दिसतात. या ठिकाणीं असणाऱ्या झाडांना नेहमीं फलपुष्पें असून भरगच्च पानें असतात. या फुलांना उत्तम सुवास असून फलांना फार गोडी असते. पुण्यवान लोक त्या ठिकाणीं दुःखशोकापासून अगदीं सुटून त्यांच्या सर्व इच्छा पूर्ण होऊन, मर्जेत मोठमोठ्या चांगल्या विमानांतून फिरत दिवस घालवितात. चांगल्या चांगल्या अप्सरा गायननर्तनानें त्यांची करमणूक करतात. गोदान करणारांना हे लोक मिळतात. या लोकांचा स्वामी पूषा असून ऐश्वर्याच्या ठिकाणीं वरुण स्वामी आहे; म्हणून गोदान करणारा वरुणाप्रमाणें ऐश्वर्यवान होतो. ' युगंधरा, सुरूपा, बहुरूपा, विश्वरूपा, माता, ' याप्रमाणें प्राजापत्य मंत्र मनुष्यानें नेहमीं जपावे. जो आदरपूर्वक गाईची सेवा करतो व नम्रपणें त्यांच्या मागून असतो, त्याला त्या संतुष्ट झालेल्या गाईपासून उत्तम वर मिळतात. मनुष्यानें मनांत सुद्धां गाईसंबंधानें वाईट न आणतां त्यांना सुखवावें. त्यांची पूजा करून त्यांना नमस्कार करावा. तीन दिवस त्यांचें उन्हून मूत्र प्यावें, तीन दिवस धारोष्ण प्यावें व नंतर तीन दिवस उन्हून तूप पिऊन पुढें तीन दिवस वायुभक्षण करून रहावें. ज्या पवित्र तुपाच्या योगानें मनुष्य पवित्र लोकांचा उपभोग घेतात तें सर्वांत पवित्र तूप त्यानें डोक्यावर वहावें व या तुपाची आहुति अग्नीमध्यें द्यावी. तूप देऊनच स्वस्तिवाचन करवावें. तूपच द्यावें व तूपच खावें. याच्या योगानें गाईचें वैभव त्याला मिळतें. गाईच्या शेणांतून निवडून काढिलेल्या जवाच्या कण्यांवर मनुष्य तीन दिवस राहिला असतां ब्रह्महत्येसारख्या मोठ्या पापापासून सुद्धां तो मुक्त होतो. दैत्यांच्या हातून पराभव झाला असतां देवांनीं हेंच प्रायश्चित्त घेतल्यामुळें त्यांना त्यांची पूर्वस्थिति मिळाली. गाई ह्या मूर्तिमान धर्म असून अगदीं खात्रीनें पाप दूर करणाऱ्या आहेत. शुचिर्भूत होऊन गाईंमध्यें राहून उपस्पर्श करून गोमती मंत्राचा जप केल्यानें मनुष्य शुद्ध होतो. जे ब्राह्मण ज्ञान, वेदाध्ययन व व्रत यांनीं शुद्ध झाले आहेत त्यांनीं अग्नीमध्यें गाईंमध्यें, किंवा ब्राह्मणसभेमध्यें राहून शिष्यांना यज्ञाच्या तोडीचा गोमती मंत्र द्यावा, व अशाप्रकारें तीन दिवस उपास केल्यानें गोमती मंत्रांत सांगितलेलें फल मिळतें. या मंत्राच्या योगानें पुत्रेच्छूला मुलगा मिळतो, धनेच्छूला पैसा मिळतो व चांगला नवरा हवा असलेल्या मुलींना चांगला नवरा मिळतो; अर्थात जी जी ह्मणून ज्याची इच्छा असेल ती ती सफल होते. गाईच्या केलेल्या सेवेनें ती संतुष्ट झाली असतां प्रत्येक कामना पूर्ण करण्याला ती समर्थ आहे. या गाईहून श्रेष्ठ कांहीं नाहीं.

गाईच्या शेणांत श्री आहे. यासंबंधांत श्री व गाई यांचा पुढील संवाद ऐक. कोणे एकेवेळीं श्री उत्तम स्वरूप धरून गाईंमध्यें शिरली, तेव्हां तिच्या सौंदर्यानें थक्क होऊन ' तूं कोण, कोठून आलीस, ' वगैरे गाईंनीं तिला विचारलें. तेव्हां श्री ह्मणाली, ' लोकांना प्रिय अशी मी श्री आहें. दैत्यांना मी सोडल्यामुळें त्यांचें कायमचें वाटोळें झालें आहे. इंद्र वगैरे देव व ऋषी माझ्यामुळें सुखांत आहेत. याप्रमाणें त्यांना माझ्यामुळेंच धर्मार्थकाम सुखकर होतात. असा माझा प्रभाव आहे. तुमच्या ठिकाणीं रहाण्याची माझी इच्छा आहे, ह्मणून तुमच्याकडे येऊन मी तुह्मांला तोंड पसरीत आहें, तेव्हां तुह्मी सर्व

श्रीमती व्हां.' गाई ह्मणाल्या, 'तूं अस्थिर व चंचळ असून पुष्कळांकडे पळणारी आहेस; ह्मणून आह्मांला तुह्मी जरूर नाहीं. तूं वाटेल तिकडे जा. आह्मां सर्वांचे हातपाय धड आहेत. आह्मांस तुला घेऊन काय करावयाचें आहे? आमचें काम आधींच झालें आहे. आतां तूं खुशाल जा.' श्री ह्मणाली, 'मला अशी तुह्मी टाकतां हें तुह्मांला चांगलें काय? मी कोणाला सहज मिळणारी नसून तुह्मी माझा कां स्वीकार करीत नाहीं? आपण होऊन मनुष्य आला असतां त्याचा मान रहात नाहीं, ही ह्मण कांहीं खोटी नाहीं. लोक मोठमोठें तप करून मला जवळ करतात. तेव्हां तुह्मी माझा स्वीकार करा त्रैलोक्यामध्यें माझा कोणीं अवमान करूं नये.' गाई ह्मणाल्या, 'आह्मी तुझा अवमान करीत नाहीं किंवा तुला तुच्छही करीत नाही. तूं चंचळ व अस्थिर आहेस; ह्मणून आह्मी तुझ्यापासून दूर आहों. उगीच वायफळ बोलून काय उपयोग? तुला वाटेल तिकडे जा. आह्मी सर्व धनकट असल्यामुळें आह्मांला तुझें कांहीं काम नाहीं.' श्री ह्मणाली, 'तुह्मी मला टाकल्यानें सर्व लोक मला तुच्छ करूं लागतील; म्हणून माझ्यावर कृपा करा. तुह्मी मोठ्या दैवशाली असून शरणांगतांना आधार आहां. तुह्मी मला मान यावा. तुमच्या कोणत्या तरी एखाद्या अवयवामध्यें मग तो कितीही निंद्य असला तरी मी राहूं इच्छितें; कारण तुमच्यामध्यें असा एकही भाग नाहीं कीं जो निंद्य आहे. तुह्मी पवित्र, पावन करणाऱ्या व दैवशाली आहां, तेव्हां माझें ह्मणणें ऐका. मी तुमच्या शरीरांत कोठें राहूं सांगा.' याप्रमाणें ती बोलली असतां दयाळू अशा गाईंनीं आपसांमध्यें विचार करून आपल्या शेणामध्यें व मुतामध्यें तिला रहाण्यास सांगितलें, तेव्हां श्री ह्मणाली, 'तुह्मीं माझ्यावर अनुग्रह करून माझ्यावर हा प्रसाद केला. हा तुह्मीं माझा बहुमान केल्यानें तुमचें कल्याण होईल.' याप्रमाणें गाईच्या शेणाचें माहात्म्य आहे.'

'जे गोदान देऊन आहुति दिल्यावर राहिलेलें खातात त्यांच्या हातून नेहमीं निरनिराळे यज्ञ घडत असतात. दहीं व तूप यांवांचून यज्ञ होत नाहीं. त्यामुळेंच यज्ञाला यज्ञत्व येतें. ह्मणूनच यज्ञाला तीं आधार समजलीं आहेत व सर्व दानांमध्यें गोदान श्रेष्ठ समजलें आहे. पुष्टीसाठीं व शांतीसाठीं मनुष्यानें गाईंना जवळ करावा. यांचें दूध, यांचें दहीं, यांचें तूप सर्वच कांहीं पापापासून मुक्त करणारीं आहेत. इहपरलोकीं गाई महातेजस्वी समजल्या आहेत. पूर्वी दैत्यांचा पराभव झाला असतां इंद्र त्रिभुवनाचा स्वामी झाला, प्रजा सर्व आनंदित होऊन सत्यधर्मामध्यें वागूं लागली. तेव्हां देव, ऋषी, गंधर्व वगैरे ब्रह्मदेवांकडे गेले असतां नारद, पर्वत, विश्वावसु, हाहा, हूहू, त्यांच्यापुढें दिव्य तान घेऊन गाऊं लागले. वायु दिव्य पुष्पें वाहून आणीत होता व सर्व ऋतु उत्तम उत्तम सुवास वाहून आणीत होते. याप्रमाणें ही मंडळी जमून उत्तम वाद्यें वाजत असतां इंद्रानें 'गाईंचे लोक सर्व देवांच्या लोकांवर कां, गाईंनीं असें तप किंवा ब्रह्मचर्य तरी काय आचरलें आहे,' ह्मणून विचारल्यावरून ब्रह्मदेव ह्मणाले, 'नेहमीं गाई तुला तुच्छ वाटल्यामुळें त्यांचा प्रभाव त्याच प्रमाणें माहात्म्य तुला ठाऊक नाहीं. गाई ह्या यज्ञाचें अंग आहेत एवढेंच नव्हे, तर प्रत्यक्ष यज्ञ समजल्या आहेत. गाईंवांचून यज्ञ कधीं होत नाहीं. आपल्या दुधानें व तुपानें ह्या लोकांना जिवंत ठेवतात. यांचे खोंड शेतीला लागून धान्य उत्पन्न करतात, व त्यामुळें यज्ञ व हव्यकव्य सुरू असतात. यांचें दूध, दहीं, तूप सर्वच पावन करणारीं आहेत. भूक व तहान सोसून या नानाप्रकारचें ओझें वहातात. सरळ वर्तन ठेवून आपल्या चांगल्या कृत्यानें मुनी व प्रजा ह्यांना ह्या आधार देतात; ह्मणून यांना आमच्या वरचे लोक मिळाले आहेत, यांना वर मिळाले असून या वरदात्या आहेत. या शुभलक्षणी, पावन करणाऱ्या गाई पृथ्वीवर कां आल्या सांगतों ऐक. पूर्वी कृतयुगामध्यें दैत्य त्रैलोक्याचे स्वामी असतां अदितीनें कडक तप केल्यामुळें विष्णूनें तिच्या उदरीं जन्म घेतला. तिच्याप्रमाणेंच दक्षकन्या सुरभीनें रमणीय कैलासपर्वतावर कडक तप केलें असतां तिच्या तपानें सर्व देव, ऋषी वगैरे भाजून निघूं लागले, तेव्हां शंकरांनीं सर्व देवांसह तिच्याकडे जाऊन तूं हें कडक तप कां करीत आहेस,' ह्मणून विचारिलें व वाटेल तो वर देण्याला तयार झाले. तेव्हां 'मला वर कांहीं नको. आपण संतुष्ट झालां एवढेंच मला पुरें,' असें ती ह्म-

णाली. तें ऐकून तिच्या निर्लोभतेनें संतुष्ट होऊन तिला त्यांनीं अमरत्व दिलें व रहाण्याला सर्वाहून उच्च गोलोक दिले व 'तुझी मुलें जगामध्यें लोककल्याण करीत रहातील,' म्हणून सांगितलें. म्हणून हे तिचे लोक सर्वसाधनांनीं संपन्न असून जरा, मृत्यु व अग्नि यांची भीति त्या ठिकाणीं मुळीं नाहीं. दुर्दैव म्हणून त्या ठिकाणीं ठाऊक नाहीं. पुष्कळ रमणीय अरण्यें, उत्तम उत्तम अलंकार व सुंदर वस्तू तेथें आहेत. चांगलीं सज्ज केलेलीं, सुंदर, आंत बसणाराच्या इच्छेप्रमाणें फिरणारीं विमानें त्या ठिकाणीं आहेत. याप्रमाणें हें गाईंचें माहात्म्य असून अशा प्रकारचा पावन करण्याचा त्यांच्या अंगीं गुण आहे. हव्यकव्याच्या वेळीं, यज्ञाच्या वेळीं व पितृतर्पणाच्या वेळीं हें गोमाहात्म्य म्हटल्यानें मनुष्याच्या सर्व इच्छा परिपूर्ण होतात. यापासून परिपूर्ण न होणारी अशी कांहींच इच्छा उरत नाहीं.'

## २६२ तारकासुराचा वृत्तांत–सुवर्णमाहात्म्य. ( १३. ८३–८६ )

युधिष्ठिर म्हणाला, 'गोदानाचें पुण्यकारक माहात्म्य आपण सांगितलें. राजांना तर हें फारच पवित्र आहे, राज्य हें फार कष्टमय असून ज्यांची अंतःशुद्धि झाली नाहीं अशांच्या हातून हा गाडा ओढला जाणें शक्य नाहीं. बहुतेक प्रसंगीं राजांना इष्टसिद्धि प्राप्त होत नाहीं. गोदानानें नृग वगैरे उद्धरल्याचें आपण सांगितलें. यज्ञामध्यें तसेंच सर्व प्रकारच्या धर्मकृत्यांमध्यें भूमि, गाय, किंवा सोनें यांची दक्षिणा यावी म्हणून वेद व उपनिषदें यांत सांगितलें आहे; परंतु श्रुतीमध्यें सुवर्णदक्षिणा सर्वांत श्रेष्ठ सांगितली आहे. तेव्हां सोनें काय आहे, त्याची उत्पत्ति कशापासून आहे, तें अस्तित्वांत केव्हां आलें, त्याचें स्वरूप काय, त्याचें दैवत काय, त्याचें फल काय, हें सर्वांत श्रेष्ठ कां मानण्यांत आलें, सुवर्णदानच लोक उत्तम कां समजतात, सर्व यज्ञांमध्यें हीच दक्षिणा उत्तम कां सांगितली आहे, वगैरे गोष्टींचा उलगडा आपण करा.' भीष्म म्हणाले, 'यासंबंधाची सविस्तर हकीकत सांगतों ऐक. माझे तात शंतनु हें जग सोडून गेल्यावर मी त्यांचें श्राद्ध करण्यासाठीं गंगाद्वाराला गेलों होतों. माझ्या गंगामातेनें मला तेथें साह्य दिलें. पुष्कळ सिद्धि पावलेल्या ऋषींना बोलावून मीं आसन वगैरे देऊन, पाणी देणें वगैरे पूर्वविधि सुरू केले. ते संपल्यावर मी पिंड देऊं लागलों असतां बाहुभूषणादि अलंकारांनीं युक्त असा हात जमिनीमधून तेथें पसरलेल्या दर्भांतून वर आला. अर्थात् तातांनीं स्वतः पिंड घेण्याकरितां हात वर केलेला पाहून मला आनंद झाला; परंतु शास्त्रविचार मनांत आणून श्राद्धामध्यें पिंड हातांत न देतां दर्भांवरच ठेविला पाहिजे, ही शास्त्राज्ञा लक्षांत घेऊन त्या पुढें केलेल्या हातावर पिंड न देतां त्या पसरलेल्या दर्भांवरच मीं पिंड दिले. याप्रमाणें बरोबर रीतीनें शास्त्राज्ञा पाळल्यामुळें तो वर आलेला हात अदृश्य झाला. त्या रात्रीं पितर माझ्या स्वप्नांत येऊन संतुष्ट होऊन मला म्हणाले, 'शास्त्राज्ञेकडे तूं आज पुरविलेलें लक्ष पाहून आम्ही संतुष्ट झालों आहों. शास्त्राज्ञेपासून तूं ढळला नाहींस हें चांगलें केलेंस. याप्रमाणें तूं शास्त्राज्ञा पाळल्यानें त्यांना एक प्रकारचें प्रामाण्य आलें आहे. आजचें हें तुझें वर्तन अगदीं व्हावें तसें झालें. भूमिदान व गोदान तुझ्या हातुन झालीं आहेत. आतां सुवर्णदान कर. कारण तें फार पावन करणारें आहे. तुला धर्म कळतोच आहे. तुझ्या या कृत्यांनीं आह्मी सर्व पापमुक्त होऊं. अशा प्रकारचें दान, दहा मागच्या व दहा पुढच्या पिढ्यांना उद्धरतें.' हे त्यांचे शब्द ऐकून जागा झालों असतां मी थक्क झालों, व सुवर्णदान करण्याचा निश्चय केला. याचें माहात्म्य फार विलक्षण आहे. हें पूर्वीं जमदग्निपुत्र रामांना सांगण्यांत आलें होतें. रामामध्यें पृथ्वी एकवीस वेळ निःक्षत्रिय करून जिंकल्यावर त्या शूर रामांनीं सर्व कामना पूर्ण करणारा अश्वमेध यज्ञ करण्याचा निश्चय करून तो शेवटास नेऊन ते पापमुक्त झाले; परंतु इतकें केलें तरी त्यांचें अंतःकरण हलकें होईना; तेव्हां सर्व विद्या अवगत असलेल्या ऋषींकडे जाऊन त्यांनीं त्यांना विचारलें. तेव्हां वसिष्ठ, अगस्त्य, काश्यप वगैरे ऋषी त्यांना म्हणाले, 'ज्याच्या हातून पाप घडलें आहे असा मनुष्य भूदान, गोदान व धनदान यानें पापमुक्त होतो; परंतु या सर्वांहून श्रेष्ठ असें अग्नीपासून

झालेलें जें सुवर्ण त्याचें माहात्म्य विशेष आहे. पूर्वी अग्नीनें सर्व जग जाळून टाकिलें. त्याच्या बीजापासून दैदीप्यमान सोनें उत्पन्न झालें व त्याच्या उत्तम वर्णामुळें तें सुवर्ण या नांवानें प्रसिद्धीस आलें. याच्या दानानें मनुष्याची प्रत्येक वासना परिपूर्ण होते. ह्या सोन्याची उत्पत्ति अग्नि व सोम ह्यांपासून आहे. बकरा हाच अग्नि असून मेंढा वरुण आहे. घोडा सूर्य आहे. हत्ती नाग असून बैल असुर आहे. कोंबडीं व डुकरें राक्षस असून पृथ्वी, यज्ञ, गाय, पाणी व सोम आहे असें शास्त्रांत सांगितलें आहे. सर्व जग घुसळून तेजाचा एक गोळा उत्पन्न झाला ह्मणून या सुवर्णाला सर्व रत्नांमध्यें श्रेष्ठ समजलें आहे; आणि ह्मणूनच देव, गंधर्व, राक्षस वगैरे सर्व मोठ्या काळजीनें याला जवळ करतात. याचें मुगुट, बाहुभूषण व दुसरे नानाप्रकारचे अलंकार करून तें घालून हे झळकतात. सुवर्णदान हें सर्व दानांमध्यें श्रेष्ठ आहे. सुवर्णदानानें सर्व दानांचें फल येतें. अग्नि हाच सर्व देवतारूप असल्यानें व सुवर्णाची अग्नीपासून उत्पत्ति असल्यानें सुवर्णदान करणाराला सर्व देवता दिल्याचें फळ येतें. पूर्वी त्रिशूलधारी रुद्रांचें हिमालयपर्वतावर पार्वतीशीं लग्न लागून त्यांच्या समागमाच्या वेळीं देवांना काळजी पडून रुद्रांकडे जाऊन तेथें एकत्र बसलेल्या त्या उमामहेश्वरांना सविनय नमस्कार करून ते ह्मणाले, 'एका तपस्व्याचा दुसऱ्या तपस्व्याशीं व एका तेजस्व्याचा दुसऱ्या तेजस्व्याशीं जो हा आपला समागम होणार आहे, त्याचा प्रभाव फुकट न जातां ह्यापासून उत्पन्न होणारा मुलगा मोठा बलशाली होऊन त्रैलोक्यामध्यें तो कांहीं बाकी ठेवणार नाहीं. तेव्हां या त्रैलोक्याचें हित मनांत आणून आम्हांला वर द्या, व हें आपलें तेजस्वी वीर्य आंवरून घ्या. त्रैलोक्याचें सारभूत असे जे तुह्मी दोघे, या दोघांच्या समागमामुळें लोकांना ताप होणार आहे. तुमच्यापासून होणाऱ्या अपत्यामुळें खात्रीनें देवांना पीडा होईल; पृथ्वी, आकाश, स्वर्ग या तिघांना मिळून सुद्धां तें तेज धारण करतां येणार नाहीं, आपल्या तेजाच्या सामर्थ्यानें सर्व विश्व जळून जाणार आहे. म्हणून आमच्यावर कृपा करा, व देवीशीं संबंध करून हिच्या ठिकाणीं पुत्र उत्पन्न करूं नका. दैदीप्यमान असें आपलें तेज धैर्यानें आंवरून घ्या.' हें त्यांचें भाषण ऐकून बरें म्हणून शंकरांनीं आपलें रेत वर चढविलें; परंतु पार्वतीनें आपल्याला होणाऱ्या मुलाच्या याप्रमाणें ते आड आल्यानें स्त्रीस्वभावानें रागावून, 'ज्याअर्थी यांना, मुलगा उत्पन्न करण्याची इच्छा असतां तुह्मी त्यापासून निवारून मला मुलाला मुकविलें, त्याअर्थी तुह्मी सर्व निपुत्रिक व्हाल, तुह्मां कोणालाच मूल होणार नाहीं,' असा तिनें त्यांना शाप दिला. अग्नि त्या वेळेस त्या ठिकाणीं नव्हता म्हणून तो मात्र अनपत्य झाला नाहीं. देवांच्या विनंतीवरून रुद्रांनीं आपलें वीर्य वर ओढून घेतलें खरें, परंतु तें वर घेतां घेतां त्याचा जो थोडा भाग जमिनीवर पडला तो अग्नीमध्यें शिरून वाढूं लागला. याप्रमाणें शंकरांचें तेज अग्नीसारख्या तेजामध्यें पडून तें तत्स्वरूप होऊं लागलें.'

'या सुमारास इंद्र व दुसरे देव यांना तारकासुराचा फार त्रास होऊं लागला होता. सर्व देवलोक, तेथील सुंदर विमानें, मोठमोठे वाडे व ऋषींचे आश्रम यांना दैत्यांचा फार त्रास होऊं लागला; तेव्हां ते ब्रह्मदेवांकडे जाऊन ह्मणाले, 'आपल्यापासून वर मिळालेला तारकासुर, देव व ऋषी यांना फार पीडा देत आहे. त्याच्या मरणाची कांहीं तरी तजवीज करा. त्याच्यापासून मोठी भीति उत्पन्न होत चालली आहे. आह्मांला त्याच्या हातून सोडवा. आपल्यावांचून आह्मांला कोणी आधार नाहीं.' ब्रह्मदेव ह्मणाले, 'मला सर्व सारखे आहेत तरी अधम मला पसंत नाहींत. तेव्हां वेद व सनातन धर्म रसातळाला जाण्यापूर्वी त्या दैत्याचा नाश होईल. या संबंधांत काय करावयाचें तें मीं ठरवून ठेविलें आहे. चिंता सोडा.' देव ह्मणाले, 'आपल्या वरामुळें शक्तीची त्याला फार घमेंड चढली आहे. देवांच्या हातून तो मरणें शक्य नाहीं; कारण, देव, असुर किंवा राक्षस यांच्या हातून तूं मरणार नाहींस, असा त्याला आपला वर आहे. शिवाय तुह्मांला मुलगा होणार नाहीं म्हणून देवांनाही शाप झाला आहे.' ब्रह्मदेव ह्मणाले, तो शाप झाला ते वेळीं अग्नि त्या ठिकाणीं नव्हता. तो देवशत्रूला मारण्याकरितां अपत्य उत्पन्न करील. सर्व देव, दानव, राक्षस, गंधर्व इत्यादिकांना मागें सारून आपल्या अ-

मोघ अस्त्रांनीं तो तुमची तारकासुरापासून उत्पन्न झालेली भीति नाहींशी करून, आणखी दुसऱ्या देवशत्रूंनाही मारील. संकल्प हा सनातन असून यालाच काल ही संज्ञा आहे. हेंच अग्नीहून वरचढ अग्नींत पडलेलें महातेज अग्नि गंगेच्या ठिकाणीं ठेवील, आणि त्याच्यापासून तुमची भीति दूर होईल; ह्मणून त्या अग्नीला सोधून त्याकडे ही कामगिरी सोंपवा. **तेजस्वी लोकांच्या शापाचा तेजस्वी लोकांवर परिणाम होत नाहीं;** त्याचप्रमाणें बलाचा त्याहून विशेष बलाशीं संबंध आला असतां पहिलें बळ दुबळें पडतें. जे तपस्वी आहेत त्यांच्या अंगीं वरदानानें अवध्य झालेल्यांना सुद्धां मारण्याचें सामर्थ्य येतें. ज्याला अपत्याची गोडी आहे, असा कामस्वरूप अग्नि सर्वांमध्यें जुनाट आहे. त्याला ओळखतां येणें कठीण आहे. वाटेल तिकडे जाण्याचें त्याच्या अंगीं सामर्थ्य असून वाटेल त्या वस्तूच्या ठिकाणीं असण्याचेंही त्याला सामर्थ्य आहे. सर्व लोकांच्या हृदयांमध्यें तो असून रुद्राहूनही तो श्रेष्ठ आहे; तेव्हां त्याला शोधून काढा. तो तुमचे हेतू परिपूर्ण करील.' हें भाषण ऐकून आपला हेतू सिद्ध होऊन देव अग्नीच्या शोधाला निघाले. त्यांनीं जगाचा प्रत्येक भाग धुंडाळला तरी आपल्या ठिकाणींच लीन होऊन नाहींसा झालेला अग्नि त्यांना सांपडेना. इतक्यांत पाण्यांतील एक बेडूक अग्नीच्या तेजानें भाजून निघाल्यामुळें पाण्यांतून वर निघून त्या देवांना ह्मणाला, 'अग्नि पाण्याच्या तळाला रहात आहे, त्याच्या संतापानेंच मी वर आलों आहें. आपल्या तेजानें पाणी उत्पन्न करून त्यानें आह्मांला अगदीं त्रास देऊन सोडला आहे. त्याच्या तेजानें आह्मी सर्व भाजून निघालों आहों. जर तुम्हांला त्याची गांठ घ्यावयाची असेल तर या ठिकाणीं तो तुम्हांला सांपडेल.' असें बोलून तो बेडूक नाहींसा झाला. त्याचा हा विश्वासघात अग्नीला कळून त्यानें सर्व बेडकांच्या जातीला 'तुम्हांला रसज्ञान रहाणार नाहीं.' म्हणून शाप देऊन तो दुसऱ्या ठिकाणीं रहाण्यासाठीं निघून गेला. देवांनीं बेडकांवर कृपा करून, 'तुम्हांला अग्नीच्या शापानें जीभ नाहींशी होऊन जरी रसज्ञान नाहींसें झालें आहे तरी नानाविध शब्द उच्चारण्याचें सामर्थ्य तुमच्या अंगांत राहील, अन्नावांचून बिळामध्यें कृश होऊन मेल्यासारखे राहिलां असतां पृथ्वी तुह्मांला कायम ठेवील व रात्रीच्या वेळीं जिकडे तिकडे अंधारमय असतां तुह्मी खुशाल फिरत रहाल,' असें म्हणून फिरून ते अग्नीच्या शोधाला निघाले; तेव्हां ऐरावतासारख्या एका हत्तीनें अग्नि पिंपळामध्यें दडून राहिला आहे, म्हणून त्यांना कळविलें. त्याच्या योगानें राग येऊन अग्नीनें, 'तुमच्या जिभा उलट्या होतील.' म्हणून त्यांना शाप देऊन तेथून निघून तो शमीमध्यें जाऊन राहिला. इकडे देवांनीं 'तुमच्या जिभा उलट्या झाल्या आहेत तरी तुम्हांला सर्व प्रकारचें अन्न घेतां येईल व अस्पष्ट पण मोठा शब्द उच्चारतां येईल असा हत्तीला वर देऊन फिरून ते अग्नीचे शोधाला लागले. तेव्हां तो शमीमध्यें असल्याची बातमी राघूनें देवांना दिली; ह्मणून यापुढें 'तुह्मांला बोलतां येणार नाहीं, असा त्यांना शाप देऊन त्यांची जीभ अग्नीनें फिरवून टाकिली. देवांनीं, 'तुह्मांला अगदींच बोलतां येणार नाहीं असें होणार नाहीं, तुमची जीभ फिरली आहे तरी लहान मूल किंवा ह्मातारे लोक यांसारखे अस्पष्ट शब्द तुमच्या वाणींतून बाहेर पडतील,' असा वर राघूला दिला. याप्रमाणें त्यांना अग्नि शमीच्या झाडांत सांपडल्यामुळें सर्व धर्मकृत्यांमध्यें शमीला अग्नीचें रहाण्याचें ठिकाण धरलें आहे. तेव्हांपासून अग्नि शमीमध्यें दिसून येतो व मनुष्यांना अग्नि उत्पन्न करण्याला तेव्हांपासून हा शमीचा वृक्ष उत्तम उपाय सांपडला आहे. अग्नीनें जें पाणी रसातळाच्या ठिकाणीं उत्पन्न केलें तें पर्वतामधून वाहणाऱ्या ऊष्ण झऱ्याच्या रूपानें बाहेर पडतें. त्यामध्यें अग्नि कांहीं काळ राहिल्यानें तें त्याच्या तेजानें ऊष्ण झालें आहे. देवांना पाहून अग्नीला त्रास झाला आणि 'तुह्मी काशाकरितां आलां,' म्हणून त्यानें त्यांना विचारलें. तेव्हां, 'आह्मी कांहीं कामाकरितां तुझ्याकडे आलों आहों, ब्रह्मदेवांच्या वरानें फुगलेला तारकासुर आपल्या वीर्यानें आह्मांला त्रास देत आहे. त्याच्यापासून आमचें रक्षण कर, तुझ्या तोडीचें तेज ज्याच्या अंगीं असा त्या असुराची भीति दूर करणारा वीर्यशाली मुलगा उत्पन्न कर. आह्मांला पार्वतीचा शाप झाला असल्यामुळें तुझ्यावांचून आधार नाहीं,'

असें ते त्याला म्हणाले. तेव्हां अतुल तेजस्वी अग्नि बरें म्हणून गंगेकडे गेला व योगसामर्थ्यानें तिच्याशीं संबंध घडवून त्यानें तिच्या ठिकाणीं गर्भ उत्पन्न केला. अग्नीप्रमाणें तेजस्वी तो गर्भ तिच्या ठिकाणीं वाढूं लागला असतां गंगेला फार अस्वस्थता उत्पन्न झाली व फार संताप होऊन तिला तो धरवेना. गंगेमध्यें अग्नीनें तो तेजस्वी गर्भ ठेविला असतां एका असुरानें मुद्दाम एक भयंकर शब्द केला; त्याच्या योगानें गंगा बावरून जाऊन तिचे डोळे कावरे बावरे होऊन तिची चलबिचल झाली, व बावरून जाऊन तो गर्भ धारण करण्याचें तिच्या अंगामध्यें सामर्थ्य उरलें नाहीं. त्या गर्भाच्या तेजानें वेडी बनून कांपत कांपत ती अग्नीला म्हणाली, 'हा गर्भ माझ्यानें धारण करवत नाहीं. यानें मला अगदीं वेड लागून माझ्या मनाची स्वस्थता नाहींशी झाली आहे. माझें मन जाग्यावरून उडालें आहे. तेव्हां मी हा गर्भ मनांत नसतां मोठ्या कष्टानें बाहेर सोडतें. तुझ्या तेजाशीं माझा प्रत्यक्ष संबंध घडला नसून अपत्यासाठीं हा सूक्ष्म संबंध घडला आहे; तेव्हां मी जो हा गर्भ टाकणार आहें त्यामध्यें जो कांहीं गुणदोष असेल तो तुझ्याच माथीं आहे.' हें ऐकून अग्नि तिला म्हणाला, 'हा गर्भ तूं धारण कर. टाकूं नकोस. यापासून चांगले परिणाम होतील.सर्व पृथ्वी धारण करण्याचें तुझ्या अंगांत सामर्थ्य आहे. याला टाकण्यांत तुला कांहीं फायदा होणार नाहीं.' असें अग्नीनें सांगितलें तरी न ऐकतां गंगेनें मेरूच्या पृष्ठावर तो गर्भ निरुपायानें सोडून दिला. अग्नीनें त्या गर्भाच्या कुशलतेसंबंधानें तिला विचारलें. तेव्हां ती म्हणाली, 'त्या गर्भाचा वर्ण सोन्यासारखा असून तो तुझ्यासारखाच तेजस्वी आहे. त्यानें सर्व पर्वतावर प्रकाश पाडला आहे. त्याच्यापासून निघणारा परिमल पद्मकमलांनीं भरलेल्या सरोवराच्या गारीगार करून सोडणाऱ्या सुगंधासारखा आहे. त्याच्या तेजानें त्या पर्वतावरील सर्व पदार्थ सूर्यकिरणांप्रमाणें सुवर्णमय बनून राहिले आहेत. त्या गर्भाचें तेज पर्वत, नद्या व झरे यांवर पसरून राहून सर्व चराचर त्यानें तेजःपुंज केलें आहे. हा तुझा मुलगा कांतीनें प्रतिचंद्रसूर्यप्रमाणें आहे.' असें म्हणून ती त्या ठिकाणीं गुप्त झाली.

अग्निही ह्याप्रमाणें देवकार्य करून यथेच्छ चालता झाला. या त्याच्या कृत्यामुळें देवांनीं त्याचें हिरण्यगर्भ असें नांव ठेविलें, व गंगेनें टाकल्यावर पृथ्वीनें हा गर्भ धारण केला, म्हणून तिला वसुमती असें नांव पडलें. इकडे गंगेनें टाकलेला तो गर्भ शरवनांत पडून तेथें तो विलक्षण वाढूं लागला असतां सकाळच्या सूर्याप्रमाणें तेजस्वी असा तो कृत्तिकांच्या दृष्टीस पडला; तेव्हां स्तनपान देऊन त्यांनीं त्याला पोसलें; म्हणून त्याला कार्तिकेयत्व आलें, व स्कन्न झालेल्या बीजापासून त्याची उत्पत्ति झाली ह्मणून त्याला स्कंद ह्मणूं लागले. गुहेमध्यें एकांतांत त्याची उत्पत्ति झाल्यामुळें त्याला गुह हें नांव पडलें. याप्रमाणें सोन्याची उत्पत्ति अग्नीपासून झाल्यामुळें सर्व वस्तूंमध्यें याला श्रेष्ठत्व येऊन देवांचेंही हें भूषण होऊन राहिलें आहे व याप्रमाणें जातवेदसापासून याची उत्पत्ति असल्यानें ज्याला जातरूप असें नांव आहे. सर्व रत्नांमध्यें हें श्रेष्ठ रत्न आहे. पवित्र वस्तूंमध्यें अति पवित्र आहे. व मंगल वस्तूंमध्येंही अतिमंगल आहे. अग्नीसोमापासून सुवर्ण निघालें आहे, त्याचा इतिहास असा आहे. पूर्वी रुद्रांनीं वरुणरूप धारण करून यज्ञ केला असतां अग्नीसह सर्व देव व ऋषी त्या यज्ञाला हजर होते. सर्व यज्ञांगें, वषट्, सामदेव, यजुर्वेद, पद व क्रम यांनीं शोभणारे ऋग्वेद लक्षण, स्वर, स्तोम, निरुक्त, स्वरपंक्ति, ओंकार त्याचप्रमाणें निग्रह व प्रग्रह, वेद, उपनिषदें, विद्या, सावित्री, भूतवर्तमानभविष्य हे सर्व त्या ठिकाणीं मूर्तिमान येऊन शिवांना भेटले. नंतर श्रीमान शंकरांनीं आपल्या ठिकाणीं आहुति देण्यास सुरुवात करून त्या यज्ञाला अद्भुत स्वरूप आणलें. स्वर्ग, आकाश, पृथ्वी सर्व तो असून पृथ्वीचा स्वामी तोच आहे. सर्व विद्यांचा स्वामी तोच असून ब्रह्मा, वरुण, अग्नि, प्रजापति वगैरे सर्व तोच आहे. सर्व प्राणिमात्रांचा स्वामी तोच आहे. यज्ञ, तप, क्रतु, दीक्षा, दिशा व त्यांचे अधिपति, देवस्त्रिया हे सर्व त्या ठिकाणीं आले. व त्या सर्वांना तो महादेवाचा यज्ञ पाहून मोठा संतोष झाला. तेथें त्या देवस्त्रियांना पाहून ब्रह्मदेवांचें रेत खालीं पडलें. सूर्यानें मातीशीं मिसळलेलें तें खालून उचलून घेऊन अ-

मींत टाकलें. इकडे तो यज्ञ सुरूच असून त्यामध्यें हवि टाकण्याचें काम सुरू होतें. ब्रह्मदेव स्वतः अग्नीमध्यें आहुति देत होते; जेव्हां त्यांचें रेत बाहेर आलें. तेव्हां त्यांनीं स्रुवामधून योग्य मंत्र ह्मणून अग्नीमध्यें त्याची आहुति दिली. यापासून ब्रह्मदेवांनीं चार वर्ण निर्माण केले. तें ब्रह्मदेवाचें बीज, सत्व, रज, तमानें युक्त होतें. त्यांतील रजोगुणापासून प्रवृत्तीकडे वळलेले सर्व जंगम प्राणिमात्र उत्पन्न झाले, तमोगुणापासून सर्व स्थावर पदार्थ उत्पन्न झाले, व त्यामध्यें असणारा सत्वगुण दोहोंमध्यें मिसळून राहिला. हा सत्वगुण तेजात्मक असून बुद्धीहून कांहीं वेगळा नाहीं, हा शाश्वत असून आकाश याच्यापासूनच आहे. **सर्वप्राणिमात्रांच्या ठिकाणीं हा सत्वगुण असून, ज्याच्या योगानें, हें खरें हें खोटें, हें कळतें तोच हा.** ब्रह्मदेवांचें वीर्य अग्नीमध्यें पडलें असतां मूर्तिमान तीन पुरुष उत्पन्न झाले व ज्या ज्या प्रसंगानें ते उत्पन्न झाले त्या त्याप्रमाणें त्यांच्यामध्यें गुण राहिले. अग्नीच्या ज्वाळेपासून (भृक्पासून) झाले-त्यांना भृगु नांव पडलें. निखाऱ्यापासून झाले त्यांना अंगिरा नांव पडले, व राखेच्या ढिगापासून झाले त्यांना कवि हें नांव पडलें. त्या अग्निच्या मरीचीपासून मरीची झाले व या मरीचींपासून काश्यप झाले. वर सांगितलेल्या अंगिरापासून, यज्ञांत पसरलेल्या कुशांमधून वालखिल्य व अत्रि निघाले. व राखेच्या ढिगापासून तपस्वी, विद्वान असे वैखानस ऋषी झाले. अग्नीच्या डोळ्यांपासून रूपवान अश्विनीकुमार झाले, व शेवटीं त्यांच्या कानापासून प्रजापति झाले. अग्निच्या रोमरंध्रापासून ऋषींची उत्पत्ति झाली. त्याच्या घामापासून छंदस झाले व बलापासून मन झालें; ह्मणूनच अग्नीमध्यें सर्व देवांचा समावेश होतो, असें सांगितलें आहे. अग्नीची ज्वाळा कायम राखणारीं लांकडें महिने होत. त्यांपासून निघणारे रस पंधरवडे होत. त्याच्या काजळाला दिवस आणि रात्र ह्मणतात, व त्याचें जें पित्त त्याला मुहूर्त ह्मणतात. याचें रक्त हेंच रुद्रस्वरूप असून त्यापासूनच मित्रसंज्ञक कनक उत्पन्न झालें. त्याच्या धुरापासून वसु झाले. त्याच्या ज्या ज्वाळा तेच रुद्र व आदित्य असून ग्रह, नक्षत्र तारा वगैरे आकाशांत चमकणारे हे त्याच्या ठिणग्या आहेत. सृष्टीच्या आदिकर्त्यानें याला सर्वश्रेष्ठ व शाश्वत ह्मटलें आहे. हाच सर्ववासना परिपूर्ण करणारा आहे. याप्रमाणें हे सर्व जन्मल्यावर वरुणरूपी पवनात्मक शंकर अग्नीला ह्मणाले, 'हा यज्ञ माझा असून मी यांत गृहपति आहें. तेव्हां यापासून झालेलीं तीन अपत्यें ह्या यज्ञाचें फल असल्यामुळें माझींच आहेत.' अग्नि म्हणाले, 'माझ्या अंगापासून यांची उत्पत्ति असल्यामुळें हीं माझीं मुलें आहेत.' नंतर ब्रह्मदेव म्हणाले, 'माझ्याच शुक्राच्या आहुतीपासून यांची उत्पत्ति आहे; तेव्हां माझींच हीं अपत्यें आहेत. ज्याचें बीज त्याचें फल. त्यांच्या उत्पत्तीला शुक्र हें मुख्य कारण आहे.' तेव्हां देव ब्रह्मदेवांपुढें हात जोडून ह्मणाले, 'आह्मी सर्व चराचर आपलेच आहोंत. तेव्हां अग्नि व महादेव यांच्या मनाप्रमाणें कां होईना.' याप्रमाणें देवांचें भाषण ऐकून ब्रह्मदेवांनीं हट्ट सोडून दिल्यामुळें प्रथम झालेल्या सूर्याप्रमाणें तेजस्वी भृगूंना महादेवांनीं घेतलें व अंगिरसांना अग्नीला दिलें. ब्रह्मदेवांनीं कवींना आपला मुलगा म्हणून घेतलें. याप्रमाणें उत्पत्ति करून लोकांचा प्रसार करण्यामध्यें गढलेले भृगु वारुण या नांवानें प्रसिद्ध झाले. आंगिरा आग्नेय म्हणून प्रसिद्धीला आले. भार्गव व आंगिरा यांचे मोठे वंश वाढून ते पुष्कळ लोकांचे पूर्वज होऊन बसले आहेत. हे सर्व लोक त्यांचे आहेत ह्मटलें तरी चालेल. भृगूंचे त्यांच्या तोडीचे च्यवन, वज्रशीर्ष, शुचि, और्व, शुक्र, वरेण्य, सवन असे सात मुलगे असून त्या सर्वांना भार्गव किंवा वारुण असें ह्मणतात. बृहस्पति, उतथ्य, पयस्य, शांति, घोर, विरूप, संवर्त, व सुधन्वा असे हे आठ आंगिरांचे मुलगे असून यांनाही वारुण अशी संज्ञा आहे. हे सर्व अग्नीपासून झाले असून सर्व निरामय व ज्ञानामध्यें गढलेले असे आहेत. ब्रह्मदेवांचे मुलगे कवी यांना कवि, काव्य, धृष्णु, बुद्धिमान, उशना, भृगु, विरजा, काशी व उग्र असे आठ ब्रह्मदेवाचे मुलगे असून यांनाही वारुण अशी संज्ञा आहे. हे सर्व प्रजांचे स्वामी आहेत. याप्रमाणें या तीन भृगु, आंगिरा

व कवि यांच्यापासून सर्व जगाची उत्पत्ति आहे. पूर्वी ब्रह्मदेव सर्व देवांवर संतुष्ट होऊन, 'हे सर्व जगाचे स्वामी सर्वांना तारतील,' या सर्वांमध्यें मोठें सामर्थ्य येऊन हे मोठमोठ्या वंशांचे कर्ते होऊन त्यांचें तेज वाढवितील, वेद यांना पूर्ण अवगत राहून हे नेहमीं देवांच्या बाजूनें रहातील, हे कडकडीत तप करून ब्रह्मचर्य पाळतील,' असें ह्मणाले. याप्रमाणें मरीचि आदिकरून सर्व ब्रह्मदेवांचे मुलगे होत. याप्रमाणें एक युग सरून फिरून नवीन युग सुरू होतांना प्रत्येक वेळीं ही मंडळी याप्रमाणें आपापल्या स्वरूपांमध्यें कायम होऊन प्रजा उत्पन्न करीत असतात. याप्रमाणें महादेवांच्या यज्ञाच्या वेळची हकीगत आहे. ब्रह्म, पशुपति, शर्व, रुद्र, प्रजापति हे सर्व अग्निस्वरूपी असून याप्रमाणें सुवर्णाची अग्नीपासूनच उत्पत्ति आहे. अग्नि मिळण्याजोगा नसेल तेव्हां त्याच्या ठिकाणीं सोन्याची योजना करून काम चालवितात. शास्त्राधार ज्यांना ठाऊक आहे ते सोन्याचें व अग्नीचें हें ऐक्य ओळखून त्याप्रमाणें वागत असतात. दर्भावर, एक सोन्याचा तुकडा ठेवून त्यावर होम केला असतां तो अग्नीला होम केल्याप्रमाणें आहे. त्याचप्रमाणें वारुळावर बकऱ्याच्या उजव्या कानांत, समभूमीवर होम दिल्यानें अग्नि संतुष्ट होतो, आणि ह्मणूनच सर्व देवतांचें लक्ष अग्नीकडे आहे. अग्नीची उत्पत्ति ब्रह्मापासून असून सोन्याची अग्नीपासून आहे; ह्मणून जे सुवर्णदान करतात त्यांना सर्वदेवता दिल्याचें श्रेय येतें. त्याला उत्तम व दैदीप्यमान लोक मिळतात. स्वर्गामध्यें तो राजाधिराज होतो. जो मनुष्य सकाळच्या वेळीं समंत्रक विधिपूर्वक सुवर्णदान देतो त्याला वाईट स्वप्न पडल्यापासून कांहीं अपाय होत नाहीं. जो सूर्य उगवल्याबरोबर सुवर्णदान करतो त्याचें पाप दूर होतें. दुपारच्या वेळीं सुवर्णदान करणाराचें पुढील पाप नाहींसें होतें, व संध्याकाळीं जो सुवर्णदान करतो तो ब्रह्मलोक, वायुलोक, अग्निलोक, सोमलोक वगैरे ठिकाणीं त्या त्या देवतेच्या समागमांत सुखानें असतो. या जगांत मोठें यश मिळवून, पाप नाहींसें होऊन तो आनंदांत दिवस काढतो. त्याच्या तोडीचा कीर्तिमान कोणी उरत नाहीं. तो यथेष्ट संचार करीत असतो. जे लोक एकदां याला मिळतात, तेथून फिरून याला खालीं यावें लागत नाहीं; अर्थात् सुवर्णदानानें याला या लोकांचा शाश्वत उपभोग मिळतो. सकाळीं अग्नि पेटवून कांहीं व्रत धरून त्याबद्दल सुवर्णदान दिलें असतां मनुष्याच्या सर्व कामना पूर्ण होतात. सुवर्णदानानें वाटेल ते गुण व सिद्धि अंगामध्यें येतात. याप्रमाणें सुवर्णमाहात्म्य आहे.'

युधिष्ठिर ह्मणाला, 'या सुवर्णाबरोबरच उपजलेल्या कार्तिकेयांनीं त्या अवध्य तारकासुराला कसें मारिलें?' भीष्म ह्मणाले, 'पूर्वी सांगितल्याप्रमाणें अग्नीपासून होऊन शरवनांत कृत्तिकांनीं पोसून वाढविलें असतां सर्व देव, गंधर्व, ऋषी त्या अग्निकुमाराला भेटण्याला आले. ऋषींनीं त्यांची स्तुति केली व गंधर्वांनीं गायन केलें. यांना सहा तोंडें असून बारा डोळे व बारा हात होते. खांदे वर आलेले असून अग्नीप्रमाणें ते तेजःपुंज होते. ब्राह्मणांची त्यांना आवड असे. अशा प्रकारें त्यांना शरवनांत निजलेले पाहून देवतांना मोठा हर्ष होऊन असुर मेला असें वाटूं लागलें. तेव्हां देवांनीं यांना जें जें पाहिजे होतें तें सर्व आणून पुरविलें. त्यांना खेळण्याला नानाप्रकारचे खेळ त्याचप्रमाणें पक्षी त्यांनीं आणून दिले. गरुडानें आपला मुलगा चित्रविचित्र पिसांचा मोर दिला. राक्षसांनीं डुक्कर व रेडा दिला. वरुणानें अग्नीसारखा तेजःपुंज कोंबडा दिला. चंद्रानें मेंढा दिला. सूर्यानें आपली रुचिरप्रभा दिली. गोमाता सुरभीनें लाखों गाई दिल्या. अग्नीनें गुणवान बकरा दिला. पृथ्वीनें पुष्कळ फलपुष्पें दिलीं. सुधन्व्यानें उत्तम दांड्याचा रथ दिला. वरुणानें समुद्रामधल्या पुष्कळ चांगल्या चांगल्या जिनसा त्याचप्रमाणें कांहीं चांगले शुभलक्षणी हत्ती दिले. इंद्रानें सिंह, वाघ, चित्ते व दुसरे क्रूर पशू दिले. पुष्कळ राक्षस व असुर त्याच्यामागून असत. याप्रमाणें याला वाढतांना पाहून तारकानें त्याला मारण्याचे पुष्कळ उपाय केले; पण त्यापुढें त्याचें कांहीं चाललें नाहीं; पुढें वेळ आली असतां देवांनीं याला सेनापत्य दिलें व तारकासुरापासून झालेला जुलूम त्याला कळविला. त्यानें आपल्या अमोघ शक्तीनें तारकासुराला सहज ठार करून इंद्राची इंद्रपदावर स्थापना केली व आपण देवांचें कायमचें सेनापत्य

स्वीकारून त्यांचें रक्षण करण्याचें काम आपल्याकडे घेतलें.'

---

## २६३ श्राद्धविधि. ( १३. ८७-९२ )

युधिष्ठिर ह्मणाला, 'तात, आपण चारी वर्णांचे धर्म मला सांगितले, तसाच आतां श्राद्धविधि सांगा.' तेव्हां भीष्म ह्मणाले, 'सांगतों ऐक. हा श्राद्धविधि फार चांगला असून कीर्तिवर्धक व पुत्रप्राप्ति करून देणारा आहे. हा पितृयज्ञ आहे. देव, असुर, मनुष्य वगैरे सर्वांना नेहमीं पितर पूज्य आहेत. प्रथम पितरांना तृप्त करून नंतर देवांना तृप्त करण्यांत येतें; ह्मणून पितरांना सर्व प्रकारें प्रथम तृप्त करावें. पितरांचें श्राद्ध महिन्या महिन्याला करावें ह्मणून सांगितलें आहे; ह्मणून श्राद्धासंबंधी सामान्य विधि कांहीं विशेष गोष्टींनीं मर्यादित केला आहे. श्राद्ध कोणत्याही दिवशीं केलें तरी पितर तृप्त होतात. निरनिराळ्या तिथीला केलेल्या श्राद्धाचे गुणावगुण ऐक. शुक्लप्रतिपदेला श्राद्ध केल्यानें गुणवान मुलें होणारी सुंदर बायको मिळते. शुक्लद्वितीयेला केल्यानें पुष्कळ मुली होतात. तृतीयेला केल्यानें पुष्कळ घोडे मिळतात. चतुर्थीला केल्यानें पुष्कळ किरकोळ जनावरें मिळतात. पंचमीला केल्यानें पुष्कळ मुलगे होतात. षष्ठीला केल्यानें कर्ता मोठा तेजस्वी होतो. सप्तमीला केल्यानें तो कीर्तिमान होतो. अष्टमीला केल्यानें व्यापारांत बरकत येते. नवमीला केल्यानें भरखुराचीं जनावरें मिळतात. दशमीला केल्यानें गुरेंढोरें पुष्कळ मिळतात. एकादशीला केल्यानें पुष्कळ वस्त्रपात्रें मिळतात व तो ब्रह्मतेजानें झळकतो. द्वादशीला केल्यानें नानाप्रकारच्या सोन्यारुप्याच्या मनोरम वस्तू मिळतात. त्रयोदशीला केल्यानें ज्ञातीमध्यें वर्चस्व मिळतें. चतुर्दशीला केल्यानें कुटुंबांतील सर्व तरुण लोक मरून जाऊन तो लढाईंत गुंतला जातो. अमावास्येला केल्यानें त्याच्या सर्व कामना पूर्ण होतात. कृष्णपक्षामध्यें दशमीपासून चतुर्दशीखेरीज बाकीचे सर्व दिवस श्राद्धाला चांगले समजले आहेत. बाकीच्या तिथी चांगल्या नाहींत. शुक्लपक्षापेक्षां कृष्णपक्ष, त्याचप्रमाणें पूर्वाण्हापेक्षां अपराण्ह श्राद्धाला चांगला.

आतां श्राद्धाला योग्य असे पदार्थ कोणते व त्यांचें फल काय तें सांगतों ऐक. तिळ, तांदूळ, जव, उडीद, पाणी, फलमूलें इत्यादिकांनीं पितरांची एक महिनाभर तृप्ति रहाते, पुष्कळ तिळांनीं केलेल्या श्राद्धाचें फल अक्षय्य आहे असें मनूचें मत आहे. सर्वांमध्यें तिळ श्रेष्ठ समजले आहेत. श्राद्धांत मासे दिल्यानें पितर दोन महिने संतुष्ट रहातात. मेंढ्याच्या मांसानें तीन महिने तृप्त होतात. ससाच्या मांसानें चार महिने, बकऱ्याच्या मांसानें पांच महिने, डुकराच्या मांसानें सहा, पक्ष्यांच्या मांसानें सात, पृषत नांवाच्या हरणाच्या मांसानें आठ, रुरु नांवाच्या हरणाच्या मांसानें नऊ, वनगाईच्या मांसानें दहा, ह्मशीच्या मांसानें अकरा व गाईच्या मांसानें बारा महिने ते तृप्त रहातात. तूप घातलेली खीर गोमांसाच्या तोडीची आहे. बैलाच्या मांसानें बारा वर्षेंपर्यंत पितर तृप्त रहातात. वार्षिक श्राद्धाला तरसाचें मांस दिलें असतां पितर बारा वर्षेंपर्यंत तृप्त रहातात. चुक्याची भाजी, कांचनाचीं फुलें व बकऱ्याचें मांस यांचेंही अक्षय्य फल मिळतें. यासंबंधानें पितरांचें ह्मणणें असें आहे कीं, 'दक्षिणायनामध्यें वद्य त्रयोदशीला मघानक्षत्रावर आमच्या वंशजानें आह्मांला तूप घातलेलें पायस द्यावें, मघानक्षत्रावर नतस्थ राहून बकऱ्याचें मांस व कांचनाचीं फुलें द्यावीं, त्याचप्रमाणें तूप घातलेली खीर, हत्तीच्या सावलींत श्राद्ध करून तेथें आह्मांला द्यावी.' पुष्कळ मुलें होण्याची इच्छा करावी ह्मणजे त्यांपैकीं एखादा तरी ज्या ठिकाणीं जगप्रसिद्ध वडाचें झाड असून तेथें केलेलें श्राद्ध अक्षय्य होतें अशा गयेला जाईल. वार्षिक श्राद्धाच्या दिवशीं फलमूलें, मांस, मधुमिश्रित अन्न थोडेंसें दिलें असतां सुद्धां तें अक्षय्य फल देणारें होतें.

यमानें शशबिंदूला निरनिराळ्या नक्षत्रांचा योग असतां जीं निरनिराळीं श्राद्धें सांगितलीं तीं ऐक. जो मनुष्य कृत्तिकेचा योग असतां श्राद्ध करतो त्याला अग्नि ठेवून यज्ञ केल्याचें फल मिळतें व निश्चिंत होऊन आपल्या मुलांसह तो स्वर्गाला जातो. मुलांची ज्याला इच्छा असेल त्यानें रोहिणीचा योग असतां श्राद्ध करावें. ज्याला तेजस्वी होण्याची इच्छा असेल त्यानें मृगशीर्षाच्या योगाला श्राद्ध क-

रावें. आर्द्रेला श्राद्ध केल्यानें मनुष्याच्या हातून क्रूर कर्मे घडतात. पुनर्वसु नक्षत्रावर श्राद्ध केल्यानें मनुष्याजवळ पुष्कळ पैसा होतो. पुष्यावर श्राद्ध केलें असतां मनुष्याला पुष्टि येते. आश्लेषेला केल्यानें शूर मुलगे होतात. मघेला केल्यानें ज्ञातीमध्यें वर्चस्व मिळतें. फल्गुनीला केल्यानें दैववान व उत्तरेला केल्यानें मनुष्य अपत्यवान होतो. हस्ताला केल्यानें मनुष्याच्या मनांत असेल ती इच्छा परिपूर्ण होते. चित्रेला केल्यानें रूपवान मुलगे होतात. स्वातीचा योग असतां पितरांना हा मान दिल्यानें व्यापारांत बरकत येते; विशाखेला श्राद्ध केल्यानें पुष्कळ मुलें होतात. अनुराधाला केल्यानें राज्यचक्र चालविण्याचें अंगांत सामर्थ्य रहातें. ज्येष्ठेला श्राद्ध करून मनुष्याला स्वामित्व मिळतें व तो समृद्धिमान व आत्मनिग्रही होतो. मूळाला श्राद्ध केल्यानें आरोग्यता रहाते. पूर्वाषाढेला केल्यानें उत्तम लौकिक वाढतो. उत्तराषाढेला केल्यानें दुःख, शोक नाहींसे होऊन मनुष्य सुखांत पृथ्वीवर फिरत रहातो. अभिजित नक्षत्रावर श्राद्ध करून मनुष्याला वैद्यकीमध्यें सिद्धि मिळते. श्रवणाला श्राद्ध केल्यानें उत्तम गति मिळते. धनिष्ठेला केल्यानें राज्य मिळतें. शततारकानक्षत्रावर श्राद्ध केल्यानें वैद्यकीमध्यें यश येतें. पूर्वाभाद्रपदेला केल्यानें पुष्कळ बकऱ्यामेंढ्या घरीं रहातात व उत्तराभाद्रेला केल्यानें हजारों गाई मिळतात. रेवतीला केल्यानें पुष्कळ तांब्यापितळेचीं भांडीं घरीं रहातात. अश्विनीला केल्यानें पुष्कळ घोडे मिळतात. भरणीला केल्यानें आयुर्वृद्धि होतें.

आतां या श्राद्धाला ब्राह्मण कसे असावे सांगतों ऐक. दानधर्म ज्याला ठाऊक आहे अशा क्षत्रियानें दानाच्या बाबतींत ब्राह्मणाची फारशी चौकशी करूं नये असें जरी आहे, तरी देवकार्य व पितृकार्य या बाबतींत ती अवश्य करावी. त्यांतून देवतेजच अंगांत शिरून त्यामुळें मनुष्य देवतार्चन करीत असल्यामुळें देवासंबंधी दान विशेष चौकशी न करतां केलें असतांही चालेल; परंतु श्राद्धामध्यें मात्र ब्राह्मणाचें कूल, त्याचें शील, वय, रूप, विद्या व चांगुलपणा या गोष्टी लक्षांत आणिल्या पाहिजेत. यांपैकीं कांहीं पंक्तीला बट्टा आणणारे असतात. कांहीं पंक्तीला पावन करणारे असतात. लुच्चे, भ्रूणहत्या करणारे, क्षयी, गुरें पाळणारे, वेदशास्त्रादिकांचा ज्याला गंध नाहीं असा कुरूप, गांवनोकर, व्याजबट्टा करणारा, गवई, सर्व कांहीं विकणारा, घराला आग लावणारा, विषप्रयोग करणारा, कुटण्या, सोम विकणारा, सामुद्रिक, राजाचा नोकर, तेली, फसव्या, बापाशीं झगडणारा, बायकोच्या जाराबरोबर घरांत रहाणारा, शाप झालेला, चोर, शिल्पकलेवर रहाणारा, बहुरूपी, मित्रद्रोही, परस्त्रीशीं संबंध ठेवणारा, व्रतहीन लोकांचा उपाध्याय, हत्यारावर पोट भरणारा, कुत्रे बरोबर घेऊन शिकारीसाठीं हिंडणारा, ज्याचें थोरल्या भावाच्या आधीं लग्न झालें आहे, ज्याला कुष्ठ वगैरे झालें आहे, गुरुपत्नीशीं संबंध ठेवणारा, नृत्य गायनावर रहाणारा, पुजारी व जोशी इतके लोक श्राद्धाला पंक्तिबाह्य समजले असून अशा ब्राह्मणाला दिलेलें अन्न राक्षसांकडे जातें. त्याचप्रमाणें श्राद्ध जेऊन जो वेदाध्ययन करतो व शूद्रिणीशीं संबंध ठेवतो त्याला श्राद्धाला बोलाविलें असतां त्याच्या ह्या कृत्याबद्दल पितरांना त्याच्या विष्ठेमध्यें एक महिनाभर पडावें लागतें. सोम विकणाराला अन्न दिलें असतां त्याला विष्ठेचें स्वरूप येतें. व वैद्याला श्राद्धांत जेऊं घातलें असतां तें पू व रक्त होतें. पुजाऱ्याला घातलेल्याचा कांहीं उपयोग होत नाहीं. व्याजबट्टा करणाऱ्याला घातलेलें दुर्लौकिकाला कारण होतें. वाण्याचा धंदा करणाराला अन्न दिलें असतां इहपरलोकीं त्याचें कांहीं फळ मिळत नाहीं. पुनर्विवाहाच्या स्त्रीला झालेल्या मुलाला घातलें असतां राखेंत दिलेल्या आहुतिप्रमाणें तें व्यर्थ जातें. त्यांना सांगितलेले धर्म किंवा त्यांच्या जातीला सांगितलेले आचार जे पाळीत नाहींत अशा ब्राह्मणांना दिलेलें अन्न व्यर्थ जातें. जो अल्पबुद्धि मनुष्य वर सांगितल्या प्रकारच्या लोकांना श्राद्धांत जेऊं घालतो तो त्या कृत्यानें आपल्या पितरांना स्वर्गांत विष्ठा खावयास लावतो. अशा प्रकारचे नीच लोक, त्याचप्रमाणें जे शूद्राला उपदेश करतात ते अपंक्त समजले आहेत. आंधळा श्राद्धकर्त्याच्या कुळांतील साठ, षंढ शंभर व कोड्या जितक्यांना पहातो तितक्यांना दूषित करतो. डोक्याला गुंडाळून, दक्षिणेकडे तोंड करून किंवा पा-

यांत जोडा घालून जें कांहीं श्राद्धामध्यें खाल्लें जातें तें असुरांकडे जातें. असूयेनें किंवा अश्रद्धेनें दिलेलें सर्व ब्रह्मदेवांनीं बळीचा भाग ह्मणून ठरवून ठेविलें आहे. कुत्रे त्याचप्रमाणें अपंक्त लोक यांची दृष्टि श्राद्धांत दिलेल्या अन्नाकडे जाऊं नये, ह्मणून चोहोंकडून बंद करून तिळ पसरलेल्या जागेंत श्राद्ध करावें. तिळाशिवाय केलेलें श्राद्ध त्याचप्रमाणें रागानें केलेलें श्राद्ध यांतील हविर्भाग राक्षस व पिशाच्च उपटतात. अपंक्त मनुष्याची नजर जितक्या ब्राह्मणांवर जाते त्या मानानें अशा मनुष्याला श्राद्धाला बोलावणाऱ्या मूर्खाचें पुण्य कमी होतें.

आतां पंक्तिपावन करणारे कोण ते सांगतों ऐक. वेदशास्त्रसंपन्न, स्नानशील, सदाचारसंपन्न, त्रिनाचिकेत, मंत्र जाणणारे, पंचाग्नि ठेवलेले, त्रिसुपर्ण त्याचप्रमाणें वेदाचीं सहा अंगें ठाऊक असलेले, वेद पढविणारांच्या कुळांत झालेले, छंदशास्त्र माहीत असलेले, ज्येष्ठसाम येत असलेले, वडिलांच्या आज्ञेंत असणारे, ज्याच्या दहा पिढ्यांमध्यें लोक श्रोत्रिय असून जो स्वतः तसा आहे, जो स्वतःच्या बायकोशीं ऋतुकालीं संबंध ठेवतो, जो अथर्वशीर्ष ह्मणतो, जो ब्रह्मचारी, व्रतशील, सत्यवादी, धर्मशील व चांगल्या कर्मांत गढलेला आहे, ज्यानें अनेक तीर्थें हिंडून त्या ठिकाणीं स्नान केलें आहे, राग व चंचळपणा ठाऊक नसून जो क्षमाशील, आत्मनिग्रही व इंद्रियनिग्रही आहे, त्याचप्रमाणें जो सर्व भूतांच्या हितामध्यें दक्ष आहे, असे लोक पंक्तिपावन समजले असल्यानें यांना श्राद्धाला बोलवावें. यांना दिलेल्याचें अक्षय्य फल मिळतें. त्याचप्रमाणें मोक्षधर्मवेत्ते यती, योगामध्यें गढलेले, चांगलें व्रत पाळणारे, जे स्वतः शुद्ध राहून दुसऱ्याला इतिहास ऐकवितात, ज्यांना भाष्य व व्याकरण कळतें, त्याचप्रमाणें जे पुराण व धर्मशास्त्र अध्ययन करून त्याप्रमाणें वागतात, जे गुरूच्या घरीं राहिले आहेत, ज्यांच्या हातून सहस्रावधि दानें झालीं आहेत, जे सर्व वेद व त्यांतील आधार यांमध्यें श्रेष्ठ आहेत, हेही पंक्तिपावन असून जितक्यांवर यांची नजर जाते तितक्यांना हे पावन करतात, आणि ह्मणूनच यांना पंक्तिपावन ह्मटलें आहे. वेद पढविणाराच्या कुळांत जन्मलेला, स्वतः वेदवेत्ता असणारा एकटा मनुष्य आसपास सात मैलपर्यंत सर्वांना पावन करतो. जो स्वतः ऋत्विज किंवा वेद पढविणारा नाहीं अशानें त्या ठिकाणीं असणाऱ्या ऋत्विजांच्या परवानगीनें सुद्धां श्राद्धामध्यें मुख्य स्थान घेऊं नये. अशा कृत्यानें त्या ठिकाणीं असलेल्या सर्वांचें पाप त्याच्या माथीं बसतें. सर्व वेदज्ञान असून पंक्तींत बसण्याला जे दोष सांगितले आहेत ते त्याच्या ठिकाणीं नसतील तर तो पतित नाहीं; ह्मणून श्राद्धाच्या ठिकाणीं योग्य मनुष्याची निवड करावी. आपल्या वर्णाला सांगितलेले धर्म योग्य रीतीनें पाळीत असून, ज्यांचा चांगल्या कुळांत जन्म झाला असेल किंवा जे विद्वान असतील अशांनाच श्राद्धाला बोलवावें. ज्याच्या हवीनें देव व पितर तृप्त होत नाहींत, जो मनुष्य श्राद्धाच्या वेळीं योग्य मनुष्याकडे लक्ष न देतां केवळ आपल्या मित्रांना व गोतावळ्यालाच जवळ करतो, असा मनुष्य झगझगीत देवयानावरून स्वर्गाला जाण्याला मुकतो. जो मनुष्य मित्रांना गोळा करण्यासाठींच श्राद्ध करतो तो दोरा तोडून टाकलेला पक्षी ज्याप्रमाणें घरट्याला मुकतो त्याप्रमाणें स्वर्गाला मुकतो; ह्मणून मनुष्यानें श्राद्ध हें मित्राच्या मेजवानीचाच प्रसंग करूं नये. दुसऱ्या प्रसंगीं यथेच्छ त्यांना जेऊं घालावें. जे मित्र नाहींत किंवा शत्रू नाहींत अशा त्रयस्थांना श्राद्धांत जेऊं घालावें. ज्याप्रमाणें नापिकजमिनीमध्यें पेरलेलें बीं उगवत नाहीं व पेरणाराला त्यापासून कांहीं फल मिळत नाहीं त्याप्रमाणें अपात्र लोकांना श्राद्धामध्यें जेऊं घातल्यानें त्याचें इहपर कोठेंच फल मिळत नाहीं. वेद न पढलेला ब्राह्मण काड्याच्या विस्तवाप्रमाणें तेव्हांच गार पडतो ह्मणून त्याला श्राद्ध देऊं नये. राखेंत कधीं कोणी आहुति दिली नाहीं. योग्य पात्राला श्राद्ध न देतां साळ्यालोळ्याच्या न्यायानें जेथें श्राद्धामध्यें व्यवहार होतो तें श्राद्ध पिशाच्चाला पोहोंचतें. देव व पितर यांना तें कधीं पोहोंचत नाहीं. त्याची मजल स्वर्गाला जाण्याऐवजीं वांसरूं चुकलेल्या गाईप्रमाणें ते येथेंच भटकत रहातें. ज्याप्रमाणें राखेमध्यें दिलेली आहुति देवांना किंवा पितरांना कोणालाच पोहोंचत नाहीं त्याचप्रमाणें गाणारा, नाचणारा किंवा लुच्चा मनुष्य यांना दिलेल्या दानाचें कांहीं फळ होत

नाहीं. लुच्चा मनुष्याला दिलेली दक्षिणा देणारा व घेणारा या दोघांनाही विघातक होऊन दोघांचाही त्यापासून कांहीं फायदा होत नाहीं. ह्मणून अशा प्रकारची दक्षिणा फार निंद्य समजली आहे. अशांच्या पितरांना देवयानावरून खालीं घसरावें लागतें. ऋषींनीं घालून ठेवलेल्या मर्यादेमध्यें राहून वेदाध्ययन, ज्ञान, तप व कर्म यांमध्यें जे गढून असतात त्यांनाच ब्राह्मण समजतात. ज्ञाननिष्ठ अशा ब्राह्मणांनाच श्राद्ध द्यावें. जे भाषणामध्यें ब्राह्मणांची निंदा करतात अशांना श्राद्धामध्यें जेऊं घालूं नये. ब्राह्मणांची निंदा केली असतां तीन कुळांचा ते फडशा पाडितात. वेदपारग असे ब्राह्मण दुरूनच ओळखावे व असा ब्राह्मण आपल्याला आवडता असो किंवा नावडता असो त्याला श्राद्ध द्यावें. हजारों खोट्या ब्राह्मणांना जेऊं घालण्यांत जें पुण्य आहे तें एका वेदवेत्त्या ब्राह्मणाला घालण्यांत आहे.'

'आतां हें श्राद्ध कोणी,केव्हां काढलें,कशा प्रकारचें आहे,श्राद्धामध्यें काय काय कर्में, कोणतीं फलमुळें, कोणतीं धान्यें वर्ज आहेत, हें सांगतों ऐक. ब्रह्मदेवपुत्र महर्षी अत्रि, यांचे वंशांत दत्तात्रय झाले. त्यांचे मुलगे निमि होते. या निमींना श्रीमान नांवाचे मुलगे झाले. हजार वर्षें कडक तप केल्यावर कालधर्माला अनुसरून ते मरण पावले. निमींनीं सर्व शौचकृत्यें विधिपूर्वक केलीं, व पुत्रशोकामुळें त्यांना फार संताप झाला. नंतर एके दिवशीं चतुर्दशीला पुष्कळ निरनिराळे पदार्थ गोळा करून त्याच्यासंबंधानें शोक करीत कशीबशी ती रात्र त्यांनीं घालविली. पुढें सकाळीं उजाडल्यावर ते जागे झाले तों त्यांचें दुःख कमी होऊन मनामध्यें दुसरे विचार येऊं लागले. तेव्हां एकचित्तानें त्यांनीं हें श्राद्ध काढलें. जीं फलमुळें व खाण्याचे पदार्थ श्रीमान खात होते, त्यांना आवडते तेच नेहमींचे खाण्याचें पदार्थ जुळवून आमावास्येला त्यांनीं पूज्य अशा ब्राह्मणाला बोलावून, दर्भासनावर बसवून त्याला प्रदक्षिणा घातल्यावर सात ब्राह्मणांना जेवावयास बसविलें व त्यांना आळणी साव्याच्या भाताचें जेवण घातलें, व त्यांच्या आसनावर दक्षिणेकडे तोंड करून दर्भ ठेविले. याप्रमाणें दर्भ देऊन त्यांनीं त्यांना गोत्र व वंश यांचें नांव घेऊन पिंड दिले. याप्रमाणें यथाविधि पिंडदान आटोपल्यावर आजपर्यंत धर्मांत न सांगितलेलें हें धर्मसंकर करणारें कृत्य केल्यानें माझ्या हातून पूर्वीं मुनींनीं न केलेलें हें कृत्य घडलें तेव्हां ब्राह्मण मला शाप देतील कीं काय, ह्मणून पश्चात्तापानें चिंतातुर होऊन त्यांनीं आपले मूळ पुरुष अत्रि यांचें ध्यान केलें. त्याबरोबर अत्रि त्यांकडे येऊन त्यांचें समाधान करून ह्मणाले, 'हें जें तूं श्राद्ध काढलेंस तें पूर्वीं ब्रह्मदेवांनींच काढलें होतें, तेव्हां तुला भिण्याचें कारण नाहीं. त्यांच्यावांचून असा हा श्राद्धविधि दुसऱ्या कोणाच्या हातून निघणार? त्यांनीं काढलेला विधि कसा आहे तो सांगतों ऐक. प्रथम समंत्रक अग्नीच्या ठिकाणीं अग्नौकरण केल्यावर अग्नि, वरुण, विश्वेदेव व पितर यांना त्यांनीं भाग दिले. तेवेळीं श्राद्धामध्यें दिलेले पिंड धारण करणाऱ्या पृथ्वीची 'वैष्णवी, काश्यपी, अक्षया,' म्हणून स्तुति करावी असें सांगितलें आहे. श्राद्धासाठीं पाणी आणण्याच्या वेळीं वरुणाची स्तुति करावी. नंतर अग्नि व सोम यांना हांक मारून हवीनें तृप्त करावें. नंतर पितर म्हणून ब्रह्मदेवांनीं निर्माण केलेले देव व थोर उष्णप यांना भाग द्यावे. याप्रमाणें त्यांना श्राद्धामध्यें भाग दिले असतां ते पापांतून मुक्त होतात. वर सांगितलेल्या पितरांचीं याप्रमाणें नांवें आहेत, अग्नि ज्यांचें मुख आहे असे विश्वेदेव पूर्वींच सांगितले आहेत. बाकीच्यांचीं नांवें बल, धृति, विपाप्मा, पुण्यकृत, पावन, पार्ष्णिक्षेम, समूह, दिव्यसानु, विवस्वान, वीर्यवान, श्रीमान, कीर्तिमान, कृत, जितात्मा, मुनिवीर्य, वीतरोमा, भयंकर, अनुकर्मा, प्रतीत, प्रदाता, अंशुमान, शैलाभ, परमक्रोधी, धीरोष्णी, भूपति, सृज, वज्री, वरी, विद्युद्वर्चा, सूर्यश्री, सोमप, तूर्य, सावित्र, दत्तात्मा, पुंडरीयक, उष्णिनाभ, नभोद, विश्वायु, दीप्ति, चमुहर, सुरेश, व्योमारी, शंकर, भव, ईश, कर्ता, कृति, दक्ष, भुवन, दिव्य, कर्मकृत, गणित, पंचवीर्य, आदित्य, रश्मिमान, सप्तकृत, सोमवर्चा, विश्वकृत, कवि, अनुगोप्ता, सुगोप्ता, नप्ता व ईश्वर हे सनातन विश्वेदेव असून अनंतकालाची गति त्यांना दिसत असते. श्राद्धामध्यें हरीक व पुलक नांवाचें भात, हिंग घातलेल्या

भाज्या, कांदा, लसूण, शेवगा, कांचन, एक कुड्याचा लसूण, कोहाळा, भोपळा, पादेलोण, गांवडुकराचें मांस किंवा यज्ञपूत न झालेल्या जनावराचें मांस, काळें जिरें, बिडलोण, शीतपाकी, ज्याला अंकुर फुटतात अशा प्रकारच्या वस्तू, शिंगाडा, सर्व प्रकारचें मीठ, जांभूळ, हे पदार्थ वर्ज्य आहेत. त्याचप्रमाणें ज्यावर थुंकी पडली आहे किंवा डोळ्यांतील पाणी पडलें आहे, असे पदार्थ श्राद्धांत घेऊं नयेत. पिंडदान किंवा हव्यकव्य यांमध्यें सुदर्शन नांवाची भाजी वर्ज्य सांगितली आहे. श्राद्धांत ब्राह्मणांना जेऊं घालण्याच्या वेळीं चांडाल वगैरे नीच जातीचे लोक, काषाय वस्त्र नेसलेले, कुष्ठ भरलेला, बाटलेला, ब्रह्महत्त्या केलेला, वर्णसंकरापासून झालेला किंवा अशांचा संबंधी यांना जवळ येऊं देऊं नये.'

याप्रमाणें अत्रींनीं सांगितल्यावरून निमींनीं पितृयज्ञ सुरू केल्यापासून सर्व मोठमोठे ऋषी विधिपूर्वक तो करूं लागले. व याप्रमाणें शाद्ध करून ते तीर्थाच्या पाण्यानें तर्पण करूं लागले. याप्रमाणें चारी वर्णांचे लोक श्राद्ध करूं लागले असतां देव व पितर तृप्त होऊन त्यांना तें अन्न जिरवितांना अजीर्ण होऊन त्रास होऊं लागला; तेव्हां ते सोमाकडे जाऊन, 'आह्मांला श्राद्धांतील अन्नानें पीडा झाली आहे, तेव्हां आमचें ज्यानें कल्याण होईल असें कर,' असें ह्मणाले. तेव्हां 'ब्रह्मदेवांकडे जा ह्मणजे ते तुमच्या हिताची गोष्ट करतील,' ह्मणून सोमानें उत्तर दिलें. तेव्हां त्याच्या सांगण्यावरून मेरूच्या शिखरावर बसलेल्या ब्रह्मदेवांकडे जाऊन, 'श्राद्धांत दिलेल्या अन्नानें आह्मांला फार त्रास झाला आहे; तेव्हां आमच्यावर कृपा करून आमचें ज्यांत कल्याण असेल असें कांहीं तरी करा,' असें ते ह्मणाले. हें त्यांचें भाषण ऐकून ब्रह्मदेव ह्मणाले, 'हा माझ्याजवळ अग्नि आहे हा तुमचें हित करील.' तेव्हां अग्नि ह्मणाला, 'श्राद्धामध्यें तुह्मी आह्मी मिळून खाऊं ह्मणजे त्याच्या योगानें तुह्मांला आपलें अन्न खात्रीनें पचवितां येईल.' हें ऐकून पितर निश्चिंत झाले; ह्मणून श्राद्धामध्यें अग्नीला प्रथम भाग देण्यांत येतो. याप्रमाणें श्राद्धामध्यें अग्नीला प्रथम भाग देऊन नंतर पितरांना दिला असतां राक्षस त्याला कांहीं पीडा देऊं शकत नाहींत. अग्निनारायण जवळ असल्यानें राक्षस दूर पळतात. पिंडदानामध्यें प्रथम वडिलांना मग आजांना व मग पणजांना पिंड द्यावें हा श्राद्धविधि आहे; त्याचप्रमाणें प्रत्येक पिंडाच्यावेळीं एकाग्रतेनें सावित्री ह्मणून '**पितृमान सोमाला**' असें ह्मणावें. जी स्त्री विटाळशी किंवा कानतुटकी असेल, तिला श्राद्धाच्या वेळीं जवळ असूं देऊं नये; त्याचप्रमाणें दुसऱ्या कुळांतल्या स्त्रीला श्राद्धामध्यें येऊं देऊं नये. नदी ओलांडीत असतां सर्वपितरांना त्यांचें नांव घेऊन पाणी द्यावें. प्रथम आपल्या पूर्वजांना पाणी दिल्यावर नंतर मेलेल्या मित्रबांधवांना द्यावें. रंगीबेरंगी बैल जुंपलेल्या गाडींतून किंवा नावेंतून नदी ओलांडीत असतां पितर पाण्याची इच्छा धरून असतात ह्मणून विद्वान लोक लक्षपूर्वक पितरांना यावेळीं तर्पण देतात. कृष्णपक्षाच्या पंधराव्या दिवशीं श्राद्ध करावें. या पितृभक्तीमुळें पुष्टी, आयुष्य, वीर्य व वैभव वाढतें. ब्रह्मदेव, पुलस्त्य, वसिष्ठ, पुलह, अंगिरा, क्रतु, कश्यप ह्या मोठ्या योग्यांची पितरांमध्यें गणना आहे. याप्रमाणें हा श्राद्धविधि असून हा केल्यानें मेलेले पूर्वज दुःखांतून मुक्त होतात. याप्रमाणें शास्त्राधारानुरूप हा श्राद्धविधि आहे.'

## २६४ वृषादर्भी व सप्तर्षी यांची हकीकत—यातुधानीची गोष्ट. (१३. ९३–९४)

युधिष्ठिर ह्मणाला, 'व्रतस्थ ब्राह्मणांनीं यजमानाच्या मर्जीखातर जर श्राद्धान्न सेवन केलें तर त्यांचें व्रत मोडतें किंवा काय?' भीष्म ह्मणाले, 'वेदांत न सांगितलेलीं व्रतें पाळणाऱ्यांनीं जर दुसऱ्याच्या मर्जीखातर श्राद्धान्न सेवन केलें तर तें व्रत मोडत नाहीं. वेदोक्त व्रतमात्र मोडतें.' युधिष्ठिरानें विचारलें. 'ज्या ह्या उपवासाला सामान्य लोक तप ह्मणतात तेंच तप, किंवा तप याहून वेगळें आहे?' भीष्म ह्मणाले 'महिनापंधरा दिवस उपवास करणें याला सामान्य लोक तप समजतात; परंतु शरीराला कष्टदायक असा हा उपवास करणाऱ्याला तपस्वी ह्मणतां येत नाहीं किंवा धर्मवेत्ताही ह्मणतां येत नाहीं. त्यागालाच उत्तम तप

समजलें आहे. मनुष्यानें सदा उपवासी, सदा ब्रह्मचारी, सदा मौनधारी राहून वेद पढत रहावें. नेहमीं कुटुंबामध्यें धर्माचरण करीत राहून झोंप घेऊं नये. कधीं मांस खाऊं नये. नेहमीं वेदशास्त्र पठण करीत रहावें. खरें बोलावें. आत्मनिग्रह ठेवावा. विघसाशन ठेवावें. अतिथीची आवड ठेवावी. अमृत भक्षण करावें व पवित्र रहावें.' युधिष्ठिर ह्मणाला, 'सदा उपवास कसा करावा, सदा ब्रह्मचारी कसें रहावें, विघसाशन कशानें होतें, व अतिथीप्रिय कसा होतो?' भीष्म ह्मणाले, नियमित वेळीं सकाळसंध्याकाळ खाऊन मध्यें जो कांहीं तोंडांत टाकीत नाहीं तो सदा उपवासी समजावा. ऋतुकालीं स्त्रीशीं संबंध ठेवणारा ब्रह्मचारी होतो. नेहमीं सत्यभाषण करून दानशील रहावें. जें यज्ञाकरितां शिजविलें नाहीं असें मांस न खाणाऱ्याची मांस न खाणाऱ्यांमध्यें गणना होते. नेहमीं दान करणाऱ्याची पवित्रांमध्यें गणना होऊन जो दिवसा निजत नाहीं तो सदा जागाच समजावा. नोकर व अतिथी यांचें जेवण झाल्यावर जो खातो तो तें अमृतच खातो. ब्राह्मण जेवल्याखेरीज जो अन्न घेत नाहीं त्याच्या त्या व्रतानें तो स्वर्ग मिळवितो. देवता, पितर व नोकरचाकर यांना देऊन राहिलेलें अन्न जो खातो, तो विघसाशन करतो असें समजावें. अशा लोकांसाठीं ब्रह्मलोकीं अनंत लोक तयार करून ठेविले असून गंधर्व व अप्सरा त्यांच्या सेवेला हात जोडून हजर असतात. देवता, अतिथी व पितर यांना देऊन खाणारे लोक पुत्रपौत्रांमध्यें आनंदांत राहून पुढें त्यांना उत्तम गति मिळते.' युधिष्ठिर ह्मणाला, 'ब्राह्मणांना नानाप्रकारचीं दानें करण्यांत येतात त्यासंबंधानें देणारा व प्रतिग्रह घेणारा यांमध्यें काय विशेष आहे?' भीष्म ह्मणाले, जो मनुष्य भल्यापासून दान घेतो, त्याला त्यापासून मुळींच दोष लागत नाहीं ह्मटलें तरी चालेल. वाइटाचा प्रतिग्रह घेतल्यानें मात्र मनुष्य नरकांत पडतो. यासंबंधांत पुढील वृषादर्भी व सप्तर्षी यांचा संवाद ऐक. कश्यप, अत्रि, वसिष्ठ, भरद्वाज, गौतम, विश्वामित्र, जमदग्नि व साध्वी अरुंधती या सर्वांची मिळून गंडा नांवाची एक मोलकरीण होती. पशुसख नांवाचा शूद्र तिचा नवरा होता. हे सर्व समाधीनें सनातन ब्रह्मलोक मिळविण्याच्या खटपटीला लागून तप आचरीत या पृथ्वीवर फिरत असतां एके वेळीं पाऊस अगदीं न पडतां मोठें दुर्भिक्ष पडलें. लोक भुकेनें हैराण होऊन अगदीं हा... झाले. पूर्वी कोणाएका यज्ञाच्यावेळीं शिबीच्या... लगा वृषादर्भी यानें ऋत्विजांना दक्षिणेबद्दल ... ला मुलगा दिला होता. तो अल्पायु असल्या... वेळीं मेला होता. भुकेनें हैराण झाल्यामुळें ...ऊन यज्ञ त्यांनीं करविला होता त्याच्या या मेलेल्या... लाच्या भोंवतीं जमून भुकेनें हैराण होऊन ... त्युलोकांत कोठेंच अन्न मिळेनासें झाल्यामुळें ... तरी प्राण रहावा म्हणून त्याला भांड्यांत घा... ते शिजवीत होते. वृषादर्भी पृथ्वीवर फिरतां फिर... त्यांच्याकडे आला. तेव्हां भुकेनें हैराण होऊन त्य... मुलाला शिजवितांना पाहून तो त्यांना ह्मणाला... माझ्याकडून प्रतिग्रह घ्याल तर त्यापासून तुह्मी य... संकटांतून सुटून तुह्मांला सामर्थ्य येईल. तेव्हां तुह्मी माझ्यापासून दान घ्या. माझ्यापाशीं असेल तें तुह्मी मागा. याचना करणारा ब्राह्मण मला फार आवडतो. मी तुह्मांला हजार खेंचरें देतों किंवा बैलासकट व्यालेल्या चपळ अशा पांढऱ्या गाई देतों, किंवा हजार चांगले जातिवंत ओझीं वहाण्याला समर्थ असे बैल देतों; त्याचप्रमाणें एकच वीण झाली असून गाभण्या असलेल्या चांगल्या गाई देतों, उत्तम उत्तम गांवें देतों, तांदूळ, जव, रत्नें किंवा दुसरें जें कांहीं दुर्लभ असेल तें देतों. या अभक्ष्य पदार्थावर मन ठेवूं नका. तुह्मांला जीव रहाण्यासाठीं काय देऊं सांगा.' ऋषी ह्मणाले, 'राजांचा प्रतिग्रह आरंभीं दिसण्यांत मधासारखा गोड असून परिणामीं विषासारखा आहे, हें आह्मांला कळत असून उगीच तूं आह्मांला मोह कां पाडतोस? ह्या ब्राह्मणाच्या देहाचा देवतांनीं आश्रय केला आहे. तपाच्या योगानें हा शुद्ध होत असून हा संतुष्ट झाल्यानें देवता संतुष्ट होतात. ब्राह्मणानें राजप्रतिग्रह घेतला असतां तो त्या दिवशींच्या त्याच्या तपाच्या योगानें जें पुण्य त्याच्या पदरीं पडलें असतें, तें वणव्याप्रमाणें जळून फडशा पाडतो. तुझें त्याचप्रमाणें तुझ्या त्या दानाचें सदा कल्याण असो. जे तुझ्याकडे तोंड पसरावयास येतील त्यांना ते मागतील तें दे ह्मणजे झालें.'

असें म्हणून ते शिजवीत असलेलें मांस न शिजल्यानें तें तसेंच तेथें टाकून ते ऋषी पुढें आहार मिळविण्यासाठीं निघून गेले. तेव्हां त्या राजाच्या सां- वरून त्याचे कांहीं प्रधान त्यांना देण्याकरितां उंबरें तोडून घेऊन त्यांकडे गेले. त्यांमध्येंच पोटांत सोनें भरलेलीं उंबरें राजाच्या नोकतलीं होतीं; परंतु तीं जेव्हां त्या ऋषींना ते ागले तेव्हां अत्रिऋषी तीं जड पाहून ह्मणा- हीं आह्मांला नकोत. आह्मी अगदीं मूर्ख किं- द्धिहीन नाहीं. यामध्यें सोनें आहे हें आह्मांला तें. आमचे डोळे उघडे आहेत, आह्मी जागें हों. हें जर आह्मी तुमच्यापासून घेतलें तर ाचा येथें व परलोकीं दोन्ही ठिकाणीं आह्मांला कडू परिणाम भोगावा लागणार आहे. ज्याला इहपर सुख हवें आहे त्यानें हें कधीं घेऊं नये.' वसिष्ठ ह्मणाले, 'एक सोन्याचें नाणें घेतलें असतां त्याच्या योगानें शंभर किंवा हजार नाणीं घेतल्याचें पाप माथीं बसतें. तेव्हां इतकीं नाणीं आह्मीं घेतलीं तर खात्रीनें आह्मांला फार वाईट गति मिळेल.' कश्यप ह्मणाले, 'ह्या पृथ्वीवर जेवढें ह्मणून तांदुळ, जव, सोनें, गुरेंढोरें व स्त्रिया आहेत त्या कांहीं एका मनुष्यालासुद्धां कधीं पुरावयाच्या नाहींत. अशी स्थिति असल्यामुळें मनुष्यानें समाधानच धरावें.' भरद्वाज ह्मणाले, 'उपजलेल्या रुरुहरणाचें शिंग जसें त्याच्याबरोबर वाढतें, त्याप्रमाणें मनुष्याची हांव नेहमीं वाढत असून तिला कांहीं मर्यादा नाहीं.' गौतम म्हणाले, 'या पृथ्वीमधील सर्व वस्तू एका मनुष्याची तृप्ति करण्याला पुऱ्या नाहींत. मनुष्य समुद्रासारखा असून तो कधींच भरला असा होत नाहीं.' विश्वामित्र म्हणाले, 'वासनेच्यामागें लागलेल्याची एक वासना पुरी होते न होते तोंच दुसरी बाणाप्रमाणें येऊन त्याला लागते,' जमदग्नि म्हणाले, 'प्रतिग्रहासंबंधानें मनावर दाब ठेवल्यानें तपाला साह्य होतें; परंतु तेंच तो ब्राह्मण लोभाच्या तावडींत सांपडेल तर तें त्याचें तपरूपी धन ओसरून जातें.' अरुंधती म्हणाली, 'कांहींच्या मतानें धर्मासाठीं द्रव्यसंचय करावा असें आहे. परंतु तपाचा संचय द्रव्यसंचयाहून अधिक चांगला.' गंडा ह्मणाली, 'हे माझे धनी सामर्थ्यवान असून ज्याअर्थीं दान घेण्याला इतके भितात त्याअर्थीं मला दुबळीला तर ह्यासंबंधानें फारच भ्यालें पाहिजे.' पशुसख ह्मणाला, 'धर्म टाकण्यांत कांहीं मोक्षसुख नाहीं. ज्ञान हें ब्राह्मणांनाच कळतें आणि हें ज्ञान मिळविण्यासाठींच मी विद्वान लोकांची सेवा करीत आहें.' यावर ऋषी ह्मणाले, 'ज्याच्या ह्या सर्व प्रजा आहेत त्या ह्या आह्मांला फसवून फळें देऊं इच्छिणाऱ्या राजाचें त्याचप्रमाणें त्याच्या या दानाचें कल्याण असो.' असें ह्मणून पोटांत सोनें भरलेलीं तीं फळें टाकून ते ऋषी निघून गेले. मंत्र्यांनीं राजाकडे येऊन ती हकीकत त्यास सांगितली. तेव्हां राजाला फार राग येऊन त्यांचा सूड घेण्याचा विचार मनांत आणून तो घराकडे गेला व कडकडीत नेम धरून होमाग्निमध्यें संस्कारयुक्त मंत्रांनीं एकेक आहुति टाकूं लागला. त्या अग्नीपासून लोकांच्या मनांमध्यें चळकांप उत्पन्न करणारी एक कृत्या उत्पन्न झाली. वृषादर्भीनें यातुधानी असें तिचें नांव ठेवलें. कालरात्रीसारखी ती कृत्या वृषादर्भीपुढें हात जोडून उभी राहून, 'काय आज्ञा आहे,' असें ह्मणाली. तेव्हां वृषादर्भीनें तिला सांगितलें कीं, 'सप्तर्षींकडे जाऊन त्यांचा, त्याचप्रमाणें अरुंधती, त्यांची दासी व नोकर या सर्वांच्या नांवाचा अर्थ पूर्णपणें लक्षांत घेऊन मग त्यांचा नाश कर आणि नंतर तुला वाटेल तिकडे जा.' बरें ह्मणून ती ज्या ठिकाणीं ते ऋषी फिरत होते तिकडे गेली.'

इकडे अत्रिप्रभृति सप्तर्षी त्या वनामध्यें फलमूलें खात फिरत असतां, ज्याचें खांदे, हात, पाय, तोंड, पोट वगैरे सर्वच आंग गलेलठ्ठ वाढून राहिलें आहे, असा एक फिरस्ता कुत्र्याला बरोबर घेऊन चाललेला त्यांना दिसला. याप्रमाणें त्याला गलेलठ्ठ पाहून 'असे लठ्ठ तुह्मी कधींच होणार नाहीं,' ह्मणून अरुंधती सप्तर्षींना ह्मणाली, तें ऐकून वसिष्ठ ह्मणाले, 'आमच्याप्रमाणें त्याच्या अग्निहोत्राला कधीं खाडा मिळाला नसला पाहिजे, सकाळ संध्याकाळ त्याच्या हातून अग्निहोत्र घडत असलें पाहिजे, ह्मणून तो असा लठ्ठ आहे,' अत्रि ह्मणाले, 'आमच्याप्रमाणें भुकेनें याचें सामर्थ्य हिरावून घेतलें नाहीं; आणि त्यामुळें मोठ्या कष्टानें संपादिलेले वेदही हा विसरला नसावा, ह्मणून हा असा लठ्ठ आहे.' वि-

श्वामित्र ह्मणाले, 'आमच्याप्रमाणें शास्त्रांत सांगितलेले शाश्वत धर्म याला पाळतां येत नाहींत असें झालें नसलें पाहिजे. भुकेनें व्याकुळ होऊन आळशी व मूर्ख बनून आमच्याप्रमाणें याच्या हातून धर्म सुटला नसावा, ह्मणून हा असा लठ्ठ आहे.' जमदग्नि ह्मणाले, 'आमच्याप्रमाणें अन्न व सर्पण यांची वर्षाची बेगमी करण्याची काळजी याला नसावी ह्मणून हा असा लठ्ठ आहे.' कश्यप ह्मणाले, 'आमच्यासारखे याचे चार भाऊ देहि ह्मणून तोंड पसरून भीक मागत नसावेत, ह्मणून हा असा लठ्ठ आहे.' भरद्वाज ह्मणाले,'बायकोच्या दुर्लौकिकामुळें या मूर्ख भटुकल्याला आमच्यासारखें वाईट वाटत नसावें, ह्मणून हा असा लठ्ठ आहे.' गौतम ह्मणाले, 'तीन वर्षांचें जुनें दर्भांचें वळलेलें दर्भासन किंवा रंकू हरणाचें कातडें यांवर याला रहावें लागत नसावें, ह्मणून हा असा लठ्ठ आहे.' असें हे एकमेकांत बोलत आहेत तोंच तो प्रवासी आपल्या कुत्र्यासह त्यांजवळ येऊन व्यवहारानुप त्यानें त्या सर्वांच्या हातांत हात घातला. त्या अरण्यामध्यें अन्नाची दुर्मिळता झाली असल्यानें उपासमार काढावा लागत असल्याचें एकमेकांमध्यें बोलणें होऊन ते सर्वच पुढें निघाले. व पोटाचा एकच निश्चय डोळ्यांपुढें ठेऊन ते नानावनांतून फलमूलें तोडीत फिरत राहिले. तेव्हां कोणे एके वेळीं याप्रमाणें फिरत असतां दाट झाडांमध्यें स्वच्छ व प्रसन्न अशा पाण्यानें भरलेलें व कमलांनीं झांकून निघालेलें एक सरोवर त्यांच्या दृष्टीस पडलें. तीं कमलें सकाळच्या सूर्याप्रमाणें कांतिमान असल्यानें त्या सरोवराला तीं फारच शोभा देत होतीं. नानाप्रकारचे जलचर प्राणी त्या पाण्यावर विहार करीत होते. त्या सरोवराकडे जाण्याला एकच वाट असून त्याच्या तीराला चिखल मुळींच नव्हता. त्यामध्यें उतरण्याची वाट फार सोपी होती. वृषदर्भीनें पाठविलेली ती विक्राळ कृत्या तेथील कमलांचें रक्षण करीत होती. ते ऋषी त्या ठिकाणीं बिस तोडण्याला आले असतां तिला एकटीला तेथें पाहून त्या ऋषींनीं तिला 'तूं येथें कोणासाठीं व कां उभी आहेस, तुझ्या मनांत काय आहे,' ह्मणून विचारलें. यातुधानी ह्मणाली, 'मी कोणी तरी असेन माझी तुह्मी चौकशी करूं नका; मी हीं कमलें राखीत आहें हें तुह्मी ध्यानांत ठेवा.' ऋषी ह्मणाले, आह्मी सर्व भुकेले असून आह्मांला खावयास दुसरें कांहीं मिळेनासें झालें आहे; तेव्हां तुझ्या परवानगीनें हीं बिसें आह्मी तोडतों.' यातुधानी ह्मणाली, 'माझा एक करार ऐकून त्याप्रमाणें तुह्मी खुशाल वाटेल तितकीं कमलें तोडा. तुह्मीं प्रत्येकानें आपापलें नांव मला सांगून मग लगेंच हीं बिसें तोडून घ्या.' याप्रमाणें तिचें भाषण ऐकून, ती आपल्याला मारण्यासाठीं आली आहे हें जाणून अत्रि ह्मणाले, 'मी सर्व जगाचें पापापासून रक्षण करतों, व रात्रीचा दिवस करून मी पढत असल्यानें मी पढत नाहीं अशी एकही रात्र सांपडावयाची नाहीं ह्मणून मला अत्रि ह्मणतात.' वसिष्ठ ह्मणाले, 'योगसामर्थ्य माझ्यामध्यें वास करीत असून, गृहस्थाश्रमामध्यें माझा वास आहे व मी सर्वांहून वरिष्ठ आहें' ह्मणून मला वसिष्ठ ह्मणतात.' कश्यप म्हणाले, 'प्रत्येक अवयवाचें मी पालन करतों त्याचप्रमाणें मी तेजस्वी आहें, म्हणून मला कश्यप ह्मणतात.' भरद्वाज ह्मणाले, 'बायका, पोरें, शिष्य, देव, या सर्वांचें मी अन्नानें योग्य भरण करीत असल्यानें मला भरद्वाज ह्मणतात.' गौतम ह्मणाले, 'आकाश व पृथ्वी दमाच्या योगानें मीं जिंकली असून सर्वांच्या ठिकाणीं माझी समदृष्टि आहे; म्हणून स्वच्छ जळत असणाऱ्या अग्नीप्रमाणें कोणाला मला शमवितां येणार नाहीं, आणि जन्मलों तेव्हां मी आपल्या तेजानें सर्व दैदीप्यमान केलें, ह्मणून मला गौतम ह्मणतात.' विश्वामित्र म्हणाले, 'सर्व विश्व माझें मित्र असून मी सर्वांचा मित्र आहें.' जमदग्नि ह्मणाले, 'देवांच्या अग्निहोत्र्याच्या अग्नीमध्यें टाकलेल्या अग्नीपासून माझा जन्म झाला असल्यामुळें मला जमदग्नि ह्मणतात.' अरुंधती ह्मणाली, 'नेहमीं पतीजवळ असून पतींना त्याचप्रमाणें पृथ्वीला मी धरतें व मी पतीच्या मनाविरुद्ध कधीं जात नाहीं; ह्मणून मला अरुंधती ह्मणतात.' गंडा ह्मणाली, गंड ह्मणजे गालाचा पुढें आलेला भाग तो माझा फार फुगीरडा आहे, ह्मणून मला गंडा म्हणतात. पशुसख ह्मणाला, 'मी सर्व पशूंशीं सख्यत्वानें वा-

गून त्यांचा सांभाळ करतों, ह्मणून मला पशुसख ह्मणतात.' यातुधानी ह्मणाली, 'तुमच्या नांवाची तुम्हीं दिलेली ही व्युत्पत्ति मला समजण्याला फार कठीण आहे. ती मला उमगत नाहीं, म्हणून तुम्ही सर्व सरोवरामध्यें शिरून खुशाल कमळें तोडा.' यावर त्या कुत्र्या बरोबर असलेल्या मनुष्याला तिनें नांव विचारलें असतां तो म्हणाला, 'त्यांनीं दिल्याप्रमाणें मला आपल्या शब्दाची व्युत्पत्ति देतां येत नाहीं. मला शुनसखसखा म्हणतात.' यातुधानी म्हणाली, तूं हें आपलें नांव एकदांच अर्धवट सांगितलेंस. फिरून तें स्पष्ट सांग. शुनसख म्हणाला. 'एकदां सांगितलेलें माझें नांव ज्या अर्थी तूं ध्यानांत घेतलें नाहींस त्या अर्थी हा त्रिदंड मारून मी तुला जाळून भस्म करतों.' असें बोलून ब्रह्मदंडाच्या तोडीचा तो त्रिदंड तिच्या टाळक्यावर हाणून त्यानें तिची राखरांगोळी उडवून देऊन खालीं पाडली व तो त्रिदंड जमिनींत रोंवून तो गवतावर बसला. नंतर त्या ऋषींनीं मोठ्या प्रयासानें वाटेल तितकीं कमलें व बिसें तोडून मोठ्या आनंदानें तीरावर त्यांची रास करून ठेवून तर्पण करण्याकरितां पाण्यामध्यें शिरले. फिरून वर येऊन बिसांचा ढीग करून ठेवला होता, त्या ठिकाणीं येऊन पहातात तों त्यांना तीं त्या ठिकाणीं दिसेनात; तेव्हां 'खाण्याकरितां तोडून ठेवलेलीं आमचीं बिसें कोणीं दुष्ट पाप्यानें उपटलीं,' असें ह्मणून एकमेकांचा संशय येऊन ते एकमेकांला विचारूं लागले, व शपथ घेण्याचें त्यांनीं ठरविलें; तेव्हां अत्रि ह्मणाले, 'गाईला पाय लावल्यानें किंवा सूर्याकडे पाहून लघवी केल्यानें किंवा अनध्यायाच्या दिवशीं वेद पढल्यानें लागणारें पाप, ज्यानें बिसें चोरलीं असतील त्याला लागेल.' वसिष्ठ ह्मणाले, 'अनध्यायाचे दिवशीं वेद ह्मणणाराला किंवा कुत्रा बरोबर घेऊन हिंडणाराला किंवा स्वच्छंद वागणाऱ्या संन्याशाला, शरण आलेल्याला, मारण्याला उठलेल्याला, त्याचप्रमाणें मुलीवर पोट भरणाऱ्याला किंवा हलक्यापासून पैसा मिळविण्याची इच्छा करणाराला लागणारें पाप बिसें चोरणाराला लागेल.' कश्यप ह्मणाले, 'वाटेल तेथें वाटेल ती बडबड करणाराला, ठेव गडप करणाराला, खोटी साक्ष देणाराला, यज्ञाशिवाय व्यर्थ मांस खाणाराला, अपात्रीं दान करणाराला, पात्रीं अकालीं दान करणाराला किंवा स्त्रीशीं दिवसा संबंध करणाराला, लागणारें पाप बिसें चोरणाराला लागेल.' भरद्वाज ह्मणाले, 'स्त्रिया, ज्ञाति व पशु यांच्या ठिकाणीं दुष्ट व अधर्मी वर्तन ठेवणाराला, ब्राह्मणाचा वादविवादांत पाडाव करणाराला, ऋक् व यजु गुरूवांचून पढणाराला त्याचप्रमाणें वाळक्या गवताच्या अग्नीवर आहुति देणाराला लागणारें पाप बिसें चोरणाऱ्याला लागो.' जमदग्नि ह्मणाले, 'पाण्यामध्यें मलोत्सर्जन करणाराला, गाईला मारणाराला, तिचा द्वेष करणाराला, ऋतुकालाव्यतिरिक्त स्त्रीशीं संबंध ठेवणाराला किंवा बायकोवर पोट भरणाराला लागणारें पाप बिसें चोरणाराला लागो. लोक त्याचा द्वेष करोत, मित्रांना मुकून त्याला पुष्कळ शत्रु होवोत व आतिथ्याचा मोबदला देण्याचें पातक त्याला लागो.' गौतम ह्मणाले, 'वेदाध्ययन करून तें सोडणाराला, तीन अग्नि न ठेवणाराला, सोम विकणाराला, ज्या गांवांत सर्व जातींचे लोक एकच ठिकाणीं पाणी भरतात अशा गांवीं राहणाराला, किंवा शूद्रीशीं लग्न करून असणाराला लागणारें पाप बिसें चोरणाराला लागो.' विश्वामित्र ह्मणाले, 'ज्यानें बिसें चोरलीं असतील, त्याला आपल्या हयातींत आपले गुरु व नोकरचाकर यांचें पोषण दुसरे करतांना पहाण्याचें नशीबीं येवो, त्याला चांगली गति न मिळो; पुष्कळ मुलें न होवोत, अपवित्र, निंद्य, संपत्तीनें फुगलेला व मत्सरी असा तो होवो. शेती करण्याचें त्याच्या नशीबीं येवो, पावसाळ्यांत घराबाहेर पडण्याचा त्यावर प्रसंग येवो, त्याला दुसऱ्याचा नोकर बनण्याची पाळी येवो, तो राजाचा उपाध्याय होवो व ज्यांचा यज्ञ करवूं नये अशांचा यज्ञ करविण्याची त्यावर पाळी येवो.' अरुंधती ह्मणाली, 'जिनें बिसें चोरलीं असतील, तिला सासूचा अवमान करण्याचें पाप लागो. नवऱ्याशीं तिचें कधीं न पटो. गोड गोड अन्न एकटीनें खाण्याचें पाप तिला लागो. नवऱ्याच्या चार आप्तांमध्यें राहून रात्रीं सतूचें पीठ खाण्याचें पाप तिला लागो. ती उपभोगाला अयोग्य अशी होवो व ब्राह्मणकुळाला अयोग्य अशी वीरवृत्तीचीं मुलें तिला होवोत.' गंडा ह्मणाली, 'जिनें बिसें चोरलीं असतील तिला ने-

ह्मीं खोटें बोलण्याचें पाप लागो. बांधवांशीं तिचें भांडण होवो. मुलीचा पैसा घेऊन तिला दिल्याचें पाप तिला लागो. चांगलें अन्न तयार करून तें एकटीलाच खाण्याचा प्रसंग तिला येवो. गुलामगिरींत तिचा जन्म जावो. व जारकर्मापासून तिला गर्भ राहो.' पशुसख ह्मणाला, 'बिसें चोरणारा गुलाम होऊन भिकार व कुचकामी अशी त्याला पोरांची थिंडोळीं होवोत. व देवतांपुढें तो कधीं न नमो.' शुनसख ह्मणाला, 'ज्यानें बिसें चोरलीं असतील त्याला सर्व साम व यजु पढलेल्या ब्राह्मणाला मुलगी दिल्याचें, व अथर्व वेद पढून अवभृतस्नान केल्याचें श्रेय येवो.' ही याची शपथ ऐकून ऋषी ह्मणाले, 'या तूं घेतलेल्या शपथेमध्यें ब्राह्मणाला प्रतिकूल कांहीं नसून सर्व अनुकूलच आहे, तेव्हां बिसें तूंच चोरलीं आहेस, हें उघड आहे.' शुनसख ह्मणाला, 'तुह्मीं ठेवलेलीं बिसें तुह्मांला दिसत नसल्यानें तुह्मी ह्मणतां हें ठीकच आहे. मींच तुमचीं बिसें चोरलीं. तुमची परीक्षा करण्यासाठीं मींच तीं तुह्मांला न दिमतीलशीं केलीं. मी इंद्र असून तुह्मांला मारण्यासाठीं वृषादर्भीनें निर्माण करून येथें पाठविलेल्या या यातुधानीपासून तुमचें रक्षण करण्यासाठीं मी येथें आलों. तुमच्या या निर्लोभतेनें सर्व कामना परिपूर्ण करणारे अक्षय्य लोक तुह्मांला मिळाले आहेत; तेव्हां त्यांचा उपभोग घेण्याकरितां लवकर चला.' हें ऐकून सर्व ऋषी आनंदभरित होऊन इंद्राबरोबर स्वर्गाला गेले. याप्रमाणें हे महात्मे भुकेनें पिडले असून नानाप्रकारचे भोग यांना देऊं केले असतांही लोभाच्या बळीं न पडल्यामुळें त्यांनीं स्वर्ग मिळविला. ह्मणून कसाही प्रसंग आला असतां लोभाच्या बळीं पडूं नये. ही गोष्ट लक्षांत ठेवल्यानें मनुष्य कोणत्याही संकटांत न पडतां देव, पितर व ऋषी यांना संतुष्ट करून यश मिळवून धर्मार्थ जोडतो.'

---

## २६९ छत्री व जोडा यांचें दान.

### (१३. ९५—९६)

युधिष्ठिर म्हणाला, 'श्राद्धामध्यें जोडा व छत्री देण्याचा जो प्रचार आहे तो कोणापासून पडला? व याची उत्पत्ति कां झाली, हे कशासाठीं देतात? केवळ श्राद्धाच्या वेळेसच नाहीं, परंतु अनेक इतर प्रसंगींही यांचें दान देतात तर यासंबंधानें सविस्तर माहिती सांगा.' भीष्म म्हणाले, 'यांचें दान कायमचें प्रचारांत येऊन पुण्यकारक कसें मानण्यांत आलें तें सांगतों ऐक. पूर्वी भगवान जमदग्नि आपलें धनुष्य घेऊन त्याला बाण जोडून तो सोडण्याचा सराव करीत असतां ज्येष्ठ महिन्यामध्यें एके वेळीं सूर्य डोक्यावर आला असतां त्यांनीं आपली बायको जी रेणुका हिला सोडलेले बाण फिरून सोडण्यासाठीं वेंचून आणण्यास सांगितलें. ती बाण वेंचून आणण्याला चालली असतां उन्हानें डोकें व पाय पोळल्यानें एका झाडाच्या सावलीला क्षणभर बसली; परंतु नवऱ्याच्या शापाच्या भीतीनें लगेच उठून बाण गोळा करून घेऊन पाय होरपळून निघालेली अशी ती खिन्नवदनानें, भीतीनें कांपत नवऱ्याकडे परत आली. 'तुला इतका उशीर कां झाला,' म्हणून जमदग्नीनीं तिला रागावून फिरून फिरून विचारलें. तेव्हां रेणुका म्हणाली, 'सूर्याच्या तेजानें माझें डोकें व पाय होरपळून निघाल्यानें मला पुढें जाववेना म्हणून मी झाडाच्या सावलीला जरा बसलें म्हणून मला थोडा वेळ लागला. तेव्हां आपण मजवर रागावूं नका.' हें ऐकून जमदग्नि म्हणाले, 'आज मी बाण सोडून अस्त्राच्या अग्नीच्या तेजानें आपल्या दैदीप्यमान किरणांनीं तुला पीडा देणाऱ्या या सूर्याला खालीं पाडतों,' असें म्हणून आपलें दिव्य धनुष्य ओढून पुष्कळ बाण घेऊन सूर्याकडे तोंड करून ते उभे राहिले. याप्रमाणें त्यांना तयार होऊन उभे राहिलेले पाहून सूर्य ब्राह्मणरूपानें त्यांकडे येऊन ह्मणाला, 'सूर्यानें आपला काय अपराध केला आहे? बिचारा आकाशामध्यें राहून आपल्या किरणांनीं तो पाणी वर ओढून घेतो व तें फिरून पावसाळ्यांत खालीं पाडतो, व त्यापासूनच लोकांना सुखावह असें अन्न उत्पन्न होतें. अन्न हेंच प्राण असें वेदांत म्हटलें आहे. ढगांमध्यें आपल्या भोंवतीं किरणांचा परिवार घेऊन झांकून राहून या सात द्वीपांवर तो पाऊस पाडतो. त्याचा ओलावा औषधि, लता, फुलें, पानें यांमध्यें भिनून त्यापासून अन्न उत्पन्न होतें. सर्व

जातकर्में, व्रतें, मुंजी, गोदानें, लग्नें, यज्ञाचे थाट, सर्व शास्त्रें, दानें, संबंध, द्रव्यसंचय हीं सर्व अन्नापासूनच आहेत. या जगांत सर्व रमणीय व सुखकर गोष्टी, त्याचप्रमाणें सर्व मनुष्यांचे व्यवसाय अन्नावर आहेत, हें आपल्याला कळत नाहीं असें नाहीं. तेव्हां राग आंवरा. सूर्याला पाडून आपण काय मिळविणार ?' याप्रमाणें तो ब्राम्हणवेषधारी सूर्य म्हणाला असतांही जमदग्नीचा राग कमी झाला नाहींसें पाहून सूर्य फिरून हात जोडून गोड शब्दांनीं त्यांना म्हणाला, ' सूर्य नेहमीं फिरता असल्यानें या चलनेमावर आपण नेम कसा मारणार ?' जमदग्नि म्हणाले,'ज्ञानचक्षूनें तूं चल व अचल असा दोन्ही आहेस, हें मी जाणतों. आज तुला मला धडा घालून दिला पाहिजे. दुपारच्या वेळीं एक क्षणभर तूं आकाशामध्यें थांबत असतोस; तेव्हां मी तुझ्यावर नेम मारून तुला फोडीन, लक्षांत ठेव. सूर्य म्हणाला, ' हे धनुर्धरामध्यें श्रेष्ठ, आपण खात्रीनें बाण मारून मला फोडाल यांत संशय नाहीं. मी गुन्हेगार आहें तरी शरण आलों आहें.' हें ऐकून जमदग्नि म्हणाले, ' तूं माझ्यापुढें नम्र झाला आहेस तेव्हां आतां तुला भिण्याचें कारण नाहीं. ब्राम्हणांमधला सरळपणा; पृथ्वीमधील स्थिरता, चंद्रामधील सौम्यता, वरुणामधील गांभीर्य, अग्नीमधील तेज, मेरूची प्रभा व सूर्याचा ताप यांचें उल्लंघन जो शरणागताला मारील त्याच्या हातून होईल. गुरुपत्नीशीं संबंध ठेवणें, ब्रह्महत्या करणें व दारू पिणें यांपासून लागणारें पाप शरणांगताला मारणाराला लागेल. आतां या संकटाला कांहीं उपाय योज कीं, ज्याच्या योगानें तुझ्या किरणांनीं ताप झाला असतां लोकांना वाटेत सुख व्हावें.' असें म्हणून ते थांबले असतां सूर्यानें झटकन् एक छत्री व जोडा त्यांना देऊन तो म्हणाला,' या छत्रीच्या योगानें माझ्या किरणांना प्रतिबंध होऊन डोक्याला त्रास होणार नाहीं, व ह्या कातड्याच्या जोड्यानें पायाचें रक्षण होईल. आजपासून या दोन वस्तूंचें दान सर्व पुण्यकर्मांच्या वेळीं कायमचें होऊन राहील.' याप्रमाणें छत्री व जोडा सूर्यानें प्रचारांत आणलीं असून त्रैलोक्यामध्यें हें दान मोठें पुण्यकारक आहे. ब्राम्हणाला छत्री व जोडा देणें हा मोठा धर्म आहे. पांढरी शंभर काड्यांची छत्री जो दान करतो त्याला मेल्यावर सुख होऊन इंद्रलोकीं तो बहुमानानें रहातो. पाय पोळणाऱ्या व्रतशील स्नातक ब्राम्हणाला जोडा देणारा देवतांकडून सुद्धां बहुमान पावून गोलोकामध्यें आनंदानें रहातो.'

---

## २६६ वासुदेव व पृथ्वी यांचा संवाद. वैश्वदेवविधि. ( १३. ९७ )

युधिष्ठिर म्हणाला, ' गृहस्थानें या जगांत वैभवाला चढण्याला काय करावें ?' भीष्म म्हणाले, ' या संबंधांत पुढील वासुदेव व पृथ्वी यांचा संवाद ऐक. पूर्वीं वासुदेवानें पृथ्वीला अशाच प्रकारचा प्रश्न केला असतां ती म्हणाली, ' गृहस्थानें ऋषी, देवता, पितर व अतिथी यांचा सत्कार करून यज्ञ करावे. यज्ञानें देवता तृप्त होतात, व आतिथ्यानें मनुष्य तृप्त होतो. सत्पात्रांना त्यांच्या इच्छेनुरूप खाऊं घातल्यानें ऋषी संतुष्ट होतात. जेवणाच्या पूर्वीं गृहस्थानें अग्नीची पूजा करून बलिकर्म करावें. त्यानें देव तृप्त होतात. त्यानें नेहमीं अन्न, पाणी, फलमूलें यांनीं पितरांना संतुष्ट करण्यासाठीं श्राद्ध करावें; शिजलेल्या अन्नाचा अग्नीमध्यें यथाविधि वैश्वदेव करावा. नंतर अग्नि, सोम, धन्वंतरी व प्रजापती यांना निरनिराळा होम द्यावा; नंतर क्रमानें यमाला दक्षिणेकडे, वरुणाला पश्चिमेकडे, सोमाला उत्तरेकडे, प्रजापतीला घरामध्यें, धन्वंतरीला ईशान्येला, इंद्राला पूर्वेला बली द्यावे, व घराच्या दारांत मनुष्याला म्हणून बलि द्यावे, मरुत् व देव यांना घरामध्यें द्यावे, विश्वेदेवांना मोकळ्या जागेत द्यावे, त्याचप्रमाणें भूतराक्षसांना रात्रीं बलि द्यावे. याप्रमाणें योग्य रीतीनें बली दिल्यावर ब्राह्मणांना भिक्षा घालावी. ब्राह्मण न मिळेल तर तो ब्राह्मणांचा भाग काढून अग्नीमध्यें टाकावा. श्राद्ध करते वेळीं, श्राद्ध आटोपून पितरांना तृप्त केल्यावर मग विधिपूर्वक बलिदान करावें. नंतर वैश्वदेव करून, ब्राह्मणांना बोलावून त्यांना बहुमानपूर्वक अन्न देऊन तृप्त करावें. याच्या योगानें तो अतिथींना संतुष्ट करतो. नित्य न राहतां येतो व जातो ह्मणूनच याला अतिथि असें ह्मटलें आहे. गुरु, वडील, मित्र व अतिथि यांना

गृहस्थानें ह्मणावें कीं, 'हें आज माझ्या घरीं तयार आहे' मग ते जें सांगतील तसें करावें. हाच धर्म सांगितला आहे. गृहस्थानें सर्वांना दिल्यावर राहिलेलें अन्न घ्यावें. यानें राजा, उपाध्याय, गुरू, सासरा व स्नातक ब्राह्मण यांना तो घरीं एक वर्षभर रहाणारा असेल तर मधुपर्क द्यावे. सकाळ, संध्याकाळ कुत्रे, चांडाळ, व पक्षी यांसाठीं अन्न जमिनीवर विकिरावें. यालाच वैश्वदेव ह्मणतात. विकारवश न होतां जो गृहस्थ हे सर्वविधि यथासांग करतो त्याला ह्या जगीं ऋषींचा आशीर्वाद मिळून मेल्यावर स्वर्गलोक मिळतात.'

---

## २६७ धूपदीपादिदान. (१३.९८–१००)

युधिष्ठिर ह्मणाला, 'हें जें दीपदान ह्मणतात हें कशाप्रकारचें आहे, कसें उत्पन्न झालें व याचें फल काय?' भीष्म ह्मणाले, 'यासंबंधानें पुढील शुक्र व विरोचनपुत्र बलि यांचा संवाद ऐक. हा बलि त्रैलोक्याचें राज्य करीत असतां भृगुकुलोत्पन्न शुक्राचार्य त्याकडे गेले. तेव्हां अर्घ्यादिकांनीं त्यांची पूजा करून त्यांच्या मागून आसनावर बसून बलीनें त्यांना विचारलें कीं, 'फुलें व धूपदीप यांच्या दानाचें काय फल आहे?' तेव्हां शुक्र ह्मणाले, 'प्रथम तपाची उत्पत्ति होऊन नंतर धर्माची उत्पत्ति झाली. याच्या मध्यंतरीं पुष्कळ लता, ओषधि वगैरे उत्पन्न झाल्या; त्याचप्रमाणें सोमवल्ली पुष्कळ ठिकाणीं उत्पन्न झाली. यांपैकीं कांहींमध्यें अमृताचे गुण असून कांहींमध्यें विषाचे गुण होते; व कांहींमध्यें हे दोन्ही गुण नव्हते. अमृत हें मनाला आल्हाद देऊन एकदम तृप्ति देणारें आहे. विष हें आपल्या उग्र वासानें मनाला वीट आणतें. अमृत हें मंगल असून विष फार अमंगल आहे. ओषधीमध्यें अमृतगुण असून विष हें तेज अग्नीपासून उत्पन्न झालें आहे. मनाला सुप्रसन्न करून फुलें वैभव देतात म्हणूनच त्याला भले लोक सुमन म्हणतात. जो मनुष्य शुचिर्भूत होऊन देवतांना फुलें अर्पण करतो त्यावर देव संतुष्ट होऊन त्याला ते पुष्टि देतात. ज्या ज्या ह्मणून देवतेला उद्देशून फुलें अर्पण करावीं ती ती देवता प्रसन्न होऊन त्याचें मंगल करण्याला तयार असते. ओषधींमध्यें उग्र, सौम्य व तेजस्वी असे प्रकार आहेत. व त्या निरनिराळ्या स्वरूपांच्या असून त्यांच्यामध्यें पुष्कळ निरनिराळे गुण आहेत. आतां यज्ञाला उपयोगी कोणते वृक्ष आहेत; कोणते उपयोगी नाहींत, कोणतीं फुलें असुरांना प्रिय आहेत, कोणतीं देवांना प्रिय आहेत, यक्ष, राक्षस, उरग, मनुष्य, पितर यांना कोणतीं प्रिय आहेत, हें सांगतों ऐक. फुलांमध्यें रानांतील, गांवांत उत्पन्न होणारीं, तयार केलेल्या जमिनींत उत्पन्न होणारीं, डोंगरी, कांटेरी, बिन कांटेरी, असे प्रकार असून त्यांना गंध, रूप व माधुर्य हीं असतात. या फुलांचे गंध मनाला प्रिय व अप्रिय असे दोन प्रकारचे आहेत. मनाला आल्हाद देणारीं अशीं सुवासिक बिनकांटेरी झाडांवर येणारीं बहुतेक पांढरीं अशीं फुलें देवांना आवडतात. पाण्यामध्यें उगवणारीं पद्में वगैरे फुलें गंधर्व व नाग यांना आवडतात. कांट्यांनीं भरलेलीं, उग्र वास असलेलीं तांबडीं फुलें अथर्ववेदामध्यें शत्रूवर जारण मारण वगैरे क्रिया करण्याकडे लावतात. ज्यांचें सामर्थ्य फार कडक आहे, ज्यांना हात लाववत नाहीं, जीं कांट्यांनीं भरलीं आहेत, अशीं तांबडीं लाल किंवा काळीं भोर फुलें भुतांना देतात. मनाला व हृदयाला आनंद देणारीं, ज्यांमध्यें विशेष माधुर्य आहे व जीं दिसण्यांत विशेष सुंदर आहेत अशीं फुलें मनुष्यांकरितां सांगितलीं आहेत. स्मशानांत किंवा देवळांत उगवलेल्या फुलांचा विवाहादि वैभव वाढविणाऱ्या कार्यांना किंवा रतिसुखाच्या वेळीं उपयोग करूं नये. पर्वताच्या शिखरावर उगवणारीं, मधुर वास असणारीं सुंदर फुलें त्यांवर चंदन शिंपडून यथाविधि देवांना अर्पण करावीं. सुवासाच्या योगानें देवांना संतोष होतो. सौंदर्याच्या योगानें यक्षराक्षसांना संतोष होतो. सुस्पर्श अशा वस्तूंनीं नागांना संतोष होतो व या तिन्ही गोष्टींनीं मनुष्यांना संतोष होतो. देवांना फुलें अर्पण केल्यानें ते तात्काल संतुष्ट होतात व केवळ त्यांनीं मनांत आणल्याबरोबर मनुष्याच्या मनांतले चांगले चांगले हेतू सिद्धीस जातात. त्यांना संतुष्ट केलें असतां ते आपल्या भक्तांना संतुष्ट करतात. त्यांना मानलें असतां ते उलट आपल्याला मानतात व त्यांकडे दुर्लक्ष करून

त्यांचा अवमान केला असतां लोकांना ते जाळून टाकतात.

आतां धूपविधि सांगतों ऐक. नानाप्रकारचे बरे वाईट धूप आहेत. कांहीं झाडाच्या रसापासून निघालेले असतात, कांहीं पदार्थांचा वि-स्तवाशीं संबंध होऊन निघतात व कांहीं अ-नेक पदार्थांच्या मिश्रणानें बनतात, कांहीं धूप सुवासिक असतात व कांहीं उग्र अस-तात. सालई खेरीज बाकीच्या सर्व चिकांचा धूप देवतांना आवडता असून त्यामध्यें गुग्गुळ श्रेष्ठ समजला आहे. विस्तवावर टाकण्याच्या धूपामध्यें आगरू मुख्य असून यक्ष, राक्षस व नाग यांना तो प्रिय आहे. दैत्यांना सालई किंवा तशा प्रकारचा धूप आवडतो. सर्ज वगैरे झाडाच्या भुकणीवर दारू वगैरे शिंपडून तयार केलेला धूप मनुष्यासाठीं सां-गितला आहे. अशा प्रकारचे धूप देव, दानव व भूतें यांनाही तात्काळ संतुष्ट करतात. याशिवाय आणखीही पुष्कळ धूप आहेत, ज्यांचा लोक वि-हारकालीं उपयोग करतात. फुलें अर्पण करण्याम-ध्यें जें फळ सांगितलें तेंच धूप दाखविण्यामध्यें-ही आहे.

आतां दीपदान कोणीं, केव्हां, कशा प्रकारानें करावें व त्याचें फल काय हें सांगतों ऐक. दीपाला ज्योति, तेज व प्रकाश ह्मटलें असून याची वर गति आहे; ह्मणून दीपरूपी तेज दान केलें असतां मनु-ष्याचें तेज वाढतें. अंधतम नांवाचा एक नरक आ-हे, त्याचप्रमाणें दक्षिणायनाचा मार्ग हाही अंधकार-मय आहे. यांतून सुटण्यासाठीं मनुष्याला उत्तराय-णामध्यें दीपदान सांगितलें आहे. दीपाची गति ऊर्ध्व असून अंधकार नाहींसा करण्याला हा एक उपाय असल्यानें हें दान प्रशस्त मानलें आहे. देव या दीपदानानेंच तेजस्वी प्रभायुक्त व प्रकाशमान झा-ले आहेत. व तें न केल्यानें राक्षस तमोगुणसंपन्न झाले आहेत. दीपदानानें मनुष्य डोळस व प्रभावान होतो. दीपदान केल्यावर तें परत घेऊं नये किंवा विझवूं नये. दीपदान परत घेणारा आंधळा होऊन त्याला अंधारांत चांचपडावें लागतें व तो प्रभाहीन होतो. दीपदान करणारा दीपमालेप्रमाणें स्वर्गामध्यें झळ-कत रहातो. दीपदानामध्यें तुपाचा दिवा उत्तम समजला आहे. वनस्पतीच्या रसाचा दिवा दुसऱ्या नंबरचा समजला आहे. चरबी वगैरे शरीरांतून निघणाऱ्या पदार्थांचा दिवा वैभवेच्छूनें देऊं नये, डोंगराच्या उताराच्या ठिकाणीं, निबिड अरण्याम-ध्यें, ग्रामवृक्षाच्या ठिकाणीं किंवा चवाठ्यावर नेहमीं दिवा ठेवल्यानें मनुष्य आपल्या कुलाला पुढें आ-णून नांवालौकिकाला चढतो व आकाशांतील ग्र-हांच्या जोडीला जाऊन बसतो.

आतां देव, यक्ष, नाग, मनुष्य, भुतें व राक्षस यांना बली देण्यामध्यें जे गुण आहेत, ते सांगतों ऐक. ज्या गृहस्थांच्या घरीं त्याच्या आधीं ब्राह्मण, देवता, अतिथि व मुलें यांना जेवावयास मिळत नाहीं, असे निःशंक व अमंगळ लोक राक्षसच स-मजावे. म्हणून प्रथम देवांची पूजा करून नमस्कार करून आधीं त्यांना बलि द्यावा. देवता नेहमीं ब-लि घेऊन त्या घरचें कल्याण चिंतीत असतात. त्याचप्रमाणें यक्ष, राक्षस, पन्नग व घरदार नसलेले असे अतिथी त्याचप्रमाणें पितर या गृहस्थानें दि-लेल्या अन्नावरच रहात असतात. देवतांना दहीं दू-ध मिसळून वर फुलें टाकून सुवासिक केलेले व दिसण्यांत चांगले असे बली द्यावे. यक्षराक्षसांना द्यावयाच्या बलीमध्यें रक्तमांसाची रेलचेल असून त्यामध्यें दारू असावी, व त्यावर लाह्यांचें पीठ टा-कलेलें असावें. नागांना पद्म वगैरे कमलांनीं युक्त असे बली आवडतात. गूळ मिसळलेले तीळ भुतां-ना द्यावे. जो याप्रमाणें देऊन खातो त्याला अस्स-ल खाणें मिळून त्याचें बल व वीर्य वाढत असतें. अशा मनुष्याचें घर नेहमीं वैभवानें झळकत असून त्यांतील देवता जागृत असतात; म्हणून वैभवेच्छूनें यांचा आधीं सत्कार करावा.

राजर्षी नहुषाला आपलीं कर्में याप्रमाणें बरोबर केल्यामुळें इंद्रपद मिळालें. तेथें असतां सुद्धां तो मनुष्यलोकांतील व स्वर्गांतील सर्व नानाप्रकारच्या क्रिया यथास्थित करीत होता. समिधा, दर्भ, फुलें, बली, अन्न व लाह्या यांच्या योगानें अग्निकार्यें, धू-पकर्म, दीपविधि हीं सर्व त्याच्या घरीं सुरू असत. स्व-र्गामध्यें सुद्धां त्याचा जपयज्ञ व ध्यानयज्ञ सुरू अ-सून आपण देवेंद्र असतां सर्व देवांची तो पूर्वीप्रमा-णें पूजा करीत असे. पुढें कांहीं काळानें मी इंद्र

म्हणून त्याला अहंकार उत्पन्न झाला व त्याच्या सर्वक्रिया बंद पडल्या व ज्याकडे पहाशील त्याचें तूं तेज हरण करशील असा ब्रह्मदेवांचा त्याला वर मिळाला असल्यानें मदानें तो ऋषींना आपल्या रथाला जुंपूं लागला. याप्रमाणें बरेच दिवस ठळक ठळक ऋषींना तो आपल्या रथाला जुंपीत असतां बरेच दिवस निघून गेले. क्रिया सर्व बंद पडल्यामुळें त्याचें सामर्थ्य कमी होत चाललें होतें. पुढें एके वेळीं अगस्त्यांना रथाला जुंपण्याची पाळी आली असतां भृगुऋषींनीं त्यांकडे येऊन, ' आपण सर्वांनीं याचा उद्दामपणा कां सहन करावा,' म्हणून विचारलें. तेव्हां अगस्त्य त्यांना, ' तूं ज्याकडे पहाशील त्याचें तेज हरण करशील असा याला ब्रह्मदेवांचा वर मिळाला असल्यानें आमचें यांच्यापुढें कांहीं चालत नाहीं, ' असें म्हणाले. तेव्हां भृगु म्हणाले, ' आज हा दुष्ट इंद्र दैवानें बुद्धीला मोह पडून आत्मनाशासाठींच आपल्याला लाथ देईल, तेव्हांच या धर्मलंड बनलेल्या मूढाच्या या निंद्य वर्तनानें याला साप करून मी पृथ्वीवर पाडतों. लोकांच्या धिक्कारयुक्त शब्दांनीं याचें सर्व तेज नाहींसें झालें आहे. ऐश्वर्याचा व बलाचा याला मोठा ताठा आला आहे.

इतक्यांत नहुषाकडून रथाला जुंपण्यासाठीं अगस्त्यांना बोलावणें आलें. तेव्हां, ' आपण डोळे मिटा, मी आपल्या जटेमध्यें शिरतों, ' असें ह्मणून भृगु त्यांच्या जटेमध्यें लपून बसले. पुढें अगस्त्यांना रथाला जुंपल्यावर लवकर लवकर चालण्यासाठीं नहुषानें डावा पाय त्यांच्या डोक्यावर मारला ते वेळीं त्याला न दिसतां लपून बसलेल्या भृगूंनीं, ' साप होऊन पृथ्वीवर पड, ' ह्मणून शाप दिल्याबरोबर तो साप होऊन खालीं पृथ्वीवर पडला. पुढें पूर्वपुण्याईनें स्मृति राहून उच्छाप देण्याविषयीं त्यानें विनंति केली. तेव्हां ' तुझ्याच कुळांतील युधिष्ठिराच्या हातून तुझा उद्धार होईल, ' म्हणून त्याला उच्छाप मिळाला व त्याप्रमाणें पुढें झालें.

तर याप्रमाणें जोंपर्यंत सर्व क्रिया त्याच्या हातून यथास्थित चालल्या होत्या तोंपर्यंत त्याचें ठीक चाललें असून त्यांना मुकल्याबरोबर त्याचा नाश झाला; म्हणून धूपदीपादि दान त्याचप्रमाणें बलिकर्म यांच्या योगानें गृहस्थ भरभराटीला चढतात. घरामध्यें अन्न शिजलें असतां प्रथम त्याचा भाग देवतांना व ब्राह्मणांना काढून द्यावा. याच्या योगानें देव संतुष्ट होतात. या कृत्यानें गृहस्थाला जितका संतोष होतो, त्याच्या शतपट संतोष देवतांना होतो. पुण्यवान असे विद्वान लोक धूपदीपादि देऊन नमस्कार करतात, त्यामुळें ते भरभराटीला चढतात. देवता, पितर, ऋषी यांची योग्य पूजा केली असतां ते फार संतुष्ट होतात. म्हणून गृहस्थांनीं संध्याकाळीं दीपदान करावें, त्याच्या योगानें त्यांना मेल्यावर डोळे मिळतात. दीपदान करणाराला रात्रीनें पुढें दिव्य चक्षू मिळतात व चंद्राप्रमाणें ते झळकत रहातात. जितकीं निमिषें दिलेला [illegible]ळत रहातो तितकीं वर्षें हा रूपवान व बली [illegible]सा झळकत रहातो. '

---

## २६८ चांडाळ व क्षत्रिय यांचा संवाद—ब्राह्मणस्व अपहार. ( १३—१०१ )

युधिष्ठिर ह्मणाला, ' जे मूढ ब्राह्मणस्व हरण करतात ते दुष्ट कर्म करणारे पापी लोक कोठें जातात? भीष्म म्हणाले, ' या संबंधांत पुढील चांडाळ व एक क्षत्रिय यांचा संवाद ऐक. क्षत्रिय ह्मणाला, ' चांडाळा, तूं दिसतोस तर ह्मातार्‍यासारखा परंतु तुझी कृति पहावी तर पोरासारखी दिसते. घोडे, गाढव, यांची धूळ अंगावर घेणारा तूं गाईच्या स्तनापासून उडणार्‍या दुधाच्या तुषारांना इतका कां भितोस? चांडाळाच्या हातून भल्यांनीं नांवें ठेवण्याजोगीं कामें होत असतात. गाईच्या दुधाचे तुषार उडाल्यामुळें असा पाण्याच्या कुंडांत बुडी कां घेतोस? ' चांडाळ ह्मणाला, ' पूर्वी कोणी एक राजा गाई चोरून नेत असतां त्यांच्या स्तनांपासून दुधाचे तुषार सोमवल्लीवर उडाले. त्याचा रस यज्ञामध्यें दीक्षा घेतलेला राजा व ब्राह्मण हे पिऊन ते सर्व त्या ब्राह्मणस्वाचा उपभोग घेतल्यानें एकदम नरकाला गेले. जे ब्राह्मण व राजे तें तिचें दूध, तूप, दहीं प्याले ते नरकाला गेले. त्या गाईंनीं आपल्या दुधानें त्या राजाच्या पुत्रपौत्रांना, त्याचप्रमाणें त्याला व त्याच्या बायकोला मारून टाकलें.

मी त्या चोरलेल्या गाई ज्या ठिकाणीं ठेवल्या होत्या त्या ठिकाणीं इंद्रियनिग्रहानें ब्रह्मचारी व्रतानें रहात असे. माझ्या भिक्षान्नावर त्या गाईच्या दुधाचे तुषार उडून तें अन्न मीं खाल्ल्यानें चांडाळ झालों. ब्रह्मस्व हरण करणारा तो राजा निंद्य गतीला गेला. ह्मणून ब्रह्मस्व कधीं हरण करूं नये. ब्रह्मस्वाचे कण उडालेलें अन्न खाऊन माझी काय दशा झाली पहा. त्याचप्रमाणें शहाण्यानें सोमही विकूं नये. शहाणे लोक सोमविक्रय निंद्य समजतात. जे हा विकत घेतात किंवा विकतात ते यमलोकाला जाऊन रौरव नरकांत पडतात. गाईच्या दुधाचे कण ज्यावर उडाले आहेत असा सोम विकून मनुष्य श्रोत्रिय प्रिय ओक्षा तरी पुढील जन्मीं सावकाराच्या जन्माला धूप आवळ नाश पावतो, व तीनशें वेळ नरकाला जा- वगैरे शिंपल्यापल्या विष्ठेवर उपजीविका करतो. नीचाची गितला अअभिमान व मित्राच्या बायकोशीं जबरीसं- भूतें नर्ग हीं पापें ताजव्यांत घातलीं असतां अभिमानाचेंच पारडें खालीं बसेल. ह्या काटकोळ व निस्तेज कुत्र्याकडे पहा. हाही पूर्वी मनुष्य होता. परंतु अभिमानाच्या योगानें याला ही शोचनीय स्थिति आली आहे. मी चांगल्या थोर व संपत्तिमान कुलांत पूर्वजन्मीं जन्मलों असून मला वेदशास्त्रांचें ज्ञान चांगलें होतें; परंतु मला सर्व गोष्टींतील पापपुण्य कळत असून डोळ्यांवर धुंदी आल्यामुळें रागांत प्राणिमात्रांच्या पाठीचें मांस मी खात असे. त्यामुळें व माझ्या उद्धट वर्तनामुळें मी या दशेला येऊन पोहोंचलों! तेव्हां काळाचा फेरा कसा आहे पहा ह्मणजे झालें. अंगवस्त्राच्या शेवटानें पेट घेतल्याप्रमाणें किंवा भुंगे लागल्याप्रमाणें गाईच्या दुधाचे तुषार अंगावर उडतांच मी कसा घाबरून इकडे तिकडे धांवतों पहा. गृहस्थांचीं मोठमोठीं पापें वेदाध्ययनानें त्याचप्रमाणें निरनिराळ्या दानांनीं जातात असें विद्वान लोक ह्मणतात. गृहस्थाश्रमामध्यें सर्वसंगापासून मुक्त असणाऱ्या ब्राह्मणाला वेद तारतात ह्मणतात. मी तर पापयोनीमध्यें जन्मलों आहें. तेव्हां माझी मुक्तता कशी होणार हें मला कळत नाहीं. माझ्या कांहीं पूर्वपुण्याईनें मला मागची आठवण मात्र आहे. तेव्हां आतां शरण आलेल्या मला मी कोणत्या शुभ कर्मानें या चांडालत्वापासून सुटेन हें सांग.' राजा ह्मणाला, 'कसा सुटशील तें सांगतों ऐक. ब्राह्मणासाठीं रणाग्नीमध्यें आपल्या प्राणाची आहुति देऊन मांसभक्षक प्राण्यांना आपलें शरीर खाऊं घालशील तरच तुझी या योनीपासून सुटका होणार आहे.' नंतर चांडालानें त्याप्रमाणें केलें असतां त्याला उत्तम गति मिळाली.'

---

## २६९ गौतम व इंद्र यांचा संवाद—कर्मानुरूप निरनिराळी गति. (१३. १०२)

युधिष्ठिर ह्मणाला, 'जे पुण्यवान आहेत त्या सर्वांना एकच गति मिळते किंवा त्यांच्या कर्मानुरूप निरनिराळी गति मिळते?' भीष्म ह्मणाले, 'लोक आपापल्या कर्माप्रमाणें निरनिराळ्या गतीला जातात. यासंबंधांत पुढील इंद्र व गौतम यांचा संवाद उदाहरणादाखल देतात. कोणी एका गौतम नांवाच्या ब्राह्मणाला एका निबिड अरण्यामध्यें एक आईला मुकलेलें गरीब हत्तीचें पिलूं सांपडलें. त्याला पाहून कींव येऊन त्यानें त्याला वाढविलें. बऱ्याच दिवसांनीं तो मोठा बलवान झाला. त्याच्या गंडस्थलांतून मद वहात आहे अशा त्या पर्वतासारख्या धिप्पाड हत्तीला मागण्याला इंद्र धृतराष्ट्र राजाचा वेष घेऊन त्यांकडे आला. तो त्या हत्तीला घेऊन चाललेला पाहून गौतम ह्मणाला, 'या माझ्या मुलासारख्या वाढविलेल्या हत्तीला घेऊन जाऊं नकोस. मीं याला मोठ्या संकटस्थितींत वाढविलें आहे. सात पावलें बरोबर चालल्यानें भल्याची मैत्री जुळते ह्मणतात. तेव्हां मित्रद्रोहाचें पाप तुझ्या माथीं न लागो. हा हत्ती मला इध्में व पाणी आणून देतो. आश्रमांत कोणी नसतांना तो राखण करतो. त्याला चांगलें शिक्षण मिळालें असल्यामुळें तो वाटेल तें माझें काम करतो. तो संभावीत व कृतज्ञ असून माझा फार लाडका आहे. तेव्हां मला रडत टाकून तूं याला घेऊन जाऊं नकोस.' धृतराष्ट्र ह्मणाला, 'तुला हजार गाई, शंभर दासी किंवा पांचशें सोन्याचीं नाणीं किंवा दुसरी नानाप्रकारची संपत्ति देतों. ब्राह्मणाला हत्ती घेऊन काय करावयाचें आहे.' गौतम ह्मणाला, 'गाई, दासी, वगैरे सर्व तुलाच असोत. ब्राह्मणाला द्रव्य घेऊन काय करावयाचें आहे!'

धृतराष्ट्र ह्मणाला, 'ब्राह्मणांना हत्तीचें कांहीं काम नाहीं. हत्ती हे राजासाठीं सांगितले आहेत. तेव्हां माझें वाहन जो हा उमदा हत्ती त्याला मी घेऊन जात असतां त्याच्या तूं आड येऊं नकोस. परत जा.' गौतम ह्मणाला, 'ज्या ठिकाणीं गेल्यावर पुण्यवान आनंदांत नांदतात, व पापी रडत बसतात त्या यमलोकीं सुद्धां तुझ्यामागून येऊन मी तुला हा हत्ती परत द्यावयास लावीन.' धृतराष्ट्र ह्मणाला, 'जे कर्में सोडून नास्तिक बनले आहेत व ज्यांना श्रद्धा मुळीं नसून जे पापी इंद्रियविषयांमध्यें गढले असतात त्यांनाच यमयातना सोसाव्या लागतात. हा धृतराष्ट्र तिकडे न जातां त्याच्या पलीकडे जाणार आहे.' गौतम ह्मणाला, 'ज्या ठिकाणीं असत्य ह्मणून ठाऊक नसून केवळ सत्याचेंच साम्राज्य आहे व ज्या ठिकाणीं बळवानाविरुद्ध दुबळ्याची दाद लागते, अशा लोकांना वाटेवर आणणाऱ्या वैवस्वत नगरींत तुझ्यामागून येऊन सुद्धां मी तुला आपला हत्ती परत द्यावयास लावीन.' धृतराष्ट्र ह्मणाला, 'जे वडील बहिणी, आईबाप यांच्याशीं माजून शत्रुप्रमाणें वागतात अशासाठीं हा लोक आहे. धृतराष्ट्र त्या ठिकाणीं जाणार नसून त्याच्या पलीकडे जाणार.' गौतम ह्मणाला, 'कुबेराचा जो पुण्यवान मंदाकिनीच्यावरील प्रदेश आहे, ज्या ठिकाणीं भोगाला पात्र असे लोक जातात व ज्या ठिकाणीं गंधर्व, यक्ष व अप्सरा फिरत असतात, त्या ठिकाणीं तुझ्यामागून येऊन मी तुला आपला हत्ती परत द्यावयास लावीन.' धृतराष्ट्र ह्मणाला, 'जे चांगले व्रतशील राहून अतिथींचा सत्कार करतात व ब्राह्मणांना खाऊं घालून राहिलेलें नोकर चाकरांना देऊन मग आपण खातात असे लोक मंदाकिनीच्या प्रदेशांत रहातात.' गौतम ह्मणाले, 'मेरूवर जें फुललेलें रम्य वन दिसतें, ज्या ठिकाणीं किन्नरींचें उत्तम गायन ऐकूं येतें व जेथें मोठमोठ्या जांभळी लागून गेल्या आहेत तेथें तुझ्यामागून येऊन मी तुला आपला हत्ती परत द्यावयास लावीन.' धृतराष्ट्र ह्मणाला, 'जे ब्राह्मण सौम्य, सत्यशील, बहुश्रुत असतात, जे जुने इतिहास वाचतात, जे सर्व भूतमात्रांना आवडते असतात, जे अग्नीला आहुति देऊन ब्राह्मणांना मध देतात ते अशा लोकांना जातात. हा धृतराष्ट्र त्या ठिकाणीं जावयाचा नसून याहून वरतीं जाणार आहे.' गौतम ह्मणाला, 'जेथें किन्नरराज, गंधर्व व अप्सरा यांचें वास्तव्य आहे, असें पुष्पांनीं फुलून राहिलेलें नारदांना प्रिय जें नंदनवन तेथें तूं गेलास तरी तेथून मी तुझ्याकडून आपला हत्ती परत घेईन.' धृतराष्ट्र ह्मणाला, 'जे नृत्यगायनामध्यें कुशल आहेत, जे कधीं याचना करीत नाहींत व आनंदांत मिळून मिसळून रहातात, अशांसाठीं तो प्रदेश असून धृतराष्ट्र त्या ठिकाणीं कधीं जावयाचा नाहीं.' गौतम ह्मणाला, 'ज्या ठिकाणीं उत्तर कुरु झळकत आहेत, जेथें लोक देवासह आनंदांत रहातात व जेथें अग्नीपासून, पाण्यापासून व पर्वतापासून ज्यांची उत्पत्ति आहे असे लोक आहेत, त्याचप्रमाणें ज्या ठिकाणीं इंद्र सर्व कामनांचा वर्षाव करतो, जेथें स्त्रिया मनाला वाटेल त्याप्रमाणें स्वच्छंद संचार करतात व ज्या ठिकाणीं स्त्रीपुरुषांना ईर्षा म्हणून ठाऊक नाहीं, अशा त्या उत्तरकुरु प्रदेशामध्यें तूं गेलास तरी तेथून मी तुझ्याकडून आपला हत्ती परत घेईन.' धृतराष्ट्र ह्मणाला, 'ज्यांची सर्व भूतमात्रासंबंधानें वासना तृप्त आहे, जे कधीं मांस खात नाहींत व शिक्षा करीत नाहींत; त्याचप्रमाणें कोणत्याही स्थावरजंगमाची हिंसा न करतां सर्व भूतमात्रांच्या हितामध्यें दक्ष असतात, निरिच्छ, ममताशून्य व निष्प्रेम राहून लाभ व हानि, त्याचप्रमाणें स्तुति किंवा निंदा हीं सारखीं समजतात, अशा प्रकारच्या लोकांसाठीं तो प्रदेश असून हा धृतराष्ट्र त्या ठिकाणीं कधीं जाणार नाहीं.' गौतम ह्मणाला, 'ज्या ठिकाणीं पुण्याचा घमघमाट चालू असून रज व शोक यांचें नांव नाहीं, अशा सोमलोकामध्यें सुद्धां तुझ्या मागून येऊन माझा हत्ती तुला परत द्यावयास लावीन.' धृतराष्ट्र ह्मणाला, 'जे नेहमीं दानशील असून कधीं दान घेत नाहींत, दुसऱ्यापासून कोणतीही वस्तु उपटून घेत नाहींत, सत्पात्राला देतां येत नाहीं असें ज्यांच्यापाशीं कांहींच नसतें, जे सर्वांचें आतिथ्य करतात, व सर्वांवर प्रसन्न असतात, जे क्षमाशील असून दुसऱ्यासंबंधानें वाईट बोलत नाहींत, जे नेहमीं पुण्यशील असून दुसऱ्यांना छत्रभूत असतात, अशा लोकांसाठीं तो लोक असून धृतराष्ट्र तेथें जाणार नाहीं.' गौतम ह्मणाला, 'ज्या

ठिकाणीं रज, तम व शोक ठाऊक नाहींत असे सूर्यलोक झळकत आहेत त्या ठिकाणीं मी तुला आपला हत्ती परत द्यावयास लावीन.' धृतराष्ट्र ह्मणाला, 'वेदाध्ययन करीत राहून जे गुरुशुश्रूषेमध्ये गढून असतात व त्यांच्या विरुद्ध भाषण कधीं बोलत नाहींत, व्रतशील राहून जे सदा खरें बोलतात आणि जे नेहमीं गुरूचें काम करण्याला एका पायावर तयार असतात, अशांसाठीं तो लोक असून हा धृतराष्ट्र तेथें कधीं जाणार नाहीं.' गौतम ह्मणाला, 'त्याच्या पलीकडे अशाच प्रकारचे वरुणाचे लोक आहेत, तेथून मी तुझ्याजवळून आपला हत्ती परत घेईन.' धृतराष्ट्र ह्मणाला, 'ज्यांनीं चातुर्मास्य केला आहे; त्याचप्रमाणें दहा हजार इष्टि केल्या आहे, श्रद्धापूर्वक तीन वर्षें वेदांत सांगितल्याप्रमाणें अग्निहोत्र केलें आहे, धर्मरूपी सुरीच्या धारेवर राहून ज्यांनीं कडक धर्म पाळला आहे, अशा धर्मात्म्यांना ती गति मिळणारी असून, धृतराष्ट्र तेथें कधीं जाणार नाहीं.' गौतम ह्मणाला, 'ज्या ठिकाणीं रज व शोक मुळीं ठाऊक नसून तेथें जाणें फार दुरापास्त आहे, अशा सर्व मानवांना इष्ट अशा इंद्रलोकाला जरी तूं गेलास तरी तेथें मी आपला हत्ती तुझ्यापासून परत घेईन.' धृतराष्ट्र ह्मणाला, 'ज्याला शंभर वर्षें आयुष्य आहे, असा शूर, वेदाध्ययन करणारा, त्याचप्रमाणें मोठ्या दक्षतेनें यज्ञ करणारा अशासाठीं तो लोक असून हा धृतराष्ट्र त्या ठिकाणीं कधीं जाणार नाहीं.' गौतम म्हणाला, 'त्याच्या पलीकडे सनातन असे सर्वप्राणिमात्रांना इष्ट मोठमोठे प्रजापतीचे लोक आहेत, तेथें मी तुझ्यापासून हत्ती परत घेईन.' धृतराष्ट्र म्हणाला, 'ज्या धर्मशील व प्रजापालक राजांनीं राजसूय, अश्वमेध वगैरे यज्ञ करून अवभृत स्नान केलें आहे, त्यांसाठीं ते लोक आहेत. धृतराष्ट्र तेथें जावयाचा नाहीं.' गौतम म्हणाला, 'त्याच्या पलीकडे रज व शोक यांपासून अलिप्त असे पुण्यवान, दुर्लभ व अगम्य असे गोलोक आहेत, त्या ठिकाणीं गेलास तरी तेथें मी आपला हत्ती तुला परत द्यावयास लावीन.' धृतराष्ट्र ह्मणाला, 'ज्याच्याजवळ हजार गाई असून जो वर्षावर्षाला शंभर गाई दान करतो, त्याचप्रमाणें शंभर गाई असून जो दहा देतो किंवा दहा अगर पांच असून जो एक देतो व जो ब्रह्मचर्यामध्यें आयुष्य घालवून वेदाक्षर जतन करतो व प्रभास, मानस, पुष्कर, महत्सर, पवित्र असें नैमिष, बाहुदा, करतोयिनी, गया, गयशीर, विपाशा, स्थूलवालुका, कृष्णा, गंगा, पंचनद, गोमती, कौशिकी, पंपा, सरस्वती, दृषद्वती, यमुना, अशा मोठमोठ्या तीर्थांना जातात, ते लोक दिव्यदेह धरून, दिव्यमालाधारी असे या गोलोकामध्यें आनंदांत रहातात; धृतराष्ट्र तेथें कधीं जावयाचा नाहीं.' गौतम ह्मणाला, 'ज्या ठिकाणीं थंडी, ऊन्ह, तहान, भूक, थकवा, सुखदुःख, जरा, मरण, पुण्य, पाप कांहीं ठाऊक नसून कोणी आवडता किंवा नावडता तसाच बंधु किंवा शत्रु नाहीं, अशा रजोगुणरहित व बुद्धि आणि सत्व अशा गुणांनीं संपन्न ब्रह्मलोकामध्यें सुद्धां तुझ्यामागून येऊन तुला हत्ती परत द्यावयास लावीन.' धृतराष्ट्र म्हणाला, 'सर्वसंगापासून मुक्त होऊन अंतःशुद्धि होऊन, अध्यात्मसमाधि लावून जे स्वर्गाला गेले आहेत, अशा सात्विक लोकांसाठीं हा ब्रम्हलोक असून धृतराष्ट्र त्या ठिकाणीं तुला दिसावयाचा नाहीं.' गौतम म्हणाला, 'ज्या ठिकाणीं श्रेष्ठ रथंतर गाइलें जात असून वेदीवर कमलें पसरलीं असतात व ज्या ठिकाणीं सोमपान करणारे उत्तम घोडे जुंपलेल्या रथांत बसून जातात, त्या ठिकाणीं येऊन मी तुला आपला हत्ती परत द्यावयास लावीन. तूं इंद्र असून या भुवनामध्यें संचार करीत आहेस हें मीं जाणलें. मनाच्या दुबळेपणामुळें चुकून तोंडांतून कांहीं निघून गेलें असल्यास मला क्षमा कर.' इंद्र ह्मणाला, 'मी इंद्र असून भांडून हत्ती घेण्यासाठीं या पृथ्वीवर आलों होतों. मी आतां तुझें काय कल्याण करूं सांग.' गौतम ह्मणाला, 'माझें हें दहा वर्षांचें पांढरें हत्तीचें पिलूं जें ह्या वनामध्यें मला केवळ माझ्या दुसऱ्या जीवाप्रमाणें प्रिय झालें आहे तें हें माझें मला परत दे.' इंद्र ह्मणाला, 'हा पहा हा तुझा मुलगा तुझ्याकडे डोळे लावून तुझ्याकडे धांव घेत आहे व तुझे पाय हुंगीत आहे. आतां मी जातों. माझें कल्याण चिंतीत रहा.' गौतम ह्मणाला, 'तुझें नेहमीं कल्याण चिंतीत राहून नेहमीं मी तुझी पूजा करीत राहीन. माझेंही तूं

कल्याण चिंतीत रहा. तूं परत दिलेला हा हत्ती घेऊन मी मोठा अभारी झालों आहें.' इंद्र ह्मणाला, 'वेद ज्यांच्या हृदयांमध्यें नेहमीं कायम राहिले आहेत, अशा महात्म्यांमध्यें मला तूंच काय तें ओळखिलेंस. मी तुझ्यावर संतुष्ट आहें. आपल्या या मुलासह तूं शुभ लोकाला या क्षणीं चल.' असें ह्मणून इंद्र त्यासह दुर्मिळ अशा स्वर्गलोकाला निघून गेला.'

## २७० भगीरथ व ब्रह्मदेव यांचा संवाद.

( १३. १०३ )

युधिष्ठिर ह्मणाला, 'नानाप्रकारचीं दानें, शांती, सत्य, अहिंसा, आपल्या बायकोच्या ठिकाणींच समाधान, वगैरे निरनिराळे धर्म व दानाचे फल हीं सर्व आपल्याला ठाऊक आहेत. याला तपोबलावांचून दुसरें काय कारण असणार? तेव्हां या तपामध्यें श्रेष्ठ तप कोणतें तें मला सांगा.' भीष्म ह्मणाले, 'ज्या मानाचें तप असतें तसा लोक मिळतो; परंतु कांहीं न खातां रहाणें यासारखें दुसरें उत्तम तप नाहीं. या संबंधांत पुढील भगीरथ व ब्रह्मदेव यांचा संवाद ऐक. जेथें देव, गंधर्व, मनुष्य यांनासुद्धां तपावांचून येणें शक्य नाहीं असे देवलोक, गोलोक, ऋषिलोक हे सर्व ओलांडून आलेल्या भगीरथाला पाहून 'या अगम्य लोकाला तूं कसा आलास,' ह्मणून ब्रह्मदेवांनीं विचारलें. भगीरथ ह्मणाला, 'नेहमीं ब्राह्म व्रत धरून मी सदा ब्राह्मणांना लाख सोन्याचीं नाणीं दान करीत आलों. दहा एकरात्रयज्ञ, दहा पंचरात्रयज्ञ, अकरा एकादशरात्रयज्ञ, त्याचप्रमाणें शंभर ज्योतिष्टोम मीं केले. त्याचप्रमाणें शंभर वर्षें कडक तप करीत भागीरथीच्या तीरीं राहून हजार खेचरी, त्याचप्रमाणें पुष्कळ दासी मीं दान दिल्या. पुष्करतीर्थाकडे लक्षावधि वेळां लक्ष घोडे, दोन लक्ष गाई मीं ब्राह्मणाला दान दिल्या. सोन्याचा चांद कपाळावर असलेल्या हजार सुरेख मुली व साठ हजार सोन्याच्या दागिन्यांनीं शृंगारलेल्या मुली मीं दान केल्या. गोसवयज्ञामध्यें एकेकाला दहा दहा प्रमाणें वांसरांसकट व सोन्याच्या व कांशाच्या धारेच्या भांड्यासकट अब्ज गाई मीं ब्राह्मणांला दिल्या. पुष्कळ सोमयाग करून त्यामध्यें एक वेताच्या दुभत्या प्रत्येक ब्राह्मणाला दहा दहा प्रमाणें, त्याचप्रमाणें शंभर शंभर रोहिणी जातीच्या गाई दिल्या. त्याचप्रमाणें दोन कोटी दुभत्या गाई दान केल्या. तसेंच पांढऱ्या रंगाचे घोडे सोन्याच्या माला घालून मीं दान केले. तसेच यज्ञामध्यें अठरा कोटी निष्क दान केलें; सतरा कोटी हिरव्या रंगाचे शामकर्ण घोडे दिले. दहा हजार फाळासारखे दांत असलेले, मोठमोठे, अंगावर पद्म असलेले सोन्यानें शृंगारलेले हत्ती दिले. सतरा हजार सोन्यानें मढवून काढलेले व शृंगारलेले घोडे जुंपलेले रथ वेदांत सांगितल्याप्रमाणें दक्षिणा ह्मणून मीं दिले. दहा वाजपेय यज्ञामध्यें मीं हजार इंद्रतुल्य पराक्रमी वीर दिले. तसेंच पुष्कळ द्रव्य खर्चून मीं राजसूय यज्ञ केले व त्यांमध्यें राजांना जिंकून सोन्याच्या माळा त्यांच्या गळ्यांत अडकवून हजार राजे मीं ऋत्विजांना दिले. ह्या यज्ञामध्यें जो दानाचा ओघ वाहूं लागला तो गंगेच्या प्रवाहाप्रमाणें मोठा होता. त्याचप्रमाणें मी सोन्यानें शृंगारलेले दोन हजार हत्ती, दोन हजार घोडे व शंभर गांवें दान केलीं. मीं नेहमीं आहार बेताचा ठेवून शमपूर्वक तोंड स्वाधीन ठेवून ज्या ठिकाणीं शंकरांनीं गंगेची दुर्धर धार आपल्या डोक्यावर घेतली त्या हिमालय पर्वतावर तप केलें. शमीचा सोटा जोरानें फेंकून तो पडेल त्या त्या ठिकाणीं वेदी उभारून मी दहा हजार सायस्क नांवाचे यज्ञ, त्याचप्रमाणें बारा दिवसांचे, तेरा दिवसांचे व पुंडरीक यज्ञ मीं केले. आठ हजार वशिंडाचे पांढरेशुभ्र, ज्यांचीं शिंगें सोन्यानें मढवून काढलीं होतीं असे बैल मीं दान केले. त्याचप्रमाणें ब्राह्मणांना सोन्यानें फुलवून काढलेल्या बायका करून दिल्या. सोनें व रत्नें यांचे ढीगच्या ढीग दिले. धनधान्यानें समृद्ध अशीं हजारों गांवें दिलीं. हजारों मोठमोठे यज्ञ करून मीं ब्राह्मणांना त्यामध्यें एक वेताच्या लाखों गाई दिल्या. मीं सोळा अर्कायण यज्ञ केले; त्याचप्रमाणें मीं योजनभर लांबरुंद कांचनाच्या झाडांनीं पसरलेलें रत्नमय वन ब्राह्मणांना दिलें. तीस वर्षेंपर्यंत राग बाजूला ठेवून महाफलदायक त्रिरायण व्रत पाळून त्यामध्यें दररोज मीं नऊशें गाई ब्राह्मणाला दिल्या. या सर्व रोहिणी जा-

तीच्या असून दुभत्या होत्या. दररोज तीस अग्नींना हवन करीं. आठ यज्ञांमध्यें मीं अग्नींत प्राण्याच्या चर्बीची आहुति दिली. सात यज्ञांमध्यें मीं मनुष्याच्या चर्बीची आहुति दिली. मीं एक हजार-अठरा विश्वजित यज्ञ केले. शरयु, बाहुदा, गंगा, नैमिषारण्य यांच्या ठिकाणीं मीं लक्ष गाई दान केल्या. परंतु या कशानेंही मी या ठिकाणीं आलों नाहीं. जें व्रत इंद्रानें गुप्त ठेविलें असून शुक्राचार्यांना तें त्यांच्या ज्ञानदृष्टीनें समजलें व जें त्यांनीं प्रथम पृथ्वीवर उघडकीस आणलें तें उपवासाचें तप मीं शेवटीं पाळलें. त्यांत जेव्हां मला सिद्धि आली, ते वेळीं हजारों ब्राह्मण व ऋषी संतुष्ट होऊन मजकडे येऊन, 'तूं ब्रह्मलोकाला जा,' असें ह्मणाले. त्या तपामुळें मी या लोकाला आलों आहें. निरशनाहून थोर तप दुसरें कांहीं नाहीं.'

## २७१ अल्पायुष्याचें कारण.
### (१३. १०४)

युधिष्ठिर ह्मणाला, 'मनुष्याचें आयुष्य शंभर वर्षांचें असून त्याचें वीर्य त्याच मानाचें असतें. मग मनुष्य लहानपणीं कां मरतो? तो दीर्घायुषी कशानें होतो व अल्पायुषी कशानें होतो व त्याला कीर्ति किंवा संपत्ति कशानें मिळते?' भीष्म ह्मणाले, 'मनुष्य कशा रीतीनें वागला असतां त्याचें कल्याण होऊन दीर्घायुष्य मिळतें तें सांगतों ऐक. **सदाचारानें आयुष्य वाढून संपत्ति मिळते व इहपरलोकीं कीर्ति होते. दुराचारी मनुष्य फार आयुष्यवान असत नाहीं.** प्राणिमात्र त्याला भितात. याच्यापासून त्यांना नेहमीं त्रास पोहोंचतो ह्मणून आपल्याला वैभवाला चढावयाचें असेल तर आचार चांगला ठेवावा. मनुष्यानें पुष्कळ पाप केलें असलें तरी सदाचारानें त्याचें तें पाप नाहींसें होतें. धर्माचें चिन्ह तरी चांगला आचार हेंच असून सद्वर्तनाच्या योगानेंच साधू ओळखले जातात. भल्यांचें वर्तन हेंच आचाराचें मुख्य लक्षण आहे. धर्माप्रमाणें वागून लोकांचें कल्याण करीत राहणाऱ्या मनुष्याला लोकांनीं पाहिलें नसलें तरी केवळ त्याचें नांव ऐकून ते त्याच्या कल्याणासाठीं झटत असतात. जे नास्तिक, क्रियाहीन, गुरु व शास्त्र यांना धाब्यावर बसविणारे असे अधर्मी व दुराचारी लोक असतात ते अल्पायुषी होतात. शीलहीन, मर्यादा सोडलेले, मैथुनामध्यें सारासार विचार न ठेवणारे असे लोक अल्पायुषी होऊन नरकाला जातात. श्रद्धापूर्वक असूया न करतां चांगलें वर्तन ठेवणारा, अंगांत कांहीं गुण नसले तरी क्रोधहीन, सत्यवादी, कोणाला पीडा न करणारा असा होऊन शंभर वर्षें जगतो. चिखल चिवडणारा, गवत हातानें तोडणारा, नखें चावणारा, नेहमीं अशुद्ध व चंचळ असणारा मनुष्य कधीं दीर्घायु होत नाहीं. पहाटे सूर्य क्षितिजाच्या अगदीं खालीं असतांना ब्राह्म मुहूर्तावर उठून धर्म व अर्थ यांचें चिंतन करावें. आचमन करून हात जोडून सकाळची संध्या करावी. याचप्रमाणें न बोलतां संध्याकाळची संध्या करावी. उगवणारा, मावळणारा, ग्रहण लागलेला, पाण्यामधील, आकाशाच्या मधोमध आलेला अशा सूर्याकडे पाहूं नये. नेहमीं संध्या करूनच मोठमोठे ऋषी दीर्घायु झाले. ह्मणून नेहमीं सकाळसंध्याकाळची संध्या करावी. जे या दोन्ही संध्या करीत नाहींत अशा सर्वांना धार्मिक राजानें शूद्राचीं कामें करावयास लावावीं. **कोणत्याच वर्णातील परस्त्रियेशीं संबंध ठेवूं नये. यासारखें आयुष्य कमी करणारें जगांत दुसरें कांहींच नाहीं.** जशा प्रकारच्या परस्त्रीशीं संबंध असतो त्याप्रमाणें त्या स्त्रीच्या अंगावर जितकीं रोमरंध्रें असतील तितकीं हजार वर्षें हा रौरव नरकांत पडतो. केंस विंचरून साफ ठेवणें, काजळ घालणें, दांत घासणें, देवतांची पूजा करणें या गोष्टी सकाळच्या प्रहरींच केल्या पाहिजेत. मलमूत्राकडे कधीं पाहूं नये किंवा तें तुडवूं नये. मोठ्या पहाटे, अगदीं संध्याकाळीं किंवा भर बारा वाजतां एकटे अनोळखी लोकांबरोबर किंवा वृषलाबरोबर प्रवासाला निघूं नये. ब्राह्मण, गाई, राजा, म्हातारेकोतारे, ओझ्याखालीं खचलेले, गर्भिणी स्त्रिया व दुबळे लोक यांना वाट द्यावी. ओळखीचीं झाडें किंवा चव्हाटे भेटले असतां त्यांना प्रदक्षिणा घालावी, भरदुपारीं, रात्रीं किंवा मध्यान्हीला त्याचप्रमाणें पहाटे व तिनिसांजेला चव्हाट्यावर जाऊं नये. दुसऱ्यानें घातलेला जोडा व वस्त्र कधीं घालूं

नये. नेहमीं ब्रह्मचर्य ठेवावें. पाय ओलांडूं नयेत. अमावास्या, पौर्णिमा, दोन्ही पक्षांच्या चतुर्दशी, अष्टमी यांना ब्रह्मचर्य असावें. यज्ञप्रसंगाखेरीज इतर वेळीं मांस खाऊं नये. पाठीच्या कण्याचें मांस खाऊं नये. दुसऱ्याच्या नांवानें खडे फोडणें, त्याची निंदा करणें, चुगली करणें या गोष्टी सोडाव्या. दुसऱ्याच्या हृदयाला घरें पडतील असें क्रूर भाषण सोडून द्यावें. नीचापासून कांहीं घेऊं नये. ज्याच्या योगानें दुसऱ्याला कांपरें भरेल असें लागणारें दुष्ट भाषण बोलूं नये. तोंडांतून पडलेले वाग्बाण लागून मनुष्य रात्रंदिवस विवळत पडतो. हे दुसऱ्याच्या मर्मस्थळाला जाऊन लागतात. म्हणून हे कधीं दुसऱ्यावर सोडूं नयेत. बाणांनीं किंवा कुऱ्हाडीनें दुखावलेलें वन फिरून वाढतें, परंतु लावून बोललेल्या दुर्भाषणानें पडलेली जखम कधीं भरून येत नाहीं. कर्णी, नालिक, नाराच इत्यादिप्रकारचे बाण शरीरांतून उपसून काढतां येतात. परंतु वाग्बाण कधीं शरीरांतून काढतां येत नसून दुसऱ्याच्या हृदयामध्यें ते आपलें कायमचें ठाणें करतात. विकलांग, ज्याला एखादा अवयव जास्ती आहे, जो विद्याहीन आहे, जो निंद्य आहे, रूप किंवा द्रव्यहीन आहे किंवा खोटा आहे, अशाला कधीं लागून बोलूं नये. नास्तिकपणा, वेदनिंदा, देवाची निंदा, द्वेष, ताठा, अभिमान, निष्ठुरपणा सोडून द्यावा. दुसऱ्यावर दंड उगारून रागानें त्याचा नाश करूं नये. शिष्य किंवा मुलगा यांखेरीज दुसऱ्या कोणाला शिक्षा करण्यासाठीं मारूं नये. ब्राह्मणांची निंदा करूं नये. नक्षत्रें बोटानें दाखवूं नयेत. जोशीपणा करून पक्षाच्या तिथी सांगूं नयेत. मलमूत्र विसर्जन केल्यावर किंवा बाहेरून आल्यावर त्याचप्रमाणें ह्मणावयास बसण्याच्या पूर्वी किंवा जेवावयास बसण्याच्या आधीं पाय धुवावेत. ज्याची अशुद्धता माहीत नसेल, जें पाण्यानें धुतलें आहे व जें तोंडानें चांगलें ह्मटलें आहे, या तीन गोष्टी ब्राह्मणाला पवित्र समजल्या आहेत. संयाव, तिळभात, मांस, शष्कुली, खीर हे पदार्थ स्वतःसाठीं कधीं न करतां देवासाठीं तयार करावे. नेहमीं अग्नीची उपासना करून भिक्षा द्यावी. दांत काडीनें घासावे. सूर्य उगवेपर्यंत कधीं निजूं नये. सूर्य उगवल्यावर निजलें असतां त्याला प्रायश्चित्त आहे. उठल्याबरोबर प्रथम आईबापांना, गुरूंना व वडिलांना नमस्कार करावा. दांत घासावयाच्या काड्या रोजच्या रोज नव्या घेऊन जुन्या टाकून द्याव्या. शास्त्रांत सांगितल्याप्रमाणें खाणें ठेवावें. पर्वकाळीं खाऊं नये. नेहमीं मन स्वच्छ ठेवून उत्तरेकडे बघून शौचविधि करावा. दांत घासल्याशिवाय देवांची पूजा करूं नये. गुरु, वडील, धार्मिक व विद्वान यांखेरीज इतर कोणाकडे देवाची पूजा केल्याखेरीज जाऊं नये. शहाण्यानें मळकट अशा आरशामध्यें पाहूं नये. निंद्य किंवा गर्भिणी स्त्रीशीं संबंध ठेवूं नये. उत्तरेकडे किंवा पश्चिमेकडे डोकें करून न निजतां पूर्वेकडे किंवा दक्षिणेकडे डोकें करून निजावें. मोडक्या किंवा मोडकळीस आलेल्या पलंगावर दिवा घेऊन तपासल्याखेरीज निजूं नये. कोणाला बरोबर घेऊन निजूं नये. वांकड्या तिकड्या अंगानें निजूं नये. नास्तिकाबरोबर कोणत्याही कामाला जाऊं नये किंवा कांहीं काम करण्याचें ठरवूं नये. आसन पायानें ओढून घेऊन त्यावर बसूं नये. नागव्यानें किंवा रात्रीं स्नान करूं नये. स्नान करून झाल्यावर मग अंग चोळूं नये. स्नान करण्याच्या आधीं अंगाला चंदनादि चोपडून घेऊं नये, स्नान केल्यावर ओलेत्यानें राहूं नये, किंवा ओलें वस्त्र हलवून वाळवीत बसूं नये. गळ्यांत घातलेली फुलांची माळ काढून टाकूं नये किंवा ती कपड्याच्यावरून घालूं नये. विटाळशीशीं बोलूं नये. शेतांत किंवा गांवाजवळ शौचाला बसूं नये. मलमूत्र पाण्यामध्यें विसर्जन करूं नये. जेवणाच्या आधीं तीनदां तोंडाला पाणी लावावें, व जेवल्यावर फिरून दोनदां लावावें. नेहमीं पूर्वेकडे बघून जेवावयास बसावें व अन्नाला नांव न ठेवतां मुकाट्यानें जेवावें. अन्नशेष थोडा टाकावा व जेवण झाल्यावर मनानें अग्नीला स्पर्श करावा. पूर्वेकडे तोंड करून जेवल्यानें मनुष्याचें आयुष्य वाढतें, दक्षिणेकडे करून जेवल्यानें यश वाढतें, पश्चिमेकडे करून जेवल्यानें संपत्ति वाढते, व उत्तरेकडे करून जेवल्यानें त्याच्या अंगीं खरेपणा येतो. जेवण झाल्यावर मनानें अग्नीला स्पर्श करून तोंड नाक वगैरे त्याचप्रमाणें सर्व गात्रें, बेंबी, हात धुवावे. कोंडा, केंस, राख किंवा

हाडें यांवर बसूं नये. दुसऱ्यानें स्नानाला घेतलेलें पाणी आपण स्नानाला घेऊं नये. शांतिहोम करून सावित्री जप करावा. बसून खावें. चालतां चालतां कधीं खाऊं नये. उभ्यानें किंवा भस्मावर किंवा गोठ्यांत मुतूं नये. पाय धुवून जेवावयास बसावें. ओल्या पायानें निजूं नये. अग्नि, गाय व ब्राह्मण या तीन तेजांना उष्ट्यानें कधीं शिवूं नये, व उष्ट्यानें सूर्य, चंद्र व नक्षत्रें यांकडे पाहूं नये. मनुष्याचे प्राण वर निघून चालले असतां घरीं आलेल्या वृद्धांना उठून अभिवादन केल्यानें ते परत मिळतात. वृद्धांना उठून अभिवादन करून आसन द्यावें. त्यांच्याजवळ हात जोडून उभें रहावें व ते चालले असतां त्यांच्या मागून चालावें. फाटक्या तुटक्या आसनावर बसूं नये किंवा फुटकें कांशाचें भांडें घेऊं नये. एका वस्त्रानिशीं जेऊं नये. नागव्यानें स्नान करूं नये किंवा नागव्यानें व उष्ट्यानें निजूं नये. उष्ट्या हातानें डोक्याला स्पर्श करूं नये; कारण सर्व प्राण डोक्याच्या आश्रयानें आहेत. केंस धरून ओढणें किंवा डोक्यावर बुक्क्या देणें चांगलें नव्हें. दोन्ही हातांनीं डोकें खाजवूं नये, वरचेवर डोक्यावरून स्नान करूं नये. डोक्यावरून स्नान केल्यावर अंगाला तेल लावूं नये. तिळाचा कोणताही पदार्थ खाऊं नये. उष्ट्यानें वेद पढवूं नये किंवा पढूं नये. हवेंत वावटळ किंवा दुर्गंधी उठली असतां वेद मनामध्यें सुद्धां ह्मणूं नयेत. या संबंधानें यमाचें ह्मणणें आहे कीं, उष्ट्या हातानें जो पळतो किंवा वेदाध्ययन करतो किंवा अनध्यायाचे दिवशीं जो न कळतां वेद पढतो त्याचे वेद विसरून जाऊन आयुष्यही कमी होतें; ह्मणून अनध्यायाचे वेळीं अध्ययन करूं नये. सूर्याकडे, अग्नीकडे, गाईकडे, ब्राह्मणांकडे पाहून जे मलमूत्र विसर्जन करतात ते अल्पायुषी होतात. दिवसां उत्तरेकडे बघून मलमूत्र विसर्जन करावें व रात्रीं दक्षिणेकडे बघून विसर्जन करावें. ब्राह्मण, क्षत्रिय व सर्प किती जरी निकृष्ट असले तरी त्यांना तुच्छ करूं नये. जालिम विषाच्या सापाची ज्याच्या ज्याच्यावर म्हणून नजर पोहोंचते त्याला त्याला तो जाळून टाकतो. रागावलेल्या क्षत्रियाचा ज्याच्याशीं प्रसंग येतो त्याला तो जाळून टाकतो; परंतु ब्राह्मण केवळ ध्यानानें किंवा नेत्रकटाक्षानें सर्व कुलाचा फडशा पाडतो; म्हणून शहाण्यानें या तिघांच्या वाटेला जाऊं नये. गुरूशीं कधीं वांकडें जाऊं नये. ते रागावले असतां त्यांची समजूत घालून प्रसन्न करून घ्यावें. गुरु भलत्या वाटेनें चालले असतां सुद्धां त्यांच्याशीं नीट वागावें. गुरुनिंदा आयुष्य जाळून कमी करते. मुतणें, पाय धुणें, उष्टीं टाकणें, या सर्व गोष्टी घरापासून दूर कराव्या. तांबड्या फुलांच्या माळा कधीं न घालतां पांढऱ्या फुलांची घालावी. कमल व कुवलय वर्जून बाकी वाटेल तीं तांबडीं फुलें किंवा पाण्यांत येणारीं फुलें डोक्यावर घालावीं. सोन्याच्या माळेला केव्हांच दोष नाहीं. स्नान केल्यावर ओली उटी अंगास लावण्यास द्यावी. शहाण्यांनीं कपड्याची अदलाबदल करून दुसऱ्याचें वस्त्र आपल्या अंगावर कधीं घेऊं नये, किंवा ज्याला दशा नाहींत असेंही वस्त्र अंगावर घेऊं नये. कपडे निजावयाच्या वेळचे वेगळे, बाहेर जाण्याच्या वेळचे वेगळे, व देवांच्या पूजेच्या वेळचे वेगळे असावे. प्रियंगु, चंदन, बिल्व, तगर, केसर, हीं निरनिराळीं उगाळून अंगाला लावावीं. स्नान करून शुद्ध होऊन अलंकारमंडित होऊन उपवास करावा व सर्व पर्वकाळीं ब्रह्मचर्य असावें. एका भांड्यांत दुसऱ्याशीं मिळून जेऊं नये. विटाळशीनें शिजविलेलें अन्न खाऊं नये. ज्यांचें सार काढून घेतलें आहे असे पदार्थ खाऊं नयेत. दुसरे आपल्याकडे टकमक पहात असतां त्यांना न देतां खाऊं नये. जो अशुद्ध आहे किंवा जो साधु आहे अशांना चिकटून कधीं बसूं नये. धर्मकृत्यामध्यें निषिद्ध केलेले पदार्थ इतर वेळेलाही खाऊं नयेत. पिंपळ, वड, सण, औदुंबर यांचीं फळें कधीं खाऊं नयेत. बकरा, गाय, मोर यांचें मांस खाऊं नये. त्याचप्रमाणें सुकलेलें किंवा शिळें मांस खाऊं नये. मीठ हातानें घेऊन कधीं खाऊं नये. रात्रीं दहीं व सतूचें पीठ खाऊं नये. सकाळ संध्याकाळ दोनदां जेवून मध्यें कांहीं खाऊं नये. अन्नांत केंस सांपडला असतां तें अन्न खाऊं नये किंवा दुसऱ्याचें श्राद्ध जेऊं नये. एका वस्त्रानिशीं, न बसतां कधीं खाऊं नये. त्याचप्रमाणें जमिनीवर खाऊं नये. व जेवतांना गडबड करूं नये. अतिथीला आधीं पाणी देऊ-

न मग अन्न देऊन मग आपण जेवावें व जेवतांना दुसरीकडे लक्ष नसावें. एका पंक्तीला मित्राशीं वसून त्याला न देतां जो खातो तो तें प्रत्यक्ष हलाहल विष खातो. पाणी, पायस, सतू, दहीं, तूप, मध हीं खाऊन अवशेष राहिलेलीं कोणाला देऊं नयेत. खातांना शंका घेत खाऊं नये. जेवणाच्या अखेरीला दहीं पिऊं नये. जेवण झाल्यावर आचमन करून मग तोंड धुवावें व नंतर पुन्हा तोंडांत थोडें पाणी घेऊन नंतर उजव्या पायाचा आंगठा भिजवावा. उजवा हात डोक्याला लावून मग एकाग्र मनानें अग्नीला स्पर्श करावा. ह्या सर्व गोष्टी ज्याला कळतात तो ज्ञातीमध्यें पुढें येतो. पाण्यानें नाक, डोळे वगैरे सर्व वरील छिद्रें त्याचप्रमाणें हात, पाय, बेंबी वगैरेंना हात लावावा. जेवल्यावर कधीं ओले हात ठेवूं नयेत. आंगठ्यामध्यें ब्रह्मतीर्थ आहे. करांगुळीच्या मागें देवतीर्थ आहे. आंगठा व तर्जनी यांच्यामधील भागांनीं पितृकर्में करावीं. दुसऱ्याची निंदा अगर त्याला न आवडेल असें कधीं बोलूं नये. कोणाला राग आणूं नये. बाटग्यांशीं बोलूं नये, त्याचें तोंड पाहूं नये किंवा त्याच्याशीं संबंध ठेवूं नये. दिवसा मैथून करूं नये. लहान मुलीशीं, वेश्येशीं किंवा विटाळशीपणानंतर जी न्हाऊन शुद्ध झाली नाहीं, अशा स्त्रीशीं संबंध ठेवूं नये. शास्त्रांत सांगितल्याप्रमाणें निरनिराळे अवयव धर्मकर्मासाठीं धुतल्यावर मनुष्यानें तिनदां तोंडांत पाणी घेऊन दोनदां तोंड पुसावें, व याप्रमाणें शुद्ध व्हावें. सर्व इंद्रियांवरून एकवार पाण्याचा हात ठेवून तीन वेळ प्रक्षालन करावें. नंतर देवकार्य व पितृकार्य करावें. जेवणास बसण्याच्या आधीं व बसल्यावर व ज्या ज्या कर्माला शुद्धता पाहिजे अशा कर्मांच्यापूर्वी आचमन करावें. त्याचप्रमाणें थुंकी किंवा दुसरें कांहीं तोंडांतून बाहेर टाकल्यावर आचमन करून पाणी लावून शुद्ध व्हावें. ज्ञातीमधला एखादा म्हातारा किंवा गरीब मित्र यांना घरीं ठेवून घ्यावें. त्याचप्रमाणें पारवे, राघू, मैना हे पक्षी घरीं ठेवून घेणें चांगलें, वाघूळ, गिधाडें, कबूतर, भुंगे हें जेव्हां घरांत विन्हाड करूं पहातात तेव्हां तें अमंगळ समजून शांती करावी, हीच गोष्ट महात्म्यांच्या रडण्याला लागूं आहे. महात्म्यांना मोठ्या हुशारीनें संभाळून त्यांना कांहीं वाईट बोलूं नये. राजस्त्रिया व सख्या वगैरे ज्यांच्या वाऱ्याला उभें रहाणें उपयोगी नाहीं, अशा स्त्रीशीं संबंध ठेवूं नये. वैद्य, मुलें, म्हातारे, नोकर, बांधव, ब्राह्मण, शरण आलेला व संबंधी यांच्यांशीं संबंध यथातथा असावा. ब्राह्मण व कारागीर यांच्या देखरेखीखालीं तयार झालेल्या घरामध्यें रहावें. संध्याकाळीं निजूं नये, विद्या शिकूं नये, तसेंच जेवूं नये. रात्रीं पितृकर्में करूं नयेत. जेवल्यावर अंगाला उटी वगैरे लावूंनये, रात्रीं स्नान करूं नये, व सतूचें पीठ खाऊं नये. जेवतांना तीर्थ वगैरे देवांना दिलेलीं पेयें घेऊं नयेत. कोणाला रात्रीं जेवावयास बोलावून पोटभर जेवायास घालूं नये व आपणही पोटभर जेऊं नये. पक्ष्यांना मारूं नये व एखादे वेळेला खाण्याचा प्रसंग असला तरी त्यांना मारूं नये. मोठ्या कुलांत जन्मलेली, गुणासंबंधानें नांवाजलेली व वयांत आलेली अशा मुलीशीं लग्न करून अपत्याच्या योगानें कूळ कायम केल्यावर त्या मुलांना ज्ञान व कुलधर्म येण्यासाठीं गुरूच्या स्वाधीन करावें. मुलीला कुलवान व शहाण्या अशा मुलाला पाहून द्यावी. मुलांना लग्न करून पोटाची तजवीज करून देऊन त्यांची व्यवस्था लावावी. डोक्यावरून स्नान करून नंतर देव व पितर यांचीं कर्में करावीं. जन्मनक्षत्र, पूर्वा किंवा उत्तरा भाद्रपदा, कृत्तिका व जन्मनक्षत्रापासून पांचव्या, चवदाव्या व तेविसाव्या नक्षत्रावर त्याचप्रमाणें उग्र अशा नक्षत्रावर श्राद्ध करूं नये. याचप्रमाणें ज्योतिषामध्यें जीं नक्षत्रें सांगितलीं आहेत तीं सर्व वर्ज्य आहेत. हजामत पूर्वेकडे तोंड करून किंवा उत्तरेकडे तोंड करून करावी. लोकासंबंधानें किंवा आपल्यासंबंधानें वाईट बोलूं नये. निंदा ही अधर्माला कारण होते. जिच्या अवयवामध्यें उणेपणा आहे, अशा स्त्रीशीं किंवा एखाद्या मुलीशीं संबंध करूं नये. **त्याचप्रमाणें एकाच प्रवराच्या किंवा आईच्या कुळांतील मुलीशीं किंवा जिला कांहीं खोड आहे अशीशीं** लग्न करूं नये. म्हातारी, जिनें संसार सोडला आहे, पतिव्रता, हीन कुळांतील, हीन वर्णाची, उत्तम वर्णाची, जिचें कूल ठाऊक नाहीं किंवा जी हीन कुळांतली आहे अशा स्त्रीशीं संबंध करूं नये. त्याचप्रमाणें पिं-

गला,कोड भरलेली, ज्यांच्या कुळांत अपस्मार आहे अशा कुळांत झालेली, त्याचप्रमाणें जिला क्षय आहे अशा मुलीशीं संबंध करूं नये. जी लक्षणसंपन्न असून त्याबद्दल नांवाजली असेल अशा मनोरम देखण्या मुलीशीं लग्न करावें. थोर किंवा आपल्या बरोबरीच्या कुलाशीं संबंध करावा. कमी कुळांतील किंवा बाटगी अशीला कधीं पतकरूं नये. ब्राह्मणांनीं अग्निसंबंधी वेदांत ज्या क्रिया सांगितल्या आहेत त्या मोठ्या लक्षपूर्वक कराव्या. स्त्रियांचा हेवा करूं नये. आपल्या बायकोचें चांगलें रक्षण करावें. हेवा आयुष्य कमी करतो. ह्मणून त्याच्या वाटेला जाऊं नये. दिवसां, सूर्य उगवेपर्यंत, संध्याकाळीं, रात्र पडल्याबरोबर किंवा उच्छिष्ट निजल्यानें आयुष्य कमी होतें. त्याचप्रमाणें परस्त्रीशीं संबंध ठेवणें व हजामत करून तसेंच रहाणें, याच्या योगानेंही आयुष्य कमी होतें. संध्याकाळच्या वेळीं अभ्यास करणें,स्नान करणें,जेवणें,वेद पढणें या गोष्टी आदरून टाळाव्या. त्यावेळीं शुचिर्भूत होऊन कांहीं न करतां एकाग्रतेनें ध्यानस्थ असावें; त्याचप्रमाणें स्नान करून ब्राह्मण, देव, यांची पूजा करून गुरूंना अभिवादन करावें. बोलावल्याशिवाय यज्ञाला केवळ पहाण्याच्या हेतुशिवाय दुसऱ्या कोणत्याही कारणानें जाऊं नये; कारण त्या ठिकाणीं बहुमान न होईल तर त्याच्या योगानें आयुष्य कमी होतें. एकट्यानें प्रवासाला जाऊं नये; त्याचप्रमाणें रात्रीं बाहेर पडूं नये. संध्याकाळ होण्याच्या पूर्वीं घरीं येऊन रहावें. आई, बाप व गुरु यांनीं सांगितलेलें हिताचें असो किंवा अहिताचें असो, विचार न करतां करावें. धनुर्विद्या, वेदविद्या, हत्तीवर बसणें, घोड्यावर बसणें व रथांत बसणें यांची संवय करावी. यांकडे जो नीट लक्ष देतो तो सुखी होतो. शत्रू, नोकर व स्वजन यांचें कांहीं चालूं न देता प्रजेचें पालन करण्यामध्यें जो गढून असतो त्याचा नाश कधीं होत नाहीं. युक्तिशास्त्र, शब्दशास्त्र, गायनशास्त्र व दुसऱ्या कला, त्याचप्रमाणें पुराण, इतिहास व सामान्य आख्यायिका माहीत असाव्या. थोरांचीं चरित्रें ऐकत असावी, बायको विटाळशी असतां **तिच्याशीं संबंध करूं नये किंवा तिला जवळ बोलावूं नये. न्हाल्यावर चवथ्या दिवशीं रात्रीं तिच्याकडे जावें. पांचव्या दिवशीं तिच्याशीं संबंध केल्यानें मुलगी होते व सहाव्या दिवशीं संबंध केल्यानें मुलगा होतो.** ज्ञाती, संबंधी व मित्र यांचा बहुमान करावा. नानाप्रकारच्या दक्षिणा देऊन यथाशक्ति अनेक यज्ञ केल्यावर नंतर अरण्यांत जावें. याप्रमाणें आयुष्य वाढण्याचीं लक्षणें थोडक्यांत सांगितलीं. आचार हाच वैभवाला चढविणारा असून आचारापासूनच कीर्ति वाढते. आचारापासून आयुष्य वाढतें व पाप दूर होतें. सर्वांमध्यें आचार श्रेष्ठ आहे. धर्माची उत्पत्ति आचारापासूनच असून धर्मापासून आयुष्यवृद्धि होते. याप्रमाणें आयुष्य वाढवून स्वर्ग देणारा, मोठा कल्याणप्रद मार्ग सर्व वर्णांची कींव करून स्वतः ब्रह्मदेवांनीं सांगितला आहे.’

---

## २७२ वडील व धाकट्या भावांमधील वर्तन. (१३. १०५)

युधिष्ठिर ह्मणाला, ‘वडील भावानें धाकट्याशीं व धाकट्यांनीं वडील भावाशीं कसें वागावें?’ भीष्म म्हणाले, ‘सांगतों ऐक. वडील भावानें वडील भावाला साजेलसें वागावें. भल्या गुरूचें आपल्या शिष्यासंबंधानें जसें वर्तन असावें तसें याचें असावें. आतां गुरु जर मूर्ख असेल तर शिष्याला त्याच्या ठिकाणीं योग्य वर्तन ठेवितां येणें शक्य नाहीं. गुरूचें जर शुद्ध व थोर वर्तन असेल तर शिष्यालाही तेंच वळण लागतें, वडील भावानें धाकट्या भावांच्या कांहीं गोष्टींकडे प्रसंगीं कानाडोळा करावा, आणि कळत असून सुद्धां प्रसंगीं जडाप्रमाणें न कळल्यासारखें रहावें. धाकट्या भावांच्या हातून चूक झाली असतां थोरल्यानें त्यांना वाटेवर आणण्याचा प्रयत्न करावा. भावांमध्यें सलोखा असून वडील भाऊ धाकट्याला प्रत्यक्ष रीतीनें वाटेवर आणण्याचा प्रयत्न करील तर त्यांचें तें सुखासमाधानानें असणें न साहून त्याबद्दल वाईट वाटणारे त्यांचे वैरी त्या दोघांमध्यें बेबनाव आणण्याच्या खटपटीला लागून तसें करतात. कुळाचें वैभव किंवा नाश हीं सर्व वडील भावावर अवलंबून आहेत. वडील भाऊ जर अक्कलशून्य व दुष्ट असेल तर तो सर्व कुळाच्या नाशाला कारण होतो. जो वडील भाऊ

धाकट्या भावांचें वाईट करतो त्याला वडील न समजतां वांटणीवर त्याचा हक्क पोहोंचत नाहीं. राजानें अशाला ताळ्यावर आणावें. असा मनुष्य खात्रीनें वाईट लोकाला जातो. अशाचा जन्म वेताच्या फुलाप्रमाणें व्यर्थ आहे. ज्या कुळामध्यें सर्व अनर्थाला कारणीभूत असा पापी मनुष्य निपजतो तो त्या कुळाच्या कीर्तीवर दडपण घालून त्याची अपकीर्ति वाढवितो. आडमार्गाला जाणाऱ्या धाकट्या भावांचाही वांटणीवर हक्क नाहीं. वडिलानें अशा धाकट्या भावांना कांहीं न देतां सर्व मालमत्ता आपण घ्यावी. बापाच्या पैशाची मदत न घेतां आपल्या पायाच्या जोरावर बाहेर पडून जर वडील भाऊ कांहीं मिळवील तर त्याचा वांटा धाकट्यांना कांहीं न देतां तो सर्व पैसा त्यानें आपल्याला ठेवावा. एकत्र असलेल्या भावांची जर बापाच्या हयातींत वेगळें होण्याची इच्छा असेल तर बापानें त्या सर्वांना कमी अधिक न देतां सारखी वांटणी द्यावी. वडील भाऊ वाईट असो किंवा चांगला असो, त्याचा अपमान करूं नये. त्याचप्रमाणें स्त्री किंवा धाकटा भाऊ यांच्या अकल्याणाचें असें कांहीं कधीं करूं नये. धर्मच कल्याणाला कारण आहे. दहा आचार्यांहून उपाध्याय श्रेष्ठ असून दहा उपाध्यायांहून बाप श्रेष्ठ आहे; व दहा बापांहून एवढेंच नव्हे तर सर्व पृथ्वीहून थोरपणामध्यें आई श्रेष्ठ आहे. तिच्यासारखा गुरु दुसरा कोणीही नाहीं; म्हणूनच हिला सर्वांत थोर समजण्यांत येतें. बाप मेल्यावर वडील भाऊ बापाच्या ठिकाणीं समजला आहे. त्यानेंच धाकट्यांचें पोटाला देऊन पालन करावें. त्याचप्रमाणें धाकट्यांनीं त्याला नमून असून त्याच्या मताप्रमाणें वागावें; व बापाप्रमाणें त्याच्या मागून असावें. आईबाप हे केवळ या शरीराला जन्म देणारे असून गुरूपासून जो जन्म मिळतो तोच खरा, अजर व अमर आहे. वडील बहीण आईच्या ठिकाणीं समजावी. त्याचप्रमाणें जिचें लहानपणीं स्तनपान केलें आहे अशी वडील भावाची बायकोही त्याच ठिकाणीं समजावी!'

---

## २७३ निरनिराळ्या उपवासांचीं फळें.

### (१३. १०६-९)

युधिष्ठिर ह्मणाला, 'सर्ववर्णांच्या लोकांचा एवढेंच नव्हे तर म्लेंच्छांचा देखील कल उपवासाकडेच दिसतो. ब्राह्मण व क्षत्रिय यांनाच उपवास सांगितले आहेत असें माझ्या ऐकण्यांत आहे. तेव्हां उपवासानें या अन्य जातीच्या लोकांना पुण्य मिळतें असें कसें ह्मणावें? हे सर्वच उपवास कसे करूं लागले व उपवासानें गति तरी कोणती मिळते? उपवास पुण्यप्रद असून हे मोठे आधार आहेत असें म्हणतात. तर उपवाशाला या जगांत काय फळ मिळतें? उपवास केल्यावर मनुष्यानें काय दान करावें? यासंबंधानें मला सविस्तर सांगा.' भीष्म म्हणाले, 'पूर्वी महातपस्वी अंगिरांना मीं हेच प्रश्न केले असतां त्यांनीं जीं उत्तरें दिलीं तीं सांगतों ऐक. ते म्हणाले, 'ब्राह्मण व क्षत्रिय यांना एका वेळेला तीन दिवस उपवास सांगितले आहेत. एक, दोन किंवा तीन रात्रींपर्यंत वाटेल तेवढा त्यांनीं उपवास करावा. वैश्य व शूद्र यांच्यासाठीं एक रात्रीचा उपवास सांगितला आहे, व प्रसंगविशेषीं दोन रात्रींचाही सांगितला आहे; परंतु तीन रात्रींचा कधींच सांगितला नाहीं. जो मनुष्य आत्मनिग्रहानें शुद्ध पंचमी, षष्ठी व पौर्णिमा यांना एक वेळ जेऊन रहातो तो क्षमाशील, रूपवान व शास्त्रसंपन्न होतो. अनपत्य किंवा निर्धन असा हा कधींच रहात नाहीं. जो शुद्ध पंचमीला व षष्ठीला देवतांचें यजन करून ब्राह्मणांना जेऊं घालतो तो सर्व कुळामध्यें मोठा होतो. जो कृष्णपक्षाच्या अष्टमीला व चतुर्दशीला उपवास करतो, त्याला रोगराई कांहीं न रहातां तो वीर्यसंपन्न होतो. जो सबंध मार्गशीर्ष महिना एकदां जेऊन राहून आपल्या शक्तीप्रमाणें ब्राह्मणांना जेऊं घालतो तो सर्व व्याधी व पापें यांपासून मुक्त होतो व सर्व प्रकारच्या कल्याणांनीं व धान्यांनीं संपन्न होतो. जो मनुष्य पौषमहिना एकदां खाऊन रहातो तो नशिबवान, देखणा व भाग्यशाली होतो. माघमास एकदां खाऊन काढणारा श्रीमानाच्या घरीं जन्माला जाऊन मोठेपणाला चढतो. फाल्गुनमहिना एकदां जेऊन का-

ढणारा स्त्रियांना आवडता होऊन त्या त्याला वश असतात. जो चैत्रमहिना एकदां जेऊन काढतो तो सुवर्ण, रत्नें व मोतीं यांनीं संपन्न अशा कुळांत जन्म घेतो. वैशाखमहिना एकदां जेऊन काढणारा मग तो पुरुष असो किंवा स्त्री असो, ज्ञातीमध्यें मोठेपणा पावतो. ज्येष्ठमहिना एकदां जेऊन काढणारा स्त्री किंवा पुरुष मोठा ऐश्वर्यवान होतो. आषाढमहिना एकदां जेऊन काढणारा पुष्कळ धनधान्य व संतती यांनीं युक्त होतो. आत्मनिग्रहपूर्वक श्रावणमहिना एकदां जेऊन काढणारा ज्ञातीला पोसणारा होतो. भाद्रपदमहिना एकवेळ खाऊन रहाणारा पुष्कळ गुरेंढोरें बाळगून कायमचें मोठें ऐश्वर्य मिळवितो. आश्विनमास एकदां जेऊन काढणारा शुद्ध अंतःकरणाचा होऊन पुष्कळ वहानें व मुलेंबाळें यांनीं संपन्न होतो. कार्तिकमहिना एकदां जेऊन काढणारा शूर व कीर्तिमान होऊन त्याला पुष्कळ बायका मिळतात. याप्रमाणें महिन्यांची व्यवस्था आहे. आतां तिथींची व्यवस्था सांगतों ऐक. पंधरा पंधरा दिवसांनीं जो एकदां जेवतो तो पुष्कळ गुरें, मुलें व बायका यांनीं संपन्न होतो. महिन्यामहिन्याला त्रिरात्रप्रमाणें बारा वर्षें जो उपवास काढतो तो आपल्या जातीचा पुढारी होऊन त्याला कोणी प्रतिस्पर्धी उरत नाहीं, व आपल्या बरोबरीला चढण्याचा कोणी प्रयत्न करील ही काळजी सुद्धां त्याला रहात नाहीं. मी सांगतों हे नियम बारा वर्षेपर्यंत पाळावे. जो मनुष्य सकाळसंध्याकाळ दोनदां जेऊन मध्यें कांहीं न खातां अहिंसा धर्म पाळून नेहमीं अग्नीला आहुति देत रहातो त्याला सहा वर्षांत सिद्धि मिळून अग्निष्टोमयज्ञाचें फल मिळतें, व तो पुण्यवान मनुष्य पापापासून मुक्त होऊन नृत्यगायनांनीं दुमदुमून राहिलेल्या अप्सरांच्या लोकीं हजारों स्त्रियांमध्यें सुखांत रहातो. तापविलेल्या सोन्याप्रमाणें लखलखीत असें विमान त्याला बसावयास मिळून तो ब्रह्मलोकामध्यें पूर्ण हजार वर्षें मोठेपणा मिळवून रहातो व त्यानंतर फिरून खालीं पृथ्वीवर आल्यावर सुद्धां त्याला मोठेपणा मिळतो. जो एक वर्षभर एकदां खाऊन रहातो त्याला अतिरात्र यज्ञाचें फल मिळतें, व दहा हजार वर्षें तो बहुमानानें स्वर्गांत राहून पुढें खालीं आल्यावरही मोठेपणाला चढतो. जो एक वर्षभर चवथ्या दिवशीं खात असून अहिंसाधर्म पाळून इंद्रियनिग्रहानें खरें बोलत रहातो त्याला वाजपेय यज्ञाचें फल मिळतें, व दहा हजार वर्षें स्वर्गलोकामध्यें बहुमान पावतो. सहाव्या दिवशीं एकदां खाऊन एक वर्ष काढणाऱ्याला अश्वमेधाचें फल मिळून चक्रवाक जोडलेल्या विमानांतून जाऊन चाळीस हजार वर्षें तो स्वर्गांत आनंदांत रहातो. एक वर्षपर्यंत आठव्या दिवशीं जेऊन राहणारा मनुष्य गवामय यज्ञाचें फल मिळवून हंस व सारस जोडलेल्या विमानांतून स्वर्गाला जाऊन पन्नास हजार वर्षें स्वर्गामध्यें आनंदांत रहातो. पंधरा दिवसांनीं एकदा जेऊन एक वर्ष काढणाराला सहा महिने उपवास केल्याचें फल मिळून साठ हजार वर्षें तो स्वर्गामध्यें वीणा, वल्लकी, अलगुज यांच्या मधुर शब्दांनीं सकाळीं जागा होत सुखांत रहातो. एक वर्षभर महिन्यामहिन्याला एकदां पाणी पिऊन रहाणाराला विश्वजित यज्ञाचें फल मिळून सिंह व वाघ जोडलेल्या रथांतून जाऊन सत्तर हजार वर्षें तो स्वर्गामध्यें आनंदांत रहातो. महिन्यापुढें उपवास सांगितला नाहीं. त्रास न होतां व्याधिरहित मनुष्य जो उपवास काढतो त्याला पावलोंपावलीं यज्ञाचें फल मिळतें, व हंस जोडलेल्या विमानांतून स्वर्गाला जाऊन लाख वर्षें तेथें तो सुखांत असतो. शेंकडों अप्सरांच्या मुली त्याला तेथें रमवितात, व कंबरपट्टा व नूपुरें यांच्या रुणझुण अशा शब्दांनीं तो तेथें जागा होतो. कृश झालेल्या मनुष्याला पुष्टि, दुखापत झालेल्याची ती भरून येणें, व्याधिग्रस्ताला नाना औषधी, रागावलेल्याचें मन धरणें, दुःखी झालेल्याचें दुःख मान व पैसा यांनीं कमी करणें वगैरेची गरज असते; पण स्वर्गेच्छूला या कशाचीच पर्वा नसते. कांहीं न खातां देह ठेवणारा निष्पाप व स्वस्थ होतो; व त्याचे सर्व संकल्प सफल होऊन तो सुखी होतो. सकाळच्या सूर्याप्रमाणें लखलखीत अशा वैडूर्य व मोत्यें यांनीं युक्त अशा सुवर्णरथांत वीणा, मुरज, दिव्यघंटा यांच्या नादानें दुमदुमलेल्या व पताका आणि दिवे यांनीं भरलेल्या अशा रथामध्यें हजारों स्त्रियांच्या घोळक्यामधून स्वर्गाला जाऊन त्याच्या अंगावर जितकीं रोमरंध्रें असतील तितकीं हजार वर्षें तो स्वर्गामध्यें सुखांत रहातो. वेदाहून श्रेष्ठ असें शास्त्र ना-

हीं. मातेहून श्रेष्ठ गुरू नाहीं, धर्माहून श्रेष्ठ लाभ नाहीं. ब्राह्मणाहून श्रेष्ठ असें पावन करणारें दुसरें नाहीं. त्याचप्रमाणें उपवासाच्या तोडीचें तप नाहीं. देव विधिपूर्वक उपवास करूनच स्वर्गाला गेले व ऋषींनीं उपवासांनींच सिद्धि मिळविली. देवांचीं हजार वर्षेंपर्यंत विश्वामित्र एकदां खाऊन राहिले तेव्हां त्यांना ब्राह्मणत्व आलें, यायोगानेंच च्यवन, जमदग्नी, वसिष्ठ, गौतम व भृगु हे क्षमावान महर्षी स्वर्गाला गेले.' नाना यज्ञांना नाना साधनांची जरूरी असून पुष्कळ खटपट असल्यानें केवळ राजांच्या हातूनच ते होण्यासारखे असून ज्यांच्याजवळ पैसा किंवा साधनें नाहींत व कोणीही माह्य नाहीं, अशा एकट्या मनुष्याला ते होणें शक्य नाहींत; तेव्हां त्यांच्यासाठीं या यज्ञांच्याच तोडीचें फळ देणारे अंगिरा मुनींनीं उपवास सांगितले आहेत. जो सकाळ संध्याकाळ जेऊन मध्यें कांहीं न खातां अहिंसाधर्माकडे लक्ष देऊन अग्नीला होम देत राहील तो सहाच वर्षांनीं सिद्धि पावून तापविलेल्या सोन्याप्रमाणें कांतिमान अशा विमानांतून नृत्यगायनानें गजबजून राहिलेल्या अशा देव व देवस्त्रियांच्या लोकांमध्यें सुखांत राहून, पुढें अग्नीप्रमाणें देदीप्यमान अशा प्रजापतीच्या लोकीं एक पद्म वर्षें रहातो. तीन वर्षें सतत जो एकदां खाऊन आपल्या धर्मपत्नीवरच संतुष्ट होऊन रहातो त्याला अग्निष्टोमाचें किंवा इंद्राला प्रिय अशा अनेक लक्षणयुक्त यज्ञाचें फळ मिळतें. असा सत्य भाषण करणारा दानशील, ब्राह्मणप्रिय, असूया न करणारा, क्षमाशील व आत्मनिग्रही मनुष्य उत्तम गतीला जातो, व हंस जोडलेल्या पांढऱ्या शुभ्रढगासारख्या विमानांत बसून जाऊन अप्सरांबरोबर तो पूर्ण दोन पद्म वर्षें सुखांत रहातो. जो बारावर्षेंपर्यंत नेहमीं दुसऱ्या दिवशीं एकवार खाऊन अग्नीला होम देतो, व पहाटे उठून अग्निकार्याकडे लक्ष देऊन रहातो त्याला अग्निष्टोम यज्ञाचें फळ मिळतें व हंस आणि सारस जोडलेल्या रथामधून इंद्रलोकाला जाऊन तेथें तो लावण्यवती स्त्रियांच्या समागमांत सुखांत रहातो. तिसऱ्या दिवशीं एक वेळ जेऊन वरच्याप्रमाणें जो नियमानें रहातो त्याला अतिरात्र यज्ञाचें फळ मिळून मोर जोडलेल्या रथांतून सप्तर्षींच्या लोकाला जाऊन तीन पद्म वर्षेंपर्यंत तेथें तो सुखांत रहातो. चवथ्या दिवशीं एकवार जेऊन वरच्याप्रमाणें रहाणाराला वाजपेय यज्ञाचें फळ मिळून इंद्रकन्या ज्याला ओढीत आहेत, अशा विमानांतून इंद्रलोकाला जाऊन अनंतकाल तेथें तो नेहमीं इंद्राचे विहार पहात रहातो. पांचव्या दिवशीं एक वेळ जेऊन वर सांगितल्याप्रमाणें एक वर्ष रहाणारा सत्यवाक्, निर्लोभी, ब्राह्मणप्रिय, हिंसाशून्य, असूयारहित व निष्पाप मनुष्य बारा दिवसांच्या यज्ञाचें फळ मिळवून हंस जोडलेल्या सूर्यमालिकेप्रमाणें ज्याची कांति आहे, अशा विमानांतून जाऊन पांढऱ्या शुभ्र अशा गृहामध्यें सोळा, अधिक पांच गुणिले सात, मिळून एकंदर एकावन पद्म वर्षें सुखांत रहातो. मौनव्रत धरून सहाव्या दिवशीं एकदां जेवीत बारा वर्षें वर सांगितल्याप्रमाणें अग्निहोत्रासाठीं त्रिकालस्नान करीत ब्रह्मचर्य व्रतानें जो रहातो त्याला गोमेधाचें फळ मिळून अग्नीच्या ज्वाळेप्रमाणें तेजःपुंज असें हंस व मोर जोडलेलें विमान मिळतें; त्याचप्रमाणें अप्सरांच्या मांडीवर झोंप घ्यावयास सांपडून नूपुर व कंबरपट्टा यांच्या शब्दांनीं तो जागा होत एक हजार तीनशें कोटी दोन पताका व अठरा पद्म वर्षें सुखांत घालवून पांच हजार अस्वलांच्या अंगावरील कातड्यावर जितके केंस आहेत तितकीं वर्षें तो ब्रह्मलोकामध्यें बहुमानानें रहातो. सातव्या दिवशीं एकदां जेऊन बारा महिने वर सांगितल्याप्रमाणें जो ब्रह्मचर्यानें गायत्री जपत, फुलें, उटी, मधु व मांस सोडून रहातो तो मरुत व इंद्र यांच्या लोकाला जाऊन त्या ठिकाणीं त्याच्या इच्छा पूर्ण होऊन देवकन्या त्याचा बहुमान करतात. ज्यामध्यें पुष्कळ सोनें दक्षिणा दिली जाते अशा यज्ञाचें त्याला फळ मिळून त्या लोकामध्यें असंख्य वर्षें तो सुखांत रहातो. आठव्या दिवशीं जेऊन वर सांगितल्याप्रमाणें एक वर्ष रहाणाराला पुंडरीकयज्ञाचें फळ मिळून पद्माप्रमाणें कांतिमान विमान त्याला बसावयास मिळतें. व काळ्यासावळ्या आणि सोन्याप्रमाणें गोऱ्यापान, वयांत आलेल्या, रूपवती, विलासिनी स्त्रिया त्याला मिळतात. जो एक वर्ष नवव्या दिवशीं जेऊन वर सांगितल्याप्रमाणें रहातो त्याला हजार अश्वमेधांचें फळ मिळून सूर्य

व अग्नि यांच्याप्रमाणें दिव्य माळा ज्याला अडक-विल्या आहेत अशा, पुंडरीककमलाप्रमाणें कांति-मान विमानांतून रुद्रकन्या त्याला स्वर्गाला घेऊन जातात, व तेथें तो अनंतकाल सुखांत रहातो. जो दहाव्या दिवशीं एकवार जेऊन वर सांगितल्याप्रमाणें रहातो त्याला हजार अश्वमेधांचें फळ मिळून सर्व भूतमात्रांचें मन वेधून घेणाऱ्या ब्रह्मकन्या ज्या ठिकाणीं रहातात ते लोक त्याला मिळून तेथें त्या रूपवती मुली त्याला रमवितात.जो अकराव्या दिवशीं एकदां जेऊन वर सांगितल्याप्रमाणें रहातो, व तोंडानें किंवा मनानें सुद्धां जो परस्त्रीचा अभिलाष करीत नाहीं व आईबापांसाठीं सुद्धां जो खोटें बोलत नाहीं, त्याला हजार अश्वमेधांचें फळ मिळून रूपवती मुली ब्रह्मविमानांतून त्याला शंकराकडे घेऊन जातात, व युगांतकालीन अग्नीप्रमाणें तेजःपुंज असा तो नेहमीं रुद्राला नमस्कार करीत व त्याचें दर्शन घेत अनंत वर्षें रुद्रलोकामध्यें रहातो. बाराव्या दिवशीं हवि भक्षण करून बारा महिने रहाणाऱ्याला सर्व यज्ञांचें फळ मिळून तो बारा सूर्य जोडलेल्या विमानांतून मोठमोठे मौल्यवान हिरे, मोतीं व प्रवाळ ह्यांच्या योगानें शोभायमान, मंजुळ शब्द करणारे, हंस, मोर, चक्रवाक व नाग यांनीं खुलून दिसणारे व मोठमोठ्या हवेल्यांनीं भरलेले अशा ब्रह्मलोकांमध्यें रहातो. तेराव्या दिवशीं हवि भक्षण करून एक वर्ष रहाणाराला देवयज्ञ केल्याचें फळ मिळतें व रक्तकमलाच्या वर्णाचें, सोन्याप्रमाणें कांतिमान, असें विमान मिळून दिव्य अलंकारांनीं विभूषित अशा देवस्त्रियांनीं भरलेले दिव्य गंधाचा ज्या ठिकाणीं घमघमाट चालला आहे व अनेक सुखाला साधनीभूत अशा, मरुतांच्या लोकामध्यें तो असंख्य वर्षें रहातो, व त्या ठिकाणीं गायन व वाद्यें यांच्या स्वरानें देवकन्या त्याचा बहुमान करतात. चवदावा दिवस संपल्यावर हवि भक्षण करून बारा महिने रहाणाराला महायज्ञाचें फल मिळतें. ज्यांचें वय व रूप सांगतां येत नाहीं अशा सुंदर देवकन्या त्याकडे विमानें घेऊन येतात. त्यामध्यें बसून देवकन्यांच्या लोकांला जाऊन त्या ठिकाणीं कलहंसाच्या कूजितांनीं, नूपुरांच्या व कमरपट्ट्याच्या शब्दांनीं दररोज सकाळीं जागा होत गंगेच्या तीराला जितके वाळूचे कण आहेत तितकीं वर्षें तो सुखांत रहातो. जो पंधरवड्याला एकदां जेऊन वरच्याप्रमाणें एक वर्ष रहातो तो हजार राजसूय यज्ञांचें फळ मिळवून हंस व मोर जोडलेल्या विमानांतून वर जातो. जो सोळाव्या दिवशीं एकदां जेऊन एक वर्ष वर सांगितल्याप्रमाणें काढतो त्याला सोमयज्ञाचें फळ मिळून तरस व हत्ती जोडलेल्या विमानांतून वर जाऊन सोमकन्यांच्या लोकामध्यें तो रहातो. मनाला आल्हाददायक अशा गंधाची उटी अंगाला लावून वाटेल तिकडे संचार करण्याचें सामर्थ्य त्याच्या अंगीं येऊन त्या ठिकाणीं राहिला असतां चांगल्या देखण्या स्त्रिया त्याच्या सेवेला हजर असतात. अशा प्रकारें असंख्य वर्षें त्या ठिकाणीं तो सुखांत काढतो. त्याचप्रमाणें सतराव्या दिवशीं अन्न घेऊन राहणारा वरुण, इंद्र, रुद्र, मरुत, शुक्र व ब्रह्मदेव यांच्या लोकांला जाऊन तेथें देवकन्या उठून त्याला आसन देतात. त्या ठिकाणीं त्याला भुर्भुव नांवाच्या देवर्षीचें दर्शन होऊन विश्वरूप पहावयास सांपडतें. त्या ठिकाणीं देवाधिदेवांच्या कन्या त्याला रमवितात. जोंपर्यंत चंद्रसूर्य आकाशामध्यें फिरत आहेत, तोंपर्यंत हा अमृत प्राशन करीत त्या ठिकाणीं रहातो. अठराव्या दिवशीं एकदां खात जो बारा महिने रहातो, त्याला सप्तलोक दिसतात. अनेक घरघर आवाज करणारीं, देवकन्या ज्यांत बसल्या आहेत अशीं विमानें त्याच्या मागून चालून ज्याला वाघ व सिंह जोडले आहेत अशा मेघाप्रमाणें शब्द करणाऱ्या विमानांत बसून जाऊन अमृततुल्य असें सुधारसपान करीत हजारों कल्पें तो त्या ठिकाणीं रहातो. एकोणिसाव्या दिवशीं एकदां खाऊन बारा महिने रहाणाराला सप्तलोक दिसूं लागून अप्सरा व गंधर्व यांच्या गायनादिकांनीं दुमदुमलेलें असें स्थान मिळतें. त्या ठिकाणीं तो मोठ्या वैभवांत हजारों वर्षें काढतो. वीस दिवसांनीं एकदां खाऊन बारा महिने खरें बोलून ब्रह्मचर्य व्रतानें, मांस न खातां सर्वभूतमात्रांच्या हितामध्यें जो गढून रहातो त्याला अनेक आदित्यांचें रम्य लोक मिळून दिव्य माला व उटी लावलेल्या अप्सरा व गंधर्व उत्तम उत्तम विमानें घेऊन त्याच्या मागून असतात. एकविसाव्या दिवशीं एकवार खाऊन रहाणाराला शुक्र, इंद्र, अश्विनीकुमार

किंवा मरुत यांचे लोक मिळतात; व त्या ठिकाणीं दुःखाची ओळख सुद्धां न रहातां सुखामध्यें चांगल्या चांगल्या विमानांतून संचार करीत तो रहातो. उत्तम उत्तम स्त्रिया त्याच्या सेवेला हजर राहून तो देवाप्रमाणें मजेंत रहातो. बाविसाव्या दिवशीं एकदां जेऊन जो बारा महिने वर सांगितल्याप्रमाणें अग्नीला होम देत, हिंसा न करतां रहातो त्याला वसूंचे लोक मिळतात, व त्या ठिकाणीं सुधा पिऊन स्वच्छंद रीतीनें तो फिरत रहातो, व देवकन्या तेथें त्याला रमवितात. तेविसाव्या दिवशीं जो एकदां खाऊन बारा महिने वर सांगितल्याप्रमाणें रहातो तो वायु, शुक्र किंवा रुद्र यांच्या लोकांला जाऊन तेथें स्वच्छंद रीतीनें वाटेल तेथें फिरत अनंतकाल रहातो. अप्सरा त्याच्या सेवेला हजर असतात. चोविसाव्या दिवशीं एकदां खाऊन रहाणारा हंस जोडलेल्या उत्तम रथामध्यें बसून जाऊन आदित्यलोकामध्यें चिरकाल रहातो. तेथें हजारों देवकन्या त्याला रमविण्याला असतात. पंचविसाव्या दिवशीं एकदां खाऊन वर्षभर रहाणारा सिंह व वाघ जोडलेल्या विमानांतून वर जाऊन अमृततुल्य सुधारस पिऊन हजारों कल्पें वर स्वर्गांत रहातो. सव्विसाव्या दिवशीं एकदां जेऊन कोणत्याही वस्तूवर आसक्ति न ठेवतां आत्मनिग्रहानें अग्नीची उपासना करीत एकवर्षभर रहाणाराला सात वसू व मरुत यांचे लोक मिळतात. रत्नखचित स्फटिकाच्या विमानांतून गंधर्व व अप्सरा त्याचा बहुमान करीत त्याच्या मागून असतात. हजारों वर्षें याप्रमाणें दिव्य तेजानें झळकत तो स्वर्गामध्यें रहातो. सत्ताविसाव्या दिवशीं एकदां जेऊन वर्षभर अग्नीची उपासना करीत रहाणाराला विपुल फल मिळून देवलोकामध्यें त्याचा बहुमान होतो; आणि सर्व वासना तृप्त होऊन अमृत भक्षण करीत तो त्या ठिकाणीं राजर्षींनीं घेतलेला देवऋषींचा मार्ग घेऊन आनंदांत रहातो. अठ्ठाविसाव्या दिवशीं एकदां जेऊन वर्षभर रहाणारा अनेक भोग भोगीत आपल्या तेजानें सूर्याप्रमाणें झळकत स्वर्गामध्यें रहातो. मोठ्या तेजःपुंज, ज्यांचे स्तन, मांड्या व जघन पुष्ट आहेत अशा कांतिमान स्त्रिया त्याला रमवितात. सूर्याप्रमाणें तेजःपुंज अशा विमानांतून फिरत हजारों वर्षें तो तेथें रहातो. याचप्रमाणें एकोणातिसाव्या दिवशीं एकदां जेऊन रहाणारा मनुष्य देव व राजर्षी यांना पूज्य अशा नानालोकांना जाऊन तेथें देवाप्रमाणें झळकत रहातो. जो शमपर होऊन एक महिन्यानें एकदां खाऊन बारा महिने रहातो, त्याला ब्रह्मलोक मिळतो व त्या ठिकाणीं वैभवामध्यें राहून, दुःख स्वप्नीं सुद्धां ठाऊक नसून सुधारसावर तो सुखांत असतो, व तेथें रुद्र व देवर्षी यांच्या मुली नानाप्रकारच्या कर्मणुकींनीं, नानाप्रकारच्या मधुर भाषणांनीं, व नानाविध प्रेम दाखवून त्याला रमवितात. गगनाकार अशा झगझगीत विमानांतून तो चालला असतां चंद्रासारखें विमान त्याच्या मागें असून ढगासारखें विमान त्याच्या पुढें असतें. त्याच्या उजव्या बाजूला तांबड्या रंगाचें विमान असून खालीं नील वर्णाचें विमान असतें. वर नाना रंगांनीं चित्रविचित्रित असें विमान असतें. याप्रमाणें अनेकांकडून बहुमान पावत हजार वर्षांमध्यें जितके जलबिंदु पावसाच्या रूपानें पडतात तितकीं वर्षें तो ब्रह्मलोकांत रहातो. दहा वर्षेंपर्यंत महिना महिना उपवास करून आत्मनिग्रहानें राग, शिश्न व उदर यांना ताब्यांत ठेवून रहाणारा, महर्षींच्या योग्यतेला पोहोंचून सूर्याप्रमाणें तेजःपुंज असा तो आपल्या शरीरासह स्वर्गाला जाऊन तेथें आपल्या कर्माचें उत्तम फल भोगीत रहातो. या व अशा प्रकारचे धर्म व व्रतें पाळून शुचिर्भूत होणारा मनुष्य निर्मल होऊन सूर्याप्रमाणें झळकत रहातो; व आपल्या शरीरासह स्वर्गाला जाऊन तेथें देवांप्रमाणें सर्व सुखांचा उपभोग घेत रहातो. याप्रमाणें गरीब लोकांना यज्ञाऐवजीं हे उपवास सांगितले असून हे पाळल्यानें त्यांना उत्तम गति मिळते.'

युधिष्ठिर ह्मणाला, 'सर्वांत उत्तम तऱ्हेनें पावन करणारें तीर्थ कोणतें?' भीष्म ह्मणाले, 'सर्वच तीर्थें पावन करणारीं आहेत; परंतु त्यामध्यें श्रेष्ठ कोणतें तें सांगतों ऐक. **मनुष्यानें नेहमीं सत्यता ठेवून मानस तीर्थामध्यें स्नान करावें. हें तीर्थ अगाध व निर्मळ असून सत्य हेंच यामधील पाणी आहे, व बुद्धि हीच याची खोली आहे. अशा या तीर्थामध्यें सत्वगुण धरून स्नान केलें असतां जी शुद्धि मिळते ती सत्य, सरळपणा,**

**अहिंसा, सर्व प्राणिमात्रांसंबंधानें दया, शम, दम, या गुणांच्या रूपानें मिळते.** जो ममताशून्य, अहंकाररहित व सुखदुःखादिद्वंद्वांच्या पलीकडे गेला आहे, बायकापोरांच्या लचांडांतून सुटून शुद्ध होऊन ज्याची भिक्षा मागण्याला तयारी झाली आहे, अशा प्रकारच्या सर्वांना तीर्थच समजावें. तरीं सर्व वस्तूंचें स्वरूप ओळखून ममतेपासून जो अलग झाला आहे, त्यालाच सर्व तीर्थांहून श्रेष्ठ तीर्थ समजावें. शुद्धतेचें स्वरूप याप्रमाणें ओळखावें. सत्व, रज, तम हे ज्यांच्या अंतःकरणांतून धुवून गेले आहेत, बाह्य शौचाशौचाची पर्वा न उरतां कांहीं कार्य डोळ्यांपुढें ठेवून त्याच्या मागें लागून बाकी सर्व ज्यांनीं सोडलें आहे, असे सर्वज्ञ ज्यांचें वर्तन फार चोख आहे ते फार उत्तम तऱ्हेचें पावन करणारें तीर्थ समजावें. **अंगावर पाणी ओतून घेऊन अंग भिजवून घेतल्यानें मनुष्यानें स्नान केलें असें ह्मणतां येत नाहीं. आत्मनिग्रहरूप स्नान ज्याला मिळालें आहे त्यानेंच खरें स्नान केलें ह्मणाययाचें.** असाच मनुष्य बाहेरून व आंतून धुवून निघाला ह्मणण्यास हरकत नाहीं. गतगोष्टींसंबंधानें बेपर्वा असून चालू गोष्टीवर ज्यांची विशेष आसक्ति रहात नाहीं, ज्यांना वासनेनें सोडलें आहे, अशांचें तें उत्तम प्रकारचें शौचच समजलें पाहिजे. **खरें ज्ञान हेंच शरीराला सर्वांत श्रेष्ठ शुद्ध करणारें आहे.** वासनेचा बीमोड, मनाची प्रसन्नता, चोख वर्तन, मनाची शुद्धता, तीर्थशुद्धि या गोष्टी जरी आहेत तरी ज्ञानानें उत्पन्न झालेली जी शुद्धता ती सर्वांत उत्तम गणली आहे. **उज्वल अशा मनानें मानसतीर्थांत ब्रह्मज्ञानरूपी जलामध्यें स्नान करणें हेंच तत्त्ववेत्ते खरें स्नान समजतात.** चोख वर्तन ठेवून त्यामध्यें ज्यांनीं शुद्धि मिळविली आहे व सर्वांसंबंधानें ज्याचा योग्य भाव झाला आहे असा शुद्ध गुणांनीं युक्त मनुष्य नेहमीं शुद्धच समजला पाहिजे. हीं मीं वर सांगितलेलीं शरीरामधील तीर्थें असून यांशिवाय पृथ्वीवरील दुसरीं तीर्थें आहेत, व ज्याप्रमाणें शरीरामधल्या निरनिराळ्या तीर्थांचे निरनिराळे गुण आहेत, त्याप्रमाणें पृथ्वीवरील निरनिराळीं तीर्थेंही त्या त्या जागेच्या गुणांमुळें, तेथें असणाऱ्या साधुलोकांमुळें, त्यांचें नांव घेतल्यानें त्यांमध्यें स्नान केल्यानें किंवा त्यांमध्यें तर्पण केल्यानें पाप धुवून काढण्याला समर्थ आहेत. याप्रमाणें कांहीं मनामध्यें व कांहीं पृथ्वीवर तीर्थें आहेत. या दोन्हींमध्यें जो स्नान करील, त्याला लवकर सिद्धि मिळेल. **ज्याप्रमाणें क्रियेवांचून बल किंवा बलावांचून क्रिया यांचा कांहीं उपयोग न होतां दोन्ही मिळालीं असतांच काम साधतें त्याप्रमाणें शरीर शुद्धि व तीर्थ शुद्धि या दोन्ही एकत्र मिळाल्यानेंच काम साधतें.**

मार्गशीर्ष महिन्याच्या द्वादशीला रात्रंदिवस उपवास करून केशवाची पूजा केली असतां अश्वमेधफल मिळून पाप नाहींसें होतें. याचप्रमाणें पौषाच्या द्वादशीला नारायणाची पूजा केली असतां वाजपेय यज्ञाचें फल मिळून मोठी सिद्धि मिळतें. माघी द्वादशीला माधवाची पूजा केल्यानें राजसूय यज्ञाचें फल मिळून कुल उद्धरतां येतें. फाल्गुन द्वादशीला गोविंदाची पूजा केल्यानें अतिरात्र यज्ञाचें फल मिळून सोमलोक मिळतो. चैत्र द्वादशीला विष्णूची पूजा करून पुंडारिक यज्ञाचें फल मिळतें, व तो देवलोकाला जातो. वैशाख द्वादशीला मधुसूदनाची पूजा करून अग्निष्टोम यज्ञाचें फल मिळतें व तो सोमलोकाला जातो. ज्येष्ठ द्वादशीला त्रिविक्रमाची पूजा करून गोलोकामध्यें अप्सरांमध्यें तो आनंदांत रहातो. आषाढ द्वादशीला वामनाची पूजा करून नरमेधाचें थोर पुण्य मिळतें. श्रावण द्वादशीला श्रीधराची पूजा करून पंच यज्ञाचें फल त्याला मिळतें, व विमानामध्यें तो मोठ्या आनंदांत रहातो. भाद्रपद द्वादशीला हृषीकेशाची पूजा करून सौत्रामणि यज्ञाचें फल मिळून अंतःशुद्धि होते. आश्विन द्वादशीला पद्मनाभाची पूजा केली असतां खात्रीनें हजार गोदानाचें फल मिळतें. कार्तिक द्वादशीला दामोदर ह्मणून पूजा केली असतां मनुष्याला तो पुरुष असो किंवा स्त्री असो, गोयज्ञाचें फल मिळतें. याप्रमाणें पुंडरीकाक्ष श्रीकृष्णाला एक वर्षभर पूजील त्याला आपल्या पुर्व जातीची आठवण राहून पुष्कळ संपत्ति मिळेल; त्याचप्रमाणें दररोज उपेंद्राच्या नांवानें श्रीकृष्णाला पूजणारा मनुष्य तद्रूप होऊन जातो. याप्रमाणें कृष्णाची उपासना केल्यावर

ब्राह्मणांना जेऊं घालून तूप दान द्यावें. याहून श्रेष्ठ व्रत दुसरें कोणतें ही नाहीं.'

## २७४ चांद्रव्रत. ( १३. ११० )

युधिष्ठिर ह्मणाला, 'मनुष्याच्या मनाप्रमाणें रूप, संपत्ति मिळून धर्मार्थकामाला धरून मनुष्य सुखी कशानें होतो?' भीष्म ह्मणाले, 'मार्गशीर्ष महिन्यांत चंद्र मुळेस आला असतां पायाच्या ठिकाणीं मूळ, घोट्याच्या वरच्या भागाला रोहिणी, गुडघ्याच्या सांध्याच्या ठिकाणीं अश्विनी, मांड्याच्या ठिकाणीं पूर्वा व उत्तराषाढा, गुह्याच्या ठिकाणीं पूर्वा व उत्तरा फाल्गुनी, कंबरेमध्यें कृत्तिका, बेंबीच्या ठिकाणीं पूर्वा व उत्तराभाद्रपदा, डोळ्याच्या भागाला रेवती, पाठीला धनिष्ठा, कानाच्या ठिकाणीं अनुराधा व उत्तरा, बाहूंच्या ठिकाणीं विशाखा, बोटाच्या ठिकाणीं पुनर्वसु, नखामध्यें आश्लेषा, मानेच्या ठिकाणीं ज्येष्ठा, कानाच्या ठिकाणीं श्रवण, तोंडामध्यें पुष्य, दांत व ओंठ या ठिकाणीं स्वाती, हास्याच्या ठिकाणीं शतभिषा, नाकाच्या ठिकाणीं मघा, डोळ्यांच्या ठिकाणीं मृगशिर, कपाळाच्या ठिकाणीं चित्रा, डोक्याच्या ठिकाणीं भरणी, केशाच्या ठिकाणीं आर्द्रा, याप्रमाणें न्यासपूर्वक चांद्रव्रत पाळून तें संपल्यावर वेदपारग ब्राह्मणाला तूप द्यावें ह्मणजे मनुष्य दैववान, देखणा, ज्ञानसंपन्न पौर्णिमेच्या चंद्राप्रमाणें सर्वांगानीं परिपूर्ण असा जन्माला येतो.'

## २७५ नानाप्रकारचीं नाना जन्मफळें. ( १३. १११—१३ )

युधिष्ठिर ह्मणाला, 'मनुष्याच्या या संसारांतील नाना फेऱ्यांच्या संबंधानें आपल्या तोंडून मला कांहीं ऐकण्याची इच्छा आहे. मनुष्य कशा रीतीनें वागला असतां त्याला उत्तम स्वर्ग मिळतो, व कशा रीतीनें वागल्यानें त्याला नरक मिळतो. देहांतून प्राण निघून गेल्यावर एखाद्या ओंडक्याप्रमाणें किंवा मातीच्या ढेंकळाप्रमाणें या देहाला येथें टाकून प्राणी परलोकाला निघाला असतां त्याच्याबरोबर साह्याला कोण असतो, बाप, आई, मुलगा, गुरु, ज्ञाती, संबंधी, मित्र किंवा कोण?' भीष्म ह्मणाले, 'हे भाग्यशाली थोर बृहस्पती येत आहेत; यांना हें गूढ विचार, ह्मणजे ते तुला सांगतील.' याप्रमाणें ते बोलत आहेत तो बृहपती त्या ठिकाणीं आले, तेव्हां सर्वांनीं त्यांचा यथायोग्य सत्कार करून ते आसनावर बसल्यावर युधिष्ठिरानें तोच प्रश्न फिरून त्यांना केल्यावरून ते म्हणाले, 'राजा, मनुष्य एकटाच जन्माला येऊन एकटाच नाश पावतो. कोणाच्या साह्यावांचून त्याला एकट्यालाच सर्व संकटांतून पार पडावें लागतें किंवा दुर्गतीला जावें लागतें. आई, बाप, भाऊ वगैरे सर्व मेलेल्याला लांकडाच्या ओंडक्याप्रमाणें सोडून घटकाभर रडून परत निघून जातात. त्यांनीं सोडल्यावर एकटा धर्म त्या प्राण्याच्या मागून जातो. ह्मणून मनुष्यानें नेहमीं धर्माला सोबती करून घ्यावा. धर्मानें वागणारा मनुष्य उत्तम स्वर्गाला जात असून अधर्मानें वागणारा नरकाला जातो; ह्मणून न्यायानें मिळालेल्या पैशानें धर्म आचरीत रहावें. एकटा धर्म मनुष्याला परलोकचा सोबती असतो. लोभानें, मोहानें, दयेनें, भीतीनें किंवा बहुश्रुतपणा नसल्यानें लोभाला बळी पडून दुसऱ्यासाठीं मनुष्याच्या हातून भलतीं सलतीं कामें होतात. धर्म अर्थ व काम हे तीन जीवितफल असून अधर्माकडे प्रवृत्ति न ठेवतां हीं तीन साधावीं.' युधिष्ठिर ह्मणाला, 'या देहाची मेल्यावर काय अवस्था असते. तें पुढें अव्यक्त असें सूक्ष्म बनून डोळ्यांला दिसेनासें झालें असतां धर्म त्याच्यामागून कसा जातो?' बृहस्पती ह्मणाले, 'पंचमहाभूतें, मन, बुद्धि व आत्मा हे प्राणिमात्रांच्या देहामध्यें रात्रंदिवस साक्षीभूत असून त्यांची धर्मावर नेहमीं नजर असते. तेव्हां धर्मही यांसह जीवाच्या मागून जातो. त्वचा, अस्थि, मांस, रेत व रक्त हीं प्राणाबरोबर शरीराला सोडून जातात. पुढें धर्माधर्माचें गांठोडें बरोबर घेऊन हा फिरून जन्माला येतो, ते वेळीं ह्या पंचभूतांमध्यें असणाऱ्या देवता याचीं बरींवाईट कर्में पहात असतात व हा धर्मानें वागत असेल तर इहपर सुख भोगतो.' यावर रेताची उत्पत्ति कशी होते ह्मणून युधिष्ठिरानें प्रश्न केल्यावरून बृहस्पती ह्मणाले, 'शरीरामध्यें असणाऱ्या पंचमहाभूतें व मन ह्या देवता अन्न खाऊन तृप्त झाल्या असतां रेत उत्पन्न होतें.

पुढें स्त्रीपुरुषांचा संयोग झाला असतां गर्भ उत्पन्न होतो. याप्रमाणें गर्भ धारण झाल्यावरोबर पंचमहाभूतें फिरून त्याला घेरतात व पंचमहाभूतांसह जीव त्या ठिकाणीं आपलें ठाणें येतो.' युधिष्ठिरानें विचारलें, 'त्वचा, अस्थि, मांस यांना सोडून पंमहाभूतांपासून वेगळा झाला असतां जीव कोठें राहून सुखदुःखाचा उपभोग घेत असतो?' बृहस्पती ह्मणाले, 'कर्माचें गांठोडें बरोबर घेऊन असणारा हा जीव तावडतोब रेत बनून स्त्रियांच्या शोणिताशीं मिळून पुढें कालानें जन्माला येतो. जन्माला आल्यावर यमदूतांकडून त्याला क्लेश व मरण हीं प्राप्त होतात. कारण क्लेश व संसारफेरा ही त्याची दौलतच होऊन बसते. जो प्राणी आजन्म पुण्यकर्म करीत रहातो तो आपल्या धर्माच्या फलानुरूप केलेल्या सुकृताचें फळ भोगीत रहातो. आजन्म त्याच्या हातून पुण्यच घडलें असेल तर तो पुरुष होऊन नेहमीं सुख भोगतो. धर्माच्या मधून मधून त्याच्या हातून पाप घडलें असेल तर आधीं सुख भोगून मग दुःख भोगतो. नेहमीं त्याच्या हातून अधर्मच घडला असेल तर यमलोकीं जाऊन महद्दुःख भोगल्यावर तो नीचयोनीमध्यें जन्माला जातो. आतां वेद, इतिहास व शास्त्र यांच्या आधारानें कोणकोणत्या कर्मानें कोणकोणत्या जन्माला जातो, हें सांगतों ऐक. मनुष्याला, जन्ममरणाच्या फेऱ्यांत घालणाऱ्या दुःखद यमलोकांना जावें लागतें. या ठिकाणीं देवलोकासारखे उत्तम लोक आहेत व नीच योनींतील प्राण्यांच्यापेक्षांही वाईट लोक आहेत. खरोखर त्याच्या निरनिराळ्या गुणांनीं ब्रह्मलोकाच्या तोडीचे असलेल्या या यमलोकांमध्यें आपापल्या कर्मांनीं जखडला गेल्यामुळें मनुष्याला नाना दुःखें भोगावीं लागतात. जो जो भाव ठेवल्यानें किंवा जें जें कर्म केल्यानें मनुष्याला जी जी भयंकर गति मिळते ती ती आतां तुला सांगतों. चार वेद पढून जो ब्राह्मण मूर्खपणानें पतिताच्या हातचें दान घेतो, तो गाढवाच्या जन्माला जाऊन त्यांत पंधरा वर्षें राहून पुढें सात वर्षें बैलाच्या जन्मांत, तीन महिने ब्रह्मराक्षसाच्या जन्मांत काढून फिरून ब्राह्मण जन्माला येतो. पतिताकडून यज्ञ करविल्यास किड्यांच्या योनीला जातो. त्या योनीमध्यें पंधरा वर्षें राहून त्यांतून सुटल्यावर पांच वर्षें गाढव, पांच वर्षें डुक्कर, पांच वर्षें कोंबडा, पांच वर्षें कोल्हा; एक वर्ष कुत्रा याप्रमाणें निरनिराळ्या जन्मांत काढून फिरून मनुष्य जन्माला येतो. जो मूर्ख शिष्य उपाध्यायासंबंधानें पाप करतो, त्याला प्रथम कुत्र्याचा, नंतर मांसाहारी प्राण्याचा व शेवटीं गाढवाचा, याप्रमाणें तीन जन्म घेऊन क्लेश सोसल्यावर फिरून तो ब्राह्मणजन्माला येतो. जो पापी शिष्य केवळ मनानें गुरुपत्नीशीं व्यभिचार करतो तो त्याच्या त्या पापीबुद्धीमुळें प्रथम कुत्र्याच्या जन्माला जाऊन त्यामध्यें तीन वर्षें राहिल्यावर पुढें किड्याच्या जन्माला जातो, त्यामध्यें एक वर्ष राहून मेल्यावर फिरून ब्राह्मणजन्माला येतो. जर मुलासारख्या आपल्या शिष्याला गुरु विनाकारण जिवें मारील तर तो आपल्या स्वैर वर्तनामुळें हिंस्रयोनीमध्यें जन्माला जातो. जो मुलगा आईबापांचा अवमान करतो, त्याला प्रथम गाढवाचा जन्म घ्यावा लागून पुढें सुसर व नंतर फिरून मनुष्यजन्म येतो. ज्यावर आईबाप रागावले असतात त्यांच्या या वाईट चिंतनामुळें तोही गाढवाच्या जन्माला जातो; त्या जन्मांत दहा महिने राहून पुढें कुत्र्याच्या जन्मांत चौदा व मांजराच्या जन्मांत सात याप्रमाणें दिवस काढून फिरून तो मनुष्यजन्माला येतो. आईबापांसंबंधानें वाईट बोलून मनुष्य साळुंकीच्या जन्माला जातो. आईबापांना मारून कांसवाच्या जन्माला जातो. त्यामध्यें दहा वर्षें राहून तीन वर्षें साळीच्या जन्माला जातो. पुढें सहा महिने सापाच्या जन्मांत राहून, नंतर मनुष्यजन्माला येतो. राजाचें अन्न खाऊन जो त्याच्या उलट वागतो, तो दहा वर्षें वानर होऊन पुढें पांच वर्षें उंदीर, सहा महिने कुत्रा याप्रमाणें होऊन नंतर फिरून मनुष्यजन्माला येतो. ठेव गडप करणारा मनुष्य यमलोकाला जाऊन शंभर जन्म घेतल्यावर पुढें किड्याच्या जन्मांत पंधरा वर्षें काढून आपलें पाप घालवून फिरून मनुष्ययोनींत जन्माला येतो. दुसऱ्याचा हेवा करणारा मनुष्य शार्ङकाच्या जन्माला जातो. विश्वासघातकी मनुष्य माशाच्या जन्माला जाऊन त्यांत आठ वर्षें काढून पुढें चार महिने हरणाच्या व एकवर्षभर बकऱ्याच्या

जन्मामध्यें राहून नंतर फिरून मनुष्यजन्माला येतो. जो निर्लज्जमनुष्य तांदूळ, जव, तीळ, उडीद, कुळीथ, शिरस, चणे, वाटाणा, मटकी, गहूं, जवस व दुसऱ्या प्रकारचीं धान्यें चोरतो तो प्रथम उंदराच्या जन्माला जाऊन नंतर डुकराच्या जन्माला जातो; नंतर कुत्र्याच्या जन्माला जाऊन त्यांत पांच वर्षें काढून फिरून मनुष्यजन्माला येतो. परस्त्रीशीं संबंध केल्यानें लांडगा, कुत्रा, कोल्हा, गिधाड, साप, कंक व बगळा या जन्माला त्याला जावें लागतें. भावाच्या बायकोशीं संबंध करणारा एक वर्षभर पुंसकोकिलेच्या जन्माला जातो. मित्राची बायको, गुरूची बायको व राजाची बायको यांच्याशीं गेल्यानें मेल्यावर मनुष्य डुकराच्या जन्माला जातो. त्यांत पांच वर्षे काढून साळीच्या जन्मांत दहा वर्षे, मांजराच्या जन्मांत पांच वर्षे व कोंबड्याच्या जन्मांत दहा वर्षे त्याला काढावीं लागून तीन महिने मुंगीच्या व एक महिना मोठ्या किड्याच्या जन्माला जावें लागतें. पुढें बारीक किड्याच्या जन्मामध्यें चवदा वर्षे पापक्षय करीत राहून फिरून तो मनुष्यजन्माला येतो. लग्न, यज्ञ किंवा दान यांना जो विघ्न करतो तो किड्याच्या जन्माला जाऊन त्या ठिकाणीं पंधरा वर्षें राहून पापाचा क्षय केल्यावर फिरून मनुष्यजन्माला येतो. मुलीला एकदां एकाला देऊन फिरून जो तिला दुसऱ्याला देऊं इच्छितो तोही किड्याच्या जन्माला जाऊन त्या ठिकाणीं तेरा वर्षें राहून पाप नाहींसें झाल्यावर फिरून मनुष्यजन्माला येतो. देवकार्य व पितृकार्य न करून पितरांना पाणी न देतां जेवणारा कावळ्याच्या जन्माला जातो. शंभर वर्षें त्या जन्मामध्यें राहून पुढें कोंबड्याच्या जन्माला जातो. पुढें खोडसाळ हत्तीच्या जन्माला जाऊन पुढें एक वर्ष चीरकच्या जन्मामध्यें राहून नंतर फिरून तो मनुष्यजन्माला येतो. शूद्र ब्राह्मणस्त्रीशीं गेला असतां किड्याच्या योनीमध्यें त्याचा जन्म होतो. नंतर डुकराच्या योनींत होऊन लगेच मरून तो कुत्र्याच्या जन्माला जातो; याप्रमाणें कुत्र्याच्या जन्मांत आपलें पाप घालवून पुढें मनुष्यजन्माला येतो. तिच्या ठिकाणीं मूल उत्पन्न झाल्यास हा उंदराच्या जन्माला जातो. कृतघ्न मनुष्य मरून यमलोकाला गेला असतां खवळलेले यमदूत त्याला हाल हाल करून मारतात. सोटा मुद्गल, शूल, भयंकर अग्निकुंभ, तरवारीचे घाव, तापलेली वाळू, कांटेरी सांवरी, अशा नानाप्रकारच्या यातना तेथें त्याला भोगावयास लागून मरावें लागतें. याप्रमाणें तेथें मेल्यावर जन्ममरणाच्या फेऱ्यांत सांपडून तो किड्याच्या जन्माला येतो. त्याठिकाणीं पंधरा वर्षें घालविल्यावर गर्भामध्यें जाऊन तेथें लहानपणींच मरतो. याप्रमाणें शेंकडों जन्म होऊन जन्ममरणाचे फेरे भोगल्यावर पुढें नीचयोनीमध्यें जन्माला जातो. त्या ठिकाणीं पुष्कळ वर्षें घालविल्यावर ज्याच्या अंगावर केंस नाहींत अशा कांसवाच्या जन्माला जातो. दहीं चोरून बगळ्याच्या, हिरवे मासे चोरून पाणकोंबड्याच्या, मध चोरून गांधिल माशांच्या, फळमूळें व वडेघारगे चोरून मुंगीच्या, पावटा, चोरून हलगोलकाच्या, खीर चोरून तित्तिर पक्ष्याच्या, अनरसे चोरून वडवाघुळाच्या, लोखंड चोरून कावळ्याच्या, कांसें चोरून तिलगिरूच्या, रुपें चोरून कबुतराच्या, सोनें चोरून किड्याच्या जन्माला जातो. रेशमी वस्त्र चोरून करढोकाच्या, तांबडें रेशमीवस्त्र चोरून गांजिणीच्या, मलमलीचें वस्त्र चोरून राघूच्या, चांगलें बारीक विणलेलें वस्त्र चोरून हंसाच्या, कापसाचें वस्त्र चोरून क्रौंच पक्ष्याच्या, सणाचें वस्त्र चोरून मेंढीच्या, तागाचें कापड चोरून ससाच्या जन्माला जावें लागतें. नानाप्रकारचे रंग चोरून मनुष्य मोराच्या जन्माला जातो. रक्तवस्त्र चोरून चकोराच्या जन्माला जातो. निरनिराळ्या उटी व सुवासिक भुकण्या चोरून मनुष्य चिचुंद्रीच्या जन्माला जातो, व त्या ठिकाणीं पंधरा वर्षें राहून पापक्षय केल्यावर मनुष्यजन्माला येतो. दूध चोरून मनुष्य बालढोकाच्या जन्माला जातो. तेल चोरून तेलडुब्याच्या जन्माला जातो. सशस्त्र असा नराधम अशस्त्र मनुष्याला पैशासाठीं किंवा वैरामुळें मारून गाढवाच्या जन्माला जातो, व त्यांत दोन वर्षें काढल्यावर पुढें हरणाच्या जन्माला जाऊन नेहमीं चिंतेंत एक वर्ष काढून पुढें माशाच्या जन्माला जातो. चार महिने त्यांत काढल्यावर जाळ्यांत सांपडून मरून पुढें श्वापद होतो. त्यामध्यें दहा वर्षें काढून पुढें पांच वर्षें चित्त्या-

च्या जन्मामध्यें रहातो. याप्रमाणें कालानें मरून पाप नाहींसें केल्यावर फिरून मनुष्यजन्माला येतो. स्त्रीला मारून यमलोकीं गेल्यावर तेथें पुष्कळ क्लेश सोसून वीस जन्म घेतल्यावर पुढें किड्याच्या जन्माला जाऊन त्यांत वीस वर्षें काढून फिरून मनुष्यजन्माला येतो. जेवण चोरून माशीच्या जन्माला जाऊन अनेक माशांच्या घोळक्यामध्यें पुष्कळ महिने राहून पापक्षय केल्यावर मनुष्यजन्माला येतो. धान्य चोरून कोल्ह्याच्या जन्माला जातो. त्याचप्रमाणें पेंडीसह खाद्य चोरून मुंगुसाच्या जन्माला जाऊन त्यामध्यें मनुष्याला नेहमीं चावत रहातो. तूप चोरून दास्यूहाच्या जन्माला जातो. मासे व मांस चोरून कावळ्याच्या जन्माला जातो.मीठ चोरून पोपटाच्या जन्माला जातो. विश्वासानें ठेवलेली ठेव जो गडप करतो तो मेल्यावर माशाच्या जन्माला जातो. पुढें मनुष्यजन्माला येऊन अल्पायु होतो. याप्रमाणें जे लोक पाप करतात ते नीचयोनींत जातात. स्वतःच्या अनुभवावरूनच खात्री पटणारा धर्म त्यांना उमगत नाहीं.जे लोक पाप करून मतादिकांनीं त्याचें निरसन करतात, त्यांना आळीपाळीनें सुखदुःख भोगावें लागून ते दुःखी होतात. लोभमोहाच्या बळीं पडून पापानें वागणारे प्रसंगीं म्लेंछ जातीमध्यें ना घर ना दार असे जन्माला जातात. जे जन्मापासून पाप करीत नाहींत ते निरोगी, देखणे व श्रीमान होतात. स्त्रियाही वर सांगितल्याप्रमाणेंच निरनिराळीं पापें करून वर सांगितलेल्या प्राण्यांच्या बायकांच्या जन्माला जातात. परस्व हरण करण्यामध्यें याप्रमाणें थोडक्यांत दोष सांगितले आहेत.' युधिष्ठिर ह्मणाला, 'आपण अधर्माचे परिणाम सांगितलेत. आतां धर्माचे परिणाम काय आहेत ते सांगा. पापकर्मे करून कोणच्या शुभ कर्मांनीं मनुष्याला चांगली गति मिळते ?' बृहस्पती ह्मणाले, 'पापकर्मे करून अधर्माच्या तावडींत गेलेला मनुष्य त्याच्या या विपरीतबुद्धीमुळें नरकाला जातो. मनुष्याला चुकून अधर्म केल्यावर फिरून पश्चात्ताप होऊन एकाग्र मनानें तो फिरून पापाकडे ढुंकूनसुद्धां न पाहील तर त्याच्या मनाला जसजसें तें पापकर्म वाईट वाटूं लागतें तसतसा त्या केलेल्या पापापासून तो मुक्त होतो. धर्मवेत्त्या ब्राह्मणापुढें तो जर आपलें पापकर्म उच्चारून टाकील तर त्या केलेल्या अधर्माच्या दोषापासून तो एकदम मोकळा होतो. जसजसा मनुष्य आपलें पाप जसेंच्या तसें बोलून टाकतो, तसतसा पूर्वीं अंगावर घेऊन जुनाट झालेली कात टाकणाऱ्या सापाप्रमाणें केलेल्या पापापासून तो मुक्त होतो, व ब्राह्मणाला नानाप्रकारचें दान देऊन मन ध्यानाकडे लावल्यानें त्याला सद्गति मिळते. आतां दानामध्यें सुद्धां जीं दानें दिल्यानें मनुष्य भलतीं सलतीं कामें करून सुद्धां पुढें धर्म जोडतो तीं दानें सांगतों ऐक. सर्वदानांमध्यें अन्नदान श्रेष्ठ सांगितलें आहे. देव, ऋषी, पितर व मानव हे सर्व अन्नाचीच प्रशंसा करतात. अन्नदान करूनच रंतिदेव स्वर्गाला गेला. अन्न न्यायानें मिळवून तें वेद पढलेल्या ब्राह्मणांना मोठ्या आनंदयुक्त अशा अंतःकरणानें द्यावें. मोठ्या आनंदानें दिलेलें ज्याचें अन्न हजार ब्राह्मण खातात, त्याला नीच योनी कधीं येत नाहीं. दहा हजार ब्राह्मणांना जेऊं घालून मनुष्य अधर्मापासून मुक्त होऊन योगामध्यें गढून जातो. भिक्षा मागून आणलेलें अन्न जो वैदिकब्राह्मण वैदिकाला देतो, त्याला इहलोकीं सुख मिळतें. ब्राह्मणाचें द्रव्य हरण न करतां यथायोग्य रीतीनें त्यांचें पालन करून आपल्या मनगटाच्या जोरावर मिळवून जो क्षत्रिय वेदवृद्ध ब्राह्मणांना देतो, तो त्याच्या योगानें आपलें पाप नाहींसें करतो. आपल्या शेतीच्या उत्पन्नापैकीं सहाव्वा हिस्सा राजाला देऊन पवित्र झालेल्या बाकीच्या मधून ब्राह्मणांना अन्नदान करून वैश्य पापापासून मुक्त होतो. काबाडकष्ट करून प्रसंगीं जीवसुद्धां धोक्यांत घालून संपादिलेलें अन्न ब्राह्मणांना देऊन शूद्र पापापासून मुक्त होतो. आपल्या अंगच्या सामर्थ्यानें कोणाला पीडा न देतां केवळ न्यायानें मिळविलेलें अन्न मोठ्या आनंदयुक्त मनानें जो ब्राह्मणांना देतो त्याला संकटें कधींच पहावीं न लागतां तो पापापासून मुक्त होतो. अन्न हें वीर्य वाढविणारें असल्यानें अन्नदान केल्यानें वीर्य वाढतें, व आचार सुधारतो. दानशील लोकांनीं दाखवून दिलेल्या ह्या वाटेनें शहाणे लोक जात असतात. कारण हेच प्राणदान करणारे असून यांच्यापासूनच सनातन धर्म निघाला आहे. ह्मणून सर्व स्थितींमध्यें मनुष्या-

नें न्यायानें मिळविलेलें अन्न पात्रापात्र पाहून दान केलें असतां त्याला उत्तम गति मिळते. दुर्घट प्रसंग त्यावर कांहीं ओढवत नाहींत. ह्मणून अन्याय न करतां न्यायानें मिळविलेलें अन्न गृहस्थानें प्रथम ब्राह्मणाला जेऊं घालून नंतर स्वतः खावें. अन्नदान दिल्याशिवाय एक दिवससुद्धां फुकट घालवूं नये. वेद, न्याय, धर्म व इतिहास ज्यांना अवगत आहे अशा दहा हजार ब्राह्मणांना अन्नदान केल्यानें मनुष्याला घोर नरक पहाण्याची किंवा पुनर्जन्म घेण्याची पाळी येत नाहीं. त्याच्या सर्ववासना परिपूर्ण होऊन तो सुख भोगतो, व याप्रमाणें निःकाळजी होऊन रूपवान, कीर्तिवान व धनवान होतो. याप्रमाणें अन्नदानाचें मोठें फळ असून सर्व धर्मांचें व सर्व दानांचें हें मूळ आहे.' युधिष्ठिर ह्मणाला, 'अहिंसा, वैदिक क्रिया, ध्यान, इंद्रियनिग्रह, तप व गुरुशुश्रूषा यांपैकीं मनुष्याला अधिक कल्याणप्रद काय आहे?' बृहस्पती ह्मणाले, 'हीं सर्व चांगलीं असून निरनिराळीं स्वर्गाचींच द्वारें आहेत. परंतु अहिंसेला धरून असणारा धर्म सर्वांत श्रेष्ठ असून तो ज्यानें साधला तोच खरा मनुष्य. काम, क्रोध व लोभ हीं तीन जो आवरतो त्याला उत्तम सिद्धि मिळते. ज्यांना मारूं नये अशांना आपल्या सुखाच्या मागें लागून जो मारतो त्याला मेल्यावर सुख कधीं होत नाहीं. जो सर्वांना आपल्याप्रमाणेंच समजून आत्मनिग्रहानें त्यांना मारीत नाहीं त्याला मेल्यावर सुख होतें. सर्व भूतमात्रांच्या ठिकाणीं आपल्या स्वतःला व आपल्या ठिकाणीं सर्वभूतमात्रांना जो पहातो त्याच्या पावलाचा मागमूस काढीत निघालेल्या देवांनासुद्धां त्याची कांहींच खूण न दिसल्यामुळें पत्ता लागत नाहीं. आपल्याला जें प्रतिकूल असतें अशी गोष्ट दुसऱ्यासंबंधानें कधीं करूं नये, हें धर्माचें थोडक्यांत स्वरूप आहे. नानावासनांच्या मागें लागून मनुष्याचें याहून निराळें वर्तन होत असतें. दान करणें किंवा नाहीं ह्मणणें, सुख किंवा दुःख, प्रिय किंवा अप्रिय या संबंधानें मनुष्यानें आपल्यावरून दुसऱ्याला ओळखावें. ज्याप्रमाणें मनुष्य दुसऱ्याशीं वागत असतो तसे दुसरे याच्याशीं वागत असतात. तो त्याच्याशीं चांगला वागला असला तर लोक त्याच्याशीं चांगले वागत असतात. तेव्हां मनुष्यानें नेहमीं हा नियम लक्षांत ठेवून वागावा' असें ह्मणून सुरगुरू बृहस्पती स्वर्गाला निघून गेले.

---

## २७६ अहिंसेचें महत्त्व व मांसनिषेध
### (१३.११४–१६)

युधिष्ठिर भीष्मांना ह्मणाला, 'वेदाच्या आधारावरून देव, ऋषी, ब्राह्मण सर्व अहिंसाधर्म चांगला ह्मणतात. तेव्हां कायावाचामनानें हिंसा करून मनुष्य त्या पापापासून कसा सुटतो?' भीष्म ह्मणाले, 'कायावाचामनानें त्याचप्रमाणें भक्षणानें मन, वाणी, कर्म व भक्षण अशा चार प्रकारानें हिंसा होत असते. यांपैकीं एकापासून भ्रष्ट झाला तरी मनुष्य नाश पावतो. ज्याप्रमाणें चतुष्पाद जनावरें तीन पायांवर कधीं उभीं राहूं शकत नाहींत, त्याप्रमाणें वरील चारांपैकीं तीन कारणांवर अहिंसाधर्म कधीं राहूं शकणार नाहीं. हत्तीच्या पावलांमध्यें ज्याप्रमाणें दुसरीं सर्व पावलें गडप होतात; त्याप्रमाणें अहिंसाधर्मामध्यें सर्वधर्मांचा समावेश होतो. मनुष्य कृतीनें, तोंडानें किंवा मनानें दोषी होत असतो; म्हणून प्रथम कायावाचामनानें जो मांसभक्षण सोडून देऊन असतो तो तिन्ही प्रकारच्या हिंसेपासून मुक्त होतो. मन, तोंड व गोडी या तीन कारणांमुळें हिंसेचे दोष उद्भवतात. म्हणून तपामध्यें गढलेले विद्वान मांस खात नाहींत. मांसभक्षणामध्यें पुढें सांगितल्याप्रमाणें दोष आहेत. जो मूर्खपणानें मांस खातो तो अधम समजला पाहिजे. आईबापांचा संबंध जडून ज्याप्रमाणें त्यापासून मुलगा होतो त्याप्रमाणें हिंसेशीं संबंध जडल्याबरोबर त्याचा बिनचूक पुनर्जन्मामध्यें परिणाम होतो. प्रथम जिभेला चट लागून त्याची प्रीति उत्पन्न होते, मग तें मांस तयार केलेलें असो किंवा नसो, मीठ घातलेलें असो किंवा नसो, शिजविलेलें असो किंवा कसेंही असो, एकदां का त्याची चव लागली कीं मग त्याची लालूच लागते. मांस भक्षण करणारे जड स्वर्गामधील नौबदी, मृदंग, वीणा, इत्यादिकांच्या सुस्वर शब्दांच्या लाभाला मुकतात. जे मांस खातात ते त्याच्या गोडीला

भुलून जाऊन त्याची फार स्तुति करतात, व 'अचिंत्य, सांगतां न येण्याजोगी, कल्पनातीत अशी त्याची गोडी आहे; असें त्यासंबंधानें गोडवे गातात. मांसाची नुसती स्तुति करणें हें सुद्धां दोषकारक आहे. पुष्कळ भले लोक स्वतःचा प्राण देऊन आपल्या मांसानें दुसऱ्याचें मांस पोसून स्वर्गाला गेले आहेत. याप्रमाणें चार लक्षणांनीं युक्त अशा या अहिंसेमध्यें सर्व धर्मांचा समावेश होतो.'

युधिष्ठिर ह्मणाला, 'अहिंसा सर्वप्रकारें श्रेष्ठ धर्म आहे, असें आपण आतां ह्मणतां; परंतु पूर्वीं श्राद्धविधि सांगतांना पितरांना मांस आवडत असून नानाप्रकारचीं मांसें त्यांना द्यावींत ह्मणून सांगितलेंत. आतां दुसऱ्याला मारल्याशिवाय मांस कोठून मिळणार ? तेव्हां आपल्या ह्या भाषणामध्यें विरोध असून मांस खाऊं नये हा जो आपण धर्म सांगितला, यासंबंधानें मला मोठा संशय पडला आहे; तेव्हां मांस खाण्यांत काय दोष आहेत व तें न खाण्यांत काय गुण आहेत, स्वतः मारून किंवा दुसऱ्यानें मारलेलें घेऊन खाण्यांत, त्याचप्रमाणें दुसऱ्यासाठीं मारण्यांत किंवा विकत घेऊन खाण्यांत काय काय दोष आहेत, हें आपल्या तोंडून ऐकण्याची माझी इच्छा आहे. मनुष्य दीर्घायु, बलवान सर्व अवयवांनीं व लक्षणांनीं संपन्न कशानें होतो ?' भीष्म ह्मणाले, 'मांस न खाल्ल्यानें आयुष्यवृद्धि, सत्व, बल, आठवण व रूप वाढून सर्व अवयवांनीं मनुष्य संपन्न होतो. ज्याला हीं पाहिजे असतील त्यानें हिंसा सोडली पाहिजे. या बाबतींत ऋषींचा पुष्कळ वादविवाद होऊन असें मत ठरलें आहे कीं, महिन्यामहिन्याला व्रतशील राहून जो अश्वमेध यज्ञ शंभर वर्षें करीत रहातो व जो मांस आणि मद्य सेवन करीत नाहीं, या दोघांना फल सारखें आहे. सप्तर्षी, वालखिल्य, मरीचिप यांनींसुद्धां मांस न खाणें हेंच चांगलें ह्मटलें आहे. जो मांस खात नाहीं तो कोणाला मारीत नाहीं किंवा मारवीत नाहीं. तो सर्व भूतमात्रांचा मित्र असतो, असें स्वयंभू मनूचें मत आहे. मांस सोडलेल्या मनुष्यापुढें कोणाचें कांहीं चालत नाहीं. सर्वांचा त्यावर विश्वास बसतो व साधूंना तो मान्य असतो. जो दुसऱ्याच्या मांसानें आपलें मांस वाढवूं इच्छितो, तो खात्रीनें नाश पावतो. जो मद्यमांसापासून अलिप्त रहातो त्याला यज्ञाचें, तसेंच तपाचें फल मिळतें. जो प्रथम मांस खात असून मागून कां होईना त्यापासून परावृत्त होतो त्याला सर्ववेदाध्ययनानें किंवा यज्ञानें जें पुण्य मिळतें तें पुण्य मिळतें. एकदां मांसाची लज्जत लागली ह्मणजे तें टाकतां येणें कठीण आहे. मांस न खाणें हें सर्व प्राणिमात्रांना अभय देणारें व्रत आचरणें फार चांगलें आहे. सर्वभूतमात्रांना जो अभयदक्षिणा देतो तो प्राणदान देणारा होतो. याप्रमाणें अहिंसा हा श्रेष्ठ धर्म सांगितला आहे. जसे प्राण आपल्याला हवेसे वाटतात तसेच ते दुसऱ्यांनाही हवेसे वाटत असतात. म्हणून शहाण्यांनीं आपल्यासारखेंच दुसऱ्यांना समजावें. कल्याणेच्छु विद्वानांनासुद्धां मृत्युपासून भय आहे. मग मांसावर रहाणाऱ्या पाप्यांकडून बलात्कारानें मारले जाणाऱ्या, बिचाऱ्या, प्राण हवेसें वाटणाऱ्या यःकश्चितांना ती इच्छा असण्यांत नवल तें काय ? ह्मणून मांस सोडणें हें, धर्म, स्वर्ग व सुख या सर्वांचें मोठें उत्तम स्थान आहे. अहिंसा हा सर्वांत श्रेष्ठ धर्म असून हेंच मोठें तप आहे, श्रेष्ठ प्रकारचें सत्य हेंच असून सर्व धर्म यापासूनच निघतात. मांस हें गवत, लांकूड व धोंडा यांपासून कधीं मिळत नसतें. प्राण्याला मारूनच तें मिळत असल्यानें तें खाण्यांत दोष आहे. स्वाहा, स्वधा व अमृत यांवर राहणाऱ्या देवांना सत्य व सरळपणा आवडतो. **मांसभक्षक राक्षस, कुटिल व असत्य भाषण करणारे असतात.** घोर अरण्यामध्यें, गहन अशा दुर्गम प्रदेशीं रात्रीं, दिवसां, संध्याकाळीं, चवाठ्यावर, सभांमधून, शस्त्र उगारलेले लोक, श्वापदें, व साप यांपासून सुद्धां मांस न खाणाराला भीति नसते. सर्वभूतमात्रांना तो आधार असून सर्वांचा त्यावर विश्वास असतो. कोणाला त्याच्यापासून भीति रहात नाहीं व त्याला कोणापासून भीति उरत नाहीं. मांस खाणाराच कोणी नसेल तर कोणीही प्राण्याला मारणार नाहीं. मारणारा खाण्यासाठींच त्याला मारीत असतो. मांस हें अभक्ष्य समजलें जाईल तर प्राणिमात्रांचा वधच होणार नाहीं. खाणाऱ्यासाठींच मृगादिकांना मारण्यांत येत असतें. ज्याअर्थीं मारणाराचें आयुष्य कमी होत असतें त्या-

अर्थी कल्याणेच्छूनें मांस सोडावें. प्राण्यांचा घात करणाऱ्या क्रूर लोकांना कोणी तारणारे मिळत नाहींत. मोठमोठे साप, व श्वापदें यांप्रमाणें भूतमात्र त्यांना भीत असतात. **लोभामुळें, बुद्धीला मोह पडल्यामुळें, बल व सामर्थ्य दाखविण्यासाठीं, पापी लोकांच्या संसर्गानें अधर्माची लोकांना गोडी लागत असते.** जो दुसऱ्याच्या मांसानें स्वतःचें मांस वाढवूं इच्छितो त्याला नेहमीं काळजींत रहावें लागून कोठें तरी भलत्यासलत्या योनींत त्याचा जन्म होतो. मांस न खाणें हें संपत्ति, यश व आयुष्य वाढवितें. हें स्वर्गदायक व कल्याणप्रद आहे. मांस भक्षणामध्यें मार्कंडेय ऋषींनीं हे दोष सांगितले आहेत कीं, प्राण हवेसे वाटणाऱ्या प्राण्यांचें जो मांस खातो मग त्यांना हा मारो किंवा ते मेलेले असोत त्यांना हाच मारणारा होतो. जो पैसा देऊन विकत घेऊन खातो तो आपल्या पैशानें त्यांना मारतो. व या उपभोगामुळें त्यांना मारणारा होतो व जो त्याला बांधून प्रत्यक्ष मारतो तोही याला मारणारा होतो. याप्रमाणें हे तीन प्रकारचे वध आहेत. जो स्वतः मांस खात नाहीं; परंतु अनुमोदन देतो तोही त्याच्या त्या दुष्ट भावामुळें दोषी होतो. मांस न खाणारा कोणाचें कांहीं चालूं न देतां नेहमीं आयुष्मान, निरोगी व सर्व प्राणिमात्रांवर दया करणारा असतो. सोनें गाय व भूमि दान करणाराहून मांस न खाण्यामध्यें श्रुतींत विशेष धर्म सांगितला आहे. संस्कारपूर्वक प्रोक्षण न केलेलें विधिहीन मांस खाल्ल्यानें मनुष्य नरकाला जातो. ब्राह्मणासाठीं प्रोक्षण करून संस्कृत केलेलें मांस खाण्यांत थोडा दोष आहे; परंतु असंस्कृत खाण्यांत फार आहे. खाणाऱ्यासाठीं जो नीच पुरुष प्राण्याला मारतो, त्याला खाणाराहून अधिक दोष लागतो. ईज्या, यज्ञ व श्रुति यांत सांगितलेले मार्ग न कळतां उगीच मांसाकरितां ह्मणून प्राणिमात्रांना मारणारा नरकाचा वाटेकरी होतो. मांस खाऊन नंतर जो तें सोडतो त्याला सुद्धां मोठा धर्म लागतो. जो मांस मिळविण्याची व्यवस्था करतो, जो अनुमोदन देतो, जो विकत घेतो, जो विकत देतो, जो मारतो, जो तयार करतो, जो उपभोग घेतो व जो खातो त्या सर्वांना पाप लागतें. आणखी पुन्हां विधिनिर्मितवेदांमधील दुसरा आधार सांगतों कीं, हा जो प्रवृत्तिरूपी मार्ग तो गृहस्थासाठीं सांगितला असून मोक्षेच्छूसाठीं नाहीं. जें वेदोक्तमंत्रानें पितृकार्यासाठीं तयार केलें असेल तेवढेंच मांस शुद्ध गणलें असून त्या व्यतिरिक्त मांस अभक्ष्य असें मनू सांगतो. अस्वर्ग्य व अयशस्य असें विधिहीन मांस मनुष्यानें खाऊं नये. आपल्याला कोणीं इजा देऊं नये अशी इच्छा असेल तर आपण कोणाही प्राणिमात्राचें मांस खाऊं नये. **पूर्वीं पुरोडाशाचा पशु करून ऋषी यज्ञ करीत असत, असें ऐकण्यांत आहे.** पूर्वीं ऋषींनीं वसूला विचारलें असतां मांस अभक्ष्य असून तें भक्ष्य आहे असें तो ह्मणाल्यानें आकाशांतून त्याला पृथ्वीवर यावें लागलें व फिरून तोच आग्रह धरल्यानें पृथ्वीमध्यें शिरावें लागलें. प्रजांच्या हिताकरितां पूर्वीं देवासाठीं ह्मणून सर्व अरण्यांतल्या पशूंवर एकदम प्रोक्षण करून ठेविलें असल्यामुळें त्यांच्या मांसानें देव व पितृकार्य केल्यानें त्यामध्यें दोष लागत नाहीं व याप्रमाणें यथाशास्त्र दिलेल्या मांसानें तृप्त होऊन पितर संतुष्ट होतात. मांस न खाण्यांत सर्व कांहीं सुख आहे. शंभर वर्षें उग्र तप करणें, व मांस न खाणें हीं दोन्ही सारखीं आहेत. विशेषतः कार्तिकाच्या शुक्ल पक्षामध्यें मांस सोडावें असें धर्मांत सांगितलें आहे. चातुर्मास्यांत मांस सोडल्यानें कीर्ति, आयुष्य यश व बल हीं चार मिळतात. एक महिनाभर कोणत्याच प्रकारचें मांस न खातां राहणारा मनुष्य सर्व दुःखांतून मुक्त व निरोगी होऊन सुखी रहातो. महिनेच्या महिने किंवा पंधरवडेच्या पंधरवडे जे मांस न खातां रहातात त्यांना ब्रह्मलोक मिळतात. ज्यांना खरें तत्त्व कळलें आहे असे, आत्मानात्मविचार करणारे नाभा, अंबरीष वगैरे शेंकडों राजे कार्तिकाच्या पहिल्या पंधरवड्यांत किंवा कार्तिकभर मांस सोडून ब्रह्मलोकामध्यें वैभवांत झळकत राहिले आहेत. हजारों गंधर्व व अप्सरा त्यांच्या सेवेला हजर आहेत. हा अहिंसात्मक उत्तम धर्म जे आजन्म पाळतात त्यांना स्वर्गवास मिळतो. असा मनुष्य सर्व पापांपासून मुक्त होऊन त्याच्या सर्व वासना परिपूर्ण होतात. ज्ञातीमध्यें त्याला श्रेष्ठपणा मिळतो. तो संकटां-

त पडला असतां त्यांतून सुटतो. त्याला रोगराईची बाधा होत नाहीं. नीच योनीमध्यें जावें लागत नाहीं. तो संपत्तिवान व रूपवान होतो.' युधिष्ठिर ह्मणाला, 'नाना प्रकारचें अपूप, भाज्या, साखरेचीं पक्वान्नें व गोड गोड पदार्थ टाकून दुष्ट लोक राक्षसाप्रमाणें मांसाच्या मागें कां लागतात हेंच मला कळत नाहीं. तेव्हां मांसाची गोडी कांहीं अजब असली पाहिजे, तेव्हां मांस न खाण्यांत काय फायदे आहेत, व खाण्यांत काय दोष आहेत, कोणतें खावें, कोणतें खाऊं नये, ह्याचें एकंदर स्वरूप काय, हें सर्व आपण मला फिरून सविस्तर सांगा.' भीष्म ह्मणाले, 'तूं ह्मणतोस तें खरें आहे. मांसाहून अधिक गोडी कशाची नाहीं. जखम लागून क्षीण झालेल्यांनां, रतिसुखांत गढलेल्यांना किंवा वाटेचे श्रम झालेल्यांना मांसाहून दुसरें कांहीं चांगलें नाहीं. हां हां ह्मणतां हें शरीराला पुष्टि देतें. याच्यासारखें दुसरें खाद्य नाहीं असें जरी आहे तरी हें न खाण्यांत पुष्कळ फायदे आहेत. जो दुसऱ्याच्या मांसानें आपलें मांस वाढवूं इच्छितो त्याहून क्षुद्र किंवा दुष्ट दुसरा कोणी नाहीं. या जगामध्यें प्राणाहून अधिक आवडती दुसरी वस्तु नाहीं; ह्मणून मनुष्यानें दुसऱ्यावर आपल्याप्रमाणेंच दया करावी. मांसाची उत्पत्ति शुक्रापासूनच आहे. हें खाण्यामध्यें मोठें पाप असून न खाण्यांत पुण्य आहे. वेदांत सांगितल्याप्रमाणें विधिपूर्वक तें खाल्ल्यानें दोष लागत नाहीं; कारण पशु हे यज्ञासाठीं निर्माण केले आहेत, असेंही शास्त्रांत सांगितलें आहे. याहून निराळ्या रीतीनें वागणारांची वृत्ति राक्षसी समजावी. पूर्वी सांगितल्याप्रमाणें अरण्यांतील सर्व मृग अगस्त्यांनीं पूर्वीच शुद्ध करून ठेविले असल्यामुळें स्वसामर्थ्यानें मिळविलेलें मांस खाण्यामध्यें क्षत्रियांना दोष नाहीं. कारण मृगया स्वतःचा जीव धोक्यांत घातल्याशिवाय होत नसते. याप्रमाणें मृगयेमध्यें दोघे सारख्याच धोक्यांत असून प्रसंगीं मृगया करणारा मारला जातो, प्रसंगीं मारतो, आणि ह्मणूनच सर्व राजर्षी मृगयेला जात असतात. याच्या योगानें त्यांना पाप लागत नसून हें वाईट समजलें नाहीं. सर्व भूतमात्रांच्या ठिकाणीं दया करणें यासारखें चांगलें इहपर दुसरें कांहींच नाहीं. दयावान मनुष्याला कशापासूनच भीति उरत नाहीं. दयावान अशा तपस्वी मनुष्यासाठींच हे लोक व स्वर्गलोक आहेत. अहिंसा हेंच धर्माचें मुख्य लक्षण आहे; ह्मणून अहिंसात्मक जें कर्म असेल तेंच शहाण्यानें करावें. देव व पितृयज्ञामध्यें प्रोक्षण करून शुद्ध केलेल्या मांसाला हवि ही संज्ञा असून तें खाण्याला हरकत नाहीं. जो सर्व भूतमात्रांना अभय देतो त्याला सर्व अभय देतात. असा मनुष्य जखमी होवो, ठेंचळो, पडो, दुबळा होवो किंवा घायाळ होवो, बऱ्या वाईट अशा सर्व प्रसंगीं सर्व भूतमात्र ह्याचें रक्षण करतात. मांसाहारी प्राणी, पिशाच्च व राक्षस कोणी याला मारीत नाहींत. दुसऱ्यांना जो भयापासून सोडवितो त्याला दुसरे भयापासून सोडवितात. प्राणदानाहून श्रेष्ठ दान आजपर्यंत झालें नाहीं, किंवा पुढें होणार नाहीं. आपल्याहून अधिक आवडतें असें जगामध्यें कांहींच नाहीं. सर्व भूतमात्रांना मरण हें अप्रिय आहे; कारण मरणसमयीं सर्वांना कांपरें सुटत असतें. गर्भवास, जन्म, जरा इत्यादि दुःखांमध्यें या संसारसागरांत प्राणी फिरत असून मरणाला ते अगदीं कांपत असतात. गर्भवासामध्यें खारट, आंबट, कडू अशा निरनिराळ्या रसांत त्याचप्रमाणें मल, मूत्र व घाम यांच्या डोकें फिरविणाऱ्या दर्पामध्यें प्राणिमात्र शिजून निघत असतात. गर्भवासांत पडल्याबरोबर पराधीनतेनें वरचेवर कापून तोडून निघतात. मांसाच्या मागें लागलेल्यांना गर्भवासांत अशा पराधीन स्थितींत रहावें लागतें. निरनिराळ्या योनींत जावें लागून कुंभिपाकामध्यें शिजत रहावें लागतें. वरचेवर दुसऱ्यांचा घाला पडून त्यांच्या हातून मरून निरनिराळ्या योनींत याला भटकावें लागतें. आपल्याहून या पृथ्वीवर दुसरें कांहींच प्रियकर नसल्यानें सर्व प्राणिमात्रांवर शहाण्यानें दया करावी. कोणत्याही प्रकारचें मांस जो आजन्म खात नाहीं त्याला स्वर्गांत उत्तम स्थान मिळतें. जगवेंसें वाटत असलेल्या प्राणिमात्रांचें मांस जे खातात त्यांनाही ते प्राणी खातात. **मला तो ज्या अर्थी खातो त्या अर्थी मी त्याला खाईन अशी मांसाची व्युत्पत्तीच आहे.** ह्मणून प्राण्याला मारणारा व त्याला खाणारा ते दोघेही मारले जातात. जो या जन्मांत दुसऱ्याशीं वैरत्वानें वागतो त्याचा तो दुसऱ्या ज-

न्मीं द्वेष करतो. मनुष्य ज्या ज्या शरीरानें जें जें कर्म करतो त्या त्या शरीरानें तें तें फळ भोगतो. अहिंसा हा श्रेष्ठ धर्म असून अहिंसा हाच थोर आत्मनिग्रह आहे. अहिंसा हेंच उत्तम दान असून उत्तम तपही अहिंसाच आहे. उत्तम यज्ञ अहिंसाच असून हेंच श्रेष्ठ फल आहे. उत्तम मित्र, उत्तम सुख सर्व कांहीं अहिंसा आहे. सर्व यज्ञांमध्यें दान करणें किंवा नाना प्रकारचीं दानें यांपैकीं एकही अहिंसेच्या तोडीला लागणार नाहीं. अहिंसा धर्म पाळणाराच्या हातून अक्षय्य तप होत असून नेहमीं त्याच्या हातून यज्ञ होत असतो. हा मनुष्य सर्वांना आईबापाप्रमाणें असतो. अहिंसेचे हे गुण थोंडक्यांत सांगितले आहेत, त्याचे सर्व गुण शंभर वर्षें सांगत बसले तरी सरणार नाहींत.'

---

## २७७ व्यास व किडा यांचा संवाद–सत्संगापासून फायदा.

### (१३. ११७–११९)

युधिष्ठिर ह्मणाला, 'इच्छा असून किंवा नसून जे रणांत मरतात त्यांना कोणती गति मिळते. रणामध्यें प्राण सोडणें मोठें कष्टाचें असून मनुष्य वैभवांत असो किंवा गरीबींत असो, चांगल्या किंवा वाईट स्थितींत असो, प्राण सोडणें हें त्याला जिवावर येतें याचें कारण काय?' भीष्म ह्मणाले, 'या संसारांत जन्माला आलेला प्राणी चांगल्या किंवा वाईट कोणत्याही योनींत जन्माला येवो, ज्याच्या योगानें त्यांत तो गढला रहातो, या संबंधांत पुढील व्यास व एक किडा यांचें भाषण सांगतों ऐक. कोणे एके वेळीं भगवान व्यास ब्रह्ममय होऊन फिरत असतां एका गाडीच्या वाटेवरून एका किड्याला धांवतांना पाहून सर्वांची गति व भाषा यांना कळत असल्यानें ते त्याला ह्मणाले, 'किड्या, तूं घाबरल्यासारखा होऊन तुझी धांदल उडाल्यासारखी दिसते. कसल्या भयानें कोठें पळतोस?' किडा ह्मणाला, 'गाडीचा मोठा घरघर व भयंकर आवाज ऐकूं येत आहे, त्याच्या योगानें मरण येऊं नये म्हणून मी या वाटेवरून दूर पळत आहें. मोठें ओझें वहात असून ज्यावर चाबकाचे कोरडे बसत आहेत अशा बैलांचा दीर्घ सुसकारा कानीं पडत आहे. आमच्यासारख्या किड्यांना हा सुद्धां अगदीं दुःसह आहे; म्हणून मी आपला भयानें हें संकट टाळण्यासाठीं बाजूला पळत आहें. मृत्यु हा सर्वांना नावडता असून जीवित दुर्लभ आहे. म्हणून सुखांतून निघून दुःखांत पडूं नये म्हणून मी पळ काढीत आहें.' यावर व्यास ह्मणाले, 'हे किड्या, तुला सुख कोठून असणार? अशा ह्या भिकार योनीमध्यें तूं असल्यानें मरणच तुला सुखाचें होईल, असें मला वाटतें. शब्द, स्पर्श, रस गंध व नानाप्रकारचे बरे वाईट भोग यांची तुला ओळख सुद्धां नसल्यानें मरणच तुझ्या फायद्याचें आहे.' किडा म्हणाला, 'मनुष्य ज्या ज्या योनीमध्यें जन्माला येतो, ती ती योनीच त्याला चांगली वाटत असल्यानें या योनींतही मला सुखच वाटतें, ह्मणून मला जगावेंसें वाटतें. ह्या जन्मांतही माझ्या देहाप्रमाणें मला भोग मिळतच आहेत. मनुष्य असो किंवा जड प्राणी असो, त्या त्या प्रमाणें निरनिराळे भोग ईश्वरानें त्यांसाठीं करून ठेवले आहेत. मी पूर्वजन्मांत मोठा पैसावान शूद्र होतों, ब्राह्मणाचा मला अगदीं तिटकारा असून दुष्ट व कृपण असा मी व्याजबट्ट्यावर उदरनिर्वाह करीत होतों. निष्ठुर भाषण, फसवेगिरी व सर्वांचा द्वेष हे गुण माझ्या अंगीं असून खोट्यानाट्या गोष्टींनें परस्व मी लुबाडीत असें. गोड गोड खाण्याला संवकलों असल्यानें मत्सर व दुष्टपणा धरून नोकर व अतिथी यांना सोडून मी खात असें. पैशाच्या नादीं लागून देव व पितर यांना श्रद्धापूर्वक द्यावयाचें अन्न मी त्यांना देत नसे. भयानें मला शरण येऊन माझ्या घरीं राहिलेल्या लोकांना त्यांचें रक्षण न करतां एकाएकीं मी सोडीत असें. लोकांचा पैसा, धान्य, त्यांच्या आवडत्या बायका, वहानें, कपडेलत्ते व थोर वैभव पाहून फुकट मी त्यांचा हेवा करीत असे. दुसऱ्याच्या सुखाची ईर्षा वाटून तें त्याला नसावें असें मला वाटे. आपल्या मनाप्रमाणें विषयवासनेच्या मागें लागून धर्मार्थकामावर कुऱ्हाड हाणून पुष्कळ दुष्टपणाचीं कर्में माझ्या हातून घडलीं. तीं सर्व आठवून आपल्या आवडत्या मुलाला सोडल्याप्रमाणें मला दुःख होत

आहे. यामुळें शुभकर्मांच्या फळाची मला ओळखच नाहींशी झाली आहे. फक्त माझ्या वृद्ध आईची मीं पूजा केली असून घरीं आलेल्या एका कुलवान अतिथीचा माझ्या हातून सत्कार घडला होता, त्यामुळें माझी आठवण कायम आहे. व त्यामुळेंच फिरून सुखाचे दिवस मला येतील असें मला वाटतें. ' व्यास ह्मणाले, ' ज्या चांगल्या गोष्टीनें तूं या हलक्या योनींत सुद्धां गडबडत नाहींस, तें माझेंच कृत्य आहे. माझ्या तपोबलानें केवळ माझ्या दर्शनानें मी तुला तारण्याला समर्थ आहें. तपोबलाहून अधिक दुसरें कोणतेंही बल नाहीं. तूं आपल्या पापकर्मानें किडा झाला आहेस हें मी जाणतों. धर्म जर तूं मानीत असशील तर फिरून तूं धार्मिक होशील. या कर्मभूमीच्या ठिकाणीं केलेल्या कर्माचें फळ देवांना तसेंच हलक्या योनींतल्या प्राण्यांना भोगावें लागतें. मूर्ख लोक धर्मसुद्धां सकाम आचरत असून त्याचीं फळेंही त्यांना तशींच मिळतात. वाणी, बुद्धि, हात, पाय, वगैरे नाहींसे झालेल्या मनुष्याला आणखी सोडावयाचें तें कोणी उरलें ? ब्राह्मण जिवंत राहील तर चंद्रसूर्याची त्याच्या हातून पूजा घडून पुण्यकारक कथा त्याच्या तोंडून निघतात. तेव्हां अशा योनीमध्यें तूं जन्माला जाशील, व त्याठिकाणीं भोग्य वस्तू बनून राहिलेल्या पंचमहाभूतांचा उपभोग घेशील, त्या योनींतून मीं तुला ब्रह्मस्वरूपाला नेऊन मिळवीन. ' हें ऐकून बरें म्हणून तो किडा त्या गाडीच्या वाटेंत तसाच उभा राहिला व ती गाडी येऊन तिच्या चाकाखालीं त्याचा चुराडा उडून त्याचा प्राण गेला. नंतर साळ, गोंधा, डुकर, मृग, पक्षी, चांडाळ, शूद्र व वैश्य अशा नाना योनींत जन्म घेऊन पुढें त्या मुनीच्या प्रसादानें क्षत्रियकुलांत जन्माला आल्यावर त्या ऋषींना तो भेटण्याला आला, व पूर्वीची आठवण होऊन त्यांचे पाय मस्तकावर घेऊन हात जोडून तो त्यांना ह्मणाला, ' दहा गुणांनीं सर्वांना हवासा वाटणाऱ्या या अतुल क्षत्रियकुलांत जन्माला येऊन मी राजपुत्र झालों आहें. सोन्याच्या माळा गळ्यांत लटकावलेल्या हत्तीवर, तसेच कांबोजचे घोडे, उंट व खेचरें जोडलेल्या रथामध्यें बसून मी जातों. माझ्या सर्व आप्तइष्टांसह मी चमचमीत मांसाचें भोजन करतों. चांगल्या सुशोभित मंदिरांतून मौल्यवान अशा सुखदायक बिछान्यांवर झोंप घेतों. पहाटेच्या प्रहरीं निरनिराळे भाट स्तुतिपाठ गाऊन मला उठवितात. किड्याच्या जन्मापासून या अशा चांगल्या जन्माला आपल्या प्रसादानेंच मी आलों असल्यानें आपल्याला मी हात जोडतों. काय आज्ञा आहे ती व्हावी. आपल्या तपोबलानें हें वैभव मिळालें आहे. ' व्यास ह्मणाले, ' ह्या स्तुतीनें तूं माझा सत्कार केला आहेस. किड्याच्या जन्माला जाऊन तुझ्या बुद्धीवर तमाचें पटल पडलें असतां माझ्या दर्शनानें फिरून तुला मागची आठवण झाली. तूं पूर्वी पैशामागें लागून दुष्टपणानें सांठविलेल्या पापाचें फळ नाहींसें झालें नव्हतें. माझी तुझी गांठ पडली हें तुझें भाग्यच ! हलक्या योनींत जन्मून माझा सत्कार तुझ्या हातून झाला. आतां या राजपुत्राच्या जन्मांतून गोब्राह्मणासाठीं रणांत प्राण सोडून तूं ब्राह्मण होशील. शेंकडों यज्ञ करून त्यांत पुष्कळ दक्षिणा देऊन ब्रह्मस्वरूपी होऊन स्वर्गामध्यें आनंदांत रहाशील. '

याप्रमाणें तो किडा किड्याचा जन्म सोडून क्षत्रिय जन्माला आला असतां मागची आठवण ठेवून तो पुष्कळ तप करूं लागला. तेव्हां व्यासांनीं येऊन त्याला सांगितलें कीं, ' भूतमात्रांचें पालन करणें हें क्षत्रियांचें मुख्य व्रत आहे. त्याकडे लक्ष दिल्यानें तूं ब्राह्मण होशील. बरेंवाईट ओळखून प्रजेचें योग्य रीतीनें पालन कर. भलत्या वासनांपासून स्वतःला दूर ठेवून चांगल्या वासना पुरवीत आत्मनिग्रहानें स्वधर्मामध्यें गढून राहिल्यानें तूं हा क्षत्रियदेह टाकून ब्राह्मण होशील. ' हें त्या महर्षीचें भाषण ऐकून धर्मानें प्रजेचें पालन करून त्याच्या योगानें लौकरच तो किडा ब्राह्मणयोनीमध्यें जन्माला आला; तेव्हां फिरून व्यास त्याच्याजवळ येऊन ह्मणाले, ' हे ब्राह्मणा, चिंता करूं नकोस. चांगलीं कर्में करणारा चांगल्या योनीमध्यें व वाईट कर्में करणारा वाईट योनीमध्यें जन्माला येतो. मनुष्याच्या पापकर्माच्या फलानुरूप त्याला दुःख भोगावें लागतें; तेव्हां मृत्यूचें भय धरून चिंता करूं नकोस. धर्मलोप होऊं नये एवढीच खबरदारी घेऊन उत्तम धर्माचरण कर. ' किडा ह्मणाला, ' भगवन्,

आपल्यामुळें मी एकाहून एक अशा अधिक अधिक सुखकर स्थितींतच येऊन पडलों. धर्ममूलक वैभव मिळून माझें पाप आज नष्ट झालें आहे.' ह्याप्रमाणें व्यासांच्या आज्ञेप्रमाणें दुर्लभ ब्राह्मणत्व आल्यावर त्यानें शेंकडों यज्ञयूपांनीं पृथ्वी भरून काढली, व मोठा ब्रह्मवेत्ता होऊन ब्रह्मार्शी सालोक्यतेला पोहोंचून, व्यासांच्या सांगण्याप्रमाणें त्याच्या कर्माचें फल मिळून सनातन ब्रह्मप्राप्ति झाली.' त्याचप्रमाणें ह्या रणामध्यें शौर्य गाजवून मेलेले क्षत्रियबहादर उत्तम गतीला गेले असल्यामुळें त्यांच्या संबंधानें उगीच शोक करूं नकोस.'

---

## २७८ व्यास व मैत्रेय यांचा संवाद–विद्या, तप व दान. (१३. १२०—२२)

'विद्या, तप व दान यांमध्यें अधिक कोणतें,' म्हणून युधिष्ठिरानें विचारल्यावरून भीष्म म्हणाले, 'या संबंधांत पुढील, व्यास व मैत्रेय यांमधील संभाषण ऐक. कोणे एके वेळीं व्यास कोणाला न कळत फिरत असतां काशीमध्यें मुनिकुलांत जन्मलेल्या मैत्रेय ब्राह्मणाकडे आले. तेव्हां मैत्रेयानें त्यांचा सत्कार करून त्यांना उत्तम अन्न जेवूं घातलें. तें सर्वप्रकारें तृप्ति देणारें उत्तम अन्न खाऊन व्यास निघाले असतां संतुष्ट होऊन हासले. त्यांना हासतांना पाहून मैत्रेयानें आपल्यासारख्या तपस्वी व इंद्रियनिग्रही मनुष्याला हासें कशानें आलें, आणि माझें तपाचें भाग्य व आपलें असें महाभाग्य तरी काय आहे,' ह्मणून विचारलें. आणि ह्मणाला, 'आपण जीवन्मुक्त असून मी संसारी आहें; व याप्रमाणें आपल्या कर्मामध्यें जरी बरेंच अंतर आहे तरी तुमच्या माझ्यामध्यें मला फारसें अंतर दिसत नाहीं. शिवाय माझें कुळही विशेष आहे.' व्यास ह्मणाले, 'वेदामधील कांहीं कांहीं अतिशयोक्तीच्या व लोकांना गोंधळून सोडणाऱ्या आज्ञांची आठवण होऊन मला हासूं आलें. वेदवचन एकदां खोटें असें वाटतें व फिरून ते खोटें कशाकरतां बोलतील असेंही वाटतें. अद्रोह, दान, व सत्यभाषण या तीन वाटांना धरून जाणें हें उत्तम व्रत समजलें आहे. पूर्वीच्या ऋषींनीं सांगून ठेविलेलीं आमच्या कानावरून गेलेलीं पूर्वींचीं वचनें हल्लीं आह्मीं सुद्धां पाळण्याजोगीं आहेत. अशा प्रकारचें अति स्वल्प दान देखील महाफलदायक होतें. अगदीं मनांत कांहीं वाईट न आणतां तूं तान्हेल्याला पाणी दिलेंस, स्वतः तान्हेला असून मला तान्हेल्याला हें अन्न देऊन तूं महायज्ञानें मिळणारे लोक मिळविले आहेस. तुझ्या पवित्र दानानें व तपानें मी संतुष्ट झालों आहे. तूं पुण्यवान झाला असून पुण्यस्वरूपी दिसत आहेस, व तुझ्याभोंवतीं पुण्यगंध पसरला आहे. तुझीं सर्व कर्में यथाविधि होतात असें मला वाटतें. अंगावरून पाणी घेणें, गंध वगैरे फांसून घेणें, इत्यादि सर्व चांगल्या कृत्यांहून दानच सर्वांत पवित्र आहे; असें नसतें तर त्याच्या वर्चस्वाचाच प्रश्न उरला नसता. वेदांत सांगितलेलीं जीं पुण्यकर्में तूं नांवाजतोस त्या सर्वांमध्यें दानच श्रेष्ठ आहे. दान करणाऱ्यांनीं जो रस्ता दाखवून दिला आहे, त्या रस्त्यानें शहाणे लोक जातात. जे दान करतात ते प्राणदान देणारे समजले आहेत. कारण, धर्म सुद्धां त्यावरच अवलंबून आहे. ज्याप्रमाणें उत्तम प्रकारें अध्ययन केलेले वेद, इंद्रियनिग्रह, व सर्वत्याग तसेच दानासारखें दुसरें नाहीं. महाबुद्धिशाली अशा तुला चांगलें सुख मिळेल. शहाणा मनुष्यच एकापेक्षां एक अधिक अशा प्रकारचीं सुखें भोगीत रहातो. याचा दाखला मला आतां प्रत्यक्ष आला आहे. श्रीमंत लोक पैसे मिळवून दान व यज्ञ करतात आणि त्याचें सुखरूपी फल भोगतात; नेहमीं साधारणतः असें घडतें कीं, सुखाच्यामागून दुःख व दुःखाच्यामागून सुख हें मनुष्याला येत असतें. त्याचप्रमाणें पुण्यकारक, पापी व ना पुण्य ना पाप अशा तीन प्रकारचें वर्तन सांगितलें आहे. कांहीं पुण्यवान असतात, कांहीं पापी असतात. कांहीं दोहोंच्या वाटेला जात नाहींत. आपल्या कर्मामध्यें गढून ब्रह्माकडे लागलेल्या मनुष्याचें वर्तन पापी किंवा पुण्यात्मक कशाच प्रकारचें नसतें. त्याच्या हातून घडणारीं पापें पापकारक समजलीं जात नाहींत; त्याचप्रमाणें स्वकर्मामध्यें गढून असणाऱ्याच्या हातूनही पाप किंवा पुण्य कांहींच घडत नसतें. यज्ञ, दान व तप यांकडे लक्ष देऊन असणारे लोक पुण्यवान समजले असून भूतमात्रांचा जे द्रोह करतात ते पापी सम-

जले आहेत. जे दुसऱ्याचें द्रव्य बुचाडतात ते नरकांत बुडून दुःख भोगतात. या तिहींखेरीज दुसरें कांहीं अधिक चांगलें नाहीं. यांहून दुसऱ्या सर्व गोष्टी ना धड पुण्यात्मक ना पापात्मक अशा असतात. मजेमध्यें वाढून यज्ञ कर व आनंदांत रहा. कोणाही विद्वानाला किंवा तपस्व्याला तुला मागें टाकतां येणार नाहीं.' यावर कर्मपूजक, श्रीमान व थोर कुलांत जन्मलेला विद्वान मैत्रेय ह्मणाला, 'आपण ह्मणतां तें अगदीं खरें आहे. परंतु आपल्या परवानगीनें मी एक प्रश्न विचारतों. दानासंबंधानें आपले विचार निर्दोष व शुद्ध आहेत. विद्या व तप यांच्या योगानें आपलें अंतःकरण शुद्ध झालें आहे यांत संशय नाहीं व त्यामुळें आपलें दर्शन हा मला मोठा लाभच झाला आहे. माझ्या बुद्धीच्या योगानें आपल्या तपाचें वैभव मोठें आहे हें मला दिसतें. आमच्या सारख्यांचा अभ्युदय आपल्यासारख्यांच्या दर्शनानेंच होत असतो. आपला हा प्रसाद असून हें आपल्या अंगवळणींच पडलें आहे. तप, विद्या, शुद्धकुलांत जन्म हीं तीन ब्राह्मणत्वाला कारण आहेत. या तीन गुणांचा उदय होतो तेव्हांच मनुष्य ब्राह्मणत्वाला पोहोंचतो. ब्राह्मण तृप्त झाला असतां देव व पितर तृप्त होतात. वैदिकब्राह्मणाहून अधिक दुसरें कांहीं नाहीं. अशांच्या अभावीं जिकडे तिकडे अंधारमय होऊन कांहींच उमगलें नसतें, व चारी वर्ण नाहींसे होऊन धर्माधर्म व खरेंखोटें कांहींच उरलें नसतें. जेव्हां चांगल्या नांगरलेल्या शेतांत पेरावें, तेव्हां त्यापासून चांगलें पीक हातीं येतें. त्याचप्रमाणें चांगल्या विद्वान ब्राह्मणाला दान केल्यानें पुष्कळ पुण्य मनुष्याच्या पदरीं पडतें. दान घेण्याला चांगला वैदिक किंवा सद्वर्तनशील ब्राह्मण नसेल तर श्रीमंताचा पैसा निरर्थक आहे. मूर्ख मनुष्य त्याला दिलेलें अन्न खाऊन तें व्यर्थ घालवितो, व तें अन्नही त्याला हितावह होत नाहीं. त्यालाच दान ह्मणावें कीं जें सत्पात्रीं दिलें जातें. बाकीचें दान कर्त्याला निरुपयोगी होऊन अयोग्य असतांना घेतल्यानें घेणाराचाही त्यापासून नाश होतो. विद्वान मनुष्य जें अन्न खातो तें तो कारणीं लावतो. त्यापासून तो दुसरें अन्न उत्पन्न करतो. अविद्वान मनुष्य जें अन्न खातो त्यापासून त्याला होणाऱ्या मुलावरचासुद्धां त्याचा हक्क नाहींसा होतो; कारण ज्या अन्नाच्या योगानें त्या मुलाला उत्पन्न करण्याचें सामर्थ्य त्याच्या अंगीं आलें त्या अन्नदात्याचा त्याच्यावर हक्क रहातो. अशा प्रकारानें प्रतिग्रह घेण्यामध्यें दोष आहे. दान करून कर्त्याला जें पुण्य लागतें तेंच घेणारालाही लागतें. ज्याठिकाणीं प्रतिग्रह घेण्याला विद्वान व आचारशील ब्राह्मण आहेत तेथेंच लोकांना दानाचें फळ मिळून तें इहपरलोकीं भोगण्याला सांपडतें. शुद्धकुलांत जन्मून तप व वेदाध्ययन यांमध्यें गढून राहून जे दान करतात ते फार पूज्य समजले आहेत. अशा लोकांनींच रेखून दिलेली वाट तुडविल्यानें मनुष्य भांबावत नाहीं. हेंच स्वर्गाला नेणारें असून यज्ञभार वहाणारे आहेत. यावर व्यास ह्मणाले, 'तुला अशाप्रकारची बुद्धि होऊन ही गोष्ट तुला उमगली हें एक भाग्यच आहे. भले लोक चांगल्या गुणाची प्रशंसा करतात. रूप, वय व संपत्ति यांचा पगडा तुझ्यावर बसला नाहीं ही एक सुदैवाची गोष्ट असून देवाचाच हा अनुग्रह आहे. आतां दानाहून श्रेष्ठ काय आहे तें तुला सांगतों ऐक. जीं कांहीं शास्त्रें किंवा ज्या कांहीं प्रवृत्ती सुरू झाल्या आहेत, त्या सर्व यथाक्रमानें वेदापासूनच निघाल्या आहेत व त्याला धरूनच मी दान चांगलें म्हणतों व तूं तप व वेद चांगले ह्मणतोस. तप हें फार पवित्र असून वेद व स्वर्ग यांचें साधन आहे. तप व विद्या यांच्या योगानें मनुष्याला सर्वांत उच्च फल मिळतें. तपाच्या योगानेंच सर्वपापें नाहींशीं करण्याला मनुष्य समर्थ होतो. जें जें ह्मणून डोळ्यांपुढें ठेवून मनुष्य तप करतो तें तें सर्व त्याला तपानें व विद्येनें मिळतें. जें शेवटास नेण्याला कठिण, तोंड देण्याला कठिण, मिळविण्याला कठिण किंवा तरून जाण्याला कठिण तें सर्व तपानें जवळ येतें. तप हें सर्वांत मोठें सामर्थ्यवान आहे. दारूबाज, चोर, भ्रूणहत्या करणारा, गुरुपत्नीशीं संबंध ठेवणारा, तपाच्या योगानें या सर्वांतून पार पडून पापापासून मुक्त होतो. विद्यासंपन्न आणि ह्मणूनच ज्ञानचक्षु असलेल्या मनुष्याच्या तपस्वी अगदीं बरोबरीचा आहे; वेद हीच ज्याची संपत्ति आहे, व जे तपोधन आहेत ते दोघेही पूज्य होत. जे दान करतात ते येथें

मोठें वैभव भोगून परलोकीं सुख भोगतात. जे धार्मिक लोक दान करतात, त्यांना हा लोक त्याचप्रमाणें ब्रह्मलोकासह दुसरे अनेक उत्तम लोक मिळतात. ज्याला सर्व मानतात किंवा भजतात, असे भले लोक सुद्धां अशा दान करणारांना मानतात व भजतात. असे हे दान करणारे लोक शेंकडों प्रकारच्या स्तुतीला पात्र आहेत. कोणी कांहीं कर्में करतो किंवा कांहीं अवश्य कर्में सोडतो त्या मनुष्याला तीं कर्में करण्याबद्दल किंवा सोडण्याबद्दल त्या त्या मानानें फळ मिळतें. मनुष्य कोठेंही असो, कर्मानुसार निरनिराळ्या लोकांना तो वांटेकरी होतो. तुला वाटेल त्या प्रकारचें अन्न, पान मिळेल; कारण बुद्धि, उत्तम कुलांत जन्म, विद्या व दया हे गुण तुझ्या अंगांत आहेत. तूं तरुण असून व्रतशील आहेस. धर्माकडे लक्ष दे. आतां गृहस्थानें कसें वागावें यासंबंधानें सांगतों ऐक. ज्या घरीं लग्नाच्या बायकोवर नवरा संतुष्ट असतो व बायको नवऱ्यावर संतुष्ट असते, त्या ठिकाणीं सर्व कल्याणाचा ओघ वहात असतो. ज्याप्रमाणें अंगावरील मल पाण्यानें धुऊन निघतो, अंधार अग्नीच्या उजेडानें नाहींसा होतो; त्याप्रमाणेंच दान व तप यांनीं पाप धुऊन निघतें. तुला उत्तम वाडे रहाण्याला मिळतील. आतां मी जातों. हें मनांत ठेव ह्मणजे तुझें कल्याण होईल.' पुढें मैत्रेयही नमस्कार व प्रदक्षिणा करून हात जोडून 'आपलें कल्याण असो;' असें ह्मणाल्यावर व्यास निघून गेले.'

## २७९ शांडिली व कैकयी यांचा संवाद—स्त्रियांचें वर्तन. (१३. १२३)

'भल्या स्त्रीचा चांगला आचार कशाला ह्मणतात?' ह्मणून युधिष्ठिरानें प्रश्न केल्यावरून भीष्म ह्मणाले, 'कशा प्रकारच्या वर्तनानें व आचारानें सर्व पाप धुऊन काढून स्वर्गाला येऊन चंद्रकन्येप्रमाणें कांतिमान अशी तूं अग्निशिखेप्रमाणें झळकत श्रम वगैरे कांहीं न्यून नसून पांढऱ्याशुभ्र वस्त्रामध्यें स्वतेजानें सहस्र गुणांनीं झळकत विमानांतून फिरत आहेस, या स्वर्गाला थोड्या थोडक्या तपानें, दानानें किंवा नियमानें तूं आली नसावीस,' ह्मणून कैकय कुळांतील सुमना नांवाच्या स्त्रीनें सर्वज्ञ व शहाण्या शांडिलीला विचारलें असतां ती ह्मणाली, 'भगवीं वस्त्रें किंवा वल्कलें नेसून, डोकें मुंडून किंवा जटा वाढवून मी देवत्वाला मिळालें नाहीं. निष्ठुर व नवऱ्याला न आवडणारें असें भाषण मी काळजीपूर्वक टाळीत असें. देवता, पितर व ब्राह्मण ह्यांच्या पूजेमध्यें दक्ष असें. सासुसासऱ्यांच्या सांगण्याच्या बाहेर कधींही जात नसें. दुष्टपणा करावयाचा नाहीं हें अगदीं ठरवून टाकलें होतें. मी दारांत कधीं उभी रहात नसें किंवा कोणाशीं फार वेळ बोलत नसें. कधीं वाईट काम माझ्या हातून घडत नव्हतें. खदखद हासणें मला कधीं ठाऊक नव्हतें. कोणाला कधीं मीं दुखविलें नाहीं. कोणाची गुप्त गोष्ट मीं दुसऱ्याला कधीं सांगितली नाहीं. पती कामाकरितां बाहेर जाऊन परत आले असतां मी त्यांना आसन देऊन आदरपूर्वक पूजा करीत असें. पतींना ठाऊक नाहीं किंवा त्यांना आवडत नाहीं अशा अन्नाला मी शिवत नसें. मोठ्या पहाटे उठून करावयाचीं कामें करून, करून घ्यावयाचीं कामें मी करून घेत असें. कांहीं कामाकरितां पती परगांवाला गेले असतां त्यांत त्यांना यश यावें ह्मणून मंगलकार्यांत गढून राही. त्या अवधींत काजळ, दागिने व माळा घालणें, उटी लावून घेणें, पाय रंगवून घेणें वगैरे गोष्टी मी करीत नसें. पति स्वस्थ निजले असतां महत्त्वाच्या कामासाठीं सुद्धां मी त्यांना जागे करीत नसें, व प्रपंचाच्या कामासाठीं मी त्यांना कधीं कष्टवीत नसें. घर नेहमीं झाडून सारवून स्वच्छ ठेवीत असें. जी स्त्री काळजीपूर्वक या गोष्टींकडे लक्ष देते तिला प्रति अरुंधतीप्रमाणें स्वर्गांत पुष्कळ मान मिळतो.' असें ह्मणून शांडिली तेथें गुप्त झाली.'

## २८० गोड भाषण. (१३. १२४)

युधिष्ठिर ह्मणाला, 'गोड भाषण व दान यांमध्यें चांगलें कोणतें?' भीष्म ह्मणाले, 'कोणी गोडभाषणानें प्रसन्न होतो, व कोणी कांहीं दिल्यानें प्रसन्न होतो. मनुष्याचा स्वभाव ओळखून यापैकीं एकाचा उपयोग करावा. आतां गोडभाषणामध्यें काय फायदे आहेत सांगतों ऐक. मोठे कडक

लोक देखील गोड भाषणानें खुष होतात. एका ब्राह्मणाला एका नरभक्षक राक्षसानें एका निर्जन अरण्यांत खाण्यासाठीं पकडलें. अशाप्रकारें तो संकटांत सांपडला असतां आपल्या गोड शब्दांनीं व अकलेनें तो राक्षसाच्या तावडींतून सुटला. त्या विक्राळ राक्षसाला पाहून अगदीं न घाबरतां न डगमगतां गोड शब्दानेंच त्यानें त्याला उत्तर दिलें ती हकीकत अशी आहे. तो राक्षस उगीच तोंडानें बहुमान दाखवून 'मी इतका फिकट व कृश कशानें झालों आहें हें सांग ह्मणजे मी तुला सोडतों,' असें त्या ब्राह्मणाला ह्मणाला असतां क्षणभर विचार करून त्या ब्राह्मणानें उत्तर दिलें, 'परदेशीं अनोळखीच्या ठिकाणीं सुहृज्जनांवांचून एकट्याला तुला अनेक चांगल्या चांगल्या विषयांचा उपभोग घेण्याचा प्रसंग असावा, तुझ्या मित्राशीं तुझें चांगलें वर्तन असून त्यांच्यामधल्या दोषामुळेंच ते तुझ्याशीं निष्प्रेम असावेत, तुझ्याहून कमी गुणाचे असून ऐश्वर्यानें अधिक असलेले गर्विष्ठ लोक तुझा अवमान करीत असावेत, तूं गुणवान, शहाणा व विनयशील असून गुणहीन व मूर्ख अशा लोकांचा सत्कार होतांना तुला दिसलें असावें, पोट भरण्याचें साधन नसल्यानें पीडला असून सुद्धां तुझ्या थोरपणामुळें पोट भरण्याचे भलतेसलते उपाय न आवडल्यामुळें तुला त्रास होत असावा, कोणी दुःखांत असतां तुझ्या थोर स्वभावामुळें तूं त्याच्यावर उपकार केला असतां तूं हरलास असें ते समजत असावेत, कामक्रोधाच्या तावडींत सांपडून आडमार्गाला लागून दुःख सोसणाऱ्या लोकांसंबंधानें नेहमीं तुझ्या मनांत विचार येत असावा, तुझ्यामध्यें अकल असून बेअकल अशा दुर्वर्तनी लोकांनीं तुझी टर करून तुला तुच्छ केलें असावें, वरून मित्रासारखें चांगलें वर्तन ठेवून तुझा वैरी तुला फसवून गेला असावा, स्पष्ट व गुप्त गोष्टी तुला कळत असून शहाणे लोक तुला मान देत नसावेत, वाईटांमध्यें बसून सुद्धां निःशंकपणें त्यांच्याशीं संभाषण करीत राहिल्यानें त्यांच्यामध्यें तुझ्या गुणांचा उजेड पडत नसावा, पैसा, बुद्धि किंवा विद्या यांचें पाठबळ नसून सुद्धां केवळ आपल्या तेजानें मोठेपणाला चढण्याची तुझी महत्त्वाकांक्षा असावी, तपाकडे लक्ष लागून अरण्यवास घेण्याचें तुझ्या मनांत असून तुझ्या बांधवांना ती गोष्ट पसंत नसावी, मोठा पैसेवान सुंदर व तरण्या बांड अशा एखाद्या शेजाऱ्याचें तुझ्या लाडक्या बायकोवर लक्ष असावें, धनिकांमध्यें योग्य प्रसंगीं बोललेल्या तुझ्या उत्तम भाषणाचासुद्धां प्रकाश पडत नसावा, तुझा एखादा आवडता नातेवाईक रागावला असून शास्त्राधारानें त्याची समजूत घालण्याला केलेला तुझा प्रयत्न त्याच्या मूर्खपणानें फुकट गेला असावा, तुला एखाद्यानें एखादें काम करावयास सांगितलें असून, आतां तुला त्याच्या फळाला मुकविण्याचें त्याच्या मनांत असावें, तुझ्यामध्यें गुण असून त्याबद्दल तुझी चहा होत असतां, आपल्यामुळें ती होत आहे असें तुझ्या नातेवाइकांना वाटत असावें, लज्जेमुळें किंवा मध्यें कांहीं विघ्न येईल या भीतीनें तुझ्या मनांतला उद्देश तुला बोलून दाखवितां येत नसावा, जगांत नानाबुद्धिच्या लोकांना त्यांच्या त्यांच्या मनाप्रमाणेंच वळविण्याला तूं प्रयत्न करीत असावास, विद्या, धैर्य व संपत्ति हीं जितक्यास तितकीं असून केवळ धैर्यानें व पराक्रमानें मिळणारी कीर्ति मिळावी असें तुला वाटत असावें, पुष्कळ दिवसांपासून इच्छिलेलें एखादें फल तुला मिळालें नसावें किंवा तुझ्या त्या कृत्याचें फळ दुसऱ्यानें उपटलें असावें, तुझा दोष कांहीं नसून एखाद्यानें तुला विनाकारण शाप दिला असावा, साधु लोक घरकोंडे होऊन राहून दुष्टांना यथेच्छ वनांत फिरतांना व मुक्यांना घरामध्यें गढून गेलेले तुझ्या पाहण्यांत आलें असावें, एखाद्या नुकसानीपासून तुझ्या सुहृदांना झालेलें दुःख जवळ पैसा किंवा सामर्थ्य नसल्यानें तुला निवारतां येत नसावें, धर्मार्थकामाला धरून असणारें, योग्यप्रसंगीं बोललेलें तुझें भाषण लोकांना पटत नसावें, मोठा अभिमानी असून कसें तरी जगण्याच्या हेतूनें क्षुद्रांनीं दिलेल्या पैशावर तुला जगण्याची पाळी आली असावी, पापी लोक भरभराटीला चढून भले लोकांना अवनतीला चाललेले पाहून तुला वाईट वाटत असावें, परस्परांशीं विरुद्ध असलेल्या मित्रांना कोणाशींच उलट न जातां खुष करण्याला तूं झटत असावास, श्रोत्रिय लोक आडमार्गाला लागले अ-

सून शहाण्या लोकांचीं इंद्रियें त्यांच्या ताब्यांत नाहींत असें पाहून त्यांच्या संबंधानें तुला काळजी लागली असावी, या व अशा प्रकारच्या दुसऱ्या चिंतेमुळें तूं पांढरा पडून सुकत चालला आहेससा दिसतोस.' याप्रमाणें त्या ब्राह्मणानें त्या राक्षसाला चढविलें असतां त्या राक्षसानेंही उलट त्याचा सत्कार केला, व त्याला आपला मित्र करून पुष्कळ पैसा देऊन सोडून दिला.'

## २८१ दुसरीं किरकोळ धर्मरहस्यें.

## ( १३. १२५-३४ )

युधिष्ठिर ह्मणाला, 'कर्मांचे केवळ घर असा हा दुर्लभ मनुष्यदेह मिळाला असतां कल्याणेच्छु गरीबानें काय करावें,? सर्व दानांमध्यें श्रेष्ठ दान कोणतें असून तें केव्हां व कसें द्यावें? मान्य व पूज्य असे लोक कोण? यावर भीष्म ह्मणाले, 'सांगतों लक्षपूर्वक ऐक. देवांना सुद्धां हें गूढ असून प्रत्यक्ष यमानें, नियम व ध्यान यांच्या योगानें तपाचें फल ह्मणून हें ज्ञान मिळविलें आहे. देवांना काय आवडतें, पितरांना काय आवडतें, तसेंच ऋषी, प्रमथ, श्री, चित्रगुप्त, दिग्गज यांना काय आवडतें, त्यांतील रहस्यासकट ऋषींचा धर्म कोणता, महादानाचें फल काय, महायज्ञाचें फल काय हें सर्व कळून त्याप्रमाणें वागतो तो सदोष असला तरी या त्याच्या गुणामुळें निर्दोषी होतो. प्रतिग्रहाच्या पापासंबंधानें दहा खाटकांच्या तोडीचा एक तेली असून दहा तेल्यांच्या तोडीचा एक मद्यपी आहे.त्याचप्रमाणें दहा मद्यप्यांच्या तोडीची एक वेश्या असून दहा वेश्यांच्या तोडीचा एक देवस्थानचा व्यवस्थापक आहे. राजापासून प्रतिग्रह घेण्यांत याच्या अर्धे पाप लागतें. धर्मसंबंधी शास्त्रें लक्षपूर्वक ऐकावीं. पितरांसंबंधाचीं गुह्यें ज्यामध्यें सांगितलीं आहेत असे श्राद्धविधी त्याचप्रमाणें देवगुह्येंही यांतच सांगितलीं आहेत. महाफलदायक ऋषींच्या धर्माला व आचाराला ते धरून आहेत. त्यांमध्यें मोठमोठ्या यज्ञांचें त्याचप्रमाणें सर्व प्रकारच्या दानांचें फल सांगितलें आहे. जे लोक हें नेहमीं वाचून लक्षांत ठेवतात व त्याप्रमाणें वागतात ते प्रत्यक्ष नारायणस्वरूपी होतात. गोदानाचें फल, तीर्थामध्यें स्नान केल्याचें फल, या फलाएवढें फल जो अतिथीची पूजा करतो त्याला मिळतें. जे हीं शास्त्रें ऐकतात, जे श्रद्धाळू आहेत व ज्यांचें अंतःकरण शुद्ध आहे त्यांनीं पुष्कळ लोक जिंकले असें समजावें. असा भला मनुष्य पापापासून मुक्त होऊन धर्म गांठीं बांधून घेऊन स्वर्गाला जातो.

कोणे एके वेळीं देवदूत इंद्रसभेला येऊन अदृष्टपणेंच तो इंद्राला ह्मणाला, 'मी त्या भिषग्वर्य अश्विनीकुमारांच्या आज्ञेनें येथें आलों आहे. श्राद्धामध्यें श्राद्ध करणारा व श्राद्ध घेणारा या दोघांनाही मैथुन वर्ज कां सांगितलें आहे. तीन पिंड एकमेकांपासून वेगळे कां ठेवण्यांत येतात व त्यापैकीं पहिला कोणाला द्यावयाचा, दुसरा कोणाला द्यावयाचा व तिसरा कोणाला द्यावयाचा?' हें त्याचें श्रद्धापूर्वक भाषण ऐकून त्याठिकाणीं असलेले पितर ह्मणाले, 'या गूढ प्रश्नाचें उत्तर ऐक. श्राद्ध करून किंवा श्राद्ध घेऊन जो स्त्रीशीं जाईल त्याचे पितर त्या अन्नानें बनलेल्या रेतामध्यें एक महिनाभर पडून रहातात. आतां पिंड वेगवेगळे व कोणकोणाला ठेवावयाचे तें ऐक. सर्वांच्या खालीं ठेवलेला पहिला पिंड पाण्यांत टाकावा, मधला पिंड बायकोनें खावा व तिसरा पिंड अग्नींत टाकावा. याप्रमाणें पिंडांची क्रमानें व्यवस्था आहे. याप्रमाणें सशास्त्र वागणाऱ्या मनुष्याचा धर्मलोप न होतां त्याचे पितर नेहमीं संतुष्ट व प्रसन्न असतात. त्याची प्रजा वाढते व अक्षय्य संपत्तीचा तो उपभोग घेतो.' देवदूत ह्मणाला, 'याप्रमाणें तीन ठिकाणीं गेलेल्या पिंडांपासून कोणता देव संतुष्ट होतो किंवा पितर कसे तरून जातात? पितर श्राद्धांत दिलेलें अन्नच कां खातात? याप्रमाणें या तीन ठिकाणीं टाकलेल्या पिंडांची काय व्यवस्था होते?' पितर ह्मणाले, 'देव व मुनी यांना सुद्धां पितृकर्मासंबंधी विधींचा बरोबर निर्णय झाला नाहीं. पितृकार्यामध्यें दक्ष असणाऱ्या फक्त एका अमर अशा महात्म्या मार्कंडेय मुनींनाच त्याचें गूढ ठाऊक आहे. या तीन पिंडांची काय व्यवस्था होते ऐक. पाण्यांत टाकलेल्या पिंडानें चंद्र संतुष्ट होऊन तो इतर देवतांना व पितरांना संतुष्ट करतो. बायकोनें खाल्लेल्या दुसऱ्या पिंडामुळें संततीची नेहमीं इच्छा करीत असलेले पितर तिला मुलें देतात. अग्नींत टाकलेल्या

पिंडाच्या योगानें तो पिंड देणाऱ्या मनुष्याच्या सर्व इच्छा पितर तृप्त करतात. श्राद्धामध्यें ऋत्विज होणारा मनुष्य त्याच्या योगानें श्राद्ध करणाराचा पितर होतो; ह्मणून त्याला याप्रमाणें दुसरेपणा आल्यामुळें त्यानेंही ते दिवशीं आपल्या बायकोशीं संबंध ठेवूं नये. त्या दिवशीं त्यानें शुद्धतेनें वागावें, असें न वागल्यानें वर सांगितलेले दोष त्याला लागतात ह्मणून श्राद्धाला बोलाविलेल्या ब्राह्मणानें स्नान करून शुद्ध होऊन मग तें श्राद्ध जेवावें व त्या दिवशीं भलतें सलतें वर्तन करूं नये. अशानें त्याची व श्राद्ध करणाराची संतति वाढते.' त्याप्रमाणें पितर बोलल्यावर सूर्याप्रमाणें झळकणाऱ्या विद्युत्प्रभ ऋषींनीं विचारलें, 'अज्ञानानें मोह पावून पुष्कळ लोक किडे, मुंग्या, साप, बकरीं, हरणें, पक्षी याप्रमाणें नीच योनींतील पुष्कळ प्राण्यांना मारतात; परंतु या कृत्यानें मोठें पाप लागतें. याला उपाय काय?' हा त्या तपोधनांचा प्रश्न ऐकून पितरांनीं त्यांची वहावा केली. नंतर त्यावर इंद्र ह्मणाला, 'कुरुक्षेत्र, गया, गंगा, प्रभास, पुष्कर, वगैरे तीर्थें यांचें स्मरण करून पाण्यामध्यें बुडी मारावी, ह्मणजे राहूंपासून ज्याप्रमाणें चंद्राची सुटका होते त्याप्रमाणें मनुष्य पापापासून मुक्त होतो. तीन दिवस याप्रमाणें स्नान करून उपाशी रहावें व गाईच्या पाठीवरून हात फिरवून शेंपटीच्या गोंड्याला नमस्कार करावा.' यावर विद्युत्प्रभ इंद्राला ह्मणाले, 'याहून सूक्ष्म धर्म हा आहे कीं, वडाच्या चिकानें अंग चोळून प्रियंगूचें तेल लावून घ्यावें; नंतर षष्टीक जातीचा भात दूध घालून खावा; ह्मणजे मनुष्य सर्वपापांतून मुक्त होतो. शिवाय दुसरें धर्मरहस्य असें आहे कीं, पर्वतावर चढून एका पायावर वर हात जोडून कांहीं न खातां सूर्याकडे पहात रहावें; याप्रमाणें कडकडीत तप केलें असतां उपासाचें फळ मिळतें. सूर्यकिरणांनीं अंग तापून निघालें असतां, मग तें उन्हाळ्यांत असो किंवा हिंवाळ्यांत असो, मनुष्य पापांतून मुक्त होऊन शाश्वत, व सूर्याप्रमाणें तेजस्वी होऊन चंद्राप्रमाणें झळकतो.' यानंतर इंद्रानें बृहस्पतींना सुखावह अशीं धर्मगुह्यें, त्यांतील रहस्यें त्यांतील दोषासह सांगण्यास विनंति केल्यावरून बृहस्पती ह्मणाले, 'जे सूर्याकडे पाहून लघ्वी करतात, जे भल्यांचा द्वेष करतात, पेटलेल्या अग्नीमध्यें समिधा टाकीत नाहींत व जिचें वांसरूं लहान आहे अशा गाईची दुधासाठीं धार काढतात, त्यांना खालीं दिल्याप्रमाणें दोष लागतात. सूर्य, भलेलोक, अग्नि व गाय या चौघांना ब्रह्मदेवांनीं लोकांना तारण्यासाठीं उत्पन्न केलें असून मृत्युलोकांतील ह्या देवता आहेत, व यांच्या अंगीं तेवढें सामर्थ्य आहे. जे सूर्याकडे पाहून लघ्वी करतात, ते, स्त्री असोत किंवा पुरुष असोत, अडुसष्ट वर्षें कुळाला कलंकभूत असे अपकीर्तीमध्यें रहातात; त्याचप्रमाणें अग्नीचा द्वेष करणाऱ्यांच्या प्रजेचा गर्भस्राव होतो. पेटलेल्या अग्नीमध्यें समिधा न टाकणाऱ्या मनुष्यानें दिलेला हवि अग्निकुंडांमध्यें अग्नि घेत नाहीं. ज्यांचीं वांसरें लहान आहेत अशा गाईंचें जे दूध पितात त्यांना दूध पिऊन कुलवृद्धि करणारी संतति होत नाहीं. त्यांच्या प्रजेचा, कुळाचा व वंशाचा क्षय होतो. त्याचप्रमाणें कुलवृद्ध अशा जुन्या ब्राह्मणांनीं जीं कर्में करूं नयेत ह्मणून सांगितलें आहे तीं न करतां वैभवेच्छूनें नेहमीं करावीं असें सांगितलेलीं कर्में करावीं.' नंतर, 'मंदबुद्धि मनुष्याच्या कोणत्या कृत्यानें तुह्मी तृप्त होतां, प्रेतासंबंधीं केलेलें कोणतें कर्म अक्षय्य फलदायक होतें व मनुष्य कोणत्या कर्मांनीं त्यांच्या ऋणांतून मुक्त होतो,' असें तेथें जमलेल्या सर्व मंडळींनीं पितरांना विचारलें असतां पितर ह्मणाले, 'जे लोक निळ्या वर्णाचा बैल सोडून अमावास्येला पितरांना तिलोदक देतात, व पावसाळ्यांत चार महिने दीपदान देतात, ते पितरांच्या ऋणांतून मुक्त होतात. निर्दोष, अक्षय्य व महाफलदायक असा हा विधि आहे. यापासून आह्मांला संतोष होत असतो. जे लोक श्रद्धापूर्वक संतति उत्पन्न करतात ते त्याच्या योगानें पणजांनासुद्धां नरकांतून तारतात.' याप्रमाणें पितरांचें भाषण ऐकून 'अशा प्रकारच्या दानामध्यें गुण काय,' म्हणून वृद्ध गार्ग्यांनीं विचारलें असतां पितर ह्मणाले, 'याप्रमाणें सोडलेल्या निळ्या वर्णाच्या बैलाच्या शेपटींतून त्यानें पाणी वर घेतलें असतां त्या पाण्यानें पितर साठ हजार वर्षें तृप्त होतात. व जो नदीकांठचा चिखल उकरून तो आपल्या शिंगावर घेतो त्याच्या योगानें पितर सोम लोकाला जातात.

पावसाळ्यांत दीपदान दिल्यानें चंद्राप्रमाणें तो झळकतो, व तमोगुण त्याच्यामध्यें मुळींच रहात नाहीं. अमावास्येला तांब्याच्या भांड्यांत मधुमिश्रित तिलोदक जो देतो त्याला यथासांग श्राद्ध केल्याचें फल मिळतें. त्याची प्रजा हृष्टपुष्ट होऊन पिंड देणाऱ्याचें कूळ व वंश वाढतात. ह्याप्रमाणें श्रद्धापूर्वक करणारा मनुष्य पितरांच्या ऋणांतून मुक्त होतो.'

यानंतर, 'तुला आवड कशाची असून संतोष कशानें होतो,' म्हणून विष्णूला इंद्रानें विचारलें असतां तो म्हणाला, 'ब्राह्मणांची निंदा ऐकणें याची मला मोठी चीड आहे. ब्राह्मणांची पूजा झाली असतां माझी पूजा झाल्याप्रमाणें आहे. नेहमीं ब्राह्मणांना अभिवादन करून पायां पडत असावें. जे गाईच्या पडणाऱ्या शेणांत दिसणाऱ्या चक्राला बलि देतात, त्याचप्रमाणें बटु ब्राह्मण, पाण्यांतून नुकताच वर येऊन नदीकांठचा चिखल डोक्यावर घेणारा डुकर यांचें दर्शन घेतात त्यांच्याठिकाणीं कांहीं पाप म्हणून उरत नाहीं; त्याचप्रमाणें पिंपळ, गोरोचन, गाय यांची जो नेहमीं पूजा करतो त्याला देव, असुर व मनुष्य यांनीं भरलेल्या पृथ्वीची पूजा केल्याचें श्रेय येतें. त्या त्या रूपामध्यें राहून मी ही पूजा घेत असतों. यांची केलेली पूजा जोंपर्यंत सृष्टी कायम आहे तोंपर्यंत मला पोहोंचते. याहून निराळ्या रीतीनें केलेली माझी पूजा मला पसंत नसून ती मी कधीं घेत नसतों. ह्यामध्येंच काय विशेष आहे तें सांगतों ऐक. चक्रानें मीं दैत्य मारले, पायानें पृथ्वी आक्रमण केली, वराहरूपानें हिरण्याक्षाला मारलें, वामनरूप धरून बलीला जिंकलें; म्हणून यानें मी मनुष्यांवर संतुष्ट होतों, व अशा प्रकारें जे माझी पूजा करतात त्यांचा कधीं पराभव होत नाहीं. बटु ब्राह्मण घरीं आला असतां त्याला आधीं खावयास घालून जे बाकी राहिलेलें अन्न खातात, त्यांना अमृत खाल्ल्याचें श्रेय येतें. पहाटेच्या वेळीं सूर्याकडे पाहून उभें राहून नाना तीर्थामध्यें स्नान केलें असतां मनुष्य सर्व पापांपासून मुक्त होतो.' बलदेव ह्मणाले, 'मनुष्याला सुखावह असें धर्मगुह्य सांगतों ऐक. तें न कळल्यानेंच अज्ञानी लोकांना भूतमात्रापासून त्रास होऊन क्लेश सोसावे लागतात. पहाटे उठून गाय, तूप, दहीं, शिरस व प्रियंगू यांना शिवलें असतां मनुष्य सर्वपापांपासून मुक्त होतो. तपोधन ऋषी श्राद्धाचे वेळीं आसपास कोणाला राहूं न देतां उच्छिष्टाशीं संबंध ठेवीत नाहींत.' देव ह्मणाले, 'ताम्रपात्र पाण्यानें भरून घेऊन पूर्वाभिमुख उभें राहून उपास किंवा दुसरें एखादें व्रत यांचा संकल्प केला असतां देवता संतुष्ट होऊन त्याच्या सर्व कामना परिपूर्ण होतात. मूढ लोक विनाकारण याहून निराळ्या रीतीनें हीं पाळतात. उपासाचा संकल्प करतांना किंवा बलि देतांना ताम्रपात्रच विशेष सांगितलें आहे. बलि, भिक्षा, अर्घ्य, पितरांना तिलोदक हीं ताम्रपात्रामध्येंच द्यावींत, दुसऱ्यांत दिलीं असतां त्यांचें फळ कमी आहे.' धर्म ह्मणाला, देव व पितृकार्यामध्यें राजाचा नोकर, देवाची घंटा वाजविणारा, नोकर, गाई राखणारा, उदीम करणारा, गाणारा किंवा दुसरा एखादा धंदा करणारा, मित्रद्रोह करणारा, वेद न पढलेला व शूद्राच्या पोटीं झालेला इतक्यांना कधीं कांहीं देऊं नये. अशांना पिंड देणारे वैभवाला मुकून त्यांचा वंश वाढत नाहीं व त्यांचे पितर संतुष्ट होत नाहींत. ज्यांच्या घरांतून अतिथि हिरमोड होऊन परततो, त्या अतिथीचा सत्कार न केल्यानें पितर, देव व अग्नि तेथून निराश होऊन निघून जातात. स्त्रीहत्या करणारा, गोहत्या करणारा, ब्रह्महत्या करणारा, कृतघ्न, गुरुस्त्रीशीं संबंध करणारा यांच्या तोंडीचें पाप अतिथिसत्कार न केल्यानें लागतें.' अग्नि ह्मणाला, 'जो मूर्ख पाय उगारून गाईला, ब्राह्मणाला, किंवा पेटलेल्या अग्नीला लाथ मारतो, त्याचा दुर्लौकिक आकाशाला जाऊन भिडतो, त्याच्या पितरांना त्याची भीति वाटते. देव फार नाखुष असतात व देव त्यानें दिलेला हवि घेत नाहींत, व शंभर जन्म तो नरकामध्यें कुजत रहातो. याला प्रायश्चित्त ह्मणून कांहीं नाहीं. ह्मणून आपलें हित चिंतणाऱ्या श्रद्धाळू मनुष्यानें ह्यांवर कधीं पाय उचलूं नये.' विश्वामित्र ह्मणाले, 'जो गजच्छायेखालीं दुपारचे वेळीं दक्षिणेकडे तोंड करून बसून भाद्रपद महिन्यांत मघेचा योग असतां पितरांना परमान्न देतो, त्याला चौदा वर्षें प्रत्येक वर्षीं मोठें श्राद्ध केल्याचें पुण्य लागतें.' गाई ह्मणाल्या, 'जो शुद्ध

होऊन, 'बहुले, सुमंगे, अकुतोभये, क्षमा करणारे, मैत्रिणी, वैभवदायिनी, जी तूं पूर्वी इंद्राच्या यज्ञामध्यें आपल्या वांसरासह हजर होतीस व जी तूं विष्णुपदीं व अग्नीच्या वाटेवर आहेस, ज्या तुला नारद व देव सर्वसहा ह्मणतात, ' असें ह्मणून गाईची पूजा करतो, त्याला इंद्रलोक मिळून गाईच्या ठिकाणीं असणारें पुण्य मिळतें व चंद्राप्रमाणें तो कांतिमान होतो. नंतर वसिष्ठप्रमुख ऋषींनीं उठून कमलासन ब्रह्मदेवांला प्रदक्षिणा करून त्यांच्या भोंवतीं हात जोडून उभे राहिल्यावर ब्रह्मवेत्त्यांमध्यें श्रेष्ठ वसिष्ठ यांनीं सर्व भूतमात्रांना हितावह व विशेषेंकरून ब्राह्मण व क्षत्रिय यांना हितावह असा 'द्रव्यहीन, परंतु भल्या मार्गानें जाणाऱ्या दरिद्री लोकांना यज्ञाचें फळ कशानें मिळतें, ' ह्मणून प्रश्न केला. तो ऐकून ब्रह्मदेव ह्मणाले, 'पौष महिन्याच्या शुक्लपक्षांत रोहिणीचा योग असतां जर मनुष्य स्नान करून शुद्ध होऊन एका वस्त्रानिशीं विश्वासपूर्वक व एकाग्रतेनें उघडा पडून सूर्यकिरणें प्राशन करीत राहील तर त्याला महायज्ञ केल्याचें फळ मिळेल.' सूर्य ह्मणाला, 'ओंजळभर पाणी व तूप टाकलेल्या अक्षता या दोन प्रकारचे बलि पौर्णिमेच्या दिवशीं चंद्रबिंबाकडे तोंड करून उभें राहून दिले असतां तिन्ही अग्नींना हवन केल्याचें श्रेय मनुष्याला मिळतें. जो मूर्ख मनुष्य अमावास्येला झाड तोडतो, एवढेंच नव्हे तर त्याचें एक पान तोडतो, त्याला ब्रह्महत्येचें पातक लागतें. जो त्या दिवशीं दांत घांसावयाची काडी चावतो त्याला त्याच्या योगानें चंद्राला चावल्याचें पाप लागतें. पर्वकाळीं अशा मनुष्यानें दिलेला हवि अग्नि घेत नाहीं. त्याचे पितर त्याजवर रागावतात आणि त्याचा वंश व कूळ लयाला पावतात. ' श्री ह्मणाली, 'ज्या घरामध्यें खाण्यापिण्याचीं भांडीं, बैठकी व आंथरुणें अस्ताव्यस्त पडलीं असतात, व बायकांना मार बसतो असें घर देव व पितर कंटाळून सोडतात, व उत्सवाचे वेळीं किंवा पर्वकाळीं अशानें दिलेले बली न घेतां त्या दुष्ट घरांपासून निराश होऊन ते चालते होतात. ' अंगिरा ह्मणाले, 'जो एक वर्षभर हातांत सुवर्चल झाडाची मुळी धरून दिवा घेऊन करंजाच्या झाडाखालीं उभा रहातो त्याची संतति वाढते. ' गार्ग्य ह्मणाले, 'मनुष्यानें नेहमीं अतिथींचा सत्कार करावा. रहाण्याच्या ठिकाणीं दिवा लावून ठेवावा. दिवसां निजूं नये, मांस खाऊं नये, गोब्राह्मणांना पीडा देऊं नये, पुष्करादि तीर्थांचें नामस्मरण करावें, हा श्रेष्ठधर्म असून यापासून चांगले परिणाम घडतात. हजारों यज्ञ केले असतां त्यांत केलेल्या होमाचें पुण्यसुद्धां नाहींसें होतें; पण वर सांगितलेल्या कर्माचें फल नाहींसें होत नाहीं. दुसरें आणखी एक धर्मरहस्य हें आहे कीं, श्राद्धामध्यें, देवकार्यामध्यें, तीर्थकार्यामध्यें किंवा पार्वणविधीमध्यें रजस्वला, कुष्ठ भरलेली व निपुत्रिक अशा स्त्रियांनीं पाहिलेला हवी देव घेत नाहींत, व पितर तेरा वर्षें असा हवी देणाराशीं नाखुष असतात. वरून व आंतून शुद्ध होऊन पांढरें वस्त्र नेसून ब्राह्मणाला बोलावून त्याच्याकडून स्वस्तिवाचन करवावें व भारत ह्मणवावें. याप्रमाणें श्राद्धांत गोष्टी करविल्या असतां अक्षय्य फळ मिळतें. ' धौम्य म्हणाले, 'फुटकीं भांडीं, जुनींपानीं आंथरुणें, कोंबडीं, कुत्रे व घरांत वाढलेलीं झाडें हीं अमंगळ समजलीं आहेत. फुटक्या भांड्यामध्यें प्रत्यक्ष कलीचें ठाणें असून फाटक्यातुटक्या आंथरुणांत अक्काबाई असते. कोंबडें व कुत्रा यांच्या दृष्टी पडलेला हवि देव घेत नाहींत. झाडाखालीं नेहमीं विंचू वगैरे रहातात म्हणून घरामध्यें झाड लावूं नये.' जमदग्नि म्हणाले, 'ज्याचें हृदय शुद्ध नाहीं त्यानें अश्वमेध केला, शंभर वाजपेय यज्ञ केले, उलटें टांगून घेऊन कडक तप केलें तरी त्याचा कांहीं एक उपयोग न होतां त्याला नरकाला जावें लागतें. यज्ञ, सत्यभाषण व अंतःकरणाची शुद्धता हीं तिन्ही सारखीं आहेत. शुद्ध मनानें एक प्रस्थभर सत्तूचें पीठ दिलें असतां ब्रह्मलोक मिळतो; येवढें उदाहरण याला पुरें आहे.' वायु ह्मणाला, 'अग्निकार्य करून परमान्न ब्राह्मणाला खाऊं घालावें. याचप्रमाणें दिवा लावून तिलोदक द्यावें. जो याप्रमाणें विश्वास धरून एकाग्रतेनें करतो त्याला हजारों पशू मारून केलेल्या यज्ञाचें फल मिळतें. याचप्रमाणें दुसरेंही धर्मरहस्य असें आहे कीं, ज्याचा होमाग्नि शूद्रानें पेटवून दिला असतां ज्याला त्यांत कांहीं अधर्म वाटत नाहीं त्याला पाप लागतें. तिन्ही अग्नी त्याच्यावर रागावतात व तो

शूद्रयोनीमध्यें जन्माला जातो. पितर व देव त्याच्याशीं तुष्ट नसतात. आतां याला प्रायश्चित्त असें आहे कीं, गाईचें मूत्र, शेण, दूध, तूप यानीं तीन दिवस निराहार करून अग्नीला होम द्यावा ह्मणजे पुढें एक वर्ष पूर्ण लोटल्यावर देवता हवी घेऊं लागतात, व श्राद्धकाल आला असतां पितरांनाही आनंद होतो. याप्रमाणें स्वर्गेच्छू लोकांना स्वर्गामध्यें सुखदायक धर्माधर्मविचार आहे.'

लोमेश ह्मणाले, 'लग्न न करतां जे दुसऱ्याच्या बायकांच्या ठिकाणींच आसक्त रहातात त्यांचे पितर श्राद्धकालीं निराश असतात, व जो परस्त्रीशीं रत आहे, व वांझेशीं संबंध ठेवतो व जो ब्रह्मस्व हरण करतो या तिघांना सारखेंच पाप लागतें. पितर यांच्याशीं बोलत नाहींत व देवांना आणि पितरांना यांनीं दिलेले हवी गोड वाटत नाहींत; शिवाय आणखी एक धर्मरहस्य असें आहे कीं, गुरूचें वचन श्रद्धापूर्वक पाळावें. दर महिन्याच्या द्वादशीला व पौर्णिमेला ब्राह्मणाला तांदूळ व तूप दिलें असतां त्याच्या योगानें सोम व समुद्र यांना वृद्धि मिळून अश्वमेधाच्या चौथ्या हिश्शाचें फळ इंद्र त्याला देतो. या दानानें मनुष्य वीर्यवान व तेजस्वी होतो. चंद्र याच्यावर संतुष्ट होऊन याला हवें तें देतो; त्याचप्रमाणें आणखी एक लोकांना सुखावह धर्म असा आहे कीं, पहाटे उठून स्नान करून पांढरें वस्त्र नेसून ब्राह्मणाला भांड्यांत तीळ द्यावे, त्याचप्रमाणें पितरांना मधुमिश्रित तिलोदक देऊन दीप व कुसर द्यावे. तिळानें भरलेलें भांडें दिलें असतां तें गोप्रदान, भूमिदान व पुष्कळ दक्षिणा देऊन केलेला अग्निष्टोमयज्ञ यांच्या जोडीचें समजतात. श्राद्धामध्यें तिलोदकानें अक्षय्य पुण्य लागतें, व दिवा व कुसर यांच्या योगानें पितामह संतुष्ट होतात. याप्रमाणें पूर्वी ऋषींच्या लक्षांत आलेला देव व पितर यांना मान्य असा हा विधि आहे.'

यानंतर तेथें जमलेल्या सर्वांनीं सामर्थ्यानें वसिष्ठांच्या तोडीची अशा अरुंधतीला कांहीं धर्मरहस्य सांगण्यास सांगितलें असतां ती म्हणाली, 'तुमच्या स्मरणानेंच माझें तप याप्रमाणें वृद्धि पावलें आहे. तेव्हां तुमच्याच प्रसादानें मला कळतात ते धर्मविचार मी सांगतें. आतां मी सांगणार हे धर्म श्रद्धावान व ज्याचें अंतःकरण शुद्ध आहे अशा मनुष्यानें पाळावे. अश्रद्धावान, मानी, ब्रह्महत्या करणारा व गुरुपत्नीशीं संबंध ठेवणारा यांच्याशीं बोलूं नये, व यांना कांहीं धर्म सांगूं नये. बारा वर्षेंपर्यंत रोजच्या रोज कपिला गाय दान करणारा, महिन्याच्या महिन्यास यज्ञ करणारा, त्याचप्रमाणें सर्वांत श्रेष्ठ अशा पुष्करतीर्थीं लक्ष गाई दान देणारा यांना मिळणारें फळ, ज्याच्यावर अतिथी संतुष्ट आहे त्याच्या तोडीचें नाहीं. तसाच आणखी हा एक धर्म असा आहे कीं, तो त्याच्या सगळ्या रहस्यासकट पाळला असतां मोठा फलदायक होतो. पहाटे उठून कांहीं न खातां गुरांजवळ जाऊन दर्भ घेऊन ते पाण्यांत बुडवून तें गाईच्या शिंगावर शिंपडावें व तें पाणी आपल्या डोक्यावर घ्यावें, ह्मणजे सिद्ध, चारण व महर्षी हे ज्या ठिकाणीं जातात अशा त्रैलोक्यामधील सर्व तीर्थांमध्यें स्नान केल्याचें फळ मिळतें.' हें तिचें भाषण ऐकून सर्वांनीं तिची वहावा केली. यावर यमधर्म ह्मणाला, 'तुमच्या सर्वांच्या तोंडून ह्या चांगल्या कथा मीं ऐकल्या. आतां धर्मरहस्यासंबंधानें चित्रगुप्ताचें मत सांगतों ऐका. केलेलें पुण्य किंवा पाप कांहींच फुकट न जातां पर्वकाळीं श्रद्धापूर्वक केलेलें सर्व सूर्याकडे जाऊन रहातें, व मनुष्य मरून हें जग सोडून गेला असतां सूर्य त्या सर्व कृत्यांना साक्षीभूत राहून ज्याचीं त्याचीं कर्में ज्याला त्याला जोडून देतो. तेव्हां या चित्रगुप्ताला पसंत असलेले कांहीं धर्म सांगतों ऐका. पाणी, दिवा, जोडे, छत्री व कपिला गाय हीं यथाविधि दान करावीं. पुष्करतीर्थामध्यें वेदपारग ब्राह्मणाला कपिला गाय द्यावी. अग्निहोत्र काळजीपूर्वक पाळावें. कालेंकरून प्रत्येक मनुष्याला मरावें लागतें. मूर्ख असतात त्यांना मेल्यावर पितृलोकीं मोठें दुःख सोसावें लागून भूक व तहान यांपासून पीडा सोसावी लागते. मोठ्या त्रासामध्यें त्यांना तेथें कुजत रहावें लागून त्यांतून त्यांची सुटका होत नाहीं. या कोत्या बुद्धीच्या लोकांना गाढ अशा अंधकारांत शिरून चांचपडावें लागतें. याला थोड्या खर्चांत या सर्व संकटांतून पार पाडून मेल्यावर उत्तम फल देणारा उपाय हा आहे. पाणी दिल्याचे फायदे असे आहेत कीं, पितृलोकीं त्यां-

त्यासाठीं पवित्र, गार व अमृतासारख्या पाण्यानें भरलेली नदी तयार राहून तिच्या पाण्याला कधीं खोट पडत नाहीं. पाणी देणाराला तेथें यथेच्छ पाणी पिण्यास मिळतें. दीपदान केल्यानें गाढ अंधकार पहाण्याची त्याला पाळी न येतां चंद्र, सूर्य व अग्नि त्याला संतति देतात, व देव त्यासाठीं सर्व दिशा स्वच्छ ठेवतात. पितृलोकाला गेल्यावर तो सूर्याप्रमाणें झळकत रहातो. वेदपारग ब्राह्मणाला कपिला गाय विशेषेंकरून पुष्करतीर्थाचें ठिकाणीं दिली असतां बैलासह शंभर गाई दिल्याचें फळ मिळतें. एक कपिला गाय दिली असतां शंभर गाईंचें दान केल्याप्रमाणें ब्रह्महत्येसारखीं त्याचीं पापें नाहींशीं होतात. ह्मणून कार्तिकीपौर्णिमेला मनुष्यानें श्रेष्ठ पुष्करतीर्थी कपिला गाय दान द्यावी. जोडा दान करणाऱ्या मनुष्याला कोणतेही संकट किंवा दुःख पहावें लागत नसून त्याच्या मार्गांतील सर्व कांटे दूर होतात. छत्री दान केल्यानें परलोकीं त्याला चांगली सावली मिळते. सत्पात्रीं केलेलें दान कधीं फुकट जात नाहीं. त्याचें चांगलें फळ मिळालेंच पाहिजे.' हें चित्रगुप्तांचें मत ऐकून सूर्याच्या अंगावर हर्षरोमांच उभे राहून तो तेथें जमलेल्यांना ह्मणाला, 'हें चित्रगुप्तांचें मत तुह्मी ऐकलेंच. जे चांगल्या ब्राह्मणांना श्रद्धाळूपणानें दान करतात, त्यांना भीति ह्मणून उरत नाहीं. ब्रह्महत्या करणारा गाय मारणारा, परस्त्रीशीं संबंध ठेवणारा, श्रद्धाहीन व बायकोवर पोट भरणारा हे पांच फार निंद्य प्रकारचे लोक असून त्यांच्याशीं संबंध येऊं देऊं नये. हे दुर्वर्तनी लोक मेल्यावर किड्याप्रमाणें पूरक्तामध्यें कुजत पडतात. देव, पितर, स्नातक ब्राह्मण व दुसरें तपोनिष्ठ लोक या पांचांना टाळतात.'

नंतर देव, पितर व ऋषी हे प्रमथांना ह्मणाले, 'तुह्मी सर्व मोठे भाग्यवान असून अदृश्य रीतीनें रात्रीं फिरतां. जे नीच, अशुद्ध, क्षुद्र व अपवित्र असतात, अशा लोकांनाच तुह्मी कां पीडा देतां? तुमचें सामर्थ्य कशापुढें चालत नाहीं? कशामुळें दुसऱ्यांना तुम्हांला पीडा देतां येत नाहीं? राक्षसांचें कांहीं चालू न देणारीं व घरांमधून तुमचा मज्जाव करणारीं अशीं कर्में कोणतीं?' प्रमथ म्हणाले, 'मैथुनानें लोक अशुद्ध होतात. जे यानंतर स्नानानें शुद्ध होत नाहींत, जे वडिलांना तुच्छ करतात, मूर्खपणानें मांस खातात, झाडाखालीं निजतात, आमिष उशाखालीं घेतात, पायाच्या ठिकाणीं उसें व उशाच्या ठिकाणीं पाय करून निजतात अशांना आह्मी अशुद्ध समजतों. यांच्या ठिकाणीं छिद्रें फार असतात; त्याचप्रमाणें शेंबूड व अमेध्य जे पाण्यांत टाकतात तेही यांच्याच जोडीचे लोक होत. अशा शीलाचे लोक आह्मी मारून खात असतों. अशांवरच आमचा हात पडतो. आतां ज्याच्यायोगानें आह्मांला त्यांवर हात टाकतां येत नाहीं याच्या उलट काय गोष्टी आहेत त्या सांगतों ऐका. ज्या लोकांच्या अंगावर गोरोचनाचे पट्टे आहेत, ज्यांच्या हातांत वेखंड आहेत, जे तूप व अक्षता दान करतात, जे हीं डोक्यावर घेतात व जे मांस खात नाहींत, अशा लोकांना आह्मांला कांहीं पीडा देतां येत नाहीं. ज्यांच्या घरांत रात्रंदिवस होमाग्नि पेटला असतो, जे वाघाचें कातडें व रानकांसव घरीं ठेवतात, ज्यांच्या घरांतून होमाचा धूर निघत असतो व ज्यांच्या घरीं मांजर व बकरा असतो अशा लोकांवर आमचा अंमल चालत नाहीं. अगदीं क्रूर अशा राक्षसांचेंही यांच्यावर कांहीं चालत नाहीं, ह्मणून मनुष्यांनीं अशा प्रकारच्या, राक्षसांना प्रतिबंधक वस्तू घरीं ठेवाव्या.' नंतर दिग्गज ह्मणाले, 'कार्तिकी अष्टमीला आश्लेषांचा विशेष योग असतां, ' बलदेव आणि दुसरे बलशाली, अविनाशी व शाश्वत नागकुलांत झालेले नाग मला माझें बळ व वीर्य वाढविण्यासाठीं, बलि देऊन, पृथ्वी वर काढतेवेळीं नारायणाच्या अंगामध्यें जे सामर्थ्य होतें तें सामर्थ्य देवोत,' असा मंत्र ह्मणून सूर्य अस्ताला चालला असतां एखादें वारुळ पसंत करून त्याठिकाणीं गुळभात बलि द्यावा. या वारुळावर प्रथम करंजाचीं फुलें उधळून त्यावर काळें कापड पसरून त्यावर सुवासिक पदार्थ टाकून मग त्यावर हा बलि द्यावा. ह्मणजे पाताळांत राहून वरच्या लोकांना आधार देणारे प्राणी तृप्त होऊन संतुष्ट होतात. आह्मांलाही ही पृथ्वी धारण करण्याचे श्रम वाटत नाहींत. आ-

झाला जरी ह्या पृथ्वीचा भार सहन करण्यांत क्लेश होतात तरी आह्मी हें स्वार्थबुद्धीनें सांगत नसून लोकांच्या केवळ हितासाठीं सांगतों. चारी वर्णाच्या लोकांनीं हा बलि देण्याचे वेळीं उपास करून हें व्रत पाळलें असतां त्यांना मोठें पुण्य लागतें. याप्रमाणें हा बलि दिल्यानें त्रैलोक्यांत असलेल्या मोठमोठ्या सामर्थ्यवान हत्तींचें शंभर वर्षे आतिथ्य केल्याचें श्रेय येतें.

शंकर ह्मणाले, ' तुह्मीं सर्वांनीं विचार करून हें धर्मांतलें सार काढून सांगितलें आहे. आतां मी एक धर्मातलें गुह्य सांगतों ऐका. ज्यांची बुद्धि धर्माला धरून असून जे श्रद्धावान असतील त्यांनाच हें रहस्य सांगितलें असतां उत्तम फल मिळतें. मन अगदीं स्वस्थ ठेवून मनुष्यानें एक महिनाभर गाईला अन्न देऊन मग स्वतः एकदां जेवून रहावें. गाई मोठ्या पवित्र मानल्या असून सर्वांत अति पूज्य आहेत. त्यांच्याच आधारावर हें त्रैलोक्य आहे. आदरपूर्वक त्यांची पूजा केली असतां मोठें पुण्य लागून उत्तम फळ मिळतें. दररोज गाईला अन्न दिल्यानें रोजच्यारोज त्याचें पुण्य वाढत रहातें. पूर्वी कृतयुगामध्यें ब्रह्मदेवाच्या विनंतीला मान देऊनच माझ्या ध्वजावर मीं बैलाचें निशाण ठेविलें आहे. मी नेहमीं त्यामध्यें रमलेला असतों. त्यांमध्यें फार सामर्थ्य आहे, व उत्तम वर देण्याचें सामर्थ्य त्यांच्या अंगीं आहे. त्यांची पूजा केली असतां ते वर देतात. त्यांना एक दिवससुद्धां अन्न दिल्यानें मनुष्याच्या सर्व आयुष्यामध्यें संचय केलेल्या पुण्याचा चौथा हिस्सा पुण्य लागतें. ' कार्तिकस्वामी ह्मणाले, ' नीलवर्ण बैलाच्या शिंगाला लागलेली माती अंगाला लावून घेऊन तीन दिवस स्नान केलें असतां सर्व पाप धुवून जाऊन परलोकीं स्वामित्व मिळतें, व जोंपर्यंत मनुष्य जन्ममरणाच्या फेऱ्यांत सांपडला असतो तोंपर्यंत हा शूर असा जन्माला येतो. दुसरें आणखी धर्मरहस्य असें आहे कीं, तांब्याच्या भाड्यांत शिजलेलें अन्न मधासकट पौर्णिमेला उगवत्या चंद्राला बलि दिला असतां साध्य, रुद्र, आदित्य, विश्वेदेव, अश्विनीकुमार, मरुत, वसु हे सर्व तो बलि घेतात आणि चंद्राची व समुद्राची वृद्धि होते. ' विष्णु ह्मणाले, ' हीं धर्मरहस्यें जो दररोज श्रद्धापूर्वक एकाग्रतेनें पठण करील, ऐकेल किंवा ऐकवील त्याला कांहीं विघ्नें किंवा भय न उरतां पापाचा पगडा त्यावर बसणार नाहीं. पितर व देव नेहमीं त्याचीं हव्यकव्यें घेतील. तो सर्वमान्य, श्रीमान व धर्मनिष्ठ होऊन महापातकाखेरीज कोणतेंही त्याच्या हातून घडलें असतां तो त्यांतून मुक्त होईल.

---

## २८२ भोज्याभोज्य व प्रायश्चित्तविचार.
## ( १३.१३५–३६ )

युधिष्ठिर ह्मणाला, ' ब्राह्मणादि चारी वर्णांनीं कोणकोणाच्या हातचें खावें व त्याविरुद्ध वर्तन घडलें असतां त्याला प्रायश्चित्त काय आहे ? ' भीष्म ह्मणाले, ' **ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य यांनीं एकमेकांमध्यें अन्नव्यवहार ठेवावा; परंतु वाटेल तें खाणाऱ्या, भलतें काम करणाऱ्या शूद्राच्या हातचें खाऊं नये.** जो शूद्राच्या हातचें खातो तो पृथ्वीचा मळ खातो. एवढेंच नव्हे तर शूद्राचें काम करणारा ब्राह्मण, क्षत्रिय किंवा वैश्य नरकांत पडतो. वेदाध्ययन करून प्राणिमात्रांचें कल्याण चिंतणें हें ब्राह्मणाचें काम असून रक्षण करणें हें क्षत्रियाचें काम आहे. राष्ट्राची संपत्ति वाढविणें हें वैश्याचें काम आहे. आपल्या कर्मांचें फल वांटून देऊन वैश्यानें रहावें. गाई पाळून शेती व उदीम करणें वैश्याला निंद्य समजलें नाहीं. आपलें कर्म सोडून जो शूद्राचें कर्म करील त्याला शूद्रच समजून त्याच्या हातचें खाऊं नये. वैद्य, हत्यारें तयार करणारा, गांवकामगार, पुरोहित व एक वर्षभर भलतें सलतें पढत राहणारा हे सर्व शूद्राच्या माळकेंत जातात. याप्रमाणें या शूद्रकर्म करणाराबरोबर जो निर्लज्ज मनुष्य अभोज्य भोजन करतो, त्याचें कूळ, वीर्य व तेज नाहींसें होऊन क्रियाहीन झाल्यानें तो कुत्र्यासारख्या नीच योनीला जातो. वैद्याच्या घरचें अन्न विष्ठेसारखें समजावें. वेश्येचें अन्न मूत्राप्रमाणें समजावें. व कारागिराचें अन्न रक्ताप्रमाणें समजावें. विद्या विक्रय करून त्यावर राहणाराचें अन्न शूद्राच्या अन्नासारखें समजून तें घेऊं नये. ज्याचा दु-

लौकिक झाला आहे त्याचें अन्न रक्ताप्रमाणें समजावें. चुगलखोर मनुष्याचें अन्न ब्रह्महत्येसारखें समजावें. अनादर किंवा अवमान सोसून कधीं अन्न घेऊं नये; त्याच्यायोगानें अजार जडून कुलाचा क्षय होतो. नगररक्षकाचें अन्न घेऊन मनुष्य नीच चांडाळाच्या जन्माला जातो. ब्रह्महत्या व गोहत्या करणारा, दारूबाज, गुरुपत्नीशीं संबंध ठेवणारा, यांचें अन्न खाऊन मनुष्य राक्षसकुलाला भर टाकतो. ठेव गडप करणारा, कृतघ्न, क्लीब यांचें अन्न खाऊन मध्यदेशच्या पलीकडच्या शबरांच्या मुलुखांत जन्म घेतो.

आतां भलता प्रतिग्रह केला असतांही ब्राह्मण कशानें मुक्त होतो सांगतों ऐक. तूप किंवा तिळ दान घेतलें असतां सावित्री मंत्र ह्मणून अग्नीमध्यें समिधा टाकावी. मांस, मधु किंवा मीठ दान घेतलें असतां सूर्योदयापर्यंत उभें राहून मनुष्य शुद्ध होतो. सोनें, द्रव्य, वस्त्र किंवा स्त्रीदान घेतलें असतां उघड्या हातांत लोखंड घेऊन वेदांत सांगितलेल्या गायत्री जपल्यानें मनुष्य शुद्ध होतो. अन्न, खीर, उंसाचा रस, ऊंस, तेल किंवा दुसरा एखादा पवित्र पदार्थ दान घेऊन दिवसांतून सकाळ, दुपार, संध्याकाळ याप्रमाणें तीनदां स्नान केलें असतां मनुष्य शुद्ध होतो. तांदूळ, फुलें, फळें, पाणी कालविलेलें पीठ, तयार न झालेले जव, दहीं, दूध, मृताबद्दल दिलेले जोडे व छत्री दान घेतलें असतां शंभर सावित्री जपल्यानें मनुष्य शुद्ध होतो. बंदिवास किंवा सुतक यांसंबंधी भूमिदान घेतल्यानें तीन रात्रीं उपास करून मनुष्य शुद्ध होतो. कृष्णपक्षांत पितरांना केलेल्या श्राद्धाला जो बसतो तो रात्रंदिवस उपास केल्यानें शुद्ध होतो. त्यानें संध्या किंवा जप करूं नये किंवा त्यावर दुसरें अन्न घेऊं नये; त्या अन्नाचा दुसऱ्या अन्नाशीं संबंध होऊं देऊं नये. ह्मणूनच पितरांचें श्राद्ध अपराण्ह काळीं सांगितलें असून त्यावेळीं पूर्वी निमंत्रण दिलेल्या ब्राह्मणांना यथास्थित जेवावयास घालावें. मनुष्य मेलेल्याच्या घरीं दुसऱ्या दिवशीं जो अन्न घेतो तो तीनदां स्नान करून बारा दिवस गेल्यावर शुद्ध होऊन ब्राह्मणाला हवि दिल्यानें शुद्ध होतो. जर मनुष्य एखाद्याच्या घरीं कोणी मेला असतां तेथें दहा दिवसांच्या आंत अन्न घेईल तर त्यानें हें वर सांगितलेलें प्रायश्चित्त घेऊन सावित्री ह्मणून रैवतसाम इष्टि करून 'यद्देवा देवहेडनं' इत्यादि पांच अन्वक (कूष्मांड) ह्मणून 'ऋतंच सत्यं' इत्यादि अघमर्षण जप करावा. मेलेल्याच्या घरीं त्रिरात्र अन्न घेतल्यानें दररोज तिनदां याप्रमाणें सात दिवस स्नान करून मनुष्य शुद्ध होतो. शूद्राबरोबर अन्न घेणाऱ्या ब्राह्मणाची अशुद्धता, शुद्धतेचीं प्रायश्चित्तें घेऊन नाहींशी होतात. वैश्याबरोबर अन्न खाणारा ब्राह्मण तीन रात्र होम करून दीक्षा घेऊन शुद्ध होतो. क्षत्रियाबरोबर अन्न घेणारा मनुष्य त्याच वस्त्रानिशीं स्नान करून शुद्ध होतो. एकाच ताटांत जेवल्यानें शूद्राच्या कुळाचा नाश होतो, वैश्याचीं गुरें व बांधव नाश पावतात, क्षत्रिय वैभवाला मुकतो व ब्राह्मणाचें तेज नाहींसें होतें. ह्मणून याबद्दल प्रायश्चित्त घेऊन शांति करून होम करावा व सावित्री जपून रैवती इष्टि करून कूष्मांड व अघमर्षण ह्मणावें. चारी वर्णांच्या पैकीं कोणी जर दुसऱ्याचें उष्टें खाईल तर अंगाला गोरोचन, दर्भ व हळकुंड लाविल्यानें तो त्या पापापासून मुक्त होतो.'

---

## २८३ दानाचें श्रेष्ठत्व व त्याचे प्रकार.
### (१३. १३७–३८)

युधिष्ठिर ह्मणाला, 'दानानें स्वर्गप्राप्ति होते असें ह्मणतात व तपानें ती होते असेंही ह्मणतात. तेव्हां यासंबंधानें माझा संशय दूर करा.' भीष्म ह्मणाले, 'तपानें शुद्ध अंतःकरण करून घेऊन सुद्धां दानानेंच ज्यांनीं उत्तम लोक मिळविले त्यांचीं नांवें सांगतों ऐक. परमपूज्य आत्रेय ऋषी शिष्यांना निर्गुण ब्रह्म उपदेशून उत्तम लोकांना गेले. उशीनरपुत्र शिबी आपल्या आवडत्या मुलाचे प्राण ब्राह्मणाच्या कामीं लावून स्वर्गाला गेला. काशीपति प्रतर्दन ब्राह्मणाला आपला मुलगा देऊन इहपरलोकीं अतुल कीर्ति भोगीत आहे. सांकृतीचा मुलगा रंतिदेव यानें महात्म्या वसिष्ठांना विधिपूर्वक अर्घ्य देऊन उत्तम लोक मिळविले. शंभर उत्तम काड्यांची सोन्याची छत्री ब्राह्मणाला देऊन देवावृध स्वर्गाला गेला. भगवान अंबरीषानें अतुल तेजस्वी ब्रा-

ह्मणाला सर्व राष्ट्र देऊन देवलोक मिळविले. कर्णानें आपलें दिव्य कुंडल,त्याचप्रमाणें जनमेजयानें उत्तम वहान व गाई ब्राह्मणांना देऊन उत्तम लोक मिळविले. राजर्षि वृषादर्भी नाना रत्नें व उत्तम घरें ब्राह्मणांना देऊन स्वर्गाला गेला. विदर्भाचा निमिराजा आपली मुलगी अगस्त्यांना देऊन आपल्या मुलाबाळांसह व गुराढोरांसह स्वर्गाला गेला. परशुरामांनीं ब्राह्मणाला भूमि देऊन त्याच्या इच्छेहून श्रेष्ठ असे अक्षय्य लोक मिळविले. एकवेळ अवर्षण पडलें असतां वसिष्ठांनीं सर्व भूतमात्रांना जगविल्यानें त्यांना कायमची गति मिळाली. दाशरथी रामानें यज्ञामधून पुष्कळ दक्षिणा देऊन अक्षय्य लोक संपादिले. राजर्षि कक्षसेनानें दानरूप ठेव योग्य रीतीनें ठेवून मोठी कीर्ति संपादन केली. करंधमाचा नातु मरुत आंगिरा ऋषींना आपली मुलगी देऊन स्वर्गाला गेला. पांचालांचा धर्मिष्ठ ब्रह्मदत्तराजा शंखऋषींना पुष्कळ पैसा देऊन उत्तम गतीला गेला. मित्रसह राजा आपली आवडती बायको मदयंती वसिष्ठांना देऊन स्वर्गाला गेला. मनूचा मुलगा सुद्युम्न यानें लिखित ऋषींना योग्य दंड करून उत्तम लोक मिळविला. राजर्षी सहस्राचित्य ब्राह्मणासाठीं आपले प्राण देऊन उत्तम लोकाला गेला. शतद्युम्न पाहिजे त्या वस्तूंनीं भरलेलें सोन्याचें घर मौद्गल्यांना देऊन स्वर्गाला गेला. सुमन्यू अन्नाच्या पर्वतासारख्या राशी करून त्या शांडिल्यांना देऊन स्वर्गाला गेला. शाल्वदेशाचा महातेजस्वी द्युतिमान यानें ऋचिकांना राज्य देऊन उत्तम लोक संपादिले. मदिश्वराजा आपल्या सुमध्यमा मुलीला हिरण्यहस्ताला देऊन देवलोकाला गेला. राजर्षि लोमपादानें आपली मुलगी शांता ऋष्यशृंगांना दिल्यानें त्याच्या सर्व इच्छा परिपूर्ण झाल्या. राजर्षि भगीरथानें आपली यशस्वी हंसी नांवाची मुलगी कोत्सांना देऊन अक्षय्य लोक मिळविले. त्याचप्रमाणें राजा भगीरथानें वांसरासकट लक्ष गाई कोहलांना देऊन उत्तम लोक संपादिले. याप्रमाणें हे व दुसरे पुष्कळ, दानानें व तपानें स्वर्गाला गेले असून फिरून फिरून ते या पृथ्वीवर येत असतात. त्यांचा लौकिक व कीर्ति पृथिवी कायम असे तोंपर्यंत राहील. याप्रमाणें हें भल्यांचें चरित्र आहे. तेव्हां तूंही नेहमीं दान, यज्ञ, यांमध्यें गढून राहून धर्माला भर घालण्याकडे तुझी बुद्धि राहूं दे.' युधिष्ठिर ह्मणाला, 'द्यावयाचीं दानें किती प्रकारचीं आहेत? कोणचें दान कोणाला, कशाकरितां द्यावें?' भीष्म ह्मणाले, 'सर्व लोक दान कशाकरितां देतात, तें सांगतों ऐक. धर्मासाठीं, पैशासाठीं, भयानें, कांहीं तरी इच्छेमुळें किंवा कींव येऊन अशीं पांच प्रकारचीं दानें असून तीं पुढील कारणाकरितां देण्यांत येतात. पहिल्या प्रकारचें दान येथें कीर्ति मिळवून मेल्यावर उत्तम सुख मिळावें ह्मणून देण्यांत येतें. दुसऱ्या प्रकारचें, यानें मला दिलें किंवा हा मला देतो किंवा देईल असा विचार करून याचना करणाराला देण्यांत येतें. हा माझा नव्हे, मी याचा नव्हे, याचा अवमान केला असतां हा माझें कांहीं तरी वाईट करील अशा विचारानें मूर्खाला देणें हें तिसऱ्या प्रकारचें दान होय. हा माझा आवडता आहे, मी याचा आवडता आहें असा विचार मनांत आणून मित्राला देण्यांत येतें तें चवथ्या प्रकारचें दान होय. हा गरीब असून तोंड पसरतो आहे, थोडक्यानें देखील याचा संतोष होण्यासारखा आहे. अशा प्रकारचा विचार मनांत आणून दिलें जाणारें दान पांचव्या प्रकारचें होय.'

---

## २८४ उमामहेश्वर संवाद–शंकरांच्या तिसऱ्या डोळ्याच्या उत्पत्तीचें कारण.

### ( १३. १३९–४६ )

युधिष्ठिर ह्मणाला, 'पितामह, आपण मोठे सुज्ञ असून सर्वशास्त्रविशारद आहां. नाना प्रकारचीं शास्त्रें आपल्याला अवगत असल्यानें या आमच्या श्रेष्ठ कुळामध्यें झळकत आहां. ह्मणून भावी सुखदायक अशा धर्मार्थाच्या गोष्टी आपल्या तोंडून ऐकाव्या असें मला फार वाटतें. आतां फिरून लाभणार नाहीं असा काळ जवळ येऊन ठेपला आहे. आपल्यावांचून दुसरा कोणी आह्माला असा उपदेशक मिळावयाचा नाहीं. तेव्हां माझ्यावर व माझ्या भावांवर अनुग्रह करण्यासाठीं सर्व राजांना मान्य असा जो हा श्रीमान नारायण बहुमानपूर्वक प्रेमानें आपल्या सेवेला हजर आहे, त्याच्या व या राजां-

च्या समक्ष आपण आमच्या कल्याणाच्या कांहीं गोष्टी सांगा. ' हें ऐकून प्रेमामुळें अंगावर हर्षरोमांच उभे राहून भीष्म ह्मणाले, ' मी तुला या वासुदेव विष्णूच्याच प्रभावाची पूर्वी ऐकलेली मनोहर गोष्ट सांगतों ऐक. पूर्वी या कृष्णानें बारा वर्षें दीक्षा घेऊन व्रताचरण केलें. तेव्हां नारद, पर्वत, व्यास, धौम्य वगैरे ऋषी आपल्या शिष्यांसह व देवतुल्य सिद्धांसह त्यांकडे गेले असतां त्यांचा आपल्या कुलाला साजेलसा बहुमानपूर्वक यानें मोठा आदरसत्कार केला. हिरव्या रंगाच्या, सोन्याच्या, मोराच्या पिसांच्या त्याचप्रमाणें दुसऱ्या नानाप्रकारच्या नव्या नव्या आसनांवर ते महर्षी बसल्यावर धर्माला धरून कर्णमधुर अशा गोष्टी त्यांच्यामध्यें सुरू झाल्या. तेव्हां श्रीकृष्णानें पाळलेल्या व्रताच्या अग्नीपासून उत्पन्न झालेलें एक तेज त्याच्या तोंडांतून बाहेर पडलें. त्यानें त्या पर्वताला त्यावरील झाडें, लता, झुडपें, पक्षी, हरणें, पशु, साप यांसह जाळून टाकलें. तेव्हां जिकडे तिकडे दीन व भयाण देखावा दिसूं लागून त्या पर्वतावरील प्राण्यांमध्यें एकच हाहाकार उडून गेला. लवकरच तेथें एक सुद्धां प्राणी जिवंत उरला नाहीं. अशा त्या अग्नीनें आपल्या मोठमोठ्या ज्वाळांनीं कांहीं एक बाकी न ठेवतां सर्व जाळून फडशा पाडल्यावर परत येऊन नम्रशिष्याप्रमाणें विष्णूचे पाय धरले. या कृष्णानें तो पर्वत जळून खाक झालेला पाहून त्यावर दयायुक्त दृष्टि फेंकली. त्याच्या योगानें तो फिरून जशाचा तसा झाला. त्यावर प्रफुल्लित झाडें व लता दिसूं लागून पशुपक्ष्यादिकांच्या शब्दांनीं तो फिरून गजबजून राहिला. तेव्हां या अद्भुत चमत्कारानें सर्व ऋषींना आश्चर्य वाटलें. त्यांच्या अंगावर हर्षरोमांच उभे राहून डोळे पाण्यानें भरून आले. याप्रमाणें त्यांना पाहून श्रीकृष्ण ह्मणाला, ‘सर्व रागापासून मुक्त, ममताशून्य व सर्व शास्त्रांमध्यें प्रवीण अशा तुह्मांला आश्चर्य वाटण्याचें कारण काय ? ' तें ऐकून ऋषी ह्मणाले, ' तूंच सर्व उत्पन्न करून सर्वांचा संहार करतोस. हिंवाळा, उन्हाळा, पावसाळा सर्व तूंच आहेस. या पृथ्वीवरील सर्व चराचर भूतमात्रांचा आई, बाप, स्वामी व मूळ तूंच आहेस. तुझ्या तोंडांतून अग्नि कां निघाला हें सांगून आमची भीति दूर कर; ह्मणजे मग आह्मी जें ऐकलें आहे किंवा पाहिलें आहे तें सर्व तुला सांगतों.' श्रीकृष्ण ह्मणाला, 'ह्या युगांतकालीच्या अग्नीसारख्या तेजस्वी, या पर्वताला भाजून टाकणाऱ्या, माझ्या तोंडांतून निघालेल्या वैष्णवाग्नीला पाहून देवतुल्य व तपोधन असे तुह्मी सर्वजण घाबरल्यासारखे दिसतां. व्रत घेऊन त्यांत गढून बसलेल्या माझ्या तोंडांतून निघालेल्या या अग्नीला पाहून तुह्मांला भिण्याचें कारण नाहीं. माझ्या तोडीचा मुलगा मला मिळावा म्हणून व्रताचरणासाठीं मी या पर्वतावर आलों; तेव्हां हा माझा आत्माच अग्नीच्या रूपानें माझ्या तोंडांतून बाहेर पडून याला वर देणाऱ्या ब्रह्मदेवाला भेटण्याला निघून गेला होता. ब्रह्मदेवानें भगवान शंकर आपल्या अर्ध्या तेजानें तुझा मुलगा होईल, असा पूर्वी मला वर दिला होता. तो हा अग्नि ब्रह्मदेवाकडून परत येऊन शिष्याप्रमाणें माझ्या पायांशीं माझ्या सेवेला हजर आहे. हा आपलें तेज टाकून शांत झाला आहे; तेव्हां आतां तुम्हांला याला भिण्याचें कारण नाहीं. तुह्मांला अंतर्ज्ञान असून तुमची गति वाटेल तेथें आहे. तेव्हां स्वर्गांत किंवा पृथ्वीवर जें कांहीं आश्चर्यकारक तुमच्या ऐकण्यांत किंवा पहाण्यांत आलें असेल तें मला सांगा. तुमच्या तोंडून गळणारें वचनामृत सेवन करण्याची मला फार उत्कंठा आहे. आतां मला माझ्या मूळ अप्रतिहत प्रकृतीच्या योगानें जरी या विश्वांतील सर्व कांहीं कळतें किंवा दिसतें तरी भल्यांच्या तोंडून किंवा पुण्यवानांच्या तोंडची विश्वानीसय गोष्ट खडकावर कोरल्याप्रमाणें पृथ्वीवर कायम रहाते, म्हणून तुमच्यासारख्या भल्यांच्या तोंडून कांहीं ऐकावेंसें मला वाटतें. त्याचा चांगला परिणाम झाल्यावांचून कधीं रहाणार नाहीं. ' हें त्याचें भाषण ऐकून ऋषी आनंदभरित होऊन त्याची वाहवा करून, ते हिमालय पर्वतावर तीर्थयात्रेला गेले असतां जी अतर्क्य गोष्ट घडली ती सांगण्याविषयीं त्यांनीं नारदांना सांगितलें; तेव्हां नारद म्हणाले, 'कोणे एकेवेळीं वृषभध्वज महादेव हिमाचलावर कडक तपश्चिर्या करीत होते. मोठमोठे ऋषी त्या ठिकाणीं त्यांचें दर्शन घेऊन त्यांना साष्टांग नमस्कार करून पावन झाले. इतक्यामध्यें त्या ठिकाणीं जिकडे तिकडे

अंधारच अंधार झाला. हिमाचलाची मुलगी त्यांची बायको पार्वती पिशाच्चस्त्रियांना बरोबर घेऊन त्या ठिकाणीं आली. तिचा वेष व व्रतचर्या तिच्या पतीसारखीच होती. तिच्या कमरेला नानातीर्थांतून पाण्यानें भरून आणलेली एक घागर होती. नानाप्रकारचीं सुगंधिक फुलें व सुवासिक भुकण्या उधळीत हलके आपल्या पतीच्या मागें येऊन थट्टेनें आपल्या दोन हातांनीं तिनें शंकराचे डोळे झांकले. त्याबरोबर जिकडे तिकडे अंधार होऊन सर्व चराचर निचेष्ट झाले. होम व वषट्कार बंद पडले. सर्व जग निरुत्साह व भयभीत झालें व जगांतून सूर्यच नाहींसा झाल्यासारखा दिसला, परंतु लवकरच तो सर्वव्यापी अंधकार नाहींसा झाला. महादेवांच्या कपाळापासून एक मोठी दैदीप्यमान ज्वाळा बाहेर पडली. तोच प्रतिसूर्यासारखा तिसरा डोळा होऊन राहिला. तो युगांतकालीं अग्नीसारखा पेट घेऊन त्या पर्वताला जाळून फडशा पाडूं लागला. तें पाहून पार्वती घाबरून त्यांना नमस्कार करून हात जोडून त्यांच्यापुढें उभी राहिली. सर्व झाडें वगैरे जळून खाक होऊं लागलीं असतां पशूंचे कळपच्या कळप घाबरून आश्रयासाठीं शंकरांकडे धांव घेऊं लागले. तेव्हां त्या शंकरांच्या आश्रमाला एक अलौकिक स्वरूप आलें. इकडे तो अग्नि फारच वाढून अगदीं आकाशाला जाऊन भिडला. विजेप्रमाणें लखलखत तो बारा सूर्यांप्रमाणें दिसत होता. हिमाचलाची अशी दशा उडालेली पाहून पार्वती आदरपूर्वक हात जोडून शंकरांच्या पुढें उभी राहिली; तेव्हां स्त्रीस्वभावानुरूप मार्दव तिच्या ठिकाणीं पाहून व आपल्या बापाची उडालेली दैना तिला पहावत नाहींसें पाहून त्यांनीं आपली कृपादृष्टि त्या पर्वतावर फेंकली; त्याबरोबर त्या पर्वताला पूर्वस्वरूप आलें व तो पूर्वीप्रमाणें प्रसन्न दिसूं लागला. तेव्हां, 'आपल्या कपाळावर हा तिसरा डोळा कां उत्पन्न झाला, व या पर्वताचा असा फडशा पाडून फिरून याला पूर्वीसारखा कां केला; म्हणून पार्वतीनें शंकरांना विचारलें,' तेव्हां शंकर म्हणाले, 'तूं अविचारानें माझे डोळे झांकल्यानें जगामध्यें उजेड नाहींसा होऊन जिकडे तिकडे अंधार झाला, तेव्हां प्रजेचें रक्षण व्हावें म्हणून मीं तिसरा डोळा निर्माण केला. त्या डोळ्याच्या तेजानें या पर्वताची ही दशा उडाली; परंतु तुला संतुष्ट करण्यासाठीं मी त्याची पूर्वस्थिति त्याला दिली.' पार्वती म्हणाली, 'आपलीं हीं पूर्व, उत्तर व पश्चिम या तिहींकडचीं तोंडें चंद्राप्रमाणें मनाला आल्हादकारक दिसत असून हें दक्षिणेकडचेंच इतकें भयंकर कां दिसतें? आपल्या ह्या जटा अशा करड्या रंगाच्या व ताठ कां आहेत? व आपला हा गळा मोराच्या पिसाप्रमाणें निळा कां? आपण हातामध्यें नेहमीं पिनाक कशाला घेतलें आहे? जटा वाढवून नेहमीं आपण ब्रह्मचर्यानें कशासाठीं असतां? आपली मी पूर्ण भक्त असून आपल्याप्रमाणेंच धर्माचरण करावें असें माझ्या मनांत असल्यानें आपण या माझ्या प्रश्नांचें उत्तर द्या.'

शंकर म्हणाले, 'पूर्वी ब्रह्मदेवानें सर्व उत्तम उत्तम वस्तूंपासून तिळ तिळ काढून घेऊन तिलोत्तमा नांवाचें स्त्रीरत्न उत्पन्न केलें. ती अप्रतिम रूपवती येथें येऊन मला प्रदक्षिणा घालीत असतां तिनें मला अगदीं मोह पाडल्यामुळें जसजशी ती माझ्या भोंवतीं फिरूं लागली तसतसें तिला पहाण्याच्या आतुरतेनें योगसामर्थ्यानें त्या त्या दिशेला तोंड उत्पन्न करून मी चतुर्मुख झालों. त्यांपैकीं पूर्वेकडच्या तोंडानें मी सर्वांवर स्वामित्व करतों. उत्तरेकडच्या तोंडानें मी तुझ्यासह रममाण होतों, पश्चिमेकडचें माझें सौम्य तोंड सर्व प्राणिमात्रांच्या सुखासाठीं आहे व दक्षिणेकडचें उग्र तोंड सर्व प्राणिमात्रांचा संहार करण्यासाठीं आहे. लोकांच्या हितासाठीं मी जटाधारी व ब्रह्मचारी असा आहें. देवकार्य शेवटास नेण्यासाठीं हें मीं पिनाक हातांत धरलें आहे. माझें वैभव मिळविण्यासाठीं पूर्वी इंद्रानें माझ्यावर वज्र सोडलें, त्याच्या योगानें माझा गळा भाजून निघाल्यामुळें मला नीलकंठत्व आलें.' पार्वती म्हणाली, 'आज इतकीं वाहनें असत, आपण बैलालाच आपलें वाहन कां केलें?' शंकर म्हणाले, पूर्वी ब्रह्मदेवानें दुधाची धार सोडणाऱ्या देवधेनु सुरभीला निर्माण केली. तिच्यापासून अमृततुल्य दूध बाहेर सोडणारीं पुष्कळ वासरें झालीं. त्यांच्या तोंडांतून बाहेर पड-

णारा फेंस माझ्या अंगावर आल्यामुळें रागानें मीं त्यांना भाजून काढलें; तेव्हां त्यांचा वर्ण नाना प्रकारचा झाला. तेव्हां ब्रह्मदेवानें माझें समाधान करून बैल माझ्या वाहनासाठीं मला दिला.' उमा म्हणाली, 'स्वर्गामध्यें सर्व तऱ्हेनें उत्तम अशीं नानाप्रकारचीं राहण्याचीं ठिकाणें आपल्याला असतां तीं सोडून केंस, हाडें, कवटी व आंतडीं ह्यांनीं भरलेल्या, त्याचप्रमाणें पुष्कळ गिधाडें, कोल्हीं यांनीं ठाणें दिलेल्या, शेंकडों चिता पेटून राहिलेल्या, मांस, चरबी व रक्त यांचा चिखल माजून राहून ज्या ठिकाणीं जिकडे तिकडे कोल्ह्यांची कोल्हेकुई उठून राहिली आहे. अशा अमंगळ स्मशानामध्यें आपण सुखांत कां रमला आहां?' शंकर ह्मणाले, 'राहण्यासाठीं पवित्र ठिकाण शोधीत मी सर्व पृथ्वीभर नेहमीं फिरतों आहें तरी स्मशानाहून पवित्र अशी जागा मला अद्यापि सांपडली नाहीं; ह्मणून सर्व ठिकाणांमध्यें वडाच्या छायेखालीं असून तुटक्या मालांनीं ज्याला शोभा आली आहे असें स्मशानच मला आवडतें. शिवाय या माझ्या भूतगणांना स्मशानाचीच आवड असून यांना सोडून रहाणें मल आवडत नाहीं. हें पवित्र ठिकाण स्वर्गाहून मला अधिक प्रिय झालें आहे. ज्यांना पवित्र ठिकाणीं रहावेंसें वाटतें असे लोक रहाण्यासाठीं स्मशानच पसंत करतात.' उमा ह्मणाली, 'धर्माचें लक्षण कशा प्रकारचें आहे, व ज्यांना तें कळत नाहीं त्यांनीं तो कसा आचरावा?' शंकर ह्मणाले, 'अहिंसा, सत्यवचन, सर्व प्राणिमात्रांवर दया, शांति व यथाशक्ति दान हा गृहस्थांचा उत्तम धर्म आहे. परस्त्रीशीं संबंध न ठेवणें, आपल्या ताब्यांत केलेल्या परक्या स्त्रीचें व संपत्तीचें रक्षण करणें, आपल्याला न दिलेली वस्तु न उपटणें, दारू व मांस अजीबात सोडून देणें, हे पांच प्रकारचे धर्म असून परिणामीं सुखदायक असे याचे निरनिराळे पुष्कळ भेद आहेत, ते धार्मिक लोकांनीं लक्षपूर्वक आचरावे. धर्माची उत्पत्ति यांपासून आहे.' पार्वती ह्मणाली, 'चारी वर्णाश्रमांचे धर्म कशा प्रकारचे आहेत, तें मला नीट समजून सांगा.' शंकर ह्मणाले, 'महाभाग्यशाली ब्राह्मण हे पृथ्वीवरील देव असून नेहमीं नियमितपणानें जेवण ठेवणें हा एक त्यांचा नेहमींचा धर्म आहे. धर्मार्थ पाळल्यानें ब्राह्मण ब्रह्मस्वरूपी होण्याला पात्र होतो. योग्य रीतीनें ब्रह्मचर्य पाळणें, त्याचप्रमाणें उपनयन, व्रतें, गुरु व देवता यांचा सत्कार वेदाध्ययन ठेवणें हा त्यांचा धर्मच आहे; त्याचप्रमाणें धर्माचीं रहस्यें ऐकत रहाणें, वेदांत सांगितलेलीं व्रतें पाळणें, अग्निकार्य करणें, गुरूचें काम करणें, भैक्ष्यचर्य घेणें, नेहमीं यज्ञोपवीत धारण करणें, वेदाध्ययन ठेवणें, ब्रह्मचर्याचें कडक व्रत पाळणें, हे ब्राह्मणाचे धर्म आहेत. वेदाध्ययनकाल संपल्यावर ब्राह्मणानें गुरूची आज्ञा घेऊन त्याचें घर सोडून वडलांच्या घराला परत जावें, व आपल्याला अनुरूप अशी बायको पाहून तिच्याशीं लग्न करावें. ब्राह्मणानें शूद्रान्न कधीं घेऊं नये, व नेहमीं सरळ मार्गानें जावें. नेहमीं नियमित आहार व नियमीत स्त्रीसंबंध ठेवावा. घरीं अग्नि ठेवून होम देत राहून आत्मनिग्रह ठेवून वेदाध्ययन करीत असावें. सर्वांना दिल्यावर नंतर नियमित आहार घ्यावा, व नेहमीं सत्य भाषण ठेवून शुद्ध रीतीनें रहावें. अतिथींकडे लक्ष द्यावें, तीन अग्नि ठेवावे, इष्टी कराव्या, व पशूंचे बळी द्यावेत. यज्ञ करणें, त्याचप्रमाणें अहिंसा हेही श्रेष्ठ धर्म सांगितले आहेत. नोकरमाणसें जेवल्यावर मग जेवणें हा श्रोत्रिय अशा गृहस्थाला श्रेष्ठ धर्म सांगितला आहे. नवरा व बायको यांचें शील सारखें असावें. गृहदेवतांना नेहमीं फुलें वाहून बळी द्यावा. घर झाडून सारवून त्याला धूप द्यावा. याप्रमाणें हा जगाचें अस्तित्व कायम ठेवणारा ब्राह्मणांचा धर्म आहे. आतां क्षत्रियांचा धर्म सांगतों ऐक. प्रजेचें पालन करणें हा त्यांचा मुख्य धर्म असून त्याला ठरवून दिलेल्या फलाचा तो उपभोग घेईल तरच धर्म त्याच्या पदरीं पडतो. जो धर्मानें प्रजापालन करतो त्याला त्यामुळें जोडलेले उत्तम लोक मिळतात. आत्मनिग्रह ठेवून वेदाध्ययन करणें, अग्निहोत्र व दान करणें, यज्ञोपवीत धारण करणें व यज्ञ आणि दुसऱ्या धर्मक्रिया करणें हाही त्यांचा धर्म आहे. त्यानें नोकरमाणसांचें पोषण करावें. हातीं घेतलेलें काम सोडूं नये. अपराधाप्रमाणें शासन करावें. तंट्याचा निकाल योग्य लावावा. खरें बोलण्याची नेहमीं आवड

ठेवावी, व संकटांत सांपडलेल्यांना हात द्यावा. गोब्राह्मणांसाठीं पराक्रम गाजवून युद्धांत प्राण देणाऱ्या राजाचा इहपरलोकीं बहुमान होतो, व अश्वमेध करून मिळणारे लोक त्याला मिळतात. पशुपालन, शेती हा वैश्याचा मुख्य धर्म असून अग्निहोत्र, दान, वेदाध्ययन, उदीमगिरी, खऱ्या मार्गाचें अवलंबन करून शांती व आत्मनिग्रह ठेवणें हाही त्याचा धर्म आहे. ब्राह्मणाचें स्वागत करूनत्यांना दान करणें हा वैश्याचा पूर्वापार धर्म आहे. सचोटीनें उदीम करणाऱ्या वैश्यानें तीळ, सुगंधी सामान व पातळ पदार्थ कधींही विकूं नयेत. तिन्ही वर्गांचें त्यांच्या त्यांच्या योग्यतेप्रमाणें यथाशक्ति आतिथ्य करून त्यांची सेवा करणें हा शूद्राचा धर्म आहे. आत्मनिग्रह ठेवून खरें बोलत राहणाऱ्या शूद्राला अतिथीची सेवा करीत राहिल्यानें मोठें तप त्याच्या पदरीं पडतें. चांगलें आचरण ठेवून देवता व द्विज यांची पूजा करीत राहिल्यानें त्याला इष्टफल मिळतें.' पार्वती ह्मणाली, 'चारी वर्णांना हितावह असा धर्म आपण मला सांगितला. आतां चारी वर्णांना सामान्य असा धर्म कोणता तो सांगा,' शंकर ह्मणाले, 'सर्वश्रेष्ठ अशा ब्रह्मदेवानें प्रजेच्या कल्याणाकडे लक्ष देऊन पृथ्वीवरील देवतारूपी ब्राह्मणांना सर्व लोकांना तारण्यासाठीं निर्माण केलें; तेव्हां त्या ब्राम्हणांचा धर्म व त्याचें फळ सांगतों ऐक. ब्रम्हदेवांनीं जगामध्यें धर्म रहाण्यासाठीं तीन धर्म निर्माण केले. त्यांमध्यें वैदिक धर्म सर्वांत श्रेष्ठ आहे. स्मृतींत सांगितलेला धर्म त्याहून कमी असून धार्मिक लोकांच्या आचारावरून ठरविलेला तिसरा धर्म आहे. विद्वान ब्राह्मणानें तीन वेद पढावे, परंतु हें आपल्या उपजीविकेचें साधन करूं नये. दान, अध्ययन, व वेद या तिहींमध्यें गढून राहून काम, क्रोध व लोभ या तिघांना जिंकावें. सर्वांशीं मित्रत्वानें असावें. यजन, याजन, दान, प्रतिग्रह, अध्ययन, अध्यापन हीं सहा ब्राह्मणाच्या उदरनिर्वाहासाठीं सांगितलीं असून त्याच्या योगानें ब्राह्मणाच्या पदरीं मोठें पुण्य पडतें. वेदाध्ययन हें ब्राह्मणाचें कर्तव्य असून यजन हेंही एक कर्तव्यच आहे; त्याचप्रमाणें शक्त्यनुसार दान करणें हेंही त्याचे संबंधानें चांगलेंच म्हटलें आहे. शम हा मोठा धर्म मानला असून भल्यांच्या ठिकाणीं हा नेहमीं दिसून येतो. शुद्ध अशा गृहस्थांचा धर्म बऱ्याच प्रकारचा असतो. पंचयज्ञानें स्वतःला शुद्ध करून घेतलें असून जो खरें बोलणारा आहे, हेवा करीत नाहीं, दान करतो, ब्राम्हणांचा सत्कार करतो, घर झाडून सारवून स्वच्छ ठेवतो, गर्व धरीत नाहीं, व्यवहारामध्यें सरळ असतो. गोड शब्द बोलतो, अतिथी, अभ्यागत यांवर लक्ष ठेवतो आणि कुटुंबांतील माणसें व नोकरचाकर यांच्या मागून जेवतो अशा मनुष्याला मोठें पुण्य लागतें. जो अतिथीला पाद्य, अर्घ्य, आसन, शयन, दिवा व राहण्याला जागा देतो, असा मनुष्य मोठा धार्मिक समजावा. सकाळीं उठून मुखमार्जनादि विधि आटोपल्यावर ब्राह्मणांना जो जेऊं घालून पाठवितो त्याला मोठें पुण्य लागतें. सर्वांसंबंधानें आतिथ्य व धर्मार्थकाम संभाळणें हें गृहस्थाचें मुख्य काम आहे. तीन वर्गांची सेवा हा शूद्राचा मुख्य धर्म सांगितला आहे. गृहस्थांना सर्वभूतमात्रांना हितावह असा प्रवृत्त्यात्मक धर्म सांगितला आहे. यथाशक्ति यानें नेहमीं दान करीत असावें, यज्ञ करावे, व नेहमीं वैभवाला चढविणाऱ्या धार्मिक गोष्टी करीत असाव्या. पैसा धर्मानें मिळवावा, व अशा प्रकारानें मिळविलेल्या पैशाचे तीन भाग करून एक भाग धर्माकडे व एक कामाकडे लावून बाकीचा वाढत ठेवावा. आतां निवृत्तिलक्षणाचा जो दुसरा धर्म आहे तो मोक्षासाठीं सांगितला आहे. तो धर्म पाळणारा सर्व भूतमात्रांच्या ठिकाणीं दया करतो. तो एका गांवांत कधीं रहात नाहीं, व सर्व आशापाश तोडून टाकतो. घर, पाणी, वस्त्र, आसन, त्रिदंड, बिछाना, अग्नि व आश्रयाची जागा या कशावरही तो आसक्ति ठेवीत नाहीं. नेहमीं अध्यात्माकडे लक्ष लावून त्यासंबंधानें तो विचार करीत असतो. योग व सांख्य तत्त्वांसंबंधानें त्याचा विचार चालला असतो. सदां झाडाखालीं, मोकळ्या घरांत, नदीच्या वाळवंटावर पडून राहून नदीतीरच त्याला आवडत असतें. सर्व संगापासून सुटून स्नेहपाश तो बिलकुल ठेवीत नाहीं. तो आपल्याच ठिकाणीं तल्लीन राहून कांहीं न खातां मोक्षमार्गांत सांगितल्याप्रमाणें आचरण ठेवून स्थाणूप्रमाणें असतो. त्याच्या सर्व क्रिया

मुक्तिमार्गाला धरून असून योगाकडे लक्ष देऊन तो फिरत रहातो. एका ठिकाणीं आसक्ति न ठेवतां एका गांवांत कधीं तो रहात नाहीं. सर्व पाशांपासून मोकळा होऊन तो पृथ्वीवर भटकत रहातो, व एकाच वाळवंटावर सुद्धां नेहमीं कधीं पडत नाहीं. हा वेदांत सांगितलेला मोक्षवेत्त्यांचा भला मार्ग आहे. या मार्गाला लागलेल्या मनुष्याचा माग कधींच सांपडत नाहीं. **एकाच झोंपड्यांत पडून रहाणारे ( कुटीचक ), अनेक तीर्थें हिंडणारे ( बहूदक ), हंस व परमहंस असे चार प्रकारचे संन्याशी असून यांपैकीं एक एकाहून दुसरे अधिक उच्च प्रतीचे समजले आहेत.** परमहंसापेक्षां श्रेष्ठ दुसरे कोणीच नाहींत. सुखदुःखापासून मुक्त अशी ही चांगली व शाश्वत स्थिति असून यामध्यें जरामरण ठाऊक नसतें.' उमा ह्मणाली, 'आपण सर्वप्राणिमात्रांना हितावह असा गृहस्थधर्म व मोक्षधर्म सांगितला आतां तपोवनामध्यें रहाणाऱ्या मुनिधर्मासंबंधानें माझा संशय दूर करा.' शंकर ह्मणाले, 'बरें तर, ज्यांच्या योगानें मुनींना सिद्धि मिळते असे ऋषींचे धर्म मुळापासून सांगतों ऐक. पूर्वी ब्रह्मदेव यज्ञामध्यें अमृत प्याला असतां त्याचा फेंस बाहेर पडला तो फेनप नांवाच्या तपस्वी मुनींनीं गोळा करून प्राशन केला, म्हणून यांना फेनप असें नांव पडलें. तसेच वालखिल्य ऋषी आपल्या तपानें सिद्धि मिळवून सूर्यमंडलामध्यें रहात असतात; पक्ष्याप्रमाणें दाणे टिपून उंच्छवृत्तीवर हे रहात असतात; हरणाचें कातडें किंवा झाडाच्या साली अंगावर घेतात. हे तपोधन सुखदुःखादि द्वंद्वापासून मुक्त राहून धर्ममार्गानें वागतात. हे आंगठ्याच्या पेराएवढ्या आकाराचे असून आपापल्या धर्मामध्यें गढून राहून नेहमीं तपाचरण करीत असतात. त्यांच्या तपाचें फल फार मोठें आहे. ते देवांच्या बरोबरीचे असून देवकार्य शेवटास नेण्यामध्यें देवांच्या तोडीचें त्यांच्या अंगांत सामर्थ्य आहे. तपानें सर्व पाप जाळून काढून ते आपल्या तेजानें सर्व दिशा प्रकाशमान करतात. तसेच शुद्ध मनाचे व दयाधर्मामध्यें गढून असणारे चक्रचर नांवाचे दुसरे तपस्वी आहेत. ते पितृलोकाजवळील सोमलोकामध्यें सोमकिरणांवर रहातात. ते उद्यांची तरतूद करून न ठेवतां खलबत्त्याच्या ऐवजीं दोन दगडांचा व उखळाच्या ऐवजीं दातांचा उपयोग करतात. तसेच सोमप त्याचप्रमाणें उष्मप आपल्या बायकांसह देवांच्या जवळ आत्मनिग्रह ठेऊन उंच्छवृत्तीवर रहात असतात. अग्नीला आहुति देऊन यथायोग्य पितरांचा सत्कार करतात. त्याचप्रमाणें ते पंचमहायज्ञ करीत असून यजन हाच ते आपला मोठा धर्म समजतात. याप्रमाणें हा मुनींचा धर्म असून यासर्वांमध्यें इंद्रियनिग्रह व आत्मज्ञान मुख्य सांगितलें असून कामक्रोधांना अगदीं जिंकले पाहिजेत. उंच्छवृत्तीनें मिळविलेल्या वस्तूनें अग्नीमध्यें आहुति देणें, रात्रीं यज्ञासाठीं आसन ठोकून बसणें, सोमयज्ञ करणें, विशेषज्ञान संपादणें, व यज्ञदक्षिणा देणें हे पांच धर्म यांना सांगितले आहेत. त्याचप्रमाणें नेहमीं यज्ञ करून देव व पितर यांची पूजा करावी व सर्वांचें आतिथ्य करावें. गाईच्या दुधापासून तयार केलेले मिष्ट आहार सोडून यावे. यानें चित्ताच्या शांत वृत्तीमध्येंच आनंद मानून घेऊन वनस्पती, झाडांचीं पानें, फलमूलें, पाणी किंवा शेवाळें यांवर राहून योगाकडे लक्ष देऊन खडकावर किंवा जमिनीवर पडून रहावें. दुसऱ्याच्या घरांतला धूर बंद होऊन मुसळ कोंपऱ्याला गेल्यावर व विस्तव विझून घरांतील माणसांचें जेवण वगैरे होऊन भांडीं इकडून तिकडे फिरेनाशीं झाल्यावर जें कांहीं मिळेल, त्यावर अशा शमपर मनुष्यानें रहावें. असें राहिल्यानेंच मुनिधर्म पाळल्याचें त्याला श्रेय येतें. त्यानें अभिमानी, गर्विष्ठ, निरानंद व असंतोषी असूं नये, व वाटेल तें पाहून आश्चर्य करूं नये. मित्र व शत्रू यांच्याशीं सारखेपणानें असून सर्व प्राणिमात्रांशीं स्नेहभावानें असावें.' उमा ह्मणाली, 'रम्य अशा प्रदेशांतून, नदीच्या उगमाजवळ व ओहोळांच्या आजूबाजूला असणाऱ्या लतामंडपांमधून त्याचप्रमाणें पर्वत, वनें व तीर्थें इत्यादि ठिकाणीं एकाग्रतेनें कडकडीत नियम पाळून पवित्र अशा फलमूलांवर आपल्या अंगमेहनतीनें उपजीविका करून रहाणारे जे वानप्रस्थ त्यांचे विधी काय आहेत हें ऐकण्याची माझी इच्छा आहे.' शंकर ह्मणाले, वनामध्यें राहून कड-

क नियमानें सिद्धि मिळविलेल्या वानप्रस्थांनीं कसें रहावें सांगतों ऐक. त्यांनीं त्रिकाल स्नान करून देवता व पितर यांचें अर्चन करावें, अग्निहोत्र, इष्टि वगैरे कराव्या, सांवा व फलमूलें गोळा करावीं,इंगुदीच्या व एरंडाच्या तेलाचा उपयोग करावा, योगसाधन करून त्यांत सिद्धि मिळवून कामक्रोधांपासून दूर असावें, वीरासन घालावें, भित्र्यांचा ज्या ठिकाणीं शिरकाव होणार नाहीं असें स्थान रहाण्याला पहावें, उन्हाळ्यामध्यें डोक्यावर सूर्य व चार बाजूंला विस्तव ठेवून उन्हांत तळपत योगसाधन करीत रहावें, त्याचप्रमाणें वीरासन घालून मंडूक योगसाधन करीत धर्माकडे मन लावून उघड्या जमिनीवर थंडीवाऱ्याला तोंड देऊन पडून रहावें. त्यांनीं पाणी, वारा किंवा शेवाळें यांवर रहावें. उखळाच्या ऐवजीं दोन दगडांचा किंवा दांतांचा उपयोग करावा. घरामध्यें सांठा करून ठेवूं नयेः चिंध्या, वल्कलें किंवा हरणाचें कातडें अंगावर घ्यावें. याप्रमाणें नियमांत काल काढीत एखाद्या शिष्याला गुरु मिळाल्याप्रमाणें अरण्यामध्यें आदरून त्यानें रहावें. होम करणें व पंचाग्नि ठेवून त्यांचा वेदांत सांगितल्याप्रमाणें तो तो काल साधणें व आठांपर्यंत असणारे दुसरे यज्ञ, तसेंच चातुर्मास्य पौर्णिमास्य, वगैरे यज्ञ करणें, हा त्यांचा धर्म आहे; त्याचप्रमाणें यांनीं बायकोशीं संबंध ठेवूं नये, सर्वसंग सोडून द्यावा व पापापासून अलिप्त असावें. स्रुक् व जलपात्र हींच काय ती त्यांची दौलत असावी. तीन अग्नींकडे त्यानें लक्ष द्यावें. वर्तन चोख ठेवून धर्ममार्गाकडे मन लावल्यानें त्याला उत्तम गति मिळते. सत्यधर्मानें राहून सिद्धि मिळविलेल्या ह्यांना ब्रह्मलोक किंवा शाश्वत चंद्रलोक मिळतात. असा हा वानप्रस्थधर्म असून याचा विस्तार पुष्कळ प्रकारांनीं आहे.' उमा ह्मणाली, 'वनामध्यें राहून ज्ञानविषयामध्यें सिद्धि मिळविलेल्या मुनींपैकीं कांहीं बायका न करितां स्वच्छंद रीतीनें वागणारे असतात व कांहीं बायका करून असतात; तर त्यांचा धर्म कशा प्रकारचा आहे हें मला थोडक्यांत सांगा.' शंकर ह्मणाले, 'स्वच्छंद रीतीनें वनांत फिरणाऱ्यांचें लक्षण, मुंडन करून काषायवस्त्र धारण करणें हें आहे, व बायका करून रहाणाऱ्यांनीं दिवसा वाटेल तेथें फिरलें तरी रात्रीं रहाण्याला घरीं यावें. त्रिकाल स्नान दोन्ही वर्गांना सांगितलें असून वन्यफलादिकांनीं होम करणें हें बायका करून रहाणाऱ्यासाठीं आहे; त्याचप्रमाणें योगामध्यें गढून रहाणें, चांगल्या ह्मणून सांगितलेल्या कांहीं गोष्टी करणें हा त्यांचा धर्म आहे. त्याचप्रमाणें पूर्वीं वानप्रस्थाला ह्मणून जे धर्म सांगितले तेही यांनीं पाळावे. हे धर्म पाळल्यानें कडक तप आचरल्याचें फल त्यांना मिळतें. बायका करून रहाणाऱ्या मुनींनीं केवळ आपल्या बायकोशीं व तोही ऋतुकालीं संबंध ठेवावा. धर्मार्जनाकडे लक्ष देऊन केवळ लहरीनें कोणत्याही इंद्रियविषयाकडे त्यांनीं लक्ष लावूं नये. जो मनुष्य सर्वप्राणिमात्रांना अभयदक्षिणा देतो, हिंसा ह्मणून करीत नाहीं, सर्वांची कींव करून सर्वांशीं सरळपणानें रहातो, व सर्वांना आपल्या सारखें लेखतो तोच धर्म जोडतो. सर्ववेदांमध्यें स्नान करणें व सर्वभूतमात्रांशीं सरळपणानें वागणें हीं दोन्ही सारखींच समजलीं आहेत. प्रसंगविशेषीं सरळपणाच श्रेष्ठ ठरेल. सरळपणानें वागणें हा धर्म असून वांकडेपणान वागणें हा अधर्म आहे. जो सरळपणानें वागतो त्याला धर्मलाभ होऊन देवांचें सान्निध्य मिळतें. क्षमाशील, आत्मनिग्रही, क्रोधहीन, हिंसा न करणारा मूर्तिमान धर्म बनून अशा मनुष्यालाच धर्म जोडतो. आळस टाकून जो यथाशक्ति भल्या मार्गानें जातो व वर्तन चोख ठेवतो असा ज्ञानी मनुष्यच ब्रह्मस्वरूपी होण्याला पात्र होतो.' उमा म्हणाली, 'आपापल्या आश्रमाला चिकटून रहाणारे तपोधन तापस कोणत्या प्रकारानें वागल्यानें झळकतात, त्याचप्रमाणें निर्धन किंवा धनवान असे राजे व राजपुत्र यांना महाफल कशानें मिळतें, व यांना कायमचें स्थान मिळून यांच्या हातांना दिव्य चंदन कशानें चोपडलें जातें, यासंबंधानें आपण मला माहिती सांगा.' शंकर म्हणाले, 'उपवासव्रत पाळून आत्मनिग्रहानें जे हिंसा करीत नाहींत व सत्य भाषण ठेवतात अशा प्रकारचे सिद्धि मिळविलेले लोक मेल्यावर खुशाल गंधर्वांसह आनंदांत रहातात. यथाशास्त्र मंडूकयोग धरून जो दीक्षा पाळतो तो नागाबरोबर आनंदांत रहातो. हरणाच्या तोंडांतून गळलेलें उष्टें गवत जो त्यांबरोबर खाऊन आनंदानें रहातो तो

अमरावतीला जातो. शेवाळ किंवा गळून पडलेलीं पानें खाऊन जो कडक थंडी सोसून रहातो त्याला उत्तम गति मिळते. वाऱ्यावर, पाण्यावर किंवा फलमूलांवर रहाणाराला यक्षांचें ऐश्वर्य मिळून अप्सरांच्या सहवासांत तो आनंदांत रहातो. बारावर्षेंपर्यंत शास्त्रांत सांगितल्याप्रमाणें अग्निसाधन करून मनुष्य राजा होतो. बारा वर्षेंपर्यंत खाण्याचा त्याचप्रमाणें पाणी व वारा यांचा नियम पाळून सुद्धां तो राजा होतो. उघड्या जमिनीवर राहण्याचें फळ उत्तम उत्तम वहानें, बिछानें, मौल्यवान व चंद्रासारखीं उत्तम उत्तम पांढरीं शुभ्र घरें मिळतात. आपल्या स्वतःच्या श्रमावर मिळविल्यावर बेताचा आहार ठेवून जो रहातो किंवा कांहीं न खातांना जो देह ठेवतो त्यालाच स्वर्ग मिळतो. बारा वर्षें आपण मिळविलेल्यावर उदरनिर्वाह करून समुद्रामध्यें जो देह ठेवतो त्याला वरुणाचे लोक मिळतात. बारा वर्षें आपल्या मिळकतीवर उदरनिर्वाह करून जो दगडानें आपले पाय फोडून घेतो तो गुह्यकांमध्यें सुखांत रहातो. जो स्वतःच्या श्रमानें आत्म्याची ओळख पटवून घेतो व बायका वगैरे लटांबरांतून मोकळा होऊन सुखदुःखादिद्वंद्वापासून मुक्त असतो असा मनुष्य बारा वर्षेंपर्यंत मनाप्रमाणें दीक्षा पाळून स्वर्गलोकाला जातो व तेथें देवांबरोबर आनंदांत रहातो. बारावर्षेंपर्यंत आपल्या श्रमाच्या मिळकतीवर राहून अग्नीमध्यें देह ठेविल्यानें मनुष्याला अग्निलोक मिळून त्या ठिकाणीं त्याचा बहुमान होतो. ममता सोडून आत्म्याकडे लक्ष लावून धर्माकडे दृष्टि देऊन बारा वर्षें काढल्यावर जो झाडाला अरणी बांधून वीरमार्ग घेऊन वनांत चालता होतो व वीरासनामध्यें गढून उघड्या जमिनीवर पडून असतो, त्याला वीराला मिळणारी गति मिळून इंद्रलोकाला गेल्यावर त्याच्या सर्व कामना पूर्ण होतात व दिव्य पुष्प व चंदन यांचा त्याला लाभ मिळून तो देवांमध्यें सुखांत रहातो. वीरयोग घेऊन सर्व त्याग करून इंद्रियनिग्रहानें शरीर व मन यांची शुद्धि ठेवून सत्वमार्गानें रहाणाऱ्याला वीरगति मिळून शाश्वतसुखाचे लोक मिळतात. वाटेल तेथें संचार करणाऱ्या विमानांत बसून चांगल्या चांगल्या लोकांमधून वाटेल तसा तो फिरत रहातो. सर्व संकटांतून मुक्त होऊन इंद्रलोकांमध्यें तो आनंदांत रहातो.' उमा म्हणाली, 'पूर्वीं ब्रह्मदेवांनीं चार वर्ण निर्माण केले, असें असून कोणत्या दुष्कर्माच्या योगानें वैश्य शूद्रत्वाला जातो, क्षत्रिय वैश्यत्वाला जातो किंवा ब्राह्मण क्षत्रियत्वाला जातो व ही अधोगति कशानें टाळतां येईल? कोणत्या कर्मानें क्षत्रियाला किंवा ब्राह्मणाला पुढच्या जन्मीं शूद्रत्व येतें, त्याचप्रमाणें क्षत्रिय, वैश्य व शूद्र हे स्वाभाविकपणें ब्राह्मणत्वाला कशाच्या योगानें चढतात?' शंकर म्हणाले, 'ब्राह्मणत्व मिळणें फार कठीण असून केवळ जन्मानेंच त्याला ब्राह्मणत्व येतें; त्याचप्रमाणें क्षत्रिय, वैश्य व शूद्र ह्या योनीही जन्मानेंच येतात. उच्चवर्ण मिळून दुष्कर्माच्या योगानें मनुष्य त्या पदापासून भ्रष्ट होतो. ह्मणून द्विजानें मिळालेलें पद मोठ्या खबरदारीनें संभाळावें. जो क्षत्रिय किंवा वैश्य ब्राह्मणधर्मानें राहून ब्राह्मणाप्रमाणें उदरनिर्वाह करतो तो पुढील जन्मीं ब्राह्मण होतो; त्याचप्रमाणें जो ब्राह्मण ब्राह्मणधर्म सोडून क्षत्रियधर्म स्वीकारतो तो पुढील जन्मीं क्षत्रिययोनीमध्यें जन्माला जातो व जो लोभ, मोह यांच्या तावडींत जाऊन वैश्य धर्म आचरतो तो वैश्य जन्माला जातो. त्याचप्रमाणें वैश्यानें शूद्रधर्म आचरला असतां तो शूद्रयोनीला जातो. स्वधर्म सोडून शूद्राचें काम करणारा ब्राह्मण आपल्या वर्णापासून भ्रष्ट होऊन शूद्र होऊन ब्रह्मलोकाला मुकतो, व नरकाला जाऊन पुढें शूद्रयोनींत जन्माला जातो. हीच गोष्ट क्षत्रियाला व वैश्यालाही लागू आहे. ज्या शुद्धशील मनुष्याला स्वधर्मानें वागून उत्तम ज्ञान झालें आहे, अशा स्वधर्मामध्यें गढून असणाऱ्या मनुष्याला धर्माचें फळ मिळतें. या विषयावर प्रत्यक्ष ब्रह्मदेवाचे उद्गार असे आहेत. धर्माची इच्छा धरून असणारे भले लोक नेहमीं अध्यात्माकडे लक्ष देतात. उग्र व क्रूर अशा मनुष्याच्यापासून मिळालेलें, त्याचप्रमाणें पुष्कळांसाठीं किंवा श्राद्धासाठीं शिजविलेलें, नानाकारणांनीं दूषित झालेलें, व शूद्राच्या हातचें अन्न निंद्य समजलें असून तें कधीं खाऊं नये. अग्नि ठेवून असणारा किंवा यजन करणारा ब्राह्मण शूद्राच्या पोटांत ठेवून घेऊन जर मरेल तर त्या पोटांत राहिलेल्या शूद्रान्नाच्या योगानें ब्राह्मण-

दाला मुकून तो खात्रीनें पुढच्या जन्मीं शूद्र होतो. ज्याच्या अन्नावर राहून तें अन्न पोटांत असतांना ब्राह्मण मरतो त्या त्या योनीमध्यें तो जन्माला जातो. दुर्लभ असें चांगलें ब्राह्मणत्व मिळून त्याकडे दुर्लक्ष करून जो भलतें सलतें अन्न खातो तो ब्राह्मणत्वापासून भ्रष्ट होतो. जो मनुष्य दारू पितो, ब्रह्महत्या करतो, हलकट वर्तन ठेवतो, चोरी करतो, व्रत मोडतो, अमंगळ रहातो, वेद सोडून देतो, पापी वर्तन ठेवतो, लोभ धरतो, लुच्चेगिरी व फसवाफसवी करतो, व्रतें पाळीत नाहीं, शूद्रस्त्रीशीं लग्न करतो, कुंटणगिरीवर पोट भरतो, सोम विकून पोट भरतो, हलक्याची सेवा करतो, गुरुपत्नीशीं संबंध ठेवतो, गुरूचा द्रोह करून त्याच्या निंदेमध्यें गढला रहातो, असा ब्राह्मण ब्रह्मवेत्ता असला तरी ब्राह्मणयोनीपासून भ्रष्ट होतो. शूद्राचीं सर्व कामें शास्त्रांत सांगितल्याप्रमाणें बरोबर करून त्याच्याहून उच्च वर्णाची सेवा जवळ राहून मोठ्या दक्षतेनें मनांत कांहीं वाईट न वाटतां जो शूद्र करतो व नेहमीं भल्या मार्गानें राहून देव, ब्राह्मण, अतिथी यांचा सत्कार करतो, इंद्रियनिग्रहानें मिताहार ठेवून ऋतुकालीं स्त्रीशीं संबंध ठेवतो, स्वतः चोख वर्तन ठेवून चोख वर्तन असलेल्या लोकांच्या मागून असतो, जो दुसऱ्याला देऊन राहिलेलें अन्न खातो व पोटाकरितां ह्मणून मांस शिजवीत नाहीं, असा शूद्र वैश्य जन्माला जाऊन पुढें क्रमाक्रमानें अशाच चोख वर्तनानें ब्राह्मणत्वाला पोहोंचतो; त्याचप्रमाणें जो वैश्य सत्य भाषण ठेवून अहंकार सोडून देतो. सुखदुःखादि द्वंद्वाची पर्वा करीत नाहीं, शम ह्मणजे काय हें पूर्णपणें ओळखतो, नित्य यज्ञ करून वेदाध्ययनामध्यें गढून असतो, शुचिर्भूतपणानें आत्मनिग्रह ठेवून ब्राह्मणांचा सत्कार करतो व सर्व वर्णांचें कल्याण पहातो, गृहस्थ धर्म पाळून दोनदां अवशिष्ट राहिलेलें अन्न खाऊन त्यांत सुद्धा बेत ठेवतो, निष्काम राहून अग्निहोत्र पाळून त्यामध्यें यथाविधि आहुति देतो, सर्वांचें आतिथ्य करतो व त्रिकाल अग्नि ठेवून त्याची समंत्रक अर्चा करतो, तो क्रमानें क्षत्रियकुळांत जन्म घेऊन पुढें ब्राह्मणत्वाला जाऊन मिळतो. असा वैश्य क्षत्रिय झाल्यावर जन्मापासून संस्कार मिळून उपनयन, व्रत वगैरे पाळून सत्कार पावून पुढें ब्राह्मण होतो. यानें दान व यज्ञ करून त्यामध्यें पुष्कळ दक्षिणा द्यावी, वेदाध्ययन करून त्रिकाल अग्नि ठेवावा, संकटांत पडलेल्यांना हात देऊन प्रजेचें धर्मानें पालन करावें, खरेपणा ठेवून सरळ मार्गानें असावें, न्यायानें शासन करून शासन मुळीं न करतां राहूं नये; त्याचप्रमाणें लोकांना धर्मानें वागण्याला सांगत राहून राजनीतीनें बांधला गेल्यामुळें प्रजेपासून सहावा हिस्सा कर घ्यावा. नीतितत्त्वें लक्षांत ठेवून मनाला वाटेल त्या विषयांत गढून राहूं नये. ऋतुकालीं स्त्रीशीं संबंध ठेवून नेहमीं आहार नियामित ठेवावा, व वेदाध्ययनामध्यें गढून असावें. नेहमीं होमशाळेमध्यें दर्भासनावर निजावें, तिन्ही वर्णांपैकीं सर्वांचें प्रसन्न मनानें आतिथ्य करावें, शूद्र अन्न मागावयास आला असतां नेहमीं तयार आहे म्हणून सांगावें, पैशासाठीं किंवा कोणत्याही हेतूनें एखाद्या गोष्टीवर नजर ठेवूं नये. पितर, देव अतिथी यांच्या संबंधानें नेहमीं साधन करीत रहावें, आपल्या घरीं भैक्ष्यचर्या पाळून राहून त्रिकाल यथाविधि अग्नीला आहुती द्यावी. गोब्राह्मणांच्या हितासाठीं रणांत शत्रूला तोंड देऊन मरावें किंवा समंत्रक तयार केलेल्या त्रेताग्नीमध्यें शिरावें. याप्रमाणें वागल्यानें क्षत्रिय ब्राह्मण होतो. ज्ञानविज्ञानसंपन्न, संस्कार मिळालेला व वेदपारग असा, धर्मानें वागणारा क्षत्रिय आपल्या कर्मानें ब्राह्मण होतो. याप्रमाणें कर्में करून हलक्या कुळांत जन्मलेला शूद्र असला तरी देखील संस्कार मिळून वेदसंपन्न होऊन ब्राह्मण होतो; त्याचप्रमाणें ब्राह्मण भलतें वर्तन ठेवून वाटेल त्याच्या हातचें खाईल तर तो ब्राह्मणत्वाला मुकून शूद्र होतो. चोख अशा कर्मांनीं अंतःकरण शुद्ध व इंद्रियें स्वाधीन ठेवून शूद्र ब्राह्मण होतो असें प्रत्यक्ष ब्रह्मदेवाचें म्हणणें आहे. चांगला स्वभाव व कर्म ज्या शूद्राच्या ठिकाणीं दिसून येईल तो ब्राह्मणापेक्षा विशेष समजावा. जन्म, संस्कार, वेद किंवा संतति हे ब्राह्मणत्वाला कारण नसून एक चोखवर्तनच त्याला कारण आहे. या जगामध्यें वर्तनानेंच मनुष्य ब्राह्मण बनतो. चोख वर्तनानें रहाणारा शूद्र असला तरी ब्राह्मणत्वाला मिळतो. सर्वांवर समबुद्धि हा ब्रह्माचा स्वभाव आहे; तेव्हां निर्गुण व निर्मल ब्रह्म

ज्या ठिकाणीं दिसून येईल तोच ब्राह्मण. जन्मामुळें जे चार भेद दिसून येतात हे केवळ वर्गीकरणाकरतां असून याहून विशेष कांहींच याचा उपयोग नाहीं. असें सृष्टि उत्पन्न करतांना प्रत्यक्ष ब्रह्मदेवाचें ह्मणआहे. ब्राह्मण हा ह्या जगामध्यें पाय असलेलें मोठें फिरतें शेत आहे. या शेतामध्यें जें बीं पेरावें तसें मेल्यावर पीक हातीं येतें. कल्याणेच्छूनें नेहमीं भल्या मार्गानें राहून दुसऱ्याला देऊन राहिलेलें अन्न खावें, व ब्राह्ममार्ग सोडून राहूं नये. संहिता पढून घरीं गृहयज्ञ करीत असावें. नेहमीं अध्ययन ठेवावें; परंतु त्यावर पोट कधीं भरूं नये. याप्रमाणें अग्नि ठेवून वेदाध्ययन करीत राहून भल्या मार्गानें जाणारा ब्राह्मण ब्रह्मस्वरूप होण्याला पात्र होतो. ब्राह्मणत्व मिळालें असतां भलत्यासलतीशीं संबंध न ठेवतां, भलतेंसलतें दान न घेतां व अशा प्रकारचीं दुसरीं वरीं वाईट कामें न करतां तें मोठ्या खबरदारीनें राखलें पाहिजे.' उमा म्हणाली, 'कर्मानें, मनानें किंवा शब्दानें अशा तीन गोष्टींमुळें मनुष्य पाशांत सांपडतो किंवा त्यांतून सुटतो; तेव्हां कशा प्रकारचें शील, वर्तन, कर्म किंवा व्यवहार ठेवल्यानें लोक स्वर्गाला जातात?' शंकर म्हणाले, 'सर्वप्राण्यांच्या हितासंबंधाच्या या तुझ्या प्रश्नाचें उत्तर देतों ऐक. जे भले लोक वर्णाश्रमाची निशाणी बाळगण्याच्या भानगडींत न पडतां सत्य धर्मानें वागून धर्मानें मिळालेल्या पैशाचा उपभोग घेतात, ते स्वर्गाला जातात. ज्यांच्या मनांतला संशय दूर झाला आहे, त्यांना धर्म किंवा अधर्म कांहींच उरत नाहीं. प्रलय व उत्पत्ति यांचें तत्व कळलें असून ज्यांना सर्व कांहीं कळलें आहे, किंवा सर्व कांहीं दिसतें आहे, व ज्यांची कशावर आसक्ति राहिली नसते असे लोक कर्मपाशांतून सुटतात. जे हावानें, मनानें किंवा वाणीनें कोणाला दुखवीत नाहींत, व कशावरच आसक्ति ठेवीत नाहींत, कोणाचा जीव घेत नाहींत शील चोख ठेवून सर्वांवर दया करतात, मित्र व शत्रु ज्यांना सारखेच वाटतात, व ज्यावर सर्व प्राणिमात्रांचा विश्वास बसतो, दुसऱ्यांच्या पैशावर किंवा बायकांवर जे लक्ष देत नाहींत, धर्मानें मिळेल तेंच खाऊन रहातात, दुसऱ्याच्या बायकांशीं आपल्या आई, बहिणी किंवा मुली यांप्रमाणें वर्तन ठेवतात, चोरी ह्मणून स्वप्नांत माहित नसून आपल्या जवळच्या पैशावर जे संतुष्ट असतात, आपल्या नशिबावर जे पोट भरतात, आपल्या बायकोशीं व तीही ऋतुकालीं जे संबंध ठेवतात, ग्राम्यसुखें जे घेत नाहींत, व जे दुसऱ्यांच्या बायकांकडे पहात सुद्धां नाहींत. असे इंद्रियनिग्रही व शीलसंपन्न लोक स्वर्गाला जातात. हा देवांनीं रेखून दिलेला मार्ग असून सर्वांनीं हा घ्यावा. रागद्वेषादिकांना याठिकाणीं जागा नसून शहाण्यांना हा घेण्याजोगा आहे. दान, धर्म, तप, शील, शुचिर्भूतता, दया इत्यादिकांनीं हा भरला असून चोख वर्तन रहावें किंवा धर्म पदरीं पडावा ह्मणून हा लोकांनीं घ्यावा. ज्यांना स्वर्गाची इच्छा आहे त्यांनीं याहून निराळा मार्ग कधीं घेऊं नये.' पार्वती ह्मणाली, 'कशा प्रकारच्या शब्दानें मनुष्य बांधला जातो व कशानें मुक्त होतो?' शंकर ह्मणाले, 'आपल्यासाठीं किंवा दुसऱ्यासाठीं, थट्टेत किंवा हासें पिकविण्यासाठीं, पोट भरण्यासाठीं किंवा धर्म पदरीं पडावा ह्मणून किंवा दुसऱ्या कांहीं हेतूनें जे खोटें बोलत नाहींत, कोणाला ज्यापासून त्रास होत नाहीं असे गोड व चांगले शब्द बोलतात, कठोर, कडू, निष्ठुर, वांकडा, चुगलखोरीचा, मित्रांमध्यें फूट पाडणारा असा शब्द ज्यांच्या तोंडून येत नाहीं, सरळ व स्नेह जोडणारे शब्द ज्यांच्या तोंडून निघतात; परद्रोह ज्यांना ठाऊक नाहीं, सर्वभूतमात्रांच्या ठिकाणीं जे सारखे असतात, ठकविण्याचे किंवा उलट शब्द जे बोलत नाहींत, रागामध्येंसुद्धां हृदयाला घरें पाडणारे शब्द ज्यांच्या तोंडून बाहेर पडत नाहींत, व जे मनमिळाऊ भाषण करतात, असे लोक स्वर्गाला जातात. अशा प्रकारची मंगलदायक वाणी शहाण्यानें नेहमीं ठेवावी.' पार्वती म्हणाली, 'कोणत्या प्रकारच्या गोष्टी मनांत आणल्यानें मनुष्य बांधला जातो.' शंकर म्हणाले, 'कसें मन ठेवल्यानें मनुष्य स्वर्गाला जातो, व कशा प्रकारच्या वाईट मार्गाला लावलेल्या मनानें त्याच्यांकडे बघण्यालांसुद्धां तो नालायक ठरून मनुष्य बांधला जातो तें सांगतों ऐक. कोणी नसलेल्या अशा घरांत, गांवांत किंवा अरण्यांत दुसऱ्याचा

जिन्नस पाहून मनानें सुद्धां तो ज्याला घ्यावासा वाटत नाहीं, त्याचप्रमाणें दुसऱ्याची बायको एकांतीं कामवश होऊन आली असतांही तिच्याशीं संबंध ठेवण्याचें ज्याच्या मनांतसुद्धां येत नाहीं, जे शत्रु व मित्र या दोघांशीं नेहमीं सारख्या मनानें वागतात, वेदाध्ययन करून, दया ठेवून, शुद्ध भावानें जे नेहमीं सत्य वचन ठेवतात, आपल्या जवळच्या पैशावर जे संतुष्ट असतात, कोणाशीं वैर न करतां पोटासाठीं फार आयास करीत नाहींत, सर्वांशीं मित्रत्वानें व दयाळूपणानें रहातात, श्रद्धाळू व सरळ असून सरळ लोक ज्यांना आवडतात, धर्माधर्म ज्यांना कळतो, बरीवाईट कर्मे हातून घडत असतां त्यांचे परिणाम ज्यांना कळतात, न्यायानें वागून देवब्राह्मणाकडे ज्यांचें लक्ष असतें,व जे उद्योगशील असतात, असे लोक स्वर्गाला जातात.' पार्वती ह्मणाली, 'काय केल्यानें मनुष्याला पुष्कळ आयुष्य मिळतें व कशाच्या योगानें तो अल्पायु होतो? कोणत्या कर्माचें काय फल मिळतें, कांहीं मोठें भाग्यशील दिसतात, कांहीं मंदभाग्य दिसतात, कांहीं कुलीन दिसतात, कांहीं अकुलीन दिसतात, कांहींच्याकडे लांकडाच्या पुतळ्याप्रमाणें पहावत सुद्धां नाहीं, व कांहीं एकदां त्यांच्याकडे पाहिल्याबरोबर आपल्याकडे ते दुसऱ्याचें मन ओढून घेतात. कांहीं मूर्ख दिसतात, कांहीं शहाणे दिसतात, कांहीं विद्या व शास्त्र यांनीं संपन्न असे महापंडित असतात, कांहींवर थोडीं संकटें ओढवतात, कांहीं संकटाच्या ओझ्याखालीं खचलेले दिसतात. यासंबंधानें आपलें मत काय आहे?' शंकर ह्मणाले, 'सांगतों ऐक. या मृत्युलोकामध्यें निरनिराळ्या कर्मांचीं फलें मिळत असून मनुष्याला आपल्या कर्माचें फल भोगावें लागतें. जो मनुष्य प्राणिमात्राला मारण्यासाठीं उग्र स्वरूप धरून नेहमीं हातांत दंड घेऊन उभा राहून निर्दयपणें सर्वांना मारीत सुटतो; आणि त्यांना भीति उत्पन्न करून किड्यामुंगीला सुद्धां आश्रय देत नाहीं, असा मनुष्य नरकाला जातो. याच्या उलट वागणारा मनुष्य स्वर्गाला जातो. हा नरकाला जाणारा मनुष्य तेथें पुष्कळ संकटें सोसून त्यांतून वर आला तरी अल्पायु असा जन्माला येतो. तो सर्व प्राणिमात्रांना नावडता होतो; परंतु प्राण्यांची हिंसा न करतां शस्त्र खालीं ठेवून जो कोणाला मारीत नाहीं किंवा मारवीत नाहीं किंवा मारण्याला अनुमोदन देत नाहीं व सर्वांशीं स्नेहानें वागतो, असा श्रेष्ठ मनुष्य देवत्वाला मिळून पुढें वाढून ठेवलेलीं सुखें मोठ्या आनंदानें भोगीत रहातो व कदाचित् मनुष्ययोनीमध्यें त्याचा जन्म झाला तर दीर्घायु होऊन सुखांत रहातो.' पार्वती ह्मणाली, 'कशा प्रकारचें शील किंवा वर्तन असलेला मनुष्य कोणत्या कर्मांनीं किंवा कोणत्या दानांनीं स्वर्गाला जातो?' शंकर ह्मणाले, 'जो दानशील राहून ब्राह्मणांचा सत्कार करतो, गरीब, संकटांत पडलेले व दीन अशांना खाण्यापिण्याला व कपडेलत्ते देतो, जो धर्मार्थ घर, धर्मशाळा, पाणपोई बांधून विहिरी, तलाव खणतो, दररोज मागतील त्यांना आसन, बिछाना, गाड्या, घोडीं, घर, रत्नें, पैसा, धान्य, गाई, शेतें, बायका जें जें मागतील तें तें त्यांना देतो, असा मनुष्य देवलोकामध्यें जन्म घेऊन तेथें पुष्कळ दिवसपर्यंत उत्तम भोग भोगीत नंदनादिक वनामध्यें अप्सरांबरोबर आनंदांत रहातो. पुढें स्वर्गापासून भ्रष्ट झाला तरी ज्या ठिकाणीं उत्तम उत्तम भोग भोगावयाला आहेत व धनधान्याची समृद्धि आहे अशा थोर कुळांत जन्माला येऊन तेथें भोग व पैसा यांची चंगाळी राहून मोठ्या आनंदांत दिवस काढतो. याप्रमाणें अशा प्रकारचे लोक मोठे भाग्यशाली राहून ज्यांना त्यांना आवडतात. आतां आपल्या जवळ असून कोत्या बुद्धीनें गरीब, आंधळे, संकटांत सांपडलेले भिक्षुक, अतिथी हे मागत असतांही जे आपल्या जिभेचेंच कोड पुरविण्याकडे लक्ष देऊन चिक्कूपणानें अशांना पैसा, कपडे, नानाप्रकारचे भोग, निरनिराळ्या प्रकारचें अन्न वगैरे कांहीं देत नाहींत, असे दानशून्य नास्तिक लोक नरकाला जातात; व पुढें कालांतरानें मनुष्ययोनींत जन्माला आले तरी निर्धन कुळांत जन्माला येऊन अन्नाला मोताद होतात. सर्व लोक त्यापासून अलग असतात. कोणत्याही प्रकारच्या भोगाची आशा न उरून भ्रष्टपणानें कसें तरी आयुष्य काढतात. याशिवाय दुसरे असे कांहीं ताठर, मानी, व पापी लोक असतात, कीं ते मूर्ख, आसन देण्याला योग्य अशा मनुष्या-

ला आसन देत नाहींत, वाट देण्याला योग्य अशा मनुष्याला वाट देत नाहींत, ज्याला पाय धुवावयाला पाणी दिलें पाहिजे अशाला पाणी देत नाहींत, व सत्काराला योग्य अशा मनुष्याला अर्घ्य व आचमनाला पाणी देत नाहींत, आपल्याकडे गुरू आले असतां प्रेमानें त्यांच्याशीं गुरूच्या ठिकाणीं ठेवावें अशा प्रकारचें प्रेम ठेवीत नाहींत, अभिमान व लोभ यांमुळें संन्याशांचा अवमान करतात, वृद्धांना तुच्छ करतात; अशा प्रकारचे लोक नरकाला जातात; व शेंकडों वर्षांनीं त्यांतून यदाकदाचित् वर आले तर चांडाल, पुक्कस इत्यादि निंद्य कुलामध्यें जन्माला येतात. जो मनुष्य ताठेर किंवा मानी नाहीं, देवता, ब्राह्मण यांचा सत्कार करतो, सर्वांना नमस्कार करून नम्रतेनें गोड गोड भाषण ठेवतो, सर्व वर्णांचें प्रिय करून सर्व भूतमात्रांच्या हितामध्यें दक्ष असतो, कोणाचा द्वेष न करतां सर्वांशीं हासतमुख असतो, स्वागत करून कोणाला पीडा देत नाहीं, ज्याच्या त्याच्या योग्यतेप्रमाणें सत्कार करून सर्वांचा बहुमान करतो, ज्यांना वाट दिली पाहिजे अशांना वाट देतो; जो अतिथींचा संग्रह करीत राहून आलेल्यांचा सत्कार करतो, असा मनुष्य स्वर्गाला जातो. पुढें मनुष्य योनींत जन्माला आला असतां सुद्धां चांगल्या कुलांत जन्माला येऊन उत्तम उत्तम भोग भोगीत रहातो; आणि सर्वांना पूज्य व संमत होऊन त्याला त्याच्या कर्माचें फल मिळतें. जो मनुष्य उग्र वर्तन ठेवून सर्व प्राणिमात्रांना भीतीला कारण होऊन हातानें, पायानें, दोरीनें, काठीनें, ढिकळानें किंवा दुसऱ्या हत्यारानें प्राणिमात्रांना पीडा देतो, व अशी पीडाकर बुद्धि ठेवून दुसऱ्याच्या मनांत चळकांप उत्पन्न करतो, अशा प्रकारचा मनुष्य नरकाला जातो व कालांतरानें मनुष्ययोनींत जन्माला आला तरी पुष्कळ दुःखांनीं भरलेल्या अशा नीच कुलांत त्याचा जन्म होतो व सर्व लोक त्याचा द्वेष करतात. आतां जो मनुष्य सर्वांकडे दयार्द्र दृष्टीनें पाहून बापाप्रमाणें स्नेहानें असतो, आत्मनिग्रह ठेवून कोणाशीं वैर करीत नाहीं; कोणाला न मारतां सर्वांच्या ठिकाणीं विश्वास उत्पन्न करतो, असा मनुष्य स्वर्गाला जाऊन तेथें सुखांत रहातो व कर्मक्षयानंतर मनुष्ययोनींत जन्माला आला असतां त्याच्यावर फार संकटें न येतां निश्चिंतपणें तो सुखांत रहातो. हा भल्यांचा मार्ग असून यामध्यें दुःखें मुळीं नसतात.' पार्वती ह्मणाली, 'कांहीं लोक ज्ञानविज्ञानसंपन्न असून वादविवादांत हुषार दिसतात, बुद्धिमान व कोणत्याही वस्तूचें यथार्थ ज्ञान असणारे दिसतात व कांहीं यांच्या उलट दिसतात. तर कोणत्या विशेष कर्मानें मनुष्य बुद्धिमान होतो व कशानें कोत्या बुद्धीचा होतो? तसेंच कोणी जात्यंध असतात, कोणी रोगग्रस्त असतात, कोणी क्लीब असतात, याला कारण काय?' शंकर ह्मणाले, 'वेदवेत्त्या ब्राह्मणांना त्याचप्रमाणें धर्मवेत्त्या सिद्ध पुरुषांना जे नेहमीं कुशल विचारतात, वाईट कर्म सोडून जे नेहमीं चांगलें कर्म करीत रहातात, त्यांना इहलोकीं सुख मिळून पुढें स्वर्ग मिळतो. असा मनुष्य जर कदाचित् मनुष्ययोनींमध्यें जन्माला आला तर बुद्धिमान निपजतो, व त्या बुद्धीप्रमाणेंच विद्वान निपजतो. परस्त्रीच्या ठिकाणीं जे वाईट नजर ठेवतात ते त्या दुष्ट स्वभावामुळें जात्यंध होतात. नग्नस्त्रीकडे दुष्ट मनानें जे पाहतात ते पापीलोक रोगग्रस्त होतात. जे दुराचारी मूर्ख लोक मैथुनासंबंधी विचार न ठेवतां भलतीशीं संबंध ठेवतात, पशूंना मारवितात व गुरुस्त्रीशीं संबंध ठेवतात, ते क्लीब निपजतात.' पार्वती ह्मणाली, 'नित्यकर्म कोणतें? अनित्य कोणतें? काय केल्यानें मनुष्याचें कल्याण होतें?' शंकर ह्मणाले, 'कल्याणाचा मार्ग कोणता त्याच्यामागें लागून जो नेहमीं ब्राह्मणांना विचारीत असतो, व धर्म आणि सद्गुण यांच्यामागें लागला असतो अशाला स्वर्गसुख मिळतें आणि जरी कदाचित् त्याला मनुष्यजन्म आला तरी बुद्धि व स्मरणशक्ति यांनीं संपन्न असा तो जन्माला येतो. हा कल्याणप्रद असा भल्यांचा धर्म प्राणिमात्रांच्या हितासाठीं मीं तुला सांगितला आहे.' पार्वती ह्मणाली, 'कांहीं कोत्या बुद्धीचे लोक भल्यांना विचारीत नाहींत. कांहीं व्रतशील व श्राद्धादिक क्रिया करीत रहाणारे असतात. कांहीं राक्षसासारखे राहून व्रत, नियम वगैरे कांहीं पाळीत नाहींत. कांहीं होम वगैरे करतात, कांहीं त्यांकडे मुळींच लक्ष देत नाहींत; तर कोणत्या कर्माच्या फलानें अशा निरनिराळ्या स्व-

भावाचे लोक निपजतात?' शंकर ह्मणाले, 'वेद हे लोकांच्या धर्माच्या मर्यादा ह्मणून निर्मिले आहेत. त्यांना धरून जे चालतात ते व्रतशील असतात. मूर्खपणानें अधर्मालाच जे धर्म ह्मणतात ते ह्या मर्यादा ओलांडून व्रतें वगैरे न पाळतां ब्रह्मराक्षसासारखे रहातात. अशा प्रकारचे हे अधम लोक कालांतरानें मनुष्ययोनींत जन्माला आले असतां होम, वषट्कार वगैरे कांहीं पाळीत नाहींत. याप्रमाणें मनुष्यासंबंधानें हा धर्माधर्मविचार आहे.'

शंकरांनीं इतकें सांगून आपल्या बायकोच्या तोंडून कांहीं धर्माधर्मविचार काढून घेण्यासाठीं ते तिला ह्मणाले, 'हे साध्वि, बरें वाईट [ ब्रह्म व जग ] यांची तुला ओळख असून धर्माची माहिती तुला आहे, व धर्माप्रमाणें तुझें वर्तन आहे; त्याचप्रमाणें ब्रह्मदेवाची स्त्री सावित्री, इंद्राची शची, मार्कंडेयांची धूम्रवर्णा, कुबेराची ऋद्धी, वरुणाची गौरी, सूर्याची सुवर्चला, चंद्राची रोहिणी, अग्नीची स्वाहा व कश्यपांची अदिती या साध्वी स्त्रियांचा तुला सहवास घडला आहे; तेव्हां स्त्रीधर्म तुझ्या तोंडून ऐकण्याची माझी इच्छा आहे. माझी तूं सहधर्मचारिणी असून शील, व्रत, सामर्थ्य, वीर्य, तप हीं सर्व तुझीं माझ्यासारखींच आहेत; तेव्हां तुझ्या तोंडून बाहेर पडलेला स्त्रीधर्म विशेष गुणावह होऊन लोकांना आधारभूत होणार आहे. विशेषेंकरून स्त्रियाच प्रमाणभूत असून तूं सांगितलेला धर्म पृथ्वीवर अनादि परंपरेनें चालत राहील. तूं माझें अर्धशरीर असून तूं देवकार्य करणारी व लोकांचें अस्तित्व कायम ठेवणारी आहेस. स्त्रीधर्म तुला सर्व ठाऊक आहे; तेव्हां तो तूं मला विस्तारानें सांग.' पार्वती म्हणाली, 'भगवन्, आपल्या प्रसादानेंच माझ्या तोंडून हे शब्द निघत आहेत. नानातीर्थांनीं युक्त अशा ह्या नद्या आपल्या स्नानाकरितां येथें हजर आहेत. क्रमानें यांचा विचार घेऊन मग कायतें मी आपल्याला सांगतें. अंगांत सामर्थ्य असून ज्याला अहंकार नाहीं तोच खरा पुरुष, बायका नेहमीं बायकांच्या अनुरोधानें असतात. शिवाय यांचा सल्ला घेतल्यानें यांचा बहुमान केल्यासारखाही होणार आहे.' असें ह्मणून तेथें जमलेल्या सर्वांमध्यें श्रेष्ठ व पावन करणाऱ्या सरस्वती, गंगा, विपाशा, वितस्ता, चंद्रभागा, इरावती, शतद्रु, देविका, सिंधु, कौशिकी, गौतमी इत्यादि स्त्रीधर्मकुशल नद्यांना स्त्रीधर्म विचारण्यासाठीं ती ह्मणाली, 'महाराजांनीं जो हा स्त्रीधर्मासंबंधानें प्रश्न केला आहे त्याचें उत्तर तुमच्या सर्वांच्या विचारानें मी देऊं इच्छितें. स्वर्गांत किंवा पृथ्वीवर सर्व शहाणपण कधीं एकट्याच्या अंगीं नसतें; ह्मणून मी तुह्मांला विचारतें.' तिचें भाषण ऐकून बुद्धिवैभवानें संपन्न अशी स्त्रीधर्म जाणणारी गंगा इतरांच्या संमतीनें तिला ह्मणाली, 'सर्व जगाला मान्य अशी तूं आमचा विचार घेऊन आह्मांला बहुमान देतेस यामुळें आह्मी धन्य आहोंत. जो मनुष्य स्वतः समर्थ असून दुसऱ्याचा सल्ला घेऊन त्याला मान देतो त्याची भल्यांमध्यें गणना होते. ज्ञानविज्ञानामध्यें संपन्न असून ऊहापोह करण्यांत पटाईत अशा बोलक्या लोकांचा जो सल्ला घेतो तो कधीं संकटांत पडत नाहीं. बुद्धीची घमेंडी असून मीपणा असणाऱ्याच्या तोंडून सभेंत भलतेच शब्द बाहेर पडून ते दुबळे पडतात. तुझ्या अंगीं दिव्यज्ञान असून दिव्यगुण आहेत; तेव्हां तुझ्या तोंडूनच स्त्रीधर्म ऐकण्याची आमची इच्छा आहे.' हें ऐकून पार्वती ह्मणाली, 'मला स्त्रियांचा धर्म जशाप्रकारचा असावासा वाटतो तो सांगतें. लग्नामध्यें आप्तांनीं हा स्त्रीधर्म आधीं करून ठेविला आहे. स्त्री अग्निसाक्षीनें नवऱ्याची सहधर्मचारिणी होते; तेव्हां तिनें आपला स्वभाव, भाषण, वर्तन चांगलें ठेवून प्रसन्नमुख राहून नवऱ्यावांचून दुसरीकडे लक्ष पुरवितां कामा नये. जी नेहमीं नवऱ्याला दैवताप्रमाणें समजते तीच उत्तम धर्म पाळणारी सहधर्मचारिणी समजावी. नवऱ्याच्या पुढें उभी राहून जी देवाप्रमाणें त्याची शुश्रूषा करते, मन नेहमीं प्रसन्न ठेवून लक्ष दुसरीकडे जाऊं देत नाहीं, मुलाच्या तोंडाप्रमाणें जी नेहमीं नवऱ्याच्या तोंडाकडे प्रेमानें पहात रहातें, आहार बेताचा ठेवून दंपतीधर्म दुसऱ्याच्या तोंडून ऐकून त्याप्रमाणें प्रसन्नमुखानें अगदीं आज्ञाधारकपणें वागते; नवरा निष्ठुर बोलला असतां किंवा त्यानें रागानें बघितलें असतांही जी नेहमीं त्याच्याकडे मोठ्या प्रसन्नवदनानें पहाते. नवऱ्याशिवाय चंद्र, सूर्य किंवा पुरुषवाचक एखादें झाड यांकडे नांवानें सुद्धां जी पहात नाहीं, तीच सहधर्मचारि-

णी पतिव्रता समजावी. दरिद्री, व्याधिग्रस्त, दीन, वाट चालून दमलेला अशा नवऱ्याची जी मुलाप्रमाणें काळजी घेते, जी आत्मनिग्रही, दक्ष, पुत्रवती असून जिचें नवऱ्यावर पूर्ण प्रेम आहे व जी नवऱ्याला प्राणाप्रमाणें वाटते अशी प्रसन्नमुखी व विनयसंपन्न बायकोच सहधर्मचारिणी समजावी. नवऱ्याइतकें लक्ष, काम, भोग, ऐश्वर्य व सुख यांकडेसुद्धां जिचें नसतें, जी पहाटे उठून झाडसारवण, त्याचप्रमाणें अग्निकार्य, पुष्पादि बलिकार्य यांमध्यें गढून राहून नवरा, देवता, अतिथी, नोकर यांना तृप्त ठेवून अवशेष अन्न खाते व इतर लोकसुद्धां जिच्यामुळें तुष्ट व पुष्ट असतात, जी गुणशील बायको सासूसासऱ्यांच्या पायांची सेवा करीत राहून मातापितरांकडे लक्ष देऊन रहाते, तिनेंच उत्तम तपाचा संचय केला म्हणावयाचा. ब्राह्मण, दुबळे, अनाथ, दीन, आंधळे, संकटांत सांपडलेले यांना जी अन्नानें पोसते तीच खरी पतिव्रता. जी कांहीं जड न वाटतां नवऱ्याचें चित्त संभाळून त्याच्या हिताविषयीं दक्ष राहून हें कठीण व्रत पाळते हेंच तिचें मोठें पुण्य असून मोठें तप आहे व हाच तिला सनातन स्वर्ग आहे; कारण स्त्रियांना नवरा हाच देव, हाच आप्त असून हाच कायतो त्यांना गति आहे. याशिवाय त्यांना दुसरी गति किंवा दुसरें दैवत नाहीं. नवऱ्याचा प्रसाद व स्वर्ग या दोहोंकडे पाहिलें असतां स्त्रीसंबंधानें हीं दोन कदाचित् सारखीं ठरतील किंवा तशीं ठरणार नाहींत. नवऱ्याला नाराज करून स्वर्गाची सुद्धां तिला इच्छा असतां कामा नये. गरीब, व्याधिग्रस्त, संकटांत सांपडलेला, शत्रूच्या तावडींत गेलेला किंवा ब्रह्मशाप झालेला असा नवरा भलतीसलती किंवा अधर्मकारक एखादी गोष्ट किंवा जीव देण्याला जरी सांगेल तर आपद्धर्माकडे लक्ष देऊन तें कांहीं विचार न करतां करावें. आपण विचारल्यावरून मीं हा स्त्रीधर्म थोडक्यांत सांगितला. याप्रमाणें वागणारी स्त्रीच खरी पतिव्रता. '

---

## २८५ ऋषी व महेश्वर यांचा संवाद—वासुदेव माहात्म्य. (१३. १४७—४९)

याप्रमाणें बोलून पार्वती थांबल्यावर ऋषींनीं शंकरांना वासुदेवाचें माहात्म्य विचारल्यावरून ते म्हणाले, ' हा हरी, ज्याला कृष्णही म्हणतात, हा ब्रह्मदेवाहून श्रेष्ठ असून शाश्वत पुरुष आहे. आकाशांत उगवलेल्या प्रतिसूर्याप्रमाणें हा तेजःपुंज आहे. याला दहा हात असून हा मोठा तेजस्वी आहे. देवशत्रूंचा हा फडशा पाडतो. श्रीवत्सांकित अशा या हृषीकेशाला सर्व देव पूजतात. त्याच्या उदरापासून ब्रह्मदेव झाले असून त्याच्या मस्तकापासून माझी उत्पत्ति आहे. केंसांपासून ज्योतिर्गणांची उत्पत्ति असून रोमांपासून देव व असुर यांची उत्पत्ति आहे. ऋषी त्याचप्रमाणें शाश्वत लोक यांची त्याच्या शरीरापासून उत्पत्ति आहे. ब्रह्मदेव व देव यांचें हा वसतिस्थान आहे. हा या सर्व स्थावरजंगमात्मक पृथ्वीचा निर्माता त्याचप्रमाणें नाशकर्ता आहे. शत्रूंना तापद असा हा सर्वज्ञ असून सर्वत्र भरून राहिला आहे. त्रैलोक्यामध्यें ज्याच्याहून श्रेष्ठ कांहीं नाहीं असा हा, मधुराक्षसाला मारणारा, सनातन, परमात्मा, गोविंद या नांवानेंही प्रसिद्ध आहे. देवकार्यासाठीं मनुष्यदेह घेऊन हा रणामध्यें सर्व राजांना मारवील. याच्या साह्यावांचून देवांच्या हातून कांहीं घडावयाचें नाहीं. सर्वांना पूज्य असा हा सर्वांचा नायक आहे. याप्रमाणें देवकार्यामध्यें गढलेल्या, देवांचा नाथभूत, ब्रह्मस्वरूपी व ब्रह्मर्षींना आधारभूत अशा याच्या पोटांत ब्रह्मदेव, मी त्याचप्रमाणें सर्व देव सुखानं राहिलों आहों. याच्याठिकाणीं श्रीचें वास्तव्य असून क्षणभरसुद्धां हा तिला विसंबून नसतो. याच्या हातांत शार्ङ्गधनुष्य, चक्र, त्याचप्रमाणें खड्ग हीं हत्यारें असून सर्व सर्पांचा वैरी जो गरुड तो याच्या ध्वजावर आहे. याचें शील उत्तम असून अंतर्बाह्य हा मोठा शुद्ध आहे. याचा पराक्रम, याचें सामर्थ्य मोठें असून याचें स्वरूप फार गोजिरें आहे. याची उंची शरीराचा बांधा असावें, तसे असून, धैर्य, सरळपणा, दया इत्यादि गुण याच्या ठिकाणीं आहेत. सर्व दिव्य अस्त्रें याच्याठिकाणीं वास्तव्य करीत असून हा योगमायेनें युक्त आहे.

याला हजारों डोळे आहेत. अपाय म्हणून याला ठाऊक नाहीं. हा मोठा थोर मनाचा असून मित्रांच्या अभिमानाला जागा व आप्तबांधवांना प्रिय आहे. हा क्षमाशील असून अहंकार म्हणून याला ठाऊक नाहीं. हा मोठा ब्राह्मणभक्त असून त्यांचा पुढारी आहे. भयपीडितांचें भय दूर करून हा मित्रांचा आनंद वाढविणारा आहे. सर्व भूतमात्रांना हा आधार असून दीनांच्या पालनामध्यें हा नेहमीं गढला आहे. याच्याकडे आलेल्या शत्रूंना देखील हा वर देतो. हा मोठा नीतिकुशल असून देवांच्या कल्याणासाठीं थोर व पवित्र अशा मनूच्या वंशामध्यें हा जन्म घेईल. मनूला अंग नांवाचा मुलगा होऊन त्या अंगाला अंतर्धामा नांवाचा मुलगा होईल. अंतर्धाम्याला हविर्धामा, हविर्धाम्याला प्राचीनबर्हि, असे मुलगे होऊन या प्राचीनबर्हीला प्रचेता प्रभृति दहा मुलगे होतील. या प्रचेताला दक्ष हा मुलगा होऊन या दक्षाला दाक्षायणी मुलगी होईल. या दाक्षायणीला आदित्य व आदित्यापासून मनु होतील. या मनूपासून इला नांवाची मुलगी व सुद्युम्न होतील. इलेचें बुधाशीं लग्न लागून त्यापासून पुरूरवा होईल. पुरूरव्याला आयु, आयूला नहुष व नहुषाला ययाति असे मुलगे होतील. त्यापासून महाबलशाली यदु, यदुपासून क्रोष्टा, क्रोष्ट्यापासून वजिनीवान, वजनीवानाला उषंगु, उषंगूला चित्ररथ, चित्ररथाला शूर, शूराला महायशस्वी आनकदुंदुभी वसुदेव व या वसुदेवाला वासुदेव होईल. ह्या ब्रह्मस्वरूपी वासुदेवाला ब्राह्मण आवडून तो त्यांचा सत्कार करील. जरासंधानें कैदेंत टाकलेल्या राजांना हा त्याचा पराभव करून सोडवील. सर्व राजांमध्यें हा श्रेष्ठ होऊन याच्या सामर्थ्यापुढें कोणाचें कांहीं चालणार नाहीं. शूरसेनामध्यें श्रेष्ठ असा हा द्वारकेमध्यें राहून नीतिशास्त्रविशारद होऊन पृथ्वीला जिंकून तिचें पालन करील. त्या ह्याचा तुह्मीं सर्वांनीं माल्यादिकांनीं सत्कार करावा. माझें ह्मणा किंवा ब्रह्मदेवाचें ह्मणा दर्शन घेण्याची ज्याची इच्छा असेल, त्यानें प्रथम या वासुदेवाचें दर्शन घ्यावें. याचें दर्शन घेतल्यानें खात्रीनें आमचें दर्शन घेतल्याप्रमाणें आहे. ज्यावर तो प्रीतिमान होईल, त्यावर ब्रह्मादिक सर्व प्रसन्न झाले असें समजावें. मृत्युलोकांमध्यें त्याचा जो आश्रय करील त्याला कीर्ति, जय मिळून स्वर्ग लाधेल. हा स्वतः धर्मानें चालून लोकांना धर्ममार्ग दाखवून देईल; ह्मणून धर्मवेत्त्यांनीं नेहमीं काळजीपूर्वक याला नमस्कार करावा. याचा बहुमान केल्यांतच उत्तम धर्म पदरीं पडतो. ह्या महा तेजस्वी वासुदेवानें प्रजेचें हित लक्षांत आणून धर्म चालण्यासाठीं हजारों ऋषी निर्माण केले. ते सनत्कुमारप्रभृति गंधमादनावर तपश्चर्या करीत राहिले आहेत. ह्मणून याला सदोदित नमस्कार करावा. याला नमस्कार करणाराला हा नमस्कार करतो, याला मान देणाराला हा मान देतो, याचा सत्कार करणाराचा हा सत्कार करतो, याची पूजा करणाराची हा उलट पूजा करतो, नेहमीं याचें दर्शन घेणाराचें हा दर्शन घेतो. याचा आश्रय केलेल्यांना हा धरून असतो, हें त्या अनिंद्य अशा वासुदेवाचें भल्यांनीं पाळलेलें उत्तम व्रत आहे. देवांनीं देखील याचा सत्कार केला असतां त्यालाच धरून रहाणाऱ्या या देवांना हा अभय देतो. ह्मणून कायावाचामनानें याला नमस्कार करून कितीही श्रम पडले तरी ते घेऊन याचें दर्शन घ्यावें. हा उत्तम मार्ग मीं तुह्मांला सांगितला. सर्व लोकांचा पितामह अशा ह्या जगत्पतीला मी स्वतः नेहमीं नमस्कार करीत असतों. याचें दर्शन घेण्यांत त्रिमूर्तीचें दर्शन घेण्याचें फळ आहे. कारण आह्मी सर्वदैव त्याच्या देहामध्यें वास्तव्य करीत असतों. शुभ्र पर्वताप्रमाणें पांढरा फेक असा हलधर पृथ्वीला आपल्या मस्तकावर धारण करणारा बलराम नांवाचा त्याचा भाऊ होईल. याच्या रथावर तीन खांचांचा सुवर्णमय वृक्ष ध्वज असेल. त्या बलशाली बलरामाचें डोकें मोठमोठ्या फड्यांच्या नागांनीं वेष्टिलेलें राहील. सर्व शस्त्रास्त्रें केवळ मनांत आल्याबरोबर याच्यापुढें हजर रहातील. देवांनीं गरुडाला याचा अंत काढण्याला सांगितला असतां तो त्याला लागला नाहीं असा हा अनंत आहे. हा पाताळामध्यें आपल्या फडांवर पृथ्वीला धारण करून शेषरूपानें रहाणारा मोठ्या आनंदानें पृथ्वीवर संचार करीत राहील. विष्णु, अनंत, राम वगैरे दुसरे कोणी नसून हा हृषीकेशच ते सर्व आहे. हे दोघे बलराम व श्रीकृष्ण मोठे सामर्थ्यवान असून एका-

ऱ्या हातांत चक्र व दुसऱ्याच्या हातांत नांगर हीं आयुधें आहेत. ते सन्मान्य असून दर्शन घेण्याला योग्य आहेत. तुमच्यावर अनुग्रह करण्यासाठीं हें वासुदेवाचें स्वरूप मीं तुह्मांला सांगितलें आहे. असें ते ह्मणताहेत तोंच आकाशामध्यें मोठा शब्द होऊन मेघगर्जना होऊन वीज चमकली. काळ्याकुट्ट अशा ढगांनीं तें भरून जाऊन पावसाळ्याप्रमाणें जोराचा पाऊस पडला. काळाकुट्ट अंधार जिकडे तिकडे पडून दिशा उमगेनाशा झाल्या व त्या मुनींना शंकर किंवा भूतगण कोणीच दिसेना. पुढें लवकरच आकाश स्वच्छ झालें. तो चमत्कार पाहून त्यांना मोठा विस्मय झाला. व ते आपापल्या ठिकाणीं निघून गेले. '

भीष्म ह्मणाले, 'याप्रमाणें त्या ऋषींनीं आश्रमामध्यें श्रीकृष्णाला शंकरांचा महिमा सांगून ते त्याला फिरून ह्मणाले, 'हे श्रीकृष्णा, तूं आह्मांला नेहमीं असेंच दर्शन देत जा. आह्मांला तुझ्यापुढें स्वर्गसुद्धां अधिक वाटत नाहीं. शंकरांनीं सांगितल्यामध्यें कांहीं खोटें नाहीं. याप्रमाणें हें सर्व आह्मीं सांगितलेलें गूढ तुला ह्मणजे ठाऊक नाहीं असें नाहीं. त्रैलोक्यांत तुला ठाऊक नाहीं असें कांहीं नाहीं. सर्व चराचराच्या उत्पत्तीचें कारण तुला कळतें. परंतु तूं सर्व मनांत ठेवतोस व आह्मांला तसें करतां येत नसल्यानें आह्मी बोलून जातों. आमच्या मनांत कांहींच रहात नसल्यामुळें आह्मीं कांहीं तरी बडबडलों. अशी कोणतीही आश्चर्यकारक गोष्ट नाहीं कीं जी तुला ठाऊक नाहीं. आतां आह्मी तुझा निरोप घेतों. तुझी बुद्धि व वैभव वाढून महत्कृत्य करणारा तुझ्याहून वरचढ असा तुला मुलगा होईल. असें ह्मणून त्याला प्रदक्षिणा करून ते निघून गेले, व या क्रमानें व्रत शेवटास नेऊन श्रीकृष्णही द्वारकेला परत आला. पुढें रुक्मिणीला गर्भ राहून दहा महिने लोटल्यावर वीर्यशाली व सर्व गुणांनीं संपन्न असा वंशकर मुलगा झाला. तोच कामस्वरूपी असून सर्वत्र भरून राहिला आहे. देव व असुर या सर्वांच्या हृदयांत तो आहे. असा जो हा परमात्मा शामवर्ण व चतुर्भुज श्रीकृष्ण हा प्रेमानें तुमच्याजवळ आहे व तुह्मीही याला धरून आहां. कीर्ति, लक्ष्मी, धृति व स्वर्गमार्ग हे सर्व हा त्रिविक्रम ज्या ठिकाणीं त्या ठिकाणीं असावयाचीं. इंद्रासह तेहतीस देव हाच आहे. सर्व देवांना आदिभूत असा आदिदेव हाच आहे, याला आदि नाहीं किंवा अंत नाहीं. मधूला मारणारा हाच आहे. महासामर्थ्यवान अशा ह्यानें देवकार्य शेवटास नेण्यासाठीं मनुष्यांमध्यें जन्म घेतला आहे. धर्मार्थासंबंधी गूढांचा उलगडा याच्या हातूनच होण्याजोगा आहे. धर्मा, याचा तूं आश्रय केला असल्यामुळें जय, अतुल कीर्ति व ही पृथ्वी तुझीच आहे. ज्या मूर्खानें कृष्णार्जुनाशीं कंबर बांधली त्याचीच कींव केली पाहिजे. याच्या चक्रापासून बाहेर पडणाऱ्या अग्नीरूपी वणव्यामध्यें पटापट मरणाऱ्या टोळांप्रमाणें सर्व दानव जळून गेले आहेत. वीर्य, सामर्थ्य व बल यांनीं दुबळे अशा मनुष्यांची यांच्यापुढें युद्ध करण्याची ताकद नाहीं. या जयासंबंधानें ह्मणशील तर हा योगी युगांतकालीन अग्नीप्रमाणें दोन्ही हातांनीं पराक्रम गाजवीत रणामध्यें पुढें सरसावून यानें आपल्या तेजानें दुर्योधनाच्या बळाचा फडशा पाडला आहे. पूर्वी शंकरांनीं हिमाचलावर जें कांहीं सांगितलें तें सांगतों ऐक. पुष्टी, तेज, दीप्ति, पराक्रम, सामर्थ्य, नम्रता, कुलीनता हे जे गुण अर्जुनामध्यें आहेत त्याच्या तिप्पट ते श्रीकृष्णामध्यें आहेत. या गुणांमध्यें श्रीकृष्णाला मागें सारणारा कोण आहे? जेथें श्रीकृष्ण तेथेंच वैभव. आमच्यासंबंधानें ह्मणशील तर कोत्या बुद्धीचे आह्मी परावलंबी कमनशीबाचे समजलों पाहिजे. आह्मीं मुद्दाम आपण होऊन मृत्यूची वाट धरली! तूं सरळ वर्तन ठेवून कराराप्रमाणें तेरा वर्षें राज्य सोडून दिलेंस. तुला या आप्तबांधवांच्या मरणासंबंधानें फार वाईट वाटत आहे; परंतु पूर्वी भीमानें केलेली प्रतिज्ञा मोडणें हेंही उचित नव्हतें. रणांत जे मेले आहेत त्या आह्मां सवांना कालानें मारलें आहे. काल सर्वशक्तिमान असून त्याचें सामर्थ्य तूं ओळखतोसच. याप्रमाणें कालानें हें सर्व केल्यामुळें त्याबद्दल शोक करूं नकोस. हा सनातन कृष्णच दंडधारी, रक्तनेत्र काल आहे; ह्मणून आतां ज्ञातिसंबंधानें तूं शोक करूं नकोस; शोक अगदीं सोडून दे. श्रीकृष्णाचें आतां मीं सांगितलेलें माहात्म्य तूं ऐकलेंच आहेस. एवढा उपदेश शहाण्याला पुरे आहे. शंकरांच्या तोंडून नि-

घालेला वरचा धर्मसंवाद लक्षांत ठेविल्यानें तुझें हित होणार आहे. अर्जुनाबरोबर दहा हजार वर्षें यानें तप केलें आहे. लहानपणीं यानें ज्ञातीचें रक्षण करण्याकरितां कंसाची चांदी उडविली आहे. याचे गुण माझ्या हातून काय वर्णवणार? हा तुझा मित्र असल्यानें तुझें खात्रीनें कल्याण होणार आहे. परलोकीं सुद्धां त्या दुष्ट दुर्योधनाची काय गति होणार तें मजला कळत नाहीं; कारण त्यासाठींच पृथ्वीवरील सर्व लोकांचा संहार झाला आहे. खरोखर दुर्योधन, कर्ण, शकुनि व दुःशासन या चौकडीच्या दोषामुळें या कौरवांचा फडशा पडला आहे.' याप्रमाणें श्रीकृष्णमहिमा सांगून त्याची अलौकिक सहस्रनामावळी सांगून भीष्म ह्मणाले, 'ही सहस्रनामावळी मनुष्यानें नेहमीं घेत असावी. रोजच्या रोज ही नामावळी उच्चारणारावर इहपर संकट कधीं गुदरत नाहीं. यानें ब्राह्मण वेदपारग होतो, क्षत्रिय विजयी होतो, वैश्य संपत्तिमान होतो व शूद्र सुखी होतो. यानें धर्मार्थकाम साधून संततीची इच्छा असणाराला संतति होते. याच्या योगानें सर्व कांहीं लाभ होऊन भय मुळीं उरत नाहीं. आकाश, चंद्र, सूर्य वगैरे सर्व या वासुदेवाच्या वीर्यानें कायम असून त्याच्या ताब्यांत आहेत. इंद्रियें, मन, बुद्धि, क्षेत्र, क्षेत्रज्ञ सर्व वासुदेवमय आहे. धर्मामध्यें आचार पहिला सांगितला असून हा आचार धर्मावर अवलंबून आहे व या धर्माचा स्वामी अच्युत वासुदेव आहे. ऋषी, पितर, देव, पंचमहाभूतें, धातु व सर्व चराचर जग नारायणापासून उत्पन्न झालें असून योग, सांख्य, शिल्प, वेद, शास्त्रें व सर्व प्रकारचें ज्ञान या एका जनार्दनापासून आहेत. हा विष्णु एक महद्भूत असून त्याच्यापासून निरनिराळीं भूतमात्रें उत्पन्न झालीं आहेत. ज्यामध्यें कधीं कमतरता पडत नाहीं असा हा सर्व भूतमात्रांचा आत्मभूत, तिन्ही लोक भरून राहून सर्वांचा उपभोग घेत राहिला आहे. जे या विश्वेश्वराला भजतात, त्यांना पराभव ह्मणून ठाऊक नसतो.'

---

## २८६ नामोच्चारण माहात्म्य.
## ( १३. १५० )

युधिष्ठिर ह्मणाला, 'कोणते जप जपल्यानें मोठें धर्मफल पदरीं पडून प्रस्थानकालीं, एखाद्या नव्या ठिकाणीं शिरतांना, एखादें काम आरंभतांना किंवा देवकादि कार्य अगर श्राद्ध करतांना ते जपल्यानें तें काम निर्विघ्नपणें शेवटास जातें व त्याच्या योगानें शांति व पुष्टि मिळून रक्षण होऊन शत्रूचा फडशा पडतो व भय नाहींसें होतें?' भीष्म ह्मणाले, 'सावित्रीच्या तोंडून निघालेला, सर्व पाप नाहींसें करणारा, व्यासांनीं सांगितलेला उत्तम मंत्रविधि सांगतों ऐक. रात्रंदिवस हा मंत्र जपल्यानें मनुष्याला पाप म्हणून मुळीं लागत नाहीं. हा ऐकणारालासुद्धां दीर्घ आयुष्य मिळून त्याचे हेतू सिद्धीस जाऊन इहपर सुख मिळतें. क्षत्रियधर्मानें रहाणाऱ्या पुष्कळ क्षत्रियांनीं हा मंत्र जपला आहे. जे शांत मनानें नेहमीं हा मंत्र जपतात त्यांना उत्तम वैभव मिळतें. वसिष्ठ, वेदनिधि पराशर, महानाग अनंत, सर्व सिद्ध, ऋषी, त्याचप्रमाणें सर्वांमध्यें श्रेष्ठ, देवदेव सहस्रशीर्ष शिव व सहस्रनाम धारण करणारा जनार्दन यांना नमस्कार असो. अज, एकपाद, अहिर्बुध्न्य, पिनाकी, ऋत, पितृरूप, त्र्यंबक, महेश्वर, वृषाकपी, शंभू, हवन, ईश्वर हे त्रिभुवनाचे स्वामी प्रसिद्ध अकरा रुद्र होत. शतरुद्रांमध्यें हे अकरा शंभर: म्हणून सांगितले आहेत. अंश, भग, मित्र, वरुण, धाता, आर्यमा, जयंत, भास्कर, त्वष्टा, पूषा, इंद्र व विष्णू हे बारा आदित्य असून ते श्रुतीचे मुलगे आहेत असें श्रुतींत सांगितलें आहे. धर, ध्रुव, सोम, सावित्र, अनिल, अनल, प्रत्यूष, प्रभास, हे आठ वसू सांगितले आहेत. नासत्य व दस्र हे दोन अश्विनीकुमार संज्ञेला झालेले मार्तंडाचे मुलगे होत. हे तिच्या नाकपुडींतून बाहेर आले. मृत्यु, काल, विश्वदेव, मूर्तिमान पितर, तपोधन ऋषी, तप व मोक्ष यांकडे लागून सिद्धि मिळाविलेले मुनी हे सर्व जगांतील सर्व कर्मांचे साक्षीभूत असून यज्ञ, दान व पुण्य यांची यांजवळ नोंद असते. अदृश्य रीतीनें हे सर्व प्राणिमात्रांचीं बरीं वाईट कर्में पहात असतात. हे देवांची नामावळी उच्चारणारांचें कल्याण करीत असतात. दिव्यतेजानें युक्त असे हे सर्व लोकां-

वर नजर ठेवून ब्रह्मदेवांनीं निर्माण केलेले लोक ते यांचें नामोच्चारण करणारांना देत असतात. या नामोच्चारण करणारांना धर्मार्थभोग पुष्कळ भोगण्याला मिळतात, व यांना सर्व जगाताच्या स्वामीनें निर्माण केलेले नाना,चांगले व सुखाचे लोक मिळतात. हे तेहतीस देव त्याचप्रमाणें वृषभध्वज शंकर, त्याचे नाना सौम्यादिगुण, आकाशांतील निरनिराळ्या ज्योती, नद्या, आकाश, गरुड, तपानें सिद्धि मिळविलेले पृथ्वविरील चराचर लोक, हिमवान त्याचप्रमाणें दुसरे पर्वत, चार महासागर, शंकराच्या तोडीचे त्याचे अनुचर, विजयशील विष्णु, स्कंद व अंबिका यांचीं नांवें इंद्रियनिग्रहपूर्वक घेतल्यानें मनुष्य सर्व पापांपासून मुक्त होतो. या नंतर ऋषिश्रेष्ठ मानवांचीं नांवें मी सांगतों ऐक. यवक्रीत, रैभ्य, अर्वावसु, परावसु, औशिज, कक्षीवान, अंगिरापुत्र बल, मेधातिथिपुत्र कण्व, बर्हिषद हे ब्रह्मतेजानें संपन्न असून लोकांचें अस्तित्व कायम ठेवणारे असें यांना ह्मटलें आहे. रुद्र, अनल व वसू यांच्यापासून यांची उत्पत्ति आहे. पृथ्वीवर चांगलीं कर्में करीत राहून यांचें नामोच्चरण करीत राहिल्यानें लोक स्वर्गी देवांमध्यें सुखांत रहातात. हे सात इंद्रगुरु असून पूर्व दिशेला असतात व शुचिर्भूततेने त्यांचें नामोच्चरण केल्यानें इंद्रलोकामध्यें मनुष्य बहुमानानें रहातो. उन्मुचु प्रमुचु, स्वस्त्यात्रेय, दृढव्य, ऊर्ध्वबाहू, तृणसोमा, अंगिरा व मित्रावरुणपुत्र अगस्त्य हे सात यमधर्माचे ऋत्विज असून दक्षिण दिशेच्या आश्रयानें आहेत. दृढेयु, ऋतेयु, कीर्तिमान, परिव्याध, सूर्याप्रमाणें तेजस्वी, एकत, द्वित व त्रित व अत्रिपुत्र सारस्वत हे सात वरुणाचे ऋत्विज असून पश्चिम दिशेला राहिले आहेत. अत्रि, वसिष्ठ, कश्यप, गौतम, भरद्वाज, विश्वामित्र, जमदग्नि हे सात कुबेराचे ऋत्विज असून ते उत्तर दिशेचा आश्रय करून राहिले आहेत. यांशिवाय एकाच दिशेला धरून न रहातां सर्व दिशांना फिरत रहाणारे सात ऋषी आहेत ते लोकांचें अस्तित्व कायम ठेवून त्यांची कीर्ति व कल्याण वाढवितात; त्याचप्रमाणें धर्म, काम, काल, वसु, वासुकी, अनंत व कपिल हे सात पृथ्वीला आधार देणारे आहेत. परशुराम, व्यास त्याचप्रमाणें द्रोणपुत्र अश्वत्थामा व लोमश हे दिव्य मुनी एकेका टोळीमध्यें सात सात याप्रमाणें सात टोळ्यांनीं सर्व दिशांचें रक्षण करीत लोकांना शांति देऊन त्यांचें कल्याण करीत असतात. ज्या दिशेमध्यें हे असतात, त्या त्या दिशेला तोंड करून यांना शरण जावें. सर्वांना हे पावन करणारे आहेत; त्याचप्रमाणें संवर्त, मेरुसावर्ण, मार्कंडेय, सांख्य, योग, नारद, दुर्वास हे मोठे आत्मनिग्रही व तपस्वी ऋषी सर्व लोकांमध्यें प्रसिद्ध आहेत. रुद्राच्या तोडीचे दुसरे आणखी कांहीं ऋषी आहेत ते ब्रह्मलोकामध्यें रहात असतात. त्यांचें नामोच्चारण केल्यानें निपुत्रिकाला पुत्र होतो व निर्धनाला धन मिळतें. तसेंच धर्मार्थकामामध्यें सिद्धि मिळते. ही सर्व पृथ्वी ज्याची मुलगी झाली होती अशा सर्व राजांमध्यें श्रेष्ठ, प्रजापतीच्या तोडीच्या सार्वभौम वैन्य राजाचे त्याचप्रमाणें सूर्यवंशांत झालेल्या, इंद्रतुल्य पराक्रमी, त्रैलोक्यांत नांवाजलेल्या इलापुत्र पुरूरव्याचे, तसेंच चंद्राचा मुलगा ज्यानें पूर्वी कृतयुगांत अश्वमेध केला असा लोकविश्रुत भरत, महादेवासारखा मोठा तेजस्वी व सर्व जगाला जिंकणारा, मोठा तपस्वी लोकमान्य रंतिदेव, त्याचप्रमाणें श्वेत व राजर्षि भगीरथ, ज्यानें सगराच्या मुलांच्या पडलेल्या रक्षेवरून गंगा वहावून त्यांना उध्दरिलें, या वर सांगितलेल्या अमितुल्य, महातेजस्वी राजांचें नामोच्चारण करीत असावें. याप्रमाणें हे वर सांगितलेले देव, ऋषी, राजे, तसेच सांख्य व योगशास्त्र व हव्यकव्य व श्रुतीमध्यें सांगितलेलें मुख्य परब्रह्म या सर्वांचा नामोच्चार करावा. याप्रमाणें नामोच्चार करणें सर्व प्राणिमात्रांना मंगलकारक व गुणांवह असून व्याधि नाहींशी करून पुष्टि देणारा आहे. आत्मनिग्रह करून मनुष्यानें सकाळसंध्याकाळ ही नांवें घेत असावीं. हेच पाऊस पाडतात, प्रकाश व उष्णता देतात. हेच वहातात. सर्वांची उत्पत्ति करणारे हेच आहेत. सृष्टीचे नायक हेच समजले असून हे दक्ष, क्षमाशील व जितेंद्रिय आहेत. मनुष्यांचीं सर्व पापें यांच्या नामोच्चारणानें नाहींशीं होतात. लोकांच्या पापपुण्याचे हे साक्षीभूत आहेत. पहाटे उठून यांचें नामोच्चारण करणारांचें कल्याण होतें. यांचें नामस्मरण केल्यानें अग्नीपासून भीति

उरत नाहीं, मार्गामध्यें अडथळा येत नाहीं, नामोच्चारण करणाराला दुःस्वप्नें पडत नाहींत, सर्वपापांपासून तो मुक्त होतो व चांगल्या कुळांत जन्माला येतो. कोणतीही दीक्षा घेण्याचे वेळीं यांचें नामोच्चारण केल्यानें मनुष्य न्यायी, आत्मज्ञानामध्यें रत, क्षमाशील, आत्मनिग्रही व असूयारहित असा होतो. रोगग्रस्त मनुष्य यांच्या नामोच्चारणानें रोगांपासून मुक्त होतो. घरांत यांचें नामोच्चारण केल्यानें सर्व संकटें दूर होतात, शेतांत नामोच्चारण केल्यानें शेत चांगलें पिकतें, प्रवासाला निघतांना किंवा घराच्या बाहेर असतांना यांचीं नांवें घेतल्यानें मनुष्यांचें कल्याण होतें. यांच्या नामस्मरणानें मनुष्याचें स्वतःचें, बायकापोरांचें व धनधान्यादिकांचें रक्षण होतें. जो क्षत्रिय लढाईला जातांना यांचीं नांवें घेतो त्याला शत्रूवर जय मिळून त्याची बाजू विजयी होते. देवपितृकार्याच्या वेळीं यांचें नामोच्चारण केल्यानें देव व पितर हव्यकव्य घेतात. यांचें नामोच्चारण करणाराला रोगांपासून, श्वापदांपासून किंवा चोरांपासून भीति उरत नाहीं. त्याची चिंता कमी होऊन सर्व पापांपासून तो मुक्त होतो. जहाजांत किंवा कोणत्याही वहानामध्यें बसलें असतां किंवा राजदरबारांत उत्तम सावित्री मंत्राच्या नामोच्चारणानें कल्याण होतें. या मंत्रोच्चारानें अग्नि लांकडाला जाळीत नाहीं, मुलें लहानपणीं मरत नाहींत व साप, पिशाच्च व राक्षस त्याचप्रमाणें अग्नि, पाणी, वारा व हिंस्र पशु यांची भीति उरत नाहीं. हे मंत्र शांतीला व कल्याणाला कारणीभूत होतात. यांपासून सर्व दुःखें नाहींशीं होऊन कल्याण होतें. हे मंत्र ऋषींचें मोठें गूढ असून जपामध्यें श्रेष्ठ आहेत. तसेंच सप्तर्षी व ध्रुव यांचेंही दररोज नामस्मरण केल्यानें मनुष्यावर संकट येत नाहीं. पूर्वीच्या कश्यप, गौतम प्रभृति ऋषींनीं यांला पूज्य मानिलें आहे. भृगूचें नांव घेतल्यानें मनुष्याची धर्मवृद्धि होते. वसिष्ठाला नमस्कार केल्यानें सामर्थ्य वाढतें. रघूला नमस्कार केल्यानें मनुष्य युद्धांत विजयी होतो. अश्विनीकुमारांचें नांव घेतल्यानें रोगराई येत नाहीं. याप्रमाणें या नामोच्चारणाचा महिमा आहे.'

---

## २८७ ब्राह्मणपरिभवाचें फळ.

### ( १३. १५१—१५७ )

'जगामध्यें पूज्य व नमस्काराला योग्य कोण आहेत व त्यांच्याशीं कसें वर्तन ठेवणें निर्दोष आहे,' ह्मणून युधिष्ठिरानें विचारलें असतां, भीष्म ह्मणाले, 'ब्राह्मणांना तुच्छ केल्यानें प्रत्यक्ष देवांचा सुद्धां फडशा पडतो. त्यांना नमस्कार केल्यानें मनुष्य दोषाला पात्र होत नाहीं. ते पूज्य असून नमस्काराला पात्र आहेत, स्वतःच्या मुलाप्रमाणें त्यांच्याशीं वर्तन असावें. या सर्व जगाला हेच बुद्धिमान आधार आहेत. धर्माचे हे मोठे सेतू असून धनत्याग हेंच त्यांचें मोठें सुख आहे. ते नेहमीं तोंड आवरून ठेवतात. सर्व प्राणिमात्रांना प्रिय असून नाना व्रतें त्यांच्या हातून पाळलीं जातात. भूतमात्रांना त्यांचाच आधार असून सर्वशास्त्रांचे नियम त्यांनींच केले आहेत. ते मोठे यशस्वी असून तप हेंच त्यांचें मोठें धन आहे, व त्यांचें बल तोंडामध्यें आहे. सर्व धर्मांची त्यांच्यापासून उत्पत्ति असून ते मोठे दूरदर्शी आहेत. नेहमीं धर्माप्रमाणें वागण्याचें मनांत ठेवून ते धर्मामध्यें गढून असतात. चतुर्विध प्रजा त्यांच्या आधारानें असते. पूर्वजांचें जड जूं त्यांनीं आपल्या मानेवर घेतलें असून कसलेल्या बैलाप्रमाणें मोठ्या बिकट मार्गामध्यें देखील ते कधीं खचत नाहींत. पितर, देवता व अतिथी यांच्या कार्यांत ते नेहमीं दक्ष असतात. हव्यकव्य प्रथम घेण्याचा त्यांना अधिकार आहे. आपण खाल्लेल्या अन्नानें ते त्रैलोक्याला महाभयापासून सोडवितात. ते सर्व लोकांना दीपाप्रमाणें असून सर्वांना वाट दाखविणारे डोळे आहेत. शिक्षा व श्रुति यांचें ज्ञान हीच काय ती त्यांची दौलत आहे. मोक्ष त्यांच्या डोळ्यांपुढें दिसत असून अध्यात्मचिंतनामध्यें ते गढलेले असतात. सर्व भूतमात्रांची गति त्यांच्या डोळ्यांपुढें असते. सर्व भूतमात्रांचे आदि, मध्य व अवसान त्यांना ठाऊक असून कोणत्याही बाबतींत संशय म्हणून त्यांच्या मनांत उरला नसतो. बरेंवाईट त्यांना कळत असून श्रेष्ठ गतीला ते जाऊन मिळतात. सर्वसंगापासून सुटून निष्पाप होऊन सुखदुःखादि द्वंद्वांना मागें सारून ऐहिक गोष्टींपासून ते अलग असतात. शहाणे लोक

त्यांना मोठा मान देतात. चंदन किंवा चिखल, अन्न मिळणें किंवा न मिळणें, जाडाभरडा कपडा, रेशमी वस्त्र किंवा हरणाचें कातडें हीं सर्व त्यांना सारखीं असतात. दिवसाचे दिवस ते अन्न खाल्यावांचन राहून अशा उपवासानें ते आपलें शरीर सुकवीत, आत्मनिग्रहानें वेदाध्ययनामध्यें गढून रहातात. ते वाटेल त्याला देवत्व आणून देवांना देवत्वाला मुकविण्यास समर्थ आहेत. प्रतिसृष्टि निर्माण करण्याचें त्यांच्या अंगांत सामर्थ्य आहे. ब्रह्मशापानेंच समुद्राचें पाणी खारें होऊन पिण्याला अयोग्य झालें आहे. त्यांचा क्रोधाग्नि अद्यापि न विझतां दंडकारण्यांत जळत राहिला आहे. ते देवांचे देव असून सर्व कारणांचे कारणभूत आहेत. सर्व प्रमाणभूत गोष्टींना ते प्रमाणभूत आहेत. कोण शहाणा मनुष्य त्यांना तुच्छ करील? ब्राह्मणांपैकीं वृद्ध किंवा बाल सर्व सन्मानाला पात्र आहेत. तप व विद्या हींच अधिक पाहून ते परस्परांना मान देत असतात. अविद्वान ब्राह्मणसुद्धां देवस्वरूपी असून दुसऱ्याला पावन करण्याला समर्थ आहे; मग भरलेल्या समुद्राप्रमाणें जो विद्वान आहे तो तर विशेषच समजला पाहिजे. मंत्रपूत असो किंवा साधा असो, अग्नि मोठें दैवत समजलें आहे. स्मशानांत जळणारा अग्निसुद्धां दोषिक समजला जात नाहीं. तुपाला तुह्मी घरांत ठेवा किंवा होमकुंडापाशीं ठेवा तें सारखेंच शोभतें. यासंबंधांत पुढील सहस्रार्जुन व वारा यांचा संवाद ऐक. कोणी सहस्रबाहु कार्तवीर्य नांवाचा राजा होऊन गेला. तो पराक्रमशाली राजा आपल्या माहिष्मती नगरींत राहून रत्नसंपन्न अशा ह्या सागरांतपृथ्वीचें राज्य करीत होता. शास्त्राप्रमाणें विनयपूर्वक क्षात्रधर्म मनांत आणून त्यानें आपला पैसा दत्तात्रयांना देऊन त्यांची आराधना केली;तेव्हां दत्तात्रयांनीं त्याला तीन वर मागण्यास सांगितलें. तेव्हां 'शत्रूंमध्यें मला हजार हात राहून घरामध्यें दोनच असावेत, आपल्या सामर्थ्यानें सर्व पृथ्वी मला जिंकतां यावी व ती जिंकल्यावर दक्षतेनें तिच्यावर राज्य करतां यावें,'असे तीन वर मागून 'मी आपल्या आधारानेंच असल्यानें जेव्हां जेव्हां मी भलत्या मार्गानें जाईन तेव्हां तेव्हां उपदेश करून मला आपण सरळ मार्गाला आणा,' असा चौथा वर त्यानें मागितला. त्या ब्राह्मणानेंही बरें ह्मणून ते वर त्याला दिले. तेव्हां अग्नीप्रमाणें दैदीप्यमान अशा आपल्या रथांत बसून शक्तीची घमेंड चढल्यामुळें, 'माझ्या तोडीचा कोणी आहे काय,' ह्मणून त्यानें मोठ्यानें उद्गार काढले; तेव्हां आकाशवाणी झाली कीं, 'मूर्खा, ब्राह्मण तुझ्याहून श्रेष्ठ आहेत हें तुला कळत नाहीं. ब्राह्मणाच्या साह्यानेंच क्षत्रियाला सर्व प्राणिमात्रांवर अधिकार गाजवितां येतो.' यावर सहस्रार्जुन ह्मणाला, 'मी संतुष्ट झालों असतां प्राणिमात्रांना उत्पन्न करण्याला समर्थ असून रागावलों असतां त्यांचा फडशा पाडण्याचें माझ्या अंगीं सामर्थ्य आहे. कर्मानें, मनानें किंवा वाणीनें ब्राह्मण माझ्यापेक्षां श्रेष्ठ मुळीं नाहींत. ब्राह्मण क्षत्रियांपेक्षां श्रेष्ठ आहेत, हा पहिला सिद्धांत असून क्षत्रिय ब्राह्मणांपेक्षां श्रेष्ठ आहेत हा त्याच्या उलट सिद्धांत आहे. तुझें ह्मणणें हे दोघे मिळून कोणतेंही कृत्य करण्याला समर्थ आहेत; परंतु यामध्यें उघड भेद असा दिसतो कीं, ब्राह्मण क्षत्रियाच्या आधारानें रहात असून क्षत्रिय ब्राह्मणाचा आधार घेण्यास कधीं जात नाहीं. सर्व जगांत ब्राह्मणच वेद पढविण्याच्या मिषानें क्षत्रियांच्या मागें लागून आपलें पोट भरतात. सर्व प्राणिमात्रांचें रक्षण करण्याचें काम क्षत्रियाच्या शिरावर असून क्षत्रियांवरच ब्राह्मण आपलें पोट भरतात. असें असून ब्राह्मण क्षत्रियांपेक्षां श्रेष्ठ कसे ठरतील? बरें तर मग आजपासून या भिकारी गर्विष्ठ ब्राह्मणांना आपल्या ताब्यांत आणण्याचा मी प्रयत्न करतों. ही आकाशवाणी अगदीं खोटी आहे. कातडीं अंगावर घेऊन या स्वैर फिरणाऱ्या ब्राह्मणांना मी आपल्या ताब्यांत आणतों. त्रैलोक्यामध्यें माझ्या वर्चस्वाला धक्का पोहोंचविणारा कोणी नाहीं. ब्राह्मणाला ज्यामध्यें श्रेष्ठत्व आहे, अशा या जगामध्यें मी आज क्षत्रियांना श्रेष्ठत्व आणून सोडतों. युद्धांत माझ्यापुढें कोणाचा टिकाव लागणार नाहीं.' हें त्याचें भाषण ऐकून आकाशवाणी घाबरली. तेव्हां आकाशामध्यें असणारा वायु त्याला ह्मणाला, 'ब्राह्मणासंबंधानें हा दुष्ट भाव टाकून त्यांच्या पुढें वांक. त्यांचें वाईट करण्याच्या मागें लागून राज्याला धोका आणून घेशील. तूं राजा आहेस, तरी त्यांच्या अंगांत

मोठें सामर्थ्य असल्यानें ते तुला मारतील तरी किंवा राज्याला तरी मुकवितील.' यावर सहस्रार्जुनानें 'ब्राह्मण कशा प्रकारचा प्राणी आहे? तो पाण्यासारखा आहे, अग्नीसारखा आहे, सूर्यासारखा आहे किंवा आकाशासारखा आहे; आहे तरी कसा,' ह्मणून विचारल्यावरून वारा फिरून ह्मणाला, 'ब्राह्मण या सर्वांहून श्रेष्ठ आहे. पूर्वी पृथ्वीनें अंगराजाशीं स्पर्धा करून आपला पृथ्वीपणा सोडून ती नाहींशी होत असतां कश्यपांनीं तिला थोपविलें. ब्राह्मण स्वर्गांत ह्मण किंवा पृथ्वीवर ह्मण ब्राह्मणपणाला हार जाणारे नव्हत. पूर्वी अंगिराऋषिंनीं सर्व पाणी दुधाप्रमाणें गटगट पिऊन टाकलें तरी त्यांची तृप्ति झाली नाहीं; तेव्हां एक मोठा लोट सोडून फिरून त्यांनीं पृथ्वी पाण्यानें भरून काढली. दुसऱ्या ऐके वेळीं ते माझ्यावर रागावले असतां मी पळून जाऊन त्यांच्या भीतीनें ब्राह्मणांच्या अग्निहोत्रामध्यें दडून बसलों; त्याचप्रमाणें अहिल्येवर मन ठेवणाऱ्या इंद्राला गौतमांनीं शाप दिला. मात्र धर्माकडे लक्ष देऊन त्याचा नाश केला नाहीं; त्याचप्रमाणें गोड पाण्यानें भरलेला समुद्र ब्राह्मणाच्या शापानें खारट झाला. सुवर्णवर्ण, निर्धूम व सरळ वर ज्वाला निघणारा अशा अग्नीला अंगिरा मुनींनीं शाप दिल्यावरून त्याच्यामधले हे गुण नाहींसे झाले. साठ हजार सगराचे मुलगे समुद्राची उपासना करण्याकरितां समुद्रतीराला आले असतां तेजःपुंज कपिल ब्राह्मणांनीं त्यांना शाप देऊन त्यांची राखरांगोळी उडविली. तूं ब्राह्मणांच्या तोडीला कधींही येणार नाहींस. आपलें कल्याण कशांत आहे याचा नीट विचार कर. मोठमोठे समर्थ असे राजे देखील गर्भामध्यें असणाऱ्या ब्राह्मणांपुढें वांकतात. दंडकेच्या विस्तृत राज्याचा ब्राह्मणानें फडशा पाडला. और्वनामक ब्राह्मणानें तालजंघ नांवाच्या मोठ्या पराक्रमी क्षत्रियाचा फडशा पाडला. तुला देखील हें जें मोठें दुर्लभ असें राज्य, मोठें बल, धर्म व ज्ञान प्राप्त झालीं आहेत तीं दत्तात्रय ब्राह्मणांच्या प्रसादानेंच मिळालीं आहे. अग्नि हा ब्राह्मण असून याची तूं रोजच्या रोज पूजा कां करतोस? कारण हा सर्व लोकांना हवी पोंहोंचविणारा ब्राह्मण आहे, हें तुला ठाऊक नाहीं काय? अथवा जगांतील सर्व प्राणिमात्रांचा उत्पादक व संरक्षक ब्राह्मण आहे हें कळत असून स्वतःला असा मोह कां पाडून घेतोस? त्याचप्रमाणें हें स्थावरजंगम विश्व उत्पन्न करणारे अव्यक्त व अव्यय असे ब्रह्मदेव ब्राह्मण आहेत. कोणी मूर्ख लोक याची उत्पत्ति अंडापासून असून तें अंड जेव्हां फुटलें तेव्हांच पर्वत, दिशा, पाणी, पृथ्वी, आकाश हीं त्यामधून बाहेर पडलीं असें ह्मणतात. 'हीं सृष्टीची उत्पत्ति कोणीही प्रत्यक्ष पाहिली नाहीं; तेव्हां ह्या ब्रह्मदेवांची विशेषेंकरून ते अज असतांना अंडापासून उत्पत्ति झाली असें कसें ह्मणतां येईल, आकाश हेंच अंडरूपी असून या अंडामधून ब्रह्मदेवांची उत्पत्ति झाली असें कांहीं ह्मणतात;' तेव्हां या आकाशापासून याची उत्पत्ति झाली असतां दुसरें कांहीं ते वेळीं नसल्यानें हे कशाच्या आधारावर त्यावेळीं राहिले असावे' ह्मणशील तर या प्रश्नाचें उत्तर असें आहे कीं, अहंकार नामक सर्व तेजांमध्यें व्यापून राहणारा एक आहे, त्याच्या अंगीं मोठें सामर्थ्य आहे. अंड हें अस्तित्वांत नसून ब्रह्मदेव अस्तित्वांत आहेत. व ते या सृष्टीचे प्रभू व उत्पादक आहेत. त्याचप्रमाणें कोणे एके वेळीं सर्व पृथ्वी ब्राह्मणाला देऊन टाकली असतां पृथ्वीला चिंता पडली कीं, 'मी ब्राह्मणकन्या असून मी सर्व भूतमात्रांना धारण करतें. असें असून हे मला फिरून ब्राह्मणाला कशी देऊन टाकतात. ह्मणून मी भूमित्व सोडून ब्रह्मदेवांकडे जातें. या राजाचा त्याच्या राष्ट्रासह नाश होईल?' असें ह्मणून ती ब्रह्मदेवांकडे निघाली असतां कश्यप ऋषी आपल्या योगसामर्थ्यानें आपलें शरीर सोडून प्रेत होऊन पडलेल्या पृथ्वीच्या शरीरामध्यें शिरले; तेव्हां पृथ्वीवर गवत, ओषधी यांची समृद्धि राहून जिकडे तिकडे धर्म चालून पृथ्वीवर भीति ह्मणून कोठेंही उरली नाहीं. याप्रमाणें तीस हजार वर्षें पृथ्वीच्या मृतशरीरामध्यें राहून त्यांनीं सर्व यथास्थित चालविलें. तेव्हां पृथ्वीनें फिरून येऊन त्यांना नमस्कार केला व तेव्हांपासून ती त्यांची मुलगी झाली; त्याचप्रमाणें अंगिरापुत्र उतथ्यांची गोष्ट ऐक. चंद्राची भद्रा नांवाची एक मोठी रूपवती मुलगी होती. चंद्राला, उतथ्य हे तिला योग्य पती आहेत असें वाटलें व तिनेंही उतथ्यासाठीं कडकडीत नियम पा-

ळून कडक तप केलें; तेव्हां सोमाचे वडील अत्री यांनीं उतथ्यांना बोलावून त्यांना ती मुलगी दिली, व उतथ्यांनींही तिचें पाणिग्रहण केलें. इकडे वरुणाचें मन पुष्कळ दिवसपर्यंत त्या मुलीवर बसलें होतें. ज्या वनामध्यें उतथ्य रहात होते, त्याच वनामध्यें येऊन ती मुलगी यमुनेमध्यें स्नानाला उतरली असतां तिला तो उपटून घेऊन गेला व आपल्या सुंदर नगरांतील, आपल्या अप्रतिम वाड्यामध्यें तिला नेऊन ठेवलें. पुढें कांहीं दिवसांनीं आपल्या बायकोला उपटून नेल्याची बातमी उतथ्यांना लागल्यावर ती परत देण्याला सांगण्यासाठीं नारदांना त्यांनीं वरुणाकडे पाठविलें. तेव्हां वरुणानें तें नाकारून त्यांच्या मानगुटीला धरून त्यांना हांकून दिलें. तें ऐकून उतथ्यांना राग येऊन त्या तपोधनांनीं पाण्याचें स्तंभन करून तें पिऊन टाकलें; तेव्हां वरुणाला त्याच्या आप्तांनीं त्या मुलीला देऊन टाकण्याविषयीं सांगितलें तरी तो ऐकेना. तेव्हां उतथ्यांनीं पृथ्वीला, साठ हजार सरोवरांच्या मध्यें असणारा तो वरुणाचा वाडा दाखविण्यास सांगितलें. त्याबरोबर समुद्र मागें सरून त्या ठिकाणीं फार सुपीक जमीन दिसूं लागली. त्या ठिकाणीं वहात असणाऱ्या नदीला उतथ्य ह्मणाले, 'तूं या ठिकाणीं अदृश्य होऊन वहात मरुप्रांताकडे जा. या प्रदेशाला अमंगळता येवो,' याप्रमाणें ती नदी नाहींशी होऊन तो प्रदेश कोरडा पडल्यावर वरुण घाबरून उतथ्यांच्या बायकोला बरोबर घेऊन त्यांकडे आला. व तिला त्यांच्या स्वाधीन केलें; याप्रमाणें वरुणाला वांकवून आपली बायको परत मिळवून उतथ्य आपल्या आश्रमाला निघून गेले.

कोणे ऐके वेळीं देव असुरांकडून फार पीडले जाऊन अगदीं निरुत्साह झाले होते. देवांचे यज्ञ व पितरांची स्वधा ते लुबाडूं लागले. सर्व प्राणिमात्रांचीं धर्मकृत्यें त्यांच्याकडून बंद पडलीं, व देव वैभवाला मुकून पृथ्वीवर भटकत फिरूं लागले. फिरतां फिरतां सूर्याप्रमाणें महातेजस्वी, व्रतशील अशा अगस्त्यांची व त्यांची गांठ पडली; तेव्हां त्यांना नमस्कार करून कुशल प्रश्न झाल्यावर देव त्यांना ह्मणाले, 'दानवांनीं आमचा पराभव केल्यामुळें आह्मी आपल्या वैभवाला मुकलों आहों; तेव्हां आपण आह्मांला या स्थितींतून सोडवा. याप्रमाणें त्यांची शोचनीय स्थिति ऐकून अगस्त्यांना फार राग आला व त्या सामर्थ्यवान ऋषींनीं प्रलयकालच्या सर्वभक्षक अग्नीप्रमाणें उग्र स्वरूप धरलें. त्यांच्यापासून निघणाऱ्या भाजून काढणाऱ्या किरणांनीं दानवांचा जळून फडशा पडूं लागला. हजारों आकाशांतील दानव होरपळून निघून पटापट खालीं पडूं लागले. याप्रमाणें त्यांच्या तेजानें होरपळून निघत असतां, दानव स्वर्ग व पृथ्वी दोन्ही सोडून दक्षिण दिशेकडे जाऊं लागले. बली पृथ्वीवर अश्वमेध यज्ञ करीत होता, त्याला व पृथ्वीवर असणाऱ्या दुसऱ्या असुरांना अगस्त्यांनीं जाळलें नाहीं, तेव्हां देवांनीं त्यांनाही जाळून टाका ह्मणून त्यांची विनंति केली. तेव्हां हे पृथ्वीवर असल्यामुळें यांना जाळल्यानें माझें तप कमी होईल ह्मणून यांना मी जाळीत नाहीं,' असें ते ह्मणाले. अशा प्रकारचा पराक्रम त्या अगस्त्यऋषींनीं गाजविला आहे. आतां महामुनि वसिष्ठांचें महत्कृत्य सांगतों ऐक. कोणे एके वेळीं देव मानस [ वैखानस ? ] सरोवरावर यज्ञ करीत असतां त्यांनीं आपल्या मनामध्यें वसिष्ठांना पुरोहित कल्पून तो यज्ञ चालविला. इकडे त्यांनीं घेतलेल्या त्या दीक्षेमुळें त्यांना क्लेश झालेले पाहून खलिन नांवाचे पर्वतासारखे धिप्पाड असुर त्यांना मारण्याला उठले. तेथें त्यांच्याजवळच ज्याला ब्रह्मदेवांनीं वर दिला होता असें एक सरोवर होतें. जसजसे ते मरत तसतसे त्यामध्यें बुडून ते फिरून जिवंत होत. त्यांनीं खळबळून सोडलेल्या त्या सरोवराचें पाणी शेंकडों योजनेंपर्यंत पसरून गेलें होतें. हे असुर मोठमोठे पर्वत, लोखंडाच्या कांबी व झाडें हातांत घेऊन देवांवर धांवून जात. त्याच्यायोगानें जेरीला येऊन देव इंद्रासह वसिष्ठांना शरण गेले; तेव्हां त्यांची ती दशा पाहून कींव येऊन त्यांनीं देवांना अभय दिलें, व आपल्या सामर्थ्यानें कांहीं प्रयास न पडतां त्या खलिन दैत्यांचा फडशा पाडला. कैलासाला निघालेल्या गंगेला त्यांनीं त्या ठिकाणीं आणलें. ती गंगा त्या सरोवरामधून बाहेर पडली व तिला सरयू हें नांव मिळालें. ज्या ठिकाणीं खलिन दैत्यांचा नाश झाला त्या देशालाही त्यांच्यावरून खलिन हेंच नांव पडलें. याप्रमाणें

ब्रह्मदेवांचा वर मिळालेल्या दैत्यांचा सुद्धां वसिष्ठांनीं फडशा पाडला.

तसेंच कोणे एके वेळीं देवासुरांचें युद्ध चाललें असतां राहूनें चंद्रसूर्यांना आपल्या बाणांनीं झांकून काढल्यामुळें देवांचें दैत्यांपुढें कांहीं चालेना, व ते अगदीं दुबळे पडले. तेव्हां शांत अशा तपोधन अत्रींना तेथें पाहून ते त्यांना ह्मणाले, 'सूर्यचंद्र बाणांनीं अगदीं झांकून निघाल्यामुळें जिकडे तिकडे अंधारमय होऊन आमचें कांहीं चालेनासें झालें आहे आणि ह्मणून शत्रूचा आमच्यावर मारा होत आहे. या संकटांतून सुटण्याचा उपाय आह्मांला कांहीं दिसत नाहीं.' यावर 'मी काय करूं,' ह्मणून अत्रींनीं विचारलें असतां देवांनीं त्यांना चंद्रसूर्य होऊन प्रकाश पाडण्यास सांगितलें. त्यावरून अत्रींनीं तसें करून त्या रणभूमीवर प्रकाश पाडला व आपल्या तेजानेंही देवशत्रू दैत्यांचा त्यांनीं बराच फडशा पाडला व देवांनींही याप्रमाणें अत्रींचा आश्रय मिळवून पुष्कळ दैत्यांना वाटेला लावलें.

त्याचप्रमाणें पूर्वी यज्ञामध्यें इंद्र अश्विनीकुमारांना इतर देवांबरोबर यज्ञभाग देण्याला कबूल नसतां च्यवनांनीं त्यांना ते देवविले ही गोष्ट जगजाहीरच आहे. त्या वेळीं इंद्रानें च्यवनांवर वज्र सोडलें असतां च्यवनांनीं मद नांवाचा दैत्य उत्पन्न केला. तो विक्राळ दैत्य आ पसरून सर्व देवांना तोंडामध्यें गट्ट करूं लागला असतां इंद्रानें भिऊन अश्विनीकुमारांचा भाग यज्ञामध्यें कबूल केला. तेव्हां च्यवनांनीं मदाला जुगार, शिकार, दारू व स्त्रिया यांमध्यें विभागून रहाण्यास सांगून परत बोलाविलें. वर सांगितल्याप्रमाणें मदानें देवांना तोंडांत घेतलें असतां च्यवनांनीं पृथ्वी आपल्या ताब्यांत घेतली व कप नांवाच्या दैत्यांनीं स्वर्ग आपल्या ताब्यांत घेतला. तेव्हां फिरून जेव्हां हे मदाच्या तोंडांतून बाहेर पडले; तेव्हां यांना रहाण्याला जागा नाहींशी झाली. तेव्हां ब्रह्मदेवांना शरण जाऊन पुढें काय करावें ह्मणून त्यांनीं ब्रह्मदेवांना विचारलें. तेव्हां ब्रह्मदेवांनीं त्यांना ब्राह्मणांना शरण जाण्यास सांगितलें. त्याप्रमाणें ते त्यांना शरण गेले असतां ज्याच्या योगानें कपांचा फडशा पडेल असें कर्म ब्राह्मणांनीं आरंभिलें. त्यावरून कपांनीं आपला धनी नांवाचा दूत त्यांकडे निरोप देऊन पाठविला. तो येऊन ब्राह्मणांना ह्मणाला, 'हे कप तुमच्यासारखेच वेदवेत्ते व शहाणे असून यज्ञ करणारे आहेत. सत्यव्रत असून महर्षींच्या तोडीचे आहेत. श्री त्यांच्या आश्रयानें सुखांत आहे. ऋतुकालाशीवाय ते स्त्रीशीं संबंध ठेवीत नाहींत व मंत्रपूत मांसावांचून मांस खात नाहींत. पेटलेल्या अग्नींत होम देतात, व गुरूंच्या आज्ञेमध्यें आहेत. सर्व आत्मनिग्रही असून मुलाबाळांना व गर्भिणी स्त्रियांना देऊन मग खातात. सर्व मिळून वहानामध्यें वगैरे बसतात, रजस्वलेशीं संबंध ठेवीत नाहींत व पुण्यकर्मानें स्वर्गप्राप्ति करून घेतात. सकाळच्या वेळीं द्यूत खेळत नाहींत व दिवसा निजत नाहींत. या व अशा पुष्कळ गुणांनीं ते संपन्न असल्यानें त्यांना तुह्मांस कसें जिंकतां येणार? तेव्हां तुह्मी या कृत्यांतून अंग काढाल तरच तुह्मांला सुख होणार आहे.' असें त्यानें सांगितलें असतांही ब्राह्मणांनीं तें जेव्हां ऐकलें नाहीं तेव्हां कप अस्त्रें घेऊन त्यांच्यावर धांवून आले. ध्वज फडकावीत त्यांना आपल्याकडे येतांना पाहून ब्राह्मणांनीं कपांचे प्राण घेणारे असे पेट घेतलेले अग्नि निर्माण केले. तें ब्राह्मणांनीं निर्माण केलेले अग्नि कपांचा फडशा पाडून आकाशांतील निरनिराळ्या ढगांप्रमाणें शोभूं लागले. हें पाहून देव त्यांची प्रशंसा करूं लागले. देवांचें तेज व वीर्य याप्रमाणें कपांचा नाश झाल्यानें वाढूं लागून त्यांना अमरत्व मिळालें. तेव्हां क्षत्रिय श्रेष्ठ किंवा ब्राह्मण श्रेष्ठ याचा विचार तूंच कर.' असें वायु सहस्रार्जुनाला ह्मणाला असतां सहस्रार्जुनानें नम्रपणें तें कबूल केल्यावर वायु निघून गेला.'

---

## २८८ कृष्णयुधिष्ठिर संवाद—ब्राह्मणपूजेचें फळ. (१३. १९८–१६१)

यावर ब्राह्मण पूजेचें कोणतें फळ डोळ्यांपुढें ठेवून आपण ब्राह्मणांची नेहमीं पूजा करीत असतां ह्मणून युधिष्ठिरानें विचारलें असतां भीष्म ह्मणाले, 'तें सर्व तुला भगवान श्रीकृष्ण सांगेल. माझें बळ, कान, शब्द, मन, डोळे, व शुद्ध ज्ञान हीं सर्व मंद

पडत चाललीं आहेत. माझा देह ठेवण्याचा समय जवळच येत चालला आहे. सूर्य आज फार सावकाश चालतोसा वाटतो. चारी वर्णांचे पुराणांत सांगितलेले ठळक ठळक धर्म मीं तुला सांगितले आहेत. आतां कांहीं बाकी राहिली असेल तर ती या श्रीकृष्णाजवळून शीक. मी हा कोण आहे व याचें बळ किती आहे हें पूर्ण ओळखतों. हा अमेयात्मा तुला जेथें जेथें संशय येईल तेथें तेथें तुला धर्म सांगेल. पृथ्वी, आकाश, स्वर्ग हीं सर्व यानेंच उत्पन्न केलीं आहेत. या वराहरूपी महाबलशाली पुराणपुरुषापासूनच पर्वतासह सर्व पृथ्वी व दिशा उत्पन्न झाल्या आहेत. या परमात्म्याच्या खालींही अंतरिक्ष, आकाश, दिशा व उपदिशा आहेत. सर्व सृष्टीची उत्पत्ति याच्यापासूनच असून याच्या नाभिकमलापासूनच कमलाची उत्पत्ति होऊन त्यापासून अतुल तेजस्वी ब्रह्मदेव निर्माण झाले. समुद्राप्रमाणें अगाध भरून राहिलेला काळोख यानेंच दूर केला. कृतयुगामध्यें हा पूर्ण धर्मरूपानें असून त्रेतायुगामध्यें ज्ञानरूपानें झाला, व द्वापरामध्यें बलरूपानें असून कलियुगामध्यें अधर्मरूपानें आहे. पूर्वी पुराणपुरुष हाच असून यानेंच दैत्यांना पूर्वी मारलें. या विश्वाला उत्पन्न करणारा, त्याचें रक्षण करणारा व त्याची गति हाच आहे. धर्मग्लानि झाली असतां देव किंवा मनुष्य यांमध्यें हा जन्म घेत असतो. धर्मानें राहून हा सर्व बरे वाईट लोक संभाळतो. ज्यांना सोडावयाचें त्यांना सोडून असुरांच्या नाशाला हाच कारण होतो. कार्याकार्याला हाच कारण असतो. एखादी घडलेली, पुढें घडणारी व घडत असलेली गोष्ट हाच आहे. राहू, चंद्र, शुक्र विश्वकर्मा सर्व हाच आहे. हा विश्वरूप असून सर्व विश्वाचा भोक्ता आहे व सर्व विश्वाला यानें आपल्या ताब्यांत ठेविलें आहे. शूलधारी व देहधारी हाच आहे. हा मोठा विक्राळ आहे. सर्व प्राणिमात्र याची याच्या कर्मावरून स्तुति करतात. हजारों गंधर्व, अप्सरा व देव नेहमीं याच्या सेवेला हजर असून राक्षस देखील याची स्तुति करतात. धान्याची वाढ करणारा हाच असून सर्वांवर विजयी असा हाच आहे. यज्ञामध्यें विद्वान लोक याची स्तुति करीत असून सामवेदी रथंतर मंत्रानें याचीच स्तुति गातात. ब्राह्मण ब्रह्ममंत्रानें याची स्तुति करीत असतात. अध्वर्यु यालाच हविर्भाग देतात. पुरातन अशा ब्रह्मगुहेमध्यें शिरून तेथून हाच पृथ्वीचें वरील आच्छादन सृष्टीच्या पूर्वी पहात रहातो. सर्व दानवांना व असुरांना हलवून सोडून पृथ्वीचा उद्धार यानेंच केला. ज्यावेळीं वृंदावनांतल्या गुराख्यांचें पावसाच्या संतत धारेपासून रक्षण करण्यासाठीं गोवर्धन पर्वत यानें उचलला तेव्हां इंद्रादि देवतांनीं याची स्तुति केली. नानाप्रकारचीं खाद्यें लोक यालाच अर्पण करीत असून लढाईच्यावेळीं वीर आपलीं सर्व वहानें यालाच अर्पण करतात. हा शाश्वत असून अंतरिक्ष, पृथ्वी, आकाश सर्व याच्याच आधारानें आहेत. यानेंच मित्रावरुणांचें रेत कुंभामध्यें पाडलें. त्यापासून उत्पन्न झालेल्या ऋषींना वसिष्ठ असें नांव मिळालें. वायु हाच असून अश्विनीकुमार व सहस्ररश्मी सूर्य हाच आहे. आपल्या पराक्रमानें तीन पावलांनीं सर्व असुरांना जिंकणारा हाच होय. देव, पितर व मनुष्य यांचा आत्मा हाच आहे, व यज्ञवेत्यांचा यज्ञही हाच आहे. आकाशामध्यें उदय पावून रात्र व दिवस, त्याचप्रमाणें उत्तरायण व दक्षिणायन असे कालाचे भाग हाच करतो. याच्याच वरून खालून व आजूबाजूंनीं किरणें बाहेर पडून पृथ्वीवर उजेड पाडतात. वेदवेत्ते ब्राह्मण यालाच भजतात. याचेंच तेज घेऊन सूर्य प्रकाशतो. महिन्या महिन्याला यज्ञ करणारा यज्ञ यालाच समजतो. सर्व यज्ञांमध्यें वेदवेत्ते याचीच स्तुति करतात. ज्याला तीन चाकें असून ओढण्याला सात घोडे आहेत, असें वर्षचक्र हाच असून हाच याप्रमाणें उन्हाळा, पावसाळा व हिंवाळा असे तीन काल निर्माण करतो. सर्वव्यापी असा महातेजस्वी श्रीकृष्णच सर्व लोकांना आधार आहे. अंधार दूर करणारा सूर्य हाच आहे व सर्व सृष्टीचा उत्पादक हाच आहे; तेव्हां याला तूं शरण जा. पूर्वी एकवेळ हाच खांडव वनामध्यें गवतामधून अग्नीरूपानें प्रकट होऊन वाटेल तेथें फिरून राक्षस व मोठमोठे साप यांची आहुति घेऊन तृप्त झाला. अर्जुनाला वरचेवर पांढरे घोडे याच्यापासूनच मिळाले. हें जग हेंच त्याचा रथ असून त्याला गति देण्यासाठीं हाच त्याला

जोडतो. सत्वरजतमात्मक याला तीन चाकें असून श्रेष्ठ, कनिष्ठ व मध्यम अशा तीन कर्मानुसार मिळणाऱ्या योनिदर्शक निरनिराळ्या तीन गाते आहेत. काल, अदृष्ट, ईश्वराची इच्छा व आपला संकल्प असे चार प्रकारचे घोडे याला जुंपले आहेत. चांगले, वाईट व या दोहोंचें मिश्रण अशा तीन प्रकारचे कर्मरूपी याला तीन तुंबे आहेत. हाच कृष्ण आकाशासह पंचमहाभूतांना आधार आहे. इंद्र याच्यावर वज्र सोडणार असतां नदीचें अवलंबन करून यानेंच त्याचे हातपाय जखडून टाकले. मोठमोठ्या यज्ञांमध्यें हजारों ऋषींच्या साहाय्यानें ब्राह्मण ज्याची स्तुति करतात, असा थोर इंद्र हाच आहे. हाच एकटा त्या क्रोधनशील दुर्वास-ऋषींना आपल्या घरीं ठेवून घेण्याला समर्थ होता. यालाच पुराण ऋषी ह्मणत असून हाच एकटा आपल्यापासून सर्व विश्व उत्पन्न करीत असतो, हाच सर्वश्रेष्ठ दुसऱ्यांना वेद पढवितो व जुनाट विधि ऐकवितो. कामिक, वैदिक व लौकिक क्रियांचें फळ हाच आहे. सर्व चकचकणारे प्रकाशमान ग्रह, तीन लोकपाल, तीन अग्नि,तीन व्याहृती, सर्व कांहीं हा देवकीपुत्र श्रीकृष्णच आहे. वर्ष, ऋतू, पंधरवडे, दिवस, रात्र, कला, काष्ठा, मात्रा, मुहूर्त, लव, क्षण हे सर्व दिवसाचे भाग याच्यापासूनच आहेत. चंद्र, सूर्य, ग्रह, नक्षत्र, तारे, अमावास्या, पौर्णिमा, नक्षत्रयोग, रुद्र, आदित्य, वसू, अश्विनीकुमार, साध्य, विश्वेदेव, गण, प्रजापति व देवमाता अदिती त्याचप्रमाणें सात ऋषी हे सर्व कृष्णापासूनच आहेत. हाच वायुरूपानें सर्व विश्वाला अस्ताव्यस्त करून सोडतो, अग्नि होऊन जाळून टाकतो, पाणी होऊन बुडवून टाकतो, व ब्रह्मदेव होऊन सर्व विश्वें पुन्हां निर्माण करतो. हाच वेदस्वरूपी वेद पढतो. धर्मासंबंधानें, वेदांसंबंधानें व ज्याच्यावर सर्व चराचर सृष्टि अवलंबून आहे त्या बलासंबंधानें हाच विधिस्वरूपी असून हा ते पाळतो. सर्व चराचर विश्व हाच आहे. हाच मोठी ज्योती होऊन विश्वरूपानें त्याच्या प्रभेच्या योगानें प्रकाशत असतो. पूर्वी यानें प्रथम पाणी उत्पन्न केलें. नंतर सर्व सृष्टि उत्पन्न केली. हा कृष्णच विष्णु आहे. सर्व विश्वाचा आत्मा याचांचून दुसरा कोणी नाहीं. आश्चर्यकारक असे उत्पात हाच आहे. पाऊस पाडणारे मेघ, लकाकणाऱ्या विजा, ऐरावत हत्ती हे सर्व हाच आहे. याला जीवस्वरूप आलें असतां संकर्षण ह्मणतात. पुढें प्रद्युम्न व अनिरुद्ध अशा प्रकारें याचीं रूपांतरें होतात. पुढें हें विश्व उत्पन्न करण्याच्या इच्छेनें हा आकाशादि पंचमहाभूतें उत्पन्न करतो. नंतर सर्व चराचर सृष्टि उत्पन्न करून त्याचे अंडजादि चार भाग करतो. नंतर चार प्रकारचे भूतमात्र व कर्म अशी पंचबीजात्मक पृथ्वी निर्माण करतो. नंतर अंतरिक्ष उत्पन्न करून त्यापासून पृथ्वीवर विपुल पाऊस पाडवितो. ह्याची उत्पत्ति याच्या स्वतःपासूनच असून पुढें सर्व देव, असुर, ऋषी, पितर वगैरे याच्यापासून उत्पन्न झाले. सर्व शुभाशुभ व स्थावर-जंगम याच्यापासूनच आहे. जें अस्तित्वांत आहे व जें पुढें होणार आहे तें सर्व याच्यापासूनच आहे. वेळ आली असतां प्राणिमात्रांना गाठणारा मृत्यु हाच असून धर्माला शाश्वत आधार याचाच आहे. मागें झालेलें व ज्याच्यासंबंधानें आह्मांला ज्ञान नाहीं असें सर्व हाच आहे. ह्या जगामध्यें जें कांहीं प्रशस्त, चांगलें किंवा बरेंवाईट आहे तें सर्व हा केशवच आहे. तेव्हां याहून निराळी समजूत करून घेणें हा मूर्खपणा आहे. अशा प्रकारचें हें या परमश्रेष्ठ, अव्यय केशवाचें स्वरूप आहे. ज्याला आदि, मध्य व अंत आहे अशा सर्व चराचरांना त्याचप्रमाणें वासनेनुरूप उत्पन्न होणाऱ्या प्राणिमात्रांना आदिकारण हाच आहे.'

याप्रमाणें भीष्मांचें भाषण ऐकून, 'ब्राह्मणपूजेचें माहात्म्य काय,' ह्मणून युधिष्ठिरानें श्रीकृष्णाला विचारलें, तेव्हां श्रीकृष्ण ह्मणाला, 'त्याचें फळ काय आहे तें सांगतों लक्षपूर्वक ऐक. जेव्हां मनुष्य धर्मार्थकाममोक्षाच्या किंवा यश, वैभव, आरोग्यता, देवता व पितर यांची पूजा यांच्यामागें लागला असतो तेव्हां त्यानें ब्राह्मणांना आधीं तोषविलें पाहिजे. मी मोठा आहें ह्मणून त्यांचा अनादर करून त्यांचा राग कधीं आपणांवर होऊं देऊं नये. कारण या जगांत ब्राह्मणासारखा कोणी मोठा नाहीं. ज्यांना सर्व कांहीं प्रत्यक्ष दिसत आहे असे हे ब्राह्मण रागावले असतां हें जग जाळून टाकण्याला किंवा दुसरी सृष्टि निर्माण करण्याला समर्थ आहेत. असें असतां

त्यांच्याशीं योग्य वर्तन कसें बरें न ठेवावें? पूर्वी ज्यांचा वर्ण हिरवट, पिंगट असून ज्यांच्या जटा फार वाढल्या होत्या असे सर्व मनुष्यांमध्यें उंच, फाटकीं तुटकीं वस्त्रें नेसलेले, बिल्वदंडधारी दुर्वासऋषी 'थोडा अपराध झाला असतां सुद्धां त्यानें रागावणाऱ्या मला रागीट ब्राह्मणाला आपल्या घरामध्यें सत्कारानें कोण ठेवून घेईल,' असें चव्हाट्यावरून व जमावामधून ह्मणत स्वच्छंदपणें फिरत असतां त्यांच्या रागाला भिऊन कोणीही त्यांना आपल्या घरीं ठेवून घेण्याला धजावेना. तेव्हां मीं त्यांना आपल्याकडे ठेवून घेतलें. तेव्हां एखादे वेळीं ते हजारों लोकांचें अन्न एकटेंच खात, केव्हां केव्हां अन्नाला मुळींच शिवत नसत. कधीं कधीं कित्येक दिवस घराकडे परत येत नसत. एखादे वेळीं एकदम हासत किंवा एकाएकीं रडत. बयानें यांच्या जोडीचा कोणी नव्हता. एके दिवशीं यांना नेमून दिलेल्या जागीं जाऊन आंथरूण, पलंगपोस व त्यांच्या सेवेकरतां ठेवलेल्या चांगल्या शृंगारलेल्या मुली या सर्वांना आग लावून देऊन ते घरांतून निघून गेले. पुढें लवकरच त्यांची माझी गांठ पडली असतां, 'मला आतां खीर पाहिजे,' असें ते मला ह्मणाले. त्यांचें मन ओळखून नानाप्रकारचे खाण्याचे बरे वाईट पदार्थ सदोदित घरीं तयार करून ठेवण्यास मीं नोकरांना सांगितलें असल्यामुळें त्यांनीं मागितल्यावरोबर ती मी त्यांच्यापुढें ठेविली. त्यांतील कांहीं खाऊन बाकीची त्यांनीं मला आपल्या अंगास चोपडून घेण्यास सांगितलें. तेव्हां कांहीं विचार न करतां त्यांच्या सांगण्याप्रमाणें मी सर्व अंगाला व डोक्याला ती चोपडून घेतली. तेथें जवळच रुक्मिणी त्यांना दिसली. तिच्याही अंगाला हासत हासत ती खीर त्यांनीं चोपडली व तशीच तिला रथाला जोडून त्या रथांत बसून माझ्या डोळ्यांदेखत तिच्यावर चाबूक ओढीत घरांतून बाहेर पडले. त्यानें ईर्ष्येनें यत्किंचित्ही मला वाईट वाटलें नाहीं. याप्रमाणें त्यांना राजमार्गावरून चाललेले पाहून दाशार्हांना मात्र फार राग आला. त्यांपैकीं कांहीं एकमेकांमध्यें कुचबुजूं लागले कीं, 'ब्राह्मणाचाच जन्म खरा. बाकी वर्णांमध्यें कांहीं अर्थ नाहीं. या अशा रथांत बसून दुसरा कोण जिवंत राहील? मोठ्या सापाचें विष जालिम ह्मणतात; परंतु ब्राह्मण त्याच्याहून जालिम आहे. ब्राह्मणरूपी सापाच्या विषानें मनुष्य करपूं लागला असतां त्याच्यावर कांहीं उपाय चालावयाचा नाहीं.' याप्रमाणें ते त्या रथांत बसून चालले असतां रुक्मिणीला अडखळतांना पाहून ते तिच्यावर कोरडे ओढून तिला लवकर चालावयास लावीत तरी तिच्यानें चालवत नाहींसें पाहून रागावून रथांतून खालीं उडी घेऊन आड वाटेनें पायानेंच ते दक्षिणेकडे पळत सुटले. मीही तसाच अंगाला खीर चोपडलेला, 'भगवन्, कृपा करा,' ह्मणून ओरडत त्यांच्या पाठोपाठ धांवत होतों. तें पाहून ते मला म्हणाले, 'हे कृष्णा, तूं आपल्या स्वभावानेंच राग जिंकला आहेस. तुझा यत्किंचित्ही अपराध मला आढळला नाहीं. तुझ्यावर मी प्रसन्न आहें. वाटेल तें मागून घे. मी प्रसन्न झाल्याचें फळ काय आहे तें पहा. जोंपर्यंत मनुष्यांची अन्नावर गोडी राहील तोंपर्यंत त्यांचा तुझ्या ठिकाणीं भाव कायम राहील. आणि जोंपर्यंत जगामध्यें धर्म राहील तोंपर्यंत तुझी कीर्ति राहील. त्रैलोक्यांत तुला श्रेष्ठपणा मिळून तूं सर्व लोकांना आवडता होशील. ज्या कांहीं तुझ्या वस्तू मीं मोडून जाळून टाकल्या आहेत त्या सर्व फिरून जशाच्यातशा कायम होतील तुला जगावेंसें वाटेल तोंपर्यंत या तुझ्या खीर चोपडलेल्या अंगाला मृत्यूचें भय रहाणार नाहीं. तूं आपल्या पायाच्या तळव्याला खीर चोपडून घेतली नाहींस हें कांहीं माझ्यामतें ठीक केलें नाहींस.' असें ते बोलत आहेत तोंच माझें शरीर कांतिमान व सुंदर झालें. रुक्मिणीवरही संतुष्ट होऊन ते ह्मणाले, 'स्त्रियांमध्यें तुझी कीर्ति पहिल्या प्रतीची होईल. तुझें यश फार वाढेल. जरा व रोग तुला कधीं न गांठतां तुझी कांति तुला कधीं सोडणार नाहीं. कृष्णाच्या सेवेला तूं कधीं चुकणार नाहींस व त्याच्या सोळा हजार बायकांमध्यें तूं सर्वांत श्रेष्ठ होशील व हें जग सोडावयाची वेळ आली असतां तुला कृष्णाचा शाश्वत समागम मिळेल.' असें तिला सांगून व मला फिरून तशीच ब्राह्मणांवर भक्ति ठेवण्यास सांगून ते अदृश्य झाले. त्या दिवसापासून ब्राह्मण

सांगतील तें करावयाचें असें मी व रुक्मिणीनें व्रतच घेतलें.' यावर युधिष्ठिर ह्मणाला, 'मधुसूदना, या महात्म्या दुर्वासांचें एकंदर सर्व माहात्म्य तूं मला सांगशील तर बरें पडेल.' तें ऐकून श्रीकृष्ण ह्मणाला, 'हे दुर्वासऋषी शंकराचाच अवतार असल्यानें ब्रह्मदेवांनीं मुद्दाम कांहीं दिवस तप करून निर्माण केलेल्या शतरुद्रीयाचें माहात्म्य मी तुला सांगतों ऐक. हे शतरुद्रीय मी नेहमीं सकाळीं ह्मणत असतों. या महादेवाहून श्रेष्ठ या त्रैलोक्यांत कोणी नाहीं. हा सर्व भूतमात्रांचा उत्पत्तिकर्ता असून सर्व स्थावरजंगम ह्याच्यापासून झालें आहे. याच्यापुढें उभें रहाण्याला कोणी समर्थ नाहीं. रणामध्यें हा रागावला असतां याच्या केवळ वासानें मृतप्राय झालेले लोक बेशुद्ध होऊन कांपत पटापट खालीं पडतात. मेघांच्या गडाडण्याप्रमाणें त्यांचा मोठा शब्द ऐकून रणांत देवांचें हृदय सुद्धां फाटून जातें. रागावून आपल्या उग्रस्वरूपानें ज्यांकडे हा पहातो, ते मग देव असोत, असुर असोत, गंधर्व असोत किंवा नाग असोत, त्यांनीं गुहेमध्यें दडी घेतली असतां सुद्धां स्वास्थ्याचें ह्मणून त्यांना नांव नको. दक्षप्रजापतीनें यज्ञाचा पसारा मांडला असतां याला न बोलावल्यामुळें रागावून मुर्तिमान यज्ञावर निर्भयपणें सूं असा आवाज करीत जाणारा बाण सोडून यानें मोठ्यानें गर्जना केली. तेव्हां देवांचें स्वास्थ्य व सौख्य व.जूला राहून त्यांची अगदीं गाळण उडून गेली. धनुष्याच्या टणत्कारानें सर्व लोक व्याकुळ व दीन झाले. जलाशयामधून खळबळ उडून राहून पृथ्वी कांपूं लागली. पर्वतांची धांवपळ उडून अंतरिक्ष फाटलें. जिकडे तिकडे अंधार होऊन प्रकाश नाहींसा झाला. ग्रह व सूर्य यांचें तेज नाहींसें झालें. ऋषी घाबरून जाऊन सर्व लोकांच्या कल्याणासाठीं शांति करून स्वस्तिवाचन ह्मणूं लागले. ते वेळीं घोर पराक्रमी रुद्रानें देवांवर धांवून जाऊन तडाखा देऊन भगाचे डोळे फोडून काढले व पूषा पुरोडाश खात होता त्याचे दांत पाडले. तेव्हां देवांनीं कांपत कांपत त्याला नमस्कार करून त्याची स्तुति केली व हात जोडून शतरुद्रीयाचा जप केला, व यज्ञामध्यें त्याला भाग ठेवला. त्यामुळें शंकर संतुष्ट होऊन यज्ञाला फिरून पूर्वीप्रमाणें सोडून त्या ठिकाणीं जी कांहीं त्यानें नासधूस उडविली होती तें सर्व पूर्वीप्रमाणें पुन्हा त्यानें नीट केलें. त्याचप्रमाणें पूर्वी लोखंड, रुपें व सोनें या तिहींचीं बनलेलीं तीन वीर्यशाली असुरांचीं नगरें आकाशांत होतीं त्यांना इंद्राला आपल्या सर्व आयुधांनिशीं जिंकतां येईना; तेव्हां देव शंकराला शरण जाऊन ह्मणाले कीं, 'या असुरांच्या योगानें लोक सर्व कर्मामध्यें क्रूर होत जातील, तेव्हां भगवन्, या दैत्यांचा आपण त्यांच्या नगरासकट फडशा पाडा.' तेव्हां भगवान शंकरानें 'बरें' ह्मणून विष्णूला आपला बाण केला. अग्नीला बाणाच्या मागची काडी करून यमाला त्याचें पीस केलें. सर्व वेदांना धनुष्य करून सावित्रीला धनुष्याची दोरी केली व ब्रह्मदेवाला सारथि करून याप्रमाणें यांना कामीं लावून तीन कांड्याच्या कालाग्नी सारख्या तेजस्वी बाणानें त्या असुरांना त्यांच्या नगरासकट जाळून टाकलें. पुढें पांच शेंड्या असलेला असा बाल होऊन तो पार्वतीच्या मांडीवर बसला असतां देव याला ओळखतात किंवा नाहीं हें पहाण्यासाठीं हा कोण ह्मणून पार्वतीनें विचारलें. तेव्हां इंद्राला असूया वाटून त्या मुलावर तो वज्र फेंकूं लागला असतां त्यानें तें वज्र व त्याचा कांबीसारखा हात यांना जागच्या जागेवरच थोपवून टाकलें. याप्रमाणें देवांना तो सर्वांचा स्वामी कांहीं ओळखतां आला नाहीं. पुढें ब्रह्मदेवांनीं ध्यानानें हा सर्वश्रेष्ठ उमापती शंकर आहे, हें ओळखल्यावर देवांनीं त्या दंपत्याला स्तुतीनें प्रसन्न केलें. तेव्हां इंद्राचा हात पहिल्यासारखा झाला. हाच परमात्मा दुर्वास ब्राह्मणाच्या रूपानें द्वारकेंत पुष्कळ दिवस माझ्या घरीं राहिला. तेथें मला राग येण्यासारख्या पुष्कळ असह्य गोष्टी ह्यानें केल्या त्या सर्व मीं सोसून घेतल्या. रुद्र, शिव, अग्नि, धाता, विधाता, काल वगैरे सर्व याच्यावांचून दुसरा कोणी नाहीं. हाच एका रूपानें व अनेक रूपांनीं प्रगट होत असतो. या शंकराचे अशा प्रकारचे गुण असून ते समग्र सांगतां येणें शक्य नाहीं. वेदपारग ब्राह्मण, याची एक घोर व एक मंगल अशा दोन तनू आहेत असें ह्मणतात. त्यापैकीं याची जी उग्र तनु ती अग्नि, सूर्य व वीज या स्वरूपी असून त्याची जी सौम्य

व मंगल तनु ती धर्म, पाणी व चंद्र या स्वरूपी आहे. त्याचप्रमाणें याचा अर्धा भाग अग्निस्वरूपी व अर्धा सोमस्वरूपी आहे असेंही ह्मणतात; त्याचप्रमाणें याची जी मंगल तनु ती ब्रह्मचर्य आचरत असून याची दुसरी उग्र तनु जगाचा संहार करीत असते. याला फार महत्व असून सर्वांचा हा ईश्वर असल्यानें याला महेश्वर ह्मणतात. हा फार कडक, तीक्ष्ण व प्रतापशाली असून सर्वांना जाळतो व मांस, रक्त व मज्जा भक्षण करतो ह्मणून याला रुद्र ह्मणतात. देवांमध्यें हा मोठा असून याचा विषय मोठा आहे व मोठ्या विश्वाचें हा पालन करतो ह्मणून याला महादेव ह्मणतात. याचा धूम्रवर्ण असल्यानें याला धूर्जटी ह्मणतात. सर्वांचें शिव करण्याच्या इच्छेनें सर्व कर्मांनीं सर्वांना हा नेहमीं पावन करीत असतो ह्मणून याला शिव असें ह्मणतात. वरतीं अंतरिक्षांत एका ठिकाणीं स्थिर राहून हा सर्वांचे प्राण जाळून टाकतो, तसेंच याचें लिंगही स्थिर आहे; ह्मणून याला स्थाणु ह्मणतात. ज्याअर्थी याचीं नानारूपें असून सर्व स्थावर जंगम हाच आहे व सर्व विश्वेदेव याच्या ठिकाणींच आहेत, त्याअर्थी याला विश्वरूप ह्मणतात. याला हजारों, लाखों डोळे असून त्याच्या सर्व डोळ्यापासून तेज बाहेर पडत असतें. सर्व पशूंचें पोषण करून त्यांच्यामध्यें हा रमला असतो व त्यांचा हा पति आहे, ह्मणून याला पशुपती ह्मणतात. ह्याचें लिंग नेहमीं ब्रह्मचर्यानें असून याची पूजा केल्यानें याला मोठा संतोष होतो. एकानें याच्या मूर्तीची पूजा केली व दुसऱ्यानें लिंगाची पूजा केली तर दुसराच मोठ्या वैभवाला चढतो. देव, ऋषी, गंधर्व, अप्सरा सर्व याच्या लिंगाचीच पूजा करतात. याची पूजा केल्यानें हा संतुष्ट होऊन भक्तवत्सल परमात्मा आपल्या भक्तांना सुख देतो. हाच स्मशानामध्यें प्रेतांना जाळीत राहिला आहे. जे याची तेथें पूजा करतात त्यांना वीरलोक मिळतात. आपली योग्य कामगिरी करीत हाच सर्व प्राणिमात्राच्या हृदयामध्यें मृत्यूच्या रूपानें राहिला आहे. मनुष्याच्या शरीरामध्यें प्राणापान वायुरूपानें हाच आहे. याचीं पुष्कळ दैदीप्यमान व घोर रूपें असून ब्राह्मण त्याची पूजा करीत असतात. देवांमध्यें याला पुष्कळ नांवें असून त्याच्या मोठेपणामुळें, वर्चस्वामुळें व कर्मांनीं तीं सर्व सार्थ आहेत. हें व्यासप्रणीत शतरुद्रीय वेदांमध्यें असून ब्राह्मण तें ह्मणत असतात. ब्राह्मण व ऋषी याला सर्वांत पुरातन समजत असून याच्या तोंडापासूनच अग्नीची उत्पत्ति झाली. हा शरणागतांना कधीं सोडीत नाहीं. वाटेल तीं संकटें सोसून त्यांच्याकरितां हा आपले प्राणसुद्धां द्यावयाला तयार होतो. आयुष्य, आरोग्य, ऐश्वर्य, पैसा व सर्व कामना हाच मनुष्यांना देतो व त्यांच्यापासून हिसकावून घेतो. हाच नेहमीं जगाच्या बऱ्या वाइटामध्यें गढला आहे. सर्व विषयोपभोगावर याचें ईश्वरत्व असल्यानेंही याला ईश्वर ह्मणतात. सर्व जग याच्याच नानारूपांनीं भरलें आहे. हाच आपल्या वडवामुखानें गर्जून समुद्राचें पाणी शोषून घेत आहे.'

---

## २८९ प्रत्यक्ष दर्शन व शास्त्र यांसंबंधानें निर्णय. ( १३.१६२.६६ )

पुढें युधिष्ठिर फिरून भीष्मांना ह्मणाला, 'प्रत्यक्ष दिसणारी गोष्ट व शास्त्राधार यांपैकीं एखादी गोष्ट ठरविण्याला कोणतें विशेष प्रमाणभूत आहे.' भीष्म ह्मणाले, 'यासंबंधीं विचार सांगतों एेक. कोणत्याही गोष्टीसंबंधानें संशय घेणें सोपें आहे; परंतु त्याचा निर्णय ठरविणें हें काम फार कठीण आहे. प्रत्यक्ष दिसणाऱ्या गोष्टी व श्रुती यां दोन्हींमध्यें अशीं असंख्य उदाहरणें आढळून येतील कीं, त्यांसंबंधानें संशय घेतां येईल. कांहीं लोक ज्यांना तर्कवादामध्यें गम्मत वाटते ते स्वतःलाच शहाणे समजून असें प्रतिपादन करतात कीं, प्रत्यक्ष दर्शनच प्रमाणभूत आहे. शास्त्राधारानें गोष्ट कितीही खरी असली तरी प्रत्यक्ष दिसल्याशिवाय ती आहे असें समजतां येत नाहीं; परंतु या ह्मणण्यांत मूर्खपणाचा भाग असून असें प्रतिपादणारे, त्यांना विद्येची कितीही घमेंडी असली तरी मूर्ख समजले पाहिजेत. जर तुला अदृश्य असें ब्रह्म सर्वांला कारण कसें असावें यासंबंधानें संशय असेल तर त्याचा निर्णय पुष्कळ दिवसपर्यंत बिन आळसानें योगाभ्यास केल्यानेंच होणार आहे. अमक्या किंवा

तमक्या ठराविक मार्गानें न जातां मिळेल त्यावर उदरनिर्वाह करून जो या गोष्टीचा छडा लावण्यामध्येंच गढून रहातो त्यालाच हें कळण्याजोगें असून दुसऱ्या कोणालाही कळावयाचें नाहीं. जो तर्काच्या अगदीं शेवटाला गेला आहे, त्यालाच सर्व विश्व प्रकाशमान करणारें हें सर्वव्यापी व उत्तम ब्रह्म आहे हें ज्ञान होणें शक्य आहे. तर्कानें न कळणारें तें सर्व टाकाऊ असें समजतां येत नाहीं; कारण परमाणु वगैरे तोंडानें सांगतां येत नाहींत ह्मणून ते कांहीं नाहींत असें ह्मणतां येत नाहीं.' युधिष्ठिर ह्मणाला, 'प्रत्यक्ष दिसणारी गोष्ट, तर्कानें दिसणारी गोष्ट, शास्त्राधारावरून ठरणारी गोष्ट व शिष्टाचारानें ठरणारी गोष्ट यांपैकीं अधिक प्रमाणभूत कोणती ?' भीष्म ह्मणाले, 'बलवान अशा दुष्ट लोकांनीं धर्मावर कुऱ्हाड उचलली असतां ही धर्मसंस्था कितीं काळजीनें संभाळली तरी तिचा कालानें नाश झालाच पाहिजे. शिवाय गवतानें झांकलेल्या कुव्याप्रमाणें धर्माखालीं कोठें कोठें अधर्म झांकला असतो, तसेंच लोकवर्तनावरही या दुष्टांचा अडथळा येऊन कुऱ्हाड बसते. जे दुर्वर्तनी लोक आहेत त्यांच श्रुतीला झुगारून देण्याकडे लक्ष असतें व हे धर्मद्वेष्टे दुष्ट आचारालाही झुगारून देत असतात. यामुळें प्रत्यक्ष दिसणारी गोष्ट, तर्क किंवा सदाचार यांसंबंधानें संशय उत्पन्न होण्याला जागा होते. ह्मणून ज्यांना श्रुतीचें ज्ञान आहे असे भले लोकच प्रमाणभूत समजून ज्यांना याचा छडा लावून घेण्याची काळजी असते, त्यांनीं अशाकडेसच जाऊन त्यांची शुश्रूषा करून संशयनिवृत्ति करून घेतली पाहिजे. लोभमोहाच्या मागून असणाऱ्यांनीं अर्थकामाकडे दुर्लक्ष करून केवळ धर्मजिज्ञासेनें त्यांची शुश्रूषा केली पाहिजे. अशांचें वर्तन त्याचप्रमाणें यज्ञ किंवा वैदिक क्रिया कधीं न सुटतां त्यांचा नाशही कधीं होत नाहीं.' युधिष्ठिर ह्मणाला, 'माझी बुद्धि फिरून संशयामध्यें गोंधळून गेली आहे. या अपार संसारसागरामध्यें चांचपडणाऱ्या मला पैलपार दिसत नाहीं. जर वेद, प्रत्यक्ष दिसणाऱ्या गोष्टी व आचार या तिन्हींना मिळून प्रमाणभूत समजावयाचें तर हे तिन्ही निरनिराळे असल्यानें जो धर्म एकच समजण्यांत येतो त्यालाही याप्रकारें तीन निराळीं स्वरूपें आलीं.' भीष्म ह्मणाले, 'तुला हे जे धर्माचे तीन विचार दिसतात ते वस्तुतः तसे नसून बलवान अशा दुष्ट लोकांनीं त्याच्यावर वेळोवेळीं कुऱ्हाड आणल्यामुळें त्याला अशीं तीन स्वरूपें आलीं आहेत. तेव्हां यासंबंधानें वेदामध्येंच सांगितलेल्या मार्गानें कांहीं कुतर्क काढीत न बसतां नेहमीं आंधळ्या किंवा जड बुद्धीच्या मनुष्याप्रमाणें डोळे मिटून चालणें बरें. अहिंसा, सत्य, अक्रोध व दान या चौकडीचा धर्मामध्यें समावेश होत असल्यानें ही मोठ्या काळजीनें संभाळावी. त्याचप्रमाणें वाडवडलांनीं ठेवल्याप्रमाणें ब्राह्मणांशीं वर्तन ठेवून ते सांगतील त्याप्रमाणें वागावें. कारण हेंच धर्माची वाट दाखविणारें आहेत. जो मूर्ख मनुष्य प्रमाण गोष्टीला अप्रमाण ह्मणून तंडेल, त्याला प्रमाणभूत धरतां येत नाहीं. कारण, उगीच वितंडवाद उत्पन्न करण्याच्या पलीकडे त्याचा कांहीं उद्देश नसतो.' युधिष्ठिर ह्मणाला, 'जे धर्मद्वेष करणारे आहेत, व जे त्याला मान देणारे आहेत यांना कोणकोणती गति मिळते ?' भीष्म ह्मणाले, 'रजतमानें भरलेले धर्मद्वेषी लोक नरकाला जातात. जे धर्माला धरून सत्यानें व सरळपणानें वागतात ते भले लोक स्वर्गाला जातात. आदरपूर्वक गुरूची उपासना केल्यामुळें धर्माकडेसच त्यांची प्रवृत्ति रहाते. धार्मिक लोक लोभद्वेष सोडून शरीराला कष्ट दिल्यानें ते मग मनुष्य असोत किंवा देव असोत, मोठें सुख पावतात. शहाणे लोक धर्माला ब्रह्मदेवाचा पहिला मुलगा समजतात व धार्मिक लोक भुकेला मनुष्य जसा गोड असें पिकलें फळ आदरानें घेतो त्याप्रमाणें धर्माला जवळ करतात.' युधिष्ठिर ह्मणाला, वाइटांचें स्वरूप कसें असतें व भले लोक कसे वागतात ?' भीष्म ह्मणाले, 'वाइटांचा आचार वाईट असून त्यांना धर्म मर्यादेखालीं ताब्यावर ठेवतां येत नाहीं. त्यांचें तोंड नेहमीं वाईट असतें. जे भले असतात, ते शीलसंपन्न असून त्यांचें वागणें शिष्टासारखें असतें. हे लोक राजमार्गांत, गोठ्यांत, उभ्या शेतांत मलमूत्र कधीं विसर्जन करीत नाहींत. देव, पितर, भूत, अतिथी व कुटुंबांतील माणसें या पांचांना अन्न देऊन बाकीचें ते खातात.

जेवतांना कधीं बोलत नाहींत व ओल्या हातानें कधीं निजत नाहींत, अग्नि, बैल, देव, गोठा, चव्हाटा, वृद्ध मनुष्य किंवा धार्मिक ब्राह्मण हे त्यांच्या दृष्टीस पडले असतां ते प्रदक्षिणा केल्यावांचून रहात नाहींत. वृद्ध, डोक्यावर ओझें घेऊन येणारे, बायका किंवा पुष्कळ गांवांचा अधिकारी, ब्राह्मण, गाई, व राजे आडवे आले असतां त्यांना ते वाट देतात. अतिथी, नोकर, स्वजन व शरणागत यांचें स्वागतपूर्वक ते रक्षण करतात. मनुष्याला सकाळ संध्याकाळ अशा दोनच वेळां जेवण सांगितलें असल्यामुळें मध्यें कांहीं न खाल्ल्यानें उपवासाचें श्रेय येतें; ज्याप्रमाणें होमकालीं प्रज्वालित केलेला अग्नि हवीची वाट पहात असतो, त्याप्रमाणें ऋतुकालींच स्त्री संभोगाची वाट पहात असते; ह्मणून त्याखेरीज इतर वेळेला तिच्याशीं संबंध न ठेवणें ह्मणजे ब्रह्मचर्य पाळल्यासारखेंच आहे. अमृत, ब्राह्मण व गाई हे तिन्ही सारखे समजले असल्यानें गोब्राह्मणाची नेहमीं यथाविधि पूजा करावी. यजुर्वेदानें पवित्र केलेलें मांस खाण्यांत दोष नाहीं. पाठीचें मांस किंवा मंत्रपूत न केलेलें मांस हें आपल्या मुलाच्या मांसाप्रमाणें आहे. मनुष्य स्वदेशांत असो किंवा परदेशांत असो त्यानें अतिथीला कधीं उपास पाडूं नये. वेदाध्ययन संपल्यावर गुरूला दक्षिणा द्यावी. गुरूंना अभिवादन करून त्यांचा सत्कार करून त्यांना आसन द्यावें. गुरूच्या पूजेनें आयुष्य, यश व वैभव वाढतें. वृद्धांना कधीं तुच्छ करूं नये. किंवा हुकूम करूं नये ते उभे असतांना बसूं नये अशानें याचें आयुष्य कधीं कमी होत नाहीं. नग्न स्त्री किंवा नग्न पुरुष यांच्याकडे दृष्टि लावूं नये. रतिसुख एकांतांत घ्यावें. जेवण देखील एकांतांतच व्हावें. गुरु हें सर्व तीर्थांमध्यें श्रेष्ठ तीर्थ असून सर्व पवित्र वस्तूंमध्यें हृदय मुख्य आहे. सर्व दर्शनांमध्यें ज्ञान श्रेष्ठ आहे, व सर्व सुखांमध्यें समाधान हें श्रेष्ठ सुख आहे. सकाळ संध्याकाळ वृद्धांचे चांगले उपदेश ऐकत जावें. वृद्धसेवेनें मनुष्याला शहाणपण येतें. वेद ह्मणतांना किंवा जेवतांना उजवा हात उपयोगांत आणावा. मन, तोंड व इंद्रियें पूर्ण ताब्यांत ठेवावीं. अष्टका नांवाच्या श्राद्धामध्यें पितरांना तसेंच ग्रहांना चांगली शिजविलेली खीर, यवागू, तिळभात तसेच हवी द्यावे. मंगळ शब्द उच्चारून मग हजामतीला बसावें. शिंकलें असतां तसेंच व्याधिग्रस्त असतां, जवळच्यानीं शतंजीव ह्मणावें. भल्या मनुष्याला तो कितीही निकृष्ट दशेंत असला तरी अरे तुरे ह्मणूं नये. विद्वानाला अरेतुरेनें हांक मारणें ठार मारण्यासारखें आहे. आपल्यापेक्षां कमी दर्जाचे किंवा आपल्या बरोबरीचे किंवा आपले शिष्य यांना अरे तुरे ह्मणावें. पापी मनुष्याचें हृदय त्यांनीं केलेल्या पापाचा डंका पिटवीत असतें. ज्यांनीं जाणून पाप केलें आहे तें त्यांनीं भल्यांपासून छपविण्याचा प्रयत्न केल्यानें त्यांचा त्यानें नाश होतो. जे नेहमीं मुद्दाम पाप झांकून ठेवीत असतात, त्यांना वाटत असतें कीं, मनुष्यांना ह्मणा किंवा देवांना ह्मणा, आपलें पाप दिसून नाहीं. पापी मनुष्य त्यानें केलेल्या पापानें घेरून जाऊन नीच योनीमध्यें जन्माला येतो, दिवसानुदिवस वाढत रहाणाऱ्या सावकाराच्या व्याजाप्रमाणें याच्या पापाला सतत भर पडत रहाते. पापकर्म करून पुढें पश्चात्ताप होऊन पुण्यकर्मानें त्यावर झांकण घालण्यास मनुष्य प्रयत्न करील तर त्याच्या योगानें तें पाप नाहींसें होऊन त्याला भर पडत रहात नाहीं आणि त्या ऐवजीं धर्म वाढतो. पाण्यांत मिठाचा खडा टाकला असतां तो ज्याप्रमाणें त्यांत मिळून जातो, त्याप्रमाणें प्रायश्चित्तानें पाप पुण्यामध्यें मिळून जातें. ह्मणून मनुष्यानें पाप कधीं झांकून ठेवूं नये. भल्यापुढें तें कबूल केलें असतां तत्काल ते तें नाहींसें करूं शकतात. आशेनें मिळविलेल्याचा योग्यकालीं उपभोग न घेतला तर याच्या मरणानंतर त्याचा दुसऱ्याला उपभोग मिळतो. मनुष्याचें मन हीच धर्माची मोठी खूण आहे असें शहाणे ह्मणतात आणि ह्मणूनच मनुष्याचा स्वभावतःच धर्माकडे ओढा असतो. मनुष्यानें धर्म एकट्यानेंच आचरावे. मी मोठा धार्मिक ह्मणून धर्मध्वज फडकावीत फिरूं नये. आचरलेल्या धर्माचें फल भोगण्याच्या इच्छेनें जे धर्माचरण करतात ते धर्माची देवघेव करणारे वाणी समजले आहेत. दंभ सोडून देवांची पूजा करावी व कपट बाजूला ठेवून गुरूंची सेवा करावी. दानरूपी मोठा सांठा परलोकासाठीं सांठवून ठेवावा.

युधिष्ठिर ह्मणाला, 'मनुष्य दुर्दैवी असेल तर तो मोठा बलवान असला तरी त्याला पैसा मिळत नाहीं. दैववान असून काटकोळ व पोर असला तरी त्याला तो मिळतो. त्याचप्रमाणें वेळ आली नसतां मनुष्यानें कितीही खटपट केली तरी त्याला लाभ होत नाहीं; तीच वेळ आली असतां लाभ घरीं चालून येतो. आपली शिकस्त करून ज्यांना कांहीं फळ मिळत नाहीं, असे शेंकडो लोक सांपडतील. तसेंच कांहीं प्रयत्नावांचून लाभ झालेले असेही पुष्कळ सांपडतील. पैसा हा श्रमानेंच जर मिळत असेल तर प्रयत्न केल्याबरोबर मनुष्याला तो मिळाला पाहिजे, व असें असतें तर विद्वानाला अविद्वानाचा पोटासाठीं आश्रय करण्याचा प्रसंग आला नसता. दैवीं नाहीं तें मनुष्याला कधीं मिळत नाहीं. मनुष्यानें कितीही श्रम केले तरी त्यांचें त्याला फल मिळत नाहीं असें दिसून येतें. तेंच दुसऱ्या एखाद्याला कांहीं श्रम केल्यावांचून मिळतें. एखादा मनुष्य पैशासाठीं सतत वाईट कर्म करीत असूनही त्याला मुळीं पैसा मिळत नाहीं व दुसरा तसें कांहीं न करतांही श्रीमान असतो. तसेंच कांहीं शास्त्राप्रमाणें वागत असून निर्धन असतात असेंही दिसून येतें. पुष्कळ नीतिशास्त्र पढून सुद्धां मनुष्याला त्याचें कांहीं ज्ञान नसलेलें दिसतें व दुसरा एखादा कांहीं त्याचा अभ्यास न करतां राजाचा मंत्री होऊन रहातो. याला काय कारण असलें पाहिजे. याप्रमाणें विद्या पढलेला मूर्ख असतो व पैसेवानाला अक्कल नसते. विद्येमुळेंच जर मनुष्याला सुख मिळत असतें तर पोटासाठीं विद्वानाला मूर्खाचा आश्रय करण्याची पाळी आली नसती. पाणी मिळाल्याबरोबर जशी मनुष्याची तहान भागते तशी केवळ विद्येनेंच पाहिजे ती गोष्ट साधत असती तर कोणीही या जगांत विद्येला सोडलें नसतें. वेळ आली नसेल तर हजारों शल्यें लागून सुद्धां मनुष्य मरत नाहीं. तीच वेळ आली असतां तो एका काडीनें सुद्धां मरतो.' भीष्म ह्मणाले, 'मोठ्या आयासाचीं कामें हातीं घेऊन मनुष्याला पैसा न मिळेल तर एका जन्मीं सत्पात्रीं दान केल्यानें दुसऱ्या जन्मीं त्यानें कडक तप करावें. पेरल्यावांचून उगवत नाहीं. त्याचा उपभोग मिळतो. त्याचप्रमाणें वयोवृद्धांची शुश्रूषा केल्यानें मनुष्य बुद्धिमान व शहाणा होतो. हिंसा सोडल्यानें दीर्घायू होतो. ह्मणून मनुष्यानें दान करीत राहून हात पसरूं नये. धार्मिकांना मान द्यावा व सर्वांशीं गोड बोलत राहून त्यांना अनुकूल असें वागावें. अंतःशुद्धि व बहिःशुद्धि ठेवण्याचा प्रयत्न करावा. कोणाची हिंसा करूं नये, किडे व मुंग्या यांच्या सुखदुःखासंबंधानें सुद्धां त्यांचीं पूर्व कर्में व स्वभाव त्यांना कारण आहेत, हा विचार मनांत आणून मनुष्यानें स्वस्थ असावें.

जर मनुष्याच्या हातून चांगलीं किंवा वाईट कृत्यें घडतील किंवा तीं तो दुसऱ्याच्या हातून घडवील तर त्यांपैकीं चांगलीं कृत्यें घडल्यानें किंवा घडविल्यानें त्यानें स्वस्थ असावें; परंतु वाईट घडल्यानें किंवा घडविल्यानें मात्र त्याला स्वस्थ रहातां येणार नाहीं. शिवाय काल हा सर्वांच्या बुद्धीमध्यें शिरून त्यांच्या हातून बरीं वाईट कृत्यें घडवून त्याप्रमाणें त्यांना सुखदुःख देत असतो. सत्कृत्याच्या फलावरून तें चांगलें आहे अशी जेव्हां मनुष्याची खात्री पटते तेव्हांच धर्माकडे त्याचा कल वळून त्यावर त्याची श्रद्धा बसते. तथापि ज्याची बुद्धि दृढ नाहीं, त्याची त्यावर श्रद्धा बसत नाहीं. धर्मावर श्रद्धा ठेवणें हें शहाणपणाचें काम आहे. कृत्याकृत्य ज्याला कळतें त्यानें प्रसंगाकडे लक्ष देऊन योग्य असें आचरण ठेवावें. ज्या धार्मिक लोकांना ह्या जन्मांत सुदैवानें संपत्ति मिळाली आहे ते पुढील जन्मीं रजोगुणामध्यें आपला जन्म होऊं नये याबद्दल खबरदारी घेतात. सर्व कांहीं घडून आणविणारा जो काळ तो धर्माचा मोबदला दुःख कधीं देत नाहीं; ह्मणून जो धर्मानें वागणारा आहे त्यानें आपण स्वतः शुद्ध आहों याबद्दल खात्री बाळगावी. कालानें संभाळलेल्या, पेटलेल्या अग्नीप्रमाणें दैदिप्यमान अशा धर्माला, अधर्माला तो कितीही जोरावला तरी नुसता स्पर्श देखील करतां येत नाहीं. तेव्हां ही विशुद्धता व अधर्मापासून मुक्तता हीं दोन मुख्य फळें धर्माचीं आहेत. धर्म हा नेहमीं जयावह असून त्याचा प्रकाश त्रैलोक्यामध्यें पडतो. मनुष्याला एखाद्याचा हात धरून त्याच्याकडून धर्माचरण करवून घेतां येत नाहीं. त्याच्या अगदीं पाठीसच लागलें तर पापी मनुष्य भीतीमुळें ढोंगानें

वागूं लागतो. शूद्रामध्यें देखील जे धार्मिक लोक आहेत ते आपल्याला सांगितलेल्या चारी आश्रमांप्रमाणें वागतां येत नाहीं ह्मणून कधीं ढोंगाचें वर्तन ठेवीत नाहींत. चारी वर्णांचे धर्म विशेषतः मी सांगतों; ह्या चारी वर्णांच्या देहासंबंधानें विचार केला असतां या चारी वर्णांच्या देहामध्यें पंचमहाभूतें सारखींच आहेत; तथापि लोकाचार व धर्म यांमध्यें फरक आहे. तथापि सर्वांना एकाच गतीला मिळतां येईल. इतकी कर्मामध्यें मोकळीक सर्वांना ठेवली आहे. धर्माचें फळ जे स्वर्गलोक ते शाश्वत नसून त्यांचा अंत आहे. परंतु धर्म हा शाश्वत आहे. तेव्हां कारण शाश्वत असून कार्य शाश्वत कां नाहीं? असा प्रश्न उद्भवतो. त्याला उत्तर एवढेंच आहे कीं, फलेच्छेनें जो धर्म आचरण्यांत येत नाहीं तेवढाच धर्म शाश्वत आहे; बाकीचा नाहीं. या शरीरासंबंधानें पाहिलें असतां सर्व लोक सारखे आहेत हें वर सांगितलेंच आहे व या सर्वांच्या आत्म्याचें स्वरूप एकच आहे, व प्रलयाच्या वेळीं हे सर्व आत्मे लय पावून धर्मयुक्त असा संकल्पच काय तो कायम राहून धर्माच्या जोरावर तो फिरून उदय पावतो. अशी स्थिति असल्यामुळें निरनिराळ्या प्राणिमात्रांमध्यें दिसून येणारा भेद उगीच कांहीं तरी आहे असें ह्मणतां येत नाहीं व हलक्या योनींतले प्राणी सुद्धां दैवानिबद्ध होऊन आपापलीं कर्में लोकदृष्टांतानें करूं लागतात.’

यावर कोणत्या नामस्मरणानें मनुष्याचें पाप धुऊन जाऊन त्याला सुख मिळेल,’ ह्मणून युधिष्ठिरानें विचारल्यावरून भीष्म ह्मणाले, ‘त्यांच्या बायकांसह ब्रह्मा, विष्णु, महेश्वर प्रभृति सर्व देव, मेनका वगैरे अप्सरा, पितर, गंगा वगैरे अनेक नद्या, मेरू, मंदार, मलय वगैरे पर्वत, चारी दिशांना असणारे निरनिराळे ऋषी, त्याचप्रमाणें थोरथोर राजर्षी यांचें सकाळ संध्याकाळ शुद्ध अंतःकरणानें एकाग्रतेनें नामस्मरण केलें असतां मनुष्य वैभवाला चढतो व दीर्घायू होऊन कीर्तिमान होतो असें मीं तुला पूर्वींच सांगितलें आहे.

याप्रमाणें शरशय्येवर पडलेल्या भीष्मांनीं युधिष्ठिराच्या नानाविषयांवरील शंका दूर केल्यावर व्यास भीष्मांना ह्मणाले, ‘हा पुरुराज युधिष्ठिर आतां आपल्या उपदेशामृतानें शुद्धीवर येऊन आदरपूर्वक आपल्याला नमस्कार करीत आहे; तेव्हां याला आतां आपण याच्या राजधानीला परत जाण्याची आज्ञा द्या’. हें ऐकून भीष्म मधुरस्वरानें युधिष्ठिराला ह्मणाले, ‘तूं आतां आपल्या नगराला परत जा. मनस्ताप बाजूला सार. नाना देवतांना नानायज्ञ करून त्यांत यथेच्छ अन्नदान व द्रव्यदान कर, क्षत्रिय धर्माकडे लक्ष देऊन राहून आपल्या आचरणानें देव व पितर यांना संतुष्ट करून कल्याण पदरीं बांधून घे. नेहमीं तुझ्या सर्व प्रजांना आनंदवून त्यांच्या मनामध्यें विश्वास उत्पन्न कर व सर्वांमध्यें शांतता राख. तुझे हितेच्छु असतील त्यांचा त्यांच्या योग्यतेप्रमाणें सत्कार कर. पवित्र ठिकाणीं फलानें लादून असलेल्या महावृक्षावर ज्याप्रमाणें पक्षी आपल्या उदरनिर्वाहासाठीं आश्रय करून असतात त्याप्रमाणें तुझे मित्र व सुहृद आपल्या उपजीविकेसाठीं तुझ्यावर अवलंबून राहोत. माझा हें जग सोडण्याचा काल येईल तेव्हां येऊन माझी भेट घे. सूर्य दक्षिणायन सोडून उत्तरायणाकडे वळेल, तेव्हां मी हा लोक सोडणार.’ यावर बरें ह्मणून युधिष्ठिर आदरपूर्वक त्यांना नमस्कार करून आपले आप्त व अनुयायी यांसह धृतराष्ट्र व गांधारी यांना पुढें करून हास्तिनापुराला गेला.

---

## २९० भीष्माचें स्वर्गारोहण.
### (१३. १६७–६८)

पुढें हास्तिनापुराला येऊन पोहोंचल्यावर नागरिक व प्रांतांतील लोक यांचा यथान्याय सत्कार करून युधिष्ठिरानें त्यांना आपल्या घराकडे जाण्यास सांगितलें. ज्यांचे नवरे युद्धांत मेले होते त्यांच्या बायकांना पुष्कळ पैसा देऊन त्यानें त्यांचें समाधान केलें. याप्रमाणें राज्य मिळून राज्याभिषेक झाल्यावर युधिष्ठिरानें आपल्या प्रजेची नानाप्रकारें स्थिरस्थावरता करून वेदपारग व चांगल्या अशा ठळक ब्राह्मणांचे आशीर्वाद घेत आपल्या राजधानीमध्यें पन्नास रात्री काढल्यावर भीष्मांनीं सांगितलेल्या प्रयाणकालाची आठवण होऊन सूर्य उत्तरायणाकडे वळला असतां पुष्कळ याजकांना बरोबर घेऊन तूप, माळा, सुवासिक पदार्थ, रेशमी

वस्त्रें, चंदन, अगरू, दारूहळद वगैरे सामान भीष्मांचा संस्कार करण्यासाठीं पुढें पाठवून धृतराष्ट्र, गांधारी व पृथा यांना पुढें करून आपले भाऊ, श्रीकृष्ण, विदुर, युयुत्सु यांना बरोबर घेऊन तो परिवारानिशीं मोठ्या राजवैभवामध्यें भीष्मांच्या अग्नीमागून निघाला. तो चालला असतां भाट त्याचा स्तुतिपाठ गात होते. लवकरच तो भीष्म ज्या ठिकाणीं शरशय्येवर पडले होते, तेथें येऊन पोहोंचला. पराशर, व्यास, नारद, देवल, असित त्याचप्रमाणें नाना देशचे अवशिष्ट राजे त्यांच्या भोंवतीं बसले होते. चोहों बाजूंनीं पाहरेकरी त्यांचें संरक्षण करीत होते. तेथें येऊन पोहोंचल्यावर रथांतून खालीं उतरून त्यानें व त्याच्या भावांनीं पितामह भीष्मांना तसेंच व्यासप्रभृति ब्राह्मणांना अभिवादन केलें. व ब्राह्मणांनींही उलट त्यांचें अभिनंदन केलें. नंतर ब्रह्मतुल्य ऋत्विजांबरोबर भीष्मांच्याजवळ जाऊन तो त्यांना म्हणाला, 'मी युधिष्ठिर आपल्याला नमस्कार करतों आहें. आपल्याला ऐकूं येत असेल तर काय आज्ञा असेल ती व्हावी. आपण सांगितलेली वेळ संभाळून मी आपला अग्नि, त्याचप्रमाणें आचार्य, ऋत्विज व माझे भाऊ यांना बरोबर घेऊन आलों आहें. आपले मुलगे धृतराष्ट्र त्याचप्रमाणें हा वासुदेव ही येथें आला आहे. त्याचप्रमाणें हे येथें युद्धांत मरून बाकी राहिलेले राजे व कुरुजांगलवासी लोक हजर आहेत. यांच्याकडे डोळे उघडून पहा. आपण सांगितल्याप्रमाणें सर्व व्यवस्थेनिशीं मी आलों आहें.' हें युधिष्ठिराचें भाषण ऐकून भीष्मांनीं डोळे उघडून सर्वांकडे पाहिलें व युधिष्ठिराचा कणकर हात धरून गंभीर स्वरानें प्रसंगोचित असे ते त्याला म्हणाले,' वा युधिष्ठिरा, तूं आपल्या सर्व प्रधानांना घेऊन आलास, ठीक झालें. भगवान सहस्त्ररश्मि सूर्य उत्तरायणांत वळला आहे. मी आज पंचायशी दिवस या शरशय्येवर पडलों असल्यानें हा काल मला शंभरवर्षाप्रमाणें गेला. हल्लीं माघ महिना आला असून त्याच्या शुक्लपक्षाचे अजून तीन भाग अवशेष आहेत.' असें युधिष्ठिराला म्हणून धृतराष्ट्राचा निरोप घेऊन ते त्याला म्हणाले, 'राजा, तुला सर्व धर्म कळत असून शास्त्रांतिल तुझे सर्व संशय दूर झाले आहेत. पुष्कळ बहुश्रुत ब्राह्मणांची तूं शुश्रूषा केली आहेस, चारी वेद व शास्त्रें, त्याचप्रमाणें निरनिराळे धर्म तुला कळत आहेत. म्हणून आतां झाल्या गोष्टीबद्दल शोक करूं नकोस. सर्व कांहीं नियमानियमाप्रमाणें घडलें आहे. याहून निराळ्या रीतीनें या गोष्टी घडणें शक्य नव्हतें. देवगुह्य तूं प्रत्यक्ष व्यासांच्या तोंडूनच ऐकलें आहेस. धर्मानें पाहिलें असतां हे पांडव जसे पंडूचे तसेच तुझेही आहेत; तेव्हां गुरुसेवेमध्यें दक्ष अशा यांना धर्माकडे लक्ष देऊन संभाळ. हा शुद्धात्मा धर्मराज तुझ्या हुकुमामध्यें राहील. याला दुष्टपणा ठाऊक नसून हा गुरुवत्सल आहे, हें मी जाणतों. तुझे मुलगे दुष्ट असून राग, लोभ व ईर्षा यांच्या तावडींत जाऊन दुर्वतन करणारे होते. तेव्हां त्यांच्याबद्दल शोक करण्याचें कारण नाहीं.' असें धृतराष्ट्राला सांगून ते श्रीकृष्णाला म्हणाले, 'हे सर्व देवांना वंद्य अशा पुरुषोत्तमा, तुला माझा नमस्कार असो. तूं विराट् जीवस्वरूपी असून सनातन परमात्मा आहेस. मला तार. मला आतां हें जग सोडण्याला आज्ञा दे. या पांडवांचें रक्षण तूंच केलें पाहिजेस. तुझ्यावांचून यांना कोणाचा आधार नाहीं. मीं पूर्वी त्या मूर्ख दुर्बुद्धि दुर्योधनाला वारंवार सांगितलें कीं, धर्म तेथें श्रीकृष्ण व श्रीकृष्ण तेथें जय असणार; तेव्हां श्रीकृष्णाचा आधार घेऊन पांडवांशीं सख्य कर. त्यांच्याशीं सख्य करण्याची ही अमौलिक संधि दवडूं नकोस. परंतु त्या दुर्बुद्धीनें माझें ऐकलें नाहीं. राजांची भयंकर कत्तल करवून तो स्वतः मरून पडला आहे ! पूर्वी पुष्कळ कालापर्यंत नरासह बदरी आश्रमामध्यें राहिलेला तूं पुराण ऋषि नरायण आहेस हें मी जाणतों. तूं व अर्जुन पुराण ऋषी नरनारायण असून मनुष्यांमध्यें अवतरलां आहां. तेव्हां तूं आतां मला आज्ञा दे. मी हा देह ठेवतों, तुझी आज्ञा मिळाल्यानें मी उत्तम गतीला जाईन.' श्रीकृष्ण म्हणाला, 'मी आपल्याला आज्ञा देतों, आपण वसूला जाऊन मिळा. आपल्या हातून या जगांत यत्किंचितही वांकडें वर्तन झालें नाहीं. आपण मोठे पितृभक्त असून प्रतिमार्कंडेयासारखे आहां, म्हणूनच मृत्यु दासाप्रमाणें आपल्या ताब्यांत आहे.'

असें श्रीकृष्ण ह्मणाल्यावर भीष्म फिरून पांडवांना ह्मणाले, ' मी आपले प्राण आतां सोडतों. तुमची सर्वांची त्याला आज्ञा असावी. सत्यासाठीं फार झटत जा; कारण सत्यामध्येंच मोठें बळ आहे. आत्मनिग्रही, तपस्वी व धर्मशील अशा ब्राह्मणांशीं नेहमीं संबंध ठेवून दुष्टपणा अगदीं सोडून द्या.' असें ह्मणून सर्वांना घट्ट आलिंगन दिल्यावर फिरून ते 'तूं विशेषतः शहण्या ब्राह्मणांचा त्याचप्रमाणें आचार्य व ऋत्विज यांचा सत्कार करीत जा,' असें युधिष्ठिराला ह्मणाले.

याप्रमाणें सर्वांचा निरोप घेतल्यावर कांहीं वेळ गप्प राहून त्यांनीं योगशास्त्रांत सांगितल्याप्रमाणें क्रमानें प्राणधारणा केली; तेव्हां त्यांचे प्राण जसजसे ते अवरोध करूं लागले, तसतसे वर निघाले आणि ज्या ज्या भागांतून ते प्राण रोधून वर येऊं लागले, त्या त्या गात्रांतून बाण उपटून निघून त्यांचें दुःख नाहींसें होत चाललें. तें पाहून तेथील लोकांना फार आश्चर्य वाटलें. सर्व द्वारांचा अवरोध केल्यानें प्राणाला कोठूनच बाहेर पडण्याची संधि न मिळाल्यामुळें तो त्यांचें डोकें फोडून वर निघून गेला. तेव्हां देवदुंदुभी वाजूं लागून त्यांच्यावर पुष्पवृष्टि झाली. सिद्ध व ब्रह्मर्षी यांना आनंद होऊन, ' शाबास, शाबास !! ' ह्मणून त्यांनीं त्यांची वाहवा केली. मोठ्या उल्केप्रमाणें भीष्मांचे प्राण त्यांचें मस्तक फोडून वर आकाशांत जाऊन दिसेनासे झाले. याप्रमाणें भरतकुलाला वर चढविणाऱ्या भीष्मांनीं कालधर्माला अनुसरून देह ठेविला.

पुढें पांडव विदुर वगैरेंनीं लांकडें व नानाप्रकारचे सुवासिक पदार्थ घालून चिता रचली. युयुत्सु वगैरे पहात उभे होते. विदुर व युधिष्ठिर यांनीं भीष्मांना रेशमी वस्त्र नेसवून त्यांच्या अंगावर माळा घातल्या. युयुत्सूनें त्यांच्यावर छत्री धरली, भीम व अर्जुन यांनीं त्यांच्यावर चवऱ्या धरल्या, नकुल सहदेवांनीं फेटे हातांत धरले, कौरवनाथाच्या बायका हातामध्यें ताडाचा पंखा घेऊन त्यांवर हळू वारा घालीत होत्या. पुढें भीष्मांचा पितृमेध सुरू होऊन नानाप्रकारच्या आहुति अग्नीमध्यें दिल्या गेल्या. सामगायक सामदेव ह्मणत होते. नंतर चंदन, दारूहळद, कालागरू वगैरे कमी अधिक दर्जाच्या सुवासिक लांकडांनीं भीष्मांना झांकून काढून चिता पेटवून दिली. नंतर धृतराष्ट्र प्रभृति मंडळींनीं चितेला डावी घातली. याप्रमाणें भीष्मांना अग्नि देऊन कौरव गंगेकडे निघाले. व्यास, नारद, श्रीकृष्ण त्याचप्रमाणें नगरवासी लोक त्यांच्या बरोबर होते, गंगेवर आल्यावर सर्वांनीं भीष्मांना पाणी दिलें. तेव्हां शोकाकुल झालेली अशी गंगा त्या पाण्यांतून मूर्तिमान वर येऊन कौरवांना ह्मणाली, ' शहाणपण व थोर कुल यांनीं संपन्न अशा माझ्या मुलानें राजघराण्याला शोभेल असें वर्तन ठेवून सर्व कुरुवृद्धांचा सत्कार केला आहे. पितृभक्ति ठेवून त्यानें मोठें कडकडीत व्रत पाळलें आहे. प्रत्यक्ष परशुरामांना आपल्या अलौकिक शस्त्रांनीं याचा पराभव करतां आला नाहीं. काशीस स्वयंवराच्या वेळीं यानें एकट्यानें सर्व क्षत्रियांना तोंड देऊन आपल्या भावांकरितां तीन मुली मिळवून आणल्या या जगांत याच्या तोडीचा सामर्थ्यवान कोणी झाला नाहीं. पण अशा याला यःकश्चित् शिखंडीसारख्यानें मारावें याहून माझें हतभाग्य दुसरें तें काय असलें पाहिजे ?' याप्रमाणें तिला शोकाकुल पाहून श्रीकृष्ण ह्मणाला, ' हे भद्रे, स्वस्थ हो. असा शोक करूं नकोस. तुझा मुलगा उत्तम लोकाला गेला आहे. तो प्रत्यक्ष वसु असून शापामुळें त्याला या नरदेहामध्यें जन्म घ्यावा लागला. क्षत्रिय धर्मानुरूप अर्जुनानें यांना मारलें आहे. सर्व देव एकत्र मिळाले तरी यांना मारण्याचें त्यांच्या अंगीं सामर्थ्य नाहीं. मग शिखंडी काय यांना मारणार ! यांना उत्तम गति मिळाली असल्यानें हा हृत्ताप तूं सोडून दे. याप्रमाणें समाधान केल्यावर तिचा शोक कमी होऊन ती पाण्यामध्यें शिरली. कृष्णप्रमुख मंडळी तिचा सत्कार करून तिचा निरोप घेऊन नगराकडे परतले.

# अश्वमेधपर्व.

## २९१ अश्वमेधाची सूचना. (१४. १–३)

धृतराष्ट्रानें गंगेमध्यें पाणी दिल्यावर त्याला पुढें करून युधिष्ठिर अगदीं कष्टी होऊन गंगेंतून बाहेर आला, तेव्हां बाण लागून घायाळ झालेल्या हत्तीप्रमाणें विव्हळ होऊन तो तिच्या तीरावर निश्चेष्ट पडला. तेव्हां श्रीकृष्णानें भीमाला त्याला सांवरण्यास सांगितलें. याप्रमाणें दीन होऊन त्याला मृतप्राय निश्चेष्ट पडलेला पाहून पांडवांनाही फार वाईट वाटलें. धृतराष्ट्र स्वतः मुलांच्या शोकानें कष्टी झाला होता तरी तो आंवरून तो युधिष्ठिराला ह्मणाला, 'बा कुरुसिंहा, ऊठ, पुढच्या कामाला लाग. क्षात्रधर्मानें तूं ही पृथ्वी जिंकली असल्यानें आतां आपल्या भावांसह यथेच्छ तिचा उपभोग घे. शोकाला कांहीं कारण मला दिसत नाहीं. मी व गांधारी यांनीं मात्र आतां रडत बसलें पाहिजे; कारण स्वप्नांत मिळालेल्या ठेव्याप्रमाणें शंभर मुलांना आह्मी मुकून बसलों आहों ! महात्म्या विदुरानें माझ्या हितासाठीं सांगितलेली चांगली गोष्ट न ऐकल्यानें आतां मला मूर्खाला रडण्याची पाळी आली आहे. 'दुर्योधनाच्या अपराधानें तुझ्या कुलाचा नाश होणार; तेव्हां कुलाचें कल्याण तुझ्या मनांत असेल तर या दुरात्म्या दुर्योधनाला ठार कर. कर्ण किंवा शकुनि यांना याला भेटूं देऊं नकोस. हा द्यूताचा बाजारही मोठ्या हुषारीनें बंद पाड. धर्मात्म्या युधिष्ठिराला राज्यावर अभिषेक कर. त्याचीं इंद्रियें त्याच्या स्वाधीन असल्यानें तो या पृथ्वीचें चांगलें पालन करील. तसें तुझ्या मनांत नसेल तर स्वतः राज्य हातीं घेऊन तें नेटानें चालीव. तूं सर्वांशीं सारखा वागूं लागून तुझे भाऊ व ज्ञाति तुझ्या आधारानें खुशाल राहोत, ' असें पूर्वीं दूरदर्शी विदुर ह्मणत असतां मी मूर्ख फुकट त्या पापी दुर्योधनाच्या मागें लागलों. त्या बिचाऱ्या शहाण्याचें हितावह भाषण मीं ऐकलें नाहीं, त्याचें फळ हें मोठें दुःख माझ्यावर कोसळून मी शोकसागरांत बुडालों आहे. या तुझ्या वृद्ध वडिलांची काय दशा झाली आहे पहा ! ' हें ऐकून युधिष्ठिर कांहीं न बोलतां गप्प आहेसें पाहून श्रीकृष्ण त्याला ह्मणाला, 'मनुष्यानें फार शोक केला असतां त्याच्या मेलेल्या पूर्वजांना फार संताप होतो. पुष्कळ नाना प्रकारचे यज्ञ करून त्यांमध्यें चांगली दक्षिणा दे; सोमानें देवांना तृप्त कर, व अतिथींना अन्नपानानें संतोषवून गरिबांना त्यांच्या त्यांच्या इच्छा परिपूर्ण करून तोषीव. कळावयाचें तें तुला कळलें असून करावयाचें तें तूं केलें आहेस. भीष्म, व्यास, नारद व विदुर यांच्यापासून तूं राजधर्म ऐकला आहेस. असें मूर्खासारखें वर्तन तुला शोभत नाहीं. तुझ्या पूर्वजांना अनुसरून हें राज्यशकट खांद्यावर घे, कारण क्षत्रियानें यश मिळविलें असतां त्याला खात्रीनें स्वर्ग मिळतो. रणामध्यें शूरांपैकीं कोणी शत्रूला पाठ दाखवून गेला नाहीं. तेव्हां आतां शोक सोड. या साऱ्या गोष्टी अशाच व्हावयाच्या होत्या. आतां तूं किती रडलास तरी हे रणांत मेलेले तुला फिरून दिसावयाचे नाहींत. ' असें ह्मणून तो थांबला असतां युधिष्ठिर त्याला ह्मणाला, 'श्रीकृष्णा, माझ्यावर तुझें प्रेम किती आहे हें मी ओळखतों. माझ्यावरील स्नेहामुळें व प्रेमामुळें माझी तुला नेहमीं कींव येते. जर तूं मला प्रेमळ मनानें वनांत जाण्याला आज्ञा देशील, तर माझें मोठें प्रिय केल्यासारखें होणार आहे. त्या पितामहांना, त्याचप्रमाणें त्या रणांतून पाय परत न घेणाऱ्या रणसिंह कर्णाला रणामध्यें मारविल्यामुळें माझ्या मनाला शांति ती कशी येत नाहीं. कृष्णा, या क्रूर पापकर्मांपासून ज्यानें मी मुक्त होईन असें कांहीं तरी कर. माझें मन कांहीं साफ होत नाहीं. ' असें तो बोलला असतां व्यास त्याचें शांतवन करून ह्मणाले, 'तात, तुझ्या मनावर उपदेश कसा तो ठसत नाहीं. फिरून फिरून मूर्खाप्रमाणें मोहजालांत तूं सां-

पडतोस. आह्मी फिरून फिरून तुला सांगतों ते को-
ण ह्मणून तूं समजतोस. क्षत्रधर्म तुला ठाऊक आ-
हे. युद्धावांचून यांना गत्यंतर नाहीं. या धर्मानें वा-
गणाऱ्या राजाला दोष मुळीं लागत नाहीं. त्याचप्र-
प्रमाणें मोक्षधर्मही तूं ऐकले आहेस. तुझ्या मनांत-
ले सर्व संदेह दूर करण्याचा मीं अनेकवार प्रयत्न
केला आहे. त्यावर विश्वास न ठेवतां मूर्खप्रमाणें
तूं फिरून फिरून विसरून जात आहेस. अशा प्र-
कारचें अज्ञान तुझ्यांसारख्याला शोभत नाहीं. सर्व
प्रायश्चित्तें व दानधर्म तुला ठाऊक आहेत. तो तूं
अज्ञानानें फिरून फिरून असा वेडा कसा बनतोस?
तुझ्या बुद्धीला भ्रम पडल्यासारखा दिसतो. कोणीही
मनुष्य स्वतंत्रतेनें कांहीं करत नसतो. मनुष्य ईश्व-
राच्या प्रेरणेनें बरें वाईट काम करतो. मग त्यासंबं-
धानें दुःख कशास पाहिजे. आतां या पापकर्माचें
कर्तृत्व जर तूं आपल्याकडे घेत असशील तर हें
पाप कशानें दूर होईल तें सांगतों. ऐक. तपानें, य-
ज्ञानें व दानानें पाप करणारे त्या पापापासून मुक्त
होतात. देव व असुर यांची देखील पुण्यसंचयासाठीं
यज्ञ करण्याविषयीं धडपड असते. यज्ञ सर्वांत श्रेष्ठ
आहे, आणि याच्याच योगानें देवांनीं राक्षसांना बु-
डवून वर्चस्व मिळविलें आहे. राजसूय, अश्वमेध,
सर्वमेध, नरमेध, असे अनेक यज्ञ आहेत. विधि-
पूर्वक अश्वमेध यज्ञ करून त्यांत चांगली दक्षिणा
दे. दाशरथि राम, भरत, वगैरे अनेक राजांनीं हे य-
ज्ञ केलें आहेत.' युधिष्ठिर ह्मणाला, 'अश्वमेध सर्व
पृथ्वीला पावन करण्याला समर्थ आहे यांत शंका
नाहीं; परंतु माझें ह्मणणें थोडें आपण ऐकून घ्या.
एवढा थोरला ज्ञातीचा फडशा पाडून थोडें देखील
दान करण्याला माझ्यापाशीं सामर्थ्य नाहीं; कारण
मजजवळ पैसा मुळीं नाहीं. ज्यांच्या अंगावरची ज-
खम अजून ओली आहे अशा संकटांत असणाऱ्या
या दीन अर्भक राजपुत्रांपासून फिरून पैसा पिळून
काढण्याचा मला धीर होत नाहीं. सर्व पृथ्वी-
चा मीच फडशा पाडून आतां यज्ञासाठीं
ह्मणून आणखी कर मी कसा बरें घेऊं? दुर्योधना-
च्या अपराधानें कां ह्मणाना आधींच सर्व राजे मरू-
न आह्मांला कलंक लागला आहे. दुर्योधनानेंही पै-
शासाठीं पृथ्वी धुऊन घेतली आहे, व तो खजि-
नाही हल्लीं रिता झाला आहे. या यज्ञामध्यें सर्व पृ-
थ्वीची दक्षिणा उत्तम समजली असून प्रतिनिधित्व
गौण समजलें आहे. ह्मणून तो पक्ष स्वीकारण्या-
लाही माझें मन घेत नाहीं. तर या बाबतींत आप-
णच मला योग्य सल्ला द्या.' असें तो ह्मणाला अ-
सतां व्यास क्षणभर विचार करून ह्मणाले, 'तुझा
हा रिता झालेला खजिना फिरून भरेल. मरुत्ताच्या
यज्ञाचे वेळीं दक्षिणेसाठीं ह्मणून गोळा केलेलें पु-
ष्कळ द्रव्य हिमाचलावर तसेंच पडलें आहे तें आ-
णीव ह्मणजे तुला तें पुष्कळ होईल.'

## २९२ मरुत्ताची कथा. (१४. ४-१०)

'कृतयुगामध्यें दंडधर ह्मणून राजा होऊन गे-
ला. त्याचा जगविख्यात प्रसंधि नांवाचा मुलगा
होता. प्रसंधीला क्षुप व क्षुपाला इक्ष्वाकु मुलगा अ-
सून या इक्ष्वाकूचे शंभर मोठे धार्मिक मुलगे होते.
त्यांपैकीं वडील विंश नांवाचा धनुर्धाऱ्यांमध्यें श्रेष्ठ
होता व त्याला विविंश नांवाचा मुलगा झाला. या
विविंशाला पंधरा मुलगे असून ते सर्व सत्यवादी व
दानधर्मामध्यें दक्ष असे होते. त्यांपैकीं वडील ख-
निनेत्र यानें त्या सर्वांला जर्जर करून अकंटक रा-
ज्य मिळविलें. परंतु तें त्याच्यानें राखवेना व प्रजाही
त्याच्यावर संतुष्ट नव्हती, ह्मणून तो राज्याला मु-
कून त्याच्यापासून सुवर्चा मुलाला राज्यपद मिळालें;
बापाची दुर्दशा उडून तो राज्यभ्रष्ट झाल्याचें पाहून
हा मोठ्या हुशारीनें प्रजेच्या हितामध्यें दक्ष राहि-
ला. प्रजा त्याच्यावर फार खूष होती. याप्रमाणें तो
धर्मानें वागत असतां त्याच्या खजिन्यांत तूट पडले-
ली पाहून मांडलिक राजे चोहोंकडून त्याला पीडा
देऊं लागले. तेव्हां त्याला फार वाईट वाटलें. परंतु
तो धार्मिक असल्यामुळें त्याची शक्ति याप्रमाणें क-
मी झाली तरी मांडलिकांना याला मारवेना. तेव्हां
याप्रमाणें फार पेंचांत सांपडला असतां या राजानें
आपला हात फुंकला. त्यापासून मोठें सैन्य उत्पन्न
होऊन सरहद्दीवरील सर्व राजांना त्यानें जिंकलें.
ह्मणून या राजाला करंधम हें नांव पडून त्याच्या
वंशजांना कारंधम हें नांव पडलें. त्याचा पहिला
अविक्षित नांवाचा मुलगा इंद्राच्या तोडीचा
असून यज्ञशील व धार्मिक होता. बृहस्पतींसारखा

तो बुद्धिमान असून कायावाचामनानें त्यानें आपल्या प्रजेला रंजविलें. त्यानें शंभर अश्वमेध केले, व विद्वान अंगिराऋषींनीं स्वतः ते चालविले. याचा मरुत्त नांवाचा मुलगा मोठा कीर्तिमान व सार्वभौम राजा होता. दहा हजार हत्तींचें त्याला बळ असून प्रत्यक्ष तो विष्णूसारखा होता. मेरुपर्वताच्या पायथ्याला जाऊन तेथें पुष्कळ सोनें मिळवून कुंडें, भांडीं, थाळ्या, आसनें वगैरे सर्व सोनाराकडून तयार करवून त्यानें यज्ञसामुग्री जमविली, व तेथें जवळच यज्ञाचें मोठें अवार उभारविलें. आंगिरा ऋषींना महातेजस्वी बृहस्पती व तपोधन संवर्त असे दोघे मुलगे होते. या दोघांमध्यें तेढ पडून बृहस्पतींकडून संवर्तांना वरचेवर त्रास पोहोंचूं लागला ह्मणून घरदार सोडून दिगंबर बनून त्यांनीं वनाची वाट धरली. इकडे इंद्रानें सर्व असुरांना जिंकून इंद्रत्व मिळविल्यावर बृहस्पतींना त्यानें उपाध्याय केलें. या बृहस्पतींचे वडील अंगिरा करंधमाचे उपाध्याय होते. इंद्रामध्यें व मरुत्तामध्यें चढाओढ लागून इंद्र किती झटपटला तरी त्याला गुणवान मरुत्ताची बरोबरी करतां येईना. तेव्हां बृहस्पतींना बोलावून तो ह्मणाला, 'माझ्या मनाप्रमाणें वागावयाचें असेल तर मरुत्ताचें कोणतेंही देवकार्य अगर पितृकार्य आपण करूं नये. मी सर्व देवांचा स्वामी असून हा मरुत्त यःकश्चित् पृथ्वीपति आहे; तेव्हां या मरुत्ताची उपाध्यायगिरी सोडून खुशाल आपण मजपाशीं रहा, किंवा मला तरी सोडा.' हें ऐकून क्षणभर विचार करून बृहस्पती ह्मणाले, 'तूं सर्व भूतमात्रांचा स्वामी असून सर्व देवांचें वैभव तूं पूर्वी एकट्यानें परत मिळविलें आहेस. तेव्हां तुझें पौरोहित्य सोडून त्या यःकश्चित् मरुत्ताचा यज्ञ मी कसा चालवीन? तेव्हां तूं स्वस्थ ऐस. मी कोणाही मर्त्याचें स्रुव हातामध्यें घेणार नाहीं, हें तुला निश्चयात्मक वचन देतों.'

इकडे मरुत्ताला बृहस्पतींचा हा निश्चय समजला, तरी सर्व यज्ञाची तयारी झाल्यावर तो त्यांकडे जाऊन 'आपण सांगितल्यावरून सर्व यज्ञाची तयारी झाली आहे, तेव्हां आपण आमचे कुलगुरु असल्यानें हा माझा यज्ञ निर्विघ्नपणें शेवटास न्या,' असें नम्रपणें म्हणाला. तेव्हां बृहस्पतींनीं तें साफ नाकारून तुच्छ करून त्याला आपला यज्ञ चालविण्यास दुसरा कोणी पहाण्यास सांगितलें. त्यानें पाणउतारा होऊन मोठ्या उद्विग्न मनानें मरुत्त परतला. तेव्हां वाटेंत देवर्षी नारद त्याला भेटले. त्यांपुढें हात जोडून मरुत्तानें बृहस्पतींनीं केलेल्या आपल्या अपमानाची सर्व हकीकत त्यांना सांगितली. तेव्हां त्याला जणूं संजीव करीत आहेत, अशा रीतीनें नारद म्हणाले, 'अंगिरांचे दुसरे संवर्त नांवाचे धार्मिक मुलगे दिगंबर रूपानें सर्व जगाला मोह पाडित पृथ्वीवर भटकताहेत त्यांच्याकडे जा. म्हणजे तुझ्यावर प्रसन्न होऊन ते तुझा यज्ञ चालवतील.' पुढें 'ते संवर्त आपल्याला कोठें भेटतील त्यांच्याशीं कसें वागल्यानें ते आपल्याला धिक्कारून सोडणार नाहींत, म्हणून मरुत्तानें त्यांना विचारलें असतां नारद म्हणाले, 'वेड्याचे वेषानें ते स्वच्छंदपणें फिरत आहेत. काशीमध्यें महेश्वर शंकराच्या दर्शनाला ते नित्य जात असतात. त्या नगराच्या वेशीमध्यें एक प्रेत नेऊन ठेव. तें पाहिल्याबरोबर जे परततील. त्यावरून तेच संवर्त असें ओळख. ते जातील तेथें त्यांच्या मागून जा व त्यांना एकांतांत गांठून हात जोडून शरण जा. 'आपली बातमी तुला कोणीं सांगितली,' म्हणून तुला ते विचारतील, तर माझें नांव सांग व माझ्याकडेच जर फिरून जाण्यास ते सांगतील तर कांहीं विचार न करतां मी अग्नींत शिरलों, म्हणून सांग.' बरें म्हणून नारदांचा सत्कार करून त्यांची आज्ञा घेऊन मरुत्त काशीला गेला. तेथें जाऊन त्यानें नारदांच्या सांगण्याप्रमाणें वेशीमध्यें एक प्रेत ठेविलें. तो तें प्रेत ठेवतो आहे तोंच एक ब्राह्मण त्या वेशींत शिरत असतां तें प्रेत पाहून परतला. तेव्हां मरुत्त हात जोडून प्रसादाच्या इच्छेनें त्यांच्या मागून गेला. एका निर्जन प्रदेशीं त्याला आपल्यामागें पाहून संवर्तांनीं धूळ, चिखल, शेंबूड, थुंकी यांनीं त्याला भरून काढलें. याप्रमाणें संवर्तांनीं अनेक प्रकारें त्रास दिला तरी राजा त्यांचे मागून विनवीत चाललाच होता. तेव्हां संवर्त दमून एका दाट व गार अशा छायेच्या वडाखालीं बसले, व आपल्या संबंधीं हकीकत त्याला कोणीं सांगितली वगैरे त्यांनीं राजाला विचारलें. व 'खरें बोलल्यानें तुझे सर्व

मनोरथ पूर्ण होतील, व खोटें बोलल्यानें तुझा पूर्ण नाश होईल,' असें ते म्हणाले. तेव्हां नारदांपासून त्यांची बातमी आपल्याला कळल्याचें सांगून मरुत्त ह्मणाला, 'आपण आमचे कुलगुरु आहां; ह्मणून आपल्यावर माझें अत्यंत प्रेम आहे.' हें त्या राजाचें भाषण ऐकून संवर्तांना बरें वाटलें. परंतु वेड्यासारखें बरळत निष्ठुर शब्दांनीं राजाची निर्भत्सना करीत ते त्याला वरपांगी ह्मणाले, 'मी वाटेल तिकडे भटकणारा असून असा विद्रूप आहें. तेव्हां अशा माझ्याकडूनच यज्ञ करविण्याची तुझी कां इच्छा? माझा भाऊ यज्ञ करविण्याला समर्थ असून इंद्राजवळ असतो, व तो नेहमीं यज्ञही करवीत असतो. तेव्हां त्याच्याकडूनच तूं आपला यज्ञ करविशील तर बरें. माझीं सर्व यज्ञियद्रव्यें वगैरे त्याच्याच ताब्यांत गेलीं असून एवढें माझें शरीर मात्र मजपाशीं उरलें आहे. शिवाय मी त्याला मानीत असल्यानें त्याच्या आज्ञेवांचून मला तुझा यज्ञ चालवितां येत नाहीं. तेव्हां त्याकडे जाऊन त्याची आज्ञा घेऊन ये, ह्मणजे मी तुझा यज्ञ चालवीन.' नंतर पूर्वी घडलेली सर्व हकीकत सांगून मरुत्त ह्मणाला, 'सर्वस्व खर्ची घालून सुद्धां आपल्याकडून यज्ञ करवावा असें माझ्या मनांत आहे. आपल्या साह्यानें इंद्राचें नाक खालीं करण्याचें माझ्या मनांत आहे. माझा अपराध नसतां बृहस्पतींनीं मला तुच्छ केलें असल्यामुळें आतां त्यांचेकडे जाण्याची माझी इच्छा नाहीं.' संवर्त ह्मणाले, 'बरें तर तुझ्या इच्छेप्रमाणें सर्व कांहीं घडून येईल. तुझ्या हेतूप्रमाणें मी तुझा यज्ञ करण्याला तयार आहें. मात्र मी तुझ्याकडून यज्ञ करवूं लागलों असतां इंद्र व बृहस्पती रागावून तुझा द्वेष करूं लागतील. तेव्हां मात्र न डगमगतां तूं मला तोंडघशीं पाडणार नाहींस असें वचन दे. मला राग येईल तर तुझ्या सर्वबांधवांसह तुला जाळून भस्म करीन.' मरुत्त ह्मणाला, 'जोंपर्यंत सूर्य प्रकाशत आहे व पृथ्वी कायम आहे, तोंपर्यंत आपल्याला सोडीन तर मला उत्तम लोक मिळणार नाहीं. त्याचप्रमाणें सद्बुद्धि मला कधीं न लाधतां मी विषयांशीं खिळून राहीन.' संवर्त ह्मणाले, 'ठीक आहे, ही बुद्धि कायम ठेव ह्मणजे झालें. माझ्याही मनांतून यज्ञ चालविण्याचें फार आहे. कधीं कमी पडणार नाहीं इतकें द्रव्य मी तुला दाखवून देतों. त्याच्या योगानें देव, गंधर्व इतकेंच नव्हे तर प्रत्यक्ष इंद्राला तुला मागें सारतां येईल. पैशावर किंवा यज्ञ चालविण्यावर माझी मोठी मदार नाहीं. त्या माझ्या भावाची व इंद्राची खोड मोडण्याचें माझ्या मनांतून फार आहे. मी तुला इंद्राच्या जोडीला नेऊन बसवीन. हिमाचलाच्या पाठीवर मुंजवान नांवाचें शिखर आहे. भगवान उमापति शंकर त्याच्या एका कठीण सुळ्याला झाडाखालीं व गुहांमधून नाना भूतगणासह स्वच्छंद फिरत असतात. सर्वदेव तेथें त्या बहुरूपी महात्म्या शंकरांची उपासना करीत असतात. विक्राळ व कुरूप अशा कुबेराच्या सेवकासह सकाळच्या सूर्याप्रमाणें लक्ष्मीनें झळकत ते त्या ठिकाणीं राहिले आहेत. त्यांचें रूप किंवा राहण्याचें ठिकाण कोणाला या चर्मचक्षूंनीं दिसत नाहीं. त्याठिकाणीं थंडी, उन्ह, किंवा वारा कांहींच नसून ह्मातारपण, भूक, तहान, मरण, भीति हींही तेथें ठाऊक नाहींत. त्या पर्वताच्या पाठीवर सूर्यकिरणाप्रमाणें लखलखीत पुष्कळ सोनें आहे. कुबेराचे साहाय्यकारी हातांत शस्त्र घेऊन कुबेराचें प्रिय करण्यासाठीं त्याचें रक्षण करीत आहेत. तेव्हां त्या महायोगी त्रिशूलधारी अव्यय व वरद अशा शंकरांना शरण जा, ह्मणजे तुला तें सोनें मिळेल. मरुत्तानें त्यांनीं सांगितल्याप्रमाणें सर्व करून यज्ञाची अलौकिक तयारी केली. शिल्पकाराकडून सर्व सोन्याचीं भांडीं तयार करविलीं. मरुत्ताची ही भरभराट कानीं पडून बृहस्पती संतापानें पांढरे फिक पडून आपल्या दुष्ट भावाचें वैभव वाढणार ह्मणून झुरणीला लागले. तेव्हां इंद्रानें त्यांकडे येऊन त्यांना त्याचें कारण विचारलें. तेव्हां बृहस्पतींनीं, मरुत्त मोठा यज्ञ करणार असून आपले भाऊ संवर्त तो चालविणार असल्याची हकीकत इंद्राला कळविली. तेव्हां इंद्र ह्मणाला, 'आपण देवपुरोहित असून जरा व मृत्यु यांच्या पलीकडे आपण गेलां. आपली ह्मणजे एखादी इच्छा पुरावयाची राहिली आहे असेंही पण नाहीं. तेव्हां हे संवर्त आपलें काय करणार आहेत?' बृहस्पती ह्मणाले, 'असुरांच्या

पाठीं लागून जो जो ह्मणून डोकें वर काढूं पाहील त्याला त्याला तूं मारतोस. आपल्या वैऱ्याचें वैभव कोणाला पहावत नाहीं. ह्मणूनच मीही पण माझ्या वैऱ्याचें वैभव वाढत चाललेलें ऐकून फिका पडत चाललों आहे. वाटेल त्या उपायानें या संवर्ताला किंवा मरुत्ताला आंवर.' हें ऐकून 'बृहस्पती तुझा यज्ञ चालवून तुला अमर करतील,' असा निरोप इंद्रानें मरुत्ताला अग्नीकडून पाठविला. मोठ्या जोरानें सर्व वनांचा व झाडांचा फडशा पाडीत अग्नि मरुत्ताकडे गेला. अग्नीला मूर्तिमान पाहून आश्चर्यचकित होऊन मरुत्त त्याला आसन पाद्य व गाय देऊं लागला असतां अग्नि तें कांहीं न घेतां ह्मणाला, 'मला सर्व पोहोंचलें.' असें ह्मणून त्यानें इंद्राचा निरोप त्याला कळविला. तेव्हां मरुत्त ह्मणाला, 'माझा यज्ञ संवर्तच चालविणार. बृहस्पतींना माझा नमस्कार सांग. इंद्राचा यज्ञ चालविणाऱ्या एवढ्या बड्यांना यःकश्चित् पामराचा यज्ञ चालविणें शोभणार नाहीं.' असें मरुत्त ह्मणाला असतांही अग्नि फिरून त्याचें मन वळवीत आहेसें पाहून संवर्त ह्मणाले, 'फिरून इंद्राचा अशा प्रकारचा निरोप घेऊन येशील तर रागानें मी तुला आपल्या डोळ्यांनीं जाळून भस्म करून टाकीन.' असें ते ह्मणाल्याबरोबर अग्नि अगदीं भिऊन जाऊन पिंपळाच्या पानाप्रमाणें लटलट कांपत इंद्राकडे गेला, व घडलेली सर्व हकीकत त्यानें त्याच्या कानावर घातली, व 'बृहस्पतींच्या साह्यानें कितीही उत्तम लोक आपल्याला मिळावयाचे असले तरी ते नकोत,' असें मरुत्तानें स्पष्ट सांगितल्याचेंही त्याला कळविलें. 'माझ्या ह्मणण्याप्रमाणें न करशील तर तुला वज्रानें मारीन,' असा निरोप त्याला सांगण्यास इंद्रानें फिरून अग्नीला सांगितलें; तेव्हां अग्नीनें संवर्ताच्या भीतीनें येथें जवळच गंधर्वराज धृतराष्ट्र होता त्याला पाठविण्यास सांगितलें. तेव्हां इंद्र ह्मणाला, 'तूंच सर्वांना जाळणारा असून तुझ्यावांचून जाळून भस्म करणार त्रैलोक्यांत कोणी नाहीं. तुझ्या स्पर्शाचीच सर्वांना भीति वाटते. तेव्हां ह्या तुझ्या ह्मणण्यांत कांहीं अर्थ नाहीं.' यावर अग्नि ह्मणाला, 'तूं आपल्या बळानें सर्व आकाश व पृथ्वी व्यापून टाकली आहेस, असें असून सुद्धां पूर्वी वृत्रानें तुझें इंद्रत्व कसें बरें हरण केलें?' इंद्र ह्मणाला, 'शत्रूंना वठणीला आणण्याचें एवढेंच नव्हे तर पर्वतांचा सुद्धां चुराडा उडविण्याचें माझ्या अंगांत सामर्थ्य आहे. परंतु शत्रूनें दिलेला सोम ज्याप्रमाणें मी घेत नाहीं त्याचप्रमाणें दुबळ्या शत्रूवर मी कधीं वज्र सोडीत नाहीं, ह्मणून वृत्रानें कांहीं वेळ डोकें वर काढलें. परंतु एकंदरींत माझ्याशीं वैर बांधून कोण सुख पावला आहे. कालेयांना पृथ्वीवरून हांकून दिलें, दानवांची स्वर्गांतून हाकालपट्टी केली व प्रल्हादाच्या स्वर्गवासाला व्यत्यय आणला. आणखी काय पाहिजे?' अग्नि ह्मणाला, 'पूर्वी शर्यातीचा यज्ञ च्यवनांनीं चालवून त्यामध्यें अश्विनीकुमारांसह त्यांनीं सोम एकव्यांनींच घेतला. त्यामुळें रागावून तो यज्ञ बंद पाडण्यासाठीं तूं त्यांवर आपलें वज्र सोडलेंस. तेव्हां त्यांनीं रागावून वज्रासह तुझा हात जागच्या जागीं बंद केला, व मद नांवाच्या एका असुराला उत्पन्न केलें. त्याला पाहिल्याबरोबर तुझे डोळेच मिटले. त्या मदाचा खालचा जबडा पृथ्वीला लागला असून वरचा आकाशाला जाऊन भिडला होता. त्याच्या लांब लांब शेंकडों दांतांमुळें तो फार विक्राळ दिसत होता. त्यांपैकीं चार पुढचे तर फारच लांब असून रुपेरी खांबाप्रमाणें दिसत होते. तो दांत खात शूल उगारून जेव्हां तुझ्यावर धांवून आला तेव्हां तें तुझें स्वरूप अगदीं पाहण्यासारखें होतें! ते वेळीं भिऊन तूं त्या ऋषींनाच शरण गेलास! तेव्हां क्षत्रियाच्या बळापेक्षां ब्राह्मणाचें बळ श्रेष्ठ आहे, हें तुला मी सांगावयाला नको. ब्राह्मणाचें बळ मी ओळखीत असल्यामुळें संवर्ताशीं कंबर बांधण्याच्या भरीस मी पडत नाहीं.' हें ऐकून इंद्रानें धृतराष्ट्राला माझें न ऐकशील तर तुला नाहींसा करीन,' असा निरोप देऊन मरुत्ताकडे पाठविलें. तो गंधर्वराज धृतराष्ट्रानें मरुत्ताला जाऊन कळविला असतां मरुत्त ह्मणाला,'मित्रद्रोहासारखें दुसरें पातक नाहीं. तें ब्रह्महत्येच्या तोडीचें आहे. बृहस्पतींना त्या देवेंद्राचें पौरोहित्य खुशाल करूं दे. माझा यज्ञ संवर्तच चालविणार. मी इंद्राच्या निरोपाची पर्वा करीत नाहीं.' तेव्हां धृतराष्ट्रानें मरुत्ताचा निरोप परत इंद्राला जाऊन कळविला. पुढें आकाशामध्यें इंद्राचा गर्जना ऐकून

मरुत्तानें संवर्तांना आपल्याला आश्रय देऊन आपली भीति दूर करण्यास सांगितलें. तेव्हां संवर्त ह्मणाले, 'हे राजसिंहा, भिऊं नकोस. मी ही तुझी भीति स्तंभनी विद्येनें आतांच्या आतां दूर करतों. माझ्या स्तंभनी विद्येपुढें इंद्राचें किंवा त्याच्या वज्राचें कांहीं चालणार नाहीं. वज्र वाटेल तेथें फिरो, वारा वाटेल तितक्या जोरानें वाहो, किंवा धों धों पाऊस पडून सर्व अंतरिक्ष पाण्यानें भरून निघून विजेचा वाटेल तेवढा कडकडाट व लखलखाट होऊन राहो, तुला भिण्याचें बिलकूल कारण नाहीं. आणखी कांहीं तुझी इच्छा आहे का सांग.' त्यावर मरुत्त ह्मणाला, 'इंद्रानें त्याचप्रमाणें इतर देवांनींही स्वतः या यज्ञामध्यें येऊन आपापला यज्ञभाग घेऊन सोम प्यावा असें माझ्या मनांत आहे.' संवर्त ह्मणाले, 'मी आपल्या मंत्रसामर्थ्यानें प्रत्यक्ष इंद्राला या यज्ञांत ओढून हा आणला पहा! तो पहा तो देवांसह कसा इकडे लगबगीनें येत आहे!' असें ते ह्मणताहेत तोंच इंद्र बाकीच्या देवांसह आपल्या रथांत बसून अविक्षिताच्या यज्ञांतील सोम पिण्यासाठीं आला. मरुत्तानें आपल्या उपाध्यायाला बरोबर घेऊन उठून त्याचा सत्कार करून त्याचें स्वागत केलें आणि तो त्याला ह्मणाला, 'मी हात जोडतों, माझ्यावर कृपा असूं दे. माझा यज्ञ कसाबसा शेवटास गेला व तो या बृहस्पतींचे धाकटे भाऊ संवर्तांकडून गेला! असो कसें तरी माझें जीवित सफल झालें.' इंद्र म्हणाला, 'या तपोधन महातेजस्वी तुझ्या गुरूंना मी ओळखतों. यांच्याच हाक मारण्यावरून मी येथें आलों आहें. मी तुझ्यावर संतुष्ट झालों असून तुझ्यावरचा माझा राग नाहींसा झाला आहे.' नंतर संवर्तांनीं त्याला यज्ञभाग सर्व देवांना स्वतः वांटून देण्यास सांगितलें, त्यावरून इंद्रानें देवांना एक भव्य सभागृह ठरवून देऊन त्यांत हजारों भव्य व सुंदर खोल्या तयार करण्यास सांगितलें. त्याला चढण्यास भक्कम व मजबूत पायऱ्या करविल्या. अप्सरांच्या नर्तनासाठीं राखून ठेवलेला यज्ञ मंडपाचा भाग तर इंद्रभुवनाप्रमाणें सजविण्यांत आला होता. देवांनीं याप्रमाणें त्याच्या आज्ञेबरहुकूम सर्व व्यवस्था तावडतोब केल्यावर, इंद्र संतुष्ट होऊन मरुत्ताला म्हणाला, 'या यज्ञांत तुझा माझा संबंध जडल्यानें तुझे पूर्वज तसेच सर्व देव संतुष्ट होऊन तूं दिलेला हविर्भाग घेण्यास प्रत्यक्ष हजर आहेत. अग्नीला एक तांबडा बैल स्थंडिलावर बळी दे. त्याचप्रमाणें शास्त्रांत सांगितल्या प्रकारचा रंगी बेरंगी कातड्याचा पवित्र काळा बैल विश्वेदेवांना दे.' याप्रमाणें तो यज्ञसमारंभ मोठ्या थाटानें चालला असतां देवांनीं स्वतः अन्न वाटून घेतलें व इंद्र त्या यज्ञामध्यें सदस्य होता. संवर्त स्थंडिलावर गेले असतां अग्नीप्रमाणें तेजःपुंज दिसत होते. त्यांनीं सर्वदेवांचीं मोठ्यानें नांवें घेऊन मंत्रपूर्वक त्यांना हवी दिले. पुढें प्रथम इंद्र सोम प्याला. नंतर देव प्याले. यज्ञ संपल्यावर राजाच्या परवानगीनें ते सुखानें आपापल्या ठिकाणीं परत गेले. तेवेळीं त्या राजानें उल्हासानें हजारों ठिकाणीं सोन्याचे ढीग लावून ते ब्राह्मणांस नेण्यास सांगितलें. त्यावेळीं ज्या सोन्याच्या राशी तेथें पडल्या त्या अद्यापि तशाच आहेत. त्या आणून तूं आपला यज्ञ कर.' हें ऐकून युधिष्ठिराला आनंद झाला व तें द्रव्य आणून यज्ञ करण्यासंबंधाचा विचार त्यानें आपल्या मंत्र्यांशीं चालविला.

---

## २९३ श्रीकृष्णाचा अश्वमेधाला सल्ला.

### ( १४-११०-१५ )

पुढें एकेवेळीं बांधवांच्या नाशामुळें राहूनें ग्रासलेल्या सूर्याप्रमाणें युधिष्ठिराला निस्तेज पाहून भगवान् श्रीकृष्ण त्याचें समाधान करून ह्मणाला, 'प्रत्येक वांकडी वाट मनुष्याला मृत्यूकडे नेऊन पोहोंचविते, व सरळ वाट ब्रह्मपदाला पोहोंचविते, ही मुख्य गुरुकिल्ली आहे. वृथा बडबडींत फायदा नाहीं. अद्यापि तुझ्या हातून सर्व काम पार पडलें नाहीं. अद्यापि मुख्य शत्रूला तूं जिंकलें नाहींस. स्वतःच्या शरीरामध्यें असणारा तुझा शत्रु तुला अजून कसा कळत नाहीं? ह्यासंबंधांत इंद्र व वृत्र यांची गोष्ट सांगतों ऐक, पूर्वी वृत्राचें व इंद्राचें युद्ध होऊन वृत्रानें सर्व पृथ्वी व्यापून टाकून तिच्यामधील गंधगुण काढून घेतल्यामुळें तिला दुर्गंधि सुटली. त्यामुळें इंद्रानें रागावून वृत्रावर आपलें वज्र सोडलें. तेव्हां

वृत्रानें पाण्यामध्यें शिरून त्याचा रसगुण काढून घेतला. तेव्हां फिरून इंद्रानें वज्र सोडलें असतां वायूमध्यें शिरून त्यानें पूर्वीप्रमाणें वायूचाही गुण काढून घेतला. फिरून इंद्रानें त्यावर वज्र सोडलें असतां तेजामध्यें शिरून त्यानें तेजाचे गुण काढून घेतले. व तेथेंही इंद्राचें वज्र मागें लागलेलें पाहून त्यानें आकाशामध्यें शिरून त्याचा गुण काढून घेतला. पुढें इंद्रानें तेथेंही त्यावर वज्र सोडलें. तेव्हां तो प्रत्यक्ष इंद्राच्या शरीरामध्यें शिरून त्याचा गुण त्यानें काढून घेतला. त्याच्या योगानें इंद्राला मोठा मोह पडला; तेव्हां मी ब्रह्म आहें हा उपदेश इंद्राच्या मनावर बिंबून नंतर त्यानें अदृश्य अशा वज्रानें शरीरामध्यें असणाऱ्या वृत्राला जिंकलें. मनुष्याला शारीरिक व मानसिक अशा दोन प्रकारच्या व्याधी जडतात. त्यांची उत्पत्ति परस्परांपासून असून एकमेकांच्या साहाय्यावांचून ते कधीं उद्भवत नाहींत. शरीराला जी व्याधि जडते तिला शारीरिक असें नांव असून मनाला जडणाऱ्या व्याधीला मानसिक असें नांव आहे. ( शीत उष्ण व वायु ) कफ, वात, पित्त हे तीन शारीरिक गुण असून हे तीन सम अवस्थेमध्यें असतात तेव्हां ती अव्यग्र स्थिति समजली जाते. उष्णामुळें शीताला पीडा होऊन, शीतानें उष्णाला पीडा होते. सत्व, रज आणि तम हे तीन आत्म्याचे गुण असून या तिघांची सम अवस्था हें मानसिक सुस्थितीचें लक्षण आहे. परंतु या तिघांपैकीं एकाचें जेव्हां प्राबल्य होतें तेव्हां त्याला उपाय करावा लागतो. आनंदाचा शोकानें शोकाचा आनंदानें मोड होतो. कांहीं लोकांना दुःख झालें असतां ते पूर्वसुख मनांत आणतात व कांहीं सुखामध्यें असतांनां पूर्वदुःख मनांत आणतात. परंतु तूं कधीं सुखदुःख मनांत न आणतां दुःखानें दुःखी किंवा सुखानें सुखी झाला नाहींस. असें असून आतां उगीच दुःखाला हार जाऊन तूं हें काय आरंभिलें आहेस. किंवा मला वाटतें हल्लींप्रमाणें नेहमीं कशानें तरी रडत बसणें हा तुझा स्वभावच आहे. द्रौपदी रजस्वला असतां तिला एका वस्त्रानिशीं तुमच्या देखत सभेमध्यें आणली, कातड्यानिशीं घोर अरण्यामध्यें जाऊन तुम्हांला रहावें लागलें, जटासुर, चित्रसेन, जयद्रथ यांच्यापासून त्रास सोसावा लागला; त्याचप्रमाणें अज्ञातवासामध्यें कीचकानें द्रौपदीला लाथ मारली; त्या साऱ्या गोष्टी मात्र तूं विसरलाससें दिसतें. पूर्वीं द्रोण, भीष्म यांच्याशीं झालेल्या युद्धाहून निराळ्या प्रकारचें तुला एकट्याला आतां तुझ्या मनाशीं युद्ध करावयाचें आहे. आणि हें युद्ध मोठ्या दक्षतेनें केवळ स्वतःच्या कर्तबगारीवर विसंबून राहून अगदीं एकांतांत दडून बसून कोणाच्या दृष्टी न पडणाऱ्या मनाशीं तुला एकट्याला करून त्यावर तुला पगडा मिळविला पाहिजे. या युद्धामध्यें बाणांचा, नोकरांचा किंवा इष्टमित्रांचा कांहीं उपयोग नसून हें युद्ध तुझें तूं एकट्यानेंच केलें पाहिजेस. या युद्धामध्यें तुला जय न मिळेल तर तुझी काय अवस्था होणार हें लक्षांत आणून तूं आपली कामगिरी नीट बजाव; आणि सर्वभूतमात्रांच्या उत्पत्तिनाशासंबंधानें नीट विचार करून आपल्या पूर्वजांप्रमाणें राहून नीट राज्य चालीव. केवळ बाह्यविषय टाकल्यानें मनुष्याला हटकून सिद्धि मिळत नाहीं, व शरीरविषय सोडल्यानें ती प्रसंगीं मिळते किंवा मिळत नाहीं. बाह्यविषय सोडून शरीरविषयाला धरून असणाऱ्या मनुष्याच्या पदरीं जो धर्म व जें सुख पडतें त्याचा लाभ आपल्या वैऱ्यांनाच होवो. 'माझें' ह्या दोन अक्षरांमध्येंच मृत्यु असून माझें कांहीं नाहीं यांतच शाश्वत ब्रह्म आहे. तेव्हां ब्रह्म आणि मृत्यु हे दोन्ही आपल्या ठिकाणींच बिऱ्हाड करून आहेत ह्मटलें तरी चालेल. ह्या दोघांनीं सर्वांच्या शरीरामध्यें कोणाला न दिसतां राहून परस्परांशीं युद्ध चालविलें आहे. आत्म्याचा जर मुळीं नाश नाहीं तर भूतमात्रांच्या शरीराचा नाश करून हिंसा कशी होणार? सर्व स्थावरजंगमात्मक पृथ्वीवर ज्याला ममत्व नाहीं त्या मनुष्याला हिची किंमत तरी काय? तेंच उलट जो मनुष्य वनामध्यें फलमूलावर राहिला असूनही वस्तूवरील ममत्व ज्याचें गेलें नाहीं, तो मृत्यूच्या जबड्यामध्येंच आहे असें समजलें पाहिजे. याप्रमाणें बाह्य व शरीरांतील शत्रूंचें स्वरूप कसें आहे पहा. ज्याला शाश्वत तत्त्वाचें खरें स्वरूप कळलें तो महाभयाच्या पार जातो. ऐहिक वासनांच्या तावडींत जाणें भल्यांना संमत नाहीं. ज्याच्या मुळाशीं वासना नाहीं असें कृत्यच जगांत नसून सर्व वासनांना

मूळ मन आहे; हें लक्षांत घेऊन विद्वान लोक प्रथम वासनांचा बीमोड करतात. ध्यान लावणारा योगीच अनेक पूर्वजन्मांच्या अभ्यासानें योग हा मुक्तीचा उत्तम मार्ग आहे हें ओळखतो, व आपण ज्याच्या मार्गे लागलों आहों तीं सकाम सत्कृत्यें सुद्धां आपल्या खऱ्या हिताचीं नसून वासनांचा बीमोड हाच सर्व धर्मांच्या मुळाशीं आहे, हें डोळ्यांपुढें ठेवतो. अशा प्रकारचे लोक दान, वेदाध्ययन, तप अशा प्रकारच्या काम्य कर्मांकडे त्यापासून कांहीं ऐहिक फायदा साधून घेण्यासाठीं कधीं लक्ष पुरवीत नाहींत. वासनेचा बीमोड हेंच मोक्षाचें बीज आहे. यासंबंधांत वासनेचेच पुढील उद्गार लक्षांत ठेवण्याजोगे आहेत. 'कोणींही प्राण्यानें योग्य उपायाखेरीज कितीही खटपट केली तरी त्याला मला जिंकतां येणें कठीण आहे. मंत्रतंत्रादिकांनीं घाव देऊन मला नाहींसें करण्याचा जर कोणी प्रयत्न करील तर त्याच्या त्या मंत्रतंत्रादिकांमध्येंच मी अहंतेच्या रूपानें प्रकट होतें. जर कोणी पुष्कळ दक्षिणा देऊन यज्ञ करून मला जिंकण्याचा प्रयत्न करील तर सर्व जंगमामध्यें माझ्यासारखा धर्मात्मा नाहीं हा अहंभाव त्याच्या मनामध्यें उत्पन्न करवून मी त्याला गोत्यांत आणितें. जो वेद व वेदान्त या साधनांनीं मला नाहींसें करण्याचा प्रयत्न करतो त्याच्या मनामध्यें सर्व स्थावरांमध्यें मी भरून आहें, असा भाव उत्पन्न करून मी त्याला फसवितें. सत्याच्या जोरावर नेटानें मला नाहींसें करण्याचा जो प्रयत्न करतो त्याचें तें अभिमानात्मक मनच मी होऊन बसतें, व याप्रमाणें माझें अस्तित्वच त्याला कळेनासें होतें. जो तपानें मला नाहींसें करण्याची खटपट करतो त्याच्या त्या तपामध्येंच मी प्रकट होतें. जो विद्वान मोक्षाच्या मार्गे लागून मला जिंकण्याचा प्रयत्न करतो, त्या स्वतःला न ओळखणाऱ्या बिचाऱ्याकडे पाहून मी नाचतें; व मला हासूं येतें. याप्रमाणें मी सनातन असून मला ठार करण्याचें सामर्थ्य कोणाच्याही अंगीं नाहीं.' तेव्हां हे युधिष्ठिरा, अशा या वासनेला धर्माकडे लावून पुष्कळ दक्षिणा देऊन अश्वमेधादि नानाप्रकारचे यज्ञ करणेंच श्रेयस्कर आहे. मेलेल्या बांधवांसंबंधानें उगीच शोक करीत बसण्यांत अर्थ नाहीं. रणामध्यें मेलेल्यांची आतां फिरून भेट होणें संभवनीय नाहीं.'

याप्रमाणें व्यास, श्रीकृष्णप्रभृति मंडळींनीं समाधान केल्यावर युधिष्ठिराचा मनस्ताप कमी झाला; व त्यानें आप्तबांधवांचीं प्रेतकार्यें उरकलीं. याप्रमाणें स्वराज्य लाधून अंतःकरण शांत झाल्यावर तो व्यासांना ह्मणाला, 'आपल्यासारख्या थोरांच्या उपदेशानें माझा शोक कमी झाला आहे. पैसाही आपण पुष्कळ दाखवून दिला आहे. त्यानें आपल्या साह्यानें मी यज्ञ करतों. हा हिमाचलाकडचा प्रदेश फार आश्चर्यकारक आहे असें माझ्या ऐकण्यांत आहे आपल्यालाच तिकडे घेऊन जाऊन तो पैसा आणूं. तुह्मी सर्वांनीं माझ्या हिताचें मला सांगितलें आहे. दुःखाच्या वेळीं भल्यांना मान्य असा हिताचा उपदेश करणारे वडील व जिव्हाळ्याचे लोक विरळा सांपडतात.' याप्रमाणें ठरल्यावर सर्व ऋषी त्याचा निरोप घेऊन निघून गेले. युधिष्ठिरानें भीष्मादिकांच्या मरणाबद्दल शौचविधी आटोपून मेलेल्या लोकांबद्दल मोठमोठीं दानें दिलीं. नंतर तो धृतराष्ट्राला पुढें करून हास्तिनापुरांत शिरला, व धृतराष्ट्राचें समाधान करून तो भावांसह पृथ्वीचें राज्य करीत राहिला.

याप्रमाणें पांडवांनीं राज्य मिळवून राष्ट्रांत जिकडे तिकडे शांतता झाली असतां, अर्जुन व श्रीकृष्ण इंद्रप्रस्थामध्यें मोठ्या आनंदांत वनें, डोंगर, नाना पवित्र तीर्थें, नद्या, तळीं, इत्यादि रम्य ठिकाणीं त्याचप्रमाणें तेथील भव्य सभामंडपामध्यें निरनिराळ्या गोष्टींच्या प्रसंगीं नाना प्रकारच्या युद्धाच्या गोष्टी बोलून, व सोसावे लागलेले क्लेश आठवून सुखांत दिवस घालवीत होते. हजारों ऋषींचे वंश सांगून उत्तम उत्तम उपदेशपर गोष्टी सांगून पुत्राच्या व ज्ञातीच्या शोकानें कष्टी झालेल्या अर्जुनाचें श्रीकृष्ण समाधान करीत होता. याप्रमाणें आपल्या डोक्यावरचा मोठा भार उतरल्याप्रमाणें वाटून तो त्याठिकाणीं सुखांत राहिला असतां एकेवेळीं गोष्टींच्या प्रसंगांत तो अर्जुनाला मधुर शब्दांनीं ह्मणाला, 'अर्जुना, धर्मराज तुझ्या व तुझ्या भावांच्या बाहुबलाच्या साहाय्यानें त्या अधर्मरुचि दुर्योधनाला त्याच्या भावांसह रणांत न्यायानें मारून ही सर्व पृथ्वी जिंकून निर्वैरपणें तो या निष्कंटक पृथ्वीचा

उपभोग घेत आहे; व तुझ्या दाबाखालीं पृथ्वीवर जिकडे तिकडे स्थिरस्थावरही झालें आहे. मीही तुझ्याबरोबर वनामध्यें सुखांत दिवस काढीत आहें. फार काय सांगूं ? जिकडे कुंति व तुह्मी पांडव तिकडे मी ओढला जावयाचा. परंतु तुझ्याबरोबर येथें स्वर्गसुख घेत आहें तरी वसुदेव, बळराम व दुसरे वृष्णिवीर यांना भेटून मला फार दिवस झाल्यानें द्वारकेला जाण्याचें माझ्या मनांत घोळत आहे. तुलाही हा माझा विचार पसंत असला पाहिजे. शोकसागरांत बुडालेल्या युधिष्ठिराचें मीं व भीष्मांनीं त्याला प्रसंगोचित उपदेश करून शांतवन केलें आहे व त्या थोर महात्म्यालाही तें आमचें ह्मणणें पटलें आहे. बिचाऱ्या धर्माला सत्याची किती तरी चाड! तसेंच किती तरी तो कृतज्ञ व थोर बुद्धीचा आहे ! तो चंचळ अगदीं नाहीं. आतां तूं त्याकडे जाऊन हळूच माझ्या जाण्याची गोष्ट काढ. जीव गेला तरी मी त्याच्या मनाविरुद्ध ह्मणून कधीं वागणार नाहीं; आणि हें सारें खरोखर तुझ्यावरील प्रेमामुळें आहे. आतां येथें राहण्याचें माझें काम उरलें नाहीं. दुर्योधन व त्याच्या कासेला लागलेले लोक यांचा फडशा पडून सर्व पृथ्वी धर्मराजाच्या ताब्यांत आली आहे. तो हिचें धर्मानें पालन करील, व महात्म्या सिद्धांचें याच्याजवळ वास्तव्य राहील. हें शरीर व मजपाशीं जें कांहीं द्रव्य आहे त्या सर्वांवर युधिष्ठिराची मालकी आहे. तो महामति कौरवराज मला सदा प्रिय असून मान्य आहे.' हें श्रीकृष्णाचें भाषण ऐकून दोघांनीं बरोबर जाऊन ती गोष्ट युधिष्ठिराच्या कानावर घालण्याचें ठरलें.

---

# अनुगीता.

## १९४ ब्राह्मण व काश्यप यांचा संवाद. जीवाची गति व मोक्ष

### ( १४. १६–१९ )

पुढें एके दिवशीं अर्जुन श्रीकृष्णासह स्वजनामध्यें सभेंत बसला असतां तो श्रीकृष्णाला ह्मणाला, 'कृष्णा, युद्धाचे आरंभीं तुझें तें ईश्वरस्वरूप पाहून तुझा मोठेपणा माझ्या ध्यानांत आला. परंतु त्यावेळीं कळकळीनें तूं जो उपदेश केलास तो सर्व मनाच्या दुबळेपणामुळें मी हल्लीं विसरून गेलों आहे. फिरून तो विषय समजून घ्यावासा मला वाटतो. आणि तूं तर आतां लवकरच द्वारकेला निघून जाणार.'

हें अर्जुनाचें भाषण ऐकून प्रेमानें त्याला आलिंगन देऊन श्रीकृष्ण ह्मणाला, 'तेवेळीं सनातन गुह्य तुला सांगून धर्माचें खरें स्वरूप मीं तुला उघड केलें. परंतु अल्पबुद्धीमुळें तें सारें तूं विसरून गेलों ह्मणतोस, हें ऐकून मला अतिशय वाईट वाटतें. तीच आठवण आज मला फिरून होईलशी वाटत नाहीं. खरोखर तूं अश्रद्धावान मूढ दिसतोस. तेवेळचें तें सर्व ब्रह्मज्ञानात्मक ज्ञान आतां जसेंच्या तसें फिरून सांगतां येणें शक्य नाहीं. तेवेळीं योगसाधनानें मीं तुला परब्रह्माचें ज्ञान करून दिलें होतें. आतां मी तुला त्यासंबंधानें एक पूर्व इतिहास मात्र सांगतों. तो तूं नीट ऐकून घेशील तर तुला उत्तम गति मिळेल. कोणी एक ब्राह्मण ब्रह्मलोक व स्वर्गलोक यांपासून मजकडे आला असतां मीं त्याचा सत्कार करून त्याला प्रश्न केले. त्यांचीं त्यानें जीं उत्तरें दिलीं तींच मी तुला सांगतों तीं नीट ऐकून घे.

तो ब्राह्मण ह्मणाला, 'श्रीकृष्णा, प्राणीमात्रांवर कींव करून मोक्षधर्मासंबंधानें तूं जो हा मला मोह दूर करणारा प्रश्न केलास त्याचें उत्तर देतों ऐक. कोणी एक काश्यप नांवाच्या तपस्वी धर्मवेत्त्यांची व धर्मशास्त्रांचें गूढ ज्यांना पूर्ण कळलें आहे अशा ब्रह्मतेजानें झळकत मुक्ताप्रमाणें पृथ्वीवर फिरत असलेल्या एका सिद्धांची एक वेळ गांठ पडली. हे सिद्ध वाऱ्याप्रमाणें सर्वांपासून अलग राहून गुप्त अशा चक्रधरांबरोबर, सिद्धगंधर्वांबरोबर वाटेल तिकडे फिरत असत. यांचीं गांठ पडल्यावर धर्मज्ञान करून घेण्याच्या इच्छेनें स्वस्थ मनानें काश्यपानीं त्यांचे पाय धरले; व त्यांच्या मधील गुणांनीं विस्मित होऊन त्यांच्या शुश्रूषेमध्यें ते दक्ष राहिले. त्यांचें तें एकंदर वर्तन चोख पाहून भाव ठेवून त्यांनीं त्यांचें शिष्यत्व करून त्यांना संतुष्ट केलें. त्यांनीं प्रसन्न होऊन श्रेष्ठपद डोळ्यांपुढें ठेवून जें का-

श्यपांना सांगितलें तें मांगतों ऐक. ते ह्मणाले, 'हे तात, नानाविध पुण्यकर्मांनीं मनुष्यांना निरनिराळी गति मिळून स्वर्गवास मिळतो. कायमचें सुख किंवा कायमचें पद असें कांहींच नाहीं. मोठ्या कष्टानें मिळालेल्या उच्च उच्च स्थानांपासून फिरून फिरून खालीं यावें लागतें. पापाच्यामागें लागल्यानें अनेक कष्टदशा मला आल्या. काम, क्रोध, तृष्णा, व मोह यांनीं मला घेरून टाकून फिरून फिरून मीं जन्ममरणाच्या तडाक्यांत सांपडलों. नानाप्रकारचे पदार्थ मीं खाल्ले. नानाविध स्तन्यांची गोडी चाखली. नानाप्रकारचे आईबाप पाहिले, नानाप्रकारचीं दुःखें अनुभविलीं. अनेकवेळां आवडत्याशीं ताटातूट होऊन नावडत्याशीं संबंध ठेवण्याचा प्रसंग आला. मोठ्या कष्टानें मिळविलेल्या पैशाला मुकलों. राजाकडून व स्वजनांकडून अवमान सोसावा लागला. शारीरिक व मानसिक दुःखें सोसण्याची पाळी आली. नानाप्रकारचीं भयंकर मरणबंधनें सोसावीं लागलीं. नरकवास घडून तेथें नानाप्रकारच्या यातना सोसल्या. जरा, रोग व सुखदुःखादि द्वंद्वापासून उद्भवणारीं अनेक संकटें सोसलीं. ह्या सर्वांमुळें एकवेळीं पूर्ण वैतागून मीं निराकार ब्रह्माचा आश्रय केला, व जगाला अगदीं कंटाळल्यामुळें लोकव्यवहार सोडून दिला. तेव्हां अनुभवानें जगांत मीं हा मार्ग स्वीकारला आहे. आणि त्यामुळें आत्मप्रसादानें ही दिसणारी सिद्धि मला मिळाली आहे. आतां माझें येथें फिरून येण्याचें नांव नको. प्रलयकाळ येऊन सर्वांचा ब्रह्मामध्यें लय होईतोंपर्यंत मीं आतां या सृष्टीच्या घडामोडीकडे पहात राहणार. आतां मला सत्यलोक खुला झाला असून तेथून पुढें मी त्याच्याही पलीकडच्या अव्यक्त अशा ब्रह्मस्वरूपामध्यें खात्रीनें जाऊन मिळणार. या मृत्युलोकाला मीं कधीं परतणार नाहीं. तुझ्यावर मीं प्रसन्न आहें. तुझें काय कल्याण करूं सांग. जी इच्छा धरून तूं मजपाशीं आला आहेस ती तुझी इच्छा पूर्ण होण्याची वेळ आली आहे. तूं ज्या हेतूनें माझ्याकडे आला आहेस तो हेतु मला कळल्यानें हें मीं तुला सुचविलें आहे. तुझ्या एकंदर वर्तनानें मी फार संतुष्ट झालों आहें. ह्मणून तूं मला आतां प्रश्न कर, ह्मणजे तुझ्या हिताचें व तुझ्या मनाजोगतें सर्व कांहीं मी सांगतों. तुझी बुद्धि फार चांगली दिसते. तिच्या संबंधानें मला मोठा आदर आहे. कारण तिच्या योगानेंच तूं मला ओळखलेंस.' हें ऐकून त्यांचे पाय धरून निरनिराळ्या धर्मासंबंधानें गूढप्रश्न काश्यपांनीं त्यांना विचारले. ते ह्मणाले, 'शरीर कसें नाहींसें होतें, व तें फिरून कसें उत्पन्न होतें? दुःखमय संसारांतून फिरतां फिरतां मनुष्य मुक्त कसा होतो? जीवात्मा, अविद्या व तिच्यापासून उत्पन्न होणारें शरीर त्यांना सोडून त्याहून वेगळें जें परब्रह्म, तद्रूपी कसा होतो? मनुष्य आपण केलेलीं बरीं वाईट कर्में कशीं भोगतो? व जीव देहापासून निराळा झाला असतां कर्में कोठें असतात?' हें ऐकून ते सिद्ध ह्मणाले, 'एखाद्या विवक्षित देहामध्यें जीव जीं आयुष्य व कीर्ति वाढविणारीं कर्में करतो, त्यांचें फल सरून आयुष्य संपण्याच्यावेळीं आयुष्य व कीर्ति यांना हानिकारक अशीं कर्में प्रसंगीं मनुष्याच्या हातून घडूं लागतात. विनाशाची वेळ आली असतां त्याची बुद्धि फिरते. आपलें सामर्थ्य, बल, काल हे सर्व जाणून देखील मनुष्य भलत्या वेळीं अहितकारक अन्न खाऊं लागतो. अशावेळीं त्याला अपायकारक असे सर्व व्यवहार त्याच्या हातून होऊं लागतात. कधीं कधीं तो अति खातो, कधीं कधीं उपासपोटीं रहातो. कधीं वाईट अन्न, वाईट मांस, वाईट पेय किंवा परस्परविरोधीधर्म अंगांत असणारे पदार्थ तो सेवन करतो. एखादेवेळीं जडान्न फाजील खातो, किंवा पूर्वीं खाल्लेलें पचण्याच्या आधींच त्यावर भर टाकतो. कधीं व्यायाम व विषयोपभोग फाजील घेतो; कधीं एखाद्या कामाच्यामागें लागून मलमूत्रादिक सुद्धां दाबतो. कधीं फार रस ज्यामध्यें आहे असें अन्न खातो; दिवसां निजतो; अशा प्रकारचे व्यवहार त्याच्या हातून घडतात. अन्न पचन चांगलें न होईल तर प्रसंगीं कफ, वात, पित्त उद्भवतात. अशा प्रकारचे दोष उत्पन्न झाले असतां त्यांपासून रोग जडून प्राण्याचा अंत होतो. किंवा फांस लावून घेणें इत्यादि घातुक विपरीत गोष्टी त्याच्या हातून घडतात. अशा प्रकारच्या कारणांनीं मनुष्याचा देह पडतो. वातप्रकोप झाला असतां त्याच्या जोरानें शरीरांतील ऊष्मा वाढतो. आणि तो शरीराच्या प्रत्येक भागांत

शिरून प्राणवायूचें चलनवलन बंद पाडतो. याप्रमाणें सर्व शरीरांत वाढलेला हा ऊष्मा जोरावून जेथें जेथें ह्मणून जीव राहतो त्या प्रत्येक मर्मस्थलाला फोडतो. यामुळें जीव एकदम फार वेदना पावून या शरीराला सोडतो. सर्व प्राणिमात्र जन्म व मरण यांनीं सतत पीडले असून संचित संपल्यावर देह ठेवून गर्भामध्यें जातांना दिसतात. त्याचप्रमाणें मर्मस्थळें फुटतांना थंडीपासून किंवा शरीरांतील जलापासून मनुष्याला फार वेदना होतात. जेव्हां एकवटलेलीं पंचमहाभूतें वेगळीं होतात तेव्हां पंचमहाभूतांमधून प्राणापानवायूंमध्यें भरून राहिलेला वायू थंडीनें वाढून वायूनें वर ढकलला जाऊन शरीर वेदनामय झालें असल्यानें त्याला सोडून निघून जातो, व याप्रमाणें शरीरांतील श्वास बंद पडतो. याप्रमाणें मनुष्याच्या अंगांतील उष्मा, श्वास, तेज, चैतन्य व जीव निघून गेल्यावर मनुष्याला मेला असें समजतात. ज्या प्रवाहांनीं मनुष्य इंद्रियविषय जाणतो, ते यापुढें कळेनासे होतात. आहारमय प्राण या शरीरामध्यें सनातन जीव राखतो. या शरीराचा जो भाग या वीर्यसंचयामध्यें गुंतला असतो त्यालाच मर्मस्थळें ह्मणतात. व हीं मर्मस्थळें अधू झाल्यानें त्यापासून एकदम वायू बाहेर पडतो. व छातींत शिरून तो सत्वाला प्रतिबंध करतो. तेव्हां प्राणी सचेतन असूनही त्याला कांहीं कळेनासें होतें. सर्व मर्मस्थळें याप्रमाणें झांकून गेल्यानें त्याच्या ज्ञानावर तमाचें झांकण पडतें. नंतर जीवाचा सर्व आधार सुटून वायूच्या योगानें त्याची अगदीं धांदल उडून जाते. आणि एक मोठा लांब व दुःखाचा श्वास टाकून शरीराला अगदीं हलवून सोडून तो शरीरांतून निघून जातो. याप्रमाणें शरीराला सोडून गेला असतांही कर्मे त्याला सोडीत नाहींत. बऱ्या वाईट कर्मांनीं चोहोंकडून तो घेरला असतो. शास्त्रासंबंधानें ठाम मत ठरलेले ज्ञानसंपन्न ब्राह्मण कांहीं लक्षणांवरून तो पुण्यवान आहे किंवा पापी आहे हें जाणतात. ज्याप्रमाणें डोळस लोकांना अंधारांत काजवा चमकून नाहींसा होतांना दिसतो त्याप्रमाणें ज्ञानचक्षूंनीं या लोकांना जीव दिसतो. याप्रमाणें सिद्धांना जीव देह सोडतांना जन्मतांना किंवा योनीमध्यें प्रवेश करतांना दिसतो. या जीवाचीं तीन ठिकाणें शास्त्रावरून कळतात. ज्या ह्या ठिकाणीं सर्व लोक राहतात त्या हिला कर्मभूमि ह्मणतात. या ठिकाणीं बरीं वाईट कर्मे करून प्राणीमात्र आपआपल्या कर्माप्रमाणें येथेंच त्यांचीं बरीं वाईट फळें भोगतात. याठिकाणीं वाईट कर्म करणारे आपल्या कर्मांनीं नरकाला जातात. ही अधोगति असून यामध्यें पडल्यानें मनुष्यांना फार दुःख सोसावें लागतें. यापासून सुटका होणें फार कठीण आहे, आणि आपलें यापासून रक्षण करून घेण्याविषयीं खबरदारी घ्यावी. या जगांतून वर गेल्यावर प्राणी कोठें राहतात तें सांगतों ऐक, व त्यावरून ठाम विचार ठरवून कर्मासंबंधानें स्पष्ट दिशा ठरीव. हे सर्व ताराच्या रूपानें प्रकाशणारे, त्याचप्रमाणें हें प्रकाशमान चंद्रमंडल व स्वयंप्रकाश सूर्यमंडल हे सर्व पुण्यवानांना मिळणारे लोक आहेत. त्यांच्या पुण्यकर्मांचा क्षय झाला असतां ते या स्थानापासून फिरून फिरून खालीं येतात. या लोकांमध्यें सुद्धां उत्तम, मध्यम व कनिष्ठ असे भेद आहेत. लोकांचें झगझगीत वैभव पाहून तेथें सुद्धां हेवा वाटतो.' आतां जीवाच्या गर्भवासासंबंधानें सांगतों ऐक. मनुष्याच्या बऱ्यावाईट कर्मांचा कधीं नाश होत नाहीं. निरनिराळे जन्म घेऊन त्या त्या कर्मांचें फळ भोगावें लागतें. ज्याला फळें येतात अशा प्रकारचें झाड हंगामाचे वेळीं यथेच्छ फळ देतें त्याप्रमाणें शुद्ध अंतःकरणानें केलेलें पुण्यकर्म यथेच्छ सुखाचा बहार देतें व पापी अंतःकरणानें केलेलीं दुष्कृत्येंही यथेच्छ तशा प्रकारचीं फळें देतात. जीव मनाला पुढें करून कर्माला प्रवृत्त होतो. कर्म करूं लागल्यावर कामक्रोधादिकांच्या तावडींत गेल्यानें त्याला पुढें सांगितल्याप्रमाणें गर्भवास येतो. स्त्रीच्या गर्भाशयामध्यें कर्माच्या फळरूपी चांगला किंवा वाईट देह शुक्रशोणिताच्या संयोगापासून त्याला मिळतो. जीव सूक्ष्म व अव्यक्त असल्यानें तो देहामध्यें शिरल्यावरसुद्धां सर्वांपासून अलग असतो. ह्मणूनच त्याला शाश्वत ( ब्रह्म ) ह्मटलें आहे. सर्वभूतमात्रांचा तो बीजरूपी असून त्याच्या योगानेंच सर्व प्राणीमात्र अस्तित्वांत येतात. गर्भाच्या सर्वभागांमधून भागशः शिरून चैतन्यरूपानें हृदयामध्यें राहून

तो निरनिराळ्या मार्गांना व मनाला आधार देतो. तेव्हां गर्भ सचेतन होऊन अवयवांचें चलनवलन होऊं लागतें. ज्याप्रमाणें लोखंडाचा रस सांच्यांत ओतला असतां सांच्याबरहुकूम पुतळा बनतो, त्याप्रमाणें गर्भामध्यें जीवाचा प्रवेश होत असतो. लोखंडी गोळ्यामध्यें ज्याप्रमाणें अग्नि चोहोंकडे पसरून त्याला उष्णता देतो त्याप्रमाणें सर्वगर्भामध्यें जीव प्रगट होतो, आणि ज्याप्रमाणें घरांत लावलेला दिवा सर्व घरामध्यें उजेड पाडतो त्याप्रमाणें चैतन्य सर्व शरीरामध्यें प्रकाश पाडतें. जें जें म्हणून बरें किंवा वाईट कर्म पूर्वदेहामध्यें प्राणी करतो त्या सर्वांचा त्याला अवश्य उपभोग घ्यावा लागतो. याप्रमाणें भोगिल्यानें पूर्वकर्मांचा क्षय होतो, परंतु मोक्षज्ञानाकडे मन लागेपर्यंत आणखी तीं कर्में सांठत जातात. आतां याप्रमाणें संसारचक्रांत फिरत असतां पुढील कर्मांनीं जीव सुखी होतो. दान, व्रत, ब्रह्मचर्य, ब्रह्मधारणा, आत्मनिग्रह, शांति, भूतमात्रांवर दया, इंद्रियनिग्रह, दुष्टपणापासून परावर्तन, दुसऱ्याचें न घेणें व प्राणीमात्रांचें वाईट मनानें देखील न करणें, आईबापांची शुश्रूषा; देवता, अतिथि व गुरु यांची पूजा, अनुकंपा, शुद्धता, चांगलीं कर्में करणें, इत्यादिकांची सद्वर्तनामध्यें गणना होते. यांपासूनच धर्माची उत्पत्ति असून हा धर्मच नेहमीं प्रजेला राखतो. भल्यांमध्यें असें वर्तन नेहमीं कायमचें दिसून येतें. कारण त्यांच्यामध्येंच हा गुण रहात असतो. शांत स्वभावाचे लोक जो आचार स्वकिरतात तोच धर्माची दिशा दाखवितो. कारण त्यांच्या हातून जें कर्म घडतें तो शाश्वत धर्मच असतो. जो त्या धर्मानें वागेल त्याची कधीं वाईट गति होणार नाहीं. धर्मामध्यें भ्रष्टाकार होऊं लागला असतां याच्या योगानेंच लोक धर्माकडे वळतात. परंतु जो साधु सर्वांहून मुक्त असतो तो अशांहूनही श्रेष्ठ समजला गेला आहे. कारण, जो धर्मानें योग्य रीतीनें वागतो अशा मनुष्याची सुटका पुष्कळ कालानें होते. याप्रमाणें पूर्वजन्मीं केलेलें कर्म या जन्मीं मनुष्याच्या बरोबर येतें, आणि रूपांतरानें या जगामध्यें फिरून येण्याला हीं कर्मेंच कारण होतात. प्रथम देह कशाच्या योगानें घ्यावा लागला, या शंकेचें उत्तर असें आहे. सर्व लोकांचे पितामह ब्रह्मदेव यांनीं प्रथम स्वतःचें शरीर उत्पन्न करून नंतर स्थावरजंगमात्मक तीन लोक उत्पन्न केले. नंतर सर्व प्राणिमात्रांची प्रधान प्रकृति त्यांनीं निर्माण केली. हीच सर्व प्राणिमात्रांच्या उत्पत्तीला प्रधान कारण आहे. व हीच सर्वांमध्यें श्रेष्ठ आहे. हें जें सर्व दृश्य आहे याला क्षर असें नांव असून याच्यांत शुद्ध चैतन्यरूपी अक्षर असा जीव आहे. हें जें दिसतें हें नाशवंत असून त्यांतील चैतन्य अमर व अविनाशी आहे. प्रत्येक पुरुष क्षर व अक्षर मिळून झालेला आहे. वर सांगितलेल्या पहिल्या प्रजापतींनीं पंचमहाभूतें व सर्व स्थावर भूतमात्र निर्माण केले; व त्यांच्या कालाची मर्यादा, निरनिराळ्या योनीमध्यें भ्रमण, या सर्व गोष्टी ठरविल्या. सुखदुःख अनित्य आहे, हें शरीर अमंगळ पदार्थांचें बनलेलें आहे, व विनाश कर्माबरोबरच ठरला आहे, व जें कांहीं थोडेंसें सुख म्हणून भासतें तें सुद्धां सर्व दुःखमयच आहे, हें ज्याला उमगेल तोच दुस्तर असा हा घोर संसारसागर तरून जाईल. जन्ममरण व रोग यांनीं पछाडलें असतांही ज्यानें या प्रकृतीला ओळखलें तो सर्व सचेतन भूतमात्रांच्या ठिकाणीं असलेलें चैतन्य एकच समजून वैराग्यानें त्याच्या पलीकडचें पद शोधण्याच्या मार्गाला लागतो. त्या अविनाशी श्रेष्ठ पदासंबंधानें माहिती सांगतों ऐक. ज्याच्या योगानें सर्वांचा एकाठिकाणीं लय होतो त्या ज्ञानामध्यें एकाग्रतेनें गढून कशाचा विचार न करतां जो हळू हळू मूळचीं स्थूल व सूक्ष्म कारणें सोडतो तो या भवपाशांतून सुटून जातो. जो सर्वांशीं मित्रभावानें राहून वाटेल तें सहन करण्याला तयार असतो, शमामध्यें गढून इंद्रियनिग्रह ठेवतो, राग, लोभ दूर करून आत्मनिग्रह ठेवतो, सर्व प्राणिमात्रांच्या ठिकाणीं आत्मत्वानें पाहूं लागतो, शुचिर्भूततेनें वागतो, मान किंवा अहंभाव बाजूला ठेवतो, जीवित, मरण, सुख, दुःख, लाभ, हानि, प्रिय, अप्रिय हीं सारखीं लेखतो, कोणाचें कांहीं घेण्याची इच्छा करीत नाहीं, कोणाला तुच्छ करीत नाहीं, सुखदुःखादिद्वंद्वापासून मुक्त असतो, मनोविकारांना दाबात ठेवतो, कोणाला शत्रु, बांधव किंवा आपला लेखीत नाहीं, व धर्म, अर्थ, काम सर्व सोडून

धर्माची किंवा अधर्माची कशाचीच पर्वा न करतां जो पूर्वसंचित चालवीत राहतो, शरीरांतील धातूंच्या क्षयाबरोबर ज्याचें चित्त शांत होत चाललें आहे, जो कर्म, वासना सर्व सोडून देऊन नेहमीं जग हें अश्वत्थ ( अशाश्वत, ) जन्म, मृत्यु व जरा यांनीं घेरलेलें आहे असें पाहूं लागतो, व वैराग्याकडे बुद्धि लावून आपल्या दोषांकडे दृष्टि देऊन असतो, असा मनुष्य कांहीं वेळ न लागतां पाश तोडून घेतो, आत्मा गंध, रूप, रस, स्पर्श, शब्द व दुसरीं लचांडें यांपासून अलिप्त आहे. याला रूप नाहीं, हा जाणवण्याजोगा नाहीं, पंचभूतांमधले गुण यामध्यें नाहींत, याला आकार नाहीं किंवा कारण नाहीं, हा निर्गुण असून गुणांचा भोक्ता आहे, असें याला पाहूं लागल्यानें मनुष्य मुक्त होतो. विचारानें सर्व शारीरिक व मानसिक संकल्प सोडून दिल्यानें सर्पण न घातलेल्या अग्नीप्रमाणें त्याचें हळू हळू वेगळें अस्तित्व नाहींसें होतें. सर्वसंकल्पांपासून सर्वसुखदुःखादि द्वंद्वांपासून व सर्वलचांडांपासून अलग होऊन जो आपलीं सर्व इंद्रियें तपाकडे लावतो तो मुक्त होऊन शांत, अचल, नित्य, अक्षर व सनातन असें ब्रह्मपद मिळवितो.

आतां, ज्याहून चांगलें दुसरें कांहींच नाहीं व ज्याकडे लक्ष लावून आत्म्याचें पूर्ण स्वरूप योगी पाहूं लागतात अशा योगासंबंधानें माहिती ऐक. ज्या साधनांनीं चित्त आंत लावून अनादि व अनंत असें ब्रह्म मनुष्य पाहूं लागतो तीं साधनें हीं आहेत. इंद्रियांना सर्व बाह्यविषयांपासून काढून मन आत्म्याच्या ठिकाणीं लावावें, व कडकडीत तपानें मोक्षदायक अशी समाधि लावावी, व याप्रमाणें योगामध्यें गढून बुद्धिमान मनुष्यानें योगशास्त्राच्या अभ्यासानें आत्मसाक्षात्कार घेत रहावें. भल्या गृहस्थाला या इंद्रियांवर दाब ठेवून आत्मनिग्रहपूर्वक एकांतांत राहून ध्यानानें मनाला आपल्या ठिकाणीं लावतां येईल तर त्याला आत्मदर्शन होऊं लागतें. ज्याप्रमाणें मनुष्याला स्वप्नामध्यें एखाद्याला पाहून पुढें जागेपणीं तोच हा ह्मणून ओळखतां येतें, त्याचप्रमाणें त्याला चांगल्या समाधीमध्यें स्वस्वरूपाला पाहूं लागल्यानें पुढें जागृतावस्थेंत त्याला ओळखतां येतें. ज्याप्रमाणें मुंजामधून त्याचा तंतु काढून दाखवितां येतो त्याप्रमाणें योगी आत्म्याला देहापासून वेगळा करून पाहतो. हें शरीर मुंजाच्या ठिकाणीं असून जीव हा तंतूच्या ठिकाणीं आहे. जे वेळीं योगधारण केलेला मनुष्य योगामध्यें आत्म्याला नीट पाहूं लागतो, तेव्हां त्यावर स्वामी कोणीच न उरतां तोच त्रैलोक्याचा स्वामी बनून राहतो, व इच्छेस वाटेल त्याप्रमाणें हजारों निरनिराळे देह त्याला धरतां येतात. जरा व मृत्यु यांना माघारें परतविल्यानें दुःख किंवा आनंद कांहींच त्याला होत नाहीं. योगामध्यें गढलेल्या ह्या आत्मनिग्रही मनुष्याला देवांवर देखील स्वामित्व मिळवितां येतें; व हा अशाश्वत देह ठेवल्यावर अव्यय अशा ब्रह्माला तो जाऊन मिळतो. सर्वभूतमात्रांचा नाश चाललेला पाहून देखील त्याला भीति वाटत नाहीं; व सर्व प्राणिमात्र दुःखामध्यें बुडाले असतां याला त्याचा लेशसुद्धां लागत नाहीं. कांहीं इच्छा न ठेवतां शांतपणें योगाकडे लक्ष लावून संग व स्नेह यांपासून होणाऱ्या दुःखशोकात्मक भयंकर पीडांनीं तो कधीं चळत नाहीं. शस्त्रें याला कधीं जखम करूं शकत नाहींत व मृत्यु याला कधीं गांठीत नाहीं. याच्याहून सुखी जगांत कोणीच नसतो. बरोबर ध्यान लावून तो आत्म्याच्या ठिकाणीं मन लावतो, व जरा व दुःख यांपासून सुटून तो सुखानें झोंप घेतो. हा मनुष्य आपलीं देह टाकून वाटेल तो देह धरूं शकतो. योगसुख घेत असतां त्याचा कंटाळा कधीं करूं नये. चांगला योग लागून हा आत्म्याला आपल्या ठिकाणीं पाहूं लागला असतां इंद्रपद सुद्धां याला तुच्छ वाटतें. एकांतामध्यें राहिल्यानें योगसिद्धि कशी होते ऐक. श्रुतीच्या आधारानें वेदामध्यें सांगितलेल्या आज्ञा लक्षांत घेऊन पूर्वी पाहिलेली दिशा डोळ्यांपुढें ठेवून मन, ज्या देहामध्यें आपण राहतों त्याच्या बाहेर जाऊं न देतां आंत लावावें, नंतर बाह्य व आंतील अशा दोन्ही विषयांकडचें मन काढून मूलाधारादि जीं चक्रें आहेत त्यांपैकीं एकाकडे तें लावावें. सर्व विश्व या देहामध्यें पाहूं लागल्यावर जिकडे मन जाईल असा बाह्य विषय याला कांहींच उरत नाहीं. निःशब्द अशा निर्जन वनामध्यें इंद्रियांना स्वाधीन ठेवून देहाच्या आंत असणाऱ्या संपूर्ण अशा त्या परमात्म्याकडे एकाग्रतेनें लक्ष लावावें. दांत,

टाळू, जीभ, गळा, मान, हृदय व हृदयबंधन ( हृदयाच्या एकशें एक नाड्या ) या योगाच्या साधनावर विचार करीत रहावें.'

यावर शिष्यानें फिरून विचारलें कीं, 'जसजसें खावें तसतसें तें अन्न पोटांत कसें पचतें, त्याचा रस होऊन रक्त कसें होतें व तें मांस, मेद, स्नायु, हाडें यांना कसें पोसतें ? त्याचप्रमाणें मनुष्याच्या वाढीबरोबर त्याचे अवयव कसे वाढतात ? बळ कसें वाढतें ? अजीर्ण झालेले पदार्थ व मळ बाहेर कसे पडतात ? प्राणी श्वास आंत कसा घेतो व बाहेर कसा सोडतो ? हा आत्मा देहामध्यें कोणत्याठिकाणीं राहिला आहे ? जीव चलनवलन ठेवून या शरीराला वाहतो कसा ? एक देह सोडल्यावर कशा वर्णाच्या व कशा प्रकारच्या देहामध्यें हा फिरून शिरतो.' याप्रमाणें शिष्याचा प्रश्न ऐकून मी म्हणालों, 'ज्याप्रमाणें जामदारखान्यांत दौलत ठेवून त्याकडे लक्ष देऊन रहावें त्याप्रमाणें इंद्रियनिग्रह करून मन देहाच्या आंत निश्चळ ठेवून आत्म्याला बिनचूक त्या ठिकाणीं हुडकावें. याप्रमाणें नेहमीं एकाग्रता लावल्यानें लवकरच अंतःकरण प्रसन्न होऊन ज्याच्या योगानें प्रकृतीचें ज्ञान होतें, व ब्रह्म याच्या हातीं येतें. डोळ्यांनीं किंवा बाकीच्या इंद्रियांनीं हा कधीं दिसत नाहीं. जळणाऱ्या मनोरूपी दिव्यानेंच हा महात्मा दिसूं लागतो. सर्वबाजूंनीं त्याला हात, पाय, डोळे, डोकीं तोंडें व कान असून तो सर्व भरून उरला आहे, जीवात्मा सत्यज्ञान झाल्यावर आत्म्याला देहापासून वेगळा पाहूं लागतो, व देह सोडून त्याला स्वस्वरूप दिसूं लागतें. नंतर त्या सगुण ब्रह्मालाही दूर करून धारणेच्या योगानें तो निर्गुण ब्रह्म पाहूं लागतो. मोठ्या प्रसन्नमनानें याप्रमाणें आत्म्याला पाहूं लागून त्याच्याच आश्रयानें तो परमात्म्याच्या ठिकाणीं मोक्षाला मिळून जातो. हें सर्वश्रेष्ठ गूढ मीं तुला सांगितलें आहे. आतां मी तुझा निरोप घेतों, असें म्हणून तो निघून गेला.'

श्रीकृष्ण म्हणाला, 'अर्जुना, हें तरी तूं एकाग्र मनानें ऐकून घेतलेंसना ! त्यावेळीं रथामध्यें तरी मीं तुला हेंच ऐकविलें होतें. ज्याची बुद्धि जाग्यावर नाहीं, ज्याच्या मनावर संस्कार झाला नाहीं व ज्याचें अंतःकरण शुद्ध नाहीं त्याला हें कळणें कठीण आहे. हें मोठें वेदरहस्य असून मनुष्यांच्या हें कधीं कोठें ऐकण्यांत नाहीं. तुझ्यावांचून दुसरा कोणी मनुष्य हें ऐकण्याला पात्र नाहीं. देवलोक क्रिया करणाऱ्या लोकांनीं भरला आहे. फिरून मनुष्यरूपाला येऊन सर्व कर्मांचा त्याग केल्याविना मोक्षाला मिळून जाणें शक्य नाहीं. त्या सनातन ब्रह्माशीं मिळून जाणें हीच सर्वांमध्यें उत्तम गति आहे. देह ठेवून याठिकाणीं जाऊनच अमृतत्वाला मिळाल्यानें मनुष्य नेहमीं सुखी असतो. हा धर्म पाळणारे पापयोनीमध्यें झाले असले तरी, अथवा बायका, वेश्या किंवा शूद्र असले तरी मोठी सिद्धि मिळवितात. मग ब्रह्मलोकाकडे दृष्टि देऊन असलेल्या बहुश्रुत व स्वधर्ममध्यें रत अशा ब्राह्मण किंवा क्षत्रिय यांच्यासंबंधानें तर विचारावयासच नको. हें अगदीं स्पष्ट ठरलें असून हा योग साधण्याचे उपायही ठरल्यासारखे आहेत. याची सिद्धि, याचें फळ, मोक्ष व दुःखाचा शेवट या सर्वांचा यथास्थित ऊहापोह झाला आहे. याहून श्रेष्ठ सुख दुसरें नाहीं. बुद्धि, विश्वास व सामर्थ्य यांच्या जोरावर लौकिक विषय तुच्छ समजून, या वर सांगितलेल्या उपायांनीं जो ते सोडतो तो कांहीं वेळ न लागतां उत्तम गतीला मिळतो. जो सतत योगाकडे आपलें लक्ष लावतो अशाला योग सहा महिन्यांचे आंत साधतो.'

---

## २९५ ब्राह्मण व ब्राह्मणी यांचा संवाद
### ( १४. २०–२३ )

'यासंबंधांत पुढील ब्राह्मण व ब्राह्मणी यांचा संवादही उदाहरण म्हणून देतात. कोणी एक ब्राह्मणी आपल्या ज्ञानविज्ञानामध्यें निष्णात अशा नवऱ्याला एकांतामध्यें पाहून म्हणाली, 'महाराज, आपल्यावांचून मला दुसरी गति नाहीं, हें न ओळखतां निष्ठुरतेनें आपण सर्व कर्म सोडून बसलां आहां ! असे आपण मला पति मिळाल्यानें माझी गति तरी काय होणार ?' हें तिचें भाषण ऐकून तो शांतात्मा हासून म्हणाला, 'हे सुभगे, ह्या तुझ्या भाषणाचें मला वाईट मुळीं वाटत नाहीं. इंद्रियग्राह्य, दृश्य व सत्याभासाचीं कर्में, कर्माकडे लागलेले लोक कर्म

कर्म ह्मणून करीत बसतात. ज्ञानावांचून कर्म करीत राहणारे कर्मठ लोक त्या कर्माच्या योगानें अज्ञानच जोडून घेतात. आतां कर्मापासून अगदीं अलिप्त राहणें ह्या जगांत एक क्षणभर देखील घडणें शक्य नाहीं. कायावाचामनानें बरें वाईट कर्म जन्मापासून हा देह पडेपर्यंत भूतमात्रांच्या हातून घडत असतें. ज्यामध्यें सोम, आज्य इत्यादि द्रव्य द्रव्याचा उपयोग होतो अशा कर्मांना राक्षसांकडून अडथळा येऊं लागल्यामुळें त्यापासून अलग होऊन नासा व भ्रूकुटी यांच्यामधलें आत्म्याचें ठिकाण आपल्या साह्यानेंच मीं हुडकून ठेविलें आहे. त्याच ठिकाणीं त्या द्वंद्वातीत ब्रह्माचें वास्तव्य आहे; इडा व पिंगला तेथेंच असून बुद्धीला प्रेरक, सर्वभूतांना धारण करणारा वायु तेथेंच आहे. याचाठिकाणीं ब्रह्मदेव वगैरे एकाग्रतेनें त्या अक्षर ब्रह्माची उपासना करतात व चांगले मतशील विद्वान इंद्रियनिग्रहपूर्वक शांत अंतःकरणानें याच्या प्राप्तीची खटपट करतात. नाकानें त्याचा वास कळत नाहीं, जिभेनें त्याची रुचि कळत नाहीं, व हातानें त्याला स्पर्श करतां येत नाहीं. केवळ तो मनोगम्य आहे. तो डोळ्यांला दिसत नसून शब्दांतीत आहे. गंध, रस, रूप, स्पर्श व शब्द यांपासून तो अगदीं अलिप्त आहे. सृष्ट्यादि व्यापार यापासूनच सुरू होऊन यावरच ते अवलंबून आहेत. प्राण, अपान, समान, व्यान व उदान हे वायू यापासूनच निघून यांतच फिरून लय पावतात. समान व व्यान यांच्यामध्यें प्राण व अपान यांचा संचार असून प्राणापान लीन झाले असतां समान व व्यान हेही त्यांमध्यें लीन होतात. या प्राणापानांमध्येंच उदान भरून राहिला आहे. प्राण व अपान हे दोन वायू मनुष्य निजला असतांही त्याला सोडीत नाहींत. उदान वायूचें सर्वांवर उदानत्व असल्यानें त्याला उदान ह्मणतात. याप्रमाणें जीवाच्या उपाधिभूत प्राणांचा एका उदानामध्यें अंतर्भाव होत असून हा उदान तपानें ताब्यांत आणतां येतो. याप्रमाणें सर्वांच्या शरीरामध्यें फिरत राहून एकमेकांचा अंतर्भाव करून घेणाऱ्या या सर्व वायूंमध्यें वैश्वानर नांवाचा अग्नि सात ज्वाळांनीं जळत आहे. नाक, जीभ, डोळे, त्वचा, कान, मन व बुद्धि हीं सात ह्या वैश्वानर अग्नीच्या सात जिव्हा होत. घ्रेय, दृश्य, पेय, स्पर्श्य, श्राव्य, ध्येय, व ज्ञेय असे सात विषय ह्या वैश्वानराच्या सात समिधा आहेत. घ्राता, भक्षिता, द्रष्टा, स्प्रष्टा, श्रोता, ध्याता, व ज्ञाता हे सात मोठे ऋत्विज आहेत. याप्रमाणें हे विद्वान सात होते घ्रेयादिकांची वर सांगितलेल्या सात अग्नींमध्यें बरोबर आहुति देऊन त्यांना आपल्या गर्भांमध्यें घेतात. अर्थात् हे घ्रेयादिक विषय वाटेल तेव्हां उत्पन्न करण्याचें त्यांच्या अंगीं सामर्थ्य येतें. पृथ्वी, वायु, आकाश, आप, ज्योति, मन व बुद्धि ह्या सातांना गर्भ ही संज्ञा आहे. हविस्वरूप झालेले हे गुण अग्निमुखामध्यें गडप होऊन तेथें कांहीं वेळ राहून या यजमानाच्या इच्छेनुरूप ते फिरून प्रगट होतात, आणि सर्व भूतमात्रांच्या उत्पादक अशा त्या ब्रह्मामध्यें प्रलयकालीं ते गडप होऊन रहातात. व त्या ब्रह्मापासून पुढें गंध, रस, रूप, स्पर्श, शब्द, मन व बुद्धि उत्पन्न होतात. याप्रमाणें सात प्रकारची उत्पत्ति आहे. मान, मेय व माता या तिघांच्या पूर्णाहुतीनें ज्ञाते यजमान याप्रमाणें सत्तावान होतात.

याच संबंधांत दहा होत्यांचें पुढील विधान लक्षांत घे. कान, त्वचा, डोळे, जीभ, नाक, पाय, हात, जननेंद्रिय, वाणी व पायु हे दहा होते आहेत. शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध, वाक्य, क्रिया, गति, रेत, मलविसर्जन हीं दहा हवी आहेत. दिशा, वायु, सूर्य, चंद्र, पृथ्वी, अग्नी, विष्णु, इंद्र, प्रजापति, मित्र हे दहा अग्नी आहेत. याप्रमाणें पांच कर्मेंद्रियें व पांच ज्ञानेंद्रियें मिळून दहा विषयनामक हवी वर सांगितलेल्या दहा अग्नींमध्यें टाकतात. चित्त हेंच या यज्ञाचें स्रुव असून पवित्र असें श्रेष्ठ ज्ञान हेंच या यज्ञाला लागणारें द्रव्य आहे. याप्रमाणें जगाचे विभाग आहेत. सर्व ज्ञानाला कारणीभूत अशा मनाला याचा सर्व इंद्रियांशीं संबंध असल्यानें सर्वच ज्ञेय वस्तूंची आहुती लागते. ज्ञाता जीव रेतापासून उत्पन्न झालेल्या ह्या स्थूल शरीरामध्यें सूक्ष्म रूपामध्यें लिंगाभिमान धरून राहिला आहे. ह्या देहाला धारण करणारा हृदयरूपी गार्हपत्य अग्नि असून त्यापासून इतर अग्नींची उत्पत्ति होते. मन हा आवहनीय अग्नि असून त्यामध्यें आहुति दिल्यावर त्यापासून वाणी उत्पन्न होऊन मन त्याकडे डोळे लावतें.

कांहीं विशेष वर्ण नसलेलें रूप पुढें उत्पन्न होऊन मनाकडे धांव घेतें.' ब्राह्मणी म्हणाली, 'मनामध्यें प्रथम विचार येऊन मग वाणींतून ते बाहेर येत असतां वाणी प्रथम उत्पन्न होऊन मागून मन झालें असें कसें? प्राण मनाच्या आश्रमानें राहिला आहे हें कशावरून? त्याचप्रमाणें सुषुप्तीमध्यें तो मनापासून वेगळा होऊन कायम असतांही त्याला विषयज्ञान कां रहात नाहीं? तें वेळीं त्याला तें ज्ञान होण्याला प्रतिबंध कोण करतो?' ब्राह्मण म्हणाला, 'अपान वायु स्वामी होऊन तो आपल्या ह्या प्राणावरील स्वामित्वामुळें त्याला आपल्या ताब्यांत घेऊन त्याला तो आपल्याशीं अगदीं एक करून सोडतो. ह्या प्राणाच्या नियंत्रित गतीलाच मनाची गति म्हणतात. म्हणून मन प्राणावर अवलंबून असून प्राण मनावर अवलंबून नाहीं, आणि म्हणूनच सुषुप्तीमध्यें मन नाहींसें झालें असतांही प्राण नाहींसा होत नाहीं. आतां मन व वाणी या संबंधाच्या तुझ्या पहिल्या प्रश्नासंबंधानें त्यांमधीलच पुढील संवाद ऐक. ह्या दोघांनीं भूतात्म्याकडे जाऊन आपल्यामध्यें श्रेष्ठ कोण म्हणून त्याला विचारलें. तेव्हां तो 'मन' असें ह्मणाला असतां 'मी सर्व माहिती देऊन आपल्या सर्व इच्छा पूर्ण करतों, तेव्हां मी कां नाहीं,' ह्मणून वाणी ह्मणाली. यावर मन ह्मणालें, 'स्थावर व जंगम अशा दोन प्रकारचे माझे मनोविषय असून स्थावर माझ्याजवळ आहे व जंगमावर तुझा ताबा आहे.' भूतात्मा ह्मणाला, 'मंत्र, वर्ण किंवा स्वर यांकडे वळणारें जें मन तें जंगम असून त्याहून तूं थोर आहेस; परंतु ज्याअर्थी मीच आपल्या सर्व वासना परिपूर्ण करतें म्हणून बढाई मारून तूं आपला पक्ष प्रतिपादूं पहातेस ह्मणून वाईट वाटून मी हें एवढें मोठ्या कष्टानें ह्मणतों. असें म्हणून तो मनाला म्हणाला, 'ही वाग्देवी नेहमीं प्राण व अपान यांच्यामध्यें राहून प्राणाचा हिला जोर न मिळेल तर हिचें कांहीं चालणार नाहीं.' तेव्हां वाणी 'भगवन् कृपा करा,' म्हणून प्रजापतीस शरण गेली; तेव्हां प्राण प्रगट होऊन त्यानें वाणीचें पोषण केलें. म्हणून वाणीचेही फिरून घोषिणी व अघोषा असे दोन प्रकार असून या दोहोंमध्यें हंसस्वरूप अघोषाच श्रेष्ठ आहे. ही उत्तम वाणी गाईप्रमाणें रसोत्पादक आहे आणि ब्रह्मोच्चारण करणारी ही नेहमीं मोक्ष बाहेर सोडीत असते.' ब्राह्मण म्हणाला, 'ही गोरूप वाणी दिव्य तशीच अदिव्य आहे; याप्रमाणें या दोन सूक्ष्म वाणी व मन यांमध्यें अंतर आहे.' ब्राह्मणी म्हणाली, 'तेवेळीं बोलण्याची इच्छा असूनही जेव्हां बोलूं लागली असतां तोंडांतून शब्द बाहेर पडेनात तेव्हां वाणी काय म्हणाली?' ब्राह्मण म्हणाला, 'वाणी म्हणाली, 'भाषण शरीरांत प्राणाच्या योगानें उत्पन्न होऊन तें अपानामध्यें शिरतें व पुढें उदानाशीं मिसळून शरीरांतून बाहेर पडतें व व्यानाच्या योगानें आकाशांत भरून रहातें व पुढें समानाशीं जुळून रहातें.' तेव्हां मन हें स्थावरांमध्यें श्रेष्ठ असून जंगमांमध्यें वाणी श्रेष्ठ आहे.'

'याच संबंधांत सात होत्यांचें पुढील विधान सांगतात तें कशाप्रकारचें आहे तें ऐक. नाक, डोळा, जीभ, त्वचा, कान, मन व बुद्धि हे सात होते असून निरनिराळ्या ठिकाणीं राहिले आहेत. सूक्ष्म जागेंत हे राहिले असून एकमेकांच्या हे दृष्टीस पडत नाहींत. हे आपापल्या निरनिराळ्या स्वभावांप्रमाणें सात होते आहेत.' ब्राह्मणी म्हणाली, 'सुक्ष्म जागीं असूनही ते एकमेकांच्या कसे दृष्टीस पडत नाहींत व त्यांचे स्वभाव काय आहेत?' ब्राह्मण म्हणाला, 'गुण न उमगणे हें अज्ञान असून गुणाचें ज्ञान असणें हेंच ज्ञान होय. हे एकमेकांचे गुण मुळींच ओळखीत नाहींत. जीभ, डोळा, कान तोंड, मन बुद्धि यांना गंधगुण माहीत नसून तो नाकालाच तेवढा कळतो. नाक, डोळा, कान, त्वचा, मन व बुद्धि यांना रसज्ञान नसून तें जिभेलाच आहे. नाक, जीभ, कान, त्वचा, मन बुद्धि यांना रूपज्ञान नसून तें डोळ्यालाच कळतें. नाक, जीभ, डोळा, कान, बुद्धि, मन यांना स्पर्शज्ञान नसून ते त्वचेलाच आहे. नाक, जीभ, डोळा, त्वचा, मन व बुद्धि यांना शब्दज्ञान नसून तें कानालाच आहे. नाक, डोळा, जीभ, त्वचा, कान व बुद्धि यांना संशय नसून तो मनालाच आहे. नाक, जीभ, डोळा, त्वचा कान, मन यांना निश्चय नसून तो गुण बुद्धीलाच आहे.' यासंबंधांत पु-

ढील इंद्रियें व मन यांचा संवाद ऐक. मन ह्मणालें, 'माझ्यावांचून नाक वास घेत नाहीं; जीभ रस चाखीत नाहीं, डोळ्याला रूपज्ञान होत नाहीं, त्वचेला स्पर्श कळत नाहीं, कानाला शब्दज्ञान होत नाहीं. ह्मणून सर्व भूतांमध्यें मीं पूर्वीपासून श्रेष्ठ आहें. शुकशुकाट झालेल्या घराप्रमाणें किंवा विझलेल्या अग्नीप्रमाणें माझ्यावांचून इंद्रियांचें तेज मुळीं पडणार नाहीं. ओलसर लांकडांप्रमाणें इंद्रियें किती जरी झटपटलीं तरी त्यांच्या योगानें प्राणिमात्रांना गुणज्ञान होणार नाहीं.' इंद्रियें ह्मणालीं, 'आमच्यावांचून तुला सर्व विषयांचें ज्ञान होऊन जर भोग भोगतां आले असते, आह्मी निमालों असतां तुझी तृप्ति राहून प्राणधारणा झाली असती, किंवा आह्मीं लीन झालों असतां सुद्धां पुढें असणाऱ्या विषयांचा जर तुला केवळ संकल्पानें बरोबर उपभोग घेतां आला असता तर हें तुझें ह्मणणें खरें ठरलें असतें. हेंच कशाला, तुला जर आमच्यावर नेहमीं तुझा ताबा आहे असें वाटत आहे तर नाकानें रूप ओळख, डोळ्यानें रस चाख, कानानें गंध घे, जिभेनें स्पर्श ओळख,त्वचेनें शब्दज्ञान करून घे किंवा बुद्धीनें स्पर्श जाण. **बलवानाला कांहीं कायदा नसून कायदे दुबळ्याकरितां आहेत.** यापुढें नवे नवे भोग भोग. उगीच तेंच तेंच उष्टे भोग कशाला भोगतोस? ज्याप्रमाणें शिष्यानें गुरूकडे वेद शिकण्याला जाऊन तो शिकल्यावर त्यावर ऐट मिरवावी त्याप्रमाणें आह्मींच दाखवून दिलेल्या मागच्यापुढच्या विषयासंबंधानें स्वप्नांत व जागेपणीं त्यांवर स्वामित्व दाखवून तूं ऐट मिरवीत रहातेस. शिवाय अल्पबुद्धि लोकांचें मन जाग्यावरून उडालें असतांही आह्मी आपापल्या कामगिऱ्या बजाविल्यानें प्राण रहातो; एवढेंच नव्हे तर स्वप्नांत पुष्कळ संकल्प मनांत आणून त्यांची मजा वाटत प्राणी त्यांचा उपभोग घेण्याच्या इच्छेनें त्या त्या विषयाकडे धांव घेतो. जो मनुष्य इंद्रियविषयांशीं संबंध न ठेवतां दारें नसलेल्या घराप्रमाणें केवळ संकल्पजन्य विषयांमध्यें शिरतो तो पेटविलेला अग्नि ज्याप्रमाणें फिरून सर्पण न घातल्यानें विझून जातो त्याप्रमाणें प्राणवायु सरून गार पडतो. आमचा आपापल्या गुणांशींच संबंध असून एकमेकांचे गुण आह्मांला कळत नाहींत हें कबूल असलें तरी आमच्यावांचून तुला विषयज्ञान किंवा हर्ष होणें मुळीं शक्य नाहीं.'

ब्राह्मण ह्मणाला, 'आतां पांच होत्यांचें विधान कशा प्रकारचें असतें तेंही ऐक. प्राण, अपान, उदान, समान व व्यान हे पांच होते आहेत, हें याचें मुख्य तत्त्व आहे. प्राणानें पोसलेला वायु पुढें अपान होतो, अपानानें तयार केलेला वायु व्यान बनून व्यानानें तयार केलेला उदान बनून काम करूं लागतो व उदानापासून झालेला समान बनतो. आपल्यामध्यें श्रेष्ठ कोण हें ठरवून घेण्यासाठीं हे पांच वायु पूर्वी ब्रह्मदेवांकडे गेले. तेव्हां जो नाहींसा झाल्यानें मनुष्याच्या शरीरांतील प्राणवायु नाहींसे होतात आणि ज्याच्या चलनवलनानें त्यांचें चलनवलन होतें तो श्रेष्ठ असा ब्रह्मदेवांनीं निकाल दिला.तेव्हां प्राण ह्मणाला, 'मी नाहींसा झाल्यानें शरीरांतील सर्व प्राणवायु नाहींसे होतात व माझें चलनवलन झाल्यानें त्यांचें चलनवलन होतें;ह्मणून मी मोठा आहें हा मी नाहींसा होतों पहा.' असें ह्मणून तो नाहींसा होऊन नंतर कांहीं वेळानें फिरून हालचाल करूं लागला; तेव्हां समान व उदान त्याला ह्मणाले, 'आह्मी जसे सर्व शरीरांतून भरून आहों; त्याप्रमाणें कांहीं तूं नाहींस; केवळ अपान तुझ्या ताब्यांत आहे.' याप्रमाणें प्राण फिरून हालचाल करूं लागल्यावर अपान ह्मणाला, 'मी नाहींसा झाल्यानें सर्व प्राणवायू नाहींसे होतील;माझ्या चलनवलनावर ते चलनवलन करीत आहेत; ह्मणून मी सर्वांत मोठा आहें. हा पहा मी नाहींसा होतों.' तेव्हां व्यान व उदान त्याला ह्मणाले,'तूं कांहीं मोठा नाहींस, केवळ प्राण तुझ्या ताब्यांत आहे,' नंतर अपान फिरून हालचाल करूं लागला. नंतर व्यान ह्मणाला, 'मी नाहींसा झालों असतां सर्व प्राणवायू नाहींसे होतील. माझ्या चलनवलनाबरोबरच त्यांचें चलनवलन होतें, तेव्हां मी श्रेष्ठ आहें. हा पहा मी नाहींसा होतों.' असें ह्मणून व्यान नाहींसा होऊन फिरून कांहीं वेळानें हालचाल करूं लागला. प्राण, अपान, उदान व समान त्याला ह्मणाले, 'तूं कांहीं आमच्या सर्वांत मोठा नाहींस. तेवढा समानच तुझ्या ताब्यांत आहे.' याप्रमाणें व्यान पुन्हां हालचाल करूं लाग-

ल्यावर समान तसेंच ह्मणून नाहींसा होऊन फिरून कांहीं वेळानें हालचाल करूं लागला. उदान त्याला ह्मणाला, 'मी तुह्मां सर्वांमध्यें श्रेष्ठ आहें. मी नाहींसा झालों तर तुह्मी नाहींसे व्हाल.' असें ह्मणून तो नाहींसा होऊन फिरून कांहीं वेळानें हालचाल करूं लागला. तेव्हां प्राण, अपान, समान व व्यान त्याला ह्मणाले, तूं कांहीं आह्मांसर्वांमध्यें मोठा नाहीस. फक्त व्यान तुझ्या ताब्यांत आहे. हें ऐकून प्रजापति ब्रह्मदेव त्या सर्वांना ह्मणाले, 'तुह्मी सर्वच मोठे आहां व कोणीच मोठा नाहीं. तुह्मां सर्वांमध्यें एकमेकांचे गुण आहेत. सर्व आपापल्या विषयामध्यें श्रेष्ठ असून एकमेकांचे धर्म तुह्मां एकमेकांमध्यें आहेत. स्थिर व अस्थिर असा एक वायु असून कांहीं विशेष कारणानें पांच वायु उत्पन्न झाले आहेत. माझें एकच स्वरूप नाना प्रकारांनीं वाढलें आहे. एकमेकांशीं मित्रत्वानें राहून एकमेकांना संतोषवून एकमेकांना आधार देत सुखांत रहा.'

---

## २९६ नारद व देवमत यांचा संवाद.
## (१४. २४–२८)

ब्राह्मण ह्मणाला, 'याच विषयावर नारद व देवमत यांमधील पुढील संभाषण ऐक. प्राणी जन्माला यावयाचा असतां प्रथम काय अस्तित्वांत येतें? प्राण, अपान, समान, व्यान किंवा उदान ह्मणून देवमतांनीं विचारलें असतां नारद ह्मणाले, 'मनुष्य कोणत्याही प्राणवायूच्या योगानें जन्माला येवो त्याहून निराळें त्या जोडींतलें दुसरें प्रथम उत्पन्न होतें. प्राणवायूच्या वर, खालीं, आजूबाजूला अशा वहणाऱ्या जोड्या आहेत.' देवमत ह्मणाले, 'कोणच्या प्राणवायूच्या योगानें प्राणी उत्पन्न होतो? कोणता दुसरा प्राणवायु त्याच्यामध्यें प्रथम येतो? प्राणवायूच्या वर, खालीं, आजूबाजूला फिरणाऱ्या जोड्या कशा आहेत?' नारद ह्मणाले, 'संकल्पापासून, शब्दापासून, गोडीपासून किंवा रूपापासून हर्ष उत्पन्न होतो. रक्तमिश्रित शुक्रापासून प्राण उत्पन्न होतो, शुक्रामध्यें प्राणाच्या योगानें विकार उत्पन्न झाला असतां अपान उत्पन्न होतो. शुक्रापासून व रसापासून हर्ष उत्पन्न होतो. हेंच उदानाचें स्वरूप असून यासंबंधाचा परिणाम हर्ष हा आहे. कामापासून शुक्र उत्पन्न होऊन शुक्रापासून रज उत्पन्न होतें. समान व व्यान वायूंपासून उत्पन्न होणाऱ्या या शुक्रशोणितांच्या संबंधामध्यें प्राण व अपानवायु शिरून ते वर खालीं फिरत रहातात, व व्यान आणि समान ही जोडी आजूबाजूंनीं वांकडी तिकडी फिरत रहाते. अग्नि हा सर्व ठिकाणीं जाणारा देव आहे, असें वेदांत सांगितलें आहे आणि त्यापासूनच बुद्धीनें हे. युक्त असें त्यांचें ज्ञान ब्राह्मणाला होतें. तम हा त्या अग्नीचा धूर असून रज त्याचें भस्म आहे, व ज्याठिकाणीं या अग्नीमध्यें हवि टाकला जातो त्याठिकाणापासून सत्वगुण उत्पन्न होतो. समान व व्यान हे मुख्य हवी असून, प्राण व अपान हे आज्यभाग आहेत; व त्यांमध्यें तसेंच दिवस व रात्र सत् व असत् या जोड्यांमध्यें अग्नि असून तीच उदानाची श्रेष्ठ जागा आहे, हें यज्ञवेत्त्या ब्राह्मणांनाच कळतें. पहिला समान असून नंतर व्यान आहे. व्यानाचें काम समानाकडून होतें; नंतर फिरून समान कामाला लागतो. व्यान हा फक्त सनातन ब्रह्मरूपी शांतीसाठीं आहे. उदानाचें हें श्रेष्ठ स्थान अशा ब्राह्मणांनाच कळतें.'

या विषयावर आतां चार होत्यांचें विधान कसें तें सांगतों ऐक. करण, कर्म, कर्ता व मोक्ष या चार होत्यांनीं हें जग भरलें आहे. नाक, जीभ, डोळा, त्वचा, कान, मन व बुद्धि हे सात (गुणाला) करणाला हेतू आहेत. गंध, रस, रूप, शब्द, स्पर्श मनाचा व बुद्धीचा विषय हे सात कर्माला हेतू आहेत. वास घेणारा, खाणारा, पाहणारा, बोलणारा, ऐकणारा, मनांत आणणारा व जाणणारा हे सात कर्त्याला हेतू आहेत. हे सर्व गुणवान असून आपापल्या बऱ्या वाईट गुणांचा उपभोग घेत रहातात. आत्मा हा निर्गुण व अनंत आहे व हे सात मोक्षाला हेतू आहेत; आणि देवतांच्या ठिकाणीं असणाऱ्या या गुणांना ओळखणारा विद्वान इंद्रियें आपापल्या ठिकाणीं या हवींचा यथान्याय उपभोग घेतात हें जाणतो. अविद्वान मनुष्याला नानाविध अन्न खातांना ममत्व चिकटतें, व स्वतःसाठीं अन्न शिजविणारा हा मूर्ख या ममत्वाच्यायोगानें नाश पावतो. अभक्ष्य भक्षण व दारू पिणें यांच्या योगानें मनुष्या-

चा नाश होतो. हा अन्नाचा फडशा पाडतो व अन्न याचा फडशा पाडतें. विद्वानाच्या अंगीं ताकद असल्यानें नाहींसें केलेलें फिरून उत्पन्न करण्याचें त्याच्या अंगीं सामर्थ्य असतें. अर्थांत अन्नापासून एवढासुद्धां भलता परिणाम त्याच्या ठिकाणीं होत नाहीं. जें मनामध्यें येतें, जें तोंडावाटें निघतें, जें कानानें ऐकलें जातें, जें डोळ्याला दिसतें, ज्याला त्वचेनें स्पर्श होतो व ज्याचा नाकाला वास येतो त्या या सहा विषयरूपी हवींना सहा इंद्रियांसह आंत घेऊन मोठा कर्तृत्ववान अग्नि शरीरामध्यें पेटून राहिला आहे. माझा योगरूपी यज्ञ चालू असून त्याच्यापासून ज्ञानाग्नि तयार होत आहे. प्राण हाच त्यामधील स्तोत्र असून अपान शस्त्र आहे. सर्वत्याग हीच त्याची उत्तम दक्षिणा आहे. ब्रह्ममय अहंकार, मन व बुद्धि हे त्याचे होता, अध्वर्यु आणि उद्गाता आहेत. या प्रशास्त्याचें सत्य हें शस्त्र आहे, मोक्ष ही दक्षिणा आहे. आत्मस्वरूपी नारायणाला ओळखणारे यासंबंधानें ऋचा ह्मणतात. पूर्वीं या नारायण देवाला पशू हवी दिले जात याला या यज्ञांत साम गातात त्याचा आधार देतात. हा नारायण सर्वांचा आत्मा आहे.'

या जगामध्यें या हृदयामध्यें असणारा एकच शास्ता असून दुसरा शास्ता नाहीं. त्याच्याच मागून सखल प्रदेशांतून वहात जाणाऱ्या प्रवाहाप्रमाणें त्यानें दाखवून दिलेल्या वाटेनें मी वहात चाललों आहें. तोच हृदयामध्यें असणारा एकटा गुरु असून दुसरा कोणी गुरु नाहीं. त्याच गुरूच्या शिक्षणावरून जगामध्यें सर्वसापांचा द्वेष होतो. या जगांत एकच आप्त असून दुसरा कोणी आप्त नाहीं आणि तो या हृदयामध्यें असणारा होय. त्यानेंच शिकविल्यावरून बांधवांमध्यें बांधवपणा उत्पन्न झाला आहे व सप्तर्षी आकाशामध्यें झळकत राहिले आहेत. हृदयामध्यें असणारा असा एकच श्रोता असून दुसरा कोणी श्रोता नाहीं. गुरूजवळ रहावें तसें त्याजवळ राहून इंद्रानें सर्व लोकांवर इंद्रत्व मिळविलें. हृदयामध्यें असणारा एकच द्वेष्टा असून दुसरा कोणी द्वेष्टा नाहीं. त्याच गुरूनें शिकविल्यावरून लोकांमध्यें सर्व सापांचा द्वेष होतो. या संबंधानें साप, देव व ऋषी या सर्वांना पूर्वी प्रजापतींनीं एकच उपदेश सांगितला, तो लक्षांत ठेवण्याजोगा आहे. पूर्वी देव, ऋषी नाग व असुर ब्रह्मदेवांकडे जाऊन 'आमच्या कल्याणाचा आह्मांस कांहीं उपदेश करा,' ह्मणून ह्मणाले, तेव्हां 'ॐ' ह्मणून एकाक्षरी ब्रह्म त्यांनीं उच्चारलें. तें ऐकून ते आपापल्या वाटेनें निघून गेले. आपापल्या उपदेशाचा तात्पर्यार्थ मनांत आणून त्याचा निरनिराळा अर्थ त्यांनीं घेतला. ॐ शब्द उच्चारतांना तोंडाची उघडझांक झाली, त्यावरून स्वभावानुरूप त्या उच्चारण कृतीला अनुसरून सापांनीं त्याचा चावणें असा अर्थ घेतला. त्याच्या उच्चाराच्या वेळीं हलणाऱ्या ओंठावरून जपादि दांभिकपणाचा अर्थ आपल्या स्वभावाला अनुसरून घेऊन असुर दांभिक झाले. ॐ ह्मणजे बरें ह्मणून लोकांच्या प्रार्थनेला रुकार, असा त्याचा अर्थ घेऊन देवांनीं दानश्रेष्ठ असा त्याचा अर्थ घेतला. व ॐ उच्चारण्यामध्यें ओंठाच्या प्रवृत्तीचा उपसंहार पाहून सर्व प्रवृत्तींचा उपसंहाररूपी आत्मनिग्रह चांगला, असा महर्षींनीं त्याचा अर्थ घेतला. तेव्हां एकाच शिक्षकापासून एकाच शब्दाचें शिक्षण मिळून त्याच्या योगानें हे चौघे निरनिराळ्या व्यवसायाचे बनले. मनुष्य बोललेलें ऐकतो व त्याचा योग्य अर्थ उमगतो, तरी विचारूं गेलें असतां एका शिक्षकावांचून दुसरा कोणी शिक्षक नाहीं; आणि त्याच्याच मतानें कर्म सुरू होतें. गुरु, जाणणारा, ऐकणारा व द्वेष करणारा असा हा सर्वरूपी नेहमीं हृदयामध्यें राहिला आहे. पापानें वागून लोकांमध्यें हा पापी होतो, चांगलें वागूनचांगला होतो, मनाप्रमाणें वागून इंद्रियसुखामध्यें गढतो. व जो इंद्रियांना जिंकण्यामध्यें गढतो तो ब्रह्मचारी, ब्रह्ममध्यें तल्लीन होतो. सर्व व्रतादिकर्मांना टाकून केवळ ब्रह्मांकडे लक्ष देऊन राहिल्यानें मनुष्य जगामध्यें ब्रम्हस्वरूपी होऊन संचार करणारा ब्रह्मचारी होतो. ब्रह्मच त्याच्या समिधा असून ब्रह्मच त्याचा अग्नि आहे. ब्रह्मच उत्पत्तिस्थान, ब्रह्मच जल व ब्रह्मच गुरू होऊन, तो ब्रह्मामध्यें तल्लीन झाला असतो. शहाणे यालाच सूक्ष्म ब्रह्मचर्य समजतात, व क्षेत्रज्ञानें दाखवून दिलेल्या या मार्गाला ओळखून त्याच्या अनुरोधानें ते जातात.

'ज्यामध्यें संकल्प हेच डांस व मच्छर आहेत, शोक व हर्ष हेच थंडी व ऊन्ह आहेत, व लोभ आणि व्याधिरूपी साप भरले आहेत, ज्याच्या वाटेवर विषयरूपी आडकाठी असून कामक्रोधरूपी वाटमारे ज्यामध्यें आहेत अशा, मोहरूपी अंधकारानें भरलेल्या बिकट जंगलांतून पार पडून मी आतां मोठ्या विस्तृत अशा रम्य वनामध्यें शिरलों आहें.' ब्राम्हणी म्हणाली, 'अहो बुद्धिशालिन् तें वन कोठें आहे, तेथें झाडें कसलीं आहेत, नद्या कोणत्या आहेत, पर्वत कशा प्रकारचे आहेत व तें दूर तरी किती आहेत?' ब्राह्मण म्हणाला, 'वेगळेपणा नाहींसा होईल तर त्याहून अधिक आल्हादकारक दुसरें कांहींच नाहीं, तेंच जेथें वेगळेपणा राहिला तेथें त्याहून कष्टमयही पण दुसरें कांहींच नाहीं. त्याहून लहान असें कांहींच नाहीं व त्याहून मोठेंही पण कांहीं नाहीं. त्याहून सूक्ष्म दुसरें कांहीं नाहीं, त्याहून सुखदायक दुसरें कांहीं नाहीं. त्याठिकाणीं गेल्यानें शोक किंवा आनंद कांहींच उरत नाहीं. तेथें जाणारांना कोणाची भीति उरत नाहीं किंवा त्यांचीही कोणाला भीति उरत नाहीं. या वनामध्यें सात मोठे वृक्ष असून त्याला सात फळें आहेत; तेथें सात अतिथी आहेत, सात आश्रम आहेत, सात समाधी आहेत व सात दीक्षा आहेत. असें ह्या वनाचें स्वरूप आहे. पंचरंगी, चौरंगी, तिरंगी, बेरंगी, व एक रंगी अशीं सुवासिक व त्याचप्रमाणें ज्यांना स्पष्ट वर्ण मुळींच नाहीं अशीं पुष्कळ फलपुष्पें देणारीं अशीं दोन झाडें त्या वनामध्यें आहेत. सुंदर फलपुष्पें ज्यांना येतात अशीं पुष्कळ झाडें या वनामध्यें भरून राहिलीं आहेत. ब्रह्माशीं संबंध असलेलें चांगलें मन हाच एक अग्नि ह्या ठिकाणीं आहे. पंचेंद्रियें समिधा आहेत. ज्यांच्यापासून प्राप्त होणारे सात प्रकारचे मोक्ष हे सात प्रकारच्या दीक्षा आहेत. गुण हीं फळें असून अतिथी तीं खातात. महर्षी येथें निरनिराळ्या ठिकाणीं आतिथ्य घेऊन नाहींसे झाले असतां त्यांच्यापुढें दुसरें एक वन झळकतें. ह्या ठिकाणीं प्रज्ञारूपी वृक्ष असून मोक्ष हेंच फल आहे. या वृक्षाची शांतिरूपी छाया आहे व हा ज्ञानाच्या आधारानें आहे; तृप्ती हेंच याला पाणी आहे. अंतस्थ क्षेत्रज्ञ हाच यावर प्रकाश पाडणारा सूर्य आहे. जे साधू लोक या वृक्षाकडे जातात त्यांना मग भय म्हणून उरत नाहीं. वर, खालीं व आजूबाजूला कोठेंच या वृक्षाचा शेवट सांपडत नाहीं.'

'मी वास घेत नाहीं, रस चाखीत नाहीं, रूप पहात नाहीं, स्पर्श जाणत नाहीं, नानाप्रकारचे शब्द ऐकत नाहीं, व मनामध्यें कांहीं संकल्पही आणीत नाहीं. स्वभावच त्याच्या आवडत्या विषयांची इच्छा करीत असून द्वेष्यवस्तूचा द्वेष करीत असतो, ज्याप्रमाणें प्राण्याच्या शरीरामध्यें शिरल्यावर प्राण व अपान आपापलीं कामें करीत रहातात, त्याचप्रमाणें हे कामद्वेषही स्वभावानेंच उत्पन्न होतात. त्यांपासून वेगळा, या शरीरामध्यें नित्य असणारा, भूतात्मा मला दिसतो. त्याच्याकडे लक्ष लावून मी काम, क्रोध, जरा, मृत्यु यांचा तडाखा पाहून कशामध्येंच आसक्त नाहीं. काम्य वस्तूंची हांव न धरल्यानें व द्वेष्य वस्तूंचा द्वेष न केल्यानें कमलावर ज्याप्रमाणें पाण्याचा बिंदु रहात नाहीं त्याप्रमाणें माझ्या मनावर कसलाच लेप बसत नाहीं; नानाप्रकारच्या निरनिराळ्या स्वभावांकडे पहात साक्षिभूत असणाऱ्या या नित्य अशा आत्म्याचे हे अनित्य संबंध आहेत. आकाशाला ज्याप्रमाणें सूर्यकिरण चिकटत नाहींत, त्याप्रमाणें सदसत् जाणणाऱ्या विद्वानाला त्याच्या हातून कर्में झालीं तरी तीं चिकटत नाहींत. यासंबंधांतच पुढील, अध्वर्यु व यति यांच्या संवादाचें उदाहरण देतात. यज्ञकर्मामध्यें पशूला प्रोक्षण करून मारावयास काढलेला पाहून त्याठिकाणीं असणारा एक यति अध्वर्यूला त्याची निंदा करून 'ही हिंसा आहे,' असें म्हणाला. त्याला अध्वर्यूनें उत्तर दिलें, 'या बकऱ्याचा कांहीं नाश होत नाहीं. वेदवाक्याप्रमाणें याचें कल्याणच होतें. याच्यामधील जो पृथ्वीचा भाग तो पृथ्वीला जाऊन मिळेल, पाण्याचा भाग पाण्याला जाऊन मिळेल, डोळे सूर्याशीं मिळतील, कान दिशांना जाऊन मिळतील व प्राण आकाशाला जाऊन मिळेल. वेदांत सांगितल्याप्रमाणें वागत असल्यानें मजकडे कांहीं दोष नाहीं.' यति म्हणाला, 'या बकऱ्याला मारून जर तुला त्यांत त्याचें कल्याणच दिसतें, तर मग हा यज्ञ तुझ्यासाठीं नसून त्या बकऱ्यासाठींच आहे, मग या

ठिकाणीं तुझें काय काम उरलें ? तेव्हां आई, बाप, भाऊ, मित्र त्यांकडे याला घेऊन जाऊन त्यांचा तूं सल्ला घे. ते ज्याप्रमाणें तुला सल्ला देतील तसा मग वाग. ह्या बिचाऱ्या बकऱ्याचे प्राण तर निघून गेले आहेत. केवळ याचें हें निचेष्ट शरीर बाकी राहिलें आहे. हिंसेमध्यें गम्मत वाटणारांना पशु हे केवळ सर्पणाप्रमाणें वाटतात. सर्वधर्मांमध्यें अहिंसा श्रेष्ठ आहे, असें वृद्धांचें सांगणें आहे. ज्यामध्यें हिंसा नसेल असें कर्म करावें एवढें आह्मांस ठाऊक आहे. अहिंसा एवढीच आमची प्रतिज्ञा आहे. आणखी बोलूं लागलों तर या आपल्या कृत्यांत आणखी पुष्कळ दोष दाखवून देतां येतील. सर्व प्राणिमात्रांच्या ठिकाणीं अहिंसा ठेवणें हाच धर्म आह्मांला पसंत आहे, व प्रत्यक्ष कृतींनीं आह्मी तो शेवटास नेतों. परोक्ष गोष्टीवर आह्मीं विसंबून रहात नाहीं.' अध्वर्यु म्हणाला, 'भूमीचा गंधगुण आपण घेतां त्याचप्रमाणें रसमय अशा निरनिराळ्या पदार्थांची गोडी आपण चाखतां, प्रकाशमान ज्योतीपासून आपण रूप पहातां, वायूला स्पर्श करतां, आकाशापासून उत्पन्न होणारा शब्द ऐकतां, मनानें विचार करतां, हीं सर्व भूतमात्रें असून यांना प्राण आहे असें तुह्मीं समजतां, तेव्हां तुह्मीही हिंसेपासून निवृत्त नसून प्राणिमात्रांची हिंसाच करीत आहां; अशी एकही हालचाल नाहीं कीं ज्यामध्यें हिंसा नाहीं.' यति म्हणाला, 'अक्षर व क्षर अशा दोन प्रकारानें आत्म्याची व्यक्तता आहे. त्यांपैकीं सद्भाव अक्षर असून भूतव्यक्ति अविनाशी आहे. प्राण, जीभ, मन, सत्व व तम यांचे गुण हे भूतव्यक्तिदर्शक आहेत, आणि जो यांपासून मोकळा आहे, ज्याला सुखदुःखादि द्वंद्वाचा विटाळ नाहीं, ज्याला आशा नाहीं, जो सर्व भूतांच्या ठिकाणीं सारखा आहे, जो ममताशून्य आहे, ज्यानें इंद्रियनिग्रह केला आहे आणि जो चोहोंकडून अगदीं मोकळा झाला आहे त्याला कांहीं भीति असत नाहीं.' अध्वर्यु म्हणाला, 'अहो बुद्धिमानांमध्यें श्रेष्ठ, खरोखर भल्याचीच संगत करावी, आपलें मत ऐकून माझ्या मनावर चक्कन उजेड पडला आहे आणि मी आपल्याला देवासारखे मानून हात जोडून सांगतों कीं, मंत्रामध्यें सांगितलेलें व्रत करणाऱ्याचा अपराध नाहीं.' याप्रमाणें त्यांना उपपत्ति दिली असतां तो यति गप्प झाला व अध्वर्यूनें मोहापासून दूर होऊन आपला मोठा यज्ञ चालविला. ब्रह्म फार सूक्ष्म आहे. त्याला त्याप्रमाणें ओळखून क्षेत्रज्ञानें दाखवून दिलेल्या दिशेनें लोक तसें वागतात.'

---

## २९७ कार्तवीर्य व समुद्र यांचा संवाद.

### (१४. २९—३१)

'यासंबंधांत कार्तवीर्य व समुद्र यांचा पुढील संवाद उदाहरण देतात. 'कार्तवीर्य अर्जुन नांवाचा कोणी राजा होता. त्याला हजार बाहू होते, त्यानें आपल्या धनुष्यानें समुद्रापर्यंत सर्व पृथ्वी जिंकली. आपल्या सामर्थ्यानें फुगून जाऊन तो समुद्रावर बाण सोडीत फिरत असतां समुद्र हात जोडून नमस्कार करून म्हणाला, 'माझ्यावर उगीच बाण सोडूं नकोस. मी तुझें काय करूं तें सांग. माझ्यामध्यें असणारे प्राणी तूं सोडलेल्या या बाणांनीं मरत आहेत, त्यांना अभय दे.' सहस्रार्जुन म्हणाला, 'जो रणामध्यें माझ्यापुढें उभा राहील असा माझ्यासारखा कोणी धनुर्धारी आहे काय सांग.' हें ऐकून समुद्र म्हणाला, 'तूं जर महर्षी जमदग्नीचें नांव ऐकलें असशील तर त्यांचे मुलगे परशुराम म्हणून आहेत ते तुझा योग्य समाचार घेतील; तेव्हां तो राजा रागानें त्यांच्याकडे गेला व आश्रमांत आल्यावर थेट परशुरामांकडे जाऊन त्यानें आपल्या भावांसह परशुरामांच्या मनाविरुद्ध पुष्कळ गोष्टी करून त्यानें परशुरामांना त्रास दिला; तेव्हां त्या अतुल तेजस्वी परशुरामांच्या तेजानें उचल खाऊन त्यांनीं शत्रुसैन्याचा जाळून फडशा पाडला. नंतर त्यांनीं परशु घेऊन त्या सहस्रार्जुनाचे बाहू, एखाद्या पुष्कळ फांद्यांच्या झाडाच्या फांद्या तोडाव्या त्याप्रमाणें तोडून टाकले. त्याला याप्रमाणें मरून पडलेला पाहून त्याचे सर्व आप्त तरवारी, शक्ति वगैरे घेऊन परशुरामांवर चालून आले. परशुरामांनींही धनुष्य घेऊन रथावर बसून एकदम त्या राजदळाला बाणांच्या वर्षावानें उडवून लाविलें; तेव्हां कांहीं क्ष-

त्रिय सिंहाच्या भीतीनें लपून बसणाऱ्या श्वापदांप्रमाणें पर्वतांमधील विकट जागेमध्यें त्यांच्या भयानें जाऊन लपून बसले. आपली कामगिरी हे बजावीनातसे झाल्यामुळें त्यांची प्रजा उपदेशाला कोणी ब्राह्मण न उरल्यानें भ्रष्ट बनली. त्याप्रमाणें द्रवीड, आभीर, पुंड्र, शबर. हे सर्व क्षत्र धर्माचे लोक आपला धर्म सोडल्यानें भ्रष्ट बनले. याप्रमाणें क्षत्रिय वीरांचा फडशा पडून द्विजांनीं उत्पन्न केलेल्या क्षत्रियांची परशुरामांनीं एकवीस वेळां कत्तल केली असतां, सर्व लोकांना ऐकूं येईल अशी आकाशवाणी झाली कीं, 'हे रामा, आतां ही कत्तल पुरी कर. या क्षत्रियबंधूंना वरचेवर मारण्यांत तुला काय फायदा आहे? त्याचप्रमाणें ऋचीक प्रभृति त्याच्या थोर पितरांनींही त्याला ह्या कृत्यापासून थांबण्यास सांगितलें. तेव्हां आपल्या बापाचा वध रामांना असह्य होऊन, 'आपण माझें असें निवारण करूं नये, असें राम त्यांना ह्मणाले,' पितरांनीं उत्तर दिलें, 'रामा, या नांवाच्या क्षत्रियांना मारणें तुला उचित नाहीं. ब्राह्मण असून राजांना मारणें हें तुला शोभत नाहीं. यासंबंधांत अलर्काचा पुढील इतिहास ऐकून मग तुला वाटेल तसें कर.'

'अलर्क नांवाचा कोणी मोठा तपस्वी, धर्मज्ञ व सत्यवादी राजर्षि होता. त्यानें आपल्या धनुष्यानें ही सागरांत पृथ्वी जिंकून अचाट कृत्यें केल्यावर सूक्ष्म गोष्टींकडे त्यानें आपलें मन वळविलें. तो झाडाखालीं बसला असतां या शत्रुविजयाच्या महत् कृत्यापासून त्याचें मन वळून तें ब्रह्मप्राप्तीकडे लागलें.' अलर्क ह्मणाला, 'माझें मन फार प्रबळ झालें आहे. याला जिंकल्यानें मला खरा जय मिळणार आहे, ह्मणून शत्रूंनीं मला घेरलें असतांही याहून वेगळ्या-ठिकाणीं अर्थात या मनावर मी बाण रोखीन. ज्याअर्थीं हें मन याच्या चंचलतेमुळें सर्व मनुष्यमात्रांना वाटेल तें काम करावयास लावतें, त्याअर्थीं मी आतां बारीक टोंकाचे बाण यावर सोडीन.' याप्रमाणें त्यानें विचार केला असतां मन ह्मणालें,' अलर्का, हे बाण मला भेदून कधींही जाणार नाहींत. तुझ्याच मर्मस्थळाला ते भेदतील आणि त्यामुळें तूं मरशील. मला मारण्याला दुसरे बाण पहा.' तें मनाचें भाषण ऐकूनही अलर्क त्याचा विचार न करतां नाक वगैरे इंद्रियांना उद्देशून ह्मणाला, 'नानाप्रकारच्या गंधाचा वास घेऊन नाकाला ते ते हवेसे वाटतात, नानाप्रकारचे गोड गोड रस चाखून ते ह्या जिभेला हवेसे वाटतात, नानाप्रकारचे स्पर्श करून त्यासंबंधानें या त्वचेला हांव वाटते, नानाप्रकारचे शब्द ऐकून कानांना ते हवेसे वाटतात, नानाप्रकारचीं रूपें पाहून डोळ्यांना त्यांची हांव सुटते, त्याचप्रमाणें ही बुद्धि आपल्या अकलेनें नानाप्रकारचे विचार ठरविते, तेव्हां यांवर तीक्ष्ण बाण सोडून यांना मी नाहींसें करतों.' यांवर इंद्रियें त्याला ह्मणालीं. 'या बाणांचा आमच्यावर कांहीं उपयोग न होतां हे तुझ्याच मर्मस्थळाला भेदून त्या योगानें तूं मरशील. तेव्हां ज्यानें आह्मांला मारावयाचें अशाप्रकारचे दुसरे बाण पहा.' तेव्हां अलर्कानें त्याठिकाणीं मोठें घोर तप केलें; परंतु त्याच्या ह्या कडक तपानें या सातांवर सोडण्याला त्याला बाण सांपडेनात; तेव्हां मन एकाग्र करून त्यानें विचार केला व बराच वेळ विचार केल्यानें योगाहून कल्याणप्रद असें दुसरें कांहींच त्याला आढळेना; तेव्हां मन एकाग्र करून निश्चलपणानें त्यानें योग लाविला. व एका बाणानें त्यानें कांहीं वेळ न लागतां सर्व इंद्रियांना ठार केलें व योगाच्या सामर्थ्यानें आपला आत्म्याच्या ठिकाणीं शिरकाव करून घेऊन मोठी सिद्धि मिळविली; त्याच्यायोगानें विस्मित होऊन पुढील कवन त्यानें केलें. 'केवढा चमत्कार कीं, आह्मी सर्व या बाह्य विषयांकडे लागलों आहों, भोगाच्या इच्छेनें पछाडल्यामुळें मी आतांपर्यंत राज्याच्यामागें लागलों होतों, आतां मागून मला कळून येतें कीं, योगाहून श्रेष्ठ सुख मुळींच नाहीं.' याप्रमाणें सांगून पितर ह्मणाले, 'रामा हें लक्षांत घेऊन क्षत्रियांना मारूं नकोस. घोर तप कर ह्मणजे त्यापासून तुझें कल्याण होईल.' हें पितरांचें भाषण ऐकून परशुरामांनीं घोर तप सुरू करून दुर्मिळ अशी सिद्धी मिळविली.

या जगामध्यें तीन प्रकारचे शत्रू असून ते आपापल्या गुणांच्या योगानें नवविध आहेत. प्रहर्ष, प्रीति व आनंद हे तीन सत्वाचे गुण असून तृष्णा, क्रोध व दीर्घद्वेष हे रजाचे गुण आहेत, श्रम, आळस व मोह हे तीन तमाचे गुण आहेत. मो-

च्या हुशारीनें शहाण्या मनुष्यानें यांवर बाण सोडून यांना कापून काढल्यावर मग तो शांतचित्त होऊन शत्रूंना जिंकण्याला समर्थ होतो. यासंबंधीं पूर्वीच्या कल्पांची ज्यांना माहिती आहे अशा लोकांनीं करून ठेवलेला गाथा अंबरीष राजानें पूर्वी गाइला आहे. दोषांचें प्राबल्य वाढून साधूलोकांना त्रास होऊं लागला असतां या महायशस्वी अंबरीषानें एकदम राज्य आपल्या ताब्यांत घेऊन आपले दोष दूर करून साधूंचा त्यानें बहुमान केला; तेव्हां मोठी सिद्धि मिळून पुढील शब्द त्याच्या तोंडांतून निघाले आहेत. ' मीं आपले पुष्कळ दोष नाहींसे केले, सर्व शत्रूंना मारलें; परंतु सर्वांहून जोरदार असा नाहींसा करण्याजोगा जो एक दोष तो मीं नाहींसा केला नाहीं; त्याच्या योगानेंच मनुष्याची आशा कधीं सुटत नाहीं, व आशेनें पछाडला गेल्यामुळें भराभर खालीं चालल्याचें सुद्धां त्याला कळून येत नाहीं, त्याच्याच योगानें मनुष्य भलतें सलतें काम करण्याला तयार होतो; तेव्हां त्या लोभाला तीक्ष्ण अशा तरवारीनें कापून काढल्याशिवाय परिणाम नाहीं. कारण, लोभामुळें तृष्णा उत्पन्न होऊन त्यापासून चिंता उत्पन्न होते. आशेच्यामागें लागल्यानें मनुष्याच्या अंगीं पुष्कळ रजोगुण येतात. ते आल्यानें पुढें त्याच्या ठिकाणीं तमोगुण येतात, या गुणांनीं कर्माच्या योगानें देह धारण करण्याला पुरेशीं बंधनें तयार होऊन मनुष्य फिरून फिरून जन्म घेतो व फिरून फिरून कर्माच्या मागें लागतो. आयुर्मर्यादा संपली असतां शरीर मोडून विस्कळित होऊन जन्मामुळेंच लागलेल्या मरणाच्या तो फिरून आधीन होतो, ह्मणून धैर्यानें लोभ जिंकून मनुष्यानें ( आपल्या ठिकाणीं ) स्वाराज्य मिळविण्याची इच्छा धरावी, हेंच खरें राज्य असून दुसरें राज्य या जगांत नाहीं. योग्यरीतीनें ओळखलेला आत्माच राजा आहे.'

---

## २९८ जनक व ब्राह्मण यांचा संवाद—ममत्वत्याग. ( १४. ३२–३४ )

ब्राह्मण ह्मणाला, ' याचसंबंधांत पुढील जनक व एक ब्राह्मण यांचा संवाद उदाहरणादाखल घेतात. कोणा एका ब्राह्मणानें कांहीं अपराध केल्यामुळें 'तूं माझ्या राष्ट्रामध्यें राहूं नकोस,' म्हणून जनकानें त्याला शिक्षा दिली. तेव्हां ब्राह्मण त्याला म्हणाला, ' हे राजा, तुझ्या ताब्यांत किती मुलूख आहे, तेवढें सांग, म्हणजे मी तुझा देश सोडून तुझी आज्ञा अक्षरशः पाळून बाहेर दुसऱ्याच्या देशांत राहण्यास जाईन. ' हें ऐकून राजानें कांहीं वेळ उत्तर दिलें नाहीं. याप्रमाणें तो गप्प झाला असतां सूर्याला ज्याप्रमाणें राहूनें झांकून काढावें त्याप्रमाणें एकदम त्याच्या डोळ्यांपुढें अंधेरी आली. तें तमोपटल दूर झाल्यावर भानावर येऊन कांहीं वेळानें तो त्यों ब्राह्मणाला ह्मणाला, ' जरी हें सर्व वडिलोपार्जित राज्य माझ्या ताब्यांत आहे तरी ही सर्व पृथ्वी धुंडाळून पाहतांही मला माझा विषय कोठेंच सांपडत नाहीं. पृथ्वीवर कोठें जेव्हां तो सांपडेना तेव्हां मीं मिथिला धुंडाळली. तेथेंही तो सांपडेना, तेव्हां मी आपली प्रजा धुंडाळली. तेथेंही तो मला जेव्हां सांपडेना, तेव्हां माझ्या डोळ्यांपुढें अंधेरी आली. ती गेल्यावर मला खरी बुद्धि उत्पन्न होऊन आतां मला माझा विषय ह्मणून कांहींच नाहीं, किंवा सर्वच कांहीं माझें आहे असें वाटूं लागलें आहे. माझा मी सुद्धां आपला नाहीं, किंवा ही सर्व पृथ्वी माझी आहे. जशी ही माझी आहे तशीच ती दुसऱ्यांचीही पण आहे. तेव्हां येथें आपल्याला वाटेल तितका काळ खुशाल रहा. ' ब्राह्मण ह्मणाला, ' असें कोणतें ज्ञान झाल्यानें एवढें वडिलोपार्जित राज्य ताब्यांत असूनही तुझ्यामधून ममत्व निघून गेलें ? कोणती बुद्धि धरून हा सर्व तुझा विषय तुला आपला नाहींसा वाटतो, तसेंच सर्व कांहीं आपलेंसें वाटतें. ' जनक ह्मणाला, ' सर्ववस्तूंमधील नाशवंत स्थिति लक्षांत आल्यानें मला माझें असें कांहींच दिसत नाहीं. 'हें कोणाचें,' असा विचार करतांना 'वैभव कोणाचें,' हें वेदवाक्य माझ्या लक्षांत आलें; आणि ह्मणून विचार करतां ज्याला माझें ह्मणतां येईल असें मला कांहींच दिसेना. ही बुद्धि माझ्या ठिकाणीं आल्यानें मी ममत्व सोडून दिलें. आतां ज्याच्या योगानें सर्व कांहीं माझेंच असें वाटतें त्याचें कारण सांगतों ऐका. नाकामध्यें शिरलेले गंधसुद्धां मी मा-

ह्यासाठीं इच्छीत नाहीं म्हणून ही भूमि मीं जिंकून माझ्या ताब्यांत ठेविली आहे, तोंडामध्यें असणारे रस मी स्वतःसाठीं इच्छीत नाहीं, म्हणून जलाला जिंकून मीं नेहमीं आपल्या ताब्यांत ठेविलें आहे. रूप व ज्योति डोळ्यामध्यें असूनही मी स्वतःसाठीं तें इच्छीत नाहीं, म्हणून तेजाला जिंकून मीं नेहमीं माझ्या ताब्यांत ठेविलें आहे. त्वचेला होणारा स्पर्श मी स्वतःसाठीं इच्छीत नाहीं, म्हणून वायूला जिंकून मीं नेहमीं माझ्या ताब्यांत ठेविला आहे, कानांत शिरलेले शब्द मी स्वतःसाठीं इच्छीत नाहीं, म्हणून शब्दाला जिंकून मीं आपल्या ताब्यांत ठेविला आहे. माझ्या मनामध्यें येणारे संकल्प सुद्धां मी स्वतःसाठीं इच्छीत नाहीं, म्हणून मनाला नेहमीं जिंकून मीं आपल्या ताब्यांत ठेविलें आहे. देव, पितर, भूतें व अतिथी यांसाठीं सर्व गोष्टी माझ्या हातून घडतात, ' हें जनकाचें भाषण ऐकून ब्राह्मण हासून त्याला म्हणाला, 'मी धर्म असून तुझी परीक्षा करण्याकरितां येथें आलों होतों, ज्याची धांव सत्वगुण आहे, ब्रह्म हीच ज्याचा तुंबा व बुद्धि ह्याच ज्याला आरा आहेत असें हें चक्र फिरत ठेवण्याला तूंच योग्य आहेस. '

असें सांगून ब्राह्मण आपल्या बायकोला म्हणाला, ' हे भीरु , तूं आपल्या बुद्धीच्या मानानें मला जसा समजून माझा दोष काढतेस तशा रीतीनें कांहीं मी या जगांत राहिलों नाहीं. मी मुक्त होऊन गृहस्थ धर्म पाळून राहणारा ब्राह्मण वनामध्यें फिरत आहें. तसाच मी व्रतशील असून बऱ्यावाईटासंबंधानें तुला दिसतों तसा मी नाहीं. या जगामध्यें जें कांहीं आहे तें सर्व माझ्यानेंच भरून राहिलें आहे. जें कांहीं स्थावर जंगम या जगामध्यें भूतमात्र आहेत त्या सर्वांचा लांकडाचा फडशा पाडणाऱ्या अग्नीप्रमाणें मी नाश करून टाकणारा आहें. ही बुद्धि सर्व पृथ्वीचें किंवा स्वर्गाचें राज्य सारखेंच समजते असें हें ज्ञान आहे. ही बुद्धीच माझें धन आहे. ब्राह्मणांचा हाच मार्ग असून हा ज्यांना कळतो ते गृहस्थाश्रम, वानप्रस्थाश्रम, ब्रह्मचारी आश्रम किंवा संन्यासाश्रम वाटेल तो आश्रम घेतात. नानाप्रकारच्या, मनाला मोह न पाडणाऱ्या गोष्टींपेक्षां एक ज्ञानप्राप्तीची बुद्धि थोर समजून जे तिला कवटाळतात. ज्यांची एक शमपर बुद्धि आहे ते नानालिंगें व नाना आश्रम यांमध्यें असले तरी समुद्राला मिळणाऱ्या निरनिराळ्या नद्यांप्रमाणें ते एकाच तत्वाला जाऊन मिळतात. तेव्हां त्याठिकाणीं गढून राहिल्यानें तूंही माझ्याच ठिकाणीं मिळून जाशील.

ब्राह्मणी म्हणाली, ' ज्यांची बुद्धि कोती आहे किंवा ज्यांचें अंतःकरण शुद्ध झालें नाहीं त्यांना हें लांबलचक दिसत असून थोड्यांत असणारें, संक्षेपरूपानें सांगितलेलें, घोंटाळ्याचें ज्ञान उमगणार नाहीं, असें मला वाटतें. ज्याच्यायोगानें अशी बुद्धि उत्पन्न होते ते उपाय सांगा. असें ज्ञान ज्यामुळें होतें तें कारण आपल्यापासून मी जाणून घेऊं इच्छितें. ' ब्राह्मण म्हणाला, ' **ब्रह्माकडे लावलेली बुद्धि ही खालची अरणी असून गुरु वरची अरणी आहे. तप व वेद यांच्या घर्षणानें ज्ञानाग्नि उत्पन्न होतो.** ' ब्राह्मणी म्हणाली, ' हें जें क्षेत्रज्ञसंज्ञित ब्रह्माचें चिन्ह त्याचें लक्षण कोठें सांपडणार कीं, ज्याच्यायोगानें त्याला जाणतां येईल. ' ब्राह्मण ह्मणाला, ' याला कांहीं चिन्ह किंवा गुण नसून याला कारणभूत असें या जगामध्यें कांहींच नाहीं; तथापि मी उपाय सांगतों त्या योगानें याला कदाचित् धरतां येण्याजोगें आहे. याला कर्म किंवा ज्ञानरूपी उत्तम उपाय आहे. या ज्ञानाला उपयोगी अशीं अज्ञानानें दिलेलीं निरनिराळीं नांवें चटदिशीं फुलें हुडकून काढणाऱ्या भुंग्याप्रमाणें ज्ञान्याला एकदम कळणें शक्य आहे. मोक्षाच्या नियमांमध्यें हें करावें किंवा हें न करावें असें कांहींच सांगितलें नाहीं. परंतु ज्याला कान व डोळे आहेत त्यानें आपल्या हिताच्या गोष्टींसंबंधानें ज्ञान करून देणाऱ्या गोष्टींपैकीं प्रत्यक्ष ज्ञानाला जितक्या व्यक्त किंवा अव्यक्त गोष्टी साधनीभूत असतील त्यामधून जेवढ्या घेण्याजोग्या असतील त्या मनुष्यानें घ्याव्या. म्हणजे मनुष्य ज्याच्या पलीकडे कांहींच नाहीं त्याच्याजवळ जाऊन पोहोंचतो. '

श्रीकृष्ण म्हणाला, ' याप्रमाणें त्या ब्राह्मणाचें भाषण ऐकून जीवपरमात्म्याचें ऐक्य होऊन जीवात्मा नाहींसा झाल्यानें या क्षेत्राच्या ज्ञानामुळें त्या ब्राह्मणीचें लक्ष क्षेत्रज्ञाच्या पलीकडचा जो परमा-

त्मा त्याकडे लागलें,' अर्जुन म्हणाला, 'कृष्णा, ज्यांना ही थोर सिद्धि मिळाली तीं दोघें ब्राह्मण व ब्राह्मणी कोठें आहेत?' श्रीकृष्ण म्हणाला, 'माझें मन यालाच ब्राह्मण समज व बुद्धि ब्राह्मणी समज, व क्षेत्रज्ञ म्हणून जो सांगितला तो दुसरा कोणी नसून मीच आहें.'

## २९९ गुरुशिष्यसंवाद. (१४.३५-५२)

अर्जुन म्हणाला, 'श्रीकृष्णा, सर्वश्रेष्ठ ज्ञेय जें ब्रह्म तें मला स्पष्ट करून सांग; कारण तुझ्या प्रसादानें अशा प्रकारच्या सूक्ष्म विषयांमध्यें माझें मन रमूं लागलें आहे.' भगवान श्रीकृष्ण म्हणाला, 'यासंबंधांत मोक्षदायक पुढील गुरुशिष्यांचा संवाद उदाहरण देतात. कोणा एक कडकडीत व्रत पाळणाऱ्या गुरूला एक बुद्धिमान शिष्य या श्रेष्ठ कल्याणासंबंधानें ह्मणाला, भगवन्, मोक्षरूपी श्रेष्ठ कल्याणाकडे लक्ष लागल्यामुळें मी आपल्याकडे येऊन विनम्र होऊन पायांवर डोकें ठेवतों. आपण यासंबंधानें माझा संशय दूर करा.' तेव्हां, 'तुला जो संशय असेल तो दूर करण्याला मी तयार आहें,' असें ते गुरु ह्मणाले असतां तो गुरुवत्सल शिष्य हात जोडून ह्मणाला, 'मी कोठून आलों आहें, आपण कोठून आलां आहां, हें सर्व स्थावरजंगम कोठून जन्माला आलें, कशावर रहातात व त्यांची सर्वांत लांब आयुर्मर्यादा किती, सत्याचें स्वरूप काय, तप कशा प्रकारचें आहे, विद्वान गुण कशाला ह्मणतात, कल्याणाच्या वाटा कोणत्या, सुख कोणतें, व पाप कशाला ह्मणतात? या माझ्या प्रश्नांचें रुपा करून बरोबर उत्तर द्या. मोक्षधर्म आपल्याला चांगला कळतो असा आपला लौकिक आहे. माझ्या सर्व शंका दूर करणारा आपल्यावांचून कोणी मिळावयाचा नाहीं; संसाराला भिऊन मला मोक्ष कसा मिळेलसें झालें आहे. यावर जो हा आपला गुणवान, शांत, अनुकूल वागणारा, आपल्यापुढें येऊन हात जोडून नम्रतेनें प्रश्न करीत होता, त्या आपल्यामागून इंद्रियनिग्रहानें ब्रह्मचर्य व्रत पाळीत छायेप्रमाणें रहाणाऱ्या या शिष्याला गुरु ह्मणाले, 'हें ब्रह्मज्ञान पूर्वी प्रत्यक्ष ब्रह्मदेवांनीं सांगितलें असून पुष्कळ थोर, थोर ऋषींनीं हा मार्ग स्वीकारला आहे. वेदाच्या आधारानें खरें तत्त्व उकलून देणारें हें ज्ञान आहे. ज्ञान हेंच आह्मी सर्वश्रेष्ठ समजून त्याग हेंच उत्तम तप समजतों. ठाम मतानें जो मनुष्य, हें निर्बाध ज्ञानतत्त्व-सर्व भूतमात्रांच्या ठिकाणीं असणारा आत्मा-पूर्ण ओळखतो त्याची सर्वत्र गति राहून तो बहुमानाला पात्र होतो. सहवास, तसाच वियोग, त्याचप्रमाणें एकपणा व भिन्नपणा ज्याला दिसतो तो दुःखापासून मुक्त होतो. ज्याला कशाची इच्छा नसून ज्याचा कशावर आपलेपणा उरत नाहीं तो ह्या लोकामध्यें असून ब्रह्मस्वरूप होण्याला पात्र असतो. प्रकृतीचे गुण व सर्व भूतमात्रांची उत्पत्ति जाणून जो माझेपणा व अहंकार सोडून असतो तो खात्रीनें मुक्त होतो. ब्रह्मरूपी बीजापासून प्रकृतिरूपी अंकुर फुटून बुद्धि हाच ज्याचा मोठा बुंधा झाला आहे व ज्याच्या अहंकाररूपी मोठमोठ्या फांद्या इंद्रियरूपी कांव्यांतून निघाल्या आहेत. पंचमहाभूतें ह्याच ज्याच्या कळ्या असून स्थूलकार्यें याच ज्याच्या लहान लहान फांद्या आहेत, असा नेहमीं पानें व फुलें यांनीं भरून राहून सदा चांगलें फल देणारा, ज्यावर सर्व भूतमात्र अवलंबून आहेत, अशा या वृक्षाला ओळखून त्याला ज्ञानरूपी पाणीदार तरवारीनें छाटून अमर झाल्यानें मनुष्य जन्ममृत्यूंतून सुटतो. भूत, वर्तमान, भविष्य त्याचप्रमाणें धर्म, अर्थ, काम यांसंबंधानें खरा निर्णय मी तुला सांगतों. हें फार पुरातन ज्ञान केवळ सिद्धांना ठाऊक झालें आहे. सर्वांत थोर अशा पदाची मी आज तुला माहिती सांगतों. तें ओळखल्यानें शहाण्या लोकांना सिद्धि मिळते. पूर्वी बृहस्पती, भारद्वाज, गौतम वगैरे अनेक ऋषी या ज्ञानासाठीं एकत्र होऊन मोठा कर्ममार्ग चालू असल्यानें थकून जाऊन अंगीराऋषींना पुढें करून ब्रह्मलोकाला निष्पाप अशा ब्रह्मदेवांकडे गेले, व सुखांत बसलेल्या त्यांना नमस्कार करून सविनय ह्मणाले, 'चांगलें कर्म करून पापापासून कसें सुटावें? आह्मांला कल्याणप्रद मार्ग कोणते? सत्याचें स्वरूप काय? पाप कशा प्रकारचें आहे? कोणत्या कर्मांनीं दक्षिणेकडील पितृमार्ग व उत्तरेकडील देवमार्ग मिळतात? प्रलय कशाला ह्मणतात? मोक्ष कशाला ह्मणतात? उत्पत्ति व नाश हें गौडबंगाल काय आहे?' ह्यावर प्रपितामह त्यांना ह्मणाले, 'एका सत्यापासून

सर्व चराचर भूतमात्र झालें असून तपावर ते रहातात. आपल्या कर्मांच्या योगानें त्यांचें मूळ ठिकाण जें ब्रह्म त्याला मुकून ते त्यापासून वेगळे होतात; कारण गुणांशीं सत्याचा संबंध जडल्यावर तें पांच प्रकारचें होतें. ब्रह्म, तप व प्रजापति हे सत्यस्वरूप आहेत. सर्व भूतमात्र सत्यापासून झाले असून हें सर्व जग सत्यमय आहे. ह्मणूनच ब्राह्मण केवळ सत्याकडे लक्ष देऊन योगामध्यें गढून राहून राग व संताप यांना दूर करून आत्मनिग्रहानें धर्माप्रमाणें वर्तन ठेवितात. एकमेकांचा एकमेकांवर दाब ठेवून शहाणपणानें धर्ममर्यादा कायम ठेवतात. आतां चार विद्या, चार वर्ण व चार आश्रम यांसंबंधी माहिती ऐक. शहाणे लोक एकच धर्म चतुष्पाद झाला आहे ( एकाच धर्माचे चार भाग झाले आहेत ) असें समजतात. ज्या मार्गानें पूर्वी शहाणे लोक ब्रह्मस्वरूपाला जाऊन मिळाले आहेत तो मंगलकारक व हिताचा मार्ग कळण्याला फार कठीण आहे. तो असा आहे. ब्रह्मचर्याश्रम पहिला आश्रम समजला असून गृहस्थाश्रम दुसरा आहे. वानप्रस्थ त्यानंतरचा तिसरा व त्याच्यानंतरचा श्रेष्ठ असें अध्यात्मपद मिळवून देणारा संन्यासाश्रम आहे. मनुष्याला अध्यात्मज्ञान झाल्यावांचून त्याला ज्योति, आकाश, सूर्य, वायु, इंद्र, प्रजापति यांना कधीं पाहतां येत नाहीं. हें अध्यात्मज्ञान होण्याला पुढील उपाय सांगितला आहे. फलमूलांवर किंवा वायु भक्षण करून वनामध्यें राहून वानप्रस्थाश्रम येणें हें तीन वर्णांच्या लोकांना सांगितलें आहे. गृहस्थाश्रम ह्मणून जो आहे तो सर्वांनाच सांगितला आहे. धर्माचें मूळ श्रद्धा हीच शहाण्यांनीं त्याची व्याख्या केली आहे. याप्रमाणें हे देवलोकाला नेणारे मार्ग असून भल्या अशा विद्वानांनीं आपल्या कर्मांनीं ते रेखून ठेवले आहेत. धर्म हाच या मार्गांतून पार पाडण्याला सेतु आहे. जो मोठ्या कडकडीत व्रतानें यांपैकीं कोणताही एक आश्रम पाळतो तो कालांतरानें सर्व प्राणिमात्रांची उत्पत्ति व नाश पाहण्याला समर्थ होतो. आतां सर्व वस्तूंच्या सर्वभागांमध्यें असणाऱ्या भुतांसंबंधानें ऐक. पहिला महान आत्मा, पुढें अव्यक्त अहंकार, अकरा इंद्रियें, पंचमहाभूतें व त्यांचे पांच विषय याप्रमाणें ही सृष्टि या पंचवीस तत्त्वांनीं युक्त, आहे. आतां जो मनुष्य या सर्व तत्त्वांची उत्पत्ति व नाश त्याचप्रमाणें सर्व गुण व सर्व देवता जाणतो तो कोणच्याच ठिकाणीं मोह न पावतां सर्व पाशांपासून सुटतो व विमल असे लोक त्याला मिळतात. तें ध्रुव, स्थिर, सर्वव्यापी असें साम्य स्थितीमधील अव्यक्त, तीन गुण व पांच धातू ह्यांनीं संपन्न झाल्यावर नऊ द्वारांनीं युक्त असें नगर बनतें. तें दहा इंद्रियें व विषय यांची ओळख पटवून देणारें मन यांनीं वेढिलें आहे. बुद्धीचें येथें स्वामित्व आहे. हें नगर तीन गुण, पांच धातू, ज्ञानेंद्रियें व कर्मेंद्रियें, अहंकार व बुद्धि यांनीं बनलें आहे. या ठिकाणीं याला पोसणाऱ्या त्रिगुणात्मक नाड्या चालू आहेत. तम, रज व सत्व हे तीन गुण असून हे जोड्याजोड्यांनीं एकमेकांवर अवलंबून एकमेकांच्या आश्रयानें असतात. यांचा परस्पर संबंध आहे. शरीरांतील पांच धातूंमध्यें हे तीन गुण आहत. तम व सत्व, सत्व व रज, रज व सत्व; आणि सत्व व तम असे हे मिळून जोडीनें आहे. तमाला दाबलें असतां सत्वगुण प्रगट होतो. तमाचें स्वरूप अंधकार असून मोह, अधर्म व पाप या त्रिगुणात्मक हा आहे. शिवाय याशीं दुसरे गुणही मिळालेले दिसतात. रजाचें स्वरूप प्रवृत्ति हें असून तें निरनिराळीं कर्में घडवून आणतें. सर्वभूतमात्रांच्या ठिकाणीं याचा प्रादुर्भाव झाला असतां कांहीं तरी कर्म घडवून आणण्याकडे त्यांची प्रवृत्ति असते. प्रकाश, लाघव व श्रद्धा हें सत्वाचें स्वरूप आहे. या तिघांचे गुण थोडक्यांत स्पष्टपणें सांगतों ऐक. संमोह, अज्ञान, कृपणता, कर्माविषयीं अस्थिर बुद्धि, स्वप्न, ताठा, भीति, लोभ, शोक, दुसऱ्यांच्या कृत्याला दोष लावणें, आठवणीची वाण, बुद्धीची अपरिपक्वता, नास्तिकपणा, धर्ममर्यादा उल्लंघन करणें, सारासारविचारशून्यता, अंधवृत्ति, नीच गुणांचें सेवन, कांहीं न करतां केल्याची व ज्ञान नसतां ज्ञानाची घमेंड धरणें, दुष्ट स्वभाव, अश्रद्धा, मूर्खपणाचे विचार, वांकडेपणा, ज्ञानाचा अभाव, पापकर्मप्रवृत्ति, अचेतना, गुरुत्व, आलस्य, अवशित्व, वांकडें वर्तन, त्याचप्रमाणें देव, ब्राह्मण व वेद यांची नेहमीं निंदा करणें, अभिमान, असहनशीलता, मत्सर, मलतीं सलतीं कामें करणें, भलत्याला

दान करणें, वाईट अन्न खाणें, दुसऱ्याच्या नांवानें खडे फोडणें यांना तामसवृत्ति ह्मणतात, व अशा प्रकारच्या निर्मर्याद पापी लोकांना तामसवृत्तीचे ह्मणतात, हे पापी खालीं खालीं नरकाकडे जाऊन नीच नीच अशा योनींमध्यें जन्म घेत रहातात, किंवा स्थावरांमध्यें, पशूंमध्यें, वाहनामध्यें, राक्षसांमध्यें, सापांमध्यें, किड्यांमध्यें, पक्ष्यांमध्यें, वेडे, बहिरे, मुके किंवा वाईट वाईट रोग जडलेले असे उत्पन्न होतात. हे तामसी पापी लोक तमामध्यें गढून आपल्या कर्माची निशाणी बरोबर घेऊन खालीं खालीं जात राहून तमामध्यें बुडतात. आतां यांतून तें वर कसे येतात सांगतों ऐक. पुण्यकर्म करीत राहिल्यानें ते पुण्यलोकाला जातात. जन्मपर्यंत वर सांगितलेल्याच्या उलट चांगलीं कर्में करीत राहिल्यानें ह्या त्यांच्या प्रयत्नानें व स्वकर्माला जागणाऱ्या ब्राह्मणांपासून मिळालेल्या संस्कारांनीं ते वर वर चढून स्वर्गाला जातात. अशीं चांगलीं कर्में करीत राहिल्यानें पुनर्जन्माच्या फेऱ्यांत मनुष्ययोनीमध्यें चांडाळ, मुके, चोचरे अशा वरवर स्थितींत जन्म होऊं लागून पर्यायानें शूद्र वर्णांतून वर वर चढत क्रमाक्रमानें ते वरवरच्या वर्णांत जन्म घेतात. निरनिराळ्या विषयवासनांमध्यें गढून राहणें हीच मोठी भूल आहे. सुखाच्या इच्छेनें ऋषी, मुनी, देव हे सुद्धां मोह पावले आहेत. तम, मोह, महामोह, क्रोधरूपी अंधकार, सर्व अंधकार करून सोडणारें मरण हे पांच फार दुःखदायक आहेत. याप्रमाणें तमाचा वर्ण व उत्पत्ति आहे. याला बरोबर कोणीच ओळखीत नाहीं. खोट्याच्या ठिकाणीं खरा भाव ठेवणें हेंच तमाचें मुख्य लक्षण आहे. ह्याप्रमाणें नानाप्रकारचे उच्चनीच प्रकारचे तमोगुण आहेत. जो हें नीट लक्षांत घेईल तो या सर्व तमोगुणांपासून मुक्त होईल.

आतां रजोगुणासंबंधानें ऐक. दुसऱ्याला पीडा करणें, रूपासंबंधानें गर्व बाळगणें, श्रम, सुख, दुःख, थंडी, ऊष्णता, ऐश्वर्य, युद्ध, संधि, हेतुवाद, हुरहुर, क्षमा, बल, शौर्य, मद, राग, व्यायाम, भांडण, ईर्षा, आशा, चुगलखोरी, चकमक, ममत्व, परिपालन, वध, बंध, पीडा, क्रयविक्रय यांकडेच लक्ष, कापणें, तोडणें, फोडणें, दुसऱ्याचें मर्मस्थळ भेदणें, उग्रपणा, क्रूरता, दुसऱ्याचें नांव बद्दू करणें, दुसऱ्याचे दोष दाखविणें, जगाचा विचार करीत बसणें, वाईट विचार मनांत घोळविणें, मत्सर, दुष्टपणा, खोटें बोलणें, अपात्रीं दान करणें, संशय, गर्व, निंदा, स्तुति, प्रशंसा, प्रताप, तुच्छता, परिचर्या, शुश्रूषा, सेवा, वासना मनांत घोळविणें. व्यवस्था, नीति, दुर्लक्ष, परिवाद, परिग्रह, पुरुष, बायका, इतर प्राणी, पदार्थ, घरें वगैरे संबंधाचे लौकिक संस्कार, संताप, अविश्वास, व्रत व नियम, सकाम कर्में, सार्वजनिक औदार्याचीं कामें, स्वाहाकार, नमस्कार, स्वधाकार, वषट्कार, यज्ञ करून ठेवणें, वेद पढविणें, यज्ञ करणें, वेद पढणें, दान करणें, दान घेणें, प्रायश्चित्तें, मंगलकार्यें, हें मला असावें, तें मला असावें अशी हांव, गुणापासून उद्भवणारा स्नेह, विश्वासघात, कपट, मानापमान, चोरी, हिंसा, जिगुप्सा, परिताप, जागृति, दंभ, ताठा, प्रेम, भक्ति, प्रीति, हर्ष, द्यूत, लोकापवाद, स्त्रियासंबंधाचे संबंध, नृत्य, वाद्य, गायन यांची आवड, हे सर्व रजोगुणात्मक समजले आहेत. भूत, वर्तमान, भविष्य गोष्टींवर जगामध्यें जे नेहमीं विचार करतात, धर्मार्थकामांमध्यें जे गढले असतात, ज्यांची प्रवृत्ति मनांत आलें कीं तें करण्याकडे असून वासना तृप्त झाल्यानें ज्यांना मोठा आनंद होतो, असे हे रजोगुणी लोकही खालीं खालीं जातात. ह्या जगांत फिरून फिरून जन्म घेऊन त्यांना निरनिराळ्या प्रकारचे आनंद होतात आणि इहपर आपल्या कर्मांचीं फळें भोगण्याची ते आशा धरतात. ते दान करतात, प्रतिग्रह घेतात, तर्पण करतात, यज्ञ करतात. अशा प्रकारचे रजोगुणाचे लोक असतात. या रजोगुणांना जो ओळखतो तो यांपासून मुक्त होतो.'

'आतां हितकर व अनिंदित असा सत्वगुण ऐक. आनंद, प्रीति, थोरपणा, प्रकाश, सुख, अदैन्य, निर्भयपणा, संतोष, श्रद्धाळूपणा, क्षमा, धृति, अहिंसा, सारखेपणा, सत्य, सरळपणा, अक्रोध, अनसूया, शुचिर्भूतता, लक्ष, पराक्रम, हे सत्वगुणापासून आहेत. ज्ञान, वर्तन, सेवा, श्रम हीं सर्व व्यर्थ आहेत असें समजून जो धर्मामध्यें गढून असतो तो श्रेष्ठपद मिळवितो. ममताशून्यता, निरहंकार, आशाराहित्य, निर्वासना, ह्या भल्यांचा सनातन धर्म आहे. विश्वास, भीड, सहनशीलता, त्याग, शुचिर्भूतता,

निरालस्य, दुष्टपणा न धरणें, मोह दूर करणें, भूतमात्रांवर दया करणें, चुगलखोरी न करणें हर्ष, समाधान, विस्मय, विनय, सद्वर्तन, शांतिदायक अंशा कर्मांमध्यें शुद्धता ठेवणें, सद्बुद्धि, मोक्ष, कशावर आसक्ति न ठेवणें, ब्रह्मचर्य, सर्वसंगाचा त्याग, ठाम भक्ति, कोणताही हेतु न धरतां दान करणें, यज्ञ करणें, वेद पढणें, व्रत पाळणें, प्रतिग्रह घेणें, धर्म आचरणें, तप करणें अशा वर्तनाचे जे सत्वशील लोक असतात ते बुद्धिमान व दूरदृष्टीचे लोक सर्व पापापासून व शोकापासून मुक्त होऊन स्वर्गाला जातात, व वाटेल तो देह स्वतःसाठीं निर्माण करून घेण्याचें त्यांच्या अंगीं सामर्थ्य असतें. ईशित्व, वशित्व, लघुत्व हे गुण देवांसारखे ते महात्मे आपल्या ताब्यांत ठेवतात. हे नेहमीं वर वर जात राहून देवांसारखे गुण अंगांत आणून घेऊन प्रत्यक्ष देव बनतात आणि तेथें जाऊन स्वभावतः निरनिराळे विकार पावतात. त्यांना वाटेल तो उपभोग भोगतां येतो. हे सत्वगुणधर्म जो पूर्णपणें ओळखतो त्याला वाटेल तें मिळतें. यांना पूर्णपणें ओळखणाऱ्या मनुष्याला यांच्याशीं संग न ठेवतां यांचा उपभोग घेतां येतो.'

'हे तिन्ही गुण एकमेकांपासून अगदीं वेगळ्या रीतीनें सांगतां येणें शक्य नाहीं. ते एकमेकांशीं मिसळलेले आहेत. यांचा एकमेकांशीं संबंध असून ते एकमेकांला पोसतात, व एकमेकांच्या अनुरोधानें असतात. सकारण किंवा अकारण हे शरीरामध्यें जुटीनें संचार करीत असतात. एकमेकांशीं जुळून परंतु निरनिराळ्या प्रकारानें वाढत असणारे हे वाढतात कसे व कमी कसे होतात हें सांगतों ऐक. नीचयोनींतील प्राण्यांमध्यें जेथें तमोगुण जोरावर असतो तेथें रजोगुण कमी असून सत्वगुण त्याहून कमी असतो. मध्यम स्थितींतल्या मनुष्यजातीमध्यें जेथें रजोगुण बाढीवर असतो तेथें तमोगुण कमी असून सत्वगुण त्याहून कमी असतो. उच्च प्रतीच्या देवादिकांमध्यें जेथें सत्वगुण जोरावर असतो तेथें तमोगुण कमी असून रजोगुण त्याहून कमी असतो. सत्वगुण हा इंद्रियांमध्यें स्फूर्ति उत्पन्न करण्याला कारण असून प्रकाश पाडणारा आहे. सत्वाहून श्रेष्ठ असा दुसरा कोणताच गुण नाहीं. सत्वगुणी लोक वर स्वर्गाला जातात. रजोगुणी लोकांना मधला मृत्युलोक मिळतो, व तमोगुणी लोक खालीं खालीं जात रहातात. शूद्राच्या ठिकाणीं तम, क्षत्रियाच्या ठिकाणीं रज व ब्राह्मणाच्या ठिकाणीं उत्तम सत्वगुण, याप्रमाणें हे तीन गुण तीन वर्णांमध्यें असतात. वरवर पहाणांना देखील हे तीन गुण एकत्र संचार करतांना दिसतात. हे निराळे असल्याचें कधीं ऐकण्यांत नाहीं. सूर्याला उगवतांना पाहून मधमाशांना भीति वाटते, प्रवाशांना त्याच्या उष्णतेपासून ताप होतो. सूर्य हा पूर्णतेला पावलेल्या सत्वगुणात्मक असून बदमाष लोक तमोगुणात्मक होत, व प्रवाशी रजोगुणात्मक होत. सूर्याचा प्रकाश हा सत्वगुण असून त्याची संताप देणारी उष्णता हा रजोगुण आहे, व पर्वकाळीं त्याला ग्रासणारे ग्रह हा तमोगुणाचा परिणाम आहे. त्याप्रमाणें सर्व प्रकाशणाऱ्या ग्रहनक्षत्रांमध्यें देखील हे तीन गुण दिसून येतात, व हे तीन गुण निरनिराळ्या ठिकाणीं निरनिराळ्या प्रकारानें आपलीं कार्यें करतात. स्थावरांमध्यें ते नीच योनीमध्यें असतात म्हणून हें त्यांच्या तमोगुणाचें प्रावल्य दर्शक आहे. रजोगुणाचे निरनिराळे भेद आहेत. स्नेहभाव हा सात्विक गुण आहे. दिवस, रात्र, महिना, अर्धमहिना, वर्ष, ऋतु, संधिकाल हे सर्व तीन प्रकारचे आहेत. दानही तीन प्रकारानें देण्यांत येतें. तीन प्रकारानें यज्ञ होतात. तीन प्रकारचे लोक आहेत. देव तीन प्रकारचे आहेत, विद्या तीन प्रकारची आहे व गति तीन प्रकारची आहे. भूत, वर्तमान, भविष्य, धर्म, अर्थ काम, तसेंच प्राण, अपान, उदान हे तीन गुण दर्शक आहेत. या जगामध्यें जें जें कांहीं आहे तें सर्व या तीन गुणांनीं युक्त असून हे तीन गुण सर्व वस्तूंमध्यें त्या त्या प्रसंगीं तशा तशा रीतीनें आपापलीं कार्यें करीत असतात. हे तीन गुण अव्यक्त रीतीनें आपली कामगिरी बजावीत असतात व यांची उत्पत्ति सनातन आहे. अव्यक्त, तम, शिव, नित्य, अज, योनी, सनातन, प्रकृति, विकार, प्रलय, प्रधान, उत्पत्ति, नाश, अनुद्रिक्त ( साम्य ), उद्रिक्त ( असाम्य ), अकंप, अचल, ध्रुव, सत्, असत् हीं सर्व अव्यक्त तीन गुणांचीं निरनिराळीं नांवें आहेत. त्यांची अध्यात्मविचार करणारांनीं ओळख करून घ्यावी. जो पूर्णपणें हीं अव्यक्त नामें, त्यांचे

गुण आणि त्यांच्या गति ओळखतो, तो यांचे भेद ओळखूं लागून देह ठेविल्यावर सर्व गुणांपासून मुक्त होऊन कैवल्यसुख भोगतो.'

'अव्यक्तापासून प्रथम महाबुद्धिशाली, महान आत्मा उत्पन्न झाला. तो सर्व गुणांचा मूळ असल्यानें त्याला आदि (उत्पत्ति) समजलें आहे. यालाच महान आत्मा, मति, विष्णु, जिष्णु, शंभु, वीर्यवान, बुद्धि, ज्ञानप्राप्तीचें साधन, छाती, धृति, स्मृति, इत्यादि पर्यायवाचक नामें आहेत. हीं नांवें बरोबर रीतीनें उमगल्यानें विद्वान मोह पावत नाहींत. याला चोहोंबाजूला हात, पाय, कान असून हा सर्व जग भरून राहिला आहे. हा मोठा प्रभावशाली पुरुष सर्वांच्या हृदयामध्यें आहे. अणिमा, लघिमा, प्राप्ति ह्या सिद्धि त्याच्या आहेत. तो सर्वांचा स्वामी आहे. हा ज्योतिर्मय असून नाश ह्मणून त्याला ठाऊक नाहीं. जे बुद्धिमान असून सद्भावयुक्त आहेत, ज्यांनीं इंद्रियनिग्रह करून ध्यानानें योगाकडे लक्ष लाविलें आहे, लोभ व राग जिंकून ज्ञान मिळविलें आहे व प्रसन्न मनानें व शहाणपणानें ज्यांनीं ममता व अहंकार सोडून दिलीं आहेत, ते मुक्त होऊन महत्तत्वाला मिळतात. जो या महात्म्याची पवित्र अशी उत्तम गति ओळखतो तो मोहापासून सुटतो. स्वयंभू विष्णु हा मूळ उत्पत्तीचा स्वामी आहे. याप्रमाणें गुहाशय, विश्वरूप, पुराण अशा या हिरण्मय श्रेष्ठ पुरुषाला जो ओळखतो तो बुद्धीच्या विषयाच्या पलीकडे जाऊन पोहोंचतो.'

'या प्रथम उत्पन्न झालेल्या महताला अहंकार ह्मणतात. अहं (मी) ह्मणून जो उत्पन्न झाला ती याची दुसरी उत्पत्ति होय. हा अहंकार पंचभूतादिक विकार उत्पन्न करणारा आहे. हा तेजोमय, चेतना ठेवणारा, प्रजापति असून यापासूनच सर्व प्रजांची उत्पत्ति आहे. हा देवांना त्याचप्रमाणें मनाला उत्पन्न करणारा आहे, हाच तिन्ही लोक उत्पन्न करतो. मी ह्मणून अभिमान धरणारा हाच आहे. जे अध्यात्मज्ञानामध्यें संतुष्ट राहून आत्म्यावर विचार करीत रहातात व वेद आणि यज्ञ यांमध्यें ज्यांनीं सिद्धि मिळविली आहे, अशा शुद्ध अंतःकरणाच्या मुनींना हा सनातन लोक मिळतो. सर्वप्राणिमात्रांना उत्पन्न करणारा, याप्रमाणें अहंकारसृष्टि उत्पन्न करून सर्व विकार उत्पन्न करतो व सर्व जगाची हालचाल ठेवून आपल्या तेजानें जग रंजवितो.'

'पृथिव्यादि पंचमहाभूतें अहंकारापासून उत्पन्न झालीं आहेत. या पंचमहाभूतमात्रांच्या ठिकाणीं शब्दादि त्यांच्या क्रियांनीं प्राणी मोह पावतात. पंचमहाभूतांचा नाश होऊन प्रलयकाल आला असतां सर्व प्राणिमात्रांवर मोठें संकट ओढवतें. ज्यापासून जें भूत उत्पन्न होतें त्यांमध्यें तें लय पावतें. हीं भूतमात्रें एका क्रमानें उत्पन्न होऊन त्याच्या उलट क्रमानें लय पावतात. याप्रमाणें स्थावरजंगम भूतमात्रें लय पावलीं असतां विद्वान लोक स्थितिमान असतात. शब्दादि पंचविषय यांच्या क्रियांना कारण असतात, आणि ह्मणूनच त्यांना अनित्य ह्मटलें असून मोह हें नांव आहे. लोभापासून उत्पन्न झालेले, एकमेकांपासून निर्विशेष, क्षुद्र, मांस व रक्त यांनीं बनलेले व एकमेकांवर अवलंबून असणारे अशा यांचा आत्म्यापासून वेगळे होऊन विषयाशीं संबंध तुटला असतां हे दीन व अनाथ बनतात. प्राण, अपान, व्यान, उदान, समान यांचा अंतरात्म्याशीं संबंध आहे, आणि वाणी, मन व बुद्धि मिळून या आठांनीं हें जग ताब्यांत ठेवलेलें आहे. त्वचा, नाक, कान, डोळा, जीभ, वाणी हीं इंद्रियें शुद्ध मन व न ढळणारी बुद्धि हे आठ अग्नि ज्याच्या मनाला सदा जाळून काढीत नाहींत तो त्या शुभ अशा ब्रह्माला जाऊन मिळतो. त्याहून श्रेष्ठ जगामध्यें कांहीं नाहीं. हीं वर सांगितलेलीं कान, त्वचा, डोळा, जीभ हीं पांच त्याचप्रमाणें दोन पाय, पायु, (गुद) शिश्न, दोन हात, वाणी हीं दहा इंद्रियें व अकरावें मन हीं अहंकारापासून उत्पन्न झालेलीं इंद्रियें प्रथम जिंकावीं ह्मणजे मग ब्रह्म प्रकाशूं लागतें. यांपैकीं पहिल्या पांचांना ज्ञानेंद्रियें ह्मणतात, व दुसऱ्यांना कर्मेंद्रियें ह्मणतात. मन हें या सर्वांमध्यें आहे. याहून निराळी बारावी बुद्धि आहे. यांना यथाक्रमानें ओळखल्यानें विद्वान आपला कार्यभाग झाला असें समजतात. आतां या इंद्रियांची निरनिराळी स्थिति ऐक. आकाश हें पहिलें असून कानाला अध्यात्म संज्ञा आहे, शब्द अधिभूत असून त्या ठिकाणची अधिदेवता दिशा आहे. त्याच-

प्रमाणें दुसरें भूत वायु असून त्यासंबंधानें त्वचा अध्यात्म आहे. स्पर्श अधिभूत आहे व वीज अधिदैवत आहे, तिसरें भूत ज्योति असून त्यासंबंधानें डोळा अध्यात्म, रूप अधिभूत व सूर्य त्या ठिकाणचें अधिदैवत आहे. चवथें जल असून त्यासंबंधानें जीभ अध्यात्म, रस अधिभूत व सोम अधिदैवत आहे. पांचवें भूत पृथ्वी यासंबंधानें नाक अध्यात्म, गंध अधिभूत व वायु अधिदैवत आहे. याप्रमाणें या पंचमहाभूतांचे तीन भाग केले आहेत; त्याचप्रमाणें पाय अध्यात्म असून हालचाल अधिभूत आहे व विष्णु त्या ठिकाणीं अधिदैवत आहे. आपानाची गति खालीं असून पायु (गुद) हें अध्यात्म, मलविसर्जन अधिभूत व मित्र त्या ठिकाणचें अधिदैवत आहे. सर्वभूतमात्रांना उत्पन्न करणारें शिश्न अध्यात्म असून शुक्र अधिभूत आहे,व प्रजापति त्याचें अधिदैवत आहे. हात अध्यात्म असून कर्में अधिभूत व शक्र आधिदैवत आहे. प्रथम उत्पन्न झालेली विश्वेदेवात्मक (सर्वदेवमय) वाणी अध्यात्म असून भाषण अधिभूत आहे, व अग्नि त्या ठिकाणचें अधिदैवत आहे. पंचमहाभूतांमध्यें संचार करीत असणारें मन अध्यात्म असून संकल्प आधिभूत आहे व चंद्रमा अधिदैवत आहे. अहंकार सर्व संसाराला कारण असें अध्यात्म असून अभिमान अधिभूत आहे व रुद्र अधिदैवत आहे. सहा इंद्रियांमध्यें फिरत रहाणारी बुद्धि अध्यात्म असून विचार अधिभूत आहे व ब्रह्मा अधिदैवत आहे. सर्वप्राणिमात्रांना स्थल, पाणी व आकाश या तीन जागा असून चवथी जागा नाहीं; त्याचप्रमाणें अंडज, उद्भिज्ज, स्वेदज व जरायुज या चारांहून निराळ्या प्रकारची उत्पत्ति नाहीं. कांहीं लहानसहान प्राणी त्याचप्रमाणें पक्षी व साप हे अंडज होत. कृमि, कीटक त्याचप्रमाणें लहान लहान जंतु हे स्वेदज होत. कालांतरानें पृथ्वींतून (अंकुरांतून) जे बाहेर पडतात त्यांना उद्भिज्ज ह्मणतात. दोन पायांचे तसेच चार पायांचे व वांकड्या तिकड्या गतीचे प्राणी जरायुज होत. तप व पुण्यकर्म हीं ब्रह्मप्राप्तीचीं दोन सनातन स्थानें आहेत. यज्ञ, दान, वेदाध्ययन अशीं निरनिराळ्या प्रकारचीं कर्में जन्माला आलेल्यांसाठीं सांगितलीं आहेत. हें ज्याला बरोबर कळतें त्याचें मन योगाकडे लागून तो सर्व पापांपासून मुक्त होतो. हा सांगितलेला अध्यात्मविधि ज्ञान्यांना बरोबर कळतो. मनुष्यानें हीं सर्व इंद्रियें, इंद्रियविषय व पंचमहाभूतें यांना मनाच्या ठिकाणीं एकत्र करून आंवरून धरावीं. याप्रमाणें सर्वांचा मनाच्या ठिकाणीं लय झाला असतां सुखाची मनुष्याला पर्वा रहात नाहीं. ज्ञानवान असे जे विद्वान लोक आहेत त्यांनाच तें सुख मिळतें. सर्व भूतमात्रांच्या ठिकाणीं कल्याणप्रद अशी निवृत्ति उत्पन्न होण्याचें साधन पुढें दिल्याप्रमाणें आहे. ज्या वृत्तीमध्यें गुण गुणासारखे दिसत नाहींत, संग उरत नाहीं, एकांताची आवड राहते, ज्याला कांहीं प्रतिबंध येत नाहीं, व जी केवळ ब्रह्ममय असते त्यालाच कैवल्यसुख समजलें आहे. विद्वानानें चोहोंकडून कांसवाप्रमाणें सर्व वासनांना आखडून घेऊन विरक्त व्हावें ह्मणजे चोहोंबाजूंनीं तो मुक्त होऊन सुखी होतो. वासनांना आपल्या ठिकाणीं आवरून धरून लक्षपूर्वक जो तृष्णा नाहींशी करतो, तो सर्व भूतमात्रांचा मित्र बनून ब्रह्मस्वरूपी होण्याला पात्र होतो. विषयांकडे सैरावैरां धांव घेणाऱ्या इंद्रियांना आंवरून लोकवस्ती टाकल्यानें अध्यात्माग्नि पेट घेतो. ज्याप्रमाणें सर्पणानें अग्नि पेट घेतो त्याप्रमाणें इंद्रियांचा निग्रह केल्यानें महाज्योतिरूपी जो हा थोर आत्मा तो प्रकाशूं लागतो. ज्या वेळेला मनुष्य प्रसन्न अंतःकरणानें सर्व भूतमात्रांना आपल्या ठिकाणीं पाहूं लागतो तेव्हां स्वतः प्रकाशमान बनून अतिसूक्ष्माहून जें सूक्ष्म त्याचा त्याला लाभ होतो. हें निश्चित आहे कीं, या शरीरामध्यें अग्नि, रूप, जल, रस, वायु, स्पर्श, पृथ्वी, किळस येण्यासारखा रेंदा, आकाश व शब्द असून हें रोगशोकांनीं भरून राहिलें आहे. पंचेंद्रियरूपी प्रवाह यामधून चालला आहे, याला नऊ द्वारें आहेत, व यामध्यें जीव व ईश्वर हीं दोन दैवतें आहेत. असें हें रजोगुणानें भरलेलें, ज्याच्याकडे पाहूं सुद्धां नये असें शरीर सत्व, रज व तम हे गुण व कफ, वात, पित्त हे तीन धातू यांनीं बनलें असून याला संसर्गाची फार गोडी लागून हें मोहामध्यें पडलें आहे. जें आत्म्यावर अवलंबून असून प्रसंगीं ज्याची हालचाल कायम ठेवणें फार कठीण जातें असें हें शरीर हेंच या जगामध्यें फिरत

असलेलें कालचक्र आहे. भयंकर आघात ज्यांत बसतात असा मोहसंज्ञक हा महासागर आहे. हें शरीरच अमरांसह या सृष्टीला पसरून आवरण्याला व फिरून यत्न करण्याला कारण आहे. काम, क्रोध, भय, लोभ, वैर, असत्य हे जे गुण सोडण्याला फार कठीण आहेत. ते भले लोक आत्मनिग्रहानें सोडूं शकतात. ज्यानें हे तीन गुण व पांच धातू जिंकले आहेत त्याला अनंत व श्रेष्ठ असें स्थान स्वर्गामध्यें मिळतें. पंचेंद्रियें हेच जिच्या काठचे मोठमोठे कडे आहेत, मनाचा वेग हाच जिच्यांतील मोठा प्रवाह आहे, व मोह हाच जिच्यांमधील डोह आहे, अशी ही आशारूपी नदी तरून कामक्रोध या दोषांना जिंकावें. याप्रमाणें मन एकाग्र करून आपल्या ठिकाणीं लावल्यानें मनुष्य सर्वदोषांपासून मुक्त होऊन त्या सर्वांच्या पलीकडच्या ब्रह्माला पाहूं शकतो. सर्व कांहीं जाणूं लागून एका दिव्यापासून लागलेल्या शेंकडों दिव्याप्रमाणें तो सर्व भूतमात्रांच्या ठिकाणीं आपल्याला एकरूपानें तसाच विकारात्मक नानारूपानें पाहूं लागतो. विष्णु, मित्र, वरुण, अग्नि, प्रजापति, धाता, विधाता, प्रभु सर्व कांहीं तो बनून राहून तो सर्वतोमुख बनतो, व सर्वभूतमात्रांचें हृदयभूत जो महान आत्मा तो त्याच्या ठिकाणीं प्रकाशूं लागतो. ब्राह्मण, देव, असुर, यक्ष, पिशाच, पितर, पक्षी, राक्षस, भूतगण व मोठमोठे ऋषी त्याची स्तुति करतात.'

'मनुष्यामध्यें क्षत्रिय हा रजोगुणाचा आहे. वाहनामध्यें हत्ती, अरण्यांमधील श्वापदांमध्यें सिंह, यज्ञीय पशूंमध्यें मेंढी, बिलांत रहाणाऱ्यामध्यें साप, गुरांमध्यें बैल, स्त्रीपुरुषांमध्यें पुरुष, हे अशा प्रकारचे आहेत; त्याचप्रमाणें वड, जांभूळ, पिंपळ, शेवरी, शिसवी, मेढशिंगी, वेळू हे झाडांमध्यें राजे असून रजोगुण संपन्न आहेत. त्याचप्रमाणें हिमवत्, पारियात्र, सह्य, विंध्य, त्रिकूट, श्वेत, नील, भास, कोष्ठवत्, गुरुस्कंध महेंद्र, माल्यवत् हे पर्वतांमध्यें राजे आहेत. मरुत् गणांमध्यें श्रेष्ठ आहे. ग्रहांचा स्वामी सूर्य असून नक्षत्रांचा चंद्र आहे. पितरांचा स्वामी यम, नद्यांचा स्वामी समुद्र, जलाचा स्वामी वरुण, देवांचा इंद्र, ऊष्णतेचा अर्क, ज्योतींचा इंदु, भूतमात्रांचा अग्नि, ब्राह्मणांचा बृहस्पती, ओषधींचा सोम, बलवानांचा विष्णु, रूपांचा त्वष्टा, पशूंचा शिव, दीक्षा घेतलेल्यांचा यज्ञ, दिशांची स्वामिनी उत्तर दिशा, विप्रांचा सोम, व सर्व रत्नांचा कुबेर स्वामी आहे. याप्रमाणें भूतमात्रांची उच्चप्रतीची उत्पत्ति असून प्रजापति सर्व लोकांचा स्वामी आहे; व जगामध्यें जें कांहीं म्हणून आहे त्या सर्वांचा मी ब्रह्ममय स्वामी आहें. माझ्याशिवाय किंवा विष्णूशिवाय जगांत मोठें असें दुसरें कांहींच नाहीं. हा ब्रह्ममय थोर विष्णु सर्वांचा स्वामी आहे, तो सर्वांचा शास्ता, उत्पन्नकर्ता असा असून त्याला कोणी उत्पन्न करणारा नाहीं. कारण तोच मनुष्य, किन्नर, यक्ष, गंधर्व, साप, राक्षस, देव, असुर व नाग यांचा स्वामी आहे. वासनेनें घेरले जाऊन ज्या ज्या म्हणून गोष्टींच्या मार्गे लोक लागतात त्या त्या सर्वांची स्वामिनी महादेवी पार्वती आहे. ही सर्व स्त्रियांमध्यें श्रेष्ठ व शुभदात्री आहे. सुखाला साधनीभूत अशा स्त्रियांमध्यें तेजस्वी अप्सरा श्रेष्ठ आहेत. राजे धर्माची इच्छा करणारे असून या धर्माला साधनभूत सेतु ब्राह्मण आहेत; म्हणून राजानें नेहमीं ब्राह्मणांचें रक्षण करण्याला झटावें; कारण ज्या राजांच्या राज्यांमध्यें चांगले लोक नाश पावतात तें आपल्या सर्व राजधर्मांना मुकून मेल्यावर त्यांना नरकाची वाट धरावी लागते. तेच ज्या राजांच्या राज्यामध्यें साधूंचें रक्षण होतें ते या लोकांमध्यें मोठ्या आनंदांत राहून मेल्यावर त्यांना सुख मिळतें, व ते उत्तम पदाला जाऊन मिळतात. आतां धर्माचीं नित्य लक्षणें ऐक. अहिंसा हा सर्वांत उत्तम धर्म असून हिंसा अधर्माचें लक्षण आहे. सत्यज्ञानरूपी प्रकाश हेंच देवाचें लक्षण असून मनुष्याचें लक्षण कर्म आहे. आकाशाचें लक्षण शब्द आहे, वायूचें लक्षण स्पर्श आहे, तेजाचें रूप, जलाचें रस व सर्व भूतमात्रांना धारण करणाऱ्या पृथ्वीचें लक्षण गंध आहे. स्वर व व्यंजन यांनीं संस्कृत अशा भाषेचें लक्षण शब्द आहेत. तसेंच बुद्धीचें लक्षण चिंता आहे. मनामध्यें आणलेल्या गोष्टी बुद्धीच्या योगानें ठाम ठरतात; तेव्हां बुद्धि ही व्यवसायानें सर्व वस्तु पहाते. मनाचें लक्षण ध्यान आहे, साधूचें लक्षण अव्यक्त हें आहे. भक्तीचें लक्षण कर्में असून ज्ञानाचें लक्षण सं-

न्यास आहे; ह्मणून ज्ञान लक्षापुढें ठेवून बुद्धिमान मनुष्यानें सर्वत्याग करावा. ज्ञानानें युक्त असा संन्याशी सुखदुःखादिद्वंद्वांतून पार पडून तम, मृत्यु व जरा यांतून सुटून श्रेष्ठ गतीला जातो. याप्रमाणें हीं धर्माचीं लक्षणें आहेत. आतां निरनिराळ्या गुणांचें ग्रहण कशानें होतें तें ऐक. पृथ्वीचा जो सुगंध तो नाकानें घेतला जातो, व नाकामध्यें असणारा जो वायु हा गंधाचें ज्ञान करून घेण्यासाठीं नेमला आहे; त्याचप्रमाणें जलाचें सार जो रस तो जिभेनें घेतला जाऊन जिभेच्या ठिकाणीं असणारा सोम या रसज्ञानावर नेमला आहे. तेजाचे गुण रूप असून डोळ्याच्या योगानें त्याचें ग्रहण होतें व डोळ्याच्या ठिकाणीं असणारा आदित्य रूपज्ञानावर नेमला आहे. वायूचा गुण स्पर्श त्वचेच्या योगानें कळतो व त्वचेच्या ठिकाणीं असणारा वायु या स्पर्शज्ञानावर नेमला आहे. आकाशाचा गुण शब्द असून तो कानानें ग्रहण केला जातो, व श्रोत्राच्या ठिकाणीं असणाऱ्या दिशा शब्दज्ञानासाठीं नेमल्या आहेत. मनाचा गुण चिंता असून तो प्रज्ञेनें घेतला जातो, व हृदयामध्यें असणारा, सचेतन, देहाला धारण करणारा ( जीव ) हा या मनाचें ज्ञान करून घेण्यावर नेमला आहे. निश्चयानें बुद्धि व ज्ञानानें महत् यांचें ज्ञान होतें. अव्यक्त जी प्रकृति हिला हा मी व हें असें आहे अशा प्रकारचें जें निश्चय ज्ञान याच्यावर नेमली आहे. निर्गुण व नित्य असा क्षेत्रज्ञ कोणत्याच लिंगानें कळण्याजोगा नाहीं; म्हणून निर्लिंग अशा या क्षेत्रज्ञाचें लक्षण केवळ ज्ञान आहे. अव्यक्तप्रकृतीला क्षेत्र अशी संज्ञा असून गुणांची या ठिकाणीं उत्पत्ति व लय होतो. ही जरी अव्यक्त आहे तरी मी हिला नेहमीं पहातों, जाणतों व ऐकतों. जीवात्म्याला हें ज्ञान आहे; ह्मणून त्याला क्षेत्रज्ञ ह्मणतात. गुणांच्या ज्या प्रकाशादि क्रिया व क्रियाराहित्य त्या या क्षेत्रज्ञाला कळतात. फिरून फिरून उत्पन्न होणारे गुण आदि, मध्य व अंत ज्याला आहेत अशा फिरून फिरून उत्पन्न होणाऱ्या अचेतन अशा स्वतःला ओळखीत नाहींत. सत्वाला, गुणांना व गुणापासून उत्पन्न झालेल्या तत्वांना त्याचप्रमाणें त्याच्याही पलीकडच्या महत्ताला दुसरे कोणी जाणत नसून केवल क्षेत्रज्ञ जाणतो; ह्मणून गुण त्याचप्रमाणें सत्व दूर करून धर्मवेत्ता मनुष्य दोषापासून मुक्त होऊन गुणांच्या पलीकडे जाऊन क्षेत्रज्ञामध्यें शिरतो. ज्याला सुखदुःखादि द्वंद्वें, नमस्कार, स्वाहाकार यांचा कांहीं संबंध नसून जो अचल व घराशिवाय आहे, असा हा क्षेत्रज्ञ सर्वांचा स्वामी आहे.'

'ज्याला आदि, मध्य व अंत आहेत अशांसंबंधानें, त्याला ग्रहण करण्याच्या उपायासंबंधानें व त्याचीं नांवें व लक्षणें यासंबंधानें सांगतों ऐक. प्रथम दिवस असून मागून रात्र, महिन्यांचें मूल शुक्लपक्ष, नक्षत्रांचें मूल श्रवण, ऋतूंचें मूळ शिशिर, गंधाचें मूळ ऋषि, रसांचें मूल जल, रूपांचें मूळ सूर्याचें तेज, स्पर्शाचें मूल वायु व शब्दाचें मूळ आकाश आहे. याप्रमाणें पंचमहाभूतांचे गुण असून आतां भूतमात्रांचें मूळ कोण तें ऐक. सर्व प्रकाशमान वस्तूंमध्यें सूर्य पहिला असून भूतांमध्यें अग्नि पहिला आहे. सर्व विद्यांचें मूळ सावित्री आहे. देवतांमध्यें श्रेष्ठ प्रजापती आहे. सर्व वेदांमध्यें पहिला ओंकार आहे, व सर्व शब्दांमध्यें प्राण मुख्य आहे. या जगामध्यें जें जें कांहीं सांगितलें आहे ती सावित्री आहे. सर्व छंदांमध्यें गायत्री पहिली आहे. यज्ञिय पशूंमध्यें बकरा श्रेष्ठ आहे, चतुष्पाद जनावरांमध्यें गाई श्रेष्ठ आहेत, मनुष्यांमध्यें द्विजाती पहिले आहेत, पक्ष्यांमध्यें ससाणा पहिला आहे. यज्ञांमध्यें हवि पहिला आहे, सर्व सरपटणाऱ्या प्राण्यांमध्यें साप पहिला आहे, सर्व युगांमध्यें कृतयुग पहिलें आहे, सर्व रत्नांमध्यें सोनें पहिलें आहे. सर्व वनस्पतींमध्यें जव पहिले आहेत. सर्व भक्ष्य व भोज्य यांमध्यें अन्न श्रेष्ठ आहे. सर्व पिण्याच्या पातळ पदार्थांमध्यें पाणी उत्तम आहे. एकंदर सर्व स्थावर पदार्थांमध्यें ब्रह्माचें ठिकाण जो प्लक्षवृक्ष हा पहिला आहे, सर्व प्रजापतींमध्यें मी श्रेष्ठ आहें, अचिंत्य व स्वयंभू जो विष्णु तो माझा आत्मा आहे. सर्व पर्वतांमध्यें महामेरू पहिला आहे. सर्व दिशा व उपदिशा यांमध्यें पूर्वदिशा पहिली आहे. सर्व नद्यांमध्यें गंगा पहिली आहे. सर्व सरोवरें व विहिरी वगैरे जलाशय यांमध्यें समुद्र पहिला आहे. देव, दानव, भूत, पिशाच्च, साप, राक्षस, मनुष्य, किन्नर या सर्वांचा प्रभू ईश्वर आहे. सर्व ब्रह्ममय व ज्याहून थोर

त्रैलोक्यामध्यें कांहीं नाहीं असा थोर विष्णु सर्व जगताचा स्वामी आहे. सर्व आश्रमांमध्यें गृहस्थाश्रम पहिला आहे. अव्यक्त जी प्रकृति ती सर्व लोकांची आदि व अंत आहे. सूर्यास्ताबरोबर दिवसाचा शेवट होऊन सूर्योदयाबरोबर रात्रीचा शेवट होतो, सुखाचा शेवट दुःखामध्यें आहे व दुःखाचा शेवट सुखामध्यें आहे. सर्व संचयाचा शेवट क्षयामध्यें आहे. उन्नतीचा शेवट अवनतीमध्यें आहे. संयोगाचा शेवट वियोगामध्यें आहे व आयुष्याचा शेवट मरणामध्यें आहे. सर्व क्रियांचा शेवटीं नाश असून जो ह्मणून जन्माला आला आहे त्याला मरण हें ठेवलें आहे. या जगांतील सर्व स्थावरजंगम वस्तू नश्वर आहेत. यज्ञ, दान, तप, अध्ययन, व्रत व नियम या सर्वांचा नाश असून ज्ञानाचा मात्र कधीं नाश नाहीं; ह्मणून शुद्ध अशा ज्ञानानें शांत अंतःकरण होऊन ज्याचीं इंद्रियें स्वाधीन झालीं आहेत व ममता आणि अहंकार ज्याच्यापासून सुटले आहेत तो सर्व पापांपासून मुक्त होतो.'

'हें कालचक्र सदां फिरत असून बुद्धि याचें सार, मन दांडी, इंद्रियें आरा, पंचमहाभूतें तुंबा व घर ही धांव आहे. जरा व शोक यांनीं हें घेरलें असून व्याधि व संकटें यांना हें उत्पन्न करणारें आहे. देशकालाप्रमाणें हें फिरत राहिलें असून श्रम व व्यायाम हाच याचा शब्द आहे. दिवस व रात्र हे याचे फेरे असून शीत व उष्ण यांमध्यें हें गुरफटलें आहे. सुखदुःख याचे सांधे असून भूक, तहान खीळ आहेत. सूर्यप्रकाश व छाया हे याचे चाकोरे आहेत. डोळ्यांची उघडझांप होण्याच्या इतक्या थोड्या वेळांतही याची हालचाल होत असते. भयंकर मोहरूपी पाण्यामध्यें हें झांकून राहिलें आहे. अचेतन असें हें नेहमीं फिरत राहिलें आहे. महिने व अर्धे महिने यांची यानें मोजदात होते. हें असें कालचक्र सर्व जगांत नेहमीं फिरत राहिलें आहे. तमोगुणांनीं युक्त असे जे नियम हाच चिखल याला लागलेला आहे. रज हाच याला जोरानें चालावयास लावणारा आहे. महा अहंकारानें दिवा लावून यावर उजेड पाडला आहे व गुणांचा याला आधार आहे. हिरमोड हींच बंधनें याला घट्ट आंवळून टाकीत आहेत. शोक व संहार यांमधून हें फिरत आहे. क्रिया व क्रिया करविणारीं साधनें हे गुण याच्यामध्यें आहेत. स्वतः मोठें असून आसक्तीची याला वाढ मिळाली आहे. लोभ व इच्छा यांनीं याला डळमळित केलें आहे. नाना प्रकारच्या अज्ञानापासून त्याची उत्पत्ति आहे. भय व मोह हे याच्या भोंवतीं आहेत; हें भूतमात्रांना मोह पाडणारें आहे. आनंद व प्रीति याकडे याची चाल असून काम व क्रोध हीच याची दौलत आहे. महत् व महतापासून आरंभ होऊन भूतमात्रांमध्यें शेवट होणाऱ्या तत्वांनीं हें बनलें आहे. याला प्रतिबंध बिलकूल नसून हें नेहमीं उत्पत्ति व नाश करीत राहणारें आहे. मनाच्या वेगाप्रमाणें याचा वेग मोठा असून मनानें याला मर्यादित केलें आहे. हें जें सुखदुःखादि द्वंद्वांनीं युक्त व अचेतन कालचक्र त्याला सर्वांनीं झुगारून देऊन, दूर करावें, आंखडावें किंवा आंवरावें. जो मनुष्य या कालचक्राची गति व स्थिति बरोबर ओळखतो तो कधीं मोह पावत नाहीं. सर्व संस्कारांतून मुक्त होऊन सुखदुःखादि द्वंद्वांपासून तसेंच सर्व पापांपासून सुटून तो श्रेष्ठ गतीला मिळतो.'

'गृहस्थ, ब्रह्मचारी, वानप्रस्थ व भिक्षुक हे चार आश्रम सांगितले असून त्या सर्वांना गृहस्थाश्रम मूळ सांगितला आहे. या जगामध्यें जो जो ह्मणून शास्त्राचा नियम सांगितला आहे तो बरोबर पाळणें हिताचें आहे. चांगल्या कुलांत जन्मल्यानें संस्कारानीं शुद्ध होऊन आधीं शास्त्रांत सांगितल्याप्रमाणें व्रत आचरून वेदाध्ययन केल्यावर गुरूच्या घरून परत यावें. नंतर आपल्या बायकोच्या ठिकाणींच लक्ष देऊन राहून आत्मनिग्रहपूर्वक शिष्टाचार पाळावा व श्रद्धापूर्वक पंचमहायज्ञ करावे. वेदकर्मामध्यें गढून राहून देवता, अतिथी यांना देऊन राहिलेलें अन्न खावें. आपल्या शक्तीप्रमाणें जिवाला त्रास न देतां यज्ञ व दान करावें. हात, पाय, डोळे, तोंड यांची खोडी ठेवूं नये. अशा रीतीनें वागणारा शिष्टांमध्यें मोडला जातो. नेहमीं यज्ञोपवीत धारण करून स्वच्छ असें पांढरें वस्त्र नेसून शुद्धतेनें नियमशील रहावें व आत्मनिग्रहपूर्वक दान करीत राहून नेहमीं शिष्टांशीं संबंध ठेवावा. शिश्न व उदर ताब्यांत ठेवून सर्वांशीं मित्रत्वानें राहून शिष्टाचार पाळावा.

कळकाची काठी व पाण्यानें भरलेला कमंडलू जवळ ठेवावा. वेदाध्ययन करावें व करवावें. त्याचप्रमाणें यज्ञ करावा व करवावा, दान द्यावें, हे सहा गृहस्थाचे धर्म सांगितले आहेत. यांपैकीं अध्यापन, याजन व शुद्ध मनुष्यापासून प्रतिग्रह या तीन गोष्टी ब्राह्मणांच्या उदरनिर्वाहासाठीं असून बाकीचीं दान, अध्ययन, व यज्ञ हीं तीन धर्मसंचयासाठीं आहेत; तेव्हां या तिहींकडे मोठ्या हुशारीनें लक्ष द्यावें. आत्मनिग्रह व सर्वांशीं मैत्री ठेवून क्षमाशीलतेनें सर्व भूतमात्रांच्या ठिकाणीं समदृष्टि ठेवावी. याप्रमाणें शुद्ध आचरण ठेवून यथाशक्ति वागणारा गृहस्थ स्वर्ग मिळवितो.'

'त्याचप्रमाणें यथाशक्ति ब्रह्मचर्य पाळून व वेदाध्ययन करून ब्रह्मचाऱ्यानें आपल्या धर्मामध्यें गढून रहावें! सर्व इंद्रियें स्वाधीन ठेवावीं, गुरूचें प्रिय करण्याकडे लक्ष ठेवून सत्यधर्माकडे पूर्ण लक्ष ठेवून शुद्धतेनें रहावें, गुरूची आज्ञा घेऊन हविष्यान्न त्याला नांव न ठेवितां खाणें, बसणें, उठणें, विहार करणें हें सर्व योग्य रीतीनें ठेवावें, शुद्ध होऊन मन एकाग्र करून दोन वेळ त्यानें अग्नीला आहुती द्याव्या, नेहमीं हातांत बिल्वाचा किंवा पळसाचा दंड घ्यावा, याचें वस्त्र तागाचें, कापसाचें, हरणाच्या कातड्याचें अथवा पूर्ण भगवें असावें; मुंजगवताचा कडदोरा बांधावा, जटा वाढवून यानें नेहमीं स्नान करावें, यज्ञोपवीत धारण करून नेहमीं वेदाध्ययन करीत असावें, लोभ सोडून व्रतशीलपणानें, शुद्धपणानें देवतांचें तर्पण करावें, याप्रमाणें पूर्ण आत्मनिग्रहानें रहणारा ब्रह्मचारी प्रशंसेला पात्र होतो. याचप्रमाणें आत्मनिग्रहानें एकाग्र राहून वानप्रस्थ उत्तम लोकाला जातो, आणि उत्तम पदाला मिळून तो पुनर्जन्माच्या फेऱ्यांत पडत नाहीं. सर्व संस्कारांनीं शुद्ध होऊन गांवांतून बाहेर पडून ब्रह्मचर्यव्रतानें वनामध्यें रहावें, सकाळ संध्याकाळ स्नान करून कातडें व वल्कलें नेसावीं, नेहमीं अरण्यामध्यें राहून गांवांत शिरून फिरूं नये. अतिथींची पूजा करून त्यांना आश्रय द्यावा, कमी अधिक प्रतीचीं फलें, पानें, मुळें त्याचप्रमाणें श्यामाक यांवर त्यानें रहावें, व पुढें क्रमाक्रमानें जसजशी दीक्षा घेत जाईल त्याप्रमाणें आळस न करतां पाणी, वारा, किंवा गवत वगैरे खाऊन रहावें. फलमूलादिकांनीं आपल्याकडे आलेल्या अतिथीचा सत्कार करावा. आपलें जें खाणें असेल त्यांतूनच नेहमीं भिक्षा द्यावी, देवता व अतिथी यांना देऊन नेहमीं न बोलतां अन्न भक्षण करावें. कोणाचा हेवा करूं नये. आहार बेताचा ठेवावा. व देवतांना धरून असावें. इंद्रियें आवरून सर्वांशीं चांगलें व क्षमाशील राहून केंस व दाढी वाढवावी. यज्ञ करीत राहून वेदांमध्यें गढलें रहावें. सत्यधर्मामध्यें लक्ष ठेवावें. देह शुद्ध ठेवावा. नेहमीं दक्ष राहून एकाग्रता ठेवल्यानें याला स्वर्ग मिळतो. ज्या गृहस्थ, ब्रह्मचारी किंवा वानप्रस्थाची मोक्ष मिळविण्याची इच्छा असेल त्यानें शेवटली संन्यास वृत्ति घ्यावी, सर्व भूतमात्रांना अभय देत राहून कर्में सोडून द्यावीं. सर्व प्राणिमात्रांशीं मित्रत्वानें राहून सर्वांना सुख होईल असें वागावें. सर्वइंद्रियें स्वाधीन ठेवावीं. कोणाला न मागतां अनायासानें सहज जें मिळेल अशी भिक्षा त्यानें ज्या घरांतून धूर निघण्याचें बंद झालें असून लोक जेवले आहेत अशा ठिकाणाहून घ्यावी. स्वयंपाकाचीं भांडीं वगैरे घासून झाल्यावर अशा ठिकाणीं मग यानें भिक्षा पहावी; ती मिळाल्यानें हर्ष मानून घेऊं नये, न मिळाल्याचा खेद मानूं नये. फार भिक्षा न मागतां केवळ जीव राहून हातपाय चालण्यापुरती भिक्षा मागावी, व काळाकडे नजर देऊन मन एकाग्र करून रहावें. कोणाबरोबर मिळून भिक्षा मागूं नये. व जेथें सत्कार होतो अशा ठिकाणीं अन्न घेऊं नये. सत्कारानें मिळणारें अन्न तुच्छ करावें. उष्टें, कडू, तिखट, पांचट असें अन्न खाऊं नये. व जेवीत असतां निरनिराळ्या पदार्थांची चव घेत बसूं नये. कोणाच्या पोटावर पाय न आणतां अन्न मिळविण्याचा प्रयत्न करावा. धर्माचें ढोंग माजवूं नये. रजोगुण सोडून देऊन एकांतामध्यें, रिकाम्या घरांत, अरण्यामध्यें, झाडाच्या मुळाशीं किंवा नदीच्या कांठीं त्यानें रहावें. त्याचप्रमाणें रहाण्यासाठीं डोंगरांतील एखादी गुहा पहावी. उन्हाळ्यामध्यें गांवांत एकापेक्षां अधिक रात्री राहूं नये. पावसाळ्यांत मात्र चार महिने एकाठिकाणीं रहावें. सूर्यानें दाखविलेल्या वाटेनें किड्याप्रमाणें भूतमात्रांवर दया करण्यासाठीं पृथ्वीच्या पाठीवर नीट विचारानें फिरत रहावें. कांहीं सं-

षय करूं नये. मित्राच्या घरीं राहूं नये. शुद्ध पाण्यानें आपलीं कर्मे उरकावीं. वर काढून घेतलेल्या पाण्यानें स्नान करावें, अहिंसा, ब्रह्मचर्य, सत्य, सरळपणा, अक्रोध, अनसूया, इंद्रियनिग्रह, आत्मनिग्रह व अपैशून्य या आठांसंबंधानें निग्रहपूर्वक दक्ष असावें. नेहमीं शुद्ध, चांगलें व सरळ वर्तन ठेवावें. आशेला बाजूला ठेवून शक्त्यनुसार घासभर दुसऱ्याला द्यावें. धर्मानें मिळालेलें अन्न केवळ जीव रहाण्यापुरतें खावें. वासनेच्यामागें लागूं नये. घासभर अन्न व अंग झांकण्यापुरतें वस्त्र याहून अधिक कोणापासून घेऊं नये. पोटाला लागेल तेवढेंच अन्न घ्यावें, अधिक घेऊं नये. प्रतिग्रह व दान यांपासून परावृत्त असावें. लोकांची गरीबी लक्षांत घेऊन त्यांना देऊन त्यांच्याबरोबर कोणत्याही वस्तूचा उपभोग घ्यावा. दुसऱ्याचें कांहीं बळकावूं नये किंवा मागितल्याशिवाय घेऊं नये. एखाद्या विषयाची चव मिळाली असतां आणखी त्याचा उपभोग मिळावा ह्मणून आशा करूं नये; काम पडेल तेव्हां, मिळेल तसें ज्याच्यावर दुसऱ्याची मालकी नाहीं अशी माती, पाणी, अन्न, पानें, फुलें व फळें घ्यावीं; शिल्यावर उदरनिर्वाह करूं नये. सोन्याची आशा करूं नये, कोणाचा द्वेष करूं नये. किंवा कोणाला उपदेश करण्याच्या भानगडींत पडूं नये, कोणत्याही वस्तू जवळ करूं नयेत. श्रद्धेनें पवित्र असें अन्न खावें, वादविवाद टाळावा. अमृततुल्य असें वर्तन ठेवावें, कशावर आसक्ति ठेवूं नये. कोणाशीं सलगी ठेवूं नये. फलाची आशा उत्पन्न करणारें हिंसायुक्त कर्म किंवा लोकसंग्रहाचा धर्म करूं नये किंवा करवूं नये. सर्व गोष्टी सोडून फिरत रहावें. सर्व चराचर भूतमात्रांच्याठिकाणीं सारखें असावें. कोणाला भेवडावूं नये किंवा कोणाला भिऊं नये. जो सर्व भूतमात्रांच्या विश्वासाला पात्र होतो, असा श्रेष्ठ मनुष्यच मोक्षवेत्ता समजला आहे. मागचा पुढचा विचार मनांत आणीत बसूं नये. मन स्वस्थ ठेवून कालाकडे दृष्टि देऊन जो जो प्रसंग येईल त्या त्या संबंधानें उदासीन रहावें. डोळ्यानें, मनानें किंवा तोंडानें कोणाचें वाईट करूं नये. डोळ्यासमोर किंवा डोळ्याआड कोणाचें कांहीं वाईट करूं नये. कांसव ज्याप्रमाणें आपले अवयव आपल्यामध्यें आखडून घेतें त्याप्रमाणें इंद्रियें आवरून, इंद्रियें, मन व बुद्धि यांनांवाचें अस्तित्व नाहींसें करावें. कशाची आशा न ठेवतां सर्व तत्त्व त्यानें ओळखून असावें. सुखदुःखादि द्वंद्वाची पर्वा न करतां नमस्कार, स्वाहाकार, ममता व अहंकार सोडून देऊन शुद्ध अंतःकरण ठेवून योगक्षेमाकडे लक्ष देऊं नये. निर्गुण व शांत बनून कशावर आसक्ति ठेवूं नये, व कशावर अवलंबून राहूं नये. याप्रमाणें तत्त्व ओळखून आपल्याठिकाणीं गढून राहिल्यानें हा खात्रीनें मुक्त होतो. ज्याला पाय, हात, पाठ, डोकें, पोट कांहीं नसून गुण, कर्मे, गंधरसादि विषय कांहीं नाहींत, जो केवळ विमल व स्थिर आहे, ज्याची अभ्यासानेंच ओळख पटणार, जो कशाशीं चिकटला नाहीं व जो मांसपिंडाचा बनला नाहीं, जो चिंतेपासून दूर आहे, जो घरामध्यें असून सर्व प्राणिमात्रांच्या ठिकाणीं आहे असा आत्मा ज्यांना दिसूं लागतो, ते अमर होतात. बुद्धीचा,त्याचप्रमाणें इंद्रियें, देवता, वेद, यज्ञ, उच्च लोक, तप, व्रतें यांचा त्याठिकाणीं प्रवेश नाहीं. केवळ ज्ञान्यांना याच्या लिंगहीन स्वरूपानें याची प्राप्ति होते ह्मणून निर्लिंग अशा याचें तत्त्व ज्याला उमगलें आहे त्यानें हें धर्मतत्त्व पाळावें. गृहस्थाश्रमामध्यें असणाऱ्या विद्वानानें या सत्यज्ञानाशीं जुळेसें आपलें वर्तन ठेवावें. मोहापासून दूर असून मूर्खांप्रमाणें धर्माला दोष न देतां त्याप्रमाणें वागावें. भल्या लोकांच्या धर्माची निंदा न करतां दुसरे आपला अवमान करतील अशा रीतीनें यानें बाहेरून वर्तन दाखवावें. याप्रमाणें वर्तन ठेवणारा मुनि श्रेष्ठ समजला आहे. तो इंद्रियें, इंद्रियविषय, पंचमहाभूतें, मन, बुद्धि, अहंकार, प्रकृति, पुरुष यांना खऱ्या ज्ञानानें बरोबर ओळखून सर्व बंधनांतून सुटून स्वर्ग मिळतो. तत्त्ववेत्यानें अंतकाळीं यास ओळखून एकांतामध्यें कशाकडे लक्ष न देतां एका ब्रह्माकडे लक्ष द्यावें, ह्मणजे आकाशामधल्या वायुप्रमाणें सर्व संगापासून मुक्त होऊन याचें सर्व संचित नाहींसें होऊन शोकमुक्त होऊन हा थोर पदाला जाऊन मिळतो. ज्यांना तत्त्वज्ञान झालें आहे असे वृद्ध लोक त्यागालाच तप समजतात. जे ज्ञानी ब्राह्मण ब्रह्मज्ञानात्मक वेदाच्या ठिकाणीं गढले आहेत ते ज्ञानच श्रेष्ठ ब्रह्म समजतात. ब्रह्म फार दूर असून

वेदज्ञानानेंच त्याची प्राप्ति होणें शक्य आहे. सर्व द्वंद्वांपासून मुक्त असून तें निर्गुण व सनातन आहे. त्याच्या ठिकाणीं अचिंत्य गुण आहेत. या श्रेष्ठ ब्रह्माला ज्ञान व तप यांनीं विद्वान लोक पहातात. ज्यांचीं मनें शुद्ध आहेत, असे रजोगुणाच्या पलीकडे गेलेले शुद्ध लोक नेहमीं संन्यासामध्यें गढून राहून या परमेश्वराला जाऊन मिळतात. तप हा दीप समजला असून आचार धर्माला साधनीभूत आहे. ज्ञान हेंच सर्वांत श्रेष्ठ असून संन्यासच तप आहे. जो तत्त्वज्ञानानें कशावरही अवलंबून नसून सर्वभूतांच्या ठिकाणीं असणाऱ्या त्या आत्म्याला ओळखतो त्याची वाटेल तिकडे गति रहाते. सहवास व वियोग त्याचप्रमाणें एकपणा व निरनिराळेपणा ज्याला दिसतो तो सर्व दुःखांपासून मुक्त होतो. जो कशाची इच्छा धरीत नाहीं, कशाचा द्वेष करीत नाहीं, तो या जगामध्यें राहून सुद्धां ब्रह्म होण्याला पात्र होतो. जो प्रकृतीचे गुण ओळखून तिला सर्वभूतमात्रांचे ठिकाणीं पहातो, तो व ममता व अहंकार यांपासून सुटून खात्रीनें मुक्त होतो, व शांतीच्या योगानें निर्गुण, नित्य व द्वंद्वातीत अशा ब्रह्मपदाला जाऊन मिळतो. गुणापासून स्वरूपाला येणारीं बरीं वाईट कृत्यें त्याचप्रमाणें सत्यासत्य सोडून मनुष्य मुक्त होतो. प्रकृति हेंच ज्याचें बीज आहे, बुद्धि ज्याचा बुंधा आहे, अहंकार ज्याच्या डाहाळ्या आहेत, इंद्रियरूपी छिद्रांतून ज्याचे अंकुर बाहेर निघतात, पंचमहाभूतें याच ज्याच्या मोठमोठ्या फांद्या असून इंद्रियविषय ज्याच्या लहान लहान फांद्या आहेत, अशा ह्या सदा बऱ्यावाईट फलपुष्पांनीं संपन्न सनातन वृक्षावर सर्व भूतमात्र रहातात. ज्ञानरूपी तरवारीनें हा वृक्ष छाटून विद्वान मनुष्य, जन्म, जरा व मृत्यु यांना कारणीभूत अशीं संगापासून जडणारीं बंधनें तोडून ममत्व आणि अहंकार सोडून मुक्त होतो. हे जे दोन एकमेकांशीं जुळून असणारे कायमचे अचेतन पक्षी यांच्या पलीकडचा जीवात्मा सचेतन आहे. जेव्हां अचेतनाप्रमाणें दिसणारा अंतरात्मा देहादि उपाधीपासून सुटून या बुद्धीच्या पलीकडच्याला जाणूं लागतो, तेव्हां याला क्षेत्राची ओळख पटून हा सर्व गुणांच्या पलीकडे जाऊन पोहोंचून सर्व पापांपासून मुक्त होतो.'

'कोणी ब्रह्माला झाड समजतात, कोणी वन समजतात, कोणी अव्यक्त समजतात, कोणी सर्व दुःखाच्या पलीकडे असून त्यापासून हें मोकळें आहे असें समजतात. ह्या सर्व विश्वाची अव्यक्तापासून उत्पत्ति असून त्यांतच याचा लय आहे. एक श्वास सोडण्याला जितका वेळ लागतो तितका वेळपर्यंत सुद्धां अंतकालीं आत्म्याशीं मिळून समस्थिति प्राप्त होईल तर तो अमर होण्याला योग्य होतो. एक निमिषपर्यंत सुद्धां मनाला आपल्या ठिकाणीं आवरून धरल्यानें त्या आत्मप्रसादाच्या योगानें कधीं खोट न पडणारा असा विद्वानांना मिळणारा थोर लाभ याला मिळतो. यमनियमादि दहा किंवा बारा साधनांनीं वरचेवर प्राणायामांनीं प्राण वायु ताब्यांत ठेवल्यानें चोविसाव्याच्या पलीकडचा जो परमात्मा त्याला मनुष्य जाऊन मिळतो. याप्रमाणें प्रथम अंतःकरण प्रसन्न झाल्यानें मनुष्याला जें जें वाटेल तें तें मिळतें. अव्यक्ताच्या ठिकाणीं (प्रकृतीच्या ठिकाणीं) जेव्हां सत्व गुणाचें प्राबल्य रहातें तेव्हां तें अमर होण्याच्या स्थितीला पात्र असतें. सत्वगुणाची ज्यांना पूर्ण ओळख आहे, ते सत्वगुणाहून श्रेष्ठ कांहीं नाहीं अशी त्याची प्रशंसा करतात. पुरुष सत्वगुणाच्या आश्रयानें आहे हें अनुमानावरून कळतें. यावांचून दुसऱ्या कोणत्याही उपायानें तें उमगणें शक्य नाहीं. क्षमा, धृति, अहिंसा, समता, सत्य, सरळपणा, त्याग, दान व संन्यास हें सात्विकवृत्तीचें लक्षण आहे व यावरूनच पुरुष व सत्वगुण एक आहेत असें विद्वान अनुमान काढतात. कांहीं विद्वान लोक हा क्षेत्रज्ञ पुरुष व ब्रह्म एक आहे असें ह्मणतात; पण तें खरें नाहीं; तसेंच हे दोघे अगदीं वेगळे आहेत असें ह्मणणेंही चुकीचें होणार आहे. यांचा एकत्रपणा व वेगळेपणा उंबर व त्यांतील किडा यांच्यासारखा समजावयाचा. यांचा संबंध कमलावरील पाण्याच्या बिंदूचा त्याच्याशीं असणाऱ्या संबंधाप्रमाणें आहे.'

यावर ऋषींना आणखी कांहीं शंका राहिल्यानें ते ह्मणाले, 'या जगांत धर्मामध्यें कोणता धर्म आचरण्याला अतिश्रेष्ठ समजला आहे? निरनिराळे

धर्माचे मार्ग एकमेकांशीं न जुळणारे दिसतात. कोणी देहनाशानंतर धर्म रहातो ह्मणतात, कोणी रहात नाहीं ह्मणतात. कोणी सर्वच संशयात्मक आहे ह्मणतात, कोणी त्यांत संशय कांहींच नाहीं असें ह्मणतात, कोणी या शाश्वत ब्रह्माला नित्य समजतात, कोणी अनित्य समजतात, कोणी त्याला आहे समजतात, कोणी नाहीं समजतात, कोणी याला एकस्वरूप समजतात, कोणी याला दोन प्रकारानें समजतात; कोणी नानाप्रकारानें समजतात, कोणी देशकाल आहे ह्मणतात, कोणी नाहीं ह्मणतात, कोणी जटा वाढवून कातडीं नेसतात, कोणी डोकें साफ मुंडून नागवे फिरतात, कोणी स्नान करूं नये ह्मणतात, कोणी स्नान करावें ह्मणतात, कोणी अन्न घेऊं नये ह्मणतात, कोणी खाण्यामध्यें गढलेले दिसतात, कांहीं कर्म करावें ह्मणतात, कांहीं न करतां स्वस्थ असावें ह्मणतात, कांहींना पैसा आसावासा वाटतो, कांहींना गरीबी चांगली वाटते, कांहीं साधनाच्या मागें लागतात, कांहीं साधनें झूट समजतात. कोणी हिंसा करीत नाहींत, कोणी हिंसेच्या मागें लागलेले असतात, कोणी पुण्याकडे लागलेले असतात, कोणी कीर्तिकडे लागलेले असतात, कोणी त्यांत कांहीं नाहीं ह्मणतात, कोणी चांगल्या रीतीनें वागतात, कोणी संशयामध्यें बुडालेले असतात, कोणी दुःखामुळें किंवा सुखासाठीं ध्यानांत गढून असतात, कोणी यज्ञ चांगला ह्मणतात, कोणी दान चांगलें ह्मणतात, कोणी तप चांगलें ह्मणतात, कोणी वेदाध्ययन चांगलें ह्मणतात, कोणी ज्ञान चांगलें ह्मणतात, कोणी संन्यास चांगला ह्मणतात, कोणी जसें चालेल तसें चालावें ह्मणतात, कोणी सर्वच गोष्टींची प्रशंसा करतात व कोणी कांहींच नाहीं ह्मणतात, याप्रमाणें धर्मासंबंधानें सर्वच घोंटाळा व परस्पर विरोधीपणा असल्यानें आह्मी घोंटाळ्यांत पडून आह्मांला कांहींच निश्चय ठरवितां येत नाहीं. हें चांगलें, तें चांगलें ह्मणून लोक कर्में करण्याला तयार होतात. जो ज्या धर्मामध्यें गढला असतो तो त्याला चांगला वाटतो. यामुळें आमची बुद्धि जाऊन मन व्यग्र झालें आहे; तेव्हां खरें कल्याणकारक काय आहे हें आपण आह्मांला सांगावें व सत्य आणि क्षेत्रज्ञ यांच्यामधील संबंधाचें कारणही आपण आह्मांला सांगावें.'

हें ऐकून ब्रह्मा ह्मणाले, 'तुमच्या प्रश्नाचें मी उत्तर देतों तें नीट ऐकून घेऊन नीट लक्षांत ठेवा. कोणालाही पीडा न देणें (अहिंसा) हा मुख्य धर्म आहे.हा उत्तम पदाला पोहोंचविणारा असून चिंतेला या ठिकाणीं बिलकुल जागा नाहीं. हें धर्माचें मुख्य लक्षण आहे; त्याचप्रमाणें खरें तत्त्व ओळखणाऱ्या वृद्धांनीं कल्याणप्रद ह्मटलें आहे; ह्मणून मनुष्य शुद्ध ज्ञानाच्या योगानें सर्वपापांपासून मुक्त होतात. जे कोणी हिंसा करणारे, नास्तिक, लोभी व मोह पावलेले असतात ते नरकाला जातात. जे नेहमीं आदरून सकाम कर्में करतात, ते ह्या जगांत फिरून फिरून जन्म घेत रहातात, जे शहाणे श्रद्धापूर्वक कांहीं आशा न ठेवतां कर्में करीत रहातात त्यांनाच खरें ज्ञान झालें समजावयाचें. आतां सत्य व क्षेत्रज्ञ यांचा संबंध विषय व विषयी यांमधील संबंधाप्रमाणें आहे. पुरुष विषयी असून सत्व विषय समजलें आहे. यासंबंधानें उंबर व किडा यांचें उदाहरण पूर्वींच सांगितलें आहे. भोग्य विषय असलेलें सत्व अचेतन असून त्याला कांहीं ज्ञान नाहीं. भोक्ता जो पुरुष त्याला त्याचें ज्ञान आहे. पुरुष भोक्ता असून सत्व भोग्य आहे. सत्व हें नेहमीं द्वंद्वयुक्त आहे व क्षेत्रज्ञ पुरुष निर्द्वंद्व, संपूर्ण, नित्य व निर्गुण आहे. तो सर्वांच्या ठिकाणीं सारख्या रीतीनें राहिला असून कमलपत्रावरील पाण्याप्रमाणें तो त्याचा उपभोग घेतो. ज्याप्रमाणें कमलाच्या पानावर असलेल्या चंचल जलबिंदूचा त्याला विटाळ होत नाहीं, त्याप्रमाणें हा अनेक गुणाच्या जवळ आला असतांही त्यांचा याला विटाळ होत नाहीं. पुरुषाचें सत्व हें केवळ उपकरण आहे. एखादें द्रव्य व कर्ता यांचा जसा संबंध असतो तशा प्रकारचा या दोघांचा संबंध आहे. ज्याप्रमाणें मनुष्य अंधारांतून दिवा घेऊन जातो त्याप्रमाणें परमेश्वराकडे जाऊं इच्छिणारे हा सत्वरूपी दिवा बरोबर घेऊन त्याकडे जातात. दिवा जळत असतो; परंतु तेल वात नाहींशी झाली असतां तो विझून जातो, याप्रमाणें सत्वगुण व्यक्त असून पुरुष अव्यक्त आहे. मंदबुद्धिलोक हजार गोष्टींनीं सुद्धां

उमगत नाहींत व तीव्र बुद्धीचा थोडक्यांत उमगून जातो; याप्रमाणें मोठ्या कष्टानें धर्माचें साधन हुडकून तें ओळखावें; कारण ज्याला उपाय कळतो तोच मोठें सुख भोगतो. ज्याप्रमाणें शिदोरी न घेतां चाललेल्या वाटसराला वाटेंत फार हाल काढावे लागतात व मध्यें गच्छंतीचीही पाळी येते, त्याप्रमाणें कर्मांमध्यें फल मिळतें न मिळतें. आपल्याला हिताचें काय आहे, अहिताचें काय आहे हें पहात रहाणें हेंच मनुष्याच्या मोठें फायद्याचें आहे. ज्याप्रमाणें अविचारी मनुष्य कधीं न पाहिलेल्या वाटेनें लांबवर पायानेंच निघतो व दुसरा एखादा त्याच वाटेनें घोडे जुंपलेल्या मोठ्या वेगवान रथांतून जातो, त्याप्रमाणें बुद्धिमानाची गोष्ट आहे. पर्वतावर चढल्यावर खालीं जमिनीकडे पाहण्यांत अर्थ नाहीं, त्याप्रमाणें ज्ञानाच्या पल्ल्याला पोंचल्यावर कर्माकडे लक्ष देऊं नये. एखादा रथांत बसून जाणारा मूर्ख रथांतून चालला असतांसुद्धां क्लेश पावतो. जोंपर्यंत रथमार्ग आहे, तोंपर्यंत त्या मार्गानें जावें, पण ती रथाची वाट बुजली असतां मनुष्य रथ सोडून देऊन पुढें निघतो. याप्रमाणें ज्याला खरें तत्त्व उमगलें आहे असा बुद्धिमान मनुष्य अशा रीतीनें गुणांना ओळखून वरवर जात रहातो. पैलपार जाण्याला नाव वगैरे कांहीं न घेतां केवळ हाताच्या जोरावर तरून जाण्याच्या हेतूनें समुद्रांत उडी घेणारा मूर्खपणानें केवळ मरणाच्या मागें लागतो असें ह्मटलें पाहिजे. निरनिराळ्या वस्तूंमधील भेदाभेद जाणणारा बुद्धिमान मनुष्य नाव, वल्हें अशा सर्व तयारीनिशीं समुद्रांत शिरून कांहीं वेळ न लागतां तो पैलपार तरून गेल्यावर त्यावरील ममत्व टाकून नाव सोडून पुढें निघून जातो. तेंच कोळ्याचा स्नेह नावेवर जडल्यानें त्याला पाण्यांतच फिरत रहावें लागतें. त्याप्रमाणें ममत्वानें पछाडलेला मनुष्य फुकट या भवसागरांत फिरत रहातो, नावेंत बसून जमिनीवर त्याचप्रमाणें रथांत बसून पाण्यामध्यें प्रवास करतां येणार नाहीं. याप्रमाणें निरनिराळ्या विषयांच्या ओढीनें नानाप्रकारचीं निरनिराळीं कर्में केलीं असतां जसें कर्म त्याप्रमाणें फळ या जगांत मिळतें. ज्याला गंध, रस, रूप, स्पर्श, शब्द कांहीं नसून मुनि ज्याच्यावर बुद्धीच्या योगानें विचार करतात त्याला प्रधान ह्मणतात. हें प्रधान अव्यक्त असून याचें कार्य महत् आहे. या महत्‌रूपी तत्त्वाचें कार्य अहंकार आहे. अहंकारापासून महाभूतें झालीं, व यांपासून निरनिराळे इंद्रियविषय झाले. याप्रमाणें अव्यक्तामध्यें बीजाचा धर्म असून उत्पत्ति करण्याचा गुण आहे; त्याचप्रमाणें महान् आत्म्याच्या ठिकाणींही बीजाचे धर्म असून प्रसव गुण आहे. त्याचप्रमाणें अहंकाराच्या ठिकाणींही हे दोन गुण आहेत. पंचमहाभूतेंही बीज व प्रसव या दोन धर्मांनीं युक्त असून यांचे गुण जे विषय त्यांच्यामध्येंही बीजधर्म असून उत्पत्ति करण्याचें सामर्थ्य आहे. या सर्वांचें मुख्य ठिकाण चित्त आहे. आतां आकाशामध्यें एक गुण असून वायूमध्यें दोन, ज्योतीमध्यें तीन, पाण्यामध्यें चार व स्थावर जंगमानें भरलेल्या या पृथ्वीमध्यें पांच गुण आहेत. ही पृथ्वी सर्वभूतमात्रांना उत्पन्न करणारी व शुभाशुभाचीं उदाहरणें दाखवून देणारी आहे. शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध हे हिच्यामधले पांच गुण आहेत. पृथ्वीचा मुख्य गंध गुण असून त्याचे नानाप्रकारचे पुढें दिल्याप्रमाणें भेद आहेत. इष्ट, अनिष्ट, मधुर, आंबट, कडु, दर्पयुक्त, मिश्र, स्निग्ध, रुक्ष, मनाला प्रसन्न करणारा याप्रमाणें हे दहा प्रकारचे गंध आहेत. शब्द, स्पर्श, रूप, रस हे चार पाण्याचे गुण असून त्याचा मुख्य गुण जो रस त्याचे मधुर, आंबट, कडु, तिखट, कषाय, खारट असे सहा प्रकारचे भेद आहेत. शब्द, स्पर्श, रूप हे तीन तेजाचे गुण असून त्याचा मुख्य गुण जो रूप त्याचे पांढरा, काळा, तांबडा, निळा, पिंवळा, तांबूस, लांब, आंखूड, काटकोळ, स्थूल, चौकोन, वाटोळा याप्रमाणें निरनिराळे भेद आहेत. त्याचप्रमाणें शब्द, स्पर्श हे दोन वायूमधील गुण असून त्याचा मुख्य गुण जो स्पर्श त्याचे रुक्ष, शीत, उष्ण, स्निग्ध, प्रसन्न, कठीण, चिकण, निसरट, दारुण, व मृदु हे बारा भेद आहेत; त्याचप्रमाणें आकाशाचा एक शब्द गुण असून त्या शब्दाचे षड्ज, ऋषभ, गांधार, मध्यम, पंचम, निषाद, धैवत, इष्ट, अनिष्ट, संहत व निरनिराळे भेद दाखविणारा, असे नाना प्रकार आहेत. याप्रमाणें अशा प्रकारचा शब्द आकाशापासून झाला

असून आकाश सर्वभूतमात्रांमध्यें श्रेष्ठ भूत आहे. अहंकार याच्या पलीकडे असून अहंकाराच्या पलीकडे बुद्धि, बुद्धीच्या पलीकडे जीवात्मा, त्याच्या पलीकडे अव्यक्त व अव्यक्ताच्या पलीकडे श्रेष्ठ पुरुष याप्रमाणें भूतमात्रांमधील कमीअधिकपणा व सर्व कर्मांचे विधि जो पूर्णपणें जाणतो तो सर्व प्राणिमात्रांच्या हृदयामध्यें असणारा आत्माच बनून राहतो. अर्थात् अव्यक्त अशा परमात्म्याशीं जाऊन मिळतो.'

'ज्याअर्थी पंचभूतांचा स्वामी मन आहे त्याअर्थी त्यांना लीन करून पुन्हा बाहेर सोडण्यांत मनच प्रधान आहे. पंचमहाभूतांवरचा अधिष्ठाता हें मनच आहे. मनानें पुढें ठेवलेल्या विषयांवरच बुद्धीचें कार्य होतें व याला क्षेत्रज्ञ ह्मणतात. ज्याप्रमाणें सारथी पाणीदार घोड्यांना रथाला जुंपतो, त्याप्रमाणें मन इंद्रियांना जोडतें. इंद्रियें, मन व बुद्धि हीं सदा क्षेत्रज्ञाशीं जुळलेलीं आहेत. जीवात्मा इंद्रियरूपी हे मोठे घोडे ज्याला जुंपले आहेत व बुद्धि ज्याचा लगाम आहे अशा रथांत बसून चोहोंकडे धांवत आहे. ह्या मोठ्या ब्रह्ममय रथाला इंद्रियरूपी घोडे जोडले असून मन सारथी आहे व बुद्धि लगाम आहे. जो विद्वान मनुष्य या ब्रह्ममय रथाला ओळखतो तो या सर्वभूतांमध्यें मोह पावत नाहीं. या ब्रह्मवनाचा अव्यक्तापासून आरंभ असून पंचमहाभूतांमध्यें शेवट आहे, व सर्व चराचरांनीं हें व्याप्त आहे. सूर्य व चंद्र यांच्या प्रभांनीं हें प्रकाशित आहे. ग्रहनक्षत्रांनीं मंडित आहे. अनेक नद्या व पर्वत यांनीं शोभायमान आहे. नानाप्रकारच्या पाण्यांनीं याला सदा शोभा आली आहे. सर्व भूतमात्र यावर रहात असून सर्वांची गति हेंच आहे, व यामध्यें क्षेत्राला जाणारा आत्मा नेहमीं फिरत आहे. या लोकांमध्ये ज्या ज्या ह्मणून चराचर वस्तू आहेत, त्या प्रथम लय पावून नंतर पंचमहाभूतांचे गुण नाहींसे होतात व नंतर पंचमहाभूतें नाहींशीं होतात. याप्रमाणें भूतमात्रांची बरबर गति आहे. देव, मनुष्य, गंधर्व, पिशाच्च, असुर व राक्षस हे सर्व स्वभावानेंच उत्पन्न झालें आहेत. क्रिया किंवा कारण यांनीं यांची उत्पत्ति करणारे हे मरीचि आदि ब्राह्मण फिरून फिरून जन्माला येतात, व समुद्रांतील लाटांप्रमाणें जें जें ह्मणून पंचमहाभूतांपासून उत्पन्न होतें तें तें वेळ आली असतां त्यामध्यें लय पावतें. पंचतन्मात्रें पंचमहाभूतांपासून पलीकडे आहेत व जो या पंचमहाभूतांपासून मुक्त होतो तो श्रेष्ठ गतीला जाऊन मिळतो. तपानें देवत्वाला पावल्यावर प्रजापतींनीं हें सर्व प्रथम मनानें उत्पन्न केलें. फलमूलांवर राहून सिद्धी पावलेले लोक तपामुळें एकाग्रतेच्या योगानें त्रैलोक्य पाहूं शकतात. नानाप्रकारच्या वनस्पती, औषधें, विद्या हीं सर्व तपानेंच फळतात. सर्व साधनाला तप हें मूळ आहे. जें दुर्मिळ आहे, शिकण्याला कठीण आहे, ज्याच्यापुढें कांहीं चालत नाहीं व ज्यामधून जातां येत नाहीं तें सर्व तपानें साधतें. तपापुढें कोणाचें कांहीं चालत नाहीं. मद्यपी, ब्रह्महत्या करणारा, चोर, भ्रूणहत्या करणारा, गुरुपत्नीशीं संबंध ठेवणारा, हे सर्व कडक तपानेंच त्या त्या पापापासून मुक्त होतात. मनुष्य, पितर, देव, पशु, पक्षी व दुसरीं चराचरभूतमात्रें नेहमीं तपामध्यें गढून तपानेंच सिद्धि पावतात. त्याचप्रमाणें देवही तपानेंच स्वर्गाला गेले. जे काळजीपूर्वक अहंकारानें फलाची आशा ठेवून कर्मे करतात, ते प्रजापतीकडे जातात. शुद्ध असे ध्यानयोग लावून जे ममता व अहंकार सोडतात तेच तेवढे श्रेष्ठ लोकाला जातात. ज्यांना आत्मज्ञान झालें आहे, असे प्रसन्न मनाचे लोक ध्यानयोगानें अदृश्य सुखसंचयामध्यें मग्न असतात. अव्यक्तापासून उत्पन्न झालेला मनुष्य ज्ञान होऊन रजतमांपासून सुटून सत्वगुणाच्या आश्रयानें सर्वपापांपासून मुक्त होतो, तेव्हां तो पूर्णपणें क्षेत्रज्ञ बनतो. याला जो ओळखतो त्यालाच वेदाची खरी ओळख पटली ह्मणावयाची. खरें ज्ञान करून घेऊन मुनीनें आत्मनिग्रह ठेवावा. मनुष्याचें ज्याच्याकडे लक्ष असतें तन्मय तो बनतो, हें अगदीं जुनें गूढ आहे. अव्यक्तापासून पंचमहाभूतांमध्यें शेवट होणारे सर्व विषय अविद्येचीं स्वरूपें आहेत. गुणांपासून अलग असणाऱ्या परमात्म्याला ओळखण्याची खटपट करावी. मृत्यु दोन अक्षरांचा असून ब्रह्म तीन अक्षरांचें आहे. मम [ माझें ] यांत मृत्यु असून न मम [ माझें कांहीं नाहीं ] यांतच शाश्वत ब्रह्म आहे. कांहीं मंदबुद्धीचे लोक कर्म चांगलें

ह्मणतात; परंतु वृद्ध असे महात्मे कर्म पसंत करीत नाहींत, कर्माच्या योगानें प्राणी सोळा गुणांनींयुक्त असा जन्माला येतो. सत्यज्ञान, अहंकारासह जीवात्म्याला गिळून टाकतें, व हें अमृताचा उपभोग घेणाऱ्यांना पसंत आहे; ह्मणून ज्यांना पैलपार दिसला आहे ते कर्मांवर प्रेम ठेवीत नाहींत. हा परमात्मा ज्ञानमय असून कर्ममय नाहीं. जो या अमर, नित्य, जाणण्याला कठीण, शाश्वत, अविनाशी, स्वतःच्या स्वाधीन असणारा व कशाशीं संबंध नसणारा अशा आत्म्याला ओळखतो, तो कधींच मरत नाहीं. ज्याच्या आधींचें कांहींच नाहीं व ज्याला कोणी केलें नाहीं अशा नेहमीं अमरत्वाचा उपभोग घेणाराची ज्याला प्राप्ति होते तो याच कारणांनीं अमर व शाश्वत होतो. बाह्यकारणापासून उद्भवणारे सर्व संस्कार दूर करून मनाला आपल्या ठिकाणीं आवरून ज्याच्याहून श्रेष्ठ दुसरें कांहींच नाहीं अशा पवित्र ब्रह्माला तो ओळखूं लागतो; व याप्रमाणें बुद्धि प्रसन्न झाल्यानें तो शांत होतो व स्वप्नाप्रमाणें त्याच्या मनाची स्थिति होते. ज्ञानामध्यें गढून मुक्त झालेल्या लोकांची स्थिति अशी असते कीं, ते सर्व प्रवृत्ती, भूतवर्तमानभविष्यांमधील सर्व विषय पूर्व कारणापासून उत्पन्न झालेले आहेत असें पाहूं लागतात. ही स्थिति विरक्तांची असून सनातन धर्म हाच आहे. हा लाभ चोख वर्तनाच्या ज्ञानवानांना होतो. जो सर्वांच्या ठिकाणीं सारखा आहे, ज्याची कशावर आसक्ति किंवा आशा उरली नाहीं अशाला ही स्थिति मिळणें शक्य आहे.'

याप्रमाणें त्या ऋषींचें समाधान करून ब्रह्मदेवांनीं त्यांना परत पाठविलें. श्रीकृष्ण ह्मणाला. 'याप्रमाणें गुरूंनीं सांगितल्यावरून त्याप्रमाणें वागून शिष्य मुक्त झाला.' अर्जुन ह्मणाला, 'तो ब्राह्मण कोण, व तो शिष्य कोण हें मला सांगण्यासारखें असल्यास सांग.' यावर श्रीकृष्ण ह्मणाला, 'अर्जुना, मीच तो गुरु व मन माझें शिष्य तुझ्यावरील माझ्या प्रेमामुळें मीं तुला हें गूढ सांगितलें आहे. माझ्यावर तुझें प्रेम असेल तर वर सांगितल्याप्रमाणें तूं अगदीं बरोबर वाग ह्मणजे तूं सर्वपापांपासून सुटून मुक्त होशील. पूर्वी युद्धाच्या वेळीं हीच गोष्ट मीं तुला सांगितली होती. आतां तरी हें नीट ध्यानांत ठेव. बरें, आतां अर्जुना, तातांना भेटून फार दिवस झाले आहेत; तेव्हां तुझ्या विचारानें त्यांना भेटण्याला जावें ह्मणतों.' अर्जुन ह्मणाला, 'आपण आज हस्तिनापुराला जाऊं व धर्मराजाची गांठ घेऊं, त्यांना विचारून मग तूं द्वारकेला जा.

नंतर श्रीकृष्णानें दारुकाला रथ जोडण्यास सांगितलें. व त्याप्रमाणें रथ जोडून तयार झाल्यावर ते रथांत बसून नानाप्रकारच्या गोष्टी बोलत हास्तिनापुराला निघाले. याप्रमाणें गोष्टी बोलत ते चालले असतां अर्जुन श्रीकृष्णाला ह्मणाला, 'हे कृष्णा, तुझ्या प्रसादानें आह्मांला जय मिळाला. शत्रु मेले व कोणी कांटा न उरतां हें राज्य आह्मांला मिळालें. तूंच आह्मांला नाव मिळून त्याच्या योगानें आह्मी हा कौरवसागर तरून पार पडलों. ज्या तुझी कृति या विश्वस्वरूपानें दृष्टोत्पत्तीस येत आहे त्या तुला विश्वात्म्याला माझा नमस्कार असो. तुझी ज्याप्रमाणें मजवर कृपा आहे त्याप्रमाणें मी तुला ओळखतों, तुझ्या तेजापासून नेहमीं भूतांतरात्मा उत्पन्न होत असतो. सर्गस्थितिलयरूपी तुझा खेळ चालला असून आकाश व पृथ्वी ही तुझी माया आहे; हें सर्व स्थावर जंगम विश्व तुझ्या ठिकाणीं असून तूंच चारी प्रकारचे भूतमात्र उत्पन्न करतोस, ही पृथ्वी, अंतरिक्ष त्याचप्रमाणें आकाश तुझ्यापासूनच झालें आहे. स्वच्छ असें चांदणें तुझें हासणें असून ऋतु तुझीं इंद्रियें आहेत, नेहमीं चालू असलेला प्राणवायु हे प्रेम असून सनातन मृत्यु हा तुझा राग आहे, तुझ्या प्रसादाच्या ठिकाणीं नेहमीं वैभवशाली श्री रहात आहे. रति, तुष्टि, धृति, क्षांति, मति व कांति तूंच असून हें चराचर विश्व तूंच आहेस. युगाच्या शेवटीं तुलाच लोक नाश समजतात. हे श्रीकृष्णा, तुझे सर्व गुण मी किती दिवस जरी गात बसलों तरी माझ्या हातून ते गाऊन संपावयाचे नाहींत, सर्वांमधला आत्मा तसाच परमात्मा तूंच आहेस. तुझ्या ठिकाणीं सर्व जग भरून राहिलें आहे. माझ्यावर कृपा करण्यासाठीं ह्मणून तूं जें कांहीं मला सांगितलेंस त्याप्रमाणें मी अगदीं बरोबर वागेन. आमचें प्रिय करण्यासाठीं रणामध्यें अचाट कृत्य करून तूं त्या पापी दुर्योधनाला मारिलेंस. तूंच आधीं जाळून पार केलेल्या सैन्याला मा-

गून मीं जिंकलें. मला जय तुझ्याच योगानें मिळा-ला. दुर्योधनाला, कर्णाला, जयद्रथाला व भूरिश्रव्यांना मारण्याचा योग्य उपाय तुझ्याच बुद्धिसामर्थ्यानें आह्मांला कळला. तूं जें अनुग्रह करण्यासाठीं मला सांगितलेंस तसें मी अगदीं विचार न करतां करीन. धर्मराजाकडे गेल्यावर त्यांना तुला जाण्याला परवानगी देण्याला सांगेन. तुझें द्वारकेला जाणें मलाही संमत आहे. लौकरच आमच्या मामांची त्याचप्रमाणें बळिरामांची व दुसऱ्या ठळक ठळक यादवांची व तुझी गांठ पडेल.' याप्रमाणें बोलत बोलत ते हास्तिनापुराला घेऊन पोहोंचल्यावर भीम, नकुल, सहदेव, धृतराष्ट्र, विदुर, युयुत्सु, युधिष्ठिर, गांधारी, कुंति व दुसऱ्या भारतस्त्रिया यांची भेट घेऊन ते कृष्णार्जुन अर्जुनाच्या वाड्याकडे गेले, व रात्रीं तेथें सर्व कांहीं मनाप्रमाणें व्यवस्था जुळून श्रीकृष्ण व अर्जुन जवळ जवळच बरोबर निजले. पुढें उजाडल्यावर प्रातर्विधि आटोपल्यावर ते दोघे धर्मराज सभेंत बसला होता त्याकडे जाऊन त्यानें मोठ्या संतोषपूर्वक बसावयास सांगितल्यावर त्याच्याजवळ जाऊन बसले. त्यांचे मनांत कांहीं बोलावयाचें आहे असें पाहून युधिष्ठिर त्यांना म्हणाला, 'तुह्मी कांहीं बोलण्याच्या हेतूनें आलां आहां असें दिसतें. काय बोलावयाचें असेल तें खुशाल बोला. मी त्याप्रमाणें वागण्यास तयार आहे.' हें ऐकून अर्जुन सविनय म्हणाला, 'या श्रीकृष्णाला येथें येऊन बरेच दिवस झाले आहेत, तेव्हां महाराजांची आज्ञा घेऊन वडिलांना भेटावयाला जावें असें त्याच्या मनांत आहे.' हें ऐकून युधिष्ठिर म्हणाला, 'हे श्रीकृष्णा, तुझें कल्याण असो. वसुदेवांना भेटण्याला खुशाल तूं द्वारकेला जा. तें मला अगदीं संमत आहे. मामांना त्याचप्रमाणें देवकीला भेटून तुला फार दिवस झाले आहेत. मामांना भेटल्यावर बलिरामदादांची गांठ घेऊन मी त्यांना आदरपूर्वक फार फार विचारलें आहे ह्मणून सांग. आह्मांला विसरूं नकोस, व सर्वांची भेट घेऊन फिरून अश्वमेधासाठीं परत ये. नानाप्रकारचीं रत्नें वगैरे जें कांहीं तुला पाहिजे असेल तें बरोबर घेऊन जा. ही सर्व पृथ्वी तुझ्या प्रसादानेंच आमच्या हातीं आली आहे.' याप्रमाणें धर्मराज बोलला असतां श्रीकृष्ण ह्मणाला, 'धर्मराजा, माझ्या घरामध्यें जें कांहीं आहे त्या सर्वांचा स्वामी तूं आहेस. हें सर्व वैभव एवढेंच नव्हे तर ही संपूर्ण पृथ्वी तुझी आहे.' याप्रमाणें एकमेकांचें भाषण होऊन धर्मराजानें सन्मानपूर्वक श्रीकृष्णाला आज्ञा दिल्यावर आतेचा वगैरे सर्वांचा निरोप घेऊन सुभद्रेला रथांत बसवून घेऊन श्रीकृष्ण हास्तिनापुरांतून बाहेर पडला. युधिष्ठिरप्रभृति मंडळींना परत जाण्यास सांगून त्यानें दारुकाला व सात्यकीला रथ झपाट्यानें हाकण्यास सांगितलें.

---

## ३०० उत्तंकांचा श्रीकृष्णाला शाप.

### (१४. ५३–५८)

याप्रमाणें श्रीकृष्ण पांडवांचा निरोप घेऊन निघाल्यावर तो एका निर्जल अशा ओसाड प्रदेशाला येऊन पोहोंचला. त्या ठिकाणीं मुनिश्रेष्ठ उत्तंकांची व त्याची गांठ पडली. त्याठिकाणीं त्या मुनींचा सत्कार करून त्यांनींही याचा सत्कार केल्यावर एकमेकांमध्यें कुशल प्रश्न चालले असतां उत्तंक श्रीकृष्णाला ह्मणाले, 'श्रीकृष्णा, कौरवपांडवांकडे जाऊन त्या दोघांमध्यें कायमचें बंधुप्रेम जुळवून देऊन तूं आलासना ? ते दोघेही तुझे संबंधी असून तुला आवडते आहेत. त्या दोघांमध्यें चांगलें सख्य जुळवून देऊनच तूं आला असला पाहिजेस ? पांडव तसेच कौरव तुझ्याबरोबर सुखांत राहून आपापल्या राज्यांमध्यें ते सुखांत नांदतीलना ? कौरवांना शांत करण्याला समर्थ अशा तूं त्यांना शांत करून तुझ्या संबंधानें जो मला नेहमीं भरंवसा वाटत होता तो तूं सफल केला असशील? ' हें ऐकून श्रीकृष्ण म्हणाला, 'आधीं मीं कौरवांमध्यें सख्य जुळवून देण्यासाठीं खटपट केली; परंतु दोघे एकमेकांशीं सख्यानें रहाण्याचें जेव्हां अशक्य वाटलें तेव्हां कौरव आपल्या सर्व मुलांबांधवासह मृत्युमुखीं पडले आहेत. बुद्धीनें किंवा बलानें दैवाला कोणालाही मागें सारतां येणार नाहीं. हें सर्व ह्मणजे आपल्याला ठाऊक नाहीं असें नाहीं. माझ्या, भीष्मांच्या, त्याचप्रमाणें विदुरांच्या बोलण्याला झुगारून देऊन ते पांडवांशीं भिडून यमसदनाला गेले.

फक्त पांच पांडव ते सुद्धां बिचारे आपल्या मित्रांना व मुलांना मुकून उरले आहेत. धृतराष्ट्राच्या सर्व मुलांचा फडशा पडला आहे.' हें ऐकून रागानें अगदीं खवळून जाऊन, डोळे वटारून उत्तंक ह्मणाले, 'कृष्णा, तुझ्या अंगांत सामर्थ्य असून ज्याअर्थी त्या कुरुवीरांना ते तुझे संबंधी असून तूं राखलें नाहींस, त्यांना धरून बसवून ज्याअर्थीं त्यांचें तूं निवारण केलें नाहींस, त्याअर्थी मी तुला शाप देतों. तूं समर्थ असूनही कपटवर्तन करून कौरवांना तुझ्या भोंवतीं जमून मरतांना पहात राहिलास.' श्रीकृष्ण ह्मणाला, 'मी सांगतों हें नीट ऐकून घ्या, माझी विज्ञप्ति लक्षांत घ्या. आपण तपस्वी आहां. माझें स्वरूप लक्षांत घेऊन मग मला शाप द्या. कोणीही पुरुष थोड्याशा तपानें माझें वांकडें करण्याला समर्थ नाहीं. आपलें तप फुकट जावें अशी माझी इच्छा नाहीं. आपण मोठें कडकडीत तप केलें असून गुरूंना संतुष्ट केलें आहे व कुमारावस्थेपासून कडकडीत ब्रह्मचर्य पाळलें आहे; तेव्हां इतक्या कष्टानें अर्जन केलेलें आपलें तप कमी व्हावें अशी माझी इच्छा नाहीं.'

उत्तंक ह्मणाले. 'तुझें शुद्ध स्वरूप मला बरोबर सांग म्हणजे तें ऐकून घेऊन शाप द्यावयाचा किंवा काय यांचा मी विचार करीन.' श्रीकृष्ण ह्मणाला, 'सत्व, रज व तम हे तीन गुण माझ्या आश्रयानें असून रुद्र व वसु यांची उत्पत्ति माझ्यापासूनच आहे. सर्व प्राणिमात्र माझ्या ठिकाणीं असून मी सर्वांच्या ठिकाणीं आहें. सर्व दैत्य, यक्ष, गंधर्व, राक्षस यांची उत्पत्ति माझ्यापासूनच आहे. सर्व जें कांहीं सत्, असत्, व्यक्त, अव्यक्त, क्षर, अक्षर आहे तें माझ्यापासूनच आहे. जे चार आश्रमांचे धर्म व जे कांहीं दुसरे वैदिक धर्म आहेत ते सर्व माझ्यापासूनच आहेत. सत्, असत् व याच्या पलीकडचें असें हें सर्व विश्व माझ्यापासून आहे. या जगामध्यें माझ्यापेक्षां श्रेष्ठ असें कांहींच नाहीं. ॐकारप्रमुख वेद, यूप, सोम, चरु, देवांना पोसणारे यज्ञामधीलहोम, होता, हव्य, अध्वर्यु, वगैरे सर्व कांहींमीच आहें. उद्गाता यज्ञामध्यें सामघोषानें माझीच स्तुति करतो. प्रायश्चित्ताचे ठिकाणीं शांतिदायक, मंगल मंत्र मीच आहें. सर्व विश्वाचा कर्ता जो मी त्या माझीच लोक स्तुति करतात. धर्म हा माझ्या मनापासून उत्पन्न झालेला सर्वभूतमात्रांवर दया करणारा माझा वडील मुलगा असून सर्व भूत, वर्तमान, भविष्य अशा लोकांसह त्या धर्माचें रक्षण करण्यासाठीं व धर्मस्थापना करण्यासाठीं निरनिराळे वेष व स्वरूपें घेऊन मी त्रैलोक्यामध्यें नानायोनींतून फिरत रहातों. विष्णु मीच आहें, ब्रह्मदेव मीच आहें, इंद्र मीच आहें. उत्पत्ति व नाश मीच असून सर्व भूतमात्रांचा उत्पन्न करणारा व संहार करणारा मीच आहें. जे पापी आहेत अशांचा नाश करून प्रत्येक बदलणाऱ्या युगामध्यें प्रजेच्या हितासाठीं निरनिराळ्या योनीमध्यें जन्म घेऊन मी धर्मसेतु कायम करतों. मी जेवेळीं देवयोनीमध्यें असतों तेव्हां देवाप्रमाणें वागतों, गंधर्वयोनीमध्यें असतों तेव्हां गंधर्वांप्रमाणें वागतों. नागयोनींत असतांना नागांप्रमाणें वागतों. यक्षराक्षसांच्या योनीमध्यें असतांना यक्षराक्षसांप्रमाणें वागतों. त्याचप्रमाणें हल्लीं मनुष्ययोनींत असल्यानें मीं तोंड पसरून त्यांची याचना केली; परंतु डोळ्यांवर धुंदी येऊन वेडेपणानें त्यांनीं माझें भाषण ऐकलें नाहीं. मोठें भय दाखवून मीं त्यांना भेवडविलेंही. रागावून त्यांना मीं आपलें खरें स्वरूपही दाखविलें. परंतु काळाच्या फेऱ्यांत सांपडून अधर्माशीं त्यांनीं स्वतःला जखडून घेतल्यानें न्यायानेंच युद्धांत मरून ते स्वर्गाला गेले. पांडवांचेंही जगामध्यें नांव झालें.'

'उत्तंक ह्मणाले, 'हे जनार्दना, तूं जगाचा कर्ता आहेस. हें माझ्यावरील तुझ्याच प्रसादानें मला कळून आलें. माझें चित्त तुझ्याकडे लागून सुप्रसन्न झालें आहे. आतां माझ्या मनांत शापाचा विचार बिलकुल येत नाहीं. जर मी कृपेला पात्र असेन तर तुझें ईश्वररूप पहावें असें माझ्या मनांत फार आहे; तेव्हां तें मला दाखीव.' हें ऐकून श्रीकृष्ण संतुष्ट होऊन त्यानें आपलें शाश्वत जें वैष्णवरूप अर्जुनाला दाखविलें होतें तेंच हजार सूर्यांप्रमाणें देदीप्यमान रूप यांना दाखविलें. आकाश भरून जाऊन जिकडे तिकडे तोंड असलेलें तें अद्भुत रूप पाहून उत्तंक फार विस्मित होऊन ह्मणाले, 'हे विश्वकर्त्या प्रभो, तूं आपल्या पायानें ही सर्व पृथ्वी व्यापून टाकून डोक्यानें आ-

काश भरून सोडलें आहेस, व तुझ्या पोटात हें अंतरिक्ष भरून राहिलें आहे. तुझ्या बाहूंनीं सर्व दिशा भरून गेल्या आहेत. हें कधीं नाश न पावणारें तुझें उत्तम रूप आवरून घे. तुझ्या पहिल्या रूपामध्येंच तुला पहावेंसें मला वाटतें.' हें ऐकून श्रीकृष्णानें प्रसन्न होऊन त्यांना वर मागण्यास सांगितलें. तेव्हां उत्तंक ह्मणाले, 'हें जें तुझें रूप आज मी पहातों आहें हाच मला वर पुरे आहे.' तेव्हां श्रीकृष्ण त्यांना पुन्हा ह्मणाला, 'माझें दर्शन कधीं फुकट जावयाचें नाहीं. तेव्हां कांहीं विचार न करतां वर माग.' उत्तंक ह्मणाले, 'जर तुला हें अवश्य वाटत असेल तर माळरानावर पाणी मिळणें फार कठीण असल्यानें जेथें ह्मणून मी पाण्याची इच्छा करीन तेथें मला पाणी मिळावें.' हें ऐकून आपलें रूप आवरून घेऊन 'तुला जेथें पाणी लागेल तेथें माझें ध्यान कर,' असें त्यांना सांगून श्रीकृष्ण पुढें चालता झाला.

याप्रमाणें पुढें उत्तंक माळरानांतून फिरतां फिरतां तहान लागल्यामुळें त्यांनीं श्रीकृष्णाची आठवण केली. तेव्हां एक अंगाला चिखल बरबटलेला, नागवा, चांडाळ त्यांना पुढें दिसला. त्याच्या भोंवतीं कुत्र्यांचा घोळका असून त्याचें स्वरूप फारच उग्र दिसत होतें. त्याच्या कमरेला तरवार लटकली असून हातामध्यें धनुष्यबाण होते. त्याच्या पायांतून पुष्कळ पाण्याचा एक प्रवाह चाललेला उत्तंकाच्या दृष्टीस पडला. उत्तंकांनीं श्रीकृष्णाची आठवण केल्याबरोबर तो मातंग त्यांना हासत हासत ह्मणाला, 'हें पाणी घ्या. आपल्याला तान्हेले पाहून मला आपली मोठी कींव येते.' असें तो ह्मणाला असतां उत्तंकांनीं तें पाणी घेतलें नाहीं, व त्याची त्यांनीं निष्ठुर शब्दांनीं निर्भर्त्सना केली. याप्रमाणें अनेकवार सांगूनही उत्तंक जेव्हां ऐकेनात व उलट ते अधिक अधिकच रागावूं लागले तेव्हां तो मातंग आपल्या कुत्र्यांसह अदृश्य झाला. तो चमत्कार पाहून उत्तंक फार खजिल झाले आणि श्रीकृष्णानें आपल्याला फसविलें अशी त्यांची खात्री झाली. पुढें लौकरच शंख, चक्र, गदाधारण करणाऱ्या श्रीकृष्णाला त्याच वाटेनें जातांना पाहून ते ह्मणाले, 'कृष्णा, माझ्यासारख्या श्रेष्ठ ब्राह्मणाला त्या मातंगाच्या हातचें पाणी देणें तुला कांहीं उचित नव्हतें.' हें ऐकून श्रीकृष्ण त्यांचें समाधान करून ह्मणाला, 'जें रूप धरून पाणी देणें योग्य होतें त्या रूपानें मीं आपल्याला पाणी दिलें; पाण्याच्या रूपानें उत्तंकाला अमृत दे ह्मणून मीं इंद्राला सांगितलें असतां तो मला ह्मणाला, 'मनुष्यानें अमर होऊं नये ह्मणून त्याला दुसरा एखादा वर दे.' तेव्हां अमृतच त्याला दिलें पाहिजे असा माझा आग्रह पाहून माझी समजूत घालण्यासाठीं तो ह्मणाला, 'जर त्याला अमृतच दिलें पाहिजे असें असेल व जर हे घेण्यास तयार असतील तर मी चांडाल होऊन त्यांला अमृत देतों. ते जर न घेतील तर मी तें त्यांला देणार नाहीं.' असें ह्मणून तें रूप घेऊन तो आपल्याकडे आला व तो अमृत देत असतांना तें आपण घेतलें नाहीं ही आपली मोठी चूक झाली. आतां फिरून आपल्या मनांत जें असेल तें करण्यास तयार आहें. ही आपली कडक तहान मी भागवितों. जेव्हां जेव्हां ह्मणून आपल्याला रानमाळावर पाणी हवेंसें वाटेल त्या ठिकाणीं पाण्यांनीं ओथंबलेले ढग उत्पन्न होऊन ते आपल्याला पाणी देतील व यांना उत्तंकमेघ असें नांव मिळून लोकांमध्यें त्यांचें नांव होईल.' हें ऐकून उत्तंक संतुष्ट झाले. अद्यापि हे उत्तंकमेघ रानमाळावर पाऊस पाडतात. याच उत्तंकांनीं आपले गुरु जे गौतम यांना आपल्या शुश्रूषेनें संतुष्ट केलें व गुरुदक्षिणा देण्याविषयीं आग्रह धरून बसले असतां गुरुपत्नी अहिल्येच्या मागण्यावरून सौदास राजाकडे जाऊन त्याच्या बायकोकडून अमोल्य कुंडलें मागून घेऊन अनेक संकटांतून तीं आणून गुरुपत्नी अहिल्येला दिलीं. व याप्रमाणें गुरुदक्षिणा देऊन ते त्यांच्या ऋणांतून मुक्त झाले.'

---

## ३०१ श्रीकृष्णाचें द्वारकेला आगमन व सर्वांचा शोक. (१४. ९९–६२)

याप्रमाणें उत्तंकाला वर देऊन श्रीकृष्ण नाना पर्वत, वनें, सरोवरें, नद्या, ओलांडून रम्य अशा द्वारकेला सात्यकीसह येऊन पोहोंचला, त्या वेळेला द्वारकेमध्यें रैवतकावर मोठा उत्सव चालला होता. नानाप्रकारानें तो पर्वत शृंगारला होता; उत्तम उ-

त्तम सोन्याचे त्याचप्रमाणें फुलांचे हार, रत्नमय कोश उत्तम वस्त्रें, तसेंच कल्पवृक्ष यांनीं तो पर्वत शृंगारला असून सोन्याच्या दीपमाळांनीं तो फार शोभायमान केला होता. याप्रमाणें रोषणाई केली असल्यामुळें गुहा व झरे अशा अंधाराच्याठिकाणीं देखील चांगल्या दिवसाप्रमाणें लख्ख उजेड पडला होता. नाना प्रकारच्या पताका त्यांना लहान लहान घंटा लावून जिकडे तिकडे उभारल्या असून त्या हवेमध्यें फडकत होत्या. बायकापुरुषांनीं तो अगदीं गच्च भरून राहिला असून त्यांच्या सुस्वर गायनांनीं तो दुमदुमला असल्यामुळें ऋषिगणांनीं भरलेल्या मेरूप्रमाणें तो खुलून दिसत होता. धुंद होऊन आनंदानें या पर्वतावर गात फिरणाऱ्या स्त्रीपुरुषांचा शब्द आकाशाला जाऊन भिडत होता. नानाप्रकारचीं दुकानें व फळाचीं दुकानें यांनीं तो शोभिवंत दिसत होता. नानाप्रकारच्या भक्ष्यभोज्यपेयांची त्या ठिकाणीं रेलचेल उडून राहिली होती. कपड्यालत्त्यांचा व मालांचा तर तेथें ढीग पडून राहिला होता. वीणा, अलगुज, मृदंग यांच्या नादानें तो अगदीं दुमदुमून राहिला होता. गरीब, आंधळे व निराश्रित अशा लोकांना जिकडे तिकडे भीक घालण्याचा सपाटा चालला होता. अशा रीतीनें त्या उत्सवाला फारच रम्यता आली होती. त्याठिकाणीं पुष्कळ पवित्र आश्रम बांधिले असून त्या ठिकाणीं धार्मिक लोक रहात होते. याप्रमाणें या रैवतक पर्वतावर वृष्णीवीर मजेंत उत्सवांत गढले असतां मोठमोठ्या हवेल्यांनीं भरून निघालेल्या देवलोकाप्रमाणें शोभणाऱ्या त्या पर्वताला या वेळीं श्रीकृष्णाच्या आगमनानें विशेषच शोभा आली. सर्व लोकांचा सत्कार घेत, द्वारका सोडून बरेच दिवस झाले असल्यानें मोठ्या आनंदयुक्त अंतःकरणानें तो आपल्या वाड्यांत शिरला. असुरांवर अचाट पराक्रम गाजवून परत येणाऱ्या इंद्राप्रमाणें महत् कृत्य करून आलेल्या या महात्म्या श्रीकृष्णाकडे सर्व यादव भेटावयास आले. त्या सगळ्यांचा सन्मान करून कुशल विचारल्यावर त्यानें मातापितरांना अभिवादन केलें व त्यांनीं आलिंगन देऊन संतुष्ट केल्यावर सर्व यादवांमध्यें तो त्या ठिकाणीं बसला. तेव्हां वसुदेवानें झालेल्या मोठ्या रणासंग्रामाची हकीकत त्याला विचारली, तेव्हां ती इत्थंभूत हकीकत त्यानें त्याचे कानावर घातली. भीष्म सेनापति असतां त्यांच्या सेनापत्याच्या दहा दिवसांत नऊ अक्षौहिणी सैन्य पडून पुढें द्रोणाच्या पांच दिवसांच्या सेनापत्यामध्यें चार अक्षौहिणी सैन्य पडलें, त्याचप्रमाणें कर्णाच्या दोन दिवसांच्या सेनापत्यामध्यें तीन अक्षौहिणींचा फडशा पडला व पुढें बाकीच्या सर्व दोन्ही दळांची वाताहत उडून जाऊन पांडवांखेरीज कोणी उरलें नाहीं, दुर्योधनाला तर तो सरोवरामध्यें लपून बसला असतां भीमानें वर काढून ठार केला, वगैरे सर्व भारतयुद्धाची हकीकत त्यानें सांगितली. याप्रमाणें आपल्या बापापुढें त्या महाभारत युद्धाची हकीकत सांगत असतां त्याच्या मनाला धक्का बसूं नये म्हणून त्याचा नातू जो अभिमन्यू तो मेल्याची हकीकत मात्र गाळून पुढें सर्व तो हकीकत सांगूं लागला. तें पाहून 'कृष्णा, माझ्या बाळाची हकीकत कां गाळलीस,' असें म्हणून सुभद्रा धाडकन खालीं पडली. तें पाहून वसुदेवालाही मूर्छा आली. याप्रमाणें आपल्या नातवाच्या मरणानें शोकाकूल होऊन तो श्रीकृष्णाला म्हणाला, 'कृष्णा, खरें बोलणारा म्हणून लोकांमध्यें तुझा डंका आहे, तेव्हां ही माझ्या नातवाच्या मरणाची हकीकतच मग कां गाळतोस ? आपल्या भाच्याच्या मरणाची हकीकत इत्थंभूत सांग पाहूं. ज्याचे डोळे अगदीं तुझ्यासारखे होते अशा त्या बाळाला शत्रूंनीं मारलें तरी कसें ? वेळ आल्यावांचून राजाची ज्याच्यापुढें मात्रा चालावयाची नाहीं तो हा बाळ मेला तरी कसा ? याची मरणवार्ता ऐकून माझ्या हृदयाचे फुटून शेंकडों तुकडे कसे होत नाहींत ? माझा बाळ रणामध्यें तुला, सुभद्रेला किंवा मला म्हणाला तरी काय ? युद्धांत लढतांना पाठ दाखवून परतला असतां त्याचें तोंड उतरलें नव्हतें ना ? तो मोठा पराक्रमी असून पोरस्वभावानें मोठ्या फुशारकीनें आपली हुशारी तो मला सांगत असे ? द्रोण कर्णादिकांनीं कपटानें तर त्याला मारलें नाहींना ? एवढा पोर पण तो भीष्म कर्णासारख्या रणशूरांना युद्धाला हाका मारीत असे.' याप्रमाणें वसुदेवाला शोकानें अगदीं वेडा बनलेला पाहून श्रीकृष्णालाही फार वाईट वाटून तो म्हणाला, 'रणा-

मध्यें पुढाकार घेऊन लढत असतां त्याचें तोंड अगदीं न उतरतां उलट फार प्रफुल्लित होतें. युद्ध अगदीं निकराचें चाललें होतें, तरी रणांतून त्यानें पाय मागें घेतला नाहीं. शेंकडों हजारों राजांचा मारून फडशा पाडल्यावर कर्णद्रोणांनीं त्याला पेंचांत आणून शेवटीं तो दुःशासनाच्या मुलाच्या तावडींत सांपडला. तो एकामागून एकाला रणामध्यें तोंड देत लढत असतां प्रत्यक्ष इंद्राला देखील रणामध्यें अजिंक्य होता. अर्जुन रणामध्यें नसून संशप्तकांकडे गेला असतां द्रोणादिकांनीं मोठ्या जोराची लगट करून त्याला घेरलें. तेव्हां शत्रूची मोठी कत्तल उडवून तो लक्ष्मणाच्या हातून मेला. तो खात्रीनें स्वर्गाला गेला आहे; तेव्हां त्याच्यासंबंधानें शोक करण्याचें कारण नाहीं. शहाणे लोक संकटामध्यें कधीं खचत नाहींत. शस्त्रपूत अशा उत्तम गतीला तो जाऊन मिळाला आहे. तो मेला असतां या सुभद्रेला फार दुःख होऊन ती मोठ्यानें रडूं लागली व कुंतीला, द्रौपदीला, उत्तरेला पाहून, 'आपला मुलगा कोठें आहे, तुझा नवरा कोठें आहे, वगैरे वेड्यासारखी बरळूं लागली. तेव्हां कुंतीलाही अनावर शोक झाला, परंतु तिनें कालमहिमा लक्षांत घेऊन उत्तरा गर्भार असल्यानें नातवाकडे डोळे लावून रहा, ' म्हणून सुभद्रेचें समाधान केलें. '

याप्रमाणें श्रीकृष्णाचें भाषण ऐकून वसुदेवानें शोक आवरून त्याचें श्राद्ध केलें. श्रीकृष्णानेंही आपल्या आवडत्या भाचाला तिलांजली देऊन साठ लक्ष ब्राह्मणांना अन्नवस्त्र देऊन यथेच्छ पैसा दिला. सोनें, गाई, बिछाने, वस्त्रें वगैरे दिलीं जात असतां ब्राह्मण, 'तुमची भरभराट होवो, ' म्हणून आशीर्वाद देत होते. त्याचप्रमाणें बलरामप्रभृति मंडळींनींही अभिमन्यूला उद्देशून श्राद्ध केलें. त्यांना त्यांच्या मरणामुळें जें दुःख झालें होतें त्यामुळें त्यांच्या मनाला शांति म्हणून नाहींशी झाली.

---

## ३०२ अश्वमेधासाठीं द्रव्यार्जन.
### (१४. ६२--६५)

इकडे पांडवांच्या मनालाही अभिमन्यूच्या मरणामुळें शांति म्हणून ठाऊक नाहींशी झाली होती. उत्तरा तर पतीच्या दुःखामुळें पुष्कळ दिवस अन्नवर्जून होती. त्यामुळें लोकांना फारच वाईट वाटत होतें. तिच्या पोटांतला गर्भ कदाचित् नाश पावेल म्हणून त्यांना भीति पडली. ज्ञानचक्षूनें हें ओळखून व्यास त्याठिकाणीं आले, व कुंति व उत्तरा यांचें समाधान करून ह्मणाले, 'हिला श्रीकृष्णाच्या प्रभावानें माझ्या म्हणण्यावरून महातेजस्वी मुलगा होईल. तो पांडवांच्या मागून पृथ्वीचें पालन करील.' असें सांगून अर्जुनाकडे पाहून त्याला आनंदवीत ते म्हणाले, 'तुला मोठा भाग्यवान नातू होऊन तो खात्रीनें आसागरान्त या पृथ्वीचें पालन करील; श्रीकृष्ण जें पूर्वीं बोलला आहे तें अगदीं खरें होणार. स्वतः मिळविलेल्या अक्षय्य लोकाला तुझा मुलगा गेला असल्यानें त्याच्यासंबंधानें तुह्मांला शोक करण्याचें कारण नाहीं.' याप्रमाणें सर्वांचें समाधान करून पुढें धर्मराजाला अश्वमेध करण्याला सांगून ते गुप्त झाले. धर्मराजही पूर्वीं सांगितल्याप्रमाणें मरुत्तानें पृथ्वीमध्यें झांकून ठेवलेला पैसा आणण्यासाठीं जाण्याचा विचार करून आपल्या भावांना बोलावून तो त्यांना म्हणाला, 'कौरवांच्या हितचिंतक अशा तपोवृद्ध व धर्मशील व्यासांनीं काय सांगितलें तें सर्व तुह्मीं ऐकलेंतच आहे. त्याप्रमाणें करण्याचा माझा विचार आहे. कारण पुढें मागें आमच्या हिताचें तेंच असून परिणामीं तेंच कल्याणकारक आहे. ह्या पृथ्वीवरचा पैसा धुवून गेला असल्यामुळें व्यासांनीं मरुत्ताचा पैसा दाखवून दिला आहे; तेव्हां तुह्मां सर्वांना हें जर पसंत असेल तर आतां त्या खटपटीला लागा.' हें ऐकून भीम हात जोडून म्हणाला. 'व्यासांनीं सांगितलेला पैसा आणण्यासंबंधाचा हा आपला विचार मला पसंत आहे. तो मरुत्ताचा पैसा हातीं लागेल तर आपलें काम झालेंच. ह्मणून कायावाचामनानें भगवान शंकराला व जे तो पैसा राखीत आहेत त्या किन्नरादि त्यांच्या सेवकांना प्रसन्न करून घेऊन तो पैसा आणूं. शंकर प्रसन्न झाले असतां ते प्रसन्न होतीलच.' हें भीमाचें म्हणणें बाकीच्या पांडवांनाही पसंत पडून त्यासाठीं निघण्याचा त्यांनीं निश्चय ठरविला, व चांगला दिवस पाहून सेनेला निघण्याला हुकूम

दिला. ब्राह्मणांकडून स्वस्तिवाचन करवून सुरश्रेष्ठ महेश्वर शंकरांची प्रथम पूजा केल्यावर मोदक, खीर, मांस वगैरे त्याला देऊन ते मोठ्या उत्साहानें निघाले. ते निघाले असतां चांगले चांगले ब्राह्मण व नागरिक यांनीं मोठ्या आनंदानें मंगलमंत्र ह्मटले. नंतर ब्राह्मणांच्या पायां पडून त्यांना व अग्नीला प्रदक्षिणा केल्यावर पुत्रशोकानें खचलेल्या धृतराष्ट्र, गांधारी व कुंती यांना विचारून धृतराष्ट्राचा मुलगा जो युयुत्सु त्याला नगरामध्यें सांभाळण्याला ठेवून पांडव निघाले. उत्साहसंपन्न लोक व वहानें बरोबर घेऊन रथाच्या घरघर आवाजानें पृथ्वी भरून सोडीत मोठ्या उत्साहयुक्त मनानें पांडव निघाले असतां सूत, मागध, भाट हे त्यांचा स्तुतिपाठ गात त्यांच्याबरोबर चालले होते. किरणांमध्यें झांकून निघालेल्या सूर्याप्रमाणें ते आपल्या सैन्याच्यामध्यें दिसत सुद्धां नव्हते. ज्याच्यावर पांढरें शुभ्र छत्र धरलें होतें, असा पौर्णिमेच्या चंद्राप्रमाणें शोभणारा युधिष्ठिर आनंदभरित अशा लोकांचे जयाशीर्वाद घेत चालला. राजाच्या भोंवताल्नून चाललेल्या राजसैन्याच्या कलकलाटानें सर्व आकाश भरून राहिलें होतें. सरोवरें, नद्या, वनें, उपवनें ओलांडून त्या पर्वताकडे आल्यावर ज्या ठिकाणीं तो विपुल पैसा होता त्या मंगलप्रद अशा सपाटीवर तप, विद्या व आत्मनिग्रह यांनीं युक्त अशा ब्राह्मणांना व वेदपारग पुरोहित अग्निवेश यांना पुढें करून त्यांनीं तळ दिला. नंतर शांति करून राजाच्या सभोंवतीं यथान्यायानें सर्व प्रधान वगैरे जमून राहिले. ज्याला सहा रस्ते व नऊ चौक आहेत असा गोठ त्याठिकाणीं तयार केला तशाच मस्त अशा हत्तींसाठींही जागा तयार केल्या होत्या. याप्रमाणें सर्व व्यवस्था झाल्यावर युधिष्ठिरानें चांगला दिवस पाहून कामाला सुरवात करण्यास सांगितल्यावरून उगीच वेळ फुकट जाऊं नये ह्मणून धर्मराजाचें कल्याण इच्छिणारे ब्राह्मण त्याला ह्मणाले, ‘ आजच चांगला दिवस आहे. तेव्हां या मंगल कार्याला आजच आह्मी लागतों, आह्मी आज पाण्यावर रहातों व तूं उपवास कर. ’ याप्रमाणें त्या ब्राह्मणांचें भाषण ऐकून त्या सर्वांनीं त्या दिवशीं उपवास करून शुद्ध होऊन त्या रात्रीं दर्भ पसरून त्यावर पडले. पुढें ब्राह्मणांशीं गोष्टी करण्यांत ती रात्र घालविल्यावर सकाळीं चांगलें उजाडल्यावर चांगल्या प्रसन्न अशा वेळीं ब्राह्मण युधिष्ठिराला ह्मणाले, ‘ शंकराला प्रथम बलि देऊन मग आपण आपल्या कामाला लागूं. हें ऐकून युधिष्ठिरानें गिरीशाला यथान्याय बलि दिला. शुद्ध केलेल्या तुपानें अग्नीला तृप्त करून धौम्यऋषींनीं मंत्र ह्मणून चरु तयार केला; व आवश्यक संस्कार केल्यावर पुष्कळ फुलें घेऊन तीं मंत्रानें पवित्र करून, मोदक, पायस, मांस हीं शंकराला देऊन नानाप्रकारचीं चांगलीं वाईट फुलें व लाह्या त्यांवर टाकल्या. याप्रमाणें सर्व यथासांग करून पुढें त्यांनीं शंकराच्या सेवकांना, त्याचप्रमाणें यक्षेंद्र, कुबेर, मणिभद्र व दुसरे यक्ष व भूतपति यांसाठीं तीळभात, मांस, तीळपाणी व अन्न हीं तयार करून भांड्यांतून नेऊन त्यांपुढें ठेविलीं. त्याचप्रमाणें रात्रींतून संचार करणाऱ्या भूतपिशाच्चांनाही बली देण्यांत आले. धूप व फुलांचा वास यांनीं भरून निघालेल्या त्या शंकराच्या स्थानाला अप्रतिम शोभा आली. याप्रमाणें शंकरांची व त्यांच्या गणांची पूजा केल्यावर व्यासांना पुढें करून राजा रत्नांच्या खाणीकडे चालला. व तेथें, कुबेर, शंख, निधी वगैरे जे खाणीचे रखवालदार होते त्यांना नानाप्रकारचीं फुलें, अपूप ( घारगे ), तीळभात वगैरे देऊन ब्राह्मणांची पूजा करून त्यांच्याकडून स्वस्तिवाचन करविल्यावर युधिष्ठिर तो पैसा खणून काढविण्याच्या कामाला लागला; तेव्हां नानाप्रकारचीं कमंडलु, झाऱ्या, बुधले, कळशा, मालव्या वगैरे हजारों भांडीं त्यानें खणवून वर काढविलीं, व त्या सर्वांना संदुकींमध्यें घातलें. कांहीं कावडीला दोहींकडे अडकवून मनुष्याच्या खांद्यावर दिलीं होतीं व कांहीं हत्ती, घोडे, उंट अशा निरनिराळ्या वहानांवरून घातलीं होतीं. साठ हजार उंट, एकशेंवीस हजार घोडे, एक लक्ष हत्ती व तितकेच रथ, गाड्या व सांडणी भरल्या असून गाढवें व लोक यांची तर गणती नव्हती. उंटावर सोळा, गाडीमध्यें आठ, हत्तीवर चोवीस, ह्याप्रमाणें ज्याच्या त्याच्या मानानें त्यावर ओझें लादलें होतें. याप्रमाणें पैसा घेऊन फिरून

शंकरांची पूजा करून ते चार चार मैलांवर मुक्काम करीत हास्तिनापुराला परत आले.

---

## १०२ परीक्षिताचा जन्म. ( १४. ६६–७० )

इकडे पांडव पैसा आणण्यासाठीं गेले असतां धर्मराजानें जाते वेळीं केलेली विनंति लक्षांत आणून अश्वमेधासाठीं भगवान श्रीकृष्ण सर्व यादव मंडळींना बरोबर घेऊन बलदेवासह हास्तिनापुराला पांडव परत येण्याच्या पूर्वीच आला असतां धृतराष्ट्र व विदुर यांनीं सामोरें जाऊन यथान्याय त्यांचा सत्कार केला. याप्रमाणें श्रीकृष्ण त्याठिकाणीं राहिला असतां उत्तरेला मुलगा झाला. अश्वत्थाम्याचें ब्रह्मास्त्र लागलें असल्यानें तो मेलेलाच जन्मला; त्यामुळें लोकांना प्रथम मुलगा झाला ह्मणून झालेला आनंद एकदम नाहींसा होऊन जिकडे तिकडे स्तब्धता दिसूं लागली. तेव्हां श्रीकृष्ण सात्यकीला बरोबर घेऊन लगबगीनें अंतःपुराकडे निघाला तों कुंती, 'कृष्णा धांव धांव,' ह्मणून त्याच्याकडे रडत धांवत येतांना त्याला दिसली. कृष्णाजवळ येऊन घसा दाटून येऊन ती ह्मणाली, ' कृष्णा, तुला जन्म दिल्यानें देवकी धन्य आहे. आह्मांला गति तूंच असून या कुळाला आधार तूंच आहेस. कृष्णा, अश्वत्थाम्यानें गर्भांतच मारून टाकल्यानें मेलेला उपजलेला हा मुलगा उठीव. कारण त्यानें ब्रह्मास्त्र मंत्रून काडी फेंकली असतां 'मेलेला जन्माला आला तरी त्या मुलाला मी उठवीन,' ह्मणून तूं प्रतिज्ञा केली आहेस. त्या ह्या उपजत मेलेल्या मुलाला उठवून आह्मां सगळ्यांना तारणारा तूंच आहेस. पांडवांचे त्याचप्रमाणें माझे प्राण याच्यावर गुंतले असून आमच्या पूर्वजांचे त्याचप्रमाणें तुझ्या लाडक्या अभिमन्यूचे पिंड याच्यावर अवलंबून आहेत. ' लाडके, तुझा मुलगा आपल्या मामाच्या घरीं जाऊन त्या ठिकाणीं धनुर्विद्या, सर्व अस्त्रें व नीतिशास्त्र शिकेल, ' असें मागें अभिमन्यु उत्तरेला बोलल्याचें तिनें मला सांगितलें आहे. स्नेहामुळें बोललेलें अभिमन्यूचें हें भाषण खरें करणें तुझ्या हातीं आहे. आह्मी हात जोडून तुला विनवितों. या कुळाच्या कल्याणासाठीं तूं आमचें एवढें काम कर. ' असें ह्मणून हात वर करून ती व तिच्याबरोबर असलेल्या दुसऱ्या बायका, ' तुझा भाचा मेलेला उपजला, ' ह्मणून मोठ्यानें रडत धाडकन् खालीं पडल्या. तेव्हां कुंतीला उचलून श्रीकृष्णानें तिचें समाधान केलें. सुभद्रा मोठ्यानें रडत आपल्या भावाला ह्मणाली, ' कृष्णा, माझ्या लाडक्या अभिमन्यूचा मुलगा या सर्व कुळाचा नाश झाला असतां मेलेला उपजला आहे पहा. भीमांना मारण्यासाठीं उचलेली काडी उत्तरा, अर्जुनमहाराज व मी यांवर पडून तिनें हें माझें हृदय फाडून टाकलें आहे; माझ्या मुलाला व आज याला मेलेला पाहून मी जिवंत तरी कशी आहें ! अभिमन्यूच्या मुलाला उपजत मेलेला पाहून आज पांडव काय म्हणतील ? अश्वत्थाम्यानें आज पांडवांना खरोखरच लुबाडलें आहे ! कृष्णा, अभिमन्यु सर्व भावांचा फार लाडका होता. अश्वत्थाम्याच्या अस्त्रानें त्यांना याप्रमाणें जिंकून टाकल्यामुळें या उपजत मेलेल्या अभिमन्यूच्या मुलापेक्षां त्यांना आणखी दुसरें दुःख काय होणार ? ह्मणून मी तुझ्या पायांवर डोकें ठेवून विनवितें. अश्वत्थामा खवळून जाऊन पांडवांचे गर्भ मारून टाकीत असतां ' या भटाचा मी हिरमोड करीन. अभिमन्यूच्या मुलाला मी उठवीन,' असें तूं ह्मणाला होतास तें तुझें वचन लक्षांत घेऊन तुझें सामर्थ्य ओळखून मी तुला हात जोडतें. याला एकदांचा जिवंत कर. पूर्वी वचन देऊन आज जर तें खरें न करशील तर मी मेलें समज. हा जर आज उठणार नाहीं तर तुला घेऊन मला काय करावयाचें आहे ! तूं धर्मात्मा व सत्यप्रतिज्ञ असल्यानें आपला शब्द खरा कर. हे तीन लोक जरी मरून पडले तरी त्याला उठविण्याचें तुझ्या अंगांत सामर्थ्य आहे, मग आपल्या लाडक्या भाच्याचा मुलाला तूं कसा उठविणार नाहींस ? तुझा प्रभाव मी जाणतें म्हणूनच मी तुझ्यापुढें तोंड पसरतें. पांडवांवर एवढी कृपा कर. बहीण म्हणून, मुलगा मेला आहे म्हणून किंवा ही मला शरण आली आहे म्हणून माझ्यावर एवढी दया कर. '

असें ती म्हणाली असतां श्रीकृष्ण फार कष्टी होऊन 'ठीक आहे' म्हणाला. त्यामुळें उन्हानें तापलेले लोक ज्याप्रमाणें पाण्यानें शांत व्हावे त्याप्रमाणें तेथें जमलेल्या सर्वांना मोठा आनंद झाला. नं-

तर श्रीकृष्ण लगबगीनें बाळंतघराकडे गेला. त्या खोलींत जिकडे तिकडे पांढरीं शुभ्र फुलें पसरलीं असून सर्व दिशांना पाण्यानें भरलेले घडे ठेविले होते. तुपानें पेटविलेल्या टेंभुर्णीच्या कोलती त्या ठिकाणीं जळत असून तेथें शिरस पसरले होते. नानाप्रकारचीं लखलखीत हत्यारें जिकडे तिकडे ठेविलीं असून ह्मातान्या बायका शुश्रूषेला उभ्या होत्या. मोठे दक्ष व हुषार असे वैद्य त्या ठिकाणीं हजर होते. तसेंच रक्षोविनाशक पुष्कळ द्रव्यें त्यांत निष्णात अशा लोकांनीं तयार ठेविलेलीं श्रीकृष्णाच्या दृष्टीस पडलीं. याप्रमाणें ते बाळंतघर पाहून आनंद पावून श्रीकृष्ण ठीक ठीक म्हणाला. द्रौपदीनें झटकन् उत्तरेकडे जाऊन, ' हा तुझा सासरा पुराणऋषि, अचिंत्यात्मा मधुसूदन तुझ्याकडे येत आहे, ' म्हणून तिला सांगितलें. तें ऐकून रडें आंवरून दीनवाणीनें उत्तरा त्याला म्हणाली, 'कृष्णा, बाळाला आह्मी मुकलों आहों पहा ! मी तुझ्या पायां पडतें. याला कसेंही करून उठीव. त्यावेळींच ती अश्वत्थाम्यांची काडी ह्या जन्मदात्या आईला मारूं दे असें ह्मणून तुह्मी गप्प बसला असतां तर तेव्हांच मी मरून गेलें असतें व आज हा प्रसंग आला नसता. त्या द्रोणपुत्रांना तरी याला गर्भांत मारून काय मिळालें कोणाला ठाऊक. आज हें मूल उठणार नाहीं तर मी कांहीं प्राण ठेवणार नाहीं. याची मी पुष्कळ आशा धरून बसलें होतें. ती सर्व आज लयाला गेल्यानें हें जिवाचें ओझें तरी वाहून मला काय करावयाचें आहे ? कृष्णा, या मुलाला मांडीवर घेऊन मी तुला नमस्कार करीन अशी मीं आशा केली होती. पण ती आज निष्फळ झाली आहे. अभिमन्युमहाराजांच्या मरणाच्या वेळीं माझ्या हृदयामध्यें ज्या आशा होत्या त्या सर्व आज लयाला गेल्या आहेत. ते आपल्याला फार आवडते होते. त्यांचा मुलगा आज ब्रह्मास्त्रानें मरून पडला आहे. त्यांच्याप्रमाणें हाही मोठा कृतघ्न व निर्दय दिसतो; कारण यानें पांडवांचें वैभव सोडून आज यमाच्या घराकडे धांव घेतली ! पूर्वी अभिमन्युमहाराज रणांत पडतील तर लगोलग त्यांच्यामागें जाईन अशी मीं शपथ घेतली होती; परंतु निष्ठुर अशा मीं जिवाच्या आशेनें ती शपथ पाळली नाहीं. आतां जर मी त्यांकडे गेलें तर ते मला काय ह्मणतील ? '

याप्रमाणें बिचारी उत्तरा मुलासाठीं वेडी होऊन दीनवाणें शोक करीत खालीं पडली. याप्रमाणें तिला पुत्रशोकानें कष्टी होऊन खालीं उघडी पडलेली पाहून कुंती व दुसऱ्या भरतस्त्रियाही मोठ्यानें रडूं लागल्या व पांडवांच्या वाड्यामध्यें क्षणभर एकच कल्होळ उडून राहून त्याकडे बघवेनासें झालें होतें! पुत्रशोकानें कष्टी झालेली उत्तरा अतिदुःखानें क्षणभर बेशुद्ध झाली. पुढें शुद्धीवर येऊन मुलाला मांडीवर घेऊन ती ह्मणाली, ' धर्म ज्यांना पूर्ण कळत होता अशांचा तूं मुलगा असून या वृष्णिश्रेष्ठ श्रीकृष्णाला नमस्कार न करण्यांत तुझ्या हातून केवढा अधर्म घडत आहे हें तुला कळत नाहीं काय? बाळा ! त्यांच्याकडे जाऊन माझा निरोप सांग कीं, वेळ आल्यावांचून मनुष्य कधीं मरत नाहीं ह्मणूनच त्याप्रमाणें आपल्याला मुकून व हल्लीं मुलाला मुकून देखील आतां मला येथें कांहींच उरलें नसतां मरावयाचें सोडून मी जीव धरून आहें; धर्मराजांची आज्ञा घेऊन मी घोर विष खाण्याला किंवा अग्नींत उडी घेण्याला सुद्धां तयार आहें. परंतु त्यानें सुद्धां मी मरेन कीं नाहीं हें सांगवत नाहीं; कारण आज पतिपुत्राला मुकले असतां देखील माझें हें हृदय फुटून याचे हजारों तुकडे होत नाहींत. शोकसागरामध्यें बुडून अगदीं दीन होऊन शोकामुळें आसवांनीं भिजून निघालेल्या या तुझ्या पणजीकडे, बिच्याऱ्या या आजीकडे त्याचप्रमाणें बाण लागून घायाळ झालेल्या मृगीसारख्या मजकडे पहा ! बाळा ऊठ आणि हुबेहुब त्यांच्यासारखा असणारा सर्वांचा स्वामी जो भगवान श्रीकृष्ण याकडे पहा. ' याप्रमाणें तिला शोकाकुल होऊन फिरून खालीं पडलेली पाहून सर्व स्त्रियांनीं फिरून तिला उठविलें. तेव्हां कशीबशी उठून श्रीकृष्णाला तिनें ओणव्यानें नमस्कार केला. तिचा तो मोठा विलाप ऐकून पाण्याला उपस्पर्श करून मोठ्यानें, ' हा पहा त्याला उठवितों, ' असें ह्मणून श्रीकृष्णानें ब्रह्मास्त्र काढून घेतलें. तो ह्मणाला, ' उत्तरे, मी आजपर्यंत कधीं थट्टेंत देखील खोटें बोललों नाहीं किंवा युद्धांतून कधीं पा-

य मागें घेतला नाहीं. धर्म व विशेषेंकरून ब्राह्मण मला फार प्रिय आहेत. अर्जुनाशीं मीं कधीं विरोध केला नाहीं. तेव्हां सत्य व धर्म माझ्या ठिकाणीं कायम असून कंस व केशी यांना मीं धर्मानें मारलें असेन तर तो धर्म पुढें उभा राहून हा अभिमन्यूचा उपजत मेलेला मुलगा उठेल. ' याप्रमाणें तो बोलला असतां त्या मुलामध्यें हळूहळू हालचाल दिसूं लागली. श्रीकृष्णानें ब्रह्मास्त्र काढून घेतल्यावर त्या मुलाच्या तेजानें ती जागा प्रकाशित दिसूं लागली. सर्व राक्षस तें घर सोडून गेले. ' कृष्णा, शाबास, शाबास, ' ह्मणून आकाशवाणी झाली. तें अस्त्र ब्रह्मदेवांकडे निघून गेलें. मुलामध्यें प्राण येऊन हालचाल दिसूं लागली. भरतस्त्रियांचा आनंद गगनांत मावेना. श्रीकृष्णाच्या सांगण्यावरून ब्राह्मणांनीं स्वस्तिवाचन ह्मटलें. सर्व भरतस्त्रिया पैलपार जाण्याला नांव मिळाल्याप्रमाणें आनंदभरित होऊन कृष्णाची वाहवा करूं लागल्या. मल्ल, नट ज्योतिषी, सुखशयित विचारणारे, सूत, मागध हे सर्व कुरुवंशाचे पोवाडे गात श्रीकृष्णाची स्तुति करूं लागले. उत्तरेनेंही उठून आपल्या मुलासह श्रीकृष्णाला नमस्कार केला. तेव्हां श्रीकृष्णानें मोठ्या आनंदानें पुष्कळ रत्नें त्या मुलाला नजर करून, पांडवकुल पूर्ण क्षयाला पावलें असतां (परिक्षीण झालें असतां) हा झाला असल्यानें परीक्षित् असें त्याचें नांव ठेविलें. तो दिवसेंदिवस वाढत राहून सर्व लोकांचा आनंद वाढवीत राहिला. तो होऊन एक महिना झाल्यावर पांडव पुष्कळ रत्नें घेऊन नगराजवळ आले. ते आलेले ऐकून सर्व वृष्णीवीर त्यांना सामोरे गेले. लोकांनीं फुलांनीं, नानाप्रकारच्या पताकांनीं व ध्वजांनीं हास्तिनापुरांतील सर्व घरें शृंगारून काढलीं, देवळांमधून नानाप्रकारच्या पूजा पांडवांच्या कल्याणासाठीं करण्यास विदुरांनीं आज्ञा दिली. राजमार्ग फुलांनीं भरून निघाले होते. नाचणारे नर्तक व गवई यांचा एकच शब्द समुद्राच्या घोंघों आवाजाप्रमाणें त्या शहरांत भरून राहिला होता. क्षणभर तें शहर कुबेरनगरीच बनून राहिली. भाट, स्तुतिपाठक व स्त्रिया यांनीं शहरांतील निरनिराळ्या कानाकोपऱ्यांना सुद्धां शोभा आली होती. नगराच्या प्रत्येक भागामध्यें पताका हवेमध्यें फडकत होत्या. जणूं काय त्या पांडवांना उत्तरदक्षिण दिशाच दाखवीत आहेत. अधिकाऱ्यांनीं सर्व राष्ट्रामधून, 'पांडव नानाविध रत्नें घेऊन आल्यामुळें आजचा दिवस सुटींत आनंदात घालवावयाचा, ' ह्मणून चोहोंकडे दांडोरा पिटविला.

## २०४ अश्वमेधदीक्षा व वारूचें पृथ्वीपर्यटण. (१४. ७१-७८)

पांडव नगराजवळ आले असतां श्रीकृष्ण, प्रधानमंडळी व इष्टमित्र त्यांना भेटण्यासाठीं सामोरी गेली, व त्यांची भेट झाल्यावर सर्व मिळून हास्तिनापुरामध्यें शिरले. मिळवून आणलेलें द्रव्य सर्वांच्या पुढें करून पांडव शहरामधून मोठ्या आनंदानें वाड्याकडे जाऊन धृतराष्ट्र, गांधारी, कुंति यांना यथाक्रमानें वंदन करून विदुरांचा सत्कार केल्यावर युयुत्सूला भेटले; नंतर त्यांना परिक्षिताच्या जन्माची हकीकत कळल्यावर त्यांनीं श्रीकृष्णाची त्याबद्दल फार प्रशंसा केली. पुढें कांहीं दिवसांनीं व्यास हास्तिनापुराला आले. तेव्हां त्यांचा यथायोग्य सत्कार होऊन कुशल प्रश्न झाल्यावर युधिष्ठिर त्यांना ह्मणाला, ' महाराज, आपल्या प्रसादानें हीं जीं रत्नें आणिलीं आहेत यांचा अश्वमेधामध्यें उपयोग व्हावा अशी इच्छा आहे; तेव्हां याला आपली आज्ञा असावी. आह्मी सर्व आपल्या व श्रीकृष्णाच्या स्वाधीन आहों. ' हें ऐकून व्यास ह्मणाले, ' राजा, अश्वमेधाला माझी पूर्ण संमति आहे. काय तयारी करावयाची असेल ती कर. हा अश्वमेध सर्वपापनाशक असल्यानें तूं हा करून सर्वपापांपासून मुक्त होशील. ' याप्रमाणें व्यास ह्मणाल्यावर अश्वमेधाचा निश्चय करून तो श्रीकृष्णाकडे येऊन ह्मणाला, ' हे श्रीकृष्णा, तुला जन्म दिल्यानें देवकी धन्य आहे. मी तुला विनंति करतों त्याप्रमाणें कर. तुझ्या प्रभावानेंच मिळालेले भोग आह्मी भोगीत आहों. तुझ्या पराक्रमानें व बुद्धीनें आह्मीं ही पृथ्वी जिंकली आहे; तेव्हां तूंच आह्मांला सर्वांत थोर असल्यामुळें तूं ही यज्ञदीक्षा घे. तूं यज्ञ केल्यानें मी पापमुक्त होणार आहें. तूंच यज्ञ आहेस, तूंच अक्षर आहेस, तूंच धर्म आहेस, तूंच

प्रजापति आहेस; एवढेंच नव्हे, तर सर्व भूतमात्रांची गति तूंच आहेस.' हें ऐकून श्रीकृष्ण ह्मणाला, ' हे महाबाहो, हें बोलणें तुला उचितच आहे; परंतु सर्वांना आधार तूंच आहेस. कुरुवीरांमध्यें धर्माच्या योगानें तूं आज फार झळकतो आहेस. त्या सर्वांना तूं मागें सारलें आहेस. तूं आमचा राजा असून आह्मांला वडील आहेस. तेव्हां माझ्या सांगण्यावरून तूं हा यज्ञ कर. आह्मांला जी कामगिरी सांगावयाची असेल ती सांग. तूं सांगशील तें करण्याला आह्मी तयार आहों. तूं यज्ञ केल्यानें तुझ्या सर्व भावांनीं तो केल्यासारखा होणार आहे. '

हें ऐकून युधिष्ठिरानें व्यासांना बोलावून त्यांना आपल्याला अश्वमेध दीक्षा देण्यास सांगितलें. तेव्हां व्यास ह्मणाले, ' मी, पैल व याज्ञवल्क्य तुझा यज्ञविधि त्या त्या प्रसंगीं योग्यरीतीनें पार पाडण्याला तयार आहों. चैत्रीपौर्णिमेला तुला यज्ञदीक्षा देऊं. यज्ञाची सर्व सामुग्री तयार असूंदे. अश्वविद्या जाणणाऱ्या सूतांना आणि ब्राह्मणांना तुझ्या यज्ञाला योग्य असा घोडा निवडून काढण्यांस सांग. त्याला या पृथ्वीवर शास्त्रोक्त रीतीनें सोडून तुझें झगझगीत वैभव दाखवीत चोंहोंकडून फिरून येऊंदे.' असें ते ह्मणाले असतां युधिष्ठिरानें त्याप्रमाणें सर्व तयारी करून त्यांच्या कानावर घातलें; तेव्हां व्यास ह्मणाले, ' ज्यावेळीं जशा रीतीनें तुला दीक्षा द्यावयाची त्या रीतीनें दीक्षा देण्याला आह्मी तयार आहों. काष्ठखड्ग, कूर्च व दुसरीं यज्ञद्रव्यें सोन्याचीं करीव. त्यामध्यें जीं कांहीं थोडीं रुप्याची चालतील तीं रुप्याचीं करीव, घोड्याला पृथ्वीपर्यटण करून येण्याला यथाशास्त्ररीतीनें सोडून त्याच्या रक्षणाला कोणी तरी चांगला मनुष्य दे.' युधिष्ठिर ह्मणाला,' घोड्याबरोबर त्याच्या रक्षणाला कोणाला पाठवावें तें आपणच सांगा.' तेव्हां व्यास ह्मणाले, ' भीमसेनाहून धाकटा, सर्व धनुर्धरांमध्यें श्रेष्ठ, वाटेल त्या प्रसंगाला तोंड देण्याला समर्थ असा धैर्यशाली अर्जुन त्याच्यामागून जाऊन त्याचें पालन करील. तो निवातकवचाचा फडशा पाडणारा पृथ्वी जिंकण्याला समर्थ आहे. त्याचीं अस्त्रें, त्याचें धनुष्य, त्याचा भाता, त्याचें चिलखत हीं सर्व दिव्य आहेत. तो ह्या घोड्याला चोंहोंकडे फिरवून आणील. भीमसेन व नकूल राष्ट्राचें रक्षण करून सहदेव घरची व्यवस्था पाहील. ' हें व्यासांचें भाषण ऐकून अर्जुनाला घोड्याबरोबर जाण्यास सांगून युधिष्ठिर त्याला ह्मणाला, ' अर्जुना, या घोड्याबरोबर जाऊन त्याचा नीट संभाळ कर. जे तुझ्यापुढें युद्धाला तयार होऊन येतील त्यांच्याशीं भांडण न होईल अशी व्यवस्था ठेव. मी हा यज्ञ करीत असून तुह्मी याला यावें ह्मणून गोडीनेंच त्यांना सांगून काम शेवटास ने.' याप्रमाणें अर्जुनाला सांगून व्यासांच्या सांगण्याप्रमाणें भीम व नकुल यांकडे नगराचें संरक्षण करण्याची कामगिरी देऊन धृतराष्ट्राच्या सल्ल्यानें घरची व्यवस्था त्यानें सहदेवाकडे सोंपविली. दीक्षा घेण्याची वेळ आली असतां यज्ञाच्या पूर्वींचा विधि आटोपल्यावर व्यासांनीं स्वतः शास्त्रोक्त रीतीनें अश्वमेधासाठीं घोडा सोडला. धर्मराज दीक्षा घेऊन कृष्णाजिन व दंड धरून पीतांबर नेसला असतां यज्ञामधील प्रत्यक्ष प्रजापतीप्रमाणें झळकत होता. ऋत्विज याच्यासारखेच वस्त्रें वगैरे नेसून तयार झाले. घोड्याच्यामागें जाण्याला तयार झालेला अर्जुनही दैदीप्यमान अग्नीप्रमाणें झळकत होता. हा श्वेताश्व अर्जुन धर्मराजाच्या आज्ञेनें त्या कृष्णवर्ण यज्ञीय घोड्याच्या मागून हाताला पंजा बांधून धनुष्याचा टणत्कार करीत निघाला. याप्रमाणें तो घोड्याच्या मागून निघाला असतां शहरांतील सर्व लोक मुलांबाळांसह त्याला पहाण्याला आले. त्या घोड्याला व त्याला पहाण्याला जमलेल्या लोकांची इतकी गर्दी झाली होती कीं, त्यांच्या एकमेकांच्या घर्षणापासून अग्नि पडत होता. त्या ठिकाणीं उठणारा शब्द आकाशाला जाऊन भिडत होता. ' हा तेजःपुंज घोडा चालला असून याच्या मागून हा उत्तम धनुष्य घेऊन महाबाहु अर्जुन जात आहे,' असें कोणी ह्मणत होते. ' कांहीं संकट न येतां खुशाल तूं जाऊन परत ये,' असा कोणी याला आशीर्वाद देत होते. ' ह्या गर्दींत अर्जुन आह्मांला दिसत नाहीं; फक्त त्याचें धनुष्य मात्र आह्मांला दिसत आहे. हें त्याचें चळकांप उत्पन्न करणारें नांवाजलेलें गांडीव पहा, वाटेंत कांहीं विघ्न न येतां खुशाल परत आलेला याला आह्मी खात्रीनें पाहूं,' याप्रमाणें कांहीं बायकापुरुषांच्या तोंडून कर्णमधुर शब्द ऐकत

तो चालला होता. यज्ञकर्मामध्यें कुशल असे याज्ञवल्क्याचे शिष्य शांतिविधीसाठीं अर्जुनाबरोबर होते. तसेंच आणखी पुष्कळ ब्राह्मण व क्षत्रिय त्याच्याबरोबर होते. पांडवांनीं आपल्या अस्त्रप्रभावानें जिंकलेल्या पृथ्वीवरून तो घोडा वाटेल तिकडे फिरत चालला असतां निरनिराळ्या ठिकाणीं निरनिराळ्या लोकांशीं अर्जुनाचें युद्ध होऊन त्यांत त्यानें त्यांचा पूर्ण पराभव केला. पुष्कळ किरात, म्लेंच्छ व दुसऱ्या जातीचे लोक व ज्यांचा रणांत यांच्या हातून पूर्वी मोड झाला होता असे दुसरे पुष्कळ आर्यराज उत्साहसंपन्न अशा लोकांनिशीं युद्धाची खुमखुमी बाळगून अर्जुनाशीं सामना देण्याला तयार होऊन आले असतां त्या सर्वांचा अर्जुनानें यथास्थित समाचार घेतला.

प्रथम ज्यांचें अर्जुनाशीं पूर्वीपासूनच वैर होतें, अशा त्रिगर्तामधल्या महारथ म्हणविणाऱ्यांशीं अर्जुनाचा प्रसंग जुडला. हे वीर भारतयुद्धांत मारलेल्या त्रिवर्गाचे मुलगे, नातू वगैरे होते. तो यज्ञियवारू आपल्या राष्ट्राच्या सरहद्दीवर आल्याचें ऐकून ते चिलखतें वगैरे चढवून तयार होऊन त्याला घेरून पकडण्याच्या तयारीनें आले. तेव्हां अर्जुनानें प्रथम त्यांना गोडीगुलाबीच्या गोष्टी सांगितल्या; परंतु त्याला न जुमानतां रागाच्या तावडींत जाऊन जेव्हां ते त्यावर बाण सोडूं लागले तेव्हां त्यानें त्यांच्याशीं युद्ध केलें. परंतु धर्मराजानें कोणाशीं अधिक प्रसंग न करतां ज्यांचें बांधव कुरुक्षेत्रीं मेले होते अशा राजाशीं गोडीगुलाबीनें वागण्यास सांगितलें असल्यामुळें त्यांना त्यानें, 'तुम्हांला आपले प्राण पाहिजे असतील तर परता' म्हणून सांगितलें. त्यालाही जेव्हां ते जुमानीनांत तेव्हां त्रिगर्तांचा राजा जो सूर्यवर्मा त्यावर त्यानें बाणांचा वर्षाव केला. सूर्यवर्म्यांनेंही हजारों बाण अर्जुनावर सोडून आपलें हस्तलाघव दाखविलें, परंतु ते सर्व अर्जुनानें मध्येंच कापून काढले. त्याचा धाकटा भाऊ केतुवर्मा हाही आपल्या भावासाठीं अर्जुनावर चालून येत होता. त्यावरही अर्जुनानें तीक्ष्ण बाण सोडले. तेव्हां धृतवर्मा रथांत बसून एकदम येऊन अर्जुनावर बाणांचा वर्षाव करूं लागला. त्या लहान मुलाची चपळाई पाहून अर्जुन फार संतुष्ट झाला. तो बाण काढून मनुष्याला केव्हां लावीत होता हें सुद्धां कळत नव्हतें. फक्त एकसारखा बाणांचा वर्षाव चाललेला मात्र दिसत होता. मनामध्यें अर्जुन त्याची वाहवा करीत होता व क्षणभर त्याला जयानें आनंद होऊं दिला. याप्रमाणें अतुल पराक्रमी अर्जुन त्याची गय करून त्याला राखीत असतां धृतवर्म्यानें एक देदीप्यमान बाण अर्जुनावर सोडला. तो जाऊन त्याच्या हाताला लागल्यामुळें चक्कर येऊन अर्जुनाच्या हातून गांडीव खालीं गळून पडलें. तें पडत असतां इंद्रधनुष्याप्रमाणें दिसत होतें. याप्रमाणें तें मोठें धनुष्य अर्जुनाच्या हातून गळून पडलें असतां धृतवर्म्यानें मोठ्यानें हासून गर्जना केली. तेव्हां अर्जुनानें खवळून जाऊन हाताचें रक्त पुसून दुसरें धनुष्य घेऊन शरवर्षाव सुरू केला. सैन्यामध्यें एकच हाहाकार उडून जाऊन तो शब्द गगनाला जाऊन भिडला. याप्रमाणें अर्जुन काळासारखा खवळला असतां त्रिगर्तवीर धृतवर्म्याचें रक्षण करण्याकरितां पुढें सरसावून त्याच्या भोंवतीं जमले; तेव्हां अर्जुनानें त्यांपैकीं अठरांना मारून पाडलें व बाकीच्यांना बाणांनीं जर्जर केलें. तेव्हां त्याच्या बाणांनीं पीडले जाऊन हिरमोड होऊन त्रैगर्त महारथी 'आह्मी सर्व आपले आज्ञाधारी सेवक आहों,' असें ह्मणून अर्जुनाला शरण आले. तेव्हां आपलें वर्चस्व त्यांच्याकडून कबूल करवून तो पुढें निघाला. पुढें घोडा प्राग्ज्योतीच्या सरहद्दीवर येऊन तेथें स्वच्छंदपणें फिरत असतां रणकर्कश भगदत्ताचा मुलगा वज्रदत्त यानें अर्जुनाशीं युद्ध केलें. नगरांतून बाहेर पडून घोड्याला धरून त्याला तो नगराकडे धरून घेऊन चालला. तें पाहून गांडीव ताणीत अर्जुन त्याच्यामागून धांवला. अर्जुनाचे बाण आपल्यावर येऊं लागलेले पाहून वज्रदत्त घोड्याला सोडून अर्जुनावर चालून गेला व त्यानें आपला पर्वतप्राय मस्त हत्ती त्यावर सोडला. अंकुशानें टोंचून तो त्याला त्यावर घेऊन चालला असतां तो आकाशांत उडतोच आहे कीं काय असा दिसत होता. त्याला आपल्यावर तुटून पडतांना पाहून अर्जुनानें जमिनीवरूनच त्याच्याशीं युद्ध चालविलें. जोराच्या टोळधाडीप्रमाणें अग्नीसारखे तोमर वज्रदत्तानें अर्जुनावर सोडले. अर्जुनानें आपल्या बाणांनीं आकाशांतच त्यांचे दोन

तुकडे करून टाकले. याप्रमाणें तोमरांची वाट लागलेली पाहून वज्रदत्तानें बाणांची रांगच्या रांग अर्जुनावर सोडली. तेव्हां अर्जुनानेंही खवळून जाऊन त्याच्यावर नेमके बाण सोडले; ते लागून वज्रदत्त खालीं पडला; परंतु तो बेशुद्ध झाला नाहीं. अर्जुनाचे बाण लागून त्या हत्तीच्या शरीरांतून चोहोंकडून रक्त निघत असतां काव मिसळलेले हजारों झरे ज्यामधून निघताहेत अशा पर्वताप्रमाणें तो दिसत होता.

याप्रमाणें त्रिरात्र अर्जुनाचें युद्ध चाललें होतें. चवथे दिवशीं मोठ्यानें हासून गर्जत वज्रदत्त त्याला म्हणाला, ' अर्जुना, आज तूं कांहीं माझ्या हातून जिवंत सुटत नाहींस. तुला मारून मग मी आपल्या तातांना यथाविधि पाणी देईन. जो तुझ्या बापाचा मित्र होता, अशा माझ्या वृद्ध ताताला तूं मारलेंस खरें; परंतु आज या त्याच्या मुलाशी प्रसंग आहे. ' असें म्हणून त्यानें आपला हत्तीला चुचकारून अर्जुनावर सोडला. तेव्हां पर्वताला झांकून टाकणाऱ्या मेघाप्रमाणें आपल्या सोंडेंतून तुषार बाहेर सोडून त्यानें अर्जुनाला भिजवून काढलें. याप्रमाणें मोठ्यानें गर्जत तो अर्जुनावर तुटून पडला असतां गांडीवधारी अर्जुन आपल्या कार्याला आलेलें विघ्न व पूर्ववैर मनांत आणून फार रागावला; आणि त्यानें बाणांनीं तो हत्ती भरून काढला. तेव्हां कांटे उभारलेल्या साळुंकीप्रमाणें तो हत्ती दिसत होता. याप्रमाणें आपल्या हत्तीची गति अगदीं कुंठित केलेली पाहून संतापून वज्रदत्तानेंही त्यावर बाण सोडले; परंतु अर्जुनापुढें त्याचें कांहीं चाललें नाहीं. पुढें मर्मस्थळावर अर्जुनाचे बाण लागून, वज्र लागून घायाळ झालेल्या पर्वताप्रमाणें तो हत्ती खालीं आला. व त्याबरोबरच वज्रदत्तही खालीं आला. तेव्हां अर्जुन त्याला ह्मणाला, ' भिऊं नकोस, ही कामगिरी माझ्यावर सोंपवितांना, कोणाला न मारतां नुसता त्यांचा पराभव कर ह्मणजे बस्स आहे, ' असें युधिष्ठिर महाराजांनीं सांगितलें असल्यामुळें मी तुला मारीत नाहीं. ऊठ, भिऊं नकोस. आतां खुशाल परत जा. चैत्री पौर्णिमेला मोठा अश्वमेध होणार आहे, ते वेळीं तूं त्या यज्ञाला ये. ' असें त्याला सांगून अर्जुन पुढें निघाला. पुढें तो घोडा सिंधुदेशाच्या हद्दींत गेला असतां भारतयुद्धांत मेलेल्या सैंधववीरांच्या मुलानातवाशीं अर्जुनाचें युद्ध झालें. अर्जुन आपल्या हद्दींत यज्ञिय घोडा घेऊन आल्याची बातमी ऐकून पूर्व वैर स्मरून ते त्याच्याभोंवतीं जमले. व आपलीं नांवें, गोत्रें व नाना अचाट कर्मे कळवून त्यांनीं त्यावर बाणांचा मारा सुरू केला. निवातकवच, संशप्तक एवढेच नव्हे तर प्रत्यक्ष यांचा राजा जयद्रथ यांना यमलोक दाखविला होता तरी न भितां हजारों घोडे व रथ यांनिशीं मोठ्या आनंदानें त्याला घेरून जयद्रथाच्या मरणाचा सूड घेण्यासाठीं त्यांनीं त्यावर पावसाप्रमाणें शरवर्षाव चालविला; त्यायोगानें पिंजऱ्यांत फिरणाऱ्या एखाद्या पक्ष्याप्रमाणें अर्जुन दिसत होता. तें पाहून जिकडे तिकडे एकच हाहाकार उडून राहिला. याप्रमाणें शरजालांनीं तो झांकून निघाला असतां त्याच्या हातांतून गांडीव व पंजा गळून खालीं पडलीं. व मूर्च्छा येऊन तो निचेष्ट पडला. इकडे सैंधवांनीं त्याच्यावर बाणांचा मारा चालविलाच होता. त्याला बेशुद्ध झालेला पाहून देवांनीं घाबरून जाऊन शांति चालविली. देव, ऋषी, सप्तर्षी व ब्रह्मर्षी यांनीं त्याला विजय येण्यासाठीं जप चालविले. याप्रमाणें देवांनीं त्याच्या तेजामध्यें भर टाकली असतां तो फिरून युद्धाला उठून तयार झाला. तो धनुष्य ओढीत असतां त्यापासून तोफेप्रमाणें मोठ्यानें शब्द निघत होता. त्याच्या बाणांनीं टोळांनीं झांकून गेलेल्या झाडांप्रमाणें झांकून गेलेले ते सैंधववीर त्या शब्दानें घाबरून जाऊन भयभीत होऊन चोहोंकडे सैरावैरा पळूं लागले. त्या सर्वांवर भराभर बाण सोडीत कोलतीप्रमाणें गरगर तो फिरत होता. परंतु लवकरच पळालेले सैंधववीर मरणासाठीं फिरून युद्धाला तयार होऊन येतांना पाहून अर्जुन त्यांना ह्मणाला, ' आपली शिकस्त करून माझ्याशीं युद्ध करून जय मिळविण्याला झटा. आपलीं सर्व कामें उरकून घ्या. तुमची मला धडगत दिसत नाहीं. हा मी तुमची खुमखुमी जिरवितों पहा. ' असें तो त्यांना ह्मणाला तरी आपल्या भावाच्या आज्ञेची आठवण होऊन लगेच तो त्यांना ह्मणाला, ' मी तुमच्या कल्याणाची गोष्ट तुह्मांला सांगतों. जो रणांत, ' मी आपला आहें, माझा पराभव झा-

ला आहे, ' असें ह्मणेल त्याला कधीं मी मारणार नाहीं. तेव्हां हें नीट लक्षांत घेऊन तुह्मांला वाटेल तसें करा. भलत्या वाटेनें जाल तर तुह्मी मोठ्या पेंचांत याल. ' असें ह्मणून अर्जुनानें त्यांच्याशीं युद्ध चालविलें. त्यांनींही आपल्या शक्त्यनुसार नेटानें युद्ध केलें, परंतु त्यांचें कांहीं न चालतां त्यांना हारच खावी लागली. पुष्कळ बेशुद्ध होऊन पडले. कांहींचीं वहानें थकून गेलीं. याप्रमाणें ते सर्व दमल्याचें कळून धृतराष्ट्राची मुलगी आपला नातु सुरथाचा मुलगा याला बरोबर घेऊन रथांत बसून सर्व योद्ध्यांमध्यें स्वस्थता व्हावी ह्मणून अर्जुनाकडे येऊन मोठ्यानें रडूं लागली. अर्जुनानेंही त्या आपल्या बहिणीला पाहून ' काय करूं ' ह्मणून विचारलें; तेव्हां दुःशीला ह्मणाली, ' हा तुझ्या भाच्याचा मुलगा बाळ तुला नमस्कार करीत आहे, त्याकडे बघ. ' तेव्हां अर्जुनानें त्याच्या बापासंबंधानें चौकशी केली. दुःशीला ह्मणाली, 'ते तुझ्याच हातून मेल्याची आठवण होऊन व हल्लीं तूं घोड्याच्या मागून आला आहेस हें ऐकून पित्याच्या मरणानें दुःखी होऊन केवळ तुझें नांव ऐकूनच धाडकन खालीं पडून तो मेला, तेव्हां त्याच्या मुलाला घेऊन मी तुला शरण आलें आहें,' असें ह्मणून ती मोठ्यानें रडूं लागली,व खालीं तोंड घालून दीनवाणीनें ह्मणाली, ' या आपल्या बहिणीकडे व भाच्याच्या मुलाकडे पाहून आमच्यावर दया कर. ' दुर्योधन त्याचप्रमाणें ते त्यांचें कृत्य मनांत न आणतां अभिमन्यूपासून झालेल्या तुझ्या परीक्षितप्रमाणें ह्या माझ्या सुरथाच्या मुलाला समज. सर्व योद्ध्यांचें बरें व्हावें ह्मणून मी सांगतें. शांत होऊन यांच्यावर तूं दया कर. तुला धर्म कळतोच आहे. रागाच्या तावडींत जाऊं नकोस. त्या अनार्य व निर्दय अशा याच्या आजाचें कृत्य विसरून याच्यावर दया कर. याप्रमाणें दुःशीला केविलवाणी बोलत असतां धृतराष्ट्र व गांधारी यांची आठवण होऊन, ' ज्यासाठीं मीं बांधवांना यमलोकाला पाठविलें त्या क्षात्र धर्माला धिक्कार असो,' असें ह्मणून अर्जुनानें तिच्यावर कृपा केली व तिला आलिंगून घराकडे जाण्यास सांगितलें. तीही सर्व योद्ध्यांना रणांतून परतवून अर्जुनाचा सत्कार करून नगराकडे गेली.

याप्रमाणें सैंधवांना जिंकून स्वैर फिरत चाललेल्या घोड्यामागून आकाशामधून मृगामागून चाललेल्या शंकरांप्रमाणें तो चालला. याप्रमाणें स्वच्छंद फिरतां फिरतां तो घोडा मणिपूर शहराला येऊन पोंचला.

---

## ३०५ बभ्रुवाहनाशीं युद्ध.
## ( १४.७९-८१ )

मणिपुरचा राजा बभ्रुवाहन आपला बाप अर्जुन आला आहे हें ऐकून ब्राह्मण व खजिना घेऊन विनयपूर्वक त्याला भेटण्याला बाहेर पडला. याप्रमाणें त्याला येतांना पाहून क्षत्रधर्म मनांत आणून अर्जुनाला तें पसंत पडलें नाहीं व तो धर्मात्मा रागानें त्याला ह्मणाला, ' तुझें हें वर्तन मला पसंत नाहीं. तूं क्षात्रधर्माच्या बाहेर गेला आहेस. मुला, युधिष्ठिराच्या यज्ञिय घोड्याच्या मागून तुझ्या राज्याच्या सरहद्दीवर मी आलों असतां तूं माझ्याशीं युद्ध कां करीत नाहींस ? जो तूं मी युद्धाला आलों असतां स्नेहानेंच मला भेटण्याला आला आहेस, त्या तुला मूढाला धिक्कार असो. कारण क्षात्रधर्म आज तुझ्या हातून सुटला आहे. तूं जिवंत राहून काय कामाचा ? तूं आज एखाद्या स्त्रीप्रमाणें सलोख्यानें मला सामोरा येत आहेस ! मी बिन हत्यारानें जर तुला भेटण्याला आलों असतों तर हें तुझें वर्तन शोभलें असतें. याप्रमाणें नवऱ्यानें त्याचा धिक्कार केलेला पाहून उलूपीला तें सहन न होतां पृथ्वी फोडून ती बाहेर पडली. युद्धासाठीं बाप वरचेवर निर्भर्त्सना करीत असून आपला मुलगा खालीं तोंड घालून विचार करीत आहे असें तिनें पाहिलें, तेव्हां ती चारुसर्वांगी त्याजवळ येऊन धर्माला धरून त्याला ह्मणाली, 'बाळा, मी तुझी आई उलूपी तुला सांगतें, तूं यांच्या ह्मणण्याप्रमाणें वाग, त्याच्या योगानें तूं उत्तम धर्म जोडणार आहेस. युद्ध करूनच यांना तोषीव; ह्मणजे ते तुझ्यावर संतुष्ट होतील. ' याप्रमाणें आईनें सांगितलें असतां महातेजस्वी बभ्रुवाहनानें युद्ध करण्याचें मनांत आणलें व लखलखीत सुवर्ण कवच व शिरस्त्राण चढवून सर्व सामान व भाते ज्यामध्यें ठेवले आहेत अशा सोन्यानें मढविलेल्या व मनोजव घोडे जुंपलेल्या रथांत बसून तो युद्धाला

तयार झाला व सिंहाची खूण असलेलें आपलें सोन्याचें निशाण फडकावीत तो अर्जुनावर चालून येऊन घोड्याचें इंगित पूर्ण कळणाऱ्या आपल्या लोकांकडून त्यानें तो घोडा पकडविला; तें पाहून अर्जुनाला आनंद होऊन तो आपल्या रथस्थ मुलाशीं जमिनीवरूनच युद्ध करण्याला तयार झाला. त्या दोघांमध्यें अलौकिक युद्ध झालें. बभ्रुवाहनानें वांकड्या टोंकाच्या बाणानें अर्जुनाच्या खांद्यावर जखम केली. पिसासह तो बाण अर्जुनाच्या शरीरांतून पार निघून बिळांत शिरणाऱ्या सापाप्रमाणें पृथ्वीमध्यें घुसला. त्यामुळें मोठी वेदना होऊन अर्जुन आपल्या धनुष्याला टेकून मेल्याप्रमाणें कांहीं वेळ स्वस्थ राहिला. पुढें शुद्धीवर येऊन मुलाची वाहवा करून 'ठीक, तुला साजेलसें तुझें कर्म पाहून मी खुष झालों आहे, हे मी बाण सोडतों, न डगमगतां युद्धाला तयार हो,' असें तो त्याला ह्मणाला. व त्यानें बाराच बाण त्यावर सोडले. बभ्रुवाहनानें त्यांचे आपल्या भल्ल बाणांनीं दोन दोन तुकडे केले. अर्जुनानें त्याचे सोन्यानें मढविलेले ध्वज एका क्षुर बाणानें रथाच्या खालीं पाडून आपल्या बाणांनीं त्याच्या मोठ्या वेगवान घोड्यांना मारून पाडलें; तेव्हां बभ्रुवाहन रथांतून खालीं उडी घेऊन पायींच आपल्या बापाशीं युद्ध करूं लागला; तेव्हां अर्जुनानें आपल्या मुलाचा पराक्रम पाहून संतुष्ट होऊन त्याला त्यानें फार पीडा दिली नाहीं. बभ्रुवाहनाला रणांतून विमुख तो झाला आहे असें वाटून त्यानें आशीविषासारख्या बाणांनीं त्याला जर्जर करून एक तीक्ष्ण बाण त्यानें त्याच्या छातीवर सोडला, त्यानें अर्जुनाचें मर्मस्थळ फोडून त्याला फार घायाळ केलें; त्यामुळें बेशुद्ध होऊन अर्जुन खालीं पडला. बभ्रुवाहनालाही मूर्छा येऊन तो खालीं पडला. कारण पूर्वींच अर्जुनानें बाणांनीं त्याला घायाळ केलें होतें. नवरा मरून मुलालाही खालीं पडलेला पाहून चित्रांगदा घाबरून रणभूमीवर आली. तिनें पुष्कळ शोक केला. पुढें शुद्धीवर येऊन उलूपीला पुढें पाहून ती ह्मणाली, 'उलूपि, तुझ्यासाठीं माझ्या मुलानें यांना रणांत मारून पाडलें आहे! तुला आर्यधर्म कळतच आहे. तुझ्यासाठीं हे जरी सर्वस्वी तुझे अपराधी असले तरी क्षमा करून यांना उठीव. मुलाच्या हातून नवऱ्याला मारवून त्याबद्दल तुला वाईट कसें वाटत नाहीं? मुलगा मेल्याबद्दल मला कांहीं वाईट वाटत नाहीं; परंतु ज्यांचें आतिथ्य अशा प्रकारानें झालें आहे अशा यांच्याबद्दल मला फार वाईट वाटतें.' असें ह्मणून नवऱ्याजवळ जाऊन ती ह्मणाली, 'महाराज, उठा, हा पहा आह्मीं आपला घोडा सोडून दिला आहे. धर्मराजमहाराजांच्या या यज्ञिय घोड्याच्या मागून जावयाचें सोडून असे निजून कां राहिलां? दुसऱ्याला प्राणदान देणारे आपण आज स्वतः प्राण सोडून कसे गेलां?' नंतर फिरून ती उलूपीला ह्मणाली, 'मुलाला भर देऊन त्याच्याकडून ह्यांना मारवून त्याबद्दल तुला वाईट मुळींच वाटत नाहींना? हे दैवशालिनि, **पुरुषांनीं पुष्कळ बायका केल्या असतां त्यांत त्यांना दोष नाहीं; परंतु बायकांनीं तसें केलें असतां मात्र त्यांत दोष आहे.** ह्मणून ही तुझी बुद्धि बरी नव्हे. हा संबंध ब्रह्मदेवानें कायमचा केला असल्यामुळें तो ओळखून खरा कर. मुलाकडून यांना मारवून जर यांना फिरून जिवंत करणार नाहींस तर मी आपले प्राण सोडीन. यांना व मुलाला मुकल्यामुळें मी तुझ्यादेखत येथें प्रायोपवेशन करीन.' याप्रमाणें चित्रांगदा आपली सवत उलूपी हिला ह्मणून प्रायोपवेशन करून स्वस्थ बसली. इकडे बभ्रुवाहन फिरून शुद्धीवर येऊन आपल्या आईला रणभूमीवर त्याप्रमाणें पडलेली पाहून कष्टी होऊन ह्मणाला, 'जे कोणाच्या हातून मरावयाचे नाहींत त्या ह्या अर्जुन महाराजांना माझ्या हातून मरून पडलेलें पाहून ही माझी सुखांत वाढलेली आई त्यांच्याजवळ खालीं जमिनीवर पडली आहे. याहून दुःखदायक आणखी काय असलें पाहिजे? हिचें हृदय किती तरी कठीण आहे! आपल्या पतीला मरून पडलेला पाहून हिचें हृदय फाटून कसें जात नाहीं? वेळ आल्यावांचून मनुष्य कधीं मरत नाहीं ह्मणूनच मी किंवा माझी आई आज न मरतां जिवंत आहों. अरेरे! मी मुलानें मारलेल्या कुरुवीरांचें सोन्याचें चिलखत त्यांच्या अंगांतून वेगळें होऊन पडलें आहे! अहो ब्राह्मणांना, म्यां मुलानें मारून पाडलेल्या या वीरपित्याला वीरशय्येवर पडलेला पहा. घोड्याच्या मागून त्याच्या रक्षणासाठीं

निघालेल्या यांची शांति करण्यासाठीं बरोबर दिलेले ब्राह्मण आज यांबद्दल काय शांति करणार ? ब्राह्मणांनो, आज पितृघाती मला दुष्ट पाप्याला काय प्रायश्चित्त आहे सांगा. बापाला मारल्यानें मला कातडें पांघरून प्रत्येक प्रकारचे कष्ट सोशीत बारा वर्षें पृथ्वीवर भटकलें पाहिजे. पित्याचें डोकें व कपाळ मला या ह्मणजे तें घेऊन मी पृथ्वीवर फिरतों. बापाला मारून आज मला दुसरें प्रायश्चित्त दिसत नाहीं. हे नागमाते, आज रणांत नवऱ्याला मारून मी तुझ्या मनाप्रमाणें केलें आहे. आतां मी तातांनीं घेतलेलीच वाट घेतों. आतां कांहीं मी जिवंत रहात नाहीं हें मी शपथपूर्वक सांगतों. मला व अर्जुन महाराजांना मरून पडलेले पाहून तूं सुखी हो. उलूपीमाते, सांगतों ऐक. जर नरश्रेष्ठ माझे तात उठणार नाहींत तर याच रणामध्यें मी आपला देह सुकवीन; कारण पित्याला मारून मला प्रायश्चित्त मुळींच नाहीं. मी खास नरकालाच जाणार. कारण वीर क्षत्रियाला मारल्यानें शंभर गोदानें करून मनुष्य त्या पापांपासून सुटतो; परंतु बापाला मारण्याबद्दल प्रायश्चित्त नाहीं. हे पांडुपुत्र धनंजय एवढे महातेजस्वी धर्मात्मे असून मला यांनीं जन्म दिला; तेव्हां त्यांना मारून मला प्रायश्चित्त कोठून असणार?' असें ह्मणून उदकाला उपस्पर्श करून तो प्रायोपवेशनाला बसला, याप्रमाणें त्या दोन मायलेकांना प्रायोपवेशनाला बसलेले पाहून उलूपीनें सर्व नागांना आधारभूत अशा संजीवनमण्याचें चिंतन केलें. त्याबरोबर तो प्रगट झाला. तो घेऊन ती मनाला आल्हाद देणाऱ्या अशा शब्दांनीं बभ्रुवाहनाला ह्मणाली, 'बाळा, ऊठ. अर्जुनांना तूं मुळींच जिंकलें नाहींस. हे वीर देवांना एवढेंच नव्हे तर प्रत्यक्ष इंद्राला सुद्धां अजिंक्य आहेत. मीं तुझ्या वडिलांचें प्रिय करण्यासाठीं ही मोहिनी माया दाखविली. तुझें बल पहाण्यासाठीं युद्ध करण्यास ते आले ह्मणून मीं तुला युद्धाला भर दिली. आपल्या हातून कांहीं पाप घडलें अशी मनांत बिलकुल शंका आणूं नकोस. या पुराणऋषींचा रणामध्यें पराभव कोणाच्याही हातून होणें शक्य नाहीं. मीं हा, जे जे ह्मणून साप मरतील त्यांना त्यांना उठविणारा मणी आणला आहे. हा यांच्या छातीवर ठेव ह्मणजे हे जिवंत होतील.' असें ती ह्मणाली असतां बभ्रुवाहनानें तो मणी घेऊन स्नेहपूर्वक अर्जुनाच्या छातीवर ठेविला. त्याबरोबर बराच वेळ झोंप घेऊन उठल्याप्रमाणें अर्जुन डोळे चोळीत उठला. याप्रमाणें सावध होऊन उठलेल्या आपल्या बापाला सुरक्षित पाहून बभ्रुवाहनानें त्याला वंदन केलें. याप्रमाणें उठून त्याच्या तोंडावर तेज दिसूं लागलें असतां इंद्रानें पुष्पवृष्टि केली. कोणी न वाजवितांच दुंदुभी मेघगर्जनेप्रमाणें नाद देऊं लागल्या. शाबास ! शाबास ! ह्मणून आकाशामध्यें शब्द उठून राहिला. महाबाहु अर्जुनानें उठून आपल्या जवळच उभा असलेल्या बभ्रुवाहनाला आलिंगन देऊन त्याचें मस्तक हुंगलें व त्याच्याजवळच उलूपी व चित्रांगदा यांना पाहून, 'या ठिकाणीं शोक, विस्मय व आनंददेणारा हा काय प्रकार आहे ? ही तुझी आई त्याचप्रमाणें ही उलूपी या ठिकाणीं कशाला आली ? माझ्या शब्दावरून तूं मजशीं युद्ध केलेंस एवढें मला ठाऊक आहे; परंतु या बायका येथें कशाला आल्या ?' ह्मणून त्यानें त्याला विचारलें. तेव्हां बभ्रुवाहनानें त्याचें कारण उलूपीलाच विचारण्यास सांगितल्यावरून अर्जुनानें विचारल्यावर उलूपी म्हणाली, 'या सर्व घडलेल्या गोष्टींत अपराध कोणाचाच नाहीं. हें सर्व मीं कां केलें सांगतें ऐका. आपण माझ्यावर रागावूं नये. आपल्या पायांवर मी डोकें ठेवतें. आपल्याच बऱ्यासाठीं हें मीं केलें. तें कसें तें सांगतें ऐका. महाभारत युद्धाच्या वेळीं आपण जे भीष्मांना अधर्मानें मारलें, त्याचें हें प्रायश्चित्त झालें. कारण भीष्म आपल्याशीं युद्ध करीत असतां आपण त्यांना न मारतां शिखंडीशीं ते भिडले असतां त्याच्या आश्रयानें आपण त्यांना मारलें. त्याबद्दल शांति न करतां जर मेला असतां तर आपल्याला खात्रीनें नरकांत जावें लागलें असतें; तेव्हां मुलाच्या हातून आपल्याला मिळालेली ही त्याबद्दल शांति आहे. पूर्वी भीष्म मेले असतां गंगेच्या तीरीं सर्वदेव जमून त्यांच्या व गंगेच्यामध्यें झालेलें भाषण माझ्या कानांवर आलें. 'या अर्जुनानें, यांच्याशीं युद्ध करीत नसून दुसऱ्याशीं भिडले असतां भीष्मांना मारलें ह्मणून त्या अपराधाबद्दल अर्जुनाला आह्मी शाप देतों,'

असें वस्तु झणाले असतां गंगेचेंही त्याला अनुमोदन पडल्याचें बाबांकडून मला कळलें. तेव्हां मला फार काळजी पडली. बाबांनीं जाऊन आपल्यासाठीं वसूं-चें समाधान केलें. तेव्हां ते झणाले, 'याचा मुलगा बभ्रुवाहन याला रणांत पाडील तेव्हां हा शापापासून मुक्त होईल. हे त्यांचे शब्द पित्याच्या तोंडून ऐकून मीं आपल्याला शापापासून सोडविलें. प्रत्यक्ष इंद्राची सुद्धां आपला पराभव करण्याची छाती नाहीं. मुलगा हा प्रत्यक्ष आत्मस्वरूप समजला आहे; झणून आज त्याच्या हातून आपला पराभव झाला आहे; तेव्हां माझा कांहीं यांत अपराध नाहीं. तेव्हां झालें हें ठीकच आहेना ? ' हें ऐकून अर्जुन संतुष्ट होऊन झणाला, 'प्रिये, हें जें तूं केलेंस तें सर्व मला फार पसंत आहे, ' असें झणून अर्जुनानें बभ्रुवाहनाला आपल्या आर्यांसह अश्वमेधयज्ञाला येण्यास सांगितलें. डोळे पाण्यानें भरून येऊन बरें आहे झणून बभ्रुवाहन झणाला, ' हास्तिनापुराला येऊन ब्राह्मणांना वाढण्याचें काम मी-आपल्याकडे घेईन. आपण माझ्यावर कृपा करण्यासाठीं या आर्यांबरोबर कांहीं विचार न करतां माझ्या नगरांत चला व आपल्या घरीं एक रात्र सुखांत काढून मग घोड्याच्या मागून चला. ' यावर अर्जुन झणाला, ' हे महाबाहो, मीं कशा प्रकारची दीक्षा घेतली आहे हें तुला कळत आहे. तेव्हां मला नगरांत येतां येत नाहीं. हा घोडा आपल्या इच्छेप्रमाणें चालला आहे, तेव्हां मला रहातां येत नाहीं. तुझें कल्याण असो. ' असें झणून त्यांचा सत्कार घेऊन अर्जुन पुढें निघाला.

## २०६ घोड्याचें परत येणें व अश्वमेधाची सुरवात. ( १४. ८२–८९ )

याप्रमाणें तो घोडा समुद्रापर्यंत पृथ्वीपर्यटण करून हास्तिनापुराकडे परत वळला असतां वाटेंत तो राजगृह नगराला आला. तेथें क्षत्रधर्मामध्यें दक्ष असणारा शरदेवाच्या मुलगा मेघसंधि यानें सज्ज होऊन नगरा बाहेर येऊन अर्जुनाला युद्धाला बोलाविलं.तेव्हां अर्जुन झणाला, 'माझ्यापुढें विघ्न करण्याला जो उभा राहील त्याचें निवारण करणें हें माझें कर्तव्य आहे. तूं खुशाल चालून ये. मला बिलकूल राग नाहीं. नंतर मेघसंधीनें प्रथम अर्जुनावर बाणांचा मारा सुरू केला. ते सर्व अर्जुनानें व्यर्थ दवडले. ध्वज, पताका, दांडा, रथ, यंत्र, ( जूं ), घोडे या सर्वांवर अर्जुनाचे बाण जाऊन पडत होते. फक्त मेघसंधि व सारथि हे मात्र त्यापासून सुटले होते. याप्रमाणें अर्जुनानें गय केली असतां आपल्याच वीर्यानें आपण सुरक्षित आहों असें वाटून मेघसंधीनें अर्जुनावर खूप बाणांचा मारा चालविला; तेव्हां अर्जुन वसंतऋतूंतील फुललेल्या पळसाप्रमाणें फारच खुलून दिसत होता. याप्रमाणें आपल्यावर मारा चाललेला पाहून अर्जुनानें रागावून घोड्यांना मारून सारथ्याचें डोकें उडवून दिलें व प्रचंड धनुष्य मोडून टाकलें. पंजा व मेघसंधीचें प्रचंड धनुष्य मोडून खालीं पाडलीं. तेव्हां मेघसंधी चिंतातुर होऊन गदा घेऊन अर्जुनावर चालून गेला. तेव्हां त्यानें त्या गदेलाही मोडून पाडलें. मेघसंधीला रथ, धनुष्य व गदा कांहीं जवळ नसलेला पाहून अर्जुन त्याला गोड शब्दानें झणाला, ' वत्सा, तूं क्षत्रधर्म दाखविलास तो बस्स आहे. आतां जा. तुझ्यासारख्या मुलाला एवढेंच फार आहे. रणांत कोणाला मारूं नकोस झणून युधिष्ठिरांचें सांगणें आहे. ' हें ऐकून मेघसंधीनेंही हात जोडून अर्जुनाचा सत्कार केला, व क्षमा मागितली. तेव्हां त्याला अश्वमेध यज्ञाला येण्यास सांगून अर्जुन पुढें निघाला. पुढें तो मोठ्या आयाळाचा घोडा समुद्रकिनाऱ्यानें वंग, पुंड्र, कोसल इत्यादि देशांतून चालला असतां अर्जुनानें त्या त्या ठिकाणीं पुष्कळ म्लेच्छ सैन्यांचा पराभव केला.

मगधदेशच्या राजाचा सत्कार घेऊन अर्जुन त्या घोड्याला दक्षिणेकडे घेऊन चालला. नंतर स्वच्छंद फिरणारा तो घोडा परतून चेदी राजाच्या शुक्तिसाह्य नगरीला आला. त्या ठिकाणीं शिशुपालाचा मुलगा शरभ यानें प्रथम युद्ध देऊन नंतर अर्जुनाचा सत्कार केला. पुढें तो घोडा काशी, अंग, कोसल, किरात, तंगण, इत्यादि देशांमधून चालला. त्या त्याठिकाणीं सत्कार घेत अर्जुन दशार्णाला आला. त्या ठिकाणच्या बलवान चित्रांगद नांवाच्या राजाशीं त्याचें मोठें युद्ध झालें. त्याला जिंकून अर्जुन निषादांचा स्वामी जो एकलव्य त्याच्या

देशाला गेला. त्या ठिकाणीं एकलव्याचा मुलगा याच्याबरोबर युद्ध देण्याला उठला. यांचें निषादाबरोबर निकराचें युद्ध झालें. नंतर एकलव्याला जिंकून तो फिरून दक्षिण समुद्राकडे निघाला. त्या ठिकाणीं द्रविड, आंध्र, रौद्र, माहिषक त्याचप्रमाणें कोलगिरेय, यांबरोबर अर्जुनाचें युद्ध होऊन त्यांना सहज जिंकून तो घोड्याच्या मागून सौराष्ट्राकडे चालला. पुढें गोकर्ण, प्रभास यांवरून रम्य अशा द्वारवतीला आला. त्या ठिकाणीं यादव कुमारांनीं घोड्याला आडविलें. परंतु उग्रसेनानें त्यांचें निवारण केलें. सगळे वृष्णी अंधक वसुदेवासह प्रेमपूर्वक अर्जुनाला सामोरे जाऊन त्यांनीं अर्जुनाचा सत्कार केला. पुढें तो घोडा पश्चिम समुद्राच्या कांठानें फिरत सुसंपन्न अशा पांच नद्यांमधील प्रदेशाला येऊन तेथून तो गांधार देशाला आला. तेथें शकुनीचा मुलगा पूर्ववैर स्मरून मोठ्या सैन्यानिशीं अर्जुनाला युद्ध देण्याला तयार होऊन उठला. शकुनीच्या मरणानें त्वेष चढून गांधार योद्धे मोठ्या आवेशानें त्यावर चालून गेले. त्यांना युधिष्ठिराचा निरोप सांगून गोडीगुलाबीनेंच परतविण्याची अर्जुनानें खटपट केली. परंतु त्याचा उपयोग न होतां जेव्हां ते घोडा घेऊन चालले, तेव्हां खवळून जाऊन अर्जुनानें त्यांचीं मुंडकीं पाडण्यास सुरवात केली. तेव्हां घाबरून जाऊन घोड्याला त्यांनीं सोडून दिलें. याप्रमाणें त्यांची कत्तल चालली असतां शकुनीच्या मुलानें अर्जुनाला अडविलें तेव्हां अर्जुनानें, 'धर्मराजाच्या सांगण्यावरून मला राजांना मारावयाचें नाहीं, तेव्हां उगीच युद्धाच्या भानगडींत पडून न मरतां परत जा,' असें त्याला सांगितलें, त्याला न जुमानतां जेव्हां तो अर्जुनावर बाणांचा मारा करूं लागला, तेव्हां अर्जुनानें जयद्रथाच्या मुंडक्याप्रमाणें अर्धचंद्र बाणानें त्याचें शिरस्त्राण उडवून दिलें. राजा म्हणून त्यानें त्याची गय केली. याप्रमाणें गांधारराजही पळत सुटला. त्याचप्रमाणें अर्जुनाच्या बाणांनीं गांधाराचे लोक, हत्ती, घोडे सर्व बुजून जाऊन पळत सुटले असतां कोणाचाच अर्जुनापुढें टिकाव लागेना. तेव्हां गांधारमाता आपल्या सर्व प्रधानांसह पूजासाहित्य बरोबर घेऊन नगराबाहेर आली, व आपल्या लोकांना निवारून तिनें अर्जुनाचें समाधान केलें. तेव्हां संतुष्ट होऊन शकुनीच्या मुलाला यज्ञाचें आमंत्रण देऊन अर्जुन पुढें निघाला.

याप्रमाणें तो हास्तिनापुराकडे वळला असतां बातमीदारांनीं येऊन घोडा परतल्याची वर्दी युधिष्ठिराला दिली. त्याचप्रमाणें अर्जुनानें निरनिराळ्या ठिकाणीं गाजविलेले पराक्रमही त्याच्या कानांवर आले; तेव्हां त्याला मोठा आनंद झाला. तेव्हां धर्मात्मा युधिष्ठिर भीमाला ह्मणाला, 'धनंजयाबरोबर असणाऱ्या दूतांच्या सांगण्यावरून घोडा परतला असून अर्जुन जवळ आल्याची बातमी आहे. आज माघी पौर्णिमा असून बाकी एक महिनाच उरला आहे, तेव्हां वेदपारग ब्राह्मणांना अश्वमेधाची तयारी करण्याला पाठवून यज्ञासाठीं त्यांना जागा पाहून काढूं द्या.' असें तो ह्मणाला असतां अर्जुन आल्याची बातमी ऐकून आनंदभरित होऊन भीमानें युधिष्ठिराच्या सांगण्याप्रमाणें केलें, व यज्ञमंडप तयार करण्यामध्यें कुशल अशा लोकांना बरोबर घेऊन यज्ञकर्ममध्यें कुशल अशा ब्राह्मणांना पुढें करून तो यज्ञमंडप तयार करावयास निघाला. यज्ञमंडपाची जागा, रहाण्याचीं घरें व रस्ते मापून नानाप्रकारचे वाडे उठवून दिले. सोन्याचे खांब उभारून यज्ञमंडपाचे जागीं कमानी तयार करविल्या. बायका व नानादेशांतून येणारे निरनिराळे राजे व ब्राह्मण यांच्यासाठीं चांगल्या शोभायमान जागा तयार करविल्या. पुढें युधिष्ठिराच्या सांगण्यावरून त्यानें चोहोंकडच्या राजांना बोलावणीं पाठविलीं; त्यावरून पुष्कळ रत्नें, दासदासी, घोडे वगैरे घेऊन युधिष्ठिराच्या मर्जीखातर चोहोंकडून राजे त्या यज्ञाला येऊन हजर झाले. ते आपापल्या जागीं जाऊन राहिले असतां गर्जणाऱ्या समुद्राप्रमाणें त्या यज्ञाच्या ठिकाणीं एकच शब्द उठून राहिला. आलेल्या पाहुण्यांची खाण्यापिण्याची उत्तम व्यवस्था करवून त्यांच्या जनावरांना धान्य, ऊस, दूध यांनीं गच्च भरून राहिलेले तबेले ठरवून दिले; त्याचप्रमाणें वेद पठण करणारे मुनी व ठळक ठळक ब्राह्मण आपापल्या शिष्यांनिशीं त्या ठिकाणीं आले असतां स्वतः युधिष्ठिर गर्व सोडून सामोरा जाऊन त्यांना त्यांचे बिऱ्हाड दाखवून देत असे. शिल्पी व कारा-

गीर यांनीं सर्व यज्ञमंडपाची व्यवस्था तयार झाल्याची वर्दी युधिष्ठिराला दिली. त्या ठिकाणीं जमलेल्या राजांना त्या सोन्याच्या कमानी, शय्या, आसनें व उपभोगाच्या व चैनीच्या दुसऱ्या वस्तु व तेथें जमलेल्या लोकांची गर्दी पाहून मोठें आश्चर्य वाटलें. त्या ठिकाणीं नानाप्रकारचीं भांडीं होतीं पण सोन्यावांचून असें एकही त्यामध्यें नव्हतें. नानाप्रकारचे यूप शास्त्रोक्त रीतीनें तेथें उभारले असून ते सोन्यानें विभूषित होते; तसेच जलचर, स्थलचर वगैरे नानाप्रकारचे प्राणी, गाई, ह्मशी, ह्मातान्या बायका, पक्षी, पहाडी प्राणी वगैरे त्या ठिकाणीं गोळा केले होते. ब्राह्मण व वैश्य यांसाठीं मिष्टान्नाची त्या ठिकाणीं रेलचेल उडून राहिली होती व लक्ष ब्राह्मणांचें जेवण सरलें ह्मणजे एकवार नगारा वाजत असे, त्यांचा रोजच्या रोज घटकोघटकेला, शब्द ऐकूं येत असे. याप्रमाणें युधिष्ठिराच्या यज्ञाला सुरवात होऊन अन्नाच्या राशींच्या राशी त्या ठिकाणीं पडत होत्या. दह्यातुपाचे हौदच्या हौद त्या ठिकाणीं भरून होते. त्या महायज्ञामध्यें सर्व जंबुद्वीपांतील सगळ्या राष्ट्रांमधील व सर्व प्रांतांमधील सर्व जातींचे व सर्व वर्णांचे लोक हजर होते. पुष्कळ लोक माळा कुंडलें घालून हातांत भांडीं घेऊन अन्न वाढीत होते. पांडवांचे नोकर ब्राह्मणांना राजोपभोज्य अशीं नानाप्रकारची खायपेयें पुरवीत होते.

त्या ठिकाणीं जमलेल्या वेद पढलेल्या राजांना पाहून युधिष्ठिर भीमसेनाला ह्मणाला, ‘ या यज्ञाला आलेल्या राजांचा योग्य सत्कार ठेवा; कारण ते सर्व मानाला पात्र आहेत. ’ हें ऐकून भीमसेनानें नकुलसहदेवांच्या साहाय्यानें त्यांची यथायोग्य बरदास्त ठेविली. इतक्यांत श्रीकृष्णानें युधिष्ठिराकडे येऊन त्यानें गोष्टींमध्यें अनेक युद्धप्रसंगामुळें सुकलेल्या अर्जुनाची गोष्ट त्यापाशीं काढली व अर्जुन सर्व राजांवर जय मिळवून वारु परत घेऊन आल्याची बातमी त्याला सांगून यज्ञ सुरूकरण्यास सांगितलें; तसेंच सर्व राजे त्याचप्रमाणें मणिपुरचा बभ्रुवाहन यज्ञाला येणार असल्याचें कळविलें. हा अमृततुल्य आनंददायक निरोप ऐकून युधिष्ठिराला मोठा आनंद झाला. तो श्रीकृष्णाला ह्मणाला, ‘ अर्जुनानें पुष्कळ राजांशीं पुष्कळ रणप्रसंग केले असल्याचें माझ्या कानावर आलें आहे. हा इतका बुद्धिशाली असून सुख व शांति हीं कशीं तीं ह्याला ठाऊक नाहींत. नेहमीं त्यालाच कां कष्टाचे प्रसंग येतात ? कामांतून सुटून एकांतांत असतां नेहमीं हेच विचार माझ्या मनांत घोळतात. त्याचें नशीब फार वाईट आहे. त्याच्या अंगावर सर्व चांगलीं चिन्हें असतां असें त्याचें काय खडतर नशीब आहे कीं, ज्याच्या योगानें त्याला नेहमीं कष्ट व दुःखें हीं सोसावीं लागतात. दुःखाचा मोठा वांटा नेहमीं त्याच्या वाट्याला पडतो; तेव्हां याचें कारण काय ? ’ हें ऐकून श्रीकृष्ण क्षणभर विचार करून ह्मणाला, ‘ मला याचें दुसरें कांहीं कारण दिसत नाहीं; मात्र त्याचे गाल थोडेसे फुगिरडे आहेत; ह्मणून कदाचित् त्याचा पाय नेहमीं बाहेर रहात असेल; बाकी कांहीं मला दिसत नाहीं. ’ हें ऐकून द्रौपदीनें वारक्या नजरेनें रागानें त्याकडे पाहिलें; कारण अर्जुनाला कोणी एवढेंसुद्धां नांव ठेविलेलें तिला खपत नसे. श्रीकृष्णालाहीं आपला मित्र जो अर्जुन त्यावरील तिचें हें प्रेम पाहून समाधान वाटलें. भीमसेन वगैरे कौरव व तेथें जमलेले याजक यांनाही अर्जुनाचा हा विजय ऐकून समाधान वाटलें. याप्रमाणें ते अर्जुनासंबंधी गोष्टी बोलत असतां त्याकडून एक दूत आला; व युधिष्ठिरापुढें जाऊन, नम्रपणें वांकून त्यानें अर्जुन आल्याची बातमी दिली. ती ऐकून राजाचे डोळे आनंदाश्रूंनीं भरून आले, व ही सुवार्ता आणल्याबद्दल त्यानें त्या दूताला चांगलें बक्षीस दिलें. दुसऱ्या दिवशीं तो कुरुवीर अर्जुन येऊन दाखल झाला. तो वारु अर्जुनाबरोबर आपल्या पायांच्या टापांनीं धूळ उसळवीत येत असतां फारच शोभिवंत दिसत होता. अर्जुन शहरांतून येत असतां पौरजनांचे पुढील कर्णमधुर शब्द त्याच्या कानावर पडत होते. ‘ संकटांतून सुटलास, बरें झालें. शाबास त्या राजा युधिष्ठिराची ! घोड्याकडून पृथ्वीप्रदक्षिणा करवून राजांना युद्धांत जिंकून परत येण्याला नरवीर अर्जुनाखेरीज दुसरा कोण समर्थ होता ? असें कृत्य आजपर्यंत दुसऱ्या कोणाच्या हातून झाल्याचें आमच्या ऐकण्यांत नाहीं व पुढेंही कोणाच्या हातून होणार नाहीं. ’ याप्रमाणें नागरिकांचे कर्णमधुर शब्द ऐकत

अर्जुन यज्ञमंडपांत आला, व धृतराष्ट्र व युधिष्ठिर यांना नमस्कार करून भीम वगैरेचा सत्कार केल्या-वर त्यानें श्रीकृष्णाला आलिंगन दिलें. सर्वांनीं त्याचा बहुमान केल्यावर समुद्रांतून पैलमार निघून दुसऱ्या तीराला पोहोंचलेल्या मनुष्याप्रमाणें त्यानें खुशाल विश्रांति घेतली. इतक्यांत बभ्रुवाहन आप-ल्या दोन आयांनिशीं तेथें आला. त्यानें यथाक्रमानें सर्व वडिलांना नमस्कार केला. त्यांनींही त्या-चा बहुमान केल्यावर तो आपल्या कुंतिआजीच्या ठिकाणाकडे गेला.

पांडवांच्या वाड्यांत शिरल्यावर प्रथम कुंतीला नमस्कार करून तो तिच्याशीं चार गोड शब्द बो-लला. चित्रांगदा व उलूपी ह्यांनींही नम्रपणें कुंति व द्रौपदी यांची भेट घेऊन पुढें सुभद्रा वगैरे बायकां-च्या गांठी घेतल्या. कुंति वगैरेनींही मौल्यवान रत्नें व दुसऱ्या वस्तू त्यांना नजर केल्या. त्या ठिकाणीं याप्रमाणें सुखांत रहात असतां पार्थाचें प्रिय कर-ण्यासाठीं प्रत्यक्ष कुंति त्यांना मोठ्या प्रेमानें वागवी-त असे. श्रीकृष्णानें बभ्रुवाहनाला उत्तम घोडे जुंप-लेला रथ नजर केला, व युधिष्ठिर, भीम, अर्जुन, नकुल सहदेव यांनींही त्याचा बहुमान केला. तिसरे दिवशीं व्यास युधिष्ठिराकडे येऊन ह्मणाले, 'आ-जपासून यज्ञ सुरू कर. यज्ञाचा मुहूर्त आला. यांत कांहीं उणें न पडतां हा शेवटास जावो. यामध्यें पु-ष्कळ सुवर्ण लागत असल्यामुळें याला बहुसुवर्णक असें नांव आहे; त्याचप्रमाणें या यज्ञाची दक्षिणा तिप्पट कर ह्मणजे यज्ञफल तिप्पट मिळेल. याप्रमाणें तीन अश्वमेध एकदम हातून हो-ऊन ज्ञातिवधामुळें झालेल्या पापापासून तूं मुक्त होशील. फार पवित्र, शुद्ध असें अश्वमेधानंतर-चें अवभृतस्नान तुला मिळेल.' हें व्यासांचें भाषण ऐकून धर्मराजानें अश्वमेधाची दीक्षा घेतली. नंतर सर्व मनोरथ पूर्ण करणारा थोर अश्वमेधयज्ञ सुरू होऊन त्यांत अन्न व दक्षिणा यांची रेलचेल उडा-ली. त्या ठिकाणीं वेदवेत्त्या, सर्वज्ञ अशा याजकांनीं चोहोंकडे फिरत राहून सर्व कर्में यथास्थित पा-र पाडलीं. त्यामध्यें कांहीं गळलें नाहीं किंवा चुकलें नाहीं. सांगितल्याप्रमाणें सर्व विधि त्यांनीं यथासांग पार पाडला. धर्मसंज्ञक प्रवर्ग्य विधि आटोपून त्यांनीं अभिषव विधिपूर्वक केला. याप्रमाणें सोम कुटून त्या श्रेष्ठ सोमपांनीं शास्त्राला धरून यथाक्रमानें स-वनें केलीं. त्या ठिकाणीं कोणी कृपण, गरीब, भु-केला व दुःखी किंवा सामान्य मनुष्य नव्हता. रा-जाज्ञेनें महातेजस्वी भीम, जे जे ह्मणून अन्न मागत असत, त्यांना त्यांना तें देववीत असे. विटांचें चयन नांवाचे स्थंडिल रचण्यामध्यें कुशल अशा याज-कांनीं सर्व कार्यें यथाशास्त्र रोजच्यारोज पार पाडलीं. या सदस्यामध्यें ज्याला षडंग वेद येत नव्हता, जो उपाध्याय नव्हता, ज्याला वाद करतां येत नव्हता किंवा जो व्रतशील नव्हता असा कोणीच नव्हता. पुढें यूप रोवण्याची वेळ आली असतां सहा बि-ल्वाचे, सहा खदिराचे, सहा सर्व जातीचे, दोन देव-दारूचे व एक श्लेष्मातकाचा व शोभेसाठीं आणखी हजारों सोन्याचे डाम करून पुरले. हे डाम सभोंवतीं सप्तर्षी देवता यासह असलेल्या इंद्राप्रमाणें शोभत होते. सोन्याच्या विटा चयन रचण्यासाठीं त-यार करून ठेविल्या होत्या. त्याला चार थर असून ते अठरा हात होते. गरुडाच्या आकाराचा त्रिको-णात्मक एक सोन्याचा पक्षी केला होता. नंतर शा-स्त्राज्ञेप्रमाणें याजकांनीं निरनिराळ्या देवांच्या नांवा-नें शास्त्रांत सांगितल्याप्रमाणें निरनिराळे पशुपक्षी, बैल, जलचरप्राणी वगैरे, होमविधि उरकल्यावर नि-रनिराळ्या यूपाला बांधले. त्या महायज्ञामध्यें अश्व-मेध घोड्यासुद्धां तीनशें प्राणी डांबाला बांधले होते. प्रत्यक्ष देव व ऋषी यांनीं तो यज्ञ गजबजला असून गंधर्वांचें गायन व अप्सरांचें नर्तन चाललें होतें. त्या ठिकाणीं जमलेल्या किन्नर व किंपुरुष यांनीं त्याला फार शोभा आली होती. सिद्ध ब्राह्मणांच्या राहाण्याच्या आजूबाजूच्या गच्च जागा भरल्या होत्या. चित्रसेन, विश्वावसु वगैरे गाण्यानाचण्यांत हुषार मंडळी यज्ञकर्म चाललीं असतां मधल्या मधल्या वेळांमधून ब्राह्मणांची करमणूक करीत होते. य-थाशास्त्र दुसरे प्राणी मारून शिजल्यावर ब्राह्मणांनीं त्या घोड्याला मारलें. शास्त्रांत सांगितल्याप्रमाणें त्याचे तुकडे केल्यावर मंत्र, द्रव्य व श्रद्धा या ति-हींनीं संपन्न अशा द्रौपदीला त्या मारून तुकडे के-लेल्या घोड्याजवळ बसविलें. नंतर याजकांनीं स्व-स्थपणें त्याच्या शरीरांतून मज्जा काढून विधिपूर्वक

ती शिजविली. तेंव्हां सर्व पाप दूर करणाऱ्या त्या धुराचा धर्मराजानें आपल्या सर्व भावांबरोबर वास घेतला. नंतर त्या घोड्याचे बाकी जे कांहीं भाग राहिले होते, ते विधिपूर्वक सोळा ऋत्विजांनीं अग्नींत टाकले. याप्रमाणें तो यज्ञ शेवटास नेल्यावर व्यासांनीं आपल्या शिष्यांसह युधिष्ठिराचा धन्यवाद गाऊन त्याला आशीर्वाद दिले. नंतर सर्व निष्क दक्षिणा युधिष्ठिरानें ब्राह्मणांना देऊन सर्व पृथ्वी व्यासांना देऊन टाकली. ती घेऊन व्यास युधिष्ठिराला ह्मणाले, 'ही तूं दिलेली पृथ्वी मी तुला परत देतों. याच्या बद्दल मला पैसा दे.' नंतर युधिष्ठिर ब्राह्मणांना ह्मणाला,'अश्वमेधाची दक्षिणा पृथ्वी सांगितली आहे ह्मणून अर्जुनानें जिंकलेली पृथ्वी मीं ब्राह्मणांना देऊन टाकली आहे; तेव्हां मी आतां अरण्यांत जातों. तुह्मी आतां ही पृथ्वी आपल्यामध्यें वांटून घ्या. चतुर्होत्र यज्ञामध्यें सांगितल्याप्रमाणें हिचे चार भाग करून तुह्मी चौघांत वांटून घ्या. ज्याच्यावर आतां दुसऱ्याची सत्ता झाली आहे तें बळकावून बसण्याची माझी इच्छा नाहीं. ब्रह्मस्व घ्यावयाचें नाहीं हाच माझा व माझ्या भावांचा आजपर्यंत अगदीं निर्धार आहे.' याप्रमाणें तो बोलला असतां अर्जुनप्रभृति भावांनीं त्याच प्रमाणें द्रौपदीनें असेंच ह्मणून त्याला आपला रुकार दर्शविला; तेव्हां सर्वलोक अगदीं थक्क होऊन जाऊन, शाबास शाबास ह्मणून आकाशवाणी झाली. ब्राह्मणांनीं त्याची फार स्तुति केली. व्यास फिरून युधिष्ठिराला ह्मणाले, 'ही तूं दिलेली भूमि मी तुला परत देतों. हिच्याबद्दल मला पैसा देऊन या ब्राह्मणांना पैसे देऊन तूं पृथ्वी आपल्याकडे ठेव.' श्रीकृष्णानेंही या गोष्टीला आपलें अनुमोदन दिलें; तव्हां युधिष्ठिर संतुष्ट होऊन यज्ञाची दक्षिणा तिप्पट करून त्यानें कोट्यावधि रुपये दक्षिणा दिली. मरुत्ताचें अनुकरण करण्याच्या इच्छेनें युधिष्ठिरानें जें हें कृत्य केलें तसें कृत्य कोणाच्या हातून होणें शक्य नाहीं. त्यानें व्यासांना दिलेल्या पैशाचे चार भाग करून कांहीं लोभ न ठेवितां त्यांनीं ऋत्विजांना देऊन टाकले. याप्रमाणें पृथ्वीदानाबद्दल असा पैसा देऊन युधिष्ठिर पापमुक्त होऊन स्वर्गाला अधिकारी झाला. त्या ऋत्विजांनीं तो पैसा, त्याचप्रमाणें यज्ञमंडपांत असलेले सोन्याचे पदार्थ, तोरणें, यूप, घागरी वगैरे निरनिराळ्या प्रकारचीं भांडीं, सोन्याच्या विटा वगैरे सर्व युधिष्ठिराच्या आज्ञेनें ब्राह्मणांना वांटून दिलीं. ब्राह्मणांनीं घेऊन राहिलेले जिन्नस क्षत्रिय, वैश्य, शूद्र त्याचप्रमाणें निरनिराळ्या जातीचे म्लेंच्छ लोक यांनीं घेतले. याप्रमाणें धर्मराजानें पुष्कळ पैसा देऊन तृप्त केल्यावर ब्राह्मण आपापल्या घराकडे गेले. व्यासांनीं आपल्या वांट्याचा पैसा बहुमानपूर्वक कुंतीला दिला. कुंतीनें ती आपल्या सासऱ्याकडून आलेली प्रेमाची देणगी मोठ्या प्रेमपूर्वक घेऊन मोठमोठ्या पुण्यकर्माकडे खर्च केली. युधिष्ठिर आपल्या भावांसह अवभृत स्नानानें पापमुक्त झाल्यावर त्याचा बहुमान होत असतां तेथें जमलेल्या सर्व राजांमध्यें तो इंद्राप्रमाणें झळकत होता. राजांना देखील त्यानें नानाप्रकारचीं रत्नें, हत्ती, घोडे, अलंकार, बायका, वस्त्रें वगैरे अपरिमित द्रव्य राजमंडळामध्यें कुबेराप्रमाणें वांटून टाकीत होता. त्याचप्रमाणें वीर बभ्रुवाहनाला बोलावून त्याला पुष्कळ द्रव्य देऊन त्याची त्यानें घराकडे पाठवणूक केली; त्याचप्रमाणें बहिणीवरील असलेल्या प्रेमामुळें तिच्या लहान नातवाला त्याच्या बापाच्या गादीवर बसविलें. याप्रमाणें सर्व राजांचा त्यांच्या त्यांच्या दर्जाप्रमाणें क्रमानें सत्कार करून त्यांना आपापल्या घराकडे पाठविलें. महात्म्या श्रीकृष्ण, बळराम वगैरे यादव मंडळींनाही त्यांचा मोठा सत्कार करून युधिष्ठिरानें त्याच्या घराकडे पाठविलें. याप्रमाणें धर्मराजाच्या त्या यज्ञामध्यें द्रव्य, रत्नें, व अन्न यांची अगदीं रेलचेल उडून जाऊन सुरा, मैरेय, यांचे समुद्र वाहिले. तुपाचे तेथें डोह बनले असून अन्नाचे पर्वत झाले होते. षड्रसयुक्त अशा चिखलानें भरलेल्या नद्या तेथें वाहिल्या. नानाप्रकारचीं भक्ष्यें व खांडवराग वगैरे बनविण्यांत व खाण्यांत गुंतलेले लोक त्याचप्रमाणें मारले जाणारे पशु यांचा तेथें अंतच दिसेना. धुंद झालेल्या लोकांनीं, आनंदित अशा स्त्रीजनांनीं व मृदंग, शंख यांच्या शब्दांनीं तें ठिकाण अगदीं भरून जाऊन त्याच्या योगानें त्याला एकप्रकारची विलक्षण शोभा आली होती. 'वाटेल तें द्या, वाटेल तें खा,' असे शब्द रात्रंदिवस त्या

यज्ञामध्यें ऐकूं येत होते. एखाद्या मोठ्या उत्सवाप्रमाणें तो यज्ञाचा समारंभ दिसत होता. त्या ठिकाणीं सर्व लोक संतुष्ट व आनंदभरित होते. याप्रमाणें द्रव्याचा व रत्नांचा वर्षाव केल्यावर सर्वांच्या निरनिराळ्या इच्छा पूर्ण करून युधिष्ठिर कृतार्थ होऊन आपल्या नगरामध्यें शिरला.

---

## ३०७ मुंगुसाची गोष्ट. ( १४. ९०–९२ )

याप्रमाणें या युधिष्ठिराच्या महायज्ञाचा डंका दाही दिशांना वाजला जात असून याच्या मस्तकावर पुष्पवृष्टि होत असतां ज्याची एक बाजू सोन्याची होती असें घाऱ्या डोळ्याचें मुंगुस सगळ्या श्वापदांना बावरून सोडीत मेघगर्जनेप्रमाणें वरचेवर शब्द करीत त्या यज्ञमंडपाकडे आलें. तो बिलवासीप्राणी मोठ्या धिटाईनें मनुष्यवाणी धरून ह्मणाला, ‘ कुरुक्षेत्रामध्यें उंच्छवृत्तीवर रहाणाऱ्या दानशूर ब्राह्मणाच्या सक्तुप्रस्थाबरोबर कांहीं हा यज्ञ नाहीं. ’ त्याचें तें भाषण ऐकून सर्वांना आश्चर्य वाटलें, व त्याच्या जवळ जाऊन त्याला ह्मणाले, ‘ ज्याठिकाणीं भले धार्मिक लोक जमले आहेत अशा ठिकाणीं तूं कोठून आलास? तुझें बळ काय आहे ? तुझी विद्या काय आहे ? तुझा मुख्य आधार काय आहे? आमच्या यज्ञाची निंदा करणाऱ्या तुला आह्मीं कशा रीतीनें ओळखावें ? कांहीं न सोडतां शास्त्रांत सांगितल्याप्रमाणें यथाशास्त्र जसा करावयाचा तसा हा यज्ञ आह्मीं केला आहे. सत्काराला पात्र अशांचा सत्कार यथाविधि केला आहे. मत्सरभाव सोडून अग्नीला द्यावयाच्या आहुती मंत्रपूर्वक दिल्या आहेत. नानाप्रकारच्या दानांनीं ब्राह्मण, चांगल्या युद्धाच्या योगानें क्षत्रिय, श्राद्धांच्या योगानें पूर्वज, पालनाच्या योगानें वैश्य, वासना तृप्तीच्या योगानें चांगल्या चांगल्या स्त्रिया, दयेच्या योगानें शूद्र, किरकोळ दानाच्या योगानें इतर लोक, त्याचप्रमाणें या राजाच्या शुद्धतेनें ज्ञाति व संबंधी, पवित्र अशा हवींनीं देव व रक्षणाच्या योगानें शरणागत संतुष्ट झाले आहेत, ह्मणून या बाबतींत जें कांहीं श्रुतीला सोडून तुझ्या पहाण्यांत आलें असेल तें खरें सांग, तुझे शब्द विश्वसनीय दिसत असून तूं शहाणा दिसतोस, व तुझें रूप दिव्य आहे, तूं विद्वान् ब्राह्मणांमध्यें आला आहेस तेव्हां खरें असेल तें सांग.’ असें विचारलें असतां नकुल हासत ह्मणाला, ‘ ताठ्याच्या योगानें किंवा कांहीं तरी खोटें बोलावें ह्मणून मी हें बोललों नाहीं. सक्तुप्रस्थाच्या तोडीचा हा यज्ञ नाहीं ह्मणून मी जें कांहीं बोललों व तुह्मीं जें कांहीं ऐकलें तें अगदीं खरें आहे. यासंबंधानें मी कुरुक्षेत्रामध्यें रहाणाऱ्या दानशूर उंच्छवृत्तीच्या ब्राह्मणासंबंधानें जो अद्भुत चमत्कार पाहिला व अनुभविला, ज्याच्या योगानें तो ब्राह्मण, आपली बायको, मुलगा व सून यांसह स्वर्गाला गेला व ज्याच्या योगानें माझें हें अर्धें शरीर सोन्याचें झालें ती गोष्ट सांगतों ऐका. न्यायानें मिळवून केलेल्या लहानशा दानाचें उत्तम फल तुह्मांला सांगतों ऐका. ज्या ठिकाणीं पुष्कळ धार्मिक लोक रहातात अशा कुरुक्षेत्रीं दाणे टिपून त्यावर कोणी एक ब्राह्मण, आपली बायको, मुलगा व सून यांसह उंच्छवृत्तीवर राहून तप करीत होता. त्याचें वर्तन शुद्ध व इंद्रियांवर दाब असून तो मोठा धर्मात्मा होता. कडक नियम पाळीत राहून तो नेहमीं तिसऱ्या प्रहरीं एकदां जेवीत असे व कधीं कधीं त्या वेळींही तें त्याला मिळत नसे; तेव्हां दुसऱ्या दिवशीं त्या वेळपर्यंत तो कांहीं खात नसे. कोणे एके वेळीं मोठा दुष्काळ पडला असून त्याच्या जवळ कांहीं सांठा नव्हता. ओषधी वगैरे सर्व पार नाहींशा झाल्या होत्या व जवळ पैसाही नव्हता. ह्मणून रोजच्यारोज तिसऱ्या प्रहरीं सुद्धा त्याला अन्न मिळेनासें झालें. अशा वेळीं शुक्लपक्षामध्यें भर बारा वाजण्याच्या उन्हांत उन्ह व भूक यांनीं पीडून जाऊन उंच्छवृत्तीनें तो तप करीत असतां त्याला कांहींच मिळेनासें झालें; याप्रमाणें तो आपल्या माणसांसह भुकेनें पीडिला जाऊन कुडींत जीव धरून कसे तरी दिवस काढीत होता. याप्रमाणें चाललें असतां एके दिवशीं त्याला सरासरी अट्ठेचाळीस मुठी ( प्रस्थ ) जव मिळाले, ते घेऊन त्यानें पीठ केलें व जपादिक आन्हिक आटोपून यथाविधि अग्नीला आहुति दिल्यावर बारा बारा मुठी ( एकेक कुडव ) त्या सर्वांनीं वांटून घेतल्या; ते तीं माणसें खाणार इतक्यांत कोणी एक अतिथि

त्यांकडे आले, त्याला पाहून त्या सर्वांना आनंद झाला. त्यांना अभिवादन करून कुशल विचारल्यावर आत्मनिग्रह व श्रद्धापूर्वक, असूया, राग किंवा मत्सर मनांत न धरतां मान व मद सोडून शुद्ध मनानें त्यांनीं आपलें ब्रह्मचर्यव्रत व गोत्र त्याला कळवून त्याचेंही तें विचारून घेतल्यावर त्या भुकेनें पीडलेल्या अतिथीला त्यांनीं आपल्या झोंपडीमध्यें नेलें व 'हें आसन, हें पाय धुण्याला पाणी, हें अर्घ्य' असें ह्मणून तीं त्याला देऊन 'व्रतपूर्वक मिळविलेलें हें पीठ घ्या' म्हणून त्या ब्राह्मणानें आपला वांटा त्या अतिथीला दिला. तें खाऊन त्याचें समाधान झालें नाहीं; तेव्हां त्याची भूक निवाली नाहींशी पाहून याला आतां काय द्यावें, हा आतां तृप्त कशानें होणार, असा तो विचार करीत असतां 'माझा वांटा यांना द्या, तो खाऊन यांना तृप्त होऊन जाऊं द्या,' म्हणून बायको त्याला ह्मणाली तरी ती बिचारी साध्वी फार भुकेली आहे हें त्याला माहीत असल्यानें त्याला तिचें म्हणणें पसंत पडलें नाहीं, व आपल्यावरूनच ती बिचारी ह्मातारी भुकेनें व्याकुळ होऊन थकली भागली आहे असें पाहून अस्थिपंजर उरून कांपत कांपत उभी असलेल्या आपल्या बायकोला तो म्हणाला, 'कल्याणि किडे, पक्षी, पशु यांमध्यें सुद्धां बायकांचें रक्षण करून पोषण करणें धर्म समजला आहे; तेव्हां तूं असें म्हणूं नकोस. बायको नवऱ्याजवळ ममतेनें वागून त्याची काळजी घेऊन त्याला वाढविते. धर्म, काम व अर्थ यांचीं सर्व कामें, सेवा, कूळ संतति हीं सर्व बायकोवर अवलंबून असून पितर व स्वतः यांसंबंधीं कर्तव्य तिच्यावरच अवलंबून आहे. बायकोचें रक्षण करणें ज्याला कळत नसून जो पुरुष त्याला असमर्थ आहे ता झगझगीत यशाला मुकून अयशाचा वांटा पदरीं घेऊन नरकाला जातो. त्याला चांगले लोक कधीं मिळत नाहींत.' असें तो ह्मणाला असतां ती ह्मणाली, 'आपला धर्म व अर्थ एकच आहे, तेव्हां माझ्यावर कृपा करून हा पिठाचा चवथा हिस्सा घ्या. बायकांचा खरेपणा, प्रीति, धर्म, आपल्या गुणांनीं मिळविलेला स्वर्ग व वासनातृप्ति हीं सर्व नवऱ्यावर अवलंबून आहेत. बायकोचा ऋतु व पुरुषाचें बीज मिळून संतति उत्पन्न होते. नवरा हा बायकांना श्रेष्ठ दैवत असून त्याच्या कृपेनेंच त्यांना रतिसुख व पुत्रफल मिळतें. तो पालन करीत असल्यामुळें त्याला पतित्व येत असून भरण करीत असल्यामुळेंच त्याला भर्ता हें नांव आलें आहे; त्याचप्रमाणें मुलगा दिल्यानें तो वरद होतो ह्मणून आपण हें पीठ घ्या. हे वृद्ध अतिथी जरेनें घेरले असून भुकेनें पीडून जाऊन आपल्या सारखेच दुबळे झाले आहेत. असें ती ह्मणाली असतां तिचा वांटा घेऊन तोही त्यानें त्या ब्राह्मणाला दिला. तो खाऊन सुद्धां त्या ब्राह्मणाचें समाधान झालें नाहींसें पाहून तो ब्राह्मण मोठ्या काळजींत पडला; तेव्हां त्याचा मुलगा त्याला म्हणाला, 'हें माझ्या वांट्याचें पीठ आपण घेऊन या ब्राह्मणांना द्या. हें माझें कर्तव्य आहे असें मी समजतों; कारण हरतऱ्हेनें आपलें परिपालन मला केलें पाहिजे; कारण वृद्ध पित्याचें पालन करावें असें भल्याचें म्हणणें आहे. म्हातारपणीं बापाचें पालन करणें हें मुलाचें कर्तव्य आहे, व तिन्ही लोकांमध्यें श्रुतीची ही शाश्वत आज्ञा आहे. जीव राहील तरच आपल्या हातून तप होणार आहे. जीव राखणें हाच मोठा धर्म आहे.' हें ऐकून बाप ह्मणाला, तुला हजार वर्षें झालीं तरी तूं मला लहानच असणार; कारण मुलाला उत्पन्न करून त्याच्यामुळेंच बाप कृतकृत्य होतो. मुलाची भूक मोठी असते हें मला ठाऊक आहे. मी ह्मातारा असल्यानें मला कशी तरी ती आवरून धरतां येईल. तूं कसा तरी बळवान ऐस. म्हातारपणामुळें भुकेची मला कांहीं बाधा होत नाहीं व मीं पुष्कळ दिवस तप केलें असल्यामुळें मला मरणाची भीति मुळींच नाहीं.' हें ऐकून मुलगा ह्मणाला, 'मी आपला मुलगा आहें. पुरुषाचें त्राण करीत असल्यामुळें मुलाला पुत्र हें नांव मिळतें. आत्मा हाच पुत्र समजला आहे. ह्मणून या आत्मस्वरूपी पुत्राच्या साह्यानें आत्म्याचें (स्वतःचें) रक्षण करून घ्या.' हें ऐकून बाप ह्मणाला, 'रूपानें, शीलानें व आत्मनिग्रहानें तूं माझ्यासारखाच आहेस. तुझी मीं पुष्कळ प्रकारांनीं परीक्षा केली. आतां तुझ्या वांट्याचें पीठ घेतों, असें ह्मणून तें घेऊन त्यानें त्या ब्राह्मणाला दिलें. तें खाऊन सुद्धां त्या ब्राह्मणाची तृप्ति झाली नाहींसें पा-

हून त्या धर्मात्म्याला लाज वाटली; तेव्हां त्याचें मन ओळखून त्याप्रमाणें करण्यासाठीं आपल्या वांट्याचें पीठ घेऊन त्याच्याजवळ येऊन त्याची साध्वी सून त्याला ह्मणाली, 'महाराज, आपल्या संतानापासूनच मला संतान होणार; तेव्हां हें पीठ घेऊन या अतिथींला द्या. आपल्या प्रसादानेंच मला अक्षय्य लोक खात्रीनें मिळणार. मुलाच्या योगानेंच जेथें गेलें असतां शोक करण्याची पाळी येत नाहीं असे लोक मिळतात. धर्म व अग्नि यांच्या त्रयीप्रमाणें शाश्वत अशी स्वर्गत्रयी मुलगा व नातू यांवर अवलंबून आहे. पुत्र ऋणापासून बापाला तारतो ह्मणतात. मुलानातवांच्या योगानेंच मनुष्याला चांगले लोक मिळतात.' सासरा ह्मणाला, 'उन्हानें व वाऱ्यानें तुझें अंग चिरून गेलें असून तुझ्या तोंडावरची कळा गेली आहे; त्याचप्रमाणें भुकेनें तूं व्याकूळ झाली आहेस; तेव्हां धर्मघातक काम करून मीं तुझें पीठ कसें बरें घ्यावें ? तेव्हां तूं असें ह्मणूं नकोस. शौच, शील व तप यांनीं युक्त अशा तुला व्रतामध्यें राहून तिसऱ्या प्रहरीं एकदां खात राहून कष्टांत दिवस काढणारीला कांहीं खावयास मिळालें नाहीं हें माझ्यानें कसें पहाववणार ? तूं स्त्री अमन पोर आहेस व भुकेनें व्याकुळ आहेस. तुझें मीं नेहमीं रक्षण केलें पाहिजे. तूं बांधवांना आनंदविणारी अशी उपासानें अगदीं थकून गेली आहेस.' सून म्हणाली, ' माझ्या गुरूचे आपण गुरू आहां व दैवताचें दैवत आहां; तेव्हां हें पीठ आपण घ्या. हा देह, हा प्राण, हा धर्म हें सर्व गुरूच्या सेवेसाठीं आहे. आपल्या प्रसादानेंच आह्मांला उत्तम लोक मिळणार आहेत. हिच्याकडे नजर दिली पाहिजे ह्मणून, हिची माझ्यावर पूर्ण भक्ति आहे म्हणून किंवा हिची मला काळजी घेतली पाहिजे म्हणून, आपण हें पीठ घ्या.' हें ऐकून सासरा म्हणाला, 'हे साध्वि, ह्या शीलानें तूं नेहमीं फार शोभतेस. नेहमीं धर्म व व्रत यांत गढून राहून तू गुरूच्या सेवेमध्यें कसें गढून असावें याकडे लक्ष देऊन आहेस म्हणून तुझीही धार्मिकामध्यें गणना करून मी हा तुझा भाग घेतों. तुझा हिरमोड करणें मला उचित नाहीं.' असें म्हणून त्यानें तिचा भाग घेऊन तो त्या ब्राह्मणाला दिला. तो घेऊन तो ब्राह्मण संतुष्ट होऊन प्रत्यक्ष धर्माचें रूप धरून त्याला ह्मणाला, 'न्यायानें मिळवून शुद्ध अंतःकरणानें तुझ्या शक्तीप्रमाणें दिलेल्या या दानानें मी संतुष्ट झालों आहे. हा पहा स्वर्गामध्यें स्वर्गवासी लोक तुझ्या दानाचा डंका वाजवीत असून आकाशांतून फुलांचा वर्षाव होत आहे. देवर्षी, देव व गंधर्व, त्याचप्रमाणें देवदूत तुझ्या दानानें थक्क होऊन तुझी स्तुति करीत आहेत. विमानांत बसलेले ब्रह्मर्षी व ब्रह्मलोकामध्यें संचार करणारे हे दुसरें तुझ्या भेटीला आतुर झाले आहेत; म्हणून तूं आतां स्वर्गाला जा. पितृलोकाला गेलेल्या व न गेलेल्या अशा सर्व पितरांना तूं तारलें आहेस. अनेक कालपर्यंत ब्रह्मचर्य पाळून यज्ञ व तप करून तूं दान दिलें आहेस. या तुझ्या शुद्ध धर्माच्या योगानें तूं स्वर्गाला जा. मोठ्या श्रद्धेनें तूं तप आचरीत आहेस; तेव्हां या तुझ्या दानानें देव संतुष्ट झाले आहेत. अशा बिकट प्रसंगीं ज्याअर्थीं मनांत कांहीं विचार न आणतां शुद्ध अंतःकरणानें तूं हें दान दिलें आहेस त्याअर्थीं ह्या तुझ्या कर्मानें तूं स्वर्ग जिंकला आहेस. **भूक मनुष्याची अक्कल नाहींशी करून धर्मबुद्धि घालविते** व भुकेनें घेरल्यामुळें मनुष्याचा धीर सुटतो. जो या भुकेला जिंकतो, व जेव्हां मनुष्याला दानाची गोडी लागते तेव्हां त्याच्या धर्मावर पाणी पडत नाहीं. मुलगा, बायको, सून या कोणाचा स्नेह न धरतां धर्म श्रेष्ठ समजून तृष्णेचीसुद्धां तूं पर्वा केली नाहींस. पैसा मिळणें हें मनुष्याला सामान्य असून सत्पात्रीं दान हें त्याहून श्रेष्ठ आहे. वेळ प्रसंग पहाणें त्याहून श्रेष्ठ असून श्रद्धा ही सर्वांत श्रेष्ठ आहे. फार सूक्ष्म असें स्वर्गाचें द्वार मोहामुळें लोकांच्या नजरेला येत नाहीं. ज्याच्या मुळाशीं लोभ आहे, विषयवासनेचा ज्याच्यावर पहारा आहे. व ज्याकडे जाऊन पोंचतां येणें कठिण आहे, अशा प्रकारचा स्वर्गाचा अडसर असून ज्यांनीं राग व इंद्रियें जिंकलीं आहेत अशा तपामध्यें गढून आपल्या शक्तीप्रमाणें दान करणाऱ्या ब्राह्मणांनाच तो दिसतो. हजारांची माया असून जो शंभर देतो, शंभरांची माया असून जो दहा देतो व जो शक्तीप्रमाणें नुसतें पाणी देतो या सर्वांना फळ सारखें आहे. रंतिदेवराजाजवळ कांहीं उरलें नाहीं तेव्हां शुद्ध

मनानें पाणी देऊन तो स्वर्गाला गेला. मोठमोठीं दानें दिल्यानेंच धर्म संतुष्ट होतो असें नाहीं, न्यायानें मिळवून श्रद्धापूर्वक दिलेल्या लहानशा दानानें सुद्धां तो संतुष्ट होतो. नृग राजानें हजार गोप्रदानें करून त्यांत एक दुसऱ्याची गाय दिल्यानें तो नरकाला गेला. शिबिराजा आपल्या अंगाचें मांस काढून देऊन पुण्यवान लोक मिळवून स्वर्गामध्यें सुखांत नांदत आहे. मनुष्याला वैभव हेंच पुण्यकारक नसून चांगल्या रीतीनें मिळविलेलें आपल्या शक्तीप्रमाणें दान करणें हेंच चांगलें समजलें आहे. न्यायानें मिळविलेलें दान केल्यानें जें फल मिळतें तें नानाप्रकारच्या हजारों यज्ञांनीं मिळत नाहीं. रागामुळें दानाच्या फळावर पाणी टाकून लोभानें मनुष्याला स्वर्ग मिळत नाहीं. ज्याला न्यायाचें इंगित कळलें आहे असा सरळ मार्गानें तपामध्यें गढून रहाणारा स्वर्गाचा उपभोग घेतो. नानाप्रकारचे राजसूय किंवा अश्वमेध यज्ञ यांच्या तोडीचें फल देणारें हें तुझें दान आहे. या एवढ्याशा पिठानें तूं अक्षय्य ब्रह्मलोक मिळविला आहेस; तेव्हां रजोगुणाचा ज्या ठिकाणीं लेश नाहीं, अशा ब्रह्मलोकाला तूं खुशाल जा. तुह्मां सर्वांसाठीं हें पहा विमान आलें आहे. त्यांत बसून तुह्मी सुखानें चला. पहा मी प्रत्यक्ष धर्म आहे. तूं आपला उद्धार केला असून तुझी लोकांमध्यें कायमची कीर्ति झाली आहे, तूं या सर्व आपल्या बायकामुलांसह स्वर्गाला जा.' याप्रमाणें तो धर्म ह्मणाला असतां तो ब्राह्मण विमानांत बसून स्वर्गाला निघून गेल्यावर मी आपल्या बिळांतून बाहेर आलों. तेथें त्या पिठाच्या वासानें व पाणी पडून झालेल्या चिखलानें त्याचप्रमाणें तेथें पडलेल्या दिव्य पुरुषांच्या सुवासानें व त्यानें केलेल्या दानाचे अंशानें माझें डोकें सोन्याचें झालें. त्या सत्यशील ब्राह्मणाच्या पिठाचे दानानें माझें हें अर्धें शरीर सोन्याचें झालें आहे पहा. याचप्रमाणें दुसरा अर्धाभाग सोन्याचा कसा होईल ह्मणून मी नेहमीं तपोवनें व यज्ञ याठिकाणीं फिरत असतों. हा युधिष्ठिराचा यज्ञ ऐकून मी सबंध सोन्याचा होईन अशा आशेनें येथें आलों; परंतु तसेंकांहीं न झाल्यामुळें हा यज्ञ त्या पिठाच्या दानाच्या तोडीचा नाहीं असें मी ह्मणालों.' असें ह्मणून तो मुंगूस अदृश्य झाला व ब्राह्मण आपापल्या घराकडे गेले.

पूर्वी जमदग्नींनीं श्राद्ध ठरविलें असतां त्यांचा होमधेनु त्यांच्याकडे आली व त्या ऋषींनीं स्वतः तिची धार काढली व तें दूध त्यांनीं एका नव्या स्वच्छ व मजबूत भांड्यांत ठेविलें. धर्म रागाचें रूप घेऊन त्या भांड्यांत शिरला. आपण यांच्या मनाविरुद्ध केल्यानें हे काय करतात हें पहाण्यासाठीं त्यानें तें दूध नासून टाकलें. तें दूध नासणारा राग आहे हे जाणून जमदग्नि त्यावर रागावले नाहींत. तेव्हां राग त्यांनीं आपल्याला जिंकलेंसें पाहून ब्राह्मणस्त्रीचें रूप धरून त्यांपुढें उभा राहून ह्मणाला, ' मला आपण जिंकलें आहे. भृगुकुलांतले लोक फार रागीट आहेत अशी लोकामध्यें पडलेली म्हण आपण आज खोटी केली आहे. आपण आज मला जिंकलें आहे, आपण महात्मे आहांत. क्षमाशील आहांत. आपली आज्ञा ऐकण्याला तयार असा हा मी येथें उभा आहें. आपल्या तपाची मला मोठी भीति वाटते. तेव्हां आपण माझ्यावर कृपा करा. जमदग्नि म्हणाले, ' हे रागा, मी आज तुला मूर्तिमान पाहिलें आहे। कांहीं मनांत चिंता न धरतां तूं वाटेल तिकडे जा. माझें कांहीं नुकसान तूं केलें नाहींस. माझा तुझ्यावर बिलकुल राग नाहीं. पितरांसाठीं मीं हें दूध ठेविलें होतें तेव्हां त्यांकडे जाऊन त्यांचें म्हणणें काय आहे हें ऐकून घे.' हें ऐकून राग घाबरून तेथें अदृश्य झाला. पितरांच्या शापानें तो मुंगूस झाला. शापाचा शेवट व्हावा म्हणून त्यानें पितरांना प्रसन्न केलें व त्यांच्या सांगण्यावरून मोठमोठ्या यज्ञांची निंदा करीत जेथें जेथें यज्ञ होईल तेथें तो फिरत राहिला. तोच येथें या युधिष्ठिराच्या यज्ञाला आला असून युधिष्ठिराची निंदा करून तो त्या शापांतून मुक्त झाला. कारण युधिष्ठिर हा प्रत्यक्ष धर्म होता.

याप्रमाणें यज्ञच फार श्रेष्ठ आहे असें नाहीं. हजारों ऋषी केवळ त्यांच्या तपानें स्वर्गाला गेले आहेत. सर्व भूतमात्रांच्या ठिकाणीं अद्रोह, संतोष, शील, सरळपणा, तप, आत्मनिग्रह, सत्य व दान यांपैकीं प्रत्येक यज्ञाच्या तोडीचें आहे. पूर्वी इंद्राच्या एका यज्ञाच्यावेळीं यज्ञकर्म सुरू असून अग्नीमध्यें

होते यथाशास्त्र हवि देत असतांना ऋषी तेथें बसले असून देवांना सुस्वरयुक्त अशा वेदमंत्रांनीं बोलावीत होते. अध्वर्यु लोक न दमतां यजुर्वेद म्हणत होते. पशु मारण्याच्या वेळीं पशूला जवळ घेतलें असतां त्या दीन पशूंना पाहून त्या ऋषींना कींव येऊन ते इंद्राला म्हणाले, ' हा यज्ञविधि कांहीं चांगला नव्हे. धर्मसंचय करण्याची तुझी बुद्धि असून हें तुझ्या ठिकाणीं अज्ञान दिसत आहे. यज्ञामध्यें पशू मारलेच पाहिजेत असा कांहीं शास्त्राधार नाहीं. ही गोष्ट केवळ धर्माला आड येणारी आहे. हा कांहीं पवित्र यज्ञ नव्हे; कारण हिंसेला कधीं धर्म म्हणतां येत नाहीं. तुझी इच्छा असेल तर ऋत्विजांना शास्त्रप्रमाणें तुझा यज्ञ करूंदे. तशा सशास्त्र यज्ञाच्या योगानें मोठा धर्म तुझ्या पदरीं पडेल. तीन वर्षे ठेवलेल्या बीजांनीं यज्ञ कर. हा धर्म मोठा चांगला असून उत्तम फल देणारा आहे. ' असें ऋषी ह्मणाले तरी अभिमानाच्या योगानें मोहाच्या तावडींत जाऊन इंद्रानें तें ऐकलें नाहीं. जंगम किंवा स्थावर ( सजीव किंवा निर्जीव ) कशानें यज्ञ करावा या संबंधानें त्यांच्यामध्यें वादविवाद झाला. वादाचा कंटाळा येऊन ऋषींनीं इंद्राशीं तडजोड करून वसु राजाला या बाबतींत निकाल विचारला; तेव्हां दोन्ही बाजूंच्या मुद्यांचा नीट विचार न करतां जवळ असेल त्यानें यज्ञ करावा असा त्यानें निकाल दिला. या त्याच्या अविचारानें भलतें बोलण्याबद्दल त्याला खालीं नरकाला ( रसातळाला ) जावें लागलें; ह्मणून एका ब्रह्मदेवाखेरीज दुसऱ्या कोणी एकट्यानें कधीं मत ठोकून देऊं नये. ज्याची बुद्धि अशुद्ध आहे. अशा पापी मनुष्यानें दिलेल्या सर्व दानांचें कांहीं फल न होतां फुकट जातात. त्या अधर्माकडे प्रवृत्ति ठेवणाऱ्या हिंसक दुरात्म्याची दानानें येथें किंवा परलोकीं कोठेंच कीर्ति होत नाहीं. जो मूर्ख मनुष्य धर्मासाठीं ह्मणून अन्यायानें मिळविलेला पैसा खर्च करून यज्ञ करतो त्याला धर्मफल कधीं मिळत नाहीं. जो नराधम पापकर्मानें पैसा मिळवून उगीच धर्माचा ध्वज मिरवून लोकांचा विश्वास बसण्यासाठीं दान देतो; परंतु स्वतः जो रागमोहाच्या तावडींत सांपडला असतो, तो शेवटीं वाईट गतीला जातो. कोणी लोभमोहाच्या तावडींत जाऊन संचयाच्या मार्गे लागलेला असतो, व आपल्या पापकर्मानें व दुर्बुद्धीच्या योगानें तो भूतमात्रांना भेवडवितो. जो मनुष्य अशा वाईट उपायांनीं पैसा मिळवून त्याच्या योगानें दान किंवा यज्ञ करतो त्याला त्या यज्ञाचें किंवा दानाचें फळ कधीं मिळत नाहीं. तप हाच ज्यांचा पैसा आहे, असे लोक उंच्छवृत्तीनें टिपलेलें धान्य, फळें, मुळें, वनस्पती, पाणी किंवा पानें यथाशक्ति दान करून मोठें पुण्य संचय करून स्वर्गाला गेले आहेत. अशा प्रकारच्या दानांमध्यें मोठें पुण्य असून मोठमोठ्या तपाच्या तोडीचें हें आहे. अशा प्रकारचीं दानें त्याचप्रमाणें सर्व भूतमात्रांवर दया, ब्रह्मचर्य, सत्य, धैर्य, क्षमा, अनुक्रोश हे शाश्वत अशा सनातन धर्माचे पाये आहेत. विश्वामित्र, असित, जनक, कक्षसेन, आर्ष्टिसेन, सिंधुद्वीप वगैरे राजांनीं न्यायानें मिळविलेल्या वस्तूंचें दान करून मोठी सिद्धि मिळविली आहे. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्रांपैकीं जे तपाकडे लागून दानानें शुद्ध होतात ते स्वर्गाला जातात.' जनमेजय ह्मणाला, ' आपण उंच्छवृत्तीनें मिळवून पीठ दान केल्याचें महाफल सांगितलें तें मी ऐकलें; न्यायानें मिळविलेल्या पैशानें जर स्वर्ग मिळतो तर सर्व यज्ञांसंबंधानें खरा निश्चय कसा ठरवावा ? ' वैशंपायन ह्मणाले, ' यासंबंधांत पूर्वी अंगरसऋषींच्या मोठ्या यज्ञाच्या वेळीं घडलेली गोष्ट ऐक. पूर्वी महातेजस्वी अगस्त्य बारा वर्षांच्या सत्राची दीक्षा घेऊन बसले. त्या महात्म्याच्या यज्ञामध्यें अग्नीसारखे तेजस्वी पुष्कळ हवन करणारे होते. त्यांमध्यें कांहीं फलमूलांवर रहाणारे होते, कांहीं केवळ दगडानें कुटून धान्य खाणारे होते, कांहीं चंद्रकिरणांवर रहाणारे होते व कांहीं केवळ त्यांच्यापुढें ठेवलेलें अन्न खाऊन रहाणारे होते. कांहीं देव, पितर व अतिथी यांना दिल्यावांचून न खाणारे होते. त्यांपैकीं कांहीं यती होते, कोहीं भिक्षु होते, त्या सर्वांना धर्माची प्रत्यक्ष गांठ पडली होती. राग जिंकून इंद्रियांवर त्यांचा पूर्ण ताबा होता. ते अभिमान व हिंसा यांपासून अलग होते. नेहमीं वर्तन चोख असून त्यांच्या वर्तनामध्यें इंद्रियांकडून कांहीं आडकाठी येत नसे. अशा प्रकारचे ऋषी त्या यज्ञामध्यें हजर असून त्यांनीं त्यांतील निरनिराळीं

कर्में यथासांग शेवटास नेलीं. त्या यज्ञासंबंधानें अन्न अगस्त्यांनीं न्यायानें यथाशक्ति मिळविलेलें असें होतें; तेव्हां याप्रमाणें ते यज्ञांत गुंतले असतां इंद्रानें पाऊस बंद पाडला; कर्में चाललीं असतां त्यामध्यें ऋषी लोक अगस्त्यासंबंधानें आपसांत बोलूं लागले कीं, 'अगस्त्यांनीं तर अगदीं मोकळ्या मनानें असें दान चालविलें आहे. पाऊस तर बंद झाला आहे. आतां अन्न कसें पिकणार ? हा यज्ञ बारा वर्षेपर्यंत टिकणारा असून तोंपर्यंत इंद्र पाऊस पाडणार नाहीं; तेव्हां याची वाट काय होणार ?' हें अगस्त्यांचे कानावर जाऊन ते ह्मणाले, 'जर इंद्रानें पाऊस पाडला नाहीं तर मी मानसयज्ञ करीन, किंवा स्पर्शयज्ञ करीन. याला शास्त्राचा आधार आहे; त्याचप्रमाणें हरप्रयत्नानें मी कठीण व कडक नियम पाळून दुसऱ्या प्रकाराचे यज्ञ करीन. केवळ बीजावरच चालविलेला हा माझा यज्ञ बारा वर्षें चालणार आहे व हा मी बीजाच्या योगानेंच शेवटास नेऊन सिद्धि मिळवीन. यामध्यें कोणत्याही प्रकारचें विघ्न येणार नाहीं. हा फुकट घालविण्याचें कोणाच्या अंगीं सामर्थ्य नाहीं. इंद्र पाऊस पाडो किंवा न पाडो; त्याची मला पर्वा थोडीच आहे. जर तो आपल्या मनानें पाऊस पाडणार नाहीं तर मीच स्वतः इंद्र होऊन सर्व प्राणिमात्रांना जिवंत ठेवीन. जो जो मनुष्य ज्या ज्या अन्नावर राहिला आहे तें तें अन्न त्याला त्याला पूर्वीप्रमाणें मिळेल. एवढेंच नव्हे तर आणखी सुद्धां मी वाटेल तें करीन. आज येथें सोनें वगैरे तिन्ही लोकांतील सर्व संपत्ति आणून टाकतों. दिव्य अप्सरा, गंधर्व, किन्नर, विश्वावसु या सर्वांना येथें हजर ठेवून उत्तरकुरूमध्यें असलेला सर्व पैसा येथें आणवितों. सर्व स्वर्गवासी लोक एवढेंच नव्हे तर प्रत्यक्ष येथें धर्माला आणवितो,' असें ते म्हणाल्याबरोबर त्यांच्या तपाच्या सामर्थ्यानें सर्व कांहीं त्याप्रमाणें घडलें. त्या ऋषींना त्यांचें तें तपोबल पाहून आश्चर्य वाटून ते म्हणाले, 'आपल्या ज्या केवळ भाषणानें आम्ही संतुष्ट आहों. अशा कामांत आपण आपलें तप खर्ची घालावें असें आम्हांला वाटत नाहीं. जें कांहीं न्यायानें मिळालें असेल त्याच्या योगानें केलेल्या यज्ञांनीं आम्ही तुष्ट आहों. यज्ञ, दीक्षा, होम व दुसरीं कोणतींही कर्में न्यायानें मिळविलेल्या तुमच्या आहारावर राहून आपल्या कर्मामध्यें दक्ष राहून आम्ही करूं इच्छितों. वेद, ब्रह्मचर्य हे न्यायानें पाळून ब्रह्मचर्यकाळ संपल्यावर घरांतून बाहेर पडून यथाशास्त्र आह्मी तप करीत आहों. ज्यामध्यें हिंसेचा भाग नाहीं असा हा आपला यज्ञ यथासांग झाला आहे. असा अहिंसापूर्वक केलेलाच यज्ञ चांगला. आम्हांला याचा फार संतोष आहे.' असें ते ह्मणताहेत तोंच इंद्र त्यांचें तें तपोबल पाहून त्यांचें तें सत्र सरेपर्यंत पाऊस पाडित राहिला. असा हा अहिंसायज्ञाचा महिमा आहे.

---

# १५ आश्रमवासीपर्व.

---

## ३०८ धृतराष्ट्राची वनवासाची तयारी.

( १५. १–४ )

शत्रूंना मारून महात्म्या पांडवांनीं याप्रमाणें राज्य मिळविल्यावर धृतराष्ट्राच्या विचारानें ते पृथ्वीचें परिपालन करूं लागले. विदुर, संजय त्याचप्रमाणें वेश्यापुत्र युयुत्सु हे नेहमीं धृतराष्ट्राचे जवळ असत. पांडव सर्व कार्यें त्याला विचारून त्याच्या परवानगीनें करीत. नेहमीं ते धर्मराजाच्या सांगण्यावरून त्याकडे जाऊन त्याच्या पायावर डोकें ठेवीत व त्यानें मस्तक हुंगून आशीर्वाद दिल्यावर मग कोणत्याही कामाला लागत. कुंति ही नेहमीं गां-

धारीच्या अनुरोधानें वागे. द्रौपदी, सुभद्रा व दुसऱ्या पांडवस्त्रिया या दोन्ही सास्वांच्या ठिकाणीं सारखेपणानें रहात. नानाप्रकारचीं मौल्यवान वस्त्राभरणें, बिछाने व राजाला उचित असे खाण्याचे व उपभोगाचे पदार्थ युधिष्ठिर धृतराष्ट्राला पुरवीत असे. द्रोणांचे मेहुणे महाधनुर्धारी कृप हे नेहमीं त्याच्याजवळ असत. भगवान व्यास नेहमीं त्याच्याजवळ राहून पुरातन देव, ऋषी, पितर व राक्षस यांच्या गोष्टी सांगून त्याचें मनरंजन करीत. विदुरांच्या उत्तम राजनीतिमुळें **थोडक्या पैशांत सामंत राजाकडून पुष्कळ मोठमोठीं कार्यें शेवटास जात.** कैदेंत टाकणें किंवा कैदेंतून सोडणें, जीवदान देणें, ह्या सर्व गोष्टी विदुर करीत; धर्मराज या गोष्टींमध्यें हात घालीत नसे. विहार, यात्रा, इत्यादिकांचे वेळीं धर्मराज धृतराष्ट्राला लागेल तें पुरवीत असे; आरालिक, ( भाजी तयार करणारे ) आचारी व रागखांडव ( पिंपळी, सुंठ, साखर घालून तयार केलेलें पक्वान्न ) तयार करणारे आचारी पूर्वीप्रमाणेंच धृतराष्ट्राच्या सेवेला हजर असत. दारू, मासे, मांस, व नानाप्रकारचीं गोड पेयें व खाण्याचे पदार्थ पूर्वीप्रमाणेंच त्यासाठीं तयार होत. जे कांहीं राजे हास्तिनापुराला येत ते पूर्वीप्रमाणेंच त्याच्यापुढें येऊन उभे रहात. नेहमीं त्याचे सभोंवतीं ऋषी लोक असत. ब्राह्मणांला देण्याचीं अग्रहारें तो त्यांना देत असे. वडिलांच्या त्याचप्रमाणें मुलांच्या व सुहृदांच्या श्राद्धतिथीला त्याच्या मनांत असेल त्याप्रमाणें सर्व व्यवस्था होत असे. सर्व पांडव धर्मराजाच्या मनाप्रमाणें वागण्यासाठीं त्याच्या सांगण्याप्रमाणें वागत. भीमाच्या मनांतून मात्र द्यूतामध्यें धृतराष्ट्राच्या दुर्बुद्धीमुळें घडून आलेली गोष्ट कधीं गेली नाहीं. मुलगे जिवंत असतांना धृतराष्ट्राला जितकें सुख होतें तेवढें सुख त्याला मिळूं लागलें. पांच पांडव नेहमीं अगदीं नियमशील शिष्याप्रमाणें धृतराष्ट्राच्या आज्ञेमध्यें असत. व तोही त्यांच्याशीं गुरुभावानें असे. याप्रमाणें पांडव त्याचा बहुमान करून चांगल्या रीतीनें वागत आल्यामुळें धृतराष्ट्राचें त्यांवर फार प्रेम बसत चाललें व गांधारीही पुत्रशोक टाकून आपल्या मुलाप्रमाणें त्यांच्यावर प्रेम करूं लागली. या वर्तनानें फार संतुष्ट होऊन त्या मूढबुद्धि धृतराष्ट्राला आपल्या मुलाची आठवण होऊन दुःख होई; नेहमीं सकाळीं उठून शुद्ध होऊन जप केल्यावर पांडवांना रणामध्यें जय यावा ह्मणून तो देवापाशीं प्रार्थना करी. ब्राह्मणांकडून स्वस्तिवाचन करवून अग्नीला आहुति दिल्यावर पांडवांचें आयुष्य वाढण्याविषयीं तो प्रार्थना करी. या पांडवांपासून त्याला जो संतोष होई तो आपल्या मुलांपासून कधीं झाला नाहीं. युधिष्ठिराच्या भीतीनें धृतराष्ट्राचें किंवा दुर्योधनाचें दुष्कृत्य बोलून दाखविण्यास कोणी धजत नसे. भीम हा आपल्या भावाच्या आज्ञेप्रमाणें वागत होता खरा, परंतु धृतराष्ट्राला पाहून त्याचें मन खवळत असे व जरी तो युधिष्ठिराबरोबर त्याच्याजवळ जाई तरी त्याचें हृदय त्यापासून माघार घेत असे. आदरासंबंधानें राज्यामध्यें लोक युधिष्ठिर व धृतराष्ट्र यांमध्यें भेदभाव ठेवीत नसत; परंतु धृतराष्ट्राच्या मनांत भीमासंबंधानें वांकडें येई, व भीमालाही नेहमीं दुष्टासारखा असणारा तो मनापासून आवडत नसे. ह्मणून दिसून न येईल अशा रीतीनें तो त्याचें वाईट करीत असे व त्यासंबंधीं नोकरांना दिलेल्या आज्ञांच्या उलट त्यांना तो सांगत असे. त्याचा पूर्वीचा दुष्ट सल्ला व दुर्वर्तन आठवून आपल्या जिव्हाळ्याच्या लोकांमध्यें हा दंड थोपटून अगदीं रागावून निष्ठुर शब्दांनीं ह्मणत असे कीं, 'त्या आंधळ्याचे मुलगे मीं ह्या कांबीसारख्या बाहूंनीं चिरडून परलोकाला पाठविले आहेत. या माझ्या चंदन चोपडलेल्या बाहूंमध्यें सांपडून त्यांचा चुराडा उडाला आहे.' या व अशा प्रकारच्या शल्यासारखें टोंचणाऱ्या भीमाच्या भाषणानें धृतराष्ट्राच्या मनाला वाईट वाटे. या सर्व खोड्या गांधारीसुद्धां काळाची वाट पहात निमुटपणें ऐकत राहिली. याप्रमाणें पंधरा वर्षें लोटल्यावर भीमाचे वाग्बाण असह्य होऊन धृतराष्ट्राला फारच उद्विग्नता वाटली. युधिष्ठिराला किंवा दुसऱ्या कोणा पांडवांना यांतलें कांहींच माहीत नव्हतें. नकुल सहदेव मात्र भीमाच्या मागून असत. परंतु धर्मराजाचें मन संभाळण्याकरितां कांहीं वांकडेंतिकडें बोलत मात्र नसत. याप्रमाणें चाललें असतां धृतराष्ट्रानें आपल्या सुहृदांना जवळ बोलावून डोळे पाण्यानें भरून येऊन तो त्यांना ह्मणाला, 'कौरवांचा नाश कसा

झाला आहे हें तुह्मांला ठाऊकच आहे. मीं ज्ञातीला संकटांत पाडणाऱ्या त्या मंदबुद्धि दुर्योधनाला कौरवांचा स्वामी करून माझ्या हितचिंतकांचा उपदेश ऐकला नाहीं. त्याचप्रमाणें या गुणवान महात्म्या पांडवांनाही वडिलोपार्जित राजलक्ष्मी मीं दिली नाहीं. श्रीकृष्णाला सर्व राजांचा नाश डोळ्यापुढें दिसत असल्यामुळें त्यानें केलेली मध्यस्थी आह्मांला मानवली नाहीं. तर याप्रमाणें झालेलें माझें कपटवर्तन शल्याप्रमाणें माझ्या हृदयाला बोंचीत आहे. ह्मणून त्या पापापासून शुद्ध होण्यासाठीं मी नेमस्त राहून कधीं चवथ्या तर कधीं आठव्या दिवशीं ठरलेल्या वेळीं भुकेपुरतें मात्र खात असतों. मी जपामध्यें गढून राहून भूमीवर दर्भ पसरून त्यावर कातडें घालून निजत असतों. रणामध्यें पळ न काढतां युद्ध करून मेलेल्या माझ्या शंभर मुलांबद्दल मला बिलकुल वाईट वाटत नाहीं; कारण त्यांना क्षात्रधर्म पूर्ण कळत होता. ' असें ह्मणून तो युधिष्ठिराला ह्मणाला, ' हे कुंतिपुत्रा, तुझें कल्याण असो. माझें ह्मणणें ऐक. तूं माझी उत्तम काळजी घेतलीस; मी येथें सुखांत राहिलों; मीं श्राद्धें केलीं; मोठमोठीं दानें दिलीं; यामुळें माझ्या सामार्थ्यानुरूप केलेलें माझें पुण्य फारच वाढलें आहे. द्रौपदीची खोडी करून तुला वैभवाला मुकविणारे माझे दुष्ट मुलगे स्वधर्मानें युद्धांत मेले आहेत. तेव्हां त्यांच्या संबंधानें कांहीं करावयाचें उरलें नाहीं. रणांत शत्रूला तोंड देऊन मेल्यानें त्यांना उत्तम लोक मिळाले आहेत. आतां मला माझें व गांधारीचें हित करून घेतलें पाहिजे. तूं धर्मवत्सल आहेस, सर्व लोकांना राजा गुरू आहे; ह्मणून तुझ्या आज्ञेनें गांधारीसह लंगोटी व वल्कलें धारण करून तप करीत व तुला आशीर्वाद देत मी वनांत राहीन ह्मणतों. म्हातारपणीं मुलाला ऐश्वर्य देऊन वनांत रहावयास जाणें हा आमच्या कुलाचा धर्मच आहे. त्याठिकाणीं वायु भक्षण करून किंवा कांहीं न खातां तप आचरीत राहीन. तूं राजा असल्यानें तुलाही त्या तपाचें फळ मिळेल; कारण प्रजेच्या बऱ्यावाईट गोष्टींचें फळ राजाला मिळत असतें. ' युधिष्ठिर ह्मणाला, ' आपल्याला असें कष्टी पाहून मला कांहीं हें राज्य गोड वाटत नाहीं. राज्यलोभांत गुंतून हातून चुका करीत रहाणाऱ्या मला दुर्बुद्धीला धिक्कार असो; कारण आपण असे कष्टी होऊन अन्न सोडून देऊन उपवास करीत जमिनीवर पडत असतां हें सुद्धां मला किंवा माझ्या भावांना ठाऊक नाहीं. आपलें मन मला कळूं न देण्यांत आपण मला फसविलें आहे. कारण मला पूर्वीं विश्वास देऊन असें दुःख आपण भोगीत आहां. ज्या माझ्यासाठीं आपल्याला हीं दुःखें होत आहेत, त्या मला राज्य, भोग, यज्ञ किंवा सुख घेऊन काय करावयाचें आहे ? या आपल्या दुःखाच्या उद्गारांवरून आपल्याला किंवा राज्याला पीडा झाली असावी असें मला वाटतें. आई, बाप, गुरु सर्व मला आपण आहां. आपण सोडल्यावर आह्मांला आधार कोठें उरला ? वेश्यापुत्र युयुत्सु हा आपला औरस मुलगाच आहे. त्याला राजा करा, किंवा दुसऱ्या एखाद्याला राजा करा. मी वनाला जातों व आपण राज्य करा. अपकीर्तीनें आधींच करपून गेलेल्या मला फिरून डागूं नका. मी राजा नसून आपण राजे आहां व मी आपला गुलाम आहें; तेव्हां वडिलांना मी परवानगी देण्याला कसा धजावेन ? दुर्योधनासंबंधानें आमच्या पोटांत बिलकुल राग नाहीं. तें सारें तसेंच घडावयाचें असल्यामुळें आह्मां सर्वांनाच मोह पडला. दुर्योधनादिकांसारखेच आह्मी आपले मुलगे आहों. गांधारी व कुंति यांच्यामध्यें मला भेदभाव नाहीं. तेव्हां जर आपण मला: सोडून जाल तर अगदीं खरोखर मी आपल्या मागून येईन. ही संपन्न व सागरांत पृथ्वी आपल्यामागें मला गोड वाटणार नाहीं, हें सर्व आपलें आहे. आपल्या पायांवर डोकें ठेवून मी आपल्याला विनवितों. आह्मी सर्व आपल्या ताब्यांत आहों. हा मनस्ताप टाकून या. जें कांहीं कपाळीं लिहून ठेविलें होतें तें आपल्यावर येऊन पडलें. आपल्या सेवेमध्यें दक्ष राहून मी आपलें हें मानसिक दुःख दूर करीन. ' धृतराष्ट्र ह्मणाला, ' हे कुरुनंदना, माझ्या मनाला आतां तप करावेंसें वाटतें. उतारवय झालें असतां अरण्याला जाणें हें आमच्या कुलाचें व्रतच आहे. मी पुष्कळ दिवस येथें राहिलों, व तूंही पुष्कळ दिवस माझी शुश्रूषा केलीस. आतां तूं मला ह्मातान्याला परवानगी दे ', कांपत कांपत हात जो-

हून आपल्यापुढें उभा असलेल्या युधिष्ठिराला असें ह्मणून तो संजय व कृप यांना ह्मणाला, 'तुह्मी आर्ता याचें समाधान करा. उतारवयामुळें व बोलण्याच्या श्रमामुळें माझें मन म्लान होऊन तोंड अगदीं सुकून गेलें आहे.' असें ह्मणून तो मेल्याप्रमाणें गांधारीला टेकला. याप्रमाणें त्याला बेशुद्ध झालेला पाहून युधिष्ठिर अगदीं घाबरून जाऊन ह्मणाला, 'ज्यांचे अंगांत एक लक्ष हत्तींचें बळ होतें, व ज्यांनीं भीमाचा लोखंडी पुतळा बाहूंमध्यें चूर करून टाकला त्यांना आज असें थकून बायकोचा आधार घेण्याची पाळी आली. ज्याच्यामुळें हे महाराज आज अशा अयोग्य रीतीनें पडले आहेत, त्या मला पाप्याला धिक्कार असो. जर हे किंवा गांधारी अन्न घेणार नाहींत तर मीही उपवासच करीन; असें ह्मणून आपला हात सुवासिक पाण्यानें भिजवून त्यानें त्याच्या छातीवरून व तोंडावरून फिरविला. त्यानें शुद्धीवर येऊन धृतराष्ट्र ह्मणाला, 'तात, फिरून माझ्या अंगावरून हात फिरीव, तुझ्या हस्तस्पर्शानें मला जीव येत चालला आहे. तुझें डोकें हुंगून तुझ्या अंगावरून हात फिरवावा असें मला वाटतें. आज मला अन्न घेतलेल्याला आठ दिवस झाले, त्यामुळें माझ्यानें हालचाल होत नाहीं. तुझी विनवणी करण्यांत मला फार श्रम झाल्यामुळें मन म्लान होऊन मला बेशुद्धि आल्यासारखी झाली; परंतु तुझा अमृतासारखा हात लागून फिरून मी जिवंत झालों आहें.' असें ह्मणून त्याला आलिंगन देऊन त्यानें त्याचें मस्तक हुंगलें. विदुरप्रभृति मंडळींना दुःख होऊन ती रडूं लागली. दुःखातिरेकामुळें त्यांच्या तोंडांतून शब्द निघेनात. गांधारी आपलें सर्वदुःख मनामध्येंच दाबून ठेवून, 'असें करूं नका,' ह्मणाली. त्या ठिकाणीं जमलेल्या इतर स्त्रियांचे डोळे पाण्यानें भरून आले. धृतराष्ट्र फिरून युधिष्ठिराला ह्मणाला, 'बा भरतश्रेष्ठा, मला तपाला जाण्याला परवानगी दे. बोलून बोलून माझा घसा कोरडा पडत चालला आहे. उगीच आतां तूं मला क्लेश देऊं नकोस.' याप्रमाणें तो बोलला असतां सर्वांमध्यें एकच हाहाकार उडून राहिला. याप्रमाणें सुकून फिका पडून केवळ अस्थिपंजर उरलेल्या अशा त्याला घट्ट आलिंगन देऊन डोळ्यांतून पाणी काढीत युधिष्ठिर ह्मणाला, 'मला ह्या पृथ्वीची किंवा ह्या प्राणाची जरूर नाहीं. आपली इच्छा असेल त्याप्रमाणें करण्याला मी तयार आहें. जर मी आपला आवडता असून आपली मजवर कृपा असेल तर आधीं आपण जेवा. मग पुढें काय करावयाचें त्याचा विचार करतां येईल. धृतराष्ट्र ह्मणाला, 'तूं परवानगी दिल्यावर मग जेवावें असें माझ्या मनांतून आहे.' याप्रमाणें त्यांचें चाललें असतां व्यास त्या ठिकाणीं येऊन ह्मणाले, 'तात युधिष्ठिर, धृतराष्ट्र ह्मणतो त्याप्रमाणें कांहीं विचार न करतां कर; कारण हा वृद्ध झाला असून विशेषेंकरून मुलांना मुकला असल्यामुळें हें दुःख याला फार दिवस सोसतां येईल असें मला वाटत नाहीं. महाभाग मायाळू गांधारी ही शहाणी असल्यामुळें पुत्रशोक मोठ्या धैर्यानें सहन करीत आहे. तेव्हां यांना वनाला जाण्याला आज्ञा दे. फुकट येथें मरूं देऊं नकोस. पूर्वींच्या राजर्षींच्या गतीला याला मिळूं दे. ते सर्व आजपर्यंत वृद्धापकाळीं वनालाच गेले आहेत.' तें ऐकून युधिष्ठिर ह्मणाला, 'आपण माझे गुरू असून या कुलाला मुख्य आधार आपलाच आहे. माझे वडील, गुरू, सर्व आपण आहां. शास्त्राप्रमाणें मुलांनें वडिलांच्या आज्ञेंत असलेंच पाहिजे.' यावर व्यास फिरून म्हणाले, 'तूं म्हणतोस तें ठीक आहे. हा राजा वृद्ध दशेला येऊन अगदीं खंगला आहे, म्हणून तुझ्या आमच्या विचारानें त्याच्या इच्छेप्रमाणें होऊंदे. एक रणामध्यें किंवा विधिपूर्वक वनामध्यें मरावें हा राजर्षींचा श्रेष्ठ धर्म आहे. तुझ्या पित्यानें शिष्यवृत्तीनें गुरूप्रमाणें याची शुश्रूषा केली आहे. यानें अनेक यज्ञ करून तुम्हांला वनाला पाठविलें व तेरा वर्षें यथेच्छ पृथ्वीचा उपभोग घेऊन वाटेल तेवढा पैसा दान केला आहे. तूं आपल्या नोकरांसह याची शुश्रूषा करून याचें व गांधारीचें मन प्रसन्न करून घेतलें आहेस. आतां याचा तप करण्याचा समय असल्यामुळें याला परवानगी दे. तुझ्यासंबंधानें याला एवढा सुद्धां राग नाहीं.' युधिष्ठिरानें या शब्दांना मान देऊन धृतराष्ट्राला परवानगी दिल्यावर व्यास वनाला निघून गेले. नंतर युधिष्ठिर धृतराष्ट्राला म्हणाला, 'व्यास जें म्हणाले व जें आपल्यालाही संमत आ-

हे तें मला कबूल आहे; परंतु आतां डोकें पायांवर ठेवून मी एवढेंच मागतों कीं, आधीं जेऊन मग आपण वनाला चला.'

## ३०९ वनाला निघालेल्या धृतराष्ट्राचा युधिष्ठिराला उपदेश. (१५. ५-७)

याप्रमाणें युधिष्ठिरानें परवानगी दिल्यावर धृतराष्ट्र गांधारीला बरोबर घेऊन शक्ति फार कमी झाली असल्यामुळें खंगलेल्या हत्तीप्रमाणें हळू हळू पावलें टाकीत आपल्या वाड्याकडे निघाला. विदुरप्रभृति मंडळी त्याच्यामागून होती. घरीं गेल्यावर पूर्वाह्णविधि सर्व आटोपून मग त्यानें भोजन केलें. कुंतिप्रभृति स्त्रियांनीं आदरपूर्वक सत्कार केल्यावर गांधारीही जेवली. याप्रमाणें त्यांचें व विदुरप्रभृतींचें जेवण झाल्यावर पांडव धृतराष्ट्राजवळ येऊन बसले; तेव्हां तेथें एकांतामध्यें असतां युधिष्ठिराच्या अंगावरून हात फिरवून धृतराष्ट्र ह्मणाला, 'बा कुरुनंदना, तूं राज्याच्या अष्टांगासंबंधानें कधीं दुर्लक्ष करूं नकोस. धर्माकडे लक्ष देऊन राज्य कर; कारण धर्मानेंच राज्याचें रक्षण करतां येणें शक्य आहे. विद्येनें वृद्ध आहेत अशांचें ऐकत जा व तें सांगतील तें वितर्क न करतां करीत जा. दररोज सकाळीं उठून त्यांचा सत्कार करीत जा. वेळ आली असतां त्यांचा सल्ला घेत जा. सर्व इंद्रियांना घोड्याप्रमाणें आवर; ह्मणजे संचय केलेल्या द्रव्याप्रमाणें हें तुझ्या हिताचें होईल. कपट ज्यांना माहीत नाहीं अशा पिढीजाद, शुद्ध व आत्मनिग्रही प्रधानांची सर्व महत्त्वांच्या कामाकडे योजना कर. शत्रूला न कळत शत्रूमध्यें आपल्या राष्ट्रांत राहणारे, नानाप्रकारें कसोटीस लावलेले हेर फिरीव. तट, वेशी, उंच उंच हवेल्या ह्यांनीं युक्त अशा नगराचें उत्तम प्रकारें संरक्षण कर. त्याला सहा तट ठेवून त्यांचीं सर्व द्वारें नीट व चांगल्या बंदोबस्ताचीं असूं दे. व त्यावर तोफा ठेवून त्याचें रक्षण करीत जा. ज्यांचें कुल व शील कळलें आहे अशा लोकांशीं तुझा संबंध असूंदे. जेवणखाण, आहारविहार, शयन इत्यादि ठिकाणीं आपल्याला चांगलें संभाळीत जा. शीलवान, कुलवान व विद्वान वृद्ध व हितेच्छु अशा लोकांच्या नजरेखालीं ठेवून बायकांचें नीट रक्षण करीत जा. विद्याविशारद, विनयसंपन्न, कुलीन, धर्मार्थामध्यें कुशल व सरळ अशा ब्राह्मणांना तूं आपले सल्लागार करून त्यांच्यांशीं मसलत करीत जा. **पुष्कळांशीं एकदम फार मसलत करूं नकोस.** सर्व एकत्र असले तरी कोणत्या तरी बाहण्यानें त्यांना निरनिराळे करून त्यांच्याशीं मसलत करीत जा. मसलतीचे ठिकाणीं कोणाला येऊं देऊं नकोस. **माडीवर किंवा ज्या ठिकाणीं गवत उगवलें नाहीं अशा अरण्यामध्यें मसलत करीत जा. रात्रीचे वेळीं कधीं मसलत करूं नकोस. माणसाळून राहणारे वानर व दुसरे पक्षी, त्याचप्रमाणें जड, पंगु इत्यादि लोक मसलतीचे ठिकाणीं ठेवूं नकोस.** मसलत फुटल्यानें राजावर जे प्रसंग ओढवतात ते कशानेंही फिरून जुळवून आणतां येणें शक्य नाहीं. मंत्रीमंडळामध्यें मसलत फुटल्यानें ओढवणाऱ्या प्रसंगासंबंधानें त्याचप्रमाणें ती गुप्त राहिल्यानें होणाऱ्या फायद्यासंबंधानें त्यांना नीट समजून सांगत जा. पौरजन व देशांतले लोक हे शुद्ध आहेत किंवा कसे यासंबंधानें माहिती काढून घेत जा. तुझ्या हितामध्यें दक्ष असणाऱ्या लोकांशीं व्यवहार ठेवून, तुझ्यावर संतुष्ट असून तुझ्या हितामध्यें दक्ष असणारे हेर ठेवीत जा. दंडाला पात्र अशा लोकांना परिणाम ओळखून दंड करीत जा. लोकांना यथान्यायानें तूं आपल्याकडे वळवून घेत जा. **लांचलुचपतीला सोकावलेले, परस्त्रीवर नजर ठेवणारे, कडक शासन करणारे, खोटें वर्तन करणारे, दुसऱ्याच्या नांवानें खडे फोडणारे, लोभी, दुसऱ्याला लुचाडणारे, साहसी, सभास्थानें व मठ यांची नासाडी करणारे इत्यादि लोकांना देशकालाकडे नजर देऊन दंड करीत जा किंवा ठार करीत जा.** पैशाची व्यवस्था ज्यांच्याकडे आहे अशा लोकांकडे सकाळीं उठल्याबरोबर आधीं लक्ष देऊन मग अलंकार व भोजन करीत जा; व त्यानंतर योध्यांची भेट घेऊन त्यांना आनंदवीत जा. दूतांची व हेरांची संध्याकाळीं भेट घेत जा, व कोणतेंही काम करणें तें पहाटेच्या वेळीं ठरवीत जा. मध्यरात्रीला त्याचप्रमाणें मध्यान्हकाळीं विहार करीत जा. ज्या ज्या

कामांना ज्या ज्या वेळा ठरल्या असतील त्या त्या वेळीं पोषाख करून तूं तयार ऐस. कामाच्या वेळा चक्राप्रमाणें फिरत असतात. खजिन्याची न्यायानें वाढ करण्याला मोठी खबरदारी घेत जा, व अन्यायानें तो भरण्याकडे प्रवृत्ति ठेवूं नकोस. शत्रू व तुझें उणें पडलेलें पहाण्याला टपून असलेले लोक यांची हेरांकडून माहिती मिळवून तुझ्या हिताकडे लक्ष असणाऱ्या लोकांकडून त्यांना लांबूनच मारवीत जा; नोकरांना त्यांचें वर्तन पाहून पसंत करीत जा, व त्यांच्या त्यांच्याकडून तीं तीं कामें करवून घेत जा. तुझा सेनापती तुझ्या ठिकाणीं विश्वासू असून शूर, वाटेल ते क्लेश सहन करणारा, तुझ्या हिताकडे पूर्ण लक्ष देणारा असा असूं दे. देशांतील कारागीर लोक बैलाप्रमाणें किंवा गाढवाप्रमाणें तुझीं कामें करण्याला तयार असूं देत. तुझ्या हिताकडे लक्ष ठेवून आपापल्या कामांत वाकबगार असणाऱ्या लोकांना त्यांच्या त्यांच्या योग्यतेप्रमाणें पोटाला देऊन तूं त्यांच्यावर अनुग्रह करीत जा. शहाण्या राजानें आपल्या प्रजेचीं सर्व कामें यथास्थित चाललीं आहेत किंवा नाहींत, याकडे लक्ष द्यावें, व प्रजेची पर्वताप्रमाणें राजावर अढळ निष्ठा असावी. आपल्या शत्रूच्या व जे उदासीन किंवा मध्यस्थ आहेत अशांच्या, त्याचप्रमाणें चार प्रकारच्या शत्रूंच्या, आततायींच्या, मित्रांच्या व शत्रूंच्या मित्रांच्या मंडलासंबंधानें माहिती करून घ्यावी; त्याचप्रमाणें अमात्य, देशांतले लोक, नानाप्रकारचे किल्ले व सैन्य यांमध्यें कांहीं बिघाड पडला नाहीं असें नेहमीं पहात असावें. या वर सांगितलेल्या बारा गोष्टींकडे राजाचें विशेष लक्ष असलें पाहिजे. बारा व साठ मिळून बाहात्तर गोष्टींना मंडल ही संज्ञा असून त्यांकडे राजाचें नीट लक्ष असावें. यावरच सामादि सहा प्रकार अवलंबून आहेत. वाढ, ओहोटी त्याचप्रमाणें कायम स्थिति यांकडे लक्ष द्यावें. वर सांगितलेल्या बहात्तर गोष्टींवर सामादि सहा अवलंबून आहेत. ज्या वेळीं आपला पक्ष बलवान असून शत्रुपक्ष दुर्बळ असतो, तेव्हां शत्रूशीं विग्रह करून त्यांना जिंकावें; जेव्हां शत्रू बलवान असून आपला पक्ष दुबळा असेल तेव्हां त्याच्याशीं संधि करावा. पैशाचा चांगला संचय करावा, व चालून जाण्याचें सामर्थ्य येईल तेव्हां मग विचार करीत राहूं नये, व विचार न करतां ज्या ज्या जागेला जे जे योग्य असतील त्यांना त्या त्या जागेवर नेमावें. उलट प्रसंग आला असतां पडजमीन किंवा हिणकस सोनें किंवा दुबळें सैन्य शत्रूला द्यावें; परंतु आपला जय होऊन शत्रूकडून घेण्याचा प्रसंग असतांना याच्या उलट घ्यावें. ओलीसाकरितां राजपुत्र मागावा. याच्याहून निराळ्या रीतीनें वागणें श्रेयस्कर नाहीं. एखादा प्रसंग गुदरला असतां नीट विचारानें त्यांतून सुटण्याचा प्रयत्न करावा. दीन अशा प्रजेला संभाळावें; आपलें स्वतःचें रक्षण करून घेऊन एकदम किंवा हळू हळू शत्रूला पीडा देण्याचा, अटकावण्याचा किंवा त्याच्या खजिन्याचा मोड करण्याचा यत्न करावा. आपल्या ताब्यांत असणाऱ्या सामंत राजाला वैभवेच्छूनें कधीं दुखवूं नये. जो पृथ्वी जिंकूं पहातो त्याला पीडा न करतां त्याच्या मंत्र्यांमध्यें फूट पाडण्याचा प्रयत्न करावा. भल्यांना जवळ करावें. पाप्यांना शिक्षा करून बलवानानें दुबळ्याच्या वाटेला जाऊं नये. एखादा बलवान एखाद्या दुबळ्यावर चालून आला असतां त्यानें वेतसी वृत्ति धरून क्रमानें सामादिक उपायांनीं त्याला परतवावें; तें न साधल्यास आपले मंत्री, खजिना, पौरजन व दुसरे जे कोणी आपलें प्रिय करण्याला तयार असतील त्यांच्या साह्यानें त्यावर तुटून पडावें आणि हेंही मिळण्यासारखें नसेल तर एकटेंच तुटून पडावें; कारण रणांत मरणें मुक्तिदायकच आहे.

संधि व विग्रह हेही दोन प्रकारचे असून त्यासंबंधानेंही अनेक उपाय व अनेक विचार आहेत. स्वतःसंबंधानें शांतपणें बलाबलाचा विचार करून मग शत्रूची गांठ घ्यावी. ज्या शत्रूचें सैन्य संतुष्ट व पुष्ट आहे व जो स्वतः बुद्धिमान आहे अशावर एकदम चालून न जातां त्याचा पाडाव करण्याच्या उपायाचा मोठ्या काळजीपूर्वक विचार करावा; पण याच्या उलट शत्रूची स्थिति असल्यास त्यावर बेशक चालून जावें. सर्व अनुकूल स्थिति असतां शत्रूचा पाडाव होणें शक्य आहे, परंतु याप्रमाणें पाडाव केल्यावर परतून आपली स्थिति चांगली भक्कम करून असावें, व शत्रूला नानाप्रकारच्या संकटांत

पाहून त्याच्यामध्यें फूट पाडण्याचा, त्याला जर्जर करण्याचा, भिवडविण्याचा व हल्ले करून त्याच्या सैन्याचा नाश करण्याचा प्रयत्न करावा. आपल्या व शत्रूच्या बलाचा विचार करतांना उत्साहशक्ति, प्रभुशक्ति व मंत्रशक्ति लक्षांत घेऊन यांची अनुकूलता असल्यास शत्रूवर चालून जावें; प्रतिकूलता असल्यास जाऊं नये. राजानें द्रव्यबल, मित्रबल, पाहाडी लोकांचें बल, सैन्यबल, कारागीर व सैन्याला सामान पुरविणारे यांचें बल मिळविण्याचा प्रयत्न करावा. त्यामध्यें मित्रबल व द्रव्यबल हीं दोन सारखीं आहेत. हेराचें बल हें ह्या दोहोंच्या तोडीचें असून पुष्कळ वेळां राजानें वेळ पडली असतां याच्याकडे लक्ष द्यावें लागतें. राजावर येऊन पडणारे प्रसंगही नानाप्रकारचे असतात. त्या सर्वांचा **उघडपणें** विचार करावा. चांगलें सैन्य बरोबर घेऊन स्वारीवर निघावें; त्याचप्रमाणें अशावेळीं देशकाल व आपल्या अंगांतले गुण हेही लक्षांत घ्यावे. आपली वाढ व भरभराट ह्यांमध्यें दक्ष राहून हृष्टपुष्ट बलानिशीं राजानें स्वारीवर निघावें. स्वतःचें सामर्थ्य चांगलें असतां एखादेवेळीं अकालीं स्वारीवर निघालें असतांही चालण्यासारखें आहे. भाले हेच ज्यांतील खडक आहेत, त्याचप्रमाणें घोडे व रथ हाच प्रवाह असून जिचा कांठ ध्वजरूपी वृक्षांनीं भरून निघाला आहे व पायदळ आणि हत्ती हाच चिखल जिच्यामध्यें माजून राहिला आहे, अशी नदी शत्रूचा नाश करण्याला उपयोगांत आणावी. शुक्राचार्यांच्या शास्त्राला अनुसरून शकट, पद्म, वज्र, इत्यादि व्यूहरचना ठेवावी. शत्रूच्या सैन्यांतून हेर फिरवून व आपल्या सैन्याचें बल पाहून नंतर राजानें आपल्या किंवा शत्रूच्या प्रदेशांत युद्धाला उठावें. सैन्य संतुष्ट ठेवून बलवान् लोकांना शत्रूवर सोडावें. आपल्या राज्यासंबंधानें विचार करून सामादिक उपाय योजावे. हरतऱ्हेनें आपलें शरीर संभाळण्याविषयीं खबरदारी घ्यावी; कारण त्याच्या साह्यानेंच इहपर कल्याण करून घ्यावयाचें असतें. वर सांगितल्याप्रमाणें बरोबर वागून प्रजा धर्मानें पालन केल्यानें राजा प्रजेला आवडता होऊन स्वर्गामध्यें सुखोपभोग घेतो. तुला ह्या सर्व गोष्टी भीष्मादिकांनीं सांगितल्याच आहेत; परंतु उगीच माझ्या प्रेमामुळें मीं त्या फिरून सांगितल्या. हजार अश्वमेध करणें व योग्य रीतीनें प्रजापालन करणें याचें सारखें फल आहे.'

## ३१० सर्वांचा निरोप. (१५.८–१९)

ह्या धृतराष्ट्राचा निरोप ऐकून, 'माझ्या हिताकडे लक्ष देऊन आपण जो कांहीं मला उपदेश केला त्याप्रमाणें मी वागेन, आपण खुशाल असा,' असें युधिष्ठिर ह्मणाला. नंतर त्याची परवानगी घेऊन धृतराष्ट्र गांधारीकडे गेला व ह्मणाला, 'वनाला जाण्यापूर्वीं सर्व प्रधानांना येथें बोलावून त्यांच्या देखत भिकार द्यूत खेळणाऱ्या माझ्या मुलांच्या नांवानें ब्राह्मणांना द्रव्य देऊन मग वनाला जावें असें माझ्या मनांत आहे.' तेव्हां कुरुजांगलामधील सर्व ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र त्या ठिकाणीं जमले. त्या सर्वांना त्याचप्रमाणें आपल्या प्रधानमंडळाला व सुहृज्जनांना आलेलें पाहून धृतराष्ट्र त्यांना उद्देशून ह्मणाला, 'कौरवांचा व तुमचा पुष्कळ दिवस संबंध व एकमेकांचा एकमेकांवर जिव्हाळा असून परस्परांच्या हितामध्यें तुह्मी दक्ष आहां. व्यासांच्या व धर्मराजाच्या परवानगीनें मीं गांधारीसह वनांत जाण्याचें योजिलें आहे. तेव्हां तुह्मीही कांहीं विचार न करतां मला परवानगी दिली पाहिजे. तुमच्या आमच्यामध्यें जें हें शाश्वत प्रेम जडलें आहे हें दुसऱ्या देशांतील राजांमध्यें व त्यांच्या प्रजेमध्यें असेलसें मला वाटत नाहीं. ह्यातारपणामुळें व मुलांना मुकल्यामुळें व उपवासामुळें आह्मी खंगलों आहों. दुर्योधनाच्या ठिकाणीं ऐश्वर्य असतांना मला जें सुख मिळालें त्याहून अधिक सुख मला युधिष्ठिराकडे राज्य गेल्यापासून मिळालें आहे. शंतनूंनीं ज्याप्रमाणें या पृथ्वीचें पालन केलें त्याचप्रमाणें भीष्मांच्या आधारानें विचित्रवीर्यानेंही पालन केलें; तसाच माझा भाऊ पंडु हाही तुह्मांला फार आवडता झाला होता. मींही काळजीपूर्वक बऱ्यावाईट रीतीनें तुमची सेवा केली आहे. या निष्कंटक राज्याचा उपभोग घेत असतां दुर्योधन दुर्बुद्धि होता तरी त्यानें तुमचा कांहीं अपराध केला नाहीं. आतां त्याच्या दुर्बुद्धीमुळें अनीतीच्या फलाला अनुसरून वीरांचा भयंकर फडशा पडला ही गोष्ट वेगळी. ह्या

ऱ्या वाईट गोष्टींबद्दल तुह्मीं कांहीं मनांत आणूं नये. हा मी तुह्मांला हात जोडतों. 'हा ह्मातारा आहे, मुलांना मुकला आहे, कष्टी आहे, पूर्वींच्या राजांचा मुलगा आहे;' हें लक्षांत घेऊन तुह्मी मला क्षमा करून परवानगी द्या. ही बिचारी पुत्रशोकानें विव्हळ झालेली दीन गांधारी तुह्मांला तोंड पसरीत आहे, या युधिष्ठिराकडे ऱ्या वाईट अशा सर्व प्रसंगीं तुमचें लक्ष असावें. आतां याच्यावर कठीण प्रसंग कधीं येणार नाहीं; कारण सर्वधर्म करणारे लोकपालासारखे याचे चार भाऊ याचे सल्लागार आहेत. हा प्रत्यक्ष ब्रह्मदेवासारखा जगाचा स्वामी तुमचें यथायोग्य पालन करील. ही ठेव मी तुह्मां सर्वांच्या हवालीं करीत आहें; ही तुह्मी नीट संभाळा. तुह्मां सर्वांनाही मी या वीरांच्या हातीं ठेव ह्मणून देत आहें. तुह्मी फार राजनिष्ठ आहां, मी तुह्मांला हात जोडून त्या माझ्या अस्थिर बुद्धीच्या लोभी व स्वैर वागणाऱ्या मुलांसंबंधानें क्षमा मागतों.' याप्रमाणें तो बोलला असतां सर्व लोक संज्ञा गेल्याप्रमाणें होऊन कांहीं वेळ गप्प झाले. पुढें त्याचे फिरून फिरून करुणापर शब्द ऐकून अंगवस्त्रांनीं व हातांनीं तोंड झांकून घेऊन शोकाकुल होऊन आईबापांप्रमाणें ते रडूं लागले. धृतराष्ट्र वनाला जाणार ह्मणून दुःखानें त्यांचें हृदय अगदीं शून्य झालें. पुढें तें दुःख बाजूला ठेवून ते एकमेकांशीं बोलूं लागले व थोडक्यांत काय बोलावयाचें हें ठरवून एका आचारशील व सर्व ऋचांचें ज्ञान असलेल्या सांब नांवाच्या ब्राह्मणाला त्यांनीं आपल्या वतीनें राजाला उद्देशून चार शब्द बोलण्यास सांगितलें. तेव्हां तो ह्मणाला, 'महाराज, या सर्व लोकांनीं आपल्या वतीनें मला जें तुह्मांस सांगावयास सांगितलें आहे तें सांगतों ऐका. आपण ह्मणतां तें सर्व अगदीं बरोबर आहे. आपल्या परस्परांमधलें प्रेम अगदीं आपण ह्मणतां तशा प्रकारचें आहे. या वंशांतील राजांपैकीं कोणी कधीं प्रजेला अप्रिय झाल्याचें आह्मांला माहीत नाहीं. बापाप्रमाणें व भावाप्रमाणें तुह्मी आमचें पालन करतां. दुर्योधनानेंही कधीं आमचें कांहीं वाईट केलें नाहीं. व्यासांनीं सांगितल्याप्रमाणें करा. तेच आह्मांला थोर आहेत. आतां आपण गेल्यामुळें आपल्या शेंकडों गुणांमुळें आह्मांला पुष्कळ दुःख होणार आहे. ज्याप्रमाणें शंतनूंनीं किंवा चित्रांगदांनीं आमचें रक्षण केलें; त्याप्रमाणेंच आपल्या देखरेखीखालीं पंडु व दुर्योधन यांनीं आमचें चांगलें परिपालन केलें आहे. दुर्योधनानें एवढें सुद्धां आमचें वांकडें केलें नाहीं. बापाप्रमाणें आह्मी त्याच्यावर विसंबून होतों हें तुह्मांला ठाऊकच आहे. त्याचप्रमाणें हजार वर्षें युधिष्ठिराच्या काळजीखालीं आह्मी सुखांत राहूं. पूर्वींच्या कुरु, संवर्ण वगैरे पूर्वजांना धरूनच त्याचें वर्तन आहे. आतां ज्ञातीचा फडशा पडल्यासंबंधानें जो दोष आपण दुर्योधनाला दिला तो सुद्धां ठीक नाहीं. तें त्याचें, आपलें किंवा दुसऱ्या कोणाचें कृत्य नसून दैवाचेंच कृत्य आहे. मनुष्यप्रयत्नानें हें दैव टाळतां येत नाहीं. अठरा अक्षौहिणी एकत्र जमल्या असून त्याचा अठरा दिवसांत फडशा पडावा ही गोष्ट दैवावांचून झाली नाहीं; शिवाय रणामध्यें शत्रूला मारून मरणें हा क्षत्रियांचा धर्मच आहे; तेव्हां हा सर्व दैवाचा खेळ असल्यानें यासंबंधानें कोणीं काय बोलावें? आपण आमचे गुरु आहां व जगाचे स्वामी आहां; तेव्हां आपल्याला आह्मी परवानगी देतों. आपल्या मुलाला त्याच्या अनुयायांसह वीरलोक मिळून स्वर्गांत तो सुख भोगो व आपणही वनामध्यें व्रतशील राहून सर्व धर्म उत्तम रीतीनें पाळीत रहा. आपली ही केवळ पांडवांवरची कृपादृष्टिसुद्धां फुकट जाणार नाहीं. ते वीर त्रैलोक्याचें पालन करण्याला समर्थ आहेत; मग पृथ्वीचें पालन करणें त्यांना काय जड जाणार? ऱ्या वाईट प्रसंगीं प्रजा शीलसंपन्न अशा पांडवांना सोडणार नाहीं, व हा दीर्घदर्शी, मृदु, आत्मनिग्रही असा कुबेरासारखा युधिष्ठिरही त्यांचें चांगलें पालन करील; याचे मैत्री थोर मनाचे असून हा स्वतः शुचिर्भूत, दयावान व सरळ आहे, व हा पुत्राप्रमाणें आमचें पालन करण्याची खबरदारी घेतो. धर्मराजाच्या सहवासामुळें भीमार्जुनादिकांच्या हातूनही कांहीं भलती गोष्ट घडणार नाहीं. चांगल्याशीं चांगले व तीक्ष्णाशीं सापासारखे असे ते आहेत. आपण लावून युधिष्ठिरानें वाढविलेल्या या प्रेमाच्या रोप्याकडे प्रजेचें दुर्लक्ष होणार नाहीं; तेव्हां युधिष्ठिरासंबंधानें काळजी सोडून आपल्या पुण्यकृत्याकडे आपण लक्ष द्या.' याप्रमा-

णें तो बोलला असतां धृतराष्ट्रानें त्याची वाहवा करून सर्वांना निरोप दिला.

---

## २११ सर्वांचा श्राद्धविधि.
## ( १५. ११–१६ )

पुढें विदुरांनीं युधिष्ठिराकडे येऊन त्याला सांगितलें कीं, वनाला जाण्यापूर्वीं धृतराष्ट्राच्या मनांत भीष्म, द्रोण, बाल्हिक दुर्योधन प्रभृति युद्धांत मेलेल्या लोकांसंबंधानें श्राद्ध देण्याचें आहे, तेव्हां त्याला कांहीं पैसा पाहिजे. तें ऐकून युधिष्ठिर मोठ्या आनंदानें 'बरें आहे,' ह्मणाला. परंतु तापट भीमाला विदुराचें बोलणें पटलें नाहीं. तों त्याचा अभिप्राय ताडून किंचित नमून अर्जुन त्याला म्हणाला, 'भीमा, वडील आज वनवासाला निघाले असून जिंकलेला पैसा भीष्मादिक सुहृदांच्या उत्तरक्रियेसाठीं मागत आहेत; तेव्हां त्याला तुझा रुकार असेलच. आज सुदैवानें ज्यांच्यापुढें आपण पूर्वीं तोंड पसरलें ते धृतराष्ट्र आपल्यापुढें तोंड पसरीत आहेत, तेव्हां हा कालाचा फेरा कसा आहे पहा. तेव्हां यावेळीं आतां दुसरा कांहीं विचार मनांत आणणें रास्त होणार नाहीं. असें करणें अधर्मकारक होऊन आपल्या नांवाला त्यानें बट्टा लागेल. हें अर्जुनाचें भाषण धर्मराजालाही पसंत पडलें, भीम मात्र रागानें ह्मणाला, 'भीष्म, द्रोण वगैरे मंडळींना श्राद्ध पाहिजे तर आह्मी देऊं, त्याला हा धृतराष्ट्र कशाला पाहिजे. आमच्या शत्रूंना, आम्हांला निंदण्याला जागा सांपडूं नये. दुर्योधनप्रभृति मंडळी अगदीं अधोगतीला जाऊन मिळोत. कारण ते कुलकलंकीच या सर्व पृथ्वीचा फडशा पाडण्याला कारण झाले आहेत. तें बारा वर्षांचें वैर व द्रौपदीचा शोक वाढविणारा तो कठीण अज्ञातवास तूं कसा विसरून गेलास ? त्यावेळीं धृतराष्ट्राचें आमच्यावरचें प्रेम कोठें दडलें होतें ? कातडें नेसून सर्व अंगावरचीं भूषणें काढून ठेवून तूं त्या द्रौपदीसह युधिष्ठिरांच्या मागून चालला होतास तेव्हां ते द्रोण, भीष्म, सोमदत्त कोठें होते ? जेव्हां तेरा वर्षें वनामध्यें रानांतील फळांवर तूं राहिलास तेव्हां या वडील बापानें कांहीं बापासारखी दृष्टी ठेवली नाहीं. या कुलकलंकी मूढानें द्यूताचे वेळीं फुरफुरून जाऊन 'काय, काय जिंकलें' असें विदुरांला विचारलें, तें तूं विसरून गेलास वाटतें? ' याप्रमाणें तो बोलत असतां त्याची निर्भर्त्सना करून युधिष्ठिरानें त्याला गप्प केलें; तेव्हां अर्जुन फिरून भीमाला ह्मणाला, 'तूं माझा वडील भाऊ मला गुरुप्रमाणें आहेस. तेव्हां मला तुला कांहीं बोलतां येत नाहीं; परंतु राजर्षी धृतराष्ट्राला मान देणें सर्वस्वी उचित आहे. ज्यांनीं भल्याचा मार्ग सोडला नाहीं असे थोर लोक दुसऱ्याचे अपराध लक्षांत घेत नाहींत. ते त्याचें चांगलें तेवढेंच लक्षांत ठेवतात. ' नंतर धर्मराज विदुरांना ह्मणाला कीं, 'माझ्या खजिन्यांतून वाटेल तेवढा पैसा मुलांच्या व भीष्मादिकांच्या श्राद्धासाठीं मी देण्याला तयार आहें.' धृतराष्ट्राकडे जाऊन युधिष्ठिराचा तो निरोप त्याला कळवून विदुर ह्मणाले, 'युधिष्ठिर तुला राज्याचा व आपल्या प्राणाचा स्वामी समजत असून मुलांच्या वगैरे उत्तरकार्यासाठीं ब्राह्मणांना अग्रहारें, रत्नें गाई, दासी, दास, मेंढ्या वाटेल तितकीं देण्याला तयार आहे. ब्राह्मण, गरीब, आंधळे, दुबळे यांना चोहोंकडून बोलावून मोठी सभा तयार करवून त्यामध्यें त्यांना वाटेल तें देण्यास, त्याचप्रमाणें गुरांना पाणी पिण्यासाठीं हौद व दुसऱ्या पुण्यकारक गोष्टी करविण्यास त्यानें मला सांगितलें आहे. तेव्हां आतां तूं सांगशील त्याप्रमाणें करण्याला मी तयार आहें. ' याप्रमाणें विदुर बोलला असतां धृतराष्ट्रानें पांडवांची वहावा करून कार्तिक महादान करण्याचा विचार मनांत आणला व भीष्मासाठीं त्यांच्या योग्यतेचे मोठमोठे ऋषी त्याचप्रमाणें सुहृद व मुलगे यांसाठीं हजारों ब्राह्मण बोलावून नानाप्रकारचीं खाद्यपेयें तयार करवून वस्त्रें, सोनें, रत्नें दासदासी, कांबळीं, गांवें, शेतें, द्रव्य, अलंकारासहित साजासह हत्ती, घोडे व उत्तम उत्तम शृंगारलेल्या मुली त्यानें सर्वांच्या नांवानें दिलीं. हा श्राद्धयज्ञ सुरू असतां अनेक रत्नांचा व द्रव्याचा युधिष्ठिराच्या आज्ञेनें लोट चालला होता. वरचेवर शेंकडों मोजणारे व टिपणारे कारकून 'याला काय द्यावयाचें, त्याला काय द्यावयाचें,' ह्मणून धृतराष्ट्राला विचारीत होते व त्याच्या तोंडांतून शब्द पडल्याबरोबर ज्याला शंभर द्यावयाचे त्याला

हजार व हजार द्यावयाचे त्याला दहा हजार युधिष्ठिराच्या सांगण्यावरून दिले जात असत. याप्रमाणें तो राजरूपी मेघ धनरूपी वर्षाव ब्राह्मणांवर करून पिकाला तृप्त करणाऱ्या मेघाप्रमाणें त्यांना संतोषित करून सोडीत होता. पुढें लगेच सर्व वर्णाच्या लोकांना त्यानें अन्नपानादिकांमध्यें अगदीं बुडवून सोडलें. खरोखर, वस्त्रें, द्रव्य व अलंकार हाच ज्याचा ओघ आहे, मृदंगाचा नाद हाच ज्याचा घों घों शब्द आहे, गाई घोडे हेच ज्यामधील जलचर व भोंवरे आहेत, गावें, अग्रहारें ह्याच बेटांनीं जो भरला आहे, रत्नें व सोनें हेंच ज्यामधलें पाणी आहे, अशा नाना रत्नांचा निधि जो वर उसळणारा धृतराष्ट्ररूपी महासागर त्यानें सर्व जग बुडवून टाकिलें. याप्रमाणें त्यानें सर्व पुत्रपौत्र व पितर यांचा, त्याचप्रमाणें **आपला व गांधारीचा उत्तरविधि आटोपून घेतला.** याप्रमाणें पुष्कळ दान देऊन जेव्हां तो अगदीं थकला तेव्हां त्यानें तो दानयज्ञ बंद केला. याप्रमाणें धृतराष्ट्रानें ज्यामध्यें नटनर्तक गात नाचत होते, व ज्यामध्यें नानाविध खाद्यपेयांची रेलचेल उडाली होती, असा थोर दानयज्ञ दहा दिवसपर्यंत सुरू ठेवून तो पुत्रपौत्रांच्या ऋणांतून मुक्त झाला.

---

## ३१२ धृतराष्ट्राचें वनवासाला प्रयाण. व आश्रमवास ( १९. १७–२० )

पुढें दुसरें दिवशीं उजाडल्यावर गांधारी बरोबर वनाला जाण्याला तयार होऊन पांडवांना बोलावून धृतराष्ट्रानें त्यांचें अभिनंदन केलें. कार्तिकी पौर्णिमेची इष्टि वेदपारग ब्राह्मणांकडून यथाविधि करवून, अग्निहोत्र पुढें चालवून साली व कातडीं अंगावर घेऊन सुनांच्या घोळक्यांमध्यें चालत चालत वाड्यांतून तो बाहेर पडला. तेवेळीं कौरवपांडवांच्या बायका व दुसऱ्या कौरव वंशांतील स्त्रिया यांची एकच गडबड उडून राहिली. लाह्या व नानाप्रकारचीं फुलें यानें त्या वाड्याची पूजा करून सर्व नोकरांना देणग्या देऊन त्यांना निरोप देऊन धृतराष्ट्र निघाला; तेव्हां युधिष्ठिर हात जोडून कांपत कांपत गळा काढून, 'तात कोठें चाललां,' असें ह्मणून रडूं लागला. तेवेळीं त्या तीव्र दुःखानें विव्हळ होऊन अर्जुनानें वरचेवर सुस्कारे टाकीत अगदीं अनाथाप्रमाणें होऊन जाऊन 'असें करूं नका,' ह्मणून युधिष्ठिराला धीर दिला. पुढें सर्व मंडळी रडत रडतच युधिष्ठिराच्या मागून चालली. कुंति डोळे बांधून चाललेल्या गांधारीचा आपल्या खांद्यावर टाकलेला हात धरून चालली होती, व धृतराष्ट्र गांधारीच्या खांद्यावर हात टाकून चालला होता. द्रौपदी, सुभद्रा, तान्हें मूल घेतलेली उत्तरा, चित्रांगदा, व दुसऱ्या बायका या सर्व त्यांच्यामागून चालल्या होत्या. मोठा स्वर काढणाऱ्या कुररीप्रमाणें त्यांचें रडें ऐकूं येत होतें. चोहोंकडून चारी वर्णांच्या बायका आपल्या घरांतून बाहेर रस्त्यावर पडत होत्या. धृतराष्ट्र निघाला असतां द्यूतानंतर कौरवसभेंतून पांडव बाहेर पडले त्यावेळीं झाल्याप्रमाणें सर्व हास्तिनापुरांतील लोकांना दुःख झालें. ज्या स्त्रियांनीं पूर्वीं चंद्र किंवा सूर्य कधीं पाहिला नव्हता त्या आज कौरवराज महावनाला निघाल्यामुळें शोकाकुल होऊन राजमार्गावर आल्या. वाड्यांच्या गच्चांवरून पुरुष व बायका यांचा एकच कलकलाट उडून राहिला. बायकापुरुषांनीं भरगच्च भरलेल्या राजमार्गांतून धृतराष्ट्र हात जोडून कांपत कांपत वर्धमान वेशींतून कसाबसा बाहेर पडला. तो वरचेवर त्या जनसमुदायाला परत जाण्याला सांगत होता. राजाबरोबर जाण्याला विदूर व संजय तयार झाले होते. धृतराष्ट्रानें कृप व युयुत्सु यांना युधिष्ठिराच्या हवाली करून परतविलें. ह्याप्रमाणें सर्व परत निघाले असतां कुंति धृतराष्ट्राबरोबर वनाला निघालेली पाहून युधिष्ठिर तिला ह्मणाला, 'मी राजाबरोबर पाहिजे तर जातों, तूं या सुनांना घेऊन नगराला परत जा. महाराजांनीं तपाचा निश्चयच केला असल्यामुळें त्यांना वनाला जाऊं दे.' हें त्याचें भाषण ऐकून डोळे पाण्यांनीं भरून येऊन तशीच गांधारीला धरून पुढें जातां जातां ती त्याला ह्मणाली, 'सहदेवावर कधीं अवकृपा करूं नकोस; कारण त्याचें माझ्यावर नेहमीं प्रेम फार आहे. त्याचप्रमाणें रणांतून कधीं पाय मागें न घेणाऱ्या कर्णाची आठवण राहूं दे; कारण बिचारा माझ्या मूर्खपणामुळें रणांत मेला. तो डोळ्यापुढें दिसत नसून मी जिवंत आहें तेव्हां खरोखर माझें हृदय लोखंडाचें असलें पाहिजे. त्याला मीं उघड केला नाहीं हा

माझा दोष आहे. तेव्हां त्याच्यासाठीं चांगलें दान दे. द्रौपदीच्या मनाप्रमाणें नेहमीं वाग. भावांचें नेहमीं समाधान ठेव. आज या कुलाचें ओझें तुझ्यावर पडलें आहे. सासुसासऱ्यांच्या पायांची सेवा करीत मी वनामध्यें तप करीत राहीन.' असें ती ह्मणाली असतां सर्व पांडवांना फार वाईट वाटलें. युधिष्ठिर कांहीं न बोलतां क्षणभर विचार करून तिला दीनवाणीनें ह्मणाला, 'हें तूं काय आरंभिलें आहेस? असें बोलणें तुला शोभत नाहीं. मी तुला जाऊं देणार नाहीं. एवढी माझ्यावर कृपा कर. पूर्वीं आह्मी वनाला निघालों असतां विदुलेच्या उदाहरणानें आह्मांला उत्तेजन देऊन आतां आह्मांला सोडून जाणें तुला शोभत नाहीं. तूं सांगितलेली बुद्धि श्रीकृष्णाच्या तोंडून ऐकून राजांना मारून हें राज्य आह्मीं संपादिलें आहे. ती बुद्धि आज कोणीकडे गेली? क्षात्रधर्म सोडूं नये ह्मणून सांगून आज तूं तो सोडूं पहात आहेस. आह्मांला त्याचप्रमाणें राज्याला व सुनांना सोडून भयंकर अरण्यामध्यें तूं रहाणार कशी?' हें युधिष्ठिराचें भाषण ऐकून सुद्धां कुंतीला पुढें चाललेली पाहून भीम ह्मणाला, 'माते, मुलांनीं जिंकून मिळविलेलें राज्य भोगीत राजधर्म साधण्याचे वेळीं ही बुद्धि तुला कोठून आली? मग आमच्याकडून पृथ्वीचा फडशा तरी तूं कां पाडविलास? कशासाठीं आह्मांला सोडून तूं वनाला जाऊं इच्छीत आहेस? तूं आह्मांला वनांतून परत तरी कशाला आणलेंस? तेव्हां माते, कृपा करून वनाला जाऊं नकोस व मनगटाच्या जोरावर मिळविलेल्या युधिष्ठिरांच्या संपत्तीचा उपभोग घे.' असें नानाप्रकारें मुलगे मन वळवीत होते तरी कुंतीचा वनवासाचा निश्चय ढळला नाहीं. द्रौपदी व सुभद्रा दीनवाण्या रडत तिच्या मागून चालल्या होत्या. कुंति रडत रडत आपल्या मुलांकडे वरचेवर पहात चालली असतां डोळे पुसून मुलांना ह्मणाली, 'हे महाबाहो, तूं ह्मणतोस तें ठीक आहे. तुह्मी पूर्वीं द्यूतामध्यें राज्य गमावून सुखाला मुकून दुःखांत बुडून चालला होतां, ज्ञातीला तुच्छ झाला होतां; तेव्हां पंडूचा वंश न बुडतां तुमचें यश लयाला जाऊं नये ह्मणून मीं तुह्मांला उत्तेजन दिलें. तुह्मी सर्व इंद्रासारखे पराक्रमी असून तुह्मांला दुसऱ्याच्या तोंडाकडे पहाण्याची वेळ येऊं नये, तुह्मीं वनामध्यें दुःखांत काळ काढूं नये, ह्या दहाहजार हत्तींचें बळ असलेल्या भीमावर कठीण प्रसंग येऊं नये, त्याचप्रमाणें त्याचा हा धाकटा भाऊ इंद्रासारखा पराक्रमी अर्जुन दुःखपंकामध्यें बुडूं नये, त्याचप्रमाणें वडिलांच्या आज्ञेंत रहाणाऱ्या नकुलसहदेवांना भुकेनें मरण्याची पाळी येऊं नये, तसेंच या बिचाऱ्या द्रौपदीचें सभेमध्यें झालेले धिंडवडे फुकट जाऊं नयेत, ह्मणून मीं तुह्मांला उत्तेजन दिलें. भीमा, तुह्मी पहात असतां स्त्रीधर्माला जागत असून केळीप्रमाणें लटलट कांपणाऱ्या या द्रौपदीला ऋतुमती असतां द्यूतामध्यें जिंकल्यामुळें दुःशासनानें जेव्हां मूर्खपणानें फरफरां ओढली तेव्हांच या कुळाचा फडशा पडला असें मला कळलें. त्या दुःशासनानें केसाला धरून फरफरां ओढीत असतां सर्व वडील माणसें तोंड खालीं घालून बसलीं व ती बिचारी त्या प्रसंगांत हात देण्यासाठीं देवाचा धांवा करून कुररीप्रमाणें रडूं लागली; तेव्हां मी अगदीं वेडी होऊन गेलें होतें; ह्मणून तुमच्या अंगांत आवेश उत्पन्न करण्याकरितां विदुलेच्या तोंडच्या शब्दांनीं मीं तुह्मांला उत्तेजन दिलें. ज्याच्यामुळें कुळ नाश पावतें त्याच्या पुत्रपौत्रांना उत्तम लोक मिळत नाहींत. बाळांनो, मीं आपल्या पतीबरोबर पुष्कळ राज्यसुख भोगिलें आहे. मोठमोठीं दानें दिलीं आहेत. सोम प्यालें आहे. मीं आपल्यासाठीं विदुलेची गोष्ट श्रीकृष्णाला सांगितली नाहीं, परंतु तें तुमच्या कल्याणासाठीं सांगितलें. **मुलांनीं मिळविलेल्या राज्याची मीं कधीं इच्छा केली नाहीं.** तपानें वनामध्यें सासुसासऱ्यांची शुश्रूषा करून मी पवित्र असे पतिलोक मिळवूं इच्छितें. तपानें हें शरीर मी झिजवीत रहाणार. तेव्हां तुह्मी आतां परता. धर्माधर्माकडे नेहमीं तुमचें चांगलें लक्ष असूंद्या.' याप्रमाणें कुंतीचें भाषण ऐकून पांडव लाजून परतले. याप्रमाणें कुंति निघालेली पाहून रडण्यानें बायकांमध्यें एकच कल्होळ उडून राहिला. पांडव तिला प्रदक्षिणा घालून परतले असतां धृतराष्ट्र गांधारी व विदुर यांना ह्मणाला, 'या युधिष्ठिराच्या आईला परतूंदे. तो ह्मणाला तें सर्व खरें आहे. पुत्रांचें हें थोरलें ऐश्वर्य टाकून त्याचप्रमाणें

मुलांना सोडून मूर्खाप्रमाणें कोण वनाला निघेल. राज्यामध्यें राहून तप करतां येण्यासारखें आहे; तेव्हां हिला माझें ऐकूंदे. गांधारी तूं हिला दोन गोष्टी सांगून परतीव.' तेव्हां गांधारीनें त्याप्रमाणें कुंतीचें मार्ग परतण्याविषयीं मन वळविलें, परंतु तिचा निश्चय ढळेना. याप्रमाणें तिचा ठाम विचार पाहून कौरवस्त्रिया व पांडव दीन होऊन आपापल्या वाहनांमध्यें बसून नगराला परतले. हास्तिनापुरामध्यें सर्व लोक निरानंद, निरुत्साह असे झाले होते. पांडव गाईला मुकलेल्या वांसरांप्रमाणें खिन्न व शोकाकुल झाले होते. इकडे धृतराष्ट्रानें त्यादिवशीं मोठा पल्ला मारून भागीरथीच्या काठीं मुक्काम केला. वेदपारग ब्राह्मणांनीं जिकडे तिकडे पेटविलेले अग्नि त्या तपोवनाला शोभा देऊं लागले. धृतराष्ट्राचा अग्नी पेटल्यावर त्याची उपासना करून त्याला आहुति देऊन धृतराष्ट्रानें अस्ताला निघालेल्या सूर्याला उपस्थान केलें. विदुर व संजय यांनीं दर्भांनीं राजाचें व त्याच्या जवळच गांधारीचें आंथरूण तयार केलें. व त्याच्या जवळच युधिष्ठिराची आई कुंति दर्भासनावर सुखांत बसली. व विदुरादिक मंडळी जवळ बसली. याचक, त्याचप्रमाणें अनुयायी आपापल्या ठिकाणीं बसले. ब्राह्मण वेदाध्ययन करीत होते, व जिकडे तिकडे अग्नि पेटले होते म्हणून त्यांची ती रात्र ब्रह्मदेवांच्या रात्रीप्रमाणें प्रीति वाढविणारी झाली. पुढें ती रात्र निघून गेल्यावर सकाळचा विधि आटोपून विधिपूर्वक अग्नीला आहुती देऊन ते सर्व उपवास करीत उत्तरेच्या बाजूनें निघाले. तेथें यांकडे वनवासी ब्राह्मण, क्षत्रिय वगैरे चारी वर्णांचे लोक आले. त्यांना नाना प्रकारें संतोषवून त्यांच्या शिष्यांसह त्यांचा सत्कार करून पुढें तो राजा कुरुक्षेत्राला गेला. त्या ठिकाणीं एका आश्रमाकडे जाऊन पोंचल्यावर केकयांचा एक मोठा शतयूप नांवाचा राजर्षि त्याला भेटला. तो मुलाला ऐश्वर्य देऊन वनामध्यें येऊन राहिला होता. त्यानें धृतराष्ट्राला बरोबर घेऊन व्यासांच्या आश्रमाकडे त्याला नेलें. व्यासांनीं यथायोग्य त्यांचा सत्कार केल्यावर त्या ठिकाणीं धृतराष्ट्राला वनवासाची दीक्षा व्यासांपासून मिळाली. पुढें तो येऊन शतयूपाच्या आश्रमामध्यें राहिला. त्याला सर्व वनवासाचे विधि व्यासांच्या सांगण्यावरून शतयूपानें सांगितले. याप्रमाणें धृतराष्ट्र आपल्या अनुयायांसह तपामध्यें गढून राहिला. त्याचप्रमाणें गांधारी व कुंति वल्कलें नेसून शारीरिक कर्मानें, मनानें, शब्दानें किंवा दृष्टीनें सर्व इंद्रियांना ताब्यांत ठेवून कडक तप करीत राहिल्या. अस्थिपंजर उरून व मांस अगदीं नाहींसें होऊन जटा वाढवून कातडीं व साली पांघरून महर्षीप्रमाणें मोह दूर करून राजा कडक तप करीत राहिला. धर्मार्थ जाणणारे मोठे बुद्धिमान विदुर व संजय धृतराष्ट्राच्या व गांधारीच्या शुश्रूषेला तयार होते.

याप्रमाणें तो तेथें राहिला असतां नारद, पर्वत, व्यास वगैरे थोरथोर मुनी त्याला भेटण्याला येत. कुंति त्या सर्वांची यथाविधि पूजा करीत असे. त्यानें ते संतुष्ट होत. त्या ठिकाणीं धर्माच्या गोष्टी सांगून ते धृतराष्ट्राला रमवीत असत. कोणेएकेवेळीं कथाप्रसंगामध्यें नारद धृतराष्ट्राला म्हणाले, 'या शतयूपाचा आजा सहस्रचित्य यानें आपल्या वडील मुलाला राज्य देऊन वनांत येऊन तप करून इंद्रपद मिळविलें. त्याला मीं पुष्कळ वेळ इंद्रलोकाला गेलों असतां तेथें पाहिलें आहे. त्याचप्रमाणें डोंगरकठडीचा भगदत्त, पृषध्र, मांधात्याचा मुलगा कुरुकुत्स, त्याचप्रमाणें मोठा धार्मिक शशलोम प्रभृति मंडळी या वनामध्यें कडकडीत तप करून स्वर्गाला गेली आहेत. तूंही व्यासांच्या प्रसादानें या तपोवनाला आल्यामुळें दुर्मिळ अशा श्रेष्ठ गतीला जाऊन मिळशील. इंद्राजवळ असणारा पंडु नेहमीं तुझी आठवण करीत आहे. तुझ्या व गांधारीच्या शुश्रूषेनें या कुंतीला पतिलोक मिळतील. विदुर युधिष्ठिरामध्यें शिरल्यावर मग संजय त्याच्यामागून स्वर्गाला जाईल.' याप्रमाणें नारदांचें भाषण ऐकून धृतराष्ट्र फार संतुष्ट झाला. त्यानें नारदांची चांगली पूजा केली. तेथें जमलेल्या ब्राह्मणांनीं याप्रमाणें धृतराष्ट्राची श्रद्धा वाढविल्यामुळें त्यांची वहावा केली व त्यांनीं या धृतराष्ट्राला कोणता व कशा प्रकारचा लोक मिळणार हें आपल्या दिव्य दृष्टीनें सांगण्यास सांगितलें. त्यावरून नारद म्हणाले, 'हें यानें चालविलेलें दुष्कर तप तीन वर्षे केल्यावर गांधारीसह हा कुबेरलोकाला जाईल. तेथें कुबेराकडून याचा मोठा सत्कार होईल. हा महा-

भाग आपल्या तपानें सर्व पाप जाळून काढून स्वच्छंदानें विमानांतून देव, राक्षस व गंधर्व यांच्या लोकांमधून फिरत राहील.' याप्रमाणें नारदांचें तें मधुर भाषण ऐकून ते त्याचप्रमाणें धृतराष्ट्र फार संतुष्ट झाले. याप्रमाणें गोष्टी सांगून धृतराष्ट्राला आनंदविल्यावर ते ऋषी त्याला सोडून सिद्धांच्या गतीला जाऊन मिळाले.

---

## ३१३ पांडव धृतराष्ट्राच्या भेटीला येतात.
## (१५. २१-२९)

इकडे धृतराष्ट्र वनाला गेल्यावर पांडवांना त्याच्यासंबंधानें तसेंच कुंतीसंबंधानें फार दुःख होत होतें. सर्व नगरवासी लोक देखील फार कष्टी होते. ब्राह्मण त्यांना आठवून त्यांच्या गोष्टी बोलत. 'हा वृद्ध राजा, त्याचप्रमाणें ती महाभाग गांधारी किंवा कुंति त्या निर्जन वनांत कशीं रहातील. आजपर्यंत सुखांत राहून आतां तो वनामध्यें कसा राहिला असेल, राज्यवैभव सोडून देऊन मुलांना टाकून कुंतीनें वनवास पत्करला हें तरी तिनें मोठें विलक्षणच काम केलें. भावाची शुश्रूषा करणारे विदुर त्याचप्रमाणें स्वामीच्या पिंडाला जागणारा संजय कसे असतील कोणाला ठाऊक.' ह्याप्रमाणें लहानापासून थोरापर्यंत सर्व पौरजन चिंताकुल होऊन भेटल्या ठिकाणीं एकमेकांशीं असें बोलत असत. पांडवांनाही आपल्या वृद्ध आईसंबंधी त्याचप्रमाणें धृतराष्ट्रगांधारीसंबंधी फार दुःख झाल्यामुळें त्यांच्यानें त्यांना सोडून नगरामध्यें फार दिवस राहववलें नाहीं. त्यांची आठवण होऊन राज्य, बायका, वेदाध्ययन कशाकडेच त्यांचें लक्ष लागेना. धृतराष्ट्राची आठवण होऊन त्याचप्रमाणें तो ज्ञातीचा, रणाच्या तोंडीं त्या बाल अभिमन्यूचा, कर्णाचा, द्रौपदीच्या मुलांचा वगैरे पडलेला फडशा मनांत येऊन पांडव उदास असत. द्रौपदी व सुभद्रा यांचे मुलगे मेल्यामुळें त्या आनंदाला अगदीं मुकल्या होत्या. उत्तरेच्या परीक्षित मुलाकडे पाहून पांडव कसे तरी प्राण धरून होते. जे पूर्वी नेहमीं राज्यकारणामध्यें गढले असत, त्यांच्या हातून आतां राज्यकृत्यें कांहींच होईनात. शोकांत गढून गेल्यासारखे झाल्यामुळें त्यांना आत. कांहींच गोड वाटेना. कोणी बोललें असतां ते त्यांना उत्तर सुद्धां देत नसत. धैर्यामध्यें जे सागराप्रमाणें असून जे कधीं कोणाला हार जाणारे नव्हते, त्यांची बुद्धि शोकानें नाहींशी होऊन ते अगदीं वेडे बनले होते. कष्ट न जुमानता कुंति त्या वृद्ध जोडप्याची शुश्रूषा कशी करीत असेल, मुलांना मुकून पशूंनीं वरलेल्या वनामध्यें धृतराष्ट्र एकटा कसा राहिला असेल, अंधपतीच्या मागून गांधारी वनामध्यें कशी राहिली असेल, असे निरनिराळे विचार मनामध्यें येऊं लागून धृतराष्ट्राला भेटण्याला जाण्याचा विचार त्यांच्या मनांत येऊं लागला. युधिष्ठिराचा तो विचार पाहून सहदेव ह्मणाला, 'माझ्या मनांतून जें फार दिवसांपासून होतें तो दिवस आज आला. आपल्यासंबंधी आदरामुळें आजपर्यंत मला हें बोलतां आलें नाहीं. तपामध्यें काल कंठीत राहिलेल्या कुंतीमातेला भेटण्याचा सुदिन आज येत आहे.' द्रौपदीला हा विचार पटून ती ह्मणाली, 'सासुबाईंना कधीं भेटेनसें मला झालें आहे. आज त्या खुशाल असल्या ह्मणजे मला सुख आहे. त्यांच्या दर्शनासाठीं आज सर्व बायका एका पायावर तयार आहेत.' हें ऐकून युधिष्ठिरानें सर्व सेनापतींना बोलवून, 'पुष्कळ हत्ती, घोडे यांनीं भरलेली सेना बाहेर काढा, धृतराष्ट्र महाराजांना वनामध्यें भेटावयाला जावयाचें आहे,' असें सांगितलें व अंतःपुरावरील अधिकाऱ्यांना शिबिका व निरनिराळीं वहानें तयार करण्याची आज्ञा देऊन युधिष्ठिर ह्मणाला, 'गाड्या, धान्याचे खटारे, खजाने, खजानवीस, कारागीर वगैरे सर्वांना कुरुक्षेत्रांतील महाराजांच्या आश्रमाकडे चलूं द्या. त्याचप्रमाणें नाना प्रकारचीं भक्ष्यभोज्यें गाड्यांमधून भरून घेऊन चला. उद्यांच निघावयाचें ह्मणून दांडोरा पिटवा. वाटेंत तंबू, डेरे देववा.' असें सांगून तो भाऊ बायका व ह्मातारे कोतारे या सर्वांसह दुसऱ्या दिवशीं शहरांतून निघून कोणा लोकांना बरोबर यावयाचें असेल तर त्यांनीं यावें ह्मणून त्यांची वाट पहात पांच दिवस नगराबाहेर राहिला, व सहाव्या दिवशीं वनाला निघाला. अर्जुनप्रमुख लोकपालांसारख्या वीरांच्या रक्षणाखालीं सर्व सेना होती. निघतेवेळीं 'तयारी तयारी' ह्मणून सर्व सै-

त्यामध्यें एकच मोठा गलगलाट उडून राहिला. कोणी गाड्यांतून, कोणी घोड्यांवरून, कोणी लखलखीत अशा सोन्याच्या रथांमधून, कोणी हत्तीवरून, कोणी उंटांवरून,कोणी वीटांनीं लढणारे पायांनीं चालले होते. नागरिक त्याचप्रमाणें देशामधील लोक निरनिराळ्या वाहनांतून धृतराष्ट्राला भेटण्याला आतुर होऊन युधिष्ठिराच्या मागून चालले होते. सेनापती कृपाचार्यही राजाच्या सांगण्यावरून सेनेबरोबर होते. युधिष्ठिराच्या भोंवतीं ब्राह्मणांचा घोळका असून बंदी, भाट व स्तुतिपाठक त्याची स्तुति करीत चालले होते. त्याच्यावर पांढरें छत्र धरलें असून मोठें रथदळ त्याच्याबरोबर चाललें होतें. निरनिराळ्या तोफा व आयुधें यांनीं युक्त अशा गजदलामधून भीमसेन चालला होता. नकुलसहदेव घोड्यावरून व अर्जुन लखलखीत अशा आपल्या रथामधून राजाच्या मागून चालले होते. द्रौपदीप्रमुख बायका शिबिकांतून पैसे उधळीत चालल्या असून त्यांच्या रक्षणाकरितां त्यांच्या भोंवतीं शिपाई होते. रथ, हत्ती, घोडे यांची रेलचेल उडून जाऊन अलगुज, वीणा इत्यादि वाद्यांचा त्या सैन्यामधून गजर चालला असल्यामुळें तो थाट मोठा भव्य दिसत होता. रम्य अशा नदीतीरावर व सरोवराच्या कांठीं मुक्काम करीत हळू हळू ते कुरुपुंगव चालले. इकडे युयुत्सु व धौम्यपुरोहित युधिष्ठिराच्या सांगण्यावरून नगराचें रक्षण करण्याला राहिले होते. युधिष्ठिर क्रमानें परम पावन करणारी यमुना ओलांडून कुरुक्षेत्रामध्यें शिरल्यावर त्याला दुरूनच शतयूप व धृतराष्ट्र यांचे आश्रम दिसले. तेव्हां सर्व लोक आनंदभरित होऊन तिकडे चालले. आश्रम दूर आहे तोंच आपापल्या वहानांतून उतरून ते विनम्र होऊन त्या आश्रमाकडे निघाले. सर्व योद्धे, राष्ट्रांतील लोक व कुरुमुख्यांच्या स्त्रिया सर्व पायांनीं त्या आश्रमाकडे चालले. त्या आश्रमामध्यें कोणी नसून पशुपक्ष्यांनीं ते गजबजले होते. व केळीच्या बनांनीं त्याला उत्तम शोभा आली होती. त्या वनांतील तापसी कुतूहलानें पांडवांना भेटण्याला आले. त्यांना 'धृतराष्ट्र महाराज कोठें आहेत,' असें युधिष्ठिरानें डोळे पाण्यानें भरून येऊन विचारलें. तेव्हां ते ह्मणाले, 'राजा स्नान करून फलें व पाणी आणण्यासाठीं यमुनेला गेला आहे. तेव्हां त्यांनीं दाखवून दिलेल्या वाटेनें ते एकदम तिकडे निघाले; तों लवकरच त्यांना पायांनीं चाललेले ते सर्व समोर दिसले. तेव्हां सर्व मंडळी त्यांना भेटण्यासाठीं गडबडीनें पुढें चालली. इकडे सहदेव एकदम कुंतीकडे धांवून जाऊन तिचे पाय घट्ट धरून मोठ्यानें गळा काढून रडूं लागला. त्या लाडक्याला पाहून तिचेही डोळे पाण्यानें भरून आले व त्याला उठवून तिनें त्याला घट्ट आलिंगन दिल्यावर सहदेव आला आहे ह्मणून तिनें गांधारीला कळविलें. नंतर ती युधिष्ठिर, भीमसेन, अर्जुन व नकुल यांना भेटली. तिला त्या दंपत्याला घेऊन पायीं चालविलेली पाहून पांडव दुःखानें खालीं पडले. धृतराष्ट्रानें त्यांच्या शब्दावरून व स्पर्शावरून त्यांना ओळखून त्यांचें समाधान केलें. डोळ्यांतून पाणी काढून पांडव त्यांच्यापुढें हात जोडून उभे राहिले व त्यांच्याजवळच्या पाण्याच्या घागरी त्यांनीं घेतल्या. पुढें सर्व बायका व प्रजा धृतराष्ट्राला भेटल्या. युधिष्ठिरानें सर्वांचीं नांवें व गोत्रें धृतराष्ट्राला सांगितलीं. त्या सर्वांमध्यें आपल्याला पाहून आनंदाश्रूंनीं डोळे भरून येऊन हास्तिनापुरांत आपण वाड्यांतच आहों असें धृतराष्ट्राला वाटलें. सर्व सुनांनीं नमस्कार केल्यावर धृतराष्ट्र, कुंति व गांधारी यांना मोठा आनंद झाला. पुढें तारांगणांनीं भरलेल्या आकाशाप्रमाणें याला भेटण्याला आलेल्या लोकांनीं भरून निघालेल्या आपल्या आश्रमाकडे तो त्यांसह गेला. पुढें नाना देशांहून त्याला भेटण्याला आलेले महाभाग तापसांनीं यांपैकीं युधिष्ठिर कोण, भीम कोण, अर्जुन कोण, नकुल कोण, सहदेव कोण, द्रौपदी कोण वगैरे प्रश्न विचारले असतां संजयानें सर्वांचीं नांवें व पूर्ण माहिती सांगून त्यांची त्यांना ओळख करून दिली.

---

### ३१४ विदुरांचा मृत्यु. ( १५.२६–२७ )

तापस लोक निघून जाऊन सर्व आपापल्या जागीं बसल्यावर धृतराष्ट्रानें पांडवांना कुशल विचारलें. तो ह्मणाला, 'युधिष्ठिरा, तुझे भाऊ, नगरवासी लोक, आश्रित, प्रधान, नोकरचाकर सर्व खुशाल आहेतना? तुझ्या राष्ट्रांत ते निष्काळजी आहेतना? पूर्वीच्या राजर्षींनीं ठेवलेली जुनी राज्य-

पद्धती तूं कायम ठेविली आहेसना? न्यायाला झुगारून देऊन तूं आपला खजिना भरण्याच्या नादीं लागला नाहींसना? शत्रु, मित्र व तिऱ्हाईत यांच्या ठिकाणीं तुझें वर्तन असावें तसें आहेना! ब्राह्मणांना अग्राहारें देऊन त्यांच्याकडे योग्य लक्ष देतोसना? तुझ्या शीलानें पौर, सेवक व स्वजन हे असोत पण शत्रूदेखील संतुष्ट आहेतना? श्रद्धापूर्वक पितर व देवता यांचें तूं यजन करतोसना? अन्नपानानें अतिथींचा सत्कार करतोसना? ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र हे न्यायानें वागून आपल्या कर्मामध्यें गढून आहेतना? बायका, मुलें व म्हातारे यांना रडण्याची पाळी येऊन भीक मागावी लागत नाहींना? तुझ्या गोत्राच्या बायकांचा तुझ्या घरीं सत्कार होत असतोना? हा राजर्षीवंश तुझ्या ताब्यांत जाऊन याचें यश कमी झालें नाहींना? अशा रीतीनें धृतराष्ट्रानें विचारलें. नंतर युधिष्ठिरानें त्यांचें कुशल व धर्माचरण यासंबंधी त्यांस उलट प्रश्न विचारले, नंतर विदुराची हकीकत विचारली असतां धृतराष्ट्र त्याला म्हणाला, 'विदुर खुशाल असून कांहीं न खातां वायु भक्षण करून अंग सुकवून अस्थिपंजर उरवून घेऊन घोर तप करीत राहिला आहे. या निर्जन अरण्यामध्यें तो ब्राह्मणांच्या कधीं दृष्टीस पडतो कधीं पडत नाहीं, असें तो म्हणतो आहे तोंच विदुर दृष्टीस पडले. त्यांनीं जटा वाढविल्या असून त्यांच्या तोंडांत खडे होते. ते दिगंबर असून त्यांच्या अंगावर धूळ चढली होती. ते आश्रमाकडे परतत होते. मधून मधून दिसत, मधून मधून न दिसत असे घोर अरण्यामध्यें ते शिरत असतां युधिष्ठिर 'अहो विदुरतात, हा मी आपला प्रिय युधिष्ठिर येत आहें,' असें म्हणत त्यांच्या मागें धांवत गेला. पुढें जवळच्या वनामध्यें एकांतीं विदुर एका झाडाला टेकून उभे राहिले. अगदीं सुकून जाऊन आकृतीवरूनच उमगणाऱ्या त्यांना युधिष्ठिरानें ओळखलें व 'मी युधिष्ठिर आलों आहे,' असें सांगून त्यांच्यापुढें उभा राहून त्यानें त्यांचा बहुमान केला. पुढें विदुरांनीं युधिष्ठिराकडे कांहीं वेळ सारखी नजर लाविली; व एकाग्रतेनें याप्रमाणें दृष्टी लावून आपलीं गात्रें, प्राण व इंद्रियें यांसह योगबलाच्या सामर्थ्यानें आत्मतेजानें झळकणारे विदुर युधिष्ठिरामध्यें मिळून गेले. झाडाला टेकून आपल्याकडे डोळे लाविलेल्या विदुरांच्या देहांतून प्राण निघून गेला आहे असें धर्मराजाला दिसलें; त्याचप्रमाणें आपल्या ठिकाणीं पूर्वीहून जास्ती बळ व अनेक गुण आले आहेत असेंही वाटूं लागलें. तेवेळीं पूर्वी व्यासांनीं सांगितलेला योगधर्म व आपला पूर्वीचा वृत्तांत हे सर्व धर्मराजाला आठवले. तेवेळीं तेथेंच संस्कार करून विदुरांच्या शरीराला अग्नि देण्याचें त्याच्या मनांत आलें; परंतु इतक्यांत 'हे राजा, येथें याप्रमाणें या विदुरसंज्ञक शरीराला जाळूं नकोस. हा सनातन धर्म नव्हे, सांतानिक लोक यांना मिळणार आहेत. यतिधर्म यांच्या पदरीं पडला आहे,' अशी आकाशवाणी झाली. ती ऐकून धृतराष्ट्राकडे परत येऊन युधिष्ठिरानें ती सर्व हकीकत त्यांच्या कानांवर घातली. ती ऐकून त्या ठिकाणीं जमलेल्या सर्वांना आश्चर्य वाटलें. पुढें आपण खातों तेंच अतिथीला द्यावें असा विचार करून धृतराष्ट्रानें युधिष्ठिराला फलमूलें घेण्यास सांगितलें व सर्व पांडवांनीं त्यानें दिलेलीं फलमूलें खाल्लीं. नंतर ते सर्वांसह झाडाखालीं त्या रात्रीं राहिले. पांडव बिछाने वगैरे सोडून आपल्या आईजवळ जमिनीवरच पडले. रात्र सरून उजाडल्यावर सकाळचें आन्हिक आटोपून युधिष्ठिर आपल्या सर्व मंडळीसह धृतराष्ट्राच्या परवानगीनें ऋषींचा आश्रम पहाण्याला निघाला. जिकडे तिकडे वेदींमधून अग्नी पेटले असून मुनिजन स्नान करून अग्नीला आहुती देऊन अग्नीपुढें उभे होते. त्या वेदींच्या भोंवतीं नागरमोथे व फुलें पसरलीं असून तुपाचा धूर त्यांतील अग्नीमधून निघत होता. या वेदींच्या भोंवतीं वेदस्वरूपी ब्राह्मण व मुनिगण दिसत होते. भीति नष्ट झालेले हरणांचे कळप त्याचप्रमाणें पक्ष्यांच्या झुंडी जिकडे तिकडे फिरत होत्या. मोरांच्या केका, त्याचप्रमाणें दात्यूह व कोकिल यांचें कूहूकू असे कानाला गोड व सुखकर शब्द ऐकूं येत होते. कोठें कोठें ब्राह्मणांचा वेदघोष कानांवर येत होता. कांहीं ठिकाणीं रानांतून गोळा केलेल्या फलमूलांच्या राशी पडल्या होत्या. याप्रमाणें या तापसांचें दर्शन घेऊन त्यांच्याकरतां आणलेलीं सोन्याचीं व तांब्याचीं भांडीं, त्याचप्रमाणें कातडीं, घोंगड्या, स्रुक, स्रुव, कमंडलू, स्थाली, आसनें, लोखंडाचीं लहान-

मोठीं भांडीं, त्यांना जें कांहीं जितकें पाहिजे होतें तितकें त्यानें त्यांना दिलें. याप्रमाणें सर्व आश्रम फिरून आश्रमवासी यांना द्रव्य देऊन आन्हिक आटोपून स्वस्थ चित्तानें बसलेल्या धृतराष्ट्राकडे तो परत आला.

---

## ३१५ स्वर्गवासी कौरवांची व धृतराष्ट्राची भेट. ( १५. २८—३६ )

याप्रमाणें पांडव त्या ठिकाणीं आपल्या सैन्यानिशीं एक महिनापर्यंत सुखांत राहिले. एके वेळीं ते सर्व धृतराष्ट्राजवळ बसले असतां शतयूपप्रभृति सर्व कुरुक्षेत्रांतली मंडळी त्या ठिकाणीं आली. व्यासही देवर्षी व आपले शिष्य यांसह तेथें आले. पांडवांनीं उठून त्यांना अभिवादन केलें. सर्व आपापल्या आसनांवर बसल्यावर व्यासांनीं धृतराष्ट्राला विचारलें, ' तप ठीक चाललें आहेना ? वनवास बरा वाटतोना ? मुलांच्या मरणाबद्दल शोक होत नाहींना ? सर्व इंद्रियें प्रसन्न आहेतना ? तप दृढ निश्चयानें चाललें आहेना ? धर्मार्थ कळणारी गांधारी शोकाखालीं खचली नाहींना ? कुंति अहंकार सोडून तुझी सेवा करीत आहेना ? ही आज आपल्या मुलांना टाकून आपल्या वडिलांच्या शुश्रूषेसाठीं त्यांजवळ राहिली आहे. धर्म व दुसरे पांडव यांचें सांत्वन करून त्यांना संतुष्ट ठेवलें आहेसना ? यांना पाहून तुला आनंद होतोना ! यांच्या संबंधानें तुझें मन शुद्ध आहेना ? ज्ञान होऊन तुझें अंतःकरण शुद्ध झालें आहेना ! सर्वांच्या ठिकाणीं निर्वैरतां, सत्य व अक्रोध ही तीनच श्रेष्ठ समजलीं आहेत. या वनवासामुळें तुला शोक होत नाहींना ? यामध्यें जें मिळेल तें खाऊन रहाण्याचा किंवा प्रसंगीं उपास काढण्याचाही प्रसंग येतो. विदुरांनीं देह ठेवल्याचें वर्तमान मला कळलें. मांडव्य ऋषींच्या शापानें धर्मच विदुर झाले होते. हे महायोगी देवांमधल्या बृहस्पतींपेक्षां किंवा असुरांमधल्या शुक्राचार्यांपेक्षांही अधिक बुद्धिमान होते. फार दिवस सांठविलेलें तप खर्चीं घालून मांडव्य ऋषींनीं धर्माची खोड मोडली. व ब्रह्मदेवांच्या सांगण्यावरून मीं आपल्या सामर्थ्यानें विचित्रवीर्याच्या बायकोच्या ठिकाणीं या तुझ्या भावाला उत्पन्न केलें. धारणा आणि ध्यान यांच्या योगानें विद्वान लोक यांना प्रत्यक्ष धर्मच समजत. नेहमीं सत्य, आत्मनिग्रह, शम, दया, व दान यांनीं वाढत राहून ते नेहमीं तपामध्यें गढले असत. त्याच धर्मापासून योगबलानें युधिष्ठिर झाला आहे. तेव्हां हाही प्रत्यक्ष धर्मच आहे. पंचमहाभूतांप्रमाणेंच धर्माचें महत्त्व इहपरलोकीं आहे. त्याची गति वाटेल त्या ठिकाणीं असून तो सर्व भरून आहे. देव, सिद्ध वगैरेंना जो धर्म दिसतो, तेच विदुर व तोच तुझ्यापुढें हा सेवकाप्रमाणें उभा असलेला युधिष्ठिर. तो तुझा भाऊ याला पाहून योगसामर्थ्य अंगीं असल्यानें याच्यामध्यें मिळून गेला आहे. तुझाही संशय दूर करून तुझें कल्याण करून देण्यासाठीं मी आलों आहें. आजपर्यंत कोणाच्या हातून झालें नाहीं असें आश्चर्यकारक तपाचें फल मी आज तुला दाखवितों. तुझ्या मनांतली वाटेल ती इच्छा मी आज पुरवितों. ' याप्रमाणें व्यास बोलले असतां क्षणभर विचार करून धृतराष्ट्र म्हणाला, ' मी आज धन्य आहें, माझ्यावर आपली कृपा झाली आहे. आपल्यासारख्या साधूंचा समागम झाल्यानें आज मी आपलें जीवित सफल समजतों. मला उत्तम गति मिळणार यांत संशय नाहीं. कारण ब्रह्मस्वरूपी आपल्यासारख्या तपोधनांचा समागम झाल्यानें माझें सर्व पाप धुवून जाऊन मी केवळ आपल्या दर्शनानेंच पवित्र झालों आहें. मला परलोकाची भीति उरली नाहीं; परंतु त्या मंद दुर्बुद्धि दुर्योधनाच्या अनीतीच्या कृत्यांनीं मला नेहमीं भीति वाटते. त्या पाप्यानें या निष्पाप पांडवांना दुखवून पृथ्वीवरील सर्व राजांचा फडशा पाडला. नाना देशचे राजे माझ्या मुलासाठीं बाप, बायका, आवडते प्राण या कशाची पर्वा न करतां मृत्यूच्या तावडींत गेले. ज्यांनीं याप्रमाणें मित्रासाठीं रणांत देह ठेविला, त्यांना गति तरी कोणची बरे मिळाली आहे. त्याचप्रमाणें माझ्या मुलानातवांना कोणती गति मिळाली आहे? त्या बलशाली भीष्मांना व वृद्ध द्रोणांना मारवून पृथ्वीच्या राज्याच्यामागें लागून त्या मूढानें या वैभवसंपन्न कुलाला मातीला मिळविलें आहे. रात्रंदिवस यासंबंधी विचार मनांत घोळत असल्यानें मा-

ङ्या मनाला शांति कशी ती नाहीं.' याप्रमाणें याचा शोक ऐकून गांधारीप्रभृति बायकांचा शोक फिरून जागृत झाला. पुत्रशोकानें अगदीं व्याकुळ होऊन गांधारी हात जोडून ह्मणाली, 'महाराज, मुलांना मरून आज सोळा वर्षें झालीं; पण यांच्या मनाला समाधान ह्मणून ठाऊक नाहीं. पुत्रशोकानें व्याकुळ होऊन सुस्कारे टाकीत हे रात्रीं निजत सुद्धां नाहींत. तपाच्या सामर्थ्यानें प्रति लोक निर्माण करण्याचें आपल्या अंगांत सामर्थ्य आहे, मग स्वर्गाला गेलेल्या मुलांची भेट करवून देणें हें कांहीं आपल्याला कठीण नाहीं; त्याचप्रमाणें आपली ज्ञाती व मुलगे मेल्यामुळें ही द्रौपदी, सुभद्रा व या दुसऱ्या बायकाही फार शोकाकुल झाल्या आहेत. तेव्हां आह्मां सर्वांचा शोक नाहींसा होईल असें करा.' हें ऐकून व्रतानें सुकून गेलेली कुंति ह्मणाली, 'कर्णासंबंधानें सर्व हकीकत आपल्याला ठाऊकच आहे. तें सर्व न्यायाचें असो किंवा अन्यायाचें असो, तें गूढ झांकून ठेवून जाणून बुजून माझ्या हातून त्याचा जो नाश झाला त्याबद्दल मला वाईट वाटतें. तेव्हां त्याला आपण भेटवाल तर माझ्यावर कृपा होणार आहे.' यावर व्यास ह्मणाले, 'ठीक आहे. तुमच्या सर्वांच्या मनाप्रमाणें करतों. काळजी करू नका. या सर्व महात्म्यांसंबंधानें शोक करण्याचें कारण नाहीं. क्षात्रधर्माला जागून यांनीं देह ठेविले आहेत. दैवाचा नियमानियमच असा होता. हे सर्व देवगंधर्वादिकांचे अंशभूत पृथ्वीवर अवतरून कुरुक्षेत्रामध्यें रणांगणांत मेले आहेत. जो प्रसिद्ध गंधर्वराज धृतराष्ट्र तोच या मनुष्यलोकामध्यें धृतराष्ट्ररूपानें अवतरला आहे. पांडूची उत्पत्ति मरुद्गणांपासून असून विदुर धर्माचे अंश होत. पांडवांची धर्मादि पांचांपासून उत्पत्ति असून श्रीकृष्ण हा प्रत्यक्ष नारायण आहे. ज्या ह्या सर्वांना आनंद देणाऱ्या अर्जुनाच्या मुलाला सहा महारथ्यांनीं मारलें तो चंद्राचा अंश असून योगबलानें त्यानें आपल्याला दोन भागांमध्यें विभागून घेतलें; त्याचप्रमाणें सूर्यानें आपल्याला दोन भागांमध्यें विभागून घेऊन एकानें तो प्रकाशत राहिला व दुसऱ्यानें कर्णरूपानें अवतरला. दुर्योधन कलीचा अवतार असून शकुनि द्वापाराचा अवतार होता. दुःशासनप्रभृति हे राक्षसांचे अवतार होत. द्रौपदीबरोबर अग्नींतून निघालेला धृष्टद्युम्न हा अग्नीचा अंश होय. शिखंडी हा राक्षसाचा अंश होय. द्रोण हे बृहस्पतीचा अंश असून अश्वत्थामा रुद्राचे व भीष्म वसूचे अंश होते. याप्रमाणें हे सर्व देव मनुष्यरूपानें अवतरून आपलीं कामें झाल्यावर फिरून स्वर्गाला गेले आहेत. तुह्मां सर्वांच्या हृदयामध्यें जें दुःख होऊन राहिलें आहे तें मी आज दूर करतों. तुह्मी सर्व भागीरथीकडे चला ह्मणजे तुह्मांला त्या ठिकाणीं रणांत मेलेले सर्व फिरून दृष्टीस पडतील.' हें व्यासांचें भाषण ऐकून तो सर्व जनसमुदाय मुनिजनांसह गंगेच्या कांठीं जाऊन उतरला. राजा धृतराष्ट्र पांडव व आपले अनुयायी यांसह एक जागा पसंत करून तेथें उतरला. मेलेल्या राजांना पहाण्याची आतुरतेनें वाट पहात असल्यामुळें तो दिवस त्यांना शंभरवर्षांप्रमाणें गेला. पुढें सूर्य अस्ताचलाला गेल्यावर स्नान करून त्यांनीं सर्व रात्रीचीं कर्में आटोपलीं. याप्रमाणें रात्र पडून संध्याकाळचे विधी आटोपल्यावर सर्व शुद्ध होऊन एकाग्रतेनें व्यासांकडे आले. नंतर व्यासांनीं पवित्र अशा गंगेमध्यें स्नान करून जे कौरवपांडवांकडील योद्धे रणांत मेले होते त्यांना हांक मारली. तेव्हां पाण्याच्या कांठीं कौरवपांडव सैन्याचा पूर्वीप्रमाणें मोठा शब्द निघून भीष्मद्रोणप्रभृति सर्व मंडळी सेनेसह पाण्यांतून वर निघाली. त्यांचे देह फार दैदीप्यमान असून ज्या वीराचा जो वेष, जो ध्वज व जें वाहन होतें, त्यानिशीं तो तो वर आला. सर्वांच्या अंगावर दिव्य वस्त्रें असून त्यांच्या कानांत कुंडलें झळकत होतीं. वैर, अहंकार, राग व मत्सर हीं त्यांच्यामधून निघून गेलीं असून गंधर्व त्यांच्यामागून गात होते, व भाट स्तुतिपाठ करीत होते. दिव्य फुलें त्यांच्या अंगावर असून त्यांच्या भोंवतीं अप्सरा होत्या. तेवेळीं व्यासांनीं तपाच्या सामर्थ्यानें धृतराष्ट्राला दिव्य चक्षु दिले, गांधारीला दिव्य ज्ञान प्राप्त झालें; त्यामुळें लढाईंत मेलेले आपले मुलगे व दुसरे यांच्याकडे टकमक पाहून ते आश्चर्यचकित झाले; व त्यांच्या अंगावर हर्षरोमांच उभे राहिले. जिकडे तिकडे मोठा उत्सव दिसूं लागून सर्व बायकापुरुष आनंदभरित झाले. पटावर काढलेल्या चित्राप्रमाणें

तो अद्भुत चमत्कार दिसूं लागला. नंतर ते सर्व रागमत्सर जाऊन निष्पाप झालेले पुरुषश्रेष्ठ एकमेकांना यथायोग्य भेटले. देवलोकांमधील देवांप्रमाणें ते सर्व आनंदित दिसत होते. बाप व आई मुलाला, बायको नवऱ्याला, भाऊ भावाला, मित्र मित्राला, याप्रमाणें सर्वांनीं एकमेकांच्या भेटी घेतल्या. पांडव मोठ्या आनंदानें कर्ण, अभिमन्यु यांना भेटून कर्णाशीं त्यांचें सख्य झालें. त्या ठिकाणीं सर्व योद्धे एकमेकांना भेटले असतां त्यांचें पूर्व वैर नाहींसें होऊन एकमेकांसंबंधानें मित्रभाव उत्पन्न झाला. ती रात्र याप्रमाणें मजेंत घालवून संतुष्ट झाल्यानें त्यांना स्वर्गांत असल्याप्रमाणें वाटत होतें. शोक, भीति, त्रास, असमाधान, कमीपणा वगैरे कांहीं एक त्या ठिकाणीं दिसून येत नव्हता. याप्रमाणें सर्वांची गांठ पडून सर्वांना आनंद झाल्यानें बायकांचें दुःख नाहींसें झालें. एक रात्र याप्रमाणें मजेंत काढून सर्वांना आलिंगन देऊन सर्वांचा निरोप घेऊन त्याठिकाणीं आलेले वीर आपले रथ, ध्वज यांनिशीं फिरून भागीरथीमध्यें बुडून आपापल्या ठिकाणीं गेले. कांहीं देवलोकाला गेले, कांहीं ब्रह्मलोकाला गेले, कांहीं वरुणाच्या लोकाला गेले, कांहीं कुबेराच्या लोकाला गेले, कांहीं सूर्यलोकाला गेले, कांहीं राक्षसांच्या व कांहीं पिशाचांच्या लोकांला व कांहीं उत्तरकुरूकडे गेले. याप्रमाणें सर्व गेले असतां भागीरथीच्या पवित्र जलामध्यें उभे राहून ज्या विधवा झाल्या होत्या त्यांना उद्देशून व्यास ह्मणाले, ‘ ज्यांना पतिलोक पाहिजे असतील त्यांनीं गंगेमध्यें बुडी घ्यावी. ह्याप्रमाणें ते बोलले असतां पुष्कळ स्त्रिया त्यावर विश्वास ठेवून सासऱ्यांची परवानगी घेऊन गंगेच्या पाण्यांत शिरल्या, व मनुष्यदेह टाकून आपल्या नवऱ्याबरोबर त्या साध्वी पतिलोकाला निघून गेल्या. याप्रमाणें शीलसंपन्न अशा त्या पतिव्रता स्त्रिया आपल्या पतीप्रमाणें दिव्यरूप होऊन विमानांत बसून आपापल्या ठिकाणांस गेल्या. तेवेळीं ज्याची ज्याची जी जी ह्मणून इच्छा झाली ती ती व्यासांनीं परिपूर्ण केली. आतां मनुष्य मेला असतां तो फिरून येऊन जशाचा तसा कसचा दिसणार ह्मणून संशय येणें शक्य आहे; परंतु त्यासंबंधानें हें लक्षांत ठेवावें कीं, कर्माचा नाश कधीं होत नसतो, व हीं शरीरें व स्वरूपें कर्मांचीं फलें आहेत पंचमहाभूतें परमात्म्याच्या आधारानें नित्यच आहेत. व नाश पावणाऱ्याबरोबर त्यांचा कधीं नाश होत नाहीं. निवृत्तिरूप अनायासानें होणारें कर्म खरें व श्रेष्ठ असें फल देणारें आहे व आयासानें होणाऱ्या प्रवृत्तिरूप कर्मांशीं स्वतःला जखडून घेतल्यानें मनुष्याला सुखदुःखाचा उपभोग घ्यावा लागतो. आत्मा जरी असा यांच्याशीं जोडला जातो तरी आरशांतील प्रतिबिंबाप्रमाणें यांच्यामुळें तो विकार पावत नाहीं. जोंपर्यंत कर्में नाहींशीं झालीं नाहींत तोंपर्यंत याची स्वरूपता ( तेंच स्वरूप ) कायम राहून कर्में नाहींशीं झाल्यावर तो निराळ्या रूपाला जाऊन मिळतो. पंचमहाभूतें, इंद्रियें इत्यादि नानाप्रकारचे भाव शरीराशीं संबंध जडल्यावर ते तेथें एकत्र असतात. ज्यांना हा वेगळेपणा कळतो त्यांच्या दृष्टीनें त्यांचा नाश नसून ते त्यांना नित्य ( शाश्वत ) च आहेत. अश्वमेधामध्यें घोड्याला मारण्यासंबंधानें अशी श्रुति आहे कीं—मनुष्यांचे प्राण, मनुष्य मरून दुसऱ्या लोकाला गेल्यावर सुद्धां कायम असतात. याप्रमाणें हा जीव नित्य असून पंचमहाभूतें व पुरुष (कोशांतर्गत आत्मा ) नित्य असल्यानें जो यांना निरनिराळ्या स्वरूपांनीं पहातो त्याची समजूत चुकीची होय, व ह्मणूनच मूर्खाला वियोगानें फार दुःख होतें. ज्याला वियोगामधील दोष दिसतात त्यानें संबंधच टाळावा. विरक्ताशीं संबंध जडत नसतो व मग वियोगदुःखही होण्याचा संभव नसतो. ज्याला देह व आत्मा यांमधला भेद कळतो तोच चुकीच्या समजुतीपासून मुक्त होतो. प्राणिमात्र अदृश्य स्थितींतून दृश्य स्थितीमध्यें येऊन फिरून अदृश्य स्थितीला जाऊन मिळतात. ज्या ज्या शरीरानें मनुष्य जें जें करतो त्या त्या शरीरानें तो त्याचा त्याचा उपभोग घेतो.

असो, आजपर्यंत मुलांना प्रत्यक्ष डोळ्यांनीं पाहिलें नसल्यामुळें व्यासांच्या प्रसादानें ते आज प्रत्यक्ष पहाण्यास मिळाल्यामुळें धृतराष्ट्राचा शोक दूर होऊन सर्वांनिशीं तो आश्रमाला परतला. ऋषी आपापल्या ठिकाणीं गेले. आश्रमाकडे आल्यावर व्यास धृतराष्ट्राला ह्मणाले, ‘ हे महाबाहो, ज्ञानवृद्ध अशा पुण्यकर्म करणाऱ्या ऋषींच्या तोंडून तूं

अनेक गोष्टी ऐकल्या आहेस. आतां शोकामध्यें मन घालूं नकोस. दैवासंबंधानें शहाणा कधीं दुःख करीत नसतो. हें वर सांगितलेले देवगूढ तुला कळलेंच आहे. क्षात्रधर्मानें शस्त्रानें पवित्र होऊन ते सर्व चांगल्या गतीला मिळाले आहेत. तुझे मुलगे कसे सुखांत आहेत हें तूं पाहिलेंसच. हा युधिष्ठिर आपल्या सर्व भावांनिशीं तुझ्या मागून आहे. याला आतां रजा दे. याला जाऊन आपलें राज्य करूं दे. वनामध्यें येऊन त्यांना महिन्याच्यावर काल झाला आहे. राज्य मोठ्या हुशारीनें संभाळलें पाहिजे; कारण त्याला विघ्नें फार असतात.' असें व्यास ह्मणाले असतां युधिष्ठिराला जवळ बोलावून धृतराष्ट्र त्याला ह्मणाला, 'अजातशत्रो, तुझें कल्याण असो, तुझ्या प्रसादानेंच मी शोकांतून सुटलों आहे. पूर्वीं हास्तिनापुरामध्यें असल्याप्रमाणें मला तुझ्या संगतीनें सुख होत आहे, माझें प्रिय करण्याला तूं अगदीं तयार असल्यानें पुत्रफल मला तुझ्यापासून मिळालें आहे. तुझ्यावर माझें अति प्रेम आहे. तुझ्यावर राग बिलकुल उरला नाहीं; परंतु तूं येथें राहिल्यानें माझ्या तपाला विघ्न येतें. हें तपाला लाविलेलें शरीर तुला पाहून कसें तरी धरून राहिलों आहे. या तुझ्या आया वाळकीं पानें खाऊन माझ्यासारखेंच कडक तप करीत राहिल्या आहेत. तुझ्या येण्यामुळें व व्यासांच्या तपाच्या सामर्थ्यानें आज दुर्योधन वगैरे मेलेल्या लोकांची गांठ पडली. आतां जगण्याचें कांहीं कारण उरलें नाहीं. तेव्हां आतां मी कडक तप करीत रहाणार, त्याला तुझी परवानगी असावी. पिंड, नांव व कुल हीं सर्व तुझ्यावर अवलंबून आहेत. तेव्हां आज किंवा उद्यां निघून तूं नगराकडे जा. अनेक राजनीती तुझ्या कानांवरून गेल्या असल्यामुळें तुला सांगावयाचें कांहीं उरलेलें मला दिसत नाहीं.' यावर 'माझ्या भावांना जाऊं देत, मी आपल्या मागून तप करीत रहातों,' असें युधिष्ठिराचें भाषण ऐकून गांधारी ह्मणाली, 'कौरवांचें कुळ व मामंजींचा पिंड तुझ्यावर अवलंबून असल्यामुळें तूं आतां जा. आमचा तूं केलेला सत्कार पुरे आहे. महाराज ह्मणाले तसें करून वडिलांची आज्ञा पाळ.' हें ऐकून भरून आलेले डोळे पुसून रडत असलेल्या कुंतीला तो ह्मणाला, 'महाराज व गांधारी मला जा ह्मणत आहेत; परंतु तुझ्याकडे लक्ष लागलें असल्यामुळें मी आतां कसा जाऊं? तरी पण तुमच्या तपामध्यें माझ्यानें विघ्न करवत नाहीं. तपाहून थोर कांहीं नसून तपानेंच ब्रह्मप्राप्ति होते. पूर्वीप्रमाणें माझेंही मन राज्याकडे न लागतां तपाकडेसच लागलें आहे. बांधव मरून गेल्यामुळें ही पृथ्वी मला पूर्वीप्रमाणें संतोष देत नाहीं. सर्व पांचाल आतां नांवाला उरले असून त्यांचें कुळ राखणारा कोणीच दिसत नाहीं. द्रोणांनीं त्या सर्वांचा रणामध्यें फडशा पाडला असून जे कांहीं थोडे बाकी राहिले होते त्यांचाही अश्वत्थाम्यांनीं फडशा पाडला आहे. फक्त श्रीकृष्णाच्या कृपेनें यादव जिवंत आहेत. त्यांच्याकडे पाहून केवळ धर्मासाठींच मी प्राण धरून आहें. आमच्या सर्वांचें कल्याण चिंतीत रहा. तुझें दर्शन आतां दुर्लभ आहे. महाराज तर आतां घोर तप आरंभणार आहेत.' यावर सहदेव डोळे पाण्यानें भरून येऊन युधिष्ठिराला ह्मणाला, 'माझ्यानें कांहीं आईला सोडवत नाहीं. तुह्मी जा. मी येथेंच तपानें देह झिजवीत यांची सेवा करीत रहातों.' यावर कुंति त्याला आलिंगन देऊन ह्मणाली, 'बाळा जा, असें ह्मणूं नकोस. मी सांगतें तें ऐक. तुह्मी स्वस्थ असा. आमच्या तपाला तुझ्या स्नेहपाशामुळें विघ्न येणार आहे; तेव्हां तूं जा. आमचें आयुष्य आतां थोडें उरलें आहे. याप्रमाणें नानाप्रकारें बोलून कुंतीनें त्याचें मन घट्ट केलें. नंतर धृतराष्ट्राला अभिवंदन करून त्यांचा निरोप घेतांना धृतराष्ट्रानें युधिष्ठिराचें अभिनंदन करून बलशाली भीमाचें त्यांनीं शांतवन केलें, व अर्जुन आणि नकुलसहदेव यांना आलिंगन देऊन जाण्याला परवानगी दिली. पुढें गांधारीचे पाय धरून तिनें परवानगी दिल्यावर कुंतीनें युधिष्ठिराला आलिंगन देऊन त्याचें मस्तक हुंगलें. पाजून एकीकडे ओढल्या जाणाऱ्या वांसराप्रमाणें त्या सर्वांनीं फिरफिरून तिच्याकडे पहात त्या तिघांना प्रदक्षिणा केली. द्रौपदीप्रमुख कौरवस्त्रियांनींही सासऱ्याचा योग्य सत्कार करून, सास्वांनीं त्यांचें कर्तव्य त्यांना सांगून आलिंगन दिल्यावर त्या आपल्या नवऱ्यांबरोबर नगराकडे निघाल्या; तेवेळीं रथ जोडा ह्मणून सारथ्यांच्या तोंडून निघणारे

शब्द व उंट, घोडे यांचे शब्द यामुळें एकच गर्दी उडून राहिली; व युधिष्ठिर आपल्या सर्व सैनिकांबरोबर हास्तिनापुराला परत आला.

---

## २१६ धृतराष्ट्र, गांधारी व कुंति यांचा शेवट

### ( १५ .३७–३९ )

याप्रमाणें पांडवांचीं पुढें दोन वर्षें निघून गेल्यावर नारद युधिष्ठिराकडे आले. त्यांचा सत्कार करून ते स्वस्थ बसल्यावर युधिष्ठिर त्यांना ह्मणाला, 'फार दिवसांनीं आपली गांठ पडली. सर्व ठीक आहेना? आपण कोणकोणते देश पहात आला? आपलें काम काय आहे तें सांगा. नारद ह्मणाले, 'मी तपोवनांतून नानातीर्थें व गंगा यांचें दर्शन घेऊन आलों.' युधिष्ठिरानें विचारलें, 'गंगातीरवासी लोक, धृतराष्ट्रमहाराज मोठें कडक तप करित राहिले आहेत असें ह्मणतात. तेव्हां महाराज त्याचप्रमाणें गांधारी, कुंति व संजय हे सर्व खुशाल आहेतना? महाराजांची गांठ पडली असल्यास त्यांची हकीकत सांगा, नारद ह्मणाले, 'राजा, जें कांहीं घडलें आहे तें सांगतों, स्वस्थ मनानें ऐक. तुह्मी वनांतून परत आल्यावर तुझा पिता, गांधारी, कुंति, संजय यांसह कुरुक्षेत्रापासून गंगाद्वाराला जाऊन तोंडामध्यें खडे ठेवून वायु भक्षण करीत अस्थिपंजर उरवून तीव्र तप करीत सहा महिने राहिला. गांधारी पाण्यावर राहिली असून कुंति महिना महिना उपवास करीत होती, व संजय सहा दिवसांनीं एकदां जेवून राहिला होता. घरदार सोडून तो याप्रमाणें वनांत सर्वांसह फिरत असतां संजय सापांनीं भरलेल्या व खाचखळग्याच्या अशा प्रदेशांतून राजाचा हात धरून चालला होता व गांधारीला कुंति धरून चालली होती. याप्रमाणें गंगेमध्यें स्नान करून धृतराष्ट्र आश्रमाकडे वळला असतां मोठा वारा सुटून त्या वनाला वणवा लागून चोहोंकडून त्यानें पेट घेतला. नाना पशु व साप चोहोंकडे पळून जात होते. डुकरांचे कळपच्या कळप पाण्याकडे धांव घेत होते. याप्रमाणें तें वन पेट घेऊन मोठें संकट ओढवलें असतां उपासामुळें शक्ति नसून राजाला व तुझ्या सुकलेल्या आयांना त्यांतून सुटून जाण्याचें सामर्थ्य नव्हतें; तेव्हां अग्नीला आपल्या जवळ येतांना पाहून धृतराष्ट्र संजयाला ह्मणाला, 'संजया, जेथें अग्नि तुला जाळू शकणार नाहीं अशा प्रदेशाला तूं निघून जा. आह्मी येथें जळून चांगल्या गतीला जाऊन मिळतों.' यावर संजय ह्मणाला, 'महाराज, असंस्कृत अशा अग्नीनें ह्या ठिकाणीं असें मरण येणें चांगलें नाहीं, परंतु यापासून सुटण्याचा कांहीं उपाय दिसत नाहीं. तेव्हां यापुढें आपण सांगाल तसें करतों.' हें संजयाचें भाषण ऐकून धृतराष्ट्र फिरून ह्मणाला, 'आपण होऊन बाहेर पडलेल्या.ना हें मरण कांहीं अनिष्ट नाहीं. पाणी, अग्नि, वायु किंवा उपास यानें मरण येणें तापसांना चांगलें समजलें आहे. असें ह्मणून मन स्वस्थ करून गांधारी व कुंति यांसह पूर्वेकडे तोंड करून तो बसला. संजयानें त्यांना प्रदक्षिणा करून समाधि लावण्यास सांगून त्याप्रमाणें त्यांनीं केल्यावर मग ते अग्नींत जळाल्यावर संजय त्या वणव्यांतून सुटून बाहेर पडून गंगातीरीं मला भेटला, व त्यानें मला सर्व हकीकत सांगितली. नंतर संजय हिमाचलाकडे निघून गेला. याप्रमाणें धृतराष्ट्र, गांधारी, कुंति मरण पावून स्वेच्छेनें चालले असतां त्यांचीं शरीरें मीं पाहिलीं. यांचें मरण ऐकून तपस्वी लोक त्या ठिकाणीं आले. राजाची निष्ठा ऐकून त्याच्या गतीबद्दल त्यांना कांहीं वाईट वाटलें नाहीं. तेव्हां राजाच्या संबंधानें शोक करण्याचें कारण नाहीं. स्वतःच अग्नि घेऊन त्यांनीं देह ठेविला आहे. याप्रमाणें धृतराष्ट्रानें देह ठेविल्याची वार्ता ऐकून सर्व पांडवांना मोठें दुःख झालें. आईची आठवण होऊन, 'आह्मांला धिक्कार असो,' असें ह्मणून युधिष्ठिर दुःखी होऊन वर हात करून शोक करून रडूं लागला, व इतर पांडव व अंतःपुरांतील बायका यांचा रडण्याचा एकच कल्होळ माजला. 'आमच्यासारख्यांची आई वनामध्यें अनाथाप्रमाणें जळून मेली हें मनांत येऊन मी वेडा बनलों आहें. अर्जुनानें खांडववनामध्यें अग्नीला उगीच तृप्त केलें; पण तो उपकार न जाणणारा कृतघ्न आहे असें मला वाटतें. ज्यानें ब्राह्मणाचा वेष घेऊन अर्जुनाकडे भिक्षा मागितली त्यानेंच त्याच्या आईला जाळली. त्या अग्नीला धिक्कार असो व त्या लोकविश्रुत अर्जुनाच्या सत्यवचनतेलाही धिक्कार असो.

मला आणखी दुसरें जें फार वाईट वाटतें आहे ती गोष्ट ही आहे कीं, मंत्राग्नीवांचून राजाला वणव्यामध्यें मरण्याचा प्रसंग आला. सर्व पृथ्वीचें राज्य करून अग्नि ठेविला असून महावनामध्यें असा मृत्यु येऊन त्यांचा शेवट कसा बरें झाला? अस्थिपंजर उरलेल्या कुंतीनें त्या भयंकर प्रसंगीं कांपत कांपत बाळा धर्मा, बाळा भीमा, मला या संकटांतून सोडवा म्हणून हंबरडा फोडला असला पाहिजे. आपल्या मुलाहून आवडता जो सहदेव तो देखील तेवेळीं तिला सोडवायाला उभा राहिला नाहींना!' असें म्हणून युगाच्या अंतकालाच्या पंचमहाभूतांसारखे ते पंच पांडव एकमेकांला कवटाळून मोठ्यानें रडूं लागले. त्यांच्या त्या रडण्यानें सर्व वाडा भरून जाऊन आकाशपाताळ एक झालें. नारद म्हणाले, 'मीं जें ऐकिलें आहे त्यावरून धृतराष्ट्र भडाग्नीनें मेला नाहीं असें कळतें. वायुभक्षण करीत राहणाऱ्या त्यानें वनामध्यें शिरते वेळीं इष्टी करवून अग्नि ठेवून गेला, व याजकांनीं तो अग्नी निर्जन वनामध्यें टाकल्यावर ते आपापल्या ठिकाणीं गेले. तो अग्नि पेट घेऊन वनामध्यें पसरला. अशा प्रकारें धृतराष्ट्र हा आपण स्वतः मंत्रसिद्ध केलेल्या अग्नीनें जळून मेला असें भागीरथीच्या तीरावर असणाऱ्या मुनींनीं मला कळविलें; तेव्हां आपण सिद्ध केलेल्या अग्नीनें जळून मरून, उत्तम गतीला गेलेल्या त्या राजाबद्दल शोक करण्याचें कारण नाहीं. त्याचप्रमाणें त्या तुझ्या आईनें वडिलांची शुश्रूषा करून उत्तम सिद्धि मिळविली आहे; तेव्हां आतां तूं आपल्या सर्व भावांबरोबर त्या सर्वांना पाणी दे.' हें ऐकून युधिष्ठिर आपल्या भावांना व अंतःपुरांतील सर्व बायकांना बरोबर घेऊन पौरजनांबरोबर एका वस्त्रानिशीं गंगेवर गेला. व सर्वांनीं गंगेमध्यें स्नान करून युयुत्सूला पुढें करून, धृतराष्ट्र, गांधारी न कुंति यांना नांव गोत्र उच्चारून विधिपूर्वक पाणी दिलें, व अशौच्य पाळीत ते त्या ठिकाणीं नगराबाहेर राहिले. तेथून युधिष्ठिरानें ज्यांना सर्व उत्तरविधि माहीत आहे, अशा आप्तांना जें कांहीं द्यावयाचें होतें तें त्यांच्याबरोबर देऊन गंगाद्वारीं जेथें धृतराष्ट्र जळून मेला होता त्या ठिकाणीं त्याचा सर्व उत्तरविधि करण्यास सांगून पाठविलें. बाराव्या दिवशीं शुद्ध होऊन पुष्कळ दक्षिणा देऊन त्यानें त्यांचीं श्राद्धें केलीं. धृतराष्ट्राच्या नांवानें सोनें, रुपें, गाई, मोठ्या मौल्यवान शय्या देऊन गांधारी व कुंति यांच्यासाठींही त्यांचीं नांवें घेऊन त्यानें चांगलें दान दिलें. शय्या, भोजन, वाहन, हिरेमाणकें, रत्नें, पैसा ज्यानें जेवढा मागितला तेवढा त्यानें त्याला दिला. त्या आर्यांच्या नांवानें वाहनें, वस्त्रें, नानाप्रकारचे भोग व शृंगारलेल्या दासी दिल्या. याप्रमाणें पुष्कळ श्राद्धें देऊन तो हास्तिनापुराला परत आला. ज्या लोकांना त्यानें गंगाद्वाराला पाठविलें होतें त्यांनीं अस्थि गोळा करून नानाप्रकारचीं फुलें व सुवासिक पदार्थ यांनीं त्यांची पूजा करून त्या गंगेंत टाकिल्यावर त्याप्रमाणें राजाला येऊन कळविलें. इकडे नारदही युधिष्ठिराचें समाधान करून निघून गेले. याप्रमाणें मुलगे मेल्यावर पंधरा वर्षें नगरांत व तीन वर्षें वनांत काढून धृतराष्ट्र देह ठेवून इहलोक सोडून गेला.

# १६ मौसलपर्व.

## २१७ सांबशाप—यादवांचा फडशा व श्रीकृष्णाचें निजधामाला जाणें.

### (१६. १—४)

युधिष्ठिराच्या राज्याला त्रेसष्टावें वर्ष सुरू झालें असतां इकडे वृष्णिकुलामध्यें मोठी गडबड उडाली. कोणे एके वेळीं विश्वामित्र, कण्व व तपोधन नारद द्वारकेला गेले असतां सारणप्रमुख वीर, कृष्णपुत्र सांबाला बायकोप्रमाणें शृंगारून त्याला पुढें करून त्या ऋषींकडे जाऊन कालदंडाच्या फेऱ्यांत सांपड-

त्यामुळें त्यांना म्हणाले, 'मुलासाठीं हपापलेल्या बभ्रूच्या या बायकोला काय मूल होईल हें आम्हांला सांगा.' या थट्टेमुळें रागावून ऋषी म्हणाले, 'या श्रीकृष्णाच्या सांबाला वृष्णी अंधक यांच्या नाशासाठीं एक घोर लोखंडी मुसळ होईल; त्याच्या योगानें दुर्वर्तनी व दुष्ट असे तुम्ही रामकृष्णांशिवाय सर्व रागाच्या झपाट्यांत कुलाचा फडशा पाडाल. बलराम समुद्राकडे निघून जाऊन देह ठेवील, व महात्मा श्रीकृष्ण निजला असतां जरा त्याला फाडून टाकील.' त्या दुष्टांनीं फसविल्यामुळें ते ऋषी रागानें डोळे लाल करून याप्रमाणें शाप देऊन श्रीकृष्णाकडे गेले. श्रीकृष्णानें अंत होण्याची वेळ आली आहे, असें जाणून भवितव्यताच तशी ठरली असल्यामुळें तो जगताचा स्वामी असतांही काळ फिरविण्याचें त्यानें मनांत आणलें नाहीं. दुसरे दिवशीं ज्याच्या योगानें वृष्णी व अंधक यांच्या कुलांतील पुरुष भस्म झाले असें त्यांच्या नाशासाठींच उत्पन्न झालेल्या मोठ्या किंकराप्रमाणें एक मुसळ सांबाला झालें. तेव्हां राजाला त्याची वर्दी मिळाली असतां त्याचें तोंड उतरून जाऊन त्यानें त्याचें अगदीं बारीक चूर्ण करविलें, व तें लोकांनीं समुद्रांत नेऊन टाकलें. आहुक, श्रीकृष्ण, बलराम व बभ्रु यांच्या सांगण्यावरून नगरांतून दांडोरा पिटविला कीं, आजपासून वृष्णी व अंधक कुलांतील सर्वांनीं व नगरवासी लोकांनीं सुरा सोडून द्यावी. जो कोणी न कळत ती पिईल त्याला त्याच्या बांधवांसह सुळावर चढविलें जाईल. ही बलरामाची आज्ञा ऐकून शहरांत दारू बंद झाली.

याप्रमाणें वृष्णी व अंधक प्रयत्न करीत असतां अक्राळविक्राळ, टक्कल पडलेला व पिंगट वर्णाचा असा काळ रोजच्यारोज त्यांच्या घरोघर संधि पहात फिरत होता; परंतु त्याला कोठें कांहीं दिसेना. त्या महाधनुर्धाऱ्यांनीं शेंकडों बाण त्यावर सोडले, परंतु त्यांचा त्याच्यावर कांहीं परिणाम होईना. मोठमोठ्या भयंकर वावटळी रोजच्यारोज उत्पन्न होऊन त्या अंगावर रोमांच उभे करूं लागल्या. रस्त्यावर उंदरांचा सुळसुळाट होऊन मडकीं वगैरे फुटूं लागलीं. निजलेल्यांचे केस व नखे पहिल्या रात्रीं व पहाटेच्या वेळीं उंदीर कुरतडूं लागले. ची, ची, कू, चि, म्हणून सारिका वृष्णींच्या वाड्यामधून शब्द करीत राहून त्यांचा तो शब्द रात्रंदिवस बंद पडेना. सारसपक्षी घुबडाप्रमाणें व मेंढ्या कोल्ह्याप्रमाणें शब्द करूं लागल्या. घरांमधून पांडुरवर्ण व लालभडक पाय असलेले काळानें पाठविलेले कपोतपक्षी फिरूं लागले. गाईंना गाढवें, खेंचरांना उंट, कुत्र्यांना मांजरें व मुंगसांना उंदीर होऊं लागले. वृष्णीकुलांतील लोकांना पाप करण्याची लाज वाटेनाशी झाली. ब्राह्मण, पितर व देव यांचा ते द्वेष करूं लागले. रामकृष्णांशिवाय बाकी सर्व गुरूंचा देखील अपमान करूं लागले. बायका नवऱ्यांना व नवरे बायकांना फसवून बदकर्म करूं लागले. जळणाऱ्या अग्नीच्या ज्वाळा डावीकडे पसरूं लागल्या. अग्नीमधून निळ्या, लाल, व मंजिष्ठ रंगाच्या ज्वाळा निघूं लागल्या. उदयास्ताचे वेळीं सूर्य कबंधांनीं घेरलेला दिसत असे. मुदपाकांतून शिजलेल्या अन्नामध्यें हजारों किडे दिसूं लागले, व पुण्याहवाचन म्हटलें जात असतां किंवा जप चालला असतां ते अंगावर धूं शब्द करीत कोणाला न दिसतां धांवून येत, नक्षत्रें ग्रहामध्यें मिळून जाऊन आपलें नक्षत्रसुद्धां त्यांना दिसेनासें झालें. यादवकुळामध्यें पांचजन्य वाजत असतां त्याच्या भोंवतीं गाढवें भयंकर रीतीनें खिंकाळत. भारतीय युद्धाच्या वेळीं पडल्याप्रमाणें त्रयोदशीला अमावास्या आली, व पुढला पंधरवडा चवदा दिवसांचा पडून राहूनें चंद्राला ग्रासलें. याप्रमाणें काळाचा फेरा आलेला पाहून श्रीकृष्णाला, पुत्रशोकानें विव्हळ होऊन गांधारीनें दिलेल्या शापाची आठवण झाली, आणि पूर्वीं दोन्ही दळें सज्ज होऊन युद्धाला तयार झालीं असतां युधिष्ठिराला जे अपशकून झाले तेच हल्लीं होऊं लागले होते; तरी श्रीकृष्णाच्या मनांतून त्याला कांहीं आळा घालण्याचें नव्हतें. मात्र त्यानें सर्व यादवांना तीर्थयात्रेला समुद्रकांठीं जाण्यासाठीं दांडोरा पिटवून आज्ञा दिली.

कालीदेवी आपले पांढरे शुभ्र दांत दाखवीत हासत रात्रींच्या वेळीं घरोघरीं शिरून झोंपेंत बायकांचीं मंगळसूत्रें वगैरे तोडून घेऊन फिरूं लागली, अग्निशाळेंतून त्याचप्रमाणें चांगल्या चांगल्या घरांतून भयंकर गिधाडें वृष्णी व अंधकांना खाऊं लागलीं.

अलंकार, छत्र, ध्वज व चिलखतें राक्षस उपटून घेऊन जाऊं लागले. श्रीकृष्णाचें लोहमय वज्रनाभ नांवाचें चक्र वृष्णी पहात असतां आकाशांत निघून गेलें; त्याचप्रमाणें चार घोडे जुंपलेला सूर्यासारखा कांतिमान श्रीकृष्णाचा रथ समुद्रावरून वर मोठ्या वेगानें उडून गेला. आकाशांतून अप्सरा मोठ्यानें तीर्थयात्रेला जाण्याकरितां सांगूं लागल्या. तेव्हां तीर्थयात्रेला जाण्याची तयारी करून त्यांनीं मद्यमांसादि नानाप्रकारचे भोज्य, भक्ष्य, पेय तयार केले. सर्व सैनिक मंडळी नगराबाहेर पडून ज्याला त्याला नेमून ठेवलेल्या घरामध्यें सर्व यादव जाऊन राहिले. तें याप्रमाणें समुद्रतीरावर येऊन राहिलेले ऐकून योगवेत्ता उद्धव त्या सर्वांचा निरोप घेऊन निघून गेला. श्रीकृष्णाला अभिवादन करून तो निघाला असतां वृष्णीचा नाश खात्रीनें होणार हें ठाऊक असल्यानें श्रीकृष्णानें त्याचें निवारण केलें नाहीं. सर्व यादव पहात असतां आपल्या तेजानें पृथ्वी व आकाश भरून काढून उद्धव निघून चाललेला दिसला. ब्राह्मणांसाठीं जें अन्न त्यांनीं शिजविलें होतें त्याला दारूचा वास लागून तें अन्न वानरांना वांटण्यांत आलें. नंतर नटनर्तकांच्या गर्दीमध्यें त्याठिकाणीं सर्व मंडळी दारू पिण्यांत गुंग झाली. कृष्णाच्या पुढें कृतवर्मा, राम, युयुधान, गद, बभ्रु वगैरे सर्व दारू प्याले. त्याच्या धुंदींत युयुधान हासून अवमान करून कृतवर्म्याला ह्मणाला, 'कोण क्षत्रिय स्वतः आतां मरतो कां घटकेनें मरतो अशा पेंचांत असतां मेल्यासारखे निजलेल्यांना मारण्याला धजेल! ह्मणून तें तुझें कृत्य यादवांना पसंत नाहीं. असें युयुधान ह्मणाला असतां प्रद्युम्नानें त्याची वाहवा करून अवमानपूर्वक त्या ह्मणण्याला आपलें अनुमत दिलें. तेव्हां कृतवर्मा अगदीं रागावून जाऊन धिकारपूर्वक उजवा हात पुढें करून ह्मणाला, 'युद्धामध्यें भूरिश्रव्याचा हात तुटून तो प्रायोपवेशन करण्याला बसला असतां वीर ह्मणविणाऱ्या तूं त्याला क्रूरपणानें कसें बरं मारलेंस?' हें त्याचें भाषण ऐकून श्रीकृष्णानें रागानें किंचित् वांकडें पाहिलें. स्यमंतक मणी जो पुढें सत्राजित झाला ती गोष्ट सात्यकीनें सांगितली. ती ऐकून सत्यभामेला राग येऊन श्रीकृष्णाला राग आणीत ती रडत त्याच्या मांडीवर बसली. सात्यकि उठून रागानें ह्मणाला, 'हा मी पांच द्रौपदीचे मुलगे, धृष्टद्युम्न व शिखंडी यांची वाट धरतों. मी शपथपूर्वक सांगतों कीं, सौप्तिकामध्यें ज्या दुष्टानें अश्वत्थाम्याच्या साह्यानें त्यांना निजले असतां मारलें त्या कृतवर्म्याचें आयुष्य व यश आज शेवटाला गेलें आहे.' असें ह्मणून हातांत तरवार घेऊन कृतवर्म्यावर धावून जाऊन त्यानें त्याचें मुंडकें उडविलें. तसेंच युयुधानही दुसऱ्यांना मारीत सुटला असतां श्रीकृष्ण त्यांचें निवारण करण्यासाठीं त्याकडे धांवून गेला. काळाच्या फेऱ्यानें बुद्धीला भ्रम पडून सर्व यादव सात्यकीच्या भोंवतीं जमले. त्यांना याप्रमाणें खवळून जाऊन तुटून पडतांना देखील काळाचा फेरा मनांत आणून श्रीकृष्णाला त्याबद्दल कांहीं वाटलें नाहीं. त्यांनीं दारूच्या धुंदींत काळाच्याच प्रेरणेवरून उष्ट्या भोज्यांनीं युयुधानाला खूप ठोकलें. इकडे सात्यकीला ते बडवीत असतां रुक्मिणीच्या मुलाला राग येऊन तो त्याला सोडविण्याकरितां त्याकडे गेला. तो भोज्यांशीं भिडला व सात्यकी अंधकांशीं भिडला. आपल्या बाहुवीर्यानें झळकणारे ते वीर जरी कटून लढत होते तरी त्यांच्या शत्रूंची संख्या पुष्कळ असल्यामुळें त्यांनीं त्या दोघांना ठार केलें. नंतर श्रीकृष्णानें रागावून गवताची मूठ हातांत घेतली त्याबरोबर तें लोहमय वज्रासारखें कठीण मुसळ झालें. त्यायोगानें श्रीकृष्णानें जे जे ह्मणून पुढें होते त्या सर्वांना ठार मारलें. नंतर अंधक, भोज, शैनेय व वृष्णी या सर्वांनीं मुसळांनीं त्या गर्दीमध्यें एकमेकांना मारून काढलें. जो जो ह्मणून कोणी रागावून हातामध्यें गवताची मूठ घेई ती ती मूठ वज्राप्रमाणें कठीण मुसळ बनत असे. हा सर्व ब्रह्मदंडाचाच परिणाम होता, जी जी म्हणून काडी ते फेंकीत असत ती तीं कठीण मुसळ होत असे. मुलगा बापाला व बाप मुलाला मारीत होता. अमलामध्यें ते योद्धे एकमेकांवर तुटून पडून आगींत पडणाऱ्या टोळाप्रमाणें वरून पडत होते तरी तेथून निघून पळून जावें असें कोणाच्याच मनांत येईना. काळाचा फेरा जाणून श्रीकृष्ण हातांत मुसळ घेऊन उभा होता. सांब, चारुदेष्ण, प्रद्युम्न, अनिरुद्ध व गद यांना म-

रून पडलेले पाहून श्रीकृष्ण फारच संतापून त्यांचा पार फडशा पाडूं लागला. त्याला याप्रमाणें मारीत सुटलेला पाहून बभ्रु व दारुक त्याला म्हणाले, ' तूं सर्वांचा फडशा पाडला आहेस. आतां बळरामांना शोधीत त्यांकडे आपण जाऊं. यानंतर ते तिघे रामाचा शोध करीत चालले असतां अनंतवीर्य राम एकांतामध्यें एका झाडावर ध्यानस्थ बसलेला त्यांना दिसला. त्याकडे आल्यावर श्रीकृष्णानें दारुकाला कौरवांकडे जाऊन यादवांनीं उडविलेला हा एकमेकांचा फडशा अर्जुनाच्या कानावर घालून त्याला यादवस्त्रियांचें रक्षण करण्याकरितां घेऊन येण्यास सांगितलें. तें ऐकून दारुक निघून गेला असतां श्रीकृष्ण बभ्रुला जवळ पाहून त्याला ह्मणाला, ' तूं स्त्रियांचें रक्षण करण्याला लौकर जा. नाहींतर चोर पैशाच्या लोभानें त्यांना ठार मारतील. बभ्रु ज्ञातीच्या वधामुळें कष्टी झालेला व दारूमुळें धुंद असा श्रीकृष्णाच्या सांगण्यावरून निघाला असतां तो फार लांब गेला नाहीं तोंच तो त्या ठिकाणीं एका मुसळावर पडून मेला. त्याला मेलेला पाहून श्रीकृष्ण बलरामाला ह्मणाला, ' दादा, तूं येथें माझी वाट पहात रहा. मी बायकांना ज्ञातीच्या ताब्यांत करून परत येतों. ' असें म्हणून द्वारकेला जाऊन तो आपल्या वडिलांना ह्मणाला, ' आपण अर्जुनाच्या येण्याची वाट पहात आमच्या सर्व बायकांचें रक्षण करून रहा. राम वनामध्यें माझी वाट पहात आहे. हा यादवांचा फडशा व पूर्वी उडालेला तो कौरवांचा फडशा पाहून यादवांवांचून त्यांच्या या पुरीकडे आज माझ्यानें पहावत नाहीं; तेव्हां वनामध्यें जाऊन मी रामाबरोबर तप करीत राहीन. ' असें ह्मणून डोकें पायांवर ठेवून श्रीकृष्ण निघाला असतां बायकांमुलांमध्यें एकच कल्होळ उडाला; तेव्हां त्यांचें रडणें ऐकून परतून तो ह्मणाला, ' अर्जुन या ठिकाणीं येईल, तो तुह्मांला तुमच्या दुःखांतून सोडवील. ' असें ह्मणून तो बळरामाकडे जातो आहे तोंच तो एकांतामध्यें योगसमाधि लावून बसलेला त्याला दिसला. तो याप्रमाणें बसला असतां एक मोठा नाग त्याच्या तोंडांतून निघाला, व श्रीकृष्ण पहात असतां बळराम आपलें रक्तवर्ण असें पूर्वस्वरूप टाकून हजार फण्यांचा पर्वतप्राय नाग बनून समुद्रामध्यें शिरला. समुद्र, कर्कोटकप्रभृति दिव्य नाग, पवित्र नद्या व प्रत्यक्ष वरुण हे त्याला सामोरे गेले, व त्याचें स्वागत करून अर्घ्यपाद्यादिकांनीं त्यांनीं त्याची पूजा केली. याप्रमाणें बळराम गेल्यावर ज्ञानदृष्टीनें सर्व कांहीं कळत असणारा भगवान् श्रीकृष्ण त्या शून्य अरण्यामध्यें फिरतां फिरतां एका ठिकाणीं बसला. पूर्वी गांधारी बोललेलें भाषण त्याचप्रमाणें उष्टी खीर अंगाला फांसून घेतली असतां दुर्वास जें कांहीं बोलले होते त्याची आठवण होऊन त्याला हें जग सोडून जाण्याचा आपला काळ आला असें वाटलें; व अत्रींचे भाषणाला मान देऊन त्रैलोक्य पालन करण्यासाठीं आपल्या लोकास जाण्याकरितां इंद्रियनिग्रह करून, तो प्रत्यक्ष देव होता तरी देह ठेवण्याचा त्यानें निश्चय केला. इंद्रियें, वाणी व मन यांचा निरोध करून महायोग लावून तो खालीं पडून राहिला. ते वेळीं जरा नांवाचा पारधी हरणाची शिकार करण्यासाठीं त्या प्रदेशाला आला होता. श्रीकृष्णाला योगसमाधि लावून पडलेला पाहून त्याच्या पायावर एक बाण मारून त्याला धरण्याला त्याजवळ जातो आहे तोंच योगयुक्त असा पीतांबरधारी व अनेक हात असलेला एक पुरुष त्याला दिसला. आपल्या हातून त्याचा अपराध झाला आहेसें वाटून साशंक होऊन त्यानें त्याचे घट्ट पाय धरले. महात्मा परमात्मा त्याला धीर देत आपल्या कांतीनें पृथ्वी व आकाश व्यापून सोडून स्वर्गाला गेला असतां इंद्रप्रभृति सर्व देव, ऋषी, गंधर्व, अप्सरा वगैरे मंडळी त्याला सामोरी गेली, व त्याचें अभिनंदन करून त्यांनीं त्याची पूजा केली.

## ३१८ यादव स्त्रियांची व्यवस्था व पांडवांचा शोक. ( १६. ५--८ )

इकडे दारुकानें पांडवांकडे जाऊन त्यांना यादवांनीं एकमेकांचा मुसळानें फडशा उडविल्याची बातमी दिली. याप्रमाणें सर्व यादवांचा फडशा उडालेला ऐकून पांडव शोकाकुल होऊन अगदीं घाबरून गेले. ते वेळीं श्रीकृष्णाचा प्रियसखा अर्जुन आपल्या भावांचा निरोप घेऊन ' हें कांहीं

खरें दिसत नाहीं; असें म्हणून द्वारकेला आपल्या मामाला भेटण्याला निघाला. द्वारकेंत शिरल्यावर ती त्याला पती मेलेल्या एखाद्या अनाथ स्त्रीप्रमाणें दिसली. ज्यांना पूर्वी त्रैलोक्यनाथाचा आधार होता त्या श्रीकृष्णाच्या सोळा हजार बायका आतां अनाथ होऊन आपल्याला हात देण्याला आलेल्या अर्जुनाला पाहून मोठ्यानें रडूं लागल्या; तेव्हां एकच कल्होळ उडून राहिला. श्रीकृष्ण त्याचप्रमाणें आपले मुलगे यांना मुकल्यामुळें त्यांचे डोळे पाण्यानें भरून आले. त्या बायकांकडे अर्जुनाच्यानें पहावेना. यादव हेच ज्यामधील पाणी असून घोडे हे मासे व रथ ह्या ज्यामध्यें नावा होत्या, वाजंत्र्याचा आणि रथाचा आवाज हाच जिचा ओघ होता, मोठमोठे वाडे हींच जिच्या कांठचीं मोठमोठीं पवित्र सरोवरें होतीं, त्याचप्रमाणें अनेक रत्नें हींच ज्यावरचें शेवाळ होतें, अशी वस्त्र व तटरूपी माळांनीं भरलेली व चौक हेच जिच्या कांठचीं शांत सरोवरें होतीं, रामकृष्णरूपी जलचरांनीं युक्त अशा द्वारकारूपी नदीला कालपाशानें घेरल्यामुळें भयंकर अशा वैतरणीप्रमाणें ती दिसूं लागली होती. वृष्णी व अंधक तिच्यामधून नाहींसें झाल्यामुळें वैभवहीन व कोमेजलेल्या हिंवाळ्यांतील कमलिनीप्रमाणें ती द्वारका त्याला दिसली. द्वारकेला त्याचप्रमाणें त्या स्त्रियांना अशा स्थितींत पाहून डोळ्यांतून पाणी काढून मोठ्यानें रडत अर्जुन खालीं जमिनीवर पडला. सत्राजिताची मुलगी सत्यभामा व रुक्मिणी अर्जुनाच्याभोंवतीं जमून रडूं लागल्या, व त्याला उठवून सोन्याच्या सिंहासनावर बसवून कांहींएक न बोलतां त्याच्या बाजूला त्या उभ्या राहिल्या. आश्वासनपूर्वक त्यांचें समाधान करून अर्जुन भेटण्याकरितां वसुदेवमामांकडे गेला. तेव्हां तो पुत्रशोकानें विव्हळ होऊन पडलेला त्याला दिसला. डोळे पाण्यानें भरून येऊन त्यांहून अधिक कष्टी होऊन अर्जुनानें त्याचे पाय धरले. आपल्या त्या भाच्याचें मस्तक हुंगण्याचें वसुदेवाच्य मनांत आलें; परंतु उठून तेवढें सुद्धां करण्याचें त्याच्या अंगांत सामर्थ्य नव्हतें. त्याला आपल्या बाहूंमध्यें धट्ट कंवटाळून सर्व मुलांची व आप्तमित्रांची आठवण होतांच विव्हळ होऊन तो ह्मणाला, ' ज्यांनीं पूर्वी शेंकडो राजे व दैत्य यांचा फडशा उडविला, ते आतां नाहींसे झाले असून मीं जिवंत आहें, तेव्हां माझें मरण कोठें दडलें आहे मला कळत नाहीं. जे ते दोघे तुझे शिष्य प्रद्युम्न व युयुधान त्यांच्या दुर्वर्तनानें हा प्रसंग ओढवला. ते दोघे यादवांच्या नाशाला कारण झाले; परंतु मी सात्यकि, कृतवर्मा, अक्रूर किंवा प्रद्युम्न यांना तरी दोष कां देऊं ? कारण ह्या यादवांच्या नाशाला शापच कारण झाला आहे. ज्यानें केशी राक्षस, कंस, आपल्या बळानें फुगलेला शिशुपाल व निषादांचा स्वामी एकलव्य व दुसरे पुष्कळ राजे यांचा फडशा पाडला, त्यानें ह्या यादवांच्या नाशाकडे दुर्लक्ष केलें! तूं त्याचप्रमाणें मुनी नारद हे हा श्रीकृष्ण सनातन परमात्मा आहे हें ओळखतां; असें असून सर्वशक्तिमान् अधोक्षज आपल्या ज्ञातीचा वध मुकाट्यानें पहात राहिला. तें गांधारीचें भाषण त्याचप्रमाणें ऋषींचे शब्द खोटे करण्याचें त्याच्या मनांत नव्हतें. प्रत्यक्ष तुझ्या नातवाला अश्वत्थाम्यानें मारलें असतां त्यानें आपल्या तेजानें जिवंत केलें; परंतु तुझ्या त्या सख्याच्या मनांत या आपल्या ज्ञातीचें रक्षण करण्याचें आलें नाहीं. आपले मुलगे, नातू, भाऊ, मित्र मरून पडलेले पाहून तो मला ह्मणाला कीं, ' कुलाच्या नाशाची वेळ आली आहे. यादव मेले ही बातमी ऐकून अर्जुन एकदम द्वारकेला येईल. जो अर्जुन तोच मी व मी हाच अर्जुन असें समजून तो सांगेल त्याप्रमाणें वागा. तो बायकामुलांची व्यवस्था लावून सर्वांची उत्तरक्रिया करील. तो द्वारका सोडून गेल्यावर मोठमोठ्या तटबंदी वाड्यांनीं भरलेली ही द्वारका समुद्र बुडवून टाकील. मी कोठें तरी पवित्र ठिकाणीं दादाबरोबर नियमस्थ राहून काळाचा नियमानियम खरा करतों. ' ज्याच्या पराक्रमाची कल्पना नाहीं असा श्रीकृष्ण याप्रमाणें मला ह्मणून व लहान मुलांसह या ठिकाणीं मला सोडून कोठेंसा निघून गेला. तो मी त्या तुझ्या दोन भावांचा व ज्ञातीचा पडलेला फडशा यांवर विचार करीत न खातां रडत पडलों आहें. मी मरतही नाहीं व जिवंतही नाहीं. तूं आलास बरें झालें. श्रीकृष्ण सांगून गेला आहे त्याप्रमाणें सर्व कर. अर्जुना, हें राज्य, ह्या बायका व हीं रत्नें तुझीं आहेत. मी आतां हा प्राण सो-

डणार.' असें वसुदेव ह्मणाला असतां वाईट वाटून तोंड उतरून जाऊन अर्जुन त्याला ह्मणाला. 'श्रीकृष्ण त्याचप्रमाणें बांधव यांना मुकून मी किंवा माझे भाऊ व द्रौपदी आतां या पृथ्वीवर राहूं इच्छित नाहीं. राजा युधिष्ठिराचाही हें जग सोडून जाण्याचा काळ आला आहे. या सर्व यादवस्त्रियांना व मुलाम्हाताऱ्यांना मी इंद्रप्रस्थाला घेऊन जातों. असें त्याला ह्मणून यादवांच्या आमात्यांना भेटण्यासाठीं तो यादव सभेकडे गेला. सभेंत शिरून तो आसनावर बसल्याबर सर्व प्रधान व वेदपारग ब्राह्मण त्याच्या भोंवतीं जमले. कष्टी होऊन वेडे बनून गेलेल्या त्या दीनांना स्वतः त्यांच्याहून अधिक कष्टी झालेला अर्जुन ह्मणाला, 'मी स्वतः या यादवमंडळींना इंद्रप्रस्थाला घेऊन जातों. हें नगर समुद्र बुडवून टाकील. वहानें व नानाप्रकारचीं रत्नें तयार ठेवा. हा तुमचा वज्र इंद्रप्रस्थामध्यें राजा होईल. आजपासून सातव्या दिवशीं सूर्य चांगला उगवल्यावर आपण नगराच्या बाहेर पडूं. तुह्मी सर्व लौकर तयार व्हा.' याप्रमाणें अर्जुन ह्मणाला असतां तें काम पार पाडण्याच्या ते तयारीला लागले. अर्जुन त्या दिवशीं रात्रीं शोकानें अगदीं वेडा होऊन श्रीकृष्णाच्या वाड्यांत राहिला. दुसरे दिवशीं महातेजस्वी वसुदेव समाधि लावून उत्तम गतीला निघून गेला. तेव्हां त्याच्या वाड्यांत मोठ्यानें रडणाऱ्या स्त्रियांचा एकच कल्होळ उडून राहिला. केस विस्कळून सोडून, अलंकार व माळा अस्ताव्यस्त टाकून हातांनीं ऊर बडवून घेत त्या दीनवाण्या रडूं लागल्या. देवकी, भद्रा, रोहिणी व मदिरा या त्याच्या बायका त्याच्या मागूनच गेल्या; तेव्हां माणसें जोडलेल्या मोठ्या मौल्यवान वाहनामध्यें वसुदेवाला ठेवून अर्जुनानें त्याला नगराबाहेर काढलें. द्वारकावासी लोक शोकाकुल होऊन त्याच्या मागून चालले होते. त्याचें अश्वमेधाच्या वेळचें छत्र व देदीप्यमान अग्नि घेऊन याजक त्या वाहनाच्यापुढें चालले होते. त्याच्या बायका हजारों स्त्रियांमधून त्यांच्या मागून चालल्या होत्या. जो देश जिवंतपणीं त्याला आवडता होता त्याठिकाणीं त्याला नेऊन ठेवून त्यानें त्याचा संस्कार केला. तेव्हां त्याला चितेवर ठेवल्यानंतर पतीलोकाला निघालेल्या त्याच्या चार बायका त्याच्यामागून त्या चितेवर चढल्या व या पांचांना अर्जुनानें उत्तम उत्तम धूप वगैरे घालून अग्नि देवविला. चिता पेटल्यावर साम ह्मणणाऱ्यांचा सामघोष व लोकांचे रडणें यांचा एकच शब्द होऊन राहिला. नंतर वज्र वगैरे यादवकुमार व बायका यांनीं पाणी दिलें. याप्रमाणें सर्व क्रिया यथास्थित करून अर्जुन यादव मेले होते त्या ठिकाणीं गेला. एकमेकांची कत्तल करून त्या ठिकाणीं पडलेल्या त्यांना पाहून अर्जुनाला फार वाईट वाटलें; व त्यासंबंधानें जें कांहीं करावयाचें होतें त्या सर्व क्रिया यथाक्रमानें त्यानें केल्या; नंतर बलराम व श्रीकृष्ण यांचे देह हुडकून काढून जिव्हाळ्याच्या लोकांकडून त्यानें त्यांना अग्नि देवविला व त्यांचे सर्व प्रेतसंस्कार विधिपूर्वक करून, सातव्या दिवशीं घोडे जुंपलेले रथ, गाई, गाढवें, उंट यांनिशीं तो निघाला. यादवस्त्रिया, नोकरचाकर, मोतद्दार वगैरे सर्व मंडळी त्याच्या मागून निघाली. माहुत पर्वतासारख्या मोठमोठ्या हत्तींना घेऊन निघाले. सांतरायुधिक आपल्या शरीररक्षक शिपायांनिशीं अर्जुनाच्या मागून निघाले. पार्थावर लगट असलेलीं यादवांचीं मुलें, त्याचप्रमाणें धनवान ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र त्याच्या मागून चालले. श्रीकृष्णाच्या सोळा हजार बायका, कृष्णाचा नातू वज्र याला पुढें करून त्याच्यामागून चालल्या. याप्रमाणें त्या यादवमंडळींना घेऊन अर्जुन द्वारकेंतून बाहेर पडतो तोंच त्या रत्नांनीं भरलेल्या द्वारकेला समुद्रानें बुडवून टाकलें. अर्जुन जसजसा द्वारकेला सोडीत चालला तसतसा तो तो भाग समुद्र पाण्यामध्यें बुडवूं लागला. तो चमत्कार पाहून 'काय तरी दैव आहे,' असें ह्मणून आश्चर्य करीत ते द्वारकावासी लोक झपाट्यानें पुढें चालले. रम्य अशा अरण्यामधून, पर्वतावरून नदीच्या कांठीं मुक्काम करीत करीत अर्जुन त्यांना घेऊन चालला. त्यानें गाई, जनावरें व धान्य यांनीं संपन्न अशा पांच नद्यांमधल्या देशामध्यें येऊन तेथें मुक्काम केला असतां त्या गतभर्तृका बायकांना एकटा अर्जुन घेऊन चालला आहे हें पाहून चोरांच्या मनांत पाप आलें याप्रमाणें ते पापकर्म करणारे लोभाच्या तावडींत जाऊन त्यांनीं आपसांत विचार केला कीं, 'हा अर्जुन एकटा पोरांह्मातान्यांना आम-

च्यावरून घेऊन चालला आहे, व यांमधील योध्यांच्या अंगांत पाणी दिसत नाहीं. असा विचार करून ते हजारों चोर हातांत काठ्या घेऊन लूट मिळविण्यासाठीं मोठ्या शब्दांनीं सामान्य लोकांना भिवडावून सोडीत त्या वृष्णींवर धांवून गेले, व काळानेंच बुद्धि दिल्यावरून त्यांना मारण्यासाठीं त्यांवर तुटून पडले; तेव्हां आपल्या अनुयायांसह अर्जुन मागें वळून त्यांना ह्मणाला, 'हे धर्मलंडांनो, जर प्राणांची तुह्मांला पर्वा असेल तर परता, नाहीं तर माझ्या बाणांनीं आतांच्या आतां तुह्मांला मरण्याची पाळी येईल.' या अर्जुनाच्या बोलण्याकडे लक्ष न देतां फिरून फिरून तो निवारण करीत असतांही ते त्या लोकांवर तुटून पडले; तेव्हां अर्जुनानें आपलें मोठें दिव्य गांडीव धनुष्य घेऊन त्याला मोठ्या कष्टानें प्रत्यंचा चढवून तें मोठ्या श्रमानें सज्ज केलें. तेवेळीं त्या धांदलीमध्यें तो आपलीं अस्त्रें मनांत आणूं लागला असतां त्याला तीं आठवेनात. याप्रमाणें आपलें बाहुवीर्य कमी होऊन तीं दिव्यमहास्त्रें आपल्याला सोडून गेलेलीं पाहून तो लाजल्यासारखा झाला. घोड्यावरून, हत्तीवरून, रथांतून चाललेल्या वृष्णी योद्ध्यांनाही चोरांनीं घेऊन चाललेल्या आपल्या लोकांना सोडवितां येईना. जनाना मोठा असून चोर चोहोंकडून त्याच्यावर तुटून पडत होते. त्या सर्वांचें रक्षण करण्यासाठीं अर्जुन आपल्या बाकीच्या योध्यांसह प्रयत्न करीत असतां त्यांतील कांहीं चांगल्या चांगल्या बायकांना चोर ओढून घेऊन चालले व कांहीं आपखुषीनेंच त्यांच्यामागून चालल्या; तेव्हां अर्जुन चिंतातुर होऊन आपल्या गांडीवापासून बाण सोडून त्यानें बऱ्याच चोरांना ठार केलें; परंतु मागें कधीं खोट न पडणारे, थेट जाऊन भिडून रक्त प्राशन करणारे त्याचे बाण लवकरच संपले. तेव्हां त्याला मोठें वाईट वाटलें, व तो आपल्या धनुष्याच्या टोंकानेंच चोरांना मारीत सुटला. अर्जुनाच्या डोळ्यासमोरून यादव स्त्रियांना चोहोंकडून म्लेच्छ घेऊन चालले हें दुर्दैव पाहून अर्जुनाला फार दुःख होऊन तो मोठ्यानें दीर्घोच्छ्वास टाकूं लागला. अस्त्रें आपल्याला सोडून जाऊन बाहुवीर्य पूर्वींसारखें चालेनासें झाल्यामुळें व धनुष्याचीही मात्रा पूर्वींसारखी चालेना, बाणही सरून गेले, हें पाहून अर्जुन मनांत खट्टू झाला. हा दैवाचा खेळ आहे असें वाटून 'हें कांहीं ठीक नाहीं,' असें ह्मणत तो परतला. नंतर बाकीच्या बायका व रत्नें घेऊन तो कुरुक्षेत्राला आला, व त्याठिकाणीं त्यानें हार्दिक्याच्या मुलाला त्याचप्रमाणें भोजांच्या राहिलेल्या बायकांना मार्तिकावत नगरामध्यें ठेवून, बाकीच्या सर्व मुलाह्मातार्‍यांना व स्त्रियांना त्यानें शक्रप्रस्थांत आणून ठेवलें. सात्यकीचा आवडता मुलगा यौयुधानी याला त्यानें सरस्वतीच्या तीरावरील प्रदेशांत ठेवलें, वज्राला इंद्रप्रस्थाचें राज्य दिलें. वज्र नको नको ह्मणत असतां अक्रूराच्या बायका वनवासाला गेल्या. रुक्मिणी, गांधारी शैब्या, हैमवती, जांबवती या अग्नींत शिरल्या व सत्यभामा वगैरे श्रीकृष्णाच्या दुसऱ्या बायका तप करण्याच्या निश्चयानें वनांत शिरल्या. जे कांहीं द्वारकावासी लोक अर्जुनाबरोबर आले होते त्यांची नीट व्यवस्था लावून अर्जुनानें त्यांना वज्राच्या स्वाधीन केलें. याप्रमाणें त्या वेळेला योग्य अशी सर्व व्यवस्था लावून डोळे पाण्यांनीं भरून येऊन तो व्यासांच्या आश्रमाकडे त्यांना भेटण्यासाठीं गेला. त्यांच्या आश्रमांत शिरल्यावर त्यांना एकांतांत बसलेले पाहून त्यांच्याजवळ जाऊन उभा राहून 'मी अर्जुन आलों आहें,' असें सांगून त्यानें त्यांना अभिवादन केलें. 'तुझें स्वागत असो,' असें ह्मणून व्यासांनीं त्याला बसण्याला सांगितलें. त्याला निरानंद व दीर्घोच्छ्वास टाकतांना पाहून व्यास ह्मणाले, 'तुझीं नखें, केस, वस्त्रांच्या दशा, तोंड हीं पाण्यानें थबथबलीं आहेत. रजस्वलेशीं संबंध, ब्रह्महत्या किंवा युद्धांत पराभव झाल्याप्रमाणें तुझ्या तोंडावरचें पाणी पळालें आहे. तुझा पराभव झालेला मला कधीं आठवत नाहीं; तेव्हां हें आहे काय हें मला सांगण्या सारखें असेल तर सांग.' अर्जुन ह्मणाला, 'तो शामवर्ण, कमलासारखा विशालनयन, श्रीमान श्रीकृष्ण बळरामाबरोबर देह ठेवून स्वर्गाला निघून गेला आहे. मौसलामध्यें ब्राह्मणांच्या शापानें यादवांचा फडशा पडला आहे. ह्या सिंहासारख्या अभिमानी, महाबलशाली वीरांनीं एकमेकांला मारलें आहे. गदा, परिघ, शक्ति यांचेंही कांहीं चालू न देणारे हे वीर यःकश्चित् काटक्यांनीं मरून पडले. तेव्हां हा काळाचा महिमा

कसा आहे पहा. ते एक लाख बाहुशाली वीर एकमेकांच्या हातून मरून पडले आहेत. एखादा समुद्र आटून जावा, पर्वत आपल्या जागेपासून ढळावा, आकाश कोसळावें किंवा अग्नि थंड पडावा, त्याप्रमाणें या श्रीकृष्णाच्या विनाशावर माझा विश्वास बसत नाहीं. श्रीकृष्णावांचून या जगांत मला रहावेंसें वाटत नाहीं. याहून वाईट गोष्ट घडली ती सांगतों ऐका. त्याची वरचेवर आठवण होऊन माझें मन कसें फाटून जात आहे. मी पहात असतां पांच नद्यांमधील आभीर जातीच्या चोरांनीं युद्ध करून यादव स्त्रियांना उपटून नेलें. मी धनुष्य घेऊन उभा राहिलों असतां धनुष्याला बाण पुरविण्याचें माझ्या हातून झालें नाहीं. पूर्वी माझें बाहुबल ज्याप्रकारचें होतें तें नाहींसें होऊन सर्व अस्त्रें मला सोडून गेलीं, व बाणांचाही तुटवडा आला. जो तो शंखचक्रगदाधर श्रीकृष्ण परमात्मा शत्रू सैन्याला जाळून टाकीत माझ्या रथाच्या पुढें असे तो आज मला दिसत नाहीं. त्यानें पूर्वी आपल्या तेजानें शत्रुसैन्याला जाळून टाकल्यावर मागून मी आपल्या बाणांनीं त्यांचा नाश करीत असें. तो आज मला दिसेनासा झाल्यामुळें माझ्या मनाला चैन पडेनासें होऊन डोळ्यांपुढें चक्कर येत आहे. मन अगदीं खचून जाऊन मनाला स्वस्थता कशी ती नाहींशी झाली आहे. त्याच्याशिवाय आतां मला जगावेंसें वाटत नाहीं. तो गेलेला ऐकून मला दिशाभूल पडत चालली आहे. ज्ञातिबल नाहींसें होऊन सर्व शून्यवत् होऊन मी सैरावैरा धांवत आहें. तेव्हां मला योग्य सल्ला आपण द्या.' व्यास ह्मणाले, 'यादव ब्रह्मशापानें जळून नाहींसें झाले आहेत; तेव्हां त्यांच्या संबंधानें शोक करण्याचें कारण नाहीं. ही भवितव्यता असून त्यांच्या कपाळींच तसें लिहून ठेवलें होतें. श्रीकृष्णाच्या अंगांत सामर्थ्य असून त्यानें त्याची उपेक्षा केली. त्रैलोक्यसुद्धां फिरवून टाकण्याचें त्याच्या अंगांत सामर्थ्य असतां या शापाची त्याला काय बिशाद होती. तो चक्रगदाधारी पुराणऋषी स्नेहामुळें तुझ्या रथावर सारथी झाला होता. पृथ्वीचा भार उतरून आपला देह ठेवून तो आपल्या उत्तम स्थानाला निघून गेला आहे; तूंही भीमादि आपल्या भावांच्या साह्यानें देवांचें मोठें काम पार पाडून कृतकृत्य झाला आहेस. तुमचें आतां काम सरलें आतां तुमची हें जग सोडून जाण्याची वेळ आली आहे. याप्रमाणें वैभवकालीं बुद्धि, तेज व विचार सुचून तोच काळ फिरला असतां तीं नाहींशीं होतात. या सर्व जगाला बीजात्मक मूळ काळ आहे. तोच आपल्या इच्छेनें सर्वांना फिरून आपल्या पोटांत घेतो, तोच बळवान होऊन पुन्हा दुर्बळ होतो, तोच सर्वांचा स्वामी होऊन दुसऱ्यांचा गुलाम होतो. तुझीं अस्त्रें आपली कामगिरी बजावून आल्याप्रमाणें आज निघून गेलीं आहेत. फिरून काळ येईल तेव्हां तीं तुझ्या हातांत येतील. सध्यां श्रेष्ठ गतीला जाऊन मिळण्याची तुमची वेळ आली असल्यामुळें तेंच तुमच्या हिताचें आहे, असें मला वाटतें.' याप्रमाणें त्यांचें भाषण ऐकून, त्यांची परवानगी घेऊन अर्जुन हास्तिनापुराला आला व यादवकुलासंबंधानें घडलेली सर्व हकीकत त्यानें युधिष्ठिराच्या कानावर घातली.

---

# १७ महाप्रस्थानपर्व.

## २१९ दूरच्या प्रवासाची तयारी.

(१७. १–३)

यादवांच्या ह्या भयंकर कत्तलीची बातमी ऐकून जग सोडण्याचें मनांत आणून युधिष्ठिर; अर्जुनाला ह्मणाला, 'हे महामते अर्जुना, काळच सर्व भूतमात्रांना परिपक्व दशेला आणतो. हा काळाचाच पाश मला वाटतो.' असें तो ह्मणाला असतां आपल्या वडील भावाचें भाषण पटून अर्जुनाच्या तोंडूनही 'काळ, काळ' ह्मणून उद्गार निघाला. नंतर धर्मसंचय करण्यासाठीं वनांत जाण्याचा हेतु धरून

वेश्यापुत्र युयुत्सूला आणवून त्याला राज्य देऊन, स्वराज्यावर परिक्षितीला अभिषेक करून दुःखाकुल युधिष्ठिर सुभद्रेला ह्मणाला, 'हा तुझा नातु हास्तिनापूराचा राजा होईल. यादवांमधला अवशिष्ट राहिलेला वज्र इंद्रप्रस्थाचा राजा होईल. वज्राला संभाळून अधर्माकडे तूं प्रवृत्ति ठेवूं नकोस. असें तिला सांगून, श्रीकृष्ण, आपला वृद्ध मामा व बळरामप्रभृति मंडळी यांना आदरपूर्वक पाणी देऊन, सर्वांच्या नांवानें यथाविधि श्राद्धें करून, व्यास, **नारद, मार्कंडेयप्रभृति उत्तम ब्राह्मणांना त्यांच्या नांवानें चांगलें जेऊं घालून** ठळक ठळक ब्राह्मणांना त्यानें हजारों वस्त्रें, रत्नें व गांव दिलें. कृपाचार्यांची पूजा करून परिक्षितीला त्यानें त्यांच्या स्वाधीन केलें; नंतर सर्व प्रधानांना आणवून त्यांना युधिष्ठिरानें आपला उद्देश कळविला. त्यांना तें कांहीं न रुचतां त्यांचें मन तें ऐकून अगदीं अस्वस्थ झालें. असें करूं नका ह्मणून त्यांनीं त्याला पुष्कळ सांगितलें; परंतु प्रसंग कळत असल्यामुळें त्यांच्या ह्मणण्याला रुकार न देतां आपल्या भावांसह निघण्याचें ठरवून त्याप्रमाणें तो व्यवस्थेला लागला. अंगावरचे अलंकार काढून त्या सर्वांनीं वल्कलें धारण केलीं; व शेवटची (उत्संग) इष्टि करून अग्नि पाण्यामध्यें टाकून ते नरवीर द्रौपदीसह निघाले. त्यांना निघालेले पाहून सर्व बायका रडूं लागल्या. आपणही निघावयाचें ह्मणून सर्व भावांना मोठा आनंद झाला. पांच भाऊ, द्रौपदी व पुढें एक कुत्रा असे ते सात हास्तिनापुरांतून बाहेर पडले. सर्व पौरजन व अंतःपुरांतील बायका त्यांच्या मागून दूरपर्यंत गेले; परंतु मागें परता ह्मणून युधिष्ठिराच्यानें कोणाला सांगवेना. पुढें कृपप्रभृति सर्व मंडळी परतून युयुत्सूच्या मागून निघाली. नागकन्या उलूपी गंगेमध्यें शिरली. चित्रांगदा मणिपुराला गेली. दुसऱ्या परिक्षितीच्या आया त्याच्यामागून निघाल्या. द्रौपदीसह पांडव उपवास करीत पूर्वदिशेनें चालले. त्यागधर्म स्वीकारून योग लावून ते नानादेशांमधून नद्या व समुद्र यांचें दर्शन घेत निघाले. युधिष्ठिर पुढें असून भीम त्याच्यामागून व अर्जुन त्याच्या मागून व बाकीची मंडळी क्रमानें त्यांच्यामागून चालली होती. शामवर्ण कमलनयना सुंदरी द्रौपदी सगळ्यांच्या मागून चालली होती. क्रमाक्रमानें हे वीर उदयाचल पर्वताजवळील समुद्राजवळ आले. रत्नांच्या लोभानें अर्जुनानें आपलें दिव्य गांडीव धनुष्य व कधीं खोट न पडणारे दोन भाते हीं टाकून दिलीं नव्हती. त्यांना पर्वताप्रमाणें पुढें वाट आडवून बसलेला मूर्तिमान अग्नि दिसला. तो पांडवांना ह्मणाला, 'वीरांनो, मी अग्नि आहें. मींच अर्जुनाच्या व श्रीकृष्णाच्या प्रभावानें पूर्वी खांडववन जाळलें; या अर्जुनाला आपलें श्रेष्ठ गांडीव धनुष्य ठेवून वनांत जाऊं दे. याचें कांहीं याला आतां काम नाहीं. श्रीकृष्णाच्या हातांत असलेलें चक्ररत्न त्याला सोडून गेलें आहे, व फिरून वेळ येईल तेव्हां तें त्याच्या हातांत परत येईल. हें धनुष्य पूर्वी अर्जुनाकरतां वरुणापासून मागून आणलें होतें; तें त्याचें त्याला देऊन टाका; तेव्हां भावांनीं सांगितल्यावरून अर्जुनानें तें धनुष्य व ते भाते पाण्यांत टाकून दिले, तेव्हां अग्नि तेथेंच गुप्त झाला. पांडववीर दक्षिणेकडून पुढें उत्तरेला लवण समुद्राकडे निघाले, व तेथून नैर्ऋत्य दिशेला आले. तेथून फिरून पश्चिमेकडे समुद्रानें बुडवून टाकलेल्या द्वारकेकडे आले व पृथ्वीची प्रदक्षिणा करण्याच्या इच्छेनें फिरून ते उत्तरेकडे वळले. याप्रमाणें आत्मनिग्रहानें योग लावून उत्तरदिशेकडे ते निघाले असतां मोठा हिमाचल पर्वत त्यांना लागला. तो ओलांडून पलीकडे एक वाळूचें मैदान ओलांडून गेल्यावर सर्व पर्वतांमध्यें श्रेष्ठ मेरू त्यांना दिसला. याप्रमाणें योगसमाधि लावून ते चालले असतां ध्यान मोडून जाऊन द्रौपदी खालीं पडली. तिला पडलेली पाहून भीमानें युधिष्ठिराला विचारलें कीं, 'हिनें अधर्म कांहीं आचरल्याचें दिसत नाहीं. मग ही कां बरें पडली?' युधिष्ठिरानें उत्तर दिलें, 'हिचा अर्जुनावर विशेष ओढा होता त्याचें हें फळ आज तिला मिळालें आहे.' असें ह्मणून तिच्याकडे लक्ष न देतां मन समाधान करून तो पुढें निघाला. इतक्यांत सहदेव खालीं पडला, तेव्हां भीमानें फिरून विचारलें, 'याला अहंकार मुळीं ठाऊक नसून नेहमीं हा आमच्या सेवेमध्यें दक्ष होता, मग हा कां बरें खालीं पडला?' युधिष्ठिर ह्मणाला, 'याला आपल्यासारखा शहाणा कोणीच नाहीं असें वाटे ह्मणून हा पडला.' असें

ह्मणून त्यालाही सोडून ते पुढें निघाले. पुढें नकुल खालीं पडला, तेव्हां 'धर्मापासून कधीं न ढळतां वडिलांच्या आज्ञेमध्यें रहाणारा हा नकुल कां पडला,' ह्मणून भीमानें विचारलें असतां युधिष्ठिर ह्मणाला, 'माझ्यासारखा रूपामध्यें कोणी नाहीं अशी याला घमेंड वाटत असल्यामुळें हा खालीं पडला. जो जें करतो त्याचें त्याला फल मिळतें.' असें ह्मणून ते पुढें चालले असतां अर्जुन पडला, तेव्हां फिरून भीमानें कारण विचारलें असतां युधिष्ठिर ह्मणाला, 'आपल्या शौर्याची घमेंड असणाऱ्या या अर्जुनानें एका दिवसांत शत्रूला जाळून काढीन असें ह्मणून बोलल्याप्रमाणें केलें नाहीं, व त्यानें धनुर्धाऱ्यांचा अवमान केला ह्मणून तो पडला. ह्मणून कल्याणेच्छूनें असें करूं नये.' असें ह्मणून ते पुढें चालले असतां भीम पडला. पडल्यानंतर भीमानें, मी कां पडलों याचें कारण सांगा,' ह्मणून विचारलें असतां 'तूं दुसऱ्याचा विचार न करतां मी मोठा खाणारा ह्मणून शक्तीची फुशारकी मारीत होतास म्हणून तूं पडलास.' असें ह्मणून त्याच्याकडे न बघतां युधिष्ठिर पुढें चालला. एकटा कुत्रा त्याच्याबरोबर चालला होता. पुढें इंद्र आपल्या रथानें आकाश व पृथ्वी दणाणून सोडीत त्याजवळ येऊन त्याला यांत बैस असें ह्मणाला. तेव्हां आपल्या पडलेल्या भावांना पाहून युधिष्ठिर ह्मणाला, 'या माझ्या भावांना व द्रौपदीला सोडून मी स्वर्गाला जाऊं इच्छीत नाहीं; तेव्हां यांनाही माझ्या बरोबर येऊं देत.' इंद्र ह्मणाला, 'तुझ्या आधींच ते स्वर्गाला गेले असून ते तुला स्वर्गामध्यें भेटतील. तेव्हां त्यांबद्दल वाईट वाटून घेऊं नकोस. मनुष्यदेह ठेवून ते स्वर्गाला गेले आहेत. तूं मात्र या आपल्या शरीरानिशीं जाशील.' यावर युधिष्ठिर ह्मणाला. 'हा कुत्रा नेहमीं माझ्यावर भक्तीनें आहे; तेव्हां याला माझ्या बरोबर येऊं दे. कोणासंबंधानें दुष्टावा माझ्या मनांत येत नाहीं.' इंद्र ह्मणाला, 'तुला अमरत्व मिळून तूं माझ्या बरोबरीचा झाला आहेस. सर्व वैभव व मोठी सिद्धि तुला मिळाली आहे. या कुत्र्याला सोडून तूं स्वर्गसुखाचा उपभोग घे, यांत निष्ठुरपणा कांहीं एक नाहीं.' युधिष्ठिर ह्मणाला, 'माझ्यासारख्यानें, भल्याला न साजेल असें हें निंद्य काम करूं नये. **ज्यासाठीं भक्तांना सोडण्याची पाळी येते अशा प्रकारचें वैभव मला नको.**' इंद्र ह्मणाला, कुत्रे बरोबर असणाऱ्यांना स्वर्गलोकांत जागा नाहीं. क्रोधवश नांवाचे देवगण अशा अपवित्र मनुष्याचें सर्व पुण्यफळ नाहींसें करतात; तेव्हां विचार करून काय करावयाचें असेल तें कर. या कुत्र्याला सोड. यांत निष्ठुरपणा बिलकुल नाहीं.' युधिष्ठिर ह्मणाला, 'भक्ताला सोडण्यांत मोठें पाप असून तें ब्रह्महत्येच्या तोडीचें आहे. ह्मणून आपल्या सुखासाठीं मी याला कधीं सोडणार नाहीं. भ्यालेला, भक्त, संकटांत पडून आपल्यावांचून कोणी नाहीं असें ह्मणणारा, आत्मरक्षणाला असमर्थ व प्राण दुसऱ्याकडून वांचवूं इच्छिणारा अशाला प्राण गेला तरी मी कांहीं सोडणार नाहीं, हें माझें व्रत आहे.' इंद्र ह्मणाला, 'जें कांहीं दान, यज्ञ किंवा होम, कुत्र्याच्या समोर उघडपणें होतें त्याचें फळ कुत्रा नाहींसें करतो; ह्मणून या कुत्र्याला सोड ह्मणजे तुला देवलोक मिळेल. भावांना, व आवडत्या द्रौपदीला सोडून आपल्या कर्मानें तूं स्वर्गाला आला असून या कुत्र्याला सोडीत नाहींस हें कसें? सर्व टाकण्याला तयार होऊन या कुत्र्यासंबंधानेंच तुला हा मोह कां पडला आहे?' युधिष्ठिर ह्मणाला, **मेलेल्यांशीं मनुष्याचें सख्य किंवा भांडण कांहींच उरत नाहीं.** त्यांना जिवंत करण्याचें माझ्या हातीं नाहीं; ह्मणून मीं त्यांना सोडलें आहे. जिवंतपणीं मीं कधीं त्यांना सोडलें नाहीं. शरण आलेल्याला भिवविणें, बायकांना ठार मारणें, ब्राह्मणस्व अपहार करणें व मित्राचा द्रोह करणें या चारांबरोबरच भक्तांना सोडण्याचें पातक मी समजतों.' हें धर्मराजाचें भाषण ऐकून प्रत्यक्ष यमधर्म त्याची वाहवा करून मोठ्या प्रेमानें गोड शब्दांनीं त्याला ह्मणाला, 'आपल्या पित्यासारख्या वर्तनानें, बुद्धीनें व सर्वभूतमात्रांच्या ठिकाणीं या तुझ्या दयाळूपणानें तूं आपला कुलीनपणा दाखविला आहेस. तात, पूर्वी द्वैतवनामध्यें पाण्यासाठीं जाऊन तुझे भाऊ मेले असतां त्यावेळीं मीं तुझी एकदां परीक्षा केली होती; तेव्हां दोन्ही आयांच्या ठिकाणीं सारखेपणा ठेवण्यासाठीं भीमार्जुनांना सोडून तूं नकुलाला उठवावें ह्मणून मागून

घेतलेंस, व आ हा कुत्रा भक्त ह्मणून तूं देवाचा रथ सुद्धां याच्यासाठीं टाकण्याला तयार झालास, तेव्हां स्वर्गामध्यें तुझ्यासारखा दुसरा कोणी नाहीं. ह्मणून या आपा शरीरासह तुला अक्षय्य लोक मिळाले असून त्तम गति मिळाली आहे.' यानंतर धर्म, इंद्र व तर देव, ऋषी वगैरे मंडळींनीं त्याला रथांत बसा ते आपापल्या विमानांतून गेले. आपल्या तेनें पृथ्वी व अंतरिक्ष भरून टाकून राजा युधिष्ठिर ज्या वेगानें वर चालला. तेवेळीं देवलोकांमध्यें सणारे महातपस्वी व मोठे वक्ते नारद ह्मणाले,ा कांहीं राजे स्वर्गाला आले आहेत त्या सर्वांचीकीर्ति यानें झांकून टाकली आहे. आपल्या यशानें तेजानें व शीलानें लोकांना झांकून टाकून आपल्यशरीरासह स्वर्गाला यांवाचून दुसरा कोणी आल्याआमच्या ऐकण्यांत नाहीं.' यानंतर तेथें असलेल्या देवांचा व आपल्या पक्षाच्या राजांचा निरोप घेऊन युधिष्ठिर ह्मणाला, 'माझ्या भावांना जें कांहीं बरें वाईट स्थान मिळालें असेल तेथेंच जाण्याची माझी इच्छा आहे. मला दुसरे लोक नकोत. हें त्याचें भाषण ऐकून इंद्र त्याला गोड शब्दांनीं ह्मणाला. 'आपल्या शुभकर्मांनीं मिळविलेल्या या लोकामध्यें तूं रहा. अद्यापि मानवी स्नेह तूं कशाला वाळगतोस? तुला उत्तम सिद्धि मिळाली आहे. तुझ्या भावांना तुझें स्थान मिळालें नाहीं. अद्यापि हा मनुष्यभाव कशाला धरतोस? हा स्वर्ग पहा. याठिकाणीं देव, ऋषी, सिद्ध व देवांच्या मोठमोठ्या हवेल्या पहा.' युधिष्ठिर त्याला ह्मणाला, 'त्यांना सोडून रहाण्याची माझी इच्छा नाहीं. जेथें माझे भाऊ गेलेआहेत, जेथें ती माझी शामवर्ण व बुद्धिशाली द्रौपदी गेली आहे तेथें मला जावयाचें आहे.'

# १८ स्वर्गारोहणपर्व.

## ३२० सवीरांची स्वर्गामध्यें गांठ.

(१८. १—९)

धर्मराज युधिष्ठिर स्वर्गामध्यें गेल्यावर तेथें वैभवामध्यें झळणारा, प्रतिसूर्याप्रमाणें तेजःपुंज व वीरश्री ज्याच्याभोंवतीं झळकत होती असा दुर्योधन त्या ठिकाणीं आसनावर बसलेला त्याला दिसला. त्याभोंवतीं पुण्यवान, देव व साध्य बसले होते. त्याप्रमाणें दुर्योधनाला तशा वैभवामध्यें पाहून युधिष्ठिरा तें सहन न होतां तो एकदम मागें फिरून ह्मणाला. 'ज्यासाठीं सर्व पृथ्वीचा आह्मीं फडशा पाडला, ज्यानें थोरांच्या देखत द्रौपदीला सभेमध्येंओढली, त्या ह्या लोभी व अदूरदर्शी दुर्योधनाबरोबर मला या लोकामध्यें रहाण्याची इच्छा नाहीं. ा त्याच्याकडे पहावेंसेंसुद्धां वाटत नाहीं. माझे भाऊ ज्या ठिकाणीं आहेत तेथें मी जाऊं इच्छितो' हें त्याचें भाषण ऐकून नारद हासून ह्मणाले राजा, स्वर्गामध्यें रहाण्यानें वैर असलें तरी तेंहीसें होतें, तेव्हां दुर्योधनासंबंधानें असें बोलूं नकोस. या दुर्योधनाला स्वर्गामध्यें देवांकडून बहुमान मिळाला आहे युद्धामध्यें आपल्या प्राणाची आहुती देऊन त्याला वीरांना उचित अशी गति मिळाली आहे, देवतुल्य अशा तुह्मांशीं जो रणांत भिडला तो हा दुर्योधन क्षात्र धर्माला जागल्यामुळें या ठिकाणीं आला आहे. जो हा अगदीं आणीबाणीच्या प्रसंगीं देखील बिलकूल कचरला नाहीं. तेव्हां ते द्यूत किंवा ते द्रौपदीचे हाल किंवा जे कांहीं दुसरे क्लेश त्यानें रणांत किंवा दुसऱ्या ठिकाणीं तुह्मांला दिले ते आतां तूं मनांत आणूं नकोस. त्याला यथान्यायानें भेट. हा स्वर्ग आहे, ह्या ठिकाणीं वैर रहात नाहीं.' हें नारदाचें भाषण ऐकून युधिष्ठिर ह्मणाला, 'ज्यासाठीं पृथ्वीचा फडशा पडला, व सुख घेण्याच्या अनावर इच्छेनें वैराग्नीनें ज्यानें आह्मांला जाळून काढलें अशा अधर्मी सर्व पृथ्वीचा द्रोह करणाऱ्या पापी दुर्योधनाला जर हे सनातन वीर लोक मिळाले आहेत तर जे माझे महात्मे भाऊ व्रतशील, सत्यप्रतिज्ञ, शूर व सत्यवादी होते, त्यांना त्याचप्रमाणें त्या महात्म्या कर्णाला

कोणते लोक मिळाले आहेत ते मला पहाण्याची इच्छा आहे. त्याचप्रमाणें जे राजे क्षात्रधर्मानें शस्त्रानें मेले आहेत ते धृष्टद्युम्न, सात्यकि, विराट, द्रुपद, शिखंडी, अभिमन्युप्रभृति वीरांना पहाण्याची माझी इच्छा आहे. ज्या महारथांनीं रणाग्नीमध्यें माझ्यासाठीं आपल्या शरीराची आहुती दिली त्या नरवीरांना देखील हाच लोक मिळाला असला पाहिजे; परंतु ते मला येथें कोठें दिसत नाहींत. जर त्यांना हे लोक मिळाले असतील तर त्यांच्याबरोबर मी येथें राहणार. त्यांना जर हे अक्षय्य चांगले असे लोक मिळाले नसतील तर त्यांच्यावांचून मी येथें सुखांत कधीं राहणार नाहीं. सर्वांना पाणी देण्याच्या वेळीं ' कर्णाला पाणी दे ' म्हणून आईच्या तोंडांतून निघालेले शब्द ऐकल्यापासून माझ्या अंगाचा संताप झाला आहे. आईच्यासारखे त्याचे पाय पाहून तेव्हांच मी त्या शत्रुविनाशक कर्णाचा दास बनलों नाहीं म्हणून मला फार वाईट वाटत आहे. तो व आम्ही एकत्र मिळालों असतों तर प्रत्यक्ष इंद्राला देखील आम्हांला जिंकतां आलें नसतें. त्या सूर्यपुत्राला तो जेथें कोठें असेल तेथें भेटण्याची मला इच्छा आहे. न कळत अर्जुनानें त्याला मारलें. त्याचप्रमाणें माझ्या प्राणाहून मला प्रिय अशा माझ्या भावांना व त्या सहधर्मचारिणी द्रौपदीला केव्हां भेटेनसें मला झालें आहे. त्यांच्यावांचून येथें रहाण्याची माझी इच्छा नाहीं. त्यांना सोडून हा स्वर्ग घेऊन मला काय करावयाचें आहे. ते असतील तोच मला स्वर्ग असून हा कांहीं मला स्वर्गसा वाटत नाहीं. ' हें ऐकून देव म्हणाले, ' जर तुझें तिकडे लक्ष लागलें असेल तर एकदम तिकडे जा. इंद्राच्या सांगण्यावरून तुझ्या मनाप्रमाणें करण्याला आम्ही तयार आहों. ' असें म्हणून युधिष्ठिराला त्याचे जिव्हाळ्याचे लोक दाखीव म्हणून त्यांनीं देवदूताला सांगितलें. पुढें ज्या ठिकाणीं अर्जुनप्रभृति होते तेथें ते दोघे निघाले. अमंगळ वाटेमधून पुढें देवदूत व मागें युधिष्ठिर चालले होते. ती वाट फार कठीण असून पापी लोक त्या वाटेनें चालले होते. अंधकारानें ती भरली असून केस, शेवाळ व गवत यांनीं तिला उग्र स्वरूप आलें होतें. पापी लोकांच्या दुर्गंधानें ती भरली असून मांस व रक्त यांचा चिखल त्यावर जला होता. वर उडणारे डांस, मधमाशा, व मा यांनीं ती भरली असून अस्वल व दुर्गंधीनें यु अशीं प्रेतें चोंहोंकडे पसरलीं होतीं. हाडें, के कृमिकीटक यांची तर त्या ठिकाणीं रेलचेल उ गेली होती. चोहोंकडे चिता पेटून राल्या होत्या. लोखंडासारख्या कठीण चोंचीचे कळे, गिधाडें वगैरे प्राण्यांची झडप त्या ठिकाणयेऊन पडत होती. त्याचप्रमाणें सुईच्या टोंकाप्रमा बारीक तोंड्याच्या, पर्वतासारख्या धिप्पाड प्रेतांचेथें गर्दी उडाली होती. चरबी व रक्त यांनीं तेरलीं होतीं. तुटलेले बाहू, मांड्या, हात, पोट ईतिकडे तिकडे पसरलीं होतीं. धर्मराज नानाप्रकारचेचार मनामध्यें करीत अंगावर कांटा उभा करण्या त्या अमंगळ प्रेताच्या दुर्गंधींतून चालला सतां त्याला कढत पाण्यानें भरलेली तरून जाप्ला कठीण अशी नदी दिसली. तिच्या कांठीं तारीच्याधारेप्रमाणें तीक्ष्ण पानांनीं भरलेलें वृक्ष ाले. त्याचप्रमाणें स्वच्छ अशी बारीक व तापी वाळू व लोहमय पथ्थर तिच्या कांठीं पसरलेोते. तेलानें भरलेल्या लोखंडाच्या कढया आसा खदखदत होत्या. जिला हात लावतां येत नाहींशा तीक्ष्ण कांट्यांनीं भरलेल्या काळ्या सांवरीाड त्याला तेथें दिसलें. त्याचप्रमाणें पापी लोक गीत असलेल्या यातनाही त्या ठिकाणीं त्याच्दृष्टीस पडल्या. ती दुर्गंधी पाहून ' आपल्याला ी वाट अजून किती जावयाची आहे, माझे भा कोठें आहेत, हा प्रदेश कोणता हें मला सांग,णून युधिष्ठिरानें देवदूताला विचारलें. तें त्याभाषण ऐकून तो देव [illegible] गें फिरून त्याला म्हला, 'येथपर्यंतच आपल्याला यावयाचें होतें. ा देवांच्या सांगण्याप्रमाणें आपल्याला मागें फिराचें आहे. जर तूं दमला असशील तर आतां पचल. युधिष्ठिर त्या दुर्गंधीनें घाबरा होऊन परयाच्या हेतूनें मागें वळला. दुःखशोकानें पीडून्नाऊन तो धर्मात्मा परतला असतां पुढील दीन द त्याच्या कानावर आले, ' हे पुण्यकुलांतन्मलेल्या धर्मराजा, आमच्यावर कृपा करण्याीं क्षणभर थांब. तूं आलास आतां तुझ्या आरून ये-

णारा वारा, सुगंध, सुखकर व गार वाहूं लागला आहे. तुझ्यामुळें आह्मांला फार दिवसांनीं सुखाचा लाभ मिळत आहे. तेव्हां क्षणभर थांब, तूं येथें उभा असतांना आह्मांला या यातनेची पीडा होत नाहीं. अशा प्रकारें वेदना सोशीत असलेल्या लोकांचे नानाप्रकारचे दीन शब्द चोहोंकडून त्याच्या कानावर आले. ते ऐकून तो दयावान युधिष्टिर केवढें हें संकट ह्मणून उभा राहिला. ते शब्द पूर्वी ऐकलेले असून कष्टानें दुःखांत काढेल. असल्यामुळें ते त्याला ओळखले नाहींत. ह्मणून तुह्मी कोण, येथें कां म्हणून त्यानें विचारलें; तेव्हां चोहोंकडून मी कर्ण, मी भीमसेन, मी अर्जुन, मी नकुल, मी सहदेव, मी धृष्टद्युम्न, अशा प्रकारचे शब्द निघून ते रडूं लागले. त्या प्रदेशाप्रमाणेंच त्यांचे ते खिन्न शब्द ऐकून, 'काय हा दैवाचा खेळ! य महात्म्यांनीं असें काय पाप केलें होतें ह्मणून या अमंगळ भयप्रद ठिकाणीं हे येऊन पडले आहेत! या पुण्यवानांच्या ठिकाणीं असें कांहीं मला पाप दिसत नहीं. असें कोणतें कृत्य करून इंद्राप्रमाणें वैभवामध्यें ळकत तो दुर्योधन आपल्या सर्व अनुयायांसह मोठ पूज्य झाला आहे व कशामुळें हे नरकाला आ आहेत? मी काय झोंपेंत आहें कां जागा अहें? मी शुद्धीवर आहें किंवा बेशुद्ध आहे? कां माझें मन भ्रमल्यामुळें मला ही भ्रांति पडली आहे?' प्रमाणें दुःखशोकानें अगदीं व्याकुळ होऊन तो विच करूं लागला; व आपला अनावर राग आवरून देव व धर्म यांची तो निंदा करूं लागला. त्या उग्रगंधीनें तो घाबरला होता तरी तो त्या देवदूताला ह्मणाला, 'ज्याचा तूं द आहेस त्याकडे तूं जा. मीं कांहीं आतां तेथें येत नाहीं. मी येथें राहिलों ह्मणून सांग. माझ्यामुळें दुःखांत पडलेल्या या माझ्या बांधवांना माझ्यामुळें सुख होत आहे.' असें तो ह्मणाला असतां देवदूतानें जाऊन तें सर्व इंद्राला कळविले. याप्रमाणें धर्मराज त्या ठिकाणीं क्षणभर उभा राहिला तोंच सर्व देव त्यांचप्रमाणें प्रत्यक्षरूपानें धर्म त्या ठिकाणीं त्याला भेटण्याला आले. ते पुण्यवान व तेजस्वी देव तेथें आल्याबरोबर अंधार नाहींसा झाला. पापी लोकांना यातना नाहींशा झाल्या. वैतरणी नदी, काळी सावरी, लोखंडी कढया, व भयंकर पथ्थर दिसेनासे झाले. जीं विक्राळ शरीरें त्यां ठिकाणीं पूर्वी पडलीं होतीं तीं नाहींशीं झालीं. वारा सुखकर, सुगंध व गार वाहूं लागला. इंद्र युधिष्ठिराजवळ येऊन त्याला ह्मणाला, 'हे महाबाहो, तूं अक्षय्य लोक मिळविले आहेस. तूं रागावूं नकोस. माझें भाषण ऐक. सर्व राजांना नरक हा पाहिलाच पाहिजे. शुभ व अशुभ अशा दोन कर्मांच्या दोन राशी असतात. **जो प्रथम आपल्या पुण्यकर्माचें फळ भोगतो त्याला मागून नरकाला जावें लागतें. जो पूर्वी नरक भोगतो त्याला मागून स्वर्ग मिळतो. ज्याचें पाप फार असतें त्याला प्रथम स्वर्ग मिळून मागून नरक मिळतो.** म्हणून द्रोणाला तूं फसविलेंस ह्मणून तुझ्या कल्याणासाठीं उगीच प्रथम नरकाची झुळूक मीं तुला दाखविली. त्याचप्रमाणें तुझ्या भावांना व द्रौपदीलाही नांवाचा नरकवास मिळाला आहे. ते सर्व आतां आपल्या पापापासून मुक्त झाले आहेत. तुझ्या पक्षाचे सर्व स्वर्गाला गेले आहेत, ते तेथें तुला दिसतील; त्याचप्रमाणें महाधनुर्धारी कर्ण ज्यासाठीं तुला इतकें वाईट वाटत आहे, त्याला उत्तम गति मिळाली आहे. ते सर्व आपापल्या ठिकाणाला गेले आहेत. हा संताप सोड. आजपर्यंत संकट सोसून आतां तूं खुशाल सुखांत राहून आपल्या पुण्यकर्माच्या, तपाच्या व दानाच्या फलाचा उपभोग घे. सर्व देव, गंधर्व व अप्सरा उत्तम वस्त्रालंकार घालून तुझ्या सेवेमध्यें तत्पर रहातील. तरवारीच्या जोरानें मिळवून राजसूयानें वाढविलेलें क्षात्रधर्माचें फळ तूं आतां भोग. वरवरचे लोक तुझ्यासाठीं तयार आहेत. हरिश्चंद्र. मांधाता, भगीरथ, भरतप्रभृति राजे ज्या ठिकाणीं आहेत तेथें तूं सुखांत रहा. ही त्रैलोक्याला पावन करणारी आकाशगंगा आहे; तिच्यामध्यें स्नान कर ह्मणजे हा मनुष्यभाव नाहींसा होऊन शोक, वैर या सर्वांतून तूं सुटशील.' हें इंद्राचें भाषण ऐकून धर्मराज आपल्या मुलाला ह्मणाला, 'तात तुझ्या भक्तीनें, खरेपणानें, सहनशीलतेनें व आत्मनिग्रहानें मी फार संतुष्ट झालों आहे. राजा, तुझी ही मीं तिसऱ्यांदा परीक्षा केली. कशानेंही स्वभावापासून तुला ढळविणें शक्य ना-

हीं. पूर्वी द्वैतवनामध्यें अग्नीच्या संबंधानें तुझी मीं परीक्षा केली. त्या कसोटींतून तूं चांगला पार पडलास; त्याचप्रमाणें तुझे भाऊ व द्रौपदी मरून पडले असतां कुत्र्याचें रूप घेऊन मीं तुझी फिरून परीक्षा केली व हल्लीं भावांसाठीं येथें राहूं इच्छितोस हा तिसरा प्रसंग आहे. हे महाभागा, तूं मोठा शुद्ध असून पापाचा तुझ्या ठिकाणीं लवलेश नाहीं. राजांना नरक अवश्य पाहिले पाहिजेत ह्मणून क्षणमात्र हें नरकाचें दुःख इंद्राच्या मायेनें तुला पहावें लागलें आहे. तुझ्या भावांपैकीं कोणी त्याचप्रमाणें कर्ण किंवा द्रौपदी नरकांत जाण्याला योग्य नाहींत. चल, ही गंगा पहा.' असें तो ह्मणाल्यावर युधिष्ठिर सर्व देवांसह त्या पावन करणाऱ्या गंगेमध्यें स्नान करून मनुष्यदेह टाकून दिव्यदेही झाला. त्या पाण्यामध्यें स्नान केल्याबरोबर त्याच्या मनांतलें वैर व संताप हीं नाहींशीं झालीं. नंतर तो देवांबरोबर महर्षींची स्तुति ऐकत नरवीर पांडव व धृतराष्ट्र गेले होते त्या ठिकाणाला गेला. त्या ठिकाणीं त्यानें ब्रह्मदेह धारण केलेल्या श्रीकृष्णाला पूर्वीच्याच देहामध्यें पाहून त्याच्या त्या सारखेपणामुळें त्यानें त्याला ओळखिलें. तो आपल्या शरीरानें झळकत असून दिव्य अस्त्रें मूर्तिमान त्याच्या सेवेला हजर होतीं; त्याचप्रमाणें तेजस्वी वीर अर्जुन त्याच्याजवळ उभा होता. त्या दोन नरवीरांनीं देवांना सुद्धां पूज्य अशा त्याचा यथायोग्य सत्कार केला. दुसरे एके ठिकाणीं सर्व शस्त्रधाऱ्यांमध्यें श्रेष्ठ असा कर्ण बारा सूर्यांमध्यें त्याला दिसला; त्याचप्रमाणें दुसऱ्या ठिकाणीं दिव्यमूर्ति भीमसेन आपल्या पूर्वीच्याच देहामध्यें मूर्तिमान वायूच्याजवळ त्याला दिसला. अश्विनीकुमारांच्याजवळ आपले तेजानें झळकणारे नकुलसहदेव त्यानें पाहिले; त्याचप्रमाणें सूर्याप्रमाणें दैदीप्यमान अशा त्या स्वर्गामध्यें पांचालीला पाहून तिच्यासंबंधानें हकीकत त्यानें विचारली असतां इंद्र ह्मणाला, 'द्रौपदीरूपानें प्रत्यक्ष ह्या श्रीनें तुझ्यासाठीं मनुष्यरूप घेतलें होतें. सर्व लोकांना मोह पाडणाऱ्या हिला अयोनीपासून शंकरांनीं तुझ्या सुखासाठीं उत्पन्न केली. द्रुपदकुलांत तिचा जन्म होऊन ती तुमच्या आश्रयानें राहिली. हे पांच अग्नीसारखे तेजस्वी द्रौपदीचे मुलगे पांच गंधर्व आहेत. हा पहा गंधर्वराज धृतराष्ट्र हा तुझ्या बापाचा वडील भाऊ. हा अग्नीप्रमाणें तेजस्वी तुझा भाऊ कर्ण बारा सूर्यांबरोबर झळकत आहे पहा. साध्य, देव, विश्व व मरुत् यांच्यामध्यें सात्यकिप्रभृति वृष्णी व अंधक कुलांतली वीरमंडळी पहा. चंद्रासारखा झळकणारा हा अभिमन्यु हा महाधनुर्धारी पांडु, कुंति व माद्री यांच्यासह विमानांत बसून नेहमीं मजकडे येत असतो. हे शांतनुपुत्र भीष्म वसूंबरोबर आहेत. हे गुरुद्रोण बृहस्पतींच्या जवळ आहेत. हे व दुसरे राजे गंधर्व, यक्ष व गुह्यक यांच्या गतीला मिळून त्यांबरोबर चालले आहेत. ज्यांची वाणी, बुद्धि व कर्में पवित्र आहेत अशा ह्यांनीं देह ठेवून स्वर्ग मिळविला आहे.' यानंतर हे सर्व महात्मे स्वर्गामध्यें कोणकोणत्या स्थितींत किती दिवस राहिले म्हणून जन्मेजयांनीं वैशंपायनाला विचारलें असतां वैशंपायन ह्मणाले, 'कर्म सरल्याबरोबर प्रकृतीमध्यें मिळून जाणें हें सर्वांना शक्य नाहीं. कर्म सरल्यावर प्राणी आपापल्या देहामध्यें शिरतात. महातेजस्वी भीष्म आठ वसूंमध्यें जाऊन मिळाले. द्रोण बृहस्पतींमध्यें जाऊन मिळाले. कृतवर्मा मरुत्गणांमध्यें व प्रद्युम्न सनत्कुमारांमध्यें जाऊन मिळाले. धृतराष्ट्र गांधारीसह दुर्मिळ अशा कुबेराच्या लोकाला जाऊन मिळाला. पांडु आपल्या बायकांबरोबर इंद्रलोकाला गेला. विराट, द्रुपद, धृतकेतु, निशठ, अक्रूर, सांब, भानु, कंप, विदूरथ, भूरिश्रवा, शल, भूरि, कंस, उग्रसेन, वसुदेव, उत्तर व त्याचा भाऊ शंख हे नरश्रेष्ठ विश्वेदेवांमध्यें जाऊन मिळाले. सोमाचा वर्चा नांवाचा मुलगा तोच नरसिंह अर्जुनाचा अभिमन्यु मुलगा झाला असल्यानें त्यानें क्षात्रधर्मानें युद्ध करण्यामध्यें सर्वांवर वरचढ करून फिरून तो सोमाशीं जाऊन मिळाला. कर्ण, सूर्याशीं, शकुनि द्वापराशीं व धृष्टद्युम्न अग्नीशीं मिळाले. धृतराष्ट्राचे मुलगे शस्त्रांनीं पवित्र होऊन बलवान यातुधान झाले युधिष्ठिर धर्मराजाशीं मिळाला. बळराम भगवान अनंत होऊन रसातळांत शिरला. वासुदेव भगवान नारायणाचा अंश असल्यानें तो नारायणामध्यें शिरला. त्याच्या सोळा हजार बायका पुढें कांहीं काळानें सरस्वतीमध्यें बुडून देह ठेवून स्वर्गाला गेल्या व अप्सरा होऊन त्या वासुदेवामध्यें शिरल्या. जे ह्मणून महावीर या महायुद्धामध्यें मेले त्या सर्वांना क्रमानें उत्तम लोक मिळाले. कोणाला इंद्रलोक, कोणाला कुबेराचे लोक, कोणाला वरुण लोक मिळाले. या इतिहासाला त्याच्या महत्त्वामुळें व भारदस्तपणामुळें महाभारत असें नांव मिळालें आहे. हें ज्याला नीट उमगेल त्याचें कल्याण होईल.'

# विद्याविनोद.

हें मासिकपुस्तक आज पांच वर्षें सुरू आहे. हें मुख्यत्वेंकरून पौराणिक व ऐतिहासिक विषयासाठीं काढलें असून मनरंजनासाठीं कादंबरी, निबंध, कविता वगैरे विषयही यांत येत असतात. गेल्या चार वर्षांत महाभारतासारखा प्रचंड पौराणिक ग्रंथ, राजाराम आणि ताराऊ, विजयानगरचा डळमळीत राजमुकुट, वुइल्यमटेल, पन्हाळगडचा किल्लेदार, गुप्त पोलिसाचें चातुर्य, कांहीं त्रोटक चरित्रें, कविता वगैरे यांतून प्रसिद्ध झालीं असून, चालू सालीं वाल्मीकिरामायण, मर्द ठाणेदारीण, यक्षप्रमाद, फत्तेसिंग कादंबरी, ऑलिव्हर क्रामवेल, धर्मपद वगैरे विषय सुरू असून हे सर्व विषय आणखी एक वर्ष टिकतील. वर्षारंभ नोव्हेंबरपासून असून याची टपाल हंशिलासह वार्षिक वर्गणी २॥ रुपये आहे. अशा प्रकारचीं कामें लोकाश्रयावांचून चांगलीं चालत नसतात हें आह्मीं वाचकांना सांगावयाला पाहिजे असें नाहीं.

संपादक, विद्याविनोद.

या मालिकेंतून छापून प्रसिद्ध झालेलीं खालील पुस्तकें आमचेकडे विक्रीस तयार आहेतः—

| | किं. | ट. |
|---|---|---|
| भारतामृत—( महाभारताचें सरळ गोष्टीच्या रूपानें भाषांतर ) .... | १० | ।॥। |
| रामसुधा—( अध्यात्म रामायणाचें सरळ गोष्टींच्या रूपानें भाषांतर ) | १। | ०= |
| सार्थगीता— .... .... .... .... .... .... | ।. | ०॥. |
| राजाराम आणि ताराऊ—ऐ. नाटक. .... .... .... | .॥।. | ०- |
| विजयानगरचा डळमळीत राजमुकूट—ऐ. ना. .... .... | .॥= | ०- |
| बाका तिरंदाज—ऐ. ना. .... .... .... .... | .॥. | ०- |
| पन्हाळगडचा किल्लेदार—ऐ. प्र० .... .... .... .... | ।. | ०॥. |
| नेदर्लंडांतील बंडाचा इतिहास .... .... .... ... | १॥ | ०= |
| गुप्त पोलिसाचें चातुर्य— .... .... .... .... .... | २॥ | ०= |

संपादक विद्याविनोद.
सदाशिव पेठ, पूना सिटी.

